DHARAMSHI RATANSHI

# प्रथमावृत्तीची प्रस्तावना.


कै. कृष्णाजी परशुराम भिडे

सर्व जगतांत दु:खसंबंधरहित संपूर्ण सुखाच्या ऐश्वर्यानें मंडित असा कोण आहे, असें जर आपण सूक्ष्म रीतीनें विचार करून पाहूं लागलों, तर तशा प्रकारचा प्राणी फार विरळा, किंबहुना नाहींच म्हटलें तरी चालेल. प्रत्येकाचे पाठीमागें कांहीं ना कांहीं तरी दु:ख आहेच. कोणास पुत्र नाहीं, कोणाची बायको कुरूप, कोणाजवळ द्रव्य नाहीं, अशा प्रकारें कोणत्या ना कोणत्या तरी कारणामुळें दु.ख हें आहेच. एतावता, दु.खसंबंधरहित केवळ परमानंदाचा अनुभव कोणी घेत आहे असे सामान्य रीतीनें पहाणारास दिसत नाहीं. पण प्रत्येक प्राण्याची इच्छा तर तशी स्थिति आपणास असावी अशी आहे, व ती प्राप्त होण्याकरितां आपआपल्या बुद्धीनें ते लौकिक उपायही करीत असतात; परंतु लौकिक उपायेंकरून अत्यंत दु:खनाश होत नाहीं, व परमानंदाचा लाभही मिळत नाहीं. त्यास आचार्यद्वारा शास्त्रैकशरण होणें हाच उपाय आहे; ह्यावाचून दुसरा उपायच नाहीं. ही गोष्ट श्रुतीमध्यें अनेक ठिकाणीं सिद्ध केलेली आहे. पण त्या श्रुतींचे ठिकाणीं सर्व प्राण्यांस अधिकार नाहीं. कारण केवळ श्रुतिवाक्यावरूनच श्रुत्यर्थ ध्यानांत घेण्याची योग्यता सर्वांचे ठिकाणीं नाहीं. जसा शूद्र किंवा स्त्रिया ह्यांचे ठिकाणीं अज्ञानाधिक्य असल्यामुळें त्यांस श्रुतीचे ठिकाणीं अधिकार नाहीं, तसाच स्मृतिवाक्याचे ठिकाणींही नाहीं. ही जरी गोष्ट खरी आहे, तरी शूद्रांस किंवा स्त्रियांस दु:खाचे अत्यंत निवृत्तीची आणि परमानंदप्राप्तिरूप मोक्षाची इच्छा नाहीं असें मात्र नाहीं. सर्वांसच मोक्षाची इच्छा आहे. अशा सर्व जीवांची भगवान व्यास यांना करुणा येऊन सर्व वेदांचें सार अशी भगवद्गीता भारताच्या भीष्मपर्वामध्यें त्यांनीं ग्रथन केली. भारत हा ग्रंथ म्हणजे फार प्राचीन काळचा इतिहास आहे. त्यांत जागोजागीं भगवद्यश वर्णन केलेले आहे, म्हणून तो पुण्यरूप आहे. फार काय सांगावे ? वेदामध्यें जितका अर्थ प्रतिपादित आहे, तितका सर्व अर्थ व्यासानीं या इतिहासांत प्रतिपादन केला आहे, म्हणून यास पांचवा वेद असें श्रेष्ठांनीं म्हटलें आहे. या इतिहासाचें श्रवण करण्यास सर्वांस अधिकार आहे. याच्या श्रवणापासून वर लिहिलेल्या स्वरूपाचें मोक्षरूप फल, श्रवण करणारास अथवा चिंतन करणारास प्राप्त होतें. त्यांतही भाषेच्या अडचणीमुळें सर्वांचाच प्रवेश होत नाहीं व थोडेंसें संस्कृत भाषेचें ज्ञान असलें तर त्यापासून उत्तान अर्थ कळेल, परंतु त्यांतील रहस्य कळणार नाहीं; ह्याकरतां भगवान विष्णूंनीं ज्ञानेश्वराचा अवतार धारण करून सर्व अनाथ जीवांचा उद्धार

करण्याकरिता त्यावर श्रीभावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) नांवाचा टीकारूप ग्रंथ केला. प्राकृत भाषेंत भगवन्मनोगत व्यक्त करून दाखविणारा ज्ञानेश्वरीशिवाय दुसरा ग्रंथच नाहीं, असें म्हणण्यास कांहींएक धास्ती वाटत नाहीं. हें खुद्द श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं आपले ज्ञानेश्वरीचे १५ वे अध्यायांत अश्वत्थ पदाचें व्याख्यान करते वेळीं लिहिलें आहे. तसेंच तेरावे अध्यायांतही महाराजांनीं स्पष्ट सांगितलें आहे. असो; संस्कृत समजणारासही ज्याप्रमाणें श्रीशंकराचार्यांचें भाष्य समजून घेण्यास परंपरागत सांप्रदायिकांकडे जावें लागतें, त्यावाचून स्वबुद्धीनें भाष्य पाहूं म्हटलें तर कांहींएक समजत नाहीं, त्याप्रमाणें श्रीज्ञानेश्वरी हा प्राकृत ग्रंथ आहे म्हणून स्वबुद्धीनें पाहून कृतार्थ होऊं, असें कोणी म्हणेल तर तें अगदीं व्यर्थ आहे. तो ग्रंथही परंपरागत सांप्रदायिकांस शरण जाऊन त्यांचेपासून समजून घेतला पाहिजे, अथवा साक्षात् श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं तरी एखाद्यावर अनुग्रह केला पाहिजे. यांपैकीं दुसरी गोष्ट अत्युत्कट पुण्याईवांचून होणार नाहीं. असे पुण्यसंपत्तिमान पुरुष फार थोडे. अशा भाग्यवान पुरुषांपैकींच श्रीनानामहाराज साखरे हे होत. ह्यांची परंपरा अशी:—

सुमारें १५० वर्षांपूर्वीं श्रीज्ञानेश्वर महाराज ह्यांचे कृपेस पुणें येथील केसकर ह्यांचे वंशांतील श्रीअच्युत महाराज नांवाचे पुरुष पात्र झाले. जन्मांतरींच्या बहुत पुण्याईनें ह्या भाग्यवान पुरुषास अशी इच्छा झाली कीं, श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं आपलेवर कृपा करून ज्ञानेश्वरी ग्रंथ समजून द्यावा ! ही इच्छा पूर्ण व्हावी म्हणून त्या थोर पुरुषानें श्रीक्षेत्र आळंदी येथें उपोषित राहून महाराजांचे समाधीपुढें ज्ञानेश्वरीचें पारायण करण्यास आरंभ करून असा निश्चय केला कीं, ज्या दिवशीं महाराजांचा अनुग्रह होईल, त्याच दिवशीं महाराजांस नैवेद्य समर्पण करून पारणा करावयाची, नाहींपेक्षां अनुष्ठान करीत करीत प्राणत्याग करावयाचा ! 'निश्चयाचें बळ, तुका म्हणे तेंचि फळ ।' श्रीअच्युतमहाराज ह्यांचा हा तीव्र निश्चय पाहून २७ वे दिवशीं रात्रीं श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं स्वप्नामध्यें दर्शन देऊन मस्तकावर वरदहस्त ठेविला आणि सांगितलें कीं, "आजपासून तूं जो ज्ञानेश्वरीचा अर्थ सांगशील तोच बरोबर असेल." अशा रीतीनें श्रीज्ञानेश्वर महाराजाचे कृपेस पात्र झालेले श्रीअच्युतमहाराज परमानंदाचा अनुभव घेत घेत शेवटीं परमानंदरूप झाले. त्यांस एक कनिष्ठ बंधु, शामराजमहाराज म्हणून होते, त्यांजवर त्यांनीं अनुग्रह केला. असा जीवन्मुक्तिसुखाचा अनुभव घेत असतां अनंत जीवांवर त्यांनीं अनुग्रह केला. त्यांतच पुणें येथील राहणारे व चिमाजीआप्पा ( पेशव्याचे बंधु ) यांचे खासगी कारभारी रामचंद्रपंत जोशी यांजवरही त्यांनीं अनुग्रह केला, तो प्रकार असा:—

एके दिवशीं रात्रीं रामचद्रपंत घोड्यावर बसून हिंडावयास निघाले असतां, येथील बुधवारांतील पासोड्या मारुतीचे देवळांत श्रीअच्युतमहाराज यांचें कीर्तन चालू होतें, तेथें क्षणभर उभे राहिले. श्रीअच्युतमहाराज यांची ज्ञानपूर्वक भक्ति व निष्कपट वैराग्य पाहून आणि अप्रतिम वक्तृत्व ऐकून दैवयोगानें त्यांस उपरति झाली. त्यांचेजवळ २१ लाख रुपये रोख होते. पोटीं पुत्रसंतान वगैरे कांहीं नव्हतें. अशा स्थितींत त्यांची अशी खात्री झाली कीं, ह्यांचेशिवाय आपलें संसारदुःख कोणी निवारण करणार नाहीं. ते दुसरे दिवशीं

सकाळींच येथील सदाशिव पेठेंतील हौदापळीकडे श्रीअच्युतमहाराज यांजकडे गेले, आणि हात जोडून म्हणाले कीं, "माझेवर अनुग्रह व्हावा. मी आपला शिष्य असून आपणांस शरण आलों आहें." तेव्हां अच्युतमहाराजांनीं सांगितलें कीं, "बाबा, तूं श्रीमंत आहेस, आम्ही गरीब आहों; अशा स्थितींत तुझें व आमचें जमावें कसें ? परमार्थाला द्रव्य फार प्रतिबंधक आहे !" असें श्रीअच्युतमहाराजांचे मुखांतील वाक्य श्रवण करितांच त्यांनीं लागलीच २१ लाख रुपयांवर त्यांचे समक्ष उदक सोडलें, आणि बुधवारांतून मोरोबादादाचे हौदाचें पाणी आपल्या खांद्यावरून कावडीनें त्यांचे येथें भरलें. तेव्हां, श्रीअच्युतमहाराज यांचें अंतःकरण सुप्रसन्न होऊन त्यांनीं त्यांस उपदेश देऊन त्यांचेकडून श्रीज्ञानेश्वरी ग्रंथ अध्ययन करविला. तसेंच २१ लाख रुपये ब्राह्मणभोजनांत खर्च कर, म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं ब्राह्मणभोजनांत त्या द्रव्याचा व्यय केला. हें ब्राह्मणभोजन करते वेळीं पुणें येथें व श्रीक्षेत्र आळंदी येथें अशी स्थिति झाली की, गांवांत व्यापाऱ्यांचे दुकानांत तूप व साखर मिळेनाशी झाली. तेव्हांपासून लोकांत त्यांचें नांव **साखरेबोवा** असें पडलें. साखरेबोवा हे पुणें येथें शनवारांतील मारुतीचे देवळासमोर आंग्रे यांचा वाडा आहे तेथें राहत असत. त्यांनीं गोपालकृष्णाची मूर्ति व गोपालकृष्ण महाराजांच्या पादुका यांची स्थापना ज्येष्ठ शुद्ध १३ रोजीं केली. ते असतांना वाढदिवसाचा उत्सव ज्येष्ठ शुद्ध १३ पासून १५ पावेतों तीन दिवस करीत; तसेंच श्रावणमासांत श्रावण वद्य १ पासून वद्य १० पावेतों गोकुळअष्टमीचा मोठा उत्सव करीत असत. पुढें पुण्यांतील त्यांचे भाऊबंदांपैकीं गोविंदपंत जोशी यांचे चार पुत्र—केशवराव, हरिपंततात्या, विनायकराव व पंढरीनाथआबा ( हे जन्मभर ब्रह्मचारी होते, ) हे चौघेही त्यांचे शिष्य झाले. ह्या चौघांची गृहस्थिति फार गरीबीची होती. तथापि त्यांची साखरेबोवांच्या ठिकाणी असलेली गुरुभक्ति मोठी अप्रतिम होती. ज्या वेळीं साखरेबोवांच्या मनांत संन्यास करावयाचें आलें, त्या वेळीं हें संस्थान कोणाचे स्वाधीन करावें असा प्रश्न सहजच त्यांच्या व त्यांचे हजार बाराशें शिष्य होते त्यांच्या मनांत आला. त्या मंडळींत श्रीमान लोक बरेच होते. त्यांनीं त्यांचेजवळ संस्थान आमचेकडे द्यावें म्हणून प्रार्थना केली; परंतु आम्ही सर्वांचे म्हणण्याचा विचार करून काय करावयाचें तें करूं असें ते सांगत असत. शेवटीं त्यांनीं सर्वांस बोलावून असें सांगितलें कीं, जरी आमचेजवळ श्रीमान लोकांनीं देवस्थानची मागणी केली, तरी आमचे मनोगताप्रमाणें देवस्थान चालविण्याचें हरिपंततात्या व पंढरीनाथआबा ह्यांचेशिवाय दुसऱ्याचे हातून होणार नाहीं; जरी ते गरीब आहेत, तरी भगवद्भक्ति म्हणजे काय हें त्यांसच माहीत आहे. असें सर्वांसमक्ष सांगून देवस्थान त्यांचे स्वाधीन केलें. तेव्हांपासून ह्या जोशांचे घराण्यास साखरे असें नांव पडलें. तें अद्याप चालू आहे. पुढें ते संन्यस्त झाले त्या वेळीं त्या आश्रमांतील त्यांचें नांव ब्रह्मानंदस्वामी असें होतें.

ते पुणें येथें समाधिस्थ झाले, तेव्हां त्यांचे पट्टशिष्य जे चौघे जोशी, त्यांनीं त्यांचे इच्छेप्रमाणें व निष्ठेप्रमाणें त्यांची समाधि श्रीक्षेत्र आळंदी येथें सिद्धबेटांत त्यांस पुण्याहून नेऊन दिली व पुढें ते त्यांची पुण्यतिथि करूं लागले. ह्या बंधुचतुष्टयाचीं आपले गुरुवर

इतकी श्रद्धा असे कीं, आपले गुरु ज्या ठिकाणीं राहात असत त्या ठिकाणचा कोणी गडी, मोलकरीण, माणूस, कारकून कोणीही त्यांचेकडे येवो, हे सर्व बंधु त्यास वंदन करीत असत. इतकेंच नव्हे, तर साखरेबोवा समाधिस्थ झाल्यास सुमारें १०० वर्षे झालीं व त्यांचे संस्थानचा उत्सव अद्याप नानामहाराज जोशी साखरे ह्यांचे वंशाकडे चालू आहे. तरीही पण आंग्रे ह्यांच्या वाड्यांतील जानवीं काढण्यास बसणारे तेलंगी ह्यांना पंढरीनाथ महाराजांनीं व्याही असें नाव दिलें. त्याप्रमाणें श्रावणमासाचा उत्सव सुरू झाला कीं, पहिले दिवशीं त्यांना भोजनास आमंत्रण करावयाचें ही गोष्ट अद्यापपावेतों साखरे यांचे घरीं चालू आहे. जोशीबंधुचतुष्टय यांचा ' देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ ' ' अन्न आच्छादन । हें तों प्रारब्धाधीन ॥ ' इत्यादि वचनांवर पूर्ण विश्वास असल्यामुळें उपजीविकेच्या साधनांत कोणीच प्रवृत्त झालें नाहीं. त्या चौघांपैकीं हरिपंत तात्यांस तीन पुत्र व चार कन्या असा परिवार होता. तथापि ते प्रपंचाकडे कधीं ढुंकून देखील बघत नसत. उपरमस्थितींत ते नेहमीं असत. कोणी अंतरंगी पुरुष आलाच तर त्याच्याशीं अध्यात्मज्ञानाचीच गोष्ट बोलावयाची. ह्यामुळें त्यांचे ठिकाणीं सर्व बंधूंची गुरुबुद्धि असे. त्यांच्या परिवाराचे संगोपनाची खटपट आपण स्वत: ब्रह्मचारी असतां खुद्द पंढरीनाथआबाच करीत असत. हीं मुलें लहान असतांच हरिपंततात्या हे वारले. पुढें पंढरीनाथआबा यांनीं ह्या मुलांचा सांभाळ करून, गुरूकडून भाग्यानें प्राप्त झालेलें श्रीगोपालकृष्णाचें संस्थान व गुरूंची कार्तिक शुद्ध ९ ची साखरेबोवांची पुण्यतिथि हीं कृत्यें ते त्यांचे हातून करवूं लागले. त्याचप्रमाणें श्रीज्ञानेश्वरी व अमृतानुभव ह्या ग्रंथांचेंही त्यानीं त्यांचेकडून अध्ययन करविलें. श्रीहरिपंततात्यांचे मुलांपैकीं **रामभाऊ व नाना** हेच काय ते अध्ययन करण्याचे वयांत होते; आणि ते त्याचे शिष्य होते. तिसरे **दामुअण्णा** हे त्या वेळीं लहान होते. त्यांपैकीं पंढरीनाथ महाराजांचे मनाप्रमाणें श्रीज्ञानेश्वरीचें अध्ययन **श्रीनानामहाराज** ह्यांनीं केलें. साखरेबोवांचे देवस्थानचे संबंधानें गुरुवारीं व एकादशीस रात्रौ जागर व पहांटेस पंचपदी व रोज नित्य पंचपदी असा क्रम आहे; जागरास साखरेबोवांचे शिष्य व पुढें जोशी ह्यांचे झालेले शिष्य येत असत. त्यांचेपुढें पंढरीनाथ महाराजांनीं **नानामहाराज** ह्यांचेकडून ज्ञानेश्वरी सांगवावी; अशा रीतीनें **श्रीनानामहाराज** ह्यांचा सुमारें दहा बारा वर्षे श्रीज्ञानेश्वरी ग्रंथावर असा कांहीं अभ्यास झाला कीं, सर्व ज्ञानेश्वरी ग्रंथ त्यांस मुखोद्गत झाला. ते स्वप्नांत जरी बरळले तरी ज्ञानेश्वरीच्या ओंवीचा अर्थच बरळत, इतकी त्यांची त्या ग्रंथात तयारी झाली. गुरुकृपेनें त्यांचे वक्तृत्वास इतका कांहीं मोहकपणा आला होता कीं, कोणीही सहज जरी नानामहाराजांचे मुखांतून ज्ञानेश्वरीच्या चार ओंव्या ऐकिल्या तरी त्याची चित्तवृत्ति रंगून गेल्याशिवाय रहात नसे. ह्या अप्रतिम गुणामुळें, वडील व चुलते वारल्यानंतर ह्या संस्थानचे पारमार्थिक कृत्याचा सर्व भार **श्रीनानामहाराजांवरच** पडला. पूर्वीं वाडिलांनीं कीर्ति संपादन केली होतीच. त्यांतही **नानामहाराजांचे** अंगचे गुणानें हीं सर्व कृत्यें मोठ्या व्यवस्थेनें चाललीं. **नानामहाराज** यांनीं आपलें सर्व आयुष्य श्रीज्ञानेश्वरीचे अध्ययनांत व अध्यापनांत घालविलें. कोणी कोणत्याही वेळीं कोणतेही जातीचा कोणच्याही अधिकाराचा मनुष्य त्यांच्याकडे जावो, त्याला

आतां मी सांगत नाहीं असें यांनीं कधींही कोणास म्हटलें नाहीं. ते असत तोंपावेतों त्यांचे घरीं रोज ज्ञानेश्वरीचा पाठ चालत असे; आणि तोच गुरुपरंपरेचा क्रम त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव **विनायकराव** हेही आज चालवीत आहेत. **श्रीनानामहाराज** ह्यांनीं शके १८२५ चे चैत्र शुद्ध ९ स चतुर्थाश्रम घेतला; आणि पुढें सुमारें सहा महिन्यानीं म्हणजे शके १८२५ भाद्रपद वद्य १० रोजीं ते समाधिस्थ झाले.

अशा सत्पुरुषाच्या अमृतवाणीचा लाभ मुमुक्षु जनास व्हावा ह्या हेतूनें मीं सन १८९८ सालीं ज्ञानेश्वरीचा **श्रीनानामहाराजांच्या** मुखांतील अर्थ उतरून घेण्यास सुरुवात केली. ह्याच सालीं प्लेगच्या पहिल्या स्वारीचा झेंडा पुण्यांत फडकूं लागला, तेव्हां पहिला मुक्काम करणें भाग पडलें. या रीतीनें प्लेगच्या प्रत्येक स्वारींत मुक्काम करीत करीत शके १८२१ चे आश्विन महिन्यांत म्हणजे सन १८९९ चे आक्टोबरांत तें पूर्ण झालें; तयार झालेलें काम तपासून व या ग्रंथांत दिलेली इतर माहिती मिळवून हा ग्रंथ शके १८२४ च्या आषाढ महिन्यांत म्हणजे सन १९०२ चे जुलईत पुरा झाला. हें काम करण्यास माझे मित्र रा. बाळकृष्ण बहिरव आसलेकर ऊर्फ आबासाहेब मालेगावकर व रा. बळवंत केशव पारखी यांनीं निरपेक्ष बुद्धीनें मदत करून सुरवात केली; परंतु लिहिण्यास फार दुःख वाटतें कीं, ते दोघेही प्लेगचे सपाट्यांत सांपडून शके १८२२ आश्विन वद्य ४ स, व शके १८२३ माघ शुद्ध १३ स अनुक्रमें वैकुंठवासी झाले; दुःखांत सुख इतकेंच कीं, ह्याच्यादेखत भाषांतराचें काम मात्र पुरें झालें होतें. ह्या दोघांचाही हा ग्रंथ छापलेला दृष्टीस पडावा असा पूर्ण हेतु होता, व हाच त्यास निदिध्यास असल्यामुळें 'अंते मतिः सा गतिः।' या वाक्याप्रमाणें ईश्वर त्यांस त्यांचे पुढील जन्मांत याच मार्गांत ठेवो अशी मी परमेश्वरास प्रार्थना करतों.

असो. आमच्या या पुस्तकांत विशेष म्हटला म्हणजे यांतील पाठ परंपरागत असून ते **उकारांसह** दिलेले आहेत. श्रीज्ञानेश्वरीची संहिता ही भाविक जनास वेदतुल्य असल्यामुळें त्यांतील एक अक्षरही इकडचें तिकडे किंवा कमीजास्ती झालेलें त्यांस खपावयाचें नाहीं, आणि या दृष्टीनेंच आम्हीं हे पाठ जसेचे तसे छापलेले आहेत. परंतु सध्यां उपलब्ध असलेल्या प्रतींतून हे उकार मुळींच आढळत नाहींत. मग यांना फांटा मिळण्याचें कारण काय असेल तें ईश्वर जाणे! आमचे ग्रंथांत डावे बाजूचे पानावर श्रीमद्भगवद्गीतेंतील श्लोक, त्याचा अन्वय, त्यावरील श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या ओंव्या ( टीका ) व ओंव्यातील कठीण शब्दांवर अर्थनिर्णायक भरपूर टीपा दिल्या आहेत; तसेंच उजवे बाजूचे पानावर श्रीमद्भगवद्गीतेंतील डावीकडे असलेल्या श्लोकाचा अर्थ बारीक टाइपांत दिलेला असून, श्रीज्ञानेश्वर महाराजाच्या ओंव्यांचा सरळ अर्थही जरा मोठ्या टाइपांत दिला आहे. ज्यास केवळ ज्ञानेश्वरीचा पाठ करणें असेल, त्यांचीही या ग्रंथांत फार उत्तम सोय आहे. कारण, डावे बाजूला नुसत्या ओंव्या आणि उजवे बाजूला निवळ अर्थ असल्यामुळें नुसत्या ओंव्या किंवा नुसता अर्थ सरळ वाचीत जाणारास कोणत्याही प्रकारची अडचण पडत नाहीं. ही व्यवस्था आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या कोणत्याही ग्रंथांत नाहीं. शिवाय, पारिभाषिक शब्द शेवटीं जोडले आहेत.

या ग्रंथांत कोणास कांहीं दोष आढळून आल्यास ते त्यांनीं कृपा करून मला कळवावे, म्हणजे पुढील आवृत्तींत मी ते अवश्य दुरुस्त करीन. शेवटीं श्रीनानामहाराजांच्या चरणकमलीं अनेक प्रणिपात करून ही प्रस्तावना संपवितों.

तारीख ३१ माहे आगष्ट, सन १९०५ — कृष्णाजी परशुराम भिडे.

---

# द्वितीयावृत्तीची प्रस्तावना.

परमेश्वरानें उत्पन्न केलेल्या स्थावर जंगमात्मक सृष्टीपैकीं चतुर्विध प्राण्यांकडे सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण केलें असतां असें दिसून येईल कीं, किड्यामुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत कोणताही जीव क्षणभरही निष्क्रिय असा नसून आपापल्या परीनें अहोरात्र सारखा धडपड करीत आहे. या सर्व प्रवृत्तीच्या मुळाशीं कांहीं तरी हेतु असला पाहिजे. तो हेतु प्रत्येकाचा वेगळा नसून, मला अखंड सुख मिळावें आणि आत्यंतिक दुःखनिवृत्ति व्हावी यासाठीं सर्वांची तळमळ आहे. पण जगांत पाहिलें असतां कोट्यावधि जीवांत एखादाच भाग्यशाली जीव असा पहाण्यास सांपडेल. बहुतेक सर्व जीव जन्ममरणाच्या फेऱ्यात सांपडून त्रिविध दुःखानें गांजलेले असेच आहेत. याचें कारण काय असावें, असा विचार करूं लागल्यास केवळ तर्कानें या प्रश्नाचा निर्णय कोणासही होणें अशक्य आहे. कारण जीवाचें खरें मूळ स्वरूप काय होतें व तो आपल्या स्वरूपापासून कसा घसरला आणि अनर्थरूपी दुस्तर भवसमुद्रात बुडून नदी–प्रवाहांतील किड्याप्रमाणें चौऱ्याशीं लक्ष योनींत गटंगळ्या खात असून त्यातून त्याची सुटका कोणत्या उपायानें होईल व शेवटीं आपल्या मूळ स्वरूपास तो कसा पोंचेल याचा विचार एका श्रुतीशिवाय होणार नाहीं. कांडत्रयात्मक, अपौरुषेय, स्वतःप्रमाणभूत वेदांपैकीं उपनिषद्वाक्याचा यथाविधि, गुरूपदेशपूर्वक विचार केल्याशिवाय अखंड सुख कशात आहे व तें कोणत्या उपायानें निश्चित मिळेल हें कोणासही कळणार नाहीं. उपक्रमोपसंहारादि तात्पर्यनिर्णायक प्रमाणानें विचार केला असतां असा अबाधित सिद्धांत ठरला आहे कीं, जीवब्रह्मैक्य अपरोक्ष साक्षात्काराखेरीज अज्ञाननिवृत्त्युपलक्षित निरतिशयानंदबोधात्मस्वरूप परमपुरुषार्थरूप मोक्ष इतर कोणत्याही साधनानें मिळणार नाहीं. मोक्षाचें साधन जें जीवब्रह्मैक्यज्ञान तें वेदान्तशास्त्राचा विचार केल्याशिवाय कोणासही होणार नाहीं. साधनचतुष्टयसंपन्न प्रमाता हाच विचाराचा खरा अधिकारी आहे. अंतःकरण पूर्ण शुद्ध झाल्याशिवाय साधनसंपन्नता प्राप्त होणार नसल्यानें अनेक जन्मांतील सांचलेलीं दुरितें साफ होण्यास बाह्य साधनें उपयोगी पडत नाहींत. शास्त्राज्ञेप्रमाणें ग्रंथाधिकार काम्यनिषिद्ध कर्मवर्जनपूर्वक नित्यनैमित्तिक प्रायश्चित्तोपासनारूप धर्मानुष्ठान या जन्मीं अथवा जन्मांतरांत घडल्याशिवाय चित्त शुद्ध होणार नाहीं. या सर्व कर्माचें यथासांग अनुष्ठान करणेसाठीं शास्त्राज्ञेप्रमाणें साग

वेदाध्ययनपूर्वक वेदार्थज्ञानाची गरज आहे. याशिवाय आत्मज्ञान होणें दुरापास्त आहे. केवळ उपनिषदावरून सामान्य लोकांना अद्वैतात्मज्ञान होणें अत्यंत कठीण असले-मुळें भगवान नारायणस्वरूपी वेदव्यास महर्षींनीं चतुरध्यायात्मक शारीरिक सूत्रात्मक ब्रह्ममीमांसाशास्त्र रचून त्यांत उपनिषदांतील अध्यात्मविद्या संक्षेपतः ग्रथित केली. श्रीभगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य यांनीं ब्रह्मसूत्रावर प्रसन्न गंभीर असें भाष्य करून पहिल्या समन्वयाध्यायांत अद्वितीय ब्रह्म हेंच जगाचें निमित्तोपादन कारण आहे, दुसऱ्या अविरोधाध्यायांत तर्कानें सर्व आस्तिकनास्तिक द्वैत मतांचें खंडन करून विरोधपरिहार केला, तिसऱ्या साधनाध्यायांत ब्रह्मज्ञानाचीं साधनें व चवथ्या फलाध्यायात आत्मज्ञानाचें, मोक्षरूपी फलाचें प्रतिपादन करून सर्व वेदांतसिद्धांताचें प्रतिपादन केलें.

ज्यांनीं वेदशास्त्राचें अध्ययन केलें आहे, त्यांना या ग्रंथांवरून आत्मज्ञान होईल, पण सर्वसामान्य जनतेला गूढ तत्वज्ञान अनायासें व्हावें आणि त्यांचाही उद्धार व्हावा यासाठीं व्यासमुनींनीं महाभारत ग्रंथ तयार केला. महाभारताची व व्यासमहर्षींची थोरवी किती आहे हें सर्व भारतवासी लोकांना विदित आहेच. महाभारतांतील भीष्मपर्वात अष्टादशाध्यायात्मक श्रीभगवद्‌गीता केवल अध्यात्मविद्याप्रधान असून प्रत्यक्ष श्रीकृष्णांनीं, शोकमोहानें संतप्त झालेल्या अशा प्रिय भक्त अर्जुनास निमित्त करून सर्व जीवांचा उद्धार करण्यासाठीं उपदेशिली. श्रीभगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य यांनीं गीतेचें भाष्यरूप व्याख्यान करून गीताशास्त्राचें मुख्य प्रयोजन व त्याचें साधन यांचा उत्तम रीतीनें सोपपत्तिक सप्रमाण विचार केला आहे. तथापि संस्कृत भाषानभिज्ञ अशा भाविक लोकांना यावरून बोध होणें फार कठीण असल्यानें सर्व मानवांना सुलभ रीतीनें आत्मस्वरूपाची ओळख व्हावी यासाठीं भगवदवतारभूत श्रीज्ञानोबारायांनीं प्राकृत भाषेंत गीतेवर ज्ञानेश्वरी ( भावार्थदीपिका ) नांवाची जी व्याख्या केली, तीमुळें गीतेंतील निगूढ आत्मविद्या समजण्याची सामान्य लोकांस असलेली अडचण बरीच कमी झाली. श्रीज्ञानोबारायांनीं ज्ञानेश्वरींत जे तत्वज्ञानाचे सिद्वान्त प्रतिपादन केले आहेत, ते श्रीवेदव्यास व श्रीमच्छंकराचार्य याच्या विचारसरणीस अनुसरूनच असल्यानें त्याबद्दल कांहीं अप्रामाण्य शंका घेण्याचें कारण नाहीं. ज्ञानेश्वरीसारखा प्रासादिक रसाळ, हृदयंगम, उपमादृष्टांतरत्नांनीं साद्यंत अलंकृत, परमेश्वराचे ठिकाणीं भक्ति उत्पन्न करून मिथ्या सुखाविषयीं विरक्ति उत्पन्न करणारा व व्यावहारिक ज्ञानानें, कवित्वानें, विचारगांभीर्यानें ओतप्रोत भरलेला असा भक्तिरस-प्रधान दुसरा ग्रंथ आज मितीस मराठींत उपलब्ध नाहीं, ही गोष्ट सर्वसंमत आहे. ज्या थोर विभूतीनें ज्ञानेश्वरी ग्रंथ लिहिला त्यांचें संक्षिप्त चरित्र लिहिणें आवश्यक आहे.

पैठण क्षेत्रानजीक गोदावरी नदीचे तीरी आपेगांव नांवाचें एक लहानसें खेडें आहे. त्या गांवीं गोविंद त्रिंबक नांवाचे वत्सगोत्री माध्यंदिन शुक्ल यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण रहात होते. त्यांच्या पत्नीचें नांव निराबाई. गोविंदपंतांना वयाच्या पंचावन्नावे वर्षी एक मुलगा झाला, त्याचें नांव विठ्ठलपंत. हे ज्ञानेश्वर महाराजांचे वडील. आळंदी येथें वास्तव्य करणारे सिधोपंत कुलकर्णी यांची कन्या रुक्मिणीबाई इच्यासीं त्यांचा विवाह झाला. विठ्ठलपंत आपल्या भार्येसह कांहीं काळ आळंदीस रहात होते. विठ्ठलपंतांना

श्रीक्षेत्र काशीस गंगास्नानासाठीं जाण्याची इच्छा होऊन ते काशीस गेले, व त्या ठिकाणीं त्यांना चतुर्थाश्रम घेण्याची प्रबळ इच्छा झाल्यानें तेथे राहणारे रामानंद नांवाचे यतीकडे जाऊन आपणास संन्यास दीक्षा मिळावी अशी त्यांनीं विनंति केली. त्या वेळीं त्या यतीनें विचारलें कीं, 'तुला काहीं परिवार आहे काय ?' त्या वेळीं विठ्ठलपंतांनीं सांगितलें कीं, मला स्त्री-पुत्र वगैरे कांहीं पाश नाहीं. त्या भापणावर विश्वास ठेवून रामानंदांनीं त्यास संन्यासदीक्षा देऊन चैतन्य असें नामाभिधान केलें. त्यानंतर कांहीं दिवसांनीं विठ्ठलपंताचे पत्नीस आपल्या पतीनें काशीस संन्यासाश्रम घेतल्याचें समजल्यानें फार दुःख झालें. पण त्या विचारी असल्यानें यापुढें आपलें जीवित सन्मार्गानें घालविण्याचा निश्चय करून ईश्वरभजनांत त्यांनीं सतत काल घालविण्याचें ठरविलें. रामानंदस्वामी रामेश्वराचे यात्रेस चालले असतां सहज ते आळंदीस आले. रखुमाबाई या एके दिवशीं सायंकाळीं मारुतीच्या दर्शनास गेल्या होत्या. तेथें रामानंद यति आलेले पाहून बाईनीं त्यांना वंदन केलें. तेव्हां त्यांनीं पुत्रवती भव असा आशीर्वाद दिला. यतीचा आशीर्वाद ऐकून रखुमाबाईंना हंसू आलें. तें पाहून त्या यतीनें हंसण्याचें कारण विचारलें. तेव्हां त्या बाईनें सांगितलें कीं, माझे यजमानांनीं काशीस जाऊन संन्यास घेतला आहे, तेव्हां आपला आशीर्वाद सफल कसा होणार म्हणून मी हंसलें. त्यानंतर रामानंदांनीं तेथें सर्व चौकशी केल्यानंतर असें समजलें कीं, आपण ज्यास संन्यास देऊन चैतन्य नांव ठेवलें तोच या बाईचा पति. नंतर रखुमाबाईस त्यांचे वडिलांसह घेऊन स्वामी परत काशीस आले आणि आपल्या शिष्यास सांगितलें कीं, तूं मला कोणी नाहीं असें खोटें सांगून आश्रम घेतलास, करतां तूं पुनः गृहस्थाश्रम स्वीकार करून आपल्या पत्नीसह प्रपंच कर. अशी आज्ञा केल्यानें ते उभयतां परत आळंदीस येऊन राहिले. पण धर्मशास्त्राविरुद्ध वर्तनामुळें तेथील ग्रामस्थ लोकांनीं त्यांचेवर बहिष्कार टाकला. नंतर विठ्ठलपंतांना चार अपत्यें झालीं, त्यांचीं नांवें—निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपान व मुक्ताबाई अशीं होतीं. विठ्ठलपंतांनीं आपणास प्रायश्चित्त देऊन पुनीत करावें व आपल्या मुलांचें मौंजीबंधन व्हावें अशी ब्रह्मवृंदाची विनंति केली. तथापि शास्त्रवचनाचा कांहीं आधार नसल्यानें आम्हांस तसें करता येणार नाहीं असें त्यांनीं सांगितल्यामुळें विठ्ठलपंत हे प्रयागास निघून गेले. नंतर कांहीं दिवसांनीं त्यांची पत्नी रखुमाबाई ही दिवंगत झाली. निवृत्तिनाथांनीं ब्राह्मणांची विनंति केली, तेव्हां ब्राह्मणांनीं सांगितलें कीं, पैठणक्षेत्रीं जाऊन शुद्धिपत्र आणा; मग आम्ही उपनयन करूं. त्याप्रमाणें हीं चारीं भावंडें पैठणास जाऊन राहिलीं. तेथील ब्रह्मवृंदांनीं त्यांना प्रथम शुद्ध करून घेण्याचें नाकारलें. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं योगबलानें व आपल्या अपूर्व तपःसिद्धीनें अनेक लोकोत्तर चमत्कार करून दाखविले. त्यामुळें हीं मुलें ईश्वरांश आहेत, अशी पैठणक्षेत्रस्थ ब्रह्मवृंदांची खात्री पटून त्यांनीं शुद्धिपत्र दिलें. तथापि त्यांनीं आपले उपनयनादि संस्कार करून घेतले नाहींत, कारण श्रेष्ठांचें आचरण सामान्य लोक करीत असल्यानें आपण जर शास्त्रविरुद्ध वागणूक केली तर तोच धर्म समजून त्याचें अनुकरण इतर लोक करतील तर मोठा अनर्थ घडेल, या हेतूनें ते तसेच अनुपनीत राहिले. ज्ञानेश्वरांनीं आपल्या पंधराव्या वर्षी ज्ञानेश्वरी ग्रंथ लिहिला. आणि २२ व्या वर्षी शके

१२२८ मध्यें आळंदी क्षेत्रीं समाधि घेतली. ज्ञानेश्वरांचें चारित्र आणि श्रीमच्छंकराचार्य यांचे चरित्रांत बरेंचसें सादृश्य आहे. दोघेही ईश्वरावतार, दोघांनींहि वैदिक धर्माची स्थापना केली. श्रीमच्छंकराचार्यांनी १२व्या वर्षीं श्रीक्षेत्र काशी येथें जाऊन ब्रह्मसूत्रभाष्य, उपनिषद् भाष्य, गीताभाष्य अशी प्रस्थानत्रयी केली, आणि सर्व भरतखंडात संचार करून वैदिक धर्माचा झेंडा फडकविला, व वयाचे बत्तीसावे वर्षीं अवतारकार्य संपविलें. तसेंच ज्ञानोबारायानें ज्ञानेश्वरी–अमृतानुभव–चांगदेवपासष्टी ही मराठी भाषेंतील प्रस्थानत्रयी करून आचार्यांची बरोबरी केली.

ज्ञानेश्वरी ग्रंथाचें परिशीलन करणारे अनेक लोक असल्यानें त्या ग्रंथाचें प्रकाशन अनेक वेळां झालें असेल. श्रीमच्छंकराचार्य यांनीं केलेल्या प्रस्थानत्रयीभाष्याचा सांप्रदायपूर्वक ज्यांनीं अभ्यास केला असेल, त्यांनाच ज्ञानेश्वरी ग्रंथाचे गूढ सिद्धांत कळूं शकतील. अशा सांप्रदायापैकीं असलेले व ज्ञानेश्वरीचा आजन्म अखंड अभ्यास केलेले ब्रह्मीभूत नानामहाराज साखरे हे प्रसिद्ध पुरुष होऊन गेले. श्रीनानामहाराज यांचे तिसरे चिरंजीव, पूर्वाश्रमींचे पुरुषोत्तमबुवा यांनीं चतुर्थाश्रम घेतल्यानंतर १९४३ सालीं ज्ञानेश्वरीमार्गदर्शिका नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत पुरुषोत्तमबोवांनीं म्हणजेच श्री. प. कृष्णानंद सरस्वती स्वामीमहाराज यांनीं असें जाहीर केलें होतें कीं, कागद स्वस्त झालेवर या सूचीसह सार्थ ज्ञानेश्वरी प्रकाशन करण्याचा आपला हेतु आहे. तथापि स्वस्ताईचा काळ लवकर येण्याचा संभव दिसेना. म्हणून स्वामीमहाराज उदासीन होते. परंतु श्रीज्ञानेश्वरमहाराज याचीच इच्छा अशी कीं, स्वामींच्याकडून कांहींतरी लोकोपयोगी कार्य घडावें, त्यामुळें ही दुसरी आवृत्ति काढण्याचा सुयोग आला आहे.

याचें वैशिष्ट्यः—श्रीनानामहाराज यांनी स्वतःच्या हयातींत ज्यांना ज्ञानेश्वरी ग्रंथाचा सांप्रदायपूर्वक पाठ दिला असे त्यांचे कनिष्ठ चिरंजीव सध्यां संन्यासदीक्षा घेतलेले श्रीकृष्णानंद सरस्वती यांनीं अखंड ज्ञानेश्वरीचा पाठप्रवचनादि व्यवसाय केवळ परमार्थबुद्धीनें करून त्यात प्रावीण्य संपादन केलें. त्यांनीं १९४३ मध्यें जी ज्ञानेश्वरीमार्गदर्शिकासूचि तयार केली, ती या पुस्तकास जोडली आहे. तसेंच कै. न. चिं. केळकर यांनीं सह्याद्रि मासिकाच्या फेब्रुवारी १९४४ च्या अंकांत सूचना केल्याप्रमाणें सूचींतील गटास अनुक्रम नंबर, त्या गटातील विषयाचा संक्षेप करून वर्णानुक्रम तयार करून तो भाग वाचकांचे सोईकरता ग्रंथाचे शेवटीं दिला आहे. त्यामुळें वाचकांना ग्रंथातील कोणताही विषय चटकन सांपडण्याची सोय आहे. ग्रंथातही सूचि ओव्यांत जागोजाग कंसांत अनुक्रम नंबर, पुढील विषय व ओव्यांचे आकडे देऊन कंस पुरा केला आहे. यास शास्त्रांत पुढील ग्रंथाचें अवतरण म्हणतात. अशा रीतीनें ग्रंथात बरीच सोय केल्यामुळें नव्याजुन्या ज्ञानेश्वरीवाचकांस हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त असा झाला आहे.

ज्ञानेश्वरीच्या दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना लिहिण्याचा हा जो सुप्रसंग आला आणि श्री. प. कृष्णानंद सरस्वती स्वामीमहाराज यांचा अलीकडे जो विशेष परिचय झाला त्याबद्दल थोडा खुलासा करणें आवश्यक आहे. श्रीस्वामीमहाराज हे त्यांचे गुरु श्री. प. द्रविड स्वामीमहाराज यांचे पुण्यतिथीकरतां सातारा येथें राहणारे धर्माभिमानी रा. बळवंतराव

महाबळेश्वरकर यांचेकडे दरवर्षी येत असत. त्या वेळीं ते सातारा येथील श्रीमदार्यशंकराचार्यमंदिरांत दर्शनास येत होते. शिवाय शके १८६८ फाल्गुन महिन्यांत धर्मप्रचारार्थ सातारा मठांतून जो संचार सुरू झाला, त्या वेळीं प्रथम पुणें येथील श्रीज्ञानेश्वरीमंदिरांत वास्तव्य करण्याचा प्रसंग आला. त्यानंतर बार्शीस चातुर्मास्याकरतां जात असतां व इतर कांहीं कारणानें एका वर्षांत ३।४ वेळां तेथें मुक्काम होऊन वेदान्तप्रवचनादि कार्यक्रम झाला. एकंदरींत त्या मंदिरांतील नित्याचे कार्यक्रम व तेथील पावित्र्य पाहून फार समाधान वाटलें. पुणें येथें अनेक मंदिरें आहेत, पण सध्यां मंदिरांत भाडेकरू नाहींत असें मंदिर बहुतेक हें एकच असेल. श्रीस्वामीमहाराज हे भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांचे परम भक्त आहेत. त्यांनीं ही प्रस्तावना लिहिणेबद्दल अत्यंत प्रेमपूर्वक प्रार्थना केल्यामुळें हा सुयोग लाभला. एकंदरींत ज्ञानेश्वरीप्रकाशनाचें कार्य सर्वांगसुंदर झालें आहे, तरी भाविक लोकांनीं या पुस्तकाचा स्वीकार अवश्य करावा.

श्रीसच्चिदानंद विद्याशंकर भारती
अधिकारी शिष्यस्वामीमहाराज,
श्रीजगद्गुरु शंकराचार्य मठ संकेश्वर, सातारा.

---

ॐ

# या ग्रंथाचे प्रकाशक श्रीकृष्णानंदसरस्वती यांचें अल्पचरित्र.




श्री. कृष्णानंदसरस्वती

ब्रह्मीभूत नानामहाराज साखरे यांना सहा अपत्यें; त्यांपैकीं तीन पुत्र आणि तीन कन्या. या साही अपत्यांवर नाना महाराज यांचे ज्ञानबीजाचा प्रभाव पूर्ण असल्यामुळें साही अपत्यें श्रीज्ञानेश्वरांचे अंतरंगांत रंगलेलीं होतीं. त्यांत मुली आपआपल्या घरीं प्रापंचिक कार्यें करून राहिलेला वेळ श्रीज्ञानेश्वरीचे अध्ययनांत घालवीत असत. पुढे त्या तीन मुली श्रीज्ञानेश्वरचरणीं लीन झाल्या. पुत्रांपैकीं वडिलपुत्र विनायकबोवा साखरे यांनीं वडिलांच्या पश्चात् शके १८२९ मध्यें दोघां कनिष्ठ बंधूंच्या हातीं वडिलार्जित व्यावहारिक व पारमार्थिक दोन्ही इस्टेटी देऊन आपण आपला स्वतंत्र कार्यभाग स्वीकारून श्रीक्षेत्र आळंदी येथें साधकाश्रम या नांवाची एक संस्था स्थापन केली. त्या ठिकाणीं त्यांनीं वयाचे ७५ वर्षेपर्यंत वेदांताचें अध्ययन व अध्यापन करीत काल घालविला. शेवटीं एके दिवशीं म्हणजे वैशाख वद्य ११ स ज्ञानेश्वरीचें प्रवचन करून ते उठले व बाहेर

जाण्यास निघाले. दोन चार पावलें गेले व चक्कर येऊन पडले ते ज्ञानेश्वरचरणीं लीन झाले. (शके १८६२). त्यांचे पश्चात् त्यांचे शिष्य डॉ. निळकंठ प्रभाकर मोडक यांनीं विनायकमहाराज साखरे यांचेजवळ श्रीज्ञानेश्वरीचें अध्ययन करून तेच हल्लीं साधकाश्रमांतील अध्ययन व अध्यापन चालवीत आहेत. (नानामहाराज यांचे मधले पुत्र वासुदेवबुवा साखरे यांचे हे जामात असून त्यांना गोविंद या नांवाचा मुलगा आहे.)

## वासुदेवबोवा साखरे

२. वासुदेवबोवा साखरे (ऊर्फ ब्रह्मदेव) यांचेमध्यें तबला वाजविण्याचा गुण ईश्वरदत्त, बालपणापासून असल्यामुळें पाटणकर संगीत मंडळीचे मालक यांनीं नानामहाराज यांचेपासून वासुदेवबोवा यांस मागून घेतलें. वडिलांनींही नाटकांत जाण्याची आज्ञा दिली. त्याप्रमाणें वासुदेवबोवा यांनीं वडिलांचे आज्ञेवरून ३०-३२ वर्षें नाटकांत तबला वाजविण्यांत घालविलीं. त्यास नाटक कंपनीचे मालक यांनीं त्यांची शरीरयष्टि उंच पुरी असल्यामुळें ब्रम्हदेव हें नांव दिलें. वासुदेवबोवा नाटक कंपनींत असल्यामुळें त्यांचें पुष्कळ देशपर्यटन झालें. कंपनीमध्यें काम आठवड्यांतून दोन दिवसच असे. बाकी आपला सर्व काळ ते श्रीज्ञानेश्वरीच्या अध्ययनांत व अध्यापनांत घालवीत असत. त्यांचे कंपनींतील स्वाध्यायी गुरुभक्त व नानामहाराज यांचे शिष्य श्री. पांडुरंग बजाजी सरदेशमुख (बाबा मुंबईकर) व पुरुषोत्तम जगन्नाथ व्यास यांनीं वासुदेवबोवा याचा उपदेश घेतला होता. व्यास हे सुंदर नट असल्यामुळें त्यांनीं ना. कंपनी सोडल्यावर सिनेमा कंपनींत १२ वर्षें काम केलें. नोकरी करीत असतांना आपला रिकामा वेळ ते श्रीज्ञानेश्वरीवाचनांत घालवीत असत. पुढें ते आजारी पडल्यामुळें पुण्यास ताराचंद हॉस्पिटलमध्यें गेले. तेथें गेल्यावर प्रकृति जास्त झाल्यामुळें त्यांचेजवळ असलेले रु. १५०० त्यांनीं श्रीज्ञानेश्वरीवाचनमंदिराचे ट्रस्टी याचे स्वाधीन केले व पुढें ते श्रीज्ञानेश्वरचरणीं लीन झाले. वासुदेवबुवा यांनीं कंपनींतून सुटल्यापासून आपला बहुतेक काळ इंदोर मुक्कामीं त्याच्या बरोबरीच्या स्नेही मंडळींत त्याचे शिष्य रा. गणेश रामचंद्र भोपटकर यांचे घरीं श्रीज्ञानेश्वरीचें अध्ययन व अध्यापन करण्यामध्यें घालवून ते शके १८४९ भाद्रपद शुद्ध १४ रोजीं श्रीज्ञानेश्वरचरणीं लीन झाले.

## पुरुषोत्तमबोवा साखरे

३. ब्रह्मीभूत नानामहाराज साखरे यांचे कनिष्ठ पुत्र पुरुषोत्तमबोवा साखरे (हे प्रस्तुत आत्मचरित्र लिहिणारे, श्रीज्ञानेश्वरी ग्रंथाचे प्रकाशक श्रीकृष्णानंदसरस्वती स्वामी होत.) हे सर्व भावंडांत शेंडेफळ, त्यांना कोणत्याही प्रकारची विद्या नाहीं. उनाडपणा जास्त, पण त्यांत एकच गुण म्हणजे नानामहाराज यांची आज्ञा कधींही उल्लंघन न करण्याचें व्रत. यामुळेंच नानामहाराज यांचें त्यांजवर प्रेम असे व कधीं ते प्रेमानें असेंही म्हणत कीं, गाढव असला तरी उपयोगी पडतो. श्रीनानामहाराज साखरे यांचे कुळांत जन्म झाल्यामुळें व श्रीनानामहाराज यांचे श्रीज्ञानेश्वरीवरील प्रभुत्वामुळें पुष्कळशा सज्जनांचें आगमन त्याचे घरीं होई. त्यांत त्या वेळच्या मंडळींतील ह. भ. प. कृष्णबोवामहाराज श्रीगोंदेकर, ह. भ. प. गणपतीबोवा व श्रीपतीबोवा भिंगारकर, ह. भ. प. विष्णुबोवा जोग,

ह. भ. प. भाऊ काटकर ( सोलापूरकर ), ह. भ. प. भूतपाचेगांवकर तसेंच आणखी कित्येक शास्त्री-पंडीत व गृहस्थ मंडळी, त्यांत श्री. महादेव गोविंद रानडे, श्री. बाळ गंगाधर टिळक, श्री. चिंतामणराव केळकर (कै. तात्यासो. केळकर यांचे वडील), श्री. रामभाऊ गोखले (एल. आर. गोखले वकील यांचे वडील) अशा कित्येक सज्जन मंडळींचा समागम बाळपणापासून झाल्यामुळें ' सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो। कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो ॥ ' (मोरोपंत) या श्लोकाप्रमाणें शुद्ध अंत:करण होत चाललें होतें. त्याचा परिणाम म्हणून पुढें सन १९०१ साल्चे जानेवारींत एकाएकीं पूर्व संस्कारामुळें अंत:करणांत सर्वत्यागाविषयीं इच्छा होऊन त्यांनीं सर्व व्यवहार सोडून दिले. व लंगोटी लावून नऊ महिने मौनव्रत धरलें व पुढें ते तीर्थयात्रेस गेले.

## पुरुषोत्तमबोवांची तीर्थयात्रा

मौनव्रत धरलें असल्यामुळें शरीराचे फारच हाल झाले. त्यांत जानवें, शेंडी वगैरे सर्व जाऊन एक वस्त्र जवळ राहिलें होतें; यामुळें आपोआपच परमहंस दीक्षा प्राप्त झाली होती. यावरून १८५९ सालीं होणाऱ्या संन्यासाचें हें पूर्व चिन्ह होतें, असें समजण्यास कांहींच हरकत नाहीं. अशा स्थितींत फिरत असतां वृंदावन क्षेत्रीं आले. त्या ठिकाणीं एक वृद्ध ब्रह्मचारी भेटले. त्यांची दृष्टादृष्ट होतांच ते म्हणाले, ‘ज्यासाठीं हा जीव भटकतो तें सर्व त्याचे घरांतच आहे.’ हें ऐकल्याबरोबर आपले घरीं नित्य चाललेल्या ज्ञानेश्वरीचे अध्यापनाचें स्मरण झालें व तीर्थरूप नानामहाराजांच्या अधिकाराची जाणीव होऊन त्या ब्रह्मचारीबुवांस उत्तर दिलें, ‘ तीर्थावांचून मुंडण होत नाहीं, या न्यायानें आतांच्या आपल्या भाषणामुळें मला घरांतील सर्व गोष्टींची आठवण झाली.’ नंतर वृंदावनाहून ग्वाल्हेरीस मुक्कामास आले. त्या वेळीं श्रावण मास होता. ग्वाल्हेरीस अंत्यविधीचा मंत्र सांगणारे वे. शा. सं. राजेश्री रघुदेवजी यांचे बगीच्यांत राहिले. तेथें असतांना शके १८२५ सालचे श्रावण वद्यांत ती. नानामहाराज यांना सर्व परिस्थितीचें एक पत्र पाठविलें. परंतु तें पत्र वाचून पाहून त्या पत्राचें उत्तर देण्यास नानामहाराज यांस आजारीपणामुळें अंगीं शक्ति नव्हती, म्हणून तें पत्र वडील बंधु विनायकबोवा यानीं वाचलें. पत्र पाहून विनायकबोवांस अति आनंद झाला व त्या आनंदाचे भरांत त्यांनीं पत्राचें उत्तर पाठविलें. त्यांत ‘ती. नानामहाराजांनीं शके १८२५ चे चैत्रांत संन्यास केला व ते फारच आजारी आहेत, अशा वेळीं आपण येऊन स्वामींची ( नानामहाराज यांची ) सेवा करावी, म्हणजे आपल्या सध्यांचे परिस्थितींत फार उपयोग होईल ’ असें त्यांनीं लिहिलें होतें. पत्र मिळाल्यावर शके १८२५ चे भाद्रपद शुद्ध १४स ( अनंत चतुर्दशीस ) पुरुषोत्तमबोवा ग्वाल्हेरीहून पुण्यास आले व ती. नानामहाराजांना भेटले. नंतर ११-१२ दिवसांचे मुक्कामांत नानामहाराज यांची सेवा करून विचारलें कीं, आतां सन्मार्गाची मी अपेक्षा करीत आहें. पण आतां आपला समाधिकाळ जवळ आलेला दिसतो. तर आतां यापुढें मी काय करावें? तेव्हां ते म्हणाले, ‘श्रीज्ञानेश्वरी वाचीत जा व चि. विनायकाजवळून कांहीं ऐक व समजून घे.’ मग त्या त्यांच्या आज्ञेप्रमाणें लागलीच त्यांचेजवळ बसून पौर्णिमेपासून नवमीपर्यंत ज्ञानेश्वरीचें एक पारायण केलें व पुढें भाद्रपद वद्य १० चे दिवशीं नानामहाराज ब्रह्मी-

भूत झाले. नंतर १३ दिवस मोठा उत्सव झाला. तें कृत्य झाल्यावर ती. विनायकबोवा यांनीं दोन महिने होईपर्यंत विचारसागर या ग्रंथाचे चार तरंग सांगितले. पुरुषोत्तमबोवांची बुद्धि सर्वत्याग करून निराधार झाली होती. पण विचारसागराच्या श्रवणानें बुद्धि कोठें निश्चित करावी हें त्यांस समजतांच त्यांस त्याचा फार आनंद झाला. व नंतर लागलीच त्यांनीं ( मार्गशीर्षांत ) पुणें सोडून जाण्याचा विचार करून तसें ती. विनायकबोवांस सांगितलें. तेव्हां त्यांनीं पुष्कळ समजाऊन सांगितलें कीं, अजून कांहीं श्रवण कर. तरी पण पुरुषोत्तमबोवा यांचा जाण्याचा निश्चय पाहून शेवटीं सांगितलें कीं, ' काशीस जाऊन कांहीं श्रवण कर.' याप्रमाणें त्यांनीं योग्य सल्ला दिला. हे त्याचे पुष्कळ उपकार झाले.

## काशीक्षेत्रांतील वास्तव्य

वडील बंधूंच्या सांगण्याप्रमाणें काशी क्षेत्रीं मार्गशीर्ष मासीं जाऊन तेथें भिक्षावृत्ति पत्करून श्रीमत् परमहंस प. वा. स्वयंप्रकाश स्वामीमहाराज यांजकडे उपनिषदांचें दोन वर्षें श्रवण झालें. तसेंच तारक मठांत पंडित लक्ष्मणशास्त्री द्रवीड यांचे ज्येष्ठ बंधु सितारामशास्त्री द्रवीड हे गीताभाष्य सांगत असत, त्याचेंही श्रवण केलें. श्रीमत् परमहंस प. वा. शांताश्रम स्वामीमहाराज हे भागवतनिष्ठ असून त्यांनीं १८ वे वर्षीं संन्यास करून श्रीभागवत ग्रंथाचीं १०८ पारायणें केलीं होतीं. त्यामुळें त्यांचे नांवाप्रमाणें ते खरेच शातीला प्राप्त झाले होते. त्या वेळचें काशींतील पंडितद्वय वे. शा. सं. लक्ष्मणशास्त्री द्रवीड व नित्यानंद पंडित यांनीं त्यांचें म्हणजे शांताश्रमस्वामींचें गुरुत्व पतकरून तेही स्वतः नित्य भागवत वाचूं लागले. शांताश्रमस्वामीमहाराज संस्कृतज्ञ नसलेमुळें श्रीनाथांचे चतुःश्लोकी भागवताचा पाठ नित्य सायंकाळीं सांगत असत. त्या वेळीं त्यांचेकडेही नित्य श्रवणास जाण्याचा नियम असे. असा श्रवणाचा क्रम चालू असतां मनांत संन्यास करावा अशी इच्छा झाली. म्हणून ती. विनायकबोवा यांस पत्र लिहिलें व पत्रांत संन्यास करण्याचा मानस कळविला. तेव्हां त्यांनीं पत्राचे उत्तरांत योग्य सल्ला सांगितला कीं, ' जितकें वैराग्य अधिक तितका तो संन्यासच आहे. भगवें वस्त्र करणें म्हणजे संन्यास नव्हे. तें संन्यासाचें बाह्य चिन्ह आहे ' व याचप्रमाणें संन्यास घेण्याबाबतचें मनोगत शांताश्रम स्वामीसही कळविलें. तेव्हां स्वामीमहाराज फार रागावले व म्हणाले, संन्यास करावयाचा असल्यास आमचे येथें येऊं नकोस ! तेव्हां त्यांस आम्ही म्हणालों, मला संन्याशांचे संगतीमुळें संन्यास करण्याची इच्छा झाली असें नसून, अंतर्यामांतून इच्छा झाली आहे. तेव्हां महाराज म्हणाले, वयाला पन्नास वर्षें झालेखेरीज संन्यास करूं नको. तेव्हांपासून तो बेत रहित झाला. पुढें स्वामीमहाराजांनीं संन्यासांतील स्वतःच्या अनुभवाच्या कित्येक गोष्टी सांगितल्या. हे शाताश्रमस्वामीमहाराज हरिद्वारास जाण्याकरितां निघाले असतां त्यांचेबरोबर हरिद्वारास जाण्याचा योग आला. जातांना वाटेंत ब्रह्मवर्तात तीन दिवस मुक्काम होता. त्या ठिकाणीं राममंदिरांत श्री. प. प. वासुदेवानंदसरस्वती ( टेंभेस्वामी ) यांचे मुखांतील उपनिषद् श्रवणाचा लाभ झाला. पुढें हरिद्वारास आलों. चार दिवस झाल्यानंतर शांताश्रमस्वामीमहाराज काशीस आले व आम्ही पुढें बद्रिकाश्रम व केदारेश्वर या ठिकाणीं जाऊन यात्रा करून पुढें आळंदी क्षेत्रांतच कायम राहावें असें ठरवून मग एकदम

पुण्यासच आलों. पुणें येथून १८२७ सालचे अखेर आळंदी क्षेत्रीं राहण्यास गेलों, व देऊळवाड्यांत वास्तव्य केलें. पुढें शके १८२८ चे श्रावणांत गोकुळअष्टमीचे उत्सवाकरितां पुण्यास श्रावण शुद्ध १० स आलों, आणि एकादशीस वडील बंधूंनीं आम्हांस बोलावून सांगितलें कीं, "मला घराशीं व गुरुपरंपरेनें श्रीगोपाळकृष्ण देवाचा चालत आलेला उत्सव याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. तुम्हीं उभयतां बंधूंनीं घर व देवकार्य परंपरेप्रमाणें चालवावें" व लागलीच द्वादशीस आपलें बिऱ्हाड वगैरे घेऊन ते घराच्या बाहेर गेले. तेव्हांपासून त्या परंपरेचीं चालत आलेलीं सर्व कृत्यें वासुदेवबोवा व पुरुषोत्तमबोवा यांनीं बारा वर्षें सतत चालविलीं. पुढें शके १८४१ सालीं मुंबई येथें सिनेमा कंपनीचे मालक पाटणकर यांचे आग्रहास्तव गोकुळअष्टमीचा उत्सव दादर मुक्कामीं केला. पुढें शके १८४२ सालीं पुणें मुक्कामीं गोकुळअष्टमीचा उत्सव झाला. शके १८४३ सालीं श्रीक्षेत्र आळंदी येथें गोपाळपुरांत श्रीगोपाळकृष्णमहाराज इनामदार यांचे वहिवाटदार मंडळीकडून जागा मिळाली, त्या जागीं वरील गोपाळकृष्ण उपास्यदेवतेसाठीं एक आश्रम बांधून त्यास "कन्हयाश्रम" हें नांव देऊन त्या ठिकाणीं परंपरेनें चालत आलेलें उत्सवकार्य सतत चालू केलें व त्याच ठिकाणीं वास्तव्य करून श्रीज्ञानेश्वरीचें अनुष्ठान व देवतार्चन करीत राहिलों.

पुणें येथील मठांत श्रीज्ञानेश्वरीचे अध्यापनाचें काम श्री नानामहाराज यांचे शिष्य व आमचे गुरुबंधु रा. पांडुरंग बजाजी सरदेशमुख ऊर्फ बाबा मुंबईकर यांनीं चालविलें होतें. मठ फारच जुना असल्यामुळें त्याचा जीर्णोद्धार करावा अशी इच्छा वडील बंधु सोडून गेल्यापासूनच पुरुषोत्तम बोवा याचे मनांत होती. परंतु त्याचा योग आठरा वर्षांनीं म्हणजे शके १८४८ सालीं आला. त्याकरितां वर्गणी जमा करून त्या वेळीं पंधरा वीस हजार रुपये खर्च करून जीर्णोद्धाराचें काम केलें व त्या ठिकाणीं नवीन शके १८४९ मध्यें माघ शुद्ध ५ स "श्रीपुरुषोत्तमरुक्मिणीपांडुरंग देवते"चीं स्थापना केली. जुन्या मठाचा सर्व लांकूडफाटा वगैरे माल श्रीक्षेत्र आळंदी येथें नेऊन त्या ठिकाणीं कन्हय्याश्रमाची वाढ केली.

श्रीज्ञानेश्वरीवाचनमंदिरांत शके १८४८ सालापासून १८५२ सालापर्यंत वेदार्थभूषण रा. सदाशिव मोरेश्वर काशीकर शास्त्री यांनीं ऋग्वेदांतील पंचसूक्तें सांगितलीं व तसेंच योगवासिष्ठ, भारत, भागवत व रामायण याही ग्रंथांचीं प्रवचनें केलीं. त्यामुळें त्या प्रवचनाच्या श्रवणाचा लाभ पुरुषोत्तमबुवांस चांगला झाला.

वडील बंधु वेगळे निघाले ते पुण्यासच आवटे यांचे इंदिरा प्रेसमध्यें राहण्यास गेले व शके १८३२ सालीं आवटे यांनीं विनायकबोवांचे नावानें एक सार्थ श्रीज्ञानेश्वरीची प्रथम आवृत्ति प्रसिद्ध केली. त्यापूर्वीं पुणें येथील कै. कृष्णाजी परशुराम भिडे यांनीं श्रीनानामहाराज साखरे यांचे मुखांतून निघालेली प्रथम आवृत्ति शके १८२७ सालीं प्रसिद्ध केली. शके १८२८ सालांत भिडे कैलासवासी झाले; त्यामुळें त्याची द्वितीय आवृत्ति निघाली नाहीं. म्हणून विनायकबोवा साखरे व आवटे यांनीं शके १८३२ पासून शके १८६९ पर्यंत ज्ञानेश्वरीच्या आवृत्त्या प्रसिद्ध करून त्यांचा फायदा विनायकबोवा

व आवटे यांनीं घेतला. व भिडे यांचे मुलांना त्याचें ज्ञान नसल्यामुळें त्याचा फायदा झाला नाहीं. आवटे यांनीं विनायकबोवांच्या ज्ञानेश्वरीची प्रथम आवृत्ति प्रसिद्ध केल्यापासून पुरुषोत्तमबोवा यांचे मनांत भिडे यांनीं प्रसिद्ध केलेल्या शके १८२७ सालच्या आवृत्तीचें द्वितीय मुद्रण करावें अशी फार इच्छा होती. पण काल अनुकूल नसल्यामुळें त्याचा योग आजवर आला नाहीं. ती. विनायकबोवा शके १८२८ सालीं मठ सोडून गेल्यापासून आमचे मेहुणे व त्यांच्या पत्नी ( यमुनाबाई घारपुरे ) या उभयतांनीं आम्हांस पुत्रवत् पाहून सर्वतोपरी कायिक, वाचिक, मानसिक व आर्थिक दृष्टींनीं मदत केली. ती सुमारें ८।९ वर्षे केली व पुढें आमचे मेहुणे रा. रघुनाथ सखाराम घारपुरे हे शके १९३७ सालीं कैलासवासी झाले. त्यापुढें त्यांचे चि. रा. जगन्नाथ रघुनाथ घारपुरे, लॉ कॉलेजचे प्रिन्सिपाल, पुणें, यांनींही शके १८३८ सालापासून शके १८६९ सालापर्यंत सर्व बाजूंनीं कायिक, वाचिक, मानसिक व आर्थिक दृष्टीनें वडिलांचेसारखीच मदत केली.

### श्रीशांताश्रम स्वामी

शके १८४८ सालीं काशीचे श्रीशांताश्रम स्वामीमहाराज मुकाम कऱ्हाड येथें गोंदवलेकर महाराज यांचे मठांत येऊन राहिले. कारण ते मूळचे कृष्णा कांठचे राहणारे असल्यामुळें शेवटीं गंगाकांठ सोडून कृष्णाकांठीं आले व तेथेंच समाधि कालापर्यंत राहिले. त्यांचे दर्शनाकरितां काशी क्षेत्राहून वे. शा. सं. पंडितद्वय लक्ष्मणशास्त्री द्रवीड व नित्यानंद पंडित हे कऱ्हाडास आले. नंतर त्यांचें दर्शन घेऊन तें पंडितद्वय पुण्यास आले. त्या वेळीं ते आम्हांस भेटले. तेव्हां त्यांचेकडून स्वामीमहाराज कऱ्हाडास येऊन राहिले असल्याचें कळलें. त्या वेळीं आमचे वयास पन्नास वर्षे पूर्ण झालीं होतीं. तेव्हां आम्हीं कऱ्हाड मुक्कामीं स्वामीमहाराजांचे दर्शनास गेलों. वंदन करून कुशल प्रश्न झाले. नंतर महाराजांना विनंती केली कीं, 'आम्हांस पन्नास वर्षे पूर्ण झालीं, तेव्हां आतां संन्यास करण्यास कांहीं हरकत नाहीं ना ?' तेव्हां महाराज म्हणाले, 'मूर्खा, अजून तुझी संन्यास करण्याची इच्छा आहेच का ?' तेव्हां आम्हीं म्हटलें, 'संन्यास करण्याची इच्छा अंतर्यामींची आहे. ती संन्यास केल्यावांचून नाहींशी होणार नाहीं.' तेव्हां ते असे म्हणाले कीं, 'आणखी आठ दहा वर्षे जाऊं दे.' नंतर चार दिवस तेथें राहून मग आळंदी क्षेत्रीं येऊन श्रीगोपाळकृष्णाची आराधना करीत व वडिलांचे आज्ञेप्रमाणें श्रीज्ञानेश्वरीचें अनुष्ठान करीत राहिलों. याप्रमाणें कालक्रमणा करीत असतां शके १८५८ सालीं आमचे चुलत बंधु रा. विठ्ठल रामचंद्र जोशी यांनीं, वडिलार्जित हुकुमनामा सन १८८० सालीं झालेला, त्याचे आधारें श्रीगोपाळकृष्ण देवतेची मागणी केली व कोर्टांत काम सुरू केलें. त्याचा निकाल, देवतेचा ताबा त्यांना द्यावा असा झाला. त्याप्रमाणें आम्ही शके १८६० चे चैत्रांत रामनवमीचे दिवशीं त्यांना ताबा दिला. तेव्हांपासून देवता सांगली मुक्कामीं त्यांचेजवळ आहेत. त्यांना चि. हरी या नांवाचा एक मुलगा आहे. पुणें येथील श्रीज्ञानेश्वरीवाचनमंदिराचा व श्रीक्षेत्र आळंदी येथील कन्हय्याश्रमाचा कायदेशीर ट्रस्ट ता. २७ माहे आक्टोबर सन १९३२ सालीं करून ट्रस्टींची नेमणूक केली. ट्रस्टींचीं नांवें:— (१) यमुनाबाई घारपुरे [ मयत ], (२) रा. जगन्नाथ रघुनाथ घारपुरे, प्रिन्सिपाल, लॉ

कॉलेज पुणें. (३) रा. धोंडो कृष्ण साठे, पुणें. (४) सदाशिव विष्णु चौधरी, पुणें. (५) दादासो नातू पुणें, (६) रा. पांडुरंग बळवंत पानसे, पुणें, याप्रमाणें आहेत.

देवस्थानाचा ताबा चुलत बंधूंस दिल्यानंतर शके १८६० सालीं वयास साठ वर्षे पूर्ण झालीं होतीं, म्हणून त्याच सालचे ज्येष्ठ मासीं शुद्ध ११ स संगममाहुली येथें गुरुस्वामी श्रीपरमहंस परिव्राजक श्रीशिवानंदसरस्वतीमहाराज यांचेजवळ आश्रमाची दीक्षा घेतली. आश्रमांतील योगपट्ट कृष्णानंद सरस्वती असें नांव ठेविलें. पुढें शके १८६१ सालीं रा. रा. जगन्नाथ रघुनाथ घारपुरे यांचे मनांत गंगोत्रीस जावें असें आलें व त्याप्रमाणें वाई येथील केवलानंदस्वामीमहाराज (नारायणशास्त्री मराठे) व कृष्णानंदस्वामी यांना बरोबर घ्यावें, म्हणून त्यांचा विचार ठरला. त्याप्रमाणें अक्षयतृतीयेस सर्वजण एकत्र पुण्यास जमले. परंतु रा. घारपुरे यांना कांहीं अडचण आल्यामुळें त्यांचा तो बेत रहित झाला. मग केवलानंद स्वामी वाईस माघारीं गेले, व कृष्णानंदस्वामी श्री. घारपुरे यांचेबरोबर त्यांचे मातोश्रीस भेटण्यासाठीं मुंबईस गेले व तेथें चार दिवस राहिले.

## पुन्हा तीर्थयात्रेचा योग

मुंबईस असतांना श्री. ज. र. घारपुरे यांनीं कृष्णानंदस्वामीस राउंड तिकिट काढून दिलें. त्याप्रमाणें ते मुंबईहून ग्वाल्हेर, आग्रा, मथुरा, कुरुक्षेत्र, दिल्ली वगैरे करून हरिद्वार येथें पोंचले. रा. घारपुरे यानीं, सवड झाल्यास मेच्या तेरा तारखेपर्यंत हरिद्वारास आम्ही येऊं व पुढें गंगोत्रीस जाऊं; आमचें हरिद्वारास येणें न झाल्यास आम्ही आपणांस तार करूं, असें मुंबईहून निघतांना सांगितलें होतें. पुढें तार न येतां त्या सुमारास त्यांचे स्नेही प्रो. माधव दामोदर आळतेकर हे सहकुटुंब बद्रिकाश्रमाची यात्रा करण्याकरितां हरिद्वार येथें आले. त्यांनीं स्वामीस भेटून रा. घारपुरे येत नसल्याचें सांगितलें. पुढें आळतेकर यांनीं स्वामीस विचारलें, आपला पुढें कोठें जाण्याचा विचार ठरला आहे? स्वामी म्हणाले, रा. घारपुरे यांचेबरोबर गंगोत्रीस जाण्याचा विचार होता. परंतु ते न आल्यामुळें गंगोत्रीस जाण्याचा आमचा बेत रहित करून काशीक्षेत्रीं दोन महिने राहून मग पुढें चातुर्मासाकरितां श्रीक्षेत्र आळंदी येथें जाण्याचा मानस आहे. तेव्हां प्रो. आळतेकर म्हणाले, आपण आमचेबरोबर गंगोत्रीस यावें अशी आमची इच्छा आहे. लागलीच स्वामी त्यांचेबरोबर निघून डेहराडून मार्गें गंगोत्री करून पुन्हा हरिद्वार मुक्कामीं आले. व प्रो. आळतेकर हे बद्रिनारायण-बद्रिकेदारकडे यात्रेकरितां सहकुटुंब गेले. स्वामी राउंड तिकिटाप्रमाणें हरिद्वाराहून काशी, गया, कलकत्ता, प्रयाग, इंदोर वगैरे करून, नाशीक–त्रिंबकेश्वर करून चातुर्मासाकरितां श्रीक्षेत्र आळंदीस आले. चातुर्मास झालेवर शके १८६३ भाद्रपद वद्य १२स संगममाहुलीस गुरुस्वामी श्रीशिवानंद स्वरस्वती ब्रम्हीभूत झाले, त्याकरितां कृष्णानंद स्वामी संगममाहुलीस गेले. तेथून परत येतांना वाई क्षेत्रीं रामचंद्र कृष्ण साने पेनशनर यांचे घरीं आठ दिवस राहिले. आठ दिवसात श्रीज्ञानेश्वरीचा बारावा अध्याय साने यांचे घरीं वाचला. त्या वेळीं वाई येथील पेनशनर मंडळींचे क्लबांतील बरीच मंडळी श्रवणास येत होती. त्यांत रा. बापूसाहेब दातार, फर्स्टक्लास सबजज्ज पेनशनर, यांनीं स्वामीस निघतेवेळीं प्रार्थना केली कीं, स्वामींनीं सर्व श्रीज्ञानेश्वरी येथें

वाचावी. मग स्वामींनी विचार केला कीं, ज्या ठिकाणीं गुरूंचें वास्तव्य बहुत वर्षे झालें, त्या ठिकाणीं आपलें वास्तव्य झाल्यास बावगें नाहीं. शिवाय गुरुपरंपरेंतील केवलानंदस्वामी-महाराज (नारायणशास्त्री मराठे) यांचा समागम व कृष्णाबाईचें स्नानपान हा लाभ होईल असें मनात आणून शके १८६२ पासून शके १८६५ पर्यंतचे चार चातुर्मास वाई क्षेत्रीं झाले. स्वामीस केवलानंद यांच्याकडे चार चातुर्मास श्रवणाचा लाभही उत्तम झाला.

श्रीज्ञानेश्वरी ग्रंथ श्रीज्ञानेश्वरांनीं सुलभ म्हणून केला, परंतु तो पंडितांना व आधुनिक बुद्धिवाद्यांनाही अवघड वाटतो. आमच्या मतें त्याचें एकच कारण आहे. तें हें कीं, हे लोक त्या ग्रंथाचें अनुष्ठान करीत नाहींत. ग्रंथाचें अनुष्ठान करणारांस ग्रंथ खरो-खरींच सोपा आहे, असें श्रीज्ञानेश्वरांनींच आपल्या ग्रंथांत म्हटलें आहे. (ज्ञा. अ. १८, ओवी १७४२:—तेणें आबाळ सुबोधें। वोवियेचेनि प्रबंधें। ब्रह्मरस सुस्वादें। अक्षरें गुंथिलीं) श्रीज्ञानेश्वरी समजण्यासाठीं त्याचें अनुष्ठान करणें व सांप्रदायिकांकडे थोडें श्रवण करणें हाच एक मार्ग आहे, असें आमचें मत आहे. असो.

स्वामी केवलानंद हे विद्याव्यासंगी असल्यामुळें त्यांनीं शके १८६४ सालीं बोलतां बोलतां शोधक दृष्टीनें श्रीज्ञानेश्वरीबद्दल कांहीं कल्पना सुचविल्या. त्याप्रमाणें कृष्णानंद स्वामी यांनीं लागलीच शके १८६५ सालीं (ता. २३ जून १९४३ रोजीं) श्रीज्ञानेश्वरीमार्ग-दर्शिका नावाचें पुस्तक लिहून तें प्रसिद्ध केलें. त्या पुस्तकाबद्दल कै. रा. नरसोपंत केळ-कर यांनीं आपला अभिप्राय सन १९४४ चे फेब्रुवारीचे सह्याद्रि मासिकाचे अंकांत 'श्रीज्ञानेश्वरीच्या अभ्यासाचीं साधनें' या नांवानें प्रथम प्रसिद्ध केला. त्याचप्रमाणें केसरी पत्रांत ता. २३।६।१९४४ चे अंकांत 'पुस्तकपरीक्षण' या सदरात कै. केळकर यांनीं आपल्या सहीनें अभिप्राय छापला आहे. सदर मार्गदर्शिकेच्या शेवटील पृष्ठावर "कागद स्वस्त झालेवर या सूचीसह सार्थ श्रीज्ञानेश्वरी प्रसिद्ध करूं" असें लिहिलें आहे.

## श्रीज्ञानेश्वरी छापण्यांतील अडचणी

कोणतेंही कृत्य करण्यास प्रारंभीं द्रव्याची आवश्यकता असते. पण भिक्षूजवळ द्रव्य कोठून असणार! आणि स्वामी हे मूळचे ग्रंथप्रकाशक नव्हते. नवीन माणसास चालू कायद्याप्रमाणें प्रकाशक होण्याची परवानगी सरकारातून मिळत नाहीं. व कागद वगैरे लागणारा माल भरपूर मिळत नाहीं. शिवाय ग्रंथ फार मोठा, यामुळें कोणी छाप-खानेवाले छापण्यासही तयार होईनात. एकंदरींत ज्ञानेश्वरी छापणें हें मोठें दिव्यच होतें. वास्तविक पाहतां हें काम स्वामींच्या मतें आळंदी संस्थानच्या ट्रस्टींनींच करण्यास हवें. कारण श्रीज्ञानेश्वरांनीं जगाकरितां जी वाक्सृष्टि निर्माण करून आबाल-वृद्धांचा व अना-थांचा उद्धार केला, त्या वाक्सृष्टीचा प्रसार करण्याकडे संस्थानच्या द्रव्याचा उपयोग करणें योग्य होतें. शिवाय पूर्वीच्या गांवच्या उत्पन्नाच्या बेज्याशिवाय सन १९११ साला-पासून सन १९४८ सालापर्यंत देवापुढील सर्व उत्पन्न संस्थान जमा करीत आहे. इतर धर्मांतील लोक आपल्या धर्माच्या प्रसाराकरितां लाखों रुपयांचा विनियोग करीत असतात. परंतु महाराष्ट्राकरितां ज्या ज्ञानेश्वरांनीं अवतार घेऊन आपली कायावाचामन हीं जगा-करितां खर्ची घातलीं, त्यांचे ट्रस्टी महाराष्ट्रीय असून व त्यांच्यापुढील पैसा घेऊन त्यांनीं

केलेल्या कृत्यांत एकही पैसा खर्ची घातला नाहीं. त्या पैशाचा विनियोग ट्रस्टी काय करितात तें त्यांचें त्यांना माहीत. असो. लोकामध्यें ज्ञानेश्वरी ग्रंथ बाजारांत मिळण्याची दुर्मिळता पाहून स्वामींस फार वाईट वाटे, परंतु त्याचा उपयोग काय? स्वामी स्वतः विद्वान नाहींत.* मग मनांत फक्त श्रीज्ञानेश्वरी छपाईबद्दल श्रीज्ञानेश्वरांची प्रार्थना करणें याशिवाय त्यांचेजवळ दुसरा मार्ग नव्हता.

## श्रीज्ञानेश्वरींचे प्रकाशनाबद्दल प्रयत्न

स्वामींच्या प्रार्थनेला श्रीज्ञानेश्वरमहाराज यांनीं ओ दिली. त्याचें प्रत्यंतर म्हणजे सन १९०५ सालीं कै. कृष्णाजीपंत भिडे यांनीं लिहिलेली ज्ञानेश्वरी तिचा हक्क भिडे यांचे चिरंजीव रा. दत्तात्रय कृष्ण भिडे व त्यांचे धाकटे बंधु याचे कुटुंब गंगाबाई भिडे या उभयतांनीं ज्ञानेश्वरी-वाचनमंदिराच्या हिताकरितां सन १९४५ सालीं बक्षिस दिला. तेव्हांपासून श्रीज्ञानेश्वरीवाचनमंदिराचे संस्थापक भिक्षु कृष्णानंद सरस्वती यांनीं अशा सर्वतोपरी अडचणींच्या काळांत हे अकटश्च विकटो काम करण्याचा प्रारंभ केला. या अवधींत १८६५ सालीं पौष वद्य ८स नानामहाराज साखरे यांची मध्यम कन्या ( रा. जे. आर. घारपुरे यांच्या मातोश्री ) या ज्ञानेश्वरचरणीं लीन झाल्या. त्यांचें ज्ञानेश्वरीवर अत्यंत प्रेम असलेमुळें त्याचे स्मरणार्थ कृष्णानंदस्वामी यांनीं शके १८६६ ते १८६८ पर्यंत श्रीज्ञानेश्वरीचें पारायण मुंबईस त्यांचे घरीं पूर्ण केलें. त्या वेळीं मुंबई मुक्कामीं असतांना भिक्षु अखंडानंदस्वामी यांनीं अहमदाबाद येथें स्थापन केलेली गुजराथी "सस्तु साहित्य" संस्था, तिनें आतांपर्यंत ५००।५५० ग्रंथांचें प्रकाशन करून लोकांना अत्यंत स्वस्त किमतींत धार्मिक ग्रंथ दिले आहेत. त्या संस्थेचें कार्य पाहून भिक्षु कृष्णानंद सरस्वती यांचे मनांत त्या धर्तीवर मराठी संतवाङ्मय शक्य तेवढें लोकांना स्वत किंमतींत देतां येईल अशी कांहीं योजना करावी असें आलें. परंतु महाराष्ट्रांतील जनता नोकर पेशांतील असल्यामुळें त्यांचेकडून द्रव्यसाहाय्य मिळणें कठीण आहे. आणि जे कांहीं द्रव्यवान लोक आहेत त्यांची वृत्ति आधुनिक विद्येकडे असलेमुळें ते लोक कॉलेज-सारख्या आधुनिक विद्यादानाकडे रक्कम देतात, पण त्यांचें लक्ष संतवाङ्मय प्रसिद्ध करण्या-कडे नाहीं. भिक्षु कृष्णानंद सरस्वती यांचे मनांत संतवाङ्मय स्वस्त करावें असें आलें परंतु हें काम करणें म्हणजे संन्याशाचे लग्नास शेंडीपासून तयारी करावयाची त्याप्रमाणें मोठ्या आयासाचें होतें. भिक्षु कृष्णानंद यांनीं ग्रंथाचे प्रकाशक होण्याकरितां गुजराथी सस्तु साहित्याचे मुख्य ट्रस्ट्री रा. मनु सुभेदार, यांनींही ज्ञानेश्वरीचें इंग्रजींत भाषांतर केलें आहे, त्यांना भेटून प्रथम प्रकाशक होणेबद्दल व कागदाबद्दल मुंबई सरकारकडे अर्ज सन १९४६ मध्यें केला. त्याप्रमाणें एक वर्षानें म्हणजे सन १९४७ अखेर प्रकाशक होणेची व कागदाची परवानगी मिळाली. पुढें या कामास लागणाऱ्या द्रव्याची अडचण पडली. परंतु श्रीज्ञानेश्वरमहाराज यांनीं काम सुरू करण्याइतकी अडचण निवारण केली.

---

* अविद्यो वा सुविद्यो वा मूर्खः पंडित एव च ॥ प्रेषमात्रेण संन्यासी पूज्यः सर्वेश्वरो यथा ॥१॥
दुर्वृत्तो वा सुवृत्तो वा यतिर्भवति कश्चन ॥ यतिर्वै निंदमानस्तु नरकं दुस्तरं नयेत् ॥ २ ॥

—वेदेश्वरींतील यतिधर्मांतील श्लोक.

म्हणजे रा. मनू सुभेदार यांचे स्नेही रा. अनंत शिवाजी देसाई टोपीवाले यांचे हल्लीचे मालक श्री. मोतीरामशेट यांजकडून श्रीज्ञानेश्वरीप्रकाशनाकरितां त्यांनीं रुपये चार हजार देवविले. तसेंच मुंबई येथील जवाहीर व्यापारनिवृत्त शेट हरीभाई कल्याणजी शेटे हे सत्संगी असल्यामुळें त्यांनीं मलबार हिलवरती सन १९४९ सालापासून भिक्षु कृष्णानंद स्वामी यांचेबरोबर समागम केला व पुढें त्यांचे स्नेही रा. रा. अनंत गणेश पंडित, रा. हरिपूर, सं. सांगली या सद्गृहस्थांनीं ज्ञानेश्वरीप्रकाशनास रुपये दोन हजार दिले. तसेंच रा. गणेश गोविंद ऊर्फ आण्णासाहेब नवरे यांनीं ग्रंथप्रकाशनास पांचशें एक रु. दिले. तसेंच मुंबई येथील श्री. व्ही. एस. आपटे यांनीं ग्रंथप्रकाशनास पांचशें रुपये दिले. या सर्व पैशाच्या जुळवाजुळवीमुळें श्रीज्ञानेश्वरी ग्रंथाच्या प्रकाशनाचा आज हा योग आला.

प्रथमतः फार मोठा ग्रंथ म्हणून सहजासहजीं कोणी छापण्याचें काम करण्यास तयार नव्हते. तरी पण ज्ञानविलास छापखान्याचे मालक रा. बाळकृष्ण भाऊ जोशी यांना अध्यात्मज्ञानाची आवड असल्यामुळें त्यांनीं श्रीज्ञानेश्वरी ग्रंथ छापण्याचें काम पतकरिलें. तसेंच त्यांनीं श्री ज्ञानेश्वरांचे अमृतानुभव ग्रंथाचे साकीरूपानें भाषांतर केलें आहे. त्यावरून त्यांना श्रीज्ञानेश्वरांचे वाङ्मयाची दृष्टि असल्यामुळें श्रीकृष्णानंदांनीं प्रुफें तपासण्याचें काम त्यांचेवरच सोंपविलें व तें काम त्यांनीं मोठ्या हौसेनें पतकरिलें. त्यामुळें भिक्षु कृष्णानंद यांची मोठी जबाबदारी निवारण झाली. शिवाय सन १९०५ सालांतील भिडे यांची छापील प्रत असल्यामुळें छापण्याच्या बाबतींत जबाबदारी पुष्कळच कमी झाली होती. यांतूनही कांहीं चुका राहिल्या असतील त्या वाचकांनीं समजून वाचाव्या, अशी सूचना आहे. तसेंच वाचकांस आढळलेल्या चुका त्यांनीं आमचेकडे कळविल्यास दुसऱ्या आवृत्तीचे वेळीं त्या चुका सुधारून घेऊं.

## पुढची योजना

आतां हें प्रकाशन झाल्यावर यांत जो नफा होईल त्या नफ्यांतून प्रथम मराठी भाषेंतील श्री ज्ञानेश्वरांची प्रस्थानत्रयी म्हणजे श्रीज्ञानेश्वरी व अमृतानुभव व चांगदेवपासष्टी यांचें प्रकाशन करूं. नंतर ग्राहकांकडून जसा फायदा मिळेल त्याप्रमाणें संतांचें गाथापंचक, नाथभागवत, भावार्थरामायण, दासबोध वगैरे संतवाङ्मय प्रसिद्ध करण्याचा स्वामींचा विचार आहे. स्वामींच्या अस्तित्वांत जितकें प्रकाशन होईल, त्यानंतर स्वामींचे पश्चात् श्री ज्ञानेश्वरी वाचनमंदिराची विश्वस्त मंडळीही वारंवार संतवाङ्मय प्रसिद्ध करून त्यांतील नफ्याचा विनियोग संतवाङ्मय प्रसिद्ध करण्याकडेच करतील. विश्वस्त मंडळींतील रा. जगन्नाथ रघुनाथ घारपुरे याचे चि. विश्वनाथ जगन्नाथ घारपुरे हे आपले आजोबा व ती. वडील यांचेप्रमाणेंच पुढें संतवाङ्मय प्रकाशकमंडळाचे मुख्य विश्वस्त होऊन श्रीज्ञानेश्वरीवाचनमंदिर या संस्थेस साह्य करतील असा स्वामींस पूर्ण भरवंसा आहे.

## ज्ञानेश्वरांची शब्दसृष्टि

आम्हीं श्रीज्ञानेश्वरींतील श्रीज्ञानेश्वरांचे शब्दसृष्टीचा कोश तयार केला आहे. तो कोश तयार करण्याचे कामीं रा. रा. विष्णु गणेश देवधर पेनशनर रा. पुणें यांनीं सन १९४६ सालापासून शब्दांचे वर्णानुक्रम लावून ते छापखान्यांत छापण्यास दे

लिहून तयार केले आहेत. एका ओवींत ५-८-९ याप्रमाणें शब्द येतात, ते सर्व या कोशांत असल्या कारणानें वाचकांस कोणताही शब्द आठवल्यास ओवीचा आकडा व अध्याय हे वर्णानुक्रमांत पाहिलें असतां सहज आढळण्यांत येईल. कारण एक ओवी शब्दामुळें सात आठ ठिकाणीं आलेली असते, ती सांपडण्यास सोईची अशी ही व्यवस्था केली आहे. तो शब्दसृष्टीचा ग्रंथ प्रकाशित करण्याचा विचार आहे. परंतु या सर्व गोष्टी संतवाङ्मयप्रेमी लोकांच्या आश्रयावर अवलंबून आहेत. भिक्षु कृष्णानंद यांच्या भावनेप्रमाणें संतवाङ्मय प्रकाशन करण्याकरितां धनिक लोकांनीं बिनव्याजी रकमेची मदत केल्यास संतवाङ्मय लवकर प्रकाशित होईल. नाहींतर तें कालांतरानें केव्हां तरी होईल. श्रीज्ञानेश्वरमहाराज हे सर्व मनोरथ पूर्ण करतीलच. कारण श्रीज्ञानेश्वरांचा लोककल्याणाचा जो हेतु तोच भिक्षु कृष्णानंद यांचा आहे. श्रीज्ञानेश्वरीप्रकाशनास लोकांकडून पूर्ण मदत मिळाली असती तर हाच ज्ञानेश्वरीग्रंथ आम्ही फार कमी किंमतींत दिला असता. परंतु तितकी मदत न मिळाल्यामुळें, ग्रंथावर किंमत जास्त ठेवून, कोणाचें देणें न राहील व पुन्हा श्रीज्ञानेश्वरीग्रंथप्रकाशनाचें कार्य होईल अशी योजना करून ठेविली आहे.

## आभार

श्री ज्ञानेश्वरीचे प्रकाशनाचे कामीं ज्यांनीं आपल्या गुणाची मदत केली आहे, त्यांत मुंबईचे प्रसिद्ध शिल्पकार श्री. बी. व्ही. तालीम यांनीं भिक्षु कृष्णानंदांचे कल्पनेप्रमाणें श्रीज्ञानेश्वरमहाराज यांची प्रतिमा तयार करून त्याचा फोटो श्रीज्ञानेश्वरींत घालण्यासाठीं दिला आहे. या तयार केलेल्या प्रतिमेंत वयोमान, ज्ञानाची प्रसन्नता व ज्ञानाचें तेज या सर्व गोष्टींचें सौष्ठव पूर्ण साधलें आहे. हल्लीं लोकांत प्रसिद्ध असलेल्या फोटोमध्यें व या फोटोमध्यें फारच अंतर आहे. तसेंच श्रीनानामहाराज साखरे यांचीहि प्रतिमा त्यांनीं तयार करून दिली आहे. मुंबई येथील ब्लाकमेकर रा. दत्तात्रय वसंतराव नेरॉय यांनीं वरील दोन्ही प्रतिमेचे फोटोवरून ब्लाक तयार करून ते श्रीज्ञानेश्वरींत घालण्यासाठीं दिले आहे.

बालोद्यान प्रेसचे मालक व रा. रा. कै. कृष्णाजी परशुराम भिडे यांचे भाचे श्री. शंकर बळवंत सहस्रबुद्धे यानीं श्रीज्ञानेश्वरांच्या चित्राचे तीन रंगी ब्लॉक विनामूल्य करून दिले. त्यामुळें ग्रंथास फारच शोभा आली आहे. वरील तिन्ही गुणी जनांस स्वामींचे नारायणस्मरणपूर्वक आशीर्वाद आहेत. तसेंच आमचे श्रीज्ञानेश्वरीच्या प्रकाशनाचे कामीं ज्या ज्या छापखान्यांनीं स्फुट लेख व जाहिराती देणें वगैरे काम विनामूल्य केलें त्या सर्वांना स्वामींचे नारायणस्मरणपूर्वक आशीर्वाद आहेत. यापुढें जे संतवाङ्मय स्वस्त करण्याकरितां आम्ही प्रयत्न करूं त्या प्रयत्नांस त्यांनीं साहाय्य करावें, अशी विनंति आहे.

श्रीसच्चिदानंद विद्याशंकर भारती, श्रीजगद्गुरु शंकराचार्य शिष्यस्वामी संकेश्वरांना विनंति केल्याप्रमाणें त्यांनीं प्रस्तावना लिहून दिली याबद्दल त्यांस वारंवार वंदन असो. श्रीज्ञानेश्वरीप्रकाशनाचे कामीं ज्या ज्या लोकांनीं मदत केली आहे, त्या सर्व मंडळीस भिक्षु कृष्णानंदस्वामींचे श्रीज्ञानेश्वरस्मरणपूर्वक अनेक आशीर्वाद. प्रकाशनाचें हें सर्व कृत्य आमचे सद्गुरु श्री. प. शिवानंद सरस्वतींचे चरणीं अर्पण करून हें आत्मचरित्र भिक्षु कृष्णानंद संपवीत आहेत.

---

## ॥ श्रीनारायणाष्टकम् ॥

श्रीज्ञानेश्वरभारतीकुमुदिनीगंधस्य यः पुष्पलिट्।
यश्चासीद्भवदावतापितजनव्रातस्य धाराधरः॥
प्रारब्धेरितकर्मभिर्जनचयैर्यः पूरुषो भावितो।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम्॥ १॥

यं दूरीकृतविश्वभासतिमिरं कौतूहलोत्पादकम्।
अद्वैताब्जविकासकं स्वमहसा मायाक्षपानाशकम्॥
जीवालेरपि मोचकं रविनिभं प्राहुश्च यं कोविदा।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम्॥ २॥

निर्मोहेन सदा स्वभक्तनिखिलस्वश्रेयसेनोद्धवत्-।
प्राणांतांबुभृदोघतीव्रमरुता स्वीयाशुभं नाशितम्॥
वैराग्यामृतसेविनश्च सुहृदा येनैव कालो जितो।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम्॥ ३॥

अंतःशत्रुजिते निजात्मकलया नित्यं जगद्व्यापिने।
विश्वाभ्रस्य विहायसाय सततं यस्मै भवध्वंसिने॥
संस्कारात्प्रतनाद्धि केशवपदे भक्तिः सदाऽरोचत।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम्॥ ४॥

यस्माच्छात्रगणस्य संसृतिभयं दुःखं च मायाकृत-।
व्यामोहो विलयं जगाम सपदि स्वांतस्य यो मोहकः॥

यस्माच्छांतिदमादिपीडिततमाः क्रोधादयो निर्गताः।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ ५ ॥

सच्छिष्यैर्गुरुचिंतनं मलयजं कृत्वेंद्रियाणां गणम् ।
पुष्पाणि प्रतिघादिकांश्च षड्रीन्धूपं मनो दीपकम् ॥
नैवेद्यं च मतिं विधाय विहितं यस्यानिशं पूजनम्।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ ६ ॥

अज्ञाहंमतिहारके भवभयान्नित्यं नृणां तारके।
सर्वेषां सुखकारके जनमनस्संतापसंहारके ॥
उत्कर्षस्तमसश्च सत्त्वरजसोर्यस्मिन्विनष्टोऽभवत्।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ ७ ॥

भो भोः संसृतिदुःखकर्षितजनव्रातस्य पीडापह।
भोः सौख्यप्रद शांतियुक्तमनसां निर्द्वंद्वतैकप्रिय ॥
पाह्यस्मानिति यो मुमुक्षुनिवहैर्ज्ञानाप्तये प्रार्थितो ।
ब्रह्मानंदजुषं तमस्तु नमनं नारायणाख्यं गुरुम् ॥ ८ ॥

अज्ञानौघनिवारणात्तवपुषो भक्ते दयां कुर्वतः।
प्राप्तज्ञानचकोरवृंदशशिनस्तस्य प्रशांतात्मनः ॥
संचक्रे शिवराम आदृततनोश्चैतद् गुरोरष्टकम्।
तेनैवाल्पधिया समर्पितमिदं श्रीसद्गुरोः पादयोः ॥ ९ ॥

इति श्रीगुरुनारायणाष्टकस्तोत्रं संपूर्णम् ॥

# पारिभाषिक शब्द.

**अन्न-चतुर्विध**-भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य.

**अंगें**-योगाचीं आठ अंगें-यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, व समाधि.

**अवस्था** ५-जाग्रति, स्वप्न, सुषुप्ति, तुर्या व उन्मनी.

**आसनें** ८४ आहेत. पैकीं सिद्ध, पद्म, वीर, भद्र, व वज्र हीं मुख्य होत.

**इंद्रियें-५-ज्ञानेंद्रियें**- श्रवण, नयन, त्वचा, घ्राण; व रसना. ५ **विषय**-शब्द, रूप, स्पर्श, गंध, व रस. ५ **कर्मेंद्रियें**-वाक्, पाणी, पाद, पायु, उपस्थ. ५ **विषय**-बोलणें, घेणें, चालणें, गुद=मलत्याग करणें व शिश्न=मूत्रत्याग करणें.

**ऋतु** ६-वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत्, हेमंत, व शिशिर.

**कपिलाषष्ठी**-हें पर्व बहुधा ६० वर्षांनीं एकदां येतें. हे पर्व येण्यास महिना भाद्रपद, पक्ष कृष्ण, तिथि षष्ठी, वार मंगळ, नक्षत्र रोहिणी, योग व्यतिपात् आणि महानक्षत्र हस्त, इतके योग यावे लागतात.

**कर्म**-नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध. (अ. १८ श्लोक २ वरील टीका पहा. )

**काम**-कोणत्याही पदार्थाची वारंवार इच्छा होणें.

**कुलाचल** ७-महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, ऋक्ष, विंध्य आणि पारियात्र हे सात कुलपर्वत होत.

**गुण** ३-सत्त्व = ज्ञानशक्ति = ज्ञानेंद्रियें.
रज = क्रियाशक्ति = कर्मेंद्रियें.
तम = पदार्थशक्ति = विषय.

**गुरु** ४-गुरु, परमगुरु, परमेष्ठिगुरु, व परात्परगुरु.

**चक्रें** ६-आधार=गुद, लिंग, नाभि, हृदय, तालुमूल=कंठ व ललाट.

**चिरंजीव** ७-अश्वत्थामा, बलि, व्यास, हनुमान्, बिभीषण, कृप व परशुराम.

**चित्तचतुष्टय**-बुद्धि, मन, अहंकार व चित्त.

**छंद** ७-गायत्री, उष्णिक्, अनुष्टुभ्, बृहती, पंक्ति त्रिष्टुप् व जगती. ( ८ अक्षरांचा चरण, ३२ अक्षरांचा छंद, २४ अक्षरांची गायत्री. )

**त्रिविधताप**-आध्यात्मिक, आधिदैविक, आधिभौतिक.

**दिग्गज** ८-ऐरावत, पुंडरीक, वामन, कुमुद, अंजन, पुष्पदंत, सार्वभौम आणि सुप्रतीक.

**देवतरु** ५-मंदार, पारिजात, संतान, कल्पवृक्ष, व हरिचंदन.

**धातु**-शरीरांतील **सप्तधातु** व त्यांचें प्रमाणः-

| रक्त, | मांस, | मज्जा, | मेद, | रस, | अस्थि, | व शुक्र. |
|---|---|---|---|---|---|---|
| ८-१० | २ | ३ | ४ | | ३ | $\frac{१}{२}$ |

एकूण ३०$\frac{१}{२}$

**पथ-चतुष्पथ**-

प्रज्ञानंब्रह्म, तत्त्वमसि, अयंआत्माब्रह्म, अहंब्रह्मास्मि.

| | | |

ऋक्शाखा, छांदोग्यांतील साम, अथर्ववेद, यजुःशाखा.

**पुरुषार्थ** ४-धर्म, अर्थ, काम व मोक्ष.

**प्रकृति** ( अष्टधा )-अप्, तेज, गगन, मही, मारुत, मन, बुद्धि व अहंकार. द्विधा- पराप्रकृति = चेतन, अपराप्रकृति = जड.

**प्रमाणें** ६-शब्द, अनुमान, उपमान, प्रत्यक्ष, अर्थापत्ति, व अनुपलब्धि.

**प्राण** ५-प्राण, अपान, व्यान, उदान व समान. **उपप्राण** ५-नाग=तोंड वासणें ( जांभई ), कूर्म=शिंक, कृकर=भूक उत्पन्न करणें (ढेकर), देवदत्त=उचकी उत्पन्न करणें, धनंजय=सर्व शरीरास व्यापून राहणें ( शरीर फुगविणें ),

**भक्त** ४ प्रकारचे-आर्त=पीडित, भगवत्प्राप्तीची इच्छा करणारा, अर्थार्थी=धनप्राप्तीची इच्छा करणारा, जिज्ञासु=ज्ञानप्राप्तीची इच्छा करणारा, ज्ञानी=ज्ञान प्राप्त झालेला.

**भक्ति** ९-श्रवण, कीर्तन, नामस्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्म निवेदन.

**भाव** ८-अष्टसात्त्विक-स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, कंप, वैवर्ण्य, अश्रुपात व प्रलय.

**भुवनें** १४-पाताल, महातल, तलातल, रसातल, सुतल, वितल, अतल, भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, सत्यं.

**भूतें-पंचमहाभूतें**-पृथ्वी, अप्, तेज, वायु व आकाश.

**मनु** १४-स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत, चाक्षुप, वैवस्वत, सावर्णि, दक्षसावर्णि, ब्रह्मसावर्णि, रुद्रसावर्णि, देवसावर्णि, इंद्रसावर्णि, धर्मसावर्णि.

**यमनियम-यम १०-**

शरीरसाधनापेक्षं नित्यं यत्कर्म तद्यमः ।
आनृशंस्यं दया सत्यमहिंसा क्षांतिरार्जवम् ॥
प्रीतिः प्रसादो माधुर्यं मार्दवं च यमा दशः

**नियम १०-**

*शौच्यमिज्या तपो दानं स्वाध्यायोपस्थनिग्रहः ।*
व्रतं मौनोपवासं च स्नानं च नियमा दशः॥

**योनि** ४-जारज=मनुष्य, अंडज=पक्षी, स्वेदज=उवा, लिखा वगैरे, उद्भिज=वृक्ष.

**रस-अलंकारांतील** ९-शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत व शांत.

**रुद्र** ११-मृगव्याध, सर्प, निर्ऋति अजैकपात्, अहिर्बुध्न्य, पिनाकी, दहन, ईश्वर, कपाली, महाद्युति आणि भर्ग.

**लोकपाल** ८-शक्र नांवाचा आदित्य, अनल नांवाचा वसु, सूर्यपुत्र यम, निर्ऋति नांवाचा रुद्र, वरुण नांवाचा आदित्य, अनिल नांवाचा वसु, वैश्रवण नांवाचा कुबेर, आणि ईश्वर नांवाचा रुद्र.

**वसु** ८-धर, ध्रुव, सोम, अन्ह, अनिल, अनल, प्रत्युप आणि प्रभास.

**वाणी** ४-परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी.

**विकार** २०-बुद्धि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, उत्पत्ति, विनाश, भय, अभय, अहिंसा, समता, संतोष, तप, दान, यश व अपयश.

**व्यष्टि-समष्टि—**

| व्यष्टि | समष्टि |
|---|---|
| विश्व=जागृति | विराट् |
| तैजस=स्वप्नावस्था | हिरण्यगर्भ. |
| प्राज्ञ=सुषुप्ति | ईश्वर. |

**शब्द** ४-घोष, ध्वनि, नाद व ॐकार.

**सिद्धि** ८-अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्या, ईशिता व वशिता. ( विशेष स्पष्टीकरणार्थ भागवत एकादश-स्कंध अ. १५ पहा. )

**स्वर** ७-गाण्यांतील-निषाद, ऋषभ, गांधार, षड्ज, मध्यम, धैवत व पंचम.

# ज्ञानेश्वरींतील विषयांची सूचि.

## ( अकारादि वर्णानुक्रमानें )

### म

## म

ज्ञानियांचा राजा गुरुमहाराज । म्हणती ज्ञानदेव तुम्हा ऐसे ॥१॥ तुकाराम



श्री ज्ञानेशो भगवान विष्णुः

जन्म शके ११९७
श्रा. वद्य ८

समाधिकाल शके १२१८
कार्तिक वद्य १३

## श्री ब्रम्हीभूत नानामहाराज साखरे

जन्म शके १७५० — समाधि शके १८२५



तैसा सज्जनाच्या मेळापीं । गीता पद्मरत्नें उमपी । वर्ण जो माझ्या रूपीं । हेतु ठेऊनि ॥१५२१॥
मग तयाचेनि घाटे । पढियंते मजपुढें । नाहींच गा मागेपुढें । त्यावाचूनिया ॥ १५२२॥
अर्जुना हा जयवरा । मी तयात सुख निरंतरी । जो गीतार्थाचें करी । परगुणें संता ॥ १५२३ ॥

प. न. ९८ पानेश्वरी वाचन पुणे २ — ज्ञानेश्वरी अध्याय १८

सान्वय व सार्थ

# भगवद्गीतेसह



सटीप सार्थ

# भावार्थदीपिका

अथवा

# ज्ञानेश्वरी.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय पहिला

श्रीगणेशाय नमः ।

( १ ॐकार आदिबीजाला नमन ) ॐ[1] नमोजी आद्या[2] । वेद[3]प्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या[4] । आत्मरूपा ॥ १ ॥ ( २ प्रणवरूप गणेशास नमन, २ ते २० ) देवा तूंचि गणेशु । सकलार्थमति[5]प्रकाशु । म्हणे निवृत्तिदासु[6] । अवधारिजो[7] जी ॥२॥ हें शब्दब्रह्म[8] अशेष[9] । तेचि मूर्ति सुवेष[10] । तेथ वर्णवपु[11] निर्दोष । मिरवत असे ॥ ३ ॥ स्मृति[12] तेचि अवयव । देखा आंगीक[13] भाव । तेथ लावण्याची ठेव । अर्थशोभा ॥ ४ ॥ अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें । पदपद्धती[14] खेवणें[15] । प्रमेय[16]रत्नांचीं ॥ ५ ॥ पदबंध नागर[17] । तेंचि रंगाथिलें[18] अंबर[19] । जेथ साहित्य[20] वाणें[21] सपूर । उजाळाचें[22] ६ देखा काव्यनाटका । जे निर्धारितां सकौतुका । त्याचि रुणझुणती[23] क्षुद्रघंटिका[24] । अर्थध्वनि ॥ ७ ॥ नाना प्रमेयांची परी । निपुणपणें पहातां कुसरी[25] । दिसती उचित पदें माझारीं । रत्नें भलीं ॥ ८ ॥ जेथ व्यासादिकांची मती । तेचि मेखळा मिरवती । चोखाळपणें झळकती । पल्लवसडका[26] ॥ ९ ॥ देखा षड्दर्शनें[27] म्हणिपती[28] । तेचि भुजांची आकृती । म्हणऊनि विसंवादें[29] धरिती । आयुधें हातीं ॥ १० ॥ तरी तर्कु तोचि फरशु । नीतिभेदु अंकुशु । वेदान्तु तो महारसु[30] । मोदकु मिरवे[31] ॥ ११ ॥ एके हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु[32] । तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकाचा ॥१२॥ मग सहजें सत्कारवादु[33] । तो पद्मकरु[34] वरदु । धर्मप्रतिष्ठा तो सिध्दु । अभयहस्तु ॥ १३ ॥ देखा विवेकवंतु सुविमळु[35] । तोचि शुंडादंडु सरळु । जेथ परमानंद केवळु । महासुखाचा ॥१४॥ तरी संवादु तोचि दशनु[36] । जो समता शुभ्रवर्णु । देव उन्मेष[37]सूक्ष्मेक्षणु[38] । विघ्नराजु ॥ १५ ॥ मज अवगमलिया[39] दोनी । मीमांसा[40] श्रवणस्थानीं । बोधमदामृत[41]

१ निर्गुणब्रह्म, आत्मरूप. २ उत्पत्तिरहित. ३ उपनिषदानीं वर्णन केलेला. ४ स्वतःस जाणणाऱ्या. ५ ज्ञानाचा प्रकाश. ६ निवृत्ति महाराजाचा दास ज्ञानेश्वर. ७ ऐका. ८ वेद. ९ संपूर्ण. १० उत्तम. ११ शरिराची कांति. १२ मन्वादिकांच्या स्मृति. १३ शरिराचा भाव. १४ घाट. १५ कोंदण. १६ तत्त्वार्थ. १७ उत्तम १८ रंगविलेलें १९ वस्त्र. २० अलंकार. २१ प्रकार. २२ लकलकीत. २३ वाजतात. २४ करगोट्याच्या घागऱ्या. २५ कुशलता. २६ पदराचे अग्रभाग. २७ पातंजल, सांख्य, वैशेषिक, न्याय, मीमांसा आणि वेदांत हीं सहा निदर्शनें आहेत. २८ म्हणतात. २९ मतभेद. ३० गोड व रसाळ. ३१ शोभे. ३२ तुटलेला. ३३ ब्रह्मविषयक वाद. ३४ कल्याणकारक. ३५ अति निर्मळ. ३६ दांत. ३७ ज्ञान. ३८ बारीक डोळ्याचा. ३९ वाटल्या. ४० पूर्व व उत्तर ह्या मीमांसा. यांत द्वैत व अद्वैत यांचा वादविवाद आहे. ४१ हत्तीच्या गंडस्थळांतील वाहणारा ज्ञानरूपी मद.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय पहिला

**श्रीगणेशाय नमः।**

हे निर्गुणब्रह्म आत्मरूपा, तूं सर्वांचा आदि असून तुझें वेदांनी वर्णन केलेलें आहे. व तुझ्या स्वरूपास जाणणारा तूं स्वतःच आहेस. तुला माझा नमस्कार असो; आणि तुझा जयजयकार होवो. १ श्रीनिवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात:— देवा, सकल जगाच्या बुद्धीला ज्ञानाचा प्रकाश देणारा जो गणपति, तो तूंच आहेस; (कसा म्हणाल) तर, ऐका महाराज— २ स्वर व व्यंजनें ही ज्या रूपाची सुंदर कांति आहे, तें शब्दमात्र म्हणजे संपूर्ण वेद हीच तुझी उत्तम व व्यापक गणेशमूर्ति होय; ३ असें पहा कीं, मन्वादिकांच्या स्मृति हेच त्या शरिराचे अवयव असून त्याची अंगलोट अवर्णनीय आहे; व त्यांतील अर्थ ही सौंदर्याची खाण आहे; ४ अठरा पुराणें हींच रत्नखचित भूषणें होत; व त्यांतील पदें हा त्यांचा घाट असून त्यातील गर्भित अर्थ हींच कोंदणें होत; ५ उत्तम पदरचना हेंच रंगविलेलें वस्त्र होय; व त्या पदांतील अलंकार हेच लकलकीत लांबरुंद वाण होत; ६ काव्यें आणि नाटकें पहा—त्यांची कौतुकानें योजना करूं म्हटलें, तर करगोट्याच्या घागऱ्यांच्या ठिकाणीं होते, आणि त्यांतील अर्थ हा त्या घागऱ्यांचा मंजुळ ध्वनि होतो; ७ मार्मिक दृष्टीनें पाहिलें म्हणजे, त्यांतील श्लेषाच्या पर्यायांची उत्तम स्थलें हींच कोणी ह्या घागऱ्यांमधील रत्नें शोभतात; ८ व्यासादिकांची बुद्धि हीच त्यावरील मेखलेच्या (कमरेच्या शेल्याच्या) ठिकाणी शोभते; व त्या बुद्धीचा सरळपणा मेखलेच्या पदराच्या शेंड्यांप्रमाणें झळकतो; ९ असें पहा कीं, सहा शास्त्रें हेच गणपतीचे सहा हात होत; आणि म्हणून त्यांतील भिन्नभिन्न अभिप्राय ही त्या त्या हातांतील निरनिराळीं शस्त्रें होत; १० तेव्हां तर्कशास्त्र हा फरशु, न्यायशास्त्र हा अंकुश, आणि वेदांतशास्त्र हें गोड व रसाळ मोदकाच्या ठिकाणीं शोभतें; ११ वार्तिककाराच्या व्याख्यानानें स्वभावत.च खंडित झालेलें बौद्धमत हें, एका हातांत असणाऱ्या मोडक्या दांताच्या ठिकाणी शोभतें; १२ मग, कल्याण-कारक व वरदायक असा जो हस्त, तो सत्कारवाद म्हणजे ब्रह्मविषयक वाद होय; धर्म आणि प्रतिष्ठा याची ज्यापासून स्थापना होते, तो अभयहस्त होय; १३ ज्या ठिकाणीं महासुखाचा परमानंद आहे, तो अति निर्मळ विचार हाच सरळ सोंडेचा सोट होय; १४ तसाच उत्तम संवाद हा सरळ व शुभ्र दांताचे ठिकाणीं असून ज्ञानदृष्टि म्हणजे त्या विघ्न-राजाचे सूक्ष्म नेत्र होत; १५ पूर्व व उत्तर ह्या मीमांसा मला कानांच्या ठिकाणीं भासल्या; बोधामृत हा गंडास्थलांतून निघणारा मद, व त्याचें सेवन करणारे मुनि हेच भ्रमर होत; १६

मुनी । अली[1] सेविती ॥ १६ ॥ प्रमेय[2]प्रवाल[3] सुप्रभ । द्वैताद्वैत तेचि निकुंभ[4] । सरिसेपणें एकवटती इभें[5] । मस्तकावरी ॥१७॥ उपरि दशोपनिषदें । जियें उदार[6]ज्ञानमकरंदें । तियें कुसुमें मुकुटीं सुगंधें । शोभती भाळीं ॥ १८ ॥ अकार चरण[7]युगुल । उकार उदर विशाल । मकार महामंडल । मस्तकाकारें ॥१९॥ हे तिन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळलें । तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज ॥ २० ॥ (३ सरस्वतीस नमन, २१) आतां अभिनव वाग्विलासिनी । जे चातुर्यार्थकलां[9]कामिनी । ते श्रीशारदा विश्व[10]मोहिनी । नमिली मियां ॥ २१ ॥ ( ४ नमन सद्गुरूचें, २२ ते २७ ) मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु । म्हणऊनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ॥ २२ ॥ जैसें डोळियां[11] अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे । मग वास[12] पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी[13] ॥ २३ ॥ का चिंतामणि आलिया हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं । तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेव म्हणे ॥ २४ ॥ म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होइजे । जैसें मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ॥ २५ ॥ का तीर्थें जियें त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनीं[14] । ना तरी अमृतरसास्वादनीं[15] । रस सकळ ॥ २६ ॥ तैसा पुढतपुढतीं[16] तोचि । मियां अभिवंदिलों[17] श्रीगुरुचि । जो अभिलाषित[18] मनोरुचि । पुरविता तो ॥ २७ ॥ ( ५ भारतमाहात्म्य, २८ ते ४९ ) आतां अवधारा कथा गहन । जे सकळ कौतुकां जन्मस्थान । कीं अभिनव उद्यान[19] । विवेकतरूचें ॥२८॥ ना-तरी सर्व सुखाची आदि । जे प्रमेयमहानिधि । नाना[21] नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे ॥ २९ ॥ कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ । शास्त्रजातां[22] वसौट[23] । अशेषांचें[24] ॥३०॥ ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार[25] । लावण्यरत्नभांडार । शारदेचें ॥ ३१ ॥ नाना कथारूपें भारती[26] । प्रकटली असे त्रिजगतीं । आविष्करोनि[27] महामती । व्यासाचिये ॥ ३२ ॥ म्हणोनि हा काव्यां रावो[28] । ग्रंथ गुरुवतीचा[29] ठावो । एथूनि रसां झाला आवो[30] । रसाळपणाचा ॥ ३३ ॥ तेवींचि आइका आणीक एक । एथूनि शब्दश्री[31] सच्छास्त्रिकें[32] । आणि महाबोधीं[33] कोंवळीक[34] । दुणावली ॥ ३४ ॥ एथ चातुर्य शाहणें झालें । प्रमेयें[35] रुचीस आलें । आणि सौभाग्य पोखलें[36] । सुखाचें एथ ॥ ३५ ॥ माधुर्यीं मधुरता । शृंगारीं सुरेखता ।

---

१ भ्रमर. २ गर्भितार्थ. ३ पोवळें ४ गंडस्थळ. ५ हत्ती. ६ टवटवीत. ७ दोन्ही पाय. ८ सरस्वती. ९ स्वामिणी. १० जगाला मोह घालणारी. ११ पायाळूच्या डोळ्यांत. १२ मुगावा. १३ द्रव्याचा ठेवा. १४ समुद्राच्या स्नानानें. १५ सेवनानें १६ पुनःपुनः. १७ प्रार्थिला. १८ इच्छित. १९ अपूर्व. २० बाग. २१ अथवा. २२ सर्व शास्त्रांचें. २३ स्थान, आश्रय. २४ सर्वांचें. २५ जिव्हाळा, आनंद देणारी. २६ सरस्वती. २७ प्रवेश करून. २८ राजा. २९ थोरपणाचा. ३० डौल. ३१ शास्त्रीय लक्ष्मी. ३२ शास्त्रीयपणा. ३३ आत्मबोधांत. ३४ कोमलता. ३५ तत्त्वार्थ. ३६ पुष्ट झालें.

त्यांतील प्रमेयें हींच गंडस्थळावरील पोंवळ्यांच्या ठिकाणीं असून, एकाच तात्पर्यांचे असे द्वैत व अद्वैत सिद्धांत हे गंडस्थलांच्या ऐवजी शोभतात; १७ त्या गंडस्थलावरील टवटवीत व सुगंधि पुलें म्हणजे ज्ञानमकरंदानें परिपूर्ण असलेली दशोपनिषदें होत; १८ ॐकारांतील अकार हा दोन्ही चरणांचे ठिकाणी, उकार हा विशाल उदराचे ठिकाणीं, व मकार हा सर्व अवयवांत श्रेष्ठ अशा मस्तकाचे ठिकाणी आहे; १९ अकार, उकार व मकार हे ज्या वेळेस एकत्र झाले, त्या वेळेस त्यात शब्दब्रह्माचा समावेश होऊन ॐकार हें रूप बनलें. त्या आदि-बीजाला मी श्रीगुरु निवृत्तिनाथांच्या कृपेनें नमस्कार करितों. २० आता अपूर्व अशा वाणीचे ठिकाणीं विलास करणारी, चातुर्य. अर्थ व कला यांची स्वामिणी, आणि विश्वाला मोहित करणारी अशी जी श्रीसरस्वती, तिला मी नमस्कार करितो. २१ माझ्या हृदयांत वास करणारे जे सद्गुरु त्यांच्या कृपेनें संसारमहापुरांतून मी पार पडलों; म्हणून विचारावर माझी विशेष प्रीति जडली. २२ ज्याप्रमाणें पायाळूच्या डोळ्यात अंजन घातलें म्हणजे त्याचीं दृष्टि चोहींकडे फाकून त्यास सुगावा लागेल तेथें भूमिगत द्रव्याचा ठेवा दिसूं लागतो, २३ सर्व हेतु पूर्ण होतात; त्याप्रमाणें, ज्ञानदेव म्हणतात की, श्रीगुरु निवृत्तीच्या कृपेनें माझे सर्व हेतु नेहमीं तडीस जातात. २४ म्हणून, जे शहाणे आहेत त्यांनीं श्रीगुरूची सेवा करावी, म्हणजे त्यांच्या मनांतील सर्व हेतु सिद्धीस जातील. ज्याप्रमाणें झाडाच्या मुळाशीं पाणी घातलें म्हणजे फांद्या व पानें आपोआप टवटवीत होतात, २५ किंवा त्रिभुवनात जितकीं तीर्थें आहेत तितक्या सर्वांचें श्रेय एका समुद्रांत स्नान केल्यानें येतें, अथवा अमृतरसाचें सेवन केलें असता सर्व रस सेवन केल्याप्रमाणें होतें, २६ त्याचप्रमाणें, इच्छित कामना पूर्ण करणारे जे श्रीगुरु, त्यासच मी पुन:पुन: अभिवंदन करितों. २७ आता, यापुढें, सर्व कौतुक उत्पन्न करणारी, अथवा विचाररूप वृक्षांची अपूर्व बागच अशी गहन कथा ऐका. २८ ती सर्वसुखदायक व अर्थरूपी केवळ मोठा ठेवा, अथवा नवरसानी पूर्ण असा अमृतसिंधुच आहे; २९ किंवा मोक्षाचें स्थान, अथवा सर्व विद्यांचें माहेरघर, किंबहुना तिच्या आश्रयानें सर्व शास्त्रें आहेत; ३० हें सर्व धर्मांचें माहेर, किंवा सज्जनाचा जिव्हाळा, अथवा सरस्वतीच्या लावण्यरूपी रत्नाचा ठेवाच आहे. ३१ किंवा सरस्वती ही श्रीव्यासाच्या महामतीत प्रवेश करून कथामिषानें या त्रिजगात प्रगट झाली आहे. ३२ म्हणून ही कथा सर्व काव्याचा राजा असून, ग्रंथाच्या थोरपणाचें ठिकाण आहे; व तेथून शृंगारादिक नवरसाना सरळपणाचा विशेष डौल आला. ३३ तसेंच आणखी एक गोष्ट ध्यानात ठेवा कीं, या वेळेपासूनच शब्दरूपी लक्ष्मीस शास्त्रीयपणा येऊन, आत्मबोधाच्या ठिकाणीं दुप्पट कोमलपणा आला. ३४ या कथेपासूनच चातुर्य शहाणें झालें; तत्त्वार्थाला जास्त रुचि आली; आणि सुखाच्या सौभाग्याची वृद्धि झाली. ३५ माधुर्याला मधुरपणा, शृंगाराला सुरेखपणा व योग्य वस्तूस श्रेष्ठपणा येऊन त्या सर्व उत्तम रीतीनें शोभूं लागल्या. ३६ या कथेपासूनच कलाना कौशल्य प्राप्त झालें; व पुण्याचा प्रताप

रूढपेण उचितां । दिसलें भलें ॥ ३६ ॥ एथ कळाविदपेण कळा । पुण्यासि प्रताप आगळा । म्हणऊनि जनमेजयाचे अवलीळा । दोष हरले ॥ ३७ ॥ आणि पाहतां नावेक । रंगीं सुरंगतेची आगळिक । गुणां सगुणपणाचें विक । बहुवस एथ ॥ ३८ ॥ भानुतेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळिलें । तैसें व्यासमती कवळिलें । मिरवे विश्व ॥ ३९ ॥ का सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलियापरी विस्तारलें । तैसें भारतीं सुरवाडलें । अर्थजात ॥ ४० ॥ नातरी नगरांतरीं वसिजे । तरी नागरचि होइजे । तैसें व्यासोक्तितेजें । धवळत सकळ ॥ ४१ ॥ कीं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी । प्रकटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ॥ ४२ ॥ ना तरी उद्यानीं माधवी घडे । तेथ वनशोभेची खाणी उघडे । आदिलापासोनि अपाडें । जियापरी ॥ ४३ ॥ नाना घनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण । मग अळंकारीं चरवेपण । निवाडू दावी ॥ ४४ ॥ तैसें व्यासोक्ती अळंकारिलें । आवडे तें वरवेपण पातलें । तें जाणोनि काय आश्रयिलें । इतिहासीं ॥ ४५ ॥ नाना पुरतियें प्रतिष्ठेलागीं । सानीव धरूनि आंगीं । पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता आलीं ॥ ४६ ॥ म्हणऊनि महाभारतीं नाहीं । तें नोहे लोकीं तिहीं । येणें कारणें म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्त्रय ॥ ४७ ॥ ऐसी जगीं सुरस कथा । जे जन्मभूमि परमार्था । मुनि सांगे नृपनाथा । जनमेजया ॥ ४८ ॥ जें अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरुपम । परम मंगलधाम । अवधारिजो ॥ ४९ ॥ (६ माहात्म्य-गीतेचें, ५० ते ५५) आतां भारतकमळपरागु । गीताख्य प्रसंगु । जो संवादला श्रीरंगु । अर्जुनेसीं ॥ ५० ॥ ना तरी शब्दब्रह्माब्धि । मथियला व्यासबुद्धी । निवडिलें निरवधि । नवनीत हें ॥ ५१ ॥ मग ज्ञानाग्निसंपर्कें । कडसिलें विवेकें । पद आलें परिपाकें । आमोदासी ॥ ५२ ॥ जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे संतीं । सोहंभावें पारंगतीं । रमिजे जेथ ॥ ५३ ॥ जें आकर्णिजे भक्तीं । जें आदिवंद्य तिजगतीं । तें भीष्मपर्वीं संगती । सांगिजेल ॥ ५४ ॥ जें भगवद्गीता म्हणिजे । जें ब्रह्मेशांनीं प्रशंसिजे । जे सनकादिकीं सेविजे । आदरेंसीं ॥ ५५ ॥ ( ७ श्रोतृ-प्रार्थना, ५६ ते ६९ ) जैसें शारदीचिये चंद्रकळे । मार्जी अमृतकण कोंवळे । ते वेंचिती[34] मनें मवाळें । चकोरतळेंगें ॥५६॥ तियांपरि श्रोता । अनुभवावी हे कथा । अति हळुवारण[36] चित्ता । आणुनियां ॥ ५७ ॥ हे शब्देंवीण संवादिजे[37] । इंद्रियां नेणतां

१ श्रेष्ठत्व. २ योग्य. ३ कुशलता. ४ अधिक ५ सहज. ६ सामर्थ्य. ७ पुष्कळ. ८ शोभे. ९ मुखावलें. १० ज्ञानमात्र. ११ शहाणा. १२ तारुण्यदशा. १३ शोभा. १४ स्त्री. १५ वसंत ऋतु. १६ पूर्वपिंडां. १७ विशेषतः. १८ लगट. १९ वेगळें. २० प्राप्त झालें. २१ नम्रता, लघुत्व. २२ वैशंपायन. २३ भारतरूपी कमळाचे रेणु. २४ वेदरूप समुद्र. २५ काढलें. २६ अवतार. २७ कढविलें. २८ स्वरूप. २९ पक्वतेनें. ३० चास, रुचि. ३१ ब्रह्मा आणि शंकर. ३२ शरदृतूच्या. ३३ पौर्णिमेचा चंद्र. ३४ प्राशन करितात. ३५ चकोर पक्ष्यांचीं पोरें. ३६ मऊपणा. ३७ बोलावी.

वाढला; म्हणूनच ( अठरा दिवसांत भारताचीं अठरा पर्वें ऐकल्यामुळें ) जनमेजयाचे ( ब्रह्महत्येचे ) दोष नाहींतसे झाले. ३७ आणि क्षणभर पाहूं लागलें असतां शृंगारादिक रसांस विशेष सुरेखपणा आला, व गुणाला चांगल्या गुणांचें विशेष सामर्थ्य या कथेनें आलें. ३८ ज्याप्रमाणें सूर्योदय झाल्यावर त्रैलोक्यावर उजेड पडतो, त्याप्रमाणें व्यासांच्या बुद्धींतून ही कथा निघाल्यामुळें सर्व जगावर उजेड पडून तें शोभलें. ३९ किंवा चांगल्या शेतांत बीं पेरलें असतां त्याचा जसा सहज उत्तम विस्तार होतो, तसे या भारती कथेंत सर्व विषय शोभिवंत झाले आहेत. ४० अथवा, नगरांत राहिल्यावर ज्याप्रमाणें मनुष्य शहाणा होतो, त्याप्रमाणें व्यासाच्या वाणीच्या तेजामुळें सर्व जग ज्ञानमय झालें. ४१ तसेंच तारुण्यदशेंत सौंदर्याची शोभा स्त्रियांच्या अंगीं जशी विशेष दृष्टीस पडते, ४२ किंवा ज्याप्रमाणें बागेंत वसंत ऋतु निघाल्यावर, वनशोभेची जणूं काय खाणच उघडून पहिल्यापेक्षां विशेष शोभा येते, ४३ अथवा सोन्याच्या लगडी पाहिल्या असतां दिसण्यांत साधारण दिसतात, पण त्यांचेच दागिने बनविले म्हणजे त्यांची शोभा ज्याप्रमाणें कांहीं निराळीच दिसते, ४४ त्याप्रमाणें, व्यासाच्या वाणीनें भारती कथा सांगण्याचें पतकरिलें, व तिला जशी हवी तशी शोभा आल्यामुळेंच कीं काय, इतिहासांनी आपण होऊनच त्या कथेचा आश्रय केला; ४५ किंवा पूर्ण प्रतिष्ठा प्राप्त होईल म्हणून, अंगी नम्रता धरून सर्व पुराणें आख्यानरूपानें भारतांत येऊन जगांत प्रसिद्धीस आलीं. ४६ म्हणून, भारतांत जी कथा नाहीं ती त्रैलोक्यांतही नाहीं. यावरून, सर्व जगांत ज्या कथा आहेत त्या व्यासांच्या उष्ट्या आहेत असें म्हणतात. ४७ अशी ही गोड व केवळ परमार्थाच्या उत्पत्तीचें स्थानच अशी कथा वैशंपायन हे जनमेजय राजास सांगतात. ४८ ती कथा अद्वितीय, उत्तम, पवित्र, उपमारहित आणि अतिकल्याणकारक अशी आहे; ती ऐका. ४९ आतां, भारत हें कोणी कमल, व भगवंतांनी स्वतः अर्जुनास सांगितलेला गीताविषय हाच त्यांतील पुष्परेणु होय. ५० अथवा, व्यासानी वेदरूप समुद्र बुद्धिरूप रवीनें घुसळून त्यांतून हें गीतारूप अनुपमेय नवनीत काढिलें; ५१ त्यास ज्ञानरूपी अग्नीचा विचाररूपी मंद जाळ लावून तें पुरें कढविल्यावर त्याचें सुवासिक तूप बनलें. ५२ त्याची वैराग्यवंत इच्छा करितात, संत नेहमी सेवन करितात, व ब्रह्मनिष्ठ देखील त्याच्या ठिकाणीं रममाण होतात. ५३ जें भक्तांनी ऐकण्याला योग्य व सर्व जगांत परमपूज्य आहे, जें भीष्मपर्वामध्यें सांगितलें आहे, ५४ त्याला ' भगवद्गीता ' असें म्हणतात; ब्रह्मा व शंकर हे तिची स्तुति करितात; व सनकादिक अति आदरानें तिचें सेवन करितात. ५५ ज्याप्रमाणे शरदृतूंतील पौर्णिमेच्या चांदण्याचे कोवळे कोवळे अमृत-कण चकोर पक्ष्यांची पिलें हळुवार मनानें प्राशन करितात, ५६ त्याचप्रमाणें श्रोत्यांनीं चित्ताची एकाग्रता करून या भगवद्गीतेचा अनुभव घ्यावा. ५७ या गीतेंतील कथेचा बोलल्याशिवाय विचार करावा, इंद्रियांना न कळत अनुभव घ्यावा, आणि ती ऐकण्याचे पूर्वीं तिच्यांतील रहस्य जाणून घ्यावें. ५८

भोगिजे। चोलाआदि झोंबिजे। प्रमेयासी ॥ ५८ ॥ जैसे भ्रमर पराग[1] नेती। परी कमळदळें[2] नेणती। तैसी परी[3] आहे सेवितीं। ग्रंथीं इये ॥ ५९ ॥ का आपुला ठावो न सांडितां। आलिंगिजे चंद्र प्रकटतां। हा अनुराग[4] भोगितां। कुमुदिनी[5] जाणे ॥ ६० ॥ ऐसेनि गंभीरपणें। स्थिरावलेनि अंतःकरणें। आथिला[6] तोचि जाणे। मानूं[7] इये ॥ ६१ ॥ अहो अर्जुनाचिये पांती[8]। जे परिसणया योग्य होती। तिहीं कृपा करूनि संतीं। अवधान द्यावें ॥ ६२ ॥ हें सलगी[9] म्यां म्हणितलें। चरणां लागोनि विनविलें। प्रभू सखोल हृदय आपुलें। म्हणऊनियां ॥ ६३ ॥ जैसा स्वभाव मायबापांचा। अपत्य बोले जरी बोबडी वाचा। तरी अधिक तयाचा। संतोष आथी[10] ॥ ६४ ॥ तैसा तुम्हीं मी अंगिकारिला। सज्जनीं आपुला म्हणितला। तरी उणें सहजें उपसाहला[11]। प्रार्थू काई ॥ ६५ ॥ परी अपराध तो आणीक आहे। जे मी गीतार्थ कैवळूं[12] पाहें। ते अवधारा विनवूं लाहें। म्हणऊनियां ॥ ६६ ॥ हें अनावर[13] न विचारितां। वायांचि धिंवसा[14] उपनला[15] चित्ता। येऱ्हवीं काय भानुतेजीं खद्योतीं[16]। शोभा आथी ॥ ६७ ॥ कीं टिटिभू[17] चांचूवरी[18]। माप सूये[19] सागरीं। मी नेणतु त्यापरीं। प्रवर्ते एथ ॥ ६८ ॥ आयका आकाश गिंवसावें[20]। तरी आणीक त्याहुनि थोर होआवें। म्हणऊनि अपाड[21] हें आघवें[22]। निर्धारितां ॥ ६९ ॥ ( ८ गीतेचें महत्त्व, ७० ते ७४ ) तया गीतार्थाची थोरी। स्वयें शंभू विवरी[23]। जेथ भवानी प्रश्न करी। चमत्कारोनी ॥ ७० ॥ तेथ हरु म्हणे नेणिजे। देवी जैसें का स्वरूप तुझें। तैसें हें नित्य नूतन देखिजे। गीतातत्व ॥ ७१ ॥ हा वेदार्थसागरु। जया निद्रिताचा घोरु[24]। स्वयें श्रीसर्वेश्वरु। प्रत्यक्ष अनुवादेला[25] ॥ ७२ ॥ ऐसें जें अगाध[26]। जेथ वेडावती[27] वेद। तेथ अल्प मी मतिमंद। काय होय ॥ ७३ ॥ हें अपार कैसेनि कवळावें। महातेज कवणें धवळावें[28]। गगन मुठीं सुवावें[29]। मशकें[30] केवीं ॥ ७४ ॥ ( ९ सद्गुरुकृपेनें गीतार्थप्रवृत्ति, ७५ ते ८२ ) परी एथ असे एक आधारु। तेणेंचि बोलें मी सधैरु[31]। जें सानुकूळ श्रीगुरु। ज्ञानदेव म्हणे ॥ ७५ ॥ येऱ्हवीं तरी मी मूर्खु। जरी जाहाला अविवेकु। तऱ्ही संतकृपादीपकु। सोज्वळें[32] असे ॥ ७६ ॥ लोहाचें कनक होय। हें सामर्थ्य परिसींच आहे। कीं मृतही जीवित लाहे[33]। अमृतसिद्धि ॥ ७७ ॥ जरी

१ रेणु २ कमळाच्या पाकळ्या. ३ प्रकार. ४ प्रीति. ५ चंद्रविकासिनी कमळ. ६ सुसंपन्न. ७ खुबी, रहस्य. ८ पंक्तीला. ९ लडिवाळपणानें. १० आहे. ११ क्षमा करण्याला. १२ स्पष्ट करूं. १३ आवरण्यास कठिण. १४ धैर्य. १५ उपजला. १६ काजव्याला. १७ टिटवी. १८ चोचीनें. १९ घाली. २० कवटाळावें. २१ अशक्य. २२ सर्व. २३ चर्चा करी. २४ घोरणें. २५ बोल्ला. २६ गहन. २७ स्तब्ध राहतात. २८ उजळावें. २९ घालावें, धरावें. ३० चिलटानें. ३१ धैर्यानें. ३२ लखलखीत. ३३ पावेतो.

ज्याप्रमाणें भ्रमर कमलदलाला न समजूं देता त्यातील पुष्परेणु सेवन करतात, त्याप्रमाणें हा ग्रंथ समजून घेण्याची पद्धत आहे. ५९ किंवा चंद्रप्रकाश होण्याबरोबर चंद्रविकासिनी कमलिनी उमलून आपली जागा न सोडतां ज्याप्रमाणें चंद्राला प्रीतीनें आलिंगन देण्याचें सौख्य जाणते, ६० त्याप्रमाणे, गांभीर्यानें ज्याचें मन स्थिर झालें आहे, तोच या कथेचें रहस्य जाणतो. ६१ अहो, अर्जुनाच्या योग्यतेचे जे श्रवण करणारे असतील, त्या संतांनी कृपा करून इकडे लक्ष द्यावें. ६२ प्रभो, आपलें हृदय फार गंभीर आहे, म्हणून माझी आपल्या चरणापाशी लडिवाळपणानें ही विनंति आहे. ६३ ज्याप्रमाणें आपलें मूल बोबडें बोललें तरी आईबापांना त्याचा स्वभावतःच अधिक संतोष वाटतो, ६४ त्याप्रमाणें माझा तुम्ही सज्जनांनी अंगिकार केला असून, ज्या अर्थी मला आपला म्हटलें आहे, त्या अर्थी माझें जें कांही उणें असेल तें तुम्ही सहज सहन कराल! त्याबद्दल म्हणजे मला आपली प्रार्थना केली पाहिजे असें नाहीं! ६५ परंतु जो अपराध म्हणून माझ्या हातून घडत आहे, तो निराळाच आहे; तो— गीतेचा अर्थ मी स्पष्ट करूं पहात आहे, आणि इकडे लक्ष द्या अशी तुम्हांला विनंती करीत आहे—हा होय. ६६ हें गीतार्थाचें काम फार कठिण आहे. याचा विचार मनात न करतां तो स्पष्ट करण्याविषयी माझ्या चित्तांत व्यर्थ धैर्य उत्पन्न झालें आहे; बाकी सूर्याच्या तेजापुढें काजव्याचें तेज काय पडणार? ६७ (आपली पिलें समुद्रांत पडली असता त्याना काढण्याकरिता) ज्याप्रमाणें समुद्र कोरडा करण्यासाठी टिटवीनें आपल्या चोचीनें पाणी उपसण्याचा प्रयत्न केला, त्याप्रमाणें मी अज्ञानी, गीतेचा अर्थ करण्याकरिता प्रवृत्त झालों आहें. ६८ असें पहा, आकाशाचें आकलन करावयाचें म्हटलें म्हणजे ज्याप्रमाणें त्याहून मोठें झालें पाहिजे, त्याचप्रमाणें वास्तविक पाहता माझें हें कृत्य अवघड आहे. ६९ या गीतार्थाची थोरवी एवढी आहे की, स्वतः शंकर त्याची चर्चा करीत असता भवानीला चमत्कार वाटून तिनें शंकराला प्रश्न केला ७० असता शंकर म्हणाले, "हे मायादेवी, तुझ्या स्वरूपाचा जसा अंत लागत नाही, त्याप्रमाणें, ह्या गीतातत्वापासून नित्य नवा आनंद प्राप्त होत असल्यामुळें त्याचाही पार लागत नाही. ७१ ज्या सर्वेश्वराच्या केवळ (योगनिद्रेतील) घोरण्यापासून वेद उत्पन्न झाले, त्या जगदीश्वरानें हें गीताशास्त्र जागृदवस्थेमध्यें स्वतः (अर्जुनाला) सांगितलें." ७२ असें हें गीताशास्त्र गहन असून याच्या ठिकाणी वेदाची देखील मति गुंग होऊन गेली; तेव्हा अशा ठिकाणी अल्प व मतिमंद असा जो मी त्या माझी काय कथा? ७३ हे अपार गीतातत्व कोणत्या उपायानें समजून घ्यावें? सूर्याच्या तेजाला कोणी उजळा द्यावा? व चिलटानें आपल्या मुठीत आकाश कसें धरावें? ७४ परंतु, ज्ञानदेव म्हणतात, ज्या अर्थी श्रीगुरु मला अनुकूल आहेत, त्या अर्थी एवढें महत्कृत्य करण्याला त्याचाच एक आधार आहे, व याचमुळें मला धीर आला आहे. ७५ एरवीं मी खरोखर मूर्ख असून अविचाराचीच गोष्ट करीत आहें; तथापि तुम्हा संताचा कृपादीप लखलखीत आहे हें मी माझें भाग्य समजतों. ७६ परिसाच्या सामर्थ्यानें लोखंडाचें सोनें होतें; किंवा मेलेल्या मनुष्यास अमृत पाजिलें असता तो जिवंत

प्रगटे सिद्ध सरस्वती । तऱ्ही मुकेया आथी भारती । एथ वस्तुसामर्थ्यशक्ती । नवल कायी ॥ ७८ ॥ का जयातें कामधेनु माय । तयासी अप्राप्य कांहीं आहे । म्हणऊनि मी प्रवर्तो लाहे । ग्रंथीं इये ॥ ७९ ॥ तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें । करूनि घ्यावें हें तुमतें । विनवीत असें ॥ ८० ॥ आंतां देइजे अवधान । तुम्हीं बोलविला मी बोलेन । जैसें चेष्टे[4] सूत्राधीन । दारुयंत्र ॥ ८१ ॥ तैसा मी अनुग्रहीतु । साधूंचा निरूपितु । ते आपला अलंकारितु । भलतयापरी ॥ ८२ ॥ ( १० सदगुरूंचा आशीर्वाद, ८३ ) तंव श्रीगुरु म्हणती राही । हें तुज बोलावें नलगे कांहीं । आतां ग्रंथा चित्त देईं । झडकरी वेगें ॥ ८३ ॥ ( ११ श्रोतृप्रार्थना, ८४ ) या बोला निवृत्तिदासु । पावूनि परम उल्हासु । म्हणे परिसा मना अवकाशु । देऊनियां ॥ ८४ ॥

धृतराष्ट्र उवाच:—

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः । मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥**

अन्वय-( हे ) संजय ! धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे युयुत्सवः समवेताः मामकाः पांडवाः च एव किम् अकुर्वत ॥ १ ॥

( १२ धृतराष्ट्रप्रश्न, ८५ ते ८७ ) तरी पुत्रस्नेहें मोहितु । धृतराष्ट्र असे पुसतु । म्हणे संजया सांगे मातु । कुरुक्षेत्रींची ॥ ८५ ॥ जें धर्मालय म्हणिजे । तेथ पांडव आणि माझे । गेले असती व्याजें । झुंझाचेनि ॥ ८६ ॥ तरी तिहीं येतुलें अवसरीं । काय किजत असे येरयेरीं । तें झडकरी कथन करी । मजप्रती ॥ ८७ ॥

संजय उवाच—

**दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा । आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥**
**पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् । व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥३॥**

अन्वय—तदा व्यूढं पांडवानीकं दृष्ट्वा तु राजा दुर्योधनः आचार्यम् उपसंगम्य वचनं अब्रवीत् ॥ २ ॥ ( हे ) आचार्य, तव श्रीमता शिष्येण द्रुपदपुत्रेण व्यूढां एतां पांडुपुत्राणाम् महतीं चमूं पश्य ॥ ३ ॥

( १३ संजयाचें उत्तर, ८८ ते ९१ ) तिये वेळीं तो संजय बोले । म्हणे पांडवसैन्य उचंललें । जैसें महाप्रळयीं पसरलें । कृतांतमुख ॥ ८८ ॥ तैसें तें घनदाट । उठावलें एकवाट । जैसें उसळलें कालकूट । धरी कवण ॥ ८९ ॥ नातरी वडवानल सादुकला[12] । प्रलयवातें पोखला । सागर शोषूनि उधवला[13] । अंबरासी ॥ ९० ॥ तैसें दळ दुर्धर । नानाव्यूहीं परिकर । अवगमलें भयासुर । तिये काळीं ॥ ९१ ॥ ( १४ पांडवसेनेची अवहेलना, ९२ ) तें देखोनि दुर्योधनें । अव्हेरिलें कवणे मानें ।

१ मुक्याला. २ वाणी. ३ सोडून द्या. ४ नाचे. ५ सुताच्या योगानें. ६ कळसूत्री लांकडी बाहुली. ७ स्वस्थपणा. ८ निमित्तानें. ९ युद्धाच्या. १० इतका. ११ खवळलें. १२ भडकला. १३ प्रदीप्त झाला.

होतो; ७७ अथवा सरस्वतीच प्रसन्न झाली तर मुक्याला देखील वाचा फुटते; तेव्हां यांत नवल नसून हें केवळ वस्तुमाहात्म्य आहे. ७८ कामधेनुच ज्याची आई, त्याला दुर्लभ असें काय आहे ? म्हणून मी हा ग्रंथ करण्यास प्रवृत्त झालों; ७९ तरी कमी असेल तर सोडून द्यां, एवढी माझी आपणांस विनंती आहे. ८० महाराज, आतां आपण इकडे लक्ष द्यावें; कारण, जर आपण मला बोलण्याची शक्ति दिली, तर मी बोलेन. ज्याप्रमाणें कळसूत्री लांकडाची बाहुली दोऱ्याचे आधारानें नाचते, ८१ त्याप्रमाणें मी तुमच्या कृपेंतला असून आज्ञाधारक आहे; तर, हे साधो, तुम्ही मला आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल तसा नटवा. ८२ तेव्हां श्रीगुरु म्हणतात: " हें तूं आम्हाला सांगावेंस असें नाहीं; आतां या गोष्टी बाजूस ठेवून गीतार्थ सांगण्याकडे लक्ष दे. " ८३ हें श्रीगुरूंचें भाषण ऐकून निवृत्तिदास ज्ञानदेव मनांत अतिसंतुष्ट होऊन म्हणतात कीं, मी बोलतों तें स्वस्थ मनानें ऐका. ८४

धृतराष्ट्र म्हणालाः—

संजया, धर्माचें ठिकाण जें कुरुक्षेत्र, तेथें युद्धाच्या इच्छेनें एके ठिकाणीं जमलेल्या माझ्या व पंडूच्या मुलांनीं काय केलें ? ॥ १ ॥

पुत्राच्या प्रेमानें मोहित झालेला धृतराष्ट्र राजा संजयास म्हणाला, " संजया, कुरुक्षेत्राची काय हकीगत आहे ती मला सांग. ८५ ज्या कुरुक्षेत्राला धर्माचें ठिकाण असें म्हणतात, तेथें माझे व पंडूचे पुत्र युद्ध करण्याच्या निमित्तानें गेले आहेत. ८६ तर ते परस्परांत एवढा वेळपर्यंत काय करीत आहेत तें मला लवकर सांग. " ८७

संजय म्हणालाः—

पांडवसैन्याची व्यूहरचना पाहिली, तेव्हां दुर्योधन राजा द्रोणाचार्यांजवळ जाऊन त्यास म्हणाला, ॥ २ ॥ " अहो गुरुमहाराज, आपला बुद्धिमान शिष्य जो द्रुपदाचा मुलगा धृष्टद्युम्न, त्यानें या पांडवांच्या प्रचंड सेनेची केलेली व्यूहरचना पहा. ॥ ३ ॥

तेव्हां संजय म्हणाला:—ज्याप्रमाणें महाप्रलयाचे वेळीं काळाचें तोंड पसरलेलें असतें, त्याप्रमाणें पांडवांचें सैन्य खवळलें. ८८ अशा प्रकारें सर्व पांडवसैन्य एकदम तयार झालें, तेव्हां त्याला कोण आवरणार ? ज्याप्रमाणें काळकूट विष उसळलें असतां त्याचें शमन कोणाच्यानें करवत नाहीं, ८९ किंवा वडवानल पेटून तो प्रलयवातानें भडकल्यावर ज्याप्रमाणें समुद्रांतील पाण्याचें शोषण करून आकाशापर्यंत प्रदीप्त होतो, ९० त्याप्रमाणें पांडवांचें भयंकर सैन्य नानाप्रकारच्या व्यूहरचनेनें तयार केलेलें असल्यामुळें त्या वेळेस अति भेसूर असें दिसलें. ९१ ( परंतु ) ज्याप्रमाणें हत्तीचे कळप

जैसें न गणिजे पंचाननें । गंजघटांतें ॥ ९२ ॥ ( १५ पांडवसेनेचें वर्णन, ९३ ते १०२) मग द्रोणापासीं आला । तयातें म्हणे हा देखिला । कैसा दळभार उचलला । पांडवांचा ॥ ९३ ॥ गिरिदुर्ग जैसे चालते । तैसे विविध व्यूह सभंवते । रचिले आथी बुद्धिमंतें । द्रुपदकुमरें ॥ ९४ ॥ जो का तुम्हीं शिक्षापिला । विद्या देऊनि कुरुठा केला । तेणें हा सैन्यसिंधु पाखरिला । देखदेख ॥ ९५ ॥

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि । युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥

अन्वय—अत्र महेष्वासाः युधि भीमार्जुनसमाः शूराः युयुधानः विराटः द्रुपदः महारथः ॥ ४ ॥

आणीकही असाधारण । जे शस्त्रास्त्रीं प्रवीण । क्षात्रधर्मीं निपुण । वीर आहाती ॥ ९६ ॥ जे बळें प्रौढी पौरुखें । भीमार्जुनांसारिखे । ते सांगेन कौतुकें । प्रसंगेंचि ॥ ९७ ॥ एथ युयुधान सुभटु । आला असे विराटु । महारथी श्रेष्ठु । द्रुपद वीर ॥ ९८ ॥

धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् । पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥
युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् । सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥६॥

अन्वय—धृष्टकेतुः चेकितानः च वीर्यवान् काशिराजः पुरुजित् च कुंतिभोजः च नरपुंगवः शैब्यः च विक्रांतः युधामन्युः च वीर्यवान् उत्तमौजाः सौभद्रः च द्रौपदेयाः एवं सर्वे महारथाः (सन्ति)

चेकितान धृष्टकेतु । काशिराज वीर विक्रांतु । उत्तमौजा नृपनाथु । शैब्य देख ॥ ९९ ॥ हा कुंतिभोज पाहे । एथ युधामन्यु आला आहे । आणि पुरुजितादि राय हे । सकळ देख ॥ १०० ॥ हा सुभद्राहृदयनंदनु । जो अपर नवार्जुनु । तो अभिमन्यु म्हणे दुर्योधनु । देखे द्रोणा ॥ १ ॥ आणीकही द्रौपदीकुमर । हे सकळही महारथी वीर । मिती[13] नेणिजे परी अपार । मीनले असती ॥ २ ॥

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम । नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते॥७
भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः । अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥

अन्वय—हे द्विजोत्तम ! अस्माकं तु ये विशिष्टाः मम सैन्यस्य नायकाः तान् निबोध, तान् ते संज्ञार्थं ब्रवीमि ॥ ७ ॥ भवान् भीष्मश्च कर्णश्च समितिंजयः कृपः च अश्वत्थामा विकर्णः तथैव च सौमदत्तिः ॥ ८ ॥

( १६ कौरवसेनेचें वर्णन, १०३ ते १०९ ) आतां आमुच्या दळीं नायक । जे रूढे वीर मैनिक । ते प्रसंगें आइक । सांगिजती ॥ ३ ॥ उद्देशें एक दोनी । जायिजती बोलेनी । तुम्हीं आदिकरूनी । मुख्य जे जे ॥ ४ ॥ हा भीष्म गंगानंदनु । जो प्रतापतेजस्वी भानु । रिपुगजपंचाननु । कर्ण वीर ॥ ५ ॥ या एके-

१ सिंहानें. २ हत्तींच्या कळपाना. ३ डोंगरी किल्ले. ४ सैन्यरचना. ५ धृष्टद्युम्नानें. ६ पढविला. ७ धर. ८ महान. ९ पुरुषार्थानें. १० महायोद्धा. ११ पराक्रमी. १२ दुसरा अर्जुनच कीं काय. १३ गणती. १४ जमले. १५ मुख्य. १६ माहितीकारिता. १७ शत्रुरूपी हत्तीचा सिंह.

पाहून सिंह त्याना क पदार्थ मानतो, त्याप्रमाणें दुर्योधनानें पांडवाचें तें सैन्य पाहून त्यास य कश्चित् मानलें. ९२ मग द्रोणाचार्यांजवळ येऊन त्यास म्हणाला, पाडवाचें हें सैन्य कसे उसळले आहे पाहिलेंना ? ९३ बुद्धिमान् असा जो द्रुपदपुत्र धृष्टद्युम्न, त्यानें त्या सैन्याची अशी चमत्कारिक रचना केली आहे की, ते चालत्या डोंगरी किल्ल्याप्रमाणेंच दिसत आहे. ९४ ज्या धृष्टद्युम्नाला तुम्ही पढवून विद्येचें आगर केलें, त्याने हा सेनासमुद्र चहूंकडे पसरविला आहे तो पहा. ९५

" या ठिकाणीं, मोठीं धनुष्यें धारण करणारे आणि युद्धामध्यें भीमार्जुनासारखे पराक्रमी असे युयुधान, विराट आणि द्रुपद हे महारथी आहेत. ॥४॥

" याशिवाय आणखी शस्त्रास्त्रात प्रवीण व क्षत्रधर्मात निपुण असे महान महान योद्धे आहेत. ९६ हे बलानें, योग्यतेनें व पुरुषार्थानें भीमार्जुनासारखे आहेत, याचें सहज प्रसंगानुसार वर्णन करतों. ९७ या ठिकाणी महायोद्धा युयुधान राजा आणि श्रेष्ठ महारथी द्रुपद राजा हे आले आहेत. ९८

" धृष्टकेतु, चेकितान, पराक्रमी काशिराजा, पुरुजित्, कुंतिभोज व नरश्रेष्ठ शैब्य, ॥ ५ ॥ शूर युधामन्यु, पराक्रमी उत्तमौजा, सुभद्रेचा मुलगा अभिमन्यु व द्रौपदीचे मुलगे हे सर्व महारथी आहेत. ॥ ६ ॥

" चेकितान, धृष्टकेतु, पराक्रमी असा काशिराजा, नृपश्रेष्ठ उत्तमौजा व शैब्य राजा याजकडे पहा. ९९ हा कुंतिभोज पहा, तसाच येथे हा युधामन्यु आलेला आहे, आणि पुरुजित् आदिकरून सर्व राजे आले आहेत ते पहा." १०० दुर्योधन म्हणतो —अहो द्रोणाचार्य, हा पहा सुभद्रेच्या अंत करणाला आल्हाद देणारा तिचा मुलगा प्रतिअर्जुन असा अभिमन्यु. १ तसेंच आणखी हे द्रौपदीचे मुलगे व सर्व महारथी—ज्यांची गणती करिता येत नाहीं असे अपरिमित वीर या ठिकाणी जमले आहेत. २

" अहो द्विजश्रेष्ठ, आता, आमच्या सैन्यातील जे मुख्य मुख्य सेनापति आहेत, त्याचीं नावें आपल्यास माहितीकरिता सागतो, श्रवण करा. ७ आपण स्वतः, भीष्माचार्य, कर्ण, सदा विजयी असे कृपाचार्य, अश्वत्थामा, विकर्ण व त्याचप्रमाणें सौमदत्ति ( भूरिश्रवा ) ॥ ८ ॥

" आतां, आमच्या सैन्यात प्रमुख असे महावीर कोणकोण आहेत ते प्रसंगानुरोधानें सागतो ऐका. ३ आपण व इतर वीर जे आहेत, त्यापैकीं दिग्दर्शनाकरिता मुख्यमुख्यांचीं नावे सागतों, ऐका. ४ शौर्यानें व बलानें केवळ सूर्यच असे हे *गंगानंदन* भीष्माचार्य, शत्रुरूपी हत्तीला केवळ सिंहासारखा भासणारा असा हा पराक्रमी कर्ण, ५ या एकेकाच्या नुसते मनांत आले तर त्या विश्वाचा संहार होईल. फार कशाला ? हे एकटे

काचोनि मनोव्यापारें । हें विश्व होय संहरे । हा कृपाचार्य न पुरे । एकलाचि ॥६॥ एथ विकर्ण वीर आहे । हा अश्वत्थामा पैल पाहे । याचा अंडदरु सदा वाहे । कृतांत मनीं ॥ ७ ॥ सामितिंजयो सौमदत्ति ।

अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः । नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥

अन्वय—अन्ये च मदर्थे त्यक्तजीविताः नानाशस्त्रप्रहरणाः बहवः शूराः ( संति ये ) सर्वे युद्धविशारदाः ( संति ) ॥ ९ ॥

ऐसे आणीकही बहुत आहाती । जयांचिया बळा मिती । धाताही नेणे ॥ ८ ॥ जे शस्त्रविद्यापारंगत । मंत्रावतार मूर्त । हो का जें अस्त्रजात । एथूनि रूढ ॥ ९ ॥ हे अप्रतिमल्ल जगीं । पुरता प्रताप अंगीं । परी सर्व प्राणें मजचिलागीं । आराइले असती ॥ ११० ॥ पतिव्रतेचें हृदय जैसें । पतीवांचूनि न स्पर्शे । मी सर्वस्व यां तैसें । सुभटांसी ॥ ११ ॥ आमुचिया काजाचेनि पाडें । देखती आपुलें जीवित्व थोकडें । ऐसे निरवधि चोखडे । स्वामिभक्त ॥ १२ ॥ झुंजती कुळकरणी जाणती । कळें कीर्तीसी जिती[14] । हें बहु असो क्षात्रनीती । एथोनियां ॥ १३ ॥ ऐसे सर्वांपरी पुरते । वीर दळीं आसुतें । आतां काय गणूं यांतें । अपार हे ॥ १४ ॥

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम्। पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम्॥१०॥

अन्वय—तत् अस्माकं भीष्माभिरक्षितं बलं अपर्याप्तं, एतेषां तु भीमाभिरक्षितं इदं बलं पर्याप्तम् ॥ १० ॥

वरी क्षत्रियांमाजी श्रेष्ठु । जो जगजेठी जगीं सुभटु । तया दळवैपणाचा पाटु । भीष्मासि पैं ॥ १५ ॥ आतां याचेनि बळें गेंवसलें । हें[20] दुर्ग जैसे पैन्नासिले । येणें पाडें थेंकुलें । लोकत्रय ॥ १६ ॥ आधींच समुद्र पाहीं । तेथ दुवाडपण कवणा नाहीं । मग वडवानळ तैसेयाही । विरजा जैसा ॥ १७ ॥ ना तरी प्रलयवन्हि महावातु । या दोघां जैसा सांधीतु । तैसा हा गंगासुतु । सेनापति ॥ १८ ॥ आतां येणेंसी कवण भिडे[26] । हें पांडवसैन्य कीर[27] थोकडें । वरचिलेनि पाडें । दिसत असे ॥ १९ ॥ ( १७ भीमसेन पांडवांचा सेनापति, १२० ) वरी भीमसेनु वेंधु । तो जाहला असे सेनानाथु । ऐसें बोलोनियां मंतु । सांडिली तेणें ॥ १२० ॥

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः । भीष्ममेवाभिरक्षंतु भवंतः सर्व एव हि ॥ ११ ॥

अन्वय— च सर्वेषु अयनेषु यथाभागं अवस्थिताः भवंतः सर्वे एवहि भीष्ममेव अभिरक्षंतु ॥ ११ ॥

( १८ भीष्माचार्यास सेनापतित्व, १२१ ते १२४ ) मग पुनरपि काय बोले ।

---

१ धाक. २ साक्षात्. ३ यच्चयावत् अस्त्रें. ४ प्रचलित. ५ बिनजोड. ६ अनुसरले. ७ कार्याच्या. ८ योग्यतेनें. ९ कमी. १० निःसीम. ११ उत्तम. १२ चातुर्य. १३ कौशल्य. १४ जिंकिलात. १५ पराक्रमी. १६ आमच्या. १७ सेनापतीचा. १८ अधिकार. १९ आच्छादिलें. २० सेनाचक्र. २१ रचिलें. २२ अल्प. २३ दुस्तरता. २४ साहाकर्ता. २५ संयोग. २६ झगडे. २७ खरोखर. २८ आतां सांगितलेल्या आमच्या सैन्याच्या तुलनेनें. २९ दांडगा. ३० बोलणें.

कृपाचार्य देखील या कृत्याला पुरे नाहीत का ? ६ हा या ठिकाणी विकर्ण वीर आहे. तसाच तो पलीकडे अश्वत्थामा पहा; प्रत्यक्ष कृतांताला देखील त्याची भीति वाटते ! ७ युद्धामध्यें सदैव विजयी असणारा हा सौमदत्ति ( भूरिश्रवा );

" आणखीही पुष्कळ वीर माझ्याकरितां जिवावर उदार झालेले आहेत. ते सर्व नानाप्रकारचीं शस्त्रास्त्रें धारण करणारे व युद्धविद्येंत कुशल असे आहेत. ॥ ९ ॥

" त्याचप्रमाणें, ज्यांच्या शौर्याचा अंत प्रत्यक्ष ब्रह्मदेवालाही लागत नाही असे आणखी किती तरी वीर आहेत, ८ की जे शस्त्रविद्येंत निपुण असून, अस्त्रविद्येचे तर साक्षात् अवतार आहेत; फार कशाला ? यांच्यापासून अस्त्रविद्या जगांत इतकी प्रसिद्धीस आली ! ९ हे जरी अतिबलवान आहेत, व जगांत जरी यांच्या तोडीचे दुसरे योद्धे नाहीत, तरीही त्यानीं जिवाभावानें माझाच पक्ष स्वीकारला आहे. १० ज्याप्रमाणें पतिव्रता स्त्रीचें मन केवळ पतीच्या ठिकाणीच असतें, त्याप्रमाणें या सर्व वीरांचें मन माझ्या ठिकाणीच आहे. ११ हे इतके निस्सीम स्वामिभक्त आहेत कीं, आमच्या कामापुढें ते आपले प्राणही कमी योग्यतेचे समजतात १२ हे युद्धकलेमध्यें निष्णात असून युद्धकौशल्यानें कीर्तीस जिंकणारे आहेत. फार काय सांगावें ? क्षत्रियाचा धर्म यांच्यापासूनच प्रसिद्धीस आला ! १३ याप्रमाणें आमच्या सैन्यात सर्वतोपरी पराक्रमी असे अपार वीर आहेत;—त्यांची गणना करतां येत नाही. १४

" भीष्माचार्यांनीं रक्षण केलेलें आमचें सैन्य अपरिमित आहे, आणि भीमानें रक्षण केलेलें पांडवाचें सैन्य कमी आहे ॥ १० ॥

" तशांत, सर्व क्षत्रियांमध्यें श्रेष्ठ आणि जगांतील सर्व योद्ध्यांमध्यें प्रतापी असे जे भीष्माचार्य, त्यांच्याकडे या सर्व सैन्याचें आधिपत्य दिलेलें आहे. १५ त्यांनीं हें सर्व आवरून अशा बेतानें रचिलें आहे की, जणूं काय हे किल्लेच बांधले आहेत; याच्यापुढें त्रिभुवन देखील तुच्छ आहे. १६ समुद्र पाहता आधींच तो कोणाला दुस्तर नाहीं ? मग त्याला जसें वडवानलानें साहाय्य करावें, १७ किंवा प्रलयकालच्या अग्नीला महावाताचें साहाय्य मिळून त्या उभयताचा जसा संयोग व्हावा, तसें आमच्या या सैन्यास भीष्माचार्यांचें साहाय्य असून, त्यांतही त्यास सेनापतीचा अधिकार मिळालेला आहे; १८ तेव्हां या आमच्या सैन्याबरोबर कोण युद्ध करील ? कारण, आतां सांगितलेल्या या आमच्या सैन्यापुढें हें पांडवाचें सैन्य खरोखर अगदीं तुच्छ आहे; १९ आणि त्यांतूनही दांडग्या भीमसेनानें याचें आधिपत्य स्वीकारिलें आहे. " इतकें बोलून तो स्तब्ध राहिला. १२०

" नेमून दिलेल्या जागेंत तुम्हीं सर्वांनीं आपआपल्या स्थानीं उभे राहून भीष्माचार्यांचेंच सर्व प्रकारें रक्षण करावें " ॥ ११ ॥

सकळ सैनिकांतें म्हणितलें । आतां दळभार आपुलाले । सं[1]रसे करा ॥ २१ ॥ जया जिया अ[2]क्षौहिणी । तेणें तिया आ[3]यणी । वरगं[4]ण कवणकवणी । महारथीया ॥ २२ ॥ तेणें तिया आवरिजे[5] । भीष्मातळीं राहिजे । द्रोणातें म्हणे पा[6]हिजे । तुम्हीं सकळ ॥ २३ ॥ हाचि एक रक्षावा । मी तैसा हा देखावा । येणें दळभार आघवा । सौं[7]च आमुचा ॥ २४ ॥

तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥

अन्वय—तस्य ( दुर्योधनस्य ) हर्षं संजनयन् प्रतापवान् कुरुवृद्धः पितामहः सिंहनादं विनद्य उच्चैः शंखं दध्मौ ॥ १२ ॥

( १९ भीष्माचार्य यांचे शंखवादन व सैनिकास आज्ञा, १२५ ते १३७) या राजाचिया बोला । सेनापति संतोषला । मग तेणें केला । सिंहनादु ॥ २५ ॥ तो गाजत असे अद्भुतु । दोन्ही सैन्याआंतु । प्रतिध्वनि न समातु । उपजत असे ॥ २६ ॥ तयाचि तुलंगासवें । वीरवृत्तीचेनि थांवें । दिव्य शंख भीष्मदेवें । आस्फुरिला ॥ २७ ॥ ते दोन्ही नाद मीनले । तेथ त्रैलोक्य बधिरीभूत जाहले । जैसें आकाश का पडिलें । तुटोनियां ॥ २८ ॥ घडघडीत अंबर । उचंबळत सागर । क्षोभलें चराचर । कांपत असे ॥ २९ ॥ तेणें महाघोषगजरें । दुमदुमिताती गिरिकंदरें[12] । तंव दळामाजि र[13]णतुरें । आस्फुरिलीं ॥ १३० ॥

ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः । सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥१३॥

अन्वय—ततः ( सैनिकैः ) शंखाः च भेर्यः च पणवानकगोमुखाः सहसा एव अभ्यहन्यत सः शब्दः तुमुलः अभवत् ॥ १३ ॥

उदंड सैं[14]घे वाजतें । भयानकें खा[15]खोतें । महाप्रळय जेथें । धो[16]कंडांसी ॥३१॥ भेरी[17] निशाण मांदळ । शंख काहळा[18] भोग[19]ळ । आणि भयासुर रणकोल्हाळ । सुभटांचे ॥ ३२ ॥ आवेशें भुजा त्रा[20]हाटिती[21] । विसं[22]गेले हांका देती । जेथ महामद भद्र[23]जाती । आवरती ना ॥ ३३ ॥ तेथ भेडां[24]ची कवण मातु । कांचें[25]या केर[26] फिटतु[27] । जेणें दचकला कृतांतु । आंग नेघे ॥ ३४ ॥ एकां उभे[28]यांचि प्राण गेले । बें[29]गांचे दांत बैसले । विरु[30]दाचे दाटुले । हिंवं[31]ताती ॥ ३५ ॥ ऐसा अद्भुत तूर[32]बंबाळ । ऐकोनि ब्रह्मा व्याकुळ । देव म्हणती प्रळयकाळ । वोढवला आजी ॥ ३६ ॥

---

१ एकत्र, सज्ज. २ रथ २१८७०, तितकेच हत्ती, हत्तींच्या तिप्पट घोडे, आणि पाचपट पायदळ. ३ अघाडी. ४ वाटणी. ५ जवळ, आश्रित. ६ व्यवस्था ठेवावी. ७ खरा, भिस्त. ८ मावत नाहीं. ९ प्रतिध्वनि. १० बळानें. ११ वाजविला. १२ पर्वताच्या गुहा. १३ रणवाद्यें. १४ बहुत प्रकारचीं वाद्यें. १५ कर्कश. १६ अन्वानास. १७ नौबद. १८ रणवाद्य. १९ झांजा. २० तुतारी. २१ थोपटणें. २२ आवेशानें. २३ हत्ती. २४ भित्र्याची. २५ अधीर. २६ कसट. २७ उडाले. २८ उभे असताना. २९ धैर्यवानाचे. ३० पूर्वी युद्धांत जय मिळविलेले वीर. ३१ कापूं लागले. ३२ वाद्यध्वनि.

मग फिरून सर्व सेनापतींस म्हणाला:—अहो, आतां आपापलें सैन्य सज्ज करा. २१ ज्यांच्या ताब्यांत अक्षौहिणी सैन्य असेल, त्यांनीं आपापल्या सैन्याच्या आघाडीस जाऊन उभें रहावें; जे महारथी आहेत, त्यांनीं आपापलें सैन्य वाटून घ्यावें; २२ आणि सर्वजणांनी भीष्माचार्यांच्या आज्ञेंत रहावें. नंतर तो द्रोणाचार्यांस म्हणाला, " तुम्हीं सर्व सैन्यावर देखरेख ठेवावी, २३ आणि भीष्मांस मजप्रमाणेंच समजून त्याचें रक्षण करावें; कारण, आमच्या सर्व सैन्याची भिस्त त्यांच्यावरच आहे. " २४

मग दुर्योधनाचे मनास हर्ष उत्पन्न करण्याकरता कुरुकुलातील वृद्ध आणि महाप्रतापी पितामह भीष्माचार्य यांनीं सिंहाप्रमाणें गर्जना करून मोठ्यानें शंख वाजविला ॥ १२ ॥

राजा दुर्योधनाचें हें भाषण ऐकून भीष्मांस फार संतोष झाला, आणि त्यांनी सिंहनाद केला. २५ तो नाद दोन्ही सैन्यात दुमदुमून गेला; इतका की, त्याचा प्रतिध्वनि आकाशांत देखील मावेना. २६ तो प्रतिध्वनि होत आहे, तोंच वीरवृत्तीच्या बळानें भीष्मांनी आपला दिव्य शंख वाजविला. २७ ते दोन्ही नाद एकत्र झाले तेव्हा आकाश कडकडून पडावें तसा भास झाला, आणि त्रैलोक्यांतील जीवांच्या कानठळ्या बसल्या! २८ त्या वेळी आकाश कडाडलें; समुद्र उसळले; हें स्थावरजंगम विश्व घाबरून जाऊन थरथर कांपूं लागलें; २९ आणि त्या महानादाच्या योगानें पर्वताच्या गुहांमधून देखील प्रतिध्वनि उठले. तों त्या सैन्यात रणवाद्यें वाजूं लागली. १३०

नंतर इतर योद्धयानीं शंख, नौबदी, डंके, मृदंग व गोमुख या नावाचीं रणवाद्यें एकदम वाजविली. त्यापासून मोठा नाद उत्पन्न झाला ॥ १३ ॥

त्या नानाप्रकारच्या रणवाद्याचा ध्वनि इतका कर्कश आणि भयंकर होता की, बलवंतांना देखील तो महाप्रलय वाटला! ३१ नौबद भेरी, निशाण, मांदळ ( एक प्रकारचें रणवाद्य ), शंख, झांज, तुतारी इत्यादि अनेक रणवाद्यांचा गजर, आणि वीराचा युद्धसंबंधीं रणकल्लोळ सुरू झाला. ३२ कोणी आवेशानें दंड ठोकूं लागले, कोणी एकमेकांचीं नांवें घेऊन मोठमोठ्यानें हाका मारूं लागले, आणि हत्ती बेफाम होऊन आवरतनासे झाले. ३३ त्या ठिकाणीं भित्र्याची गोष्ट कशाला विचारावी? ते तर कस्पटाप्रमाणें उडून गेलेच; पण यमास सुद्धां दहशत बसून तो इकडे तोंड देखील करीनासा झाला! ३४ कित्येकांचे उभ्या उभ्याच जीव गेले; जे साधारण धैर्यवान होते, त्यांची दांतखिळी बसली; आणि जे नांवाजित योद्धे होते, त्यांच्या अंगास कांपरें सुटलें! ३५ अशा प्रकारचा तो भयंकर वाद्यध्वनि ऐकून ब्रह्मदेव देखील व्याकुळ झाला; आणि इंद्रादि देव तर, 'आज हा प्रलयकाळच ओढवला कीं काय' असें म्हणूं लागले. ३६

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ । माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः॥१४॥
पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः। पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥
अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः । नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

अन्वय—ततः श्वेतैः हयैः युक्ते महति स्यंदने स्थितौ माधवः पांडवः च एव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥ हृषीकेशः पाञ्चजन्यं शंखं दध्मौ, धनंजयः देवदत्तं शंखं दध्मौ, भीमकर्मा वृकोदरः पौंड्रं महाशंखं दध्मौ ॥ १५ ॥ कुंतीपुत्रः युधिष्ठिरः राजा अनंतविजयं दध्मौ, नकुलः च सहदेवः ( एतौ ) सुघोषमणिपुष्पकौ दध्मतुः ॥ १६ ॥

ऐसी स्वर्गीं मातु। देखोनि तो आकांतु । तंव पांडवदळाआंतु । वर्तलें कायी ॥ ३७ ॥ ( २० अर्जुनाच्या रथाचें वर्णन, १३८ ते १४२ ) हो का निर्जेसार विजयाचें । कीं तें भांडार महातेजाचें । जेथ गरुडाचिये जावळिचे । कौंतले चाऱ्ही ॥३८॥ कीं पाखांचा मेरु जैसा । रहंवरु मिरवतसे तैसा । तेजें कोंदोटलिया दिशा । जयाचेनि ॥ ३९ ॥ जेथ अश्ववाहक आपण । वैकुंठींचा राणा जाण । तया रथाचे गुण । काय वर्णूं ॥ १४० ॥ ध्वजस्तंभावरी वानरु । तो मूर्तिमंत शंकरु । सारथी शार्ङ्गधरु । अर्जुनेंसी ॥ ४१ ॥ देखा नवल तया प्रभूचें । अद्भुत प्रेम भक्ताचें । जे सारथ्यपण पार्थाचें । करीत असे ॥ ४२ ॥ ( २१ भगवंताचें भक्तवात्सल्य व शंखवादन, १४३ ते १५३ ) पाईक पाठीसीं घातला । आपण पुढां राहिला । तेणें पांचजन्य आस्फुरिला । अवलीळाचि ॥ ४३ ॥ परी तो महाघोष थोरु । गर्जत असे गंहिरु । जैसा उदेला लोपी दिनकरु । नक्षत्रांतें ॥ ४४ ॥ तैसे तूरबंबाळ भंवते । कौरवदळीं गाजत होते । ते हारपोनि नेणों केउते । गेले तेथ ॥४५॥ तैसाचि देखें येरें[१२]। निनादें अतिगजरें । देवदत्त धनुर्धरें । आस्फुरिला ॥ ४६ ॥ ते दोनी शब्द अचाट । मीनले एकवट । तेथ ब्रह्मकटाह शतकूट । हों पाहत असे ॥ ४७ ॥ तंव भीमसेनु विसणैला । जैसा महाकाळ खवळला । तेणें पौंड्र आस्फुरिला । महाशंख ॥ ४८ ॥ तो महाप्रलयजलधरु । जैसें गडगडित गंहिरु । तंव अनंतविजय युधिष्ठिरु । आस्फुरित असे ॥ ४९ ॥ नकुळें सुघोषु । सहदेवें मणिपुष्पकु । जेणें नादें अंतकु । गजबजला ठाके ॥ १५० ॥

काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः । धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः॥१७॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते । सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक् पृथक् १८
स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् । नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन्॥१९॥

अन्वय— ( हे ) पृथिवीपते, परमेष्वासः काश्यः महारथः शिखंडी धृष्टद्युम्नः विराट च अपराजितः सात्यकिः च द्रुपदः द्रौपदेयाः च महाबाहुः सौभद्रः च सर्वशः पृथक् पृथक् शंखान् दध्मुः ॥ १७ ॥ १८ ॥ सः तुमुलः घोषः नभः च पृथिवीं च एव व्यनुनादयन् धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ॥ १९ ॥

तेथ भूपति होते अनेक । द्रुपद द्रौपदेयादिक । हा काशीपति देख । महाबाहू ॥ ५१ ॥ तेथ अर्जुनाचा सुतु । सात्यकि अपराजितु । धृष्टद्युम्न नृपनाथु । शिखंडी हन ॥ ५२ ॥ विराटादि नृपवर । जे सैनिक मुख्य वीर । तिहीं नानाशंख

नंतर, पांढरे घोडे जोडलेल्या मोठ्या रथांत बसलेले कृष्ण व अर्जुन यांनीं दिव्य शंख वाजविले ॥ १४ ॥ श्रीकृष्णानीं पांचजन्य नांवाचा, अर्जुनानें देवदत्त नांवाचा व भयंकर कर्म करणाऱ्या भीमसेनानें पौन्ड्र नांवाचा शंख वाजविला ॥ १५ ॥ कुंतीपुत्र धर्मराज व नकुलसहदेव यांनीं (अनुक्रमें) अनंतविजय, सुघोष व मणिपुष्पक हे शंख वाजविले ॥ १६ ॥

याप्रमाणें स्वर्गलोकांत दाणादाण उडून गेली असतां इकडे पांडवसैन्यांत काय झालें पहा. ३७ जो विजयाचें प्रत्यक्ष माहेरघर असून तेजाचें केवळ भांडारच, व ज्यास गरुडाप्रमाणें वेगवान असे चार घोडे जुंपिलेले असून ३८ जो पक्षयुक्त मेरु पर्वताप्रमाणें दिसत होता, तो श्रेष्ठ रथ तेथें शोभूं लागला. त्याच्या तेजानें दाही दिशा लकलकीत दिसत होत्या. ३९ ज्या रथावर प्रत्यक्ष वैकुंठाधिपति श्रीकृष्ण सारथी होता, त्या रथाचे गुण कोठवर वर्णन करावे ? १४० साक्षात् शंकराचा अवतार जो मारुति, तो त्याच्या ध्वजस्तंभावर असून, शार्ङ्ग धनुष्य धारण करणारे भगवान श्रीकृष्ण अर्जुनाचे सारथी होते. ४१ त्या प्रभूंचें नवल केवढें तें पहा; भक्ताच्या प्रेमामुळें ते पार्थाचें सारथ्य करूं लागले. ४२ आपल्या सेवकाला पाठीशीं वाढून आपण पुढें झालेल्या भगवान श्रीकृष्णांनीं आपला पांचजन्य नांवाचा शंख सहज लीलेनें वाजविला; ४३ पण सूर्याचा उदय झाला म्हणजे ज्याप्रमाणें नक्षत्रें लोपतात, त्याप्रमाणें त्या शंखाच्या महानादानें ४४ कौरवांच्या सैन्यामध्यें होत असलेला वाद्यगजर कोणीकडे नाहींसा झाला त्याचा पत्ता लागेना. ४५ त्याचप्रमाणें अर्जुनानेंहि आपला देवदत्त नांवाचा गंभीर नादाचा शंख वाजविला. ४६ त्या वेळीं त्या दोन्ही शंखांचा अद्भुत ध्वनि एकत्र झाल्यामुळें ब्रह्मांडाचे शतशः तुकडे होतात कीं काय असें वाटूं लागलें ! ४७ इतक्यांत भीमसेनालाही आवेश आला, आणि महाकाळाप्रमाणें खवळून त्यानें आपला पौन्ड्र नांवाचा महाशंख वाजविला. ४८ त्या शंखाचा ध्वनि महाप्रलयाच्या मेघाप्रमाणें होत आहे, तों धर्मराजानें अनंतविजय नामक शंख वाजविला; ४९ नकुलानें सुघोष नांवाचा, आणि सहदेवानें मणिपुष्पक नांवाचा शंख वाजविला. त्या नादानें प्रत्यक्ष यमाचेंही धाबें दणाणून गेलें ! १५०

धृतराष्ट्रा, महाधनुर्धारी काशिराजा, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट, अजिंक्य सात्यकि, द्रुपद, द्रौपदीचे मुलगे व महापराक्रमी अभिमन्यु या सर्वांनीं आपआपले शंख वाजविले. ॥ १७ ॥ ॥ १८ ॥ *तो भयंकर शंखनाद आकाश व पृथ्वी यांत दुमदुमून गेला, व त्या योगानें दुर्योधनादिकांचें हृदय फाटून गेलें !* ॥ १९ ॥

द्रुपद राजा, महावीर काशिराजा, द्रौपदीचे पुत्र इत्यादि अनेक वीर, जे त्या ठिकाणीं जमले होते; ५१ त्याचप्रमाणें अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु, अजिंक्य असा सात्यकि, नृपश्रेष्ठ धृष्टद्युम्न, शिखंडी, ५२ त्याचप्रमाणें विराट व इतर जे जे सेनानायक होते, त्यांनींही आपापले निरनिराळे शंख वाजविण्यास आरंभ केला. ५३ त्या शंखांच्या

१ माहेरघर. २ बरोबरीचे. ३ जोडले. ४ उत्तम रथ. ५ भरल्या. ६ सारथी. ७ मारुति. ८ सेवक. ९ सहज. १० गंभीर. ११ कोठें. १२ दुसरा. १३ ध्वनि. १४ ब्रह्मांड. १५ शेंकडों तुकडे. १६ आवेश आला. १७ यम. १८ आणखी, हा.

निरंतर। आस्फुरिलें ॥ ५३ ॥ ( २२ शंखनादानें कौरवसेनेची वाताहात, १५४ ते १६६ ) तेणें महाघोषनिर्घातें। शेष कूर्म अवचितें। गजबजोनि भूभारातें। सांडूं पाहती ॥ ५४ ॥ तेथ तिन्ही लोक डळमळित। मेरु मांदारा आंदोळित। समुद्रजळ उसळत। कैलासवेरी ॥ ५५ ॥ पृथ्वीदळ उलथों पाहात। आकाश असे आसुडत। तेथ सडा होत। नक्षत्रांचा ॥ ५६ ॥ सृष्टि गेली रे गेली। देवां मोकळवांदी जाहली। ऐशी एक टाळी पिटिली। सत्यलोकीं ॥ ५७ ॥ दिहोंचि दिन थोकला। जैसा प्रळयकाळ मांडला। तैसा हाहाकार जाहला। तिहीं लोकीं ॥५८॥ तें देखोनि आदिपुरुष विस्मितु। म्हणे झणें होय पां अंतु। मग लोपिला अद्भुतु। संभ्रम तो ॥ ५९ ॥ म्हणोनि विश्व सावरलें। एऱ्हवीं युगान्त होतें वोडवलें। जें महाशंख आस्फुरिले। कृष्णादिकीं ॥ १६० ॥ तो घोष तरी उपसंहरला। परी पडिसाद होता राहिला। तेणें दळभार विध्वंसिला। कौरवांचा ॥ ६१ ॥ जैसा गजघटांआंतु। सिंह लीलां विदारितु। तैसा हृदयातें भेदितु। कौरवांचिया ॥ ६२ ॥ तो गाजत जंव आइकती। तंव उभेचि हियें घालिती। एकमेकांतें म्हणती। सावध रे सावध ॥ ६३ ॥

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः। प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः॥२०॥

अन्वय—अथ कपिध्वजः पांडवः धार्तराष्ट्रान् व्यवस्थितान् दृष्ट्वा शस्त्रसंपाते प्रवृत्ते सति धनुः उद्यम्य ॥ २० ॥

तेथ बळप्रौढीपुरते। महारथी वीर होते। तिहीं पुनरपि दळातें। आवरिलें ॥ ६४ ॥ मग [14]सरिसेपणें उठावले। [15]दुणवटोनि उचलले। तया दंडीं [16]क्षोभले। लोकत्रय ॥ ६५ ॥ तेथ बाणवरी धनुर्धर। वर्षताति निरंतर। जैसे प्रळयांत जळधर। अनिवार का ॥ ६६ ॥ ( २३ अर्जुन सज्ज होतो, ६७-६८ ) देखिलिया अर्जुनें। संतोष वेउनि मनें। मग संभ्रमें सेने। [17]दिठी घालितसे ॥ ६७ ॥ तंव संग्रामीं सज्ज जाहले। सकळ कौरव देखिले। तंव लीला धनुष्य उचलिलें। पंडुकुमरें ॥६८॥

हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते।

( २४ भगवान अर्जुनाचा रथ दोन्ही सैन्यांच्यामधें नेतात, १६९ ते १७६ ) अर्जुन उवाचः—ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा। आतां झडकरी रथ पेलावा। नेऊनि मध्यें घालावा। दोहीं दळां ॥ ६९ ॥

सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥

यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान्। कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥२२॥

योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः। धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

अन्वय—तदा, हे महीपते, हृषीकेशं इदं वाक्यं आह, अर्जुन उवाच-हे अच्युत, अहं अवस्थितान् योद्धुकामान् एतान् यावत् निरीक्षे तावत् उभयोः सेनयोः मध्ये मे रथं स्थापय. अस्मिन् रणसमुद्यमे मया कैः सह योद्धव्यं, दुर्बुद्धेः धार्तराष्ट्रस्य युद्धे प्रियचिकीर्षवः ये एते अत्र समागताः तान् योत्स्यमानान् अहं अवेक्षे ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥

महाध्वनीनें शेष व कूर्म हे एकदम दचकले आणि पृथ्वीचा भार टाकून देण्यास प्रवृत्त झाले. ५४ त्या योगानें त्रैलोक्य डळमळूं लागलें, मेरु व मांदार हे हालूं लागले, समुद्राचें पाणी कैलासापर्यंत उसळलें, ५५ पृथ्वी पालथी होते की काय व आकाश कोसळून पडतें काय असें वाटूं लागलें, आणि नक्षत्रांचा सडा झाला ! ५६ सत्यलोकीं, ' सृष्टि बुडाली रे बुडाली, आतां देव निराधार झाले ' अशी एकच हांक झाली; ५७ सूर्य दिवसाच थांबला, आणि प्रलयकालचे वेळेप्रमाणें तिन्ही लोकांत हाहाकार उडून गेला. ५८ तें पाहून भगवान् श्रीकृष्ण फार विस्मित झाले, आणि कदाचित् सृष्टीचा अंत होईल असें जाणून, त्यांनीं तो अद्भुत शंखनाद बंद केला, ५९ म्हणूनच हें जग वांचलें; एरवी, कृष्णादिकांनीं जेव्हां शंख वाजविले, तेव्हांच त्याचा अंत होण्याची वेळ आली होती. १६० तो शंखनाद बंद झाला, तथापि त्याचा जो प्रतिध्वनि घुमत होता, त्या योगानें कौरवसैन्याची दाणादाण झाली. ६१ सिंहाच्या सहज लीलेनें जसें हत्तींच्या समुदायाचें विदारण होतें, तसें त्या शंखनादानें कौरवांचें हृदय फाटून गेलें. ६२ तो ध्वनि ऐकून कित्येक उभ्यानेंच खाली पडले, व एकमेकांस म्हणूं लागले कीं, सावध रे सावध ! ६३

ज्याच्या ध्वजस्तंभावर मारुति आहे अशा अर्जुनानें ( युद्धाकरितां व्यवस्थित रीतीनें उभे राहिलेले ) दुर्योधनादिक शस्त्रप्रहार करण्यास उद्युक्त झालेले पाहून आपलें धनुष्य उचलिलें ।। २० ।।

त्या ठिकाणी, जे बलाढ्य महारथी होते, त्यांनी सैन्याला पुनः धीर दिला. ६४ मग ते मोठ्या तयारीनें पुढें सरसावले, व त्यांनीं दुप्पट आवेशानें चाल केली. तेव्हां हें त्रिभुवन त्रस्त होऊन गेलें. ६५ त्या धनुर्धारी वीरांनी बाणांची इतकी भयंकर वृष्टि केली कीं, जणुं काय प्रलयकालची पर्जन्यवृष्टि होत आहे ! ६६ तें पाहून अर्जुनाच्या मनाला फार संतोष झाला, व त्यानें मोठ्या गंभीरतेनें सैन्यावर नजर टाकली. ६७ तेव्हां सर्व कौरव युद्धास सिद्ध झालेले पाहून पंडुपुत्रानें सहज लीलेनें धनुष्य उचललें. ६८

त्या वेळेस राजा, अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, " हे कृष्णा, माझा रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागीं नेऊन, येथें युद्धाच्या इच्छेनें आलेल्या सर्वांस मी पाहींपर्यंत उभा कर. ह्या रणामध्यें मीं कोणाबरोबर युद्ध करावें ( हें मला पाहिलें पाहिजे. ) अधर्मनिष्ठ दुर्योधनाला यश मिळावें या हेतूनें जे योद्धे येथें आले आहेत, त्यास मी पहातों ! " ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥

मग अर्जुन म्हणाला, " देवा, आतां आपला रथ लौकर नेऊन दोन्ही सैन्यांचे मध्यें उभा करा. ६९ म्हणजे येथें युद्ध करण्याकरितां आलेल्या सर्व वीरांस मी क्षणभर न्याहाळून पाहीन. १७० कारण येथें जरी सर्व वीर जमले आहेत, तरी समरांगणीं मला कोणकोणाशीं युद्ध करावयाचें आहे तें पाहिलें पाहिजे.

१ आवाजानें. २ हालणें. ३ तुटून पडणें ४ निराधार. ५ दिवसातच. ६ थांबला ७ श्रीकृष्ण ८ कदाचित्. ९ आवेश. १० नाहींसा झाला. ११ प्रतिध्वनि. १२ सहज. १३ बलानें पूर्ण. १४ सिद्धतेनें. १५ दोहींकडून. १६ वेळीं. १७ बाणावर बाण. १८ त्वरेनें. १९ दृष्टि. २० न्याया.

जंव मी नावेक । हे सकळ वीर सैनिक । न्याहाळीन अशेख । झुंजते जे ॥ १७० ॥ एथ आले असती आघवे । परी कवणेंसीं म्यां झुंझावें । हें रणीं लागे पहावें । म्हणउनियां ॥ ७१ ॥ बहुतकरूनि कौरव । हे आतुर दुःस्वभाव । वांटिवांवीण हांव । बांधिती झुंजीं ॥ ७२ ॥ झुंजाची आवडी धरिती । परी संग्रामीं धीर नव्हती । हें सांगोनि रायाप्रती । काय संजयो म्हणे ॥ ७३ ॥

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत । सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥२४॥
भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् । उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति॥२५॥
तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान्।आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा।
श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि । तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥२७॥

अन्वय—हे भारत ! एवं गुडाकेशेन उक्तः हृषीकेशः उभयोः सेनयोः मध्ये भीष्मद्रोणप्रमुखतः च सर्वेषां महीक्षितां प्रमुखतः रथोत्तमं स्थापयित्वा, ' हे पार्थ, एतान् समवेतान् कुरून् पश्य ' इति उवाच. तत्र पार्थः पितॄन् अथ पितामहान् आचार्यान् मातुलान् भ्रातॄन् पुत्रान् पौत्रान् तथा सखीन् श्वशुरान् सुहृदः उभयोः सेनयोः अपि स्थितान् अपश्यत्. स कौंतेयः तान् सर्वान् बंधून् अवस्थितान् समीक्ष्य. ॥ २४ ॥ २५ ॥ २६ ॥ २७ ॥

आइका अर्जुन इतकें बोलिला । तंव श्रीकृष्णें रथ पेलिला । दोहीं सैन्यांमाजीं केला । उभा तेणें ॥ ७४ ॥ जेथ भीष्मद्रोणादिक । जवळिकेचि सन्मुख । पृथिवीपति आणिक । बहु आहाती ॥ ७५ ॥ तेथ स्थिर करूनियां रथु । अर्जुन असे पाहतु । तो दळभार समस्तु । संभ्रमेंसीं ॥ ७६ ॥ ( २५ भीष्मद्रोणादिकांना पाहून अर्जुनास मोह, १७७ ) मग देवा म्हणे देख देख । हे गोत्रगुरु अशेख । तंव कृष्णमनीं नावेक । विस्मो जाहला ॥ ७७ ॥ ( २६ अर्जुनाचें भाषण ऐकून देवाचे स्वगत विचार, १७८ ते १७९ ) तो आपणपयां आपण म्हणे । एथ कायी कवण जाणे । हें मनीं धरिलें येणें । परि कांहीं आश्चर्य असे ॥ ७८ ॥ ऐसी पुढील सें घेतु । तो सहजें जाणे हृदयस्थु । परि उगा असे निवांतु । तिये वेळीं ॥ ७९ ॥ ( २७ गुरुगोत्रजांस पाहून अर्जुनास मोह, १८० ते १८४ ) तंव तेथ पार्थ सकळ । पितृ पितामह केवळ । गुरु बंधु मातुळ । देखता जाहला ॥ १८० ॥ इष्ट मित्र आपुले । कुमरजन देखिले । हे सकळ असती आले । तयांमाजी ॥ ८१ ॥ सुहृज्जन सासरे । आणीकही सखे सोइरे । कुमर पौत्र धनुर्धरें । देखिले तेथ ॥ ८२ ॥ जयां उपकार होते केले । कीं आपदीं जे रक्षिले । हें असो वडिल धाकुले । आदिकरुनी ॥ ८३ ॥ ऐसें गोत्रचि दोहीं दळीं । उदित जालें असे कळीं । हें अर्जुनें तिये वेळीं । अवलोकिलें ॥ ८४ ॥

कृपया परयाऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।

अन्वय—परया कृपया आविष्टः विषीदन् ( सन् ) इदं अब्रवीत् ।

तेथ मनीं गजबज जाहाली । आणि आपैसी कृपा उपजली । तेणें अपमानें निघाली । वीरवृत्ति ॥८५॥ ( २८ मोहित झालेल्या अर्जुनाचें भाषण, १८५ ते १९२ )

७१ हे उतावळे व दुष्टबुद्धि कौरव बहुतकरून अंगांत पराक्रम नसतां युद्धाविषयीं डौल मारीत असतात. ७२ यांनां युद्धाची हौस आहे खरी; परंतु यांच्याच्यानें रणभूमीवर टिकाव धरवत नाही." इतकें सांगून संजय पुढें म्हणाला:—७३

संजय म्हणाला:—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें अर्जुन श्रीकृष्णास बोलल्यावर श्रीकृष्णानीं दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं भीष्म, द्रोण व सर्व राजे यांच्यासमोर रथ नेऊन उभा केला, आणि अर्जुनास म्हटलें, "येथें आलेल्या सर्व कौरव मंडळीस अवलोकन कर." तेव्हा अर्जुनानें वडील, आजे, गुरु, मामे, भाऊ, मुलगे, नातू, मित्र, सासरे व आपले हितकर्ते दोन्ही सैन्यात उभे आहेत असें पाहिलें. ॥२४॥२५॥२६॥२७॥

राजा, ऐक, अर्जुनाचें हें भाषण श्रवण करतांच श्रीकृष्णांनीं रथ नेऊन दोन्ही सैन्यांमध्यें उभा केला. ७४ ज्या ठिकाणीं भीष्मद्रोणादिक आप्तसंबंधी व अनेक राजे समोर आहेत, ७५ त्या ठिकाणीं रथ उभा करताच अर्जुन त्या सेनेकडे न्याहाळून पाहूं लागला. ७६ मग म्हणाला, "देवा, पहा पहा, हे तर सर्व आंमचे आप्तवर्ग व गुरु आहेत." हें ऐकून श्रीकृष्णांस क्षणभर, आश्चर्य वाटलें. ७७ ते आपल्या मनांत म्हणतात, अर्जुनानें हें मनांत काय आणलें आहे कोण जाणे; परंतु हा कांहीं तरी चमत्कारिक प्रकार आहे. ७८ ते दुसऱ्याचें मनोगत सहज जाणणारे असल्यामुळें त्यांनी पुढील भविष्य जाणलें; परंतु त्या वेळेस काहीएक न बोलतां ते स्तब्ध राहिले. ७९ अर्जुनानें आपले सर्व चुलते, आजे, गुरु, बंधु व मामा असे पाहिले. १८० आपले इष्टमित्र व मुलगे हे सर्व त्या ठिकाणी आलेले पाहिले. ८१ तसेंच अर्जुनानें आपले जिवलग मित्र, सासरे, आप्तवर्ग व नातू हेही त्या ठिकाणीं आलेले पाहिले. ८२ ज्यांच्यावर उपकार केले होते, व ज्यांचें संकटसमयीं रक्षण केलें होतें, फार काय? परंतु एकंदर वडील व धाकटे यांसुद्धां ८३ आपले सर्व गोत्रज दोन्ही सैन्यांत युद्धाकरिता तयार झालेले अर्जुनानें त्या वेळेस पाहिले. ८४

त्या सर्वांना पाहून तो करुणेनें पीडित झाला व खिन्न होरसाता बोलला.

त्या वेळीं त्याचें मन बावरून जाऊन त्यास आपोआप करुणा उत्पन्न झाली व त्या अपमानामुळें वीरवृत्ति अर्जुनास सोडून निघाली. ८५ ज्या स्त्रिया उत्तम कुळांतल्या असून गुणी व लावण्यवती असतात, त्याना, आपल्या सतेजपणामुळें, दुसऱ्या स्त्रियांचें वर्चस्व सहन होत नाही. ८६ ज्याप्रमाणें नवीन स्त्रीच्या आवडीचे भरांत विषयी पुरुष आपल्या स्त्रीस विसरून भ्रम झालेल्या मनुष्याप्रमाणें योग्यतेवांचून तिच्या नादीं लागतो, ८७ किंवा तपश्चर्येच्या योगानें ऋद्धिसिद्धि प्रसन्न झाल्या असतां वैराग्यशील पुरुषाचे बुद्धीस भ्रम पडून त्याला ज्याप्रमाणें वैराग्याची आठवण

१ पराक्रमावाचून. २ नातेवाईक. ३ आठवण, भविष्य. ४ मनोगत. ५ आपोआप. ६ शौर्य.

जिया उत्तम कुळींचिया होती । आणि गुणलावण्य आथी । तिया आणिकीतं न साहती । सुतेजपणें ॥ ८६ ॥ नवियें आवडीचेनि भरें । कामुक निज वनिता विसरे । मग पाडेंवीणें अनुसरे । भ्रमला जैसा ॥ ८७ ॥ कीं तपोवळें ऋद्धी । पातलिया भ्रंशे बुद्धी । मग तया विरक्ततासिद्धि । आठवेना ॥ ८८ ॥ तैसें अर्जुना तेथ जाहलें । असतें पुरुषत्व गेलें । जे अंतःकरण दिधलें । कारुण्यासी ॥ ८९ ॥ देखा मंत्रज्ञ बरळ जाय । तेथ का जैसा संचार होय । तैसा तो धनुर्धर महामोहें । आकळिला ॥ १९० ॥ म्हणउनि असता धीर गेला । हृदया द्रव आला । जैसा चंद्रकळीं शिवतला । सोमकांतु ॥ ९१ ॥ अर्जुन उवाचः—तयापरी पार्थु । अतिस्नेहें मोहितु । मग सखेद असे बोलतु । श्रीअच्युतेसीं ॥ ९२ ॥

दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥
सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति । वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥
गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते । न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥३०॥

अन्वय—हे कृष्ण, इमं स्वजनं युयुत्सु (सतं) समुपस्थितं ॥२८॥ दृष्ट्वा मम गात्राणि सीदंति च मुखं परिशुष्यति च मे शरीरे वेपथुः च रोमहर्षः जायते ॥ २९ ॥ हस्तात् गांडीव स्रंसते च त्वक् परिदह्यते एव च अहं अवस्थातुं न शक्नोमि च मे मनः भ्रमतीव ॥ ३० ॥

( २९ अर्जुन धैर्यवान असून मोहित झाला, १९३ ते २०२ ) तो म्हणे अवधारीं देवा । म्यां पाहिला हा मेळावा । तंव गोत्रवर्ग आघवा[6] । देखिला एथ ॥ ९३ ॥ हे संग्रामीं उदितँ[7] । जहाले असती कीर समस्त । पण आपणपेयां उचित । केवीं होय ॥ ९४ ॥ येणें नावेंचि नेणों कायी । मज आपणपें सर्वथा नाहीं । मन बुद्धी ठायीं । स्थिर नोहे ॥ ९५ ॥ देखे देह कांपत । तोंड असे कोरडें होत । विकळता उपजत । गात्रांसी ॥ ९६ ॥ सर्वांगा कांटाळी आला । अति संताप उपजला । तेथें वेंवळौ हातु गेला । गांडिवाचा[13] ॥ ९७ ॥ तें न धरताचि निष्टलें[14] । परि नेणोंचि हातोनि पडिलें । ऐसें हृदय असे व्यापिलें । मोहें येणें ॥ ९८ ॥ जें वज्रापासोनि कठिण । दुर्धर अतिदारुण । तयाहून असाधारण[15] । हें स्नेह नवल ॥ ९९ ॥ जेणें संग्रामीं हरु जितिला । निवातकवचांचा ठावो फेडिला । तो अर्जुन मोहें कवळिला । क्षणामाजीं ॥ २०० ॥ जैसें भ्रमर भेदी कोडें[21] । भलतैसें काष्ठ कोरडें । परि कळिकेमाजी[22] सांपडे । कोवळिये ॥१॥ तेथ उत्तीर्ण[23] होईल प्राणें । परि तें कमळदळ चिरूं नेणे । तैसें कठिण कोवळेपणें । स्नेह[24] देखा ॥ २ ॥ ( ३० मायेचें वर्णन, २०३ ) हे आदिपुरुषाची माया । ब्रह्मयेंही[25] न येचि आया[26] । म्हणऊनि भुलविला ऐके राया । संजयो म्हणे ॥ ३ ॥ ( ३१ प्रवृत्तिशास्त्रदृष्टया युद्ध न करण्याचीं कारणें, २०४ ते २६७) अवधारी मग तो अर्जुनु । देखोनि सकळ स्वजनु । विसरला अभि-

१ आपल्या सौंदर्यापुढें. २ योग्यतेशिवाय. ३ चुकणें. ४ भ्रम. ५ समुदाय. ६ सर्व. ७ उद्युक्त.

राहत नाहीं, ८८ त्याप्रमाणें, अर्जुनानें आपल्या अंतःकरणांत करुणेस थारा दिल्यामुळें त्याची स्थिति होऊन, त्याचें धैर्य नाहीसें झालें. ८९ असें पहा की, मांत्रिक मंत्रोचार करण्यांत चुकूं लागला म्हणजे जसा भ्रमिष्ट होतो, त्याप्रमाणें अर्जुन महामोहानें व्याकुळ झाला, १९० व त्याचे ठिकाणीं स्वभावतः असलेला धीर खचून जाऊन त्याच्या हृदयास दयेचा पाझर फुटला ! ज्याप्रमाणें चंद्रकिरणांचा स्पर्श होण्याबरोबर चंद्रकांत मण्यास पाझर फुटतो, ९१ त्याप्रमाणें तो करुणेनें अतिमोहित झाला, व मग खेदयुक्त अंतःकरणानें श्रीकृष्णांशी बोलूं लागला. ९२

अर्जुन म्हणालाः—कृष्णा, हे आप्तजन युद्धाविषयीं तयार झालेले पाहून ॥ २८ ॥ माझीं गात्रें शिथिल झालीं आहेत, तोंडचें पाणी पळालें आहे, माझ्या शरीरास कंप सुटून रोमांच उभे राहिले आहेत, ॥ २९ ॥ गांडीव धनुष्य हातातून गळून पडत आहे, व सर्वांगाचा दाह होत आहे; आता मला येथें उभें राहवत नाहीं. माझें मन फार भ्रमण पावत आहे. ॥ ३० ॥

अर्जुन म्हणाला, " देवा, असें पहा—मी हा सर्व सैन्यसमुदाय पाहिला, तों येथें सर्व माझे गोत्रजच माझ्या दृष्टीस पडले. ९३ हे सर्व युद्ध करण्याकरितां तयार झाले आहेत खरे; परंतु यांच्या बरोबर युद्ध करणें आपल्यास कसें उचित होईल? ९४ या विचारानें मला कांहीं सुचत नसून माझें मलाच भान नाहीसें झालें आहे, आणि मन व बुद्धि हीही स्थिर नाहीत. ९५ हें पहा, माझ्या सर्व अंगास कंप सुटला असून तोंडास कोरड पडली आहे, व गात्रें शिथिल झाली आहेत. ९६ सर्वांगावर कांटा उभा राहून मनाला अति संताप उत्पन्न झाल्यामुळें गांडीव धनुष्य धरण्याचा हात ढिला पडला; ९७ व त्यामुळें तें माझ्या हातून केव्हा गळून पडलें हें देखील मला समजलें नाहीं. इतकें माझें अंत.करण आप्तवर्गाच्या मोहानें व्याप्त झालें आहे ! ९८ माझें अंत.करण वज्रापेक्षांही कठिण असून दुसऱ्यास दाद न देणारें असें अतिभयंकर आहे, परंतु यापेक्षांही हा मोह विशेष कठिण आहे, हें मोठें आश्चर्य आहे ! " ९९ ज्यानें युद्धात शंकरांसही जिंकलें, व निवातकवच राक्षसाचा मागमूस नाहींसा केला, तो अर्जुन मोहानें एका क्षणांत व्याप्त झाला ! २०० भुंगा हा पाहिजे त्या वाळलेल्या लाकडास सहज भोंक पाडतो, परंतु कोंवळ्या कमळाच्या कळीमध्यें ती मिटल्यावर अडकला जातो; १ तो त्या ठिकाणीं प्राणासही मुकेल, परंतु तें कमलदल फाडून बाहेर निघण्याचें त्याच्या मनांत सुद्धां येणार नाहीं; त्याप्रमाणेंच आप्तवर्गाची मोहममता-तोडण्यास कठिण आहे. २ संजय म्हणतोः— राजा धृतराष्ट्रा, हा मोह म्हणजे परमेश्वराची माया आहे. ही ब्रह्मदेवालाही आवरत नाही. म्हणून अर्जुनास त्यानें व्याकुळ केलें. ३ असो. राजा, मग आपले सर्व आप्तवर्ग पाहून

८ सरोवर. ९ आपल्याला. १० व्याकुळपणा. ११ काटा. १२ ढिला. १३ नावाचें धनुष्य. १४ निसटलें. १५ विशेष. १६ शंकर. १७ जिंकिला. १८ नावाचे राक्षस. १९ ठिकाण. २० नाहींसा केला. २१ सहज. २२ कमळाची कळी. २३ मुकणें. २४ मुकता. २५ ब्रह्मदेवालाही. २६ स्वाधीन. २७ धृतराष्ट्रा.

मातु । संग्रामींचा ॥ ४ ॥ कैसी नेणों सदयेता । उपनली तेथें चित्ता । मग म्हणे कृष्णा आतां । नैसिजे एथ ॥ ५ ॥ माझें अतिशयें मन व्याकुळ । होतसे वाचा वरेंळ । जे वधावे हे सकळ । येणें नांवें ॥ ६ ॥

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव । न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥

अन्वय—च हे केशव, विपरीतानि निमित्तानि पश्यामि, च आहवे स्वजनं हत्वा श्रेयः न अनुपश्यामि ॥ ३१ ॥

या कौरवां जरी वधावें । तरी युधिष्ठिरादिकां कां न वधावें । हे येरयेर आघवे । गोत्रजं आमुचे ॥ ७ ॥ म्हणोनि जळों हें झुंज । प्रत्ययां नये मज । एणें काय काज । महापापें ॥ ८ ॥ देवा बहुतांपरी पाहतां । एथ वोखटें होईल झुंजतां । वरी कांहीं चुकवितां । लाभु आथी ॥ ९ ॥

न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च । किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३१ ॥ येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च । त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३२ ॥ आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः । मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥

अन्वय—हे कृष्ण, अहं विजयं न कांक्षे च राज्यं च सुखानि न कांक्षे. हे गोविंद, नः राज्येन किं भोगैः किंवा जीवितेन किं ? ॥ ३२ ॥ ( यतः ) येषां अर्थे नः राज्यं कांक्षितं भोगाः कांक्षिताः च सुखानि कांक्षितानि ते इमे आचार्याः पितरः पुत्राः तथा एव च पितामहाः मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः तथा संबंधिनः प्राणान् च धनानि त्यक्त्वा युद्धे अवस्थिताः ॥३३॥३४॥

तया विजयवृत्ती कांहीं । मज सर्वथा काज नाहीं । एथ राज्य तरी कायी । पावोनियां ॥ २१० ॥ या सकळांतें वधावें । मग जे भोग भोगावे । ते जळोत आघवे । पार्थु म्हणे ॥ ११ ॥ तेणें सुखेंविण होईल । तें भलतैसें साहिजेल । वरी जीवितही वेंचिजेल । याचिलागीं ॥ १२ ॥ परी यांसी घातु कीजे । मग आपण राज्यसुख भोगिजे । हें स्वप्नींही मन माझें । करूं न शके ॥ १३ ॥ तरी आम्हीं कां जन्मावें । कवणालागीं जियावें । जरी वडिलां यां चिंतावें । विरुद्ध मनें ॥१४॥ पुत्रातें इच्छी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ । जें निर्दळिजे[१४] केवळ । गोत्र आपुलें ॥ १५ ॥ हें मनींचि केवीं धरिजे । आपण वज्रा ऐसें होइजे । वरी घडे तरी कीजे । भलें ईयां ॥ १६ ॥ आम्हीं जें जें जोडावें । तें समस्तीं इहीं भोगावें । हें जीवितही उपकारावें । काजीं इयांच्या ॥ १७ ॥ आम्ही दिगंतींचे[१७] भूपाळ । विभांडूनि[१८] सकळ । मग संतोषविजे कुळ । आपुलें जें ॥ १८ ॥ तेंचि हे समस्त । परी कैसें कर्म विपरीत । जे जहाले असती उद्यत । झुंजावया ॥ १९ ॥ अंतोरियां कुमरें । सांडोनियां भांडारें । शस्त्राग्रीं जिव्हारें । आरोपुनी ॥ २२० ॥ ऐसियांतें कैसेनि मारूं । कवणावरी शस्त्र धरूं । निज हृदया करूं । घातु केवीं ॥ २१ ॥ हे

अर्जुनाच्या हृदयांतील युद्धाविषयींचा अभिमान मावळून गेला. ४ त्या ठिकाणीं त्याचे मनांत करुणा कशी उद्भवली हें कळत नाहीं. मग तो श्रीकृष्णास म्हणाला— " देवा, मला वाटतें, आतां येथें राहूं नये. ५ या सर्वांस मारावयाचें ही गोष्ट मनांत आल्याबरोबर माझें मन अति व्याकुळ होऊन बोबडी वळली आहे. ६

आणि हे केशवा, येथें काहीं विपरीत होईल अशीं चिन्हें दिसतात व युद्धामध्ये स्वजनाचा घात केला असता पुरुषार्थ होईल असें मला वाटत नाहीं. ॥ ३१ ॥

या कौरवांना जर मारावयाचें, तर मग धर्मराजादिकांना का मारूं नये ? कारण हे सर्व परस्पर आमचे गोत्रजच आहेत. ७ म्हणून, देवा ! जळो हें युद्ध; मला कांही तें पसंत पडत नाहीं. असलें महापातक केल्यावाचून आमचें काय खोळंबलें आहे ? ८ देवा, अनेक प्रकारें विचार करून पाहतां युद्ध केल्यास त्याचा परिणाम वाईटच होईल असें वाटतें; पण जर तें टाळलें तर मात्र काहीं तरी कल्याण होईल. ९

कृष्णा, मला जय, राज्य व सुख यांची अपेक्षा नाहीं. हे गोविंदा, आम्हास राज्य व भोग भोगून काय करावयाचें आहे ? ॥ ३२ ॥ कारण, ज्याच्याकरिता आम्ही राज्य, भोग व सुख याची इच्छा करावयाची, ते हे गुरु, वडील, पुत्र, आजोबा, मामा, सासरे, नातू, मेहुणे, तसेच इतर आप्तवर्ग सर्व या ठिकाणीं आपल्या प्राणावर व धनावर उदार होऊन युद्धाकरिता उभे आहेत. ॥ ३३।३४॥

अशा रीतीनें जय मिळविण्याची मला मुळींच गरज नाहीं, व असलें राज्य मिळवून तरी काय करावयाचें आहे ?" २१० अर्जुन म्हणाला, " या सर्वांचा वध करून जे भोग भोगावयाचे, त्या सर्वांस आग लागो ! ११ या असल्या सुखाशिवाय वाटतील तीं दुःखें आम्ही सोसू, यांच्याकरितां आम्ही आपले प्राण देखील खर्चीं घालूं; १२ परंतु याचा घात करून आपण राज्यसुख भोगावें ही गोष्ट माझ्या स्वप्नातही येणार नाहीं. १३ जर आमच्या वडील मंडळींचें आम्ही अहित चिंतिलें, तर मग आम्हीं जन्मास तरी यावयाचें कशाकरिता व जगायाचें तरी कोणासाठीं ? १४ कुळात पुत्रप्राप्तीची इच्छा करतात, त्याचें हेंच का फळ ! कीं त्या पुत्रानें आपल्या गोत्रजांचा संहार करावा ? १५ आपण आपलें मन वज्रा-प्रमाणें कठोर करावें हें असें मनांत तरी कसें आणावे ? त्यांचें आपल्या हातून जेवढे बरें होईल तेवढें करावें. १६ आम्हीं जे जें मिळवावें, त्या सर्वांचा त्यांनीं उपभोग घ्यावा, इतकेंच नव्हे, तर त्याच्या कामाकरितां आम्हीं आपलें जीवितही खर्च करावें. १७ आम्ही देशोदेशींचे राजे जिंकावे, व यशाच्या योगें आपल्या कुळास संतोषित करावें. १८ पण कर्मांची किती विपरीत गति आहे, कीं तेच हे आमचे सर्व गोत्रज आम्हांबरोबर युद्ध करण्यास उद्युक्त झाले आहेत ! १९ बायका, मुलें व धन ह्या सर्वांस सोडून तरवारीच्या धारेवर ज्यांनी आपले जीव ठेविले आहेत. २२० अशाना मी कसें मारूं ? कोणावर शस्त्र

---

१ दयार्द्रबुद्धि. २ उपजली. ३ राहूं नये. ४ बोबडी वळणें. ५ यामुळें. ६ एकमेक. ७ पसत पडणें. ८ घाईट. ९ जय मिळवणें. १० जरूर. ११ वाटेल तें. १२ सोसवेल १३ याचाचें. १४ संहार करवा. १५ मास. १६ उद्योगीं लावावें. १७ सर्व दिशाचे. १८ जिंकून. १९ तयार. २० स्त्रिया. २१ प्राण. २२ ठेवून.

नेणसी तूं कवण । परी पैलै भीष्म द्रोण । जयांचे उपकार असाधारण । आम्हां बहुत ॥ २२ ॥ एथ शालक सासरे मांतुळ । आणि बंधु कीं हे सकळ । पुत्र नातू केवळ । इष्टही असती ॥ २३ ॥ अवधारी अति जवळिकेचे । हे सकळही सोयरे आमुचे । म्हणोनि दोष आथी वाचे । बोलतांचि ॥ २४ ॥

एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन । अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ३५

अन्वय—हे मधुसूदन ! अहं घ्नतः अपि एतान् त्रैलोक्यराज्यस्य हेतोः अपि हंतुं न इच्छामि महीकृते किं नु ॥ ३५ ॥

हे वरी भलतें करितु । आतांचि येथें मारितु । परि आपण मनें घातु । न चिंतावा ॥ २५ ॥ त्रैलोक्यींचें अनकाळित । जरी राज्य होईल प्राप्त । तरी हें अनुचित । नाचरें मी ॥ २६ ॥ जरी आजि एथ ऐसें कीजे । तरी कवणाच्या मनीं उरिजे । सांगे मुख केवीं पाहिजे । तुझें कृष्णा ॥ २७ ॥

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन । पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥३६

अन्वय—हे जनार्दन, धार्तराष्ट्रान् निहत्य नः का प्रीतिः स्यात् ? एतान् आततायिनः हत्वा अस्मान् पापम् एव आश्रयेत् ॥ ३६ ॥

जरी वधु करीं गोत्रजांचा । तरी वसौटा होऊनि दोषांचा । मज जोडिलासि तूं हातींचा । दूरी होसी ॥ २८ ॥ कुळहरणीं पातकें । तियें आंगीं जडती अशेखें । तये वेळीं तूं कवणें कें । देखावासी ॥ २९ ॥ जैसा उद्यानामाजीं अनळु । संचरला देखोनि प्रबळु । मग क्षणभरी कोकिळु । स्थिर नोहे ॥ २३० ॥ का सकर्दम सरोवर । अवलोकुनी चकोर । न सेवित अव्हेर । करूनि निघे ॥ ३१ ॥ तयापरी तूं देवा । मज झकेऊन न येसी भावा । जरी पुण्याचा बोलावा । नाशिजैल ॥ ३२ ॥

तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् । स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव

अन्वय—तस्मात् स्वबांधवान् धार्तराष्ट्रान् हंतुं वयं अर्हाः न (स्मः) हि, हे माधव, स्वजन हत्वा वयं कथं सुखिनः स्याम ॥ ३७ ॥

म्हणोनि मी हें न करीं । इये संग्रामीं शस्त्र न धरीं । हें किडाळ बहुतीं परी । दिसतसे ॥ ३३ ॥ तुजसीं अंतराय होईल । मग सांगे आमुचें काय उरेल । तेणें दुःखें हियें[17] फुटेल । तुजवीण कृष्णा ॥ ३४ ॥ म्हणऊनि कौरव हे वधिजती । मग आम्हीं भोग भोगिजती । हे असो मात अघडती । अर्जुन म्हणे ॥ ३५ ॥

यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः । कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥
कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् । कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९॥

अन्वय—यद्यपि एते लोभोपहतचेतसः कुलक्षयकृतं दोषं च मित्रद्रोहे पातकं न पश्यति ॥३८॥ (तथापि) हे जनार्दन, कुलक्षयकृतं दोष प्रपश्यद्भिः अस्माभिः अस्मात् पापात् निवर्तितुम् कथं न ज्ञेयम् ॥ ३९ ॥

धरूं आणि आपल्याच सुहृज्जनांचा कसा घात करूं ? २१ हे कोण आहेत हें तुला माहीत नाहीं काय ? ते पहा पलीकडे भीष्म व द्रोण आहेत. त्यांचे आमच्यावर महत् उपकार आहेत. २२ या ठिकाणीं मेव्हणे, सासरे, मामा आणि बंधु, तसेच हे सर्व पुत्र, नातू व आप्तही आहेत. २३ हे पहा—हे सर्व आमचे फार जवळचे नातेवाईक आहेत, तेव्हां यांना मारण्याची गोष्ट नुसती तोंडावाटे काढली तरी देखील दोष घडतील. २४

हे मधुसूदना, जरी त्यांनीं माझा वध केला, तरी मी त्रैलोक्याच्या राज्यसुखाकरितां देखील ह्यांना मारण्याची इच्छा करणार नाहीं. मग पृथ्वीच्या राज्याकरिता मी ह्यांना कसा मारीन?॥३५॥

उलटपक्षी ह्यांनी वाटेल ते जरी केलें, किंवा आम्हाला येथेंच जरी मारिलें, तथापि आपण त्यांचा घात करण्याचें मनांत आणूं नये. २५ निष्कंटक असें त्रिभुवनाचें राज्य जरी प्राप्त झालें, तरी सुध्दा हे अनुचित मी करणार नाही. २६ कृष्णा, जर आज या ठिकाणी आम्हीं यांचा वध केला, तर आमचे कोण नांव घेईल ? आणि तूंच साग कीं, मग तुझें मुख तरी आमच्या कसें दृष्टीस पडेल ? २७

हे जनार्दना, या कौरवाना मारून आम्हाला काय सुख होणार ? हे आततायी असल्यामुळें यांच्या वधानें आम्हास पापच लागेल. ॥ ३६ ॥

जर मी गोत्रजांचा वध करीन, तर मी दोषांचे घर होईन; व असें झाल्यानें, ज्या तुझी मी जोड केली आहे तो तूंही हातचा जाशील. २८ कुळक्षय केला असता अनंत पातके लागतात; अशा प्रसंगीं तुला कोणीं आणि कोठें शोधावें ? २९ ज्याप्रमाणें बागेंत अग्नीचा भडका झाला असता कोकीळ पक्षी एक क्षणभरही राहत नाहींत; २३० किंवा तलावांत चिखल झालेला पाहून चकोर पक्षी तो सोडून चालते होतात, ३१ त्याप्रमाणें, देवा, जर माझी पुण्याई कमी होईल, तर आपण आपल्या मायेनें मला फसववून हातावर तुरी देऊन जाल ! ३२

म्हणून, आपल्या बांधवांस—या कौरवांस मारणें हें आम्हांस योग्य नाहीं. माधवा, आपल्या आप्तांना मारून आम्ही कसे सुखी होऊं ? ॥ ३७ ॥

म्हणून ही गोष्ट मी कधीं करणार नाहीं, व या समरांगणात हातात शस्त्रही धरणार नाहीं; कारण, हें कृत्य बहुत प्रकारानें निंद्य आहे असें मला वाटतें. ३३ कृष्णा, आपण आम्हांला अंतरला म्हणजे मग आमची काय गति होईल ? त्या दु:खाने आमचें हृदय कीं हो फाटून जाईल!" ३४ अर्जुन पुढें म्हणतो, "म्हणून, देवा, ह्या कौरवाचा वध करून मग आम्हीं राज्याचा उपभोग घ्यावा ही गोष्ट कधींही घडणार नाहीं. ३५

लोभानें चित्त भ्रष्ट झाल्यामुळें, कुलक्षय केल्यापासून लागणारा दोष व मित्राशीं वैर केल्यानें लागणारें पातक हीं जरी हे कौरव पहात नाहींत, ॥ ३८ ॥ तरी, हे जनार्दना, कुलक्षय केल्यापासून लागणारें पाप आम्हास ढळढळीत दिसत असताही, या पापापासून निवृत्त होण्याविषयीं आम्हीं विचार कसा करूं नये ? ॥ ३९ ॥

१ पलीकडे. २ मेहुणे. ३ मामा. ४ सहजगत्या. ५ आश्रयस्थान. ६ सापडलेला. ७ कुळाच्या घातानें. ८ कोठें. ९ बागेंत. १० अग्नि ११ चिखलानें युक्त. १२ तिरस्कार. १३ ठकवून. १४ मायेनें. १५ निंद्य कर्म. १६ वियोग. १७ हृदय. १८ न घडणारी.

मग कुळा तया अशेखा । आणि कुळघातकां । येरयेरां नरका । जाणें आथी ॥ ५२ ॥ देखे वंशवृद्धि समस्त । यापरी होय पतितें । मग वोवांडिती[3] स्वर्गस्थ । पूर्वपुरुष ॥ ५३ ॥ जेथ नित्यादि क्रिया ठाके । आणि नैमित्तिक[5] क्रिया पारुखे । तेथ कवणा तिळोदकें । कवण अर्पी ॥ ५४ ॥ तरी पितर काय करिती । कैसेनि स्वर्गीं वसती । म्हणोनि तेही येती । कुळापासीं ॥ ५५ ॥ जैसा नखाग्रीं व्याळ लागे । तो शिखांत व्यापी वेगें । तेवीं आब्रह्म कुळ अवघें । आप्लाविजे ॥ ५६ ॥

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः । उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥४३॥
उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन । नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥
अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् । यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥४५॥

अन्वय—कुलघ्नानां एतैः वर्णसंकरकारकैः दोषैः शाश्वताः जातिधर्माः च कुलधर्माः उत्साद्यंते॥४३॥ हे जनार्दन, उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां नरके नियतं वासः भवति इति ( वयं ) अनुशुश्रुम ॥ ४४ ॥ अहो ! वयं महत्पापं कर्तुं व्यवसिताः बत यत् राज्यसुखलोभेन स्वजनं हंतुं उद्यताः ॥ ४५ ॥

देवा अवधारीं आणीक एक । एथ घडे महापातक । जे संगदोषें हा लौकिकुं । भ्रंश पावे ॥ ५७ ॥ जैसा घरीं आपुला । वींनिवसें अग्नि लागला । तो आणिकांही प्रज्वाळिला । जाळूनि घाली ॥ ५८ ॥ तैसिया तया कुळसंगती । जे जे लोक वर्तती । तेही बाधा पावती । निमित्तें येणें ॥ ५९ ॥ तैसें नाना दोषें सकळ । अर्जुन म्हणे तें कुळ । मग महाघोर केवळ । निरयें भोगी ॥ २६० ॥ पडिलिया तिये ठायीं । मग कल्पांतींही उकलु नाहीं । येसणें पतन कुळक्षयीं । अर्जुन म्हणे ॥ ६१ ॥ देवा हें विविधें[6] कानीं ऐकिजे । परी अझुनिवरी त्रासु नुपजे । हृदय वज्राचें हें काय कीजे । अवधारीं पां ॥६२॥ अपेक्षिजे राज्यसुख । जयालागीं तें तंव क्षणिक । ऐसें जाणतांही दोखें । अव्हेरूं ना ॥ ६३ ॥ जे हे वडिल सकळ आपुले । वधावया दिठी[11] सूदले । सांग पां काय थेंकुलें । घडलें आम्हां ॥ ६४ ॥

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः । धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

अन्वय—यदि शस्त्रपाणयः धार्तराष्ट्राः अशस्त्रं अप्रतीकारं मा रणे हन्युः तत् मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

आतां यावरी जें जियावें । तयापासूनि हें बरवें । जे शस्त्रें सांडूनि साहावे । बाण यांचे ॥ ६५ ॥ तयावरी होय जितुकें । तें मरणही वरी निकें । परी येणें कल्मषें । चाड नाहीं ॥ ६६ ॥ ऐसें देखून सकळ । अर्जुनें आपुलें कुळ । मग म्हणे राज्य तें केवळ । निरयभोगु ॥ ६७ ॥

१ सर्व. २ दूषित. ३ पडतात. ४ स्नानसंध्यादि नित्य कर्में. ५ पर्वणीनिमित्त किंवा श्राद्धादि कर्में. ६ मंद होणें. ७ तर्पण. ८ सर्प. ९ बुडतें. १० लोकाचार. ११ माजघरात. १२ नरक. १३ सुटका.

मग त्या कुळास आणि कुळाचा नाश करणारास—अशा दोघांसही नरकप्राप्ति होते. ५२ ( मग ) हें पहा—याप्रमाणें सर्व वंशाची वृद्धि दूषित होऊन त्यांतील स्वर्गस्थ पूर्वज आपोआप पतन पावतात. ५३ ज्या कुळांत नित्य व नैमित्तिक कर्मे घडत नाहींत, त्या ठिकाणी पितरांना तिलोदक कोण अर्पण करणार ? ५४ अशी स्थिति झाल्यावर त्या पितरांनीं काय करावें व स्वर्गात कसें रहावें ? म्हणून तेही आपल्या कुळापाशी येतात. ५५ ज्याप्रमाणें नखास चावलेल्या सापाची वेदना शेंडीपर्यंत सर्वांग व्यापून टाकते, त्याप्रमाणें आप्तवर्गाचा वध करण्यापासून उत्पन्न होणारे हे दोष हल्लीं जिवंत असलेल्या कुळापासून मूळ पुरुषापर्यंत सर्वांस बुडवितात ! ५६

वर्णसंकर उत्पन्न करणाऱ्या ह्या कुलघातक पुरुषांच्या दोषामुळें, पुरातन जातिधर्म व कुलधर्म नाहींतसे होतात. ॥ ४३ ॥ ज्याचे कुलधर्म नष्ट झाले आहेत, त्या मनुष्यास निश्चयेंकरून नरकप्राप्ति होते असें आम्ही ऐकतों. ॥ ४४ ॥ अरेरे ! आम्ही राज्यसुखाच्या लोभानें आपल्या बांधवास मारण्यास उद्युक्त झालों, हें आम्ही मोठें पाप करण्यास तयार झालों आहों. " ॥ ४५ ॥

कृष्णा, या ठिकाणी आणखी एक महापातक घडतें. तें कोणतें म्हणाल तर, या दोषापासून लोकाचार नाहींतसे होतात. ५७ ज्याप्रमाणें घराला आग लागून तो अग्नि पेटल्यावर घराचे दुसरेही भाग जाळून टाकतो, ५८ त्याप्रमाणें, अशा कुळांचा ज्या लोकास सहवास घडतो, त्यांनाही त्यांच्या संगतीच्या योगानें पातक लागतें." ५९ अर्जुन म्हणतो: " देवा, त्याप्रमाणेंच, त्या कुळांत नानाप्रकारचे दोष घडून आले म्हणजे मग त्याला भयंकर नरकवास भोगावा लागतो. " २६० अर्जुन आणखी म्हणतो: " त्या नरकांत पडल्यावर मग कल्पांतींही तेथून त्याची सुटका होत नाहीं. इतकें या कुलक्षयापासून पतन होतें. ६१ आता, एवढा वेळपर्यंत चाललेली माझी ही कटकट ऐकूनही तिजपासून अजून आपल्या मनास त्रास होत नाहीं; तर आपण आपलें मन एवढें कठोर कां केलें ? ६२ असें पहा कीं, कुलक्षय करून ज्याच्याकरितां राज्यसुखाची इच्छा करावयाची, तें शरीर तर क्षणिक आहे, असें जाणूनही आम्ही कुलक्षयाचे दोष करण्याचें सोडूं नये काय ? ६३ आमचे जे हे सर्व वडील जमले आहेत, त्यांचा वध करावा या हेतूनें मी त्यांच्याकडे दृष्टि फेंकली, हें आमच्या हातून काय लहान पातक घडलें आहे सांगा बरें ? ६४

म्हणून, निःशस्त्र होऊन प्राणसंरक्षणार्थ मी काहीं प्रयत्न करीत नसताना जरी ह्या शस्त्रधारी कौरवांनीं माझा वध केला, तरी त्यात देखील माझें अधिकच कल्याण आहे. ॥ ४६ ॥

तर असें करून जें वांचावें, त्यापेक्षा आपले हातातील शस्त्र टाकून कौरवांचे बाण सहन करावे हें बरें. ६५ असें केल्यामुळें जरी मरण प्राप्त झालें, तरी तें चागलें. परंतु यांचा वध करून पाप जोडण्याची माझी इच्छा नाहीं." ६६ याप्रमाणें अर्जुनानें आपले सर्व कुल पाहून म्हटलें कीं, " यांचा क्षय करून राज्य मिळवणें म्हणजे केवळ नरकाची जोड करणें होय. " ६७

१४ एवढें. १५ पाप. १६ नानाप्रकार. १७ उद्भवत नाहीं. १८ इच्छावें. १९ शरीर. २० दीप. २१ दृष्टीपुढें. २२ घातलें. २३ कमी. २४ जगावें. २५ चागलें. २६ पापाची. २७ गरज. २८ नरकवास. शाने. ५.

संजय उवाचः—

एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् । विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ४७

अन्वय—शोकसंविग्नमानसः अर्जुनः संख्ये एवं उक्त्वा सशर चाप विसृज्य रथोपस्थे उपाविशत् ॥ ४७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादेऽर्जुनविषादयोगो नाम प्रथमोध्यायः ॥१॥

( ३२ मोहयुक्त अर्जुनाच्या स्थितीचें वर्णन, २६८ ते २७५ ) ऐसें तिये अवसरीं । अर्जुन बोलिला समरीं । संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ॥ ६८ ॥ मग अत्यंत उद्वेगला[१] । न धरेत गहिंवरु आला । तेथ उडी घातली खालां । रथौनियां[४] ॥६९॥ जैसा राजकुमर पदच्युतु[५] । सर्वथा होय उपहतु[६] । कां रवि राहुग्रस्तु । प्रभाहीतु[७] ॥ २७० ॥ नातरी महासिद्धिसंभ्रमें[८] । जिंतिला तपसु[१०] भ्रमे । मग आकळूनि कामें । दीनु कीजे ॥ ७१ ॥ तैसा तो धनुर्धरु । अत्यंत दुःखें जर्जरु । दिसे जेथ रहंवरु[१२] । त्यजिला तेणें ॥ ७२ ॥ मग धनुष्यबाण सांडिले । न धरत अश्रुपात आले । ऐसें ऐक राया वर्तलें । संजयो म्हणे ॥ ७३ ॥ आतां यावरी तो वैकुंठनाथु । देखोनि सखेद[१३] पार्थु । कवणेपरी परमार्थु[१४] । निरूपील ॥ ७४ ॥ ते सविस्तर पुढारी कथा । अति सकौतुक ऐकतां । ज्ञानदेव म्हणे आतां । निवृत्तिदास ॥ २७५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ श्लोक ४७ ओंव्या २७५.

---

१ उदास झाला. २ आवरण्यास अशक्य. ३ हुंदका. ४ रथातून. ५ स्थानभ्रष्ट. ६ मानरहित. ७ निस्तेज. ८ भपक्यानें, भ्रमानें. ९ जिंकिलेला. १० तपस्वी. ११ इच्छा. १२ रथ. १३ दुःखी. १४ तत्त्वज्ञान.

संजय म्हणालाः—याप्रमाणें बोलून, ज्याचें अंतःकरण शोकाकुल झालें आहे असा तो अर्जुन रथोपस्थावर बसला. ॥ ४७ ॥

संजय म्हणालाः—राजा धृतराष्ट्रा, ऐक. त्या वेळेस समरांगणांत उभा असलेला अर्जुन असें बोलला; ६८ आणि मग अत्यंत उदासीन झाला, व अनिवार गहिवर येऊन त्यानें रथावरून खालीं उडी टाकली. ६९ ज्याप्रमाणें एखादा राजकुमर पदच्युत झाला म्हणजे त्याला कोणीही मान देत नाहीं, किंवा राहूच्या योगानें सूर्यास ग्रहण लागलें म्हणजे तो निस्तेज होतो, २७० किंवा तपस्वी महासिद्धीच्या प्राप्तीच्या भ्रमानें व्यापला म्हणजे तपाचा त्याग करून कामाच्या सपाट्यांत सांपडून निंदेस पात्र होतो, ७१ त्याप्रमाणें तो अर्जुन रथाखालीं उतरल्यावर अत्यंत दुःखानें व्याप्त झालेला दिसला. ७२ संजय म्हणतो, " राजा, आणखी असें झालें कीं, त्यानें धनुष्यबाण टाकून दिले, व त्याच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा चालल्या. " ७३ आतां यापुढें, अर्जुनास दुःख झालेलें पाहून वैकुंठनाथ श्रीकृष्ण हे त्यास कशा रीतीनें तत्वज्ञानाचा बोध करतील, ७४ ती कौतुककारक कथा ऐका, असें निवृत्तिनाथाचे दास श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणाले. ७५

---

# ज्ञानेश्वरी

## अध्याय दुसरा

संजय उवाच—

तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम्। विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥

अन्वय—तथा कृपया आविष्टम् अश्रुपूर्णाकुलेक्षणं विषीदन्तं तं (अर्जुनं) मधुसूदनः इदं वाक्यं उवाच ॥ १ ॥

(३३ अर्जुनाची शोकाकुलता, १ ते ५) मग संजयो म्हणे रायातें। आइके तो पार्थु तेथें। शोकाकुल रुदनातें। करीत असे ॥ १ ॥ तें कुळ देखोनि समस्त। स्नेह उपनलें अद्भुत। तेणें द्रवलें असे चित्त। कवणेपरी ॥ २ ॥ जैसें लवण जळें झळंबलें। ना तरी अभ्र वातें हालें। तैसें सधीर परी विरमलें। हृदय तयाचें ॥ ३ ॥ म्हणोनी कृपा आकळिला। दिसतसे अति कोमाइला। जैसा कर्दमीं रुपला। राजहंसु ॥ ४ ॥ तयापरी तो पांडुकुमरु। महामोहें अति जर्जरु। देखोनी श्रीशांर्गधरु। काय बोले ॥ ५ ॥

श्रीभगवानुवाच—

कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम्। अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥

अन्वय—अर्जुन, अनार्यजुष्टं अस्वर्ग्यं अकीर्तिकर (च) इदं कश्मलं त्वा विषमे कुतः समुपस्थितम् ॥ २ ॥

(३४ देव अर्जुनास शोकाचीं कारणें विचारतात, ६-७) म्हणे अर्जुना आदि पाहीं। हें उचित काय इये ठायीं। तूं कवण हें कायी। करीत आहासी ॥ ६ ॥ तुज सांगे काय झालें। कवण उणें आलें। करितां काय ठेलें। खेदु कायिसा ॥ ७ ॥ (३५ देव अर्जुनाला शौर्याचें व मोठेपणाचें स्मरण देतात, ८ ते १२) तूं अनुचिता चित्त [10]नेदिसी। धीर कंहीं न सांडिसी[11]। तुझेनि नामें अपयशीं। दिशा लंविजे ॥८॥ तूं शूरवृत्तीचा ठावो। क्षत्रियांमाजीं रावो। तुझिया लाठेपणाचा आवो। तिहीं लोकीं ॥ ९ ॥ तुवां संग्रामीं हरु जिंकिला। निवातकवचांचा ठावो फेडिला। पवाडा तुवां केला। गंधर्वांसी ॥ १० ॥ पाहतां तुझेनि पाडें। दिसे त्रैलोक्य थोकडें[12]। ऐसें पुरुषत्व चोखडें। पार्था तुझें ॥ ११ ॥ तो तूं कीं आजि येथें। सांडूनियां वीरवृत्तीतें। अधोमुख रुदनातें। करीत आहासी ॥ १२ ॥ (३६ कारुण्यानें अर्जुनाचें दीनत्व, १३ ते १७) विचारीं तूं अर्जुनु। कीं कारुण्यें किजेसी दीनु। सांग पां

# ज्ञानेश्वरी

## अध्याय दुसरा

संजय म्हणालाः— याप्रमाणें करुणेनें व्याप्त झालेल्या, डोळे पाण्यानें भरून आलेल्या व खिन्न झालेल्या अर्जुनाला मधुसूदन असें बोलते झाले ।। १ ।।

मग संजय धृतराष्ट्र राजास म्हणालाः—महाराज, ऐका. अर्जुन त्या ठिकाणीं शोकानें व्याकुळ होऊन रुदन करूं लागला. १ तें आपलें कुळगोत पाहून त्याच्या मनांत विलक्षण मोह उत्पन्न झाला, आणि त्या योगानें त्याचें चित्त द्रवलें; कसें म्हणाल तर, २ पाण्यानें ज्याप्रमाणें मीठ विरघळतें, अथवा वाऱ्यानें ज्याप्रमाणें ढग नाहींतसे होतात, त्याप्रमाणें, तो मोठा धैर्यवान होता तरी त्याच्या हृदयास द्रव आला ! ३ जसा राजहंस पक्षी चिखलांत रुतल्यावर म्लान दिसतो, तसा तो ममतेनें व्याकुळ होऊन अगदीं म्लान दिसूं लागला. ४ याप्रमाणें तो पांडुकुमर अर्जुन महामोहानें ग्रस्त झालेला पाहून भगवान श्रीकृष्ण म्हणालेः—५

श्रीभगवान म्हणालेः—अर्जुना, थोर लोकांना मान्य न होणारा, स्वर्गप्राप्तीचे आड येणारा व इहलोकीं कीर्तीचा नाश करणारा असा हा मोह तुला हा युद्धप्रसंगीं कोठून उत्पन्न झाला ? ।। २ ।।

अर्जुना, अरे असें पहा, या ठिकाणीं तुला हें शोभतें काय ? तूं कोण आहेस व हें काय करीत आहेस याचा अगोदर विचार कर. ६ तुला काय झालें सांग बरें ? कोणतें कमी पडलें ? काय करण्याचें राहिलें ? आणि दुःख कशाकरितां झालें ? ७ तूं अनुचित गोष्टीकडे कधीं लक्ष देत नाहींस, व कधींही धीर सोडीत नाहींस. तुझ्या केवळ नामस्मरणानें अपयश दिगंती पळूत जातें. ८ तूं शौर्याचें केवळ आगर व क्षत्रियांचा मुकुटमणि आहेस, व तुझ्या शौर्याचा डंका त्रैलोक्यांत गाजत आहे. ९ तूं युद्धात शंकरास जिंकिलेंस; निवातकवचांचा समूळ उच्छेद केलास; आणि आपलें यश गंधर्वास गाण्यास विषय करून ठेविलेंस. १० अर्जुना, ज्या तुझा पराक्रम एवढा मोठा आहे कीं, त्याच्या तुलनेला हें त्रिभुवन देखील कमी आहे, ११ तोच तूं आज वीरवृत्ति सोडून खालीं तोंड घालून रडत बसला आहेस ! १२ अर्जुना, तूं करुणेनें इतका दीन झाला आहेस याचा विचार कर ! अरे, अंधकारानें सूर्याला कधीं गिळून टाकलें आहे का

१ उपजलें. २ विरघळतें. ३ धैर्ययुक्त. ४ विरघळलें. ५ ममतेनें. ६ म्लान झाला. ७ चिखलांत. ८ राहिलें. ९ कशाकरितां. १० देत नाहींस ११ सोडीत नाहींस. १२ ठिकाण १३ शौर्याचा, मोठेपणाचा. १४ प्रतिष्ठा, डंका. १५ शंकर. १६ बरोबरीनें १७ लहान. १८ चांगलें. १९ विचार कर. २० केला गेलास.

अंधकारें भानु । ग्रासिला ओंथी ॥ १३ ॥ ना तरी पवनु मेघासि बिहे[3] । कीं अमृतासि मरण आहे । पाहे पां इंधनाचि गिळोनि जाये । पावकातें ॥ १४ ॥ कीं लवणेंचि जळ विरे । संसर्गें काळकूट मरे । सांग पां महाफणी दर्दुरें[7] । गिळिजे कायी ॥ १५ ॥ सिंहासि झोंबे कोल्हा । ऐसा अपाडु आथि कें[8] जहाला । परी तो त्वां सांच केला । आजि एथ ॥ १६ ॥ म्हणोनि अझुनी अर्जुना । झणें चित्त देसी या हीना । वेगीं धीर करूनियां मना । सावधु होई ॥ १७ ॥ ( ३७ मूर्खत्व टाकून शहाणा होण्याचा देवांचा उपदेश, १८ ते २९ ) सांडी हें मूर्खपण । उठी घे धनुष्यबाण । संग्रामीं हें कवण । कारुण्य तुझें ॥ १८ ॥ हां गौं तूं जाणता । तरी न विचारिसी कां आतां । सांगे झुंझावेळे सदयता । उचितु कायी ॥ १९ ॥ हे असतिये कीर्तीसी नाशु । आणि पारत्रिकासि अपभ्रंशु । म्हणे जगन्निवासु । अर्जुनातें ॥ २० ॥

क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते । क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥

*अन्वय—पार्थ, क्लैब्यं मा गमः स्म एतत् त्वयि न उपपद्यते. हे परंतप ! ( इदं ) क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वा उत्तिष्ठ ॥ ३ ॥*

म्हणोनि शोकु न करी । तूं पुरता धीरु धरी । हे शोच्यता अव्हेरी । पंडुकुमरा ॥ २१ ॥ तुज नव्हे हें उचित । येणें नासेल जोडलें बहुत । तूं अझुनि तरी हित । विचारी पां ॥ २२ ॥ येणें संग्रामाचेनि अवसरें । एथ कृपाळुपण नुपकरे । हे आतांचि काय सोयरे । जाहले तुज ॥ २३ ॥ तूं आधींचि काय नेणसी । कीं हे गोत्रज नोळखसी । वायांचि काय करिसी । अतिशयो आतां ॥ २४ ॥ आजिचें हें झुंज । काय जन्मा नवल तुज । हें परस्परें तुम्हां व्याज । सदांचि आथी ॥ २५ ॥ तरी आतां काय जाहलें । कायि स्नेह उपनलें । हें नेणिजे परी कुडें केलें । अर्जुना तुवां ॥ २६ ॥ मोह धरिलिया ऐसें होईल । जे असती प्रतिष्ठा जाईल । आणि परलोकही अंतरेल । ऐहिकेंसीं[14] ॥ २७ ॥ हृदयाचें ढिलेपण । एथ निकयासि नव्हे कारण । हें संग्रामीं पतन जाण । क्षत्रियांसी ॥ २८ ॥ ऐसेनि तो कृपावंतु । नानापरी असे शिकवितु । ( अर्जुन उवाच ) हें ऐकोनि पंडुसुतु । काय बोले ॥ २९ ॥

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन । इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥

*अन्वय—( हे ) मधुसूदन ! अहं भीष्मं द्रोणं च संख्ये इषुभिः कथं प्रतियोत्स्यामि ! (यतः) हे अरिसूदन ! ( तौ ) पूजार्हौ ( स्तः ) ॥ ४ ॥*

( ३७ धर्मग्राह्य वर्तन कसें करावें, ३० ते ३८ ) देवा हें येतुलेंवरी । बोलावें नलगे

---

१ आहे. २ वारा. ३ भय पावे. ४ सर्पण. ५ अग्नीला. ६ मोठा सर्प. ७ बेडकानें. ८ विलक्षण गोष्ट. ९ कोठें. १० खरा. ११ नको. १२ अरे. १३ विचार करीत नाहींस. १४ योग्य.

सांग बरें ? १३ किंवा वाऱ्यास मेघाचें भय कधीं वाटलें आहे ? अथवा अमृतास कधीं मरण आहे ? किंवा लांकडानें कधी अग्नि गिळला आहे ? १४ अथवा मिठानें कधी पाणी विरलें आहे ? किंवा कालकूट विप हें दुसऱ्या विपाच्या बाधेनें मेलें आहे ? अथवा मोठ्या भुजंगाला कधीं बेडकानें गिळलें आहे ? १५ बरें, कधी कोल्ह्यानें सिंहाबरोबर झोंबी केली आहे ? अशा विलक्षण गोष्टी कधीं तरी घडल्या आहेत का ? पण त्या तूं येथें आज खऱ्या करून दाखविल्यास ! १६ म्हणून, अर्जुना, अजून या गोष्टीकडे लक्ष न देतां मनास लवकर धीर देऊन सावध हो. १७ हा मूर्खपणा सोडून उठ, व धनुष्यबाण हातीं घे. कारण, या रणभूमीवर तुझ्या या करुणेचा काय उपयोग ? १८ अर्जुना, तूं ज्ञाता असून या वेळीं विचार कसा करीत नाहींस ? अरे, युद्धाचे प्रसंगीं दया असणें योग्य आहे का सांग बरें ? १९ श्रीकृष्ण म्हणतात:—अर्जुना, हें तुझें वर्तन असलेल्या कीर्तीचा नाश करणारें व परलोकगतीस मुकविणारें आहे ! २०

पार्था, हा नामर्दपणा धरूं नको. हा तुला शोभत नाहीं. हे शत्रूंस ताप देणाऱ्या अर्जुना, क्षुद्र असें हें मनाचें दुबळेपण टाकून युद्धाकरितां ऊठ ॥ ३ ॥

म्हणून अर्जुना, तूं शोक करूं नको. धीर धरून हा खेद टाकून दे. २१ तुला हें करणें चांगलें नाहीं. तूं आजपर्यंत जें कांहीं संपादन केलें आहेस, त्याचा (यायोगानें) नाश होईल; म्हणून आतातरी जी हिताची गोष्ट असेल ती कर. २२ यांच्याशीं संग्राम करण्याचे वेळीं कृपाळूपणा उपयोगी नाही. हे कौरव याच वेळेस तुझे नातलग झाले आहेत कीं काय ? २३ ही गोष्ट तुला पूर्वीं माहित नव्हती का ? किंवा हे नातेवाईक आहेत हें तूं ओळखीत नव्हतास का ? मग आताच हा व्यर्थ पाल्हाळ कां लावला आहेस ? २४ आजचा हा युद्धप्रसंग तुला जन्मांत नवीन का आहे ? तुम्हा परस्पराना युद्धाला नेहमींचेंच निमित्त आहे. २५ मग आतांच काय झालें ? आतांच हा स्नेह कोठून उद्भवला ? मला तर बाबा हें कांहींच समजत नाहीं. पण, अर्जुना, ही गोष्ट तूं फार वाईट केलीस. २६ जर तूं हा मोह धारण केलास, तर आजपर्यंत मिळविलेला लौकीक जाऊन इहपरलोकांसही अंतरशील. २७ अंतःकरणांत शिथिलता असणें हें कांहीं चांगलें नाहीं; क्षत्रियांस युद्धाचे ठिकाणी ही शिथिलता म्हणजे नरकाचें साधन आहे. २८ याप्रमाणें त्या दयाळु भगवंतानीं पुष्कळ प्रकारें केलेला बोध ऐकून अर्जुन बोलला:—२९

अर्जुन म्हणाला:—हे मधुसूदना ! मी ह्या युद्धात भीष्म व द्रोणाचार्य यांच्यावर बाण कसे सोडूं ? कारण, हे शत्रुदमना, ते पूजा करण्यास योग्य आहेत. ॥ ४ ॥

देवा ! ऐका. इतकें बोलायचें कांहीं कारण नाहीं. ह्या युद्धाविषयीं आधीं आपणच

१५ असलेल्या. १६ परलोकगतीला. १७ खेद. १८ टाक. १९ प्रसंगीं. २० उपयोगी नाहीं. २१ पाल्हाळ. २२ निमित्त. २३ वाईट. २४ इहलोकासह. २५ चागुलपणाला. २६ कृपाळू. २७ इतकें.

अवधारी । आधीं तूंचि विचारी । संग्रामु हा ॥ ३० ॥ हें झुंज नव्हे प्रमादु । एथ प्रवर्तलिया दिसे बाधु । हा उघड लिंगभेदु । वोढवला आम्हां ॥ ३१ ॥ देखे मातापितरें अर्चिजती । सर्वस्वें तोष पावविजती । तियें पाठीं केविं वधिजती । आपुलिया हातीं ॥ ३२ ॥ देवा, संतवृंद नमस्कारिजे । कां घडे तरी पूजिजे । हें वांचूनि केवीं निंदिजे । स्वयें वाचा ॥ ३३ ॥ तैसे गोत्रगुरु आमुचे । पूजनीय आम्हां नेमाचे । मज बहुत भीष्मद्रोणांचें । वर्ततसे ॥ ३४ ॥ जयांलागीं मनें विरूं । आम्ही स्वप्नीं न शकों धरूं । तयां प्रत्यक्ष केवीं[15] करूं । घातु देवा ॥ ३५ ॥ वरी जळो हें जियालें । एथ आघवेयांसि हेंचि काय जाहलें । जे यांच्या वधीं अभ्यासिलें । मिरविजे आम्हीं ॥ ३६ ॥ मी पार्थु द्रोणाचा केला । येणें धनुर्वेदु मज दिधला । येणें उपकारें काय आभारैला । वधीं तयातें ॥ ३७ ॥ जेथींचिया कृपा लाहिजे वरु । तेथेंचि मनें व्यभिचारु । तरी काय मी भस्मासुरु । अर्जुन म्हणे ॥ ३८ ॥

गुरूनहत्वा हि महानुभावाञ्श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ॥
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुञ्जीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥

अन्वय—महानुभावान् गुरून् हि अहत्वा, इहलोके भैक्ष्यं भोक्तुम् अपि श्रेयः ( अस्ति; ) अर्थकामान् गुरून् हत्वा तु इह एव ( न तु स्वर्गे ) रुधिरप्रदिग्धान् भोगान् भुंजीय ॥ ५ ॥

( ३९ द्रोणाचार्यांचे उपकार व थोरवी, ३९ ते ४४ ) देवा समुद्र गंभीर आइकिजे । वरि तोहि आहाच देखिजे । परी क्षोभ मनीं नेदिजे । द्रोणाचिये ॥ ३९ ॥ हें अपार जें गगन । वरी तयाही होईल मान । परी अगाध भलें गहन । हृदय याचें ॥ ४० ॥ वरी अमृतही विटे[23] । कीं काळवशें वज्रही फुटे । परी मनोधर्मु न लोटे । विकरविलाही ॥ ४१ ॥ स्नेहालागीं माये । म्हणिपे कीरें[28] होये । परी कृपा ते मूर्त आहे । द्रोणीं[30] इये ॥ ४२ ॥ हा कारुण्याची आदि । सकळ गुणांचा निधि[32] । विद्यासिंधु निरवधि । अर्जुन म्हणे ॥ ४३ ॥ हा येणें मानें महंतु । वरी आम्हांलागीं कृपावंतु । आतां सांग पां येणें घातु । चिंतूं येईल ॥ ४४ ॥ (४० युद्ध न करण्याचीं कारणें, ४५ ते ४९ ) ऐसे हे रणीं वधावे । मग आपण सुखें राज्य भोगावें । तें मना नये आघवें ।[35] जीवितेसीं ॥ ४५ ॥ हें येणें मानें दुर्धर । जे यांहीहूनी भोग[37] सधर । ते असतु एथवर । भिक्षा मागतां भली ॥ ४६ ॥ ना देहत्यागें जाइजे । का गिरिकंदरें सेविजे । परी शस्त्र आतां न धरिजे । इयांवरी ॥ ४७ ॥ देवा नवनिशितीं शरीं । बाबरोनी यांच्या जिव्हारीं ।

१ ऐका. २ अमर्यादा. ३ दोष. ४ थोराचा उच्छेद. ५ प्राप्त झाला. ६ पूजिले जातात. ७ पावतात. ८ मागून. ९ साधुसमूह. १० सोडून. ११ कुलगुरु. १२ पूज्य. १३ ऋण. १४ वैर. १५ कोणत्या प्रकारें. १६ जिणें. १७ सर्वांस. १८ शिष्य. १९ प्राप्त करून घ्यावा. २० विपर्यास.

विचार करा. ३० हें युद्ध नसून आमचे हातून मोठी अमर्यादा होत आहे; हें करण्याला आम्ही प्रवृत्त झालों, तर हा दोष आहे; इतकेंच नव्हे, तर आम्ही आराध्यदेवताचा उघड उघड उच्छेद करीत आहों. ३१ असें पहा कीं, मातापिराची सेवा करून त्याना सर्व प्रकारें संतुष्ट ठेवावें; आणि मागून आपण आपल्याच हातानें त्याचा वध कसा करावा ? ३२ देवा, साधुसंताना नमस्कार करावा, घडेल तर त्याची पूजा करावी, पण हें सोडून आपण आपल्याच मुखाने त्याची निंदा करावी ? ३३ त्याचप्रमाणे, हे तर आमचे कुलगुरु असून आम्हाला सर्वदा पूज्य आहेत. त्यातून भीष्म व द्रोण याचा तर मी फार ऋणी आहे. ३४ देवा, ज्यांच्याविषयीं आम्हीं स्वप्नांत देखील वैर धरूं शकत नाहीं, त्याचा प्रत्यक्ष घात कसा करावा बरें ? ३५ आज या सर्वांच्या अकलींना झाले आहे तरी काय ? ज्या शस्त्रविद्येचा अभ्यास आम्हीं याच्यापाशीं केला, तिचा उपयोग याना मारण्याकडे करून त्याविषयीं प्रतिष्ठा मिरवावयाची; असे जर होईल, तर जळो हें जिणें ! ३६ मी अर्जुन, द्रोणाचार्यांचा शिष्य; त्यानींच मला धनुर्विद्या शिकविली, तर आता त्याना मारून त्याच्या त्या उपकाराची फेड करूं होय ? ३७ अर्जुन म्हणतो.—ज्याच्या कृपेनें आम्हीं वरप्राप्ति करून घ्यावी, त्याच्याशींच कृतघ्नपणा करायला मी का भस्मासुर आहे ?

अशा उदार अंतःकरणाच्या भीष्मद्रोणादि गुरूंस न मारता ह्या लोकीं भिक्षा मागूनही निर्वाह करणें हें मला कल्याणकारक वाटतें. कारण गुरुजन जरी अर्थलुब्ध असले, तरी त्याना मारून त्याच्या रक्तानें भरलेले भोग इहलोकींच ( स्वर्गलोकीं नव्हे ) आम्हाला भोगावे लागणार ! ॥ ५ ॥

देवा, समुद्र गंभीर आहे असें ऐकतो, तथापि ते वरकरणींच; परंतु द्रोणाचार्यांविषयीं म्हटले तर त्याना राग म्हणजे काय हे माहीत सुद्धा नाहीं. ३९ आकाशाचा अंत नाहीं, पण त्याचेही माप करता येईल, परंतु द्रोणाचार्यांचे अंतःकरण इतकें खोल आहे कीं, त्याचे माप करता येणार नाहीं. ४० कदाचित् अमृतही अंबेल, किंवा वज्रही फुटेल, पण द्रोणाचार्यांस प्रयत्नानींही राग यावयाचा नाहीं. ४१ आईशिवाय इतरांची माया व्यर्थ होय अशी जी म्हण आहे; ती खरी आहे, परंतु द्रोणाचार्यांचे ठिकाणीं माया मूर्तिमंत वास करिते. ४२ अर्जुन म्हणतो.—हे आचार्य म्हणजे दयेचा उगम, सर्व गुणाची खाण, व विद्येचे केवळ महानिधि आहेत, ४३ अशा प्रकारें हे सर्वश्रेष्ठ असून आम्हाविषयीं तर पूर्ण कृपावंत आहेत, तेव्हा याचा घात करण्याचें मनात आणणे तरी योग्य होईल का ? ४४ अशाना रणात मारून मग आपण सुखानें राज्य भोगावें हीं गोष्ट अंतःकरणापासून माझ्या मनात येत नाहीं, ४५ इतकें हें कृत्य कठिण आहे. याच्यापेक्षा राज्यभोग श्रेष्ठ असतील, तर असोत बिचारे ! पण त्यापेक्षा

२१ वरकातींच. २२ माप. २३ अंबेल. २४ पालटत नाहीं. २५ क्षोभविला. २६ आई. २७ म्हणतात. २८ खरें. २९ मूर्तिमत ३० ह्या. ३१ मूळ. ३२ समुद्र. ३३ विद्येचा सागर. ३४ मर्यादारहित. ३५ अंतःकरणापासून. ३६ कठिण, मोठे ३७ राज्यसुख. ३८ मोठे. ३९ पर्वताची गुहा. ४० ताजी धार लावलेल्या बाणानीं. ४१ प्रहार करून. ४२ मर्मस्थानीं.

भोग गिंवसावे रुधिरीं[2] । बुडाले जे ॥ ४८ ॥ ते काढूनि काय किजती । लिप्त केवीं सेविजती । मज नये हे उपपत्ती । याचिलागीं ॥ ४९ ॥ ( ४१ देवांची नापसंती, ५० ते ५१ ) अवतरण:—ऐसें अर्जुन ते अवसरीं । म्हणे श्रीकृष्णा अवधारीं । परि तें मना नयेचि मुरारी । आइकोनियां ॥ ५० ॥ हें जाणोनि पार्थ भ्याला । मग पुनरपि बोलों लागला । म्हणे देवो कां चित्त या बोला । देतीचि ना ॥ ५१ ॥

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः।
यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥

*अन्वय—नः कतरत् गरीयः इति एतत् न च विद्मः, यद्वा ( वयं तान् ) जयेम यदि वा ( ते ) नो जयेयुः ( इति एतदपि न विद्मः ); यान् हत्वा न जिजीविषामः एव ते धार्तराष्ट्राः प्रमुखे अवस्थिताः ॥ ६ ॥*

( ४२ युद्ध करावें कीं न करावें हें निश्चित सांगा, ५२ ते ५७ ) येऱ्हवीं माझ्या चित्तीं जें होतें । तें मी विवरूनि बोलिलों एथें । परी निकें काय यापरौतें । तें तुम्ही जाणा ॥ ५२ ॥ पैं विरु जयांसी ऐकिजे । आणि या बोलींचि[11] प्राण सांडिजे । ते एथ संग्रामव्याजें । उभे आहाती ॥ ५३ ॥ आतां ऐसेयांतें वधावें । कीं अव्हेरूनियां निघावें । या दोहोंमाजीं बरवें । तें नेणों आम्ही ॥ ५४ ॥

कार्पण्यदोषोपहतस्वभावः । पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ॥
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे । शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥

*अन्वय—कार्पण्यदोषोपहतस्वभावः धर्मसंमूढचेताः अहं त्वां पृच्छामि, यत् निश्चितं श्रेयः स्यात् तन्मे ब्रूहि; अहं ते शिष्यः ( अस्मि ), त्वां प्रपन्नं मा शाधि ॥ ७ ॥*

आम्हां काय उचित । तें पहातां न स्फुरे येथ । [14]जे मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें ॥ ५५ ॥ तिमिरावरुद्ध जैसें । दृष्टीचें तेज भ्रंशे । मग पासींच असतां न दिसे । वस्तुजात ॥ ५६ ॥ देवा तैसें मज जाहलें । जे मन हें भ्रांती ग्रासिलें । आतां काय हित आपुलें । तेंही नेणें ॥ ५७ ॥ ( ४३ धर्माला विरुद्ध न होतां निश्चित कल्याण कशानें होईल, ५८ ते ६३ ) तरी श्रीकृष्णा तुवां जाणावें । निकें तें आम्हां सांगावें । जे सखा सर्वस्व आघवें । आम्हांसि तूं ॥ ५८ ॥ तूं गुरु बंधु पिता । तूं आमुची इष्ट देवता । तूंचि सदा रक्षिता । आपदीं आमुतें ॥ ५९ ॥ जैसा शिष्यातें गुरु । सर्वथा नेणे अव्हेरू । कीं सरितांतें सागरु । त्यजी केवीं ॥ ६० ॥ ना तरी अपत्यांतें माये । सांडूनि जरी जाये । तरी तें कैसेनि जिये[21] । ऐकें कृष्णा ॥ ६१ ॥ तैसा सर्वांपरी आम्हांसी । देवा तूंचि एक आहासी । आणि बोलिलें जरी न मानिसी[23] । मागील माझें ॥ ६२ ॥

१ शोधावे. २ रक्तांत. ३ करावे. ४ रक्तानें माखलेले. ५ युक्ति, कृत्य. ६ त्या वेळीं. ७ स्पष्ट करून. ८ वैरें. ९ पलीकडे. १० वैर. ११ असें बोलतांच. १२ युद्धाचे निमित्तानें. १३ मुचे. १४ कारण.

भिक्षा मागणेंच बरें. ४६ नाहींपेक्षां देशत्याग करावा, अथवा गिरिकंदरांत जाऊन रहावें, परंतु यांजवर आतां शस्त्र म्हणून धरूं नये. ४७ देवा, नवीन पाजळलेल्या बाणांनीं यांच्या मर्मस्थानीं प्रहार करून त्यांच्या रक्तांत बुडून गेलेले जे भोग शोधून काढावयाचे, ४८ ते प्राप्त करून घेऊन करावयाचें काय ? आणि रक्तानें भरलेले ते भोग कसे उपभोगावयाचे ? म्हणून हें करणें माझ्या मनास येत नाहीं. ४९ अशा प्रकारें बोलून त्या वेळेस अर्जुन श्रीकृष्णांस म्हणाला: " देवा, ऐकलें का ? " परंतु तें बोलणें कृष्णास पसंत पडलें नाहीं, ५० असें पाहून अर्जुन आपल्या मनांत भिऊन पुनः म्हणाला:—देवा, माझ्या बोलण्याकडे आपण लक्ष कां देत नाहीं ? ५१

( आतां सांगितलेलें युद्ध किंवा भिक्षाटन यांपैकीं ) कोणतें आम्हांस अधिक श्रेयस्कर आहे, हें, व यांना आम्ही जिंकूं किंवा हे आम्हांला जिंकतील हेंही मला कळत नाहीं. ज्या कौरवांना मारून आम्ही जगण्याची देखील इच्छा करीत नाहीं, ते तर माझ्यासमोर युद्धास तयार होऊन उभे राहिले आहेत ॥ ६ ॥

बाकी माझ्या मनांत जें होतें, तें मी येथें स्पष्ट करून बोललों; परंतु यापेक्षां चांगलें कोणतें तें तुम्हांसच माहीत. ५२ हें पहा—ज्यांच्याशीं आमचें वैर आहे हीं अक्षरें ऐकल्याबरोबर आम्हीं प्राण सोडावे, तेच रणभूमीवर संग्राम करण्याकरितां उभे आहेत, ५३ तर यांना मारावें किंवा सोडून निघून जावें, या दोहोंमध्यें चांगली गोष्ट कोणती हें आम्हांला समजत नाहीं. ५४

अज्ञाननिमित्तक दोषामुळें माझें अंतःकरण दूषित झालें आहे, व माझें कर्तव्य काय आहे हें मला समजत नाहीं, म्हणून तुम्हांला मी विचारतों. तर यांत निश्चयेंकरून कल्याणकारक जें असेल तें मला सांगा. मी तुमचा शिष्य आहे व तुम्हांला शरण आलों आहें. यास्तव मला उपदेश करा ॥ ७ ॥

आम्हांस कोणती गोष्ट करणें योग्य आहे हें सुचत नाहीं; कारण, या मोहानें माझें चित्त व्याकुळ झालें आहे. ५५ ज्याप्रमाणें अंधारानें डोळ्यांचें तेज नाहींसें झालें म्हणजे जवळ असलेलाही पदार्थ दिसत नाहीं, ५६ त्याप्रमाणें देवा, माझी स्थिति झाली आहे. माझें मन भ्रांतीनें ग्रासून गेलें असून, आपलें हित कशांत आहे तेंही मला समजत नाहीं. ५७ तर श्रीकृष्णा, आपण विचार करून खरें असेल तें आम्हांला सांगा; कारण, आमचें सर्व प्रकारें साह्य करणारे आपण आहां. ५८ आमचे गुरु, बंधु, बाप, कुलदैवत आणि नेहमीं संकटसमयीं रक्षण करणारे आपणच आहां. ५९ ज्याप्रमाणें गुरु शिष्याचा अव्हेर करीत नाहीं, किंवा समुद्र नद्यांचा अव्हेर कसा करील ? अथवा देवा, आपणच विचार करा, कीं आई मुलास सोडून गेली तर तें कसें वांचेल ? ६१ त्याचप्रमाणें, सर्वतोपरी आम्हांस आपणच आहां, व इतका वेळपर्यंत जें मी आपल्याला बोललों तें जर तुम्हांस पटत नसेल, ६२ तर

१५ अंधारानें वेष्टित. १६ जवळ. १७ पदार्थमात्र. १८ आपत्कालीं. १९ नद्यांना. २० मुलाला. २१ वांचेल. २२ ( तुला ) मान्य नसेल.

तरी उचित काय आम्हां । जें व्यभिचरेना धर्मा । तें झडकरी पुरुषोत्तमा । सांग आतां ॥ ६३ ॥

न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ।
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८ ॥

अन्वय—भूमौ असपत्नं ऋद्धं राज्यं अवाप्य अपि सुराणां आधिपत्यं अवाप्य हि यत् मम इंद्रियाणां उच्छोषणं शोकं अपनुद्यात् तत् न प्रपश्यामि ॥ ८ ॥

( ४४ शिष्य-भावानें शरण होऊन उपदेशाची प्रार्थना, ६४ ते ६९ ) हें सकळ कुळ देखोनी । जो शोक उपनलासे मनीं । तो तुझिया वाक्यावांचुनी । न जाय आणिकें ॥ ६४ ॥ एथ पृथ्वीतळ आप होईल । हें महेंद्रपदही पाविजेल । परि मोह हा न फिटेल । मानसींचा ॥ ६५ ॥ जैसीं सर्वथा बीजें आहाळलीं । तीं सुक्षेत्रीं जर्‍ही पेरिलीं । तरी न विरूढती सिंचलीं । आवडे तैसीं ॥ ६६ ॥ ना तरी आयुष्य पुरलें आहे । तरी औषधें कांहीं नोहे । एथ एकचि उपेगा जाये । परमामृत ॥ ६७ ॥ तैसें राज्यभोगसमृद्धी । उज्जीवन नोहे इये बुद्धी । एथ जिव्हाळा कृपानिधी । कारुण्य तुझें ॥ ६८ ॥ ऐसें अर्जुन तेथें बोलिला । जंव क्षणएक भ्रांती सांडिला । मग पुनरपि व्यापिला । उर्मी तेणें ॥ ६९ ॥ ( ४५ ज्ञानेश्वरांचें काव्य, दोन रूपकें, ७० ते ८० ) कीं मज पाहतां उर्मी नोहे । हें अनारिसें गमतें आहे । तो ग्रासिला महामोहें । काळसर्पे ॥ ७० ॥ सर्वमर्म हृदयकल्हारीं । तेथ कारुण्यवेळेच्या भरीं । लावला म्हणोनि लहरी । भांजेचि ना ॥ ७१ ॥ हें जाणोनि ऐसी प्रौढी । जो दृष्टिसवेंचि विष फेडी । तो धांवया श्रीहरी गारुडी । पातला कीं ॥ ७२ ॥ तैसिया पंडुकुमरा व्याकुळा । मिरवतसे श्रीकृष्ण जवळा । तो कृपावशें अवलीळा । रक्षील आतां ॥ ७३ ॥ म्हणोनि तो पार्थु । मोहफणिग्रस्तु । म्यां म्हणितला हा हेतु । जाणोनियां ॥७४॥ मग देखा तेथ फाल्गुनु । घेतला असे भ्रांती कवळनु । जैसा घनपडळीं भानु । आच्छादिजे ॥ ७५ ॥ तयापरी तो धनुर्धरु । जाहलासे दुःखें जर्जरु । जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवरु । वणवला का ॥ ७६ ॥ म्हणोनि सहजें सुनीळु । कृपामृतें सजळु । तो बोलला श्रीगोपाळु । महामेघु ॥ ७७ ॥ तेथ सुदर्शनाची द्युती । तेचि विद्युल्लता झळकती । गंभीर वाचा ते आयती । गर्जनेची ॥ ७८ ॥ आतां तो उदार कैसा वर्षेल । तेणें अर्जुनाचळु निवेल । मग नवी विरूढी फुटेल । उन्मेषाची ॥ ७९ ॥ ते कथा आइका । मनाचिया आराणुका । ज्ञानदेव म्हणे देखा । निवृत्तिदासु ॥ ८० ॥

१ विरुद्ध नसेल. २ प्राप्त. ३ इंद्रपद. ४ भाजल्लीं. ५ चांगल्या शेतात. ६ उगवत नाहींत. ७ मनाजोगीं. ८ सरलें ९ उपयोगीं. १० भगवन्नामामृत. ११ उत्तेजन. १२ आश्रय. १३ वेग, लहर. १४ वेगळेंच. १५ धारत. १६ मर्मयुक्त. १७ हृत्कमलीं. १८ भंगेना. १९ मोठा प्रसंग. २० समज.

पुरुषोत्तमा, जी गोष्ट आम्हांस उचित असून धर्मविरुद्ध नसेल, ती लवकर सांगा. ६३

इहलोकीं, पृथ्वीचें निष्कंटक व सपन्न राज्य अथवा ( स्वर्गी ) देवाचें आधिपत्य म्हणजे इद्रपद मिळालें, तरीही, माझ्या इंद्रियाना शोषून टाकणारा हा शोक कोणत्या उपायानीं दूर होईल हें मला कळत नाहीं.

हे सर्व गोत्रज पाहून माझ्या मनांत जो शोक उत्पन्न झाला आहे, तो आपल्या उपदेशावांचून दुसऱ्या कोणत्याही उपायानें नाहींसा होणार नाहीं. ६४ या ठिकाणी पृथ्वीचें राज्य मिळालें किंवा इंद्रपद प्राप्त झाले, तरी देखील माझ्या अंत.करणात उत्पन्न झालेला हा दयारूप मोह दूर होणार नाही. ६५ ज्याप्रमाणें भाजलेलें बीं कितीही उत्तम जमिनीत पेरलें व त्यास मनमुराद पाणी घातलें, तरी उगवत नाहीं; ६६ किंवा जेथें आयुष्य संपलें आहे तेथें एका परमामृताशिवाय इतर औषधाचा कांहीं उपयोग होत नाही, ६७ त्याप्रमाणें या माझ्या मोहित बुद्धीला सर्व राज्यभोग व संपत्ति यांचा बिल्कुल उपयोग होणार नाहीं. तर, हे कृपानिधे, तुझा जिव्हाळाच उपयोगीं पडेल. ६८ याप्रममाणें क्षणभर भ्रांति दूर झाल्यामुळें अर्जुन त्या ठिकाणी बोलला, परंतु त्याला पुन. मायेच्या लहरीनें ग्रासिलें. ६९ ज्ञानेश्वर म्हणतात.—ह्याला मायेची लहर नसून हा कांहीं निराळाच प्रकार असावासें मला वाटतें. तो कोणता ? तर महामोह हाच कोणी काळसर्प, त्यानें अर्जुनास ग्रासलें; ७० आणि हृदयकमलांत कारुण्याची उसळी आली आहे अशी संधि साधून मर्मस्थानीं दंश केला, म्हणून त्यास लहरींवर लहरी येऊन झेंडू फुटला ! ७१ असा कठिण प्रसंग पाहून ज्याच्या कृपादृष्टीने विष नाहींसें होतें तो श्रीकृष्णरूपी गारुडी त्याचें रक्षण करण्याकरितां धावून आला. ७२ तशा त्या व्याकुळ झालेल्या पंडुकुमराजवळ असलेला श्रीकृष्ण आपल्या कृपादृष्टीनें आता सहज त्याचें रक्षण करील; ७३ म्हणून, मोह हाच कोणी सर्प व त्याने पार्थाला ग्रासलें आहे हा हेतु मनात धरून मीं येथें ही उत्प्रेक्षा केली. ७४ ज्याप्रमाणें ढगांनीं सूर्य आच्छादित होतो, त्याप्रमाणें अर्जुन ह्या वेळी भ्रांतीनें आच्छादित झाला. ७५ जसा उन्हाळ्यांत डोंगराला वणवा लागतो, तसा तो अर्जुन दु.खानें अगदीं जर्जर होऊन गेला. ७६ म्हणून, वणवा लागलेल्या डोंगरावर जसे निळ्या रंगाच्या पाण्यानें भरलेले ढग कोसळून तो शात करितात, तसा आधीच नीलवर्ण व कृपामृतरूप जलानें भरलेला तो महामेघरूप गोपाळ वळला. ७७ त्या श्रीकृष्णरूप मेघाचे ठिकाणीं दांतांची प्रभा हीच वीज, गंभीर भाषण हीच गर्जना, ७८ असा तो श्रीभगवानरूप उदार मेघ आतां कशी वृष्टि करील, व त्या वृष्टीने अर्जुनरूप पर्वत कसा शांत होईल, आणि त्याला ज्ञानाचा कसा नवा अंकुर फुटेल, ७९ ती कथा मनाच्या समाधानासाठीं ऐका, असें निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणाले. ८०

२१ मोहरूपी सर्पानें ग्रासलेला. २२ अर्जुन. २३ भ्रांतीनें व्यापून. २४ ढगाच्या पडद्यानीं. २५ उन्हाळ्यात. २६ पेटला. २७ उत्तम श्यामवर्ण. २८ साहित्य, सामुग्री. २९ दाताची प्रभा. ३० अर्जुनरूप पर्वत. ३१ पालवी. ३२ ज्ञानाची. ३३ समाधानाकरिता.

संजय उवाच—

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतपः। न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूर्ष्णी बभूव ह ॥९॥

अन्वय—परंतपः गुडाकेशः हृषीकेशं एवम् उक्त्वा 'न योत्स्ये' इति गोविंदं उक्त्वा तूर्ष्णीं बभूव ह ॥ ९ ॥

( ४६ संजय, शोकयुक्त अर्जुनाचा अभिप्राय सांगतो, ८१ ते ८३ ) ऐसें संजय असे सांगत। म्हणे राया तो पार्थ। पुनरपि शोकाकुळित। काय बोले ॥ ८१ ॥ आइकें सखेद बोले श्रीकृष्णातें। आतां नाळवावें तुम्हीं मातें। मी सर्वथा न झुंजें एथें। भरंवसेनी ॥ ८२ ॥ ऐसें येकिहेळां बोलिला। मग मौन धरूनि ठेला। तेथ श्रीकृष्ण विस्मयो पावला। देखोनि तयातें ॥ ८३ ॥

तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत। सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥

अन्वय—हे भारत! उभयोः सेनयोः मध्ये विषीदन्तं ( अर्जुनं ) हृषीकेशः प्रहसन्निव इद वचः उवाच ॥ १० ॥

( ४७ मोह घालविण्याविषयीं देवाचे स्वगत विचार, ८४ ते ९० ) मग आपुलां चित्तीं म्हणे। एथ हें कायि आदरिलें येणें। अर्जुन सर्वथा कांहीं नेणे। काय कीजे ॥ ८४ ॥ हा उमजे आतां कवणेपरी। कैसेनि धीरु स्वीकारी। जैसा ग्रहीतें पंचाँक्षरी। अनुमानी का ॥ ८५ ॥ ना तरी असाध्य देखोनि व्याधि। अमृतासम दिव्य औषधि। वैद्य सूचि निरवंधि। निदानींचीं ॥ ८६ ॥ तैसें विवरीत[१२] असे श्रीअनंतु। तया दोहीं सैन्यांआंतु। जयापरी पार्थु। भ्रांति सांडी ॥ ८७ ॥ तें कारण मनें धरिलें। मग सरोष[१३] बोलों आदरिलें। जैसें मातेच्या कोपीं थोकुलें[१४]। स्नेह आथी ॥ ८८ ॥ कीं औषधाचिया कडवटपणीं। जैसी अमृताची पुरवणी[१५]। ते आहाच[१६] न दिसे परी गुणीं। प्रकट होय ॥ ८९ ॥ श्रीभगवानुवाचः—तैसीं वरिवरी पाहतां उदासें। आंत तरी अतिसुरसें। तियें वाक्यें हृषीकेशें। बोलों आंदरिलीं ॥९०॥

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे। गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः॥११॥

अन्वय—त्वं अशोच्यान् अन्वशोचः च प्रज्ञावादान् भाषसे; पंडिताः गतासून् च अगतासून् न अनुशोचन्ति ॥ ११ ॥

( ४८ आत्मानात्मविचार, ९१ ते ९४ ) मग अर्जुनातें म्हणितलें। आम्हीं आजि हें नवल देखिलें। जें तुवां एथ आदरिलें। मांझारींचि ॥ ९१ ॥ तूं जाणता तरी म्हणविसी। परी नेणिवेतें[१८] न सांडिसी। आणि शिकवूं म्हणों तरी बोलसी। बहुसाल नीति ॥ ९२ ॥ जात्यंधा लागे पिसें। मग तें सैरा धांवे जैसें। तुझें शहाणपण तैसें। दिसतसे ॥ ९३ ॥ तूं आपणापें नेणसी। परी या कौरवांतें शोचूं[२४] पाहासी। हा बहु विस्मय आम्हांसी। पुढतपुढती ॥ ९४ ॥ ( ४९ जगताच्या उत्पत्त्यादिकांचा प्रश्न, ९५ ते १०२ ) तरी सांग पां अर्जुना। तुजपासूनि स्थिति[२६] या

१ मीड घालूं नये. २ एकदम. ३ राहिला. ४ आश्चर्य. ५ आरंभिलें. ६ भूतबाधेला. ७ मंत्री. ८ परीक्षा करतो. ९ योजतो. १० लागलीच. ११ आणीबाणीची. १२ विचार करीत.

संजय म्हणालाः—शत्रूंस ताप देणारा अर्जुन ह्याप्रमाणें श्रीकृष्णास बोलून, 'मी आतां युद्ध करणार नाहीं' असें श्रीगोविंदाला म्हणून स्तब्ध राहिला. ॥ ९ ॥

ह्याप्रमाणें धृतराष्ट्रास सांगून संजय आणखी म्हणतोः—राजा, पुनः तो अर्जुन शोकयुक्त अंतःकरणानें बोलूं लागला, ८१ "देवा, ऐका. आपण मला युद्ध करण्याविषयीं कोणत्याही प्रकारें भीड घालूं नका. ह्या ठिकाणीं मी निःसंशय युद्ध करणार नाहीं" ८२ ह्याप्रमाणें एकदम बोलून पुढें कांहीं न बोलतां तो स्तब्ध राहिला. हें पाहून भगवंतांस मोठें आश्चर्य वाटलें. ८३

राजा, दोन्ही सैन्यामध्यें खेद पावलेल्या अर्जुनास श्रीकृष्ण हंसल्यासारखें करून हें भाषण बोलले ॥ १० ॥

भगवान् आपल्या मनांत विचार करतात, ह्या प्रसंगीं अर्जुनानें हें काय आरंभिलें आहे ? आणि ह्याची समजूतही कांहीं केल्या पडत नाहीं, ह्याला काय करावें ? ८४ ह्याची कोणत्या उपायानें समजूत पडेल ? काय केलें असतां ह्याला धैर्य येईल ? पंचाक्षरी जसा भूतबाधानिवारणाचा विचार करतो, ८५ अथवा रोग असाध्य आहेसें पाहतांच वैद्य जसा निदानींच्या अमृत्यतुल्य दिव्य औषधीची तत्काळ योजना करतो, ८६ त्याप्रमाणें, त्या दोन्ही सैन्यांमध्यें स्थित असलेले भगवान् श्रीकृष्ण विचार करूं लागले कीं, ज्या कारणानें याला शोकमोह उत्पन्न झाले आहेत, ती भ्रांति हा कसा सोडून देईल ? ८७ तें कारण मनांत आणून मग त्यांनीं रोषयुक्त भाषण करण्यास आरंभ केला. ज्याप्रमाणें, आई च्या रागांत गुप्तरूपानें स्नेह असतो, ८८ किंवा कडू औषधाचे अंतर्यामीं अमृतासारखी गोडी असते, ती जरी वरकांती दिसत नाहीं तरी परिणामीं दृष्टोत्पत्तीस येते, ८९ त्याप्रमाणें, वरकांतीं क्रोधयुक्त परंतु अंतर्यामीं अतिममत्वानें भरलेला असा अर्जुनास श्रीकृष्णांनीं उपदेश करण्यास आरंभ केला. ९०

श्रीकृष्ण म्हणालेः—ज्याचा शोक करणें योग्य नाहीं त्याचा तूं शोक करतोस, आणि मोठ्या ज्ञानाच्या गोष्टी सांगतोस. जे ज्ञानी आहेत ते मेलेल्या व जिवंत असलेल्या माणसाबद्दल शोक करीत नाहींत ॥ ११ ॥

मग अर्जुनास म्हणालेः—या ठिकाणीं तूं जें काय हें आरंभिलें आहेस, तें आज नवलच दृष्टीस पडलें । ९१ तूं आपल्याला तर मोठा ज्ञानी म्हणवितोस, पण अज्ञान सोडीत नाहींस; बरें, तुला एखादी गोष्ट शिकवावी म्हटलें, तर तूं नानाप्रकारच्या नीतीच्या गोष्टी सांगतोस. ९२ जन्मांधाला वेड लागल्यावर तो सैरावैरा धावतो, त्यापेक्षांच तुझें हें शहाणपण दिसतें. ९३ तूं आपल्या स्वतःस न जाणतां कौरवाकरितां शोक करतोस, ह्याबद्दल आम्हास वारंवार आश्चर्य वाटतें. ९४ तर अर्जुना, तूंच सांग बरें कीं, या विश्वाची जी अनादि रचना ती खोटी असून, या त्रैलोक्याचा पालनकर्ता तूंच आहेस की काय ?

१३ क्रोधयुक्त. १४ भरलेलें. १५ व्याप्ति, भरती. १६ वरवरच. १७ प्रारंभ केला. १८ मध्येंच. १९ अज्ञानपणाला. २० नानाप्रकारची. २१ जन्मांधाला. २२ सैरावैरा. २३ आपल्या स्वतःला. २४ शोक करणें. २५ वारंवार. २६ आधार.

संजय उवाच—

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतपः। न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा

अन्वय—परंतपः गुडाकेशः हृषीकेशं एवम् उक्त्वा ' न योत्स्ये ' इ

बभूव ह ॥ ९ ॥

( ४६ संजय, शोकयुक्त अर्जुनाचा अभिप्राय सांगतो, ८१ ते

असे सांगत। म्हणे राया तो पार्थ। पुनरपि शोकाकुळित। क

आइकें सखेद बोले श्रीकृष्णातें। आतां नाळवावें तुम्हीं मातें।

एथें। भरंवसेनी ॥ ८२ ॥ ऐसें येकिहेळां बोलिला। मग मं

तेथ श्रीकृष्ण विस्मयो पावला। देखोनि तयातें ॥ ८३ ॥

तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत। सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंता

अन्वय—हे भारत! उभयोः सेनयोः मध्ये विषीदन्तं ( अर्जुनं )

वचः उवाच ॥ १० ॥

९५ या जगतामध्यें कोणी एक ईश्वर असून त्याच्यापासून प्राणिमात्राची उत्पत्ति होते असें जे लोक म्हणतात, तें खोटे आहे कीं काय? ९६ आतां मग असें झालें, की जन्ममृत्यु तूंच उत्पन्न केलेस, आणि जर तूं मनात आणिलेस तरच ते नाश पावतील! ९७ जरी भ्रममूलक अहंकारानें ग्रस्त होऊन या कौरवाचा घात करण्याचे तूं मनात आणलें नाहींस, तरी हे चिरंजीव होतील का साग बरें? ९८ किंवा तूंच कांय तो एक मारणारा आणि बाकीचे हे सर्व मरणारे अशी भ्रांति चित्तात येऊं देशील हो! ९९ या सर्व अनादिसिद्ध गोष्टी आपोआप घडताहेत; त्याबद्दल तूं व्यर्थ शोक का करतोस मला सांग पाहूं? १०० परंतु मूर्खपणामुळें तुला हें समजत नाहीं; व ज्या गोष्टींचें चिंतन करूं नये त्या गोष्टीचें चिंतन करून उलट आणखी आम्हालाच शहाणपणाच्या गोष्टी सागतोस! १०१ जे विचारवंत आहेत, ते जन्म आणि मृत्यु ही भ्रांति आहे असें म्हणून दोहोंचाही शोक करीत नाहींत. २

मी पूर्वी कधीं नव्हतों, किंवा तूंही कधीं नव्हतास, किंवा हे राजेही नव्हते, किंवा आपण सर्व ह्यापुढें (ह्या देहानंतर) कधीं असणार नाहीं, असें नाहीं! ॥ १२ ॥

अर्जुना, आणखी सागतों, ऐक. तुम्ही, आम्ही व हे सर्व राजे ह्या ठिकाणीं जमले आहेत, ३ ते असेच रहातील किंवा लयाला जातील ही भ्रांति सोडून दिली, म्हणजे ह्या दोन्ही गोष्टी खऱ्या नाहींत. ४ उत्पत्ति किंवा नाश जे दिसतात, ते मायेच्या योगानें, एरव्हीं खरोखर आत्मा अविनाशीच आहे. ५ पाणी हालून त्याजवर बुडबुडे दृष्टीस पडतात, तेव्हा त्या ठिकाणीं पाण्याशिवाय काय उत्पन्न झालें म्हणावें? ६ वाऱ्याचें वाहणें नाहींसें झाल्यावर पाणी स्थिर झाले असता त्या ठिकाणी पाण्याशिवाय काय लयास गेलें याचा विचार कर. ७

देही—आत्मा, ह्याचा जो हा देह, त्यामध्यें बाल, तरुण व वृद्ध ह्या तीन अवस्था जशा एका देहाचे ठिकाणीं येतात व जातात (परंतु त्या अवस्थाबरोबर देह जात येत नाहीं), तशी आत्म्याला दुसऱ्या देहाची प्राप्ति होते, असें समजून ज्ञानी त्या देहांतरप्राप्तीबद्दल मोहांत पडत नाहीं ॥ १३ ॥

आणखी असें पहा कीं, शरीर तर एकच असतें, पण वयपरत्वें त्यात देखील भेद दृष्टीस पडतात हें प्रत्यक्षच प्रमाण आहे. ८ त्याच शरिरावर बालपण आपण पहातों; पुढें तेच बालपण तारुण्यात नाहींसें होतें; परंतु त्या प्रत्येकाबरोबर शरीर नाहींसे होत नाहीं. ९ त्याचप्रमाणें, चैतन्याचे ठिकाणीं शरिराचीं रूपातरें होतात हे जाणणारास भ्रममूलक दुःख होत नाहीं. ११०

अर्जुना, मात्रा म्हणजे इंद्रियें, त्याचे स्पर्श म्हणजे विषय ह्याच्याशीं होणारे संबंध शीत, उष्ण, सुख व दुःख देणारे आहेत; ते विषयसंबंध उत्पत्तिनाशरूप आहेत, म्हणून अनित्य आहेत. तर हे भारता, ते मिथ्या समजून सहन कर. ॥ १४ ॥

---

१ प्राणी. २ उत्पन्न केले. ३ अहंकार. ४ चिरंजीव. ५ नको. ६ विचारवंत. ७ उत्पन्न होणें व मरणें ह्या दोहोंनाही. ८ संपूर्ण. ९ खरोखर. १० परब्रह्म. ११ नाशरहित. १२ पाणी. १३ फोटें. १४ बंद झालें. १५ स्थिर. १६ लय पावलें. १७ वयपरत्वें. १८ बालपण. १९ आत्म्याच्या. २० हीं. २१ भ्रांति.

त्रिभुवना । हे अनादि विश्वचरना । तें लटकें कायी ॥ ९५ ॥ एथ समर्थु एक आथी । तयापासूनि भूतें[1] होती । तरी हें वायांचि काय बोलती । जगामाजीं ॥९६॥ हों कां सांप्रत ऐसें जाहलें । जे हे जन्ममृत्यु तुवां सृजिले[2] । आणि नाश पावे नाशिले । तुझेनि कायी ॥ ९७ ॥ तूं भ्रमलेपणें अहंकृती[3] । यांसि घातु न धरिसी चित्तीं । तरी सांगें कायि हें होती । चिरंतन ॥ ९८ ॥ कीं तूं एक वधिता । आणि सकळ लोकु हा मरता । ऐसी भ्रांति झणें चित्ता । येवों देसी ॥ ९९ ॥ अनादिसिद्ध हें आववें । होत जात स्वभावें । तरी तुवां कां शोचावें । सांगें मज ॥१००॥ परी मूर्खपणें नेणसी । न चिंतावें तें चिंतिसी । आणि तूंचि नीति सांगसी । आम्हां प्रति ॥ १०१ ॥ देखें विवेकी[6] जे होती । ते दोहींतेंही[7] न शोचिती । जे होय जाय हे भ्रांती । म्हणऊनियां ॥ २ ॥

न त्वेवाहं जातु नाऽऽसं न त्वं नेमे जनाधिपाः ।
न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥

अन्वय—अहं जातु न आसं इति न ( किं तु आसं एव ), त्वं ( नासीः इति ) न ( किंतु आसीः एव ), इमे जनाधिपाः ( न आसन् इति ) न ( किंतु आसन् एव ); अतः परं सर्वे वयं न भविष्यामः इति न ॥ १२ ॥

( ५० आत्म्याची निर्विकारता, १०३ ते ११० ) अर्जुना सांगेन आइक । एथ आम्ही तुम्ही देख । आणि हे भूपति अशेख । आदिकरूनी ॥ ३ ॥ नित्यता ऐसेचि असोनी । ना तरी निश्चित क्षया जाउनी । हे भ्रांति वेगळी करूनी । दोन्ही नाहीं ॥ ४ ॥ हें उपजे आणि नाशे । तें मायावशें दिसे । येऱ्हवीं तत्त्वता वस्तु जे असे । ते अविनाशचि ॥ ५ ॥ जैसें पवनें तोयें[2] हालविलें । आणि तरंगाकार जाहलें । तरी कवण कें[3] जन्मलें । म्हणांवे तेथ ॥ ६ ॥ तेंचि वायूचें स्फुरण ठेलें[4] । आणि उदक सहज सैंपाट जाहलें । तरी आतां काय निमालें । विचारीं पां ॥ ७ ॥

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

अन्वय—देहिनः अस्मिन् देहे यथा कौमारं यौवनं जरा तथा देहांतरप्राप्तिः ( अस्ति; ) तत्र धीरः न मुह्यति ॥ १३ ॥

आइकें शरीर तरी एक । परी वैसाभेदें अनेक । हें प्रत्यक्षचि देख । प्रमाण तूं ॥ ८ ॥ एथ कौमारत्व दिसे । मग तारुण्यीं तें भ्रंशे । परी देहचि हा न नाशे । एकेकासवें ॥ ९ ॥ तैसीं चैतन्याच्या ठायीं । [2]इयें शरीरांतरें होती जाती पाहीं । ऐसें जाणे तया नाहीं । व्यामोहदुःख ॥ ११० ॥

मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।
आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥

अन्वय—हे कौंतेय ! मात्रास्पर्शाः तु शीतोष्णसुखदुःखदाः आगमापायिनः अनित्याः ( संति ); हे भारत ! तान् तितिक्षस्व ॥ १४ ॥

९५ या जगतामध्ये कोणी एक ईश्वर असून त्याच्यापासून प्राणिमात्राची उत्पत्ति होते असे जे लोक म्हणतात, तें खोटें आहे कीं काय ? ९६ आता मग असें झाले, कीं जन्ममृत्यु तूच उत्पन्न केलेस, आणि जर तू मनात आणिलेस तरच ते नाश पावतील ! ९७ जरी भ्रममूलक अहंकाराने ग्रस्त होऊन या कौरवाचा घात करण्याचे तू मनात आणले नाहींस, तरी हे चिरंजीव होतील का साग बरें ? ९८ किंवा तूच काय तो एक मारणारा आणि बाकीचे हे सर्व मरणारे अशी भ्राति चित्तात येऊ देशील हो ! ९९ या सर्व अनादिसिद्ध गोष्टी आपोआप घडताहेत, त्याबद्दल तू व्यर्थ शोक का करतोस मला साग पाहू ? १०० परतु मूर्खपणामुळे तुला हें समजत नाहीं, व ज्या गोष्टीचे चिंतन करू नये त्य गोष्टीचें चिंतन करून उलट आणखी आम्हालाच शहाणपणाच्या गोष्टी सागतोस ! १०१ जे विचारवंत आहेत, ते जन्म आणि मृत्यु ही भ्रांति आहे असे म्हणून दोहोंचाही शोक करीत नाहीत २

मी पूर्वी कधीं नव्हतों, किंवा तूंही कधीं नव्हतास, किंवा हे राजेही नव्हते, किंवा आपण सर्व ह्यापुढें ( ह्या देहानतर ) कधीं असणार नाहीं, असें नाहीं ! ॥ १२ ॥

अर्जुना, आणखी सागतो, ऐक. तुम्ही, आम्ही व हे सर्व राजे ह्या ठिकाणी जमले आहेत, ३ ते असेच रहातील किंवा लयाला जातील ही भ्राति सोडून दिली, म्हणजे ह्या दोन्ही गोष्टी खऱ्या नाहीत. ४ उत्पत्ति किंवा नाश जे दिसतात, ते मायेच्या योगाने, एरव्हीं खरोखर आत्मा अविनाशीच आहे ५ पाणी हालून त्याजवर बुडबुडे दृष्टीस पडतात, तेव्हा त्या ठिकाणीं पाण्याशिवाय काय उत्पन्न झाले म्हणावे ? ६ वाऱ्याचे वाहणे नाहींसे झाल्यावर पाणी स्थिर झाले असता त्या ठिकाणीं पाण्याशिवाय काय लयास गेले याचा विचार कर. ७

देही—आत्मा, ह्याचा जो हा देह, त्यामध्यें बाल, तरुण व वृद्ध ह्या तीन अवस्था जशा एका देहाचे ठिकाणीं येतात व जातात ( परतु त्या अवस्थाबरोबर देह जात येत नाहीं ), तशी आत्म्याला दुसऱ्या देहाची प्राप्ति होते, असें समजून ज्ञानी त्या देहांतरप्राप्तीबद्दल मोहात पडत नाहीं ॥ १३ ॥

आणखी असे पहा कीं, शरीर तर एकच असते, पण वयपरत्वे त्यात देखील भेद दृष्टीस पडतात हे प्रत्यक्षच प्रमाण आहे ८ त्याच शरिरावर बालपण आपण पहातो, पुढ तच बालपण तारुण्यात नाहींसे होते, परतु त्या प्रत्येकाबरोबर शरीर नाहींसे होत नाहीं. ९ त्याचप्रमाणें, चैतन्याचे ठिकाणीं शरिराचीं रूपातरे होतात हे जाणणारास भ्रममूलक दु ख होत नाहीं. ११०

अर्जुना, मात्रा म्हणजे इंद्रियें, त्याचे स्पर्श म्हणजे विषय ह्याऱ्याशीं होणारे संबध शीत, उष्ण, सुख व दु ख देणारे आहेत, ते विषयसबध उत्पत्तिनाशरूप आहेत, म्हणून अनित्य आहेत तर हे भारता, ते मिथ्या समजून सहन कर ॥ १४ ॥

---

१ प्राणी २ उत्पन्न केले ३ अहकार ४ चिरजीव ५ नको ६ विचारवत ७ उत्पन्न होणें व मरणें ह्या दोहोंनाही ८ सपूर्ण ९ खरोखर १० परब्रह्म ११ नाशरहित १२ पाणी १३ कोठें. १४ बद झालें १५ स्थिर १६ लय पावलें १७ वयपरत्वें १८ बालपण १९ आत्म्याच्या २० हीं. २१ भ्राति

( ५१ इंद्रियाधीनास दुःखें भोगावीं लागतात, १११ ते १२२ ) एथ नेणावया हेंचि कारण । जे इंद्रियां आधीनपण[1] । तिहीं आकाळिजे[2] अंतःकरण । म्हणऊनि भ्रमे ॥ ११ ॥ इंद्रियें विषय सेविती । तेथ हर्ष शोकु उपजती । ते अंतर आप्लविती[3] । संगें येणें ॥ १२ ॥ जयां विषयांच्या ठायीं । एकनिष्ठता[4] कैंहीं नाहीं । तेथ दुःख आणि कांहीं । सुखही दिसे ॥ १३ ॥ देखें शब्दाची व्याप्ती । निंदा आणि स्तुती । तेथ द्वेषाद्वेष उपजती । श्रवणद्वारें ॥ १४ ॥ मृदु आणि कठिण । हे स्पर्शाचे दोनी गुण । जे वपूचेनि[6] संगें कारण । संतोषखेदां ॥ १५ ॥ भ्यासुर[7] आणि सुरेख । हें रूपाचें स्वरूप देख । जें उपजवी[8] सुखदुःख । नेत्रद्वारें ॥ १६ ॥ सुगंधु आणि दुर्गंधु । हा परिमळाचा[9] भेदु । जो घ्राणसंगें[10] विषादु[11] । तोषु देता ॥ १७ ॥ तैसाचि द्विविध[12] रसु । उपजवी प्रीतित्रासु । म्हणूनि हा अपभ्रंशु[13] । विषयसंगु ॥ १८ ॥ देखें इंद्रिया आधीन होइजे । तैं शीतोष्णातें पाविजे । आणि सुखदुःखीं आकाळिजे[14] । आपणपें ॥ १९ ॥ या विषयांवांचूनि कांहीं । आणीक सर्वथा रम्य नाहीं । ऐसा स्वभावोचि पाहीं । इंद्रियांचा ॥ १२० ॥ हे विषय तरी कैसे । रोहिणीचें[15] जळ जैसें । कां स्वप्नींचा[16] आभासे । इंद्रजाति[17] ॥ २१ ॥ देखें अनित्य तयापरी । म्हणऊनि तूं अव्हेरीं[18] । हा सर्वथा संगु न धरीं । धनुर्धरा ॥ २२ ॥

यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ।
समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥

अन्वय—हे पुरुषर्षभ, यं हि समदुःखसुखं धीरं पुरुषं एते ( मात्रास्पर्शाः ) न व्यथयन्ति, सः अमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥

( ५२ जितेंद्रियाला सुखदुःखें होत नाहींत, १२३ ते १२४ ) हे विषय जयातें नाकळिती । तया सुखदुःखें दोनी नैं[19] पवती । आणि गर्भवासु संगती । नाहीं तया ॥ २३ ॥ तो नित्यरूप पार्था । वोळखावा सर्वथा । जो या इंद्रियार्थां । नागवेचि[20] ॥ २४ ॥

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।
उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥

अन्वय—असतः भावः न विद्यते, सतः अभावः न विद्यते; तत्त्वदर्शिभिः तु उभयोः अपि अनयोः अन्तः दृष्टः ॥ १६ ॥

( ५३ सत्-असताचा निष्कर्ष जाणून असतांतून सताचा स्वीकार, १२५ ते १३२ ) आतां अर्जुना कांहीं एक । सांगेन मी आइक । जें[21] विचारपर लोक । वोळखिती ॥ २५ ॥ या उपाधिमाजीं[22] गुप्त । चैतन्य असे सर्वगत[23] । तें तत्त्वज्ञ[24] संत । स्वीका-

१ स्वाधीन. २ ओढलें आहे. ३ भ्रमवितात. ४ एकच स्थिति. ५ फर्धी. ६ त्वचेच्या. ७ भयंकर ८ उत्पन्न करितें. ९ वासाचा. १० घ्राणेंद्रियांच्या योगानें. ११ असंतोष. १२ दोन

इंद्रियांचे अधीन झाल्यामुळें हें मनुष्यास समजत नाहीं. इंद्रियानी मनुष्याचें अंतःकरण विषयांकडे ओढलें आहे, म्हणून हा भ्रम होतो. ११ इंद्रियानीं विषय सेवन केले, म्हणजे सुखदुःखें उत्पन्न होतात; व मग तीं सुखदुःखें आपल्यासंबंधानें मनुष्याचें मन भ्रमवितात. १२ ज्या शब्दादिक विषयाच्या ठिकाणीं एक स्थिति कधींच नसते, तेथें वेळेनुसार सुख किंवा दुःख दोन्हीही भासतात. १३ आतां शब्दविषयाची व्याप्ति पहा कीं, कानानीं निंदा ऐकली, तर द्वेष उत्पन्न होतो; आणि त्याच शब्दांनी स्तुति केलेली ऐकली, तर समाधान उत्पन्न होतें. १४ आतां, मऊपणा व कठिणपणा हे स्पर्श या विषयाचे दोन भेद आहेत; परंतु ते त्वचेच्या ठिकाणीं भासल्यावर सुख व दुःख उत्पन्न होतें. १५ तसेंच, भेसुर आणि सुरेख अशी दोन लक्षणें रूपविषयाचीं आहेत. पण तीं डोळ्यांनी पाहिल्यावर दुःखसुख उत्पन्न होतें. १६ त्याचप्रमाणें, गंध विषयाचे सुगंध व दुर्गंध हे दोन भेद आहेत. हे घ्राणेंद्रियद्वारा संतोष व असंतोष उत्पन्न करतात. १७ तद्वतच रसाच्या दोन स्वरूपांपासून प्रीति आणि त्रास हीं उत्पन्न होतात; म्हणून, विषयसंग हाच मुख्य स्वरूपापासून भ्रष्ट करणारा आहे. १८ असें पहा की, जे इंद्रियाधीन होतात, त्याना शीतोष्णांची बाधा होऊन ते आपोआपच सुखदुःखांचे अधीन होतात, १९ इंद्रियाचा स्वतःचाच धर्म असा आहे कीं, या विषयांशिवाय त्याना जगतांत रम्य असें दुसरें कांहींच वाटत नाहीं. १२० हे विषय म्हटले तर मृगजळ, किंवा स्वप्नांत दिसणारे हत्ती जसे केवळ भासणारे, २१ त्याप्रमाणें अनित्य आहेत पहा! म्हणून, पार्था, ह्यांची यत्किंचितही संगति न धरतां तूं त्यांचा त्याग कर. २२

हे पुरुषश्रेष्ठा, ज्याला सुखदुःख समान ( मिथ्या ) आहे, व जो धैर्ययुक्त आहे, अशा पुरुषाला हे विषयसंबंध बाधा करूं शकत नाहींत. तो पुरुष मोक्षप्राप्तीस योग्य होतो ॥ १५ ॥

जो पुरुष या विषयांच्या स्वाधीन होत नाही; त्याला सुख व दुःख हीं दोन्ही प्राप्त होत नाहींत; आणि गर्भवासाची संगति घडत नाही ( जन्म प्राप्त होत नाहीं ). २३ अर्जुना, जो या विषयांच्या पाशात सांपडत नाही, तोच अविनाशी आहे असें समज. २४

जें असत् म्हणजे मिथ्या, तें खरेपणास कधीं यावयाचें नाहीं; आणि जें खरें आहे, त्याचा नाश कधीं व्हावयाचा नाहीं. हा सत् व असत् ह्याचा परिणाम तत्त्ववेत्त्यानीं जाणलेला आहे. ॥ १६ ॥

आतां अर्जुना, तुला आणखी एक गोष्ट मी सागतों; ती विचारवंत लोक ओळखतात. २५ ह्या जगामध्यें सर्वव्यापक असें जें एक गूढ चैतन्य आहे, त्याचा तत्त्वज्ञ लोक सदैव स्वीकार करतात. २६ दूध व पाणी एकत्र मिळविलें असतां ज्याप्रमाणें राजहंस पक्षी तें

प्रकारचा १३ स्वरूपापासून-भ्रष्ट करणारा. १४ अधीन होतात. १५ मृगजळ. १६ दिसणारे. १७ हत्ती. १८ सोडून दे. १९ प्राप्त होत नाहींत. २० स्वाधीन होत नाहीं. २१ जो. २२ जगामध्यें. २३ सर्वव्यापक. २४ ब्रह्मस्वरूप जाणणारे.



रिती ॥ २६ ॥ सलिलीं[1] पयें जैसें । एक होऊनि मीनलें[3] असे । परी निवडूनि राजहंसें । वेगळें कीजे ॥ २७ ॥ कीं अग्निमुखें किडाळ । तोडोनियां चोखाळ । निवडिती केवळ । बुद्धिमंत ॥ २८ ॥ ना तरी जाणिवेच्या आयणी । करितां दधि कडसणी । मग नवनीत निर्वाणीं[11] । दिसे जैसें ॥ २९ ॥ कीं भूस बीज एकवट । उपणितां राहे घनवट । तेथ उडे तें फोलकट । जाणों आलें ॥ १३० ॥ तैसें विचारितां निरसलें । तें प्रपंचु सहजें सांडवलें । मग तत्त्वतां तत्त्व उरलें । ज्ञानियांसी ॥ ३१ ॥ म्हणोनी अनित्याच्या ठायीं । तयां आस्तिक्यबुद्धि नाहीं । निष्कर्पु दोहींहीं[20] । देखिला असे ॥ ३२ ॥

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥

अन्वय—येन इदं सर्वं ततं तत् तु अविनाशि विद्धि; अस्य अव्ययस्य विनाशं कर्तुं कश्चित् न अर्हति ॥ १७ ॥

( ५४ असताचा विचार, १३३ ते १४४ ) देखें सारासार विचारितां । भ्रांति ते पाहीं असारता । तरी सार तें स्वभावतां । नित्य जाणें ॥ ३३ ॥ हा लोकत्रयाकारु । तो जयाचा विस्तारु । तेथें नाम वर्ण आकारु । चिन्ह नाहीं ॥ ३४ ॥ जो सर्वदा सर्वगतु । जन्मक्षयातीतु । तया केलियाहि घातु । कदा नोहे ॥ ३५ ॥

अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः, अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥१८॥

अन्वय—अनाशिनः अप्रमेयस्य नित्यस्य शरीरिणः इमे देहाः अन्तवन्तः ( इति विवेकिभिः ) उक्ताः; तस्मात् हे भारत ! युध्यस्व ॥ १८ ॥

आणि शरीरजात आघवें । हें नाशवंत स्वभावें । म्हणोनी तुवां झुंजावें । पंडुकुमरा ॥ ३६ ॥

य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् । उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते॥१९॥

अन्वय—यः एनं ( देहिनं ) हन्तारं वेत्ति च यः एनं हतं मन्यते, तौ उभौ न विजानीतः, अयं न हन्ति ( च ) न हन्यते ॥ १९ ॥

तूं धरूनि देहाभिमानातें । दिठी[23] [24]सूनि शरीरातें । मी मारिता हे मरते । म्हणत आहासी ॥ ३७ ॥ तरी अर्जुना, तूं हें नेणसी । जरी तत्त्वेंतां[25] विचारिसी । तरी वधिता तूं नव्हेसी । हे वध्य नव्हती ॥ ३८ ॥

न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वाऽभविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥
वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् । कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंति कम्॥२१॥

अन्वय—अयं कदाचित् न जायते वा न म्रियते वा अयं भूत्वा भूयः अभविता न; अयं अजः नित्यः शाश्वतः पुराणः च शरीरे हन्यमाने ( सति ) न हन्यते ॥ २० ॥ हे पार्थ, यः एनं अविनाशिनं नित्यं अजं अव्ययं वेद, सः पुरुषः कथं कं घातयति कं हन्ति ? ( न कंचित्कथंचिदपि घातयति हन्ति वा ) ॥ २१ ॥

वेगळें करतात, २७ अथवा चतुर लोक डाकलग सोनें अग्नीत घालून ताव दिल्यावर शुद्ध करतात, २८ किंवा चातुर्यानें दही घुसळल्यानंतर शेवटीं जसें लोणी निघालेलें दृष्टीस पडतें, २९ अथवा कोंडा आणि धान्य हीं एकत्र असून वाऱ्यावर धरून उफणल्यावर ज्याप्रमाणें धान्य खालीं राहून फोल उडून जातें, १३० त्याप्रमाणें विचाराअंतीं प्रपंच सहजच नाहींसा होतो, आणि मग ज्ञानी पुरुषांना विचार करण्याला फक्त तत्त्व अर्थात् ब्रह्मच उरतें. ३१ म्हणून, त्याची असताचे ठिकाणीं आस्तिक्यबुद्धि नसते; कारण सत् आणि असत् या दोहोंचाही परिणाम त्यास माहीत असतो. ३२

ज्या चैतन्यानें सर्व जगत् व्यापलें आहे, तें नाश पावणारें नव्हे असें समज; असें नाशरहित जें चैतन्य, त्याचा नाश करण्यास कोणीही समर्थ नाहीं ॥ १७ ॥

असें पहा कीं, खऱ्याखोट्याचा विचार जर केला, तर सहजच, भ्रांति ही निस्सार आहे, आणि सार हें स्वभावतःच अविनाशी आहे हें ध्यानांत धर. ३३ ज्यापासून हें त्रैलोक्य झालें आहे, त्यास नांव, रंग, रूप हीं कांहीं चिन्हे नाहीत. ३४ तो सदैव सर्वव्यापक असून जन्ममरणातीत आहे; त्याचा नाश करूं म्हटल्यास तो कधीं सुद्धां होणार नाही. ३५

नित्य, अविनाशी आणि ज्याचें मान करता येत नाहीं अशा आत्म्याचे जे देह, ते नाशवंत आहेत असें ज्ञानी म्हणतात. म्हणून हे भारता, तू युद्ध कर. ॥ १८ ॥

आणि अर्जुना, शरीरमात्र स्वभावतःच नाशवंत आहे. याकरितां तूं युद्ध कर. ३६

आत्मा मारणारा आहे व आत्मा मरणारा आहे असें जे समजतात, ते दोघेही अज्ञानी आहेत. कारण, हा कोणाकडून मारला जात नाहीं, व कोणास मारीतही नाहीं. ॥ १९ ॥

तूं देहाचा अभिमान धरून व शरिरावर दृष्टि ठेवून मी मारणारा आणि हे कौरव मरणारे असें म्हणत आहेस. ३७ पण अर्जुना, त्यातील तत्त्वार्थ तुला कळत नाही; जर यथार्थ पुसशील, तर तूं मारणारा नव्हेस, व ते मरणारेही नव्हत. ३८

हा आत्मा कधींही उत्पन्न होत नाहीं व कधींही मरत नाहीं; हा मागें जन्म पावला असून पुनः मृत्यु पावणार असेंही नाहीं. कारण हा जन्मरहित, नित्य, शाश्वत व अनादि आहे; आणि शरिराचा वध झाला तरी ह्याचा वध होत नाहीं. ॥ २० ॥ पार्था, आत्मा अविनाशी, नित्य, जन्मरहित व विकार न पावणारा आहे असें जो जाणतो, तो पुरुष आत्म्याला कसा कोणाकडून मारवील आणि मारील ? ( तर मारणारही नाहीं व मारविणारही नाहीं ) ॥२१॥

---

१ उदकात. २ दूध. ३ मिळालें. ४ डागलग सोनें. ५ शुद्ध. ६ चतुर. ७ ज्ञानाच्या. ८ बुद्धीनें. ९ घुसळणें. १० लोणी. ११ शेवटीं. १२ पाखडता. १३ धान्य. १४ फोल. १५ नाहींसें झालें. १६ अशाश्वताच्या ( शरीरादिकाच्या. ) १७ त्या ज्ञान्याना. १८ सत्यभाव. १९ परिणाम. २० परमात्मा व जगत् याचा. २१ जन्मनाशरहित. २२ शरीरधारी. २३ दृष्टी. २४ ठेवून. २५ यथार्थ, खरोखर.

जैसें स्वप्नामाजि देखिजे । तें स्वप्नींचि साच आपजे । मग चेऊनियां पाहिजे तंव कांहीं नाहीं ॥ ३९ ॥ तैसी हे जाण माया । तूं भ्रमत आहासी वायां । श हाणितलिया छाया । जैसी आंगीं न रुपे ॥ १४० ॥ कां, पूर्ण कुंभ उलंडल तेथ बिंबाकारु दिसे भ्रंशलों । परी भानु नाहीं नासला । तयासवें ॥४१॥ ना त भेठीं आकाश जैसें । मठाकृती अवतरलें असे । तो भंगलिया आपैसें । स्वरूप ॥ ४२ ॥ तैसें शरीराच्या लोपीं । सर्वथा नाशु नाहीं स्वरूपीं । म्हणऊनि तूं नारोपीं । भ्रांति बापा ॥ ४३ ॥

वासांसि जीर्णानि यथा विहाय । नवानि गृह्णाति नरोऽपराणि ॥
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २२ ॥

अन्वय—यथा नरः जीर्णानि वासांसि विहाय अपराणि नवानि गृह्णाति, तथा देही जीर्णा शरीराणि विहाय अन्यानि नवानि संयाति ॥ २२ ॥

जैसें जीर्ण[१२] वस्त्र सांडिजे । मग नूतन वेढिजे[१३] । तैसें देहांतरातें स्वीकारिजे चैतन्यनाथें ॥ ४४ ॥

नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः । न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥२
अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च, नित्यः सर्वगतःस्थाणुरचलोऽयं सनातनः॥२

अन्वय—एनं ( प्रकृतं आत्मानं ) शस्त्राणि न छिंदंति, पावकः एनं न दहति, आपः न क्लेदयन्ति, च मारुतः एनं न शोषयंति ॥ २३ ॥ अयं अच्छेद्यः, अयं अदाह्यः, अयं अक्लेद्यः अशोष्यः एव (अस्ति); अयं नित्यः सर्वगतः स्थाणुः अचलः सनातनः ( अस्ति ) ॥ २४ ॥

( ५५ आत्म्याचें अविकारित्व, १४५ ते १५१ ) हा अनादि नित्यसिध्दु निरुपाधि विशुध्दु । म्हणऊनि शस्त्रादिकीं छेदु । न घडे यया ॥४५॥ हा प्रळयो दकें नाप्लवे । अग्निदाहो न संभवे । एथ महाशोषु न प्रभवे । मारुताचा ॥ ४६ अर्जुना हा नित्यु । अचळु हा शाश्वतु । सर्वत्र सदोदितु । परिपूर्ण हा ॥ ४७ ॥

अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते । तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥

अन्वय— अयं अव्यक्तः अयं अचिन्त्यः अयं अविकार्यः इति उच्यते; तस्मात् एनं विदित्वा त्वं अनुशोचितुं न अर्हसि ॥ २५ ॥

हा तर्काचिये दिठी । गोचर नोहे किरीटी । ध्यानध्याचिये भेटी । उत्कं वाहे ॥ ४८ ॥ हा सदा दुर्लभु मना । आपु नोहे साधना । निःसीमु हा अर्जुना पुरुषोत्तमु ॥ ४९ ॥ हा गुणत्रया रहित । अनादि अविकृत । व्यक्तीसि अतीत सर्वरूप ॥ १५० ॥ अर्जुना ऐसा हा जाणावा । सकळात्मकु देखावा । मग सह शोकु आघवा । हरेल तुझा ॥ १५१ ॥

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् । तथाऽपि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि

अन्वय— अथ च ( यदि ) एनं नित्यजातं वा नित्यं मृतं मन्यसे, तथापि (हे) महाबाहो त्वं एवं शोचितुं न अर्हसि ॥ २६ ॥

ज्याप्रमाणें स्वप्नातील विषय स्वप्नांतच भासतात, परंतु जागृत झाल्यावर पहावें तो खरोखर कांहींएक नसतें, ३९ त्याप्रमाणें ही माया असून हिच्या भ्रमांत तूं व्यर्थ पडला आहेस. अरे, मनुष्याच्या सांवलीवर शस्त्रप्रहार केला तर तो जसा त्याच्या अंगात रुपत नाहीं, १४० किंवा पाण्यानें भरलेलें भांडे पालथें केल्यावर त्यातील सूर्यबिंब नाहींसें झालेलें दिसतें—परंतु त्यामुळे खऱ्या सूर्यावर कांहींएक परिणाम होत नाहीं, ४१ अथवा आकाश हें बांधलेल्या घरात त्या घराच्या आकृतीचें दिसतें, पण तें घर मोडल्यावर ज्याप्रमाणें त्याचें मूळ स्वरूपच राहतें, ४२ त्याचप्रमाणें, शरीर नाश पावलें तरी आत्म्याचा नाश होत नाहीं; म्हणून, बाबारे ! तूं नसतीच भ्रांति घेऊन बसूं नको. ४३

जसा पुरुष जुनीं वस्त्रें टाकून नवा घेतो, तसा आत्मा जुनीं शरिरें टाकून नवीं धारण करतो ॥२२॥

मनुष्य ज्याप्रमाणें जुनें झालेलें वस्त्र टाकून नवें धारण करितो, त्याप्रमाणें हा चैतन्यनाथ—आत्मा एक देह टाकून दुसऱ्याचा स्वीकार करतो. ४४

*ह्या आत्म्याला शस्त्रें तोडीत नाहींत; ह्याला अग्नि जाळीत नाहीं; ह्याला पाणी भिजवीत नाहीं; व ह्याला वारा सुकवीत नाहीं.* ॥ २३ ॥ हा आत्मा छिन्न होण्याजोगा नाहीं, हा जाळता येण्यासारखा नाहीं, भिजविता येण्यासारखा नाहीं, व सुकविता येण्याजोगा नाहीं; तर नाश न पावणारा, सर्वव्यापी, स्थिर, अचल, आणि त्रिकाल राहणारा असा आहे ॥ २४ ॥

हा आत्मा जन्ममरणरहित असून नित्य शाश्वत आहे; व तो उपाधिरहित असून शुद्ध आहे; म्हणून, ह्याचा शस्त्रादिकानीं सुद्धां घात होत नाहीं. ४५ हा प्रलयकालच्या पाण्यात बुडत नाहीं; हा अग्नीपासून जळण्याचा संभव नाहीं; तसेंच वायूचीही याला शुष्क करण्याची शक्ति नाहीं. ४६ म्हणून अर्जुना, हा नित्य, स्थिर व शाश्वत असून सर्व ठिकाणीं पूर्ण भरलेला आहे. ४७

ह्या आत्म्याला आकार नाहीं, (म्हणून) चित्तानें त्याचें चिंतन करता येत नाहीं; हा विकाररहित आहे असें म्हणतात. ह्यास्तव आत्मा अशा प्रकारचा आहे असें समजल्यावर तुला शोक करणें योग्य नाहीं. ॥२५॥

हा तर्कशास्त्राच्या दृष्टीनें दिसणारा नव्हे; ध्यानाला तर त्याच्या भेटीची उत्कंठा लागलेली असते; ४८ अर्जुना, हा मनास नेहमीं दुर्लभ, साधनानें प्राप्त न होणारा, अनंत व जीवमात्रात श्रेष्ठ आहे. ४९ हा गुणत्रयापासून वेगळा, अनादि, विकाररहित, आकाराच्या पलीकडला व वस्तुमात्राच्या स्वरूपासारखा आहे. ५० अर्जुना, अशा प्रकारें हा सर्वव्यापी आहे हें तूं जाणलेस, म्हणजे सहज शोकरहित होशील. १५१

आता, आत्मा नित्य उत्पन्न होतो व नित्य नाश पावतो असें जरी तुझें मत असलें, तरी, अर्जुना, तुला त्याच्याबद्दल असा शोक करणें योग्य नाहीं. ॥ २६ ॥

---

१ वाटे. २ जागे होऊन. ३ पालथा झाला. ४ प्रतिबिंबरूप. ५ नष्ट झाला. ६ घरात. ७ पोकळी. ८ आकारास आले. ९ नाशात. १० आत्म्याच्या ठिकाणीं. ११ आरोपू नको. १२ जुनें. १३ नेसावें १४ दुसऱ्या शरिराला. १५ आत्म्यानें. १६ उत्पत्तिरहित. १७ नित्य असणारा. १८ उपाधिरहित. १९ न बुडे. २० वायूचा. २१ तर्कशास्त्राच्या. २२ प्राप्त. २३ पाररहित. २४ विकार न पावणारा. २५ आकारास.

( ५६ देहादि जगत् विनाशी असल्यामुळे शोक करणें योग्य नाहीं, १५२ ते १६३ ).

अथवा ऐसा नेणसी । तूं अंतवंताचि[1] मानिसी । तर्‍ही शोचूं न पवसी । पंडुकुमरा ॥ ५२ ॥ जे आदि[2] स्थिति[3] अंतु[4] । हा निरंतर असे नित्यु । जैसा प्रवाह अनुस्यूतु[5] । गंगाजळाचा ॥ ५३ ॥ तें आदि[6] नाहीं खंडलें । समुद्रीं तरी असे मिनलें[7] । आणि जातांचि[8] मध्यें उरलें[9] । दिसे जैसें ॥ ५४ ॥ इयें तिन्ही तयापरी । सरिसींच[10] सदा अवधारीं । भूतांसि कवणीं अवसरीं[11] । ठाकती[12] ना ॥ ५५ ॥ म्हणोनि हें आघवें । एथ तुज नलगे शोचावें । जे स्थितिचि[13] हे स्वभावें । अनादि ऐसी ॥ ५६ ॥ ना तरी हें अर्जुना । न येचि तुझिया मना । जे देखोनि लोकु अधीनां[14] । जन्मक्षया ॥ ५७ ॥ तरी येथ कांहीं । तुज शोकासि कारण नाहीं । हे जन्ममृत्यु पाहीं । अपरिहर ॥ ५८ ॥

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च । तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि २७**

अन्वय— हि जातस्य मृत्युः ध्रुवः ( अस्ति ) च मृतस्य जन्म ध्रुवम् ( अस्ति ). तस्मात् अपरिहार्ये अर्थे त्वं शोचितुं न अर्हसि ॥ २७ ॥

उपजे तें नाशे । नाशलें पुनरपि दिसे । हें घटिकायंत्र[15] जैसें । परिभ्रमे[16] गा ॥ ५९ ॥ ना तरी उदो अस्तु आपैसे । अखंडित होत जात जैसे । हें जन्ममरण तैसें । अनिवार जगीं ॥ १६० ॥ महाप्रळयअवसरें[17] । हें त्रैलोक्यही संहरे । म्हणोनि हा नपरिहरे[18] । आदि अंतु ॥ ६१ ॥ तूं जरी हें ऐसें मानिसी । तरी खेदु कां करिसी । काय जाणताचि नेणसी । धनुर्धरा ॥ ६२ ॥ अवतरण.—एथ आणिकही एक पार्था । तुज बहुतीं[19] परी पाहतां । दुःख करावया सर्वथा । विषो[20] नाहीं ॥ ६३ ॥

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत । अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥२८॥**

अन्वय— ( हे ) भारत, भूतानि अव्यक्तादीनि व्यक्तमध्यानि अव्यक्तनिधनानि ( सन्ति ) एव, तत्र परिदेवना का ? ॥ २८ ॥

( ५७ आत्म्याचें नित्यत्व होणें जाणें मायेमुळें, १६४ ते १७१ ) जियें[21] समस्तें इयें[22] भूतें । जन्माआदि अमूर्तें[23] । मग पातलीं व्यक्तीतें[24] । जन्मलेया ॥ ६४ ॥ तियें क्षयासि जेथ जाती । तेथ निभ्रांत[25] आनें[26] नव्हती । देखें पूर्वस्थितीच येती । आपुलिये ॥ ६५ ॥ येरें[27] मध्यें जें प्रतिभासे । तें निद्रिता स्वप्न जैसें । तैसा आकार[28] हा मायावशें । सत्स्वरूपीं[29] ॥६६॥ ना तरी पवनें[30] स्पर्शिलें नीरें[31] । पढियासे तरंगाकार[32] । का परापेक्षा[33] अळंकार । व्यक्ती[34] कनकीं ॥ ६७ ॥ तैसें सकळ हें मूर्त[35] । जाण पां माया करित । जैसें आकाशीं बिंबत । अभ्रपटळ[36] ॥ ६८ ॥ तैसें आदीचि जें नाहीं ।

१ नाशवंत. २ उत्पत्ति. ३ पालन. ४ संहार. ५ अखंड. ६ आरंभीं. ७ मिळालें. ८ वाहत्या प्रवाहात. ९ पसरले. १० सारखीं. ११ समयीं. १२ बंद होत नाहींत. १३ सृष्टिनियम. १४ स्वाधीन. १५ रहाटगाडगें. १६ फिरतें. १७ वेळीं. १८ दूर होत नाहीं. १९ अनेक तर्‍हांनीं. २० विषय,

अथवा, अर्जुना, असें न जाणता हा नाशवंतच आहे असें जरी तूं मानलेंस, तरी देखील तुला शोक करण्याचें कारण नाहीं. ५२ कारण, गंगेच्या पाण्याचा ओघ ज्याप्रमाणें अखंड आहे, त्याप्रमाणे उत्पत्ति, स्थिति आणि लय ही नित्य आहेत. ५३ ते गंगेचें पाणी उत्पन्न होत असतें, व मध्यें प्रवाहात वहात असून शेवटीं समुद्रास मिळतें. ५४ त्या आत्म्याला ह्या तिन्ही अवस्था नेहमीं सारख्याच आहेत. प्राणिमात्रास या तिन्ही अवस्था कोणत्याही वेळीं सोडीत नाहीं असें जाण. ५५ म्हणून तुला या सगळ्यांबद्दल शोक करण्याचें कारण नाही. या सर्वांचा स्वभावतःच अनादि सृष्टिक्रम चालत आलेला आहे. ५६ हें तुझ्या मनात येत नसलें, तर प्राणिमात्र जन्ममरणाच्या अधीन आहे, ५७ तर हें जन्ममरण न टळणारें आहे असे समजून तुला शोक करण्याचें कारण नाहीं. ५८

जो उत्पन्न झाला तो निश्चयेंकरून मरण पावतो, व जो मरतो तो निश्चयेंकरून पुनः जन्म पावतो. ही गोष्ट टाळता येण्यासारखी नाहीं, म्हणून द्दिजबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं ॥२७॥

जन्मास आलें तें नाश पावणार, व नाश पावलेले पुनः जन्मास येणार. हें रहाट-गाडगें सारखें चालू आहे. ५९ अथवा सूर्याचे उदयास्त ज्याप्रमाणें आपोआप निरंतर होत असतात, चुकत नाहींत, त्याप्रमाणे या जगात जन्ममरण अनिवार आहे. ६० महा-प्रलयकालीं ह्या त्रैलोक्याचाही संहार होतो, तथापि आदि व अंत ह्याचा कांहीं परिहार होत नाहीं, ६१ अशी जर तुझी समजूत असली, तरी अर्जुना, खेद कां करतोस? आणि समजून उमजून वेडात कां शिरतोस? ६२ पार्था, कोणत्याही बाजूनें पाहिलें तरी ह्या ठिकाणी तुला दुःख करण्याचें कारण नाहीं. ६३

हे भारता, हीं सर्व भूतें मुळीं अव्यक्त म्हणजे अस्पष्ट स्थितींत असतात; नंतर मध्यें व्यक्त भावाला येतात; व शेवटीं अव्यक्तात जातात. तेव्हां त्याच्याबद्दल शोक कसला करा-वयाचा! ॥ २८ ॥

हे सर्व प्राणी उत्पत्तीपूर्वीं निराकार असून, जन्म धारण केल्यावर आकाराला आले. ६४ ते जेथे लय पावतात, तेथेही ते निःसंशय दुसऱ्या स्थितींत जात नाहींत, तर आपल्या पूर्वस्थितीलाच प्राप्त होतात. ६५ निजलेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें स्वप्न दिसतें, त्याप्रमाणें जन्म व मृत्यु या दोन अवस्थांमध्ये दिसणारे आकार मायेच्या योगानें ब्रह्मस्वरूपावर भासतात. ६६ किंवा उदकाला वाऱ्यानें स्पर्श केल्यावर त्याच्यावर जशा लाटा दिसतात, किंवा आपल्या मनाप्रमाणे दागिना तयार केल्यावर अज्ञानाला ज्याप्रमाणें सुवर्णावर दागिन्याचाच भास होतो, ६७ त्याप्रमाणे सर्व प्राणी मायेनें उत्पन्न झालेले आहेत असें समज. ६८ ज्याप्रमाणें आकाशात ढग उत्पन्न होतात, त्याप्रमाणें, जें मुळातच नाहीं, त्याजबद्दल तूं

ठिकाण. २१ जीं. २२ हीं. २३ निराकार. २४ आकाराला. २५ निःसंशय २६ अन्य २७ दुसरें. २८ जग. २९ आत्म्यावर ३० वायूनें. ३१ उदक. ३२ भासे. ३३ लाटारूप. ३४ दुसऱ्याच्या इच्छेनें होणारे. ३५ स्पष्ट होणें. ३६ साकार. ३७ पडदा.

तयालागीं तूं रुदेसी कायी । तूं अवीट तें पाहीं । चैतन्य एक ॥६९॥ अवतरणः– जयाची औतींचि भोगित । विषयीं त्यजिले संत । जयालागीं विरक्त । वनवासिये ॥१७०॥ दिठी सूनि[5] जयातें । ब्रह्मचर्यादि व्रतें । मुनीश्वर तपातें । आचरताती॥७१॥

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाऽप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २९ ॥

अन्वय— कश्चित् एनं आश्चर्यवत्पश्यति; तथा एव च अन्यः कश्चित् एनं आश्चर्यवत् वदति; अन्यः ( च कश्चित् ) एनं आश्चर्यवत् शृणोति; कश्चित् एनं श्रुत्वा अपि न वेद ॥ २९ ॥

( ५८ आत्मस्वरूपाचें आश्चर्यत्व, १७२ ते १७६ ) एक अंतरीं निश्चळ । जें निहाळितां केवळ । विसरले सकळ । संसारजात ॥७२॥ एकां गुणानुवादु करितां । उपरति होऊनि चित्ता । निरवंधि तल्लीनता । निरंतर ॥ ७३ ॥ एक ऐकतांचि निवाले । ते देहभावीं सांडिले । एक अनुभवें पातले । तद्रूपता ॥ ७४ ॥ जैसे सरितौघ समस्त । समुद्रामाजि मिळत । परी मांघौते न समात । परतले नाहीं ॥ ७५ ॥ तैसिया योगीश्वरांचिया मती । मिळणीसवें एकवटती । परी जे विचारूनि पुनरावृत्ती । भंजतीचिना ॥ ७६ ॥

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत । तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ३०

अन्वय—हे भारत, सर्वस्य देहे ( वर्तमानः ) अयं देही नित्य अवध्य. ( यस्मादेव ), तस्मात् त्वं सर्वाणि भूतानि शोचितुं न अर्हसि ॥ ३० ॥

( ५९ आत्मा अमर आहे, म्हणून शोक करूं नको; १७७ ते १७९ ) जें सर्वत्र सर्वही देहीं । जया करितांही घातु नाहीं । तें विश्वात्मक तूं पाहीं । चैतन्य एक ॥ ७७ ॥ इयाचेनि स्वभावें । हें होत जात आघवें । तरी सांग काय शोचावें । एथ तुवां ॥ ७८ ॥ एऱ्हवीं तरी पार्था । तुज कां नेणों न मने चित्ता । परी किडाळ हें शोचितां । बहुतीं परी ॥ ७९ ॥

स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि । धर्म्याद्धि युध्दाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ३१

अन्वय—च स्वधर्मं अपि अवेक्ष्य विकंपितुं न अर्हसि. हि क्षत्रियस्य धर्म्यात् युद्धात् अन्यत् श्रेयः न विद्यते ॥ ३१ ॥

( ६० क्षत्रियधर्मदृष्टीनेंहि शोक करणें योग्य नाही, १८४ ते २२५ ) तूं अझुनि कां न विचारिसी । काय हें चिंतित आहासी । स्वधर्म तो विसरलासी । तरावें जेणें ॥ १८० ॥ या कौरवां भलतें जाहलें । अथवा तुजचि कांहीं पातलें । कीं युगाचि हें बुडालें । जऱ्ही एथ ॥ ८१ ॥ तरी स्वधर्मु एक आहे । तो सर्वथा त्याज्य नोहे । मग तरिजेल काय पाहें । कृपाळूपणें ॥ ८२ ॥ अर्जुना तुझें चित्त । जऱ्ही जाहलें द्रवीभूत । तऱ्ही हें अनुचित । संग्रामसमयीं ॥ ८३ ॥ अगा गोक्षीर

१ रडतोस. २ ब्रह्म. ३ आवड. ४ वैराग्यसंपन्न. ५ घालून, ठेवून. ६ चलनरहित. ७ पाहता. ८ खटपट. ९ विषयनिवृत्ति. १० निःसीम. ११ निमग्न १२ शांत झाले. १३ मीपणानें.

का रडतोस? तर अक्षय्य असें जें ब्रह्म त्याजकडे लक्ष दे. ६९ साधूंना त्या ब्रह्माची आवड उत्पन्न झाल्यावर त्यांना विषय सोडून जातात, आणि त्या ब्रह्माकरितां ते वनवासी किंवा वैराग्यसंपन्न होतात; ७० आणि त्यावर दृष्टि ठेवून ब्रह्मचर्यादि व्रतें व तपें आचरतात. ७१

कोणी आत्मस्वरूपाला आश्चर्य म्हणून पाहतो, कोणी आश्चर्य म्हणून वर्णन करितो, कोणी आश्चर्य म्हणून ऐकतो, आणि कोणी त्याचे गुणानुवाद ऐकूनही त्याला जाणत नाहीं ॥ २९ ॥

त्या शुद्ध ब्रह्माकडे एकाग्र अंतःकरणानें पाहतां पाहतां कित्येकजण अंतर्यामीं निश्चल होऊन सर्व संसार विसरतात, ७२ कित्येक त्याचे गुणानुवाद गाताना चित्तास उपरति उत्पन्न होऊन शेवटी त्याच्या ठिकाणीं निमग्न होतात, ७३ कोणी त्याचें स्वरूप ऐकूनच शांत होऊन देहाभिमानापासून निवृत्त होतात, आणि कोणी अनुभवानें तद्रूप होतात. ७४ ज्याप्रमाणें नद्यांचे प्रवाह समुद्रास मिळतात, परंतु समुद्रात न समावतसे होऊन माघारे परतत नाहींत, ७५ त्याप्रमाणें ह्या योग्यांच्या बुद्धि ब्रह्मसाक्षात्काराबरोबर तद्रूप होऊन जातात;—परंतु त्याचा विचार करूनही कोणी पुनर्जन्म पावत नाहींत. ७६

अर्जुना, सर्व देहात देही जो आत्मा, तो कधींही वध पावत नाहीं; म्हणून सर्व भूताच्याबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं. ॥ ३० ॥

अर्जुना, सर्वत्र, सर्वांतर्यामीं व्यापलेलें व ज्याचा घात करूं गेलें असता होत नाहीं असें एक चैतन्यच असून तें जगद्रूप आहे हें लक्षात ठेव; ७७ ह्याच्यामुळें स्वभावतःच जर सर्व गोष्टींची घडामोड होते, तर मग तूंच सांग कीं, त्याजबद्दल शोक का करावा? ७८ पार्था, हें एरव्हीं तरी तुझ्या मनास का येऊं नये हें मला समजत नाहीं; परंतु एकंदरींत हा शोक करणें तुला निंद्य आहे. ७९

अथवा स्वधर्माच्या दृष्टीनेंही तुला शोक करणें योग्य नाहीं. कारण, धर्मयुद्ध प्राप्त झालें असतां त्याहून क्षत्रियाना दुसरें काहींही कल्याणकारक नाहीं. ॥ ३१ ॥

अरे, अद्यापि तुला कसा विचार सुचत नाहीं? हें काय तूं घेऊन बसला आहेस? ज्या स्वधर्मानें मनुष्य तरतो, त्याला तर तूं पार विसरलास! १८० असें पाहा कीं, ह्या ठिकाणीं या कौरवांना भलतेंच कांहीं झालें, किंवा तुझें कांहीं कमजास्त झालें, अथवा सगळे जग नाहींसें झालें, ८१ तरी स्वधर्म म्हणून जो आहे, तो कदापि त्याज्य नाहीं; त्याचा त्याग केल्यावर, तुझ्या मनांत जी दया उत्पन्न झाली आहे तिच्यापासून तूं तरला जाशील काय? ८२ अर्जुना, ह्या ठिकाणीं तुझे चित्तात जी दया उत्पन्न झाली आहे, ती ह्या युद्ध-प्रसंगीं अयोग्य होय. ८३ अरे, असें पहा कीं, गाईचें दूध उत्तम आहे, तरी तें पथ्याला सांगितलें नाहीं, असें असूनही जर तें नवज्वराच्या मनुष्यास दिलें, तर विषवत् होतें;

१४ नद्यांचे प्रवाह. १५ माघारे. १६ (समुद्रात) न माता. १७ मिळताच. १८ पुनर्जन्म. १९ पावत नाहींत. २० जगद्रूप. २१ शोक करावा. २२ मनाला आवडत नाहीं. २३ निंद्य. २४ मरण. २५ प्राप्त झालें. २६ टाकण्यास योग्य. २७ स्नेहयुक्त. २८ अयोग्य. २९ गाईचें दूध.

जरी जाहलें । तरी पथ्यासि नाहीं म्हणितलें । ऐसेंनिहि विष होय सुदलें । नवज्वरीं देतां ॥ ८४ ॥ तैसें आनीं[2] आन करितां । नाशु होईल हिता । म्हणऊनि तूं आतां । सावधु होईं ॥ ८५ ॥ वायांचि व्याकुळ[3] कायी । आपुला निजधर्म पाहीं । जो आचरितां वांधु[4] नाहीं । कवणे काळीं ॥ ८६ ॥ जैसें मार्गेंचि चालतां । अपायो[5] न पवे सर्वथा । कां दीपाधारें[6] वर्ततां । नांडळिजे[7] ॥ ८७ ॥ तयापरी पार्था । स्वधर्मे राहाटतां[8] । सकळ कामपूर्णता[9] । सहजें होय ॥ ८८ ॥ म्हणोनि यालागीं पाहीं । तुम्हां क्षत्रियां आणीक कांहीं । संग्रामावांचूनि नाहीं । उचित जाणें ॥८९॥ निष्कपट होआवें । उसिणा[10] घाई झुंझावें । हें असो काय सांगावें । प्रत्यक्षावरी ॥ ९० ॥

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् । सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभंते युद्धमीदृशम् ॥३२॥**

अन्वय—हे पार्थ, अपावृतं स्वर्गद्वार (इव) यदृच्छया उपपन्नं ईदृशं युध्दं सुखिनः क्षत्रियाः लभंते ॥ ३२ ॥

अर्जुना झुंज देख आतांचें । हें हो का दैव तुमचें । कीं निधान[11].सकळ धर्माचें । प्रगटलें असे ॥ ९१ ॥ हा संग्रामु काय म्हणिपे[12] । कीं स्वर्गचि येणें रूपें । मूर्त[13] कां प्रतापें[14] । उदयो केला ॥९२॥ नातरी गुणाचेनि पतिकरें[15] । आर्तीचेनि[16] पडिभरें[17] । हे कीर्तिचि स्वयंवरें । आली तुज ॥ ९३ ॥ क्षत्रियें वहुत पुण्य कीजे । तैं झुंज ऐसें लाहिजे[18] । जैसें मार्गें जातां ओंढळिजे । चिंतामणीसी[20] ॥ ९४ ॥ ना तरी जांभया पसरे मुख । तेथ अवचटें[21] पडे पीयूख[22] । तैसा संग्रामु हा देख । पातला असे ॥ ९५ ॥

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि, ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ३३**

अन्वय—अथ त्वं इमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि चेत् ततः स्वधर्मं च कीर्तिं हित्वा पापं अवाप्स्यसि ॥ ३३ ॥

आतां हा ऐसा अव्हेरिजे[23] । मग नांथिलें[24] शोचूं वैसिजे । तरी आपण ओहाणा[25] होइजे । आपणपेयां ॥ ९६ ॥ पूर्वजांचें जोडलें । आपणाचि होय धांडिलें[26] । जरी आजि. शस्त्र सांडिलें । रणीं ईयें[27] ॥ ९७ ॥ असती[28] कीर्ति जाईल । जगचि अभिशापु देईल । आणि गिंवसितें[29] पावतील । महादोष ॥ ९८ ॥ जैसी भर्तारेंहीन[30] वनिता[31] । उपहति[32] पावे सर्वथा । तैशी दशा जीविता । स्वधर्मेंवीण ॥ ९९ ॥ नातरी रणीं शैव[33] सांडिजे । तें चौमेरीं[34] गिधीं[35] विदारिजे । तैसें स्वधर्महीना अभिभविजे[36] । महादोषीं ॥२००॥

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् ।**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥**

अन्वय—अपि च भूतानि ते अव्ययां अकीर्तिं कथयिष्यंति च संभावितस्य अकीर्तिः मरणात् अतिरिच्यते ॥ ३४ ॥

---

१ घातलें. २ भलत्या वेळीं भलतें. ३ स्नान. ४ दोष. ५ हानि. ६ दिव्याच्या उजेडानें. ७ अडखळत नाहीं. ८ वागत असतां. ९ मनोरथसिध्दि. १० समोरासमोर उभे राहून उरानवार फेडावें. ११ ठेवा १२ म्हणावा. १३ मूर्तिमंत. १४ संभ्रम. १५ अनुभवानें. १६ प्रीतीच्या. १७ आसक्तीनें.

८४ त्याचप्रमाणें, भलत्यानें भलतेंच आचरण केलें, तर त्याच्या हिताचा नाश होतो. म्हणून तूं आतां सावध हो, ८५ व्यर्थ शोकाकुल होऊं नको; आणि ज्याचें आचरण केलें असतां कोणतेही काळीं दोष घडत नाहीं, त्या आपल्या स्वधर्माकडे लक्ष दे. ८६ ज्याप्रमाणें योग्य मार्गानें चाललें म्हणजे कधींही अपाय घडत नाहीं, किंवा दिव्याच्या उजेडानें चाललें असतां ठेंच लागत नाहीं, ८७ त्याप्रमाणें अर्जुना, जो स्वधर्मानें वागतो, त्याच्या सर्व कामना सहज पूर्ण होतात. ८८ ह्याकरितां, तुम्हां क्षत्रियांना संग्रामावांचून दुसरें कांहीं योग्य नाहीं. ८९ मनांत कपट न धरतां समोरासमोर उभें राहून एकमेकांवर प्रहार करून युद्ध करावें हें प्रत्यक्ष तुला माहीत असून आणखी काय सांगावें? १९०

पार्था, सहजरीत्या प्राप्त झालेला हा युद्धप्रसंग म्हणजे स्वर्गाचें उघडलेलें द्वारच होय. असलें युद्ध भाग्यशाली क्षत्रियांना प्राप्त होतें. ॥ ३२ ॥

अर्जुना, अरे, हें युद्ध म्हणजे तुमचें पूर्वसुकृत फळलें, किंवा सर्व धर्मांचें निदान तुम्हांला प्राप्त झालें आहे. ९१ अरे, याला काय युद्ध म्हणावें? तर हा मूर्तिमंत स्वर्गच संग्रामाच्या रूपानें अवतरला आहे! ९२ किंवा तुझ्या गुणांचा लौकिक ऐकून तुजवर अतिशय आसक्त झाल्यामुळें कीर्तिरूप स्त्री तुला वरण्यास आली आहे! ९३ क्षत्रियानें पुष्कळ पुण्य करावें, तेव्हां त्याला हा असला युद्धप्रसंग प्राप्त होतो. ज्याप्रमाणें एखाद्याला मार्गानें जातांना इच्छित फल देणारा चिंतामणि सांपडावा, ९४ किंवा जांभईनें तोंड पसरल्यावर अकस्मात् त्यांत अमृत पडावें, त्याप्रमाणें हा युद्धप्रसंग तुम्हांला प्राप्त झाला आहे! ९५

'असें असतां जर तूं ह्या धर्मयुद्धाचा त्याग करशील, तर इहलोकींची कीर्ति व परलोकाला साधन जो स्वधर्म तो नाहींसा होऊन पापाची जोड करशील ॥ ३३ ॥

आतां, असला हा संग्राम टाकून भलत्या गोष्टीचा शोक करीत बसलास, तर आपली आपणच हानि करून घेतल्यासारखें होईल. ९६ ह्या रणाचे ठिकाणीं जर तूं आज शस्त्र टाकून दिलेंस, तर पूर्वजांनीं जोडून ठेविलेली कीर्ति घालविलीस असें होईल; ९७ इतकेंच नव्हे, तर तुझ्या असलेल्या कीर्तिचाही नाश होईल, व सर्व जग तुझी निंदा करील; आणि मग तुझ्या ठिकाणीं वास्तव्य करण्याकरितां महादोष तुला शोधीत येतील. ९८ ज्याप्रमाणें पतिविरहीत स्त्री सर्वांच्या उपहासास पात्र होते, त्याप्रमाणें स्वधर्मत्याग करणाराची अवस्था होते; ९९ अथवा रणभूमीवर प्रेत पडलें म्हणजे ज्याप्रमाणें चोहोंकडून त्याला गिधाडें फाडतात, त्याप्रमाणें स्वधर्महीन मनुष्याला महादोष जिकतात. २००

आणखी सर्व लोक निरंतर तुझी अपकीर्ति वर्णन करतील; आणि संभावित पुरुषाला अपकीर्ति ही मरणापेक्षांही अधिक दुःखकर आहे. ३४

१८ प्राप्त होतें. १९ सांपडावा. २० इच्छित फल देणारा मणि. २१ अकस्मात् २२ अमृत. २३ टाकावा. २४ नसतें. २५ हानि करणारा २६ गमावलें. २७ ह्या. २८ असलेली. २९ शोधीत. ३० पतिविरहित. ३१ स्त्री. ३२ तिरस्कार. ३३ प्रेत. ३४ चोहोंकडून. ३५ गिधाडांनीं. ३६ जिंकितात.

म्हणोनि स्वधर्मु हा सांडसील । तरी पापा वरपेडा होसील । आणि अपेश[1] तें ने[2] वचेल । कल्पांतवरी ॥ १ ॥ जाणतेनि[3] तंवचि जियावें[4] । जंव अपकीर्ति आंगा न येवे[5] । आणि सांग पां केविं निगावें[6] । एथोनियां ॥ २ ॥ तूं निर्मत्सर[7] सदयता[8] । येथूनि निघसील कीरे[9] माघौतां[10] । परी ते गती[11] समस्तां । न मनेल[12] येयां[13] ॥ ३ ॥ हे चहुंकडूनि वेढितील । बाणवरी[14] घेतील[15] । तेथ पार्था न सुटिजेल । कृपाळूपणें ॥ ४ ॥ ऐसेनिहि प्राणसंकटें । जरी विपायें[16] पां निघणें घडे[17] । तरी तें जियालें[18] वोखटें[19] । मरणाहुनी ॥ ५ ॥

भयाद्रणादुपरतं मंस्यंते त्वां महारथाः, येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यासि लाघवम् ॥३५॥

अन्वय—महारथाः त्वा भयात् रणात् उपरतं मंस्यन्ते येषां च त्वं बहुमतः भूत्वा लाघवं यास्यसि ॥ ३५ ॥

तूं आणिकही एक न विचारिसी । एथ संभ्रमें[20] झुंजों आलासी । आणि सकणवपणें निघालासी । माघुता[21] जरी ॥ ६ ॥ तरी तुझें तें[22] अर्जुना । या वैरियां दुर्जनां । कां प्रत्यया[23] येईल मना । सांगे मज ॥ ७ ॥

अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यंति तवाहिताः । निंदंतस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ३६

अन्वय—तव सामर्थ्यं निन्दन्तः तव अहिताः बहून् अवाच्यवादान् वदिष्यंति; ततः दुःखतरं नु किम् ? ॥ ३६ ॥

हे म्हणती गेलारे गेला । अर्जुन आम्हां बिहाला[24] । हा सांगे बोलु उरला । निकौ[25] कायी ॥ ८ ॥ लोक सायासें करूनि बहुतें । का वेंचिती[26] आपुलीं जीवितें । परी वाढविती कीर्तीतें । धनुर्धरा ॥ ९ ॥ ते तुज अनायासें । अनकाळित[27] जोडिली असे । हें अद्वितीय जैसें । गगन आहे ॥ २१० ॥ तैसी कीर्ति निःसीम[28] । तुझ्या ठायीं निरुपम । तुझे गुण उत्तम । तिहीं लोकीं ॥ ११ ॥ दिगंतींचे भूपती । भाट होऊनि वाखाणिती । जे ऐकिलिया दचकती । कृतांतादिक ॥ १२ ॥ ऐसी महिमा घनवट[29] । गंगा तैसी चोखट । जया देखीं जगीं सुभट[30] । वांठ[31] जहाले ॥ १३ ॥ तें पौरुष[32] तुझें अद्भुत । आइकोनियां हे समस्त । जाहले अति विरक्त । जीवितेंसीं ॥ १४ ॥ जैसा सिंहाचिया हांका । युगांतु[33] होय मैदमुखा[34] । तैसा कौरवां अशेखां[35] । धाकु तुझा ॥ १५ ॥ जैसे पर्वत वज्रातें । ना तरी सर्प गरुडातें । तैसे अर्जुना हे तूतें । मानिती सदा ॥ १६ ॥ तें अगाधपण[36] जाईल । मग हीनत्व[37] अंगा येईल । जरी माघुता निघसील । न झुंजताचि ॥ १७ ॥ आणि हे पळतां पळों नेदिती । धरूनि अवकळा[38] करिती । न गणित कुटी[39] बोलती । आइकतां तुज ॥ १८ ॥ मग ते वेळीं हियें[40] फुटावें । आतां लोठेपणें कां न झुंजावें । अवतरण.—हे जिंतले तरी भोगावें । महीतळें ॥ १९ ॥

१ प्राप्त. २ दूर होणार नाहीं. ३ ज्ञात्यानें. ४ जगावें. ५ पावत नाहीं. ६ निघावें. ७ मत्सररहित. ८ कनवाळूपणानें. ९ निश्चयें. १० माघारा. ११ गोष्ट. १२ वाटेल. १३ कौरवांना. १४ योगानें. १५ व्यापतील. १६ कदाचित्. १७ घडे. १८ वाचणें. १९ वाईट. २० समारंभानें. २१ माघारा. २२ दयाळूपणा. २३ अनुभवास. २४ भ्याला. २५ चांगला. २६ खर्चितात. २७ निष्प्रतिबंध.

म्हणून, जर तूं स्वधर्माचा त्याग करशील, तर तुला पाप लागेल; आणि कल्पातापर्यंतही तो अपयशाचा डाग नाहींसा होणार नाहीं. १ जोंपर्यंत अपकीर्ति झाली नाहीं, तोंपर्यंतच ज्ञात्यानें जगावें. मग तूंच सांग, कीं आतां येथून कसें परत जावें? २ सदय अंतःकरणानें व मत्सररहित असा तूं माघारा फिरशील खरा, परंतु ह्यांना कांहीं ती गोष्ट पटणार नाहीं. ३ हे कौरव तुला चोहींकडून वेढतील, व तुजवर बाणांना मारा करतील; पार्था, मग त्या प्रसंगीं ह्या तुझ्या कनवाळूपणानें कांहीं तुझी सुटका होणार नाहीं. ४ इतकेंही जर कदाचित् मोठ्या कष्टानें येथून तुझी सुटका झाली, तरी तें वाचणें मरणापेक्षांही वाईट आहे. ५

हे सर्व महारथी तूं भयानें रणांतून पळून गेलास असें मानतील. मग, तूं ह्या सर्वांना जो बहुमान्य आहेस, त्या तुला कमीपणा येईल. ३५

आणखी एक गोष्टीचा तूं विचार केला नाहींस; तूं ह्या ठिकाणीं मोठ्या थाटानें युद्धास आला असून जर दयार्द्र होऊन माघारा जाण्यास निघालास, ६ तर अर्जुना, तूंच सांग, कीं तुझें तें दयाळूपण हे दुर्जन वैरी कौरव ह्यांना खरें वाटेल का? ७

तुझ्या सामर्थ्याची निंदा करून तझे शत्रु न बोलावीं अशीं पुष्कळ दुर्भाषणें तुझ्या संबंधानें बोलतील. ह्यापेक्षां अधिक दुःखकारक तें काय आहे? ॥ ३६ ॥

हे म्हणतील, 'गेला रे गेला! अर्जुन आम्हांस भिऊन पळून गेला?" अरे, असा हा दोष तुझ्यावर राहिलेला चांगला का? ८ धनुर्धरा, पाहिजे तितके सायास करून, किंवा प्रसंगीं प्राणही खर्ची घालून लोक ज्या कीर्तीचें संपादन करितात, ९ ती गगनाप्रमाणें अनुपमेय व निष्प्रतिबंध कीर्ति संपादण्याचा प्रसंग अनायासानें तुला आला आहे. ११० तुझी कीर्ति अमर्याद असून तुझे गुणही उपमारहित आहेत, अशी तिन्ही लोकांत ख्याति आहे. ११ देशांतरींचे राजेरजवाडे स्तुतिपाठक होऊन तुझी कीर्ति गातात, ती ऐकून यमादिक देखील तुला भितात! १२ त्या कीर्तीचा महिमा गंगेच्या पाण्याप्रमाणें निर्मल व गहन आहे, आणि तो ऐकून जगांतील मोठमोठे योद्धेही स्तब्ध होतात. १३ असा तुझ्या अद्भुत शौर्याचा महिमा ऐकून हे सर्व कौरव आपल्या प्राणांवर उदार झाले आहेत. १४ ज्याप्रमाणें सिंहाची गर्जना ऐकल्याबरोबर उन्मत्त हत्तीलाही प्रलयकाळच ओढवला असें वाटतें, त्याप्रमाणें ह्या सर्व कौरवांस तुझा धाक वाटतो. १५ ज्याप्रमाणें पर्वत वज्राला किंवा सर्प गरुडाला मानतात, त्याप्रमाणें हे कौरव तुला नेहमी मानतात, १६ तेव्हां आता युद्ध न करतां जर माघारा फिरशील, तर ही तुझी थोरवी नाहींशी होऊन तुला हीनत्व प्राप्त होईल. १७ बरें, पळून जाऊं म्हणशील, तर ते तुला जाऊं देणार नाहीत; तुला धरून आणून तुझी फजिती करतील, आणि तोंडावर तुझी अतिशय निंदा करतील. १८ ते मर्मभेदक शब्द ऐकून अंतःकरण विदीर्ण होण्यापेक्षां शौर्यानें का युद्ध करूं नये? जर ह्यांना तूं जिंकलेंस, तर पृथ्वीचें राज्य भोगशील, १९

२८ अमर्याद. २९ गहन. ३० महायोद्धे. ३१ तटस्थ, स्तब्ध. ३२ शौर्य ३३ प्रलयकाल. ३४ उन्मत्त हत्तीला. ३५ सर्वांस. ३६ गंभीरता. ३७ नीचपणा. ३८ फजिती. ३९ वर्म. ४० छाती. ४१ शूरपणानें. ४२ पृथ्वीचें राज्य.

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ॥
तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युध्दाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥

अन्वय—हतः स्वर्गं प्राप्स्यसि वा जित्वा महीम् भोक्ष्यसे; तस्मात्, (हे) कौंतेय, त्वं कृत निश्चयः (सन्) युद्धाय उत्तिष्ठ ॥ ३७ ॥

ना तरी रणीं एथ। झुंजतां वेंचलें जीवित। तरी स्वर्गसुख अनकळित। पावसील ॥ २२० ॥ म्हणोनि ये गोठी। विचारु न करीं किरीटी। आतां धनुष्य घेऊनि उठीं। झुंज वेगीं ॥ २१ ॥ देखें स्वधर्मु हा आचरतां। दोषु नाशे असता। तुज भ्रांति हे कवण चित्ता। पातकाची। ॥ २२ ॥ सांगें प्लवेंचि काय बुडिजे। कां मार्गीं जातां आडळिजे। परी विपायें चालों नेणिजे। तरी तेही घडे ॥ २३ ॥ अमृतें तरीचि मरिजे। जरी विखेंसीं[४] सेविजे। तैसा स्वधर्मीं दोषु पाविजे। हेतुकपणें ॥ २४ ॥ म्हणोनियां पार्था। हेतु सांडूनि सर्वथा। तुज क्षात्रवृत्ति झुंजतां। पाप नाहीं ॥ २५ ॥

सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ। ततो युध्दाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ३८

अन्वय—सुखःदुःखे, लाभालाभौ, जयाजयौ समे कृत्वा ततः युद्धाय युज्यस्व; एवं पापं न अवाप्स्यसि ॥ ३८ ॥

( ६१ अर्जुनास युद्ध करण्यास आज्ञा, २२६ ते २२९ ) सुखीं संतोषा न यावें। दुःखीं विषादा नं भजावें। आणि लाभालाभ न धरावे। मनामाजीं ॥ २६ ॥ एथ विजयपण होईल। कीं सर्वथा देह जाईल। हें आधींचि कांहीं पुढील। चितावेना ॥ २७ ॥ आपणयां उचिता। स्वधर्में राहाटतां। जें पावे तें [१०]निवांता। साहोनि जावें ॥ २८ ॥ ऐसेयी मनें होआवें। तरी दोषु नं घडे स्वभावें। म्हणोनि आतां 'झुंजावें। निभ्रांत तुवां ॥ २९ ॥

एषा तेऽभिहिता सांख्ये बुध्दिर्योगे त्विमां शृणु।
बुध्दया युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥ ३९ ॥

अन्वय—हे पार्थ, एषा ते सांख्ये बुद्धिः अभिहिता तु योगे इमां शृणु, यया बुध्या युक्तः (त्वं) कर्मबंधं प्रहास्यसि ॥ ३९ ॥

( ६२ निष्काम कर्म केलें असता पाप लागत नाहीं. बुद्धियोगाचें महत्त्व, २३० ते २४२ ) हे सांख्यस्थिति मुकुलित। सांगितली तुज येथ। आतां बुद्धियोगु[४] निश्चित। अवधारीं पां ॥ २३० ॥ जया बुद्धियुक्ता। जाहलिया पार्था। कर्मबंधु सर्वथा। बाधूं न [५]पवे ॥ ३१ ॥ जैसें वज्रकवच लेइजे। मग शस्त्रांचा वर्षाव साहिजे। परी जैतेंसीं[६] उरिजे। अचुंबित ॥ ३२ ॥

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते। स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ४०

अन्वय—इह अभिक्रमनाशः न अस्ति, प्रत्यवायः न विद्यते. अस्य धर्मस्य स्वल्पं अपि (अनुष्ठानं) महतः भयात् त्रायते ॥ ४० ॥

युध्दांत मरण पावलास तर स्वर्गप्राप्ति होईल, अथवा युध्दात जय पावलास तर पृथ्वीचें राज्य भोगशील. म्हणून अर्जुना, युध्दाविषयीं निश्चय करून ऊठ. ॥ ३७ ॥

अथवा ह्या रणामध्यें युद्ध करताना तूं मेलास, तर सहज निरामय असें स्वर्गसुख भोगशील. २२० म्हणून अर्जुना, ह्याबद्दल आतां विचार करीत बसूं नको; तर उठ, आणि हातांत धनुष्य घेऊन लवकर युद्धास आरंभ कर. २१ हें पहा—स्वधर्माचें आचरण केलें तर असलेले दोष नाश पावतात, असें असून त्याच्यापासून पातक लागेल हा भ्रम तुझ्या मनांत कोठून उत्पन्न झाला? २२ तूंच सांग, कीं नावेंत बसणारा कधीं बुडेल का? त्याचप्रमाणे चांगल्या रस्त्यानें जाणारा कधी ठेंच लागून पडेल का? परंतु ज्याला चालतां येत नाहीं तो मात्र कदाचित् ठेच लागून पडण्याचा संभव आहे. २३ दूध प्याल्यानें मरण येणार नाही; परंतु तें विषाबरोबर सेवन केल्यास तो सेवन करणारा मरेल; त्याचप्रमाणें, फलाच्या आशेनें स्वधर्माचें आचरण केल्यास मात्र दोष लागतील. २४ म्हणून अर्जुना, निष्काम होऊन क्षत्रियधर्मानें युद्ध कर, म्हणजे पातकाचा लेशाही तुला लागणार नाहीं. २५

सुख, दुःख, लाभ, हानि, जय, अपजय हीं सर्व सारखीं मानून मग युद्धास तयार हो. म्हणजे तुला पाप कधींहि लागणार नाहीं. ॥ ३८ ॥

सुख प्राप्त झालें असता संतोष मानूं नये, दु.ख प्राप्त झालें असता खेद मानूं नये, आणि मनांत लाभालाभ धरूं नयेत. २६ ह्या समरांगणीं आपल्यास जय मिळेल किंवा आपण मरूं, ह्या पुढील गोष्टींचा अगोदर विचार करूं नये. २७ आपण स्वधर्मानें वागत असताना जें बरें वाईट प्राप्त होईल, तें निमूटपणानें सहन करावें. २८ अशा रीतीनें मनाचा निश्चय केला, म्हणजे सहजच दोष घडत नाहींत; म्हणून तूं निश्चयानें आता युद्धास आरंभ कर. २९

पार्था, आतापर्यंत तुला सांख्यबुद्धि (परमार्थशास्त्रातील ज्ञान) सांगितली. आता, कर्मयोगाविषयींची जी बुद्धि—जिच्या योगानें कर्मबंध नाहींसा होतो—ती ऐक. ॥ ३९ ॥

येथपर्यंत हा ज्ञानयोग तुला संक्षिप्तपणें सांगितला, आता बुद्धियोग (कर्माशीं ज्ञानाचा संबंध—कर्मयोग) सांगतों ऐक. २३० अर्जुना, पुरुष बुद्धियोगाला प्राप्त झाला असतां त्याला कर्मबंधाची मुळींच बाधा होत नाहीं. ३१ ज्याप्रमाणें अंगात वज्रकवच घातलें म्हणजे शस्त्रांची वृष्टि सहन करून विजयी पुरुष सुरक्षित राहतो, ३२

ह्या बुध्दियोगात आरंभिलेलें कर्म मध्येंच बंद पडलें असता घडलेलें कर्म नाश पावत नाहीं, व त्याला अडचण किंवा संकट येत नाहीं; आणि या धर्माच्या थोडक्या देखील अनुष्ठानानें मोठ्या भयापासून रक्षण होतें. ॥ ४० ॥

---

१ नावेनें. २ ठेंच लागावी, अडखळावें. ३ दुधानें. ४ विषाबरोबर. ५ हेतु धरून. ६ क्षत्रियधर्मानें. ७ खेद मानूं नये. ८ युद्धाचे ठिकाणीं. ९ वागताना. १० स्वस्थपणानें. ११ असें दृढ. १२ ज्ञानयोग. १३ संक्षेपेकरून. १४ कर्मयोग. १५ न बाधे. १६ विजयी. १७ अबाध.

ज्ञाने. ९.

तैसें ऐहिक तरी न नंशे । आणि मोक्षु तो उरला असे । जेथ पूर्वानुक्रम दिसे । चोखौळत ॥ २३ ॥ कर्माधारें राहाटिजे । परी कर्मफळ न निरीक्षिजे[४] । जैसा मंत्रज्ञु न बेंधिजे । भूतबाधां ॥ २४ ॥ तियापरी जे सुबुद्धि । आंपु जालिया निर्रवधि । हा असतांचि उपाधि । आकळूं न सके ॥ २५ ॥ जेथ न संचरे पुण्यपाप । जे सूक्ष्म अति निष्कंप । गुणत्रयादि लेप । न लैगती जेथ ॥ २६ ॥ अर्जुना ते[१२] पुंण्यवशें । जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे । तरी अशेषही नाशे । संसारभय ॥ २७ ॥

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन । बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥४१॥**

अन्वय—हे कुरुनंदन ! इह व्यवसायात्मिका बुद्धिः एका एव, अव्यवसायिनां बुद्धयः बहुशाखाः च अनन्ताः (संति) हि ॥ ४१ ॥

जैसी दीपैकळिका धौकुटी । परी बहु तेजातें प्रगटी । तैसी सद्बुद्धि हे थैंकुटी । म्हणों नये ॥ २८ ॥ पार्था बहुतीं परी । हे अपेक्षिजे[१७] विर्चारशूरीं । जे दुर्लभ चराचरीं । सद्वासना ॥ २९ ॥ आणिकें सारिखा बहुवस्तु । जैसा न जोडे परिसु । कां अमृताचा लेशु । दैवगुणें ॥ २४० ॥ तैसी दुर्लभ जे सद्बुद्धि । जिये परमात्माचि अंवधि । जैसा गंगेसी उदधि । निरंतर ॥ ४१ ॥ तैसें ईश्वरावांचूनि कांहीं । जिये आणीक लौणी नाहीं । ते एकचि बुद्धि पाहीं । अर्जुना जगीं ॥४२॥ (६३ दुर्मति, २४३ ते २५९) येर ते दुर्मती । जे बहुधा असे विकरैती । तेथ निरंतर रमती । अविवेकिये ॥४३॥ म्हणोनि तयां पार्था । स्वर्गसंसार नरकावस्था । आत्मसुख सर्वथा । दृष्ट नाहीं ॥ ४४ ॥

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः । वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ४२**

अन्वय—हे पार्थ, वेदवादरताः अविपश्चितः अन्यत् न अस्ति इति वादिनः या इमां पुष्पितां वाचं प्रवदन्ति ॥ ४२ ॥

वेदाधारें बोलती । केवळ कर्म प्रतिष्ठिती । परी कर्मफळीं आसक्ती । धरूनिया ॥ ४५ ॥ म्हणती संसारीं जन्मिजे । यज्ञादिक कर्म कीजे । मग स्वर्गसुख भोगिजे । मनोहर ॥ ४६ ॥ एथ हेंवांचूनि कांहीं । आणिक सर्वथा सुखचि नाहीं । ऐसें अर्जुना बोलती पाहीं । दुर्बुद्धि ते ॥ ४७ ॥

**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् । क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥**

अन्वय—कामात्मानः स्वर्गपराः भोगैश्वर्यगतिं प्रति क्रियाविशेषबहुलां जन्मकर्मफलप्रदाम् ॥४३॥

---

१ नाशे. २ पूर्वी केलेला आरंभ. ३ स्पष्ट. ४ पहावें. ५ बाधा पावत नाहीं. ६ ईश्वरार्पणबुद्धि. ७ प्राप्त. ८ निःशेष. ९ जन्ममरणाचा. १० निश्चल. ११ लागती. १२ सुबुद्धि. १३ पुण्याईने. १४ दिव्याची ज्योत. १५ लहान. १६ अल्प. १७ इच्छावें. १८ विचारशांनीं. १९ दगडादिक दुसरे. २० पुष्कळ. २१ शेवट, पर्यवसान. २२ समुद्र. २३ प्राप्य स्थान. २४ विकार पावणारी. २५ अविचारी. २६ स्वरूपानंद. २७ स्थापिती. २८ लोभ.

त्याप्रमाणें इहलोकींचें सुख नाहींसें न होतां मोक्ष अंतरत नाहीं. ज्या कर्मयोगांत पूर्वी केलेला आरंभ, खंड पडला असला तरी शाबूत असतो. ३३ कर्माच्या आधारानें वागणूक ठेवावी, परंतु त्या कर्मापासून होणाऱ्या फलाची इच्छा धरूं नये; जसा पंचाक्षरी भूतबाधेपासून बाधा पावत नाहीं, ३४ त्याप्रमाणें, (कर्मफलाच्या ठिकाणीं आसक्ति न ठेवितां निरभिमानबुद्धीनें कर्म करण्याची) सद्बुद्धि ज्याला प्राप्त झाली आहे, त्याला जन्ममरणाचा उपाधि होत नाहीं. ३५ ज्या बुद्धीला पापपुण्याची बाधा होत नाही; जी अतिशय सूक्ष्म असून निश्चल आहे; आणि सत्त्व, रज व तम हे तिन्ही गुण जिच्यात प्रवेश करीत नाहीत; ३६ अर्जुना, अशी जी सुबुद्धि, ती पुण्याईनें थोडीशी जरी एखाद्याला प्राप्त झाली, तरी ती सर्व संसारभयाचा नाश करिते. ३७

अर्जुना, ह्या कर्मयोगामध्यें निश्चयात्मक बुध्दि एकच आहे, आणि अनिश्चित पुरुषाच्या बुध्दि अनेक भेदांनीं युक्त व अनंत असतात ॥ ४ ॥

ज्याप्रमाणें दिव्याची ज्योत लहान असूनही तिचा प्रकाश मोठा पडतो, त्याप्रमाणें सद्बुद्धि अल्प जरी असली, तरी तिला लहान समजूं नये. ३८ अर्जुना, जे ज्ञानी आहेत ते बहुतकरून हिची इच्छा करतात. ती सद्बुद्धि प्राणिमात्राला दुर्लभ आहे. ३९ ज्याप्रमाणें इतर दगडांसारखे परीस काही पुष्कळ सापडत नाहींत, अथवा लेशमात्र अमृत प्राप्त होण्यास देखील दैवयोगच लागतो, २४० त्याप्रमाणें, परमेश्वरप्राप्तींतच जिचें पर्यवसान होतें अशी ही सद्बुद्धि फार दुर्लभ आहे. ज्याप्रमाणें गंगेचें पर्यवसान निरंतर समुद्रच आहे ४१ त्याप्रमाणें, अर्जुना, जिला ईश्वरप्राप्तीवांचून दुसरी काहीं प्राप्ति नाहीं, अशी जगतामध्यें एकच बुद्धि आहे. ४२ इजशिवाय इतर बुद्धि त्या दुर्बुद्धि होत; त्यांचे ठिकाणीं विकार उत्पन्न होतात व तेथें अविचारी लोक नेहमीं रमतात. ४३ म्हणून अर्जुना, त्या लोकांना स्वर्ग, संसार आणि नरकावस्था प्राप्त होते; परंतु आत्मसुख कधीं दृष्टीस देखील पडत नाहीं. ४४

अर्जुना, वेदाच्या नुसत्या अर्थवादाच रत झालेले जे अविचारी लोक, कर्मावाचून दुसरें काहीं नाहीं, ही अशी पुष्पित (बाह्यतः मनोहर भासणारी) वाणी बोलतात; ॥ ४२ ॥

ते वेदाचे आधारानें बोलून कर्ममार्गाचें श्रेष्ठत्व स्थापन करतात, परंतु त्या कर्माचे फळावर लोभ ठेवतात. ४५ त्याचें म्हणणे असें असतें कीं, वारंवार मृत्युलोकीं जन्म घेऊन यज्ञादिक कर्में आचरावीं, व आल्हाददायक असें स्वर्गसुख भोगावें. ४६ अर्जुना, ते दुर्बुद्धि नेहमीं असें म्हणतात कीं, एथें ह्या स्वर्गसुखावाचून निरंतर सुख देणारें असें दुसरें सुखच नाहीं. ४७

ते विषयभोगाविषयीं तत्पर व स्वर्ग मिळावा हाच ज्याचा हेतु असे पुरुष जन्म व कर्म हीं फळें देणाऱ्या व जींत पुष्कळ कर्में सांगितलीं आहेत अशा वेदवाणीचे आधारानें भोग व ऐश्वर्य ह्यांच्या प्राप्तीकरितां आचरण करतात. ॥ ४३ ॥

देखें कामनाअभिभूत । होऊनि कर्मे आचरत । ते केवळ भोगीं चित्त । देऊनियां ॥ ४८ ॥ क्रियाविशेषें[1] वहुतें[2] । न लोपिती[3] विधीतें[4] । निपुण होऊनि धर्मातें । अनुष्ठिती ॥ ४९ ॥

भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् । व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ४४

अन्वय—तया अपहृतचेतसां भोगैश्वर्यप्रसक्तानां ( तेषां ) व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥

परी एकचि कुडें करिती । जे स्वर्गकामु मनीं धरिती । यज्ञपुरुषा चुकती । भोक्ता जो ॥ २५० ॥ जैसा कर्पूराचा राशि कीजे । मग अग्नि लाऊनि दीजे । कां मिष्टान्नीं संचरविजे । काळकूट ॥ ५१ ॥ दैवें अमृतकुंभ जोडला । तो पायें हाणोनि उलंडिला । तैसा नासिती धर्मु निपजेला । हेतुकपणें ॥ ५२ ॥ सायासें पुण्य अर्जिजे । मग संसार कां अपेक्षिजे । परी नेणती ते काय कीजे । अप्राप्त देखें ॥ ५३ ॥ जैसी रांधवणी रससोय निकी[16] । करूनियां मोलें विकी । तैसा भोगासाठीं अविवेकी । धाडिती धर्मु ॥ ५४ ॥ म्हणोनि हे पार्था । दुर्बुद्धि देख सर्वथा । तयां वेदवादरतां । मनीं वसे ॥ ५५ ॥

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन । निर्द्वंद्वो नित्यसत्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ४५

अन्वय—हे अर्जुन, वेदाः त्रैगुण्यविषयाः संति. ( त्वं ) निस्त्रैगुण्यः निर्द्वंद्वः नित्यसत्त्वस्थः निर्योगक्षेमः च आत्मवान् भव ॥ ४५ ॥

तिहीं गुणीं आवृत । हे वेद जाण निभ्रांत । म्हणोनि उपनिषदादि समस्त । सात्विक ते ॥ ५६ ॥ येरें रजतमात्मक । जेथ निरूपिजे कर्मादिक । जे केवळ स्वर्गसूचक । धनुर्धरा ॥ ५७ ॥ म्हणोनि तूं जाण । हे सुखदुःखासीच कारण । एथ झणें अंतःकरण । रिघों देसी ॥ ५८ ॥ तूं गुणत्रयातें अव्हेरीं । मी[24]-माझें हें न करीं । एक आत्मसुख अंतरीं । विसंबें झणीं ॥ ५९ ॥

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके । तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥

अन्वय—यावान् अर्थः उदपाने ( तावान् ) सर्वतः संप्लुतोदके ( भवति ); ( यावान् च अर्थः ) सर्वेषु वेदेषु तावान् विजानतः ब्राह्मणस्य ( भवति ) ॥ ४६ ॥

( ६४ समत्वयोग, २६० ते २८४ ) जरी वेदें बहुत बोलिलें । विविधें भेद सूचिले । तऱ्ही आपण हित आपुलें । तेंचि घेपें[28] ॥ २६० ॥ जैसा प्रगटलिया गभस्ती । अशेषही मार्ग दिसती । तरी[30] तेतुलेहि काय चालिजती । सांगें मज ॥ ६१ ॥ कां उदकमय सकळ । जऱ्ही जाहलें असे महीतळ । तरी आपण घेपें केवळ ।

१ कामाच्या स्वाधीन. २ अनेक प्रकारचीं अनुष्ठानें. ३ माहिती. ४ कर्तव्यप्रयोगादिकांना. ५ वांईट. ६ स्वर्गेच्छा. ७ ईश्वरास. ८ मिसळावें. ९ उत्पन्न झाला. १० फलाशेनें, ११ श्रमानें. १२ संपादावें. १३ अज्ञानी. १४ स्वयंपाक करणारी. १५ स्वयंपाक. १६ चांगला. १७ अविचारी.

हें पहा-ते केवळ उपभोगाच्या ठिकाणीं लक्ष देऊन सकाम कर्मे करतात, ४८ व अनेक प्रकारची अनुष्ठानें विधियुक्त करून तीं शेवटास नेण्याकरितां फार दक्षतेनें धर्माचरण करतात. ४९

( अशा प्रकारें ) भोग व ऐश्वर्य ह्यांचे ठिकाणीं तत्पर, व माझ्या पुष्पित वाणीला ज्यांचें चित्त वश झालें आहे त्यांच्या अंतःकरणांत आत्मतत्त्वविषयक किंवा कर्मयोगविषयक बुद्धि असत नाहीं ॥४४॥

परंतु, अर्जुना, ते एक गोष्ट फार वाईट करतात. ती ही कीं, ते मनामध्यें स्वर्गेच्छा धारण करतात, आणि यज्ञभोक्ता जो ईश्वर त्याला विसरतात. २५० ज्याप्रमाणें कापुराच्या शुभ्र राशीस अग्नि लावून ती व्यर्थ जाळून टाकावी, अथवा मिष्टान्नांत काळकूट विष मिसळावें, ५१ किंवा दैवयोगानें मिळालेल्या अमृताचा कुंभ पायानें पालथा करावा, त्याप्रमाणें फलप्राप्तीचे हेतूनें प्राप्त झालेला धर्म हे लोक वायां दवडतात. ५२ असें पहा कीं, मोठ्या श्रमानें पुण्य संपादन करून मग संसाराची इच्छा कां करावी ? परंतु काय करावें, हें त्या अज्ञानी लोकांना समजत नाहीं. ५३ ज्याप्रमाणें उत्तम स्वयंपाकीण नानातऱ्हेचा चांगला स्वयंपाक तयार करून तें अन्न द्रव्याच्या आशेनें विकते, त्याप्रमाणें अविचारी लोक हे सुखोपभोगासाठीं धर्म गमवितात. ५४ म्हणून पार्था, वेदांतील अर्थवादांत मग्न झालेल्या लोकांच्या मनांत नेहमीं दुर्बुद्धिच वास करिते हें लक्षांत असूं दे. ५५

अर्जुना, वेदांत सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांचेंच प्रतिपादन केलें आहे, म्हणून तूं गुणातीत हो; मी व माझें हें द्वंद्व टाकून दे; नित्य शुद्ध सत्त्वगुणानें स्थिर हो; योगक्षेम म्हणजे अन्नवस्त्र कसें मिळेल ह्याची काळजी सोड; आणि आत्मस्वरूपीं चित्त ठेव. ॥ ४५ ॥

तूं निश्चयानें असें समज कीं, वेद हे तीन गुणांनी ( सत्त्व, रज, तम ह्यांनीं ) भरलेले आहेत; म्हणून सर्व उपनिषदें ह्यांची सत्त्वगुणामध्यें गणना केली जाते. ५६ धनुर्धरा, बाकीच्यामध्यें कर्म, उपासना इत्यादिकांचें निरूपण केलेलें आहे, ते सर्व रज व तम ह्या गुणांनीं युक्त असून केवळ स्वर्गसूचकच आहेत. ५७ म्हणून तूं असें पक्कें समज कीं, हे सुखदुःखांनाच कारण आहेत; व ह्यांकरितां तूं आपलें मन कदाचित् तेथें शिरूं देशील ! तर तसें करूं नको. ५८ तूं ह्या गुणत्रयाची त्रिपुटी टाकून दे, व अहंममता सोडून अंतःकरणांत आत्मसुखाचा विसर पडूं देऊं नको. ५९

अल्प जलसमुदायांत जीं स्नानपानादिक कामें प्रत्येकीं कष्टानें होतात, तीं सर्व मोठ्या जलाशयांत अनायासें होतात. तसें, सर्व वेदांतील कष्टसाध्य जें फल तें ब्रह्मज्ञान्याला अनायासें प्राप्त होतें ॥४६॥

जरी वेदांत पुष्कळ गोष्टी सांगितल्या असून पुष्कळ प्रकार सुचविले आहेत, तरी ज्यांत आपलें हित आहे तोच मार्ग स्वीकारला पाहिजे. २६० ज्याप्रमाणें सूर्योदय झाल्यावर अनेक रस्ते दृष्टीस पडतात, परंतु तितके रस्ते मनुष्य आक्रमूं शकतो काय, सांग बरें ? ६१ अथवा सर्व पृथ्वी उदकमय झाली तरी जसें आपल्या इच्छेपुरतेंच पाणी घेतलें पाहिजे,

१८ गमाविती. १९ वेदांतील अर्थवादांत मग्न झालेले. २० वेष्टित. २१ दुसरें. २२ कदाचित्. २३ सोड. २४ अहंमता. २५ विसंबूं नको. २६ अनेक. २७ सुचविले. २८ घ्यावें. २९ सर्व. ३० तितकें.

ओतींचजोगें ॥६२॥ तैसे ज्ञानी जे होती । ते वेदार्थातें [2]विवरिती । मग अपेक्षित तें स्वीकारिती । शाश्वत जें ॥ ६३ ॥

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन। मां कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥४७॥

अन्वय—( हे पार्थ, ) ते अधिकारः कर्मणि एव; कदाचन फलेषु मा; त्वं कर्मफलहेतुः मा भूः च अकर्मणि ते संगः मा अस्तु ॥ ४७ ॥

म्हणोनि आइकें पार्था । याचिपरी पहातां । तुज उचित होय आतां । स्वकर्म हें ॥ ६४ ॥ आम्हीं समस्तही विचारिलें । तंव ऐसेंचि हें मना आलें । जे न सांडिजे तुवां आपुलें । विहित कर्म ॥ ६५ ॥ परी कर्मफळीं आस न करावी । आणि कुकर्मीं संगती न व्हावी । हे सत्क्रियाचि आचरावी । हेतुविण ॥ ६६ ॥

योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।
सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥

अन्वय—हे धनंजय ! त्वं संगं त्यक्त्वा सिद्ध्यसिद्ध्योः समः भूत्वा योगस्थः ( सन् ) कर्माणि कुरु; समत्वं योगः उच्यते ॥४८॥

तूं योगयुक्त होउनी । फळाचा संगु टाकुनी । मग अर्जुना चित्त देउनी । करीं कर्में ॥ ६७ ॥ परी आदरिलें कर्म दैवें । जरी समाप्तीतें पावे । तरी विशेषें तेथ तोषावें । हेंही नको ॥ ६८ ॥ कीं निमित्तें कोणे एकें । तें सिध्दी न वचतांचि ठाके । तरी तेथिंचेनि अपरितोखें । क्षोभावें[11] ना ॥ ६९ ॥ आचरतां सिध्दी गेलें । तरी कौजाचि कीर[13] आलें । परी ठेलियांही संपूर्ण जहालें । ऐसेंचि मानीं ॥ २७०॥ देखें जेतुलालें कर्म निपजे[17] । तेतुलें आदिपुरुषीं समर्पिजे । तरी परिपूर्ण सहजें । जहालें जाणें ॥७१॥ देखें संतासत्कर्मीं । हें जें सरिसेपण मनोधर्मीं । तेचि योगस्थिति उत्तमीं । प्रशंसिजे ॥ ७२ ॥

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय । बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥
बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते। तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥५०

*अन्वय*—हे धनंजय, ( *फलाभिसंधिना कृतं* ) *कर्म बुद्धियोगात् दूरेण अवरं हि* ( *यतः एवं* ततः ) बुद्धौ शरणं अन्विच्छ. फलहेतवः कृपणाः ( सन्ति ) ॥ ४९ ॥ बुद्धियुक्तः इह उभे सुकृतदुष्कृते जहाति. तस्मात् योगाय युज्यस्व; योगः कर्मसु कौशलम् ( अस्ति ). ॥ ५० ॥

अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें । जेथ मन आणि बुध्दीचें । ऐक्य आथी ॥ ७३ ॥ तो बुध्दियोग विचारितां[23] । बहुतें पाडें पार्था । दिसे हा आरुता । कर्मयोगु ॥ ७४ ॥ परी तोंचि कर्म आचरिजे । तरीच हा योगु पाविजे । जें कर्मशेष सहजें । योगस्थिती ॥ ७५ ॥ म्हणोनि बुध्दियोगु सधरु । तेथ अर्जुना होईं स्थिरु । मनें करीं अव्हेरु । फळहेतूचा ॥ ७६ ॥ जे बुध्दियोगा योजिले[30] । तेचि पारंगत जाहले । इहीं उभयबंधीं सांडिले । पापपुण्यीं ॥ ७७ ॥

१ इच्छेपुरतें. २ विचार करितात. ३ इच्छित. ४ कर्तव्यकर्म. ५ इच्छा. ६ निषिद्ध कर्मी. ७ आरंभिलेलें. ८ जातांच. ९ राहे. १० असंतोषानें. ११ त्रासूं नये. १२ कामाला. १३ निश्चयेंकरून,

६२ त्याप्रमाणें, ज्ञानी जे आहेत, ते वेदार्थाचा विचार करून अपेक्षित अशा शाश्वत ब्रह्माचा तेवढा स्वीकार करतात. ६३

अर्जुना, तूं कर्माचाच अधिकारी आहेस. फलाचा अधिकारी कधींही होऊ नको, व कर्माच्या फलाची इच्छा देखील धारण करू नको; आणि कर्म करण्याविषयींही तूं आग्रह धरू नको. ॥ ४७ ॥

म्हणून पार्था, ऐक. ह्या सर्व गोष्टीचा विचार करून पाहतां तुला स्वकर्मच उचित आहे. ६४ आम्हीं सर्व गोष्टींचा विचार करून पाहिला, तों आमचे मनास असें आलें कीं, तूं आपलें कर्तव्यकर्म सोडूं नये.. ६५ पण कर्मफलाची इच्छा न ठेवतां, आणि निषिद्ध कर्मांचा अंगीकार न करता सत्कर्माचेंच निष्काम आचरण करावें. ६६

हे धनंजया, ईश्वरार्पण बुद्धीनें कर्माचे ठिकाणीं स्थिर होऊन कर्माच्या कर्तेपणाचा अभिमान व फलाची इच्छा टाकून कर्म कर. आरंभिलेलें कर्म शेवटास गेलें तरी हर्ष व शोक मानूं नको. सुखदुःखाचे ठिकाणीं समता असणें ह्यालाच योग म्हणतात ॥ ४८ ॥

अर्जुना, त्वां योगयुक्त होउन फलाची इच्छा टाकून द्यावी, व मन लावून कर्में करावीं. ६७ परंतु आरंभिलेलें कर्म दैवयोगानें पूर्ण झालें, तरी त्याचा संतोष मानूं नये; ६८ किंवा कोणत्याही कारणानें तें कर्म सिद्धीस न जाता तसेंच राहिलें, तरी त्याजबद्दल मनांत असंतोष मानून त्रासूं नये. ६९ कर्म करताना जर शेवटास गेलें, तर तें खरोखर उपयोगालाच आलें; परंतु कदाचित् विघ्न येऊन अपुरतेंच राहिलें, तरीही तें सफलच झालें असें समज. २७० कारण, असें पहा: जेवढें कर्म घडेल, तेवढें ईश्वराला अर्पण करावें, म्हणजे सहजरीत्या पूर्ण झालें असें समज. ७१ आणखी असें पहा कीं, चागल्या व वाईट कर्माचे ठिकाणीं मनोधर्म सारखा राहणें हीच योगस्थिति असें उत्तम लोक म्हणतात. ७२

अर्जुना, ईश्वराला अर्पण करण्याच्या हेतूनें केलेल्या कर्मापेक्षा फलाच्या हेतूनें केलेलें कर्म फार कमी योग्यतेचें आहे. म्हणून बुद्धियोगालाच शरण जा. कर्माच्या फलाची इच्छा करणारे अतिदीन होत. ॥४९॥ बुद्धियोगानें युक्त असा पुरुष, कर्माचें फल जें पापपुण्य त्यापासून ह्या लोकींच मुक्त होतो. म्हणून, समत्वबुद्धियोग साध्य करून घे. कर्माचें कौशल्य ईश्वराला कर्म अर्पण करण्यातच आहे॥५०॥

अर्जुना, ज्या ठिकाणीं मन (क्रिया) आणि बुद्धि ( ज्ञान ) ह्यांचें ऐक्य आहे, त्याच ठिकाणीं चित्ताची समता राहते, आणि तेंच योगाचें सार आहे. ७३ पार्था, विचारांतीं बुद्धियोयाची व कर्मयोगाची तुलना केली असता हा ( अहंकारयुक्त व फलेच्छासहित ) कर्मयोग फार कमी योग्यतेचा आहे. ७४ परंतु त्या कर्मांचेंच आचरण केलें, म्हणजे हा बुद्धियोग साध्य होतो; आणि अशा रीतीनें कर्मसिद्धि झाली म्हणजे त्याला योगस्थिति म्हणतात. ७५ म्हणून अर्जुना, बुद्धियोग हाच पायाशुद्ध आहे, आणि त्याचेच ठिकाणीं तूं आपलें मन लाव; परंतु मनांत फलप्राप्तीची आशा करूं-नको. ७६ ज्याची बुद्धियोगाकडे प्रवृत्ति झाली, तेच पार पडतात; आणि पाप व पुण्य या दोहोंच्या बंधनातून सुटतात. ७७

---

खरोखर १४ राहिलें असताही. १५ सफळ. १६ जेवढें. १७ उत्तम होतें. १८ तेवढें. १९ ईश्वराला. २० चागलें व वाईट. २१ सारखेपण. २२ समता. २३ विचार करितां. २४ मानानें. २५ कमी योग्यतेचा. २६ बुद्धियोग. २७ कर्मसिद्धि. २८ बळकट. २९ तिरस्कार. ३० उद्युक्त झालें. ३१ पार.

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः। जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥

अन्वय—हि बुद्धियुक्ताः मनीषिणः ( भूत्वा ) कर्मजं फलं त्यक्त्वा जन्मबंधविनिर्मुक्ताः (सन्तः) अनामयं पदं गच्छंति ॥ ५१ ॥

ते कर्मी तरी वर्तती। परी कर्मफळा नीतळती। आणि यातायाती लोपती। अर्जुना तयां ॥७८॥ मग निरामयभरित। पावती पद अच्युत। ते बुद्धियोगयुक्त। धनुर्धरा ॥ ७९ ॥

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति। तदा गंताऽसि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥५२

अन्वय—यदा ते बुद्धिः मोहकलिलं व्यतितरिष्यति, तदा त्वं श्रोतव्यस्य श्रुतस्य च निर्वेदं गंता असि ॥ ५२ ॥

तूं ऐसा तैं होसी। जैं मोहातें यया सांडिसी। आणि वैराग्य मानसीं। संचरेल ॥ २८० ॥ मग निष्कळंक गहन। उपजेल आत्मज्ञान। तेणें निचाड होईल मन। अपैसें तुझें ॥ ८१ ॥ तेथ आणिक कांहीं जाणावें। कां मागील तें स्मरावें। हें अर्जुना आघवें। पैरुपेल ॥ ८२ ॥

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला। समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ५३

अन्वय—यदा ते श्रुतिविप्रतिपन्ना बुद्धिः निश्चला ( भूत्वा ) समाधौ अचला स्थास्यति, तदा योगं अवाप्स्यसि ॥ ५३ ॥

इंद्रियांचिया संगती। जिये पैसरु होतसे मती। ते स्थिर होईल मागुती। आत्मस्वरूपीं ॥ ८३ ॥ समाधिसुखीं केवळ। जैं बुद्धि होईल निश्चळ। तैं पावसी तूं सकळ। योगस्थिति ॥ ८४ ॥

अर्जुन उवाचः—

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव। स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम्

अन्वय—हे केशव ! समाधिस्थस्य स्थितप्रज्ञस्य का भाषा ? स्थितधीः किं प्रभाषेत ? किं आसीत ? किं व्रजेत ? ॥ ५४ ॥

( ६५ स्थितप्रज्ञाबद्दल प्रश्न, २८५ ते २९० ) तेथ अर्जुन म्हणे देवा। हाचि अभिप्रायो आघवा। मी पुसेन आतां सांगावा। कृपानिधि ॥ ८५ ॥ मग अच्युत म्हणे सुखें। जें किरीटी तुज [14] निकें। तें पूस पां उन्मेखें। मनाचेनि ॥ ८६ ॥ या बोला पार्थें। म्हणितलें सांग पां श्रीकृष्णातें। काय म्हणिपे स्थितप्रज्ञातें। वोळखों केवीं ॥ ८७ ॥ आणि स्थिरबुद्धि जो म्हणिजे। तो कैसिया चिन्हीं जाणिजे। जो समाधिसुख भुंजे। अखंडित ॥८८॥ तो कवणे स्थिती असे। कैसेनि रूपीं विलसे [१९]। देवा सांगावें हें ऐसें। लक्ष्मीपति ॥८९॥ श्रीभगवानुवाचः—तंव परब्रह्म-अवतरणु। जो षड्गुणाधिकरणु। तो काय तेथ नारायणु। बोलतु असे ॥२९०॥

प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान्।
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥

अन्वय—हे पार्थ, यदा मनोगतान् सर्वान् कामान् प्रजहाति, आत्मनि एव आत्मना तुष्टः ( भवति ), तदा स्थितप्रज्ञः उच्यते ॥ ५५ ॥

म्हणून समत्वबुद्धियुक्त असे पुरुष ज्ञानी होऊन, कर्मफलाची आशा सोडून व जन्मबंधापासून मुक्त होऊन सर्व उपद्रवानीं रहित अशा ( परब्रह्म ) पदाप्रत पावतात ॥ ५१ ॥

अर्जुना, त्यांनीं जरी कर्मे केलीं, तरी ते कर्मांच्या फळांची इच्छा धरीत नाहींत; म्हणून त्यांच्या जन्ममरणाच्या यातायाती चुकतात. ७८ धनुर्धरा, मग बुद्धियोगयुक्त होऊन ब्रह्मानंदानें भरलेलें अविनाशी असें पद ते पावतात. ७९

जेव्हा तुझी बुद्धि मोहरूपी पातक तरून जाईल, तेव्हा तू ऐकलेले व ऐकावयाचे ह्यांबद्दल विरक्त होशील ॥ ५२ ॥

जेव्हां तूं ह्या मोहाचा त्याग करशील, तेव्हां त्या स्थितीस पावून मग तुझ्या मनांत वैराग्य उत्पन्न होईल. २८० त्यामुळें, निर्दोष आणि गहन असें जें आत्मज्ञान, तें तुला प्राप्त होईल; आणि मग आपोआप तुझें मन तृप्त होईल; ८१ अशी तुझ्या मनाची स्थिति झाल्यावर मग पुढल्याबद्दल कांही विचार करणें किंवा मागील गोष्टी आठवणें हे सर्व प्रकार जागचे जागीं राहतील. ८२.

वेदांतील नानाप्रकारचीं वाक्यें श्रवण करून घोटाळ्यात पडलेली तुझी बुद्धि जेव्हा आत्म्याचे ठिकाणीं स्थिर होईल, तेव्हा तूं योगाप्रत प्राप्त होशील. ॥ ५३ ॥

इंद्रियाच्या संगतीनें जी बुद्धि चंचल होते, ती आत्मस्वरूपाची प्राप्ति झाल्यावर मग सहज स्थिर होते. ८३ समाधिसुखाचे ठिकाणी जेंव्हां तुझी बुद्धि स्थिर होईल, तेव्हांच तुला सर्व योगस्थिति साधेल. ८४

अर्जुन म्हणालाः— हे केशवा ! ज्याची बुद्धि स्थिर होऊन योगस्थ झाली आहे, त्याला लोकात काय म्हणतात ? तो बोलतो कसा ? असतो कसा ? आणि चालतो कसा ? ॥ ५४ ॥

त्या वेळीं अर्जुन म्हणालाः—श्रीकृष्णा, कृपानिधे, ह्याजबद्दलचा खुलासा मी जो विचारीन, तो कृपा करून सांगा. ८५ मग श्रीकृष्ण म्हणतात, " अर्जुना, जे तुला संतोषित मनानें योग्य वाटेल तें खुशाल विचार. " ८६ असें म्हटल्यावर अर्जुन श्रीकृष्णांस म्हणाला, " स्थितप्रज्ञ ( ज्याची बुद्धि स्थिर आहे तो ) कोणाला म्हणावें, व तो ओळखावा कसा, हें उघड करून सांगा. ८७ ज्याला स्थिरबुद्धि म्हणतात, व जो निरंतर समाधिसुख भोगतो, तो कोणत्या चिन्हांनीं ओळखावा ? ८८ देवा लक्ष्मीपते, तो कोणत्या स्थितींत असतो, व कोणत्या रूपानें वर्तन करतो, हें कृपा करून मला सांगा. " ८९. तेव्हां षड्गुणैश्वर्यसंपन्न, सर्व गुणाचें अधिष्ठान व परब्रह्मावतार असे भगवान श्रीकृष्ण बोलूं लागले. ॥ २९० ॥

श्रीकृष्ण म्हणालेः—हे अर्जुना, जेव्हा मनात असलेल्या सर्व वासना अगदीं निःशेष टाकून आत्मसमाधानानें जो आपल्या ठिकाणींच संतुष्ट होईल, तेव्हा त्याला स्थितप्रज्ञ असें म्हणावें ॥ ५५ ॥

---

१ शिवत नाहींत. २ जन्ममरणादि येरझारा. ३ ब्रह्मानंदभरित. ४ अविनाशी. ५ तेव्हा. ६ शिरेल. ७ निर्दोष. ८ खोल ९ तृप्त. १० आपोआप. ११ राहील. १२ विस्तार, चंचल. १३ पुनः. १४ चांगलें. १५ संतोषानें १६ म्हणावें. १७ म्हणतात. १८ भोगतो. १९ रममाण होतो, वर्तन करतो. २० अवतार. २१ ऐश्वर्य, धर्म, यश, लक्ष्मी, ज्ञान आणि वैराग्य ह्या सहा गुणाचा आधार,

( ६६ स्थितप्रज्ञाचीं लक्षणें, २९१ ते ३७५ ) म्हणे अर्जुना पैरियेसीं[१] । जो हा अभिलाषु[२] प्रौढ[३] मानसीं । तो अंतराय[४] स्वसुखेंसी[५] । करीत असे ॥ ९१ ॥ जो सर्वदा नित्यतृप्तु । अंतःकरणभरितु । परी विषयामाजि पतितु । जेणें संगें कीजे ॥ ९२ ॥ तो कामु सर्वथा जाये । जयाचें आत्मतोषीं मन राहे । तोचि स्थितप्रज्ञु होये । पुरुष जाणें ॥ ९३ ॥

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥५६॥

अन्वय--दुःखेषु अनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः वीतरागभयक्रोधः मुनिः स्थितधीः उच्यते ॥५६

नाना दुःखीं प्रांप्तीं[६] । जयासी उद्वेगु[७] नाहीं चित्तीं । आणि सुखाचिया आर्ती[८] । अडपैजेना[९] ॥ ९४ ॥ अर्जुना तयाच्या ठायीं । कामक्रोधु सहजें नाहीं । आणि भयातें नेणे कहीं[१०] । परिपूर्णु तो ॥ ९५ ॥ ऐसा जो निरवधि[११] । तो जाण पां स्थिरबुद्धि । जो निरसूनि[१२] उपाधि[१३] । भेदरहितु ॥ ९६ ॥

यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् । नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता५७

अन्वय—यः सर्वत्र अनभिस्नेहः तत्तत् शुभाशुभं प्राप्य न अभिनन्दति न द्वेष्टि, तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥

जो सर्वत्र सदा सरिसा[१४] । परिपूर्णु चंद्र कां जैसा । अधमोत्तम प्रकाशा- । माजीं न म्हणे ॥ ९७ ॥ ऐसी अवच्छिन्न[१५] समता । भूतमात्रीं[१६] सदयता । आणि पालटु नाहीं चित्ता । कवणे वेळे ॥ ९८ गोमटें[१७] कांहीं पावे । तरी संतोषें तेणें नाभिभवे[१८] । जो ओखटेनि[१९] नागवे[२०] । विषादासी[२१] ॥ ९९ ॥ ऐसा हरिख[२२]शोकरहित । जो आत्मबोधभरित । तो जाण पां प्रज्ञायुक्त[२३] । धनुर्धरा ॥ ३०० ॥

यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः । इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५८

अन्वय—यदा च कूर्मः अंगानि इव अयं इंद्रियार्थेभ्यः इंद्रियाणि सर्वशः संहरते, ( तदा ) तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥

कां कूर्म[२४]ाचियापरी । उवाइला[२५] अवेव[२६] पसरी । ना तरी इच्छावशें आवरी । आपुलें आपण ॥ १ ॥ तैसीं इंद्रियें आपैतीं[२७] होती । जयाचें म्हणितलें करिती । तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पातली असे ॥ २ ॥

विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः । रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥

अन्वय—निराहारस्य देहिनः विषयाः रसवर्जं विनिवर्तन्ते; अस्य रसः अपि परं दृष्ट्वा निवर्तते ५९

अर्जुना आणिकही एक । सांगेन ऐकें कवतिक । जे विषयातें साधक[२८] । त्यजिती नियमें ॥ ३ ॥ श्रोत्रादि इंद्रियें आवरिती । परी रसने[२९] नियमु न करिती । ते सहस्रधा[३०] कवळिजती[३१] । विषयीं इहीं ॥ ४ ॥ जैसी वरिवरी पालवी खुडिजे[३२] ।

१ ऐक. २ इच्छा. ३ प्रबळ. ४ विघ्न. ५ आत्मसुखाला. ६ प्राप्त झाली असतां. ७ त्रास. ८ आशा. ९ अडचणींत पडत नाहीं. १० कधीं. ११ केवळ. १२ सोडून. १३ संसार. १४ सारखा. १५ अखंड. १६ प्राणिमात्रावर. १७ चांगलें. १८ जिंकिला जात नाहीं. १९ वाईटानें.

श्रीभगवान म्हणतातः—अर्जुना, ऐक; मनांतील जी बलवत्तर इच्छा, ती आत्मसुखाला विघ्न आणते. ९१ जो सर्वदा तृप्त असून ज्याचें अंतःकरण आत्मज्ञानानें भरलेलें आहे, आणि ज्याच्या संगतीनें विषयांमध्यें पतन घडतें ९२ त्या कामाची ज्याच्या मनांतून पूर्ण निवृत्ति होऊन ज्याचें मन आत्मसंतोषांत म्हणजे स्वानंदांत रममाण असतें, तोच पुरुष स्थिरबुद्धि असें जाणावें. ९३

ज्याचें मन दुःखप्राप्तीनें खेद पावत नाहीं, व सुखाविषयीं ज्याला इच्छा नाहीं, म्हणून काम, क्रोध व भय हे विकार ज्याच्या अंतःकरणातून गेलेले आहेत, असा जो मुनि त्याला स्थितप्रज्ञ असें म्हणतात ॥ ५६ ॥

नानाप्रकारचीं दुःखें प्राप्त झाली असतां ज्याच्या मनांत त्रास उत्पन्न होत नाहीं, आणि जो सुखाच्या प्राप्तीकरतां झटत नाहीं; ९४ अर्जुना, त्या सत्पुरुषाचे अंतःकरणांतून कामक्रोध सहज नाहींतसे झालेले असतात, व त्या पूर्णावस्थेस पोहोंचलेल्या पुरुषास भयाचें नांव देखील माहीत नसतें, ९५ अशा प्रकारें संसार सोडून देऊन जो केवळ भेदरहित झालेला असतो, तोच पुरुष स्थिरबुद्धि असें समजावें. ९६

सर्व विषयांविषयीं ज्याचें ममत्व नष्ट झालें आहे, व ज्याला चांगलें अगर वाईट विषय प्राप्त झाले तरी त्यांपासून सुख किंवा दुःख होत नाहीं, त्याचीच बुद्धि स्थिर झाली असें समजावें. ॥ ५७ ॥

पौर्णिमेचा चंद्र जसा चांगल्या किंवा वाईट लोकांस सारखा प्रकाश देतो, तसा जो सर्वांशीं सदैव सारखें वर्तन ठेवितो; ९७ त्याप्रमाणेंच, अखंड समता आणि प्राणिमात्राविषयीं सदयता असून ज्याच्या चित्ताची स्थिति कधींही पालटत नाहीं; ९८ कांहीं चांगलें प्राप्त झालें तरी त्याच्या संतोषानें ज्याला गर्व होत नाहीं, व वाईट गोष्टीपासून, ज्याला दुःख होत नाहीं, ९९ असा जो हर्षशोकरहित असून नेहमीं आत्मविचारांत निमग्न असतो, तोच अर्जुना, स्थिरबुद्धि असें जाण. ३००

ज्याप्रमाणें कासव आपले अवयव आपले इच्छेप्रमाणें आवरून घेतें, त्याप्रमाणें सर्व विषयापासून इंद्रियें माघारीं ओढून आपले ताब्यात जेव्हां ठेवतो, तेव्हां त्याची बुद्धि स्थिर झाली असें म्हणावें. ५८

किंवा, कांसव आनंदात असतां आपले हातपाय पसरतें, अथवा हवें असल्यास आपलें आपण आवरून धरतें; १ त्याप्रमाणें ज्याचीं इंद्रियें स्वाधीन होऊन तो जें म्हणेल तें करतात, त्याची बुद्धि स्थिरता पावली असें समज. २

आहार न करणाऱ्या पुरुषाचे विषय नाहींतसे होऊन त्याचे ठिकाणीं फक्त प्रीति उरते, आणि ती प्रीतिही ब्रह्मसाक्षात्कार झाल्यावर नाहींशी होते. ॥ ५९ ॥

अर्जुना, आणखी एक गंमत तुला सांगतों, ऐक. जे साधक नियमांच्या योगानें विषयांचा त्याग करून ३ श्रोत्रादि इंद्रियांचें आकलन करितात, परंतु जिव्हेचा निग्रह करीत नाहींत, ते नानातऱ्हेनें ह्या विषयांमध्यें गुरफटले जातात. ४ एखाद्या वृक्षाचे वरचेवरचे

२० पावत नाहीं. २१ दुःखाला. २२ हर्ष २३ स्थिर बुद्धीचा. २४ कांसव. २५ आनंदात असतां. २६ अवयव. २७ स्वाधीन. २८ मुमुक्षु. २९ जिभेचा, भोजनाचा. ३० हजारों प्रकारांनीं. ३१ वेढले जातात. ३२ खुडावी.

आणि मुळीं उदक घालिजे । तरी कैसेनि नाशु निपजे । तया वृक्षा ॥ ५ ॥ तो उदकाचेनि बळें अधिकें । जैसा आडवेनि आंगें फांके । तैसा मानसीं विषयो पोखे । रसनाद्वारें ॥ ६ ॥ येरां इंद्रियां विषय तुटे । तैसा नियमू न ये रस हटें । जे जीवन हें न घटे । येणेंविण ॥७॥ मग अर्जुना स्वभावें । ऐसियाहि नियमातें पावे । तें परब्रह्म अनुभवें । होऊनि जाइजे ॥ ८ ॥ तैं शरीरभाव नासती । इंद्रियें विषय विसरती । जें सोहंभावप्रतीति । प्रगट होय ॥ ९ ॥

**यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः । इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः ॥ ६० ॥**

अन्वय—( हे ) कौंतेय, प्रमाथीनि इंद्रियाणि यततः विपश्चितः अपि पुरुषस्य मनः प्रसभ हरन्ति हि ॥ ६० ॥

येऱ्हवीं तरी अर्जुना । हें आया न ये साधना । जे राहाटताति जतना । निरंतर ॥ ३१० ॥ जयातें अभ्यासाची घरटी । यमनियमांची तांटी । जे मनातें सदा मुठी । धरूनि आहाती ॥ ११ ॥ तेही[१६] किजती कासाविसी । या इंद्रियांची प्रौढी ऐसी । जैसी मंत्रज्ञातें विवसी[१९] । भुलवी कां ॥ १२ ॥ देखें विषय हे तैसे । पावती ऋद्धिसिद्धीचेनि मिषें । मग आकळिती स्पर्शें । इंद्रियांचेनि ॥१३॥ तिये संधीं मन जाये । मग अभ्यासीं थोटावलें ठाये । ऐसें बळकटपण आहे । इंद्रियांचें ॥१४॥

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः । वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥६१**

अन्वय—तानि सर्वाणि ( इंद्रियाणि ) संयम्य युक्तः ( सन् ) मत्परः आसीत; यस्य हि वशे इंद्रियाणि ( संति ), तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥

म्हणोनि आइकें पार्था । यांतें निर्दळी[२१] जो सर्वथा । सर्व विषयीं आस्था । सांडूनियां ॥ १५ ॥ तोचि तूं जाण । योगनिष्ठेसि कारण । जयाचें विषय-सुखें अंतःकरण । झकेना ॥ १६ ॥ जो आत्मबोधयुक्तु । होऊनि असे सततु । जो मातें हृदयाआंतु । विसंबेना ॥१७॥ अवतरण.—येऱ्हवीं बाह्य विषय तरी नाहीं । परी मानसीं होईल जरी कांहीं । तरी सांगतांचि पाहीं । संसारु असे ॥ १८ ॥ जैसा कां विषाचा लेशु । घेतलियां होय बहुवसु । मग निभ्रांत करी नाशु । जीवितासी ॥ १९ ॥ तैसी विषयाची शंका । मनीं वसती देखा । घातु करी अशेखा । विवेकजाता ॥ ३२० ॥

**ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते । संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते॥६२**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति॥**

अन्वय—विषयान् ध्यायतः पुंसः तेषु संगः उपजायते, संगात् कामः संजायते, कामात् क्रोधः अभिजायते, क्रोधात् संमोहः भवति, संमोहात् स्मृतिविभ्रमः ( भवति ), स्मृतिभ्रंशात् बुद्धिनाशः ( भवति ), बुद्धिनाशात् ( पुमान् ) प्रणश्यति ॥ ६२ ॥ ६३ ॥

---

१ विस्तारतो. २ जिभेनें. ३ निग्रह करणें. ४ भोजनाचा विषय. ५ हट्टानें. ६ घडणें. ७ व्यवहार. ८ वश होतात. ९ आपण ब्रह्म आहों असा अनुभव. १० स्वाधीन. ११ मागतात. १२ बलानें. १३ गस्त. १४ अंतःकरण व इंद्रियें ह्यांचें शमन. १५ कुंपण. १६ योगाभ्यासी.

शेंडे खुडले आणि मुळाशीं पाणी घातलें, तर त्या वृक्षाचा नाश कसा होईल ? ५ तो जसा उदकाच्या बळानें आडवा फुटतो, त्याप्रमाणें ह्या रसनेच्या द्वारें अंत:करणांत विषय अधिकाधिकच पुष्ट होतात; ६ इतर इंद्रियांचे विषय कमी केले असतां कमी होतात; पण त्याच प्रमाणानें जिव्हेचा विषय हट्टानें कमी करतां येत नाही; कारण, तें जीवन आहे; त्याशिवाय हें शरीर चालावयाचें नाहीं. ७ परंतु अर्जुना, साधक जेव्हां परब्रह्माचा अनुभव घेतो, तेव्हां रसनेचें सहज नियमन होऊं शकते. ८ ज्या वेळीं, आपण ब्रह्म आहों असा मनुष्यास अनुभव येतो, त्या वेळी शरिराचे व्यवहार बंद होऊन इंद्रियें विषयांना विसरून जातात. ९

अर्जुना, हीं बलवान इंद्रियें, मनुष्य विद्वान असून इंद्रियनिग्रह करण्याचा प्रयत्न करीत असला तरी त्याचें मन बलात्कारानें आपल्याकडे ओढून घेतात. ॥ ६० ॥

एरवीं अर्जुना, ह्यांना जिकण्याबद्दल जे निरंतर यत्न करतात, त्यांच्या देखील हीं अधीन होत नाहींत. ३१० जो आपल्या सभोंवतीं अभ्यासाची गस्त ठेवून यमनियमांचें कुंपण करितो, आणि मन सदा मुठींत बाळगतो, ११ त्याला सुद्धां हीं इंद्रियें व्याकुळ करून टाकतात, असा ह्या इंद्रियांचा प्रताप आहे. ज्याप्रमाणें मात्रिकाला जखीण भुलवून टाकते, १२ त्याप्रमाणें हे विषय ऋद्धिसिद्धींच्या रूपानें योग्याला प्राप्त होतात, व मग इंद्रियद्वारा योग्याचें मन भ्रष्ट करतात. १३ अशा संधींत जर मन सांपडलें, तर अभ्यास जागच्या जागीं रहातो. अशी ह्या इंद्रियाची शक्ति आहे ! १४

म्हणून तीं सर्व इंद्रियें आपल्या ताब्यात ठेवून ज्ञानी पुरुषानें माझ्याकडेच आपलें मन स्थिर करावें. ज्याचीं इद्रियें स्वाधीन असतात, तो निश्चल बुद्धीचा असें समजावें ॥ ६१ ॥

म्हणून पार्था, सर्व विषयांचे ठिकाणची इच्छा सोडून इंद्रियांना जो जिकतो, १५ व ज्याचें अंत:करण विषयांच्या सुखानें लाचावलें जात नाहीं, तोच योगनिष्ठा प्राप्त होण्यास योग्य असें जाण. १६ कारण तो नेहमीं आत्मबोधानें युक्त होऊन राहतो, व तो अंत:करणांत मला कधीं विसरत नाहीं. १७ जरी कोणी बाहेरचे विषय सोडून कर्मेंद्रियांना आवरून धरून स्वस्थ बसला, व त्यानें मनांत जरी विषयांची इच्छा केली, तथापि तो जन्ममरणाचे फेऱ्यांतून सुटला असें म्हणतां येत नाहीं. १८ विष हें सेवन करतेवेळीं जरी थोडें असलें तरी, तें ज्याप्रमाणें शरिरांत पसरून जिवाचा नि:संशय नाश करितें, १९ त्याप्रमाणें, मनांत विषयांची थोडी जरी इच्छा राहिली, तरी ती सर्व विचारसमूहाचा घात करिते ! ३२०

विषयाचें चिंतन करणाऱ्या पुरुषाचे ठिकाणीं विषयाची आसक्ति (प्रीति) उत्पन्न होते. प्रीतीमुळें काम ( प्रबल इच्छा ) उत्पन्न होतो. त्या इच्छेच्या आड कोणी आलें असतां क्रोध, क्रोधापासून मूर्खपणा, मूर्खपणापासून स्मृतिनाश, स्मृतिनाशापासून बुद्धिनाश, व बुद्धिनाशामुळें पुरुषाचा सर्वस्वी नाश होतो ! ॥ ६२ ॥ ६३ ॥

१७ केले जातात. १८ व्याकुळ. १९ जखीण. २० स्तब्ध राहतें. २१ संहार करतो. २२ लाचावलें जात नाहीं. २३ विसरत नाहीं. २४ सर्व. २५ अल्पस्वल्प. २६ नि:शेप. २७ विचारसमूह.

जरी हृदयीं विषय स्मरती । तरी निःसंगाही आपजे संगती । संगें प्रगटे मूर्ती । अभिलाषांची ॥ २१ ॥ जेथ कामु उपजला । तेथ क्रोधु आधींचि आला। क्रोधीं असे ठेविला । संमोहु जाणें ॥ २२ ॥ संमोहा जालिया व्यक्ती । तरी नाशु पावे स्मृती । चंडवातें ज्योती । हेत जैसी ॥२३॥ कां अस्तमानीं निशी[६] । जैसी सूर्यतेजाते ग्रासी । तैसी दशा स्मृतिभ्रंशीं । प्राणियासी ॥ २४ ॥ मग अज्ञानांध केवळ । तेणें आप्लाविजे सकळ । तेथ बुद्धि होय व्याकुळ । हृदयामाजीं ॥ २५ ॥ जैसें जात्यंधा पळणी पावे । मग ते काकुळती सैरा धांवे । तैसे बुद्धीसि होती भंवे[१४] । धनुर्धरा ॥ २६ ॥ ऐसा स्मृतिभ्रंशु घडे । मग सर्वथा बुद्धि अवघडे । तेथ समूळ हें उपडे । ज्ञानजात ॥ २७ ॥ चैतन्याच्या भ्रंशीं । शरिरा दशा जैशी। तैसें पुरुषा बुद्धिनाशीं । होय देखें ॥ २८ ॥ म्हणोनि आइकें अर्जुना । जैसा विस्फुलिंग लागे इंधना । मग तो प्रौढ जालिया त्रिभुवना । पुरों शके ॥ २९ ॥ तैसें विषयांचें ध्यान । जरी विपायें वाहे मन । तरी येसणें[२२] हें पतन । गिंवसीत पावे ॥ ३३० ॥

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् । आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति॥ ६४॥

अन्वय—विधेयात्मा तु रागद्वेषवियुक्तैः आत्मवश्यैः इंद्रियैः विषयान् चरन् प्रसादम् अधिगच्छति६४

म्हणोनि विषय हे आघवे । सर्वथा मनौनि सांडावे । मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ॥ ३१ ॥ पार्था आणिकही एक । जरी नाशले रागद्वेष । तरी इंद्रियां विषयीं बाधक । रमतां नाहीं ॥ ३२ ॥ जैसा सूर्य आकाशगतु । रश्मिकरें जगातें स्पर्शतु । तरी संगदोषें काय लिंपतु । तेथींचेनि ॥ ३३ ॥ तैसा इंद्रियार्थीं उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न । जो कामक्रोधविहीन । होऊनि असे ॥ ३४ ॥ तरी विषयांतही कांहीं । आपणपेंवांचूनि नाहीं । मग विषय कवण कायी । बाधितील कवणा ॥ ३५ ॥ जरी उदकीं उदकें बुडिजे । कां अग्नि आगी पोळिजे। तरी विषयसंगें आप्लाविजे । परिपूर्णु तो ॥ ३६ ॥ ऐसा आपणचि केवळ । होऊनि असे निखळ । तयाची प्रज्ञा अचळ । निभ्रांत मानीं ॥ ३७ ॥

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते । प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

अन्वय—प्रसादे अस्य सर्वदुःखानां हानिः उपजायते, प्रसन्नचेतसः हि बुद्धिः आशु पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

देखें अखंडित प्रसन्नता । आथी जेथ चित्ता । तेथ रिगणें[३६] नाहीं समस्तां । संसारदुःखां ॥ ३८ ॥ जैसा अमृताचा निर्झरु । प्रसवे जयाचा जठरु । तया क्षुधेतृषेचा अडदरु । कांहींचि नाहीं ॥ ३९ ॥ तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख

१ उपजे. २ धन मिळण्याची इच्छा. ३ अविचार. ४ प्रचंड वाऱ्यानें. ५ नष्ट. ६ रात्र. ७ स्मृतीची आठवण नाहींशी झाल्यावर. ८ बुडयावें. ९ कासावीस १० जन्माधाला. ११ धावाधाव. १२ दीन होऊन. १३ पाहिजे तिकडे. १४ भ्रम–जन्ममरण. १५ अवघडली जाते. १६ उपटून जातें. १७ प्राणाच्या. १८ जिवाला. १९ विस्तवाची ठिणगी. २० लाकूड. २१ कदाचित्. २२ येवढें.

अंत करणात विषयाची नुसती आठवण झाली, तरी विरक्ताला देखील त्याविषयीं प्रीति उत्पन्न होते, आणि ह्या प्रीतीच्या योगाने मूर्तिमत काम प्रगट होतो. २१ काम उत्पन्न झाला, कीं त्या ठिकाणीं आधीं क्रोध आलेलाच, व क्रोधामध्ये अविचार आपला ठेवलेलाच असावयाचा ! २२ ज्याप्रमाणे दिव्याची जोत वाऱ्याने नाहींशी होते, त्याप्रमाणे अविचारामुळे स्मृति नाश पावते. २३ संध्याकाळ होताच रात्र जशी सूर्यतेजाला गिळून टाकते, त्याप्रमाणे स्मृतीचा भ्रंश झाल्यावर मनुष्याची दशा होते. २४ मग अज्ञानामुळे त्याची बुद्धि केवळ अधळी होऊन तो सर्व गोष्टींस आचवतो, आणि त्याला काहीं सुचेनासे होते. २५ जन्मांधाला पळण्याचा प्रसंग आल्यावर तो जसा दीन होऊन सैरावैरा धावू लागतो, त्याप्रमाणे अर्जुना, बुद्धीला भ्रमण होते. २६ अशा रीतीने बुद्धीला भ्रंश झाला म्हणजे बुद्धि घोटाळ्यात पडते, आणि मग सर्व ज्ञान नष्ट होते. २७ शरिरातील प्राण निघून गेला म्हणजे जसा देह प्रेतरूपी होतो, त्याप्रमाणें, बुद्धि नष्ट झाल्यावर जिवाची स्थिति होते. २८ म्हणून अर्जुना, ऐक इधनाला ठिणगी लागून ती भडकली म्हणजे जशी त्रिभुवनाला देखील पुरते, २९ त्याप्रमाणं अंत करणात यत्किंचित् जरी विषयाचे स्मरण झाले, तरी एवढा हा अनर्थ ओढवतो ! ३३०

प्रीति व द्वेष टाकून ज्यानें आपलीं इंद्रियें आपल्या अधीन ठेविलीं आहेत, त्यानें विषयाचें जरी सेवन केलें तरी त्याचे अत करणाची प्रसन्नता बिघडत नाहीं. ॥ ६४ ॥

म्हणून, मनातून सर्व विषय काढून टाकावे, म्हणजे राग, प्रीति आणि द्वेष ( अप्रीति ) हे आपोआप नाहींतसे होतात. ३१ पार्था, आणखी तुला सागतो कीं, राग व द्वेष नाहीतसे झाल्यावर जरी इंद्रिये विषयाचे ठिकाणीं रममाण झालीं, तरी ते विषय बाधक होत नाहीत. ३२ ज्याप्रमाणे, आकाशातून सूर्य हा आपल्या किरणरूपी हातानीं जगतातील वस्तूना स्पर्श करतो, परतु त्याच्या ससर्गदोषाने लिप्त होतो कीं काय ? (नाहीं.) ३३ त्याप्रमाणे, जो विषयाचे ठिकाणीं उदासीन, आत्मस्वरूपाचे ठिकाणीं निमग्न, व कामक्रोधापासून अलिप्त असतो, ३४ आणि, अर्जुना, जो विषयामध्ये आपल्या स्वरूपाशिवाय दुसरें काहींच पहात नाहीं त्याला विषय कसले ? आणि बाधणार तरी कोणाला ? ३५ जर पाण्यात पाणी बुडेल, किंवा अग्नीन अग्नि जळेल, तर मात्र तो परिपूर्णत्वास पावलेला पुरुष विषयाचे संगतीन बुडेल ३६ अशा प्रकारे, जो आपण स्वत च सर्वरूप होऊन राहतो, तोच अचलप्रज्ञ ( स्थिरबुद्धि ) असे निश्चित समज ३७

चित्ताला प्रसन्नता प्राप्त झाली म्हणजे सर्व दु खाचा नाश होतो, आणि प्रसन्नचित्त झालेल्याची बुद्धि लवकर आत्म्याचे ठिकाणीं स्थिर होते ॥ ६५ ॥

असे पहा कीं, ज्या ठिकाणीं मनाची पूर्ण शाति आहे, तेथ या सर्व ससारदु खाचा प्रवेश होत नाहीं. ३८ ज्याचे उदरातच अमृताचा झरा उत्पन्न झाला आहे, त्याला जशी

---

२३ अनर्थ २४ शोधीत येतो २५ मनापापासून २६ प्रीति २७ किरणानीं. २८ लिप्त होतो. २९ विषयाचे ठिकाणीं. ३० ब्रह्मरस. ३१ परिपूर्ण ३२ रीहत. ३३ बुडेल ३४ सर्व ३५ बुद्धि. ३६ प्रवेश करणें. ३७ झरा ३८ उदर ३९ भय

कैचें कें आहे । तेथें आपैसी[1] बुद्धि राहे । परमात्मरूपीं ॥ ४० ॥ जैसा [2]निर्वातींचा दीपु । सर्वथा नेणे कंपु । तैसा स्थिरबुद्धि [3]स्वस्वरूपु । योगयुक्तु ॥ ४१ ॥

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना । न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम्॥

अन्वय—अयुक्तस्य बुद्धिः नास्ति च अयुक्तस्य भावना न ( अस्ति ) च अभावयतः शांतिः न ( अस्ति ); अशांतस्य सुखं कुतः ? ॥ ६६ ॥

ये [4]युक्तीची कडसेणी । नाहीं जयाच्या अंतःकरणीं । तो आकळिला जाण [5]गुणीं । विषयादिकीं ॥ ४२ ॥ तया स्थिरबुद्धि पार्था । कहीं नाहीं सर्वथा । आणि स्थैर्याची आस्था । तेही नुपजे ॥ ४३ ॥ निश्चळत्वाची भावना । जरी नव्हेचि देखें मना । तरी शांति केवीं अर्जुना । आपु होय ॥ ४४ ॥ जेथ शांतीचा जिव्हाळा नाहीं । तेथ सुख विसरोनि न रिघे कहीं । जैसा पापियाच्या ठायीं । मोक्षु न वसे ॥ ४५ ॥ देखें आग्निमाजि धोंपती । तियें बीजें जरी विरूढती । तरी [8]अशांता सुखप्राप्ती । घडों शके ॥ ४६ ॥ अवतरणः—म्हणोनि [8]अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें । या कारणें इंद्रियांचें । दमन निकें ॥ ४७ ॥

इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते । तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥६७॥

अन्वय—चरतां इंद्रियाणां हि यन्मनः अनुविधीयते, तत् अंभसि वायुः नाव इव अस्य प्रज्ञां हरति ॥ ६७ ॥

इंद्रियें जें जें म्हणती । तें तेंचि जे पुरुष करिती । ते तरलेचि न तरती । विषयसिंधु ॥ ४८ ॥ जैसी नाव थडिये[10] ठाकितां । जरी वरपडी होय दुर्वाता । तरी चुकलाही मागौता । अपावो पावे ॥ ४९ ॥ तैसीं [9]प्राप्तेंही पुरुषें । इंद्रियें लालिलीं जरी कौतुकें । तरी [11]आक्रमिला जाण दुःखें । संसारिकें ॥ ३५० ॥

तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः । इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥

अन्वय—तस्मात्, हे महाबाहो ! यस्य इंद्रियाणि इंद्रियार्थेभ्यः सर्वशः निगृहीतानि, तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥

म्हणोनि आपुलीं आपणपेंया । जरी इंद्रियें येती [12]आया । तरी अधिक कांहीं धनंजया । सार्थक असे ॥५१॥ देखें कूर्म जियापरी । उवाइला अवयव पसरी । ना तरी इच्छावशें आवरी । आपणपेंचि ॥ ५२ ॥ तसीं इंद्रियें अपैतीं होती । जयाचें म्हणितलें करिती । तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पावली असे ॥५३॥ अवतरणः—आतां आणिक एक गहन । पूर्णाचें चिन्ह । अर्जुना तुज सांगेन । परिस पां ॥ ५४ ॥

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी । यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः

अन्वय—या सर्वभूतानां निशा तस्यां संयमी जागर्ति, यस्यां भूतानि जाग्रति सा पश्यतः मुनेः निशा ॥ ६९ ॥

---

१ आपोआप. २ निवान्यातला. ३ आत्मरूप समाधीनें युक्त. ४ योगयुक्तीची. ५ विकार. ६ पाद्यानीं. ७ शद्वादिकानीं. ८ स्थिरपणाची. ९ प्राप्त. १० पाणार. ११ घातलेली. १२ उगवतील.

तहानभुकेची कांहींच पीडा होत नाहीं, ३९ त्याप्रमाणें, ज्याचें हृदय प्रसन्न आहे, त्याला दु:ख कसलें ? आणि तें होणार तरी कोठून ? त्याची बुद्धि आपोआपच ईश्वरस्वरूपीं जडून राहते. ३४० ज्याप्रमाणें निवाऱ्यांतील दिव्याची जोत मुळींच कधींही हालत नाहीं, त्याप्रमाणें जो स्थिरबुद्धि आहे, तो आत्मस्वरूपसमाधीमध्यें निश्चलपणें रत असतो. ४१

ज्याचें अंतःकरण स्वस्थ नसतें, त्याला आत्मज्ञानाची बुद्धि नाहीं; ज्याला ध्यान नाहीं त्याला शांति नाहीं; व ज्याला शांति नाहीं त्याला सुख कोठून असणार ? ॥ ६६ ॥

हा योगयुक्तीचा विचार ज्याचे अंतःकरणांत नाहीं, त्याला शद्बादिक विषय आपले पाशांत गोंवून घेतात. ४२ पार्था, त्याच्या बुद्धीला कधींही स्थिरता नसते, व तिचे प्राप्तीविषयीं त्याचे अंतःकरणांत इच्छाही उत्पन्न होत नाहीं. ४३ अर्जुना, स्थिरपणाची भावना त्याचे अंतःकरणांत मुळींच जर उत्पन्न होत नाहीं, तर त्याला शांति कशाची प्राप्त होणार ? ४४ पाप्याकडे मोक्ष जसा ढुंकूनही पहात नाहीं, त्याप्रमाणें जेथें शांतीचा लेशही नाहीं, तेथें सुख हें चुकून देखील जात नाहीं. ४५ हें पहा, जर विस्तवांत घातलेलीं धान्याचीं बीजें उगवलीं, तरच शांतिहीन मनुष्याला सुखप्राप्ति घडूं शकेल. ४६ म्हणून, मनाचा अनियमितपणा हेंच दु:खाचें कारण आहे; ह्याकरितां इंद्रियनिग्रह करणें हेंच उत्तम. ४७

ज्याचें मन इंद्रियाच्या संगतीनें त्यांचे मागोमाग जातें, तें मन, जशी समुद्रांत असलेली नाव प्रतिकूल वाऱ्यानें बुडते, तसें बुद्धीस हरण करतें. ॥ ६७ ॥

जे पुरुष इंद्रियांचे इच्छेप्रमाणें वागतात, ते, ह्या विषयरूप सागरांतून आपण तरलों आहों असें समजत असले तरी खरोखर तरत नाहींत. ४८ ज्याप्रमाणें एखादी नाव तीराजवळ आली असून जर वादळ उत्पन्न झालें तर चुकवून आलेल्या अपायांत फिरून सांपडते, ४९ त्याप्रमाणें, सिद्ध पुरुषानें जरी इंद्रियांचें कौतुकानें लालन केलें तरी तो संसारदु:खांनीं व्यापिला जातो, असें समज. ३५०

म्हणून, हे महाबाहो अर्जुना, इंद्रियांचे अर्थ जे विषय त्यांपासून इंद्रियें सर्वप्रकारेंकरून जो आवरून धरतो, त्याची बुद्धि स्थिर झाली असें समज. ॥ ६८ ॥

म्हणून धनंजया, आपलीं इंद्रियें आपल्या अधीन झालीं म्हणजे मग ह्यापेक्षा अधिक सार्थक तें काय आहे ? ५१ पहा कीं—ज्याप्रमाणें कांसव आपले पसरलेले अवयव स्वेच्छेनें स्वतःच आवरतें, ५२ त्याप्रमाणें, ज्याचीं इंद्रियें स्वाधीन असून तो म्हणेल त्याप्रमाणें करतात, त्याचीच बुद्धि स्थिरत्वाप्रत पावली असें समज. ५३ अर्जुना, आतां ज्ञान्यास ओळखण्याची आणखी एक सूक्ष्म खूण तुला सांगतों, ती ऐक. ५४

स्वरूपाविषयीं अज्ञान हीच रात्र. त्या रात्रीचे समयीं योगी पुरुष जागा असतो, व स्वरूपानुभवरूप जागृति भोगतो; आणि ज्या स्वरूपाज्ञानरूप रात्रीचे ठिकाणीं सर्व भूतें सत्यबुद्धीनें जागीं असतात, त्या संसाराविषयीं योगी पुरुषाला रात्र झालेली असते ! ॥ ६९ ॥

१३ शांति नसणाऱ्यास. १४ अनियमितपणा. १५ निग्रह. १६ तीरास. १७ प्राप्त. १८ भोंवरा, वादळ. १९ पुनः. २० अपाय. २१ सिद्ध, कृतार्थ. २२ पोशिलीं. २३ ओढला. २४ संसारसंबंधीं. २५ आपणास. २६ स्वाधीन. २७ सुखावलेला. २८ वश, स्वाधीन. २९ ज्ञान्याचें.

देखें भूतजात निदेलें[2] । तेथेंचि जया पाहलें । आणि जीव जेथ चेइले । तेथ निद्रितु जो ॥५५॥ तोचि तो निरुपाधि । अर्जुना तो स्थिरबुद्धि । तोचि जाणें निरवधि । मुनीश्वर ॥ ५६ ॥

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥

अन्वय—यद्वत् आपः आपूर्यमाणं अचलप्रतिष्ठं समुद्रं प्रविशंति, तद्वत् सर्वे कामाः यं प्रविशंति सः शांतिं आप्नोति; कामकामी न ॥ ७० ॥

पार्था आणीकही एके परी । तो जाणों येईल अवधारीं । जैसी अक्षोभता सागरीं । अखंडित ॥ ५७ ॥ जऱ्ही सरितावोघ समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत । तऱ्ही अधिक नोहे ईषेत । मर्यादा न संडी ॥ ५८ ॥ नातरी ग्रीष्मकाळीं सरिता । शोषूनि जाती समस्ता । परी न्यून नव्हे पार्था । समुद्रु जैसा ॥ ५९ ॥ तैसा प्राप्तीं ऋद्धिसिद्धी । तयासि क्षोभु नाहीं बुद्धी । आणि न पैवतां न बाधी । अधृति तयातें ॥ ३६० ॥ सांगें सूर्याच्या घरीं । प्रकाशु काय वातीवेरी । कां न लविजे तरी अंधारीं । कोंडेल तो ॥ ६१ ॥ देखें ऋद्धिसिद्धि तयापरी । आली गेली से न करी । तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं ॥६२॥ जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभुवनातें पोंवळें म्हणे । तो केवि रंजे पालवणें । भिल्लांचेनि ॥ ६३ ॥ जो अमृतासी ठी[११] ठेवी । तो जैसा कांजी न सेवी । तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ॥ ६४ ॥ पार्था नवल हें पाहीं । जेथ स्वर्गसुखा लेखणी नाहीं । तेथ ऋद्धिसिद्धि कायी । भोंकृता होती ॥ ६५ ॥

*विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।*
*निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥ ७१ ॥*

*अन्वय—यः पुमान् सर्वान् कामान् विहाय निस्पृहः निर्ममः निरहंकारः ( सन् ) चरति, सः शांतिं अधिगच्छति ॥ ७१ ॥*

ऐसा आत्मबोधें तोषला । जो परमानंदें पोखला । तोचि स्थिरप्रज्ञु भला । वोळख तूं ॥ ६६ ॥ तो अहंकारातें दवडुनी । सकळ काम सांडुनी । विचरे[१४] विश्व होउनी । विश्वामाजीं ॥ ६७ ॥

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वाऽस्यामंतकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥

*अन्वय—हे पार्थ, एषा ब्राह्मी स्थितिः, एनां प्राप्य न विमुह्यति; अंतकाले अपि अस्यां स्थित्वा निर्वाणं ब्रह्म ऋच्छति ॥ ७२ ॥*

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥

१ प्राणिमात्र. २ निजलेले. ३ उजाडलं. ४ जागे झाले. ५ गंभीर. ६ स्थितप्रज्ञ. ७ शांतता. ८ नद्यांचा प्रवाह. ९ किंचित. १० उद्धार. ११ प्राप्त होतां. १२ असंतुष्टता. १३ एकदा. १४ लाजणा.

सर्व प्राण्यांस अज्ञात असलेल्या आत्मस्वरूपाविषयीं ज्याला पूर्ण ज्ञान आहे, आणि ज्याविषयीं प्राणिमात्र जागे आहेत त्या विषयसुखाचे ठिकाणीं जो निजलेला आहे, ५५ तोच अर्जुना, उपाधिरहित, स्थिरबुद्धि आणि गंभीर असा सत्पुरुष आहे. असें समज. ५६

वरचेवर पाण्यानें भरणाऱ्या व मर्यादा न सोडणाऱ्या समुद्रांत जशा सर्व नद्या वगैरे येऊन मिळतात, तसें, जो निष्काम असून सर्व काम ज्यांचे ठिकाणीं प्रवेश करितात, त्याला शांति मिळते; परंतु जो कामाची इच्छा करतो त्याला शांति मिळत नाहीं. ॥ ७० ॥

पार्था, आणखी एका पर्यायानें तो स्थितप्रज्ञ मनुष्य ओळखतां येतो, तो कोणता तो ऐक. समुद्राचे ठिकाणीं जशी निरंतर परिपूर्णता असते, तशी ह्या पुरुषाचे ठिकाणीं असते. ५७ जरी समुद्रास पावसाळ्यांत नद्यांचे प्रवाह भरपूर येऊन मिळतात, तरी तो किंचित्ही अधिक न होतां आपली मर्यादा उल्लंघन करीत नाहीं; ५८ किंवा, अर्जुना, उन्हाळ्यांत सर्व नद्यांचें पाणी जरी आटलें तरी तो समुद्र ज्याप्रमाणें कमी होत नाहीं, ५९ त्याप्रमाणें ऋद्धिसिद्धि प्रसन्न झाल्यानें तो पुरुष उल्हास पावत नाहीं, आणि प्रसन्न न झाल्या तरी असंतुष्ट होत नाहीं. ३६० पहा कीं, सूर्याचे घरीं दिव्याचे जोतीचा प्रकाश केला तरच उजेड पडतो, किंवा तो न लावला तर त्याला अंधारांत कोंडून बसावें लागतें काय ? ६१ त्याप्रमाणें, त्या पुरुषाच्या घरीं ऋद्धिसिद्धि आल्या काय व गेल्या काय, त्याची आठवण सुद्धां त्याला होत नाहीं. कारण, त्याचें अंतःकरण महासुखांत निमग्न असतें. ६२ जो आपल्या घराच्या सौंदर्यापुढें इंद्रभुवनाला सुद्धां तुच्छ मानतो, त्याला भिल्लांच्या पालांपासून कसें समाधान होणार ? ६३ जो अमृताला देखील नांवें ठेवितो तो जसा कांजी पीत नाहीं, तसा आत्मज्ञानी ऋद्धिसिद्धींचा उपभोग घेत नाहीं. ६४ अर्जुना, ही एक मोठी आश्चर्यकारक गोष्ट आहे कीं, ज्या ठिकाणीं स्वर्गसुखाची सुद्धां गणती नाहीं, त्याला यःकश्चित् ऋद्धिसिद्धींनीं मोह घालण्याचा प्रयत्न करणें म्हणजे काय ? ६५

जो पुरुष सर्व कामवासनांचा त्याग करून, निस्पृह होऊन आणि मी व माझें हें द्वंद्व टाकून असतो, त्यालाच शांतिसुख प्राप्त होतें. ॥ ७१ ॥

ह्याप्रमाणें आत्मबोधानें संतोष पावलेला आणि परमानंदांत निमग्न झालेला तोच खरा स्थिरबुद्धि असें तूं समज. ६६ तो मीपणा दवडून, सर्व विषय सोडून, जगदाकार होऊन जगांत संचरतो. ६७

अर्जुना, ह्याच स्थितीला ब्रह्मस्थिति ( सर्व कर्म सोडून ब्रह्मरूपानें असणें ) म्हणतात. ही प्राप्त झाली असतां प्राणी मोह पावत नाहीं. ह्या स्थितींत असून मरण आलें तरीही तो शांत असें जें ब्रह्म त्याला प्राप्त होतो. ॥ ७२ ॥

१५ आठवण. १६ घराच्या शोभेनें. १७ तुच्छ. १८ पालें ( कोल्हाट्यांचीं घरें ). १९ नाव, दोष. २० पर्वा, गणना. २१ अल्प, साधारण. २२ पोसला, पुष्ट झाला. २३ स्थिरबुद्धि. २४ फिरे.

हे ब्रह्मस्थिति निःसीम । जे अनुभविती निष्काम । ते पावले परब्रह्म । अनायासें ॥६८॥ जे चिद्रूपीं मिळतां । देहांतींची व्याकुळता । आड ठाकों न सके चित्ता । प्रज्ञा जैया ॥ ६९ ॥ तेचि हे स्थिति । स्वमुखें श्रीपति । सांगत अर्जुनाप्रति । संजयो म्हणे ॥ ३७० ॥ पुढील अध्यायाचें बीज.—ऐसें कृष्णवाक्य ऐकिलें । तेंय अर्जुनें मनीं म्हणितलें । आतां आमुचिया काजा कीर आलें । उपपत्ती इया ॥ ७१ ॥ जें कर्मजात आघवें । एथ निराकरिलें देवें । तरी पार्थें म्यां झुंझावें । म्हणूनियां ॥ ७२ ॥ ऐसा श्रीअच्युताचिया बोला । चित्तीं धनुर्धर उवायिला । आतां प्रश्न करील भला । आशंकोनी ॥ ७३ ॥ तो प्रसंगु असे नागरु । जो सकळ धर्मासि आगरु । कीं विवेकामृतसागरु । [12]प्रांतहीनु ॥ ७४ ॥ जो आपण सर्वज्ञनाथु । निरूपिता होईल श्रीअनंतु । ज्ञानदेव सांगेल मातु । निवृत्तिदासु ॥३७५॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

( अध्याय २, ओवी ३७५ )

१ सीमारहित, थाणेदार. २ ज्ञानस्वरूपीं. ३ ज्ञान्याला. ४ ज्या ब्रह्मस्थितीनें. ५ युक्ति. ६ सर्व कर्मे. ७ निषेधिलें. ८ राहिलें. ९ हर्ष पावला. १० सुंदर. ११ उत्पत्तिस्थान. १२ अमर्याद. १३ गोष्ट.

अशी निःसीम ब्रह्मस्थिति जे निष्काम पुरुष अनुभवितात, ते अनायासेंच परब्रह्मास ( आत्मस्वरूपास ) जाऊन मिळतात. ६८ ज्ञानस्वरूपीं मिळाल्यावर ज्या ब्रह्मस्थितीनें देहांतींची व्याकुळता ( भ्रांति ) त्यांच्या चित्ताच्या आड येऊं शकत नाहीं, ६९ संजय धृतराष्ट्रास म्हणतो, राजा, तीच ही स्थिति श्रीकृष्णांनी स्वतः अर्जुनास सांगितली. ३७० असें श्रीकृष्णाचें बोलणें ऐकल्यावर अर्जुन मनांत म्हणाला कीं, ही युक्ति आतां आमच्या बरी पथ्यावर पडली! ७१ जर सर्व कर्मांचा देवांनी निषेध केला, तर त्या निषेधानें मी युद्ध करावें असें देवांचें म्हणणें सहज बाजूस राहतें. ७२ ह्याप्रमाणें श्रीकृष्णांचें भाषण ऐकून अर्जुन आपले मनांत फार हर्षित झाला. आतां तो शंका घेऊन पुढें गहन प्रश्न करील. ७३ तो संवाद फार सुरस असून सर्व धर्मांचें उत्पत्तिस्थान अथवा अमर्याद विचारामृतसमुद्रच आहे. ७४ त्या संवादाचें निरूपण जगदीश्वर स्वतः करतील, व ती गोष्ट निवृत्तिदास जे ज्ञानदेव ते सांगतील. ३७५

---

# ज्ञानेश्वरी

## अध्याय तिसरा

अर्जुन उवाच—

ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन । तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव॥१॥

अन्वय—हे जनार्दन, ते कर्मणः बुद्धिः ज्यायसी मता चेत्, तत्, हे केशव, मां घोरे कर्मणि किं नियोजयसि ? ॥ १ ॥

( ६७ घोरकर्म कां करवितां ? १ ते ५ ) मग आइका अर्जुनें म्हणितलें । देवा तुम्हीं जें वाक्य बोलिलें । तें निकें[1] म्यां परिसिलें । कृपानिधि ॥ १ ॥ तेथ कर्म आणि कर्ता । उरेचिना पाहतां[2] । ऐसें मत तुझें श्रीअनंता । निश्चित जरी ॥ २ ॥ तरी मातें केविं श्रीहरी । म्हणसी पार्था संग्रामु करीं । इये लाजसी ना महाघोरीं । कर्मी घालितां[3] ॥ ३ ॥ हां गा कर्म तूंचि अशेष । निराकरिसी[4] निःशेष । तरी मजकरवीं हें हिंसक । कां करविसी ॥ ४ ॥ तरी हेंचि विचारीं श्रीहृषीकेशा । तूं मान देसी कर्मलेशा[5] । आणि येसणी[6] हे हिंसा । करवीत आहासी ॥ ५ ॥

व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे । तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्॥२॥

अन्वय—व्यामिश्रेण इव वाक्येन मे बुद्धिं मोहयसि इव, तत् निश्चित्य एकं वद, येन अहं श्रेयः आप्नुयाम् ॥ २ ॥

( ६८ मला घोटाळ्यामध्यें कां घालतो ? ६ ते १७ ) देवा तुवांचि ऐसें बोलावें । तरी आम्हीं नेणतीं[7] काय करावें । आतां संपलें म्हणों पां आघवें । विवेकाचें[8] ॥६॥ हां गा उपदेशु जरी ऐसा । तरी अपभ्रंशु[9] तो कैसा । आतां पुरला[10] आम्हां धिंवसा[11] । आत्मबोधाचा ॥ ७ ॥ वैद्यु पथ्य वारूनि जाये । मग जरी आपणचि विष सुये[12] । तरी रोगिया कैसेनि जिये । सांगें मज ॥ ८ ॥ जैसें आंधळें सुइजे अव्हांटा । कां माजवण दीजे मर्कटा । तैसा उपदेशु हा गोमटा । वोढवला आम्हां ॥ ९ ॥ मी आधींचि कांहीं नेणें । वरी कवळिलों मोहें येणें । श्रीकृष्णा विवेकु या कारणें । पुसिला तुज ॥ १० ॥ तंव तुझी एकेक नवाई । एथ उपदेशामाजि गोवाई । तरी अनुसरलीया काई । ऐसें कीजे ॥ ११ ॥ आम्हीं तनुमनजीवें । तुझिया बोला वोटंगावें । आणि तुवांचि ऐसें करावें । तरी सरलें म्हणे ॥ १२ ॥ आतां ऐसियापरी बोधिसी । तरी निकें आम्हां करिसी । एथ ज्ञानाची आस

१ चांगलें. २ त्यावरून पाहतां. ३ घालितांना. ४ निषेधिसी. ५ कर्ममार्गास. ६ येवढी. ७ अज्ञान्यांनीं. ८ विचाराचें. ९ भ्रष्टपणा. १० पूर्ण झाला. ११ मनोरथ. १२ घालीत.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय तिसरा

अर्जुन म्हणालाः—हे जनार्दना, केशवा, कर्मयोगापेक्षा बुद्धियोग श्रेष्ठ आहे असें जर तुझें मत आहे, तर मग हे केशवा, मला हिंसक कर्माचे ठिकाणीं का प्रवृत्त करीत आहेस ? ॥ १ ॥

*मग अर्जुन म्हणाला —देवा कृपानिधे, तुम्हीं जे बोलला, ते मीं लक्षपूर्वक ऐकलें.* १ त्यावरून पाहता, कर्म आणि कर्ता हीं उरतच नाहींत. श्रीअनंता, हेच जर आपले निश्चित मत असेल, २ तर मग हृषीकेशा, ' पार्था, तूं संग्राम कर ' असें मला का सागता ? ह्या भयंकर कर्मात मला घालताना तुम्हाला संकोच कसा वाटत नाहीं ? ३ हे पहा—सर्व कर्मांचा तुम्ही निषेध करता, तर मग माझ्या हातून असलें हिसक कर्म का करविता ? ४ तर हृषीकेशा, ह्याचा आपणच विचार करा कीं, आपण कर्ममार्गाला इतका मान देऊन माझ्या हातून ही भयंकर हिसा करवीत आहा ! ५

ह्या आपल्या जणू काय घोंटाळ्याच्या बोलण्यानें तू माझ्या मनाला भ्रम उत्पन्न करीत आहेस; तेव्हा तू असें एक निश्चित साग कीं, ज्याच्या योगानें मी आपलें कल्याण करून घेईन ॥२॥

देवा, तुम्हीच जर असे बोलू लागला, तर आम्हीं अज्ञान्यानीं काय करावं ? तर आता विचाराची गोष्ट संपलीच असे म्हटले पाहिजे. ६ अज्ञान घालविण्याकरिता जर असा संदिग्ध उपदेश कराल, तर ह्याहून भ्रम निराळा कोणता ?–आता आमची आत्मबोधाची इच्छा पूर्ण झाली म्हणावयाची ! ७ मला सागा कीं, वैद्य हा रोग्याची प्रकृति पाहून त्यावर पथ्याची योजना करून गेल्यावर जर आपण होऊनच औषधात विष घालील, तर रोग्यानें जगावें कसे ? ८ ज्याप्रमाणें अंधळ्यास आडवाटेला लावावें, किंवा माकडाला मद्य पाजावें, तसा आपला हा उत्तम उपदेश आम्हास चागलाच फळला ! ९ श्रीकृष्णा, मला आधीच काहीं समजत नाहीं, त्यातून मी ह्या मोहाने ग्रस्त झालो आहे, म्हणून तुम्हाला विचाराची गोष्ट पुसली, १० तो तुमचे आपले एकेक नवलच ! तुमच्या उपदेशात साराच घोटाळा ! तर शरणागताशीं असं का वागावयाचें ? ११ आम्हीं कायावाचामनेंकरून आपल्या बोलण्यावर भरंवसा ठेवावा, आणि तुम्हीच जर असे करू लागला, तर मग आटोपलेंच म्हणावयाचें ! १२ अर्जुन म्हणतो, " आता अशा प्रकारें जर आपण

१४ वाचेल. १५ घालवावें १६ आडमार्गाला. १७ मद्यादि कैफी पदार्थ. १८ मुरेल, आवडता. १९ ग्रास झाला. २० ग्रस्त झालों २१ भ्रांतीनें. २२ विचार. २३ नवल, मजा. २४ गुतागुंत. २५ शरणागताश. २६ आश्रय करावा.

कायसी । अर्जुन म्हणे ॥ १३ ॥ तरी ये जाणिवेचें कीर सरलें । परी आणीक एक असें जाहलें । जें थितें[2] हें डहुळलें । मानस माझें ॥ १४ ॥ तेवींचि श्रीकृष्णा हें तुझें । चरित्र कांहीं नेणिजे । जरी चित्त पाहसी माझें । येणें मिषें ॥ १५ ॥ नो तरी झकवीतु आहासी मातें । कीं तत्त्वाचि कथिसी ध्वनितें । हें अवगमितां निरुतें । जाणवेना ॥ १६ ॥ म्हणोनि आइकें देवा । हा भावार्थु आतां न बोलावा । मज विवेकु सांगावा । मऱ्हाटा जी ॥ १७ ॥ ( ६९ मीं काय करावें तें निश्चित सांगा, १८ ते २१ ) मी अत्यंत जड असें । परी ऐसाही निकें परियेसें । श्रीकृष्णा बोलावें तुवां तैसें । एकनिष्ठ ॥ १८ ॥ देखें रोगातें जिणावें । औषध तरी देयावें । परी तें अति रुच्य व्हावें । मधुर जैसें ॥ १९ ॥ तैसें सकळार्थभरित । तत्त्व सांगावें उचित । परी बोधे माझें चित्त । जयापरी ॥ २० ॥ देवा तुजऐसा निजगुरु । आजि औतिथणी कां न करूं । एथ भीड कवणाची धरूं । तूं माय आसुची ॥२१॥ ( ७० गुरूपासून आपले मनोरथ पूर्ण करून कां न घ्यावे? २२ ते ३१ ) हां गा कामधेनूचें दुभतें । दैवें जाहलें जरी आपैतें । तरी कामनेची कां तेथें । वाणी कीजे ॥ २२ ॥ जरी चिंतामणी हाता चढे । तरी वांछेचें कवण सांकडें । कां आपुलेनि सुरवाडें । इच्छावें ना ॥ २३ ॥ देखा अमृतसिंधूतें ठाकावें । मग ताहानाचि जरी फुटावें । तरी सायासु कां करावे । मागील ते ॥ २४ ॥ तैसा जन्मांतरीं बहुतीं । उपासितां श्रीलक्ष्मीपती । तूं दैवें आजि हातीं । जाहलासी जरी ॥ २५ ॥ तरी आपुलिया सवेसी । कां न मागावासि परेशा । देवा सुकाळु हा मानसा । पाहला असे ॥ २६ ॥ देखें सकळार्तीचें जियालें । आजि पुण्य यशासि आलें । हे मनोरथ जहाले । विजयी माझे ॥ २७ ॥ जी जी परममंगळधामा । सकळदेवदेवोत्तमा । तूं स्वाधीन आजि आम्हां । म्हणऊनियां ॥ २८ ॥ जैसें मातेच्या ठायीं । अपत्या अनवसरु नाहीं । स्तन्यालागूनि पाहीं । जियापरी ॥ २९ ॥ तैसें देवा तूतें । पूसिजतसे आवडतें । आपुलेनि आर्तें । कृपानिधी ॥ ३० ॥ तरी पारत्रिकीं हित । आणि आचरितां तरी उचित । तें सांगें एक निश्चित । पार्थु म्हणे ॥ ३१ ॥

भगवानुवाचः—लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ ।
ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥

अन्वय—हे अनघ, अस्मिन् लोके मया द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता, सांख्यानां ज्ञानयोगेन, योगिनां कर्मयोगेन ॥ ३ ॥

---

१ ज्ञानाचें. २ स्थिर असलेलें. ३ घोटाळ्यांत पडलें. ४ फसवीत आहेस. ५ गूढार्थानें. ६ अनुमान करितां. ७ खरें. ८ स्पष्ट, प्राकृत. ९ मंदमति. १० चांगलें ऐकेन. ( मला स्पष्ट समजेल अशा प्रकारें ). ११ संकोच. १२ इच्छेची तृप्ति. १३ प्राप्त. १४ कमतरता. १५ संकट. १६ सुखानें,

बोध करीत असलां, तर मग आमचें चांगलेंच करीत आहां ! १३ तर आतां ज्ञानाची आशा कशाला पाहिजे ? ज्ञान संपादन करण्याची हौस संपली; परंतु उलटें एक असें झालें कीं, माझ्या मनाची स्थिरता जाऊन तें जास्त घोंटाळ्यात मात्र पडलें ! १४ त्याचप्रमाणें, श्रीकृष्णा, तुमची लीला आम्ही काही जाणूं शकत नाहीं. ह्या उपदेशाच्या मिषानें जर आपण माझें मन पहात असाल तर कोण जाणे ! १५ किंवा मला फसवीत आहां, का गूढार्थानें ब्रह्मस्वरूप सांगत आहां ? ह्याचें अनुमान करतां, खरें कांहींच कळत नाहीं. १६ म्हणून देवा, ऐका. हा गूढार्थ न सांगतां, जो कांही आपला विचार असेल तो स्पष्ट सांगा. १७ श्रीकृष्णा, मी अतिशय मंदबुद्धि आहें, तेव्हां अशा मलाही चांगलें समजेल, असें एक निश्चयात्मक बोलणें आपण बोला. १८ असें पहा—, औषध देऊन रोग तर नाहींसा व्हावा, परंतु तें औषध मधुर व रुचकर असावें; १९ त्याचप्रमाणें, सर्व अर्थानें परिपूर्ण व ( आचरण्यास ) योग्य असें तत्त्व आपण सांगा; पण ज्या रीतीनें माझ्या मनाला त्याचा पूर्ण बोध होईल, त्या रीतीनें सांगा २० देवा, तुमच्यासारखा गुरु मला मिळाला असतां आज मी आपल्या मनाची इच्छा कां न तृप्त करून घ्यावी ? ह्या ठिकाणीं मीं भीड कोणाची धरावी ? तूं माझी माउली आहेस ! २१ असें पहा कीं, दैवयोगानें कामधेनूचें दुभतें प्राप्त झाल्यावर इच्छित मागण्यास कां कमी करावें ? २२ किंवा चिंतामणि हातीं आल्यावर मग इच्छित वस्तु मागण्याचें संकट कां पडावें ? आपल्याला जें अपेक्षित असेल तें कां न मागावें ? २३ पहा की, अमृतसिंधूचे काठीं उभें राहून अमृत न पितां जर तहानेनें व्याकूळ व्हावें, तर मग अमृतसिंधूजवळ येण्याचे श्रम तरी कां घ्यावे ? २४ त्याचप्रमाणें, हे कमलापते, तुझी जन्मोजन्मीं उपासना करितां करितां दैवयोगानें आज जर तुझी आम्हांस प्राप्ति झाली आहे, २५ तर मग परमेश्वरा, आपल्याच इच्छेनें तुमच्यापाशीं आम्ही मागणें कां मागूं नये ? देवा, आज मनांतील हेतु पूर्ण होण्याचा उदयकाल आला आहे ! २६ हें पहा--आज माझ्या सर्व इच्छा परिपूर्ण होऊन व माझें पूर्वपुण्य फळास येऊन सर्व मनोरथ सिद्धीस गेले; २७ कारण, कल्याणाचें आदिपीठ व सर्व देवांचे देव जे तुम्ही ते आज आमच्या अधीन झालां आहां. २८ आईचें स्तनपान करण्यास मुलाला जशी वेळअवेळ ह्यांची अडचण नसते, २९ त्याप्रमाणें देवा, कृपानिधे, मी तुम्हांला माझे इच्छेनुरूप विचारीत आहें. " ३० अर्जुन म्हणतो, " म्हणून, देवा, इहलोकीं आचरण्यास योग्य व परलोकीं हितकारक अशी एक निश्चित गोष्ट सांगा. " ३१

श्रीभगवान म्हणाले:— हे निष्पाप अर्जुना ! ह्या लोकीं सृष्टीचे आरंभींच मीं हे दोन प्रकारचे मार्ग सांगितले आहेत. सांख्यविचार करणारांना ज्ञानयोग, व कर्म करणारांना कर्मयोग ॥ ३ ॥

आवडेल तसें. १७ उभें रहावें. १८ तरफडावें १९ स्वेच्छेनें. २० परमेश्वरा. २१ उजेडला. २२ सर्व इच्छेचें. २३ जीवसाफल्य. २४ फलप्रद. २५ पूर्ण कल्याणाचें स्थान. २६ अवेळ. २७ स्तनपान करण्यास. २८ इच्छेनें. २९ परलोकीं.

( ७१ ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा, ३२ ते ४४ ) या बोला श्रीअच्युतु । म्हणतसे विस्मितु[1] । अर्जुना हा ध्वनितु[2] । अभिप्रावो ॥ ३२ ॥ जे बुद्धियोगु[3] सांगतां । सांख्यमतसंस्था[4] । प्रकटिली[5] स्वभावतां । प्रसंगें आम्हीं ॥ ३३ ॥ तो उद्देशु तूं नेणसीचि । म्हणोनि क्षोभलासि वायांचि । तरी आतां जाणें म्यांचि । उक्त दोन्ही ॥ ३४ ॥ अवधारीं वीरश्रेष्ठा । ये लोकीं या दोन्ही निष्ठा । मजचिपासूनि प्रगटा । अनादिसिद्ध[6] ॥ ३५ ॥ एक ज्ञानयोगु म्हणिजे । जो सांख्यीं अनुष्ठिजे[7] । जेथ वोळखीसवें पाविजे । तद्रूपता[8] ॥ ३६ ॥ एक कर्मयोगु जाण । जेथ साधकजन[9] निपुण[10] । होऊनियां निर्वाणें[11] । पावती वेळें[12] ॥ ३७ ॥ हे मार्गु तरी दोनी । परी ऐकवटती[13] निदानीं[14] । जैसी सिद्धसाध्यभोजनीं[15] । तृप्ति एक ॥ ३८ ॥ कां पूर्वापरें[16] सरिता । भिन्न दिसती पाहतां । मग सिंधुमिळणीं[17] ऐक्यता । पावती शेखीं[18] ॥ ३९ ॥ तैसी दोनीही मतें । सूचिती[19] एका कारणातें[20] । परी उपास्ति[21] ते योग्यते । आधीन असे ॥ ४० ॥ देखें उत्प्लवनासरिसा[22] । पक्षी फळासि झोंबे जैसा । सांगें नरु केविं तैसा । पावे वेगा ॥ ४१ ॥ तो हळू हळू ढाळेंढाळें[23] । केतुलेनि[24] एके वेळें । तया मार्गाचेनि बळें । निश्चित ठाकी[25] ॥ ४२ ॥ तैसें देख पां विहंगममतें[26] । अधिष्ठूनि ज्ञानातें । सांख्य सद्य मोक्षातें । आकळिती ॥ ४३ ॥ येर[30] योगिये कर्माधारें । विहितेंचि निजाचारें[32] । पूर्णता अवसरें[33] । पावते होती ॥ ४४ ॥

**न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते । न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥**

अन्वय—कर्मणाम् अनारंभात् पुरुषः नैष्कर्म्यं न अश्नुते च कर्मणां संन्यसनात् एव सिद्धिं न समधिगच्छति ॥ ४ ॥

( ७२ कर्मारंभावाचून निष्कर्म होतां येत नाहीं, ४५ ते ५२ ) वांचोनि कर्मारंभ उचित । न करितां सिद्धवत । कर्महीना निश्चित । होइजेना ॥ ४५ ॥ कीं प्राप्त-कर्म सांडिजे । येतुलेनि नैष्कर्म्य होइजे । हें अर्जुना वायां बोलिजे । मूर्खपणें ॥ ४६ ॥ सांगें पैलतीरा जावें । ऐसें व्यसन कां जेथ पावे । तेथ नावेतें त्यजावें । घडे केवीं ॥ ४७ ॥ ना तरी तृप्ति इच्छिजे । तरी कैसेनि पाकु न कीजे । कीं सिद्धही न सेविजे । केवीं सांगें ॥ ४८ ॥ जंव निरार्ततौ नाहीं । तंव व्यापारु असे पाहीं । मग संतुष्टीच्या ठायीं । कुंठे सहजें ॥ ४९ ॥ म्हणोनि आइकें पार्था । जया नैष्कर्म्यपदीं आस्था । तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥ ५० ॥ आणि आपुलिये चाडे । आपादिलें हें मांडे । कीं त्यजिलें कर्म सांडे । ऐसें आहे

१ आश्चर्यानें. २ गर्भित. ३ ईश्वरार्पण–कर्मयोग. ४ आत्मानात्मविचार, ज्ञानयोग. ५ सांगितलें. ६ संप्रदाय. ७ आचरतात. ८ ब्रह्मरूपत्व ९ मुमुक्षु. १० तत्पर. ११ मोक्ष. १२ ज्ञानोत्तरकालीं. १३ एकत्र होतात. १४ शेवटीं. १५ तयार असलेले व तयार होणारे अन्नानें. १६ पूर्वपश्चिम. १७ समुद्रांत मिळाल्यानंतर. १८ अखेरीस १९ सुचवितात. २० तत्त्वाला. २१ उपासना. २२ उड्डाणाबरोबर. २३ ह्या फांदीवरून त्या फांदीवर. २४ काहीं. २५ प्राप्त होतो. २६ पक्षीपद्धतीनें,

हें बोलणें ऐकून श्रीकृष्ण आश्चर्यानें म्हणतातः—अर्जुना, तुला जो सांगितला तो गर्भितार्थ आहे. ३२ ईश्वरार्पण कर्ममार्ग सांगतांना प्रसंगानुसार जो ज्ञानमार्गाचा महिमा आम्ही सांगून गेलों, ३३ तो आमचा हेतु तूं जाणला नाहींस, म्हणून व्यर्थ क्षोभलास. तेव्हां आतां हें ध्यानांत ठेव कीं, ज्ञानयोग आणि कर्मयोग हे दोन्ही मार्ग मींच सांगितलेले आहेत. ३४ हे वीरश्रेष्ठा, ऐकः ह्या पृथ्वीवर हे दोन्ही संप्रदाय माझ्यापासूनच पूर्वापार प्रकट झाले आहेत. ३५ जड—चैतन्याचा विचार करणारे ज्याचें आचरण करतात, व ज्या योगानें ब्रह्मरूपाची ओळख होतांक्षणींच ते तद्रूप होऊन जातात, त्या एका संप्रदायाला ज्ञानयोग म्हणतात. ३६ दुसऱ्यास कर्मयोग म्हणतात. त्या योगांत तत्पर असे मुमुक्षुजन अवकाशानें ( ज्ञानोत्तरकाळीं ) मोक्षास पावतात. ३७ तयार असलेल्या व तयार करून घेतलेल्या अन्नाच्या भोजनापासून जशी सारखीच तृप्ति होते, तसा ह्या दोन्ही मार्गांचा परिणाम एकच आहे. ३८ किंवा पूर्वपश्चिम दिशांकडे जाणाऱ्या नद्या पाहिल्या तर भिन्न दिसतात, परंतु समुद्रांत मिळण्याचे वेळीं अखेरीस त्या जशा एकत्र होतात, ३९ तशीं हीं दोन्ही मतें एकाच तत्त्वाचीं सूचक आहेत; परंतु त्याची उपासना उपासकाच्या योग्यतेवर अवलंबून आहे. ४० असें पहा--पक्षी एका उड्डाणाबरोबर झाडाच्या फळास धरतो; पण त्याच वेगानें मनुष्यास तें फळ कसें प्राप्त करून घेतां येईल सांग बरें ? ४१ तो हळूहळू फांदीफांदीवरून, मार्ग क्रमितां क्रमितां कांहीं वेळानें फळावर खरोखर जाऊन पोहोंचेल; ४२ त्याचप्रमाणें, ज्ञानमार्गाचें जे आचरण करितात, ते ज्ञानी विहंगममार्गानें तत्काल मोक्ष प्राप्त करून घेतात. ४३ इतर योगी कर्ममार्गानें ( पिपीलिकामार्गानें ) विहित वर्णाश्रमधर्माचें आचरण करून अवकाशानें ( ज्ञानोत्तरकाळीं ) मोक्ष प्राप्त करून घेतात. ४४

कर्माचें आचरण केल्यानें पुरुषाला कर्मशून्यत्व प्राप्त होत नाहीं, व केवळ कर्मसंन्यास केला म्हणजेच सिद्धि प्राप्त होते असेंही नाहीं. ४

कोणीही मनुष्य विहित कर्में टाकून जर सिद्ध (ज्ञानी) होऊं म्हणेल, तर निश्चयानें त्याला तसें होतां येणार नाहीं. ४५ अर्जुना, जीं ज्याला विहित कर्में करावयाचीं, तीं टाकल्यानें तो कृतार्थ होईल असें म्हणणें हा केवळ वेडेपणा होय. ४६ नदी दुथडी भरली आहे, व ती उतरून पलीकडे जाण्याची जेथें आवश्यकता आहे, तेथें नावेशिवाय जाऊं म्हटलें तर कसें जातां येईल सांग बरें ? ४७ किंवा भोजनापासून जो तृप्तीची इच्छा करतो, त्याला स्वयंपाक न करतां अथवा तयार असलेलें अन्न न खातां ती कशी प्राप्त होईल ? ४८ जोंपर्यंत निरिच्छपणा प्राप्त झाला नाही, तोंपर्यंत खटपट ही केलीच पाहिजे. तोच प्राप्त झाला, म्हणजे आत्मसंतोषांत प्राणी सहज गुंतून जातो; ४९ म्हणून पार्था, ज्याला मोक्षप्राप्तीची इच्छा आहे, त्याला विहित कर्माचरण कधींही सोडतां येत नाहीं; ५० आणि

---

ज्ञानमार्गानें. २७ आश्रय करून. २८ ज्ञानी. २९ लागलीच. ३० पिपीलिकामार्ग, कर्ममार्ग. ३१ ३२ विहित कर्मानें. ३३ अवकाशानें. ३४ विहित कर्म. ३५ कृतार्थ. ३६ संकट, जरूरी ३७ निरिच्छपणा. ३८ मोक्षपदीं. ३९ गरजेनें. ४० संपादिले. ४१ घडेल.

॥ ५१ ॥ अवतरणः—हें वायांचि सैरा बोलिजे । उकलु तरी देखोनि पाहिजे । परी त्यजितां कर्म न त्यजे । निभ्रांत मानीं ॥ ५२ ॥

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् । कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥५॥

अन्वय—कश्चित् जातु क्षणमपि अकर्मकृत् न हि तिष्ठति, सर्वः हि अवशः ( सन् ) प्रकृतिजैः गुणैः कर्म कार्यते ॥ ५ ॥

( ७३ देहधारी जीवाला कर्मावांचून एक क्षणही राहता येत नाहीं, ५३ ते ६३ ) जंव प्रकृतीचें अधिष्ठान । तंव सांडी मांडी हें अज्ञान । जे चेष्टा ते गुणाधीन । आपैसी असे ॥ ५३ ॥ देखें विहित कर्म जेतुलें । तें सगळें जरी वोसंडिलें । तरी स्वभाव काय निमालें । इंद्रियांचे ॥ ५४ ॥ सांगें श्रवणीं ऐकावें ठेलें । कीं नेत्रींचें तेज गेलें । हें नासारंध्र बुझालें । परिमळु नेघे । ॥ ५५ ॥ ना तरी प्राणापानगति । कीं निर्विकल्पें जाहली मति । कीं क्षुधातृषादि आर्ति । खुंटलिया ॥ ५६ ॥ हे स्वप्नावबोधु ठेले । चरण चालों विसरले । हें असो काय निमाले । जन्ममृत्यु ॥ ५७ ॥ हें न ठकेचि जरी कांहीं । तरी सांडिलें तें कायी । म्हणोनि कर्मत्यागु नाहीं । प्रकृतिवंतां ॥ ५८ ॥ कर्म पराधीनपणें । निपजतसे प्रकृतिगुणें । येरीं धरीं मोकलीं अंतःकरणें । वाहिजे वायां ॥ ५९ ॥ देखें रथीं आरूढिजे । मग जरी निश्चळ बैसिजे । तरी चळ होऊनि हिंडिजे । परतंत्रा ॥ ६० ॥ का उचलिलें वायुवशें । चळे शुष्क पत्र जैसें । निचेष्ट आकाशें । परिभ्रमे ॥ ६१ ॥ तैसें प्रकृतिआधारें । कर्मेंद्रियविकारें । नैष्कर्मही व्यापारे । निरंतर ॥६२॥ म्हणऊनि संगु जंव प्रकृतीचा । तंववरी त्यागु न घडे कर्माचा । ऐसियाहि करूं म्हणती तयांचा । आग्रहोचि उरे ॥ ६३ ॥

कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् । इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते

अन्वय—यः विमूढात्मा कर्मेंद्रियाणि संयम्य मनसा इंद्रियार्थान् स्मरन् आस्ते सः मिथ्याचारः उच्यते ॥ ६ ॥

( ७४ निष्कर्म न होतां केवळ इंद्रियनिरोध तो दांभिक आचार, ६४ ते ६७ ) जे उचित कर्म सांडिती । मग नैष्कर्म्य होऊं पाहती । परी कर्मेंद्रियप्रवृत्ती । निरोधुनी ॥ ६४ ॥ तयां कर्मत्यागु न घडे । जें कर्तव्य मनीं सांपडे । वरी नटती तें फुडें । दरिद्र जाण ॥ ६५ ॥ ऐसे ते पार्था । विषयासक्त सर्वथा । ओळखावे तत्वता । भ्रांति नाहीं ॥ ६६ ॥ अवतरणः—आतां देईं अवधान । प्रसंगें तुज सांगेन । या नैराश्याचें चिन्ह । धनुर्धरा ॥ ६७ ॥

यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन । कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते॥७॥

अन्वय—(हे) अर्जुन, यः तु इंद्रियाणि मनसा नियम्य असक्तः (सन्) कर्मेंद्रियैः कर्मयोगं आरभते, सः विशिष्यते ॥ ७ ॥

---

१ अट्टाहास. २ निर्णय ३ वास्तव्य. ४ त्याग-स्वीकार. ५ वर्तन. ६ आपोआप. ७ टाकिलें. ८ लय पावले. ९ बंद झालें. १० नाकाचें भोंक. ११ वास. १२ कल्पनारहित. १३ मन. १४ इच्छा. १५ झोंप

आपआपले गरजेप्रमाणें कर्माचा स्वीकार व त्याग करूं म्हटल्यानें तो होईल काय ? ५१ हें बोलणें व्यर्थ बहकल्यासारखें आहे. ह्याचा नीट विचार करून पाहिला तर कर्म टाकल्यानें कर्माचा त्याग होत नाही असें पक्कें समज. ५२

॥ कारण, कोणताही प्राणी कर्म केल्यावांचून एक क्षणभरही स्वस्थ असत नाहीं; प्रकृतीपासून उत्पन्न झालेले सत्वादि गुण हे सर्वांकडून कर्मे करवितात ॥ ५ ॥

जोंपर्यंत मायेचें वास्तव्य आहे, तोंपर्यंत कर्म स्वीकारणें अगर टाकणें हें बोलणें अज्ञानपणाचें आहे. कारण, ह्या जीवाच्या हातून जो व्यापार होतो, तो मायेच्या गुणानुरोधानें सहज होतो, ५३ जेवढीं विहित कर्मे आहेत तेवढीं सगळीं जरी त्रासानें सोडलीं, तरी इंद्रियांचे स्वभावधर्म नाहींतसे होतात का ? ५४ कर्मत्याग केला म्हणून कानांचें एकणें बंद झालें ? का डोळ्याची दृष्टि गेली ? का नाकाचीं भोंकें बुजून जाऊन वास येईनासा झाला ? झालें काय सांग. ५५ किंवा प्राणापानवायूंची गति बंद झाली ? का मन हें कल्पनारहित झालें ? का भूकतहान ह्यांची इच्छा नाहींशी झाली ? ५६ अथवा निद्रा व जागृति ह्या अवस्था बंद झाल्या ? किंवा पाय चालणें विसरले ? इतकेंच नव्हे, परंतु जन्ममरण तरी चुकलें आहे काय ? ५७ मग हे इंद्रियाचे व्यापार जर बंद रहात नाहींत, तर मग सोडलें तें काय ? म्हणून देहाभिमान्याला कर्माचा त्याग करतां येणार नाहीं. ५८ कर्म हें पराधीन असल्यामुळें प्रकृतीच्या गुणानुरोधानें घडतें; ह्यास्तव, मी कर्म करीन अगर सोडीन असें समजणें व्यर्थ होय. ५९ पहा की, रथांत बसल्यावर मग जरी स्तब्ध बसून राहिलें, तरी तो रथाच्या अधीन असल्यामुळें रथाचें फिरणें म्हणजे तोच फिरला असें होतें; ६० किंवा झाडाचें वाळलेलें पान निश्चेष्ट असताही ज्याप्रमाणें वायूच्या वेगानें उडून आकाशांत भ्रमण करितें, ६१ त्याप्रमाणें, मायेच्या आधारानें व कर्मेंद्रियाच्या विकारानें निष्कामही नेहमीं कर्म करतो. ६२ म्हणून, जोंपर्यंत मायेचा संग आहे, तोंपर्यंत कर्माचा त्याग घडत नाहीं. असें असूनही जे कर्माचा त्याग करूं म्हणतात, त्यांचा तो रिकामा आग्रह होय. ६३

जो मूर्ख पुरुष कर्मेंद्रियांचें संयमन करून इंद्रियांच्या विषयांचें चिंतन करीत राहतो, त्याला दांभिक–दुराचारी असें म्हणतात ॥ ६ ॥

जे योग्य कर्मे टाकून व कर्मेंद्रियांचें दमन करून कर्मातीत होऊं इच्छितात, ६४ त्यांना कर्मत्याग घडत नाहीं. कारण, त्याच्या मनांमध्यें कर्मे करण्याविषयींची वासना जागृत असते. कर्मत्याग केला असें वरवर दाखविणें ही खरोखर विटंबना होय. ६५ पार्था, असे हे प्राणी नेहमीं विषयासक्त असतात असें निःसंशय जाण. ६६ आतां अर्जुना, प्रसंगानुसार तुला निरिच्छ मनुष्याची खूण सांगतों ती लक्षपूर्वक ऐक. ६७

परंतु अर्जुना, जो मनानें इंद्रियांचें नियमन करून आसक्ति न ठेवितां कर्मयोगाचें आचरण आरंभितो, तो अधिक श्रेष्ठ होय ॥ ७ ॥

---

व जागेपण. १६ देहाभिमान्याला १७ जिवानें. १८ धरणें. १९ सोडणें. २० समजणें २१ शानी. २२ इसक्यावर. २३ कर्मातीत. २४ आवरून. २५ खरोखर. २६ विटंबना. २७ निरिच्छपणाचें.

( ७५ फलेच्छारहित कर्म करण्यानें निष्कर्म होतां येतें, ६८ ते ७६ ) जो अंतरीं दृढ । परमात्मरूपीं गूढ । बाह्यांतरीं रूढ । लौकिकें भागु ॥६८॥ जो इंद्रियां आज्ञा न करी । विषयांचें भय न धरी । प्राप्त कर्म नाव्हेरी । उचित जें जें ॥ ६९ ॥ तो कर्मेंद्रियें कर्मीं । राहटतां तरी न नियेमी । परी तेथींचेनि ऊर्मीं । झांकोळेना ॥ ७० ॥ तो कामनामात्रें न घेपे । मोहमळें न लिंपे । जैसें जळीं जळें न शिंपे । पद्मपत्र ॥७१॥ तैसा संसर्गींमाजि असे । सकळांसारिखा दिसे । जैसें तोयसंगें आभासे । भानुबिंब ॥ ७२ ॥ तैसा सामान्यत्वें पाहिजे । तरी साधारणुचि देखिजे । येरवीं निर्धारितां नेणिजे । सोयें जयाची ॥ ७३ ॥ ऐशा चिन्हीं चिन्हितु । देखसी तोचि मुक्तु । आशापाशरहितु । वोळख पां ॥ ७४ ॥ अर्जुना तोचि योगी । विशेषिजे जो जगीं । म्हणोनि ऐसा होय यालागीं । म्हणिपे तूतें ॥ ७५ ॥ तूं मानसा नियमु करीं । निश्चळु होय अंतरीं । मग कर्मेंद्रियें व्यापारीं । वर्ततु सुखें ॥ ७६ ॥

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः। शरीरयात्राऽपि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः॥८**

अन्वय—त्वं नियतं कर्म कुरु, अकर्मणः कर्म ज्यायः ( अस्ति ); ते शरीरयात्रा अपि च अकर्मणः न प्रसिद्ध्येत् ॥ ८ ॥

( ७६ नित्य कर्मानेंच परंपरेने मोक्ष मिळतो, ७७ ते ८० ) म्हणोनि नैष्कर्म्य होआवें । तरी एथ तें न संभवे । आणि निषिद्ध केविं राहाटावें । विचारीं पां ॥७७॥ म्हणोनि जे जें उचित । आणि अवसरेंकरूनि प्राप्त । तें कर्म हेतुरहित । आचरें तूं ॥ ७८ ॥ पार्था आणिकही एक । नेणसी तूं हें कवतिक । जें ऐसें कर्ममोचक । आपैसें असे ॥ ७९ ॥ देखें अनुक्रमाधारें । स्वधर्मु जो आचरे । तो मोक्षु तेणें व्यापारें । निश्चित पावे ॥ ८० ॥

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः। तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचर ॥ ९॥**

अन्वय—यज्ञार्थात् कर्मणः अन्यत्र अयं लोकः कर्मबंधनः ( अस्ति ). ( हे ) कौंतेय, ( त्वं ) मुक्तसंगः ( सन् ) तदर्थं कर्म समाचर ॥ ९ ॥

( ७७ नित्यकर्म न केल्यानें जीवाला बंध होतो, केल्यानें होत नाहीं, ८१–८४ ) स्वधर्मु जो बापा । तोचि नित्ययज्ञु जाण पां । म्हणोनि वर्ततां तेथ पापा । संचारु नाहीं ॥ ८१ ॥ हा निजधर्म जे सांडे । आणि कुकर्मीं रति घडे । तैंचि बंधु पडे । संसारिक ॥ ८२ ॥ म्हणोनि स्वधर्मानुष्ठान । ते अखंड यज्ञयाजन । जो करी तया बंधन । कांहींच न घडे ॥ ८३ ॥ हा लोकु कर्में बांधिला । जो परतंत्रीभूत झाला । तो नित्ययज्ञातें चुकला । म्हणोनियां ॥८४॥ ( ७८ नित्यकर्मानें परंपरेनें मोक्ष मिळतो. त्यासाठी ब्रह्मदेवाची गोष्ट, ८५ ते ९७ ) अवतरण—आतां येचिविशीं पार्था । तुज सांगेन एक मी कथा । जैं सृष्ट्यादि संस्था । ब्रह्मेनें केली ॥ ८५ ॥

१ आचरण करणारा. २ लोकाचार. ३ वागत असतां. ४ आवरणें. ५ विकार. ६ आच्छादत नाहीं. ७ आकळणें. ८ भिजणें. ९ कमळाचें पान. १० ससार. ११ पाणी. १२ वरकांतीं. १३

जो अंतर्यामीं निश्चल व परमात्म्याचे ठिकाणीं तल्लीन, तथापि बाह्यात्कारीं लोकाचाराप्रमाणें वागणारा, ६८ तो इंद्रियाना आज्ञा करीत नाहीं, विषयांची भीति बाळगीत नाहीं, आणि ज्या ज्या वेळेस जी जीं कर्मे करावयाचीं तीं कर्मे टाकीत नाहीं; ६९ कर्मेंद्रियांकडून कर्मे होत असतांना तो त्यांना आवरीत नाहीं. ७० तो वासनेनें आकळला जात नाहीं व त्याच्या मनाला मोहाची बाधा होत नाहीं. कमळाचें पान जसें रात्रंदिवस पाण्यांत असून पाण्यानें भिजत नाहीं, ७१ त्याप्रमाणें, संसारामध्यें राहून तो इतर जनांसारखा दिसतो. ज्याप्रमाणें, पाण्याच्या संगतीनें सूर्यबिंब पाण्यांत दिसतें, ७२ त्याप्रमाणें, वरकांतीं पाहतां तो मनुष्य साधारणसा दिसतो; बाकी निश्चयानें त्याची आत्मस्थिति ओळखतां येत नाहीं. ७३ अशा गुणांनीं जो युक्त असेल व जो निरिच्छ असेल, तोच मुक्त असें तूं समज ७४ अर्जुना, तोच योगी व तोच जगांत स्तुतीस पात्र असतो. म्हणून तूं असा हो असें मी तुला म्हणतों. ७५ तूं आपल्या मनाला आवरून धर, व अंतर्यामीं स्थिरबुद्धि हो. ( मग ) कर्मेंद्रियें खुशाल आपापले व्यापार करोत. ७६

अरे, तूं विहित कर्मांचें आचरण कर. कर्म न करण्यापेक्षा कर्म करणें हेंच श्रेयस्कर आहे. कर्म केल्यावाचून तुझ्या शरिराचा निर्वाह देखील होणार नाहीं. ॥ ८ ॥

म्हणून, कर्मरहित होणें हें ह्या संसारांत असंभवनीय आहे; मग शास्त्रविरुद्ध आचरण कां करावें ह्याचा विचार कर. ७७ म्हणून जें जें योग्य व समयानुसार प्राप्त झालेलें कर्म असेल, तें तें तूं निष्काम बुद्धीनें कर. ७८ पार्था, आणखी एक कौतुक तुला माहीत नाहीं; तें हें की, निष्काम बुद्धीनें केलेलें हें कर्म कर्मापासून म्हणजे संसारांतून सोडविणारें होतें. ७९ पहा कीं, अधिकाराप्रमाणें स्वधर्माचें जो आचरण करतो, तो त्या आचरणानेंच निश्चयेंकरून मोक्ष पावतो. ८०

अर्जुना, ईश्वरार्पण बुद्धीवांचून फलाच्या इच्छेनें केलेल्या कर्माच्या योगानें हा जीव बांधला जातो; म्हणून अर्जुना, कर्तेपणाचा अभिमान सोडून ईश्वरार्पण बुद्धीनें तूं कर्म कर ॥ ९ ॥

बाबारे ! आपल्या धर्माप्रमाणें आचरण करणें हाच नित्ययज्ञ असें समज; म्हणून त्याप्रमाणें वर्तन केल्यावर त्यांत पापाचा रिघाव होत नाहीं. ८१ प्राणी जेव्हा हा स्वधर्म टाकतात आणि वाईट कर्मांच्या ठिकाणीं प्रवृत्त होतात, तेव्हांच जन्ममरणाचे फेऱ्यांत पडतात. ८२ म्हणून, स्वधर्माप्रमाणें आचरण करणें हाच अखंड यज्ञ असें समज; आणि जो पुरुष हा यज्ञ करतो, त्याला कांहीं सुद्धां बंधन होत नाहीं. ८३ हें सर्व जग कर्मानें बांधलें जाऊन मायेचे पाशांत गुंतलें आहे तें स्वकर्माला चुकलें म्हणूनच. ८४ पार्था, आतां तुला मी ह्याविषयीं एक कथा सांगतों. ज्या वेळेस ब्रह्मदेवानें सृष्टि निर्माण केली, ८५

आत्मस्थिति. १४ युक्त. १५ वर्णन करावा, आगळा आहे. १६ आवरणें. १७ कर्मरहित. १८ शास्त्रविरुद्ध. १९ समयानुसार. २० निष्काम. २१ कर्मापासून सोडविणारें. २२ वर्णाश्रमधर्माप्रमाणें. २३ शिरकाव. २४ आवड. २५ मायेला वश झाला. २६ जग इत्यादि व्यवस्था.

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः। अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् १०

अन्वय—प्रजापतिः पुरा सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा उवाच, अनेन ( यूयं ) प्रसविष्यध्वम्, एष. वः इष्टकामधुक् अस्तु ॥ १० ॥

तैं नित्ययागसहितें। सृजिलीं भूतें समस्तें। परी नेणतीचि तियें यज्ञातें। सूक्ष्म म्हणउनी ॥ ८६ ॥ ते वेळीं प्रजीं विनविला ब्रह्मा। देवा काय आश्रयो एथ आम्हां। तंव म्हणे तो कमळजन्मा। भूतांप्रति ॥ ८७ ॥ तुम्हां वर्णविशेषवशें। आम्हीं हा स्वधर्मुचि विहिला असे। यातें उपासा मग आपैसे। पुरती काम ॥ ८८ ॥ तुम्ही व्रतनियमु न करावे। शरीरातें न पीडावें। दुरि केंही न वचावें। तीर्थासि गा ॥ ८९ ॥ योगादिकें साधनें। साकांक्ष आराधनें। मंत्रयंत्रविधानें। झणीं करा ॥ ९० ॥ देवतांतरा न भजावें। हें सर्वथा कांहीं न करावें। तुम्ही स्वधर्मयज्ञीं यजावें। अनायासें ॥ ९१ ॥ अहेतुकें चित्तें। अनुष्ठा पां यातें। पतिव्रता पतीतें। जियापरी ॥ ९२ ॥ तैसा स्वधर्मरूप मखु। हाचि सेव्यु तुम्हां एकु। ऐसें सत्यलोकनायकु। बोलता जाहला ॥ ९३ ॥ देखा स्वधर्मातें भजाल। तरी कामधेनु हा होईल। मग प्रजाहो न संडील। तुमतें कदा ॥ ९४ ॥

देवान्भावयतानेन ते देवा भावयंतु वः। परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥

अन्वय—अनेन ( यूयं ) देवान् भावयत, ते देवाः वः भावयन्तु; ( एवं ) परस्परं भावयतः परं श्रेयः अवाप्स्यथ ॥ ११ ॥

जें येणेंकरूनि समस्तां। परितोषु होईल देवतां। मग ते तुम्हां ईप्सितां। अर्थातें देती ॥ ९५ ॥ या स्वधर्मपूजा पूजितां। देवतागणां समस्तां। योग-क्षेमु निश्चिता। करिती तुमचा ॥ ९६ ॥ तुम्ही देवांतें भजाल। देव तुम्हां तुष्टतील। ऐसी परस्परें घडेल। प्रीति जेथ ॥ ९७ ॥ ( ७९ नित्यकर्मानुष्ठानानें देव प्रसन्न होऊन जीवाला भोगसमृद्धि देतात, ९८–१०२ ) तेथ तुम्ही जें करूं म्हणाल। तें आपैसें सिध्दी जाईल। वांछितही पुरेल। मानसींचें ॥ ९८ ॥ वाचासिद्धि पावाल। आज्ञापक होआल। म्हणियें तुमतें मागतील। महाऋद्धि ॥ ९९ ॥ जैसें ऋतुपतीचें द्वार। वनश्री निरंतर। वोळंगे फळभार। लावण्येंसीं ॥ १०० ॥

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः। तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः१२

अन्वय—देवाः यज्ञभाविताः ( संतः ) वः इष्टान् भोगान् दास्यते, तैः दत्तान् ( भोगान् ) एभ्यः अप्रदाय यः भुंक्ते सः हि स्तेनः एव ॥ १२ ॥

तैसें सर्व सुखेंसहित। दैवाचि मूर्तिमंत। येईल देखा काढेंतें। तुम्हांपाठीं ॥१॥ ऐसे समस्त भोगभरित। होआल तुम्ही अनार्त। जरी स्वधर्मनिरत। वर्ताल बापा ॥२॥ ( ८० संपत्तीचा विनियोग स्वधर्माकडे न करील त्याची हानि होईल, १०३–११७ ) कां जालिया सकल संपदा। जो अनुसरेल इंद्रियमदा। लुब्ध होऊनिया स्वादा।

---

१ उत्पन्न केलीं. २ ब्रह्मदेव. ३ ब्राह्मणादि जातिपरत्वें. ४ नियमित केलीं. ५ आचरण करा. ६ कोठेंही. ७ जावें. ८ सकाम. ९ तांत्रिक अनुष्ठानें. १० करूं नका. ११ इतर देवतांस. १२

सृष्टीच्या आरंभीं यज्ञासहवर्तमान प्रजा उत्पन्न करून ब्रह्मदेव त्यांना म्हणालाः–तुम्हीं स्वधर्मरूप यज्ञाचें धर्माचरण करा, म्हणजे हा यज्ञ तुमचे इच्छित मनोरथ पूर्ण करील ॥ १० ॥

त्या वेळेस प्राणी व त्यांनीं नित्य आचरण्याचे धर्म हीं दोन्ही बरोबर उत्पन्न केलीं; परंतु ते गहन असल्यामुळें प्राण्यांना समजले नाहीत. ८६ तेव्हां त्यानी ब्रह्मदेवाची प्रार्थना केली कीं, " देवा, ह्या ठिकाणीं आम्हांला काय तरणोपाय आहे ? " तेव्हां तो त्यांना म्हणाला, ८७ " तुमच्या वर्णाश्रमाप्रमाणें आम्हीं पूर्वींच धर्म नियमित केले आहेत, त्याप्रमाणें तुम्ही आचरण करा म्हणजे तुमचे हेतु सहज पूर्ण होतील. ८८ तुम्ही व्रतवैकल्यें करूं नका; उपासतापास करून शरिरास कष्ट देऊं नका; व तीर्थयात्रांकरितां दूर जाण्याचे श्रम करूं नका; ८९ योगादिक साधनें, तसेंच कामनिक आराधना व मंत्रतंत्रादिक अनुष्ठानें करूं नका; ९० इतर देवांस भजूं नका, व ह्या गोष्टी करूं नका. तर, तुम्ही आपल्या वर्णाश्रमाप्रमाणें जो धर्म सांगितला आहे त्याचें साहजिक आचरण करा. ९१ ज्याप्रमाणें पतिव्रता आपल्या पतीची सेवा निष्काम बुद्धीनें करिते, त्याप्रमाणें तुम्ही आपल्या स्वधर्मोचें निष्काम बुद्धीनें आचरण करा." ९२ ब्रह्मदेव म्हणाले.—"स्वधर्मोचें आचरण हाच एक तुमचा यज्ञ होय; म्हणून त्याचें आचरण करा. ९३ जनहो, असें पहा कीं, तुम्ही जर स्वधर्मानें वागाल, तर तो कामधेनूसारखा फलद्रूप होऊन तुम्हाला कधींही अंतर देणार नाहीं. ९४

या स्वधर्मरूप यज्ञानें देवाचें पूजन केलें असता ते देव तुम्हावर प्रसन्न होतील; व ह्याप्रमाणें तुम्ही परस्परांना संतुष्ट करून आपलें कल्याण करून घ्या ॥ ११ ॥

ह्या स्वधर्माच्या आचरणानें सर्व देवता संतोष पावतील, आणि मग त्या तुमच्या इच्छित कामना सहज पूर्ण करतील. ९५ अशा रीतीनें आपल्या धर्माचें आचरण केल्यावर सर्व देवता तुम्हांला अप्राप्त वस्तूंची प्राप्ति करून देऊन त्याचें संरक्षणही निःसंशय करतील. ९६ तुम्ही देवांना भजाल तर देवही तुम्हांवर संतुष्ट होतील; आणि अशा प्रकारें एकमेकांचें एकमेकांवर जेव्हां प्रेम जडेल, ९७ तेव्हां तुम्ही जें करूं म्हणाल तें सहज सिद्धीस जाईल; आणि तुमच्या मनांतील सर्व वासना पूर्ण होतील. ९८ तुमच्या बोलास यश येईल, आणि तुम्ही दुसऱ्यांना आज्ञा करणारे व्हाल, आणि महाऋद्धि नेहमी तुमच्या आज्ञेंत राहून ' सेवा घ्या ' असें म्हणतील. ९९ वसंत ऋतूचे द्वारांत ज्याप्रमाणें वनशोभा ही आपल्या फलपुष्पभाराच्या लावण्यानें निरंतर वास करिते, १००

यज्ञानें पूजन केलेले देव संतुष्ट होऊन तुम्हास तुमचे इच्छित भोग देतील. देवतानीं दिलेले भोग त्याना अर्पण न करितां जो आपण स्वतः भोगतो, तो चोरच समजावा ॥ १२ ॥

त्याप्रमाणें, तुम्ही जेथें असाल, तेथें सर्व सुखासह मूर्तिमंत दैव तुमचा शोध करीत येईल. १ बाबांनो ! जर तुम्ही एकनिष्ठेनें स्वधर्मोचें आचरण कराल, तर तुम्ही ऐश्वर्ययुक्त

वर्णाश्रमधर्म हाच यज्ञ, ह्या यज्ञात. १३ निष्काम. १४ यज्ञ १५ आचरण्यास योग्य. १६ ब्रह्मदेव. १७ सोडील. १८ इच्छिलेल्या. १९ अप्राप्य वस्तूंची प्राप्ति. २० प्राप्त वस्तूंचें पालन. २१ हुकूम. २२ वसंत ऋतु. २३ वनशोभा. २४ आश्रय करणें. २५ शोध करीत. २६ सुखी, पूर्णकाम. २७ एकनिष्ठ. २८ इंद्रियांच्या उन्मत्तपणास. २९ गोडीस.

विषयांचिया ॥ ३ ॥ तिहीं यज्ञभाविकीं सुरीं । जे हे संपत्ति दिधली पुरी । तयां स्वधर्मीं सर्वेश्वरीं । न भजेल जो ॥ ४ ॥ अग्निमुखीं हवन । न करील देवतापूजन । प्राप्तवेळ भोजन । ब्राह्मणाचें ॥ ५ ॥ विमुख होईल गुरुभक्ती । आदर न करील अतिथी । संतोष नेदील ज्ञाती । आपुलिये ॥६॥ ऐसा स्वधर्मक्रियारहितु । आथिलेपणें प्रमत्तु । केवळ भोगसक्तु । होईल जो ॥ ७ ॥ तया मग अपावो थोर आहे । जेणें तें हातींचें सकळ जाये । देखा प्राप्तही न लाहे । भोग भोगूं ॥ ८ ॥ जैसें गतायुषीं शरिरीं । चैतन्य वासु न करी । कां निदैवाचेंया घरीं । न राहे लक्ष्मी ॥ ९ ॥ तैसा स्वधर्मु जरी लोपला । तरी सर्व सुखाचा थारा मोडला । जैसा दीपासवें हरपला । प्रकाशु जाय ॥ ११० ॥ तैसी निजवृत्ति जेथ सांडे । तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे । आइका प्रजाहो फुडें । विरंचि[13] म्हणे ॥ ११ ॥ म्हणऊनि स्वधर्म जो सांडील । तयातें काळु दंडील । चोरु म्हणूनि हरील । सर्वस्व तयाचें ॥ १२ ॥ मग सकळ दोषु भंवते[14] । गिंवसोनि घेती तयातें । रात्रिसमयीं श्मशानातें । भूतें जैसीं ॥ १३ ॥ तैसीं त्रिभुवनींचीं दुःखें । आणि नानाविधें पातकें । दैन्यजात तितुकें । तेथेंचि वसे ॥१४॥ ऐसें होय तया उन्मत्ता । मग न सुटे बापा रुदतां । कल्पांतींही सर्वथा । प्राणिगणहो ॥ १५ ॥ म्हणऊनि निजवृत्ति हे न संडावी । इंद्रियें बैरळों नेदावीं । ऐसें प्रजांतें शिकवी । चतुराननु ॥ १६ ॥ जैसें जळचरा जळ सांडे । मग तत्क्षणीं मरण मांडे । हा स्वधर्मु तेणें पाडें । विसंबों नये ॥ १७ ॥ ( ८१ मनुष्यानें विहितकर्माचें आचरण करावें, ११८ ) म्हणोनि तुम्हीं समस्तीं । आपुलालिया कर्मीं उचितीं । निरत व्हावें पुढतपुढती । म्हणिपत असें ॥ १८ ॥

यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः । भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ॥

अन्वय—यज्ञशिष्टाशिनः सन्तः सर्वकिल्बिषैः मुच्यते; ये तु पापाः आत्मकारणात् पचन्ति ते तु अघं भुंजते ॥ १३ ॥

( ८२ जीवानें विहितकर्म निर्हेतुक बुद्धीनें केलें असतां पापनिवृत्ति होते. संपत्ति स्वधर्मात खर्चावी, ११९ ते १२६ ) देखा विहित क्रियाविधि । निर्हेतुका बुद्धि । जो असतिये समृद्धि । विनियोग करी ॥ १९ ॥ गुरु गोत्र अग्नि पूजी । अवसरीं भजे द्विजीं । निमित्तादिकीं यजी । पितरोद्देशें ॥ १२० ॥ या यज्ञक्रिया उचिता । यज्ञेशीं हवन करितां । हुतशेष स्वभावता । उरे जें जें ॥ २१ ॥ तें सुखें आपुलें घरीं । कुटुंबेंसीं भोजन करी । कीं भोग्याचि तें निवारी । कल्मषातें ॥ २२ ॥ ते यज्ञावशिष्ट भोगी । म्हणोनि सांडिजे तो अघीं । जयापरी महारोगी । अमृतसिद्धी ॥ २३ ॥ कीं तत्वनिष्ठ जैसा । नागवे भ्रांतिलेशा । तो शेष भोगी तैसा । नाकळे

१ यज्ञानें संतुष्ट झालेल्या देवानीं. २ यथाकाळीं. ३ अन्नदान. ४ फंटाळेल. ५ श्रीमंतीनें. ६ दुःख. ७ लाभणें. ८ आयुष्य सरलेल्या. ९ आत्मा. १० करटा. ११ स्वधर्मवृत्ति. १२ सैरं १३ ब्रह्मदेव. १४ आसपास. १५ वेढून. १६ सर्व दुःखें. १७ रडतां. १८ गाफील. १९ योग्य

होऊन तुम्हांला विषयांची इच्छा राहणार नाहीं; २ सकल संपत्ति प्राप्त झाली असतां विषयसेवनाच्या गोडीला लंपट होऊन इंद्रियांची तृप्ति करण्यांत जो काळ घालवील व ३ यज्ञानें संतुष्ट झालेल्या देवांनीं जी ही आपल्यास पूर्ण संपत्ति दिली आहे, त्या संपत्तीनें व स्वधर्माचरणानें जो ईश्वरास भजणार नाहीं, ४ जो अग्नींत आहुति देणार नाहीं, देवतापूजन करणार नाहीं, अतिथीस यथाकाळीं अन्नदान वगैरे करणार नाहीं, ५ अथवा गुरुभक्तीला जो कंटाळेल, अतिथींचा आदरसत्कार करणार नाहीं, व आपल्या जातीस संतोष देणार नाहीं, ६ असा जो स्वधर्मांचें आचरण करीत नाहीं, श्रीमंतीनें ज्याला गर्वाचा ताठा :भरला आहे, आणि जो केवळ विषयासक्त झाला आहे, ७ त्याला महत्संकटें येतात; त्या योगानें जवळ असलेलें ऐश्वर्य नाहीसें होतें, आणि असलेले भोग सुद्धां भोगवत नाहीत. ८ ज्याप्रमाणें आयुष्य संपलेल्या शरिरांत जीव वास करीत नाहीं किंवा करंट्याचे घरीं लक्ष्मी वास करीत नाहीं, ९ त्याप्रमाणें, स्वधर्माचा लोप झाला म्हणजे सुखाचें आश्रयस्थान नष्ट झालें म्हणून समजावें. दीप मालवतांक्षणीच जसा प्रकाश नाहींसा होतो, ११० त्याप्रमाणें, ब्रह्मदेव म्हणतात, " प्रजाजनहो ! जो स्वधर्मांचें आचरण सोडतो, त्याचें स्वातंत्र्य खरोखर नष्ट होतें. ११ म्हणून, स्वधर्माचा जो त्याग करील, त्याला काळ शिक्षा करील, आणि हा चोर आहे असें समजून त्याच्या सर्वस्वाचें हरण करील. १२ मग, रात्र झाल्यावर स्मशानाला जशी भूतें वेढतात, तशीं सर्व संकटें त्याच्याजवळ येऊन त्याला वेढतात. १३ तसेंच, त्रिभुवनांतील सर्व दुःखें आणि हजारों प्रकारचीं पातकें आणि झाडून सर्व दारिद्य ही त्याचे ठिकाणीं वास करितात. १४ जनहो, ह्याप्रमाणें त्या उन्मत्त मनुष्याची स्थिति होते, आणि अशा प्राण्यांना कल्पांतींही दुःखें सोडीत नाहींत. " १५ ब्रह्मदेव प्रजेला असा बोध करतात कीं, " म्हणून आपला स्वधर्म सोडूं नका, आणि इंद्रियांना स्वैर वर्तन करूं देऊं नका. १६ ज्याप्रमाणें जलचराला पाण्यांतून बाहेर काढल्याबरोबर लागलीच मृत्यु येतो, त्याप्रमाणें, स्वधर्माचा विसर पडला म्हणजे प्राणी अधःपात पावतो. " १७ ब्रह्मदेव म्हणतात, म्हणून तुम्हीं सर्वांनीं आपल्या धर्माप्रमाणें कर्मे करण्यास नेहमीं तत्पर रहावें. १८

यज्ञाचा अवशिष्ट प्रसाद जे ग्रहण करतात, ते श्रेष्ठ पुरुष सर्व पापापासून मुक्त होतात; पण जे प्राणी केवळ आपल्याकरितांच पाक करून भोजन करतात, ते पातकच सेवन करतात. ॥ १३ ॥

हें पहा—जो विहित कर्माचें निष्काम बुद्धीनें आचरण करण्यामध्यें असलेल्या संपत्तीचा विनियोग करतो, १९ आपले गुरु, आप्त व अग्नि ह्यांची पूजा करतो, आणि आलेल्या ब्राह्मणाची सेवा करतो, व आपल्या पितरांच्या श्राद्धतिथि वगैरे पाळतो, १२० आणि ह्याप्रमाणें विहित कर्माचरण व पंचमहायज्ञादि करून जें यज्ञशेष बाकी राहील, २१ तें सुखानें आपण कुटुंबासह सेवन करतो, त्याच्या सर्व पातकांचा त्या यज्ञशेषसेवनामुळें

२० वारंवार. २१ कर्मानुष्ठान. २२ निरिच्छ. २३ यथाशक्ति २४ यथाकालीं. २५ पर्वकालीं. २६ हवनद्रव्यातील अवशेष, २७ पापातें, २८ दुःखें, २९ ब्रह्मनिष्ठ, ३० सांपडत नाहीं, ३१ यज्ञावशिष्ट.

दोषा ॥ २४ ॥ म्हणोनि स्वधर्में जें अर्जे । तें स्वधर्मेंचि विनियोगिजे । मग उरे तें भोगिजे । संतोषेंसीं ॥ २५ ॥ हें वांचूनि पार्था । राहाटों नये अन्यथा । ऐसी आद्य हे कथा । श्रीमुरारि सांगे ॥२६॥ ( ८३ देहात्मवादी पातकी होत, १२७-१४२) जे देहाचि आपणपें मानिती । आणि विषयांतें भोग्य म्हणती । यापरतें न स्मरती । आणिक कांहीं ॥ २७ ॥ हें यज्ञोपकरण सकळ । नेणतसाते बरळ । अहंबुद्धी केवळ । भोगूं पाहती ॥ २८ ॥ इंद्रियरुचीसारिखे । कराविती पाक निके । ते पापिये पातकें । सेविती जाण ॥२९॥ हें संपत्तिजात आघवें । हवनद्रव्य मानावें । मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥ १३० ॥ हें सांडोनियां मूर्ख । आपणपें यालागीं देख । निपजविती पाक । नानाविध ॥ ३१ ॥ जिहीं यज्ञ सिद्धी जाये । परेशा तोषु होये । तें हें सामान्य अन्न न होये । म्हणोनियां ॥ ३२ ॥ हें न म्हणावे साधारण । अन्न ब्रह्मरूप जाण । हें जीवनहेतुकारण । विश्वा यया॥३३॥

अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः । यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥
कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् । तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५

अन्वय—अन्नात् भूतानि भवति, पर्जन्यात् अन्नसंभवः, यज्ञात् पर्जन्यः भवति, यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥ ( त्व ) कर्म ब्रह्मोद्भव विद्धि, ब्रह्म अक्षरसमुद्भव, तस्मात् सर्वगत ब्रह्म यज्ञे नित्य प्रतिष्ठितम् ( अस्ति ) ॥ १५ ॥

अन्नास्तव भूतें । प्ररोह पावती समस्तें । मग पर्जन्यु या अन्नातें । सर्वत्र प्रसवे ॥३४॥ तया पर्जन्या यज्ञीं जन्म । यज्ञा प्रगटी कर्म । कर्मासि आदि ब्रह्म । वेदरूप ॥ ३५ ॥ तया वेदांतें परात्पर । प्रसवतसे अक्षर । म्हणऊनि हें चराचर । ब्रह्मबद्ध ॥ ३६ ॥ परी कर्माचिये मूर्ति । यज्ञीं अधिवासु श्रुति । ऐकें सुभद्रापति । अखंड गा ॥ ३७ ॥

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः । अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥

अन्वय—( हे ) पार्थ, एव प्रवर्तित चक्र यः इह न अनुवर्तयति, सः अघायुः इंद्रियाराम. मोघ जीवति ॥ १६ ॥

ऐसी हे आदि परंपरा । संक्षेपें तुज धनुर्धरा । सांगीतली या अध्वरा । लागूनियां ॥ ३८ ॥ म्हणूनि समूळ हा उचितु । स्वधर्मरूप क्रतु । नानुष्ठी जो मत्तु । लोकीं इये ॥ ३९ ॥ तो पातकांची राशी । जाण भार भूमीसी । जो कुकर्मे इंद्रियांसी । उपेगा गेला ॥१४०॥ ते जन्मकर्म सकळ । अर्जुना अति निष्फळ । जैसें कां अभ्रपटळ । अकाळींचें ॥ ४१ ॥ कां गळां स्तन अजेचें । तैसें जियालें देखें तयाचें । जया अनुष्ठान स्वधर्माचें । घडेचिना ॥ ४२ ॥ ( ८४ विहित कर्मांचा

१ रापादावें. २ आत्मा. ३ यज्ञाचें साहित्य. ४ न जाणून. ५ भात. ६ उत्तम प्रकारें. ७ परमेश्वरास. ८ अन्नापासून. ९ उत्पत्ति. १० निपजविती. ११ सगळ्यामध्यें श्रेष्ठ. १२ अविनाशी ब्रह्म.

नाश होतो. २२ अमृताचें सेवन केल्यापासून ज्याप्रमाणें महारोगाचा नाश होतो, त्याप्रमाणें यज्ञावशिष्ट अन्नाचें सेवन केल्यानें त्याचीं दुःखें नाहीतशीं होतात. २३ जशी ब्रह्मनिष्ठाला भ्रांतीपासून बाधा होत नाही, तशी, जो हें यज्ञावशिष्ट अन्न सेवन करतो, त्याला दोपापासून बाधा होत नाहीं २४ म्हणून, स्वधर्मानें संपादन केलेलें द्रव्य स्वधर्मानेंच खर्चावें आणि बाकी राहील त्याचा संतोषानें उपभोग घ्यावा. २५ श्रीमुरारि सांगतातः—पार्था अशी ही आद्यस्थिति आहे; ह्याशिवाय मनुष्यानें अन्य मार्गानें वागू नये. २६ जे पुरुष आपल्या शरिरासच आत्मा असें मानतात, विषयांचें सेवन हीच भोग्यवस्तु असें मानून त्याशिवाय दुसरें कांहीं जाणत नाहींत, २७ हें सर्व साहित्य यज्ञसंबंधीं आहे हें न जाणून जे भ्रांतींत असतात आणि अहंकारबुद्धीनें फक्त विषयोपभोगावरच ज्यांची दृष्टि असते, २८ जे आपणांस आवडणारीं उत्तम पक्वान्नें तयार करून आपणच त्यांचें सेवन करतात, ते पापी असून पातकांचेंच सेवन करतात असें जाण. २९ ही सर्व संपत्ति स्वधर्मरूप यज्ञाचें हवनद्रव्य आहे, असें समजून ती स्वधर्मयज्ञानेंच परमेश्वरास अर्पण करावी. १३० हें सर्व सोडून मूर्ख लोक आपल्याकरितांच नानाप्रकारचे पदार्थ तयार करवितात. ३१ ज्या अन्नापासून यज्ञाची सिद्धि होते आणि परमेश्वर संतुष्ट होतो, तें हें अन्न सामान्य नाही; म्हणून ३२ ह्या अन्नाला साधारण असें न समजता तें ब्रह्मरूप आहे असें समज. कारण, सर्व जगाचें हें जीवित होय. ३३

अन्नापासून भूतजात उत्पन्न होते; तें अन्न पर्जन्यापासून होतें; तो पर्जन्य यज्ञापासून होतो; व तो यज्ञ कर्मापासून उत्पन्न होतो. ॥ १४ ॥ कर्म वेदापासून उत्पन्न होतें असें तूं समज. वेद परमेश्वरापासून उत्पन्न होतात; म्हणून सर्वगत जे वेद ते स्वधर्मरूप यज्ञात नित्य वास करितात. ॥ १५ ॥

अन्नापासून प्राणिमात्राची उत्पत्ति होते, आणि पर्जन्यापासून सर्व ठिकाणीं अन्न उत्पन्न होतें. ३४ त्या पर्जन्याची उत्पत्ति यज्ञापासून, आणि यज्ञाची कर्मापासून होते; कर्माची उत्पत्ति वेदरूप ब्रह्मापासून, ३५ आणि त्या वेदाची उत्पत्ति परात्पर अविनाशी ब्रह्मापासून होते; म्हणून हें सर्व जग ब्रह्मापासून उत्पन्न झालेलें आहे. ३६ पण; हे सुभद्रापते, ऐकः कर्माची मूर्ति जो यज्ञ, त्यांत वेदब्रह्म निरंतर वास करितें. ३७

पार्था, अशा प्रकारें चालू असलेल्या चक्राला अनुसरून जो ह्या लोकीं वागत नाहीं, त्याचें जिणें व्यर्थ होय. म्हणून, तो इंद्रियलंपट होऊन आपलें आयुष्य व्यर्थ घालवितो. ॥ १६ ॥

ह्याप्रमाणें धनुर्धरा, ह्या स्वधर्मरूप यज्ञाची मूळ पीठिका तुला संक्षेपानें सांगितली. ३८ म्हणून जो उन्मत्त पुरुष उचित अशा ह्या स्वधर्मरूप यज्ञाचें ह्या लोकी आचरण करीत नाहीं, ३९ तसेंच जो दुराचरणाकडे इंद्रियाचा उपयोग करितो, तो पापराशि भूमीला केवळ भारभूत आहे असें समज. १४० ज्याप्रमाणें अकाळीं आकाशात आलेले ढग निरुपयोगी असतात, त्याप्रमाणें अर्जुना, या उन्मत्त मनुष्याची सर्व जन्मांतील कर्मे

१३ ईश्वरापासून उत्पन्न झालेलें. १४ मालिका. १५ स्वधर्मयज्ञ. १६ यज्ञ. १७ उन्मत्त. १८ इंद्रियाचा उपयोग करू लागला, १९ ढगांचे. २० जीवित.

कंटाळा करतात ते मूर्ख, १४३-१४५) म्हणोनि ऐकें पांडवा। हा स्वधर्मु कवणें न संडावा। सर्वभावें भजावा। हाचि एकु ॥ ४३ ॥ हां गा शरीर जरी जाहलें। तरी कर्तव्य वोघें आलें। मग उचित कां आपुलें। वोसंडावें ॥ ४४ ॥ परिस पां सव्यसाची। मूर्ति लाहोनि देहाची। खंती करिती कर्माची। ते गांवढे गा ॥ ४५ ॥

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः। आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥१७॥

अन्वय—यः तु मानवः आत्मरतिः एव स्यात् च आत्मतृप्तः (स्यात्), च आत्मनि एव संतुष्टः (स्यात्), तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥

(८५ स्वधर्मानें आत्मज्ञानप्राप्ति होते, कर्मबंध होत नाहीं व कर्तव्यही उरत नाही, १४६ ते १५१) देखें असतेनि देहधर्मे। एथ तोचि एक न लिंपे कर्में। जो अखंडित रमे। आपणपांचि ॥ ४६ ॥ जे तो आत्मबोधें तोषला। तरी कृतकार्य देख जाहला। म्हणोनि सहजें सांडवला। कर्मसंगा ॥ ४७ ॥

नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन। न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥

अन्वय—इह तस्य कृतेन अर्थः न एव, अकृतेन (अपि) कश्चन (अर्थः) न, च सर्वभूतेषु अस्य कश्चित् अर्थव्यपाश्रयः न ॥ १८ ॥

तृप्ति जालिया जैसीं। साधनें सरतीं आपैसीं। देखें आत्मतुष्टी तैसीं। कर्म नाहीं ॥ ४८ ॥ जंववरी अर्जुना। तो बोधु भेटेना मना। तंवचि यया साधनां। भजावें लागे ॥ ४९ ॥

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर। असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥

अन्वय—तस्मात् (त्व) असक्तः (सन्) कार्यं कर्म समाचर पुरुषः हि असक्तः (सन्) कर्म आचरन् परं आप्नोति ॥ १९ ॥

म्हणऊनि तूं नियतु। सकळ कामरहितु। होऊनियां उचितु। स्वधर्मे राहाटे ॥१५०॥ जे स्वधर्मे निष्कामता। अनुसरले पार्था। ते कैवल्यपद तत्त्वता। पावले जगीं ॥ ५१ ॥

कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः। लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥

अन्वय—जनकादयः कर्मणा एव संसिद्धिं आस्थिताः हि, (त्वं) अपि लोकसंग्रहं एव संपश्यन् (कर्म) कर्तुं अर्हसि ॥ २० ॥

(८६ स्वकर्मानें संसिद्धि प्राप्त होते, लोकसंग्रह होतो; त्याबद्दल जनकाचे व श्रीकृष्णाचे उदाहरण; १५२ ते १७१) देख पां जनकादिक। कर्मजात अशेख। न सांडितां मोक्षसुख। पावते जाहले ॥ ५२ ॥ याकारणें पार्था। होआवी कर्मी आस्था। हे आणिकाही एका अर्था। उपकारेल ॥ ५३ ॥ जे आचरतां आपणपयां। देखी लागेल लोका यया। तरी चुकेल अपाया। प्रसंगेंचि ॥ ५४ ॥

१ प्रवाहानें. २ टाकावें. ३ दोन्ही हातानीं बाण सोडणाऱ्या अर्जुना. ४ प्राप्त होऊन. ५ अडाणी.

निष्फल होत. ४१ ज्याला स्वधर्माचें अनुष्ठान घडत नाहीं, त्याचें जिणे शेळीच्या गळ्यातील स्तनाप्रमाणें व्यर्थ होय. ४२ म्हणून पांडवा, ऐकः हा स्वधर्म कोणीं सोडूं नये, आणि सर्वभावानें ह्याचेंच आचरण करावें. ४३ पहा कीं, शरीर ( मनुष्यदेह ) जरी प्राप्त झालें आहे, तरी पूर्व कर्मानुसारच झालें आहे; असें असून, मग त्यानें आपलें उचित तें कर्म कां करूं नये ? ४४ हे सव्यसाची, हा मनुष्यदेह प्राप्त झाला असतां कर्म करण्याची ज्यांना खंती येते, ते मूर्ख असें समज. ४५

परंतु जो आत्म्याचेच ठिकाणीं रममाण झालेला आहे, व आत्मसुखानें तृप्त झाला असून आत्मानंदानेंच संतुष्ट आहे, त्याला कांहीं कर्तव्य उरत नाहीं. ॥ १७ ॥

हें पहा कीं, देहाचे व्यापार चालले असूनही त्या कर्मामध्यें एक तोच लिप्त होत नाहीं, कीं जो सदैव आत्मस्वरूपीं रममाण असतो. ४६ कारण, तो आत्मबोधानें संतोष पावलेला असल्यामुळें कृतकार्यच झालेला असतो, म्हणून सहजींच कर्मसंगापासून मुक्त होतो. ४७

ह्या लोकीं कर्म केल्यापासून त्याला कांहीं लाभ नसतो, तसेंच कर्म न केल्यापासूनही त्याची कांहीं हानि होत नाहीं; व कोणत्याही प्राण्यापासून त्याचें कसलेंही कार्य साधावयाचें नसतें ॥ १८ ॥

ज्याप्रमाणें तृप्ति झाल्यावर तिचीं साधनेंही आपोआप संपतात, त्याप्रमाणें स्वस्वरूपानंदांत निमग्न झाल्यावर कर्मेंही उरत नाहींत. ४८ अर्जुना, जोंपर्यंत हें आत्मज्ञान झालें नाहीं, तोंपर्यंतच ह्या साधनांचें आचरण करावें लागतें. ४९

ह्या कारणास्तव, फलाची इच्छा टाकून तू नेहमीं विहित कर्म कर. कारण फलाविषयीं निष्काम असणारा पुरुष विहित कर्मांच्या आचरणानें–चित्तशुद्धीमुळें–परमपद प्राप्त करून घेतो ॥ १९ ॥

म्हणून, नेहमीं फलाची आशा सोडून देऊन तूं उचित अशा आपल्या धर्माचें आचरण कर. १५० पार्था, ह्या जगात खरोखर ज्यानीं स्वधर्माचें आचरण निष्कामबुद्धीनें केलें, ते मोक्षपदास गेले. ५१

जनकादिक ज्ञानी कर्मच करून मुक्त झाले; आणि लोकहिताकडे लक्ष देऊन तुलाही कर्मच करणें योग्य आहे. ॥ २० ॥

हें पहा कीं, कर्मांचा मुळींच त्याग न करिता जनकादिक मोक्षपदास गेले. ५२ ह्याकरिता पार्था, कर्माचे ठिकाणीं तूं आस्था ठेव. कारण तिच्यापासून आणखीही एक उपयोग होणार आहे; ५३ त्या कर्माचें आपण आचरण केलें असता ह्या लोकाना वळण लागेल, आणि त्यामुळें त्याचीं दु.खें अनायासें नाहींतशीं होतील. ५४ असें पहा कीं, जे कृतार्थ झाल्यामुळें ज्याना कशाचीच गरज उरली नाहीं, त्यानीं देखील लोकाना वळण

६ करीत असून. ७ मुकला. ८ स्वरूपानंदांत. ९ ज्ञान १० आचरावें. ११ सदोदित. १२ मोक्षपद. १३ संपूर्ण. १४ उपयोगी पडेल. १५ आपण स्वतः. १६ मार्ग, चाल, रीत. १७ दुःख.

देखें मोक्षार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयांही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥ ५५ ॥ मार्गी अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा । अज्ञाना प्रकटावा धर्मु तैसा । आचरोनि ॥ ५६ ॥ अवतरणः—हां गा ऐसें जरी न कीजे । तरी अज्ञानां काय उमजे । तिहीं कवणेपरी जाणिजे । मार्गातें या ॥ ५७ ॥

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः । स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥

अन्वय—यत् यत् श्रेष्ठः आचरति, तत् तत् एव इतरः जनः ( आचरति ); सः यत् प्रमाण कुरुते, लोकः तत् अनुवर्तते ॥ २१ ॥

एथ वडील जें जें करिती । तया नाम धर्मु ठेविती । तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ ५८ ॥ हें ऐसें असे स्वभावें । म्हणोनि कर्म न संडावें । विशेषें आचरावें । लागे संतीं ॥ ५९ ॥

न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन । नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥२२

अन्वय—हे पार्थ, ( यद्यपि ) मे त्रिषु लोकेषु किंचन कर्तव्यं न अस्ति च अनवाप्त अवाप्तव्यं न ( अस्ति, तथापि ) अहं कर्मणि एव वर्ते ॥ २२ ॥

आतां आणिकाचिया [१] गोठी । कायशा सांगों किरीटी । देखें मीचि इये राहाटी । वर्तत असें ॥ १६० ॥ काय [२] सांकडें कांहीं मातें । कीं कवणें एकें आर्तें । आचरें मी धर्मातें । म्हणसी जरी ॥ ६१ ॥ तरी पुरतेपणालागीं । आणिक दुसरा नाहीं जगीं । ऐसी सामग्री माझ्या आंगीं । जाणसी तूं ॥ ६२ ॥ मृत गुरुपुत्र आणिला । तो तुवां पैवाडा देखिला । तोही मी उगला । कर्मी वर्ते ॥ ६३ ॥

यदि ह्यहं न वर्तेय जातु कर्मण्यतन्द्रितः । मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥

अन्वय—यदि हि अहं अतन्द्रितः ( सन् ) कर्मणि जातु न वर्तेय, ( तर्हि हे ) पार्थ, मनुष्याः सर्वशः मम वर्त्म अनुवर्तन्ते ( तेपि कर्म न कुर्युः ) ॥ २३ ॥

परी स्वधर्मी वर्ते कैसा । सकांमु कां होय जैसा । तयाचि एका उद्देशा । लागोनियां ॥ ६४ ॥ जे भूतजात सकळ । असे आम्हांचि आधीन केवळ । तरी न व्हावें वैकळ । म्हणोनियां ॥ ६५ ॥

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् । संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः २४

अन्वय—अहं कर्म न कुर्यां चेत् इमे लोकाः उत्सीदेयुः, संकरस्य कर्ता स्यां; इमाः प्रजाः उपहन्यां च ॥ २४ ॥

आम्ही पूर्णकाम होऊनी । जरी आत्मस्थिती [१४] राहुनी । तरी प्रजा हे कैसेनी । निस्तरैल ॥ ६६ ॥ इहीं आमुची वास पाहावी । मग वर्तती पैरी जाणावी । ते लोकस्थिति [१८] आघवी । नासिली होईल ॥६७॥ अवतरणः—म्हणोनि समर्थु जो एथें । आथिला सर्वज्ञते । तेणें सविशेषें कर्मातें । त्यजावें ना ॥ ६८ ॥

१ पूर्ण मनोरथ. २ डोळस. ३ वळण लागेल. ४ गोष्ट. ५ सकट. ६ इच्छेनें. ७ पूर्णपणानें. ८ सामर्थ्य. ९ सांदीपनीचा मुलगा. १० पराक्रम. ११ निरिच्छ. १२ साभिलाष कामीजन. १३

लागण्याकरितां कर्माचें आचरण केलें पाहिजे. ५५ आंधळ्यांच्या रांगेंतील पुढारी डोळस मनुष्य जसा त्यांच्याप्रमाणेंच मार्ग चालतो, त्याप्रमाणें ज्ञान्यांनीं स्वतः धर्माचें आचरण करून अज्ञानी जनांस मार्गास लावावें. ५६ जर ज्ञान्यांनी अशा प्रकारचें वर्तन न केलें, तर अज्ञानी लोकांस कसें वळण लागेल ? आणि त्यांना हा मार्ग कोणच्या उपायानें समजेल ? ५७

श्रेष्ठ पुरुष जें जें कर्म आचरण करितो, तें तेंच कर्म इतर लोक करितात; आणि तो पुरुष जें प्रमाण ठरवितो, त्याचेंच लोक अनुकरण करतात. ॥ २१ ॥

ह्या लोकीं श्रेष्ठ लोक जें आचरण करतात, त्यालाच धर्म असें नाव ठेवून इतर सर्व लोक त्याचेंच आचरण करितात. ५८ ही गोष्ट साहाजिक असल्यामुळें, कर्माचा त्याग करितां येत नाहीं; आणि साधूसंतांना तर कर्माचें आचरण विशेषेंकरून करावें लागतें. ५९

पार्था, त्रैलोक्यामध्यें मला काहीं करावयाचें आहे, अथवा काहीं अप्राप्य प्राप्त करून घ्यावयाचें आहे, असें नाहीं; तथापि ( लोकसंग्रहाकरिता ) मी कर्म करितोंच ॥ २२ ॥

आतां, हे किरीटी ! दुसऱ्यांच्या गोष्टी कशाला सांगूं ? मी स्वतांच ह्या कर्ममार्गानें वागतों हें पहा ना ! १६० आतां, मला कांही तरी एखादें संकट पडलें असेल, किंवा कोणती तरी इच्छा असेल, म्हणून मी स्वधर्माचें आचरण करतों, असें ,जर तूं म्हणशील, ६१ तर ह्या जगांत माझ्याइतका गुण व ऐश्वर्य ह्यांनी संपन्न दुसरा कोणी नाहीं, हें माझें सामर्थ्य तुला माहीत आहेच; ६२ सांदीपनि गुरूचा मेलेला मुलगा मी आणून दिला तो पराक्रम तूं पाहिलास; पण असाही जो मी निरिच्छ, तो सुद्धां कर्ममार्गाचें आचरण करीत आहें. ६३

पार्था, जर मी आळस टाकून कर्माचें आचरण करणार नाहीं, तर हे सर्व लोक सर्वांशीं माझ्या मार्गाला अनुसरून चालूं लागतील. ( तेही कर्म करणार नाहींत. ) ॥ २३ ॥

परंतु त्या एका उद्देशाकरिता मी स्वधर्माचें आचरण अशा प्रकारें करतों, की जसा कांहीं सकाम पुरुषच ! ६४ कारण, सर्व प्राणी आमच्यावरच अवलंबून आहेत, तेव्हां त्यांनीं कर्मभ्रष्ट होऊं नये. ६५

जर मी कर्म करणार नाहीं, तर सर्व प्रजेचा नाश केल्याचा दोष मलाच लागेल; प्रजेचा वर्णसंकर मीं केला असें होईल; व सर्व लोकाना मारणारा मी होईन ॥ २४ ॥

आम्ही निरिच्छ होऊन जर ब्रह्मस्वरूपातच निमग्न झालों, तर मग प्रजांनी कोणत्या रीतीनें वागावें ? ६६ आमचें वर्तन पाहून जर ह्या प्रजा त्याचप्रमाणें वागूं लागल्या, तर ह्या जगाची सारी राहाटी इथून तिथून बिघडून जाईल. ६७ म्हणून. जो समर्थ व सर्वज्ञानसंपन्न असेल, त्यानें विशेषेंकरून कर्माचा त्याग कधींही करूं नये. ६८

मुळें. १४ ब्रह्मस्वरूपात निमग्न. १५ पार पडेल, करवेल. १६ वाट. १७ वागणुकीचा किस्ता. १८ राहाटी. १९ संपन्न.

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वंति भारत। कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम्२५

अन्वय—हे भारत, अविद्वांसः यथा कर्मणि सक्ताः ( सन्तः कर्म ) कुर्वन्ति, तथा लोकसंग्रहं चिकीर्षुः विद्वान् ( कर्मणि ) असक्तः ( सन् कर्म ) कुर्यात्. ॥ २५ ॥

देखें फळाचिया आशा। आचरे कामुकु जैसा। कर्मी भरु होआवा तैसा। निराशाही ॥ ६९ ॥ जे पुढतेंपुढती पार्था। हे सकळ लोकसंस्था। रक्षणीय सर्वथा। म्हणऊनियां ॥ १७० ॥ अवतरणः—मार्गाधारें वर्तावें। विश्व हें मोहरे लावावें। अलौलिका नोहावें। लोकांप्रति ॥ ७१ ॥

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम्। जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन्॥२६॥

अन्वय—विद्वान् कर्मसंगिना अज्ञाना बुद्धिभेदं न जनयेत्, ( किंतु ) युक्तः समाचरन् सर्वकर्माणि जोषयेत् ॥ २६ ॥

( ८७ अज्ञजनांचा बुद्धिभ्रंश करू नये, १७२ ते १७६ ) जें सायासें स्तन्य सेवी। तें पक्वान्नें केवीं जेवी। म्हणोनि बाळका जैसीं नेदावीं। धनुर्धरा ॥ ७२ ॥ तैसी कर्मी जयां अयोग्यता। तयांप्रति नैष्कर्म्यता। न प्रगटावी खेळतां। आदिकरुनी ॥ ७३ ॥ तेथें सत्क्रियाचि लावावी। तेचि एकी प्रशंसावी। नैष्कर्मींहि दावावी आचरोनि ॥७४॥ तया लोकसंग्रहालागीं। वर्ततां कर्मसंगीं। तो कर्मबंधु आंगीं। बाजेलना ॥ ७५ ॥ जैसी बहुरूपियांची रावो-राणी। स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं। परी लोकसंपादणी। तैसीच करिती ॥ ७६ ॥

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः। अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते॥२७

अन्वय—प्रकृतेः गुणैः सर्वशः ( अपि ) कर्माणि क्रियमाणानि ( सन्ति ); अहंकारविमूढात्मा ' अहं कर्ता ' इति मन्यते ॥ २७ ॥

( ८८ प्रकृतीचीं कर्मे, अज्ञानी मी करितों असें म्हणतो, १७७ ते १७८ ) देखें पुढिलांचें वोझें। जरी आपुला माथां घेइजे। तरी सांगें कां न दाटिजे। धनुर्धरा ॥ ७७ ॥ तैसीं शुभाशुभें कर्मे। जियें निपजती प्रकृतिधर्मे। तियें मूर्ख मतिभ्रमें। मी कर्ता म्हणे ॥ ७८ ॥ ( ८९ अहंकारारूढ झालेल्याला गूढ परमार्थ सागूं नये, १७९ ) ऐसा अहंकाराधिरूढ। एकदेशी मूढ। तया हा परमार्थ गूढ। प्रगटावा ना ॥७९॥ ( ९० तत्त्ववेत्ता प्रकृतीचीं कर्मे आपल्या शिरावर घेत नाहीं, १८०-१८३ ) अवतरणः—हें असो प्रस्तुत। सांगिजेल तुज हित। तें अर्जुना देऊनि चित्त। अवधारीं पां ॥१८०॥

तत्त्वविंतु महाबाहो गुणकर्मविभागयोः। गुणा गुणेषु वर्तंत इति मत्वा न सज्जते ॥२८॥

अन्वय—(हे) महाबाहो, गुणकर्मविभागयोः तत्त्ववित् तु गुणाः गुणेषु वर्तन्ते इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥

जे तत्त्वज्ञानियांच्या ठायीं। तो प्रकृतिभावो नाहीं। जेथ कर्मजात पाहीं।

---

१ तत्परता, आवड. २ निरिच्छास देखील. ३ वारंवार. ४ पाळली पाहिजे. ५ आपल्याकडेस. ६ आसक्त. ७ देऊ नये. ८ कर्मातीतता. ९ थट्टेनें, उगीच. १० देखील. ११ निष्काम,जनानींही.

हे भारत, जसे अविद्वान लोक कर्मफलाच्या ठिकाणीं सक्त होऊन कर्म करितात, तसें विद्वानानीं फलाची इच्छा न धरता लोकसंग्रहार्थ कर्म करावें ॥ २५ ॥

ज्याप्रमाणें फलेच्छु लोक फलावर लक्ष ठेवून कर्माचें आचरण करितात, त्याप्रमाणें निरिच्छ पुरुषानें देखील कर्में करण्याची हाव धरिली पाहिजे. ६९ कारण, पार्था, वारंवार उत्पन्न होणाऱ्या प्राण्यांचा धर्म सर्व प्रकारें राखला पाहिजे; म्हणून, १७० कर्ममार्गाचें आचरण करून जगाचें मन आपले आचरणाकडे लावून घ्यावें; परंतु लोकांचे ठिकाणीं आसक्ति ठेवूं नये. ७१

विद्वान मनुष्यानें फलाच्या आशेनें कर्म करणाऱ्या अज्ञानी लोकांचा बुद्धिभेद करूं नये; तर उलट त्या कर्माचें आपण निष्काम बुद्धीनें आचरण करून त्याना कर्म करण्याविषयीं अभिरुचि उत्पन्न करावी ॥ २६ ॥

धनुर्धरा, जें मूल स्तनपान देखील मोठ्या आयासानें करितें, तें पक्वान्नें कसें बरें खाणार? म्हणून त्याला ज्याप्रमाणें तीं देऊं नयेत, ७२ त्याचप्रमाणें, कर्माचरण करण्यास जो अधिकारी आहे, त्याला ज्ञानमार्गाची थोरवी थट्टेंत सुद्धां सांगूं नये. ७३ त्याला सत्कर्माचेंच आचरण करण्यास लावावें, त्याचीच एकट्याची प्रशंसा करावी, आणि निष्काम जनांनींही स्वतः त्याचें आचरण करून दाखवावें. ७४ वर्णाश्रमधर्मरक्षणाकरितां कर्ममार्गाचें आचरण करीत असतां, त्यांना कर्मबंध भोगावा लागणार नाहीं. ७५ बहुरूप्यांनीं जरी राजाराणींचीं सोंगें घेतलीं, तरी त्यांच्या मनांत स्त्री-पुरुषभाव मुळींच नसतो; पण लोकांची समजूत मात्र ते तशी करितात. ७६

सर्व कर्में सर्व प्रकारें प्रकृतीच्या गुणानीं होत असूनही, अहंकारानें ज्याचें मन मोहित झालें आहे असा मनुष्य तीं कर्में 'मीं केलीं' असें मानतो ॥ २७ ॥

अर्जुना, असें पहा कीं, दुसऱ्याचें ओझें आपल्या डोक्यावर जर घेतलें, तर आपली मान नाहीं का अवघडणार? ७७ त्याचप्रमाणें, जीं बरी वाईट कर्में प्रकृतीच्या गुणांनीं उत्पन्न होतात, त्यांचा कर्ता मी असें वेडे लोक अहंकारानें म्हणतात. ७८ असा जो अहंकारानें भरलेला व एकदेशी अज्ञानी, त्याला हें गहन आत्मज्ञान सांगूं नये. ७९ पण, अर्जुना, सध्यां हें राहूं दे. मी तुला एक हिताची गोष्ट सांगणार आहें, ती तूं लक्षपूर्वक ऐक. १८०

हे महाबाहो! सत्त्वादि गुणकर्मेंद्रियाच्या विभागाचें तत्त्व जाणणारा तर, गुण हे गुणांचे ठिकाणीं म्हणजे इंद्रियें विषयाचे ठिकाणीं राहतात असें मानून, त्याचे ठिकाणीं आसक्त होत नाहीं ॥ २८ ॥

ज्या ठिकाणीं सर्व कर्में उत्पन्न होतें, तो प्रकृतीचा विकार ज्ञान्यांचे ठिकाणीं मुळींच

१२ वर्णाश्रमधर्मसंरक्षणासाठीं. १३ लागणार नाहीं. १४ राजा. १५ लोकाची समजूत. १६ दुसऱ्याचें. १७ मान अवघडेल. १८ माया.

निपजत असे ॥ ८१ ॥ ते देहाभिमानु सांडुनी । गुणकर्मे वोलांडुनी । साक्षिभूत होउनी । वर्तती देहीं ॥ ८२ ॥ म्हणुनि शरीरी जरी होती । तरी कर्मबंधा नातळती । जैसा कां भूतचेष्टा गभस्ती । घेपवेना ॥ ८३ ॥

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जंते गुणकर्मसु । तानकृत्स्नविदो मंदान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥२९॥

अन्वय—प्रकृतेः गुणसंमूढाः गुणकर्मसु सज्जन्ते, कृत्स्नवित् तान् अकृत्स्नविदः मन्दान् न विचालयेत् ॥ २९ ॥

( ९१ प्रकृतीचीं कर्मे मी करितों असें म्हणणारा मूर्ख, १८४–१८५ ) एथ कर्मी तोचि लिंपे । जो गुणसंभ्रमें घेपे । प्रकृतीचेनि आटोपें । वर्ततु असे ॥ ८४ ॥ इंद्रियें गुणाधारें । राहाटती निजव्यापारें । तें परकर्म बलात्कारें । आपादी जो ॥ ८५ ॥

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा । निराशीर्निर्ममो भूत्वा युद्धयस्व विगतज्वरः

अन्वय—सर्वाणि कर्माणि अध्यात्मचेतसा मयि संन्यस्य निराशीः निर्ममः विगतज्वरः भूत्वा युद्धयस्व ॥ ३० ॥

( ९२ ईश्वराचे ठिकाणीं सर्व कर्मांचा संन्यास करून युद्ध कर, १८६–१९१ ) तरी उचितें कर्मे आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं । परी चित्तवृत्ति विन्यासावी । आत्मरूपीं ॥ ८६ ॥ आणि हें कर्म मी कर्ता । कां आचरेन यें अर्था । ऐसा अभिमान झणें चित्ता । रिघों देसी ॥ ८७ ॥ तुवां शरीरपरा नोहावें । कामनाजात सांडावें । मग अवसरोचित भोगावे । भोग सकळ ॥ ८८ ॥ आतां कोदंड घेऊनि हातीं । आरूढ पां इये रथीं । देईं आलिंगन वीरवृत्ती । समाधानें ॥ ८९ ॥ जगीं कीर्ति रूढवीं । स्वधर्माचा मानु वाढवीं । ईयां भारापासोनि सोडवीं । मेदिनी हे ॥ १९० ॥ आतां पार्था निःशंकु होईं । या संग्रामा चित्त देईं ॥ एथ हेंवांचूनि कांहीं । बोलों नये ॥ ९१ ॥

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः । श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ॥३१

अन्वय—ये मानवाः श्रद्धावंतः अनसूयन्तः ( संतः ) इदं मे मतं नित्यं अनुतिष्ठन्ति, ते अपि कर्मभिः मुच्यन्ते ॥ ३१ ॥

( ९३ श्रद्धेनें अनुष्ठान करील तो कर्मबंधांतून सुटेल, १९२–१९३ ) हें अनुपरोध मत माझें । जिहीं परमादरें स्वीकारिजे । श्रद्धापूर्वक अनुष्ठिजे । धनुर्धरा ॥ ९२ ॥ तेही सकळ कर्मी वर्ततु । जाण पां कर्मरहितु । म्हणोनि हें कर्म निश्चितु । करणीय गा ॥ ९३ ॥

ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम् । सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥३२॥
सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि । प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥३३

अन्वय—ये तु एतत् अभ्यसूयंतः ( संतः ) मे मतं न अनुतिष्ठंति, तान् सर्वज्ञानविमूढान् अचेतसः नष्टान् विद्धि ॥ ३२ ॥ ज्ञानवान् अपि स्वस्याः प्रकृतेः सदृशं चेष्टते, भूतानि प्रकृतिं यांति; निग्रहः किं करिष्यति ? ॥ ३३ ॥

नसतो. ८१ ते ज्ञानी देहाचा अभिमान सोडून व गुणकर्मातीत होऊन देहांत फक्त साक्षित्वानें वागतात. ८२ म्हणून, सूर्य ज्याप्रमाणें जगतावर प्रकाश पाडीत असून जगाच्या कर्मांनीं लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें ते जरी देह धारण करितात, तरी देहकर्मांनीं बद्ध होत नाहीत. ८३

प्रकृतीच्या गुणांनीं जे मोहित झाले आहेत, ते गुणांनीं केलेल्या कर्मांच्या ठिकाणीं सक्त होतात. अशा मंदबुद्धि व अल्पज्ञ लोकाचा ज्ञानी मनुष्यानें बुद्धिभेद करूं नये ॥ २९ ॥

प्रकृतीच्या अधीन होऊन जो वागतो, गुणांच्या सपाट्यांत सांपडतो, तोच कर्मानें लिप्त होतो. ८४ इंद्रियें गुणांच्या अधीन होऊन आपआपल्या व्यापारांत वर्तत असतां, तें दुसऱ्याचें कर्म मीच करतों असें तो मुद्दाम अंगावर घेतो. ८५

अर्जुना, माझ्या ठायीं विचारयुक्त अंतःकरणानें सर्व कर्में अर्पण कर; कर्मफलाचे ठिकाणीं आशा धरू नको; आणि शोकरहित होऊन युद्ध कर ॥ ३० ॥

म्हणून सर्व विहित कर्मांचें आचरण करून त्यां ती मला अर्पण करावीं, पण चित्तवृत्ति मात्र सदैव आत्मस्वरूपीं ठेवावी. ८६ ह्या कर्मांचा मी कर्ता आहें, आणि अमुक फळासाठीं हें मी करीत आहें, असा अभिमान तूं आपल्या चित्तांत उत्पन्न होऊं देऊं नको. ८७ तूं शरिराच्या स्वाधीन न होतां सर्व इच्छा सोडून दे, आणि मग सकल भोग यथाकालीं भोग. ८८ आतां हातांत धनुष्य घेऊन ह्या रथावर बैस, आणि समाधान ठेवून व मायामोह सोडून वीरवृत्तीचा स्वीकार कर. ८९ जगात तूं आपली कीर्ति वाढीव; स्वधर्माचा महिमा वाढीव आणि ( दुर्योधनादिक दैत्याच्या ) या भारापासून ह्या पृथ्वीला सोडीव. १९० पार्था, आतां तूं निःशंक होऊन ह्या युद्धाचे ठिकाणी लक्ष दे; ह्याशिवाय दुसरें कांहीं बोलूं नको. ९१

जे लोक निंदा न करिता श्रद्धेनें माझ्या ह्या मताचे नेहमीं अनुष्ठान करतात, ते देखील कर्मबंधापासून मुक्त होतात ॥ ३१ ॥

अर्जुना, ह्या माझ्या निश्चित मताचा जे मोठ्या आदरानें स्वीकार करून त्याचें श्रद्धापूर्वक आचरण करतील, ९२ ते देखील सकल कर्मांचें आचरण करून कर्मरहित आहेत असें जाण. म्हणून, हें माझें मत निश्चयानें आचरण्यास योग्य आहे. ९३

जे ह्या माझ्या मताची निंदा करून त्याचें अनुष्ठान करीत नाहींत, ते लोक ज्ञानविहीन, मूर्ख व चित्तभ्रष्ट झाले असें जाण ॥ ३२ ॥ ज्ञाता देखील आपल्या स्वभावाला अनुसरून वागतो, सर्व भूतेंही आपल्या स्वभावाला अनुसरून वागतात, तर येथें निश्चयाचें काय चालणार ? ॥ ३३ ॥

१ बद्ध होत नाहींत. २ सूर्य. ३ लिप्त होत नाहीं. ४ गुणाच्या सपाट्यात. ५ सापडणें. ६ स्वाधीन होऊन. ७ स्वीकारी. ८ विहित. ९ ठेवावी, योजावी. १० फळासाठीं. ११ नको. १२ सक्त. १३ सर्व हेतु. १४ यथाकाल. १५ धनुष्य. १६ शौर्य. १७ वाढीव. १८ ह्या दुर्योधनादिकाच्या, १९ पृथ्वी. २० निश्चित. २१ आचरितात. २२ करण्यास योग्य.

( ९४. ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म न करणाराचा नाश होईल, १९४–२०१ ) नातरी प्रकृतिमंतु[1] होउनी । इंद्रियां लळा[2] देउनी । जे हें माझें मत अव्हेरुनी । वोसंडिती ॥ ९४ ॥ जे सामान्यत्वें लेखिती । अवज्ञा करूनि देखिती । कां हा अर्थवादु[3] म्हणती । वाचाळपणें ॥ ९५ ॥ ते मोहमदिरें[4] भुलले । विषयविखें घोंटले[5] । अज्ञानपंकीं[6] बुडाले । निभ्रांत मानीं ॥ ९६ ॥ देखें शवाच्या[7] हातीं दिधलें । जैसें कां रत्न वायां गेलें । नातरी जात्यंधा पाहलें । प्रमाण नोहे[8] ॥ ९७ ॥ कां चंद्राचा उदयो जैसा । उपयोगा नव्हे वायसा[9] । मूर्खा विवेकुं[10] हा तैसा । रुचेल ना ॥ ९८ ॥ तैसे जे पार्था । विमुखें[11] या परमार्था । तयांसी संभाषणंही सर्वथा । करावें ना ॥ ९९ ॥ म्हणोनि ते न मानिती । आणि निंदाही करूं लागती । सांगें पतंगु काय साहती । प्रकाशातें ॥ २०० ॥ पतंगा दीपीं आलिंगन । तेथ त्यासी अचुक मरण । तेविं विषयाचरण । आत्मघाता ॥ १ ॥

( ९५. ज्ञात्यांनीं इंद्रियांचे लाड करूं नयेत, २०२–२०४ ) म्हणोनि इंद्रियें एकें । जाणतेनि पुरुखें[12] । लाळावीं[13] ना कौतुकें । आदिकरुनी[14] ॥ २ ॥ हां गा सर्पेंसीं खेळों येईल । कीं व्याघ्रेंसंसर्गे[15] सिद्धि जाईल । सांगें हाळाहाळ जिरेल । सेविलिया काई ॥ ३ ॥ देखें खेळतां अग्नि लागला । मग तो न सांवरे जैसा उधवला[16] । तैसा इंद्रियां लळा दिधला । भला नोहे ॥ ४ ॥ ( ९६. शरीर कर्माधीन आहे, म्हणून जीवांनीं सुखदु:खाकरितां कष्ट करूं नयेत, २०५–२०९ ) येरवीं तरी अर्जुना । या शरीरा पराधीना । कां नाना भोगरचना[17] । मेळवावी ॥ ५ ॥ आपण सायासें करूनि बहुतें । सकळही समृद्धिजातें । उदोअस्तु[18] या देहातें । प्रतिपाळावें कां ॥ ६ ॥ सर्वस्वें शिणोनि एथें । ओंजवावीं[19] संपत्तिजातें । तेणें स्वधर्मु सांडूनि देहातें । पोखावें काई ॥ ७ ॥ मग हें तंव पांचमेळावा । शेखीं अनुसरेल पंचत्वा । ते वेळीं केला कें गिंवसावा[23] । शीणु आपुला ॥ ८ ॥ म्हणूनि केवळ देहंभरण[24] । ते जाणें उघडी नागवण[25] । यालागीं एथ अंतःकरण । देयावें[26] ना ॥ ९ ॥

इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।
तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥

अन्वय—इंद्रियस्य इंद्रियस्य अर्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ( स्तः ); तयोः वशं न आगच्छेत्, तौ हि अस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥

( ९७. रागद्वेषाधीन झालेला पतित होतो, २१०–२१८ ) येऱ्हवीं इंद्रियांचिया अर्था- । सारिखा विषयो पोखितां । संतोषु कीरें[28] चित्ता । ओंपजेल ॥ २१० ॥

१ मायेचे आधीन. २ लाड. ३ व्याजस्तुति. ४ मोहरूप मद्यानें. ५ व्यापले. ६ चिखलांत. ७ प्रेताच्या. ८ न पडे. ९ कावळा. १० विचार. ११ पंराङ्मुख. १२ पुरुषानें. १३ लाड करणें. १४ देखील. १५ सहवास. १६ भडकला. १७ विषयभोग. १८ जन्मापासून मरेपर्यंत. १९ मिळवावी.

नाहीं तर, देहाचे पाशांत गुंतून व इंद्रियांचे लाड पुरवून जे माझे मताचा तिरस्कार करून टाकून देतात, ९४ जे त्याला सामान्य समजतात, व त्याची थट्टा करितात, किंवा वाचाळपणें ती व्याजस्तुति आहे असें म्हणतात, ९५ ते मोहरूपी मद्यपान करून भुललेले व विषयरूप विषानें व्यापलेले आणि अज्ञानरूपी चिखलांत रुतलेले असे निःसंशय समज. ९६ पहा कीं, प्रेताच्या हातीं परीक्षेकरितां दिलेलें रत्न जसें वायां जातें, किंवा, जो जन्मापासून अंधळा आहे त्यानें दिवस उगवला असें जर म्हटलें तर त्याचें बोलणें जसें लोक खरें मानीत नाहींत, ९७ अथवा चंद्रप्रकाश ज्याप्रमाणें कावळ्यांच्या उपयोगीं पडत नाहीं, त्याप्रमाणें, जे मूर्ख आहेत त्यांना हा विचार रुचत नाहीं. ९८ तसेंच पार्था, जे जन ह्या परमार्थाला कंटाळले आहेत, त्यांच्याशी कधींही भाषण देखील करूं नये. ९९ कारण, ज्याप्रमाणें पतंग दिव्याचा मत्सर करितात, त्याप्रमाणें ते जन त्या विचारावर भरंवसा न ठेवितां उलट त्यांची निंदा करतात. २०० पतंगानें दिव्याला आलिंगन देतांच जसें त्यास एकदम अचुक मरण येतें, तसें विषयांचें आचरण करणें हें आपल्या नाशास कारण होतें, १. म्हणून, कोणीही ज्ञानी पुरुषानें ह्या इंद्रियांचे कौतुकानें देखील लाड पुरवूं नयेत. २ अरे, असें पहा कीं, सर्पाबरोबर खेळतां येईल का? किंवा वाघाचा सहवास सिद्धीस जाईल का? अथवा हालाहल विष प्राशन केलें तर तें जिरेल का सांग पाहूं? ३ हें पहा, सहज खेळतांना जर अग्नि लागला, तर तो जसा भडकल्यावर आवरत नाहीं, तसें इंद्रियांचे लाड पुरविणें हें चांगलें होणार नाहीं. ४ अर्जुना, वास्तविक पाहतां हें शरीर पराधीन (गुणाधीन) जर आहे, तर त्याच्याकरता यत्नानें विषयोपभोग मिळविण्याची खटपट कां करावी? ५ पुष्कळ यत्न करून आणि सर्व गोष्टी संपादन करून ह्या देहाचें होरात लालन कां करावें। ६ ह्या ठिकाणीं सर्व परिश्रम करून, पुष्कळ संपत्ति मिळवून, स्वधर्माचा त्याग करून केवळ देहाचें पोषण का करावें? ७ मग हें पंचतत्त्वांतच जाऊन मेळाल्यावर त्या वेळीं आपण केलेली खटपट कोठें शोधीत बसावें? ८ म्हणून, केवळ रीरपोषण करणें म्हणजे प्रत्यक्ष नागवणूक आहे असें समज. ह्याकरिता, ह्या देहाकडे लक्ष ऊं नये. ९

-इंद्रियाचे अर्थ जे विषय, त्याच्या ठिकाणीं इंद्रियाची प्रीति (राग) किंवा अप्रीति (द्वेष) ों ठरलेलींच आहेत. त्या रागद्वेषाना वश होऊं नये. कारण, ते जिवाचा घात करतात ॥३४॥

येरव्हीं, 'इंद्रियांना आवडेल त्याच विषयांचें सेवन केलें तर चित्ताला समाधान होईल हें खरें, २१० परंतु तें समाधान म्हणजे संभावित चोराची गांठ पडल्यावर तो जसा

२० पोषण करावें. २१ जमाव. २२ पाच तत्त्वांस. २३ शोधावा. २४ शरीरपोषण. २५ नागवणूक. २६ देऊं नये. २७ इच्छा. २८ खरोखर. २९ उत्पन्न होईल.

परी तो संवचोराचा सांगातु । जैसा नावेक स्वस्थु । जंव नगराचा प्रांतु । सांडिजेना ॥ ११ ॥ आपा विषाची मधुरता । झणें आवडी उपजे चित्ता । परी तो परिणाम विचारितां । प्राणु हरी ॥ १२ ॥ देखें इंद्रियीं कामु असे । तो लावी सुखदुराशे । जैसा गळीं मीनु आमिषें । भुलविजे गा ॥ १३ ॥ परी तयामाजीं गळु आहे । जो प्राणातें घेऊनि जाये । तो जैसा ठाउवा नोहे । झांकलेपणें ॥ १४ ॥ तैसें अभिलाषें येणें कीजेल । विषयांची आशा धरिजेल । तरी वरपडा होइजेल । क्रोधानळा ॥ १५ ॥ जैसा कवळोनियां पारधी । घातेचिये संधी । आणी मृगातें बुद्धी । सोधावया ॥ १६ ॥ एथ तैसीचि परी आहे । म्हणूनि संगु हा तुज नोहे । पार्था दोन्ही कामक्रोध हे । घातकु जाणे ॥ १७ ॥ म्हणऊनि हा आश्रयोचि न करावा । मनेंही आठवो न धरावा । एक निजवृत्तीचा वोलावा । नासों नेदीं ॥ १८ ॥

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् । स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५

अन्वय—स्वधर्मः विगुणः ( अपि ) स्वनुष्ठितात् परधर्मात् श्रेयान्, स्वधर्मे निधनं श्रेयः, परधर्मः भयावहः ॥ ३५ ॥

( ९८. स्वधर्म परधर्मापेक्षा कठीण असला तरी तोच कल्याणाला कारण, २१९–२३० ) अगा स्वधर्मु हा आपुला । जरी कां कठिण जाहला । तरी हाचि अनुष्ठिला । भला देखें ॥ १९ ॥ येरु आचारु जो परावा । तो देखतां कीर बरवा । परी आचरतेनि आचरावा । आपुलाचि ॥ २२० ॥ सांगें शूद्रघरीं आघवीं । पक्वान्नें आहाति बरवीं । तीं द्विजें केविं सेवावीं । दुर्बळु जरी जाहला ॥ २१ ॥ हें अनुचित कैसेनि कीजे । अग्राह्य केविं इच्छिजे । अथवा इच्छिलेंही पाविजे । विचारीं पां ॥ २२ ॥ तरी लोकांचीं धवळारें । देखोनिया मनोहरें । असतीं आपुलीं तणारें । मोडावीं केवीं ॥ २३ ॥ हें असो वानिता आपुली । कुरूप जरी जाहली । तऱ्ही भोगितां तेचि भली । जियापरी ॥ २४ ॥ तेवीं आवडे तैसा सांकडु । आचरतां जरी दुवाडु । तऱ्ही स्वधर्मुचि सुखाडु । परत्रींचा ॥ २५ ॥ हां गा साकर आणि दूध । हे[23] गौल्य कीर प्रसिद्ध । परी कृमिदोषीं विरुद्ध । घेपे केवीं ॥ २६ ॥ ऐसेनिही जरी सेविजेल । तरी ते आळुकीचि उरेल । जे तें परिणामीं पथ्य नव्हेल । धनुर्धरा ॥ २७ ॥ म्हणोनि आणिकांसीं जें विहित । आणि आपणपेयां अनुचित । तें नाचरावें जरी हित । विचारिजे ॥ २८ ॥ या स्वधर्मातें अनुष्ठितां । वेंचु[26] होईल जीविता । तोहि निकें[27] वैर उभयतां । दिसत

१ स्नेहभावानें वागणाऱ्या चोराचा. २ आरभीं. ३ सुखासारखी वाटणारी दुराशा. ४ मांस. ५ गळ. ६ स्वाधीन. ७ क्रोधाग्नीला. ८ मारण्याची. ९ मारण्याकरिता. १० प्रकार. ११ आत्मबोधाचा जिव्हाळा. १२ दुसरा. १३ दुसऱ्याचा. १४ गरीब. १५ वाडे. १६ सुंदर. १७ गवताच्या

नगरसीमा ओलांडीपर्यंत क्षणभर स्वस्थ असतो, ( आणि मग घोर वनांत गेल्यावर जसा वित्ताचें हरण करितो ), तसें होय. ११ बाबारे, विषाची गोडी प्रथम चित्तास जशी समाधानकारक होते—परंतु विचार करून पाहता परिणामीं तें जसें प्राणाचें हरण करतें, त्याप्रमाणें १२ इंद्रियाचे ठिकाणीं कामवासना असते ती प्रथम सुखकर वाटून परिणामीं दु:खास कारण होते. ज्याप्रमाणें मासा गळाला लावलेल्या आमिषाला भुलतो, १३ परंतु त्याचे आंत गळ असून तो आपला प्राण घेईल हें तो झाकलेला असल्यामुळें त्याला कळत नाहीं, १४ त्याप्रमाणें, विषयसुखाच्या अभिलाषानें जो विषयाची इच्छा करील, तो क्रोधाग्नींत पडेल. १५ ज्याप्रमाणें पारधी मृगाला धरण्याकरितां चारी बाजूंनीं मारण्याची संधि साधून वळवून आणितात, १६ त्याप्रमाणें ह्या विषयांची तऱ्हा आहे; म्हणून पार्था, कामक्रोध हे घातक समजून त्यांचा संग तूं करूं नको; १७ आणि ह्या विषयांना थारा न देतां मनाला त्याची आठवण देखील होऊं देऊं नको. परंतु मनाचे ठिकाणीं आत्मबोधाची जागृति जाऊं देऊं नकोस. १८.

आपला धर्म जरी वैगुण्ययुक्त असला, तरी उत्तम प्रकारें आचरिलेल्या परधर्मापेक्षा तो चांगला आहे. स्वधर्माचरणात मृत्यु जरी आला तरी तो कल्याणप्रद आहे; परधर्म भय देणारा आहे. ॥ ३५ ॥

अरे, आपला धर्म जरी आचरण्यास कठिण असला, तरी त्याचेंच आचरण करणें उत्तम होय. १९ दुसऱ्याचा धर्म खरोखर दिसण्यांत जरी चांगला असला, तरी आचरण करणारानीं आपल्याच धर्माचें आचरण केलें पाहिजे. २२० ब्राह्मण जरी दरिद्री झाला, तरी त्यानें शूद्राच्या घरची उत्तम पक्वान्नें कशीं सेवावी सांग बरें ? २१ असें हें अनुचित कर्म कसें करावें ? आणि जी गोष्ट घेण्यास योग्य नाहीं, तिची इच्छा कशी करावी ? अथवा जरी इच्छित प्राप्त झाले, तरी तें घ्यावें का ह्याचा विचार कर. २२ तसेंच, लोकांचे मोठमोठे सुंदर वाडे पाहून आपल्या असलेल्या गवती झोंपड्या मोडाव्या का ? २३ हें असो, परंतु ज्याप्रमाणें आपली स्त्री कुरूप असली तरी तीच आपल्यास भोगण्यास योग्य होय, २४ त्याप्रमाणें, वाटेल तसा कठिण आणि आचरण्यास दुर्घट असा स्वधर्म असला, तरी तोच परलोकचा सखा होय. २५ असें पहा कीं, दूध आणि साखर हे दोन पदार्थ गोड आहेत म्हणून प्रसिद्ध आहे; पण ज्यांना जंत झाले आहेत, त्यांनीं ते कसे सेवन करावे ? २६ अर्जुना, इतक्यावरही जर रोग्यानें ते सेवन केले, तर त्याचा तो हट्टवादीपणाच आहे. कारण, परिणामीं ते त्यास हितकर होणार नाहींत. २७ म्हणून, आपलें हित पाहणें असेल, तर जें दुसऱ्यास उचित असून आपल्यास अनुचित आहे, त्याचें आचरण करूं नये, २८ स्वधर्माचें आचरण करीत

झोपड्या. १८ वाटेल. १९ कठीण. २० दुर्घट. २१ सखा. २२ परलोकचा. २३ गोडी. २४ जंताच्या रोग्याला. २५ आग्रह. २६ खर्च. २७ खरोखर. २८ श्रेष्ठ. २९ दोन्ही लोकीं.

ज्ञाने. १५

असे ॥ २९ ॥ ऐसें समस्तसुरशिरोमणी । बोलिजे जेथ श्रीशार्ङ्गपाणी । तेथ अर्जुन म्हणे विनवणी । असे देवा ॥ २३० ॥ ( ९९. मनुष्याला पापाकडे कोण प्रवृत्त करतो? २३१–२३८ ) हें जें तुम्हीं सांगितलें । तें सकळ कीर म्यां परिसिलें । तरी आतां पुसेन कांहीं आपुलें । अपेक्षित ॥ ३१ ॥

अर्जुन उवाच—

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः । अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६

अन्वय-( हे ) वार्ष्णेय, अथ केन प्रयुक्तः अयं पूरुषः अनिच्छन् अपि बलात् नियोजितः इव पापं चरति ? ॥ ३६ ॥

तरी देवा हें ऐसें कैसें । जे ज्ञानियांचीही स्थिति भ्रंशे । मार्गु सांडूनि अनारिसे । चालत देखों ॥ ३२ ॥ सर्वज्ञुही जे होती । हे उपायही जाणती । तेही परधर्मे व्यभिचरती । कवणे गुणें ॥ ३३ ॥ बीजा आणि भुसा । अंध निर्वाडु नेणे जैसा । नावेक देखणाही तैसा । चेरळे कां पां ॥ ३४ ॥ जे असता संगु सांडिती । तेचि संसर्गु करितां न धाती । वनवासीही सेविती । जनपदातें ॥ ३५ ॥ आपण तरी लपती । सर्वस्वें पाप चुकविती । परी बळात्कारें सुईजती । तयाचि माजीं ॥ ३६ ॥ जयाची जीवें घेती विवसी । तेचि जडोनि ठाके जीवेंसीं । चुकविलां ते गिंवसी । तयातेंचि ॥ ३७ ॥ अवतरण.–ऐसा बळात्कारु एकु दिसे । तो कवणाचा एथ आग्रहो असे । हें बोलावें हृषीकेशें । पार्थु म्हणे ॥ ३८ ॥

श्रीभगवानुवाच—

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः । महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७

अन्वय—एषः कामः एषः क्रोधः रजोगुणसमुद्भवः ( अस्ति, च ) महाशनः महापाप्मा ( अस्ति; त्व ) एनं इह वैरिणं विद्धि ॥ ३७ ॥

( १००. कामक्रोध जीवाला पापाकडे प्रवृत्त करतात, २३९–२५९ ) तंव हृदयकमळआरामु । जो योगियांचा [12]निष्कामकामु । तो म्हणतसे पुरुषोत्तमु । सांगेन आइक ॥ ३९ ॥ तरी हे कामु क्रोधु पाहीं । जयांतें कृपेची सांठवण नाहीं । हे कृतांताच्या ठायीं । मानिजती ॥ २४० ॥ हे ज्ञाननिधीचे भुजंग । विषयदरीचे वाघ । भजनमार्गीचे मांग । मारक जे ॥ ४१ ॥ हे देहदुर्गीचे धोंडे । इंद्रियग्रामींचे कोंडे । यांचें व्यामोहादिक बंड । जगावरी ॥ ४२ ॥ हे रजोगुण मानसींचे । समूळ आसुरियेचे । धालेपण ययांचें । अविद्या केलें ॥ ४३ ॥ हे रजाचे कीर जाहले । परी तमासी पढियंते भले । तेणें निजपदें यां दीधलें । प्रमादमोहो ॥ ४४ ॥ हे मृत्यूच्या नगरीं । मानिजती निकियेपरी । जे जीविताचे वैरी । म्हणऊनियां ॥ ४५ ॥ जयांसि भुकेलियां आमिषा । हें विश्व न

१ इच्छित. २ भ्रष्ट. ३ वेगळे. ४ वेगळे करणें. ५ चुके. ६ तृप्त होती. ७ गांवची वस्ती. ८ मातेचे जातात. ९ किळस १० शोधणें. ११ हृदयाला रममाण करणारा. १२ योगी ज्यांची

असताना जरी आपला जीव खर्ची पडला, तरी तो दोन्ही लोकीं खरोखर श्रेष्ठ असा मानला जातो. २९ देवाधिदेव श्रीशार्ङ्गपाणि ह्यांचें हें भाषण ऐकून अर्जुन म्हणालाः— देवा, माझी एक विनंती आहे. २३० आपण जें मला आतां सांगितलें, तें मीं सर्व नीट ऐकलें; तर आतां मला जें कांहीं पाहिजे आहे तें मी विचारतों. ३१

अर्जुन म्हणाला—कृष्णा, ( जीवाला ) विषयाची इच्छा नसूनही कोणाच्या प्रेरणेनें जीव बलात्कारानें ढकलल्याप्रमाणें पापाचरण करतो ? ॥ ३६ ॥

देवा, ज्ञान्यांची सुद्धां स्थिति भ्रष्ट होऊन ते भलत्याच मार्गानें जातात हें कसें ? ३२ ते सर्वज्ञ असून व त्यांना हे उपाय माहीत असताही ते परधर्माचें आचरण का करतात ? ३३ जसे अंधळ्या मनुष्यास धान्य आणि कोंडा हे निराळे करता येत नाहींत, तसें क्षणभर डोळसासही का व्हावें ? ३४ जे असलेला संग सोडतात, तेच पुन. संग करूनही तृप्त होत नाहींत; व वनवासास जातात, तेही पुनः गांवात येऊन राहतात, ३६ आपण लपून सर्व पापें चुकवितात, परंतु बलात्कारानें त्या पापांचे ठिकाणीं पाडिले जातात. ३६ ज्या वस्तूची मनाने किळस घेतली आहे, तीच पुनः प्रिय होते; आणि जर तिला आपण चुकवूं लागलों, तर ती उलटी आपल्या पाठीस लागते. ३७ अर्जुन म्हणतो, " देवा, अशा रीतीचा बलात्कार ह्या शरिरांत जो दिसतो, त्याचा एवढा पुरस्कर्ता कोण तें सांगा. " ३८

श्रीभगवान म्हणाले—हा काम व हा क्रोध. ह्याची उत्पत्ति रजोगुणापासून आहे. हा महाभक्षक व महापापी आहे. तू या लोकीं याला वैरी समज ॥ ३७ ॥

तेव्हा, हृदयास रमविणारा, आणि योगीजन ज्याची निष्कामबुद्धीनें इच्छा करतात, असा जो पुरुषोत्तम तो म्हणालाः—सांगतों ऐक. ३९ हे तर बाबा काम आणि क्रोध. ह्याचेपाशीं दयेचा लवलेश नाहीं. ह्याना मूर्तिमंत कृतात समजले जातात. २४० हे ज्ञानरूप धनाच्या ठेवींवरील नाग, व विषयखोऱ्यातील वाघ, आणि भजनमार्गाचे मारेकरी माग आहेत. ४१ देहरूप किल्ल्यावरील मोठे दगड व इंद्रियरूपी गावाचें गावकुसूं आहेत, आणि सर्व जगात भ्रांति वगैरे उत्पन्न करण्याविषयीं ह्याचें प्राबल्य आहे. ४२ हे रजोगुणात्मक मनापासून उत्पन्न झालेले आहेत, आणि आसुरी संपत्तीचें कारण होत; आणि त्याची पुष्टि अविद्या ( माया ) करिते. ४३ हे रजोगुणापासून झालेले आहेत खरे, परंतु तमोगुणाचे फार आवडते आहेत; म्हणून तमोगुणानें आपलें वर्चस्व—माजुरपणा व अज्ञान—ह्यास दिले आहे. ४४ हे जीविताचे शत्रु आहेत, म्हणून मृत्यूचे नगरांत हे मोठे श्रेष्ठ असे मानले जातात. ४५ ह्याच्या नुसत्या भुकेच्या इच्छेला हें विश्व एक घासाला देखील पुरत नाहीं, आणि आशा ही ह्यांच्या व्यापाराची वृद्धि करते.

निष्काम बुद्धीनें इच्छा करतात. १३ लवलेश. १४ मारेकरी. १५ दगड. १६ गावकुसू. १७ अज्ञानादिक. १८ रजोगुणात्मक. १९ आसुरी संपत्तीचे. २० पुष्टीकरण, तृप्ति. २१ माया. २२ रजोगुणाचे. २३ आवडते. २४ सर्वस्व. २५ माजुरीपणा. २६ अज्ञान. २७ श्रेष्ठ. २८ इच्छा.

पुरोचि घांसा। कुळवाडियांचिया आशा। चालीतें असे ॥ ४६ ॥ कौतुकें कवळितां मुठी। जिये चवदा भुवनें थेंकुटीं। तिये भ्रांतिही धाकुटी। वोल्हीदुल्ही ॥ ४७ ॥ जे लोकत्रयाचें भांतुकें। खेळतांचि खाय कव्तिकें। तिच्या दासीपणाचेनि विकें। तृष्णा जिये ॥ ४८ ॥ हें असो मोहें मानिजे। यातें अहंकारें घेपे दीजे। जेणें जग आपुलेनि भोजें। नाचवीत असे ॥४९॥ जेणें सत्याचा भोकसा काढिला। मग असत्य तृणकुटा भरिला। तो दंभु रूढविला। जगीं इहीं ॥२५०॥ सांध्वी शांति नागविली। मग माया मांगी शृंगारिली। तियेकरवीं विटाळविलीं। साधुवृंदें ॥५१॥ इहीं विवेकाची त्रायें फेडिली। वैराग्याची साल काढिली। जितेया मान मोडिली। उपशमाची ॥ ५२ ॥ इहीं संतोषवन खांडिलें। धैर्यदुर्ग पाडिले। आनंदरोप सांडिलें। उपडूनियां ॥५३॥ इहीं बोधाचीं रोपें लुंचिलीं। सुखाची लिपि पुसिली। जिव्हारीं आगी सूंदली। तापत्रयांची ॥ ५४ ॥ हे आंगा तंव घडले। जीवींचि आथी जडले। परी नातुडती गिंवसिले। ब्रह्मादिकां ॥५५॥ हे चैतन्याचे शेजारी। वसती ज्ञानाच्या एका हारीं। म्हणोनि प्रवर्तले महामारी। सांवरती ना ॥ ५६ ॥ हे जळेंवीण बुडविती। आगीवीण जाळिती। न बोलतां कवळिती। प्राणियांतें ॥ ५७ ॥ हे शस्त्रेंवीण सौधिती। दोरेंवीण बांधिती। ज्ञानियासी तरी वधिती। पैज घेउनी ॥५८॥ हे चिखलेंवीण रोंविती। पाशिकेंवीण गोंविती। हे कवणाजोगे न होती। आंतौटेपणें ॥ ५९ ॥

धूमेनाऽऽव्रियते वन्हिर्यथाऽऽदर्शो मलेन च। यथोल्बेनाऽऽवृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥

अन्वय—यथा धूमेन वन्हिः आव्रियते, यथा च आदर्शः मलेन, यथा गर्भः उल्बेन आवृतः, तथा तेन ( कामेन ) इद आवृतम् ॥ ३८ ॥

( १०१. कामक्रोध ज्ञानास आच्छादून टाकतात, २६०—२६६ ) जैसी चंदनाचे मुळीं। गिंवसोनि घेपे व्याळीं। नातरी उल्बाची खोळी। गर्भस्थासी ॥ २६० ॥ कां प्रभावीण भानु। धूमेंवीण हुताशनु। जैसा दर्पण मळहीनु। कहींच नसे ॥ ६१ ॥ तैसें इहींवीण एकलें। आम्हीं ज्ञान नाहीं देखिलें। जैसें कोंडेनि पांगुतलें। बीज निपजे ॥ ६२ ॥

आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा। कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥

अन्वय—( हे ) कौंतेय, ज्ञानिनः नित्यवैरिणा एतेन कामरूपेण दुष्पूरेण च अनलेन (इद) ज्ञानं आवृतम् ॥ ३९ ॥

तैसें ज्ञान तरी शुद्ध। परी इहीं असे प्रैरुद्ध। म्हणोनि तें अगाध। होऊनि ठेलें ॥६३॥ आधीं यांतें जिणावें। मग तें ज्ञान पावावें। तंव पराभवो न संभवे। रागद्वेषां ॥ ६४ ॥ यांतें साधावयालागीं। जें बळ वाणिजे आंगीं। तें इंधनें जैसी आगी। सावावो होय ॥ ६५ ॥

१ व्यापार. २ करीत असे. ३ सदन. ४ तुच्छ. ५ जिवलग. ६ मातुकली. ७ मळें. ८ पोवळे.

४६ जिनें सहज आपल्या मुठी वळल्या असता त्यांत मावण्याला चौदा भुवनेंही कमीच; ती भ्रांति ह्यांची आवडती धाकटी बहीण आहे. ४७ ही भ्राति केवळ भातुकली खेळतां खेळतां सहज तिन्ही लोक खाऊन टाकते; आणि तृष्णा जी पुष्ट होते, ती हिच्या दास्यत्वाच्या बळावरच ! ४८ हें असो; पण ह्यांना मोहानें पूज्य मानिलें आहे, आणि ज्या अहंकारानें सर्व जगाला नाचवून सोडलें आहे, त्या अहंकाराची ह्यांशीं देवघेव आहे. ४९ ज्यानें सत्याचा कोथळा फोडून त्यांत असत्याचा पेंढा भरला, त्या दंभाला ह्यांनींच जगांत प्रसिद्धीला आणलें. २५० ह्यांनीं पतिव्रतारूप शांतीला लुबाडून घेऊन मायारूप मांगिणीला सजविलें आणि तिच्याकडून साधूंचे समुदाय भ्रष्ट करविले ! ५१ ह्यांनीं वैराग्याचा आश्रय नाहींसा केला, विवेकाचें चामडें लोळविलें; आणि उपशमाची जिवंत मान तोडिली ! ५२ ह्यांनी संतोषरूपी वन, तोडून टाकिलें, धैर्यरूपी किल्ले जमीनदोस्त केले; आणि आनंदरूपी रोपडें उपटून टाकलें. ५३ ह्यांनीं ज्ञानाचीं रोपें खुडून टाकलीं, सुखाचें नांव सुद्धां पुसून टाकलें, आणि प्राणिमात्राच्या हृदयांत त्रिविध तापांची आग उत्पन्न केली. ५४ हे शरिराबरोबर घडलेले असून जीवाबरोबरच जडलेले आहेत; पण ब्रह्मादिकांना शोधाअंतींही सांपडत नाहींत. ५५ हे ब्रह्मस्वरूपाच्या शेजारीं आणि ज्ञानाच्या पंक्तीला वास करतात, म्हणून जगताचा महाप्रलय करण्यास प्रवृत्त होऊन कोणाला आवरत नाहीत. ५६ हे पाण्याशिवाय बुडवितात, अग्नीशिवाय जाळतात, आणि प्राण्याला न कळतां ग्रासतात. ५७ हे शस्त्राशिवाय मारतात, दोराशिवाय बंधन करतात, आणि तत्त्ववेत्त्यांना तर पैजेनें आपल्या अधीन करून घेतात. ५८ हे चिखलाशिवाय रोंवतात, पाशाशिवाय लोकांना बांधून ठेवितात, आणि शरिराच्या इतक्या अंतर्यामीं पोहोंचल्यामुळें ह्यांच्या साम्यतेचे दुसरे कोणी नाहीत. ५९

जसा धुरानें अग्नि, मळानें आरसा व वारेनें गर्भ आच्छादिलेला असतो, तसें हें शुद्ध ज्ञान ह्या कामानें आच्छादिलेलें आहे ॥ ३८ ॥

साप जसा चंदनाच्या मुळाला वेढून राहतो, किंवा वारेच्या पिशवीनें गर्भ जसा आच्छादित असतो २६० अथवा प्रभेशिवाय सूर्य, धुराशिवाय अग्नि किंवा मळाशिवाय आरसा हीं ज्याप्रमाणें सांपडावयाचीं नाहीत, ६१ त्याप्रमाणें कामक्रोधांशिवाय शुद्ध ज्ञान आमच्या दृष्टीस कधीं पडलें नाहीं. ज्याप्रमाणें कोंड्यानें झांकलेलेंच बीज उत्पन्न होतें, ६२

ज्ञान्याचें नित्य वैर करणारा, व कधीं तृप्त न होणाऱ्या अग्नीप्रमाणें असणारा अशा कामानें ज्ञान झाकून टाकलें आहे. ॥ ३९ ॥

तसें ज्ञान हें स्वतः जरी शुद्ध आहे, तरी कामक्रोधांनीं आच्छादित असतें, म्हणूनच तें अगाध झालें आहे. ६३ अगोदर मुमुक्षूनें ह्यांना जिंकून मग ज्ञान मिळवावें; पण रागद्वेषांस

९ देवघेव होते. १० हौसेनें. ११ आतील गर्भ १२ पेंढा. १३ पतिव्रता. १४ मळ. १५ जिवंत. १६ इंद्रियनिग्रह. १७ तोडलें. १८ खुडलीं. १९ लेश. २० कोठ्यात. २१ घातली. २२ त्रिविध ताप. २३ सापडत नाहींत. २४ ब्रह्मस्वरूप. २५ मारतात. २६ आत असल्यामुळें. २७ शोधून. २८ घेतलीं जाते. २९ गर्भवेष्टणाची. ३० आच्छादिलेलें. ३१ खोल. ३२ साहाय्य. ३३ हठयोग

इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते। एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥

अन्वय—इंद्रियाणि, मनः, बुद्धिः अस्य अधिष्ठानं उच्यते. एषः एतैः ज्ञानं आवृत्य देहिनं विमोहयति ॥ ४० ॥

तैसे उपाय कीजती जे जे । ते यांसीच होती विरजे[1] । म्हणोनि हटियांतें[2] जिणिजे । इहींचि जगीं ॥ ६६ ॥ ( १०२. कामक्रोध जिंकण्यास उपाय इंद्रियजय, २६७ ते २७३ ) अवतरणः—ऐसियांही सांकडा बोला । एक उपायो आहे भला । तो करितां जरी आंगवला । तरी सांगेन तुज ॥ ६७ ॥

तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ। पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥४१
इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः। मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥४२॥
एवं बुद्धेः परं बुध्वा संस्तभ्यात्मानमात्मना। जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥४३

अन्वय—( हे ) भरतर्षभ ! तस्मात् त्वं आदौ इंद्रियाणि नियम्य ज्ञानविज्ञाननाशनं एनं पाप्मानं प्रजहि ॥ ४१ ॥ इंद्रियाणि पराणि आहुः, इंद्रियेभ्यः मनः परं ( अस्ति ), बुद्धिः तु मनसः परा ( अस्ति ); यः बुद्धेः तु परतः सः ( परमात्मा ) ॥ ४२ ॥ महाबाहो, एवं बुद्धेः परं बुध्वा आत्मानं आत्मना संस्तभ्य दुरासदं कामरूपं शत्रुं जहि ॥ ४३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

यांचा पहिला कुरुठा इंद्रियें । एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये । आधीं निर्दळून घालीं तियें । सर्वथैव ॥ ६८ ॥ मग मनाची धांव पारुषेल । आणि बुद्धीची सोडवण होईल । इतुकेनि थारा मोडेल । या पापियांचा ॥ ६९ ॥ हे अंतरींहूनि जरी फिटले । तरी निभ्रांत जाण निवटले । जैसें रश्मीवीण उरलें । मृगजळ नाहीं ॥ २७० ॥ तैसे रागद्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें । मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ॥ ७१ ॥ ते गुरुशिष्याची गोठी । पदपिंडाची गांठी । तेथ स्थिर राहोनि नुठीं । कवणे काळीं ॥ ७२ ॥ ऐसें सकळ सिद्धांचा रावो । देवी लक्ष्मीयेचा नाहो । राया ऐकें देवदेवो । बोलता जाहला ॥ ७३ ॥ ( १०३. पुढील चतुर्थाध्यायाचें चीज, २७४–२७६ ) अवतरणः—आतां पुनरपि तो अनंतु । आद्य एकी मातु । सांगेल तेथ पंडुसुतु । प्रश्नु करील ॥ ७४ ॥ तया बोलाचा हैन पाडु । कीं रसवृत्तीचा निवाडू । येणें श्रोतयां होईल सुरवाडु । श्रवणसुखाचा ॥ ७५ ॥ ज्ञानदेवो म्हणे निवृत्तीचा । चांगें उठावा करूनि उन्मेषाचा । मग संवादु श्रीहरिपार्थाचा । भोगावा बापा ॥ २७६ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ श्लोक ४३, ओव्या २७६.

जिकणें फार कठिण आहे. ६४ ह्यांना मारण्याकरितां जें अवसान आणावें, तें उलट त्यांनाच साह्यकारी होतें. लांकडें ज्याप्रमाणें अग्नीला साह्य करितात, २६५

इंद्रियें, मन आणि बुद्धि ही याची राहण्याची जागा होय. म्हणून हा इंद्रियादिकाच्या योगें जीवाचें ज्ञान झाकून टाकून त्याला मोहांत पाडतो ॥ ४० ॥

त्याप्रमाणें, जे जे उपाय करावे ते ते ह्यांनाच साह्यकारी होतात; म्हणून ह्या जगामध्यें हटयोग्यांना ( सुद्धां ) हेच जिकितात. ६६ ( पण, अर्जुना, ) अशाही संकटांतून पार पडण्यास एक उत्तम उपाय आहे; तो तुला साधेल तर सांगतों. ६७

म्हणून अर्जुना, तूं प्रथम इंद्रियाना जिंक आणि शास्त्रीय व अनुभविक ज्ञानाचा नाश करणाऱ्या अशा महापापी कामाला मारून टाक. देहापेक्षा इद्रियें सूक्ष्म, इद्रियापेक्षां मन सूक्ष्म, मनापेक्षां बुद्धि सूक्ष्म, व बुद्धीपेक्षा जो सूक्ष्म तो परमात्मा असें ज्ञानी म्हणतात. ४२ हे महाबाहो, ह्याप्रमाणें बुद्धीच्या पलीकडे असणाऱ्या परमात्म्याला जाणून आपली स्वस्थता आपण संपादन करून घेऊन, जिंकण्यास कठिण अशा कामरूपी शत्रूस जिंक. ॥ ४३ ॥

ह्यांचें मूळ वास्तव्य इंद्रियांचे ठिकाणी आहे, आणि इंद्रियांपासून कर्माची प्रवृत्ति होते, म्हणून त्या इंद्रियाना अगोदर जिंक. ६८ असें झालें म्हणजे मनाची धाव कुंठित होऊन बुद्धीची सोडवणूक होईल आणि मग तेथून ह्या दुष्टांचें बिऱ्हाड मोडेल. ६९ ह्याप्रमाणें ह्यांची शरिरांतील वस्ती मोडली म्हणजे हे खास मेले असें समज. ज्याप्रमाणें सूर्यकिरणाशिवाय मृगजल दृष्टीस पडावयाचें नाहीं, २७० त्याप्रमाणें, राग आणि द्वेष हे जर नाश पावले, तर ब्रह्मरूपी स्वराज्यच हातीं आलें. मग तो आपलेंच सुख आपण भोगतो. ७१ हीच गुरुशिष्यांची गुह्य गोष्ट; हेंच जीवब्रह्माचें ऐक्य. तूं तेथें स्थिर होऊन तेथून कधींही हालूं नको. ७२ संजय म्हणतोः—राजा, ऐक; सकलसिद्धमुकुटमणि लक्ष्मीपति श्रीकृष्ण ह्याप्रमाणें बोलले. ७३ आतां ह्यापुढें भगवान श्रीकृष्ण एक पुरातन कथा सांगतील, ती ऐकून अर्जुन प्रश्न करील. ७४ त्या कथेची योग्यता व रसिकपणा हीं ऐकून श्रोत्यांना फार समाधान होईल. २७५ निवृत्तीचे दास जे ज्ञानदेव, ते म्हणतात "बापांनो, आत्मज्ञानप्राप्तीच्या चांगल्या तयारीनें तुम्ही कृष्णार्जुनसंवाद ऐका." २७६

---

१ संकट २ साधला. ३ घर. ४ नाश करणें. ५ कुंठित होईल. ६ मेले. ७ किरण. ८ जीवब्रह्माची. ९ नाथ. १० पाहिलें. ११ समुच्चयार्थक अन्वय. १२ योग्यता. १३ रसभरितपणाचा. १४ सुख. १५ चांगला. १६ ज्ञानाचा.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय चौथा

( १०४. ज्ञानेश्वराची काव्यप्रतिभा, १–५ ) आजि श्रवणेंद्रिया पैहलें । जे येणें गीतानिधान देखिलें । आतां स्वप्नचि हें तुकलें । साचासरिसें ॥ १ ॥ आधींचि विवेकाची गोठी । वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी । आणि भक्तराजु किरीटी । परिसत असे ॥ २ ॥ जैसा पंचमालापु सुगंधु । कीं परिमळु आणि सुस्वादु । तैसा भला जाहला विनोदु । कथेचा इये ॥ ३ ॥ कैसी आगळिकें दैवाची । जे गंगा जोडली अमृताची । हो कां जपतपें श्रोतयांचीं । फळा आलीं ॥ ४ ॥ आतां इंद्रियजात आघवें । तिहीं श्रवणाचें घर रिघावें । मग संवादसुख भोगावें । गीताख्य हें ॥ ५ ॥ ( १०५. श्रोत्यांची कथा सांगण्या-विषयी सूचना, ६ ) हा अतिसो अतिप्रसंगें । सांडूनि कथाचि ते सांगें । जे कृष्णार्जुन दोघे । बोलत होते ॥ ६ ॥ ( १०६. देव अर्जुनाला प्रेमानें सांगूं लागले, ७–१५ ) ते वेळीं संजयो रायातें म्हणे । अर्जुनु अधिष्ठिलों दैवगुणें । जे अति-प्रीति श्रीनारायणें । बोलतु असे ॥ ७ ॥ जें न सांगेचि पितया वसुदेवासी । जें न सांगेचि माते देवकीसी । जें न सांगेचि बंधु बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेंशीं बोलत ॥ ८ ॥ देवी लक्ष्मीयेवढी जवळिके । परी तेही न देखे या प्रेमाचें सुख । आजि कृष्णस्नेहाचें बिक । यातेंचि आथी ॥ ९ ॥ सनकादिकांचिया आशा । वाढीनल्या होतिया कीर वेहुवसा । परी त्याही येणें मानें यशा । येतीचिना ॥ १० ॥ या जगदीश्वराचें प्रेम । एथ दिसतसे निरुपम । कैसें पार्थे येणें सर्वोत्तम । पुण्य केलें ॥ ११ ॥ हो कां जयाचिया प्रीती । अमूर्त हा आला व्यक्ती । मज ऐकवंकी याची स्थिती । आवडतु असे ॥ १२ ॥ श्रीभगवानुवाचः—येऱ्हवीं हा योगियां नेंडळे । वेदार्थासी नाकळे । जेथ ध्यानाचेही डोळे । पावतीना ॥ १३ ॥ तो हा निजस्वरूप । अनादि निष्कंप । परी कवणें मानें सकृप । जाहला आहे ॥ १४ ॥ हा त्रैलोक्यपटाची घडी । आकाराची पैलथडी । कैसा याचिये आवडी । आवरला असे ॥ १५ ॥

---

१ कानाला. २ उजाडलें. ३ ठेवा. ४ मासलें. ५ विचाराची ६ सप्तस्वरातील पाचवा. ७ सुवास. ८ मधुर. ९ कौतुक; करमणूक. १० थोरवी. ११ पाल्हाळ. १२ युक्त झाला. १३ सत्त्वगुणानें. १४ सन्निध असणारी. १५ अतिशय. १६ एकरूपी. १७ वाटत असे. १८ हातीं लागत नाहीं. १९ अचल. २० दयाळू. २१ संकोच व विस्तार. २२ स्वाधीन झाला.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय चौथा

( मागील अध्यायांतील कथाभागाचें श्रवण झाल्यानंतर त्याचें मनन होऊन त्याचाच निदिध्यास लागल्यामुळें, ज्ञानेश्वर महाराज उत्प्रेक्षा करितात:— )

आज कानांना उजाडलें; ( त्यांचा भाग्योदय झाला; ) कारण, त्यांनीं गीतेचा ठेवा पाहिला. ( जागृत झाल्यावर ) स्वप्नांतील गोष्ट ( खोटीशी भासते ) पण ती आज खरी झाली. १ आधींच आत्मविचाराची गोष्ट; त्यांत श्रीकृष्ण जगजेठी प्रतिपादन करणारा, आणि भक्तशिरोमाणि अर्जुन ऐकणारा. २ जसा ( कोकिळेचा ) मंजुळ पंचम स्वर आणि त्यांतच उत्तम सुवास व गोडी या तिहींपासून आनंद होतो, तसा या कथेपासून आनंद झाला आहे. ३ दैवाची थोरवी काय वर्णावी, कीं जिच्यामुळें श्रोत्यांचीं जपतपें फळास येऊन अमृतरूप गंगाच त्यांना प्राप्त झाली. ४ म्हणून, सर्व इंद्रियांनीं आपआपलीं कामें सोडून श्रवणाचे ठिकाणीं वास करून कृष्णार्जुनसंवादरूप गीतेचें सुख घ्यावें. ५ तेव्हां संतमंडळी ज्ञानेश्वरास म्हणाली कीं, आतां तुझा पाल्हाळ व अधिक प्रसंग पुरे करून कृष्णार्जुन जे बोलत होते ती कथा आम्हांला सांग. ६ त्या वेळेस संजय धृतराष्ट्रास म्हणाला:—सत्त्वगुणानें युक्त झालेला जो अर्जुन, त्याला अतिप्रेमानें श्रीकृष्ण म्हणाले:— ७ जें गुह्य श्रीकृष्णांनीं आपला पिता वसुदेव, माता देवकी, व बंधु बलराम ह्यांसही सांगितलें नाहीं, तें अर्जुनास सांगितलें. ८ लक्ष्मी देवी नेहमीं सन्निध राहणारी, पण तिलाही ज्या प्रेमसुखाचा अनुभव लाभला नाहीं, त्या कृष्णप्रेमाचा उमाळा आज पार्थावरच आला आहे. ९ सनकादिक त्याची बहुत दिवसांपासून इच्छा करीत होते, पण त्यांनाही इतक्या योग्यतेचें ते प्रेम प्राप्त झालें नाहीं. १० पार्थानें असें कोणतें महत्पुण्य केलें, कीं ज्या योगानें त्याचे ठिकाणीं जगदीश्वराचें अनुपमेय प्रेम दृष्टीस पडतें ? ११ पहा कीं, ज्याच्या प्रीतीकरितां निराकार साकार झाला. ह्यावरून मला तर असें वाटतें कीं, ह्या दोघांची स्थिति ( देह ) जरी भिन्न आहे, तरी दोघे एकरूपच आहेत. १२ येऱ्हवीं हा भगवान योग्यांचे हातीं लागत नाहीं, वेदालाही कळत नाहीं, व त्याचे ठिकाणीं ध्यानाचीही दृष्टि पोहोंचत नाहीं. १३ असा जो आत्मस्वरूपी भगवान, व ज्याला आदि आणि अंत नसून जो अचल आहे, तो कोणत्या कारणानें अर्जुनावर कृपावंत झाला आहे ? १४ हा त्रैलोक्यरूप वस्त्राच्या संकोचविस्तारांचें अधिष्ठान आहे, ( त्रैलोक्य हें ह्याचें रूप असून त्याची घडी करून हा अवतार घेऊन आला आहे, ) आणि आकाराच्या पलीकडला असून हा अर्जुनाला इतक्या प्रेमानें कसा स्वाधीन झाला नकळे ! १५

श्रीभगवानुवाचः—

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् । विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥१॥

अन्वय—अहं इमं अव्ययं योगं विवस्वते प्रोक्तवान्; विवस्वान् मनवे प्राह; (च) मनुः इक्ष्वाकवे अब्रवीत् ॥ २ ॥

( १०७. ज्ञानोपदेशाची परंपरा, १६–१९ ) मग देव म्हणे पंडुसुता । हाचि योगु आम्हीं विवस्वता । कथिला परी ते वार्ता । बहुतां दिवसांची ॥ १६ ॥ मग तेणें विवस्वतें रवी । हे योगस्थिति आघवी । निरूपिली बरवी । मनूप्रति ॥१७॥ मनूनें आपण अनुष्ठिली । मग इक्ष्वाकुवा उपदेशिली । अवतरणः—ऐसी परंपरा विस्तारिली । आद्य हे गा ॥ १८ ॥

एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः । स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥

अन्वय—(हे) परंतप, एवं परंपराप्राप्तं इमं (योगं) राजर्षयः विदुः; सः योगः महता कालेन इह नष्टः ॥ २ ॥

मग आणिकही या योगातें । राजर्षि जाहले जाणते । परि तेयोनि आतां सांप्रतें । नेणिजे कोण्ही ॥ १९ ॥ ( १०८. ज्ञानयोगाचा लोप होण्याचीं कारणें, २०–२६) जे प्राणिया कामीं भरु । देहाचिवरी आदरु । म्हणोनि पाडिला विसरु । आत्मबोधाचा ॥ २० ॥ अव्हांटलिया आस्थाबुद्धि । विषयसुखचि परमावधि । जीव तैसा उपाधि । आवडे लोकां ॥२१॥ येरवीं तरी खवणेयांच्या गांवीं । पाटाउवें काय करावीं । सांगें जात्यंधा रवी । काय आथी ॥२२॥ कां बहिरेयांच्या आस्थानीं । कवण गीतातें मानी । कीं कोल्हेया चांदणी । आवडी उपजे ॥ २३ ॥ पैं चंद्रोदया आरौतें । जयांचे डोळे फुटती असते । ते काउळे केवीं चंद्रातें । वोळखती ॥ २४ ॥ तैसी वैराग्याची शिंव न देखती । जे विवेकाची भाषा नेणती । ते मूर्ख केवीं पावती । मज ईश्वरातें ॥ २५ ॥ कैसा नेणों मोहो वाढिनला । तेणें बहुतेक काळु व्यर्थ गेला । म्हणोनि योगु हा लोपला । लोकीं इये ॥ २६ ॥

स एवाऽयं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।
भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥

अन्वय—सः एव अयं पुरातनः योगः मया अद्य ते प्रोक्तः हि इति; (त्वं) मे भक्तः असि सखा च (असि). एतत् हि उत्तमं रहस्यम् ॥ ३ ॥

( १०९. सूर्याला सांगितलेला योग आज तुला सांगतों, २७–३१ ) तोचि हा आजि आतां । तुजप्रती कुंतीसुता । सांगितला आम्हीं तत्वतां । भ्रांति न करीं ॥२७॥ हें जीवींचें निज गुज । परी केवीं राखों तुज । जे पैढियेसी तूं मज । म्हणऊनियां ॥२८॥ तूं प्रेमाचा पुतळा । भक्तीचा जिव्हाळा । मैत्रियेची चित्कळा । धनुर्धरा ॥ २९ ॥ तूं अनुसंगाचा ठावो । आतां तुज काय वंचूं जावों । जन्हीं संग्रा-

भगवान म्हणाले:—हा नाशरहित कर्मयोग आम्हीं पूर्वी सूर्याला सांगितला; सूर्यानें मनूला सांगितला; आणि मनूनें इक्ष्वाकूला सांगितला ॥ १ ॥

मग श्रीकृष्ण अर्जुनास म्हणाले.—हाच कर्मयोग आम्ही पूर्वी विवस्वानाला—सूर्याला—सांगितला; परंतु त्या गोष्टीला पुष्कळ दिवस झाले. १६ मग त्या विवस्वान सूर्यानें हा सर्व योग वैवस्वत मनूला सांगितला, १७ आणि मनूनें त्याचें आचरण करून इक्ष्वाकु नामक आपल्या पुत्रास त्याचा उपदेश केला; अशी ही मुळापासून परंपरा चालत आली आहे. १८

अर्जुना, अशा परंपरेनें प्राप्त झालेला हा योग राजर्षींना समजला. तोच योग पुष्कळ काल गेल्यामुळें ह्या लोकीं नष्ट झाला आहे ॥ २ ॥

पुढें आणखीही कांहीं राजर्षींना हा योग माहीत होता. परंतु त्यानंतर आजपर्यंत कोणालाही तो माहीत नाही. १९. कारण, प्राणिमात्राची आवड विषयसेवनाविषयीं असून देहावरच विशेष प्रेम असल्यामुळें त्याना आत्मबोधाचा विसर पडला. २० आस्तिक्यबुद्धि आडमार्गानें गेल्यामुळें विषयसुख म्हणजेच इतिकर्तव्य असें लोकांना वाटून, ते जिवावरच्या सारखेंच विषयोपाधींवरही प्रेम करूं लागले। २१ असें पहा कीं, नग्न लोकांच्या गांवी उंची वस्त्रांची चाड काय असणार? किंवा जन्मांधाला सूर्याचा काय उपयोग सांग बरें? २२ किंवा बहिऱ्यांच्या सभेंत गाण्याला कोण मान देईल? अथवा कोल्ह्याला चादण्यापासून कसा आनंद होईल? २३ तसेंच, चंद्रोदयापूर्वी ज्याचे डोळे फुंटतात—मिटतात—ते कावळे चंद्रास कसे ओळखतील? २४ त्याप्रमाणें, ज्यांनीं वैराग्याची शीव सुद्धां पाहिली नाहीं, आणि ज्यांना विचाराचें नांव देखील माहीत नाहीं, त्या मूर्खांना मज परमेश्वराचा लाभ कसा होईल? २५ हा मोह कसा वाढला हें कांहीं कळत नाहीं; पण त्यामुळें बहुतेक काळ व्यर्थ गेला; आणि म्हणून ह्या लोकीं हा योग बुडाला. २६

तोच हा पुरातन व उत्तम रहस्यरूप असा योग मीं तुला आज सांगितला; कारण तूं माझा भक्त व सखा आहेस ॥ ३ ॥

हे कुंतीसुता, खरोखर तोच हा योग तुला तत्वतः आज आम्हीं सांगितला आहे. तूं कांहीं सुद्धां शंका धरूं नको. २७ हा योग म्हणजे माझा जीव कीं प्राण आहे; परंतु तुजपासून तो चोरून कसा ठेवावा? कारण, तूं माझा फार आवडता भक्त आहेस. २८ धनुर्धरा, तूं केवळ प्रेमाची मूर्ति असून, भक्तीचा जिव्हाळा, जिवलग मित्रत्वाचें तर केवळ जीवन. २९ आणि माझ्या विश्वासाचें ठिकाण आहेस; तेव्हां तुझी वंचना कशी करावी? आम्ही जरी

१ निष्काम कर्मयोग. २ सूर्याला. ३ आचरण केली. ४ विषयसेवनाविषयीं. ५ प्रीति. ६ आडमार्गानें गेल्यास. ७ सार्थक. ८ दिगंबर. ९ उंची पर्वे. १० सभेंत. ११ अगोदर. १२ जिवलग. १३ जीव. १४ अनुभवाचा, विश्वासाचा.

मोरूढ आहों। जाहलों आम्ही ॥३०॥ तरी नावेक हें सहावें। गाजावज्यही न धरावें। परी तुझें अज्ञानत्व हरावें। लागे आघीं ॥ ३१ ॥

अर्जुन उवाचः—

अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः। कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥४॥

अन्वय—भवतः जन्म अपरं, विवस्वतः जन्म परं (अस्ति; अतः) त्वं आदौ प्रोक्तवान् इति (अहं) एतत् कथं विजानीयाम् ॥ ४ ॥

(११०. अर्जुनाची शंका, ३२—४०) तंव अर्जुन म्हणे श्रीहरी। मीय आपुलेयाचा स्नेहो करी। येथ विस्मयो काय अवधारीं। कृपानिधि ॥ ३२॥ तूं संसारश्रांतांची साउली। अनाथ जीवांची माउली। आमुतें कीर प्रसवली। तुझीच कृपा ॥३३॥ देवा पांगुळ एकादें विजे। तरी जन्मौनि जोजौरु साहिजे। हें बोलों काय तुझें। तुजचि पुढां ॥ ३४ ॥ आतां पुसेन जें मी कांहीं। तेथ निकें चित्त देईं। तेवींचि देवें कोपावें ना कांहीं। बोला एका ॥ ३५ ॥ तरी मागील जे वार्ता। तुवां सांगितली होती अनंता। ते नावेक मज चित्ता। मानेचिना ॥ ३६ ॥ जे तो विवस्वतु म्हणजे कायी। ऐसें हें वडिलां ठाऊवें नाहीं। तरी तुवांचि केविं पाहीं। उपदेशिला ॥३७॥ तो आइकिजे बहुतां काळांचा। आणि तूं तंव श्रीकृष्ण सांपेचा। म्हणोनि गा इये मातूचा। विसंवादु ॥ ३८ ॥ तेवींचि देवा चरित्र तुझें। आपण कांहींचि नेणिजे। हें लटिकें केविं म्हणिजे। ऐकिहेळां ॥३९॥ परी हेचि मातु आवघी। मीं परियसें ऐशी सांगावी। जे तुवांचि रवी केवीं। उपदेशु केला ॥४०॥

श्रीभगवानुवाचः—

बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन। तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥५॥

*अन्वय—(हे) परंतप अर्जुन, मे तव च बहूनि जन्मानि व्यतीतानि; तानि सर्वाणि अहं वेद, त्वं न वेत्थ ॥ ५ ॥*

(१११. देव म्हणतात, मागील सर्व मला स्मरतें व तुला स्मरत नाहीं, ४१—४३) तंव श्रीकृष्ण म्हणे पंडुसुता। तो विवस्वतु जैं होता। तैं आम्ही नसों ऐसी चित्ता। भ्रांति जरी तुज ॥ ४१ ॥ तरी तूं गा हें नेणसी। पैं जन्में आम्हां तुम्हांसी। ब्रहुतें गेलीं परी न स्मरसी। तूं आपुली ॥ ४२ ॥ मी जेणें जेणें अवसरें। जें जें होऊनि अवतरें। तें समस्तही स्मरें। धनुर्धरा ॥ ४३ ॥

अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन्।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥

अन्वय—(अहं) अजः अव्ययात्मा अपि सन् भूतानां ईश्वरः अपि सन् स्वां प्रकृतिं अधिष्ठाय आत्ममायया संभवामि ॥ ६ ॥

(११२. अवतारकृत्य भ्रांतिमूलक आहे, ४४—४७) म्हणोनि हें आघवें। मागील मज आठवे। मी अजुही परि संभवें[१४]। प्रकृतियोगें ॥४४॥ माझें अव्ययत्व तरी न नॅसे। परी होणें जाणें एक दिसे। तें प्रतिबिंबे मायावशें। माझ्याचि

युद्धास सिद्ध झालों आहों, ३० तरी क्षणभर ही युद्धाची गडबड आहे ती बाजूस ठेवून, न घाबरतां प्रथम तुझें अज्ञान आम्हांस दूर केलें पाहिजे. ३१

अर्जुन म्हणालाः—कृष्णा, तुमचा जन्म अलीकडचा, आणि सूर्य तर प्राचीन काळचा; तेव्हां तुम्हीं त्याला प्रथम योग सांगितला हें मीं कसें खरें मानावें ॥ ४ ॥

त्या वेळेस अर्जुन म्हणतो, " हे कृपानिधे श्रीहरि ! आईनें-आपल्या लेंकरावर प्रेम केलें, तर त्यांत आश्चर्य तें कोणतें ? ३२ तूं संसारांत थकलेल्यांची सावली व दीन अनाथ जनांची माउली आहेस; आणि खरोखर आमचा जन्म तुमचेच कृपेमुळें झाला आहे. ३३ देवा, आईला पांगळें मूल झालें, तर त्याच्या जन्मापासून तिला त्रास सोसावा लागतो हें सर्व तुम्ही जाणतां; तर आम्ही तुमच्यापुढें तुमचें महत्त्व काय बोलावें ? ३४ आतां मी जें कांहीं विचारणार आहें, त्याकडे चांगलें लक्ष द्यावें; व त्या गोष्टीचा राग मनांत आणूं नये. ३५ हे अनंता, तुम्ही जी मागील गोष्ट म्हणून सांगितली, ( सूर्याला हा कर्मयोग सांगितला त्याची ) ती माझ्या मनाला मुळींच रुचत नाहीं. ३६ सूर्य म्हणजे कोण हें आमच्या वाडवडिलांना सुद्धां माहित नाहीं. तर त्याला आपण कधी व कसा उपदेश केला ? ३७ तो सूर्य तर फार जुनाट आहे असें ऐकतों, आणि आपण तर, श्रीकृष्णा, हल्लींचे; म्हणून ह्या गोष्टींत आम्हांला विरोध दिसतो. ३८ तशांतून, देवा, तुमचें चरित्र कांही आम्हास कळत नाही; तेव्हां आपण म्हणतां तें खोटें आहे असें तरी आम्हीं एकदम कसें म्हणावें ? ३९ तेव्हां, मी सूर्याला उपदेश केला, हें जें आपण म्हणतां, तें मला समजेल अशा रीतीनें स्पष्ट सांगा. " ४०

श्रीभगवान म्हणालेः—हे शत्रुतापना अर्जुना, माझे व तुझे बहुत जन्म होऊन गेले; त्या सर्वांचें स्मरण मला आहे, तुला नाहीं ॥ ५ ॥

तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले.—अर्जुना, ज्या वेळेस तो सूर्य होता, त्या वेळेस आम्ही नव्हतों अशी जरी तुझ्या मनांत शंका आली, ४१ तरी तुला हें माहीत नाही, कीं तुझे व माझे जन्म पुष्कळ झाले; परंतु तुझ्या जन्मांची तुला आठवण नाहीं. ४२ अर्जुना, मी ज्या ज्या वेळेस जे जे अवतार घेतले, त्या सर्व अवतारांचें मला स्मरण आहे. ४३

मी जन्मनाशरहित व सर्व भूताचा नियता असतांही, स्वकीय प्रकृतीचा स्वीकार करून आपल्या मायेनें जन्म घेतों. ॥ ६ ॥

म्हणून मला मागील सर्व गोष्टींचें स्मरण आहे. मी अजन्मा असूनही मायेचे योगानें अवतार घेतों; ४४ माझें अव्ययत्व नाहींसें होत नाहीं; पण अवतार घेणें व तो संपविणें हें जें भासतें, तें मायेच्या योगानें माझ्या ठिकाणींच भासतें. ४५ माझ्या स्वातंत्र्याचा तर

१ युद्धाला सज्ज. २ गडबड. ३ बाळकाचा. ४ संसारात श्रमलेल्याची. ५ फळा आली. ६ जन्मापासून. ७ त्रास. ८ साम्प्रतचा. ९ गोष्टींचा. १० विरोध. ११ एकाएकीं. १२ सूर्य. १३ वेळीं. १४ अवतार घेतों. १५ माया. १६ अविनाशित्व. १७ विघडत नाहीं. १८ दिसतें.

ठायीं ॥४५॥ माझी स्वतंत्रता तरी न मोडे । परी कर्माधीनु ऐसा आवडे । तेही भ्रांतिबुद्धि तरी घडे । येऱ्हवीं नाहीं ॥ ४६ ॥ कीं एकचि दिसे दुसरें । तें दर्पणाचेनि आधारें । येऱ्हवीं काय वस्तुविचारें । दुजें आहे ॥ ४७ ॥ ( ११३. प्रकृतीच्या साहाय्यानें मी साकार होतों ४८). तैसा अमूर्तचि मीं किरीटी । परी प्रकृति जैं अधिष्ठीं । तैं साकारपणें नटनटीं । कार्यालागीं ॥ ४८ ॥

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत। अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ७

अन्वय—( हे ) भारत, यदा यदा हि धर्मस्य ग्लानिः भवति ( च ) अधर्मस्य अभ्युत्थानं ( भवति ), तदा अहं आत्मानं सृजामि ॥ ७ ॥

( ११४. साकार होण्याचीं कारणें, धर्मस्थापना व साधूंचें पालन, ४९–५७ ) जें धर्मजात आघवें । युगायुगीं म्यां रक्षावें । ऐसा ओघु हा स्वभावें । आद्य असे ॥४९॥ म्हणोनि अजत्व परतें ठेवीं । मी अव्यक्तपणही नाठवीं । जे वेळीं धर्मातें अभिभवी । अधर्मु हा ॥ ५० ॥

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्। धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥८

अन्वय—साधूनां परित्राणाय, दुष्कृतां विनाशाय च धर्मसंस्थापनार्थाय अहं युगे युगे संभवामि ॥ ८ ॥

ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें । मी साकारु होऊनि अवतरें । मग अज्ञानाचें आंधारें । गिळूनि घालीं ॥ ५१ ॥ अधर्माची अवधी तोडीं । दोषाचीं लिहिलीं फाडीं । सज्जनांकरवीं गुढी । सुखाची उभवीं ॥ ५२ ॥ दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मानु गिंवशीं । धर्मासी नीतीशीं । शेंजे भरीं ॥५३॥ मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं । तैं योगियां पाहे दिवाळी । निरंतर ॥ ५४ ॥ स्वसुखें विश्व कोंदे । धर्मचि जगीं नांदे । भक्तां निघती दोंदें । सात्विकांचीं ॥५५॥ तैं पापांचा अंचळु फिटे । पुण्याची पहांट फुटे । जैं मूर्ति माझी प्रगटे । पंडुकुमरा ॥ ५६ ॥ ऐसिया काजालागीं । अवतरें मी युगींयुगीं । परी हेंचि वोळखे जो जगीं । तो विवेकिया ॥ ५७ ॥

जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्वतः। त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन

अन्वय—( हे ) अर्जुन, यः तत्त्वतः मे दिव्यं जन्म कर्म च एवं वेत्ति, सः देहं त्यक्त्वा पुनर्जन्म न एति ( किंतु ) मां एति ॥ ९ ॥

( ११५. ईश्वराचें दिव्य जन्मकर्म जाणणाराला पुनर्जन्म नाहीं, ५८–५९ ) माझें अजत्वें जन्मणें । अक्रियताचि कर्म करणें । हें अविकार जो जाणे । तो परम मुक्त ॥५८॥ तो चालिला संगें न चले । देहींचा देहा नाकळे । मग पंचत्वीं तंव मिळे । माझ्याचि रूपीं ॥ ५९ ॥

१ घाटतो, २ अज्ञान ३ आरसा. ४ क्रम. ५ ऱ्हास करतो. ६ भक्ताच्या. ७ मर्यादा.

भंग होत नाहींच; पण मी कर्माधीन आहें असें जें लोकांस वाटतें, तें भ्रांतीमुळें वाटतें; बाकी खरोखर पाहतां तसें कांहीं नाहीं. ४६ किंवा एकच वस्तु आरशाच्या योगानें दोन ठिकाणीं दिसते, पण वस्तुस्थितीचा विचार केला तर त्या दोन का आहेत? ४७ त्याचप्रमाणें, अर्जुना, मी तर निराकारच आहें; पण जगत्कार्यासाठीं मायेचा स्वीकार करून नटाप्रमाणें बाह्यत: आकार धारण करितों. ४८

अर्जुना, जेव्हां जेव्हा धर्माला ग्लानि येते आणि अधर्म उठाव घेतो, तेव्हा तेव्हा मी अवतार घेतों. ॥ ७ ॥

जेवढे म्हणून धर्म आहेत, त्यांचें म्यां युगायुगांचे ठायीं रक्षण करावें असा हा क्रम अगदीं मुळापासून चालत आलेला आहे. ४९ म्हणून, ज्या ज्या वेळीं अधर्मानें धर्माचा ऱ्हास होतो, त्या त्या वेळीं मी आपला जन्मरहितपणा बाजूला ठेवतों, व निराकारपणाची आठवणही धरीत नाहीं. ५०

साधूंचें रक्षण करण्याकरिता, दुष्टाचा समूळ नाश करण्याकरिता, व धर्म स्थापन करण्याकरिता मी युगायुगाच्या ठिकाणीं अवतीर्ण होतों. ॥ ८ ॥

त्या वेळीं आपल्या भक्तांच्या कैवारानें मी देह धारण करून अवतार घेतों, आणि मग अज्ञानरूप अंधारास गिळून टाकतों. ५१ अधर्माची मर्यादा तोडतों, दोषयुक्त लिखाणें फाडून टाकतों, आणि जे साधु आहेत त्यांजकडून सुखाचे ध्वज उभारवितों. ५२ दैत्यकुळांचा नाश करतों, साधूंना योग्य मान देववितों, आणि धर्म व नीति ह्यांची ओटी भरतों ( गांठ घालतों. ) ५३ अविचाररूप दिव्याची काजळी काढून विचाररूप दिवा प्रज्वलित करतों, त्या वेळीं योगी लोकांना निरंतर आनंदाची दिवाळीच भासते. ५४ मग सत्सुखानें सर्व विश्व भरून जातें, जिकडे तिकडे लोक धर्माचें आचरण करितात, आणि भक्तजन सत्त्वगुणानें परिपूर्ण होतात. ५५ अर्जुना, ज्या वेळीं माझा अवतार प्रकट होतो, त्या वेळीं पापांचे पर्वत नाहींतसे होतात, व पुण्याचा उदय होतो. ५६ अशा कामाकरितां मी युगायुगांचे ठायीं अवतार धारण करितों, परंतु असें जो ओळखतो तोच जगांत ज्ञानी होय. ५७

अर्जुना, अशा प्रकारें, माझें जन्म व कर्म दिव्य आहे असें जो यथार्थ जाणतो, तो देहत्यागानतर पुनः जन्मास येत नाहीं; तर मजप्रत प्राप्त होतो. ॥ ९ ॥

माझें अजत्व कायम असून जन्म घेणें, व अकर्तृत्व कायम असून कर्म करणें असें जें माझें स्वरूप, तें जो नि:शंक जाणतो, तोच परममुक्त होय. ५८ तो देहाच्या संबंधानें जरी चालला, तरी तो चालत नाहीं; आणि त्यानें देह धारण केला, तरी तो देहभावानें आकळिला जात नाहीं. मग मेल्यावर तो माझ्या स्वरूपांत येऊन मिळतो. ५९

८ सनद. ९ ध्वज. १० स्वाधीन करतों. ११ ओटी भरतों, ओंवाळतों. १२ अज्ञानाची. १३ उजाडे. १४ आत्मसुखानें. १५ मरे. १६ पर्वत. १७ नि:शंक. १८ स्वाधीन होत नाहीं. १९ मरणानंतर.

वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः । बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥१०॥

अन्वय—वीतरागभयक्रोधाः मन्मयाः मां उपाश्रिताः बहवः ज्ञानतपसा पूताः ( सन्तः ) मद्भावं आगताः ॥ १० ॥

( ११६. भगवत्स्वरूप जाणणाराचीं लक्षणें, ६०–६५ ) येऱ्हवीं पैरापर न शोचिती । जे कामनाशून्य होती । वाटा कोणे वेळीं न वेचती । क्रोधाचिया ॥६०॥ सदा मियांचि आथिले । माझिया सेवा जियाले । कीं आत्मबोधें तोषले । वीतरांग जे ॥ ६१ ॥ जे तपोतेजाचिया राशी । कीं एकायतन ज्ञानासी ॥ जे पावित्रता तीर्थांसी । तीर्थरूप ॥ ६२ ॥ ते मद्भावा । सहजें आले । मी तेचि ते होऊनि ठेले । जे मज तयां उरले । पदँरु नाहीं ॥६३॥ सांगें पितळेची गंधिर्कांळिक । जैं फिटली होय निःशेख । तैं सुवर्ण काई आणिक । जोडूं जाइजे ॥ ६४ ॥ तैसें यमनियमीं कंडसले । जे तपोज्ञानें चोखाळले । मी तेचि ते जाहले । एथ संशयो कायसा ॥ ६५ ॥

ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम्। ममवर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥११

अन्वय—ये मां यथा प्रपद्यंते, तान् तथा एव अहं भजामि; पार्थ, मनुष्याः सर्वशः मम वर्त्म अनुवर्तंते ॥ ११ ॥

( ११७. भक्त ज्या भावनेनें भजतो, त्याच भावनेने मीही भजतों, ६६–६७ ) येऱ्हवीं तरी पाहीं । जे जैसे माझ्या ठायीं । भजती तयां मीही । तैसाचि भजें ॥ ६६ ॥ देखें मनुष्यजात सकळ । हे स्वभावतां भजनशीळ । जाहलें असें केवळ । माझ्याचि ठायीं ॥ ६७ ॥ ( ११८. अज्ञानी बुद्धिभेदामुळें माझ्या ठिकाणीं भेद पाहातात, ६८–७० ) परी ज्ञानेंवीण नाशिले । जे बुद्धिभेदासी आले । तेणेंचि त्या कल्पिलें । अनेकत्व ॥ ६८ ॥ म्हणऊनि अभेदीं भेद देखती । यया अनार्म्यां नामें ठेविती । देवी देवो म्हणती । अर्चेचातें ॥ ६९ ॥ जें सर्वत्र सदा सम । तेथ विभाग अधमोत्तम । मतिवशें संभ्रम । विवंचिती[१] ॥ ७० ॥

कांक्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः । क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥१२

अन्वय—कर्मणां सिद्धिं कांक्षंतः इह देवताः यजन्ते; हि मानुषे लोके कर्मजा सिद्धिः क्षिप्रं भवति ॥ १२ ॥

( ११९. भक्तीला अनुरूप फळ मिळतें, ७१–७६ ) मग नानाहेतुप्रकारें । यथोचितें उपचारें । मानिलीं देवतांतरें । उपासिती ॥ ७१ ॥ एथ जे जें अपेक्षित । ते तैसेंचि पावती समस्त । परी तें कर्मफळ निश्चित । वोळख तूं ॥ ७२ ॥ वांचूनि देतें घेतें आणिक । निभ्रांत नाहीं सम्यकें । एथ कर्मचि फळसूचक । मनुष्यलेर्कीं ॥ ७३ ॥ जैसें क्षेत्रीं जें पेरिजे । तेंवांचूनि आन न निपजे ।

१ मार्गालपुढील. २ वाती. ३ युक्त. ४ विषयप्रीतिरहित. ५ एक ठिकाण. ६ माझ्या

ज्याचे काम, भय व क्रोध हे दोष गेले आहेत, व जे मद्रूप होऊन माझाच आश्रय करून राहिले आहेत, असे, ज्ञानरूप-तपानें पवित्र झालेले पुष्कळ ज्ञानी माझ्या स्वरूपाला पावले. ॥ १०॥

एरव्हीं, मागील व पुढील गोष्टींचा जे शोक करीत नाहींत, आणि जे वासनारहित असतात, ते कोणत्याही वेळेस क्रोधाच्या मार्गाला जात नाहींत. ६० जे विषयप्रीतिरहित आहेत, जे नेहमीं माझ्या स्वरूपाच्या प्राप्तीमुळें आपल्यास धन्य मानतात, आणि माझ्याच सेवेकरितां जे वांचले आहेत, किंवा जे ज्ञानाच्या बोधानें संतोष पावतात व विषयप्रीतिरहित झाले आहेत, ६१ जे तपाच्या तेजाचे राशि किंवा ज्ञानाचें एकमेव घरच अथवा जे तीर्थाळाही पवित्र करणारे तीर्थरूप आहेत, ६२ ते माझ्या स्वरूपास सहज येऊन मिळतात, आणि मद्रूपच होतात;—त्यांच्यात व माझ्यांत भिन्नभाव नसतो. ६३ सांग कीं, कळकटपणा व रंग अजिबात नाहींसा झाला तर मग पितळ आणि सोनें ह्यांत काय अंतर आहे ? ६४ त्याचप्रमाणें, जे यमनियमादि अष्टांगयोगांत पारंगत होऊन तपानें व ज्ञानाने शुद्ध झाले आहेत, ते माझ्या स्वरूपांत मिळतात, यात संशय कसला ? ६५

हे अर्जुना, जे ज्या भावनेनें माझें भजन करतात, त्याप्रमाणेंच मी त्यांच्या इच्छा पूर्ण करितों. सर्व लोक सर्व प्रकारें माझ्या मार्गानें चालणारे आहेत. ॥ ११ ॥

शिवाय असें पहा कीं, जे ज्या ज्या भावानें मला भजतात, त्या त्या भावानें मीही त्यांना तसाच भजतों. ६६ हें पहा कीं, मनुष्यमात्राची स्वभावतांच माझें भजन करण्याकडे प्रवृत्ति आहे. ६७ परंतु ज्ञानाच्या अभावानें बुद्धीचे ठिकाणीं भेद उत्पन्न होऊन, मी जो एक आहें, त्या माझे ठिकाणी ते अनेकत्व कल्पितात. ६८ म्हणून मी अभेद असून माझ्या ठिकाणीं भेद कल्पितात, मी नामरहित असून मला अनेक नावें देतात, आणि मी शब्दातीत असून मला कोणी देव, कोणी देवी असें म्हणतात. ६९ मायेच्या अधीन होऊन, जो मी नेहमीं सर्व-ठिकाणीं सारखा आहें, त्या माझ्या ठिकाणीं ते भ्रांतीनें ' वाईट, चांगला ' असा भेद मानतात. ७०

कर्माच्या फलाच्या प्राप्तीची इच्छा धरणारे पुरुष ह्या लोकीं देवताचें यजन करतात. कारण, ह्या मनुष्यलोकीं कर्मापासून फलाची सिद्धि त्वरित होते. ॥ १२ ॥

मग मनांत नानाहेतु धारण करून, जे ज्यास आवडतात त्या उपचारांनीं अनेक देव मानून त्यांची उपासना करतात. ७१ अशा प्रकारें, एथें ज्याचें जें इच्छित असतें, तें त्यांना तसेंच प्राप्त होतें; परंतु हें त्यांच्या कर्माचें फळ आहे असें निश्चयानें तूं समज. ७२ खरोखर पाहतां, देणारा किंवा घेणारा कर्माशिवाय निःसंशय दुसरा कोणी नसून ह्या मनुष्यलोकीं कर्मापासूनच फलप्राप्ति होते. ७३ जसें जमिनींत जें धान्य पेरावें, त्यावाचून

स्वरूपाला. ७ पडदा. ८ कलंक. ९ पारंगत झाले. १० निर्मळ झाले. ११ नामरहिताला. १२ चर्चेचा विषय नव्हे असाला. १३ मानितो. १४ खरें पाहता.

कां पाहिजे तेंचि देखिजे । दर्पणाधारें ॥ ७४ ॥ नातरी कडेयांतळवटीं । जैसा आपुलाचि बोलु किरीटि । पडिसादु होऊनि उठी । निमित्तयोगें ॥ ७५ ॥ तैसा समस्तां यां भजनां । मी साक्षिभूतु पैं अर्जुना । एथ प्रतिफळे भावना । आपुलाली ॥ ७६ ॥

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः । तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३

अन्वय—मया गुणकर्मविभागशः चातुर्वर्ण्यं सृष्टं; तस्य कर्तारं अपि मां अकर्तारं अव्ययं विद्धि ॥ १३ ॥

( १२०. चातुर्वर्ण्यव्यवस्था, ७७–८० ) आतां याचिपरि जाण । चाऱ्ही हे वर्ण । सृजिले[3] म्यां गुण- । कर्मविभागें ॥७७॥ जे प्रकृतीचेनि आधारें । गुणाचेनि व्यभिचारें । कर्मैं तदनुसारें । विवंचिलीं[6] ॥ ७८ ॥ एथ एकचि हे धनुष्यपाणी । परी जाहले गा चहुं वर्णीं । ऐसी गुणकर्मकडसणी । केली सहजें ॥ ७९ ॥ म्हणोनि आइकें पार्था । हे वर्णभेदसंस्था । मी कर्ता नव्हें सर्वथा । याचिलागीं ॥ ८० ॥

न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा ।
इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बद्ध्यते ॥ १४ ॥

अन्वय—मा कर्माणि न लिंपन्ति, मे कर्मफले स्पृहा न, इति यः मा अभिजानाति, सः कर्मभिः न बद्ध्यते ॥ १४ ॥

( १२१. चातुर्वर्ण्याचा कर्ता ईश्वर नव्हे असें जाणणारा कर्मबंधांतून सुटतो, ८१) हें मजचिस्तव जाहलें । परी म्यां नाहीं केलें । ऐसें जेणें जाणिलें । तो सुटला गा ॥८१॥

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः । कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥१५॥

अन्वय—एवं ज्ञात्वा, पूर्वैः मुमुक्षुभिः अपि कर्म कृतं; तस्मात् त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतं कर्म एव कुरु ॥ १५ ॥

( १२२. मुमुक्षु असें जाणून कर्मबंधातून सुटले, ८२–८३ ) मागील मुमुक्षु जे होते । तिहीं ऐसिया जाणोनि मातें । कर्में केलीं समस्तें । धनुर्धरा ॥ ८२ ॥ परि तें बीजें जैसीं दग्धलीं । नुगवतींचि पेरिलीं । तैसीं कर्मेंचि परि तयां जाहलीं । मोक्षहेतु ॥ ८३ ॥ ( १२३. कर्माकर्मांचा विचार मोठा गहन आहे, ८४–८८ ) एथ आणिकही एक अर्जुना । हे कर्माकर्मविवंचना । आपुलिये चाडें सज्ञाना । योग्यु नोहे ॥८४॥

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।
तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥

अन्वय—किं कर्म किं अकर्म इति अत्र कवयः अपि मोहिताः, तत् कर्म ते प्रवक्ष्यामि, यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे ॥ १६ ॥

कर्म म्हणिपे तें कवण । अथवा अकर्मा काय लक्षण । ऐसें विचारितां विचक्षण । गुंफोनि[12] ठेले ॥८५॥ जैसें का कुडें नाणें । खऱ्याचेनि सारखेपणें । डोळ्यांचेंहि[14] देखणें । संशयीं घाली ॥ ८६ ॥ तैसें नैष्कर्म्यतेचेनि भ्रमें । गिंवसिजेंत

१ डोंगराच्या तळाखालीं. २ सिद्धीस जातें. ३ उत्पन्न केले. ४ सत्त्व, रज व तम ह्या तीन

दुसरें उत्पन्न व्हावयाचें नाहीं, किंवा आरशांत जें पहावें तेंच दृष्टीस पडतें, ७४ किंवा, अर्जुना, डोंगराच्या कड्याखालीं ज्याप्रमाणें आपलाच शब्द आपण बोलल्यानें प्रतिध्वनि घेऊन उठतो, ७५ त्याचप्रमाणें, अर्जुना, प्रत्येक उपासनेला मीच आधारभूत आहें, म्हणून प्रत्येकास त्याचे भावनेप्रमाणें फलप्राप्ति होते. ७६

श्लोकार्थः—गुणकर्मांच्या विभागानुसार (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे) चार वर्ण मीं उत्पन्न केले; (आणि म्हणून) ह्या वर्णांचा मी कर्ता असें जरी दिसलें, तथापि मी अकर्ता, आणि नाशी व असंसारी आहें असें जाण. ॥ १३ ॥

आतां ह्याचप्रमाणें तूं हेंही लक्षांत ठेव कीं, हे जे चार वर्ण आहेत, तेही गुण व कर्म यांच्या विभागानें मींच उत्पन्न केले आहेत; ७७ आणि त्या चाऱ्ही वर्णांच्या कर्मांची आपापल्या प्रकृतिधर्मानें आणि गुणांच्या तारतम्यानें व्यवस्था केली आहे. ७८ अर्जुना, हे सर्व लोक एकच असून, गुण व कर्म ह्यांच्या योगानें त्यांच्या चार वर्णांची व्यवस्था सहज झाली. ७९ म्हणून, पार्था, असें पहा कीं, याच कारणास्तव या वर्णभेदाच्या स्थापनेचा मी मुळींच कर्ता नाहीं. ८०

श्लोकार्थः—कर्में मला बद्ध करीत नाहींत, आणि कर्मफलाविषयीं माझी आसक्तिही नाहीं असा मी आहें असें जो जाणतो, त्याला कर्में बद्ध करीत नाहींत. ॥ १४ ॥

हा वर्णभेद जरी माझ्यापासून झाला आहे, तरी तो मीं केला नाहीं असें जो जाणतो, तोच कर्मातीत झाला. ८१

श्लोकार्थः—(मी कर्म करून अकर्ता आहें) असें जाणून पूर्वीच्या मुमुक्षूंनीं कर्में केलीं, म्हणून तूंही पूर्वीच्या लोकाप्रमाणें कर्म कर. ॥ १५ ॥

अर्जुना, पूर्वींचे जे मुमुक्षु झाले, त्यांनीं अशा प्रकारेंच मला जाणून सर्व कर्में केलीं; ८२ परंतु ज्याप्रमाणें भाजलेलें बीं पेरलें असतां मुळींच उगवत नाहीं, त्याप्रमाणें त्यांचीं निष्काम कर्मेंच त्यांना मोक्षप्राप्तीस कारणीभूत झालीं; ८३ आणि अर्जुना, त्यांत आणखी एक गोष्ट अशी आहे कीं, हा कर्माकर्माचा विचार शहाण्या मनुष्यानें आपले इच्छेप्रमाणें करणें योग्य नव्हे. ८४

श्लोकार्थः—कर्म म्हणजे काय, अकर्म म्हणजे काय, हें जाणण्याविषयीं मोठे दूरदर्शी देखील मोहांत पडले आहेत. असें जें कर्म, तें मी तुला सांगतों. तें जाणलें असता तूं संसारदुःखापासून मुक्त होशील ॥ १६ ॥

कर्म म्हणतात तें कोणतें, व अकर्माचें लक्षण काय हा विचार करतां करतां शहाणे देखील घोटाळ्यांत पडले. ८५ जसें खोटें नाणें खऱ्यासारखें हुबेहूब दिसल्यानें शान्यांच्याही डोळ्यांस संशयांत घालतें, ८६ तसें, नुसतें मनांत आलें तर प्रतिसृष्टि

गुणांच्या योगानें; आणि शम, दम, शौर्य, तेज, कृषि, वाणिज्य, सेवा इत्यादि कर्मांच्या योगानें; ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हा गुणकर्मविभाग. ५ तारतम्यानें ६ व्यवस्था केली. ७ विचार. ८ मुक्तीला कारण. ९ इच्छेप्रमाणें. १० विचारी. ११ शहाणे. १२ गोत्यात पडणे. १३ खोटें. १४ शान्याच्याही डोळ्याना. १५ गुंततात.

आहाती कर्में । जे दुजी सृष्टि मनोधर्में । करूं सकती ॥ ८७ ॥ वांचूनि मूर्खांची गोठी कायसी । एथ मोहले गा क्रांतदर्शी । म्हणोनि आतां तेचि परियेसीं । सांगेन तुज ॥ ८८ ॥

कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः । अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥१७

अन्वय—कर्मणः अपि ( तत्त्वं ) हि बोद्धव्यं च विकर्मणः ( तत्त्व ) बोद्धव्यं च अकर्मणः ( तत्त्वं ) बोद्धव्यं, कर्मणः गतिः गहना ( अस्ति ) ॥ १७ ॥

( १२४. कर्म, विकर्म, अकर्म जाणणाऱ्याचीं लक्षणें, ८९–१२२ ) तरी कर्म म्हणजे स्वभावें । जेणें विश्वाकारु संभवे । तें सम्यक आधीं जाणावें । लागे एथ ॥८९॥ मग वर्णाश्रमासि उचित । जें विशेष कर्म विहित । तेंही वोळखावें निश्चित । उपयोगेंसीं ॥ ९० ॥ पाठीं जें निषिद्ध म्हणिपें । तेंही बुझावें स्वरूपें । येतुलेनि कांहीं न गुंफे[७] । आपैसेंचि ॥ ९१ ॥ येऱ्हवीं जग हें कर्माधीन । ऐसियाची व्याप्ति गहन । अवतरणः—परी ते असो आइकें चिन्ह । प्राप्ताचें गा ॥ ९२ ॥

कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः । स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥१८

अन्वय—यः कर्मणि अकर्म पश्येत् अकर्मणि च यः कर्म पश्येत्, सः मनुष्येषु बुद्धिमान्, सः युक्तः, सः कृत्स्नकर्मकृत् ( अस्ति ) ॥ १८ ॥

जो सकळकर्मीं वर्ततां । देखे आपुली नैष्कर्म्यता । कर्मसंगें निराशता । फळाचिया ॥ ९३ ॥ आणि कर्तव्यतेलागीं । जया दुसरें नाहीं जगीं । ऐसिया नैष्कर्म्यता तरी चांगी । बोधली असे ॥ ९४ ॥ तरी क्रियाकलापु आघवा । आचरतु दिसे बरवा । तोचि तो ये चिन्हीं जाणावा । ज्ञानिया गा ॥ ९५ ॥ जैसा कां जळापाशीं उभा ठाके । तो जरी आपणपें जळामाजि देखे । तरी तो निभ्रांत वोळखे । म्हणें मी वेगळा आहें ॥ ९६ ॥ अथवा नावे हन जो रिगे । तो थडियेचे रुख जातां देखे वेगें । तेचि साचोकारें जों पाहों लागे । तंव रुख म्हणे अचल ॥ ९७ ॥ तैसें सर्व कर्मीं असणें । तें फुडें मानूनि वोंथाणें । मग आपणया जो जाणे । नैष्कर्म्यु ऐसा ॥ ९८ ॥ आणि उदोअस्ताचेनि प्रमाणें । जैसें न चलतां सूर्याचें चालणें । तैसं नैष्कर्म्यत्व जाणे । कर्मींचि असतां ॥ ९९ ॥ तो मनुष्यासारिखा तरी आवडे । परी मनुष्यत्व तया न घडे । जैसें जळामाजी न बुडे । भानुबिंब ॥ १०० ॥ तेणें न पाहतां विश्व देखिलें । न करितां सर्व केलें । न भोगितां भोगिलें । भोग्यजात ॥ १ ॥ एकेचि ठायीं बैसला । परि सर्वत्र तोचि गेला । हें असो विश्व जाहला । [१६]आंगेंचि तो ॥ २ ॥

---

१ सर्वज्ञ. २ यथार्थ. ३ फळासह. ४ उलट. ५ जाणावें ६ एकदाचें. ७ गुंते. ८ ब्रह्मनिष्ठाचें. ९ समजली असे. १० कर्मसमुदाय. ११ नौकेंत. १२ कांठींचे. १३ वृक्ष. १४ स्पष्ट. १५ खोटें. १६ स्वतः.

निर्माण करणारे देखील ' आम्ही कर्मातीत आहों ' अशा भ्रमानें युक्त होऊन कर्मांचे पाशांत सांपडतात. ८७ मग मूर्खांची—अज्ञान्यांची—गोष्ट कशाला पाहिजे ? येथें ज्ञानी लोक सुद्धां मोह पावले आहेत; म्हणून तीच गोष्ट सांगतों ऐक ८८.

श्लोकार्थः —कर्मांचें[1], विकर्मांचें[2] व अकर्मांचें[3] तत्त्व यथार्थ जाणलेंच पाहिजे. कारण, त्या कर्मादिकांचें यथार्थ तत्त्व समजण्यास फार कठिण आहे ॥ १७ ॥

जेथें आपोआप विश्वरचना संभवते, तेंच कर्म समज; आणि त्याचेंच पहिल्या प्रथम यथार्थ ज्ञान करून घेतलें पाहिजे. ८९ मग, जें कर्म वर्णाश्रमास योग्य व वेदांत सांगितलेलें आहे, त्याचीही निश्चित फळासह ओळख करून घेतली पाहिजे. ९० उलट, ज्याला निषिद्ध म्हणतात, त्याचेंही स्वरूप जाणलें पाहिजे. असें झालें म्हणजे आपोआपच तो बद्ध होत नाहीं. ९१ एरव्हीं, ह्या कर्माची व्याप्ति इतकी गहन आहे.की, सर्व जग कर्माधीन आहे. पण तें असो; आतां ब्रह्मनिष्ठाचीं चिन्हें कोणतीं तीं ऐक. ९२

श्लोकार्थः—जो कर्मांत अकर्म पाहतो, व अकर्मांत कर्म पाहतो, तो सर्व मनुष्यात बुद्धिमान, योगी व सर्व कर्मे करणारा होय. ॥ १८ ॥

फळाची आशा न धरतां जो कर्माचें आचरण करितो, पण तें कर्म आपण करितों, असें मानीत नाहीं; ९३ आणि त्याला अशा प्रकारें कर्मातीतपणा इतका चागला समजला असतो कीं, त्याशिवाय त्याला या जगात दुसरें कांहींच कर्तव्य उरलेलें नसतें; ९४ तथापि तो सगळीं कर्में नीट रीतीनें आचरीत आहे असे दिसतें; तोच ( अर्जुना, ) ज्ञानी होय असें समजावें. ९५ ज्याप्रमाणें एखादा मनुष्य नदीच्या काठी उभा राहिल्यावर आपलें प्रतिबिंब पाण्यात पाहतो, तरी ' प्रतिबिंबाहून मी वेगळा आहें ' असें तो निःसंशय समजतो, ९६ अथवा नावेंत बसून जाणाऱ्या मनुष्यास नदीच्या कांठावरील झाडें धावतात असें दिसतें, परंतु तोच खरें पाहूं लागला म्हणजे त्याला तीं झाडें अचल आहेत असें समजतें, ९७ त्याप्रमाणें, सर्व कर्में करीत असतां, कर्म करणें निवळ खोटें आहे असें मानून, मी कर्मकर्ता नांही असें जो समजतो, ९८ आणि सूर्य उगवतो व मावळतो एवढ्याच प्रमाणावरून तो चालतो असें आपल्यास दिसतें, तसें कर्म आचरीत असतां तें आपण करीत नाहीं असें जो जाणतो, ९९ तो मनुष्यासारखा जरी दिसतो, तरी तो मनुष्य नसून परब्रह्मच आहे असें समजावें. ज्याप्रमाणें सूर्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडलें तरी सूर्य त्यांत नसतो, १०० त्याप्रमाणें, जो ब्रह्मस्वरूप झालेला आहे, तो जग पाहून पहात नाहीं, सर्व क्रिया करून कोणतीही क्रिया करीत नाही, आणि सर्व भोग्य वस्तु भोगीत असून भोगीत नाहीं. १ तो सर्व ठिकाणीं हिंडला तरी त्याचें स्वकीय स्थान सुटत नाहीं. इतकेंच नव्हे, तर तो स्वयमेव जगच झालेला असतो असें समज. २

१ विहित कर्माचें. २ निषिद्ध कर्माचें. ३ कांहीं न करणें ह्याचें, नैष्कर्म्याचें.

यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः । ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः १९

अन्वय—यस्य सर्वे समारम्भाः कामसंकल्पवर्जिताः ( सन्ति ), तं बुधाः ज्ञानाग्निदग्धकर्माणं पंडितं आहुः ॥ १९ ॥

जया पुरुषाच्या ठायीं । कर्माचा तरी खेदु नाहीं । परी फळापेक्षा कहीं । संचरेना ॥ ३ ॥ आणि हें कर्म मी करीन । अथवा आदरिलें सिद्धी नेईन । येणें संकल्पेंही जयाचें मन । विटाळेना ॥ ४ ॥ ज्ञानाग्नीचेनि मुखें । जेणें जाळिलीं कर्में अशेखें । तो परब्रह्मचि मनुष्यवेखें । वोळख तूं ॥ ५ ॥

त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।
कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥

अन्वय—( यः ) कर्मफलासंगं त्यक्त्वा नित्यतृप्तः निराश्रयः ( भवति ), सः कर्मणि अभिप्रवृत्तः अपि न एव किंचित् करोति ॥ २० ॥

जो शरीरीं उदासु । फळभोगीं निरासु । नित्यता उल्हासु । होऊनि असे ॥ ६ ॥ जो संतोषाचा गाभारा । आत्मबोधाचिया वोगरां । पुरे न म्हणेचि धनुर्धरा । आरोगितां ॥ ७ ॥

निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः । शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥२१
यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः । समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबद्ध्यते ॥

अन्वय—निराशीः ( अत एव ) त्यक्तसर्वपरिग्रहः यतचित्तात्मा केवलं शारीरं कर्म कुर्वन् किल्बिषं न आप्नोति ॥२१॥ यदृच्छालाभसंतुष्टः, द्वंद्वातीतः, विमत्सरः च सिद्धौ असिद्धौ समः ( अस्ति सः ) कृत्वा अपि न निबद्ध्यते ॥ २२ ॥

कैसी अधिकाधिक आवडी । घेत महासुखाची गोडी । सांडोनियां आशा कुरोंडी । अहंभावेंसीं ॥ ८ ॥ म्हणोनि अवसरें जें जें पावे । तेणेंचि तो सुखावे । आपुलें आणि परावें । दोन्ही नाहीं ॥ ९ ॥ तो दिठी जें पाहे । तें आपणचि होऊनि जाये । आइके तें आहे । तोचि जाहला ॥ ११० ॥ चरणीं हन चाले । मुखें जें जें बोले । ऐसे चेष्टाजात तितुलें[1] । आपणचि जो ॥ ११ ॥ हें असो विश्व पाहीं । जयासि आपणपेंवांचूनि नाहीं । आतां कवण तें कर्म कायी । बाधी तयातें ॥ १२ ॥ हा मत्सरु जेथ उपजे । तेतुलें उरेचि जया दुजें । तो निर्मत्सरु काइ म्हणिजे । बोलेंवरी ॥ १३ ॥ म्हणोनि सर्वांपरी मुक्तु । तो सकर्मुचि कर्मरहितु । सगुण परि गुणातीतु । एथ भ्रांति नाहीं ॥ १४ ॥

गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः । यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥

अन्वय—गतसंगस्य, मुक्तस्य, ज्ञानावस्थितचेतसः यज्ञाय कर्म आचरतः ( तत् ) समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥

तो देहसंगें[2] तरी असे । परि चैतन्यासारिखा दिसे । पाहतां परब्रह्माचेनि कसें । चोखाळ भला ॥ १५ ॥ ऐसाही परी कौतुकें । जरी कर्में करी यज्ञादिकें । तरी

१ खिन्नता. २ शिरेना. ३ वेषानें. ४ निरिच्छ. ५ वाढण्याला ६ भोजन करिता.

श्लोकार्थः—ज्याच्या सर्व कर्मांचे आरंभ संकल्प व फलाची इच्छा याविरहित असतात, त्याला ज्ञानी जन ' ज्ञानाग्नीनें सर्व कर्में दग्ध झालेला पंडित ' असें म्हणतात. ॥ १९ ॥

ज्या पुरुषाला कर्माचरणाविषयी खेद होत नाहीं, परंतु कर्मफलाची इच्छा ज्याचे मनांत मुळींच उद्भवत नाहीं, ३ आणि अमुक एक कर्म मी करीन अथवा अमुक कर्म सुरू केलेलें शेवटास नेईन, असा संकल्प देखील ज्याचे मनास स्पर्श करीत नाहीं, ४ आणि ज्ञानरूप अग्नीचे मुखांत ज्यानें आपलीं सर्व कर्मं जाळून टाकलीं आहेत, असा तो पुरुष म्हणजे मनुष्यरूपानें परब्रह्मच अवतरलें आहे असें समज. ५

श्लोकार्थः—जो कर्माचे फलाची इच्छा सोडून देतो, आणि (आत्मानंदांत) नित्य तृप्त राहून कशाचाही आश्रय करीत नाहीं, तो सर्व कर्में करीत असला तरी वस्तुतः कांहींच करीत नाहीं ॥२०॥

जो शरिराविषयीं उदासीन असतो, आणि कर्मापासून होणाऱ्या फलप्राप्तीविषयीं निरिच्छ असतो, व जो नेहमीं आनंदस्वरूपांत निमग्न असतो, ६ पार्था, जो संतोषाच्या गाभाऱ्यामध्यें बसून जेवीत असतांना आत्मबोधाच्या वाढण्याला कधींही पुरे म्हणत नाहीं, ७

श्लोकार्थः—ज्यानें आशा सोडली आहे, आपलें चित्त व बुद्धि हीं स्वाधीन ठेवलीं आहेत, आणि (अशा प्रकारें निरिच्छ झाल्यामुळें ज्यानें) सर्व संग्रह सोडला आहे, त्यानें शरीरनिर्वाहापुरतीं (भिक्षाटनादिक) कर्में केलीं तरी त्याला कर्माचा दोष लागत नाहीं. (संसार प्राप्त होत नाहीं.) ॥२१॥ सहजगत्या मिळेल त्यात संतुष्ट असणारा, (मी व माझें या) द्वंद्वाच्या पलीकडे असणारा, मत्सररहित आणि कर्म पूर्ण किंवा अपूर्ण झालें असता हर्ष व खेद न मानणारा असा पुरुष संपूर्ण कर्में करीत असताही कर्मबंधानें लिप्त होत नाहीं; ॥ २२ ॥

जो अहंकारासुद्धा आशेची ओंवाळणी करून अधिकाधिक प्रेमानें ब्रह्मसुखाची गोडी घेतो, ८ म्हणून, ज्या ज्या वेळेस जें जें मिळेल त्यांतच तो सुख मानतो, आणि ज्याला आपलें आणि दुसऱ्याचें असा भेद नाहीं, ९ तो आपल्या दृष्टीनें जें जें पाहतो व ऐकतो, तें तो आपणच होतो. ११० पायानें चालतो, तोंडानें बोलतो, व त्याचप्रमाणें शरिरानें जितके व्यापार करतो, ते सर्व आपणच बनतो. ११ हें असो; परंतु जगतांत पाहिलें असतां आत्मस्वरूपावांचून ज्याला दुसरें कांहीं दिसत नाहीं, त्याला कोणत्या कर्मापासून कसली बाधा होणार? १२ ज्या ठिकाणीं मत्सर उत्पन्न होतो असा दुजेपणा ज्याचे ठिकाणीं मुळींच उरत नाहीं, तो निर्मत्सर आहे असें बोलून काय दाखवावयाचें आहे? १३ तो सर्व प्रकारानें कर्म करीत असतां कर्मरहित, आणि सत्त्व, रज व तम हे गुण त्याचे अंगीं असले तरी तो गुणातीत, म्हणून तो सर्व प्रकारें मुक्त आहे ह्यात संशय नाहीं. १४

श्लोकार्थः—जो सर्वसंगविवर्जित असून धर्माधर्माच्या बंधातून पार पडला आहे, आणि ज्याचें चित्त ज्ञानाचे ठिकाणीं स्थिर झालें आहे, तो जरी यज्ञ शेवटास नेण्याच्या उद्देशानें कर्म करीत असला, तरी त्याचें तें कर्म फलासहवर्तमान लय पावतें. ॥ २३ ॥

तो देहधारी आहे तरी निर्गुणासारखा दिसतो, आणि ब्रह्माच्या कसाला लावून पाहिला तर त्याच्यासारखा शुद्ध दिसतो; १५ असा जरी तो केवळ मुक्त आहे, तरी

७ ओंवाळणी. ८ अहंकारासह ९ दुसऱ्याचें. १० व्यापार. ११ तितकें. १२ शब्दानीं. १३ शरीरधारी. १४ निर्गुणासारखा. १५ कसोटीनें. १६ शुद्ध.

तियें लया जाती निःशेखें । तयाच्याचि ठायीं ॥ १६ ॥ अकाळींचीं अभ्रें जैशीं । ऊर्मीवीण आकाशीं । हरपती आपैसीं । उदयलीं सांतीं ॥ १७ ॥ *अवतरणः—तैसीं*, विधिविधानें विहितें । जरी आचरे तो समस्तें । तरी तियें ऐक्यभावें ऐक्यातें । पावतीचि गा ॥ १८ ॥

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् । ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥

अन्वय--ब्रह्म ( एव ) अर्पण, ब्रह्म ( एव ) हविः, ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ( च ) ब्रह्मकर्मसमाधिना तेन ब्रह्म एव गतव्यम् ॥ २४ ॥

हें हवन मी होता । कां इये यज्ञीं हा भोक्ता । ऐसिया बुद्धीसि नाहीं भिन्नता । म्हणऊनियां ॥ १९ ॥ जे इष्टयज्ञ यजावे । तें हविर्मंत्रादि आघवें । तो देखतसे अविनाशभावें । आत्मबुद्धि ॥ १२० ॥ म्हणऊनि ब्रह्म तेंचि कर्म । ऐसें बोधा आलें जया सम । तया कर्तव्य तें नैष्कर्म्य । धनुर्धरा ॥ २१ ॥ आतां अविवेक-कुमारत्वा मुकले । जयां विरक्तीचें पाणिग्रहण जाहलें । मग उपासन जिहीं आणिलें । योगाग्नीचें ॥ २२ ॥

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते । ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥

अन्वय—अपरे योगिनः दैवं एव यज्ञ पर्युपासते, अपरे ब्रह्माग्नौ यज्ञ यज्ञेन एव उपजुह्वति २५

( १२५. यज्ञाचे अनेक प्रकार, १२३ ते १५१ ) जे यजनशील अहर्निशीं । *जिहीं अविद्या हविली मनेंसीं । गुरुवाक्यहुताशीं । हवन केलें ॥ २३ ॥ तिहीं* योगाग्निकीं यजिजे । तो दैवयज्ञ म्हणिजे । जेणे आत्मसुख कांमिजे । पंडुकुमरा ॥ २४ ॥ दैवास्तव देहाचें पाळण । ऐसा निश्चयो परिपूर्ण । जो चिंतीना देहभरण । तो महायोगी जाण दैवयोगें ॥ २५ ॥ आतां अवधारीं सांगेन आणिक । जे ब्रह्माग्नी सा[१]ग्निक । तयांतें यज्ञचि यज्ञु देख । उपासिजे ॥ २६ ॥

श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।
शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥

अन्वय--अन्ये श्रोत्रादीनि इंद्रियाणि संयमाग्निषु जुह्वति. अन्ये शब्दादीन् विषयान् इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥

एक संयमाग्निहोत्री । ते युक्तित्रयाच्या मंत्रीं । यजन करिती पवित्रीं । इंद्रियद्रव्यीं ॥ २७ ॥ एकां वैराग्य रवि विवळे । तंव संयती विहीर केले । तेथ अपावृत्तें जाहले । इंद्रियानळें ॥ २८ ॥ तिहीं विरक्तीची ज्वाळा घेतली । तंव विकारांचीं इंधनें पळिपैलीं । तेथ आशाधूमें सांडिलीं । पांचही कुंडें ॥ २९ ॥ मग वाक्यविधीचिया निरवडीं । विषय आहुती उदंडीं । हवन केलें कुंडीं । इंद्रियाग्नीच्या ॥ १३० ॥

---

१ वृष्टि न करितां. २ लागलींच. ३ यज्ञादि कर्मे. ४ लाभतें. ५ *प्राक्तनकर्म करितां*. ६ अग्निहोत्री. ७ आत्मसंयमरूप अग्नीमध्यें होम करणारे. ८ कायिक, वाचिक व मानसिक.

एखादे वेळेस कौतुकानें यथाविधि यज्ञादिक कर्माचें आचरण करितो, तरी तीं संपूर्ण कर्में त्याच्याच ठिकाणीं लयाला जातात. १६ ज्याप्रमाणे आकाशात अकालीं उत्पन्न झालेले पोकळ ढग वृष्टि केल्यावाचून आपोआप लयाला जातात, १७ त्याप्रमाणें, तो जरी वेदविहित कर्में यथाविधि आचरीत असला, तरी त्या कर्मांच्या ठिकाणीं त्याचा दुजा भाव नसल्यांमुळे तीं त्याचेच ठायीं लय पावतात. १८

श्लोकार्थः—( का कीं, ) होमसाधन, होमद्रव्य, अग्नि, होता आणि हवनक्रिया हीं त्या ब्रह्मवेत्याच्या दृष्टीनें ब्रह्मच आहेत, आणि ब्रह्मरूप कर्माच्या ठिकाणीं लय लागून राहिलेल्या त्या ब्रह्मवेत्याला प्राप्त होणारें फलही ब्रह्मच आहे. ॥ २४ ॥

हें हवन, त्याचा कर्ता मी, किंवा ह्या यज्ञाचा भोक्ता अमुक, अशा प्रकारें त्याच्या बुद्धीचा भिन्नभाव नाहीं; म्हणून १९ जें जे इष्ट यज्ञ तो करतो, त्यातील होमद्रव्यें व मंत्र हीं सर्व आत्मरूप म्हणजे ब्रह्मस्वरूपच आहेत असें तो समजतो. १२० म्हणून अर्जुना, ब्रह्म तेंच कर्म अशी समबुद्धि ज्याच्या अंतःकरणात बाणली, त्यानें कर्म केलें तरी तें नैष्कर्म्यच होय. २१ आता, अविचाररूप बाळपणांतून सुटल्यावर तारुण्यात ज्यानीं वैराग्याचा स्वीकार करून योगाभ्यासाची भक्ति आरंभिली, २२

श्लोकार्थः—दुसरे कित्येक योगी दैवयज्ञ (इंद्रादिक देवताकरिता केलेला यज्ञ) करितात; दुसरे ब्रह्मरूप अग्नीचे ठिकाणीं ( यज्ञसाधक ) स्वधर्मानें ( आत्म्यानें ) आत्म्याचें हवन करतात. ॥२५॥

जे रात्रंदिवस यज्ञ करणारे आहेत, त्यानीं गुरुवाक्यरूप अग्नींत मनासह अज्ञानाचें हवन केलें. २३ अशा रीतीनें योगरूप अग्नींत जे हवन करणें, त्याला दैवयज्ञ म्हणतात. हे पंडुकुमरा, त्या योगाने आत्मसुखाचा लाभ होतो. २४ प्राक्तनकर्मानेंच देहाचे पालन होतें असा ज्याचा पूर्ण निश्चय असतो, व जो आपले देहाचे संरक्षणाकरिता काळजी करीत नाहीं, तो दैवयोगानें महायोगी असें समजावें. २५ आता, जे ब्रह्माग्नीचे अग्निहोत्री स्वकर्मानें ईश्वराराधन करतात, त्याजविषयीं वर्णन करितो तें ऐक. २६

श्लोकार्थः—कोणी श्रोत्रादि ज्ञानेंद्रियाचें हवन संयमरूपी अग्नींत करतात, आणि दुसरे कोणी शब्दादि पंचविषयाचें हवन इंद्रियरूपी अग्नींत करतात. ॥ २६ ॥

कोणी आत्मसंयमरूप अग्नीमध्यें होम करणारे—ते कायिक, वाचिक व मानसिक या तीन युक्तिमंत्रानीं पवित्र इंद्रियरूप द्रव्याने हवन करतात, २७ कोणी वैराग्यरूपी सूर्य उगवल्यावर संयमाग्नीचें उद्धरण करून तो प्रज्वलित झाल्यावर इंद्रियरूप अग्नि ज्ञानानें पेटवितात; २८ त्या इंद्रियाग्नीनें वैराग्यरूप ज्वाला घेतली तेव्हा लागलीच विषयविकाररूप लांकडे पेटलीं; तेव्हा ज्ञानेंद्रियाच्या पाच विषयाच्या कुंडाचा आशारूप धुराने त्याग केला. २९ मग वेदात सांगितलेल्या विधीच्या योगानें इंद्रियरूप अग्नि पेटलेल्या कुंडात विषयाच्या मोठ्या आहुति दिल्या. १३०

९ उदय होतो. १० इंद्रियनिग्रह ११ कुंडें. १२ पेटला १३ अग्नि. १४ पेटली. १५ पाच ज्ञानेंद्रियें. १६ वेद. १७ कौशल्यानें. १८ मोठी, समग्र.

सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे । आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥२७॥

*अन्वय--अपरे ज्ञानदीपिते आत्मसंयमयोगाग्नौ सर्वाणि इंद्रियकर्माणि प्राणकर्माणि च जुह्वति ॥ २७ ॥*

एकीं ययापरी पार्था । दोषु क्षाळिले सर्वथा । आणिकीं हृदयारणी[1] मंथों । विवेकु केला ॥ ३१ ॥ तो उपशमें[3] निहाटिलों । धैर्यभारें दाटिला । गुरुवाक्यें काढिला । बळकटपणें ॥ ३२ ॥ ऐसें संभरसें मंथन केलें । तेथ झडकरी काजा[6] आलें । जे उज्जीवन जहालें । ज्ञानाग्नीचें ॥ ३३ ॥ पहिला ऋद्धिसिद्धीचा संभ्रमु । तो निवर्तोनि गेला धूमु । मग प्रगटला सूक्ष्मु । विस्फुलिंगु ॥ ३४ ॥ तया मनाचें मोकळें । तेंचि पेटवण घातलें । जें यमनियमीं हळुवारलें । आइतें होतें ॥ ३५ ॥ तेणें सौदुकपणें ज्वाळा समृद्धा । मग वासनांतराचिया सामिधा । स्नेहेंसीं[13] नानाविधा । जाळिलिया ॥ ३६ ॥ तेथ सोहंमत्रें दीक्षितीं । इंद्रियकर्मांचिया आहुती । तिये ज्ञानानळीं प्रदीप्तीं । दिधलिया ॥ ३७ ॥ पाठीं प्राणक्रियेचिये स्रवेनिशीं[14] । पूर्णाहुती पडलिया हुताशीं । तेथ अवभृथ[16] सैमरसीं । सहजें जहालें ॥ ३८ ॥ मग आत्मबोधींचें सुख । जें संयमाग्नीचें हुतशेष । तोचि पुरोडाशु देख । घेतला तिहीं ॥ ३९ ॥ एक ऐशिया इहीं यजनीं । मुक्त ते जाहले त्रिभुवनीं । अवतरण.—या यज्ञाक्रिया तरी आनानी । परी प्राप्य तें एक ॥ १४० ॥

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथाऽपरे । स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥२८॥

*अन्वय—संशितव्रताः अपरे यतयः द्रव्ययज्ञाः तपोयज्ञाः, योगयज्ञाः, तथा च स्वाध्यायज्ञानयज्ञाः ( सन्ति ) ॥ २८ ॥*

एक द्रव्ययज्ञु म्हणिपैती । एक तपसामग्रिया निपजविती । एक योगयागु[22]ही आहाती । जे सांगितले ॥ ४१ ॥ एकीं शब्दीं शब्दु यैजिजे । तो वाग्यज्ञु म्हणिजे । ज्ञानें ज्ञेयें[24] गैमिजे[25] । तो ज्ञानयज्ञु ॥ ४२ ॥ हें अर्जुना सकळ कुवाडें[26] । जें अनुष्ठितां अतिसांकडें । परी जितेंद्रियांसीचि घडे । योग्यतावशें ॥ ४३ ॥ ते प्रवीण तेथ भले । आणि योगसमृद्धि आथिले । म्हणोनि[27] आपणपां तिहीं केलें । आत्महवन ॥ ४४ ॥

अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे । प्राणापानगती रुध्वा प्राणायामपरायणाः ॥२९

*अन्वय—तथा, अपरे अपाने प्राण जुह्वति, च प्राणे अपान ( जहुवति; तथा अपरे ) प्राणापानगती रुध्वा प्राणायामपरायणाः ( सन्तिः ) ॥ २९ ॥*

---

१ हृदयरूप अरणी. २ रवी. ३ शातीनें. ४ घुसळला. ५ सर्व वृत्तींच्या ऐक्यानें. ६ कार्य झालें. ७ प्रदीपन. ८ मोह. ९ ठिणगी. १० निर्दोष. ११ वाळून हलकें झालें. १२ साह्यानें. १३ मोहरूप तुपासहित. १४ होमात आहुती घालण्याचें पात्र. १५ अग्नीत. १६ यज्ञाच्या शेवटचें स्नान. १७ आत्मस्वरूपीं. १८ होम करून राहिलेलें द्रव्य. १९ यज्ञसंबंधी चरु. २० भिन्न, निरनिराळ्या. २१ म्हणतात. २२ अष्टांगयोगरूप यज्ञ. २३ होम करतात. २४ ब्रह्म. २५ मिळतें २६ बिकट. २७ कारण. २८ आपल्याच ठायीं.

श्लोकार्थः— दुसरे कोणी ज्ञानानें प्रदीप्त झालेल्या मनोनिग्रहरूपी अग्नींत सर्व इंद्रियांचीं व प्राणांचीं कर्मे हवन करितात. ॥ २७ ॥

पार्था, अशा प्रकारें कोणीं आपल्या सर्व दोषांचें क्षालन केलें; कोणीं हृदयरूप अरणीवर विचाररूप मंथा केला, व ३१ तो धैर्यरूप भारानें दाबून आणि शांतिरूप रज्जूनें घुसळून, गुरुवाक्यरूप मंत्रानें मंथन केला. ३२ अशा प्रकारें सर्व वृत्तींचें ऐक्य करून मंथन केल्यानें तेथें तत्काल कार्य झालें. ( तें कोणतें ? ) तर ज्ञानाग्नि प्रज्वलित झाला । ३३ तेव्हां प्रथम ऋद्धिसिद्धींचा मोह हाच उत्पन्न झालेला धूर नाहींसा होऊन मग सूक्ष्म अशी अग्नीची ठिणगी उत्पन्न झाली. ३४ यमनियमांनीं सहज तयार झालेलें जें निर्दोष मन, त्याचें अग्नीला पेटवण घातलें. ३५ त्याच्या साहाय्यानें मोठी ज्वाला उत्पन्न झाली. नंतर वासनारूप समिधांना अनेक प्रकारचा मोह हें घृत लावून त्या जाळल्या. ३६ नंतर जीवरूप दीक्षितानें ज्ञानरूपी प्रदीप्त केलेल्या अग्नींत इंद्रियकर्मांची आहुति दिली. ३७ शेवटीं, प्राणकर्म ह्याच स्रुवा नांवाच्या यज्ञपात्रासह अग्नीमध्यें पूर्ण आहुति दिल्यावर, ऐक्यबोध हें ( यज्ञाच्या शेवटचें ) अवभृथस्नान सहज घडलें; ३८ आणि संयमाग्नींत इंद्रियादिक होमद्रव्याचें हवन करून बाकी राहिलेलें जें आत्मसुख, तेंच पुरोडाश म्हणून घेतलें. ३९ कोणी अशा रीतीनें यज्ञ करून त्रिभुवनांत मुक्त झाले; म्हणून, या यज्ञक्रिया जरी नानाप्रकारच्या आहेत, तरी त्यांची अखेर फलप्राप्ति एकच आहे. १४०

श्लोकार्थः—आरंभिलेलें कर्म निश्चयानें कडेला नेणारे दुसरे योगी कोणी द्रव्ययज्ञ, कोणी तपोयज्ञ, कोणी योगयज्ञ, कोणी स्वाध्याय-( वेदाध्ययन ) यज्ञ व कोणी ज्ञानयज्ञ ( असे मोक्षप्राप्ती-करिता नानाप्रकारचे यज्ञ ) करतात. ॥ २८ ॥

हे जे योग सांगितले, त्यांपैकीं एकाला ' द्रव्ययज्ञ ' म्हणतात, एकाला ( तपःसामर्थ्यानें केलेला ) ' तपोयज्ञ ' म्हणतात, एकाला ( अष्टांगसाधनानें साधलेला ) ' योगयज्ञ ' म्हणतात. ४१ ज्यामध्यें शब्दानें शब्दाचा होम केला जातो, त्याला ' वाग्यज्ञ ' म्हणतात; आणि ज्या यज्ञात ज्ञानानें ब्रह्म मिळतें, त्याला ' ज्ञानयज्ञ ' म्हणतात. ४२ अर्जुना, हे सर्व यज्ञ फार बिकट असून याचें आचरण करणें फार दुर्घट आहे; परंतु ज्यानें इंद्रियें जिंकलीं आहेत, त्यास मात्र ते अधिकारपरत्वें करितां येतील. ४३ योगसमृद्धीनें सुसंपन्न असलेले पुरुषच हे यज्ञ करूं शकतील; कारण त्यांनीं आपल्या जीवाचें आत्म्याचे ठिकाणी हवन केलेलें असतें. ४४

श्लोकार्थः—त्याचप्रमाणें, कोणी अपानवायूच्या ठिकाणीं प्राणवायूचा प्रक्षेप करितात ( पूरक ); दुसरे प्राणवायूच्या ठिकाणीं अपानवायूचा प्रक्षेप करतात ( रेचक ); आणि कोणी प्राण व अपान ह्या दोन वायूंचा निरोध करितात ( कुंभक ); ह्यांनः प्राणायामपरायण योगी म्हणतात. ॥ २९ ॥

मग अपानाग्नीचे मुखीं । प्राणद्रव्यें देखीं । हवन केलें एकीं । अभ्यासयोगें ॥ ४५ ॥ एक अपानु प्राणीं अर्पिती । एक दोहींतेंही निरुंधिती[2] । ते प्राणायामी म्हणिपती । पंडुकुमरा ॥ ४६ ॥

अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति । सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥३०॥

अन्वय—अपरे नियताहाराः ( सन्तः ) प्राणान् प्राणेषु जुह्वति. एते सर्वे अपि यज्ञविदः यज्ञक्षपितकल्मषाः ( सन्ति ) ॥ ३० ॥

एक वज्रयोगक्रमें । सर्वाहारसंयमें । प्राणीं प्राणु संभ्रमें । हवन करिती ॥ ४७ ॥ ऐसे मोक्षकाम सकळ । समस्त हे यजनशीळ । जिहीं यज्ञद्वारां मनोमळ । क्षाळण केले ॥ ४८ ॥ जयां अविद्याजात जाळितां । जें उरलें निजस्वभावतां । जेथ अग्नि आणि होता । उरेचिना ॥ ४९ ॥ जेथ यजितयांचा काम पुरे । यज्ञींचें विधान सरे । मागुतें जेथून वोसरे[3] । क्रियाजात ॥ १५० ॥ विचार जेथ न रिगे । हेतु जेथ न निगे । जें द्वैतदोषसंगें । लिंपेचिना ॥ ५१ ॥

यज्ञशिष्टामृतभुजो यांति ब्रह्म सनातनम् । नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥

अन्वय—( हे ) कुरुसत्तम ! यज्ञशिष्टामृतभुजः सनातन ब्रह्म यान्ति. अयज्ञस्य अयं लोकः न अस्ति; कुतः अन्यः ( लोकः ) ॥ ३१ ॥

( १२६. यज्ञाचा शेष सेवन करणारा ब्रह्मरूप होतो, १५२–१५३ ) ऐसें अनादिसिद्ध चोखट । जें ज्ञान यज्ञावशिष्ट । तें सेविती ब्रह्मनिष्ट । ब्रह्माहंमंत्रें ॥५२॥ ऐसे शेषामृतें धाले । कीं अमर्त्यभावा आले । म्हणोनि ब्रह्म ते जहाले । अनायासें ॥५३॥ (१२७. यज्ञ न करणाराला इहलोक व परलोकही नाहीं, १५४-१५५ ) येरां विरक्ति माळ न घालीचि । जयां संयमाग्नीची सेवा न घडेचि । जे योगयागु न करितीचि । जन्मले सांते ॥५४॥ जयां ऐहिक धड नाहीं । तयांचें परत्र पुससी काई । म्हणोनि असो हे गोठी पाहीं । पंडुकुमरा ॥ ५५ ॥

एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे । कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥

अन्वय—एवं बहुविधाः यज्ञाः ब्रह्मणः मुखे विततः ( सन्ति ), त्वं तान् सर्वान् कर्मजान् विद्धि, एवं ज्ञात्वा त्वं विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥

( १२८. ज्ञानयज्ञाची बरोबरी कोणत्याच यज्ञाला नाही, १५६ ते १६४ ) ऐसें बहुतीं परी अनेग । जे सांगितले तुज कां येंग । विस्तारूनि वेदें चांग । म्हणितले आहाती ॥ ५६ ॥ परि तेणें विस्तारें काय करावें । हेंचि कर्मसिद्ध जाणावें । येतुलेनि कर्मबंधु स्वभावें । पावेल ना ॥ ५७ ॥

श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप । सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥

अन्वय—( हे ) परंतप ! द्रव्यमयात् यज्ञात् ज्ञानयज्ञः श्रेयान्; हे पार्थ, सर्वं अखिलं कर्म ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥

---

१ अपानवायुरूप अग्नींत. २ आवरून धरतात. ३ हठयोग. ४ जिंकून. ५ त्वरेनें. ६ मोक्षेच्छु. ७ यज्ञकर्ते. ८ धुतले. ९ सर्व अज्ञान. १० होम करणारा. ११ यज्ञ करणाराचा. १२ यज्ञक्रिया.

कोणी अभ्यासाचे योगानें अपानवायुरूप अग्नीत प्राणवायुरूप द्रव्याचें हवन करितात; ४५ हे पंडुकुमरा, कोणी अपानवायु प्राणवायूंत मिळवितात; आणि कोणी दोन्ही वायूंना निरोध करतात. त्यांना 'प्राणायामी' यज्ञ करणारे असें म्हणतात. ४६

श्लोकार्थः—दुसरे, आहार नियमित करून प्राणातच प्राणाचें हवन करतात. हे सर्व यज्ञ जाणणारे योगी यज्ञानें पापाचा नाश करतात ॥ ३० ॥

कोणी हठयोगाच्या क्रमानें सर्व आहार जिकून प्राणवायुरूपी अग्नींत त्वरेनें प्राणांचें हवन करतात. ४७ अशा प्रकारें मोक्षप्राप्तीची इच्छा करणारे हे सर्व सांगितलेले यज्ञकर्तेच असून, त्यांनीं त्या यज्ञांच्या द्वारें आपले कामक्रोधादिक विकार नाहींतसे केलेले असतात. ४८ अशा प्रकारें सर्व अविद्या–अज्ञान–जाळून टाकल्यामुळें त्याला स्वाभाविकपणेंच शुद्ध स्वरूप उरतें, व अग्नि आणि यज्ञ करणारा असा द्वैतभाव रहात नाहीं; ४९ ज्या ठिकाणीं यज्ञ करणाराची इच्छा पूर्ण होऊन यज्ञक्रिया संपतात, आणि अर्थात् शेवटीं सर्व कर्मे नाहींतशीं होतात; १५० ज्या ठिकाणीं विचाराचा शिरकाव होत नाही, कामनेचा स्पर्श होत नाहीं, व जें द्वैतदोषाच्या संगतीनें लिप्त होत नाही; ५१

श्लोकार्थः—हे कुरुकुलश्रेष्ठा, यज्ञाचा अवशिष्ट प्रसाद घेणारे लोक सनातन ब्रह्माप्रत प्राप्त होतात. यज्ञ न करणाराला इहलोक देखील नाहीं, मग परलोक कोठून मिळणार? ॥ ३१ ॥

असें जें अनादिसिद्ध व *शुद्धयज्ञावशिष्ट ब्रह्म, त्या ब्रह्माचें, ब्रह्मनिष्ठ लोक हे* '**अहं ब्रह्मास्मि**'–मी ब्रह्म आहें–या मंत्रानें सेवन करितात. (ब्रह्मरूप होतात.) ५२ ह्याप्रमाणें यज्ञाचें शिल्लक राहिलेलें ज्ञानरूप अमृत पिऊन जे तृप्त होऊन अमर होतात, ते सहज ब्रह्मत्व पावतात. ५३ ज्यांच्या हातून या यज्ञाचें आचरण घडत नाहीं, ज्याना विरक्ति माळ घालीत नाहीं, ज्यांना आत्मसंयमन करतां येत नाहीं, व जे जन्मास आले असतां योगयागही करीत नाहींत; ५४ अर्जुना, ज्यांची इहलोकीं धडगत नाहीं, त्यांची परलोकची हालहवाल कशाला पुसतोस ? त्यांच्याविषयीं गोष्टच बोलणें नको. ५५

श्लोकार्थः—ह्याप्रमाणें, जे अनेक प्रकारचे यज्ञ वेदांनीं सांगितले आहेत, ते सर्व कर्मापासून उत्पन्न होणारे आहेत असें समज. असें तूं जाणलेंस म्हणजे तूं मोक्ष पावशील. ॥ ३२ ॥

अशा प्रकारें जे तुला पुष्कळ प्रकारचे (बारा) यज्ञ सांगितले, त्यांच्याबद्दल वेदात पुष्कळ विस्तारानें चांगलें वर्णन केलें आहे. ५६ परंतु वेदांतील त्यांचें वर्णन ऐकून आपल्याला काय करावयाचें आहे ? त्यातील सार हेंच कीं, हे सर्व यज्ञ कर्मापासून उत्पन्न झालेले आहेत, एवढें जाणलें असतां कर्माची बाधा होणार नाहीं. ५७

श्लोकार्थः—हे शत्रुतापना, द्रव्यानें साध्य होणाऱ्या यज्ञापेक्षा ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे; कारण, पार्था, सर्व कर्मांचा ज्ञानामध्यें अंतर्भाव होतो ॥ ३३ ॥

१३ नाहींसें होतें. १४ कर्म. १५ लिप्त होत नाहीं. १६ तृप्त झाले. १७ अमरपणास. १८ असतां. १९ अनेक. २० यज्ञ.

अर्जुना वेदु जयांचें मूळ । जे क्रियाविशेष स्थूळ । जया नैव्हाळियेचें फळ । स्वर्गसुख ॥ ५८ ॥ ते द्रव्यादि यागु कीर होती । परी ज्ञानयज्ञाची सैरी न पवती । जैसी तारातेजसंपत्ती । दिनकरापाशीं ॥ ५९ ॥ देखें परमात्मसुखनिधान । साधावया योगीजन । जें न विसंबिती अंजन । उन्मेषनेत्रीं ॥ १६० ॥ जें धांवतया कर्माची लाणी । नैष्कर्म्यबोधाची खाणी । जें भुकेलिया धणी । साधनाची ॥ ६१ ॥ जेथ प्रवृत्ति पांगुळ जाहली । तर्काची दिठी गेली । जेणें इंद्रियें विसरलीं । विषयसंगु ॥ ६२ ॥ मनाचें मनपण गेलें । जेथ बोलाचें बोलकेपण ठेलें । जयामाजि सांपडलें । ज्ञेय दिसे ॥ ६३ ॥ जेथ वैराग्याचा पांगु फिटे । विवेकाचाही सोसु तुटे । जेथ न पाहतां सहज भेटे । आपणपें ॥ ६४ ॥

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया । उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥

*अन्वय—तत्वदर्शिनः ज्ञानिनः ते तत् ज्ञानं प्रणिपातेन, परिप्रश्नेन, सेवया उपदेक्ष्यंति (इति) त्वं विद्धि ॥ ३४ ॥*

( १२९. ज्ञानप्राप्तीचा उपाय, १६५ ते १६८ ) तें ज्ञान पैं बरवें । जरी मनीं आथि आणावें । तरी संतां यां भजावें । सर्वस्वेंसीं ॥ ६५ ॥ जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंठा । तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनी ॥ ६६ ॥ तरी तनुमनुजीवें । चरणासीं लागावें । आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ॥ ६७ ॥ मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगतील पुसिलें । जेणें अंतःकरण बोधलें । संकल्पा न ये ॥ ६८ ॥

यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव । येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥३५

*अन्वय—( हे ) पाडव, यत् ज्ञात्वा पुनः एवं मोहं न यास्यसि, येन सर्वाणि भूतानि अशेषेण आत्मनि अथो मयि द्रक्ष्यसि ॥ ३५ ॥*

( १३०. ज्ञान झालें असतां पुन्हा मोह होत नाहीं, १६९ ते १७१ ) जयाचेनि वाक्य–उजिवेडें । जाहलें चित्त निधडें । ब्रह्माचेनि पाडें । निःशंकु होय ॥ ६९ ॥ ते वेळीं आपणपेंयां सहितें । इयें अशेषेंहि भूतें । माझ्या स्वरूपीं अखंडितें । देखसी तूं ॥ १७० ॥ ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल । तैं मोहांधकार जाईल । जैं श्रीगुरुकृपा होईल । पार्था गा ॥ ७१ ॥

अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः । सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥३६॥

*अन्वय—( त्वं ) सर्वेभ्यः पापेभ्यः अपि पापकृत्तमः असि चेत् (तर्हि) सर्वं वृजिनं ज्ञानप्लवेनैव ( त्वं ) संतरिष्यसि ॥ ३६ ॥*

---

१ यज्ञादि कर्मे. २ अपूर्वतेचें. ३ बरोबरी. ४ नक्षत्राचा प्रकाश. ५ सूर्य. ६ ठेवा. ७ जागृत असतात. ८ ज्ञान. ९ समाप्तीचें ठिकाण. १० कर्मातीतपणा. ११ आत्मज्ञानाकरितां भुकेलेले. १२ तृप्ति. १३ कर्माची इच्छा. १४ श्रद्धा. १५ हीनत्व, दारिद्य. १६ विचाराचा. १७ उत्कंठा.

अर्जुना, ज्या यज्ञाचें मूळ वेद आणि ज्यांत जडकर्में पुष्कळ सांगितलीं आहेत, आणि ज्यापासून केवळ स्वर्गसुख हाच अपूर्व लाभ होतो, ५८ ते कर्मयज्ञ खरे आहेत; परंतु सूर्यापुढें जसें नक्षत्रांचें तेज लोपतें, त्याप्रमाणें ते ज्ञानयज्ञाची बरोबरी पावत नाहींत. ५९ जें ज्ञानांजन डोळ्यांत वाढून आत्मसुखरूप ठेवा मिळविण्याकरिता योगीजन रात्रंदिवस जागृत असतात, १६० जें ज्ञान फलोन्मुख कर्मांच्या समाप्तीचें ठिकाण आहे, जें कर्मातीत बोधाची खाण आहे, व आत्मप्राप्तीकरितां भुकेलेल्या साधकाच्या तृप्तीचें स्थान आहे, ६१ ज्या ठिकाणीं कर्माची इच्छा राहिली व तर्क बंद राहिला, आणि ज्याच्या योगानें इंद्रियें विषय सेवन करणें विसरलीं, ६२ ज्या ठिकाणीं मनाचें मनपण गेलें, जेथें शब्दाची धाव खुंटली, आणि ज्या ठिकाणीं अंतर्गत जें ब्रह्म तें प्राप्त होतें, ६३ ज्या ठिकाणीं वैराग्याचें हीनत्व नाहींसें होते, विचाराची उत्कंठा संपते, आणि शोधल्याशिवाय आपलेपणा सहज आपल्यास दिसतो, ( ब्रह्म प्राप्त होतें, ) ६४

श्लोकार्थः—( तें ज्ञान प्राप्त व्हावें अशी इच्छा असल्यास ) तत्त्वदर्शी ज्ञान्यांना नमस्कार करून नंतर प्रश्न करून त्याची सेवा केली असता ते त्या ज्ञानाचा तुला उपदेश करतील असें समज. ॥ ३४ ॥

असें जें चागलें ज्ञान, तें तुला मिळविण्याची इच्छा असेल तर, तूं ( मागील श्लोकांत सांगितलेल्या ) ह्या सत्पुरुषांची सेवा कर. ६५ ते संत ज्ञानाचें घर असून सेवाधर्म हा त्या घराचा उंबरठा आहे; तर अर्जुना, सेवा करून तूं तो आपल्या अधीन करून घे. ६६ नंतर तन, मन व जीव अर्पण करून त्याचे चरणीं लागावें, आणि अभिमान सोडून त्याचें दास्य करावें. ३७ मग त्या साधूंस आपलें इच्छित विचारले असतां ते तें सांगतील आणि त्यांच्या सांगण्याचा अंत.करणामध्यें बोध झाला म्हणजे मनात संकल्प उत्पन्न होणार नाहींत. ६८

श्लोकार्थः—हे पाडुपुत्रा, तें ज्ञान प्राप्त झालें असता पुनः असा ( भेदरूपी ) मोह तुला होणार नाहीं; आणि त्या ज्ञानानें हीं सर्व भूतें तू आपल्या स्वताचे ठायीं आणि माझे ठायीं पहाशील. ३५

ज्याच्या उपदेशरूप उजेडाने चित्त निर्भय होईल, आणि नि.संशय ब्रह्माचे योग्यतेस जाऊन पोहोंचेल; ६९ त्या वेळीं, तूं आपल्यासह बाकीचें सर्व जग माझे स्वरूपांत निरंतर पाहशील. १७० पार्था, अशा रीतीनें जेव्हां सत्पुरुषाची कृपा होईल, तेव्हा तुझे अंत.करणांत ज्ञानाचा उजेड पडून मोहरूपी अंधकार नाहींसा होईल. ७१

श्लोकार्थः—तूं जरी सर्व पाप्यापेक्षा अति पापी असलास, तरी ज्ञानरूप नौकेच्या साधनानें सर्व पापरूप समुद्र अनायासें तरून जाशील. ३६

१८ धरून, सेवा करून. १९ अभिमान सोडून. २० मनोव्यापार, कल्पना. २१ उजेडानें. २२ निर्भय.

( १३१. ज्ञानानें सर्व पापे दग्ध होतात, १७२ ते १७८ ) जरी कल्मषाचा आगरु । तूं भ्रांतीचा सागरु । व्यामोहाचा डोंगरु । होउनी अससी ॥ ७२ ॥ तऱ्ही ज्ञानशक्तीचेनि पाडें । हें आघवेंचि गा थोकडें । ऐसें सामर्थ्य असे चोखडें । ज्ञानीं इये ॥ ७३ ॥ देखें विश्वभ्रमाऐसा । जो अमूर्ताचा कवडसा । तो जयाचिया प्रकाशा । पुरेचिना ॥ ७४ ॥ तया कायसे हे मनोमळ । हे बोलतांचि अति किडाळ । नाहीं येणें पाडें ढिसाळ । दुजें जगीं ॥ ७५ ॥

यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन । ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥

अन्वय—( हे ) अर्जुन, यथा समिद्धः अग्निः एधांसि भस्मसात् कुरुते, तथा ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते ॥ ३७ ॥

सांगें भुवनत्रयाची काजळी । जे गगनामाजि उधवली । तिये प्रळयींचे वाहुटळी । काय अभ्र पुरे ॥ ७६ ॥ कीं पवनाचेनि कोपें । पाणियेंचि जो पेळिपे । तो प्रळयानळु दडपे । तृणें काष्ठें काई ॥ ७७ ॥

नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते । तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥३८॥

अन्वय—हि ज्ञानेन सदृश इह पवित्र न विद्यते, स्वयं योगसंसिद्धः ( पुरुषः ) तत् ज्ञानं कालेन आत्मनि विन्दति ॥ ३८ ॥

म्हणोनि असो हें न घडे । तें विचारितांचि असंगडें । पुढती ज्ञानाचेनि पाडें । पवित्र न दिसे ॥७८॥ ( १३२. ज्ञानाइतकी पवित्र वस्तु दुसरी नाहीं, १७९ ते १८४ ) एथ ज्ञान हें उत्तम होये । आणिकही एक तैसें कें आहे । जैसें चैतन्य कां नोहे । दुसरें गा ॥७९॥ या महातेजाचेनि कैसें । जरी चोखाळ प्रतिबिंब दिसे । कां गिंवसिलें गिंवसे । आकाश हें ॥ १८० ॥ नातरी पृथ्वीचेनि पाडें । कांटाळें जरी जोडे । तरी उपमा ज्ञानीं घडे । पंडुकुमरा ॥८१॥ म्हणूनि बहुतीं परीं पाहतां । पुढतपुढती निर्धारितां । हे ज्ञानाची पवित्रता । ज्ञानींचि आथी ॥ ८२ ॥ जैसी अमृताची चवी निवडिजे । तरी अमृताचिसारिखी म्हणिजे । तैसें ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसींचि ॥ ८३ ॥ आतां यावरी जें बोलणें । तें वायांचि वेळ फेडणें । तंव साचचि हें पार्थु म्हणे । जें बोलत असां ॥ ८४ ॥ ( १३३. ज्ञानप्राप्तीचा उपाय, १८५ ते १९२ ) अवतरण.—परि तेंचि ज्ञान केंवि जाणावें । ऐसें अर्जुनें जंव पुसावें । तंव तें मनोगत देवें । जाणितलें ॥ ८५ ॥ मग म्हणतसे किरीटी । आतां चित्त देईं इये गोठी । सांगेन ज्ञानाचिये भेटी । उपायो तुज ॥ ८६ ॥

श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः । ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥३९

अन्वय—श्रद्धावान्, तत्परः, संयतेंद्रियः ( च ) ज्ञानं लभते, ज्ञानं लब्ध्वा अचिरेण परां शान्तिं अधिगच्छति ॥ ३९ ॥

---

१ आगर. २ विश्वभ्रमपासारखा. ३ निराकाराचा. ४ अपेर. ५ निंद्य, खोटें. ६ मोठें. ७ त्रैलोक्याची. ८ धूर. ९ उधळणें. १० वावधूळ. ११ जाळतो. १२ प्रळयकाळचा अग्नि. १३

तूं पातकाचे आगर, भ्रांतीचा सागर अथवा भ्रमाचा पर्वत जरी असलास, ७२ तरी ज्ञानाच्या शक्तीपुढें हें सर्व तुच्छ आहे, असें या ज्ञानाच्या अंगीं उत्तम सामर्थ्य आहे. ७३ हें पहा कीं, विश्वाएवढा जो कांहीं निराकार ब्रह्माचा काळोख आहे, तो ज्याच्या प्रकाशाला पुरता होत नाहीं, ( विश्वाभासरूपी जो अज्ञानांधकार, त्याला नष्ट करून जें ज्ञान अवशिष्ट राहते, ) ७४ त्या ज्ञानापुढें मनातील अज्ञानाची काय कथा ? म्हणून तुझे मनात ही शंका येणें हेंच बरोबर नाहीं; कारण, ह्या जगांत ज्ञानाच्या तोडीची दुसरी वस्तुच नाहीं. ७५

श्लोकार्थः—अर्जुना, प्रज्वलित झालेला अग्नि जसा काष्ठाचें भस्म करून टाकतो, तसा ज्ञानाग्नि सर्व कर्मांचें भस्म करून टाकतो. ॥ ३७ ॥

त्रैलोक्य पेटल्यावर आकाशांत पसरलेल्या त्याच्या धुराला पार उडवून देणारी जी प्रळयकाळची वावटळ, तिला ढग नाहींतसे करणें अवघड आहे का ? ७६ किंवा वाऱ्याच्या साह्यानें भडकला असता जो पाणीही जाळून टाकतो, तो प्रळयकाळचा अग्नि गुवत आणि काष्ठ ह्यांनीं विझेल का ? ७७

श्लोकार्थः—कारण, ज्ञानाच्या बरोबरीचें पवित्र असें दुसरें ह्या जगात काहीं नाहीं, आणि योगानें युक्त झालेला पुरुष कालेंकरून तें ( आत्मविषयक ) ज्ञान स्वताच मिळवितो. ॥ ३८ ॥

असो. ह्या गोष्टी कधीं घडून येणाऱ्या नाहींत, आणि त्याचा विचार करणें हें असंगत दिसतें; म्हणून ज्ञानाचा जों जों विचार करावा, तों तों त्याच्या योग्यतेची पवित्र वस्तु दुसरी कोणतीच दिसत नाहीं. ७८ ज्याप्रमाणें चैतन्याला दुसरा पडोसा नाहीं, त्याप्रमाणें ह्या लोकीं ज्ञान ही उत्तम वस्तु असून त्याच्या बरोबरीची दुसरी वस्तु कोठें मिळणार ? ७९ जर सूर्याचे कसोटीला त्याच्या प्रतिबिंबाचें तेज लागेल, किंवा आकाशाला आपल्या कवळ्यात कवटाळता येईल, १८० किंवा पृथ्वीच्या बरोबरीची दुसरी वजनदार वस्तु सापडेल, तरच अर्जुना, ज्ञानाच्या किमतीची दुसरी वस्तु मिळेल. ८१ म्हणून, पुष्कळ प्रकारानें वारंवार विचार करून पाहता ह्या ज्ञानाचा पवित्रपणा ज्ञानालाच आहे. ८२ अमृताची चव कोणी विचारली असता ती जशी अमृतासारखीच असें म्हणावें लागतें, तशी ज्ञानाला ज्ञानाचीच उपमा ! ८३ आता ह्यापेक्षा ज्ञानाविषयीं जास्त वाटावाट करणें म्हणजे वेळ व्यर्थ घालविणे होय. तेव्हा अर्जुन म्हणाला, " तुम्ही बोलता तें खरें आहे." ८४.पण ' तें ज्ञान कोणत्या उपायानें प्राप्त करून घ्यावें ' असें जों अर्जुन पुसणार, तोच त्याचे मनांतील हेतु देवानीं जाणला; ८५ आणि मग अर्जुनास म्हटलें.—हे किरीटी, ज्ञानप्राप्तीचा जो उपाय मी तुला आतां सागणार आहें, त्या गोष्टीकडे लक्ष दे. ८६

श्लोकार्थः—परम विश्वासू, ज्ञानप्राप्तीविषयीं तत्पर, आणि इंद्रियें जिंकलेला अशा पुरुषास ज्ञान प्राप्त होतें, व तें प्राप्त झाल्यावर लवकरच उत्तम शांति प्राप्त होते. ॥ ३९ ॥

असंगत. १४ योग्यतेनें. १५ कसोटीनें १६ शुद्ध. १७ कवटाळणें. १८ काष्ठ्यात घालावयाला. १९ घालविणें. २० प्राप्तीकरितां.

तरी आत्मसुखाचियां गोडिया । विटे जो कां सकळ विषयां । जयाच्या ठायीं इंद्रियां । मानु नाहीं ॥ ८७ ॥ जो मनासी चौंड न सांगे । जो प्रकृतीचें केलें नेघे । जो श्रद्धेचेनि संभोगें । सुखिया जाहला ॥ ८८ ॥ तया तेंचि गिंवसित । ज्ञान पावे निश्चित । जयामाजि अचुंबित । शांति असे ॥ ८९ ॥ तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतीचा अंकुर फुटे । मग विस्तार बहु प्रकटे । आत्मबोधाचा ॥ १९० ॥ मग जेउतें वास पाहिजे । तेउती शांतीचि देखिजे । तेथ आपपरु नेणिजे । निर्धारितां ॥ ९१ ॥ ऐसा हा उत्तरोत्तरु । ज्ञानबीजाचा विस्तारु । सांगतां असे अपारु । परि असो आतां ॥ ९२ ॥

अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।
नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥

अन्वय--अज्ञः च अश्रद्दधानः च संशयात्मा विनश्यति; संशयात्मनः अयं लोकः न अस्ति, परलोकः न (अस्ति), सुखं (च न अस्ति) ॥ ४० ॥

( १३४. ज्ञानाची इच्छा ज्याला नाहीं तो जिवंत असून मेल्यासारखाच आहे, १९३ ते २०६ ) ऐकें जया प्राणियाच्या ठायीं । इया ज्ञानाची आवडी नाहीं । तयाचें जियालें म्हणों काई । वरी मरण चांग ॥ ९३ ॥ शून्य जैसें गृह । कां चैतन्येंवीण देह । तैसें जीवित ते संमोह । ज्ञानहीन ॥ ९४ ॥ अथवा ज्ञान कीर आपु नोहे । परि ते चाड एकी जरी वाहे । तरी तेथ जिव्हाळी कांहीं आहे । प्राप्तीचा पैं ॥ ९५ ॥ वांचूनि ज्ञानाची गोठी कायसी । परि ते आस्थाही न धरी मानसीं । तरी तो संशयरूप हुताशीं । पडिला जाण ॥ ९६ ॥ जे अमृतही परि नावडे । ऐसें सावियाचि अरोचक जैं पडे । तैं मरण आलें असे फुडे । जाणों एकीं ॥ ९७ ॥ तैसा विषयसुखें रंजे । जो ज्ञानेंसींचि भांजे । तो संशयें अंगिकारिजे । एथ भ्रांति नाहीं ॥ ९८ ॥ मग संशयीं जरी पडिला । तरी निभ्रांत जाणें नासला । तो ऐहिकपरत्रा मुकला । सुखासि गा ॥ ९९ ॥ जया काळज्वरु आंगीं बाणे । तो शीतोष्णें जैशीं नेणे । आगी आणि चांदिणें । सरिसेंचि मानी ॥ २०० ॥ तैसें साच आणि लटिकें । विरुद्ध आणि निकें । संशयी तो नोळखे । हिताहित ॥ १ ॥ हा रात्रिदिवसु पाहीं । जैसा जात्यंधा ठाउवा नाहीं । तैसें संशयीं असतां कांहीं । भैना नये ॥ २ ॥

योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् । आत्मवंतं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥४१
तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः । छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥४२॥

१ निजानंदाच्या. २ इच्छा. ३ सपूर्ण. ४ स्थिर होतें. ५ जिकडे. ६ वाट. ७ विकडे. ८ मोहयुक्त. ९ इच्छा. १० माळगोल. ११ समव. १२ इच्छा. १३ अग्नीत. १४ सहज. १५ अरुचि. १६ बेपर्वा असतो. १७ मस्त होतो. १८ इहपरलोकांस. १९ ऊन. २० प्रतिकूल. २१ अनुकूल. २२ ओळख नसते.

आत्मसुखाच्या गोडीनें ज्याचें मन सर्व विषयांविषयीं विटून जातें, आणि ज्याच्या ठिकाणीं इंद्रियांची मुळींच प्रतिष्ठा नाहीं, ८७ जो आपली इच्छा आपल्या मनाला कळूं देत नाहीं, प्रकृतीच्या अधीनतेमुळें शरिराकडून घडलेल्या गोष्टी जो आपल्यावर ओढून घेत नाहीं, आणि जो श्रद्धेच्या योगानें संतोष पावतो, ८८ त्यालाच ज्ञान हें शोधीत येऊन निश्चयानें प्राप्त होतें. त्याचे ठिकाणीं ओतप्रोत शांति भरलेली असते. ८९ तें ज्ञान मनाच्या ठिकाणीं स्थिर झालें म्हणजे मग शांतीचा अंकुर फुटून पुढें आत्मबोधाचा प्रकाश होतो. १९० मग तो जिकडे पाहील तिकडे त्याला शांतिच दिसते, आणि त्या शांतीचे ठिकाणी खरोखर आपपरभाव नसतो. ९१ अशा रीतीनें ज्ञानाविषयीं जेवढें वर्णन करावें तेवढें थोडेंच आहे; तर ती गोष्ट आता राहूं दे. ९२

श्लोकार्थः– अज्ञानी, अविश्वासी व संशययुक्त असा पुरुष नाशाप्रत पावतो; (स्वार्थाला मुकतो), आणि त्या संशयी पुरुषास इहलोक, परलोक व मोक्षसुख हीं प्राप्त होत नाहींत ॥ ४० ॥

हें पहा–ज्या मनुष्याचे ठिकाणीं अशा प्रकारच्या ह्या ज्ञानाची आवड नाहीं, त्याचें जिणें काय म्हणावयाचें ? त्यापेक्षां मरण चांगलें ! ९३ एखादें ओसाड घर किंवा प्राणावांचून जसें शरीर, त्याचप्रमाणें ज्ञानहीन मनुष्याचें जीवित मोहयुक्त होय. ९४ खरें ज्ञान प्राप्त झालें नसलें, परंतु तें प्राप्त होण्याबद्दल जो मनुष्य इच्छा बाळगतो, त्याला कांहीं ज्ञानप्राप्तीचा संभव आहे. ९५ ज्ञान असण्याविषयींची गोष्ट राहिली; परंतु तें प्राप्त व्हावें अशी इच्छा जो करीत नाहीं, तो संशयरूप अग्नींत पडला असें समज. ९६ कां कीं, अमृतही आवडत नाहीं अशी अरुचि जेव्हां सहज उत्पन्न होते, तेव्हां त्या मनुष्याचें मरण ओढवलें आहे असें जाणावें. ९७ त्याचप्रमाणें, विषयसुखांतच जो आनंद मानतो, आणि ज्ञानप्राप्तीविषयीं बेपरवा असतो, त्याला संशयानें ग्रासलें ह्यांत संशय नाहीं. ९८ अशा रीतीनें जो संशयांत पडला, तो निःसंशय भ्रष्ट झाला; म्हणून तो इहलोकच्या व परलोकच्या सुखास आंचवला ! ९९ ज्याला सन्निपात ज्वर झाला आहे, त्याला ज्याप्रमाणें शीत–उष्ण कळत नाहीं, आणि तो ऊन व चांदणें सारखेंच मानतो, २०० त्याचप्रमाणें खरें-खोटें, अनुकूल-प्रतिकूल, हित-अहित हीं संशयी पुरुषाला कळत नाहींत. १ ज्याप्रमाणें जन्मांधास रात्र व दिवस ठाऊक नसतात, त्याचप्रमाणें संशयी पुरुषाला कशाचीच ओळख नसते. २

श्लोकार्थः—अर्जुना, ज्यानें योगानें सर्व कर्मांचा संन्यास केला आहे, ज्ञानानें ज्याचे संशय नाहींतसे झाले आहेत, व आत्मस्वरूप ज्याला प्राप्त झालें आहे, त्या पुरुषाला कर्मापासून बंधन प्राप्त होत नाहीं. ॥ ४१ ॥ म्हणून अर्जुना, अज्ञानापासून उत्पन्न झालेला हा हृदयांतील संशय आपल्या ज्ञानरूप शस्त्रानें नाहींसा करून ( ईश्वरार्पण ) कर्मयोगाचें अवलंबन कर, आणि युद्धास ऊठ. ॥ ४२ ॥

अन्वय—( हे ) धनजय ! कर्माणि योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयं आत्मवंत न निबध्नंति ॥ ४१ ॥ ( हे ) भारत, तस्मात् अज्ञानसभूत हृत्स्थं आत्मनः एनं सशय ज्ञानासिना छित्वा योगं आतिष्ठ ( च युद्धाय ) उत्तिष्ठ ॥ ४२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
कर्मब्रह्मार्पणयोगो नाम चतुर्थोध्यायः ॥ ४ ॥

म्हणऊनि संशयाहूनि थोर । आणिक नाहीं पाप घोर । हा विनाशाची वागुर । प्राणियासी ॥ ३ ॥ येणें कारणें तुवां त्यजावा । आधीं हाचि एकु जिणावा । जो ज्ञानाचिया अभावा । मांजि असे ॥४॥ जैं अज्ञानाचें गंडद पडे । तैं हा बहुवस मनीं वाढे । म्हणोनि सर्वथा मार्गु मोडे । विश्वासाचा ॥५॥ हृदयीं हाचि न समाये । बुद्धीतें गिंवसूनि ठाये । तेथ संशयात्मक होये । लोकत्रय ॥ ६ ॥ ( १३५. ज्ञानानेंच संशयनिवृत्ति होते, २०७ ते २०८ ) ऐसा जरी थोरावे । तरी उपायें एकें आंगवे । जरी हातीं होय बरवें । ज्ञानखड्ग ॥ ७ ॥ तरी तेणें ज्ञानशस्त्रें तिखटें । निखळ हा निवटे । मग निःशेष खतीं फिटे । मानसींचा ॥ ८ ॥ (१३६. संशय टाकून युद्धाला उठ, २०९—२१० ) याकारणें पार्था । उठीं वेगीं वरौतीं । नाशु करोनि हृदयस्था । संशयासी ॥ ९ ॥ ऐसें सर्वज्ञाचा बापु । जो श्रीकृष्णु ज्ञानदीपु । तो म्हणतसे सकृपु । ऐकें राया ॥ २१० ॥ ( १३७. अवतरण, पांचव्या अध्यायाचें, २११ ते २२५. ओवी १०, ११, १२ ह्यापुढील अध्यायाचें बीज ) तंव या पूर्वापार बोलाचा । विचार करूनि कुमरु पंडूचा । कैसा प्रश्नु अवसरींचौ । करिता होईल ॥ ११ ॥ ते कथेची संगति । भावांची संपत्ति[11] । रसाची उन्नति । म्हणिपेल पुढां ॥१२॥ जयाचिया बरवेपणीं । कीजे आठां रसांची वोवाळणी । जो सज्जनाचिये आयणी । विसांवा जगीं ॥१३॥ तो शांतुचि अभिनवेल । ते परियसा मन्हाठे बोल । जे समुद्राहूनि सखोल । अर्थभरित ॥ १४ ॥ जैसें बिंब तरी बचकेचि एवढें । परि प्रकाशासि त्रैलोक्य थोकडें । शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी ॥ १५ ॥ नातरी कामितयाचिया इच्छा । फळे कल्पवृक्षु जैसा । बोलु व्यापकु होय तैसा । तरी अवधान द्यावें ॥ १६ ॥ हें असो काय म्हणावें । सर्वज्ञु जाणती स्वभावें । तरी निकें चित्त द्यावें । हे विनंती माझी ॥ १७ ॥ जेथ सौंहित्य आणि शांति । हे रेखा दिसे बोलती । जैसी लावण्यगुण-कुलवती । आणि पतिव्रता ॥१८॥ आधींचि साखर आवडे । तेचि जरी ओखदीं जोडे । तरी सेवावी ना कां कोडें[13] । नावांनावा ॥१९॥ सहजें मलयानिलु मंदु सुगंधु । तया अमृताचा होय स्वादु । आणि तेथेंचि जोडे नादु । जरी दैवगत्या ॥ २२० ॥ तरी स्पर्शें सर्वांग निववी । स्वादें जिव्हेतें

१ चाळे. २ जिंकावा. ३ लोप. ४ आत. ५ काळोख. ६ वाढला. ७ स्वाधीन होतो. ८ अगदीं, समूळ. ९ नाहींसा होतो. १० किंतु. ११ वर. १२ समयोचित. १३ जुळणी.

म्हणून संशयापेक्षां दुसरें भयंकर पाप कोणतेंच नाहीं. प्राण्याचा नाश करण्याचें हें एक जाळें आहे. ३ ह्याकरितां तूं त्याचा संग सोडून आधीं ह्याला जिंक. ह्याचें वास्तव्य ज्ञानाच्या अभावीं असतें. ४ जेव्हां अज्ञानाचा निबिड काळोख असतो, तेव्हां हा संशय मनांत जास्त वाढतो, म्हणून तो विश्वासाविषयीं कल्पना देखील येऊं देत नाहीं. ५ हा अंतःकरणांतच भरून राहतो असें नाहीं, तर हा बुद्धीलाही ग्रासून टाकितो, आणि मग त्या मनुष्याला तिन्हीं लोक संशयात्मकच दिसूं लागतात. ६ पण इतका जरी तो वाढला, तरी त्याला स्वाधीन करून घेण्याला एक उपाय आहे. तीव्र ज्ञानखड्ग जर हातीं असेल, ७ तर त्या तिखट शस्त्राच्या योगानें हा नाहींसा होतो; आणि मग मनांत दुःखाचा लेशही रहात नाहीं. ८ म्हणून पार्था, आपल्या मनांतील संशय नाहींसा करून लवकर उठ. ९ संजय धृतराष्ट्र राजास म्हणतोः—राजा, ऐक. ज्ञानी जनांचे जनक जे ज्ञानदीप भगवान श्रीकृष्ण, ते अशा रीतीनें मोठ्या कृपेनें अर्जुनास म्हणाले. २१० तेव्हां, ह्या सर्व पूर्वापर कथेचा विचार करून तो अर्जुन समयोचित असा प्रश्न करील. ११ त्या कथेची जुळणी, अभिप्रायाची शोभा व रसाची गोडी पुढें सांगण्यांत येईल. १२ ज्याच्या बोलाच्या चांगलेपणावरून आठही रस ओंवाळून टाकावे, आणि जो सज्जनांच्या बुद्धीला ह्या जगतामध्यें विश्रांतीचें स्थान होय, १३ ज्या मराठी बोलापासून शांतरसच प्रगटेल, व जो समुद्रापेक्षां गंभीर असून अर्थभरित आहे, तो बोल ऐका. १४ जसें सूर्यबिंब हें बचकेंत मावण्याएवढेंच दिसतें, परंतु त्याच्या प्रकाशाला त्रिभुवन सुद्धां पुरत नाहीं, तशी या शब्दार्थाची व्याप्ति आहे असें अनुभवावें; १५ किंवा कल्पवृक्ष जसा कामीजनांच्या इच्छा पूर्ण करतो, तसे हे बोल सर्व इच्छा पूर्ण करणारे आहेत, म्हणून ह्यांच्याकडे लक्ष पुरवावें. १६ श्रोतेहो, तुम्हांला आणखी काय काय सांगावें ? तुम्ही जाणतेच आहां, तेव्हां नीट लक्ष द्यावें एवढीच माझी विनंती आहे. १७ ज्याप्रमाणें एखादी स्त्री सुंदर, गुणी आणि कुलशीलवती असून पतिव्रता असते, त्याप्रमाणें, या बोलण्याचे पद्धतीवरून, या बोलामध्यें सर्व अलंकार व शांति हीं भरलेलीं दिसतात. १८ अगोदर साखरेची आवड असून ती जर औषधाच्या अनुपानांत दिली, तर ती आनंदानें वरचेवर कां न खावी ? १९ साहजिकपणें मैळागिरी पर्वतावरील सुगंध व मंद असा वारा वाहात असून त्याला जर अमृताचें पुट मिळालें, आणि दैवयोगानें तेथें जर पंचमसुरासारखा नाद कानीं आला, २२० तर त्या वाऱ्याच्या स्पर्शानें जसें सर्व अंग गार होईल, आणि गोडीनें जिव्हेला समाधान होईल, तसेंच मधुर स्वर ऐकल्यावर कान वाहवा म्हणतील, २१ त्याचप्रमाणें,

१४ अभिप्रायाची. १५ शोभा. १६ वाढ, गोडी. १७ बुद्धीला. १८ प्रकटेल. १९ अर्थाची. २० अलंकार वगैरे. २१ पद्धत. २२ औषधांत. २३ आनंदानें. २४ वारंवार. २५ मैळागिरीवरील वारा. २६ पुट. २७ स्वर.

नाचवी । तेवींचि कानांकरवीं । म्हणवी चोपु माझा ॥ २१ ॥ तैसे कथेचें इये ऐकणें । एक श्रवणासि होय पारणें । आणि संसारदुःख मूळेंवणें । विकृतीविणें ॥ २२ ॥ जरी मंत्रेंचि वैरी मरे । तरी वायां कां बांधावीं कटारें । रोग जाय दूधसाखरें । तरी निंब कां पियावा ॥ २३ ॥ तैसा मनाचा मारु न करितां । आणि इंद्रियां दुःख न देतां । एथ मोक्षु असे आयता । श्रवणाचिमाजि ॥ २४ ॥ म्हणोनि ओथिलिया आराणुका । गीतार्थ हा निका । ज्ञानदेवो म्हणे आइका । निवृत्तिदासु ॥ २२५ ॥

अध्याय चौथा, ओव्या २२५.

---

१ नाहवा. २ धान्यगें. ३ विकाराशिवाय. ४ श्रम. ५ असलेल्या. ६ उत्कंठेला.

हीच कथा ऐकल्याने कानाचे पारणें फिटेल, आणि संसारदु खापासून काहीं एक विकार न होता ते आपोआप नाहींसे होईल. २२ जर मंत्रानेंच शत्रूचा नाश होईल, तर मग कमरेला कट्यार का बाधावी ? तसें, दूधसाखरेने जर रोग नाहींतसे होतील, तर कडुलिंबाचें सेवन का करावे ? २३ त्याचप्रमाणें, मनाला न जिकता व इद्रियाना दु ख न देता या श्रवणामध्येंच प्रत्यक्ष मोक्ष आहे; २४ म्हणून, निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात, "तुमच्या मनात जितकी उत्कंठा असेल, तितक्या उत्कंठेने हा गीतेचा अर्थ ऐका." २२५

# ज्ञानेश्वरी

## अध्याय पांचवा

अर्जुन उवाच—

संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि । यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥१॥

अन्वय—(हे) कृष्ण, कर्मणां संन्यासं पुनः योगं च शंससि; एतयोः यत् एकं श्रेयः तत् मे सुनिश्चितं ब्रूहि ॥ १ ॥

(१३८. संन्यास व कर्म यांपैकीं निश्चित काय तें सांगा, १ ते ८) मग पार्थु श्रीकृष्णातें म्हणे । हां हो हें कैसें तुमचें बोलणें । एक होय तरी अंतःकरणें । विचारूं ये ॥ १ ॥ मागां सकळ कर्मांचा संन्यासु । तुम्हींच निरोपिला होता बहुवसु । तरी कर्मयोगीं केविं अतिरसु । पोखितसां पुढती ॥ २ ॥ ऐसें द्व्यर्थ हें बोलतां । आम्हां नेणतयांच्या चित्ता । आपुलिये चाडे श्रीअनंता । उमजु नोहे ॥ ३ ॥ ऐकें एक सारातें बोधिजे । तरी एकनिष्ठाचि बोलिजे । हें आणिकीं काय सांगिजे । तुम्हांप्रति ॥ ४ ॥ तरी याचिलागीं तुमतें । म्यां राउळासि विनविलें होतें । जे हा परमार्थु ध्वनितें । न बोलावा ॥ ५ ॥ परी मागील असो देवा । आतां प्रस्तुतीं उकलु देखावा । सांगें दोहींमाजि बरवा । मार्गु कवण ॥ ६ ॥ जो परिणामींचा निर्वाळीं । अचुवितु ये फळा । आणि अनुष्ठितां प्रांजळा । सो-वियाचि ॥ ७ ॥ जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि मार्गु तरी बहुसाल सांडे । तैसें सुखासना सांगडें । सोहपें होय ॥ ८ ॥ (१३९ देवभक्तांचें प्रेम, ज्ञानेश्वराची काव्यप्रतिभा, ९ ते १४) येणें अर्जुनाचेनि बोलें । देवो मनीं रिझले । मग होईल ऐकें म्हणितलें । संतोषोनियां ॥ ९ ॥ देखा कामधेनुऐसी माये । सदैवा जया होये । तो चंद्रुही परी लाहे । खेळावया ॥ १० ॥ पाहें पां श्रीशंभूची प्रसन्नता । तया उपमन्यूचिया आर्ता । काय क्षीराब्धि दूधभाता । देइजेचिना ॥ ११ ॥ तैसा औदार्याचा कुरुठा । श्रीकृष्ण आपु जाहालिया सुभटा । कां सर्व सुखांचा वसौटा । तोचि नोहावा ॥ १२ ॥ एथ चमत्कारु कायसा । गोसावी श्रीलक्ष्मी-कांताऐसा । आतां आपुलिया सवेसा । मागावा कीं ॥ १३ ॥ अवतरणः— म्हणोनि अर्जुनें म्हणितलें । तें हांसोनि येरें दिधलें । तेंचि सांगेन बोलिलें । काय कृष्णें ॥ १४ ॥

---

१ परोपरीनें. २ आग्रह. ३ वाढवितां, करितां. ४ दोन अर्थांचें, दुटप्पी. ५ समजूत. ६ तत्त्व. ७ दुसऱ्यानीं. ८ पूज्य, श्रेष्ठ. ९ गूढार्थानें. १० उलगडा. ११ चांगला, श्रेष्ठ. १२ शेवटचा.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय पांचवा

श्लोकार्थः—अर्जुन म्हणालाः—कृष्णा, एकदा कर्मसंन्यासाची प्रशंसा करिता, व पुनः कर्मयोगाची प्रशंसा करिता; तेव्हा या दोहोंमध्ये जें एक कल्याणकारक असेल, तें निश्चयेकरून मला सांगा. ॥ १ ॥

मग अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, " अहो, असलें कसलें हें तुमचें ( दुटप्पी ) बोलणें ? तुम्ही एक कांहीं तरी सांगाल तर त्याचा अंतःकरणपूर्वक विचार करतां येईल. १ सर्व कर्मांचा त्याग करावा, असे परोपरीनें पूर्वीं तुम्हींच निरूपण केलें; आणि आतां कर्म करण्याविषयीं पुनः आग्रह कां वाढवितां ? २ हे अनंता, असें तुमचें द्व्यर्थी बोलणें आमच्यासारख्या अज्ञान जनांच्या चित्ताला आमच्या बुद्धीनें उमजत नाहीं. ३ हें पहा देवा, एक तत्त्वाचा बोध करणें असेल, तर एकच मार्ग सांगावा, हें दुसऱ्यांनीं का आपल्याला सांगावयास पाहिजे ? ४ तरी याचकरिता मीं पूर्वीं तुमची विनवणी केली होती, कीं, हा परमार्थ गूढ अर्थानें सांगूं नका; ५ पण देवा, ती मागील गोष्ट राहूं द्या; प्रस्तुत दोन्ही मार्गांपैकीं उत्तम मार्ग कोणता हे स्पष्ट करून सांगा. ६ तो मार्ग शेवटपर्यंत सोबत देऊन बिनचूक फलप्रद होणारा व आचरण्यास सुलभ असा असावा. ७ ज्याप्रमाणें सोपें व सुखावह वाहन असलें म्हणजे झोंप न मोडतां पुष्कळ मार्ग क्रमिला जातो, त्याप्रमाणें तुम्ही मला सुलभ साधन सांगा. " ८ याप्रमाणें अर्जुनाचें बोलणें ऐकल्यावर देव मनांत फार प्रसन्न झाले, आणि परम उल्हासानें अर्जुनास म्हणाले, " तूं म्हणतोस त्याप्रमाणें होईल. ९ ऐक. ( ज्ञानेश्वर म्हणतातः—) पहा कीं, ज्या प्रारब्धवान पुरुषाला कामधेनूसारखी आई मिळाली आहे, त्याला खेळण्याला चंद्र देखील मिळेल. १० आणखी असें पहा कीं, उपमन्यूला श्रीशंकर प्रसन्न झाल्यावर त्याचे इच्छेप्रमाणें दूधभाताचे ऐवजीं त्याला त्यांनीं क्षीरसमुद्र दिला नाहीं का ? ११ त्याचप्रमाणें, औदार्याचें भांडार असा जो श्रीकृष्ण परमात्मा, तो अर्जुनाला प्राप्त झाल्यावर त्याला सर्व सुखाची प्राप्ति कां न व्हावी ? १२ किंवा, श्रीलक्ष्मीकांतासारखा ज्याचा धनी, त्यानें आपले इच्छेप्रमाणें मागावें यात चमत्कार तो कोणता ? १३ म्हणून, अर्जुनानें जें जें मागितलें, तें तें त्याला सुप्रसन्न वदनानें श्रीकृष्णांनीं दिलें. तें काय तें आता सांगतों. १४

१३ सोबत, जामीन. १४ बिनचूक. १५ सुलभ. १६ सहज. १७ पुष्कळ. १८ क्रमिला जाई. १९ पालखीसारखें वाहन. २० संतोषानें. २१ इच्छेसाठीं. २२ क्षीरसागर. २३ प्राप्त. २४ वसतिस्थान. २५ धनी. २६ इच्छेसारखा.

श्रीभगवानुवाच—

संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ । तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥२॥

अन्वय—सन्यासः कर्मयोगः च उभौ निःश्रेयसकरौ (स्तः), तयोः तु कर्मसंन्यासात् कर्मयोगः विशिष्यते ॥ २ ॥

( १४०. कर्मयोगानेंच संन्यासाचें फल मिळतें, १५ ते १७ ) तो म्हणे गा कुंतीसुता । हे संन्यासयोगु विचारितां । मोक्षकैरु तत्वता । दोनीही होती ॥ १५ ॥ तरी जाणानेणां सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांजळा । जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणीं ॥ १६ ॥ तैसें सारासार पाहिजे । तरी सोहपा हाचि देखिजे । येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें ॥ १७ ॥ ( १४१. संन्यासाचें फल प्राप्त झालेल्यांचीं चिन्हें, १८ ते २५ ) अवतरणः—आतां याचिलागीं सांगेन । तुज संन्यासियाचें चिन्हें । मग सहजें हे[४] अभिन्न । जाणसी तूं ॥ १८ ॥

ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति ।
निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥

अन्वय—यः न द्वेष्टि न काङ्क्षति, सः नित्यसंन्यासी ज्ञेयः; हे महाबाहो, हि स निर्द्वंद्वः (सन्) बंधात् सुखं प्रमुच्यते ॥ ३ ॥

तरी गेलियाची से न करी । न पवतां चाड न धरी । जो सुनिश्चळु अंतरीं । मेरु जैसा ॥ १९ ॥ आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण । पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ॥ २० ॥ जो मनें ऐसा जाहला । संगीं तोचि सांडिला । म्हणोनि सुखें सुख पावला । अखंडित ॥ २१ ॥ आतां गृहादिक आघवें । तें कांहीं नलगे त्यजावें । जे घेतें जाहलें स्वभावें । निःसंगु म्हणउनि ॥ २२ ॥ देखें अग्नि विझोनि जाये । मग जे राखोंडी केवळ होये । तें ते कापुसें गिंवसूं ये । जियापरी ॥ २३ ॥ तैसा असतेनि उपाधी । नाकळिजे तो कर्मबंधीं । जयाचिये बुद्धी । संकल्पु नाहीं ॥ २४ ॥ अवतरणः—म्हणोनि कल्पना जें सांडे । तेंचि गा संन्यासु घडे । इये कारणें दोनी सोंगडे । संन्यास योगु ॥ २५ ॥

सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः ।
एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ४ ॥

अन्वय—सांख्ययोगौ पृथक् (इति) बालाः प्रवदंति, पण्डिताः न (प्रवदति); एकं अपि सम्यक् आस्थितः उभयोः फल विन्दते ॥ ४ ॥

( १४२. ज्ञानयोगाचें व कर्मयोगाचें फल एकच, २६ ते ३१ ) येऱ्हवीं तरी पार्था । जे मूर्ख होती सर्वथा । ते सांख्ययोगसंस्था । जाणती केवीं ॥ २६ ॥ सहजें ते अज्ञान । म्हणोनि म्हणती ते भिन्न । एऱ्हवीं दीपाप्रति काइ आनान ।

१ मोक्षदायक. २ जाणत्यास व नेणत्यास. ३ उदक तरण्यास. ४ कर्मयोग व संन्यासयोग.

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणाले, कर्मसंन्यास आणि कर्मयोग हे दोन्ही मोक्षदायक आहेत; परंतु त्या दोहोंमध्यें, कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग श्रेष्ठ आहे. ॥ २ ॥

भगवान म्हणाले:—हे कुंतीसुता, खरोखर विचार केला असतां कर्मयोग आणि कर्मत्याग हे दोन्हीही मोक्षदायकच आहेत. १५ तथापि, नाव जशी बायकांना व मुलांना उदक तरून जाण्यास सोपी आहे, तसा जाणत्याला व नेणत्याला संसाररूपी समुद्र तरून जाण्यास हा कर्मयोग खरोखर सुलभ आहे. १६ सारासार विचार करितां हाच योग सोपा आहे; आणि ह्याचें आचरण केलें असतां अनायासेंकरून कर्मत्यागाचेंही फल मिळतें. १७ याच कारणाकरितां तुला कर्मसंन्यास करणारांचें चिन्ह सांगेन, म्हणजे कर्मयोग आणि संन्यासयोग हे दोन्ही एकच आहेत अशी तुझी सहज खात्री होईल. १८

श्लोकार्थः—अर्जुना, जो पुरुष कोणाचा द्वेष करीत नाहीं व अभिलाष धरीत नाहीं, तो नित्यसंन्यासी समजावा; कारण द्वंद्वरहित होऊन तो संसारबंधनापासून सुखानें मुक्त होतो. ॥ ३ ॥

जो गेल्या वस्तूची आठवण करीत नाहीं, आणि एखादी वस्तु मिळाली नाहीं तर तिची इच्छा करीत नाहीं, जो मेरु पर्वताप्रमाणें अंतर्यामीं स्थिर असतो; १९ आणि पार्था, ज्याचे अंतःकरणांत मी आणि माझें यांची आठवण देखील होत नाहीं; तो नित्य संन्यासी असें जाण. २० ज्याच्या मनाची अशी वृत्ति झाली आहे, त्यालाच विषयेच्छा सोडते; व म्हणून, आनंदानें त्याला अखंड सुखाची प्राप्ति होते. २१ अशा मनुष्याला गृहादिक सोडण्याचें कारण नाहीं. कां की, त्याच्या मनानें, मी निःसंग आहें असें पक्कें घेतलें असतें. २२ विस्तव विझल्यावर मग त्याची झालेली नुसती राख जशी कापसांत ठेवतां येते, २३ त्याचप्रमाणें, ज्याच्या बुद्धीला, मी कर्ता आहें असा विकार होत नाहीं, तो संसारांत राहून कर्मबंधनानें आकळिला जात नाहीं. २४ म्हणून, जेव्हां मनांतील कल्पना नाहींतशा होतात, तेव्हाच संन्यास घडतो, आणि याच कारणामुळें कर्मत्याग आणि कर्मयोग हे दोन्ही सारखे आहेत. २५

श्लोकार्थः—सांख्ययोग ( कर्मसंन्यास ) व कर्मयोग हे दोन्ही फलदृष्टीनें वेगळे आहेत असें अज्ञानी म्हणतात, परंतु ज्ञानी तसें म्हणत नाहींत; कारण, दोहोंपैकीं एकाचें अनुष्ठान चांगल्या रीतीनें करणाराला दोन्ही योगांचें फल मिळतें. ॥ ४ ॥

याशिवाय पार्था, जे सर्वस्वीं अज्ञानी आहेत, त्यांना ज्ञानयोग व कर्मयोग यांची व्यवस्था कशी समजेल ? २६ त्यांच्या स्वाभाविक अज्ञानामुळें, हे दोन्ही योग भिन्न आहेत असें ते म्हणतात; परंतु पहा कीं, झरोक्यांतून पडलेल्या एकाच दिव्याच्या प्रकाशांत कांहीं भिन्नपणा येतो काय ? २७ तथापि, ज्यांनीं चांगल्या रीतीनें अनुभव घेऊन परब्रह्मरूपाचें तत्त्व जाणलें आहे, ते, हे दोन्ही योग एकच आहेत असें मानतात. २८

५ आठवण. ६ इच्छा. ७ शांत, गंभीर. ८ विषयसंगानें. ९ स्वभावतः. १० आच्छादन करितां येते. ११ सारखे. १२ ज्ञानयोग आणि कर्मयोग याची व्यवस्था. १३ निरनिराळे,

प्रकाशु आहाती ॥ २७ ॥ पैं सैम्यक एणें अनुभवें । जिहीं देखिलें तत्त्व आघवें । ते दोहींतेंही ऐक्यभावें । मानिती गा ॥ २८ ॥

यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते।
एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति॥ ५ ॥

अन्वय—यत् स्थानं सांख्यैः प्राप्यते, तत् योगैः अपि गम्यते; यः सांख्यं च योगं एकं पश्यति, सः पश्यति ॥ ५ ॥

आणि सांख्यीं जें पाविजे । तेंचि योगीं गैमिजे । म्हणोनि ऐक्य दोहींतें सहजें । इयापरी ॥ २९ ॥ देखें आकाशा आणि अवकाशा । भेदु नाहीं जैसा । तैसें ऐक्य योगसंन्यासा । वोळखे जो ॥ ३० ॥ तयासीचि जगीं पाँहलें । आपणपें तेणेंचि देखिलें । जया सांख्ययोगें जाणवलें । भेदेंविण ॥ ३१ ॥

संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।
योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥

अन्वय—(हे) महाबाहो, सन्यासः तु अयोगतः आप्तुं दुःखम्; योगयुक्तः मुनिः न चिरेण ब्रह्म अधिगच्छति ॥ ६ ॥

( १४३. कर्मयोगाचें आचरण करणारालाच ज्ञानाची प्राप्ति होते, ३२—३३ ) जो युक्तिपंथें पार्था । चढे मोक्षपर्वता । तो महासुखाचा निमथा । वेंहिला पावे ॥ ३२ ॥ येरा योगस्थिति जया सांडे । तो वायांचि गा हेंव्यासीं पडे । परी प्राप्ति कहीं न घडे । संन्यासाची ॥ ३३ ॥

योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः।
सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥

अन्वय—योगयुक्तः, विशुद्धात्मा, विजितात्मा, जितेंद्रियः, सर्वभूतात्मभूतात्मा (च) कुर्वन् अपि न लिप्यते ॥ ७ ॥

( १४४. आत्मस्वरूपीं चित्त स्थिर करण्यानेंच बंधनाश होतो, ३४ ते ६३ ) जेणें भ्रांतीपासूनि हिरैतले । गुरुवाक्यें मन धुतलें । मग आत्मस्वरूपीं घातलें । रोऊनियां ॥ ३४ ॥ जैसें समुद्रीं लवण न पडे । तंव वेगळें अल्प आंवडे । मग होय सिंधूचि एवढें । मिळे तेव्हां ॥ ३५ ॥ तैसें संकल्पोनि काढिलें । जयाचें मनचि चैतन्य जाहलें । तेणें एकदेशियें परी व्यापिलें । लोकत्रय ॥ ३६ ॥ आतां कर्ता कर्म करावें । हें खुंटलें तया स्वभावें । आणि करी जन्ही आघवें । तन्ही अकर्ता तो ॥ ३७॥

नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।
पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्श्वसन् ॥ ८ ॥
प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि । इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥९॥

अन्वय—युक्तः तत्त्ववित् पश्यन्, शृण्वन्, स्पृशन्, जिघ्रन्, अश्नन्, गच्छन्, स्वपन्, श्वसन्, प्रलपन्, विसृजन्, गृह्णन्, उन्मिषन्, निमिषन् अपि, इंद्रियाणि इंद्रियार्थेषु वर्तंते इति धारयन्, अहं किंचित् एव न करोमि इति मन्येत ॥ ८ ॥ ९ ॥

श्लोकार्थ—जें पद सांख्यांना मिळतें, तेंच योग्यांनाही मिळतें; म्हणून, सांख्य व योग हे फलदृष्ट्या एकच आहेत असें जो समजतो, तोच खरा ज्ञानी होय. ॥ ५ ॥

आणि ज्ञानयोगापासून जी प्राप्ति होते, तीच कर्मयोगापासूनही होते, म्हणून अशा प्रकारें या दोहोंमध्यें सहजींच ऐक्य आहे. २९ हें पहा कीं, आकाश आणि पोकळी यांत जसा भेद नाहीं, तसा ज्ञानयोग आणि कर्मयोग यांत भेद नाहीं. हें जो जाणतो, ३० ज्यानें ज्ञानयोग आणि कर्मयोग यांत भिन्नभाव नाहीं हें जाणलें, त्यालाच ह्या जगतामध्यें उजाडलें; ( ज्ञानप्राप्ति झाली; ) व त्यानेंच आत्मस्वरूप पाहिलें. ३१

श्लोकार्थ—हे महाबाहो, कर्मयोगावाचून कर्मसंन्यास प्राप्त करून घेणें फार कठिण आहे. कर्मयोगयुक्त मुनीला संन्यास त्वरित प्राप्त होतो. ॥ ६ ॥

पार्था, जो कर्ममार्गानें मोक्षरूप पर्वतावर चढतो, तो त्या पर्वताच्या ब्रह्मरूपी शिखरावर लवकरच पोहोंचतो. ३२ येऱ्हवीं जे कर्ममार्गाचें आचरण करीत नाहींत, ते ज्ञानप्राप्तीविषयीं व्यर्थ हव्यास करतात. परंतु त्यांना तें कधीं प्राप्त होत नाही. ३३

श्लोकार्थ—ज्या कर्मयोग्याचें अंतःकरण शुद्ध झालेलें आहे, ज्यानें देह व इंद्रियें हीं स्वाधीन ठेविलीं आहेत, आणि ज्याचा आत्मा सर्व भूतांचा आत्मा झालेला आहे, त्या पुरुषानें कर्में केलीं तरी तो बद्ध होत नाहीं. ॥ ७ ॥

ज्यानें आपलें मन भ्रांतीपासून माघारें वळवून व गुरुवाक्यानें शुद्ध करून आत्मस्वरूपाचे ठिकाणीं लावलें; ३४ जोंपर्यंत समुद्रांत मीठ घातलें नाहीं तोंपर्यंत तें जसें समुद्रापासून वेगळें असून लहान दिसतें, व तेंच समुद्रांत घातलें म्हणजे समुद्रभर पसरतें, ३५ त्याचप्रमाणें, ज्याचें मन संकल्पापासून काढल्यावर ब्रह्मरूपीं मिळालें आहे त्याचें मन एकदेशीय खरें; पण त्यानें त्रिभुवन व्याप्त केलें ! ३६ मग त्याला ' मी कर्ता ' व ' अमुक कर्म करावयाचें ' या गोष्टी स्वभावतांच नाहीतशा होतात; आणि त्यानें जरी सर्व कर्में केलीं, तरी तीं न केल्यासारखींच आहेत. ३७

श्लोकार्थः—योगयुक्त झालेला तत्त्ववेत्ता पुरुष आपण स्वतः पहात असतां, ऐकत असतां, स्पर्श करीत असतां, वास घेत असतां, खात असतां, गमन करीत असतां, निद्रित असतां, श्वासोच्छ्वास करीत असतां, बोलत असतां, मलादि टाकीत असतां, ग्रहण करीत असतां, किंवा डोळ्यांची उघडझांप करीत असतां ' इंद्रियें आपापल्या विषयांचे ठायीं प्रवृत्त होत आहेत ' असा निश्चय करून, ' मी कांहीं सुद्धा करीत नाहीं ' असें मानतो ॥ ८ ॥ ९ ॥

कारण पार्था, त्याच्या देहांत मीपणाची आठवण देखील नसते, मग त्याच्या ठिकाणीं ' मी कर्ता ' हा अभिमान कोठून उरणार सांग. ३८ याप्रमाणें, शरिराचा त्याग

१ चांगले. २ परब्रह्मस्वरूप. ३ ज्ञानयोगानें. ४ कर्मयोगानें. ५ पावावें. ६ पोकळीला. ७ उजाडलें, उघड झालें. ८ ज्ञान. ९ कर्म. १० कर्मयोगानें. ११ ब्रह्मसुखाचा. १२ शिखर. १३ त्वर. १४ कर्मयोग. १५ छंदांत. १६ ज्ञानयोगाची. १७ माघारें फिरविलें. १८ मीठ. १९ मादतें. २० ब्रह्मरूप, २१ राहिलें.

जे पार्था तया देहीं । मी ऐसा आठऊ नाहीं । तरी कर्तृत्व कैचें काई । उरे सांगें ॥ ३८ ॥ ऐसे तनुत्यागेंविण । अमूर्ताचे गुण । दिसती संपूर्ण । योगयुक्ता ॥ ३९ ॥ येऱ्हवीं आणिकांचिये परी । तोही एक शरीरी । अशेषांही व्यापारीं । वर्ततु दिसे ॥ ४० ॥ तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकतु आहे । परि तेथींचा सर्वथा नोहे । नवल देखें ॥ ४१ ॥ स्पर्शासि तरी जाणे । परिमळ सेवी घ्राणें । अवसरोचित बोलणें । तयाहि आथी ॥ ४२ ॥ आहारातें स्वीकारी । त्यजावें तें परिहरी । निद्रेचिया अवसरीं । निदिजे सुखें ॥ ४३ ॥ आपुलेनि इच्छावशें । तोही गा चालतु दिसे । पैं सकळ कर्म ऐसें । राहाटे कीर ॥ ४४ ॥ हें सांगों काई एकेक । देखें श्वासोश्वासादिक । आणि निमिषोन्मेषं । आदिकरूनि ॥ ४५ ॥ पार्था तयाचे ठायीं । हें आघवेंचि आथी पाहीं । परी तो कर्ता नव्हे कांहीं । प्रतीतिबळें ॥ ४६ ॥ जैं भ्रांतिसेजे सुतला । तैं स्वप्नसुखें भुतला । मग तो ज्ञानोदयीं चेइला । म्हणोनियां ॥ ४७ ॥

ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥

अन्वय—यः संगं त्यक्त्वा ब्रह्मणि कर्माणि आधाय ( तानि ) करोति, सः पद्मपत्रं अम्भसा इव पापेन न लिप्यते ॥ १० ॥

आतां अधिष्ठानसंगती । अशेषाही इंद्रियवृत्ती । आपुलालिया अर्थीं । वर्तत आहाती ॥ ४८ ॥ दीपाचेनि प्रकाशें । गृहींचे व्यापार जैसे । देहीं कर्मजात तैसें । योगयुक्ता ॥ ४९ ॥ तो कर्में करी सकळें । परी कर्मबंधा नाकळे । जैसें न सिंपे[17] जळीं जळें । पद्मपत्र ॥ ५० ॥

कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि । योगिनः कर्म कुर्वंति संगं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥

अन्वय—योगिनः कायेन, मनसा, बुद्ध्या, केवलैः इंद्रियैः अपि आत्मशुद्धये संगं त्यक्त्वा कर्म कुर्वन्ति ॥ ११ ॥

देखें बुद्धीची भाष नेणिजे । मनाचा अंकुर नुदैजे । ऐसा व्यापारु तो बोलिजे । शारीरु गा ॥ ५१ ॥ हेंच मऱ्हाटे परियेसीं । तरी बाळकाची चेष्टा जैशी । योगिये कर्में करिती तैशीं । केवळा तनु ॥ ५२ ॥ मग पांचभौतिक संचलें । जेव्हां शरीर असे निदेलें । तेथें मनचि राहाटे एकलें । स्वप्नीं जेवीं ॥ ५३ ॥ नवल ऐकें धनुर्धरा । कैसा वासनेचा पसारा । देहा होऊं नेदी उजगरा । परी सुखदुःखें भोगी ॥ ५४ ॥ इंद्रियांचा गांवीं नेणिजे । ऐसा व्यापारु जो निपजे[27] । तो केवळ गा म्हणिजे । मानसाचा ॥ ५५ ॥ योगिये तोही करिती ।

१ शरीर असतांही. २ निराकार-ब्रह्माचे. ३ सर्व. ४ सुगंध. ५ नाकानें. ६ समयोचित. ७ टाकतो. ८ निजतो. ९ डोळे मिटणें व उघडणें. १० आत्मानुभवाच्या बळानें. ११ निजला. १२ भुलला. १३ जागा झाला. १४ आत्मा. १५ विषयांमध्यें. १६ सर्व कर्में. १७ भिजत नाहीं.

न करितां त्या योगयुक्त पुरुषाचे अंगीं निराकार ब्रह्माचे सर्व गुण दृष्टीस पडतात. ३९ बाकी इतर लोकांप्रमाणें तोही शरीरधारी असून सर्व व्यापार करतो असें दिसतें. ४० तो नेत्रानें पाहतो, कानानें ऐकतो, तरी शरिराच्या भावांत तो लिप्त होत नाहीं. हें नवल पहा! ४१ त्याला स्पर्श झालेला समजतो, तो नाकानें वास घेतो, आणि त्याला समयोचित भाषणही करतां येतें; ४२ तो जेवतो, टाकावयाची वस्तु टाकतो, झोपेच्या वेळीं सुखानें झोंप घेतो, ४३ आपले इच्छेप्रमाणे तो चालतो व त्याचप्रमाणें ज्या ज्या वेळेस जीं जीं कर्में करावयाचीं तीं सर्व करतो; ४४ हें आणखी एक एक काय सांगूं? हें पहा—श्वासोच्छ्वास करणें; तसेंच डोळे मिटणें व उघडणें इत्यादि ४५ सर्व कांहीं गोष्टी त्याचे ठिकाणी दृष्टीस पडतात; परंतु पार्था, आत्मानुभवाचे बळानें तो त्या गोष्टींचा कर्ता नव्हे. ४६ जेव्हां तो भ्रांतिरूप बिछान्यावर निजला होता, तेव्हां स्वप्नसुखानें भुलला होता; परंतु आता त्याला ब्रह्मज्ञानाची जागृति झाली, म्हणून तो कर्ता नव्हे. ४७

श्लोकार्थः—जो फलाची इच्छा सोडून सर्व क्रिया ब्रह्मार्पणबुद्धीनें करितो, तो कमळाचें पान जसें पाण्यांत असूनही भिजत नाहीं, तसा ( कर्में करीत असून तज्जन्य ) पापानें लिप्त होत नाहीं. ॥ १० ॥

आतां आत्म्याच्या आश्रयानें सर्व इंद्रियांच्या वृत्ति आपआपल्या विषयांत राहत असतात; ४८ दिव्याच्या उजेडानें ज्याप्रमाणें घरांतील सर्व व्यवहार चालतात, ( पण स्वतः दिवा त्यांपासून अगदीं अलिप्त असतो; ) त्याप्रमाणें, ज्ञान्याकडून कर्में होत असतात. (पण) ४९ कमळाचें पान जसें पाण्यांत असूनही भिजत नाहीं, तसा तो ज्ञानी सर्व कर्में करीत असतांही कर्मबंधनानें आकळिला जात नाहीं. ५०

श्लोकार्थः—योगी हे आत्मशुद्धीकरितां केवळ शरिराचीं, मनाचीं, बुद्धीचीं व इंद्रियाचीं अशीं चार प्रकारचीं कर्में फलासक्ति टाकून करतात. ॥ ११ ॥

ज्यात बुद्धीची खूण दिसत नाहीं, व मनाचा अंकुर उगवत नाहीं, त्या व्यापाराला ' देहव्यापार ' म्हणावें. ५१ यापेक्षा जास्त स्पष्ट करून सागतों ऐक. जसे लहान मुलाचे व्यापार मन किंवा बुद्धि यांना सोडून होतात, तसे योगी लोक हे केवळ देहानें कर्में करितात. ५२ अशा प्रकारें, पाच तत्त्वानीं बनलेलें हें शरीर जेव्हां निजलें असतें, तेव्हां मन हें स्वप्नातल्याप्रमाणें एकटेंच व्यापार करीत असतें. ५३ अर्जुना, हें एक नवल ऐक—वासनेचा कसा पसारा आहे कीं, तो देहाला कळूं न देता त्याजकडून सुखदुःखें भोगवितो. ५४ इंद्रियांना माहीत पडल्याशिवाय जो व्यापार होतो, त्यालाच केवळ मनाचा व्यापार असें म्हणावें. ५५ योगीलोक ह्याही मनोव्यापाराचें आचरण करितात, परंतु ते कर्मानें

१८ खूण. १९ उगवत नाहीं. २० देहाचा. २१ स्पष्ट रीतीनें २२ एक. २३ पंचतत्त्वांना. २४ बनलेलें. २५ निजलेलें. २६ कळणें. २७ उत्पन्न होतो.

परी कर्में ते न बंधिजती[1] । जे[2] सांडिली आहे संगती । अहंभावाची ॥ ५६ ॥ आतां जाहालिया भ्रमहत[3] । जैसें पिशाचाचें चित्त । मग इंद्रियांचें चेष्टित । विकळ[4] दिसे ॥ ५७ ॥ स्वरूप तरी देखे । आळविले[5] आइके । शब्दु बोले मुखें । परि ज्ञान नाहीं ॥ ५८ ॥ हें असो काजेंवीण[6] । जें जे कांहीं करण । तें केवळ कर्म जाण । इंद्रियांचें ॥ ५९ ॥ मग सर्वत्र जे जाणतें । तें बुद्धीचें कर्म निरुतें[7] । वोळख अर्जुनातें । म्हणे हरी ॥ ६० ॥ ते बुद्धि धुरे[8] करुनी । कर्म करिती चित्त देउनी । परि ते कर्मापासुनी । मुक्त दिसती ॥६१॥ जे बुद्धीचिये ठावूनि[9] देहीं[10] । तयां अहंकाराची सेचि नाहीं । म्हणोनि कर्म करितां पाहीं । चोखाळले[11] ॥ ६२॥ अगा करितेनवीण[12] कर्म । तेंचि तें निष्कर्म । हें जाणती सुवर्म[13] । गुरुगम्य[14] जे ॥ ६३ ॥ ( १४५. श्रोत्याची प्रकृत विषय सागण्याची सूचना, ६४ ते ६८ )( ओवी ६४ ते ७० हे अवतरण ) आतां शांतरसाचें भरितें[15] । सांडीत आहे पात्राते । जें बोलणें बोलापरौतें[16] । बोलवलें ॥ ६४ ॥ एथ इंद्रियांचा पांगु[17] । जया फिटला आहे चांगु[18] । तयासीचि आथि लागु[19] । परिसावया ॥६५॥ हा असो अतिप्रसंगु[20] । न संडीं[21] पां कथालागु । होईल श्लोकसंगतिभंगु । म्हणऊनियां ॥ ६६ ॥ जे मना आकाळितां कुवाडें[22] । घेंघुसितां[23] बुद्धी नातुडे[24] । तें दैवाचेनि सुरवाडें[25] । सांगवलें तुज ॥ ६७ ॥ जें शब्दातीत[26] स्वभावें । तें बोलींचि जरी फावे[27] । तरी आणिकें काय करावें । कथा सांगें ॥ ६८ ॥ ( १४६. कृष्णार्जुनसंवाद, ६९ ) हा अतिविशेषु[28] श्रोतयांचा । जाणोनि दास निवृत्तीचा । म्हणे संवादु दोघांचा । परिसोनि परिसा ॥ ६९ ॥ ( १४७. आत्मज्ञानी पुरुषाचीं चिन्हें, ७० ) मग श्रीकृष्ण म्हणे पार्थातें । आतां प्राप्ताचें[29] चिन्ह पुरतें । सांगेन तुज निरुतें[30] । चित्त देईं ॥ ७० ॥

युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ।
अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबद्धयते ॥ १२ ॥

अन्वय—युक्तः कर्मफलं त्यक्त्वा नैष्ठिकीं शातिं आप्नोति; अयुक्तः कामकारेण फले सक्तः (सन्) निबद्धयते ॥ १२ ॥

( १४८. आत्मज्ञानानेच शाति प्राप्त होते, ७१ ते ७२ ) तरी आत्मयोगें[31] आथिला[32] । जो कर्मफळाशीं विटला । तो घर रिघोनि वरिला । शांती जगीं ॥ ७१ ॥ येरु[33] कर्मबंधें किरीटी । अभिलाषाचिया[34] गांठी । कळासैला[35] खुंटी । फळभोगाच्या ॥ ७२ ॥

---

१ बाधले जात नाहींत. २ कारण. ३ भ्रमिष्ट. ४ अव्यवस्थित. ५ हाक मारलेली. ६ निष्कारण. ७ खरोखर. ८ पुढें. ९ आत शिरून. १० देहाचे व्यापार करतात. ११ शुद्ध झाले. १२ कर्तृत्वाच्या अभिमानावाचून. १३ तत्त्व. १४ गुरूपासून शिकण्याचें. १५ पूर. १६ शब्दाच्या पलीकडचें बोलणें. १७ दैन्य. १८ उत्तम. १९ अधिकार. २० विषयांतर. २१ सवध. २२ अवघड. २३ शोधितां, विवरण करितां. २४ सापडत नाहीं २५ अनुकूलतेनें. २६ बोलण्यापलीकडचें.

बांधले जात नाहींत; कारण, त्यानीं अहंकाराचा त्याग केलेला असतो. ५६ ज्या वेळेस एखाद्या मनुष्याचें मन भ्रमिष्ट झालेलें असतें, किंवा जसें पिशाच्चाची बाधा झालेल्याचें चित्त असतें, त्या वेळेस इंद्रियांचे सर्व व्यापार अव्यवस्थित दिसतात. ( मनाला आणि बुद्धीला ते धरून नसतात; कारण, भ्रम नाहींसा झाल्यावर त्यांची त्याला आठवण नसते. ) ५७ समोर मनुष्य आलें असतां त्याला दिसतें; कोणी हांक मारली असता ऐकूं येते व तो स्वतः बोलतो; परंतु त्याचे ठिकाणीं ज्ञानाचा अभाव असतो. ५८ असो; तत्त्वार्थ काय कीं, निष्कारण जें काहीं करणें, तें फक्त इंद्रियांचेंच कर्म होय असें समज. ५९ श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतातः—ह्याव्यतिरिक्त, सर्व जाणून जें कर्म करणें, तें बुद्धीचें कर्म असें समज. ६० ते योगी बुद्धीला पुढें करून मनापासून कर्माचें आचरण करतात, परंतु ते कर्मकर्तेपणाच्या भावापलीकडे असून मुक्त आहेत. ६१ कारण, बुद्धीपासून देहापर्यंत त्यांना अहंकाराची आठवण सुद्धां होत नाहीं. म्हणून ते कर्म करीत असले तरी शुद्ध होत. ६२ ' कर्म करणारा मी आहें ' असा भाव न ठेवितां जें कर्म करणें, तेंच नैष्कर्म्य होय, हें गुरूपासून कळणारें तत्त्व ते जाणतात. ६३ आम्ही आतां जें बोलूं नये तें बोललों, म्हणून शांतिरस इतका अधिक झाला कीं, तो ज्या पात्रांत भरला आहे, तें पात्र भरून तो खालीं सांडत आहे ! ६४ ज्याच्या इंद्रियांचें दैन्य पूर्णपणें नाहींसें झालें आहे, त्यालाच हें ( अनुभवाचें ) बोलणें ऐकावयाचा अधिकार आहे. ६५ ( मग श्रोते ज्ञानेश्वरांस म्हणतात, ) "अहो, हें विषयांतर पुरे करा; कथेचा संबंध सोडूं नका; कारण श्लोकांच्या संगतीचा बिघाड होईल. ६६ जें मनानें समजण्यास अवघड, व विचार करूनही बुद्धीला न सांपडणारें, तें दैवाच्या अनुकूलतेनें तुम्हीं आम्हांस सांगितलें. ६७ जें मुळींच बोलतां येत नाहीं, तें जर बोलण्यांत सांपडलें, तर आणखी उपाय कशास पाहिजेत ? परंतु हें असो; आतां कथा सांगा." ६८ ऐकणारांची ही उत्कट इच्छा जाणून निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणालेः—दोघांचा संवाद जो एवढा वेळ ऐकिला, त्याचें मनन करून पुढें तोच ऐका. ६९ मग श्रीकृष्ण पार्थाला म्हणालेः—पूर्ण ब्रह्मनिष्ठाला ओळखण्याचें खरें चिन्ह कोणचें तें मी सांगतों, लक्ष दे. ७०

श्लोकार्थः—आत्मनिष्ठ पुरुष हा कर्मफलाचा त्याग करून अढळ शांति प्राप्त करून घेतो;आणि आत्मनिष्ठ नसणारा पुरुष, वासनेनें प्रेरित होऊन फलासक्त झाल्यामुळें बद्ध होतो. ॥ १२ ॥

हें पहा कीं, आत्मज्ञानानें जो पूर्ण भरला व ज्याला कर्मफलाचा अगदीं वीट आला, त्याला या जगामध्यें घरीं बसल्याच शांति येऊन वरते ( प्राप्त होते ). ७१ अर्जुना, दुसरा जो संसारी. तो कर्मबंधानें बांधला जाऊन अभिलाषाच्या गांठीनें फलभोगाच्या खुंटीला अडकला जातो. ७२

२७ सांपडतें, स्पष्ट करिता येतें. २८ उत्कट इच्छा. २९ योग्याचें. ३० बरोबर. ३१ आत्मज्ञानानें. ३२ संपन्न झाला. ३३ दुसरा. ३४ कर्मफलाची इच्छा. ३५ आडकतो.

सर्वकर्माणि मनसा संन्यस्याऽऽस्ते सुखं वशी ।
नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥

अन्वय—वशी देही सर्वकर्माणि मनसा संन्यस्य नवद्वारे पुरे न एव कुर्वन् न कारयन् सुखं आस्ते ॥ १३ ॥

( १४९. आत्मज्ञान्याची लक्षणें, ७३ ते ७५ ) जैसा फळाचिये हांवें । तैसें कर्म करी आघवें । मग न कीजेचि येणें भावें । [२]उपेक्षी जो ॥ ७३ ॥ तो जयां-कडे वासु पाहे । तेउती सुखाची सृष्टि होये । तो म्हणे तेथ राहे । महाबोधु ॥ ७४ ॥ नवद्वार देहीं । तो असतुचि परि नाहीं । करितुचि न करी कांहीं । फलत्यागी ॥ ७५ ॥

न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः । न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥१४॥

अन्वय—प्रभुः लोकस्य कर्तृत्वं न सृजति, कर्माणि ( च ) न ( सृजति ), कर्मफलसंयोगं ( च ) न ( सृजति ), स्वभावः तु प्रवर्तते ॥ १४ ॥

( १५०. ईश्वर जगाची उत्पत्ति करूनही अकर्ता, ७६ ते ८२ ) जैसा का सर्वेश्वरु । पाहिजे तंव निर्व्यापारु । परि तोचि रची विस्तारु । त्रिभुवनाचा ॥ ७६ ॥ आणि कर्ता ऐसें म्हणिपे । तरी कवणें कर्मीं न [१०]शिंपे । जे हातुपावो न [११]लिंपे । उदासवृत्तीचा ॥ ७७ ॥ योगनिद्रा तरी न मोडे । अकर्तेपणा सळु न पडे । परि महाभूतांचें दळवाडें । उभारी भलें ॥ ७८ ॥ जगाच्या जीवीं आहे । परी कवणाचा कांहीं नोहे । जगचि हें होय जाये । तो शुद्धीही नेणे ॥ ७९ ॥

नाऽऽदत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः । अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥१५॥

अन्वय—विभुः कस्यचित् पापं न आदत्ते, सुकृतं च न एव ( आदत्ते ); ज्ञानं अज्ञानेन आवृतम्, तेन जन्तवः मुह्यन्ति ॥ १५ ॥

पापपुण्यें अशेषें । पासींचि असतु न देखे । आणि साक्षीही होऊं नेणे ठके । येरी गोठी कायसी ॥ ८० ॥ पैं मूर्तीचेनि [१६]मेळें । तो मूर्तचि[१७] होऊनि खेळे । परी अमूर्तपण न [१८]मैळे । दादुलयाचें ॥ ८१ ॥ तो सृजी पाळी संहरी । ऐसें बोलती जे चराचरीं । ते अज्ञान गा अवधारीं । पंडुकुमरा ॥ ८२ ॥

ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः । तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥१६॥

अन्वय—येषां तु तत् अज्ञानं आत्मनः ज्ञानेन नाशितं, तेषां तत् ज्ञानं आदित्यवत् परं प्रकाशयति ॥ १६ ॥

( १५१. अज्ञानाचा नाश ज्ञानानेंच होतो, ८३ ते ८६ ) तें अज्ञान जें समूळ तुटे । तें भ्रांतीचें [२३]मैसरें फिटे । मग अकर्तृत्व प्रगटे । मज ईश्वराचें ॥ ८३ ॥ एथ ईश्वरु एक अकर्ता । ऐसें मानलें जरी चित्ता । तरी तोचि मी हें स्वभावतां । आदीचि आहे ॥ ८४ ॥ ऐसेनि विवेकें उदो चित्तीं । तयासि भेदु कैंचा त्रिजगतीं ।

१ आदरानें. २ ( फलेच्छा ) सोडतो ३ दृष्टीनें. ४ तेवढी. ५ महाज्ञान. ६ पाहिला असतां. ७ अकर्ता. ८ म्हणावें. ९ लिप्त होत नाहीं. १० संसर्ग होत नाहीं. ११ दोष, रेपा. १२ समुदाय.

श्लोकार्थः—परमार्थज्ञान झालेला देही, मनापासून सर्व कर्मांचा त्याग करून, ह्या नवद्वारपुरांत (शरिरात) कांहीं न करता व कांहीं न करवितां सुखानें राहतो. ॥ १३ ॥

फलेच्छेनें कर्माचरण करणाऱ्याप्रमाणें जो सर्व कर्मे यथासांग करतो, परंतु त्या कर्मांचा मी कर्ता नव्हे असें समजून फलेच्छा सोडतो, ७३ तो पुरुष जिकडे जिकडे पाहतो, तिकडे तिकडे सुखमय सृष्टि होते, आणि तो म्हणेल तेथें ब्रह्मज्ञान उभें राहतें. ७४ एक फलाची इच्छा धरली नाहीं म्हणजे तो नवद्वारांच्या देहांत असूनही नसल्यासारखा आहे; आणि सर्व कर्मे करूनही त्यानें तीं न केल्याप्रमाणें आहेत. ७५

श्लोकार्थः—ईश्वर जीवाचीं कर्मे, कर्तेपणा व फलाचा संबंध हीं तिन्ही उत्पन्न करीत नाहीं, परंतु हा सर्व मायेचा खेळ आहे. ॥ १४ ॥

जसा ईश्वर पाहिला असता अकर्ता आहे, परंतु (मायोपाधीचा आरोप त्याजवर केला म्हणजे) या त्रिभुवनाचा विस्तार तोच करतो (असें दिसतें;) ७६ आणि तो कर्ता आहे असें म्हटलें तर तो कोणत्याही कर्मानें लिप्त होत नाहीं. कारण त्याची उदासीन वृत्ति असल्याकारणानें त्याच्या हातापायांस कशाचाही संसर्ग होत नाहीं; ७७ त्याच्या योगनिद्रेचा मुळींच भंग होत नाहीं; व त्याच्या अकर्तेपणालाही दोष लागत नाहीं; पण तो महाभूतांचे समुदाय मात्र भले उठवून देतो ! ७८ पहायला लागलें तर ह्या जगात प्राणिमात्राच्या ठायीं हा आहे, परंतु केव्हांही कोणाचा नसतो; आणि हें जगत् उत्पन्न होतें व लयास जातें, याची त्याला वार्ता देखील नसते ! ७९

श्लोकार्थः—ईश्वर कोणाचें पाप व पुण्य आपलेकडे घेत नाहीं; पण ज्ञान हें अज्ञानानें आच्छादित झाल्यामुळें सर्व जीव मोह पावतात. ॥ १५ ॥

पापपुण्य सर्व त्याच्याजवळ असूनही तो पाहत नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्याला साक्षीभूत सुद्धां तो नसतो; मग दुसऱ्या गोष्टीबद्दल कशाला विचारावें ? ८० तथापि मूर्ति धारण करून तो देहांच्या बरोबर खेळतो, (अवतार घेऊन जगामध्यें वावरतो,) परंतु त्या प्रभूचें निराकारपण मोडत नाहीं. ८१ असें असतां अर्जुना, तो उत्पन्न करतो, पालन करतो, आणि संहार करतो, असें जे लोक म्हणतात, तें सर्व अज्ञानामुळें म्हणतात असें समज. ८२

श्लोकार्थः—ज्याच्या ठिकाणचें तें अज्ञान आत्मस्वरूपाच्या ज्ञानानें नष्ट झालें आहे, त्याचें तें सूर्याप्रमाणें उज्ज्वल असें ज्ञान परब्रह्माप्रत प्रकाशित करतें ॥ १६ ॥

तें अज्ञान जेव्हा समूळ नाहींसें होतें, तेव्हां भ्रांतिरूप काजळी नाहींशी होते. असें झालें म्हणजे मग ईश्वराचें अकर्तेपण स्पष्ट समजून येतें. ८३ अशा प्रकारें ईश्वर हा अकर्ता आहे अशी जर मनाची खातरी झाली, तर तोच मी आहें हें पूर्वीपासून सिद्धच

१३ कधीं. १४ जवळ असून. १५ शकत नाहीं. १६ देहाच्याबरोबर. १७ देह धारण करून. १८ निराकारपणा. १९ विघडत नाहीं २० प्रभूचें. २१ उत्पन्न करतो. २२ अंधकार, काजळी. २३ उजेड.

देखे आपुलिया प्रतीती[1] । जगचि मुक्त ॥ ८५ ॥ जैशी पूर्वदिशेच्या रांउळीं[2] । उदया येतांचि सूर्यदिवाळी[3] । कीं येरीही दिशा तियेचि काळीं । काळिमा[4] नाहीं ॥ ८६ ॥

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः । गच्छंत्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥१७॥**

अन्वय—तद्बुद्धयः, तदात्मानः, तन्निष्ठाः, तत्परायणाः (च) ज्ञाननिर्धूतकल्मषाः (पुरुषाः) अपुनरावृत्तिं गच्छंति ॥ १७ ॥

(१५२. बुद्धि ज्ञानपरायण करून जन्ममरणांतून सुटावें, ८७ ते ९२) बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान । ब्रह्मरूप भावी[5] आपणा आपण । ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण । तत्परायण[6] अहर्निशीं[7] ॥ ८७ ॥ ऐसें व्यापक ज्ञान भलें । जयांचिया हृदया गिंवसीत[8] आलें । तयांची समतादृष्टि बोलें । विशेखूं[9] काई ॥ ८८ ॥ एक आपणपांचि जैसें । ते देखती विश्व तैसें । हें बोलणें कायसें । नवलु एथ ॥ ८९ ॥ परी दैवें[10] जैसें कवतिकें । कहींचि दैन्यें[11] न देखे । कां विवेकु[12] हा नोळखे । भ्रांतीतें जेवीं ॥ ९० ॥ नातरी अंधकाराची वानी[13] । जैसा सूर्य न देखे स्वप्नीं । अमृत नायके कानीं । मृत्युकथा ॥ ९१ ॥ हें असो संतापु[14] कैसा । चंद्रु न स्मरे जैसा । भूतीं भेदु नेणती तैसा । ज्ञानिये ते ॥ ९२ ॥

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि । शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥१८**

अन्वय—पंडिताः विद्याविनयसंपन्ने ब्राम्हणे, गवि, हस्तिनि, शुनि च एव श्वपाके समदर्शिनः (सन्ति) ॥ १८ ॥

(१५३. ज्ञात्याची समता, ९३ ते १०२) मग हा मशकु हा गजु[15] । कीं श्वपचु[16] हा द्विजु । पैल[17] इतरु हा आत्मजु[18] । हें उरलें कें[19] ॥ ९३ ॥ नातरी हे धेनु हें श्वान । एक गुरु[20] एक हीन[21] । हें असो कैचें स्वप्न । जागतया[22] ॥ ९४ ॥ एथ भेदु तरी कीं देखावा । जरी अहंभाव[23] उरला होआवा[24] । तो आधींचि नाहीं आघवा । आतां विषमु[25] काई ॥ ९५ ॥

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद् ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥**

अन्वय—येषां मनः साम्ये स्थितं तैः इह एव सर्गः जितः; हि ब्रह्म निर्दोषं, समं (च अस्ति), तस्मात् ते ब्रह्मणि स्थिताः (अतएव निर्दोषाः सन्ति) ॥ १९ ॥

म्हणोनि सर्वत्र सदा सम । तें आपणचि अद्वय ब्रह्म । हें संपूर्ण जाणें वर्म । समदृष्टीचें ॥ ९६ ॥ जिहीं विषयसंगु न सांडितां । इंद्रियांतें न दंडितां । परी भोगिली निःसंगता । कामनेविण ॥ ९७ ॥ जिहीं लोकांचेनि आधारें ।

---

१ अनुभवानें. २ घरीं. ३ उजेड, प्रकाश. ४ अंधार ५ मानितो. ६ ब्रह्मपरायण. ७ रात्रंदिवस. ८ शोधीत. ९ विशेष बोलून दाखवावें. १० सुख, भाग्य. ११ दारिद्य. १२ विचार. १३ स्वरूप, १४ उष्मा. १५ हत्ती. १६ अंत्यज, अतिशूद्र. १७ पलीकडचा. १८ आपला मुलगा. १९ कोठून. २० थोर. २१ लहान, २२ जागणाराला, २३ मीपणा. २४ असेल, २५ भिन्नपणा,

आहे. (तेव्हां अर्थात् मीही अकर्ता आहें हें सिद्धच झालें !) ८४ याप्रमाणें विवेकानें ज्याचे चित्तांत उजेड पडतो, त्याला या त्रिजगतात भेद रहात नसून, आपले अनुभवावरून सर्व जग मुक्तच आहे असें तो समजतो. ८५ (कसा ? तर) पूर्वेस सूर्य उगवतांच प्रकाश पडतो त्या वेळेस दुसऱ्यांही दिशाचा अंधार नाहीसा होतो त्याप्रमाणें. ८६.

श्लोकार्थः—त्या परब्रह्माचे ठिकाणींच ज्याची बुद्धि रममाण झाली आहे, तेंच ज्याचा आत्मा आहे, त्याचेच ठिकाणीं ज्याची पूर्ण निष्ठा आहे, आणि जे तत्परायण–ब्रह्मपरायणच–झाले आहेत, ते जन्ममरणाच्या येरझारा करीत नाहींत; का कीं, आत्मज्ञानामुळें त्यांचीं सर्व पातकें धुऊन गेलेलीं असतात. ॥ १७ ॥

ज्याच्या बुद्धीचा निश्चय आत्मज्ञानाविषयीं आहे, व जो आपण आपल्याला ब्रह्मरूप मानतो, आणि रात्रंदिवस ब्रह्मपरायण होऊन आपली ब्रह्मस्थिति पूर्णपणें राखतो; ८७ असें सर्वव्यापक ज्ञान ज्याना शोधीत आलें, त्यांची समदृष्टि होते हें विशेषेंकरून बोलून काय दाखवावें ? ८८ जसे आपण स्वतः त्याचप्रमाणे ते सर्व विश्वाला मानतात, असें जर म्हटलें, तर यात नवल ते कसलें ? ८९ ज्याप्रमाणें भाग्य हें कौतुकानें देखील दैन्याचा अनुभव घेत नाहीं, किंवा विचाराला जशी भ्रांतीची ओळख देखील नसते, ९० अथवा सूर्य जसा स्वप्नांत देखील अंधकाराचें स्वरूप पाहत नाहीं, किंवा अमृत कानानें देखील मृत्यूची वार्ता ऐकत नाहीं; ९१ हें असो, परंतु ज्याप्रमाणें चंद्र हा उष्मा कसा आहे तें जाणत नाही, त्याचप्रमाणे ज्ञानी जे आहेत, त्याना प्राणिमात्रात भेद दिसत नाहीं. ९२

श्लोकार्थः—ज्ञाते–आत्मनिष्ठ–जे आहेत, ते, विद्या नम्रता या गुणानीं युक्त असा ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रें व चांडाळ या सर्वांचे ठिकाणीं ब्रह्मच पाहतात. ॥ १८ ॥

मग हें मशक किंवा हा हत्ती, तसाच हा अंत्यज किंवा हा ब्राह्मण, तसेंच हा माझा मुलगा किंवा दुसऱ्याचा, हें त्यांच्यापाशीं कोठून उरणार ? ९३ किंवा ही गाय अथवा हा कुत्रा, एक थोर एक लहान, हें असो; जो जागा आहे त्याला स्वप्न कोठून पडणार ? ९४ जेथें मीपणा उरला असेल, तेथेंच भेद दृष्टीस पडेल; परंतु तो जेथें अजीबात नाहींसा झाला असेल, तेथ भिन्नपणा कोठून असणार ? ९५

श्लोकार्थः—ज्याचें मन सम अवस्थेमध्यें (ब्रह्माचे ठिकाणीं) स्थिर झालें आहे, त्यानीं या लोकींच जन्म व मरण जिंकिलें. कारण, ब्रह्म हें दोषरहित व सम आहे; म्हणून, ते पुरुष ब्रह्माचे ठिकाणीं स्थित आहेत (अतएव निर्दोष आहेत) ॥ १९ ॥

म्हणून, ज्याची नेहमीं सर्वत्र सारखी दृष्टि आहे, तो स्वतांच अद्वितीय ब्रह्म आहे. हें समदृष्टीचें पूर्ण वर्म होय असें समज. ९६ ज्यानें विषयसंग तर सोडला नाहीं आणि इंद्रियांना दंडही केला नाहीं, पण वासनेवांचून अकर्तेपणाचा अनुभव घेतला आहे; ९७ ज्यानें लोकांच्या आश्रयानें वागून, आणि सर्व व्यावहारिक व्यापार करूनही लौकिकांत असलेलें अज्ञान सोडून दिलें आहे; ९८ तो पुरुष, पिशाच ज्याप्रमाणें सर्व लोकांत

लौकिकेंचि[1] व्यापारें। परी सांडिलें निद्रुरें। लौकिकु हें ॥ ९८ ॥ जैसा जनामाजि खेचरु। असताचि जना नोहे गोचरु। तैसा शरीरीं परि संसारु। नोळखे तयातें ॥ ९९ ॥ हें असो पवनाचेनि मेळें। जैसें जळींचि जळ लोळे। तें आणिकें म्हणती वेगळे। कल्लोळ हे ॥ १०० ॥ तैसें नाम रूप तयाचें। येऱ्हवीं ब्रह्मचि तो साचें। मन साम्या आलें जयाचें। सर्वत्र गा ॥ १ ॥ अवतरणः—ऐसेनि समदृष्टि जो होये। तया पुरुषा लक्षणही आहे। अर्जुना संक्षेपें सांगेन पाहें। अच्युत म्हणे ॥ २ ॥

न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम्।
स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥

*अन्वय—स्थिरबुद्धिः, असंमूढः, ब्रह्मणि स्थितः ब्रह्मवित् प्रियं प्राप्य न प्रहृष्येत् च अप्रियं प्राप्य न उद्विजेत् ॥ २० ॥*

( १५४. समता पावलेल्यांचीं लक्षणं, १०३ ते १०८ ) तरी मृगजळाचेनि पूरें। जैसें न लोटिजे कां गिरिवरें[10]। तैसा शुभाशुभीं न विकरे[11]। पातलियां जो ॥३॥ तोचि तो निरुतां[12]। समदृष्टि तत्वतां। हरि म्हणे पंडुसुता। तोचि ब्रह्म ॥ ४ ॥

बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम्।
स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षयमश्नुते ॥ २१ ॥

अन्वय—यः बाह्यस्पर्शेषु असक्तात्मा ( सन् ) आत्मनि यत् सुखं विन्दति, सः ब्रह्मयोगयुक्तात्मा अक्षयं सुखं अश्नुते ॥ २१ ॥

जो आपणपें सांडूनि कांहीं। इंद्रियग्रामावरी येणेंचि नाहीं। तो विषय न सेवी हें काई। विचित्र येथ ॥ ५ ॥ सहजें स्वसुखाचेनि अपारें। सुरवाडलेनि अंतरें[18]। रचिला म्हणऊनि बाहिरें। पाऊल न घाली ॥ ६ ॥ सांगें कुमुददळाचेनि ताटें। जो जेविला चंद्रकिरणें चोखटें। तो चकोरु काय वाळुवंटें। चुंबितु असे ॥ ७ ॥ तैसें आत्मसुख उपाइलें। जयासि आपणपेंचि फावलें। तया विषयो सहज सांडवले। म्हणों काई ॥ ८ ॥ ( १५५. आत्मदर्शन नसलेल्यांना विषय आवडतात, १०९ ते ११२ ) अवतरणः—येऱ्हवीं तरी कौतुकें। विचारूनि पाहें पां निकें। या विषयांचेनि सुखें। झकविजेती कवण ॥ ९ ॥

ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते। आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥२२॥

अन्वय—हि, ( हे ) कौंतेय, संस्पर्शजाः ये भोगाः, ते आद्यन्तवन्तः दुःखयोनयः एव संति; ( अतः ) बुधः तेषु न रमते ॥ २२ ॥

जिहीं आपणपें नाहीं देखिलें। तेचि इहीं इंद्रियार्थीं रंजले[23]। जैसें रंकु कां आंवळलें। तुषातें सेवी ॥ ११० ॥ नातरी मृगें तृषापीडितें। संभ्रमें विसरोनि

१ व्यावहारिक. २ अज्ञान. ३ पिशाच, भूत. ४ असूनही. ५ दृष्टीस पडणें. ६ वाऱ्याचे. ७ लाटा. ८ साक्षात्. ९ समतेस, समदृष्टीस. १० डोंगर. ११ विकार पावणें. १२ प्राप्त झाली असता. १३ खरा. १४ तत्त्व जाणणारा. १५ आत्मस्वरूप. १६ इंद्रियाधीन. १७ सुखी.

असूनही दिसत नाहीं, त्याप्रमाणें, शरीरधारी असूनही तो संसारला ओळखीत नाहीं. ९९ हें असो, वाऱ्यामुळें पाण्यांत पाणी उसळतें; पण त्याला ज्याप्रमाणें इतर लोक पाण्याहून वेगळ्या 'लाटा' असें म्हणतात, १०० त्याप्रमाणें, ह्याचें शरीर आणि नांव हीं जरी जगाप्रमाणेंच आहेत, तथापि तो साक्षात् ब्रह्मच आहे; आणि त्याचें मन सर्व ठिकाणीं समतेला पावलें आहे. १ श्रीअच्युत म्हणतात:—अर्जुना, अशी ज्याची समदृष्टि झालेली आहे, त्या पुरुषाचें लक्षण काय, तें संक्षेपानें तुला सागतों. ऐक. २

श्लोकार्थ:–ज्याची बुद्धि स्थिर झाली आहे, ज्याचें सर्व अज्ञान नष्ट झालें आहे, व जो ब्रह्माचे ठिकाणीं स्थित झाला आहे, असा ब्रह्मवेत्ता पुरुष आवडता विषय प्राप्त झाला असता सुख मानीत नाहीं, व नावडता विषय प्राप्त झाला असता त्याचे चित्ताला दुःख होत नाहीं ॥ २० ॥

ज्याप्रमाणें मृगजलाच्या पुरानें डोंगर वाहून जात नाहींत, त्याचप्रमाणें, जो चांगली किंवा वाईट गोष्ट प्राप्त झाली असता तिच्यापासून विकार पावत नाहीं, ३ तोच खरा. श्रीहरि म्हणतात:—अर्जुना, त्यानेंच समदृष्टीचें तत्त्व जाणलें आणि तोच स्वयमेव ब्रह्म होय. ४

श्लोकार्थ:—ज्या पुरुषाचें मन बाह्य विषयाच्या ठिकाणीं आसक्त नसतें, त्याला आत्म्याचे ठिकाणचें जें सुख आहे तें मिळतें. परंतु तोच पुरुष जेव्हा ब्रह्मयोगयुक्त होतो, तेव्हा अक्षय सुखाला पावतो ॥ २१ ॥

जो आत्मस्वरूपाला सोडून कधींही इंद्रियाधीन होत नाहीं, त्यानें विषयांचें सेवन केलें नाहीं यांत नवल तें कोणतें ? ५ आत्मसुखाच्या पूर्णतेनें त्याचें अंतःकरण स्वाभाविकताच संतुष्ट झालेलें असतें, म्हणून तो बाहेर पाऊल घालीत नाहीं. ( इंद्रियाकडे त्याचें मन वळत नाहीं. ) ६ ज्या चकोर पक्ष्यानें चंद्रविकासी कमलांच्या पानांत उत्तम चंद्रकिरणाचें भोजन केलें आहे, तो वाळवंटांत वाळू चोखीत बसेल काय ? ७ ज्याला आपल्याच ठिकाणीं आत्मस्वरूप आपण होऊन प्राप्त झालें आहे, त्यानें विषयांचा सहज त्याग केला, यात विशेष सांगण्यासारखें तें काय ? ८ बाकी या विषयांच्या सुखानें कोण फसले जातात याचा कौतुकानें आपल्याशी सहज चांगला विचार करून पहा. ९

श्लोकार्थ:—का कीं, अर्जुना, जे विषयाचे भोग इंद्रियाना प्राप्त होतात, ते उत्पत्ति व नाश-यानीं युक्त असून दुःखासच कारण आहेत, म्हणून ज्ञानी पुरुष त्याचे ठिकाणीं रममाण होत नाहींत. ॥ २२ ॥

ज्याप्रमाणें दरिद्री भुकेनें व्याप्त झाल्यावर कोंडा देखील खातो, त्याप्रमाणें, ज्यांनीं आत्मस्वरूपाचा अनुभव घेतला नाहीं, तेच ह्या इंद्रियांपासून होणाऱ्या विषयसुखांत रममाण होतात । ११० किंवा तहानेनें व्याकूळ झालेलीं हरणें भ्रमानें खऱ्या पाण्याला विसरून माळ जमिनीवर उत्पन्न होणाऱ्या उन्हाच्या झळ्यानाच पाणी असें समजून

१८ मनात, अतर्यामीं. १९ चंद्रविकासी कमल. २० उत्सुक होऊन. २१ प्राप्त झालें. २२ फसतात. २३ सुखावले. २४ दरिद्री. २५ भुकेनें व्याकुळ झालेला. २६ कोंड्याला. २७ तहान. २८ भ्रमानें.

जळातें । मग. तोयबुद्धी[1] बैरडीतें[2] । ठाकूनि येती ॥ ११ ॥ तैसें आपणपें नाहीं दिठें[3] । जयांतें स्वसुखाचे सदा खरांटे[4] । तयांसीचि विषय हे गोमटे[5] । आवडती ॥ १२ ॥ ( १५६. विषय आद्यंतवंत आहेत, ते विरक्ताला आवडत नाहींत, ११३ ते १२८ ) येऱ्हवीं विषयीं सुख आहे । हें बोलणेंचि सारिखें[6] नोहे । तरी विद्युत्स्फुरणें[7] कां न पाहे । जगामाजीं ॥ १३ ॥ सांगें वात[8] वर्ष[9] आतपु[10] धरे । ऐसे अभ्रच्छायाचि जरी सरे[11] । तरी त्रिमाळिकें[12] धवळारें[13] । करावीं कां ॥ १४ ॥ म्हणोनि विषयसुख जें बोलिजे । तें नेणतां गा वायां अलिपजे[14] । जैसें महुर[15] कां म्हणिजे । विषकंदातें[16] ॥ १५ ॥ नातरी भौमा[17] नाम मंगळु । रोहिणीतें[18] म्हणती जळु । तैसा सुखप्रवादु[19] वरळु[20] । विषयिकु हा ॥ १६ ॥ हे असो आघवी बोली । सांग पां सर्पफणीची साउली । ते शीतल होईल केतुली । मूषकासी[21] ॥ १७ ॥ जैसा आमिषकवळु[22] पांडवा । मीनु[23] न सेवि तंवाचि बरवा । तैसा विषयसंगु आघवा । निभ्रांत जाणें ॥ १८ ॥ हे विरक्तांचिये दिठीं । जैं न्याहाळिजे किरीटी । तैं पांडुरोगाचिये[24] पुष्टी-। सारिखें दिसे ॥ १९ ॥ म्हणोनि विषयभोगीं जें सुख । तें सौध्यंतचि[25] जाण दुःख । परी काय कीजे मूर्ख । न[26] सेवितां न सरे[27] ॥ १२० ॥ तें अंतर[28] नेणती बापुडे । म्हणोनि अगत्य सेवणें घडे । सांगें पूयपंकींचे[29] किडे । काय चिळसी[30] घेती ॥ २१ ॥ तयां दुःखियां दुःखचि जिव्हार[31] । ते विषयकर्दमींचे[32] दर्दुर[33] । ते भोगजळींचे जलचर । सांडिती केवीं ॥ २२ ॥ आणि दुःखयोनि जिया आहाती । तिया निरर्थका तरी नव्हती । जरी विषयांवरी विरक्ती[34] । धरिती जीव ॥ २३ ॥ नातरी गर्भवासादि संकट । कां जन्ममरणींचे कष्ट । हे विसांवेवीण[35] वाट । वाहावी[36] कवणें ॥ २४ ॥ जरी[37] विषयीं विषयो सांडिजेल । तरी महादोषीं कें[38] वसिजेल । आणि संसारु हा शब्दु नव्हेल[39] । लटिका जगीं ॥ २५ ॥ म्हणोनि अविद्याजात[40] नाथिले[41] । तें तिहींचि साच[42] दाविलें । जिहीं सुखबुद्धी घेतलें । विषयदुःख ॥ २६ ॥ याकारणें गा सुभटा । हा विचारितां विषय वोखटा[43] । तूं झणें[44] केंहीं[45] या वाटा । विसरोनि जाशी ॥ २७ ॥ पै यातें विरक्त पुरुष । त्यजिती कां जैसें विष । निराशा[46] तयां दुःख । दाविलें नावडे ॥ २८ ॥

---

१ पाणी असें मानून. २ माळ जमिनीवर. ३ अनुभवले. ४ तोटा. ५ सुंदर. ६ योग्य. ७ विजेच्या प्रकाशानें. ८ वारा. ९ पाऊस. १० ऊन. ११ निवारण होईल. १२ तीन मजली. १३ घरें. १४ बडबडावें. १५ मधुर. १६ बचनागाला. १७ मंगळ ग्रहाला. १८ मृगजळास. १९ सुख आहे असें म्हणणें. २० व्यर्थ. २१ उंदराला. २२ मासाचा घास. २३ मासा. २४ पंडुरोगाच्या. २५ मुळापासून अखेरपर्यंत. २६ वाचून, शिवाय. २७ इलाज नाहीं. २८ मर्म. २९ पू व चिखल यातले. ३० किळस, कंटाळा. ३१ प्रिय. ३२ चिखलातले. ३३ बेडूक. ३४ वीट. ३५ विश्रांतीवाचून. ३६ चालावी. ३७ विषयासक्तांनीं. ३८ कोठें. ३९ होणार नाहीं काय? ४० सर्व अज्ञान. ४१ लटकें. ४२ खरें. ४३ वाईट. ४४ नकोस. ४५ कधीं. ४६ निरिच्छ.

धावून येतात, ११ त्याप्रमाणें, ज्यांनीं आत्मसुखाचा अनुभव घेतला नाहीं, ज्यांना स्वात्मसुखाचा सदोदित तोटा असतो, त्यांनाच हें विषयसुख चांगलें वाटतें। १२ बाकी विषयांत सुख आहे हें म्हणणेंच योग्य नाहीं; तथापि सुख घेऊन चाललें, तर मग विजेच्या चमकण्यापासून पडणाऱ्या उजेडांत जगांतील व्यापार कां न व्हावे ? १३ तूं हें सांग कीं, वारा, पाऊस आणि ऊन यांचें निवारण जर अभ्रांच्या छायेपासून होईल, तर तीन मजली घरें बांधण्याचें कारण तरी काय ? १४ म्हणून, विषाच्या कांद्याला (बचनागाला) ज्याप्रमाणें अज्ञानपणानें गोड म्हणतात, त्याप्रमाणें, विषयांचे ठिकाणीं सुख आहे हें व्यर्थ बडबडणें आहे. १५ किंवा भौम ह्या ग्रहास जसें मंगळ हें नांव आहे—परंतु त्याचा अनुभव तसा नाहीं; किंवा मृगजलाला जल म्हणतात, तसें विषयसेवनांत सुख आहे हें म्हणणें व्यर्थ आहे. १६ हें सर्व बोलणें राहूं द्या. परंतु तूं असें सांग कीं, नागाच्या फणीची छाया उंदराला कितपत सुखावह होईल बरें ? १७ अर्जुना, गळाला लावलेल्या मांसाला मासा तोंड लावीत नाहीं तोंपर्यंतच चांगलें; त्याचप्रमाणें, विषयसंगाचा जोंपर्यंत अनुभव घेतला नाहीं तोंपर्यंतच तें गोड। १८ हे किरीटी, जर विरक्ताच्या दृष्टीनें हे विषय पाहिले, तर पंडुरोग्याच्या पुष्टीसारखे ( निःशक्त असून ) लठ दिसतात. १९ म्हणून, विषयोपभोगांत ज्याला सुख म्हणावयाचें, तें मुळापासून अखेरपर्यंत दुःखच आहे असें समज. परंतु मूर्ख जन काय करतील ? कारण त्यांचें सेवन केल्यावांचून त्यांना दुसरा मार्गच नाहीं। १२० त्यांना त्याचें वर्म न समजल्यामुळें त्यांचें सेवन करणें भाग पडतें. पुवांत व चिखलांत असणाऱ्या किडयांना किळस कधीं तरी आली आहे का, सांग बरें ? २१ त्या दुःखितांना दुःखच प्रिय ( जीवन ) असतें; कारण, ते विषयरूप चिखलांतले बेडूक व विषयोपभोगरूप जलांतील मासे असल्यानें विषयांचें सेवन कसें सोडतील ? २२ जर विषयांचे ठिकाणीं जीवमात्र विरक्ति धरतील, तर जितक्या दुःखदायक योनि आहेत, तितक्या व्यर्थ होणार नाहींत का ? २३ किंवा, गर्भवासांत होणारीं दुःखें अथवा जन्ममरणांचे कष्ट यांचे अविश्रांतपणें चालावे लागणारे मार्ग कोणीं चालावे ? २४ जर विषयासक्त जनांनीं विषयोपभोग सोडले, तर महादोषांनीं कोठें वस्ती करावी ? आणि मग ' संसार ' हा शब्द जगांत खोटा नाहीं का होणार ? २५ म्हणून, जे विषयांच्या भोगांपासून होणाऱ्या दुःखालाच सुख मानतात, ते, ' लटकें ' असें जें सर्व अज्ञान तें खरें आहे असें लोकांस भासवितात। २६ याकरिता अर्जुना, विचार करून पाहतां हे विषय फार वाईट आहेत; म्हणून तूं चुकून सुद्धां त्या मार्गाला जाऊं नको. २७ कारण, जे विरक्त पुरुष आहेत, ते या विषयसुखाला विषाप्रमाणें मानून त्याचा त्याग करतात; आणि ते निरिच्छ असल्यामुळें विषयांनीं दाखविलेलें सुखरूपी दुःख त्यांना आवडत नाहीं। २८

शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥

अन्वय—इह एव शरीरविमोक्षणात्प्राक् यः कामक्रोधोद्भव वेग सोढु शक्नोति, सः नरः युक्तः, सः सुखी भवति ॥ २३ ॥

( १५७. कामक्रोध जिकणारा ब्रह्मनिष्ठ होतो. काव्यप्रतिभा, १२९ ते १३५ ) ज्ञानियांच्या हन ठायीं । याची मौतुही कीर नाहीं । देहीं देहभावो जिहीं । स्ववश केले ॥ २९ ॥ जयांतें बाह्याची भाष । नेणिजेचि निःशेप । अंतरीं सुख । एक आथि ॥ १३० ॥ परि तें वेगळेपणें भोगिजे । जैसें पाक्षियें फळ चुंबिजे । तैसे नव्हे तेथ विसरिजे । भोगितेपणही ॥ ३१ ॥ भोगीं अवस्था एकी उठी । ते अहंकाराचा अचळु लोटी । मग सुखेंसि घे आंटी । गाढेपणें ॥ ३२ ॥ तिये आलिंगनमेळीं । होय आपेंआप कैवळीं । तेथ जळ जैसें जळीं । वेगळें न दिसे ॥ ३३ ॥ कां आकाशीं वायु हारपे । तेथ दोन्ही हे भाष लोपे । तैसें सुखचि उरे स्वरूपें । सुरतीं तिये ॥ ३४ ॥ अवतरण —ऐशी द्वैताची भाष जाय । मग म्हणों जरी एकचि होय । तरी तेथ साक्षी कवणु आहे । जाणते जे ॥ ३५ ॥

योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः ।
स योगी ब्रह्म निर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥
लभंते ब्रह्म निर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः । छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥२५

अन्वय—यः अतःसुखः, अन्तरारामः, तथा यः अतर्ज्योतिः एव, सः योगी ब्रह्मभूतः ( सन् ) निर्वाण ब्रह्म अधिगच्छति. ॥ २४ ॥ क्षीणकल्मषाः छिन्नद्वैधाः, यतात्मानः सर्वभूतहिते रताः ( च ) ऋषयः निर्वाण ब्रह्म लभन्ते. ॥ २५ ॥

( १५८. ब्रह्मरूप झालेल्या पुरुषाचे वर्णन, १३६ ते १४० ) म्हणोनि असो हें आघवें । एथ न बोलणें काय बोलावें । ते खुणाचि पावेल स्वभावें । आत्मीराम ॥ ३६ ॥ जे ऐसेनि सुखें मैतले । आपणपांचि आपण गुंतले । ते मी जाणें निर्विळे वोतले । सामरस्याचे ॥ ३७ ॥ ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर । कीं महाबोधें विहार । केले जैसे ॥ ३८ ॥ ते विवेकाचे गांव । कीं परब्रह्मींचे स्वभाव । नातरी अळंकारले अवयव । ब्रह्मविद्येचे ॥ ३९ ॥ ते सत्त्वाचे सात्विक ।

*श्लोकार्थः—ह्या लोकींच देहपातापर्यंत जो कामक्रोधापासून उत्पन्न झालेले वेग सहन करण्यास समर्थ आहे, तोच पुरुष योगी व तोच सुखी होय. ॥ २३ ॥*

ज्ञान्यांच्या ठिकाणीं तर निश्चयानें ह्या विषयाची गोष्ट सुद्धां निघत नाहीं; कारण ते देहधारी असूनही त्यांनीं इंद्रियांच्या वृत्ति स्वाधीन करून घेतल्या असतात, २९ ज्याना अंतर्यामीं आत्मसुखाचा लाभ झाला आहे, ते विषयांची गोष्ट देखील जाणत नाहींत. १३० परंतु त्या आत्मसुखाचा उपभोग घेण्याची रीत निराळी आहे. कशी? तर जसे पक्षी फळाचें चुंबन करीत असतां त्या ठिकाणीं भोक्ता, भोग्य वस्तु आणि भोग ही त्रिपुटी असते, तशी नसून, त्या ठिकाणीं ते भोक्तेपणही विसरतात. ३१ आत्मसुखाचा भोग घेण्याकरिता जी एक वृत्ति उत्पन्न होते, ती अहंकाराचा नाश करिते; व मग दृढपणानें सुखाला आलिंगन देते; (आपण सुखरूप बनते;) ३२ आणि त्या आलिंगनाचे भरांत आपोआप एकरूपता होऊन जाते. ज्याप्रमाणे पाणी पाण्यांत मिसळल्यावर वेगळें दिसत नाहीं, ३३ किंवा आकाशांतील वायु नाहींसा झाल्यावर त्या ठिकाणीं आकाश आणि वायु हा भेद नाहींसा होतो, त्याप्रमाणें वृत्ति व आत्मा याच्या एकपणात फक्त सुखच राहतें. ३४ याप्रमाणें ज्या वेळेस दुजेपणा नाहीसा होऊन एकत्व प्राप्त होतें, त्या वेळीं एकत्वाला जाणणारा तरी दुसरा साक्षी कोण आहे? ३५

*श्लोकार्थः—जो योगी आपले ठिकाणीं सुखी झाला आहे, आपलेच ठिकाणीं कृतकृत्य होऊन बसला आहे, व त्याला आपले ठिकाणीं ब्रह्माचा प्रकाश झाला आहे, तो ब्रह्मरूप होऊन, शांत असें जें ब्रह्म त्या ब्रह्माप्रत प्राप्त होतो ॥ २४ ॥ ज्यांचीं पापें नाहींतशीं झालीं आहेत, ज्याचा द्वैतभाव गेला आहे, ज्यांनीं आपलीं अंतःकरणें जिंकिलीं आहेत, व जे सर्व भूताचे हिताविषयीं तत्पर आहेत, असे ऋषि, शांत असें जें ब्रह्म त्याप्रत जातात ॥ २५ ॥*

म्हणून हें सर्व राहूं द्या. कारण येथें (अनुभवाशिवाय) न कळणारी गोष्ट ती नुसती बोलून काय उपयोग? जो स्वत. आत्मस्वरूपी झाला, त्यालाच त्याची खूण सहज समजेल. ३६ अशा सुखानें जे परिपूर्ण झाले, आणि स्वस्वरूपांत जे निमग्न होऊन राहिले, ते मद्रूप होऊन ब्रह्मानंदाचे निखालस पुतळेच ओतले आहेत असे मी समजतां. ३७ ते आनंदाच्या स्वरूपसुखाचे अंकुर, किंवा आत्मबोधाचें क्रीडास्थानच होत. ३८ ते विचाराचे गांव, परब्रह्मींचे स्वभाव, किंवा ब्रह्मविद्येचे सुशोभित केलेले असे अवयवच होत. ३९ ते सत्त्वाचेही सात्त्विक किंवा जीवात्म्याचे ठसे; हें बहुत बोलणें, असो; एकेक किती वर्णन करशील? १४० तूं साधुजनांची स्तुति करावयास लागलास, तर तुला कथेची आठवण सुद्धां होत नाहीं; कारण तूं निराकार स्वरूपाविषयीं प्रेमळ भाषण करतोस. ४१ परंतु आतां ती स्तुति पुरे कर, आणि गीतार्थरूपी दीप उजळून साधुजनांच्या हृदयमंदिरांत मंगलदायक ज्ञानाचा उजेड कर. ४२ याप्रमाणें निवृत्तिदासाला गुरूंचा इशारा मिळाल्यावर मग तो

१८ जीवात्म्याचे. १९ ठसे. २० वर्णन करणें. २१ आठवण. २२ निराकार स्वरूप. २३ प्रेमळ. २४ स्तुति. २५ पुरे करा. २६ हृदयमंदिरात. २७ मंगलदायक. २८ पहाट. २९ इशारा.

दासासी पातला । मग तो म्हणे श्रीकृष्ण बोलिला । तेंचि आइका ॥ ४३ ॥ ( १६०. ब्रह्मरूप झालेल्या पुरुषाचें वर्णन, १४४ ते १५० ) अर्जुना अनंत सुखाच्या डोहीं । ऐकसरां[1] तळचि घेतला जिहीं । मग स्थिरौऊनि[2] तेही । तेंचि जाहले ॥ ४४ ॥ अथवा आत्मप्रकाशें चोखें[3] । जो आपणपेंचि विश्व देखे । तो देहेंचि परब्रह्म सुखें । मानूं येईल ॥ ४५ ॥ जें सांचोकारें[4] परम । ना तें अक्षर[5] निःसीम । जिये गावींचे निष्काम[6] । अधिकारिये ॥ ४६ ॥ जें महर्षी वाढले । विरक्तां भागा फिटलें । जें निःसंशयां पिकलें । निरंतर ॥ ४७ ॥

कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् । अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् २६

अन्वय—कामक्रोधवियुक्तानां यतचेतसां विदितात्मनां यतीनां अभितः निर्वाणं ब्रह्म वर्तते ॥ २६॥

जिहीं विपयापासोनि हिरैतलें[7] । चित्त आपुलें आपण जिंतिलें[8] । ते निश्चित जेथ सुतले[9] । [10]चेतीचिना ॥ ४८ ॥ ते परब्रह्म निर्वाणें[11] । जे आत्मविदांचें[12] कारण । तेचि ते पुरुष जाण । पंडुकुमरा ॥ ४९ ॥ अवतरणः— ते ऐसे कैसेनि जहाले । जे देहींचि ब्रह्मत्वा आले । हें पुससी तरी भलें । संक्षेपें सांगों ॥ १५० ॥

स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।
प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥ २७ ॥
यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः । विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥२८॥

अन्वय—यः मुनिः बाह्यान् स्पर्शान् बहिः कृत्वा, च भ्रुवोः अन्तरे चक्षुः ( कृत्वा ), नासाभ्यन्तरचारिणौ प्राणापानौ समौ ( कृत्वा ), यतेन्द्रियमनोबुद्धिः, विगतेच्छाभयक्रोधः, मोक्षपरायणः ( स्यात् ), सः सदा मुक्तः एव ॥ २७ ॥ २८ ॥

( १६१. ब्रह्मरूप होण्याचा उपाय, पुढील अध्यायाचें बीज, १५१ ते १६० ) तरी वैराग्याचेनि आधारें । जिहीं विपय दवडूनि बाहिरें । शरीरीं ऐकंदरें[13] । केलें मन ॥ ५१ ॥ सहजें तिहीं[14] संधी भेटी । जेथ भ्रूपल्लवा[15] पडे गांठी । तेथ पाठिमोरी दिठी । पौरुखोनियां ॥ ५२ ॥ सांडूनि दक्षिणें वाम । प्राणापान सम । चित्तेसीं व्योमें-। गांमिये करिती ॥ ५३ ॥ तेथ जैसीं रथ्योदकें सकळें । घेऊनि गंगा समुद्रीं मिळे । मग एकेक वेगळें । निवडूं न ये ॥ ५४ ॥ तैसी वासनांतराची विवंचना । मग आपैसी पौरुखे अर्जुना । जे वेळीं गगनीं लयो मना । पवनें कीजे ॥ ५५ ॥ जेथ हें संसारचित्र उमटे । तो मनोरूप पटु फाटे । जैसें सरोवर आटे । मग प्रतिमा नाहीं ॥ ५६ ॥ तैसें मन एथ मुदल जाय । मग अहंभावादिक कें आहे । म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो ॥ ५७ ॥

भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् । सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥२९

१ एकसारखी. २ स्थिर होऊन. ३ निर्मळ. ४ खरोखर. ५ अविनाशी. ६ निरिच्छ. ७ हिरावून घेतलें. ८ जिंकिलें. ९ निजले. १० जागे होत नाहींत. ११ केवलस्वरूप. १२ आत्मज्ञान्यांचें. १३ एकनिष्ठ. १४ इडा, पिंगला व सुषुम्ना या तिहींची जेथें भेट होते तेथें. १५ भुंवयांच्या

म्हणाला कीं, कृष्ण काय बोलले तेंच ऐका. ४३ अर्जुना, आत्मसुखाच्या डोहात ज्यांनीं एकसारखी तळाशींच बुडी दिली आहे, ते तेथेंच स्थिर होऊन आत्मस्वरूपच बनले; ४४ किंवा आत्म्याच्या निर्मळ प्रकाशानें जो आपल्या ठिकाणीच विश्व पाहतो, तो देहासह परब्रह्म झाला असें खुशाल मानतां येईल. ४५ जें खरोखर अति उत्तम, अविनाशी व अमर्याद असें ब्रह्मसुख, त्याचे अधिकारी निरिच्छ हेच होतात. ४६ तें सुख महर्षींकरितांच राखून ठेविलें; विरक्तांच्याच वांटणीस आलें; आणि तें जीवाकरितांच निरंतर पिकलें आहे. ४७

श्लोकार्थः—कामक्रोधविरहित, चित्त स्वाधीन केलेले, आणि ज्यानीं आत्मस्वरूपाला जाणलें आहे, असे योगी जिवंतपणीं व मरणानंतर शांत असें ब्रह्मच असतात. ॥ २६ ॥

ज्यांनीं आपलें मन विषयांपासून माघारें घेऊन जिकलें आहे, ते जेथें निजले तेथून निश्चयानें जागे होत नाहींत. ( ते ब्रह्माकार होऊन देहभानावर येत नाहींत. ) ४८ हे पंडुकुमरा, ते पुरुष म्हणजे, आत्मज्ञान्याचें कारण जें कैवल्य परब्रह्म तेच होत. ४९ ते असे कशानें झाले, आणि देहांत असतां ब्रह्मत्वास कशानें पावले, हें तूं विचारशील, तर तुला संक्षेपानें सांगतों, ऐक. १५०

श्लोकार्थः—शब्दादिक बाह्य विषय बाहेर टाकून, भ्रुकुटीमध्यें दृष्टि स्थापन करून, व नासिकेच्या आंत संचार करणारे प्राणापान वायु एकत्र करून, इंद्रियें, मन व बुद्धि याना आपल्या आधीन करून, आणि इच्छा, भय व क्रोध नाहींतशीं करून जो योगी मोक्षतत्पर असतो, तो सदा मुक्तच आहे. ॥ २७ ॥ २८ ॥

तर वैराग्याच्या आधारानें विषयांना बाहेर घालवून जे शरिराचे ठिकाणीं आपलें मन एकनिष्ठ करतात, ५१ इडापिंगला सोडून व सुषुम्नेमध्यें प्राण नेऊन, ललाटचक्रामध्यें स्वरूपाकडे दृष्टि माघारी फिरवून स्थिर करतात; ५२ डावी आणि उजवी नाकपुडी सोडून प्राण व अपान या वायूंस एक करून चित्ताला चिदाकाशात नेतात; ५३ मग, रस्त्यावरील ( बरें वाईट ) सर्व प्रकारचें उदक घेऊन गंगा समुद्रास मिळाल्यावर ज्याप्रमाणें त्यांतून रस्त्यावरील उदक वगैरे वेगळें निवडिता येत नाहीं, ५४ त्याप्रमाणें अर्जुना, ज्या वेळेस चिदाकाशांत मनाचा प्राणाच्या निरोधानें लय होतो, त्या वेळीं वासनाचा विचार आपोआप नाहींसा होतो. ५५ ज्या मनोरूप पटावर हें संसाररूपी चित्र उमटलेलें असतें, तो पट आपोआप फाटतो. ज्याप्रमाणें सरोवर आटल्यावर त्यात प्रतिबिंब दिसत नाहीं, ५६ त्याप्रमाणें, जेथें मुद्दल मनच नाहींसें होतें, तेथें अहंकार इत्यादिक कोठून राहणार ? म्हणूनच, ब्रह्मस्वरूपाचा अनुभव घेणारा शरिरासह ब्रह्मच होतो. ५७

---

आतील वायूस म्हणजे ललाटचक्रात. १६ माघारी फिरवून. १७ उजवी व डावी नाकपुडी. १८ ब्रह्मांड–चिदाकाश. १९ जाणारे. २० रस्त्यावरील उदकें. २१ इतर वाहनांची. २२ विचार. २३ आपोआप. २४ नाहींसा होतो, राहतो. २५ चिदाकाशात. २६ वायूनें. २७ मन. २८ प्रतिबिंब.

अन्वय—यज्ञतपसां भोक्तारं, सर्वलोकमहेश्वरं, सर्वं भूतानां सुहृदं मां ज्ञात्वा शान्तिं ऋच्छति ॥२९॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
कर्मसंन्यासयोगो नाम पंचमोऽध्यायः ॥ ५॥

आम्हीं मागां हन सांगितलें । जे देहींचि ब्रह्मत्व पावले । ते येणें मार्गें आले । म्हणऊनियां ॥ ५८ ॥ आणि यमानियमांचे डोंगर । अभ्यासाचे सागर । क्रमोनि हें पांर । पातले ते ॥ ५९ ॥ तिहीं आपणपें करूनि निर्लेप । प्रपंचाचें घेतलें माप । मग साञ्चाचेंचि रूप । होऊनि ठेलें ॥ १६० ॥ ( १६२. योगाविषयीं कृष्णार्जुनांचा संवाद, १६१ ते १६९ ) ऐसा योगयुक्तीचा उद्देशु । जेथ बोलिला हृषीकेशु । तेथ अर्जुनु सुदंशु । म्हणोनि चमत्कारिला ॥ ६१ ॥ तें देखिलिया कृष्णें जाणितलें । मग हांसोनि पार्थातें म्हणितलें । काइ पां चित्त उबाइलें । इये बोलीं तुझें ॥ ६२ ॥ तंव अर्जुन म्हणे देवो । परचित्तलक्षणांचा रावो । भला जाणितला जी भावो । मानसु माझा ॥ ६३ ॥ म्यां जें कांहीं विवंरूनि पुसावें । तें आधींचि जाणितलें देवें । तरी बोलिलें तेंचि सांगावें । विवळें करूनि ॥ ६४ ॥ येऱ्हवीं तरी अवधारा । जो दाविला तुम्हीं अनुसारा । तो पव्हण्याहूनि पाय-उतारा । सोहपा जैसा ॥ ६५ ॥ तैसा सांख्याहूनि प्रांजळा । आम्हांसारिखिया अभोळा । एथ आहति परी कांहीं कीळा । तो सोहो ये वरु ॥ ६६ ॥ म्हणोनि एक वेळ देवा । तोचि पडताळा घेयावा । विस्तारेल तरी सांगावा । सायंतुचि ॥६७॥ तंव श्रीकृष्ण म्हणती हो कां । तुज हा मार्गु गमला निकों । तरी कीय जहालें आइकें जो कां । सुखें बोलों ॥ ६८ ॥ अर्जुना तूं परिसशी । परिसोनि अनुष्ठिसी । तरी आम्हांसीचि वानी कायसी । सांगावयाची ॥ ६९ ॥ ( १६३. देवभक्ताचें प्रेम, काव्यप्रतिभा, १७०—१७९ ) आधींच चित्त मायेचें । वरी मिषें जाहलें पढियंताचें । आतां तें अद्भुतपण स्नेहाचें । कवण जाणे ॥ १७० ॥ ते म्हणों कारुण्यरसाची वृष्टि । कीं नवेया स्नेहाची सृष्टि । हें असो नेणिजे दृष्टि । हरीची वानूं ॥ ७१ ॥ जे अमृताची वोतली । कीं प्रेमचि पिऊन मातली । म्हणोनि अर्जुनमोहें गुंतली । निघों नेणे ॥ ७२ ॥ हें बहु जें जें जल्पिजेल । तेथें कथेसि फांकु होईल । परि तें स्नेहरूपा न येल । बोलवरी ॥ ७३ ॥ म्हणोनि विसुरी काय येणें । तो ईश्वरु कवळावा कवणें । जो आपुलें मान नेणे । आपणचि ॥ ७४ ॥ तरी मागील

१ यम, नियम, आसन, धारणा इत्यादि योगमार्गाचे. २ पैलतीर. ३ आपणास. ४ उपाधिरहित. ५ स्वस्वरूप. ६ अभिप्राय. ७ मार्मिक, ज्ञाता. ८ चमत्कार वाटला. ९ प्रसन्न झालें. १० दुसऱ्याचे मनातील अभिप्राय जाणणाराचा. ११ विस्तारानें. १२ स्पष्ट. १३ ऐका. १४ मार्ग. १५ खोल पाण्यातून पोहून जाण्यापेक्षा. १६ ज्ञानयोगापेक्षा ( अष्टांगयोग ). १७ सोपा. १८ निर्बळांना. १९ कांहीं काळानें. २० साध्य. २१ चांगला. २२ कां घाबरलास ! २३ न्यूनता, कमतरता.

श्लोकार्थः--सर्व यज्ञ व त्यांचा भोक्ता, सर्व लोकांचा महेश्वर व सर्व भूतांचा हितकर्ता, असा जो मी परमेश्वर, त्या मला जो जाणतो, तो शांतिसुखाप्रत प्राप्त होतो. ॥ २९ ॥

जिवंतपणींच कांहीं लोक ब्रह्म झाले म्हणून आम्हीं पूर्वीं तुला सांगितलें, ते तरी या योगमार्गानें आले म्हणूनच; ५८ आणि म्हणूनच ते यमनियमरूपी योगमार्गाचे डोंगर व योगाभ्यासरूप सागर आक्रमून पार झाले; ( ब्रह्मत्व पावले; ) ५९ आणि त्यांनींच आपल्या स्वतांला उपाधिरहित करून प्रपंच अजमावला, म्हणून ते स्वतः खऱ्या ब्रह्माचें स्वस्वरूप बनून राहिले. १६० याप्रमाणें जेव्हां, श्रीकृष्णांनीं योगयुक्तीचा अभिप्राय प्रदर्शित केला, तेव्हां, अर्जुन मार्मिक होता म्हणून त्याला मोठा चमत्कार वाटला. ६१ हें पाहून कृष्ण त्याच्या मनांतील उद्देश जाणून हास्यवदनानें पार्थास म्हणाले, "मीं जें तुला सांगितलें, त्यामुळें तुझें मन कां बरें प्रसन्न झालें ? " ६२ तेव्हां अर्जुन म्हणतो, " देवा, दुसऱ्याच्या मनांतील अभिप्राय जाणणारांचे तुम्ही राजे आहां, यामुळें माझे मनांतील भाव तुम्हीं चांगला जाणला. ६३ देवा, मीं जें कांहीं तुम्हांस विचारपूर्वक पुसावें, तें तुम्ही आधींच जाणलें. तर तुम्ही जें कांही म्हणतां, तें अधिक स्पष्ट करून सांगा. ६४ बाकी योगशास्त्राचा जो मार्ग तुम्ही सांगितला, तो कसा आहे म्हणाल, तर खोल पाण्यांतून पोहून जाण्यापेक्षां पायउतार जसा सोपा असतो, तसा आहे. ६५ त्याचप्रमाणें, ज्ञानयोगापेक्षां अष्टांगयोग आमच्यासारख्या निर्बळांना सुगम आहे; परंतु तो कांहीं कालाच्या अवधीनें साध्य होणार आहे. ६६ म्हणून देवा, तो योग आणखी एक वेळ सांगावा. आंता अशानें विस्तार होईल खरा; पण तो सार्यंत सांगाच. " ६७ तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, " होय-का ? तुला हा योगमार्ग चांगला आवडला आहे, तर तूं इतका घाबरा होऊं नको; तुला तो आम्ही सुखानें सांगतों; ऐक. ६८ अर्जुना, तूं ऐकतोस आणि त्याप्रमाणें आचरण करतोस; असें असतांना आम्हीं तुला सांगण्याची कमतरता कां करावी ? " ६९ अगोदर आईचें चित्त, आणि त्यांत आवडत्या मुलाचें निमित्त झालें, तर त्या ठिकाणच्या स्नेहाचा अद्भुतपणा कोण जाणील ? १७० त्या स्नेहाला, कारुण्यरसाची वृष्टि झाली, किंवा अद्भुत स्नेहाची सृष्टिच निर्माण झाली असें म्हटलें तरी चालेल. परंतु हें असो, भगवंतांच्या कृपादृष्टीचें वर्णन करतां येत नाहीं. ७१ ती दृष्टि अमृताच्या मुशींतच ओतली किंवा प्रेम पिऊन उन्मत्त झाली, म्हणून अर्जुनाच्या मोहांत गुंतून तिला बाहेर निघतां येईना. ७२ हिच्याबद्दल जों जों जास्त बोलावें, तों तों कथेचें विषयांतर होईल; तथापि श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या स्नेहाचें वर्णन शब्दानें बोलून करतां येणार नाहीं. ७३ ज्या ईश्वराला स्वतः आपलें माप करतां येत नाहीं, तो ईश्वर दुसऱ्या कोणीं जाणावा ? म्हणून हा विचार करीत बसण्यांत काय

२४ आईचें. २५ निमित्त. २६ आवडत्या मुलाचें. २७ अद्भुत. २८ वर्णन करूं. २९ जास्त बोलावें. ३० विस्तार. ३१ विचार. ३२ जाणावा. ३३ प्रमाण.

ध्वनी आंतु । मज गमला साविंयेंचि मोहितु । जे बलात्कारें असे म्हणतु । परिस वापा ॥ ७५ ॥ अर्जुना जेणें जेणें भेदें[3] । तुझें का चित्त बोधे । तैसें तैसें विनोदें[4] । निरूपिजेल ॥ ७६ ॥ तो कोइसया नांव योगु । तयाचा कवण उपेगु[6] । अथवा अधिकारप्रसंगु । कवणा येथ ॥ ७७ ॥ ऐसें जें जें कांहीं । उक्त असे इये ठाईं । तें आघवेंचि पाहीं । सांगेन आतां ॥ ७८ ॥ तूं चित्त देऊनि अवधारीं । ऐसें म्हणोनि श्रीहरी । बोलिजेल ते पुढारी । कथा आहे ॥ ७९ ॥ ( १६४. देव पुढील अध्यायांत योग सांगतील, १८० ) श्रीकृष्ण अर्जुनासी संगु । न सांडोनि सांगेल योगु । तो व्यक्त करूं प्रसंगु । म्हणे निवृत्तिदासु ॥ १८० ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां पंचमोऽध्यायः ५ ॥ श्लोक २९, ओव्या १८०.

१ अभिप्राय. २ सहज. ३ प्रकारानें. ४ कौतुकानें. ५ काय. ६ उपयोग. ७ योग्य. ८ संबंध. ९ द्वैत कायम ठेवून. १० स्पष्ट.

अर्थ आहे ? ७४ तरी मागें सांगितलेल्या अभिप्रायावरून मला असे वाटते की, तो सहज मोहित होऊन बलात्काराने अर्जुनाला असे म्हणाला कीं, " हे बापा, मी सांगतो ते ऐक. ७५ अर्जुना, ज्या ज्या प्रकाराने तुझ्या मनाला बोध होईल, त्या त्या प्रकाराने तुला कौतुकाने आम्ही हा योगमार्ग सांगूं. ७६ त्या योगाला काय म्हणतात, त्याचा उपयोग कोणता, आणि तो आचरण्यास अधिकारी कोण, ७७ असें जे जें कांहीं या संबंधानें योग्य असेल, तें सर्व आर्ता तुला आम्ही सांगतो. ७८ म्हणून तूं चित्त देऊन ऐक. " असे बोलून श्रीहरींनीं जें कांहीं सांगितले, ती कथा पुढे ( पुढील अध्यायात ) आहे. ७९ निवृत्तिदास ज्ञानेश्वर म्हणतात कीं, द्वैत कायम ठेवून श्रीकृष्णानीं अर्जुनाला जो योग सांगितला, तो आम्ही स्पष्ट करून सांगतो. १८०

अध्याय ५, ओव्या १८०.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सहावा

( १६५. संजय धृतराष्ट्रास म्हणतो, भगवान योग सागतात, १ ते ३ ) मग रायातें म्हणे संजयो । तोचि अभिप्राव अवधारिजो । श्रीकृष्ण सांगती आतां जो । योगरूप ॥ १ ॥ सहजें ब्रह्मरसाचें पारणें । केलें अर्जुनालागीं नारायणें ।·कीं तेचि अवसरीं पाहुणे । पातलों आम्ही ॥ २ ॥ कैसी दैवाची थोरी नेणिजे । जैसें तान्हेलिया तोयें सेविजे । कीं तेंचि चवी[4] करूनि पाहिजे । तंव अमृत आहे ॥३॥ ( १६६. धृतराष्ट्राचें भाषण, ४ ) तैसें आम्हां तुम्हां जाहलें । जे आडमुठीं तत्त्व फावलें । तंव धृतराष्ट्रें म्हणितलें । हें न पुसों तूतें ॥ ४ ॥ ( १६७. संजयास राजाच्या बोलण्याचें हसूं येतें, ५ ते ९ ) तया संजया येणें बोलें । रायाचें हृदय चोजवलें । जे अवसरीं आहे घेतलें । कुमरांचिया ॥ ५ ॥ हें जाणोनि मनीं हांसिला । म्हणे म्हातारा मोहें नाशिला । येऱ्हवीं बोलु तरी भला जाहला । अवसरीं इये ॥ ६ ॥ परि तें तैसें कैसेनि होईल । जात्यंधा कैसें पाहेल । तेवींचि येरु रोषु घेईल । म्हणोनि बिहे[17] ॥ ७ ॥ परि आपण चित्तीं आपुला । निकियेपरी संतोषला । जे तो संवादु फावला । श्रीकृष्णार्जुनांचा ॥ ८ ॥ तेणें आनंदाचेनि धालेपणें । साभिप्राय अंतःकरणें । आतां आदरेंसीं बोलणें । घडेल तया ॥ ९ ॥ ( १६८. सहाव्या अध्यायाचें महत्त्व, १० ते १३ ) तो गीतेमाजि षष्ठींचा । प्रसंगु असे आयणीचा । जैसा क्षीरार्णवीं अमृताचा । निवाडु जाहला ॥ १० ॥ तैसें गीतार्थाचें सार । जें विवेकसिंधूचें पार । नाना योगविभवभांडार । उघडलें कां ॥ ११ ॥ जें आदिप्रकृतीचें विसवणें । जें शब्दब्रह्मासि नबोलणें । जेथूनि गीतावल्लीचें ठाणें । प्ररोहो पावे ॥ १२ ॥ तो अध्याय सहावा । वरि साहित्याचिया बरवा । सांगिजेल म्हणोनि परिसावा । चित्त देउनी ॥ १३ ॥ ( १६९. मराठी भाषेचें वैभव व श्रवणाची पद्धत, १४ ते २५ ) माझा मऱ्हाठाचि बोलु कौतुकें । परि अमृतातेंही पैजां[38] जिंके । ऐशीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ १४ ॥ जियें कोंवळिकेचेनि[40] पाडें । दिसती नादींचे रंग थोडे । वेधें परिमळाचें बीक मोडे ।

१ आत्मज्ञानरसाचें. २ समयीं. ३ पाणी. ४ चाखून. ५ आडगिऱ्हाइकी. ६ ब्रह्म. ७ प्राप्त झालें. ८ जाणवलें. ९ बाधेनें. १० उत्कंठित झालें आहे. ११ पुत्राची चांगली हकीकत. १२ पुत्रवात्सल्यानें. १३ मागील कथा. १४ जन्मांधाला. १५ दिसेल. १६ हा धृतराष्ट्र. १७ भ्याला. १८ उत्तम प्रकारें. १९ तृप्तीनें. २० प्रफुल्लित. २१ आदरानें. २२ सहाव्या अध्यायाचा. २३ चतुरपणाचा. २४ क्षीरसागराचें मंथन करतांना. २५ प्राप्ति. २६ पैलथडी. २७ अथवा.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सहावा

मग संजय धृतराष्ट्रास म्हणाला, "राजा, आता, श्रीकृष्णानीं योगाबद्दल जो आपला अभिप्राय सागितला, तो ऐक. १ नारायणानीं अर्जुनाला सहज ब्रह्मज्ञानरसाचे पारणें केले, तो तेच वेळीं आम्ही तेथें पाहुणे म्हणून गेलो होतों २ दैवाची थोरवी काय वर्णावी ? कीं, तहान लागलेल्या मनुष्याने पाणी पिण्याकरिता म्हणून पाण्याचे भाडें तोडीं लावावें, व त्याची चव घेताच पाण्याचे ऐवजीं त्याला ज्याप्रमाणे अमृतच मिळाव, ३ त्याचप्रमाणे राजा, एखादी आडगि हाइकी मूल्यवान वस्तु थोडक्यात प्राप्त होते, त्याप्रमाणे मला व तुला ब्रह्माची प्राप्ति झाली." परतु धृतराष्ट्र सजयाला म्हणाला कीं, "तुला ब्रह्मरसाबद्दल मी काहीं विचारीत नाहीं।" ४ हें ऐकून धृतराष्ट्र राजाच मन फक्त पुत्राचीच हकीकत ऐकण्याविषयीं उत्कंठित झाले आहे अस सजयाने जाणले, ५ व हे जाणून तो मनांत विस्मय पावला आणि म्हणाला, "हा वृद्ध धृतराष्ट्र पुत्रवात्सल्याने अगदीं वेडावला आहे, एरवीं एथपर्यंतचा कृष्णार्जुनाचा सवाद अति उत्तम झाला. ६ परतु या सवादाची गोडीं याला कोठून लागणार ? कारण, जो जन्माध आहे त्याला कसे दिसेल ? परतु त्याला असं स्पष्ट जर बोलावें तर राग येईल, म्हणून सजय या भीतीने स्पष्ट बोलला नाहीं. ७ तथापि श्रीकृष्णार्जुनाच्या परस्पर सवादापासून तो आपल्या मनात उत्तम प्रकारे सतोषित झाला. ८ ह्या आनदाच्या तृप्तीनें व प्रफुल्लित अत करणाने तो आता मोठ्या अदबीने धृतराष्ट्राला आभिप्राय सागेल ९ क्षीरसागराचे मथन करताना जशी अमृताची प्राप्ति ।झाली, तसा तो आभिप्राय म्हणजे गीतेतील सहाव्या अध्यायाचा योगरूप अभिप्राय होय, व तो बुद्धीने जाणला पाहिजे. १० तो अध्याय गीतेतील सार होय, व आत्मानात्मविचाररूपी समुद्राची पैलथडी होय, अथवा जणू काय योगसपत्तीचा जामदारखानाच उघडला आहे ११ जे आदिमायेच विश्रांतिस्थान, व ज्या ठिकाणीं वेदानाही मौन धारण करावें लागतें, आणि ज्यापासून गीतारूप वेलीला अकुर फुटला, १२ तो हा सहावा अध्याय सर्व अलकारानें युक्त असा सागितला जाईल म्हणून चित्त देऊन ऐका १३ माझे बोल निवळ मराठींत आहेत खरे, परतु ते प्रतिज्ञेने सहज अमृतालाही जिकतील अशा गोड अक्षररचनेने मी सागेन १४—त्या बोलाच्या मृदुपणाने, सप्तस्वरापासून होणारा आनदही कमी असा भासेल,

२८ योगसपत्तीचा जामदारखाना २९ आदिमायेचें ३० विश्रांतिस्थान ३१ वेदाला ३२ मौन ३३ गीतारूप वेलीचें ३४ स्वरूप ३५ अकुर ३६ सर्व कौशल्याच्या उपसहारासहित ३७ प्राकृत, साधा ३८ प्रतिज्ञेनें. ३९ गोड ४० कोंवळेपणाच्या तुळनेनें ४१ सप्त सुराचे ४२ आनद ४३ छंदानें. ४४ सुवासाचे ४५ बळ.

जयाचेनि ॥ १५ ॥ ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होती जिभा ।
बोलें इंद्रियां लागे कळंभो[1] । एकमेकां ॥ १६ ॥ सहजें शब्दु तरी विषो श्रवणाचा ।
परि र[2]सना म्हणे रसु हा आमुचा । घ्राणासि भावो जाय परिमळाचा । हा [3]तोचि
होईल ॥ १७ ॥ नवल बोलतिये रे[4]खेची वाहे[5]णी । देखतां डोळा पुरों लागे ध[6]णी । ते
म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥ १८ ॥ जेथ संपूर्ण प[7]द उभारे । तेथ मनाचि
धां[8]वे बाहिरें । बोलु भुजांहीं आविष्करे । आलिंगावया ॥ १९ ॥ ऐशीं इंद्रियें आपु-
ला[9]लिया भावीं । झोंबती परि तो स[10]रिसेपणेंचि बु[11]झावी । जैसा एकला जग चेववी[12] ।
सहस्र[13]करु ॥ २० ॥ तैसें शब्दाचें व्यापकपण । देखिजे अ[14]साधारण । पाहातयां भा[15]वज्ञां
फा[16]वती गुण । चिंतामणीचे ॥ २१ ॥ हें असो तया बोलांचीं ताटें भलीं । वरी
कैवल्य[17]रसें वो[18]गरलीं । ही [19]प्रतिपत्ति मियां केली । निष्कामासी ॥ २२ ॥ आतां आ[20]त्म-
प्रभा नित्य नवी । तेचि करूनि ठा[21]णदिवी । जो इंद्रियांतें चोरूनि जेवी । तयासीचि
फा[22]वे ॥ २३ ॥ येथ श्रवणाचेनि पांगें[23] । वी[24]णें श्रोतयां व्हावें लागे । हे मनाचेनि[25]
निजांगें । भोगिजे गा ॥ २४ ॥ आ[26]हाच बोलाची वा[27]लीफ फेडिजे । आणि
ब्रह्माचियाचि आंगा [28]घडिजे । मग सुखेंसीं सु[29]रवाडिजे । सुखाचिमाजी ॥ २५ ॥
( १७०. श्रवणाचा अधिकारी, २६–३१ ) ऐसें ह[30]ळुवारपण जरी येईल । तरीच हें
[31]उपेगा जाईल । येऱ्हवीं आघवी गोष्टी होईल । मुकया बहिरयाची ॥ २६ ॥ परि
तें असो आतां आघवें । नलगे श्रोतयांतें क[32]डसावें । जे अधिकारिये एथ स्वभावें ।
निष्[33]कामकामु ॥ २७ ॥ जिहीं आत्मबोधाचिया आवडी । केली स्वर्गसंसाराची
कु[34]रोंडी । तेवांचूनि एथींची गोडी । नेणती आणिक ॥ २८ ॥ जैसा वा[35]यसीं चंद्र
नोळखिजे । तैसा प्राकृतीं ग्रंथु हा नेणिजे । आणि तो हिमांशु[36]चि जेवि खा[37]जें ।
चकोराचें ॥ २९ ॥ तैसा सज्ञानासी तरी हा ठावो । आणि अज्ञानासी आ[38]न
गांवो । म्हणोनि बोलावया विषय पहाहो । विशेषु नाहीं ॥ ३० ॥ परि अ[39]नु-
वादलों मी प्रसंगें । तें सज्जनीं उ[40]पसाहावें लागे । आतां सांगेन काय श्रीरंगें ।
निरोपिलें जें ॥ ३१ ॥ ( १७१. अतींद्रिय ज्ञान सद्गुरूच्या कृपेनें इंद्रियांना गोचर
करीन, ३२–३६ ) तें बुद्धीही आ[41]कळितां सांकडें[42] । म्हणऊनि बोलीं वि[43]पायें
सांपडे । परि श्रीनिवृत्तिकृपादीप-उजियेडें । देखेन मी ॥ ३२ ॥ जें दिठीहीं[44] न

१ कलह. २ जीभ. ३ वासच. ४ कवित्वाची. ५ पद्धत. ६ तृप्ति. ७ वाक्य. ८ प्रगटे, धावे. ९ स्वभावाचे. १० सारखेपणें. ११ बोध करी. १२ जागवितो. १३ सूर्य. १४ विशेष. १५ अर्थ जाणणारांस. १६ आढळतात. १७ मोक्षरसानें. १८ वाढली. १९ मेजवानी ( ग्रंथरचना ). २० आत्मज्योति. २१ ठाणवई. २२ लाभे. २३ गरज, कमीपणा. २४ न करिता. २५ मनापासून. २६ उगीच. २७ त्वचा. २८ व्हावें. २९ उपभोग घ्यावा. ३० नम्रपणा. ३१ उपयोगास. ३२ सावध करावें. ३३ कर्मफलाविषयीं निरिच्छ. ३४ ओंवाळणी. ३५ कावळ्यांनीं. ३६ चंद्र. ३७ खाद्य. ३८ दुसरा. ३९ बोललों. ४० क्षमा करावी. ४१ कळण्यास. ४२ कठीण. ४३ कदाचित्. ४४ दृष्टीस,

किंवा त्यांच्या छंदानें सुवासही कमीपणा पावेल. १५ पहा कीं, गोडीच्या आशेनें कानाला च जिव्हा फुटतील, व इंद्रियें आपआपसांत कलह करूं लागतील. १६ मूळ शब्द विषय म्हटला म्हणजे कानांचा होय; परंतु हा रस आमचा आहे असें जीभ म्हणेल, व नाकालाही या शब्दापासून सुगंधाचा भास होईल. १७ यापेक्षां आणखी नवल कोणतें ? कीं बोलण्याची नुसती सरणी पाहून डोळे तृप्त होतील ; आणि त्यांना असें वाटूं लागेल कीं, हे बोल नसून ही प्रत्यक्ष रूपाची खाणच निर्माण झाली आहे ! १८ जेव्हां शब्द जुळून संपूर्ण वाक्य बाहेर पडेल, तेव्हां मन हें बाहेर निघेल; आणि आपले बाहु उभारून त्या वाक्याला आलिंगन देण्याला धावेल. १९ याप्रमाणें सर्व इंद्रियें आपापल्या धर्माप्रमाणें त्या बोलाला झोंबतील, परंतु तो सगळ्यांना सारखेपणानें बोध करील. ज्याप्रमाणें एकटा सूर्य सर्व जगाला वागवितो, २० त्याप्रमाणें शब्दांचा व्यापकपणा अलौकिक आहे असें समजा; आणि पाहूं गेलें असतां, जो त्यांचा अर्थ जाणणारा आहे, त्याला त्यांचे ठिकाणीं चिंतामणीचे गुण आढळून येतात. २१ हें असो; त्या बोलाचीं मोठालीं ताटें बनवून व त्यांत मोक्षरस वाढून, निष्कामी जनांना ही ग्रंथरूपी मेजवानीच केली आहे. २२ या मेजवानींत उजेडाकरितां नित्य नवी अशी आत्मज्योतीची ठाणवई करून, त्या उजेडांत जो इंद्रियांना न कळत मेजवानीचें सेवन करील, त्यालाच तिची प्राप्ति होईल. २३ या ठिकाणीं श्रवणाचा कमीपणा न करितां श्रोत्यांनीं मनानेंच उपभोग घ्यावा. २४ बोलावरची नुसती साल अगोदर काढून टाकावी, आणि ब्रह्मस्वरूप होऊन मग सुखानेंच सुखाची गोडी घ्यावी. २५ जर अशा सूक्ष्म मनानें वागलें, तरच त्याचा उपयोग होईल; नाहीं तर सर्व गोष्टी मुक्यानें बोलून बहिऱ्यानें ऐकल्याप्रमाणें होतील. २६ परंतु ही गोष्ट आतां राहूं द्या. कां कीं, सर्व श्रोत्याना सावध करण्याची गरज नाहीं. कारण, या ठिकाणी, ज्यांना स्वभावतांच विषयांची वासना नाहीं, तेच ही गोष्ट ऐकण्यास अधिकारी आहेत. २७ ज्यांनीं ब्रह्मज्ञानाच्या आवडीकरितां स्वर्ग आणि संसार यांच्या प्राप्तीची ओंवाळणी केली आहे, त्यांच्याशिवाय इतरांना या बोलाची गोडी कळणार नाहीं. २८ कावळ्यांना जशी चंद्राची ओळख नाहीं, तशी या गीताग्रंथाची प्राकृत जनांना ओळख नाहीं; परंतु तोच चंद्र जसा चकोराचें खाद्य आहे, ( तद्वत्, कर्माच्या फळांची ज्याना आशा नाहीं, त्यांनाच या गीताग्रंथाची ओळख आहे. ) २९ तसेंच, जे ज्ञानी आहेत, त्यांना हा ग्रंथ म्हणजे विश्रांतीचें ठिकाण आहे; आणि जे अज्ञानी आहेत, त्याना परक्या गांवाप्रमाणें आहे. म्हणून या विषयाबद्दल विशेष बोलण्याचें कारण नाहीं. ३० परंतु प्रसंगानुसार मी जें बोललों, त्याची सज्जनांनीं मला क्षमा करावी. यापुढें, श्रीरंगानीं जें काय सांगितलें आहे तें मी सांगेन. ३१ तें बोलणें बुद्धीलाही कळण्याला कठिण आहे, म्हणून शब्दांत सापडणें कठीणच; परंतु श्रीगुरु निवृत्तिमहाराजांच्या कृपारूप दीपाच्या उजेडानें मी तें जाणून बोलेन. ३२ इंद्रियातीत असें जें ब्रह्मज्ञान, तें जर प्राप्त झालें, तर जी गोष्ट दृष्टीस न

पविजे । तें दिठीवीण देखिजे । जरी अतींद्रिय लोहिजे । ज्ञानबळ ॥ ३३ ॥ नातरी जे धातुवादाही न जोडे । तें लोहींचि पंधेरें सांपडे । जरी दैवयोगें चढे । परिसु हाता ॥ ३४ ॥ तैसी सद्गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे । म्हणऊनि ते अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥ ३५ ॥ तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचें रूप दावीन,। अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥ ३६ ॥ ( १७२. भगवान म्हणजे षड्गुणैश्वर्यसंपन्न, ३७ ) श्रीभगवानुवाच:- आइका यश श्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य । हे साही गुणवर्य । वसती जेथ ॥ ३७ ॥ ( १७३. कर्मे करून जो फलेच्छा धरीत नाहीं तोच संन्यासी. नुसतीं कर्मे टाकून संन्यासी होत नाहीं, ३८–५१ ) म्हणोनि तो भगवंतु । जो निःसंगाचा सांगातु । तो म्हणे पार्था दत्तचित्तु । होईं आतां ॥ ३८ ॥

अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।
स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १ ॥

अन्वयः—यः कर्मफलं अनाश्रितः ( सन् ) कार्यं कर्म करोति, सः ( अपि ) संन्यासी च योगी ( भवति ), ( केवल ) न निरग्निः न च अक्रियः ॥ १ ॥

आइकें योगी आणि संन्यासी जनीं । हे एकचि सिनाने झणीं मानीं । येऱ्हवीं विचारिजती जंव दोन्ही । तंव एकचि ते ॥ ३९ ॥ सांडिजे दुजया नामाचा आभासु । तरी योगु तोचि संन्यासु । पाहतां ब्रह्मीं नाहीं अवकाशु । दोहीं-मार्जी ॥ ४० ॥ जैसें नामाचेनि अनारिसेपणें । एका पुरुषातें बोलावणें । कां दोहीं मार्गीं जाणें । एकाचि ठाया ॥ ४१ ॥ नातरी एकचि उदक सहजें । परि सिनाना घटीं भरिजे । तैसें भिन्नत्व जाणिजे । योगसंन्यासांचें ॥ ४२ ॥ आइकें सकळ संमतें जगीं । अर्जुना पाहें गा तोचि योगी । जो कर्मे करूनि रागी । नोहेचि फळीं ॥ ४३ ॥ जैसी मही हे उद्भिजे[२०] । जैनीं अहंबुद्धीवीण सहजें । आणि तेथींचीं तियें बीजें । अपेक्षीना ॥ ४४ ॥ तैसा अन्वयाचेनि आधारें । जातीचेनि अनुकारें । जें जेणें अवसरें । करणें पावे ॥ ४५ ॥ तें तैसेंचि उचितें करी । परी सांटोपु नोहे शरीरीं । आणि बुद्धिही करोनि फळ-वेरीं । जायेचिना ॥ ४६ ॥ ऐसा तोचि संन्यासी । पार्था गा परियेसीं । तोचि भरंवसेनिसीं । योगीश्वरु ॥ ४७ ॥ वांचूनि उचित कर्म प्रासंगिक । तयातें म्हणे हें सांडावें वैद्धिक । तरी टांकोटाकीं आणिक एक । मांडीचि तो ॥ ४८ ॥ जैसा क्षाळूनियां लेपु एकु । सवेंचि लाविजे आणिकु । तैसेनि आग्रहाचा पाइकु । [३३]विचंवे

१ इंद्रियातीत. २ मिळेल. ३ ब्रह्मज्ञान. ४ किमयागारास. ५ पथराच्या द्रावें उत्तम सोनें. ६ प्राप्त. ७ सद्गुरुकृपा. ८ निराकाराचें. ९ भग=यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य हा गुणसमुदाय—त्यानें युक्त. १० सोबती. ११ लक्ष दिलेला. १२ फलेच्छा नसून कर्माचरण करणारे. १३ सर्वसर्गपरित्याग करणारे. १४ वेगळे. १५ नको. १६ आरोप. १७ भेद. १८ वेगळेपणानें.

पडणारी ती दृष्टीशिवाय दिसेल. ३३ जर दैवयोगानें हातास परीस लागला, तर किमयागारासही जें न मिळणारें तें सोनें लोखंडांत सांपडतें; ३४ तसें, जर सद्गुरूची कृपा होईल, तर प्रयत्न केला असतां काय प्राप्त होणार नाहीं ? म्हणून ज्ञानदेव म्हणतात, अशी जी सद्गुरुकृपा, ती मजवर पूर्ण आहे. ३५ त्यायोगानें मी बोलेन, आणि माझ्या बोलण्यांत निराकार वस्तु सर्वांस प्राप्त करून देईन; आणि जी वस्तु इंद्रियातीत आहे, ती इंद्रियांकडून भोगवीन. ३६ पहा—यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य हे सहा गुण ज्याचे ठिकाणीं वास करतात, ३७ म्हणून ज्याला भगवान असें म्हणतात; व ज्यांनीं सर्वसंगपरित्याग केला आहे त्यांचा जो मित्र, तो पार्थास असें म्हणाला कीं, अर्जुना, आतां लक्ष देऊन ऐक. ३८

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणालेः—जो कर्मांचे फलाची इच्छा न करितां विहित कर्में करितो, तोच संन्यासी व योगी होय. जो अग्निसेवा व विहित कर्में करीत नाहीं तो नव्हे. ॥ १ ॥

श्रीकृष्ण म्हणतातः—पार्था, हें पहा—योगी आणि संन्यासी हे या जगांत एकच आहेत. ते वेगळे आहेत असें मानूं नको. कारण, विचार केला तर ते दोन्ही एकच आहेत. ३९ त्यांच्यावर दोन नांवांचा जो आरोप आहे, तो सोड. कारण, ब्रह्मदृष्टीनें पाहूं गेलें असतां या दोहोंत भेद नाहीं. म्हणून योग तोच संन्यास होय. ४० जसें नांवांच्या वेगळेपणानें एकाच पुरुषाला हांका मारणें किंवा एकाच ठिकाणाला दोन मार्ग जाणें, ४१ किंवा एकच उदक दोन भांड्यांत भरल्यावर पाण्याला जसा दुजा भाव नाहीं, तसा योग आणि संन्यास यांत भेद नाहीं असें जाण. ४२ अर्जुना, जो कर्में करून त्यांच्या फलांची इच्छा धरीत नाहीं, तोच या जगतांत सर्वांच्या बुद्धीनें योगी असा समजला जातो. ४३ पृथ्वी ही वृक्षादिकांना उत्पन्न करून त्यांच्या उत्पत्तीबद्दल कांहीं अहंकारबुद्धि दाखवीत नाहीं; आणि त्यांच्यापासून उत्पन्न होणाऱ्या फलांचीही ज्याप्रमाणें इच्छा करीत नाहीं, ४४ त्याचप्रमाणें, आत्मबोधाच्या आधारानें आणि जातीस अनुरूप असें ज्या ज्या वेळेस जें जें करणें पडेल, ४५ तें तें सर्व यथाविधि करून तो आपल्या शरिरांत अहंकार उत्पन्न होऊं देत नाहीं, आणि बुद्धीला फळाच्या आशेकडे जाऊं देत नाहीं. ४६ पार्था, ऐक. असा जो पुरुष, तोच संन्यासी, आणि तोच निःसंशय योगीश्वर होय. ४७ या हातोटीशिवाय, जो कोणी, नित्यनैमित्तिक कर्में बद्धक आहेत असें समजून त्यांचा त्याग करतो आणि लागलींच दुसरीं कर्में करण्यास प्रवृत्त होतो, ४८ तो, एक लेप धुऊन टाकून दुसरा लेप लावण्याच्या आग्रहाचे स्वाधीन झालेल्या मनुष्या-

१९ इच्छायुक्त. २० उद्भिज ( वृक्षादिक ). २१ उत्पन्न करिते. २२ इच्छा करीत नाहीं. २३ आत्मबोधाच्या. २४ अनुरूप. २५ यथाविधि. २६ अहंकार. २७ फलाच्या आशेकडे. २८ नित्यनैमित्तिक. २९ जन्ममरण देणारे. ३० लागलीच. ३१ धुऊन. ३२ नौकर, अधीन झालेला. ३३ घोंटाळतो.

वायां ॥ ४९ ॥ गृहस्थाश्रमाचें वोझें । कपाळीं आधींचि आहे सहजें । कीं तेंचि संन्याससवां ठेविजे । सरिसें पुढती ॥ ५० ॥ म्हणूनि अग्निसेवा न सांडितां । कर्माची रेखा नोलांडितां । आहे योगसुख स्वभावतां । आपणपांचि ॥ ५१ ॥

यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव । न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥२

अन्वयः—पांडव, ( पंडिताः ) यं संन्यासमिति प्राहुः तं योगं विद्धिः, असंन्यस्तसंकल्पः कश्चन योगी न भवति हि ॥ २ ॥

( १७४. संन्यासी व योगी यांचें ऐक्य, ५२-५३ ) ऐकें संन्यासी तोचि योगी । ऐसी एकवाक्यतेची जगीं । गुढी उभविली अनेगीं । शास्त्रांतरीं ॥ ५२ ॥ जेथ संन्यासिला संकल्पु तुटे । तेथचि योगाचें सार भेटे । ऐसें हें अनुभवाचेनि घटे । साचें जया ॥ ५३ ॥

आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते । योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥

अन्वयः—योगं आरुरुक्षोः मुनेः कर्म कारणं उच्यते; योगारूढस्य तस्यैव शमः कारणं उच्यते ॥३॥

( १७५. योगारूढ होण्यास कर्मयोगच कारण आहे, ५४ ते ६० ) आतां योगाचळाचा निमथा । जरी ठाकावा आथि पार्था । तरी सोपानां या कर्मपथा । चुका झणीं ॥ ५४ ॥ येणें यमनियमांचे तळवटें । रिगे आसनाचिये पाउलवाटें । येई प्राणायामाचेनि आडकाठें । वरौता गा ॥ ५५ ॥ मग प्रत्याहाराचा अधाडा । जो बुद्धीचियाहि पायां निसरडा । जेथ हटिये सांडिती होडा । कडेलग ॥ ५६ ॥ तरी अभ्यासाचेनि बळें । प्रत्याहारीं निराळें । नखी लागेल ढाळें ढाळें । वैराग्याची ॥ ५७ ॥ ऐसा पवनाचेनि पैठारें । येतां धारणेचेनि पैसारें । क्रमी ध्यानाचें चवरें । सांपडे तंव ॥ ५८ ॥ मग तया मार्गाची धांव । पुरेल प्रवृत्तीची हांव । जेथ साध्यसाधना खेंव । समरसें होय ॥ ५९ ॥ जेथ पुढील पैस पारुखे । मागील स्मरावें तें ठाके । ऐसिये सरिसीये भूमिके । समाधि राहे ॥ ६० ॥ ( १७६. योगारूढ पुरुषांचीं लक्षणें, ६१-६५ ) येणें उपायें योगारूढु । जो निरवधि जाहला प्रौढु । अवतरणः–तयाचिया चिन्हांचा निवाडु । सांगेन आइकें ॥ ६१ ॥

यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते । सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥

अन्वयः—यदा च इंद्रियार्थेषु च कर्मसु न अनुषज्जते, सर्वसंकल्पसंन्यासी ( च भवति ), तदा योगारूढः उच्यते ॥ ४ ॥

तरी जयाचिया इंद्रियांचिया घरा । नाहीं विषयांचिया येरझारा । जो आत्मबोधाच्या वोवरां । पहुडला असे ॥ ६२ ॥ जयाचे सुखदुःखाचेनि आंगें ।

१ पुनः. २ श्रौत-स्मार्त होमादिक कर्मे. ३ मर्यादा. ४ न टाकतां. ५ बहुतानीं. ६ सोडलेला. ७ ब्रह्म. ८ मापानें. ९ कर्मरूप पर्वताचा. १० मस्तक. ११ चढावा. १२ जिना. १३ नको. १४ कड्यानें. १५ वर. १६ विषयांपासून इंद्रियें मागें ओढणें. १७ अर्धा तुटलेला कडा. १८ हठयोगी. १९ प्रतिज्ञा. २० पराकाष्ठेच्या. २१ निराधार आकाश. २२ प्रवेश. २३ हळू हळू. २४ पाठाळ,

प्रमाणें उगीच घोटाळ्यांत पडतो. ४९ गृहस्थाश्रमाचें ओझें सर्वांच्या कपाळीं अगोदर सहजींच लागलें आहे; परंतु गृहस्थाश्रमाचें आचरण यथाविधि न करितां संन्यास घेऊन पहिलें ओझें टाकून लगेच दुसरें ओझें डोक्यांवर घेतो. ५० म्हणून, श्रौत–स्मार्त होमादिक कर्मांचें यथाविधि आचरण न टाकता कर्मांची मर्यादा ओलांडली नाहीं, तर आपल्याजवळच सहजानुसार योगसुख आहे. ५१

श्लोकार्थः—हे अर्जुना, ज्ञाते ज्याला सन्यास असें म्हणतात, तोच योग असें तूं समज. कारण, सकल्पत्यागीवाचून कोणीही योगी होत नाहीं. ॥ २ ॥

ऐक—' संन्यासी तोच योगी ' असा एकवाक्यतेचा ध्वज अनेक शास्त्रांनीं या जगांत उभारला आहे. ५२ ज्या ठिकाणीं सोडलेला संकल्प नाहींसा होतो त्याच ठिकाणीं योगाचें सार जे ब्रह्म त्याची भेट होते, असें अनुभवाअंतीं ठरलें आहे. ५३

श्लोकार्थः—ज्या मुनीला ध्यानयोग प्राप्त करून घ्यावयाचा आहे, त्याला विहित कर्माचें आचरण हेंच साधन होय; व योग प्राप्त झाल्यावर तो पूर्णत्वास येण्याला कर्मनिवृत्ति हें साधन होय. ३

पार्था, योगरूप पर्वताच्या माथ्यावर ज्याला जाण्याची इच्छा असेल, त्यानें कर्ममार्ग हा सोपा जिना सोडता कामा नये. ५४ या कर्ममार्गानें जावयास लागलें, म्हणजे पहिल्यानें या पर्वताचा यमनियमरूपी तळ लागतो, नंतर आसनाच्या पाऊलवाटेनें प्राणायामरूप कड्यानें वर जावें लागतें; ५५ नंतर, प्रत्याहार हाच कोणी अर्धा तुटलेला कडा लागतो. त्याच्यावरून बुद्धीचेही पाय निसरतात; आणि तो ओलांडताना हटयोग्यांच्या सुद्धा पराकाष्ठेच्या प्रतिज्ञा शेवटास जात नाहींत. ५६ तथापि अभ्यासाच्या बळानें प्रत्याहाररूप निराधार आकाशांत फक्त वैराग्यच हळूहळू चढूं शकतें. ५७ अशा रीतीनें वायुरूप घोड्यावरून मार्ग क्रमीत असता चित्त स्थिर करण्याचा मार्ग क्रमूं लागल्यावर तो ध्यानाच्या माथ्यावर येऊन पोहोंचतो. ५८ मग त्याचें मार्ग चालणें बंद पडतें, व मनाचीही हांव बंद होते; आणि ब्रह्माशीं ऐक्य झाल्यामुळें साध्यसाधन भेद नाहींसा होतो. ५९ ज्या ठिकाणीं पुढील पाऊल टाकणें बंद होऊन मागीलही आठवण रहात नाहीं, अशा सम-अधिकार भूमीवर समाधि लागतो. ६० या उपायानें जो योगारूढ होतो, तो निःसंशय परिपूर्ण झाला. आता त्याच्या चिन्हांचा निर्णय तुला सांगतों, तो ऐक. ६१

श्लोकार्थः——जेव्हा योगी विषयाचे ठिकाणीं व कर्माचे ठिकाणीं सक्त होत नाहीं, आणि सर्व सकल्प टाकून देतो, तेव्हा त्याला योगारूढ असें म्हणतात. ॥ ४ ॥

हें पहा—ज्याच्या इंद्रियांच्या घरीं विषयाचें येणें जाणें बंद होतें, (ज्याच्यावर इंद्रियाचा पगडा बसत नाहीं,) जो आत्मबोधाच्या घरांत निजलेला असतो, (ज्याला

२५ चित्त स्थिर करण्याचा मार्ग. २६ मस्तक. २७ इच्छा. २८ भेट. २९ ऐक्यानें. ३० पाऊल. ३१ बंद होते. ३२ बद पडतें. ३३ सम. ३४ अयत. ३५ परिपूर्ण. ३६ निर्णय. ३७ स्वयपाकघरांत. ३८ निजला.

झगटलें मानस चेवो [2]नेघे । विषय [4]पासींही आलिया[3] से न रिघे । हें काय म्हणऊनि ॥ ६३ ॥ इंद्रियें कर्मांच्या ठायीं । वाढीनलीं परि कँहीं । फळ-हेतूची चौंड नाहीं । अंतःकरणीं ॥ ६४ ॥ [6]असतेनि देहें एतुला । जो चेतुचि दिसे निदेलों । तोचि योगारूढु भला । वोळखें तूं ॥ ६५ ॥ अवतरणः– ( १७७. अर्जुनाचा प्रश्न, ६६ ) तेथ अर्जुन म्हणे अनंता । हें मज विस्मो बहु आइकतां । सांगें तया ऐसी योग्यता । कवणें दीजे ॥ ६६ ॥

उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् । आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥५॥

*अन्वयः—आत्मना आत्मानं उद्धरेत्, आत्मान न अवसादयेत्; आत्मा एव हि आत्मनः बंधुः, आत्मा एव आत्मनः रिपुः ॥ ५ ॥*

( १७८. अद्वैत स्थितींत देणें घेणें नाहीं, ६७ ) तंव हांसोनि कृष्ण म्हणे । तुझें नवल हें बोलणें । कवणासि काय दीजेल कवणें । अद्वैतीं एथ ॥ ६७ ॥ ( १७९. शत्रु व मित्र आपले आपण, कल्पनेनें बद्ध व कल्पनेनें मुक्त; ६८ ते ८० ). पैं [10]व्यामोहाचिये शेजे । [11]वळियें अविद्या निद्रितु होइजे । ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे । जन्ममृत्यूंचा ॥ ६८ ॥ पाठीं [12]अवसांत ये [13]चेवो । तैं तें अवघेंचि होय वावो । ऐसा उपजे नित्य सद्भावो । तोही आपणपांचि ॥ ६९ ॥ म्हणऊनि आपणाचि आप-णया । घातु कीजतु असे धनंजया । चित्त देऊनि नाथिलियां । देहाभिमाना ॥७०॥

बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥

*अन्वयः—येन आत्मना एव आत्मा जितः, तस्य आत्मनः बंधुः आत्मा; अनात्मनः तु शत्रुत्वे आत्मा एव शत्रुवत् वर्तेत ॥ ६ ॥*

हा विचारूनि अहंकार सांडिजे । मग असतीच [16]वस्तु होइजे । तरी आपली [17]स्वस्ति सहजें । आपण केली ॥ ७१ ॥ येऱ्हवीं [18]कोशकीटकाचिया परी । तो आपणयां आपण वैरी । जो आत्मबुद्धि शरीरीं । [19]चारुस्थळीं ॥ ७२ ॥ कैसे प्राप्तीचिये वेळे । निदैवा आंधळेपणाचे डोहळे । कीं असते आपुले डोळे । आपण झांकी ॥ ७३ ॥ कां कवण एकु भ्रमलेपणें । मी तो नव्हे गा चोरलों म्हणे । ऐसा नाथिला छंदु अंतःकरणें । घेऊनि ठाके ॥ ७४ ॥ येरवीं होय तें तोचि आहे । परि काई कीजे बुद्धि तैसी नोहे । देखा स्वप्नींचेनि घायें । कीं मरे साचें ॥ ७५ ॥ जैसी ते [21]शुकाचेनि आंगभारें । नळिका भोविन्नली [23]ऐरी [24]मोहरें । तेणें उडावें परि न पुरे । मनशंका ॥ ७६ ॥ वायांचि मान पिळी । [24]अडुवें [25]हियें

१ शिणलेलें. २ जागें होत नाहीं. ३ स्मरण. ४ कधीं. ५ इच्छा. ६ विद्यमान. ७ एवढा. ८ जागा असतां. ९ नवल. १० भ्रांति. ११ बळवान. १२ अकस्मात्. १३ जागृति. १४ व्यर्थ. १५ मिथ्या. १६ ब्रह्म. १७ कल्याण. १८ आपल्या अंगाभोंवतीं काड्यांचें घर बांधणारा किडा.

आत्मज्ञान झालेलें असतें ), ६२ संसारांतील सुखदुःखांशीं झगडतांना टकरा देऊन ज्याचें मन विटल्यामुळें प्रोत्साहन पावत नाहीं, त्याच्याजवळ जरी विषय ( मूर्तिमंत ) येऊन उभे राहिले, तरी ते कोण आहेत ह्याबद्दल त्याला स्मृतिही नसते. ६३ कदाचित् इंद्रियें कर्मे करण्याला प्रवृत्त झालीं, तरी त्याला अंतःकरणांत फळाच्या हेतूची इच्छा नसते. ६४ व जो देही जागा असतां निजलेला दिसतो, त्यालाच खरा योग साध्य झाला असें तूं ओळख. ६५ त्या वेळेस अर्जुन अनंतास म्हणतो, "देवा, तुम्ही जें सांगतां, तें ऐकून मला नवल वाटतें; तर त्या योग्याला अशी योग्यता कोण देतो हें मला सांगा." ६६

श्लोकार्थः—आपण आपल्या आत्म्यानें आत्म्याचा उद्धार करून घ्यावा; आपल्या आत्म्याला अधोगतीस नेऊं नये; कारण आत्मा हाच आत्म्याचा हितकर्ता व आत्मा हाच आत्म्याचा शत्रु होय. ॥ ५ ॥

त्या वेळेस श्रीकृष्ण हसून म्हणतातः—तुझ्या बोलण्याचें मला नवल वाटतें. कारण, ह्या अद्वैतांत कोणाला कोणीं काय द्यावयाचें आहे ? ६७ परंतु भ्रांतिरूप शय्येवर प्रबळ अज्ञानानें जेव्हां मनुष्य निजलेला असतो, त्या वेळेस जन्ममृत्यूंचीं दुष्ट स्वप्नें त्यास भोगावीं लागतात. ६८ नंतर अकस्मात् जागा झाल्यावर तीं सर्व स्वप्नें व्यर्थ होतात; आणि आपण खरे आहों असा निश्चय होतो, तोही आपणच होय. ६९ म्हणून, हे धनंजया, खोट्या देहावर भरवंसा ठेवला म्हणजे आपणच आपले घातास प्रवृत्त होतों. ७०

श्लोकार्थः—ज्यानें आत्म्याच्या साहाय्यानें आत्मा जिंकिला त्याचा आत्माच त्याचा बंधु, हितकर्ता होय; परंतु ज्यानें आत्मा जिंकला नाहीं, त्याचा आत्माच त्याचा शत्रु होतो ॥ ६ ॥

हा विचार करून अहंकार सोडला, म्हणजे मग आपलेंच ब्रह्मस्वरूप आपल्या प्रत्ययास येतें. असें झालें म्हणजे आपलें कल्याण आपण सहज केलें असें होतें. ७१ जो सुशोभित अशा शरिराचे ठिकाणीं लुब्ध होऊन आत्मस्वरूप विसरतो, व आपलेपणा मानितो, तो कोशाकिड्याप्रमाणें आपला आपण वैरी होतो. ७२ जसें लाभाची वेळ आली असतां हतभागी मनुष्याला अंधळेपणाचे डोहाळे आठवून तो आपले डोळे झांकितो, व वस्तुलाभाला अंतरतो; ७३ किंवा एखादा मनुष्य भ्रमानें माझा मीच हरवलों असें म्हणतो; आणि अंतःकरणांत तोच खोटा भाव धरून बसतो. ७४ येरवीं या भ्रमाशिवाय पाहूं गेलें असतां तो स्वतांच ब्रह्म आहे; परंतु कांहीं केल्यानें त्याचे बुद्धीला तसा भास होत नाहीं. पहा कीं, स्वप्नांतील ( तरवारीचे ) वारानें कोणी खरोखर मरतो काय ? ७५ राघूला धरण्याकरितां टांगलेली झाडावरील नळी त्याच्या अंगभारानें उलट फिरली असतां, तो उडून न जातां आपणच फिरलों अशी मनांत शंका येऊन ती जशी सोडीत नाहीं, ७६ तो व्यर्थ मान हालवतो, आणि छातीनें व चवड्यानें ती नळी आवळून चोंचीनें धरून

१९ सुशोभित. २० ( तरवारीचे ) वारानें, २१ राघू, २२ फिरली, २३ उलट, दुसरीकडे. २४ चवडे, २५ छाती.

आंवळी । टिटांतु नळी । धरूनि ठाके ॥ ७७ ॥ म्हणे बांधला मी फुडा । ऐसिया भावनेचिया पडे खोडां । कीं मोकळिया पायांचा चवडा । गोंवी अधिकें ॥७८॥ ऐसा कोंजेंवीण आंतुडला । तो सांग पां काय आणिकें बांधला । मग न सोडीच जऱ्ही नेला । तोडूनि अर्धा ॥ ७९ ॥ म्हणऊनि आपणयां आपणचि रिपु । जेणें वाढविला हा संकल्पु । येर स्वयंबुद्धी म्हणे बापु । जो नाथिलें नेघे ॥ ८० ॥

जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः । शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥७
ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः । युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥ ८

अन्वयः–जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ( भवति, यदा ) योगी विजितेंद्रियः, ज्ञानविज्ञानतृप्तात्मा, समलोष्टाश्मकांचनः, शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ( समः ) कूटस्थः ( भवति, तदा ) युक्तः इति उच्यते ॥ ७ ॥ ८ ॥

( १८०. संकल्परहिताळा द्वंद्वाची बाधा होत नाहीं, ८१–१०७ ) तया स्वांतःकरणजिता । सकळकामोपशांता । परमात्मा परौतां । दूर नाहीं ॥ ८१ ॥ जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी [12]पंधरें तेंचि होये । तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं ॥ ८२ ॥ हा घटाकारु जैसा । निमालियां तया अवकाशा । नलगे मिळों जाणें आकाशा । आनीं ठाया ॥ ८३ ॥ तैसा देहाहंकारु नाथिला । हा समूळ जयाचा नाशिला । तोचि परमात्मा संचला । आधींचि आहे ॥ ८४ ॥ आतां शीतोष्णाचिया वाहणी । तेथ सुखदुःखाची कडसणी । इयें न समाती कांहीं बोलणीं । मानापमानाचीं ॥ ८५ ॥ जें जिये वाटा सूर्यु जाये । तेउतें तेजाचें विश्व होये । तैसें तया पावे तें आहे । तोचि म्हणउनी ॥ ८६ ॥ देखें मेघौनि सुटती धारा । तिया न रुपती जैसिया सागरा । तैसीं शुभाशुभें योगीश्वरा । नव्हती आनें ॥ ८७ ॥ जो हा विज्ञानात्मकु भावो । तया विवरितां[20] जाहला वावो । मग लागला जंव पाहों । तंव ज्ञान तें तोचि ॥ ८८ ॥ आतां व्यापकु कीं एकदेशी । हे ऊहापोही जे ऐसी । ते करावी ठेली[23] आपैसी । दुजेनवीण ॥८९॥ ऐसा शरीरीचि परि कौतुकें । परब्रह्माचेनि पाडें तुके । जेणें जितलीं एकें । इंद्रियें गा ॥ ९० ॥ तो जितेंद्रियु सहजें । तोचि योगयुक्त म्हणिजे । जेणें सानें थोर नेणिजे । कवणे काळीं ॥ ९१ ॥ देखें सोनयाचें निखळ । मेरुयेसणें ढिसाळ । आणि मातियेचें डिखळ । सरिसेंचि मानी ॥ ९२ ॥ पाहतां पृथ्वीचें मोल थोडें । ऐसें अनर्घ्य रत्न चोखडें । देखे दगडाचेनि पाडें । निचाडु ऐसा ॥ ९३ ॥

१ चोंन्वीत. २ खरोखर. ३ खोड्यात. ४ गुंतवी. ५ निरर्थक. ६ सापडला. ७ दुसऱ्यानें. ८ जिंकणारा. ९ सर्व इच्छा तृप्त झालेला. १० इतराप्रमाणें. ११ हिणकटाचा. १२ पंधराच्या दराचें उत्तम सोनें. १३ नाश पावल्यावर. १४ अन्य स्थळीं. १५ सर्वत्र भरलेला. १६ विचार. १७ सहन न होणें. १८ भिन्न. १९ संसारिक ज्ञान. २० विचार करितां. २१ अव्यापक. २२ घाटाघाट. २३ राहिली. २४ कसाला. २५ तोलला जातो. २६ मेरु पर्वताएवढें. २७ मोठें. २८ अमोल. २९ ज्याला गरज नाहीं तो.

ओरडतो, ७७ मी खरोखर बाधला गेलों अशा समजुतीनें खोड्यांत पडतो, आणि मोकळ्या पायोंचे चवड्याने नळी बळकट धरितो, ७८ असा जो निरर्थक सांपडला, त्याला कोणी दुसरें बांधावयास आलें होतें का सांग बरें? आणि नंतर त्याला अर्धा तोडून नेला तरी तो ती नळी सोडीत नाहीं; ७९ म्हणून, ज्यानें मनांतील संकल्प जास्ती वाढविले आहेत, तो आपला आपणच शत्रु होय. पण जो पुरुष वृथाभिमान धारण करीत नाहीं, तो आत्मज्ञानी होय. ८०

श्लोकार्थः—ज्यानें आपलें मन जिंकिलें व ज्याच्या मनाला पूर्ण शांति प्राप्त झाली आहे, तो जीव परमात्मरूपी आहे. तेव्हां योगी आपलीं इंद्रियें स्वाधीन ठेवितो, ब्रह्मज्ञान व अनुभविक ज्ञान यानीं तृप्त असतो; माती, दगड व सोनें हीं सारखीं समजतो; शीत उष्ण, सुख दुःख, तसेंच मान-अपमान हीं सारखीं मानितो, आणि निर्विकारस्वरूपीं मन स्थिर ठेवितो, तेव्हां त्याला 'युक्त' असें म्हणतात ॥ ७ ॥ ८ ॥

ज्यानें आपले मन जिंकिलें आहे व ज्याच्या सर्व वासना शांत झाल्या आहेत त्याला इतराप्रमाणें परमात्मा लांब नाहीं. ८१ सोन्याचा हिणकटपणा तावून नाहींसा झाल्यावर तेंच जसें उत्तम सोनें होतें, तद्वत् मनांतील संकल्प नाहींतसे होताच जीवास ब्रह्मत्व येतें. ८२ घटातील आकाशाला घटाचा नाश झाल्यावर जसें महाकाशाला मिळण्याकरितां दुसरे ठिकाणीं जावें लागत नाहीं, ८३ तसा ज्याच्या देहातील खोट्या अहंकाराचा समूळ नाश झाला, तो पुरुष मूळचाच परमात्मा आहे. ८४ आता अशा स्थितींत शीत किंवा उष्ण, सुख किंवा दुःख, मान किंवा अपमान याचा विचार त्याचे ठिकाणीं मुळींच संभवत नाहीं; म्हणजे त्याला हें सर्व सारखें दिसतें. ८५ ज्या ज्या वाटेने सूर्य जातो त्या त्या ठिकाणीं त्याचा प्रकाश पडतो; त्याप्रमाणें, त्याला जी जी वस्तु आढळते, ती ती—तो स्वतः ब्रह्मरूप बनल्यामुळें ब्रह्मरूपीच भासते. ८६ पहा कीं, मेघांपासून सुटणाऱ्या पावसाच्या धारा ज्याप्रमाणें समुद्राला खुपत नाहींत, त्याचप्रमाणें, जो ब्रह्मरूप बनला आहे, त्याला शुभाशुभ कर्में हीं भिन्न वाटत नाहींत. ८७ परोक्ष ( संसारिक ) ज्ञानाचा विचार करूं लागल्यावर, तें व्यर्थ आहे असा ज्याला प्रत्यय होतो, त्याला, तो ज्ञानाचा शोध करूं लागला असता तें आपणच आहों असें वाटूं लागतें. ८८ नंतर, मी व्यापक आहें किंवा अव्यापक आहें याची तो वाटाघाट करूं लागल्यावर, ती जागच्या जागींच राहते; कारण, त्याच्या मनात द्वैतभाव नसतो. ८९ अशा रीतीनें शरिरात राहून ज्यानें आपलीं इंद्रियें जिंकलीं आहेत, व जो सहज लीलेनें परब्रह्माच्या योग्यतेला आला आहे, ९० तोच सहज जितेंद्रिय आणि तोच योगी ! कारण, त्याला लहान आणि थोर हा भेद कधीं नसतो. ९१ असें पहा कीं, शुद्ध सोन्याचा मेरूएवढा पर्वत व मातीचें ढेंकूळ हीं दोन्ही जो सारखींच मानतो, ९२ ज्याचें मोल पाहूं गेले असता त्यापुढे पृथ्वीचेही मोल थोडें आहे अशा रत्नाला केवळ दगडाप्रमाणें मानण्याइतका जो निरिच्छ असतो, ९३

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु । साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥

अन्वयः—यः सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु, साधुषु च पापेषु अपि समबुद्धिः (अस्ति, सः) विशिष्यते ॥ ९ ॥

तेथ सुहृद आणि शत्रु । कां उदासु आणि मित्रु । 'हा भावभेदु विचित्रु । कल्पूं कैचा ॥ ९४ ॥ तया बंधु कोण कांह्याचा । द्वेषिया कवण तयाचा । मीचि विश्व ऐसा जयाचा । बोधु जाहला ॥ ९५ ॥ मग तयाचिये दिठी । अधमोत्तम असे किरीटी । काय परिसाचिये कसवटी । वानियां कीजे ॥ ९६ ॥ ते [4]जैसी निर्वाणें सुवर्णचि करी । तैसी जयाची बुद्धी चराचरीं । होय साम्याची उजरी । निरंतर ॥ ९७ ॥ जे ते विश्वाळंकाराचे विसुरे[7] । जरी आहाती आनानें आकारें । तरी घडले एकचि भांगारें । परब्रह्में ॥ ९८ ॥ ऐसें जाणणें जें बरवें । तें फावलें तया आघवें । म्हणोनि आहाचवाहाच न झकवे । येणें आकारचित्रें ॥ ९९ ॥ घापे पटामाजि दृष्टीं । दिसे तंतूची सैंघ सृष्टी । परी तो एकवांचूनि गोष्टी । दुजी नाहीं ॥ १०० ॥ ऐसेनि प्रतीती हें [14]गवसे । ऐसा अनुभव जयातें असे । तोचि समबुद्धि हें अनारिसें । नव्हे जाणें ॥ १ ॥ जयाचें नांव तीर्थरावो । दर्शनें प्रशांतीसि ठावो । जयाचेनि संगें ब्रह्मभावो । भ्रांतासही ॥ २ ॥ जयाचेनि बोलें धर्मु जिये । दिठी महासिद्धीतें विये । देखें स्वर्गसुखादि इयें । खेळ जयाचा ॥३॥ विपायें जरी आठवला चित्ता । तरी दे आपुली योग्यता । हें असो तयातें प्रशं- सितां । लाभु आथि ॥ ४ ॥

योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः । एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥१०

अन्वयः—योगी रहसि स्थितः एकाकी यतचित्तात्मा निराशीः अपरिग्रहः (च सन्) सततं आत्मानं युंजीत ॥ १० ॥

पुढती अस्तवेना ऐसें । जया पाहलें अद्वैतदिवसें । मग आपणपांचि आपणु असे । अखंडित ॥ ५ ॥ ऐसिया दृष्टी जो विवेकी । पार्था तो ऐकाकी । सहजें अपरिग्रही जो तिहीं लोकीं । तोचि म्हणउनी ॥ ६ ॥ ऐसियें असाधारणें । निष्पन्नाचीं लक्षणें । आपुलेनि वेहुवसपणें । श्रीकृष्ण बोले ॥ ७ ॥ ( १८९. पूर्णाचीं लक्षणें सांगतां येत नाहींत, तरीपण सांगितलीं; १०८—११२ ) जो ज्ञानियांचा बापु । देखणेयांचे दिठीचा दीपु । जया दार्दुल्याचा संकल्पु । विश्व रची ॥ ८ ॥ प्रणवा- चिये पेठे । जाहलें शब्दब्रह्म मांजिठें । तें जयाचिये यशा धाकुटें । वेढूं न पुरे ॥९॥ जयाचेनि आंगिकें तेजें । आवो रविशशीचिये [33]वणिजे । म्हणऊनि जग हें [34]वेसजे-

१ आप्त. २ कशाचा. ३ अंतर. ४ कसवटी. ५ केवळ, उत्तम. ६ स्पष्ट. ७ ठसे. ८ सुवर्ण. ९ समजलें. १० वरचेवर. ११ फसत नाहीं. १२ चित्रविचित्र विश्वरचना. १३ घातल्याने. १४ जग. १५ खोटें, वेगळें. १६ प्रयाग. १७ समाधानास. १८ पुनः १९ मावळत नाहीं. २० उदय झाला, प्रातःकाल झाला. २१ ज्ञानसूर्य. २२ अद्वितीय. २३ संग्रह न करणारा. २४ ठोकळ. २५ सिद्धाचीं.

श्लोकार्थः - ज्या योग्याची सुहृद् (प्रत्युपकाराची आशा न धरिता उपकार करणारा), मित्र (सहवासानें प्रीति करणारा), शत्रु, उदासीन, मध्यस्थ, द्वेषास योग्य व संबंधी याचे ठिकाणीं, आणि साधूचे ठिकाणीं, तशीच पाप्याचे ठिकाणींही समबुद्धि असते, तो सर्वांत श्रेष्ठ आहे ॥ ९ ॥

त्याचे ठिकाणीं आप्त आणि शत्रु, अथवा उदासीन आणि मित्र अशा विचित्र कल्पना कोठून येणार ? ९४ मीच विश्व आहें असा ज्याच्या मनांत बोध झाला आहे, त्याला बंधु कोण आणि द्वेषी कशाचा ? ९५ मग अर्जुना, त्याच्या दृष्टीला लहान आणि थोर असा कोठून भास होणार ? असें पहा कीं, परिसाच्या कसोटीस लागल्यावर निरनिराळे कस लागतील काय ? ९६ त्या कसोटीपासून जसें शुद्ध सोनेंच उत्पन्न होतें, तशी त्याची बुद्धि नेहमीं चराचरांचे ठिकाणीं केवळ एकत्वच जाणते. ९७ विश्वरूप अलंकाराचे ठसे जरी पुष्कळ आकाराचे आहेत, तरी ते एकाच परब्रह्मरूपी सुवर्णाचे घडलेले आहेत; ९८ असें शुद्ध व खरें तत्त्व ज्याला पूर्णपणें समजलें आहे, तो चित्रविचित्र रचनेनें वरचेवर फसला जात नाहीं. ९९ वस्त्राकडे पाहिलें असतां जसें तें सर्व तंतुमय दिसतें, तसें त्याला ब्रह्मावांचून जगतांत दुसरें काहीं दिसत नाहीं. १०० अशा रीतीनें सर्व जग भरलेलें आहे असा ज्याला अनुभव येतो, तोच समबुद्धि होय, हें खोटें नाहीं असें पक्कें समज. १ ज्याचें नांव तीर्थराज होय, ज्याचें दर्शन घेतलें असतां अंतःकरणाला समाधान होतें, आणि ज्याच्या संगतीनें, अहंकारानें भ्रमित झालेल्या पुरुषांची भ्रांति जाऊन तो ब्रह्मस्वरूप होतो, २ ज्याचें बोलणें हें धर्माचें जीवन, आणि दृष्टि ही महासिद्धि उत्पन्न करणारी होय, व स्वर्गसुख इत्यादि सुखें हे ज्याचे खेळ आहेत, ३ अशा मनुष्याची जरी चित्तांत सहज आठवण झाली, तरी तो आपली योग्यता देतो. फार काय सांगावें ? त्याची स्तुति केली असतां महान् लाभच आहे. ४

श्लोकार्थः—योग्यानें एकटेंच एकातांत वास करून, आणि मन व देह स्वाधीन ठेवून, कशाचीही आशा व संग्रह न करिता सतत आत्मध्यान करावें ॥ १० ॥

जो कधींही मावळत नाहीं असा ज्ञानसूर्य ज्याचे हृदयात उदय पावला आहे, तो आपण आपल्या ठिकाणींच सदोदित ब्रह्मानंदांत असतो. ५ पार्था, अशा दृष्टीनें जो विचार करतो, तोच अद्वितीय व तोच तिन्ही लोकीं परिग्रह न करणारा असें जाण. ६ अशा प्रकारें आपल्या स्वतांच्याहीपेक्षां विशेष गौरवानें श्रीकृष्णानीं साधूंची ठोकळ लक्षणें सांगितलीं. ७ जो सर्व ज्ञानी लोकांत श्रेष्ठ व सर्व पाहणाऱ्याच्या दृष्टीचा प्रकाशक, आणि ज्या समर्थाच्या केवळ संकल्पानें विश्वाची रचना होते; ८ ॐकाराच्या बाजारात जें शब्दब्रह्मरूप उत्तम वस्त्र निघालें, तें ज्याच्या यशास आच्छादन करण्यास पुरत नाहीं; (ज्या श्रीकृष्णाच्या यशाचें वेदही वर्णन करूं शकत नाहींत;) ९ ज्याच्या अंगाच्या तेजाने सूर्य

२६ षड्गुणैश्वर्यसंपन्नतेनें. २७ श्रेष्ठ. २८ समर्थाचा. २९ ॐकाराच्या. ३० उत्तम वस्त्र. ३१ अंगीच्या. ३२ प्रतिष्ठा. ३३ व्यापारास. ३४ आधार.

वीण असे तया ॥ ११० ॥ हां गा नामचि एक जयाचें । पाहतां गगनही दिसे टांचें । गुण एकैक काय तयाचे । आकळिशील तूं ॥ ११ ॥ म्हणोनि असो हें वानणें । सांगों नेणों कवणाचीं लक्षणें । दावावीं मिषें येणें । कां बोलिलों तें ॥ १२ ॥ ( १८२. देवाचें स्वगत भाषण, काव्यप्रतिभा, ११३–११९ ) ऐकें द्वैताचा ठावोचि फेडी[3] । ते ब्रह्मविद्या कीजेल उघडी । तरि अर्जुना पँढिये हे गोडी । नासेल हन ॥ १३ ॥ म्हणोनि तें तैसें बोलणें । नव्हे सपातळ आड लावणें । केलें मनाचि वेगळवाणें । भोगावया ॥ १४ ॥ जया सोहंभाव[6] अटकु[7] । मोक्षसुखा-लागोनि रंकु । तयाचिये दिठीचा झणें कळंकु । लागेल तुझिया प्रेमा ॥ १५ ॥ विर्पायें अहंभाव ययाचा जाईल । मी तोंचि हा जरी होईल । तरि मग काय कीजेल । एकलेया ॥ १६ ॥ दिठीचि पाहतां निविजे । कां तोंड भरोनि बोलिजे । नातरी दाटूनि खेंवें[10] दीजे । ऐसें कोण आहे ॥ १७ ॥ आपुलिया मना बरवी । असमाई गोठी जीवीं । ते कवणेंसि चावळावी । जरी ऐक्य जाहलें ॥ १८ ॥ इया काकुळती[13] जनार्दनें । अन्योपदेशाचेनि हौतासनें । बोलामाजि मन मनें । आलिंगूं सरलें ॥ १९ ॥ ( १८३. अर्जुनाच्या प्रेमानें देव मोहित झाले, म्हणून इतकें बोलावें लागलें. काव्यप्रतिभा, १२०–१३१ ) हें परिसतां जरी कोंनडें[16] । तरी जाण पां पार्थ उघडें । कृष्णसुखाचेंचि रूपडें । वोतलें गा ॥ १२० ॥ हें असो वेंथसेचिये[17] शेवटीं । जैसें एकचि विये वांझोटी । मग ते मोहाची त्रिपुटी[18] । नाचों लागे ॥ २१ ॥ तैसें जाहलें श्रीअनंता । ऐसें तरि मी न म्हणतां । जरी तयाचा न देखता । अतिशेंयो[19] एथ ॥ २२ ॥ पाहा पां नवल कैसें चोजें[20] । कें[21] उपदेशु केउतें[22] झुंजें[23] । परि पुढें वौलभाचें भोजें[25] । नाचत असे ॥ २३ ॥ आवडी आणि लाजवी । व्यसन आणि शिणवी । पिसें[26] आणि न भुलवी । तरी तें काई ॥ २४ ॥ म्हणऊनि भावार्थु तो ऐसा । अर्जुन मैत्रियेचा कुंवांसा[27] । कीं सुखें शृंगारलिया मानसा । दर्पणु तो ॥ २५ ॥ यापरी वोंप[28] पुण्यपवित्र । जगीं भक्तिबीजासि सुक्षेत्र । तो श्रीकृष्णकृपे पात्र । याचिलागीं ॥ २६ ॥ हो कां आत्मनिवेदना[29] तळींची । जे पीठिका[30] होय सरळ्याची । पार्थु अधिष्ठात्री[31] तेथींची । मातृका[32] गा ॥ २७ ॥ पासींचि गोसांवी[33] न वानिजे[34] । मग पाइकाचों[35] गुण घेइजे । ऐसा अर्जुन तो सहजें । पढिये हरी ॥ २८ ॥ पाहा पां अनुरागें[36] भजे । जे प्रियोत्तमें[37] मानिजे । ते पतीहुनि काय न वानिजे ।

---

१ तुच्छ. २ जाणशील. ३ नाहींसा करी. ४ अति प्रिय ५ पडदा. ६ अहंब्रह्म. ७ अडथळा. ८ कदाचित्. ९ आनंदानें. १० आलिंगन. ११ न मावणारी. १२ बोलावी. १३ अडचण. १४ योगशास्त्राचें. १५ मिषानें. १६ अवघड. १७ वयाच्या. १८ पुतळी. १९ अतिशय प्रेम. २० आवड. २१ कोठें. २२ कोणीकडे. २३ युद्ध. २४ प्रीतीचें. २५ चित्र. २६ पिशाच. २७ घर. २८ धन्य. २९ आत्मनिवेदनाच्या मागची. ३० भूमिका. ३१ मालक. ३२ देवता. ३३ भगवान्. ३४ वर्णन करावा. ३५ सेवकाचा. ३६ प्रीतीनें. ३७ नवऱ्यानें.

आणि चंद्र यांच्या व्यापारांस प्रतिष्ठा येते, तेव्हां हें जग त्याच्या आधाराशिवाय आहे काय ? ११० पहा कीं, ज्याच्या नुसत्या नांवाबरोबर गगन तुच्छ दिसतें, असे याचे किती गुण तूं जाणशील ? ११ म्हणून ही प्रशंसा आतां पुरे. कारण, अशा लक्षणांनीं युक्त जो श्रीकृष्ण भगवान, तो ज्या साधूचें वर्णन करितो, त्याचीं लक्षणें आम्ही सांगूं शकत नाहीं; परंतु तीं सांगावीं म्हणून सांगितली, १२ जी ब्रह्मविद्या द्वैताचा नाश करते, ती जर स्पष्ट केली, तर आपला प्रियकर असा जो अर्जुन, त्याची प्रीति नाहींशी होईल, १३ म्हणून ब्रह्मज्ञानाविषयीं न बोलतां त्याच्या आड पडदा लावून अर्जुनाचें मन त्याच्या व आपल्या प्रेमाचा उपभोग घेण्याकरितां भगवंतांनीं वेगळें ठेविलें. १४ जे अहंब्रह्मापर्यंत येऊन ठेपले आहेत, व जे मोक्षसुखाच्या प्राप्ती-करितां गयावया झाले आहेत, त्यांच्या दृष्टीचा कलंक कदाचित् तुझ्या ब्रह्मविद्येच्या ठिकाणीं असलेल्या प्रेमाला लागेल. १५ कदाचित् अर्जुनाचा मीपणा जाऊन ' मी तोच हा ' असें जर होईल, तर मग मी एकट्यानें काय करावयाचें आहे ? १६ पाहिल्याबरोबर डोळे शांत होण्यास, व तोंड भरून बोलण्यास, किंवा आनंदानें दृढ आलिंगन देण्याला दुसरें कोण आहे ? १७ जर अर्जुनाचें आणि माझें ऐक्य झालें, तर आपल्या मनांत न मावणारी अशी उत्तम गोष्ट ती कोणाजवळ बोलावी ? १८ या अडचणीमुळें श्रीकृष्णांनीं बोलण्यांत साधूंचीं लक्षणें सांगून ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला व त्याचें मन वळवलें. १९ हें तुम्हां श्रोत्यांना जरी ऐकतांना अशक्य वाटेल, तरी पार्थ हा खरोखर श्रीकृष्णाच्या सुखा-चीच ओतीव मूर्ति आहे असें पक्कें समजा. १२० हें असो; एखाद्या वाझ स्त्रीला, तिचें वय होऊन गेल्यानंतर, एकच मूल झाले म्हणजे ती जशी त्याच्यावरील प्रेमाची प्रत्यक्ष पुतळी होऊन नाचूं लागते, २१ तशी श्रीकृष्णांची गोष्ट झाली आहे. त्यांचें अर्जुनावरील अति-शय प्रेम जर दृष्टोत्पत्तीस न येतें, तर मी असें बोललों नसतों. २२ पहा कीं, हें काय नवल व ही कोण आवड ? कीं कसला युद्धप्रसंग, आणि हा काय उपदेश ? परंतु अशा ठिकाणीं भगवंताच्या प्रीतीचें चित्र जो अर्जुन, त्याच्यापुढें प्रेमाचें कौतुक ( मूर्तिमान ) नाचत आहे ! २३ लज्जा उत्पन्न करणारी आवड, शीण उत्पन्न करणारें व्यसन, व न मुल-विणारें पिशाच अशा गोष्टी दृष्टीस पडतील, तर काय उपयोग ? २४ या गोष्टीचें सार इतकेंच कीं, अर्जुन हा श्रीकृष्णाच्या मैत्रीचें घर होय, किंवा सुखानें शृंगारलेलें आपलें मन पाहण्याचा आरसाच होय. २५ अशा प्रकारें अर्जुन हा धन्य, पुण्यपवित्र आणि भक्तिरूप बीज पेरण्याचें उत्तम शेत असल्यामुळेंच श्रीकृष्णकृपेस पात्र झाला ! २६ श्रवणापासून आत्मनिवेदनापर्यंत जी नऊ प्रकारची भक्ति आहे, त्यापैकीं आत्मनिवेदनाच्या अलीकडची जी सख्य नांवाची आठवी भक्ति, त्या ठिकाणची अर्जुन हा मुख्य देवता आहे. २७ ( भगवान ) श्रेष्ठ शेजारीं असतां त्याचें वर्णन केलें असतां मालकाला आवडावें अशा योग्य-तेचा अर्जुन हा भगवंताचा आवडता आहे. २८ जी पतिव्रता स्त्री आपल्या पतीची प्रीतीनें

पतिव्रता ॥ २९ ॥ तैसा अर्जुनाचि विशेषें स्तवावा । ऐसें आवडलें मज जीवा । जे तो त्रिभुवनींचिया दैवा । एकायतनु जाहला ॥ १३० ॥ जयाचिया आवडीचेनि पांगें । अमूर्तुही मूर्ति आवगे । पूर्णाहि परी लागे । अवस्था जयाची ॥ ३१ ॥ ( १८४. श्रोते ज्ञानेश्वरांच्या बोलण्याचें कौतुक करतात; काव्यप्रतिभा, १३२-१३५ ) तंव श्रोते म्हणती दैव । कैसी बोलाची हवाव । काय नादातें हन बरव । जिणोनि[७] आली ॥ ३२ ॥ हांहो नवल नोहे देशी । मऱ्हाटी बोलिजे तरी ऐशी । वाणें उमटताहे आकाशीं । साहित्य रंगाचें ॥ ३३ ॥ कैसें उन्मेख चांदिणें तोरें । आणि भावार्थु पडे गार । होचि श्लोकार्थ–कुमुदिनी फार । सांविया होती ॥ ३४ ॥ चोंडाचि निचोंडां करी । ऐसी मनोरथीं ये थोरी । तेणें विवळलें अंतरीं । तेथ डोलैं आला ॥ ३५ ॥ ( १८५. अर्जुनास देवाला प्रश्न करण्यास संकोच वाटत नाहीं; काव्यप्रतिभा, १३६ ते १३८ ) तें निवृत्तिदासें जाणितलें । मग अवधान द्या म्हणितलें । नवल पांडवकुळीं पोहलें । कृष्णादिवसें ॥ ३६ ॥ देवकीया उदरीं वाहिला । यशोदा सायासें पाळिला । [२०]शेखीं उपेगीं गेला । पांडवांसी ॥ ३७ ॥ म्हणऊनि बहुदिवस वोळगावा । कां अवसरु पाहोनि विनवावा । हाही सोसु तया सदैवा । पडेचिना ॥ ३८ ॥ हें असो कथा सांगें वेगीं । मग अर्जुन म्हणे सलगी । देवा इयें संतचिन्हें आंगीं । न ठके़ती माझ्या ॥ ३९ ॥ ( १८६. पूर्णत्व मला केव्हां येईल व ब्रह्म मला केव्हां कराल? काव्यप्रतिभा, १३९–१४२ ) येऱ्हवीं या लक्षणांचिया निजसारा । मी अपाडें कीर अपुरा । परि तुमचेनि बोलें अवधारा । [३०]थोरावे जरी ॥ १४० ॥ जी तुम्ही चित्त देयाल । तरी ब्रह्म मियां होइजेल । काय जहालें अभ्यासिजेल । सांगाल जें ॥ ४१ ॥ हांहो नेणों कवणाची काहाणी । आइकोनि श्लाघिजत असों अंतःकरणीं । ऐसी जाहलेपणाची शिरयाणी । कायसी देवा ॥ ४२ ॥ ( १८७. ब्रह्म होण्याच्या इच्छेवरून बुद्धींत खास वैराग्य-गर्भधारणा झाली आहे; काव्यप्रतिभा, १४३–१५१ ) हें आंगें म्यां होइजो का । येतुलें गोसावी आपुलेपणें कीजो का । तंव हांसोनि श्रीकृष्ण होका । करूं म्हणती ॥ ४३ ॥ देखा संतोषु एक न जोडे । तंवचि सुखांचें सांघे सांकडें । मग जोडलिया कवणेकडे । अपुरें असे ॥ ४४ ॥ तैसा सर्वेश्वरु वळियो सेवकें । म्हणोनि ब्रह्मही होय तो कौतुकें । परि कैसा भारें

१ एकच अधिष्ठान. २ संबंधानें. ३ अवतरे. ४ गंमत, शोभा. ५ स्वरास. ६ सौंदर्य. ७ जिंकून. ८ ठसे. ९ हृदयीं. १० श्रवणसुखाचे नवरस. ११ ज्ञान. १२ चकचकित. १३ प्रसृत. १४ सहज. १५ इच्छा. १६ निष्काम. १७ प्रकाशलें. १८ विस्मय. १९ उजाडलें. २० शेवटीं. २१ उपयोगीं पडला. २२ सेवा करावी. २३ समय. २४ प्रयास. २५ लडिवाळपणानें. २६ बसत नाहींत. २७ तात्पर्य. २८ अयोग्य. २९ विचार करा. ३० योग्य होईन. ३१ स्तुति करणें. ३२ मांठेपणा. ३३ चोहोंकडे. ३४ संकट. ३५ बळकट. ३६ भारानें.

सेवा करिते आणि पतीस मान्य होते, त्या पतिव्रतेची पतीपेक्षां वाखाणणी का करूं नये ? २९ त्याचप्रमाणें, अर्जुनाचीच विशेष स्तुति करावी असें माझ्या मनास वाटलें. कारण, तो त्रिभुवनाच्या भाग्याला पात्र झाला आहे । १३० ज्याच्या आवडीच्या वेडानें निराकार अशा ब्रह्माला देखील अवतार घेणें भाग पडलें आणि त्याच्या सर्व इच्छा पूर्ण असूनही अर्जुनाबद्दल त्याला उत्कंठा उत्पन्न झाली । ३१ तेव्हां श्रोते म्हणाले:—दैवाची गति काय विचित्र आहे ? आणि तशीच वर्णन करण्याची शैली तरी काय आहे ? कीं जिच्या सुंदरपणानें नादब्रह्मालाही जिंकिलें आहे. ३२ शुद्ध मराठी भाषेंत जर अशा रीतीचें वर्णन करितां येतें, कीं ज्याच्यापासून हृदयावर शृंगारादि नवरसांचे निरनिराळे ठसे उमटतात, तर हें अतिशय नवल नव्हे काय ? ३३ ज्ञानेश्वरांचें हें बोलणें कसें आहे म्हणाल, तर ज्ञानरूप चंद्राच्या चांदण्याप्रमाणें स्वच्छ असून त्याच्या भावार्थापासून मनाला आनंद होतो. म्हणून गीतेच्या श्लोकाचा अर्थ चंद्रविकासी कमळाप्रमाणें सहज उमलला आहे. ३४ त्या बोलण्याची अशी योग्यता आहे कीं, ब्रह्मविद्या ऐकणाराची इच्छा याच्या श्रवणापासून तृप्त होते; अशा या बोलापासून श्रोते अंतर्यामीं प्रसन्न होऊन डोलूं लागले. ३५ असा श्रोत्यांच्या मनांतील भाव निवृत्तिदास ज्ञानदेव यानीं जाणून, मग, ' श्रोतेहो, इकडे लक्ष द्या ' असें ते म्हणाले. कृष्णरूप दिवसानें पांडवकुळावर प्रकाश केला. (श्रीकृष्णांनीं पांडवांवर कृपा केली.) ३६ (तो कृष्ण कसा आहे म्हणाल, तर) ज्याला देवकीनें आपल्या उदरांत नऊ महिने वागविलें, यशोदेनें अति श्रमानें ज्याचें लालनपालन केलें, तो शेवटीं पांडवांच्या उपयोगीं पडला । ३७ म्हणून, पुष्कळ दिवस त्याची सेवा करावी, किंवा समय पाहून त्याची विनवणी करावी, इतका देखील प्रयास त्या दैववान अर्जुनाला पडला नाहीं । ३८ श्रोते म्हणतात, " 'ज्ञानेश्वरा, हा पाल्हाळ राहूं द्या, आतां, पुढें कथाभाग लवकर सांगा. " तेव्हां ज्ञानेश्वर म्हणतात:—अर्जुन लडिवाळपणानें म्हणतो कीं, " देवा, तुम्हीं हीं जीं संताचीं चिन्हें सांगितलीं, तीं माझ्या अंगीं वसत नाहींत. ३९ येऱ्हवीं या लक्षणांचें तात्पर्य जाणण्यास मी खरोखर अयोग्य आणि अपुरा असा आहें. परंतु तुमच्या सांगण्यानें जर मला योग्यता आली तर येईल. १४० जर तुम्हीं मनांत आणलें तर मी ब्रह्म सुद्धां होईन । तुम्ही ज्याचा मला अभ्यास करावयास सांगाल, तो करण्याला मला काय अशक्य आहे ? ४१ ही तुम्हीं कोणाची गोष्ट सांगितली हें मला कांहीं कळत नाहीं; परंतु ती ऐकल्यापासून तिची स्तुति करावी असें अंतःकरणांत वाटतें; तर ही योग्यता ज्याच्या अंगांत असेल, त्याच्या आनंदास पारावारच नाहीं । ४२ प्रभो, याचप्रमाणें माझे अंगीं योग्यता येईल एवढें आपण कराल काय ? " तेव्हां श्रीकृष्ण हसून म्हणाले की, " हो, तुला आम्ही ब्रह्मरूपी करूं. " ४३ असें पहा कीं, जर एक संतोष प्राप्त न झाला तर चोहोंकडे सुखाची उणीव भासते; परंतु तो प्राप्त झाल्यावर मग कोठें सुखाची उणीव येईल ? ४४ त्याचप्रमाणें, जो सर्वेश्वराचा पूर्ण सेवक

ओतला पिकें। दैवाचेनि ॥४५॥ जो जन्मसहस्रांचियासाठीं। इंद्रादिकांही महाग भेटी। तो अधीनु केतुला किरीटी। जे बोलुही न साहे ॥४६॥ मग ऐका जें पांडवें। म्हणितलें म्यां ब्रह्म होआवें। तें अशेषही देवें। अवधारिलें ॥४७॥ तेथ ऐसेंचि एक विचारिलें। जे या ब्रह्मत्वाचे डोहळे जाहले। परि उदरा वैराग्य आहे आलें। बुद्धीचिया ॥४८॥ येऱ्हवीं दिवस तरी या अपुरे। परि वैराग्य-वसंताचेनि भरें। जे सोहंभाव मेहुरें। मोडोनि आला ॥४९॥ म्हणोनि प्राप्ति-फळीं फळतां। ययासि वेळ न लगेल आतां। होय विरक्तु ऐसा अनंता। भरंवसा जाहला ॥१५०॥ म्हणे जें जें हा अधिष्ठील। तें आरंभींच यया फळेल। म्हणोनि सांगितला न वेंचेल। अभ्यासु वायां ॥५१॥ (१८८. ब्रह्मरूप होण्याचा उपाय सांगून देव अर्जुनाची स्तुति करतात, काव्यप्रतिभा, १५२-१६०) ऐसें विवरोनियां श्रीहरी। म्हणितलें तिये अवसरीं। अर्जुना हा अवधारीं। पंथराजु ॥५२॥ तेथ प्रवृत्तितरूचिया बुडीं। दिसती निवृत्तिफळाचिया कोडी। जिये मार्गींचा कापडी। महेशु अझुनी ॥५३॥ पैं योगिवृंदें वहिलीं। आडवीं आकाशीं निघालीं। कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं। धोरणु पडिला ॥५४॥ तिहीं आत्मबोधाचेनि उजुकारें। धांव घेतली एकसरें। कीं येर सकळ मार्ग निदसुरे। सांडूनियां ॥५५॥ पाठीं महर्षि येणें आले। साधकांचे सिद्ध जाहले। आत्मविद थोरावले। येणेंचि पंथें ॥५६॥ हा मार्गु जैं देखिजे। तैं तहान-भूक विसरिजे। रात्रिदिवसु नेणिजे। वाटे इये ॥५७॥ चालतां पाऊल जेथ पडे। तेथ अपवर्गाची खाणी उघडे। आव्हांटलिया तरी जोडे। स्वर्गसुख ॥५८॥ निगिजे[21] पूर्वेलियों मोहरां। कीं येइजे पश्चिमेचियों घरा। निश्चळपणें धनुर्धरा। चालणें एथींचें ॥५९॥ येणें मार्गें जया ठाया जाइजे। तो गांवो आपणचि होइजे। हें सांगों काय सहजें। जाणसी तूं ॥१६०॥ (१८९. ब्रह्मरूप होण्याचा मार्ग लवकर सांगा, १६१) तेथ पार्थें म्हणितलें देवा। तरि तेंचि मग केव्हां। कां औत्सिसमुद्रोनि न काढावा। बुडतु जी मी ॥६१॥ (१९०. देव म्हणतात, इतकी घाई कां? १६२) तंव कृष्ण म्हणती ऐसें। हें उत्संखळ बोलणें कायसें। आम्ही सांगतसों आपैसे। वरि पुशिलें तुवां ॥६२॥

---

१ दडपलेला. २ मोहोरानें. ३ मोक्षप्राप्ति. ४ ग्रहण करील. ५ व्यर्थ होणें. ६ राजमार्ग. ७ आचरण्यास तयार झाल्यावर; संसारवृक्षाच्या. ८ यात्रेकरू. ९ शंकर. १० प्रथम. ११ आडव्यातिडव्या मार्गानें. १२ हृदयाकाशीं. १३ थाग. १४ सरळ मार्गानें. १५ अज्ञानातील. १६ मागून; मार्गानें. १७ तत्त्वज्ञानी. १८ श्रेष्ठ झाले. १९ मोक्षाची. २० आडमार्गानें गेल्यास. २१ निघावें. २२ प्रवृत्तीच्या. २३ वाटेस. २४ निवृत्तीच्या. २५ उत्कंठा. २६ अमर्याद, उतावळेपणाचें.

बनला आहे, तो सहज ब्रह्मरूपी होऊं शकेल; पण अर्जुन सुदैवाच्या पिकाच्या भारानें किती लवला आहे पहा: ४५ जो ईश्वर हजारों जन्मांनीं इंद्रादिकांना सुद्धां भेटण्यास दुर्मिळ आहे, तो अर्जुनाच्या इतका अधीन झाला आहे कीं, त्याचें बोलणें खालीं पडूं देत नाहीं. ४६ तेव्हां ऐका:––अर्जुनानें मीं ब्रह्म व्हावें असें जें म्हटलें, तें देवानीं सर्व ऐकिलें. ४७ त्या वेळेस देवांच्या मनात असा विचार उत्पन्न झाला कीं, अर्जुनाला ब्रह्म होण्याविषयींचे डोहाळे लागले आहेत, याचें कारण–त्याच्या बुद्धीच्या उदरांत वैराग्याचा गर्भ राहिला आहे. ४८ अथवा, अर्जुन हा नूतन झाड असूनही वैराग्यरूप वसंताच्या भरानें अहंब्रह्मरूप मोहरानें वांकला आहे; ४९ म्हणून याला मोक्षरूप फळाची प्राप्ति अगदीं लवकर होईल; कारण हा विरक्त झाला आहे; अशी श्रीकृष्णांची खातरी झाली. १५० श्रीकृष्ण म्हणतात:–आतां हा अर्जुन ज्याचें ज्याचें आचरण करील, त्याचें त्याचें त्याला लागलीच फळ मिळेल. म्हणून, ज्याचा अभ्यास याला आपण करावयास सांगूं, तो व्यर्थ जाणार नाहीं. ५१ अशा प्रकारें त्या वेळीं श्रीहरींनीं मनांत विचार करून म्हटलें:––अर्जुना, आम्ही जो तुला योगमार्ग सांगणार आहों, तो सर्व मार्गाचा राजा आहे; तो तूं ऐक. ५२ तो योग असा आहे कीं, ज्याच्या प्रवृत्तिरूपी वृक्षाखालीं कोट्यवधि मोक्षफळें दृष्टीस पडतात; ( ज्याचें आचरण करूं लागलें असतां मोक्षप्राप्ति होते; ) त्या या मार्गाची श्रीशंकर हे अद्यापपावेतों यात्रा करीत आहेत ! ५३ परंतु योगिजन प्रथम हृदयाकाशांत आडव्यातिडव्या मार्गानें चालूं लागले, नंतर अनुभवाच्या पावलांनीं त्यांना ब्रह्माचा थाग लागला; ५४ तेव्हां इतर अज्ञानरूप सर्व मार्ग सोडून त्या योग्यांनीं आत्मबोधाच्या सरळ मार्गानें एकसारखी धाव घेतली ! ५५ त्यांच्या मार्गानें महर्षि आले, आणि ते साधकांचे सिद्ध बनले. त्याचप्रमाणें, तत्त्वज्ञानी हे याच पंथानें श्रेष्ठत्वास पावले. ५६ हा मार्ग जेव्हां दृष्टीस पडतो, तेव्हा तहान व भूक हीं हारपतात, व याची वाट चालत असतांना रात्र व दिवस याची आठवण होत नाहीं. ५७ या मार्गाचें क्रमण करीत असतां, ज्या ठिकाणी मनुष्य पाऊल टाकील त्या ठिकाणीं मोक्षाची खाणच उत्पन्न होते; व कदाचित् तो आडमार्गानें गेला तरी स्वर्गसुख मिळतें. ५८ तो पूर्वेच्या वाटेनें निघून म्हणजे प्रवृत्तीची वाट सोडून ( इंद्रियाचें आकलन करून ) पश्चिमेस येतो. ( निवृत्तीच्या वाटेला लागतो ). हे धनुर्धरा, या ठिकाणचें चालणें कोणतें म्हणशील तर निश्चळपणें बसणें हें होय ५९ या मार्गानें ज्या ठिकाणाला तो जातो, त्या ठिकाणीं तो गाव आपणच बनतो, हें काय सांगावें ? हें तुला आपोआपच कळेल. १६० तेव्हा पार्थ म्हणाला, " देवा, तर तुम्ही हें योगशास्त्र मला केव्हां सांगाल ? कारण, उत्कंठारूप समुद्रांत बुडालेला जो मी, त्या मला वर कां न काढावा ? " ६१ तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, इतका उतावीळपणा कां करतोस ?- आम्ही होऊन तुला सागतों आहों, तशांत तूं हा प्रश्न केला आहेस ! ६२

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥

अन्वयः--शुचौ देशे स्थिरं, न अत्युच्छ्रितं, न अतिनीचं, चैलाजिनकुशोत्तरं आत्मनः आसन प्रतिष्ठाप्य ॥ ११ ॥

( १९१. योगाभ्यासाकरितां स्थळ, १६३-१८० ) तरी विशेषें आतां बोलिजेल । परि तें अनुभवें उपेगा जाईल । म्हणोनि तैसें एक लागेल । स्थान पाहावें ॥ ६३ ॥ जेथ आराणुकेचेनि [3]कोडें । बैसलिया उठों नावडे । वैराग्यासी दुणीव चढे । देखिलिया जें ॥ ६४ ॥ जो संतीं वसविला ठावो । संतोषासि सावावो । मना होय उत्सावो । धैर्याचा ॥ ६५ ॥ अभ्यासुचि आपणयातें करी । हृदयातें अनुभव वरी । ऐसी रम्यपणाची थोरी । अखंड जेथ ॥ ६६ ॥ जया आड जातां पार्था । तपश्चर्या मनोरथा । पाखांडियाहि आस्था । समूळ होय ॥ ६७॥ स्वभावें वाटे येतां । जरी वैरपडा जाहला अवचितां । तरि सकामुही परि मावौता । निघों विसरे ॥ ६८ ॥ ऐसेनि न राहतयातें राहवी । भ्रमतयातें बैसवी । थापटूनि चेववी । विरक्तीतें ॥ ६९ ॥ हें राज्य वर सांडिजे । मग निवांता एथेंचि असिजे । ऐसें शृंगारियाहि उपजे । देखत-खेंवो ॥ १७० ॥ जें येणें मानें बरवंट । आणि तैसेंचि अति चोखट । जेथ अधिष्ठान प्रगट । डोळां दिसे ॥ ७१ ॥ आणिकही एक पाहावें । जें साधकीं वसतें होआवें । आणि जनाचेनि पांयरवें । रुळेचिना ॥७२॥ जेथ अमृताचेनि पाडें । मुळाहीसकट गोडें । जोडती दाटें झाडें । सदा फळती ॥७३॥ पाउला पाउला उदकें । वर्षाकाळावीण अति चोखें । [17]निर्झरे का विशेखें । सुलभें जेथ ॥ ७४ ॥ हा आतपुही अळुमाळ । जाणिजे तरी शीतळ । पवनु अति निश्चळु । मंद झुळके ॥ ७५ ॥ बहुतकरुनि निःशब्द । दाट न रिघे श्वापद । शुक हैन षट्पद । तेउतें[23] नाहीं ॥ ७६ ॥ पाणिलगें हंसें । दोनी चारी सारसें । कवणें एके वेळे बैसे । तरी कोकिळही हो का ॥ ७७ ॥ निरंतर नाहीं । तरि आलीं गेलीं कांहीं । होतु कां मयूरेंही । आम्ही ना न म्हणों ॥ ७८ ॥ परि आवश्यक पांडवा । ऐसा ठाव जोडावा । तेथ निगूढ मठ होआवा । कां शिवालय ॥ ७९ ॥ दोहीं-माजि आवडे तें । जें मानलें होय चित्तें । बहुतकरुनि एकांतें । बैसिजे गा ॥१८०॥

( १९२. आसन, १८१–१८५ ) म्हणोनि तैसें तें जाणावें । मनराहतें पाहावें । राहेल तेथ रचावें । आसन ऐसें ॥ ८१ ॥ वरी चोखट मृगसेवडी । माजी धूतवस्त्राची घडी । तळवटीं अमोडी । कुशांकुर ॥ ८२ ॥ सकोमळ सरिसे । सुबद्ध राहती

१ अभ्यासानें. २ करमणुकीचे. ३ हौसेनें, सुखानें. ४ साहाय्य. ५ बाजूनें. ६ प्राप्ति. ७ फिरणाराला. ८ उठवी, जागें करी. ९ बरोबर. १० चागलें. ११ शुद्ध. १२ ब्रह्मस्वरूप. १३ वस्ती केलेली. १४ वर्दळ. १५ मळेना. १६ आढळतात. १७ झरे १८ ऊन. १९ थोडें. २० जनावर. २१ अथवा. २२ भ्रमर. २३ जुजबी. २४ बदकें. २५ चक्रवाक पक्षी. २६ असोत. २७ गुप्तस्थान. २८ कृष्णाजिन. २९ साग्र. ३० दर्भ.

श्लोकार्थः—योग्यानें शुद्ध प्रदेशीं आपलें आसन घालावें; प्रथम दर्भ, त्यावर मृगाजिन, आणि त्यावर वस्त्र घालावें, आणि तें फार उंच किंवा फार सखलही असूं नये. ॥ ११ ॥

तर आतां आम्ही तुला स्पष्टपणें सांगतों, पण त्याचा अभ्यास केल्यावर उपयोग घडेल. म्हणून तशा रीतीच्या योग्याभ्यासाकरितां एक जागा शोधून काढावी. ६३ ती जागा अशी असावी कीं, ज्या ठिकाणीं करमणुकीची हौस पुरी होत असल्यामुळें, बसल्यावर उठूं नये असें वाटावें, आणि जी पाहतांक्षणींच वैराग्य दुप्पट वाढावें. ६४ ती जागा पूर्वी सत्पुरुषांनीं वसविलेली असावी, व तिच्यापासून मनाच्या संतोषाला साहाय्य व्हावें, व धैर्याचा उत्कर्ष व्हावा. ६५ त्या जागेंत अभ्यास करण्यास उत्तेजन यावें आणि मनाला अनुभवानें माळ घालावी, अशी त्या जागेची रम्यपणाबद्दल नेहमीं योग्यता असावी. ६६ पार्था, त्या जागेच्या जवळून गेलें असतां पाखांड्याचेही मनात तपश्चर्या करण्याबद्दल आस्था उत्पन्न व्हावी. ६७ एखादा मनुष्य सहज वाट चालत असतां जर अवचित त्या ठिकाणीं येईल, तर, जरी तो कामेच्छु असून आपल्या घरीं जात असला, तरी तें ठिकाण सोडून जाऊं नये असें त्याला वाटावें. ६८ अशा रीतीनें, ज्याला त्या ठिकाणीं राहण्याची इच्छा नाहीं त्यालाही ती जागा राहवून घेते, आणि फिरणारास बसवून घेते, व वैराग्य उत्पन्न करिते. ६९ एखादा मनुष्य जरी विलासी असला, तरी त्यालाही ती जागा पाहतांक्षणींच असें वाटावें कीं, आपलें उत्तम राज्य सोडून या ठिकाणीं एकांतवासांत राहावें. १७० अशा प्रकारानें जें स्थान उत्तम, आणि त्याचप्रमाणें अति शुद्ध, त्या ठिकाणीं ब्रह्मस्वरूप डोळ्याला प्रत्यक्ष दृष्टीस पडतें. ७१ आणखी एक गोष्ट साधकानें पहावी. ती ही कीं, त्या ठिकाणी वस्ती केली असतां मनुष्यांची वर्दळ लागणार नाहीं. ७२ त्या ठिकाणीं अमृतासारखीं मुळासुद्धां गोड व नेहमी फळांनीं युक्त अशीं दाट झाडें असावीं. ७३ तेथें पावलापावलावर पाण्याचे झरे असावे; ते असे कीं, ज्याचें पाणी पावसाळ्यांतही निर्मळ असतें; व ते पुष्कळ असून, उतरण्यास किंवा पाणी काढण्यास सोपे असावे. ७४ त्या ठिकाणीं सूर्याचें ऊनही सौम्य असावें, आणि कदाचित् ऊन स्वच्छ पडलें तर त्यापासून ताप उत्पन्न होऊं नये; तसाच वारा मंद व शीतळ वाहात असावा. ७५ तेथें बहुतकरून गडबड नसावी, व श्वापदाची गर्दी नसावी. परंतु राघू आणि भ्रमर हे गुंजवीत असावेत. ७६ त्या ठिकाणीं बदकें, हंस, दोन चार चक्रवाक पक्षी, तसेंच एखादे वेळेस कोकिळ पक्षी येऊन बसला तरी चालेल. ७७ नेहमीं नव्हत, पण येऊन जाऊन मोर असले, तरी आम्ही त्यांना नको म्हणणार नाहीं. ७८ परंतु हे पांडवा, अवश्यमेव अशा तऱ्हेची एक जागा पहावी आणि त्या ठिकाणीं गुप्त गुहा किंवा शिवालय असावें; ७९ आणि दोहोंतून जें आपणास आवडेल किंवा आपल्या चित्तास पसंत पडेल, त्या ठिकाणीं पुष्कळ वेळ पावेतों एकातवासांत बसावें; १८० म्हणून अशी सर्व सोय पाहून त्या ठिकाणीं मन स्थिर होतें किंवा नाहीं हें पाहावें, आणि स्थिर झाल्यास तेथें आसन घालावें; त्याचा

आपैसे । एकपाडें तैसें । वोजा घालीं ॥ ८३ ॥ परि सांवियाचि उंच होईल । तरि आंग हन डोलेल । नीच तरी पावेल । भूमिदोषु ॥ ८४ ॥ म्हणोनि तैसें न करावें । समभावें धरावें । हें बहु असो होआवें । आसन ऐसें ॥ ८५ ॥

**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः । उपविश्यासने युंजाद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥**

अन्वयः—तत्र आसने उपविश्य, मनः एकाग्रं कृत्वा, यतचित्तेन्द्रियक्रियः ( सन् ) आत्मविशुद्धये योगं युञ्जीत् ॥ १२ ॥

( १९३. आसनावर बसून मन एकाग्र करावें, १८६–१९१ ) मग तेय आपण । एकाग्र अंतःकरण । करूनि सद्गुरुस्मरण । अनुभविजे ॥ ८६ ॥ जेय स्मरतेनि आदरें । सबाह्य सात्त्विकें भरे । जंव काठिण्य विरे । अहंभावाचें ॥ ८७ ॥ विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची कसमस मोडे । मनाची घडी घडे । हृदयामाजीं ॥ ८८ ॥ ऐसें ऐक्य हें सहजें । फांवे तंव राहिजे । मग तेणेंचि बोधें बैसिजे । आसनावरी ॥ ८९ ॥ आतां आंगातें आंग वरी । पवनातें पवनु धरी । ऐसी अनुभवाची उजरी । होंचि लागे ॥ १९० ॥ प्रवृत्ति मांघौति मोहरे । समाधि ऐलौंडी उतरे । आघवें अभ्यासूं सरे । वैसतखेंवो ॥ ९१ ॥ ( १९४, मूळबंधाचें लक्षण, १९२-१९९ ) मुद्रेची प्रौढी ऐशी । तेचि सांगिजेल आतां परियेसी । तरी ऊरु या जंघनासी । जडोनि घालीं ॥ ९२ ॥ चरणतळें देव्हेंडीं । आधारद्रुमाच्या बुडीं । सुघटितें गाढीं । संचरीं पां ॥ ९३ ॥ सव्य तो तळीं ठेविजे । तेणें सिवणी मध्यें पीडिजे[22] । वरी बैसे तो सहजें । वाम चरणु ॥ ९४ ॥ गुद मेढ्रांआंतौतीं । चारी अंगुळें निगुतीं । तेथ सांधे सांधे प्रांतीं । सांडूनियां ॥ ९५ ॥ माजि अंगुळ एक निगे[28] । तेथ टांचेचेनि उत्तरभागें । [30]नेहेटिजे वरि आंगें । पेललेनी ॥ ९६ ॥ उचलिलें कां नेणिजे । तैसें पृष्ठांत उचलिजे । गुल्फद्वय धरिजे । तेणेंचि मानें ॥ ९७ ॥ मग शरीरसंचु पार्था । अशेषही सर्वथा । पांष्णींचा माथा । स्वयंभु होय ॥ ९८ ॥ अर्जुना हें जाण । मूळबंधाचें लक्षण । वज्रासन गौण । नाम यासी ॥ ९९ ॥ ( १९५. जालंधर बंधाचें लक्षण, २००-२०८ ) ऐसी आधारीं मुद्रा पडे । आणि आधींचा मार्गु मोडे । तेथ अपानु आंतुलेकडे । वोहोटों लागे ॥ २०० ॥

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः । संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥१३**

अन्वयः—स्थिरः ( भूत्वा ) कायशिरोग्रीवं अचलं समं धारयन् स्वं नासिकाग्रं संप्रेक्ष्य च दिशः अनवलोकयन् ( योगं कुर्यात् ) ॥ १३ ॥

---

१ व्यवस्थित रीतीनें. २ कदाचित्. ३ सखल. ४ गारठा, पाळथी इत्यादिक. ५ स्मरण केल्यानें. ६ कासाविसी. ७ प्राप्त होणें. ८ प्राणायाम पायूला. ९ उत्कर्ष. १० माघारी. ११ अलीकडे. १२ बसल्याबरोबर. १३ मांडी. १४ पोटरी. १५ एका पायावर दुसरा पाय वाकडा ठेवणें. १६ गुदस्थानाच्या. १७ सुस्थिर. १८ चळकट. १९ शिरकावणें. २० उजवी टांच २१ वृषणापासून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा. २२ दाबावी. २३ डावा. २४ अपानद्वार. २५ शिश्नामधोल. २६ नुसती. २७ दीड दीड बोट. २८ राहते. २९ वरचे भागानें. ३० दाबावें. ३१ पाठीच्या कण्याचा शेवटचा भाग.

प्रकार असा ८१ वर धूतवस्त्राची घडी असून त्याच्या खाली कृष्णाजिन व त्याच्या खालीं साग्र दर्भाचे आसन ८२ ते दर्भ कोमल, सारखे आणि आपोआप एके ठिकाणीं राहतील अशा चांगल्या व्यवस्थेने जोडलेले असावे ८३ परंतु ते आसन कदाचित् उंच झाले तर अंग डोलेल, आणि अगदी सखल झाले तर भूमीचा गारवा, वाळवी वगैरे दोष, इत्यादिकापासून इजा होईल, ८४ म्हणून तसे न करिता ते समभाग घालावे. अशा रीतीनें आसनाची योजना करावी. ८५

श्लोकार्थ —त्या आसनावर बसून, एकाग्र मन करून आणि चित्त व इंद्रियें यांना जिंकून आपल्या अंतःकरणाची शुद्धि करण्याकरितां योगाभ्यास करावा ॥ १२ ॥

मग त्या ठिकाणीं मनाची एकाग्रता करून सद्गुरूचे स्मरण करून आत्मसुखाचा अनुभव घ्यावा. ८६ त्या ठिकाणीं, अहंभाव नाहींसा होऊन अष्टसात्त्विकभाव अंतर्बाह्य उत्पन्न होत तोपर्यंत सद्गुरूचे आदराने स्मरण करावें. ८७ जेथे विषयाची आठवण देखील राहणार नाहीं, इंद्रियांची विषयावरील इच्छा नाहींशी होईल, आणि मनाची हाव मोडून हृदयात घडी बनेल, ८८ अशा रीतीनें सहज ऐक्य होईपर्यंत त्या ठिकाणीं रहावे, आणि मग असा मनाला बोध झाल्यावर आसनावर बसावे. ८९ नंतर अंगाने अंग सावरावे व प्राणापानवायूने प्राणापानाला आवरावे, अशा रीतीने अनुभव वाढूं लागतो. १९० त्या ठिकाणीं प्रवृत्ति मागे फिरून समाधि सहज साध्य होतो. मग आसनावर बसल्यावरोबर सर्व अभ्यास आपोआप पूर्ण होतात ९१ मुद्रेची जी थोरवी आहे, तिचे आता वर्णन करितों, ते ऐक. पोटऱ्या मांड्यास लावून आसन घालावें. ९२ एका पायावर दुसरा पाय वाकडा ठेवून गुदस्थानाच्या बुडाशीं टाच स्थिर आणि बळकट लावावी. ९३ उजवा पाय खालीं ठेवून, त्याने, वृषणापासून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा मध्यें दाबावी. नंतर डावा पाय उजव्या पायावर सहज ठेवावा. ९४ अपानद्वार आणि शिश्न यामध्ये जी चार बोट जागा आहे, तीपैकीं मागपुढे दीड दीड बोट सोडून, ९५ मध्ये जी एक बोट जागा राहते, ती, शरीर तोलून धरून टाचेच्या वरच्या भागाने दाबावी. ९६ शरीर उचललेले आहे असे समजूं न देता पाठीच्या कण्याचा शेवटला भाग उचलावा आणि त्याचप्रमाणे दोन्ही घोटे सरळ धरावे. ९७ मग पार्था, हे सर्व शरीर घोट्याच्या माथ्यावर आधाराशिवाय स्वतःसिद्ध राहते. ९८ अर्जुना, हे मूळबंध नामक आसनाचें लक्षण होय. यालाच वज्रासन असे एक गौण नाव आहे ९९ अशा रीतीने मूळबंधाचे आसन केलें, म्हणजे खालचा रस्ता बंद होतो, आणि मग अपानवायु आतल्या आंत वर जाऊं लागतो. २००

श्लोकार्थ—साधकानें स्वतः स्थिर होऊन शरीर, डोकें व मान हीं नीट स्थिर धरावीं, व आपल्या नाकाच्या शेंड्याकडे दृष्टि ठेवून इकडे तिकडे न पाहतां योगाभ्यास करावा ॥ १३ ॥

३२ घोटे ३३ समग्र ३४ पोटरीचा. ३५ स्वतःसिद्ध ३६ अपानवायु ऊर्ध्वगतीस नेणें. ३७ खालचा. ३८ संकुचित होणें.

आपैसे । एकपाडें तैसें । वोजा घालीं ॥ ८३ ॥ परि सांवियाचि उंच होईल । तरि आंग हन डोलेल । नीच तरी पावेल । भूमिदोषु ॥ ८४ ॥ म्हणोनि तैसें न करावें । समभावें धरावें । हें बहु असो होआवें । आसन ऐसें ॥ ८५ ॥

**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः । उपविश्यासने युंजाद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥**

अन्वयः—तत्र आसने उपविश्य, मनः एकाग्रं कृत्वा, यतचित्तेन्द्रियक्रियः ( सन् ) आत्मविशुद्धये योगं युञ्जीत् ॥ १२ ॥

( १९३. आसनावर बसून मन एकाग्र करावें, १८६–१९१ ) मग तेथ आपण । एकाग्र अंतःकरण । करूनि सद्गुरुस्मरण । अनुभविजे ॥ ८६ ॥ जेथ स्मैरतेनि आदरें । सबाह्य सात्त्विकें भरे । जंव काठिण्य विरे । अहंभावाचें ॥ ८७ ॥ विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची कसमस मोडे । मनाची घडी घडे । हृदयामाजीं ॥ ८८ ॥ ऐसें ऐक्य हें सहजें । फाँवे तंव राहिजे । मग तेणेंचि बोधें बैसिजे । आसनावरी ॥ ८९ ॥ आतां आंगातें आंग वरी । पवनातें पवनु धरी । ऐसी अनुभवाची उजरी । होंचि लागे ॥ १९० ॥ प्रवृत्ति मांघौति मोहरे । समाधि ऐलौंडी उतरे । आघवें अभ्यासूं सरे । बैसतखेंवो ॥ ९१ ॥ ( १९४. मूळबंधाचें लक्षण, १९२-१९९ ) मुद्रेची मौढी ऐशी । तेचि सांगिजेल आतां परियेसी । तरी ऊरु या जंघनासी । जडोनि घालीं ॥ ९२ ॥ चरणतळें देव्हेंडीं । आधारद्रुमाच्या बुडीं । सुंघटितें गाढीं । संचेरीं पां ॥ ९३ ॥ सव्य तो तळीं ठेविजे । तेणें सिवणी मध्यें पीडिजे[22] । वरी बैसे तो सहजें । वाम चरणु ॥ ९४ ॥ गुद मेंढ्रांआंतौतीं । चारी अंगुळें निगुतीं । तेथ सांधे सांधे प्रांतीं । सांडूनियां ॥ ९५ ॥ माजि अंगुळ एक निगे[28] । तेथ टांचेचेनि उत्तरभागें । [30]नेहेटिजे वरि आंगें । पेलूनी ॥ ९६ ॥ उचलिलें कां नेणिजे । तैसें पृष्ठांत उचलिजे । गुल्फद्वय धरिजे । तेणेंचि मानें ॥ ९७ ॥ मग शरीरसंचु पार्था । अशेषही सर्वथा । पार्ष्णींचा माथा । स्वयंभु होय ॥ ९८ ॥ अर्जुना हें जाण । मूळबंधाचें लक्षण । वज्रासन गौण । नाम यासी ॥ ९९ ॥ ( १९५. जालंधर बंधाचें लक्षण, २००-२०८ ) ऐसी आधारीं मुद्रा पडे । आणि आधींचा मार्गु मोडे । तेथ अपानु आंतुलेकडे । वोहोटों लागे ॥ २०० ॥

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः । संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३**

अन्वयः—स्थिरः ( भूत्वा ) कायशिरोग्रीवं अचलं समं धारयन् स्वं नासिकाग्रं संप्रेक्ष्य च दिशः अनवलोकयन् ( योगं कुर्यात् ) ॥ १३ ॥

---

१ व्यवस्थित रीतीनें. २ कदाचित्. ३ सखल. ४ गारठा, घाळथी इत्यादिक. ५ स्मरण केल्यानें. ६ कासाविसी. ७ प्राप्त होणें. ८ प्राणायाम वायूला. ९ उत्कर्ष. १० माघारी. ११ अलीकडे. १२ बसल्याबरोबर. १३ मांडी. १४ पोटरी. १५ एका पायावर दुसरा पाय वाकडा ठेवणें. १६ गुदस्थानाच्या. १७ सुस्थिर. १८ बळकट. १९ शिरकावणें. २० उजवी टांच २१ वृषणावरून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा. २२ दाबावी. २३ डावा. २४ अपानद्वार. २५ शिश्नामधील. २६ नुसती. २७ दीड-दीड बोट. २८ राहते. २९ वरचे भागानें. ३० दाबावें. ३१ पाठीच्या कण्याचा शेवटचा भाग.

प्रकार असा: ८१ वर धूतवस्त्राची घडी असून त्याच्या खाली कृष्णाजिन व त्याच्या खालीं साग्र दर्भाचें आसन. ८२ ते दर्भ कोमल, सारखे आणि आपोआप एके ठिकाणीं राहतील अशा चागल्या व्यवस्थेनें जोडलेले असावे. ८३ परंतु ते आसन कदाचित् उंच झालें तर अंग डोलेल, आणि अगदी सखल झालें तर भूमीचा गारवा, वाळवी वगैरे दोष, इत्यादिकांपासून इजा होईल, ८४ म्हणून तसें न करितां तें समभाग घालावें. अशा रीतीनें आसनाची योजना करावी. ८५

श्लोकार्थः—त्या आसनावर बसून, एकाग्र मन करून आणि चित्त व इंद्रियें यांना जिंकून आपल्या अंतःकरणाची शुद्धि करण्याकरिता योगाभ्यास करावा. ॥ १२ ॥

मग त्या ठिकाणीं मनाची एकाग्रता करून सद्गुरूचें स्मरण करून आत्मसुखाचा अनुभव घ्यावा. ८६ त्या ठिकाणीं, अहंभाव नाहींसा होऊन अष्टसात्त्विकभाव अंतर्बाह्य उत्पन्न होत तोपर्यंत सद्गुरूचें आदरानें स्मरण करावें. ८७ जेथें विषयाची आठवण देखील राहणार नाहीं, इंद्रियांची विषयावरील इच्छा नाहींशी होईल, आणि मनाची हाव मोडून हृदयात घडी बनेल, ८८ अशा रीतीनें सहज ऐक्य होईपर्यंत त्या ठिकाणीं रहावें; आणि मग असा मनाला बोध झाल्यावर आसनावर बसावें. ८९ नंतर अंगानें अंग सावरावें व प्राणापानवायूनें प्राणापानाला आवरावें; अशा रीतीनें अनुभव वाढूं लागतो. १९० त्या ठिकाणीं प्रवृत्ति मागे फिरून समाधि सहज साध्य होतो. मग आसनावर बसल्याबरोबर सर्व अभ्यास आपोआप पूर्ण होतात. ९१ मुद्रेची जी थोरवी आहे, तिचें आता वर्णन करितों, तें ऐक. पोटऱ्या मांड्यांस लावून आसन घालावें. ९२ एका पायावर दुसरा पाय वाकडा ठेवून गुदस्थानाच्या बुडाशी टाच स्थिर आणि बळकट लावावी. ९३ उजवा पाय खालीं ठेवून, त्याने, वृषणापासून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा मध्यें दाबावी. नंतर डावा पाय उजव्या पायावर सहज ठेवावा. ९४ अपानद्वार आणि शिश्न यामध्यें जी चार बोटें जागा आहे, तींपैकीं मागेपुढे दीड दीड बोट सोडून, ९५ मध्यें जी एक बोट जागा राहते, ती, शरीर तोलून धरून टाचेच्या वरच्या भागाने दाबावी. ९६ शरीर उचललेले आहे असें समजूं न देता पाठीच्या कण्याचा शेवटला भाग उचलावा आणि त्याचप्रमाणे दोन्ही घोटे सरळ धरावे. ९७ मग पार्था, हें सर्व शरीर घोट्याच्या माथ्यावर आधाराशिवाय स्वत.सिद्ध राहते. ९८ अर्जुना, हे मूळबंध नामक आसनाचें लक्षण होय. यालाच वज्रासन असें एक गौण नाव आहे. ९९ अशा रीतीनें मूळबंधाचें आसन केलें, म्हणजे खालचा रस्ता बंद होतो; आणि मग अपानवायु आतल्या आत वर जाऊं लागतो. २००

श्लोकार्थ—साधकानें स्वतः स्थिर होऊन शरीर, डोकें व मान हीं नीट स्थिर धरावीं, व आपल्या नाकाच्या शेंड्याकडे दृष्टि ठेवून इकडे तिकडे न पाहता योगाभ्यास करावा ॥ १३ ॥

---

३२ घोटे. ३३ समम. ३४ पोटेचा. ३५ स्वत.सिद्ध. ३६ अपानवायु ऊर्ध्वगतीस नेणें. ३७ खालचा. ३८ संकुचित होणें.

तंव करसंपुट आपैसें । वाम चरणीं बैसे । तंव बाहुमूळीं दिसे । थोरीव आली ॥ १ ॥ माजि उभारलेनि दंडें । शिरकमळ होय गाढें । नेत्रद्वारींचीं कवाडें । लागूं पाहती ॥ २ ॥ वराचिलें पातीं न ढळती । तळींचीं तळीं पुंजोळती । तेथ अर्धोन्मीलित स्थिती । उपजे तया ॥ ३ ॥ दिठी राहोनि आंतुलेकडे । बाहेर पाऊल घाली कोडें । ते ठायीं ठावो पडे । नासाग्रपीठीं ॥ ४ ॥ ऐसें आंतुच्या आंतुचि रचे । बाहेरी मागुतें न वचे । म्हणोनि राहणें अंधिये दिठीचें । तेथेंचि होय ॥ ५ ॥ आतां दिशांची भेटी घ्यावी । कां रूपाची वास पहावी । हे चाड सरे आघवी । आपैसया ॥ ६ ॥ मग कंठनाळ आटे । हनुवटी हेंडौती दाटे । ते गाढी होऊनि नेहटे[12] । वक्षस्थळीं ॥ ७ ॥ माजि घंटिका लोपे । वरी बंधु जो आरोपे । तो जाळंधरु म्हणिपे । पंडुकुमरा ॥ ८ ॥ (१९६. उडियान बंधाचें लक्षण, २०९–२१०) नाभी वरी पोखे[16] । उदर हें थोके[17] । अंतरीं फांके । हृदयकोशु ॥ ९ ॥ स्वाधिष्ठाना वरिचिले कांठीं । नाभिस्थान तळवटीं । बंधु पडे किरीटी । वोढियाणा तो ॥ २१० ॥ ऐसी शरीराबाहेरली कडे । अभ्यासाची पौखर पडे । अवतरणः—तंव आंतु त्रौय मोडे । मनोधर्माची ॥ ११ ॥

**प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः । मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः १४**

*अन्वयः—प्रशांतात्मा, विगतभीः, ब्रह्मचारिव्रते स्थितः, मनः संयम्य, मच्चितः मत्परः* (च) युक्तः आसीत ॥ १४ ॥

(१९७. मूळबंधाच्या दाबानें कुंडलिनी जागृत होते व योग्याच्या शरीरांतील पृथ्वी व आप हीं दोन भूतें खाऊन सुषुम्ना नाडीच्या सांनिध्यांत राहाते, २११-२४०) कल्पना निमे[23] । प्रवृत्ती शमे । आंग मन विरमे[26] । सावियाचि ॥ १२ ॥ क्षुधा काय जाहाली । निद्रा केउती गेली । हे आठवणही हारपली । न दिसे वेगा[28] ॥ १३ ॥ जो मूळबंधें कोंडला । अपानु माघौता मुरडला । तो सवेंचि वरी सांकडैला । धरी फुगूं ॥ १४ ॥ क्षोभलेपणें माजे । उवाइलौ ठायीं गाजे । मणिपूरेंसी झुंजे । राहोनियां ॥ १५ ॥ मग थांवलिये वाहटुळी । सैंघ घेऊनि धेरे डहुळी । बाळपणींची कुहीटुळी । बाहेर घाली ॥ १६ ॥ भीतरीं वैळी न धरे । कोठ्यामाजीं संचरे । कफपित्ताचे थारे । उरों नेदी ॥ १७ ॥ धातूंचे समुद्र उलंडी । मेदाचे पर्वत फोडी । आंतील मज्जा काढी । अस्थिगतें ॥ १८ ॥ नाडीतें सोडवी । गात्रांतें विघडवी । साधकातें भेडसावी । परि बिहावें ना ॥ १९ ॥ व्याधीतें दावी । सवेंचि हारवी । आप पृथ्वी कालवी । एकवाट ॥ २२० ॥ तंव येरीकडे

१ द्रोणाच्या आकाराप्रमाणें जोडलेले हात. २ उंचपणा. ३ गदळ्यासारखें. ४ पापण्या. ५ पसरतात. ६ अर्धी मिटलेली व अर्धी उघडलेली ७ नाकाच्या शेंड्यावर. ८ जात नाहीं. ९ अर्धी. १० शेंड्यावर. ११ टाळ्याखालच्या खळगीस लागते. १२ दाबते. १३ कंठमणि. १४ मुद्रा. १५ कंठस्थानातील बंध. १६ फुगते. १७ सपाट होते. १८ कमळ. १९ गुदद्वार. २० सुषुम्नामार्गानें येथीने वरचे भागानें उजवीकडे वर वायु जातो तो बंध. २१ पसरलेली दशा. २२ वळ. २३ खुंटे.

नंतर डाव्या पायावर सहज दोन्ही हात द्रोणाकार करून ठेवावे, म्हणजे अर्थात् बाहूटे उंच होतात. १ नंतर दंड उभे राहिल्यानें शिरकमल हें आंत गढतें, आणि त्यामुळें डोळ्यांच्या पापण्या मिटूं लागतात; २ वरची पापणी ढळत नाहीं व खालची पापणी खालींच स्थिर राहते. असें झालें म्हणजे डोळ्यांची अर्धी उघडलेली व अर्धी मिटलेली अशी दृष्टि होते. ३ अशा रीतीनें दृष्टि आंतल्या आंत राहून कौतुकानें फार बाहेर आलीच तर नाकाच्या शेंड्यापर्यंत येते. ४ अशी आंतल्या आंत दृष्टि कायम होऊन पुनः बाहेर येत नाहीं, म्हणून दृष्टीचें नाकाच्या शेंड्यावर राहणें कायम होतें. ५ यामुळें, इतर दिशांकडे पाहावें किंवा स्वरूप दृष्टीस पडेल म्हणून वाट पहावी, ही इच्छा आपोआप नाहींशी होते. ६ मग गळ्याची नळी आंत झांकली जाते, आणि हनुवटी गळ्याखालच्या खळगीला लागते वे उरावर दृढ होऊन दाबून राहते. ७ हे पंडुकुमरा, नंतर कंठमणि दिसेनासा होतो. अशा रीतीनें जी मुद्रा बनते, तिला जालंधरबंध असें म्हणतात. ८ बेंबी वर फुगते, पोट सपाट होतें, व हृदयकोश अंतर्यामीं पसरतो. ९ अर्जुना, गुदद्वारावरच्या भागावर आणि बेंबीच्या खालच्या भागामध्यें जी मुद्रा बनते, तिला वोढियाणाबंध असें म्हणतात. २१० अशा रीतीनें शरिराच्या बाहेरील भागानें अभ्यासक्रम सुरू झाला,

श्लोकार्थः—योग्यानें प्रसन्न अंतःकरणानें निर्भय होऊन ब्रह्मचर्यव्रत आचरावें, व मनाचें संयमन करून, व माझें चिंतन करीत मत्परायण होऊन रहावें. ॥ १४ ॥

म्हणजे आत मनाच्या धर्माचें बळ नाहींसें होतें. ११ (ते मनोधर्म कोणते ते ऐक). कल्पना खुंटते, मनाची हांव कमी होते; आणि मनोविकार आपोआप बंद पडतात; १२ भूक काय झाली, व झोंप कोणीकडे गेली ह्याची आठवण नाहींशी होऊन त्यांचा पत्ता देखील लागत नाहीं. १३ मूळबंधानें कोंडलेला अपानवायु माघारी फिरला, म्हणजे सहज वर अडकून फुगा धरतो. १४ तो क्षोभून बलवत्तर होतो, अडकलेल्या जागीं गुरगुरतो, आणि राहून राहून लिंगचक्राशी धडका मारितो. १५ मग अशा रीतीनें माजलेली वावटळ चोहोंकडे पोटांत फिरून ढवळाढवळ करिते, आणि बालपणापासून सांचलेली कुजकी घाण बाहेर काढण्याचा प्रयत्न करिते. १६ तो वायु पोटांत तळाशीं न मुरडतां कोठ्यांत शिरतो, आणि कफपित्तांचा नाश करितो, १७ सप्त धातूंचीं स्थानें ओलांडतो, मेदाचे डोंगर फोडतो, आणि हाडातील रस बाहेर काढतो. १८ नाड्या सोडवतो, अवयवांना शिथिल करतो, आणि योगसाधन करणाराला भीति घालतो; परंतु त्यानें भिऊं नये. १९ तो व्याधि उत्पन्न करतो, आणि लागलीच नाहींशी करतो, व कफ वगैरे ओलसर पदार्थ आणि मांस वगैरे जड पदार्थ हे एकत्र करतो; २२० अर्जुना, दुसरीकडे

२४ कमी होते. २५ आपोआप. २६ बंद होते. २७ सहज. २८ लवकर. २९ संकुचित झाला. ३० तीव्रतेनें. ३१ प्रशस्त स्थलीं. ३२ लिंगचक्र. ३३ जागी केलेली. ३४ सर्व. ३५ पोट. ३६ कुजकी घाण. ३७ मुरड. ३८ ठिकाण. ३९ पालथे करी. ४० हाडातील. ४१ अवयव. ४२ कफ वगैरे ओलां भाग. ४३ शरीर.

धनुर्धरा । आसनाचा उबारा । शक्ति करी उेंजगारा । कुंडलिनीतें ॥ २१ ॥ नागिणीचें पिलें । कुंकुमें नाहुलें । वेंळण घेऊनि आलें । सेजे जैसें ॥ २२ ॥ तैसी ते कुंडलिनी । मोटकी[3] औट वळणी । अधोमुख सर्पिणी । निदेली असे ॥ २३ ॥ विद्युल्लतेची विडी । वन्हिज्वाळांची घडी । पंधरेयाची चोखडी । घोंटीव जैशी ॥ २४ ॥ तैसी सुबंध आटली । पुटीं होती दाटली । ते वज्रासनें चिमुटली । सावधु होय ॥ २५ ॥ तेथ नक्षत्र जैसें उलंडलें । कीं सूर्याचें आसन मोडलें । तेजाचें बीज विरूढलें । अंकुरेंशीं ॥२६॥ तैसी वेढियातें सोडिती । कवतिकें आंग मोडिती । कंदावरी शेंकी । उठिली दिसे ॥ २७ ॥ सहजें बहुतां दिवसांची भूक । वरि चेववली तें होय मिख । मग आवेशें पसरी मुख । ऊर्ध्व उजू ॥ २८ ॥ तेथ हृदयकोशीं तळवटीं । जो पवनु भरे किरीटी । तया सगळेयाचि मिठी । देऊनि घाली ॥ २९ ॥ मुखींच्या ज्वाळीं । तळीं वरी कवळी । मांसाची वेंडवाळी । आरोगूं[14] लागे ॥ १३० ॥ जे जे ठाय समांस । तेथ औहाच जोडे घोंउस । पाठी एकदोनी घांस । हियाही भरी ॥ ३१ ॥ मग तळवे तळहात शोधी । ऊर्ध्वींचे खेंडें भेदी । झाडा घे संधी । प्रत्यंगाचा ॥ ३२ ॥ अधोभाग तरी न संडी । परि नखींचेंही सत्व काढी । त्वचा धुवूनि जडी । पंजरेंशीं ॥ ३३ ॥ अस्थींचे नळे निरपे[20] । शिरांचे हीर[21] वोरपे । तंव बाहेरी विरूढी[22] करपे । रोमबीजाची[23] ॥ ३४ ॥ मग सप्त धातूंच्या[24] सागरीं । तहानेली घोंट भरी । आणि सवेंचि उन्हाळा करी । खडखडीत ॥ ३५ ॥ नासापुटौनि[25] वारा । जो जातसे अंगुळें बारा । तो गचियें[26] धरूनि माघारा । आंतु घाली ॥ ३६ ॥ तेथ अधवरौतें आकुंचे । ऊर्ध्वतळौतें[28] खाचे । तया खेवामाजि चक्राचे । पेंदर उरती ॥ ३७ ॥ येऱ्हवीं तरी दोन्ही[31] तेव्हांचि मिळती । परी कुंडलिनी नावेक दुश्चितें होती । ते तयातें म्हणे परौती । तुम्हीचि काय एथें ॥ ३८ ॥ आयकें पार्थिवें[33] धातु आघवी । आरोगितां कांहीं नुरवी । आणि आपातें तंव ठेवी । पुसोनियां ॥ ३९ ॥ ऐसी दोनी भूतें खाये । ते वेळीं संपूर्ण धेंये । मग सौम्य होऊनि राहे । सुषुम्नेपाशीं ॥ २४० ॥ ( १९८. मनबुद्धिसह कुंडलिनी सुषुम्ना नाडींत प्रवेश करते, मग तिला चंद्रामृताचें प्राशन होतें, २४१–२५० ) तेथ तृप्तीचेनि संतोपें । गरळ जें वेमी मुखें । तेणें तियेचेनि पीयूखें । प्राणु जिये[40] ॥ ४१ ॥ तो अग्नि आंतूनि निघे । परि सबाह्य निवबूंचि लागे । ते वेळीं

१ जागी. २ वेटाळें. ३ लहान. ४ सोन्याची. ५ नाभिस्कंधात. ६ पेंचात सापडली. ७ मुटून पडलें. ८ उगवलें. ९ नाभीवर. १० कुंडलिनी. ११ कमळ. १२ खालीं. १३ घास. १४ खाऊ लागे. १५ सहज. १६ ग्रास. १७ भाग. १८ प्रत्येक अवयवाचा. १९ हाडाच्या सापळ्यास २० आतून साफ करते. २१ गाभे. २२ वाढ; वृद्धि. २३ केसाच्या मुळाची. २४ रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र या शरीरातील सात धातु. २५ नाकपुड्यातून. २६ गच प्राणास धरून.

काय प्रकार होतो म्हणशील, तर आसनाच्या उष्णतेनें कुंडलिनी नांवाची शक्ति जागी होते. २१ नागिणीचें पिलें यांजला कुंकवानें नाहावयास घालून तें जसें वेटोळें करून निजतें, २२ त्याप्रमाणें ती कुंडलिनी लहानसे साडेतीन वेढे घालून खालीं तोंड करून सर्पाप्रमाणें निजलेली असते. २३ ती विजेच्या कंकणाप्रमाणें, किंवा अग्निज्वालेच्या घडीप्रमाणें अथवा घोटून चकचकीत केलेल्या सोन्याच्या वेढ्याप्रमाणें, २४ नाभिस्कंधांत जी दाटून बसलेली असते, ती मूळबंधाच्या चिमट्यानें जागी होते. २५ तेव्हां, नक्षत्र तुटून पडतेवेळीं जसें चकाकतें, किंवा सूर्याचें आसन ढळावें अथवा तेजाचें बीं पेरून त्याला जसा अंकुर यावा, २६ त्याप्रमाणें ती कुंडलिनी आपले वेढे सोडून कौतुकानें आळस देऊन नाभीवर उभी राहिलेली दिसते. २७ ती सहजच फार दिवसांची भुकेलेली; त्यांत तिला जागें केल्याचें निमित्त झाल्यामुळें मग आवेशानें तोंड उघडून ती वर नीट उभी राहते. २८ हे किरीटी, तेव्हां हृदयकमलाच्या खालीं जो वारा भरलेला असतो, त्या सगळ्याला ती कवटाळून मिठी घालते; २९ आणि मुखांतील ज्वालांनीं खालवरचे मांसादिकांचे घांस करून खाऊं लागते. २३० ज्या ज्या ठिकाणीं मांस असेल, त्याचा सहज घांस घेते, आणि मागाहून त्या राहिलेल्या भागाचेही घांस घेते. ३१ मग पायांचे तळ व हाताचे तळ यांचें शोधन करून वरील अंगाचा भेद करिते, आणि दरएक अंगाचा व सांध्याचा झाडा घेते. ३२ आपली मूळ जागा न सोडतां नखांतीलही सत्त्व काढते, व त्वचा धुऊन हाडांच्या व शिराच्या सांपळ्यास मिळविते. ३३ अस्थींच्या नळ्यांतील रस काढून शिरांचे गाभे ओरपून टाकिते. त्या योगानें बाहेरील केसांच्या मुळ्यांची वाढ करपून जाते. ३४ नंतर, सप्तधातूंच्या सागरांत आपली तहान भागविते, आणि त्याबरोबर जिकडे तिकडे शरीर खडखडीत कोरडें करून टाकिते. ३५ नाकपुड्यांतून जो बारा बोटें वाहणारा वारा, त्या प्राणवायूस गच्च धरून आंत ओढते. ३६ त्या वेळेस प्राण व अपान हे दोन वायु आकुंचित होतात, व प्राण अपानास दाबून धरतो, आणि त्या दोघांच्या आलिंगनामध्यें चक्राचे सांगाडे उरतात. ३७ प्राण व अपान वायु हे दोन्ही त्याच वेळेस एके ठिकाणीं मिळाले असते; परंतु ती कुंडलिनी क्षणभर घाबरी होऊन "तुम्ही माघारे जा, तुमचें काय काम ?" असें त्यांना म्हणते. ३८ अर्जुना, ऐक. शरिरांतील सर्व पृथ्वीचा भाग खाऊन अकून कांहीं शिल्लक ठेवीत नाहीं, व तसाच उदकाचा भाग सर्व चाटूनपुसून टाकते. ३९ अशा रीतीनें दोन्ही भूतांचा भाग खाऊन तृप्त झाल्यावर मग सौम्य होऊन स्वस्थपणें सुषुम्ना नाडीपाशीं राहते. २४० त्या ठिकाणीं तृप्तीच्या भरांत ती मुखांतून जी गरळ ओकते, त्या गरळरूपी अमृताच्या योगानें प्राण

२७ खालचें वर ओढते. २८ वरचें खालीं खेचतें. २९ आलिंगनामध्यें. ३० सांगाडा. ३१ प्राण व अपान. ३२ घाबरी होते. ३३ पृथ्वीसंबंधीं. ३४ भक्षिता. ३५ पृथ्वी, अप्. ३६ तृप्त होते. ३७ इडा व पिंगळा यांचेमधील नाडी. ३८ ओके. ३९ अमृतानें. ४० वाचे. ४१ विषरूप अग्नि.

केसु[1] वांधिती अंगें । सांडिली पुढती[2] ॥ ४२ ॥ मार्ग मोडिती नाडीचे । नवविध[3]-पण वायूचें । जाय म्हणऊनि शरीराचे । धर्मु नाहीं ॥४३॥ ईडा[4] पिंगेला[5] एकवटती । गांठी तिन्ही[6] सुटती । साही पदर फुटती । चक्रांचे हे ॥ ४४ ॥ मग शशी आणि भानु । ऐसा कल्पिजे जो अनुमानु । तो वातीवरी पवनु । गिंवसितां न दिसे ॥४५॥ वुद्धीची फुलिका[7] विरे । परिमळु घ्राणीं उरे । तोही शक्तीसवें[8] संचरे । मध्यमे[9]-माजी ॥ ४६ ॥ तंव वरिलेकडोनि ढळें[10] । चंद्रामृताचें[11] तळें ; कोनवडोनि[12] मिळे । शक्तिमुखीं[13] ॥ ४७ ॥ तेणें नाळकें[14] रस भरे । तो सर्वांगामाजि संचरे । जेथिंचा तेथ मुरे । प्राणपवनु[15] ॥ ४८ ॥ तावलिये[16] मुसें । मेण निघोनि जाय जैसें । मग कोंदली[17] राहे रसें । वोतलेनि ॥ ४९ ॥ तैसें पिंडाचेनि[18] आकारें । ते कळाचि[19] कां अवतरे । वरि त्वचेचेनि पदरें[20] । पांगुरली असे ॥ २५० ॥ ( १९९. कुंडलिनीला चंद्रामृत प्राशन झाल्यामुळें योग्याला काळही भितो, २५१ ते २५९ ) जैसी आभाळाची बुंथी[21] । करूनि राहे गभस्ती[22] । मग फिटलिया[23] दीप्ती । धरून ये ॥ ५१ ॥ तैसा आहाचवरि[24] कोरडा । त्वचेचा असे पातोडा[25] । तो झडोनि जाय कोंडा । जैसा होय ॥ ५२ ॥ मग कश्मीरीचे[26] स्वयंभ । कां रत्नवीजा निघाले कोंभ[27] । अवयवकांतीची भांब । तैसी दिसे ॥ ५३ ॥ नातरी संध्यारागीचे रंग । काढूनि वाळिलें तें आंग । कीं अंतर्ज्योतीचें लिंग । निर्वाळिलें[30] ॥ ५४ ॥ कुंकुमाचें भरींव । सिद्धरसाचें वोतींव । मज पाहतां सावेव । शांतिचि ते ॥ ५५ ॥ तें आनंदचित्रींचे लेपें[33] । नातरी महासुखाचें रूप । कीं संतोषतरूचें रोप । थांवलें जैसें ॥ ५६ ॥ तो कनकचंपकाचा[36] कळा । कीं अमृताचा पुतळा । नाना सार्सिनला मळा । कोंवळिकेचा ॥ ५७ ॥ हो कां जे शारदियेचेनि वोलें । चंद्रबिंब पाल्हेलें । कां तेजचि मूर्त वैसलें । आसनावरी ॥ ५८ ॥ तैसें शरीर होये । जे वेळीं कुंडलिनी चंद्रें पिये । मग देहाकृति विहे[42] । कृतांतु[43] गा ॥ ५९ ॥ ( २००. योग्याच्या शरीराची कांति उत्तम होते, २६०—२६८ ) वार्धक्य तरी वहुडे । तारुण्याची गांठी विघडे । लोपली उघडे । वाळदशा ॥ २६० ॥ वयसा तरी येतुलेवरी । येऱ्हवीं वाळाचा वळार्थु करी । धैर्याची थोरी । निरुपमु ॥ ६१ ॥ कनकद्रुमाच्या पालवीं । रत्नकळिका नित्य नवी । नखें तैसी वरवीं । नवीं निघती ॥ ६२ ॥ दांतही आन होती । परि अपाडें सानेजेंती । जैसी दुवाहीं

१ सामर्थ्य. २ पूर्वी. ३ अपान, समान, उदान, व्यान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय. ४ डाव्या नाकपुडींतलि नाडी. ५ उजव्या नाकपुडींतील नाडी. ६ आधारचक्र, नाभिचक्र, हृदयचक्र. ७ टिकली; चमक. ८ कुंडलिनी. ९ सुषुम्ना. १० हलूच. ११ सत्रावीचें. १२ एका अंगावर कलून. १३ कुंडलिनीचे मुखीं. १४ त्या वाजूचे नळीनें. १५ प्राणवायु. १६ तापलेल्या. १७ गच्च भरलेली. १८ शरिराच्या. १९ कांति. २० पडद्यानें. २१ बुरखा. २२ सूर्य. २३ नाहींसें झाल्यावर. २४ उगाच. २५ पापुद्रा. २६ केशर. २७ झांक.

रक्षण होतात. ४१ तो गरळरूप अग्नि बाहेर निघून सर्व अंगांतील दाह शमवितो; त्यामुळें अंगांतील पूर्वी गेलेलें सामर्थ्य फिरून येऊं लागतें. ४२ नाडीचें वाहणें बंद होतें, व नऊ वायूंचे व्यापार बंद होतात, म्हणून शरिराचे धर्म राहत नाहींत. ४३ इडा व पिंगळा ह्या एक होतात, तिन्ही गांठी सुटतात आणि साही चक्रांचे संबंध नाहींतसे होतात. ४४ मग, चंद्र आणि सूर्य अशीं ज्या वायूला नांवें आहेत, तो दिव्याच्या उजेडानें पाहूं गेलें असतांही दिसत नाहीं. ४५ बुद्धीची ज्ञानकळा जागचे जागीं नाहींशी होते, आणि नाकामध्यें उरलेला सुगंधही कुंडलिनीबरोबर सुषुम्नेंत जातो. ४६ त्या वेळीं, भ्रुकुटीचक्रामध्यें जें चंद्रामृताचें तळें आहे, त्याला हळूच धक्का बसून तें वाकडें होतें, व त्यांतील अमृत कुंडलिनीच्या मुखांत पडूं लागतें. ४७ त्यामुळें तिच्यांत रस भरून तो सर्वांगांत पसरतो आणि तो प्राणवायूनें जेथच्या तेथेंच मुरतो. ४८ तापलेल्या मुशींतील मेण नाहींसें होऊन ती ज्याप्रमाणें ओतलेल्या रसानें गच्च भरून राहते, ( मुशीचा आकार रसाला येतो, ) ४९ त्याचप्रमाणें, तें शरीर इतकें तेजस्वी दिसतें कीं, जणूं काय मूर्तिमंत तेजच त्या ठिकाणीं अवतरलें आहे ! २५० सूर्य अभ्राच्या बुरख्यांत दडून राहिलेला असतो; परंतु तेंच आभाळ नाहींसें झाल्यावर तो ज्याप्रमाणें आपले तेजानें वर येतो, ५१ त्याचप्रमाणें, शरीरावर त्वचेचा जो उगाच पापुद्रा असतो, तो कोंड्याप्रमाणें निघून जातो. ५२ मग केशराच्या स्वयमेव रंगासारखी, अथवा रत्नरूप बीजाला निघालेल्या कोंबासारखी त्या अवयवकांतीची झांक दिसते. ५३ नाहींतर संध्याकाळच्या आकाशाच्या रंगाची लाली काढून तें अंग बनविलें असावें काय, अथवा आत्मचैतन्याच्या तेजाचें लिंग केलें असावें, ५४ किंवा तें कुंकुमानें भरलेलें आणि आत्मरसानें ओतलेलें, अथवा ती मूर्तिमंत शांतिच असावी असें मला वाटतें. २५ तें आनंदरूपी चित्राचा रंग, किंवा परब्रह्म सुखाचें रूप, अथवा संतोषरूपी वृक्षाचें रोप आहे असें भासतें. ५६ तो सोनचांफ्याचा कळा किंवा अमृताचा पुतळा, अथवा नाजुकपणाचा भर आलेला असा मळाच. ५७ शरदृतूच्या पौर्णिमेच्या ओलाव्यानें चंद्रबिंब शोभावें, किंवा जणूं काय मूर्तिमंत तेजच आसनावर बसावें. ५८ त्याप्रमाणें, कुंडलिनी चंद्रामृताच्या तळ्यांतील अमृत प्याल्यावर शरीर दिसूं लागतें. मग त्या शरिराला यम देखील भितो ! ५९ वृद्धपणा मागें फिरतो, तारुण्याची ज्वानी मोडते, आणि गेलेली बाल्यावस्था पुनः प्राप्त होते. २६० वयानें पाहिलें तरी एवढासाच दिसतो; परंतु, अतिशय पराक्रम करतो; व त्याचें धैर्य अनुपम असतें. ६१ सुवर्णवृक्षाच्या पालवींतून रत्नाची कळी सतत नवी निघावी, त्याप्रमाणें नवी नखें निघून सतेज दिसतात. ६२ दांतही दुसरे होतात,

२८ संध्याकाळच्या आकाशाचे. २९ आत्मचैतन्य. ३० बनविले. ३१ अमृत. ३२ मूर्तिमंत. ३३ रंग. ३४ ब्रह्माचें. ३५ बळावलेले. ३६ सोनचाफ्याचा. ३७ भरास आला. ३८ नाजुकपणाचा. ३९ शरदृतूचें. ४० पसरलें. ४१ अमृत. ४२ भय पावतो. ४३ यम. ४४ मागें फिरे. ४५ वयानें. ४६ येथवर. ४७ पराक्रम. ४८ सुवर्णवृक्षाच्या. ४९ दुसरे. ५० अपूर्व. ५१ लहान होतात. ५२ दोन बाजूंनीं.

परंतु अतिशय बारीक बनतात; जणूं काय दोही बाजूंला हिऱ्याच्या पंक्तिच मांडल्या आहेत ! ६३ सर्व अंगावरील रोमांचीं अग्रें माणकांच्या कण्याप्रमाणें लहान अशीं सतेज उद्भवतात. ६४ हातपायांचे तळवे कमळाप्रमाणें लाल बनतात, आणि डोळे स्वच्छ होतात, आणखी काय सांगावें ? मोत्यें पक्कदशेला येऊन फुगल्याकारणानें शिंपींत मावत नाहींत, म्हणून शिंपीचा सांधा उकलतो, ६६ त्याप्रमाणें, दृष्टि पापण्यांच्या कवळींत न मावता लांबवर पोहोंचून बाहेर येऊं पाहते. ती दृष्टि पहिलीच खरी, परंतु सगळ्या गगनाला व्यापते. ६७ अर्जुना, ऐक. देहाची सुवर्णासारखी कांति होते. परंतु तो सर्व वायुमय असतो. त्यांत अप् आणि पृथ्वी याचा अंशही नसतो. ६८ मग त्याला समुद्रापलीकडी-लही वस्तु दिसतात, स्वर्गातील मसलती समजतात, व मुंगीच्याही मनांतील भाव ओळखतां येतात. ६९ तो वाऱ्याच्या घोड्यावर स्वार होतो, पाण्यावर चालतांना पाण्याला पाय लागत नाहींत, अशा प्रकारें प्रसंगानुसार त्याला पुष्कळ सिद्धि प्राप्त होतात. २७० पहा कीं, प्राणवायूचा हात धरून व हृदयाकाशाच्या पायऱ्या करून सुषुम्नेच्या जिन्यानें हृदयांत आलेली, ७१ व जीवात्म्याला शोभा देणारी जी कुंडलिनी जगदंबा, ती जगद्बी-जाचा कोंब ( गाभा ) जो जीव त्याच्यावर सावली करते. ७२ जी निराकार ब्रह्माची साकार मूर्ति, जी परमात्म्या शिवाची संबळी, जी ॐकाराची केवळ जन्मभूमिच. ७३ आणखी काय सांगावें ? ती कुंडलिनी बाळी हृदयांत आली म्हणजे अखंड ॐकाराचा ध्वनि होऊं लागतो. ७४ त्या कुंडलिनीच्या जवळ बुद्धि असल्यामुळें तिच्या कानावर किंचित् ॐकाराचा ध्वनि जातो. ७५ घोषाच्या कुंडींत ध्वनि व नादरूपी ॐकाराच्या आकाराचीं रेखलेलीं अशीं रूपें उमटतात. ७६ या गोष्टी कल्पनेनेंच जाणतां येतात, परंतु कल्पना करणारा कोठून आणावा ? ( कारण, त्याचें जीवात्म्याशीं ऐक्य झालेलें असतें ) म्हणून त्या हृदयाकाशात कसली गर्जना होते ती कांहीं समजत नाहीं. ७७ अर्जुना, मी तुला एक गोष्ट सांगण्याची विसरलों. ती कोणती, तर जोंपर्यंत प्राण, अपान वगैरे वायूंचा नाश होत नाहीं, तोंपर्यंत हृदयाकाशाला वाचा असते आणि म्हणूनच शब्द उत्पन्न होतो. ७८ त्या अखंड ॐकाराच्या मेघासारख्या ध्वनीनें हृदयाकाश दुमदुमूं लागतें, तेव्हां ब्रह्मरंध्राची खिडकी सहज उघडते. ७९ पहा कीं, कमळांतील पोकळीप्रमाणें हृदयाकाशांत जी पोकळ जागा असते, तेथें चैतन्य हें अधातरीं वास करितें ( पूर्ण नसतें. ) २८० त्या आत्म्याच्या घरीं कुंडलिनी परमेश्वरी पाहुणी आल्यावर तेजरूपाची मेजवानी दिली, ८१ त्या वेळेस बुद्धिरूप भाजीसह ताट वाढून—कीं ज्यात द्वैताचा भास देखील होऊं नये—अशी मेजवानी दिली. ८२ कुंडलिनी आपली तेजरूप कांति टाकून वायुरूप

३८ अक्षरचित्र. ३९ ॐकार. ४० आकार. ४१ कल्पना करणारें. ४२ गर्जे. ४३ शब्द करी. ४४ खिडकी. ४५ उघडे. ४६ अधातरीं. ४७ गुप्तस्थानीं. ४८ मेजवानी, फराळ. ४९ अर्पण केली. ५० नैवेद्य. ५१ तेज. ५२ वायु.

वैसे पांती[1] । हिरेयांची ॥ ६३ ॥ माणिकुलियांचिया[2] कणिया । सावियाचि[3] अणुप्रमाणिया । तैसिया सर्वांगीं उंथवती[4] अणियो[5] । रोमांचिया ॥६४॥ करचरणतळें । जैशीं का रातोत्पलें[6] । पांखाळींव[7] होती डोळे । काय सांगों ॥ ६५ ॥ निडाराचेनि[8] कोंदाटें । मोतियें नावरती संपुटें[9] । मग शिवणी[10] जैसी उंतटे[11] । शुक्तिपल्लवांची[12] ॥ ६६ ॥ तैसी पांतियांचिये[13] कवळिये न समाये[14] । दिठी जौकळोनि[15] निघों पाहे । आंधिलीचि[16] परी होये । गगना कवळिती ॥ ६७ ॥ आइकें देह होय सोनियाचें । परि लाघव[17] ये वायूचें । जे आप आणि पृथ्वीचें । अंशु नाहीं ॥६८॥ ( २०१. योग्यास सर्व सिद्धि प्राप्त होतात, २६९–२७० ) मग समुद्रापैलीकडील देखे । स्वर्गींचा आलोचु[18] आइके । मनोगत वोळखे । मुंगियेचें ॥ ६९ ॥ पवनाचा वारिकां[19] वेळंवे[20] । चाले तरी उदकीं पाउल न लागे । येणें येणें प्रसंगें । येती बहुता सिद्धि ॥ २७० ॥ ( २०२. कुंडलिनी सुषुम्ना नाडीचे द्वारां योग्याच्या शरीरांतील तीनही भूतें खाऊन टाकते, २७१–२९० ) आइकें प्राणाचा हात धरुनी । गगनाची[21] पाउठी[22] करुनी । मध्यमेचेनि[23] दादराहुनी[24] । हृदया[25] आली ॥ ७१ ॥ ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची[26] शोभा । जया विश्वबीजाचिया[27] कोंभा[28] । साउली केली ॥ ७२ ॥ जे शून्यलिंगाची[29] पिंडी[30] । जे परमात्मया शिवाची करंडी[31] । जे प्रणवाची[32] उघडी । जन्मभूमि ॥ ७३ ॥ हें असो ते कुंडलिनी बाळी[33] । हृदयाआंतु आली । तंव अनुहताची[34] बोली । चावळे[35] ते ॥ ७४ ॥ शक्तीचिया आंगा लागलें । बुद्धीचें चैतन्य होतें जाहलें । तें तेणें आइकिलें । अळुमाळ[36] ॥ ७५ ॥ घोषाच्या[37] कुंडीं । नादचित्रांचीं रूपडीं । प्रणवाचिया मोडी[40] । रेखिलीं ऐसीं ॥ ७६ ॥ हेंचि कल्पावें तरी जाणिजे । परि कल्पितें[41] कैचें आणिजे । तरी नेणों काय गाजे । तिये ठायीं ॥ ७७ ॥ विसरोनि गेलों अर्जुना । जंव नाशु नाहीं पवना । तंव वाचा आथी गगना । म्हणऊनि घुमे[43] ॥७८॥ तया अनाहताचेनि मेघें । आकाश दुमदुमों लागे । तंव ब्रह्मस्थानींचें वेगें[44] । सहज फिटे[45] ॥ ७९ ॥ आइकें कमळगर्भाकारें । जें महदाकाश दुसरें । जेथ चैतन्यें आधारुतुरें । करूनि असिजे ॥२८०॥ तया हृदयाच्या परिवरीं[46] । कुंडलिनिया परमेश्वरी । तेजाची शिदोरी[48] । विनियोगिली[49] ॥ ८१ ॥ बुद्धीचेनि शाकें । हातेंयोनें निकें । द्वैत तेथ न देखे । तैसें केलें ॥८२॥ निजकांती हारविली । मग प्राणुचि केवळ जाहली । ते वेळीं कैसी गमली । म्हणावी पां ॥८३॥

१ पंक्ति. २ माणकांच्या. ३ सहज. ४ उद्भवतात. ५ अग्रें. ६ लाल कमळें. ७ स्वच्छ. ८ फुगीरपणा. ९ शिंपल्याचा जोड. १० सांधा. ११ उकलतो. १२ शिंप. १३ पापण्यांच्या. १४ मावे. १५ व्यापून. १६ पद्मिनीच. १७ कर्णवगारी. १८ नाद; मसलत. १९ घोडा. २० चढे. २१ हृदयाकाश. २२ पायरी. २३ सुषुम्नेचे. २४ जिना. २५ आत्मस्वरूपाजवळ. २६ जीवात्म्याची. २७ ॐकार. २८ जीव. २९ निराकार ब्रह्माची. ३० साकार मूर्ति. ३१ संबळी; संपुट. ३२ ॐकाराची. ३३ कोमल. ३४ अखंड ॐकाराचा ध्वनि. ३५ बोलूं लागे. ३६ किंचित्. ३७ शब्द.

परंतु अतिशय बारीक बनतात, जणू काय दोही बाजूला हिऱ्याच्या पंक्तिच मांडल्या आहेत ! ६३ सर्व अंगावरील रोमाचीं अग्रे माणकाच्या कण्याप्रमाणे लहान अशीं सतेज उद्भवतात. ६४ हातपायाचे तळवे कमळाप्रमाणे लाल बनतात, आणि डोळे स्वच्छ होतात, आणखी काय सांगावे ? मोत्यें पक्वदशेला येऊन फुगल्याकारणाने शिंपींत मावत नाहीत, म्हणून शिंपीचा सांधा उकलतो, ६६ त्याप्रमाणे, दृष्टि पापण्याच्या कवळींत न मावता लांबवर पोहोंचून बाहेर येऊ पाहते. ती दृष्टि पहिलीच खरी, परंतु सगळ्या गगनाला व्यापते. ६७ अर्जुना, ऐक. देहाची सुवर्णासारखी कांति होते. परंतु तो सर्व वायुमय असतो. त्यांत अप् आणि पृथ्वी यांचा अंशही नसतो. ६८ मग त्याला समुद्रापलीकडी-लही वस्तु दिसतात, स्वर्गातील मसलती समजतात, व मुंगीच्याही मनातील भाव ओळखता येतात. ६९ तो वाऱ्याच्या घोड्यावर स्वार होतो, पाण्यावर चालताना पाण्याला पाय लागत नाहींत, अशा प्रकारे प्रसंगानुसार त्याला पुष्कळ सिद्धि प्राप्त होतात २७० पहा कीं, प्राणवायूचा हात धरून व हृदयाकाशाच्या पायऱ्या करून सुषुम्नेच्या जिन्याने हृदयात आलेली, ७१ व जीवात्म्याला शोभा देणारी जी कुंडलिनी जगदंबा, ती जगद्बी-जाचा कोंब ( गाभा ) जो जीव त्याच्यावर सावली करते. ७२ जी निराकार ब्रह्माची साकार मूर्ति, जी परमात्म्या शिवाची सबळी, जी ॐकाराची केवळ जन्मभूमिच. ७३ आणखी काय सांगावे ? ती कुंडलिनी बाळी हृदयात आली म्हणजे अखंड ॐकाराचा ध्वनि होऊ लागतो. ७४ त्या कुंडलिनीच्या जवळ बुद्धि असल्यामुळे तिच्या कानावर किंचित् ॐकाराचा ध्वनि जातो. ७५ घोषाच्या कुंडींत ध्वनि व नादरूपी ॐकाराच्या आकाराचीं रेखलेलीं अशीं रूपे उमटतात. ७६ या गोष्टी कल्पनेनेच जाणता येतात, परंतु कल्पना करणारा कोठून आणावा ? ( कारण, त्याचे जीवात्म्याशीं ऐक्य झालेले असते ) म्हणून त्या हृदयाकाशात कसली गर्जना होते ती कांहीं समजत नाहीं. ७७ अर्जुना, मी तुला एक गोष्ट सांगण्याची विसरलो. ती कोणती, तर जोपर्यंत प्राण, अपान वगैरे वायूंचा नाश होत नाहीं, तोपर्यंत हृदयाकाशाला वाचा असते आणि म्हणूनच शब्द उत्पन्न होतो. ७८ त्या अखंड ॐकाराच्या मेघासारख्या ध्वनीने हृदयाकाश दुमदुमूं लागतें, तेव्हा ब्रह्मरंध्राची खिडकी सहज उघडते. ७९ पहा कीं, कमळातील पोकळीप्रमाणे हृदयाकाशात जी पोकळ जागा असते, तेथे चैतन्य हे अधांतरीं वास करितें ( पूर्ण नसते.) २८० त्या आत्म्याच्या घरीं कुंडलिनी परमेश्वरी पाहुणी आल्यावर तेजरूपाची मेजवानी दिली, ८१ त्या वेळेस बुद्धिरूप भाजीसह ताट वाढून—कीं ज्यात द्वैताचा भास देखील होऊ नये—अशी मेजवानी दिली. ८२ कुंडलिनी आपली तेजरूप कांति टाकून वायुरूप

३८ अक्षरचित्र. ३९ ॐकार. ४० आकार ४१ कल्पना करणारें. ४२ गर्जे. ४३ शब्द करी. ४४ खिडकी. ४५ उघडे. ४६ अधांतरीं. ४७ गुप्तस्थाना. ४८ मेजवानी, फराळ. ४९ अर्पण केली. ५० नैवेद्य. ५१ तेज ५२ वायु

हो कां जे पवनाची पुतळी । पांघुरली होती सोनेसळी । ते फेडूनियां वेगळी । ठेविली तिया ॥ ८४ ॥ नातरी वायूचेनि आंगें झगटली । दीपाची दिठी निवटली । कां लखलखोनि हारपली । वीजु गगनीं ॥ ८५ ॥ तैसी हृदयकमळवेर्‍हीं । दिसे जैसी सोनियाची सैरी । नातरी प्रकाशजळाची झरी । वाहत आली ॥ ८६ ॥ मग ते हृदयभूमी पोकळे । जिराली कां एके वेळे । तैसें शक्तीचें रूप मावळे । शक्तीचिमाजी ॥ ८७ ॥ तेव्हां तरी शक्तीचि म्हणिजे । येर्‍हवीं तो प्राणु केवळ जाणिजे । आतां नादबिंदु नेणिजे । कळाज्योति ॥ ८८ ॥ मनाचा हन मारु । कां पवनाचा आधारु । ध्यानाचा आदरु । नाहीं परी ॥ ८९ ॥ हे कल्पना घे सांडी । ते नाहीं इये परवडी । हे महाभूतांची फुडी । आटणी देखा ॥ २९० ॥ ( २०३. योग शंकर करितात व त्याचें वर्णन विष्णु करितात, २९१ ) पिंडें पिंडाचा ग्रासु । तो हा नाथसंकेतींचा दंशु । परि दाऊनि गेला उद्देशु । श्रीमहाविष्णु ॥ ९१ ॥ ( २०४. विष्णूनें सांगितलेल्या योगाचें वर्णन, २९२ ) तया ध्वनिताचें केणें[13] सोडुनी । यथार्थाची घडी झाडुनी । उपलविली म्यां जाणुनी । ग्राहीक श्रोते ॥ ९२ ॥

*युंजन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः । शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥१५॥*

अन्वयः—एवं सदा आत्मानं युंजन् नियतमानसः योगी निर्वाणपरमां मत्संस्थां शांतिं अधिगच्छति ॥ १५ ॥

( २०५. योगाची फलप्राप्ति, २९३ ते ३१० ) ऐकें शक्तीचें तेज जेव्हां लोपे । तेथ देहाचें रूप हारपे । मग तो डोळ्यामाजि लपे । जगाचिया ॥ ९३ ॥ येर्‍हवीं आधिलाचि ऐसे । सावयव तरी दिसे । परी वायूचें कां जैसें । वळिलें होय ॥ ९४ ॥ नातरी कर्दळीचा गाभा । बुंथी सांडोनि उभा । कां अवयवचि नभा । उदयला तो ॥ ९५ ॥ तैसें होय शरीर । तें तें म्हणिजे खेचर । हें पद होतां चमत्कार । पिंडजनीं ॥ ९६ ॥ देखें साधकु निघोनि जाये । मागा पाउलांची वोळ राहे । तेथ ठायीं ठायीं होये । अणिमादिक ॥ ९७ ॥ परि तेणें काय काज आपणपयां । अवधारीं ऐसा धनंजया । लोप आथी भूतत्रया । देहींच्या देहीं ॥ ९८ ॥ पृथ्वीतें आप विरवी । आपातें तेज जिरवी । तेजातें पवनु हरवी । हृदयामाजीं ॥ ९९ ॥ पाठीं आपण एकला उरे । परि शरीराचेनि अनुकारें । मग तोही निगे अंतरें । गगना मिळे ॥ ३०० ॥ ते वेळीं कुंडलिनी हे भाष जाये ।

१ गर्भसुती वस्त्र. २ लागली. ३ झांकली. ४ पर्यंत. ५ नाड काय. ६ पोकळीमध्यें. ७ मध्यमा वाचा; ध्वनि. ८ प्राप्तीपर्यंत. ९ खरोखर. १० निर्मळपणा. ११ शिव. १२ सिद्धांत. १३ गांठोडें. १४ विस्तारिली. १५ गिऱ्हाईक १६ अगोदरचा. १७ सोपट. १८ आकाशांत संचार करणारे. १९ स्वरूप. २० लोकांत. २१ अणिमादिक अष्टसिद्धि. २२ पृथ्वी, अप, तेज. २३ वायु. २४ आकारें. २५ आकाशाला, ब्रह्मांडाला.

बनली, त्या वेळीं कशी दिसली म्हणाल, तर प्रत्यक्ष वाऱ्याची पुतळी जी सोनसळी नेसली होती, तें ( वस्त्र ) फेकून तिनें एका बाजूला ठेवल्याप्रमाणें दिसली; ८४ किंवा, दिव्याची ज्योति वारा लागल्यानें ज्याप्रमाणें मालवते, अथवा वीज चमकून गगनांत नाहींशी होते, ८५ त्याप्रमाणें हृदयकमळापर्यंत जाऊन ती सोन्याच्या जाड कांबीसारखी सतेज, किंवा तेजरूप पाण्याच्या झऱ्याप्रमाणें वाहात आलेली दिसते. ८६ मग ती हृदयरूप भुसभुशीत भूमींत एकाएकीं जिरते, तेव्हां कुंडलिनी शक्तीचें रूप शक्तींतच लय पावतें. ८७ अशी स्थिति झाल्यावर हिला शक्तिच म्हणावयाचें; येरवीं ती खरोखर प्राणच होय. परंतु त्या वेळेस ध्वनि, कला, ज्योति हीं नाहींतशीं होतात. ८८ नंतर मन जिंकणें, वायूचें अधर राहणें, किंवा ध्यान करणें, हींही नाहींतशीं होतात. ८९ आणि कल्पना घेणें व सोडणें ही खटपट नाहींशी होते. असे व्यापार बंद होतात, म्हणून कुंडलिनी ही केवळ पंचमहाभूतें आटण्याची मूस होय. ९० शरिरानें शरीर नाहींसें करणें हा, योगशास्त्राचे नाथ जे शंकर, त्यांनीं केलेल्या सिद्धांताचा अभिप्राय होय. त्याचा श्रीमहाविष्णूंनीं हेतु दर्शित केला; ९१ ( ज्ञानेश्वर म्हणतात:— ) त्या महाविष्णूच्या संकेताचें गांठोडें सोडून व यथार्थरूप वस्त्राची घडी झाडून, श्रोते हेच या मालाचे गिऱ्हाईक आहेत असें जाणून, मीं ती त्यांच्यापुढें मांडून ठेविली. ९२

श्लोकार्थ—अशा प्रकारें सर्वकाल आपलें अंतःकरण समाधीचे ठिकाणीं लावून मनाचा निग्रह करणाऱ्या योग्याला, मोक्ष हेंच जिचें परम फल आहे, अशी माझ्या स्वरूपीं असणारी शांति प्राप्त होते. ॥ १५ ॥

पहा कीं, ज्या वेळेस शक्तीचें तेज नाहींसें होतें, त्या वेळेस देहाचें रूप नाहींसें होतें, *आणि तो योगी इतकें सूक्ष्म रूप धारण करितो कीं, त्याला जगाच्या डोळ्यांतही* लपतां येतें. ९३ येरवीं तें शरीर पूर्वीप्रमाणेंच सावयव असतें, परंतु तें केवळ वायूचेंच असतें. ९४ किंवा केळीची सोपटें काढून त्याचा गाभा उभा केला म्हणजे जसें कांहींच उरत नाहीं, किंवा आकाशालाच जसे अवयव फुटावे, तसे त्याचे अवयव असून नसल्याप्रमाणें असतात. ९५ याप्रमाणें शरीर बनल्यावर त्यालाच आकाशांत संचार करणारा खेचर असें म्हणतात; आणि याप्रमाणें स्वरूप बनल्यावर त्याचा देह लोकांत आश्चर्यकारक दिसतो. ९६ पहा कीं, योग साध्य करणारा साधक चालून गेल्यावर पाठीमागें पावलें उमटतात, त्या प्रत्येक पावलाच्या ठिकाणीं अणिमादिक सिद्धि हात जोडून उभ्या असतात. ९७ परंतु, धनंजया, ऐक; त्या अणिमादिक सिद्धींशीं आपल्याला काय करावयाचें आहे ? पृथ्वी, अप्, व तेज या तीन भूतांचा देहातल्या देहांतच लोप होतो. ९८ पृथ्वीला उदक विरवतें, उदकाला अग्नि जिरवितो, आणि हृदयात वायु अग्नीचा नाश करतो. ९९ पाठीमागें एकटा वायु आपण उरतो, तो शरीराचे आकृतीनें असतो; पण तोही कांहीं वेळानें निघून ब्रह्मरंध्र आकाशात जाऊन मिळतो. २०० त्या वेळीं कुंडलिनी हें नांव

मग मारुत ऐसें नाम होये । परि शक्तिपण तें आहे । जंव न मिळे शिवीं ॥१॥ मग जालंधर सांडी । ककारांत फोडी । गगनाचिये पोंहाडीं । पैठी होय ॥ २ ॥ ते ॐकाराचिये पाठी । पाय देत उठाउठी । पश्यंतीचिये पाउठी । मागां घाली ॥ ३ ॥ पुढें तन्मात्रा अर्धवरी । आकाशाच्या अंतरीं । भरती गमे सागरीं । सरिता जेवीं ॥ ४ ॥ मग ब्रह्मरंध्रीं स्थिरावोनी । सोहंभावाच्या बाह्या पसरुनी । परमात्मलिंगा धांवोनी । आंगा घडे ॥ ५ ॥ तंव महाभूतांची जवनिका फिटे । मग दोहींसि होय झटे । तेथ गगनासकट आटे । समरसीं तिये ॥ ६ ॥ पैं मेघाचेनि मुखीं निवडला । समुद्र कां वोघीं पाडिला । तो मागुता जैसा आला । आपणपयां ॥ ७ ॥ तेवीं पिंडाचेनि मिषें । पदीं पद प्रवेशे । तें एकत्व होय तैसें । पंडुकुमरा ॥ ८ ॥ आतां दुजें हन होतें । कीं एकचि हें आइतें । ऐसिये विवंचनेपुरतें । उरेचिना ॥ ९ ॥ गगनीं गगन लया जाये । ऐसें जें कांहीं आहे । तें अनुभवें जो होये । तो होऊनि ठाके ॥ ३१० ॥ ( २०६. योगाची स्थिति वर्णन करण्यासारखी नाहीं, फक्त अनुभविण्याची आहे; ३११–३१८ ) म्हणोनि तेथींची मातु । न चढेचि बोलाचा हातु । जेणें संवादाचिया गांवा आंतु । पैठी कीजे ॥ ११ ॥ *अर्जुना येऱ्हवीं तरी । इया अभिप्रायाचा जे गर्व धरी । ते पाहें पां* वैखरी । दुरी ठेली ॥ १२ ॥ भ्रूलता मागिलीकडे । तेथ मकाराचेंचि आंग न मांडे । सडेयां प्राणा सांकडें । गगना येतां ॥ १३ ॥ पाठीं तेथेंचि तो मेसळला । तें शब्दाचा देवो मावळला । मग तयाहि वरी आंटु भविन्नला । आकाशाचा ॥ १४ ॥ आतां महाशून्याचिया डोहीं । जेथ गगनासीचि थावो नाहीं । तेथ तागा लागेल काई । बोलाचा इया ॥ १५ ॥ म्हणूनि आखरांमाजि सांपडे । कीं कानावरी जोडे । हें तैसें नव्हे फुडें । त्रिशुद्धी गा ॥ १६ ॥ जें कहीं दैवें । अनुभविलें फावे । तें आपणचि हें ठाकावें । होऊनियां ॥ १७ ॥ पुढती जाणणें तें नाहींचि । म्हणोनि असो किती हेंचि । बोलावें आतां वायांचि । धनुर्धरा ॥१८॥

( २०७ बोलण्याचे पलीकडील निजस्वरूप या योगानें प्राप्त होतें, ३१९–३२३ )

ऐसें शब्दजात माघौतें सरे । तेथ संकल्पाचें आयुष्य पुरे । वाराही जेथ न शिरे । *विचाराचा ॥ १९ ॥ जें उन्मनीयेचें लावण्य । जें तुर्येचें तारुण्य । अनादि जें* अगण्य । परम तत्त्व ॥३२०॥ जें विश्वाचें मूळ । जें योगद्रुमाचें फळ । जें आनंदाचें

१ वायु. २ ब्रह्मात. ३ जालंधरनामक बंध. ४ काकीमुख. ५ पर्वतावर. ६ प्रवेश करते. ७ पश्यंती नावाची दुसरी वाचा. ८ पायरी. ९ अर्धचंद्र मात्रा. १० आत्माकाशाच्या. ११ मस्तकाच्या पोकळींत. १२ मी परमात्मा ह्या भावाच्या. १३ परब्रह्माचें चिन्ह. १४ पडदा. १५ शिवशक्तीस. १६ ऐक्य. १७ ब्रह्मानंदात. १८ भिन्न जाहला. १९ देहाचे. २० ब्रह्मपदीं. २१ सिद्ध होतो. २२ वैखरी नामक चौथी वाणी. २३ भ्रुकुटीच्या, भुवयांच्या. २४ आतील बाजूस. २५ तुर्यावस्था, ॐकारांतील तिसरी मात्रा. २६ एकट्या. २७ संकट. २८ दिवस. २९ आटणी. ३० झाली.

जाऊन मग फक्त मारुत ( वायुमय ) हें नांव प्राप्त होतें. परंतु ती ब्रह्मांत मिळेपर्यंत तिची शक्ति कायम असतेच. १ मग जालंधरबंध सोडून काकीमुख ( कंठस्थान ) फोडून ब्रह्मरंध्र आकाशाचे पहाडावर प्रवेश करते. २ ती ॐकाराचे पाठीवर पाय देऊन पश्यंती वाचेची पायरी मागें टाकिते. ३ पुढें ॐकारांतील अर्धवर्तुलाकार मात्रा मागें टाकून, ज्याप्रमाणें नदी सागराला मिळते, त्याप्रमाणें ती ब्रह्माकाशांत जाऊन मिळते. ४ नंतर मस्तकाच्या पोकळींत ( ब्रह्मरंध्रांत ) स्थिर होऊन, मी ब्रह्म आहें ह्या भावनेनें बाहु पसरून परब्रह्माला मिठी मारून एकवटते. ५ त्या वेळेस पंचमहाभूतांचा पडदा नाहींसा होऊन मग शिवशक्तींचें ऐक्य होतें. त्या ठिकाणीं ती आकाशासह ब्रह्मानंदात मिळून जाते. ६ ज्याप्रमाणें समुद्राचें पाणी मेघाच्या द्वारें जाऊन नंतर जमिनीवर वर्षाव होऊन तें नदीमार्गानें पुन: समुद्रासच येऊन मिळतें, ७ त्याचप्रमाणें, अर्जुना, देहाच्या निमित्तानें ब्रह्मपदीं जीवात्मा प्रवेश करितो. तें एकत्वही समुद्राच्या पाण्याप्रमाणें होय. ८ नंतर, मी वेगळा व आत्मा वेगळा किंवा दोन्ही एक ही वाटाघाट उरतच नाहीं. ९ आकाश आकाशांत मिळतें. असें जें कांहीं एक तत्त्व आहे, त्याचा जो कोणी अनुभव घेईल त्यालाच सिद्धि प्राप्त होईल. ३१० म्हणून, ज्या शब्दानीं कोणतीही गोष्ट स्पष्ट करून सांगतां येते, त्या शब्दांनीं तेथली गोष्ट व्यक्त करतां येत नाहीं. ११ अर्जुना, खरोखर पाहिलें तर अभिप्राय सांगण्याचा गर्व वाहणारी जी वाणी, तिला देखील याचा पत्ता लागत नाहीं. १२ भिवयांच्या आंतल्या बाजूस मकाराचा देखील प्रवेश होत नाहीं; त्याचप्रमाणें एकट्या प्राणवायूला देखील ब्रह्माकाशांत जाण्याला संकट पडतें. १३ पुढें तो वायु तेथें गेल्यावर तदाकार होतो, त्या वेळेस शब्दाचें बोलणें खुंटतें. मग आकाशतत्त्वाचीही आटणी होते. १४ जेथें अव्यक्त स्थितीच्या डोहांत महदाकाशाचाही पत्ता लागत नाहीं, तेथें या शब्दाची दाद लागेल काय ? १५ म्हणून हें ब्रह्म अक्षरांत सांपडण्याजोगें ( वर्णन करतां येण्याजोगें ) किंवा ऐकूं येण्याजोगें नाहीं, हें त्रिवार सत्य जाण. १६ ज्या वेळेस कांहीं दैवगतीनें याचा अनुभव येतो, त्या वेळेस तो अनुभव घेणारा तद्रूप होऊन जातो. १७ नंतर तेथील स्थिति जाणण्याचें आपोआप राहतें; म्हणून, धनुर्धरा, याच्याबद्दल कितीही बोललें तरी तें व्यर्थ होय. १८ याप्रमाणें सर्व बोलणें आपोआप राहतें; त्या ठिकाणीं संकल्पही मावळतो आणि म्हणूनच विचाराची तेथें दादही लागत नाहीं. १९ तें ब्रह्मस्वरूप कसें आहे, तर सहज स्थितीचें सौंदर्य, आणि समाधि अवस्थेचें तारुण्य होय; आणि ज्याला आदि नाहीं व जें मापतां येत नाहीं, ३२० तें विश्वाचा आधार व योगरूप वृक्षाचे फळ आणि आनंदाचें केवळ जीवन

३१ अव्यक्त स्थितीच्या. ३२ ठिकाण. ३३ याग. ३४ अक्षरामध्यें. ३५ त्रिवार सत्य. ३६ प्राप्त होतें. ३७ राहावें. ३८ नंतर. ३९ उन्मनीनामक पाचवी अवस्था, जिच्यात मनाचा लय होतो. ४० समाधीची तुर्यानामक चौथी अवस्था. ४१ ब्रह्मस्वरूप. ४२ योगरूप वृक्षाचें.

केवळ। चैतन्य गा ॥ २१ ॥ जें आकाराचा प्रांतु। जें मोक्षाचा एकांतु। जेथ आदि आणि अंतु। विरोनि[४] गेले ॥ २२ ॥ जें महाभूतांचें बीज। जें महातेजाचें तेज। एवं पार्था जें निज। स्वरूप माझें ॥ २३ ॥ ( २०८. योगसाधनानें जीव ब्रह्मरूप होतो, ३२४–३२८ ) तें हे चतुर्भुज कोंभेली[५]। जयाची शोभा रूपासि आली। देखोनि नास्तिकीं[६] नोकिली। भक्तवृंदें ॥ २४ ॥ तें अनिर्वाच्य महासुख। पैं आपणचि जाहले ते पुरुष। जयांचे कां निष्कर्ष। प्राप्तिवेरी ॥ २५ ॥ आम्हीं साधन हें जें सांगितलें। तेंचि शरीरा जिहीं केलें। ते आमुचेनि पाडें आले। निर्वाळलेया ॥ २६ ॥ परब्रह्माचेनि रसें। देहाकृतीचियेनि मुसें। वोतींव जाहाले तैसे। दिसती आंगें ॥ २७ ॥ जरि हे प्रतीति हन अंतरीं फांके। तरी विश्वचि हें अवघें झांके। तव अर्जुन म्हणे निकें। साचचि जी हें ॥ २८ ॥ ( २०९. योगानें ब्रह्मरूप होतो हें कळलें, पण एक विचारणा आहे. ३२९–३३२ ) कां जे आपण आतां देवो। हा बोलिले जो उपावो। तो प्राप्तीचा ठावो। म्हणोनि घडे[१०] ॥ २९ ॥ इये अभ्यासीं जे दृढ होती। ते भरंवसेंनि ब्रह्मत्वा येती। हें सांगतियाची रीती। कळलें मज ॥ ३३० ॥ देवा गोठीचि हे ऐकतां। बोधु उपजतसे चित्ता। मा अनुभवें तल्लीनता। नोहेल केवीं ॥ ३१ ॥ म्हणऊनि एथ कांहीं। अनारिसें नाहीं। परी नावभरी चित्त देईं। बोला एका ॥ ३२ ॥ ( २१०. अर्जुन म्हणतो, मला योगसाधन घडेल का नाहीं ? नसेल तर मला जें घडेल तें सांगा. ३३३–३३८ ) आतां कृष्णा तुवां सांगितला योगु। तो मना तरी आला चांगु। परि न शकें करूं पांगु[६]। योग्यतेचा ॥ ३३ ॥ सहजें आंगिक जेतुलें आहे। तेतुलियाचि जरी सिद्धि जाये। तरी हाचि मार्ग सुखोपायें। अभ्यासीन ॥ ३४ ॥ नातरी देव जैसें सांगतील। तैसें आपणपें जरी न ठकेल। तरी योग्यतेवीण होईल। तेंचि पुसों ॥ ३५ ॥ जीवींचिये ऐसी धारण। म्हणोनि पुसावया जाहलें कारण। मग म्हणे तरी आपण। चित्त देइजो ॥ ३६ ॥ हां हो जी अवधारिलें। जें हें साधन तुम्हीं निरूपिलें। तें आंवडतयाहि अभ्यासिलें। फावों[२१] शके ॥ ३७ ॥ कीं योग्यतेवीण नाहीं। ऐसें हन आहे कांहीं। तेथ श्रीकृष्ण म्हणती काई। धनुर्धरा ॥ ३८ ॥ ( २११. योग्यता प्रयत्न केल्यानें येते, ३३९–३४१ ) हें कैंज कीर निर्वाणें। परि आणिकही जें कांहीं साधारण। तेंही अधिकाराचे वोडवेंविणें। काय सिद्धी जाय ॥ ३९ ॥ पैं योग्यता जे म्हणिजे। ते प्राप्तीचि अधीन जाणिजे। कां जे योग्य होऊनि कीजे। तें आरंभिलें

१ जीव. २ शेवट. ३ केवल स्थिति. ४ लय पावले. ५ आकाराला आली. ६ छळिली. ७ प्रयत्न. ८ योग्यतेनें. ९ तयार झाल्यामुळें. १० ब्रह्मसाक्षात्कार होतो. ११ ज्ञान. १२ तर मग. १३ तद्रूपता. १४ मिथ्या. १५ क्षणभर. १६ उणीव. १७ बळ. १८ प्राप्त होणार नाहीं.

होय. २१ तेथें आकाशाचा शेवट होतो; तें म्हणजे मोक्षाची केवळ स्थिति असून त्या ठिकाणीं आदि आणि अंत यांचा लय झाला आहे. २२ तें ब्रह्म पंचमहाभूतांचें मूळकारण व महातेजाचें तेज होय. सारांश, पार्था, तें ब्रह्म माझें मूळस्वरूप होय. २३ साधुवृंदांचा नास्तिकांनीं जेव्हां छळ केला, तेव्हां हीच चतुर्भुज मूर्ति या स्वरूपापासून आकाराला आली. २४ ( अर्जुना, ) असें हें महासुख अवर्णनीयच; परंतु याची प्राप्ति होईपर्यंत ज्या पुरुषांचे प्रयत्न अव्याहत चालले, ते पुरुष स्वयमेव सुखरूप झाले. २५ आम्हीं हें जें अष्टांगयोगाचें साधन सांगितलें, तें स्वतः शरिरानें जे करितात, ते योगानें तयार झाल्यामुळें माझ्याच योग्यतेस येतात. २६ त्या योग्यांचीं शरिरें परब्रह्माच्या रसानें देहाकृतीच्या मुशींत ओतल्यासारखीं सतेज दिसतात. २७ जर हा अनुभव अंतर्यामीं प्राप्त झाला, तर हें सर्व विश्व त्याला मावळतें. तेव्हां अर्जुन म्हणाला, “देवा, आपण बोललां, तें सत्य आहे. २८ देवा, आपण आतां जो हा उपाय सांगितला, तो ब्रह्मप्राप्तीचें ठिकाण आहे, म्हणूनच त्या ठिकाणीं ब्रह्मसाक्षात्कार होतो. २९ आपण जो हा मार्ग सांगितला, त्याचा दृढ अभ्यास करणारे खरोखर ब्रह्मपदाला पावतात, हें आपल्या सांगण्यावरून मला समजलें. ३३० देवा, आपण सांगितलेली गोष्ट ऐकतांनाच चित्तांत ज्ञान उत्पन्न होतें; तर मग तिचा अनुभव घेणाराला तद्रूपता कशी बरें प्राप्त होणार नाहीं ? ३१ म्हणून, हें जें आपण सांगितलें, यांत कांहीं संशय नाहीं. परंतु क्षणभर मी जी विनंती करतों, तिकडे लक्ष द्यावें. ३२ कृष्णा, आता तुम्हीं जो मला योग सागितला, तो माझ्या मनाला फार आवडला; परंतु माझी योग्यता कमी असल्याकारणानें माझ्या हातून कांहीं तो होणार नाहीं. ३३ माझ्या अंगांत जेवढी शक्ति आहे, तेवढी खर्च करूनही जरी हा शेवटाला जाईल, तरी देखील मी मोठ्या समाधानानें याचा अभ्यास करीन. ३४ किंवा, देवा, तुम्ही जसें सांगतां तसें माझ्यानें जर न करवेल, तर आपल्या योग्यतेच्या मानानें आपल्या हातून जें होईल तेंच आपण विचारावें, ३५ अशी माझ्या मनांत इच्छा उत्पन्न झाल्यामुळें आपल्याला विचारण्याचें कारण पडलें.” अर्जुन म्हणतो, “तर मग देवा, आपण इकडे लक्ष द्यावें. ३६ महाराज, आपण हें जें योगसाधन सांगितलें, तें ऐकलें; परंतु वाटेल त्यानें याचा अभ्यास केला तर या योगाची प्राप्ति होईल काय ? ३७ किंवा हें योग्यतेशिवाय होणारच नाहीं असें आहे कीं काय ?” तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, “अर्जुना, हें तूं काय विचारतोस ? ३८ हा योगाभ्यास जर म्हणशील तर खरोखर मोक्ष देणारा आहे; पण याशिवाय दुसरी साधारण जरी गोष्ट असली, तरी ती सुद्धां अधिकाराच्या योग्यतेशिवाय सिद्धीस जाईल काय ? ३९ परंतु योग्यता म्हणून जिला म्हणतात, ती प्राप्तीचे पूर्वी समजत नाहीं. कारण, अधिकारी होऊन आरंभिलेलें काम

१९ इच्छा. २० वाटेल त्याला देखील. २१ प्राप्त होईल. २२ कार्य. २३ मोक्षाचें. २४ योग्यतेवांचून.

फळे ॥ ३४० ॥ तरी तैसी एथ कांहीं । सावियांचि लेंणी नाहीं । आणि योग्यतेची काई । खाणी असे ॥ ४१ ॥ ( २१२. योगप्राप्तीच्या शंकेचें निवारण, ३४२—३४३ ) नावेक विरक्तु । जाहला देहधर्मीं नियतु । तरि तोचि नव्हे व्यवस्थितु । अधिकारिया ॥ ४२ ॥ येतुलालियें आयणीमाजि येवढें । योग्यपण तुतेंही जोडे । ऐसें प्रसंगें सांकडें । फेडिलें तयाचें ॥ ४३ ॥ ( २१३. अनियमित पुरुष योगाचा अधिकारी नाहीं, योग साधण्याची युक्ति, ३४४—३५६ ) अवतरण:— मग म्हणे पार्था । ते हे ऐसी व्यवस्था । अनियतासी सर्वथा । योग्यता नाहीं ॥ ४४ ॥

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः । न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन १६

अन्वयः—अर्जुन, अत्यश्नतः तु योगः न अस्ति, एकांत च अनश्नतः योगः न ( अस्ति ) च अतिस्वप्नशीलस्य ( योगः ) न ( अस्ति; ) च एव जाग्रतः ( योगः न अस्ति ) ॥ १६ ॥

जो रसनेंद्रियाचा अंकिला । कां निद्रेसी जीवें विकला । तो नाहीं एथ म्हणितला । अधिकारिया ॥ ४५ ॥ अथवा आग्रहाचिये बांदोडीं । क्षुधा तृषा कोंडी । आहारातें तोडी । मारूनियां ॥ ४६ ॥ निद्रेचिया वाटा नेवचे । ऐसा द्वढिवेचेनि अवतरणें नाचे । तें शरीरचि नव्हे तयाचें । मग योगु कवणाचा ॥ ४७ ॥ म्हणोनि आतिशयें विषय सेवावा । तैसा विरोधु नोहावा । कां सर्वथा निरोधावा । हेंही नको ॥ ४८ ॥

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु । युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥१७॥

अन्वयः—युक्ताहारविहारस्य, कर्मसु युक्तचेष्टस्य, युक्तस्वप्नावबोधस्य (योगिनः) योगः दुःखहा भवति ॥ १७ ॥

आहार तरी सेविजे । परी युक्तीचेनि मापें मेविजे । क्रियाजात आचरिजे । तयाचि स्थिती ॥ ४९ ॥ मापितला बोल बोलिजे । मितलियें पाउलीं चालिजे । निद्रेही मानु दीजे । अवसरें एकें ॥ ३५० ॥ जागणें जरी जाहलें । तरी व्हावें तें मितलें । येतुलेनि धातुसाम्य संचलें । असेल ॥ ५१ ॥ ऐसें युक्तीचेनि हातें । जें इंद्रियां वोपिजे भातें । तें संतोषासी वाढतें । मनचि करी ॥ ५२ ॥

यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते । निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥१८

अन्वयः—यदा ( योगिनः ) विनियत चित्त आत्मनि एव अवतिष्ठते, ( च ) सर्वकामेभ्यः निस्पृहः ( भवति, तदा ) युक्तः इति उच्यते ॥ १८ ॥

बाहेर युक्तीची मुद्रा पडे । तंव आंत आंत सुख वाढे । तेथें सहजेंचि योगु घडे । नाभ्यासितां ॥ ५३ ॥ जैसें भाग्याचिये भेंडसें । उद्यमाचेनि मिषें[23] । मग समृद्धिजातें अपैसें । घर रिघे[26] ॥ ५४ ॥ तैसा युक्तिमंतु कौतुकें ।

१ निश्चयानें; निःसंशय, खरोखर. २ अडचण. ३ विहित धर्मात. ४ एवढाल्या. ५ युक्तीमध्यें, इच्छेंत. ६ संकट. ७ अव्यवस्थिताला. ८ जिव्हेचा. ९ सर्वथैव. १० आवेशानें. ११ जात नाहीं. १२ निश्चयानें. १३ अभिमानानें. १४ बद्ध करावा. १५ मोजावा. १६ मोजका. १७ परिमित.

तत्काल फलद्रूप होतें. ३४० तरी या ठिकाणीं खरोखर तशी कांहीं अडचण नाहीं; आणि दुसरें असें पहा कीं, योग्यतेची एखादी खाण आहे कीं काय ? ४१ जो थोडासा विरक्त किंवा विहित धर्म आचरण्यांत जो नियमित झाला आहे, इतकेंच नव्हे, तर सामान्यतः व्यवस्थेशीर वागणारा जो आहे, तो देखील अधिकारी होतो. ४२ अशा युक्तीनें इतकी योग्यता तुझे ठिकाणींही आहे." याप्रमाणें अर्जुनाचा त्या समयाला संशय फेडला. ४३ मग श्रीकृष्ण म्हणाले:—पार्था, या योगप्राप्तीची अशी व्यवस्था आहे; परंतु अव्यवस्थित मनुष्याला त्याची प्राप्ति होण्याचा कधींही संभव नाहीं. ४४

श्लोकार्थः—अर्जुना, अति खाणाराच्यानें योग मुळींच होणार नाहीं, आणि अगदीं न खाणाराच्यानें एकान्तवास ( योग ) होणार नाहीं; त्याचप्रमाणें अत्यंत झोंप घेणाराच्यानेंही योग-साधन होणार नाहीं, व जागणाराच्यानेंही होणार नाहीं ॥ १६ ॥

जो जिव्हेच्या अंकित झाला, किंवा सर्वथैव झोंपेच्या अधीन झाला, तो या योगाचा अधिकारी म्हटला जात नाहीं. ४५ अथवा, दुराग्रहाच्या आवेशांत जो भूक आणि तहान मारतो, आणि जेवण कमी करतो, ४६ आणि झोंपेचें नांव देखील न घेतां बळकट अभिमान धरतो, त्याचें शरीर सुद्धा त्याच्या अधीन राहत नाहीं, मग त्याला योग कोठून साध्य होणार ? ४७ म्हणून विषयांचें अति सेवन करण्याची किंवा त्यांचा अगदींच त्याग करण्याची इच्छा करूं नये; अर्थात् सर्व गोष्टी नियमित असाव्या. ४८

श्लोकार्थः—ज्याचे आहारविहार उक्त असतात, कर्माचरणातील व्यापार योग्य तऱ्हेनें चाललेले असतात, आणि ज्याची निद्रा व जागृति प्रमाणशील असते, त्या पुरुषाचा योग त्याच्या दुःखाचा नाश करितो ॥ १७ ॥

अन्न ग्रहण तर करावें, पण तें युक्तियुक्तीनें परिमित करावें; त्याचप्रमाणें, जीं जीं कामें करावयाचीं तींहीं सर्व युक्तीनेंच प्रमाणात आणावीं. ४९ भाषण परिमित असावें, त्याचप्रमाणें व्यायामही माफक करावा; व झोंपही नेमलेल्या वेळींच घ्यावी. ३५० जागरण जरी करावयाचें झालें तरी तें नियमित वेळेपर्यंत करावें. अशा नियमित रीतीनें आचरण केल्यावर शरीरांतील रक्तादिक सप्तधातु-समतोल राहतील. ५१ अशा प्रकारें बेताबातानें इंद्रियांची तृप्ति केली, म्हणजे आपलें मनच संतोषाची वृद्धि करितें. ५२

श्लोकार्थः—जेव्हा योग्याचें नियत—एकाग्र झालेलें चित्त आत्म्याच्याच ठिकाणीं स्थिर राहतें, आणि म्हणूनच सर्व वासना, विषयीं निस्पृहनिरिच्छ बनतें, तेव्हा त्याला 'युक्त' असें म्हणतात ॥१८॥

याप्रमाणें बाहेरील इंद्रियाची स्थिति नियमित ठेविली, तर अंतर्यामीं सुख उत्पन्न होऊन, त्या मनुष्याला अभ्यास न करिता योग सहज घडतो. ५३ ज्याप्रमाणें भाग्योदय झाला असतां उद्योगाचे निमित्तानें सर्व संपत्ति आपोआप घरीं चालून येते, ५४ त्याप्रमाणें,

१८ धावें. १९ खाय. २० स्थिति. २१ मर. २२ उद्योगाच. २३ निमित्तानें. २४ सर्व संपत्ति. २५ आपोआप. २६ येते.

अभ्यासाचिया मोहरा ठोके । आणि आत्मसिद्धिचे पिके । अनुभव तयाचा ॥ ५५ ॥ म्हणोनि युक्ति हे पांडवा । घडे जया सदैवा । तो अपवर्गीचिये राणिवां । अळंकरिजे ॥ ५६ ॥

यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता ॥
योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥ १९ ॥

अन्वयः—यथा निवातस्थः दीपः न इङ्गते, सा उपमा आत्मनः योगं युंजतः यतचित्तस्य योगिनः स्मृता ॥ १९ ॥

( २१४. युक्ति व योग या दोन साधनांनीं योग्याचें मन निर्वात दिव्याप्रमाणें स्थिर होतें, ३५७–३५८ ) युक्ति योगाचें आंग पावे । ऐसें प्रयाग जेथ होय बरवें । तेथ क्षेत्रसंन्यासें स्थिरावे । मानस जयाचें ॥ ५७ ॥ तयातें योगयुक्त तूं म्हण । हेंही प्रसंगें जाण । तें दीपाचें उपलक्षण । निर्वातींचिया ॥ ५८ ॥ ( २१५. इंद्रियें अभ्यासाला बागुलबोवा दाखवितात, ३५९–३६४ ) अवतरणः—( ओवी ३५९ ते ३६३ ) आतां तुझें मनोगत जाणोनी । कांहीं एक आम्ही म्हणोनी । तें निकें चित्त देउनी । परिसावें गा ॥ ५९ ॥ तूं प्राप्तीची चाड वाहसी । परि अभ्यासीं दक्ष न होसी । तें सांग पां काय बिहसी । दुवाडपणा ॥ ३६० ॥ तरि पार्था हें झणें । सौयास घेशी हो मनें । वायां बागूल इयें दुर्जनें । इंद्रियें करिती ॥ ६१ ॥ पाहें पां आयुष्यातें अढळ करी । जें सरतें जीवित वारी । तया औषधातें वैरी । काय जिव्हा न म्हणे ॥ ६२ ॥ ऐसें हितासि जें जें निकें । तें सदाचि या इंद्रियां दुखे । येऱ्हवीं सोपें योगासारिखें । कांहीं आहे ॥ ६३ ॥

यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया । यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥२०॥
सुखमात्यंतिकं यत्तद् बुद्धिग्राह्यमतींद्रियम् । वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः २१

अन्वयः—योगसेवया निरुद्धं चित्तं यत्र उपरमते, यत्र च आत्मना एव आत्मानं पश्यन् आत्मनि तुष्यति ॥ २० ॥ यत्र यत् आत्यंतिकं, बुद्धिग्राह्यं, अतींद्रियं सुखं ( अस्ति ), तत् वेत्ति; ( तत्र ) अयं स्थितः ( योगी ) तत्त्वतः न एव चलति ॥ २१ ॥

म्हणोनि आसनाचिया गाढिकां । जो आम्हीं अभ्यासु सांगितला निका । तेणें होईल तरी हो कां । निरोध येयां ॥ ६४ ॥ ( २१६. योगसिद्ध पुरुषाचें मन सुखाच्या साम्राज्यावर बसतें, ३६५–३६८ ) येऱ्हवीं तरी येणें योगें । जें इंद्रियां विंदाण लागे । तें चित्त भेटों रिगे । आपणपेयां ॥ ६५ ॥ परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियातें आपण देखे । देखतखेंवो वोळखे । म्हणे तत्त्व हें मीचि ॥ ६६ ॥ तिये वोळखीचि सरिसें । सुखाचिया साम्राज्यीं बैसे । मग आप-

१ वळतो. २ दैववानाला. ३ मोक्षाच्या. ४ राज्यास. ५ शोभवितो. ६ ज्या स्थलीं नियम

जो नियमशील आहे, तो कौतुकानें जरी योगाभ्यासाकडे वळला, तरी त्याला आत्मस्थितीचा अनुभव येतोच. ५५ म्हणून, अर्जुना, ज्या दैववान पुरुषाला युक्तीचें साह्य असतें, तो मोक्षाच्या राज्यावर शोभिवंत होतो. ५६

श्लोकार्थः—जसा निवाऱ्यात ठेविलेला दिवा हालत नाहीं, ती उपमा आत्मविषयक योग करणाऱ्या स्थिरचित्त झालेल्या योग्याला लागू पडते ॥ १९ ॥

नियमित वागणाराला जर योगाभ्यास करण्याची इच्छा झाली, तर तो योग गंगा आणि यमुना यांचा संगम झालेल्या प्रयागतीर्थाप्रमाणें होय. त्या आत्मस्वरूपी प्रयागाचे ठिकाणीं ज्या मनुष्याचें मन क्षेत्रसंन्याशाप्रमाणें कायम राहतें, ५७ त्याच मनुष्याला तूं योगी म्हण; आणि प्रसंगानुरोधानें हेंही पण लक्षांत ठेव कीं, त्याच्या चित्ताला निवाऱ्यांतील दिव्याची उपमा लागू पडते. ५८ आतां तुझ्या मनांतील भाव जाणून आम्ही तुला कांहीं गोष्ट सांगतों, ती चित्त देऊन ऐक, ५९ तूं योगप्राप्तीची इच्छा मनांत बाळगतोस, परंतु अभ्यासाकडे तुझें लक्ष नाहीं; तर तो अभ्यास कठिण आहे अशी तुझ्या मनांत भीति वाटते कीं काय, तें सांग. ३६० पार्था, कदाचित् तूं ही भीति मनांत बाळगशील; पण तसें करूं नको हो! कारण, हीं दुर्जन इंद्रियें त्या अभ्यासाचा उगीच बागुलबोवा करून भीति दाखवितात! ६१ पहा कीं, जें आयुष्य स्थिर करतें (वाढवितें), आणि संपणाऱ्या जीविताला मागें आणतें (मृत्यु टाळतें), त्या औषधाला देखील जिव्हा शत्रु समजत नाहीं का? ६२ त्याचप्रमाणें, पारलौकिक हितास जें चांगलें, तें नेहमीं या इंद्रियांना दुःखदायक वाटतें; येरवीं या योगसाधनाइतकें दुसरें कांहीं सोपें साधन आहे का? ६३

श्लोकार्थः—योगाभ्यासानें संयमित झालेलें चित्त जेव्हां कर्मापासून उपरम पावतें, निवृत्त होतें, व जेव्हां तो आपण आपल्या ठिकाणीं आपल्या स्वरूपाला पाहूनच संतुष्ट होतो ॥ २० ॥ आणि अनंत, बुद्धीला ग्रहण होण्यासारखें, व इंद्रियांना न घेववणारें असें जें सुख आहे, तें जेव्हां तो अनुभवितो, तेव्हा तो स्थिर झालेला योगी ब्रह्मस्वरूपापासून ढळतच नाहीं ॥ २१ ॥

म्हणून आसनाच्या बळकटीनें जो आम्हीं खरा अभ्यास सांगितला, त्या योगानेंच झाला तर या इंद्रियांचा निग्रह होईल. ६४ येरवीं या योगसाधनानें जेव्हां इंद्रियांचा निग्रह होतो, तेव्हा आपलें आपणच चित्त हें आत्म्याची भेट घेण्याकरितां जातें. ६५ चित्ताची धाव नेहमीं पुढें असते; ती मागें फिरून ज्या वेळेस त्या आत्म्याकडे पाहतें, त्या वेळेस त्याला आत्मा व आपण हे दोन्ही एकच आहों अशी ओळख पटते. ६६ ती ओळख झाल्याबरोबर तें सुखाच्या राज्यावर बसतें, आणि मग ब्रह्मानंदानें आपल्या

केला, तें स्थल शरीर असेपर्यंत न सोडणें. ७ उपमा. ८ निवाऱ्यातल्या. ९ आम्ही सांगतों. १० चांगलें. ११ इच्छा. १२ भितोस. १३ कठिण म्हणून. १४ कदाचित्. १५ धास्ती. १६ बागुलबोवा. १७ स्थिर. १८ संपणारें. १९ पारलौकिक हित. २० बळकटी. २१ इंद्रियांना. २२ निग्रह. २३ लागलीच.

णपां समरसें । विरोनि जाय ॥ ६७ ॥ जयापरतें आणिक नाहीं । जयातें इंद्रियें नेणती कहीं । तें आपणाचि आपुलिया ठायीं । होऊनि ठाके ॥ ६८ ॥

यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।
यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणाऽपि विचाल्यते ॥ २२ ॥

अन्वयः—यं लाभं लब्ध्वा च अपरं ततः अधिकं न मन्यते; यस्मिन् स्थितः (योगी) गुरुणा अपि दुःखेन न विचाल्यते ॥ २२ ॥

( २१७. आत्मसुख प्राप्त झालें म्हणजे सर्व दुःखाचा नाश होतो, ३६९ ते ३७१ ) मग मेरूपासूनि थोरें । देहदुःखाचेनि डोंगरें । दाटिजो पां परी भारें । चित्त न दाटे ॥ ६९ ॥ कां शस्त्रें वरी तोडिलिया । देह अग्नीमाजि पडलिया । चित्त महासुखीं पहुडलिया । चेवोचि नये ॥ ३७० ॥ ऐसें आपणपां रिगोनि ठाये । मग देहाची वासु न पाहे । आणिकचि सुख होऊनि जाये । म्हणूनि विसरे ॥ ७१ ॥

तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् । स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥२३॥

अन्वयः—तं दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितं विद्यात्; सः योगः अनिर्विण्णचेतसा निश्चयेन योक्तव्यः ॥ २३ ॥

( २१८. आत्मसुखप्राप्तीनें मनाच्या सर्व वासना लय पावतात, ३७२—३७४ ) ज्या सुखाचिया गोडी । मन आर्तीची सेचि सोडी । संसाराचें तोंडीं । गुंतलें जें ॥ ७२ ॥ जें योगाची वरव । संतोषाची राणिव । ज्ञानाची जाणिव । जयालागीं ॥ ७३ ॥ तें अभ्यासिलेनि योगें । सावयव देखावें लागे । देखिलें तरी आंगें । होइजेल गा ॥ ७४ ॥

संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः । मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥२४॥

अन्वयः—सर्वान् संकल्पप्रभवान् कामान् अशेषतः त्यक्त्वा, मनसा एव इंद्रियग्रामं समन्ततः विनियम्य ॥ २४ ॥

( २१९. सर्वसंकल्पलय व इंद्रियनिग्रहानें आत्मसुखप्राप्ति होते, ३७५—३७८ ) तरि तोचि योगु बापा । एके परी आहे सोपा । जरी पुत्रशोकु संकल्पा । दाखवीजे ॥ ७५ ॥ हां विषयातें निमालिया आइके । इंद्रियें नेमाचिया धारणीं देखे । तरी हियें घालूनि मुके । जीवित्वासी ॥ ७६ ॥ ऐसें वैराग्य हें करी । तरी संकल्पाची सरे वारी । सुखें धृतीचिया धवळारीं । बुद्धि नांदे ॥ ७७ ॥

शनैः शनैरुपरमेद् बुद्ध्या धृतिगृहीतया ।
आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ २५ ॥
यतो यतो निश्चलति मनश्चंचलमस्थिरम् ।
ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥

अन्वयः—धृतिगृहीतया बुद्ध्या शनैः शनैः उपरमेत्; मनः आत्मसंस्थं कृत्वा किंचिदपि न चिंतयेत् ॥ २५ ॥ चचल अस्थिरं मनः यतः यतः निश्चलति, ततः ततः एतत् नियम्य आत्मनि एव वशं नयेत् ॥ २६ ॥

ठिकाणींच लय पावतें; ६७ आणि ज्यापेक्षां दुसरें अधिक कांहीं नाहीं, व ज्याला इंद्रियें कधीं जाणत नाहींत असें जें ब्रह्म, तें तें स्वतांच होऊन राहतें. ६८

श्लोकार्थः—आणखी, जो प्राप्त झाला असताना योगी त्याहून दुसरा अधिक कोणताही लाभ मानीत नाहीं, आणि कसलेंही महद्दुःख प्राप्त झालें तरी त्याचें चित्त स्वरूपानंदापासून चळत नाहीं ॥ २२ ॥

मग अशी स्थिति झाल्यावर, मेरु पर्वतापेक्षांही मोठ्या दुःखाच्या भारानें देह दडपला असता त्याच्या चित्ताला दुःख होत नाहीं; ६९ किंवा शस्त्रानें जरी देह तोडला, अथवा अग्नींत जरी पडला, तरी महासुखांत निमग्न झालेलें त्याचें चित्त जागृत होत नाहीं. ३७० याप्रमाणें आत्मसुखांत निमग्न झाल्यावर तो देहाची आठवण विसरतो; आणि असें अनिर्वाच्य ब्रह्मसुख प्राप्त झाल्यामुळें इतर गोष्टींचा त्याला विसर पडतो. ७१

श्लोकार्थः—त्याला दुःखसंबंधाची ताडातोड करणारा योग असें जाणावें. तो योग प्रसन्न चित्तानें साधकानें निश्चयानें करावा ॥ २३ ॥

ज्या ब्रह्मसुखाच्या गोडीनें संसारांत गुंतलेलें मन वासनेची आठवणच सोडतें, ७२ जें योगाची शोभा, संतोषाचें केवळ राज्य, आणि ज्याच्याकरितां ज्ञानाची आवश्यकता, ७३ तें ब्रह्मसुख अभ्यासाचे योगानें मूर्तिमंत दिसूं लागतें; आणि दिसूं लागल्यावर तें पाहणारा तद्रूपच बनतो. ७४

श्लोकार्थः—संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व वासनांचा निखालस त्याग करून मनानेंच सर्व इंद्रियें सर्व बाजूंनें जिंकून ॥ २४ ॥

तथापि-अर्जुना, एका परी हा योग सोपा आहे.-संकल्पाचे पुत्र जे कामक्रोधादिक, त्यांचा नाश केल्यामुळें त्या संकल्पाला जेव्हां पुत्रशोक होईल, तेव्हांच तो साध्य होतो! ७५ विषय लय पावले असें या संकल्पानें ऐकलें, व इंद्रियें नियमितपणानें वागतात असें पाहिलें, म्हणजे याची छाती फुटून जाऊन हा जिवाला मुकतो. ७६ अशा रीतीनें वैराग्य प्राप्त झाल्यावर संकल्पाच्या यात्रा संपतात, आणि धैर्याच्या मंदिरांत बुद्धि ही सुखानें वास करते. ७७

श्लोकार्थः—धैर्ययुक्त बुद्धीनें हळू हळू आत्मस्वरूपीं स्थिर व्हावें. याप्रमाणें मन स्थिर करून मग कशाचेंही चिंतन करूं नये ॥ २५ ॥ हें अस्थिर व चंचल मन ज्या ज्या ठिकाणीं जाईल, तेथून तेथून त्याला निग्रहानें ओढून आणून आत्मस्वरूपींच लावावें ॥ २६ ॥

बुद्धीला धैर्याचा आश्रय मिळाला, म्हणजे मग ती मनाला हळू हळू ब्रह्मानुभवाच्या वाटेला लावून त्याची ब्रह्मस्वरूपीं स्थापना करते. ७८ या एका मार्गानें ब्रह्मप्राप्ति होते,

१ दडपला जातो. २ निजलें असता. ३ आशा, आठवण. ४ अनिर्वाच्य. ५ मूर्तिमंत. ६ संकल्पाचे पुत्र जे कामक्रोधादिक, ते नाहींतसे करून. ७ संकल्प. ८ स्थितींत. ९ हृदय. १० वारी, फेरी. ११ धैर्याच्या. १२ मंदिरांत.

बुद्धि धैर्या होय वैसौटा । तरी मनातें अनुभवाचिया वाटा । हळु हळु करी प्रतिष्ठी । आत्मभुवनीं ॥ ७८ ॥ ( २२०. मनाला नियमबद्ध केलें असतां आत्मस्वरूपीं स्थिर होतें, ३७९–३८६ ) याही एके परी । प्राप्ति आहे विचारीं । हें न ठके तरी सोपारी । आणिक ऐकें ॥ ७९ ॥ आतां नियमुचि हा एकला । जीवें करावा आपुला । जैसा कृतनिश्चयाचिया बोला । बाहेरौं नोहे ॥ ३८० ॥ जरी येतुलेनि चित्त स्थिरावे । तरी कार्जा आलें स्वभावें । नाहीं तरी घोलावें । मोकलुनी ॥ ८१ ॥ मग मोकलिलें जेथ जाईल । तेथूनि नियमुचि घेऊनि येईल । ऐसेनि स्थैर्येचि होईल । सौवियाचि कीं ॥ ८२ ॥

*प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् । उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥*

अन्वयः—प्रशांतमनसं शांतरजसं ब्रह्मभूत अकल्मष एनं हि योगिनं उत्तम सुखं उपैति ॥२७॥

पाठीं केलुलेनि एके वेळे । तया स्थैर्याचेनि मेळें । आत्मस्वरूपाजवळें । येईल सहजें ॥ ८३ ॥ तयातें देखोनि आंगा घडेल । तेथ अद्वैतीं द्वैत बुडेल । आणि ऐक्यतेजें उघडेल । त्रैलोक्य हें ॥ ८४ ॥ आकाशीं दिसे दुसरें । तें अभ्र जैं विरे । तैं गगनचि कां भरे । विश्व तैसें ॥ ८५ ॥ जैसें चित्त लया जाये । आणि चैतन्यचि आघवें होये । ऐसी प्राप्ति सुखोपायें । आहे येणें ॥ ८६ ॥

**युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः । सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ २८ ॥**

अन्वयः—एव सदा आत्मान युंजन् विगतकल्मषः योगी ब्रह्मसंस्पर्शं अत्यंत सुख सुखेन अश्नुते ॥ २८ ॥

( २२१. मन आत्मरूप झाले म्हणजे सर्व जग आत्मरूप दिसतें, ३८७–३९० ) या सोपया योगस्थिती । उँकलू देखिला गा बहुतीं । संकल्पाचिया संपत्ती । रुसोनियां ॥ ८७ ॥ तें सुखाचेनि सांगातें । आलें परब्रह्म आंतौतें । तेथ लवण जैसें जळातें । सांडूं नेणे ॥ ८८ ॥ तैसें होय तिये मेळीं । मग सामरस्याचिया राउळीं । महासुखाची दिवाळी । जगचि दिसे ॥ ८९ ऐसें आपले पायेंवरी । चालिजे आपुले पाठीवरी । अवतरण.—हें पार्था नैगवे तरी । आन ऐकें ॥३९०॥

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि । ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥२९॥**
**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति । तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥**

अन्वयः—योगयुक्तात्मा सर्वत्रसमदर्शनः (पुरुषः) आत्मानं सर्वभूतस्थ च आत्मनि सर्वभूतानि ईक्षते ॥ २९ ॥ यः मा सर्वत्र पश्यति च सर्वं मयि पश्यति, तस्य अहं न प्रणश्यामि न च सः मे प्रणश्यति ॥ ३० ॥

( २२२. साम्ययोगाचा उपाय, ३९१–४१० ) तरि मी तंव सकळ देहीं । असे एथ विचारु नाहीं । आणि तैसेंचि माझ्या ठायीं । सकळ असे ॥ ९१ ॥ हें ऐसेंचि संचलें । परस्परें मिसळलें । बुद्धि घेपे एतुलें । होआवें गा ॥ ९२ ॥

आणि हेंही घडत नसल्यास याहीपेक्षां सुलभ असा दुसरा एक मार्ग सांगतों तो ऐक. ७९ साधकानें आपला एक नियम करावा कीं, एकदा केलेला निश्चय कधींही टाळावयाचा नाहीं. ३८० अशा निश्चयानें जर चित्त स्थिर झालें, तर अनायासेंच काम झालें; पण असें जर न होईल, तर त्या चित्ताला खुशाल स्वैर वर्तू द्यावें. ८१ मग तें मोकळें सुटल्यावर जेथें जाईल तेथून निश्चय त्याला परत घेऊन येईल; आणि अशा रीतीनें तें तत्काल स्थिर होऊन राहील. ८२

श्लोकार्थः—ज्या योग्याचें चित्त समाधान पावलें आहे, ज्याचा रजोगुण नाहींसा झाला आहे, व जो ब्रह्मस्वरूप व निष्पाप झाला आहे, अशा ह्या योग्यालाच ब्रह्मसुख प्राप्त होतें ॥ २७ ॥

नंतर अशा प्रकारें अनेक वेळां स्थिर राहण्यानें तें सहज आत्मस्वरूपाजवळ येईल; ८३ आणि त्या आत्मस्वरूपाला पाहून स्वतः तद्रूप होईल. मग अद्वैतामध्यें द्वैत हें बुडून जाईल, आणि ऐक्याच्या तेजानें हें त्रैलोक्य प्रकाशित होईल. ( त्रैलोक्यभर ब्रह्मपद दिसूं लागेल. ) ८४ आकाशात उत्पन्न झालेलीं अभ्रें ज्या वेळेस नाहींतशीं होतात, त्या वेळेस जिकडे तिकडे शुद्ध आकाशच दिसतें; ८५ त्याचप्रमाणें, चित्त लयाला जाऊन जीवात्मा ब्रह्मस्वरूप होणें ही प्राप्ति या उपायापासून सहज होते. ८६

श्लोकार्थः—याप्रमाणें निरंतर आत्मविषयक योग करणारा व पापरहित योगी ब्रह्माचा अनुभव ज्यात आहे असें अत्यंत सुख अनायासानें मिळवितो ॥ २८ ॥

मनांतील संकल्पविकल्प सोडून जे या सोप्या योगस्थितीचा पुष्कळ अनुभव घेऊन सुखी झाले, ८७ ते त्या सुखाच्या संगतीनें परब्रह्मपदास येऊन पोहोंचले. मीठ पाण्यांत मिळाल्यावर ज्याप्रमाणें पाण्याला सोडूं शकत नाही, ८८ त्याप्रमाणें, जीव आणि ब्रह्म याचें ऐक्य झाल्यावर त्यांची स्थिति होते; आणि नंतर ब्रह्मानंदाच्या मंदिरात महासुखाची दिवाळी झाल्याप्रमाणें तो सर्व जग पाहतो. ८९ याप्रमाणें आपलेच पाय आपले पाठीवर घेऊन योगी चालतो. असा अवघड जो योग तो तुला घडत नसेल, तर तुला आणखी दुसरा उपाय सांगतों. ३९०

श्लोकार्थः—सर्वत्र समदृष्टि आहे असा योगयुक्त पुरुष सर्व भूतामध्यें आपणच आहों व सर्व भूतें आपल्यामध्यें आहेत असें पाहतो. ॥ २९ ॥ जो सर्व भूतांमध्यें मला पाहतो व माझ्या ठिकाणीं सर्व भूतें पाहतो, त्याच्या दृष्टीआड मी होत नाहीं व माझ्या दृष्टीआड तो होत नाहीं. ( कारण दोघे एकरूप असतों ) ॥ ३० ॥

मी सर्वांच्या देहांत आहें याविषयीं शंका नाहीं; आणि त्याचप्रमाणें माझ्या ठिकाणीं सर्व आहे. ९१ अशा रीतीनें जग व ईश्वर हीं एकमेकांत मिसळलेलीं आहेत. परंतु साधकानें आपल्या बुद्धीचा निश्चय मात्र करावा. ९२ अर्जुना, येरवीं तरी, जो

१ आश्रय. २ ब्रह्मानुभवाच्या ३ स्थापना. ४ घडे. ५ सुलभ. ६ साधकानें. ७ अन्यथा. ८ उपयोगी पडलें. ९ मोकळें सोडून द्यावें. १० मोकळें सुटल्यावर. ११ तत्काल. १२ ब्रह्मरूप. १३ ( आत्मप्राप्तीचा ) अनुभव. १४ आंत. १५ पायांनीं. १६ घडणार नाहीं. १७ दुसरा. १८ शंका. १९ भरलेलें. २० घेतलें जाईल, म्हण करवेल.

येऱ्हवीं तरी अर्जुना । जो एकवटलिया भावना । सर्वभूतीं अभिन्ना । मातें भजे ॥९३॥ भूतांचेनि अनेकपणें । अनेक नोहे अंतःकरणें । केवळ एकत्वाचि माझें जाणे । सर्वत्र जो ॥ ९४ ॥ मग तो एक हा मियां । बोलतां दिसतसे वायां । येऱ्हवीं न बोलिजे तरि धनंजया । तो मीचि आहें ॥ ९५ ॥ दीपा आणि प्रकाशा । एकेंवंकीचा पैंडु जैसा । तो माझ्या ठायीं तैसा । मी तयामाजीं ॥९६॥ जैसा उदकाचेनि आयुष्यें रसु । कां गगनाचेनि मानें अवकाशु । तैसा माझेनि रूपें रूपसु । पुरुषु तो गा ॥ ९७ ॥

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः । सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते

अन्वयः—यः एकत्वं आस्थितः (सन्) सर्वभूतस्थितं मा भजति, सः योगी सर्वथा वर्तमानः अपि मयि वर्तते ॥ ३१ ॥

जेणें ऐक्याचिये दिठी । सर्वत्र मातेंचि किरीटी । देखिला जैसा पैंटीं । तंतु एक ॥ ९८ ॥ कां स्वरूपें तरी बहुतें आहाती । परी तैसीं सोनीं बहुवें न होती । ऐसी ऐक्याचळाची स्थिती । केली जेणें ॥ ९९ ॥ नातरी वृक्षांचीं पानें जेतुलीं । तैतुलीं रोपें नाहीं लाविलीं । ऐसी अद्वैतदिवसें पाहली । रात्री जया ॥ ४०० ॥ तो पंचात्मकीं सांपडे । तरी मग सांग पां कैसेनि अडे । तो प्रतीतीचेनि पाडें । मजसी तुके ॥ १ ॥ माझें व्यापकपण आघवें । गवसलें तयाचेनि अनुभवें । तरी न म्हणतां स्वभावें । व्यापकु जाहला ॥ २ ॥ अवतरणः—आतां शरीरी तरी आहे । परी शरीराचा तो नोहे । ऐसें बोलवरी होये । तें करूं ये काई ॥ ३ ॥

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।
सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ३२ ॥

अन्वयः—अर्जुन, यः आत्मौपम्येन सर्वत्र सुखं वा दुःखं यदि वा समं पश्यति, सः योगी परमः मतः ॥ ३२ ॥

म्हणोनि असो तें विशेषें । अथवा आपणपेंयासारिखें । तो चराचर देखे अखंडित ॥ ४ ॥ सुखदुःखादि वर्में । कां शुभाशुभें कर्में । दोनी ऐसीं मनोधर्में नेणेचि जो ॥ ५ ॥ हे समविषम भाव । आणिकही विचित्र जें सर्व । तें मानी जैसे अवयव । आपुले होती ॥ ६ ॥ हें एकैक काय सांगावें । जया त्रैलोक्यचि आघवें । मी ऐसें स्वभावें । बोधा आलें ॥ ७ ॥ तयाही देह एकु कीर आथी । लौकिकीं सुखदुःखी तयातें म्हणती । परी आम्हांतें ऐसी प्रतीती । परब्रह्मचि हा ॥ ८ ॥ म्हणोनि आपणपां विश्व देखिजे । आणि आपण विश्व होईजे ।

१ एकनिष्ठ. २ एकत्वाची. ३ योग्यता. ४ गोडी ५ पोकळी. ६ सुंदर. ७ वस्त्रात. ८ ऐक्यरूप पर्वताची. ९ उजाडली. १० अज्ञानरूप रात्र. ११ पंचभूतात्मक शरिरात. १२ स्वरूपीं येण्यास प्रतिबंध पावणें. १३ अनुभवाच्या. १४ तोलला जातो. १५ सापडलें.

एकत्वभावनेनें सर्व भूतांचे ठिकाणीं मी व्यापक आहे असें मानून मला भजतो, ९३ व्यक्तिमात्राच्या अनेकत्वानें ज्याचे अंत:करणांत अनेकत्व उत्पन्न होत नाहीं, आणि जो केवळ सर्व ठिकाणीं मीच व्यापक आहे असें जाणतो, ९४ तो आणि मी एक असें बोलणेंच व्यर्थ होय. येरवीं धनंजया, बोलून दाखविलें नाहीं, तरी तो आणि मी एक आहे. ९५ ज्याप्रमाणें दिवा आणि प्रकाश यांच्या एकत्वाची योग्यता असते, त्याप्रमाणें तो माझ्या ठिकाणीं व मी त्याचे ठिकाणीं आहे. ९६ जसें पाण्याचे योगानें गोडी किंवा गगनाच्या योगानें पोकळी यांचें अस्तित्व असतें, तसा माझ्याच रूपानें तो योगी रूपवान दिसतो. ९७

श्लोकार्थः—जो योगी एकनिष्ठेनें सर्व भूतांत असलेल्या मला भजतो, तो कोणत्याही प्रकारें वागत असला तरी माझ्या स्वरूपाचे ठिकाणींच असतो ॥ ३१ ॥

अर्जुना, ज्याप्रमाणें वस्त्रांत तंतु एक असतात, त्याप्रमाणें ज्यानें ऐक्याचे दृष्टीनें सर्व ठिकाणीं माझी व्याप्ति आहे असें जाणलें, ९८ किंवा पुष्कळ जरी अलंकार घातले तरी अनेकत्व नसणाऱ्या सोन्याप्रमाणें ज्यानें ऐक्यरूप पर्वताची स्थिति बनविली आहे, ९९ अथवा, जितकीं झाडाचीं पानें तितकीं रोपें लाविलेलीं नसतात, अशा अद्वैतप्रकाशानें ज्याची अज्ञानरात्र उजाडली आहे, ४०० तो पंचमहाभूतात्मक शरीरांत जरी सांपडला, तरी मग तो स्वस्वरूपास येण्याला कसा बरें प्रतिबंध पावेल? कारण, अनुभवाच्या योगानें जो माझी एकता पावतो, १ त्याच्या अनुभवानें माझें सर्व ठिकाणीं व्यापकत्व आहे असें जाणलें आहे, मग 'तो सर्वव्यापक झाला' असें म्हटलेंच पाहिजे असें नाहीं. २ हें पहा कीं, ह्यानें जरी शरीर धारण केलें आहे, तरी तो शरिराचा नाही. ही गोष्ट बोलून दाखवितां येण्यासारखी नव्हे; तेव्हा तिचें वर्णन करितां येईल काय? ३

श्लोकार्थः—हे अर्जुना, जो योगी सर्वत्र सुख आणि दुःख आपलेप्रमाणें सारखें पाहतो, तो योगी परममान्य होय ॥ ३२ ॥

अर्थात् या विषयाबद्दल जास्त सांगणें नको. जो सदोदित आपल्यासारखेंच सर्व जग मानतो; ४ जो सुख आणि दु:ख याचे विकार अथवा शुभ व अशुभ कर्मं हीं दोन आहेत असें आपल्या मनांत समजत नाही; ५ हें सम आणि हें विषम असा भाव मनांत न धरतां, याशिवाय इतर सर्व विचित्र गोष्टी जो आपल्या शरीराच्या अवयवांप्रमाणें एकच आहेत, असें समजतो; ६ यापेक्षा आणखी काय काय गोष्टी सांगाव्या? ज्याला सर्व त्रैलोक्य मीच आहें असें अनुभवानें समजलें आहे, ७ त्याला शरीर आहे ही गोष्ट खरी, आणि तो सुखदु:ख भोगतो असें लोक देखील म्हणतात; तथापि आमच्या अनुभवानें तो परब्रह्मच आहे. ८ म्हणून अर्जुना, ज्याच्या योगानें आपल्याच ठिकाणीं सर्व विश्व पाहतां येईल, आणि आपणा स्वतांसच विश्वरूप होतां येईल, त्या समदृष्टीची तूं

ऐसें साम्युचि एक उपासिजे । पांडवा गा ॥ ९ ॥ हें तूतें बहुतीं प्रसंगीं । आम्ही म्हणों याचिलागीं । जे साम्यांपरौती जगीं । प्राप्ति नाहीं ॥ ४१० ॥

अर्जुन उवाच—

योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।
एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥
चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद् दृढम् ।
तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥

अन्वयः—(हे) मधुसूदन! (यः) अयं योगः त्वया साम्येन प्रोक्तः (आसीत्), अहं (मनसः) चंचलत्वात् एतस्य स्थिरां स्थितिं न पश्यामि ॥ ३३ ॥ कृष्ण, मनः चंचलं, प्रमाथि, बलवत् दृढं (अस्ति); अहं हि तस्य निग्रहं वायोः इव सुदुष्करं मन्ये ॥ ३४ ॥

( २२३. वायूसारखें चंचल मन स्थिर कसें होणार? ४११-४१७ ) तंव अर्जुन म्हणे देवा । तुम्ही सांगा कीर आमुचा कैणवा । परि न पुरों जी स्वभावा । मनाचिया ॥ ११ ॥ हें मन कैसें केवढें । ऐसें पाहों म्हणों तरी न सांपडे । येऱ्हवीं राहाटावया थोडें । त्रैलोक्य यया ॥ १२ ॥ म्हणोनि ऐसें कैसें घडेल । जे मर्कट समाधी येईल । कां राहा म्हणतलिया राहेल । महावातु ॥ १३ ॥ जें बुद्धीतें सैळी । निश्चयातें टाळी । धैर्येसीं हातफळी । मिळवूनि जाय ॥ १४ ॥ जें विवेकातें भुलवी । संतोषासी चाँड लावी । बैसिजे तरी हिंडवी । दाही दिशा ॥ १५ ॥ जें निरोधलें घे उवावो । जया संयमुचि होय सांवावो । तें मन आपुला स्वभावो । सांडील काई ॥ १६ ॥ म्हणोनि मन एक निश्चळ राहेल । मग आम्हांसि साम्य होईल । हें विशेषेंही न घडेल । याचिलागीं ॥ १७ ॥

श्रीभगवानुवाच—

असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् । अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥३५॥

अन्वयः—हे महाबाहो ! असंशयं चलं मनः दुर्निग्रहं (अस्ति); हे कौंतेय, (तत्) अभ्यासेन तु वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥

( २२४. अभ्यास व वैराग्य या साधनांनीं मन स्थिर होतें, ४१८-४२६ ) तंव कृष्ण म्हणती साचचि । बोलत आम्हांसि तें तैसेंचि । यया मनाचा कीर चपळाचि । स्वभावो गा ॥ १८ ॥ परि वैराग्याचेनि आधारें । जरि लाविलें अभ्यासाचिये मोहरें । तरि केतुलेनि एके अवसरें । स्थिरावेल ॥ १९ ॥ कां जें यया मनाचें एक निकें । जें देखिलें गोडीचिया ठाया सोकें[२] । म्हणोनि अनुभव-सुखाचि कवातिकें । दावीत जाइजे ॥ ४२० ॥

असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः । वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः

अन्वयः—असंयतात्मना योगः दुष्प्रापः (अस्ति), वश्यात्मना यतता तु उपायतः आवाप्तुं शक्यः (अस्ति), इति मे मतिः (अस्ति) ॥ ३६ ॥

येऱ्हवीं विरक्ति जयांसि नाहीं । जे अभ्यासीं न रिघती कहीं । तयां

१ समदृष्टीपेक्षां. २ दयेनें. ३ पुरे पडणें, टिकाव लागणें. ४ व्यवहार करण्यास, फिरण्यास.

उपासना कर. ९ आम्हीं तुला पुष्कळ प्रसंगीं याच कारणाकरितां असें सांगितलें आहे कीं, समदृष्टीपेक्षां या जगतांत दुसरी अधिक प्राप्ति कसली नाहीं. ४१०

श्लोकार्थः—अर्जुन म्हणाला, "हे मधुसूदना ! तुम्हीं जो हा समत्वयोग सांगितला, तो, मनाच्या चचलपणामुळें, साधेल असें मला वाटत नाहीं. ॥ ३३ ॥ हे कृष्णा, मन हें अति चंचल, कोणताही बेत तडीस जाऊं न देणारें, बलवान व अभेद्य आहे; त्याचा निग्रह करणें वायूप्रमाणें दुःसाध्य आहे असें मी मानतों." ॥ ३४ ॥

मग अर्जुन श्रीकृष्णास म्हणतो, देवा, तुम्हीं आमची दया मनांत आणून हा समतेचा मार्ग सांगितला, परंतु मनाच्या चंचल स्वभावापुढें आमचा टिकाव लागत नाहीं. ११ हें मन कसें आणि केवढें आहे असें पाहूं म्हटलें तर तें सांपडत नाहीं. येरवीं त्याला फिरण्याला त्रैलोक्यही पुरें होत नाहीं. १२ म्हणून, माकडाला समाधि लागणें किंवा मोठ्या वाऱ्याला स्थिर हो म्हणतांच तो थांबणें ह्या गोष्टी कशा घडतील ? १३ जें मन बुद्धीला हलवतें, निश्चय मोडतें, आणि धैर्याचे हातावर हां हां म्हणतां तुरी देऊन निघून जातें, १४ जें विचाराला चकवितें, संतोषाला नादीं लावतें, आणि मनुष्य एके ठिकाणीं बसला तरी त्याला दशदिशा हिंडवितें, १५ ज्याला कोंडलें असतां तें उसळून बाहेर येतें, आणि निग्रह केला तर तो उलटा त्याला साह्य करतो, असें हें मन आपला स्वभाव सोडील का ? १६ म्हणून, एक मन जर स्थिर राहील, तर मग आम्हांला समदृष्टि प्राप्त होईल; परंतु मनाची अशीच चंचल वृत्ति असल्यामुळें ती प्राप्त होणें दुर्घट आहे." १७

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणाले:—हे महाबाहो ! या चंचल मनाचा निग्रह करणें खरोखर फार कठीण आहे, हें मीही निःसंशय मानतों; पण अर्जुना, वैराग्य व अभ्यास या दोहोंच्या योगानें तें स्वाधीन होतें ॥ ३५ ॥

तेव्हा श्रीकृष्ण म्हणतातः—तूं जें बोललास, तें खरोखर तसेंच आहे. या मनाचा स्वभाव खरोखर चंचल आहे. १८ परंतु याला वैराग्याच्या आधारानें अभ्यासाच्या रस्त्याला लावलें, तर कांहीं अवकाशानें हें स्थिर होईल. १९ कारण, या मनाच्या ठिकाणीं एक चांगला गुण आहे: ज्याची याला चटक लागेल, त्याच ठिकाणीं राहावयास हें सोकावतें ! म्हणून कौतुकानें आत्मसुखाकडेसच याला वळवावें. ४२०

श्लोकार्थः—मनाचा निग्रह करण्याचा जे अभ्यास करीत नाहींत, त्याना योग प्राप्त होत नाहीं; परंतु जे अंतःकरण वश करून मनाचा निग्रह करण्याचा यत्न करतात, त्याना उपायानें योग प्राप्त होतो असें माझें मत आहे. ॥ ३६ ॥

येरवीं, ज्याला वैराग्य नाहीं व जो कधीं अभ्यासही करीत नाहीं, त्याला हें मन आवरणार नाहीं असें आम्ही देखील कोठें मानीत नाहीं ? २१ आणि जो यम, नियम, प्राणायाम वगैरेंचा अभ्यास करीत नाहीं, ज्याला वैराग्याची कधीं आठवण होत नाहीं,

५ छळतें. ६ बोलतां बोलता हातावर हात देऊन. ७ आशा, नाद. ८ उचल. ९ निग्रह. १० साहाय्य. ११ ठिकाणीं, १२ सोकावतें, १३ आत्मसुख.

नोकळे हें आम्हीही । न मैनूं कायी ॥ २१ ॥ परि यमनियमांचिया वाटा न वैचिजे । कहीं वैराग्याची से न करिजे । केवळ विषयजळीं ठाकिजे । बुडी देउनी ॥ २२ ॥ येया जालिया मानसा कहीं । युक्तीची कोंवी लगली नाहीं । तरी निश्चळ होईल काई । कैसेनि सांगें ॥ २३ ॥ म्हणोनि मनाचा निग्रहो होये । ऐसा उपाय जो आहे । तो आरंभी मग नोहे । कैसा पाहों ॥ २४ ॥ तरी योगसाधन जितुकें । तें अवघेंचि काय लटिकें । परि आपणपया अभ्यासूं न ठाके । हेंचि म्हणो ॥ २५ ॥ आंगीं योगाचें होय बळ । तरि मन केतुले चपळ । काय महदादि हे सकळ । आपु नोहे ॥ २६ ॥ (२२५. योगाभ्यासाचा परिचय झाला म्हणून मन स्थिर होण्याची शंका गेली, ४२७-४२९) तेथ अर्जुन म्हणे निकें । देवो बोलती तें न चुके । साचचि योगबळेंसीं न तुके । मनोबळ ॥ २७ ॥ तरि तोचि योगु कैसा केंवि जाणों । आम्ही येतुले दिवस याची मातुही नेणों । म्हणोनि मनातें जी म्हणों । अनावर ॥ २८ ॥ हा आतां आघवेया जन्मा । तुझेनि प्रसादें पुरुषोत्तमा । योगपरिचय आम्हां । जाहला आजी ॥ २९ ॥

अर्जुन उवाच—

**अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः । अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥**
**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति । अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥३८**
**एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः । त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥३९॥**

अन्वयः—( हे ) कृष्ण ! श्रद्धया उपेतः अयतिः योगात् चलितमानसः ( सन् ) योगसंसिद्धिं अप्राप्य, का गतिं गच्छति ? ॥ ३७ ॥ ( हे ) महाबाहो ! ब्रह्मणः पथि अप्रतिष्ठः विमूढः सः उभयविभ्रष्टः ( सन् ) छिन्नाभ्रं इव न नश्यति कच्चित् ? ॥ ३८ ॥ ( हे ) कृष्ण ! मे एतत् संशयं अशेषतः छेत्तु अर्हसि; त्वदन्यः अस्य संशयस्य छेत्ता न हि उपपद्यते ॥ ३९ ॥

( २२६. योगाभ्यास करीत असता मध्येंच प्राण गेला तर योगाभ्यास करणाराला काय गति होईल ? ४३०—४३६ ) परि आणिक एक गोसांविया । मज संशय असे साविया । तो तूं वांचुनि फेडावया । समर्थु नाहीं ॥ ४३० ॥ म्हणोनि सांगें श्रीगोविंदा । कवण एकु मोक्षपदा । झोंबत होता श्रद्धा । उपायेंविण ॥ ३१ ॥ इंद्रियगामोनि निगाला । आस्थेचिया वाटा लागला । आत्मसिद्धीचिया पुढिला । नगरा यावया ॥ ३२ ॥ तंव आत्मसिद्धि न ठेकेचि । आणि मागुतें न येववेचि । ऐसा अस्तु गेला मांझारींचि । आयुष्यभानु ॥ ३३ ॥ जैसें अकाळीं आभाळ । अंब्रमाळ संपातळ । विपर्यें आलें केवळ । वेंसे ना वेंषे ॥ ३४ ॥ तैसीं दोन्ही दुरावलीं । जे प्राप्ति तंव अलग ठेली । आणि अप्राप्तिही सांडवली । श्रद्धा तया ॥ ३५ ॥ ऐसा दोला अंतरला कां जी । जो श्रद्धेच्या समाजीं । बुडला तया हो जी । कवण गति ॥ ३६ ॥

१ आवरत नाहीं. २ मानीत नाहीं का ! ३ जावें. ४ विषयलंपट. ५ चिमट. ६ महत्तत्त्वादि.

आणि जो केवळ विषयरूप जलांत माशासारखी बुडी देऊन राहिला आहे, २२ आणि अशा प्रकारें विषयलंपट झालेल्या त्याच्या मनाला युक्तीची चिमट कधीं लागली नाहीं, त्याचें मन निश्चल कसें होईल सांग बरें ? २३ म्हणून, मनाचा निग्रह करणें हा जो उपाय आहे, त्याला तूं आरंभ कर; मग तें कसें निश्चळ होत नाहीं तें पाहूं ! २४ तर योगसाधनें म्हणून जेवढीं आहेत, तेवढीं सर्व काय खोटीं आहेत ? परंतु आपल्याला अभ्यास होत नाहीं असें म्हण. २५ जर योगसाधनाचें बळ अंगात असलें, तर मनाच्या चंचलतेची काय बिशाद आहे ? महत्तत्त्वादिक स्वाधीन होत नाहीत काय ? २६ तेव्हां अर्जुन म्हणतो, " देवा, आपण जें म्हणतां तें खरें आहे; खरोखर योगबळापुढें मनाचें बळ टिकणार नाही. २७ तरी तो योग कसा आहे व कशा रीतीनें जाणावा त्याची गोष्ट इतके दिवस आम्हांस माहीत नव्हती. म्हणून मन हें अनावर आहे असें आम्ही म्हणत होतों. २८ हे पुरुषोत्तमा, तुमच्या प्रसादानें आमच्या सगळ्या जन्मात आज योगाचा परिचय आम्हास झाला ! २९

श्लोकार्थः—अर्जुन म्हणालाः—हे कृष्णा, जो साधक श्रद्धेनें युक्त आहे, परंतु विशेष यत्न करीत नाहीं, व योगापासून ज्याचें मन भ्रष्ट झालें आहे, असा पुरुष, योगसिद्धीला न पावता कोणत्या गतीला जातो ? ॥ ३७ ॥ कृष्णा, ब्रह्ममार्गाचे ठिकाणीं स्थिर न होता, मोहाला पावलेला योगी कर्ममार्ग व योगमार्ग या दोहोंपासून भ्रष्ट होऊन, तुटलेल्या ढगाप्रमाणें नाशाला पावत नाहीं काय ? ॥ ३८ ॥ हे कृष्णा, या माझ्या संशयाचा निःशेष छेद करण्याविषयीं तुम्हीच योग्य आहा, तुमच्यांवाचून या संशयाचा छेद करण्यास दुसरा कोणी समर्थ नाहीं. ॥ ३९ ॥

" परंतु, हे प्रभो, आणखी एक संशय सहज उत्पन्न झाला आहे, तो फेडण्यास आपल्याशिवाय दुसरा कोणीही समर्थ नाहीं. ४३० म्हणून, गोविंदा, मला सांगा कीं, कोणीएक मनुष्य मोक्षप्राप्तीकरतां भक्तियुक्त अंतःकरणानें उपायाशिवाय इच्छा करीत होता; ३१ इंद्रियरूपी गांवाहून निघून मोक्षरूपी गांवास जाण्याकारितां तो भक्तिरूप मार्गाला लागला; ३२ तोंच मोक्ष प्राप्त होत नाहीं, आणि परतही येववत नाहीं, अशा स्थितींत त्याचा आयुष्यरूपी सूर्य मध्येंच मावळला; ३३ सहज अकालीं आलेला लहान पातळ ढग ज्याप्रमाणें टिकत नाहीं व वृष्टिही करीत नाहीं, ३४ त्याप्रमाणें, ज्याला दोन्ही अंतरलीं, म्हणजे मोक्षप्राप्ति तर दूरच राहिली, आणि श्रद्धेमुळें सोडलेल्या संसारासही तो मुकला; ३५ असा दोन्ही गोष्टींना जो मुकला, परंतु भक्तींत निमग्न झाला, त्याला कोणती गति प्राप्त होते हें सांगा. " ३६

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणाले, हे पार्था, असा योगेच्छु पुरुष जो आहे, तो इहलोकाला व परलोकाला अंतरत नाहीं बापा, कल्याण व्हावें अशी इच्छा करणारा जो आहे, तो (जन्ममरणरूप) दुर्गतीप्रत कधींही जात नाहीं. ॥ ४० ॥

७ स्वाधीन. ८ गोष्टी. ९ आर्जिक्य. १० प्रभो. ११ साहजिक. १२ भक्तीनें १३ प्राप्त झाली नाहीं. १४ मावळला. १५ मध्येंच. १६ किंचित्. १७ पट्यासारखें. १८ सहज १९ राही. २० वृष्टि करी. २१ दूर. २२ संसार. २३ हारवली. २४ मुकला.

श्रीभगवानुवाच—

पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते। न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥४०

अन्वयः--पार्थ, इह तस्य विनाशः न एव विद्यते, ( च ) अमुत्र ( तस्य विनाशः न एव विद्यते; हे ) तात! कल्याणकृत कश्चित् दुर्गतिं न हि गच्छति ॥ ४० ॥

( २२७. योगी मोक्षसुखालाच प्राप्त होतो, परंतु मध्यें विसावा घेत जातो; ४३७–४४० ) तंव कृष्ण म्हणती पार्था । जया मोक्षसुखीं आस्था । तया मोक्षावांचूनि अन्यथा । गती आहे गा ॥ ३७ ॥ परि एतुलें हेंचि एक घडे । जें माझारीं विसांवावें[1] पडे । तेंही परि ऐसेनि सुरवाडें । जो देवां नाहीं ॥ ३८ ॥ येऱ्हवीं अभ्यासाचा उचलता । पाउलीं जरी चालता । तरि दिवसाआधीं ठाकता । सोहंसिद्धीतें[4] ॥ ३९ ॥ परि तेतुला वेग नव्हेचि । म्हणऊनि विसावा तरि निकाचि । पाठीं मोक्षु तैसाचि । ठेविला असे ॥ ४४० ॥

प्राप्य पुण्यकृतांल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥

अन्वयः--योगभ्रष्टः ( पुरुषः ) पुण्यकृतान् लोकान् प्राप्य ( तत्र ) शाश्वतीः समाः उषित्वा शुचीनां श्रीमतां गेहे अभिजायते ॥ ४१ ॥

( २२८. मोक्षाला जातांना विसाव्याचीं स्थळें, ४४१–४४३ ) ऐकें कवतिक हें कैसें । जे शतमखा लोक सायासें । ते तो पावे अनायासें । कैवल्यकामु ॥ ४१ ॥ मग तेथींचे जे अमोघ । अलौकिक भोग । भोगितांही सांग । कांटाळे मन ॥ ४२ ॥ हा अंतराय अवचितां । कां वोढवला श्रीभगवंता । ऐसा दिविभोग योगितां । अनुतापी नित्य ॥ ४३ ॥ ( २२९. योगभ्रष्ट मृत्युलोकीं आचारसंपन्न व बुद्धिमान कुलांत जन्म घेतो, ४४४–४५१ ) पाठीं जन्मे संसारीं । परि सकळ धर्माचिया माहेरीं । लांबैं उगवे आगरीं । विभवश्रियेचा ॥ ४४ ॥ जयातें नीतिपंथें चालिजे । सत्य-पूत बोलिजे । देखावें तें देखिजे । शास्त्रदृष्टी ॥ ४५ ॥ वेद तो जागेश्वरु । जया व्यवसाय निजाचारु । सारासार विचारु । मंत्री जया ॥ ४६ ॥ जयाच्या कुळीं चिंता । जाली ईश्वराची पतिव्रता । जयातें गृहदेवता । आदि ऋद्धि ॥ ४७ ॥ ऐसी निजपुण्याची जोडी । वाढिन्नली सर्वसुखाची कुळवाडी । तिये जन्मे तो सुर-वाडी । योगच्युतु ॥ ४८ ॥

अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् । एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥४२
तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् । यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥ ४३ ॥

अन्वयः—अथवा धीमतां योगिनां एव कुले ( जन्म ) भवति; यत् ईदृशं एतत् जन्म ( तत् ) लोके हि दुर्लभतरम् ॥ ४२ ॥ ( हे ) कुरुनंदन ! तत्र तं पौर्वदेहिकं बुद्धिसंयोगं लभते; ततः ( च ) संसिद्धौ भूयः यतते ॥ ४३ ॥

अथवा ज्ञानाग्निहोत्री । जे परब्रह्मश्रोत्री[21] । महासुखक्षेत्रीं । आदिवंत ॥४९॥ जे

तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले:—पार्था, ज्याला मोक्षप्राप्तीची इच्छा आहे, त्याला मोक्षावांचून दुसरी गति आहे काय ? ३७ परंतु त्याला मध्यंतरीं विश्रांति घ्यावी लागते एवढेंच काय तें ! पण त्या विश्रांतींत त्याला जें सुख होतें तें देवांना सुद्धा मिळत नाहीं ! ३८ येरवीं, जर ह्यानें अभ्यासाचें पाऊल उचलून मागे क्रमिलें असता, तर दिवस ( आयुष्य ) मावळण्याच्या पूर्वीच हा मोक्षप्राप्तीच्या गांवाला पोहोंचला असता ! ३९ परंतु तितका त्याचा वेग नसल्यामुळें त्याला विसांवा घेणें भाग पडलें. तथापि मागाहून तरी मोक्षप्राप्ति ही ठेविलेलीच आहे. ४४०

श्लोकार्थः—योगभ्रष्ट पुरुष, महत्पुण्यानें प्राप्त व्हावयाचे जे ( इंद्रादिक ) लोक तेथें जाऊन पुष्कळ वर्षें राहून नंतर मृत्युलोकामध्यें पवित्र व श्रीमंत पुरुषाच्या कुलांत जन्मास येतो. ॥ ४१ ॥

अरे, हें कौतुक पहा कीं, ज्या लोकांची प्राप्ति व्हावयास शंभर यज्ञ करणाऱ्या इंद्रालाही सायास पडतात, ते या मोक्षेच्छु पुरुषाला अनायासें प्राप्त होतात. ४१ मग तेथील निष्फल न होणारे व अप्रतिम असे भोग भोगतां भोगतां त्याच्या मनाला कंटाळा येतो ! ४२ ते दिव्य भोग भोगीत असतां तेथें त्यास सुख होत नाही; व ' हे भगवंता, हें विघ्न माझ्यामागें कां लागलें ? ' असा तो निरंतर पश्चात्ताप करीत असतो. ४३ नंतर तो फिरून मृत्युलोकीं जन्म पावतो, पण सर्व धर्माचें माहेरघर अशा कुळांत जन्म पावतो; आणि शेत कापल्यावर पडलेल्या भातगोट्यांचें शेत जसें जोरानें फोफावतें, तशी त्याच्या ऐश्वर्याची वृद्धि होते. ४४ जें कुळ नीतिमार्गानें चालणारें, सत्य आणि पवित्र भाषण करणारें, आणि शास्त्ररीतीनें वागणारें, ४५ ज्या कुळाला वेद जागृत ठेवतो, ( जेथें वेदाध्ययन सुरू असतें ) स्वधर्माचें आचरण हा ज्याचा व्यवसाय, व सारासार विचार हाच ज्याचा मंत्री होय, ४६ ज्या कुळांत चितेनें ईश्वरास वरिलें, ( ज्या कुळाला चिंता ही ठाऊक नाहीं ) आणि ज्याच्या गृहदेवता ऋध्यादिक ह्या आहेत, ४७ असें ज्या कुळानें पुण्य जोडलें आहे, व जेथें सर्व सुखाची समृद्धि आहे, अशा कुळांत तो योगभ्रष्ट पुरुष सुखानें जन्म घेतो. ४८

श्लोकार्थः—अथवा बुद्धिमान योग्याच्या कुळामध्यें हा योगभ्रष्ट जन्माला येतो. का कीं, अशा प्रकारचा जन्म ह्या लोकीं फार दुर्लभ आहे. ॥ ४२ ॥ अशा योग्याच्या कुळांत जन्म झाला म्हणजे त्याला पूर्वजन्मींची योगबुद्धि ह्या जन्मीं प्राप्त होते, आणि योगाच्या सिद्धीकरितां हा पुनः यत्न करतो ॥ ४३ ॥

अथवा ज्ञानरूप अग्नीमध्यें हवन करणारे, व अध्यात्मसिद्धांतांत निष्णात, आणि

१ विसावा घ्यावा लागतो. २ सुखावे. ३ विसावा. ४ अद्यंब्रह्माला. ५ शंभर यज्ञ करणाऱ्याला-इंद्राला. ६ मोक्षेच्छु. ७ निष्फल न होणारे. ८ विघ्न. ९ स्वर्गांचे दिव्य भोग. १० नंतर. ११ विश्रांतिस्थानीं. १२ शेत कापल्यावर पडलेल्या भातगोट्याचें उगवलेलें शेत. १३ ऐश्वर्याचा. १४ पवित्र. १५ आद्यदैवत. १६ सल्लामसलतगार. १७ समृद्धि. १८ सुखांत. १९ योगभ्रष्ट. २० ज्ञानरूप अग्नीमध्यें हवन करणारे. २१ विद्वान. २२ महारूप क्षेत्रांत. २३ वतनदार.

सिद्धांतांचिया सिंहासनीं । राज्य करिती त्रिभुवनीं । जे कूंजती[1] कोकिलवनीं । संतोषाच्या ॥४५०॥ जे विवेकद्रुमाचे[3] मुळीं । बैसले आहाति नित्यफळीं । तया योगियांचिया कुळीं । जन्म पावे ॥५१॥ ( २३०. अंते मतिः सा गतिः, ४५२-४७३) मोटकी[4] देहाकृती उमटे । आणि निजज्ञानाची पाहांट फुटे[5] । सूर्यापुढे प्रगटे । प्रकाशु जैसा ॥ ५२ ॥ तैसी दशेची[6] वाट न पाहतां । वयसेचिया[7] गांवा न येतां । बाळपणींच सर्वज्ञता । वरी[8] तयातें ॥ ५३ ॥ तिये सिद्धप्रज्ञेचेनि[9] लाभें । मनचि सारस्वतें[10] दुभे[11] । मग सकळ शास्त्रें स्वयंभें । निघती मुखें ॥५४॥ ऐसें जें जन्म । जयालागीं देव सकाम[12] । स्वर्गीं ठेले जप होम । करिती सदा ॥ ५५ ॥ अमरीं भाट होइजे । मग मृत्युलोकातें वानिजे । ऐसें जन्म पार्था गा जें । तें तो पावे ॥ ५६ ॥

पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः । जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥४४॥

अन्वयः—सः अवशः अपि तेन एव पूर्वाभ्यासेन ह्रियते; योगस्य जिज्ञासुः अपि शब्दब्रह्म अतिवर्तते ॥ ४४ ॥

आणि मागील जे सद्बुद्धि । जेथ जीवित्वीं[13] जाहाली होती अवधि[14] । मग तेचि पुढती निरवधि । नवी लाहे ॥ ५७ ॥ तेथ सदैवीं[15] आणि पायाळीं[16] । वरि दिव्यांजन होय डोळां । मग देखे जैसीं अवलीळा[17] । पाताळधनें ॥ ५८ ॥ तैसे दुर्भेदे[18] जे अभिप्राय । कां गुरुगम्य[19] हन ठाय । तेथ संसरेंवीण[20] जाय । बुध्दि तयाची ॥ ५९ ॥ बळियें इंद्रियें येती मना । मन एकवटे पवना[21] । पवन सहजें गगना[22] । मिळोंचि लागे ॥ ४६० ॥ ऐसें नेणों काय अपैसें । तयातेंचि कीजे अभ्यासें । समाधि घर पुसे । मानसाचें ॥ ६१ ॥ जाणिजे योगपीठींचा[23] भैरवु । काय हा आरंभु भैरेचा गौरवु । कीं वैराग्यसिद्धीचा अनुभवु । रूपा आला ॥ ६२ ॥ हा संसार उमाणितें[26] माप । कां अष्टांगसामग्रीचें द्वीप[28] । जैसें परिमळेंचि धरिजे रूप । चंदनाचें ॥६३॥ तैसा संतोषाचा काय घडिला । कीं सिद्धिभांडारींहुनि[30] काढिला । दिसे तेणें मानें रूढलीं । साधकदशे ॥ ६४ ॥

प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः । अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ४५

अन्वयः—प्रयत्नात् यतमानः, संशुद्धकिल्बिषः योगी तु अनेकजन्मसंसिद्धः ( सन् ) ततः परां गतिं याति ॥ ४५ ॥

जे वर्षशतांचिया[31] कोडी । जन्मसहस्रांचिया आडी[33] । लंघितां पातला थडी । आत्मसिद्धीची ॥ ६५ ॥ म्हणोनि साधनजात आधवें । अनुसरे तया स्वभावें ।

१ एकमेवाद्वितीयं या सिद्धांताच्या. २ शब्द करितात. ३ विचाररूप वृक्षाच्या. ४ मोजकी; लहानशी. ५ उजाडे. ६ प्रौढ अवस्थेची. ७ वयाच्या ८ पाणिग्रहण करते. ९ सिद्ध बुद्धीच्या. १० विद्येने. ११ फलप्रद होतें. १२ देवांनीं १३ आयुष्याला. १४ शेवट. १५ दैववान. १६ पायाळू मनुष्य १७ सहज. १८ अगम्य. १९ गुरूपासूनच प्राप्त होणारे. २० कष्टावाचून, अचूक. २१ प्राणात. २२ चिदाकाशात. २३ मुख्य स्थानावरचा. २४ शकर. २५ मोठेपणाचा.

परब्रह्मरूप गांवचे वतनदार; ४९ जे एकमेवाद्वितीयं या सिद्धांतांत नेहमीं निमग्न राहून त्रिभुवनाचें राज्य करतात, आणि संतोषरूप वनांत कोकिळासारखा मधुर ध्वनि करतात, ४५० आणि जे विचारवृक्षाच्या मुळापाशीं बसून ब्रह्मरूप नित्य फळांचें सेवन करतात, अशा योग्यांच्या कुळांत तो ( योगभ्रष्ट ) पुरुष जन्म घेतो. ५१ जन्म घेतल्यावर लहान वयांतच त्याच्या ठिकाणीं आत्मज्ञानाचा उजेड पडतो; व ज्याप्रमाणें सूर्य उगवण्याच्या अगोदर चहूंकडे प्रभा फांकते, ५२ त्याप्रमाणें, प्रौढ वयाची वाट न पाहतां ज्ञान हें त्याला बालपणींच वरतें. ५३ पूर्वजन्मीं सिद्ध झालेल्या बुद्धीच्या योगानें सर्व विद्या त्याला प्राप्त होतात; व त्याच्या मुखांतून सर्व शास्त्रें स्वयमेव निघूं लागतात. ५४ असें जें उत्तम कुळीं जन्म, तें प्राप्त होण्याकरितां स्वर्गवासी देव देखील मनात हेतु धरून नेहमीं जप, होम करीत असतात. ५५ पार्था, देवानीं स्तुतिपाठक होऊन मृत्युलोकाचें वर्णन करावें असें जें उत्तम कुळीं जन्म, तें तो योगभ्रष्ट पुरुष पावतो. ५६

श्लोकार्थः—तेथें जन्म झाल्यावर, तो परतंत्र असला तरी पूर्वाभ्यासाचे बलानें ( योगाकडे ) ओढला जातो; आणि योगाविषयीं जो ( नुस्ता ) जिज्ञासु आहे त्याला देखील वेदाचरणाच्या फलापेक्षा विशेष फल मिळतें ॥ ४४ ॥

आणि ज्या पूर्वजन्मात आयुष्याचा शेवट झाला होता, त्या वेळची सद्बुद्धि त्याला पुनः प्राप्त होते. ५७ त्या समयीं, दैववान, पायाळू आणखी वर डोळ्यात दिव्याजन घातलेल्या पुरुषास जसें भूमींतील धन सहज दृष्टीस पडते, ५८ त्याप्रमाणें, गुरुमुखाशिवाय न कळणाऱ्या कठीण अशा अभिप्रायाच्या ठिकाणीं त्याची बुद्धि अनायासे जाऊन पोहोंचते. ५९ इंद्रियें हीं आपण होऊन मनाच्या अधीन होतात, मन प्राणवायूंत ऐक्य पावतें व तो प्राणवायु चिदाकाशांत मिळतो. ४६० आणखी काय गोष्टी असतील त्या असोत, परंतु योगाभ्यासही त्याला आपोआप प्राप्त होतो, आणि समाधिही त्याच्या मनाचें घर विचारीत येतो. ६१ असे वाटतें कीं, हा पुरुष योगस्थानचा शंकर किंवा योगाच्या आरंभींचें वैभवच अथवा वैराग्यरूप सिद्धीचा मूर्तिमंत अनुभवच आहे. ६२ किंवा हें संसार मोजण्याचे मापच, अथवा अष्टांगयोगसाहित्याचें बेटच होय. सुगंधानेंच ज्याप्रमाणें चंदनाचें रूप धारण करावें, ६३ त्याचप्रमाणें, साधकदशेंतच हा इतका धैर्ययुक्त झालेला असतो कीं, संतोषाचा पुतळा बनविल्यासारखा किंवा सिद्धीच्या भांडारातून काढल्यासारखा दिसतो. ६४

श्लोकार्थः—नियमानें प्रयत्न करणारा, सर्व पातकापासून मुक्त झालेला, व अनेक जन्म हाच प्रयत्न करीत आलेला योगी परमगतीप्रत प्राप्त होतो. ॥ ४५ ॥

कारण कोट्यवधि वर्षांनीं हजारों जन्माचा प्रतिबंध दूर करून तो आत्मसिद्धीच्या किनाऱ्यावर येऊन पोहोंचलेला असतो. ६५ म्हणून सर्व साधनें त्याला स्वभावत.च प्राप्त

२६ मोजणारें. २७ योगसाहित्याचें. २८ बेट. २९ सुवासानें. ३० खजिन्यातून. ३१ काढला. ३२ कोटी. ३३ प्रतिबंध.

मग आयतिये वैसे राणिवे । विवेकाचिये ॥ ६६ ॥ पाठीं विचारितया वेगां । तो विवेकुही ठाके मागां । मग अविचारणीय तें आंगा । घडोनि जाय ॥ ६७ ॥ तेथ मनाचें मेहुडें विरे । पवनाचें पवनपण सरे । आपणपां आपण मुरे । आकाशही ॥ ६८ प्रणवाचा माथा बुडे । येतुलेनि अनिर्वाच्य सुख जोडे । म्हणोनि आधींचि बोल वेहुडे । तयालागीं ॥ ६९ ॥ ऐसी ब्रह्मींची स्थिति । जे सकळा गतींसी गति । तया अमूर्ताची मूर्ति । होऊनि ठाके ॥ ४७० ॥ तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं । विक्षेपांचीं पाँणिवळें क्षाडिलीं । म्हणोनि उपजतखेंवो बुडाली । लग्नघटिका ॥ ७१ ॥ आणि तद्रूपतेसीं सुलग्न । लागोनि ठेलें अभिन्न । जैसें लोपलें अभ्रें गगन । होऊनि ठाके ॥ ७२ ॥ तैसें विश्व जेथ होये । मागौतें जेथ लया जाये । तें विद्यमानेंचि देहें । जाहला तो गा ॥ ७३ ॥

तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।
कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥

अन्वयः--योगी तपस्विभ्यः अधिकः ( अस्ति; ) च ज्ञानिभ्यः अपि अधिकः मतः; योगी कर्मिभ्य च अधिकः ( अस्ति; ) तस्मात् अर्जुन, त्वं योगी भव ॥ ४६ ॥

( २३१. अर्जुनाला योगी होण्यास सांगतात, ४७४–४८१ ) जैंया लाभाचिया आशा । करूनि धैर्यबाहूंचा भरंवसा । घालीत धैर्य कर्माचा धौंरसा । कर्मनिष्ठ ॥ ७४ ॥ कां जिये एक वस्तूलागीं । घाणोनि ज्ञानाची वेंत्रांगी । झुंजत प्रपंचेंशीं समरंगीं । ज्ञानिये गा ॥ ७५ ॥ अथवा निलैंगें निसरडा । तपोदुर्गाचा औंडकडा । झोंबती तपिये चाडा । जयाचियेँ ॥ ७६ ॥ जें भजतियां भैंज्य । याज्ञिकांचें यैंज्य । एवं जें पूज्य । सकळां सदा ॥ ७७ ॥ तेंचि तो आपण । स्वयें जाहला निर्वाणें । जें साधकांचें कारण । सिद्ध तत्त्व ॥ ७८ ॥ म्हणोनि कर्मनिष्ठां वंद्यु । तो ज्ञानियांसि वेद्युँ । तापसांचा आद्यु । तपोनाथु ॥ ७९ ॥ पैं जीवपरमात्मसंगमा । जयाचें येणें जाहलें मनोधर्मा । तो शरीरीचि परी महिमा । ऐशी पावे ॥ ४८० ॥ अवतरणः—म्हणोनि याकारणें । तूतें मी सदा म्हणें । योगी होईं अंतःकरणें । पंडुकुमरा ॥ ८१ ॥

योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना । श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ४७

अन्वयः—सर्वेषामपि योगिनां ( मध्ये ) यः मद्गतेन अंतरात्मना श्रद्धावान् ( सन् ) मां भजते, सः मे युक्ततमः मतः ( अस्ति ) ॥ ४७ ॥

• इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृ० अभ्यासयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥६॥

( २३२. देव म्हणतात, योगी माझा आत्मा व मी त्याचा देह. ४८२–४८६) अगा योगी जो म्हणिजे । तो देवाचा देव जाणिजे । आणि सुखसर्वस्व माझें । चैतन्य

१ विचार करण्याच्या. २ विचाराच्या पलीकडलें–ब्रह्म. ३ ढग ४ ॐकाराचा. ५ बद्द होता. ६ एका रूपावर दुसरें रूप भासणें; आत्म्यावर जग भासणें. ७ पाण्यातील सर्व मळ. ८ बुद्धिरूप लग्नघटिका. ९ संयोग. १० ज्या ईश्वरस्वरूपाच्या. ११ यजन, याजन, अध्ययन,

होतात; आणि मग सहजच तो विचाराच्या गादीवर बसतो. ६६ नंतर, विचार करण्यामध्यें प्रबळ असा विवेकही मागें राहतो; आणि अविचारणीय असें जें ब्रह्म, तें तो स्वतांच होतो. ६७ त्या ठिकाणीं मनाचे ढंग नाहींतसे होतात; प्राणवायूचें हालणें बंद होतें; व तो आपल्या ठिकाणींच चिदाकाशात लीन होऊन, ६८ ॐकाराच्या अर्धबिंदूंत निमग्न होतो. अशा रीतीचें त्याला अवर्णनीय सुख प्राप्त होतें, म्हणून त्या ठिकाणीं बोलणेंच बंद होतें. ६९ मग, सगळ्या गतींना गति देणारी जी ब्रह्मस्थिति, त्या निराकार स्थितीचें रूपच तो बनून राहतो. ४७० त्यानें मागल्या अनेक जन्मांत, विक्षेप हाच कोणी पाण्यावरील मळ, तो झाडून टाकलेला असतो, म्हणून त्याची लग्नघटिका त्याचा जन्म होताच बुडते, ७१ आणि तद्रूपतेशीं शुभ लग्न होऊन तो अभिन्नत्व पावतो. अभ्रें नाहींतशीं झालीं म्हणजे तीं ज्याप्रमाणें आकाशरूपच होऊन राहतात, ७२ त्याप्रमाणें ( विक्षेपादि विघ्नें नाहींतशीं झालीं म्हणजे, ) ज्यापासून विश्वाची उत्पत्ति होते, व ज्या ठिकाणीं तें पुनः लय पावतें, तें ब्रह्म, तो या विद्यमान देहांत असतांनाच बनतो. ७३

श्लोकार्थः--तप करणाऱ्याहून, ज्ञान्याहून व कर्म करणाऱ्याहून योगी अधिक श्रेष्ठ आहे; म्हणून अर्जुना, तूं योगी हो ॥ ४६ ॥

ज्या लाभाच्या आशेनें कर्मनिष्ठ पुरुष आपल्या धैर्यरूप बाहुबलाच्या भरंवशावर कर्ममार्गाच्या प्रवाहांत उडी घालतात, ७४ किंवा ज्या एका वस्तूसाठीं ज्ञानी पुरुष हे ज्ञानरूप कवच धारण करून समरांगणांत प्रपंचशत्रूशीं झगडतात, ७५ अथवा ज्याच्या प्राप्तीसाठीं तपस्वी लोक हे निराश्रित व निसरडें झालेल्या अशा तपोरूप पर्वताच्या तुटलेल्या कड्यांवरून प्रवास करितात, ७६ जें भजन करणारांच्या भजनाचें अधिष्ठान, यज्ञ करणाऱ्यांचा यज्ञीय विषय, अशा प्रकारें सर्वास पूज्य, ७७ आणि जें साधकांचें सिद्धतत्त्व, तें निर्वाण परब्रह्म तो स्वतांच बनतो. ७८ म्हणून, तो कर्मनिष्ठांना वंद्य व ज्ञान्यांना विचारणीय आणि तपस्व्यांचा मूळ तपोनाथ होय. ७९ हें पहा कीं, जीव व परमात्मा यांच्या संगमाच्या ठिकाणीं त्याच्या मनाचें ऐक्य झाल्याकारणानें, तो देही असूनही अशा योग्यतेस पावतो. ४८० म्हणून अर्जुना, याच कारणास्तव ' तूं योगी हो. ' असें मनापासून तुला मी नेहमीं सांगत असतों. ८१

श्लोकार्थः--सर्व योग्यामध्येंही, जो माझ्याशीं ऐक्य पावून श्रद्धेनें ( ऐक्यबोधानें ) मला भजतो, तो मला परममान्य आहे ॥ ४७ ॥

अरे, योगी म्हणजे देवांचा देव, माझें सर्व सुखाचें आगर, आणि केवळ माझा प्राण असें समज. ८२ त्याच्या ठिकाणीं भजन करणारा, भजनक्रिया व भज्य वस्तु ही

अध्यापन, दान व प्रतिग्रह या सहा कर्मांच्या. १२ प्रवाहीं. १३ दृढ कवच. १४ निराश्रय. १५ तुटलेला कडा. १६ ज्या आत्म्याच्या. १७ ज्याचें भजन करावयाचें तें. १८ ज्याप्रीत्यर्थ यजन करावयाचें तें. १९ केवळ; तद्रूप. २० जाणण्यास योग्य,

भक्तीची त्रिपुटी सदोदित राहते. ८३ हे सुभद्रापते, मग त्याच्या आणि माझ्या प्रीतीचें स्वरूप वर्णन करितां येत नाहीं. तर असें समज कीं, तो म्हणजे प्रत्यक्ष मींच. ८४ अशा रीतीनें जें प्रेमाचें ऐक्य झालेलें असतें, त्याच्या तुलनेला उपमा पाहिजे असली तर मी देह व तो आत्मा याशिवाय दुसरी उपमा नाही! ८५ संजय म्हणतोः—राजा, भक्तरूप चकोरांचा चंद्र किंवा सर्व त्रिभुवनाचा राजा व गुणांचा समुद्र जो श्रीकृष्ण परमात्मा, तो असें बोलला. ८६ तेथें पार्थाला पूर्वीपासून योगाचें ऐश्वर्य ऐकण्याची आस्था होतीच, ती पुनः दुप्पट झाली, असें यदुनाथानें मनांत जाणलें; ८७ आणि तें पाहून श्रीकृष्णाच्या मनांत सहज आनंद झाला कीं, मी जें सांगतों, तें प्रत्यक्ष पाहण्याचा अर्जुन हा आरसाच होय. तेव्हां आतां या आनंदाचे भरांत ते पुढील कथा सांगतील. ८८ तो प्रसंग पुढें असून त्यांत शांतिरस स्पष्ट दिसेल, व ज्ञानरूप बीजाचा मुढा उघडा होईल. ८९ जें ज्ञान-बीज पेरण्याकरितां सत्त्वगुणाची वृष्टि होऊन, व आध्यात्मिक तापांचे गुंतडे वाहून जाऊन, चतुर श्रोत्यांच्या चित्तांचे वाफे सहज तयार झाले, ४९० त्यांवर सोन्यासारखी अवधानाची वाफसा साधल्यामुळें श्रीनिवृत्तिनाथांना तें ज्ञानरूप बीज पेरण्याची उत्कंठा उत्पन्न झाली. ९१ ज्ञानदेव म्हणतातः—तें बीज पेरण्याकरितां सद्गुरूंनीं माझी मोठ्या कौतुकानें चाड्याच्या ठिकाणीं योजना केली, व माझ्या मस्तकावर हात ठेवून तें बीज चाड्यांत घातलें. ९२ म्हणून, या माझ्या मुखांतून जें जें कांहीं निघेल, तें संतांच्या मनाला खरेंच भासतें. हें असो, आतां श्रीरंग जें कांहीं बोलले, तें मी पुढें सांगेन. ९३ परंतु तें लक्ष देऊन ऐका. बुद्धीनें त्याचा विचार करा, त्याला चित्त अर्पण करून त्याचा अर्थ घ्या, ९४ व अवधानरूप हातानें तें आपल्या हृदयांत सांठवा; म्हणजे सज्जनाच्या मनाला हें रमविणारें आहे. ९५ ह्या बोलापासून नित्य आत्मप्राप्ति होईल, संकटांतून मुक्तता होईल, व जीवाला सुखप्राप्ति होईल. ९६ आतां, श्रीमुकुंद अर्जुनाला विनोदानें जें कांहीं सर्वोत्कृष्ट ज्ञान सांगतील, तें मी ओंवीनामक कवितेनें तुम्हाला सांगेन. ४९७

अध्याय ६ वा, ओवी ४९७.

तो ॥ ८२ ॥ तेथ भजता भजन भजावें । हें भक्तिसाधन जें आघवें । तो मीचि जाहलों अनुभवें । अखंडित ॥ ८३ ॥ मग तया आम्हां प्रीतीचें । स्वस्वरूप बोलीं निर्वचें[1] । ऐसें नव्हे गा तो साचें । सुभद्रापती ॥ ८४ ॥ तया एकवटलिया प्रेमा । जरी पैाडें पाहिजे उपमा । तरी मी देह तो आत्मा । हेंचि होय ॥ ८५ ॥ ऐसें भक्तचकोरचंद्रें । बोलिलें गुणसमुद्रें । त्रिभुवनैकनरेंद्रें । संजयो म्हणे ॥ ८६ ॥ ( २३३. श्रवणेच्छा पाहून देवास आनंद, ४८७–४८८ ) तेथ आदिलापासूनि पार्था । ऐकिजे ऐसीचि आस्था । दुणावली हें यदुनाथा । भावों[3] सरलें ॥ ८७ ॥ कीं सावियाचि मनीं संतोषला । जे बोला आरिसा जोडला । तेणें हरिखें[4] आतां उपलवेला । निरूपील ॥ ८८ ॥ ( २३४. ज्ञानेश्वर म्हणतात, निवृत्तिनाथांनी मजकडून बोलविलें, म्हणून संतांना रुचलें, ४८९–४९३ ) तो प्रसंगु आहे फुडा । जेथ शांत दिसेल उघडा । तो पाल्हेविजेल मुडा । प्रमेयबीजाचा ॥ ८९ ॥ जे सात्विकाचेनि वडपें । गेलें आध्यात्मिक खरपें । सहजें निडोरले वाफे । चतुरचित्ताचे ॥ ४९० ॥ वरी अवधानाचा वाफसा । लाधला सोनयाऐसा । म्हणोनि पेरावया धिंवसा । श्रीनिवृत्तीसी ॥ ९१ ॥ ज्ञानदेव म्हणे मी चाडें । सद्गुरूंनीं केलें [16]कोडें । माथां हात ठेविला तें फुडें । बीजचि वाइलें ॥९२॥ म्हणऊनि येणें मुखें जें जें निगे । तें संतांच्या हृदयीं साचेंचि लागे । हें असो सांगों श्रीरंगें । बोलिलें जे ॥ ९३ ॥ ( २३५. श्रवणाची पद्धत व श्रवण केलें असतां काय फलप्राप्ति होते तें सांगून पुढील कथा सांगेन, असें ज्ञानेश्वर म्हणतात; ४९४–४९७ ) परि तें मनाच्या कानीं ऐकावें । बोल बुद्धीच्या डोळां देखावे । हे सांटोवाटीं घ्यावें । चित्ताचिया ॥ ९४ ॥ अवधानाचेनि हातें । नेयावें हृदया-आंतौतें । हे रिझवितील आयणीतें । सज्जनाचिये ॥९५॥ हे स्वहितातें निवविती । परिणामातें जीवविती[21] । सुखाची वाहती । लाखोली जीवा ॥ ९६ ॥ आतां अर्जुनेंसीं श्रीमुकुंदें । नागर बोलिजेल विनोदें । तें ओंवियेचेनि प्रबंधें । सांगेन मी ॥ ४९७ ॥

*इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥*

श्लोक ४७, ओंव्या ४९७.

---

१ सांगण्यास अशक्य. २ तुलनेनें. ३ वार्टू लागलें. ४ हर्षानें ५ भरतें आलें. ६ शांतिरस. ७ पेरला जाईल, विस्तारिला जाईल. ८ तादूळ इत्यादि भरून केलेला पेंढ्याचा गठा. ९ सिद्धांत. १० वृष्टि. ११ गुताडे. १२ परिपक्व झाले. १३ चतुराच्या, शाहण्याच्या अंतःकरणाचे. १४ पेरण्याजोगी ऊब. १५ धैर्य. १६ नवल. १७ उत्कंठेनें. १८ रमवितील, १९ मनाला. २० नाशाप्रत. २१ मुक्त करिती. २२ सर्वोत्कृष्ट. २३ कवितेनें.

भक्तीची त्रिपुटी सदोदित राहते. ८३ हे सुभद्रापते, मग त्याच्या आणि माझ्या प्रीतीचें स्वरूप वर्णन करितां येत नाहीं. तर असें समज कीं, तो म्हणजे प्रत्यक्ष मीच. ८४ अशा रीतीनें जें प्रेमाचें ऐक्य झालेलें असतें, त्याच्या तुलनेला उपमा पाहिजे असली तर मी देह व तो आत्मा याशिवाय दुसरी उपमा नाहीं! ८५ संजय म्हणतो:—राजा, भक्तरूप चकोरांचा चंद्र किंवा सर्व त्रिभुवनाचा राजा व गुणांचा समुद्र जो श्रीकृष्ण परमात्मा, तो असें बोलला. ८६ तेथें पार्थाला पूर्वीपासून योगाचें ऐश्वर्य ऐकण्याची आस्था होतीच, ती पुनः दुप्पट झाली, असें यदुनाथानें मनांत जाणलें; ८७ आणि तें पाहून श्रीकृष्णाच्या मनांत सहज आनंद झाला कीं, मी जें सांगतों, तें प्रत्यक्ष पाहण्याचा अर्जुन हा आरसाच होय. तेव्हां आतां या आनंदाचे भरांत ते पुढील कथा सांगतील. ८८ तो प्रसंग पुढें असून त्यांत शांतिरस स्पष्ट दिसेल, व ज्ञानरूप बीजाचा मुढा उघडा होईल. ८९ जें ज्ञानबीज पेरण्याकरितां सत्त्वगुणाची वृष्टि होऊन, व आध्यात्मिक तापांचे गुंतडे वाहून जाऊन, चतुर श्रोत्यांच्या चित्तांचे वाफे सहज तयार झाले, ४९० त्यांवर सोन्यासारखी अवधानाची वाफसा साधल्यामुळें श्रीनिवृत्तिनाथांना तें ज्ञानरूप बीज पेरण्याची उत्कंठा उत्पन्न झाली. ९१ ज्ञानदेव म्हणतात:—तें बीज पेरण्याकरितां सद्गुरूंनीं माझी मोठ्या कौतुकानें चाड्याच्या ठिकाणीं योजना केली, व माझ्या मस्तकावर हात ठेवून तें बीज चाड्यांत घातलें. ९२ म्हणून, या माझ्या मुखांतून जें जें कांहीं निघेल, तें संतांच्या मनाला खरेंच भासतें. हें असो, आतां श्रीरंग जें कांहीं बोलले, तें मी पुढें सांगेन. ९३ परंतु तें लक्ष देऊन ऐका. बुद्धीनें त्याचा विचार करा, त्याला चित्त अर्पण करून त्याचा अर्थ घ्या, ९४ व अवधानरूप हातानें तें आपल्या हृदयांत सांठवा; म्हणजे सज्जनांच्या मनाला हें रमविणारें आहे. ९५ ह्या बोलापासून नित्य आत्मप्राप्ति होईल, संकटांतून मुक्तता होईल, व जीवाला सुखप्राप्ति होईल. ९६ आता, श्रीमुकुंद अर्जुनाला विनोदानें जें कांहीं सर्वोत्कृष्ट ज्ञान सांगतील, तें मी ओंवीनामक कवितेनें तुम्हांला सांगेन. ४९७

अध्याय ६ वा, ओवी ४९७.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सातवा

श्रीभगवानुवाच—

मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः। असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु १
ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः। यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते॥२

अन्वयः—पार्थ, मयि आसक्तमनाः मदाश्रयः ( त्वं ) योगं युंजन्, असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तत् शृणु. ॥ १ ॥ अहं ते इदं सविज्ञानं ज्ञानं अशेषतः वक्ष्यामि; यत् ज्ञात्वा इह भूयः अन्यत् ज्ञातव्यं न अवशिष्यते ॥ २ ॥

( २३६. ज्ञानविज्ञानयोग, १–९ ). आइका मग तो अनंतु । पार्थातें असे म्हणतु । पैं गा तूं योगयुक्तु । जालासि आतां ॥ १ ॥ मज समग्रातें जाणसी ऐसें । आपुलिया तळहातींचें रत्न जैसें । तुज ज्ञान सांगेन तैसें । विज्ञानेंसीं ॥ २ ॥ एथ विज्ञानें काय करावें । ऐसें घेसी जरी मनोभावें । तरी पैं आधीं जाणावें । तेंचि लागे ॥ ३ ॥ मग ज्ञानाचिये वेळे । झांकती जाणिवेचे डोळे । जैसी तीरीं नाव न ढळे । टेंकली सांतीं ॥ ४ ॥ तैसी जाणीव जेथ न रिघे । विचार मागुता पाउलीं निघे । तर्कु आयैणी नेघे । आंगीं जयाच्या ॥ ५ ॥ अर्जुना तया नांव ज्ञान । येर प्रपंच हें विज्ञान । तेथ सत्यबुद्धि तें अज्ञान । हेंही जाण ॥ ६ ॥ आतां अज्ञान अवघें हारपे । विज्ञान निःशेष करपे । आणि ज्ञान तें स्वरूपें । होऊनि जाइजे ॥ ७ ॥ जेणें सांगतयाचें बोलणें खुंटे । ऐकतयाचें व्यसन तुटे । हें जाणणें सानें मोठें । उरों नेदी ॥ ८ ॥ ऐसें वर्म जें गूढ । तें कीजेल वाक्यारूढ । जेणें थोडेनि पुरे कोड । बहुत मनींचें ॥ ९ ॥

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये। यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ३

अन्वयः—मनुष्याणां सहस्रेषु कश्चित् सिद्धये यतति; यतताम् सिद्धानाम् अपि कश्चित् मा तत्त्वतः वेत्ति ॥ ३ ॥

( २३७. ज्ञान एखाद्यालाच होतें, १०-१४ ) पैं गा मनुष्यांचिया सहस्रशां- । माजि विपाइलेचिया येथ धिंवसा । तैसें या धिंवसेकरां बहुवसां- । माजि विरळा जाणे ॥ १० ॥ जैसा भरलेया त्रिभुवना- । आंतु एकएकु चांगु अर्जुना । निवडूनि कीजे सेना । लक्षवरी ॥ ११ ॥ कीं तयाहीपाठीं । जे वेळीं लोहें मांसातें घांटी । ते वेळीं विजयश्रियेच्या पाटीं । एकचि बैसे ॥ १२ ॥ तैसे आस्थेच्या

१ श्रीशंकराचार्य—सविज्ञानं = स्वानुभवसंयुक्तम् ( विज्ञानासह=अनुभवयुक्त ज्ञानासह. )
श्रीज्ञानेश्वर—येर प्रपंच हें विज्ञान ( प्रापंचिक ज्ञानाला विज्ञान म्हणतात. )

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सातवा

*श्लोकार्थः*—भगवान म्हणाले:—अर्जुना, माझ्या ठिकाणीं मन आसक्त करून व केवळ माझाच आश्रय धरून तूं योगाभ्यास करूं लागलास, म्हणजे ज्या प्रकारें निःसंशय मला समग्र (पूर्णपणें) जाणशील, तो प्रकार ऐक. ॥ १ ॥ मीं तुला विज्ञानासहवर्तमान तें ज्ञान पूर्णपणें सांगतों. तें जाणल्यावर मग या लोकीं आणखी जाणण्याजोगें कांहीं राहणार नाहीं ॥ २ ॥

श्रोतेहो, ऐका. मग श्रीअनंत पार्थाला म्हणाले:—अरे, तूं निश्चयेंकरून योगयुक्त झालास. १ आतां मी तुला व्यावहारिक (प्रापंचिक) ज्ञानासह ब्रह्मज्ञान अशा रीतीनें सांगेन की, त्या योगानें, तळहातावरील रत्न आपण पहातों, त्याप्रमाणें तूं मला सगळीं ओळखशील. २ या ठिकाणी प्रापंचिक ज्ञानाशी काय करावयाचें आहे, असा जर तुझ्या मनाचा ग्रह होईल, तर आधीं खरोखर तेंच समजून घेतलें पाहिजे. ३ मग ज्ञानाच्या साक्षात्काराच्या वेळीं बुद्धीची नजर थांबते. ज्याप्रमाणें तीराला टेंकलेली नाव हालत नाहीं, ४ त्याप्रमाणें, ज्या ठिकाणीं बुद्धीचा शिरकाव होत नाहीं, विचारही मागे राहतो, आणि तर्काचा हुरूप मोडतो, ५ त्यालाच ज्ञान असें म्हणतात; अर्जुना, बाकीचीं सर्व प्रापंचिक ज्ञानें, त्यांना विज्ञान असें म्हणतात; आणि प्रपंच खरा मानणें हें अज्ञान होय असे समज. ६ आतां, सर्व अज्ञान नाहींसें होईल, विज्ञान समूळ जळून जाईल आणि मूर्तिमंत ज्ञान प्रकट होईल. ७ ज्याच्या योगाने सांगणाराचें बोलणें खुंटते, ऐकणाराची इच्छा कमी होते, आणि अमुक मोठें व अमुक लहान असा भेद रहात नाहीं; ८ व जे थोडें ऐकलें असतां सुद्धा मनांतील पुष्कळ हेतु पूर्ण होतील, तें गुप्त तत्त्व मी तुला सांगतों. ९

*श्लोकार्थः*—हजारों मनुष्यामध्यें कोणी एखादाच माझ्या प्राप्तीविषयीं यत्न करितो, आणि माझ्याकरितां यत्न करणाऱ्या सिद्धांतूनही एखादाच मला तत्त्वतः (खऱ्या खऱ्या स्वरूपानें) जाणतो ॥ ३ ॥

अरे, खरोखर हजारों मनुष्यांत एखाद्यालाच या ज्ञानाची इच्छा होते, आणि तसेंच, ज्ञानाची इच्छा उत्पन्न झालेल्या पुष्कळांत मला तत्वत. जाणणारा क्वचितच सांपडतो. १० ज्याप्रमाणें मनुष्यांनीं भरलेल्या त्रिभुवनांत फौजेमध्यें ठेवण्याकरिता एकेक चांगला शूर निवडून लक्षावधि फौज तयार करितात, ११ आणि त्यांतूनही, ज्या वेळेस तरवारीचे घाव शरिरावर बसतात त्या वेळेस एखादाच विजयश्रीचा अधिकारी होतो,

१ ब्रह्मज्ञान. २ व्यावहारिक ज्ञानासह. ३ बुद्धीचे. ४ असता. ५ शिरत नाहीं. ६ मागल्या. ७ हुरूप. ८ ज्याच्या (ब्रह्माच्या.) ९ छंद १० लहान. ११ आवड; हौस. १२ एखाद्यालाच. १३ इच्छा. १४ जाणतो. १५ चांगला शूर. १६ शस्त्र. १७ शरिरावर. १८ घाव करितें.

महापुरीं । रिघताती कोटिवरी । परी प्राप्तीच्यां[1] पैलतीरीं । विपाइला[2] निगे ॥ १३ ॥
अवतरण:— म्हणऊनि सामान्य गा नोहे । हे सांगता वडिलें[3] गोठि गा आहे । परी तें बोलों येईल पाहें । आतां प्रस्तुत ऐकें ॥ १४ ॥

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च । अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥४॥

अन्वयः-- भूमिः, आपः, अनलः, वायुः, ख, मनः, बुद्धिः, अहकारः एव च इति अष्टधा भिन्ना मे इय प्रकृतिः ( अस्ति ) ॥ ४ ॥

( २३८. प्रकृति–परा व अपरा, १५-२१ ) तरी अवधारीं गा धनंजया । हे महदादिक[4] माझी माया । जैसी प्रतिबिंबें छाया । निजांगाची ॥ १५ ॥ आणि इयेतें प्रकृति म्हणिजे । जे अष्टधा[5] भिन्न जाणिजे । लोकत्रय निपजे[6] । इयेस्तव ॥ १६ ॥ हे अष्टधा भिन्न कैसी । ऐसा ध्वनि[7] धरिसी जरी मानसीं । तरी तेचि गा आतां परियेसीं । विवंचना[8] ॥ १७ ॥ आप[9] तेज गगन । महीं[10] मारुत[11] मन । बुध्दि अहंकार हे भिन्न । आठै भाग ॥ १८ ॥

अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् । जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥५

अन्वयः—महाबाहो, इयम् अपरा; इतः तु अन्या जीवभूता मे पराम् प्रकृतिं विद्धि, यया इदं जगत् धार्यते ॥ ५ ॥

या आठांची जे साम्यावस्था[12] । ते माझी परम[13] प्रकृति पार्था । तिये नाम व्यवस्था । जीव ऐसी ॥ १९ ॥ जे जडातें[14] जीववी । चेतनेतें[15] चेतवी । मनाकरवीं मानवी । शोकमोहो ॥ २० ॥ पैं बुध्दीच्या अंगीं जाणणें । तें जिये जेवाळिकेचें[16] करणें । जिया अहंकाराचें विंदाणें[17] । जगचि धरिजे ॥ २१ ॥

एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय । अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥

अन्वयः—सर्वाणि भूतानि एतद्योनीनि इति उपधारय; अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः तथा प्रलयः ( अस्मि ) ॥ ६ ॥

( २३९. दोन प्रकृतींच्या मिश्रणानें जगाची उत्पत्ति, २२-२७ ) ते सूक्ष्म प्रकृति कोडें[18] । जैं स्थूळाचिया आंगा घडे । तैं भूतसृष्टीची[19] पडे । टांकसाळ ॥ २२ ॥ चतुर्विध[20] ठसा । उमटों लागे आपैसा । मोलें तरी सरिसा । परि थरचि[21] आनान ॥ २३ ॥ होती चौऱ्यांशीं लक्ष थरा । येरा मिती नेणिजे भांडारा । भरे आदिशून्याचा गाभारा । नाणेयांसीं ॥ २४ ॥ ऐसे एकेतुकें पांचभौतिक । पडती बहुवस टांकें । मग तिये समृध्दीचे लेखें । प्रकृतिचि धरी ॥ २५ ॥ जे आंखूनि नाणें विस्तारी । पाठीं तयाची आटणी करी । माजी कर्माकर्मांचिया व्यवहारीं । प्रवर्तु दावी ॥ २६ ॥ हें रूपकें परी असो । सांगों उघड जैसें परियेसों । तरी

१ आत्मप्राप्तीच्या. २ क्वचित्. ३ कठीण. ४ महत्तत्त्वादि. ५ आठ प्रकारानीं. ६ उत्पन्न होतें. ७ शंका. ८ विचार. ९ पाणी. १० पृथ्वी. ११ वायु. १२ एकीकरण. १३ चेतन. १४ अचेतनाला. १५ ज्ञानाला. १६ सन्निधपणानें. १७ कुशलतेनें. १८ आवडीनें. १९ महाभूताच्या. २० प्राण्याच्या उत्पत्तीची. २१ जारज=मनुष्य, अंडज=पक्षी; स्वेदज=उवा, लिखा वगैरे; आणि उद्भिज=लतावृक्षादि

१२ त्याप्रमाणें माझ्या ज्ञानाच्या प्राप्तीच्या आस्थेच्या पुरांत कोट्यवधि लोक उड्या टाकतात; परंतु एखादाच तिच्या पैलथडीस जातो. ( एखाद्यालाच माझी प्राप्ति होते ). १३ म्हणून, ही सामान्य गोष्ट नसून मोठी श्रेष्ठ आहे; परंतु ती पुढें सागतां येईल. प्रस्तुत ( तुला विज्ञानाचें रूप सांगतों तें ) ऐक. १४

श्लोकार्थः—भूमि, उदक, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार अशी आठ प्रकारें विभागलेली माझी प्रकृति आहे ॥ ४ ॥

हे धनंजया, ऐक; आपल्या अंगाची पडछाया असते, त्याप्रमाणें हीं महदादि तत्त्वें म्हणजे माझी माया होय; १५ हिलाच प्रकृति असें म्हणावें; व हिचे आठ निरनिराळे प्रकार आहेत असें समजावें; आणि हिच्यापासून हें त्रैलोक्य उत्पन्न होतें. १६ ही आठ प्रकारांनीं कशी निराळी आहे अशी शंका जर तूं मनांत आणशील, तर तोच विचार सांगतों, ऐक. १७ उदक, तेज, आकाश, पृथ्वी, वायु, मन, बुद्धि आणि अहंकार हे तिचे निरनिराळे आठ प्रकार आहेत. १८

श्लोकार्थः—हे महाबाहो, ही अपरा म्हणजे गौण प्रकृति होय. इच्याहून वेगळी जी माझी परा म्हणजे जीवभूता प्रकृति, ती श्रेष्ठ आहे असें समज. तिचा या जगताला आधार आहे ॥५॥

पार्था, ह्या आठ भागांची साम्यस्थिति ( एकीकरण ) ती माझी परमप्रकृति, आणि तिलाच जीवभूता ही संज्ञा आहे. १९ ही अचेतनाचें ( शरिराचें ) जीवन करते, ज्ञानाला चेतना देते, आणि मनाला शोक व मोह मानण्यास लाविते. २० हें पहा कीं, हिच्या सान्निध्यानें बुद्धीच्या अंगीं ज्ञान उत्पन्न होतें, व ही अहंकाराच्या कुशलतेनें जगाला धारण करिते. २१

श्लोकार्थः—या दोन्ही प्रकृति सर्व भूताच्या उत्पत्तीला कारण आहेत असें तूं समज; (आणि म्हणून ) मी सर्व जगताचा उत्पत्तिकर्ता आणि संहारकर्ता आहे ॥ ६ ॥

ही सूक्ष्म ( परा ) प्रकृति जेव्हां स्वेच्छेनें स्थूल प्रकृतीशीं संयुक्त होते, तेव्हां सृष्टींतील प्राण्याची टांकसाळ सुरू होते. २२ त्या टांकसाळींत आपोआप चार प्रकारचे ठसे उमटूं लागतात. त्यांतील पंचमहाभूतांची योग्यता सारखीच असते, परंतु जाति भिन्न असतात. २३ त्यांच्या चौऱ्यायशी लक्ष जाति असून, त्या जातींत आणखी किती जाति आहेत त्यांची गणती नाहीं. अशा पुष्कळ नाण्यानीं ( जातींनीं ) निराकार शून्य म्हणजे अव्यक्ताचा गाभारा भरून जातो. २४ याप्रमाणें पंचमहाभूताचे एकसारखे पुष्कळ ठसे बनतात, व त्यांच्या वृद्धीची गणना प्रकृति ( माया ) हीच ठेवते. २५ ती नाण्यांवर खुणा करून त्यांचा विस्तार करिते, व मागाहून त्यांची आटणी करिते; अशा प्रकारें कर्माकर्मप्रमाणें घडामोड करण्याची मायेची प्रवृत्ति आहे. २६ हें रूपक असो. तुला समजेल अशा उघड रीतीनें सांगावयाचें म्हटलें, तर ही प्रकृतिच प्राण्यांच्या नामरूपाचा विस्तार करते; २७

---

या चोहोंची. २२ योग्यतेनें. २३ जाति, भाग. २४ भरती. २५ निराकाराचा. २६ एकसारखें. २७ नाणीं, ठसे. २८ जमाखर्च. २९ खुणा करून. ३० प्रवृत्ति. ३१ सादृश्याचें उदाहरण.

नामरूपाचा अंतिसो । प्रकृतीच कीजे ॥ २७ ॥ ( २४०. प्रकृतीचा आश्रय परमात्मा, २८ ) आणि प्रकृति तंव माझ्या ठायीं । बिंबे[2] येथ आन नाहीं । अवतरणः— म्हणोनि आदि मध्य अवसान पाहीं । जगासि मी ॥ २८ ॥

**मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय । मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥**

अन्वयः—धनंजय, मत्तः परतरं अन्यत् किंचित् न अस्ति; सूत्रे मणिगणाः इव इदं सर्वं मयि प्रोतम् ॥ ७ ॥

( २४१. जगाचें आदिमध्यावसान परमात्माच, २९-३२ ) हें रोहिणीचें[4] जळ । तयाचें पाहातां येइजे मूळ । तें रश्मि[5] नव्हती केवळ । होय ते भानु ॥ २९ ॥ तयाचिपरी किरीटी । इया प्रकृती जालिये[6] सृष्टी । जें उपसंहरूनि कीजेल ठी । तें मीचि आहें ॥ ३० ॥ ऐसें होय दिसे न दिसे । हें मजचिमाजीं असे । मियां विश्व धरिजे जैसें । सूत्रें माणि ॥ ३१ ॥ सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाचे सुतीं वोविले[7] । तैसें म्यां जग धरिलें । सबाह्याभ्यंतरीं[8] ॥ ३२ ॥

**रसोऽहमप्सु कौंतेय प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः । प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥**
**पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ । जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥**

अन्वयः—कौंतेय, अहं अप्सु रसः, शशिसूर्ययोः प्रभा अस्मि; सर्ववेदेषु प्रणवः, खे शब्दः, नृषु पौरुषम् (अस्मि) ॥ ८ ॥ (अहं) पृथिव्यां च पुण्यः गंधः, विभावसौ च तेजः अस्मि; सर्वभूतेषु जीवनं, तपस्विषु च तपः अस्मि ॥ ९ ॥

( २४२. आत्मस्वरूपाची व्याप्ति, ३३-५३ ) म्हणोनि उदकीं रसु । कां पवनीं जो स्पर्शु । शशिसूर्यीं जो प्रकाशु । तो मीचि जाण ॥ ३३ ॥ तैसाचि नैसर्गिकु[11] शुध्दु । मी पृथ्वीच्या ठायीं गंधु । गगनीं मी शब्दु । वेदीं प्रणवु[12] ॥ ३४ ॥ नराच्या ठायीं नरत्व । जें अहंभावियें सत्व । तें पौरुष[13] मी हें तत्त्व । बोलिजत असे ॥ ३५ ॥ अग्निऐसें आहाच । तेजीं[14] नामाचें आहे कवच । तें परतें केलिया साच । निजतेज तें मी ॥ ३६ ॥ आणि नानाविध योनी । जन्मोनि भूतें त्रिभुवनीं । वर्तत आहाति जीवनीं[15] । आपुलाल्या ॥ ३७ ॥ एकें पवनेंचि पिती । एकें तृणास्तव जिती । एकें अन्नाधारें राहातीं । जळें एकें ॥ ३८ ॥ ऐसें भूतप्रति आनान[16] । जें प्रकृतिवशें दिसे जीवन । तें आघवां ठायीं अभिन्न । मीचि एक ॥ ३९ ॥

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् । बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥**
**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम् । धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥**

अन्वयः—पार्थ, मां सर्वभूतानां सनातनं बीजं विद्धि; ( अहं ) बुद्धिमतां बुद्धिः अस्मि, अहं तेजस्विनां तेजः ( अस्मि ) ॥ १० ॥ अहं च बलवतां कामरागविवर्जितं बलं ( अस्मि; हे ) भरतर्षभ, भूतेषु धर्माविरुद्धः कामः अहं अस्मि ॥ ११ ॥

१ विस्तार. २ भासते. ३ लय. ४ मृगजळ. ५ किरण. ६ उत्पन्न होते. ७ दोऱ्यानें. ८ अंतर्बाह्य. ९ गोडी. १० बाऱ्यांत. ११ स्वाभाविक. १२ ॐकार. १३ मनुष्यपणा. १४ मीपणा.

आणि प्रकृति तर निःसंशय माझ्याच ठायीं बिबते; अर्थात् जगाची उत्पत्ति, स्थिति व लय यांस मीच कारण आहें. २८

श्लोकार्थः—हे धनंजया, माझ्याहून जगाला दुसरें कारण कांहीं नाहीं. (सोन्याचे) सुतांत जसे सोन्याचे मणि ओंवावे, तसें हें सर्व जग ओतप्रोत माझ्यात ओंविलेलें आहे ॥ ७ ॥

(हें दृश्य विश्व मृगजलासारखें आहे !) मृगजळाचें मूळ पाहूं गेलें असतां तें केवळ सूर्यकिरण नसून सूर्यच होय; २९ त्याचप्रमाणें, अर्जुना, जीपासून ही सृष्टि झाली आहे, ती प्रकृति आणि सृष्टि यांचा उपसंहार करून (यांना वजा करून) पाहिलें तर अवशिष्ट तत्त्व मीच आहें. ३० अशा प्रकारें, जें उत्पन्न होतें, दिसतें व नाहींसें होतें, तें माझ्याच ठिकाणीं होतें. ज्याप्रमाणें दोऱ्यानें माणि धरलेले असतात, त्याप्रमाणें मीं हें विश्व धरलें आहें. ३१ सोन्याचे माणि करून ते सोन्याच्याच तारेंत ओंवावे, त्याप्रमाणें हें सर्व जग अंतर्बाह्य मीच व्यापलें आहे. ३२

श्लोकार्थः—हे कौंतेया, सर्व उदकामध्यें जो रस तो मी आहें; सूर्यचंद्रामध्यें जी प्रभा, ती मी, सर्व वेदांमध्यें जो प्रणव (ॐकार) तो मी, आकाशामध्ये शब्द तो मी, पुरुषामध्यें पराक्रम तो मी आहें ॥ ८ ॥ आणि पृथ्वीमध्यें उत्तम सुवास तो मी, अग्नीमध्यें तेज मी, सर्व भूताच्या ठायीं जीवन मी, व तपस्व्यामध्यें तप मी आहें ॥ ९ ॥

म्हणून, पाण्यांत जो रस आहे, किंवा वाऱ्यांत जो स्पर्श आहे, आणि चंद्र व सूर्य यांच्यांत जो प्रकाश आहे, तो मीच आहें असें समज. ३३ त्याचप्रमाणें, पृथ्वीच्या ठिकाणीं स्वभावतः असणारा जो सुवास, तो मी; आकाशात शब्द म्हणून जो आहे, तो मी; तसेंच वेदात ॐकार म्हणून जो आहे, तो मी. ३४ मनुष्याच्या ठिकाणीं असणारा मनुष्यपणा—जो अहंभावाचें सत्त्व आहे—तें पौरुष मी, हें तत्त्व तुला सांगून ठेवतों. ३५ तेजाला अग्नि या नांवाचें जें उगीच पांघरूण आहे, तें दूर केलें असतां त्याचें खरें स्वरूप तें मी; ३६ आणि या त्रिभुवनांत प्राणी पुष्कळ प्रकारच्या जातींत जन्म घेऊन आप-आपल्या जातीच्या अनुरोधानें अन्नादि जीवनानें जीवन पावतात; ३७ कोणी वारा पिऊन असतात, कोणी गवतावर उपजीविका करतात, कोणी अन्नावर राहतात, आणि कोणी पाण्यावर आपलें उपजीवन करतात: ३८ असें प्रत्येक प्राण्याचें त्याच्या प्रकृतीच्या मानानें जें निरनिराळें जीवन दिसतें, तें सर्व मीच आहें. ३९

श्लोकार्थः—पार्था, सर्व भूतांचें सनातन बीज मी हें जाण. बुद्धिमंताची बुद्धि मी; तेजस्व्याचें तेज मी. ॥ १० ॥ इच्छा-प्रीति रहित असें बलवान पुरुषाचें बल मी; हे भरतश्रेष्ठा, सर्व भूताचे ठिकाणीं धर्माला अनुकूल असणारा जो काम (अन्नपानादिविषयक इच्छा) तो मी आहें ॥ ११ ॥

१५ बळ. १६ पराक्रम १७ उगीच. १८ प्रकाशात. १९ उपजीविकेंत, (अन्नानें.) २० वारा. २१ गवतावर. २२ प्रत्येक प्राण्याला. २३ निरनिराळें. २४ अन्न. २५ सर्व ठिकाणीं.

पैं आंदीचेनि[1] अवसरें । विरूढे[2] गगनाचेनि अंकुरें । जें[3] अंतीं गिळी अक्षरें[4] । प्रणवपीठींचीं[5] ॥ ४० ॥ जंव हा विश्वाकार असे । तंव जें विश्वाचि-सारिखें[6] दिसे । मग महाप्रळयदशे । कांहींच नव्हे ॥४१॥ ऐसें अनादि जें सहज[7] । तें मी गा विश्वबीज[8] । हें हातातळीं तुज । देइजत असे ॥ ४२ ॥ मग उघड करूनि पांडवा । जें हें आणिलीं सांख्याचिया[9] गांवा । तें ययाचा उपेगु[10] बरवा । देखशील ॥ ४३ ॥ परी हे अप्रासंगिक आलोप[11] । आतां असतु[12] बोलों संक्षेप । जाण तापियांच्या ठायीं तप । तें रूप माझें ॥ ४४ ॥ बळियांमाजि बळ । तें मी जाण अढळ । बुद्धिमंतीं केवळ । बुद्धि ते मी ॥ ४५ ॥ भूतांच्या ठायीं कामु । तो मी म्हणे आत्मारामु[13] । जेणें अर्थास्तव धर्मु । थोरु होय ॥ ४६ ॥ येऱ्हवीं विकाराचेनि[14] पैसें । करी कीर इंद्रियांचिऐसें । परी धर्मासि वेखासें[15] । जावों नेदी ॥ ४७ ॥ [16]जो अप्रवृत्तीचा[17] अव्हांटा[18] । सांडूनि विधीचिया निघे वाटा । तेवींचि नियमाचा दिवटा[19] । सवें चाले ॥ ४८ ॥ कामु ऐसिया वोजा[20] प्रवर्ते । म्हणोनि धर्मासि होय पुरतें । मोक्षतीर्थींचे मुक्तें[21] । संसार भोगी ॥ ४९ ॥ जो श्रुतिगौरवाच्या[22] मांडवीं । कामसृष्टीचा वेलु वाढवी । जंव कर्मफळेंसि पालवी । अपवर्गीं टेंके ॥ ५० ॥ ऐसा नियंतु कां कंदर्पु । जो भूतां यां बीजरूपु । तो मी म्हणे बापु । योगियांचा ॥ ५१ ॥ अवतरण:—हें एकेक किती सांगावें । आतां वस्तुजाताचि आववें । मजपासूनि जाणावें । विकारलें असे ॥ ५२ ॥

ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।
मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥

अन्वयः—ये सात्त्विकाः भावा. च एव राजसाः च ये तामसाः ( भावाः संति, ते ) मत्तः एव इति तान् विद्धि; अहं तु तेषु न ( अस्मि ), ते मयि ( वर्तन्ते ) ॥ १२ ॥

जे सात्त्विक हन भाव । कां रजतमादि सर्व । ते मम रूपसंभव । वोळखें तूं ॥ ५३ ॥ ( २४३. आत्मसत्तेवर विकार होतात, परंतु विकारांत आत्मा नाहीं; ५४-५९ ) ते हे जाले तरी माझ्या ठायीं । परी तयांमाजीं मी नाहीं । जैसी स्वप्नींच्या डोहीं । जागृति न बुडे ॥ ५४ ॥ जैसी रसाचीच सुंघट । बीजकणिका घनवट । परी तियेस्तवें होय काष्ठ । अंकुरद्वारें ॥ ५५ ॥ मग तया काष्ठाच्या ठायीं । सांग पां बीजपण असे काई । तैसा मी विकारी नाहीं । जरी विकारला दिसें ॥ ५६ ॥ पैं गगनीं उपजे आभाळ । परी तेथ गगन नाहीं केवळ । अथवा आभाळीं होय सलिल । तेथ अभ्र नाहीं ॥ ५७ ॥ मग त्या उदकाचेनि आवेशें । प्रगटलें तेज

१ उत्पत्तीच्या वेळेस. २ विस्तार पावतें. ३ जें बीज. ४ अ, उ, म् हीं. ५ ॐकाराचीं अक्षरें. ६ कोणासारखें नाहीं. ७ स्वतःसिद्ध. ८ जगाचें कारण. ९ विचाराच्या. १० उपयोग. ११ बोलणें. १२ बाजूला राहू दे. १३ श्रीकृष्ण. १४ पसारा. १५ विरुद्ध. १६ जो काम. १७ निषेधाची. १८ आडवाट. १९ मशाल. २० रीतीनें. २१ मुक्तता. २२ श्रुतीच्या महत्त्वाच्या.

खरोखर, उत्पत्तीचे वेळी जें आकाशाच्या अंकुरानें विस्तार पावतें आणि जें अंतकालीं ॐकाराचीं अक्षरें गिळून टाकतें; ४० जोंपर्यंत या जगाला आकार आहे, तोंपर्यंत जें त्याच्यासारखेंच दिसतें, परंतु महाप्रलयाचे वेळेस तें कोणत्याही आकाराचें नसतें; ४१ असें जें ह्या जगाचें अनादि व स्वतःसिद्ध बीज, तें मी आहें; तें आज अगदीं तुझ्या हातांत देत आहें. ४२ मग अर्जुना, तें समजून घेऊन जर तूं त्याचा विचार करशील, तर त्याचा उपयोग कसा चांगला होईल तो पहाशील. ४३ परंतु आतां हें अप्रासंगिक बोलणें बाजूला राहूं दे; तुला मी आपला संक्षेपानें सांगतों:—हें पहा कीं, तपस्व्यांचे ठायीं तप म्हणून जें आहे, तें माझें रूप होय. ४४ बलवानांत बल म्हणून जें आहे तें मी असें निःसंशय समज; आणि बुद्धिमंतांत बुद्धि म्हणून जी आहे ती मी. ४५ श्रीकृष्ण म्हणतातः—ज्याच्या आचरणापासून धर्म व अर्थ हे पुरुषार्थ साध्य होतात, तो प्राणिमात्राचे ठिकाणीं असणारा काम मी. ४६ येरवीं, विकार उत्पन्न होऊन इंद्रियांच्या इच्छेप्रमाणें जरी आचरण केलें, तरी तो काम धर्माविरुद्ध जाऊं देत नाहीं. ४७ तो काम निषेधाची आडवाट सोडून विधीच्या वाटेनें नीट जातो; आणि त्याचप्रमाणें त्याच्याबरोबर नियमरूप मशाल पेटलेली असते. ४८ अशा रीतीनें हा काम चालतो, म्हणून धर्माचें आचरण पूर्ण होतें; व त्यामुळें संसारांत राहणाराला मोक्षरूपी तीर्थांत मुक्ति प्राप्त होते. ४९ तो काम वेदाच्या महत्त्वरूपी मांडवावर कर्मफळांचीं पानें मोक्षाला लागत तोंपर्यंत सृष्टीचा वेल वाढवितो. ५० योग्यांचे जनक श्रीकृष्ण म्हणतातः—अशा नियमानें राहणारा व प्राणिमात्रास बीजभूत असा काम, तो मी आहें. ५१ हें एकेक तुला कोठवर सांगावें ! तर वस्तुमात्र म्हणून जें कांहीं आहे, तें सर्व माझ्यापासून विस्तार पावलें आहे असें समज. ५२

श्लोकार्थः—जे सात्त्विक, राजस आणि तामस विकार आहेत, ते माझ्यापासूनच उत्पन्न झाले आहेत, असें समज; पण त्याच्या ठायीं मी नाहीं, माझ्या ठायीं ते आहेत ॥ १२ ॥

जे सात्त्विक किंवा रजतमादि भाव आहेत, ते सर्व माझ्या रूपापासूनच उत्पन्न झाले आहेत हें ओळखून ठेव. ५३ ते जरी माझ्यापासून झाले आहेत, तरी मी त्याच्यांत नाहीं. ज्याप्रमाणें स्वप्नींच्या डोहांत जागृति बुडत नाहीं; ५४ किंवा ज्याप्रमाणें बीं (दाणा) रसानें पूर्ण भरलेलें असतें; परंतु त्याचेपासून अंकुर फुटून लाकूड बनल्यावर, ५५ मग त्या लांकडाचे ठिकाणीं बीज असतें का सांग बरें ? त्याचप्रमाणें, सात्त्विकादि सर्व भाव जरी माझ्याचपासून उत्पन्न झाले आहेत, तरी त्यांमध्यें मी नाहीं. ५६ खरोखर, आकाशांत जे ढग उत्पन्न होतात, त्यात शुद्ध आकाश नसतें; किंवा ढगांत जें पाणी असतें, त्या पाण्यांत ढग नसतात; ५७ नंतर त्या पाण्याच्या घर्षणानें उत्पन्न होणारें तेज ( वीज ) जें चकचकीत दिसतें, त्या विजेमध्यें पाणी असतें काय ? ५८ अग्नीपासून जो धूर उत्पन्न

२३ मोक्षांत. २४ नियमानें वागणारा. २५ काम. २६ विस्तार पावलें. २७ विकार. २८ माझ्या रूपापासून उत्पन्न झालेले. २९ चांगली मढलेली. ३० दाणा, बी. ३१ घट्ट. ३२ तिच्यापासून. ३३ पाणी.

जें लखलखीत दिसे । तिये विजूमाजीं असे । सलिल कायी ॥ ५८ ॥ सांगें अग्नीस्तव धूम होये । तिये धूमीं काय अग्नि आहे । तैसा विकारु हा मी नोहें । जरी विकारला असें ॥ ५९ ॥

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् । मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् १३**

अन्वयः—एभिः त्रिभिः गुणमयैः भावैः इद सर्वं जगत् मोहितं; (यतः) एभ्यः परं अव्ययं मां न अभिजानाति ॥ १३ ॥

(२४४. जीव त्रिगुणात्मक अविद्येनें मोहित होऊन आत्म्याला जाणत नाहींत, ६०-६७) परी उदकीं जाली बाबुळी । ते उदकातें जैसी झांकोळी । कां वायांचि आभाळीं । आकाश लोपे ॥ ६० ॥ हा गां स्वप्न लटिकें म्हणों ये । परि निद्रावशें बाणलें होये । तंव आठवु काय देत आहे । आपणपेयां ॥ ६१ ॥ हें असो डोळ्यांचें । डोळांचि पडळ रचे । तेणें देखणेपण डोळयांचें । न गिळिजे कायी ॥ ६२ ॥ तैसी हे माझीच बिंबली । त्रिगुणात्मक साउली । कीं मजचि आड ओडवली । जवनिका जैसी ॥ ६३ ॥ म्हणऊनि भूतें मातें नेणती । माझींच परी मी नव्हती । जैसीं जळींचीं जळीं न विरती । मुक्ताफळें ॥ ६४ ॥ पैं पृथ्वीयेचा घटु कीजे । सवेंचि पृथ्वीसि मिळे तरी मेळविजे । येऱ्हवीं तोचि अग्निसंगें सिजे । तरी वेगळा होय ॥ ६५ ॥ तैसें भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव । परि मायायोगें जीव- । दशे आले ॥ ६६ ॥ म्हणोनि माझेचि मी नव्हती । माझेचि मज नोळखती । अहंममतेभ्रांती । विषयांध झाले ॥ ६७ ॥

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया । मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥१४॥**
**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः । माययाऽपहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः १५**

अन्वयः—एषा दैवी गुणमयी मम माया हि दुरत्यया (अस्ति), ये मा एव प्रपद्यते, तें एतां माया तरंति ॥ १४ ॥ मायया अपहृतज्ञानाः आसुरं भावं आश्रिताः दुष्कृतिनः मूढाः नराधमाः मा न प्रपद्यन्ते ॥ १५ ॥

(२४५. मायानदीचें वर्णन व ती जीवांना तरणें शक्य नाहीं; काव्यप्रतिभा, ६८-८१) आतां महदादि हे माझी माया । उतरोनियां धनंजया । मी होइजे हें आया । कैसेनि ये ॥६८॥ जिये ब्रह्माचळाचा आंधाडा । पहिलिया संकल्पजळाचा उभेंडा । सवेंचि महाभूतांचा बुडबुडा । साना आला ॥ ६९ ॥ जे सृष्टिविस्तारा-चेनि वोघें । चढत काळकळनेचेनि वेगें । प्रवृत्तिनिवृत्तीचीं तुंगें । तटें सांडी ॥ ७० ॥ जे गुणघनांचेनि वृष्टिभरें । भरली मोहाचेनि महापूरें । घेऊनि जात नगरें । यमनियमांचीं ॥ ७१ ॥ जे द्वेषाच्या आवर्तीं दाटत । मत्सराचे वळसे पडत । माजि प्रमादादि तळपते । महामीन ॥ ७२ ॥ जेथ प्रपंचाचीं

१ समाप्त. २ गोंधळ. ३ आच्छादिते. ४ अनुभवास येतें,-साय भासतें. ५ पडस. ६ प्रतिबिंबित झाली. ७ प्राप्त झाली. ८ पडदा. ९ मद्रूप. १० मोत्यें. ११ 'मी' व 'माझें' या भ्रांतीनें.

होतो, त्या धुरांत अग्नि आहे का सांग बरें ? त्याचप्रमाणें, हे भाव जरी माझ्यापासून उत्पन्न झाले आहेत, तरी ते म्हणजे मी नव्हे. ५९

श्लोकार्थः—या त्रिगुणमय विकारांनीं हें सर्व जग मोहून गेलें आहे; म्हणून, या गुणाच्या पलीकडे असलेला अविनाशी असा जो मी, त्या मला तें जाणत नाहीं ॥ १३ ॥

तथापि, पाण्यापासूनच उत्पन्न झालेलें गोंडाळ पाण्याला झांकून टाकतें, किंवा ढगाच्या योगानें आकाश व्यर्थ लोपलें जातें; ६० असें पहा कीं, स्वप्न हें खोटें आहे, परंतु निद्रेच्या योगानें तें खरे भासतें, त्या वेळेस तें आपली आपल्याला आठवण होऊं देतें का ? ६१ अथवा डोळ्यांतील पाण्यानें उत्पन्न झालेला पडस दृष्टि बंद करीत नाहीं का ? ६२ त्याचप्रमाणें, माझ्याच ठिकाणीं प्रतिबिंबित झालेली सत्त्व, रज व तम या गुणांनीं युक्त अशी माझी सावली ( माया ) पडद्याप्रमाणें माझ्याच स्वरूपाच्या आड येते. ६३ म्हणून प्राणी मला जाणत नाहींत, आणि माझ्याचपासून उत्पन्न झालेले असून ते मद्रूप होत नाहींत. ज्याप्रमाणें पाण्यापासूनच उत्पन्न झालेलीं मोत्यें पाण्यांत मिसळत नाहींत, ६४ अथवा मातीचा घट करून तो ( कचेपणीं ) तसाच मातीस मिळविला असतां मिळतो—परंतु तोच विस्तवांत भाजल्यावर निराळा बनतो, ६५ त्याचप्रमाणें, सर्व भूतजात हे माझेच अवयव आहेत; परंतु मायेच्या योगानें जीवपणाला पावले, ६६ म्हणून माझ्यापासून उत्पन्न झाले असून मद्रूप होत नाहींत, माझेच असून मला ओळखीत नाहींत, व ' मी ' आणि ' माझें ' या भ्रांतीनें विषयांध झालेले आहेत. ६७

श्लोकार्थः—ही अति दिव्य आणि त्रिगुणात्मक अशी माझी माया दुस्तर आहे. जे मलाच शरण येतात ते ही माया ( रूप नदी ) तरून जातात ॥१४॥ मायेनें ज्याचें ज्ञान नष्ट केलें आहे, व आसुरी प्रकृतीचा ज्यांनीं आश्रय केला आहे, असे पापी व मूर्ख नराधम मला शरण येत नाहींत.१५

तेव्हां आतां धनंजया, ही महत्तत्त्वादि माझी माया तरून मद्रूप व्हावें, ह्या गोष्टीचा अनुभव कसा यावा ? ६८ ( कारण ) जी मायानदी निर्गुण ब्रह्मरूपी पर्वताच्या तुटलेल्या कड्यांत असतांनाच, प्रथम तिच्या ठिकाणीं संकल्परूप जलाचा उगम होऊन पंच महाभूतांचा लहानसा बुडबुडा आला; ६९ जी सृष्टीच्या विस्ताररूपी ओघानें व कालगतीच्या वेगानें कर्म व मोक्ष यांचे उंच कांठ ओलांडून पुढें चालली आहे; ७० जी सत्त्वादि-गुणरूपी मेघांच्या वृष्टीनें भरून भ्रांतिरूप महापुरानें यमनियमरूपी शहरें वाहून नेत आहे; ७१ जिच्यांत द्वेषरूपी भोंवरे असून जी मत्सररूप वळणानें वहात आहे; जिच्यात उन्मत्तपणा इत्यादि मोठाले मासे तळपत आहेत; ७२ जिच्यांत प्रपंचरूपी भेदांचीं वळणें असून कर्माकर्मांच्या पुरामध्यें सुखदुःखरूपी केरकचरा तरंगत येऊन

१२ अनुभवास. १३ निर्गुणब्रह्मरूपी पर्वताचा. १४ अर्धा कडा. १५ लोंढा. १६ जीवोत्पत्तीच्या विस्ताराच्या ओघानें. १७ कालगतीच्या. १८ कर्ममार्ग व मोक्षमार्ग यांची. १९ उंच. २० डगरी. २१ सत्त्वादिगुणरूपी मेघाच्या. २२ भोंवऱ्यात. २३ वळणें. २४ उन्मत्तपणा वगैरे. २५ चमकतात. २६ मोठाले मासे.

वळणें । कर्माकर्माचीं वोभाणें । वरी तैरतोती वोसैंणें । सुखदुःखांचीं ॥७३॥ रतीच्रिया वेटा । आदळती कामाचिया लाटा । जेथ जीवफेंन संघटैं । सैंध दिसे ॥७४॥ अहंकाराचिया चाळिया । वरि मैंदत्रयाचिया उकळिया । जेथ विषैंयोर्मींच्या औकाळिया । उल्लाळैं घेती ॥ ७५ ॥ उदयास्तांचे लोंढे[14] । पाडीत जन्ममरणांचे चोंढे[15] । जेथ पांचैं- भौतिक बुडबुडे । होती जाती ॥ ७६ ॥ सैंम्मोह विभ्रर्मैं मासे । गिळिताति धैर्याचीं आँमिषें । तेथ देंव्हंडे भोंवत वैंळसे । अज्ञानाचे ॥७७॥ भ्रांतीचेनि रैंहुळें । रेवले[23] आस्थेचेनि गाळें । रजोगुणाचेनि खैळाळें । स्वर्ग गाजे ॥७८॥ तमाचे धैरसे वैंड । सत्वाचें स्थिरपण जाड । किंबहुना हे दुैंवाड । मायानदी ॥७९॥ पैं पुनरावृत्तीचेनि उर्भंडें । झैंळंबती सत्यलोकींचे हुंडे । धैंयें गडबडती धोंडे । ब्रैंह्मगोळकाचे ॥ ८० ॥ तया पाणियाचेनि वैंहिलेपणें । अझुनी न धरती वोभाँणें । ऐसा मायापूर हा कवणें । तरिजेल गा ॥ ८१ ॥ ( २४६. मायानदी तरण्याचे उपाय अपाय होतात, ८२-९२ ) ऐथ एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो । तो तो अपैंवो । होय तें ऐक ॥ ८२ ॥ एक स्वयंबुद्धीच्या बाँहीं । रिगाले तयांची शुँद्धीचि नाहीं । एक जाँणिवेचे डोहीं । गर्वेचि गिळिले ॥ ८३ ॥ एकीं वेदंत्रैया- चिया सांगडी । घेतल्या अँहंभावाचिया धोंडी । ते मदमीनाच्या तोंडीं । सगळेचि गेले ॥ ८४ ॥ एकीं वयसेचें जाँडें-बांधलें । मग मन्मर्थांचिये कासे लागले । ते विषयमगरीं सांडिले । चघळूनियां ॥ ८५ ॥ आतां वार्धक्याच्या तरंगा- । माजि मतिभ्रंशाचा जरैंगीं । तेणें कवाळिजैंतोति पैं गा । चहूंकडे ॥ ८६ ॥ आणि शोकाचा कडा उपँडत । क्रोधाच्या आँवर्तीं दाटत । आँपदा-गिधीं चुंबिजैंतें । उधवला ठायीं ॥ ८७ ॥ मग दुःखाचेनि बेरंटें बोवले । पाठीं मरणाचिये रेवे रेवले । ऐसे कामाचे कासे लागले । ते गेले वायां ॥ ८८ ॥ एकीं यजनाक्रियेची पेटी । बांधोनि घातली पोटीं । ते स्वर्गसुखाच्या कैंपाटीं । शिरकोनि ठेले ॥ ८९ ॥ एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा । केला कर्मबाह्यांचा भरंवसा । परी ते पडिले वैंळसां । विधिनिषेधांच्या ॥ ९० ॥ जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तैंगा न लगे । वरि कांहीं तरोंये योगें । तरी विपायें तो ॥ ९१ ॥ ऐसें

१. धरणें. २ पूर. ३ तरंगतात. ४ पुरांत वाहून आलेला कचरा कडेला लागतो तो. ५ विषयसुखाच्या ६ जीवरूपी फेंस. ७ समुदाय. ८ पुष्कळ. ९ ओध. १० विद्या, धन व सामर्थ्य हे जे तीन मद, त्याच्या. ११ विषयरूपी तरंगांच्या. १२ लाटा. १३ उसळतात. १४ पूर. १५ धोंडे. १६ शरीर. १७ अत्यंत मोह. १८ भ्रांति. १९ मांसानें. २० मोठे. २१ भोंवरे. २२ गढूळ पाण्यानें. २३ रुतले. २४ खळखळाटानें. २५ प्रवाह २६ मोठा. २७ कठीण. २८ लोंढ्यानें. २९ वाहून जातात. ३० किल्ले. ३१ घाईनें. ३२-ब्रह्मांडगोलाचें. ३३ प्रवाहानें. ३४ उभें राहणें. ३५ हानि. ३६ धळानें. ३७ थांग. ३८ ज्ञानाच्या. ३९ ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तीन वेदांच्या. ४० मीपणाच्या. ४१ गर्वरूपी माशाच्या. ४२ मळ. ४३ मदनाच्या.

कडेला लागत आहे; ७३ जीमधील विषयसुखरूपी बेटावर कामरूपी लाटा आदळून त्या ठिकाणीं जीवसमुदायरूपी फेंस पुष्कळ दिसत आहे; ७४ अहंकाररूपी ओघानें, व विद्या, धन आणि सामर्थ्य या तीन मदाच्या उकळ्यांनीं ज्या ठिकाणीं विषयतरंगाच्या लाटा उसळताहेत, ७५ उदय आणि अस्त यांच्या लोंढ्यांनीं जन्ममरणांचे धोंडे पडून त्या ठिकाणीं पंचभूतात्मक शरीररूप बुडबुडे उत्पन्न होतात व लय पावतात; ७६ जिच्यांत मोह व भ्रांति हे मासे धैर्यरूप मांस गिळून टाकतात; त्या ठिकाणीं अज्ञानरूपी मोठे भोंवरे भोंवतीं फिरत असतात; ७७ भ्रांतिरूप गढूळ पाण्यानें आस्थारूप गाळांत रुतून तमोरूपी खळखळाटानें स्वर्गप्राप्तीची गर्जना होत असते; ७८ (असा हा) तमोरूपी प्रवाह तरून जाण्यास अवघड आहे; (येथें) सत्त्वरूपी स्थिर पाण्याचा मोठा डोह आहे; किंबहुना ही मायानदी दुस्तर आहे. ७९ खरोखर हीमधील जन्ममृत्यूंच्या पुराच्या लोंढ्यात सत्यलोकाचे किल्ले वाहून जातात, आणि ब्रह्मांडगोलाचे धोंडे तेव्हांच गडबडत जातात. ८० त्या पुराच्या प्रवाहांत अजून कोणाचे पाय लागत नाहींत ! अरे, असा हा मायापूर कोणाच्यानें तरून जाववेल ? ८१ आणखी एथें एक मोठेंच नवल आहे; ही नदी तरून जाण्याला जे जे उपाय करावे, ते ते अपायकारकच होतात ! ८२ कोणीं आपल्या बुद्धीच्या बळावर (हीमधून तरून जावें म्हणून) हिजमध्यें उडी टाकली, त्यांचा पत्ताच नाहीं; कोणाला ज्ञानरूपी डोहांत गर्वानें पार गिळून टाकलें; ८३ कोणी वेदत्रयीच्या सांगडीवर बसून तिच्याखालीं मीपणाचे धोंडे बांधून या मायारूप नदींतून तरून जाण्यास निघाले, ते मदरूपी माशाच्या तोंडांत सबंधच नाहींतसे झाले; ८४ कोणी तारुण्याच्या बळानें कमर कसून मदनाच्या कासेला लागले, तों त्यांना विषयरूप सुसरीनेंच चघळून टाकिलें; ८५ मग ते वार्धक्यरूप लाटांमध्यें तरंगत जात असतां मतिभ्रंशरूप जाळ्यांत सांपडतात, व त्यायोगें चहूंकडून जखडले जाऊन ८६ शोकरूप कड्यावर आदळतात; व पुढें क्रोधरूपी भोंवऱ्यांत सांपडले असतां कोठें वर डोकें करावयास लागले, कीं आपत्तिरूप गिधाडें त्यांस टोंचटोंचून खाऊं लागतात; ८७ आणि मग ते दुःखरूप चिखलांत फसून मरणरूप वाळूंत रुतले जातात ! अशा प्रकारें जे विषयाच्या मागें लागले ते फुकट जातात. (त्यांचें जिणें व्यर्थ होतें.) ८८ कोणी यज्ञादिक क्रियारूपी पेटी बांधून पोटाखालीं घेतात, ते स्वर्गसुखरूपी कपारींत अडकून राहतात. ८९ कोणी मोक्षप्राप्तीच्या आशेनें कर्मरूप बाहुबलावर भरंवसा ठेवतात, परंतु कर्तव्याकर्तव्यांच्या वळणांत पडतात. ९० त्या नदीमध्यें वैराग्यरूप नाव चालत नाहीं, व विवेकरूप काठी टेंकत नाहीं; तथापि योगानें तरतां येईल. परंतु असें क्वचित् घडून येतें. ९१ अशा प्रकारें, जीवाच्या अंगबळानें ह्या मायारूप नदींतून तरून

४४ जाळें. ४५ बांधले जातात. ४६ आदळतो. ४७ भोंवऱ्यात. ४८ आपत्तिरूप गिधाडांनीं. ४९ टोंचले जातात. ५० वर डोकें काढतांच. ५१ चिखलानें. ५२ भरून. ५३ वाळूंत. ५४ रुततात. ५५ कपारींत. ५६ बाहुबळाच्या. ५७ वळणात. ५८ टिकाव ५९ क्वचित्.

तरी जीवाचिये आंगवणें । इये मायानदीचें तरणें । हें कासयासारिखें बोलणें । म्हणावें पां ॥ ९२ ॥ ( २४७. अशक्य गोष्टी घडतील तर जीव मायानदी तरतील, ९३-९६ ) जरी अपथ्यशीला व्याधी । कळे साधूसी दुर्जनाची बुद्धी । कीं रोगी[3] सांडी सिद्धी । आली सांती ॥ ९३ ॥ जरी चोरां सभा दांटे । अथवा मीनां गळ घोटे । ना तरी भेंडां उलटे[6] । विवसी[7] जरी ॥ ९४ ॥ पाडस वागुर करांडी । कां मुंगी मेरु वोलांडी । तरी मायेची पैलथडी । देखती जीव ॥ ९५ ॥ म्हणऊनि गा पंडुसुता । जैसी सकामा न जिणवेचि वनितीं । तेवीं मायामय हे सरितीं । न तरवे जीवां ॥ ९६ ॥ ( २४८. परमात्म्याला शरण आल्यानें जीव मायानदी तरतील, ९७-१०२ ) येथ एकचि लीळा[13] तरले । जे सर्वभावें मज भजले । तयां ऐलीच थडी सरलें । मायाजळ ॥ ९७ ॥ जयां सद्गुरु तारूं[14] फुडें । जे अनुभवाचे कासे गाढे[16] । जयां आत्मनिवेदनें तरांडें । आकळलें ॥ ९८ ॥ जे अहंभावाचें वोझें सांडुनि । विकल्पाचिया झुळका चुकाउनी । अनुरागाचा निरुता[21] होउनि । पाणीढाळ[22] ॥ ९९ ॥ जया ऐक्याचिया[23] उतारा । बोधाचा जोडला तारा[24] । मग निवृत्तीचिया पैल तीरा । झेंपावले जे ॥ १०० ॥ ते उपरतीच्या वांवीं सेलेंत । सोहंभावाचेनि थावें पेलेंत । मग निघाले अनकोळित । निवृत्तितटीं ॥ १ ॥ येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले । परि ऐसे भक्त विपाइले । बहुवसें नाहीं ॥ २ ॥

चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन । आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ १६
तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते । प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥

अन्वयः—अर्जुन, ( हे ) भरतर्षभ, आर्तः, जिज्ञासुः, अर्थार्थी च ज्ञानी ( इति ) चतुर्विधाः सुकृतिनः जनाः मां भजन्ते ॥ १६ ॥ तेषां नित्ययुक्तः एकभक्तिः ज्ञानी विशिष्यते; अहं हि ज्ञानिनः अत्यर्थं प्रियः ( अस्मि ) च सः मम प्रियः ( अस्ति ) ॥ १७ ॥

( २४९. आत्म्याचें ज्ञान नसण्याचें कारण, १०३–१०८ ) जे बहुतां एकां अवांतरें[34] । अहंकाराचा भूतसंचार । जाहाला म्हणोनि विसर । आत्मबोधाचा ॥ ३ ॥ ते वेळीं नियमाचें वस्त्र नाठवे । पुढील अधोगतीची लाज नेणवे । आणि करितात जें न करावें । वेदु म्हणे ॥ ४ ॥ पाहें पां शरीराचिया गांवा । जयालागीं आले पांडवा । तो कार्यार्थु आघवा । सांडूनियां ॥ ५ ॥ इंद्रियग्रामींचे राजबिदीं । अहंममतेचिया जल्पवादीं । विकारांतराची मांदी । मेळवूनियां ॥ ६ ॥ दुःखशोकांच्या घाईं । मारिलियाची सेचि नाहीं । हें सांगावया कारण काई । जे ग्रासिले

१ आंगबळानें. २ विषयासक्त. ३ भरेल. ४ पाशाला. ५ भितऱ्याला ( पाहून ). ६ भिऊन मागें फिरेल. ७ पिशाच. ८ हरणाचें पोर. ९ जाळें. १० विषयी पुरुषास. ११ स्त्री. १२ नदी. १३ सहज. १४ नावाडी, तारणारा. १५ ब्रह्माच्या. १६ बळकट. १७ आत्मा ईश्वरास समर्पण करणें. १८ तारू. १९ सापडलें. २० बायकामुलांवरील प्रेम २१ चुकवून. २२ पाण्याची धार. २३ जीवब्रह्माचें ऐक्य. २४ सागड. २५ जाऊन पोहोंचले. २६ हातानीं. २७ तरंगतात.

जातां येतें हें म्हणणें कशासारखें आहे म्हणावें, तें सांगतों. ९२ जर पथ्य न करणाराची व्याधि टळेल, साधूला दुर्जनाची बुद्धि कळेल, किंवा विषयासक्त पुरुष सिद्धि प्राप्त झाली असतां तिला सोडील; ९३ जर चोरांची सभा भरेल, अथवा माशाला गळ गिळितां येईल, किंवा भिन्याला भिऊन पिशाच माघारें फिरेल; ९४ जर हरणाचें पाडस जाळें कुरतुडील, किंवा मुंगी मेरु पर्वत ओलांडील, तरच जीवांना. ( आपल्या स्वतांच्या शहाणपणानें ) मायानदी तरून पलीकडल्या तीरीं जाता येईल ! ९५ म्हणून, हे पांडुसुता, ज्याप्रमाणें विषयी पुरुषाला स्त्री जिंकवत नाहीं, त्याप्रमाणें ही मायारूप नदी जीवाला तरवत नाहीं. ९६ येथें जे मला अनन्यभावानें शरण येतात, ते फक्त ह्या दुस्तर नदींतून सहज तरून जातात. इतकेंच नव्हे, तर ते अलीकडच्या काठीं असतांनाच मायारूप जल पार नाहींसें होतें. ९७ ज्यांना सद्गुरु हाच नावाडी असून ज्यांनीं ब्रह्माची कांस बळकट धरली आहे, व ज्याना आत्मनिवेदन हेंच तारूं सापडलें आहे; ९८ जे अहंभावाचें ओझें टाकून, विकल्परूपी वारा चुकवून, आणि बायकामुलांच्यावरील अनुरागरूपी पाण्याची धार टाळून, ९९ ते जीवात्म्याचें ऐक्य हाच उतार त्या उतारानें बोधरूपी सांगडीच्या आश्रयानें निवृत्तीच्या पलीकडील कांठाला जाऊन पोहोंचतात, १०० ते वैराग्यरूप हात टाकीत ' अहंब्रह्म ' ह्या भावाच्या बळावर पोहून निवृत्तिरूपी तटावर निर्विघ्नपणें निघतात. १ या उपायानें जे मला भजतात, तेच ह्या मायारूप नदींतून तरून जातात; परंतु असे भक्त अगदीं विरळा. फार नाहींत. २

श्लोकार्थः—अर्जुना, हे भरतश्रेष्ठा, आर्त ( रोगादिकांनीं पीडित ), जिज्ञासु ( भगवत्तत्त्व जाणण्याची इच्छा करणारा ), अर्थार्थी ( भोगेच्छु ) आणि ज्ञानी असे चार प्रकारचे पुण्यवान लोक मला भजतात ॥ १६ ॥ त्यामध्यें, ज्ञानी हा निरंतर माझे ठिकाणीं तत्पर असून एकनिष्ठेनें माझी भक्ति करतो, म्हणून श्रेष्ठ आहे. ज्ञान्याला मी अत्यंत प्रिय आहे, व तो मला अत्यंत प्रिय आहे ॥ १७ ॥

कारण, त्या एकाशिवाय इतर सर्व प्राण्यांना अहंकाररूप भूताचा संचार झाल्यामुळें आत्मस्वरूपाचा विसर पडतो. ३ त्या वेळीं त्यास नियमरूपी वस्त्राचें भान राहत नाहीं, अधोगतीची लाज नाहींशी होते, आणि ते वेदबाह्य वर्तणूक करितात. ४ अर्जुना, असें पहा कीं, या शरीररूप गांवांत ज्या कार्याकरितां आले, तो सर्व कार्यभाग सोडून, ५ या इंद्रियसमुदायरूप राजमार्गावर अहंममतेची बडबड करण्याकरिता कामक्रोधादिक विकारांचा समुदाय गोळा करितात; ६ आणि दुःख व शोक यांचे घाव पडत असतांही त्यांना त्यांची आठवण सुद्धां नसते. हें सांगावयाचें कारण काय म्हणशील, तर ते मायेनें ग्रासलेले असतात. ७ म्हणून ते मला मुकतात; परंतु फक्त चौघानींच, ज्यांनीं माझें भजन

२८ मीच ईश्वर अशा भावाच्या. २९ बळानें. ३० पोहतात. ३१ निर्विघ्न. ३२ मुक्तिरूप तटावर. ३३ पुष्कळ. ३४ इतर. ३५ इंद्रियसमुदायाच्या. ३६ राजमार्गांत. ३७ बडबडीनें. ३८ कामक्रोधादिकांची. ३९ समुदाय. ४० आठवण.

माया ॥ ७ ॥ म्हणोनि ते मातें चुकले । एक चतुर्विध मज भजले । जिहीं आत्महित केलें । वाढतें गा ॥८॥ ( २५०. भक्त चार प्रकारचे, त्यांत आवडत्या भक्तांचें वर्णन, १०९-११८ ) तो पहिला आर्तु म्हणिजे । दुसरा जिज्ञासु बोलिजे । तिजा अर्थार्थी जाणिजे । ज्ञानिया चौथा ॥ ९ ॥ तेथ आर्त तो आर्तीचेनि वेयाजें । जिज्ञासु तो जाणावयालागीं भजे । तिजेनि तेणें इच्छिजे । अर्थसिद्धि ॥ ११० ॥ मग चौथियाच्या ठायीं । कांहींचि करणें नाहीं । म्हणोनि भक्तु एकु पाहीं । ज्ञानिया जो ॥११॥ जे तया ज्ञानाचेनि प्रकाशें । फिटलें भेदाभेदांचें कडवसें । मग मीचि जाहाला समरसें । आणि भक्तुही तेवींचि ॥ १२ ॥ परि आणिकांचिये दिठी नावेक । जैसा स्फटिकुचि आभासे उदक । तैसा ज्ञानी नव्हे कौतुक । सांगतां तो ॥१३॥ जैसा वारा कां गगनीं विरे । मग वारेपण वेगळें नुरे । तेविं भक्त हे पैजें न सरे । जरी ऐक्या आला ॥ १४ ॥ जरी पवन हालवूनि पाहिजे । तरी गगनावेगळा देखिजे । येऱ्हवीं गगन तों सहजें । असे जैसें ॥ १५ ॥ तैसें शरीरीं इन कर्मे । तो भक्त ऐसा गमे । परी आंतरप्रतीतिधर्मे । मीचि जाहला ॥ १६ ॥ आणि ज्ञानाचेनि उजिडलेपणें । मी आत्मा ऐसें तो जाणे । म्हणऊनि मीही तैसेंचि म्हणें । उंचंबळलासांता ॥ १७ ॥ हां गा जीवापैलीकडिली खुणे । जो पावोनि वावरों जाणे । तो देहाचेनि वेगळेपणें । काय वेगळा होय ॥ १८ ॥

उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।
*आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥*

अन्वयः—एते सर्वे एव उदाराः ( सन्तिः, परंतु ) ज्ञानी तु ( मम ) आत्मा एव ( अस्ति इति ) मे मतं हि; युक्तात्मा सः अनुत्तमां गतिं मां एव आस्थितः ( अस्ति ) ॥१८॥

( २५१. ज्ञानी भक्तावर देव प्रेम करितात, ११९–१२६ ) म्हणोनि आपुलाल्या हिताचेनि लोभें । मज आवडे तोही भक्त शोभे । परी मीचि करीं वालभें । ऐसा ज्ञानिया एक ॥ १९ ॥ पाहें पां दुभतेयाचिया आशा । जग धेनूसि करीतसे फांसीं । परि दोरेंवीण कैसा । वत्साचा वळी ॥ २० ॥ कां जे तनुमनप्राणें । तें आणिक कांहींचि नेणे । देखे तयातें म्हणे । हे माय माझी ॥ २१ ॥ तें येणें मानें अनन्यगती । म्हणूनि धेनूही तैसीचि प्रीती । तयालागीं लक्ष्मीपती । बोलिले साचें ॥ २२ ॥ हें असो मग म्हणितलें । जे कां तुज सांगितले । तेही भक्त भले । पढियंते आम्हां ॥२३॥ परि जाणोनियां मातें । जे पाहों विसरले मागौतें । जैसें सागरा येऊनि सरिते । मुरडावें ठेलें ॥ २४ ॥ तैसी अंतःकरणकुंहरीं जन्मली । जयांची प्रतीतिगंगा मज मीनली । तो मी हे काय बोलीं । फार करूं ॥ २५ ॥ येऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे । तो चैतन्यचि केवळ माझें । हें न म्हणावें परि काय

१ चौवेजण. २ पीडित. ३ ज्ञानप्राप्तीची इच्छा करणारा. ४ धनादिकांची इच्छा करणारा. ५ मिषानें. ६ तिसऱ्यानें, अर्थार्थी यानें. ७ द्रव्यप्राप्ति. ८ अंधार. ९ ऐक्यानें. १० प्राणा. ११ वारा.

केलें त्यांनीं आत्महित वृद्धिंगत केलें. ८ त्या चौघांपैकीं पहिल्याला आर्त, दुसऱ्याला जिज्ञासु, तिसऱ्याला अर्थार्थी, व चौथ्याला ज्ञानी असें म्हणतात. ९ आर्त हा दुःख-निवारणासाठीं मला भजतो; जिज्ञासु ज्ञानप्राप्तीकरतां भजतो; आणि तिसरा जो अर्थार्थी तो द्रव्यप्राप्तीचे इच्छेनें मला भजतो. ११० परंतु चौथा जो असतो, त्याला कांहींच कर्तव्य नसतांही तो मला भजतो, म्हणून तो एक ज्ञानी पुरुषच माझा भक्त होय हें ध्यानांत ठेव. ११ कारण, त्याच्या ज्ञानाच्या प्रकाशानें भेदाभेदरूप अंधकार नाहींसा होतो; व मग त्याचें माझ्याशीं ऐक्य होऊन तो मद्रूप होऊन बसतो, व त्याची भक्तिही तशीच कायम असते. १२ परंतु स्फटिक मणि जसा उदकमय दिसतो, तसा हा ज्ञानी पुरुष इतरांच्या दृष्टीला दिसतो तसा नव्हे; त्याचें वर्णन करतांना कौतुक वाटतें. १३ ज्याप्रमाणें वारा हा गगनांत शांत झाल्यावर मग त्याचें वारेपण वेगळें उरत नाहीं, त्याप्रमाणें हा जरी मद्रूप झाला, तरी त्याचा भक्ताचा बाणा जात नाहीं. १४ जर वारा हालवून पाहिला तर तो गगनाहून वेगळा भासतो, येऱ्हवीं गगन आणि तो ज्याप्रमाणें एकच, १५ त्याचप्रमाणें शरिरासंबंधीं सर्व कर्मांच्या आचरणानें तो माझा भक्त असा वाटतो; परंतु स्वानुभवाच्या योगानें तो मद्रूपच असतो; १६ आणि ज्ञानप्राप्तीच्या उजेडानें मीच त्याचा आत्मा आहे असें तो जाणतो, म्हणून मींही संतोष पावून त्याला आपला आत्मा असें म्हणतो. १७ जो जीवपणाच्या पलीकडील खूण समजून घेऊन व्यवहारांत वागतो, तो देह धारण केल्यामुळें माझ्यापासून वेगळा होईल का पहा बरें ! १८

श्लोकार्थः—हे सर्व श्रेष्ठच आहेत; परंतु त्यांत ज्ञानी तर माझा आत्माच असें मी मानितों. कारण, तो माझ्या ठायीं चित्त ठेवून मलाच सर्वोत्तम गति मानून माझा आश्रय करतो ॥ १८ ॥

म्हणून आपल्या हिताकरितां हवा तो मनुष्य माझी भक्ति करतो, परंतु मी ज्याच्यावर प्रीति करतों असा एक भक्त ज्ञानीच होय. १९ हें पहा कीं, दुधाच्या आशेनें सर्व लोक गाईला भाला घालतात; परंतु आपल्या वासराला भाल्याशिवाय ती कसें दूध पाजिते ? १२० का तर, त्याला दुसरी कांहीं एक गोष्ट माहीत नसून आपल्या तनमनप्राणानें तें आईलाच ओळखत असतें; आणि जी वस्तु पाहील ती माझी आई आहे असें समजतें, २१ अशा प्रकारें, तें वासरूं अनन्य भक्त असतें म्हणून त्याच्यावर गायही तशीच प्रीति करते. यास्तव लक्ष्मीपति (कृष्ण) जें बोलले तें खरें. २२ हें असो. मग म्हणतातः— ज्ञान्याशिवाय जे तुला इतर भक्त सांगितले, तेही माझे आवडते आहेत. २३ त्यांना माझें ज्ञान झालें म्हणजे मग ते परत फिरणें विसरतात. ज्याप्रमाणें नदी सागराला मिळाल्यावर तिचें माघारी फिरणें खुंटतें, २४ त्याचप्रमाणें ज्याच्या अंतःकरणरूपी दरीतून अनुभवरूप गंगा निघून मला मिळाली तो मद्रूप झाला हें वर्णन किती करूं ? २५ येऱ्हवीं ज्ञानी

---

१२ स्वानुभवानें. १३ उदयानें. १४ हर्षयुक्त झाला असता. १५ जीवाच्या स्वरूपापलीकडची—आत्मस्वरूपाची. १६ प्रीति. १७ भाला, (दूध काढतांना गाय लाथा मारीत असेल तर तिला भाला घालावा लागतो.) १८ आवडते. १९ नदीनें. २० दरीमध्यें. २१ अनुभवरूपी गंगा. २२ मिळाली.

कींजे । न बोलणें बोलों ॥ २६ ॥

बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते । वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥१९॥

अन्वयः—ज्ञानवान् बहूनां जन्मनां अंते ' सर्वं वासुदेवः ' इति मां प्रपद्यते; सः महात्मा सुदुर्लभः ( अस्ति ) ॥१९॥.

( २५२. ज्ञानी भक्त जगांत दुर्लभ आहे, १२७–१३७ ) जे तो विषयांची दाट झाडीं-। माजि कामक्रोधांचीं सांकडीं । चुकावूनि आला पाडीं । सद्वासनेचिया ॥ २७ ॥ मग साधुसंगें सुभटा । उजू सत्कर्माचिया वाटा । अप्रवृत्तीचा अव्हांटा । डावलूनि ॥ २८ ॥ आणि जन्मशतांचा वाहतवणा । तेवींचि आस्थेचिया न लोचि वाहणा । तेथ फळहेतूचा उगाणा । कवणु चाळी ॥ २९ ॥ ऐसा शरीर-संयोगाचिये राती-। माजि धांवतां सडिया आयती । तंव कर्मक्षयाची पाहाती । पाहांट जाली ॥ १३० ॥ तैसीच गुरुकृपा उखा उजळली । ज्ञानाची वोतपली पडली । तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ॥ ३१ ॥ ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया एकु आहे । अथवा निवांत जरी राहे । तऱ्ही मीचि तया ॥ ३२ ॥ हें असो आणिक कांहीं । तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं । जैसें सबाह्य जळ डोहीं । बुडालिया घटा ॥ ३३ ॥ तैसा तो मजभीतरीं । मी तया आंतुबाहेरी । हें सांगिजेल बोलेंवरी । तैसें नव्हे ॥ ३४ ॥ म्हणोनि असो हें इया-परी । तो देखे ज्ञानाची वाखारी । तेणें संचरलेनि करी । आपु विश्व ॥ ३५ ॥ हें समस्तही श्रीवासुदेव । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भाव । म्हणोनि भक्तांमाजीं रावं । आणि ज्ञानिया तोचि ॥ ३६ ॥ जयाचिये प्रतीतीच्या वाखारां । पैवाडु होय चराचरा । तो महात्मा धनुर्धरा । दुर्लभ आथी ॥ ३७ ॥ ( २५३. ज्ञानी भक्ताशिवाय इतर भक्तांचीं भजनें भोगासाठीं असतात. १३८–१४२ ) अवतरणः— येर बहुत जोडती किरीटी । जयांचीं भजनें भोगासाठीं । जे आशातिमिरें दृष्टि । विषयांध जाले ॥ ३८ ॥

कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यंतेऽन्यदेवताः । तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया२०

अन्वयः—तैः तैः कामैः हृतज्ञानाः स्वया प्रकृत्या नियताः ( अज्ञानिनः ) तं तं नियमं आस्थाय अन्यदेवताः प्रपद्यंते. ॥ २० ॥

आणि फळाचिया हांवा । हृदयीं कामा जाला रिगावा । कीं तयाचिये वेंसणीं दिवा । ज्ञानाचा गेला ॥ ३९ ॥ ऐसे उभयतां आंधारीं पडले । म्हणोनि पासींचि मातें चुकले । मग सर्वभावें अनुसरले । देवतांतरां ॥ १४० ॥ आधींच प्रकृतीचे पाइक । वरी भोगालागीं तंव रंकें । मग तेणें लोलुपत्वें कौतुक । कैसेनि

१ संकटें. २ दुराचरणाचा. ३ आडमार्ग. ४ वाटसरू. ५ हिशेब. ६ उपाधिरहित. ७ उजेडानें. ८ ज्ञानोदयाची वेळ ९ उपःकाल. १० कोंवळें ऊन. ११ ऐश्वर्य. १२ वाट, मार्ग. १३ याचेनें, १३ वन्दांना. १४ वखार. १५ संचार करितो. १६ स्वानुभवाचा. १७ श्रेष्ठ. १८ महत्त्व; विस्तार.

ज्याला म्हणतात, तो केवळ माझा जीव कीं प्राण होय. हें सांगूं नये, पण काय करावें ? ही न बोलण्याची गोष्ट तुला प्रसंगोपात सांगितली. २६

श्लोकार्थः—ज्ञानी पुरुषाला, बहुत जन्मानंतर, 'सर्व कांहीं वासुदेवरूप आहे' अशा प्रकारें माझी प्राप्ति होते; असा हा महात्मा फार दुर्लभ आहे ॥ १९ ॥

जो विषयरूप दाट झाडींतून कामक्रोधादिक संकटें टाळून व सद्वासनेच्या पहाडावर चढून आला; २७ नंतर, हे वीरश्रेष्ठा अर्जुना, साधूंच्या संगतीनें, सत्कर्माच्या सरळ वाटेनें, दुराचरणाच्या आडमार्गाला डावलून, २८ आणि आस्थेच्या (फलाशेच्या) वाहणा पायांत न घालतां शेंकडों जन्म भक्तीची वाट चालणारा जो ज्ञानी भक्त, तो फलाच्या हेतूंचा का हिशेब करील ? २९ याप्रमाणें शरीरसंबंधी अज्ञानरूप रात्रींत उपाधिरहित वाट चालत असतां सहज कर्मक्षय होऊन ज्ञानोदयाची पहांट होते. १३० त्याच वेळेस गुरुकृपारूप उषःकाल होतो आणि मग ज्ञानरूप सूर्याचीं कोवळीं किरणें पडून समदृष्टीचें ऐश्वर्य त्याच्या दृष्टीस पडतें. ३१ त्या वेळीं तो जिकडे जिकडे पाहातो, तिकडे तिकडे त्याला माझ्याशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं. अथवा तो जरी स्वस्थ बसला, तरी त्याला मीच दिसतों. ३२ फार काय सांगावें ? त्याला सर्व ठिकाणीं माझ्यावाचून दुसरें कांहीं दिसत नाहीं. ज्या-प्रमाणें पाण्यांत बुडालेल्या घटाच्या आंत व बाहेर पाणीच असतें. ३३ त्याप्रमाणें, तो माझ्या आंत व मी त्याच्या अंतर्बाह्य आहें; हें बोलून दाखविण्यासारखें नाहीं. ३४ म्हणून तें असो. याप्रमाणें त्याला ज्ञानाची वखारच दृष्टीस पडते; आणि तो जिकडे जिकडे संचार करितो, तिकडे तिकडे त्याला आपणच विश्व आहों असें भासतें. ३५ या सर्व विश्वात वासुदेव भरला आहे असा त्याचा पूर्ण अनुभव असतो, म्हणून भक्तांमध्यें तोच सर्वश्रेष्ठ आणि तोच ज्ञानी होय. ३६ धनुर्धरा, ज्याच्या अनुभवाच्या वखारींत सर्व चराचर विश्व सांठविलें आहे, असा हा महात्मा फार दुर्लभ आहे. ३७ याच्याशिवाय, अर्जुना, पुष्कळ मला भजतात, पण त्यांची भक्ति फक्त विषयसुखाशेनें असते; कारण आशातिमिरानें त्याची दृष्टि विषयांध झालेली असते. ३८

श्लोकार्थः—वेगवेगळ्या कामनांनीं ज्यांचें ज्ञान नाहींसें झालें आहे, आणि जे अज्ञानी आप-आपल्या स्वभावाच्या अधीन झालेले आहेत, ते (ज्या ज्या देवतेचा जो जो उपासनानियम असेल,) त्या त्या नियमाचें अवलंबन करून (मज आत्मरूप वासुदेवाहून भिन्न असलेल्या) इतर देवतास भजतात ॥ २० ॥

आणि फलाच्या इच्छेनें त्याच्या हृदयात कामाचा रिघाव झाला कीं, त्याच्या संगर्गानें ज्ञानरूपी दिवा मालवतो. ३९ अशा रीतीनें त्याना अंतर्बाह्य अंधार होतो, म्हणून मी त्यांच्याजवळ असूनही ते मला अंतरतात; आणि मग सर्व भावानें इतर देवाना भजूं लागतात. १४० अगोदर ते मायेच्या अधीन झालेले, आणि त्यांत फलप्राप्तीकरितां दीन

१९ इच्छारूप अंधकारानें. २० इच्छेनें. २१ संसर्गानें. २२ आत व बाहेर. २३ जवळ असून. २४ आराधन करूं लागले. २५ दीन. २६ लपटपणानें.

भजती ॥ ४१ ॥ कवणी तिया नियमबुद्धि । कैसिया हन उपचारसमृद्धि । कां अर्पण यथाविधि । विहित करणें ॥ ४२ ॥

यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयाऽर्चितुमिच्छति ।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥

अन्वयः—यः यः भक्तः यां यां तनुं श्रद्धया अर्चितुं इच्छति, तां एव तस्य तस्य श्रद्धां अहं अचलां विदधामि ॥२१॥

( २५४. अन्य देवाची भक्ति करणाऱ्या भक्तांना फळ देणारा मीच आहें, १४३–१४६ ) पैं जो ज़िये[2] देवतांतरीं । भजावयाची चाड करी । तयाची ते चाड पुरी । पुरविता मी ॥ ४३ ॥ देवो देवी मीचि पाहीं । हाही निश्चय त्यासि नाहीं । भाव ते ते ठायीं । वेगळाला धरी ॥ ४४ ॥

स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते । लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान् ॥

अन्वयः—सः तया श्रद्धया युक्तः तस्य आराधनं ईहते च ततः मया एव विहितान् तान् कामान् लभते हि ॥ २२ ॥

मग तिया श्रद्धायुक्त । तेथींचें आराधन जें उचित । तें सिद्धीवरी समस्त । वर्तों लागे ॥ ४५ ऐसें जेणें जें भाविजे । तें फल तेणें पाविजे । परी तेंही सकळ निपजे । मजचिस्तव ॥ ४६ ॥

अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् । देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥२३

अन्वयः—अल्पमेधसा तेषां तत् फलं तु अन्तवत् भवति; देवयजः देवान् यान्ति, मद्भक्ताः अपि मां यान्ति ॥ २३ ॥

( २५५. अन्य देवतांना भजणारे भक्त त्या देवत्वाला प्राप्त होतात व त्यांनीं दिलेलें फल अशाश्वत असतें, १४७–१४९ ) परी ते भक्त मातें नेणती । जे कल्पनेबाहेरी न निघती । म्हणोनि कल्पित फळा पावती । अंतवंत ॥ ४७ ॥ किंबहुना ऐसें भजन । तें संसाराचेंचि साधन । येर फळभोग तो स्वप्न । नावभरी दिसे ॥ ४८ ॥ हें असो परौतें । मग हो कां आवडतें । परि यजी जो देवतांतें । तो देवत्वासीचि ये ॥ ४९ ॥ ( २५६. आत्म्याला शरण जाणारे आत्मत्वाला प्राप्त होतात. १५० ) येर तनुमनप्राणीं । जे अनुसरले माझेयाचि वाहणीं । ते देहाच्या निर्वाणीं । मीचि होती ॥ १५० ॥

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः । परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ॥२४॥

अन्वयः—मम परं अव्ययं अनुत्तमं भावं अजानन्तः अबुद्धयः अव्यक्तं मां व्यक्तिं आपन्नं मन्यन्ते ॥ २४ ॥

( २५७. फलेच्छा करणारा आत्मस्वरूपाला प्राप्त होत नाहीं, १५१–१५८ ) परी तैसें न करिती प्राणिये । वायां आपल्या हितीं वाणिये । जे पोहताती पाणिये । तळहातींचेनि ॥ ५१ ॥ नातरी अमृताच्या सागरीं बुडिजे । मग तोंडा

झालेले, मग काय? ते मोठ्या कौतुकानें लंपट होऊन देवांची कशी भक्ति कारितात पण! ४१ कोणत्या नियमानें व उपचारद्रव्यानें, तसेंच यथाविधि, त्याला काय वस्तु अर्पण केल्या पाहिजेत इकडे लक्ष देऊन, जे जे उपचार त्याला आवडत असतील ते ते करतात! ४२.

श्लोकार्थः—जो जो भक्त ज्या ज्या देवतेच्या ठायीं भक्ति ठेवून श्रद्धेनें आराधना करूं इच्छितो, त्याची त्याची ती श्रद्धा मी त्या त्या देवतेच्या ठायीं स्थिर करतों ॥ २१ ॥

परंतु जो जो ज्या ज्या देवतेची फलाकरितां उपासना करितो, त्याची ती इच्छा मीच पुरवितों. ४३ हें पहा कीं, देव-देवी मीच आहें; परंतु त्याचा तसाही निश्चय नसतो, म्हणून त्या त्या देवतांचे ठिकाणीं त्याचा निरनिराळा भाव असतो. ४४

श्लोकार्थः—तो त्या श्रद्धेनें युक्त होऊन त्या देवतेची आराधना करण्याचा प्रयत्न करतो, आणि मग मींच निर्माण केलेल्या त्याच्या त्या कामना पूर्ण होतात ॥ २२ ॥

मग त्यांना ज्या ज्या देवतेची श्रद्धा असेल, त्या त्या देवतेचें, आपली कार्यसिद्धि होईपर्यंत, तें यथाविधि पूजन करितात. ४५ याप्रमाणें ज्यानें जें फल इच्छावें तें त्याला प्राप्त होतें; परंतु तें सर्व माझ्यापासूनच मिळतें. ४६

श्लोकार्थः—( परंतु अन्य देवतांना भजणाऱ्या त्या ) अल्पबुद्धि मनुष्यांना प्राप्त होणारें तें फल नाशवंत असतें. देवतांचे भक्त देवतांना जाऊन मिळतात, आणि माझे भक्त मला येऊन मिळतात ॥ २३ ॥

परंतु ते भक्त मला जाणत नाहींत; कारण ते आशापाशांतून मुक्त होत नाहींत, (त्यांतच घोंटाळतात; ) आणि म्हणूनच, नाशवंत अशीं इच्छित फलें त्यांना प्राप्त होतात. ४७ किंबहुना अशा प्रकारचें हें भजन म्हणजे संसाराचें साधनच होय. बाकी त्याचा फलभोग म्हणजे स्वप्नांतील क्षणिक सुखाप्रमाणेंच होय. ४८ हें एकीकडे राहूं द्या. त्याचें आवडतें दैवत का असेना? त्यानें त्या देवतांचें पूजन केलें म्हणजे तो देवत्वच पावतो. ४९ बाकी तनमन अर्पण करून जे माझ्याच भक्तिमार्गाला लागले, ते देहांतीं माझ्याकडे येतात. १५०

श्लोकार्थः—माझा उत्कृष्ट, अविनाशी व अत्युत्तम असा भाव न जाणणारे अज्ञानी लोक मी अव्यक्त असता मला देहधारी मानतात. ॥ २४ ॥

पण प्राणी तसें करीत नाहींत, आणि फुंकट आपल्या हिताचें नुकसान करून घेऊन ( इतर देवतांच्या पूजनानें अल्प-फलप्राप्ति करून घेऊन ) तळहातावरच्या पाण्यांत पहिल्याप्रमाणें करतात! ५१ किंवा अमृताच्या समुद्रांत बुडाला असतां मग तोंड दाबून कां धरावें? आणि मनामध्यें डबक्यांतील पाण्याची आठवण का करावी? ५२ अमृतांत

१ कोणत्या. २ ज्या ज्या ३ इच्छा. ४ नाशवंत. ५ पलीकडे, ६ पूजन करतो, ७ मार्गाला. ८ शेवटीं, अंतःकाळीं, ९ तोंडा करतात, १० अथवा.

कां वेंत्रमिठी पाडिजे । आणि मनीं तरी आठविजे । थिल्लरोदकातें[2] ॥ ५२ ॥ हें ऐसें कासया[3] करावें । जें अमृतींही रिगोनि मरावें । तें सुखें अमृतें[4] होऊनि कां नसावें । अमृतामाजीं ॥ ५३ ॥ तैसा फळहेतूचा पांजरा[5] । सांडूनियां धनुर्धरा । कां प्रतीतिपाखीं[6] चिदंबरा[7] । गोसांविया नोहावें ॥ ५४ ॥ जेथ उंचावलेनि पैवाडें । सुखाचा पैसारा[10] जोडे । आपुलेनि सुरवाडें । उडों ये ऐसा ॥ ५५ ॥ तया निरुपमा[12] माप कां सुंवावें[13] । मज अव्यक्ता व्यक्त कां मानावें । सिद्ध असता कां निर्मावें । सौधनवरी ॥ ५६ ॥ परि हा बोल आघवा । जरी विचारिजे[16] तसे पांडवा । तरी विशेषें या जीवां । न चोजवे[17] गा ॥ ५७ ॥

नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः । मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम्

अन्वयः—योगमायासमावृतः अहं सर्वस्य प्रकाशः न ( अस्मि ); अयं मूढः लोकः अजं अव्ययं मा न अभिजानाति ॥ २५ ॥

कां जे योगमायापडळें । हे जाले आहाती आंधळे । म्हणोनि प्रकाशाचेनि देहवळें । न देखती मातें ॥५८॥ ( २५८. ईश्वरच सर्वत्र भरला आहे, १५९-१६४ ) येऱ्हवीं मी नसे ऐसें । काय वस्तुजात असे । पाहें पां लवण जळरसें- । राहित आहे ॥ ५९ ॥ पवन कवणातें न शिवेचि । आकाश[18]कें न संमायेचि । हें असो एक मीचि । विश्वीं आहे ॥ १६० ॥

वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन । भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥२६

अन्वयः—अर्जुन, अहं समतीतानि च वर्तमानानि च भविष्याणि भूतानि वेद; कश्चन मां तु न वेद ॥ २६ ॥

येथें भूतें जियें अतीतलीं । तियें मीचि होऊनि ठेलीं[21] । आणि वर्तत आहाति जेतुलीं । तीहीं मीचि ॥ ६१ ॥ कां भविष्यमाणें जियें हीं । तींही मज- वेगळीं नाहीं । हा बोलचि येऱ्हवीं कांहीं । होय ना जाय ॥ ६२ ॥ दोराचिया सापासी । डोंबा वडियां नोगव्हाळ ऐसी । संख्या न करवे कोण्हासी । तेवीं भूतांसि मिथ्यत्वें ॥ ६३ ॥ ऐसा मी पंडुसुता । अनुस्यूत सदा असतां । या संसार जो भूतां । तो आनें बोलें ॥ ६४ ॥ ( २५९. जीवाच्या संसारप्राप्तीचें कारण, १६५–१७१ ) अवतरण.—तरि तेचि आतां थोडीसी । गोठी सांगिजेल परियेसीं । जेथ अहंकार- तनूंसी । वोलभ पडिलें ॥ ६५ ॥

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत । सर्वभूतानि संमोहं सर्गे यांति परंतप ॥ २७ ॥

अन्वयः—(हे) परंतप भारत, सर्वभूतानि इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन सर्गे संमोह यान्ति २७

तेथ इच्छा हे कुमारी जाली । मग ते कामाचिया तारुण्या आली । तेथ द्वेषेंसीं मांडिली । वराडिकें[31] ॥ ६६ ॥ तया दोघांस्तवें[32] जन्मला । ऐसा द्वंद्वमोह

१ घट्ट. २ डबक्यात साचलेल्या पाण्याला. ३ का. ४ अमर. ५ पिंजरा, शरीर. ६ सर्वव्यासीच्या. ७ चिदाकाशास. ८ घनी ९ माहात्म्यानें. १० फैलावा. ११ इच्छेप्रमाणें. १२ मापाच्या पलीकडच्याला. १३ घालावें. १४ शिणावें १५ सिद्धीपर्यंत. १६ विचार करिता. १७ आवडत नाहीं.

शिरून देखील मरावयाचें, हें असें तरी का करावें ? अमृतांत सुखानें अमृतरूप होऊन कां राहूं नये ? ५३ त्याचप्रमाणें धनुर्धरा, फलाशारूप पिंजरा टाकून देऊन अनुभवरूप पंखांनीं ( संचार करून ) चिदाकाशाचें ( भगवत्स्वरूपाचें ) धनी कां न व्हावें ? ५४ तें चिदाकाश, आपण कितीही उंच उडण्याचें मनांत आणलें तरी सुखानें उडण्यास फैलावलेलें आहे. ५५ त्या मला, न मोजतां येणाऱ्याला, मापात का घालावें ? मज निराकाराला साकार कां मानावें ? मी सिद्ध असतां माझ्या प्राप्तीकरतां साधनानें कां शिणावें ? ५६ पण अर्जुना, खरें विचारशील कीं नाहीं, तर बहुतकरून हें बोलणें कोणाला आवडत नाही. ५७

श्लोकार्थः—योगमायेनें व्याप्त असा जो मी, तो सर्वांना स्पष्ट दिसत नाहीं. हे मूढ लोक, जन्माला न येणाऱ्या व अविनाशी अशा मला जाणत नाहींत ॥ २५ ॥

कां कीं, योगमायेच्या पडद्यानें ते आंधळे झालेले असतात; म्हणून, देहबुद्धीच्या बळानें, प्रकाशरूप जो मी त्या मला ते पहात नाहींत. ५८ येऱ्हवीं, मी जींत नाहीं अशी एक तरी वस्तु आहे का ? पहा कीं, कोणतेंही पाणी रसविरहित आहे का ? ५९ वारा कोणाला स्पर्श करीत नाहीं ? आकाश कोठें सामावत नाहीं ? हें असो; अवघ्या विश्वांत मीच एकटा भरलेला आहें. १६०

श्लोकार्थः—अर्जुना, मागें झालेलीं, सध्या असणारीं, आणि पुढें होणारीं भूतें मी जाणतों; परंतु मला कोणी जाणत नाहीं ॥ २६ ॥

ह्या जगांत जितके प्राणी होऊन गेले, त्यांचे ठिकाणीं मीच होतों, आणि हल्लीं आहेत त्यांतही मीच आहें. ६१ किंवा पुढें होणार आहेत, तेही मजपासून भिन्न नाहींत; परंतु हें फक्त बोलणें आहे. बाकी कांहीं होत नाहीं, आणि कांहीं जात नाहीं. ६२ ज्याप्रमाणें दोरीच्या सापाविषयीं तो काळा, कवडया, गव्हला वगैरे कांहींच कल्पना करता येत नाहीं, त्याप्रमाणें, प्राणिमात्र मिथ्या असल्यामुळें तत्संबंधीं कोणतीच कल्पना करतां येत नाहीं. ६३ हे पंडुसुता, अशा प्रकारें मी सदा अखंड आहें; प्राणिमात्राच्या मागें जो संसार लागला आहे, त्याचें कारण निराळें आहे. ६४ म्हणून त्याविषयीं थोडीशी गोष्ट सांगतों, ती ऐक: अभिमान व तनु ( शरीर ) या दोहोंची प्रीति जडली; ६५

श्लोकार्थः—हे परंतपा भारता, इच्छा आणि द्वेष यापासून उत्पन्न झालेल्या सुखदुःखरूप मोहानें सर्व भूतें वेडावून जाऊन उत्पत्तिकालीं मोठ्या गोंधळात पडतात ॥ २७ ॥

त्या दोघांच्या प्रीतीपासून इच्छारूप कन्या उत्पन्न झाली, व ती आपल्या पूर्ण तारुण्यांत आल्यावर तिचें द्वेषाशीं लग्न लागलें. ६६ त्या दोघापासून ( सुखदुःखरूप )

१८ कोठें. १९ मावत नाहीं. २० होऊन गेलीं. २१ राहिलीं. २२ पुढें होणारीं. २३ काळा. २४ कवडा. २५ जवसासारखा. २६ अखंड. २७ शरीराशीं. २८ प्रीति; सख्य. २९ अप्राप्त वस्तुविषयीं प्रथम जो विचार मनात येतो ती इच्छा. ३० ती इच्छा बळावली म्हणजे तिला काम म्हणतात. ३१ लग्नसोहळा. ३२ दोघापासून.

जाला । मग तो आजेयानें वाढविला । अहंकारें ॥ ६७ ॥ तो धृतीसि सदां प्रतिकूळ । नियमाही नावेसूळ । आशारसें दोंदिलु । जाला सांता ॥ ६८ ॥ असंतुष्टीचिया मादिरा । मत्त होवोनि धनुर्धरा । विषयाचे वोवरां । विकृतीविणें असे ॥६९॥ तेणें भावशुध्दीचिया वाटे । विखुरले विकल्पाचे कांटे । मग चिरिले अव्हांटे । अप्रवृत्तीचे ॥ १७० ॥ तेणें भूतें भांबावलीं । म्हणोनि संसाराचिया आडवामाजि पडिलीं । मग महादुःखाच्या घेतलीं । दांडे वैरी ॥ ७१ ॥

येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् । ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः ॥२८

अन्वयः—येषा पुण्यकर्मणा जनाना तु पाप अतगतं ( अस्ति ), ते दृढव्रताः ( जनाः ) द्वंद्वमोहनिर्मुक्ताः ( संतः ) मा भजंते ॥ २८ ॥

( २६०. पुण्यमार्गाचे आचरणाने आत्मस्वरुपाला येतात, १७२–१७४ ) ऐसे विकल्पाचे वैयाणे । कांटे देखोनि सणाणे । जे मतिभ्रमाचें पैसावणें । घेतीचिनों ॥ ७२ ॥ उजू एकनिष्ठेच्या पाउलीं । रगडूनि विकल्पाचिया भोंलीं । महापातकांची सांडिली । अटवी जिहीं ॥ ७३ ॥ मग पुण्याचे धांवा घेतले । आणि माझी जवळीक पावले । किंबहुना ते चुकले । वाटवधेयां ॥ ७४ ॥

जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये । ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥

अन्वयः—ये मा आश्रित्य जरामरणमोक्षाय यतंति, ते तत् ब्रह्म, कृत्स्नं अध्यात्म च अखिल कर्म विदुः ॥ २९ ॥

( २६१. परमात्म्याचा आश्रय करणारानींच अध्यात्म व ब्रह्म जाणलें आणि त्यांनींच सर्व केले, १७५-१८४ ) येऱ्हवीं तरी पार्था । जन्ममरणाची निमे[24] कथा । ऐसिया प्रयत्नातें आस्था । विये[25] जयाची ॥ ७५ ॥ तया तो प्रयत्नचि एके वेळे । मग समग्र परब्रह्में फळे । जया पिकलेला रा गळे । पूर्णतेचा ॥ ७६ ॥ ते वेळीं कृतकृत्यता जग भरे । तेथ अध्यात्माचें नवलपणें पुरे । कर्माचे काम सरे । विरमे[28] मन ॥ ७७ ॥ ऐसा अध्यात्मलाभ तया । होय गा धनंजया । भांडवल जया । उंधर्मी मी ॥ ७८ ॥ तयातें साम्याचिये वोढी । ऐक्याची सांदे कुळवाडी । तेथ भेदाचिया दुबळवाडी । नेणिजे तया ॥ ७९ ॥

साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।
प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥

अन्वयः—ये साधिभूताधिदैवं च साधियज्ञं मा विदुः, ते युक्तचेतसः प्रयाणकाले अपि च मां विदुः ॥ ३० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

जिहीं साधिभूतौ मातें । प्रतीतीचेनि हातें । धरूनि अधिदैवातें । शिवतले गा ॥ १८० ॥ जया आणिवेचेनि वेगें । मी अधियज्ञु दृष्टी रिगे । ते तनूचेनि

द्वंद्वमोह हा पुत्र झाला. नंतर त्याच्या अहंकार आजोबानें त्याला वाढविलें. ६७ तो द्वंद्वमोह नेहमीं धैर्याला व इंद्रियदमनालाहि सदा प्रतिकूळ आणि आशारूप दुग्धानें पुष्ट झालेला आहे. ६८ हे धनुर्धरा, असंतोषरूपं मद्यानें उत्पन्न झाल्यामुळें तो विषयांच्या उपभोगाला विटत नाहीं. ६९ त्यानें शुद्ध भक्तीच्या वाटेवर विकल्पाचे कांटे पसरून मग कुमार्गाच्या आडवाटा काढिल्या आहेत. १७० त्या योगानें प्राणिमात्र भ्रम पावून संसाररूप अरण्यांत पडतात, व त्यांना महादुःखाचे सपाटे सोसावे लागतात. ७१

श्लोकार्थः—परंतु पुण्यकर्माच्या योगानें ज्याचें पातक लयास गेलें आहे, ते दृढनिश्चयी जन सुखदुःखांच्या मोहापासून मुक्त होऊन मला भजतात. ॥ २८ ॥

याप्रमाणें विकल्पाचे तीक्ष्ण परंतु निष्फल काटे पाहून, ज्यापासून मतिभ्रम उत्पन्न होतो त्यांना जे मानीत नाहींत; ७२ भक्तीच्या एकनिष्ठेच्या पावलांनीं जे नीट जातांना विकल्पाचे काटे चिरडून टाकतात, ते महापातकांचें अरण्य टाकून सरळ मार्गानें जातात. ७३ नंतर, पुण्याच्या मार्गानें लौकर चालून माझें सांनिध्य पावतात आणि अशा रीतीनें वाटमाऱ्यांच्या ( कामक्रोधादिकांच्या.) हातून सुटतात ! ७४

श्लोकार्थः—जे माझ्या आश्रयानें जरामरणापासून मुक्त होण्यासाठीं यत्न करतात, ते तें ब्रह्म जाणतात; आणि सर्व अध्यात्माला व सर्व कर्मालाही जाणतात. ॥ २९ ॥

येऱ्हवीं, पार्था, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटावें असें जें साधन आहे, त्याच्या प्राप्तीची ज्यांना इच्छा उत्पन्न होते, ७५ त्यांना त्यांचा तो प्रयत्न फलद्रूप होऊन ब्रह्मप्राप्ति होते, व पिकलेल्या फळांच्या रसाप्रमाणें ते पूर्णतेस पावतात. ७६ त्या वेळीं, आम्ही धन्य आहों, असें त्यांना वाटून सर्व जगभर आनंद भरलेला दिसतो; नंतर आत्मज्ञानाची हौस पुरी होऊन व कर्में जागच्या जागीं राहून त्याचें मन शांत होतें. ७७ हे धनंजया, अशा रीतीनें त्यांना आत्मज्ञानाचा लाभ होतो; कारण त्यांच्या या परमार्थरूप व्यापारांत भांडवल मीच आहें. ७८ त्यांना समदृष्टि हेंच व्याज मिळून ऐक्यरूप संपत्तीची समृद्धि होते, यामुळें भेदरूप दैन्याची ओळखही रहात नाहीं. ७९

श्लोकार्थः—जे योगी अधिभूत, अधिदैव आणि अधियज्ञ यांसह मला जाणतात, ते स्वस्थचित्त पुरुष मरणकालींही मला जाणतात ॥ ३० ॥

ज्यांनीं अनुभवाच्या हातांनीं मायावश जीवाला धरून पांचभौतिकासह मला स्पर्श केला, १८० ज्यांच्या ज्ञानाच्या वेगानें मला अधियज्ञ या दृष्टीनें पाहिलें, त्यांना शरि-

१ धैर्याशीं. २ इंद्रियदमनासही. ३ प्रतिकूल. ४ आशारूप दुधानें. ५ पुष्ट. ६ ओरींत. ७ विटल्याशिवाय. ८ शुद्ध भक्तीच्या. ९ पसरले. १० संशयात्मक बुद्धीचे. ११ कुमार्गाचे. १२ भ्रमिष्ट झालीं. १३ अरण्यांत. १४ स्वाधीन झालीं. १५ सपाटे. १६ व्यर्थ. १७ तीक्ष्ण. १८ जवळ होणें. १९ मानीत नाहींत. २० कांट्यांनीं. २१ अरण्य. २२ मदत. २३ वाटमाऱ्यांना. २४ संपे. २५ उत्पन्न करते. २६ आत्मज्ञानाचें. २७ नवाई. २८ शांत होतें. २९ व्यापारांत. ३० समदृष्टीच्या. ३१ व्याजानें. ३२ सिद्ध होते. ३३ संपत्ति. ३४ दैन्य. ३५ नाशवंत भूतांसह. ३६ अनुभवाच्या. ३७ मायावश जीवाला. ३८ ज्ञानाच्या. ३९ परमात्मा.

वियोगें । विन्हये नव्हती ॥ ८१ ॥ येन्हवीं आयुष्याचें सूत्र विघडतां । भूतांची उमटे खडाडतां । काय न मरतयाहि चित्ता । युगांत नोहे ॥ ८२ ॥ परी नेणों कैसें पैं गा । जे जडोनि गेले माझिया आंगा । ते प्रयाणींचिया लगबगा । न सांडितीच मातें ८३ ॥ येन्हवीं तरी जाण । ऐसे जे निपुण । तेचि अंतःकरण-। युक्त योगी ॥ ८४ ॥ तंव इये शब्दकुपिकेतळीं । नोडवोचि अवधानाची अंजुळी । जे नावेक अर्जुन तये वेळीं । मागांचि होता ॥ ८५ ॥ ( २६२. आठव्या अध्यायाचें अवतरण, १८५-२५० ) जेथ तद्ब्रह्मवाक्यफळें । जियें नानार्थरसें रसाळें । वहंकतें आहाति परिमळें । भावाचेनि ॥ ८६ ॥ सहज कृपामंदानिळें । श्रीकृष्णद्रुमाचीं वचनफळें । अर्जुनश्रवणाचिये खोळे । अवचित पडिलीं ॥ ८७ ॥ तियें प्रमेयांचीं हो कां वळलीं । कीं ब्रह्मरसाच्या सागरीं चुबुकाळिलीं । मग तैसींच का घोळिलीं । परमानंदें ॥ ८८ ॥ तेणें बरवेपणें निर्मळें । अर्जुना उन्मेषाचे डोहाळे । घेताति गळाळे[14] । विस्मयामृताचे ॥ ८९ ॥ तिया सुखसंपत्ति जोडलिया । मग स्वर्गा वैये वांकुलिया । हृदयाच्या जीवीं गुतकुलिया । होत आहाती ॥ १९० ॥ ऐसें वैरंचिलीचि बरवा । सुख जावों लागलें फांवा । तंव रस-स्वादाचिया हांवों । लौहो केला ॥ ९१ ॥ झडकरी अनुमानाचेनि करतळें । घेऊनि तियें वाक्यफळें । प्रतीतिमुखीं एके वेळे । घालूं पाहे ॥ ९२ ॥ तंव विचारा-चिया रसना न दाटती । वरी हेतूच्या दशनीं न फुटती । ऐसें जाणोनि सुभद्रा-पती । चुंबीचिना ॥ ९३ ॥ मग चमत्कारलां म्हणे । इयें जळींचीं मौं तारांगणें । कैसा झकविलों असलागपणें । अक्षरांचेनि ॥ ९४ ॥ इयें पदें नव्हती फुंडिया । गगनाचिया घडिया । येथ आमुची मति बुडालिया । थांव न निघे ॥ ९५ ॥ वांचूनि जाणावयाचि कें गोठी । ऐसें जीवीं कल्पूनि किरीटी । तिया पुनरपि केली दृष्टि । यादवेंद्रा ॥ ९६ ॥ मग विनविलें सुभटें । हां हो जी ये ऐकवाटे । सातही पदें अनुच्छिटें । नवलें आहाती ॥ ९७ ॥ येरव्हीं अवधानाचेनि वेंहिलेपणें । नाना प्रमेयांचे उगाणे । काय श्रवणाचेनि आंगेवणें । वोलों लाहाती ॥ ९८ ॥ परि तैसें हें नोहेचि देवा । देखिला अक्षरांचा मेळावा । आणि विस्मयाचिया जीवा । विस्मयो जाला ॥ ९९ ॥ कानाचेनि गवाक्षद्वारें । बोलाचे रश्मि अभ्यंतरें । पाहेना तंव चमत्कारें । अवधान ठाकलें ॥ २०० ॥ तेविंचि अर्थाची चाड मज आहे । ते सांगतांही वेळ न साहे । म्हणूनि निरुपण लवलाहें । कीजो देवा ॥ १ ॥ असा

१ दुःखी. २ क्षोभ. ३ प्रळयकाळ. ४ शब्दरूप कुपींच्या खालीं. ५ प्राप्त झाली नाहीं. ६ ब्रह्मप्रतिपादक. ७ पसरले. ८ इच्छेच्या. ९ मंद. १० श्रीकृष्णरूप वृक्षाचीं. ११ ओटींत. १२ वेदांतसिद्धांताचीं. १३ ज्ञानाचे. १४ घोट. १५ दाखवी. १६ गुदगुल्या. १७ वरकाती. १८ विस्ताराप्रत. १९ इच्छेस. २० प्रारंभ. २१ दांतांनीं. २२ अहो. २३ फसलों. २४ सुंदरपणानें. २५ लक्ष्य.

राच्या वियोगानें ( मरणसमयीं ) दुःख होत नाहीं. ८१ येऱ्हवीं, आयुष्याची दोरी तुटावयाचे बेतांत आली असतां प्राण्याची जी खळबळ उडून जाते, ती पाहून, न मरणारांच्या चित्ताला सुद्धा युगांत ओढवल्यासारखें नाहीं का होत ? ८२ परंतु जे मद्रूप झाले, ते प्राणांतींही मला सोडीत नाहींत. हें कसें होतें तें मला सांगतां येत नाहीं. ८३ येऱ्हवीं असें पक्कें समज कीं, जे अशा प्रकारें पूर्ण ज्ञानी आहेत, तेच अंतःकरणापासून माझें ऐक्य पावले आहेत. ८४ हें तत्त्व सांगते वेळीं श्रीकृष्णाच्या मुखांतील शब्दरूप कुपीच्या खालीं अर्जुनाची अवधानरूप ओंजळ नव्हती. कारण त्याचें लक्ष क्षणभर दुसरीकडे होतें. ८५ त्या ठिकाणीं तीं ब्रह्मप्रतिपादक वाक्यें हीच फळें पुष्कळ अर्थरूपी रसानें भरलेलीं होतीं, व त्यांचा भक्तिरूप सुवास चोहींकडे पसरला होता. ८६ त्या वेळीं कृष्णकृपारूप मंद वाऱ्याच्या योगानें, श्रीकृष्णरूप वृक्षापासून वचनरूप फळें अर्जुनाच्या श्रवणरूप ओटींत सहज येऊन पडलीं ! ८७ तीं फळें वेदांतसिद्धांतांचींच बनलेलीं, ब्रह्मरसाच्या सागरांत बुचकळलेलीं, व तशींच परमानंदरूप साखरेंत घोळलेलीं होतीं. ८८ अशा रीतीनें बनलेलीं जीं निर्मळ फळें, त्याच्या अर्थरूपी गर्भाचा लाभ व्हावा अशी अर्जुनास इच्छा उत्पन्न होऊन तो विस्मयरूप अमृताचे घोंट घेऊं लागला. ८९ अशा रीतीचें सुख झाल्यावर तो स्वर्गसुखाला वेडावून दाखवूं लागला, व त्याच्या अंतःकरणात गुदगुल्या होऊं लागल्या. १९० याप्रमाणें त्या फळाचें बाहेरील स्वरूप पाहून त्याचा आनंद वाढूं लागला. त्या वेळेस त्या फळांची चव घेण्याची जिभेला इच्छा उत्पन्न झाली. ९१ म्हणून लवकर अनुमानरूप हस्तावर तीं श्रीकृष्णवाक्यरूप फळें घेऊन तीं तो अनुभवरूप मुखात एकदम घालूं लागला. ९२ त्या वेळीं विचाररूप जिभेनें तीं घेता येईनात, व हेतुरूप दातानीं फुटेनात असें जाणून, सुभद्रापति जो अर्जुन तो त्याना तोंड लावीना. ९३ मग चमत्कार वाटून असें म्हणतो कीं, " अहो, पाण्यांत दिसणाऱ्या नक्षत्राप्रमाणें या अक्षराच्या सुंदरपणानें अक्षराना फळ समजून मी कसा फसलों ! ९४ हीं अक्षराची पदें नसून केवळ आकाशाच्या घड्या आहेत, व यात आमच्या बुद्धीनें किती जरी बुड्या मारल्या, तरी कांहीं थांग लागावयाचा नाहीं. " ९५ ( तेव्हा हीं फळें घेता येत नाहीत तर ) मग तीं जाणता कशीं येतील ? असें अर्जुनानें मनात आणून पुन. यादवेंद्र श्रीकृष्णाकडे पाहिलें. ९६ मग अर्जुनानें देवाची विनंती केली कीं, " देवा, हीं जीं एकवटलेलीं सात पदें, त्याचा कधींही कोणीं स्वाद घेतला नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे. ९७ एरवीं, लक्षपूर्वक ऐकत नसतां, केवळ श्रवणाच्या जोरावर ( लक्ष नसता श्रवण केलेलें असेल तर ) अनेक ( साधारण ) सिद्धांतांचे तात्पर्यार्थ तरी बोलून दाखविता येतील का ? ९८ ( नाहीं. ) आणि त्यातूनही, देवा, आपलें हें बोलणें काहीं साधारण नव्हे. हीं अक्षरें नुसतीं पाहिल्यावर विस-

२६ अंत. २७ दुरापास्त. २८ एकत्र. २९ स्वाद न घेतलेली. ३० नसल्यामुळें. ३१ तात्पर्यार्थ. ३२ बळानें. ३३ सापडतात. ३४ झरोक्यातून. ३५ किरण. ३६ उघाडलें नाहीं. ३७ लष्कर. झाले ३४

मागील पडताळा घेउनी । पुढां अभिप्राय दृष्टि सूनी । तेविंचि माजी शिरउनी। औंर्ती आपुली ॥ २ ॥ कैसी पुसती पाहे पां जाणिव । भिडेंचि तरी लंघों नेदी शिंव । येन्हवीं श्रीकृष्णहृदयासि खेंवें । देवों सरला ॥ ३ ॥ अहो श्रीगुरुतें जें पुसावें । तें येणें मानें सावध व्हावें । हें एकाचि जाणे आघवें । सव्यसाची ॥ ४ ॥ आतां तयाचें तें प्रश्न करणें। वरी सर्वज्ञ श्रीहरीचें बोलणें। हें संजयो आँवडलेपणें। सांगेल कैसें ॥ ५ ॥ ( २६३. मराठी भाषेनें दिलेल्या उत्तराची थोरवी, २०६-२१० ) तिये अवधान द्यावें गोठी । बोलिजेल नीट मऱ्हाठी । जैसी कानाचे आधीं दिठी। उपयोगा जाये ॥ ६ ॥ बुद्धीचिया जिभा । बोलाचा न चाखतां गाभा । अक्षरांचिया भांर्वा । इंद्रियें जिती ॥ ७ ॥ पहा पां मालतीचे कळे । घ्रांणासि कीर वाटले परिमळें । परि वराचिया वैंरंवा काई डोळे । सुखिये नव्हती ॥ ८ ॥ तैसें देशियेचियें हेंवावा । इंद्रियें करिती राणिवौं । मग प्रमेयाचियें गांवा । लेसों जाइजे ॥ ९ ॥ ऐसेंनि नागरपणें । बोल निमे तें बोलणें । ऐका ज्ञानदेव म्हणे। निवृत्तीचा ॥ २१० ॥

इति श्रीज्ञानेश्वरविरचितायां भावार्थदीपिकायां सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

श्लोक ३०, ओंव्या २१०.

---

१ ठेवून. २ इच्छा. ३ ज्ञान. ४ मर्यादेची. ५ आलिंगन. ६ प्रेमानें. ७ सार. ८ शोभा. ९ नाकाला. १० सुरेखपणा. ११ देशी भाषेच्या. १२ शोभेनें. १३ राज्य. १४ सिद्धांताच्या. १५ त्वरित. १६ सुंदरपणें. १७ बोल बंद करणारें.

याला देखील माझें आश्चर्य वाटलें. ९९ कानाच्या झरोक्यांतून बोलरूपी किरण आंत शिरले नाहींत, तोंच चमत्कार वाटून माझें लक्ष खुंटलें ( मति चालेना ). २०० त्या शब्दांचा अर्थ समजण्याची मला फार इच्छा आहे असें म्हणण्यांत जो वेळ चालला आहे, तोही मला सहन होत नाहीं. म्हणून, देवा लवकर सांगा." १ याप्रमाणें, मागील प्रत्यंतर घेऊन, पुढल्या अभिप्रायावर दृष्टि ठेवून व मध्येंच आपली ऐकण्याची इच्छा दर्शवून अर्जुनानें विचारलें. २ अर्जुनाची प्रश्न करण्याची काय शैली आहे पहा ! कीं मर्यादेचे उल्लंघन न करितां श्रीकृष्णाच्या हृदयाला प्रेमालिंगन देण्यास तो तयार झाला ! ३ अहो, श्रीगुरूंना ज्या वेळेस पुसावयाचें, त्या वेळेस अशाच मर्यादेनें पुसावें लागतें. त्याची मर्यादा कायम ठेवून कसें पुसावें हें फक्त एक सव्यसाची अर्जुनच जाणतो. ४ आता त्याचें तें प्रश्न करणें, आणि त्यावर सर्वज्ञ श्रीहरीचें उत्तर देणें, हें संजय कशा प्रेमानें सांगेल तें पहा. ५ जी गोष्ट नीट मराठी भाषेंत सांगितली जाईल, तिच्याकडे नीट लक्ष द्या. असें कीं, ज्या योगानें कानाच्या अगोदर दृष्टीला अर्थ दिसेल. ६ बुद्धिरूप जिभेनें त्या शब्दाचा रस न चाखतां अक्षरांच्या शोभेनें इंद्रियें तगतील. ७ पहा कीं, मालती पुष्पाच्या कळ्याचा स्वाद नाकाला खरोखर येईल, परंतु त्याच्या बाहेरील सुरेखपणानें डोळ्याना सुख होणार नाहीं का ? ८ त्याचप्रमाणें, मराठी भाषेच्या शोभेनें इंद्रियें सुखाचें राज्य करतील, व मग त्वरित सिद्धान्ताच्या गांवाला जातील. ९ अशा सुंदरपणानें जें बोलणें ऐकल्यापासून बोलणें बंद होतें, तें ऐका, असें निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात. २१०

अध्याय ७ वा, ओवी २१०.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय आठवा

अर्जुन उवाच.—

किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम । अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥१

अन्वयः—पुरुषोत्तम ! तत् ब्रह्म किं ? अध्यात्म किं ? (च) कर्म किम् ? अधिभूत किं प्रोक्त ? अधिदैव च किम् उच्यते ? ॥ १ ॥

(२६४. अर्जुनाचे ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव, अधियज्ञ व अंतकाळीं स्मरण यांविषयीं सात प्रश्न, १–५) मग अर्जुनें म्हणितलें । हां हो जी अवधारिलें । जें म्यां पुसिले । तें निरूपिजे ॥ १ ॥ सांगा कवण तें ब्रह्म । कासया नाम कर्म । अथवा अध्यात्म । काय म्हणिपे ॥ २ ॥ अधिभूत तें कैसें । एथ अधिदैवत तें कवण असे । हें उघड मी परियेसे । ऐसें बोला ॥ ३ ॥

अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन । प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥२

अन्वयः—मधुसूदन, अत्र अस्मिन् देहे अधियज्ञः कः (च) कथं (अस्ति) ? च प्रयाणकाले नियतात्मभिः त्वं कथं ज्ञेयः असि ? ॥ २ ॥

देवा अधियज्ञ तो काइ । कवण पां इये देहीं । हें अनुमानासि कांहीं । दिठी न भरे ॥ ४ ॥ आणि नियता अंतःकरणीं । तूं जाणिजेसी देहप्रयाणीं । तें कैसेनि हें शार्ङ्गपाणी । परिसवा मातें ॥५॥ (२६५. अर्जुनाचें भाग्यवर्णन, काव्यप्रतिभा, ६–१४)

अवतरणः—देखा धवळारीं चिंतामणीचा । जरी पहुडला होय दैवाचा । तरी बोसणतेंही बोल तयाचा । सोपें न वचे ॥ ६ ॥ तैसें अर्जुनाचिया बोलासवें । आलें तेंचि म्हणितलें देवें । परियेसें गा बरवें । जें पुसिलें तुवां ॥ ७ ॥ किरीटी कामधेनूचा पाडा । वरी कल्पतरूचा आहे मांडोडा । म्हणोनि मनोरथसिद्धीचिया चाडा । तो नवल नोहे ॥ ८ ॥ श्रीकृष्ण कोपोनि ज्यासि मारी । तो पावे परब्रह्मसाक्षात्कारीं । मा कृपेनें उपदेशु करी । तो कैशापरी न पवेल ॥ ९ ॥ जैं कृष्णाचि होइजे आपण । तैं कृष्ण होय आपुलें अंतःकरण । मग संकल्पाचें आंगण । वोळंगती सिद्धि॥१०॥ परि ऐसें जें प्रेम । तें अर्जुनींचि आथी निःसीम । म्हणऊनि तयाचे काम । सदा सफळ । ॥ ११ ॥ या कारणें श्रीअनंतें । तें मनोगत तयाचें पुसतें । होईल जाणूनि आइतें । वोगरूनि ठेविलें ॥ १२ ॥ जें अपत्य थानौनि निगे । तयाची भूक ते

१ स्वाधीन. २ ओळखता येईल. ३ अतकाळीं. ४ मंदिरात. ५ बरळला तरी. ६ व्यर्थ. ७ मंडप. ८ मग. ९ आलिंगितात; राबतात. १० वाढून. ११ दूर होतें.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय आठवा

श्लोकार्थः—अर्जुन म्हणाला, "हे पुरुषोत्तमा, तें ब्रह्म म्हणजे काय? अध्यात्म म्हणजे काय? कर्म म्हणजे काय? अधिभूत कशाला म्हणतात? आणि अधिदैव कशाला म्हणतात? ॥ १ ॥

मग अर्जुन म्हणाला, "अहो देवा! ऐकलें का? मीं जें विचारलें तें मला स्पष्ट करून सांगा. १ ब्रह्म कोणतें, कर्म कशाचें नांव, अथवा अध्यात्म कशाला म्हणतात, २ अधिभूत कसें, आणि या जगांत अधिदैवत कोण आहे, हें मला नीट समजेल असें सांगा." ३

श्लोकार्थः—"हे मधुसूधना, या देहामध्यें अधियज्ञ तो कोण व कसा आहे? आणि ज्यांनीं अंतःकरण जिंकलें आहे असे योगी मरणकालीं तुला कसे जाणतात?" ॥ २ ॥

"देवा, अधियज्ञ तो काय, व तो या देहांत कोणता, हें अनुमानानें नीट लक्षांत येत नाहीं. ४ हे शार्ङ्गपाणि, ज्यांनीं अंतःकरण स्वाधीन करून घेतलें आहे, त्यांना अंतःकालीं तुम्हांला कसें ओळखतां येतें, हें मला चांगल्या रीतीनें समजवा." ५ (ज्ञानेश्वर म्हणतात,) पहा कीं, चिंतामणीच्या मंदिरांत एखादा दैववान मनुष्य जर निजला, तर तो जरी झोंपेंत बरळला तरी त्याचें बरळणें व्यर्थ जात नाहीं, ६ त्याचप्रमाणें, अर्जुनाच्या मुखांतून जीं वाक्यें आलीं त्याबरोबर देव म्हणाले, "तूं जें कांहीं पुसलेंस तें नीट ऐक." ७ किरीटी हा कामधेनूचा बछडा असून कल्पतरूच्या मंडपांत बांधलेला आहे, अर्थात् त्याच्या मनांतील सर्व हेतु सिद्धीस जातात यांत नवल तें काय? ८ श्रीकृष्ण ज्याला रागावून मारतात, तो देखील ब्रह्मस्वरूपाला पावतो; मग ज्याला कृपादृष्टीनें उपदेश करतील, त्याला काय प्राप्त होणार नाहीं? ९ ज्या वेळेस कृष्णाचे आपण भक्त व्हावें, त्या वेळीं आपलें अंतःकरण कृष्णरूप बनतें; मग संकल्परूप आंगणांत (आपल्या मनांत जे जे संकल्प येतील, ते ते पूर्ण करण्याकरिता) ऋद्धिसिद्धि सहज हात जोडून उभ्या असतात. १० परंतु अशा प्रकारचें जें निस्सीम प्रेम, तें एक अर्जुनाच्या ठिकाणींच अमर्याद आहे, म्हणून त्याच्या मनकामना नेहमी पूर्ण होतात. ११ म्हणूनच, अर्जुन हा आतां आपल्या मनांतील गोष्ट मला विचारील, असें जाणून श्रीकृष्णांनीं आयतेंच उत्तराचें ताट वाढून ठेविलें. १२ स्तनपान करून दूर खेळत असलेल्या बालकाला भूक लागली आहे, हें त्याच्या आईलाच समजतें. नाहीं तर त्यानें मागितल्यावर मग का ती त्याला दूध पाजते? १३ अर्थात् कृपाळू अशा सद्गुरूचे ठिकाणीं (आपल्या शिष्यासंबंधीं) हें प्रेम असणें म्हणजे कांहीं नवल नव्हे. पण हें असो; देव जें म्हणाले तें

मातेसीचि लागे । येऱ्हवीं तें शब्दें काय सांगे । मग स्तन्य[1] दे येरी ॥ १३ ॥ म्हणवोनि कृपाळुवा गुरूचिया ठायीं । हें नवल नोहे कांहीं । परि तें असो आइका काई । भगवानुवाचः– जे देव बोलते जाहले ॥ १४ ॥

अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते । भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥३॥

*अन्वयः—अक्षरं परमं ब्रह्म उच्यते; स्वभावः अध्यात्मं उच्यते; भूतभावोद्भवकरः विसर्गः कर्मसंज्ञितः ( अस्ति ) ॥ ३ ॥*

( २६६. ब्रह्मप्रश्नाचें उत्तर, १५–१७ ) मग म्हणितलें सर्वेश्वरें । जें आकारीं इये खोंकरे[2] । कोंदलें[3] असत न[4] खिरे । कवणे काळीं ॥ १५ ॥ येऱ्हवीं सपूरपण तयाचें पहावें । तरि शून्याचि नव्हे स्वभावें । वरि गगनाचेनि पालवें[6] । गाळूनि घेतलें ॥१६॥ जें ऐसेंही परि विरुळे[7] । इये विज्ञानाचिये खोळे[8] । हालवलेंही न गळे । तें परब्रह्म ॥ १७ ॥ ( २६७. अध्यात्माचें उत्तर, १८–१९ ) आणि आकाराचेनि जालेपणें । जन्मधर्मातें नेणे । आकारलोपीं निमेंणें[10] । नाहीं कहीं ॥ १८ ॥ ऐशिया आपुलियाची सहज स्थिति । जया ब्रह्माची नित्यता असती । तया नाम सुभद्रापती । अध्यात्में गा ॥ १९ ॥ ( २६८. कर्म म्हणजे काय, या प्रश्नाचें उत्तर, २०–२९ ) मग गगनीं जेविं निर्मळें । नेणों कैचीं एक वेळे । उठती घनपटळें । नानावर्णे ॥ २० ॥ तैसे अमूर्तीं तिये विशुद्धें । महदादि भूतभेदें । ब्रह्मांडाचे बांधे । होंचि लागती ॥ २१ ॥ पैं निर्विकल्पाचिये वेरडी । फुटे आदिसंकल्पाची विरूढी । आणि[22] ते सवेंचि मोडोनि ये ढोंढी । ब्रह्मगोळकांच्या ॥ २२ ॥ तया एकैकाचे भीतरीं[24] पाहिजे । तंव बीजाचाचि भरिलें देखिजे । माजि होतिया जातिया नेणिजे । लेख जीवां ॥ २३ ॥ मग तया ब्रह्मगोळकांचे अंशांश । प्रसवती आदिसंकल्प असमास । हें असो ऐसी बहुवस । सृष्टी वाढे ॥ २४ ॥ परि दुजेनविण एकला । परब्रह्मचि संचला । अनेकत्वाचा आला । पूर जैसा ॥ २५ ॥ तैसें समविषमत्व नेणों कैचें । वायांचि चरोचर रचे । पाहातां प्रसवतिया योनीचे । लक्ष दिसती ॥ २६ ॥ येरी[28] जीवभावाचिये पोलवियें । कांहीं मर्यादा करूं नये । पाहिजे कवण हें आघवें विये । तंव मूळ तें शून्य ॥ २७ ॥ म्हणूनि कर्ता मुद्दल न दिसे । आणि सेरखीं[31] कारणही कांहीं नसे । माजि कार्याचि आपैसें । वाढोंचि लागे ॥ २८ ॥ ऐसा करितेनवीण गोचरु[32] । अव्यक्तीं हा आकारु । निपजे जो व्यापारु । तया नाम कर्म ॥ २९ ॥

अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् । अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥

---

१ स्तनपान. २ फुटक्या. ३ दाट भरलेलें. ४ नाश पावत नाहीं. ५ सूक्ष्मपणा. ६ पदरानें. ७ पातळ. ८ व्यावहारिक ज्ञानाच्या. ९ मोटेंतून ( शरिरांतून ). १० मरणें; लीन होणें.

श्लोकार्थः — भगवान म्हणालेः—ब्रह्म हे अविनाशी व श्रेष्ठ आहे; स्वभाव ( ब्रह्माचें शरीरात असणें ) म्हणजे अध्यात्म; आणि प्राण्याच्या उत्पत्तीला कारण असलेला जो विसर्ग ( यज्ञामध्यें चरु-पुरोडाशादिकाचें प्रदान ) त्याला कर्म म्हणतात. ॥ २ ॥

मग सर्वेश्वर म्हणाले.—जें या फुटक्या आकारात ( देहांत ) ओतप्रोत भरलेलें असून कोणत्याही वेळीं नाश पावत नाहीं; १५ बरें, त्याचा सूक्ष्मपणा पहावा, तर स्वभावतः तें शून्य नव्हे, पण अति पातळ अशा आकाशाच्या पदराने गाळून घेतलेलें आहे; १६ अशा प्रकारचें जें विरळ आहे व जे प्रापंचिक ज्ञानाच्या मोटेतून ( शरीरातून ) हालवलें असतांही गळत नाहीं, त्याला 'परब्रह्म' असें म्हणतात; १७ आणि आकार म्हणजे शरीर हें जन्मास आल्याने त्याचे जे धर्म त्याला जें जाणत नाहीं, व तें शरीर नाश पावल्यावरही जें कधीं नाश पावत नाहीं, १८ हे सुभद्रापते, अशा रीतीनें ज्या ब्रह्माची आपल्याच ठिकाणीं निरंतर सहज स्थिति असते, त्याला अध्यात्म असें म्हणतात. १९ मग, निर्मळ आकाशात नाना रंगाचे ढग एकदम कसे उत्पन्न होतात हें ज्याप्रमाणें कळत नाही, २० त्याचप्रमाणें त्या निराकार शुद्ध ब्रह्मात प्रकृति-अहंकारादि भेदानीं ब्रह्मांडाचे आकार होऊं लागतात. २१ परंतु कल्पनातीत शुद्धब्रह्माच्या माळ जमिनींत, मी बहुत प्रकारचा होईन अशा संकल्पाचा अंकुर उत्पन्न होऊन, त्याला लागलीच ब्रह्मांडाचे घोंडे ( आकार ) उत्पन्न होऊन त्यानीं तो लवतो. २२ आकारात पाहूं लागलें म्हणजे तो त्या बीजानें म्हणजे ब्रह्मानेंच भरलेला आहे असें दिसतें; आणि त्या प्रत्येकात किती जीव होतात व जातात याची गणना करता येत नाहीं. २३ मग त्या ब्रह्मांडाच्या गोलाचे प्रत्येक अंशापासून असंख्यात आदिसंकल्प उत्पन्न होतात. असो; अशा रीतीनें सृष्टीचा विस्तार होतो. २४ परंतु दुसऱ्या कोणाशिवाय एकटेंच परब्रह्म सर्वत्र भरले असून अनेकरूपानें नटून पूर आल्याप्रमाणें भासते. २५ त्याचप्रमाणें, स्थावरजंगम विश्वाची रचना सहज होऊन त्यांत अधिकउणेपणा कसा होतो, हें समजत नाहीं; परंतु पाहूं गेलें असता लक्षावधि जाति उत्पन्न झालेल्या दिसतात. २६ याव्यतिरिक्त, नानाप्रकारच्या जीवाच्या विस्ताराची मर्यादा करता येत नाहीं. ह्याची कोणापासून उत्पत्ति होते हे पाहूं गेले तर त्यांचे मूळ अव्यक्तच आहे. २७ म्हणून, मूळात कर्त्याचा ठिकाण नसून आणि शेवटीं काहीं कारणही नसता मध्येच कार्याची आपोआप वृद्धि होते. २८ अशा प्रकारें, अव्यक्ताच्या ठिकाणीं कर्त्यावांचून प्रत्यक्ष दिसणारा आकार उत्पन्न करण्याचा जो व्यापार, त्याला कर्म असें म्हणतात. २९

११ निरतर. १२ असणारी. १३ देहातर्गत ब्रह्म ( कूटस्थ किंवा प्रत्यगात्मा ). १४ गडद ढगाचीं पटलें. १५ निराकार शुद्ध ब्रह्मात. १६ प्रकृति, अहंकार इत्यादिकाच्या. १७ आकार. १८ कल्पनातीत शुद्ध ब्रह्माच्या. १९ माळ जमिनींत. २० मी बहुत प्रकारचा होईन ह्या संकल्पाच्या. २१ अंकुर; वाढ. २२ ॐकार. २३ ब्रह्मांड. २४ आत पहावें तर. २५ भरणा. २६ असंख्य २७ स्थावरजंगम विश्व. २८ इतर व्यक्ति. २९ विस्तार. ३० अव्यक्त. ३१ शेवटीं. ३२ दिसणारा.

अन्वयः—( हे ) देहभृतां वर, यः क्षरः भावः तत् अधिभूतं, पुरुषः अधिदैवतं, च अत्र देहे अधियज्ञः अहं एव ( अस्मि ) ॥ ४ ॥

( २६९. अधिभूताचें उत्तर, ३०–३२ ) आता अधिभूत जें म्हणिपे । तेंहि सांगों संक्षेपें । तरी होय आणि हारपे । अभ्र जैसें ॥ ३० ॥ तैसें असतेपण आहाच । नाहीं होइजे हें साच । जयातें रूपा आणिती पांचपांच । मिळोनियां ॥ ३१ ॥ भूतांतें अधिकरूनि असे । आणि भूतसंयोगें तरि दिसे । जे वियोगावेळे भ्रंशे । नामरूपादिक ॥ ३२ ॥ ( २७०. अधिदैवताचें उत्तर, ३३–३६ ) तयातें अधिभूत म्हणिजे । मग अधिदैवत पुरुष जाणिजे । जेणें प्रकृतीचें भोगिजे । उपार्जिलें ॥ ३३ ॥ जो चेतनेचा चक्षु । जो इंद्रियदेशींचा अध्यक्षु । जो देहास्तमानीं वृक्षु । संकल्पविहंगमाचा ॥ ३४ जो परमात्माचि परि दुसरा । जे अहंकारनिद्रा निदसुरा । म्हणोनि स्वप्नाचिया वोरबारा । संतोषे शिणे ॥ ३५ ॥ जीव येणें नांवें । जयातें आळविजे स्वभावें । तें अधिदैवत जाणावें । पंचायतनींचें ॥ ३६ ॥ ( २७१ अधियज्ञाचें उत्तर, ३७–४५ ) आतां इयेचि शरीरग्रामीं । जो शरीरभावातें उपशमी । तो अधियज्ञ एथ गा मी । पंडुकुमरा ॥ ३७ ॥ येर अधिदैवाधिभूत । तेहि मीचि कीर समस्त । परि पंधरें किडाळीं मिळत । तें काय सांके नोहे ॥ ३८ ॥ तरि तें पंधरेपण न मैळे । आणि किडाळाचियाही अंशा न मिळे । परि जंव असे तयाचेनि मेळें । तंव सांकेचि म्हणिजे ॥ ३९ ॥ तैसें अधिभूतादि आघवें । हें अविद्येचेनि पालवें । झाकलें तंव मानावें । वेगळें ऐसें ॥ ४० ॥ तेचि अविद्येची जवनिक फिटे । आणि भेदभावाची अवधी तुटे । मग म्हणों एक होऊनि जरी अटे । तरी काय दोनी होती ॥ ४१ ॥ पैं केशांचा गुंडाळा । वरि ठेविली स्फटिकशिळा । ते वरि पाहिजे डोळां । तंव भेदली गमती ॥ ४२ ॥ पाठीं केश परौते नेले । आणि भेदलेपण काय नेणों जाहालें । तरि डांक देऊनि सांदिलें । शिळेतें काई ॥ ४३ ॥ नां ते अखंडाचि आयती । परि संगें भिन्न गमली होती । ते सारिलिया मागौती । जैसी का तैसी ॥ ४४ ॥ तेवींचि अहंभावो जाये । तरी ऐक्य तें आधींचि आहे । हेंचि साचें जेथ होये । तो अधियज्ञु मी ॥ ४५ ॥ ( २७२. यज्ञांत अधियज्ञ मुख्य, ४६–५३. ) पैं गा आम्हीं तुज । सकळ यज्ञ कर्मज । सांगितले जें काज । मनीं धरूनि ॥४६॥ तो हा सकळ जीवांचा विसांवा । नैष्कर्म्यसुखाचा ठेवा । परि उघड करूनि पांडवा । दाविजत असे ॥ ४७॥ पहिलें वैराग्यइंधनें परिपूर्तीं । इंद्रियानळीं प्रदीप्तीं । विषयद्रव्याचिया आहुति । देऊनियां ॥४८॥

१ नाशवंत. २ नाहींसें होतें. ३ पंचीकृत पंचमहाभूतें. ४ आश्रय करून. ५ जीव. ६ उत्पन्न केलें. ७ बुद्धीचा. ८ द्रष्टा; पाहणारा. ९ मनोरथरूप पक्ष्याचा. १० निजलेला. ११ खटपट. १२ हांक मारली. १३ पंचमहाभूतांचें बनलेलें जें शरीर त्याचें. १४ उपाधीस. १५ लय करतो. १६ पधराव्या कसाचें ( उत्तम ) सोनें. १७ हिणकट सोनें. १८ कमी योग्यतेचें. १९ पडदा. २० अंतर; मर्यादा.

श्लोकार्थः--हे पुरुषश्रेष्ठा, नाशवंत जो विकार त्याला अधिभूत म्हणावें; [ हिरण्यगर्भ ( समष्टीतील ) आणि तैजस ( व्यष्टींतील ) असा ] पुरुष याला अधिदैवत म्हणावें; व या देहात ( केवळ साक्षित्वानें ) असणाराला अधियज्ञ म्हणावे व तो मीच आहें. ॥ ४ ॥

आतां, ' अधिभूत ' ज्याला म्हणतात तें संक्षेपानें सांगतों: ज्याप्रमाणें ढग उत्पन्न होतात आणि लय पावतात, ३० त्याप्रमाणें, ज्याचें अस्तित्व लटकें असून खरोखर पाहूं गेलें असता जे होत नाहीं व ज्याला पंचमहाभूतें एकत्र होऊन रूपाला आणतात; ३१ जें पंचमहाभूतांच्या आश्रयानें असतें, त्यांच्याच संयोगानें दृष्टीस पडतें, व विनाशकालीं लय पावतें, असें जें नामरूप, ३२ त्याला " अधिभूत " असें म्हणतात. मग अधिदैवत म्हणजे जीव असें समजावें. तो प्रकृतिजन्य भोगांचा उपभोग घेतो. ३३ जो बुद्धीचा द्रष्टा, इंद्रियरूप देशाचा अधिपति, व शरीराच्या अंतकालीं मनोरथरूप पक्ष्यांचा विसावा घेण्याचा वृक्ष; ३४ जो प्रत्यक्ष दुसरा परमात्माच आहे, परंतु अहंकाररूप निद्रेंत निजल्यामुळें ज्याला स्वप्नाच्या खटपटीनें संतोष व शीणही होतो, ३५ आणि ज्याला जीव या नांवानें हाक मारतात, त्याला ' अधिदैवत ' असें म्हणतात; व तो पंचमहाभूतांनीं बनलेल्या शरीरांतील मुख्य दैवत आहे. ३६ आता, पंडुकुमरा, याच शरीररूप गांवांत जो शारीरिक उपाधीचा लय करितो, तो ' अधियज्ञ ' मी होय. ३७ येरवीं, अधिदैव व अधिभूत हें सर्व खरोखर मीच आहें; परंतु उत्तम कसाचें सोनें हिणकसाला मिळविल्यावर तें डाकलग होत नाहीं का ? ३८ तथापि त्याचा उत्तमपणा कमी होत नाहीं, व तें हिणकस सोन्यांतही मिळत नाहीं; परंतु जोंपर्यंत त्याच्याशीं एकत्र असतें, तोंपर्यंत त्याला डाकलंगच म्हणतात; ३९ त्याचप्रमाणें, अधिभूतादि सर्व हे अज्ञानाच्या पदरानें जोपर्यंत झांकले आहेत, तोंपर्यंत वेगळे मानले पाहिजेत. ४० तोच अज्ञानाचा पदर काढून आणि भेदभावाची मर्यादा तोडून जर एकत्र करून आणले तर ते दोन वेगळे आहेत काय ? ४१ परंतु केंसाची गुंडाळी करून त्यांवर स्फटिकाची शिळा ठेवल्यावर ती वरच्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां जशी भंगलेली दिसते; ४२ पाठीमागून ते केश बाजूस केल्यावर तिच्या चिरा कोणीकडे गेल्या हें समजत नाहीं; म्हणून ती शीळ डाक लावून जोडली आहे का ? ४३ नाहीं; तर ती मूळची अखंडितच होती; परंतु ( केंसांच्या संगतीनें ) भंगलेली भासत होती, परंतु ते केस एके बाजूस केल्यावर ती शीळ जशी होती तशीच दिसते; ४४ त्याचप्रमाणें, अहंभाव नाहींसा झाला म्हणजे ऐक्य हें मूळचेंच आहे; व हेंच ऐक्य जेथें प्रत्ययास येतें तो अधियज्ञ मीच. ४५ हें पहा, जो हेतु मनात धरून, ' सर्व यज्ञ कर्मापासून झालेले आहेत ' म्हणून आम्हीं पूर्वीं ( चौथ्या अध्यायात ) तुला सांगितलें, तोच हा अधियज्ञ होय. ४६ हा सर्व जीवांचा विसावा असून ब्रह्मसुखाचा ठेवा आहे. पण अर्जुना, तुला तो स्पष्ट करून सांगतों. ४७ प्रथम वैराग्यरूप इंधनांच्या

२१ फुटलीशी. २२ दूर, पलीकडे. २३ नाहीं, तर. २४ कर्मापासून झालेले. २५ ब्रह्मसुख. २६ सर्पण. ज्ञाने ३५

मग वज्रासन तेचि उर्वी[1] । शोधूनि आधारमुद्रा[2] बरवी । वेदिका[3] रचे मांडवीं । शरीराचा ॥ ४९ ॥ तेथ संयमाग्नीचीं[4] कुंडें । इंद्रियद्रव्याचेनि पवाडें[5] । यजिजती उदंडें । युक्तिघोषें ॥ ५० ॥ मग मनप्राणसंयमु । हाचि हवनसंपदेचा संभ्रमु[6] । येणें संतोषविजे निर्धूमु । ज्ञानानळु[7] ॥ ५१ ॥ ऐसेनि हें सकळ ज्ञानीं समर्पे[8] । मग ज्ञान तें ज्ञेयीं[9] हारपे । पाठीं ज्ञेयाचि स्वरूपें । निखिल उरे ॥ ५२ ॥ तया नांव गा अधियज्ञु[10] । ऐसें बोलला जंव सर्वज्ञु[11] । तंव अर्जुन अतिप्रौढु[12] । तया पैंतलें[13] तें ॥ ५३ ॥ ( २७३. अर्जुनाचा आनंद, काव्य, ५४-५५) हें जाणोनि म्हणितलें देवें । पार्था परिसतु आहासि बरवें । या कृष्णाचिया बोलासवें । येरु सुखाचा जाहला ॥ ५४ ॥ देखा बाळकाचिया धणी[14] धाइजे । कां शिष्याचेनि जौहालेपणें[15] होइजे । हें सद्गुरुचि एकलेनि जाणिजे । कीं[16] प्रसवतियें[17] ॥ ५५ ॥ ( २७४. देवांचा आनंद, काव्य, ५६-५८ ) म्हणोनि सात्त्विक भावाची मांदी[18] । कृष्णाआंगीं अर्जुनाआधीं । न समातसे परी बुद्धी । सांवरूनि देवें ॥ ५६ ॥ मग पिकालिया सुखाचा परिमळु । कीं निवालिया अमृताचा कल्लोळु । तैसा कोंवळा आणि रसाळु । बोलु बोलिला ॥ ५७ ॥ म्हणे परिसणेयांच्या राया । आइकें बापा धनंजया । ऐसी जळों सरलिया माया । तेथ जौळितें तेंही जळे ॥ ५८ ॥

अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।
यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥

*अन्वयः—यः अंतकाले मामेव स्मरन् च कलेवरं मुक्त्वा प्रयाति, सः मद्भावं याति, अत्र संशयः न अस्ति ॥ ५ ॥*

( २७५. अधियज्ञाचे ज्ञानानें आत्मप्राप्ति, ५९-६८) जें आतांचि सांगितलें होतें । अगा अधियज्ञ म्हणितला जयातें । जें आधींचि तया मातें । जाणोनि अंतीं ॥ ५९ ॥ तें देह झोळें[22] ऐसें मानुनी । ठेलें आपणपें आपण होउनी । जैसा मठ गगना भरुनी । गगनींचि असे ॥ ६० ॥ ये प्रतीतीचिया माजघरीं । तया निश्चयाची[23] बोवरी । आली म्हणोनि बाहेरी । नव्हेचि से ॥ ६१ ॥ ऐसें सबाह्य ऐक्य संचलें । मीचि होऊनि असतां रचिलें । बाहेरि भूतांचीं पांचही खेंवळें । नेणतांचि पडिलीं ॥ ६२ ॥ आतां उभयां उभेपण नाहीं जयाचें । मा पडिलिया गहन[26] कवण तयाचें । म्हणोनि प्रतीतीचिये पोटींचें । पाणी न हाले ॥ ६३ ॥ ते[27] ऐक्याची आहे वोतिली । कीं नित्यतेचिया हृदयीं घातली । जैसी समरससमुद्रीं धुतली । रुळेचि[29] ना ॥ ६४ ॥ पैं अथावीं[30] घट बुडाला । तो आंतबाहेरी उदकें

१ पृथ्वी. २ मूळबंध. ३ ओटा. ४ इंद्रियनिग्रहरूप अग्नीचीं. ५ योगमंत्रानें; ६ तयारी. ७ ज्ञानरूप अग्नि. ८ अर्पण करावें. ९ ब्रह्मात. १० ब्रह्म. ११ सर्व जाणणारा भगवान श्रीकृष्ण. १२ महाबुद्धिमान. १३ समजलें. १४ तृप्तीनें. १५ कृतार्थपणें. १६ किंवा. १७ आईनें. १८

पूर्णतेनें इंद्रियरूप अग्नि पेटवून त्यांत विषयरूप द्रव्याची आहुति देतात; ४८ मग वज्रासन हीच भूमिका शुद्ध करून त्यावर मूळबंधमुद्रेचा ओटा करतात, त्यावर शरीराचा मांडव उभा करतात. ४९ त्या ठिकाणीं इंद्रियनिग्रहरूप अग्नीच्या कुंडांत इंद्रियरूप होमद्रव्यें घालून योगमंत्रानें हवन करतात. ५० मग, मन व प्राण याचा निग्रह हीच होमाच्या द्रव्याची तयारी, इनें, धुराशिवाय निर्दोष जो ज्ञानाग्नि त्याचा संतोष करितात. ५१ याप्रमाणें हें साहित्य ज्ञानांत अर्पण करून मग तें ज्ञान ब्रह्मांत लय पावतें. नंतर निवळ जें ब्रह्म, तेंच एकटें उरतें. ५२ त्यालाच अधियज्ञ म्हणजे ब्रह्म म्हणावें. असें ज्या वेळेस सर्वज्ञ श्रीकृष्ण बोलले, त्या वेळेस महाबुद्धिमान अशा अर्जुनाला तें समजलें. ५३ अर्जुनाला ब्रह्म समजलें असें देवांनींही जाणून ते म्हणाले, ' तूं फार उत्तम प्रकारें ऐकतो आहेस. ' असें श्रीकृष्ण बोलल्यावर अर्जुन संतोष पावला. ५४ पहा कीं, तान्ह्या मुलाच्या तृप्तीनें आपण तृप्त व्हावें, किंवा शिष्याच्या कृतार्थपणानें आपण कृतार्थ व्हावें, हें एक आई किंवा सद्गुरुच जाणतात. ५५ म्हणून अर्जुनाच्या पूर्वीच श्रीकृष्णाच्या अंगीं अष्टसात्विक भाव उत्पन्न होऊन मावेनातसे झाले; परंतु देवांनीं बुद्धि आवरली, व ५६ पूर्णतेस पावलेल्या सुखाच्या सुगंधाप्रमाणें किंवा थंडगार अमृताच्या लाटांप्रमाणें कोमळ आणि रसाळ असे बोल ते बोलूं लागले. ५७ मग म्हणतातः—श्रवण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ अशा अर्जुना, ऐक. बाबारे, माया जळून गेली, म्हणजे मग तिला जाळणारें ज्ञानही जळून जातें. ५८

श्लोकार्थः—जो अंतकालीं माझें स्मरण करीत देह सोडतो, तो माझ्या स्वरूपीं मिळून जातो यांत संशय नाहीं ॥ ५ ॥

अरे ! आतांच जें मी सांगितलें, ज्याला मीं अधियज्ञ म्हटलें, त्या मला जे अगोदर व प्राणांतसमयींही जाणतात, ५९ ते देहाला मिथ्या मानून स्वताचे ठिकाणींच ब्रह्मरूप होतात. ज्याप्रमाणें एखादें घर आकाशानें भरून आकाशांतच असतें, ६० त्याप्रमाणें, अनुभवरूप माजघरांत त्याची निश्चयरूप खोली असते, म्हणून त्याला ब्रह्माशिवाय बाहेरील वस्तूंचें स्मरण नसतें. ६१ अशा प्रकारें जो अंतर्बाह्य ऐक्यतेमुळें मद्रूपच होऊन राहिला आहे, तो, बाहेरील पंचमहाभूतांचीं पांच कवचें ( शरीर ) पडून गेलीं तरी तो जाणत नाहीं. ६२ जें शरीर जिवंत असतांही त्याची जो पर्वा बाळगीत नाहीं, तें पडल्यावर त्याचें दुःख कोणाला होणार ? म्हणून अनुभवाच्या पोटांतलें पाणी हालत नाहीं. ( अंतकालीं त्याचा ब्रह्माविषयींचा अनुभव ढळत नाहीं. ) ६३ तो अनुभव केवळ ऐक्याचा ओतून अविनाशीपणाच्या हृदयांत घातलेला आणि तसाच पूर्णानंदसमुद्रांत धुतलेला असतो म्हणून कामादिक मळांनीं तो मळत नाहीं. ६४ हें पहा कीं, अथांग पाण्यात

समुदाय. १९ लाटा. २० श्रोतृश्रेष्ठा. २१ जाळणारें (ज्ञान). २२ मिथ्या. २३ कोठडी. २४ कवचें. २५ उभ्या; जिवंत. २६ संकट. २७ ती प्रतीति. २८ पूर्णानंदैक्यसमुद्रांत. २९ मळेविना. ३० खोल पाण्यांत.

भरला । पाठीं दैवगत्या जरी फुटला । तरी उदक काय फुटे ॥ ६५ ॥ नातरी सर्पें क्वच सांडिलें । कां उबारेनें वस्त्र फेडिलें । तरी सांग पां काय मोडलें । अवेवा-माजीं ॥६६॥ तैसा आकार हा आहाच भ्रंशे । वांचूनि वस्तु ते सांचलीचि असे । तेचि बुद्धि जालिया विसुकुसे । कैसेनि आतां ॥ ६७ ॥ म्हणोनि यापरि मातें । अंतकाळीं जाणतसातें । जे मोकळिती देहातें । ते मीचि होती ॥ ६८ ॥ ( २७६. भावनेप्रमाणें अंतीं जीवाला गति, ६९-७४ ) येऱ्हवीं तरी साधारण । उरीं आदळलिया मरण । जो जाठव धरी अंतःकरण । तेंचि होइजे ॥ ६९ ॥ जैसा कवण एक काकुळती । पळतां पवनगती । दुपांवलीं अवचितीं । कुंहामाजि पडियेला ॥ ७० ॥ आतां तया पडणयाआरौतें । पडण चुकवावया परौतें । नाहीं म्हणोनि तेथें । पडावेंचि पडे ॥ ७१ ॥ तेवि मृत्यूचेनि अवसरें एकें । जें येऊनि जीवासमोर ठाके । तें होणें मग न चुके । भलतयापरी ॥ ७२ ॥ आणि जागता जंव असिजे । तंव जेणें ध्यानें भावना भाविजे । डोळां लागतखेंवो देखिजे । तेंचि स्वप्नीं ॥ ७३ ॥

यं यं वाऽपि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम् । तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥६॥

अन्वयः—कौंतेय, यं यं वा अपि भावं अंते स्मरन् कलेवरं त्यजति, ( सः ) सदा तद्भावभावितः ( सन् ) तं तं एव एति ॥ ६ ॥

तेविं जितेनि अवसरें । जें आवडोनि जीवीं उरे । तेंचि मरणाचिये मेरे । फौरें हों लागे ॥ ७४ ॥ ( २७७. नित्यस्मरणानें भगवत्प्राप्ती. ७५–७९ ) आणि मरणीं जया जें आठवे । तो तेचि गतीतें पावे । अवतरणः–म्हणोनि सदां स्मरावें । मातेंचि तुवां ॥ ७५ ॥

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युद्धय च । मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयः ॥ ७ ॥

अन्वयः—तस्मात्, ( अर्जुन, त्वं ) मयि अर्पितमनोबुद्धिः ( सन् ) सर्वेषु कालेषु मा अनुस्मर च युद्धय; ( एवं कृते सति ) असंशयः मा एव एष्यसि ॥ ७ ॥

डोळां जें देखावें । कां कानीं हन ऐकावें । मनीं जें भावावें । बोलावें वाचे ॥ ७६ ॥ तें आंत बाहेरि आघवें । मीचि करूनि घालावें । मग सर्वीं काळीं स्वभावें । मीचि आहें ॥ ७७ ॥ अर्जुना ऐसें जाहलिया । मग न मरिजे देह गेलिया । मा संग्रामु केलिया । भय काय तुज ॥ ७८ ॥ तूं मन बुद्धि सांचेसीं । जरी माझिया स्वरूपीं आर्पिसी । तरी मातेंचि गा पावसी । हे माझी भाक ॥७९॥ ( २७८. अभ्यासक्रम, ८०-८५ ) अवतरण.—हेंच कायिसेंया वरी होये । ऐसा जरी संदेहो वर्तत आहे । तरी अभ्यासूनि आदि पाहें । मग नव्हे तरी कोपे ॥ ८० ॥

अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना । परमं पुरुषं दिव्यं याति पार्थाऽनुचिंतयन् ॥८॥

अन्वयः—पार्थ, अभ्यासयोगयुक्तेन न अन्यगामिना चेतसा ( माम् ) अनुचिंतयन् ( पुरुषः ) दिव्यं परमं पुरुषं याति ॥ ८ ॥

घट बुडाला असतां त्याच्या आंत व बाहेर पाणी असतें; पण दैवगत्या जर तो मागाहून फुटला, तर उदकाचा नाश होतो का ? ६५ किंवा सर्पानें कात टाकली, अथवा उष्णतेमुळें वस्त्र फेडून टाकलें, तर अवयवांत कांहीं बिघाड होतो का सांग बरें ? ६६ त्याचप्रमाणें, शरीर हें वरचेवर नाश पावलें, तरी ब्रह्म हें सर्वत्र भरलेलेंच आहे. त्या ठिकाणीं बुद्धि जर निपुण झाली, तर भय कशाचें आहे ? ६७ म्हणून अशा रीतीनें अंतकालीं माझें स्मरण ठेवून जे देह सोडतात ते मद्रूप होतात. ६८ येऱ्हवीं साधारण नियम असा आहे कीं, मरण प्राप्त झालें असता अंतःकरणांत ज्याचें स्मरण असतें, त्याप्रत तो पावतो. ६९ ज्याप्रमाणें एखादा भयभीत मनुष्य वाऱ्यासारखा पळत असतां मार्गांत अवचित विहिरींत पडतो; ७० त्या स्थितींत त्याला पडण्याच्या अगोदर पळण्याचा वेग आवरून धरून, पडणें चुकवितां येत नाहीं; म्हणून विहिरींत पडणें भाग पडतें, ७१ त्याचप्रमाणें, मृत्युसमयीं जीवासमोर जी वस्तु उभी राहते, तद्रूपच ( मरणानंतर ) त्यास व्हावें लागतें. तें कोणत्याही उपायानें चुकत नाहीं; ७२ आणि मनुष्य जागा असतां त्याच्या मनांत ज्या कल्पना येतात, त्याच कल्पना डोळा लागल्यावर स्वप्नांत दिसूं लागतात. ७३

श्लोकार्थः—हे कौंतेया, ( मनुष्य ) जो जो भाव मनांत आणून शेवटीं तो शरीर सोडतो, दुसऱ्या जन्मीं त्या त्या भावानें सदा युक्त होत्साता जन्म घेतो.॥ ६ ॥

त्याचप्रमाणें, जिवंत असतांना अंतःकरणांत जी जी गोष्ट आवडीनें अंतःकरणांत उतरते, त्याविषयींचीच आवड अंतकाळचे समयीं वृद्धिंगत होते; ७४ आणि मरणाच्या समयीं ज्या गोष्टीची आठवण असते, त्याच्याच गतीला तो ( मरणानंतर ) पावतो.

श्लोकार्थः—याकरिता अर्जुना, माझ्या ठायीं मन आणि बुद्धि हीं अर्पण करून सदैव माझें चिंतन कर, आणि युद्धाला लाग, म्हणजे मलाच येऊन मिळशील यांत संशय नाहीं ॥ ७ ॥

म्हणून तूं नेहमीं मलाच स्मरत जा. ७५ डोळ्यांनीं जें पहावें किंवा कानांनीं जें ऐकावें, मनानें जें चिंतावें अथवा वाचेनें जें बोलावें, ७६ तें हृदयांत भासणारें व बाह्यदृष्टीला दिसणारें सर्व मीच आहें असें समजावें. मग सर्वत्र मीच आहें असें सहज तुला दिसेल. ७७ अर्जुना, याप्रमाणें, सर्व गोष्टी मद्रूप आहेत असें तुझ्या मनानें घेतलें, म्हणजे देह गेला तरी तूं मरणार नाहींस. मग युद्ध केलें असतां तुला भय कसलें आहे ? ७८ तूं मन आणि बुद्धि हीं खरोखर माझ्या स्वरूपास अर्पण करशील, तर मद्रूप होशील हें प्रतिज्ञापूर्वक तुला मी सांगतों. ७९ हेंच कशानें होईल, असा जर तुझ्या मनांत संशय येत असेल, तर अगोदर याचा अभ्यास करून अनुभव घे, आणि जर मी म्हणतों त्याप्रमाणें न होईल तर मग माझ्यावर रागाव. ८०

---

१ अवयवामध्यें. २ वरचेवर. ३ ब्रह्म. ४ तत्पर. ५ भय कशाचें आहे. ६ सोडितात; त्यागितात. ७ मद्रूपच. ८ साधारण नियम. ९ भयानें. १० वाटेंत. ११ विहिरींत. १२ वेगी. १३ आवडूं. १४ चिंतावें. १५ खरेपणानें. १६ प्रतिज्ञापूर्वक वचन. १७ कशानें.

येणेंचि अभ्यासेंसी योगू । चित्तासि करी पां चांगू । अगा उपायबळें पंगु पहाड ठाकी ॥ ८१ ॥ तेविं सदभ्यासें निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहेर। लावी मग शरीर । राहो अथवा जावो ॥ ८२ ॥ जें नानागतींतें पाववितें । तें चित्त वरील आत्मयातें । मग कवण आठवी देहातें । गेलें कीं आहे ॥ ८३ ॥ पैं सरितेचेनि ओघें । सिंधुजळा मीनलें घोघें । तें काय वर्तत आहे मागें । म्हणोनि पाहों येती ॥ ८४ ॥ ना तें समुद्रचि होऊन ठेलें । तेविं चित्ताचें चैतन्य जाहालें। जेथ यातायात निमालें । घनानंद जें ॥ ८५ ॥

कविं पुराणमनुशासितारम्, अणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।
सर्वस्य धातारमचिंत्यरूपम्, आदित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥
प्रयाणकाले मनसाऽचलेन, भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।
भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक्, स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ १० ॥

अन्वयः—यः कविं, पुराणं, अनुशासितारं, अणोः अणीयांसं, सर्वस्य धातारं, अचिंत्यरूपं, आदित्यवर्णं, तमसः परस्तात् ( विद्यमानं पुरुषं ) प्रयाणकाले अचलेन मनसा च भक्त्या ( च ) योगबलेन युक्तः ( सन् ) भ्रुवोः मध्ये प्राणं सम्यक् आवेश्य अनुस्मरेत्, सः तं दिव्यं परं पुरुषं उपैति ॥ ९ ॥ १० ॥

( २७९. अभ्यासानें ब्रह्मप्राप्ति, ८६-९१ ) जयाचें आकारावीण असणें । जया जन्म ना निर्मणें । जें आघवेंचि आघवेंपणें । देखत असे ॥ ८६ ॥ जें गगनाहून जुनें । जें परमाणूहूनि सानें । जयाचेनि सन्निधानें । विश्व चळे ॥ ८७ ॥ जें सर्वांतें यया विये । विश्व सर्व जेणें जिये । हेतु जया बिहे । आचिंत्य जें ॥ ८८ ॥ देखे वोळंबाँ इंगळु न चरे । तेजीं तिमिर न शिरे । जें दिहाचि आंधारें । चर्मचक्षूंसी ॥ ८९ ॥ सुसडा सूर्यकणांच्या राशी । जो नित्य उदो ज्ञानियांसी । अस्तमानाचें जयासी । आडनांव नाहीं ॥ ९० ॥ तया अव्यंगवाणेया ब्रह्मातें । प्रयाणकाळें प्राप्ते । जो स्थिरावलेनि चित्तें। जाणोनि स्मरे ॥९१॥ ( २८०. अंतकाळीं स्मरण होण्यास योगाचें साहाय्य लागतें, ९२-९९ ) बाहेरी पद्मासन रचुनी । उत्तराभिमुख बैसोनी । जीवीं सुख सूनि । कर्मयोगाचें ॥ ९२ ॥ आंतु मीनलेनि मनोधर्में । स्वरूपप्राप्तीचेनि प्रेमें । आपेंआप संभ्रमें । मिळावया ॥ ९३ ॥ आकळलेनि योगें । मध्यमा मध्य मार्गें । अग्निस्थानौनि निगे । ब्रह्मरंध्रा ॥९४॥ तेथ अचेत चित्ताचा सांगातु । आहाचवाणा दिसे मांडतु । जेथ प्राण गगनाआंतु । संचरे का ॥ ९५ ॥ परी मनाचेनि स्थैर्यें धरिला । भक्तीचिया भावना भरला । योगबळें आवरला । सज्ज होउनी ॥ ९६ ॥ तो जडाजेडातें विरवितु । भ्रूलतामाजीं संचरतु । जैसा घंटानाद लयस्तु । घंटेसीच होय ॥ ९७ ॥ कां झांकलिये घटींचा दिवा । नेणिजे

१ छंद. २ घो घो करीत. ३ परमानंद. ४ मरणें. ५ लहान. ६ व्यापार चालतात.

श्लोकार्थः—पार्था, आपलें चित्त दुसरे कोठेंही जाऊं न देता अभ्यासाच्या साधनानें एकाग्र करून जो माझें चिंतन करतो, तो प्रकाशात्मक अशा परमपुरुषाला जाऊन मिळतो. ॥ ८ ॥

याकरितां चांगल्या रीतीनें चित्ताची आणि अभ्यासाची गांठ घातली ( मनःपूर्वक अभ्यास केला, ) तर, ज्याप्रमाणें लंगडा उद्योगबलानें पर्वतही चढूं शकतो, ८१ त्याप्रमाणें, नेहमीं ब्रह्मविचाराचा अभ्यास करून चित्ताला आत्म्याचा छंद लाव, मग शरीर राहो अथवा जावो. ८२ नानागति पावविणारें असें चित्त जर आत्म्याला वरील, तर मग देह गेला कीं आहे याची आठवण कोण करील ? ८३ हें पहा कीं, पाणी नदीच्या ओघानें घो घो करीत समुद्रात मिळण्यास चाललें म्हणजे, मागें काय होतें आहे हें पाहण्याकरितां परततें का ? ८४ नाहीं. तें समुद्रांत मिळाल्यावर समुद्ररूपच होतें. त्याचप्रमाणें, चित्त हें आत्मरूप झालें, म्हणजे जन्ममरणांच्या यातायाती चुकतात. कारण त्या ठिकाणीं परमानंदच भरलेला आहे. ८५

श्लोकार्थः—जो अंतकालीं निश्चल मन करून, भक्तियुक्त होऊन, योगबलानें दोन्ही भुवयांच्या मध्यमार्गी प्राणाला उत्तम प्रकारें स्थिर करितो, आणि सर्वज्ञ, अनादि, सर्वांचा नियंता, सूक्ष्माहून सूक्ष्म, सर्वांचा पोषक, अचिंत्यरूप सूर्याप्रमाणें तेजस्वी, व तमोगुणापासून दूर अशा दिव्य परमपुरुषाचें एकसारखें चिंतन करतो, तो त्याला जाऊन मिळतो. ॥ ९ ॥ १० ॥

ज्याचें निराकार अस्तित्व, ज्याला जन्म अथवा मरण नाहीं, व जें सर्वव्यापकपणानें सर्वांस पाहतें; ८६ जें आकाशाच्या आधींचें, जें परमाणूहूनही सूक्ष्म, ज्याच्या सान्निध्यानें विश्वाचे व्यापार चालतात, ८७ ज्याच्यापासून ह्या सर्वांची उत्पत्ति होते, सर्व विश्व जगतें, ज्याला तर्क भितो व ज्याचें अनुमान करतां येत नाहीं; ८८ पहा—वाळवी कधीं इंगळ ( विस्तव ) खात नाहीं; तेजामध्यें अंधार शिरत नाहीं; व जें अज्ञानदृष्टीला दिवसाही दिसत नाहीं; ८९ जें निर्मळ अशा सूर्यरूप कणांच्या राशीसारखें आहे, व ज्ञान्याला नित्य उजेड करणारें आहे व ज्याला अस्त कधींच नाहीं, ९० त्या अव्यंग स्वरूपाच्या ब्रह्माला जाणून, मरणकाळ समीप आला असतां जो एकाग्र चित्तानें त्याचें स्मरण करितो; ९१ बाहेर पद्मासन घालून, उत्तरेस तोंड करून बसून, आणि कर्मयोगानें प्राप्त झालेलें सुख अंतःकरणांत सांठवून, ९२ अंतर्यामीं एकाग्र चित्तानें स्वरूपप्राप्तीच्या प्रेमानें आपोआप ब्रह्मास त्वरित मिळण्याकरितां, ९३ संपादिलेल्या योगाच्या द्वारें सुषुम्ना नाडीच्या मध्यमार्गानें, अग्निस्थानापासून ब्रह्मरंध्रांत जाण्याकरितां निघतो; ९४ जेथें प्राण व चित्त यांची संगति आहे असें उगीच बाह्यात्कारीं दिसतें; जेथें प्राणाचा लय आकाशांत होतो ९५ परंतु मनाच्या स्थिरतेनें जो बांधला गेला, व ज्याचें अंतःकरण भक्तियुक्त झालें आहे, व जो योगाचे बळानें तयार होऊन मन आपल्या ताब्यांत ठेवितो,

७ वाळवी. ८ निर्मळ. ९ मरणसमयीं. १० सांठवून. ११ एकवटलेल्या. १२ त्वरेनें. १३ सुषुम्ना. १४ आधारपद्मापासून. १५ प्राण. १६ व्यापत्ता. १७ तो प्राणवायु. १८ चेतन व अचेतन याला. १९ लीन करतो. २० भिवयामध्यें. २१ लय पावणें.

काय जाहला केव्हां । या रीती जो पांडवा । देह ठेवी ॥ ९८ ॥ तो केवळ परब्रह्म । जया परमपुरुष ऐसें नाम । तें माझें निजधाम । होऊनि ठाके ॥ ९९ ॥

यदक्षरं वेदविदो वदंति, विशंति यद्यतयो वीतरागाः ।
यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति, तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥

अन्वयः—वेदविदः यत् अक्षरं वदन्ति, वीतरागाः यतयः यत् विशंति, ( ब्रह्मचारिणः ) यत् इच्छंतः ( सन्तः ) ब्रह्मचर्यं चरन्ति, तत् पदं ते संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥

( २८१. ब्रह्मत्वाला प्राप्त झालेल्याची स्थिति, १००–१०८ ) सकळां जाणणेयां जे लेणी[१] । तिये जाणिवेची जे खाणी । तयां ज्ञानियांचिये आयणीं । जयातें अक्षर म्हणिपे ॥ १०० ॥ चंडवातेंही न मोटे । तें गगनाचि कीं फुटे । वांचूनि जरी होईल मेहुडें[२] । तरी उरेल कैंचें ॥ १ ॥ तेवि जाणणेया जें आकळिलें । तें जाणिवलेपणेंचि उमाणलें[३] । मग नेणवेचि तया म्हणितलें । अक्षर सहजें ॥ २ ॥ म्हणोनि वेदविद[४] नर । म्हणति जयातें अक्षर । जें प्रकृतीसी पर । परमात्मरूप ॥ ३ ॥ आणि विषयांचें विष उलंडूनि । जे सर्वेंद्रियां प्रायश्चित्त देऊनि । आहाति देहाचिया बैसोनि । झाडातळीं ॥ ४ ॥ ते यापरी विरक्त । जयाची निरंतर वाट पाहात । निष्कामासि अभिप्रेत । सर्वदा जें ॥ ५ ॥ जयाचिया आवडी । न गणिती ब्रह्मचर्यादि सांकडीं । निष्ठुर होउनि बापुडीं । इंद्रियें करिती ॥ ६ ॥ ऐसें जें पद । दुर्लभ आणि अगाध । जयाचिये थडिये वेद[७] । बुडकळिले ठेले ॥ ७ ॥ तें ते पुरुष होती । जे यापरी लया जाती । तरी पार्था हेचि स्थिती । एक वेळ सांगों ॥ ८ ॥ ( २८२. अर्जुन म्हणतो, देवा, मला कळेल असें सांगा; काव्य, १०९ ) अवतरणः—तेथ अर्जुनें म्हणितलें स्वामी । हेंचि म्हणावया होतों पां मी । तंव सहजें कृपा केली तुम्हीं । तरी बोलिजो कां ॥ ९ ॥ ( २८३. मनाला हृदयात कोंडून टाक, ११०–१११ ) परि बोलावें तें अति सोहोपें । तेथें म्हणितलें त्रिभुवनदीपें । तुज काय नेणों संक्षेपें । सांगेन ऐक ॥ ११० ॥ तरी मना या बाहेरिलीकडे । येयाची सौंविया सैंवे मोडे । हें हृदयाचिया डोहीं बुडे । तैसें कीजे ॥ ११ ॥

सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।
मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ १२ ॥

अन्वयः—सर्वद्वाराणि संयम्य च मनः हृदि निरुध्य, मूर्ध्नि आत्मनः प्राण आधाय योगधारणां आस्थितः ॥ १२ ॥

( २८४. मन योगाभ्यासावांचुन कोंडलें जाणार नाहीं, ११२-११९ ) परी हे तरीच घडे । जरी संयेमाचीं अखंडें । सर्वद्वारीं कवाडें । कैळासती ॥ १२ ॥ तरी

१ शेवट. २ बुद्‌बुदानें. ३ ब्रह्म. ४ खरें. ५ ढग. ६ अटकळीत आलें. ७ वेदांचा तत्त्वार्थ

९६ तो चित्त व प्राण याना भ्रुकुटींमध्यें आवरून धरून, ज्याप्रमाणें घंटेचा नाद घंटेंतच लय पावतो, त्याप्रमाणें दोघांचा लय करतो. ९७ किंवा मडक्याखालील झांकलेला दिवा केव्हां नाहींसा होतो हें ज्याप्रमाणें समजत नाही, त्याप्रमाणें; अर्जुना, जो आपला देह ठेवतो ( ब्रह्माकाशांत प्राणवायु नेऊन तो आत्मस्वरूपीं केव्हां लीन होतो हें समजूं न देता आपला देह ठेवतो ). ९८ तो केवळ परब्रह्म—ज्याला परमपुरुष असें नाव आहे—त्या माझ्या निजस्वरूपाप्रत जाऊन मिळतो. ९९

श्लोकार्थः—वेदवेत्ते ज्या तत्त्वाला अक्षर म्हणतात, ज्याचे काम व क्रोध नाहींतसे झाले आहेत असे यति ज्या स्वरूपाला प्राप्त होतात, ज्याच्या प्राप्तीसाठीं ब्रह्मचारी ब्रह्मचर्यव्रतानें राहतात, तें पद, अर्जुना, तुला संक्षेपानें सांगतों. ।। ११ ।।

जें ज्ञान म्हणजे सर्व ज्ञानाचा शेवट, त्या ज्ञानाची जें केवळ खाणच आहे, तें असणाऱ्या बुद्धिमान ज्ञानी पुरुषांनींही ज्याला ' अक्षर ' असें म्हटलें आहे. १०० झंझावातानें न मोडणारें असें एक खरोखर गगनच आहे; त्याच्याशिवाय, त्या वाऱ्यापुढें ढग आले असतां कसे टिकतील ? १ त्याचप्रमाणें, ज्ञान्याला जें समजलें तें ज्ञानाच्या मापांत आलें म्हणून तें क्षर ( नाशवंत ) होय; मग, जें जाणण्यास अशक्य, त्याला सहज अक्षर ( अविनाशी ) असें म्हणतात. २ म्हणून वेदपारंगत पुरुष ज्याला अक्षर ( ब्रह्म ) असें म्हणतात, व जें मायेच्या पलीकडील असून सच्चिदानंदरूप आहे, ३ आणि विषयाची इच्छा टाकून व सर्व इंद्रियांचें दमन करून देहरूपी झाडाच्या तळीं उदासीनवृत्तीनें बसलेले ४ त्याप्रमाणें विरक्त पुरुषही ज्याची नेहमीं वाट पहात असतात व जें नेहमीं निरिच्छ लोकांना आवडतें, ५ ज्याच्या आवडीकरिता योगिजन ब्रह्मचर्यादि संकटें जुमानीत नाहींत व निष्ठुरपणानें इंद्रियाना दीन करतात, ६ असें जें दुर्लभ पद—ज्याचा अंत नाहीं व जें वेदालाही जाणतां आलें नाहीं, ७ त्या पदाला, मी सांगितल्याप्रमाणें जे देह ठेवतात, ते प्राप्त होतात; म्हणून, पार्था, त्याबद्दल आणखी एकवार तुला सांगतों. ८ त्या वेळेस अर्जुन म्हणतो, " हे गुरो, मी आपल्यास आतां हेच विचारणार होतों, तों आपण मजवर कृपा केली. तर आतां सांगण्यास सुरवात करावी; ९ परंतु काय सांगावयाचें तें अगदीं सोप्या रीतीनें मात्र सांगा. " त्या वेळीं, त्रिभुवनदीप जे श्रीकृष्ण ते म्हणाले:—तुला का आम्ही ओळखीत नाहीं ? तुला संक्षेपानें सांगतों. ११० तर मग, मनाची बाहेर हिंडण्याची स्वाभाविक संवय मोडून, तें हृदयांतच स्थिर राहील, असें कर. ११

श्लोकार्थः—जो सर्व द्वाराचा निरोध करून, मनाला हृदयांत स्थिर करून, व कपाळाच्या आंत भुवयांच्या मध्यभागीं आपल्या प्राणवायूला निश्चल करून योगाभ्यासामर्थ्यें स्थिर होतो ॥१२॥

परंतु ज्या वेळेस इंद्रियद्वारें निग्रहरूपी कुलपानें बंद असतात, तेव्हाच ही गोष्ट घडते. १२ असें झालें म्हणजे मग मन सहज कोंडलें जाऊन हृदयातच निर्विकल्प असतें.

जाणणारे. ८ आवडतें. ९ संकटें. १० काठाला. ११ लीन होऊन. १२ श्रीकृष्णानें. १३ सहज. १४ संवय. १५ इंद्रियनिग्रहाची. १६ लागतीं.

सहजें मन कोंडलें । हृदयींचि असेल उंगलें । जैसें करचरणीं मोडलें । परिवेरु न संडी ॥ ११ ॥ तैसें चित्त राहिल्या पांडवा । प्राणांचा प्रणवुचि करावा । मग अनुवृत्तिपंथें आणावा । मूर्ध्निवरी ॥ १४ ॥ तेथ आकाशीं मिळे न मिळे । तैसा धरावा धारणाबळें । जंव मात्रात्रय मावळे । अर्ध बिंबीं ॥१५॥ तंववरी तो समीरु । निराळीं कीजे स्थिरु । मग लयीं जेविं ॐकारु । [12]बिंबींचि विलसे ॥ १६ ॥

ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।
यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ १३ ॥

अन्वयः—ॐ इति एकाक्षरं ब्रह्म व्याहरन् माम् अनुस्मरन् यः देहं त्यजन् प्रयाति, सः परमां गतिं याति ॥ १३ ॥

'तैसें ॐ हें स्मरों सरे । आणि तेथेंचि प्राणु पुरे । मग प्रणवातीत उरे । पूर्णघनें जें ॥ १७ ॥ म्हणोनि प्रणवैकनाम । हें एकाक्षर ब्रह्म । जो माझें स्वरूप परम । स्मरतसांता ॥ १८ ॥ यापरी त्यजी देहातें । तो त्रिशुद्धी पावे मातें । जया पावणयापरौतें । आणिक पावणें नाहीं ॥ १९ ॥ ( २८५. अंतकाळीं जीवाला स्मरण कसें होणार, अशी शंका, १२०-१२३. ) अवतरण.—(ओव्या १२०-२१-२२-२३) तेथ अर्जुना जरी विपायें । तुझ्या जीवीं हन ऐसें जाये । ना[20]हें स्मरण मग होये । काय सयावरी अंतीं ॥ १२० ॥ इंद्रियां अनघड पडलिया । जीविताचें सुख बुडालिया । आंतुबाहेरी उघडलिया । मृत्युचिन्हें ॥ २१ ॥ ते वेळीं बैसावेंचि कवणें । मग कवण विरोधी[23] करणें । तेथ काह्यचेनि अंतःकरणें । प्रणव स्मरावा ॥ २२ ॥ तरि गा ऐसिया हो ध्वनी । झणें थारा देशी गा मनीं । पैं नित्य सेविला मी निदानीं । सेवकु होय ॥ २३ ॥

अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः । तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥
मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् । नाप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥१५

अन्वयः—पार्थ! यः नित्यशः अनन्यचेताः ( सन् ) मां सततं स्मरति, तस्य नित्ययुक्तस्य योगिनः अहं सुलभः ( अस्मि ) ॥ १४ ॥ परमां संसिद्धिं गताः महात्मानः मां उपेत्य पुनः दुःखालयं अशाश्वतं जन्म न आप्नुवंति ॥ १५ ॥

( २८६. अखंड स्मरण करणाऱ्याचा अंतकाळीं देव सेवक होतो, १२४-१३१ ) जे विषयांसि तिळांजळी देऊनि । प्रवृत्तीवरी निगडु वाऊनि । मातें हृदयीं सूनि । भोगिताती ॥ २४ ॥ परि भोगितया आराणुका । भेटणें नाहीं क्षुधादिकां । तेथ चक्षुरादि रंकां । कवण पाड ॥ २५ ॥ ऐसे निरंतर एकवटले । जे अंतःकरणीं मजशीं लिगटले । मीचि होऊनि आंतले । उपासिती ॥ २६ ॥ तयां देहावसान

१ निर्विकल्प. २ घर. ३ प्राणायामानें ॐकाराचें ध्यान करणें. ४ जय. ५ क्रमाक्रमानें. ६ ब्रह्मरंध्रापर्यंत. ७ अकार, उकार, मकार. ८ अर्धमात्रेंत. ९ वायु. १० मस्तकाकाशांत. ११ ऐक्यावस्थेंत. १२ मूळ स्वरूप जें ब्रह्म त्या ब्रह्मांत. १३ ॐकाराहून पर. १४ ब्रह्मानंदस्वरूप.

ज्याप्रमाणें हातपाय मोडलेला प्राणी आपलें घर सोडीत नाहीं, १३ त्याचप्रमाणें अर्जुना, चित्ताची स्थिरता झाल्यावर प्राणायामानें ॐकाराचें ध्यान करावें, मग प्राणवायु क्रमाक्रमानें ब्रह्मरंध्रापर्यंत आणावा. १४ मग, अकार, उकार व मकार ही त्रयी अर्धमात्रेंत मिळेपर्यंत, धारणाशक्तीच्या बळानें, प्राणवायु ब्रह्माकाशांत मिळतो न मिळतो अशा बेतानें धरावा; १५ तोंपर्यंत तो वायु मस्तकाकाशांत स्थिर करावा; नंतर ॐकाराचा व त्याचा संयोग झाल्यावर, मूळ स्वरूप जें ब्रह्म त्यांत तो रममाण होतो. १६

श्लोकार्थः—आणि निर्विकार ब्रह्माचें वाचक ॐ हें एकाक्षर उच्चारून माझें स्मरण करीत देहाचा त्याग करून निघून जातो, तो उत्तम गतीला जाऊन पोंहोंचतो. ॥ १३ ॥

त्याबरोबर ॐकाराचें स्मरण बंद पडतें, आणि तेव्हांच प्राणाचा शेवट होतो; मग, ॐकाराचे पलीकडील जें ब्रह्मानंदस्वरूप तेंच बाकी राहतें. १७ म्हणून, ज्याला प्रणव म्हणतात व जें एकाक्षर ब्रह्म आहे, त्या माझ्या परमस्वरूपाचें स्मरण करीत असतां १८ जो त्या स्थितींतच देहत्याग करितो, तो निश्चयानें मजप्रत पावतो. कारण, त्याला माझ्या प्राप्तीशिवाय दुसरी गतिच नाहीं. १९ अर्जुना, कदाचित् तुझ्या मनांत जर अशी शंका येईल कीं, कायहो, मरणसमयीं माझें स्मरण कसें व्हावें ? १२० जीविताचें सुख नाहींसें होऊन व इंद्रियें संकटांत पडून अंतर्यामीं व बाहेर मृत्युचिन्हें उघड दिसूं लागल्यावर २१ त्या वेळेस उठून बसावें कोणीं ? इंद्रियांचें संयमन करावें कोणीं ? आणि कोणत्या अंतःकरणानें ॐकाराचें स्मरण करावें ? २२ तर बाबारे, असल्या संशयास तूं आपल्या अंतःकरणांत थारा देऊं नको. असें पहा कीं, माझी जो नित्य सेवा करितो, त्याच्या निदानींच्या समयीं मी त्याचा दास बनून राहतों. २३

श्लोकार्थः—पार्था, जो योगी एकाग्र चित्तानें सदासर्वदा माझें स्मरण करणारा व निरंतर समाधानयुक्त, त्याला मी सहज प्राप्त होतों. ॥ १४ ॥ परम सिद्धीला पावलेले महात्मे, मला पावल्यावर, दुःखाचें स्थान व अशाश्वत अशा जन्माला पावत नाहींत. ॥ १५ ॥

जे विषयांला तिळांजलि देऊन, विषयांविषयीं होणाऱ्या इच्छा आवरून व मला हृदयांत सांठवून त्या सुखाचा उपभोग घेतात, २४ त्याना त्या समाधानांत क्षुधा वगैरेंची आठवणही रहात नाहीं. मग गरीब बिचाऱ्या नेत्रादिकांचा तेथें काय पाड ! २५ अशा रीतीनें निरंतर माझ्या ऐक्यरूपास पावलेले, आपले अंतःकरणांत माझ्याशीं तल्लीन झालेले, व मद्रूप होऊन जे माझीच सेवा करणारे आहेत, २६ त्यांचा अंतकाल समीप यावा, त्यांनीं माझें स्मरण करावें, आणि मग जर मी त्यास पावावें, तर मग त्यांनीं पूर्वी जी माझी

१५ प्रणव हेंच एक ज्याचें नांव आहे. १६ स्मरत असता. १७ निश्चयानें. १८ प्राप्तीपलीकडे. १९ गति. २० कायहो. २१ कसें. २२ संकट. २३ संयम. २४ कोणत्या. २५ संशयास. २६ कदाचित्. २७ आंदु–हत्तीला धरण्याकरितां केलेला खोडा. २८ पावून. २९ सांठवून. ३० समाधान. ३१ दाद. ३२ तल्लीन झालें. ३३ व्यापलें.

जैं पावे । तें तिहीं मातें स्मरावें । मग म्यां जरी पावावें । तरि उपास्ति ते कायसी ॥ २७ ॥ पैं रंक एक ओडलेपणें । काकुळती धांव गा धांव म्हणे । तरि तयाचिये ग्लानी धांवणें । काय न घडे मज ॥ २८ ॥ आणि भक्तांही तेचि दशा । तरी भक्तीचा सोस कायसा । म्हणऊनि हा ध्वनी ऐसा । न वाखाणावा ॥ २९ ॥ तिहीं जे वेळीं मी स्मरावा । ते वेळीं स्मरिला कीं पावावा । तो आभारही जीवा । साहवेचि ना ॥ १३० ॥ तें ॠणवेपण देखोनि आंगीं । मी आपुलियाचि उत्तीर्णत्वालागीं । भक्तांचिया तनुत्यागीं । परिचर्या करीं ॥ ३१ ॥ ( २८७. भक्ताची सेवा, १३२–१३५ ) देहवैकल्याचा वारा । झणें लागेल यां सुकुमारा । म्हणोनि आत्मबोधाचे पांजिरें । सूयें तयातें ॥ ३२ ॥ वरि आपुलिया स्मरणाची उवाइली । हींवे ऐसी करीं साउली । ऐसेनि नित्य बुद्धि संचैली । मी आणीं तयातें ॥ ३३ ॥ म्हणोनि देहांतींचें सांकडें । मौझिया कहींचि न पडे । मी आपुलियातें आपुलीकडे । सुखेंचि आणीं ॥ ३४ ॥ वरचील देहाची गंवसणी फेडुनी । आहाच अहंकाराचे रेंजे झाडुनी । शुद्ध वासना निवडुनी । आपणपां मेळवीं ॥ ३५ ॥ ( २८८. भक्त देहाविषयीं उदासीन असतात, १३६-१३९. ) आणि भक्तां तरी देहीं । विशेष ऐक्यवंकीचा ठाव नाहीं । म्हणऊनि अव्हेर करितां कांहीं । वियोग ऐसा न वाटे ॥ ३६ ॥ ना तरी देहांतींचि मियां यावें । मग आपणपेंयातें न्यावें । हेंही नाहीं जें स्वभावें । जे आधींचि मज मीनले ॥३७॥ येरीं शरीराचिया सलिलीं । असतेंपण हेंचि सौउली । वांचूनि चंद्रिका ते ठेली । चंद्रींच आहे ॥ ३८ ॥ ऐसे जे नित्ययुक्त । तयांसि सुलभ मी सतत । म्हणऊनि देहांतीं निश्चित । मीचि होती ॥ ३९ ॥ ( २८९. अनित्य शरीराचें वर्णन, १४०-१५० ) मग क्लेशतरूची वौडी । जे तापत्रयाग्नीची सेंगडी । जे मृत्युकाकासि कुरोंडी । सांडिली आहे ॥ १४० ॥ जें दैन्याचें दुभतें । जें महाभयातें वाढवितें । जें सकळ दुःखाचें पुरतें । भांडवल ॥ ४१ ॥ जे दुर्मतीचें मूळ । जें कुकर्माचें फळ । जें व्यामोहाचें केवळ । स्वरूपचि ॥ ४२ ॥ जें संसाराचें बैसणें । जें विकाराचें उद्यानें । जें सकळ रोगांचें भाणें । वाढिलें आहे ॥ ४३ ॥ जें काळाचा खिचें उशिटा । जें आशेचा आंगवेठा । जन्ममरणाचा वोलिवटा । स्वभावें जे ॥४४॥ जें भुलीचें भरींव । जें विकल्पाचें वोतींव । किंबहुना पेंव । विंचुवांचें ॥ ४५ ॥ जें व्याघ्राचें क्षेत्र । जें पण्यांगनांचें मित्र । जें

१ भक्ति. २ निरुपायानें. ३ सशयात्मक अभिप्राय. ४ उपकार. ५ ॠणाचें ओझें. ६ उतराई. ७ सेवा. ८ ग्लानीचा. ९ संबंध. १० कवच. ११ थडगार. १२ स्थिर. १३ माझ्या भक्तास. १४ वरचा. १५ धुरळा. १६ भगवत्प्राप्तीची वासना. १७ ऐक्याचा. १८ याशिवाय. १९ उदकांत. २० सत्ता. २१ प्रतिबिंब. २२ चांदणें. २३ अशा निदिध्यासानें जे नित्ययुक्त आहेत. २४ बाग. २५ आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक एतद्रूप अग्नीची. २६ शेगडी, २७ मृत्युरूप कावळ्याला.

उपासना केली तिचा काय उपयोग ? २७ हें पहा कीं, संकटाच्या वेळीं एखादा गरीब मनुष्यानेंही मोठ्या काकुळतीनें 'देवा, धावरे धाव' म्हणून माझा धावा केला, तर त्याचें दुःख निवारण करण्याकरितां मला जावें लागत नाहीं काय ? २८ आणि माझे जे भक्त आहेत, त्यांची जर तीच दशा झाली तर त्यांनीं मग माझ्या भक्तीचे श्रम तरी कां करावे ? म्हणून अशा संशयात्मक अभिप्रायाचें नांव देखील काढूं नको. २९ ते ज्या वेळीं स्मरण करितात त्या वेळींच त्यांच्या स्मरणाबरोबर मी त्यांना पावतों. ( ते माझी भक्ति करितात ) हें देखील मला सहन करवत नाही. १३० अशा प्रकारें आपण ऋणी झालों आहों हें पाहून, त्यांतून उतराई होण्याकरिता मी आपल्या भक्ताच्या अंतकाळीं त्याची सेवा करतों. ३१ देहाच्या ग्लानीचा संबंध माझ्या त्या सुकुमार भक्ताला लागूं नये म्हणून मी त्याला आत्मबोधरूपी पिंजऱ्यात ठेवितों; ३२ त्या पिंजऱ्यावर माझ्या स्मरणाची थंडगार अशी सावली करतों; आणि अशा प्रकारें, ज्यांची बुद्धि नेहमीं मजकडे स्थिर असते त्याना मी आपल्या स्वरूपीं आणितों. ३३ म्हणून, देहाच्या अंतकाळचें दुःख माझ्या भक्तांस कधींही होत नाहीं, व माझा जो भक्त आहे त्याला मी सुखानें आपल्याकडे आणतों. ३४ आत्म्यावरील देहरूप गवसणी काढून व त्यांतला अहंकाररूप धुरळा झाडून केवळ भगवत्प्राप्तीच्या वासनेनें त्याला मद्रूप करतों; ३५ आणि भक्तालाही देहाचे ठिकाणीं प्रेम नसल्यामुळें, त्याचा त्याग करतांना, त्याची व आपली ताटातूट होते असें वाटत नाहीं. ३६ कारण, देहाच्या अंतसमयीं भगवतांनीं पावावें आणि आपलेजवळ न्यावें, असेंही त्यांच्या मनांत येत नाहीं; कां कीं, ते पूर्वीच मद्रूप झालेले असतात. ३७ याशिवाय त्यांचें जें शरीर राहिलें, त्या शरीररूप पाण्यात आत्मा असतो खरा; परंतु तो सावलीप्रमाणें मिथ्या आहे. ज्याप्रमाणें चांदणें जरी बाहेर पसरलेले दिसतें तरी खरोखर पाहूं गेले असतां तें चंद्राचेच ठिकाणीं आहे. ३८ असे जे माझें नेहमीं स्मरण करणारे आहेत, त्यांना मी नेहमीं जवळच आहें. म्हणून ते मरणानंतर निश्चयानें मद्रूप होतात. ३९ मग, जें ( शरीरं ) क्लेशरूप झाडाचें बन, जें तापत्रयरूप अग्नीची शेगडी, जें मृत्युरूप कावळ्यास बळी दिलें आहे, १४० जें दैन्य वाढवितें, जें मृत्यूचे भय वाढविणारें, जें सर्व दुःखाचें पूर्ण भांडवल, ४१ जें वाईट बुद्धीचें मूळ, जें पूर्वजन्मींच्या वाईट कर्माचें फळ, जें भ्रांतीचें केवळ स्वरूपच, ४२ जें संसाराची बसण्याची जागा, जे अहंकारादि विकारांची बाग, जें सर्व व्याधींचें वाढलेलें ताटच होय; ४३ जें काळानें चघळून टाकलेली उष्टी खिचडी, जें आशेचें आंगबळ, जें स्वभावतः जन्ममरणाला ओल देणारें, ४४ जें भ्रांतीनें भरलेलें, जें वाईट कल्पनाचें ओतलेलें, किंबहुना विचवाचें पेवच होय; ४५ जें वाघाची जाळी, जें वेश्याचें मित्र म्हणजे मनाला वेश्याप्रमाणें मोह घालणारें, जें विषय

२८ बळी. २९ मृत्युभयाला. ३० पूर्ण. ३१ भ्रांतीचें. ३२ जेवण. ३३ खिचडी ३४ उष्टा. ३५ आगवळ. ३६ वाहती वाट. ३७ शेत. ३८ वेश्याचें.

विषयविज्ञानयंत्र[1] । सुपूजित[2] ॥ ४६ ॥ जें लावेचा कळवैळा[3] । निवालिया[4] विषोदकाचा गळोळा । जें विश्वासु[5] आंगवेळा[6] । संवचोराचा ॥ ४७ ॥ जें कोढियांचें खेंव[8] । जें काळसर्पाचें मार्दव[9] । गोरियेचें[10] स्वभाव । गायन जें ॥ ४८ ॥ जें वैरियाचा पाहुणेर[11] । जें दुर्जनाचा आदर । हें असो जें सागर । अनर्थाचा ॥ ४९ ॥ जें स्वप्नीं देखिलें स्वप्न । जें मृगजळें सासिन्नलें वन । जें धूम्ररजांचें गगन । ओतलें आहे ॥ १५० ॥ ( २९०. भक्ताला पुन्हा शरीरप्राप्ति नाही, १५१-१५३ ) ऐसें जें हें शरीर । तें ते न पवतीचि पुढती नर । जे होऊनि ठेले अपार । स्वरूप माझें ॥ ५१ ॥

आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन । मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥

अन्वयः—अर्जुन, आब्रह्मभुवनात् ( सर्वे ) लोकाः पुनरावर्तिनः ( सन्ति ); कौंतेय, मा उपेत्य तु पुनः जन्म न विद्यते ॥ १६ ॥

येऱ्हवीं ब्रह्मपणाचिये भेंडसे । न चुकतीचि पुनरावृत्तीचे वेळसे । परि निवटेलियाचें जैसें । पोट न दुखे ॥ ५२ ॥ नातरी चेइलियांनंतरें । न बुडिजे स्वप्नींचेनि महापुरें । तेवीं मातें पावले ते संसारें । लिंपतीचि नाँ ॥ ५३ ॥ ( २९१. अहोरात्रविदाचे लक्षण, १५४-१५९ ) येरवीं जगदाकाराचें सिरें[19] । जें चिरस्थायियांचें[20] धुरे[21] । ब्रह्मभुवन गा चवरे[22] । लोकाचळाचें[23] ॥ ५४ ॥ जिये गांवींचा[24] पहार[25] दिवोवरी[26] । एका अमरेंद्राचें आयुष्य न धरी[27] । विळोनि[28] [29]पांतीं उठी एकसरी । चवदा जणांची ॥ ५५ ॥

सहस्रयुगपर्यंतमहर्यद् ब्रह्मणो विदुः । रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥

अन्वयः—यत् ते अहोरात्रविदः जनाः सहस्रयुगपर्यंतम् ब्रह्मणः अहः, तां युगसहस्रां रात्रिं ( च ) विदुः ॥ १७ ॥

जें चौकडियां सहस्र जाये । तें ठायेठांवो विळेचि होये । आणि तैसेंचि सहस्रवरियें पाहें । राती जेथ ॥ ५६ ॥ येवढें अहोरात्र जेथींचें । तेणें न लोटती[33] जे भाग्याचे । देखती ते स्वर्गींचे । चिरंजीव ॥ ५७ ॥ येरां सुरगणांची नैवाई । विशेष सांगावी तेथ काई । सुदल इंद्राचीचि दशा पाहीं । जे दिहाचे चौदा ॥ ५८ ॥ परि ब्रह्मयाचियाहि आठां प्रहरांतें । आपुलिया डोळां देखते । जे आहाति गा तयांतें । अहोरात्रविद[36] म्हणिजे ॥ ५९ ॥

अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे । राञ्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥
भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते । राञ्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥

१ विषयाच्या माहितीचें. २ उत्तम. ३ दयेचें ठिकाण. ४ घोट. ५ बळकट. ६ स्नेहभावानें वागणाऱ्या चोराचा. ७ कोडानें ग्रस्त झालेल्याचें. ८ आलिंगन. ९ मऊपणा. १० पारध्याचें. ११ साहजिक. १२ धुराच्या परमाणूंचें १३ घमेंड. १४ फेरे. १५ मेलेल्याचें. १६ जागें झाल्यावर. १७ लिप्त होत नाहींत. १८ चौदा भुवनांचें. १९ शिखर. २० ( सप्त ) चिरंजीवांचें २१ मुख्य. २२ मस्तक. २३ त्रैलोक्यरूप पर्वताचें. २४ ज्या ब्रह्मलोकरूप गावाचा. २५ प्रहर. २६ एक दिवस.

जाणण्याचें उत्तम यंत्रच होय; ४६ जें जखिणीच्या दयेचें ठिकाण, व विषयरूपी थंड पाण्याचा घोंट, जें स्नेहभावानें वागणाऱ्या चोराच्या बळकट विश्वासाप्रमाणें होय; ४७ जें कोडानें ग्रस्त झालेल्या मनुष्याचें आलिंगन, जें महाविषारी सर्पाच्या अंगाप्रमाणें मऊ, जें पारध्याच्या साहजिक गायनाप्रमाणें मधुर, ४८ जें वैऱ्याच्या पाहुणचाराची मेजवानी, जें दुर्जनांनीं केलेलें आगतस्वागत, फार काय सांगावें ? जें अनर्थाचा समुद्रच होय, ४९ जें स्वप्नांत पडलेलें स्वप्न, जें मृगजळाचें तयार झालेलें वन, व जें धुराच्या रजांनीं भरलेलें आकाश, १५० तें हें शरीर, मद्रूप होऊन राहिलेल्या पुरुषांना पुनः प्राप्त होत नाहीं. ५१

श्लोकार्थः—हे अर्जुना, ब्रह्मलोकापर्यंत जे सर्व लोक, त्यांना उत्पत्ति व विनाश आहे; परंतु हे कौंतेया, माझी प्राप्ति झाल्यावर मात्र पुनः जन्म नाहीं ॥ १६ ॥

येरव्हीं, ब्रह्मपणाची घमेंड असणाऱ्यांना सुद्धा ( ब्रह्मदेवाला सुद्धां ) पुनर्जन्माचे फेरे चुकत नाहींत; परंतु मेलेल्या मनुष्याचें जसें पोट दुखत नाहीं, ५२ किंवा जागृत झाल्यावर जसें स्वप्नांतल्या महापुरांत कोणी बुडत नाहीं, त्याप्रमाणें जे माझ्याप्रत पावले, ते संसारानें लिप्त होत नाहींत. ५३ येरव्हीं, चौदा भुवनांचें जें शिखर, जें सप्तचिरंजीवांमध्यें अग्रभागीं असणारें, व त्रैलोक्यरूप पर्वताचें मस्तक जें ब्रह्मभुवन, ५४ ज्या ब्रह्मलोकाच्या एक प्रहर दिवसापर्यंत एका इंद्राचें आयुष्य टिकत नाहीं, व एका दिवसांत एकदम चौदा इंद्रांचा निकाल लागतो; ५५

श्लोकार्थः—कां कीं, चार युगें सहस्र वेळा गेलीं असतां जो काळ जातो तो ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो आणि त्यानंतर तितकाच काळपर्यंत ब्रह्मदेवाची रात्र येते, असें ते दिवस व रात्र जाणणारे लोक जाणतात ॥ १७ ॥

चार युगें हजार वेळां जातील, तेव्हां ब्रह्मदेवाचा खरोखर पुरा एक दिवस होतो; आणि तशीच हजार चौकड्यांची जेथें रातही आहे. ५६ एवढा दिवस व रात्र जेथें आहे, तेथें जे भाग्यवान पुरुष आहेत, ते मरत नाहींत व त्या दिवसरात्री पाहातात. ते स्वर्गलोकींचे चिरंजीव होत. ५७ येरव्हीं, जेथें मुदलीं इंद्राचीच दशा अशी आहे कीं, एका दिवसांत चौदा इंद्र होतात, तेथें देवगणांची काय प्रतिष्ठा वर्णन करावी ? ५८ परंतु ब्रह्मदेवाच्याही आठ प्रहरांला जे आपल्या डोळ्यांनीं पाहतात, त्यांना ( ब्रह्मदेवाचे ) दिवस व रात्र जाणणारे असें म्हणतात. ५९

श्लोकार्थः—दिवस आला म्हणजे अव्यक्तापासून सर्व व्यक्तींचा उदय होतो, आणि रात्र आली म्हणजे त्याच अव्यक्तामध्यें त्याचा लय होऊन जातो. ॥ १८ ॥ हे पार्था, तोच सर्व चराचर वस्तूंचा हा परतंत्र असा समुदाय पुनः पुनः उत्पन्न होऊन रात्र येतांच लय पावतो, आणि दिवस येतांच पुनः उत्पन्न होतो ॥ १९ ॥

---

२७ टिके. २८ एकदम एका दिवसांत. २९ पंक्ति. ३० चार युगांची एक चौकडी. ३१ वास्तविक. ३२ ब्रह्मदेवाचा पुरा दिवस. ३३ मरती. ३४ प्रतिष्ठा. ३५ एका दिवसांत. ३६ ( ब्रह्मदेवाचा ) दिवस व रात्र जाणणारे.

अन्वयः—अहरागमे सर्वाः व्यक्तयः अव्यक्तात् प्रभवंति; ( पुनः ) राञ्यागमे तत्र अव्यक्त संज्ञके एव प्रलीयंते ॥ १८ ॥ पार्थ, स. एव अयं भूतग्रामः अवशः ( सन् ) राञ्यागमे भूत्वा भूत्वा प्रलीयते ( पुनः ) अहरागमे प्रभवति ॥ १९ ॥

( २९२. ब्रह्मदेवाचें अहोरात्र, १६०–१६५ ) तये ब्रह्मभुवनीं दिवसें पाहे। ते वेळीं गणना केंही[1] न समाये। ऐसें अव्यक्ताचें होये। व्यक्त[3] विश्व ॥ १६० ॥ पुढती देहाची चौपाहारी फिटे। आणि हा आकारसमुद्र[2] आटे। पाठीं तैसाचि मग पाहांटे। भरों लागे ॥६१॥ शारदीयेचिये[5] प्रवेशीं। अभ्रें जिरती आकाशीं। मग ग्रीष्मांतीं[6] जैशीं। निगती पुढती[7] ॥ ६२ ॥ तैसी ब्रह्मदिनाचिये आदी[8]। हे भूतसृष्टीची मांदी[9]। मिळे जंव सहस्रावधी[10]। निमित्त पुरे ॥ ६३ ॥ पाठीं रात्रीचा अवसरु होये। आणि विश्व अव्यक्तीं लया जाये। तोही युगसहस्र मोटका पाहे। आणि तैसेंचि रचे ॥ ६४ ॥ हें सांगावया काय उपपत्ती। जे जगाचा प्रळयो आणि संभूती। इये ब्रह्मभुवनींचिया होती। अहोरात्रामाजीं ॥ ६५ ॥ ( २९३. ब्रह्मदेव पुनरावृत्तीच्या मापाची शीग आहे, १६६–१७४ ) केसें थोरियेचें[11] मानें पाहें पां। तो सृष्टिबीजाचा सांठोपा। परि पुनरावृत्तीचिया मापा। शीग जाहाला ॥ ६६ ॥ येऱ्हवीं त्रैलोक्य हें धनुर्धरा। गा तियें[12] गांवींचा पसारा। तो हा दिनोदयीं एकसरां। मांडतु असे ॥ ६७ ॥ पाठीं रात्रीचा समो पावे। आणि अपैसाचि सांटवे। म्हणिये जेथींचें तेथ स्वभावें। साम्यासि ये ॥ ६८ ॥ जैसें वृक्षपण बीजासि आलें। कीं मेघ हे गगन जाहालें। तैसें अनेकत्व जेथ सामावलें। ते साम्य म्हणिपे ॥ ६९ ॥

परस्तस्मात्तु भावोऽन्यो व्यक्तोऽव्यक्तात्सनातनः।
यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥

अन्वयः—यः तु सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति, तस्मात् अव्यक्तात् अन्यः अव्यक्तः परः सनातनः भावः ( अस्ति ) ॥ २० ॥

तेथ समविषम न दिसे कांहीं। म्हणोनि भूतें ही भाष नाहीं। जेविं दुधचि जाहालिया दहीं। नामरूप जाय ॥१७०॥ तेविं आकारलोपासरिसें। जगाचें जगपण भ्रंशे। परि जेथें[13] जाहालें तें जैसें। तैसेंचि असे ॥ ७१ ॥ तें तया नांव सहज अव्यक्त। आणि आकारा ये तेंचि व्यक्त। हें एकास्तव एक सूचित। येऱ्हवीं दोनी नाहीं ॥ ७२ ॥ जैसें आटलिया रुपें। आटलेंपण ते खोटी म्हणिपे। पुढती तो घनाकारु हारपे। जे वेळीं अळंकार होती ॥ ७३ ॥ हीं दोन्ही जैशीं होणीं। एकीं साक्षीभूत सुवर्णीं। तैसी व्यक्ताव्यक्ताची कडसणी। वस्तूच्या ठायीं ॥७४॥ ( २९४. अक्षरब्रह्माच्या आश्रयावर ब्रह्मदेवाचे होणें जाणें, १७५-१९१ )

१ कोठेंही. २ निराकाराचें. ३ साकार. ४ अपार चराचर. ५ शरत्कालाचे. ६ ग्रीष्म ऋतूचे शेवटीं. ७ पुनः. ८ आरंभीं. ९ समुदाय. १० चार युगें हजार वेळा जात तोंपर्यंत.

त्या ब्रह्मदेवाचा दिवस ज्या वेळेस उगवतो, त्या वेळेस निराकाराचें साकार विश्व अशा रीतीनें उत्पन्न होतें कीं, त्याची मोजदाद करवत नाहीं. १६० पुढें त्या दिवसाचे चार प्रहर संपल्यावर हें विश्व नाहींसें होतें; आणि पुनः पहांट झाली म्हणजे पहिल्या-प्रमाणें भरूं लागतें. ६१ शरत्कालाच्या आरंभीं आकाशांतील अभ्रें नाहींतशीं होतात, आणि तींच पुनः ग्रीष्मऋतूचे शेवटीं जशीं उत्पन्न होतात, ६२ त्याचप्रमाणें, ब्रह्मदेवाच्या दिवसाचे आरंभीं ह्या भूतसृष्टीचा समुदाय एकत्र होतो, व तो चार युगें हजार वेळ जात तोंपर्यंत असतो. ६३ मागाहून ब्रह्मदेवाचे रात्रीचा समय झाला असता हें विश्व निराकारात लय पावतें, तेंही पूर्वोक्त काल गेल्यावर उदय काळीं पूर्ववत् होतें. ६४ अशा रीतीनें विश्वाची रचना होते. हें सांगण्याचा कोणता उद्देश म्हणशील, तर या ब्रह्मदेवाच्या दिवसांत आणि रात्रींत जगाची उत्पत्ति आणि लय होतो. ६५ त्याच्या थोरपणाची योग्यता कशी आहे म्हणून पाहूं गेलें तर, तो ब्रह्मदेव सृष्टीच्या बीजाचें भांडार आहे, पण तोही जन्ममरणाला अग्रेसर झाला. ६६ हे धनुर्धरा, येरव्ही हीं त्रैलोक्यसृष्टि सत्य-लोकाचा पसारा असून, ब्रह्मदेवाचा दिवस उगवण्याबरोबर हा एकसारखा मांडला जातो. ६७ मागाहून रात्रीचा समय झाला असतां तो आपोआप अव्यक्तांत लय पावतो, व हें पंचभूतादिक ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें सहज जेथल्या तेथें लय पावतें. ६८ ज्याप्रमाणें झाड हें बीजरूपांत सामावतें, किंवा मेघ हे आकाशांत लीन होतात, त्याप्रमाणें, ज्या ठिकाणीं पुष्कळ वस्तूंचा समावेश होतो, त्याला ' साम्य ' असें म्हणतात. ६९

श्लोकार्थः—सर्व चराचराचा नाश झाला असतांही जो नाश पावत नाहीं, तो त्या अव्यक्ताहून पलीकडे असलेला अव्यक्त व अविनाशी असा दुसरा भाव आहे ॥ २० ॥

त्या साम्यांत न्यूनाधिक कांहीं दिसत नाही, म्हणून तें भूत हें नाव पावत नाहीं. ज्याप्रमाणें दुधाचें दही झाल्यावर त्याचें (दुधाचें) नांव व रूप ही नाहींतशीं होतात, १७० त्याप्रमाणें, आकाराचा नाश झाल्याबरोबर जगाचें जगपण नाहींसें होतें; परंतु ज्यापासून हें झालें आहे, त्या ठिकाणीं तें जसेंच्या तसेंच असतें, ७१ तेव्हांच त्याला 'अव्यक्त' असें म्हणतात आणि साकार होतें त्यालाच 'व्यक्त' म्हणतात. हीं एकाला एक दाखविणारीं आहेत, परंतु पाहूं गेलें असतां दोन्ही नाहींत. ७२ ज्याप्रमाणें रुपें आटल्यावर त्या आकाराला लगड म्हणतात, पुढें त्याचे दागिने बनल्यावर ती लगड नाहींशी होते; ७३ हीं दोन्ही रूपांतरें जशीं एका रुप्यावरच होतात, त्याचप्रमाणें, व्यक्त व अव्यक्त हे दोन्ही विकार ब्रह्माच्याच ठिकाणीं होतात. ७४ तें ब्रह्म तर व्यक्त नाहीं आणि अव्यक्तही नाहीं, उत्पन्न होत

११ समय. १२ लख्खन; थोडासा उजेड होतो. १३ उद्देश. १४ उत्पत्ति. १५ महत्त्वाचें; थोरपणाचें. १६ योग्यता. १७ साठवण. १८ सत्यलोकींचा. १९ आपोआपच; स्वाभाविक रीत्या. २० समान अवस्थेस. २१ मूळ रूपास येणें. २२ कमजास्त. २३ ज्या अव्यक्ताचे ठायीं. २४ लगड २५ घट्टपणा. २६ रुप्यात (सु=चांगला वर्ण ज्याचा). २७ साकार निराकाराचा. २८ विचार. २९ ब्रह्माच्या.

तें तरी व्यक्त ना अव्यक्त । नित्य ना नाशवंत । या दोहीं भावां अतीत । अनादिसिद्ध ॥ ७५ ॥ जें हें विश्वचि होऊनि असे । परि विश्वपण नासिलेनि न नासे । अक्षरें पुसिलिया न पुसे । अर्थु जैसा ॥ ७६ ॥ पाहें पां तरंग तरी होत जात । परि तेथ उदक तें अखंड असत । तेवीं भूताभावीं न नाशत । अविनाश जें ॥ ७७ ॥ नातरी आटतिये अळंकारीं । नाटतें कनक असे जयापरी । तेवीं मरतिये जीवाकारीं । अमर जें आहे ॥ ७८ ॥

अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।
यं प्राप्य न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥
पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।
यस्यांतःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥

अन्वयः--यः अव्यक्तः भावः अक्षरः इति उक्तः, तं परमां गतिं आहुः; ( ज्ञानिनः ) यं प्राप्य न निवर्तंते, तत् मम परमं धाम ( अस्ति ) ॥ २१ ॥ पार्थ, भूतानि यस्य अंतःस्थानि ( संति ) येन इदं सर्वं ततम्, सः परः पुरुषः तु अनन्यया भक्त्या लभ्यः अस्ति ॥ २२ ॥

जयातें अव्यक्त म्हणों ये कोडें[2] । म्हणतां स्तुति हे ऐसें नावडे । जे मनबुद्धी न सांपडे । म्हणऊनियां ॥ ७९ ॥ आणि आकारा आलिया जयाचें । निराकारपण न वेंचे । आकारलोपें न विसंचें[4] । नित्यता गा ॥ १८० ॥ म्हणोनि अक्षरें जें म्हणिजे । तेवींचि म्हणतां बोधुही उपजे । जयापरौता पैसु[6] न देखिजे । या नाम परमगती[7] ॥ ८१ ॥ परि आघवा इहीं देहपुरीं । आहे निजेलियाचे परी । जे व्यापारु करवी ना करी । म्हणऊनियां ॥ ८२ ॥ येऱ्हवीं जे शारीरचेष्टा । त्यामाजीं एकीही न ठके[8] गा सुभटा । दाही इंद्रियांचिया वाटा । वाहताचि आहाती ॥ ८३ ॥ उकलूनि[9] विषयांचा पेठीं[10] । होत मनाचा चोहटा[11] । तो सुखःदुखाचा रांजवांटा । भीतरैराहि पावे ॥ ८४ ॥ परि रावो पहुडलियाँ सुखें । जैसा देशींचा व्यापारु न ठके । प्रजा आपुलालेनि अभिलोखें । करितीच असती ॥ ८५ ॥ तैसें बुद्धीचें हन जाणणें । कां मनाचें घेणें देणें । इंद्रियांचें करणें । स्फुरण वायूचें ॥ ८६ ॥ हे देहक्रिया आघवी । न करितां होय बरवी । जैसा न चलवितेनि रवी । लोकु चाले ॥ ८७ ॥ अर्जुना तयापरी । सुँतला ऐसा आहे शरीरीं । म्हणोनि पुरुषु गा अवधारीं । म्हणिपे जयातें ॥ ८८ ॥ आणि प्रकृति-पतिव्रते । पडिला एकपत्नीव्रतें । येणेंही कारणें जयातें । पुरुषु म्हणों ये ॥ ८९ ॥ पैं वेदाचें वैहुवसपण । देखेचिना जयाचें आंगण । हें गगनाचें पांघरुण । होय देखा ॥ १९० ॥ ऐसें जाणूनि योगीश्वर । जयातें म्हणती परात्पर । जें अनन्यगतीचें घर । गिंवसीतें[12] ये ॥ ९१ ॥ ( २९५.

८ १ भूतें नाहींतशीं झालीं असतां. २ कौतुकानें. ३ जात नाहीं. ४ बिघडे. ५ नाश न पावणारें. ६ विस्तार, ठिकाण. ७ ब्रह्मप्राप्ति. ८ रहात नाहीं. ९ उघडून. १० बाजार. ११ चव्हाटा. १२ मुख्य

नाहीं आणि नाश पावत नाहीं; परंतु या दोन्ही स्थितींच्या पलीकडलें अनादिसिद्ध असें आहे. ७५ तें ब्रह्म विश्वाकार होऊन राहतें, परंतु विश्वपण लयाला गेलें तरी तें लय पावत नाही. ज्याप्रमाणें अक्षरें पुसून टाकलीं तरी त्यांचा अर्थ पुसला जात नाहीं. ७६ पहा कीं, उदकावर तरंग येतात व जातात. परंतु उदक हें कायमच असतें. त्याप्रमाणें, भूतें नाहींतशीं झालीं असतां अविनाशी परब्रह्म नाश पावत नाहीं. ७७ किंवा अलंकार आटल्यावर सोनें जसें आटलें जात नाहीं, त्याप्रमाणें मृत्यु पावणाऱ्या शरीरांत जें अमर आहे; ७८

श्लोकार्थः—जो अव्यक्त भाव, त्यालाच अक्षर असें म्हटलें आहे. त्यालाच परम गति म्हणतात. ज्ञानी जेथें प्राप्त झाले असता पुनः मागें येत नाहींत, तें हें माझें परमधाम होय ॥ २१ ॥ पार्था, ज्याच्या आंत ह्या सर्व भूताचा समावेश होतो, आणि ज्यानें हें सर्व जग व्यापलें आहे, तो परमपुरुष अनन्यभक्तीनेंच प्राप्त होतो ॥ २२ ॥

ज्याला कौतुकानें अव्यक्त म्हटलें असता त्याची स्तुति केली असें वाटत नाहीं; कारण जें मन व बुद्धि यांना सांपडत नाहीं; ७९ जें आकाराला आलें असतांही ज्याचें निराकारपण जात नाहीं, व आकाराचा नाश झाला असतां ज्याची नित्यता बिघडत नाहीं, १८० म्हणून ज्याला 'अक्षर' म्हणतात, त्याचा अक्षर म्हणण्यांतच बोध उत्पन्न होतो. याच्या पलीकडे कशाचाही विस्तार दिसत नाहीं, आणि याचेंच नांव 'परमगति. ८१ परंतु तें या शरीरांत व्यापून राहिलेलें असून निजल्याप्रमाणें आहे. का कीं, तें व्यापार करवीत नाहीं व करीतही नाहीं. ८२ हे महावीरा अर्जुना, येरव्हीं शरीराच्या सर्व व्यापारात एकही व्यापार रहात नाहीं; दहाही इंद्रियांचे व्यापार चालूच आहेत. ८३ विषयरूप बाजार उघडून मनाच्या चव्हाट्यावर व्यापार सुरू झाल्यावर, त्यापासून होणाऱ्या सुखदुःखांचा मुख्य हिस्सा अंतर्यामींही प्राप्त होतो. ८४ परंतु राजा सुखानें निजला असतां ज्याप्रमाणें त्याच्या राज्यांतील व्यापार रहात नाहींत, प्रजा आपआपल्या (प्राप्तीच्या) इच्छेनें व्यापार करीतच असते, ८५ त्याप्रमाणें, बुद्धीचें जाणणें किंवा मनाचें देणेंघेणें, इंद्रियांचें करणें, व प्राणवायुचें स्फुरण पावणें ८६ हे सर्व देहव्यापार त्यानें न करवितां आपोआपच होतात. ज्याप्रमाणें सूर्यानें न चालवितां लोकत्रय चालतें, ८७ त्याप्रमाणें, अर्जुना, तो शरीरात स्वस्थ आहे, म्हणून त्याला पुरुष म्हणतात असें समज; ८८ आणि मायारूप पतिव्रतेच्या एकपत्नीव्रतात पडल्यामुळें हा पुरुष हें नाव पावला आहे. ८९ परंतु वेदाच्या ज्ञानदृष्टीच्या महत्त्वाला ज्याचें आंगणही दृष्टीस पडत नाहीं, व ज्याच्यांत आकाशाचा समावेश झाला आहे, १९० असें जाणूनच योगिजन त्याला परात्पर म्हणतात. तो एकनिष्ठ भक्तांचा शोध करीत त्याचे घरीं येतो. ९१ जो एकनिष्ठ भक्त कायावाचामनेंकरून दुसरें कांहीं जाणत

हिस्सा. १३ अंतर्यामीं. १४ निजला असता. १५ इच्छेनें १६ प्राणवायूचें. १७ स्वस्थ असणें. १८ ज्ञानदृष्टीचें महत्व. १९ व्यापक. २० जीव व प्रकृति याच्या पलीकडला. २१ एकनिष्ठतेचें, २२ शोधीत.

भक्त भक्तीच्या योगानें अक्षर ब्रह्माला जाणून परम पदाला प्राप्त होतात, १९२–२०३)
जे तनू वाचा चित्तें । नाइकती दुजिये गोष्टीतें । तयां एकनिष्ठेचें पिकतें । सुक्षेत्र जें ॥ ९२ ॥ हें त्रैलोक्याचि- पुरुषोत्तमु । ऐसा साचा जयाचा मनोधर्मु । तया आस्तिकाचा आश्रमु । पांडवा गा ॥ ९३ ॥ जें निर्वाणींचें गौरव । जें निर्गुणाची जाणीव । जें सुखाची राणीव । निराशासी ॥ ९४ ॥ जें संतोषियां वाढिलें ताट। जें अचिंता अनाथाचें मायपोट । भक्तीसी उजू वाट । जया गांवा ॥ ९५ ॥ हें एकैक सांगोनि वायां । काय फार करूं धनंजया । पैं गेलिया जया ठाया । तो ठावोचि होइजे ॥ ९६ ॥ हिंवाचिया झुळुका । जैसें हिंवचि पडे उष्णोदका । कां सामोर जालिया अर्का । तमचि प्रकाशु होय ॥ ९७ ॥ तैसा संसार जया गांवा । गेलासांतां पांडवा । होऊनि ठाके आघवा । मोक्षाचाचि ॥ ९८ ॥ तरि अग्नीमाजि आलें । जैसें इंधनाचि अग्नि जहालें । पाठीं न निवडेचि कांहीं केलें । काष्ठपण ॥ ९९ ॥ नातरी साखरेचा मैंघौता । बुद्धिमंतपणेंही करितां । पुरि ऊंस नव्हे पंडुसुता । जियापरी ॥ २०० ॥ लोहाचें कनक जहालें । हें एके परिसेंचि केलें । आतां आणिक कैंचें तें गेलें । लोहत्व आणी ॥ १ ॥ म्हणोनि तूप होऊनि माघौतें । जेवीं दूधपण न येचि निरुतें[13] । तेविं पावोनियां जयातें । पुनरावृत्ति नाहीं ॥ २ ॥ तें माझें परम । साचोकारें निजधाम । हें अंतवट तुज वर्म । दाविजत असे ॥ ३ ॥

यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः । प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ २३

अन्वयः—भरतर्षभ, यत्र काले प्रयाताः योगिनः अनावृत्तिं च आवृत्तिं यांति, तं काल वक्ष्यामि ॥ २३ ॥

(२९६. उत्तरायण-मार्ग, २०४–२२५) तेवींचि आणिकेंही एके प्रकारें । हें जाणतां आहे सोपारें[15] । तरि देह सांडितेनि अवसरें । [16]जेथें मिळती योगी ॥ ४ ॥ अथवा अवचटें ऐसें घडे । जे अनवसरें देह सांडे । तरि माघौतें येणें घडे । देहासीचि ॥ ५ ॥ म्हणोनि कौळशुद्धी जरी देह ठेविती । तरी [20]ठेवितखेंवों ब्रह्मचि होती । एरवीं अकाळीं तरी येती । संसारा पुढती ॥६॥ तैसें सायुज्य आणि पुनरावृत्ती । या दोन्ही अवसरा आहाती । तेचि अवसरु तुजप्रती । प्रसंगें सांगों ॥७॥ तरि ऐकें गा सुभटा । पातलिया मरणाचा मौजिवटा । [24]पांचै आपुलिया वाटा । निघती अंतीं ॥ ८ ॥ ऐसा वरि वैरिपडिला प्रयाणकाळीं । बुद्धीतें भ्रम न गिळी । स्मृति नव्हे आंधळी । न मरे मन । ॥९॥ हा चेतनावर्गु आघवा । मरणीं दिसे टवटवा । परि अनुभविलिया ब्रह्मभावा । गवसणी होउनी ॥ २१० ॥ ऐसा सावध हा सर्मवावो । आणि निर्वाणवेन्हीं [30]निर्वाहो । हें तरीच घडे सौवावो । अग्नीचौ आथी॥११॥

---

१ उत्तम शेत. २ भगवद्रूप. ३ महत्त्व. ४ ज्ञान. ५ राज्य. ६ चितारहित. ७ शरणागताचें. ८ सूर्य. ९ अज्ञान व त्याचें कार्य जग. १० असता. ११ पुनः. १२ दुसरा परीस. १३ निश्च-

नाहीं, त्याच्या एकनिष्ठेचें पीक देणारें तें उत्तम शेत होय. ९२ हे पांडवा, हें त्रैलोक्य भगवद्रूप आहे असा खरोखर ज्यांचा मनोभाव आहे, त्या भक्तांचा हा आश्रमच होय. ९३ जें निरभिमान्यांचें वैभव, जें गुणातीतांचें ज्ञान, व जें निस्पृहाचें सुखोपभोग घेण्याचें स्थान ( राज्य ), ९४ जें संतोषी जनांचें जेवण, जें संसाराची चिंता न करणाऱ्या शरणागताचें मायपोट व जें भक्तीनें चालणाराला मोक्षरूपी गावांची सरळ वाट. ९५ धनंजया, असें एकेक सांगून उगीच किती वर्णन करूं? परंतु ज्या ठिकाणीं गेलें असतां मनुष्य तद्रूपतेला पावतो. ९६ थंडीच्या झुळकेनें जसें ऊन पाणी थंड होतें, किंवा सूर्य समोर आल्यावर अंधारच प्रकाशरूप होतो, ९७ त्याप्रमाणें पांडवा, अज्ञान व त्याचें कार्य जग ज्या गांवाला गेलें असतां आपणच मोक्ष होऊन रहातें. ९८ तसेंच इंधन विस्तवांत घातलें असतां विस्तवच होऊन रहातें, व मागून निवडूं गेलें असतां त्याचें लाकूडपण दृष्टीस पडत नाहीं; ९९ किंवा, पंडुसुता, ज्याप्रमाणें साखर झाल्यावर पुनः चातुर्यानें तिचा ऊंस करितां येत नाहीं, २०० लोखंडाचें एका परिसानें सोनें बनलें, नंतर कोणता दुसरा असा दगड आहे, कीं त्याचें गेलेलें लोखंडपण परत आणील? १ म्हणून, तुपाचें ज्याप्रमाणें पुनः खरोखर दूध होत नाहीं, त्याप्रमाणें, ज्याप्रत गेलें असतां पुनः जन्म नाहीं, २ तें माझें खरोखर उत्तम ठिकाण होय. हें गुह्य वर्म तुला स्पष्ट करून सांगितलें आहे. ३

श्लोकार्थः—हे भरतश्रेष्ठा, ज्या कालीं योगी मरण पावले असतां पुनः जन्माला येत नाहींत आणि येतात, तो काल मी तुला सांगतों ॥ २३ ॥

त्याचप्रमाणें, देहावसानानंतर ज्या स्वरूपाला योगी प्राप्त होतात, तें गुह्य वर्म आणखी एक प्रकारानें समजण्याला सोपें आहे. ४ अथवा अकस्मात् असें घडतें कीं, जे योगी अकालीं देह सोडतात, त्यांना पुनः देह धारण करावा लागतो. ५ म्हणून, शास्त्रोक्त शुद्ध कालीं जर देहाचें अवसान झालें, तर तत्क्षणीं ते योगी ब्रह्म होतात. येरव्हीं अकालीं देहावसान झाल्यावर पुनः जन्मास येतात. ६ त्याचप्रमाणें, मोक्ष व पुनर्जन्म हीं दोन्हीं कालाच्या स्वाधीन आहेत. अशा जो काल, तो प्रसंगानुसार तुला सांगतों. ७ तर हे महावीरा अर्जुना, ऐक. मरणकाल समीप आला असतां शेवटीं पंचमहाभूतें आपापल्या रस्त्यानें जातात. ८ असा मरणकाल प्राप्त झाला असतां बुद्धीला भ्रांति गिळीत नाहीं, स्मरणशक्ति अंधळी होत नाहीं, व मनही मरत नाहीं. ९ ज्यानें ब्रह्मभावाचा अनुभव घेतला आहे, तोच त्या ब्रह्माचा अंतर्यामीं उपभोग घेतो. म्हणून हा सगळा प्राणसमुदाय मरणसमयीं टवटवीत दिसतो. २१० अशा रीतीनें हा समुदाय सावध असतो; व ज्याला मरेपर्यंत इंद्रियांची मदत असते, असें सांह्य जठराग्नि प्रदीप्त असला म्हणजेच मिळतें. ११ पहा कीं,

यानें. १४ गुह्य; अंतर्यामींचें. १५ सोपें. १६ ज्या स्वरूपीं. १७ अकस्मात्. १८ अकालीं. १९ शास्त्रोक्त शुद्ध कालीं. २० तत्क्षणीं. २१ मोक्ष. २२ समय. २३ काल. २४ पंचमहाभूतें. २५ प्राप्त झालेल्या. २६ प्राणसमुदाय. २७ उपभोग घेतो. २८ समुदाय. २९ मरेपर्यंत. ३० मदत. ३१ बाह्य. ३२ जठराग्नींचा.

वाऱ्यानें किंवा पाण्यानें ज्या वेळेस दिव्याचा प्रकाश नाहींसा होतो, त्या वेळेस आपली दृष्टि विद्यमान असतांही तिला कांहीं दिसतें कां ? १२ त्याचप्रमाणें, देहावसानाच्या वेळेचा वात वाढल्यानें शरीर आंतबाहेर कफानें व्याप्त होतें, त्या वेळेस जठराग्नीचें तेज विझून जातें, १३ त्या वेळेस प्राणाला अवसान नसतें; मग बुद्धि असूनही काय करणार? म्हणून अग्नीशिवाय देहांत चेतना रहात नाहीं. १४ हें पहा, शरीरांतील जठराग्नि जर नाहींसा झाला, तर तो देह नसून ओला चिखलच होय. अशा वेळेस साधक आपल्या आयुष्याची वेळ अंधारांत शोधीत बसतो. १५ नंतर पाठीमागील सर्व गोष्टींचें मरतेसमयीं स्मरण होतें. मग देह टाकून स्वरूपाला मिळावें कसें ? १६ इतक्यांत त्या देहांतील कफाच्या चिखलांत चेतना बुडून गेल्यामुळें मागील व पुढील गोष्टींचें स्मरण नाहींसें होतें. १७ म्हणून पूर्वी जो योगाभ्यास केला तो मरण येण्याच्या आधीं नाश पावतो. ज्याप्रमाणें आपण ठेविलेली वस्तु दिवा हातांत घेऊन शोधण्याकरितां गेलें असतां ती दृष्टीस पडण्याच्या अगोदर दिवा जावा, त्याप्रमाणें. १८ आतां या सर्व गोष्टी राहूं दे; तूं हें समज कीं, ज्ञानाला जठराग्नि हा मूळ कारण आहे, आणि मरणसमयीं सर्व बळ त्या अग्नीचेंच असतें. १९

श्लोकार्थः—अग्नि, ज्योति, दिवस, शुक्लपक्ष व उत्तरायण या कालीं मरण पावलेले ब्रह्मवेत्ते लोक ब्रह्माला जाऊन मिळतात ॥ २४ ॥

शरीराच्या आंत जठराग्नीच्या ज्योतीचा प्रकाश, बाहेर शुक्ल पक्षाचा पंधरवडा असून उत्तरायणातील कोणत्याही महिन्यांपैकीं एक महिना, २२० अशा प्रकारें सर्व गोष्टींची तयारी असतां जे आपला देह ठेवितात, ते ज्ञानी ब्रह्मस्वरूपीं मिळतात. २१ धनुर्धरा, ऐक. या वेळेच्या योगाचें असें विलक्षण सामर्थ्य आहे, म्हणून मोक्षप्राप्तीकरितां स्वस्वरूपीं येण्यास हा सरळ मार्ग आहे. २२ या मार्गांत जठराग्नि ही पहिली पायरी होय; अग्नीचें सतेजपण ही दुसरी पायरी; दिवस ही तिसरी पायरी; शुक्लपक्ष ही चौथी पायरी असें समज; २३ आणि उत्तरायणातील सहा महिन्यांपैकीं एक महिना ही जिन्याची वरची पायरी, अशा क्रमानें गेल्यावर योगी मोक्षसिद्धिरूप घराला पावतो. २४ हा उत्तम काल असें समज, आणि याला अर्चिरादि मार्ग असें म्हणतात. आता मरण्यास अयोग्य काल कोणता तो प्रसंगानुसार तुला सांगतों, ऐक. २५

श्लोकार्थः—धूर, रात्र, तसाच कृष्णपक्ष व दक्षिणायन अशा समयीं मरण पावणारा योगी चंद्रलोकचे उपभोग भोगून पुढें न जाता परत येतो ॥ २५ ॥

मरणसमयीं कफवातादि दोषांच्या भरानें अंतःकरणात अंधार होऊन जातो; २६ सर्व इंद्रियांची गति कुंठित होते; स्मृतीला भ्रम उत्पन्न होतो; मन वेडावून प्राण घोटाळतो;

१३ मोक्षास. १४ पायरी. १५ तेजःपुंज; प्रखर. १६ जिना. १७ मोक्ष. १८ जठराग्नि सतेज असून प्राणोत्क्रमणाचा मार्ग. १९ वातकफ. २० भरानें. २१ गति कुंठित होते.

पाहा पां वारेनें कां उदकें । जैं दिवियाचें दिवेपण झांके । तैं [1]असतीच काय देखे । दिठी आपुली ॥ १२ ॥ तैसें देहांतींचेनि [2]विषमेंवातें । देह आंतबाहेरि [3]श्लेष्मातें । तैं विझोनि जाय [4]उंजितें । अग्नीचें जेव्हां ॥ १३ ॥ ते वेळीं प्राणासि प्राणु नाहीं । तेथ बुद्धि असोनि करील काई । म्हणोनि अग्नीवीण देहीं । चेतना न थारे ॥१४॥ अगा देहींचा अग्नि जरी गेला । तरी देह नव्हे चिखल वोला । वायां आयुष्यवेळ आपुला । आंधारें [5]गिंवसी ॥ १५ ॥ आणि मागील स्मरण आघवें । तें तेणें अवसरें सांभाळावें । मग देह त्यजूनि मिळावें । स्वरूपीं कीं ॥ १६ ॥ तंव तया देहश्लेष्माचे चिखलीं । चेतनाचि बुडोनि गेली । तेथ मागिली पुढिलीहि ठेली । आठवण ॥ १७ ॥ म्हणोनि आधीं अभ्यासु जो केला । तो मरण न येतां [7]निमोनि गेला । जैसें ठेवणें न दिसतां मालवला । दीपु हातींचा ॥ १८ ॥ अवतरण.—आतां असो हें सकळ । जाण पां ज्ञानासि अग्नि मूळ । तया अग्नीचें प्रयाणीं वळ । संपूर्ण [8]आथी ॥ १९ ॥

अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।
तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥

अन्वयः—अग्निः, ज्योतिः, अहः, शुक्लः ( पक्षः ), षण्मासाः उत्तरायणम् तत्र ( काले ) प्रयाताः ब्रह्मविदः जनाः ब्रह्म गच्छति ॥ २४ ॥

आंतु अग्निज्योतीचा प्रकाशु । बाहेरी शुक्लपक्षु आणि दिवसु । आणि सामासांमाजि मासु । उत्तरायण ॥ २२० ॥ ऐसिया समयोगाची [9]निरुती । लाहोनि जे देह ठेविती । ते ब्रह्मचि होती । [12]ब्रह्मविद ॥ २१ ॥ अवधारीं गा धनुर्धरा । येथवरी सामर्थ्य यया अवसरा । तेवींचि हा उजू मार्ग [10]स्वपुरा । यावया पैं ॥ २२ ॥ एथ अग्नि हें पहिलें पैयतरें । ज्योतिर्मय हें दुसरें । दिवस जाण तिसरें । चौथें शुक्लपक्ष ॥ २३ ॥ आणि सामास उत्तरायण । तें वरचील गा सोपान । येणें [10]सायुज्यसिद्धिसदन । पावती योगी ॥ २४ ॥ हा उत्तम काळ जाणिजे । यातें [11]अर्चिरादि मार्गु म्हणिजे । अवतरण:—आतां अकाळु तोही सहजें । सांगेन आइक ॥ २५ ॥

धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।
तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥

अन्वयः—धूमः, रात्रिः, तथा कृष्णः, षण्मासाः दक्षिणायनम् तत्र ( काले मृतः ) योगी चांद्रमस ज्योतिः प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥

( २९७. दक्षिणायन-मार्ग, २२६–२३६ ) तरि प्रयाणाचिया अवसरें । वातश्लेष्मां संभरे । तेणें अंतःकरणीं आंधारें । कोंदलें ठाके ॥ २६ ॥ सर्वेंद्रियां लांकुड पेंडे । स्मृति भ्रमामाजि बुडे । मन होय वेडें । कोंडे प्राण ॥२७॥ अग्नीचें अग्निपण

१ विद्यमान. २ वायु वाढल्यानें. ३ कफानें व्यापलेला. ४ तेज. ५ गतायुष्यातील. ६ शोधितो. ७ नाश पावून. ८ असलें पाहिजे. ९ सर्व गोष्टींची. १० सिद्धि. ११ प्राप्त होऊन. १२ ज्ञानी.

वाऱ्यानें किंवा पाण्यानें ज्या वेळेस दिव्याचा प्रकाश नाहींसा होतो, त्या वेळेस आपली दृष्टि विद्यमान असतांही तिला कांहीं दिसतें का ? १२ त्याचप्रमाणें, देहावसानाच्या वेळेचा वात वाढल्यानें शरीर आंतबाहेर कफानें व्याप्त होतें, त्या वेळेस जठराग्नीचें तेज विझून जातें, १३ त्या वेळेस प्राणाला अवसान नसतें; मग बुद्धि असूनही काय करणार? म्हणून अग्नीशिवाय देहांत चेतना रहात नाहीं. १४ हें पहा, शरीरांतील जठराग्नि जर नाहींसा झाला, तर तो देह नसून ओला चिखलच होय. अशा वेळेस साधक आपल्या आयुष्याची वेळ अंधारांत शोधीत बसतो. १५ नंतर पाठीमागील सर्व गोष्टींचें मरतेसमयीं स्मरण होतें. मग देह टाकून स्वरूपाला मिळावें कसें ? १६ इतक्यांत त्या देहांतील कफाच्या चिखलांत चेतना बुडून गेल्यामुळें मागील व पुढील गोष्टींचें स्मरण नाहींसें होतें. १७ म्हणून पूर्वी जो योगाभ्यास केला तो मरण येण्याच्या आधीं नाश पावतो. ज्याप्रमाणें आपण ठेविलेली वस्तु दिवा हातांत घेऊन शोधण्याकरितां गेलें असतां ती दृष्टीस पडण्याच्या अगोदर दिवा जावा, त्याप्रमाणें. १८ आतां या सर्व गोष्टी राहूं दे; तूं हें समज कीं, ज्ञानाला जठराग्नि हा मूळ कारण आहे, आणि मरणसमयीं सर्व बळ त्या अग्नीचेंच असतें. १९

श्लोकार्थः—अग्नि, ज्योति, दिवस, शुक्लपक्ष व उत्तरायण या कालीं मरण पावलेले ब्रह्मवेत्ते लोक ब्रह्माला जाऊन मिळतात ॥ २४ ॥

शरीराच्या आंत जठराग्नीच्या ज्योतीचा प्रकाश, बाहेर शुक्ल पक्षाचा पंधरवडा असून उत्तरायणातील कोणत्याही महिन्यांपैकीं एक महिना, २२० अशा प्रकारें सर्व गोष्टींची तयारी असतां जे आपला देह ठेवितात, ते ज्ञानी ब्रह्मस्वरूपीं मिळतात. २१ धनुर्धरा, ऐक. या वेळेच्या योगाचें असें विलक्षण सामर्थ्य आहे, म्हणून मोक्षप्राप्तीकरितां स्वस्वरूपीं येण्यास हा सरळ मार्ग आहे. २२ या मार्गांत जठराग्नि ही पहिली पायरी होय; अग्नीचें सतेजपण ही दुसरी पायरी; दिवस ही तिसरी पायरी; शुक्लपक्ष ही चौथी पायरी असें समज; २३ आणि उत्तरायणातील सहा महिन्यांपैकीं एक महिना ही जिन्याची वरची पायरी, अशा क्रमानें गेल्यावर योगी मोक्षसिद्धिरूप घराला पावतो. २४ हा उत्तम काल असें समज, आणि याला अर्चिरादि मार्ग असें म्हणतात. आता मरण्यास अयोग्य काल कोणता तो प्रसंगानुसार तुला सांगतों, ऐक. २५

श्लोकार्थः—धूर, रात्र, तसाच कृष्णपक्ष व दाक्षिणायन अशा समयीं मरण पावणारा योगी चंद्रलोकचे उपभोग भोगून पुढें न जाता परत येतो ॥ २५ ॥

मरणसमयीं कफवातादि दोषांच्या भरानें अंतःकरणांत अंधार होऊन जातो; २६ सर्व इंद्रियांची गति कुंठित होते; स्मृतीला भ्रम उत्पन्न होतो; मन वेडावून प्राण घोटाळतो;

१३ मोक्षास. १४ पायरी. १५ तेजःपुंज; प्रखर. १६ जिना. १७ मोक्ष. १८ जठराग्नि सतेज असून प्राणोत्क्रमणाचा मार्ग. १९ वातकफ. २० भरानें. २१ गति कुंठित होते.

जाये । मग तो धूमचि आवघा होये । तेणें चेतना गिंवसली[१] ठाये । शरीरींची ॥ २८ ॥ जैसें चंद्राआड आभाळ । सैंदट[२] दाटे सैंजळ[३] । मग गैंडद[४] ना उजोळ[५] । ऐसें झांवळें[६] होय ॥ २९ ॥ कां मरे ना सावध । ऐसें जीवितासि पडे स्तब्ध । आयुष्य मरणाची मर्याद- । वेंळु ठाकी ॥ २३० ॥ ऐसी मनबुद्धिकरणीं[७] । सभोंवतीं धूमकुळाची कोंडणी । तेथ जन्में जोडलिये वोहणी । युगचि बुंडे ॥ ३१ ॥ हां गा हातींचें जे वेळीं जाये । ते वेळीं आणिका लाभाची गोठी कें आहे । म्हणऊनि प्रयाणीं तंव होये । येतुली दशा ॥ ३२ ॥ ऐसी देहाआंतु स्थिती । बाहेरि कृष्ण-पक्षु वरि रांती । आणि सामासही वोडवती । दक्षिणायन ॥ ३३ ॥ इयें पुनरा-वृत्तीचीं घैंराणीं । आघवीं एकवटती जयाचिया प्रयाणीं । तो स्वरूपसिद्धीची काहाणी । कैसेनि आइके ॥ ३४ ॥ ऐसा जयाचा देह पडे । तया योगी म्हणोनि चंद्रैंवरी जाणें घडे । मग तेथूनि मागुता बैंहुडे । संसारा ये ॥ ३५ ॥ आम्हीं अकाळ जो पांडवा । म्हणितला तो हा जाणावा । आणि हाचि धूम्रमार्गु गांवा । पुनरावृत्तीचिया ॥ ३६ ॥ ( २९८. मरणकाळीं दोन मार्गांपैकीं भाग्यानें जो मिळेल तो मिळेल, २३७–२४६ ) येर तो अर्चिरादि मार्गु । तो वसतों आणि असलैंगु । सविंयाँ स्वस्त चांगु । निर्वृत्तीवरी ॥ ३७ ॥

शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते । एकया यात्यनावृत्तिमन्ययाऽऽवर्तते पुनः ॥२६॥

अन्वयः--एते जगतः शुक्लकृष्णे गती हि शाश्वते मते; एकया अनावृत्तिं याति ( च ) अन्यया पुनः आवर्तते ॥ २६ ॥

ऐसिया अनादि या दोनी वाटा । एकी उंजू एकी अंव्हांटा । म्हणवूनि बुद्धिपूर्वक सुभटा । दाविलिया तुज ॥ ३८ ॥ कां जे मार्गामार्ग देखावे । साच लटिकें वोळखावें । हिताहित जाणावें । हिताचिलागीं ॥ ३९ ॥ पाहें पां नाव देखतां बरवी । कोणी आड घाली काय अंथावीं । कां सुपंथ जाणोनि अंडवीं । रिगवत असे ॥ २४० ॥ जो विष अमृत ओळखे । तो अमृत काय सांडूं शके । तेवीं जो उजू वाट देखे । तो अव्हांटा न वचे ॥ ४१ ॥ म्हणोनि पुढें । पारखावें खरें कुंडें । पारखिलें तरी न पडे । अंनवसरें कांहीं ॥ ४२ ॥ एऱ्हवीं देहांतीं थोर विषम । या मार्गाचें आहे संभ्रम । जन्में अभ्यासिलियाचें हन काम । जाईल वायां ॥ ४३ ॥ जरी अर्चिरादि मार्गु चुकलिया । अवचटें धूम्रपंथें पाडिलिया । तरी संसारपांतीं[२७] जुंतलिया । भंवतांचि असावें ॥ ४४ ॥ हे सायास देखोनि मोठे ।

१ आच्छादलेली. २ दाट. ३ पाण्यानें युक्त. ४ अंधार. ५ स्वच्छ. ६ झाकड. ७ इंद्रियें. ८ धुराची. ९ लाभ. १० नाश होतो. ११ रात्र. १२ योग. १३ चंद्रलोकीं. १४ फिरे. १५ वस्ती असलेला. १६ सोपा. १७ सर्वथा. १८ मोक्षापर्यंत. १९ सरळ. २० आडवाट. २१ खोल पाण्यांत. २२ आडमार्गांत; अरण्यात. २३ खोटें. २४ संकटांत. २५ संकट. २६ भ्रांति. २७ ओळ; रांग. २८ जुंपल्यानें. २९ फिरत.

२७ अग्नीचें अग्निपण जातें व त्याचा चोहींकडे धूरच होतो, त्यामुळें शरीरांतील ज्ञान दिपून जातें. २८ ज्याप्रमाणें चंद्राच्या आड दाट व पाण्यानें भरलेले ढग आल्यावर धड अंधार ना प्रकाश अशी झांजड पडते, २९ त्याचप्रमाणें, तो मरतही नाही व सावधही नसतो. अशा रीतीनें शरीर नुसतें पडलेलें असतें, व आयुष्य हें मरणाची वेळ पहात असतें. २३० अशा प्रकारें बुद्धि व इंद्रियें यांच्या सभोंवतीं धूर अतिशय कोंडतो, त्या वेळेस जन्मभर मिळविलेले सर्व लाभ नाश पावतात. ३१ हें पहा, हातचें गेल्यावर मग पुन: लाभ होण्याची गोष्ट कशाला पाहिजे? म्हणून मरणसमयीं अशी दशा प्राप्त होते. ३२ याप्रमाणें देहांतील आंतली स्थिति असून बाहेर कृष्णपक्षाचा पंधरवडा असतो, व त्यांत रात्र आणि दक्षिणायनांतील सहा महिन्यांपैकीं एक महिना हीं प्राप्त होतात. ३३ हे सर्व जन्ममरणाच्या फेऱ्यात पाडणारे योग ज्यांच्या मरणसमयीं एके ठिकाणीं येतात, त्यांच्या कानीं मोक्षप्राप्तीची गोष्ट कोठून पडणार? ३४ अशा वेळेवर ज्याचें देहावसान होतें, त्याला, तो योगी असल्यामुळें चंद्रलोकापर्यंत जातां येतें. मग तेथून परतून तो फिरून जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतो. ३५ हे पांडवा, आम्हीं मरणास अयोग्य काळ म्हणून जो म्हटला, तो हाच असें समज; जन्ममरणाच्या गावास नेणारा धूम्रमार्ग हाच; ३६ याच्याशिवाय दुसरा जो अर्चिरादि मार्ग, तो भरवस्तीचा, सोपा, अति उत्तम व अगदीं सुलभ असून मोक्षापर्यंत गेलेला आहे. ३७

श्लोकार्थः—या जगाच्या शुक्ल आणि कृष्ण ह्या दोन गति निरंतर म्हणून संमत आहेत. एका गतीनें जाणाराला परत येणें घडत नाहीं, आणि दुसऱ्या गतीनें जाणाराला पुनः परत येणें घडतें ॥ २६ ॥

असे हे दोन मार्ग—एक सरळ आणि दुसरा वाकडा—अनादि कालापासून चालत आलेले आहेत. म्हणून, हे महावीरा, ते तुला बुद्धिपुरस्सर दाखविले. ३८ कां कीं, त्या मार्गांपैकीं चांगला कोणता व वाईट कोणता हें तुला दिसावें; आणि खरें खोटें ओळखून, आपलें हित साधून घेण्याकरितां ( त्या ) हित व अहित याचाही विचार करावा. ३९ हें पहा, उत्तम अशी नाव पाहिल्यावरही अथांग डोहांत कोणी उडी घालील काय? किंवा राजमार्ग टाकून आडमार्गाला जाईल काय? २४० जो विष आणि अमृत हीं दोन्ही ओळखतो, तो अमृत टाकील का? त्याचप्रमाणे, जो सरळ मार्ग पहातो, तो आड-मार्गाला जाणार नाहीं. ४१ म्हणून प्रथम खऱ्या-खोट्याची पारख करावी. ती पारख झाली म्हणजे मग तो संकटांत पडत नाहीं. ४२ बाकी मरणसमयीं ह्या मार्गाची प्राप्ति होण्याला मोठमोठ्या संकटाची मोठी भीतिच आहे. अंतकाळीं याची प्राप्ति व्हावी म्हणून जन्मभर जरी अभ्यास केला तरी तें सर्व व्यर्थ होतें. ४३ जर अर्चिरादि मार्ग चुकला, आणि तो योगी अकस्मात् धूम्रमार्गांत पडला, तर जन्ममरणाच्या फेऱ्यात गुंतून फिरत असतो. ४४ अशीं हीं मोठालीं संकटें पाहून, तीं एकदा कशानें दूर होतील म्हणून

आता कैसेनि पां एकवेळ फिटे। म्हणोनि योगमार्गु गोमटे। शोधिले दोन्ही॥४५॥ तंव एकें ब्रह्मत्वा जाइजे। आणि एकें पुनरावृत्ती येइजे। परि दैवगत्या जो लाहिजे। देहांतीं जेणें ॥ ४६ ॥

नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन। तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥२७

अन्वयः— अर्जुन, एते सृती जानन् कश्चन योगी न मुह्यति; तस्मात् (त्वं) सर्वेषु कालेषु योगयुक्तः भव ॥ २७ ॥

(२९९. काळाचा विचार न करतां परमात्म्याचें स्मरण कर, म्हणजे तूं योगयुक्त होशील, २४७–२५८) ते वेळीं म्हणितलें हें नव्हे। वायां अवचटें[१] काय पावे। देह त्यजूनि वस्तु होआवें। मार्गेंच कीं ॥ ४७ ॥ तरि आतां देह असो अथवा जावो। आम्ही तों केवळ वस्तुचि आहों। कां जे दोरी-सर्पत्व वावो। दोराचि-कडूनि ॥ ४८ ॥ मज तरंगपण असे कीं नसे। ऐसें हें उदकाप्रती कहीं भासें। तें भलतेव्हां जैसें तैसें। उदकाचि कीं ॥ ४९ ॥ तरंगाकारें न जन्मेचि। न तरंगलोपें निमेचि। तेविं देहीं जे देहेंचि। वस्तु जाहले ॥ २५० ॥ आतां शरीराचें तयां-चिया ठाईं। आडनांवही उरलें नाहीं। तरि कोणें काळे काई। निमे तें पाहे पां ॥ ५१ ॥ मग मार्गातें कासया शोधावें। कोणें कोठूनि कें जावें। जरी देशकाला-दि आघवें। आपणचि असे ॥ ५२ ॥ आणि हां गा घट्ट जे वेळीं फुटे। ते वेळीं तेथींचें आकाश लागे नीट वाटे। वाटा लागलें तरि गगना भेटे। येरवीं चुके ॥५३॥ पाहे पां ऐसें हन आहे। कीं तो आकारुचि जाये। येर गगन तें गगनींचि आहे। घटत्वाहि आधीं ॥ ५४ ॥ ऐसिया बोधाचेनि सुरवाडें। मार्गामार्गाचें सांकडें। तया सोहंसिद्धा न पडे। योगियासी ॥ ५५ ॥ या कारणें पंडुसुता। तुवां होआवें योगयुक्ता। तेतुलेनि सर्वकाळीं साम्यता। आपैसया होईल ॥ ५६ ॥ अवतरणः- (ओवी २५७ ते २६०) मग भलतेथ भलतेव्हां। देह असो अथवा जावा। परि अबंधीं नित्य ब्रह्मभावा। विघड नाहीं ॥ ५७ ॥ तो कल्पादि जन्मा नोंगवे। कल्पांतीं मरण नोंप्लवे। माजि स्वर्गसंसाराचे लँघवें। झकवेना ॥ ५८ ॥ (३००. आत्मरूप झालेला योगी स्वर्गसुख तुच्छ समजतो, २५९–२६९) येणें बोधें जो योगी होये। तयासीचि या बोधाचें नीटपण आहे। कां जे भोगातें पेलूनि पाये। निजरूपा ये ॥ ५९ ॥ पैं गा इंद्रादिकां देवां। जयां सर्वस्वें स्वर्गीं गाजती राणिवा। तें सांडणें मानूनि पांडवा। डावलीं जो ॥ २६० ॥

वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम्।
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥ २८ ॥

१ स्पष्टीकरण केलें. २ अकस्मात्. ३ ब्रह्मरूप. ४ लाट. ५ वाटेल तेव्हां, केव्हांही. ६ सोईनें. ७ मी ब्रह्म असा अनुभव झालेल्यास. ८ ब्रह्मरूपता. ९ आपोआप. १० निष्प्रतिबधाला. ११ न सांपडे.

दोन्ही योगमार्गांचें चांगलें स्पष्टीकरण केलें. ४५ तेव्हां, एका मार्गानें योगी मोक्षाला जातो, आणि दुसऱ्या मार्गानें जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतो; परंतु देहावसानाच्या वेळेस दैवगतीनें ज्याला जो प्राप्त होईल तो खरा. ४६

श्लोकार्थः—अर्जुना, हे मार्ग जाणणारा कोणताही योगी मोहात पडत नाहीं; यास्तव सर्व काळ तू योगयुक्त हो. ॥ २७ ॥

अकस्मात् कोणत्या वेळेस काय प्राप्त होईल याचा कांहीं नेम आहे ? म्हणून ही गोष्ट राहूं दे. तर देहांतीं ब्रह्मप्राप्ति करून घेण्यास मार्गच कशाला हवा ? ४७ तर मग देह राहो अथवा जावो, आम्ही केवळ ब्रह्मच आहों असें ज्ञानी समजतात. कारण, दोरीवरील सर्पाचा भास जसा दोरीचें सत्यत्व भासल्यावर दोरीचे ज्ञानासह व्यर्थ होतो; ४८ आपल्यावर लाटा येतात किंवा नाहींतशा होतात, याचा पाण्याला कधीं भास होतो काय ? कारण तें केव्हांही पाहिलें तरी पाणीच्या पाणीच कायम असतें; ४९ तें पाणी लाटा उत्पन्न झाल्यामुळें जन्म पावत नाहीं, किंवा लाटा नाहींतशा झाल्यावर तें नाश पावत नाहीं; त्याप्रमाणें, देहात राहून जे देहासुद्धां ब्रह्म झाले, २५० देहांसकट ब्रह्म झाल्यावर त्यांच्या ठिकाणीं देहाचें नुसतें आडनांव सुद्धां रहात नाहीं. मग असें पहा कीं, कोणच्या वेळेस कशाचा लय होतो ? ५१ जर देश, काल इत्यादि गोष्टी तो आपणच होऊन राहिला आहे, तर मग कोणीकडून कसें जावें ? इत्यादि ब्रह्मप्राप्तीच्या मार्गाचा शोध कां करावा ? ५२ आणि ज्या वेळेस घट फुटतो, त्या वेळेस त्यातील आकाश नीट मार्गाला लागल्यावरच आकाशाला भेटतें, नाहीं तर चुकतें कीं काय ? ५३ हें पहा—खरी गोष्ट अशी आहे कीं, त्या घटाच्या आकाराचाच नाश होतो; येरव्हीं घटाकाश हें घट निर्माण होण्याचे पूर्वीपासून मूळचेंच आकाशरूपी आहे. ५४ अशा ज्ञानाच्या साधनानें, आपण ब्रह्मच आहों असा अनुभव आलेल्या योग्यास चांगल्या व वाईट मार्गांचें संकट पडत नाहीं. ५५ यास्तव, हे पंडुसुता, तूं योगयुक्त हो; त्या योगानें तुला नेहमीं आपोआप ब्रह्मस्वरूपता प्राप्त होईल. ५६ मग वाटेल त्या ठिकाणीं व वाटेल तेव्हा देह असो वा जावो. परंतु निष्प्रतिबंध व नित्य अशा परब्रह्मस्वरूपाला अंतर पडणार नाहीं. ५७ तो सृष्टीच्या आरंभीं जन्माला येत नाहीं, सृष्टीच्या अंतीं मरण पावत नाहीं, तसेंच सृष्टीच्या स्थितींत स्वर्ग व संसारसुख याच्या मोहानें कधीं फसत नाहीं. ५८ या बोधानेंच जो योगी सावध असतो, त्यालाच या बोधाची फलप्राप्ति होते. कारण, तो विषयोपभोगाला तोलून पाहून ब्रह्मरूपाला मिळतो. ५९ हें पहा अर्जुना, इंद्रादिक देवांना स्वर्गात नेहमीं सर्व प्रकारच्या सुखांचा उपभोग मिळतो, तें सुख त्याज्य मानून तो दूर लोटतो. २६०

१२ न बुडे. १३ मोडे. १४ फसत नाहीं. १५ फलप्राप्ति. १६ तोलून. १७ उत्कर्ष. १८ त्याज्य, ओंवाळून टाकलेलें. १९ दूर लोटी.

अन्वयः—वेदेषु, यज्ञेषु, तपःसु दानेषु च यत्पुण्यफलं प्रदिष्टम्, तत्सर्वं इदं विदित्वा योगी अत्येति च आद्यं परं स्थानम् एव उपैति ॥ २८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे तारकब्रह्मयोगो नाम अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥

जरी वेदाध्ययनाचें जालें। अथवा यज्ञाचें शेतचि पिकलें। कीं तपदानाचें जोडलें। सर्वस्व हन जें ॥ ६१ ॥ तया आघवां पुण्यांचा मळा। भार आंतौनि जया ये फळा। तें परब्रह्म निर्मळा। सांठी न सरे ॥ ६२ ॥ जें नित्यानंदाचेंनि मानें। उपमेचा कांटाळा न दिसे सानें। पाहा पां वेदयज्ञादि साधनें। जया सुखा ॥ ६३ ॥ जें विटे ना सरे। भोगी तयाचेनि पैंवाडें पुरे। पुढती महासुखाचें सोयरें। भावंडचि ॥ ६४ ॥ ऐसें दृष्टीचेनि सुखपणें। जयासी अदृष्टाचें वैसणें। जें शतमखांही आंगँवणें। नोहेचि एका ॥ ६५ ॥ तयातें योगीश्वर अलौकिकें। दिठीचेनि हातनुकें। अनुमानती कौतुकें। तंव हेळवार औवडे ॥ ६६ ॥ मग तया सुखाची किरीटी। करूनियां गा पौंउठी। परब्रह्माचिये पाठी। आरूढती ॥ ६७ ॥ ऐसें चराचरैकभाग्य। जें ब्रह्मेशां आराधने योग्य। योगियांचें भोग्य। भोगधन जें ॥६८॥ जो सकळ कळांची कळा। जो परमानंदपुतळा। जो जिवाचा जिव्हाळा। विश्वाचिया ॥ ३९ ॥ ( २०१. देव अर्जुनाचें भाषण संजय राजाला सांगतो व तेंच ज्ञानेश्वर पुढील अध्यायांत सांगतात; २७०—२७१ ) जो सर्वज्ञतेचा वोलावा। जो यादवकुळींचा कुळदिवा। तो श्रीकृष्णजी पांडवा-। प्रती बोलिला ॥ २७० ॥ ऐसा कुरुक्षेत्रीं वृत्तांतु। संजयो रायासी असे सांगतु। तेचि परियेसा पुढारी मातु। ज्ञानदेव म्हणे ॥ २७१ ॥

इति श्रीज्ञानेश्वरविरचितायां भावार्थदीपिकायां अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥

श्लोक २८, ओंव्या २७१.

---

१ व्यापून. २ बरोबरी न होणें. ३ बरोबरीनें. ४ इच्छेनें. ५ मरणानंतर. ६ शंभर यज्ञ करणाराला. ७ स्वाधीन. ८ दिव्य. ९ अटकळीनें. १० सूक्ष्म. ११ वाटे. १२ पायरी. १३ ब्रह्मदेव व शंकर यांना. १४ जीवन.

श्लोकार्थः—( ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव, अधियज्ञ व मरणकाळीं भगवद्-चिंतन कसें होतें ) हें सर्व पूर्णपणें समजल्यावर, वेद, यज्ञ, तप आणि दान ह्यांच्यापासून जी पुण्यफलप्राप्ति सांगितली आहे, तिचें अतिक्रमण करून, आद्य व उत्कृष्ट अशा स्थानाला तो प्राप्त होतो ॥ २८ ॥

जरी वेदाचें अध्ययन करून वैदिक झाला, अथवा यज्ञ करून पुण्य पेरून ठेविलें, किंवा तप आणि दान करून पुण्य जोडलें, ६१ अशा प्रकारचा सर्व पुण्याचा मळा जरी फळांच्या भारानें व्यापून गेला, तरी त्या निर्मळ ब्रह्माची बरोबरी कोणाच्यानेंही करवत नाहीं. ६२ जें नित्यानंदाच्या तुलनेनें ताजव्यात घातलें असता लहान दिसतें व ज्याच्या प्राप्तीकरितां वेदयज्ञादि साधनें करावीं लागतात; ६३ जें स्वर्गसुख विटत नाहीं व संपतही नाहीं, भोगणाराच्या इच्छा पूर्ण करतें, व जें महासुखाचें ( ब्रह्मसुखाचें ) धाकटें भावंडच होय; ६४ अशाप्रमाणे वरकातीं दिसणारें तें सुख, व जें मरणानंतरच प्राप्त होतें, आणि जें शंभर यज्ञ करूनही साध्य होत नाहीं, ६५ तें स्वर्गसुख, योगीश्वर दिव्यदृष्टीच्या अटकळीनें व कौतुकानें पाहूं गेले असता त्यांना ब्रह्मसुखाच्या पुढें सूक्ष्म वाटतें. ६६ मग अर्जुना, त्या स्वर्गसुखाची पायरी करून ते ब्रह्मपदावर चढतात. ६७ याप्रमाणें, स्थावर-जंगमाचें मुख्य भाग्य, जें ब्रह्मदेव व शंकर यांनीं आराधना करण्यास योग्य, व जी योग्याची उपभोग घेण्याची वस्तु, ६८ जो आद्य ज्ञानस्वरूप, जो परमानंदाची केवळ मूर्ति, जो सर्व विश्वांतील प्राणिमात्राचें जीवन, ६९ जो सर्व ज्ञानाचा जिव्हाळा, व यादवकुळाचा कुलदीपक असा जो श्रीकृष्ण, तो अर्जुनाला बोलला. २७० असा कुरुक्षेत्रातील कथाभाग संजय धृतराष्ट्राला सांगता झाला. ज्ञानदेव म्हणतात, ती कथा पुढें ऐका. २७१

अध्याय ८ वा, ओवी २७१.

---

# ज्ञानेश्वरी

## अध्याय नववा

( ३०२. गुरूशीं सलगी करण्याचें कारण, काव्यप्रतिभा, १–७ ) तरी अवधान येकलें दीजे । मग सर्वसुखासि पात्र होइजे । हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड आइका ॥ १ ॥ परी प्रौढी न बोलें हो जी । तुम्हां सर्वज्ञांच्या समाजीं । देयावें अवधान हे माझी । विनवणी सलगीची ॥ २ ॥ कां जे लेंळेयाचे ळळे सरती । मनोरथांचे मनोरथ पुरती । जरी माहेरें श्रीमंतें होती । तुम्हांऐसीं ॥ ३ ॥ तुमचे या दिठी-वेयांचिये वोलें । सासिन्नले प्रसन्नतेचे मळे । ते साउली देखोनि लोळे । श्रांतु जी मी ॥ ४ ॥ प्रभू तुम्ही सुखामृताचे डोहो । म्हणोनि आम्ही आपुलिया स्वेच्छा वोलावो लाहों । तेथही जरी सलगी करूं विहों[4] । तरी निवों[5] के पां ॥ ५ ॥ नातरी बाळक बोवडा बोलीं । वांकुडा विचुंका पाउलीं । ते चोज करूनि माउली । रिझे जेवीं ॥ ६ ॥ तेवीं तुम्हां संतांचा पढियावो । कैसेनि तरी आम्हांवरी हो । या बहुवा आळुंकिया जी आहों । सलगी करीत ॥ ७ ॥ ( ३०३. सलगीचें दुसरें कारण, ८–१२ ) वांचूनि माझिये बोलतिये योग्यते । सर्वज्ञ भेवादृश श्रोते । काय धड्ड्या-वरी सौंरस्वतें । पढों सिकिजे ॥ ८ ॥ अवधारा आवडे तेसैंणा धुंधुरु । परि महा-तेजीं न मिरवे काय करूं । अमृताचिया ताटीं वोगरूं । ऐसी रसैसोय कैंची ॥ ९ ॥ हां हो हिमैंकरासी विंजणें[18] । कीं नादापुढें आइकवणें । लेणियासी लेणें । हें कहीं आथी ॥ १० ॥ सांगा परिमळें काय तुरंबावें । सागरें कवणे ठायीं नाहावें । हें गगनाचि आंडे आघवें । ऐसा पैवाडु कैंचा ॥ ११ ॥ तैसें तुमचें अवधान धैंये । आणि तुम्ही म्हणा हें होये । ऐसें वक्तृत्व कवणा आहे । जेणें रिझां तुम्ही ॥ १२ ॥ ( ३०४. सलगीचें तिसरें कारण, १३-१९ ) तरि विश्वप्रैगटीतिया गैंभस्ती । काय हातिवेंनें न कीजे आरती । कां चुंळोदकें अंपांपती । अर्घ्यु नेदिजे ॥ १३ ॥ प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मी दुबळा आर्चितसें भक्ती । म्हणोनि

---

१ आवड म्हणून जी वृत्ति आहे, तिचे. २ कृपादृष्टीच्या. ३ भरास आले. ४ भिऊं लागलों. ५ ( मीं ) कोठें तृप्त व्हावें ? ६ वेड्यावाकड्या. ७ कौतुक. ८ प्रीति. ९ इच्छा. १० आपणां-सारखे. ११ घडे पाठ करून. १२ सरस्वतीपुत्रानें. १३ तेवढा. १४ काजवा. १५ वाढूं. १६ पाकनिष्पत्ति. १७ चंद्राला. १८ पंख्यानें वारा घालणें. १९ वास घ्यावा. २० मावेल.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय नववा

श्रीज्ञानेश्वर म्हणतात, "श्रोतेहो, ऐका. मी प्रतिज्ञापूर्वक हें स्पष्ट सांगतों कीं, तुम्ही एक लक्ष इकडे दिलें तर सर्व सुखाला पात्र व्हाल. १ पण तुम्हां सर्वज्ञांच्या सभेपुढें मी हें आढ्यतेनें बोलत नाहीं हो! 'तुम्ही लक्ष द्या' ही माझी तुम्हांला लडिवाळपणाची विनंती आहे. २ कारण, तुम्हासारखीं संपन्न माहेरघरें असल्यावर, आवड म्हणून जी एक वृत्ति आहे तिची देखील आवड पूर्ण होते, आणि मनोरथाची देखील इच्छा तृप्त होते! ३ तुमच्या कृपादृष्टीच्या ओलाव्यानें भरांत आलेल्या प्रसन्नतेच्या मळ्याची थंडगार सावली पाहून, श्रमलेला असा जो मी, तो त्या ठिकाणीं विश्रांति घेतों. ४ महाराज, तुम्ही सुखामृताचे डोहच आहां; म्हणून आम्ही आपले इच्छेप्रमाणें त्यांत बागडावें असें म्हणतों. येथेंही जर तसें करून घेण्यास तुमच्याशीं सलगी करण्यास भिऊं लागलों, तर आम्हीं तृप्त तरी व्हावें कोठें? ५ किंवा बालकाच्या बोबड्या बोलांनीं व वेड्यावाकड्या चालण्यानें ज्याप्रमाणें कौतुक मानून आई आनंद पावते, ६ त्याप्रमाणें तुम्हां संतजनाची प्रीति कोणत्या तरी रीतीनें मजवर व्हावी, या पूर्ण इच्छेनें मी तुमच्याशीं सलगी करीत आहें. ७ याशिवाय तुमच्यासारख्या सर्वज्ञ श्रोत्यांची माझ्या बोलण्याच्या तुटत्या योग्यतेवर प्रीति बसणार नाहीं. सरस्वतीपुत्राला धडे पाठ करून विद्या संपादन करावी लागते काय? ८ पहा कीं, पाहिजे तेवढा मोठा जरी काजवा असला तरी सूर्यप्रकाशापुढें त्याचें तेज पडेल काय? तसेंच अमृतरूप ताटांत वाढण्याजोगी पाकनिष्पत्ति कोणती आहे? ९ अहो, ज्याचे थंड किरण आहेत, अशा चंद्राला पंख्यानें वारा घालणें किंवा सुस्वराला गायन ऐकविणें, तसेंच दागिन्याला अलंकार घालणें असें कोठें होईल का? १० परिमळानें कशाचा वास घ्यावा? समुद्रानें कशांत नहावें? आणि हें आकाश ज्यात मावेल अशी मोठी वस्तु कोणती आहे सांगा बरें! ११ त्याचप्रमाणें, तुमचें अवधान तृप्त होईल, आणि तुम्ही असें म्हणाल कीं, 'ही गोष्ट खरी,' असें तुम्हांला तृप्त करण्याजोगें वक्तृत्व कोणाचें आहे? १२ म्हणून, सर्व जग प्रकाशमय करणाऱ्या सूर्याला काडवातीनें आरती करूं नये कीं काय? किंवा समुद्राला चुळकाभर पाण्यानें अर्घ्य देऊं नये का? १३

२१ मोठी वस्तु. २२ तृप्त होईल. २३ प्रकाशमय करणाऱ्या. २४ सूर्याला. २५ काडवातीनें. २६ चूळभर पाण्यानें. २७ समुद्राला.

बोल जऱ्ही गंगांवती । तऱ्ही स्वीकाराल कीं ॥ १४ ॥ बाळक बापाचिये ताटीं रिगे । आणि बापातेंच जेवऊं लागे । कीं तो संतोषलेनि वेगें[2] । मुखचि वोढवी ॥ १५ ॥ तैसा मी जरी तुम्हांप्रती । चावटी करितसें बाळमती । तरी तुम्ही संतोषिजे ऐसी जाती । प्रेमाची असे ॥ १६ ॥ आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें[4] । तुम्ही संत घेतले असा बहुवें । म्हणोनि कोलिये सलगीचा नोहे । आभारु तुम्हां ॥ १७ ॥ अहो तान्हियाचें लागतां झटें । तेणें अधिकचि पान्हा फुटे । रोषें[10] प्रेम दुणवटे । पढियंतयांचेनि ॥ १८ ॥ म्हणऊनि मज लेंकुरवाचेनि बोलें । तुमचें कृपाळूपण निदैलें[13] । तें चेइलें[14] ऐसें ज़ी जाणवलें । यालागीं बोलिलों मी ॥ १९ ॥ ( ३०५. सलगीचें कारण, २०–२३ ) येऱ्हवीं चांदिणें पिकविजत आहे चपैणीं । कीं वारया वापैत आहे वाहणी । हां हो गगनासि गंवसणी । घालिजे केवीं ॥ २० ॥ आइका पाणी वोथिजैवें न लगे । नवनीतीं माथुलें न रिगे । तेवि लाजिलें व्याख्यान[20] निगे । देखोनि जयातें ॥ २१ ॥ हें असो, शब्दब्रह्ह जिये वीजे । शब्द मावळलेया निवांतु निजे । तो गीतार्थु मऱ्हाटिया बोलिजे । हा पैंडु काई ॥ २२ ॥ परि ऐसियाही मज धिंवसैं । तो पुढतियाचि येकी आशा । जे धिटींवा करूनि भैवादशां । पढियंतया होआवें ॥ २३ ॥ ( ३०६. अवधान देण्याची प्रार्थना, कृपेची याचना, काव्यप्रतिभा, २४–२९ ) तरि आतां चंद्रापासोनि निववितें । जें अमृताहूनि जीववितें । तेणें अवधानें कीजे वाढतें । मनोरथा माझिया ॥ २४ ॥ का जें दिठिवा तुमचा वरुषे । तैं सकळार्थसिद्धि मती पिके । येऱ्हवीं कोंभेला उन्मेषु सुके । जरी उदास तुम्ही ॥ २५ ॥ सहजें तरी अवधारा । वक्तृत्वा अवधानाचा होय चारा । तरी दोंदें पेलती अक्षरां । प्रमेयाचीं ॥ २६ ॥ अर्थु बोलाची वाट पाहे । तेथ अभिप्रावोचि अभिप्रायातें विये । भावाचा फुलौरा होत जाये । मतिवरी ॥ २७ ॥ म्हणूनि संवादाचा सुवावो ढेळे । तऱ्ही हृदयाकाश सारस्वतें घोळे । आणि श्रोता दुश्चिता तरि वितुळे । मांडला रसु ॥ २८ ॥ अहो चंद्रकांत द्रवता कीर होये । परि ते हातवटी चंद्रीं कीं आहे । म्हणऊनि वक्ता तो वक्ता नोहे । श्रोतेनिविण ॥ २९ ॥ ( ३०७. प्रार्थना करण्याचें कारण, काव्य, ३०–३१ ) परी आतां आमुतें गोड करावें । ऐसें तांदुळीं कासया विनवावें । साइखेडियांनें

---

१ निर्गुडीचीं पानें. ( प्रसंगविशेषीं, श्रीशंकराला वाहणेस बिल्वपत्र न मिळाल्यास निर्गुडीचीं दलें वाहतात ). २ भरानें. ३ विनोद. ४ अभिमानानें. ५ स्वीकार केला. ६ बहुत प्रकारानीं. ७ उपकार. ८ वासराचें. ९ दुश्शी. १० रागावण्यानें. ११ दुप्पट होतें. १२ अत्यंत प्रियकराच्या. १३ निजलेलें. १४ जागें झालें. १५ आर्दीत. १६ दिलीं आहे. १७ गति. १८ पातळ करावें. १९ रवी. २० माघारी येतें. २१ वेद. २२ शम्येवर. २३ अधिकार. २४ इच्छा. २५ भाटपणा. २६ तुमच्यासारख्याची. २७ कृपादृष्टि. २८ श्लेषार्थाचा. २९ अनुकूल वारा सुटला असतां. ३० महाज्ञानाची. ३१ वृद्धि होते. ३२ कळसूत्री बाहुल्यानीं.

महाराज, तुम्ही केवळ शंकराची मूर्ति आहा, आणि मी गरीब तुमची भक्तीनें पूजा करीत आहें. म्हणून, बोलाच्या ऐवजीं माझ्या बोलरूपी निर्गुंडीचा तुम्ही स्वीकार करणार नाहीं कां ? १४ लहान मूल बापाच्या ताटांत जेवायला बसून बापालाच जेवूं घालतें, तेव्हा तो संतोषभरानें आपलें तोंड घास घेण्याकरितां पुढें करतोच; १५ त्याचप्रमाणें, मी जरी तुमच्याशीं बालकाप्रमाणें विनोदानें वर्तन करितों, तरी तुम्हांला त्या माझ्या वर्तनापासून आनंदच झाला पाहिजे, असा प्रेमाचा गुण आहे; १६ आणि त्या आपलेपणाच्या अभिमानानें तुम्ही, संतजनांनीं बहुत प्रकारांनीं मला ' आपला ' असें म्हटलें आहे; म्हणून माझ्या या सलगीचा आपणांस विषाद होणार नाही. १७ अहो, वासरानें ढुशी दिल्यावर गाईला ज्याप्रमाणें अधिकच पान्हा फुटतो, त्याप्रमाणें अत्यंत प्रिय जो मनुष्य असतो त्याच्या रागावण्यानें प्रेम दुप्पट होतें. १८ म्हणून, मज लेंकराच्या बोबड्या बोलांनीं तुमचें निजलेलें कृपाळूपण जागें झालें, असे जाणून मी बोललों. १९ येऱ्हवीं चंद्राचें चांदणें कोणीं आढीत घालून पिकविलें आहे काय ? किंवा वाऱ्याला वाहण्याकरिता कोणी गति दिली आहे का ? तसेंच आकाशाला कोणीं गवसणी घातली आहे का ? २० ऐका: पाण्याला पातळ करावें लागत नाहीं; आणि लोणी तयार झाल्यावर तें रवीनें कोणी घुसळीत नाहीं; त्याचप्रमाणें, ज्याला पाहून माझें व्याख्यान लाजल्यामुळें माघारी येतें. २१ हें असो; ज्यापुढें वेदाचे शब्द कुंठित झाल्यामुळें तेही ज्याच्या शय्येवर गाढ निद्रा घेतात, ( ज्यापुढें वेदाची मति कुंठित झाल्यामुळें तेही स्तब्ध राहातात, ) तो गीतार्थ मीं मराठी भाषेंत वर्णन करावा असा माझा अधिकार आहे का ? २२ परंतु अशी स्थिति असतांही मला पुढच्या आशेवर इच्छा उत्पन्न झाली. ती ही कीं, मन धीट करून तुमच्यासारख्यांची प्रीति संपादन करावी. २३ तर आता चंद्रापेक्षांही थंड करणाऱ्या व अमृताहूनही जीवन देणाऱ्या अशा अवधानानें माझ्या मनोरथाला पुष्टि द्या. २४ कारण, जर तुमची कृपादृष्टिरूप वृष्टि मजवर पूर्ण होईल, तर माझ्या बुद्धिरूप भूमींत सकलार्थरूप धान्य पिकेल. येरव्हीं जर तुम्ही उदास असाल, तर अंकुर आलेलें ज्ञान सुकून जाईल. २५ वक्तृत्वरूप पांखराला अवधानरूपी चारा मिळाल्यावर त्याच्या प्रत्येक अक्षररूपी अवयवाला अर्थरूपी पुष्टि येईल. २६ अर्थ हा शब्द बाहेर पडण्याची वाट पहात असतो; शब्द बाहेर पडल्यावर त्यातून अर्थावर अर्थ निघतात आणि बुद्धीला नानाप्रकारचे श्लेष सुचूं लागतात. २७ म्हणून, संवादरूपी अनुकूल वारा सुटला असतां वक्त्याच्या हृदयाकाशात ब्रह्मज्ञानाची वृष्टि होते; आणि जर. ऐकणाराचें दुर्लक्ष असलें, तर वक्तृत्वाला आलेला रस वितळून जातो. २८ अहो, चंद्रकांत मण्याला पाझर सुटतो ही गोष्ट खरी आहे; परंतु ही शक्ति एक चंद्राचेच ठिकाणीं आहे. म्हणून बोलणारास श्रोत्याशिवाय किंमत नाहीं; २९ परंतु आम्हास गोड करून घ्या, अशी तांदुळांना विनंती करावी लागते का ? तसेंच, कळसूत्री बाहुल्यांना, ' आम्हाला नाचवा '

काई प्रार्थीवें । सूत्रधारातें ॥ ३० ॥ तो काय वाहुलियांचिया काजा नाचवी । कीं आपुलिये जाणिवेची कळा वाढवी । म्हणऊनि आम्हां या ठेवाठेवी । काय काज ॥३१॥ ( ३०८. ग्रंथ सांगण्याची आज्ञा, ३२ ) तंव श्रीगुरु म्हणती काइ जाहलें । हें समस्तही आम्हां पावलें । आतां सांगें जें निरोपिलें । नारायणें ॥ ३२ ॥ ( ३०९. ग्रंथ सांगण्याकडे प्रवृत्ति, ३३ ) भगवानुवाचः—येथ संतोषोनि निवृत्तिदासें । जी जी म्हणऊनि उल्हासें । अवधारा श्रीकृष्ण ऐसें । बोलते जाहले ॥ ३३ ॥

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे । ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१**

अन्वयः—यत् ज्ञात्वा ( त्वं ) अशुभात् मोक्ष्यसे, ( तत् ) इदं तु गुह्यतमं ज्ञानं ते अनसूयवे विज्ञानसहितं प्रवक्ष्यामि ॥ १ ॥

( ३१०. भगवान गुह्य सांगतात, ३४ ) नातरि अर्जुना हें[1] बीज[2] । पुढती सांगिजेल तुज । जें हें अंतःकरणींचें गुज । जीवाचिये ॥ ३४ ॥ ( ३११. गुह्य सांगण्याचें कारण, ३५–४२ ) येणें मानें जीवाचें[3] हियें फोडावें । मग गुज कां पां मज सांगावें । ऐसें कांहीं स्वभावें । कल्पिशी जरी ॥ ३५ ॥ तरी परियेसीं गा प्राज्ञा । तूं आस्थेचीच संज्ञा । बोलिलिये गोष्टीची अवज्ञा । नेणसी करूं ॥ ३६ ॥ म्हणोनि गूढपण आपुलें मोडो । वरि न बोलणेंही बोलावें घडो । परि आमुचिये जीवींचें पडो । तुझ्या जीवीं ॥ ३७ ॥ अगा थानीं कीर दूध गूढ । परि थानासीचि नव्हे कीं गोड । म्हणोनि सरो[4] कां सेवितयाची चाड । जरी अनन्य मिळे ॥ ३८ ॥ मुडांहुनि[5] बीज काढिलें । मग निर्वाळिलिये भूमी पेरिलें । तरि तें सांडीविखुरी[6] गेलें । म्हणों ये कायी ॥ ३९ ॥ यालागीं सुमनु[7] आणि शुद्धमती । जो अनिंदकु अनन्य-गती । पैं[8] गा गौप्यही परी तयाप्रती । चावाळिजे[9] सुखें ॥ ४० ॥ तरि प्रस्तुत आतां गुणीं इहीं । तूंवांचून आणिक नाहीं । म्हणोनि गुज तरी तुझ्या ठायीं । लपऊं नये ॥ ४१ ॥ आतां किती नावानावा गुज । म्हणतां कानडें[10] वाटेल तुज । तरि ज्ञान सांगेन सहज । विज्ञानेंसीं[11] ॥ ४२ ॥ ( ३१२ ज्ञान-विज्ञान झालें असतां जीवाला मोक्ष मिळतो, ४३–४६ ) परि तेंचि ऐसेनि निवाडें । जैसें भेसळलें खरें-कुडें । मग काढिजे फेंडोवाडें । पारखुनियां ॥ ४३ ॥ कां चांचूचेनि सांडसें । खांडिजे पय-पाणी राजहंसें । तुज ज्ञान-विज्ञान तैसें । वांटूनि देऊं ॥ ४४ ॥ मग वारेचिया धारसा । पडिला कोंडा कां तुरेचि जैसा । आणि कणांचा आपैसा । राशिवे जोडे ॥ ४५ ॥ तैसें जें जाणितलेयासाठीं । संसारें संसाराचिये गांठी । लाऊनि बैसवी पाठीं । मोक्षश्रियेच्या ॥ ४६ ॥

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् । प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २॥**

१ उठाठेवी, खटपट. २ ज्ञानाचें आदिकरण. ३ गुह्य. ४ पूर्ण होवो. ५ मुडयांतून. ६ समार फेकेल्या. ७ सांडलवंडावारी. ८ प्रशस्त अंतःकरणाचा. ९ वारंवार. १० फंटाळवाणें. ११ ब्रह्मज्ञान.

म्हणून सूत्रधाराची विनंती करावी लागते का ? ३० तो सूत्रधार बाहुल्यांच्या कामाकरितां त्यांना नाचवीत नाहीं, तर आपली कुशलता दाखविण्याकरितां नाचवितो; म्हणून आम्हांला या उठाठेवी करण्याचें काय कारण आहे ? ३१ त्या वेळीं श्रीगुरु निवृत्तिराज म्हणतात, "तुला इतकें उदास होण्याचें कारण काय झालें ? तुझें सर्व बोलणें आम्हांला मान्य आहे; तर आतां श्रीकृष्णांनीं जें अर्जुनास सांगितलें, तें सांग." ३२ तेव्हां निवृत्तिदास ज्ञानदेव संतोष पावून मोठ्या उल्हासानें म्हणाले:—होय महाराज, ऐका. श्रीकृष्ण असें म्हणाले:—३३

श्लोकार्थ:—श्रीभगवान म्हणाले, जें जाणलें असतां तूं अशुभ अशा संसारापासून मुक्त होशील, असें हें अत्यंत गुह्य ज्ञान, निर्मत्सर अशा तुला मी विज्ञानासहित सांगतों ॥ १ ॥

अर्जुना, माझ्या अंतःकरणांतील अति गुह्य असें जें ज्ञानाचें आदिकारण, तें पुनः तुला सांगतों. ३४ आतां अशा प्रकारें हें जीवींचें गुह्य फोडून तें तुला मी कां सांगतों अशी जर तुझ्या मनांत सहज शंका येईल, ३५ तर बाबारे, ऐक. तूं समजदार असून केवळ आस्थेची मूर्ति आहेस; आणि आम्ही जें तुला सांगतों, तें तूं मनापासून ऐकतोस; ३६ म्हणून, आमची गुह्य गोष्ट बाहेर पडली तरी पडो, आणि न बोलावयाची गोष्ट बोलावी लागली तरी लागो, पण आमच्या हृदयांतील गुह्य गोष्ट तुझ्या हृदयांत पडो. ३७ अरे, स्तनांत जरी दूध सांठविलेलें असलें, तरी त्याची गोडी स्तनाला नसते; म्हणून, जर एकनिष्ठ सेवन करणारा वत्स मिळाला, तर त्याची इच्छा पूर्ण होवो. ३८ मुद्यांतून पेरण्याचें बीं काढून तें तयार केलेल्या जमिनींत पेरलें, तर तें सांडलवंडीवारी गेलें असें म्हणतां येईल का ? ३९ याकरितां, प्रशस्त अंतःकरणाचा, शुद्ध बुद्धीचा, निंदा न करणारा व एकनिष्ठ असा जर भक्त असेल, तर त्याला आपली मनांतील गुप्त गोष्टही आनंदानें सांगावी. ४० तर ह्या गुणांनीं संपन्न असा सांप्रत तुजवांचून कोणी नाहीं, म्हणून गुप्त अशी ही गोष्ट तुझ्यापासून चोरतां येत नाहीं. ४१ आतां वारंवार गुप्त गुप्त म्हटल्यामुळें तुला कंटाळवाणें वाटेल; तर आता तुला प्रापंचिक ज्ञानासह ब्रह्मज्ञान सागतों * ४२ परंतु खरें आणि खोटें नाणें एके ठिकाणीं मिसळल्यावर ज्याप्रमाणें फाडी लावून निराळें करतात, त्याप्रमाणें ज्ञान व विज्ञान निराळें करून दाखवितों. ४३ किंवा राजहंस आपल्या चोंचीची सांडस करून दूध व पाणी निरनिराळें करतो, त्याप्रमाणें हें ज्ञान-विज्ञान तुला स्पष्ट करून सांगतों. ४४ म्हणजे मग कोंडा व धान्य उफणण्याकरितां वाऱ्यावर धरलें असतां धान्याची खाली सहज रास होऊन कोंडा निराळा होतो. ४५ त्याप्रमाणें तें जाणल्याबरोबर संसाराच्या पाठीमागेंच संसार लावून साधकाला तें मोक्षश्रीच्या पाठीवर नेऊन बसवितें ! ४६

१२ प्रापंचिक ज्ञानासह. १३ खोटें. १४ फाडी लावून. १५ चोंचीचे. १६ निराळें करतो. १७ प्रवाहांत. १८ रास. १९ बरोबर. २० जन्ममरण. * पृ. २४० पहा.

अन्वयः—इदं ( ज्ञानं ) राजविद्या, राजगुह्यं, उत्तमं, पवित्रं, प्रत्यक्षावगमं, धर्म्यं, कर्तुं सुसुखं च अव्ययं अस्ति ॥ २ ॥

( ३१३. ज्ञानाचें श्रेष्ठत्व, ४७–५२ ) जे जाणणेया सुविद्येच्या गांवीं । गुरुत्वाची आचार्यपदवी । जें सकळ गुह्यांचा गोसावी । पवित्रां रावो ॥ ४७ ॥ आणि धर्माचें निजधाम । तेविंचि उत्तमाचें उत्तम । पैं जया येतां नाहीं काम । जन्मांतर ॥ ४८ ॥ मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभाचि असे । प्रत्यक्ष फावो लागे तैसें । आपैसयाचि ॥ ४९ ॥ तेवींचि गा सुखाच्या पाउटीं । चढतां येइजे जयाच्या भेटी । मग भेटल्या कीर मिठी । भोगणें याहि पडे ॥ ५० ॥ परि भोगाचिये ऐलीकडिलिये मेरे । चित्त उभें ठेलें सुखा भरे । ऐसें सुलभ आणि सोपारें । वरि परब्रह्म ॥ ५१ ॥ पैं गा आणिकही एक याचें । जें हाता आलिया तरी न वचे । आणि अनुभवितां कांहीं न वेचे । परि विटेहि ना ॥ ५२ ॥ ( ३१४. शंकेचें स्पष्टीकरण, ५३–५६ ) अवतरणः—येथ जरी तूं तार्किकां- । ऐसी हन घेसी शंका । ना येवढी वस्तु हे लोकां । उरली केविं पां ॥ ५३ ॥ जे एकोत्तरेयाचिया वाढी । जळतिये आगीं घालिती उडी । ते अनायासें स्वगोडी । सांडिती केवीं ॥ ५४ ॥ तरी पवित्र आणि रम्य । तेवींचि सुखोपाय सुगम्य । आणि सुसुख परम धर्म्य । वरि आपणपां जोडे ॥ ५५ ॥ ऐसा अवघाचि हा सुरवाडु आहे । तरी जनाहातीं केविं उरों लाहे । हा शंकेचा ठाव कीर होये । परि न धरावी तुवां ॥ ५६ ॥

अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप । अप्राप्य मां निवर्तंते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥

अन्वयः—हे परंतप, अस्य धर्मस्य अश्रद्दधानाः पुरुषाः मां अप्राप्य मृत्युसंसारवर्त्मनि निवर्तंते ॥ ३ ॥

( ३१५. ज्ञान जीवाचे दृष्टींतून चुकलें, म्हणून ते जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत सांपडले; ५७-६२ ) पाहें पां दूध पवित्र आणि गोड । पासीं त्वचेचिया पदराआड । परि तें अव्हेरूनि गोचिड । अशुद्ध काय न सेविती ॥ ५७ ॥ कां कमलकंदा आणि दुर्दुरीं । नांदणूक एकेचि घरीं । परि परागु सेविजे भ्रमरीं । येरां चिखलुचि उरे ॥ ५८ ॥ नातरी निदैवाच्या परिवरीं । लोह्यां रुतलियें आहाति सहस्रवरी । परि तेथ वसोनि उपवासु करी । कां दरिद्रें जिये ॥ ५९ ॥ तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्वसुखाचा आरामु । कीं भ्रांतासी कामु । विषयांवरी ॥ ६० ॥ बहु मृगजळ देखोनि डोळां । थुंकिजे अमृताचा गिळितां गळाळौ । तोडिला परिसु बांधिला गळां । शुक्तिकालाभें ॥ ६१ ॥ तैसी अहंममतेचिये लवडसवैडी । मातें न पवतीचि

१ ज्ञानाच्या. २ ज्या ज्ञानाला. ३ कारण. ४ थोडें. ५ प्राप्त होते. ६ पायरीनें. ७ कांठावर. ८ आनंदयुक्त. ९ नाहींसें होत नाहीं. १० चतुरा. ११ मिळाल्याशिवाय कशी राहिली ! १२ एकोत्रा व्याजाकरिता १३ धर्माला पूर्ण अनुकूल. १४ अनुकूल. १५ जवळ. १६ रक्त.

श्लोकार्थः—हें ज्ञान सर्व विद्यांचा राजा, सर्व गुह्यामध्यें श्रेष्ठ, उत्कृष्ट, पवित्र, प्रत्यक्ष अनुभवास येणारें, धर्मास अनुसरून असणारें, सुखानें प्राप्त होणारें व अविनाशी असें आहे ॥ २ ॥

ज्याला सर्व ज्ञानांच्या ठिकाणीं मुख्य असें आचार्याचें स्थान मिळतें, जें सर्व गुह्याचा स्वामी, पवित्र वस्तूंचा राजा, ४७ आणि धर्माचें अधिष्ठान; तसेंच उत्तमांत उत्तम, व ज्या ज्ञानाची प्राप्ति झाली असता दुसरा जन्म घेण्याचें कारण रहात नाहीं; ४८ जें गुरूच्या मुखातून थोडें बाहेर दिसूं लागलें नाहीं तोंच शिष्याच्या हृदयांत स्वयमेव असलेलें ( ब्रह्म ) त्यास सहज प्राप्त होतें; ४९ त्याचप्रमाणें, सुखाच्या पायरीनें चढत गेलें असता ज्याची भेट होते; आणि मग भेट झाल्यावर, भेटीपासून होणाऱ्या सुखाचा ज्याच्या ठिकाणीं लय होतो; ५० परंतु ज्याच्या प्राप्तीच्या सुखाच्या अलीकडील काठावर उभें असतांही चित्त आनंदयुक्त होतें, असें सुलभ आणि सोपें असून जें परब्रह्म होय. ५१ खरोखर या ज्ञानात आणखीही गुण आहेत, ते हे कीं, हें प्राप्त झालें असतां नाहीसें होत नाहीं; हें अनुभव घेतल्यानें कमी होत नाही; तसेंच जवळ असतें, परंतु विटतही नाहीं. ५२ हे चतुर अर्जुना, आतां तूं जर अशी शंका घेशील कीं, एवढी अप्रतिम वस्तु असतां लोकांना मिळाल्याशिवाय कशी राहिली ? ५३ जे लोक एकोत्रा व्याजाकरिता जळत्या आगींतही उडी घालण्यास मागेंपुढें पहात नाहींत, ते सहज आपल्या ठिकाणींच असलेली गोडी कशी टाकून देतील ? ५४ तरी पवित्र आणि रमणीय, तसेंच सुख देणारें, जाणण्यास सुलभ, अति सुखकारक, धर्माला पूर्ण अनुकूल व आपले ठिकाणींच प्राप्त होणारें; ५५ अर्जुना, याप्रमाणें सर्व गोष्टी अनुकूल असतांही लोकांच्या हातीं लागल्याशिवाय हें कसें राहिलें, ही शंका घेण्यास जागा आहे खरी; परंतु तूं अशी शंका घेऊं नको. ५६

श्लोकार्थः—हे परतपा, ह्या ( आत्मज्ञानरूप ) धर्मावर श्रद्धा न ठेवणारे पुरुष, माझी प्राप्ति न होतां मृत्युयुक्त संसाराच्या मार्गांतच परिभ्रमण करितात ॥ ३ ॥

हें पहा, गाईचें दूध हें पवित्र असून गोड आहे; तसेंच अगदीं जवळ—त्वचेच्या पडद्याच्या आंतच—आहे; परंतु त्याचा त्याग करून गोचीड रक्तच सेवन करीत नाहीं का ? ५७ किंवा कमळांचा कांदा व बेडूक हे एकेच ठिकाणीं वास्तव्य करतात, परंतु कमळांतील मकरंदाचें सेवन भ्रमर करतात व बेडकांच्या वाट्याला चिखलच राहतो ! ५८ अथवा, दुर्दैव्याच्या घरीं मोहरा वगैरे अगणित द्रव्य पुरलेलें असूनही तो तेथें बसून उपास काढून दारिद्रावस्था भोगतो; ५९ त्याचप्रमाणें, मनुष्याच्या सर्व सुखाचें विश्रांतिस्थान असा मी " राम " मनुष्याच्या हृदयात असता त्या अज्ञानी पुरुषाची विषयावर वासना असते. ६० पुष्कळसें मृगजळ दृष्टीस पडून तोंडांत असलेला अमृताचा घोंट थुंकून टाकावा, किंवा शिंप मिळाली असतां गळ्यांत बांधलेला परीस तोडून टाकावा, ६१ त्याप्रमाणें, ज्याचे मनावर अहंममतेचा

१७ बेडूक. १८ मकरंद. १९ घरीं. २० मोहरा वगैरे द्रव्याच्या कढया. २१ पुरलेल्या. २२ घोंट. २३ पगडा बसलेला आहे.

बापुडीं । म्हणोनि जन्ममरणाचिये दुथडी । डेहुळितें ठेलीं ॥ ६२ ॥ ( ३१६. पूर्ण स्वरूपाच्या ठिकाणीं जग हें केव्हांही नाहीं, हाच ऐश्वर्य योग, (६३–८७) अवतरणः– येऱ्हवीं मी तरी कैसा । मुखाप्रति भानु कां जैसा । कहीं दिसे न दिसे ऐसा । वीणीचा नोहें ॥ ६३ ॥

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना। मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः॥४**

अन्वयः—अव्यक्तमूर्तिना मया इदं सर्वं जगत् ततं (अस्ति); सर्वभूतानि मत्स्थानि (सन्ति) अहं तेषु न च अवस्थितः ( अस्मि ) ॥ ४ ॥

माझेया विस्तारलेपणा नांवें[4] । हें जगचि नोहे आघवें । जैसें दूध मुरालें स्वभावें । तरि तेंचि दहीं ॥ ६४ ॥ कां बीजचि जाहलें तरु । अथवा भांगा[6]राचि अळंकारु । तैसा मज एकाचा विस्तारु । तें हें जग ॥ ६५ ॥ हें अव्यक्तपणें थिजलें । तेंचि मग विश्वाकारें वोथिंजलें । तैसें अमूर्तमूर्ति मियां विस्तारलें । त्रैलोक्य जाणें ॥ ६६ ॥ महदादि देहान्तें । इयें अशेषेंही भूतें । पैं माझ्या ठायीं बिंबतें[10] । जैसें जळीं फेण ॥ ६७ ॥ परि तया फेणाआंतु पाहतां । जेवीं जळ न दिसे पंडुसुता । नातरी स्वप्नींची अनेकता । चेइलिया नोहिजे ॥ ६८ ॥ अवतरणः–तैसीं भूतें इयें माझ्या ठायीं । बिंबतीं तयांमाजि मी नाहीं । इया उपपत्ती तुज पाहीं । सांगितलिया मागां ॥ ६९ ॥ म्हणऊनि बोलिलिया बोलाचा अंतिसो । न कीजे यालागीं हें असो । परि मजआंतु पैसो[13] । दिठी तुझी ॥ ७० ॥

**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्। भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ५**

अन्वयः—च भूतानि मत्स्थानि न ( सन्ति ); मे ऐश्वरं योगं पश्य. अहं भूतभृत् अपि भूतस्थः न; मम आत्मा च भूतभावनः ( अस्ति ) ॥ ५ ॥

आमुचा प्रकृतीपैलीकडील भांवो । जरी कल्पनेवीण लागसी पाहों । तरी मजमाजि भूतें हेंही वावो । जें मी सर्व म्हणउनी ॥ ७१ ॥ येऱ्हवीं संकल्पाचिये सांजवेळे । नावेकें[16] तिमिरेजैती बुद्धीचे डोळे । म्हणोनि अखंडिताचि परि झांवळें । भूतभिन्न ऐसें देखे ॥ ७२ ॥ तेचि संकल्पाची सांज जैं लोपे । तैं अखंडिताचि आहे स्वरूपें । जैसें शंका जातखेंवो लोपे । सापपण माळेचें ॥ ७३ ॥ येऱ्हवीं तरी भूमीआंतूनि स्वयंभ । काय घडेया गाडगेयांचे निघती कोंभ । परि ते कुलालमतीचे गर्भे । उमटले कीं ॥ ७४ ॥ नातरी सागरींच्या पाणी । काय तरंगाचिया आहाती खाणी । ते अवांतर करणी । वारयाची नव्हे ॥ ७५ ॥ पाहें पां कापसाच्या पोटीं । काय कापडाची होती पेटी[20] । तो वेढितयाचिया दिठी । कापड जाहला ॥ ७६ ॥

१ दोन्ही तीरामध्यें. २ बुचकळ्या खात. ३ उणीवेचा. ४ म्हणशील तर. ५ थिजलें. ६ सोनें. ७ पातळ झालें. ८ निर्गुण असून साकार झालेला. ९ महत्तत्त्वापासून देहापर्यंत. १० उत्पन्न होतें. ११ खुबी. १२ पाल्हाळ. १३ प्रवेश करो. १४ स्वरूप. १५ मिथ्या. १६ काहीं वेळ. १७ अंधकारानें ग्रासले जातात. १८ क्षणहीत. १९ जातांक्षणीं. २० गट्ठा.

पगडा बसलेला आहे, ते बिचारे मला प्राप्त होत नाहींत. म्हणून जन्ममरणांच्या दोन्ही तीरांच्या मध्येंच बुचकळ्या खात बसतात ! ६२ येरव्हीं मी कसा आहें म्हणशील, तर सूर्य ज्याप्रमाणें वाटेल तिकडून पाहणाराला तोंडासमोर दिसतो, त्याप्रमाणें आहें. परंतु त्याच्यांत जी एक उणीव आहे, कीं तो केव्हां दिसतो व केव्हां दिसत नाहीं, ती मात्र माझ्यांत नाहीं. ६३

श्लोकार्थः—अव्यक्तस्वरूप अशा मीं हें सर्व जग व्यापून टाकलें आहे; सर्व भूतें माझे ठिकाणीं आहेत, पण मी त्यांच्यामध्यें स्थित नाहीं ॥ ४ ॥

माझ्या निर्गुण स्वरूपाचा विस्तार कोणता म्हणशील, तर हें सर्व जगच नव्हे का? ज्याप्रमाणें, दूध सहज जरी थिजलें तरी तेंच दहीं; ६४ किंवा बीजाचाच वृक्ष होतो, अथवा सुवर्णाचे अलंकार होतात, त्याचप्रमाणें, निर्गुण असा जो एकटा मी, त्या माझा जो विस्तार तेंच हें जग होय. ६५ माझें हें स्वरूप अव्यक्त असतें, तेव्हां निराकार असतें; तेंच मग सृष्टीच्या रूपानें विस्तार पावून आकाराला येतें. याप्रमाणें, निर्गुण असून साकार झालेला जो मी, त्यानेंच हें त्रैलोक्य मांडलें असें जाण. ६६ महत्तत्त्वापासून देहापर्यंत हीं सर्व भूतें खरोखर माझ्यापासूनच उत्पन्न होतात. ज्याप्रमाणें पाण्यापासून फेंस उत्पन्न होतो, ६७ परंतु त्या फेंसाच्या आंत पाहूं गेलें असतां पाणी दिसत नाहीं; किंवा अर्जुना, स्वप्नांत जीवाचें अनेक रूपें धारण करणें ज्याप्रमाणें जागें झाल्यावर नाहींसें होतें, ६८ त्याप्रमाणें, हीं भूतें जरी माझ्या ठिकाणीं भासलीं, तरी त्यांचे ठिकाणीं मी नाहीं. हें उपपादन तुला मागें सांगितलेंच आहे.* ६९ म्हणून, बोललेल्या गोष्टीचा पाल्हाळ करूं नये. तेव्हां तें राहूं दे. परंतु तुझ्या दृष्टीचा प्रवेश माझ्या अंतर्यामीं होऊं दे. ७०

श्लोकार्थः—आणि भूतें माझ्या ठिकाणीं नाहींत, अशी माझी ईश्वरी अद्भुत घटना पहा. मी भूतांना धारण करणारा असून भूताचे ठिकाणीं राहणारा नाहीं, आणि माझा आत्मा भूतांची उत्पत्ति व संरक्षण करणारा आहे ॥ ५ ॥

मायेच्या पलीकडील माझें जें स्वरूप, तें जर कल्पनेशिवाय पाहूं लागलास, तर माझे ठिकाणीं सर्व भूतें आहेत असें जें तुला सांगितलें, तें सर्व मिथ्या आहे असें तुला भासेल. कारण सर्व मीच आहें. ७१ एरव्हीं, संकल्परूप संध्याकाळचे वेळेस ज्ञानरूप डोळे अज्ञानरूप अंधकारानें कांहीं वेळ ग्रासले जातात; म्हणून त्या झांजडींत, मी अखंड असतां भूतें मजहून निराळीं दृष्टीस पडतात. ७२ त्याच संकल्परूपी संध्याकाळचे वेळेचा लोप झाला म्हणजे, ज्याप्रमाणें नीळमण्याच्या माळेवर कवड्या सापाचा झालेला सर्व भास, शंका दूर होण्याबरोबर नाहींसा होतो, त्याप्रमाणें मी अखंड आहें असा दिसतों. ७३ येरव्हीं जमिनींतून घागर, मडकीं वगैरेंचे कोंम स्वतःसिद्ध निघतात काय? परंतु कुंभाराच्या बुद्धीनें ते सर्व तयार होतात. ७४ किंवा समुद्राच्या पाण्यांत लाटांच्या खाणी का आहेत? तर तें कृत्य वाऱ्याशिवाय इतराचें नव्हें; ७५ हें पहा, कापसाच्या पोटांत कापडाचे गठ्ठे असतात का? वापरणाराच्या समजुतीनें तो कापड बनला आहे! ७६ जर

* सातवे अध्यायांतील १२ वा श्लोक पहा.

जरी सोनें लेणें होऊनि घडे । तरी तयाचें सोनेपण काय मोडे । येर अळंकार हे वराचिलीकडे । लेतयाचेनि भावें ॥ ७७ ॥ सांगें पडिसादाचीं[१] प्रत्युत्तरें । कां आरिसां जें आविष्करे[२] । तें आपलें कीं साचोकारें । तेयांचि होतें ॥ ७८ ॥ तैसी इये निर्मळ माझ्या स्वरूपीं । जो भूतभावना आरोपी । तयासि तयाच्या संकल्पीं । भूताभासु असे ॥ ७९ ॥ तेचि कल्पिती प्रकृती पुरे । तरि भूताभासु आधींच सरे । मग स्वरूपीं उरे एकसरें । निखळ माझें ॥ ८० ॥ हें असो आंगीं भरलिया भंवडी । जैशा भोंवत दिसती अरडींदरडी[३] । तैसी आपुलिया कल्पना अखंडीं । गमती भूतें ॥ ८१ ॥ तेचि कल्पना सांडूनि पाहीं । तरि मी भूतीं भूतें माझिया ठायीं । स्वप्नींही परि नाहीं । कल्पावयाजोगें ॥ ८२ ॥ आतां मीच एक भूतातें धर्ता । अथवा भूतांमाजि मी असता । या संकल्पसान्निपाता[४] । आंतुलियाँ बोलिया ॥८३॥ म्हणोनि परियेसीं गा प्रियोत्तमा । यापरी मी विश्वासी विश्वात्मा । जो इया लटकिया भूतग्रामा । भाव्यु[५] सदा ॥ ८४ ॥ रश्मीचेनि[६] आधारें जैसें । नव्हे तेंचि मृगजळ आभासे । माझ्या ठायीं भूतजात तैसें । आणि मातेंही भावी[८] ॥ ८५ ॥ मी ये परीचा भूतभावनु[९] । परि सर्व भूतांसि अभिन्नु[१०] । जैसी प्रभा आणि भानु । एकचि ते ॥ ८६ ॥ हा आमुचा ऐश्वर्ययोगु[११] । तुवां देखिला कीं चांगु । आतां सांगें कांहीं एथ लैंगु[१२] । भूतभेदाचा असे ॥ ८७ ॥ ( ३१७. भूतापासून भगवान वेगळा नाहीं व भूतें भगवंताहून वेगळी नाहींत, ८८–९२ ) अवतरण:—यालागीं, मजपासूनि भूतें । आनें नव्हती हें निरुतें[१३] । आणि भूतांवेगळिया मातें । कांहींचें न मनीं हो ॥ ८८ ॥

यथाऽऽकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।
तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥

अन्वयः—यथा सर्वत्रगः महान् वायुः नित्यं आकाशस्थितः ( अस्ति ), तथा सर्वाणिभूतानि मत्स्थानि ( सन्ति ) इति उपधारय ॥ ६ ॥

पैं गगन जेवढें जैसें । पवनहि गगनीं तेवढाचि असे । सहजें हालविलिया वेगळा दिसे । येऱ्हवीं गगन तेंचि तो ॥ ८९ ॥ तैसें भूतजात माझ्या ठायीं । कल्पिजे तरी आभासे कांहीं । निर्विकल्पीं[१६] तरि नाहीं । तेथ मीचि मी आघवें ॥ ९० ॥ अवतरण:—( ओवी ९१ ते ९७ पर्यंत ) म्हणऊनि नाहीं आणि असे । हें कल्पनेचेनि सौरसें[१७] । जें कल्पनालोपें भ्रंशे । आणि कल्पनेसवें होय ॥ ९१ ॥ तेंचि कल्पितें मुदल जाये । तैं असे नाहीं हें कें आहे । म्हणऊनि पुढती तूं पाहें । हा ऐश्वर्ययोगु ॥ ९२ ॥ ( ३१८. बोधानें चराचरात आपणच भरले आहों असा अनुभव येईल, ९३–९५ ) ऐसिया प्रतीतिबोधसागरीं[१८] । तूं आपणेयातें

१ प्रतिध्वनीचीं. २ प्रगट होतें. ३ डोंगर वगैरे. ४ सन्निपातवायूच्या लहरींतील. ५ सृष्टीला. ६ आधार. ७ सूर्यकिरणाच्या. ८ कल्पना करतो. ९ भूतांना उत्पन्न करणारा. १० एकरूप. ११ अद्भुत शक्ति. १२ संबंध. १३ खरोखर. १४ कधींही. १५ धारा. १६ कल्पनेच्या अभावीं. १७ संबंधानें. १८ अनुभवरूपी.

सोन्याचे दागिने बनविले, तर सोनेंपण नाहींसें होतें का? बाकी स्थूल दृष्टीनें वापरणाराच्या कल्पनेनें ते दागिने) दिसतात; ७७ आपल्या शब्दाचा जो प्रतिध्वनि ऐकूं येतो, किंवा आरशांत जें आपलें स्वरूप आपण पाहतों, तो खरोखर आपल्या बोलण्याचा किंवा पाहण्याचा परिणाम आहे, किंवा आपल्या पूर्वीच तें तेथें होतें सांग बरें! ७८ त्याचप्रमाणें ह्या माझ्या निरुपाधिक स्वरूपावर जो भूतांच्या कल्पनेचा आरोप घेतो, त्याला त्याच्या कल्पनेमुळें माझ्या ठिकाणीं भूतांचा भास होतो. ७९ तीच कल्पना करणारी माया संपली, म्हणजे माझ्या ठिकाणचा भूतांचा भास नाहींसा होतो. मग, माझें निरुपाधिक असें जें शुद्ध स्वरूप, तेंच निखालस उरतें. ८० हें असो; आपल्या भोंवतीं गरगर फिरतांना भोवंड आल्यावर ज्याप्रमाणें डोंगर वगैरे फिरतातसें दिसतें, त्याचप्रमाणें, आपल्या मनांत कल्पना उत्पन्न झाल्यावर अखंड ब्रह्मस्वरुपांत भूतांचा भास होतो. ८१ तीच कल्पना सोडून जर पाहिलें, तर मी भूतांच्या ठिकाणी व भूतें माझ्या ठिकाणीं आहेत, अशी संभ्रांत देखील कल्पना करण्यासारखी गोष्ट नाहीं. ८२ आतां, 'मीच एक भूतांचा धारण करणारा अथवा भूतांत असणारा' ह्या सर्व गोष्टी संकल्परूप सन्निपात वायूच्या लहरींतील बडबडी आहेत. ८३ म्हणून हे प्रियोत्तमा, ऐक कीं, अशा प्रकारें मी सृष्टीचा विश्वात्मा किंवा खोट्या सृष्टीचा आधार, ह्या कल्पना मिथ्या आहेत. ८४ ज्याप्रमाणें सूर्याच्या प्रखर किरणांनीं, पाणी नसता मृगजलाचा भास होतो, त्याप्रमाणें, सर्व भूतें माझ्या ठिकाणीं आहेत व मीही त्यांमध्यें आहें, अशी कल्पना उत्पन्न होते. ८५ अशा प्रकारें, भूतांना उत्पन्न करणारा असूनही, सूर्य आणि त्याचें तेज हीं ज्याप्रमाणें एकच आहेत, त्याप्रमाणें मी त्यांपासून निराळा नाहीं. ८६ हा आमचा ऐश्वर्ययोग (अद्भुत कृत्य) तुला चांगला समजला ना? तर आतां सांग बरें, कीं मी व प्राणिमात्र यांच्यांत कांहीं तरी भेदाचा संबंध आहे काय? ८७ याकरितां, माझ्याहून सर्व प्राणिमात्र खरोखर वेगळे नाहींत; आणि मीही त्यांच्यापासून वेगळा आहें असें कधीं समजूं नको. ८८

श्लोकार्थः—ज्याप्रमाणें सर्वगामी व मोठा वायु नेहमीं आकाशाचे ठिकाणीं असतो, त्याप्रमाणें सर्व भूतें माझे ठिकाणीं आहेत, असें तूं समज ॥ ६ ॥

आकाशाचा जेवढा विस्तार आहे, तेवढा वारा भरून राहिलेला आहे; परंतु तो सहज हालवला तर आकाशापासून निराळा भासतो. येरव्हीं आकाश तेंच तो आहे; ८९ त्याप्रमाणें, प्राणी माझ्या ठिकाणीं आहेत अशी मनांत कल्पना आली, म्हणजे थोडा भास होतो. तेंच कल्पनेच्या अभावीं पाहूं गेलें असतां सर्वत्र मी एकच आहें. ९० म्हणून भूतांचें नसणें आणि असणें हें कल्पनेच्या संबंधानें भासतें; व जें कल्पना नाहींशी झाल्यावर भासत नाहीं आणि कल्पनेबरोबर भासतें, ९१ तेंच कल्पना उत्पन्न करणारें अज्ञान समूळ नाहींसें झाल्यावर भूतांचें असणें व नसणें हें कोठून भासणार? म्हणून यापुढें माझी अद्भुत कृति तुला सांगतों ती पहा. ९२ अशा या अनुभवरूपी समुद्रांत तूं स्वतः एक लाट बनून

कल्लोळ एक करीं । मग जंव पाहसी चराचरीं । तंव तूंचि आहासी ॥ ९३ ॥ या जाणणेयाचा चेवो[३] । तुज आला म्हणती देवो । तरी आतां द्वैत स्वप्न वावो । जालें कीं ना ॥ ९४ ॥ तरी पुढती जरी विपायें । बुद्धीसि कल्पनेची झोंप ये । तरी अभेदबोधु जाये । जें स्वप्नीं पडिजे ॥ ९५ ॥ ( ३१९. कल्पनारूप निद्रा जाऊन बोधरूपता प्राप्त होते, ९६–९७ ) म्हणोनि ये निद्रेची वाट मोडे । निखिळ उद्‌बोधाचेंचि आपणपें घडे । ऐसें वर्म जें आहे फुडें । तें दावों आतां ॥ ९६ ॥ तरी धनुर्धरा धैर्या । निकें अवधान देईं बा धनंजया । पैं सर्व भूतांतें माया । करी हरी गा ॥ ९७ ॥

सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ।
कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥

अन्वयः—कौंतेय, सर्वभूतानि कल्पक्षये मामिकां प्रकृतिं यान्ति; पुनः अहं कल्पादौ तानि विसृजामि ॥ ७ ॥

( ३२०. भूतें प्रकृतीपासून होतात व प्रकृतींत लय पावतात, ९८–१०५ ) जिये नांव गा प्रकृती । जे द्विविध सांगितली तुजप्रती । एकी अष्टधा भेदव्यक्ती । दुजी जीवरूपा ॥ ९८ ॥ हा प्रकृतिविखो[१०] आघवा । तुवां मागां परिसिलासे पांडवा । म्हणोनि असो काई सांगावा । पुढतपुढती ॥ ९९ ॥ तरी ये माझिये प्रकृती । महाकल्पाच्या अंतीं । सर्व भूतें अव्यक्तीं । ऐक्यासि येती ॥ १०० ॥ ग्रीष्माच्या अतिरसीं । सबीजें तृणें जैसीं । मागुती भूमीसी । सुलीनें[१२] होतीं ॥ १ ॥ का वर्षिये ढेंढें[१४] फिटे । जेव्हां शारदीयेचा अनुघडु फुटे । तेव्हां घनजात आटे । गगनींचें गगनीं ॥ २ ॥ नातरी आकाशाचे खोंपे[१८] । वायु निवांतुचि लोपे । कां तरंगता हारपे । जळीं जेवीं ॥ ३ ॥ अथवा जागिनालिये वेळे । स्वप्न मनींचें मनीं मावळे । तैसें प्राकृत प्रकृतीं मिळे । कल्पक्षयीं ॥ ४ ॥ मग कल्पादीं पुढती । मीचि सृजीं ऐसी वदंती[२३] । तरी इयेविषयीं निरुती[२४] । उपपत्ती आइक ॥ ५ ॥

प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः । भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥८॥

अन्वयः-( अहं ) स्वां प्रकृतिं अवष्टभ्य प्रकृतेः वशात् इमं कृत्स्नं अवशं भूतग्रामं पुनः पुनः विसृजामि ॥ ८ ॥

( ३२१. प्रकृतीचा स्वीकार करून मी सर्व भूतांची उत्पत्ति करितों, तरी पण मला भूतांचें कांहीं करावें लागत नाहीं, १०६-१२२ ) तरी हेचि प्रकृति किरीटी । मी स्वकीया सहजें अधिष्ठीं । तेथ तंतुसमवायें पटीं । जेविं विणावणी दिसे ॥ ६ ॥ मग तिये विणावणीचेनि आधारें । लहाना चौकडिया पटत्व भरे । तैसी पंचात्मकें आकारें । प्रकृतिचि होय ॥ ७ ॥ जैसें विरजणियाचेनि संगें । दूधाचें आटेजों

१ लाट. २ ज्ञानाचा. ३ प्रकाश. ४ खोटें. ५ प्रज्ञानाचें. ६ खरें. ७ उत्पत्ति करी. ८ लय करी. ९ देहरूप ( जड प्रकृति ) व जीवरूप ( चेतन प्रकृति ) अशी दोन प्रकारची. १०

रहा; मग तूं या चराचराकडे पाहूं लागलास, म्हणजे सर्वत्र तूंच भरला आहेस असें तुझ्या दृष्टीस पडेल । ९३ देव म्हणाले:—अर्जुना । हें जें मी तुला ज्ञान सांगितलें, त्याचा तुझ्या मनांत कांहीं प्रकाश पडला का ? तर आता तुला जें मीं व विश्व हीं दोन आहेत असें स्वप्न पडलें होतें, तें खोटें ठरलें नाहीं का ? ९४ परंतु पुढें कदाचित् तुझ्या बुद्धीला जर कल्पनारूपी झोंप लागली, तर मी व जग हीं एकच आहेत असा जो बोध, तो जगद्रूपी स्वप्न पडूं लागल्यावर नाहींसा होईल; ९५ म्हणून, या कल्पनारूप निद्रेची वाट मोडून, शुद्ध असें जें ब्रह्मज्ञान तें आपोआप तुला प्राप्त होईल असें जें एक खरें तत्त्व आहे तें तुला आतां दाखवून देतों. ९६ तर, हे धैर्यवान धनुर्धरा धनंजया, तूं नीट लक्ष दे कीं, प्राणिमात्राची उत्पत्ति, स्थिति व लय यांस एक मायाच कारण आहे. ९७.

श्लोकार्थः—अर्जुना, सर्व भूतें कल्पाचे अंतीं माझ्या प्रकृतीचे ठिकाणीं लीन होतात; आणि कल्पाचे प्रारंभीं मी पुनः त्याना उत्पन्न करीत असतों ॥ ७ ॥

त्या मायेला प्रकृति असें म्हणतात, व ती दोन प्रकारची आहे म्हणून तुला पूर्वीं* सांगितलेंच आहे. पैकीं एक आठ प्रकारच्या रूपानें भिन्न आहे व दुसरी जीवरूप अशी आहे. ९८ हे पांडवा, ह्या प्रकृतीचा सर्व विषय तूं पूर्वीं* ऐकलाच आहेस, म्हणून त्याजबद्दल पुनःपुनः सांगण्याचें कारण नाहीं. ९९ तरी महाप्रलयाच्या शेवटीं हीं सर्व भूतें माझ्या प्रकृतिरूप अव्यक्त स्वरूपांत लय पावतात. १०० ग्रीष्म ऋतूमध्यें कडक उन्हाच्या योगानें ज्याप्रमाणें गवत बीजासह जिरून जातें; १ किंवा वर्षाकालच्या मेघाचें अवडंबर संपल्यावर शरदतूचा अंकुर फुटतो, तेव्हां सर्व आकाशातील ढग आकाशांतच जिरून जातात; २ अथवा आकाशाच्या पोकळींत ज्याप्रमाणें वायु उत्पन्न होऊन नाहींसा होतो, किंवा पाण्यांत उत्पन्न झालेल्या लाटा पाण्यांतच नाहींतशा होतात, ३ नाहीं तर जागें झाल्यावर मनांतलें स्वप्न मनांतच मावळतें, त्याप्रमाणें महाप्रलयाच्या शेवटीं प्रकृतीपासून उत्पन्न झालेलीं सर्व भूतें प्रकृतींतच मिळतात; ४ मग सृष्टीच्या आरंभीं पुनः तीं मीच निर्माण करितों अशी जी बोलवा आहे, तीविषयींची खरी खुबी तुला सांगतों, ती ऐक. ५

श्लोकार्थः—मी आपल्या प्रकृतीचें अवलंबन करून, स्वभावतःच पराधीन असा हा सर्वभूतसमुदाय पुनःपुनः उत्पन्न करितों ॥ ८ ॥

तर अर्जुना, ह्याच माझ्या प्रकृतीचा मी जेव्हां सहज अंगीकार करतों, तेव्हां, तंतूंच्या समुदायासंबंधानें ज्याप्रमाणें वस्त्रावर विणकर दिसते, व ६ मग त्या विणकरीच्या आधारानें जशी लहान चौकड्यांची वस्त्रें तयार होतात, त्याप्रमाणें, पंचभूतात्मक आकारानें प्रकृति सृष्टिरूपानें चमकूं लागते. ७ ज्याप्रमाणें विरजण घातल्याच्या योगानें दूध विरजूं

विषय. ११ उष्णकाळाच्या अंतीं. १२ गुप्त होतात. १३ वर्षाकालचें. १४ अवडंबर. १५ शरदृतूचा. १६ अंकुर. १७ ढग. १८ पोकळींत. १९ जागें झाल्यावर. २० प्रकृतीपासून उत्पन्न झालेलें. २१ महाप्रलयाच्या शेवटीं. २२ सृष्टीच्या आरंभीं. २३ बोलवा. २४ खरी. २५ खुबी. २६ अंगीकार करतो. २७ तंतुसंबंधानें. २८ विणकर. २९ पंचभूतात्मक.  * अध्याय ७, श्लोक ४।५ पहा.

लागे । तैसी प्रकृती आंगा रिगे । सृष्टीपणाचिया ॥ ८ ॥ बीज जळाची जवळीक लाहे । आणि तेंचि शाखोपशाखीं होये । तैसें मज करणें आहे । भूतांचें हें ॥ ९ ॥ अगा नगर हें रायें केलें । या म्हणणया साचपण कीर आलें । परि निरुतें पहाता काय सिणले । रायाचे हात ॥ ११० ॥ आणि मी प्रकृति अधिष्ठीं तें कैसें । जैसा स्वप्नीं जो असे । मग तोच प्रवेशे । जागृतावस्थे ॥ ११ ॥ तरि स्वप्नौनि जागृती येतां । काय पाय दुखती पंडुसुता । कीं स्वप्नामाजि असतां । प्रवासु होय ॥ १२ ॥ या आघवियाचा अभिप्रावो कायी । जे हें भूतसृष्टीचें कांहीं । मज एकही करणें नाहीं । ऐसाचि अर्थु ॥ १३ ॥ जैसी रायें अधिष्ठिली प्रजा । व्यापारे आपुलालिया काजा । तैसा प्रकृतिसंगु हा माझा । येर करणें तें इयेचें ॥ १४ ॥ पाहें पां पूर्णचंद्राचिये भेटी । समुद्रीं अपार भरतें दाटी । तेथ चंद्रासि काय किरीटी । उपेखा पडे ॥ १५ ॥ जड परि जवळिका । लोह चळे तरी चळो कां । तरि कवणु शिणु भ्रामका । सन्निधानाचा ॥ १६ ॥ किंबहुना यापरी । मी निजप्रकृति अंगिकारीं । आणि भूतसृष्टि एकसरी । प्रसवोंचि लागे ॥ १७ ॥ जो हा भूतग्रामु आघवा । असे प्रकृतीअधीन पांडवा । जैसी बीजाचिया वेल-पालवा । समर्थ भूमि ॥ १८ ॥ नातरी बाळादिकां वयसा । गोसांवी देहसंगु जैसा । अथवा घनावळी आकाशा । वार्षिये जेवीं ॥ १९ ॥ कां स्वप्नासि कारण निद्रा । तैसी प्रकृति हे नरेंद्रा । या अशेषाहि भूतसमुद्रा । गोसाविणी गा ॥ १२० ॥ स्थावरा आणि जंगमा । स्थूळा अथवा सूक्ष्मा । हें असो भूतग्रामा । प्रकृतिचि मूळ ॥ २१ ॥ अवतरण.—म्हणोनि भूतें हन सृजावीं । कां सृजिलीं प्रतिपाळावीं । इये करणीं न येतीं आघवीं । आमुचिया आंगा ॥ २२ ॥ ( १२२. प्रकृतिकर्मापासून परमात्मा अलिप्त आहे, १२३-१२६ ) जळीं चांद्रिकेचिया पसरती वेली । ते वाढी चंद्रें नाहीं केली । तेविं मातें पावोनि ठेलीं । दुरी कर्में ॥ २३ ॥

**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय । उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥**

अन्वयः—धनंजय, तानि कर्माणि, तेषु कर्मसु असक्तं उदासीनवत् आसीनं मा न च निबध्नंति ॥ ९ ॥

आंगें सुटलिया सिंधुजळाचा लोटू । न शके धरूं सैंधवाचा घांटु । तेविं सकळ कर्मा मीच शेवटु । तीं काय बांधती मातें ॥ २४ ॥ धूमरेंजांची पिंजरी । वाजतिया वायूतें जरी होकोरी । कां सूर्यबिंबामाझारीं । आंधारें शिरे ॥ २५ ॥ हें असो पर्वताचिये हृदयींचें । जेविं पर्जन्यधारास्तव न खोंचे । तेविं कर्मजात

१ आज्ञेंत ठेवलेली. २ श्रम. ३ लोहचुंबकाला. ४ हालवून जवळ आणण्याचा. ५ प्राणिसमुदाय. ६ अवस्था. ७ मुख्य कारण. ८ मेघपंक्ति. ९ उत्पन्न करावी. १० धुराच्या परमाणूंची. ११ छत १२ हाक मारून अडथळा करील.

लागतें, त्याप्रमाणें, प्रकृति ही सृष्टींतील आकार बनूं लागते. ८ ज्याप्रमाणें पाण्याच्या सान्निध्यानें बीजाला फांद्या वगैरे फुटून त्याचें झाड होतें, त्याप्रमाणें प्राणिमात्रासंबंधीं सृष्टींतील पसारा माझ्यामुळें होतो. ९ अरे, एखादें शहर राजानें बसविलें हें म्हणणें जरी खरें असलें, तरी खरोखर पाहूं गेलें असतां राजाच्या हाताला कांहीं शीण पडतो का ? ११० आणि मी प्रकृतीचा स्वीकार करतां तो कसा म्हणशील, तर जसा स्वप्नावस्थेंत असलेला मनुष्य जाग्रदवस्थेंत येतो तसा. ११ तर, हे पंडुसुता, स्वप्नावस्थेंतून जाग्रदवस्थेंत येतांना त्या मनुष्याचे पाय दुखतात का ? किंवा स्वप्नावस्थेंत असतांना त्याला फिरण्याचे श्रम होतात का ? १२ या सर्वांचा अभिप्राय काय म्हणशील, तर ही भूतसृष्टि निर्माण करण्याला मला कांहींएक करावें लागत नाहीं, हाच अर्थ आहे. १३ ज्याप्रमाणें राजानें आज्ञेंत ठेवलेली प्रजा आपआपल्या प्राप्तीस्तव व्यापार करते, त्याप्रमाणें, प्रकृतीचा व माझा संबंध आहे. येऱ्हीं उत्पत्ति, स्थिति व लय हे सर्व व्यापार तिचेच आहेत. १४ हें पहा, पौर्णिमेच्या चंद्राची भेट होताच समुद्राला अपार भरती येते. पण अर्जुना, एथें चंद्राला कांहीं श्रम पडतात का ? १५ लोखंड जड असूनही लोहचुंबक जवळ असल्यानें जरी हालतें, तरी लोहचुंबकाला लोखंड हालवण्याचे कोणते श्रम पडतात ? १६ किंबहुना याप्रमाणें मीं सृष्टि उत्पन्न होणाऱ्या इच्छेचा अंगीकार केल्यावर एकदम प्राणिमात्राचा विस्तार होऊं लागतो. १७ हे पांडवा, हा सर्व प्राणिसमुदाय प्रकृतीच्या आधीन आहे. ज्याप्रमाणें बीजाला वेली, पानें वगैरे उत्पन्न करण्यास भूमि समर्थ आहे, १८ अथवा बाळपण, तारुण्य व वृद्धपण या अवस्थांना ज्याप्रमाणें देहसंग हें मुख्य कारण आहे, किंवा आकाशात मेघपंक्ति उत्पन्न होण्यास जसा वर्षाकाल कारण आहे, १९ किंवा स्वप्नाला जशी निद्रा कारण आहे, त्याचप्रमाणें हे नरेंद्रा, या सर्व प्राणिसमुदायाला प्रकृति मुख्य कारण होय. १२० स्थावरजंगमाला, स्थूलसूक्ष्माला, फार काय सांगावें ? या सर्व जगाला प्रकृतिच मूळ कारण होय. २१ म्हणून, प्राणी उत्पन्न करावे किंवा उत्पन्न झालेल्यांचा प्रतिपाळ करावा, या सर्व कृतींचें कर्तृत्व मजकडे येत नाहीं. २२ पाण्यांत चंद्राचा प्रकाश वेल पसरल्याप्रमाणें दिसतो, त्याची उत्पत्ति चंद्रानें केली नाहीं, त्याप्रमाणें, हीं कर्में मजपासून उत्पन्न झालेलीं असूनही मजपासून दूरच असतात. २३

श्लोकार्थः—हे धनंजया, (जगाची उत्पत्ति वगैरे) कर्मांचे ठिकाणीं उदासीन पुरुषाप्रमाणें आसक्तिरहित असणारा जो मी, त्या मला तीं कर्में बद्ध करीत नाहींत ॥ ९ ॥

ज्याप्रमाणें, समुद्राच्या पाण्याचा लोट वाहूं लागल्यावर त्याला मिठाचा बांध आडवूं शकत नाहीं, त्याप्रमाणें, माझ्यांत लय पावणारीं सर्व कर्में मला कशीं बांधूं शकतील ? २४ धुराचें छत जर वाहणाऱ्या वायूस हांक मारून अडथळा करील, किंवा सूर्यकिरणांत अंधार शिरेल, २५ फार काय सांगावें ? ज्याप्रमाणें पर्वताच्या पोटातील द्रव्यांना पर्जन्याच्या अतिवृष्टीनेंही कांहीं बाधा होत नाहीं, त्याप्रमाणें, प्रकृतीच्या कर्मांपासून मला कांहीं

प्रकृतीचें । न लगे मज ॥ २६ ॥ ( ३२३. प्रकृतीच्या कर्मांत भगवान उदासीनासारखा असतो, १२७-१३० ) येऱ्हवीं इये प्रकृतिविकारीं । एकु मीचि असें अवधारीं । परि उदासीनाचिया परी । करीं ना करवीं ॥ २७ ॥ जैसा दीपु ठेविला परिवरीं । कवणातें नियमी ना निवारी । आणि कवण कवणिये व्यापारीं । राहाटे तेंहि नेणे ॥ २८ ॥ तो जैसा कां साक्षिभूतु । गृहव्यापारप्रवृत्तिहेतु । तैसा भूतकर्मीं अनासक्तु । मी भूतीं असें ॥ २९ ॥ हा एकचि अभिप्रावो पुढतपुढती । काय सांगों बहुतां उपपत्ती । येथ एकहेळां सुभद्रापती । येतुलें जाण पां ॥ १३० ॥

**मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् । हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥**

*अन्वयः—कौंतेय, मया अध्यक्षेण प्रकृतिः सचराचरं सूयते, अनेन हेतुना जगत् विपरिवर्तते ॥ १० ॥*

( ३२४. आत्माश्रयानें प्रकृति निरनिराळ्या जगाला निर्माण करते, १३१-१३२) जे लोकचेष्टां समस्तां । जैसा निमित्तमात्र कां सविता । तैसा जगत्प्रभवीं पंडुसुता । हेतु मी जाणें ॥ ३१ ॥ कां जें मियां अधिष्ठिलिया प्रकृति । होती चराचराचिया संभूति । म्हणोनि मी हेतु हे उपपत्ति । घडे यया ॥ ३२ ॥ ( ३२५. ज्ञानदृष्टीनें हृदयस्थ आत्म्याचा भोग घेतो. १३३–१३६.) आतां येणें उजिवडें निरुतें । न्याहाळीं पां ऐश्वर्ययोगातें । जे माझ्या ठायीं भूतें । परी भूतीं मी नसें ॥ ३३ ॥ अथवा भूतें ना माझ्या ठायीं । आणि भूतांमाजि मी नाहीं । या खुंणा तूं कहीं । चुकों नको ॥ ३४ ॥ हें सर्वस्व आमुचे गूढ । परि दाविलें तुज उघड । आतां इंद्रियां देऊनि कवाड । हृदयीं भोगीं ॥ ३५ ॥ हा दंशु जंव नये हातां । तंव माझें साचोकारेंपण पार्था । न संपडे गा सर्वथा । जेविं तुंषीं कण ॥३६॥ (३२६. अनुमानिक ज्ञान प्रसंगीं उपयोगीं पडत नाहीं, १३७-१३९) येऱ्हवीं अनुमानाचेनि पैसें[11] । आंवडे कीर कळलें ऐसें । परि मृगजळाचेनि वोलांशें[13] । काय भूमि तिमे[14] ॥ ३७ ॥ जें जाळ जळीं पांगिलें । तेथ चंद्रबिंब दिसे आंतुडलें । परि थडिये काढूनि झाडिलें । तेव्हां बिंब के सांगें ॥ ३८ ॥ तैसें बोलेंवरि वाचाबळें । वायांचि झकविजती प्रतीतीचे डोळे । मग साचोकारें बोधावेळे । आथी ना होइजे ॥ ३९ ॥

**अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् । परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम् ॥११॥**

अन्वयः—मूढाः मानुषीं तनुं आश्रितं मा अवजानन्ति ( यत् ते ) मम भूतमहेश्वरं परं भावं अजानन्तः ( सन्ति ) ॥ ११ ॥

( ३२७. परमभाव न कळल्यामुळें जीव मूढ, त्यामुळें ईश्वराला मनुष्य असें सम-

१ कार्यांत. २ गृहकृत्याची प्रवृत्ति होण्यास कारणीभूत. ३ सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व लय या कर्मांत. ४ व्यापार. ५ जगाच्या उत्पत्तीस. ६ उत्पत्ति ७ वर्म. ८ वेदांतसिद्धांताचें वर्म. ९ खरें स्वरूप. १० कोंड्यांत. ११ साह्यानें. १२ वाटे. १३ ओलाव्यानें. १४ भिजते.

एक बाधा होत नाहीं. २६ एरव्हीं त्या प्रकृतीच्या कार्याला मीच एक कारण आहें असें समज; परंतु उदासीनाप्रमाणें मी कांही करीत नाहीं, व करवीत नाहीं. २७ ज्याप्रमाणें, घरात ठेवलेला दिवा अमुक कर किंवा करूं नको असें कोणाला सांगत नाही, आणि कोण काय व्यापार करतो हेंही जाणत नाहीं; २८ तो साक्षिभूत असून गृहकृत्यांची प्रवृत्ति होण्यास कारणीभूत होतो, त्याप्रमाणें, सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व लय या कर्मात मी उदासीन असून भूतांच्या ठिकाणीं आहें. २९ हा एकच अभिप्राय खरा आहे. पुनः पुनः पुष्कळ पर्यायांनीं काय सांगूं ? तर, हे सुभद्रापति, एकदां एवढें लक्षात ठेव. १३०.

श्लोकार्थः—हे कौंतेया, माझ्या अध्यक्षतेनें ही त्रिगुणात्मका माया हें चराचर उत्पन्न करिते; आणि ह्याच कारणामुळें जगत् फिरत राहतें ॥ १० ॥

अर्जुना, सर्व सृष्टींतील लोकांच्या व्यापारास ज्याप्रमाणें सूर्य हा कारणीभूत आहे, त्याप्रमाणें, जगाच्या उत्पत्तीला मी कारण आहें असें जाण. ३१ का कीं, मायेचा अंगीकार मीं केला आहें, व तिच्या योगानें प्राणिमात्राची उत्पत्ति होते. म्हणून या जगाच्या उत्पत्तीचें कारण मी अशी लोकांची समजूत आहे. ३२ तेव्हां माझ्यापासून भूतांची उत्पत्ति जरी होते, तरी भूतांत मी नाहीं, ही माझी अद्भुत करणी या ज्ञानाच्या उजेडानें नीट न्याहाळून पहा. ३३ अथवा प्राणी माझ्या ठिकाणीं नाहींत व मी त्यांच्या ठिकाणीं नाहीं हें वर्म तूं कधींही विसरूं नकोस. ३४ हें माझें मुख्य वर्म असूनही तुला उघड करून दाखविलें आहे. तर आता तूं आपल्या इंद्रियांचीं दारें बंद करून त्यांना कळूं न देतां आपल्या हृदयांत याचा उपभोग घे. ३५ पार्था, हें वेदांतसिद्धांताचे वर्म जोंपर्यंत हातीं लागलें नाहीं, तोंपर्यंत माझें खरें स्वरूप कधींही कळणार नाहीं. ज्याप्रमाणें कोंड्यांत शोधूं लागलें असतां दाण्याचा एक कण सुद्धां सांपडत नाहीं. ३६ एरव्ही, अनुमानाच्या साह्यानें माझें खरें स्वरूप कळलें असें वाटतें. पण मृगजलाच्या ओलाव्यानें जमीन कधीं भिजली आहे का ? ३७ माशाला धरण्याकरिता जें जाळें पसरतात त्यात चंद्राचें बिंब सांपडल्यासारखें दिसतें, परंतु तें जाळें नदीच्या कांठावर काढून झाडल्यावर चंद्रबिंब कोठें असतें सांग बरें ? ३८ त्याचप्रमाणें, 'आम्हाला अनुभव आला' असें शब्दांच्या व वाणीच्या योगानें कितीएक लोक वरकरणीं दाखवितात, पण मग खऱ्या बोधाच्या परीक्षेची वेळ आली म्हणजे त्या वेळेस खरोखर त्याना ज्ञान झालेलें नाहीं (असें अनुभवास येतें), व दुसऱ्यास तें करूनही देता येत नाहीं. ३९

श्लोकार्थः—मी मनुष्यदेह धारण केला असल्यामुळें, मूर्ख लोक माझी अवज्ञा करितात; कारण मी सर्व भूताचा स्वामी हें जें माझें उत्कृष्ट स्वरूप, त्याचें त्याना ज्ञान नसतें ॥ ११ ॥

किंबहुना या संसाराला भिऊन माझ्या प्राप्तीची जर खरी इच्छा असली तर तुला

१५ जाळें. १६ पसरलें. १७ सांपडलें. १८ कांठावर. १९ शब्दांनीं. २० फसवितात. २१ अनुमवाचे. २२ खरोखर.

जतात, १४०–१७१.) किंबहुना भेवा[1] विहाया[2] । आणि साचे चाड आथी जरी मियां । तरि तूं गा उपपत्ती[3] इया । जतन कीजे ॥ १४० ॥ येऱ्हवीं दिठी वेधली कवळें[4] । तें चांदणियातें म्हणे पिवळें । तेविं माझ्या स्वरूपीं निर्मळें । देखती दोष ॥ ४१ ॥ नातरी ज्वरें विटाळलें मुख । तें दुधातें म्हणे कडु विख । तेविं अमानुषा मानुष । मानिती मातें ॥ ४२ ॥ म्हणऊनि पुढतपुढती धनंजया । झणें विसंबसी या अभिप्राया । जे इयां स्थूलदृष्टी वायां । जाइजेल गा ॥ ४३ ॥ पैं स्थूलदृष्टी देखती मातें । तेंचि न देखणें जाण निरुतें । जैसें स्वप्नींचेनि अमृतें । अमर नोहिजे ॥ ४४ ॥ एऱ्हवीं स्थूलदृष्टी मूढ । मातें जाणती कीर दृढ । परि तें जाणणेंचि जाणणेया आड । रिगोनि ठाके ॥ ४५ ॥ जैसा नक्षत्राचिया आभासा-[5] साठीं घातु तया हंसा । माजीं रत्नबुद्धीचिया आशा । रिगोनियां ॥ ४६ ॥ सांगें गंगा या बुद्धी मृगजळ । ठाकोनि आलियाचें कवण फळ । काय सुरतरु म्हणोनि बाबुळ । सेविली करी ॥ ४७ ॥ हा निळयाचाचि दुसरा । या बुद्धी हातु घातला विखारा[6] । कां रत्नें म्हणोनि गारा । वेंची जेविं ॥ ४८ ॥ अथवा निधान[7] हें प्रगटलें । म्हणोनि खदिरांगार[8] खोळे[9] भरिले । कां साउंली[10] नेणतां घातलें । कुहां[11] सिंहें ॥ ४९ ॥ तेविं मी म्हणोनि प्रपंचीं । जिहीं बुडी दिधली कृतनिश्चयाची । तिहीं चंद्रासाठीं जेविं जळींची । प्रभा धरिली ॥ १५० ॥ तैसा कृतनिश्चय वायां गेला । जैसा कोण्ही एकु कांजी प्याला । मग परिणाम पाहों लागला । अमृताचा ॥ ५१ ॥ तैसें स्थूलाकारीं नाशिवंतें । भरंवसा बांधोनि चित्तें । पाहती मज अविनाशातें । तरी कैंचा दिसे ॥ ५२ ॥ अगा काई पश्चिमसमुद्राचिया तटा । निघिजेत आहे पूर्विलियें[12] वाटा । कां कोंडा कांडितां सुभटा । कण जोडे ॥ ५३ ॥ तैसें विकारलें[13] हें स्थूळ[14] । जाणितलेया मी जाणवतसें केवळ[15] । काई फेण पितां जळ । सेविलें होय ॥ ५४ ॥ म्हणोनि मोहिलेनि मनोधर्में । हेंचि मी मानूनि संभ्रमें । मग येथींचीं जियें जन्मकर्में । तियें मजाचि म्हणती ॥ ५५ ॥ येतुलेनि अनामा[16] नाम । मज अक्रियेंसि[17] कर्म । विदेहासि[18] देहधर्म । आरोपिती ॥ ५६ ॥ मज आकारशून्या आकारु । निरुपाधिका उपचारु । मज विधिवर्जितो[19] व्यवहारु । आचारादिक ॥ ५७ ॥ मज वर्णहीनां[20] वर्णु । गुणातीतासि गुणु । मज अचरणा[21] चरणु । अपाणियां[22] पाणी ॥ ५८ ॥ मज अमेयां[23] मान । सर्वगतासी[24] स्थान । जैसें सेजेमाजी वन । निदेला देखे ॥ ५९ ॥ तैसें अश्रवणा[25] श्रोत्र । मज अचक्षूसी[26] नेत्र । अगोत्रा[27]

१ संसाराला. २ भिऊन. ३ वर्म. ४ काविळीनें. ५ प्रतिबिंबास्तव. ६ सर्पाला. ७ द्रव्याचा ठेवा. ८ खैराचे निखारे. ९ पदरांत. १० पडछाया. ११ विहिरींत. १२ पूर्वेच्या. १३ विस्तारलेलें. १४ जग. १५ निर्दोष. १६ नामरहिताला. १७ क्रियारहिताला. १८ देहरहिताला. १९ कर्तव्यरहिताला. २० जातिरहिताला. २१ चरणरहिताला. २२ हस्तरहिताला. २३ परिमाणातीताला. २४ सर्वव्यापकाला. २५ कर्णरहिताला. २६ नेत्ररहिताला. २७ गोत्ररहिताला.

हें जें मीं वर्म सांगितलें, तें आपल्या लक्षांत पूर्ण वागीव. १४० एरवीं, काविळीच्या योगानें दृष्टि ग्रासल्यावर तो मनुष्य चांदण्याला पिवळें म्हणतो, त्याप्रमाणें, निर्दोष असें जें माझें शुद्ध स्वरूप, त्या स्वरूपावर त्याला दोष दिसतात. ४१ किंवा तापानें कडू तोंड झाल्यावर त्याला ज्याप्रमाणें दूध विषासारखें कडू लागतें, त्याप्रमाणें मी मनुष्य नसूनही मनुष्य आहें असें ते मला मानतात. ४२ म्हणून, हे धनंजया, वारंवार या अभिप्रायाला विसरूं नको. जर नुसत्या स्थूल दृष्टीनें पाहूं लागलास, तर तुझें पाहणें व्यर्थ होईल. ४३ ज्याप्रमाणें स्वप्नांतील अमृतानें कोणी अमर होत नाहीं, त्याप्रमाणें जे मला स्थूल दृष्टीनें पाहतात, ते खरोखर मला पहात नाहींत. ४४ एरवीं अज्ञानी लोक स्थूल दृष्टीनें मला जाणलें असें म्हणतात, परंतु त्यांचा समज त्यांच्या खऱ्या समजाच्या आड येतो. ४५ ज्याप्रमाणें नक्षत्राचें प्रतिबिंब पाण्यांत पाहून तें मोतीच आहे असें समजून तें प्राप्त करून घेण्याकरितां हंस पक्षी आकाशांतून उडी टाकून प्राणास मुकतो; ४६ गंगा आहे असें समजून मृगजळाजवळ जर कोणी गेला, तर त्याला त्या ठिकाणीं काय प्राप्त होईल सांग बरें? त्याचप्रमाणें, कल्पवृक्ष समजून बाभूळ हातीं धरल्यावर त्याचा काय उपयोग होणार? ४७ नीलमण्याचा दोन सरांचा हार समजून जर कवड्या सर्पाला हातीं धरलें, किंवा रत्न समजून गारा वेचून घेतल्या, ४८ अथवा द्रव्याचा ठेवा जमिनींतून वर येऊन उजेड पडला आहे असें समजून खैराचे निखारे पदरांत घेतले, अथवा आपलीच पडछाया पाण्यांत पडली आहे असें न जाणतां सिंह विहिरींत उडी टाकून ज्याप्रमाणें प्राणास मुकला, ४९ त्याप्रमाणें, प्रपंचांत मी खास आहें, अशा कृतनिश्चयानें जे प्रपंचांतच गुंग होतात, ते, चंद्राच्या ऐवजीं त्याचें पाण्यांत पडलेलें प्रतिबिंब धरण्याकरितां प्रयत्न करणाऱ्याप्रमाणें फसतात; १५० त्याचप्रमाणें, संसारांत मी आहें असा जो त्यांचा कृतनिश्चय, तो वायां जातो. जसा कोणी एखादा कांजी पिऊन अमृतापासून होणाऱ्या सुखाचा लाभ इच्छितो, ५१ त्याप्रमाणें, अंतःकरणपूर्वक भरंवशानें नाशवंत अशा देहाचे ठिकाणीं अविनाशी अशा मला पाहतात, तर मी त्यांना कसा दिसेन? ५२ हें पहा, कोणी पश्चिमसमुद्राकडे जाण्याच्या हेतूनें पूर्वसमुद्राच्या वाटेला जाऊं लागला, तर त्याला पश्चिमसमुद्र प्राप्त होईल का? किंवा, हे महावीरा, कोंडा कांडूं लागलें असता त्यांत धान्य प्राप्त होईल कां? ५३ त्याचप्रमाणें, हें विस्तार पावलेलें जग जाणल्यानें निर्दोष अशा मला जाणतां येईल का? फेंस प्याल्यानें पाणी प्याल्याप्रमाणें होतें का? ५४ म्हणून, मायामोहित मनोवृत्तीनें संसारांतच मी आहें असें भ्रांतीनें मानून तेथील जन्ममरणादि सर्व स्थिति मलाही आहेत असें समजतात. ५५ याप्रमाणें नामरहित, क्रियारहित व देहरहित असा जो मी, त्या मला नामधारी, कर्मकारी व देहधर्मांनीं युक्त असणारा असें समजतात. ५६ मला निराकाराला आकार, निरुपाधिकाला उपचार, कर्तव्यरहिताला व्यवहार; ५७ मला जातिरहिताला जात, गुणातीताला गुण, चरणरहिताला चरण, हस्तरहिताला हस्त,

गोत्र । अरूपा[1] रूप ॥ १६० ॥ मज अव्यक्तासि व्यक्ती । अनार्तासी[2] आर्ती । स्वयंतृप्ता तृप्ती । भाविती गा ॥ ६१ ॥ मज अनावरणा[3] प्रावरण । भूपणातीतासि भूषण । मज सकळकारणां[4] कारण । देखती ते ॥ ६२ ॥ मज सहजातें करिती[5] । स्वयंभातें प्रतिष्ठिती[6] । निरंतरातें[7] आव्हानिती[8] । विसर्जिती गा ॥ ६३ ॥ मी सर्वदा स्वतःसिध्दु । तो कीं बाळ तरुण वृध्दु । मज एकरूपा संबंधु[9] । जाणती ऐसें ॥ ६४ ॥ मज अद्वैतासि दुजें । मज अकर्तयासि काजें । मीं अभोक्ता कीं भुंजें[10] ऐसें । म्हणती ॥६५॥ मज अकुळाचें कुळ वानिती । मज नित्याचे[11] निधनें शिणती । मज सर्वांतरातें[12] कल्पिती । अरिमित्र गा ॥ ६६ ॥ मी स्वानंदाभिरामु[13] । तया मज अनेकसुखाचा कामु[14] । आघवाचि मी असें समु । कीं म्हणती एकदेशी ॥ ६७ ॥ मी आत्मा एक चराचरीं । म्हणती एकाचा कैपक्ष[15] करीं । आणि कोपोनि एकातें मारीं । हेंचि वाढविती ॥ ६८ ॥ किंबहुना ऐसे समस्त । जे हे मानुपधर्म प्राकृत । तयांचि नांव मी ऐसें विपरीत । ज्ञान तयांचें ॥ ६९ ॥ जंव आकारु एक पुढा देखती । तंव हा देव येणें भावें भजती । मग तोचि विघडलिया टाकिती । नाहीं म्हणोनि ॥ २७० ॥ मातें येणें येणें प्रकारें । जाणती मनुष्य ऐसेनि आकारें । म्हणऊनि ज्ञानचि तें आंधारें । ज्ञानासि करी ॥ ७१ ॥

मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।
राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥

अन्वयः—( ते ) मोघाशाः, मोघकर्माणः, मोघज्ञानाः, विचेतसः ( च ) राक्षसीं आसुरीं मोहिनीं च प्रकृतिं एव श्रिताः ( सन्ति ) ॥ १२ ॥

( ३२८. आत्म्याला न जाणणाऱ्या लोकांचें जन्म, ज्ञान, कर्म व्यर्थ व ते आसुरी प्रकृतीचे तोंडांत पडतात. १७२–१८५ ) यालागीं[16] जन्मलेचि ते मोघ[17] । जैसें वोर्पियेवीण[18] मेघ । कां मृगजळाचे तरंग । दुरुनीचि पाहावे ॥ ७२ ॥ अथवा कोल्हेरीचे[19] असिवार[20] । नातरी वोडंबरीचे[21] अळंकार । कीं गंधर्वनगरीचे[22] आवार[23] । आभासैंती[24] का ॥ ७३ ॥ सौबरी[25] वाढिन्नल्या सरळा । वरी फळ नाहीं आंतु पोकळा । कां स्तन जालें गळां । शेळिये जैसें ॥ ७४ ॥ तैसें मूर्खांचें तयां जियालें[26] । आणि धिग् कर्म तयांचें निपजलें । जैसें सांवरीं फळ आलें । घेपे[27] ना दीजे ॥ ७५ ॥

१ निराकाराला. २ निरिच्छाला. ३ सर्व जगाला पांघरूण घालणाराला. ४ सर्व उत्पन्न करणाराला. ५ मूर्ति कारितात. ६ प्राणप्रतिष्ठा करितात. ७ ओतप्रोत भरलेल्याला. ८ आवाहन करतात. ९ अवस्था. १० खातों. ११ मरणानें. १२ सर्वांच्या अंतर्यामीं राहणाराला. १३ निजानंदांत निमग्न असणारा. १४ इच्छा. १५ कैवार घेतो. १६ साराश. १७ व्यर्थ. १८ पर्जन्यकालावांचून. १९ मातीच्या चित्रांतले. २० घोडेस्वार. २१ कपटविद्येचे. २२ आकाशात ढग आले असता, आपल्या कल्पनेप्रमाणें हत्ती, घोडा, नगर इत्यादि ज्या निरनिराळ्या आकृति दिसतात, त्यास ' गंधर्वनगर ' म्हणतात; अर्थात् मिथ्या. २३ गावकुसूं. २४ भासतात. २५ शेर. २६ वांचणें. २७ घेतां येत नाहीं.

५८ मज परिमाणातीताला परिमाण, सर्वव्यापकाला ठिकाण; ज्याप्रमाणें अंथरुणात निजलेला वनाची शोभा स्वप्नांत पाहतो, ५९ त्याप्रमाणें, कर्णरहिताला कान, नेत्ररहिताला नेत्र, गोत्ररहिताला गोत्र, निराकाराला रूप, १६० अव्यक्त असा जो मी त्या मला व्यक्ति, निरिच्छास इच्छा व जो मी स्वयमेव तृप्त आहें, त्यास तृप्ति अशा कल्पना करतात. ६१ मी वस्त्ररहित म्हणजे सर्व जगाला पांघरूण घालणारा, त्या मला पांघरूण घालतात; भूषणातीत म्हणजे निराकार असा जो मी, त्या मला दागिने घालतात; मी सर्व जगाचा उत्पन्न करणारा असून मला दुसऱ्यांनीं उत्पन्न केला आहे असें मानतात. ६२ मी स्वयमेव असून माझ्या मूर्ति करतात; मी स्वत:सिद्ध असून माझी प्राणप्रतिष्ठा करतात; व ओतप्रोत, भरलेला असून माझें आव्हानविसर्जन करतात. ६३ मी नेहमीं स्वयमेव व निराकार असून, मला बाल्य, तारुण्य व वृद्ध अशा अवस्था आहेत असें मानतात. ६४ मी अद्वैत असून माझ्या ठिकाणीं द्वैत मानतात; मी कांहींएक न करणारा असून कर्मे करतों व कांहीं न खाणारा असून खातों, असें म्हणतात; ६५ मला कुळगोत नसून माझ्या कुळाचें वर्णन करतात; मी नित्य असून मी मरतों असे मानून माझ्या मरणानें शोक करतात; तसेंच मी सर्वांच्या अंतर्यामीं राहणारा असून अमक्याचा शत्रु व अमक्याचा मित्र अशी माझ्या ठिकाणीं कल्पना करतात. ६६ मी निजानंदात निमग्न असणारा, त्या मला इतर सुखांची इच्छा करणारा असें मानतात, व सर्व ठिकाणीं माझी समदृष्टि असून मला एकदेशी म्हणजे एका स्थळीं राहणारा असें म्हणतात. ६७ मी सर्व स्थावरजंगमाचा आत्मा असून एकाचा कैवारी व एकावर रागावून त्यास मारणारा अशी माझी सर्वत्र प्रसिद्धि करतात. ६८ किंबहुना जे जे मनुष्यधर्म, ते ते सर्व मला लागू आहेत असें त्यांचें विपरीत ज्ञान असतें. ६९ ज्या वेळेस ते दृष्टीसमोर एखादी मूर्ति पाहतात, त्या वेळेस ती देवच आहे या भावानें तिला भजतात; मग तीच भंगल्यावर तिच्यातील देवपण नाहींसें झालें असें मानून तिचा त्याग करतात. १७० अशा प्रकारानें मी मनुष्याचा देह धारण करणारा आहें असें समजतात, म्हणून त्यांचें हें ज्ञानच खऱ्या ज्ञानाच्या आड येतें. ७१

श्लोकार्थः—त्या मूर्खांच्या आशा, कर्मे व ज्ञान हीं सर्व व्यर्थच असतात; ते विचारशून्य होतात; आणि मोह पाडणाऱ्या अशा राक्षसी व आसुरी स्वभावाचा आश्रय करतात ॥ १२॥

सारांश, ज्यांची मजविषयी अशा प्रकारची समजूत असते, त्यांचा जन्म व्यर्थच होय. ज्याप्रमाणे, पर्जन्यकालावांचून मेघ व्यर्थ आहेत किंवा मृगजलाच्या लाटा जशा दुरूनच पाहण्यास योग्य होत, ७२ अथवा मातीच्या चित्रांतले घोडेस्वार, कपटविद्येचे अलंकार किंवा संध्याकाळीं ढगांत दृष्टीस पडणाऱ्या गांवाचें कुसूं भासतें, ७३ शेर जरी सरळ वाढला तरी तो जसा आत पोकळ असून वर फळही येत नाहीं, किंवा शेळीच्या गळ्याला उत्पन्न झालेल्या स्तनांतून जसें दूध निघत नाहीं, ७४ किंवा सांवरीच्या झाडाला फळ आलें असतां तें जसें कोणाला घेतां किंवा देतां येत नाहीं, त्याप्रमाणें त्या मूर्खांचें

मग जें कांहीं ते पढिन्नले । तें मर्कटें नारेळ तोडिलें । कां आंधळ्या हातीं पडिलें । मोतीं जैसें ॥ ७६ ॥ किंबहुना तयांचीं शास्त्रें । जैसीं कुमारीहातीं दिघलीं शस्त्रें । कां अशौच्या मंत्रें । बीजें कथिलीं ॥ ७७ ॥ तैसें ज्ञानजात तयां । आणि जें कांहीं आचरलें गा धनंजया । तें आघवेंचि गेलें वायां । जे चित्तहीन ॥ ७८ ॥ पैं तमोगुणाची राक्षसी । जे सुबुद्धीतें ग्रासी । विवेकाचा ठावोचि पुसी । निशाचरी जे ॥ ७९ ॥ तिये प्रकृती वरपेंडे जाले । म्हणऊनि चिंतेचेनि कपाळें गेले । वरि तामसीयेचिये पाडिले । मुखामाजीं ॥ १८० ॥ जेथ आशेचिये लाळे । आंतु हिंसा जीभ लोळे । तेवींचि असंतोषाचे चाकळे । अखंड चघळी ॥ ८१ ॥ जे अनर्थाचे कानवेरी । आंवाळुवें चाटीत निघे बाहेरी । जे प्रमादपर्वतींची दरी । सदाचि मातली ॥ ८२ ॥ जेथ द्वेषाचिया दाढा । खसखसां ज्ञानाचा करिती रगडा । जे अगस्तिगवसणी मूढां । स्थूलबुद्धि ॥ ८३ ॥ ऐसे आसुरिये प्रकृतीचे तोंडीं । जे जाले गा भूतोंडी । ते बुडोनि गेले कुंडीं । व्यामोहाच्या ॥ ८४ ॥ एवं तमाचिये पाडिले गर्ते[10] । न [11]पवितीचि विचाराचेनि हातें । हें असो ते गेले जेथें । ते शुद्धीचि नाहीं ॥ ८५ ॥ ( ३२९. साधूंचे वर्णनानें वाणीला सुख, १८६–१८७ ) अवतरणः–म्हणोनि असोतु इयें वायाणीं । कायशीं मूर्खांचीं बोलणीं । वायां वाढवितां वाणी । शिणेल हन ॥ ८६ ॥ ऐसें बोलिलें देवें । तेथ जी जी म्हणितलें पांडवें । आइकें जेथ वाचा विसवे[12] । ते साधुकथा ॥ ८७ ॥

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।
भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥

अन्वयः—पार्थ, दैवीं प्रकृतिं आश्रिताः महात्मानः तु मा भूतादिं अव्ययं ज्ञात्वा अनन्यमनसः ( सन्तः ) भजन्ति ॥ १३ ॥

( ३३०. दैवी प्रकृतीचा आश्रय करून ईश्वराला अनन्यभावानें भजतात, १८८–१९६ ) तरी जयाचे चोखँटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी । जया निजेलियातें उँपासी । वैराग्य गा ॥ ८८ ॥ जयाचिया आस्थेचिया सद्भावा । आंतु धर्म करी राणिवा । जयाचें मन ओलावा । विवेकासी ॥ ८९ ॥ जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णतां जेऊनि धाले । जे शांतीसि आले । पालव नवे ॥ १९० ॥ जे परिणामा निघाले कोंभ । जे धैर्यमंडपाचे स्तंभ । जे आनंद-समुद्रीं कुंभ । चुबकळोनि भरिले ॥ ९१ ॥ जयां भक्तीची येतुली प्रांप्ती । जे कैवल्यातें परौतें सर म्हणती । जयांचिये लीळेमाजि नीति । जियाली दिसे ॥ ९२ ॥ जे आघवांचि कैरणीं ।

१ अशुचिर्भूतास. २ चित्त स्वाधीन नसणारे. ३ जखीण. ४ ग्रस्त. ५ मासाचे गोळे. ६ ओठ. ७ भूल. ८ भूतबळी. ९ अज्ञानाच्या. १० खळग्यात. ११ सापडत नाहींत. १२ विश्रांति पावते; सुख पावते. १३ निर्मळ. १४ आजन्म एकाच क्षेत्रात राहण्याचा संकल्प करणारा, तो

जिणें होय, आणि त्यांच्या कार्यालाही धिक्कार असो! ७५ मग त्या मूर्खांनीं जें कांहीं शास्त्राध्ययन केलें असेल, तें म्हणजे माकडानें नारळ तोडल्याप्रमाणें किंवा अंधळ्याला मोर्ती सांपडावें त्याप्रमाणें होय. ७६ किंबहुना त्यांनीं म्हटलेलीं तीं शास्त्रें लहान मुलीच्या हातांत दिलेल्या शस्त्राप्रमाणें, अथवा अशुचिर्भूताला बीजांसह शिकविलेल्या मंत्राप्रमाणें निरर्थक होत. ७७ धनंजया, त्याचप्रमाणें, ज्यांचें चित्त स्वाधीन नाहीं, त्याचें सर्व ज्ञान वं आचरण हीं व्यर्थ होत. ७८ याप्रमाणें तमोगुणरूप राक्षसी सद्बुद्धीला ग्रासून ज्ञानाचा ठाव-ठिकाण नाहींसा करणारी आहे. ७९ त्या प्रकृतीनें जे ग्रस्त होतात, ते सदोदित चिंताक्रांत असून शिवाय तामस प्रकृतीच्या आयतेच घशांत उतरतात. १८० जी राक्षसी प्रकृति आशारूप लाळेंत हिंसारूप जीभ लोळवून असंतोषरूप मांसाचे गोळे निरंतर चघळते; ८१ जी अनर्थरूप कानापर्यंत ओठ चाटीत बाहेर निघते; जी प्रमादरूपी म्हणजे भूलरूपी पर्वताची मोठी माजलेली दरी आहे; ८२ जिच्या द्वेषरूप दाढा खसखसा चावून ज्ञानाचा चुराडा करतात, व जी अगस्ति ऋषीला असलेल्या कुंभाच्या आवरणाप्रमाणें स्थूलबुद्धि लोकांना आसुरी मायेची गवसणी आहे; ८३ अशा प्रकारच्या त्या आसुरी प्रकृतीच्या तोंडांत जे बळी होऊन पडतात, ते भ्रांतिरूप कुंडांत बुडून जातात. ८४ याप्रमाणें जे अज्ञानाच्या खळग्यांत पडतात, ते विचाररूपी हाताला सांपडत नाहींत; इतकेंच नव्हे, तर ते कोठें जातात त्याचा देखील पत्ता लागत नाहीं. ८५ म्हणून ही निष्फल कथा राहूं दे. कारण, मूर्खांचें व्यर्थ वर्णन केलें असतां वाणीला शीण मात्र होईल. ८६ असें श्रीकृष्ण बोलल्यावर अर्जुन 'हो हो!' असें म्हणाला. नंतर भगवान फिरून म्हणतातः—जिचें वर्णन केलें असतां वाणीला सुख होतें, ती साधूंची कथा ऐक. ८७

श्लोकार्थः—हे अर्जुना, दैवी संपत्तीचा आश्रय केलेले महात्मे तर, मी भूताचा आदि व अविनाशी आहें असें जाणून एकनिष्ठेनें मला भजतात ॥ १३ ॥

ज्या साधूंच्या निर्मळ अंत:करणांत मी क्षेत्रसंन्यासी होऊन वास करितों; व जे निजले असतांही वैराग्य हें ज्यांची सेवा करितें, म्हणून ज्यांना स्वप्नांत सुद्धां विषयवासना होत नाहीं; ८८ ज्यांच्या सद्वासनेंत धर्म राज्य करतो, (ज्यांना अधर्माची इच्छा सुद्धां होत नाहीं), व ज्यांचें मन नेहमी सद्विचाराला पुष्टि देतें; ८९ जे ज्ञानरूप गंगेंत स्नान करून अंतर्बाह्य शुद्ध झाले, पूर्णब्रह्मस्वरूपाच्या प्राप्तीनें तृप्त झाले, व शांतीला नवीन पालवी फुटल्याप्रमाणें शांत झाले, १९० जे ब्रह्माच्या रूपांतराला कोंभ निघाल्याप्रमाणें आहेत, व जे धैर्यरूप मंडपाचे खांबच होत; त्याचप्रमाणें, जे आनंदसमुद्रांत बुडवून काढलेल्या कुंभाप्रमाणें ओतप्रोत भरलेले असून, ९१ ज्यांना भक्तीची इतकी योग्यता वाटते कीं, ते मोक्षालाही मागें सर असें म्हणतात, व ज्यांच्या सहज लीलेंत नीति जागृत दिसते, ९२

क्षेत्रसंन्यासी. १५ सेवा करते. १६ पूर्ण ब्रह्मस्वरूपता. १७ ब्रह्माच्या रूपांतराला. १८ योग्यता. १९ मोक्षाला २० अवयवांत.

लेइले शांतीचीं लेणीं । जयांचें चित्त गवसणी । व्यापका मज ॥ ९३ ॥ ऐसे जे महानुभाव । दैविये[2] प्रकृतीचें दैव । जे जाणोनियां सर्व । स्वरूप माझें ॥ ९४ ॥ मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती जे महात्मे । परि दुजेपणें मनोधर्में । शिवतलें नाहीं ॥ ९५ ॥ ऐसे मीच होऊनि पांडवा । करिती माझी सेवा । अवतरण.—परि नवलावो तो सांगावा । असे आइक ॥ ९६ ॥

सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ।
नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ ८४ ॥

अन्वयः—( ते ) भक्त्या नित्ययुक्ता ( सन्तः ) मा सतत कीर्तयन्तः च यतन्तः दृढव्रता च मा नमस्यन्त उपासते ॥ १४ ॥

( ३३१. महात्म्याचे भजनप्रकार, १९७–२२७ ) तरी कीर्तनाचेनि नैटनाचें । नाशिलें व्यवसाय प्रायश्चित्ताचे । जे नामचि नाहीं पापाचें । ऐसें केलें ॥ ९७ ॥ यमदमां अवकळा आणिली । तीर्थें ठायावरूनि उठविलीं । यमलोकींची खुंटिली । राहटी आघवी ॥ ९८ ॥ यमु म्हणे काय यँमावें । दमु म्हणे कवणातें दमावें । तीर्थें म्हणती काय खावें । दोष औषधासि नाहीं ॥ ९९ ॥ ऐसे माझेनि नामघोषें । नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें । अवघें जगचि महासुखें । दुमदुमित भरलें ॥ २०० ॥ ते पहांटेवीण पाहावित । अमृतेंवीण जीवावित । योगेंवीण दावित । कैवल्य डोळां ॥ १ ॥ परी राया रंका पाड धरूं । नेणती सानेयां थोरां कडसणी करूं । एकसरें आनंदाचें आवारु । होत जगा ॥ २ ॥ कहीं एखादेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें । ऐसें नामघोषगौरवें । धँवळलें विश्व ॥ ३ ॥ तेजें सूर्य तैसे सोज्वेळ । परि तोही अस्तवे हें किडाळ । चंद्र संपूर्ण एखादे वेळ । हे सदा पुरते ॥ ४ ॥ मेघ उदार परी वोसरे । म्हणऊनि उपमेसी न पुरे । हे निःशंकपणें सँपांखरे । पंचाननु ॥ ५ ॥ जयांचे वाचेपुढां भोंजें । नाम नाचत असे माझें । जे जन्मसहस्रीं वोळगिजे[16] । एकवेळ यावया ॥ ६ ॥ तो मी वैकुंठीं नसें । वेळ एक भानुबिंबींही न दिसें । वरी योगियांचींही मानसें । उँमरडोनि जाये ॥ ७ ॥ परी तयांपाशीं पांडवा । मी हारपैला गिंवसावा । जेथ नामघोषु बरवा । करिती माझा ॥ ८ ॥ कैसे माझ्या गुणीं धाले । देशकाळातें विसरले । कीर्तनें सुखी झाले । आपणपांचि ॥ ९ ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामांचे निखिल प्रबंध । माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥ २१० ॥ हें बहु असो यापरी । कीर्तित

१ महात्मे. २ भगवद्भक्तीला अनुकूल असणाऱ्या सात्त्विक स्वभावाचें. ३ प्रेमानें उड्या मारणें. ४ व्यापार. ५ यम=मनोनिग्रह, दम=इंद्रियनिग्रह. ६ निकृष्ट दशा. ७ नियमन करावें. ८ शिकावें. ९ माहेरघर १० पवित्र केलें. ११ निर्मळ १२ दोष १३ पंखासहित १४ सिंह. १५ कौतुकानें. १६ सेवा करावी. १७ उल्लंघन करून. १८ हरवल्यास. १९ शोधावा. २० तृप्त झाले. २१ काव्यें. २२ आत्मानात्मविचार. २३ स्पष्ट. २४ सतत. २५ गुणानुवाद गाऊन.

ज्यांनीं आपल्या सर्व अवयवांत शांतिरूप अलंकार घातले आहेत (ज्याच्या इंद्रियाची विषयावर कधींही वासना जात नाही), व ज्यानीं आपल्या चित्ताची मज सर्वव्यापकाला गवसणी केली आहे; ९३ असे जे महात्मे, ते भगवद्भक्तीला अनुकूल असणाऱ्या सात्विक प्रकृतीचें भाग्यच होत. ते माझ्या सर्व स्वरूपाला जाणतात; ९४ आणि मग वाढत्या प्रेमानें ते महात्मे मला भजतात. पण त्यांच्या मनोधर्मानें द्वैताला स्पर्श सुद्धां केलेला नसतो. ९५ अर्जुना, अशा प्रकारें जे मद्रूप होऊन माझी सेवा करतात, त्यांच्या त्या सेवेची आश्चर्यकारक गोष्ट सागावयाची राहिली आहे ती ऐक. ९६

श्लोकार्थः—सर्वदा भक्तियुक्त असलेले, आणि जें स्वीकारलें असेल तें नेटानें चालविणारे ते महात्मे सतत माझें कीर्तन करून, इंद्रियदमन करून आणि नमस्कार करून माझी उपासना करतात ॥१४॥

'तरी हरिकीर्तनाच्या प्रेमाने ते नाचतात, त्यामुळें प्रायश्चित्ताचे सर्व व्यापार नाश पावले आहेत, व त्या कीर्तनानें पापाचें नांव देखील राहूं दिले नाहीं. ९७ यम म्हणजे मनोनिग्रह व दम म्हणजे इंद्रियनिग्रह याना निकृष्ट दशा आणिली, तीर्थें आपआपल्या जाग्यांवरून उठवून लावलीं, व यमलोकचे सर्व व्यापार बंद पाडले। ९८ यम म्हणूं लागला कीं, कोणाचें नियमन करावे। दम म्हणाला, कोणाला जिकावें? व तीर्थें म्हणूं लागलीं, " आम्ही कशाचें क्षालन करावें? कारण दोष औषधासही उरले नाहींत।" ९९ याप्रमाणें माझ्या नामघोषानें जगातील सर्व प्राण्यांचीं दु.खे नाहींतशीं होतात, व सर्व जग ब्रह्मसुखानें दुमदुमून जातें. २०० ते साधु पहाट झाल्याशिवाय जीवाना प्रकाश म्हणजे आत्मज्ञान करून देतात; अमृताशिवाय प्राण्याच्या जीवाचें रक्षण करतात; व योगसाधना-शिवाय धडधडीत डोळ्यासमोर मोक्ष दाखवितात. १ परंतु राजात व रंकात अंतर मानीत नाहींत, व लहान थोर जाणीत नाहींत. याप्रमाणें जगाला सरसकट आनंदाचें माहेरघर होतात. २ वैकुंठास जाणारा क्वचितच आढळतो; परंतु ह्या साधूंनीं सर्व जगच वैकुंठ केलें. अशा माझ्या नामभजनाच्या योग्यतेने सर्व जग पवित्र केलें. ३ त्या साधूंचें तेज सूर्याप्रमाणें निर्मळ आहे. परंतु त्या सूर्यातही तो अस्तास जातो हा दोष आहे; चंद्रा-सारखे म्हणावें, तर तो एखादे वेळेसच पूर्ण असतो. परंतु हे साधु नेहमीं पूर्णत्वास पावलेले आहेत. ४ यांचें औदार्य मेघाप्रमाणें म्हणावें, तर तो ओसरतो; म्हणून उपमा देण्यास योग्य होत नाहीं. तर हे साधु नि.शंकपणें पंख असणाऱ्या सिंहाप्रमाणें होत. ५ ज्या माझ्या नांवाचा मुखानें एकदा उच्चार होण्याकरितां सहस्र जन्म माझी सेवा करावी लागते, तें माझें नाव ज्यांच्या वाचेपुढें कौतुकाने नाचत असते, (ज्या माझ्या नावाचा असा महिमा आहे,) ६ तो मी वैकुंठलोकीही नसतो; एखादे वेळीं सूर्यमंडळातही दिसत नाहीं; इतकेच नव्हे, तर योग्यांच्याही मनाचें उल्लंघन करून जातों; ७ परंतु, हे पाडवा, जरी मी कोठें सांपडलों नाहीं, तरी जे माझ्या नांवाचा सतत घोष करतात, त्यांच्याजवळ सांपडायचाच ८ ते माझ्या गुणानीं इतके तृप्त झालेले असतात कीं, ते देशकालाला

मातें अवधारीं । एक विचरती चराचरीं । पंडुकुमारा ॥ ११ ॥ मग आणिक ते अर्जुना । साविया बहुवा जतना । पंचप्राण मना । पाखौऊ घेउनी ॥ १२ ॥ बाहेरी यमनियमांची कांटी लाविली । आंतु वज्रासनांचीं पौळी पन्नासिली । वरी प्राणायामाचीं मांडिलीं । वाहीतीं यंत्रें ॥ १३ ॥ तेथ उल्हाट शक्तीचेनि उजिवडें । मन पवनाचेनि सुरवाडें । सतरावियेचें पाणियाडें । वळंघाविलें ॥ १४ ॥ तेव्हां प्रत्याहारें ख्याति केली । विकारांची सैंपिली बोहेरिली । इंद्रियें बांधोनि आणिलीं । हृदयाआंतु ॥ १५ ॥ तंव धारणावारू दाटिन्नले । महाभूतातें एकवटिलें । मग चतुरंग सैन्य निवाटिलें । संकल्पाचें ॥ १६ ॥ तयावरी जैत रे जैत । म्हणोनि ध्यानाचें निशाण वाजत । दिसे तन्मयाचें झळकत । एकछत्र ॥ १७ ॥ पाठीं समाधिश्रियेचा अशेखां । आत्मानुभव राज्यसुखा । पट्टाभिषेको देखा । समरसें जाहला ॥ १८ ॥ ऐसें हें गहन । अर्जुना माझें भजन । आतां ऐकें सांगेन । जे करिती एक ॥ १९ ॥ तरी दोन्ही पांलववेरी । जैसा एक तंतु अंबरीं । तैसा मीवांचूनि चराचरीं । जाणती ना ॥ २२० ॥ आदि ब्रह्मा करुनी । शेवटीं मशक धरुनी । माजी समस्त हें जाणोनी । स्वरूप माझें ॥ २१ ॥ मग वाड धाकुटें न म्हणती । सजीव निर्जीव नेणती । देखिलिये वस्तु उजू लुंठिती । मीचि म्हणोनि ॥ २२ ॥ आपुलें उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे । एकसरें व्यक्तिमात्राचेनि नांवें । नमूंचि आवडे ॥ २३ ॥ जैसें उंचीं उदक पडिलें । तें तळवटवरी ये उंगेलें । तैसें नामिजे भूतजात देखिलें । ऐसा स्वभावोचि तयांचा ॥ २४ ॥ कां फळलिया तरूची शाखा । सहजें भूमीसी उतरे देखा । तैसें जीवमात्रां अशेखां । खालावती ते ॥ २५ ॥ अखंड अगर्वता होऊनि असती । तयांची विनय हेचि संपत्ती । जे जयजयमंत्रें अर्पिती । माझ्या ठायीं ॥ २६ ॥ नमितां मानापमान गळाले । म्हणोनि अवचितां मीचि जहाले । ऐसे निरंतर मिसळले । उपासिती ॥ २७ ॥ ( २२२. ज्ञानभक्तीचा प्रकार, २२८–२२९. ) अर्जुना हे गुरुवी भक्ती । सांगितली तुजप्रती । अवतरणः—आतां ज्ञानयज्ञें यजिती । ते भक्त आइकें ॥ २८ ॥ परि भजन करिती हातवटी । तूं

---

१ हिंडतात. २ जगतात. ३ सर्वथा. ४ जिंकून. ५ जयपत्र. ६ कुंपण. ७ मूळबंधाचा, हठयोगाचा. ८ कोट. ९ तयार केला. १० तोफा. ११ कुंडलिनीच्या. १२ प्रकाशानें. १३ अनुकूलतेनें. १४ चंद्रामृताचें सतराव्या कलेचें. १५ तळें. १६ स्वाधीन करून घेतलें. १७ पराक्रम १८ परिवार. १९ नाहींसा केला. २० ध्यानाची पूर्ण दशा हेच घोडे. २१ हल्ला केला. २२ ऐक्य केलें. २३ नाहींसें केलें. २४ जयजयकार करून २५ नौबद २६ एकरूपतेचें. २७ मागून. २८ अखंड. २९ ब्रह्मरूपैक्यतेनें. ३० पदरापर्यंत. ३१ मोठें. ३२ सरळ भावानें. ३३ नमस्कार करितात. ३४ निमित्तानें. ३५ एकदम, सहज. ३६ नम्रूप होऊन. ३७ श्रेष्ठ.

विसरून मन्नामसंकीर्तनाच्या योगें आपल्या ठिकाणींच सुखी झालेले असतात. ९ कृष्ण, विष्णु, हरि, गोविंद या शुद्ध नांवांच्या कवितेनें आत्मानात्मविचार करून ते माझें सतत नामस्मरण करतात. २१० हे पंडुकुमरा, अशा प्रकारें आणखी पुष्कळ तऱ्हेनें माझे गुणानुवाद वर्णन करीत कोणी जगतांत हिंडतात. ११ अर्जुना, मग दुसरे कित्येक पंचप्राण व मन यांना अंतर्यामीं जिंकून जयपत्र मिळवितात. १२ बाहेरून यमनियमांचें कुंपण लावून, आंत मूळबंधाचा कोट तयार करतात, व त्यावर प्राणायामरूप सतत चालू असणाऱ्या तोफा ठेवतात. १३ मग कुंडलिनी ऊर्ध्वमुख होऊन, तिच्या प्रकाशानें मन व प्राण यांच्या अनुकूलतेनें चंद्रामृताचें—सतराव्या कलेचें तळें स्वाधीन करून घेतात. १४ त्या वेळीं प्रत्याहार हा मोठ्या पराक्रमानें कामक्रोधादि विकाराचा, परिवारासह फडशा करतो; आणि इंद्रियें बांधून हृदयात आणतो. १५ इतक्यांत धारणारूप घोडेस्वार हे हल्ला करून पंचमहाभूतांचें ऐक्य करतात, व संकल्पाचें चतुरंग सैन्य ( मन, बुद्धि, चित्त व अहंकार ) नाहींसें करतात. १६ नंतर जयजयकार शब्द होतो; ध्यानरूपी नौबद वाजूं लागून एकरूपतेचें छत्र चमकूं लागतें. १७ मागाहून समाधिरूप लक्ष्मीचा अखंड-आत्मानुभवरूपी राज्यसुखाच्या ब्रह्मरूप ऐक्यतेनें पट्टाभिषेक होतो. १८ हे अर्जुना, असें जें माझें कठीण भजन, तें कोण करतात हे तुला सांगितले. आतां याशिवाय दुसरे भजन करणारे कोण आहेत तें ऐक. १९ वस्त्राच्या दोन्ही पदरापर्यंत जसा आडवा व उभा भरलेला तंतुच असतो, त्याप्रमाणें माझ्याशिवाय हें जगत् दुसरे कशानेही व्यापलेले नाहीं, अशी त्यांची समजूत आहे. २२० ब्रह्मदेव एका बाजूस व दुसरे बाजूस चिलीट धरून मध्यें माझ्या स्वरूपाशिवाय दुसरें कांहीं नाहीं असें ते समजतात. २१ मग लहान व मोठें, सजीव व निर्जीव असा भेद न धरतां, जी जी वस्तु दृष्टीस पडेल ती मद्रूपच आहे अशा सरळ भावाने ते जीवमात्राला नमस्कार करतात. २२ आपला मोठेपणा विसरून, पुढें येणारी वस्तु योग्य आहे किंवा अयोग्य आहे हे न जाणता सरसकट सर्व वस्तूला नमस्कार करणे हेंच त्यांना आवडतें. २३ ज्याप्रमाणें पुष्कळ उंचीवरून पडणारें पाणी एकदम सहज तळाशीं येतें, त्याप्रमाणें, जो प्राणी दृष्टीस पडेल त्यास नमस्कार करणे असा त्याचा स्वभावच बनतो. २४ किंवा फळानें भरलेल्या झाडाची खांदी जशी सहज भुईला लवल्याप्रमाणें दिसते, त्याप्रमाणें प्राणिमात्रापुढें ते नमस्कार घालतात. २५ ते नेहमीं गर्वरहित असतात व नम्रता हीच त्यांची संपत्ति असते; व ते जयजयमंत्रानें माझ्या ठिकाणीं आपलीं सर्व कर्में अर्पण करतात. २६ नम्र होतां होतां त्यांना मानापमानाचा विचार राहत नाहीं, म्हणून ते मीच होऊन राहतात; व अशा प्रकारें मद्रूप होऊनही निरंतर माझीच उपासना करतात. २७ अर्जुना, अशा प्रकारें ही श्रेष्ठ भक्ति तुला सांगितली. आता जे माझी ज्ञानयज्ञानें भक्ति करतात, ते कोणते भक्त ते ऐक. २८ परंतु, हे किरीटी, त्याची भजन करण्याची

जाणत आहासि किरीटी । जे मागां इया गोष्टी । केलिया आम्हीं ॥ २९ ॥ ( ३३३. अर्जुनाची पुन्हां ऐकण्याची इच्छा, काव्य, २३० ) तंव आथि जी अर्जुन म्हणे । हें दैवी क्रियाप्रसादाचें करणें । तरि काय अमृताचें आरोगणें । पुरें म्हणावें ॥ २३० ॥ ( ३३४. श्रवणेच्छा पाहून देव बोलतात; काव्य, २३१–२३२ ) या बोला श्रीअनंतें । लागटा देखिलें तयातें । कीं सुखावलेनि चित्तें । डोलतु असे ॥ ३१ ॥ म्हणे भलें केलें पार्था । येऱ्हवीं हा अनवसरु सर्वथा । परि बोलवीतसे आस्था । तुझी मातें ॥ ३२ ॥ ( ३३५. जगाचें कल्याण व्हावें असा देवांचा स्वभावच आहे; काव्य, २३३–२३६ ) तंव अर्जुन म्हणे हें कायी । चकोरेंवीण चांदिणेंचि नाहीं । जगचि निवविजे हा तयाच्या ठायीं । स्वभावो कीं जी ॥ ३३ ॥ येरें चकोरें तियें आपुलिये चाडे । चांचू करितां चंद्राकडे । तेविं आम्ही विनवूं तें थोकडें । देवो कृपासिंधु ॥ ३४ ॥ जी मेघु आपुलिये प्रौढी । जगाची आर्ती दवडी । वांचूनि चातकाची तहान केवढी । तो वर्षाव पाहुनी ॥ ३५ ॥ परि चुळा एकाचिया चाडे । जेविं गंगेतेंचि ठाकणें पडे । तेविं आर्त बहु कां थोडें । तरि सांगावें देवा ॥ ३६ ॥ ( ३३६. अर्जुनाचें भाषण ऐकून देवांस आनंद; काव्य, २३७–२३८ ) तेथें देवें म्हणितलें राहें । जो संतोष आम्हां जाहला आहे । तयावरी स्तुती साहे । ऐसें उरलें नाहीं ॥ ३७ ॥ पैं पैरिसतु आहासि निकियेंपरी । तेचि वक्तृत्वा वेंव्हाडी करी । ऐसें पुरस्करोनि श्रीहरी । आदरिलें बोलों ॥ ३८ ॥

ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजंतो मामुपासते । एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥१५॥

अन्वयः—च अन्ये अपि ज्ञानयज्ञेन यजन्तः एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखं मां उपासते ॥ १५ ॥

( ३३७. ज्ञानयज्ञ, २३९–२६४ ) तरि ज्ञानयज्ञु तो एवंरूपु । जेथ आदिसंकल्पु हा यूपु । महाभूतें मंडपु । भेदु तो पशु ॥ ३९ ॥ मग पांचांचे जे विशेष गुण । अथवा इंद्रियें आणि प्राण । हेचि यज्ञोपचारभरण । अज्ञानघृत ॥ २४० ॥ तेथ मनबुद्धीचिया कुंडा । आंतु ज्ञानाग्नि धडफुडा । साम्य तेचि सुहाडा । वेदिका जाणें ॥ ४१ ॥ सविवेक मतिपाटव । तेचि मंत्र विद्यागौरव । शांति स्रुक्स्रुव । जीव यज्वा ॥ ४२ ॥ तो प्रतीतीचेनि पात्रें । विवेकमहामंत्रें । ज्ञानाग्निहोत्रें । भेदु नाशी ॥ ४३ ॥ तेथ अज्ञान सरोनि जाये । आणि याजिता यजन हें ठाये । आत्मसमरसीं न्हाये । अवभृथीं जेव्हां ॥ ४४ ॥ तेव्हां भूतें विषयें करणें । हें

१ सेवन. २ कार्यसाधु. ३ अप्रसंग. ४ उत्कंठा. ५ शांत करावी. ६ दुःख. ७ जावें लागतें. ८ ऐकण्याची इच्छा. ९ ऐकतो आहेस. १० लक्ष देऊन. ११ मेजवानी. १२ मान देऊन. १३ अहंब्रह्मास्मि. १४ यज्ञस्तंभ. १५ जीव व ईश्वर यांची भिन्नता. १६ यज्ञाचें साहित्य. १७ प्रदीप्त करून. १८ यज्ञाद्य. १९ परिघ. २० आत्मानात्मविचार करण्याची बुद्धीची कुशलता. २१ स्रुक् स्रुवा नांवाचीं हवनपात्रें. २२ यज्ञ करणारा. २३ आत्मानंदरसांत. २४ यज्ञाच्या शेवटचें स्नान. २५ शब्द, स्पर्श आदि. २६ इंद्रियें.

शैली तुला माहीत आहेच, व त्याबद्दल आम्हीं पूर्वीं* वर्णन केलेंच आहे. २९ तेव्हा अर्जुन म्हणाला, " होय, हा ईश्वरी प्रसादच आहे. तथापि अमृताचें सेवन करणाराच्यानें कधीं पुरे म्हणवतें का ? " २३० तेव्हां अर्जुनाचें हें बोलणें ऐकून, हा कार्यसाधु आहे असें पाहून श्रीअनंत चित्तांत संतोष मानून डोलूं लागले, ३१ आणि म्हणाले, " पार्था, शाबास ! बाकी सांगितलेली गोष्ट पुन: सांगणें हें अप्रासंगिकच, पण तुझी ऐकण्याची उत्कंठा पाहून मला सांगणें भाग पडतें. ३२ तेव्हां अर्जुन म्हणाला, "तुम्ही म्हणतां अशी गोष्ट नाहीं. पहा कीं, चकोर पक्ष्याची तहान भागविण्याशिवाय चंद्राला इतर कांहीं कर्तव्य नाहीं कीं काय ? जगाला शांत करणें हा त्याचा स्वभावच आहे; ३३ एरव्हीं चकोर पक्ष्यानें आपल्या गरजेकरतां ज्याप्रमाणें चंद्राकडे चोंच करावी, त्याप्रमाणें आम्हीं आपली जेवढी विनंति करावी तेवढी थोडीच आहे. कारण, देवा आपण दयेचे सागर आहांत. ३४ मेघ आपल्या थोरपणानें जगाचें दु:ख निवारण करतो, त्या त्याच्या मोठ्या वर्षा-वाच्या मानानें पाहिलें असतां चातकाची तहान ती केवढी असणार ! ३५ परंतु एकच चूळ भरण्याची इच्छा झाली तरी ज्याप्रमाणें गंगेंतच जावें लागतें, त्याप्रमाणें, आम्हांला ऐकण्याची इच्छा थोडी किंवा बहुत असली, तरी देवा, आतां सांगण्यास सुरवात करावी." ३६ त्या वेळेस देव म्हणाले:—अर्जुना; आतां तुझें बोलणें राहूं दे. आम्हांला जो संतोष झाला आहे, त्यापेक्षां तूं स्तुति करून तो वाढेल असें नाहीं; ३७ परंतु तूं ज्याप्रमाणें लक्ष देऊन एवढा वेळ ऐकलेंस, तसेंच लक्ष देऊन आमच्या बोलण्यास मेजवानी कर ( व पुढेंही तसेंच ऐक ). अशा रीतीनें श्रीहरींनीं अर्जुनास मान देऊन बोलण्यास सुरवात केली. ३८

*श्लोकार्थ:—ज्ञानयज्ञानें पूजन करणारे कांहीं लोक एकरूपानें, निरनिराळ्या रूपांनीं व बहुत प्रकारांनीं, सर्वतोमुख अशा जो मी त्या माझी उपासना करतात ॥ १५ ॥*

ज्ञानयज्ञाचें लक्षण कोणतें म्हणशील, तर ज्या ठिकाणीं ' ब्रह्माचें बहुत प्रकारचें होणें ' म्हणजे आदिसंकल्प हाच यज्ञस्तंभ; पंचमहाभूतें हा यज्ञमंडप; जीव व ईश्वर यांचा भिन्नपणा हाच पशु; ३९ मग पंचमहाभूताचे जे विशेष गुण ते, अथवा पांच इंद्रियें आणि पंचप्राण हेंच यज्ञाचें साहित्य, व ब्रह्माविषयीं जें अज्ञान तेंच घृत. २४० हे बलाढ्य अर्जुना, त्या यज्ञांत मन व बुद्धि हीं दोन कुंडें असून या दोन कुंडांत ज्ञानरूप अग्नि प्रदीप्त केला जातो; सुख व दु:ख यांचे ठिकाणीं जी समता तीच वेदिका म्हणजे यज्ञकुंडाच्या सभोंवतीं असलेला परिघ होय; ४१ आत्मानात्मविचार करण्याविषयीं जी बुद्धीची कुशलता, तेच यज्ञांतील मंत्र होत; शांति हीच स्रुक् व स्रुवा नांवाचीं हवनपात्रें व जीव हा यज्ञ करणारा होय. ४२ तो यज्ञ करणारा जीव अनुभवरूप पात्रांनीं, ब्रह्माच्या विचार-रूप महामंत्रांनीं, ज्ञानरूप अग्निहोत्र कर्मानें, जीव व ईश्वर यांच्या भिन्नपणाची आहुति देऊन तो भेद नाहींसा करतो, ४३ त्या वेळेस अज्ञान नाहींसें होऊन यज्ञ करणारा

* अध्याय ४, श्लोक ३३ पासून ४२ पर्यंत पहा.

वेगळालें कांहीं न म्हणे । आघवें एकचि ऐसें जाणे । आत्मबुद्धि ॥ ४५ ॥ जैसा चेइला तो अर्जुना । म्हणे स्वप्नींची हे विचित्र सेना । मीचि जाहालों होतों ना । निद्रावशें ॥ ४६ ॥ आतां सेना ते सेना नव्हे । हें मीच एक आघवें । ऐसें एकत्वें मानवे । विश्व तया ॥ ४७ ॥ मग तो जीव हे भाप सरे । आब्रह्म परमात्मबोधें भरे । ऐसें भजती ज्ञानाध्वरें । एकत्वें येणें ॥ ४८ ॥ अथवा अनादि हें अनेक । जे आनासारिखे एका एक । आणि नामरूपादिक । तेंही विषम ॥४९॥ म्हणोनि विश्व भिन्न । परि न भेदे तयाचें ज्ञान । जैसे अवयव तरी आन आन । परि एकोचि देहींचे ॥ २५० ॥ कां शाखा सानिया थोरा । परि आहाति एकाचिये तरुवरा । बहु रश्मि परि दिनकरा । एकाचे जेवी ॥ ५१ ॥ तेवि नानाविधा व्यक्ती । आनानें नामें आनाना वृत्ती । ऐसें जाणती भेदलां भूतीं । अभेदा मातें ॥ ५२ ॥ येणें वेगळालेपणें पांडवा । करिती ज्ञानयज्ञु बरवा । जे न भेदती जाणिवा । जाणते म्हणउनी ॥ ५३ ॥ ना तरी जेधवां जिये ठायीं । देखती कां जें जें कांहीं । तें मीवांचूनि नाहीं । ऐसाचि बोधु ॥ ५४ ॥ पाहें पां बुडबुडा जेउतां जाये । तेउतें जळचि एक तया आहे । मग विरे अथवा राहे । तऱ्ही जळाचिमाजीं ॥ ५५ ॥ कां पवनें परमाणु उचलले । ते पृथ्वीपणावेगळे नाहीं केले । आणि माघौते जरी पडले । तरी पृथ्वीचिवरी ॥ ५६ ॥ तैसें भलतेथ भलतेणें भावें । भलतेंही हो अथवा नोहावें । परि तें मी ऐसें आघवें । होऊनि ठेलें ॥ ५७ ॥ अगा हे जेव्हडी माझी व्याप्ती । तेव्हडीचि तयांची प्रतीती । ऐसे बहुधाकारीं वर्तती । मीचि होउनी ॥ ५८ ॥ हें भानुबिंब आवडे तया । सन्मुख जैसें धनंजया । तैसे ते विश्वा या । समोर सदा ॥ ५९ ॥ अगा तयांचिया ज्ञाना । पाठीं पोटें नाहीं अर्जुना । वायु जैसा गगना । सर्वांगीं असे ॥ २६० ॥ तैसा मी जेतुला आघवा । तेंचि तुक तयांचिया सद्भावा । तरी न करितां पांडवा । भजन जहालें ॥ ६१ ॥ येऱ्हवीं तरी सकळ मीचि आहें । तरी कवणीं कें उपासिला नोहें । एथ एके जाणणेवीण ठाये । अप्राप्तीसी ॥६२॥ परि ते असो येणें उचितें । ज्ञानयज्ञें यजितंसांते । उपासिती मातें । तें सांगितलें ॥ ६३ ॥ अखंड सकळ हें सकळां मुखीं । सहज अर्पत असे मज एकीं । कीं नेणणें यासाठीं मूर्खीं । न पविजेचि मातें ॥ ६४ ॥

अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् । मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥१६॥

१ ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत. २ ज्ञानयज्ञानें. ३ निराळीं. ४ अनेक. ५ स्वभाव. ६ भिन्न. ७ एक. ८ ज्ञान. ९ जिकडे. १० तिकडे. ११ मान्यानें. १२ मातीचे कण. १३ पुष्कळ व्यक्तींत. १४ आत व बाहेर असा भेद. १५ तोल, प्रमाण. १६ कोठें. १७ पूर्ण ज्ञानाशिवाय. १८ अज्ञानी. १९ योग्य. २० यज्ञ करतात. २१ याजूनें. २२ पावतात.

व यज्ञक्रिया हीं जागचे जागींच राहतात. नंतर आत्मानंदरसांत जीव-यजमानाचें अवभृथस्नान होतें. ४४ तेव्हां पंचमहाभूतें, शब्दस्पर्श इत्यादि विषय व इंद्रियें हीं वेगळालीं आहेत असें म्हणत नाहीं व ब्रह्माशीं तादात्म्य झाल्यामुळें सर्व एक आहे असें तो जाणतो. ४५ अर्जुना, ज्याप्रमाणें झोंपेंतून जागा झालेला मनुष्य म्हणतो कीं, 'स्वप्नांत पाहिलेली चित्रविचित्र सेना झोप लागल्यामुळें मीच झालों होतों ना! ४६ आतां, जी सेना पाहिली होती, ती सेना नव्हती; ती मीच झालों होतों;' अर्जुना, अशा प्रकारें त्या पुरुषाला जग एकरूप भासतें. ४७ मग तो जीव 'मी आहें' अशी आठवण विसरतो, व ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत आत्माच भरलेला आहे असें मानतो. अशा प्रकारें ज्ञानयज्ञानें ऐक्य पावून कितीएक मला भजतात. ४८ दुसरा, माझें भजन करणारा असें समजतो कीं, जगांतील जे सर्व पदार्थ दिसतात, ते अनादि आहेत. एकासारखे एक असूनही निराळे आहेत, आणि त्यांचीं नावें व रूपें हीं निराळीं आहेत, ४९ म्हणून, जग हें जरी भिन्न वस्तूंनीं भरलेलें आहे, तरी त्या वस्तूचें जें अधिष्ठान त्याच्या ज्ञानाबद्दल त्यांचे मनांत भेद नसतो. ज्याप्रमाणें, अवयव जरी निरनिराळे आहेत, तरी ते एकच देहाचे आहेत. २५० किंवा फांद्या जरी लहानमोठ्या असल्या तरी त्या एकाच झाडाच्या असतात, अथवा पुष्कळ किरणें दृष्टीस पडलीं तरी तीं जशीं एकाच सूर्यापासून निघालेलीं असतात. ५१ त्याप्रमाणें अनेक व्यक्ति असून जरी त्यांचीं नावें व स्वभाव पुष्कळ आहेत, तरी भूतांमध्यें माझें ऐक्य आहे असें ते जाणतात. ५२ हे पांडवा, अशा रीतीनें सर्व भूतें वेगळीं आहेत असें जाणून जे उत्तम असा ज्ञानयज्ञ करतात, व जे जाणते असल्यामुळें त्यांच्या ज्ञानाच्या ठिकाणीं भिन्नभाव उरत नाहीं; ५३ किंवा, जेव्हा व ज्या ठिकाणीं ते जी जी वस्तु पाहतात, त्यात माझ्यावाचून दुसरें कांहीं नाहीं असा ज्याच्या मनाचा निश्चय असतो; ५४ हें पहा, पाण्यावरील बुडबुडा जिकडे जातो, तिकडे पाणी म्हणून त्याला एकच आहे, मग तो नाहींसा झाला अथवा राहिला तरी तो पाण्यांतच असतो; ५५ किंवा वाऱ्यानें मातीचे कण उंच उडाले, तरी त्यांना कांहीं पृथ्वीपणावेगळें केलें नाहीं; आणि पुनः जरी ते खालीं पडले, तरी ते पृथ्वीवरच; ५६ त्याचप्रमाणें, पाहिजे तेथें पाहिजे त्या भावनेनें पाहिजेल तें होवो अथवा न होवो, परंतु तें सर्व 'मीच आहें' अशी ज्यांचे मनाची वृत्ति होऊन गेली आहे; ५७ अर्जुना, माझी जेवढी व्याप्ति आहे तेवढा त्यांचा अनुभव आहे; आणि याप्रमाणें पुष्कळ व्यक्तींत जरी ते वागले, तरी ते मद्रूपच झालेले असतात. ५८ हे धनंजया, सूर्यबिंब पाहिजे त्यानें पाहिलें असतां त्याच्यासमोरच तें दिसतें, त्याप्रमाणें ते ज्ञानी नेहमीं जगाच्या समोरच असतात; ५९ अर्जुना, त्यांच्या ज्ञानाला आंतबाहेर असा भेद नाहीं. ज्याप्रमाणें वायु हा आकाशात सर्वत्र भरलेला आहे, २६० त्याप्रमाणें, मी जेवढा संपूर्ण आहें, तेवढा त्यांच्या सद्भावाच्या मापास उतरतों; म्हणून हे पाडवा, त्यांनीं भजन न करितां माझें भजन केल्याप्रमाणें होतें. ६१ एरव्हीं

अन्वयः—अहं क्रतुः, अहं यज्ञः, अहं स्वधा, अहं औषधं, अहं मंत्रः, अहं एव आज्यं, अहं अग्निः, अहं हुतं ( अस्मि ) ॥ १६ ॥

( ३३८. ज्ञानी पुरुषाची ईश्वराबद्दलची भावना, २६५–२६८ ) तोचि जाणिवेचा जरी उदय होये । तरी मुदल वेदु मीचि आहे । आणि तो विधानातें जया विये । तो क्रतुही मीचि ॥ ६५ ॥ मग तया कर्मापासूनि बरवा । जो सांगोपांगें आघवा । यज्ञु प्रगटे पांडवा । तोही मी गा ॥ ६६ ॥ स्वाहा मी स्वधा । सोमादि औषधी विविधा । आज्य मी समिधा । मंत्रु मी हवि ॥ ६७ ॥ होतीं मी हवन कीजे । तेथ अग्नि तो स्वरूप माझें । आणि हुतक वस्तु जें जे । तेंही मीचि ॥ ६८ ॥

पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः । वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ॥१७॥

अन्वयः—अहं अस्य जगतः पिता, माता, धाता, पितामहः, वेद्य ( वस्तु ), पवित्रं ( वस्तु ) ओंकारः, ऋक्, साम च यजुः एव ( अस्मि ) ॥ १७ ॥

( ३३९. ईश्वराची व्याप्ति, २६९–३०० ) पैं जयाचेनि अंगसंगें । इये प्रकृतीस्तव अष्टांगें । जन्म पाविजत असे जगें । तो पिता मी गा ॥ ६९ ॥ अर्धनारीनटेश्वरीं । जो पुरुष तोचि नारी । तेवीं मी चरींचरीं । माताही होय ॥ २७० ॥ आणि जाहालें जग जेथ राहे । जेणें जीवित वाढत आहे । तें मीवांचूनि नोहे । आन निरुतें ॥ ७१ ॥ इयें प्रकृतिपुरुषें दोन्ही । उपजलीं जयाचिया अमनेंमनीं । तो पितामह त्रिभुवनीं । विश्वाचा मी ॥ ७२ ॥ आणि आघवेया जाणणेयाचिया वाटा । जया गांवा येती गा सुभटा । वेदांचिया चोहटां । वेद्य जे म्हणिजे ॥ ७३ ॥ जेथ नाना मतां बुझावणी आली । एकमेकां शास्त्रांची अनोळखी फिटली । चुकलीं ज्ञाने जेथ मिळो आलीं । जें पवित्र म्हणिजे ॥ ७४ ॥ पैं ब्रह्मबीजा जाहला अंकुरु । घोषध्वनि नादाकारु । तयाचें गा भवन जो ॐकारु । तोही मी गा ॥ ७५ ॥ जया ॐकाराचिये कुशीं । अक्षरें होतीं अउमकारेंसी । जियें उपजत वेदेंसीं । उठलीं तिन्ही ॥ ७६ ॥ म्हणोनि ऋग्यजुःसामु । हे तिन्ही म्हणे मी आत्मारामु । एवं मीचि कुलक्रमु । शब्दब्रह्मींचा ॥ ७७ ॥

गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।
प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥

अन्वयः—( अहं ) गतिः, भर्ता, प्रभुः, साक्षी, निवासः शरणं, सुहृत्, प्रभवः, प्रलय, स्थानं, निधानं, अव्ययं बीजं ( अस्मि ) ॥ १८ ॥

हें चराचर आघवें । जियें प्रकृतीआंत सांठवे । ते गिणली जेथ विसवे[20] ।

१ ज्ञानाचा. २ विधिअनुष्ठान. ३ यज्ञ. ४ यज्ञविधान. ५ यथाविधि. ६ देवास हवि देण्याचा मंत्र. ७ पितरास हवि देण्याचा मंत्र. ८ सोमवल्ली. ९ होमद्रव्य १० ऋत्विज. ११ हुत वस्तु. १२ स्थावरजंगमात. १३ अंतःकरणोपाधिरहित स्वरूपात=निर्गुणात. १४ समजूत, ऐक्यता. १५ चतुर्विधाचा. १६ मंदिर. १७ अकार, उकार व मकार यांसह. १८ वंशपरंपरा. १९ वेदांची. २० विश्रांति पावते.

तरी मी सर्वत्र भरलेला आहें; परंतु माझी कोण व कोठें उपासना करीत नाहींत? परंतु एक पूर्ण ज्ञानाशिवाय अज्ञानी जनाला माझी प्राप्ति होत नाही. ६२ परंतु हें असो; या योग्य ज्ञानयज्ञानें यज्ञ करून जे माझी उपासना करतात, ते भक्त तुला सांगितले. ६३ सदासर्वकाळीं जीं जीं कर्मे होतात, तीं सर्व बाजूनें मला सहज पावतात; परंतु हें मूर्खांना समजत नसल्यामुळें मी त्यांना प्राप्त होत नाहीं. ६४

श्लोकार्थः—अग्निहोत्रादि श्रौत यज्ञ, वैश्वदेवादिक स्मार्त यज्ञ, पितराना अर्पण केलेलें स्वधा नामक अन्न, मनुष्याचें अन्न, मंत्र, होमद्रव्य, अग्नि व हवनकर्म मीच आहें ॥ १६ ॥

तेंच ज्ञान झालें असतां, मुख्य वेद मीच आहें; त्यात विधि—अनुष्ठान जें सांगितलें आहे तो क्रतुही मीच. ६५ मग हे पाडवा, त्या यज्ञविधानापासून प्रकट होणारा जो यथाविधि यज्ञ, तोही मीच आहे; ६६ देवांस हवि देण्याचा मंत्र मी, पितरांसही हवि देण्याचा मंत्र मी, सोमवल्ली वगैरे नानाप्रकारच्या औषधि मी, घृत मी, समिधा मी, मंत्र मी, होमद्रव्य मी, ६७ ऋत्विज मी, ज्यांत हवन करावयाचें तो अग्निही माझें स्वरूप आहे, आणि अग्नींत हवन करण्याच्या ज्या ज्या वस्तु, त्याही मीच आहें. ६८

श्लोकार्थः—या जगाचा पिता, माता, प्राण्याना कर्मफल देणारा, ब्रह्मदेवाचा पिता, जाणण्याची योग्य वस्तु, जगताला पावन करणारी वस्तु, प्रणव, आणि ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेद मीच आहें ॥१७॥

हें पहा, ज्याच्या अंगसंगानें अष्टाग—प्रकृति ही जगास प्रसवते, तो जगत्पिता मी; ६९ अर्धनारीनटेश्वर स्वरूपांत ज्याप्रमाणें पुरुष तोच स्त्री व स्त्री तोच पुरुष असतो, त्याप्रमाणें स्थावरजंगमाची माताही मी; २७० आणि उत्पन्न झालेलें जग ज्या ठिकाणीं राहतें, व ज्याच्या योगानें प्राणिमात्राचें रक्षण होतें तें निःसंशय माझ्याशिवाय होत नाहीं. ७१ प्रकृति व पुरुष हीं दोन्ही ज्याच्या अंतःकरणो-पाधिरहित स्वरूपांत म्हणजे निर्गुणात उत्पन्न होतात, तो या विश्वाचा आजा त्रिभुवनात मीच. ७२ अर्जुना, सर्व ज्ञानाच्या वाटा ज्या गावात येऊन मिळतात, व चारी वेदाच्या चव्हाट्यावर ज्याला वेद्य असें म्हणतात; ७३ ज्या ठिकाणीं पुष्कळ प्रकारचीं मतें ऐक्य-तेस आलीं; शास्त्रांचीं एकमेकांशीं ओळख झाली; व चुकलेलीं ज्ञानें जेथें एकत्र मिळालीं, असें जें स्थान, त्याला पवित्र असें म्हणतात. ७४ हे पहा, ब्रह्मबीजाला परा, पश्यन्ती, मध्यमा आणि वैखरी या चार वाचा हेंच अंकुर फुटल्यावर, त्यांचें मंदिर जो ॐकार, तोही मीच होय. ७५ ज्या ॐकाराच्या पोटीं अ, उ व म् अशीं अक्षरें उत्पन्न होतात, व जीं उपजल्याबरोबर तीन वेद उत्पन्न झाले, ७६ म्हणून ऋक्, यजु व साम हे तिन्ही वेदही मीच, व त्याप्रमाणें वेदांची वंशपरंपराही मीच होय, असें श्रीकृष्ण म्हणाले. ७७

श्लोकार्थः—कर्मफल, जगाचें पोषण करणारा, स्वामी, साक्षी, वसतिस्थान, शरणागताचा रक्षक, अनपेक्ष मित्र, जगताची उत्पत्ति, लय, स्थिति, निधि आणि अविनाशी बीज मी आहें ॥१८॥

हें सर्व स्थावर जंगम विश्व ज्या प्रकृतीच्या आत भरलेलें आहे, ती प्रकृति श्रमली

ते परम गति मी ॥ ७८ ॥ आणि जयाचेनि प्रकृति जिये[1] । जेणें आधिष्ठिली विश्व विये । जो येऊनि प्रकृती इये । गुणातें भोगी ॥ ७९ ॥ तो विश्वश्रियेचा भर्ता । मीचि गा एथ पंडुसुता । मी गोसांवी समस्ता । त्रैलोक्याचा ॥ २८० ॥ आकाशें सर्वत्र वसावें । वायूनें नॉवभरी उगें नसावें । पावकें दाहावें । वर्षावें जळें ॥ ८१ ॥ पर्वतीं बैसका न संडावी । समुद्रीं रेखा नोलांडावी । पृथ्विया भूतें वाहावीं । हे आज्ञा माझी ॥८२॥ म्यां बोलविल्या वेदु बोले । म्यां चालविल्या सूर्यु चाले । म्यां हालविल्या प्राणु हाले । जो जगातें चाळिता ॥८३॥ मियांचि नियमिलासांतां । काळु ग्रासितसे भूतां । इयें म्हणियेंगतें पंडुसुता । सकळें जयाचीं ॥ ८४ ॥ जो ऐसा समर्थु । तो मी जगाचा नाथु । आणि गगनाऐसा साक्षिभूतु । तोही मीचि ॥८५॥ इहीं नामरूपीं आघवा । जो भरला असे पांडवा । आणि नामरूपांचाही वोल्हावा । आपणाचि जो ॥ ८६ ॥ जैसे जळाचे कल्लोळ । आणि कल्लोळीं आथी जळ । ऐसेनि वसवीतसे सकळ । तो निवासु मी ॥ ८७ ॥ जो मज होय अनन्य शरण । त्याचें निवारीं मी जन्ममरण । यालागीं शरणागता शरण्य । मीचि एकु ॥८८॥ मीचि एक अनेकपणें । वेगळालेनि प्रकृतिगुणें । जीतें[14] जगाचेनि प्राणें । वर्तत असें ॥ ८९ ॥ जैसा समुद्र थिल्लर न म्हणतां । भलतेथ बिंबे सविता[16] । तैसा ब्रह्मादि सर्वां भूतां । सुहृद तो मी ॥ २९० ॥ मीचि गा पांडवा । या त्रिभुवनासि वोलावा । सृष्टिक्षयप्रभावा । मूळ तें मी ॥९१॥ बीज शाखांतें प्रसवे । मग तें रूखपण बीजीं समावे । तैसें संकल्पें होय आघवें । पाठीं संकल्पीं मिळे ॥९२॥ ऐसें जगाचें बीज जो संकल्पु । अव्यक्त वासनारूपू । तया कल्पांतीं जेथ निक्षेपु[19] । होय तें स्थान मी ॥ ९३ ॥ इयें नामरूपें लोटती[20] । वर्णव्यक्ती आटती । जातीचे भेद फिटती । जैं आकारु नाहीं ॥ ९४ ॥ तैं संकल्पवासनासंस्कार । माघौतें रचावया चराचर । जेथ राहोनि असती अमर । तें निधान मी ॥ ९५ ॥

तपाम्यहमहं वर्षं निगृण्हाम्युत्सृजामि च । अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥१९॥

अन्वयः—अर्जुन, अहं तपामि, अहं वर्षं निगृण्हामि च उत्सृजामि, अहं एव अमृतं च मृत्युः, सत् च असत् ( अस्मि ) ॥ १९ ॥

मी सूर्याचेनि वेषें । तपें तें हें शोषे । पाठीं इंद्र होऊनि वर्षें । तें पुढती भरे ॥ ९६ ॥ अग्नि काष्ठें खाये । तें काष्ठचि अग्नि होये । तैसें मरतें मारितें पाहें । स्वरूप माझें ॥ ९७ ॥ यालागीं मृत्यूच्या भागीं जें जें । तेंही पैं रूप माझें ।

१ वांचते. २ आश्रयानें. ३ स्वामी. ४ क्षणभर ५ अग्नीनें जाळावें. ६ मेघानें. ७ जागा. ८ मर्यादा. ९ आज्ञा दिली असता. १० आज्ञाधारक. ११ जिव्हाळा. १२ वसतिस्थान. १३ रक्षण करणारा. १४ जिवंत. १५ नाला. १६ सूर्य. १७ आवडता. १८ उत्पत्ति, स्थिति व लय यांस. १९ सांठवण. २० लय पावतात. २१ जग. २२ देव.

असतां ज्या ठिकाणी विश्रांति पावते, तें उत्तम स्थान मी; ७८ आणि ज्याच्यामुळें ही प्रकृति वांचते, ज्याच्या आश्रयानें विश्व प्रसवते व जो प्रकृतीच्या निमित्तानें सत्त्व, रज, तम या गुणांचा उपभोग घेतो, ७९ तो विश्वलक्ष्मीचा पति मीच; आणि अर्जुना, सर्व त्रैलोक्याचा स्वामीही मीच. २८० आकाशानें सर्व ठिकाणीं असावें, वायूनें क्षणभर देखील स्वस्थ राहूं नये, अग्नीनें जाळावें, मेघानें वृष्टि करावी. ८१ पर्वतांनीं आपली जागा सोडूं नये, समुद्रानें आपली मर्यादा ओलांडूं नये, व पृथ्वीनें सर्व भूतांचा भार वहावा, ही आज्ञा माझी आहे. ८२ मीं बोलविल्यानें वेद बोलतात, मी चालविल्यानें सूर्य चालतो, सर्व जगाचा चालक जो प्राण, तोही मी हालविल्यानें हालतो; ८३ आणि मीच आज्ञा दिली असतां भूतांना काळ ग्रासतो. अर्जुना, याप्रमाणें हाच सर्व ज्याचीं आज्ञाधारक असून आपापलीं कामें करतात, ८४ असा जो समर्थ, तो जगाचा नाथ मी; व आकाशाप्रमाणें सर्व ठिकाणीं असून साक्षिभूत असणारा तोही मीच. ८५ हे पांडवा, याप्रमाणें या नामरूपानीं जो सर्वत्र भरलेला आहे, आणि जो आपणच नामरूपांचाही जिव्हाळा आहे, ८६ ज्याप्रमाणें लाटा पाण्यांतच उत्पन्न होतात, आणि लाटातही पाणी असतें, त्याप्रमाणें जग माझ्यांत व मी जगांत आहें. ८७ जो मला एकनिष्ठपणें शरण येतो, त्याला जन्ममरणापासून मी मुक्त करतों. म्हणून शरणागताचें रक्षण करणारा एकटा मीच आहें. ८८ प्रकृतीच्या वेगळाल्या गुणांनीं मी एक असून अनेकपणानें जगांतील प्राणिमात्रात प्राणरूपानें असतों. ८९ ज्याप्रमाणें, हा समुद्र किंवा हा नाला असें न म्हणतां सूर्य सर्व ठिकाणीं प्रकाशित होतो, त्याप्रमाणें ब्रह्मापासून चिलटापर्यंत प्राणिमात्राला आवडता म्हणून जो आहे तो मीच. २९० हे पांडवा, या त्रिभुवनाचें जीवन, आणि उत्पत्ति, स्थिति, लय ह्या तिन्ही अवस्थांस जो मूळ तो मीच. ९१ बीजापासून वृक्ष व शाखा उत्पन्न होतात, पुढें तीं झाडेंच बीजांत समावेश पावतात; त्याप्रमाणें, आदिसंकल्पापासून सर्व जगाची उत्पत्ति होऊन पुनः तें जग आदिसंकल्पातच लय पावतें. ९२ असें अव्यक्त वासनारूप जगाचें बीज जो संकल्प, त्याला कल्पांतीं जेथें राहण्यास ठिकाण मिळतें, तें मीच. ९३ जेव्हां निराकार स्वरूप प्रकट होतें, तेव्हां हीं सर्व नाना रूपें लय पावतात, वर्णव्यक्ति नाहींतशा होतात, व जातीचे भेदही राहत नाहींत; ९४ तेव्हां पुन. जग निर्माण करण्याकरितां संस्काररूप वासनाशक्ति धारण करून ज्या ठिकाणीं देव राहातात, तें ठिकाणही मीच. ९५

श्लोकार्थः--हे पार्था, मी सूर्यरूपानें ऊन पाडतों; मी पर्जन्य आवरून धरितों व पाडतों; मीच अमृत, मृत्यु मीच, सत् म्हणजे विद्यमान असणाऱ्या वस्तु ( कार्य ) व असत् म्हणजे त्याचें कारण मीच आहें. ॥ १९ ॥

मी सूर्याच्या रूपानें ज्या वेळेस तापतां, त्या वेळेस हें जग कोरडें होतें; आणि पुनः इंद्राच्या रूपानें पाऊस पाडतों, तेव्हां पुनः समृद्धि होते. ९६ ज्याप्रमाणें अग्नीनें

आणि न मरतें तंव सहजें । मीचि आहें ॥ ९८ ॥ आतां बहु बोलोनि सांगावें । तें एकिहेळां घे पां आघवें । तरी सतासैतही जाणावें । मीचि पैं गा ॥ ९९ ॥ अवतरणः—म्हणोनि अर्जुना मी नसें । ऐसा कवणु ठाव असे । परि प्राणियांचें दैव कैसें । जे न देखती मातें ॥ ३०० ॥ ( ३४०. ईश्वर सर्वव्यापी असून अज्ञानी जीव त्याला जाणत नाहीत, ३०१–३१८ ) तरंग पाणियेंवीण सुकती । रश्मि वातीवीण न देखती । तैसे मीचि ते मी नोहती । विस्मो देखें ॥ १ ॥ हें आंतबाहेर मियां कोंदलें । जग निखिल माझेंचि वोतिलें । कीं कैसें कर्म तयां आड आलें । जे मीचि नाहीं म्हणती ॥ २ ॥ परि अमृतकुहां पाडिजे । का आपणपयातें कढिये काढिजे । ऐसेअर्थीं काय कीजे । अप्राप्ति ॥ ३ ॥ ग्रासा एका अन्नासाठीं । अंधु धांवत हे किरीटी । आढळला चिंतामणि पायें लोटी । आंधळेपणें ॥ ४ ॥ तैसें ज्ञान जैं सांडूनि जाये । तैं ऐसी हे दशा आहे । म्हणोनि कीजे तें केलें नोहे । ज्ञानेंविण ॥ ५ ॥ आंधळेया गरुडाचे पांख आहाती । ते कवणा उपेगा जाती । तैसे सत्कर्माचे उपखे ठाती । ज्ञानेंविण ॥ ६ ॥

त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते ।
ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नंति दिव्यान् दिवि देवभोगान् ॥२०॥

अन्वयः—त्रैविद्याः, सोमपाः, पूतपापाः मा यज्ञैः इष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते; ते पुण्य सुरेंद्रलोक आसाद्य दिवि दिव्यान् देवभोगान् अश्नंति ॥ २० ॥

देख पां गा किरीटी । आश्रमधर्मांचिया राहाटी । विधिमार्गा कसवटी । जे आपणाचि होती ॥ ७ ॥ यजन करितां कौतुकें । तिहीं वेदांचा माथा तुकें । क्रिया फळेंसि उभी ठाके । पुढां जयां ॥ ८ ॥ ऐसे दीक्षित जे सोमपें । जे आपणाचि यज्ञाचें स्वरूप । तिहीं तया पुण्याचेनि नांवें पाप । जोडिलें देखें ॥ ९ ॥ जे श्रुतित्रयातें जाणोनि । शतवरी यज्ञ करूनि । यजिलिया मातें चुकोनि । स्वर्गा वरती ॥ ३१० ॥ जैसें कल्पतरूतळवटीं । बैसोनि झोळिये देतसे गांठी । मग निदैवें निघे किरीटी । दैन्यचि करूं ॥ ११ ॥ तैसे शतक्रतू यजिलें मातें । कीं ईप्सितैाति स्वर्गसुखातें । आतां पुण्य कीं हें निरुतें । पाप नोहे ॥ १२ ॥ म्हणोनि मजवीण पाविजे स्वर्गु । तो अज्ञानाचा पुण्यमार्गु । ज्ञानिये तयातें उपसर्गु । हानि म्हणती ॥ १३ ॥ येऱ्हवीं तरी नरकींचें दुःख । पावोनि स्वर्गा नाम कीं सुख । वांचूनि नित्यानंद गा निर्दोष । तें स्वरूप माझें ॥ १४ ॥ मज येता पैं सुभटा । या द्विविधा गा अव्हांटा । स्वर्गु नरकु या वाटा । चोराचिया ॥१५॥ स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे । पापात्मकें पापें नरका जाइजे । मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य

१ एकदां. २ व्यक्त व अव्यक्त. ३ कुपांत. ४ अभाग्यास. ५ श्रम व्यर्थ होतात. ६ वर्णविहित धर्मानें. ७ आचरण करून. ८ कसोटी. ९ ( यज्ञांतील ) सोमपान करणारे. १० दुवभाग्य. ११ भिक्षा मागण्यास. १२ शंभर यज्ञांनीं. १३ इच्छितात. १४ जन्ममरण. १५ आडमार्ग.

काष्ठ भक्षण केल्यावर तेंच काष्ठ पुनः अग्नि होतें, त्याप्रमाणें मरणारें व मारणारें स्वरूप माझेंच आहे. ९७ यावरून, मृत्यूच्या भागांतील जीं जीं रूपें आहेत तीं तीं माझींच आहेत, आणि न मरणारींही रूपें सहज माझींच आहेत. ९८ आतां फार बोलून काय सांगावें ? सर्व तुला एकदांच सांगतों कीं, व्यक्त व अव्यक्त रूपें हीं माझींच आहेत असें जाण. ९९ म्हणून अर्जुना, मी नाहीं असें कोणतें ठिकाण आहे ? परंतु प्राणिमात्राचें दैव काय चमत्कारिक आहे, कीं ते मला पहात नाहींत. ३०० ज्याप्रमाणें लाटा पाण्याशिवाय आटाव्या किंवा सूर्यकिरण दिव्याच्या उजेडाशिवाय दिसूं नयेत, त्याप्रमाणें सर्व जीव मीच बनलेला असून, ते मला ओळखत नाहीत, हें केवढें आश्चर्य आहे पहा. १ ह्या सकल विश्वांत अंतर्बाह्य मीच भरलेला आहें, व हें जग मद्रूपच आहे; परंतु जीवाचीं कर्में त्यांस कशीं आड येतात पहा, कीं ते मलाच ' नाहीं ' असें म्हणतात. २ परंतु अमृताच्या कूपात पडल्यावर ज्याप्रमाणें एखांदा मनुष्य आपल्याला बाहेर काढा असें म्हणतो, तेव्हा अशा त्या अभाग्याला काय म्हणावें ? ३ हे किरीटी, अन्नाकरितां धावणाऱ्या अंधळ्याला चिंतामणि सांपडला असतां दृष्टि नसल्यामुळें तो जसा त्याला पायानें लोटून देतो, ४ त्याप्रमाणें ज्ञानाचा त्याग केला म्हणजे अशी स्थिति होते; म्हणून ज्ञानाशिवाय जीं जीं कर्में करावीं तीं न केल्यासारखीं आहेत. ५ अंधळ्याला गरुडाचे पंख जरी मिळाले, तरी त्याला त्यांचा काय उपयोग होणार ? त्याचप्रमाणें, ज्ञानाशिवाय सत्कर्मांचे श्रम व्यर्थ आहेत. ६

श्लोकार्थः—तीन वेद जाणणारे, सोमपान करणारे व त्या योगानें निष्पाप झालेले याज्ञिक यज्ञाचे योगानें माझें पूजन करून स्वर्गप्राप्तीविषयीं प्रार्थना करितात; व ते दीक्षित पुण्यफलरूप स्वर्गांत जाऊन तेथें दिव्य असे देवाचे भोग भोगतात ॥ २० ॥

अरे अर्जुना, हें पहा, वर्णविहित धर्मांचें आचरण करून जे आपणच विधिमार्गाची कसोटी बनतात, ( वेदांत सांगितल्याप्रमाणें यथाविधि आचरण करतात ), ७ ते यज्ञ करूं लागले म्हणजे तिन्ही वेद संतोष पावून मान डोलवितात, व त्यांच्यापुढें क्रियाही फलप्राप्तीसह उभी राहते. ८ याप्रमाणें यज्ञांतील सोमपान करणारे यज्ञकर्ते ( दीक्षित ) जे आपणच यज्ञरूप होतात, त्यांनीं, नांवमात्र पुण्य, परंतु खरोखर पापाचीच जोड केली असें समज. ९ ते ऋक्, यजु व साम या तिन्ही वेदांस जाणून शंभर यज्ञांनीं माझें यजन करतात; परंतु माझ्या प्राप्तीची इच्छा सोडून स्वर्गप्राप्तीची इच्छा करतात. १० अर्जुना, ज्याप्रमाणें एखादा हतभाग्य मनुष्य कल्पतरूचे खालीं बसून झोळीच्या पदरास गांठी मारतो, आणि मग भिक्षा मागण्यास निघतो, ११ त्याप्रमाणें, शंभर यज्ञांनीं माझें यजन करून ते स्वर्गसुखाची इच्छा करतात; तेव्हां हें पुण्य नसून खरोखर पाप नव्हे का ? १२ म्हणून, माझ्या प्राप्तीची इच्छा सोडून जे स्वर्गाला जातात, त्यांना अज्ञानी लोक पुण्यमार्ग म्हणोत; परंतु ज्ञानी जे आहेत, ते, तो जन्ममरणरूप फेऱ्यांत पडून त्याची हानि झाली असें म्हणतात. १३ एरव्हीं नरकांतील दुःखाच्या मानानें

॥ १६ ॥ आणि मजचिमाजीं असतां । जेणें मी दुऱ्हावे पंडुसुता । तें पुण्य ऐसें म्हणतां । जीभ न तुटे काइ ॥ १७ ॥ परि हें असो आतां प्रस्तुत । ऐकें यापरि ते दीक्षित । यजूनि मातें यांचित । स्वर्गभोगु ॥ १८ ॥ ( ३४१. यज्ञभोक्त्याला चुकून स्वर्ग भोगतात, त्या स्वर्गाचें वर्णन; ३१९-३२७ ) मग मी न पविजे ऐसें । जें पापरूप पुण्य असे । तेणें लाधलेनि [3]सौरसें । स्वर्गा येती ॥ १९ ॥ जेथ अमरत्व हें सिंहासन । ऐरावतासारिखें वाहन । राजधानी भुवन । अमरावती ॥ ३२० ॥ जेथ महासिद्धींचीं भांडारें । अमृताचीं कोठारें । जिये गांवीं खिल्लारें । कामधेनूंचीं ॥ २१ ॥ जेथ वोळंगे देव पा[6]इका । सेंधं चिंतामणीचिया भूमिका । विनोद-वनवाटिका । सुरतरूंचिया ॥ २२ ॥ गंधर्व गात गाणीं । जेथ रंभेऐशिया नाचणी । उर्वशीमुख्य विलासिनी । अंतौरियीं ॥ २३ ॥ मदन ओळगे[11] शेजारें । जेथ चंद्र शिंपे सांवरें[13] । पवनाऐसे म्हणियारे । धांवणें जेथ ॥ २४ ॥ पैं बृहस्पती मुख्य आपण । ऐसे स्वस्तिश्रियेचे ब्राह्मण । तोंटिये सुरगण । बहुवस जेथें ॥ २५ ॥ लोकपाळ रांगेचे । राऊत जिये पदवीचे । उच्चैःश्रवा खेंचे । खेळणिये ॥ २६ ॥ हें असो बहु ऐसें । भोग इंद्रसुखासरिसे । ते भोगिजती जंव असे । पुण्यलेशु ॥ २७ ॥

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ।
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥ २१ ॥

अन्वयः—ते तं विशालं स्वर्गलोकं भुक्त्वा पुण्ये क्षीणे ( सति ) मर्त्यलोकं विशन्ति, एवं त्रयी धर्मं अनुप्रपन्नाः कामकामाः ( दीक्षिताः ) गतागतं लभन्ते ॥ २१ ॥

( ३४२. यज्ञपुण्याने स्वर्गांत जातात व पुण्य संपतांच मृत्युलोकीं येतात, ३२८-३३२ ) मग तया पुण्याची पाउंटी सरे । सवेंचि इंद्रपणाची उंटी उतरे । आणि येऊं लागती माघारे । मृत्युलोका ॥ २८ ॥ जैसा वेश्याभोगा कवडा वेंचे । मग दारही चेपूं न ये तियेचें । तैसें लाजिरवाणें दीक्षिताचें । काय सांगों ॥ २९ ॥ एवं थितिया मातें चुकले । जिहीं पुण्यें स्वर्ग कामिले । तयां अमरपण तें वावो जालें । आतां मृत्युलोकु ॥ ३३० ॥ मातेचिया उदरकुहरीं । पचूनि विष्ठेच्या दाथरीं । उकडूनि नवमासवरी । जन्मजन्म मरती ॥ ३१ ॥ अगा स्वप्नीं निधान फावे । परि चेइलिया हारपे आघवें । तैसें स्वर्गसुख जाणावें । वेदज्ञांचें ॥ ३२ ॥ ( ३४३. ईश्वराला न जाणतां वेदाध्ययन फुकट, ३३३ ) अर्जुना वेदविद जऱ्ही जाहला । तरी मातें नेणतां वायां गेला । कण सांडूनि उपणिलें । कोंडा

---

१ इच्छा करतात. २ प्राप्त झाल्यानें. ३ हौसेनें. ४ कळप. ५ वागण्याकरितां. ६ चाकर. ७ सर्वत्र. ८ उपवनें. ९ कल्पतरूंच्या. १० स्त्रिया. ११ चाकरी करितो. १२ शेजघरांत. १३ सडा संमार्जन. १४ पंक्तीला. १५ जय मिळविलेले सरदार. १६ खासगी. १७ कोतवाल. १८ पुंजी. १९ अभिमान. २० सर्व द्रव्य. २१ इच्छा केली. २२ गुंतेत. २३ घरात. २४ ठेवा. २५ दीक्षितांचें. २६ वेदार्थज्ञानी. २७ वाऱ्यावर धरला.

स्वर्गप्राप्तीला सुख म्हणतां येईल; परंतु या दोहोंशिवाय अखंड आनंददायक व निर्दोष असें जें सुख, तें माझें स्वरूप होय. १४ हे महावीरा अर्जुना, माझ्याकडे येण्याला स्वर्ग व नरक हे दोन आडमार्ग असून चोरांच्या वाटा आहेत. १५ स्वर्गप्राप्ति पुण्यात्मक पापानें होते, व नरकप्राप्ति पापात्मक पापानें होते, पण ज्या योगानें माझी प्राप्ति होते, तें शुद्ध पुण्य समज. १६ हे पांडुसुता, माझाच अंश असून ज्या कर्मांमुळें मी अंतरतों, त्याला पुण्य असें जर म्हटलें, तर जीभ तुटणार नाहीं काय? १७ परंतु हें आतां राहूं दे. याप्रमाणें ते दीक्षित माझें यजन करून स्वर्गभोगांची इच्छा करतात. १८ मग ज्या पुण्यानें मी पावणार नाहीं असें पापरूप पुण्य प्राप्त करून हौसेनें स्वर्गी जातात. १९ जेथें अमरत्व हेंच सिंहासन, ऐरावतासारखें वाहन, अमरावती हें राजधानीचें शहर; ३२० जेथें अष्टमहासिद्धींचीं भांडारें आहेत, अमृताचीं कोठारें आहेत, व ज्या गांवांत कामधेनूचे कळपचे कळप आहेत; २१ जेथें देवांच्या चाकरांना वागण्याकरितां चिंतामणीच्या वाटा आहेत व कल्पतरूचीं उपवनें आहेत; २२ जेथें गंधर्व गायन करताहेत, रंभेसारख्या नृत्य करणाऱ्या आहेत, व जेथें उर्वशी प्रमुख स्त्रिया विलासाकरितां आहेत, २३ ज्या ठिकाणी मदन सेजघरांत चाकरी करतो आहे, चंद्र सडासंमार्जन करतो आहे, व वायूसारखे धावणारे चाकर आहेत, २४ जेथें इंद्राला आशीर्वाद देणारांत बृहस्पतीसारखे मुख्य ब्राह्मण आहेत, व ज्यांच्या पंक्तीला देवमंडळी आहेत, २५ ज्यांच्या सभोंवतीं लोकपालांसारखे राजे चालत असून, जय मिळविलेले पदवीधर सरदार आहेत, व उच्चैःश्रवा नामक खाजगी कोतवालघोडा आहे. २६ हें असो; याप्रमाणें, जोंपर्यंत पुण्याचा अंश आहे, तोंपर्यंत ते इंद्राच्या सुखासारखे पुष्कळ भोग भोगतात. २७

श्लोकार्थः—ते त्या विस्तीर्ण स्वर्गलोकाचा उपभोग घेऊन पुण्य संपल्यावर मृत्युलोकांत येतात, आणि याप्रमाणें तीन वेदात सांगितलेलें केवळ कर्म करणारे कामुक लोक जन्ममृत्यूंची यातायात पावतात ॥२१॥

मग त्यांच्या पुण्याची पुंजी संपतांक्षणींच इंद्रपणाचा अभिमान लोपून ते मृत्युलोकीं माघारे येतात. २८ ज्याप्रमाणें वेश्येच्या पायीं एखाद्यानें आपलें सर्व द्रव्य खर्च केल्यानंतर त्याला तिच्या दाराला देखील बोट लावण्याची सत्ता नसते, त्याप्रमाणें या यज्ञकर्त्यांची स्थिति फार लाजिरवाणी होते, ती तुला काय सांगूं? २९ याप्रमाणें, ज्या वेळेस जपावयाचें, त्या वेळेस मला चुकून ज्यांनीं पुण्यमार्गाच्या आचरणानें स्वर्गप्राप्ति करून घेतली, त्यांचें अमरत्व वायां जाऊन शेवटीं ते मृत्युलोकीं परत येतात. ३३० नंतर मातेच्या उदररूप गृहेंत विष्ठेच्या थरांत नऊ महिनेपर्यंत उकडून पक्क दशेंत येतात, आणि जन्माला येऊन मरण पावतात. ३१ अरे; स्वप्नांत प्राप्त झालेला ठेवा जसा जागृत झाल्यावर सर्व नाहींसा होतो, त्याप्रमाणें यज्ञकर्त्यांचें सुख आहे असें समज. ३२ अर्जुना, ज्याप्रमाणें धान्य काढून घेतलेला कोंडा उफणला असतां व्यर्थ होतो, त्याप्रमाणें, वेदार्थज्ञानी जरी झाला, तरी मला जाणल्याशिवाय त्याचा जन्म व्यर्थ होय. ३३ म्हणून माझ्या एकट्याशिवाय हें

जैसा ॥३३॥ (३४४. ईश्वरावांचून काहींही जाणूं नकोस, म्हणजे सुखी होशील, ३३४) म्हणऊनि मज एकेंविण । हे त्रैयीधर्म[1] अकारण[2] । आतां मातें जाणोनि कांहीं नेण । तूं सुखिया होसी ॥ ३४ ॥

**अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥२२**

अन्वयः—अनन्याः चिन्तयन्तः ( सन्तः ) ये जनाः मा पर्युपासते, तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं अहं वहामि ॥ २२ ॥

( ३४५. अनन्यभावानें मला शरण ये, ३३५-३३७ ) पैं सर्वभावेंसीं उखितें[3] । जे वोपिले[4] मज चित्तें । जैसा गर्भगोळु उद्यमातें[5] । कोणाही नेणे ॥ ३५ ॥ तैसा मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटेंचि नाहीं । मजचि नाम पाहीं । जिणेंया[6] ठेविलें ॥ ३६ ॥ ऐसे अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसांते मातें । जे उपासिती तयांतें । मीचि सेवीं ॥ ३७ ॥ (३४६. अनन्य भक्ताचा योगक्षेम, ३३८—३४३ ) ते ऐकत्व[7]-दूनि जिये क्षणीं । अनुसरले गा माझिये वाहणीं[8] । तेव्हांचि तयांची चिंतवणी[9] । मजचि पडली ॥ ३८ ॥ मग तिहीं जें जें करावें । तें मजचि पडिलें आघवें । जैसी अजातपक्षाचेनि[10] जीवें । पक्षिणी जिये[11] ॥ ३९ ॥ आपुली तहान भूक नेणे । तान्हया निकें[12] तें माउलीसचि करणें । तैसे अनुसरले जे मज प्राणें । तयांचें सर्व मी करीं ॥ ४० ॥ तयां माझिया सायुज्याची[13] चाड । तरि तेंचि पुरवीं कोडें[14] । कां सेवा म्हणतां तरी आड[15] । प्रेम सुयें ॥ ४१ ॥ ऐसा मनीं जो जो धरिती भावो । तो तो पुढां पुढां[16] लागे तयां देवों । आणि दिधलियाचा निर्वाहो[17] । तोही मीचि करीं ॥ ४२ ॥ हा योगक्षेमु[18] आघवा । तयांचा मजचि पडिला पांडवा । जयांचिया सर्वभावा । आश्रयो मी ॥ ४३ ॥

**येऽप्यन्यदेवताभक्ता यजंते श्रद्धयान्विताः । तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम् ॥२३**

अन्वयः—अपि ये अन्यदेवताभक्ताः श्रद्धया अन्विताः यजन्ते, ते अपि कौंतेय, अविधिपूर्वकं मा एव यजन्ति ॥ २३ ॥

( ३४७. अज्ञानपूर्वक भजन, ३४४—३४९ ) आतां आणीकही संप्रदायें । परि मातें नेणती सैंमवायें । जे अग्निइंद्रसूर्यसोमाये । म्हणऊनि यजिती ॥ ४४ ॥ तेंही कीर मातेंचि होये । कां जें हें आघवें मीचि आहें । परि ते भजती उंजरी नव्हे । विषम पडे ॥ ४५ ॥ पाहे पां शाखापल्लव रुखाचे । हे काय नव्हती एकाचि बीजाचे । परी पाणी घेणें मुळाचें । तें मुळींचि घांपे ॥ ४६ ॥ कां दहाही इंद्रियें आहाती । इयें जरी एकेचि देहींचीं होती । आणि इहीं सेविले विषयो जाती । एकाचि ठायां ॥ ४७ ॥ तरि करोनि रससोयें बरवी । कानीं केवि

१ वेदोक्त धर्म. २ व्यर्थ. ३ उचलें. ४ विकले. ५ उद्योग. ६ वाचणें. ७ ऐक्यतेस पावून. ८ भजनीं. ९ चिंता. १० पंख न फुटलेल्या पक्ष्याच्या. ११ वाचवीत. १२ सुखकारक. १३ ऐक्याची. १४ कौतुक १५ दरम्यान. १६ वारंवार. १७ रक्षण. १८ योग=अप्राप्ताची प्राप्ति; क्षेम=

तिन्ही वेदोक्त धर्म व्यर्थ आहेत; तेव्हां आतां मलाच जाण, दुसरें कांहीं मनांत आणूं नको, म्हणजे सुखी होशील. ३४

श्लोकार्थः—जे लोक एकनिष्ठ होऊन माझें चिंतन करून माझी उपासना करतात, त्या सर्वदा माझ्याशीं युक्त असलेल्या निष्काम भक्ताचा योगक्षेम मी चालवितों ॥ २२ ॥

हें पहा, ज्यांनीं आपलें चित्त सर्वभावेंकरून माझ्याच ठिकाणीं उक्तें विकलें आहे; ज्याप्रमाणें गर्भातील गोळा कोणताही उद्योग करावयाचें जाणत नाहीं, ३५ त्याप्रमाणें ज्यांना माझ्यावांचून दुसरें कांहींच चांगलें दिसत नाहीं, व ज्यांनीं माझ्याचकरितां आपला जीव ठेवला आहे; ३६ अशा प्रकारें एकनिष्ठ अंत.करणानें जे माझें चिंतन करून माझी सेवा करतात, त्यांची सेवा मीच करतों. ३७ ते ऐक्यतेस पावून ज्या वेळेस माझ्याच भजनीं लागले, त्याच वेळीं त्यांची चिंता मला पडली. ३८ मग जें जें कांहीं करण्याचें ते मनात आणतात, तें सर्व मला करावें लागतें. ज्याप्रमाणें पंख न फुटलेल्या पक्ष्यांच्या जीवनाकरितां पक्षिणीच सारखी खटपट करीत असते, ३९ किंवा, आपली तहानभूक न जाणतां, आपल्या तान्ह्या लेंकरास जें सुखकारक तेंच आईला करावें लागतें, त्याचप्रमाणें, ज्यांनीं मनापासून सर्व भार मजवर टाकला आहे, त्यांचें सर्व इच्छित मीच पूर्ण करतों. ३४० त्यांना माझ्या ऐक्याची इच्छा झाली, तर मी त्यांचें कौतुक पुरवितों; किंवा माझी सेवाच करावी असें ते म्हणतील, तर त्यांच्या व माझ्यामध्यें प्रेमभाव उत्पन्न करतों. ४१ याप्रमाणें ते आपल्या मनांत जी जी इच्छा करतात, ती ती वारंवार मला पुरवावी लागते; आणि जें त्यांना दिलेलें असतें, त्याचें रक्षणही मीच करतों. ४२ हे पांडवा, ज्यांचा सर्व भाव मजवरच असतो, त्यांचा योगक्षेम मजवरच पडतो. ४३

श्लोकार्थः—अन्य देवतांची भक्ति करणारेही जे लोक श्रद्धायुक्त होत्साते त्या देवतांचें यजन करतात, ते देखील अर्जुना, माझेंच यजन करतात; परंतु हें त्यांचें करणें अविधिपूर्वक (अज्ञानपूर्वक) असतें ॥ २३ ॥

आतां मी सर्वव्यापकरूपानें आहें असें न जाणून प्रत्येक सांप्रदायिक लोक अग्नि, इंद्र, सूर्य, चंद्र यांना मीच जाणून भजतात; ४४ तें त्यांचें पूजन खरोखर माझेंच होतें, कारण या सर्व जगांत मीच भरून राहिलों आहें, परंतु तें त्याचें भजन पद्धतशीर नसून चुकलेलें असतें. ४५ हें पहा, वृक्षांच्या शाखा, पानें वगैरे एकाच बीजापासून उत्पन्न झालेलीं नव्हत का? परंतु पाणी जें घालावयाचें, तें मुळाशींच घातलें पाहिजे; ४६ किंवा दहा इंद्रियें जरी एकाच देहाचीं आहेत, आणि त्यांनीं सेवन केलेले विषय जरी एकाच ठिकाणीं जातात, ४७ तरी उत्तम स्वयंपाक करून तो कानांत कसा घालावा? आणि फुलें आणून डोळ्यांनीं कशीं हुंगावीं? ४८ तर अन्न हें तोंडानेंच सेवन केलें पाहिजे, आणि सुवास

मातांचें रक्षण. १९ सर्वव्यापक रूपानें. २० पद्धत. २१ चुकलेले. २२ झाडाचे. २३ घातलें पाहिजे. २४ स्वयंपाक.

भरावी। फुलें आणोनि तुरंबावीं । डोळां केवि ॥ ४८ ॥ तेथ रसु तो मुखेंचि सेवावा । परिमळु तो घ्राणेंचि घ्यावा । तैसा मी तो यजावा । मीचि म्हणोनि ॥ ४९ ॥ ( ३४८. अज्ञानानें जें भजन, तें खरें भजन नव्हे, ३५०-३५४ ) येर मातें नेणोनि भजन । तें वायांचि गा आनेआनें । म्हणोनि कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवें ॥ ३५० ॥

अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च । न तु मामभिजानंति तत्त्वेनातश्च्यवंति ते ॥२४

अन्वयः—हि अहं सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुः एव च ( अस्मि ). मां तु तत्त्वेन न अभिजानन्ति अतः ते च्यवन्ति ॥२४॥

ये-हवीं पाहें पां पंडुसुता । या यज्ञोपहारां समस्तां । मीवांचूनि भोक्ता । कवणु आहे ॥ ५१ ॥ मी सकळां यज्ञांचा आदि । आणि यजना या मीचि अवधि । कीं मातें चुकोनि दुर्बुद्धि । देवां भजले ॥ ५२ ॥ गंगेचें उदक गंगे जैसें । अर्पिजे देवपितरोद्देशें । माझें मज देती तैसें । परि आनानीं भावीं ॥ ५३ ॥ म्हणऊनि ते पार्था । मातें न पवतीचि सर्वथा । मग मनीं वाहिली जे आस्था । तेथ आले ॥ ५४ ॥

यांति देवव्रता देवान् पितॄन्यांति पितृव्रताः ।
भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥

अन्वयः—देवव्रताः देवान् यान्ति; पितृव्रताः पितॄन् यान्ति; भूतेज्याः भूतानि यान्ति; मद्याजिनः अपि मां यान्ति ॥ २५ ॥

( ३४९. देवतांचें पूजन करणारे देवत्वाला प्राप्त होतात; भगवंताचें भजन करणारे मला प्राप्त होतात, ३५५–३६६ ) मनें वाचा करणीं । जयांचीं भजनें देवाचिया वाहणीं । ते शरीर जातियेक्षणीं । देवचि जाले ॥ ५५ ॥ अथवा पितरांचीं व्रतें । वाहतीं जयांचीं चित्तें । जीवित सरलिया तयांतें । पितृत्व वरी ॥ ५६ ॥ कां क्षुद्रदेवतादि भूतें । तियेचि जयांचीं परमदैवतें । जिहीं अभिचारिकीं तयांतें । उपासिलीं ॥ ५७ ॥ तयां देहाची जवनिका फिटली । आणि भूतत्वाची प्राप्ति जाहली । एवं संकल्पवशें फळलीं । कर्मे तयां ॥ ५८ ॥ मग मीचि डोळां देखिला । जिहीं कानीं मीचि ऐकिला । मीचि मनीं भाविलो । वानिलों वाचा ॥ ५९ ॥ सर्वांगीं सर्वाठायीं । मीचि नमस्कारिला जिहीं । दानपुण्यादिकें जें कांहीं । तें माझियाचि मोहरें ॥ ३६० ॥ जिहीं मातेंचि अध्ययन केलें । जे आंतबाहेरि मियांचि धाले । जयांचें जीवित्व जोडलें । मजचिलागीं ॥ ६१ ॥ जे अहंकारु वाहत आंगीं । आम्ही हरीचे भूपावेयालागीं । जे लोभिये एकचि जगीं । माझेनि लोभें ॥ ६२ ॥ जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम । जे माझिया भुलीं सँभ्रम । नेणती लोक ॥ ६३ ॥ जयांचीं जाणतीं मजचि शास्त्रें । मी जोडे

हा नाकानेंच घेतला पाहिजे, त्याचप्रमाणें माझी पूजा करणें ती मीच समजून केली पाहिजे. ४९ एरव्हीं, मला न जाणता जें भजन करणें, तें कांहीं तरी असून व्यर्थ होय. म्हणून, कर्म आचरण्यास ज्ञान ही दृष्टि आहे, तर तें ज्ञान निर्दोष असें झालें पाहिजे. ३५०

श्लोकार्थः—कारण, मी सर्व यज्ञाचा भोक्ता व स्वामी आहें, पण हे अन्यदेवताभक्त मला तत्त्वतः जाणीत नाहींत, म्हणून ते मुख्य यज्ञफलाला मुकतात. ( माझी प्राप्ति त्याना होत नाहीं ) ॥२४॥

अर्जुना, एरव्ही असें पहा कीं, या सर्व यज्ञोपचारांचा माझ्यावांचून दुसरा कोण भोक्ता आहे ? ५१ मी सर्व यज्ञांचा आदि आहें, व यजनाचा शेवटही मीच आहें; परंतु दुर्बुद्धि जे असतात, ते मला सोडून इंद्रादि देवास भजतात. ५२ ज्याप्रमाणें गंगेचें पाणी देव व पितर याच्या नावानें गंगेंतच अर्पण करतात, त्याप्रमाणें ते माझें मलाच देतात; पण निराळ्या भावानें ! ५३ म्हणून पार्था, ते कधींही मला पावत नाहींत; मग मनांत जी इच्छा धारण करतात, त्या ठिकाणीं ते जातात. ५४

श्लोकार्थः—देवाची उपासना करणारे देवलोकास जातात, पितृभक्ताना पितृलोक मिळतो, क्षुद्र देवतादि भूताचे पूजकांस भूताची प्राप्ति होते, आणि माझें भजन करणाऱ्यास माझी प्राप्ति होते ॥ २५ ॥

मन, वाचा व इंद्रियें यांच्या योगानें जे इंद्रादि देवांचे भजन करतात, ते, शरीर जातांक्षणींच देवरूप होतात. ५५ अथवा, ज्यांच्या मनानें पितरांचीं व्रतें करण्याचें घेतलें आहे, त्यांना प्राणांतीं पितृलोक प्राप्त होतो; ५६ किंवा वेताळादि पिशाच व क्षुद्र देव हीं ज्यांचीं परम दैवतें आहेत, व ज्यांनीं घातक अशा जारणमारण कर्मांनी त्याची उपासना केली आहे, ५७ त्याना, देहाचा पडदा पडतांच पिशाचयोनीची प्राप्ति होते. अशा प्रकारें त्यांच्या संकल्पाप्रमाणें त्यांचीं कर्मे त्याना फळतात ! ५८ मग जे दृष्टीनें मलाच पाहतात, कानांनीं माझ्याच नांवाचें श्रवण करतात, मनानें माझेंच ध्यान करतात, व माझेंच वर्णन करतात, ५९ सर्वांगानें व सर्व ठिकाणीं मलाच नमस्कार करतात; दानें, पुण्य वगैरे सर्व कांहीं माझ्याच उद्देशानें करतात, ३६० ज्यांनीं माझ्या नामस्मरणाचेंच अध्ययन केलें आहे, जे माझ्याच योगानें अंतर्बाह्य तृप्त झाले आहेत, ज्यांनी आपलें आयुष्य माझ्याकडेच खर्च केलें आहे, ६१ ज्याना माझ्याशिवाय दुसऱ्या कसल्याही प्राप्तीची इच्छा नाहीं; आम्ही हरीची कीर्ति वाढविणारे आहों असा जे अहंकार बाळगतात, ६२ माझीच इच्छा करून ज्यांची इच्छा पूर्ण होते, जे मजवरच प्रेम ठेवून आनंदित होतात, जे माझ्याचमुळें वेडावून जाऊन लोकाची पर्वा करीतनासे होतात, ६३ मलाच जाणणें हींच ज्यांचीं शास्त्रें आहेत, आणि ज्यांच्या गुरुमंत्रानें इतराना माझी प्राप्ति होते, व अशा प्रकारें जे सर्व व्यवहारांत

१ हुंगावीं. २ पूजा करावी. ३ कांहीं तरी. ४ यज्ञोपचार. ५ शेवट. ६ धरली. ७ इंद्रियांनीं. ८ कारणें, निमित्तानें. ९ घातक मार्गांनीं. १० पडदा. ११ ध्यान केलें. १२ वर्णन केलें. १३ उद्देशानें. १४ तृप्त झाले. १५ खर्च केले. १६ कीर्ति वाढविण्याकरितां. १७ वेडावून जातात. १८ पर्वा करीत नाहींत.

जयांचेनि मंत्रें । ऐसे जे चेष्टामात्रें । भजले मज ॥ ६४ ॥ ते मरणाऐलीचकडे । मज मिळोनि गेले फुडे । मग मरणीं आणिकीकडे । जातील केंवि ॥६५॥ म्हणोनि मंद्याजी जे जाहाले । ते माझियांचि सायुज्या आले । जिहीं उपचारामिषें दिधलें । आपणपें मज ॥ ६६ ॥ ( ३५०. आपलेपणा दिल्यावांचून ईश्वर प्राप्त होत नाहीं; काव्य, ३६७ ) पै अर्जुना माझे ठायीं । आपणपेंवीण सौरसु नाहीं । मी उपचारें कवणाही । नाकळे गा ॥ ६७ ॥ ( ३५१. देहाभिमान व संपत्तिमद टाकून अनन्य भक्ति कर; काव्य, ३६८–३८१ ) एथ जाणीव करी तोचि नेणे । आथिलेंपण मिरवी तेंचि उणें । आम्ही जाहालों ऐसें जो म्हणे । तो कांहींचि नव्हे ॥ ६८ ॥ अथवा यज्ञदानादि किरीटी । कां तपे हन जे हुटहुटी । ते तृणा एकासाठीं । न सरे[11] एथ ॥ ६९ ॥ पाहें पां जाणिवेचेनि बळें । कोण्ही वेदांपासूनि असे आगळें । कीं शेषाहूनि तोंडाळें । बोलकें आथी ॥ ३७० ॥ तोही आंथरुणातळवटीं दडे । येरु नेति[12] नेति म्हणोनि बहुडे । एथ सनकादिक वेडे । पिसे जाहले ॥ ७१ ॥ करितां तापसांची कडसणी । कवणु जवळां ठेविजे शूळपाणी । तोहि अभिमानु सांडूनि पायवणी । माथां वाहे ॥ ७२ ॥ नातरी आथिलेपणें सरिसी । कवणी आहे लक्ष्मियेऐसी । श्रियेसारिखिया दासी । घरीं जियेतें ॥ ७३ ॥ तिया खेळतां करिती घरकुलीं । तया नामें अमरपुरें जरी ठेविलीं । तरी न होती काय बाहुलीं । इंद्रादिक तयांचीं ॥ ७४ ॥ तिया नावडोनि जेव्हां मोडती । तेव्हां महेंद्राचे रंक होती । तिया जेउते झाडां पाहाती । ते कल्पवृक्ष ॥ ७५ ॥ ऐसिया जियेचिया जवळिका । सामर्थ्य घरींचिया पाइका । ते लक्ष्मी मुख्य नायिका । न मनेचि एथ ॥ ७६ ॥ मग सर्वस्वें करूनि सेवा । अभिमानु सांडूनि पांडवा । ते पाय धुवावयाचिया देवा । पात्र जाहाली ॥ ७७ ॥ म्हणोनि थोरपण पऱ्हां सांडिजे । येथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे । जैं जगा धाकुटें होइजे । तैं जवळीक माझी ॥ ७८ ॥ अगा सहस्रकिरणाचिये दिठी । पुढां चंद्रही लोपे किरीटी । तेथ खद्योत कां हुटहुटी । आपुलेनि तेजें ॥ ७९ ॥ तैसें लक्ष्मियेचें थोरपण न सरे । जेथ शंभूचेंही तप न पुरे । तेथ येर प्राकृत हेंदरें । केंवि जाणों लाहे ॥ ३८० ॥ अवतरणः—यालागीं शरीरसांडोवा कीजे । सकळगुणांचें लोण उतरिजे । संपत्तिमदु साडिजे । कुरवंडी करुनी ॥ ८१ ॥

पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति । तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः॥२६

१ सर्व व्यवहारात. २ माझी पूजा करणारे. ३ ऐक्यास. ४ सेवेच्या मिषानें. ५ आपलेपणा. ६ प्रेम. ७ ज्ञानी म्हणविणारा. ८ कृतार्थ. ९ मुक्त झालों. १० घमेंड. ११ योग्यता नसते. १२ वेद. १३ हें नव्हे, हें नव्हे. १४ मागें सरे. १५ सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार हे महादेवाचे चार मानसपुत्र सदोदित पाच वर्षांचे व नग्न अशा स्थितींत असून पूर्ण ब्रह्मज्ञानी आहेत.

माझ्याशिवाय इतर कोणाचेंच भजन करीत नाहींत, ६४ ते मरणाच्या अगोदरच मद्रूप होऊन जातात; मग मरणानंतर माझ्याशिवाय दुसरीकडे कसे जातील? ६५ म्हणून, माझें यजन करणारे जे होतात, ते माझ्यांत मिसळतात; कारण, त्यांनीं सेवेच्या मिषानें आपलेपणा मला अर्पण केला आहे. ६६ अर्जुना, माझ्या ठिकाणीं आत्मत्व समर्पण केल्याशिवाय माझ्यावर त्यांचें खरें प्रेम उत्पन्न होत नाहीं. म्हणून, दुसऱ्या कोणत्याही उपायानें मी प्राप्त होत नाहीं. ६७ मजविषयीं ज्ञान झालें असें जो म्हणतो, त्याला खरोखर माझें ज्ञान होत नाहीं. मी कृतार्थ झालों असें जो दाखवितो, तो कृतार्थ होत नाहीं. मी मुक्त झालों असें जो म्हणतो, तो खरोखर मुक्त होत नाहीं. ६८ अथवा, हे किरीटी, आम्हीं यज्ञ केले, आम्हीं धर्म केला, किंवा आम्हीं तप केलें, अशी जे घमेंडी बाळगतात, त्यांना माझ्या प्राप्तीच्या मानानें पाहिलें असतां काडीइतकीही योग्यता नसते. ६९ हें पहा, ज्ञानबलांत वेदाहून कोणी अधिक जाणता आहे काय? किंवा शेषापेक्षां बोलण्यांत किंवा मुखांनीं कोणी अधिक आहे काय? ३७० पण तो शेषही ज्याच्या अंथरुणाखाली दडतो, वेदही " नेति नेति " म्हणून मागें सरतो, तसेंच सनकादिक पूर्ण ब्रह्मज्ञानीही ज्याच्याविषयीं वेडे झाले आहेत; ७१ तपस्व्यांची गणती करूं लागलें, तर महादेवाच्या योग्यतेला दुसरा कोण लागेल? परंतु त्यानेंही अभिमान सोडून ज्याचें पादोदक म्हणजे भागीरथी आपले मस्तकावर धारण केली आहे; ७२ किंवा संपन्नपणात लक्ष्मीपेक्षा कोणी अधिक आहे का? तिच्या घरीं सिद्धींसारख्या दासी आहेत. ७३ त्या दासी आपल्या खेळांत जीं घरकुलीं करतात, त्यांचें नांव जर अमरपुरी ठेविलें, तर इंद्रादिक देव हे त्यांच्या घरकुल्यांतील बाहुली होणार नाहींत काय? ७४ पुढें त्या दासींना तीं घरकुलीं न आवडून जेव्हां तीं मोडतात, तेव्हां इंद्राचे रंक बनतात व त्या ज्या झाडाकडे पाहतात, तीं झाडें कल्पवृक्ष होतात; ७५ असें जिच्या घरातील दासींचें सामर्थ्य आहे, त्या पट्टराणी श्रीलक्ष्मीचीही या ठिकाणीं प्रतिष्ठा नाहीं. ७६ मग अर्जुना, मनोभावानें सेवा करून व सर्व अभिमान टाकून ती पाय धुण्याच्या अधिकारास पात्र झाली! ७७ म्हणून, थोरपणा एकीकडे ठेवून व सर्व शास्त्रीय ज्ञान विसरून जेव्हा जगतात नम्रपणाने वागावें, तेव्हांच माझी प्राप्ति होते. ७८ हे किरीटी, ज्या ठिकाणीं सूर्याचे तेजापुढे चंद्रही लोपून जातो, तेथें काजव्यानें आपल्या तेजाबद्दल का घमेंड मारावी? ७९ त्याचप्रमाणें, लक्ष्मीचेंही ऐश्वर्य जेथें शोभत नाहीं, व शंभूचें तपही पुरत नाहीं, त्या ठिकाणीं अज्ञानी व हेंदरा मला कसा जाणूं शकेल? ३८० याकरिता, सर्व अभिमान टाकून, सर्व गुणांचें लिंबलोण उतरून, आणि संपत्तीचा मद सोडून आपला देह मजवरून ओवाळून टाकला पाहिजे. ८१

१६ गणती. १७ महादेव. १८ पादोदक. १९ संपन्नपणात. २० सिद्धि. २१ सेवक. २२ प्रतिष्ठा नाहीं. २३ अधिकारास. २४ बाजूस. २५ नम्र. २६ सूर्याच्या. २७ काजवा. २८ घमेंड. २९ शोभत नाहीं. ३० अज्ञानी. ३१ हेंदरा; अजागळ. ३२ शकेल. ३३ अभिमान टाकून.

अन्वयः—यः पत्रं, पुष्पं, फलं, तोयं मे भक्त्या प्रयच्छति, (तस्य) प्रयतात्मनः भक्त्युपहृतं तत् अहं अश्नामि ॥ २६ ॥

(३५२. अनन्य भक्तानें दिलेल्या पत्रपुष्पानें देवास आनंद होतो; काव्य, ३८२–३९७) मग निःसीमभाव उल्हासें । मज अर्पावयाचेनि मिसें । फळ एक आवडे तैसें । भेलतयाचें हो ॥ ८२ ॥ भक्तु माझियाकडे दावी । आणि मी दोन्ही हात वोडवीं[2] । मग देंठु न फेडितां सेवीं । आदरेंसीं ॥ ८३ ॥ पैं गा भक्तीचेनि नांवें । फूल एक मज द्यावें । तें लेखें[4] तरि म्यां तुरंबावें[5] । परि मुखींचि घालीं ॥ ८४ ॥ हें असो कायसीं फुलें । पानचि एक आवडतें जाहलें । तें साजुकही न हो सुकलें । भलतैसें ॥ ८५ ॥ परि सर्वभावें भरलें देखें । आणि भुकेला अमृतें तोखे । तैसें पत्राचि परि तेणें सुखें । आरोगूं[6] लागें ॥ ८६ ॥ अथवा ऐसेंही एक घडे । जे पालाही परी न जोडे । तरि उदकाचें तंव सांकडें[7] । नव्हेल कीं ॥ ८७ ॥ तें भलतेथ निर्मोलें[8] । न जोडितां[9] आहे जोडलें । तेंचि सर्वस्वें करूनि अर्पिलें । जेणें मज ॥ ८८ ॥ तेणें वैकुंठापासोनि विशाळें । मज-लागीं केलीं रांउळें । कौस्तुभाहोनि निर्मळें । लेणीं[13] दिधलीं ॥ ८९ ॥ दुधाचीं सेजारें । क्षीराब्धीऐसीं मनोहरें । मजलागीं अपारें । सृजिलीं तेणें ॥ ३९० ॥ कर्पूर चंदन अगरु । ऐसेया सुगंधाचा महामेरु । मज हातिवें[1] लाविला दिनकरु । दीप-माळे ॥ ९१ ॥ गरुडासारिखीं वाहनें । मज सुरतरूचीं उद्यानें[5] । कामधेनूचीं गोधनें[6] । अर्पिलीं तेणें ॥ ९२ ॥ मज अमृताहूनि सुरसें । बोनीं[9] वोगरिलीं[10] बहु-वसें । ऐसा भक्तांचेनि उदकलेशें । परितोषें गा ॥ ९३ ॥ हें सांगावें काय किरीटी । तुवांचि देखिलें आपुलिया दिठी । मी सुदामयाचिया सोडीं गांठीं । पेव्हयांसाठीं ॥ ९४ ॥ पैं भक्ति एकी मी जाणें । तेथ सानें थोर न म्हणें । आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया ॥ ९५ ॥ येर पत्र पुष्प फल । हें भजावया मिस केवळ । वांचूनि आमुचा लाग निष्फळ । भक्तितत्त्व ॥ ९६ ॥ अवतरणः—म्हणोनि अर्जुना अवधारीं । तूं बुद्धि एकी सोपारी करीं । तरी सहजें आपुलिया मनोमंदिरीं । न विसंबें मातें ॥ ९७ ॥

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् । यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् २७

अन्वयः—कौंतेय, यत् करोषि, यत् अश्नासि, यत् जुहोषि, यत् ददासि, यत् तपस्यसि तत् मदर्पणं कुरुष्व ॥ २७ ॥

(३५३. भक्ति करण्याची युक्ति, ३९८-४००) जे जे कांहीं व्यापार करिसी । कां भोग हन भोगिसी । अथवा यज्ञीं यजिसी । नानाविधीं ॥ ९८ ॥ नातरी

१ हव्या त्या झाडानें. २ पुढें करून. ३ तोडल्याशिवाय. ४ समज ५ हुंगावें. ६ खाऊं. ७ सकट. ८ फुकट. ९ मेहनतीशिवाय. १० मनोभावानें. ११ मोठीं. १२ देवळें. १३ दागिने.

श्लोकार्थः— जो पान, फूल, फळ अथवा पाणी मला भक्तीनें अर्पण करितो, त्या शुद्धचित्त भक्ताचें भक्तीनें दिलेलें ( पान वगैरे ) मी स्वीकारितों. २६

नंतर, दृढ भक्तीनें, मला अर्पण करण्याच्या निमित्तानें, हव्या त्या झाडाचें हवें तें फळ ८२ भक्तानें माझ्या पुढें केलें म्हणजे मी तें दोन्ही हात पुढें करून घेतों, व त्याचा देंठ न तोडतां तें आदरानें सेवन करतों. ८३ हें पहा, भक्तिभावानें जर मला कोणीं एखादें फूल दिलें, तर वास्तविक पाहतां तें हुंगावयाचें; पण तें सोडून देऊन प्रेमाच्या भरांत मी तोंडांतच घालतों ! ८४ फार काय सांगावें ? फुलेंचशीं काय, परंतु मला एक झाडाचें पानही प्रिय आहे; मग तें कोणत्याही झाडाचें आणि ताजें किंवा सुकलेलें—कसेंही असो. ८५ पण तें भक्तिभावानें अर्पण केलेलें आहे असें पाहतांच, ज्याप्रमाणें एकादा क्षुधित मनुष्य अमृतानें तृप्त होतो, त्याप्रमाणें भक्तिभावानें अर्पण केलेलें तें पान अमृततुल्य मानून मीं खाऊं लागतों. ८६ अथवा एखाद्या वेळेस अशी गोष्ट घडली कीं, झाडाला कोठेंच पाला नाहीं, पण पाणी मिळण्याचें तर संकट पडणार नाहींना ? ८७ तें वाटेल त्या ठिकाणीं फुकट मेहनतीशिवाय मिळतें. तेंच मला मनोभावानें अर्पण करतो, ८८ त्यानें माझ्याकरितां वैकुंठाहूनही मोठीं देवळें बांधल्याप्रमाणें व कौस्तुभ मण्याहूनही तेजस्वी असे दागिने दिल्याप्रमाणें होतें. ८९ त्यानें दुधासारखीं स्वच्छ व क्षीरसमुद्रांतील लाटांप्रमाणें फुगीर व मनोहर अशीं अगणित शय्यास्थानें माझ्याकरिता निर्माण केल्याप्रमाणें आहेत. ३९० कापूर, चंदन, कृष्णागरु अशा सुगंधाच्या महामेरूएवढाल्या ढिगानीं माझ्यापुढें काडवाती लावून सूर्याची दिपमाळ पाजळल्याप्रमाणें आहे; ९१ त्यानें गरुडासारखीं वाहनें, कल्पतरूच्या बागा, व कामधेनूंची खिल्लारें मला अर्पण केल्याप्रमाणें आहेत. ९२ मला अमृताहूनही गोड अशीं पुष्कळ पक्वान्नें वाढून जो संतोष होतो, तो अशा भक्तियुक्त अंतःकरणानें अर्पण केलेल्या पाण्याच्या थेंबापासून होतो. ९३ हे किरीटी, मी पोह्यांसाठीं सुदामजीच्या जवळील गाठोडीच्या गाठी सोडल्या, त्या तूं पाहिल्या आहेस ना ? हें तुला सांगितलें का पाहिजे ? ९४ म्हणून, मी फक्त एक भक्ति ओळखतां. त्या ठिकाणीं लहानथोर हें मनांत आणीत नाहीं; आणि वाटेल त्यानें भक्तीची मेजवानी केली असतां आम्ही तिचा आदर करतों. ९५ एरव्हीं पत्रें, पुष्पें, फळें, हीं आमची भक्ति करण्याकरितां केवळ निमित्तमात्र आहेत; याशिवाय भक्तितत्त्वाखेरीज इतर सर्व सामुग्री आम्ही व्यर्थ समजतों. ९६ म्हणून अर्जुना, ऐक; तूं आपली बुद्धि स्वाधीन करून नेहमीं आपल्या मनोरूप मंदिरांत माझा विसर पडूं देऊं नको. ९७

श्लोकार्थः—अर्जुना, तूं जें जें कांहीं करतोस, जें भक्षण करतोस, जें हवन करतोस, जें दान करतोस आणि जें तप करतोस, तें सर्व मला अर्पण कर ॥ २७ ॥

१४ दुधासारखी स्वच्छ १५ शय्यास्थानें. १६ काडवाती. १७ बागा. १८ खिल्लारें. १९ पक्वान्नें. २० माहिलीं. २१ पोह्याकरितां. २२ व्यर्थ. २३ स्वाधीन करून घे.

पात्रविशेषें दानें । कां सेवकां देशी जीवेंनें । तपादि हन साधनें । व्रतें करिसी ॥ ९९ ॥ तें क्रियाजात आघवें । जें जैसें निपजेल स्वभावें । तें भावना करोनि करावें । माझिया मोहेरां ॥ ४०० ॥ ( ३५४. युक्तीनें कर्म केल्यास ईश्वरप्राप्ति होते व युक्तीलाच संन्यास म्हणतात, ४०१–४०६ ) परि सर्वथा आपुले जीवीं । केलियाची सें[3] कांहींचि नुरवीं । ऐसीं धुवोनि कर्मे द्यावीं । माझिया हातीं ॥ १ ॥

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः । संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥२८॥**

अन्वयः--एव ( कृते सति ) शुभाशुभफलैः कर्मबंधनैः मोक्ष्यसे, ( च ) संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तः ( भूत्वा ) मा उपैष्यसि ॥ २८ ॥

मग अग्निकुंडीं बीजें घातलीं । तियें अंकुरदशे जेवि मुकलीं । तेविं न फळतींचि मज आर्पिलीं । शुभाशुभें ॥ २ ॥ अगा कर्मे जें उरावें । तें तिहीं सुखदुःखीं फळावें । आणि तयातें भोगावया यावें । देहा एका ॥ ३ ॥ तें उगाणिलें मज कर्म । तेव्हांचि पुसिलें मरण जन्म. । जन्मासवें श्रम । वरचिलही गेले ॥ ४ ॥ म्हणऊनि अर्जुना यापरी । पोहेचा वेळु नव्हेल भारी । हे संन्यासयुक्ति सोपारी । दिधली तुज ॥ ५ ॥ या देहाचिये बांदोडीं[6] न पडिजे । सुखदुःखाचिया सागरीं । न बुडिजे । सुखें सुखरूपा घडिजे । माझिया आंगा ॥ ६ ॥

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।**
**ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥**

अन्वयः--अहं सर्वभूतेषु समः, मे द्वेष्यः ( च ) प्रियः न अस्ति; ( परं ) ये तु मां भक्त्या भजन्ति, ते मयि च अहं अपि तेषु ( अस्मि ) ॥ २९ ॥

( ३५५. समत्वानें भजणारास मी एकरूप होतों, ४०७–४११ ) तो मी पुससी कैसा । तरि जो सर्वभूतीं सदा सरिसा । जेथ आपपर ऐसा । भागु नाहीं ॥ ७ ॥ जे ऐसिया मातें जाणोनि । अहंकाराचा कुरुठा मोडोनी । जे जीवें कर्मे करूनि । मातें भजले ॥ ८ ॥ ते वर्तत दिसती देहीं । परि ते देहीं ना माझ्या ठायीं । आणि मी तयांच्या हृदयीं । समग्र असे ॥ ९ ॥ सविस्तर वटत्व जैसें । बीजकणिकेमाजि असे । आणि बीजकणु वसे । वटीं जेवीं ॥ १० ॥ तेवीं आम्हां तयां परस्परें । बाहेर नामाचींचि अंतरें । वांचूनि आंतुवट वस्तुविचारें । मी तेचि ते ॥ ११ ॥ ( ३५६. भक्ताची देहाकडे पाहाण्याची दृष्टि, ४१२–४१४ ) आतां जैयांचें जैसें लेणें । आंगावरी थिंहाचवाणें । तैसें देहधरणें । उदास तयांचें ॥ १२ ॥ परिमळु निघालिया पवनापाठीं । मागें वोस फूल राहे देठीं । तैसें आयुष्याचिये मुठीं । केवळ देह ॥ १३ ॥ येर अवष्टंभु जो आघवा । तो आरुढोनि मद्भावा । मजचि आंतु पांडवा । पैठा जाहाला ॥ १४ ॥

१ वेतन. २ उद्देशानें. ३ आठवण. ४ अर्पण केलें. ५ उद्याचा. ६ बंधनांत. ७ अनाथाचें.

तूं जे जे कांहीं व्यापार करशील, किंवा ज्या वस्तूंचा उपभोग घेशील, अथवा, ज्या पुष्कळ प्रकारच्या यज्ञांनीं माझें यजन करशील, ९८ किंवा सत्पात्रीं जीं जीं दानें करशील, अथवा चाकरमाणसांस जीं वेतनें देशील आणि जीं जीं तपादि सर्व साधनें व व्रतें करशील, ९९ तीं तुझ्या हातून सहजगत्या होणारीं सर्व कर्मे तूं माझ्या उद्देशानें भक्तिपुरःसर कर. ४०० परंतु तीं केल्याबद्दलची आपल्या मनांत आठवणही राहूं नये इतक्या निष्कामतेनें तीं सर्व मला अर्पण कर. १

श्लोकार्थः—याप्रमाणें सर्व कर्मे मला अर्पण केल्यावर, शुभ व अशुभ फल देणाऱ्या कर्मबंधनापासून तूं मोकळा होशील; व याप्रमाणें संन्यासयोगानें तुझें अंतःकरण युक्त होऊन, तूं कर्मबंधनापासून मुक्त होऊन मला येऊन मिळशील ॥ २८ ॥

मग, ज्याप्रमाणें अग्नींत भाजलेल्या बीजाला अंकुर येत नाहींत, त्याप्रमाणें मला अर्पण केलेल्या शुभाशुभ कर्मांची फलप्राप्ति तुला होणार नाहीं. २ अरे, जर कर्म उरलें, तर त्याच्यापासून सुखदुःख भोगावें लागतें, व तें भोगण्याकरितां जन्म घ्यावा लागतो. ३ तेंच कर्म जर मला अर्पण केलें, तर लागलीच जन्ममरण चुकतें; आणि जन्माबरोबर त्याच्या पुढील भोगावयास लागणारे श्रमही चुकतात. ४ म्हणून अर्जुना, याप्रमाणें आजचें काम उद्यांवर टाकलेंस तर फलप्राप्तीला वेळ लागणार नाहीं काय ? म्हणून, सोपी अशी ही सर्व ( कर्मफलाचा त्याग करण्याची ) युक्ति तुला सांगितली. ५ आता या देहाच्या बंधनांत न पडतां व सुखदुःखाच्या सागरांत न बुडतां, अनायासानें, संतोषकारक असें जें माझें रूप, त्यांत मिसळून जा. ६

श्लोकार्थः—मी सर्व भूताना सारखा आहें. माझा कोणी शत्रु नाहीं व कोणी मित्र नाहीं, परंतु जे मला भक्तीनें भजतात, ते माझे ठिकाणीं व मीही त्याचे ठिकाणीं असतों ॥ २९ ॥

तो मी कसा आहें म्हणून विचारशील, तर सर्व भूताचे ठिकाणीं नेहमीं सारखा असून, माझ्या ठिकाणीं ' माझें ' व ' तुझें ' असा भेद नाही. ७ जे अशा माझ्या स्वरूपाला जाणतात, व अहंकाराचा बींमोड करून कायावाचामनानें कर्म करून मला भजतात, ८ ते जगात देहानें जरी व्यापार करीत असले, तरी त्याचें चित्त इकडे नसून माझे ठिकाणीं असतें, आणि मीही त्याच्या हृदयात पूर्ण भरलेला असतों. ९ ज्याप्रमाणें विस्तारासह वडाचें मोठें झाड वडाच्या बीजांतच असतें, व बीज त्या झाडांतच असतें, ४१० त्याप्रमाणें माझ्यांत व त्यांच्यात केवळ नावाचेंच अंतर असतें, बाकी अंतःस्थितीचा विचार करून पाहतां ते व मी हे एकच आहों. ११ आतां, लोकांचे मागून आणलेले दागिने अंगावर घालणें जसें व्यर्थ, त्याचप्रमाणें त्याचें देह धारण करणें उदासीनपणाचें असतें. १२ वाऱ्याबरोबर ज्याप्रमाणें फुलाचा वास त्याचे मागोमाग जातो, व देठापाशी

८ घरटें. ९ कायावाचामनानें. १० वडाचें झाड. ११ अंतर्यामींचा. १२ मागून आणलेलें. १३ व्यर्थ. १४ मुदतीपर्यंत. १५ अभिमान.

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥

अन्वयः—सुदुराचारः अपि चेत् मा अनन्यभाक् भजते, सः साधुः एव मंतव्यः, सः हि सम्यग्व्यवसितः ( अस्ति ) ॥ ३० ॥

( ३५७. अनन्यभक्त दुराचारी असला तरी तो साधुच आहे; तो नाश पावत नाहीं, ४१५–४२९ ) ऐसें भजतेनि प्रेमभावें । जया शरीरही पैठीं न पवे । तेणें भलतया व्हावें । जातीचिया ॥ १५ ॥ आणि आचरण पाहातां सुभटा । तो दुष्कृताचा[१] कीर सेलै[२] वांटा । परि जीवित वंचिलें चोहटा[३] । भक्तीचिया कीं ॥१६॥ अगा अंतींचिया मती । साचपण पुढिले गती । म्हणोनि जीवित जेणें भक्ती । दिधलें शेवीं ॥ १७ ॥ तो आधीं जरी दुराचारी । तरी सर्वोत्तमुचि अवधारीं । जैसा बुडाला महापूरीं । न मरतु निघाला ॥ १८ ॥ तयाचें जीवित ऐल थडिये आलें । म्हणोनि बुडालेंपण जेवीं वायां गेलें । तेवीं नुरेचि[१] पाप केलें । शेवटलिये भक्ती ॥ १९ ॥ यालागीं दुष्कृति जऱ्ही जाहाला । तरि अनुतापतीर्थीं[५] न्हाला । न्हाऊनि मजआंतु आला । सर्वभावें ॥ ४२० ॥ तरि आतां पवित्र तयाचेंचि कुळ । आभिजात्य[६] तेंचि निर्मळ । जन्मलेयाचें फळ[७] । तयासीच जोडलें ॥ २१ ॥ तो सकळही पढिन्नला । तपें तोचि तापिन्नला । अष्टांग अभ्यासिला । योगु तेणें ॥ २२ ॥ हें असो बहुत पार्था । तो उतरला[८] कर्मे सर्वथा । जयाची अखंड गा आस्था । मजचिलागीं ॥ २३ ॥ अवघिया मनोबुद्धीचिया राहटी[९] । भरोनि एकनिष्ठेची पेटी । मजमाजी किरीटी । निक्षेपिली[१०] जेणें ॥ २४ ॥

क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।
कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥

अन्वयः—( सः ) क्षिप्रं धर्मात्मा भवति च शश्वत् शान्तिं निगच्छति; कौंतेय, मे भक्तः न प्रणश्यति ( इति त्वं ) प्रतिजानीहि ॥ ३१ ॥

तो आतां अवसरें मजसारिखा होईल । ऐसा हन भाव तुज जाईल । हां गा अमृताआंत राहील । तया मरण कैंचें ॥ २५ ॥ पैं सूर्य जो वेळ नुदैजे[११] । तया वेळा कीं रात्रि म्हणिजे । तेवीं माझिये भक्तीविण जें कीजे । तें महापाप नोहे ॥ २६ ॥ म्हणोनि तयाचिया चित्ता । माझी जवळिकै[१२] पांडुसुता । तेव्हांचि तो तत्त्वता । स्वरूप माझें ॥ २७ ॥ जैसा दीपें दीपु लाविजे । तेथ आदील कोण हें नोळखिजे । तैसा सर्वस्वें जो मज भजे । तो मीचि होऊनि ठाके ॥ २८ ॥ मग माझी नित्य शांती । तया दशा[१३] तेचि कांती । किंबहुना जिती । माझेनि जीवें ॥ २९ ॥ ( ५५८.

१ पुनः. २ पापाचा. ३ शेलका. ४ मार्गानें. ५ पश्चात्ताप. ६ कुलीनपणा. ७ फळ जी भक्ति. ८ पार पडला. ९ व्यापार. १० ठेवली. ११ उगवत नाहीं. १२ योग. १३ स्थिति.

फूल जसें वासरहित राहतें, त्याप्रमाणें, आयुष्याची मुदत संपविण्यापुरताच ते देह धारण करतात. १३ हे पांडवा, जो अभिमान म्हणून आहे; तो सर्व माझी भक्ति पावून माझ्या स्वरूपांतच मिळाला. १४

श्लोकार्थः—अत्यंत दुराचारी असूनही जर एकनिष्ठपणानें माझें भजन करूं लागला, तर तो साधुच समजला पाहिजे. कारण त्याचा विचार चांगला असतो ॥ ३० ॥

अशा प्रेमभावानें जे मला भजतात, व ज्यांना हें शरीर पुनः प्राप्त होत नाहीं, ते हव्या त्या जातीचे असले तरी असोत; १५ आणि हे महावीरा, त्यांचें आचरण जरी पाप करणाऱ्यांत पहिल्या प्रतीचें असलें, तरी ज्यांनीं आपल्या आयुष्याचा शेवट भक्तिमार्गांत केला आहे; १६ अरे, अंतकाळीं जी मनाला बुद्धि होते, तीच गति खरोखर पुढील जन्मीं प्राप्त होते; म्हणून आपल्या आयुष्याच्या शेवटचा काळ जो माझ्या भक्तींत घालवितो, १७ तो पूर्ववयांत जरी दुराचरण करणारा असला, तरी तो सर्वोत्तमच आहे असें समज. एखाद्या मनुष्यानें महापुरांत नदीच्या अलीकडच्या कांठीं उडी घातली; मग जरी सर्व मनुष्यांस तो मेला असें वाटलें, तरी न मरतां तो जसा पलीकडील कांठाला महापुरांतून बाहेर निघावा, १८ व तसा तो जिवंत निघाल्यामुळें जसें त्याचें बुडालेंपण व्यर्थ व्हावें, त्याचप्रमाणें पूर्ववयांत केलेलें पाप उत्तरवयांतील ज्ञानोत्तर भक्तीनें नाहींसें होतें. १९ याकरितां, पापाचरण करणारा जरी असला, तरी तो पश्चात्तापरूप तीर्थांत न्हाऊन जर सर्वभावानें मला शरण आला, ४२० तर त्याचें कुल पवित्र होतें, तो निर्मळ कुलीनपणास पावतो, व जन्मास आल्याचें फळ जी भक्ति तीही त्यालाच प्राप्त होते. २१ त्याला सर्व शास्त्रें वगैरे अवगत होतात; त्याला तपाचेंही आचरण केल्याचें श्रेय येतें, व त्याला अष्टांगयोगसाधनाची सिद्धि मिळते. २२ पार्था, फार काय सांगावें ? तो सर्व कर्मांच्या झपाट्यांतून पार पडतो, व त्याचें सर्व प्रेम माझ्याच ठिकाणीं असतें. २३ हे किरीटी, एकनिष्ठारूप पेटींत मनोबुद्धीचे सर्व व्यापार भरून ती माझ्यामध्यें जो ठेवितो, २४

श्लोकार्थः—तो लवकर धर्मात्मा होतो व निरंतर शांतीला प्राप्त होतो. सारांश हे अर्जुना, माझा भक्त कधींही नाश पावत नाहीं हें तूं पक्कें जाण ॥ ३१ ॥

तो काहीं अवकाशानें मजसारखा होणार असा जर तुझा कदाचित् समज होईल, तर पहा कीं, जो अमृतांत वास करील त्याला मरण कोठून प्राप्त होणार ? २५ हें बघ, ज्या वेळीं सूर्य उदय पावत नाहीं, त्याच वेळेला रात्र असें म्हणतात; त्याचप्रमाणें, माझ्या भक्तीशिवाय जें करणें तें महापाप नव्हे काय ? २६ म्हणून हे पांडुसुता, त्याच्या चित्ताला जेव्हां माझा योग होतो, तेव्हांच खरोखर तो माझ्या स्वरूपाला पावतो. २७ ज्याप्रमाणें एका दिव्यानें दुसरा दिवा लावला असतां त्यांत पहिला कोणता हें ओळखतां येत नाहीं, त्याप्रमाणें, जो सर्व भावानें मला भजतो, तो मद्रूपच होऊन राहतो. २८ मग

भक्तीवांचून जिणें व्यर्थ, म्हणून भक्त व्हावें, ४३०–४४२ ) एथ पार्था पुढतपुढती। तेंचि तें सांगों किती। जरी मियां चाड तरी भक्ती। न विसंबिजे गा ॥ ४३० ॥ अगा कुळाचिया चोखटपणा नलगा। आभिजात्य झणीं श्लाघा। व्युत्पत्तीचा वाउगा। सोसु कां वाहावा ॥ ३१ ॥ कां रूपवयसा माजा। आथिलेपणें कां गाजा। एक भाव नाहीं माझा। तरी पाल्हाळ तें ॥ ३२ ॥ कणेंविण सोपटें। कणसें लागलीं घनदाटें। काय करावें गोमटें। वोस नगर ॥ ३३ ॥ नातरी सरोवर आटलें। रानीं दुःखिया दुःखी भेटलें। कां वांझ फुलीं फुललें। झाड जैसें ॥ ३४ ॥ तैसें सकळ तें वैभव। अथवा कुळ जाति गौरव। जैसें शरीर आहे सावेव। परि जीवचि नाहीं ॥ ३५ ॥ तैसें माझिये भक्तीविण। जळो तें जियालेपण। अगा पृथ्वीवरी पाषाण। नसती काई ॥ ३६ ॥ पैं हिवरोची दाट साउली। सज्जनीं जैसी वाळिली। तैसीं पुण्यें डावलूनि गेलीं। अभक्तातें ॥ ३७ ॥ निंब निंबोळिया मोडोनि आला। तरि तो काउळियांसिचि सुकाळु जाहाला। तैसा भक्तिहीनु वाढिन्नला। दोषाचिलागीं ॥ ३८ ॥ कां पेंडूस खापरीं वाढिले। वाढूनि चोहटां ठेविलें। ते सुणियांचे उपेगा आले। जियापरी ॥ ३९ ॥ तैसें भक्तिहीनाचें जिणें। जो स्वप्नींहि परि सुकृत नेणे। तेणें संसारदुःखासि भाणें। वोगरिलें ॥ ४४० ॥ अवतरणः—म्हणोनि कुळ उत्तम नोहावें। जाती अंत्यजही व्हावें। वरि देहाचेनि नांवें। पशूचेंही लाभो ॥ ४१ ॥ पाहें पां सांवजें हातिरूं धरिलें। तेणें तया काकुळती मातें स्मरिलें। कीं तयाचें पशुत्व वांवो जाहलें। पावलिया मातें ॥ ४२ ॥

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥ ३२ ॥

अन्वयः—पार्थ, ये हि पापयोनयः अपि स्त्रियः, वैश्याः तथा शूद्राः स्युः, ते अपि मां व्यपाश्रित्य परां गतिं यान्ति ॥ ३२ ॥

( ३५९. पापयोनिही ईश्वरभक्तीमुळें मोक्षाला जातात; काव्यमय वर्णन, ४४३-४७४ ) अगा नांवें घेतां वोखटीं। जे आघवेया अधमाचिये शेवटीं। तिये पापयोनीहि किरीटी। जन्मले जे ॥ ४३ ॥ ते पापयोनि मूढ। मूर्ख जैसे कां दगड। परि माझ्या ठायीं दृढ। सर्व भावें ॥ ४४ ॥ जयांचिये वाचे माझे आलाप। दृष्टि भोगी माझेंचि रूप। जयांचें मन संकल्प। माझाचि वाहे ॥ ४५ ॥ माझिये कीर्तीविण। जयांचे रिते नाहीं श्रवण। जयां सर्वांगीं भूषण। माझी सेवा ॥ ४६ ॥ जयांचें ज्ञान विषो[२२] नेणे। जाणीव मज एकातेंचि

१ माही. २ थोरवी. ३ हाव. ४ प्रतिष्ठा. ५ संपत्तीचा. ६ डौल. ७ व्यर्थ. ८ रिकामी. ९ एक फाटेरी झाड आहे त्याची. १० निषिद्ध मानली. ११ लेह्य=चाटणें, चोष्य=चोखणें, खाद्य=खाणें, पेय=पिणें, भक्ष्य=पातळ, भोज्य=पक्वान्नें. १२ कुत्र्यांच्या. १३ कुत्र्यांचें. १४ पुण्य.

त्याला माझी स्थिति, माझी कांति व माझी नित्य शांति प्राप्त होते. फार तर काय ? तो माझ्या जीवानेंच जिवंत राहतो. २९ पार्था, एथें वारंवार तेंच तें काय सांगूं ! पण जर कोणाला माझ्या प्राप्तीची इच्छा असेल, तर त्यानें माझी भक्ति विसरतां कामा नये. ४३० अरे, कुळाच्या चांगुलपणाची आवश्यकता नाहीं, चांगल्या जातीचीही अडचण नाहीं, आणखी मग विद्वत्तेचा तरी उगीच सोस पाहिजे कशाला ? ३१ अथवा रूपाची आणि वयाची प्रतिष्ठा किंवा संपत्तीचा डौल (ह्यांपैकीं कांहीं सुद्धां नको;) एक माझ्या ठिकाणीं भक्ति नसली तर हीं सर्व व्यर्थ. ३२ दाण्याशिवाय रिकामीं कणसें जरी पुष्कळ दाट लागलीं असलीं, अथवा सुंदर शहर असून तें जर ओसाड असलें, तर त्याला काय करावयाचें आहे ? ३३ किंवा मोठा तलाव असून तो जर आटला, तसेंच रानांत एका दुःखीकष्टी मनुष्यास दुसरा तसाच भेटला, अथवा ज्याप्रमाणें वाझ फुलांनीं एखादें झाड फुललें असावें, ३४ त्याचप्रमाणें, सर्व वैभव, कुल अथवा जातीचा मोठेपणा व्यर्थ होय. जसें सर्व अवयवांनीं युक्त शरीर असून त्यात फक्त जीव नसावा, ३५ त्याचप्रमाणें, माझ्या भक्तीशिवाय त्याचें जीवन व्यर्थ होय. अरे, पृथ्वीच्या पाठीवर दगड नाहींत का ? ३६ हें पहा, हिवराची अगदीं दाट सावली आहे; पण सज्जनांनीं ती निषिद्ध मानली आहे. त्याचप्रमाणें, जो माझी भक्ति करीत नाहीं, त्याला पुण्य डावलून (सोडून) जातें. ३७ लिंब हा लिंबोळ्यांच्या भरानें जरी वांकला, तरी त्यापासून ज्याप्रमाणें कावळ्यानाच सुकाळ होतो, त्याप्रमाणें माझी भक्ति न करणारा पापाचीच जोड करण्याकरिता जगतो. ३८ किंवा ज्याप्रमाणें षड्रस अन्नांनीं भरलेलें खापर चव्हाट्यावर ठेविलें म्हणजे कुत्र्यांच्याच उपयोगाला येतें, ३९ त्याप्रमाणें, जो स्वप्नातही पुण्यमार्गाचें आचरण जाणत नाहीं, त्या भक्तिहीनाचें जिणें म्हणजे संसारदुःखाला ताट वाढून ठेवल्याप्रमाणेंच होय. ४४० म्हणून, उत्तम कुल नसलें अथवा जातीनें अंत्यज असला, व पशूचाही देह प्राप्त झाला असला, (तरी चालेल, पण भक्ति पाहिजे.) ४१ पहा कीं, नक्रानें गजेंद्राला धरल्यावर त्यानें दीनपणानें माझें स्मरण केलें, त्या वेळेस तो मजप्रत प्राप्त झाल्यामुळें त्याचें पशुत्व व्यर्थ झालें. ४२

श्लोकार्थः—स्त्रिया, वैश्य, शूद्र इत्यादि पापयोनींमध्यें जरी कोणी जन्मास आले असतील, तरी देखील कौंतेया, माझा आश्रय केल्यानें त्याना उत्तम गति मिळते ॥ ३२ ॥

हे किरीटी, जी अधमाहून अधम, व जिचें नाव देखील घेणें उचित नव्हे, अशा पापयोनींत ज्यांनीं जन्म घेतलें आहे, ४३ जन्म तर अशा पापयोनींत व मूर्खपणानें तर केवळ दगड; परंतु माझ्या ठिकाणीं सर्वस्वा दृढ भाव आहे; ४४ ज्यांच्या वाणीनें माझा नामोच्चार होतो, जे दृष्टीनें माझ्याच रूपाचा उपभोग घेतात, व ज्यांच्या मनांत माझ्याशिवाय दुसरा संकल्पच नसतो; ४५ ज्याचे कान माझा गुणानुवाद ऐकण्याशिवाय रिकामे नसतात,

१५ ताट. १६ महार. १७ नक्रानें. १८ हत्ती. १९ व्यर्थ. २० वाईट. २१ नामोच्चार. २२ पाच विषय.

जाणे । जयां ऐसें लाभे तरी ज़िणें । येऱ्हवीं मरण ॥ ४७ ॥ ऐसा आघवाचि परी पांडवा । जिहीं आपुलिया सर्वभावा । जियावयालागीं वोलावा । मीचि केला ॥ ४८ ॥ ते पापयोनीही होतु कां । ते श्रुताधीतही न होतु कां । परि मजसीं तुकितां तुका । तुटी नाहीं ॥ ४९ ॥ पाहें पां भक्तीचेनि आथिलेपणें । दैत्यीं देवां आणिलें उणें । माझें नृसिंहत्व लेणें । जयाचिया महिमे ॥ ४५० ॥ तो प्रऱ्हादु गा मजसाठीं । घेतां बहुतें सदा किरीटी । कां जे मियां द्यावें ते गोष्टी । तयाचिया जोडे ॥५१॥ येऱ्हवीं दैत्यकुळ साचोकारें । परि इंद्रही सैंरी न लाहे उपरें । म्हणोनि भक्ति गा एथ सरे । जाति अप्रमाण ॥५२॥ राजाज्ञेचीं अक्षरें आहाती । तियें चांमा एका जया पडती । तया चामासाठीं जोडती । सकळ वस्तु ॥ ५३ ॥ वांचूनि सोनें रूपें प्रमाण नोहे । एथ राजाज्ञाचि समर्थ आहे । तेंचि चाम एक जें लाहे । तेणें विकती आघवीं ॥ ५४ ॥ तैसें उत्तमत्व तेंचि सरे । तेंचि सर्वज्ञता सरें । जें मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥ ५५ ॥ म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण । एथ अर्जुना मांझेपण । सार्थक एक ॥ ५६ ॥ तेंचि भलतेणें भावें । मन मजआंतु येतें होआवें । आलें तरी आघवें । मागील वावो ॥ ५७ ॥ जैसें तंवाचि वेंहाळ वोहळ । जंव न पवती गंगाजळ । मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप ॥ ५८ ॥ कां खैर चंदन काष्ठें । हे विवंचना तंवचि घटे । जंव न घापती एकवटे । अग्नीमाजीं ॥ ५९ ॥ तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इयां । जाती तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ॥ ४६० ॥ मग जाति व्यक्ती पडे बिंदुलें[17] । जेव्हां भावें होती मज मीनले । जैसे लवणकण घातले । सागरामाजीं ॥ ६१ ॥ तंववरी नदनदींचीं नांवें । तंवचि पूर्वपश्चिमेचे यावे । जंव न येती आघवे । समुद्रामाजीं ॥ ६२ ॥ हेंचि कवणें एकें मिसें । चित्त माझे ठायीं प्रवेशे । येतुलें हो मग आपैसें । मीचि होणें असे ॥ ६३ ॥ अगा वरी फोडावयालागीं । लोहो मिळो कां परिसाचे आंगीं । कां जे मिळतिये प्रसंगीं । सोनेंचि होईल ॥ ६४ ॥ पाहे पां वालभाचेनि[18] व्याजें । तिया व्रजांगनांचीं निजें[20] । मज मीनालिया काय माझें । स्वरूप नव्हती ॥ ६५ ॥ नातरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसें । कीं अखंड वैरवशें । चैद्यादिकीं ॥ ६६ ॥ अगा सोयरेपणेंचि पांडवा । माझें सायुज्य यादवां । कीं ममत्वें वसुदेवा- । दिकां सकळां ॥ ६७ ॥ नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका हन सनत्कुमारा । इयां भक्ती मी धनुर्धरा ।

१ शास्त्र पढलेले. २ तुलना केली असता. ३ वजनात. ४ कमी. ५ महत्त्वानें. ६ छळिता. ७ बरोबरी. ८ मोठेपणानें. ९ पुरे. १० कातड्याचे तुकड्यावर. ११ शोभते. १२ निष्कारण. १३ भक्तपणा. १४ लहान ओढे. १५ विचार. १६ घातले नाहींत. १७ शून्य. १८ प्रीतीच्या मिषानें. १९ गोपींचीं. २० अंतःकरणें. २१ शिशुपालादिकानीं.

व ज्यांच्या सर्व अवयवांना माझ्या सेवेशिवाय दुसरें कशाचेंच भूपण नाहीं; ४६ ज्यांच्या बुद्धीला विपयांची आठवणही होत नाहीं, जे मला एकट्यालाच जाणतात, व ज्यांना या गोष्टी प्राप्त झाल्याशिवाय जिवंत राहण्यापेक्षां मरण बरें वाटतें; ४७ हे पांडवा, अशा सर्व प्रकारानें जे आपला भाव सर्वस्वीं मजवर ठेवून असतात; ४८ ते पापयोनींत जन्म घेतलेले असोत किंवा शास्त्र देखील पढलेले नसोत, पण त्यांची माझ्याबरोबर तुलना केली असतां ते मजपेक्षां कमी नाहींत. ४९ हें पहा कीं, भक्तीच्या महत्वानें दैत्यांनीं देवांनाही मागें टाकलें, व त्या भक्तीच्या महिम्याकरितां मला नरसिंह अवतार घ्यावा लागला. ४५० हे किरीटी, ज्या प्रल्हादाला माझ्याकरता पुष्कळांनीं नेहमीं छळलें, तो, एका भक्तीनें, मजपासून प्राप्त होणाऱ्या गोष्टी दुसऱ्यास प्राप्त करून देण्यास समर्थ झाला. ५१ बाकी वास्तविक पाहतां त्यानें दैत्यकुळांत जन्म घेतलेला, पण त्याच्यापेक्षां अधिक मोठेपणा इंद्रालाही प्राप्त झालेला नाहीं; म्हणून माझी प्राप्ति करुन घेण्याला एक भक्ति पुरे आहे; जात वगैरेंची कांहींएक चाड नाहीं. ५२ राजाज्ञेचीं अक्षरें एका कातड्याचे तुकड्यावर जरी पडलीं, तरी त्या कातड्यापासून सर्व वस्तु प्राप्त होतात. ५३ त्या अक्षरांवांचून सोन्यारुप्याला किंमत नाहीं; तर येथें राजाज्ञा हीच मुख्य होय, व त्याच राजशिक्क्याच्या कातड्यानें सर्व वस्तु विकत मिळतात. ५४ त्याचप्रमाणें, जेव्हां मन व बुद्धि हीं माझ्याच प्रेमानें युक्त होतात, तेव्हांच मोठेपणा व सर्वज्ञपणा यांचा डौल शोभतो. ५५ म्हणून कुळ, जात, वर्ण हे निष्कारण आहेत. तर अर्जुना, फक्त माझी भक्ति केली असतां सार्थक होतें. ५६ ती माझी भक्ति वाटेल त्यानें मनोभावानें केली असतां, तो पूर्वी कोणत्याही वर्णातला असला तरी चिंता नाहीं. ५७ ओढे जोंपर्यंत गंगेस मिळाले नाहींत तोंपर्यंतच त्यांस ओहोळ, वहाळ वगैरे म्हणतात; पण ते गंगेस मिळाल्यावर जसे गंगारूपच होतात; ५८ किंवा लांकडें जोंपर्यंत अग्नींत घातलीं नाहींत तोंपर्यंतच त्यांस खैर, चंदन अशीं नांवें असतात, ५९ त्याचप्रमाणें, जोंपर्यंत मद्रूपता प्राप्त झाली नाहीं, तोंपर्यंतच क्षत्रिय, वैश्य, स्त्री, शूद्र, अंत्यज इत्यादि जाति वेगळाल्या असतात. ४६० मनोभावानें मला शरण आल्यावर जाति, व्यक्ति वगैरे भेद नाहींसा होतो. ज्याप्रमाणें समुद्रांत मीठ घातल्यावर एकरूप होऊन जातें, ६१ जोंपर्यंत समुद्राला येऊन मिळाले नाहींत, तोंपर्यंत नद, नदी, पूर्ववाहिनी, पश्चिमवाहिनी वगैरे भेद असतो; ६२ त्याचप्रमाणें, कोणत्याही निमित्तानें माझ्याकडे चित्त लागलें म्हणजे पुरे; मग सहजच मद्रूपत्व प्राप्त होतें. ६३ अरे, परिसाला फोडण्याकरितां जरी लोखंडानें स्पर्श केला, तरी त्याचें लागलीच सोनें होतें; ६४ हें पहा, गोपींनीं प्रीतीच्या मिषानें माझे ठिकाणीं आपलें चित्त ठेवलें तरी त्या मद्रूप झाल्या नाहींत का ? ६५ किंवा भीतीच्या योगानें कंस मद्रूप झाला नाहीं का ? किंवा माझ्याशीं अखंड वैर केल्यानें शिशुपालादिक मद्रूप झाले नाहींत का ? ६६ अरे, तसेंच पांडव व यादव यांस सोयरिकीच्या नात्यानें व वसुदेवादिक यांना ममत्वानें माझें सायुज्य मिळालें नाहीं का ? ६७

प्राप्यु जैसा । ॥ ६८ ॥ तैसाचि गोपिकांसि कामें । तया कंसा भयसंभ्रमें । येरां घातकां मनोधर्में । शिशुपालादिकां ॥ ६९ ॥ अगा मी ऐकुलाणीचें ठाणें । मज येवो पां भलतेनि मार्गें । भक्ती कां विषयविरागें । अथवा वैरें ॥४७०॥ म्हणोनि पार्था पाहीं । प्रवेशावया माझ्या ठायीं । उपायांची नाहीं । वाणी एथ ॥ ७१ ॥ आणि भलतिया जातीं जन्मावें । मग भजिजे कां विरोधावें[६] । परि भक्त का वैरिया व्हावें । माझियाचि ॥ ७२ ॥ अगा कवणें एकें बोलें[७] । माझेपण जन्हीं जाहालें । तरी मी होणें आलें । हाता निरुतें ॥ ७३ ॥ यालागीं पापयोनिही अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना । मातें भजतां सदना । माझिया येती ॥ ७४ ॥

किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।
अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥

अन्वयः—किं पुनः पुण्याः भक्ताः ब्राह्मणाः तथा राजर्षयः ! (तस्मात्) अनित्य असुख इमं लोकं प्राप्य मां भजस्व ॥ ३३ ॥

( ३६०. पापयोनि भक्त माझ्या स्वरूपास प्राप्त होतात, मग पुण्ययोनि ब्राह्मण व राजर्षि मला कसे प्राप्त होणार नाहींत ? काव्यमय वर्णन, ४७५–४८९ ) मग वर्णांमाजि छत्रचामर । स्वर्ग जयांचें अग्रहार । मंत्रविद्येसि माहेर । ब्राह्मण जे ॥७५॥ जे पृथ्वीतळींचे देव । जे तपोवतार सावयव । सकळ तीर्थांसि दैव । उदयलें जे ॥ ७६ ॥ जेथ अखंड वसिजे यागीं । जे वेदाची वज्रांगीं । जयांचिये दिठीचिया उत्संगीं । मंगल वाढे ॥ ७७ ॥ जयांचिये आस्थेचेनि वोलें[१५] । सत्कर्म पाल्हाळीं[१६] गेलें । संकल्पें सत्य जियालें । जयांचेनि ॥ ७८ ॥ जयांचेनि गा बोलें । अग्नीसि आयुष्य जाहालें । म्हणोनि समुद्रें पाणी आपुलें । दिधलें यांचि प्रीती[१७] ॥ ७९ ॥ मियां लक्ष्मी डावलोनि केली परौती । फेडोनि कौस्तुभ घेतला हातीं । मग वोढविली वक्षस्थळाची वाखती । चरणरजां ॥ ४८० ॥ अझूनि पाउलाची मुद्रा । मी हृदयीं वाहें गा सुभद्रा । जे आपुलिया दैवसमुद्रा । जतनेलागीं ॥ ८१ ॥ जयांचा कोप सुभटा । काळाग्निरुद्रांचा वसौटा । जयांचे प्रसादीं फुकटा । जोडती सिद्धी ॥ ८२ ॥ ऐसे पुण्यपूज्य जे ब्राह्मण । आणि माझ्या ठायीं अतिनिपुण । आतां मातें पावती ते हें कवण । सामर्थ्यें ॥ ८३ ॥ पाहें पां चंदनाचेनि अंगानिळें । शिवतिले निंब होते जे जवळे । तिहीं निर्जीवींही[२६] देवांचीं निडळें । बैसणीं केलीं ॥ ८४ ॥ मग तो चंदनु तेथ न पवे । ऐसें मनीं कैसेनि धरावें । अथवा पातला हें समर्थावें । तेव्हां कायि साच ॥ ८५ ॥ जेथ निववील

१ विषयबुद्धीनें. २ निर्वाणीचें. ३ खळगा; स्थान. ४ विरक्ततेनें. ५ उणीव. ६ वैर करावें. ७ निमित्तानें. ८ श्रेष्ठ. ९ इनामाचें गाव. १० मूर्तिमान. ११ यज्ञानीं. १२ बळकट कवच. १३ संबंधानें. १४ इच्छा. १५ ओलाव्यानें. १६ प्रसार झाला. १७ प्रीति संपादण्याकरितां.

हे धनुर्धरा, नारद, ध्रुव, अक्रूर, शुक आणि सनत्कुमार यांना जसा मी भक्तीनें प्राप्त झालों आहें, ६८ तसाच गोपींना विषयबुद्धीनें, कंसाला भीतीनें, व शिशुपालादिकांना वैरबुद्धीनें मी प्राप्त झालों आहें. ६९ अरे, मी निर्वाणीचें स्थान आहें, म्हणून मला वाटेल त्या मार्गानें–भक्तीनें, विषयबुद्धीनें, विरक्ततेनें अथवा वैरानें–कोणीही प्राप्त झाला असतां हरकत नाहीं. ४७० म्हणून पार्था, हें पहा कीं, मला येऊन मिळण्याकरितां येथें उपायांची उणीव नाहीं; ७१ आणि वाटेल त्या जातींत जन्म होवो आणि माझी भक्ति करो अथवा वैर करो; परंतु भक्त किंवा वैरी जें व्हावयाचें, तें माझेंच व्हावें. ७२ अरे, कोणत्याही निमित्तानें जर मला कोणी शरण आला, तर मद्रूप होणें हें अगदीं त्याच्या हातचें आहे. ७३ यास्तव हे अर्जुना, पापयोनींत जन्म घेतलेले, किंवा वैश्य, शूद्र, स्त्रिया यांनीं माझी भक्ति केली असतां ते माझ्याजवळ येतात. ७४

श्लोकार्थः—तर मग पुण्यवान् असून माझी भक्ति करणारे ब्राह्मण व राजर्षि हे मला आवडतील, हें कशास सांगावयास पाहिजे ? म्हणून, तूं अशाश्वत व दुःखदायक अशा या मृत्युलोकीं जन्म पावला आहेस; यासाठीं माझें भजन कर ॥ ३३ ॥

मग, स्वर्गलोक म्हणजे ज्यांचें केवळ इनामगांवच; आणि जे मंत्रविद्येचें माहेरघरच; जे सर्व वर्णांमध्यें श्रेष्ठ ब्राह्मण; ७५ जे पृथ्वीवरील देवच; जे तपश्चर्येचे मूर्तिमंत अवतार; ज्यांच्या योगानें सर्व तीर्थांचें दैव उदय पावलें आहे; ७६ ज्यांच्या ठिकाणीं यज्ञांचा अखंड वास, जे वेदांचीं बळकट कवचें, व ज्यांच्या दृष्टीच्या संबंधानें सर्व ठिकाणीं मंगलाची वृद्धि होते; ७७ ज्यांच्या आस्थारूप ओलाव्यानें सत्कर्मांचा प्रसार झाला, व ज्यांच्या निश्चयानें सत्य कायम राहिलें; ७८ ज्यांच्या आशीर्वादानें अग्नीचें आयुष्य वाढलें म्हणून त्यांच्या प्रीतीस्तव अग्नीला समुद्रानें आपल्या ठिकाणीं आश्रय दिला; ७९ मीं लक्ष्मीला ढकलून पलीकडे केली, व कौस्तुभ मणि गळ्यांतून काढून हातांत घेतला; आणि मग ज्यांच्या चरणरजांच्या प्राप्तीकरितां मीं आपल्या उराची खळगी म्हणजे छाती पुढें केली; ४८० हे नरेंद्रा, माझा शांतपणाचा लौकिक कायम राहण्याकरिता ज्यांच्या पावलाची खूण मीं अजून आपल्या हृदयावर बाळगली आहे; ८१ हे महावीरा, ज्यांचा कोप म्हणजे काळ, अग्नि व रुद्र यांचें वसतिस्थान होय, व जे प्रसन्न झाले असतां फुकट सिद्धि प्राप्त होतात; ८२ असे पुण्यपूज्य जे ब्राह्मण, आणि त्यांतून माझे ठिकाणीं पूर्ण भक्ति करितात, ते मद्रूप होतात, यांत सिद्ध तें काय करावयाचें आहे ? ८३ हें पहा, चंदनाच्या अंगवायूनें स्पर्श केलेल्या जवळच्या कमी किंमतीच्या लिंबासही जर देवाच्या मस्तकावर स्थान मिळतें, ८४ तर मग चंदनाचें वास्तव्य तेथें घडणार नाहीं अशी मनात शंका कशी धरावी ? अथवा, त्या ठिकाणीं त्याचें वास्तव्य घडलें असें सांगितल्या-

१८ ढकलून. १९ उराची. २० खळगी; छाती. २१ खूण. २२ शांतपणाचा लौकिक. २३ वसतिस्थान. २४ सिद्ध करावें. २५ अंगवायूनें. २६ कमी किंमतीच्या. २७ मस्तक.

ऐशिया आशा । हरें चंद्रमा आधा ऐसा । वाहिजत असे शिरसा । निरंतर ॥८६॥ तेथ निववितां आणि सगळा । परिमळें चंदनाहून आगळा । तो चंदनु केवीं अवलीळा । सर्वांगीं न वैसे ॥ ८७ ॥ कां रथ्योदकें[2] जियेचिये कासे । लागलिया समुद्र जाली अनायासें । तिये गंगेसि काय अनारिसें । गत्यंतर असे ॥ ८८ ॥ म्हणोनि राजर्षि कां ब्राह्मणु । जयां गति मति मीचि शरण्यु । तयां शिर्डुदी मीचि निर्वाणु । स्थितिही[6] मीचि ॥ ८९ ॥ ( ३६१. मृत्युलोकांत जन्मलेल्यानीं आंग झाडून बाहेर पडावें; काव्यमय वर्णन, ४९०–५१६ ) यालागीं शतजर्जर नावे । रिगोनि केवीं निश्चिंत होआवें । कैसेनि उघडिया असावें । शस्त्रवर्षीं ॥ ४९० ॥ आंगावरी पडतां पाषाण । न सुवावें केवीं वोडेण । रोगें दाटला आणि उदासपण । वोखदेंसी ॥ ९१ ॥ जेथ चहुंकडे जळत वणवा । तेथूनि न निगिजे केवीं पांडवा । तेवीं लोकीं येऊनि सोपद्रवा । केवीं न भजिजे मातें ॥ ९२ ॥ अगा मातें न भजावयागीं । कवण बळ पां आपुलिया आंगीं । काई घरीं कीं[14] भोगीं । निश्चिती[15] केली ॥ ९३ ॥ नातरी विद्या कीं वयसा । ययां प्राणियांसि हा ऐसा । मज न भजतां भरंवसा । सुखाचा कवणु ॥ ९४ ॥ तरी भोग्यजात जेतुलें । तें एका देहाचिया निकिया लागलें । आणि एथ देह तंव असे पडिलें । काळाचिये तोंडीं ॥ ९५ ॥ बाप दुःखाचें केणें[18] सुटलें । जेथ मरणाचें भरें लोटलें । तिये मृत्युलोकींचे शेवटिले । येणें जाहालें हाटवेळे ॥ ९६ ॥ आतां सुखेंसि जीविता । कैंची ऐहिकी कीजेल पांडुसुता । काय राखोंडी फुंकितां । दीपु लागे ॥ ९७ ॥ अगा विषाचे कांदे वांटुनी । जो रसु घेइजे पिळुनी । तया नाम अमृत ठेवुनी । जैसें अमर होणें ॥ ९८ ॥ तेवीं विषयांचें जें सुख । तें केवळ परम दुःख । परि काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे[22] ॥ ९९ ॥ कां शीस खांडूनि आपुलें । पायींच्या खतीं बांधिलें । तैसें मृत्युलोकींचे भलें । आहे आघवें ॥ ५०० ॥ म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची काहाणी । ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं । कैंची सुखनिद्रा आंथरुणीं । इंगळांच्या ॥ १ ॥ जिये लोकींचा चंद्रु क्षयरोगी । जेथ उदयो होय अस्तालागीं । दुःख लेऊनि सुखाची आगी[23] । साळितें जगातें ॥२॥ जेथ मंगळाचिया अंकुरीं । सवेंचि अमंगळाची पडे पौरी । मृत्यु उदराचिया परिवरीं[27] । गर्भु गिंवसी ॥ ३ ॥ जें नाहीं तयातें चिंतवी । तंव तेंचि नेइजे गंधर्वीं ।

१ सहज. २ रस्त्यावरील पाणी. ३ रक्षण करणारा. ४ खरोखर. ५ मुक्ति. ६ मुक्ति. ७ शता-वधि भोंकांच्या. ८ निष्काळजी. ९ शस्त्रांचा वर्षाव होत असताना. १० पुढें न करावी. ११ टाक. १२ मृत्युलोकीं. १३ उपद्रवानें भरलेल्या. १४ भोग्य वस्तूंचीं. १५ समृद्धि. १६ तारुण्य. १७ सुखाकरितां १८ माल. १९ माप. २० बाजाराच्या समयीं. २१ खरेदी. २२ रहात नाहीं. २३ पांघरूण. २४ छळणें. २५ कल्याणाच्या. २६ आच्छादन. २७ घरीं. २८ शोधतो. २९ यमदूतांनीं.

वर खरें वाटावें, नाहीं तर तें खोटें का होईल ? ८५ विष प्राशन केल्यानें त्यापासून होणाऱ्या दाहाचें शमन होईल अशा आशेनें, शंकरांनीं मस्तकावर निरंतर अर्धचंद्र धारण केला; ८६ तर दाहाचें शमन करणारा, व पूर्ण, आणि चंद्राहून सुवासानें अधिक असा जो चंदन, तो सर्वांगावर सहजच कां धारण केला जाणार नाहीं ? ८७ किंवा रस्त्यावरील उदकें जिच्यांत मिळाल्यामुळें समुद्रांत सहज जाऊन मिळतात, त्या गंगेला समुद्राशिवाय दुसरी गति आहे काय ? ८८ म्हणून, ज्यांना गति व ज्ञान देणारा आणि ज्यांचें रक्षण करणारा मीच आहें, त्या राजर्षींना व ब्राह्मणांना भक्ति व मुक्ति खरोखर मीच आहें. ८९ वास्तव, शतावधि छिद्रांच्या नावेंत बसून आपण बुडणार नाहीं अशा भरंवशानें निष्काळजी कसें राहावें ? तसेंच, शस्त्रांचा वर्षाव चालला असतां आपल्यास दुखापत होणार नाहीं अशा भरंवशानें उघड्या अंगानें कसें फिरावें ? ४९० अंगावर दगड पडत असतां ढाल का न पुढें करावी ? रोगानें ग्रस्त असतां औषध घेण्याविषयीं कसें उदासीन असावें ? ९१ हे अर्जुना, चोहोंकडून वणवा लागल्यावर तेथून बाहेर कसें पडूं नये ? त्याचप्रमाणें, उपद्रवासहित असलेला जो मृत्युलोक, त्यात जन्मल्यावर माझें भजन कां न करावें ? ९२ अरे, मला न भजण्याविषयीं मनुष्यांच्या अंगीं असें कोणतें सामर्थ्य आहे ? त्याच्या घरीं सर्व भोग्य वस्तूंची समृद्धि असल्यामुळें ते निष्काळजी झाले काय ? ९३ का, मला न भजतां विद्या, तारुण्य यांपासून सुखप्राप्ति होईल असा प्राण्यांना भरंवसा आहे ? ९४ तर बाबारे, जितक्या म्हणून भोग्य वस्तु आहेत, तितक्या एका देहाच्या सुखाकरितां उत्पन्न केलेल्या आहेत; आणि ह्या मृत्युलोकीं देह पाहूं गेलें असतां काळाच्या तोंडांत पडलेला आहे ! ९५ या मृत्युलोकाच्या बाजारात दुःखरूपी माल भरलेला असून मरणरूपी माप चाललें आहे. त्या ठिकाणीं बाजार उठण्याचे समयीं मनुष्यरूपानें येणें झालें आहे. ९६ तर हे पांडुसुता, अशा वेळीं जिवाला सुख होईल अशी कोणती खरेदी करतां येईल ? हें पहा ( विस्तव विझून गेल्यावर राहिलेली ) राख फुंकून दिवा लागेल का ? ९७ अरे, विषाचे कांदे वांटून ते पिळावयाचे, व त्यांचा रस काढल्यावर त्याला अमृत असें म्हणावयाचें, व तें पिऊन ज्याप्रमाणें अमर होण्याची इच्छा करावयाची, ९८ त्याप्रमाणें, या विषयांपासून होणारें जें सुख, तें केवळ महत् दुःख आहे. परंतु काय करावें, जे अज्ञानी आहेत, त्यांना त्याचें सेवन केल्याशिवाय होत नाहीं. ९९ किंवा पायाला झालेल्या जखमेवर आपलें डोकें तोडून बांधणें जितकें चांगलें, तितक्याच या मृत्युलोकांतील गोष्टी चांगल्या आहेत. ५०० म्हणून, या मृत्युलोकीं सुखाच्या गोष्टी कोणाच्या कानीं पडणार आहेत ? विस्तवाच्या अंथरुणावर निजलें असतां सुखाची झोंप कशी लागणार ? १ ज्या मृत्युलोकीं चंद्राला देखील क्षय लागतो, जेथें अस्ताकरितां सूर्यचंद्र उदयास येतात, व जेथें दुःख हें सुखाचें पांघरूण घेऊन जगाला छळतें; २ जेथें कल्याणाचा अंकुर फुटल्यावर लागलीच त्यावर अकल्याणाचें आच्छादन पडतें ! व मृत्यु हा

गेलियाची कवणे गांवीं । शुद्धि न लगे ॥४॥ अगा गिंवसिता आघविया वाटीं । पर-तलें पाउलचि नाहीं किरीटी । सैंघ निभालियाचिया गोठी । तियें पुराणें जेथींचीं ॥ ५ ॥ जेथींचिये अनित्यतेची थोरी । करितया ब्रह्मयाचे आयुष्यवेरी । कैसें नाहीं होणें अवधारीं । निपटूनियां ॥ ६ ॥ ऐसी लोकींची जिये नांदणूक । तेथ जन्मले आथि जे लोक । तयांचिये निश्चितीचें कौतुक । दिसत असे ॥ ७ ॥ पैं दृष्टादृष्टाचिये जोडी- । लागीं भांडवल न सुटे कवडी । जेथ सर्वस्वें हानि तेथ कोडी । वेंचिती गा ॥ ८ ॥ जो बहुवें विषयविलासें गुंफे । तो म्हणती उवाईं पडिला सोपें । जो अभिलाषभारें दडपे । तयातें सज्ञान म्हणती ॥ ९ ॥ जयाचें आयुष्य धाकुटें होय । बळप्रज्ञा जिरोनि जाय । तयाचे नमस्कारिती पाय । वडिल म्हणूनि ॥ ५१० ॥ जंव जंव बाळ बाळिया वाढे । तंव तंव भोजें नाचती कोडें । आयुष्य निमालें आतुलियेंकडे । ते ग्लानिचि नाहीं ॥ ११ ॥ जन्मलिया दिवस-दिवसें । हों लागे काळाचेचि ऐसें । कीं सोंढती करिती उल्हासें । उभविती गुढिया ॥ १२ ॥ अगा मर हा बोलु न साहती । आणि मेलिया तरी रडती । परि असतें जात न गणिती । गाहिंसेपणें ॥ १३ ॥ दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा । कीं तो मासिया वेटाळी जिभा । तैसे प्राणिये कवणा लोभा । वाढविती तृष्णा ॥ १४ ॥ अहा कटकटा हें वोखटें । इये मृत्युलोकींचें उफराटें । येथ अर्जुना जरी अवचटें । जन्मलासि तूं ॥ १५ ॥ तरि झडझडोनि वहिलां निघ । इये भक्तीचिये वाटे लाग । जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें ॥ १६ ॥

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥

अन्वयः—( हे पार्थ ) त्वं मन्मना मद्भक्तः च मद्याजी भव, मां नमस्कुरु; एवं आत्मानं युक्त्वा मत्परायणः ( सन् ) मां एव एष्यसि ॥ ३४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

( ३६२. मनानें भक्त हो, मलाच नमस्कार कर, आणि मत्परायण हो, म्हणजे मद्रूप होशील; ५१७–५२१ ) तूं मन हें मीचि करीं । माझिया भजनीं प्रेम धरीं । सर्वत्र नमस्कारीं । मज एकातें ॥ १७ ॥ माझेनि अनुसंधानें देख । संकल्पु जाळणें निःशेख । मैंयाजी चोख । याचि नाव ॥ १८ ॥ ऐसा मियां आथिला होसी । तेथ माझियाचि स्वरूपा पावसी । हें अंतःकरणींचें तुजपासीं । बोलिजत असे ॥ १९ ॥ अगा आघविया चोरियां आपुलें । जें सर्वस्व आम्हीं असे ठेविलें । तें पावोनि सुख संचलें । होऊनि ठासी ॥ ५२० ॥ ऐसें सांवळेनि परब्रह्में । भक्त-

१ शोध. २ मेलेल्या लोकांच्या. ३ गुढि उभारणाऱ्या. ४ मुलामध्यें. ५ प्रस्तुत. ६ होम.

उदरांतील गर्भाला देखील शोधीत येतो; ३ ज्याचें चिंतन न करावें त्याचें करण्यास लावून, त्या योगानें यमदूत हे प्राण्याला घेऊन जातात, व कोणत्या गांवीं जातात याचा शोध लागत नाहीं. ४ अरे, सर्व वाटा शोधिल्या असतांही जेथें माघारी येण्याची गोष्टच नाहीं, व ज्या ठिकाणी मृत्यु पावलेल्या लोकांच्या गोष्टी हींच पुराणें, ५ तेथील अशाश्वततेचा लौकिक सृष्टि उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या आयुष्यापर्यंत जरी वाखाणिला तरी संपणार नाहीं ! ६ अशी ज्या मृत्युलोकाची स्थिति, तेथें जन्म घेणाऱ्या लोकाचा निष्काळजीपणा पाहून मोठें नवल वाटतें. ७ हें पहा, प्रत्यक्ष अथवा परलोकीं होणाऱ्या लाभांच्या प्राप्ती-करितां जे एक कवडीही खर्च करीत नाहींत, ते सर्व प्रकारें हानि होणाऱ्या ठिकाणीं कोट्यवधि द्रव्य खर्च करतात ! ८ जो प्रस्तुत कालीं पुष्कळ विषयसुखात गुंततो, त्याला सुखी असें मानतात; व जो लोभी आहे त्याला ज्ञानी असें म्हणतात. ९ ज्याचें आयुष्य थोडें राहिलें आहे, व ज्याची शक्ति, बुद्धि कमी झाली आहे, त्याला ' वडील ' म्हणून पायां पडतात. ५१० लहान मूल जों जों मोठें होतें, तों तों त्याचा आनंद मानतात; परंतु त्याचें आयुष्य उलट कमी झाल्याबद्दल त्यांना दुःख होत नाहीं. ११ जन्मापासून दिवसा-नुदिवस काळाच्याच स्वाधीन होत असतो; परंतु आनंदानें वाढदिवस करून गुढ्या उभार-तात. १२ अरे, ' मर ' हा शब्द देखील सहन होत नाहीं, आणि मेल्यावर तर रडता-तच ! परंतु असलेलें आयुष्य संपत चाललें आहे याची मूर्खपणानें खिजगणतीही करीत नाहींत. १३ बेडकाला साप गिळीत असतां तो जिभेनें माशा धरून गिळीत असतो; त्याप्रमाणें हे प्राणी कसल्या लोभानें आपली इच्छा वाढवीत असतात, कोण जाणे ! १४ हायहाय ! किती ही वाईट गोष्ट ! या मृत्युलोकीं सर्वच गोष्टी उलट्या घडतात ! तर अर्जुना, तूं जरी एथें यदृच्छेनें जन्मला आहेस, १५ तरी झडकर वेगळा हो; आणि ज्या योगानें माझ्या अविनाशी पदाला प्राप्त होशील, त्या भक्तिमार्गाला लवकर लाग. १६

श्लोकार्थः—हे अर्जुना, तूं माझे ठिकाणीं आपलें मन ठेव; माझा भक्त हो; माझें यजन कर; आणि मलाच नमस्कार कर. ह्याप्रमाणें माझे ठिकाणीं चित्त स्थिर करून मत्परायण झालास म्हणजे मज परमेश्वरासच येऊन मिळशील ॥ ३४ ॥

तूं आपलें मन मद्रूपी करून माझें भजन करण्याविषयीं प्रेम धर, आणि सर्व ठिकाणीं मीच आहें असें समजून नमस्कार कर. १७ हें पहा, मनांतील सर्व संकल्प नाहीं-तसे करून जो माझ्याकडेस लक्ष ठेवितो, तोच माझें पूजन करणारा असें नांव पावतो. १८ असा माझ्या योगानें संपन्न होशील, त्याच वेळेस माझ्या स्वरूपाला पावशील. ही माझ्या अंतःकरणांतील गुह्य गोष्ट तुला मीं सांगितली आहे. १९ अरे, सर्वांना चोरून ठेविलेली

७ थोडें राहिलें. ८ बुद्धि. ९ संतोषानें. १० कमी झालें. ११ उलट. १२ वाढदिवस. १३ असलेलें. १४ संपतांना. १५ मूर्खपणें. १६ अकस्मात्. १७ वेगळा. १८ माझें यजन करणारा. १९ संपन्न. २० चोरून ठेवलेलें. २१ रस. २२ श्यामवर्ण.

कामकल्पद्रुमें । बोलिलें आत्मारामें । संजयो म्हणे ॥ २१ ॥ ( ३६३. संजय धृतराष्ट्राच्या मोहाचें वर्णन करतो; काव्य, ५२२–५२४ ) अहो ऐकिजत असे कीं अवधारा । तंव इया बोला निवांत म्हातारा । जैसा म्हैसा नुठी कां पुरा । तैसा उगाचि असे ॥ २२ ॥ तेथ संजयें माथा तुकिला । अहो अमृताचा पाऊस वर्षला । कीं हा एथ असतुचि गेला । सेजिया गांवा ॥ २३ ॥ तऱ्ही दातारु हा आमुचा । म्हणोनि हें बोलतां मैळेल वाचा । काय कीजे ययाचा । स्वभावोचि ऐसा ॥ २४ ॥ ( ३६४. संजय आपल्या भाग्याचें वर्णन करीत असतां अष्ट सात्विक भाव होतात; अष्ट सात्विक भावांचें काव्य, ५२५–५३० ) परि बाप भाग्य माझें । जें वृत्तांतु सांगावयाचेनि व्याजें । कैसा रक्षिलों मुनिराजें । श्रीव्यासदेवें ॥ २५ ॥ येतुलें हें वॉड सायासें । जंव बोलत असे दृढमानसें । तंव न धरवेचि आपुलिया ऐसें । सात्विकें केलें ॥ २६ ॥ चित्त चाकोटलें आंटु घेत । वाचा-पांगुळली जेथींची तेथ । आपाद कंचुकित । रोमांच आले ॥ २७ ॥ अर्धोन्मीलित डोळे । वर्षताति आनंदजळें । आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरी कांपे ॥ २८ ॥ पैं आघवाचि रोममूळीं । आली स्वेदकणिका निर्मळीं । लेइला मोतियांची कडियाळी । आवडे तैसा ॥ २९ ॥ ऐसा महासुखाचेनि अतिरसें । जेथ ओंटणी हो जीवदशे । तेथ निरोपिलें व्यासें । तें नेदीचें हों ॥ ५३० ॥ ( ३६५. संजय सात्विक भावाचें विसर्जन करून देवाचें बोलणें धृतराष्ट्राला सांगतो, ५३१–५३२ ) आणिक श्रीकृष्णाचें बोलणें । घों कैरी आलें श्रवणें । कीं देहस्मृतीचा तेणें । वापसा केला ॥ ३१ ॥ तेव्हां नेत्रींचें जळ विसर्जी । स्वर्वांगींचा स्वेदु परिमार्जी । तेवींचि अवधारा म्हणे हो जी । धृतराष्ट्रातें ॥ ३२ ॥ ( ३६६. दहाव्या अध्यायाचें अवतरण, ५३३–५३५ ) आतां श्रीकृष्णवाक्यबीजा निवाडु । आणि संजय सात्विकाचा विवेडु । म्हणोनि श्रोतयां होईल सुरवाडु । प्रमेय पिकाचा ॥ ३३ ॥ अहो अळुमाळ अवधान देयावें । येतुलेनि आनंदाचे राशीवरी बैसावें । बाप श्रवणेंद्रिया दैवें । घातली माळ ॥ ३४ ॥ म्हणोनि विभूतींचा ठावो । अर्जुना दावील सिद्धांचा रावो । तो ऐका म्हणे ज्ञानदेवो । निवृत्तीचा ॥ ५३५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

श्लोक ३४, ओंव्या ५३५.

---

१ टोणगा. २ शेजारच्या. ३ धनी. ४ मोठें. ५ गढून गेलें. ६ स्थिर झालें. ७ नखशिखान्त. ८ अर्धे उघडलेले. ९ घामाचे बारीक कण. १० जाळी. ११ नाहींशी होणें. १२ करांना. १३ घों घों करीत. १४ पुसी. १५ उत्तम. १६ पीक चांगलें यावें म्हणून, ज्या जमिनींत तें पेरावयाचें

अशी आमची गुप्त गोष्ट ती प्राप्त करून घेऊन तूं सुखरूप होऊन राहशील. ५२० संजय म्हणतोः—श्यामवर्ण परमात्मा व भक्तांची इच्छा पूर्ण करणारे असे जे श्रीकृष्ण, ते याप्रमाणें बोलले. २१ अहो श्रोतेहो, ऐका; रेडा ज्याप्रमाणें महापुराला न जुमानतां पाण्यांतच बसतो, त्याप्रमाणें हा कृष्णार्जुनसंवाद ऐकून वृद्ध धृतराष्ट्र स्वस्थ बसला! २२ त्या वेळीं संजय मान डोलवून म्हणाला, आज अमृताचा वर्षाव झाला, परंतु हा येथें असून शेजारच्या गांवास गेला कीं काय? २३ तथापि हा आमचा धनी असल्यामुळें अशा रीतीनें बोललों असतां आमची वाणी दूषित होईल; पण काय करावें? याचा स्वभावच असा आहे. २४ परंतु मुनिश्रेष्ठ व्यास ऋषींनीं श्रीकृष्णार्जुनांचा संवाद धृतराष्ट्रास सांगण्यास माझी योजना केल्यामुळें माझें भाग्य धन्य होय! २५ इतका मनाचा निश्चय करून मोठ्या सायासांनीं बोलत असतां संजयास असा अष्टसात्विकभाव उत्पन्न झाला कीं, तो त्यास आवरेना. २६ त्या कृष्णार्जुनसंवादामध्यें चित्त गढून गेल्यामुळें स्थिर होऊन वाणी जागच्या जागींच स्तब्ध राहिली, आणि नखशिखान्त रोमांच उभे राहिले. २७ डोळे अर्धवट उघडे राहून, त्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले, व अंतर्यामीं सुखाच्या लाटा आल्यामुळें बाहेरून अंगास कंप सुटला. २८ सर्व रोमरंध्रांतून निर्मळ घामाचे बारीक कण उद्भवल्यामुळें, मोत्याची जाळीच घातली आहे कीं काय असें वाटलें. २९ या महासुखाच्या प्रेमानें जीवदशा नाहींशी झाल्यामुळें, व्यासांनीं सोंपविलेलें काम तो करीनासा झाला. ५३० इतक्यांत श्रीकृष्णार्जुनांचा संवाद घो घो करीत येऊन कानीं पडतांच त्या बोलण्यानें संजयाचे देहस्थितीचा वाफसा केला. ( तो भानावर येऊन आपलेकडे सोंपविलेलें काम करण्यास तयार झाला ). ३१ मग लागलीच डोळ्यांचें पाणी व सर्वांगाचा घाम पुसून धृतराष्ट्राला म्हणाला, " महाराज, ऐका. " ३२ आता श्रीकृष्णवाक्यरूप उत्तम बीजास संजयाच्या सात्विकतेचा बिवड मिळाल्यामुळें श्रोत्याना सिद्धातरूप पिकाचा सुकाळ होईल. ३३ अहो, किंचित् अवधान द्याल, तर आनंदरूप राशीवर बसाल; कारण, श्रवणेंद्रियास दैवानें माळ घातली आहे. ३४ म्हणून, ईश्वरविभूतींचीं जीं स्थळें आहेत, तीं सर्व सिद्धांचे राजे भगवान श्रीकृष्ण हे अर्जुनास दाखवितील. निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात, ती कथा ऐका. ५३५.

अध्याय ९ वा, ओवी ५३५.

---

असेल त्या जमिनींत त्या पिकास अनुकूल असें दुसरें पीक प्रथम पेरितात; आणि मग तें काढून इच्छित पिकाची पेरणी करितात. यापैकीं प्रथम काढलेल्या पिकास बिवड म्हणतात. जसें:—तागाचा बिवड सर्व पिकास चांगला. १७ सुकाळ, १८ किंचित्.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय दहावा

( ३६७. सद्गुरुमाहात्म्य, काव्य, १–१५ ) नमो विशदबोधविदग्धा । विद्यारविंदप्रबोधा । पराप्रमेयप्रमदा- । विलासिया ॥ १ ॥ नमो संसारतमसूर्या । अपरिमित परमवीर्या । तरुणतरतुर्या- । लालनलीला ॥ २ ॥ नमो जगदखिल- पालना । मंगलमणिनिधाना । सज्जनवनचंदना । आराध्य लिंगा ॥ ३ ॥ नमो चतुरचित्तचकोरचंद्रा । आत्मानुभवनरेंद्रा । श्रुतिसारसमुद्रा । मन्मथमन्मथा ॥४॥ नमो सुभावभजनभाजना । भवेभकुंभभंजना । विश्वोद्भवभुवना । श्रीगुरुराया ॥ ५ ॥ तुमचा अनुग्रहो गणेशु । जैं दे आपुला सौरसु । तैं सारस्वतीं प्रवेशु । बाळकाही आथी ॥ ६ ॥ जी दैविकी[17] उदार वाचा । जैं उद्देशु दे नाभिकाराचा । तैं नवरससुधाब्धीचा । थावो लाभे ॥ ७ ॥ जी आपुलिया स्नेहाची वागेश्वरी । जरी मुकेयातें अंगिकारी । तो वाचस्पतीशीं करी । प्रबंधु होडा ॥ ८ ॥ हें असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्मकरु माथां पारुखे । तो जीवचि परि तुके[22] । महे[23]- शेंसीं ॥ ९ ॥ एवढें जिये महिमेचें करणें । ते वाचाबळें वानूं मी कवणें । का सूर्याचिया आंगा उटणें । लागत असे ॥ १० ॥ केउता कल्पतरूवरी फुलौरा । कायसेनि पाहुणेरु क्षीरसागरा । कवणें वासीं कापुरा । सुवासु देवों ॥ ११ ॥ चंद- नातें कायसेनि चर्चावें । अमृतातें केउतें रांधावें । गगनावरी उभैवावें । घडे केवीं ॥ १२ ॥ तैसें श्रीगुरूचें महिमान । आकळितें के[26] असे साधन । हें जाणोनियां नमन । निवांतें[27] केलें ॥ १३ ॥ जरी प्रज्ञेचेनि[28] आथिलेपणें । श्रीगुरुसामर्थ्या रूपें करूं म्हणें । तरि तें मोतियां भिंगं देणें । तैसें होईल ॥ १४ ॥ कां साडे- पंधरया रजतवणी । तैशी स्तुतीची बोलणीं । उगियाचि माथां ठेविजे चरणीं ।

---

१ निर्मळ. २ चतुरा. ३ विद्यारूप कमळाला विकसित करणारा. ४ परा=वाणी, प्रमेय=अर्थ, प्रमदा=स्त्री; परा वाणीच्या अर्थरूप स्त्रीशीं विलास करणारा. ५ सामर्थ्यवंता. ६ तारुण्यभरात असणाऱ्या तुर्यावस्थेशीं. ७ विलास करणारा. ८ कल्याणरूप रत्न. ९ राजा. १० मदनाचा नाश करणारा. ११ पात्र. १२ संसाररूप हत्तीचें गंडस्थळ फोडणारा. १३ जगताचें उत्पत्तिस्थान. १४ कृपा. १५ प्रसाद. १६ शास्त्रांच्या गुह्य सिद्धांतामध्यें १७ गुरूंची. १८ अभयाचा. १९ प्रेमाची. २० ग्रंथ करण्याची प्रतिज्ञा. २१ स्थिर होतो. २२ साम्य पावतो. २३ ईश्वराशीं. २४ उंच करावें. २५ जाणणारें. २६ कोठें. २७ नुसतें. २८ बुद्धीच्या. २९ वर्णन. ३० अभ्रक. ३१ रुप्याची बरोबरी.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय दहावा

(हे गुरो,) निर्मल अशा ब्रह्मज्ञानाचा बोध करण्यात चतुर, विद्यारूप कमलाला विकसित करणारा, आणि परा वाणीच्या अर्थरूप स्त्रीशीं विलास करणारा असा जो तू त्या तुला नमस्कार असो। १ संसाररूप अधकाराचा-अज्ञानाचा-नाश करण्यात सूर्याप्रमाणे अतिसामर्थ्यवान, व तारुण्यभरात असणाऱ्या तुर्यावस्थेशीं विलास करणारा असा जो तूं, त्या तुला नमस्कार असो। २ सर्व जगाचे पालन करणारा, कल्याणरूप रत्नाचा ठेवा, सज्जनरूप वनात चदनासारखा श्रेष्ठ, आणि ज्याचे स्वरूप आराधन करण्यास योग्य, असा जो तू, त्या तुला नमस्कार असो। ३ भक्ताच्या चित्तरूप चकोर पक्ष्यास चद्रासारखा, ब्रह्मानदरूप अनुभवाचा राजा, श्रुतींच्या ज्ञानाचा समुद्र, आणि मदनाचा नाश करणारा असा जो तू, त्या तुला नमस्कार असो। ४ भावयुक्त ज्ञान्याच्या भजनास पात्र, ससाररूप हत्तीचे गडस्थळ फोडणारा, व जगाच्या उत्पत्तीचे स्थान अशा तुजप्रत नमस्कार असो। ५ गुरो, तुमच्या कृपारूप गणेशाचा जेव्हा प्रसाद होतो, तेव्हा लहान मुलालाही शास्त्राच्या गुह्य सिद्धाताचे ज्ञान होते. ६ गुरूच्या उदार वाणीने जेव्हा अभयवचन मिळते, तेव्हा नवरसामृताच्या समुद्राचाही थाग लागतो ७ जेव्हा आपली प्रेमरूप सरस्वती मुक्याचाही अगिकार करते, तेव्हा ग्रथ करण्यात तो बृहस्पतीशीं सुद्धा प्रतिज्ञा करू शकतो. ८ फार तर काय? परतु ज्यावर आपली कृपादृष्टि होते, किंवा ज्याच्या मस्तकावर आपला वरदहस्त पडतो, तो जीव असूनही ईश्वराची साम्यता पावतो. ९ असा ज्या गुरुकृपेचा महिमा आहे, तिचे वर्णन मी कोणत्या वाचेच्या बलाने करू शकेन? कारण, सूर्याच्या अगाला उटणे लावता येईल का? १० कल्पतरूला नेहमीं फुले येण्याची इच्छा करणे व्यर्थ आहे, (कारण तो सर्वदा फलद्रूपच आहे.) क्षीरसागराला कशाची मेजवानी करावी? कापुराला दुसऱ्या कशाचा सुवास देता येईल? ११ चदनाला कशाची उटी लावावी? अमृताला कसे शिजवावे? गगनापेक्षा (काहीं) उच करावे हें कसे घडून येणार? १२ त्याचप्रमाणें, श्रीगुरूचा महिमा जाणण्याचे साधन कोठून मिळणार? हें समजूनच मी गुरूना नुस्ता नमस्कार केला। १३ जर बुद्धीच्या जोरावर श्रीगुरूच्या सामर्थ्याचे वर्णन करू म्हटल, तर ते मोत्याबरोबर अभ्रकाचे तेज लावल्याप्रमाणे होईल, १४ किंवा उत्तम सोन्याबरोबर रुपें लावणे ज्याप्रमाणे व्यर्थ आहे, त्याचप्रमाणे श्रीगुरूची स्तुति करूं लागले

हेंचि भलें ॥ १५ ॥ ( ३६८. सद्गुरुकृपेनें गीतेचा पूर्वार्ध पुरा झाला; काव्य, १६–२३ ) मग म्हणितलें जी स्वामी । भलेनि ममत्वें देखिलें तुम्हीं । म्हणोनि कृष्णार्जुनसंगमीं । प्रयागवटु जाहलों ॥ १६ ॥ मागां दूध दे म्हणितलियासाठीं । आघवेया क्षीराब्धीची करूनि वाटी । उपमन्यूपुढें धूर्जटी[1] । ठेविली जैसी ॥ १७ ॥ नातरी वैकुंठपीठनायकें । रुसला ध्रुव कवतिकें । बुझाविला देऊनि भातुकें[2] । ध्रुवपदाचें ॥ १८ ॥ तैसी जे ब्रह्मविद्यारावो । सकळ शास्त्रांचा विसंवता ठावो । ते भगवद्गीता वोंविये गावों । ऐसें केलें ॥ १९ ॥ जे बोलणियाचे रानीं हिंडतां । नायकिजे फळलिया अक्षराची वार्ता । परि ते वाचाचि केली कल्पलता । विवेकाची ॥ २० ॥ होती देहबुद्धी एकसरी । ते आनंदभांडारा केली वोवरी । मन गीतार्थसागरीं । जळशयन जालें ॥ २१ ॥ ऐसें एकेक देवाचें करणें । तें अपार बोलों केवि मी जाणें । तन्हीं अनुवादलों धीटपणें । तें उपसाहिजो जी ॥ २२ ॥ आतां आपुलेनि कृपाप्रसादें । मियां भगवद्गीता वोंवीप्रबंधें । पूर्वखंड विनोदें । वाखाणिलें ॥ २३ ॥ ( ३६९. मागील अध्यायाचा अनुवाद, २४–४० ) प्रथमीं अर्जुनाचा विषादु । दुर्जी बोलिला योगु विशदु[3] । परि सांख्यबुद्धीसी[4] भेदु । दाऊनिया ॥ २४ ॥ तिर्जी केवळ कर्म प्रतिष्ठिलें । तेंचि चतुर्थीं ज्ञानेंशी प्रगटिलें । पंचमीं गेव्हरिलें[5] । योगतत्त्व ॥ २५ ॥ तेंचि षष्ठामाजि प्रगट । आसनालागोनि स्पष्ट । जीवात्मभाव एकवट । होती जेणें ॥ २६ ॥ तैसी जे योगस्थिती । आणि योगभ्रष्टां जे गती । ते आघवीचि उपपत्ती[6] । सांगितली षष्ठीं ॥ २७ ॥ तयावरी सप्तमीं । प्रकृति परिहार[7] उपक्रमीं[8] । करूनि भजती जे पुरुषोत्तमीं । ते बोलिले चाऱ्हीं[9] ॥ २८ ॥ पाठीं सप्तप्रश्नविधि । बोलोनि प्रयाणसमयसिद्धि । एवं सकळवाक्यावधि । अष्टमाध्यायीं ॥ २९ ॥ मग शब्दब्रह्मीं[10] असंख्याकें । जेतुला काहीं अभिप्राय पिकें । तेतुला महाभारतें एकें । लक्षें[11] जोडे ॥ ३० ॥ तिये आघवाचि जें महाभारतीं । तें लाभे कृष्णार्जुनवाचोक्तीं । आणि जो अभिप्रावो सातेंशतीं । तो एकलाचि नवमीं ॥ ३१ ॥ म्हणोनि नवमींचिया अभिप्राया । सहसा मुद्रा[12] लावावया । बिहाला मग मी वाया । गर्व कां करूं ॥ ३२ ॥ अहो गुळा साखरे भेलियाचे[13] । हे बांधे तरी एकाचि रसाचे । परि स्वाद गोडियेचे । आन आन जैसे ॥ ३३ ॥ एक जाणोनियां बोलती । एक ठायें ठाय जाणविती । एक जाणों जातां हारपती । जाणते गुणेंसी ॥ ३४ ॥ हे ऐसे अध्याय गीतेचे । परि अनिर्वाच्यपण नवमाचें । तो अनुवादलों हें तुमचें । सामर्थ्य प्रभू ॥ ३५ ॥ अहो

१ शंकरानें. २ खाऊ. ३ स्पष्ट. ४ ज्ञान व कर्म. ५ आरंभिलें. ६ सिद्धांत. ७ नाश. ८ आरंभीं. ९ ( आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी हे ) चार भक्त. १० वेदांत. ११ लक्षानें. १२ स्पष्ट समजण्यास. १३ ढेपींचे.

असतां व्यर्थ होईल; म्हणून गुरुचरणीं लीन होऊन त्याच्या पदीं नुसतें मस्तक ठेवणें हेंच बरें होइल. १५ मग ज्ञानेश्वरांनीं म्हटलें, " हे स्वामी, तुम्हीं माझ्यावर ममतेनें कृपादृष्टि केल्यामुळें कृष्णार्जुनसंवादरूपी संगमांत मी प्रयाग येथील वटवृक्षाप्रमाणें झालों ! १६ पूर्वी, ' मला दूध हवें ' असें उपमन्यूनें म्हटल्यावरून शंकरांनीं ज्याप्रमाणें सर्व क्षीरसमुद्राची वाटी करून त्यापुढें ठेवली; १७ किंवा ध्रुव रुसला असतां त्याला अढळ पदाचा खाऊ देऊन श्रीविष्णूंनीं त्याची समजूत केली, १८ त्याप्रमाणें, ब्रह्मविद्येमध्यें श्रेष्ठ व सकल शास्त्रांचें विश्रांतिस्थान अशी जी अध्यात्मविद्यारूप भगवद्गीता, ती मी ओंवीरूपानें वर्णन करावी अशी मला शक्ति दिली ! १९ ज्या भाषणाच्या रानांत हिंडत असतां एकही अक्षराचें सार्थक झाल्याचें माझ्या कानीं पडलें नाहीं, परंतु तें बोलणेंच विचाररूप कल्पतरु झालें; २० ज्या माझ्या बुद्धीची गति देहापलीकडे गेली नव्हती, ती बुद्धि हल्लीं ब्रह्मानंदरूपी भांडाराची खोलीच बनविली आहे; आणि माझ्या मनाला गीतार्थरूपी क्षीरसागरात जलमंदिर बांधून दिलें आहे. २१ याप्रमाणें गुरुदेवाची एकेक करणी अगाध असल्यामुळें, मला त्यांच्या अपार सामर्थ्याचें कसें वर्णन करितां येईल ? तेव्हा, महाराज, जें कांहीं मी धिटाईनें बोललों आहें, त्याची मला क्षमा असावी. २२ आतांपर्यंत आपल्या कृपाप्रसादानें मीं भगवद्गीतेच्या पूर्वखंडाचें ओंवीबद्ध वर्णन आनंदानें केलें. २३ पहिल्या अध्यायांत ( आप्त स्वकीयांबरोबर युद्ध करणें अयोग्य आहे असें वाटल्यामुळें ) अर्जुनास खेद उत्पन्न झाला; दुसऱ्यांत योग स्पष्ट सांगितला आहे; परंतु त्यांत ज्ञानयोग व कर्मयोग असे भेद दाखविले आहेत. २४ तिसऱ्यांत केवळ कर्मच प्रतिपादन केलें आहे; तेंच कर्म चौथ्यांत ज्ञानासह प्रकट केलें आहे; व पांचव्यांत योगतत्त्वास आरंभ केला आहे. २५ तेंच योगतत्त्व सहाव्या अध्यायात आसनविधीपासून जीवाचें ऐक्य होईपर्यंत स्पष्ट सांगितलें आहे. २६ त्याचप्रमाणें, अष्टांगयोगास्थिति व योगभ्रष्टांस मिळणारी गति याविषयीं सर्व सिद्धांत सहाव्यांत सांगितले आहेत. २७ त्यानंतर सातव्यांत, आरंभीं प्रकृतीचा उपक्रम व परिहार सांगून, नंतर ईश्वराचें भजन करणाऱ्या चार प्रकारच्या भक्तांचें म्हणजे आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी यांचें वर्णन केलें आहे. २८ पुढें *प्रश्नसप्तकाचें स्पष्टीकरण करून, प्रयाणसमयीं चित्तशुद्धि करण्याचा निर्णय आठव्यांत सांगितला आहे. २९ मग, वेदांत जेवढा म्हणून अभिप्राय आहे, तेवढा एक लक्ष महाभारत ग्रंथांत आणिला आहे; ३० व भारतांत सांगितलेला सर्व अभिप्राय कृष्णार्जुनांच्या संवादरूपी गीतेच्या सातशें श्लोकांत आहे; व तोच एकट्या नवव्या अध्यायांत आणिलेला आहे. ३१ म्हणून, नवव्या अध्यायाचा अभिप्राय स्पष्ट समजण्यास जेथें अर्जुनाचीही शक्ति झाली नाहीं, तो स्पष्ट करून सांगण्याबद्दल मी व्यर्थ गर्व कशाला वाहूं ? ३२ अहो, गूळ आणि साखर यांच्या ढेपा जरी एका रसाच्या तयार केलेल्या असतात, तरी त्यांची गोडी

* अध्याय आठ, श्लोक १।२ पहा.

होंचि भलें ॥ १५ ॥ ( ३६८. सद्गुरुकृपेनें गीतेचा पूर्वार्ध पुरा झाला; काव्य, १६–२३ ) मग म्हणितलें जी स्वामी । भलेंनि ममत्वें देखिलें तुम्हीं । म्हणोनि कृष्णार्जुनसंगमीं । प्रयागवटु जाहलों ॥ १६ ॥ मागां दूध दे म्हणितलियासाठीं । आघविया क्षीराब्धीची करूनि वाटी । उपमन्यूपुढें धूर्जटी । ठेविली जैसी ॥ १७ ॥ नातरी वैकुंठपीठनायकें । रुसला ध्रुव कवतिकें । बुझाविला देऊनि भातुकें । ध्रुवपदाचें ॥ १८ ॥ तैसी जे ब्रह्मविद्यारावो । सकळ शास्त्राचा विसंवता ठावो । ते भगवद्गीता वोंविये गावों । ऐसें केलें ॥ १९ ॥ जे बोलणियाचे रानीं हिंडतां । नायकिजे फळलिया अक्षराची वार्ता । परि ते वाचाचि केली कल्पलता । विवेकाची ॥ २० ॥ होती देहबुद्धी एकसरी । ते आनंदभांडारा केली वोवरी । मन गीतार्थसागरीं । जळशयन जालें ॥ २१ ॥ ऐसें एकेक देवाचें करणें । तें अपार बोलों केविं मी जाणें । तऱ्ही अनुवादलों धीटपणें । तें उपसाहिजो जी ॥ २२ ॥ आतां आपुलेनि कृपाप्रसादें । मियां भगवद्गीता वोंवीप्रबंधें । पूर्वखंड विनोदें । वाखाणिलें ॥ २३ ॥ ( ३६९. मागील अध्यायाचा अनुवाद, २४–४० ) प्रथमीं अर्जुनाचा विषादु । दुजीं बोलिला योगु विशदु[१] । परि सांख्यबुद्धीसी भेदु । दाऊनिया ॥ २४ ॥ तिजीं केवळ कर्म प्रतिष्ठिलें । तेंचि चतुर्थीं ज्ञानेंशीं[२] प्रगटिलें । पंचमीं गौव्हारिलें[३] । योगतत्त्व ॥ २५ ॥ तेंचि षष्ठामाजि प्रगट । आसनालागोनि स्पष्ट । जीवात्मभाव एकवट । होती जेणें ॥ २६ ॥ तैसी जे योगस्थिती । आणि योगभ्रष्टां जे गती । ते आघवीचि उपपत्ती[४] । सांगितली षष्ठीं ॥ २७ ॥ तयावरी सप्तमीं । प्रकृति परिहार[५] उपक्रमीं[६] । करूनि भजती जे पुरुषोत्तमीं । ते बोलिले चाऱ्हीं[७] ॥ २८ ॥ पाठीं सप्तप्रश्नविधि । बोलोनि प्रयाणसमयसिद्धि । एवं सकळवाक्यावधि । अष्टमाध्यायीं ॥ २९ ॥ मग शब्दब्रह्मीं[८] असंख्याकें । जेतुला काहीं अभिप्राय पिके । तेतुला महाभारतें एकें । लक्षें[९] जोडे ॥ ३० ॥ तिये आघवाचि जें महाभारतीं । तें लाभे कृष्णार्जुनवाचोक्तीं । आणि जो अभिप्रावो सातेंशतीं । तो एकलाचि नवमीं ॥ ३१ ॥ म्हणोनि नवमींचिया अभिप्राया । सहसा मुद्रा[१०] लावावया । बिहाला मग मी वाया । गर्व कां करूं ॥ ३२ ॥ अहो गुळा साखरे भेलियाचे । हे वांधे तरी एकाचि रसाचे । परि स्वाद गोडियेचे । आन आन जैसे ॥ ३३ ॥ एक जाणोनियां बोलती । एक ठायें ठाय[११] जाणविती । एक जाणो जातां हारपती । जाणते गुणेंसी ॥ ३४ ॥ हे ऐसे अध्याय गीतेचे । परि अनिर्वाच्यपण नवमाचें । तो अनुवादलों[१२] हे तुमचें । सामर्थ्य प्रभू ॥ ३५ ॥ अहो

१ शंकरानें. २ खाऊ. ३ स्पष्ट. ४ ज्ञान व कर्म. ५ आरंभिलें. ६ सिद्धांत. ७ नाश. ८ आरंभीं. ९ ( आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी हे ) चार भक्त. १० वेदांत. ११ लक्षानें. १२ स्पष्ट समजण्यास. १३ ढेपींचे.

असतां व्यर्थ होईल; म्हणून गुरुचरणीं लीन होऊन त्याच्या पदीं नुस्तें मस्तक ठेवणें हेंच बरें होइल. १५ मग ज्ञानेश्वरांनीं म्हटलें, " हे स्वामी, तुम्हीं माझ्यावर ममतेनें कृपादृष्टि केल्यामुळें कृष्णार्जुनसंवादरूपी संगमांत मी प्रयाग येथील वटवृक्षाप्रमाणें झालों ! १६ पूर्वी, ' मला दूध हवें ' असें उपमन्यूनें म्हटल्यावरून शंकरांनीं ज्याप्रमाणें सर्व क्षीरसमुद्राची वाटी करून त्यापुढें ठेवली; १७ किंवा ध्रुव रुसला असतां त्याला अढळ पदाचा खाऊ देऊन श्रीविष्णूंनीं त्याची समजूत केली, १८ त्याप्रमाणें, ब्रह्मविद्येमध्यें श्रेष्ठ व सकल शास्त्रांचें विश्रांतिस्थान अशी जी अध्यात्मविचाररूप भगवद्गीता, ती मी ओंवीरूपानें वर्णन करावी अशी मला शक्ति दिली ! १९ ज्या भापणाच्या रानांत हिंडत असतां एकही अक्षराचें सार्थक झाल्याचें माझ्या कानीं पडलें नाहीं, परंतु तें बोलणेंच विचाररूप कल्पतरु झालें; २० ज्या माझ्या बुद्धीची गति देहापलीकडे गेली नव्हती, ती बुद्धि हल्लीं ब्रह्मानंदरूपी भांडाराची खोलीच बनविली आहे; आणि माझ्या मनाला गीतार्थरूपी क्षीरसागरात जलमंदिर बांधून दिलें आहे. २१ याप्रमाणें गुरुदेवाची एकेक करणी अगाध असल्यामुळें, मला त्यांच्या अपार सामर्थ्याचें कसें वर्णन करितां येईल ? तेव्हा, महाराज, जें कांहीं मी धिटाईनें बोललों आहें, त्याची मला क्षमा असावी. २२ आतांपर्यंत आपल्या कृपाप्रसादानें मीं भगवद्गीतेच्या पूर्वखंडाचें ओंवीबद्ध वर्णन आनंदानें केलें. २३ पहिल्या अध्यायांत ( आप्त स्वकीयांबरोबर युद्ध करणें अयोग्य आहे असें वाटल्यामुळें ) अर्जुनास खेद उत्पन्न झाला; दुसऱ्यांत योग स्पष्ट सांगितला आहे; परंतु त्यांत ज्ञानयोग व कर्मयोग असे भेद दाखविले आहेत. २४ तिसऱ्यांत केवळ कर्मच प्रतिपादन केलें आहे; तेंच कर्म चौथ्यांत ज्ञानासह प्रकट केलें आहे; व पांचव्यांत योगतत्त्वास आरंभ केला आहे. २५ तेंच योगतत्त्व सहाव्या अध्यायात आसनविधीपासून जीवाचें ऐक्य होईपर्यंत स्पष्ट सांगितलें आहे. २६ त्याचप्रमाणें, अष्टांगयोगास्थिति व योगभ्रष्टांस मिळणारी गति याविषयीं सर्व सिद्धांत सहाव्यांत सांगितले आहेत. २७ त्यानंतर सातव्यात, आरंभीं प्रकृतीचा उपक्रम व परिहार सांगून, नंतर ईश्वराचें भजन करणाऱ्या चार प्रकारच्या भक्तांचें म्हणजे आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी यांचें वर्णन केलें आहे. २८ पुढें *प्रश्नसप्तकाचें स्पष्टीकरण करून, प्रयाणसमयीं चित्तशुद्धि करण्याचा निर्णय आठव्यात सांगितला आहे. २९ मग, वेदांत जेवढा म्हणून अभिप्राय आहे, तेवढा एक लक्ष महाभारत ग्रंथांत आणिला आहे; ३० व भारतांत सांगितलेला सर्व अभिप्राय कृष्णार्जुनांच्या संवादरूपी गीतेच्या सातशें श्लोकांत आहे; व तोच एकट्या नवव्या अध्यायांत आणिलेला आहे. ३१ म्हणून, नवव्या अध्यायाचा अभिप्राय स्पष्ट समजण्यास जेथें अर्जुनाचीही शक्ति झाली नाहीं, तो स्पष्ट करून सांगण्याबद्दल मी व्यर्थ गर्व कशाला वाहूं ? ३२ अहो, गूळ आणि साखर यांच्या ढेपा जरी एका रसाच्या तयार केलेल्या असतात, तरी त्यांची गोडी

* अध्याय आठ, श्लोक १।२ पहा.

एकोची शेटी तापिन्नली । ऐकीं सृष्टीवरी सृष्टि केली । ऐकीं पाषाणीं वाऊनि उतरलीं । समुद्रीं कटकें ॥ ३६ ॥ ऐकीं आकाशीं सूर्यातें धरिलें । एकीं चुळींचि सागरातें भरिलें । तैसें मज मुकयाकरवीं बोलविलें । अनिर्वाच्य तुम्हीं ॥ ३७ ॥ परि हें असो एथ ऐसें । राम रावण झुंजिन्नले कैसे । राम रावण जैसे । मीनले समरीं ॥ ३८ ॥ तैसें नवमीं कृष्णाचें बोलणें । तें नवमींचियाचि ऐसें मी म्हणें । या निवाडा तत्वज्ञु जाणे । जया गीतार्थु हातीं ॥ ३९ ॥ एवं नवही अध्याय पहिले । मियां मतीसारिखे वाखाणिले । आतां उत्तरखंड उवाइलें । ग्रंथाचें ऐका ॥ ४० ॥ ( ३७०. विभूतियोग, मराठी भाषेचें श्रेष्ठत्व, काव्य, ४१-४७ ) जेथ विभूती प्रतिविभूती । प्रस्तुत अर्जुना सांगिजती । ते विंदेंदा रसवृत्ती । म्हणिपैल कथा ॥ ४१ ॥ देशियेचेनि नागरपेणें । शांतु शृंगारातें जिणे । तरि ओंविया होती लेणें । साहित्यैसी ॥ ४२ ॥ मूळ ग्रंथींचिया संस्कृता । वरि मऱ्हाटी नीट पढतां । अभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमि हें न चोजवे ॥ ४३ ॥ जैसें अंगाचेनि सुंदरपणें । लेणिया आंगचि होय लेणें । तेथ अळंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥ ४४ ॥ तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं । शोभती आयणी । चोखट आइका ॥ ४५ ॥ उठावलिया भावीं रूप । करितां रसवृत्तीचें लागे वडपें । चातुर्य म्हणे पडपें । जोडलें आम्हां ॥ ४६ ॥ तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि आणिलें तारुण्य । मग रचिलें अगण्य । गीतातत्त्व ॥ ४७ ॥ ( ३७१. भगवान अर्जुनाच्या हिताकरिता श्रेष्ठ वचन सांगतात, ४८–५२ ) श्रीभगवानुवाचः—जो चराचरपरमेंगुरु । चतुरचित्तचमत्कारु । तो ऐका यादवेश्वरु । बोलता जाहला ॥ ४८ ॥ ज्ञानदेव निवृत्तीचा म्हणे । ऐसें बोलिलें श्रीहरी तेणें । अर्जुना आधवियाचि मातृ अंतःकरणें । धडौता आहासि ॥ ४९ ॥

भूय एव महाबाहो श्रृणु मे परमं वचः ।
यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥

अन्वयः—महाबाहो, मे परमं वचः भूयः एव शृणु; यत् अहं प्रीयमाणाय ते हितकाम्यया वक्ष्यामि ॥ १ ॥

आम्हीं मागील जें निरूपण केलें । तें तुझें अवधानाचि तुकिलें । तंव टांचें नव्हे भलें । पुरतें आहे ॥ ५० ॥ घटीं थोडेंसें उदक घालिजे । तेणें न गळे तरी वरिता भरिजे । ऐसा परिसौनि पाहिलासि तंव परिसाविजे । ऐसेंचि होतसे

१ वसिष्ठांची. २ छाटी. ३ विश्वामित्रानें. ४ श्रीरामचंद्रानीं. ५ (वानर) सैन्य. ६ मारुतीनें. ७ अगस्तीनें. ८ वाणीस अगम्य असें ब्रह्म. ९ गौण. १० उत्तम. ११ सुंदरपणानें. १२ अलंकारशास्त्रास. १३ अभिप्राय प्रगट करणें. १४ वृष्टि. १५ भूषण. १६ गुरु चार प्रकारचेः—गुरु, परमगुरु, परमेष्ठिगुरु व परात्परगुरु. १७ अपुरें.

निरनिराळी असते; ३३ ( त्याचप्रमाणें, गीतेच्या सर्व अध्यायांत जरी ब्रह्मतत्त्वाचें वर्णन केलें आहे, तरी ) कांहीं अध्याय ब्रह्म जाणून त्याचें प्रतिपादन करतात; कांहीं ब्रह्माचें ठिकाण दर्शवितात; व कांहीं ब्रह्म जाणण्यास गेले असतां आपल्या जाणत्या गुणासह ब्रह्मरूपच होतात. ३४ याप्रमाणें गीतेचे अध्याय आहेत; परंतु नववा अध्याय असा आहे कीं, त्याचें वर्णन करतां येत नाहीं. प्रभो, तो मीं वर्णन केला, हें तुमचेंच सामर्थ्य होय. ३५ अहो, एका ऋषीच्या ( वसिष्ठाच्या ) छाटीनें सूर्यासारखा प्रकाश पाडला; एकानें ( विश्वामित्रानें ) प्रतिसृष्टि निर्माण केली; एकांनीं ( रामचंद्रांनीं ) समुद्रावर दगडाचा सेतु बांधून सर्व सैन्य पार उतरविलें; ३६ एकानें ( मारुतीनें ) जन्मतांच आकाशांत उड्डाण करून सूर्याला फळ म्हणून हातांत धरलें, आणि एकांनीं ( अगस्ति ऋषींनीं ) एकाच आचमनानें समुद्र प्राशन केला; त्याचप्रमाणें, मज मुक्याकडून वाणीला अगम्य असें ब्रह्म तुम्हीं बोलविलें. ३७ परंतु तें तितकेंच राहूं द्या; कारण रामरावणांचें युद्ध रामरावणांच्या युद्धाप्रमाणेंच झालें म्हणून ( म्हणावयाचें; त्याप्रमाणेंच तें अनुपमेय होय. ) ३८ त्याचप्रमाणें, श्रीकृष्णाचें नवव्या अध्यायांतील बोलणें हें नवव्या अध्याया-सारखेंच आहे, असें मी म्हणतों. ज्या तत्त्वज्ञान्यांना गीतेचें खरें रहस्य समजलें आहे, तेच याचा निवाडा जाणतील. ३९ अशा प्रकारें पहिले नऊ अध्याय मीं यथामति वर्णन केले आहेत; आतां येथून उत्तरखंडास आरंभ झाला आहे, तें एका. ४० त्या उत्तरखंडांत आरंभींच्या अध्यायांत श्रीकृष्ण हे अर्जुनास आपल्या मुख्य व गौण विभूति सांगतील, ती उत्तम रसभरित कथा तुम्हांला मी सांगतों. ४१ देशी भाषेच्या सुंदरपणानें शांत-रसही शृंगाररसाला जिंकील; त्या योगानें मराठी ओंव्याच अलंकारशास्त्राला भूषणा-सारख्या शोभतील. ४२ मूळ संस्कृत ग्रंथ व त्यावरील मराठी टीका वाचून जर खरा अर्थ मनांत उतरेल, तर त्यांतील मूळ ग्रंथ कोणता हें समजणार नाहीं. ४३ ज्याप्रमाणें शरीराच्या सौंदर्यानें शरीरच डागिन्यांना शोभवितें आणि कोणी कोणाला शोभा आणली आहे याचा निवाडा करतां येत नाहीं, ४४ त्याप्रमाणें, देशी आणि संस्कृत भाषा एकाच ग्रंथाचा ( गीतेचा ) भावार्थ वर्णन करून एका जागीं कशा शोभतात, तें स्वस्थ बुद्धीनें ऐका. ४५ कोणताही अभिप्राय प्रकट करतांना ( शृंगारादि ) रसांची वृष्टि होते, तेव्हां चातुर्याला शोभा येते; ४६ त्याचप्रमाणें, देशी भाषेचें सौंदर्य व तारुण्य लुटून त्या योगानें अगणित अशा गीतातत्त्वाची रचना केली. ४७ जो स्थावरजंगमाचा परमगुरु, व चतुर जनाच्या चित्तास आनंद देणारा, तो यादवेश्वर श्रीकृष्ण काय बोलला तें ऐका. ४८ निवृत्तिदास ज्ञानदेव सांगतात:—श्रीहरि म्हणाले, " अर्जुना, माझ्या सर्व गोष्टींकडे तुझें पूर्ण लक्ष आहे ना ? ४९

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणालेः—हे महाबाहो, पुनः माझें परम वचन ऐक. तूं माझ्या भाषणानें संतुष्ट होतोस, म्हणून तुझें हित व्हावें या इच्छेनें हें मी तुला सांगतों ॥ १ ॥

॥ ५१ ॥ अवचिंतयावरी सर्वस्व सांडिजे । मग चोख तरी तोचि भांडारी कीजे । तैसा किरीटी तूं आतां माझें । निजधाम कीं ॥ ५२ ॥ ( ३७२. भगवंताचें अर्जुनावरील उत्कट प्रेम, ५३–६३ ) ऐसें अर्जुना येउतें सर्वेश्वरें । पाहोनि बोलिलें अत्यादरें । गिरि देखोनि सुभरे । मेघु जैसा ॥ ५३ ॥ तैसा कृपाळुवांचा रावो । म्हणे आइकें गा महाबाहो । सांगितलाचि अभिप्रावो । सांगेन पुढती ॥ ५४ ॥ पैं प्रतिवर्षी क्षेत्र पेरिजे । पिकाची जरी वाढी देखिजे । यालागीं तुबगिजे । वाहो करितां ॥ ५५ ॥ पुढतपुढती पुटें देतां । जोडे वानियेची अधिकता । म्हणोनि सोनें पांडुसुता । शोधूंचि आवडे ॥ ५६ ॥ तैसें एथ पार्था । तुज आभार नाहीं सर्वथा । आम्ही आपुलियाचि स्वार्था । बोलों पुढती ॥ ५७ ॥ जैसें बाळका लेवविजे लेणें । तया शृंगारा बाळ काइ जाणे । परि तें सुखाचे सोहळे भोगणें । माउलिये दिठी ॥ ५८ ॥ तैसें तुझें हित आघवें । जंव जंव कां तुज फावे । तंव तंव आमुचें सुख दुणावे । ऐसें आहे ॥ ५९ ॥ आतां अर्जुना असो हे विकॅडी । मज उघड तुझी आवडी । म्हणोनि तृप्तीची सवडी । बोलतां न पडे ॥ ६० ॥ आम्हां येतुलियाचि कारणें । तेंचि तें तुजशीं बोलणें । परि असो हें अंतःकरणें । अवधान देईं ॥ ६१ ॥ तरी ऐकें ऐकें गा सुवर्म । वाक्य माझें परम । जें अक्षरें लेऊनि परब्रह्म । तुज खेवांसि आलें ॥ ६२ ॥ परी किरीटी तूं मातें । नेणसी ना निरुतें[११] । तरि तो गा जो मी एथें । तें विश्वचि हें ॥ ६३ ॥

न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः । अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥

अन्वयः—सुरगणाः च महर्षयः मे प्रभवं न विदुः, अहं हि देवानां च महर्षीणा सर्वशः आदि (अस्मि) ॥ २ ॥

( ३७३. देवर्षि–महर्षींनाही परमात्मा कळत नाहीं, ६४–७१ ) ऐथ वेद मुके जाहले । मन पवन पांगुळले । रातीविण मावळले । रविशशी जेथ ॥ ६४ ॥ अगा उदरींचा गर्भु जैसा । न देखे आपुलिये मातेची वयसा । मी आघवेया देवां तैसा । नेणवे कांहीं ॥ ६५ ॥ आणि जळचरां उदधीचें मान । मशका नोलंडवेचि गगन । तैवि महर्षीचें ज्ञान । न देखेचि मातें ॥ ६६ ॥ मी कवण पां केतुला । कवणाचा कैं जाहला । या निरुती[१३]करितां बोला । कल्प गेले ॥ ६७ ॥ कां जे महर्षी आणि देवां । येरां भूतजातां सर्वां । मी आदि म्हणोनि पांडवा । अवघड जाणतां ॥ ६८ ॥ उतरलें उदक पर्वत वळघे । जरी झाड वाढत मुळीं लागे । तरी

१ नव्या चाकावर. २ भरून येतो. ३ कंटाळूं नये. ४ लागवड. ५ रंगाची. ६ शुद्ध करणेंच. ७ अलंकारिक बोलणें. ८ शेवट. ९ अत्यंत मार्मिक. १० आलिंगन देण्यास. ११ खरोखर. १२ माझ्या स्वरूपाचे ठिकाणीं. १३ निश्चय.

" आम्हीं मागें ( नऊ अध्यायांत ) जें कांहीं सांगितलें, त्यांत आमच्या बोलण्याकडे तुझें लक्ष कितपत असतें हें पाहिलें; तों तें अपुरें नाहीं, पूर्ण आहे, अशी आमची खातरी झाली. ५० ज्याप्रमाणें नव्या मडक्यांत थोडें पाणी घालून तें गळत नाहीं अशी खातरी झाल्यावर तें पूर्ण भरतात, त्याप्रमाणें तुला आम्हीं थोडें ऐकविलें तों तें तुझ्या लक्षांत आहे अशी आमची खातरी झाल्यावरून तुला जास्तच ऐकवावें असें आम्हांस वाटूं लागलें. ५१ ज्याप्रमाणें एखादा नवीन चाकर ठेवल्यावर त्याची कसोटी पाहण्याकरिता त्याच्या जाण्यायेण्याच्या वाटेंत वाटेल तें टाकतात, व तें त्यानें आपल्याजवळ न ठेवतां मालकाच्या स्वाधीन केल्यावर त्याची जामदारखान्यावर नेमणूक करतात, त्याप्रमाणें अर्जुना, तूं आमच्या कसोटीस उतरल्यामुळें, तूं माझ्या ज्ञानाचें भांडारच झालास. " ५२ असें भाषण, अर्जुनाला पाहून सर्वेश्वर श्रीकृष्ण अत्यादरानें बोलले; ज्याप्रमाणें डोंगर पाहून मेघ भरून येतो, ५३ त्याप्रमाणें तो कृपासागर श्रीकृष्ण म्हणालाः—अर्जुना, पूर्वी सांगितलेलाच अभिप्राय तुला सांगतों. ५४ हें पहा, दर वर्षास शेत पेरीत असतां पीक जरी पुष्कळ येऊं लागलें, तरी त्याची लागवड करतांना कंटाळूं नये; ५५ अथवा, हे पाडुसुता, ज्याप्रमाणें वरचेवर ताव दिल्यानें सोन्याचा कस वाढतो, म्हणून सोनार ( आपल्या हिताकरितां ) तें जास्तीच शुद्ध करतो. ५६ त्याप्रमाणें, पार्था, हा अभिप्राय सांगण्यांत आम्ही तुझ्यावर मुळींच उपकार करीत नसून, आपल्या स्वार्थाकरितां पुढील भाग तुला सांगत आहों. ५७ ज्याप्रमाणें बालकाला दागिने घातले असतां त्यांचें सुख त्या बालकास काय असतें ? परंतु त्याचें खरें सुख त्याच्या आईच्या दृष्टीला होतें, ५८ त्याचप्रमाणें, जों जों तुला तुझें हित समजत जाईल, तों तों आमचें सुख दुप्पट वाढेल असें आहे. ५९ अर्जुना, आतां या बोलण्याच्या खुब्या राहूं दे; खरोखर माझें तुझ्यावर फार प्रेम आहे; म्हणून, मी तुझ्याशीं किती जरी बोललों तरी माझी तृप्ति होत नाहीं. ६० म्हणूनच आम्हांला तीच ती गोष्ट तुझ्याशीं बोलावी लागते. तर आमच्या बोलण्याकडे अंतःकरणपूर्वक लक्ष दे. ६१ हे मार्मिक अर्जुना, अत्युत्तम असें जें माझें वाक्य तें ऐक; तें वाक्य नसून अक्षररूपानें प्रत्यक्ष परब्रह्मच तुला आलिंगन देण्यास आलें आहे. ६२ परंतु, हे किरीटी, तूं खरोखर मला जाणत नाहींस ना ? तर जो मी तुला दिसतों आहें, तेंच हें सर्व विश्व ! ६३

*श्लोकार्थः—माझी उत्पत्ति देवगणाना ठाऊक नाहीं आणि महर्षींनाही ठाऊक नाहीं; कां कीं, मी सर्व प्रकारें देव आणि महर्षि यांचें आदिकारण आहें ॥ २ ॥*

हे माझें स्वरूप जाणण्याविषयीं वेदांची वाणी कुंठित झाली; मन व वायु यांची गति खुंटली; व माझ्या तेजामुळें, रात्र झाल्याशिवायच सूर्य व चंद्र हे मावळले. ६४ अरे, ज्याप्रमाणें उदरांतील गर्भ आपल्या मातेचें वय जाणण्यास असमर्थ असतो, त्याप्रमाणें, माझ्यापासून झालेले देव हे मला जाणण्यास समर्थ नाहींत; ६५ आणि जलचराना ज्या-

मिया झालेनि जगें । जाणिजे मातें ॥ ६९ ॥ कां गाभें वनें वटू गिंवसवे । जरी तरंगीं सागरु सांठवे । कां परमाणूमाजी सामावे । भूगोलु हा ॥ ७० ॥ तरी मियां जालिया जीवां । महर्षीं अथवा देवां । मातें जाणावया होआवा । अवकाशु गा ॥ ७१ ॥ ( ३७४. लोकमहेश्वराला जाणणारा सर्व पापांपासून मुक्त होतो; ७२–८० ) अवतरणः—ऐसाही जरी विपायें । सांडूनि पुढीलें पाये । सर्वेंद्रियांसि होये । पाठिमोरा जो ॥ ७२ ॥ प्रवर्तलाही वेगीं बहुडे । देह सांडूनि मागलीकडे । महाभूतांचिया चढे । माथयावरी ॥ ७३ ॥

यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् । असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३॥

अन्वयः—यः मां अजं, अनादिं च लोकमहेश्वरं वेत्ति, सः मर्त्येषु असंमूढः ( भूत्वा ) सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥

तेथ राहोनि ठायठिकें । स्वप्रकाशें चोखें । अजत्व माझें देखे । आपुलिया डोळां ॥ ७४ ॥ मी आदीसि परु । सकळलोकमहेश्वरु । ऐसिया मातें जो नरु । यापरी जाणे ॥ ७५ तो पाषाणामाजि परिसु । जैसा रसाआंत सिद्धरसु । तैसा मनुष्याआंत तो अंशु । माझाचि जाण ॥ ७६ ॥ तें चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ । येर माणुसपण तें भांबें । लौकिक भागु ॥ ७७ ॥ अगा अवचिता कापुरा- । माजीं सांपडला हिरा । वरि पडिलिया नीरा । नासवे कांहीं ॥ ७८ ॥ तैसा मनुष्यलोकाआंतु । तो जरी जाहला प्राकृतु । तऱ्ही प्रकृतिदोषाची मातु । नेणेचि कीं ॥ ७९ ॥ तो आपैसयेंचि सांडिजे पापीं । जैसा जळत चंदनु सर्पीं । तेविं मातें जाणे तो संकल्पीं । वर्जूनि धांपे ॥ ८० ॥ ( ३७५. परमात्म्याचे भाव, ८१–८६ ) अवतरणः—तेंचि आसुतें कैसें जाणिजे । ऐसें कल्पी जरी चित्त तुझें । तरी मी ऐसा हे माझे । भाव ऐकें ॥ ८१ ॥ जे वेगळालिया भूतीं । सारिखे होऊनि प्रकृती । विखुरले आहेति त्रिजगतीं । आघविये ॥ ८२ ॥

बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।
सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥
अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।
भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥

अन्वयः—बुद्धिः, ज्ञान, असंमोहः, क्षमा, सत्यं, दमः, शमः च सुखं, दुःखं, भवः, अभावः, भयं, अभयं एव च ॥४॥ अहिंसा, समता, तुष्टिः, तपः, दानं, यशः, अयशः ( इमे ) पृथग्विधाः भूतानां भावाः मत्तः एव भवंति ॥ ५ ॥

तेथ प्रथम जाण बुद्धि । मग ज्ञान जें निरवधि । असंमोह सहनसिद्धि । क्षमा सत्य ॥ ८३ ॥ मग शम दम दोन्ही । सुखदुःख वर्ते जें जनीं । अर्जुना

१ माझ्यापासून. २ झाडांतील अंकुरानें. ३ प्रवृत्तीकडील. ४ मागें फिरे. ५ निवृत्तीकडे. ६ ठिकाणीं. ७ आत्मप्रकाशानें. ८ पलीकडील. ९ अमृत. १० भ्रम. ११ विरघळत नाहीं. १२ घातला जातो.

प्रमाणें समुद्राचा अंत नसतो किंवा मशकाला आकाश ओलांडितां येत नाहीं, त्याप्रमाणें महर्षींचें ज्ञान मला ओळखूं शकत नाहीं. ६६ मी कोण, केवढा, कोणाचा, कोठें झालों, या गोष्टींचा निश्चय करतां करतां युगाचीं युगें लोटलीं. ६७ कारण अर्जुना, हे सर्व महर्षि, देव व इतर प्राणी या सर्वांचें मूळ मी असल्यामुळें, मला जाणणें त्यांना कठीण पडतें. ६८ जर पर्वतावरून खालीं आलेलें पाणी पुनः वर चढेल, अथवा झाड वाढत जातां जातां मुळाला लागेल, तर माझ्यापासून झालेलें जग मला जाणील. ६९ किंवा जर झाडांतील गाभा झाड व वन यांना कवटाळील, अथवा लाटांत समुद्र सांठवेल, तसेंच परमाणूंमध्यें भूगोला समावेश होईल, ७० तर माझ्यापासून झालेल्या जीवास, महर्षींस किंवा देवांस मला जाणतां येईल. ७१ याप्रमाणें जरी मी जाणण्यास कठीण आहें, तरी सहज चुकून जो कोणी प्रवृत्तीची वाट सोडून इंद्रियांना पाठमोरा होतो (इंद्रियें जिंकतो) ७२ व अशा रीतीनें मागें फिरल्यावर देह मागें सोडून जो पंचमहाभूतें स्वाधीन करून घेतो; ७३

श्लोकार्थः—जो मला उत्पन्न न होणारा, अनादि व सर्व लोकाचा अधिपति असें जाणतो, तो मनुष्यामध्यें ज्ञानी होऊन सर्व पापापासून मुक्त होतो ॥ ३ ॥

अशी मनाची स्थिति कायम झाल्यावर, निर्मळ आत्मप्रकाशानें त्याच्या डोळ्यांसमोर, उत्पत्तिरहित असें जें स्वरूप, तें त्याला दिसतें. ७४ मी सर्वांच्या आरंभाच्याही पलीकडचा आणि सर्वांत श्रेष्ठ आहें; अशा मला जो मनुष्य जाणील, ७५ तो दगडांत जसा परीस, किंवा रसांत जसें अमृत, तसा सर्व मनुष्यांत तो माझा अंश आहे असें समज. ७६ तो चालत्या बोलत्या ज्ञानाची केवळ मूर्ति, व त्याचे अवयव म्हणजे सुखाचे अंकुर; एरवीं लौकिकदृष्ट्या त्याचें जें मनुष्यपण, तो केवळ भ्रम होय. ७७ अरे, कापुरात अवचित हिरा सांपडला, आणि त्याच्यावर जरी पाणी पडलें, तरी तो ज्याप्रमाणें विरघळत नाहीं, ७८ त्याप्रमाणें तो जरी मनुष्यलोकांत राहात असला, तरी त्याला मायेपासून बाधा होत नाहीं; ७९ व आपलाच नाश होईल या भीतीनें त्याला पाप सोडतें. आपलें राहण्याचें स्थान जें चंदनाचें झाड, तें जर जळत असलें, तर सर्प त्याचा त्याग करतो; त्याप्रमाणें, जो मला जाणतो, त्याला सर्व संकल्प सोडतात. ८० तेंच मला कसें जाणावें, असें जर तुझ्या मनात येईल, तर मी कसा आहें व माझे विकार कोणते आहेत, ते ऐक. ८१ हे विकार निरनिराळ्या प्राण्यांत त्यांच्या त्यांच्या प्रकृतीसारखे बनून त्रिजगात पसरले आहेत. ८२

श्लोकार्थः—बुद्धि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, उत्पत्ति, विनाश, भय, अभय, ॥ ४ ॥ अहिंसा, समता, संतोष, तप, दान, यश व अपयश हे निरनिराळ्या प्रकारचे प्राण्याचे विकार माझ्यापासूनच होतात ॥ ५ ॥

त्या विकारात पहिली बुद्धि असें समज; मग अमर्याद ज्ञान, दक्षता, सहनशीलपणा, क्षमा व सत्य; ८३ मग मनोनिग्रह व इंद्रियनिग्रह हे दोन्ही. आणखी अर्जुना, जगातील

भावोभावें मानीं । भावाचिमाजीं ॥ ८४ ॥ पैं भय आणि निर्भयता । अहिंसा आणि समता । तुष्टि तप पंडुसुतां । ओळख तूं ॥ ८५ ॥ अगा दान यश अपकीर्ति । हे जे भाव सर्वत्र दिसती । ते मजचि पासूनि होती । भूतांचिया ठायीं ॥ ८६ ॥ ( ३७६. कांहीं मला जाणतात व कांहीं जाणत नाहींत, ८७–९० ) जैसीं भूतें आहातीं सिनानीं । तैसेचि हेही वेगळाले मानीं । एक उपजती माझ्या ज्ञानीं । एक नेणती मातें ॥ ८७ ॥ प्रकाश आणि कडवसें । हें सूर्याचिस्तव जैसें । प्रकाश उदयीं दिसे । तम अस्तुसीं ॥ ८८ ॥ आणि माझें जाणणें नेणणें । तें तंव भूतांचिया दैवाचें करणें । म्हणोनि भूतीं भावाचिया होणें । विषम पडे ॥ ८९ ॥ यापरी माझिया भावीं । हे जीवसृष्टि आघवी । गुंतली असे जाणावी । पंडुकुमारा ॥ ९० ॥ ( ३७७. परमात्म्याचे, सृष्टीचे पालनकर्ते असे अकरा भाव, ९१–१०३ ) अवतरण:—आतां इये सृष्टीचे पालक । जयां आधीन वर्तती लोक । ते अकरा भाव आणिक । सांगेन तुज ॥ ९१ ॥

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा । मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥६**

अन्वयः—पूर्वे सप्त महर्षयः तथा चत्वारः मनवः इमे मद्भावाः मानसाः जाताः; येषां इमाः प्रजाः लोकः ( अस्ति ) ॥ ६ ॥

तरी आघवाचि गुणीं वृद्ध । जे महर्षींमाजि प्रबुद्ध । कश्यपादि प्रसिध्द । सप्तर्षि ॥ ९२ ॥ आणिकही सांगिजतील । जे कां चौदाआंतुल मुदल ॥ स्वयंभू मुख्य वडिल । चारी मनु ॥ ९३ ॥ ऐसे हे अकरा । माझ्या मनीं जाहले धनुर्धरा । सृष्टीचिया व्यापारा- । लागोनियां ॥ ९४ ॥ जैं लोकांची व्यवस्था न पडे । जैं या त्रिभुवनाचें कांहीं न मांडे । तैं महाभूतांचें दळवाडें । अचुंबित असे ॥ ९५ ॥ तैंचि हे जाहले । मग इहीं लोक केले । तेथ अध्यक्ष रचूनि ठेविले । इहीं जन ॥ ९६ ॥ म्हणोनि अकराही हे राजा । मग येर जगीं यांचिया प्रजा । एवं विश्वविस्तारु हा माझा । ऐसेंचि जाण ॥ ९७ ॥ पाहें पां आरंभीं बीज एकलें । मग तेंचि विरूढलिया बूड जाहालें । बुडीं कोंभ निघाले । खांदियांचे ॥ ९८ ॥ खांदियांपासूनि अनेका । फुटलिया नाना शाखा । शाखांस्तव देखा । पल्लव पानें ॥ ९९ ॥ पल्लवीं फूल फळ । एवं वृक्षत्व जाहालें सकळ । तें निर्धारितां केवळ । बीजचि आघवें ॥ १०० ॥ तैसें मी एकचि पहिलें । मग मी तेंचि मनातें व्यालें । तेथ सप्तऋषि आणि जाहाले । चारी मनु ॥ १ ॥ इहीं लोकपाळ केले । लोकपाळीं विविध लोक सृजिले । लोकांपासूनि निपजलें । प्रजाजात ॥ २ ॥ ऐसेनि हें विश्व येथें । मीचि विस्तारिलोंसें निरुतें । परी भावांचेनि हातें । माने जया ॥ ३ ॥

१ जन्म. २ नाश. ३ संतोष. ४ निराळीं. ५ अंधार. ६ अस्तमानीं. ७ निरनिराळे. ८ कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि व वसिष्ठ. ९ स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम व

सुखदुःख व जन्ममरण हेही विकारच आहेत असें समज. ८४ पांडुसुता, भीति आणि निर्भयपणा, अहिंसा आणि सुखदु.ख, समता, संतोप आणि तप हेही भावच आहेत असें समज. ८५ अरे, सर्व भूताच्या ठिकाणीं दान, यश, अपकीर्ति हे जे भाव दृष्टीस पडतात, ते माझ्याचपासून भूतांचे ठिकाणीं उत्पन्न होतात. ८६ जशीं भूतें निरनिराळीं आहेत, तसे हे विकारही वेगळाले आहेत असें समज. त्यापैकीं कांहींना माझें ज्ञान होतें, व कांहींना होत नाहीं. ८७ ज्याप्रमाणें प्रकाश व अंधार हीं सूर्यापासूनच उत्पन्न होतात; प्रकाश उदयाबरोबर व अंधार अस्तमानाबरोबर ( दृष्टीस पडतो ) ; ८८ त्याप्रमाणें, माझें ज्ञान होणें अगर न होणें हें प्राण्याच्या कर्माचें फळ आहे; म्हणूनच त्याच्या ठिकाणीं निरनिराळे विकार प्राप्त होतात. ८९ याप्रमाणें अर्जुना, ही सर्व जीवसृष्टि माझ्याच विकारांनीं भरलेली आहे असें समज. ९० आतां, जे या सृष्टीचे पालक आहेत, आणि ज्यांच्या आज्ञेनें सर्व लोक वर्तन करतात, असे आणखी अकरा भाव आहेत, ते तुला सांगतों. ९१

*श्लोकार्थः—प्राचीन ( भृगु आदिकरून ) सात महर्षि आणि ( सावर्णादिक ) चार मनु हे माझ्या सामर्थ्यानें युक्त असे माझ्या मनापासून उत्पन्न झाले; व त्यांच्यापासूनच या सर्व जगांतील लोकाची उत्पत्ति झाली ॥ ६ ॥*

तर सर्व गुणांनीं युक्त व महर्षींत ज्ञाते असे जे कश्यपादि प्रख्यात सात ऋषि आहेत, ९२ व आणखी जे चौदा मनु आहेत, त्यातील स्वायंभुवादि मुख्य जे चार ते तुला सागतों. ९३ हे धनुर्धरा, असे हे अकरा भाव सृष्टीच्या उत्पत्तीकरितां माझ्या मनापासून उत्पन्न झालेले आहेत. ९४ जेव्हां लोकांची व्यवस्था लागली नव्हती, व त्रिभुवनाची रचना झाली नव्हती, तेव्हां पंचमहाभूतांचे समुदाय कार्य केल्याशिवाय जागचे जागींच स्तब्ध होते. ९५ तेव्हा हे ( सात ऋषि व चार मनु ) उत्पन्न झाले, व त्यांनीं अष्टलोकपाल उत्पन्न करून त्यांना सर्व जगतांत मुख्य करून ठेवलें. ९६ म्हणून हे अकराजण राजाप्रमाणें असून इतर सर्व जग त्यांची प्रजा आहे; व अशा प्रकारें हा विश्वविस्तार माझाच आहे असें समज. ९७ हें पहा, पहिल्या प्रथम बीज एक असतें, मग तेंच वाढल्यावर त्याचें बूड बनतें, व बुडाला कोम निघूं लागून त्याच्या खाद्या होतात. ९८ खाद्यापासून पुष्कळ फांटे फुटून त्यांना कोमल पल्लव येतात, ९९ आणि त्या पानांना फुलें व फळें येतात. याप्रमाणें सर्व झाड बनल्यावर तें कारणदृष्टीनें पाहूं लागल्यास सर्व बीजच आहे असें सिद्ध होतें; १०० त्याचप्रमाणें, मूळारंभीं मी एकटाच होतों. नंतर मजपासून मन उत्पन्न झालें, व त्या मनापासून सात ऋषि आणि चार मनु उत्पन्न झाले. १ त्यांच्यापासून इंद्रादि अष्टलोकपाल उत्पन्न झाले, व लोकपालांनीं पुष्कळ प्रकारचे लोक उत्पन्न केले; आणि त्या लोकांपासून सर्व प्राणी उत्पन्न झाले. २ याप्रमाणें खरोखर सर्व विश्वाचा विस्तार मीच झालों आहें; परंतु हें ज्याला या युक्तीनें मान्य आहे, त्यालाच समजणार आहे. ३

*तामस. १० उत्पत्तीकरितां. ११ समुदाय. १२ स्तब्ध. १३ इंद्रादिक. १४ कारणदृष्टीनें. १५ बहुत प्रकारचें व्हावें ही इच्छा. १६ युक्तीच्या.*

एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ।
सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥

अन्वयः—यः मम एतां विभूतिं च योगं तत्त्वतः वेत्ति, सः अविकंपेन योगेन युज्यते, अत्र संशयः न ( अस्ति ) ॥ ७ ॥

( ३७८. विभूतियोग यथार्थ जाणतो तो मत्स्वरूपाला प्राप्त होतो, १०४-१०८ ) यालागीं सुभद्रापती । हे भाव इया माझिया विभूती । आणि यांचिया व्याप्ती । व्यापिलें जग ॥ ४ ॥ म्हणोनि गा यापरी । ब्रह्मादि पिपीलिकावरी । मीवांचूनि दुसरी । गोठीच नाहीं ॥ ५ ॥ ऐसें जाणे जो साचें । तया चेयिरें जाहालें ज्ञानाचें । म्हणोनि उत्तमाधम भेदाचें । दुःस्वप्न न देखे ॥ ६ ॥ मी माझिया विभूती । विभूतीं अधिष्ठिलिया व्यक्ती । हें आघवें योगप्रतीती । एकचि मानी ॥ ७ ॥ म्हणोनि निःशंकें येणें महायोगें । मज मीनले मनाचेनि आंगें । एथ संशय करणें न लगे । तो त्रिशुद्धी जाहला ॥ ८ ॥ ( ३७९. अभेदभक्ति करणारा मध्येंच मेला तर तो मत्स्वरूपाला प्राप्त होतो, १०९-११० ) कां जे ऐसें किरीटी । मातें भजे जो अभेदा दिठी । तयाचिये भजनाचे नाटीं । सूती मज ॥ ९ ॥ अवतरणः—म्हणऊनि अभेदें जो भक्तियोगु । तेथ शंका नाहीं नये खंगु । करितां ठेला तरी चांगु । तें सांगितलें षष्ठीं ॥ ११० ॥ ( ३८० अभेदभक्तियोगाचें लक्षण, १११–११८ ) तोचि अभेदु कैसा । हें जाणावया मानसा । सोंद झाली तरी परियेसा । बोलिजेल ॥ ११ ॥

अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते । इति मत्वा भजंते मां बुधा भावसमन्विताः ॥८

अन्वयः–अहं सर्वस्य प्रभवः (अस्मि); मत्तः सर्वं प्रवर्तते, इति मत्वा बुधाः भावसमन्विताः (संतः) मां भजंते ॥ ८ ॥

तरि मीचि एक सर्वा । या जगा जन्म पांडवा । आणि मजचिपासूनि आघवा । निर्वाहो यांचा ॥ १२ ॥ कल्लोळमाळा अनेगां । जन्म जळींचि पैं गा । आणि तयां जळचि आश्रयो तरंगां । जीवनही जळ ॥ १३ ॥ ऐसें आघवाचि ठायीं । तयां जळचि जेवीं पाहीं । तैसा मीवाचूनि नाहीं । विश्वीं इये ॥ १४ ॥ ऐसिया व्यापका मातें । मानूनि जे भजती भलतेथें । परि साचोकारें उदितें । प्रेमभावें ॥ १५ ॥ देश काळ वर्तमान । आघवें मजसीं करूनि अभिन्न । जैसा वायु होऊनि गगन । गगनींचि विचरे ॥ १६ ॥ ऐसेनि जे निजज्ञानी । खेळत सुखें त्रिभुवनीं । जगद्रूपा मनीं । सांठवूनि मातें ॥ १७ ॥ जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत । हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥ १८ ॥

मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् । कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ ९ ॥

अन्वयः—मच्चित्ताः मद्गतप्राणाः परस्परं मां बोधयंतः च मां कथयंतः नित्य तुष्यंति च रमंति ॥ ९ ॥

श्लोकार्थः—हा माझा विस्तार व तो उत्पन्न करण्याचें चातुर्य जो खरोखर जाणतो, तो पूर्ण ज्ञानी होतो यांत संशय नाहीं ॥ ७ ॥

यास्तव हे सुभद्रापते, हे माझे ( वीस ) भाव व ( अकरा ) विभूति यांनीं सर्व जग व्यापलें आहे. ४ म्हणून, ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत याप्रमाणें माझ्याशिवाय दुसरी गोष्टच नाहीं. ५ हें जो खरोखर जाणतो, त्याला ज्ञानाची जागृति होते; म्हणूनच उत्तम व वाईट अशा प्राण्यांतील भेदाचें त्याला स्वप्नही पडत नाहीं. ६ मी, माझ्या विभूति व माझ्या विभूतींनीं युक्त असलेले प्राणी हा योगानुभव हें सर्व एकच आहे असें समज; ७ म्हणून, खरोखर जो या ज्ञानयोगानें मनोभावेंकरून मद्रूप झाला, तो कृतार्थ झाला यात संशय नाहीं. ८ कारण अर्जुना, अभेददृष्टीनें जो मला भजतो, त्याच्या भजनाच्या छंदानें मी त्याच्या पाशांत पडतों; ९ म्हणून जो माझ्या ठिकाणीं अभेदबोधानें भक्ति करतो, त्याला माझ्या प्राप्तीमध्यें खरोखर व्यत्यय येत नाहीं व अशी भक्ति करीत असता जरी तो मरण पावला, तरी तेंही उत्तमच आहे हें सहावे अध्यायात पूर्णपणे सांगितलेंच आहे. ११० ती अभेदभक्ति कशी असते हें जाणण्याची जर तुझ्या मनांत इच्छा झाली असेल, तर सांगतों ऐक. ११

श्लोकार्थः—मी सर्वांचा उत्पादक आहें, व माझ्याचपासून सर्व प्रवृत्त होतें, असें जाणून ज्ञाते जन श्रद्धायुक्त होत्साते मला भजतात ॥ ८ ॥

अर्जुना, या सर्व जगाचा उत्पन्नकर्ता व पालनकर्ताही मीच आहे. १२ अरे, ज्याप्रमाणें लाटांचा जन्म पाण्यातच होतो, त्यांना आश्रय पाण्याचाच असतो, त्यांचें जीवनही पाणीच असतें; १३ आणि याप्रमाणें त्याना जसें सर्व ठिकाणीं पाणीच आहे, त्याप्रमाणें या सर्व विश्वांत माझ्याशिवाय दुसरें काहीं नाहीं. १४ अशा प्रकारें मी सर्वव्यापक आहें असे मानून जे खऱ्या उत्कंठेनें व प्रेमभावानें वाटेल त्या ठिकाणीं मला भजतात; १५ देशकालवर्तमान या सर्वांपासून मी भिन्न नाहीं ( असें जे जाणतात ), वायु हा आकाशरूप होऊन आकाशातच संचार करतो, १६ त्याप्रमाणें, जे आत्मज्ञानी सर्वव्यापक असा जो मी, त्या मला मनात आठवून सुखानें त्रिभुवनांत कालक्रमणा करतात, १७ आणि जो जो प्राणी दृष्टीस पडेल, त्याला त्याला ईश्वर समजतात. हा माझा खरा ' भक्तियोग ' आहे असें समज. १८

श्लोकार्थः—ज्ञानी माझ्या ठिकाणीं चित्त ठेवून व माझ्या ठिकाणीं जीव लावून, एकमेकाला माझ्याविषयीं बोध करून माझें कीर्तन करीत सर्व काळ संतोष मानून माझे ठिकाणीं रममाण होतात ॥ ९ ॥

जे आपलें चित्त मद्रूप करतात, व माझ्याच योगानें ज्यांचे प्राण संतोष पावतात,

१ वीस विकार. २ अकरा विभूति. ३ मुंगीपर्यंत. ४ जागृति. ५ अनुभव. ६ ज्ञानयोगानें. ७ कृतार्थ झाला. ८ छंदानें ९ पाशांत पाडतात. १० व्यत्यय, ११ इच्छा. १२ आत्मज्ञानी.

(३८१. महात्मे पुरुष जगांत कसे वावरतात, ११९–१२८) चित्तें मीचि जाहाले। मियांचि प्राणें धाले। मग जीवों मरों विसरले। बोधाचिया भुली॥१९॥ मग तया बोधाचेनि माजें। नाचती संवादसुखाचीं भोजें[1]। आतां एकमेकां घेपे दीजे। बोधाचिवरी॥ १२०॥ जैशीं जवळिकेचीं सरोवरें। उचंबळलिया कालवती परस्परें। मग तरंगांसी घवळारें[2]। तरंगाचि होती॥ २१॥ तैसी येरयेरांचिये मिळणीं। पडत आनंदकल्लोळांची वेणी। तेथें बोध बोधाचीं लेणीं। बोधेंचि मिरवी॥ २२॥ जैसें सूर्यें सूर्यातें वोंवाळिलें। कीं चंद्रें चंद्रम्या क्षेम दिधलें। ना तरी सरिसेनि पाडें मीनले। दोन्ही वोघ॥ २३॥ तैसें प्रयाग होत सामरस्याचें। वरी वोसाण तरत सात्विकाचें। ते संवादचतुष्पथींचे[3]। गणेश जाहाले॥ २४॥ तेव्हां तया महासुखाचेनि भरें। धांवोनि देहाचिये गांवा बाहेरें। मियां धाले तेणें उद्गारें। लागती गाजों॥ २५॥ पैं गुरुशिष्यांचिया एकांतीं। जे अक्षरा एकाचि वदती। ते मेघाचियापरी त्रिजगतीं। गर्जती संघ॥ २६॥ जैसी कमळकळिका जालेपणें[4]। हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे। दे राया रंका पारणें। आमोदाचें॥ २७॥ तैसेंचि मातें विश्वीं कथित। कथितेनि तोषें कथूं विसरत। मग तया विसरामाजि विरेत[5]। आंगें जीवें॥ २८॥ ऐसे प्रेमाचेनि बहुवसपणें[6]। नाहीं राती दिवो जाणणें। केलें माझें सुख अव्यंगवाणें[7]। आपणपेयां जिहीं॥ २९॥

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्। ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते॥१०॥**

अन्वयः—(एवं) सततयुक्तानां प्रीतिपूर्वकं भजतां तेषां, येन ते मां उपयांति तं बुद्धियोगं अहं ददामि॥ १०॥

(३८२. सतत भक्ति करणाराला भक्तियोगप्राप्ति, १३०–१४०) तयां मग जें आम्हीं कांहीं। द्यावें अर्जुना पाहीं। ते ठायींचीच तिहीं। घेतली सेलें[8]॥१३०॥ कां जे ते जिया वाटा। निघाले गा सुभटा। ते सोय पाहोनि अव्हांटा[9]। स्वर्गापवर्ग॥३१॥ म्हणोनि तिहीं जें प्रेम धरिलें। तेंचि आमुचें देणें उपाइलें[10]। परि आम्हीं देयावें तेंही केलें। तिहीं म्हैणियें[11]॥३२॥ आतां यावरी येतुलें घडे। जे तेंचि[12] सुख आगळें वाढे। आणि काळाची दृष्टि न पडे। हें आम्हां करणें॥३३॥ लळेयाचिया बाळका किरीटी। गवसणी करूनि स्नेहाची दिठी। जैसी खेळतां पाठोपाठीं। माउली धांवे॥ ३४॥ तें जो जो खेळ दावी। तो तो पुढें सोनियाचा करूनि ठेवी। तैसी उपास्तीची पदवी। पोषित मी जायें॥ ३५॥ जिये पदवीचेनि पोषकें। ते मातें पावती यथासुखें। हें पाळिती मज विशेखें[13]। आवडे करूं॥ ३६॥ पैं गा

१ फौतुकानें. २ पुरात वाहणारीं लाकडें, केरकचरा इत्यादि. ३ चव्हाट्यावरचे. ४ फुलल्यामुळें ५ रममाण होतात. ६ आधिक्यानें. ७ पूर्ण. ८ शेलका, हिस्सा. ९ उत्पन्न झालें. १० आज्ञाधारक. ११ तें प्रेमसुख. १२ गोजिरवाणा; उत्तम. १३ राखण.

ते मग ज्ञानाच्या भुलीनें जन्ममरणास विसरतात. १९ नंतर ज्ञानाचा माज येऊन ते कौतुकानें संवादसुखात नाचूं लागल्यावर, एकमेकांला देणें व घेणें म्हणजे ज्ञानाशिवाय दुसरें कांहींच नसतें, १२० ज्याप्रमाणें, जवळ जवळ असलेले तलाव पाण्यानें भरून गेल्यावर त्यांचें पाणी एकमेकांत मिसळतें आणि मग लाटांना लाटाच आश्रयभूत होतात, २१ त्याप्रमाणें, ज्ञानी एके ठिकाणीं मिळाल्यावर ब्रह्मानंदरूपी लाटा एकात एक मिसळतात; त्या ठिकाणीं आत्मबोध हा आत्मबोधाला आत्मबोधाचाच अलंकार घालून मिरवतो! २२ ज्याप्रमाणें सूर्यानें सूर्यालाच ओंवाळावें, किंवा चंद्रानें चंद्रालाच आलिंगन द्यावें, अथवा योग्यतेनें सारखे असे दोन ओघ एकमेकात मिळावे, २३ त्याचप्रमाणें ब्रह्मैक्याच्या संगमाने पूर येऊन त्यात अष्टसात्विकभावरूपी केरकचरा तरंगून आला, म्हणजे ते ज्ञाते संवादरूप चव्हाट्यावरील गणपति बनतात. २४ तेव्हां त्या ब्रह्मानंदाच्या भरांत देहरूप गांवाच्या बाहेर धावूं लागून माझ्या प्राप्तीमुळें संतोष झाला अशी मोठ्यानें गर्जना करूं लागतात. २५ गुरुशिष्याच्या एकांतांत जो एकाक्षरी मंत्र सांगावयाचा, तो सर्वजण मेघाप्रमाणें तिन्ही लोकात गर्जना करून सांगतात. २६ ज्याप्रमाणें कमळाची कळी विकसित झाल्यावर आपल्यातील मकरंद झाकूं शकत नाहीं, आणि राजापासून रंकापर्यंत सर्वांना आपल्या वासाची मेजवानी करते, २७ त्याप्रमाणें, जगतात माझे गुण गाऊन गाण्याच्या भरांत ते स्तब्ध राहतात, व त्या स्थितींत त्यांचा जीवभाव व देहभाव हे दोन्ही हारपतात; २८ आणि अशा प्रेमभरांत ते रात्र व दिवस जाणत नाहींत. अशा प्रकारें जे आत्मत्वानें माझें सुख परिपूर्ण घेतात, २९

श्लोकार्थः—याप्रमाणें नेहमीं माझे ठिकाणीं तत्पर असलेले व प्रीतिपूर्वक मला भजणारे जे ज्ञानी, ते ज्या योगानें मला मिळतील असा बुद्धियोग मी त्यांना देतों ॥ १० ॥

त्यांना, अर्जुना, आम्ही जें कांहीं द्यावयाचें, त्या ठिकाणाचा शेलकाच वांटा ते घेतात. १३० कारण अर्जुना, ते ज्या मार्गानें माझ्याकडे येण्यास निघाले, त्या मार्गाच्या दृष्टीनें स्वर्ग व मोक्ष ह्या आडवाटा असें वाटतें; ३१ म्हणून त्यानीं माझ्या ठिकाणीं जी भक्ति केली त्या भक्तीमुळें त्यांना कांहीं द्यावें असे मला वाटलें; परंतु मीं जें कांहीं त्यांस द्यावयाचें, तें त्यांनीं होऊनच आपल्या आधीन करून घेतलें. ३२ आतां माझ्या भक्तीचें जें प्रेमसुख, तें जास्त वाढवावें व अशा माझ्या भक्तांवर काळाची दृष्टि न पडावी, याविषयीं मला जपलें पाहिजे, एवढेंच माझें कर्तव्य आहे. ३३ हे किरीटी, ज्याप्रमाणें लाडकें लेकरूं खेळत असतां आई त्याजवर प्रेमदृष्टि ठेवून त्याच्या मागोमाग धावते, ३४ व तें जों जों एक एक नवीन खेळ खेळेल, त्या त्याप्रमाणें त्याला सोन्याचे पदार्थ करून ठेवते, त्याप्रमाणें माझ्या भक्ताच्या उपासनेचे संप्रदाय मला वाढवावे लागतात. ३५ जे संप्रदाय वाढविल्यानें माझे भक्त मला सहज येऊन मिळतात, ते विशेषेंकरून वाढवावे

( ३८१. महात्मे पुरुष जगांत कसे वावरतात, ११९–१२८ ) चित्तें मीचि जाहाले । मियांचि प्राणें धाले । मग जीवों मरों विसरले । बोधाचिया भुली ॥११९॥ मग तया बोधाचेनि माजें । नाचती संवादसुखाचीं भोजें[1] । आतां एकमेकां घेपे दीजे । बोधाचिवरी ॥ १२० ॥ जैशीं जवळिकेचीं सरोवरें । उचंबळलिया कालवती परस्परें । मग तरंगांसी घवळारें । तरंगाचि होती ॥ २१ ॥ तैसी येरयेरांचिये मिळणीं । पडत आनंदकल्लोळांची वेणी । तेथें बोध बोधाचीं लेणीं । बोधेंचि मिरवी ॥ २२ ॥ जैसें सूर्यें सूर्यातें ओंवाळिलें । कीं चंद्रें चंद्रम्या क्षेम दिधलें । ना तरी सरिसेनि पाडें मीनले । दोन्ही वोध ॥ २३ ॥ तैसें प्रयाग होत सामरस्याचें । वरी वोसाण तरत सात्विकाचें । ते संवादचैतुष्पथींचे । गणेश जाहाले ॥ २४ ॥ तेव्हां तया महासुखाचेनि भरें । धांवोनि देहाचिये गांवा बाहेरें । मियां घाले तेणें उद्गारें । लागती गाजों ॥ २५ ॥ पैं गुरुशिष्यांचिया एकांतीं । जे अक्षरा एकाचि वदती । ते मेघाचियापरी त्रिजगतीं । गर्जती संघ ॥ २६ ॥ जैसी कमळकळिका जालेपणें । हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे । दे राया रंका पारणें । आमोदाचें ॥ २७ ॥ तैसेंचि मातें विश्वीं कथित । कथितेनि तोषें कथूं विसरत । मग तया विसरामाजि विरेत । आंगें जीवें ॥ २८ ॥ ऐसे प्रेमाचेनि वहुवसपणें । नाहीं राती दिवो जाणणें । केलें माझें सुख अव्यंगवाणें । आपणपेयां जिहीं ॥ २९ ॥

तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् । ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥१०॥

अन्वयः—( एवं ) सततयुक्तानां प्रीतिपूर्वकं भजतां तेषां, येन ते मां उपयांति तं बुद्धियोगं अहं ददामि ॥ १० ॥

( ३८२. सतत भक्ति करणाराला भक्तियोगप्राप्ति, १३०–१४० ) तयां मग जें आम्हीं कांहीं । द्यावें अर्जुना पाहीं । ते ठायींचीच तिहीं । घेतली सेलें ॥१३०॥ कां जे ते जिया वाटा । निघाले गा सुभटा । ते सोय पाहोनि अव्हांटा । स्वर्गापवर्ग ॥३१॥ म्हणोनि तिहीं जें प्रेम धरिलें । तेंचि आमुचें देणें उपाइलें । परि आम्हीं देयावें तेंही केलें । तिहीं म्हणियें ॥३२॥ आतां यावरी येतुलें घडे । जे तेंचि सुख आगळें वाढे । आणि काळाची दृष्टि न पडे । हें आम्हां करणें ॥३३॥ ललेयाचिया बाळका किरीटी । गवसणी करूनि स्नेहाची दिठी । जैसी खेळतां पाठोपाठीं । माउली धांवे ॥ ३४ ॥ तें जो जो खेळ दावी । तो तो पुढें सोनेयाचा करूनि ठेवी । तैसी उपास्तीची पदवी । पोषित मी जायें ॥ ३५ ॥ जिये पदवीचेनि पोषकें । ते मातें पावती यथासुखें । हें पौंळती मज विशेखें । आवडे करूं ॥ ३६ ॥ पैं गा

१ कौतुकानें. २ पुरात वाहणारीं लाकडें, केरकचरा इत्यादि. ३ चव्हाट्यावरचे. ४ फुलल्या-मुळें ५ रममाण होतात. ६ आधिक्यानें. ७ पूर्ण. ८ शेलका, हिस्सा. ९ उत्पन्न झाले. १० आज्ञाधारक. ११ तें प्रेमसुख. १२ गोजिरवाणा; उत्तम. १३ राखण.

असें मला वाटतें. ३६ भक्तांना माझी आवड असल्यामुळे मला त्याच्या एकनिष्ठेने प्रेम उत्पन्न होतें; कारण, माझ्या घरीं प्रेमळ भक्ताची फार उणीव आहे. ३७ हें पहा, वरवर भक्ति करणारासाठीं स्वर्ग व मोक्ष असे दोन मार्ग उत्पन्न केले आहेत आणि लक्ष्मीसह मी आपले शरीर शेषाचे स्वाधीन केलें आहे; ३८ परंतु आत्मत्वावांचून जें एक नाजूक सुख, तें प्रेमळ भक्ताकरितां तसेंच राखून ठेविलें आहे. ३९ अर्जुना, इतके आम्ही प्रेमळ भक्तांना आपल्या जवळ करितों. ह्या गोष्टी बोलून दाखविण्यासारख्या नाहींत, तर अनुभवानें समजणाऱ्या आहेत. १४०

श्लोकार्थः—त्याच्यावर अनुग्रह करण्याकरताच त्याच्या बुद्धीमध्यें वास करून, सुप्रकाशित ज्ञानदीपाच्या योगानें मी अज्ञानजन्य अंधकाराचा नाश करतों ॥ ११ ॥

म्हणून, आत्मा जो मी, त्या माझी भक्ति हेंच आपल्या जीवनास कारण करून ज्यानीं माझ्याशिवाय इतर सर्व वस्तु व्यर्थ मानल्या, ४१ त्या शुद्ध आत्मज्ञान्यांकरितां मी कापुराची मशाल पाजळून मशालजी बनून त्याचे पुढें पुढें चालतों. ४२ अज्ञानरूप रात्रींत जमलेल्या गर्द अंधाराचा नाश करून त्या भक्तांकरितां मी नेहमीं ज्ञानरूपी सूर्योदय करतों. ४३ प्रेमळ भक्तांना प्रिय असा पुरुषोत्तम जेव्हा याप्रमाणें बोलला तेव्हा अर्जुन म्हणाला, " देवा, माझे सर्व मनोरथ शात झाले ! ४४ हें पहा महाराज, आपण माझ्यावरील संसाररूपी केर चागला झाडून टाकला; आणि प्रभो, त्यामुळें मी पुनर्जन्मापासून मुक्त झालों ! ४५ अहो, माझें जन्म मीं आपल्या डोळ्यानीं पाहिलें, व माझें जीवित आज माझ्या हातीं आलें असें मला वाटतें. ४६ प्रभो, आपल्या मुखातून हें बोलणें ऐकून माझ्या आयुष्याचें सार्थक झालें आणि माझ्या दैवाचा भाग्योदय झाला ! ४७ आतां या वचनरूप सूर्यानें माझ्या अंतर्बाह्य अज्ञानांधकाराचा नाश झाला; म्हणून, प्रभो तुमचें यथार्थ स्वरूप मला दिसूं लागलें. ४८

श्लोकार्थः—अर्जुन म्हणालाः–देवा, तुम्ही सर्वश्रेष्ठ ब्रह्म, उत्तम स्थान आणि परम पवित्र असे आहां. आपण निरतर असणारे, तेजस्वी, सर्व देवाचे आदि, न उत्पन्न होणारे व सर्वव्यापक आहा. १२

" तरी कृष्णा, आपण परब्रह्म आहां व सर्व महाभूतांचें विश्रांतिस्थान असून पवित्र आणि सर्व जगाचे पालनकर्ते आहां. ४९ तुम्ही ब्रह्मा, विष्णु व महेश या तिघांचें आदिदैवत आहां. देवा, पंचविसावें तत्त्व जो पुरुष तो तूंच, आणि मायेच्या पलीकडील जो दिव्य भाव, तोही तूंच. १५० हे स्वामी, तुम्ही अनादिसिद्ध असून, तुम्हांला जन्मादि धर्म नाहींत; असे तुम्ही आहां असें मला आतां समजलें. ५१ तुम्ही तीन कालाचे चालक आहां. तुम्ही जीवकलेची मुख्य देवता आहां, व तुम्ही ब्रह्मांडास आश्रयभूत आहां असें आतां मला स्पष्ट कळलें. ५२

८ पलीकडे. ९ शात झालों. १० मातेचें उदर. ११ घर. १२ सार्थक. १३ वचनरूपी सूर्यानें. १४ मायेच्या विकाराच्या. १५ सूत्रधार. १६ मुख्य देवता. १७ ब्रह्मांडरूप कढईला धारण करणारा.

भक्तासि माझें कोड । मज तयाचे अनन्यगतीची चाड । कां जे प्रेमळाचें सांकड । आमुचिया घरीं ॥ ३७ ॥ पाहें पां स्वर्ग मोक्ष उपायिले । दोन्ही मार्ग तयांचिये वाहणी केले । आम्हीं आंगही शेखीं वोंचेलें । लक्ष्मियेसी ॥ ३८ ॥ परि आपणपेंवीण जें एक । तें तैसेंचि सुख साजुक । सप्रेमालागीं देख । ठेविलें जतन ॥३९॥ हा ठायवरी किरीटी । आम्ही प्रेमळ घेवों आपणयासाठीं । या वोलीं वोलाविया गोष्टी । तैसिया नव्हती गा ॥ १४० ॥

तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः । नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥११॥

अन्वयः--तेषाम् एव अनुकंपार्थं अहं आत्मभावस्थः ( सन् ) भास्वता ज्ञानदीपेन अज्ञानजं तमः नाशयामि ॥ ११ ॥

( ३८३. अज्ञानतमाचा नाश ज्ञानदीपानें होतो, १४१–१४४ ) म्हणोनि मज आत्मयाचा भावो । जिहीं जियावया केला ठावो । एक मीवांचूनि वावो । येर मानिलें जिहीं ॥ ४१ ॥ तयां तत्वज्ञां चोखटां । दिवी पोतैंाची सुभटा । मग मीचि होऊनि दिवटा । पुढां पुढां चाले ॥ ४२ ॥ अज्ञानाचिये राती- । माजि तमाची मिळणी दाटती । ते नाशूनि घालीं परौती । तयां करीं नित्योदयो ॥ ४३ ॥ ऐसें प्रेमळाचेनि प्रियोत्तमें । बोलिलें जे पुरुषोत्तमें । अर्जुन उवाचः—तेथ अर्जुन मनोधर्में । निवालों म्हणतसे ॥ ४४ ॥ ( ३८४. भगवत्स्वरूपाचें वर्णन, भगवत्कृपेचें वर्णन, १४५–१४८ ) हांहो जी अवधारा । भला केरु फेडिला संसारा । जाहलों जननीजेंठरजोहरीं । वेगळा प्रभू ॥ ४५ ॥ जी जन्मलेपण आपुलें । हें आजि मियां डोळां देखिलें । जीवित हाता चढलें । आवडे तैसे ॥ ४६ ॥ आजि आयुष्या उंजवण जाहली । माझिया दैवा दशा उदयली । जे वाक्यकृपा लाधली । दैविकेनि मुखें ॥ ४७ ॥ आतां येणें वचनतेजाकारें । फिटलें आंतील बाहेरील आंधारें । म्हणोनि देखतसें साचोकारें । स्वरूप तुझें ॥ ४८ ॥

परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् । पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥१२

अन्वयः—भवान् परं ब्रह्म, परं धाम, परमं पवित्रं, पुरुषं, शाश्वतं, दिव्यं, आदिदेवं, अजं, विभुं ॥ १२ ॥

( ३८५. परब्रह्मरूप जाणल्याचें वर्णन, १४९–१५२ ) तरी होसी गा तूं परब्रह्म । जें या महाभूतां विसंवतें धाम । पवित्र तूं परम । जगन्नाथा ॥ ४९ ॥ तूं परम दैवत तिहीं देवां । तूं पुरुष जी पंचविसावा । दिव्य तूं प्रकृतिभावा- । पैलीकडील ॥ १५० ॥ अनादिसिद्ध तूं स्वामी । जो नाकळिजसी जन्मधर्मीं । तो तूं हें आम्हीं । जाणितलें आतां ॥ ५१ ॥ तूं या कालत्रयासि सूत्री । तूं जीवकळेची अधिष्ठात्री । तूं ब्रह्मकटाहयंत्री । हें कळलें फुडें ॥ ५२ ॥

१ उणीव. २ साठीं. ३ शेवटीं. ४ लक्ष्मीसह. ५ प्रेमळ भक्ताला. ६ मशाल. ७ कापुराची.

असें मला वाटतें. ३६ भक्तांना माझी आवड असल्यामुळें मला त्यांच्या एकनिष्ठेनें प्रेम उत्पन्न होतें; कारण, माझ्या घरीं प्रेमळ भक्तांची फार उणीव आहे. ३७ हें पहा, बरबर भक्ति करणारासाठीं स्वर्ग व मोक्ष असे दोन मार्ग उत्पन्न केले आहेत आणि लक्ष्मीसह मी आपलें शरीर शेषाचे स्वाधीन केलें आहे; ३८ परंतु आत्मत्वावांचून जें एक नाजूक सुख, तें प्रेमळ भक्तांकरितां तसेंच राखून ठेविलें आहे. ३९ अर्जुना, इतके आम्ही प्रेमळ भक्तांना आपल्या जवळ करितों. ह्या गोष्टी बोलून दाखविण्यासारख्या नाहींत, तर अनुभवानें समजणाऱ्या आहेत. १४०

श्लोकार्थः—त्यांच्यावर अनुग्रह करण्याकरताच त्यांच्या बुद्धीमध्यें वास करून, सुप्रकाशित ज्ञानदीपाच्या योगानें मी अज्ञानजन्य अंधकाराचा नाश करतों ॥ ११ ॥

म्हणून, आत्मा जो मी, त्या माझी भक्ति हेंच आपल्या जीवनास कारण करून ज्यांनीं माझ्याशिवाय इतर सर्व वस्तु व्यर्थ मानल्या, ४१ त्या शुद्ध आत्मज्ञान्यांकरितां मी कापुराची मशाल पाजळून मशालजी बनून त्यांचे पुढें पुढें चालतों. ४२ अज्ञानरूप रात्रींत जमलेल्या गर्द अंधाराचा नाश करून त्या भक्तांकरितां मी नेहमीं ज्ञानरूपी सूर्योदय करतों. ४३ प्रेमळ भक्तांना प्रिय असा पुरुषोत्तम जेव्हां याप्रमाणें बोलला तेव्हां अर्जुन म्हणाला, " देवा, माझे सर्व मनोरथ शांत झाले ! ४४ हें पहा महाराज, आपण माझ्यावरील संसाररूपी केर चागला झाडून टाकला; आणि प्रभो, त्यामुळें मी पुनर्जन्मापासून मुक्त झालों ! ४५ अहो, माझें जन्म मीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलें, व माझें जीवित आज माझ्या हातीं आलें असें मला वाटतें. ४६ प्रभो, आपल्या मुखातून हें बोलणें ऐकून माझ्या आयुष्याचें सार्थक झालें आणि माझ्या दैवाचा भाग्योदय झाला ! ४७ आतां या वचनरूप सूर्यानें माझ्या अंतर्बाह्य अज्ञानांधकाराचा नाश झाला; म्हणून, प्रभो तुमचें यथार्थ स्वरूप मला दिसूं लागलें. ४८

श्लोकार्थः—अर्जुन म्हणालाः–देवा, तुम्ही सर्वश्रेष्ठ ब्रह्म, उत्तम स्थान आणि परम पवित्र असे आहां. आपण निरंतर असणारे, तेजस्वी, सर्व देवांचे आदि, न उत्पन्न होणारे व सर्वव्यापक आहां. १२

" तरी कृष्णा, आपण परब्रह्म आहां व सर्व महाभूतांचें विश्रांतिस्थान असून पवित्र आणि सर्व जगाचे पालनकर्ते आहां. ४९ तुम्ही ब्रह्मा, विष्णु व महेश या तिघांचें आदिदैवत आहां. देवा, पंचविसावें तत्त्व जो पुरुष तो तूंच, आणि मायेच्या पलीकडील जो दिव्य भाव, तोही तूंच. १५० हे स्वामी, तुम्ही अनादिसिद्ध असून, तुम्हांला जन्मादि धर्म नाहींत; असे तुम्ही आहां असें मला आतां समजलें. ५१ तुम्ही तीन काळांचे चालक आहां. तुम्ही जीवकलेची मुख्य देवता आहां, व तुम्ही ब्रह्मांडास आश्रयभूत आहां, असें आतां मला स्पष्ट कळलें. ५२

८ पलीकडे. ९ शांत झालों. १० मातेचें उदर. ११ घर. १२ सार्थक. १३ वचनरूपी सूर्यानें. १४ मायेच्या विकाराच्या. १५ सूत्रधार. १६ मुख्य देवता. १७ ब्रह्मांडरूप कढईला धारण करणारा.

आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।
असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥

अन्वयः—( ईदृशं ) त्वां सर्वे ऋषयः-देवर्षिः नारदः तथा असितः देवलः व्यासः-आहुः, च त्वं स्वयं एव मे ब्रवीषि ॥ १३ ॥

( ३८६. पूर्वी मुनींनीं हें रूप सांगितलें, तरी त्याचा अनुभव आला नाहीं, १५३–१६२ ) पैं आणिकही एकें परी । इयें प्रतीतीची येतसे थोरी । जे मागें ऐसेंचि ऋषीश्वरीं । सांगितलें तूतें ॥ ५३ ॥ परि तया सांगितलियाचें साचपण । हें आतां माझें देखतसे अंतःकरण । जे कृपा केली आपण । म्हणोनि देवा ॥ ५४ ॥ येऱ्हवीं नारदु अखंड जवळा ये । तोही ऐसेंचि वचनीं गाये । परि अर्थ न बुजोनि ठाये । गीतसुखचि ऐकों ॥ ५५ ॥ जी आंधळेयांच्या गांवीं । आपणपें प्रगटलें रवी । तरि तिहीं वोतपलीचि घ्यावी । वांचूनि प्रकाशु कैंचा ॥ ५६ ॥ परि देवर्षि अध्यात्म गातां । आहाच रागांगेंसीं जे मधुरता । तेचि फावे येर चित्ता । नलगे-चि कांहीं ॥ ५७ ॥ पैं असिता देवलाचेनि मुखें । मी एवंविधा तूतें आइकें । परि तैं बुद्धि विषयविखें । धारिली होती ॥ ५८ ॥ विषयविषाचा पैंरिपाडू । गोड परमार्थु लागे कडू । कडू विषय तो गोडू । जीवासी जाहला ॥ ५९ ॥ आणि हें आणिकांचें काय सांगावें । राउळा आपणाचि येऊनि व्यासदेवें । तुझें स्वरूप आघवें । सर्वदा सांगिजे ॥ १६० ॥ परि तो आंधारीं चिंतामणि देखिला । जेविं नव्हे या बुद्धी उपेक्षिला । पाठीं दिनोदयीं वोळखिला । होय म्हणोनि ॥ ६१ ॥ तैसीं व्यासादिकांचीं बोलणीं । तिया मजपाशीं चिद्रत्नांचिया खाणी । परि उपेक्षिल्या जात होतिया तरणी । तुजवीण कृष्णा ॥ ६२ ॥

सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव । न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥१४

अन्वयः—केशव, यत् मां वदसि, तत् एतत् सर्वं ( अहं ) ऋतं मन्ये; भगवन्, देवाः दानवाः ते व्यक्तिं न हि विदुः ॥ १४ ॥

( ३८७. ऋषींच्या सांगण्यानें मला बोध झाला नाहीं; तो देवांच्या सांगण्यानें झाला, १६३–१८० ) ते आतां वाक्यसूर्यकर तुझे फांकले । आणि ऋषीं मार्ग होते जे कथिले । तयां आघवयांचेंचि फिटलें । अनोळखपण ॥ ६३ ॥ जी ज्ञानाचें बीज तयांचे बोल । माजि हृदयभूमिके पडिले सखोल । वरि इये कृपेची जाहाली वोल । म्हणोनि संवाद फळेंसीं उठिले ॥ ६४ ॥ अहो नारदादिका संतां । त्यांचिया उक्तिरूप सरिता । मी महोदधी जाहलों अनंता । संवादसुखाचा ॥ ६५ ॥ प्रभू आघवेनि येणें जन्में । जियें पुण्यें केलीं मियां उत्तमें । तयांचीं न ठकतीचि अंगीं कामें । सद्गुरु तुवां ॥ ६६ ॥ येऱ्हवीं वडिलवडिलांचेनि मुखें । मी सदा तूतें कानीं आइकें । परि कृपा न कीजेचि तुवां एकें । तंव नेणवेचि कांहीं ॥ ६७ ॥

१ ऊन. २ व्यापिली. ३ थोरवी. ४ श्रेष्ठ ५ ज्ञानरूप रत्नांच्या. ६ अज्ञानपण. ७ रहात नाहींत.

श्लोकार्थः—असे आपण आहां म्हणून सर्व ऋषि–देवर्षि नारद, असित, देवल व व्यास हे सर्व ऋषि–म्हणत आहेत; आणि तुम्हीही स्वतः तेंच मला सांगत आहां ॥ १३ ॥

" हें पहा, आणखी दुसऱ्याही एका तऱ्हेनें त्या गोष्टीच्या खरेपणाविषयीं अनुभव येतो. तो असा कीं, पूर्वी तुमच्याविषयीं अशाच गोष्टी पुष्कळ ऋषींनीं सांगितल्या आहेत. ५३ परंतु त्यांनीं सांगितलेल्या गोष्टी खऱ्या आहेत असें आज मला कळून आलें; पण तें सुद्धां तुम्हीं कृपा केली म्हणूनच ! ५४ एरवीं नारद मुनि आमच्या घरीं नेहमीं येतात ते सुद्धां हेंच गात असतात; पण त्याचा अर्थ न समजतां मी त्यांचें गाणेंच सुखानें ऐकत असें. ५५ महाराज ! अंधळ्यांच्या गावीं सूर्य जरी स्वतः प्रकट झाला, तरी त्यांना फक्त उन्हाचा उपयोग होतो, बाकी त्यांना प्रकाश कसा दिसणार ! ५६ त्याचप्रमाणें, नारद हे अध्यात्मगायनें करीत असतां मला त्यांच्या रागरागिणींचें माधुर्य वरचेवरच तेवढें समजत असे, दुसरें कांहीं नाहीं. ५७ त्याचप्रमाणें, असित व देवल यांच्या तोंडूनही तुमचे याच प्रकारचे गुणानुवाद मी ऐकत असें; परंतु त्या वेळेस माझी बुद्धि विषयरूप विषानें व्यापली होती. ५८ विषयरूप विषाचा महिमा असा आहे कीं, परमार्थ गोड असून तो जिवास कडू लागतो, व विषय कडू असून ते गोड लागतात. ५९ आणखी दुसऱ्याविषयीं काय सांगूं ? परंतु सर्वश्रेष्ठ जे व्यास मुनि, ते देखील स्वतः येऊन तुमच्या स्वरूपाचें वर्णन करीत असत. १६० परंतु एखादाला अंधारात चिंतामणि सांपडून तो चिंतामणि नव्हे या बुद्धीनें तो टाकून देतो, आणि दिवस उगवल्यावर तोच चिंतामणि आहे असें ओळखतो, ६१ त्याचप्रमाणे कृष्णा, व्यासादिक मुनींचीं भाषणें ज्ञानरूप रत्नांच्या खाणींप्रमाणें असून, तुमच्या उपदेशरूप सूर्याशिवाय त्या मीं टाकून दिल्या होत्या ! ६२

*श्लोकार्थः—केशवा, जें तुम्ही मला सांगतां, तें हें सर्व मी सत्य मानतों. भगवन्, देवांना आणि दैत्यानाही तुमचें स्वरूप समजलें नाहीं ॥ १४ ॥*

" ते आतां तुमचे वाक्यरूपी किरण माझ्या हृदयांत सर्वत्र फांकून, ऋषींनीं सांगितलेल्या त्या मार्गाविषयींचें अज्ञान पार नाहींसें झालें. ६३ महाराज, त्याचे शब्द म्हणजे ज्ञानाचें बीज; तें माझ्या हृदयरूपी खोल जमिनींत पडलें होतें, पण आता त्याला तुमच्या कृपारूप ओलाव्यानें संवादरूप फळें आलीं. ६४ अहो अनंता, नारदादिक संतांच्या भाषणरूपी नद्यांस, तुमचा व माझा जो संवाद, त्या संवादरूपी सुखाचा मी समुद्र झालों. ६५ हे प्रभो, हे सद्गुरो, मीं जन्मजन्मांतरी जीं जीं उत्तम पुण्यें केलीं, त्यांनीं तुमची प्राप्ति करून देऊन तीं माझ्या ऋणांतून मुक्त झालीं. ६६ एरव्हीं, वाडवडिलांच्या मुखांतून तुमचे गुणानुवाद माझ्या कानीं पडत असत; परंतु तुम्हीं कृपा केली नव्हती तोंपर्यंत मीं कांहींच ओळखलें नव्हतें. ६७ म्हणून, नशीब जेव्हां अनुकूल होते तेव्हां सर्व केलेले उद्योग सफल होतात; त्याप्रमाणें गुरुकृपा झाली म्हणजे ऐकलेलें व अध्ययन केलेलें सर्व खरें आहे, असें अनुभवास येतें. ६८ महाराज, माळी ज्या झाडांना पाणी

म्हणोनि भाग्य जैं सानुकूळ । जालिया केले उद्यम सदा सफळ । तैसें श्रुताधीतें सकळ । गुरुकृपा साच ॥ ६८ ॥ जीं वैनकरु झाडें सिंपी जीवेंसीठीं । पाडूनि जन्में काढी आँटी । परि फळेंसी तैंचि भेटी । जैं वसंतु पावे ॥ ६९ ॥ अहो विषमा जैं वोहँट पडे । तैं मधुर तैं मधुर आवडे । पै रसायन तैं गोडें । जैं आरोग्य देहीं ॥ १७० ॥ कां इंद्रियें वाचा प्राण । यां जालियांचें तैंचि सार्थकपण । जैं चैतन्य येऊनि आपण । संचरे मार्जी ॥ ७१ ॥ तैसें शब्दजात आँलोडिलें । अथवा योगादिक जें अभ्यासिलें । तें तैंचि म्हणों ये आपुलें । जैं सानुकूळ श्रीगुरु ॥ ७२ ॥ ऐसिये जालिये प्रतीतीचेनि माजें । अर्जुन निश्चयाचि नाचतुसे भोजें । तेवींचि म्हणे देवा तुझें । वाक्य मज्ञ मानलें ॥ ७३ ॥ तरि साचचि हे कैवल्यपती । मज त्रिशुद्धी आली प्रतीती । जे तूं देवादानवांचिये मती- । जोगा नव्हसी ॥ ७४ ॥ तुझें वाक्य व्यक्ती न येतां देवा । जो आपुलिया जाणे जाणिवा । तो कहींचि नोहे हें मद्भावा । भरंवसेनि आलें ॥ ७५ ॥

स्वयमेवात्मनाऽऽत्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।
भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥

अन्वयः—पुरुषोत्तम, (हे) भूतभावन, (हे) भूतेश, (हे) देवदेव, (हे) जगत्पते, त्वं स्वयं एव आत्मना आत्मानं वेत्थ ॥ १५ ॥

एथ आपुलें वैंडपण जैसें । आपणचि जाणिजे आकाशें । कां मी येतुली धैंनवट ऐसें । पृथ्वीचि जाणे ॥ ७६ ॥ तैसा आपुलिये सर्वशक्ती । तुज तूंचि जाणसी लक्ष्मीपती । येर वेदादिक मती । मिरवैंती वायां ॥ ७७ ॥ हां गा मनातें मागां सांडावें । पवनातें वैंवीं मवावें । आँदिशून्य तरोनि जावें । केउतें बाँहीं ॥ ७८ ॥ तैसें हें तुझें जाणणें आहे । म्हणोनि कोणाही ठाउकें नोहे । आतां तुझें ज्ञान होये । तुजचिजोगें ॥ ७९ ॥ जी आपणयातें तूंचि जाणसी । आणिकांतें सांगावयाही समर्थ होसी । तरि आतां एक वेळ धाम पुसीं । आर्तीचिये निडळींचा ॥ १८० ॥ ( ३८०. जगाला व्यापणाऱ्या तुझ्या मुख्य विभूति सांग, १८१–१८६ ) हें आइकिलें कीं भूतभावना । त्रिभुवनगजपंचानना । सकळदेवदेवतार्चना । जगन्नायका ॥ ८१ ॥ जरी थोरी तुझी पाँहत आहों । तरी पासीं उभे ठाकावयाही योग्य नोहों । या शोर्च्यता जरी विनवूं बिहों । तरी आन उपायो नाहीं ॥ ८२ ॥ भरले समुद्र सरिता चहूंकडे । परि ते चापियेंसि कोरडे । कां जैं मेघौनि थेंबुटा पडे । तैं पाणी कीं तया ॥ ८३ ॥ तैसे श्रीगुरु सर्वत्र आथी । परि कृष्णा आम्हां तूंचि गती । हें असो मजप्रती । विभूति सांगें ॥ ८४ ॥

१ ऐकलेलें व अध्ययन केलेलें. २ माळी. ३ जिवापाड. ४ मेहनत घेतो. ५ विषमज्वराला. ६ उतार. ७ अभ्यासिलें, ८ संतोषानें. ९ अनुभवास. १० वडीलपण. ११ घननदार. १२ गर्वे

घालून आपल्या जीवापाड मेहनत करतो, परंतु त्यांना ज्याप्रमाणें वसंत ऋतूशिवाय फळें येत नाहींत; ६९ अहो, जेव्हां विषमज्वराला उतार पडतो, तेव्हांच गोड पदार्थ गोड लागतो. हें पहा, औषध हें आरोग्य झाल्याशिवाय गोड म्हणतां येत नाहीं; १७० किंवा इंद्रियें, वाचा व प्राण यांत जेव्हां चैतन्य येऊन संचार करतें, तेव्हांच त्याचें सार्थक होतें; ७१ त्याचप्रमाणें, वेदशास्त्रांचा अथवा योगादिकांचा अभ्यास करूनही, जेव्हां गुरूची कृपा होते, तेव्हाच तीं आपल्या उपयोगीं पडतात." ७२ याप्रमाणें अनुभव आल्यामुळें अर्जुन निश्चयपूर्वक संतोषानें नाचूं लागला व देवांस म्हणाला कीं, "तुमचें बोलणें माझ्या खरें प्रत्ययास आलें. ७३ तेव्हां, हे मुक्तिदात्या श्रीकृष्णा, मला खरोखर असा अनुभव आला कीं, तुम्ही देव व दानव यांच्या बुद्धीला जाणण्याजोगे नाहीं। ७४ देवा, तुमच्या बोलण्याचा अनुभव न येतां जो आपल्या ज्ञानानें तुम्हांला जाणलें असें म्हणतो, त्याला तुमचें ज्ञान होत नाहीं असें माझ्या पक्कें अनुभवाला आलें आहे. ७५

श्लोकार्थः—हे पुरुषोत्तमा, हे भूतभावना, हे भूतेशा, हे देवदेवा, हे जगत्पते, आपण आपल्याच सामर्थ्यानें आपल्याला जाणता ॥ १५ ॥

ज्याप्रमाणें आकाशाचें मोठेंपण आकाशालाच समजतें, किंवा पृथ्वीचें वजन पृथ्वीलाच समजतें, ७६ त्याप्रमाणें, हे लक्ष्मीपते, तुमची सर्व शक्ति तुम्हीच जाणतां. एरव्हीं (तुमची शक्ति आम्हांला कळली असा) वेदादिक व्यर्थ गर्व वाहतात. ७७ अहो, मनाच्या गतीला कसें मागें टाकावें ? वाऱ्याला वेंगेंत कसें धरावें ? आणि बाहूंनीं माया कशी तरून जावी ? ७८ त्याचप्रमाणें, तुमचें ज्ञान होणें फार दुस्तर आहे, म्हणून तें कोणाला होत नाहीं; तर तुमचें तुम्हांलाच समजतें. ७९ महाराज, तुमचें ज्ञान तुम्हांलाच आहे, व तें आपण दुसऱ्यांनाही समजून देण्यास समर्थ आहां; तर एकदा आमच्या हौसेच्या कपाळाचा घाम पुसून टाका बरें। (आमची ऐकण्याची हौस पुरी करा।) १८० अहो प्राणिमात्राचे उत्पादका, अहो संसाररूपी गजाचा नाश करणाऱ्या पंचानना ! अहो सर्व देवांना पूज्य व जगदाधिपते, आपण ऐकलें का ? ८१ तुमचा मोठेपणा आम्हीं ओळखूं म्हटलें, तर तुमच्या जवळ उभें राहण्यासही आम्हीं योग्य नाहीं; व या संकटाला भिऊन जर आम्हीं तुमची विनंती केली नाहीं, तर आमच्या मनाच्या समाधानाला दुसरा उपायही नाहीं. ८२ चोहोंकडे समुद्र व नद्या जरी पाण्यानें भरलेल्या आहेत, तरी त्याचा चातकास काय उपयोग ? कारण, जेव्हां मेघांचे थेंब पडतील, तेव्हांच त्याला पाणी पिण्यास मिळेल; ८३ त्याचप्रमाणें कृष्णा, जगतांत जरी चोहीं-कडे गुरु आहेत तरी आम्हांला तुमच्यावांचून दुसरा गुरु नाहीं. हें असो, आतां तुमच्या विभूति सांगा. ८४

वाहतात. १३ पावेनें मोजावें. १४ माया. १५ बाहूंनीं. १६ जगदुत्पादक. १७ ओळखतों. १८ संकटानें; दैन्यानें. १९ चातकास.

वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।
याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥

अन्वयः—याभिः विभूतिभिः त्वं इमान् लोकान् व्याप्य तिष्ठसि, ( ताः ) दिव्याः हि आत्मविभूतयः अशेषेण वक्तुं अर्हसि ॥ १६ ॥

जी तुझिया विभूति आघविया । परि व्यापिती शक्ति दिव्या जिया । तिया आपुलिया दावाविया । आपण मज ॥ ८५ ॥ जिहीं विभूतीं यया समस्ता । लोकांतें व्यापूनि आहासी अनंता । तिया प्रधाना नामांकिता । प्रकटा करीं ॥८६॥

कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन् ।
केषु केषु च भावेषु चिंत्योऽसि भगवन्मया ॥ १७ ॥

अन्वयः—योगिन्, त्वां सदा परिचिंतयन् अहं कथं विद्याम्? भगवन्, केषु केषु भावेषु च त्वं मया चिंत्यः असि ? ॥ १७ ॥

( ३८९. चिंतन करण्याकरितां विभूति, १८७–१८९ ) जी कैसें मियां तूतें जाणावें । काय जाणोनि सदा चिंतावें । जरी तूंचि म्हणों आघवें । तरि चिंतनचि न घडे ॥ ८७ ॥ म्हणोनि मागां भाव जैसे । आपुले सांगितले तुवां उद्देशें[२] । आतां विस्तारोनि तैसे । एक वेळ बोलें ॥ ८८ ॥ जया जया भावाचिया ठायीं । तूतें चिंतितां मज सायासु नाहीं । तो विवळ करूनि देईं । योगु आपुला ॥ ८९ ॥

विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।
भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥

अन्वयः—जनार्दन, आत्मनः योगं च विभूतिं विस्तरेण भूयः कथय; अमृतं शृण्वतः हि मे तृप्तिः नास्ति ॥ १८ ॥

( ३९०. देवाचें भाषण अर्जुनास पुन्हां ऐकावेंसें वाटतें; काव्य, १९०–१९४ ) आणि पुसलिया जिया विभूती । त्याही बोलाविया भूतपती । एथ म्हणसी जरी पुढतीं । काय सांगों ॥ १९० ॥ तरी हा भाव मना । झणें जाय हो जनार्दना । पैं प्राकृताही अमृतपाना । ना न म्हणवे जेविं ॥ ९१ ॥ जें काळकूटाचें सहोदर । जें मृत्युभेणें प्याले अमर । तरि दिहांचे पुरंदर । चौदा जाती ॥ ९२ ॥ ऐसा कवण एक क्षीराब्धीचा रसु । जया वायाचि अमृतपणाचा आभासु । तयाचाही मिठांशु । जे पुरे म्हणों नेदी ॥ ९३ ॥ तया पांवळयाही येतुलेवरी । गोडियेची आथी थोरी । मग हें तंव अवधारीं । परमामृत साचें ॥ ९४ ॥ ( ३९१. अमृत हें काळकूटाचें सहोदर आहे, व देवाच्या मुखांतून येणारें बोधामृत खरें अमृत आहे; काव्य, १९५–२०३ ) जें मंदराचळ न ढाळितां । क्षीरसागरु न डहुळतां । अनादि स्वभावतां । आइतें आहे ॥ ९५ ॥ जे सैवे ना द्रवे नव्हे बद्ध । जेथ नेणिजती रस गंध । जें भलतयाही सिद्ध । आठवलेंचि फैंवे ॥ ९६ ॥ जयाची गोठीचि ऐकत-

श्लोकार्थः—ज्या विभूतींच्या योगानें तुम्हीं या सर्व लोकांना व्यापून राहतां, त्या तुमच्या अद्भुत अशा सर्व विभूति मला सांगा. ॥ १६ ॥

" महाराज, आपल्या ज्या कांहीं विभूति असतील, त्यातून जेवढ्या व्यापक, शक्तिमान व सतेज आहेत, तेवढ्या तुम्ही मला दाखवा. ८५ हे अनंता, ज्या तुमच्या विभूति तिन्ही लोकांना व्यापून आहेत, त्यांतील मुख्य मुख्य नांवाजलेल्या असतील, त्या मला आतां सांगा. ८६

श्लोकार्थः—हे योगिन् ! तुमचें सतत चिंतन करणारा मी, तुम्हाला कसा जाणूं शकेन ? आणि हे भगवन् ! कोणकोणत्या वस्तूंचे ठिकाणीं मीं तुमचें ध्यान करावें ? ॥ १७ ॥

" महाराज, मी तुम्हांला कसें जाणावें ? व नेहमीं कशाचें चिंतन करावें ? जर सर्वत्र तुम्हीच आहां असें म्हणावें, तर माझ्या हातून तुमचें चिंतन होणार नाहीं; ८७ म्हणून *पूर्वी तुम्हीं जे संक्षेपानें आपले भाव सांगितले, त्याचा विस्तार करून एक वेळ सांगा. ८८ ज्या ज्या विभूतींच्या ठिकाणीं तुम्ही आहां असें समजून चिंतन केलें असतां मला श्रम पडणार नाहींत, अशी तुमच्या प्राप्तीची जी युक्ति ती स्पष्ट करून सांगा. ८९

श्लोकार्थः—हे जनार्दना ! तो तुमचा योग व विभूति मला पुनः विस्तारानें सांगा. कारण, तुमचें अमृतासारखें भाषण कितीही ऐकलें तरी माझी तृप्तिच होत नाहीं. ॥ १८ ॥

" हे भूतपते, मीं ज्या विभूतींबद्दल तुम्हाला विचारलें आहे, त्या सांगा. त्याच त्या पुनः काय सांगावयाच्या आहेत असें जर कदाचित् म्हणाल, १९० तर, हे जनार्दना, अशी शंका मनांत येऊं देऊं नका. कारण, जगांतील साधारण जें अमृतपान, त्यालाही पुरे असें कोणाच्यानें म्हणवत नाहीं. ९१ जें अमृत काळकूट विषाचें सख्खें भावंड आहे, तें मरणाच्या भीतीनें देवानीं प्राशन केलें असताही, ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा इंद्र लय पावतात ! ९२ असा क्षीराब्धीचा असा एक रस आहे कीं, त्याला अमृत हें नाव व्यर्थ प्राप्त झालें आहे. पण त्याचीही गोडी पुरी झाली असे कोणाच्यानें म्हणवत नाहीं. ९३ त्या तुच्छ अमृताच्या गोडीचा जर एवढा महिमा आहे, तर मग असें पहा कीं, हे तुमचें बोलणे तर खरोखर ज्ञानामृत आहे. ९४ हें मंदराचल न हालवितां, क्षीरसागर न घुसळितां, अनादि असून स्वभावतः स्वयमेव आहे. ९५ हें पाझरत नाहीं, पातळ होत नाहीं, व घट्टही होत नाहीं; याची गोडी व सुवास हीं समजत नाहींत व हें आठवण करण्याबरोबर वाटेल त्याला प्राप्त होतें. ९६ याची गोष्ट ऐकतांक्षणींच

१ विभूति. २ संक्षेपानें. ३ स्पष्ट. ४ प्राप्तीचा योग; युक्ति. ५ अमृत आणि काळकूट विष हीं दोन्ही एका समुद्रातूनच निघाली असल्यामुळें, अमृत हें काळकूटाचें सहोदर असें म्हटलें. ६ देव. ७ दिवसाचे, एका दिवसात. ८ इंद्र. ९ नाशवंतालाही, तुच्छाला १० ज्ञानामृत. ११ पातळ होत नाहीं. १२ पाझरत नाहीं. १३ घट्ट १४ प्राप्त होतें.

* ह्याच अध्यायाचे ४, ५ व ६ हे श्लोक पहा. ह्या वेळीं,......हे माझे ! भाव ऐकें ॥८१॥ असा उपक्रम केला आहे.

सर्व संसार मिथ्या वाटूं लागतो, व यामुळें बळकट अविनाशपण आपोआपच प्राप्त होतें; ९७ याच्या योगानें जन्ममृत्यूंची वार्ता समूळ नाहींशी होते, व अंतर्बाह्य महासुखाचा लाभ होतो. ९८ मग दैवयोगानें जर तें सेवन केलें, तर तें आत्मरूपी करून टाकतें. अशा प्रकारचें जें तुमचें ज्ञानामृत, तें तुम्ही मला पाजीत असतां माझें चित्त पुरे म्हणूं शकत नाहीं. ९९ आधीं तुमचें नांव मला आवडतें, त्यांत तुमची भेट होऊन सहवास घडला, व नंतर आनंदयुक्त होऊन तुम्ही गोष्टी सांगत आहां, २०० तेव्हां, हें सुख कशासारखें आहे हें माझ्यानें सांगवत नाहीं; परंतु मला फार संतोष होत आहे. तर मला असें वाटतें कीं, तुमच्या मुखानें पुनः एक वेळ तें ऐकावें. १ (कदाचित् तुमच्या मनांत शंका येईल कीं, एकवार सांगितलेलें पुनः कसें सांगावें ? तर ) महाराज ! असें पहा कीं, सूर्याच्या नित्य प्रकाशाला शिळा म्हणतां येईल काय ? अग्नीला ओंवळा म्हणतां येईल काय ? किंवा अखंड वाहणाऱ्या गंगोदकास पारोसेंपण आहे काय ? २ तुम्हीं आपल्या मुखानें जें ज्ञान सांगितलें, तें ऐकून आम्हांला असें वाटलें कीं, नादब्रह्म मूर्तिमंत आमच्यापुढें उभें आहे; तसेंच, दुर्मिळ अशा चंदनाच्या फुलांचा आम्ही आज सुवास घेत आहों !" ३ अर्जुनाचें हें भाषण ऐकून श्रीकृष्ण सर्वांगानें डोलूं लागले, आणि म्हणाले:—हा पार्थ भक्ति व ज्ञान यांचें आगरच झाला आहे. ४ याप्रमाणें अनुभवाच्या संतोषांत प्रेमाचा उमाळा येऊं लागला, तो कष्टानें सावरून श्रीअनंत बोलूं लागले. ५

श्लोकार्थ:—श्रीभगवान म्हणाले, अर्जुना, ठीक आहे; तर माझ्या मुख्य मुख्य विभूति तुला सांगतों. कारण माझ्या विभूतींच्या विस्ताराचा अंत नाहीं. ॥ १९ ॥

मी ब्रह्मदेवाचा बाप हें माहीत असूनही त्याची आठवण न राहतां भगवान म्हणाले, " बापा अर्जुना, फार चांगलें केलें." ६ आतां भगवंतांनीं अर्जुनाला ' बापा ' म्हटलें म्हणून आपणांस आश्चर्य करण्याचें कारण नाहीं; का कीं, भगवान स्वतः नंदपुत्र होऊन खेळ खेळले नाहींत का ? ७ पण सध्यां तें असो; हा सर्व प्रकार विशेष आवडीनें घडतो. तर भगवान म्हणाले:—हे धनुर्धरा, मी सांगतों तें ऐक. ८ हे सुभद्रापते, तूं ज्या माझ्या विभूतींबद्दल विचारलेंस, त्या अगणित असून, जरी माझ्याच आहेत तरी माझ्याही बुद्धीनें त्यांची गणना करतां येत नाहीं. ९ ज्याप्रमाणें आपल्या अंगावरील केश ज्याचे त्यासही मोजतां येत नाहींत, त्याप्रमाणें माझ्या विभूति मला मोजता येत नाहींत. २१० एरवीं देखील, मी कसा व केवढा आहें, हें माझें मलाच खरें कळत नाहीं. याकरितां, माझ्या मुख्य मुख्य विभूति ज्या प्रसिद्ध आहेत, त्या ऐक. ११ हे किरीटी, त्या जाणल्या असतां इतर सर्व विभूति जाणतां येतील. ज्याप्रमाणें झाडाचें बीं हातीं आलें असतां झाड हातीं आल्याप्रमाणेंच होतें, १२ किंवा बाग हातीं आल्यावर आपोआप फळें;

८ पें ज्ञान. ९ ध्वनिला. १० अनुभवाच्या. ११ ब्रह्मदेवाचा. १२ खरें कळणें. १३ जाणल्या असतां.

खेंवो । आघवा संसारु होय वावो । बळियें नित्यता लागे येवों । आपणपेया ॥ ९७ ॥ जन्ममृत्यूची भींख । हारपोनि जाय निःशेख । आंत बाहेरी महासुख । वाढोंचि लागे ॥ ९८ ॥ मग दैवगत्या जरी सेविजे । तरी तें आपणचि होऊनि ठाकिजे । तें तुज देतां चित्त माझें । पुरे म्हणों न शके ॥ ९९ ॥ तंव तुझें नामचि आम्हां आवडे । वरि भेटी होय आणि जवळिकें जोडे । पाठीं गोठी सांगसी सुरेवाडें । आनंदाचेनि ॥ २०० ॥ आतां हें सुख कायिसयासारिखें । कांहीं निर्वचेना मज परितोखें । तरी येतुलें जाणें जे येणें मुखें । पुनरुक्तही हो ॥ १ ॥ हां गा सूर्य काय शिळा । अग्नि म्हणों येल आहे वोंविळा । कां नित्य वाहतया गंगाजळा । पारसेपण असे ॥ २ ॥ तुवां स्वमुखें जें बोलिलें । हें आम्हीं नादासि रूप देखिलें । आजि चंदनतरूचीं फुलें । तुरंबीत आहों मां ॥ ३ ॥ ( ३९२. देवांना आनंद झाला, तो आवरून देव बोलतात; काव्य, २०४–२०५ ) भगवानुवाचः– तया पार्थाचिया बोला । सर्वांगें श्रीकृष्ण डोलला । म्हणे भक्तिज्ञानासि जाहला । आगरु हा ॥ ४ ॥ ऐसा पतिकराचिया तोषाआंतु । प्रेमाचा वेग उचंबळतु । तो सायासें सांवरूनि अनंतु । काय बोले ॥ ५ ॥

हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥ १९ ॥

अन्वयः—कुरुश्रेष्ठ, हंत; ( परंतु ) आत्मविभूतयः ते प्राधान्यतः कथयिष्यामि; मे विस्तरस्य हि अन्तः नास्ति ॥ १९ ॥

( ३९३. देवभक्तांच्या प्रेमाचा विनोद, काव्य, २०६–२०८ ) मी पितामहाचा पिता । हें आठवितांही नाठवे चित्ता । कीं म्हणतसे बा पांडुसुता । भलें केलें ॥ ६ ॥ अर्जुनातें बा म्हणे एथ कांहीं । आम्हां विस्मो करावया कारण नाहीं । आंगें तो लेंकरूं काई । नव्हेचि नंदाचें ॥ ७ ॥ परि प्रस्तुत ऐसें असो । हें करवी आवडीचा अतिसो । मग म्हणे आइकें सांगतसों । धनुर्धरा ॥ ८ ॥ ( ३९४. ज्या विभूति जाणल्या असतां माझी व्यापकता तुला कळेल, २०९–२१४ ) तरि तुवां पुसलिया विभूती । तयांचें अपारपण सुभद्रापती । ज्या माझियाचि परि माझिये मती । आकळती ना ॥ ९ ॥ आंगींचिया रोमा किती । जयाचिया तयासि न गणवती । तैसिया माझिया विभूती । असंख्य मज ॥ २१० ॥ येऱ्हवीं तरी मी कैसा केवढा । म्हणोनि आपणपयाही नव्हेचि फुडा । यालागीं प्रधाना जिया रूढा । तिया आइकें ॥ ११ ॥ जिया जाणितलियांसाठीं । आघविया जाणवतील किरीटी । जैसें बीज आलिया मुठीं । तरुचि आला होय ॥ १२ ॥ कां उद्यान हाता चढिन्नलें । तरी आपैसीं सांपडलीं फळें फुलें । तेवि देखिलिया जिया देख-

१ प्रकट. २ अविनाशपण. ३ वार्ता, गोष्ट. ४ सान्निध्य. ५ युद्धीनें. ६ बोलवेना. ७ पारसेपण.

सर्वे संसार मिथ्या वाटूं लागतो, व यामुळें बळकट अविनाशपण आपोआपच प्राप्त होतें; ९७ याच्या योगानें जन्ममृत्यूंची वार्ता समूळ नाहींशी होते, व अंतर्बाह्य महासुखाचा लाभ होतो. ९८ मग दैवयोगानें जर तें सेवन केलें, तर तें आत्मरूपी करून टाकतें. अशा प्रकारचे जें तुमचें ज्ञानामृत, तें तुम्ही मला पाजीत असता माझें चित्त पुरे म्हणूं शकत नाहीं. ९९ आधीं तुमचें नाव मला आवडतें, त्यांत तुमची भेट होऊन सहवास घडला, व नंतर आनंदयुक्त होऊन तुम्ही गोष्टी सागत आहां, २०० तेव्हां हें सुख कशासारखें आहे हें माझ्यानें सागवत नाहीं; परंतु मला फार संतोष होत आहे. तर मला असें वाटतें कीं, तुमच्या मुखानें पुनः एक वेळ तें ऐकावें. १ (कदाचित् तुमच्या मनांत शंका येईल कीं, एकवार सागितलेलें पुनः कसें सागावें ? तर ) महाराज ! असें पहा कीं, सूर्याच्या नित्य प्रकाशाला शिळा म्हणतां येईल काय ? अग्नीला ओंवळा म्हणतां येईल काय ? किंवा अखंड वाहणाऱ्या गंगोदकास पारोसेंपण आहे काय ? २ तुम्हीं आपल्या मुखानें जें ज्ञान सागितलें, तें ऐकून आम्हांला असें वाटलें कीं, नादब्रह्म मूर्तिमंत आमच्यापुढें उभें आहे; तसेंच, दुर्मिळ अशा चंदनाच्या फुलांचा आम्ही आज सुवास घेत आहों ! " ३ अर्जुनाचें हे भाषण ऐकून श्रीकृष्ण *सर्वांगानें डोलूं लागले, आणि म्हणाले:—हा पार्थ भक्ति व ज्ञान यांचें आगरच झाला* आहे. ४ याप्रमाणें अनुभवाच्या संतोषांत प्रेमाचा उमाळा येऊं लागला, तो कष्टानें सावरून श्रीअनंत बोलूं लागले. ५

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणाले, अर्जुना, ठीक आहे; तर माझ्या मुख्य मुख्य विभूति तुला सागतों. कारण माझ्या विभूतींच्या विस्ताराचा अंत नाहीं. ॥ १९ ॥

मी ब्रह्मदेवाचा बाप हें माहीत असूनही त्याची आठवण न राहतां भगवान म्हणाले, "बापा अर्जुना, फार चागलें केलें." ६ आता भगवंतानीं अर्जुनाला 'बापा' म्हटलें म्हणून आपणांस आश्चर्य करण्याचें कारण नाहीं; का कीं, भगवान स्वतः नंदपुत्र होऊन खेळ खेळले नाहींत का ? ७ पण सध्यां तें असो; हा सर्व प्रकार विशेष आवडीने घडतो. तर भगवान म्हणाले:—हे धनुर्धरा, मी सांगतों तें ऐक. ८ हे सुभद्रापते, तूं ज्या माझ्या विभूतींबद्दल विचारलेंस, त्या अगणित असून, जरी माझ्याच आहेत तरी माझ्याही बुद्धीनें त्याची गणना करता येत नाहीं. ९ ज्याप्रमाणें आपल्या अंगावरील केश ज्याचे त्यासही मोजतां येत नाहींत, त्याप्रमाणे माझ्या विभूति मला मोजता येत नाहींत. २१० एरवीं देखील, मी कसा व केवढा आहें, हें माझें मलाच खरें कळत नाहीं. याकरितां, माझ्या मुख्य मुख्य विभूति ज्या प्रसिद्ध आहेत, त्या ऐक. ११ हे किरीटी, त्या जाणल्या असतां इतर सर्व विभूति जाणतां येतील. ज्याप्रमाणें झाडाचें बीं हातीं आलें असतां झाड हातीं आल्याप्रमाणेंच होतें, १२ किंवा बाग हातीं आल्यावर आपोआप फळें;

८ जें ज्ञान. ९ ध्वनीला. १० अनुभवाच्या. ११ ब्रह्मदेवाचा. १२ खरें कळणें. १३ जाणल्या असतां.

वलें । विश्व सकळ ॥ १३ ॥ येन्हवीं साचचि गा धनुर्धरा । नाहीं शेवटू माझिया विस्तारा । पैं गगनाऐशिया अपारा । मजमाजी लपणें ॥ १४ ॥

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः । अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ॥२०॥

अन्वयः—गुडाकेश, अहं सर्वभूताशयस्थितः आत्मा; च भूताना आदिः मध्य च अंतः अहमेव ( अस्मि ) ॥ २० ॥

( ३९५. सर्व प्राण्याचा आत्मा देव आहे, २१५–२१८ ) आइकें कुटिलालकमस्तका । धनुर्वेदत्र्यंबकां । मी आत्मा असें एकैका । भूतमात्राच्या ठायीं ॥१५॥ आंतुलीकडे मीचि यांचे अंतःकरणीं । भूतां बाहेरी माझीच गवसणी । आदि मी निर्वाणीं । मध्यही मींचि ॥ १६ ॥ जैसें मेघां या तळीं वरी । एक आकाशचि आंत बाहेरी । आणि आकाशींचि जाले अवधारीं । असणेंही आकाशीं ॥ १७ ॥ पाठीं लया जे वेळीं जाती । ते वेळीं आकाशचि होऊनि ठाती । तेविं आदि स्थिति अंत गती । भूतांसि मी ॥ १८ ॥ अवतरणः—ऐसें बहुवस आणि व्यापकपण । माझें विभूतियोगें जाण । तरी जीवचि करूनि श्रवण । आइकोनि आइक ॥ १९ ॥ याहीवरी त्या विभूती । सांगणें ठेलें सुभद्रापती । सांगेन म्हणितलें तुजप्रती । त्या प्रधाना आइकें ॥ २२० ॥

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।
मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥

अन्वयः—अहं आदित्याना विष्णुः, ज्योतिषा अंशुमान् रविः, मरुता मरीचिः अहं नक्षत्राणा च शशी अस्मि ॥ २१ ॥

हें बोलोनि तो कृपावंतु । म्हणे विष्णु मी आदित्यांआंतु । रवि मी रश्मिवंतु । सुप्रभांमाजी ॥ २१ ॥ मरुद्गणांच्या वर्गीं । मरीचि म्हणे मी शार्ङ्गी । चंद्रु मी गगनरंगीं । तारांमाजी ॥ २२ ॥

वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।
इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥

अन्वयः—वेदाना सामवेदः अस्मि, देवानां वासवः अस्मि, इंद्रियाणां मनः अस्मि, भूतानां च चेतना अस्मि ॥ २० ॥

वेदां आंत सामवेदु । तो मी म्हणे गोविंदु । देवांमाजि मरुद्बंधु । महेंद्रु तो मी ॥ २३ ॥ इंद्रियांमाजि अकरावें । मन तें मी हें जाणावें । भूतांमाजी स्वभावें । चेतना ते मी ॥ २४ ॥

रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।
वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥

अन्वयः—रुद्राणां शंकरः च यक्षरक्षसां वित्तेशः अस्मि, अहं वसूनां पावकः च शिखरिणां मेरुः अस्मि ॥ २३ ॥

अशेषांही रुद्रांमाझारीं । शंकर जो मदनारी । तो मी येथ न धरीं । भ्रांति

व फुलें हातीं लागतात, त्याप्रमाणें, त्या विभूति पाहिल्या असतां सर्व विश्व पाहिल्याप्रमाणें होतें. १३ हे धनुर्धरा, बाकी खरोखर माझ्या विस्ताराचा अंत नाहीं. हें पहा कीं, गगनासारखे मोठमोठे पदार्थही माझ्यांत मावतात. १४

*श्लोकार्थ*—हे गुडाकेशा, सर्व भूताच्या अंतरीं असणारा आत्मा मी आहें, आणि सर्व भूताचा आदि, मध्य व अंतही मीच आहें ॥ २० ॥

कुरळे केश मस्तकीं धारण करणाऱ्या, व धनुर्विद्येत शिवाप्रमाणें प्रवीण अशा अर्जुना, ऐक. प्रत्येक प्राण्याच्या ठिकाणीं जो आत्मा आहे तो मी. १५ शरीराच्या आंतील भागाच्या अंतःकरणात मीच आहें; प्राणिमात्राच्या बाहेरच्या बाजूसही माझेंच आच्छादन आहे; आणि प्राणिमात्राच्या आरंभीं, अंतीं व मध्येंही मीच आहें. १६ ज्याप्रमाणें मेघांच्या खालीं, वर, आत व बाहेर सर्वत्र आकाशच असतें, आणि ते आकाशात उत्पन्न होऊन आकाशांतच असतात; १७ आणि मग ज्या वेळेस ते मेघ लय पावतात, त्या वेळेसही आकाशच होऊन राहतात, त्याप्रमाणें उत्पत्ति, स्थिति व लय या तिन्ही गति प्राणिमात्रास देणारा मीच आहें. १८ याप्रमाणें माझें मोठेपण आणि व्यापकपण हें माझ्या विभूतींच्या योगानें समजतें; तरी जीवालाच कान करून पूर्वीं ऐकलेल्या गोष्टींवर अनुसंधान ठेवून पुढें ऐक. १९ हे सुभद्रापते, यापुढें तुला सांगावयाच्या राहिलेल्या विभूति—ज्या तुला सांगतों म्हणून म्हटलें होतें, त्यातील मुख्य मुख्य ऐक. २०

*श्लोकार्थः*—द्वादशादित्यामध्यें विष्णु मी; प्रकाशवतामध्यें किरणवंत सूर्य मी; मरुद्गणामध्यें मरीचि मी; आणि नक्षत्रामध्यें चंद्र मी आहें ॥ २१ ॥

इतकें बोलल्यावर कृपावंत श्रीकृष्ण म्हणाले, " बारा आदित्यात विष्णु मी; तेजस्वी वस्तूंत किरणयुक्त सूर्य तो मी. " २१ श्रीकृष्ण म्हणतात, " एकुणपन्नास मरुद्गणांत मरीचि मी; व आकाशातील नक्षत्रांत चंद्र मी आहे " २२

*श्लोकार्थः*—वेदामध्यें सामवेद मी आहें; देवामध्यें इंद्र मी आहें; इंद्रियामध्यें मन मी आहें; आणि प्राण्यामध्यें चेतना मी आहें ॥ २२ ॥

श्रीगोविंद म्हणाले, " वेदांत सामवेद मी; देवांत मरुद्बंधु जो इंद्र तो मी; २३ आणि इंद्रियांत अकरावें जें मन तें मी असें जाण. तसेंच प्राणिमात्रांत जी मूळ जीवकळा ती मी आहें. २४

*श्लोकार्थः*—रुद्रामध्यें शंकर मी आहें; यक्षराक्षसामध्यें कुबेर मी; अष्टवसूंमध्यें अग्नि मी आहें; आणि पर्वतामध्यें मेरु मी आहें ॥ २३ ॥

" सगळ्या रुद्रामध्यें मदनाचा शत्रु जो शंकर तो मी आहें, याबद्दल मनांत शंका

१ कुरळे केश मस्तकीं धारण करणाऱ्या. २ धनुर्विद्येमध्यें केवळ शिवच. ३ खालीं व वर. ४ राहतात. ५ देवांत. ६ तेजस्वी पदार्थांमध्यें. ७ एकुणपन्नास मरुद्गणात. ८ शार्ङ्ग-नावाचें धनुष्य धारण करणारा. ९ आकाशात. १० इंद्र. ११ जीव.

आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक्।
प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥
अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम्।
पितृणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥

अन्वयः—अहं आयुधानां वज्रं, धेनूनां कामधुक् अस्मि, प्रजनः कंदर्पः अस्मि, सर्पाणां च वासुकिः अस्मि; ॥ २८ ॥ अहं नागानां अनंतः, यादसां वरुणः अस्मि; अहं पितृणां अर्यमा च संयमतां यमः अस्मि ॥ २९ ॥

पैं आघवेयां हातियेरां- । आंत वज्र तें मी धनुर्धरा । जें शतमखोत्तीर्ण-करा । आरुढोनि असे ॥ २४० ॥ धेनूंमध्यें कामधेनु । ते मी म्हणे विष्वक्सेनु । जन्मवितया आंत मदनु । तो मी जाणें ॥ ४१ ॥ सर्पकुळाआंत अधिष्ठाता । वासुकी गा मी कुंतीसुता । नागांमाजि समस्तां । अनंतु तो मी ॥ ४२ ॥ अगा यादसांआंतु । जो पश्चिम-प्रमदेचा कांतु । तो वरुण मी हें अनंतु । सांगत असे ॥ ४३ ॥ आणि पितृगणां समस्ता- । माजी अर्यमा जो पितृदेवता । तो मी हें तत्वता । बोलत आहें ॥ ४४ ॥ जगाचीं शुभाशुभें लिहिती । प्राणियांच्या मानसाचा झाडा घेती । मग केलियानुरूप होती । भोगनियम जे ॥ ४५ ॥ तयां नियमितयांमाजी यमु । जो कर्मसाक्षी धर्मु । तो मी म्हणे आत्मारामु । रमापती ॥ ४६ ॥

प्ऱ्हादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम्।
मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥

अन्वयः—दैत्यानां प्रल्हादः अस्मि; च अहं कलयतां कालः; अहं मृगाणां मृगेंद्रः च पक्षिणां वैनतेयः ( अस्मि ) ॥ ३० ॥

अगा दैत्यांचिया कुळीं । प्ऱ्हादु तो मी न्याहाळीं । म्हणोनि दैत्यभावादि मेळीं । लिंपेचिनां ॥ ४७ ॥ पैं कलितयांमाजि महाकाळु । तो मी म्हणे गोपाळु । श्वापदांमाजि शार्दूळु । तो मी जाण ॥ ४८ ॥ पक्षिजातीमाझारीं । गरुड तो मी अवधारीं । यालागीं जो पाठीवरी । वाहों शके मातें ॥ ४९ ॥

पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम्।
झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जान्हवी ॥ ३१ ॥

अन्वयः—अहं पवतां पवनः अस्मि; च शस्त्रभृतां रामः; झषाणां मकरः अस्मि; च स्रोतसां जान्हवी अस्मि ॥ ३१ ॥

पृथ्वीचिया पैसारा- । माजी घडी न ल[illegible] रा । [illegible] ड्डाणें सातांहि सागरां । प्रदक्षिणा कीजे ॥ २५० ॥ [illegible] ५) तयां वहिलिया गतिमंतां- । आंत पवनु तो मी [illegible] माजी श्रीराम तो मी ॥ ५१ ॥ जेणें सांकडलि[illegible] धनुष्य करूनि दुसरें । [illegible] ऽभये एक मोहरें [illegible]

श्लोकार्थः—आयुधांमध्यें वज्र नावाच आयुध मी आहें; गाईमध्यें कामधनु मी आहें; प्रजा उत्पन्न करणारा जो मदन तो मी आहें, सर्पांमध्यें वासुकी मी आहें. ॥ २८ ॥ नागांमध्यें मी नागराज अनंत आहें; जलदेवतामध्यें वरुण मी आहें; पितरांमध्यें अर्यमा नावाचा पितर मी आहें; व नियमन करणारांमध्यें यम मी आहें. ॥ २९ ॥

" हें पहा अर्जुना, शंभर यज्ञ परिपूर्ण केलेल्या इंद्राच्या हातांत असणारें आयुधांमध्यें श्रेष्ठ असें वज्र मी आहें." २४० श्रीविष्णु म्हणाले, " सर्व गाईंत कामधेनु नांवाची गाय ती मी; आणि उत्पन्न करणारांमध्यें मदन म्हणून जो आहे तो मी. ४१ हे कुंतीसुता, सर्पकुलांचा नायक वासुकि तो मी; व सर्व नागांमध्यें श्रेष्ठ जो अनंत तो मी." ४२ श्रीकृष्ण सांगतातः—सर्व जलदेवतांत पश्चिम दिशेचा पति जो वरुण तो मी; ४३ सर्व पितृगणांत पितृदेवता जो अर्यमा तो मीं, असें खरोखर सांगतों. ४४ जे जगाचीं शुभाशुभ कर्में लिहितात, प्राण्यांच्या मनाच्या व शरीराच्या कर्मांची झडती घेतात व कर्मानुसार भोगाचें फळ देतात, ४५ त्या नियमन करणारांत, प्राण्यांच्या कर्मांचा साक्षिभूत जो यमधर्म तो मी, असें रमापति आत्माराम म्हणाले. ४६

श्लोकार्थः—दैत्यांमध्यें प्रल्हाद मी आहें; गणती करणारांमध्यें काल मी आहें; पशूंमध्यें सिंह ( किंवा व्याघ्र ) मी आहें, पक्ष्यांमध्यें गरुड मी आहें. ॥ ३० ॥

अरे, दैत्यकुळांत जन्मलेला प्रल्हाद म्हणून जो दैत्य, तो मी असें समज; आणि म्हणूनच तो दैत्यांच्या स्वभावानें लिप्त झाला नाहीं. ४७ श्रीगोपाळकृष्ण म्हणतातः—हरण करणारांत जो महाकाळ तो मी; व सर्व जनावरांत वाघ तो मी असें समज. ४८ अर्जुना, ऐक. सर्व पक्ष्यांत गरुड पक्षी तो मी; म्हणूनच तो मला आपले पाठीवर वाहूं शकतो. ४९

श्लोकार्थ—पवित्र करणाऱ्या वस्तूंमध्यें वायु मी आहें, शस्त्रधरांमध्यें राम मी आहें, जलचरांमध्यें मकर मी आहें, व नद्यांमध्यें भागीरथी मी आहें. ३१

हे धनुर्धरा, या पृथ्वीच्या सभोंवतीं एक घटका न लागतां जो फिरतो, व एक उडीबरोबर सातही समुद्रांना प्रदक्षिणा करतो, २५० असा वेगवानांमध्यें श्रेष्ठ जो वायु, तो मी; आणि अर्जुना, सर्व शस्त्रधरांत श्रीराम तो मी. ५१ ज्या रामानें त्रेतायुगीं संकटांत पडलेल्या धर्माच्या कैवारानें आपल्या रूपाचेंच दुसरें धनुष्य बनवून, विजयश्रीला आपल्याशिवाय दुसरा मार्गच ठेविला नाहीं; ५२ नंतर सुवेलाचलावर उभें राहून लंकाधीश रावणाच्या मस्तकाच्या पंक्ति गगनांत उदो उदो म्हणणाऱ्या भूतांना बळी दिल्या;

१ शंभर यज्ञ पूर्ण केलेल्या इंद्राच्या हातांत. २ आसमतात् ज्याची सेना आहे असा भगवान श्रीकृष्ण. ३ उत्पन्न करणारात. ४ नायक. ५ शेष. ६ जलदेवतांत. ७ पश्चिम दिशेचा. ८ शासन करणारांत. ९ दैत्यस्वभावानें. १० लिप्त झाला नाहीं. ११ हरण करणारात. १२ वाघ. १३ संकटांत. १४ आपल्या रूपानें. १५ लक्ष्मीनें.

उभें ठाकूनि सुवेळीं[१] । प्रतापलंकेश्वराच्या सिसाळीं । गगनीं उदो म्हणतया हस्तवळी । दिधली भूतां ॥ ५३ ॥ जेणें देवांचा मानु गिंवसिला । धर्मासि जीर्णोद्धार केला । सूर्यवंशीं उदेला । सूर्य जो कां ॥ ५४ ॥ तो हातियेरु पराजितयाआंतु । रामचंद्र मी सीताकांतु । मकर मी पुच्छवंतु । जळचरांमाजी ॥ ५५ ॥ पैं समस्तांही वोघां- । मध्यें जे भगीरथें आणितां गंगा । जन्हूनें गिळिली मग जंघों । फाडूनि दिधली ॥ ५६ ॥ ते त्रिभुवनैकसरिता । जान्हवी मी पांडुसुता । जळप्रवाहां समस्तां- । माझारीं जाणें ॥ ५७ ॥ अवतरणः—ऐसेनि वेगळालां सृष्टीपैकीं । विभूति नाम सूतां एकेकीं । सगळेन जन्मसहस्रें अवलोकीं । अर्धी[६] नव्हती ॥५८॥

सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन ।
अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥
अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ।
अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥

अन्वयः—अर्जुन, अहं सर्गाणां आदिः च मध्यं च अंतः एव ( अस्मि ), अहं विद्यानां अध्यात्मविद्या, प्रवदतां वादः ( अस्मि ) ॥ ३२ ॥ अक्षराणां अकारः अस्मि, च सामासिकस्य द्वंद्वः अक्षयः कालः अहमेव ( अस्मि ), च विश्वतोमुखः धाता अहं ( अस्मि ) ॥ ३३ ॥

जैसीं अवघींचि नक्षत्रें वेंचावीं । ऐसी चाड उपजेल जैं जीवीं । तैं गगनाची बांधावी । लोथ जेवीं ॥ ५९ ॥ कां पृथ्वीये परमाणूचा उगाणा घ्यावा । तरि भूगोलुचि काखे सुवावा । तैसा विस्तारु माझा पाहावा । तरि जाणावें मातें ॥ २६० ॥ जैसें शाखांसी फूल फळ । एकिहेळां वेटाळं म्हणिजे सकळ । तरी उपडूनियां मूळ । जेविं हातीं घेपे ॥ ६१ ॥ तेवीं माझे विभूतिविशेष । जरी जाणों पाहिजेती अशेष । तरी स्वरूप एक निर्दोष । जाणिजे माझें ॥ ६२ ॥ येऱ्हवीं वेगळालिया विभूती । कायिएक परिससी किती । म्हणोनि एकिहेळां महामती । सर्व मी जाण ॥ ६३ ॥ मी आघवियेचि सृष्टी । आदिमध्यांत किरीटी । ओतप्रोत पटीं । तंतु जेविं ॥ ६४ ॥ ऐसिया व्यापका मातें जाणावें । तैं विभूतिभेदें काय करावें । परि हे तुझी योग्यता नव्हे । म्हणोनि असो ॥ ६५ ॥ कां जें तुवां पुसिलिया विभूती । म्हणोनि तिया आईक सुभद्रापती । तरी विद्यांमाजि प्रस्तुतीं अध्यात्मविद्या ते मी ॥ ६६ ॥ अगा बोलतयांचिया ठायीं । वादु तो मी पाहीं । जो सकलशास्त्रसंमतें कहीं । सरेचिना ॥ ६७ ॥ जो निर्वचूं जातां वाढे । आइकतया उत्प्रेक्षे सैंठ चढे । जयावरी बोलतयांचीं गोडें । बोलणीं होती ॥ ६८ ॥ ऐसा प्रतिपादनामाजि वादु । तो मी म्हणे गोविंदु । अक्षरांमाजि विशदु । अकारु तो मी ॥ ६९ ॥ पैं गा समासांमाझारीं । द्वंद्व तो मी अवधारीं । मशकालागोनि ब्रह्मावेरीं । ग्रासिता तो मी ॥ २७० ॥ मेरुमंदरादिकीं सर्वी ।

५३ ज्या रामानें देवांचा मान राखला, धर्माचा जीर्णोद्धार केला, व जो सूर्यवंशांत केवळ प्रतिसूर्यच उदयास आला; ५४ तो शस्त्रें परजणाऱ्यांत सीतापति रामचंद्र मी; व पुच्छवंत जलचरांत मकर तो मी. ५५ सर्व वाहणाऱ्या नद्यांमध्यें, ज्या गंगेला भगीरथ आणीत असतां जन्हूनें गिळून पुनः मांडी फोडून जिला वाट दिली, ५६ ती सर्व त्रैलोक्यांतील नद्यांत मुख्य नदी जान्हवी मी, असें अर्जुना, तूं जाण. ५७ हें पहा, याप्रमाणें सृष्टींतील माझ्या एकएक निरनिराळ्या विभूतींचें वर्णन करूं लागलें, तर हजार जन्मांत अर्ध्या विभूतींचेंही वर्णन होणार नाहीं. ५८

श्लोकार्थः– हे अर्जुना, मी सृष्ट पदार्थांचा आदि, मध्य आणि अंत आहें, सर्व विद्यामध्यें, आत्मा काय, अनात्मा काय, याचा भेद दाखविणारी जी अध्यात्मविद्या, ती मी आहें, वादविवादात तत्त्व जाणण्याच्या इच्छेनें केलेला जो वाद तो मी आहें. ॥ ३२ ॥ अक्षरामध्यें ॐ हें अक्षर मी आहें, समासामध्यें द्वंद्व समास मी आहें, अक्षय जो काल तो मी आहें, व सर्व बाजूनें कर्मांचें फल देणारा मी आहें. ३३

ज्याप्रमाणें, सर्व नक्षत्रें वेंचून घ्यावीं अशी मनांत इच्छा उत्पन्न झाली असतां आकाशाची मोट बांधिली म्हणजे तीं सर्व हातीं येतील; ५९ किंवा पृथ्वीच्या परमाणूंचा झाडा घ्यावयाचा असल्यास भूगोलच खाकेत मारला पाहिजे, त्याप्रमाणें, माझा विस्तार पहावयाचा असल्यास मलाच जाणलें पाहिजे; ( म्हणजे तें सर्व दृष्टीस पडेल. ) २६० खांद्या, फुलें व फळें हीं सर्व एकदम गुंडाळून घ्यावीं असें वाटल्यास ज्याप्रमाणें झाड मुळासकट उपटून घ्यावें, ६१ त्याप्रमाणें, माझ्या सर्व विभूति समजाव्या अशी इच्छा झाल्यास माझें निर्दोष असें स्वरूप जाणून घ्यावें. ( म्हणजे त्या सहज समजतील ) ६२ एरवीं अर्जुना, माझ्या वेगळाल्या विभूति किती म्हणून ऐकशील ? म्हणून, एकदां मला जाणलेंस, म्हणजे त्या सर्व तुला कळतील. ६३ हे किरीटी, मी सर्व सृष्टीचा आदि, मध्य आणि अंत आहें. ज्याप्रमाणें वस्त्रांत तंतु उभे व आडवे भरलेले असतात, ६४ त्याप्रमाणें, जो मी सर्वव्यापक आहें,–त्या मला जाण. त्यानंतर माझ्या विभूति जाणून काय करावयाच्या आहेत ! परंतु तसें करण्याची तुझी योग्यता नाहीं. म्हणून तें असूं दे. ६५ हे सुभद्रापते, तूं माझ्या विभूति कोणत्या म्हणून विचारलेंस, तर त्या ऐक. सर्व विद्यांत ( आत्मज्ञान होणारी ) वेदांतविद्या ती मी आहें. ६६ अरे, बोलणाराच्या ठिकाणीं जो सर्व शास्त्रांच्या संमतीनें कधीं संपत नाहीं, तो वाद मी. ६७ निश्चय करूं लागलें असता जो उलट वाढतो, व ऐकणारांच्या तर्कांस बळ येतें, आणि त्या तर्कांवर बोलणारांचीं गोड भाषणें होतात: ६८ श्रीगोविंद म्हणाले:–अशा वाटाघाटींत जो वाद चालतो तो मी; आणि अक्षरांत स्पष्ट असा जो अकार, तो मी. ६९ समासांत द्वंद्व समास तो मी असें

१ सुवेळाचळावर. २ मस्तकपंक्ति. ३ राखला. ४ हत्यार परजणारात. ५ मांडी. ६ अर्ध्यांचें वर्णन होणार नाहीं. ७ मोट. ८ झाडा. ९ तर्कांना. १० बळ.

सहित पथ्वीतें विरंवी । जो ऐकार्णवातेंही जिरवी । जेथींचा तेथें ॥ ७१ ॥ जो प्रळयतेजा देत मिठी । सगाळिया पवनातें गिळी किरीटी । आकाश जयाचिया पोटीं । सामावलें ॥ ७२ ॥ ऐसा अपार जो काळु । तो मी म्हणे लक्ष्मीलीळु । मग पुढती सृष्टीचा मेळु । सृजिता तो मी ॥ ७३ ॥

मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।
कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ ३४ ॥

अन्वयः—सर्वहरः मृत्युः अहं, च भविष्यतां उद्भवः (अहं) च नारीणां कीर्तिः, श्रीः, वाक्, स्मृतिः, मेधा, धृतिः च क्षमा (अहं अस्मि) ॥ ३४ ॥

आणि सृजिलिया भूतांतें मीचि धरीं । सकळां जीवनही मीचि अवधारीं । शेखीं सर्वांतें या संहारीं । तेव्हां मृत्युही मीचि ॥ ७४ ॥ (१९७. स्त्रीजातीच्या विभूति, २७५–२८०) आता स्त्रीगणांच्या पैकीं । माझिया विभूति सात आणिकी । तिया ऐक कवतिकीं । सांगिजतील ॥ ७५ ॥ तरी नित्य नवी जे कीर्ति । अर्जुना ते माझी मूर्ति । आणि औदार्येसीं जे संपत्ति । तेही मीचि जाणें ॥ ७६ ॥ आणि ते गा मी वाचा । जे सुखासनीं न्यायाचा । आरुढोनि विवेकाचा । मार्गी चाले ॥ ७७ ॥ देखिलेनि पदार्थें । जे आठवूनि दे मातें । ते स्मृतिही एथें । त्रिशुद्धि मी ॥ ७८ ॥ पैं स्वहिता अनुयायिनी । मेधा ते गा मी इये जनीं । धृति मी त्रिभुवनीं । क्षमा ते मी ॥ ७९ ॥ एवं नारींमाझारीं । या सातही शक्ति मी अवधारीं । ऐसें संसारगजकेसरी । म्हणता जाहला ॥ २८० ॥

बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् ।
मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥

अन्वयः—अहं साम्नां बृहत्साम, तथा छंदसां गायत्री, अहं मासानां मार्गशीर्षः, ऋतूनां कुसुमाकरः (अस्मि) ॥ ३५ ॥

वेदराशीचिया सामा- । आंत बृहत्साम जें प्रियोत्तमा । तें मी म्हणे रमा- । प्राणेश्वरु ॥ ८१ ॥ गायत्रीछंद जें म्हणिजे । तें सकळा छंदांमाजि माझें । स्वरूप हें जाणिजे । निभ्रांत तुवां ॥ ८२ ॥ मासांआंत मार्गशिरु । तो मी म्हणे शार्ङ्गधरु । ऋतूंमाजि कुसुमाकरु । वसंत तो मी ॥ ८३ ॥

द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।
जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥ ३६ ॥
वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः ।
मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥

अन्वयः—अहं छलयतां द्यूतं अस्मि, तेजस्विनां तेजः; (अहं) जयः अस्मि; (अहं) व्यवसायः अस्मि. अहं सत्त्ववतां सत्त्वं (अस्मि) ॥ ३६ ॥ वृष्णीनां वासुदेवः अस्मि, पांडवानां धनंजयः (अस्मि); अहं मुनीनां अपि व्यासः अस्मि; (च) कवीनां उशना कविः (अस्मि) ॥ ३७ ॥

समज; आणि मशकापासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांना ग्रासणारा काळ तो मी. २७० मेरु-मंदारादिकांसह जो पृथ्वीचा नाश करतो, व प्रलयकाळीं जलमय झालेल्या जगास जो जागचे जागीं जिरवितो; ७१ हे किरीटी, प्रलयकालच्या तेजाला जो मिठी मारतो, सर्व वाऱ्याला गिळून टाकतो, व ज्याच्या पोटांत आकाश मावतें, ७२ असा अपरिमित काळ तो मी, असें लक्ष्मीशीं विलास करणारे श्रीकृष्ण म्हणाले. मग पुन. म्हणतात.—सृष्टीचा जो उत्पन्नकर्ता तो मी आहें. ७३

श्लोकार्थः—सर्वांना हरण करणारा मृत्यु मी आहें; उत्पन्न होणाऱ्या भाग्यवान प्राण्याचें भाग्य मी आहें; व स्त्रीलिंगी विभूतींमध्यें कीर्ति, लक्ष्मी, वाणी, स्मृति, बुद्धि, धृति ( धैर्य ) आणि शांति मी आहें. ॥ ३४ ॥

उत्पन्न झालेल्या प्राणिमात्रांचें धारण करणारा मीच, सर्वांचें जीवनही मीच; व शेवटीं सर्वांचा संहार करतों म्हणून मृत्युही मीच असे समज. ७४ आतां स्त्रीजातीपैकीं माझ्या आणखी सात विभूति आहेत, त्यांचें मी कौतुकानें वर्णन करतों, ते ऐक. ७५ अर्जुना, नित्य नवी कीर्ति ती माझीच मूर्ति; औदार्ययुक्त जी संपत्ति तीही मीच असें जाण; ७६ आणि न्यायाच्या सिंहासनावर बसून विचाराच्या मार्गानें चालणारी जी वाणी, तीही मी. ७७ पदार्थ पाहिल्यानें जिच्या योगानें माझी आठवण होते, ती स्मरणशक्ति मी असें पक्कें समज. ७८ इहलोकीं स्वहित जागृत करणारी जी बुद्धि ती मी, व या त्रिभुवनांत धृति ती मी, आणि क्षमा ही मीच. ७९ संसारगजेंद्राचा नाश करण्यामध्यें केवळ सिंहच असे भगवान श्रीकृष्ण म्हणाले.—याप्रमाणें स्त्रीजातींत ज्या सात शक्ति आहेत, त्या सर्व मी आहें असें समज. २८०

*श्लोकार्थः—सामामध्यें बृहत्साम मी आहें, छंदामध्यें गायत्री छंद मी आहें, मासामध्यें मार्गशीर्ष मास मी आहें, व ऋतूमध्यें वसंत ऋतु मी आहें ॥ ३५ ॥*

श्रीरमापति म्हणतात:—हे मित्रश्रेष्ठा, वेदामध्ये असलेल्या सामसमुदायात बृहत्साम आहे तें मी. ८१ सात छंदांत गायत्री म्हणून जो छंद आहे, तें माझें स्वरूप आहे, असें तूं निःसंशय जाण. ८२ श्रीकृष्ण म्हणतात.—सर्व महिन्यामध्यें मार्गशीर्ष मास तो मी; व ऋतूंमध्यें पुष्पाची वृद्धि करणारा जो वसंत तो मी. ८३

श्लोकार्थः—फसविणाऱ्यामध्यें द्यूत मी आहें; तेजस्व्यामध्यें तेज मी आहें; जय मी, उद्योग मी, सात्त्विकामध्यें सत्त्व मी आहें; ॥ ३६ ॥ यादवामध्यें वासुदेव मी आहें; पांडवामध्यें अर्जुन तो मी आहें; मुनीमध्यें व्यास मी आहें; व कवींमध्यें उशना कवि मी आहें ॥ ३७ ॥

हे शहाण्या अर्जुना, दुसऱ्यास फसविण्याचे जे प्रकार आहेत, त्यात जुगार म्हणून

---

१ नाश करी. २ प्रळयकाळीं समुद्रमय झालेल्या जगास. ३ लक्ष्मीशीं लीला करणारा श्रीकृष्ण. ४ सिंहासनीं. ५ जागृत. ६ बुद्धि. ७ धैर्य. ८ संसाररूप हत्तीचा सिंह म्हणजे कृष्ण. ९ स्तोत्रामध्यें. ( यांत ईश्वराची स्तुति आहे. ) १० पुष्पाची खाण.

छळितयां विंदोणां- । माजि जूं[3] तें मी विचक्षणा । म्हणोनि चोहटा चोरी परि कवणा । निवारूं न ये ॥ ८४ ॥ अगा अशेषांही तेजसां- । आंत तेज तें मी भरंवसा । विजयो मी कार्योद्देशां । सकळामाजी ॥ ८५ ॥ जेणें चोखोळत दिसे न्याय । तो व्यवसायात व्यवसाय । माझें स्वरूप हें राय । सुरांचा म्हणे ॥ ८६ ॥ ( ३९८. कृष्णावतार, २८७–२९२ ) सत्वाथिलियां[6] आंतु । सत्व मी म्हणे अनंतु । यादवांमाजि श्रीमंतु । तोचि तो मी ॥ ८७ ॥ जो देवकी-वसुदेवा-स्तव जाहला । कुमारीसाठीं गोकुळीं गेला । तो मी प्राणासकट पियाला । पूतनेतें ॥ ८८ ॥ नुघडतां बालपणाची फुली । जेणें मियां अदानवी सृष्टि केली । करीं गिरि धरूनि उमाणिली । महेंद्रमहिमां ॥ ८९ ॥ कालिंदीचें हृदयशल्य फेडिलें । जेणें मिया जळत गोकुळ राखिलें । वासरुवांसाठीं लाविलें । विरंचीसें पिसें ॥२९०॥ प्रथमदशेचिये पहांटे- । माजी कंसाऐशीं अचाटें । महाघेंडीं अवचटें । लीळाचि नासिलीं ॥९१॥ हें काय कितीएक सांगावें । तुवांही देखिलें ऐकिलें असे आघवें । तरि यादवांमाजि जाणावें । हेचि स्वरूप माझें ॥९२॥ ( ३९९. विशेष विभूति, २९३-२९९ ) आणि सोमवंशीं तुम्हां पांडवां- । माजी अर्जुन तो मी जाणावा । म्हणोनि एकमेकांचिया प्रेमभावा । बिघडू न पडे ॥ ९३ ॥ संन्यासी तुवां होऊनि जनीं । चोरूनि नेली माझी भगिनी । तन्ही विकल्पु नुपजे मनीं । मी तूं दोन्ही स्वरूप एक ॥ ९४ ॥ मुनींआंत व्यासदेवो । तो मी म्हणे यादवरावो । कवीश्वरांमाजी धैर्या ठावो । उशनाचार्य तो मी ॥ ९५ ॥

दंडो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।
मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥

अन्वयः—अहं दमयतां दंडः अस्मि, जिगीषतां नीतिः अस्मि, गुह्यानां मौनं अस्मि च ज्ञानवतां ज्ञानं ( अस्मि ) ॥ ३८ ॥

अगा दमितयांमाझारीं । अनिवार दंडु तो मी अवधारीं । जो मुंगियेलागोनि ब्रह्मावेरीं । नियमित पावे ॥ ९६ ॥ पैं सारासार निर्धारितयां । धर्मज्ञानाचा पक्षु धरितयां । सकळशास्त्रांमाजि यया । नीतिशास्त्र तें मी ॥ ९७॥ आघवियाचे गूढां- । माजी मौन तें मी सुहाडा । म्हणोनि न बोलतया पुढां । स्रष्टाही नेणे होय ॥९८॥ अगा ज्ञानियाचियां ठायीं । ज्ञान तें मी पाहीं । आतां असो हें येथें कांहीं । पार न देखो ॥ ९९ ॥

यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन । न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥३९
नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप । एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया॥४०

---

१ फसवण्याच्या २ प्रकारांत. ३ जुगार. ४ चव्हाट्यावर. ५ नीतिला सोडून जो न्याय नसतो. ६ सत्त्वशीरात. ७ कळी. ८ दैत्यरहित. ९ तोलला. १० इंद्राचा गर्व. ११ यमुनेचें. १२ ब्रह्मदेवास. १३ बलवंता. १४ ब्रह्मदेव. १५ अज्ञानी. १६ विभूतींना.

जी विद्या आहे, ती मी; म्हणूनच, चावडीवर जरी दरवडा पडला, तरी त्याचें निवारण कोणास करतां येत नाहीं. ८४ अरे, सर्व सतेज पदार्थांत तेज म्हणून जी वस्तु आहे, ती मी असें पक्कें समज; आणि सर्व आरंभिलेल्या कार्यांत ज्याची इच्छा असते तो जय मी. ८५ देवश्रेष्ठ श्रीकृष्ण म्हणाले:—नीति न सोडतां सर्व उद्योगांत जो उद्योग, तें माझें स्वरूप आहे. ८६ सत्वधीरांत सत्त्व मी, व यादवात जो श्रीमंत तो मी असें श्रीअनंत म्हणाले. ८७ जो देवकीवसुदेवांकरितां जन्म घेऊन यशोदेच्या मुलीकरितां गोकुळांत गेला व ज्यानें स्तनपान करण्याच्या निमित्तानें पूतना राक्षसीचें प्राणहरण केलें, तो मी. ८८ बाळपणची कळी उमलली नाहीं तोंच ज्यानें दैत्यरहित पृथ्वी केली, व हातावर गोवर्धन पर्वत धारण करून इंद्राचा गर्व हरण केला; ८९ ज्यानें यमुनेंतील कालिय सर्पाचें मर्दन करून तिचे हृदयांतील दुःख निवारण केलें; ( कालियमर्दनाच्या समयीं सर्व लोक ) गोकुळ ( सोडून यमुनेच्या कांठीं आले असतां त्यांस ) जाळणारा अग्नि भक्षण करून ज्यानें त्यांचें संरक्षण केलें; आणि ब्रह्मदेवानें गोपबाळकें व वांसरें यांचें हरण करून नेल्यावर, तीं सर्व दुसरीं उत्पन्न करून त्यास ज्यानें वेड लावलें; २९० बालदशेच्या आरंभीं कंसचाणूरादिक मोठमोठीं धेंडें ज्यानें सहज मारलीं. ९१ अशा तुला किती गोष्टी सांगूं ? तूं सुद्धां असल्या पुष्कळ ऐकल्या व पाहिल्या आहेस. म्हणून, यादवात अशी ज्याची कृति आहे, तेंच माझें स्वरूप होय; ९२ आणि सोमवंशांत तुमच्या पांडवांत जो अर्जुन, तो मी असें समज; म्हणूनच तुझ्या व माझ्या प्रेमभावांत अंतर पडत नाहीं. ९३ तूं लोकदृष्ट्या संन्यासी होऊन माझी भगिनी सुभद्रा हिला हरण करून नेलेंस, तरी तुझ्याबद्दल माझ्या मनांत संशय उत्पन्न झाला नाहीं. कारण, तुझें व माझें स्वरूप एकच आहे. ९४ सर्व मुनींत श्रेष्ठ असे जे व्यास मुनि, ते मी; व सर्व कवींत श्रेष्ठ जे उशनाचार्य* ते मी, असें यादवश्रेष्ठ श्रीकृष्ण म्हणाले. ९५

श्लोकार्थः—दमन करणारामध्यें दंड म्हणजे शिक्षा मी आहें; जय मिळवूं इच्छिणाराची नीति मी आहें; गुह्य गोष्टींमध्यें मौन मी आहें; व ज्ञानवत जनांचें ज्ञान तें मी आहें. ॥ ३८ ॥

अरे, दमन करणाऱ्यांमध्यें ( जो श्रेष्ठ ) दंड ( तो ) मी. जो मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांस सारखें शासन करतो तो मी असें समज. ९६ सारासार विचार करून ज्या शास्त्रांत धर्माचें अनुकरण केलेलें असतें, तें सकल शास्त्रांतील नीतिशास्त्र मी. ९७ हे बलवान अर्जुना, सर्व गुह्य गोष्टींत मौन तें मी. म्हणून मौन धारण करणारापुढें ब्रह्मदेव देखील अज्ञानी ठरतो. ९८ अरे, ज्ञान्यांच्या ठिकाणीं जें ज्ञान आहे, तें मी असें समज. आतां विभूतिविस्तार राहूं दे; कारण, कांहीं केलें तरी त्यांचा अंत लागणार नाहीं. ९९

* यास शुक्राचार्य असेंही म्हणतात; पण सोमवंशीय ययाति राजाची पत्नी जी देवयानी, तिचा पिता शुक्राचार्य तो हा नव्हे. हा वारुणि-कवीचा पुत्र असून, देवयानीचा पिता वारुणिभृगूचा पुत्र होय.

वायां आपुलिये मती वंगु । भेदाचा लावावा ॥ १३ ॥ येऱ्हवीं तूप कासया घुसळावें । अमृत कां रांधूनि अर्धें करावें । हां गा वायूसि काय पां डावें । उजवें आंग आहे ॥ १४ ॥ पैं सूर्यबिंबासि पोट पाठी । पाहतां नासेल आपुली दिठी । तेविं माझ्या स्वरूपीं गोठी । सामान्यविशेषाची नाहीं ॥ १५ ॥ आणि सिनाना इहीं विभूतीं । मज अपारातें मविसीलं किती । म्हणोनि किंबहुना सुभद्रापति । असो हें जाणणें ॥ १६ ॥ आतां पैं माझेनि एके अंशें । हें जग व्यापिलें असे । यालागीं भेदु सांडूनि सरिसें । साम्यें भज ॥ १७ ॥ ऐसें विबुधवन-वसंतें । तेणें विरक्तांचेनि एकांतें । बोलिलें जेथ श्रीमंतें । श्रीकृष्णदेवें ॥ १८ ॥ ( ४०३. देवभक्तांचा विनोद, काव्य, ३१९–३२७ ) तेथ अर्जुन म्हणे स्वामी । येतुलें हें रौभस्य बोलिलें तुम्हीं । जे भेदु एक आणि आम्हीं । सांडावा एकीं ॥ १९ ॥ हां हो सूर्ये म्हणे काय जगातें । आंधारें दवडा का परौतें । तेविं घैसाळ म्हणों देवा तूतें । तरी आधिक हा बोलु ॥ ३२० ॥ तुझें नामचि एक कोण्ही वेळे । जयाचिये मुखासि कां काना मिळे । तयाचिया हृदयातें सांडूनि पळे । भेदु जी साच ॥२१॥ तो तूं परब्रह्मचि असकें । मज दैवें दिधलासि हस्तोदकें । तरी आतां भेदु कायसाकें । देखावा कवणें ॥ २२ ॥ जी चंद्रबिंबाचा गाभारां । रिगालियावरीही उबारा । परि राणेपणें शार्ङ्गधरा । बोला हें तुम्ही ॥२३॥ तेथ सावियेंचि परितोषोनि देवें । अर्जुनातें आलिंगिलें जीवें[१०] । मग म्हणे तुवां न कोपावें । आमुचिया बोला ॥२४॥ आम्हां तुज भेदाचिया वौहाणी । सांगितली जे विभूतींची कहाणी । ते अभेद काय अंतःकरणीं । मानिलीं कीं न मैंने ॥ २५ ॥ हेंचि पाहावयालागीं । नावेक बोलिलों बाहेरिसेंवडिया भंगीं । तंव विभूती तुज चांगी । आलिया बोधा ॥ २६ ॥ ( पुढील अध्यायाचें बीज ) तेथ अर्जुन म्हणे देवें । हें आपुलें आपण जाणावें । परि देखतसें विश्व आघवें । तुवां भरलें ॥ २७ ॥ ( ४०४. संजय धृतराष्ट्राच्या भूमिकेचें वर्णन करतो; काव्य, ३२८–३३० ) पैं राया तो पांडुसुतु । ऐसिये प्रतीतीसि जाहला वरितु[१४] । या संजयाचिया बोला निवांतु । धृतराष्ट्र राहे ॥ २८ ॥ कीं संजयो दुखवलेनि अंतःकरणें । म्हणतसे नवल नव्हे दैवा दवडणें । हा जीवें धेंडसा आहे मी म्हणें । तंव आंतुही आंधळा ॥ २९ ॥ परि असो हें तो अर्जुनु । स्वहिताचा वाढवितसे मानु । कीं याहीवरी तया आनु । धिंवसा उपनला ॥ ३३० ॥ ( ४०५. अकराव्या अध्यायाचा प्रस्ताव, ३३१–३३५ ) म्हणे हेचि हृदयाआंतुली प्रतीती । बाहेरी अवतरो कां डोळ्यांप्रती । इये आर्तीचिया पाउलीं मती । उठती जाहली ॥ ३१ ॥ मियां इहींच दोहीं डोळां । झोंबावें विश्वरूपा सकळा । येवढी

---

१ कलंक. २ वेगळाल्या. ३ मोजशील. ४ ज्ञानी. ५ थोरपणा. ६ अविचारी. ७ सर्व. ८ मोठेपणानें. ९ तात्काळ. १० मनानें. ११ परंपरा. १२ न कळे. १३ बाह्यदर्शीच्या रीतीनें. १४ योग्य. १५ डोळस.

घुसळावें ? अमृताला शिजवून निमें कां आटवावें ? तसेंच वायूला उजवें व डावें अंग आहे का ? १४ सूर्यबिंबाचा पुढील व पाठीमागील भाग पाहूं लागलें असतां ज्याप्रमाणें आपली दृष्टि मात्र नाहींशी होईल, ( तो सर्व प्रकाशमयच असल्यामुळें त्याला पुढें व मागें अशा बाजू नाहींत; व त्याकडे पाहूं लागलें म्हणजे डोळे मात्र अंधळे होतील. ) त्याप्रमाणें, माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं साधारण व विशेष असा भेद नाहीं. १५ आणि हे सुभद्रापते, माझ्या ज्या अनंत वेगळाल्या विभूति आहेत, त्या तूं किती मोजशील ? म्हणून, माझ्या विभूति जाणण्याची तुझी इच्छा पुरे कर. १६ आतां हें पहा, माझ्या एका अंशानें हें सर्व जग भरलेलें आहे, म्हणून अभेदबुद्धीनें सर्वत्र मीच आहें असें समजून मला भज. १७ ज्ञानरूप वनास वसंत ऋतुप्रमाणें आनंद देणारा, व विरक्तांना एकांतांत सोबत देणारा असा सकलैश्वर्यसंपन्न श्रीकृष्ण परमात्मा याप्रमाणें बोलता झाला; १८ तेव्हां अर्जुन म्हणाला, " प्रभो, ' माझ्या विभूतींचे ठिकाणीं भेद मानूं नको ' म्हणून जें तुम्हीं सांगितलें, तें आपल्या थोरपणाला शोभलेंच आहे ! कारण, मग भेद निराळा आणि त्याचा त्याग करणारे आम्ही निराळे असें झालें. १९ हें पहा, सूर्य उगवण्याचे पूर्वी जगाला असें म्हणतो काय, कीं अंधाराला एक बाजूला घालवून द्या ! ( कारण, सूर्य उगवल्याबरोबर अंधकाराचा आपोआप नाश होतो. त्याप्रमाणें, ईश्वरमय सर्व जगत् आहे असें ज्ञान उत्पन्न होण्याबरोबर ईश्वरास जाणणाराही तद्रूपच होतो. ) पण देवा, या बाबतींत तुम्हांला अविचारी असें म्हणावें तर अधिक प्रसंग होईल. ३२० प्रभो, तुमचें फक्त नांव जर एक वेळ कोणीं तोंडानें उच्चारलें, किंवा कानानीं ऐकलें, तर त्याच्या मनांतून खरोखर भेद नाहींसा होतो. २१ ते तुम्ही प्रत्यक्ष परब्रह्मच जर माझ्या सुदैवानें माझ्या हातीं आलां आहां, तर तुम्हांआम्हांत भेद म्हणतां तो कोठून असणार ? व तो कोणीं कोठें पहावा ? २२ हें पहा, एखाद्यानें चंद्रबिंबाच्या गाभाऱ्यांत प्रवेश केल्यावरही त्याला उकडावयास लागेल का ? पण श्रीकृष्णा, आपण मोठे आहां, तेव्हां हवें तसें बोला !" २३ हें बोलणें ऐकतांच श्रीकृष्णांस अतिशय संतोष झाला, व त्यांनीं अर्जुनाला अंतःकरणपूर्वक आलिंगन देऊन म्हटलें, "आमच्या बोलण्याचा तूं राग मानूं नको. २४ भेदाची परंपरा सांगण्याच्या ओघांत आम्हीं विभूतींविषयीं जे प्रकार सांगितले, ते अभेदरूपानें तुझ्या मनांत ठसले कीं नाहीं, २५ हें समजण्याकरितां क्षणभर बाह्यात्कारीं तसें बोललों, तों माझ्या विभूतींबद्दल तुला चांगला बोध झाला आहे असें दिसलें !" २६ तेव्हां अर्जुन म्हणाला, " देवा, हें आपलें आपणच काय तें पाहून घ्या; पण या विश्वांत सर्वत्र तुम्ही भरलेले आहां असें मला दिसतें. " २७ अशा रीतीनें अर्जुन योग्यतेस आला असें संजय सांगत असतां धृतराष्ट्र राजा स्तब्ध बसला होता. २८ तेव्हां संजयाच्या मनाला खेद वाटून तो म्हणाला:—सहज लाभ होत असतां तो दवडणें हें नवल नव्हे का ? धृतराष्ट्र राजाची ज्ञानदृष्टि शाबूत आहे असें मी समजत होतों; परंतु तसा प्रकार नसून हा बा। ८६।मभा।

हाव तो देवाआगळा । म्हणऊनि करी ॥ ३२ ॥ आजि तो कल्पतरुची शाखा । म्हणोनि वांझोळी[1] न लगती देखा । जें जें येईल तयाचिया मुखा । तें तें साचचि करीतसे येरु[2] ॥ ३३ ॥ जो प्रऱ्हादाचिया बोला । विषाहीसकट आपणचि ज़ाहाला । तो सद्गुरु असे जोडला । किरीटीसी ॥ ३४ ॥ म्हणोनि विश्वरूप पुसावयालागीं । पार्थ रिगता[3] होईल कवणें भंगीं[4] । तें सांगेन पुढिलिये प्रेसंगीं[5] । ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचा ॥ ३३५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां दशमोऽध्यायः ॥ १० ॥
श्लोक ४२, ओंव्या ३३५.

१ वांझ फुलें. २ भगवान श्रीकृष्ण. ३ आरंभ करितांना. ४ रीतीनें. ५ अध्यायांत.

ज्ञानदृष्टीनेंही अंधळा आहे. २९ परंतु धृतराष्ट्राची गोष्ट असूं द्या. अर्जुन मात्र आपल्या स्वहिताची योग्यता वाढवीत आहे; कां कीं, या गोष्टीपेक्षांही दुसऱ्या एका गोष्टीविषयीं त्याच्या मनांत उत्कंठा उत्पन्न झाली ३३० व तो म्हणाला, " सर्व जग ईश्वरमय आहे असा जो माझ्या अंतःकरणांत अनुभव आला आहे, तो माझ्या डोळ्यांसमोर प्रकट व्हावा. " या इच्छेच्या मार्गानें बुद्धि चालूं लागली आहे. ३१ " ह्याच दोन्ही डोळ्यांनीं मी सकल विश्वरूप पहावें. " तो दैववान असल्यामुळें अशी इच्छा करूं लागला. ३२ आज अर्जुन म्हणजे कल्पतरूची केवळ शाखाच आहे; म्हणून त्याला वांझ फुलें कधींही यावयाचीं नाहींत. कारण, त्याच्या तोंडून ज्या ज्या गोष्टी निघतील, त्या श्रीकृष्ण खऱ्या करीत आहेत. ३३ जो श्रीकृष्ण परमात्मा प्रल्हादाच्या बोलाप्रमाणें विष सुद्धां आपणच बनला, तो सद्गुरु अर्जुनास प्राप्त झाला आहे. ३४ म्हणून निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात.—विश्वरूप पुसण्याकरितां पार्थ कशा रीतीनें आरंभ करील, ती कथा आतां पुढील प्रसंगीं सांगेन. ३३५

अध्याय १० वा, ओव्या ३३५.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय अकरावा

(४०६. अकराव्या अध्यायांत शांत व अद्भुत रस आहेत, १–६) आतां यावरी एकादशीं। कथा आहे दोन्ही रसीं। येथ पार्था विश्वरूपेंसीं। होईल भेटी ॥ १ ॥ जेथ शांताचिया घरा। अद्भुत आला पाहे पाहुणेरा। आणि येरांही रसा पांतिकेरां। जाहला मानु ॥ २ ॥ अहो वधूवरांचिये मिळणीं। जैशीं वराडियांही लुगडीं लेणीं। तैसे देशियेच्या सुखासनीं। मिरवले रस ॥ ३ ॥ परि शांताद्भुत बरवे। जे डोळयांच्या अंजळीं घ्यावे। जैसे हरिहर प्रेमभावें। आले खेंवा ॥ ४ ॥ नातरी अंवसेच्या दिवशीं। भेटलीं बिंबें दोनी जैशीं। तेवीं एकवळा रसीं। केला एथ ॥ ५ ॥ मीनले गंगेयमुनेचे ओघ। तैसें रसां जाहलें प्रयाग। म्हणोनि सुस्नात होत जग। आघवें एथ ॥ ६ ॥ (४०७. शान्त व अद्भुत रसांच्या संयोगावर प्रयागाचे रूपक, ७) माजीं गीता सरस्वती गुप्त। आणि दोनी रस ते ओघ मूर्त। यालागीं त्रिवेणी हे उचित। फावली बापा ॥ ७ ॥ (४०८. गीतारूप तीर्थाला मराठी भाषेचे सोपे घाट बांधले, ८–१०) एथ श्रवणाचेनि द्वारें। तीर्थी रिघतां सोपारें। ज्ञानदेव म्हणे दातारें। माझेनि केलें ॥ ८ ॥ तीरें संस्कृताचीं गहनें। तोडोनि मऱ्हाटिया शब्दसोपानें। रचिलीं धर्मनिधानें। श्रीनिवृत्तिदेवें ॥ ९ ॥ म्हणोनि भलतेणें एथ सद्भावें नाहावें। प्रयागमाधव विश्वरूप पहावें। येतुलेनि संसारासि द्यावें। तिळोदक ॥ १० ॥ (४०९. श्रोत्यांची प्रार्थना, ११–१५) हें असो ऐसे सावयव। एथ सासिन्नले आथी रसभाव। तेथ श्रवणसुखाची राणीव। जोडली जगा ॥ ११ ॥ जेथ शांताद्भुत रोकडे। आणि येरां रसां पडेंप जोडे। हें अल्पचि परी उघडें। कैवल्य येथ ॥ १२ ॥ तो हा अकरावा अध्यावो। जो देवाचा आपणपें विसंवता ठावो। परि अर्जुन सदैवांचा रावो। जे एथही पातला ॥ १३ ॥ एथ अर्जुनाचि काय म्हणों पातला। आजि आंवडतयाही सुकाळ जाहला। जे गीतार्थु हा आला। मऱ्हाटिये ॥ १४ ॥ याचि-

१ पंक्तीस आलेल्या. २ ओंजळीत. ३ आलिंगन देण्यास. ४ एकोपा; ऐक्य. ५ मिळाले. ६ पवित्र. ७ श्रीगुरु निवृत्तिनाथांनीं. ८ घाट ९ राज्य. १० महत्त्व. ११ पाहिजे त्याला.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय अकरावा

आतां ह्यापुढें अकराव्या अध्यायांत जो कथाभाग आहे, तो ( शांत व अद्‌भुत या ) दोन रसांनीं भरलेला आहे; आणि या ठिकाणीं भगवंताचें विश्वरूप अर्जुनाच्या दृष्टीस पडेल. १ या ठिकाणीं शांतरसाच्या घरीं अद्‌भुतरस हा पाहुणा आलेला असून, त्याच्या बरोबर इतर रसांनाही पंक्तीचा लाभ मिळाला. २ वधूवरांच्या लग्नांत ज्याप्रमाणें वऱ्हाडयांनाही वस्त्रालंकारांनीं भूषित होऊन मिरवावयास सांपडतें, त्याप्रमाणें, देशी भाषेच्या सुखासनावर सर्व रसांस मिरवणुकीचा लाभ मिळाला आहे. ३ परंतु त्या सर्वांत शांतरस व अद्‌भुतरस हे असे शोभले कीं, डोळ्यांनीं प्रत्यक्ष पहावे. अशा प्रकारें कीं, जणूं काय शंकर व विष्णु हे प्रेमभावानें एकमेकांस आलिंगन देण्याकरितांच आले आहेत. ४ किंवा अमावास्येच्या दिवशीं ज्याप्रमाणें सूर्य व चंद्र यांची दोन्ही बिंबें एके समयीं भेटावीं, त्याप्रमाणें शांत व अद्‌भुत यांचें ऐक्य झालें आहे. ५ किंवा ज्याप्रमाणें गंगा व यमुना या दोन नद्यांचे ओघ प्रयागास मिळाले आहेत, त्याप्रमाणें शांत व अद्‌भुत हे दोन्ही रस एकत्र मिळून अकरावा अध्याय हा प्रयागच बनला आहे; म्हणून हा अध्याय ऐकल्यानें सर्व जगांतील मुमुक्षु जन पवित्र होतात. ६ या दोन रसांच्या संगमांत गीतारूप तिसरी सरस्वती नदी गुप्त आहे; व शांत आणि अद्‌भुत हे दोन्ही रस गंयायमुनांच्या ओघांप्रमाणें मूर्तिमंत आहेत; म्हणून बाबांनो, अकरावा अध्याय हा त्रिवेणीसंगमाचा योग आला आहे असें समजा. ७ या ठिकाणीं श्रवणेंद्रियाच्या द्वारानें या तीर्थांत शिरणें फार सोपें आहे. ( त्रिवेणीसंगमाप्रमाणें येथें बुडण्याची भीति नाहीं. ) ज्ञानदेव म्हणतातः—हा इतका सोपा मार्ग, आमचे गुरु जे निवृत्तिनाथ त्यांनीं केला आहे. ८ या गीतारूप तीर्थाचें संस्कृत भाषारूप तीर कठीण असल्यामुळें, तें तोडून व तेथे मराठी भाषारूप पायऱ्यांचे सोपे घाट करून श्रीनिवृत्तिदेवांनीं केवळ धर्माच्या ठेवीच केल्या आहेत. ९ म्हणून, वाटेल त्यानें या तीर्थांत भक्तिभावाने स्नान करावें; व ज्याप्रमाणें प्रयागास माधवाचें दर्शन होते, त्याप्रमाणें येथें श्रीभगवंताच्या विश्वरूपाचें दर्शन घ्यावें, आणि जन्ममरणरूप संसाराला तिलांजळी द्यावी. १० फार काय सांगावें ? या अकराव्या अध्यायांत सर्व रस मूर्तिमंत उभे आहेत, व या ठिकाणीं जगाला श्रवणसुखाची रेलचेल

लागीं माझें । विनाविलें आइकिजे । तरी अवधान दीजे । सज्जनीं तुम्हीं ॥ १५ ॥ ( ४१०. ज्ञानेश्वर सलगीची क्षमा मागतात, १६–२० ) तेवींचि तुम्हां संतांचिये सभे । ऐसी सलगी कीर करूं नलभे । परि मानावें जी तुम्हीं लोभें । आपत्या मज ॥ १६ ॥ अहो पुंसा आपणाचि पढ़विजे । मग पढे तरी माथा तुकिजे । कां करविलेनि चोजें न रिझे । बाळका माय ॥ १७ ॥ तेवि मी जें जें बोलें । तें प्रभु तुमचेंचि शिकविलें । म्हणोनि अवधारिजो आपुलें । आपण देवा ॥ १८ ॥ हें सारस्वताचें गोड । तुम्हींचि लाविलें जी झाड । तरी आतां अवधानामृतें वोंड । सिंपोनि कीजे ॥ १९ ॥ मग हें रसभाव-फुलीं फुलेल । नानार्थ-फळभारें फळा येईल । तुमचेनि धर्में होईल । सरवाडु जगा ॥ २० ॥ ( ४११. श्रोते म्हणतात–अर्जुन काय बोलला तें सांग, २१ ) या बोला संत रिझले । म्हणती तोषलों गा भलें केलें । आतां सांगें जें बोलिलें । अर्जुनें तेथ ॥ २१ ॥ ( ४१२. ज्ञानेश्वर म्हणतात, सद्गुरो, आपण बोलवाल तसें बोलेन, २२–२४ ) तंव निवृत्तिदास म्हणे । जी कृष्णार्जुनांचें बोलणें । मी प्राकृत काय सांगों जाणें । परि सांगवा तुम्ही ॥ २२ ॥ अहो रानींचिया पालेखाइरा । नेवाणें करविलें लंकेश्वरा । एकला अर्जुन परी अक्षौहिणी अकरा । न जिणेचि काई ॥ २३ ॥ म्हणोनि समर्थ जें जें करी । तें न होय चराचरीं । तुम्ही संत तयापरी । बोलवा मातें ॥ २४ ॥ ( ४१३. भगवान काय बोलले तें सांगतों, २५ ) आतां बोलिजतसें आइका । हा गीताभाव निका । जो श्रीवैकुंठनायका- । मुखौनि निघाला ॥ २५ ॥ ( ४१४. गीतेची थोरवी, २६–२७ ) बापबाप ग्रंथ गीता । जो वेदीं प्रतिपाद्य देवता । तो श्रीकृष्ण वक्ता । जिये ग्रंथीं ॥ २६ ॥ तेथींचें गौरव कैसें वानावें । जें श्रीशंभूचिये मती नेगवे । तें आतां नमस्कारिजे जिवेंभावें । हेंचि भलें ॥ २७ ॥ ( ४१५. विश्वरूप दाखवा असें देवाला कसें विचारावें याबद्दल अर्जुनाचे स्वगत विचार, २८–३८ ) अवतरण:–मग आइका तो किरीटी । घालूनि विश्वरूपीं दिठी । पहिली कैसी गोठी । करिता जाहला ॥ २८ ॥ हें सर्वही सर्वेश्वरु । ऐसा प्रतीतिगत जो प्रतिकरु । तो बाहेरी होआवा गोचरु । लोचनासी ॥ २९ ॥ हे जिवाआंतुली चाड । परि देवासि सांगतां सांकड । कां जें विश्वरूप गूढ । कैसेनि पुसावें ॥ ३० ॥ म्हणे मागां कवणीं कहीं । जें पढियंतेनें पुसिलें नाहीं । तें सहसा कैसें काई । सांगा म्हणों ॥ ३१ ॥ मी जरी सलगीचा चांगु । तरी काय आइसीहूनि अंतरंगु । परि तेही हा प्रसंगु । बिहाली पुसों ॥ ३२ ॥ माझी आवडे तैसी सेवा जाहली । तरि काय होईल गरुडाचिया येतुली ।

१ राघूला. २ वाढ. ३ धन्य धन्य. ४ वर्णावें. ५ कळत नाहीं. ६ अनुभवजन्य. ७ प्रकार. ८ विशेष स्नेहातला. ९ यशोदा मातेहून. १० जिवलग.

झाली आहे. ११ या ठिकाणीं शांत व अद्भुत हे प्रत्यक्ष दिसत असून इतर रसांचेंही महत्त्व दृष्टीस पडत आहे. पण ही उपमा देखील हलकीच आहे. तर- या ठिकाणीं उघड उघड मोक्षसुखच प्राप्त होतें. १२ तो हा अकरावा अध्याय स्वतः देवांचें विश्रांतिस्थान आहे; पण अर्जुन हा भाग्यवानांचा मुगुटमणिच आहे. कारण तो या अशा ठिकाणीं देखील येऊन पोहोंचला आहे. १३ या ठिकाणीं अर्जुनच आला म्हणून कशाला म्हणावें? तर गीतेचा अर्थ मराठींत झाल्यामुळें वाटेल त्या मनुष्यास येथील सुखाचा सुकाळ झाला आहे. १४ याचकरितां माझी विनंती ऐका कीं, तुम्ही सज्जनांनीं इकडे लक्ष द्यावें. १५ तुम्हां संतांच्या सभेपुढें मी इतक्या सलगीनें बोलणें योग्य नाहीं; परंतु तुम्हीं मला प्रेमानें आपल्या लेंकराप्रमाणें मानावें. १६ अहो, राघूला आपणच पढवितों, आणि तोच आपण पढविलेलें बोलल्यावर आपल्यास मान डोलवावी लागते; किंवा आई आपल्या लेंकराकडून कौतुक करवून तें पाहून रिझत नाहीं का? १७ त्याचप्रमाणें प्रभो, मी जें जें कांहीं बोलेन, तें तुम्हींच मला शिकविलें आहे; म्हणून देवा, आपलें बोलणें आपणच श्रवण करावें. १८ माझें भाषण म्हणजे तुम्हींच लावलेलें गोड असें एक ज्ञानाचें झाड आहे. तर याला एकाग्र अंतःकरणरूप पाण्यानें शिंपून तुम्हीं वाढवावें. १९ मग या झाडाला नवरसादि फुलें येऊन तें फुलेल; पुष्कळ प्रकारच्या अर्थरूप फलभारानें लवेल; व तुमच्या या कृतीनें सर्व जगास सुखप्राप्ति होईल; २० असें बोलल्यावर संतजन प्रसन्न होऊन म्हणाले, " आम्ही तुझ्या बोलण्यानें संतोष पावलों; आतां अर्जुन काय बोलला तेवढें सांग." २१ तेव्हां निवृत्तीचे दास ज्ञानदेव म्हणाले:—कृष्णार्जुनांचा संवाद मला प्राकृताला कसा सांगता येईल? पण तुम्हीं मला शक्ति दिली तर मी सांगेन. २२ अहो, रानावनातील पाला खाणाऱ्या वानरांकडून लंकाधीश रावणाचाही पराभव करविला, त्याचप्रमाणें एकट्या अर्जुनाकडून कौरवांचें अकरा अक्षौहिणी सैन्य जिकविलें नाहीं काय? २३ म्हणून, समर्थ जें करितात, तें प्राणिमात्राच्या हातून होत नाहीं. त्याचप्रमाणें, आपणही संतजन आहां, तर माझ्याकडून गीतार्थ बोलवाल.' २४ आतां वैकुंठनायक श्रीकृष्णाच्या मुखातून जो गीतेचा खरा भावार्थ निघाला, तो मी तुम्हांला सांगतो. इकडे लक्ष असूं द्या. २५ धन्य भाग्य त्या गीतेचें! कीं वेदांनीं ज्याचें प्रतिपादन केलें आहे, त्या श्रीकृष्णानीं ती आपल्या मुखानें सांगितली. २६ या गीतेचें महत्त्व काय वर्णन करावें? कारण तें शंकराच्या बुद्धीलाही कळलें नाहीं. तर आतां तिला मनोभावाने नमस्कार करावा हेंच बरें! (असो). २७ पुढें त्या अर्जुनानें विश्वरूप पाहण्याची इच्छा मनांत धरून (त्यासंबंधानें) कृष्णाबरोबर बोलण्याचा कसा उपक्रम केला, तें ऐका. २८ हें सर्व जग ईश्वररूपच आहे अशी प्रतीति ठेवून जो अनुभव आला, तो आपल्या बाह्यदृष्टीसही प्रत्यक्ष दिसावा, २९ अशी मनांत उत्कट इच्छा; पण ती श्रीकृष्णास सांगण्याचें फार संकट पडलें. कारण गूढ असें विश्वरूप मला दाखवा असें त्यांना

परि तोही हे बोली । करीचिना ॥ ३३ ॥ मी काय सनकादिकांहुनि जवळां । परि तयांही नागवेचि हा चाळा । मी आवडेन काय प्रेमळां । गोकुळींचिया ऐसा ॥ ३४ ॥ तयांतेंही लेंकुरपणें झकविलें । एकाचे गर्भवासही साहिले । परि विश्वरूप हें राहविलें । न दावीच कवणा ॥ ३५ ॥ हा ठायवरी गुज । याचिये अंतरीचें हें निज । केविं उैराउरी मज । पुसों ये पां ॥ ३६ ॥ आणि न पुसेंचि जरी म्हणें । तरि विश्वरूप देखिलियाविणें । सुख नोहेचि परि जिणें । तेंही विपायें ॥ ३७ ॥ म्हणोनि आतां पुसों अळुमाळसें । मग करू देवा आवडे तैसें । येणें प्रवर्तला सौंघ्वसें । पार्थु बोलों ॥ ३८ ॥ ( ४१६, देवभक्त प्रेमांत बद्ध होऊन प्रेमात बोलतात, ३९–४३ ) परि तोंचि ऐसेनि भावें । जे एका दों उत्तरांसवें । दावी विश्वरूप आघवें । झाडा देऊनि ॥ ३९ ॥ अहो वांसरूं देखिलियाचिसाठीं । धेनु खडबडोनि मोहें उठी । मग स्तनासुखाचिये भेटी । काय पान्हा धरे ॥ ४० ॥ पाहा पां तया पांडवांचेनि नांवें । जो कृष्ण रानींही प्रतिपाळूं धांवे । तयातें अर्जुनें जंव पुसावें । तंव साहील काई ॥ ४१ ॥ तो सहजेंचि स्नेहाचें अवतरण । आणि येरू स्नेहा घातलें आहे मौजवण । ऐसिये मिळवणीं वेगळेंपण । उरे हेंचि बहु ॥ ४२ ॥ म्हणोनि अर्जुनाचिया बोलासरिसा । देव विश्वरूप होईल आपैसा । तोचि पहिला प्रसंगु ऐसा । ऐकिजे तरी ॥ ४३ ॥

अर्जुन उवाच—

मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् । यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥१॥

अन्वयः—( हे भगवन् ) त्वया मदनुग्रहाय अध्यात्मसंज्ञितम् यत् परमं गुह्यं वचः उक्तं, तेन अयं मम मोहः विगतः ॥ १ ॥

( ४१७. अर्जुन म्हणतो, देवा आपल्या अनुग्रहानें माझा मोह गेला, ४४–४८ ) मग पार्थु देवातें म्हणे । जी तुम्हीं मजकारणें । वाच्य केलें जें न बोलणें । कृपानिधे ॥ ४४ ॥ जें महाभूतें ब्रह्मीं आटती । जीव महदादींचे ठाय फिटती । तैं जें देव होऊनि ठाकती । तें विसवणें शेपींचें ॥ ४५ ॥ होतें हृदयाचिये परिवरीं[१०] । रोविलें कृपणाचिये परी । शब्दब्रह्मासिही चोरी । जयाची केली ॥४६॥ तें तुम्हीं आजि आपुलें । मजपुढां हियें[११] फोडिलें । जया अध्यात्मा वोंवाळिलें । ऐश्वर्य हरें[१२] ॥ ४७ ॥ ते वस्तु मज स्वामी । एकिहेळां दिधली तुम्हीं । हें बोलों तरी आम्ही । तुज पावोनि कैंचे ॥ ४८ ॥ ( ४१८. मोहाचें वर्णन, ४९–६८ ) परि साचचि महामोहाचिये पुरीं । बुडिलिया देखोनि सीसेंवरी । तुवां आपणपें घालोनि

१ त्यानाही हा चाळा सुचला नाहीं. २ भाविक. ३ झडकर; भरवेगर. ४ याचणें. ५ थोडेसें ६ आवडेल तसें. ७ हिय्या करून. ८ खाय; भरण. ९ शेवटचें. १० आवारात. ११ हृदय. १२ दिवानें. १३ डोक्यापर्यंत.

कसें पुसावें ? ३० तो मनांत म्हणतोः-पूर्वी कोणत्याही आवडत्या भक्तानें जें कधींही पुसलें नाहीं, तें विश्वरूप मला दाखवा असें एकाएकीं मी कसें म्हणूं ? ३१ मी जरी देवांच्या विशेष स्नेहांतला आहें, तरी यशोदेपेक्षां का यांचा जिवलग आहे ? पण ती देखील हें विचारावयास भ्याली! ३२ मी जरी यांची हवी तेवढी सेवा केली असली तरी माझ्यानें गरुडाची बरोबरी करवेल का ? पण त्या गरुडानेंही या विश्वरूपाचें नांव काढलें नाहीं. ३३ मी सनकादिकांपेक्षां का देवांच्या सन्निध वास करणारा आहें ? पण त्यांना देखील हा चाळा सुचला नाहीं. तसेंच मी गोकुळींच्या भाविक गोपगोपींपेक्षां देवाला जास्ती आवडता आहे काय ? ३४ पण त्या गोकुळांतील लोकांनाही यांनीं आपण लेंकरूं आहों अशा भ्रमानें फसविलें, व अंबऋषिराजाकरितां दहा वेळ गर्भवास भोगला; पण आपलें विश्वरूप कोणासही न दाखवितां गुप्त ठेविलें. ३५ एवढी श्रीकृष्णाच्या अंतर्यामींची गुह्य गोष्ट मला एकदम कशी पुसतां येईल ? ३६ बरें, पुसूं नये, तर विश्वरूप पाहिल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं; इतकेंच नव्हे, तर मी जिवंत राहीन किंवा नाहीं हा संशयच आहे. ३७ म्हणून आतां थोडीशी विचारण्यास सुरवात करावी. मग देवांच्या इच्छेस येईल तसें ते करतील. असा मनाचा हिय्या करून पार्थ बोलला. ३८ परंतु तो अशा खुबीनें बोलला, कीं, देवांनीं एक दोन प्रश्नोत्तरांत आपलें सर्व विश्वरूपच त्यास दाखवावें. ३९ अहो, वांसराला पाहिल्याबरोबर गाय प्रेमानें गडबडून उठते, मग पुढें वांसराच्या तोंडाची व स्तनाची गांठ पडल्यावर तिच्यानें पान्हा चोरवेल काय ? ४० हें पहा कीं, ज्या पांडवांचें संरक्षण करण्याकरितां श्रीकृष्ण भगवान रानावनांतही धावले, त्यांना अर्जुन जें विचारील तें सांगतांना राहवेल का ? ४१ श्रीकृष्ण भगवान हे मूर्तिमंत स्नेहच होत. त्यांना अर्जुनरूपी भक्ष्य मिळाल्यानें या दोघांच्या ऐक्यभावांत यांच्या दोन वेगळाल्या मूर्ति दिसतात, हाच चमत्कार होय. ४२ म्हणून, अर्जुनानें विचारल्याबरोबर देव आपोआप विश्वरूप धारण करतील. तरी आतां आरंभींचा तो प्रसंग ऐकावा. ४३

श्लोकार्थः— अर्जुन म्हणाला, हे भगवन्, माझ्यावर अनुग्रह करण्याकरितां जो तुम्हीं मला अध्यात्मनामक अत्यंत गुह्य ज्ञानाचा उपदेश केला, त्याच्या योगानें माझा सर्व मोह नाहींसा झाला ॥१॥

मग पार्थ देवाला म्हणाला, " हे कृपानिधे, तुम्हीं माझ्याकरितां, शब्दातीत जें गुह्य, तें बोलून दाखविलें. ४४ जेव्हां पंचमहाभूतें ब्रह्मामध्यें लीन होतात, आणि जीव व माया लय पावतात, त्या वेळेस परमात्मा जें रूप धारण करून राहतात, तें शेवटचें स्वरूप, ४५ कृपणाच्यासारखें हृदयांत सांठवलेलें असून वेदांनाही चोरून ठेविलेलें होतें, ४६ तें आज माझ्यापुढें हृदय फोडून उघडें केलें; व ज्या अध्यात्मज्ञानासाठीं शंकरांनीं ऐश्वर्य सोडून स्मशानवास केला, ४७ तें ज्ञान, प्रभो, तुम्हीं मला एकदम दिलें आहे. पण असें जर म्हणावें, तर तुमच्याशीं ऐक्य झाल्याचा काय उपयोग ? ( ऐक्य झाल्यावर देणें घेणें कोठून उरणार ?) ४८ परंतु, खरोखर मोहरूप पुरांत मी डोक्यापर्यंत बुडालों असें पाहून

श्रीहरी । मग काढिलें मातें ॥ ४९ ॥ एक तुंवाचूनि काहीं । विश्वीं दुजियाची भाप नाहीं । कीं आमुचें कर्म पाहीं । जे आम्ही आथी म्हणों ॥ ५० ॥ मी जगीं एक अर्जुनु । ऐसा देहीं वाहे अभिमानु । आणि कौरवांतें इयां स्वजनु । आपुले म्हणें ॥ ५१ ॥ याहीवरी यांतें मी मारीन । म्हणें तेणें पापें कें रिगेन । ऐसें देखत होतों दुःस्वप्न । तों चेवविला प्रभु ॥ ५२ ॥ देवा गंधर्वनगरीची वस्ती । सोडूनि निघालों लक्ष्मीपती । होतों उदकाचिया आर्तीं । रोहिणी[२] पीत ॥ ५३ ॥ जी किरडूं तरी कापडाचें । परि लहरी येत होतिया साचें[३] । ऐसें वायां मरतया जीवाचें । श्रेय तुवां घेतलें ॥ ५४ ॥ आपुलें प्रतिबिंब नेणतां । सिंह कुहां घालील देखोनि आतां । ऐसा धरिजे तेविं अनंता । राखिलें मातें ॥ ५५ ॥ येऱ्हवीं माझा परी येतुलेवरी । येथ निश्चय होता अवधारीं । जे आतांचि सातांही सागरीं । एकत्र मिळिजे ॥ ५६ ॥ हें जगचि आघवें बुडावें । वरी आकाशही तुटोनि पडावें । परि झुंजणें न घडावें । गोत्रजेंशीं मज ॥ ५७ ॥ ऐसिया अहंकाराचिये वोढी । मियां अग्रजळीं दिधली होती बुडी । चांगाचि तूं जवळां येऱ्हवीं काढी । कवणु मातें ॥ ५८ ॥ नाथिलें आपणपां एक मानिलें । आणि नव्हतया नाम गोत्र ठेविलें । थोर पिसें होतें लागलें । परि राखिलें तुम्हीं ॥ ५९ ॥ मागां जळत काढिलें जोहेरीं । तैं तें देहासीच भय अवधारीं । आतां हे जोहरवाहार दुसरी । चैतन्यासकट ॥ ६० ॥ दुराग्रहें हिरण्याक्षें । माझी बुद्धिवसुंधरा सूदली काखे । मग मोहार्णव गँवाक्षें । रिघोनि ठेला ॥ ६१ ॥ तेथ तुझेनि गोसावीपणें । एकवेळ बुद्धीचिया ठाया येणें । हें दुसरें वराह होणें । पाडिले तुज ॥ ६२ ॥ ऐसें अपार तुझें केले । एकी वाचा काय मी बोलें । परि पांचही पोलव मोकलिले । मजप्रती ॥ ६३ ॥ तें कांहीं न वचेचि वायां । भलें यश फोवलें देवराया । जे साद्यंत माया । निरसिली माझी ॥ ६४ ॥ आजी आनंदसरोवरींचीं कमळें । तैसे हे तुझे डोळे । आपुलिया प्रसादाचीं राउळें । जयालागीं करिती ॥ ६५ ॥ हां हो तयाही आणि मोहाची भेटी । हे कायसी पोंवळी गोठी । केउती मृगजळाची वृष्टी । वडवानळेंसी ॥ ६६ ॥ आणि मी तंव दातारा । ये कृपेचिये रिघोनि गाभारां । घेत आहे चँारा । ब्रह्मरसाचा ॥ ६७ ॥ तेणें माझा जी मोह जाये । एथ विस्मो कांहीं आहे । तरी उद्धरलों कीं तुझे पाये । शिवतले आहाती ॥ ६८ ॥

भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।
त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥

अन्वयः—कमलपत्राक्ष, त्वत्तः भूताना भवाप्ययौ मया विस्तरशः श्रुतौ हि, च अव्ययं माहात्म्यं अपि श्रुतम् ॥ २ ॥

१ इच्छेनें. २ मृगजळ. ३ विहिरींत. ४ लटकें. ५ लाक्षागृहातून. ६ अज्ञानरूपी लाक्षागृह. ७ खळगा, झरोका. ८ सामर्थ्यानें ९ प्राण. १० दिले. ११ जोडलें. १२ तुच्छ. १३ अनुभव.

आपण स्वतः उडी घालून मला बाहेर काढलें आहे. ४९ फक्त तुमच्यावांचून या जगांत दुसरी वस्तु नाहीं; परंतु आमचें कर्म पहा कसें ओढवलें कीं, आम्ही ' मी व माझें ' या फेऱ्यांत पडून तुमच्याहून भिन्न आहों असें उघड म्हणत आहों ! ५० मी या जगांत कोणीएक अर्जुन आहें, असा मी या देहाचा अभिमान बाळगीत होतों, व या कौरवांना आप्त म्हणत होतों; ५१ आणखी, यांना मी मारीन व त्यापासून होणाऱ्या पापाबद्दल मला काय शासन होईल, अशा प्रकारचें वाईट स्वप्न पहात होतों. तों, प्रभो, तुम्हीं मला जागृत केलें. ५२ हे लक्ष्मीपते, गंधर्वनगरीची वस्ती सोडून पाणी पिण्याच्या इच्छेनें मृगजळ प्राशन करीत होतों. ५३ महाराज, कापडाचा साप डसला या भ्रांतीनें खऱ्या लहरी येत होत्या; अशा प्रकारें अज्ञानांत मरत असलेला जो मी, त्या मला जीवदान दिल्याचें पुण्य आपण घेतलें. ५४ विहिरींत आपलें प्रतिबिंब पडलें आहे हें न समजतां सिंह आंत उडी घालतो आहे हें पाहून कोणी एखाद्यानें त्यास धरून रक्षण करावें, त्याप्रमाणें अनंता, मी अज्ञानसागरांत बुडत असतां मला आवरून आपण माझें रक्षण केलें. ५५ बाकी असें पहा कीं, माझा तर हा वेळपर्यंत निश्चयच होता कीं, आतांच जरी सप्तसमुद्र एकत्र झाले, ५६ अथवा हें सर्व जग बुडून गेलें, किंवा आकाशही तुटून पडलें ( तरी चिंता नाहीं ), पण गोत्रजांबरोबर मला युद्ध करण्याचा प्रसंग न येवो. ५७ अशा अहंकाराच्या योगानें मीं आग्रहरूपी जलांत बुडी मारली होती; परंतु तुम्ही जवळ होतां म्हणून बरें झालें. एरवीं त्यांतून मला कोणीं बाहेर काढलें असतें ? ५८ वास्तविक मी नसून कोणी आहें असें मानलें, व नाहींत त्यांना नांव ठेवून गोत्रज म्हटलें, अशा प्रकारचें मला जबर वेड लागलें होतें, पण त्यापासून तुम्हीं माझें रक्षण केलें. ५९ पूर्वीं लाक्षागृहांत जळत असतांना त्यांतून बाहेर काढून आपण रक्षण केलें खरें; पण त्या वेळीं फक्त देहाचेंच भय वाटत होतें. आता हें दुसरें लाक्षागृह असून यांत माझें चैतन्य नाश पावत होतें, त्यांतून तुम्हीं मला बाहेर काढलें. ६० दुराग्रहरूपी हिरण्याक्ष दैत्य माझी बुद्धिरूपी पृथ्वी खाकेंत मारून मोहरूपी समुद्राच्या खोल पाण्यांत घेऊन गेला, ६१ तेव्हां तुमच्या बोधाच्या सामर्थ्यानें मी एकदम शुद्धीवर आलों; हा तुम्हांला दुसरा वराहाचा अवतारच घेणें भाग पडलें ! ६२ याप्रमाणें तुमचीं अपार महत्कृत्यें आहेत. तीं माझ्या एकट्या वाणीनें कशीं वर्णन करवतील ? फार काय सांगावें ? तुम्हीं आपले पंचप्राण मला अर्पण केले आहेत. ६३ त्यामुळें देवराया, तुमचे श्रम कांहीं व्यर्थ न जातां यशप्राप्ति झाली. ती ही कीं, माझ्या अज्ञानाचा समूळ नाश झाला. ६४ महाराज, आनंदसरोवरांतील कमलांप्रमाणें असलेले आपले हे नेत्र ज्याकरितां आपल्या कृपाप्रसादाचीं मंदिरें तयार करितात, ( ज्याच्यावर आपली कृपादृष्टि होते, ) ६५ त्याची आणि मोहाची भेट होते हें म्हणणें किती तुच्छ ! महाराज, मृगजलाची वृष्टि वडवानलाला काय करणार ? ६६ आणि हे दातारा, मी तर त्या तुझ्या कृपामंदिराच्या गाभाऱ्यांत शिरून आत्मज्ञानाचा पूर्ण अनुभव घेत आहें. ६७ तेव्हां

( ४१९. देवांच्या कृपेनें बुद्धीला पर तत्व कळलें, ६९–७६ ) पैं कमलायतडोळसा। सूर्यकोटितेजसा। मियां तुजपासोनि महेशा[1]। परिसिलें आजि ॥ ६९ ॥ इयें भूतें जयापरी होती। अथवा लया हन जैसेनि जाती। ते मजपुढां प्रकृती। विरंचिली[2] देवें ॥ ७० ॥ आणि प्रकृती कीर उगाणा[3] दिधला। वरि पुरुषा[4]चाही ठावो दाविला। जयाचा महिमा पांघरोनि जाहला। धडौता[5] वेदु ॥ ७१ ॥ जी शब्दराशी वाढे जिये। कां धर्माऐशिया रत्नातें विये। ते एथींचे प्रभूचे पाये। वोळगे[7] म्हणोनि ॥ ७२ ॥ ऐसें अगाध माहात्म्य। जें सकळमार्गैकगम्य[8]। जें स्वात्मानुभवरम्य। तें इयापरि दाविलें ॥ ७३ ॥ जैसा केरु फिटलिया आभाळीं। दिठी रिगे सूर्यमंडळीं। कां हातें सारूनि बेंबुळी[10]। जळ देखिजे ॥ ७४ ॥ ना तरी उकलूनियां सापाचे वेढे। जैसें चंदना खेंव देणें घडे। अथवा विवसी[11] पळे मग चढे। निधान हाता ॥ ७५ ॥ तैसी प्रकृति हे आड होती। ते देवेंचि सारोनि परौती। मग परतत्व[13] माजिये मती। शेजार केलें ॥ ७६ ॥ ( ४२०. अर्जुनाची इच्छा, ७७–७९ ) म्हणोनि इयेविषयींचा मज देवा। भरंवसा कीर जाहला जीवा। अवतरणः—परि आणीक एक हेवा[14]। उपनला असे ॥ ७७ ॥ तो भिडा[15] जरी म्हणों राहों। तरी आना कवणा पुसों जावों। काय तुजवांचोनि ठावो। जाणत आहों आम्ही ॥ ७८ ॥ जळचर जळाचा आभारु धरी। बाळक स्तनपानीं उपरोधु[16] करी। तरी तया जिणंया श्रीहरी। आन उपायो असे ॥७९॥ ( ४२१. अर्जुनाची इच्छा काय, असा देवांचा प्रश्न, ८० ) म्हणोनि भीडसांकडी न धरवे। जीवा आवडे तेंही तुजपुढां बोलावें। तंव राहें म्हणितलें देवें। चोंडें सांगे ॥ ८० ॥

एवमेतद्यथाऽऽत्थ त्वमात्मानं परमेश्वर। द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥

अन्वयः—परमेश्वर, यथा त्वं आत्मानं आत्थ एवं एतत्, पुरुषोत्तम, ते ऐश्वरं रूपं द्रष्टुं इच्छामि॥३॥

( ४२२. विश्वरूप पाहाण्याची इच्छा, ८१–८८ ) मग बोलिला तो किरीटी। म्हणे तुम्हीं केली जे गोठी। तिया प्रतीतीची दिठी। निवाली माझी ॥ ८१ ॥ आतां जयाचेनि संकल्पें। हे लोकपरंपरा होय हारपे। जया ठायातें आपणपें। मी ऐसें म्हणसी ॥ ८२ ॥ तें मुद्दल रूप तुझें। जेथूनि इयें द्विभुजें हन चतुर्भुजें। सुरकार्याचेनि व्याजें। घेवोंघेवों येसी ॥ ८३ ॥ पैं जलशयनाचिया अवगणिया। कां मत्स्य कूर्म इया मिरवणिया। खेळ सरलिया तूं गुणियौं। सांठविसी जेथ

१ देवाधिदेवा. २ विस्तारानें सांगितली. ३ झाडा. ४ परमात्म्याचा. ५ वस्त्रयुक्त. ६ वेद. ७ आश्रय करतात. ८ सर्व मार्गांनी एकच जाणण्यास योग्य. ९ अभ्र. १० गोंडाळ, शेवाळ. ११ पिशाच. १२ ठेवा. १३ ब्रह्मतत्त्व. १४ इच्छा. १५ भीड धरून. १६ भीड. १७ पांचण्यास. १८ संकोच. १९ इच्छा. २० आरंभापासून. २१ अवतार. २२ गारोडया.

आता माझा मोह नाहींसा झाला यांत कांहीं संशय का आहे ? खरोखर, तुझ्याच पायाची शपथ वाहून सांगतों कीं, मी उद्धरलों। ६८

श्लोकार्थः–हे कमलपत्राक्षा, चराचराची उत्पत्ति आणि विनाश हे दोन्ही विस्तारपूर्वक तुमच्या मुखांतून मीं ऐकले; तसेंच तुमचा महिमा अविनाशी आहे हेंही ऐकिलें ॥ २ ॥

अहो कमलनयना, कोटिसूर्यतेजसा महेशा, आज तुम्हांकडून मीं असें ऐकलें: ६९ हीं सर्व भूतें जिच्यापासून उत्पन्न होतात व लय पावतात अशी जी माया, ती मला देवांनीं विस्तारपूर्वक सांगितली आहे. ७० त्या मायेचा झाडा देऊन परमात्म्याचेंही मूळ-स्थान दाखविलें; ज्याचें यश पांघरून वेद वस्त्रयुक्त झाले ( ज्या परमात्म्याचें यश वेद गातात ), ७१ जे वेद उत्पन्न होऊन अस्तित्वांत आहेत, व ज्यांच्यापासून धर्मासारखीं रत्नें निपजतात, ह्या सर्व गोष्टी, ते आपल्याच पायांचा आश्रय करतात म्हणून, हे प्रभो, घडून येतात ! ७२ त्याप्रमाणें, देवा, तुमचें जें अगाध माहात्म्य, जें सर्व मार्गांनीं एकच जाणण्यास योग्य व आत्मानुभवानें परिपूर्ण, तें तुम्हीं मला दाखविलें. ७३ ज्याप्रमाणें अभ्रें नाहींतशीं झाल्यावर आकाशांत सूर्यमंडळ दृष्टीस पडतें, किंवा हातानें गोंडाळ बाजूला सारल्यावर स्वच्छ उदक दृष्टीस पडतें, ७४ किंवा चंदनाच्या झाडाला सापानें दिलेले वेढे निघाल्यावर त्याला आलिंगन देतां येतें, अथवा पिशाच नाहींसें झाल्यावर द्रव्य हातीं लागतें, ७५ त्याप्रमाणें, ज्ञानाच्या आड जी माया होती, ती देवांनीं पलीकडे सारल्यामुळें माझ्या बुद्धीला ब्रह्मतत्त्व भेटलें. ७६ म्हणून देवा, तुमच्या अगाध शक्तीचा माझ्या जीवाला पूर्ण भरंवसा आला आहे; परंतु मला आणखी एक इच्छा उत्पन्न झाली आहे. ७७ भीड धरून जर मीं ती तुम्हांला विचारली नाहीं, तर दुसऱ्या कोणास विचारावयास जावें ? कारण, तुमच्यावांचून दुसरें आम्हांस ठिकाण माहित आहे का ? ७८ माशांनीं जळाचा आभार मानून त्यास तसदी न देतां बाहेर राहावें असें जर मनांत आणलें, किंवा बालकानें आईजवळ वरचेवर स्तनपान मागण्याची भीड धरली, तर श्रीहरी, त्यांना वांचण्याला दुसरा उपाय आहे का ? ७९ म्हणून, संकोच न करितां मनास येईल ती गोष्ट तुम्हांला विचारावी. इतकें अर्जुन म्हणतो आहे, तोंच देव म्हणाले कीं, तुझें हें बोलणें राहूं दे; तुला कसली इच्छा उत्पन्न झाली आहे ती सांग. ८०

श्लोकार्थः—परमेश्वरा, हें जें तुम्हीं आपल्याविषयीं वर्णन केलें, तें खरोखर तसेंच आहे; तेव्हां पुरुषोत्तमा, तें तुमचें व्यापक रूप पाहण्याची मला इच्छा आहे ॥ ३ ॥

मग अर्जुन म्हणालाः—देवा, तुम्हीं ज्या गोष्टी सांगितल्या, त्यांच्या अनुभवानें माझी दृष्टि शांत झाली. ८१ आतां, ज्याच्या इच्छेनें हें सर्व जग उत्पन्न होतें व लय पावतें, आणि ज्या ठिकाणाला तुम्ही आपलें स्वतःचें असें म्हणवितां, ८२ तें तुमचें मुख्य स्वरूप; जेथून देवांचीं संकटें निवारण करण्याच्या निमित्तानें द्विभुज, चतुर्भुज अशीं रूपें घेऊन तुम्ही येतां; ८३ क्षीराब्धींतील शेषशयनाच्या आरंभापासून मत्स्यकूर्मादि अवतार

॥ ८४ ॥ उपनिषदें जें गाती । योगिये हृदयीं रिगोनि पाहाती । जयातें सनकादिक आहाती । पोटाळूनियां ॥ ८५ ॥ ऐसें अगाध जें तुझें । विश्वरूप कानीं ऐकिजे । तें देखावया चित्त माझें । उतावीळ देवा ॥ ८६ ॥ देवें फेडूनियां सांकड । लोभें पुसिली जरी चाड । तरि हेचि एकी वाँड । आर्ती जी मज ॥ ८७ ॥ तुझें विश्वरूप आघवें । माझिये दिठीसि गोचर होआवें । ऐशी थोर आस जीवें । बांधोनि आहें ॥ ८८ ॥

मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो । योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ४

अन्वयः—प्रभो, योगेश्वर, तत् मया द्रष्टुं शक्यं इति त्वं यदि मन्यसे, ततः मे अव्ययं आत्मानं दर्शय ॥ ४ ॥

(४२३. विश्वरूप पाहाण्याची माझी योग्यता असल्यास विश्वरूप दाखवा, ८९–९४) परि आणीक एक एथ शाङ्र्गीं । तुज विश्वरूपातें देखावयालागीं । पैं योग्यता माझिया आंगीं । असे कीं नाहीं ॥ ८९ ॥ हें आपलें आपण मी नेणें । ते कां नेणसी जरी देव म्हणे । तरी सरोगु काय जाणे । निदान रोगाचें ॥९०॥ आणि जी आर्तीचेनि पडिभरें । आर्तु आपली ठाकी पैं विसरे । जैसा तान्हेला म्हणे न पुरे । समुद्र मज ॥ ९१ ॥ ऐशा सचाडपणाचिये भुली । न सांभाळवे समसैया आपुली । यालागीं योग्यता जेविं माउली । बाळकाची जाणे ॥ ९२ ॥ तयापरी श्रीजनार्दना । विचारिजे माझी संभावना । मग विश्वरूपदर्शना । उपक्रम कीजे ॥ ९३ ॥ तरि ऐसी ते कृपा करा । येऱ्हवीं नव्हे हें म्हणा अवधारा । वायां पंचमालापें बधिरा । सुख केउतें देणें ॥ ९४ ॥ (४२४. देवांच्या उदारत्वाचें वर्णन, ९५–१११) येऱ्हवीं येकले बापियांचे तृषे । मेघ जगापुरतें काय न वर्षे । परी जाहालीही वृष्टि उँपखे । जऱ्ही खडकीं होय ॥ ९५ ॥ चकोरा चंद्रामृत फावलें । येरां आण वाहूनि काय वारिलें । परि डोळ्यांवीण पोंहलें । वायां जाय ॥ ९६ ॥ म्हणोनि विश्वरूप तूं सहसा । दाविसी कीर हा भरंवसा । कां जे कडाडा आणि गाहिंसी । माजी नित्य नवा तूं कीं ॥ ९७ ॥ तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देतां न म्हणसी पात्रापात्र । पैं कैवल्य ऐसें पवित्र । जें वैरियांही दिधलें ॥ ९८ ॥ मोक्षु दुराराध्यु कीर होय । परि तोही आराधी तुझे पाय । म्हणोनि धाडिसी तेथ जाय । पाईकु जैसा ॥ ९९ ॥ तुवा सनकादिकांचेनि मानें । सायुज्यीं सौरसु दिधला पूतने । जे विषाचेनि स्तनपानें । मारूं आली ॥ १०० ॥ हा गा राजसूय यागाचिया सभासदीं । देखतां त्रिभुवनाची मांदी । कैसा शतधा दुर्वाक्य शब्दीं । निस्तेजिलेंसी ॥ १ ॥ ऐसिया अपराधिया शिशु-

१ आठवण करून. २ आलिंगन देऊन. ३ मोठी. ४ योग्यता. ५ इच्छा. ६ अधिकार. ७ प्रारंभ. ८ पंचमस्वरानें. ९ चातकाचे. १० व्यर्थ होतें. ११ प्रकाशलें. १२ सुंदर. १३ चाकर. १४ तुझा अपमान केला.

घेऊन सर्व अवतारकृत्य संपल्यावर, हे गारोड्या श्रीकृष्णा, ज्या ठिकाणीं तुम्ही पुनः जातां, ८४ उपनिषदें ज्याचे गुणानुवाद वर्णन करतात, योगिजन हृदयांत आठवून ध्यान करतात, व ज्याला सनकादिक आलिंगन देऊन राहतात, ८५ असें जे तुमचें अगम्य विश्वरूप—ज्याचा लौकिक आम्ही ऐकतों, तें पाहण्याकरितां देवा, माझें चित्त फार उतावळें झालें आहे. ८६ तुम्हीं मनांतील संकोच टाकून, प्रेमानें, माझी इच्छा काय आहे म्हणून विचारलें, तर हीच एक माझी बलवत्तर इच्छा आहे. ८७ आपलें सर्व विश्वरूप मीं दृष्टीनें पहावें असा माझ्या मनानें ध्यास घेतलेला आहे. ८८

श्लोकार्थः—प्रभो, हे योगेश्वरा, तें तुमचें रूप मी पाहूं शकेन असें जर तुम्हाला वाटत असेल, तर तें तुमचें अविनाशी रूप मला दाखवा ॥ ४ ॥

परंतु हे शार्ङ्गधरा, आणखी एक मला अशी शंका आहे कीं, तुमचें विश्वरूप पाहण्याची माझ्या अंगांत योग्यता आहे किंवा नाहीं; ८९ हें माझें मला कांहीं समजत नाहीं, तें कां समजत नाहीं म्हणाल, तर हें पहा—रोग्याला आपल्या रोगाचें निदान समजतें का ? ९० आणखी महाराज, इच्छेची आसक्ति प्रबळ असल्यामुळें इच्छा करणारा मनुष्य जशी आपली योग्यता विसरतो, किंवा ज्यास तहान लागली आहे, त्यास जसें समुद्रही आपली तहान भागविण्यास पुरा पडणार नाहीं असें वाटतें, ९१ तशाच प्रबल इच्छेनें मला भूल पडली असल्यामुळें, माझी इच्छा मला आवरून ठेववत नाहीं. याकरितां आई ज्याप्रमाणें आपल्या मुलाची योग्यता जाणून त्याची इच्छा पुरी करिते, ९२ त्याप्रमाणें, हे जनार्दना, माझ्या अधिकाराचा विचार करून मग तुम्ही आपलें विश्वरूप दाखविण्यास आरंभ करा. ९३ माझा अधिकार असेल तर ही कृपा करा. एरव्हीं असें पहा कीं, माझा अधिकार नसेल तर नाहीं म्हणून सांगा; हो—पंचम स्वरातील उत्तम गाणें ऐकून बहिऱ्याला कसें सुख होणार ? ९४ बाकी मेघ हा एकट्या चातकाकरितांच वर्षाव करतो, आणि जगाकरिता करीत नाहीं असें कांहीं नाहीं; परंतु तोच पाऊस खडकावर पडला तर व्यर्थ जातो. ९५ चंद्रप्रकाशापासून चकोरालाच अमृत प्राप्त होतें, आणि दुसऱ्याला शपथ का घातली आहे ? पण ( प्राशन करण्याची युक्ति चकोराप्रमाणें इतराना माहीत नसल्यामुळें त्यांना ज्याप्रमाणें त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं, त्याप्रमाणें ) दृष्टीशिवाय प्रकाश व्यर्थ आहे; ९६ म्हणून तुम्ही बहुतकरून मला विश्वरूप दाखवाल असा माझा पूर्ण भरंवसा आहे. कारण, भयंकर अथवा सुंदर रूप दाखविण्याची आपली अलौकिक शक्ति आहे. ९७ ( कारण ) तुमचें औदार्य स्वतंत्र आहे व तुमच्या मनांत एखादी गोष्ट देण्याचें आलें असतां पात्र किंवा अपात्र हा भेद तुम्ही मानीत नाहीं. असें पहा, मोक्षासारखें पवित्र ठिकाण तुम्हीं आपल्या शत्रूंसही दिलें आहे. ९८ खरोखर मोक्ष जरी दुष्प्राप्य आहे, तरी तोही तुमच्या पायाची सेवा करतो; म्हणून तुम्ही त्यास जिकडे जाण्याची आज्ञा कराल तिकडे तो जाऊन चाकराप्रमाणें तुमची आज्ञा पाळतो. ९९ आपल्या स्तनात विष घालून तुम्हांला

पाळा । आपणपें ठावों दिधला गोपाळा । आणि उत्तानचरणाचिया बाळा ।
काय ध्रुवपदीं चाड ॥ २ ॥ तो वना आला याचिलागीं । जे बैसावें पितयाचिया
उत्संगीं । कीं तो चंद्रसूर्यादिकांपरिस जगीं । श्लाघ्यु केला ॥ ३ ॥ ऐसा वनवा-
सिया सकळां । देता एकचि तूं धसाळा । पुत्र आळवितां अजामिळा । आपणपें
देसी ॥ ४ ॥ जेणें उरीं हाणितलासि पायेंरा । तयाचा चरण वाहासी दातारा ।
अझुनी वैरियांचिया कलेवरा । विसंबसीना ॥ ५ ॥ ऐसा अपकारियां तुझा उप-
कारु । तूं अपात्रींही परि उदारु । दे दान म्हणोनि दारवंटेकैरू । जाहलासी
'बळीचा ॥ ६ ॥ तूतें आराधीं ना आइके । होती पुंसा चोलवीत-कौतुकें । तिये
वैकुंठीं तुवां गणिके । सुरवाड्ड केला ॥ ७ ॥ ऐसीं पाहूनि वायांणीं मिसें । आप-
णपें देवों लागसी वानिवसें । तो तूं कां अनारिसें । मजलागीं करिसी ॥ ८ ॥ हां
गा दुभतयाचेनि पैवाडें । जें जगाचें फेडी सांकडें । तिये कामधेनूचे पाडे । काय
भुकेले ठाती ॥ ९ ॥ म्हणोनि मियां जें विनविलें कांहीं । तें देव न दाखविती हें
कीर नाहीं । परि देखावयालागीं देईं । पात्रता मज ॥ ११० ॥ तुझें विश्वरूप
आंकळे । ऐसे जरी जाणसी माझे डोळे । तरि आर्तीचे डोहळे । पुरवीं देवा
॥ ११ ॥ ( ४२५. देव विश्वरूप दाखविण्यास उतावीळ झाले, ११२–१२३ ) ऐसी
ठायेंठीवो विनंती । जंव करूं सरला सुभद्रापती । भगवानुवाच:—तंव तया षड्गुण-
चक्रवर्ती । साहवेचिना ॥१२॥ तो कृपापीयूषें सजळु । आणि येरु जवळां आला
वर्षाकाळु । नाना श्रीकृष्ण कोकिळु । अर्जुन वसंतु ॥ १३ ॥ नातरी चंद्रबिंब
वाटोळें । देखोनि क्षीरसागर उचंबळे । तैसा दुणेंही प्रेमबळें । उल्लासितु जाहला
॥ १४ ॥ मग तिये प्रसन्नतेचेनि आटोपें । गाजोनि म्हणितलें सकृपें । पार्था
देख देख अमूपें । स्वरूपें माझीं ॥ १५ ॥ एक विश्वरूप देखावें । ऐसा मनोरथु
केला पांडवें । कीं विश्वरूपमय आघवें । करूनि घातलें ॥ १६ ॥ बाप उदार देवो
अपरिमितु । याचक स्वेच्छा सदोदितु । असे सहस्रवरी देतु । सर्वस्व आपुलें
॥ १७ ॥ अहो शेषाचेहि डोळे चोरिले । वेद जयालागीं झकविले । लक्ष्मीयेही
रांहविलें । जिव्हार जें ॥ १८ ॥ तें आतां प्रगटूनि अनेकधा । करीत विश्वरूप-
दर्शनाचा धांदों । बाप भाग्य अगाधा । पार्थाचिया ॥ १९ ॥ जो जागता स्वप्ना-
वस्थे जाये । तो जेवीं स्वप्नींचें आघवें होये । तेवीं अनंत ब्रह्मकटाह आहे । आप-
णचि जाहला ॥ १२० ॥ ते सहसा मुद्रा सोडिली । आणि स्थूलदृष्टीची जव-
निका फेडिली । किंबहुना उघडिली । योगऋद्धी ॥ २१ ॥ परि हा हें देखेल कीं

१ मांडीवर. २ लाथेनें. ३ द्वारपाळ. ४ राघूला. ५ सुख. ६ व्यर्थ. ७ निमित्तें. ८ अकस्मात.
९ अधिकपणानें. १० पाहातां येईल. ११ यथायोग्य. १२ अमृत. १३ मेघ. १४ दुपटीपेक्षां अधिक.
१५ उद्यक्त. १६ आवेश; भर. १७ अगणित. १८ गुह्य. १९ धंदा. २० ब्रह्मांड. २१ कृष्णरूप.

मारण्याच्या हेतूने स्तनपान देण्याकरितां पूतना राक्षसी आली होती, तिलाही तुम्हीं सनकादिकांच्या बरोबरीनें सायुज्य मुक्ति दिली. १०० महाराज ! धर्मराजाच्या राजसूय यज्ञांत त्रिभुवनांतील देव, ऋषि व राजे जमले असतां त्या ठिकाणीं ज्यानें आपणांस दुर्वाक्यें बोलून आपला अपमान केला, १ त्या महदपराधी शिशुपालालाही तुम्हीं सरूपता मुक्ति दिली. आणखी गोपालकृष्णा, उत्तानपाद राजाचा मुलगा जो ध्रुव, त्याने अढळ पदाची का इच्छा केली होती ? २ बापाचे मांडीवर बसावयास मिळावें एवढ्याचकरिता तो वनांत आला होता; पण त्याला तुम्ही चंद्रसूर्यादिकांपेक्षांही श्रेष्ठ स्थानीं नेऊन बसविलें ! ३ याप्रमाणें दुःखितांना उदारपणें देणारे एक तुम्हीच. हें पहा, अजामिळाने मृत्युसमयीं पुत्रमिषानें नारायण नामाचा उच्चार केल्यामुळें त्याला मुक्ति दिली; ४ प्रभो, ज्या भृगु ऋषीनें तुमच्या हृदयावर लाथ मारली होती, त्याचें श्रीवत्सलाञ्छन चिन्ह तुम्हीं आपल्या हृदयावर भूषण मानून बाळगिलें आहे; व तुमचा वैरी जो शंखासुर त्याचें शरीर तुम्हीं हातांत धारण केलें आहे. ५ याप्रमाणे, अपकार करणारावरही तुम्ही उपकारच करितां आणि अपात्र मनुष्यास तुम्ही औदार्यानें दान करिता; बळीपाशीं आपण दान मागावयास जाऊन त्याचे द्वारपाळ झाला ! ६ तुमची आराधना न करता व तुमचे गुणानुवाद न ऐकतां राघूला तुमच्या नांवानें हांक मारीत असता गणिकेला तुम्ही वैकुंठसुखाची प्राप्ति करून दिली; ७ अशा क्षुल्लक कारणानेंही अकस्मात् तुम्ही स्वस्वरूप प्राप्त करून देणारे, ते तुम्ही मला वेगळी प्राप्ति कशी करून द्याल ? ८ अहो, दुभत्याच्या अधिकपणानें जी कामधेनु जगाचें संकट निवारण करते, तिचीं वांसरें उपाशीं राहतील काय ? ९ म्हणून, मीं ज्याबद्दल विनंती केली आहे, तें विश्वरूप देव मला दाखवणार नाहींत असें कधींही होणार नाहीं. परंतु तें पाहण्याची मला योग्यता द्या. ११० तुमचें विश्वरूप माझ्या डोळ्यांनीं पाहवेल अशी जर तुमची खात्री असेल, तर देवा, माझे विश्वरूप पाहण्याचे डोहाळे पुरवा. ११ अशी सुभद्रापतीनें यथायोग्य विनंती केल्यावर षड्गुणैश्वर्याचा राजा जो श्रीकृष्ण, त्याला ती सहन झाली नाहीं. १२ अर्जुन हा वर्षाकाळाप्रमाणें व श्रीकृष्ण वर्षाकाळीं उत्पन्न होणाऱ्या कृपामृतयुक्त मेघाप्रमाणें दिसूं लागले. अथवा, अर्जुन हा वसंत ऋतु व त्यांत कृष्ण हे मंजुळ शब्द करणारा कोकिळ असें भासलें. १३ किंवा पूर्णचंद्रबिंब पाहून ज्याप्रमाणें क्षीरसागराला भरती येते, त्याप्रमाणें त्या समुद्राच्या दुपटीपेक्षाही अधिक प्रेमानें श्रीकृष्ण उचंबळले. १४ मग कृपावंत श्रीकृष्ण त्या प्रसन्नपणाच्या भरात मोठ्यानें म्हणाले, " पार्था, माझीं अगणित रूपें पाहा. " १५ अर्जुनाच्या मनात देवाचें एक विश्वरूप पहावें असा हेतु होता, परंतु श्रीकृष्णानीं सर्व जग विश्वरूप आहे असें दाखविलें. १६ प्रभूचें औदार्य अपरिमित असल्यामुळे मागणाराच्या इच्छेच्या सहस्रपट आपलें ते नेहमीं देतात. १७ अहो, जे आपलें गुह्य असें विश्वरूप शेषाच्या दोन हजार डोळ्यांसही दाखविलें नाहीं, वेदानाही ज्याच्याविषयीं फसविलें, व लक्ष्मीपासूनही जे गुप्त ठेवलें, १८ तें विश्वरूप

नाहीं । ऐसी सेचि न करी कांहीं । एकसरां म्हणतसे पाहीं । स्नेहातुर ॥ २२ ॥

पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।
नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥

*अन्वयः—पार्थ, नानाविधानि, नानावर्णाकृतीनि च दिव्यानि शतशः अथ सहस्रशः मे रूपाणि पश्य ॥ ५ ॥*

अर्जुना तुवां एक दावा म्हणितलें । आणि तेंचि दावूं तरी काय दाविलें । आतां देखें आघवें भरिलें । माझ्याचि रूपीं ॥ २३ ॥ ( ४२६. नाना प्रकारचें विश्वरूप, १२४–१३१ ) एकें कृशें एकें स्थूळें । एकें ऱ्हस्वें[2] एकें विशाळें । पृथुतरें[3] सरळें । अप्रांतें[4] एकें ॥ २४ ॥ एकें अनावरें प्रांजळें[5] । सव्यापारें एकें निश्चळें । उदासीनें स्नेहाळें । तीव्रें एकें ॥ २५ ॥ एकें घूर्णितें सावधें[6] । असलगें[7] एकें अगाधें[8] । एकें उदारें[9] आतिबद्धें । क्रुद्धें एकें ॥ २६ ॥ एकें शांतें सन्मदें[10] । स्तब्धें एकें सानंदें । गर्जितें निशब्दें । सौम्यें एकें ॥ २७ ॥ एकें साभिलाषें विरक्तें । उन्निद्रितें[11] एकें निद्रितें । परितुष्टें एकें आर्तें । प्रसन्नें एकें ॥ २८ ॥ एकें अशस्त्रें सशस्त्रें । एकें रौद्रें[12] अति मित्रें । भयानकें एकें विचित्रें । स्वस्थें[13] एकें ॥२९॥ एकें जनलीलाविलासें । एकें पालनशीलें लालसें । एकें संहारकें सावेशें । साक्षिभूतें एकें ॥१३०॥ एवं नानाविधें परि बहुवसें । आणि दिव्यतेजप्रकाशें । तेवींचि एकएकाऐसें । वर्णही नव्हे ॥ ३१ ॥ ( ४२७. विश्वरूपाचे नाना प्रकार, १३२–१३६ ) एकें तांतलें[14] साडेपंधरें । तैसीं कपिलवर्णें[15] अपारें । एकें सर्वांगीं जैसें सिंदुरें । डवरलें[16] नभ ॥३२॥ एकें सावियाचीं चुळुकीं[17] । जैसें ब्रह्मकटाह खचिलें माणिकीं । एकें अरुणोदयासारिखीं । कुंकुमवर्णें ॥ ३३ ॥ एकें शुद्धस्फटिकसोज्वळें[18] । एकें इंद्रनीळसुनीळें । एकें अंजनवर्णें[19] सकाळें । रक्तवर्णें एकें ॥ ३४ ॥ एकें तप्तकांचनसम[20] पिंवळीं । एकें नवजलदश्यामळीं[21] । एकें चांपेगोरीं[22] केवळीं । हरितें[23] एकें ॥ ३५ ॥ एकें तप्तताम्र[24]-तांबडीं । एकें श्वेतचंद्रें[25] चोखडीं । ऐसीं नानावर्णें रूपडीं । देखें माझीं ॥ ३६ ॥ ( ४२८. नाना आकृति, १३७–१४० ) हे जैसे कां आनान वर्ण । तैसें आकृतीही अनारिसेपण । लाजा[26] कंदर्प[27] रिघाला शरण । तैसीं सुंदरें एकें ॥ ३७ ॥ एकें अतिलावण्यसाकारें । एकें स्निग्धवपु[28] मनोहरें । शृंगारश्रियेचीं भांडारें । उघडिलीं जैसीं ॥ ३८ ॥ एकें पीनावयवें[29] मांसळें । एकें शुष्कें अतिविक्राळें । एकें दीर्घकंठें

१ प्रेमाच्या भरात. २ ठेंगणीं. ३ लाड. ४ अमर्याद. ५ निष्कपटी. ६ बेसावध. ७ सुंदर. ८ गंभीर. ९ कृपण. १० चांगल्या मदानें युक्त. ११ जागृत. १२ उग्र. १३ सामाधिस्थ. १४ तावलेल्या. १५ पिंगट. १६ सुशोभित झालेलें. १७ तोरमल्ल्याप्रमाणें लहान १८ स्वच्छ. १९ काळजासारखी. २० ताव दिलेल्या सोन्याप्रमाणें. २१ नव्या मेघाप्रमाणें श्याम वर्णाची. २२ सोनचाफ्याप्रमाणें पिवळीं. २३ हिरवीगार. २४ तापलेल्या तांब्याप्रमाणें. २५ शुभ्र चंद्राप्रमाणें. २६ लाजेनें. २७ मदन. २८ तेजःपुंज शरीरें. २९ गोंडस.

भाग्यवान पार्थाला आतां अनेक प्रकारें प्रकट करून दाखविण्याचा धंदा प्रभूंनीं आरंभिला आहे। १९ कोणी एखादा जागृत अवस्थेंतून स्वप्नावस्थेंत गेल्यावर ज्याप्रमाणें स्वप्नात दृष्टीस पडणारे सर्व पदार्थ आपणच बनतो, त्याप्रमाणें श्रीकृष्ण आपणच ब्रह्मांड झाले। १२० प्रभूंनीं श्रीकृष्णरूप सोडून देऊन ज्या अज्ञानदृष्टीच्या पडद्यानें ते लोकांस मनुष्यरूपानें भासत होते, तो पडदा काढून घेऊन, आपलें सर्व योगबल प्रकट केलें. २१ परंतु अर्जुनाच्यानें हें रूप पहावेल किंवा नाहीं याची आठवण सुद्धां नाहींशी होऊन, प्रेमभरांत एकदम 'माझें रूप पाहा' असें म्हणूं लागले. २२

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणाले, पार्था, अनेक प्रकारचीं, अनेक वर्णाचीं आणि अनेक आकारांचीं व अलौकिक अशीं माझीं शेंकडों हजारों रूपें पाहा ॥ ५ ॥

अर्जुना, तूं माझें एकच विश्वरूप दाखवा असें म्हटलेंस, आणि तें एकच तुला दाखविलें, तर यांत नवल तें काय ? म्हणून आतां माझ्या स्वरूपांतच सर्व जग भरलें आहे असें पहा. २३ माझीं रूपें कशीं आहेत म्हणशील, तर तीं पहा—कांहीं रोडकीं, कांहीं लठ्ठ, कांहीं ठेंगणीं, कांहीं उंच, कांहीं जाड, कांहीं सडपातळ, कांहीं अमर्याद, २४ कांहीं न आवरणारीं, कांहीं निष्कपटी, कांहीं उद्योग करणारीं, कांहीं स्वस्थ बसणारीं, कांहीं उदासीन, कांहीं प्रेमयुक्त आणि कांहीं तीव्र बुद्धीचीं; २५ कांहीं बेसावध, कांहीं सावध, कांहीं सुंदर, कांहीं गंभीर, कांहीं उदार, कांहीं कृपण, कांहीं रागीट, २६ कांहीं शांत, कांहीं चांगल्या मदानें युक्त, कांहीं निरुपयोगी, कांहीं आनंदयुक्त, कांहीं ओरडणारीं, कांहीं न बोलणारीं, कांहीं सौम्य, २७ कांहीं लोभी, कांहीं विरक्त, कांहीं जागृत, कांहीं निजणारीं, कांहीं संतोषी, कांहीं दुःखी, कांहीं प्रसन्न; २८ कांहीं निःशस्त्र, कांहीं शस्त्रधारी, कांहीं उग्र, कांहीं स्नेहाळू, कांहीं भयंकर, कांहीं चित्रविचित्र, कांहीं समाधिस्थ, २९ कांहीं जनांच्या लीलेंत निमग्न, कांहीं प्रीतीनें पालन करणारीं, कांहीं क्रोधानें संहार करणारीं, कांहीं साक्षीभूत. १३० ह्याप्रमाणें नाना प्रकारचीं पुष्कळ आणि तेजस्वी व त्याचप्रमाणें निरनिराळ्या वर्णाचीं आहेत. ३१ कांहीं तावलेल्या सोन्याप्रमाणें, त्याचप्रमाणें शेंकडों पिंगट वर्णाचीं, आकाश अस्तमानसमयीं सुशोभित दिसतें त्याप्रमाणें कांहीं, कांहीं तांबड्या रंगाचीं, ३२ कांहीं तोरमल्लयांप्रमाणें लहान—जसें कांहीं सर्व ब्रह्मांड माणकांनीं भरलेलें आहे अशीं शोभणारीं—कांहीं अरुणोदयाप्रमाणे तांबड्या वर्णाचीं, ३३ कांहीं शुद्ध स्फटिकाप्रमाणें स्वच्छ पांढरीं, कांहीं इंद्रनीळ मण्याप्रमाणें निळीं, कांहीं काजळासारखीं काळीं, कांहीं रक्ताप्रमाणें लाल, ३४ कांहीं ताव दिलेल्या सोन्याप्रमाणें पिवळीं, कांहीं नव्या मेघाप्रमाणें श्यामवर्णाचीं, कांहीं निवळ चोनचांफ्याप्रमाणें पिवळीं, कांहीं हिरवींगार, ३५ कांहीं तापलेल्या तांब्याप्रमाणें लाल, आणि कांहीं चंद्राप्रमाणें अति शुभ्र, याप्रमाणें माझीं नानावर्णाचीं रूपें पाहा. ३६ हे जसे भिन्न भिन्न रंग आहेत, त्याप्रमाणें भिन्न भिन्न आकृतीही आहेत. कीं ज्या आकृतींच्या सौंदर्यापुढें मदनही लाजून शरण आला. ३७ कांहीं तेज.पुंज, कांहीं मनोहर,

वितांळें । विकटें[2] एकें ॥ ३९ ॥ एवं नानाविधाकृती । इया पाहतां पारु नाहीं सुभद्रापती । ययांच्या एकेकीं अंगप्रांतीं । देख पां जगा ॥ १४० ॥

पश्यादित्यान्वसून् रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।
बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥

अन्वयः—भारत ! आदित्यान्, वसून्, रुद्रान्, अश्विनौ तथा मरुतः पश्य, अदृष्टपूर्वाणि बहूनि आश्चर्याणि च पश्य ॥ ६ ॥

( ४२९. देव स्वतः आपल्या विश्वरूपाचें वर्णन करतात, १४१–१५१ ) जेथ उन्मीलॅन होत आहे दिठी । तेथ पसरती आदित्यांचिया सृष्टी । पुढती निमीलॅनीं मिठी । देत आहाती ॥ ४१ ॥ वदनींचिया वाफेसवें । होत ज्वाळामय आवर्वे । जेथ पावकादिक पावे । संमूह वसूंचा ॥ ४२ ॥ आणि भ्रूलतांचे शेवट । कोपें मिळों पाहती एकवट । तेथ रुद्रगणांचे संघाट । अॅवतरत देखें ॥ ४३ ॥ पैं सौम्यतेचा ओलावा । मिती नेणिजे अश्विनौदेवां । श्रोतीं होती पांडवा । अनेक वायु ॥ ४४ ॥ यापरी एकेकाचिये लीळे । जन्मती सुरसिद्धांचीं कुळें । ऐसीं अपारें आणि विशाळें । रूपें इयें पाहीं ॥ ४५ ॥ जयांतें सांगावया वेद बोवडे । पाहावया काळाचेंही आयुष्य थोकडें । धातयाही परि न सांपडे । ठाव जयांचा ॥४६॥ जयांतें वेदत्रयी कधीं नायके । तियें इयें प्रत्यक्ष देख अनेकें । भोगी आश्चर्याचीं कवतिकें । महासिद्धी ॥ ४७ ॥

इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।
मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥

अन्वयः—गुडाकेश, कृत्स्नं सचराचरं जगत् इह मम देहे एकस्थं अद्य पश्य; यत् अन्यत् द्रष्टुं इच्छसि ( तदपि पश्य ) ॥ ७ ॥

इया मूर्तीचिया किरीटीं । रोममूळीं देखें पां सृष्टी । सुरतरुतळवटीं । तृणांकुर जैसे ॥ ४८ ॥ वातायनाचेनि प्रकाशें । उडत परमाणु दिसती जैसे । भ्रमत ब्रह्मकटाह तैसे । अवयवसंधीं ॥ ४९ ॥ एथ एकैकाचिया प्रदेशीं । विश्व देख विस्तारेंसीं । आणि विश्वाही परौतें मानसीं । जरी देखावें वर्ते ॥ १५० ॥ तरी इयेही विषयींचें कांहीं । एथ सर्वथा सांकडें नाहीं । सुखें आवडे तें माझिया देहीं । देखसी तूं ॥ ५१ ॥ ( ४३०. देव म्हणतात, विश्वरूप दाखविलें तरी अर्जुन पाहातच नाहीं, १५२–१५५ ) अवतरणः— ऐसें विश्वमूर्ती तेणें । बोलिलें कारुण्यपूर्णें । तंव देखत आहे कीं नाहीं म्हणे । निवांतुचि येरु ॥ ५२ ॥ एथ कां पां हा उगला । म्हणोनि श्रीकृष्णें जंव पाहिला । तंव आर्तीचें लेणें लेइला । तैसाचि आहे ॥ ५३ ॥

१ मोठ्या डोक्यांची. २ भयंकर. ३ उघडणें. ४ मिटणें. ५ समुदाय. ६ भिवयांचे. ७ उत्पन्न झालेले. ८ स्वस्थ बसला.

—जणूं काय शृंगारलक्ष्मीचे जामदारखानेच उघडले आहेत. ३८ कांहीं गोंडस, कांहीं किडकिडीत, कांहीं अति विक्राळ, कांहीं उंच मानेचीं, आणि कांहीं मोठ्या डोक्यांचीं, भयंकर; ३९ हे सुभद्रापते, याप्रमाणें माझ्या रूपाच्या शेंकडों आकृति आहेत, व त्या पाहूं गेलें असतां त्यांचा पार लागणारा नसून, या एकएक रूपाच्या एकएक अवयवावर सर्व जग भरलेलें आहे तें पहा. १४०

श्लोकार्थः—हे भारत, ( बारा ) आदित्य, ( आठ ) वसु, ( अकरा ) रुद्र, दोन अश्विनीकुमार, ( एकूणपन्नास ) मरुद्गण आणि पूर्वी कधींही पाहिलीं नाहींस अशीं अनेक आश्चर्यकारक रूपें माझे ठिकाणीं पहा ॥ ६ ॥

माझी दृष्टि उघडल्याबरोबर आदित्यादि देवांची उत्पत्ति होते, व पुढें तीच दृष्टि मिटल्याबरोबर सर्व देव लय पावतात. ४१ माझ्या मुखांतील श्वासोच्छ्वासाबरोबर सर्व ज्वालामय होऊन ज्वालांतून अष्टवसूंचा समुदाय उत्पन्न होतो; ४२ आणि माझ्या भिवयांचीं टोंकें रागानें एके ठिकाणीं मिळतात असें दिसूं लागलें म्हणजे अकरा रुद्रगण उत्पन्न झालेले दृष्टीस पडतात. ४३ माझ्या सौम्य मुद्रेवरून असंख्य अश्विनीकुमार उत्पन्न होतात; आणि हे पांडवा, कानांतून अनेक वायु उत्पन्न होतात. ४४ याप्रमाणें माझ्या एकेक अवयवाच्या लीलेपासून देव व सिद्ध यांचीं कुळें उत्पन्न होतात; अशीं अपार आणि विशाळ रूपें या ठिकाणीं पहा. ४५ ज्या रूपांचें वर्णन करण्यास वेदांचीही वाणी कुंठित झाली; व जीं रूपें पहावयास काळाचेंही आयुष्य पुरलें नाहीं; व ज्या रूपांचा ब्रह्मदेवासही अंत लागला नाहीं; ४६ आणि ज्यांचें नांव तीन वेदांनींही कधीं ऐकलें नाहीं, तीं माझीं अनेक रूपें या ठिकाणीं प्रत्यक्ष पहा; व तीं पाहिल्यापासून आश्चर्यकारक लीलेचा व महासिद्धीचा उपभोग घे. ४७

श्लोकार्थः—हे गुडाकेशा, चराचरासहित हे सर्व जग, आणि जें कांहीं आणखी तूं पाहूं इच्छितोस तें सर्व आज माझ्या देहामध्यें एके ठिकाणीं असलेलें पहा. ॥ ७ ॥

हे किरीटी, या रूपाच्या प्रत्येक रोमाच्या मुळाशीं सृष्टि आहे ती पहा. जसें कांहीं कल्पतरूच्या बुडाजवळ कोंवळें गवतच उगवलेलें आहे. ४८ ज्याप्रमाणें झरोक्यांतून सूर्यकिरण घरांत पडल्यावर त्यांत परमाणु उडतात असें दिसतें, त्याप्रमाणें या रूपांच्या प्रत्येक अवयवाच्या सांध्यांतून ब्रह्मांडाचे थवेचे थवे भ्रमण करीत आहेत, असें दिसत आहे पहा. ४९ या एकेक स्वरूपाच्या अवयवाच्या ठिकाणीं सर्व ब्रह्मांड भरलेलें आहे तें पाहा; आणि जर तुला कदाचित् विश्वापलीकडेही आणखी पाहावेंसें कांहीं वाटेल, १५० तर त्याबद्दलही कांहीं संकट पडण्याचें कारण नाहीं; या माझ्या शरीरांत, जें तुला आवडेल तें सुखानें पाहून घे. ५१ याप्रमाणें ते विश्वरूप श्रीकृष्ण पूर्ण प्रेमानें बोलल्यावर, अर्जुन आपलें रूप पहात आहे किंवा नाहीं म्हणून पाहूं लागले तों तो स्वस्थ बसलेला त्यांच्या दृष्टीस पडला ! ५२ तेव्हां हा कां स्वस्थ बसला म्हणून ते जों पाहूं लागले, तों हा

न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।
दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥

अन्वयः—अनेन स्वचक्षुषा एव त्वं तु मां द्रष्टुं न शक्यसे; अत एव ते दिव्यं चक्षुः ददामि; मे ऐश्वरं योगं पश्य ॥ ८ ॥

मग म्हणे उत्कंठे वोहँट न पडे । अझुनी सुखाची सोयें न सांपडे । परि दाविलें तें फुडें । नाकळेचि यया ॥ ५४ ॥ हें बोलोनि देवो हांसिले । हासोनि देखणियातें म्हणितलें । आम्हीं विश्वरूप तरी दाविलें । परि न देखसीच तूं ॥ ५५ ॥ ( ४३१. अर्जुन म्हणतो—देवा, माझ्या योग्यतेचा विचार न करतां विश्वरूप दाखविलें, हा दोष तुमचा कीं माझा ? १५६–१६० ) यया बोला येरें विचक्षणें । म्हणितलें हा जी कवणासि तें उणें । तुम्ही बकाकरवीं चांदिणें । चरऊं पहा मा ॥ ५६ ॥ हांहो उटोनियां आरिसा । आंधळिया दाऊं बैसा । बहिरियापुढें हृषीकेशा । गाणीव करा ॥ ५७ ॥ मकरंदकणाचा चारा । जाणतां घालूनि दर्दुरां । वायां धांडा शार्ङ्गधरा । कोपा कवणा ॥ ५८ ॥ जें अतींद्रिय म्हणोनि व्यवस्थिलें । केवळ ज्ञानदृष्टीचिया भागा फिटलें । तें तुम्हीं चर्मचक्षूंपुढें सूदलें । मी कैसेनि देखें ॥ ५९ ॥ परि हें तुमचें उणें न बोलावें । मीचि साहें तेंचि बरवें । एथ आथि म्हणितलें देवें । मानूं बापा ॥ १६० ॥ ( ४३२. देव आपली चूक कबूल करून अर्जुनाला दिव्य दृष्टि देतात, १६१–१६४ ) साच विश्वरूप जरि आम्हीं दावावें । तरी आधीं देखावया सामर्थ्य कीं द्यावें । परि बोलत प्रेमभावें । धेंसाळ गेलों ॥ ६१ ॥ काय जाहलें न वाहतां भुई पेरिजे । तरी तो वेलु विलया जाइजे । तरी आतां माझें निजरूप देखिजे । ते दृष्टि देवों तुज ॥ ६२ ॥ मग तिया दृष्टी पांडवा । आमुचा ऐश्वर्ययोगु आघवा । देखोनियां अनुभवा । माजिवडा करीं ॥ ६३ ॥ अवतरणः—ऐसें तेणें वेदांतवेद्यें । सकळलोकआद्यें । बोलिलें आराध्यें । जगाचेनि ॥ ६४ ॥

संजय उवाचः—

एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः ।
दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥

अन्वयः—राजन्, एवम् उक्त्वा ततः महायोगेश्वरः हरिः पार्थाय परमं ऐश्वरं रूपं दर्शयामास ॥ ९ ॥

( ४३३. देवाला पांडवांचें प्रेम पाहून संजयाला आश्चर्य वाटलें, १६५–१७४ ) पैं कौरवकुळचक्रवर्ती । मज हाचि विस्मयो पुढतपुढती । जे श्रियेहूनि त्रिजगतीं । सदैव असे कवणी ॥ ६५ ॥ नांतरी श्रुतीचें वोंनावयालागीं । श्रुतीवांचूनि दावा

१ उतार. २ मार्ग. ३ बगळ्याकरवीं. ४ पुष्परागाचा. ५ बेडकाला. ६ घालविता. ७ इंद्रियांस न दिसणारें. ८ वर्णन केलें. ९ ठेवलें. १० विस्मरण झालें. ११ वर्णन करण्यास.

आपला विश्वरूप पहाण्याच्या आशेंत जसा गुंगलेला होता तसाच दृष्टीस पडला । ५३

श्लोकार्थः--पण या तुझ्या चर्मचक्षूंनीं तूं मला पाहूं शकणार नाहींस. म्हणून मी तुला दिव्य चक्षु देतों; आणि मग तूं माझी ईश्वरी शक्ति पहा ॥ ८ ॥

मग मनांत म्हणतातः—याची उत्कंठा अजून कमी झाली नाहीं व याला ( विश्वरूपदर्शनानें आनंदही झालेला नाहीं. मी ह्याला विश्वरूप दाखविलें, पण याला तें आकलन झालेंच नाहीं. ५४ असें म्हणून देव हंसले, आणि अर्जुनास म्हणाले, 'आम्हीं तुला विश्वरूप दाखविलें; परंतु तूं तर तें पाहतच नाहींस!' ५५ हें बोलणें ऐकून तो बुद्धिमान अर्जुन म्हणाला, " महाराज, हा दोष कोणाचा आहे? तुम्ही बगल्याकडून चंद्रामृत पिवविण्याचा प्रयत्न करीत आहां ( आणि चादण्याचे भोक्ते आहेत चकोरपक्षी, बगळे नाहींत! ) ५६ अहो महाराज, आरसा स्वच्छ पुसून आपण तो अंधळ्यास दाखविण्याची खटपट करीत आहां; आणि, हे हृषीकेशा, बहिऱ्यापुढें गायन करीत आहां. ५७ हे शार्ङ्गधरा, आपण जाणूनबुजून पुष्पपरागाचा चारा ( भ्रमरास न घालतां ) बेडकास घालतां आहां, आणि मग तो वायां गेला म्हणून कोणावर रागावतां? ५८ जें विश्वरूप इंद्रियांस अगोचर आहे असें शास्त्रांनींही वर्णन केलें आहे, व जें केवळ ज्ञानदृष्टीलाच पाहतां येतें, तें जर तुम्हीं माझ्या चर्मचक्षूंपुढें ठेविलें तर माझ्यानें कसें पाहवेल? ५९ परंतु तुमच्या या चुकीचा उच्चार न करितां आपण आपलें स्वस्थ बसावें हेंच बरें." अर्जुनाचें हें भाषण ऐकून देव म्हणाले: " बा अर्जुना, तुझें बोलणें मला मान्य आहे. १६० जर तुला विश्वरूप दाखवावयाचें, तर खरोखर तें पाहण्यास अगोदर आम्हीं तुला सामर्थ्य द्यावयास पाहिजे होतें; परंतु प्रेमाच्या भरांत बोलत असतां तुला दृष्टि देण्याचें विस्मरण झालें. ६१ नांगरल्याशिवाय जमिनींत पेरल्यामुळें तो वेल ज्याप्रमाणें वायां जातो, त्याप्रमाणें तुला विश्वरूप दाखविण्याविषयींची माझी खटपट व्यर्थ गेली, तर तुला आतां अशी दृष्टि देतों कीं, जिच्या योगानें तुला माझें विश्वरूप पाहता येईल. ६२ मग हे पांडवा, त्या दृष्टीनें माझा सर्व ( अघटित घटनारूप ) ऐश्वर्ययोग पाहून तो आपल्या पूर्ण अनुभवास आणून घे. " ६३ जो वेदांनीच जाणण्यास योग्य, व सकळ लोकांचा आदिपुरुष, व सर्व जगास परमपूज्य, तो श्रीकृष्ण परमात्मा याप्रमाणें बोलला. ६४

श्लोकार्थः-संजय म्हणालाः- धृतराष्ट्र राजा, याप्रमाणें बोलून नंतर महायोगेश्वर कृष्णांनीं पार्थाला आपलें श्रेष्ठ विश्वरूप दाखविलें ॥ ९ ॥

संजय म्हणाला, " हे कौरवकुळांतील चक्रवर्ती धृतराष्ट्रराजा, मला वारंवार हेंच आश्चर्य वाटतें कीं, ह्या तिन्ही लोकांत लक्ष्मीपेक्षां कोणी अधिक दैववान आहे का? ६५ किंवा या जगांत श्रुतीशिवाय कोणी गुणेनें वर्णन करणारा दुसरा आहे का? किंवा दास्यत्व म्हणून जें म्हणतात, तें एक शेषाच्याच अंगीं आहे. ६६ अहो, भगवंताच्या प्राप्तीसाठीं योग्यासारखी आठही प्रहर सेवा करणारा गरुडासारखा दुसरा कोणी आहे

पां जगीं । ना सेवकपण तरी आंगीं । शेषाच्याचि आथि ॥ ६६ ॥ हां हो जयाचेनि सोसें । शिणत आठही पाहर योगी जैसे । अनुसरलें गरुडाऐसें । कवण आहे ॥ ६७ ॥ परि ते आघवेचि एकीकडे ठेले । सांपें कृष्णसुखा एकंदरें जाहले । जिये दिनूंति जन्मले । पांडव हे ॥ ६८ ॥ परि पांचांही आंतु अर्जुना । श्रीकृष्ण साविआचि जाहला अधीना । कामुक का जैसा अंगना । आपैती कीजे ॥ ६९ ॥ पढविलें पाखिरूं ऐसें न बोले । यापरी क्रीडामृगही तैसा न चले । कैसें दैव एथें सुखाडलें । तें जाणों न ये ॥ १७० ॥ आजि परब्रह्म हें सगळें । भोगावया सदैव याचेचि डोळे । कैसें वाचेचे हन लळे । पाळीत असे ॥ ७१ ॥ हा कोपे कीं निवांतु साहे । हा रुसे तरी बुझावीत जाये । नवल पिसें लागलें आहे । पार्थाचें देवा ॥ ७२ ॥ येन्हवीं विषय जिणोनि जन्मले । जे शुकादिक दादुले । ते विषयोचि वानिता जाहले । भाट ययाचे ॥ ७३ ॥ हा योगियांचें समाधिधन । कीं होऊनि ठेलें पार्थाअधीन । यालागीं विस्मयो माझें मन । करीतसे राया ॥ ७४ ॥ ( ४३४. संजय म्हणतो, आश्चर्य करण्याचेंही कारण नाहीं, १७५–१७९ ) तेवींचि संजय म्हणे कायसां । विस्मयो एथें कौरवेशा । श्रीकृष्णें स्वीकारिजे तया ऐसा । भाग्योदय होय ॥ ७५ ॥ म्हणोनि तो देवांचा रावो । म्हणे पार्थातें तुज दृष्टि देवों । जया विश्वरूपाचा ठावो । देखसी तूं ॥ ७६ ॥ ऐसीं श्रीमुखौनि अक्षरें । निघती ना जंव एकसरें । तंव अविद्येचें आंधारें । जावोंचि लागे ॥ ७७ ॥ तीं अक्षरें नव्हती देखा । ब्रह्मसाम्राज्यदीपिका । अर्जुनालागीं चित्‌काळिका । उजळलिया श्रीकृष्णें ॥ ७८ ॥ मग दिव्यचक्षुप्रकाशु प्रगटला । तया ज्ञानदृष्टी फांटा फुटला । ययापरी दाविता जाहला । ऐश्वर्य आपुलें ॥ ७९ ॥ ( ४३५. दिव्य दृष्टीनें अर्जुनानें काय पाहिलें ? १८०–१९६ ) हे अवतार जे सकळ । ते जिये समुद्रींचे कां कल्लोळ । विश्व हें मृगजळ । जया रश्मींस्तव दिसे ॥ १८० ॥ जिये अनादिभूमिके निटें । चराचर हें चित्र उमटे । आपणपें श्रीवैकुंठें । दाविलें तया ॥ ८१ ॥ मागां बाळपणीं येणें श्रीपती । जें एकवेळ खादली होती माती । तें कोपोनियां हातीं । यशोदा धरिला ॥ ८२ ॥ मग भेणें भेणें जैसें । मुखीं झाडा द्यावयाचेनि मिसें । चवदाही भुवनें सावकाशें । दाविलीं तिये ॥ ८३ ॥ नातरी मधुवनीं ध्रुवासि केलें । जैसें कपोलें शंखें शिवतलें । आणि वेदाचियेही मती ठेलें । तें लागला बोलों ॥ ८४ ॥ तैसा अनुग्रहो पैं राया । श्रीहरी केला धनंजया । आतां कवणेकडेही माया । ऐसी भाष नेणेचि तो ॥ ८५ ॥ एकसरें ऐश्वर्यतेजें पाहलें । तया चमत्काराचें एकार्णव जाहलें । चित्त समाधीं बुडोनि ठेलें । विस्मयाचिया

१ भातीसाठीं. २ साम्प्रत. ३ स्वाधीन. ४ अनुकूळ झालें. ५ समर्थ. ६ ज्ञानदीप. ७ किरणांच्या योगानें. ८ शुद्ध स्वरूप. ९ गाल. १० समुद्रमय.

का ? ६७ परंतु तें सर्व एकीकडे राहून, ज्या दिवशीं पांडव जन्मास आले, त्या दिवसापासून हल्लीं त्यांचे ठिकाणीं कृष्णसुख एकवटलें आहे. ६८ तथापि पांचही पांडवांत, ज्याप्रमाणे कामातुर पुरुषाला एखादी स्त्री आपल्या अधीन करून घेते, त्याप्रमाणें श्रीकृष्ण अर्जुनाच्या सहज अधीन झाले आहेत. ६९ ( इतके कीं ) पढविलेला पोपटही बोलणार नाहीं, किंवा खेळण्याकरितां बाळगलेला पशुही इतका आज्ञेंत चालणार नाहीं ! अर्जुनाला कसें दैव अनुकूल झालें असेल ते नकळे ! १७० आज पूर्णब्रह्म जे श्रीकृष्ण परमात्मा, त्यांचें ऐश्वर्य भोगण्यास अर्जुनाचे डोळे भाग्यवान आहेत म्हणूनच त्याचें बोलणें श्रीकृष्ण कसे झेलताहेत; ७१ अर्जुन रागावला तर देव स्वस्थपणें सहन करतात; आणि तो रुसला तर त्याला समजावितात. अर्जुनाचें हें देवांना कसें वेड लागलें आहे पहा. ७२ येरवीं श्रीकृष्णाची योग्यता काय वर्णन करावी ? ज्या समर्थ शुकाचार्यांनीं बारा वर्षेपर्यंत मातेच्या उदरांत राहून विषय जिकले, ते शुकाचार्य यांच्या विषयाचे ( रासक्रीडेचें ) वर्णन करून आपण कृतार्थ होऊं या इच्छेनें स्तुतिपाठक बनले ! ७३ राजा, श्रीकृष्ण परमात्मा योग्यांच्या समाधीचें अधिदैवत; ते पार्थाच्या स्वाधीन झाले म्हणून माझ्या मनाला मोठा चमत्कार वाटतो !, ७४ इतकें बोलून संजय पुनः धृतराष्ट्राला म्हणाला: राजा, पण यांत चमत्कार तरी कसला ? श्रीकृष्ण ज्याचा अंगीकार करतील, त्याचा असा भाग्योदय व्हावयाचाच. ७५ म्हणून ते देवाधिदेव पार्थाला म्हणाले कीं, मी तुला दिव्य दृष्टि देतों, तिच्या योगानें अखंड विश्वरूप तुला पहातां येईल. ७६ श्रीकृष्णांच्या मुखांतून हीं अक्षरें निघालीं नाहींत तोंच एकदम अर्जुनाचें अज्ञान नाहीसें होऊं लागलें. ७७ ज्ञानेश्वर म्हणतात:— " तुला दिव्य दृष्टि देतो " हीं अक्षरें नसून ब्रह्माचें ऐश्वर्य दाखविणाऱ्या ज्ञानरूपी मशालीच श्रीकृष्णानीं अर्जुनाकरिता लावल्या. ७८ मग दिव्य दृष्टीचा उजेड पडल्याबरोबर अर्जुनाची ज्ञानदृष्टि चहूंकडे फाकली. याप्रमाणें आपलें ऐश्वर्य श्रीकृष्णानें त्याला दाखविलें. ७९ भगवंताचे सर्व अवतार ज्या विश्वरूप समुद्राच्या लाटा आहेत, किंवा ज्याच्या तेजरूपी सूर्य किरणामुळें हें सर्व जग मृगजलाप्रमाणें भासतें, १८० ज्याच्या अनादिसिद्ध सत्स्वरूप भूमिकेवर स्थावरजंगमरूप चित्रें उमटतात तें आपलें मूळ स्वरूप श्रीकृष्णानीं अर्जुनास दाखविलें. ८१ पूर्वीं लहानपणीं या श्रीकृष्णानीं जेव्हा एकदा माती खाल्ली होती, तेव्हां यशोदेनें रागावून हातीं धरल्यावर ८२ भीत भीत " मीं माती खाल्ली नाहीं " म्हणून तोंडाचा झाडा देण्याच्या निमित्तानेंच कीं काय तें उघडून यशोदेला त्यांत चौदाही भुवनें सावकाशपणें दाखविलीं; ८३ किंवा मधुवनात ध्रुव बाळ दर्शनास गेल्यावर देवाची स्तुति करावी अशी मनाची उत्कट इच्छा असून, ती कशी करावी हें माहीत नसल्यामुळें त्याच्या गालास देवानी आपला शंख लावल्याबरोबर तो जसा वेदांनाही जी स्तुति करता आली नाहीं ती करूं लागला, ८४ त्याप्रमाणे, राजा, श्रीहरींनीं धनंजयाला उपदेश केल्यावर माया कोणीकडे गेली तिचा पत्ताही लागला नाहीं. ८५ एकदम ऐश्वर्यतेजाचा उजेड पडून

॥ ८६ ॥ जैसा आब्रह्म पूर्णोदकीं । पव्हे मार्कंडेयें[1] एकाकी । तैसा विश्वरूप-कौतुकीं । पार्थु लोळे ॥ ८७ ॥ म्हणे केवढें गगन एथ होतें । तें कवणें नेलें पां केउतें । तीं चराचरें महाभूतें । काय जाहलीं ॥ ८८ ॥ दिशांचे ठावही हारपले । अधोर्ध्व काय नेणों जाहलें । चेइलिया स्वप्न तैसें गेलें । लोकाकार ॥ ८९ ॥ नाना सूर्यतेजप्रतापें । सचंद्र तारांगण जैसें लोपे । तेसी गिळिली विश्वरूपें । प्रपंचरचना ॥ १९० ॥ तेव्हां मनासी मनपण न स्फुरे । बुद्धि आपणपें न सांवरे । इंद्रियांचे रश्मि माघारे । हृदयवरी भरले ॥ ९१ ॥ तेथ ताटस्थ्या ताटस्थ्य पडिलें । टकासी टक लागलें । जैसें मोहनास्त्र घातलें । विचारजातां ॥९२॥ तैसा विस्मितु पाहे कोडें । तंव पुढां होतें चतुर्भुज रूपडें । तेंचि नानारूप चहुंकडे । मांडोनि ठेलें ॥ ९३ ॥ जैसे वर्षाकाळींचे मेघौडे । कां महाप्रळयींचें तेज वाढे । तैसें आपणावीण कवणीकडे । नेदीचि उरों ॥ ९४ ॥ प्रथम स्वरूपसमाधान । पावोनि ठेला अर्जुन । सवेंचि उघडिले लोचन । तंव विश्वरूप देखे ॥ ९५ ॥ इहींचि दोहीं डोळां । पाहावें विश्वरूपा सकळा । तो श्रीकृष्णें सोहळा । पुरविला ऐसा ॥ ९६ ॥

अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।
अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥

अन्वयः-- अनेकवक्त्रयनं, अनेकाद्भुतदर्शनं, अनेकदिव्याभरणं, दिव्यानेकोद्यतायुधम् ( रूपं दर्शयामास ) ॥ १० ॥

( ४३६. विश्वरूपाचीं मुखें, १९७–२०१ ) मग तेथ सैंघ देखे वदनें । जैसीं रमानायकाचीं राजभुवनें । नाना प्रगटलीं निधानें । लावण्यश्रियेचीं ॥ ९७ ॥ कीं आनंदाचीं वनें सासिन्नलीं । जैसीं सौंदर्या राणीव जोडली । तैसीं मनोहरें देखिलीं । हरीचीं वक्त्रें ॥ ९८ ॥ तयांहीमाजि एकैकें । सावियाचि भयानकें । काळरात्रीचीं कँटकें । उठावलीं जैसीं ॥ ९९ ॥ कीं मृत्यूसिचि मुखें जाहलीं । हो कां जे भयाचीं दुर्गे पन्नासिलीं । कीं महाकुंडें उघडलीं । प्रळयानळाचीं ॥ २०० ॥ तैसीं अद्भुतें भयासुरें । तेथ वदनें देखिलीं वीरें । आणिकें साधारणें साळंकारें । सौम्यें बहुतें ॥ १ ॥ ( ४३७. विश्वरूपाचे डोळे, २०२–२०४ ) पैं ज्ञानदृष्टीचेनि अवलोकें । परि वदनाचा शेवटू न टके । मग लोचन ते कवतिकें । लागला पाहों ॥ २ ॥ तंव नानावर्णें कमळवनें । विकासिलीं तैसें अर्जुनें । नेत्र देखिले पॅंलिंगनें । आदित्यांचीं ॥ ३ ॥ तेथेंचि कृष्णमेघाचिया दाटी- । माजी कल्पांत विजूंचिया स्फुंटी । तैसिया वन्हि पिंगळा दिठी । भ्रूभंगांतळीं ॥ ४ ॥ ( ४३८. साद्यंत विश्वरूप, २०५-

१ श्रीभागवत, स्कं. १२ अ. ८–१० २ स्तब्धतेला. ३ एकाग्रतेस. ४ मांडोरे. ५ चैन्यें ६ किल्ले. ७ उमारले. ८ प्रळयाग्नीचीं ९ पाहण्यानें. १० न लागे. ११ पंक्ति. १२ चमक. पिंगट. १३ भिवयांखालीं.

त्याला सर्वच चमत्कारमय दिसूं लागलें, व त्याचें चित्त आश्चर्यांत निमग्न झालें. ८६ नदीचे काठीं मार्कंडेय ऋषि संध्या करीत असतां भगवंतांस 'आश्चर्य दाखवा' अशी विनंती केल्यावरून ( ज्याप्रमाणें पृथ्वीपासून आकाशापर्यंत सर्वत्र पाणी होऊन त्यांत तो एकटा ) पोहूं लागला; त्याप्रमाणें विश्वरूपाच्या कौतुकांत पार्थ निमग्न झाला. ८७ तो म्हणाला " या ठिकाणीं केवढें आकाश दृष्टीस पडत होतें, तें कोणीं कोणीकडे नेलें, तसेंच तीं स्थावरजंगम महाभूतें कोणीकडे गेलीं ? ८८ दिशांचा पत्ता नाहींसा झाला; आकाश व पाताळ कोणीकडे गेलें हें समजेना; आणि जागृत झालेल्या मनुष्यास ज्याप्रमाणें स्वप्नांत पाहिलेले पदार्थ दृष्टीस पडत नाहींत, त्याप्रमाणें एवढा वेळ दृष्टीस पडणारी सृष्टि नाहींशी झाली; ८९ अथवा सूर्याच्या तेजानें जसे चंद्र व तारे नाहींतसे होतात. त्याप्रमाणें सृष्टीची सर्व रचना विश्वरूपानें नाहींशी केली. " १९० त्या वेळेस त्याच्या मनाची मनाला आठवण नाहींशी होऊन बुद्धि आपली आपल्यास आवरेना व इंद्रियांच्या वृत्ति सर्व माघाऱ्या फिरून हृदयात सांठवल्या. ९१ तेव्हां स्तब्धपणाला स्तब्धता प्राप्त झाली; एकाग्रतेस एकाग्रता आली, जणू काय सर्व ज्ञानाला मोहनी अस्त्रच घातलें आहे; ९२ याप्रमाणें तो आश्चर्ययुक्त कौतुकानें चहूंकडे पाहूं लागला. तों त्याच्या पुढें जी चतुर्भुज लहान मूर्ति होती, ती वाढून पुष्कळ रूपानें चहूंकडे पसरली असे दिसलें. ९३ ज्याप्रमाणें पावसाळ्यातील मेघ किंवा महाप्रळयकाळचें सूर्याचें तेज एकदम चहूंकडे पसरतें, त्याप्रमाणें भगवंतानें आपल्याशिवाय कोणीकडेही दुसरें कांहीं उरूं दिलें नाहीं. ९४ पहिल्या प्रथम अर्जुनास श्रीकृष्णाचें स्वरूप पाहून समाधान वाटलें, व लागलीच डोळे उघडून पाहितो तों विश्वरूप दृष्टीस पडलें ९५ अशा रीतीनें, या दोन्ही डोळ्यांनीं सर्व विश्वरूप पहावें अशी जी त्याची इच्छा होती, तो सर्व लळा श्रीकृष्णांनीं पुरविला. ९६

श्लोकार्थः—त्या विश्वरूपात अनंत मुखें, अनंत नेत्र, आणि अनंत अद्भुत दर्शनीय प्रकार होते. त्यांमध्यें अनंत सुप्रकाशित अलंकार होते, व अनंत चकचकीत आयुधें उचलून धरलेलीं होतीं.

मग पुष्कळ तोंडें पाहिलीं, तीं केवळ श्रीविष्णूच्या राजवाड्यांप्रमाणें दिसला, जणू काय लावण्यश्रियेचीं भांडारेंच उघडलीं आहेत. ९७ किंवा आनंदरूपी वनेंच भरास आलीं आहेत कीं काय ! ज्याप्रमाणें सौंदर्याला राज्याधिकार मिळावा, त्याप्रमाणे आल्हादकारक अशीं श्रीहरीचीं मुखें अर्जुनानें पाहिलीं. ९८ त्या तोंडांतही कांहीं भयंकर, जणू काळरात्रींचा सैन्यच उठलीं आहेत अशी—दिसलीं ९९ किंवा मृत्यूलाच तोंडें उत्पन्न व्हावीं, भयाचे किल्लेच उभारावे, अथवा प्रळयाग्नीचीं महाकुंडेंच पेटवावीं, २०० त्याप्रमाणें अद्भुत व भयंकर अशीं तोंडें अर्जुनानें त्या ठिकाणीं पाहिलीं; आणि पुष्कळ सौम्य अलंकार घातलेलीं चमत्कारिक अशींही पाहिलीं. १ त्याच्या ज्ञानदृष्टीच्याही पाहण्यानें त्या मुखांचा अंत त्याला लागेनाच. म्हणून डोळे कोठें आहेत तें तो कौतुकानें पाहूं लागला. २ तेव्हा नाना रंगांचीं कमलवनेंच विकसित झालीं आहेत अशा सूर्यतेजाप्रमाणें

२१० ) हें एकैक आश्चर्य पाहतां । तिये एकेचि रूपीं पांडुसुता । दर्शनाची अनेकता । प्रतिफळली ॥ ५ ॥ मग म्हणे चरण ते कवणेकडे । केउते मुकुट कें दोर्दंडें । ऐसी वाढविताहे कोडें । चाड देखावयाची ॥ ६ ॥ तेथ भाग्यनिधि पार्था । कां विफलत्व होईल मनोरथा । काय पिनाकपाणीचिया भाता । वायैकांडीं आहाती ॥ ७ ॥ ना तरी चतुराननाचिये वाचे । काय आहाती लटिकिया अक्षरांचे सांचे । म्हणोनि सार्वतपण अपारांचें । देखिलें तेणें ॥ ८ ॥ जयाची सोय वेदां नाकळे । तयाचे सकळावयव एकेचि वेळे । अर्जुनाचे दोन्ही डोळे । भोगिते जाहले ॥ ९ ॥ चरणौनि मुगुटवरी । देखत विश्वरूपाची थोरी । जे नाना रत्न अलंकारीं । मिरवत असे ॥ २१० ॥ ( ४३९. विश्वरूपाचे अलंकार, २११–२१३ ) परब्रह्म आपुलेनि आंगें । ल्यावया आपणचि जाहला अनेगें । तियें लेणीं मी सांगें । काइसयासारिखीं ॥ ११ ॥ जिये प्रभेचिये झळाळें । उजाळु चंद्रादित्यमंडळा । जे महातेजाचा जिव्हाळा । जेणें विश्व प्रगटे ॥ १२ ॥ तो दिव्यतेजशृंगारु । कोणाचिये मतीसी होय गोचरु । देव आपणपेंचि लेइले ऐसें वीरु । देखत असे ॥१३॥ ( ४४०. विश्वरूपानें धारण केलेलीं आयुधें, २१४–२१७ ) मग तेथेंचि ज्ञानाचिया डोळां । पहात करपल्लवां जंव सरळा । तंव तोडित कल्पातींचिया ज्वाळा । तैसीं शस्त्रें झळकत देखे ॥ १४ ॥ आपण आंग आपण अलंकार । आपण हात आपण हतियार । आपण जीव आपण शरीर । देखे चराचर कोंदलें देवें ॥ १५ ॥ जयाचिया किरणांचे निखरेपणें । नक्षत्रांचे होत फुटाणे । तेजें खिरडला वन्हि म्हणे । समुद्रीं रिघो ॥ १६ ॥ मग काळकूटकल्लोळीं कवळिलें । नाना महाविजूंचें दांगें उमटलें । तैसे अपार कर देखिले । उदितायुधीं ॥१७॥

दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनम् ।
सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥

*अन्वयः—दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगंधानुलेपनं सर्वाश्चर्यमयं विश्वतोमुखं अनंतं देवं (अपश्यत्)॥११॥*

( ४४१. विश्वरूपाच्या पुष्पमाला व वस्त्रपरिधान, २१८-२२१ ) कीं भेणें तेथूनि काढिली दिठी । मग कंठमुगुट पहातसे किरीटी । तंव सुरतरूची सृष्टी । जयापासोनि कां जाहली ॥१८॥ जियें महासिद्धीचीं मूळपीठें । शिणली कमळा जेथ वींवटे । तैसीं कुसुमें अति चोखटें । तुरंबिलीं देखिलीं ॥ १९ ॥ मुगुटावरी स्तैवक । ठायीं ठायीं पूजाबंध अनेक । कंठीं रुळताति अलौकिक । माळादंड ॥ २२० ॥ स्वर्गें सूर्यतेज वेढिलें । जैसें पंधरेनें मेरूतें मढिलें । तैसें नितंबीवरी गांढिलें । पीतांबरु झळके ॥ २१ ॥ ( ४४२. विश्वरूपाची गंधउटी, २२२–२२५ ) श्रीमहादेवो कापुरें उटिला ।

१ साहु. २ शंकराच्या. ३ व्यर्थ होणारे बाण. ४ अनेक. ५ प्रकाशानें. ६ प्रखरपणानें. ७ दिपला. ८ अरण्य. ९ शस्त्रें घेऊन उगारल्याप्रमाणें. १० लक्ष्मी. ११ विश्रांति घेते. १२ घोंस. १३ कंबरेभोंवतीं. १४ नेसविलेंसें.

चमकणाऱ्या डोळ्यांच्या पंक्ति त्या अर्जुनाच्या दृष्टीस पडल्या. ३ त्यांतच, काळ्या कुळकुळीत मेघांच्या गर्दीत कल्पांताचे वेळीं विजा चमकतात त्याप्रमाणें भिवयाखालीं अग्नीप्रमाणें पिंगट असे नेत्र चमकत होते. ४ त्या एकाच रूपावर एकएक आश्चर्य पाहून, विश्वरूपांत अनेक गोष्टी भरल्या आहेत असें त्याच्या अनुभवास आलें. ५ मग, या विश्वरूपाचे पाय कोणीकडे आहेत, मुगुट कोणीकडे आहे, व बाहु कोणीकडे आहेत, हें पाहण्याची त्याची कौतुकानें इच्छा वाढत चालली. ६ मग भाग्यवान असा जो पार्थ, त्याचे मनोरथ विफल होतील काय ? हें पहा, शंकराच्या भात्यात कधीं वायचाण सांपडतील का ? ७ किंवा ब्रह्मदेवाच्या वाचेंत लटक्या अक्षराचे साचे असूं शकतील का ? नाहीं; म्हणून, अपार असें जें विश्वरूप, त्याचा आदि व अंत हे अर्जुनानें पाहिले. ८ ज्या रूपाचा थांग वेदांसही लागला नाहीं, त्याचे सर्व अवयव एकदम अर्जुनानें दोन्ही डोळ्यांनीं पाहिले. ९ जें नानारत्नाच्या अलंकारांनीं शोभायमान होतें त्या विश्वरूपाचा चरणापासून मुकुटापर्यंत महिमा पाहिला. २१० परब्रह्मानें आपण स्वतः स्वरूप धारण करून त्याजवर परब्रह्मरूपीच अलंकार घातल्यावर ते अलंकार कशासारखे शोभतात म्हणून मी सांगूं ? ११ ज्या तेजानें चंद्र व सूर्य यांचीं मंडळें प्रकाशित होतात, व ज्या महातेजानें विश्व प्रकाशित होतें, त्यांचें जें जीवन, १२ तें ब्रह्म ब्रह्मरूपी अलंकार घातल्यावर जाणण्याची कोणाची शक्ति होणार ? तर अर्जुनाला, त्या ब्रह्मानें ब्रह्मच अलंकार घातले आहेत असें दृष्टीस पडलें. १३ मग ज्ञानदृष्टीनें विश्वरूपाचे हात पाहूं लागला, तों ते सरळ असून त्यांत कल्पांतींच्या ज्वाळा तोडणारीं शस्त्रें चमकत आहेत असें दृष्टीस पडलें. १४ आपणच शरीर, आपणच त्यावर घातलेले अलंकार, आपणच हात, आपणच हातात घेतलेलीं हत्यारें, व आपणच जीव असें देवानीं आपल्याच ठिकाणीं सर्व स्थावरजंगम भरून टाकलें. १५ त्याच्या किरणाच्या प्रखरपणानें नक्षत्राचे फुटाणे होऊन, त्या तेजापुढें अग्निही दिपून जाऊन समुद्रांत शिरला. १६ मग जणूं काय काळकूट विषाच्या लाटाच उसळल्या आहेत, किंवा महाविजाचें अरण्यच उद्भवलें आहे, अशीं आयुधें हातांत घेऊन दुसऱ्यास मारण्याकरितां उगारल्यासारखे अपरिमित हात अर्जुनानें पाहिले. १७

श्लोकार्थः—अंगावर सुप्रकाशित पुष्पें आणि वस्त्रें होतीं; व अंगाला दिव्य सुवासिक पदार्थ लावलेले होते. असा सर्व आश्चर्यांनीं भरलेला व सर्व बाजूंस तोंडें आहेत असा विश्वरूप धारण केलेला देव अर्जुनानें पाहिला. ॥ ११ ॥

( त्या हातातील असंख्य शस्त्रांच्या ) भयानें अर्जुनानें तेथून आपली दृष्टि फिरवून तो कंठ व मुगुट यांजकडे पाहूं लागला, तेव्हां त्याला असें वाटलें कीं, कल्पतरूची उत्पत्ति याजपासूनच झाली आहे कीं काय ? १८ महासिद्धींचें अधिष्ठान जी लक्ष्मी, ती शिणली असता जेथें विश्रांति घेते, अशीं जीं अति उत्कृष्ट कमळें, त्याचा वास घेत आहेत असें पाहिलें १९ मुकुटावर अनुक्रमानें फुलांचे गुच्छ एकावर एक लावलेले असून, कंठांत अन-

कां कैलासु पारजें डवरिला । नाना क्षिरोदकें पांघरविला । क्षीरार्णवो जैसा ॥२२॥ जैसी चंद्रमयाची घडी उपलविली । मग गगनाकरवीं बुंथी घेवविली । तैसी चंदनपिंजरी देखिली । सर्वांगीं तेणें ॥ २३ ॥ जेणें स्वप्रकाशा कांती चढे । ब्रह्मानंदाचा निदाघु मोडे । जयाचेनि सौरभ्यें जीवित जोडे । वेदवातिये ॥ २४ ॥ जयाचे निर्लेप अनुलेपु करी । जे अनंगुही सर्वांगीं धरी । तया सुगंधाची थोरी । कवण वाणी ॥ २५ ॥ ( ४४३. विश्वरूपाचें सर्व बाजूंनीं आश्चर्य, २२६–२२८ ) ऐसी एकैक शृंगारशोभा । पाहतां अर्जुन जीतसे क्षोभा । तेवींचि देवो बैसला कीं उभा । कीं शयालु हें नेणवे ॥ २६ ॥ बाहेर दिठी उघडोनि पाहे । तंव आघवें मूर्तिमय देखत आहे । मग आतां न पाहे म्हणोनि उगा राहे । तरी आंतुही तैसेंचि ॥२७॥ अनावर मुखें समोर देखे । तया भेणें पाठीमोरा जंव ठाके । तंव तयाहीकडे श्रीमुखें । करचरण तैसेचि ॥ २८ ॥ ( ४४४. देवाच्या अनुग्रहानें अर्जुनास पाहिलें तरी दिसतें व न पाहिलें तरी दिसतें, २२९–२३१ ) अहो पाहतां कीर प्रतिभासे । एथ नवलावो काय असे । परि न पाहातांही दिसे । चोज आइका ॥ २९ ॥ कैसें अनुग्रहाचें करणें । पार्थाचें पाहणें आणि न पाहणें । तयाहीसकट नारायणें । व्यापूनि घेतलें ॥२३०॥ म्हणोनि आश्चर्याच्या पुरीं एकीं । पडिला ठायेंठाव तैंडीं ठाकी । तंव चमत्काराचिया आणिकीं । महार्णवीं पडे ॥ ३१ ॥ ( ४४५. अनंत विश्वतोमुख, २३२-२३६ ) ऐसा अर्जुन असाधारणें । आपुलिया दर्शनाचेनि विंदाणें । कवळूनि घेतला तेणें । अनंतरूपें ॥ ३२ ॥ तो विश्वतोमुख स्वभावें । आणि तोंचि दावावयालागीं पांडवें । प्रार्थिला आतां आघवें । होऊनि ठेला ॥ ३३ ॥ आणि दीपें कां सूर्यें प्रगटे । अथवा निमुटलिया देखावेंचि खुंटे । तैसी दिठी नव्हे जे वैकुंठें । दिधली आहे ॥ ३४ ॥ म्हणोनि किरीटी दोहीं परी । तें देखणें देखे आंधारीं । हे संजयो हस्तिनापुरीं । सांगतसे राया ॥ ३५ ॥ म्हणे किंबहुना अवधारिलें । पार्थें विश्वरूप देखिलें । नाना आभरणीं भरलें । विश्वतोमुख ॥ ३६ ॥

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता । यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥१२**

अन्वयः—यदि दिवि सूर्यसहस्रस्य भाः युगपत् उत्थिता भवेत्, तर्हि सा तस्यमहात्मनः भासः सदृशी स्यात् ॥ १३ ॥

( ४४६. विश्वरूपाचें तेज, २३७–२४१ ) तिये अंगप्रभेचा देवा । नवलावो काइसयाऐसा सांगावा । कल्पांतीं एकुचि मेळावा । द्वादशादित्यांचा होय ॥३७॥ तैसे ते दिव्य सूर्य सहस्रवरी । उदजयती कां एकेचि अवसरीं । तरी तया तेजाची थोरी । उपमूं नये ॥ ३८ ॥ आघावियाचि विजूंचा मेळावा कीजे । आणि

१ पान्यानें. २ झिंपला. ३ चंद्राची. ४ उटी. ५ दाह. ६ सुंगधीपणानें. ७ गंधमय अशी पृथ्वी. ८ निर्दोष. ९ निस्तेज करी. १० निराकार. ११ मांघारून गेला. १२ कांठावर. १३ विशेषेंकरून. १४ कौशल्यानें. १५ झांकली असतां.

र्णनीय अशा पुष्पमाळा घातलेल्या होत्या. २२० ज्याप्रमाणें स्वर्ग सूर्यतेजानें भरलेला किंवा मेरु पर्वत सोन्यानें मढविलेला आहे, त्याप्रमाणें कंबरेसभोंवतीं नेसलेला पितांबर झळकत होता. २१ ज्याप्रमाणें श्रीमहादेवास कापुराची उटी लावावी, किंवा कैलास पर्वत पाऱ्यानें लिपावा, अथवा क्षीरसमुद्राला पांढऱ्या स्वच्छ उदकानें आच्छादावा, २२ ज्याप्रमाणें चंद्राची घडी उघडून तिचा आकाशाला बुर्खा घालावा, त्याप्रमाणें सर्वांगावर पांढरी शुभ्र चंदनाची उटी दिसली. २३ ज्याच्या योगानें प्रकाशणाऱ्या वस्तूलाही तेज चढतें, 'ब्रह्मानंद' जो जात्याच अति थंड आहे, त्याचाही ज्यानें दाह नाहींसा होतो, व ज्याच्या सुगंधानें जात्याच सुगंधमय असलेली पृथ्वीही सुगंधित होते; २४ ज्या गंधापुढें इतर गंधाचें तेज नाहींसें होतें, व ज्या गंधाला आकार नाहीं, असा ज्यानें ( मदनानें ) सर्वांगावर धारण केला आहे, त्या सुगंधाची योग्यता कोण करूं शकणार ? २५ याप्रमाणें एक एक अलंकाराची शोभा पाहून अर्जुन भांबावला; व तशांत, देव बसले आहेत, उभे आहेत किंवा निजलेले आहेत हें त्यास समजेना. २६ डोळे उघडून इकडे तिकडे पहातो तों सर्व विश्वरूपानें भरलें आहे असें दिसलें; म्हणून त्याकडे न पाहतां डोळे झांकून स्वस्थ बसावें असें मनांत आणून डोळे झांकतो तों अंतर्यामींही विश्वरूप दिसूं लागलें. २७ समोर अगणित तोंडें दिसतात, म्हणून त्याच्या भीतीनें पाठीमागें जों पाहूं लागला तों तिकडेही विश्वरूपाचीं तोंडें, हात, पाय तसेच दिसूं लागले. २८ अहो, दृष्टि उघडून पाहिल्यावर सर्वत्र विश्वरूपाचा भास होतो यांत आश्चर्य तें कसलें ? परंतु डोळे मिटल्यावर तें दिसतें हें नवल ऐका. २९ प्रभूच्या कृपेची करणी कशी आहे ती पहा कीं, पार्थाच्या पाहण्यात आणि न पाहण्यांत श्रीकृष्ण व्यापून राहिले. २३० म्हणून, एका आश्चर्यरूपी पुरांत पडल्यावर तात्काळ कांठावर जाऊन जो उभा राहतो आहे तों दुसऱ्या चमत्काररूपी महासमुद्रांत पडला. याप्रमाणें आपल्या ( विश्वरूप ) दर्शनाच्या कौशल्यानें श्रीकृष्णांनीं अर्जुनाला अनंतरूपें दाखवून व्यापून टाकलें. ३२ तो सर्वव्यापी व स्वभावतःच सर्वतोमुख असल्यामुळें, आणि तशांत अर्जुनानें विश्वरूप दाखवा अशी प्रार्थना केल्यामुळें आपणच सर्व रूपें घेऊन नटला. ३३ अर्जुनाला श्रीकृष्णांनीं जी दिव्य दृष्टि दिली होती, ती दिव्याचा किंवा सूर्याचा प्रकाश असला तरच दिसावें किंवा मिटली असतां पाहणेंच बंद व्हावें अशातली नव्हती. ३४ म्हणून, अर्जुनास डोळे उघडे ठेवून किंवा झाकून आणि अंधारात सुद्धां त्या दिव्यदृष्टीनें दिसत होतें, असें हस्तिनापुरात संजयानें धृतराष्ट्र राजास सांगितलें, ३५ व म्हटलें कीं, "राजा, ऐकलेंस का ? नाना अलंकारानीं भरलेलें व ज्याला सर्व बाजूंनीं डोळे आहेत असें विश्वरूप पार्थानें पाहिलें. ३६

श्लोकार्थः—आकाशामध्यें सहस्र सूर्यांची जर एका क्षणीं प्रभा पसरली, तर ती त्या विश्वरूपाच्या प्रभेसारखी काहींशी दिसेल. ॥ १२ ॥

राजा, त्या विश्वरूपाचें तेज कशासारखें होतें म्हणून सांगूं ? प्रलयकाळीं जसे

प्रळयाग्नीची सर्व सामग्री आणिजे । तेवींचि दशकुही मेळविजे । महातेजांचा ॥३९॥ तऱ्ही तिये अंगप्रभेचेनि पाडें । हें तेज कांहीं होईल थोडें । आणि तयाऐसें कीर चोखडें । त्रिशुद्धी नोहे ॥२४०॥ ऐसें माहात्म्य या श्रीहरीचें सहज । फांकलसें सर्वांगींचें तेज । ते मुनिकृपा जी मज । दृश्य जाहलें ॥ ४१ ॥

तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा । अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३ ॥

अन्वयः—पांडवः अनेकधा प्रविभक्तं कृत्स्नं जगत् तत्र देवदेवस्य शरीरे तदा एकस्थं अपश्यत् ॥ १३॥

( ४४७. विश्वरूपाचे ठिकाणीं वेगळालें वेगळालें जगत्, २४२–२४४ ) आणि तिये विश्वरूपीं एकीकडे । जग आघवें आपुलेनि पवाडें । जैसे महोदधीमाजि बुडबुडे । सिसाने दीसती ॥ ४२ ॥ कां आकाशीं गंधर्वनगर । भूतळीं पिपीलिका बांधे घर । नाना मेरूवरी सपुंर । परमाणु बैसले ॥ ४३ ॥ विश्व आघवेंचि तयापरी । तया देवचक्रवर्तीचिया शरीरीं । अर्जुन तिये अवसरीं । देखता जाहाला ॥ ४४ ॥

ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः । प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ॥१४॥

अन्वयः—ततः विस्मयाविष्टः हृष्टरोमा सः धनंजयः देवं शिरसा प्रणम्य कृतांजलिः ( सन् ) अभाषत ॥ १४ ॥

( ४४८. विश्वरूप पाहून अर्जुनास अष्ट सात्विक भाव, २४५–२५४ ) तेथ एक विश्व एक आपण । ऐसें अळमाळ होतें जें दुजेंपण । तेंही आटोनि गेलें अंतःकरण । विरालें सहसा ॥ ४५ ॥ आंतु आनंदा चेइरें जाहलें । बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें । आपाद पां गुंतलें । पुलकांचलें ॥ ४६ ॥ वार्षिये प्रथमदशे । वोहंळलया[१] शैलांचें सर्वांग जैसें । विरूढे कोमलांकुरीं तैसे । रोमांच जाहले ॥ ४७ ॥ शिवतला[२] चंद्रकरीं । सोमकांतु द्रावो धरी । तैसिया स्वेदकणिका शरीरीं । दाटलिया ॥ ४८ ॥ माजी सांपडलेनि अलिकुळें[४] । जळावरी कमळकलिका जेवीं आंदोळे[५] । तेवीं आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरि कांपे ॥ ४९ ॥ कर्पूरकर्दळीचीं[६] गर्भपुटें । उकलतां कापुराचेनि कोंदाटें । पुलिकां गळती तेवीं थेंबुटे । नेत्रौनि पडती ॥ २५० ॥ उदयलेनि सुधाकरें । जैसा भरलाचि समुद्र भरे । तैसा वेळोवेळां ऊर्मिभरे । उचंबळत असे ॥ ५१ ॥ ऐसा सात्विकांही आठां भावां । परस्परें वर्ततसे हेवा । तेथ ब्रह्मानंदाची जीवा । राणीव फावली ॥५२॥ तैसाचि तया सुखानुभवापाठीं । केला द्वैताचा सांभाळ दिठी । मग उसोंसौनि[१०] किरीटी । वास[११] पाहिली ॥ ५३ ॥ तेथ बैसला होता जियें सवा । तियाचिकडे मस्तक खालविला देवा । मग जोडूनि करसंपुट बरवा । बोलतु असे ॥ ५४ ॥

पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।
ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥

१ बारीक. २ रोमांचानीं. ३ बाहून गेलें असता. ४ भ्रमर. ५ हालते; आपटते. ६ ज्या केळींतून कापूर निघतो अशा केळींचीं. ७ दोपटें. ८ कण. ९ लाटांनीं. १० उसासा टाकून. ११ ज्या बाजूस.

द्वादशसूर्य एकत्र मिळतात, ३७ तसे सहस्रावधि सूर्य एकाच वेळेला उदय पावले, तरी त्यांच्यानेंही त्या विश्वरूपाच्या तेजाची बरोबरी करवणार नाहीं. ३८ सर्व विजा एकत्र करून व प्रळयकाळच्या अग्नीचीं सर्व साहित्यें जमवून व त्यांत महातेजाचें दशकही जर मिळविलें, ३९ तर त्या विश्वरूपाच्या आंगच्या तेजाची कांहीं थोडी बरोबरी होईल; परंतु त्याची अगदीं बरोबरी तर खास होणार नाहीं. २४० असा त्या श्रीहरीचा महिमा आहे. त्याच्या विश्वरूपाचें तेज सर्वत्र पसरलें होतें तें व्यासांच्या कृपेनें माझे दृष्टीस पडलें. ४१

श्लोकार्थः—त्या देवाधिदेवाच्या शरीरामध्यें सर्व जग एकत्र दिसत असून त्यामध्यें नाना विभाग आहेत, असें अर्जुनानें त्या वेळेस पाहिलें. ॥ १३ ॥

आणखी, त्या विश्वरूपावर सर्व जग एका बाजूस दिसत होतें. ज्याप्रमाणें समुद्राच्या पाण्यावर निरनिराळे बुडबुडे दृष्टीस पडतात, ४२ किंवा आकाशात ढगांवर जसें गंधर्वनगर, पृथ्वीवर मुंग्याचें वारूळ, किंवा डोंगरावर बारीक मातीचे कण असतात, ४३ त्याप्रमाणें त्या वेळीं त्या देवाधिदेव श्रीकृष्णाच्या शरीवर अर्जुनानें हें सर्व जग पाहिलें. ४४

श्लोकार्थः—तेव्हां धनंजय आश्चर्यानें चकित होऊन त्याच्या अंगावर रोमाच उभे राहिले; आणि नमस्कार करून व हात जोडून तो देवाना म्हणाला ॥ १४ ॥

तेव्हा, विश्व वेगळें व आपण वेगळे असें जें थोडें द्वैत होतें, तेंही नाहीसें होऊन अर्जुनाचें मनही सहज विरून गेलें. ४५ अंतर्यामीं ब्रह्मानंद जागृत होऊन बाहेरील अवयव ढिले पडले, आणि पायांपासून मस्तकापर्यंत रोमाच उभें राहिले. ४६ पावसाळ्याच्या सुरवातीस पर्वतावरील सर्व मळ वाहून गेल्यावर जसें गवत उगवतें, त्याप्रमाणें अर्जुनाच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले; ४७ चंद्रकिरणाचा स्पर्श झाल्यावर ज्याप्रमाणें चंद्रकांत मण्यास पाझर सुटतो, त्याप्रमाणें अर्जुनाच्या शरीरावर घामाचे बिंदु आले; ४८ कमळाच्या कळींत भुंगा सांपडला म्हणजे ती जशी हेलकावते, त्याप्रमाणें अंतर्यामींच्या सुखाच्या लहरीनें अर्जुनाचें शरीर बाहेर कापूं लागलें; ४९ कापूर दाटल्यावर ज्याप्रमाणें कापूरकेळीचीं सोपटें उकलून कापुराचे कण बाहेर पडूं लागतात, त्याप्रमाणें डोळ्यावाटे आनंदाश्रूचे थेंब पडूं लागले; २५० चंद्रोदय झाल्यावर ज्याप्रमाणें समुद्र भरलेला असूनही त्यास भरती येते, त्याप्रमाणें अंतर्यामींच्या सुखाच्या लाटांनीं तो वरचेवर डोलूं लागला. ५१ याप्रमाणें अष्टसात्त्विक भावाची एकमेकांत चढाओढ लागून, अर्जुनास ब्रह्मानंदाची राज्यप्राप्ति झाली. ५२ त्याचप्रमाणें, ब्रह्मानंदसुखाच्या मागोमाग देव व मी असें द्वैत कायम राहिल्यामुळें अर्जुन श्वासोच्छ्वास टाकून दृष्टीनें पाहूं लागला; ५३ आणि ज्या बाजूला देव बसले होते त्या बाजूला वळून, मस्तक लववून व हात जोडून प्रार्थना करूं लागला. ५४

श्लोकार्थः—अर्जुन म्हणालाः—हे देवा, तुमच्या देहामध्यें मला सर्व देव, निरनिराळ्या प्रकारच्या प्राण्याचे समुदाय, कमळाच्या आसनावर बसलेला सर्व प्रजाचा स्वामी ब्रह्मदेव, सर्व ऋषि आणि दिव्य सर्प हेही दिसतात ॥ १५ ॥

अर्जुन म्हणाला, " प्रभो, आपला जयजयकार असो. आपली आम्हा प्राकृत जनांवर फार मोठी कृपा झाली कीं, आम्हाला विश्वरूप पहाण्यास मिळालें. ५५ भगवन्, आपण ही गोष्ट फार चांगली केली, व तिच्या योगानें स्वभावतःच मला फार आनंद झाला; ती ही कीं, सर्व सृष्टीला तुमचा आश्रय आहे असें मीं आज आपल्या दृष्टीनें पाहिलें. ५६ देवा, पर्वताच्या अंतर्गत जशीं जागोजाग दऱ्यातून श्वापदांचीं अरण्यें असतात, त्यांप्रमाणें या तुमच्या शरिरावर शेंकडों इंद्रचंद्रादि लोक माझ्या दृष्टीस पडले. ५७ अहो, आकाशावर ज्याप्रमाणें ग्रहांचे समुदाय दिसतात, किंवा महावृक्षांवर जशीं पक्ष्यांचीं घरटीं दृष्टीस पडतात, ५८ त्याप्रमाणें श्रीहरी, तुमच्या या विश्वरूपी शरिरावर देवांसह स्वर्ग दिसत आहे पहा. ५९ हे प्रभो, पंचमहाभूतें व त्यांपासून उत्पन्न होणारे भूतसृष्टींतील प्राणिमात्र हें सर्व मी तुमच्या शरीरावर पाहात आहें. २६० तसाच या तुमच्या शरीरावर सत्यलोकही आहे, व तेथील ब्रह्मदेव तो हाच नव्हे काय ? दुसरीकडे जों पाहावें तों कैलासही दिसत आहे. ६१ पार्वतीसह श्रीशंकर हे तुमच्या शरीराच्या एका भागावर दिसत आहेत. हे हृषीकेशा, तुम्हांलाही तुमच्या या शरीरावर मी पाहतों आहें. ६२ कश्यपादि ऋषींचीं सर्व कुळें व सर्पांसह पाताळही तुमच्या विश्वरूपावर दिसत आहे. ६३ फार काय, हे त्रैलोक्यपते, तुमच्या या एकएक अवयवरूपी भिंतीवर चौदा भुवनांच्या चित्राकृतिच काढल्या आहेत कीं काय असें वाटतें; ६४ आणि त्या भुवनांतील जे जे लोक तेही त्या चित्रांत दिसत आहेत, असें तुमचें अलौकिक मोठेंपण दृष्टीस पडतें. ६५

श्लोकार्थः—विश्वेश्वरा, हे विश्वरूपा, तुम्हांला अनंत बाहु, अनंत उदरें, अनंत मुखें व अनंत नेत्र असून, सर्व बाजूंनीं तुम्हांला अनंत रूपें आहेत असें मी पाहतों; पण तुमचा आदि, मध्य व अंत मला दिसत नाहीं ॥ १६ ॥

तुम्हीं दिलेल्या दिव्य चक्षूंच्या बळानें मी चहूंकडे पाहूं लागलों, तों तुमच्या बाहुदंडाचे ठिकाणीं आकाशाचे कोंब आले आहेत कीं काय असें वाटतें; ६६ त्याप्रमाणें, देवा, तुमच्या हातांनीं एकाच वेळीं सर्व व्यापार होत आहेत असें दृष्टीस पडतें, ६७ व आकाशांत जशीं जगाचीं भांडारें उत्पन्न होतात, त्याप्रमाणें तुमच्या शरीरावर अपार उदरें दिसत आहेत. ६८ तुमच्या हजार मस्तकांचीं कोट्यवधि मुखें जणूं काय परब्रह्मरूपी वृक्ष वदनरूपी फळांनीं लवून आल्याप्रमाणें दिसत आहेत. ६८ त्याचप्रमाणें, तुमच्या विश्वमूर्तीवर जिकडे तिकडे तोंडें दिसत आहेत, व नेत्राच्याही अनेक रांगा दिसताहेत. २७० इतकेंच नव्हे, तर स्वर्ग, पाताळ, भूमि, दिशा किंवा आकाश हा सर्व भेद नाहींसा होऊन हें सर्व विश्व मूर्तिमय दिसत आहे. ७१ तुमच्याशिवाय एखाद्या बाजूसही परमाणूइतकी जागा कौतुकानें पाहूं गेलें असतां सांपडत नाहीं; याप्रमाणें सर्व तुम्हीं व्यापिलें

१ संबंधानें. २ अरण्यें. ३ पुष्कळ. ४ घरटीं. ५ देवांसह. ६ ब्रह्मदेव. ७ सर्पांसह. ८ काढल्या आहेत. ९ बळानें. १० बाहूंचे ठिकाणीं. ११ आकाशाचे. १२ जगाचीं. १३ जिकडे तिकडे. १४ भेद.

*अन्वयः—हे देव, तव देहे अहं सर्वान् देवान् तथा भूतविशेषसंघान् च कमलासनस्थं ईशं ब्रह्माणं च सर्वान् ऋषीन् च दिव्यान् उरगान् पश्यामि ॥ १५ ॥*

( ४४९. विश्वरूपाचे ठिकाणीं ब्रह्मदेव, शंकर व ऋषिकुळें पाहातो, २५५–२६५ ) म्हणे जयजयाजी स्वामी । नवल कृपा केली तुम्हीं । जें हें विश्वरूप कीं आम्हीं । प्राकृत देखों ॥ ५५ ॥ परि साचचि भलें केलें गोसाविया । मज परितोषु जाहला साविया । जी देखिलासि जो इया । सृष्टीसि तूं आश्रयो ॥ ५६ ॥ देवा मंदराचेनि अंगलगें । ठायीं ठायीं श्वापदांचीं [2]दांगें । तैसीं इये तुझ्या देहीं अनेगें । देखतसें भुवनें ॥ ५७ ॥ अहो आकाशाचिये खोळे । दिसती ग्रहगणांचीं कुळें । कीं महावृक्षीं अविसाळें । पक्षिजातीचीं ॥ ५८ ॥ तयापरी श्रीहरी । तुझिया विश्वात्मकीं इये शरीरीं । स्वर्गु देखतसें अवधारीं । सुरगणेंसी ॥ ५९ ॥ प्रभु महाभूतांचें पंचक । येथ देखत आहे अनेक । आणि भूतग्राम एकेक । भूतसृष्टीचे ॥ २६० ॥ जी सत्यलोकु तुजमाजि आहे । देखिला चतुराननु हा नोहे । आणि येरीकडे जंव पाहें । तंव कैलासुही दिसे ॥ ६१ ॥ श्रीमहादेव भवानियेशीं । तुझ्या दिसतसे एके अंशीं । आणि तूंतेंही गा हृषीकेशी । तुजमाजि देखें ॥ ६२ ॥ पैं कश्यपादि ऋषिकुळें । इयें तुझिया स्वरूपीं सकळें । देखतसें पाताळें । पन्नगेंशीं ॥ ६३ ॥ किंबहुना त्रैलोक्यपती । तुझिया एकेकाचि अवयवाचिये भिंती । इयें चतुर्दशभुवनें चित्राकृती । अंकुरलीं जाणों ॥ ६४ ॥ आणि तेथींचे जे जे लोक । ते चित्ररचना जी अनेक । ऐसें देखतसें अलोलिक । गांभीर्य तुझें ॥ ६५ ॥

*अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ।*
*नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप ॥ १६ ॥*

अन्वयः— हे विश्वेश्वर, हे विश्वरूप, अहं त्वा अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं सर्वतः अनंतरूपं पश्यामि; पुनः तव अंत, मध्यं, आदि न पश्यामि ॥ १६ ॥

( ४५०. विश्वरूपाचे हात, २६६–२६७ ) त्या दिव्यचक्षूंचेनि पैसें । चहूंकडे जंव पाहत असे । तंव दोर्दंडिकीं जैसें । आकाश कोंभैलें ॥ ६६ ॥ तैसे एकचि निरंतर । देवा देखत असें तुझे कर । करीत आघवेचि व्यापार । एकेचि काळीं ॥ ६७ ॥ ( ४५१. विश्वरूपाचीं उदरें, २६८ ) मग महाशून्याचेनि पैसारें । उघडलीं ब्रह्मकटाहींचीं भांडारें । तैसीं देखतसें अपारें । उदरें तुझीं ॥ ६८ ॥ ( ४५२. विश्वरूपाचीं मुखें व नेत्र, २६९–२७० ) जी सहस्रशीर्षयाचें देखिलें । कोडीवरी होताति एकि वेळे । कीं परब्रह्मचि वदनफळें । मोडोनि आलें ॥ ६९ ॥ तैसीं वक्त्रें जेउतीं[3] तेउतीं । तुझीं देखतसें विश्वमूर्ती । आणि तयाचिपरी नेत्रपंक्ति । अनेका सैंघ ॥ २७० ॥ ( ४५३. विश्वरूप अनंत आहे, २७१–२७३ ) हें असो स्वर्ग पाताळ । कीं भूमि दिशा अंतराळ । हे विवेंक्षा ठेली सकळ । मूर्तिमय देखतसें ॥ ७१ ॥ तुजवीण

अर्जुन म्हणाला, " प्रभो, आपला जयजयकार असो. आपली आम्हा प्राकृत जनावर फार मोठी कृपा झाली कीं, आम्हाला विश्वरूप पहाण्यास मिळालें. ५५ भगवन्, आपण ही गोष्ट फार चांगली केली, व तिच्या योगानें स्वभावतःच मला फार आनंद झाला; ती ही कीं, सर्व सृष्टीला तुमचा आश्रय आहे असें मीं आज आपल्या दृष्टीनें पाहिलें. ५६ देवा, पर्वताच्या अंतर्गत जशीं जागोजाग दऱ्यांतून श्वापदांचीं अरण्यें असतात, त्यांप्रमाणें या तुमच्या शरिरावर शेंकडों इंद्रचंद्रादि लोक माझ्या दृष्टीस पडले. ५७ अहो, आकाशावर ज्याप्रमाणें ग्रहांचे समुदाय दिसतात, किंवा महावृक्षांवर जशीं पक्ष्यांचीं घरटीं दृष्टीस पडतात, ५८ त्याप्रमाणें श्रीहरी, तुमच्या या विश्वरूपी शरिरावर देवासह स्वर्ग दिसत आहे पहा. ५९ हे प्रभो, पंचमहाभूतें व त्यांपासून उत्पन्न होणारे भूतसृष्टींतील प्राणिमात्र हें सर्व मी तुमच्या शरीरावर पाहात आहें. २६० तसाच या तुमच्या शरीरावर सत्यलोकही आहे, व तेथील ब्रह्मदेव तो हाच नव्हे काय? दुसरीकडे जों पाहावें तों कैलासही दिसत आहे. ६१ पार्वतीसह श्रीशंकर हे तुमच्या शरीराच्या एका भागावर दिसत आहेत. हे हृषीकेशा, तुम्हांलाही तुमच्या या शरीरावर मी पाहतों आहें. ६२ कश्यपादि ऋषींचीं सर्व कुळे व सर्पासह पाताळही तुमच्या विश्वरूपावर दिसत आहे. ६३ फार काय, हे त्रैलोक्यपते, तुमच्या या एकएक अवयरूपी भिंतीवर चौदा भुवनांच्या चित्राकृतिच काढल्या आहेत कीं काय असें वाटतें; ६४ आणि त्या भुवनांतील जे जे लोक तेही त्या चित्रांत दिसत आहेत, असें तुमचें अलौकिक मोठेंपण दृष्टीस पडतें. ६५

श्लोकार्थः—विश्वेश्वरा, हे विश्वरूपा, तुम्हाला अनंत बाहु, अनंत उदरें, अनंत मुखें व अनंत नेत्र असून, सर्व बाजूंनीं तुम्हाला अनंत रूपें आहेत असें मी पाहतों; पण तुमचा आदि, मध्य व अंत मला दिसत नाहीं ॥ १६ ॥

तुम्हीं दिलेल्या दिव्य चक्षूंच्या बळानें मी चहूंकडे पाहूं लागलों, तों तुमच्या बाहुदंडाचे ठिकाणीं आकाशाचे कोंब आले आहेत कीं काय असें वाटतें; ६६ त्याप्रमाणें, देवा, तुमच्या हातांनीं एकाच वेळीं सर्व व्यापार होत आहेत असे दृष्टीस पडतें, ६७ व आकाशांत जशीं जगाचीं भांडारें उत्पन्न होतात, त्याप्रमाणें तुमच्या शरीरावर अपार उदरे दिसत आहेत. ६८ तुमच्या हजार मस्तकांचीं कोट्यवधि मुखें जणूं काय परब्रह्मरूपी वृक्ष वदनरूपी फळांनीं लवून आल्याप्रमाणें दिसत आहेत. ६९ त्याचप्रमाणें, तुमच्या विश्वमूर्तीवर जिकडे तिकडे तोंडें दिसत आहेत, व नेत्रांच्याही अनेक रांगा दिसताहेत. २७० इतकेंच नव्हे, तर स्वर्ग, पाताळ, भूमि, दिशा किंवा आकाश हा सर्व भेद नाहींसा होऊन हें सर्व विश्व मूर्तिमय दिसत आहे. ७१ तुमच्याशिवाय एखाद्या बाजूसही परमाणूइतकी जागा कौतुकानें पाहूं गेलें असतां सांपडत नाहीं; याप्रमाणें सर्व तुम्हीं व्यापिलें

१ संबंधानें. २ अरण्यें. ३ पुष्कळ. ४ घरटीं. ५ देवासह. ६ महादेव. ७ सर्पासह. ८ काढल्या आहेत. ९ बळानें. १० बाहूंचे ठिकाणीं. ११ आकाशाचे. १२ जगाचीं. १३ जिकडे तिकडे. १४ भेद.

एकादियाकडे । परमाणुहि एतुलें कोडें । अवकाशु पाहतसें परि न सांपडे । ऐसें व्यापिलें तुवां ॥ ७२ ॥ ( ४५३. विश्वरूप अनंत आहे, २७१–७३ ) इयें नानापरी अपरिमितें । जेतुलीं सांठविलीं होतीं महाभूतें । तेतुलाही पवाडु तुवां अनंतें । कोंदलां देखतसें ॥ ७३ ॥ ( ४५४. विश्वरूप अनादि व आयतें आहे, २७४–२७९ ) ऐसा कवणे ठायाहूनि तूं आलासी । एथ बैसलासि कीं उभा आहासी । आणि कवणिये मायेचिये पोटीं होतासी । तुझें ठाण केवढें ॥ ७४ ॥ तुझें रूप वय कैसें । तुजपैलीकडे काय असे । तूं काइसयावरी आहासि ऐसें । पाहिलें मियां ॥ ७५ ॥ तंव देखिलें जी आघवेंचि । तरि आतां तुझा ठावो तूंचि । तूं कवणाचा नव्हेसि ऐसाचि । अनादि आयता ॥ ७६ ॥ तूं उभा ना बैठा । दिर्घटू ना खुजटा । तुज तळीं वरी वैकुंठा । तूंचि आहासि ॥ ७७ ॥ तूं रूपें आपणयाचि ऐसा । देवा तुझी तूंचि वयसा । पाठी पोट परेशा । तुझें तूं गा ॥ ७८ ॥ किंबहुना आतां । तुझें तूंचि आघवें अनंता । हें पुढतपुढती पाहतां । देखिलें मियां ॥ ७९ ॥ ( ४५५. विश्वरूप आदिमध्यांतरहित आहे, २८०–२८२ ) परि या तुझिया रूपाआंतु । जी उणीव एक असे देखतु । जे आदि मध्य अंतु । तिन्ही नाहीं ॥ २८० ॥ येऱ्हवीं गिंवसिलें आघवा ठायीं । परि सोय न लाहेचि कहीं । म्हणोनि त्रिशुद्धी हे नाहीं । तिन्ही एथ ॥ ८१ ॥ एवं आदिमध्यांतरहिता । तूं विश्वेश्वरा अपरिमिता । देखिलासि जी तत्वता । विश्वरूपा ॥ ८२ ॥ ( ४५६. अर्जुन म्हणतो, देवा, तूंच विश्वरूप आहेस, २८३–२८७ ) तुज महामूर्तीचिया आंगीं । उमटलिया पृथक् मूर्ती अनेगी । लेइलासि वेनेपरीची आंगी । ऐसा आवर्डतु आहासी ॥ ८३ ॥ नाना पृथक् मूर्ति तिया द्रुमवल्ली । तुझिया स्वरूपमहाचळीं । दिव्यालंकार-फुलीं फळीं । सासिन्नलिया ॥८४॥ हो कां जे महोदधि तूं देवा । जाहलासि तरंगमूर्ती हेलावा । कीं तूं एक वृक्षु बरवा । मूर्तिफळीं फळलासी ॥ ८५ ॥ जी भूतीं भूतळ मांडिलें । जैसें नक्षत्रीं गगन गूढलें । तैसें मूर्तिमय भरलें । देखतसें तुझें रूप ॥ ८६ ॥ जी एकेकीच्या अंगप्रांतीं । होय जाय हे त्रिजगती । एवढियाही तुझ्या आंगीं मूर्ती । कीं रोमां जालिया ॥ ८७ ॥ ( ४५७. सारथीच विश्वरूप झाला हें देवांच्या कृपेनें कळलें, २८८–२९३ ) अवतरण:–ऐसा पवाडु मांडूनि विश्वाचा । तूं कवण पां एथ कोणाचा । हें पाहिलें तंव आमुचा । सारथी तोचि तूं ॥ ८८ ॥ तरी मज पाहतां मुकुंदा । तूं ऐसाचि व्यापकु सर्वदा । मग भक्तानुग्रहें तया मुग्धा । रूपातें धरिसी ॥ ८९ ॥ कैसें चहूं भुजांचें सांवळें । पाहतां वोल्हावती मन डोळे । खेंव देऊं जाइजे तरि आकळे । दोहींचि बाहीं ॥ २९० ॥ ऐसी मूर्ति कोडिसेवाणी कृपा । करूनि होसी ना विश्वरूपा ।

१ जागा. २ उंच. ३ ठेंगणा. ४ देवाधिदेवा. ५ अनेक प्रकारच्या रंगाची. ६ दिसत आहेत.

आहे. ७२ नानाप्रकारच्या अपरिमित महाभूतांनीं जें सर्व जग व्यापिलें होतें, तें सर्व, हे अनंता, तुम्हीं व्यापिलें आहे असें दिसतें. ७३ असे तुम्ही कोठून आलां, या ठिकाणीं बसले आहां किंवा उभे आहां, कोणत्या आईच्या पोटांत होतां, व तुमची केवढी आकृति आहे, ७४ तुमचें रूप आणि वय कसें आहे, तुमच्या पलीकडे काय आहे, व तुमचें अधिष्ठान कोणतें, हें जों मी पाहूं लागलों, ७५ तों मीं सर्वत्र पाहिलें; आणि तुमचें अधिष्ठान तुम्हीं आहां, तुम्ही कोणापासून उत्पन्न झाला नाहीं, जन्मरहित व असेच स्वयमेव आहां. ७६ देवा, तुम्ही उभे नाहीं व बसलेलेही नाहीं, उंच नाहीं व ठेंगणे नाहीं, तुमच्या वर व खालीं तुम्हीच आहां; ७७ देवा, तुमचें रूप कशाप्रमाणें आहे म्हणाल, तर तुमच्यासारखेंच आहे, व तुमचें वयही तुमच्यासारखेंच आहे. हे देवाधिदेवा, तुमची पाठ व पोट हीं तुमचीं तुम्ही आहां; ७८ फार तर काय ? हे अनंता, मी जों आणखी पाहूं लागलों, तों तुमच्यासारखे तुम्हीच आहा असें माझ्या दृष्टीस पडलें. ७९ पण तुमच्या विश्वरूपांत मला एक कमीपणा दिसतो: तो हा कीं, त्याला आदि, मध्य व अंत हीं तिन्ही नाहींत. २८० नाहीं तर सर्व ठिकाणीं शोधून पाहिलें, परंतु मला पत्ता लागला नाहीं; म्हणून आदि, मध्य व अंत हे तिन्ही तुमच्या रूपाला नाहींतच यांत संशय नाहीं. ८१ हे आदिमध्यांतरहिता, हे अपरिमिता जगदीशा, खरोखर याप्रमाणें मीं तुमचें विश्वरूप पाहिलें. ८२ तुमच्या विश्वरूपावर शेंकडों निरनिराळ्या मूर्ति उमटलेल्या आहेत, त्यामुळें तुमच्या अंगांत नानाप्रकारच्या रंगांचा आंगरखाच घातला आहे असे तुम्ही दिसतां आहां. ८३ तुमच्या विश्वरूपी पर्वतावर ज्या तऱ्हेतऱ्हेच्या निरनिराळ्या मूर्ति आहेत, त्या वृक्ष व वेली याप्रमाणें शोभत असून, मूर्तींवरचे जे अलंकार ते फुलें व फळें आहेत. ८४ हे देवा, तुम्ही महासमुद्र असून मूर्तिरूपी लाटांनीं उसळलेले दिसतां; किंवा तुम्ही एक उत्तम वृक्ष असून मूर्तिरूप फळांनीं भरलेले दिसतां. ८५ पृथ्वी जशी भूतांनीं भरलेली आहे, किंवा आकाश जसें नक्षत्रांनीं व्यापिलें आहे, तसें तुमचें विश्वरूप मूर्तींनीं भरलेलें आहे, असें दिसतें. ८६ ज्या एकेक मूर्तीच्या अंगावर त्रैलोक्य उत्पन्न होतें व लय पावतें, तेवढाल्या मूर्ति तुमच्या अंगावरील एका रोमांचाच्या ठिकाणीं आहेत. ८७ असा या जगाचा विस्तार करणारे जे तुम्हीं, ते तुम्ही कोण व कोणाचे, हें जों मी पाहूं लागलों, तों आमचे जे सारथि तेच तुम्ही आहां. ८८ तर हे मुकुंदा, तुम्ही सर्वदा असेच सर्वव्यापक आहां, परंतु भक्तांवर अनुग्रह करण्याकरितांच सगुण रूप धारण करतां, असें मला वाटतें. ८९ तुमची ती चतुर्भुज सावळी मूर्ति पाहिल्यावर मन व डोळे कसे तृप्त होतात ! तिला आलिंगन देऊं लागलें तर ती दोन्ही हातांत सुद्धां धरतां येते ! २९० हे विश्वरूप धारण करणाऱ्या देवा, असें गोजिरवाणें रूप तुम्ही भक्तावर कृपा करण्या-

७ रूपें. ८ वृक्ष व वेली. ९ मनुष्यानीं. १० पृथ्वी. ११ व्यापलें. १२ कैसात झाल्या. १३ सगुण. १४ धात होतात. १५ गोजिरवाणी.

कीं आमुचियाचि दिठी सलेपा । जे सामान्यत्वें देखती ॥ ९१ ॥ तरि आतां दिठीचा विटाळु गेला । तुवां सहजें दिव्यचक्षु केला । म्हणोनि यथारूपें देखवला । महिमा तुझा ॥ ९२ ॥ परि मकरतुंडों मागिलेकडे । होतासि तोचि तूं एवढें । रूप जाहलासि हें फुडें । वोळखिलें मियां ॥ ९३ ॥

किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतोदीप्तिमंतम् ।
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥

अन्वयः—त्वा किरीटिनं गदिनं च चक्रिणं तेजोराशिं सर्वतः दीप्तिमंतं समंतात् दीप्तानलार्कद्युतिम् अप्रमेयम् दुर्निरीक्ष्यं पश्यामि ॥ १७ ॥

( ४५८. शंख चक्र गदा धारण करणारा भगवानच विश्वरूप झाला, २९४–३०६ ) नोहे तोचि हा शिरीं । मुगुट लेइलासि श्रीहरी । परि आतांचें तेज आणि थोरी । नवल कीं बहु हें ॥ ९४ ॥ तेंचि हें वरिलीयेचि हातीं । चक्र परिजिंतैया आयती । सांवरितासि विश्वमूर्ती । ते न मोडे खुण ॥ ९५ ॥ येरीकडे तेचि हे नोहे गदा । आणि तळिलिया दोनी भुजा निरायुधा । वेगोरे सावरावया गोविंदा । संसरिलीया ॥ ९६ ॥ आणि तेणेंचि वेगें सहसा । माझिया मनोरथासरिसा । जाहलासि विश्वरूपा विश्वेशा । म्हणोनि जाणें ॥ ९७ ॥ परि कायसें वा हें चोज । विस्मयो करावयाहि पाडु नाहीं मज । चित्त होऊनि जातसे निर्बुज । आश्चर्यें येणें ॥ ९८ ॥ हें एथ आथि कां येथ नाहीं । ऐसें श्वसोंही नये काहीं । नवल अंगप्रभेची नवाई । कैसी कोंदली सैंघ ॥ ९९ ॥ एथ अग्नीचीही दिठी करपत । सूर्य खद्योतु तैसा हारपत । ऐसें तीव्रपण अद्भुत । तेजाचें यया ॥ ३०० ॥ हो कां महातेजाचिया महार्णवीं । बुडोनि गेली सृष्टि आघवी । कीं युगांतविजूंच्यां पालवीं । झांकलें गगन ॥ १ ॥ नातरी संहारतेजाचिया ज्वाळा । तोडोनि मांचु बांधला अंतराळां । आतां दिव्यज्ञानाचिया डोळां । पाहवेना ॥ २ ॥ उजाळु अधिकाधिक बहुवसु । धडौडीत आहे अतिदाहसु । पडत दिव्यचक्षूंसही त्रासु । न्याहाळितां ॥ ३ ॥ हो का जे महाप्रळयींचा भडौडु । होता काळाग्निरुद्राचिया ठायीं गूढु । तो तृतीयनयनाचा मेंढु । फुटला जैसा ॥ ४ ॥ तैसें पसरलेनि प्रकाशें । सैंघ पांचवनिया ज्वाळांचे वळसे । पडतां ब्रह्मकटाह कोळिसे । होत आहाती ॥५॥ ऐसा अद्भुत तेजोराशी । जन्मा नवल म्यां देखिलासी । नाहीं व्याप्ती आणि कांतीसी । पारु जी तुझिये ॥ ६ ॥

त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥

---

१ दूषित. २ मकराकार जुवाच्या. ३ स्वीकारण्याची. ४ तयारी. ५ लगाम. ६ सरसावल्या. ७ थक. ८ विचार करण्यास अवकाश. ९ पदरानीं. ११ माळा. ११ दाह होणें. १२ भडभडाट. १३ गुप्त. १४ कळी. १५ उमलून. १६ पंचमहाभूतात्मक शरीरें. १७ ब्रह्मांड.

करितां घेत नाहीं का ? तर घेतां; पण आमच्या दूषित दृष्टीनें तें तुमचें रूप सामान्य मनुष्याप्रमाणें आम्ही मानतों. ९१ परंतु तुम्हीं सहज दिव्यचक्षु दिल्यामुळें माझ्या दृष्टीचा दोष नाहींसा होऊन तुमचा महिमा यथार्थ दृष्टीस पडला. ९२ परंतु, रथाच्या मकराकार जुंवाच्या मागल्या बाजूला जे तुम्ही बसलां होतां, त्या तुम्हीं एवढें विश्वरूप धारण केलें आहे एवढें मीं पक्कें ओळखलें. ९३

श्लोकार्थः—हे भगवन्, मस्तकावर किरीट असून हातात गदा आणि चक्र असलेले, तेजः-पुंज, सर्व बाजूंनीं देदीप्यमान, प्रदीप्त अग्नीच्या आणि सूर्याच्या प्रभेसारखी ज्याची प्रभा आहे, व ज्याची गणती करितां येत नाहीं, व कोणीकडूनही पाहण्यास अशक्य अशा तुम्हाला मी पाहतों. १७

हे श्रीहरी, तुम्हीं जो डोक्यावर मुगुट धारण केला होता, तोच हा नव्हे का ? पण हल्लींचें त्याचें तेज व आकार विशेष आहे, हेंच मोठें आश्चर्य आहे. ९४ वरच्या हातांतील फिरत असलेलें चक्र हेंच नव्हे का ? कारण, हे विश्वमूर्ते, तें तुम्ही सावरून हातात धरीत आहां, ही खूण कायम आहे. ९५ दुसऱ्या हातांत तीच ही गदा नव्हे काय ? हे गोविंदा, खालचे दोन हात निःशस्त्र असून घोड्यांचे लगाम याच हातांत धरले नव्हते काय ? ९६ आणि हे विश्वेशा, माझी विश्वरूप पाहण्याची इच्छा पूर्ण करण्याच्या हेतूनेंच तुम्हीं हें एकदम विश्वरूप धारण केलें, हें मी जाणतों आहें. ९७ परंतु देवा, ह्या तुमच्या रूपाचें आश्चर्य मानण्याचीही माझी योग्यता नाहीं; या आश्चर्यानें माझें मन थक्क होऊन गेलें आहे यांत नवल तें काय ? ९८ हें तुमचें विश्वरूप येथें आहे किंवा नाहीं, असा विचार करण्यासही अवकाश नाहीं. त्या रूपाच्या तेजाचा चमत्कार असा आहे कीं, ते सर्वत्र भरलेलें दिसतें. ९९ या रूपाच्या तेजाची अशी अलौकिक तीव्रता आहे कीं, त्याच्यापुढें अग्नीचीही दृष्टि करपून जाते व सूर्यही काजव्याप्रमाणें दिपून जातो ! ३०० असें वाटतें कीं, सृष्टि महातेजाच्या मोठ्या समुद्रांत बुडाली आहे, किंवा कल्पांतींच्या वेळेच्या विजांनीं सर्व आकाश झांकून टाकलें आहे कीं काय ? १ अथवा प्रळयकाळच्या तेजाच्या ज्वालांनीं आकाश व्यापिलें आहे ! असें तुमचें तेज माझ्या दिव्य दृष्टीनें पाहवत नाहीं. २ तें तेज अधिक प्रखर होऊन शरीरास अति दाह होत आहे; त्याजकडेस पाहून माझ्या दिव्यचक्षूंसही त्रास होत आहे. ३ अहो महाराज, प्रलय-कालचा अग्नि जो काळाग्निरुद्राच्या ठिकाणी गुप्त असतो, त्या प्रलयरुद्राची जणूं कळीच उमलली आहे असें भासतें; ४ तसेंच, तुमच्या पसरलेल्या विश्वरूपाच्या तेजाच्या वळशांत पंचमहाभूतात्मक शरीरें जळून ब्रह्मकटाहाचे कोळसे होत आहेत ! ५ ज्या तुमच्या रूपाच्या व्याप्तीला व तेजाला अंत नाहीं, असें हें अद्भुत रूप मीं यावज्जन्मांत पाहिलें नाहीं. ६

श्लोकार्थः—हे प्रभो, जाणण्यास योग्य असें जें अक्षर नावाचें परब्रह्म तें तुम्ही आहां; तुम्ही अविनाशी असून सनातन धर्माचे रक्षक आहां; व तुम्ही चिरकाल राहणारे असे पुरुष आहां, हें मला मान्य आहे ॥ १८ ॥

*अन्वयः—( हे भगवन् ) त्वं वेदितव्यं परमं अक्षरं; त्वं अस्य विश्वस्य परं निधानम्; त्वं अव्ययः शाश्वतधर्मगोप्ता; त्वं सनातनः पुरुषः ( असि इति ) मे मतः ॥ १८ ॥*

( ४५९. अनंत चरण, बाहु, डोळे, मुखांची तेजोमय मूर्ति, ३०७–३१४ ) देवा तूं अक्षर[1] । औटावियें मात्रेसि पर[2] । श्रुती जयाचें घर[3] । गिंवसीत आहाती ॥ ७ ॥ जें आकाराचें आयतन । जें विश्वनिक्षेपैकनिधान[4] । तें अव्यय तूं गहन । अविनाश जी ॥ ८ ॥ तूं धर्माचा वोलावा । अनादिसिद्ध तूं नित्य नवा । जाणें मी सदतिसावा[5] । पुरुष विश्वेश तूं ॥ ९ ॥

अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् ॥ १९ ॥

*अन्वयः—( हे भगवन् ) अनादिमध्यांतं, अनंतवीर्यं, अनंतबाहुं, शशिसूर्यनेत्रं, दीप्तहुताशवक्त्रं, स्वतेजसा इदं विश्वं तपंतम् त्वां पश्यामि ॥ १९ ॥*

तूं आदिमध्यांतरहितु । स्वसामर्थ्यें तूं अनंतु । विश्वबाहु अपरिमितु । विश्वचरण तूं ॥ ३१० ॥ पैं चंद्र चंडांशु[5] डोळां । दावितासि कोप प्रसाद लीळा । एका रुससी[6] तमाचिया डोळां । एकां पाळितोसि कृपादृष्टी ॥ ११ ॥ जी एवंविधा[7] तूतें । मी देखतसें हें निरुतें[8] । पेटलें प्रळयाग्नीचें उजितें[9] । तेसें वक्त्र हें तुझें ॥ १२ ॥ वणिवेनि पेटले पर्वत । कवळूनि ज्वाळांचे उभेंड उठत । तैसीचाटीत दाढा दांत । जीभ लोळे ॥ १३ ॥ इये वदनींचिया उबा । आणि जी सर्वांगकांतीचिया प्रभा । विश्व तौतलें[10] अति क्षोभीं । जात आहे ॥ १४ ॥

द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।
दृष्ट्वाऽद्भुतं रूपमिदं तवोग्रं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥

*अन्वयः—( हे महात्मन्, ) त्वया एकेन द्यावापृथिव्योः इदं अंतरं व्याप्तं च सर्वाः दिशः ( व्याप्ताः ), इदं तव अद्भुतं उग्रं रूपं दृष्ट्वा लोकत्रयं प्रव्यथितं हि ॥ २० ॥*

( ४६०. तेजोमय रूपाला पाहून जग दुःखग्रस्त झालें आहे. ३१५–३२५ ) कां जे द्यौलोकें आणि पाताळ । पृथिवी आणि अंतराळ । अथवा दशदिशा समाकुळ । दिशाचक्र ॥ १५ ॥ हें आघवेंचि तुवां एकें । भरलें देखत आहें कौतुकें । परि गगनाहीसकट भैयानकें । आप्लविजे जेविं ॥ १६ ॥ नातरी अद्भुतरसाचिया कल्लोळीं । जाहली चवदाही भुवनांसी कडियेंळीं । तैसें आश्चर्याचे मग मी आकळीं । काय एक ॥१७॥ नावरे व्याप्ती हे असाधारण । न साहवे रूपाचें उग्रपण । सुख दुरी गेलें परी प्राण । विपायें धरिजे ॥ १८ ॥ देवा ऐसें देखोनि तूतें । नेणों कैसें आलें भयाचें भरितें । आतां दुःखकल्लोळीं झळंबेतें । तिन्ही भुवनें ॥ १९ ॥ येऱ्हवीं तुज महा-

१ परब्रह्म. २ साडेतीन. ३ घर. ४ विश्व सांठविण्याचें स्थान. ५ सूर्य. ६ शासन करतोस. ७ या प्रकारांनीं. ८ खरें. ९ लवलखाट उजेड. १० मडकतात. ११ उबारा. १२ पोळलें.

देवा, तुम्ही अक्षर परब्रह्म असून साडेतीन मात्रांचा जो ॐकार, त्याच्याही पली-कडील आहां; व तुमचें स्थान श्रुति शोधीत असताही त्यांस सापडत नाहीं. ७ तुमच्या ठिकाणीं प्राणिमात्र लय पावतात, व तुम्ही विश्व सांठविण्याचें स्थान असून गहन, अव्यय आणि अविनाशी असे आहां. ८ तुम्ही धर्माचें जीवन आहां; अनादिसिद्ध असून नित्य नवे आहां; व छत्तीस तत्त्वाच्याही पलीकडील सदतिसावे पुरुष असून, या जगाचे ईश्वर आहां. ९

श्लोकार्थः—हे प्रभो, ज्याला आदि, मध्य व अंत नाहीं; ज्याच्या शक्तीला अंत नाहीं; ज्याला अनंत हस्त आहेत; सूर्य ज्याचे डोळे आहेत, ज्याचें तोंड प्रदीप्त झालेल्या अग्नीप्रमाणें आहे; व जो आपल्या तेजानें या विश्वाला ताप करतो, अशा तुम्हांला मी पाहतों ॥ १९ ॥

तुम्ही आदिमध्यांतरहित असून स्वतःच्या पराक्रमानें अपार आहां; तुम्हांला चहूं बाजूंनी असंख्य हात व पाय आहेत; ३१० चंद्र व सूर्य हे तुमचे डोळे असून ते शांति व कोप यांची लीला दाखवितात. तुम्ही तमोरूप डोळ्यानें. एकाला शासन करतां व कृपारूप डोळ्यानें एकाचें पालन करतां. ११ खरोखर, अशा अनेक प्रकारांनीं तुम्ही माझ्या दृष्टीला दिसत आहां. ज्याप्रमाणें प्रळयाग्नि पेटल्यावर चहूंकडे उजेड पडतो, त्या-प्रमाणें तुमचें तोंड महाप्रखर दिसत आहे. १२ वणव्यानें पर्वत पेटल्यावर ज्याप्रमाणें पर्वतावरील सर्व पदार्थ पेटून ज्वाला भडकत असतात, त्याप्रमाणें तुमची जीभ दाढा व दांत चाटीत आहे अशी दिसते. १३ तुमच्या या तोंडांतील अग्नीच्या उष्णतेनें व तुमच्या रूपाच्या तेजानें सर्व विश्व करपून जाऊन नाश पावत आहे. १४

श्लोकार्थः—हे महात्मन्, आकाश आणि पृथ्वी यांमधील हें अंतर आणि सर्व दिशा तुम्ही एकट्यानें व्यापून टाकल्या आहेत. तुमचें हें अद्भुत उग्ररूप पाहून हें सर्व त्रैलोक्य अतिशय भय-भीत झालें आहे ॥ २० ॥

किंवा स्वर्ग, पाताळ, पृथ्वी, आणि अंतरिक्ष, तशाच दहा दिशा व सर्व दिशाचक्र, १५ हें सर्व तुमच्या एकरूपानें व्यापून गेलें आहे, असें कौतुकानें मी पाहातों; परंतु आकाशासकट तुमच्या भेसूर रूपात जणूं काय सर्व विश्व बुडत आहे, १६ किंवा तुमच्या अद्भुत रूपाच्या ताटांत चौदाही भुवनें सांपडलीं आहेत, असें तुमचें रूप आश्चर्यकारक आहे. तें मला कसें पाहवेल ? १७ तुमच्या भव्य रूपाच्या प्राप्तीची कल्पना करवत नाहीं, तुमच्या रूपाचें तेज सहन करवत नाहीं, व या तुमच्या रूपाच्या दर्शनापासून जगाला सुख प्राप्त होण्याचें एकीकडे राहून उलट जग कष्टानें प्राण धरीत आहे. १८ देवा, असें तुमचें अद्भुत रूप पाहून भीतीचें भरतें कसें आलें हें समजत नाहीं. कारण, भीतीपासून होणाऱ्या दुःखाच्या लाटांत त्रैलोक्य बुडत आहे. १९ येरवीं तुम्हा महात्म्यांच्या दर्श-

१३ नाशास. १४ स्वर्ग. १५ अंतरिक्ष. १६ सर्व. १७ भेसूर रूप. १८ बुडवावें. १९ जाळी; आंत सापडणें. २० पाहतों. २१ कष्टानें. २२ बुडतात.

त्मयाचें देखणें । तरि भयदुःखासि कां मेळवणें । परि हें सुख नव्हेचि जेणें गुणें । तें जाणत आहे मज ॥ ३२० ॥ जंव तुझें रूप नोहे दिठें । तंव जगासि संसारिक गोमटें । आतां देखिलासि तरी विषयविटें । उपनला त्रासु ॥ २१ ॥ तेवींचि तुज देखिलियासाठीं । काय सहसा तुज देवों येईल मिठी । आणि नेदीं तरी शोकसंकटीं । राहों केंवि ॥ २२ ॥ म्हणोनि मागां सरों तंव संसारु । आडवीत येतसे अनिवारु । आणि पुढां तूं तंव अनावरु । नयेसि घेवों ॥ २३ ॥ ऐसा माझारिलिया सांकडां । बापुड्या त्रैलोक्याचा होतसे हुरडा । ऐसा हा ध्वनी जी फुडा । चोजेवला मज ॥ २४ ॥ जैसा आरंवळला आगीं । तो समुद्रा ये निवावयालागीं । तंव कल्लोळपाणियाचिया तरंगीं । आगळा विहे ॥ २५ ॥ ( ४६१. विश्वरूपाला पाहून कोणी भिऊन शरण येतात व कोणी स्तुति करतात, ३२६–३३१ ) तैसें या जगासि जाहलें । तूतें देखोनि तळमळित ठेलें ।

अमी हि त्वा सुरसंघा विशंति केचिद्भीताः प्रांजलयो गृणंति ।
स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥२१॥

अन्वयः—( हे भगवन् ) अमी हि सुरसंघाः त्वा विशंति, केचित् भीताः प्राजलयः (संतः) गृणंति; महर्षिसिद्धसंघाः स्वस्ति इत्युक्त्वा पुष्कलाभिः स्तुतिभिः त्वां स्तुवंति ॥ २१ ॥

यामाजि पैल भले । सुरांचे मेळावे ॥ २६ ॥ हे तुझेनि आंगिकें तेजें । जाळूनि सर्व कर्माचीं बीजें । मिळत तुजआंतु सहजें । सद्भावेंसीं ॥ २७ ॥ आणिक एक सावियाचि भयभीरु । सर्वस्वें धरूनि तुझी मोहेरु । तुज प्रार्थिताति करु । जोडोनियां ॥ २८ ॥ देवा अविद्यार्णवीं पडिलों । जी विषयवागुरे आतुडलों । स्वर्गसंसाराचिया सांकडलों । दोहीं भागीं ॥ २९ ॥ ऐसे आमुचें सोडवणें । तुजवांचोनि कीजेल कवणें । तुज शरण गा सर्वप्राणें । म्हणत देवा ॥ ३३० ॥ आणि महर्षि अथवा सिद्ध । विद्याधरसमूह विविध । हे बोलत तुज स्वस्तिवाद । करिती स्तवन ॥ ३१ ॥

रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।
गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥

अन्वयः—( हे भगवन् ) रुद्रादित्याः वसवः च ये साध्याः च विश्वे अश्विनौ मरुतः च ऊष्मपाः ये गंधर्वयक्षासुरसिद्धसंघाः, ते सर्वे विस्मिताः ( एव सतः ) त्वा वीक्षंते ॥ २२ ॥

( ४६२. देवादिक विश्वरूपाला पाहून जयजयकार करतात, ३३२–३३७ ) हे रुद्रादित्यांचे मेळावे । वसु हन साध्य आघवे । अश्विनौ देव विश्वेदेव विभवें । वायुही हे जी ॥ ३२ ॥ अवधारा पितर हन गंधर्व । पैल यक्षरक्षोगण सर्व । जी महेंद्रमुख्य देव । का सिद्धादिक ॥ ३३ ॥ हे आघवेचि आपुलालिया

१ दृष्टिगोचर. २ होरपळा. ३ हौस. ४ खरोखर. ५ अनुभवास आला. ६ पोळला. ७ लाटांचा खळखळाट. ८ सहज. ९ भयभीत. १० सन्मुख. ११ हात. १२ अज्ञानसमुद्रात. १३ विषयरूप

नापासून भय व दुःख यांची का प्राप्ति व्हावी ? परंतु या तुमच्या रूपापासून सुख होणारच नाहीं असें मला भासत आहे. ३२० जोंपर्यंत तुमचें रूप दृष्टीस पडलें नव्हतें, तोंपर्यंत जगाला संसारसुखच उत्तम वाटत होतें; परंतु तुमचें रूप पाहिल्यामुळें विपयवासनाही विटून गेल्या आणि त्रासही उत्पन्न झाला ! २१ तसेंच, हें तुमचें रूप पाहिल्यापासून मला जी भीति उत्पन्न झाली आहे, अशा स्थितींत मी कसा राहूं ? २२ म्हणून, मागें सरावें तर जन्ममरण तुमच्या व माझ्या भेटींत अंतर पाडतें; आणि पुढें सरावें तर हें प्रचंड विश्वरूप धारण केल्यामुळें तुम्हांला आलिंगन देता येत नाहीं. २३ अशा रीतीनें दोन संकटांच्या कचाटींत सांपडून बिचाऱ्या त्रैलोक्याचा हुरडा होत आहे; अशी माझी तुमचें विश्वरूप पाहण्याची खरी हौस माझ्या अनुभवास आली आहे. २४ ज्याप्रमाणें एखादा मनुष्य अग्नींत पोळल्यामुळें आपला दाह शमन होण्याकरितां समुद्राकडे धाव घेतो, तों समुद्राच्या लाटा पाहून त्याला जास्तच भीति वाटते, २५ त्याप्रमाणें या जगाची स्थिति झाली आहे. तुम्हांला पाहून तें तळमळावयास लागलें आहे.

श्लोकार्थः—हे प्रभो, हे देवाचे संघ तुमच्या स्वरूपात प्रवेश करीत आहेत; कित्येक भयभीत होऊन हात जोडून तुमची स्तुति करीत आहेत; व महर्षि आणि सिद्ध याचे समुदाय 'स्वस्ति' शब्द उच्चारून पुष्कळ स्तुतींनीं तुमची प्रशसा करीत आहेत ॥ २१ ॥

आतां त्या पलीकडील देवाचे समुदायांची झालेली स्थिति पहा. २६ तुमच्या अंगच्या तेजानें हे देव सर्व कर्मांचीं बीजे जाळून सद्भावानें तुमच्या ठिकाणीं लीन होत आहेत; २७ आणखी कांहीं खरोखर भयभीत होऊन तुमच्या समोर उभे राहून हात जोडून तुमची प्रार्थना करीत आहेत. २८ देवा, अज्ञानसमुद्रांत पडून विषयांच्या जाळ्यांत आम्हीं सापडलों आहों, व स्वर्गसुख आणि संसार या दोहोंच्या कचाट्यांत पडलों आहों. २९ अशा संकटांतून तुमच्यावाचून आम्हांस कोण सोडवील ? म्हणून, देवा, आम्ही सर्वभावानें तुला शरण आलों आहों, असें देवा, ते म्हणताहेत पहा. ३३० आणखी कश्यपादि महर्षि व कपिलादि सिद्ध व विद्याधर आदिकरून गंधर्वांचे मेळे हे "तुमचे कल्याण होवो" असें म्हणत असून तुमची प्रार्थना करिताहेत. ३१

श्लोकार्थः--हे प्रभो, रुद्र, आदित्य, वसु, साध्य ( रुद्रगण ), विश्वेदेव, अश्विनीकुमार, मरुत्, पितर, गंधर्व, यक्ष, असुर व सिद्ध, याचे समुदाय हे विस्मित होऊन तुमच्या रूपाकडे टक लावून पहात आहेत. ॥ २२ ॥

हे अकरा रुद्र, बारा आदित्य, आठ वसु व साध्य नामक सर्व देव, अश्विनीकुमार व एकुणपन्नास मरुद्गण हे सर्व आपल्या वैभवानें,\ ३२ तसेंच पितर, गंधर्व, यक्ष, सर्व राक्षसगण, इंद्रादिक मुख्य देव व सर्व सिद्ध, ३३ हे सर्व आपआपल्या लोकातून मोठ्या उत्कंठेनें

जाळ्यांत. १४ सापडलों. १५ कचाटींत पडलों. १६ कल्याणकारक भाषण. १७ स्तुति. १८ राक्षस. १९ इंद्रादिक.

लोकीं । सोत्कंठित अवलोकीं । हे महामूर्ति दैविकीं[1] । पाहात आहाती ॥ ३४ ॥ मग पाहात पाहात प्रतिक्षणीं । विस्मित होऊनि अंतःकरणीं । करित निजमुकुटीं[2] ओवाळणी । प्रभुजी तुज ॥ ३५ ॥ ते जयजयघोष कलरवें । स्वर्ग गाजविताती आघवे । ठेवित ललाटावरी बरवें । करसंपुट ॥ ३६ ॥ तिये विनय[3]द्रुमाचिये [4]आरवीं । [5]सुरवाडली सात्त्विकाची [6]माधवी । म्हणोनि [7]करसंपुटपल्लवीं । तूं होतासि फळ ॥३७॥

रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ॥
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाऽहम् ॥ २३ ॥

अन्वयः—महाबाहो ! बहुवक्त्रनेत्रं, बहुबाहूरुपादं बहूदरं, बहुदंष्ट्राकरालं ते महत् रूपं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथिताः ( संति ) तथा अहं ( अपि प्रव्यथितः अस्मि ) ॥ २३ ॥

( ४६३. भाग्यवानालाच विश्वरूपच दिसतें, इतरांस नाहीं; ३३८–३३९ ) जी लोचनां भाग्य उदेलें । मना सुखाचें सुयाणें पाहलें । जें अगाध तुझें देखिलें । विश्वरूप इहीं ॥ ३८ ॥ हें लोकत्रयव्यापक रूपडें । पाहतां देवांही वेंचक पडे । याचें सन्मुखपण जोडे । भलतयाकडुनी ॥ ३९ ॥ ( ४६४. ऋषि आणि देवांनीं विश्वरूप कसें पाहिलें, ३४०–३४६ ) ऐसें एकचि परि विचित्रें । आणि भयानकें वक्त्रें । बहुलोचन हे सशस्त्रें । अनंतभुजा ॥ ३४० ॥ अनंत चारु बाहु चरण । बहूदर आणि नानावर्ण । कैसें प्रतिवदनीं मातलेपण । आवेशाचें ॥ ४१ ॥ हो कां महाकल्पाचिया अंतीं । तेवेंकलेनि यमें जेउतें[12]तेउतीं । प्रळयाग्नीचीं उजितीं । आंबुखिलीं[13] जैसीं ॥ ४२ ॥ नातरी संहारत्रि[14]पुरारीचीं यंत्रें । कीं प्रळयभैरवांचीं क्षेत्रें[15] । नाना युगांत[16]शक्तीचीं पात्रें । भूतां[17]खिचा वोढविलीं[18] ॥ ४३ ॥ तैसीं जियेतियेकडे । तुझीं वक्त्रें जीं प्रचंडें । न [19]समाती दरीमाजि [20]सिंहांडे । तैसे [21]दशन दिसती रागिट ॥ ४४ ॥ जैसें काळरात्रीचेनि आंधारें । उल्हासत निघती संहार[22]खेचरें । तैसिया वदनीं [23]प्रळयरुधिरें । [24]कांटलिया दाढा ॥ ४५ ॥ हें असो काळें [25]अवांतिलें रण । का सर्वसंहारें [26]मांतलें मरण । तैसें अति भिंगुळ[27]वाणेंपण । वदनीं तुझिये ॥ ४६ ॥ ( ४६५. विक्राळ मुख पाहून अर्जुन व त्रैलोक्य भयग्रस्त झालें, ३४७–३५० ) हे बापुडी लोकसृष्टी । मोटकीये[28] विपाइली दिठी । आणि दुःखकालिंदीचिया तटीं । झाड होऊनि ठेली ॥ ४७ ॥ तुज महामृत्यूचिया सागरीं । आतां हे त्रैलोक्यजीविताची [29]तरी । शोकदुर्वातें[30]लहरी । आंदोळ[31]त असे ॥ ४८ ॥ एथ कोपोनि जरी वैकुंठें । ऐसें हन म्हणिपैल [32]अवचटें । जे तुज लोकांचें [33]कईं

१ देवरूप. २ मस्तक लववणें. ३ नम्रतारूप वृक्षाच्या. ४ बागेंत ५ प्राप्त झाली. ६ वसंत ऋतु. ७ दोन हातांनीं. ८ डोळ्यांचें. ९ सुदिन. १० भीति. ११ रागावलेल्या. १२ जिकडेतिकडे. १३ पसरल्या. १४ शंकराचीं. १५ जमाव. १६ युगाचा अंत करणारी जी. जगदंबा तिचीं. १७ भूतांच्या नाशाला. १८ प्राप्त झालीं. १९ मावत नाहींत. २० सिंह. २१ दांत. २२ नाश करणारीं

तुमचें विश्वरूप पहात आहेत तें पहा; ३४ आणि प्रभो, तुम्हांला पाहतांना क्षणोक्षणी मनांत आश्चर्य मानून तुमच्यापुढें ते आपलें मस्तक लववीत आहेत. ३५ ते सर्व मंजुळ शब्दानें स्वर्गांत तुमचा जयजयकार करीत आहेत व हात जोडून तुम्हांला नमस्कार करीत आहेत. ३६ त्या देवांच्या नम्रतारूपी वृक्षांच्या बागेंत अष्टसात्त्विकभावरूप वसंत प्राप्त होऊन, त्या वृक्षास करसंपुटरूपी पालवी फुटून तुमची त्यांना फलरूपी प्राप्ति झाली। ३७

श्लोकार्थः—हे महाबाहो, तुमचें बहुत मुखाचें, बहुत नेत्राचें, बहुत हस्ताचें, बहुत मांड्याचें, बहुत पायाचें, बहुत पोटाचें, व बहुत दाढांनीं विक्राळ असें विशाळ रूप पाहून सर्व लोक भयानें अत्यंत भयभीत होत आहेत; आणि मीही तसाच भयभीत होत आहें ॥ २३ ॥

जणूं काय त्यांच्या नेत्रांचें भाग्यच उदयास आलें व तुमचें हें अगाध विश्वरूप पाहून त्यांच्या मनाला आज सुखाचा सुदिन उगवला. ३८ हें तीन लोक व्यापणारें तुमचें स्वरूप पाहून देवांनाही भीति उत्पन्न झाली. कारण हें स्वरूप वाटेल तिकडून पाहिलें असतां प्रत्येक पाहणाराला आपल्या समोर आहे असें दिसतें. ३९ याप्रमाणें हें एकच असून विचित्र व भेसूर आहे; याला पुष्कळ तोंडें व नेत्र आहेत; व अनंत हात असून त्यांत शस्त्रें धारण केलेलीं आहेत. ३४० तसेंच, अनंत उत्तम बाहु, पाय, उदर आणि नानावर्ण इतकीं असून प्रत्येक मुख खावयाला उठलें आहे असें दिसतें; ४१ ज्याप्रमाणें महाकल्पाच्या अंतीं रागावलेला यम जिकडे तिकडे प्रळयाग्नीच्या होळ्या पसरतो, ४२ किंवा शंकराचीं संहार करण्याचीं यंत्रेंच अथवा पात्रें, प्रळयभैरवांचे जमाव, किंवा अंत करणाऱ्या जगदंबेची विभूति संहार करण्याकरितां यावी कीं काय, ४३ त्याप्रमाणें जिकडे तिकडे तुमचीं प्रचंड तोंडें दिसतात; आणि दरीमध्यें ज्याप्रमाणें सिंह मावत नाहींत, त्याप्रमाणें तुमचे दांत तोंडांत न मावतां भयंकर दिसतात. ४४ प्रळयरात्रीच्या अंधारामध्यें जशी नाश करणारीं पिशाचें निघतात, त्याप्रमाणें प्रळयकाळच्या संहाराच्या रक्तानें तुमच्या दाढा किटलेल्या दिसतात. ४५ फार काय सांगावें? काळानें जसें युद्धाला आमंत्रण द्यावें, किंवा सर्वसंहारांत जीवांचा नाश व्हावा, त्याप्रमाणें तुमच्या मुखामध्यें अत्यंत भयंकरपणा दिसतो, ४६ काय सांगूं! हें सर्व जग अत्यंत दीन दिसतें. कारण, जगाकडे किंचित् नजर टाकून पाहील त्याला, ते दुःखरूप यमुनानदीच्या कांठाच्या झाडाप्रमाणें उभें राहिलेलें आहे असें दिसेल. ४७ तुमच्या या महामृत्युरूपी सागरांत जगताचें आयुष्य हीच कोणी नाव शोकरूपी तुफानानें हेलकावे खात आहे. ४८ देवा, कदाचित् तुम्ही असें म्हणाल कीं, तुला लोकांच्या भीतीबद्दल वाटाघाट करण्याचें काय कारण आहे? तर तसें न करतां; जें हल्लीं विश्वरूप पाहिलें आहेस, त्याचें मनांत ध्यान करून

पिशाचें. २३ प्रळयकाळच्या संहाराच्या रक्तानें. २४ टिकलेल्या. २५ आमंत्रण केलें. २६ आलें. २७ भयंकरपणा. २८ थोडी. २९ नौका. ३० तुफान. ३१ हेलकावे खात आहे. ३२ अकस्मात्. ३३ वाटाघाट.

वाटे । तूं घ्यानसुख हें भोगीं ॥ ४९ ॥ तरी जी लोकांचें कीर साधारण । वायां आड सूतसें वोडँण । केविं सहसा म्हणें प्राण । माझेचि कांपती ॥ ३५० ॥
( ४६६. अर्जुन धीरवान असूनही विश्वरूपाला भ्याला व म्हणतो—ही मोठी महामारीच आहे, ३५१–३५२ ) ज्या मज संहाररुद्र वाँसिपे । ज्या मज भेणें मृत्यु लपे । तो मी एथें अँहाळबाहळीं कांपे । ऐसें तुवां केलें ॥ ५१ ॥ परि नवल बापा हे महामारी । इया नाम विश्वरूप जरी । हे भ्यासुरपणें हारी । भयासि आणी ॥ ५२ ॥

*नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।*
*दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामि शमं च विष्णो ॥ २४ ॥*

अन्वयः—विष्णो, त्वा नभःस्पृशं, दीप्तं, अनेकवर्णं, व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रं दृष्ट्वा अहं प्रव्यथितांतरात्मा ( अस्मि ). धृतिं शमं च न विंदामि ॥ २४ ॥ .

( ४६७. अर्जुन भयानें विश्वरूप आवरण्याची प्रार्थना करतो, ३५३–३८२ ) ठेलीं[6] महाकाळेंसि हटेंतटें[7] । तैसीं कितीएकें मुखें रागिटें । इहीं वाढोनियां धाकुटें । आकाश केलें ॥ ५३ ॥ गगनाचेनि वाडपणें नाकळे । त्रिभुवनींचियाही वारिया न वेंटाळे । ययाचेनि वाफा आगी जळे । कैसें धडाडीत असे ॥ ५४ ॥ तेवींचि एकासारिखें एक नोहे । एथ वर्णावर्णाचा भेदु आहे । हो कां जे प्रळयीं सावांवो लाहे । वन्ही ययाचा ॥ ५५ ॥ जयाचिये आंगींची दीप्ति येवढी । जे त्रैलोक्य कीजे राखोंडी । कीं तयाही तोंडे आणि तोंडीं । दांत दाढा ॥ ५६ ॥ कैसा वारया धनुर्वात चढला । समुद्र कीं महापुरीं पडिला । विषाग्नि मौरा प्रवर्तला । वेंडवानळासी ॥ ५७ ॥ हैंळाहळ आगी पियालें । नवल मरण मारा प्रवर्तलें । तैसें संहारतेजा या जाहलें । वदन देखा ॥ ५८ ॥ परी कोणें मानें विशाळ । जैसें तुटिलिया अंतराळ । आकाशासि कव्हेंळें । पडोनि ठेलें ॥ ५९ ॥ नातरी काखे सूँनि वसुं-धरी । जैं हिरण्याक्षु रिगाला विवरीं[17] । तैं उघडलें हाँटकेश्वरीं । जेवीं पाताळकुहेरें ॥ ३६० ॥ तैसा वक्त्रांचा विकाँसु । माजि जिव्हांचा आगळाचि आवेशु । विश्व न पुरे म्हणोनि घांसु । न भरीचि कोंडें ॥ ६१ ॥ आणि पाताळव्याळांचिया फूत्कारीं । गैरळज्वाळा लागती[24] अंबरीं । तैसी पसरलिये वदनदरी- । माजि हे जिव्हा ॥ ६२ ॥ काढूनि प्रळयविजूचीं जुंबाँडें । जैसें पैन्नासिले गगनाचे हुँडे । तैसे औवाळुवांवरी आंकडे । धगधगीत दाढांचे ॥ ६३ ॥ आणि ललाटपटांचिये खोळे । कैसे भयातें भेडविताती डोळे । हो कां जे महामृत्यूचे उमाळे । कडवसां

१ घालतो २ पडदा. ३ भितो. ४ आत व बाहेर. ५ जिंकते. ६ लढताहेत. ७ पैजेनें. ८ मोठेपणानें. ९ आकळता येत नाहीं. १० साहाय्य लागते. ११ मारण्यास उद्युक्त झाला. १२ वडवानलाच्या साहाय्यानें १३ विष १४ वेढा १५ घालून १६ पृथ्वी. १७ पाताळात. १८ पाताळातील महादेवानें. १९ विवर २० पसरणें. २१ नागाच्या. २२ फुत्कान्यानें. २३ विष. २४ आकाशीं.

सुखाचा उपभोग घे. ४९ तर, लोकांच्या भीतीचा फक्त आडपडदा असून, खरें म्हणाल तर भीतीनें माझीच पाचावर धारण बसली आहे। ३५० ज्या मला प्रळयकाळचा रुद्र भितो, व माझ्या भीतीनें मृत्यु लपतो, तो मी अंतर्बाह्य तुमचें स्वरूप पाहून कापत आहे. अशी तुम्हीं माझी स्थिति करून टाकिली। ५१ परंतु हे प्रभो, ह्या तुमच्या अति भयंकर रूपाला, कीं जें आपल्या उग्र तेजानें भयालाही जिकून टाकतें, त्याला विश्वरूप म्हणणें हें नवल नव्हे का? तर ही महामारी होय. ५२

श्लोकार्थः—हे विष्णो, तुम्ही जे आकाशापर्यंत पोहोंचलेले, प्रकाशमान, अनेक वर्णांचे, पसरलेल्या तोंडाचे व प्रदीप्त आणि विशाल नेत्राचे, त्या तुम्हाला पाहून माझा अंतरात्मा भयभीत होऊन गेला आहे; माझें धैर्य टिकट नाहीं; व मला शांतिही वाटत नाहीं ॥ २४ ॥

कित्येक रागीट मुखें जणूं काय महाकाळाबरोबर पैजेनें लढताहेत, व त्यांनीं आपल्या मोठेपणानें आकाशास मागें टाकलें आहे; ५३ तीं आकाशाच्याही मोठेपणानें आकळलीं जात नाहींत; व त्रिभुवनाच्या वाऱ्यानेंही ज्याचें वेष्टन होत नाहीं; उलट तीं आपल्या वाफांनीं अग्नीला जाळून सर्वत्र भडका करीत आहेत। ५४ त्याचप्रमाणें, तीं एकासारखीं एक नसून प्रत्येकांत रंगारूपाचा भेद आहे, व प्रळयकाळचा अग्नि ज्या वेळेस उत्पन्न होतो, त्या वेळेस तो यांच्याच साहाय्यानें पृथ्वीचा प्रळय करतो कीं काय कोण जाणे। ५५ यांच्या अंगचें तेज एवढें आहे कीं, ज्यानें त्रैलोक्याची राखुंडी होते। त्यांतही तोंडें आहेत आणि तोंडांत दांत व दाढा आहेत। ५६ काय वाऱ्याला धनुर्वात झाला? किंवा समुद्राला महापूर येऊन तो मर्यादा सोडून वाहूं लागला? अथवा वडवानळाच्या साहाय्यानें विषरूप अग्नि मारण्यास प्रवर्तला आहे कीं काय? ५७ काळकूट विष अग्नीनें घ्यावें, अथवा मरण हेंच मारण्यास उद्युक्त व्हावें, त्याप्रमाणें या विश्वरूपाचें तेज प्रखर असून त्याला आणखी तोंडेंही आहेत. ५८ परंतु तीं तोंडें केवढीं मोठीं आहेत म्हणाल, तर आकाश मध्येंच तुटून त्याला जशी खिंड पडावी त्याप्रमाणें; ५९ किंवा हिरण्याक्ष राक्षस पृथ्वी खाकेंत मारून ज्या वेळेस पाताळांत जावयास निघाला, त्या वेळेस हाटकेश्वरानें ( सप्तपाताळाखालील महादेवाच्या अवतारानें ) जसें पाताळाचें विवर उघडलें, ३६० त्याप्रमाणें हीं तुमचीं तोंडं पसरलेलीं असून, त्यांत जिव्हा आवेशानें लडबडताहेत; आपल्या ( एक ) घासासही विश्व पुरणार नाहीं, म्हणून कौतुकानें देखील तें खाऊन टाकीत नाहींत; ६१ आणि पाताळांतील नागांच्या फुस्काऱ्यानें जशा विषाच्या ज्वाळा आकाशास लागतात, त्याप्रमाणे ह्या तोंडाच्या दरींत जिव्हा भासतात। ६२ प्रळकाळच्या विजाचे समुदाय एकत्र करून जसे गगनाचे किल्ले शृंगारावे, त्याप्रमाणें ओठाच्या दोन्ही बाजूंस दाढांचे आकडे प्रखर दिसतात; ६३ आणि कपाळाच्या भागांतील

---

२५ समुदाय. २६ शृंगारिले. २७ बुरुज. २८ ओंठाबाहेर. २९ प्रखर. ३० कपाळाच्या भागांतील खळग्यांत. ३१ लहरी. ३२ आधारात.

राहिले ॥ ६४ ॥ ऐसें वाऊनि भयाचें भोजे । एथ काय निपजवूं पाहतोसि काज । तें नेणों परी मज । मरणभय आलें ॥ ६५ ॥ देवा विश्वरूप पहावयाचे डोहळे । केले तिये पावलों प्रतिफळें । बापा देखिलासि आतां डोळे । निवावे तैसे निवाले ॥ ६६ ॥ अहो देहो पार्थिव[2] कीर जाये । ययाची काकुळती[3] कवणा आहे । परि आतां चैतन्य माझें विपाये । वांचे कीं न वांचे ॥ ६७ ॥ येऱ्हवीं भयास्तव आंग कांपे । नावेक आगळे तरी मन तापे । अथवा बुद्धिही वोसिपे । अभिमानु विसरिजे ॥ ६८ ॥ परी येतुलियाही वेगळा । जो केवळ आनंदैककळा । तया अंतरात्मयाही निश्चळा । शियारी[6] आली ॥ ६९ ॥ बाप साक्षात्काराचा वेधु । कैसा देशधडी केला बोधु । हा गुरुशिष्यसंबंधु । विपायें नांदे ॥ ३७० ॥ देवा तुझ्या ये दर्शनीं । जें वैकल्य उपजिलें आहे अंतःकरणीं । तें सांवरावयालागीं गवेसणी । धैर्याची करितसें ॥ ७१ ॥ तंव माझेनि नामें धैर्य हारपलें । कीं तयाहीवरी विश्वरूपदर्शन जाहलें । हें असो परि मज भलें औतुडविलें । उपदेशा इया ॥ ७२ ॥ जीव विसंवेवयाचिया चाडा । सैंघ धांवाधांवी करितसें बापुडा । परि सोय[4] ही कवणेकडा । न लभे एथ ॥ ७३ ॥ ऐसें विश्वरूपाचिया महामारी । जीवित्व गेलें आहे चराचरीं । जी न बोलें तरि काय करीं । कैसेनि राहें ॥ ७४ ॥

दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसन्निभानि।
दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥ २५ ॥

अन्वयः—देवेश, ( हे ) जगन्निवास ! कालानलसन्निभानि दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वा एव ( अहं ) दिशः न जाने च शर्म न लभे; ( तस्मात् त्वं ) प्रसीद ॥ २५ ॥

पैं अखंड डोळ्यापुढें । फुटलें जैसें महाभयाचें भांडें । तैशीं तुझीं मुखें वितंडें[17] । पसरलीं देखें ॥ ७५ ॥ असो दांतदाढांची दाटी । न झांकवे मा दोहीं ओठीं । सैंघ प्रळय शस्त्रांचिया दाट कांटी । लागलिया जैशा ॥ ७६ ॥ जैसें तक्षका विष भरलें । हो कां जे काळरात्रीं भूत संचरलें । कीं आग्नेयास्त्र परजिलें । वज्राग्नी जैसें ॥ ७७ ॥ तैशीं तुझीं वक्त्रें प्रचंडें । वरि आवेश हा बाहेरी वोसंडे[20] । आले मरणरसाचे लोंढे । आम्हांवरी ॥ ७८ ॥ संहारसमयींचा चंडानिळु । आणि महाकल्पांत प्रळयानळु । या दोहीं जें होय मेळु । तें काय एक न जळे ॥ ७९ ॥ तैसीं संहारकें तुझीं मुखें । देखोनि धीरु कां आम्हां पारुखे । आतां भुललों मी दिशा न देखें । आपणपें नेणें ॥ ३८० ॥ मोटकें विश्वरूप डोळां

१ कौतुक. २ मातीचें. ३ पर्वा. ४ भीति पावते. ५ स्वरूप. ६ शिसारी. ७ छंद. ८ देशपार. ९ ज्ञान १० क्वचित्. ११ व्याकुळता. १२ खटपट. १३ गुतविलें. १४ विसावा घेण्याकरितां. १५ पुष्कळ. १६ थारा. १७ मोठीं. १८ कुपण. १९ प्रळयाग्नीनें. २० उचंबळे. २१ प्रळयकाळाचा. २२ प्रचंड वारा. २३ प्रळयाग्नि. २४ थोडें.

खळग्यांत भयाला भिवविणारे असे डोळे दिसत असून, ते महामृत्यूचे प्रवाह अंधारात दडून बसल्यासारखे दिसताहेत. ६४ याप्रमाणें भीतीचें कौतुक करून या ठिकाणीं तुम्ही कसल्या प्राप्तीची आशा करतां हें मला समजत नाहीं; परंतु मला मात्र मरणाची भीति उत्पन्न झाली आहे. ६५ देवा, मला जें विश्वरूप पहाण्याविषयीं डोहाळे झाले होते, ते माझे मलाच फळले; व तें रूप पाहून जशा रीतीनें डोळ्याची शांति व्हावयाला पाहिजे होती, त्याप्रमाणें झाली आहे. ६६ देवा, शरीर हें मातीचें असून तें नाहींसें झालें असता त्याची कोण पर्वा करील? परंतु माझें चैतन्य हेंही कदाचित् राहील कीं नाहीं याचा भरंवसा नाहीं. ६७ थोडा बहुत मनालाही ताप उत्पन्न होत आहे, व बुद्धीला भीति उत्पन्न होऊन अभिमानाचाही विसर पडला आहे. ६८ इतकेंच नव्हे तर इंद्रियांहून निराळा असा जो आनंदरूपी निश्चळ आत्मा, त्यालाही शिसारी झाली आहे. ६९ देवा, विश्वरूपाचा साक्षात्कार काय सांगावा, कीं ज्याच्या दर्शनानें माझें ज्ञानच देशोधडीस लागलें; आणि माझा व तुमचा जो गुरुशिष्याचा संबंध तो या जगात उरेल कीं नाहीं याचा मला संशय आहे. ३७० देवा, तुमच्या विश्वरूपाच्या दर्शनानें माझें व्याकुळ झालेलें अंतःकरण सावरून धरण्याकरितां त्याला मी धीर देण्याची खटपट करीत आहें; ७१ मूळ माझें व धैर्याचें वांकडें पडिलें होतें, तशांत हें विश्वरूप डोळ्यांनीं पाहिलें; हें असो. परंतु शाबास, तुम्हीं मला उपदेशाच्या घोटाळ्यांत चांगलेंच पाडलें! ७२ माझा जीवात्मा विसावा घेण्याच्या निमित्तानें बिचारा चहूंकडे धाव घेत आहे, परंतु त्याला कोठेंही थारा मिळत नाहीं. ७३ याप्रमाणें तुमच्या या विश्वरूपी महामारीच्या दर्शनानें स्थावरजंगमादि सृष्टींतील सर्वांचें जीवित्व नाहींसें झालें आहे. पण जर तुम्हाला शरण न आलों तर मी जिवंत तरी कसा राहीन? ७४

श्लोकार्थः—हे देवाधिदेवा, जगन्निवासा, प्रलयकालच्या अग्नीसारखीं प्रदीप्त आणि भयंकर दाढांनीं विक्राळ अशीं तुमचीं मुखें पाहताच मला दिशा समजेनातशा झाल्या आहेत व मला सुख वाटत नाहीं; तस्मात् आपण मजवर कृपा करा. ॥ २५ ॥

जसें महाभयाचें सबंध भांडें फुटून आपल्या डोळ्यापुढें उघड दिसावें, त्याप्रमाणें तुमचीं अक्राळविक्राळ मोठीं तोंडें पसरलेलीं दिसतात; ७५ आणि आतील दांत व दाढा यांची इतकी गर्दी झालेली आहे कीं, त्या दोन्ही ओठांच्या आंत मावत नाहींत. त्या योगानें चहूंकडे प्रलयकालच्या शस्त्रांचें दाट कुंपण लावलें आहे कीं काय असें वाटतें. ७६ तक्षक हा पूर्ण विषारी असून त्याच्या तोंडांत जगीं विषाचीच भर घालावी, किंवा अमावास्येच्या रात्रीं भुतांचा संचार व्हावा; अथवा प्रळयाग्नीनें आग्नेयास्त्र परजावें, ७७ त्याप्रमाणें तुमचीं विशाळ तोंडें असून त्यातून आवेश बाहेर उचंबळत आहे, व त्या योगानें आमच्यावर मरणरूपी पाण्याचे लोंढेच आले आहेत कीं काय असें वाटतें. ७८ सर्व ब्रह्मांडाचा नाश करणारा प्रळयाग्नि उद्भवला व त्याला प्रळयकाळचा प्रचंड वारा साहाय्य झाला, तर तो काय जाळणार

देखिलें । आणि सुखाचें अवर्षण पाडिलें । आतां जापाणी जापाणीं आपुलें । अस्ताव्यस्त हें ॥ ८१ ॥ ऐसें करिसी म्हणोनि जरि जाणें । तरि हे गोष्टि सांगावी कां मी म्हणें । आतां एक वेळ वांचवीं जी प्राणें । या स्वरूपप्रळयापासोनी ॥ ८२ ॥ ( ४६८. भयग्रस्त अर्जुनाची प्रार्थना, ३८३-३८६ ) जरि तूं गोसावी आमुचा अनंता । तरि सुंई वोडैंण प्राणिया जीविता । सांठवीं पसारा हा मागुता । महामारीचा ॥ ८३ ॥ आइकें सकळ देवांचिया परदेवते । तुवां चैतन्यें गा विश्व वसतें । तें विसरलासि हें उपरतें । संहारूं आदरिलें ॥ ८४ ॥ म्हणोनि वेगीं प्रसन्न होईं देवराया । संहरीं संहरीं आपुली माया । काढी मातें महाभया- । पासोनियां ॥ ८५ ॥ हा ठायवरी पुढतपुढती । तूतें म्हणिजे बहुवा काकुळती । ऐसा मी विश्वमूर्ती । भेडका जाहलों ॥ ८६ ॥ ( ४६९. अर्जुनाचें शौर्य, ३८७ ) जैं अमरावतीये आला धांडा । तैं म्यां एकलेनि केला उवेडा । जो मी काळाचियाही तोंडा । वासिपु न धरीं ॥ ८७ ॥ ( ४७०. विश्वरूपाच्या मुखात सर्व सैन्य गेलें, ३८८–४०५ ) परि तेंया आंतुल नव्हे हें देवा । एथ मृत्यूसही करूनि चढावा । तुवां आमुचाचि घोटु भरावा । या सकळ विश्वेंसीं ॥ ८८ ॥ कैसा नव्हता प्रळयाचा वेळु । हो कां तूंचि मिनलासि काळु । बापुडा हा त्रिभुवनगोळु । अल्पायु जाहला ॥ ८९ ॥ अहा भाग्या विपरीता । विघ्न उठिलें शांति करितां । कैटकटा विश्व गेलें आतां । तूं लागलासि ग्रासूं ॥ ३९० ॥ हें नव्हे मी रोकडें[१३] । सैंघें पसरूनियां तोंडें । कवळितासि चहुंकडे । सैन्यें इयें ॥ ९१ ॥

अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः ।
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथाऽसौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥ २६ ॥

अन्वय--( हे भगवन् ) अमी सर्वे धृतराष्ट्रस्य पुत्राः अवनिपालसंघैः सह एव तथा भीष्मः द्रोणः च असौ सूतपुत्रः अस्मदीयैः अपि योधमुख्यैःसह, ॥ २६ ॥

नोहेति[१४] हे कौरवकुळींचे वीर । आंधळिया धृतराष्ट्राचे कुमर । हे गेले गेले सहपरिवार । तुझिया वदनीं ॥ ९२ ॥ आणि जे जे यांचेनि सैंवायें । आले देशोदेशींचे राये । तयांचें सांगावया जावों न लैहे । ऐसें सैंरकाटित आहासी ॥ ९३ ॥ मैंदमुखाचिया संघैंटा । घेत आहासि घटघटां । रैंणीं हन थैंटा । देतासि मिठी ॥ ९४ ॥ जंत्रींवरिचील मार । पैंदातींचे मोगैर । मुखाआंत भैंर । हैंरपताति मा ॥ ९५ ॥ कृतांताचिया जैंवळी । जें एकाचि विश्वातें गिळी । तियें कोटीवरी

१ बाजूस ठेव. २ घनी. ३ घाल. ४ आड. ५ उलटें. ६ छापा. ७ पराभव. ८ भय. ९ त्यापैकीं. १० झालास. ११ अरे अरे. १२ काय. १३ प्रत्यक्ष १४ अनेक. १५ हे नव्हेत काय! १६ साहाय्यास. १७ राहात. १८ गिळीत. १९ हत्तींचा. २० समुदाय. २१ या रणभूमीवर. २२ थाटानें. २३ तोफा, बंदुका वगैरेंचा. २४ पायदळ. २५ झुंडीच्या झुंडी. २६ नाहींतशा होतात. २७ भावंड.

नाहीं ? ७९ त्याप्रमाणें, संहार करणारीं अशीं हीं तुमचीं तोंडें पाहून माझा धीर अगदीं खचला, व मी वेडावून जाऊन मला दिशांचीही भूल पडली व माझा मलाच विसर पडला ! ३८० तुमचें विश्वरूप मीं डोळ्यांनीं पाहिलें नाहीं, तांच त्यापासून होणारें सुख नाहींसें झालें. म्हणून हें तुमचें अवाढव्य स्वरूप आवरून घ्या. ८१ तुम्ही अशा रीतीनें मला भिववाल असें जर माहीत असतें, तर मला विश्वरूप दाखवा असें तुम्हांला मीं कां म्हटलें असतें ? तर आतां ह्या आपल्या विश्वरूप प्रळयाग्नीपासून एक वेळ माझे प्राण वांचवा. ८२ हे अनंता, तुम्ही जर आमचे खरोखर धनी आहां, तर माझ्या मरणाच्या आड कांहीं तरी घालून मग हा महामारीरूपी तुमच्या विश्वरूपाचा पसारा आवरा ! ८३ हे देवाधिदेवा, सर्व विश्वाचें वसतिस्थान असे जे तुम्ही, ते सर्व जगाचें पालन करण्याचें विसरून त्याचा उलट संहार करूं पाहतां काय ? ८४ म्हणून हे देवराया, लवकर प्रसन्न होऊन आपली माया आवरून घेऊन मला या भयापासून सोडवा. ८५ एवढा वेळपर्यंत पुष्कळ काकुळ-तीस येऊन तुमची जी विनवणी करीत आहें, त्याचें कारण, मला या विश्वमूर्तीची इतकी भीति वाटली ! ८६ ज्या वेळेस अमरावतीवर राक्षसांचा छापा पडला होता, त्या वेळेस त्यांचा पराभव मीं एकट्यानें केला. मी काळाच्याही तोंडात जाण्यास भिणारा नव्हे; ८७ परंतु देवा, हें आपलें विश्वरूप या गोष्टींपैकीं नव्हे; या ठिकाणीं मृत्यूवरही ताण करून सकल विश्वासह आमचा घोट घ्यावा या हेतूनें तुम्ही प्राप्त झालां आहां. ८८ हें पहा-प्रलयकालचा समय नसूनही तुम्ही मध्येंच काळरूपानें प्राप्त झाल्यामुळें, या बिचाऱ्या त्रिभुवनगोलाचीं शंभर वर्षें भरलीं आहेत ! ८९ अहारे दैवा ! तुझी गति किती विपरीत आहे ! विश्वरूपाच्या दर्शनापासून शांति होईल अशा समजुतीनें मी देवांस ' विश्वरूप दाखवा ' म्हणून म्हटलें, तर तें सुख न होतां उलट विघ्न ओढवलें. अरेरे ! देवा, आता मात्र हें विश्व बुडालें ! कारण, तूंच त्याला ग्रासूं लागलास ! ३९० देवा, अहो ! आपण अनेक मुखें पसरून या सर्व सैन्याला चहूंकडून भक्षण करीत आहां, हें प्रत्यक्ष माझ्या दृष्टीस पडत नाहीं का ? ९१

श्लोकार्थः—हे प्रभो, हे धृतराष्ट्राचे ( दुर्योधनादि ) सर्व पुत्र, राजाचे समुदायासह आणि भीष्म, द्रोण, तसाच हा कर्ण व आमच्याकडील मुख्य मुख्य योद्धे यांसह ॥ २६ ॥

अहो, कौरवकुलातील वीर आणि आंधळ्या धृतराष्ट्राचे मुलगे ते हेच नव्हत का ? अहाहा ! हे गेले, गेले ! सहपरिवार तुमच्या मुखांत गेले ! ९२ आणखी जे देशोदेशींचे राजे यांचें साह्य करण्याकरितां आले होते, त्यांचा निरोप मावारा सांगण्याकरितां देखील कोणी मनुष्य उरला नाहीं. अशा रीतीनें तुम्ही सर्वांना गिळीत आहां ! ९३ या रणांत मोठ्या थाटानें हत्तींच्या समुदायांचे देखील घटघटा घास करीत आहां. ९४ बंदुका, तोफा याचा मारा करणारे आणि पायदळांचे समुदाय याच्या झुंडीच्या झुंडी तुमच्या मुखांत कीं हो नाहींतशा होत आहेत ! ९५ कृतांताच्या तोंडीचीं अशीं असे, कीं ज्यांपैकीं एक

सगळीं । गिळितासि शस्त्रें ॥ ९६ ॥ चतुरंगा[1] परिवारा । संजोडियां[2] रहंवरां । दांत न लविसी मा परमेश्वरा । कैसा तुष्टलासि बरवा ॥ ९७ ॥ हां गा भीष्माऐसा कवणु । सत्यशौर्यनिपुणु । तोही आणि ब्राह्मण द्रोणु । ग्रासिलासि कटकटा ॥ ९८ ॥ अहा सहस्रकराचा[3] कुमरु । एथ गेला गेला कर्णवीरु । आणि आमुचिया आघवियांचा केरु । फेडिला देखें ॥ ९९ ॥ कटकटा धातया । कैसें जाहलें अनुग्रहा[4] यया । मियां प्रार्थूनि जगा बापुडिया । आणिलें मरण ॥ ४०० ॥ मागां थोडिया बहुवा उपपत्ती[5] । येणें सांगितलीया विभूती । तैसा नसेचि मा पुढती । बैसलों पुसों ॥ १ ॥ म्हणोनि भोग्य[6] तें त्रिशुद्धि न चुके । आणि बुद्धिही होणारासारिखी ठाके । माझ्या कपाळीं पिटावें[7] लोकें । तें लोटेल काह्यां ॥ २ ॥ पूर्वीं अमृतही हाता आलें । परि देव नसतीचि उगले[8] । मग काळकूट उठविलें । शेवटीं जैसें ॥ ३ ॥ परि तें ऐकबगीं[9] थोडें । केलिया प्रतिकारा[10] माजिवडें[11] । आणि तिये अवसरींचें तें सांकडें[12] । निस्तरविलें शंभू ॥ ४ ॥ आता हा जळता वारा कें वेंटाळे[13] । कोणाही विषा भरलें गगन गिळे । महाकाळेंसि कें खेळें । आंगवतें[14] असे ॥ ५ ॥ ( ४७१. भगवंताचा विश्वरूप दाखविण्याचा आभिप्राय अर्जुनाला न कळल्यामुळें तो भयग्रस्त झाला, ४०६-४०८ ) ऐसा अर्जुन दुःखें शिणतु । शोचित असे जिवाआंतु । परि न देखे तो प्रस्तुतु । अभिप्राय देवाचा ॥ ६ ॥ जे मी मारिता हे कौरव मरते । ऐसेनि वेंटाळिला[15] होता मोहें बहुतें । तो फेडावयालागीं अनंतें । हें दाखविलें निज ॥ ७ ॥ अरे कोण्ही कोण्हातें न मारी । एथ मीचि हें सर्व संहारीं । हें विश्वरूपव्याजें[16] हरी । प्रकटित असे ॥ ८ ॥ ( ४७२. अर्जुन भयानें विश्वरूपाच्या विक्राळ मुखाचें वर्णन करतो, ४०९-४२२ ) परि वायांचि व्याकुळता । तें न चोजवेचि[17] पंडुसुता । मग अहा कंपु न्हता । वाढवीत असे ॥ ९ ॥

वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।
केचिद्विलग्ना दशनांतरेषु संदृश्यंते चूर्णितैरुत्तमांगैः ॥ २७ ॥

अन्वयः—( त्वा ) दंष्ट्राकरालानि भयानकानि वक्त्राणि ते त्वरमाणाः विशंति, तेषां मध्ये केचित् दशनांतरेषु विलग्नाः, केचित् चूर्णितैः उत्तमांगैः युक्ताः संदृश्यंते ॥ २७ ॥

तेथ म्हणे पाहा हो एके वेळे । सैंसि कवचेंसि दोन्ही दळें । वदनीं गेलीं आभाळें । गगनीं कां जैसीं ॥ ४१० ॥ कां महाकल्पाचिया शेवटीं । जें कृतांतु कोपला होय सृष्टीं । तें ऐकविसांहि स्वर्गां मिठी । पाताळासकट दे ॥ ११ ॥ नातरी

१ हत्ती, घोडे, रथ व पायदळ. २ घोडे जोडलेले रथ. ३ सूर्याचा. ४ अडचण. ५ प्रसाद. ६ रीति. ७ भोक्तृत्व. ८ खापर फोडावें. ९ चुकेना. १० तृप्त झाले. ११ एकपक्षीं. १२ निराकरण करण्याकरितां. १३ संकट. १४ आवरील. १५ सामर्थ्य. १६ माखिला. १७ निमित्तानें. १८ समजे. १९ व्यर्थ २० शिरस्त्राणें. २१ यम. २२ एकवीस.

देखील सर्व विश्वाचा नाश करील, अशीं कोट्यवधि तुम्ही गिळून टाकीत आहां। ९६ चतुरंग सेना, तसेंच घोडे जोडलेले रथ या सर्वांना दात न लावतां गट्ट करीत आहां। तर देवा, यापासून तुम्हांला कसा संतोष वाटतो ? ९७ अहो, भीष्मासारखा सत्यवादी व शौर्यनिपुण असा दुसरा कोण आहे ? याला, आणि हा द्रोण ब्राह्मण असून त्याला देखील आपण ग्रासून टाकलेंना ? ९८ अरेरे। अहो, सूर्यपुत्र जो महावीर कर्ण, तोही गेला; आणि आतां आमच्याकडील योद्ध्यांची पाळी येऊन, त्यांचीही अडचण नाहींशी केलीत। ९९ हायरे ब्रह्मदेवा। या प्रभूच्या प्रसादापासून ही काय अनन्वित गोष्ट घडत आहे, कीं मीं प्रभूची प्रार्थना करून बिचाऱ्या जगाला मारण्यास मात्र कारण झालों। ४०० पूर्वीं थोड्या बहुत प्रकारांनीं प्रभूंनीं आपल्या विभूति सांगितल्या; पण त्याप्रमाणें देवांची माझ्या समोर दिसत असलेली स्थिति नाहीं असा हट्ट मी धरून बसलों. १ म्हणून, भोक्तव्य हें केव्हांही चुकत नाहीं म्हणतात ती गोष्ट अगदीं खरी आहे; आणि बुद्धिही त्याप्रमाणेंच होते हेंही खरें आहे. लोकांनीं आपल्या मरणाचें खापर माझ्या डोक्यावर फोडावें ही गोष्ट कशी चुकणार ? २ पूर्वीं ( समुद्रमंथनाच्या वेळीं ) अमृत हाताला आलें असूनही देवांनीं समुद्रमंथन बंद न करतां जास्ती इच्छा केली, तेव्हां शेवटीं त्यांच्या हातीं काळकूट विष आलें। ३ परंतु तेंही एका प्रकारें कमीच. शिवाय, त्याचें निराकरण करण्यासारखें होतें; आणि त्या वेळचें तें संकट शंकरांनीं दूरही केलें. ४ पण हल्लींचा जो हा विश्वरूपाचा प्रकार—हा अग्नीस मदत करणारा वारा नसून प्रत्यक्षच पेटलेला वारा आहे। तर त्याला कोण आवरील ? तसेंच, सर्व गगनांत जें विष पसरलें आहे, तें कोण गिळील ? व महाकाळाबरोबर खेळण्याचें कोणाचें सामर्थ्य आहे ? ५ ( ज्ञानेश्वर म्हणतातः— ) याप्रमाणें अर्जुन दुःखानें व्यापून मनांतल्या मनांत शोक करूं लागला. परंतु या प्रसंगीं देवांच्या मनांतील अभिप्राय त्याला कळला नाहीं. ६ मी मारणारा व हे कौरव मरणारे अशा मोहानें जो तो व्यापून गेला होता, तो त्याचा मोह नाहींसा करण्याकरितांच श्रीअनंतानें आपलें हें विश्वरूप दाखविलें; ७ आणि कोणी कोणास मारीत नाहीं; तर या ठिकाणीं सर्वांचा संहार करणारा मीच आहें, हें त्यांनीं विश्वरूपाच्या योगानें व्यक्त केलें. ८ परंतु अर्जुनास हें न समजता तो व्यर्थ व्याकुळ झाला व उगीच मनांत भीति धरूं लागला. ९

श्लोकार्थः—हे योद्धे, दाढांनीं विकाळ अशा तुमच्या भयंकर मुखांमध्यें त्वरेनें शिरत आहेत. त्यांत कित्येक तुमच्या दांतांच्या मध्यें सापडले आहेत असे दिसतात; आणि कित्येकांच्या मस्तकांचा चुराडा होऊन गेला आहे असे दिसतात ॥ २७ ॥

त्या वेळेस तो पुनः म्हणाला, " अहो, हें पहा। आकाशांत ज्याप्रमाणें अभ्रें नाहींतशीं होतात, त्याप्रमाणें शिरस्त्राणें व कवचें यांसकट हीं दोहींकडचीं सैन्यें तुमच्या तोंडांत नाहींतशीं झालीं। ४१० किंवा महाप्रळयाच्या वेळीं यम कोपल्यावर जसा एक-

उदासीनें देवें । संचैकांचीं वैभवं । जेथींचीं तेथ स्वभावें । विलैया जाती ॥ १२ ॥ तैसीं सौसिन्नलीं सैन्यें एकवटें । इयें मुखीं जाहलीं प्रविष्टें । परि एकही तोंडौनि न सुटे । कैसें कर्म देखा ॥ १३ ॥ अशोकाचे अंगेवसे । चघाळिले कैन्हेंनि जैसे । लोक वक्त्रांमाजि तैसे । वायां गेले ॥१४॥ परि सिँसाळें मुकुटेंसीं । पडिलीं दाढांचे सांडसीं । पीठ होत कैसीं । दिसत आहाती ॥ १५ ॥ तियें रत्नें दांतांचिये सवडी । कूंट लागलें जिभेच्या बुडीं । कांहीं कांहीं ॲंगरडीं । दंष्ट्रांचीं''माखलीं ॥ १६ ॥ हो कां जे विश्वरूपें काळें । ग्रासिलीं लोकांचीं शरीरें बळें । परि जीवित्व देहींचीं सिसैंाळें । अवश्य कीं राखिलीं ॥ १७ ॥ तैसीं शरीरामाजि चोखडीं । इयें उँत्तमांगें होती फुडीं । म्हणोनि महाकाळाचियाहि तोंडीं । परि उरलीं शेंखीं ॥ १८ ॥ मग म्हणे हें काई । जन्मलियां आँन मोहराचि नाहीं । जग आपैसेंचि वदनडोहीं । संचरताहे ॥ १९ ॥ यया आपेंआप आघविया सृष्टीं । लागलिया आहाति वदनाचिया वाटीं । आणि हा जेथींचिया तेथ मिठी । देतसे उँगला ॥ ४२० ॥ ब्रह्मादिक समस्त । उंचा मुखामाजिं धांवत । येर सामान्य हे भरत । ऐलीच वदनीं ॥ २१ ॥ अवतरणः—आणीकही भूतजात । तें उपजलेंचि ठायीं ग्रासित । परि याचिया मुखा निभ्रांत । न सुटेचि कांहीं ॥ २२ ॥

यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवंति ।
तथा तवामी नरलोकवीरा विशंति वक्त्राण्यभिविज्वलंति ॥ २८ ॥

अन्वयः—( हे भगवन् ) यथा नदीनां बहवः अंबुवेगाः अभिमुखाः ( संतः ) समुद्रं एव द्रवंति, तथा अमी नरलोकवीराः तव अभिविज्वलंति वक्त्राणि विशंति ॥ २८ ॥

( ४७३. विश्वतोमुखांत ब्रह्मांड गेलें, ४२३–४२६. ) जैसे महानदीचे वोघ । वहिलें ठाकिती समुद्राचें आंग । तैसें आघवांचिकडूनि जग । प्रवेशत मुखीं ॥ २३ ॥ आयुष्यपंथें प्राणिगँणीं । करोनि अहोरात्रांची मोर्वेणी । वेगें वक्त्रमिळणीं । साधिजत आहाती ॥ २४ ॥

यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशंति नाशाय समृद्धवेगाः ।
तथैव नाशाय विशंति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥

अन्वयः—( हे देव, ) यथा पतंगाः समृद्धवेगाः ( संतः ) नाशाय प्रदीप्तं ज्वलनं विशंति, तथा एव लोकाः समृद्धवेगाः ( संतः ) तव वक्त्राणि अपि नाशाय विशंति ॥ २९ ॥

जळतया गिरीच्यें गवाखें- । माजि धेंपती पतंगाचिया शेंका । तैसे समग्र लोक देखा । इये वदनीं पडती ॥ २५ ॥ परि जेतुलें येथ प्रवेशलें । तें तातलिया लोहें पाणीचि पां गिळिलें । बाहिर्वटींहि पुसिलें । नामरूप तयांचें ॥ २६ ॥

---

१ प्रतिकूल. २ संग्रह करणारांचीं. ३ लयास. ४ जमलेलीं. ५ डाढाळे. ६ ठेटानें. ७ मस्तकें. ८ चिमटयांत. ९ पीठ. १० टोकें. ११ दाढांची. १२ सांगाडे. १३ मस्तकें. १४ दुसरा मार्ग.

वीस स्वर्गांना पाताळासह गिळून टाकतो, ११ अथवा दैव प्रतिकूळ झाल्यावर संग्रह करणाराचें ऐश्वर्य जागचे जागीं आपल्या आपणच नाहींसें होतें, १२ त्याप्रमाणें ही कर्माची गति कशी विलक्षण आहे तें पहा, कीं हीं जमलेलीं सैन्यें एकदम या मुखात शिरून त्यातून एकही बाहेर पडत नाहीं । १३ उंटाच्या तोंडात अशोक वृक्षाचे डाहाळे जसे चघळताना दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें हे सर्व लोक या तोंडांत लयास गेले । १४ परंतु मुकुटांसह मस्तकें दाढाच्या चिमट्यात सांपडून त्यांचें कसें पीठ होत आहे पहा, १५ तीं रत्नें दांतांच्या मधल्या भागात चमकत आहेत, व त्यांचें पीठ जिभेच्या बुडाला उगीच लागलें असून त्यांत जीं ठोकळ होतीं त्यांच्या रक्तांनीं कांहीं दाढा माखल्या आहेत; १६ या विश्वरूप काळानें ज्या बळकट लोकांचीं शरीरें ग्रासलीं आहेत, त्यांच्या देहांचे सांगाडे, जीवित्व नाहींसें करून, मुद्दाम राखून ठेवले आहेत. १७ त्याप्रमाणें, शरीरांत उत्तम भाग जें मस्तक, तें जरी महाकाळाच्या तोंडात सांपडलें होतें, तरी तीं मुद्दाम शेवटीं राखून ठेवलीं आहेत ।" १८ मग अर्जुन पुनः म्हणतो, "या जगाचा जन्म आणि मृत्यु या दोहोंला दुसरा मार्गच नाहीं; तर सर्व जग या वदनरूपी डोहांत आपोआप येऊन बुडत आहे; १९ ही सर्व सृष्टि आपोआप या मुखांच्या वाटेला लागली आहे, आणि हा परमात्मा जागच्या जागीं स्वस्थ राहून सर्व जगाला सहज गिळीत आहे; ४२० ब्रह्मदेवासारखी मोठमोठाली मंडळी, या विश्वरूपाचें जें सर्वांत अति उंच तोंड, त्यात धांव घेत आहेत; एरव्हीं इतर मंडळी अलीकडल्याच मुखांत शिरताहेत; २१ व इतर प्राणिमात्र हे उपजल्या ठिकाणींच नाहींतसे होत आहेत; परंतु या विश्वरूपाच्या मुखांच्या सपाट्यांतून निःसंशय कांहींच सुटत नाहीं. २२

श्लोकार्थः—हे प्रभो, जसे नद्यांचे मोठमोठे प्रवाह समुद्राकडेसच धाव घेत असतात, तसे हे मृत्युलोकींचे वीर ह्या तुमच्या प्रज्वलित मुखामध्यें शिरत आहेत ॥ २८ ॥

ज्याप्रमाणें महानद्यांचे प्रवाह सहज समुद्राकडे वळतात, त्याप्रमाणें सर्व जग चोहोंकडून येऊन तुमच्या मुखांत प्रवेश करीत आहे; २३ व सर्व प्राणी आयुष्यरूपी मार्गात दिवसरात्रींच्या पायऱ्या करून त्वरेनें तुमच्या मुखांत येऊन मिळण्याचा योग साधीत आहेत. २४

श्लोकार्थः—हे प्रभो, जसे भडकलेल्या अग्नीमध्यें नाश पावण्यास्तव पतंग मोठ्या वेगानें शिरत असतात, तसेच हेही सर्व लोक तुमच्या मुखांमध्यें नाश पावण्यास्तव मोठ्या वेगानें शिरत आहेत । ॥२९॥

"ज्याप्रमाणें वणवा लागलेल्या डोंगराच्या दरींत पतंग उड्या घालतात, त्याप्रमाणें सर्व लोक तुमच्या मुखांत येऊन पडत आहेत; २५ परंतु ज्याप्रमाणें तापलेल्या तव्यावर पाणी पडलें असतां जळून खाक होतें, त्याप्रमाणें, ज्यांनीं ज्यांनीं तुमच्या मुखांत प्रवेश केला, त्यांचें नांवरूप वहिवाटींतून देखील अजीबात पुसून टाकलें ( त्यांच्या नांव-रूपांचा पत्ता देखील नाहीं ) २६

'१५ उगीच. १६ अगोदर; सहज. १७ प्राणिमात्र. १८ मोक्षणी, पायऱ्या. १९ डोंगराच्या. २० दरी. २१ पडतात. २२ उड्या. २३ तापलेल्या लोखंडानें. २४ वहिवाटींतून.

लेलिह्यसे ग्रसमानः समंताल्लोकान् समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः।
तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपंति विष्णो ॥ ३० ॥

अन्वयः--विष्णो, समंतात् ज्वलद्भिः वदनैः समग्रान् ग्रसमानः त्वं लेलिह्यसे; तव उग्राः भासः तेजोभिः समग्रं जगत् आपूर्य प्रतपंति ॥ ३० ॥

( ४७४. विश्वरूपाच्या तेजानें त्रैलोक्य गांजलें, ४२७–४४० ) आणि येतुलियाही आरोगेण । करितां भुके नाहीं उणेपण । कैसें दीपॅन असाधारण । उदयलें यया ॥ २७ ॥ जैसा रोगिया ज्वराहूनि उठिला । कां भैणगा दुकाळु पाहला । तैसा जिभांचा लळलळाटू देखिला । आँवाळवें चाटितां ॥ २८ ॥ तैसें आहाराचे नांवें कांहीं । तोंडापासूनि उरलेंचि नाहीं । कैसी सँमसमित नेंवाई । भुकेलेपणाची ॥ २९ ॥ काय सागराचा घोंटु भरावा । कीं पर्वताचा घांसु करावा । ब्रह्मकटाहो घालावा । आघवाचि दाढे ॥ ४३० ॥ दिशा सगळियाचि गिळावियां । चांदिणिया चाटूनि घ्यावियां । ऐसें वर्तत आहे सावियैं । लोलुप्य वा तुझें ॥ ३१ ॥ जैसा भोगीं कामु वाढे । कां इंधनें आगीसि हकाक चढे । तैसीं खातखातांचि तोंडें । खाखातें ठेलीं ॥ ३२ ॥ कैसें एकचि केवढें पसरलें । त्रिभुवन जिव्हाग्रीं आहे टेकलें । जैसें कां कवीठ घातलें । वडवानळीं ॥ ३३ ॥ ऐसीं अपार वदनें । आता येतुलीं कैंचीं त्रिभुवनें । का आहारु न मिळतां येणें मानें । वाढविलीं सैंध ॥ ३४ ॥ अगा हा लोकु बापुडा । जैंहला वदनज्वालां वेरँपडा । जैसीं वणवेयाचिया वेढां । सांपडती मृगें ॥ ३५ ॥ आतां तैसें या विश्वा जाहालें । देव नव्हे हें कर्म आलें । कां जगजळचरां पैंगिलें । काळजाळें ॥ ३६ ॥ आतां इयें अंगप्रभेचियें वैंगुरें । कोणीकडूनि निगिजैल चराचरें । हीं वक्त्रें नोहेति जोहरें[१३] । वोडवलीं जगा ॥ ३७ ॥ आगी आपुलेनि दाहकपणें । कैसेनि पोळिजे तें नेणे । परि जया लागे तया प्राणें । सुटिकाचि नाहीं ॥ ३८ ॥ नातरी माझेनि तिखटपणें । कैसें निवटे[१४] हें शस्त्र कायि जाणे । कां आपुलिया मारा नेणे । विष जैसें ॥ ३९ ॥ तैसी तुज कांहीं । आपुलिया उग्रपणाची सेचि नाहीं । परि ऐलीकाडिले मुखीं रैंवाई । हों सैंरली जगाची ॥ ४४० ॥ ( ४७५. अर्जुन म्हणतो, विश्वरूप गिळ्लेंस तरी हरकत नाहीं, पण मला वांचीव; ४४१–४४३ ) अगा आत्मा तूं एकु । सकळ विश्वव्यापकु । तरी कां आम्हां अंतकु । तैसा वोडेवेंलासी ॥ ४१ ॥ तरि मियां सांडिली जीवित्वाची चाड । आणि तुवांही न धरावी भीड । मनीं आहे तें उघड । बोल पां सुखें ॥ ४२ ॥ किती वाढविसी या उग्र रूपा । आंगींचें भगवंतपण आठवीं बापा । नाहीं तरि कृपा । मजपुरती पाहीं ॥ ४३ ॥

१ भोजन. २ जठराग्नि. ३ भिकारी. ४ ओठ. ५ खमंग. ६ महिमा. ७ सर्वथा. ८ हावरेपणा. ९ भडका. १० सापडला. ११ पसरलें. १२ आळ्यातून. १३ लाक्षागृहें. १४ मरे. १५ क्षम. १६ सरसावला. १७ प्राप्त झाला.

श्लोकार्थः—हे विष्णो, सर्व बाजूंनीं पेटलेल्या मुखानीं सर्व लोकाना गट्ट करून तुम्ही वारंवार जिभल्या चाटीत आहा, तुमच्या उग्र प्रभा संपूर्ण जगताला व्यापून आपल्या प्रखर तेजानें तापवीत आहेत ॥३०॥

" आणि याप्रमाणें सर्व जगाचें भक्षण करूनही तुमची भूक कमी होत नाहीं, तर तुमचा जठराग्नि इतका प्रदीप्त तरी झाला कसा ? २७ ज्याप्रमाणें एखादा रोगी तापांतून वरा झाल्यावर त्याला खा खा सुटते, किंवा एखादा भिकारी दुष्काळांत पडावा, त्याप्रमाणें सर्व जगाचा लय करूनही अझून तुम्ही जिभल्या चाटीत आहां ! २८, याचप्रमाणें, या तुमच्या तोंडापुढें खाण्याचा जिन्नस म्हणाल तर एकही उरला नाहीं; तेव्हां आपल्या खमंग भुकेचा महिमा काय वर्णन करावा ? २९ का समुद्राचा एक घोंट करावा, का पर्वताचा एक घास करावा, का हा सर्व ब्रह्मगोल दाढेखालीं चिरडावा, ४३० कीं सर्व दिशा गिळून टाकाव्या, कीं चटसाऱ्या चांदण्या चाटून टाकाव्या, अशा प्रकारचा हा तुमचा हावरेपणा नजरेस येत आहे ! ३१ ज्याप्रमाणें भोग जास्ती घेऊं लागलें असतां काम वाढतो, किंवा विस्तवाला जों जों लांकडें लावावीं तों तों तो जास्ती भडकतो, त्याप्रमाणें सर्व जगाला खात असतांही तुमचीं तोंडें खा खा करीत उठलीं आहेत. ३२ ज्याप्रमाणें वणव्यांत कवठ टाकलें असतां तें त्याला पुरत नाहीं, त्याप्रमाणें आपलें हें एकच तोंड केवढें पसरलें आहे पहा, कीं त्याच्या जिभेच्या टोंकाला त्रिभुवनही पुरे होत नाहीं ! ३३ तेव्हां ( एका तोंडाची जर ही वाट, तर ) तुमच्या या अगणित तोंडांना इतकीं त्रिभुवनें कोठून आणावीं ? त्यांना खाद्य मिळत नसून, इतकीं पुष्कळ कां उत्पन्न केलीं आहेत ? ३४ ज्याप्रमाणें चोहोंकडून वणवा लागून मध्यें हरणें सांपडावीं, त्याप्रमाणें सर्व जग तुमच्या या वदनरूपी ज्वाळांच्या मध्यें सांपडलें आहे. ३५ या विश्वाची स्थिति अशी झाली आहे कीं, तुम्ही देव नसून या विश्वरूपानें त्यांचें कर्मच ओढवलें आहे; किंवा जगरूपी जळचरांना तुमचें वदनरूपी काळजाळेंच पसरलें आहे ! ३६ म्हणून तुमच्या विश्वरूपाच्या तेजरूपी जाळ्यांतून स्थावरजंगम वस्तूंनीं कोणीकडून बाहेर पडावें ? हीं तुमचीं तोंडें नसून जगाला लाक्षागृहेंच ओढवलीं आहेत ! ३७ आपल्या प्रखर तेजानें प्राणिमात्राचीं अंगें कशीं पोळतात हे अग्नीला समजत नाहीं, परंतु ज्याचा त्याला स्पर्श होतो, त्याचा मात्र प्राण गेल्याशिवाय राहत नाहीं; ३८ किंवा, आपल्या तीक्ष्ण धारेनें दुसऱ्याला कसें मरण येतें हें जसें शस्त्राला माहित नसतें, अथवा आपल्या सेवनानें लोकांचे प्राण कसे हरण होतात हें जसें विषाला समजत नाहीं, ३९ त्याप्रमाणे, तुमच्या मुखांच्या प्रखरपणाची तुम्हांला आठवणच नाहीं; परंतु तुमच्या या अग्नीकडील मुखांतच सर्व जग नाश पावलें आहे. ४४० देवा, आत्मा म्हणून ज्याला म्हणतात, तो तुम्ही एकच असून सर्व विश्वाचे व्यापकही आहां, मग आमचा नाश करण्यास कां प्रवृत्त झालां ? ४१ मीं तर आपल्या जिवाची आशा सोडली आहे, आणि तुम्हीही भीड न धरतां तुमच्या मनांत जें काय असेल तें खुशाल उघडपणें सांगा. ४२ तुम्ही आपल्या विश्वरूपाचें उग्रपण किती

आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।
विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं नहि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥ ३१ ॥

अन्वयः—देववर, ते नमः अस्तु; त्वं प्रसीद. भवान् उग्ररूपः कः ( असि,) तत् मे आख्याहि; अहं आद्यं भवंतं विज्ञातुं इच्छामि, तव प्रवृत्तिम् अहं न हि प्रजानामि ॥ ३१ ॥

( ४७६. अर्जुनाचा प्रश्न, हें उग्ररूप का व कशाकरिता धारण केलेंस ? ४४४–४४९ ) तरि एक वेळ वेदवेद्या । जी त्रिभुवनैकआद्या । विनवणी विश्ववंद्या । आइकें माझी ॥ ४४ ॥ ऐसें बोलोनि वीरें । चरण नमस्कारिले शिरें । मग म्हणे तरी सर्वेश्वरें । अवधारिजो ॥ ४५ ॥ मियां होआवया समाधान । जी पुसिलें विश्वरूपध्यान । आणि एकेंचि काळें त्रिभुवन । गिळितचि उठिलासि ॥ ४६ ॥ तरि तुं कोण कां येतुलीं । इयें भ्यासुरें मुखें कां मेळविलीं । अवघियाचि करीं परिजिलीं । शस्त्रें काह्यां ॥ ४७ ॥ जी जंव तंव रागीटपणें । वाढोनि गगना आणितोसि उणें । कां डोळे करूनि भिंगुळवाणे । भेडसावीत आहासी ॥ ४८ ॥ येथ कृतांतेंसीं देवा । कासया किजतसे हेवा । हा आपुला तुवां सांगावा । अभिप्राय मज ॥ ४९ ॥ ( ४७७. देव म्हणतात, लोकक्षयाकरितां उग्ररूप धारण केलें, ४५०–४५१ ) भगवानुवाचः—या बोला म्हणे अनंतु । मी कोण हें आहासी पुसतु । आणि कायिसयालागीं असे वाढतु । उग्रतेंसी ॥ ४५० ॥

कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।
ऋतेऽपि त्वा न भविष्यंति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ ३२ ॥

अन्वयः—( अहं ) लोकक्षयकृत् प्रवृद्धः कालः अस्मि; इह लोकान् समाहर्तुं प्रवृत्तः (अस्मि), प्रत्यनीकेषु ये योधाः अवस्थिताः ( संति ), ते सर्वे त्वा ऋते अपि न भाविष्यंति ॥ ३२ ॥

तरि मी काळु गा हें फुडें । लोक संहारावयालागीं वाढें । सैंघ पसारिलीं आहातीं तोंडें । आतां ग्रासीन हें आघवें ॥ ५१ ॥ ( ४७८. विश्वरूप पाहून सुख न होता दुःख मात्र झालें, ४५२ ) एथ अर्जुन म्हणे कटकटां । उबगिलों मागिल्या संकटा । म्हणोनि आळविला तंव वोखटा । उधाईला हा ॥ ५२ ॥ ( ४७९. खिन्न अर्जुनास देव धीर देतात, ४५३–४५४ ) तेवींचि कठिण बोलें आसतुटी । अर्जुन होईल हिंपुटी । म्हणोनि सवेंचि म्हणे किरीटी । परि आन एक असे ॥ ५३ ॥ तरि आतांचिये संहारवाहरे । तुम्ही पांडव असा बाहिरे । तेथ जातजातां धनुर्धरें । सांवरिले प्राण ॥ ५४ ॥ ( ४८०. देवाच्या धीरानें अर्जुन सावध झाला, ४५५ ) होता मरणमहामारीं गेला । तो मागुता सावधु जाहला । मग लागला बोला । चित्त देऊं ॥ ५५ ॥ ( ४८१. देव म्हणतात, तुम्ही पांडव माझे आहात; आणि इतर सर्व मीं ग्रासून टाकिले आहेत, ४५६ ) ऐसें म्हणिजत आहे देवें । अर्जुना तुम्ही माझे हें जाणावें । येर जाण मी आघवे । सरलों ग्रासूं ॥ ५६ ॥ ( ४८२. मोठेमोठे वीर उगाच वल्गना करीत आहेत, ४५७–४६३ ) वैश्वानरीं प्रचंडीं । जैसी घेंपे लोणि-

वाढवणार ? देवा, तुमच्या अंगीं जो जगाचा पालनकर्तेपणा आहे, त्याची तरी आठवण करा, निदान माझ्यावर तरी कृपा करा. ४३

श्लोकार्थः—हे प्रभो, तुम्हांला नमस्कार असो. तुम्ही प्रसन्न व्हा. उग्र रूप धारण केलेले असे तुम्ही कोण आहां तें मला सांगा. तुम्ही सर्वांचे आदि आहां, त्या तुम्हाला मी विशेष जाणण्याची इच्छा करितों. तुमचा हेतु मला कांहींच कळत नाहीं ! ३१ ॥

" अहो वेदवंद्य त्रिभुवनैकआद्य विश्ववंद्य महाराज, माझी एवढी विनंती ऐकावी." ४४ याप्रमाणें बोलून अर्जुनानें भगवंतांच्या चरणांवर मस्तक ठेविलें, आणि म्हटलें, " देवाधिदेवा, माझी विनंती ऐका. ४५ मला समाधान व्हावें म्हणून ' विश्वरूप दाखवा ' असें मीं म्हटलें, तों तुम्हीं एकदम त्रिभुवनाला गिळण्याच्या हेतूनें मोठें भयंकर रूप धारण केलें; ४६ तर तुम्ही कोण आहां, अशीं इतकीं भयंकर तोंडें तुम्हीं कां धारण केलीं, आणि त्याचप्रमाणें ह्या सर्व हातांत शस्त्रें कशाकरतां घेतलीं आहेत ? ४७ महाराज, वारंवार रागावून, गगनापेक्षां अधिक उंच होऊन व डोळे लाल करून भीति कां दाखवितां ? ४८ देवा, या ठिकाणीं तुम्ही यमाचा हेवा कां करतां ? असें उग्र रूप धारण करण्याचा तुमचा काय हेतु आहे तो तरी मला सांगा. " ४९ असें ऐकून श्रीकृष्ण म्हणाले, " मी कोण आहें व कशाकरितां उग्ररूप धारण करून एवढा मोठा झालों आहें हेंच तुझें म्हणणें आहे ना ? ४५०

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणालेः—जगाचा क्षय करणारा वाढलेला काळ तो मी आहें. प्राण्यांचा संहार करण्यास्तव मी एथें प्रवृत्त झालों आहें. उभय सैन्यामध्ये जे उभे आहेत, ते सर्व तूं खेरीज करून जगणार नाहींत ! ॥ ३२ ॥

" तर खरोखर मी काळ आहें, व लोकांचा संहार करण्याकरितां मोठा वाढून चहूंकडे तोंडें पसरलीं आहेत, आणि आतां मी सर्व विश्वाला गिळून टाकीन. " ५१ तेव्हां अर्जुन म्हणतो, " अरेरे ! मागल्या संकटाला त्रासून याची प्रार्थना केली, तों हें उलट जास्तच भयंकर असें संकट प्रकट झालें. " ५२ आपल्या अशा कठोर भाषणानें अर्जुन खिन्न होईल म्हणून श्रीकृष्ण अर्जुनास पुनः म्हणाले, " पण एक सवड आहे, ५३ ती ही कीं, तुम्ही पांडव या संहाररूपी लाक्षागृहांतून निभावाल. " एवढें ऐकतांच अर्जुनाच्या जिवांत जीव आला. ५४ तो मृत्युरूप महामारीच्या तडाख्यांतच सांपडला होता, पण हे शब्द ऐकताच पुनः सावध होऊन श्रीकृष्णाचे बोल लक्षपूर्वक ऐकूं लागला. ५५ देव म्हणालेः—अर्जुना, अरे, तुम्ही पांडव हे माझे आहां, हें ध्यानांत ठेव; बाकी या सर्व जगाला मी गिळण्याकरितां प्राप्त झालों आहें. ५६ प्रलयकाळच्या प्रचंड अग्नींत लोण्याचा गोळा घातल्यावर जसा तो नाश पावतो, त्याप्रमाणें माझ्या तोंडांत सर्व जग

१ धारण केलीं. २ भयंकर. ३ अरे अरे ! ४ कंटाळलों. ५ प्रार्थिजे. ६ प्रकट झाला. ७ निराधा. ८ खिन्न. ९ लाक्षागृह. १० प्रळयाग्नींत. ११ सांपडे.

याची उंडी । तैसें जग हें माझिया तोंडीं । तुवां देखिलें जें ॥ ५७ ॥ तरि तया-माझारीं कांहीं । भरंवसेनि उरणें नाहीं । इयें वायांचि सैन्यें पाहीं । वल्गिजत आहाती ॥ ५८ ॥ ऐशा चतुरंगाचिया संपदा । करीत महाकाळेंसीं स्पर्धा । वांटिवेचिया मदा । वळंघले जे ॥ ५९ ॥ म्हणती सृष्टीवरी सृष्टी करूं । आण वाहूनि मृत्यूतें मारूं । आणि जगाचा भरूं । घोंटू यया ॥ ४६० ॥ पृथ्वी सगळीचि गिळूं । आकाश वरिच्यावरी जाळूं । कां बाणवरी खिळूं । वारयातें ॥ ६१ ॥ हे जे मिळोनियां मेळे । कुंथती वीरवृत्तीचेनि बळें । जमावावरी जगदळें । वाखाणिजताती ॥ ६२ ॥ बोल हातियेराहूनि तिखट । दिसतीं अग्नीपरिस दासट । मारकपणें कालकूट । महुर म्हणत ॥ ६३ ॥ ( ४८३. सैन्य सर्व मातीच्या चित्रांसारखें निर्जीव आहे, ४६४–४६७ ) तरी हे गंधर्वनगरींचे उमाळे । जाण पोकळीचे पेंडवळे । अगा चित्रींचे पुतळे । वीर हे देखें ॥ ६४ ॥ हां गा मृगजळाचा पूर आला । दळ नव्हे कापडाचा साप केला । इया शृंगारूनियां खोला । मांडिलिया पैं ॥ ६५ ॥

तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम् ।
मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥

अन्वयः—तस्मात्, सव्यसाचिन्, त्वं उत्तिष्ठ, यशः लभस्व, शत्रून्जित्वा समृद्धं राज्यं भुङ्क्ष्व; मया एव एते पूर्वं एव निहताः ( संति ), त्वं निमित्तमात्रं भव ॥ ३३ ॥

येर चेष्टवितें जें बळ । तें मागांचि मियां ग्रासिलें सकळ । आतां कोल्हेरीचे[१०] वेतोंळ । तैसे निर्जीव हे आहाती ॥ ६६ ॥ हालविती दोरी तुटली । तरि तियें खांबावरील बाहुलीं । भलतेणें लोटिलीं । उलथोनि पडती ॥ ६७ ॥ (४८४. अर्जुना, तूं निमित्त होऊन यश संपादन कर, ४६८–४७१. ) तैसा सैन्याचा यया बैगा । मोडता वेळु न लगेल पैं गा । म्हणोनि उठीं उठीं वेगां । शाहाणा होईं ॥ ६८ ॥ तुवां गोग्रहणाचेनि अवसरें । घातलें मोहनास्त्र येकसरें । मग विराटाचेनि महाभेडें उत्तरें । आंसडूनि नागविलें ॥ ६९ ॥ आतां हें त्याहुनि निपटारें जाहलें । निवटीं[११] आयितें रण पडिलें । घेईं यश रिपु जिंतले । एकलेनि अर्जुनें ॥४७०॥ आणि कोरडें यशचि नोहे । समग्र राज्यही आलें आहे । तूं निमित्तमात्रचि होयें । सव्यसाची ॥ ७१ ॥

द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥

अन्वयः--(त्वं) द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथा मया हतान् अन्यानपि योधवीरान् जहि, मा व्यथिष्ठाः युध्यस्व, रणे सपत्नान् जेता असि ॥ ३४ ॥

( ४८५. अर्जुना, तूं भीष्मादिकांचें भय धरूं नको, मीं यांना मारलें आहे. तूं विजयी हो व राज्य भोग, ४७२–४८१ ) द्रोणाचा पाडु न करीं । भीष्माचें भय न

गेलेलें तूं पाहिलेंच आहेस; ५७ तर त्या सर्व जगाचा नाश होईल, हें तूं निःसंशय समज. हें सर्व सैन्य व्यर्थ वल्गना करीत आहे. ५८ हें सर्व या ठिकाणीं मिळालेलें सैन्य वीरवृत्तीच्या बळावर मोठ्या डौलानें बोलत आहे कीं यमही आमच्यापुढें तुच्छ आहे ! ५९ ते म्हणतात कीं, आम्ही सृष्टीवर प्रतिसृष्टि निर्माण करूं, पैजेनें मृत्यूला मारूं, व जगाचा संहार करूं ! ४६० सर्व पृथ्वी गिळून टाकूं, आकाश वरच्यावरच जाळून टाकूं, व बाणानें वाऱ्याला हालूं देणार नाहीं ! ६१ अशा चतुरंग सेनेच्या संपत्तीच्या बळावर कृतांताबरोबरही जे स्पर्धा करितात, व पराक्रमाच्या गर्वानें जे चढून गेले आहेत, ६२ शस्त्रापेक्षांही ज्यांचे बोल अति तिखट आहेत, जे अग्नीपेक्षां दाहक आहेत, व मारण्याच्या कामांत काळकूट विषाला मधुर असें म्हणवितात, ६३ तर जसे गंधर्वनगरीचे लोट किंवा पोकळीचे भेंडोळे अथवा चित्रांतील पुतळे असावे, त्याप्रमाणें हे वीर निर्जीव आहेत असें समज. ६४ अरे, जसा मृगजळाचा पूर यावा, तद्वत् हें सैन्य आहे; अथवा कापडाचा साप करावा, आणि अलंकार घालून बाहुलीं उभीं करावीं, तशीं हीं सैन्यें होत. ६५

श्लोकार्थः—वास्तव, हे अर्जुना, तूं ऊठ, यश मिळव, आणि शत्रूला जिंकून सर्व राज्याचा उपभोग घे. हे मीं पूर्वींच मारून ठेविलेले आहेत. तूं निमित्ताला मात्र पुढें हो ॥ ३३ ॥

एरव्हीं, ज्या बळानें शरीराच्या चेष्टा चालतात, तें सर्व मीं पूर्वींच ग्रासून टाकलें आहे. आतां हें सर्व सैन्य कुंभाराच्या घरच्या पुतळ्यांप्रमाणें निर्जीव आहे. ६६ कळसूत्री बाहुल्यांस हालविणारी दोरी तुटल्यावर तीं वाटेल त्यानें लोटलीं असतां जशीं उलथून पडतात, ६७ त्याप्रमाणें या सर्व सैन्याचा हा आकार मोडून टाकण्यास वेळ लागणार नाहीं. म्हणून अर्जुना, लवकर ऊठ व शुद्धीवर ये. ६८ तूं उत्तरगोग्रहणाच्या वेळीं शत्रूच्या सर्व सैन्यास मोहनास्त्र घालून, विराटाच्या भित्र्या उत्तराकडून त्यांचीं वस्त्रें हरण करविलींस; ६९ तेंच सैन्य आतां त्या वेळेपेक्षां निकृष्ट झालें आहे, व आयतें रणांत आलेलें आहे, तर त्याचा संहार कर व 'एकट्या अर्जुनानें शत्रूस जिंकलें' असें यश मिळीव. ४७० आणि तें यश कोरडें नसून त्याच्याबरोबर सर्व राज्याचीही प्राप्ति होईल. हे सव्यसाचिन्, तूं निमित्तमात्र होऊन शत्रूचा संहार कर. ७१

श्लोकार्थः—द्रोण, भीष्म, जयद्रथ, कर्ण आणि दुसरे पराक्रमी योद्धे यांना मीं आधींच मारलेलें आहे. त्यांना तूं मार; खिन्न होऊं नको; युद्ध कर, रणामध्यें तूं शत्रूंना जिंकशील. ॥ ३४ ॥

तूं द्रोणाची पर्वा करूं नको, भीष्माचें भय बाळगूं नको, व कर्णावर शस्त्र कसें धरूं असें म्हणूं नको; ७२ आणि जयद्रथाला मारण्याकरितां कशाची योजना करावी

१ बडबड करणें. २ पराक्रमाचा. ३ अहंकार. ४ चढले. ५ दाहक. ६ मधुर. ७ लोट. ८ भेंडाळे. ९ बाहुल्यां. १० कुंभाराच्या घरचे. ११ पुतळे. १२ आकार. १३ हिसकावून. १४ निकृष्ट, हीन. १५ संहारीं.

धरीं । कैसेनि कर्णावरी । पंर्जू न म्हण ॥ ७२ ॥ कोण उपायो जयद्रथा कीजे । हें न चिंतू चित्त तुझें । आणिकही आथि जे जे । नावाणिगे वीर ॥ ७३ ॥ तेही एकेक आघवे । चित्रींचे सिंहाडे मानावे । जैसे वोलेनि[3] हातें घ्यावे । पुसोनियां ॥ ७४ ॥ यावरी पांडवा । कायसा युद्धाचा मेळावा । हा आभासु गा आघवा । येर ग्रासिलें मियां ॥ ७५ ॥ जेव्हां तुवां देखिलें । हे माझिया वदनीं पडिले । तेव्हांचि याचें आयुष्य सरलें । आतां रितीं[4] सोपें[5] ॥७६॥ म्हणोनि वहिला[6] उठीं । मियां मारिले तूं निवटीं । न रिघें शोकसंकटीं । नाथिलिया ॥ ७७ ॥ आपणाचि आडखिळा कीजे । तो कौतुकें जैसा विंधोनि[7] पाडिजे । तैसें देखें गा तुझें । निमित्त आहे ॥ ७८ ॥ वापा विरुद्ध जें जाहलें । तें उपजतांचि वाघें नेलें । आतां राज्येंशीं संचलें । यश तूं भोगीं ॥ ७९ ॥ सावियेंचि उंतत होते दायाद । आणि वाळेये जगीं दुर्मद । ते वाघिले विपैंद । सायासु न लागतां ॥ ४८० ॥ ऐसिया इया गोष्टी । विश्वाच्या वाक्पटीं । लिहूनि घालीं किरीटी । विजयी होईं ॥ ८१ ॥

एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी ।
नमस्कृत्वा भूय एवाऽऽह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५ ॥

अन्वयः—एतत् केशवस्य वचनं श्रुत्वा वेपमानः किरीटी कृतांजलिः ( सन् ) कृष्णं नमस्कृत्वा भूय एव प्रणम्य भीतभीतः ( सन् ) सगद्गदं आह ॥ ३५ ॥

( ४८६. देवाचें भाषण ऐकून अर्जुनास गहिंवर येऊन, देवास नमस्कार करून तो म्हणतो, मी काळ आहें असेंच बोललांत ना ? ४८२–४८८ ) ऐसी आघवीचि हे कथा । तया अपूर्णमनोरथा । संजयो सांगे कुरुनाथा । ज्ञानदेवो म्हणे ॥ ८२ ॥ मग सत्यलोकौनि गंगाजळ । सुटलिया वाजत खळाळ । तैशी वाचा विशाळ । बोलतां तया ॥ ८३ ॥ नातरी महामेघांचे उमाळे । घडघडीत एके वेळे । कां घुमघुमिला मंदराचळें । क्षीराब्धि जैसा ॥ ८४ ॥ तैसें गंभीरें महानादें । हें वाक्य विश्वकंदें । बोलिलें अगाधें । अनंतरूपें ॥ ८५ ॥ तें अर्जुनें मोटकें[7] ऐकिलें । आणि सुख कीं भय दुणावलें । हें नेणों परी कांपिन्नलें । सर्वांग तयाचें ॥ ८६ ॥ सखोलपणें वळली मोट । आणि तैसेंचि जोडलें करसंपुट । आणि वेळोवेळां ललाट । चरणीं ठेवी ॥ ८७ ॥ तेवींचि कांहीं बोलों जाये । तंव गळा दुंजलाचि ठाये । हें सुख कीं भय होये । हें विचारा तुम्ही ॥ ८८ ॥ ( ४८७. अर्जुन भयभीत झाला, ज्ञानेश्वर सांगतात. ४८९–४९० ) परि तेव्हां देवाचेनि बोलें । अर्जुना हें ऐसें जाहलें । मियां पदांवरूनि देखिलें । श्लोकाचिया ॥ ८९ ॥ मग तैसाचि भेंणभेण । पुढती जोहारूनि चरण । मग म्हणे जी आपण । ऐसें बोलिलेति ॥ ४९० ॥

१ शस्त्र धरूं. २ नामांकित. ३ पोतेऱ्यानें. ४ रिकामीं. ५ सोपटें. ६ लवकर. ७ मार.

याजविषयीं विचार करूं नको. आणखीही इतर जे नामांकित वीर आहेत, ७३ ते सर्व भिंतीवरील चित्रांतल्या सिंहाप्रमाणें निर्जीव समज. त्यांना काय, पोतेऱ्यानें पुसून टाकावयाचें! ७४ तेव्हां अर्जुना, या युद्धाकरितां जमलेल्या वीरांची काय कथा आहे ? हा सर्व भास आहे. बाकी खरोखर त्यांना मीं ग्रासून टाकलेलें आहे! ७५ जेव्हां तूं हे सगळे माझ्या तोंडात गेलेले पाहिलेस, तेव्हाच यांचें आयुष्य संपलें! हे आतां रिकाम्या सोंपटांप्रमाणें आहेत. ७६ म्हणून लवकर उठ, आणि मीं ज्यांना मारलेलें आहे त्यांचा तूं संहार कर. नमत्या शोकसंकटात बुडूं नको! ७७ आपणच एखादें निशाण धरून तें जसें कौतुकानें भेदून पाडावें, त्याप्रमाणें या सर्वांचा नाश करण्याकरितां तूं केवळ निमित्तमात्र आहेस. ७८ अरे, जे तुझ्याशीं वैर करीत, त्यांना उपजतांक्षणींच वाघानें नेलें आहे. तर आतां राज्यासह यश संपादन करून त्याचा उपभोग घे. ७९ स्वभावतः उन्मत्त, सर्व जगांत बलवान व दुष्ट, आणि विष घालणारे असे जे भाऊबंद, ते वेळ न लागतां मारले, ४८० अशा प्रकारच्या या गोष्टी, अर्जुना, जगाच्या वाकपटावर लिहून ठेव ( लोकांच्या चर्चेस विषय करून ठेव ), आणि विजयी हो. ८१

श्लोकार्थः—संजय म्हणाला—याप्रमाणें केशवाचें भाषण ऐकून, थरथर कापणारा किरीटी हात जोडून श्रीकृष्णांना पुनः नमस्कार करून भीत भीत सद्गदित अंतःकरणानें नम्र होऊन म्हणाला. ॥ ३५ ॥

( ज्ञानदेव म्हणतात:— ) याप्रमाणें ही सर्व कथा संजयानें अपूर्णमनोरथ अशा धृतराष्ट्राला सांगितली. ८२ मग म्हणतो, -" सत्यलोकांतून गंगेचा ओघ निघाल्यावर जसा खळखळ वाजतो, त्याप्रमाणें गंभीर वाणीनें श्रीकृष्ण बोलले. ८३ किंवा मेघाच्या पाण्याचे लोट जसे धडधडा एकदम वाजत सुटतात, अथवा समुद्रमंथनाच्या वेळीं क्षीराब्धि जसा मंदराचलाच्या रवीनें दणाणत होता, ८४ त्याप्रमाणें अनंतरूपी विश्वाचें मूळ जे श्रीकृष्ण गंभीर वाणीनें हें वाक्य बोलले, ८५ तें अर्जुनानें थोडेसें ऐकलें. त्यामुळें त्याचें सुख वाढलें किंवा दुःख वाढलें हे कांहीं कळलें नाहीं. परंतु त्याचें सर्वांग कांपूं लागलें! ८६ तो अति नम्रपणानें लवून हात जोडून वरचेवर श्रीकृष्णांच्या चरणीं मस्तक ठेवूं लागला, ८७ आणि कांहीं बोलणार, तों त्याचा कंठ भरून आला. श्रोतेहो, ही स्थिति सुखामुळें झाली, किंवा दुःखामुळें झाली, याचा तुम्हीच विचार करा. ८८ परंतु देवाच्या बोलण्यानें अर्जुनाची अशी स्थिति झाली, हें श्लोकांतील पदाच्या अर्थावरून मी म्हणतों. ८९ मग भीत भीत त्यानें भगवंतांच्या चरणांवर पुनः मस्तक ठेविलें, आणि तो म्हणाला, " महाराज! आपण असेंच ना बोललां ? ४९०

८ नमत्या; लटक्या. ९ निशाण. १० छेदून. ११ स्वभावतः. १२ उन्मत्त. १३ भाऊबंद. १४ विष घालणारे. १५ वाणीरूप पटावर. १६ लोट. १७ अमळसें. १८ भरून आला. १९ भीत भीत. २० पायीं मस्तक ठेवून.

अर्जुन उवाच—

स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।
रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः ॥ ३६ ॥

अन्वयः—हृषीकेश, तव प्रकीर्त्या जगत् प्रहृष्यति च अनुरज्यते; ( एतत् ) स्थाने । रक्षांसि भीतानि ( संति ) दिशः द्रवंति, च सर्वे सिद्धसंघाः नमस्यंति ॥ ३६ ॥

( ४८८. अर्जुन म्हणतो, देवा, तुमचें बोलणें युक्तीला धरून नाहीं. ४९१–४९८) ना तरी अर्जुना मी काळु । आणि ग्रासिजे तो माझा खेळु । हा बोलु तुझा कीर अढळु । मानूं आम्ही ॥ ९१ ॥ परि तुवां जी काळें । आजि स्थितीचिये वेळे । ग्रासिजे हें न मिळे । विचारासी ॥ ९२ ॥ कैसेनि आंगींचें तारुण्य काढावें । कैचें नव्हे तें वार्धक्य आणावें । म्हणोनि करूं म्हणसी तें नव्हे । बहुतकरुनी ॥ ९३ ॥ हां जी चौपाहारी न भरतां । कोणेही वेळे श्रीअनंता । काय माध्यान्हीं सविता । मावळतु । आहे ॥ ९४ ॥ पैं तुज अखंडिता काळा । तिन्ही आहाती जी वेळा । त्या तिन्ही परी सबळा । आपुलिया समयीं ॥ ९५ ॥ जे वेळीं हों लागे उत्पत्ती । ते वेळीं स्थिति-प्रळयो हारपती । आणि स्थितिकाळीं न मिरविती । उत्पत्ति-प्रळयो ॥ ९६ ॥ पाठीं प्रळयाचिये वेळे । उत्पत्ति-स्थिति मावळे । हें कायसेनही न ढळे । अनादि ऐसें ॥ ९७ ॥ म्हणोनि आजि तंव भरें भोगें । स्थिति वर्तत आहे जगें । एथ ग्रासिसी तूं हें नलगे । माझ्या जीवीं ॥ ९८ ॥ ( ४८९. देवानीं संकेतानें सुचविलें, यथाकाल होणार आहे; असें म्हणतांच मुखात गेलेलें सर्व जग पुन्हां अर्जुनानें पाहून तो देवाची स्तुति करतो, ४९९–५०३ ) तंव संकेतें देव बोले । अगा या दोन्ही सैन्यांसीचि भेरण पुरलें । तें प्रत्यक्षचि तुज दाविलें । येर यथाकाळें जाण ॥ ९९ ॥ हा संकेतु जंव अनंता । वेळु लागला बोलतां । तंव अर्जुनें लोकु मागुता । देखिला यथास्थिति ॥ ५०० ॥ मग म्हणतसे देवा । तूं सूत्री विश्वलाघवा । जग आला मा आघवा । पूर्व स्थिती पुढती ॥ १ ॥ परि पडिलिया दुःखसागरीं । तूं काढिसी कां जयापरी । ते कीर्ति तुझी श्रीहरी । आठवीत असें ॥ २ ॥ कीर्ति आठवितां वेळोवेळां । भोगीतसें महासुखाचा सोहळा । तेथ हर्षामृतकल्लोळा- । वरि लोळत आहें ॥ ३ ॥ ( ४९०. मुखातून बाहेर आल्यामुळें सर्व देव स्तवन करतात, ५०४–५०६ ) देवा जियालेपणें जग । धरी तुझ्या ठायीं अनुरागु । आणि दुष्टां तयां भंग । अधिकाधिक ॥ ४ ॥ पैं त्रिभुवनींचिया राक्षसां । महाभय तूं हृषीकेशा । म्हणोनि पळताति दाही दिशां- । पैलीकडे ॥५॥ एथ सुर नर सिद्ध किन्नर । किंबहुना चराचर । ते तुज देखोनि हर्षनिर्भर । नमस्कारित असती ॥ ६ ॥

कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।
अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥

श्लोकार्थः—अर्जुन म्हणालाः—हृषीकेशा, तुमच्या विशेष कीर्तीनें सर्व जगत् आनंदभरित होतें, आणि तुमच्यावर प्रेम करितें; तसेंच, राक्षस भयभीत होऊन दशदिशाकडे धाव घेतात, आणि सर्व सिद्धांचे समुदाय तुम्हांला नमस्कार करितात, हें योग्यच आहे ॥ ३६ ॥

" कीं अर्जुना, मी कालरूपी असून, ह्या सर्वांना जें ग्रासून टाकलें तो केवळ माझा खेळ आहे म्हणून? तर, देवा, हें तुमचें बोलणें निश्चयात्मक खरें आहे, असें आम्ही मानतों; ९१ परंतु तुम्हीं काळरूपी परमेश्वरानें या स्वस्थपणाच्या वेळीं जगास ग्रासावें ही गोष्ट विचारास जुळत नाहीं. ९२ एखाद्याच्या अंगातील तारुण्य काढून म्हातारपण कसें घालता येईल? म्हणून, तुम्ही जें करूं म्हणतां तें बहुतकरून न होण्याजोगें आहे. ९३ हें पहा अनंता, दिवसाचे चार प्रहर न भरतां मध्यान्हीं सूर्य कधीं तरी मावळतो का? ९४ (इतकेंच नव्हे, तर) हें पहा—तुम्ही अखंडित असे जे काळ, त्यालाही तीन स्थिति आहेत; आणि त्या प्रत्येक आपआपल्या वेळीं सबळ आहेत. ९५ ज्या वेळेस उत्पत्ति होऊं लागते, त्या वेळीं स्थिति व प्रळय ह्या नाहींतशा होतात; आणि स्थितीच्या वेळेस उत्पत्ति व प्रलय याचें कांहीं चालत नाहीं; ९६ आणि मागाहून प्रळयाच्या वेळीं उत्पत्ति व स्थिति ह्या आपोआप नाहींतशा होतात. ह्या अवस्था अनादि असून कशानेंही टळत नाहींत. ९७ म्हणून, आज हें जग स्थितीचा उपभोग घेण्याच्या भरांत असतां त्याला ग्रासलें असें तुम्ही म्हणतां ही गोष्ट मला रुचत नाहीं." ९८ तेव्हां खुणेनें देव म्हणाले, "अरे, ह्या दोन्ही सैन्यांचें आयुष्य संपलें आहे, हें प्रत्यक्ष तुला दाखविलें; परंतु इतर लोक यथाकालींच मरण पावतील असें समज." ९९ इतकी गोष्ट श्रीकृष्ण भगवान बोलताहेत तोंच पूर्ववत् अर्जुनानें सर्व सैन्य जागचे जागीं आहे असें पाहिलें. ५०० मग तो म्हणतो, "देवा, आपण विश्वाचें चालन करणारे सूत्रधार आहां, त्या योगानें हें जग पूर्वस्थितीला पुनः प्राप्त झालें; १ परंतु हे श्रीहरी, दुःखसागरांत पडलेल्यांना तुम्ही बाहेर काढता अशी तुमची कीर्ति आहे याची आम्हांला पूर्ण आठवण आहे. २ तुमच्या कीर्तीचें वारंवार स्मरण होऊन, महासुख भोगीत असून आनंदसमुद्राच्या लहरींत मी लोळत आहें. ३ देवा, हें जग जिवंत राहिल्यानें तुमच्या ठिकाणीं प्रीति धरून सुखानें राहतें व जे दुष्ट आहेत त्याचा तुम्ही नाश करतां; ४ परंतु हे हृषीकेशा, त्रिभुवनांतल्या राक्षसांना तुमचें भय वाटतें, म्हणून तुमच्यापासून ते दाही दिशा दूर पळतात. ५ एरव्हीं देव, मनुष्य, सिद्ध, यक्ष, किंबहुना सर्व स्थावरजंगम हे तुम्हांला पाहून हर्षयुक्त होऊन वंदन करतात. ६

श्लोकार्थः—हे महात्मन्, हे अनंता, हे देवाधिदेवा, तुम्ही श्रेष्ठ असून ब्रह्मदेवाचेही उत्पन्नकर्ते आहां, मग ते तुम्हांला का नमस्कार करणार नाहींत? हे जगन्निवासा, जें सत् आणि असत् आहे, त्याच्या पलीकडचें जें अविनाशी ब्रह्म तें तुम्ही आहां ॥ ३७ ॥

---

१ सूर्य. २ आयुष्य. ३ सूत्रधार. ४ विश्वाच्या हालचालीस. ५ आनंदसमुद्र. ६ जिवंतपणीं. ७ प्रीति. ८ हर्षयुक्त.

अन्वयः—महात्मन्, अनंत, देवेश, गरीयसे ब्रह्मणः अपि आदिकर्त्रे (तुभ्यं) ते कस्मात् न नमेरन्! च जगन्निवास, यत सत् परं (यत्) अक्षरं, तत् त्वं (असि) ॥ ३७ ॥

( ४९१. देवा, तूं सर्वापेक्षां श्रेष्ठ आहेस, म्हणून सर्वांना वंद्य आहेस, ५०७-५२१)

एथ गा कवणा कारणा । राक्षस हे नारायणा । न लगतीचि चरणा । पळते जाहले ॥ ७ ॥ आणि हें काय तूतें पुसावें । येतुलें आम्हांसिही जाणवे । तरी सूर्योदयीं राहावें । कैसेनि तमें ॥ ८ ॥ जी तूं प्रकाशाचा आगरु । आणि जाहला आम्हांसि गोचरु । म्हणोनिया निशाचरां केरु । फिटला सहजें ॥ ९ ॥ हें येतुले दिवस आम्हां । कांहीं नेणवेचि श्रीरामा । आतां देखतसें महिमा । गंभीर तुझा ॥ ५१० ॥ जेथूनि नाना सृष्टीचिया वोली[3] । पसरती भूतग्रामाचिया वेली । तया महद्ब्रह्मातें व्याली । दैविकी इच्छा ॥ ११ ॥ देवो निःसीमें तत्त्व सदोदितु । देवो निःसीमगुण अनंतु । देवो निःसीम साम्य सततु । नरेंद्र देवांचा ॥ १२ ॥ जी तूं त्रिजगतियें वोलावा । अक्षर तूं सदाशिवा । तूंचि सदसत् देवा । तयाही अतीत तें तूं ॥ १३ ॥

त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप ॥ ३८ ॥

अन्वयः—त्वं आदिदेवः, त्वं पुराणः पुरुषः, त्वं अस्य विश्वस्य परं निधानं, त्वं वेत्ता च परं धाम असि; अनंतरूप, त्वया विश्वं ततं (अस्ति) ॥ ३८ ॥

तूं प्रकृतिपुरुषांचिया आदि । जी महत्तत्त्वा तूंचि अवधि । स्वयें तूं अनादि । पुरातनु ॥ १४ ॥ तूं सकळ विश्वजीवन । जीवांसि तूंचि निधान । भूतभविष्याचें ज्ञान । तुझ्याचि हातीं ॥ १५ ॥ जी श्रुतीचिया लोचना । स्वरूपसुख तूंचि अभिन्ना । त्रिभुवनाचिया आयतना । आयतन तूं ॥ १६ ॥ म्हणोनि जी परम । तूंतें म्हणिजे महाधाम । कल्पांतीं महद्ब्रह्म । तुजमाजि रिगे ॥ १७ ॥ किंबहुना तुवां देवें । विश्व विस्तारिलें आहे आघवें । तरि अनंतरूपा वानावें । कवणें तूंतें ॥ १८ ॥

वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।
नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥
नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोपि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥

अन्वयः—त्वं वायुः, त्वं अग्निः, त्वं यमः, त्वं वरुणः, त्वं शशांकः, त्वं प्रजापतिः च त्वं प्रपितामहः (असि); ते सहस्रकृत्वः नमो नमः पुनश्च भूयोऽपि (ते) नमो नमः अस्तु ॥३९॥ ते पुरस्तात् नमः अथ ते पृष्ठतः नमः (अस्तु); हे सर्व, सर्वतः एव नमः अस्तु, त्वं अनंतवीर्यः अमितविक्रमः (यस्मात्) सर्वं समाप्नोषि ततः सर्वः असि ॥ ४० ॥

जी काय एक तूं नव्हसी । कवणे ठायीं नससी । हें असो जैसा आहासी । तैसिया नमों ॥ १९ ॥ वायु तूं अनंता । यम तूं नियमिता । प्राणिगणीं वसता ।

१ अंधारानें. २ मुख्य ठिकाण. ३ ओळी. ४ मायेच. ५ अगणित. ६ समदृष्टि. ७ वर्चिर्,

नारायणा, काय कारणास्तव राक्षस तुम्हांला नमस्कार न करतां दूर पळतात, ७ हें तुम्हांला विचारावें असें नाहीं; कारण आम्हाला इतकें कळत आहे. हें पहा—सूर्योदय झाल्यावर अंधार कसा राहील ? त्याप्रमाणे, तुमच्यापुढें राक्षस कसे राहतील ? ८ तुम्ही स्वप्रकाशाचें मुख्य ठिकाण दृष्टीस पडल्यावर राक्षस सहज नाहींतसे झाले. ९ हे श्रीरामा, इतके दिवस ही गोष्ट आम्हांला समजली नव्हती; परंतु आता तुमचा हा अलौकिक महिमा आमच्या दृष्टीस पडत आहे. ५१० ज्या ठिकाणाहून अनेक सृष्टींच्या ओळी व प्राणिमात्राच्या वेली जगभर पसरतात, त्या मायेला तुमची इच्छा ही आदिस्थान होय. ११ तुम्ही अगणित अशा सत्त्वानें नेहमीं भरलेले आहा. तुमच्यांत परमावधि अनंत गुण भरलेले आहेत; सर्वज्ञ सतत समदृष्टि असून तुम्ही देवाचे देव आहां. १२ हे सदाशिवा, तुम्ही ह्या सकल ब्रह्मांडाचें राहण्याचें ठिकाण असून अविनाशी आहां; आणि देवा, तुम्हीच व्यक्त व अव्यक्त असून, त्यापलीकडील जाणता येणारें जें तत्त्व तेही तुम्हीच आहां. १३

श्लोकार्थः—तुम्ही आदिदेव, पुराणपुरुष, तुम्ही या विश्वाचे लयस्थान, तुम्ही ज्ञाते, तुम्ही जाणावयाची योग्य वस्तु, व तुम्ही परमपद आहा. हे अनंतरूपा, तुम्हीं हें सर्व जग व्यापिलें आहे ॥ ३८ ॥

तुम्ही शिव ( पुरुष ) व शक्ति ( प्रकृति ) याच्या अगोदरचे असून मायेची मर्यादाही तुम्हीच आहां, व तुम्ही पुरातन असून तुमच्या पूर्वीचा असा दुसरा कोणी नाहीं. १४ तुम्ही सर्व विश्वाचे चालक व सर्व जीवाचें अधिष्ठान असून, भूत व भविष्य हें ज्ञान तुम्हांलाच आहे. १५ श्रुतींच्या नेत्रास ज्या स्वरूपापासून सुख होतें, तें, भेदरहित असे जे तुम्ही त्या तुमचेंच होय; व ज्या मायेनें हें सर्व जग व्यापले आहे, तिला आश्रयही तुमचाच आहे. १६ म्हणून तुम्ही सर्व सृष्टीचें आश्रयस्थान असून परमश्रेष्ठ आहां व ब्रह्मांडाच्या अंतकाळीं मायाही तुमचेच ठिकाणीं लय पावते. १७ किंबहुना देवा, हे सर्व जग तुम्हीच विस्तारलें आहे. तेव्हां, अनंतरूप असे जे तुम्ही त्या तुमचें वर्णन कोण करूं शकेल ? १८

श्लोकार्थः—वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र, कश्यपादि प्रजापति व ब्रह्मदेवाचा पिताही तुम्हीच आहा. सहस्र वेळा तुम्हाला नमस्कार असो, आणि पुनः पुनः तुम्हाला नमस्कार असो ॥ ३९ ॥ हे सर्वरूपा परमेश्वरा, तुम्हाला समोरून, मागून आणि सर्व बाजूंनीं नमस्कार असो. ज्याच्या बलाला आणि पराक्रमाला पार नाहीं असे तुम्ही आहा. ज्यापेक्षा तुम्हीं हें सर्व जग व्यापिलें आहे, त्यापेक्षा तुम्ही सर्वस्वरूप आहा ॥ ४० ॥

तुम्ही ज्यांत नाहीं अशी या जगात कोणती वस्तु आहे ? व तुम्ही नाहीं असें कोणतें ठिकाण आहे ? तेव्हा, तुम्ही जेथें जेथें असाल, तेथें तेथें तुम्हाला माझा नमस्कार असो. १९ श्रीअनंता, तुम्ही वायु आहां. शासन करणारा जो यम, तो तुम्ही आहां. प्राणिमात्राच्या ठिकाणी वास करणारा जो जठराग्नि तोही तुम्ही आहां.

८ शिव. ९ माया. १० मर्यादा. ११ भेदरहित. १२ त्रिभुवनास जिचा आश्रय आहे त्या मायेस. १३ आश्रय. १४ आश्रयस्थान.

अग्नि तो तूं ॥ ५२० ॥ वरुण तूं सोम । स्रष्टा तूं ब्रह्म । पितामहाचाही परम । आदि जनक तूं ॥ २१ ॥ ( ४९२. अर्जुन सर्वव्यापी देवाला सर्व बाजूंनीं नमस्कार करतो, ५२२–५३६ ) आणीकही जें जें कांहीं । रूप आथी अथवा नाहीं । तया नमो तुज तैसयाही । जगन्नाथा ॥ २२ ॥ ऐसें सानुरागें चित्तें । नमन केलें पांडुसुतें । मग पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २३ ॥ पाठी तियें साद्यंतें । न्याहाळी श्रीमूर्तीतें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥२४॥ पाहतां पाहतां प्रांतें । समाधान पावे चित्तें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २५ ॥ इये चराचरीं जीं भूतें । सर्वत्र देखे तयांतें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २६ ॥ ऐसीं रूपें तियें अद्‌भुतें । आश्चर्यें स्फुरतीं अनंतें । तंव तंव नमस्ते । नमस्तेचि म्हणे ॥ २७ ॥ आणिक स्तुतिही नाठवे । आणि निवांतुही न बैसवे । नेणों कैसा प्रेमभावें । गाजोंचि लागे ॥ २८ ॥ किंबहुना इयापरी । नमन केलें सहस्रवरी । कीं पुढती म्हणे श्रीहरी । तुज सन्मुखा नमो ॥ २९ ॥ देवासि पाठी पोट आथी कीं नाहीं । येणें उपयोगु आम्हां काई । तरि तुज पाठिमोरेयाही । नमो स्वामी ॥ ५३० ॥ उभा माझिये पाठीसीं । म्हणोनि पाठिमोरें म्हणावें तुम्हांसी । सन्मुख विमुख जगेंसीं । न घडे तुज ॥ ३१ ॥ आतां वेगळालिया अवयवां । नेणें रूप करूं देवा । म्हणोनि नमो तुज सर्वा । सर्वात्मका ॥ ३२ जी अनंत बळ-संभ्रमा । तुज नमो अमितविक्रमा । सकळ काळीं समा । सर्वरूपा ॥३३॥ आघवियां आकाशीं जैसें । अवकाशचि होऊनि आकाश असे । तूं सर्वपणें तैसें । पातलासि सर्व ॥ ३४ ॥ किंबहुना केवळ । सर्व हें तूंचि निखिळ । परि क्षीरार्णवीं कल्लोळ । पयाचे जैसे ॥ ३५ ॥ म्हणोनियां देवा । तूं वेगळा नव्हसी सर्वां । हें आलें मज सद्भावा । आतां तूंचि सर्व ॥ ३६ ॥

> सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
> अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वाऽपि ॥ ४१ ॥

अन्वयः— ( भगवन्, ) तव महिमानं अजानता मया सखा इति मत्वा, हे कृष्ण, हे यादव, हे सखे, इति प्रमादात् वा प्रणयेन अपि प्रसभं यत् उक्तं ( अस्ति ), ॥ ४१ ॥

( ४९३. सर्वव्यापी देवाला न जाणल्यामुळें अपराध घडले त्याची अर्जुन क्षमा मागतो, ५३७–२६० ) परि ऐसिया तूतें स्वामी । कहींच नेणों जी आम्ही । म्हणोनि सोयरे-संबंध-धर्मीं । राहाटलों तुजसीं ॥ ३७ ॥ अहा घोर वाउर जाहलें । अमृतें संमार्जन म्यां केलें । वांरिकें घेऊनि दिधलें । कामधेनूतें ॥ ३८ ॥ परिसाचा खंडवाचि जोडला । कीं फोडोनि आम्हीं गांडोरीं घातला ।

१ गणती. २ सर्वस्वरूप. ३ साठा. ४ अगणित पराक्रमी. ५ वाईट गोष्ट. ६ शिंगरूं. ७ पर्वत. ८ गडगा, पायांत भर.

५२० तुम्हीं वरुण, चंद्र व सृष्टि निर्माण करणारे ब्रह्मदेव आहां; व ब्रह्मदेवालाही जो उत्पन्न करणारा, तोही तुम्हीच आहां. २१ श्रीजगन्नाथा, ह्याशिवाय इतर म्हणून ज्या आपल्या विभूति आहेत, त्यांना आकार असो वा नसो, त्यांना माझा नमस्कार असो. २२ याप्रमाणें अर्जुनानें सप्रेम चित्तानें नमस्कार केला; व पुनः, 'हे प्रभो, तुम्हाला नमस्कार असो, नमस्कार असो,' असें तो म्हणूं लागला. २३ नंतर श्रीकृष्णाच्या मूर्तीकडे नीट न्याहाळून पाहिल्यावर, पुनः 'हे प्रभो, तुम्हांला नमस्कार असो, नमस्कार असो,' असें म्हणूं लागला. २४ एकेक अवयवाकडे पाहून चित्तात समाधान पावल्यानें, पुन. 'हे प्रभो, तुम्हाला नमस्कार असो, नमस्कार असो,' असें म्हणूं लागला. २५ स्थावरजंगम पदार्थ व प्राणी त्या रूपाचे ठिकाणीं पाहून, 'हे प्रभो, तुम्हांस नमस्कार असो, नमस्कार असो,' असेंच म्हणूं लागला. २६ याप्रमाणें अद्भुत अशीं रूपें श्रीअनंताचे ठिकाणीं आश्चर्यानें पाहून, 'नमस्कार असो, नमस्कार असो,' असें म्हणूं लागला. २७ यापेक्षां जास्त स्तुति कशी करावी हें आठवेना आणि स्वस्थही बसवेना, अशी अर्जुनाची स्थिति होऊन तो प्रेमभावानें जास्त स्तुतिच करूं लागला, ती सांगतां येत नाहीं. २८ फार काय, याप्रमाणें त्यानें हजारों वेळा नमस्कार केले व तो पुनः श्रीहरीस म्हणाला, "तुम्ही माझ्यासमोर जे दिसत आहा, त्या तुम्हाला नमस्कार असो. २९ देवाला पाठपोट आहे कीं नाहीं, याची चौकशी करून आम्हांला काय उपयोग होणार ? तथापि हे स्वामी, माझ्या पाठीमागें जे तुम्ही आहां, त्या तुम्हांला नमस्कार असो. ५३० तुम्ही माझ्या पाठीशीं उभे आहां, म्हणून तुम्ही पाठीमागें आहा असें म्हणता येतें; परंतु खरोखर तुम्ही जगाच्या पाठीमागें किंवा पुढें आहां असं कांहींच म्हणता येत नाहीं. ३१ तुमच्या निरनिराळ्या अवयवांची गणती करतां येत नाहीं; म्हणून, सर्वस्वरूपी असे जे तुम्ही त्या तुमच्या सर्व अंगाला नमस्कार असो. ३२ देवा, जे तुम्ही अनंत बळाचा सांठा आहां, तुम्ही अगणित पराक्रमी व सर्व रूपांत सर्वकाळीं सम आहां, त्या तुम्हांला नमस्कार असो. ३३ ज्याप्रमाणें सर्व आकाशात आकाशमय होऊन आकाशच असतें, त्याप्रमाणें सर्व ठिकाणीं तुमची व्याप्ति असल्यामुळें तुम्ही सर्वांत आहां: ३४ किंबहुना सर्वत्र तुम्हीच केवळ भरलेले आहां. पण ज्याप्रमाणें क्षीरसमुद्रात लाटाही दुधाच्याच येतात, (त्याप्रमाणें.) ३५ म्हणून देवा, तुम्ही सर्व पदार्थांपासून वेगळे नाहीं हें माझ्या प्रत्ययास आलें आहे; तेव्हां आता सर्वत्र तुम्ही भरलेले आहां. ३६

श्लोकार्थः—हे प्रभो, तुमचा हा महिमा न जाणता, मी तुम्हाला मित्र समजून, हे कृष्णा, हे यादवा, हे सख्या, असें अमर्यादेनें अथवा प्रीतीनें जें उद्दाम भाषण बोललों आहें; ॥ ४१ ॥

परंतु प्रभो, तुमची अशी योग्यता आहे असें मीं मुळींच जाणलें नाहीं, म्हणून सोयरेपणाच्या नात्यानें वागलों. ३७ अरेरे ! माझ्या हातून फार वाईट गोष्ट घडली, कीं म्यां अमृताचा उपयोग सडासंमार्जनाकडे केला, व कामधेनु देऊन तिच्या बदला शिंगरूं

कल्पतरु तोडोनि केला । कूंप शेता ॥ ३९ ॥ चिंतामणीची खाणी[१] लागली । तेणें करें वोढाळें वोल्हांडिलीं[२] । तैसी तुझी जंवळीक धाडिली । सांगातीपणें ॥ ५४० ॥ हें आजिचोंचि पाहें पां रोकडें[३] । कवण झुंज हें केवढें । एथ परब्रह्म तूं उघडें[४] । सारथी केलासी ॥ ४१ ॥ ययां कौरवांचिया घरा । शिष्टाई धाडिलासि दातारा । ऐसा वणिजेसाठीं[५] जगदीश्वरा । विकलासि आम्हीं ॥ ४२ ॥ तूं योगियांचें समाधिसुख । कैसा जाणोंचिना मी मूर्ख । उपरोधुं जी सन्मुख । तुजसीं करूं ॥ ४३ ॥

यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाऽप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥

अन्वयः–अच्युत, यत् च विहारशय्यासनभोजनेषु अवहासार्थं एकः अथवा तत् समक्षं असत्कृतः असि, तत अहं त्वा क्षामये ॥ ४२ ॥

तूं या विश्वाची अनादि आदी । बैससी जिये सभासदीं । तेथें सोयरीकीचिया संबंधीं । र्‍ळीं[७] बोलों ॥ ४४ ॥ विपायें राउळा येवों । तरि तुझेनि अंगें मानु पावों । न मानिसी तरी जावों । रुसोनि सलगीं ॥ ४५ ॥ पायां लागोनि बुझावणी[९] । तुझ्या ठायीं शार्ङ्गपाणी । पाहिजे ऐसी करणी । बहु केली आम्हीं ॥ ४६ ॥ सजाणपणाचिया वाटा । तुजपुढें बैसें उँफराटा[१०] । हा पाड[११] काय वैकुंठा[१२] । परि चुकलों आम्ही ॥ ४७ ॥ देवेंसि कोलैंकाठी[१३] धरूं । अखंडें[१४] झोंबीलोंबी[१५] करूं । सौंरी[१६] खेळतां आविष्कैरूं[१७] । निकरेंही भांडों ॥ ४८ ॥ चांग तें उँराउरी[१८] मागों । सर्वज्ञासि कीं बुद्धि सांगों । तेवींचि म्हणों काय लागों । तुझें आम्ही ॥ ४९ ॥ ऐसा अपराधु हा आहे । जो त्रिभुवनीं न समाये । जी नेणतांचि कीं पाये । शिवतिले तुझे ॥ ५५० ॥ देवो बोनैयांच्या[१९] अवसरीं । लोभें कीर आठवण करी । परि माझा निसुगं[२०] गर्व अवधारीं । जे फुगूनचि बैसें ॥ ५१ ॥ देवाचिया भोगायतनीं[२१] । खेळता आशंकेना मनीं । जी रिगोनियां शयनीं । सरिसा पैहुडें ॥ ५२ ॥ कृष्ण म्हणोनि हाकारिजे । यादवपणें तूतें लेखिजे । आपली आण घालिजे । जातां तुज ॥ ५३ ॥ मज एकासनीं बैसणें । कां तुझा बोलु न मानणें । हें वोतटीचेनि[२३] दाटपणें । बहुत घडलें ॥ ५४ ॥ म्हणोनि काय काय आतां । निवेदिजेल अनंता । मी राशि आहें समस्तां । अपराधाची ॥ ५५ ॥ यालागीं पुढा अथवा पाठीं । जियें

१ कुंपण. २ ओढाळ गुरें. ३ हाकून लावलीं. ४ सान्निध्य. ५ उघड उघड. ६ आमच्या कामाकरिता. ७ विनोद; थट्टा. ८ विनोदानें. ९ समजूत. १० पाठमोरा. ११ योग्यता. १२ श्रीकृष्णा. १३ दांडपट्टा. १४ आखाड्यात. १५ कुस्ती. १६ सोंगट्या. १७ तिरस्कार करून. १८ ताब्डतोब. १९ जेवणाच्या. २० रिकामा. २१ अंतःपुरात. २२ निजत होतों. २३ परिचयानें.

घेतलें ! ३८ परिसाचा डोंगर मिळाला असतां तो फोडून त्याची आम्ही घराच्या पायांत भर घातली; तसेंच कल्पतरु तोडून त्याचें शेतास कुंपण केलें; ३९ चिंतामणीची खाण लागली असून ते दगड गोफणीनें मारून ओढाळ गुरें हांकून लावलीं; त्याप्रमाणें तुमच्याशीं असलेल्या अतिस्नेहाचा उपयोग करून न घेतां तुम्हांला दूर केलें. ५४० हें आजचेंच उघड उघड उदाहरण पहा, कीं हें युद्ध केवढें व काय किंमतीचें, पण परब्रह्म जे तुम्ही त्या तुम्हांला आम्हीं आपले सारथि केलें. ४१ हे कृपासागरा, दुष्ट अशा कौरवांकडे तुम्हाला शिष्टाई करण्याकीरतां आम्ही धाडलें; याप्रमाणें हे जगदीश्वरा, आम्हीं आपल्या कामाकरितां तुमचा उपयोग करून घेतला. ४२ तुम्ही योग्यांचें समाधिसुख असून म्यां मूर्खानें तुम्हाला जाणलें नाहीं, व तुमच्या बरोबर विनोदाचीं भाषणें केलीं. ४३

श्लोकार्थः—आणखी हे अच्युता, खेळतांना, निजतांना, बसतांना आणि जेवतांना तुमच्या समक्ष थट्टेनें जो तुमचा अपमान केला, त्याबद्दल, अनंत असे जे तुम्हीं, त्या तुमची ' क्षमा करा ' अशी मी प्रार्थना करितों ॥ ४२ ॥

तुम्ही विश्वाचे आदिपुरुष आहां; तुमच्या अगोदरचा दुसरा कोणी नाही. ते तुम्ही ज्या सभेंत बसत होतां, तेथें तुम्ही आमचे नातेवाईक याप्रमाणें मी तुमच्याशीं विनोदानें बोललों. ४४ कदाचित् तुमच्या घरीं आलों, तर तुमच्या बरोबरीनें मान घेत होतों; आणि तो तुम्हीं न दिला तर स्नेहाच्या नात्यानें आम्ही रुसून परत जात होतों. ४५ हे शार्ङ्गपाणी, 'तुम्ही माझे पायां पडून समजूत केली पाहिजे ' याप्रमाणें हव्या त्या प्रकारानें आम्हीं तुमचा उपमर्द केला. ४६ शहाणपणाच्या घमेंडीवर आम्ही तुमच्या पुढें पाठमोरे देखील बसलों आहों; तर हे श्रीकृष्णा, अशी आमची योग्यता आहे का ? परंतु आमची चूक झाली. ४७ देवा, तुमच्याबरोबर दांडपट्टा वगैरे खेळ तर खेळलों; आखाड्यांत कुस्ती तर केली; व सोंगट्या खेळतांना तुमचा तिरस्कार करून तुमच्याबरोबर निकरानें तर भांडलों. ४८ जी उत्तम वस्तु असेल, ती अगोदर आम्हांला द्या म्हणून मागितली; सर्वज्ञ असे जे तुम्ही त्या तुम्हाला युक्तीच्या गोष्टी सांगितल्या. त्याचप्रमाणें, 'तुमचें आम्ही काय लागत आहों ?' असें तुम्हांला म्हटलें. ४९ अशा रीतीनें, त्रिभुवनांत न मातील असे आमचे हातून अपराध घडले आहेत, परंतु तुमच्याच पायाची शपथ कीं, आम्हीं तुम्हाला न ओळखतां तुमच्याशी असें वर्तन केलें. ५५० देवांनीं जेवणाचे वेळेस लोभानें खरोखर माझी आठवण करावी, परंतु मीं रिकामा गर्व करून रुसून बसावें; ५१ देवांच्या अंतःपुरांतही खेळतांना माझ्या मनात शंका उत्पन्न होत नसे, व आथरुणावर जाऊन मी शेजारीं निजत असें. ५२ मी तुम्हांला ' कृष्णा ' म्हणून हांक मारीत असून, इतर यादवांप्रमाणें तुम्हाला मानीत होतो, आणि तुम्ही जाऊं लागलां म्हणजे मी आपली शपथ घालीत असें. ५३ माझें तुमच्याबरोबर एका आसनावर बसणें, किंवा तुमचा शब्द मोडणें, हें अतिपरिचयामुळें पुष्कळ वेळां घडलें आहे. ५४

राहटलों बहुवें वोखटीं । तियें मायेचिया परी पोटीं । सामावीं प्रभो ॥ ५६ ॥ जी कोण्ही एके वेळे । सरिता घेऊनि येती खंडुळें । तियें सामाविजेति सिंधुजळें । आन उपायो नाहीं ॥ ५७ ॥ तैसीं प्रीती कां प्रमादें । देवेंसीं मज विरुद्धें । बोलविलीं तियें मुकुंदें । उपसाहावीं जी ॥ ५८ ॥ आणि देवाचेनि क्षमत्वें क्षमा । आधारु झाली आहे या भूतग्रामा । म्हणोनि जी पुरुषोत्तमा । विनवूं तें थोडें ॥ ५९ ॥ तरि आतां अप्रमेया । मज शरणागता आपुलिया । क्षमा कीजे जी यया । अपराधांसी ॥ ५६० ॥

पिताऽसि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव ॥ ४३ ॥

अन्वयः—अप्रतिमप्रभाव ! त्वं अस्य चराचरस्य लोकस्य पिता च गरीयान् पूज्यः गुरुः असि; लोकत्रये अपि त्वत् समः न अस्ति, अधिकः अन्यः कुतः ( स्यात् ) ! ॥ ४३ ॥

( ४९४. देवाच्या प्रसादानें देवाचा अलौकिक महिमा कळला, ५६१—५६६ ) जी जाणितलें मियां साचें । महिमान आतां देवाचें । जे देव होय चराचराचें । जन्मस्थान ॥ ६१ ॥ हरिहरादि समस्तां । देवा तूं परम देवता । वेदातेंही पढविता । आदि गुरु तूं ॥ ६२ ॥ गंभीर तूं श्रीरामा । नानाभूतैकसमा । सकळगुणीं अप्रतिमा । अद्वियीया ॥ ६३ ॥ तुजसी नाहीं सरिसें । हें प्रतिपादनचि कायसें । तुवां जालेनि आकाशें । सामाविलें जग ॥ ६४ ॥ तया तुझेनि पाडें दुजें । ऐसें बोलतांचि लाजिजे । तेथ अधिकाची कीजे । गोठी केवीं ॥ ६५ ॥ म्हणोनि त्रिभुवनीं तूं एकु । तुजसारिखा नाहीं आणिकु । तुझा महिमा अलौकिकु । नेणिजे वानूं ॥ ६६ ॥

तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥ ४४ ॥

अन्वयः—देव ! तस्मात् कायं प्रणिधाय प्रणम्य अहं ईड्यं ईशं त्वा प्रसादये. पुत्रस्य ( अपराधं ) पिता इव, सख्युः ( अपराधं ) सखा इव, प्रियः प्रियायाः ( इव, मम अपराधान् त्वं ) सोढुं अर्हसि ॥ ४४ ॥

( ४९५. अपराध पोटांत घालण्यास अर्जुन सांगतो, ५६७—५७८ ) ऐसें अर्जुनें म्हणितलें । मग पुढती दंडवत घातलें । तेथें सात्विकाचें आलें । भरतें तया ॥ ६७ ॥ मग म्हणतसे प्रसीद । वाचा होतसे सद्गद । काढीं जी अपराध- । समुद्रौनि मातें ॥ ६८ ॥ तुज विश्व-सुहृदातें कहीं । सोयरेपणें न मनूंचि पाहीं । तुज विश्वेश्वराचिया ठायीं । आश्चर्य केलें ॥ ६९ ॥ तूं वर्णनीय परी लोभें ।

---

१ रीतीनें. २ नद्या. ३ गढूळ पाणी. ४ सहन करण्याच्या शक्तीनें. ५ पृथ्वी. ६ अतर्क्य. ७ अपूर्व; अगाध. ८ कृपा करा. ९ स्नेहास.

म्हणून हे अनंता, आणखी अशा अमर्यादेच्या तुम्हांला किती तरी गोष्टी सांगूं? तर मी सर्व अपराधांची रासच आहें. ५५ याकरितां प्रभो, पुढें अथवा पाठीमागें जितक्या म्हणून माझ्या हातून वाईट गोष्टी घडून येतील किंवा आल्या आहेत, तितक्या आईप्रमाणें पोटांत घाला. ५६. एखादे वेळेस नदीचें पाणी गढूळ होऊन समुद्रास मिळण्यास गेलें असतां त्याचा अंगीकार केल्याशिवाय समुद्रास दुसरा उपाय नसतो, ५७ त्याप्रमाणें, प्रीतीनें म्हणा अथवा प्रमादानें म्हणा, देवा, तुम्हांला विरुद्ध अशीं जी जीं भाषणें मी बोललों, तीं तीं, हे मुकुंदा, पोटांत घाला! ५८ देवा, तुमच्या सहन करण्याच्या शक्तीनें ही पृथ्वी प्राणिमात्राचा भार सहन करण्यास समर्थ झाली आहे; म्हणून हे पुरुषोत्तमा, जितकी तुमची विनंती करावी तितकी थोडी आहे. ५९ तर आतां, हे अतर्क्या कृष्णा, तुमचा म्हणविलेला मी तुम्हाला शरण आलों आहें. तर माझ्या सर्व अपराधांची क्षमा करा. ५६०

श्लोकार्थः--तुम्ही या चराचर जगताचे उत्पादक व अति श्रेष्ठ आणि पूज्य असे गुरु आहा. तुमच्या सामर्थ्याला उपमा नाहीं. तुमच्यासारखा या त्रैलोक्यात दुसरा कोणी नाहीं; तेव्हा तुमच्यापेक्षां अधिक कोठून असणार? ॥ ४३ ॥

हे श्रीकृष्णा, तुमचा महिमा मीं आता पूर्ण जाणला आहे. देवा, तुम्ही या चराचराचें उत्पत्तिस्थान आहां. ६१ तुम्ही विष्णु, शंकर आदिकरून सर्व देवांचें परमदैवत आहां; आणि वेदांनाही पढविणारे असे मूळ गुरु तुम्ही आहां. ६२ हे श्रीरामा, तुम्ही गंभीर असून सर्व भूतांचे ठिकाणीं तुमची समदृष्टि आहे. तुम्ही सर्व गुणात अप्रतिम असून अद्वितीय आहा. ६३ तुमच्या बरोबरीचा दुसरा कोणी नाहीं. याचें प्रतिपादन तरी कशाला करावयाचें? कारण, तुम्हीं जें आकाश उत्पन्न केलें आहे, त्यात सर्व जगाचा समावेश होतो. ६४ त्या तुमच्या बरोबरीचें दुसरें कोणी आहे असें म्हणणेंच लज्जास्पद होय. मग तुमच्यापेक्षां दुसरा कोणी अधिक आहे, ही गोष्टच बोलण्यास नको! ६५ म्हणून, सर्व त्रिभुवनांत तुम्ही एकच असून, तुमच्या बरोबरीचा किंवा तुमच्याहून अधिक दुसरा कोणी नाहीं; व तुमचा महिमा अगाध असून तो वर्णन करण्यास आम्ही असमर्थ आहों. ६६

श्लोकार्थः--म्हणून हे देवा, साष्टांग नमस्कार करून, स्तुतीस योग्य व समर्थ अशा तुम्हांला प्रसन्न होण्याकरितां मी प्रार्थना करतों. जसा पिता पुत्राचे ( अपराध ), मित्र मित्राचे (अपराध) आणि पुरुष आपल्या प्रियेचे ( अपराध ) सहन करतो, तसे तुम्हीं माझे ( अपराध ) सहन करण्यास योग्य आहां ॥ ४४ ॥

याप्रमाणें बोलून अर्जुनानें भगवंतास साष्टांग नमस्कार घातला. त्या वेळीं त्याला अष्टसात्त्विक भाव उत्पन्न झाले. ६७ मग गहिंवरून म्हणाला, "कृपा करा, कृपा करा व मला अपराधरूपी समुद्रांतून बाहेर काढा. ६८ तुम्ही आमचे नातेवाईक आहां अशा समजुतीनें तुम्हां विश्वसुहृदाला मीं कधींच मान दिला नाहीं; व तुम्ही सर्व विश्वाचे ईश्वर आहां, असें कोणीं म्हटलें, तर उलट आम्ही आश्चर्य करीत होतों. ६९ तुमचेंच वर्णन करणें

मातें वर्णिसी पां सभे । तरि मियां वलिगजे क्षोभें । अधिकाधिक ॥ ५७० ॥ आतां ऐसिया अपराधां । मर्यादा नाहीं मुकुंदा । म्हणोनि रक्ष रक्ष प्रेमादा- । पासोनियां ॥ ७१ ॥ जी हेंचि विनवावयालागीं । कैची योग्यता माझिया आंगीं । परि अपत्य जैसें सलगी । बापेंसीं बोले ॥ ७२ ॥ पुत्राचे अपराध । जरी जाहले अगाध । तरी पिता साहे निर्द्वंद्वे । तैसें साहिजो जी ॥ ७३ ॥ सख्याचें उद्धत । सखा साहे निवांत । तैसें तुवां समस्त । साहिजो जी ॥ ७४ ॥ प्रियाचिया ठायीं सन्मान । प्रिय न पाहे सर्वथा जाण । तेवीं उच्छिष्ट काढिलें आपण । ते क्षमा कीजो जी ॥ ७५ ॥ नातरी प्राणाचें सोयरें भेटे । मग जीवें भूतलीं जियें संकटें । तियें निवेदितां न वाटे । संकोचु कांहीं ॥ ७६ ॥ कां उखितें आंगें जीवें । आपणपें दिधलें जिया मनोभावें । तिया कांतु मिनलिया न राहवे । हृदय जेवीं ॥ ७७ ॥ तयापरी जी मियां । हें विनविलें तुमतें गोसाविया । आणीक कांहीं- एक म्हणावया । कारण असे ॥ ७८ ॥

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।
तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥

अन्वयः—देवेश, जगन्निवास, अदृष्टपूर्वं ( विश्वरूपं ) दृष्ट्वा ( अहं ) हृषितः अस्मि, मे मनः च भयेन प्रव्यथितं ( अस्ति; अतएव, ) देव त्वं प्रसीद ( च ) तदेव रूपं मे दर्शय ॥ ४५ ॥

( ४९६. विश्वरूपाला भ्यालेला अर्जुन चतुर्भुज पाहाण्याची इच्छा करतो, ५७९-६०८. ) तरि देवेंसीं सलगी केली । जे विश्वरूपाची ओंळी घेतली । ते मायबापें पुरविली । स्नेहाळाचेनि ॥ ७९ ॥ सुरतरूचीं झाडें । आगणीं लावावीं कोडें । देयावें कामधेनूचें पोंडें । खेळावया ॥ ५८० ॥ मियां नक्षत्रीं डांव पाडावा । चंद्र चेंडुवालागीं आणावा । हा छंदु सिद्धी नेला आघवा । माउलिये तुवां ॥ ८१ ॥ जिया अमृतलेशालागीं सायास । तयाचा पाऊस केला चारी मास । पृथ्वी वाहून चासेंचौस । चिंतामणि पेरिले ॥ ८२ ॥ ऐसा कृतकृत्य केला स्वामी । वहुवें लळा पाळिला तुम्हीं । दाविलें जें परमर्हीं । नायकिजे कानीं ॥ ८३ ॥ मीं देखावयाची केउती गोठी । जयाची उपनिषदा नाहीं भेटी । ते जिव्हारींची गांठी । मजलागीं सोडिली ॥ ८४ ॥ जी कल्पादिलागौनी । आजिची घडी धरूनी । माझीं जेतुलीं होउनी । गेलीं जन्में ॥ ८५ ॥ तया आघवियांचिआंतु । घेरडोळी घेऊनि असें पाहतु । परि हीं देखिलीं ऐकिलीं मातु । आतुडेचिना ॥ ८६ ॥ बुद्धीचें जाणणें ।

१ अपराध. २ दुजा भाव सोडून. ३ दाडगेपणा. ४ अपेक्षा करीत नाहीं. ५ उष्टीं. ६ अनुभवशी. ७ सर्वस्व अर्पण केलें. ८ भेटल्यावर. ९ छंद. १० अत्यंत दयाळूपणें. ११ आवडीनें. १२ वासरूं. १३ फासे करावे. १४ चेंडू. १५ वाफ्यावाफ्यानें. १६ तर मग. १७ अंतरंगांतील. १८ घरांचा झाडा. १९ सांपडेना.

योग्य असताही, सभेमध्यें जों जों तुम्हीं माझें प्रेमानें वर्णन करावें, तो तों चढेलपणानें मी अधिक बडबड करावी. ५७० हे मुकुंदा, असे जे माझे हातून एकएक अपराध झाले आहेत, ते अमर्याद आहेत; म्हणून त्या अपराधापासून माझें रक्षण करा! ७१ अहो, अशा प्रकारें तुमची प्रार्थना करण्याची देखील योग्यता माझ्या अंगीं नाहीं, पण लहान मूल जसें बापाशीं लडिवाळपणानें बोलतें, ७२ त्याप्रमाणें, मी हे म्हणतों. प्रभो, पुत्राच्या हातून पुष्कळ अपराध घडले असले तरी पिता दुजा भाव सोडून जसे ते सहन करतो, तसे माझे सर्व अपराध तुम्ही सहन करा! ७३ देवा, मित्राचा उद्धटपणा मित्र जसा निवातपणें सहन करतो, तसे माझे सर्व अपराध तुम्ही सहन करा! ७४ ज्याप्रमाणे आपल्या आवडत्या मित्राकडून आपला सन्मान व्हावा अशी कधीं कोणी अपेक्षा करीत नाहीं, त्याप्रमाणें, (राजसूय यज्ञात) तुम्हीं उष्टीं काढलीं त्याची क्षमा करा. ७५ किंवा आपला जिवलग स्नेही भेटल्यावर, आपण जितकी संकटें अनुभविलीं असतील, तितकीं त्याला सांगण्याचा कधींही संकोच वाटत नाहीं. ७६ अथवा जिनें आपलें तन, मन व आत्माही मनोभावानें आपले पतीस अर्पण केला आहे, अशा पतिव्रता स्त्रीस पतीची गांठ पडल्यावर जशी मनांतील गोष्ट सांगितल्याशिवाय राहवत नाहीं, ७७ त्याप्रमाणें प्रभो, माझे अपराध क्षमा करण्याबद्दल मीं तुम्हांस विनंति केली, परंतु मला आणखी एक गोष्ट विचारावी असें वाटत आहे. ७८

श्लोकार्थः हे देवाधिदेवा जगन्निवासा, पूर्वी कधीं न पाहिलेलें असें विश्वरूप पाहून मला हर्ष झाला; आणि भयानें माझें मन अति व्याकुळ झालें. यास्तव, हे देवा, प्रसन्न व्हा. आणि तुमचें तेंच (पूर्वींचें) रूप मला दाखवा ॥ ४५ ॥

श्रीकृष्णा, तुमच्याशीं सलगी करून ' विश्वरूप दाखवा ' म्हणून जो छंद घेतला, तो अत्यंत दयाळूपणानें तुम्हीं पुरविला. ७९ अंगणात कल्पतरु लावण्याची व कामधेनूचें वासरूं खेळावयास देण्याची माझी हौस पुरविली. ५८० मला ( फाशांच्या ऐवजीं ) खेळण्यास नक्षत्रें द्यावीं, व चेंडूच्या ऐवजीं चंद्र द्यावा, ही माझी सर्व हौस तुम्हीं मातेप्रमाणें पूर्ण केली. ८१ जें अमृत थोडकें मिळविण्यासही श्रम पडतात, त्याचा चार महिने पाऊस पाडला; आणि जमीन उत्तम रीतीनें तयार करून तिच्या प्रत्येक वाफ्यात चिंतामणि पेरले! ८२ याप्रमाणें प्रभो, सर्व गोष्टी मला देऊन माझे लाड पुरविल्यानें मी कृतकृत्य झालो, आणि जें तुम्हीं मला प्रत्यक्ष दाखविलें, त्या विश्वरूपाची गोष्ट शंकर, ब्रह्मदेव यांनीं कानानीं ऐकलीही नाहीं, ८३ मग तें त्यांच्या दृष्टीस कोठून पडणार? हें पहा कीं, उपनिषदांसही ज्याची भेट झाली नाहीं, तें आपलें अंतरंगातील रूप तुम्हीं माझ्याकरितां उघड करून दाखविलें. ८४ कल्पाच्या आरंभापासून आज घटकेपर्यंत जितके माझे जन्म होऊन गेले, ८५ त्या सर्व जन्मात प्रत्येक जन्माचा झाडा घेऊन पाहतो, परंतु या रूपाची गोष्ट मीं कधीं ऐकिली आहे, किंवा हे रूप पाहिलें आहे असें आढळून येत नाहीं. ८६

कांहीं न वेचेचि याचेनि आंगणें। हे सौदही अंतःकरणें। करवेचिना ॥ ८७॥ तेथ डोळ्यां देखी होआवी । ही गोष्टीचि कायसया करावी । किंबहुना पूर्वी । दृष्ट ना श्रुत ॥ ८८ ॥ तें हें विश्वरूप आपुलें । तुम्हीं मज डोळां दाविलें । तरि माझें मन झालें । हृष्ट देवा ॥ ८९ ॥ परि आतां ऐसी चाड जीवीं । जे तुजसी गोठी करावी । जवळीक हे भोगावी । आलिंगायासी॥५९०॥ते याचि रूपीं करूं म्हणिजे । तरि कोणे एके मुखेंसीं चावाळिजे । आणि कवणा खेंवें देइजे । तुज लेख नाहीं ॥ ९१ ॥ म्हणोनि वारियासवें धावणें। नें ठके गगना खेंव देणें। जेंलकेली खेळणें। समुद्रीं केउतें ॥ ९२ ॥ यालागीं जी देवा। एथींचें भय उपजतसे जीवा। म्हणोनि येतुला लेंळा पाळावा । जे पुरे हें आतां ॥ ९३ ॥ पैं चराचर विनोदें पाहिजे। मग तेणें सुखें घरीं राहिजे । तैसें चतुर्भुज रूप तुझें । तो विसांवा आम्हां ॥ ९४ ॥ आम्हीं योगजात अभ्यासावें । तेणें याचि अनुभवा यावें । शास्त्रांतें आलोडावें । परि सिद्धांतु तो हाचि ॥ ९५ ॥ आम्हीं यजनें कीजती सगळें । परि तियें फळावीं येणेंचि फळें । तीर्थें होतु सकळें । याचिलागीं ॥ ९६ ॥ आणीकही कांहीं जें जें । दान पुण्य आम्हीं कीजे । तया फळीं फळ तुझें । चतुर्भुज रूप ॥ ९७ ॥ ऐसी तेथींची जीवा आवडी । म्हणोनि तेंचि देखावया लेंवडसवडी । वर्तत असे ते सांकडी । फेडिजे वेगीं ॥ ९८ ॥ अगा जीवींचें जाणतेया । सकळ विश्व वसवितेया । प्रसन्न होई पूजितया । देवांचिया देवा ॥ ९९ ॥

किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥

अन्वयः—सहस्रबाहो, हे विश्वमूर्ते, अहं त्वा किरीटिनं च गदिनं तथैव चक्रहस्तं द्रष्टुं इच्छामि; (तस्मात्) तेन एव चतुर्भुजेन रूपेण (युक्तः) भव ॥ ४६ ॥

कैसें नीलोत्पलातें रांवितें । आकाशाही रंगु लावित । तेजाची वोजें दावित । इंद्रनीळा ॥ ६०० ॥ जैसा परिमेळ जाहला मेरगजा । कां आनंदासि निघालिया भुजा । ज्याचे जानूवरी मकरध्वजा । जोडली येंरव ॥ १ ॥ मस्तकीं मुकुटातें ठेविलें । कीं मुकुटा मुकुट मस्तक झालें । शृंगारा लेणें लेंधलें । आंगाचेनि जया ॥ २ ॥ इंद्रधनुष्याचिये आंडणी- । माजी मेघ गगनरंगणीं । तैसें आंवरिलें शार्ङ्गपाणी । वैजयंतिया ॥ ३ ॥ आतां कवणी ते उदार गदा । असुरां देत कैवल्य सदा । कैसें चक्र हन गोविंदा । सौम्य तेजें मिरवे ॥ ४ ॥ किंबहुना स्वामी । तें देखावया उत्कंठित पां मी । म्हणोनि आतां तुम्हीं । तैसया होआवें

१ पोहोंचत नाहीं. २ कल्पना. ३ दृष्टीस पडावें. ४ पाहिलें नाहीं व ऐकिलें नाहीं. ५ आनंदित. ६ चोलावें. ७ आलिंगन. ८ गणना. ९ घडत नाहीं. १० जलक्रीडा. ११ हौस. १२ अध्ययन करावें. १३ लगबग. १४ नीलकमलास. १५ रंगवीत. १६ झाक. १७ सुगंध. १८ पाच नावाचें

या विश्वरूपाच्या अंगणात देखील बुद्धीची कल्पना गेली नाहीं, मग अंतःकरणात त्याची आठवण कोठून होणार ? ८७ अशा स्थितींत तें विश्वरूप डोळ्यांनीं पाहावें, याजबद्दल गोष्ट बोलायलाच नको. किम्बहुना असें पूर्वीं कधीं ऐकिलें नाहीं व पाहिलेंही नाहीं. ८८ देवा, तें हें तुमचें विश्वरूप तुम्हीं मला दाखविल्यानें माझें मन आनंदित झालें. ८९ परंतु आता अशी एक मनांत इच्छा उत्पन्न झाली आहे कीं, तुमच्याबरोबर गोष्टी सागून तुमच्या स्नेहाचा उपभोग घ्यावा, व तुम्हाला आलिंगन द्यावें. ५९० तेव्हा तें याच रूपात करूं म्हटलें, तर तुमच्या कोणत्या तोंडाबरोबर बोलावें ? व कोणाला आलिंगन द्यावें ? कारण. तुमच्या रूपाला पार नाहीं. ९१ म्हणून, वाऱ्याबरोबर धावणें अगर गगनाला आलिंगन देणें हें घडावयाचें नाही. समुद्रांत जलक्रीडा कशी करितां येईल ? ९२ याकरितां देवा, या विश्वरूपाचें मला भय वाटतें; म्हणून हें आटोपून घ्यावें, एवढी माझी हौस पुरवावी. ९३ हें पहा—या चराचराचें कौतुकानें अवलोकन करूनही जसें घरींच राहावेंसें वाटतें, त्याप्रमाणें तुमचें चतुर्भुज रूपच आमच्या विश्रांतीचें स्थान होय. ९४ आम्हीं सर्व योगांचा अभ्यास केला तरी त्या योगानें पहावयास मिळणार हेंच; आणि शास्त्राचा विचार केला असतांही याच स्वरूपाचा सिद्धांत होतो. ९५ आम्हीं सर्व यज्ञ केले तरी त्यांची फलप्राप्ति हेंच रूप होय; व याच रूपाकरितां सर्व तीर्थें करावीं लागतात. ९६ आणखीही जें जें काहीं पुण्य अथवा दान आम्ही करतों, त्याची फलप्राप्ति तुमचें चतुर्भुज रूपच होय. ९७ याप्रमाणें त्या चतुर्भुज रूपाची जिवास आवड उत्पन्न होऊन, तें पाहण्याकरितां माझी लगबग उडाली आहे, तर ही माझी अडचण लवकर दूर करा. ९८ अहो, दुसऱ्याच्या मनातील गोष्ट जाणणाऱ्या जगन्निवासा व सकल विश्व वसविणाऱ्या परमपूज्य देवाधिदेवा, मला प्रसन्न व्हा. ९९

श्लोकार्थः—हे सहस्रबाहो, हे विश्वमूर्ते, तुम्हास मुकुट घातलेले आणि हातात गदा, तसेंच चक्र घेतलेले असे पाहावें, अशी माझी इच्छा आहे; म्हणून त्याच चतुर्भुज रूपानें युक्त असे तुम्ही व्हा. ४६

देवा, तुमच्या अंगकांतीचें कोठवर वर्णन करावें ? ज्याच्या योगानें नीलकमलास व आकाशासही निळेपणा येतो, व इंद्रनील मण्याच्या तेजाची झांक पसरते; ६०० ज्याप्रमाणें पाचेला सुगंध सुटावा किंवा आनंदाला हात फुटावे, त्याप्रमाणें प्रभूचे गुडघ्यांवर ( खेळल्यामुळें ) मदनाला शोभा आली. १ प्रभूंनीं मस्तकावर धारण केलेल्या मुगुटास मस्तकाच्या सौंदर्यानें जास्त शोभा येते, व अंगाच्या प्रभेनें शृंगारास शोभा येते; २ इंद्रधनुष्याच्या मधल्या भागात आकाशातील मेघाप्रमाणें श्रीहरीनें गळ्यात घातलेली वैजयंती माळ शोभते; ३ आता, राक्षसांनाही मोक्षपद देणारी प्रभूंच्या हातांतील उदार गदा, व तसेंच हातांतील चक्र किती सौम्य दिसतें ! ४ फार काय, प्रभो, अशी तुमची

रत्न. १९ हात. २० गुडघे. २१ मदनास. २२ शोभा. २३ आली. २४ बैठक; मध्यभाग. २५ धारण केलें. २६ मोक्षपद.

॥ ५ ॥ हे विश्वरूपाचे सोहाळे । भोगूनि निवाले जी डोळे । आतां होताति आंधले । कृष्णमूर्तीलागीं ॥ ६ ॥ तें साकार कृष्णरूपडें । वांचूनि पाहों नावडे । तें न देखतां थोडें । मानिताती हे ॥ ७ ॥ आम्हा भोगमोक्षा[3]चिया ठायीं । श्रीमूर्तीवांचूनि नाहीं । म्हणोनि तैसाचि साकारु होईं । हें सांवरीं[4] आतां ॥ ८ ॥

श्रीभगवानुवाच—( ४९७. विश्वरूपाला पाहून पुन्हां चतर्भुज रूपाला पाहाण्याची इच्छा करतोस. तरी तूं वेडाच आहेस; तं व्यापक स्वरूपाचे ठिकाणीं प्रेम ठेव, ६०९–६३९ )

या अर्जुनाचिया बोला । विश्वरूपा विस्मयो जाहला । म्हणे ऐसा नाहीं देखिला । धसाळ कोणी ॥ ९ ॥

मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।
तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥

अन्वयः—अर्जुन, यत् इदं मे तेजोमयं, विश्व, अनंतं, आद्यं, परं रूपं प्रसन्नेन मया आत्मयोगात् तव दर्शितं ( तत् ) त्वदन्येन दृष्टपूर्वं न ॥ ४७ ॥

कोण हे वस्तु पावला आहासी । तया लाभाचा तोषु न घेसी । मा भेणें[6] काय नेणों बोलसी । हेकाडु ऐसा ॥ ६१० ॥ आम्हीं सावियाचि जैं प्रसन्न होणें । तैं आंगचिवरी म्हणे देणें । वांचोनि जीव असे वेंचणें । कवणासि गा ॥ ११ ॥ तें हें तुझिये चाडे । आजि जीवाचोंचि दें‍ळवाडें । कांमऊनियां येवढें । रचिलें ध्यान ॥ १२ ॥ ऐसी काय नेणों तुझिये आवडी । जाहली प्रसन्नता आमुची वेडी । म्हणोनि गौप्याची ही गुढी । उभविली जगीं ॥१३॥ तें हें अपरां अपार । स्वरूप माझें परात्पर । एथूनि ते अवतार । कृष्णादिक ॥ १४ ॥ हें ज्ञानतेजाचें निखळ । विश्वात्मक केवळ । अनंत हें अढळ । आद्य सकळां ॥१५॥ हें तुजवांचोनि अर्जुना । पूर्वीं श्रुतदृष्ट नाहीं आना । जे जोगें नव्हे साधना । म्हणोनियां ॥ १६ ॥

न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।
एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥

अन्वयः—कुरुप्रवीर, अहं एवंरूपः नृलोके त्वदन्येन न वेदयज्ञाध्ययनैः न दानैः न क्रियाभिः न उग्रैः तपोभिः द्रष्टुं शक्यः ॥ ४८ ॥

याची सोयें पातले । आणि वेदीं मौनाचि घेतलें । यज्ञ कीर माघौते आले । स्वर्गौनियां ॥ १७ ॥ साधकीं देखिला आयासु । म्हणोनि वाळिलें योगाभ्यासु । आणि अध्ययनें सौरसु । नाहीं एथ ॥ १८ ॥ सीगेचीं सत्कर्मे । धाविन्नलीं संभ्रमें । तिहीं बहुतेकीं श्रमें । सत्यलोकु ठाकिला ॥ १९ ॥ तपीं ऐश्वर्य देखिलें । आणि उग्रपण उभयांचि सांडिलें । एवं तपसाधना जें ठेलें । अपारांतरें ॥ ६२० ॥ तें हें तुवां अनायासें । विश्वरूप देखिलें जैसें । इये मनुष्य-

१ मुकेले. २ कमी. ३ भुक्ति व मुक्ति यांच्या. ४ आवरून घ्यावें. ५ अविचारी. ६ भयानें. ७ अडाण्यासारखा. ८ साक्षात्कारानें. ९ समुदाय. १० कमवून; एकत्र करून. ११ गुह्य रूपाची.

सर्व शोभा पहावयास मी उत्सुक झालों आहें; तर तें रूप तुम्ही धारण करा. ५ विश्वरूप पाहण्याचे सोहाळे भोगून माझे डोळे निवाले आहेत, व ते आता कृष्णमूर्ति पाहण्याला भुकेले आहेत. ६ तुमचें गोजिरवाणें कृष्णरूप पाहण्याशिवाय दुसरी कोणतीही इच्छा नाहीं. तें जर दृष्टीस न पडलें, तर त्याच्यापेक्षां विश्वरूपाची किंमत मी कमी मानतो. ७ आम्हांला तुमच्या मूर्तीवाचून भुक्ति व मुक्ति देणारें दुसरें कांहीं नाहीं; म्हणून हें विश्वरूप आतां आवरून, देवा, चतुर्भुज गोजिरवाणें रूप धारण करा. " ८

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणालेः—हे अर्जुना, तें हें माझें सर्वव्यापक, अपार, सर्वांचें मूळ व उत्कृष्ट असें रूप मीं प्रसन्न होऊन आपल्या योगसामर्थ्यानें तुला दाखविलें. हें तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणाला पूर्वी दिसलेलें नाहीं ॥ ४७ ॥

याप्रमाणें अर्जुनाचें बोलणें ऐकून श्रीकृष्णांना मोठें आश्चर्य वाटलें, व ते म्हणाले, " तुझ्यासारखा अविचारी मनुष्य मीं पाहिला नाहीं. ९ अरे, तुला हा कसला लाभ झाला आहे, याचा संतोष न मानतां भीतीनें हेकडासारखा काय बोलतोस ? ६१० आम्ही कोणासही प्रसन्न झालों तर साक्षात्कारींच होतों, परंतु मनापासून प्रसन्न कोणालाही होत नाहीं. ११ तें आमचे मनापासून प्रसन्न होणें तुझ्याचकरितां असून जीवांचे समुदाय एकत्र करून एवढें मोठें ध्यान तयार केलें. १२ माझें मन तुझ्या प्रेमभक्तीनें कसें वेडावलें हें मला कळत नाहीं; म्हणून, आमचें जे परम गुह्य रूप, त्याचा जगतांत ध्वज उभारिला. १३ तें हें माझें अखंड व अनादि स्वरूप असून, याच्यापासून कृष्णादिक अवतार उत्पन्न होतात. १४ हें स्वरूप केवळ ज्ञानतेजानें भरलेलें, विश्वव्यापक, अनंत व दृढ असून सर्वांच्या आरंभींचें आहे. १५ अर्जुना, तुझ्यावाचून हें दुसऱ्या कोणी पूर्वी ऐकिलेलें व पाहिलेलें नाहीं. कारण हें साधनानें प्राप्त होणारें नव्हे. १६

श्लोकार्थः—हे कुरुश्रेष्ठा, या मृत्युलोकीं तुजवाचून दुसऱ्या कोणालाही या प्रकारचें माझें विश्वरूप वेदाध्ययनानें, यज्ञाचरणानें आणि दानानें व कर्माचरणानें, तसेंच उग्र तपाचरणानेंही दृष्टीस पडणें शक्य नाहीं ॥ ४८ ॥

" स्वरूपाचे ठिकाणापर्यंत येतांच वेदानीं मौन धारण केलें; यज्ञ स्वर्गापर्यंत जाऊन मागें परतले; १७ साधकांनीं, योगाभ्यासाच्या ठिकाणीं श्रम पडतात असें पाहून योगाभ्यासच सोडला; आणि अध्ययन करणारासही ह्या स्वरूपापर्यंत येणें सुलभ नाहीं. १८ पूर्णत्वास आलेल्या नित्यनैमित्तिक कर्मांनीं आपल्या मोठेपणाच्या भ्रमानें धाव घेतली, तीं तरी मोठ्या श्रमानें सत्यलोकापर्यंत येतात; १९ तपस्यांनीं याचें ऐश्वर्य पाहून उभ्यानेच आपला उग्रपणा टाकला; याप्रमाणें तपसाधन करणारेही यापासून दूर राहिले; ६२० तें हें विश्वरूप सहजीं जसें तुझ्या दृष्टीस पडलें, तसें या मनुष्यलोकांत कोणालाही दिसलें

१२ ध्वज. १३ अखंड. १४ मायेच्या पलीकडील १५ ठिकाण. १६ श्रम १७ सोडून दिला. १८ सुलभ. १९ पूर्ण. २० आपल्या मोठेपणानें. २१ येतात. २२ उभ्यानेंच, २३ दूर राहिलें.

लोकीं तैसें । न फावेची कवणा ॥ २१ ॥ आजि ध्यानसंपत्तीलागीं । तूंचि एकु आथिला जगीं । हें परमभाग्य आंगीं । विरंचीही[२] नाहीं ॥ २२ ॥

मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।
व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥

अन्वयः—( हे अर्जुन ) मम इदं ईदृक् घोरं रूपं दृष्ट्वा ते व्यथा मा ( अस्तु ) च विमूढभावः ( मा अस्तु ); त्वं व्यपेतभीः प्रीतमनाः ( सन् ) पुनः तत् एव इदं मे रूपं प्रपश्य ॥ ४९ ॥

म्हणोनि विश्वरूपलाभें श्लाघ । एथींचें भय नेघ नेघ । हें वांचूनि अन्य चांग । न मनीं कांहीं ॥ २३ ॥ हां गा समुद्र अमृताचा भरला । आणि अवसांत[५] वरपडा[६] जाहला । मग कोणीही आथी वोसंडिला । बुडिजेल म्हणोनि ॥ २४ ॥ नातरी सोनयाचा डोंगरु । येंसणा न चले हा थोरु । ऐसें म्हणोनि अव्हेरु । करणें घडे ॥ २५ ॥ दैवें चिंतामणि लेइजे । कीं हें ओझें म्हणोनि सांडिजे । कामधेनु दवडिजे । न पोसवे म्हणोनि ॥ २६ ॥ चंद्रमा आलिया घरा । म्हणे निगें[१०] करितोसि उबारा । पडिसांयि पाडितोसि दिनकरा । परता सर ॥ २७ ॥ तैसें ऐश्वर्य हें महातेज । आजि हातां आलें आहे सहज । कीं एथ तुज गजबज । होआवी कां ॥ २८ ॥ परि नेणसीच गांवढिया । काय कोपों आतां धनंजया । आंग सांडोनि छाया । आलिंगितोसि मा ॥ २९ ॥ हें नव्हे जो मी साचें । एथ मन करूनियां कांचें । प्रेम धरिसी अवगणियेचें । चतुर्भुज जें ॥ ६३० ॥ तरि अझूनिवरी पार्था । सांडीं सांडीं हे आस्था । इयेविषयीं अनास्था । करिसी झणें ॥ ३१ ॥ हें रूप जरी घोर । विक्रौति आणी थोर । तरी कृतनिश्चयाचें घर । हेंचि करीं ॥ ३२ ॥ कृपण चित्तवृत्ति जैसी । रोंवोनि घाली ठेवयापासीं । मग नुसधेनि देहेंसीं । आपण असे ॥ ३३ ॥ कां अजातपक्षिया जवळा । जीव बैसवूनि अविसोळां । पक्षिणी अंतराळा- । माजि जाय ॥ ३४ ॥ नाना गाय चरे डोंगरीं । परि चित्त बांधिलें वत्सें घरीं । तैसें प्रेम एथींचें करीं । स्थानपति ॥ ३५ ॥ येरें वरिचिलेनि चित्तें । बाह्य सख्य सुखापुरतें । भोगिजो का श्रीमूर्तीतें । चतुर्भुज ॥ ३६ ॥ परि पुढतपुढती पांडवा । हा एक बोलु न विसरावा । जे इये रूपींहूनी सद्भावा । नेदावें निवों ॥ ३७ ॥ हें कहीं नव्हतेंचि देखिलें । म्हणोनि भय जें तुज उपजलें । तें सांडीं एथ संचलें । असों दे प्रेम ॥ ३८ ॥ आतां करूं तुझ्यासारिखें । ऐसें म्हणितलें विश्वतोमुखें । तरि मागील रूप सुखें । न्याहाळीं पां तूं ॥ ३९ ॥

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।
आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥

१ प्राप्त झालें नाहीं. २ संपत्ति. ३ महादेवाचही. ४ धन्य. ५ अकस्मात्. ६ प्राप्त झाला. ७ सोडला. ८ एवढा. ९ नेतां येत नाहीं. १० निघून जा. ११ पडछाया. १२ पाचरेपणा. १३ कचें; अधीर. १४ अघाटव्य. १५ पंख न फुटलेल्या पिलांस. १६ परटयांत.

नाहीं. २१ आज या जगांत ध्यानसंपत्तीला योग्य असा तूं एकटाच आहेस. ब्रह्मदेवाच्याही नशीबीं या विश्वरूपदर्शनाचा लाभ नाहीं. २२

श्लोकार्थः—हे अर्जुना, हें माझें असलें घोर रूप पाहून तूं भिऊं नको, आणि गोंधळूंही नको; भय सोडून संतुष्ट मनानें माझें हेंच रूप पुनः नीट पहा. ॥ ४९ ॥

" म्हणून, विश्वरूपदर्शनाच्या लाभानें तूं आज धन्य झाला आहेस. बाबारे ! याचें भय मानूं नको, आणि यावांचून दुसरें कांहीं चांगलें आहे असें मनांत देखील आणूं नको. २३ अरे, अमृतानें भरलेला समुद्र जर अकस्मात् प्राप्त झाला, तर आपण त्यांत बुडून मरूं अशा भीतीनें तो कोणी सोडून देईल का ? २४ किंवा सोन्याचा डोंगर दृष्टीस पडल्यावर हा एवढा मोठा कसा नेतां येईल असें म्हणून कोणी सोडून जाईल का ? २५ दैवयोगानें चिंतामणि प्राप्त झाल्यावर तो अंगावर घालण्याचें सोडून, ओझें होतें म्हणून कोणी टाकून देईल का ? तसेंच, कामधेनु प्राप्त झाली असतां, आपल्याला ती पोसवत नाहीं म्हणून तिला कोणी घालवून देईल का ? २६ शीत उत्पन्न करणारा चंद्र जर घरांत आला, तर त्याच्यापासून उष्मा होतो, असें म्हणून त्याला बाहेर जा असें कोणी म्हणेल का ? 'तूं सावली पाडतोस म्हणून पलीकडे जा' असें कोणी सूर्याला म्हणेल काय ? २७ त्याचप्रमाणें, या विश्वरूपाचें ऐश्वर्य आज तुझ्या हातीं सहज लागलें असून तुझ्या अंगीं असा घाबरेपणा कां उत्पन्न व्हावा ? २८ पण अर्जुना, तूं अगदीं गांवढळ असून तुला कांहीं समजत नाहीं. तुला काय म्हणावें ? अरे, तूं अंग सोडून पडछायेला आलिंगन देतोस ! २९ तूं आपलें मन अधीर करून साकार चतुर्भुज रूपावर प्रीति करतोस, पण तें माझें खरें स्वरूप नव्हे. ६३० म्हणून पार्था, अजून तरी चतुर्भुज रूपाची आस्था सोड; व माझ्या विश्वरूपाची अनास्था करूं नको. ३१ हें विश्वरूप जरी भयंकर अवाढव्य आहे, तरी त्याच्या ठिकाणीं तूं आपला पूर्ण निश्चय ठेव. ३२ ज्याप्रमाणें कृपण आपलें मन द्रव्याच्या ठेव्याजवळ ठेवून फक्त शरीरानें जगांत व्यापार करतो, ३३ किंवा पंख फुटले नाहींत अशा पिलांजवळ घरट्यांत आपला जीव ठेवून पक्षिणी भ्रमण करिते, ३४ अथवा गाय जरी डोंगरावर चरत असली तरी तिचें चित्त घरीं बांधलेल्या वांसराकडे असतें, तसें तुझें प्रेम या माझ्या विश्वरूपाचे ठिकाणीं कायम ठेव. ३५ बाकी मनाच्या समाधानाकरितां वरकांतीं माझ्या चतुर्भुज मूर्तीचें ध्यान कर. ३६ परंतु, हे पांडवा, वारंवार हें माझें वाक्य विसरूं नको; कीं या माझ्या स्वरूपापासून तूं आपला भाव दुसरीकडेस जाऊं देऊं नको. ३७ हें तूं पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतेंस, म्हणून तुला भीति उत्पन्न झाली आहे, पण ती सोडून दे; व या विश्वरूपाच्या ठिकाणीं तुझें प्रेम कायम राहूं दे. " ३८ नंतर विश्वरूप धारण करणारे श्रीकृष्ण भगवान म्हणाले, " अर्जुना, तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी आतां आपलें पूर्वीचें चतुर्भुज रूप धारण करतों, तें तूं सुखानें पाहा." ३९

श्लोकार्थः—संजय म्हणालाः—भगवान वासुदेवानीं याप्रमाणें भाषण करून पुनः आपलें रूप अर्जुनाला दाखविलें; आणि अशा सौम्यरूपानें, भ्यालेल्या अर्जुनाला पुनः धीर दिला. ॥ ५० ॥

अन्वयः—इति अर्जुनं उक्त्वा वासुदेवः तथा भूयः स्वकं रूपं दर्शयामास; पुनः सौम्यवपुः भूत्वा ( सः ) महात्मा भीतं एनं च आश्वासयामास ॥ ५० ॥

( ४९८. देवाला अर्जुनाचें वेड लागलें आहे असें संजय म्हणतो, ६४०–६४६ ) ऐसें वाक्य बोलतखेंवों[1] । मागुता मनुष्य जाहला देवो । हें ना परि नेवलावो । आवडीचा तिये ॥ ६४० ॥ श्रीकृष्णाचि कैवल्य उघडें । वरि सर्वस्व विश्वरूपाएवढें । हातीं दिधलें कीं नावडे । अर्जुनासी ॥ ४१ ॥ वस्तु घेऊनि वाळिजे । जैसें रत्नासि दूषण ठेविजे । नातरी कन्या पाहूनियां म्हणिजे । मना नये हे ॥ ४२ ॥ तया विश्वरूपायेवढी दशा । करितां प्रीतीचा वाढु कैसा । शेलें दिधलीसे उपदेशा । किरीटीसि देवें ॥ ४३ ॥ मोडोनि भांगाराचा रवा । लेणे घडिलें आपलिया सवा । मग नावडे जरी जीवा । तरी आटिजे पुढती ॥ ४४ ॥ तैसें शिष्याचिये प्रीती जाहलें । कृष्णत्व होतें तें विश्वरूप केलें । तें मना नयेचि मग आणिलें । कृष्णपण मागुतें ॥ ४५ ॥ हा ठाववरी शिष्याची निकसी । साहाते गुरु आहाती कवणे देशीं । परी नेणिजे आवडी कैसी । संजयो म्हणे ॥ ४६ ॥

( ४९९. अर्जुनाच्या इच्छेकरितां देवानीं चतुर्भुज रूप दाखविलें, ६४७–६५४. ) मग विश्व व्यापूनि भोंवतें । जें दिव्य तेज प्रगटलें होतें । तेंचि सामावलें मागुतें । कृष्णरूपीं तिये ॥ ४७ ॥ जैसें त्वंपद हें आघवें । तत्पदीं सामावे । अथवा द्रुमाकारु सांठवे । बीजकणिके जेविं ॥ ४८ ॥ नातरी स्वप्नसंभ्रमु जैसा । गिळी चेइली[2] जीवदशा । श्रीकृष्णें योगु हा तैसा । संहरिला तो ॥ ४९ ॥ जैसी प्रभा हारपली बिंबीं । कीं जलदसंपत्ति नभीं । भरतें सिंधुगर्भीं । रिगालें राया ॥६५०॥ हो का जे कृष्णाकृतीचिये मोडीं । होती विश्वरूपपटाची घडी । ते अर्जुनाचिये आवडी । उकलुनी दाविली ॥५१॥ तव परिमाणा रंगु । तेणें देखिले साविया चांगु । तेथ ग्राहकीये नव्हेचि लागु । म्हणोनि घडी केली पुढती ॥५२॥ तैसें वाढीचेनि बहुवसपणें । रूपें विश्व जिंतिलें जेणें । तें सौम्य कोडिसवाणें । साकार जाहलें ॥ ५३ ॥ किंबहुना अनंतें । धरिलें धाकुटपण मागुतें । परि आश्वासिलें पार्थातें ।

... ॥ ५४ ॥ ( ५०० ... चतुर्भुज रूप पाहून ... आनंद ...

एवढें वाक्य बोलून देवांनी पुनः लागलीच मनुष्यरूप धारण केलें. ( ज्ञानेश्वर म्हणतातः— ) ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण भक्तांच्या आवडीप्रमाणें पाहिजे तें रूप त्यास घेतां येतें. ६४० श्रीकृष्ण हे केवळ परब्रह्म आणि त्यांनीं विश्वरूपासारखें आपलें सर्वस्व अर्जुनाच्या हातीं दिलें, पण तें त्याला आवडलें नाहीं. ४१ आपणास एखादी वस्तु पाहिजे म्हणून मागून घेऊन ती टाकावी, अथवा रत्नाला दूषण ठेवावें, किंवा एखाद्या मुलीची सर्व विचारपूस करून तिला पाहिल्यावर ' मला ती आवडत नाहीं ' असें म्हणावें, तसा हा प्रकार झाला. ४२ श्रीकृष्णांनीं अर्जुनास, उपदेशाचा शेलका वाटा जें विश्वरूप तें दाखविलें. यापेक्षा आणखी त्याजवर प्रीति तरी कशी करावयाची ! ४३ सोन्याची लागड मोडून आपल्या हौसेप्रमाणें डागिना घडल्यावर तो जर आपल्या मनास न आला तर आटवून जशी त्याची पुनः लगड करावी, ४४ त्याप्रमाणें, अर्जुनाच्या प्रीतीकरिता, कृष्णांनीं विश्वरूप धारण केलें, पण तें त्याला आवडलें नाहीं. म्हणून पुनः कृष्णरूप घेतलें. ४५ अशा प्रकारची शिष्याची जिकीर सहन करणारे गुरु कोठें सांपडतील ? परंतु, संजय म्हणतो, कृष्णाच्या अर्जुनावरील प्रीतीची कमाल झाली. ४६ भगवंतांनीं विश्व व्यापून विश्वरूपाचे जें दिव्य तेज प्रकट केलें होतें, त्याचा पुनः कृष्णरूपांत समावेश केला. ४७ ज्याप्रमाणें ईश्वरस्वरूपांत सर्व जीवस्वरूपाचा समावेश होतो, अथवा बीजांत वृक्षाकार सांठवला जातो, ४८ किंवा स्वप्नाचा विस्तार जागृत झाल्यावर नाहींसा होतो, त्याप्रमाणें श्रीकृष्णांनीं चतुर्भुज मूर्ति धारण करून विश्वरूपाचा योग नाहींसा केला. ४९ जशी सूर्याची प्रभा सूर्यातच लय पावते, अथवा मेघ आकाशांत लय पावतात, किंवा समुद्राची भरती समुद्रातच जिरते; ६५० असें पहा कीं, अर्जुनाच्या आवडीकरिता, कृष्णरूप आकृतींत जी विश्वरूपवस्त्राची घडी घातली होती, ती उघडून दाखविली. ५१ तेव्हां त्या वस्त्राची लांबी, रुंदी व रंग सर्व नीट पाहिल्यावर, गिऱ्हाईक जो अर्जुन, त्यास तें वस्त्र घेण्याची आवड नसल्यामुळें पुनः त्याची घडी घातली. ५२ याप्रमाणें ज्या विश्वरूपाच्या अति वाढण्यानें सर्व जग व्यापून टाकलें होतें, तेंच रूप चतुर्भुज गोजिरवाणें असें झालें. ५३ किंबहुना अनंतानेंच पुन. लहान स्वरूप धारण केलें; आणि अर्जुन जो अगदी भिऊन गेला होता त्याला आश्वासन दिलें. ५४ एखादा मनुष्य स्वप्नांत स्वर्गास गेला असता जसा एकाएकीं जागा होऊन आश्चर्य पावतो, तसा अर्जुन चकित झाला. ५५ किंवा, गुरुकृपा होतांक्षणींच सर्व प्रपंचज्ञान लय पावून ब्रह्माची स्फूर्ति होते, त्याप्रमाणें श्रीमूर्ति पाहून अर्जुनाची स्थिति झाली. ५६ अर्जुनाच्या मनाला असें वाटलें कीं, या चतुर्भुज मूर्तीच्या आड जो विश्वरूपाचा पडदा होता, तो नाहींसा झाला, ही गोष्ट फार उत्तम झाली. ५७ जसें काळाला जिकावें, किंवा भयंकर वाऱ्यांतून सुटून जावें, अथवा सात समुद्र आपल्या

१५ अथवा. १६ समुद्रात. १७ जिरतें. १८ लांबी-रुंदी. १९ गोजीरवाणें. २० नाहींसें झाल्यावर. २१ ब्रह्म. २२ पडदा.

*अन्वयः—इति अर्जुनं उक्त्वा वासुदेवः तथा भूयः स्वकं रूपं दर्शयामास; पुनः सौम्यवपुः भूत्वा ( सः ) महात्मा भीतं एनं च आश्वासयामास ॥ ५० ॥*

( ४९८. देवाला अर्जुनाचें वेड लागलें आहे असें संजय म्हणतो, ६४०-६४६ ) ऐसें वाक्य बोलतखेंवो[1] । मागुता मनुष्य जाहला देवो । हें ना परि नेवलावो[2] । आवडीचा तिये ॥ ६४० ॥ श्रीकृष्णाचि कैवल्य[3] उघडें । वरि सर्वस्व विश्वरूपाएवढें । हातीं दिधलें कीं नावडे । अर्जुनासी ॥ ४१ ॥ वस्तु घेऊनि वाळिजे । जैसें रत्नासि दूषण ठेविजे । नातरी कन्या पाहूनियां म्हणिजे । मना नये हे ॥ ४२ ॥ तया विश्वरूपायेवढी दशा । करितां प्रीतीचा वाढु कैसा । शेलें दिधलीसे उपदेशा । किरीटीसि देवें ॥ ४३ ॥ मोडोनि भांगाराचा रवा । लेणें घडिलें आपालिया सवां । मग नावडे जरी जीवा । तरी आटिजे पुढती ॥ ४४ ॥ तैसें शिष्याचिये प्रीती जाहलें । कृष्णत्व होतें तें विश्वरूप केलें । तें मना नयेचि मग आणिलें । कृष्णपण मागुतें ॥ ४५ ॥ हा ठाववरी शिष्याची निकसी । साहते गुरु आहाती कवणे देशीं । परी नेणिजे आवडी कैसी । संजयो म्हणे ॥ ४६ ॥

( ४९९. अर्जुनाच्या इच्छेकरिता देवानीं चतुर्भुज रूप दाखविलें, ६४७–६५४. ) मग विश्व व्यापूनि भोंवतें । जें दिव्य तेज प्रगटलें होतें । तेंचि सामावलें मागुतें । कृष्णरूपीं तिये ॥ ४७ ॥ जैसें त्वंपद हें आघवें । तत्पदीं सामावे । अथवा द्रुमाकारु सांठवे । बीजकणिके जेवीं ॥ ४८ ॥ नातरी स्वप्नसंभ्रमू जैसा । गिळी चेइली[13] जीवदशा । श्रीकृष्णें योगु हा तैसा । संहरिला तो ॥ ४९ ॥ जैसी प्रभा हारपली बिंबीं । कीं जळदसंपत्ति नभीं । नाना भरतें सिंधुगर्भी । रिगालें राया ॥६५०॥ *हो का जे कृष्णाकृतीचिये मोडीं । होती विश्वरूपपटाची घडी । ते अर्जुना*चिये आवडी । उकलुनी दाविली ॥५१॥ तव परिमाणा रंगु । तेणें देखिले साविया चांगु । तेथ ग्राहकीये नव्हेचि लागु । म्हणोनि घडी केली पुढती ॥५२॥ तैसें वाढीचेनि बहुवसपणें । रूपें विश्व जिंतिलें जेणें । तें सौम्य कोडिसवाणें । साकार जाहलें ॥ ५३ ॥ किंबहुना अनंतें । घरिलें धाकुटपण मागुतें । परि आश्वासिलें पार्थातें । बिहालियासी ॥ ५४ ॥

( ५००. भगवंताचें चतुर्भुज रूप पाहून अर्जुनास आनंद झाला, ६५५–६५९ ) जो स्वप्नीं स्वर्गा गेला । तो अवसांत जैसा चेइला । तैसा विस्मयो जाहला । किरीटीसी ॥ ५५ ॥ नातरी गुरुकृपेसवें । वोसरलेयां प्रपंचज्ञान आघवें । स्फुरे तत्त्व तेंवि पांडवें । श्रीमूर्ति देखिली ॥ ५६ ॥ तया पांडवा ऐसें चित्तीं । आड विश्वरूपाची जवनिका होती । ते फिटोनि गेली परौती । हें भलें जाहलें ॥ ५७ ॥ काय काळातें जिणोनि आला । कीं महावातु मागा सांडिला । आपु-

---

१ क्षणींच. २ आश्चर्य. ३ परब्रह्म. ४ टाकावी. ५ उत्तम वाटा. ६ सोन्याची लगड. ७ हौस. ८ जिकीर. ९ सहन करणारे. १० वृक्ष. ११ बीजांत. १२ विस्तार १३ जागी झालेली. १४ मेघ.

एवढें वाक्य बोलून देवांनीं पुनः लागलीच मनुष्यरूप धारण केलें. ( ज्ञानेश्वर म्हणतातः— ) ह्यात कांहीं आश्चर्य नाहीं. कारण भक्तांच्या आवडीप्रमाणें पाहिजे तें रूप त्यांस घेतां येतें. ६४० श्रीकृष्ण हे केवळ परब्रह्म आणि त्यांनीं विश्वरूपासारखें आपलें सर्वस्व अर्जुनाच्या हातीं दिलें, पण तें त्याला आवडलें नाहीं. ४१ आपणास एखादी वस्तु पाहिजे म्हणून मागून घेऊन ती टाकावी, अथवा रत्नाला दूषण ठेवावें, किंवा एखाद्या मुलीची सर्व विचारपूस करून तिला पाहिल्यावर ' मला ती आवडत नाहीं ' असें म्हणावें, तसा हा प्रकार झाला. ४२ श्रीकृष्णांनीं अर्जुनास, उपदेशाचा शेलका वांटा जें विश्वरूप तें दाखविलें. यापेक्षा आणखी त्याजवर प्रीति तरी कशी करावयाची ! ४३ सोन्याची लागड मोडून आपल्या हौसेप्रमाणें डागिना घडल्यावर तो जर आपल्या मनास न आला तर आटवून जशी त्याची पुन. लगड करावी, ४४ त्याप्रमाणें, अर्जुनाच्या प्रीतीकरितां, कृष्णांनीं विश्वरूप धारण केलें, पण तें त्याला आवडलें नाहीं. म्हणून पुनः कृष्णरूप घेतलें. ४५ अशा प्रकारची शिष्याची जिकीर सहन करणारे गुरु कोठें सांपडतील ? परंतु, संजय म्हणतो, कृष्णाच्या अर्जुनावरील प्रीतीची कमाल झाली. ४६ भगवंतांनीं विश्व व्यापून विश्वरूपाचें जें दिव्य तेज प्रकट केलें होतें, त्याचा पुनः कृष्णरूपांत समावेश केला. ४७ ज्याप्रमाणें ईश्वरस्वरूपांत सर्व जीवस्वरूपाचा समावेश होतो, अथवा बीजांत वृक्षाकार सांठवला जातो, ४८ किंवा स्वप्नाचा विस्तार जागृत झाल्यावर नाहींसा होतो, त्याप्रमाणें श्रीकृष्णांनीं चतुर्भुज मूर्ति धारण करून विश्वरूपाचा योग नाहींसा केला. ४९ जशी सूर्याची प्रभा सूर्यातच लय पावते, अथवा मेघ आकाशांत लय पावतात, किंवा समुद्राची भरती समुद्रातच जिरते; ६५० असें पहा कीं, अर्जुनाच्या आवडीकारितां, कृष्णरूप आकृतीत जी विश्वरूपवस्त्राची घडी घातली होती, ती उघडून दाखविली. ५१ तेव्हां त्या वस्त्राची लांबी, रुंदी व रंग सर्व नीट पाहिल्यावर, गिऱ्हाईक जो अर्जुन, त्यास तें वस्त्र घेण्याची आवड नसल्यामुळें पुनः त्याची घडी घातली. ५२ याप्रमाणें ज्या विश्वरूपाच्या अति वाढण्यानें सर्व जग व्यापून टाकलें होतें, तेंच रूप चतुर्भुज गोजिरवाणें असे झाले. ५३ किंबहुना अनंतानेंच पुनः लहान स्वरूप धारण केलें; आणि अर्जुन जो अगदीं भिऊन गेला होता त्याला आश्वासन दिलें. ५४ एखादा मनुष्य स्वप्नात स्वर्गास गेला असता जसा एकाएकीं जागा होऊन आश्चर्य पावतो, तसा अर्जुन चकित झाला. ५५ किंवा, गुरुकृपा होतांक्षणींच सर्व प्रपंचज्ञान लय पावून ब्रह्माची स्फूर्ति होते, त्याप्रमाणे श्रीमूर्ति पाहून अर्जुनाची स्थिति झाली. ५६ अर्जुनाच्या मनाला असें वाटलें कीं, या चतुर्भुज मूर्तीच्या आड जो विश्वरूपाचा पडदा होता, तो नाहींसा झाला, ही गोष्ट फार उत्तम झाली. ५७ जसें काळाला जिकावें, किंवा भयंकर वाऱ्यांतून सुटून जावें, अथवा सात समुद्र आपल्या

१५ अथवा. १६ समुद्रात. १७ जिरतें. १८ लांबी-रुंदी. १९ गोजीरवाणें. २० नाहींसें झाल्यावर. २१ ब्रह्म. २२ पडदा.

लिया वाहीं उतरला । सातही सिंधु ॥ ५८ ॥ अर्जुन उवाचः—अवतरणः—ऐसा संतोष घड्ड चित्तें । घेइजत असे पंडुसुतें । विश्वरूपापाठीं कृष्णातें । देखोनियां ॥ ५९ ॥ ( ५०१. अर्जुन म्हणतो, मी चतुर्भुज रूप पाहून सुखी झालों, ६६०–६७२ ) मग सूर्याचिया अस्तमानीं । मागुती तारा उगवती गगनीं । तैसा देखों लागला अवनी । लोकांसहित ॥ ६६० ॥ पाहे तंव तेंचि कुरुक्षेत्र । तैसेंचि देखे दोहीं भागीं गोत्र । वीर वर्षताति शस्त्रास्त्र । संघाटवरी ॥ ६१ ॥ तया बाणांचिया मांडवाआंतु । तैसाचि रथु देखे निवांतु । धुरे बैसला लक्ष्मीकांतु । आपण तळीं ॥ ६२ ॥

दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।
इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥

अन्वयः—जनार्दन, तव इदं मानुषं सौम्यं रूपं दृष्ट्वा ( अहं ) इदानीं सचेताः प्रकृतिं गतः संवृत्तः अस्मि ॥ ५१ ॥

एवं मागितलें जैसें तैसें । तेणें देखिलें वीरविलासें । मग म्हणे जियालों ऐसें । जाहलें आता ॥ ६३ ॥ बुद्धीतें सांडोनि ज्ञान । भेणें वेंळघलें रान । अहंकारेंसीं मन । देशधडी जाहलें ॥ ६४ ॥ इंद्रियें प्रवृत्ती भुललीं । वाचा आपणा चुकली । ऐसी आपांपैंरी होती जाली । शरीरग्रामीं ॥६५॥ तियें आधवींचि मागुतीं । जिवातें भेटलीं प्रकृतीं । आतां जितेणें श्रीमूर्ती । जाहलें मियां ॥ ६६ ॥ ऐसें सुख जीवीं घेतलें । मग श्रीकृष्णातें म्हणितलें । मियां तुमचें रूप देखिलें । मानुष हें ॥ ६७ ॥ हें रूप दाखवणें देवराया । कीं मज अपत्या चुकलिया । बुझावोनि तुवां माया । स्तनपान दिधलें ॥ ६८ ॥ जी विश्वरूपाचिया सागरीं । होतों तरंग मविते वरेरी । तो इये निजमूर्तीच्या तीरीं । निगालों आतां ॥ ६९ ॥ आइकें द्वारकापुरसुहाडा । मज सुकतिया जी झाडा । हे भेटी नव्हे वेंहुडा । मेघाचा केला ॥ ६७० ॥ जी सावियाचि तृषा फुटला । तया मज अमृतसिंधु हा भेटला । आतां जिणयाचा जाहला । मज भरवंसा ॥ ७१ ॥ माझिया हृदयरंगणीं । होताहे हरिख-लतांची लावणी । सुखेंसीं बुंझावणी । जाहली मज ॥ ७२ ॥

श्रीभगवानुवाच.—

सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम । देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥५२॥

अन्वयः—यत् मम सुदुर्दर्शं इदं रूपं दृष्टवान् असि, देवाः अपि अस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ( सन्ति ) ॥ ५२ ॥

( ५०२. देव म्हणतात, विश्वरूपदर्शनाची इच्छा देव करतात आणि तूं त्याची अवहेलना करतोस, ६७३–६८४ ) यया पार्थ[illegible] बोलासरें [illegible] राय म्हणितलें देवें । तुवा प्रेम ठेवूनि यावें । विश्वरूपीं [illegible] ॥ म[illegible] । भेटावें सडिया आयती । ते शिकवण सुभद्रापती [illegible] मा [illegible] । आंब- ळिया अर्जुना । हाता आलिया मेरुही होय [illegible]

हातांनीं तरून जावें, ५८ त्याप्रमाणें, विश्वरूपानंतर श्रीकृष्णरूप पाहिल्यावर अर्जुनाच्या चित्तांत फार समाधान झालें. ५९ मग, सूर्य अस्तास गेल्यावर जशा आकाशांत चांदण्या पुनः चमकूं लागतात, त्याप्रमाणें विश्वरूप नाहींसें झाल्यावर अर्जुनास सर्वलोकसमुदायासह पृथ्वी दृष्टीस पडली; ६६० आणि पाहतो तों तेंच कुरुक्षेत्र असून आपल्या व शत्रूच्या सैन्यात सर्व गोत्रज आहेत व एकमेकांवर शस्त्रास्त्राचा वर्षाव करीत असून, ६१ त्यांनीं टाकलेल्या बाणांच्या मंडपाखालीं आपला रथ जागच्या जागीं उभा आहे, व भगवान लक्ष्मीपति धुऱ्यावर बसलेले असून आपण रथाखालीं उभे आहों. ६२

श्लोकार्थः—अर्जुन म्हणाला, हे जनार्दना, हें तुमचें सौम्य मानवरूप पाहून आतां मी सावध होऊन माझें मन पूर्ववत् स्वस्थ झालें आहे ॥ ५१ ॥

याप्रमाणें, .वीरश्रेष्ठ अर्जुनानें जसें मागितलें, तसें प्रभूचें पूर्ववत् स्वरूप पाहिल्यावर तो मग म्हणालाः—महाराज ! खरोखर मी आतां वाचलों असें मला वाटतें. ६३ ज्ञान हें बुद्धीला सोडून भीतीनें रानांत शिरलें होतें, अहंकारासह मन हें देशोधडीस लागलें होतें, ६४ इंद्रियांचे व्यापार बंद झाले होते, वाचा बोलणें विसरली होती, आणि याप्रमाणें शरीररूप गांवांत अव्यवस्था झाली होती; ६५ ही सर्व अव्यवस्था मोडून इंद्रियें आपआपला व्यापार करूं लागलीं, म्हणून श्रीकृष्णमूर्तीच्या दर्शनानें .मी आता खास वाचलों असें त्यास वाटलें. ६६ याप्रमाणें अंतर्यामीं सुख पावून अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला कीं, " देवा, तुम्हीं हें जें मनुष्यरूप धारण केलें तें मीं डोळे भरून पाहिलें. ६७ देवराया, आपण या रूपाचें दर्शन मला दिलें, हें मज चुकलेल्या लेंकरास समजावून त्वां मातेनें स्तनपान दिलें. ६८ विश्वरूपसमुद्रांत जो मी हातांनीं लाटांचें पाणी तोडीत होतों, तो आता या तुमच्या चतुर्भुज मूर्तिरूप तीराला येऊन लागलों. ६९ हे द्वारकावासी वीरश्रेष्ठा, आपण मला हें दर्शन दिलें नाहीं, तर मज सुकून चाललेल्या वृक्षावर मेघवर्षाव केला ! ६७० महाराज, सहजगत्या तहान लागलेल्या मला हा अमृतसिंधुच भेटला. आतां, मी वाचेन किंवा नाहीं हा जो अविश्वास उत्पन्न झाला होता तो नाहींसा झाला. ७१ माझ्या हृदयरूप अंगणांत हर्षरूप वेलीची लावणी होऊन त्यापासून मला आनंद व ज्ञान झालें." ७२

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणाले, ( हे अर्जुना ) हें पाहण्यास अति अशक्य असें जें माझें रूप तूं पाहिलेंस, तें रूप पहावें असें देव देखील निरंतर इच्छितात ॥ ५२ ॥

हें अर्जुनाचें भाषण ऐकल्याबरोबर श्रीकृष्ण म्हणालेः—अरे हें काय ! विश्वरूपावर प्रेम ठेव, ७३ आणि मग या चतुर्भुज मूर्तीला भेटण्याकरितां फक्त शरीरानें ये, हें जें मीं तुला पूर्वीं शिकविलें, तें विसरलास का ! ७४ अरे अर्जुना, अंधळयाच्या हातीं सोन्याचा

१ पृथ्वी. २ समुदायानें. ३ स्थिर; जागच्या जागीं. ४ अर्जुनानें. ५ वाचलों. ६ शिरले. ७ अव्यवस्था. ८ सांप्रत. ९ वाचलों. १० समजावून. ११ मोडीत. १२ वीरश्रेष्ठा. १३ वृष्टि. १४ ज्ञान.

जरी मेरु पर्वत लागला, तरी त्याला तो लहानच वाटतो, ही चूक मनाच्या भावनेची आहे; ७५ तर बाबा, आम्हीं जें विश्वव्यापक रूप तुला दाखविलें, तें तप केल्यानें शंकरासही प्राप्त होत नाहीं; ७६ आणि हे किरीटी, अष्टांगयोगसाधनांनीं योगी जरी शिणले, तरी त्यांनाही जें विश्वरूप पाहण्याला सापडत नाहीं, ७७ तें विश्वरूप एकदां तरी थोडेसें दृष्टीस पडावें असें घोकता घोकतां देवांचेंही आयुष्य निघून जातें; ७८ आशारूप ओंजळ हृदयरूप कपाळावर ठेवून (अतिशय आशाबद्ध होऊन) चातक पक्षी जसा मेघाची वाट पहात आकाशाकडे बघत बसतो, ७९ त्याप्रमाणें उत्सुक होऊन मोठे मोठे देव ज्याच्या भेटीची आठही प्रहर इच्छा करितात, ६८० पण त्यांपैकीं कोणी स्वप्नांत देखील जें पाहिलें नाहीं, तें विश्वरूप प्रत्यक्ष मोठ्या आनंदानें त्वां पाहिलें. ८१

श्लोकार्थः—हे अर्जुना, तुला जसें माझें दर्शन झालें, तसें वेदाध्ययनानें, तपानें, दानानें किंवा यज्ञानें देखील कोणाला होऊं शकणार नाहीं ॥ ५३ ॥

हें बघ अर्जुना; या विश्वरूपाचें दर्शन होण्यास कांहीं मार्ग नाहींत, म्हणून चारी वेदांनीं सहा शास्त्रांसह माघार घेतली. ८२ हे धनुर्धरा, माझ्या विश्वरूपासमोर येण्यास पुष्कळ तपेंही समर्थ नाहींत. ८३ ज्याप्रमाणें तूं अनायासें माझें विश्वरूप पाहिलेंस, त्याप्रमाणें तें दानें व यज्ञ करणाऱ्यांच्याही दृष्टीस पडणें कठीण आहे. ८४ असा जो मीं, तो एकच उपायानें सांपडेन; ध्यानांत ठेव. तो उपाय हा कीं, जर अंतःकरण भक्तियुक्त होईल, तरच माझ्या विश्वरूपाचें दर्शन होईल. ८५

श्लोकार्थः—हे परंतपा अर्जुना, माझें विश्वरूप खरोखर जाणण्याला, पहाण्याला व तद्रूप होण्याला एक अनन्यभक्तिच साधन आहे ॥ ५४ ॥

परंतु ती भक्ति, पावसाच्या धारा आकाशांतून सुटल्यावर त्यांना जशी पृथ्वीवर येऊन पडल्याशिवाय दुसरी गतिच नाहीं, त्याप्रमाणें जर एकनिष्ठ असेल; ८६ किंवा ज्याप्रमाणें गंगा आपल्यांत मिळालेले सर्व ओघ घेऊन समुद्रास मिळण्याकरितां जाते, व तिच्या ओघांत व समुद्रांत मिळण्यांत खंड न पडून तिला दुसरी गति नसते, ८७ त्याप्रमाणें अष्टसात्त्विकभावांनीं जो सर्वत्र सारखें प्रेम धरतो, तो मजप्रत प्राप्त होऊन मद्रूप होतो; ८८ आणि ज्याप्रमाणें क्षीरसमुद्र हा कांठाशीं व मध्यभागीं सारखाच गोड असतो; त्याप्रमाणें, मीं सर्वत्र सारखाच आहें. ८९ त्याचप्रमाणें, माझ्यापासून मुंगीपर्यंत किंबहुना स्थावरजंगम प्राणिमात्राचे ठिकाणीं ज्यांना भजन करण्यास द्वैतभावच उरत नाहीं, ६९० अशी ज्या वेळेस चित्तवृत्ति होते, त्याच वेळेस माझ्या विश्वरूपाचें ज्ञान होतें, आणि ज्ञान झालें म्हणजे अर्थात् दर्शनही होतें. ९१ मग जसें लाकडापासून अग्नि उत्पन्न होऊन लांकूड पेटल्यावर लाकूड हें नांव नाहींसें होऊन तें अग्निरूप बनतें, ९२ किंवा जोंपर्यंत सूर्य व

७ समुदाय. ८ उपाय. ९ कठीण. १० अनायासें. ११ सापडे. १२ सुटका. १३ खंड न पडता. १४ सावरत नाहीं. १५ दृष्टीस पडतों. १६ लांकडात. १७ उत्पन्न होतो. १८ असतो. १९ सूर्य व चंद्र यानीं.

भावों ॥ ७५ ॥ तरि विश्वात्मक रूपडें । जें दाविलें आम्हीं तुजपुढें । तें शंभूही परि न जोडे । तपें करितां ॥ ७६ ॥ आणि अष्टांगादिसंकटीं । योगी शिणताति किरीटी । परि अवसरु नाहीं भेटी । जयाचिये ॥ ७७ ॥ तें विश्वरूप एकादे वेळ । कैसेनि देखों अळुमाळ । ऐसें स्मरतां काळ । जातसे देवां ॥ ७८ ॥ आशेचिया अंजुळी । ठेवूनि हृदयाचिया निडळीं । चातक निरोळीं । लागले जैसे ॥ ७९ ॥ तैसे उत्कंठानिर्भर । होऊनियां सुरवर । घोकीत आठही पाहार । भेटी जयाची ॥ ६८० ॥ परि विश्वरूपासारिखें । स्वप्नींही कोण्ही न देखे । तें प्रत्यक्ष तुवां सुखें । देखिलें हें ॥ ८१ ॥

*नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।*
*शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥*

अन्वयः—त्वं यथा मां दृष्टवान् असि एवंविधः अहं न वेदैः, न तपसा, न दानेन, न च इज्यया द्रष्टुं शक्यः ( अस्मि ) ॥ ५३ ॥

पैं उपायांसि वाटा । न वाहती एथ सुभटा । साहीसहित वोहटा । वाहिला वेदीं ॥ ८२ ॥ मज विश्वरूपाचिया मोहरा । चालावया धनुर्धरा । तपांचियाही संभारा । नव्हेचि लागू ॥ ८३ ॥ आणि दानादि कीर कानडें । मी यज्ञींही तैसा न सांपडें । जैसेनि कां सुरवाडें । देखिला तुवां ॥ ८४ ॥ ( ५०३. *भक्तीनें मला जाणून माझ्या स्वरूपाशीं एकरूप हो, ६८५–६९५* ) *तैसा मी एकीचि परी । आंतुडें* गा अवधारीं । जरीं भक्ति येऊनि वरी । चित्तातें गा ॥ ८५ ॥

*भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।*
*ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४ ॥*

अन्वयः—परंतप अर्जुन, एवंविधः अहं अनन्यया भक्त्या तु तत्त्वेन ज्ञातुं द्रष्टुं च प्रवेष्टुं शक्यः ( अस्मि ) ॥ ५४ ॥

परि तेचि भक्ति ऐसी । पर्जन्याची सुटिका जैसी । धरावांचूनि अनारिसी । गतीचि नेणे ॥ ८६ ॥ कां सकळ जळसंपत्ति । घेऊनि समुद्रातें गिंवसिती । गंगा जैसी अनन्यगती । मीनलीच मिळे ॥ ८७ ॥ तैसें सर्वभावसंभारें । न धरतें प्रेम एकसरें । मजमाजि संचरे । मीचि होउनी ॥ ८८ ॥ आणि तेवींचि मी ऐसा । थडिये माझारीं सरिसा । क्षीराब्धि कां जैसा । क्षीराचाचि ॥ ८९ ॥ तैसें मजलागुनी मुंगीवरी । किंबहुना चराचरीं । भजनासि कां दुसरी । परीचि नाहीं ॥ ६९० ॥ तयाचि क्षणासवें । एवंविध मी जाणवें । जाणितला तरी स्वभावें । दृष्टही होयें ॥ ९१ ॥ मग इंधनीं[६] अग्नि उद्दीपे । आणि इंधन हे भाष हारपे । तें आग्निचि होऊनि आरोपे । मूर्त जेवीं ॥ ९२ ॥ कां उदय न कीजे तेजोकारें । तंव गगनाचि होऊन असे आंधारें । मग उदेलिया एकसरें । प्रकाशु होय ॥ ९३ ॥ तैसें माझिये साक्षात्कारीं ।

१ कपाळावर. २ आकाशाकडे. ३ उत्सुक. ४ सहा शास्त्रांसह. ५ ओहोट, माघार घेतली. ६ समोर.

जरी मेरु पर्वत लागला, तरी त्याला तो लहानच वाटतो, ही चूक मनाच्या भावनेची आहे; ७५ तर बाबा, आम्हीं जें विश्वव्यापक रूप तुला दाखविलें, तें तप केल्यानें शंकरासही प्राप्त होत नाहीं; ७६ आणि हे किरीटी, अष्टांगयोगसाधनांनी योगी जरी शिणले, तरी त्यांनाही जें विश्वरूप पाहण्याला सापडत नाहीं, ७७ तें विश्वरूप एकदां तरी थोडेसें दृष्टीस पडावें असें घोकता घोकतां देवांचेंही आयुष्य निघून जातें; ७८ आशारूप ओंजळ हृदयरूप कपाळावर ठेवून ( अतिशय आशाबद्ध होऊन ) चातक पक्षी जसा मेघाची वाट पहात आकाशाकडे बघत बसतो, ७९ त्याप्रमाणें उत्सुक होऊन मोठे मोठे देव ज्याच्या भेटीची आठही प्रहर इच्छा करितात, ६८० पण त्यांपैकीं कोणी स्वप्नांत देखील जें पाहिलें नाहीं, तें विश्वरूप प्रत्यक्ष मोठ्या आनंदानें त्वां पाहिलें. ८१

श्लोकार्थः—हे अर्जुना, तुला जसें माझें दर्शन झालें, तसें वेदाध्ययनानें, तपानें, दानानें किंवा यज्ञानें देखील कोणाला होऊं शकणार नाहीं ॥ ५३ ॥

हें बघ अर्जुना; या विश्वरूपाचें दर्शन होण्यास कांहीं मार्ग नाहींत, म्हणून चारी वेदांनीं सहा शास्त्रांसह माघार घेतली. ८२ हे धनुर्धरा, माझ्या विश्वरूपासमोर येण्यास पुष्कळ तपेंही समर्थ नाहींत. ८३ ज्याप्रमाणें तूं अनायासें माझें विश्वरूप पाहिलेंस, त्याप्रमाणें तें दानें व यज्ञ करणाऱ्यांच्याही दृष्टीस पडणें कठीण आहे. ८४ असा जो मीं, तो एकच उपायानें सांपडेन; ध्यानांत ठेव. तो उपाय हा कीं, जर अंतःकरण भक्तियुक्त होईल, तरच माझ्या विश्वरूपाचें दर्शन होईल. ८५

श्लोकार्थः—हे परंतपा अर्जुना, माझें विश्वरूप खरोखर जाणण्याला, पहाण्याला व तद्रूप होण्याला एक अनन्यभक्तिच साधन आहे ॥ ५४ ॥

परंतु ती भक्ति, पावसाच्या धारा आकाशातून सुटल्यावर त्यांना जशी पृथ्वीवर येऊन पडल्याशिवाय दुसरी गतिच नाहीं, त्याप्रमाणें जर एकनिष्ठ असेल; ८६ किंवा ज्याप्रमाणें गंगा आपल्यांत मिळालेले सर्व ओघ घेऊन समुद्रास मिळण्याकरितां जाते, व तिच्या ओघात व समुद्रांत मिळण्यांत खंड न पडून तिला दुसरी गति नसते, ८७ त्याप्रमाणें अष्टसात्त्विकभावानीं जो सर्वत्र सारखें प्रेम धरतो, तो मजप्रत प्राप्त होऊन मद्रूप होतो; ८८ आणि ज्याप्रमाणें क्षीरसमुद्र हा कांठाशीं व मध्यभागीं सारखाच गोड असतो; त्याप्रमाणें, मी सर्वत्र सारखाच आहें. ८९ त्याचप्रमाणें, माझ्यापासून मुंगीपर्यंत किंबहुना स्थावरजंगम प्राणिमात्राचे ठिकाणीं ज्यांना भजन करण्यास द्वैतभावच उरत नाहीं, ६९० अशी ज्या वेळेस चित्तवृत्ति होते, त्याच वेळेस माझ्या विश्वरूपाचें ज्ञान होतें, आणि ज्ञान झालें म्हणजे अर्थात् दर्शनही होतें. ९१ मग जसें लांकडापासून अग्नि उत्पन्न होऊन लांकूड पेटल्यावर लाकूड हें नांव नाहींसें होऊन तें अग्निरूप बनतें, ९२ किंवा जोंपर्यंत सूर्य व

७ समुदाय. ८ उपाय. ९ कठीण. १० अनायासें. ११ सापडे. १२ सुटका. १३ खंड न पडता. १४ सावरत नाहीं. १५ दृष्टीस पडतों. १६ लाकडात. १७ उत्पन्न होतो. १८ असतो. १९ सूर्य व चंद्र यांनीं.

सरे अहंकाराची वारी । अहंकारलोपीं अवधारीं । द्वैत जाय ॥ ९४ ॥ मग मी तो हें आघवें । एक मीचि आथी स्वभावें । किंबहुना सामावे । सैंमरसें तो ॥ ९५ ॥

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः। निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥**

अन्वयः—पांडव, यः मत्कर्मकृत् मत्परमः संगवर्जितः सर्वभूतेषु निर्वैरः मद्भक्तः ( अस्ति ), सः मां एति ॥ ५५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनयोगो नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

( ५०४. अर्जुना, निर्वैर व निःसंग होऊन सर्व कर्मे माझ्यासाठीं कर, ६९६-६९९ ) जो मजचि एकालागीं । कर्मे वाहतसे आगीं । जया मजवांचोनि जगीं । गोमटें नाहीं ॥ ९६ ॥ दृष्टादृष्ट सकळ । जयाचें मीचि केवळ । जेणें जिणयाचें फळ । मजचि नाम ठेविलें ॥ ९७ ॥ मग भूतें हे भाप विसरला । जे दिठी मीचि आहें सूदला । म्हणोनि निर्वैर जाहला । सर्वत्र भजे ॥ ९८ ॥ ऐसा जो भक्तु होये । तयाचें त्रिधातुक हें जैं जाये । तें मीचि होऊनि ठायें । पांडवा गा ॥ ९९ ॥ ( ५०५. देवाचें भाषण संजय राजाला सांगतो, ७०० ) ऐसें जगदुदरदोंदिलें । तेणें करुणारसरसाळें । संजयो म्हणे बोलिलें । श्रीकृष्णदेवें ॥ ७०० ॥ ( ५०६. देवाचीं दोन्हीं रूपें पाहून चतुर्भुज रूपाचा आनंद वाटला, पण तो देवाला आवडला नाहीं; कारण एकदेशी रूपापेक्षा व्यापक रूप चांगलें म्हणून; ७०१–७०४ ) ययावरी तो पांडुकुमरु । जाहला आनंदसंपदा थोरु । आणि कृष्णचरणचतुरु । एक तो जगीं ॥ १ ॥ तेणें देवाचिया दोनही मूर्ती । निकिया न्याहाळिलिया चित्तीं । तंव विश्वरूपाहूनि कृष्णाकृतीं । देखिला लाभु ॥ २ ॥ परि तयाचिये जाणिवे । मानु न कीजेचि देवें । जे व्यापकाहूनि नव्हे । एकदेशी ॥ ३ ॥ हेंचि सैंमर्थावयालागीं । एक दोन चांगी । उपपत्ती शार्ङ्गी । दाविता जाहला ॥ ४ ॥ (ओवी ७०५ पुढील अध्यायाचें बीज ) ( ५०७. अर्जुन म्हणतो, दोन्ही रूपांपैकीं चांगलें कोणतें हें देवाला विचारूं, असा पुढील अध्यायाचा प्रस्ताव, ७०५ ) तिया ऐकोनि सुभद्राकांतु । चित्तीं आहे म्हणतु । तरि होय बरवें दोहींआंतु । तें पुढती पुसों ॥ ५ ॥ ( ५०८. अर्जुनाच्या प्रश्न करण्याच्या हातोटीचें वर्णन, ७०६-७०७ ) ऐसा आलोचु करूनि जीवीं । आतां पुसती वोजे बरवी । आदरील ते परिसावी । पुढें कथा ॥ ६ ॥ प्रांजळ ओवीप्रबंधें । गोष्टी सांगिजेल विनोदें । तें परिसा आनंदें । ज्ञानदेवो म्हणे ॥ ७ ॥ ( ५०९. ओव्यारूप फुलें, ज्ञानेश्वर म्हणतात, मीं विश्वरूपचरणीं अर्पण केलीं, ७०८ ) भरोनि सद्भावाची अंजुळी । मियां वोंवियाफुलें मोकळीं । अर्पिलीं अंघ्रियुगुळीं । विश्वरूपाच्या ॥ ७०८ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां एकादशोऽध्यायः ।
श्लोक ५५, ओंव्या ७०८.

---

चंद्र हे उगवले नाहींत तोंपर्यंत गगन अंधकारानें भरलेलें असतें, मग तेच उगवल्यावर जसा सर्वत्र प्रकाश होतो, ९३ त्याप्रमाणें, माझ्या विश्वरूपाचा प्रत्यय आल्यावर अहंकार नाहींसा होतो, व अहंकार नाहींसा झाल्यावर द्वैतभाव नाहींसा होतो, असें समज. ९४ मग मी, तो, वगैरे भाव नाहींसा होऊन सर्वत्र मीच भरलेला आहें असें जेव्हां हृदयांत बिंबतें, तेव्हां त्याच्या अंगात पूर्ण एकत्व येतें. ९५

श्लोकार्थः—हे पांडवा, माझ्या उद्देशानें कर्म करणारा, मीच ज्याचे सर्वस्व आहे, उपाधिरहित असणारा, व प्राणिमात्राशीं वैर न करणारा असा जो माझा भक्त आहे, तो मला प्राप्त होतो ॥५५॥

जो मलाच एकट्याला स्वतः केलेलीं कर्में अर्पण करतो, व ज्याला जगांत माझ्यावांचून दुसरें कांहीं आवडत नाहीं; ९६ जो इह व पर या लोकींचें फल मीच असें समजतो; ज्यानें मलाच जीवनाचें फल असें मानलें आहे; ९७ जो प्राणिमात्र हें नांव विसरून मलाच सर्वत्र पाहतो, म्हणून तो निर्वैर होऊन जगतांतील जी जी वस्तु दृष्टीस पडेल, तिला भजतो; ९८ हे पांडवा, याप्रमाणें ज्या भक्ताची वृत्ति बनते, आणि ज्या वेळेस त्याचें कफपित्तवातात्मक शरीर नाहींसें होतें, त्या वेळेस तो मद्रूप होतो. ९९ संजय म्हणतो:—हे धृतराष्ट्र, ज्याच्या उदरांत सर्व जगत् भरून उदर मोठें झालें आहे, अशा त्या श्रीकृष्ण भगवानानें करुणारसयुक्त वाणीनें असें भाषण केलें. ७०० आनंदरूप संपत्तीनें श्रीमान व या सर्व जगतांत कृष्णाची भक्ति करण्यांत चतुर असा जो अर्जुन, १ त्यानें देवांच्या दोन्ही मूर्ति नीट न्याहाळून पाहिल्या; परंतु त्यात विश्वरूपापेक्षां कृष्णमूर्तींत विशेष लाभ आहे असें मानलें. २ पण अर्जुनाच्या या समजुतीस श्रीकृष्णानीं मान दिला नाहीं. कारण, व्यापक रूपापेक्षां एकदेशी रूप खरें नव्हे, ३ हेंच सिद्ध करण्याकरितां श्रीकृष्णांनीं एक दोन चागले दाखले दिले. ४ ते ऐकून अर्जुन आपल्या मनांत असें म्हणूं लागला कीं, या दोन्ही रूपांत चागलें रूप कोणतें आहे तें पुढें विचारावें. ५ याप्रमाणें मनात विचार करून, पुढें तो कशा रीतीनें श्रीकृष्णास प्रश्न करील, ती कथा ऐका. ६ ज्ञानदेव म्हणतातः—जी गोष्ट ओंवीप्रबंधात विनोदानें सागितली जाईल, ती आनंदयुक्त अंतःकरणानें ऐका. ७ सद्भावाची ओंजळ भरून ओंवीरूप मोकळीं फुले विश्वरूपाच्या दोन्ही पायावर मीं अर्पण केलीं । ७०८

अध्याय ११ वा, ओंव्या ७०८.

---

१ एकत्वानें. २ इह व पर या लोकींचें फळ. ३ भरलेला. ४ कफ पित्त-वातात्मक शरीर. ५ ज्याचे उदरात सर्व जग भरून उदर मोठें झालें आहे त्यानें. ६ करुणारसयुक्त वाणीनें. ७ आनंदरूप संपत्तीनें श्रीमान. ८ कृष्णाची भक्ति करण्यात चतुर. ९ समजुतीस. १० सिद्ध करण्याकरिता. ११ दाखले. १२ विचार. १३ रीति, चाल. १४ स्पष्ट. १५ दोन्ही पायावर.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय बारावा

( ५१०. सद्‌गुरूच्या कृपादृष्टीची प्रार्थना; काव्य, १–१० ) जयजय वो शुद्धे। उदारे प्रसिद्धे। अनवरत आनंदे। वर्षतिये ॥ १ ॥ विषयव्याळें मिठी। दिधलिया नुठी ताटी। ते तुझिये गुरुकृपादृष्टी। निर्विष होय ॥ २ ॥ तरि कवणातें तापु पोळी। कैसेनि वो शोकु जाळी। जरि प्रसादरस-कल्लोळीं। पुरें येसि तूं ॥ ३ ॥ योगसुखाचे सोहळे। सेवकां तुझेनि स्नेहाळे। सोहंसिद्धीचे लळे। पाळिसी तूं ॥ ४ ॥ आधारशक्तीचिया अंकीं। वाढविसी कौतुकीं। हृदयाकाशपल्लंकीं। परिये देसी निजें ॥ ५ ॥ प्रत्यक्‌ज्योतीची वोवाळणी। करिसी मनपवनाचीं खेळणीं। आत्मसुखाचीं बाळलेणीं। लेवविसी ॥ ६ ॥ सतरावियेचें स्तन्य देसी। अनुहताचा हल्लरु गासी। समाधिबोधें निजविसी। बुझाउनी ॥ ७ ॥ म्हणोनि साधका तूं माउली। पिके सारस्वत तुझिया पाउलीं। या कारणें मी साउली। न संडीं तुझी ॥ ८ ॥ अहो सद्‌गुरूचिये कृपादृष्टी। तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी। तो सकळ विद्यांचिये सृष्टी। धाता होय ॥ ९ ॥ म्हणोनि अंबे श्रीमंते। निजजनकल्पलते। आज्ञापीं मातें। ग्रंथनिरूपणीं ॥ १० ॥ ( ५११. कृपादृष्टी देवीची प्रार्थना, ११–१७ ) नवरसीं भरवीं सागरु। करवीं उचितें रत्नांचे आगरु। भावार्थाचे गिरिवरु। निफजवीं माये ॥ ११ ॥ साहित्यसोनियाचिया खाणी। उघडवीं देशियेचिया अक्षौणी। विवेकवल्लीची लावणी। हों देईं सैंघ ॥ १२ ॥ संवादफळनिधानें। प्रमेयाचीं उद्यानें। लावीं म्हणे गहनें। निरंतर ॥ १३ ॥ पाखांडाचे दरकुटे। मोडीं वाग्वाद अव्हांटे। कुतर्कांचीं दुष्टें। सावजें फेडीं ॥ १४ ॥ श्रीकृष्णगुणीं मातें। सर्वत्र करीं वो सरतें। राणिवे बैसवीं श्रोते। श्रवणाचिये ॥ १५ ॥ ये मऱ्हाठियेचिया नगरीं। ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं। घेणें देणें सुखाचिवरी। हों देईं या जगा ॥ १६ ॥ तूं आपुलेनि स्नेहपल्लवें। मातें पांघुरविशील सदैवें। तरि आतांचि हें आघवें। निर्मीन माये ॥ १७ ॥ ( ५१२.

---

१ निर्मळ. २ निरंतर दुःखरहित. ३ मूर्च्छेनें. ४ योगशक्तीच्या. ५ पाळण्यात. ६ झोंके. ७ उपदेशानें. ८ आत्मज्योतीची. ९ जीवनकलेचें. १० 'हंसः सोहं' या अखंड ध्वनीचा. ११ खुळखुळा. १२ ब्रह्मज्ञान. १३ आश्रय देतें. १४ आपल्या सेवकाच्या मनातील इच्छा पूर्ण करणाऱ्या.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय बारावा

( हे गुरुकृपादृष्टे, ) तुझा जयजयकार असो. तूं कशी आहेस ? तर निर्मल, उदार, निरंतर दुःखरहित व आनंद देणारी अशी सुप्रसिद्ध आहेस. १ हे गुरुकृपादृष्टे, विषयरूप सर्पानें मिठी मारल्यावर मूर्च्छित झालेल्या मनुष्याचें विष तुझ्या योगानें उतरतें. २ तुझ्या प्रसादरूपी लाटांचा पूर आला, म्हणजे संसारतापापासून कोणाला त्रास होईल ? व शोकापासून कोण पीडा पावेल ? ३ हे स्नेहाळे, तुझ्यापासून सेवकाला योगसुखाचे चमत्कार प्राप्त होतात; व ' मीं ब्रह्म व्हावें ' अशी जी सेवकाची हौस, तीही तूं पूर्ण करतेस. ४ भक्ताला तूं आपल्या योगशक्तीनें अंकावर कौतुकानें बसवून हृदयाकाशरूपी पाळण्यांत आपल्या उपदेशानें निजवून झोंके देतेस; ५ मन विषयापासून पराङ्मुख करवून व आत्मज्योतीची ओंवाळणी करून, मन व पवन यांचीं खेळणीं करतेस, आणि सेवकाकडून आत्मसुखाचीं बाळलेणीं लेववितेस; ६ जीवनकलेचें अमृतपान देऊन ' हंसः सोहं ' या अखंड ध्वनीचा हातात खुळखुळा देऊन समाधिसुखाचा बोध करून निजवितेस; ७ म्हणून तूं साधकांची माता आहेस, व तुझे पाय धरल्यानें ज्ञानमात्राची प्राप्ति होते; याकरिता, मी तुझा आश्रय सोडीत नाहीं. ८ हे सद्‌गुरुकृपादृष्टे, तुझी ज्याच्यावर दया होते, तो सर्वविद्यारूप सृष्टीचा उत्पन्नकर्ताच होतो. ९ म्हणून हे श्रीमान अंबे, तूं सेवकाच्या मनांतील इच्छा पूर्ण करणारी कल्पलताच आहेस. तर या गीतेचा अर्थ सागण्याची मला आज्ञा दे. १० माते, या माझ्या ग्रंथात नवरसांचे सागर, अलंकारांच्या खाणी, व भावार्थांचे पर्वत निर्माण कर. ११ देशभाषारूप जमिनींत अलंकाररूप सोन्याच्या खाणी उघडून विचाररूप वेलींची दाट लावणी कर. १२ त्यांत संवादरूप फळाचे ठेवे व मार्मिक अर्थरूपी सतत राहणाऱ्या अशा पुष्कळ बागा लाव. १३ पाखंडरूपी दरडी व वितंडवादरूपी आडवाटा मोडून, कुतर्करूपी दुष्ट हिंसक जनावरें नाहींतशीं कर. १४ मला श्रीकृष्णाचे गुण नेहमीं गाण्यास उद्युक्त कर, व श्रोत्यांना श्रवणरूपी राज्यावर बसीव. १५ मराठी-भाषारूप नगरांत ब्रह्मविद्या स्वस्त कर, व सर्व लोकांनीं सुखाच्या देण्याघेण्याचा व्यापार करावा असें कर. १६ हे सदैव गुरुकृपादृष्टे माये, तूं आपल्या कृपारूप पदराचें

---

१५ अलंकाराची. १६ खाण. १७ अलंकाररूप. १८ समुदाय. १९ दरडी, २० वितंडवाद. २१ हिंसक जनावरें. २२ नाहींतशीं कर. २३ उद्युक्त.

गीतार्थ सांगण्याविषयीं गुरूंची आज्ञा, १८ ) इये विनेवणीचेसाठीं । अवलोकिलें गुरुकृपादृष्टी । म्हणे गीतार्थेंसी उठीं । न बोलें बहु ॥ १८ ॥ ( ५१३. गीतार्थश्रवणाची श्रोत्यांची प्रार्थना, १९ ) तेथ जी जी महाप्रसादु । म्हणोनि साविया जाहला आनंदु। आतां निरोपीन प्रबंधु । अवधान दीजे ॥ १९ ॥

अर्जुन उवाच—

एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते । ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥

अन्वयः—( हे भगवन्, ) एवं सततयुक्ताः ये भक्ताः त्वा पर्युपासते ये च अव्यक्तं अक्षरं अपि ( पर्युपासते, ) तेषां ( मध्ये ) के योगवित्तमाः ( संति ) ? ॥ १ ॥

( ५१४. अकराव्या अध्यायाच्या अर्थाचा अनुवाद, २०-२२ ) तरी सकळवीराधिराजु । जो सोमवंशीं विजयध्वजु । तो बोलता जाहला आत्मजु । पांडुनृपाचा ॥२०॥ कृष्णातें म्हणे अवधारिलें । आपण विश्वरूप मज दाविलें । तें नवल म्हणोनि बिहालें । चित्त माझें ॥ २१ ॥ आणि इये कृष्णमूर्तीची सेवे । यालागीं सोयँ धरिली जीवें । तंव नको म्हणोनि देवें । वारिलें मातें ॥२२॥ ( ५१५. सगुणनिर्गुण दोन्ही रूपें एकच, २३-२८ ) तरि ँव्यक्त आणि अव्यक्तें । हें तूंचि एक निभ्रांत । भक्ती पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥२३॥ या दोनी जी वाटा । तुतें पावावया वैकुंठा । व्यक्ताव्यक्त दारवंठा । रिगिजे येथ ॥२४॥ पैं जे वांनी ँयातुका । तेचि वेगळिये वाला येका । म्हणोनि एकदेशीया व्यापका । सरिसा पाडु ॥ २५ ॥ अमृताचिया सागरीं । जे लाभे सामर्थ्याची थोरी । तेचि दे अमृतलहरी । चुळी घेतलिया ॥ २६ ॥ हे कीर माझ्या चित्तीं । प्रतीति आथी जी निरुती । परि पुसणें योगपती । तें याचिलागीं ॥ २७ ॥ जे देवा तुम्हीं नावेक । अंगीकारिलें ँव्यापक । तें साचचि कीं कवतिक । हें जाणावया ॥ २८ ॥ ( ५१६. सगुण निर्गुण उपासकांत कोणीं यथार्थ योग जाणला ? २९–३३ ) तरि तुजलागीं कर्म । तूंचि जयांचें परम । भक्तीसी मनोधर्म । विकोनि घातला ॥ २९ ॥ इत्यादि सर्वां परी । जे भक्त तूतें श्रीहरी । बांधोनियां जिव्हारीं । उपासिती ॥३०॥ आणि जे प्रणवापैलीकडे । वैखरीयेसि जें कांनडें । कायिसयाहि सांगडें । नव्हेचि जें वस्तु ॥ ३१ ॥ तें अक्षर जी अव्यक्त । निर्देशें देशरहित । सोहंभावें उपासित । ज्ञानिये जें ॥३२॥ तयां आणि जी भक्तां । येरयेरांमाजि अनंता । कवणें योगु तत्त्वतां । जाणितला सांगा ॥ ३३ ॥ ( ५१७. देवाला आनंद होऊन देव म्हणतात, तुझा प्रश्न कसा करावा हें चांगलें समजतें, ३४ ) इया किरीटीचिया बोला । भगवानुवाचः—तो जगद्बंधु संतोषला । म्हणे हो प्रश्नु भला । जाणसी करूं ॥ ३४ ॥

१ विनंतीबरोबर. २ सवय. ३ आवड. ४ साकार, सगुण. ५ निराकार, निर्गुण. ६ कस. ७ शंभर भार सोन्याच्या गटास. ८ विश्वरूप. ९ हृदयाल. १० अवघड. ११ सारखे. १२ अविनाशी. १३ नावाने दाखविता न येणारे.

मला पांघरूण घालशील, तर याप्रमाणें ग्रंथनिरूपणादिक सर्व मी उत्पन्न करीन. १७ एवढी विनंती ऐकल्याबरोबर गुरुकृपादृष्टीनें ज्ञानेश्वराकडे अवलोकन करून असें भाषण केलें कीं, तूं आतां गीतेचा अर्थ सांगण्यास सुरवात कर. फार बोलूं नको. १८ तेव्हां ज्ञानेश्वर म्हणतातः—हा माझ्यावर महाप्रसादच झाला आहे; त्यामुळें आनंद पावून मी आतां गीतेच्या अर्थावरील कविता सांगेन, तिकडे लक्ष द्यावें. १९

श्लोकार्थः—अर्जुन म्हणालाः—देवा, याप्रमाणें एकनिष्ठ होऊन तुझ्या सगुण रूपाची उपासना करितात ते, आणि अव्यक्त व अविनाशी अशा निर्गुण ब्रह्माची उपासना करतात ते, या दोहों प्रकारच्या भक्तामध्यें भक्तीचें खरें तत्त्व कोणास समजलें आहे ? ॥ १ ॥

सकलवीर्यशिरोमणि, सोमवंशाचा विजयध्वज, व पंडूचा मुलगा जो अर्जुन, तो म्हणालाः—२० हे श्रीकृष्णा, ऐकलें कां ? तुम्हीं जें मला विश्वरूप दाखविलें, तें अद्भुत असल्यामुळें माझ्या चित्तास भीति उत्पन्न झाली; २१ आणि तुमच्या या सगुण मूर्तीची संवय असल्यामुळें माझ्या मनानें तिचीच आवड घेतली; परंतु देवा, तुम्हीं माझा निषेध केला. २२ तरी साकार व निराकार हीं दोन्ही रूपें निःसंशय तुमचींच आहेत. भक्तीनें सगुणरूपाची व योगानें निर्गुणरूपाची प्राप्ति होते. २३ हे वैकुंठनायका श्रीकृष्णा, तुमची प्राप्ति करून घेण्याकरितां या दोन वाटा असून, साकार व निराकार हे दोन उंबरे आहेत. २४ हें पहा, शंभर भार वजनाच्या सोन्याच्या गटास जो कस लागतो, तोच कस त्या गटांतील थोडें सोनें निराळें करून त्यास लाविला तरी लागतो; म्हणून, व्यापक अथवा एकदेशीय रूपाची योग्यता सारखीच आहे. २५ अमृताच्या समुद्रांत जें सामर्थ्य आहे, तेंच चुळकाभर अमृतांतही आहे; २६ आणि माझ्या मनाचा अनुभव खरोखर हाच आहे. पण याचकरितां मला तुम्हाला कांही विचारावयाचें आहेः २७ देवा, तुम्हीं जें क्षणभर व्यापक रूप धारण केलें होतें, तेंच तुमचें खरें स्वरूप, किंवा ती लीला आहे, हें समजण्याची माझी इच्छा आहे. २८ तर, जो आपलीं सर्व कर्में तुमच्याचकरतां करतो; ज्याला तुमच्याशिवाय श्रेष्ठ असें जगतांत दुसरें कांहीं नाहीं; व ज्यानें आपले सर्व मनोधर्म तुमच्या भक्तीला विकले आहेत; २९ याप्रमाणे, हे श्रीहरी, जे भक्त सर्वतोपरी तुमची मूर्ति हृदयात धरून उपासना करतात; ३० आणि जें तुमचें स्वरूप ॐकारापलीकडे असून वाणीनें वर्णन करण्यास अशक्य, व कोणच्याही वस्तूबरोबर ज्याची तुलना होत नाहीं, ३१ जें अविनाशी, निराकार, स्थलरहित व नामरहित आहे; आणि ज्याची ज्ञानी लोक हे सोहंभावानें उपासना करितात, ३२ त्या ज्ञान्यांमध्यें व भक्तामध्यें, हे श्री अनंता, खरा योग कोणास समजला तें सांगा. ३३ अर्जुनाच्या या बोलण्यानें जगद्बंधु श्रीकृष्ण संतोष पावून म्हणालेः—वाहवा ! प्रश्न करण्याची शैली तर तुला फार चांगली साधली आहे ! ३४

मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।
श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥

अन्वयः—( हे अर्जुन, ) मयि मनः आवेश्य नित्ययुक्ताः ( सन्तः ) ये परया श्रद्धया उपेताः मा उपासते, ते युक्ततमाः मे मताः ॥ २ ॥

( ५१८. सगुणाची उपासना करणारेच परमयोगी होत, ३५–३९ ) तरि अस्तगिरीचिया उपकंठीं । रिगालिया रविबिंबापाठीं । रश्मि जैसे किरीटी । संचरती गा ॥ ३५ ॥ वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागे पांडुसुता । तैसी नीचें नवी भजतां । श्रद्धा दिसे ॥ ३६ ॥ परि ठाकिलियाहि सागरु । जैसा मागीलही यावा अनिवारु । तिये गंगेचिये ऐसा पडिभरु । प्रेमभावा ॥ ३७ ॥ तैसे सर्वेंद्रियांसहित । मजमाजि सूनि चित्त । जे रात्रिदिवस न म्हणत । उपासिती ॥ ३८ ॥ इया परी जे भक्त । आपणपें मज देत । तेचि मी योगयुक्त । परम मानीं ॥ ३९ ॥

ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते । सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥
संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः । ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥

अन्वयः—ये तु सर्वभूतहिते रताः सर्वत्र समबुद्धयः ( सन्तः ) इंद्रियग्रामं संनियम्य अनिर्देश्यं, अव्यक्तं, सर्वत्रगं, अचिन्त्यं, कूटस्थं, अचल, ध्रुवं च अक्षरं पर्युपासते ते मा एव प्राप्नुवंति ॥ ३ ४

( ५१९. निर्गुण उपासनेनेंही माझीच प्राप्ति होते, पण तो मार्ग क्लेशदायक आहे; ४०-७४ ) आणि येर तेही पांडवा । जे आरुढोनि सोहंभावा । झोंबती निरवयवा । अक्षरासी ॥ ४० ॥ मनाची नखी न लगे । जेथ बुद्धीची दृष्टि न रिगे । इंद्रियां कीर जोगें । कायि होईल ॥ ४१ ॥ परि ध्यानाही कुंवाडें । म्हणोनि एके ठायीं न संपडे । व्यक्तीसि माजिवडें । कवणेही नोहे ॥ ४२ ॥ जया सर्वत्र सर्वपणें । सर्वांही काळीं असणें । जें पावूनि चिंतवणें । हिंपुटीं[११] जाहलें ॥ ४३ ॥ जें होय ना नोहे । जें नाहीं ना आहे । ऐसें म्हणोनि उपाये । उपजतीचिना ॥ ४४ ॥ जें चळे ना ढळे । सरे ना मैळे । तें आपुलेनीचि बळें । आंगविलें[१२] जिहीं ॥ ४५ ॥ पैं वैराग्यमहापावकें । जाळूनि विषयांचीं कटकें । अधपलीं तैंवकें । इंद्रियें धरिलीं ॥ ४६ ॥ मग संयमाची थाटी । सूनि मुरडिलीं उफराटीं । इंद्रियें कोंडिलीं कपाटीं । हृदयाचिया ॥ ४७ ॥ ( ५२०. योगाचें वर्णन, ४८–५७ ) अपानींचिया कवाडा । लावोनि आसनमुद्रा सुहाडा । मूळबंधाचा हुडा । पन्नासिला ॥ ४८ ॥ आशेचे लाग तोडिले । अधैर्याचे कडे झाडिले । निद्रेचें शोधिलें । काळवखें ॥ ४९ ॥ वैज्राग्नीचिया ज्वाळीं । करूनि सप्तधातूंची होळी । व्याधींच्या सिसाळीं । पूजिलीं[१२] यंत्रें ॥ ५० ॥ मग कुंडलिनियेचा टेंभा । आधारीं केला उभा । तया चोजवलें[१३] प्रभा । निमथावरी ॥ ५१ ॥

१ समर्थी. २ नित्य ३ मिळाल्यावर. ४ भरती. ५ ठेवून. ६ कल्पना. ७ गूढ. ८ सारखें मध्यें, ९ सर्वस्वरूपानें. १० चिंतन. ११ कष्टी. १२ स्वाधीन करून घेतले. १३ डोरपळली.

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणालेः—अर्जुना, माझ्या ठिकाणीं चित्त स्थिर करून नित्ययुक्त होत्साते जे उत्कृष्ट श्रद्धेनें मला भजतात, त्यांनीं भक्तियोग खरा जाणला असें मी मानतों ॥ २ ॥

हें पहा कीं, अस्तमानाच्या समयीं सूर्यबिंब नाहींसें झाल्यावर ज्याप्रमाणें त्याच्या मागें किरण जातात; ३५ किंवा अर्जुना, पावसाळ्यांत नदी अधिक वाढते, त्याप्रमाणें, माझी भक्ति करितांना ज्यांच्या ठिकाणीं नित्य नवी श्रद्धा दृष्टीस पडते; ३६ अथवा, समुद्रास मिळाल्यावरही जिच्यामध्यें मागून अनिवार लाटा येतच असतात, त्या गंगेप्रमाणें ज्यांच्या ठिकाणीं पूर्ण प्रेमभाव उचंबळत असतो; ३७ तसेंच, दिवस व रात्र मनात न आणितां कायावाचामनेंकरून माझ्याच ठिकाणीं चित्त ठेवून, जे माझी उपासना करितात; ३८ आणि याप्रमाणें जे भक्त आपणा स्वतांला माझे ठिकाणीं वाहून घेतात, त्यांनाच मी ' परम योगयुक्त ' असें समजतों; ३९

श्लोकार्थः—प्राणिमात्राचें हित करण्याविषयीं तत्पर आणि सर्वत्र-समदृष्टि असे जे पुरुष सर्व इंद्रियांचें नियमन करून, अनिर्देश्य, अव्यक्त, सर्वव्यापी, अचिंत्य, कूटस्थ, अचल व शाश्वत अशा नाशरहित ब्रह्माची उपासना करतात, तें मलाच येऊन मिळतात ॥ ३ ॥ ४ ॥

आणि अर्जुना, दुसरे जे माझे ज्ञानी भक्त आहेत, ते, ' आपण ब्रह्म आहों ' अशी वृत्ति धरून, निराकार जें ब्रह्म, तें प्राप्त करून घेण्याची खटपट करितात. ४० जें मनाला अचिंत्य व बुद्धीला न समजणारें, तें इंद्रियांना कसें समजेल ? ४१ परंतु ध्यानासही गूढ असल्यामुळें जें एके ठिकाणीं सांपडत नाहीं, व ज्याला कोणचाही आकार नाहीं, ४२ जें सर्व ठिकाणीं सर्व रूपानें नेहमीं असतें, व ज्याची प्राप्ति झाली असतां चिंतन आपोआप थांबतें; ४३ जें कधीं झालेंही नाहीं, व होणारही नाहीं; तसेंच, जें आहे असेंही नाहीं व नाहीं असेंही नाहीं, म्हणजे ज्याच्या प्राप्तीविषयीं उपायच नाहीं; ४४ जें चालत नाहीं व हालतही नाहीं, जें संपत नाहीं व दूषितही होत नाहीं, तें ज्यांनीं आपल्या अंगबळानें स्वाधीन करून घेतलें आहे; ४५ वैराग्यरूप मोठ्या अग्नीनें विषयरूप सैन्य जाळून जे आपलीं होरपळलेलीं इंद्रियें मोठ्या कष्टानें धारण करतात; ४६ मग आत्मसंयमनाचे पाशानें उफराटीं करून हृदयाच्या गुहेंत तीं कोंडतात; ४७ अपानवायूच्या द्वाराला आसनाची बळकट मुद्रा लावून मूळबंधाचे बुरूज उभे करतात; ४८ आशेचे संबंध तोडून व अधीरपणाचे कडे दूर करून निद्रारूप अंधार नाहींसा करितात; ४९ मूळबंध आसनाच्या ज्वालाग्नीनें शरीरांतील सप्तधातूंची होळी करून व्याधींचीं शिरें षट्चक्रास अर्पण करितात; ५० मग कुंडलिनीचा टेंभा आधारचक्रावर उभा करून, त्या उजेडांत आनंदानें मस्तकापर्यंत जातात, ५१ नवद्वारांच्या चौकींत इंद्रियनिग्रहाचा आडसर घालून सुषुम्ना नाडीची वाट मोकळी करतात; ५२ प्राणशक्तिरूप चामुंडादेवीप्रीत्यर्थ

१४ कष्टानें. १५ आत्मसंयमनाच्या पाशानें. १६ अपानवायूच्या. १७ दृढ. १८ संबंध. १९ नाहींसें केलें. २० मूळबंध आसनाच्या ज्वालाग्नीनें. २१ शिरें. २२ षट्चक्रें. २३ आनंदानें गेले.

नवद्वारांचिया चौचकीं । वाणूनि संयतीची अडवंकी । उघडली खिडकी । केकारांतींची ॥ ५२ ॥ प्राणशक्ति चामुंडे । प्रहारूनि संकल्पाचे मेंढे । मनोमहिषाचेनि मुंडें । दिधलीं बळी ॥ ५३ ॥ चंद्रसूर्यां बुझावणी । करूनि अनुहताची सुंडावणी । सतरावियेचें पाणी । जिंतिलें वेगीं ॥ ५४ ॥ मग मध्यमा मध्यविवरें । तेणें कोरिवें दादरें । ठाकिलें चवरें । ब्रह्मरंध्र ॥ ५५ ॥ वरी मकरांत सोपान । तें सांडोनिया गहन । काखे सूनियां गगन । भरले ब्रह्मीं ॥ ५६ ॥ ऐसे जे समबुद्धि । गिळावया सोहंसिद्धि । आंगवितीति निरवधि । योगदुर्गें ॥ ५७ ॥ आपुलिया सांटोवाटीं । शून्य घेती उठाउठी । तेही मातेंचि किरीटी । पावती गा ॥ ५८ ॥

अवतरणः—वांचूनि योगाचेनि बळें । अधिक कांहीं मिळे । ऐसें नाहीं आगळे । कष्टचि तयां ॥ ५९ ॥

> क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
> अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

*अन्वयः--अव्यक्तासक्तचेतसां तेषां अधिकतरः क्लेशः ( अस्ति; तैः ) देहवद्भिः हि अव्यक्ता गतिः दुःखं अवाप्यते ॥ ५ ॥*

जिहीं सकळभूतांचिया हितीं । निरालंबीं अव्यक्तीं । पसरलिया आसक्ती । भक्तीविण ॥ ६० ॥ तयां महेंद्रादि पदें । वरितांति वाटवधें । आणि ऋद्धिसिद्धीचीं द्वंद्वें । पडोनि ठाती ॥ ६१ ॥ कामक्रोधांचे विलग । उठावती अनेग । आणि शून्येंसीं आंग । झुंजवावें कीं ॥ ६२ ॥ ताहानें तहानचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी । अहोरात्र वोंवीं । मवावा वारा ॥ ६३ ॥ उनीं दिहाचें पहुडणें । निरोधाचें वेल्हावणें । झाडासि सौजणें । चोंवळावें गा ॥ ६४ ॥ शीत वेढावें । उष्ण पांघुरावें । वृष्टीचिया असावें । घराआंतु ॥ ६५ ॥ किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेशु नीच नवा । भातारेंवीण करावा । तो हा योगु ॥ ६६ ॥ एथ स्वामीचें काज । ना बापिकें व्याज । परि मरणेंसीं झुंज । नित्य नवें ॥ ६७ ॥ ऐसें मृत्यूहूनि तिख । कां घोंटे कढत विख । डोंगर गिळतां मुख । न फाटे काई ॥ ६८ ॥ म्हणोनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा । तयां दुःखाचाचि शेल वांटा । भागा आला ॥ ६९ ॥ पाहें पां लोहाचे चणे । जैं बोचरिया पडती खाणें । तैं पोट भरणें कीं मरणें । शुद्धि नेणे ॥ ७० ॥ म्हणोनि समुद्र बाहीं । तरणें आथी केंही । कां गगनामाजि पायीं । खोलिजेतु असे ॥ ७१ ॥ वळघलिया रणाची थाटी । आंगीं न लागतां काठी । सूर्याची पाउठी । कां होय गा ॥ ७२ ॥ यालागीं

१ चौकात. २ घालून. ३ इंद्रियनिग्रहाची. ४ आडसर. ५ सुषुम्ना नाडीची. ६ प्राणशक्तिरूप चामुंडा देवीप्रीत्यर्थ. ७ मारून. ८ मनरूपी महिषासुराचें मस्तक. ९ इडा व पिंगळा यांस. १० ऐक्य. ११ गजर. १२ जीवनकलेचें. १३ सुषुम्ना नाडी. १४ मिळाले. १५ स्वाधीन करतात,

संकल्परूपी मेंढे मारून मनोरूपी महिषासुराचें मस्तक बळी देतात; ५३ इडा व पिंगला या नाड्यांचें ऐक्य करून व अनुहतध्वनीचा गजर करून जीवनकलेच्या तलावापर्यंत जाऊन ठेपतात; ५४ मग सुषुम्ना नाडीच्या मध्य विवरांतील कोरींव दादरानें वर चढून मस्तकांतील ब्रह्मरंध्रापर्यंत मजल गांठतात; ५५ नंतर मकाराचा कठीण जिना चढून व माया खाकेंस मारून ब्रह्मास मिळतात; ५६ याप्रमाणें सर्वत्र सारखी बुद्धि ठेवून, ब्रह्मप्राप्ति करून घेण्याकरितां योगादि कठीण मार्ग वेळ न लागतां स्वाधीन करून घेतात; ५७ अशा प्रकारें, अर्जुना, आपली अदलाबदल निरवयवाशीं करतात, तेही मलाच येऊन मिळतात. ५८ बाकी, योगाच्या बळानें त्याना अधिक कांहीं प्राप्ति होते असें नाहीं; उलट जास्त यातना मात्र सोसाव्या लागतात। ५९

श्लोकार्थः—निर्गुण ब्रह्माची उपासना करणाऱ्या देहधारी पुरुषांना उपासनेचे कष्ट होऊन अव्यक्त गति फार प्रयासानें प्राप्त होते. ॥ ५ ॥

प्राणिमात्राला प्रिय, अनाश्रित व अव्यक्त असें जें ब्रह्म, तें भक्तीशिवाय प्राप्त करून घेण्याची जे इच्छा करितात, ६० त्यांना, वाटमारी अशीं जीं इंद्रादिक पदें, तीं माळ घालतात; आणि ऋद्धिसिद्धीची जोडी ब्रह्मप्राप्तीच्या आड येते. ६१ कामक्रोधादि पुष्कळ उपद्रव उत्पन्न होतात, व निराकार परब्रह्माची प्राप्ति करून घेण्याकरितां त्यांना शून्याशीं ( आकाशाशीं ) झटावें लागतें. ६२ तहान लागली असतां तीच पिऊन तृप्त व्हावें लागतें, भूक लागली असतां तीच खाऊन समाधान करावें लागतें, व रात्रंदिवस हाताच्या वावांनीं निराकाराच्या प्राप्तीकरितां वाराच मोजावा लागतो; ६३ दिवसा उन्हांत निजणें, इंद्रियांच्या इच्छेविरुद्ध वागण्याचे विलास करणें, व झाडाबरोबर मित्रभावानें बोलणें; ६४ थंडी नेसणें, ऊन पांघरणें व पावसांत बसणें; ६५ किंबहुना अर्जुना, पतीशिवाय रोज सती जाणें, अशा प्रकारचा हा योग होय. ६६ या ठिकाणीं पतीकरितां अग्निप्रवेश करण्याचें किंवा हव्यकव्याचें निमित्त नसूनही मृत्यूबरोबर नित्य नवी लढाई करावी लागते. ६७ असें मृत्यूहूनही तिखट व कडत जें विष, तें गिळवेल का ? अरे ! डोंगर गिळतांना तोंड नाहीं का फाटणार ? ६८ म्हणून हे महावीरा, जे असें योगसाधन करण्यास निघाले, त्यांच्या नशिबीं दुःखाचा शेलकाच वाटा आला ! ६९ हें पहा, लोखंडाचे चणे जेव्हां बोथऱ्याला खाण्याचा प्रसंग येतो, तेव्हां त्याचें पोट भरेल का प्राण जाईल हें कांहीं समजत नाहीं ! ७० म्हणून, समुद्र कोणी बाहूंनीं तरून गेला आहे का ? किंवा आकाशांत कोणी पायांनीं चालला आहे का ? ७१ समरांगणात गेल्यावर अंगावर समोर वार न होतां सूर्यलोक प्राप्त होईल का ? ७२ यास्तव, अर्जुना, ज्याप्रमाणें पांगळ्याला वायूबरोबर

१६ अदलाबदलीनें. १७ अव्यक्त ब्रह्म. १८ अनाश्रित. १९ वाटमारी. २० उपद्रव. २१ हाताच्या वावांनीं. २२ मोजावा. २३ उन्हांत. २४ निजणें. २५ मित्रभावानें. २६ बोलावें. २७ हव्यकव्य. २८ निमित्त. २९ बाहूंनीं. ३० कोठेंही. ३१ चालत. ३२ गेला असता. ३३ प्राप्ति.

पांगुळा हेवा । नव्हे वायूसि पांडवा । तेविं देहवंतां जीवां । अव्यक्तीं गति ॥७३॥ ऐसाही जरी धिंवसा । बांधोनिया आकाशा । झोंबती तरी क्लेशा । पात्र होती ॥ ७४ ॥ अवतरणः—( ५२१. सर्व कर्मांचा संन्यास माझे ठिकाणीं करून अनन्यभावानें सगुण उपासना करतो, त्याला क्लेश होत नाहींत; त्या भक्ताचें सर्व कांही मी करतों; ७५–८२ ) म्हणोनि येर ते पार्था । नेणतीचि हे व्यथा । जे कां भक्तिपंथा । वोठंगले ॥ ७५ ॥

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।
अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ६ ॥

अन्वयः—ये तु मत्पराः ( संतः ) सर्वाणि कर्माणि मयि सन्यस्य ( मा ) ध्यायंतः अनन्येन योगेन एव मा उपासते ॥ ६ ॥

कर्मेंद्रियें सुखें । करिती कर्में अशेखें । जियें कां वर्णविशेखें । भागा आलीं ॥ ७६ ॥ विधीतें पाळित । निषेधातें गाळित । मज देऊनि जाळित । कर्मफळें ॥ ७७ ॥ ययापरी पाहीं । अर्जुना माझे ठायीं । संन्यसूनि नाहीं । करिती कर्में ॥ ७८ ॥ आणीकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव । तयां मी-वांचूनि धांवं । आनौती नाहीं ॥ ७९ ॥ ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर । ध्यानमिषें घर । माझें झाले ॥ ८० ॥ जयाचिये आवडी । केली मजशीं कुळवाडी । भोग मोक्ष बापुडीं । त्यजिलीं कुळें ॥ ८१ ॥ ऐसे अनन्ययोगें । विकले जीवें मनें आंगें । अवतरणः—तयाचें कायि एक सांगें । जे सर्व मी करीं ॥ ८२ ॥

तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।
भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥

अन्वयः—पार्थ, मयि आवेशितचेतसा तेषा अहं मृत्युसंसारसागरात् न चिरात् समुद्धर्ता भवामि ॥ ७ ॥

( ५२२. देव जन्ममरणांतून भक्तांचा उद्धार करतो. ८३–८७ ) किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया ये उदरा । तो मातेचा सोयरा । केतुला पां ॥ ८३ ॥ तेवीं मी तयां । जैसे असती तैसियां । कळिकाळ नोकोनियां । घेतला पट्टा ॥ ८४ ॥ येऱ्हवीं तरी माझिया भक्तां । आणि संसाराची चिंता । काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ॥ ८५ ॥ तैसे ते माझें । कलत्र हें जाणिजे । कायिसेनिही न लाजे । तयांचेनि मी ॥ ८६ ॥ जन्ममृत्यूचिया लाटीं । झळंबेंती इया सृष्टी । तें देखोनियां पोटीं । ऐसें जाहलें ॥ ८७ ॥ ( ५२३. ज्या योग्यतेचा भक्त असेल त्याप्रमाणेंच त्याचा उद्धार केला जातो. ८८–९३ ) भवासिंधूचेनि माजें । कवणासि धाकु नुपजे । तेथ जरी कीं माझे । बिहिती[१२] हन ॥ ८८ ॥ म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा । करूनि त्यांचिया गांवा । धावतु आलों ॥ ८९ ॥ नामाचेया सहस्रवरी । नावा इया अवधारीं । सजूनियां संसारीं । तारूं जाहलों ॥ ९० ॥ सैंडे जे देखिले । ते

धावण्याची पैज मारता येणार नाहीं, त्याप्रमाणें देहाभिमानी जीवाला निराकाराची प्राप्ति होणार नाहीं. ७३ असे असूनही मनात इच्छा धारण करून जे अव्यक्तप्राप्तीविषयीं झटतात, ते क्लेशांस पात्र होतात. ७४ म्हणून पार्था, ज्यानीं भक्तिमार्गाचा स्वीकार केला आहे, त्याना असे कष्ट सोसावे लागत नाहींत. ७५

श्लोकार्थः—जे मत्पर होऊन, सर्व कर्मे मला अर्पण करून, व माझें ध्यान करून अनन्यभावानें माझी उपासना करतात, ॥ ६ ॥

आपल्या वर्णाश्रमधर्मप्रमाणें जीं कर्मे करावयाचीं, तीं सर्व कर्मे इंद्रियें सुखानें आचरतात; ७६ सर्व कर्मे यथाविधि मला अर्पण करून व निषिद्ध कर्मे टाकून, कर्मापासून होणारीं फळे जाळून टाकतात; ७७ याप्रमाणें, अर्जुना सर्व कर्मे मला अर्पण करून कर्मनाश करतात. ७८ आणखी कायिक, वाचिक, मानसिक जीं जीं कर्मे, त्यांनाही माझ्याशिवाय सोय नसते; ७९ असे जे निरंतर माझी सेवा करून मत्पर होतात, ते माझ्या ध्यानाच्या निमित्तानें माझें राहण्याचें ठिकाण होतात. ८० त्याची आवड माझ्याशीं व्यवहार करून, विचारी मुक्ति व भुक्ति हीं गरीब कुळें टाकून देते; ८१ याप्रमाणें अनन्यभावानें ज्यांनीं आपला जीव, मन व शरीर मला अर्पण केलें, त्याचीं एखादी गोष्ट मी करतों असें काय सांगूं ? कारण त्यांच्या सर्व इच्छा मलाच पूर्ण कराव्या लागतात. ८२

श्लोकार्थः—पार्था, त्या माझे ठिकाणीं चित्त समर्पण केलेल्या भक्तांचा मी जन्ममरणयुक्त संसारसमुद्रापासून लवकरच उद्धार करतों ॥ ७ ॥

किंबहुना पार्था, जो आपल्या मातेच्या उदरीं जन्म घेतो, तो तिचा कितपत आवडता असतो हें सांगावयास नकोच. ८३ त्याचप्रमाणें, माझे भक्त कोणी व कसलेही असोत, त्यांना मी आवडता आहे व तेही मला आवडते आहेत; आणि त्याना जे त्रास देणारे असतील, त्यांचा नाश करण्याचा मीं पतकरच घेतला आहे. ८४ बाकी माझ्या भक्ताना संसाराची चिंता का असावी ? हे पहा कीं, श्रीमंताच्या बायकोला कधीं कोरान्न मागण्याचा प्रसंग येईल का ? ८५ याचप्रमाणें, माझे भक्त माझ्या कुटुंबापैकींच आहेत असें मी समजतों. अर्थात् त्याना कोणतेही संकट आले तर त्याची लाज मला नाहीं का ? ८६ माझे भक्त या सृष्टींत जन्ममृत्यूंच्या लाटात बुडताहेत असे पाहून माझ्या पोटात कसेंसेंच झालें ! ८७ भवसागराच्या लाटाची कोणाला भीति वाटत नाहीं ? अर्थात् त्यांची माझ्या भक्तांनाही भीति वाटतेच; ८८ म्हणून, अर्जुना, रामकृष्णादि अवतार घेऊन या मृत्युलोकीं त्याच्या गावीं मीं धाव घेतली; ८९ माझ्या सहस्रनामरूपी नावा तयार करून, या संसाररूप सागरात मी त्यांना तारक झालो असें समज. ९० जे उपाधि-

१ पैज. २ नाहींतर्शी. ३ सोय, आधिष्ठान. ४ माझ्याच ठिकाणीं एकनिष्ठ. ५ व्यवहार. ६ आवडता. ७ त्रास देणारे. ८ नाश करून. ९ पतकर. १० कुटुंब. ११ बुडतात. १२ भितील. १३ अवतार. १४ तारक. १५ उपाधिरहित.

ध्यानकासे लाविले । परिग्रही घातले । तरियोंवरी ॥ ९१ ॥ प्रेमाची पेटीं । बांधली एकाचिया पोटीं । मग आणिले तटीं । सायुज्याचिया ॥ ९२ ॥ परि भक्तांचेनि नांवें । चतुष्पदादि आघवे । वैकुंठींचिये राणिवे । योग्य केले ॥ ९३ ॥ ( ५२४. भक्त आपलें चित्त देवाला अर्पण करतो, तेव्हापासून त्याचा सर्व भार देव घेतो, ९४–९६ ) म्हणोनि गा भक्तां । नाहीं एकही चिंता । तयांतें समुद्धर्ता । आथि मी सदा ॥ ९४ ॥ आणि जेव्हांचि कां भक्तीं । दिधली आपुली चित्तवृत्ती । तेव्हांचि मज सूती । त्यांचिये नाटीं ॥ ९५ ॥ अवतरणः—याकारणें गा भक्तराया । हा मंत्र तुवां धनंजया । कीजे जे यया । मार्गा भजिजे ॥ ९६ ॥

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।
निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥

अन्वयः—( हे अर्जुन, ) मयि एव मनः आधत्स्व च मयि बुद्धिं निवेशय; अतः ऊर्ध्वं मयि एव निवसिष्यसि ( अत्र ) संशयः न ॥ ८ ॥

( ५२५. मनबुद्धि देवाला अर्पण केली म्हणजे देवरूप होईल असें शपथपूर्वक देव सागतात, ९७–१०३ ) अगा मानस हें एक । माझ्या स्वरूपीं वृत्तिक । करूनि घालीं निष्टंक । बुद्धि निश्चयेंसीं ॥ ९७ ॥ इयें दोनी सरिसीं । मजमाजि प्रेमेंसीं । रिगालीं तरी पावसी । मातें तूं गा ॥ ९८ ॥ जे मनबुद्धि इहीं । घर केलें माझ्या ठायीं । तरि सांगें मग काई । मी तूं उरे ॥ ९९ ॥ म्हणोनि दीप पालवे । सवेंचि तेज मालवे । कां रविबिंबासवें । प्रकाशु जाय ॥ १०० ॥ उंचललेया प्राणासरिसीं । इंद्रियेंही निगती जैसीं । तैसा मनोबुद्धिपासीं । अहंकारु ये ॥ १ ॥ म्हणोनि माझिया स्वरूपीं । मनबुद्धि इयें निक्षेपीं । येतुलेनि सर्वव्यापी । मीचि होसी ॥ २ ॥ यया बोला कांहीं । अनारिसें नाहीं । आपली आण पाहीं । वाहतु असें गा ॥ ३ ॥

अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।
अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥

अन्वयः—धनंजय, अथ मयि स्थिरं चित्तं समाधातुं न शक्नोषि ( चेत् ), ततः अभ्यासयोगेन मां आप्तुं इच्छ ॥ ९ ॥

( ५२६. मनबुद्धि अर्पण करण्यास असमर्थ असशील तर अभ्यासानें तूं मत्स्वरूप हो, १०४–११३ ) अथवा हें चित्त । मनबुद्धीसहित । माझ्या हातीं अचुंबित । न शकसी देवों ॥ ४ ॥ तरि गा ऐसें करीं । यया आठां पाहरांमाझारीं । मोटकें निमिषभरी । देतु जाय ॥ ५ ॥ मग जें जें कां निमिख । देखेल माझें सुख । तेतुलें अरोचक । विषयीं घेईल ॥ ६ ॥ जैसें शरत्कालु रिगे । आणि सरिता वोहटूं लागे । तैसें चित्त काढेल वेगें । प्रपंचौनी ॥ ७ ॥ मग पुनवेहूनि जैसें ।

१ परिवारासह असलेले गृहस्थ. २ नावेवर. ३ सागाडा. ४ मुक्तीच्या. ५ तारण करणारा. ६

रहित होते, त्यांना मीं आपलें ध्यान करण्यास सांगितलें; व जे परिवारासह आले, त्यांना नावेवर बसण्यास सांगितलें. (त्यांना नामस्मरण करण्यास सांगितलें.) ९१ कांहीं भक्तांच्या पोटाला प्रेमरूपी सांगाडा बांधून त्यांना मुक्तिरूप तटाला आणलें; ९२ परंतु ज्यांनीं म्हणून आपल्यास माझे भक्त म्हणविलें—मग ते चतुष्पाद का असतना ?—त्यांना मीं वैकुंठाच्या राज्यावर बसण्यास योग्य केलें. ९३ म्हणून, माझ्या भक्तांना कसलीही चिंता उत्पन्न होत नाहीं; कारण, त्यांना तारणारा मी सदोदित उभा आहें; ९४ आणि ज्या वेळेस भक्त आपली चित्तवृत्ति माझ्या ठिकाणीं अर्पण करतात, त्याच वेळेस ते आपल्या छंदांत मला घालतात; ९५ याच कारणास्तव, हे भक्तराया धनंजया, ' भक्तिमार्गाला लाग ' हा मंत्र मी तुला सांगतों. ९६

*श्लोकार्थः—अर्जुना, तूं माझ्या ठिकाणींच मन ठेव; व माझ्याच ठिकाणीं बुद्धीची स्थापना कर. असें केल्यावर तूं माझ्या ठिकाणींच वास करशील यात संशय नाहीं. ॥ ८ ॥*

अरे, एक मन व दुसरी बुद्धि हीं निश्चयानें माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं वतनदार करून ठेव. ९७ याप्रमाणें हीं दोन्ही ( मन व बुद्धि ). प्रेमानें माझ्या स्वरूपांत बरोबर रीतीनें एकत्र होऊन माझ्या ठिकाणीं प्रविष्ट झालीं, म्हणजे तूं मलाच येऊन मिळशील. ९८ कारण, मन व बुद्धि यांनीं माझ्या ठिकाणीं वास्तव्य केल्यावर, तुझ्यांत व माझ्यांत दुजेपणा उरला का सांग बरें ? ९९ म्हणून, दिवा मालवल्याबरोबर ज्याप्रमाणें त्याचें तेज नाहींसें होतें, किंवा सूर्यबिंब मावळल्याबरोबर प्रकाश नाहींसा होतो, १०० अथवा बाहेर निघूं पाहणाऱ्या प्राणाबरोबर इंद्रियें बाहेर पडतात, त्याप्रमाणें मन व बुद्धि एकत्र होऊन जिकडे जातील, तिकडे अहंकार हा त्यांचेबरोबर आपोआप जातो. १ म्हणून, माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं मन व बुद्धि हीं दोन्ही कायम ठेव; म्हणजे, सर्वव्यापक असा जो मी तोच तूं होशील. २ अर्जुना, मी आपल्या गळ्याची शपथ वाहून सांगतों कीं, या माझ्या बोलण्यांत एक अक्षर देखील खोटें नाहीं. ३

*श्लोकार्थः—धनंजया, जर तूं आपलें चित्त माझ्या स्वरूपीं स्थिर करण्यास समर्थ होणार नाहींस, तर अभ्यासाच्या योगानें मला प्राप्त करून घेण्याची इच्छा धर ॥ ९ ॥*

अथवा, जर मन व बुद्धि यांसहित तूं आपलें चित्त माझ्या ठिकाणीं पूर्णपणें अर्पण करण्यास समर्थ नसशील, ४ तर असें कर कीं, या आठ प्रहरामध्यें एक क्षणभर तरी मन व बुद्धि यांना माझ्याकडे लाव. ५ मग जितका वेळ तुझ्या मनाला माझ्या समागमसुखाचा अनुभव येईल, तितका वेळपर्यंत त्याला विषयाची अरुचि उत्पन्न होईल. ६ मग, ज्याप्रमाणें शरदृतु सुरू झाला म्हणजे नद्यांचें पाणी कमी होऊं लागतें, त्याप्रमाणें जसजसें माझ्या ठिकाणीं तुझें चित्त गुंतेल, तसतसें तें प्रपंचांतून बाहेर निघेल. ७ अथवा,

छंदात. ७ वतनदार. ८ अन्याहत. ९ मालवल्याबरोबर. १० बाहेर निघूं पाहणाऱ्या. ११ कायम ठेव; पुरून ठेव. १२ खोटें; वेगळें. १३ पूर्णपणें. १४ अरुचि; नावड. १५ सुरू झाला.

शशिबिंब दिसेंदिसें । हारपत आवसे । नाहींचि होय ॥ ८ ॥ तैसें भोगाआंतूनि निगतां । चित्त मजमाजि रिगतां । हळु हळु पांडुसुतां । मीचि होईल ॥ ९ ॥ अगा अभ्यासुयोगु म्हणिजे । तो हा एकु जाणिजे । येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ॥ ११० ॥ पैं अभ्यासाचेनि बळें । एकां गति अंतराळें । व्याघ्र सर्प पाळिले । केले एकीं ११ ॥ विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे । एकीं वाग्ब्रह्म थोकेडें । अभ्यासें केलें ॥ १२ ॥ म्हणोनि अभ्यासासि कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं । यालागिं माझ्या ठायीं । अभ्यासें मिळ ॥ १३ ॥

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव।
मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥

*अन्वयः*—(त्वं) अभ्यासे अपि असमर्थः असि (चेत्), तर्हि मत्कर्मपरमः भव; मदर्थं कर्माणि कुर्वन् अपि सिद्धिं अवाप्स्यसि ॥ १० ॥

( ५२७. अभ्यास करण्यास असमर्थ असशील तर सर्व कर्मे माझ्यासाठींच कर. ११४–१२४ ) कां अभ्यासाही लागीं । कैसु नाहीं तुझिया आंगीं । तरि आहासी जया भाँगीं । तैसाचि अस ॥ १४ ॥ इंद्रियें न कोंडीं । भोगातें न तोडीं । अभिमानु न संडीं । स्वजातीचा ॥ १५ ॥ कुळधर्मु चाळीं । विधिनिषेध पाळीं । मग सुखें तुज सरळी । दिधली आहे ॥ १६ ॥ परि मनें वाचा देहें । जैसा जो *व्यापारु* होये । तो मी करितु आहें । ऐसें न म्हणें ॥ १७ ॥ करणें कां न करणें । हें आघवें तोचि जाणे । विश्व चळतसे जेणें । परमात्मेनि ॥ १८ ॥ उणया पुरेयाचें कांहीं । उरों नेदीं आपुलिया ठायीं । स्वजाती करूनि घेईं । जीवित्व आपुलें ॥ १९ ॥ माळिये जेउतें नेलें । तेउतें निवांतचि गेलें । तया पाणियाऐसें केलें । होआवें गा ॥ १२० ॥ म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ति । इयें वोझीं नेघें मति । अखंड चित्तवृत्ति । माझ्या ठायीं ॥ २१ ॥ येऱ्हवीं तरी सुभटा । उजू का अव्हांटा । रथु काई खटपटा । करितु असे ॥ २२ ॥ आणि जें जें कर्म निपजे । तें थोडें बहु न म्हणिजे । निवांतचि अर्पिजे । माझ्या ठायीं ॥ २३ ॥ ऐसिया मद्भावना । तनुत्यागीं अर्जुना । तूं सायुज्यसदना । माझिया येसी ॥ २४ ॥

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः।
सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

अन्वयः—अथ एतत् अपि कर्तुं अशक्तः असि, ततः यतात्मवान् मद्योगमाश्रितः (सन्) सर्वकर्मफलत्यागं कुरु ॥ ११ ॥

( ५२८. माझ्यांसाठीं कर्मे करण्यास असमर्थ असशील तर सर्व कर्मफलत्याग कर,

१ दिवसानुदिवस. २ अंतरिक्षांत. ३ निर्विरों. ४ वेद. ५ आपल्या अधीन करून घेतले. ६ शक्ति. ७ क्रमांत. ८ कर. ९ मोकळीक. १० व्यापार करतें. ११ प्रपंच–चागलें कर्म करणें. १२ परमार्थ–वाईट कर्मापासून माघार घेणें. १३ मरणकाळीं.

ज्याप्रमाणें पौर्णिमेपासून चंद्रबिंब दिवसानुदिवस कमी होत जाऊन अमावास्येला नाहींसें होतें, ८ त्याप्रमाणें अर्जुना, तें चित्त हळू हळू विषयोपभोगांतून निघून माझ्या ठिकाणीं लागतां लागतां शेवटीं मद्रूपच होऊन जाईल। ९ अरे, अभ्यासयोग ज्याला म्हणतात, तो हाच, असें पक्कें समज. यापासून प्राप्त होणार नाहीं अशी कोणतीही वस्तु नाहीं। ११० अभ्यासाच्या बळानें कोणी अंतरिक्षांत फिरतात; कोणी वाघ, सर्प ह्यांना देखील निर्वैर करतात, ११ विषसुद्धा पचनीं पडतें, समुद्रावरही पायवाट होते, व कोणीं कोणीं तर अभ्यासाच्या योगानें वेदांसही हस्तगत करून घेतलें आहे; १२ म्हणून अभ्यास केला असता कोणतीही वस्त प्राप्त होणारी नाहीं असें नाहीं; याकरितां, अभ्यासाच्या योगानें तूं मला येऊन मिळ. १३

श्लोकार्थः—अभ्यास करण्याचें देखील जर तुला सामर्थ्य नसलें, तर माझ्या उद्देशानें कर्में करीत जा. माझ्या उद्देशानें कर्में केलींस तरी तुला मोक्षप्राप्ति होईल ॥ १० ॥

किंवा अभ्यास करण्याची जर तुझ्या अंगांत शक्ति नसेल, तर तुझ्या आचरणाचा जो क्रम असेल तो तसाच चालीव. १४ इंद्रियांना कोंडूं नको, उपभोग कमी करूं नको, आणि आपल्या स्वतांच्या जातीचा अभिमान सोडूं नको; १६ आपले कुळधर्म-कुळाचार यथाविधि कर; जीं कर्में करण्यास योग्य असतील तीं कर व करण्यास अयोग्य असतील तीं करूं नको. याप्रमाणें सुखानें वागण्याची तुला मोकळीक आहे. १६ परंतु कायावाचामनेंकरून जे व्यापार होतील, ते ' मी करतों ' असें म्हणूं नको. १७ जो परमात्मा या विश्वाचा चालक आहे, तो, कर्मांचा कर्ता कोण व कर्म न करणारा कोण हें सर्व जाणतो आहे. १८ अमुक कर्म कमी झालें व अमुक कर्म जास्ती झालें याविषयीं आपले मनांत खेद मानूं नको, व आपलें जीवित आपल्या स्वरूपरूपी करून घे. १९ ज्याप्रमाणें, माळी नेईल तिकडे पाणी हें निवातपणें जातें, त्याप्रमाणें मनांतील कर्तृत्वाभिमान टाकून द्यावा. १२० म्हणजे प्रवृत्तिनिवृत्तींचें ओझें बुद्धीवर पडत नाहीं ( अमुक चागलें किंवा अमुक वाईट हा भेद उरत नाहीं ), व चित्तवृत्ति माझ्या ठायीं अखंड राहते. २१ बाकी अर्जुना, वाट सरळ आहे किंवा वाकडी आहे, याविषयीं रथाला कांहीं काळजी आहे का ? जिकडे त्यास न्यावें तिकडे तो जातो; २२ त्याप्रमाणें, जें जें कर्म तूं करशील; तें थोडें किंवा पुष्कळ आहे असे न म्हणतां एकनिष्ठेनें मला अर्पण कर. २३ अर्जुना, अशा प्रकारें तूं सर्व कर्मांविषयीं माझ्याच ठिकाणीं भावना धरलीस, ( सर्व कर्में मलाच अर्पण केलींस ), म्हणजे शरीरत्यागानंतर तूं मत्पदालाच येशील. २४

श्लोकार्थः—आता, हेंही करण्याला जर तूं असमर्थ असलास, तर मनाचा संयम कर; आणि अनन्यभावेंकरून मला शरण येऊन, सर्व कर्मांच्या फलाचा त्याग कर ॥ ११ ॥

किंवा हे पांडुकुमरा, जर तुझ्यानें मला कर्में अर्पण करवणार नाहींत, तर तूं असें

म्हणजे मत्स्वरूप होशील; १२५–१३६ ) ना तरी हेंही तुज । नेदवे[1] कर्म मज । तरी गा तूं बूज । पाण्डुकुमरा ॥ २५ ॥ बुद्धीचिये पाठीं पोटीं । कर्मा आदि कां शेवटीं । मातें बांधणें किरीटी । दुवाड जरी ॥ २६ ॥ तरि हेंही असो । सांडीं माझा अतिसो[4] । परि संयतीसी[5] वसो । बुद्धि तुझी ॥ २७ ॥ आणि जेणें जेणें वेळे । घडती कर्में सकळें । तयांचीं तियें फळें । त्यजीतु जाय ॥ २८ ॥ वृक्ष कां वेली । लोटती फळें आलीं । तैसीं सांडीं निपजलीं । कर्में सिद्धें ॥ २९॥ परि मातें मनीं धरावें । कां मजउद्देशें करावें । हें कांहीं नको आघवें । जाऊं दे शून्यीं ॥ १३० ॥ खडकीं जैसें वर्षलें । कां आगीमाजि पेरिलें । कर्म मानीं देखिलें । स्वप्न जैसें ॥ ३१ ॥ अगा आत्मजेच्या विषीं । जिवु जैसा निरभिलाषी । तैसा कर्मीं अशेषीं । निष्कामु होईं ॥ ३२ ॥ वन्हीची ज्वाळा जैसी । वायां जाय आकाशीं । क्रिया जिरों दे तैसी । शून्यामाजी ॥ ३३ ॥ अर्जुना हा फलत्यागु । आवडे कीर असलगु । परि योगामाजि योगु । धुरेचा हा ॥ ३४ ॥ येणें फलत्यागें सांडे । तें तें कर्म न विरुढे[11] । एकाचि वेळे वेळझाडें । वांझें जैसीं ॥ ३५ ॥ तैसें येणेंचि शरीरें । शरीरा येणें सरे । किंबहुना येरझारे । चिरा पडे[12] ॥ ३६ ॥

अवतरणः—( ५२९ अभ्यासापेक्षां ज्ञान श्रेष्ठ, ज्ञानापेक्षां ध्यान श्रेष्ठ, ध्यानापेक्षां कर्मफलत्याग श्रेष्ठ व कर्मफलत्यागानें शांति प्राप्त होते, १३७–१४३ ) पैं अभ्यासाचिया पैंउठीं । ठाकिजे ज्ञान किरीटी । ज्ञानें येइजे भेटी । ध्यानाचिये ॥ ३७ ॥ मग ध्यानासि खेंवें । देती[15] आघवेचि भाव । तेव्हां कर्मजात सर्व । दुरी ठाके ॥ ३८ ॥ कर्म जेथ दुरावे । तेथ फलत्यागू संभवे । त्यागास्तव आंगवे[16] । शांति सगळी ॥ ३९ ॥ म्हणोनि यावया शांती । हाचि अनुक्रमु सुभद्रापति । म्हणोनि अभ्यासुचि प्रस्तुतीं । करणें एथ ॥ १४० ॥

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥ १२ ॥

अन्वयः—अभ्यासात् ज्ञानं श्रेयः ( आस्ति ); ज्ञानात् ध्यान विशिष्यते; ध्यानात् कर्मफलत्यागः ( विशिष्यते ); अनंतरं त्यागात् शांतिः ( भवति ) हि ॥१२॥

अभ्यासाहूनि गहन । पार्था मग ज्ञान । ज्ञानापासोनि ध्यान । विशेषिजे ॥ ४१ ॥ मग कर्मफलत्यागु । तो ध्यानापासोनि चांगु । त्यागाहूनि भोगु । शांतिसुखाचा ॥ ४२ ॥ अवतरणः—ऐसिया या वाटा । इहींचि पेणाँ सुभटा । शांतीचा माजिवटीं । ठाकिलों जेणें ॥ ४३ ॥

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च । निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

१ अर्पण करवणार नाहीं. २ समज. ३ माझी आठवण धरणें. ४ आठवण. ५ इंद्रियनिग्रहामध्यें. ६ शून्यांत जाऊं दे, निष्फळ होऊं दे. ७ कन्येच्या. ८ निरिच्छ. ९ सोपा; सामान्य. १० श्रेष्ठ. ११ पुनर्जन्मास कारणीभूत होत नाहीं. १२ दगड पडतो; बंद पडतात. १३ पायरीनें. १४ प्राप्त होते.

समज: २५ कर्मे करण्याला उद्युक्त करणारी जी बुद्धि, तिच्या अगोदर किंवा पाठीमागून अथवा कर्मांच्या अगोदर किंवा अंतीं माझी आठवण करणें तुला जर कठीण वाटलें, २६ तर माझी वरचेवर आठवण करणें हेंही एका बाजूस राहूं दे; परंतु तूं आपल्या बुद्धीचा विनियोग इंद्रियनिग्रह करण्यांत कर; २७ आणि ज्या ज्या वेळीं जीं जीं कर्में घडतील त्यांच्या त्यांच्या फळाची आशा धरूं नको. २८ ज्याप्रमाणें वृक्ष किंवा वेली आपल्यास फळें आलीं असतां त्यांची आशा न धरतां तीं टाकून देतात, त्याप्रमाणें, जीं जीं कर्में पूर्ण होतील, त्यांच्या त्यांच्या फळाची आशा सोडून दे. २९ परंतु मला मनांत आठवून किंवा मला उद्देशून कोणतींही कर्में करावीं, ही खटपट न करितां सर्व निष्फळ होऊं दे. १३० ज्याप्रमाणें खडकावर पाऊस पडला असतां किंवा अग्नींत बीं पेरलें असतां निष्फळ होतें, त्याप्रमाणें जें जें कर्म तूं करशील, तें तें स्वप्नवत् मान. ३१ अरे, ज्याप्रमाणें पिता आपल्या कन्येविषयीं अभिलाष बाळगीत नाहीं, त्याप्रमाणें जीं जीं कर्में तूं करशील, त्यांच्या फलप्राप्तीची इच्छा करूं नको. ३२ ज्याप्रमाणें अग्नीची ज्वाला आकाशात व्यर्थ जाते, त्याप्रमाणें कर्मांपासून उत्पन्न होणारीं फळें व्यर्थ जाऊं दे. ३३ अर्जुना, कर्में करून त्यांच्या फळांची इच्छा न करणें हा जरी सामान्य मार्ग वाटत आहे, तरी सर्व योगांत हा श्रेष्ठ योग आहे. ३४ याप्रमाणें कर्में करून त्यांचा फलत्याग केला, म्हणजे तीं कर्में पुनर्जन्मास कारणीभूत होत नाहींत. जसें वेळूचें झाड एक वेळ व्यालें म्हणजे पुनः वीत नाहीं, ३५ तसें ऱ्या देहानें (याच जन्मीं) पुनः देह धारण करणें संपतें; किंबहुना जन्ममरणांच्या फेऱ्यांतून मुक्तता होते. ३६ परंतु अर्जुना, अभ्यासाच्या योगानें ज्ञान प्राप्त होतें, व ज्ञानप्राप्ति झाल्यावर ध्यान करतां येतें. ३७ नंतर सर्व मनोवृत्ति व धर्म ध्यानाला आलिंगन देतात; तेव्हां कर्म आपोआप दूर राहतें. ३८ जेव्हां कर्म आपोआप दूर राहतें, तेव्हां फळाची इच्छा नाहींशी होते. असें झाल्यावर सर्व शांति आपल्या अधीन होते. ३९ म्हणून, हे सुभद्रापते, शांति उत्पन्न होण्याचा हाच एक मार्ग आहे. तेव्हां तुला अगोदर अभ्यासच केला पाहिजे. १४०

*श्लोकार्थः—अभ्यासाहून ज्ञान श्रेष्ठ आहे; ज्ञानाहून ध्यान श्रेष्ठ आहे; व ध्यानाहून कर्मफलत्याग श्रेष्ठ आहे; का कीं, कर्मफलत्यागापासून शांति प्राप्त होते ॥ १२ ॥*

पार्था, अभ्यासापेक्षां ज्ञान कठीण, व ज्ञानापेक्षां ध्यान अधिक कठीण आहे. ४१ नंतर, कर्मांच्या फळांची इच्छा सोडणें हें ध्यानापेक्षाही उत्तम आहे; व त्यागापेक्षाही ब्रह्मरूपप्राप्तीचें सुख विशेष आहे. ४२ हे महावीरा, याप्रमाणें हे ब्रह्मरूपप्राप्तीचे मार्ग असून याच टप्प्यानें जो शांतीची प्राप्ति करून घेतो, ४३

*श्लोकार्थः—जो कोणाचाही द्वेष करीत नाहीं; जो सर्व भूतांचा मित्र, जो दयाळू, जो ममत्वशून्य, सुख व दुःख हीं दोन्ही ज्याला समान, जो क्षमावान् आहे ॥ १३ ॥*

---

१५ आलिंगन देतात, येऊन भेटतात; प्राप्त होतात. १६ स्वाधीन होते. १७ मुक्काम; टप्पे. १८ मध्यभाग. १९ प्राप्त करून घेतला.

अन्वयः—( यः ) सर्वभूतानां अद्वेष्टा, मैत्रः च एव करुणः निर्ममः, निरहंकारः, सम दुःखसुखः, क्षमी ॥ १३ ॥

( ५३०. शांति प्राप्त झालेल्या पुरुषाचीं लक्षणें, १४४–१५२ ) जो सर्व भूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेचि कहीं । आपपरु जया नाहीं । चैतन्या जैसें ॥ ४४ ॥ उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे । हें कांहींच नेणिजे । वसुधा जेवीं ॥ ४५ ॥ कां रायाचें देह चाळूं । रंकां परौतें गाळूं । हें न म्हणेचि कृपाळु । प्राणु पैं गा ॥ ४६ ॥ गाईची तृषा हरूं । कां व्याघ्रा विष होऊनि मारूं । ऐसें नेणेचि कां करूं । तोय जैसें ॥ ४७ ॥ तैसी आघवियांचि भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री । कृपेशीं धात्री । आपणचि जो ॥ ४८ ॥ आणि मी हें भाष नेणे । माझें कांहींचि न म्हणे । सुख दुःख जाणणें । नाहीं जया ॥ ४९ ॥ तेवींचि क्षमेलागीं । पृथ्वीसि पवाडु आंगीं । अवतरणः—संतोषा उत्संगीं । दिधलें घर ॥ १५० ॥

संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥

अन्वयः—संततं संतुष्टः, योगी, यतात्मा, दृढनिश्चयः, मय्यर्पितमनोबुद्धिः, मद्भक्तः, सः मे प्रियः ( अस्ति ) ॥ १४ ॥

वार्षियेवीण सागरु । जैसा जळें नित्य निर्भरू । तैसा निरुपचारु । संतोषी जो ॥ ५१ ॥ वाहूनि आपुली आण । धरी जो अंतःकरण । निश्चया साचपण । जयाचेनि ॥ ५२ ॥ ( ५३१. जीवपरमात्म्याचे ऐक्याचा निश्चय करणारा भक्त देवाला फार आवडतो, १५३-१५४ ) जींवु परमात्मा दोनी । बैसोनि ऐक्यासनीं । जयाचिया हृदयभुवनीं । विराजती ॥ ५३ ॥ ऐसा योगसमृद्धि । होऊनि जो निरवधि । अर्पी मनोबुद्धि । माझ्या ठायीं ॥ ५४ ( ५३२. देवभक्तांच्या प्रेमाचें वर्णन; काव्य, १५५-१६४ ) आंतु बाहेरि योगु । निर्वाळिलेयाही चांगु । तरि माझा अनुरागु । सप्रेम जया ॥ ५५ ॥ अर्जुना तो भक्तु । तोचि योगी तोचि मुक्तु । तो वल्लभा मी कांतु । ऐसा पढिये[2] ॥ ५६ ॥ हें ना तों आवडे । मज जीवाचेनि पाडें । हेंही एथ थोकडें । रूप[3] करणें ॥५७॥ तरी पढियंतयाची कहाणी । हे भुलीची भारणी । इयें तंव न बोलणीं । परी बोलवी श्रद्धा ॥ ५८ ॥ म्हणोनि गा आम्हा । वेगां आली उपमा । येऱ्हवीं काय प्रेमा । अनुवादु असे ॥ ५९ ॥ आतां असो हें किरीटी । पैं प्रियाचिया गोष्टी । दुणा थांव उठी । आवडी गा ॥ १६० ॥ तयाहीवरी विपायें । प्रेमळु संवादिया होये । तिये गोडीसी आहे । कांटाळें मग ॥ ६१ ॥ म्हणोनि गा पांडुसुता । तूंचि प्रियु आणि तूंचि श्रोता । वरि प्रियाची वार्ता । प्रसंगें आली ॥ ६२ ॥ अवतरणः—तरि आतां बोलों । भलें या सुखा मीनलों ।

१ पृथ्वी. २ रहावें. ३ राहूं नये. ४ पाणी. ५ आधारभूत. ६ योग्यता. ७ मांडीवर. ८

त्याच्या मनांत भूतमात्राविषयीं द्वेष म्हणून मुळींच वसत नाहीं. ( त्याची सर्वत्र समदृष्टि असते. ) चैतन्याला जसा आपपरभाव नाहीं; ४४ पृथ्वी ज्याप्रमाणें, उत्तम मनुष्याचा भार सहन करावा व अधमाचा करूं नये असा भेद बाळगीत नाहीं; ४५ अथवा कृपावंत प्राणाला, ज्याप्रमाणें राजाचे देहांत राहावें व रंकाच्या देहांत राहूं नये असें वाटत नाहीं; ४६ किंवा पाणी ज्याप्रमाणें गाईची तहान भागवावी वा वाघाला विषाप्रमाणें होऊन मारावें असें मनांत आणीत नाहीं, ४७ त्याप्रमाणें, प्राणिमात्राच्या ठिकाणीं ज्याची सारखी मैत्री असून जो कृपेला आपण आधारभूत होतो, ४८ आणि मी व माझें असें ज्याच्या मनांत उद्भवत नाहीं, व सुख-दुःख हेंही ज्याचे मनांत येत नाहीं; ४९ त्याचप्रमाणें, क्षमेविषयीं ज्याची पृथ्वीसारखी योग्यता आहे, व संतोषाला ज्यानें आपल्या मांडीवर राहण्यास जागा दिली आहे; १५०

श्लोकार्थः—जो सर्वदा संतुष्ट आहे, जो स्थिरचित्त आहे, ज्याच्या मनाचा संयम झाला आहे, ज्याचा निश्चय बळकट आहे, आणि ज्यानें आपलें मन व बुद्धि हीं मला अर्पण केलीं आहेत, असा जो माझा भक्त, तो मला प्रिय आहे. ॥ १४ ॥

वर्षाऋतूशिवाय देखील जसा समुद्र नेहमीं पाण्यानें भरलेला असतो, तसा आनंदाचे उपचार केल्याशिवायही जो सहज आनंदांत निमग्न असतो; ५१ जो आपलें मन आपलीच शपथ घालून ताब्यांत ठेवतो, व ज्याच्या निश्चयाच्या बळानें निश्चयाला खरेपणा येतो; ५२ ज्याच्या हृदयमंदिरांत एकाच आसनावर बसून जीव व परमात्मा हे दोन्ही विराजमान होतात; ५३ अशा योगसंपत्तीनें पूर्णत्वास पावला असून जो मन व बुद्धि माझ्या ठिकाणीं अर्पण करतो; ५४ आणि अंतर्यामीं ( ध्यानयोगानें ) व बाहेरून ( अष्टांगयोगानें ) जरी सिद्ध झाला, तरी माझी भक्ति जो प्रेमानें करतो, ५५ अर्जुना, तोच भक्त, तोच योगी, आणि तोच मुक्त. फार काय सांगावें ? तो स्त्री व मी पति इतका मला तो आवडता आहे. ५६ छे छे ! असें नव्हे, तो मला माझ्या जिवापेक्षाही जास्त प्रियकर आहे; परंतु हाही दृष्टांत या ठिकाणीं कमीच होय. ५७ तर, आवडत्याची गोष्ट ही केवळ भुरळ पाडणारी भूलच होय. ही बोलून दाखविण्यासारखी गोष्ट नाहीं. परंतु आवडच आमच्याकडून वदविते; ५८ आणि म्हणूनच आम्ही सहज अशी उपमा देऊन गेलों; बाकी प्रेमाचें वर्णन करतां आलें आहे का ? ५९ अर्जुना, ह्या सर्व गोष्टी बाजूस ठेव; कारण, आवडत्या मनुष्याविषयीं गोष्टी निघाल्या असतां आवड दुप्पट वाढते. १६० त्यांतूनही कदाचित् गोष्ट ऐकणाराही प्रेमळच भेटला, तर त्या गोडीला उपमा देतां येईल का ? ६१ म्हणून अर्जुना, तूंच माझा आवडता असून, तूंच आवडीच्या गोष्टी ऐकणारा आहेस; आणि त्यांतून माझ्या प्रिय भक्ताचीच गोष्ट तुझ्याजवळ बोलण्याचा प्रसंग आला. ६२ तर आतां काय होईल तें होवो, मी बोलतोंच; व बोलण्याचा प्रसंग आला हेंही आपलें

* बनला, तयार झाला. ९ प्रीति. १० स्त्री. ११ भ्रतार. १२ आवडता. १३ उपमा.

ऐसें म्हणतखेवीं डोलों । लागला देवो ॥ ६३ ॥ मग म्हणे जाण । तया भक्ताचें लक्षण । जया मी अंतःकरण । बैसों घालीं ॥ ६४ ॥

यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥

अन्वयः—लोकः यस्मात् न उद्विजते यः च लोकात् न उद्विजते, यः च हर्षामर्षभयोद्वेगैः मुक्तः, सः मे प्रियः ( अस्ति ) ॥ १५ ॥

( ५३३. हर्षामर्षरहित भक्त देवाला फार आवडतो. १६५–१७१. ) तरि सिंधूचेनि[1] माजें । जळचरां भय नुपजे । आणि जळचरीं नुबगिजे । समुद्र जैसा ॥ ६५ ॥ तेविं उन्मत्तें जगें । जयासि खंती न लगे । आणि जयाचेनि आंगें । न शिणे लोकु ॥ ६६ ॥ किंबहुना पांडवा । शरीर जैसें अवयवां । तैसा नुबगे जीवां । जीवैंपणें जो ॥ ६७ ॥ जगचि देह जाहलें । म्हणोनि प्रियाप्रिय गेलें । हर्षामर्ष ठेले । दुजेनविण ॥ ६८ ॥ ऐसा द्वंद्वनिर्मुक्तु । भयोद्वेगरहितु । याही-वरी भक्तु । माझ्या ठायीं ॥ ६९ ॥ तरि तयाचा गा मज मोहो । काय सांगों तो पढियावो । हें असो जीवें जीवों । माझेनि तो ॥ १७० ॥ अवतरण—जो निजानंदें धालें । परिणामु आयुष्या आला । पूर्णतें जाहला । वल्लभु जो ॥७१॥

अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।
सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥

अन्वयः—यः मद्भक्तः अनपेक्षः, शुचिः, दक्षः, उदासीनः, गतव्यथः, सर्वारंभपरित्यागी, सः मे प्रियः ( अस्ति ) ॥ १६ ॥

( ५३४. सर्व आरंभांचा त्याग करणारा निःस्पृह उदासीन भक्त देवाला फार आवडतो. १७२–१८७. ) जयाचिया ठायीं पांडवा । अपेक्षे नाहीं रिगावा । सुखासि चढावा । जयाचें असणें ॥ ७२ ॥ मोक्ष देऊनि उदार । काशी होय कीर । परि वेंचे शरीर । तिये गांवीं ॥ ७३ ॥ हिमवंतु दोष खाये । परि जीविताची हानि होये । तैसें शुचित्व नोहे । सज्जनांचें ॥ ७४ ॥ शुचित्वें शुचि गंगा होये । आणि पाप तापही जाये । परि तेथें आहे । बुडणें एक ॥ ७५ ॥ खोलिये पारु नेणिजे । तरी भक्तीं न बुडिजे । रोकडाचि लाहिजे । न मरतां मोक्षु ॥ ७६ ॥ संतांचेनि अंगलगें । पापातें जिणणें गंगे । तेणें संतसंगें । शुचित्व कैसें ॥ ७७ ॥ म्हणोनि असे जो ऐसा । शुचित्वें तीर्था कुवासा । जेणें उलंघविले दिशा । मनोमळ ॥७८॥ आंतु बाहेरि चोखाळ । सूर्य तैसा निर्मळ । आणि तत्त्वार्थींचा पायाळ । देखणा

१ सांठवून ठेवतों. २ खवळल्यानें. ३ कंटाळत नाहीं. ४ आपण सर्वांचा जीव आहों असें मानून. ५ आनंद व क्रोध. ६ सुख व दुःख यांपासून मुक्त. ७ भय व त्रास यांनीं रहित. ८ प्रेम. ९ प्राण. १० तृप्त झाला. ११ रूपांतर. १२ इच्छेस. १३ आश्रय. १४ ब्रह्मज्ञानाविषयीं.

भाग्यच समजतों. असें म्हणून देव डोलूं लागले. ६३ मग म्हणाले:—अर्जुना, ज्यांना मी आपल्या हृदयांत सांठवून ठेवितों, त्या भक्तांचीं लक्षणें कोणतीं तीं ऐक. ६४

श्लोकार्थः—ज्याच्यापासून लोकांना उद्वेग होत नाहीं, व लोकांपासून ज्याला संताप होत नाहीं; आणि विषयसंबंधीं आनंद, क्रोध, भय व त्रास या सर्वांपासून जो मुक्त असतो, तो मला प्रिय आहे ॥ १५ ॥

ज्याप्रमाणें समुद्र क्षोभला असतां जलचरांना त्याची भीति वाटत नाहीं, व जलचरांचा पुष्कळ समुदाय वाढला असतां समुद्रही त्यांचा कंटाळा करीत नाहीं, ६५ त्याचप्रमाणें, उन्मत्त जगाचा ज्याला खेद वाटत नाहीं व ज्याच्या योगानें लोकांनाही त्रास होत नाहीं; ६६ फार काय सांगावें ? शरीर ज्याप्रमाणें अवयवांना कंटाळत नाहीं, त्याप्रमाणें, आपण सर्वांचा जीव आहों असें मानून जो प्राणिमात्राला कंटाळत नाहीं; ६७ जग हेंच शरीर बनल्यामुळें ज्याला आवडती. नावडती गोष्ट असा भेद राहत नाही, व अशा प्रकारें द्वैतभाव नाहींसा झाला म्हणजे ज्याच्या ठिकाणचे आनंद व क्रोध हे विकार नाहींतसे होतात; ६८ याप्रमाणें सुखदुःखापासून ज्याला बाधा होत नाहीं; जो भय, उद्वेग इत्यादिकांनीं रहित असतो; आणि इतकी स्थिति प्राप्त झाली असूनही जर तो माझी भक्ति करीत असला, ६९ तर त्याची मला फार आवड असते; त्या प्रेमाचें मी काय वर्णन करूं ? इतकेंच नव्हे, तर तो माझ्या प्राणांचा प्राण आहे. १७० जो आत्मानंदानें तृप्त झाला आहे, व रूपांतर घेऊन जो जन्मास आला आहे, तो पूर्णतारूप तरुण स्त्रीचा पतिच होय. ७१

श्लोकार्थः—जो माझा भक्त निस्पृह, अंतर्बाह्य पवित्र, दक्ष, उदासीन, निर्भय व फलाच्या इच्छेनें कोणतेंही कर्म न करणारा असा असतो, तो मला प्रिय आहे ॥ १६ ॥

त्याच्या ठिकाणीं, अर्जुना, इच्छा अगदीं नसते, व त्याच्या वृत्तींत सुखाची नेहमीं भर पडत असते. ७२ काशीक्षेत्र मोक्षप्राप्ति करून देण्याबद्दल प्रख्यात आहे; परंतु त्या ठिकाणीं शरीर ठेवल्याशिवाय मोक्ष मिळत नाहीं. ७३ हिमालय पर्वतावर गेलें असतां दोषांचें क्षालन होतें; परंतु तेथील हवा न मानवल्यामुळें जीवाची हानि होते; परंतु जे सज्जन आहेत, त्याच्यापासून जीवाची हानि न होतां पवित्रता प्राप्त होते. ७४ दुसऱ्यास पावन करते म्हणून गंगा ही पवित्र आहे, आणि तिच्या स्नानानें पाप व मनाचा ताप हीं दूर होतात; परंतु तिच्यांत बुडण्याची भीति असते. ७५ तशी भक्तिरूप नदीची खोली अपार आहे, तरी जो मनुष्य तिच्या मार्गानें जाईल, तो न बुडतां व त्याची प्राणहानि न होतां त्याला अविच्छिन्न मोक्ष प्राप्त होतो. ७६ ज्या संतांच्या समागमानें गंगेचेंही पातक नाहींसें होतें, त्या संतसंगापासून पवित्रता प्राप्त होईल किंवा नाहीं हें कशास विचारावें ? ७७ म्हणून, जो साधु आहे, तो आपल्या पवित्रपणानें तीर्थांलाही आश्रयभूत होऊन मनाचे सर्व विकार दशदिशांस लावतो, ७८ तो सूर्याप्रमाणें अंतर्बाह्य निर्मळ असून, पायाळू मनुष्याला ज्याप्रमाणें द्रव्यदृष्टि असते, त्याप्रमाणें त्याला ब्रह्मतत्त्व दिसतें. ७९ ज्याप्रमाणें आकाश

जो ॥ ७९ ॥ व्यापक आणि उदास । जैसें कां आकाश । तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ॥ १८० ॥ संसारव्यथे फिटला । जो नैराश्यें विनटला । व्याधाहातोनि सुटला । [2]विहंगु जैसा ॥ ८१ ॥ तैसा सतत जो सुखें । कोणीही टवैंच न देखे । नेणिजे गतायुषें । लज्जा जेवीं ॥ ८२ ॥ आणि कर्मारंभालागीं । जया अहंकृति नाहीं आंगीं । जैसी निरिंधन आगी । विझोनि जाय ॥ ८३ ॥ तैसा [6]उपशमुचि भागा । जयासि आला पैं गा । जो मोक्षाचिया आंगा । लिहिला असे ॥ ८४ ॥ अर्जुना हा ठाववरी । जो सोहंभावें सरोभरी[7] । द्वैताच्या पैलतीरीं । निगों सरला ॥ ८५ ॥ कीं भक्तिसुखालागीं । आपणपेंचि दोहीं भागीं । वांटूनियां आंगीं । सेवकै घाणे ॥ ८६ ॥ येरा नाम मी ठेवी । मग भजती वोजे बरवी । न भजतया दावी । योगिया जो ॥ ८७ ॥ ( ५३५. देवाला भक्ताचें प्रेम, काव्य, १८८–१८९ ) तयाचें आम्हां व्यसन । आमुचें तो निजध्यान । किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥ ८८ ॥ तयालागीं मज रूपा येणें । तयाचेनि मज एथें असणें । तया लोण कीजे जीवें प्राणें । ऐसा पढिये ॥ ८९ ॥

यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।
शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥

अन्वयः—यः न हृष्यति, न द्वेष्टि, न शोचति, न काङ्क्षति, शुभाशुभपरित्यागी यः भक्तिमान् ( अस्ति, ) सः मे प्रियः ( अस्ति ) ॥ १७ ॥

( ५३६. शुभाशुभ कर्मफळाचा त्याग करणारा भक्त देवाला फार आवडतो, १९०-१९६ ) जो आत्मलाभासारिखें । गोमटें कांहींचि न देखे । म्हणोनि भोगविशेखें । हरिखेजेना ॥ १९० ॥ आपणचि विश्व जाहला । तरि भेदभावो सहजाचि गेला । म्हणोनि द्वेषु ठेला । जया पुरुषा ॥ ९१ ॥ पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे । हें जाणोनि गताचें । न शोची जो ॥ ९२ ॥ आणि जयापरौतें कांहीं नाहीं । तें आपणपेंचि आपल्या ठायीं । जाहला यालागीं जो कांहीं । आकांक्षी ना ॥ ९३ ॥ वोखटें कां गोमटें । हें कांहींचि तया नुमटे । रात्रिदिवस नें घटे । सूर्यासि जेवीं ॥ ९४ ॥ ऐसा बोधुचि केवळ । जो होऊनि असे निखळ । त्याहीवरी भजनशीळू । माझ्या ठायीं ॥ ९५ ॥ तरि तया ऐसें दुसरें । आम्हां पढियंतें सोयरें । नाहीं गा साचोकारें । तुझी आण पांडवा ॥ ९६ ॥

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥

अन्वयः—( यः ) शत्रौ च मित्रे तथा मानापमानयोः समः, शीतोष्णसुखदुःखेषु समः ( च ) संगविवर्जितः ( अस्ति ) ॥ १८ ॥

---

१ तयार झाला. २ पक्षी. ३ आयु, काळजी, पर्वा. ४ मेलेल्याला. ५ लांकडाशिवाय. ६ शांति. ७ ओतप्रोत भरलेला. ८ निघून गेला. ९ रीत. १० पावत नाहीं. ११ माघत नाहीं.

हें सर्वव्यापक असून अलिप्त आहे, त्याप्रमाणें ज्याचें मन सर्वव्यापी असून कशानेंही लिप्त होत नाहीं; १८० ज्याप्रमाणें पारध्याचे हातून पक्षी सुटून गेल्यावर निर्भय होतो, त्याप्रमाणें जो संसाराच्या काळजींतून दूर होऊन निरिच्छ बनलेला असतो; ८१ मेलेल्या मनुष्याला आपलें अंग उघडें पडल्याबद्दल जशी लाज वाटत नाहीं, तसा जो नेहमीं सुखी असून त्याला चांगलें व वाईट यांची पर्वा बिलकूल नसते. ८२ आणि कोणतेंही कर्म आरंभ करण्यापूर्वी त्याचे मनांत कर्तृत्वाभिमान बिलकूल नसतो; ज्याप्रमाणें अग्नि सर्पणाशिवाय आपोआप विझून जातो, ८३ त्याप्रमाणें मोक्षप्राप्तीकरितां सांगितलेल्या अंगांपैकीं उपशम ( शांति ) ज्याच्या वाट्याला आलेला आहे; ८४ अर्जुना, अशा प्रकारें आत्मस्वरूपानें ओतप्रोत भरलेला पुरुष द्वैताच्या पलीकडील तीरावर निघून जातो; ८५ किंवा भक्तीपासून उत्पन्न होणाऱ्या सुखाकरितां आपणच आपली दोन ठिकाणीं वाटणी करून, एकाचें नाव ' सेवक ' असें ठेवतो, ८६ व सेवकाहून जो दुसरा त्याचें नांव ' देव ' असें ठेवून, जो भक्ति न करणाऱ्या लोकांस भक्तिमार्ग आचरून दाखवितो, ८७ त्याचीच आम्हांला प्रीति असते. तो आमचें निजध्यान होतो, किंबहुना तो मिळेल तेव्हाच आम्हांस समाधान होतें. ८८ त्याच्याचकरतां मला हे अवतार घ्यावे लागतात, त्याच्याचकरिता मला या ठिकाणीं वास्तव्य करावें लागतें, आणि त्याच्यावरून मी पंचप्राण ओंवाळून टाकतों, इतका तो मला आवडता असतो ! ८९

श्लोकार्थः—जो इष्ट वस्तूच्या लाभापासून हर्षानें उचंबळत नाहीं, ती न मिळाल्याचा खेद मानीत नाहीं, तिचा वियोग झाला असताना शोक करीत नाहीं व ती प्राप्त होण्याबद्दल इच्छा करीत नाहीं, आणि शुभाशुभ कर्मांचा अत्यंत त्याग करतो, आणि माझी भक्ति करतो, तो मला प्रिय आहे ॥ १७ ॥

जो ब्रह्मप्राप्तीच्या लाभाप्रमाणें उत्तम असें दुसरें कांहींच मानीत नाहीं, व म्हणून त्याला कोणत्याही विशेष उपभोगापासून आनंद होत नाही. १९० जो आपणच विश्व झाल्यामुळें सहजच दुजा भाव विसरतो, म्हणून ज्या पुरुषाचे मनांतून द्वेष नाहींसा होतो; ९१ जी खरोखर आपली वस्तू आहे, ती कल्पांतींही नाहींशी व्हावयाची नाहीं, असें मनांत पक्कें समजून जो गत गोष्टीचा शोक करीत नाहीं, ९२ आणि ज्या स्वरूपापेक्षां उत्तम वस्तु या जगांत दुसरी कोणतीच नाहीं, तें जो स्वतांच होऊन राहिला, तो कसल्याही गोष्टीची इच्छा करीत नाहीं. ९३ वाईट अगर चांगलें हें काहींच ज्याला वाटत नाहीं. ज्याप्रमाणें सूर्याजवळ रात्र व दिवस हा भेद मुळींच नसतो, ९४ त्याप्रमाणें, जो केवळ ज्ञानरूप होऊनही माझ्या भजनांत आपला काळ घालवितो, ९५ त्या भक्ताप्रमाणें आम्हांला दुसरें आवडतें असें कोणी नाहीं, हें अर्जुना, तुझ्याच गळ्याशपथ मी खरोखर सांगतों ! ९६

श्लोकार्थः—जो शत्रूशीं आणि मित्राशीं सारखा वागतो; मान आणि अपमान सारखा मानतो; शीतउष्ण व सुख-दुःख हीं सारखींच समजतो; ज्यानें सर्व संग वर्ज्य केले आहेत ॥ १८ ॥

( ५३७. स्थिरबुद्धि करून भक्ति करणारा देवाला फार आवडतो, १९७-२१३ ) पार्था जयाचिया ठायीं । वैषम्याची वार्ता नाहीं । रिपुमित्रा दोहीं । सरिसा पाडु ॥ ९७ ॥ कां घरींचियां उजियेडु करावा । पारखियां आंधारु पाडवा । हें नेणेचि गा पांडवा । दीपु जैसा ॥९८॥ जो खांडावया घावो घाली । कां लावणी जयानें केली । दोघां एकाचि साउली । वृक्षु दे जैसा ॥ ९९ ॥ नातरी इक्षुदंडु । पाळितया गोडू । गाळितया कडू । नोहेचि जेवीं ॥ २०० ॥ अरिमित्रीं तैसा । अर्जुना जया भावो ऐसा । मानापमानीं सरिसा । होतु जाय ॥ १ ॥ तिहीं ऋतूं समान । जैसें कां गगन । तैसा एकचि मान । शीतोष्णीं जया ॥ २ ॥ दक्षिण उत्तर मारुता । मेरु जैसा पांडुसुता । तैसा सुखदुःख प्राप्तां । मध्यस्थु जो ॥ ३ ॥ माधुर्यें चंद्रिका । सरिसी राया रंका । तैसा जो सकळिकां । भूतां समु ॥ ४ ॥ आघवेया जगा एक । सेव्य जैसें उदक । तैसे तयातें तिन्ही लोक । आकांक्षिती ॥ ५ ॥ जो सबाह्य संग । सांडोनिया लाग । एकाकी असे आंग । आंगीं सूनी ॥ ६ ॥

तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित् ।
अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥

*अन्वयः—( यः ) तुल्यनिंदास्तुतिः, मौनी, येनकेनचित् संतुष्टः ( भवति च ) अनिकेतः,* स्थिरमतिः, भक्तिमान्, सः नरः मे प्रियः ( अस्ति ) ॥ १९ ॥

जो निंदेतें नेघे । स्तुती न श्लाघे । आकाशा न लगे । लेपु जैसा ॥ ७ ॥ तैसें निंदे आणि स्तुती । मानु करूनि एके पांतीं । विचरे प्राणवृत्ती । जनीं वनीं ॥ ८ ॥ साच लटिकें दोन्ही । बोलोनि न बोले जाहला मौनी । जो भोगिता उन्मनी । आरायेना ॥ ९ ॥ जो यथालाभें न तोखे । अलाभें न पारुखे । पाउसेंवीण न सुके । समुद्र जैसा ॥ २१० ॥ आणि वायूसि एकें ठायीं । बिढार जैसें नाहीं । तैसा न धरीच कहीं । आश्रयो जो ॥ ११ ॥ आघवाचि आकाशस्थिति । जेविं वायूसि नित्य वसति । तेविं जगचि विश्रांति- । स्थान जया ॥ १२ ॥ हें विश्वचि माझें घर । ऐसी मति जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ १३ ॥ ( ५३८. भक्त देवाला फार आवडतात, २१४–२२९ ) मग याहीवरी पार्था । माझ्या भजनीं आस्था । तरि तयातें मी माथां । मुकुट करीं ॥१४॥ उत्तमासि मस्तक । खालविजे हें काय कौतुक । परि मानु करिती तिन्ही लोक । पायेंवणिया ॥ १५ ॥ तरि श्रद्धावस्तूसि आदरु । करितां जाणिजे मकारु । जरी

१ वांकडेपणाची. २ परक्याला. ३ चांदणें. ४ अंतर्बाह्य. ५ संबंध. ६ धन्य मानीत नाहीं. ७ गणना. ८ वागतो. ९ ब्रह्मस्थिति. १० दूर होत नाहीं. ११ आपल्या इच्छेप्रमाणें. १२ रागाव‍ नाहीं. १३ राहणें. १४ पायाच्या तीर्थास.

पार्था, ज्याच्या मनांत वांकडेपणाची गोष्टही नसते, आणि जो शत्रु व मित्र या दोघांनाही जो सारखेंच मानतो; ९७ किंवा अर्जुना, आपल्या घरच्या लोकानाच उजेड पाडावा, व परक्यांना अंधार पाडावा हें ज्याप्रमाणें दिवा जाणत नाहीं; ९८ जो आपल्यावर तोडण्याकरितां घाव घालतो किंवा जो आपल्यास लावतो, त्या दोघांनाही झाड सारखीच सावली करितें; ९९ किंवा ऊंस हा, जो पाणी घालून वाढवितो त्यासच गोड, व जो चरकांत घालून गाळतो त्यास कडू असा कधींच लागत नाहीं; २०० त्याप्रमाणें, अर्जुना, शत्रुमित्रभाव ज्याच्या मनांत नसतो, व जो मानापमानाचे ठिकाणीं समबुद्धि ठेवितो; १ आकाश ज्याप्रमाणें तिन्ही ऋतूंत सारखें असतें, त्याप्रमाणें जो थंडी व उन्हाळा या दोहोंस सारखेंच मानतो; २ अर्जुना, मेरु पर्वत ज्याप्रमाणें दक्षिण व उत्तर या दोन्ही दिशांकडील वाऱ्यास सारखाच मानतो, त्याप्रमाणें सुख व दुःख प्राप्त झालें असतां जो आपल्या मनाची समता ढळूं देत नाहीं; ३ रावापासून रंकापर्यंत चांदणें जसें सर्वांस सारखेंच सुखकर असतें, त्याप्रमाणें जो प्राणिमात्रास सारखेंच मानतो; ४ सर्व जगाला पाणी सारखेंच सेव्य आहे, त्याप्रमाणें ज्याची तिन्ही लोक इच्छा करतात; ५ जो अंतर्बाह्य होणाऱ्या विषयाचे संबंध व तसेंच पुढें प्राप्त होणारे संबंध सोडून देतो, व एकांतांत राहून आपलें मन आपल्या मनावरच स्थिर करून सुख मानतो; ६

श्लोकार्थः—ज्याला निंदा आणि स्तुति समान आहे; जो मौन धारण करितो, यदृच्छया जें कांहीं मिळेल त्यातच संतुष्ट असतो, ज्याचें कोणचेंही ठिकाण ठरलेलें असें नाहीं; ज्याची बुद्धि स्थिर आहे; आणि जो माझी भक्ति करतो, तो मनुष्य मला प्रिय आहे ॥ १९ ॥

जो दुसऱ्यानें आपली निंदा केली असतां राग मानीत नाहीं; व स्तुति केली असतां आपल्यास धन्य मानीत नाहीं; ज्याप्रमाणें आकाश सर्वव्यापक असून त्याला कशाचाही संसर्ग होत नाही, ७ त्याप्रमाणें निंदा व स्तुति याची सारखीच गणना करून जो प्रपंचांत व वनात आपली वृत्ति सारखी ठेवून वागतो; ८ खरें व खोटें भापण मुखांतून निघालें असतां संकल्पवृत्ति नसल्यानें त्याचें मौन मोडत नाहीं, व ब्रह्मस्थितीचा उपभोग घेण्यापासून जो कधींही दूर होत नाहीं; ९ ज्याप्रमाणें पाऊस न पडला तरी समुद्र आटत नाहीं, त्याप्रमाणें, आपले इच्छेप्रमाणें जरी गोष्टी घडल्या तरी जो संतोष मानीत नाहीं, व इच्छेविरुद्ध घडल्या तरी रागावत नाहीं, २१० आणि ज्याप्रमाणें वायूचें एक ठिकाणीं राहणें नसतें, त्याप्रमाणें जो कोठेंच आश्रय करून राहत नाहीं, ११ ज्याप्रमाणें वायु सर्व आकाशभर नित्य राहतो, त्याप्रमाणें सर्व जग हे ज्याचें विश्रांतिस्थान आहे; १२ हें विश्वच माझें घर आहे अशी ज्याची पकी समजूत झाली आहे, किंबहुना स्थावरजंगम विश्वच जो आपण बनला आहे; १३ आणि अर्जुना, असा पूर्णत्वास पोहोंचला असूनही ज्याची माझ्या भजनाविषयीं पूर्ण इच्छा आहे, त्याला मी आपल्या मस्तकावर मुगुटाप्रमाणें धारण करितों. १४ जो उत्तम पुरुप आहे, त्याला मस्तक लवविणें यात कांहीं

होय श्रीगुरु । सदाशिवु ॥ १६ ॥ परि हें असो आतां । महेशातें वानितां । आत्मस्तुति तत्वता । संचारु असे ॥ १७ ॥ ययालागीं हें नोहे । म्हणितलें रेंमानाहें । अर्जुना मी वाहें । शिरीं तयातें ॥ १८ ॥ जे पुरुषार्थसिद्धि चौथी । घेऊनि आपुलिया हातीं । रिगाला भक्तिपंथीं । जगा देतु ॥ १९ ॥ कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडी बांधी करी । कीं जळाचिये परी । तळवटु घे ॥ २० ॥ म्हणोनि गा नमस्कारूं । तयातें आम्ही माथां मुकुट करूं । तयाची टांचें धरूं । हृदयीं आम्ही ॥२१॥ तयाचिया गुणांचीं लेणीं । लेववूं आपुलिये वाणीं । तयाची कीर्ति श्रवणीं । आम्ही लेऊं ॥२२॥ तो पाहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसी मज डोळे । हातींचेनि लीलाकमळें । पूजूं तयातें ॥ २३ ॥ दोंवरी दोनी । भुजा आलों घेउनी । आलिंगावयालागुनी । तयाचें आंग ॥ २४ ॥ तया संगाचेनि सुरवाडें । मज विदेहा देह धरणें घडे । किंबहुना आवडे । निरुपमु ॥ २५ ॥ तेणेंसी आम्हा मैत्र । एथ कायसें विचित्र । परि तयाचें चरित्र । ऐकती जे ॥ २६ ॥ तेही प्राणापरौते । आवडती हें निरुतें । जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती ॥ २७ ॥ अवतरण:— जो हा अर्जुना साद्यंत । सांगितला प्रस्तुत । भक्तियोगु समस्त । योगरूपु ॥ २८ ॥ जेणें मी प्रीति करीं । कां मनीं शिरसा धरीं । येवढी थोरी । जया स्थिती ये ॥ २९ ॥

ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।
श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥

अन्वयः—ये तु श्रद्दधानाः मत्परमाः भक्ताः इदं यथोक्तं धर्म्यामृत पर्युपासते, ते मे अतीव प्रियाः ( संति ) ॥ २० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

( ५३९. धर्मरूप व अमृतरूप गोष्टींचें जो अनुष्ठान करतो तो देवाला फार आवडतो, २३०—२३४) ते हे गोष्टी रम्य । अमृतधारा धर्म्य । करिती प्रतीतिगम्य । आइकोनि जे ॥ २३० ॥ तैसीचि श्रद्धेचेनि आदरें । जयांचे ठायीं विस्तरे । जीवीं जयां थारे । जे अनुष्ठिती ॥ ३१ ॥ परि निरूपिली जैसी । तैसीच स्थिति मानसीं । मग सुक्षेत्रीं जैसी । पेरणी केली ॥ ३२ ॥ परि मातें परम करूनि । इये अर्थीं धरूनि । हेंचि सर्वस्व मानूनि । घेती जे पैं ॥ ३३ ॥ पार्था गा जगीं । तेचि भ तेचि योगी । उत्कंठा तयांलागीं । अखंड मज ॥ ३४ ॥ (५४०. भक्त व भक्तांचे

१ रमानाथानें. २ मोक्ष. ३ नम्र असतो. ४ श्रीवत्सलाञ्छन. ५ सुखातिशयानें. ६ निकाराला. ७ धर्मास अनुकूल. ८ अनुभवास येण्याजोगें. ९ ठसतो. १० विचार करून.

नवल नाही; परंतु तिन्ही लोकींचे लोक ज्याच्या पायाचें तीर्थ घेऊन आपल्यास धन्य मानतात, असा जो मी, तो त्याला मस्तकावर धारण करतों. १५ तर ज्याची माझ्या ठिकाणीं पूर्ण श्रद्धा आहे, त्याचा आदरसत्कार कसा करावा ही गोष्ट श्रीशंकर गुरु होतील तरच समजणारी आहे. १६ परंतु ही गोष्ट राहूं दे. कारण, श्रीशंकराचें वर्णन करूं लागलें म्हणजे खरोखर आपली स्तुति केल्याप्रमाणें होणार आहे. १७ म्हणून, श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना, हा दृष्टांत या ठिकाणीं बरोबर नाहीं; तर अशा माझ्या भक्तांना मी आपल्या मस्तकावर धारण करतों. १८ तो पुरुष चौथी पुरुषार्थसिद्धि जो मोक्ष तो हातांत घेऊन भक्तिमार्गानें जात असतां जगाला किता घाळून देतो. १९ तो ब्रह्मप्राप्तीचा पूर्ण अधिकारी असून मोक्षाची बांधसोड करितो, परंतु पाण्याप्रमाणें नम्र असतो, २२० म्हणूनच त्याला आम्ही नमस्कार करितों, आपल्या मस्तकावर धारण करतों, व त्याची टांच म्हणजे श्रीवत्सलांच्छन चिन्ह आम्ही आपल्या हृदयावर धारण करतों. २१ त्याचे गुणरूपी अलंकार आम्ही आपले वाणीकडून धारण करवूं ( त्याचे गुणानुवाद आम्ही गाऊं ) व त्याचे कीर्तिरूप अलंकार कानाकडून धारण करवूं ( त्याचें यश कोणीं गाइलें असतां आम्ही ऐकूं), २२ असे जे माझे भक्त आहेत, त्यांना पहावें असे डोहळे आम्हांला झाल्यावरून, नेत्ररहित असा जो मी, तो अवतार धारण करून त्याला पाहतों; व नेहमीं आमच्या हातात असणाऱ्या कमळानें त्याचें पूजन करतों. २३ दोन हातांवर दुसरे दोन हात धारण करून त्यांना आलिंगन देण्याकरितां मी अवतरलों आहें ! २४ त्यांच्या संगतीच्या सुखातिशयानें, निराकार जो मी, त्या मला देह धारण करावा लागला ! फार काय सांगावें ? ते माझे जीव कीं प्राण आहेत ! २५ तेच एक आमचे परम मित्र आहेत असें म्हणण्यांत विशेष गोष्ट ती कोणती ! तर इतकेंच नव्हे, परंतु जे त्यांचें चरित्र ऐकतात, २६ व जे माझ्या भक्ताच्याच चरित्राची प्रशंसा करितात, तेही माझ्या प्राणाहून मला जास्त आवडतात. २७ अर्जुना, तुला जो हा पूर्ण रीतीनें योग सांगितला, तो भगवत्प्राप्तीच्या उपायानें भरलेला असा पूर्ण ' भक्तियोग ' आहे. २८ ज्या योगाच्या स्थितीची अशी थोरवी आहे कीं, ज्याच्यावर मी प्रीति करतों, आणि ज्याला आपल्या मनांत व मस्तकावर धारण करतों, २९

श्लोकार्थः—पण माझ्यावर श्रद्धा ठेवून आणि मत्पर होऊन जे माझे भक्त हा आतापर्यंत सांगितलेल्या धर्म्यामृताचें सेवन करितात, ते मला अतिशय प्रिय आहेत ॥ २० ॥

त्या ह्या योगाच्या रम्य, अमृत वर्षाव करणाऱ्या व धर्मास अनुकूळ अशा गोष्टी ऐकून जे त्याचा अनुभव घेतात; २३० त्याचप्रमाणें, त्या योगाचे ठिकाणीं पूर्ण श्रद्धा ठेवून, ज्याचे मनांत तो उत्तम रीतीनें ठसतो, व त्याजविषयीं आपले मनांत पूर्ण विचार करून जे त्याचें आचरण करतात; ३१ व ज्यांच्या मनाची खरोखर अशी स्थिति होते, त्यांना; चांगल्या शेतांत पेरणी केली असतां जसें उत्तम पीक होतें, तसें उत्तम फळ प्राप्त

कथा ऐकणारे मला फार आवडतात, २३५-२३८ ) ते तीर्थ ते क्षेत्र । जगीं तेचि पवित्र । भक्तिकथेसि मैत्र । जयां पुरुषां ॥ ३५ ॥ आम्ही तयांचें करूं ध्यान । ते आमुचे देवतार्चन । तेवांचूनि आन । गोमटें नाहीं ॥३६॥ तयांचे आम्हां व्यसन । ते आमुचे निधिनिधानें । किंबहुना समाधान । ते मिळती तें ॥ ३७ ॥ पैं प्रेमळाची वार्ता । जे अनुवादती पांडुसुता । ते मानूं परमदेवता । आपुली आम्ही ॥ ३८ ॥ ( ५४१. कथा संजय धृतराष्ट्राला सांगतो, २३९-२४५ ) ऐसें निजजनानंदें । तेणें जगदादिकंदें । बोलिले मुकुंदें । संजयो म्हणे ॥ ३९ ॥ राया जो निर्मळु । निष्कलंक लोककृपाळु । शरणागतां प्रतिपाळु । शरण्यु जो ॥२४०॥ पैं सुरसहायशीळु । लोकलालनलीळु । प्रणतप्रतिपाळु । हा खेळु जयाचा ॥ ४१ ॥ जो धर्मकीर्ति-धवळु । अगाध दातृत्वे सरळु । अतुळबळें प्रबळु । बळिबंधनु ॥ ४२ ॥ जो भक्तजनवत्सलु । प्रेमळजन-प्रांजळु । सत्यसेतु सकळु । कलानिधि ॥ ४३ ॥ तो श्रीकृष्ण वैकुंठींचा । चक्रवर्ती निजांचा । सांगे येरु दैवाचा । आइकतु असे ॥ ४४ ॥ (पुढील अध्यायाचें बीज) आतां ययावरी । निरूपिती परी[12] । संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्राते ॥४५॥ ( ५४२. ज्ञानदेव म्हणतात—ती कथा मी मराठींत सांगेन आणि संतांची सेवा करीन, २४६-२४७. ) तेचि रसाळ कथा । मऱ्हाटिया प्रतिपैथा[13] । आणिजेल आतां । अवधारिजो ॥ ४६ ॥ ज्ञानदेव म्हणे तुम्ही । संत वोळेंगावेति[14] आम्हीं । हे पढविलो जी स्वामी । निवृत्तिदेवीं ॥ २४७ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

श्लोक २०, ओव्या २४७

---

१ ठेवा. २ सांगतात. ३ सर्व जगास आनंद देणाऱ्या. ४ जगाला उत्पन्न करणाऱ्या. ५ देवाना साहाय्य करणें हेंच ज्याचें शील आहे ६ *लोकांचें पालन करणें हीच ज्याची लीला आहे* ७ शरणागतांचें रक्षण करणें. ८ शोभणारा ९ निरुपम बळानें. १० खऱ्या रीतीनें वागणाऱ्याचा तारक. ११ भक्ताचा. १२ प्रकार. १३ प्रतिमार्गी—भाषेंत. १४ शरण जावें.

होतें. ३२ परंतु मला परम श्रेष्ठ मानून व माझ्या ठिकाणीं प्रेम धरून, मी सर्वव्यापक आहें असें जे मानतात, ३३ तेच या जगतांत माझे भक्त व योगी होत; आणि म्हणूनच, पार्था, त्यांच्याविषयीं मला आतिशय प्रेम असतें. ३४ ज्याना भक्तिकथा अत्यंत आवडते, तेच या जगतात आमचें तीर्थ; तेच क्षेत्र, व तेच पवित्र पुरुष आहेत. ३५ त्यांचें आम्ही ध्यान करतों, तेच आमचें पूर्णदैवत, व त्यांशिवाय आम्हाला दुसरी आवडती गोष्ट कोणतीही नाहीं. ३६ त्यांचाच आम्हांला नाद लागतो, व तेच आमचा ठेवा होत; फार काय सांगावें ? त्यांना पाहिल्याशिवाय आम्हांला समाधान होत नाहीं. ३७ हे पांडुसुता, माझ्या प्रेमळ भक्तांच्या गोष्टी जे सांगतील, तीच आमची परमदेवता असें आम्ही मानूं. ३८ संजय म्हणतो:—सर्व जगास आनंद देणारा, व सर्व जगाला उत्पन्न करणारा जो मुकुंद, तो याप्रमाणें बोलला. ३९ राजा धृतराष्ट्रा, जो निर्मळ, निष्कलंक, लोकांवर कृपा करणारा, शरणागताचें रक्षण करणारा, शरण जाण्यास योग्य, २४० देवाना साह्य करणें हेंच ज्याचें शील, व लोकांचें लालन करणें हीच ज्याची लीला, व शरणागतांचें रक्षण करणें हाच ज्याचा खेळ आहे, ४१ जो धर्म व कीर्ति यांनीं स्वच्छ शोभणारा, दान करण्यांत ज्याचा अगाध सरळपणा आहे, व जो निरुपम बळवान असून बळीच्या प्रेमबंधनानें बद्ध झाला आहे, ४२ जो भक्तजनांचा कनवाळु, प्रेमळ जनाशीं मोकळ्या मनानें वागणारा, खऱ्या रीतीनें वागणाऱ्यांचा तारक, आणि चौदा विद्या व चौसष्ट कला यांचा निधि, ४३ तो भक्तांचा राजा वैकुंठनायक श्रीकृष्ण भगवान दैवशाली अशा अर्जुनास सांगता झाला व त्यानें ऐकलें. ४४ संजय आणखी म्हणतो:—हे राजा धृतराष्ट्रा, यापुढें कथा सांगण्याचा जो प्रकार आहे तो ऐक. ४५ तीच रसभरित गोष्ट मराठी भाषेंत आम्ही सांगूं, ती ऐका. ४६ ज्ञानदेव म्हणतात:—श्रोतेहो, तुम्हासारख्या संतांना आम्हीं शरण जावें, हेंच आम्हांस आमच्या गुरूंनीं—निवृत्तिनाथांनीं शिकविलें आहे। २४७

अध्याय १२, ओंव्या २४७.

---

# ज्ञानेश्वरी, तृतीय षट्क, अध्याय १३-१८

# ज्ञानेश्वरी

## अध्याय तेरावा

( ५४३. गणेशस्मरणरूप मंगल, काव्य, १–६ ) आत्मरूप गणेशु केलिया स्मरण । सकळ विद्यांचें अधिकरण । तेचि वंदूं चरण । श्रीगुरूचे ॥ १ ॥ जयांचेनि आठवें । शब्दसृष्टि आंगवे । सारस्वत आघवें । जिव्हेसि ये ॥ २ ॥ वक्तृत्वा गोडपणें । अमृतातें पारुखें म्हणे । रस होती वोळगणे । अक्षरांसी ॥ ३ ॥ भावांचें अवतरण । अवतरविती खुणे । हाता चढे संपूर्ण । तत्वभेदें ॥ ४ ॥ श्रीगुरूचे पाय । जैं हृदय गिंवसूनि ठाय । पैं येवढें भाग्य होय । उन्मेषासी ॥ ५ ॥ ते नमस्कारूनि आतां । श्रीभगवानुवाचः—जो पितामहाचा पिता । लक्ष्मीयेचा भर्ता । ऐसें म्हणे ॥ ६ ॥

इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते । एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥

अन्वयः—कौंतेय, इदं शरीरं क्षेत्रं इति अभिधीयते; यः एतत् वेत्ति, तं क्षेत्रज्ञः इति तद्विदः प्राहुः ॥ १ ॥

( ५४४. क्षेत्र व क्षेत्रज्ञाचा विचार, ७ ) ( सर्व अध्याय ) तरी पार्था परिसिजे । देह हें क्षेत्र म्हणिजे । जो हें जाणे तो बोलिजे । क्षेत्रज्ञु एथें ॥ ७ ॥

क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत । क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥

अन्वयः—भारत, सर्वक्षेत्रेषु मां अपि च क्षेत्रज्ञं विद्धि; यत् क्षेत्रक्षेत्रज्ञयोः ज्ञानं, तत् ज्ञानं ( इति ) मम मतं ( अस्ति ) ॥ २ ॥

( ५४५. क्षेत्रज्ञ म्हणजे ईश्वर, ८–९ ) तरी क्षेत्रज्ञु जो एथें । तो मी जाण निरुतें । जो सर्व क्षेत्रांतें । संगोपोनि असे ॥ ८ ॥ क्षेत्र आणि क्षेत्रज्ञातें । जाणणें जें निरुतें । ज्ञान ऐसें तयातें । मानूं आम्ही ॥ ९ ॥

तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारि यतश्च यत् । स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥

अन्वयः—तत् क्षेत्रं यत् च यादृक् च यद्विकारि च यतः यत् च सः यः यत्प्रभावः ( अस्ति ) तत् ( त्वं ) मे समासेन शृणु ॥ ३ ॥

( ५४६. क्षेत्र ज्या विकारांनीं बनलें ते विकार, १०–१२ ) तरि क्षेत्र येणें नांवें । हें शरीर जेणें भावें । म्हणितलें तें आघवें । सांगों आतां ॥ १० ॥ हें क्षेत्र का म्हणिजे । कैसें कें हें उपजे । कवणकवणीं वाढविजे । विकारीं एथ ॥ ११ ॥

# ज्ञानेश्वरी

## अध्याय तेरावा

आत्मरूप गणेशाचे स्मरण करून, सर्व विद्यांचें आश्रयस्थान असे जे श्रीगुरूंचे चरण, त्यांस माझा नमस्कार असो. १ त्यांचें स्मरण केलें असतां सर्व कविताशक्ति स्वाधीन होते व सर्व विद्या जिव्हाग्रीं येतात; २ तसेंच भाषणाला इतके माधुर्य येतें कीं, तें अमृतासही शिळें पाडतें; व तोंडातून निघणाऱ्या प्रत्येक अक्षरास रस अनुकूळ होतात; ३ गर्भित अर्थाची रेलचेल होऊन ते एकामागून एक सुचतात, व आत्मज्ञानाचे वर्म समजतें; ४ जर आपल्या मनांत श्रीगुरूचे चरण नेहमीं आठवले, तर अशा रीतीनें ज्ञानाचा भाग्योदय होतो; ५ त्या गुरुचरणांस वंदन करून, ( ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.– ) ब्रह्मदेवाचा पिता व श्रीलक्ष्मीचा नाथ जे श्रीकृष्ण भगवान, ते असें म्हणाले:—६

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणाले:—हे कुंतीपुत्रा, या शरीराला 'क्षेत्र' म्हणतात; आणि हें जो जाणतो, त्याला, ( क्षेत्र क्षेत्रज्ञाचें ज्ञान असलेले ) तत्त्वज्ञ जन 'क्षेत्रज्ञ' असें म्हणतात ॥ १ ॥

पार्था, ऐक. या देहाला क्षेत्र असें म्हणतात; व जो हें जाणतो, त्याला क्षेत्रज्ञ असें म्हणतात; ७

श्लोकार्थः—हे अर्जुना, सर्व क्षेत्रामध्यें जो क्षेत्रज्ञ, तोही मीच आहें असें जाण. क्षेत्र व क्षेत्रज्ञ याचें जें ज्ञान, तेंच उत्तम ज्ञान, असा माझा अभिप्राय आहे ॥ २ ॥

आणि क्षेत्रज्ञ ज्याला म्हणतात व जो सर्व क्षेत्राचें पोषण करतो, तो मीच होय असें पक्कें समज. ८ ज्या ज्ञानानें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ खरोखर जाणतां येतात, तेंच ज्ञान असें आम्ही समजतों. ९

श्लोकार्थः—तें क्षेत्र काय, कोणत्या प्रकाराचें व कोणत्या विकाराचें आहे, व त्यापासून कोणतीं कार्यें उत्पन्न होतात; आणि तो क्षेत्रज्ञ कोण व त्याचें सामर्थ्य काय आहे, तें सर्व मजपासून अर्जुना, तू संक्षेपानें ऐक ॥ ३ ॥

तर आता या शरीराला ज्या अभिप्रायानें 'क्षेत्र' हें नांव दिलें, तो सर्व अभिप्राय आम्ही सागतों. १० याला क्षेत्र का म्हणावें, हें कसें व कोठें उत्पन्न होतें, कोणत्या कोणत्या विकारानीं हें वाढलें जातें, ११ हे लहान जें साडेतीन हाताचें आहे, तें केवढें

---

१ आश्रयस्थान. २ कवित्वशक्ति. ३ स्वाधीन होते. ४ सर्व विद्या. ५ शिळें. ६ अनुकूल. ७ गर्भित अर्थाची. ८ रेलचेल, समृद्धि, आगमन. ९ इशारत. १० मर्म. ११ धरून. १२ शेत. १३ जीव. १४ पोषण करून. १५ विकारानें.

हें औट हात मोटकें । कीं केवढें पां केतुकें । वैरड कीं पिकें[2] । कोणाचें हें ॥ १२ ॥ इत्यादि सर्व । जे जे याचे भाव । ते बोलिजती सावेव । अवधान देईं ॥ १३ ॥ ( ५४७. क्षेत्र कोणालाही कळलें नाहीं, १४-२६ ) अवतरण:–पै याचि स्थळाकारणें । श्रुति सदां बोंबाणे । तर्कु येणेंचि ठीं करणें । तोंडाळु केला ॥१४॥ चाळितां हेचि बोली । दर्शनें शेवटा आलीं । तेवींचि नाहीं बुझाविलीं । अद्युनी द्वंद्वें[11] ॥ १५ ॥ शास्त्राचिये सोयरिके । विचळिजे[12] येणेंचि एकें । याचेनि ऐकवंकें । जगासि वादु ॥ १६ ॥ तोंडेंसी तोंडा न पडे । बोला बोलेंसी न घडे । इया युक्ति वडवडे । थोर जाहली ॥ १७ ॥ नेणों कोणाचें हें स्थळ । परि कैसें अभिलाषाचें बळ । जे घरोघरीं कपाळ । पिटवीत असे ॥ १८ ॥ नास्तिका धावया तोंड । वेदांचें गाढें बंड । तें देखोनि पाखांड । आनचि वाजे ॥ १९ ॥ म्हणती निर्मूळ । लटिकें हें वाग्जाळ । ना म्हणसी तरी पोफळ । घातलें आहे ॥ २० ॥ पाखाडाचिये कंडे । नागवीं लुंचिती[22] मुंडें । नियोजिलीं[23] वितंडें[24] । ताळासि येती ॥२१॥ मृत्युबळाचेनि माजें । हें जाईल वायां काजें । तें देखोनियां व्याजें । निघाले योगी ॥ २२ ॥ मृत्यूनि आंधाधिले । तिहीं निरंजन सेविलें । यमनियमांचे केले । मेळावे पुरे ॥ २३ ॥ येणेंचि क्षेत्राभिमानें । राज्य त्यजिलें ईशानें । गुंती[30] जाणोनि स्मशानें । वासु केला ॥ २४ ॥ ऐसिया पैजा महेशा । पांघुरणें दाही दिशा । लांचकेरु[32] म्हणोनि कोळसा । कामु[33] केला ॥ २५ ॥ पैं सत्यलोकनाथा । वद्नें आलीं वेळार्था[34] । तरी तो सर्वथा । जाणेचि ना ॥ २६ ॥

ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् । ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥४॥

अन्वयः--( इदं क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञानं ) ऋषिभिः बहुधा गीतं, तथा विविधैः छंदोभिः पृथक् ( गीतं ), च हेतुमद्भिः विनिश्चितैः ब्रह्मसूत्रपदैः ( गीतं ) एव ॥ ४ ॥

( ५४८. क्षेत्राबद्दल कर्मवाद्यांचा विचार, २७–३२ ) ऐकें[35] म्हणती हें स्थळ । जीवाचोंचि समूळ । भग प्राण हें कुळ । तयाचें एथ ॥ २७ ॥ जया प्राणाचे घरीं । अंगें रावती भाऊ[36] चारी । आणि मनाऐसा आवरी । कुळवाडीकर[37] ॥ २८ ॥ तयातें इंद्रियबैलांची पेटी[38] । न म्हणे अवसीं पाहाटीं । विषयक्षेत्रीं आंटी । काढी

१ नापीक. २ पिकाऊ. ३ यथासांग. ४ बडबडे. ५ निश्चय करणें. ६ बाटाघाट करतो. ७ खल करतां करतां. ८ सहा शास्त्रें. ९ थकून स्वस्थ बसलीं. १० संपले नाहींत. ११ वाद. १२ चालू आहे. १३ ऐक्य स्थापन करण्याकरितां. १४ शिकस्त. १५ मोपणाचें. १६ मोठें. १७ पाखांडी. १८ सुपारी पुढें ठेवून प्रतिज्ञा करतो. १९ पाखाडी लोकांचे. २० समुदाय. २१ दिगंबर. २२ डोक्याचे केस उपटतात;–मुंडन करितात. २३ ठरविलेले. २४ वितंडवाद. २५ निरर्थक. २६ निमित्तानें. २७ भ्याले. २८ एकांत. २९ शंकरांनीं. ३० उपाधि. ३१ प्रतिज्ञा. ३२ लांचखाऊ. ३३ मदन. ३४ निश्चय करण्याकरिता. ३५ कर्मवादी. ३६ अपान, व्यान, उदान व समान हे चार बंधु. ३७ देखरेख करणारा. ३८ जोडी. ३९ शब्द, रस, गंध इत्यादि विषयरूप क्षेत्रांत. ४० मेहनत.

मोठें व किती वजनदार आहे, तसेंच नापीक किंवा पिकाऊ, कोणाचें आहे, १२ इत्यादि जे जे याचे गुण आहेत, ते यथासांग आम्ही वर्णन करतों, तिकडे तूं लक्ष दे. १३ याच क्षेत्राकरितां श्रुतींची नेहमी बडबड चालू आहे; व तर्कही याचाच निश्चय करण्याकरितां एकसारखी वाटाघाट-करितो; १४ याच गोष्टीचा खल करता करतां सहा शास्त्रें थकून स्वस्थ बसलीं; आणि म्हणूनच त्यांच्यात अजून ऐक्य झालें नाहीं. १५ या क्षेत्राविषयीं एकमत स्थापन करण्याकरितां सर्व जगभर शास्त्रसंबंधयुक्त वाटाघाट चालू आहे. १६ पण अजून एकमेकांचीं तोंडें मिळालीं नाहींत, व ऐक्यही झालें नाहीं; आणि याचसंबंधानें युक्ति लढवितां लढवितां शिकस्त झाली. १७ हें क्षेत्र कोणाचें आहे हें कोणी जाणत नाहीं; परंतु त्याच्या मीपणाबद्दलची काय थोरवी वर्णावी, की ज्याच्या योगानें घरोघर याचाच काथ्याकूट केला जातो ! १८ नास्तिकांच्या तोंडास तोंड देण्याकरितां व वेदाचें बंड माजलें असें पाहून पाखांड्यांची तिसरीच बडबड सुरू झाली. १९ ते म्हणतात, " तुमचें वाक्पांडित्य खोटें असून त्यास मिल्कूल आधार नाहीं. आमचें हें म्हणणें खोटें म्हणत असाल तर तुम्हांला जिकण्याविषयीं आम्ही ही सुपारी पुढें ठेवून प्रतिज्ञा करतों. " २० पाखांड्यांचे थवेच्या थवे—कोणी दिगंबर बनतात, व कोणी मुंडन करितात, तरी त्यांनीं ठरविलेले सर्व वितंडवाद आपोआप खालीं बसतात. २१ हें क्षेत्र मृत्यूच्या सपाट्यांत सांपडून निरर्थक जाईल म्हणून ( आत्मा ब्रह्मांडीं नेऊन त्याचें संरक्षण करण्याकरितां ) योगी पुढें सरसावतात. २२ जे मृत्यूला भितात, ते एकांतवास करून यमनियमांचें साधन करतात; २३ याच क्षेत्राच्या विचाराच्या अभिमानाकरितां श्रीशंकरांनीं राज्य सोडिलें; आणि त्यापासून आपल्यास उपाधि लागूं नये, म्हणून ते स्मशानांत जाऊन राहिले. २४ ( या क्षेत्राचें ज्ञान करून घेणार ) अशी प्रतिज्ञा करून शंकरांनीं वनांत राहून दाही दिशा हेंच आपलें पांघरूण असें मानलें; व काम हा योगभ्रष्ट करणारा (लांचखाऊ) असें जाणून त्यास जाळून टाकलें. २५ ह्याच गोष्टीचा निश्चय करण्याकरितां ब्रह्मदेवाला जरी चार तोंडें उत्पन्न झालीं, तरी त्यालाही या क्षेत्राची ओळख पटली नाहीं. २६

*श्लोकार्थः—हें क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञान ऋषींनीं बहुत प्रकारांनीं सांगितलें आहे; ऋग्वेदादि वेदांनीं वेगळें वेगळें सांगितलें आहे; आणि युक्तीनें युक्त व निश्चयरूपी अशा ब्रह्मप्रतिपादक सूत्रांनीं व पदांनींही सांगितलें आहे ॥ ४ ॥*

जे कर्मवादी आहेत, ते असें म्हणतात कीं, हें सर्व क्षेत्र जीवाच्या ताब्यात असून त्याची सर्व व्यवस्था प्राणाकडे सोंपविली आहे. २७ ज्या प्राणाच्या वरीं त्याचे चार भाऊ ( अपान, व्यान, समान व उदान ) हे अंगमेहनतीनें झटतात, व त्यांच्यावर मनासारखा देखरेख करणारा कुळवाडी आहे; २८ त्या जीवाजवळ पंचज्ञानेंद्रियें व पंच-

भली ॥ २९ ॥ मग विधीचीं वाफ चुकवी । आणि अन्यायाचें बीज वोफवी[2] । कुकर्माचा करवी । राशु जरी ॥ ३० ॥ तरी तयाचिसारिखें । असंभाव्य पाप पिके । मग जन्मकोटी दुःखें । भोगी जीवु ॥ ३१ ॥ नातरी विधीचिये वाफे । सत्क्रिया-बीज आरोपे । तरी जन्मशतांचीं मापें । सुखचि मविजे[3] ॥ ३२ ॥ ( ५४९. क्षेत्राबद्दल प्रकृतिवादी ( सांख्य ) यांचें मत, ३३-३९. ) तंव आणिक[4] म्हणती हें नव्हे । हें जिवाचेंचि न म्हणावें । आमुतें पुसा आघवें । क्षेत्राचें या ॥ ३३ ॥ अहो जीवु एथ उखिता । वस्तीकरु वाटे जातां । आणि प्राणु हा बलौता[6] । म्हणोनि जागे ॥ ३४ ॥ अनादि जे प्रकृती । सांख्य जियेतें गाती । क्षेत्र हे वृत्ती । तियेची जाणा ॥ ३५ ॥ आणि तियेतेंचि आथवा । आथी घरमेळावा । म्हणोनि ते वाहिवाँ । घरीं वाहे ॥ ३६ ॥ वाहिव्याचिये राहाटी । जे कां मुदल तिघे इये सृष्टी । ते तियेच्याचि पोटीं । जहाले गुण ॥ ३७ ॥ रजोगुण पेरी । तेतुलें सत्त्व सोंकरी । मग एकलें तम कैरी । संवगणी ॥ ३८ ॥ रचूनि महत्तत्त्वाचें खळें । मळी एके काळुगेनि पोळें । ते अव्यक्ताची मिळे । सांजे[11] भली ॥ ३९ ॥ ( ५५०. क्षेत्राबद्दल संकल्पवाद्यांचें मत, ४०–५१. ) तंव ऐकीं मतिवंतीं[13] । या बोल्याचिया खंती[14] । म्हणितलें या ज्ञप्ती[15] । अर्वाचीना ॥ ४० ॥ हां हो परतत्त्वाआंतु[16] । कें प्रकृतीची मातु । हा क्षेत्रवृत्तातु । उगेचि आइका ॥ ४१ ॥ शून्यसेज शेजलिये[17] । सुलीनतेचिये[18] तुळियें[19] । निद्रा केली होती- बळियें[20] । संकल्पें येणें ॥ ४२ ॥ तो अवसांत चेइला । उद्यमी सदैव भला । म्हणोनि ठेवा जोडला । इच्छावशें ॥ ४३ ॥ निरालंबींची[21] वाडी[22] । होती त्रिभुवनायेवढी । हे तयाचिये जोडी[23] । रूपा आली ॥ ४४ ॥ मग महाभूतांचें एकवट[24] । सैरा[25] वेंटाळूनि भाट[26] । भूतग्रामाचे[27] घाट । रचिले चारी ॥ ४५ ॥ यावरी आदी । पांचभूतिकांची[28] बांधी । बांधली प्रभेदीं[29] । पंचभौतिकीं ॥ ४६ ॥ कर्माकर्माचे गुंडे[30] । बांध घातले दोहींकडे । नपुंसकें वरडें[31] । रानें केलीं ॥ ४७ ॥ तेथ येरझारेलागीं । जन्ममृत्यूची सुरंगी[32] । सुहाविली[33] निलागी[34] । संकल्पें येणें ॥ ४८ ॥ मग अहंकारासि एकलाधी[35] । करूनि जीवितावधी[36] । वहाविलें[37] बुद्धी । चराचर ॥ ४९ ॥ यापरी निराळीं[38] । वाढे संकल्पाची डाहाळी । म्हणोनि तो मुळीं । प्रपंचा यया ॥ ५० ॥ ययापरि मत्तें[39]-

१ कर्तव्यकर्माची. २ पेरतो. ३ मोजतो. ४ साख्यमतवादी. ५ उपरा. ६ बलुतेदार. ७ वहि-वाट; लागवड. ८ राखतो. ९ सर्व पीक गोळा करतो. १० जीवांची. ११ संध्याकाल. १२ संकल्प-वाद्यांनीं. १३ बुद्धिमंतांनीं. १४ तिरस्कारानें. १५ कल्पना. १६ ब्रह्मापुढें. १७ गादीवर. १८ लयाच्या. १९ पलंगावर. २० बलवान. २१ निर्गुण स्वरूपाची. २२ बाग. २३ पराक्रम. २४ एकत्र करून. २५ यथेच्छ. २६ भाग. २७ जारज, स्वेदज, अंडज, उद्भिज्ज या भूतांचे. २८ पंचमहा-भूताची. २९ वेगळाली. ३० ताली. ३१ नापीक. ३२ वाट. ३३ सोपी. ३४ कधीं बंद न पडणारी. ३५ ऐक्य. ३६ जगेपर्यंत. ३७ वहिवाट केली. ३८ चिदाकाशांत. ३९ संकल्पवाद्यांचीं मुक्ताफळें.

कर्मेंद्रियें मिळून दहा इंद्रियरूप बैलांची जोडी असून, तो रात्र दिवस कांहीं न म्हणतां मेहनत करवून घेऊन विषयरूप क्षेत्रांत राब काढतो; २९ मग कर्तव्याची वाफ चुकवून ( विहित कर्माचरणाची संधि दवडून ) व अन्यायाचें बीज पेरून त्याला वाईट कर्माचें खत घालतो; ३० त्या योगानें बीजाप्रमाणें अनन्वित पापें पिकून मग कोट्यवधि जन्म-पर्यंत जीव दुःखें भोगितो. ३१ किंवा विहित कर्माचरणरूपी वाफ साधून सत्क्रियेचें बीज पेरल्यास कोट्यवधि जन्मपर्यंत सुखच भोगितो. ३२ पण सांख्यमतवाद्यांचें असें म्हणणें नसून ते म्हणतात कीं, क्षेत्र हें जीवाच्या स्वाधीन नाहीं; तें कोणाच्या स्वाधीन आहे तें सर्व आम्हांस पुसा. ३३ अहो, जीव हा उपरा वाटसरू असून वाट चालत असतांना क्षेत्रांत नुस्ती वस्ती करतो; आणि प्राण हा बळुतेदार असल्यामुळें तो जागा राहून क्षेत्राचें संरक्षण करतो. ३४ ज्या अनादिसिद्ध प्रकृतीची सांख्यमतवादी स्तुति करतात त्या प्रकृतीची या क्षेत्राचे ठिकाणीं वृत्ति आहे असें समजा; ३५ आणि त्या प्रकृतीच्या घरचा सर्व जमाव असल्यामुळें, क्षेत्राची सर्व वहिवाट ती घरीं करते. ३६ त्या शेताची मूळ लागवड करणारे या सृष्टींत जे मुख्य तीन गुण, ते तिच्या पोटीं उत्पन्न झाले आहेत. ३७ रजोगुण हा पेरणी करतो, सत्त्वगुण हा राखतो, व मग एकटा तमोगुण सर्व पीक गोळा करतो. ३८ नंतर महत्तत्त्वाचें खळें करून काल नामक जबरदस्त पोळाकडून ती मळणी घालते; मग अव्यक्तरूपी आयतीच संध्याकाळ होते. ३९ इतक्यांत बुद्धिमान संकल्पवाद्यांना हें बोलणें न रुचून ते म्हणाले कीं, या तुमच्या कल्पना अगदीं अलीकडल्या आहेत ! ४० अहो, ब्रह्मापुढें प्रकृतीची काय बाब ! या क्षेत्राची हकीगत आम्ही सांगतों, ती ऐका तर खरी ! ४१ लयरूपी पलंगावरील शून्यरूपी बिछा-न्यावर बलवान संकल्प निजला होता, ४२ तो अकस्मात जागा झाला, व तो आपल्या व्यापारांत नेहमीं तत्पर होता म्हणून त्याला त्याच्या इच्छेनुरूप ठेवा मिळाला; ४३ आणि त्या संकल्पाच्या निर्गुण स्वरूपाची त्रिभुवनाएवढी बाग त्याच्या खटपटीनें रूपाला आली. ४४ नंतर निरनिराळीं पंचमहाभूतें एकत्र करून, भूतग्रामांचे जारज, स्वेदज, अंडज व उद्भिज्ज असे चार घाट त्यानें रचिले; ४५ नंतर प्रथम पंचमहाभूतांचे निरनिराळे पोटभेद करून बांधे तयार केले; ४६ त्या घाटाच्या दोन्ही बाजूंस कर्म व अकर्म याच्या ताली घातल्या, व त्यामधील नापीक जमिनीचीं म्हणजे पशुपक्ष्यादिक हीं रानें बनविलीं; ४७ नंतर या संकल्पाच्या योगानें जन्ममृत्यूंच्या येरझारा करण्याकरितां सोपी व कधीं बंद न पडणारी अशी वाट तयार केली; ४८ मग संकल्पानें अहंकाराबरोबर ऐक्य करून, बुद्धी-कडून तो चराचरांची वहिवाट करवूं लागला ! ४९ याप्रमाणें चिदाकाशांत संकल्पाची ढाळी वाढल्यामुळें प्रपंचाला तो मूळ कारण झाला. ५० याप्रमाणें संकल्पवाद्यांचीं मुक्ताफळें ऐकून, त्या ठिकाणीं जे दुसरे ( स्वभाववादी ) होते ते पुढें होऊन म्हणाले कीं. “ आपण

मौक्तिकीं । तेथ पडिघायिले आणिकीं । म्हणती हां हो विवेकी । तरी तुम्ही भले ॥ ५१ ॥ ( ५५१. क्षेत्राबद्दल स्वभाववाद्यांचे मत, ५२-५७ ) परतत्वाचिया गांवीं । संकल्पसेजे देखावी । तरि कां पां न मनावी । प्रकृति तयाची ॥ ५२ ॥ परि असो हें नव्हे । तुम्हीं या न लगावें । आतांचि हें आघवें । सांगिजेल ॥ ५३ ॥ तरि आकाशीं कवणें । केलीं मेघाचीं भरणें । अंतरिक्षीं तारांगणें । धरी कवण ॥ ५४ ॥ गगनाचा तडवा । कोणें वेढिला केधवां । पवनु हिंडतु असावा । हें कवणाचें मत ॥ ५५ ॥ रोमा कवण पेरी । सिंधू कवण भरी । पर्जन्याचिया करी । धारा कवण ॥ ५६ ॥ तैसें क्षेत्र हें स्वभावें । हे वृत्ति कवणाची नव्हे । हें वाहे तया फावे । येरा तुटे ॥ ५७ ॥ ( ५५२. क्षेत्राबद्दल कालवाद्याचें मत, ५८-६५ ) तंव आणिकें एकें । क्षोभें म्हणितलें निकें । तरि भोगिजे एकें । काळें केविं हें ॥ ५८ ॥ तरि ययाचा मांरु । देखताति अनिवारु । परी स्वमतीं भरु । अभिमानियां ॥ ५९ ॥ हें जाणोनि मृत्यू रागिटीं । सिंहाडयाचा दरकुटीं । परी काय कीजे वांजटीं । पूरिजत असे ॥ ६० ॥ महाकल्पापरौती । कवें घालूनि अवचितीं । सत्यलोकभद्रजाती । आंगीं वाजे ॥ ६१ ॥ लोकपाळ नित्य नवे । दिग्गजांचे मेळावे । स्वर्गींचिये आडवे । रिगोनि मोडी ॥ ६२ ॥ येर ययाचेनि अंगवातें । जन्ममृत्यूचिये गर्तें । निर्जिवें होऊनि भ्रमतें । जीवमृगें ॥ ६३ ॥ न्याहाळीं पां केव्हडा । पसरलासे चवडा । करूनिया माजिवडां । आकारगेंजु ॥ ६४ ॥ म्हणोनि काळाची सत्ता । हाचि बोलु निरुता । ऐसे वाद पांडुसुता । क्षेत्रालागीं ॥ ६५ ॥ ( ५५३. क्षेत्राबद्दल देवाचें मत, ६६-७५ ) हे बहु उखिविखी । ऋषीं केली नैमिषीं[23] । पुराणें इयेविषीं । मतपत्रिकीं[24] ॥ ६६ ॥ अनुष्टुभादि छंदें । प्रबंधिजे एवंविधें । तें पत्रावलंबन मदें । करिती अझुनी ॥ ६७ ॥ वेदींचें बृहत्सामसूत्र । जें देखणेपणें पवित्र । परी तयाही हें क्षेत्र । नेणवेचि ॥ ६८ ॥ आणीक आणिकींही बहुतीं । महाकवीं हेतुमंतीं । या लागीं मती । वेंचिलिया ॥ ६९ ॥ परि ऐसें हे एवढें । कीं अमुकेयाचेंचि फुडें । हें कोण्हाही वरपडें । होयेचिना ॥ ७० ॥ अवतरण.—आतां यावरी जैसें । क्षेत्र हें असे । तुज सांगों तैसें । सावंतु गा ॥ ७१ ॥

महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च । इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥ ५ ॥

१ पुढें झाले. २ स्वभाववादी. ३ बिन्हाड. ४ संकल्पाची. ५ आकाशातील. ६ नक्षत्रें. ७ खपेल. ८ फलद्रूप होईल. ९ कालवादी यानीं. १० सपाटा. ११ भयंकर. १२ गुहा; दरी. १३ व्यर्थ. १४ पुरी पडणार आहे. १५ मिठी. १६ मिठी मारतो. १७ आठ दिशाचे आठ ऐरावत. १८ अरण्यात. १९ खळग्यात. २० मध्यें. २१ जगदाकार हत्ती. २२ वादविवाद; भवति न भवति. २३ नैमिषारण्यात. २४ अभिप्रायपत्रें; आधार. २५ आठ अक्षराचा चरण; बत्तीस

फार विद्वान आहां, तरी आपलें मत आपलेजवळच ठेवा. ५१ परब्रह्माच्या गावात जर संकल्पाचें बिऱ्हाड आहे असें मानावयाचें, तर मग त्यापासून उत्पन्न होणाऱ्या प्रकृतीला कां मानूं नये ? ५२ परंतु तुम्ही म्हणतां अशी गोष्ट नाहीं. तुम्ही संकल्पाचा नाद टाकून द्या, हें काय प्रकरण आहे हें अस्मादिक सांगतील. ५३ तर आकाशांतील ढगांमध्यें पाण्याचा भरणा कोण करतो ? व अंतरिक्षांतील चांदण्या खालीं पडत नाहींत, त्यांना कोणाचा आधार आहे ? ५४ आकाशाचें छत मध्यें झोळ न येतां जें सारखें ताणलेलें आहे, तें कोणीं व केव्हां ताणलें ? आणि वाऱ्यास नेहमीं वाहण्यास कोणीं सांगितलें आहे ? ५५ अंगावरील जी लव दिसते तिची पेरणी कोण करतो ? व समुद्र कधींही आटत नाहीं त्यांत पाणी कोण भरतो ? आणि पावसाच्या धारा कोण उत्पन्न करतो ? ५६ या गोष्टींप्रमाणें क्षेत्र हें स्वभावसिद्ध असून याचा कोणीही वतनदार नाहीं. जो यात खपेल त्यास हें फलद्रूप होईल, व खपणार नाहीं त्यास फलद्रूप होणार नाहीं." ५७ इतक्यांत दुसरे एक ( कालवादी ) रागावून म्हणाले कीं, "तुम्ही म्हणतां हें जर खरें आहे, तर या क्षेत्रावर कालाची सत्ता कां आहे ? ५८ तथापि, त्या कालाचा अनिवार सपाटा आहे हें जाणूनही, जे अभिमानी आहेत ते त्यास न जुमानतां आपल्याच मताचें समर्थन करतात. ५९ सिंहाच्या दरीप्रमाणें मृत्यु हा भयंकर आहे असें समजून, जर तुम्हीं या क्षेत्राबद्दल व्यर्थ बडबड केली, तर ती काय पुरी पडणार आहे ? ६० हा काल महाकल्पापलीकडे मिठी घालून, ब्रह्मदेवाचें स्थान जो सत्यलोक त्यालाही जाऊन मिठी मारतो, ६१ स्वर्गाच्या अरण्यांत शिरून अष्टलोकपाळ नित्य नवे करतो, व आठ दिशांच्या आठ ऐरावतांचा संहार करतो. ६२ याच्या अंगवायूनें जीवरूप मृग जन्म-मृत्यूंच्या खळग्यांत पडून निर्जीव होऊन भ्रमण करतात. ६३ या कालानें हाताचा पंजा केवढा मोठा पसरला आहे तो पहा, कीं जगदाकाररूपी जो हत्ती तो यानें आपल्या तळ-हातावर धारण केला आहे. ६४ म्हणून, काळाची सत्ता आहे असें म्हणतात; हीच गोष्ट खरी आहे." याप्रमाणें, अर्जुना, या क्षेत्राबद्दल मतभेद आहेत. ६५ अशी पुष्कळ भवति नभवति नैमिषारण्याचे ठिकाणीं ऋषींनी केली, याबद्दल आपल्यास पुराणांचा आधार आहे. ६६ वेदांतील अनुष्टुभादि छंदांत याबद्दल पुष्कळ चर्चा केली असून, या क्षेत्राविषयीं गर्वानें अद्याप ग्रंथ तयार करतात. ६७ वेदांतील बृहत्सामसूत्र, जें ज्ञानदृष्टीनें अति पवित्र आहे. त्यालाही क्षेत्र म्हणजे काय हें समजलें नाहीं; ६८ आणखी पुष्कळ दूरदर्शी महाकवि या क्षेत्राबद्दल वादविवाद करून थकले; ६९ परंतु हें एवढें बिकट आहे कीं, हें खरोखर कोणाचें आहे हें सांगतां येत नाहीं, व कोणाच्याही स्वाधीन होत नाहीं. ७० -तर आतां क्षेत्र म्हणजे काय आहे, याविषयीं सांग्रत विचार तुला मी सांगतों. ७१

---

अक्षराचा छंद. २६ कविता. २७ ग्रंथ तयार करतात. २८ ज्ञानदृष्टीनें. २९ दूरदर्शी यानीं.

इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः । एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥

अन्वयः—महाभूतानि, अहंकारः, बुद्धिः, अव्यक्तं एव च दश इंद्रियाणि च एकं ( मनः ) पंच इंद्रियगोचराः च ॥ ५ ॥ इच्छा, द्वेषः, सुखं, दुःखं, संघातः, चेतना, धृतिः, एतत् सविकारं क्षेत्रं मया समासेन उदाहृतम् ॥ ६ ॥

तरि महाभूतपंचकु । आणि अहंकारु एकु । बुद्धि अव्यक्त[1] दशकु । इंद्रियांचा ॥ ७२ ॥ मन आणीकही एकु । विषयांचा दशकु । सुख दुःख द्वेषु । संघात इच्छा ॥ ७३ ॥ आणि चेतना धृती । एवं क्षेत्रव्यक्ती[2] । सांगितली तुजप्रती । आघवीचि ॥ ७४ ॥ आतां महाभूतें कवणें । कवण विषयो कैसीं करणें[3] । हें वेगळालेपणें । एकैक सांगों ॥ ७५ ॥ ( ५५४. पंचमहाभूतें, ७६ ) तरी पृथ्वी आप तेज । वायु व्योम[5] इयें तुज । सांगितलीं बुझें[6] । महाभूतें पांचें ॥ ७६ ॥ ( ५५५. अहंकारतत्व, ७७–८२ ) आणि जागतिये दशे । स्वप्न लपालें असे । नातरी अंवसे । चंद्र गूढ ॥ ७७ ॥ नाना अप्रौढ[7] बाळकीं । तारुण्य राहे थोकीं[8] । का न फुलतां कळिकीं । आमोदु जैसा ॥ ७८ ॥ किंबहुना काष्ठीं । वन्हि जेविं किरीटी । तेविं प्रकृतीचिया पोटीं । गोप्यु जो असे ॥ ७९ ॥ जैसा ज्वरु धातुगतु । अपथ्याचें मिष पाहतु । मग जालिया आंतु- । बाहेरि व्यापी ॥ ८० ॥ तैसी पाचाही गांठी पडे । जैं देहाकारु उघडे । तैं नाचवी चहुंकडे । तो अहंकारु गा ॥ ८१ ॥ नवल अहंकाराची गोठी । विशेषें न लगे अज्ञानापाठीं । सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी ॥ ८२ ॥ ( ५५६. बुद्धितत्व, ८३-८९ ) आतां बुद्धि जे म्हणिजे । ते ऐशिया चिन्हीं जाणिजे । बोलिलें यदुराजें । तें आइकें सांगों ॥ ८३ ॥ तरी कंदर्पाचेनि बळें । इंद्रियवृत्तीचेनि मेळें । विभांडूनि[12] येती पाळे[13] । विषयांचे ॥ ८४ ॥ तो सुखदुःखाचा नागोवा । जेथ उगाणों[14] लागे जीवा । तेथ दोहींसी बरवा । पाडु जे धरी ॥ ८५ ॥ हें सुख हें दुःख । हें पुण्य हे दोष । कां हें मैळ हें चोख । ऐसें जे निवडी ॥ ८६ ॥ जिये अधमोत्तम सुझे । जिये सानें थोर बुझे । जिया दिठी पारखिजे । विषो जिवें ॥ ८७ ॥ जे तेजतत्वाची आदि । जे सत्वगुणाची वृद्धि । जे आत्मया जीवाची[15] संधी । वसवीतें[16] असे ॥ ८८ ॥ अर्जुना ते गा जाण । बुद्धि तूं संपूर्ण । आतां आइकें वोळखण । अव्यक्ताची ॥ ८९ ॥ ( ५५७. अव्यक्त तत्व, ९०–९७ ) पैं सांख्यांचिया सिद्धांतीं । प्रकृती जे महामती[17] । तेचि एथें प्रस्तुतीं । अव्यक्त गा ॥ ९० ॥ आणि सांख्ययोगमतें । प्रकृति परिसविली तूतें । ऐसी दोन्ही परी जेथें । विवंचिली ॥ ९१ ॥ तेथ दुजी जे जीवदशा । तिये नांव वीरेशा[19] । येथें अव्यक्त ऐसा । पर्यावो हा ॥ ९२ ॥ तऱ्ही पाहालेंया[20] रजनी । तारा

१ प्रकृति, २ आत्मसत्ता. ३ तत्त्वें. ४ इंद्रियें. ५ आकाश. ६ समज. ७ लहान. ८ गुप्त. ९ कळींत. १० वास. ११ समागमानें. १२ जिंकून. १३ लूट. १४ अनभवूं लागे. १५ समजे. १६ ज्ञान. १७ मर्धे. १८ रहात असते. १९ बुद्धिमान अर्जुना. २० पहाट झाल्यावर.

श्लोकार्थः—पंचमहाभूतें, अहंकार, बुद्धि, महत्तत्त्व, आणि दहा इंद्रियें, मन आणि श्रोत्रादिक ज्ञानेंद्रियांचे पांच विषय, ( व वागादि कर्मेंद्रियाचे पांच विषय ), ॥ ५ ॥ इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात ( समुदाय ), चेतना, व धैर्य एतद्विकारयुक्त असें हें शरीर संक्षेपानें मीं सांगितलें ॥ ६ ॥

तर पंचमहाभूतें, अहंकार, बुद्धि, प्रकृति, पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें मिळून दहा इंद्रियें, ७२ एक मन, ज्ञानेंद्रियाचे पांच व कर्मेंद्रियाचे पांच असे दहा विषय, सुख, दुःख, द्वेष, संघात, इच्छा, ७३ चेतना ( आत्मसत्ता ) आणि धृति याप्रमाणें या क्षेत्राचीं ( छत्तीस ) तत्त्वें आहेत तीं तुला सर्व सांगितलीं. ७४ आतां, महाभूतें कोणतीं, विषय कोणते, इंद्रियें कोणतीं, हें प्रत्येकाचें वर्णन निरनिराळें करून तुला सांगतों. ७५ हें पहा, पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं पंचमहाभूतें आहेत असें समज; ७६ आणि जाग्रदवस्थेंत जसें स्वप्न गुप्त असतें, किंवा अमावस्येच्या दिवशीं चंद्र जसा गुप्त असतो, ७७ अथवा लहान बालकाच्या ठिकाणीं तारुण्य जसें गुप्त असतें, किंवा फुलाची कळी उमलण्याच्या पूर्वी जसा तिच्यांत सुगंध गुप्त असतो; ७८ किंबहुना अर्जुना, लांकडांत ज्याप्रमाणें अग्नि गुप्त असतो, त्याप्रमाणें मायेच्या पोटांत जो गुप्त असतो; ७९ ज्याप्रमाणें हाडीज्वर हा कुपथ्याचें निमित्त होण्याची वाट पहात असतो, व तेंच झाल्यावर तो शरीराला अंतर्बाह्य व्यापून टाकतो, ८० त्याप्रमाणें पंचमहाभूतांची गाठ पडून ज्या वेळीं देहाचा आकार बनतो, त्या वेळीं जो त्या देहाला चहूंकडे नाचवितो, त्यालाच अहंकार असें म्हणतात; ८१ या अहंकाराची अशी गंमत आहे कीं, तो अज्ञान्याच्या पाठीस न लागतां सज्ञानाच्या पाठीस लागून त्याला नानाप्रकारच्या संकटांत घालतो. ८२ यदुराज श्रीकृष्ण म्हणतात:- अर्जुना ! ऐक. आतां, बुद्धि जिला म्हणतात, ती या खुणांनीं जाणावी: ८३ कामाचा जोर उत्पन्न झाल्यावर जी इंद्रियांच्या साहाय्यानें विषयांचे समुदाय जिंकून आणते; ८४ त्या सुखदुःखांच्या लुटीचा जेव्हां जीवास अनुभव घ्यावा लागतो, तेव्हां सुख व दुःख यांत जास्ती योग्यता कोणाची आहे हें जिच्या योगानें समजतें; ८५ हें सुख व हें दुःख, हें पुण्य व हें पाप, हें वाईट व हें चांगलें, असें जिच्या योगानें निवडतां येतें; ८६ जिच्या योगानें उच्च-नीच हें समजतें, लहान-मोठें कळतें, व जिच्या दृष्टीनें जीवांना विषय ओळखतां येतात; ८७ जी ज्ञानतत्त्वाचें मूळ, जी सत्त्वगुणाची वाढती दशा, आणि जी आत्मा व जीव या दोहोंच्या संधींत असते, ८८ अर्जुना, तीच बुद्धि आहे असें समज. आतां अव्यक्ताचीं सर्व लक्षणें तुला सांगतों, तीं ऐक. ८९ हे महाबुद्धिमंता, सांख्यांच्या मतानें जिला प्रकृति हें नांव आहे, तेंच तूं सध्यां अव्यक्त असें समज ९० आणि पूर्वी ( सातव्या अध्यायांत ) सांख्य व योग या मतांतील प्रकृतीचे दोन प्रकार पुष्कळ विस्तारानें जेथें वर्णिले आहेत, ९१ त्यांतील दुसरी जी जीवदशा, तिलाच, हे वीरश्रेष्ठ अर्जुना, अव्यक्त असें पर्यायानें म्हणतात. ९२ पहांट झाल्यावर ज्याप्रमाणें आकाशांतील नक्षत्रें नाहींतशीं होतात, अथवा अस्तमान झाल्यावर प्राणिमात्राचे व्यापार

इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः । एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥

अन्वयः—महाभूतानि, अहंकारः, बुद्धिः, अव्यक्तं एव च दश इंद्रियाणि च एकं ( मनः ) पंच इंद्रियगोचराः च ॥ ५ ॥ इच्छा, द्वेषः, सुखं, दुःखं, संघातः, चेतना, धृतिः, एतत् सविकारं क्षेत्रं मया समासेन उदाहृतम् ॥ ६ ॥

तरि महाभूतपंचकु । आणि अहंकारु एकु । बुद्धि अव्यक्त दशकु । इंद्रियांचा ॥ ७२ ॥ मन आणीकही एकु । विषयांचा दशकु । सुख दुःख द्वेषु । संघात इच्छा ॥ ७३ ॥ आणि चेतना धृती । एवं क्षेत्रव्यक्ती[१] । सांगितली तुजप्रती । आघवीचि ॥ ७४ ॥ आतां महाभूतें कवणें । कवण विषयो कैसीं करणें । हें वेगळालेपणें । एकैक सांगों ॥ ७५ ॥ ( ५५४. पंचमहाभूतें, ७६ ) तरी पृथ्वी आप तेज । वायु व्योम इयें तुज । सांगितलीं बुझें । महाभूतें पांचें ॥ ७६ ॥ ( ५५५. अहंकारतत्व, ७७–८२ ) आणि जागतिये दशे । स्वप्न लपालें असे । नातरी अंवसे । चंद्र गूढ ॥ ७७ ॥ नाना अप्रौढबाळकीं । तारुण्य राहे थोकीं । का न फुलतां कळिकीं । आमोदु जैसा ॥ ७८ ॥ किंबहुना काष्ठीं वन्हि जेवीं किरीटी । तेवीं प्रकृतीचिया पोटीं । गोप्यु जो असे ॥ ७९ ॥ जैसा ज्वरु धातुगतु । अपथ्याचें मिष पाहतु । मग जालिया आंतु-। बाहेरि व्यापी ॥ ८० ॥ तैसी पाचाही गांठी पडे । जैं देहाकारु उघडे । तैं नाचवी चहुंकडे । तो अहंकारु गा ॥ ८१ ॥ नवल अहंकाराची गोठी । विशेषें न लगे अज्ञानापाठीं । सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी ॥८२॥ ( ५५६. बुद्धितत्व, ८३-८९ ) आतां बुद्धि जे म्हणिजे । ते ऐशिया चिन्हीं जाणिजे । बोलिलें यदुराजें । तें आइकें सांगों ॥ ८३ ॥ तरी कंदर्पाचेनि बळें । इंद्रियवृत्तीचेनि मेळें । विभांडूनि येती पाळे । विषयांचे ॥८४॥ तो सुखदुःखाचा नागोवा । जेथ उगाणों लागे जीवा । तेथ दोहींसी वरवा । पाडु जे धरी ॥ ८५ ॥ हें सुख हें दुःख । हें पुण्य हे दोष । कां हें मैळ हें चोख । ऐसें जे निवडी ॥ ८६ ॥ जिये अधमोत्तम सुझे । जिये सानें थोर बुझे । जिया दिठी पारखिजे । विषो जिवें ॥ ८७ ॥ जे तेजतत्वाची आदि । जे सत्वगुणाची वृद्धि । जे आत्मया जीवाची संधी । वसवीत असे ॥ ८८ ॥ अर्जुना ते गा जाण । बुद्धि तूं संपूर्ण । आतां आइकें वोळखण । अव्यक्ताची ॥ ८९ ॥ ( ५५७. अव्यक्त तत्व, ९०–९७ ) पैं सांख्यांचिया सिद्धांतीं । प्रकृती जे महामती । तेचि एथें प्रस्तुतीं । अव्यक्त गा ॥ ९० ॥ आणि सांख्ययोगमतें । प्रकृति परिसाविली तूतें । ऐसी दोन्ही परी जेथें । विवंचिली ॥ ९१ ॥ तेथ दुजी जे जीवदशा । तिये नांव वीरेशा । येथें अव्यक्त ऐसा । पर्यावो हा ॥ ९२ ॥ तन्ही पाहालेंया रजनी । तारा

१ प्रकृति, २ आत्मसत्ता. ३ तत्त्वें. ४ इंद्रियें. ५ आकाश. ६ समज. ७ लहान. ८ गुप्त. ९ कळींत. १० वास. ११ समागमानें. १२ लिंकून. १३ लूट. १४ अनभवूं लागे. १५ समजे. १६ ज्ञान, १७ मधें, १८ रहात असते, १९ बुद्धिमान अर्जुना. २० पहांट झाल्यावर.

बंद होतात, ९३ अथवा अर्जुना, देह नाहींसा झाल्यावर देहापासून वासनेपर्यंत सर्व विकार केलेल्या कर्मांत गुप्त असतात; ९४ किंवा बीजाच्या आकारांत जसा वृक्ष अंतर्गत असतो, अथवा तंतूंच्या दशेंत ज्याप्रमाणें वस्त्र अंतर्गत असतें, ९५ त्याप्रमाणें महाभूतें व भूतांचा समुदाय आपला स्थूल धर्म टाकून ज्या ठिकाणीं सूक्ष्म होऊन अंतर्धान पावतात, ९६ त्यालाच अर्जुना, अव्यक्त असें समज. आतां सर्व इंद्रियांचे भेद तुला सांगतों, ते ऐक. ९७ कान, डोळे, त्वचा, नाक व जिव्हा ही पांच ज्ञानेंद्रियें आहेत. ९८ या पांच तत्त्वांचें ऐक्य झालें म्हणजे ह्याच्या द्वारें बुद्धि ही सुखदु:खांचा विचार करते. ९९ वाचा, हात, पाय, गुद व शिश्न हे इंद्रियाचे आणखी पाच प्रकार आहेत. १०० श्रीकृष्ण म्हणतात, "अर्जुना, ज्यांना कर्मेंद्रियें म्हणतात तीं हीं होत. १ प्राणाची स्त्री क्रियाशक्ति, जी या शरिरांत वास करते, ती त्या पांच कर्मेंद्रियांच्या द्वारानें आंत बाहेर जाण्यायेण्याचा व्यापार करते." २ श्रीकृष्ण म्हणतात:—याप्रमाणें पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें अशीं दहा इंद्रियें सांगितलीं. आतां मन म्हणजे काय तें तुला स्पष्टपणें सांगतों, ऐक. ३ जें इंद्रियें आणि बुद्धि या दोहोंच्या सांध्यामध्यें रजोगुणाच्या खांदीवर चमकत असतें; ४ ज्याप्रमाणें आकाशाचा नीलवर्ण अथवा मृगजळाच्या लाटा व्यर्थ भासतात, त्याप्रमाणें वायूचें जें व्यर्थ चमकणें, तेंच मन आहे; ५ आणि शुक्र व शोणित यांचें ऐक्य होऊन जेव्हां पंचतत्त्वांचा आकार बनतो, तेव्हा, एका वायुतत्वाचे स्थानभेदानें पाच प्राण व पांच उपप्राण असे दहा प्रकार होतात. ६ मग ते दहा भाग आपापल्या धर्मांच्या बळानें देहातील एक एक भागाच्या ठिकाणीं वस्ती करतात. ७ त्यामध्यें निखालस चंचलपणा राहिल्यानें त्याचे अंगीं रजोगुणाचें बळ उत्पन्न होतें, ८ तें बुद्धीच्या बाहेर व अहंकाराच्या उरावर अशा मध्यभागांत बलाढ्य होतें. ९ त्याला मन हें व्यर्थ नांव आहे. एरवीं तें मूर्तिमंत कल्पनारूपच होय. ज्याच्या योगानें ब्रह्माला जीवदशा घ्यावी लागली, १० जें कोणतीही गोष्ट करण्यास मूळ कारण आहे, ज्याच्या योगानें वासना उत्पन्न होते, व जें नेहमीं अहंकाराशीं स्पर्धा करतें; ११ ज्याच्या योगानें इच्छा वाढते, आशा प्रबल होते, व ज्याच्या योगानें भय उत्पन्न होतें; १२ ज्याच्या योगानें द्वैतभाव उत्पन्न होतो व अज्ञान जोरावतें; जें इंद्रियाना विषयाकडे वळवितें; १३ जें एका क्षणांत सृष्टि उत्पन्न करतें, व ती लागलीच मोडूनही टाकतें, आणि मनोरथांच्या उतरंडी रचतें व उतरतें, १४ जें भ्रमाचें कोठार व वायुतत्त्वाचा अर्क आहे; व ज्यानें बुद्धीचें द्वार झांकून टाकिलें आहे ( म्हणजे बुद्धीचें कांहीं चालूं देत नाहीं ) १५ त्यालाच, अर्जुना मन म्हणतात; हें नि:संशय होय. आतां विषयांच्या नावाचे जे जे भेद आहेत, ते ऐक. १६ शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच ज्ञानेंद्रियांचे पांच विषय आहेत. १७ ज्याप्रमाणें जनावर हिरव्या चाऱ्याकडे धाव घेतें, त्याप्रमाणें ह्या पाच ज्ञानें-

२५ मूर्तिमंत. २६ ब्रह्म. २७ वासनेस. २८ स्पर्धा. २९ उत्पन्न करते. ३० अज्ञान. ३१ जोरावतें. ३२ धाईट कल्पना करून. ३३ भ्रमाचें ३४ अर्क.

लोपती गगनीं । का हारपे अस्तमानीं । भूतक्रिया ॥ ९३ ॥ नातरी देहो गेलिया पाठीं । देहादिक किरीटी । उपाधि लपे पोटीं । कृतकर्माच्या ॥ ९४ ॥ कां बीज-मुद्रेआंतु । थोके तरु समस्तु । कां वस्त्रपण तंतु-। दशे राहे ॥ ९५ ॥ तैसे साहूनियां स्थूळधर्म । महाभूतें भूतग्राम । लया जाती सूक्ष्म ।-होऊनि जेथें ॥ ९६ ॥ अर्जुना तया नांवें। अव्यक्त हें जाणावें। आतां आइकें आघवे। इंद्रियभेद ॥ ९७॥ (५५८. इंद्रियें, ९८-११६ ) तरी श्रवण नयन। त्वचा घ्राण रसन। इयें जाणें ज्ञान-। करणें पांचै ॥ ९८ ॥ इये तत्वेंमेळापंकीं। सुखदुःखाची उखिविखी। बुद्धि करिते मुखीं । पांचें इहीं ॥ ९९ ॥ मग वाचा आणि कर । चरण आणि अधोर्द्वार । पायु हे प्रकार । पांच आणिक ॥ १०० ॥ कर्मेंद्रियें म्हणिपती । तीं इयें जाणिजती । आइकें कैवल्यपती । सांगतसे ॥ १ ॥ पैं प्राणाची अंतौरीं । क्रियाशक्ति जे शरीरीं । तियेची रिगिनिगी द्वारीं । पांचें इहीं ॥ २ ॥ एवं दहाही करणें । सांगितलीं देवो म्हणे । पारिस आतां फुडेंपणें । मन तें ऐसें ॥ ३ ॥ जें इंद्रियां आणि बुद्धि। माझारिलिये संधीं । रजोगुणाच्या खांदीं । तरळत असे ॥ ४ ॥ नीळिमा अंबरीं । का मृगतृष्णा-लहरी । तैसें वायांचि फेरारी । वावो जाहले ॥ ५ ॥ आणि शुक्र-शोणिताचा सांधा । मिळतां पांचांचा बांधा । वायुतत्व दशधा । एकचि जाहलें ॥ ६ ॥ मग तिहीं दाहें भागीं । देहधर्माच्या खेवंगीं । अधिष्ठिलें आंगीं । आपुलाल्या ॥ ७ ॥ तेथ चांचल्य निखळ । एकलें ठेलें निढाळ । म्हणोनि रजाचें बळ । धरिलें तेणें ॥ ८ ॥ तें बुद्धीसी बाहेरी । अहंकाराच्या उरावरी । ऐसा ठायीं-माझारीं । बाळियावलें ॥ ९ ॥ वाया मन हें नाव । येऱ्हवीं कल्पनाचि सोंवेव । जयाचेनि संगें जीव- । दशा वस्तु ॥ ११० ॥ जें प्रवृत्तीसि मूळ । कामा जयाचे बळ । जें अखंड सूये छळ । अहंकारासी ॥ ११ ॥ जें इच्छेतें वाढवी । आशेतें चढवी । जें पाठी पुरवी । भयासि गा ॥ १२ ॥ द्वैत जेथ उठी । अविद्या जेणें लाठी । जें इंद्रियांतें लोटी । विषयांमाजी ॥ १३ ॥ संकल्पें सृष्टी घडी । सवेंचि विकल्पूनि मोडी । मनोरथाच्या उतरंडी । उतरी रची ॥ १४ ॥ जें भुलीचें कुहर । वायुतत्त्वाचें अंतर । बुद्धीचें द्वार । झांकविलें जेणें ॥ १५ ॥ तें गा किरीटी मन । या बोला नाहीं आन । आतां विषयाभिधान- । भेदु आइकें ॥१६॥ ( ५५९. इंद्रियांचे विषय,११७-१२१ ) तरी स्पर्शु आणि शब्दु । रूप रसु गंधु । हा विषयो पंचविधु । ज्ञानेंद्रियांचा ॥ १७ ॥ इहीं पांचै द्वारीं । ज्ञानासि धांव बाहेरी ।

१ वासना. २ बीजाच्या आकारात. ३ थाबून रहातो. ४ मिलाफ झाला असता. ५ विचार. ६ मुखानें; द्वारानें. ७ ज्ञानेंद्रियें. ८ शिस्न. ९ गुद. १० श्रीकृष्ण. ११ स्त्री. १२ आत बाहेर जाणें येणें. १३ कर्मेंद्रियें. १४ स्पष्टपणें. १५ चमकत. १६ आकाशाचा नीलवर्ण. १७ मृगजळाच्या लाटा. १८ भास. १९ वाटला. २० ऐक्य, २१ संबंध. २२ वस्ती करतात. २३ केवळ. २४ रजोगुणाचे.

बंद होतात, ९३ अथवा अर्जुना, देह नाहींसा झाल्यावर देहापासून वासनेपर्यंत सर्व विकार केलेल्या कर्मांत गुप्त असतात; ९४ किंवा बीजाच्या आकारांत जसा वृक्ष अंतर्गत असतो, अथवा तंतूंच्या दशेंत ज्याप्रमाणें वस्त्र अंतर्गत असतें, ९५ त्याप्रमाणें महाभूतें व भूतांचा समुदाय आपला स्थूल धर्म टाकून ज्या ठिकाणीं सूक्ष्म होऊन अंतर्धान पावतात, ९६ त्यालाच अर्जुना, अव्यक्त असें समज. आतां सर्व इंद्रियांचे भेद तुला सांगतों, ते ऐक. ९७ कान, डोळे, त्वचा, नाक व जिव्हा हीं पांच ज्ञानेंद्रियें आहेत. ९८ या पांच तत्त्वांचें ऐक्य झालें म्हणजे ह्यांच्या द्वारें बुद्धि ही सुखदुःखांचा विचार करते. ९९ वाचा, हात, पाय, गुद व शिश्न हे इंद्रियाचे आणखी पांच प्रकार आहेत. १०० श्रीकृष्ण म्हणतात, " अर्जुना, ज्यांना कर्मेंद्रियें म्हणतात तीं हीं होत. १ प्राणाची स्त्री क्रियाशक्ति, जी या शरिरात वास करते, ती त्या पांच कर्मेंद्रियांच्या द्वारानें आंत बाहेर जाण्यायेण्याचा व्यापार करते." २ श्रीकृष्ण म्हणतात:—याप्रमाणें पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें अशीं दहा इंद्रियें सांगितलीं. आतां मन म्हणजे काय तें तुला स्पष्टपणें सांगतों, ऐक. ३ जें इंद्रियें आणि बुद्धि या दोहोंच्या सांध्यामध्यें रजोगुणाच्या खांदीवर चमकत असतें; ४ ज्याप्रमाणें आकाशाचा नीलवर्ण अथवा मृगजळाच्या लाटा व्यर्थ भासतात, त्याप्रमाणें वायूचें जें व्यर्थ चमकणें, तेंच मन आहे; ५ आणि शुक्र व शोणित याचें ऐक्य होऊन जेव्हां पंचतत्त्वांचा आकार बनतो, तेव्हा, एका वायुतत्वाचे स्थानभेदानें पाच प्राण व पांच उपप्राण असे दहा प्रकार होतात.६ मग ते दहा भाग आपापल्या धर्मांच्या बळानें देहांतील एक एक भागाच्या ठिकाणीं वस्ती करतात. ७ त्यामध्यें निखालस चंचलपणा राहिल्यानें त्याचे अंगीं रजोगुणाचें बळ उत्पन्न होतें, ८ तें बुद्धीच्या बाहेर व अहंकाराच्या उरावर अशा मध्यभागात बलाढ्य होतें. ९ त्याला मन हें व्यर्थ नांव आहे. एरवीं तें मूर्तिमंत कल्पनारूपच होय. ज्याच्या योगानें ब्रह्माला जीवदशा घ्यावी लागली, १० जें कोणतीही गोष्ट करण्यास मूळ कारण आहे, ज्याच्या योगानें वासना उत्पन्न होते, व जें नेहमीं अहंकाराशीं स्पर्धा करतें; ११ ज्याच्या योगानें इच्छा वाढते, आशा प्रबल होते, व ज्याच्या योगानें भय उत्पन्न होतें; १२ ज्याच्या योगानें द्वैतभाव उत्पन्न होतो व अज्ञान जोरावतें; जें इंद्रियाना विषयाकडे वळवितें; १३ जें एका क्षणांत सृष्टि उत्पन्न करतें, व ती लागलीच मोडूनही टाकतें, आणि मनोरथाच्या उतरंडी रचतें व उतरतें, १४ जें भ्रमाचें कोठार व वायुतत्त्वाचा अर्क आहे; व ज्यानें बुद्धीचें द्वार झांकून टाकिलें आहे ( म्हणजे बुद्धीचें कांहीं चालूं देत नाहीं ) १५ त्यालाच, अर्जुना मन म्हणतात; हें निःसंशय होय. आतां विषयांच्या नांवाचे जे जे भेद आहेत, ते ऐक. १६ शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच ज्ञानेंद्रियांचे पांच विषय आहेत. १७ ज्याप्रमाणें जनावर हिरव्या चाऱ्याकडे धाव घेतें, त्याप्रमाणें ह्या पाच ज्ञानें-

२५ मूर्तिमंत. २६ ब्रह्म. २७ वासनेस. २८ स्पर्धा. २९ उत्पन्न करते. ३० अज्ञान. ३१ जोरावतें. ३२ भाईट कल्पना करून. ३३ भ्रमाचें ३४ अर्क.

जैसा कां हिरवे चार्गी । भांबावे पशु ॥ १८ ॥ मग स्वर वर्णविसर्गु । अथवा स्वीकारत्यागु । चंक्रमणें उत्सर्गु । विर्णमूत्राचा ॥ १९ ॥ हे कर्मेंद्रियांचे पांच । विषय गा साच । जे बांधोनियां मोच । क्रिया धांवे ॥ १२० ॥ ऐसे हे दाही । विषय गा इये देहीं । आतां इच्छा तेही । सांगिजैल ॥ २१ ॥ ( ५६०. इच्छा, १२२–१२५) तरि भूतलें आठवे । कां बोले कान झांकवे । ऐसियावरि चेतवे । जे गा वृत्ति ॥ २२ ॥ इंद्रियविषयांचिया भेटी- । सरसीच जे गा उठी । कामाची बाहुटी । धरूनियां ॥ २३ ॥ जियेचेनि उठिलेपणें । मना सैंघ धांवणें । न रिगावें तेथ करणें । तोंडें सुंती ॥ २४ ॥ जिये वृत्तीचियें आवडी । बुद्धी होय वेडी । विषया जिया गोडी । ते गा इच्छा ॥ २५ ॥ ( ५६१. द्वेष, १२६ ) आणि इच्छीलिया सांगडें । इंद्रिया आमिष[13] न जोडे । जेथ जोडेऐसा जो डावो पडे । तोचि द्वेषु ॥ २६ ॥ ( ५६२. सुख, १२७-१३१ ) आतां यावरी सुख । तें एवंविध देख । जेणें एकेंचि अशेख । विसरे जिवु ॥ २७ ॥ मना वाचे काये । जें आपुली आण वाये । देहस्मृतीची न्राये । मोडित जें ये ॥ २८ ॥ जयाचेनि जालेपणें । पांगुळा होइजे प्राणें । सात्विकासी दुणें । वरीही लाभु ॥ २९ ॥ का आघवियाचि इंद्रियवृत्ती । हृदयाचिया एकांतीं । थापटूनि सुषुप्ती । आणी जें गा ॥ १३० ॥ किंबहुना [16]सोये । जीव आत्मयाची लाहे । तेथ जें होये । तया नाम सुख ॥ ३१ ॥ ( ५६३. दुःख, १३२–१३३. ) आणि ऐसी हे अवस्था । न जोडतां पार्था । [17]जीजे तेंचि सर्वथा । दुःख जाणें ॥ ३२ ॥ तें मनोरथसंगें नव्हे । येऱ्हवीं सिद्धी गेलेंचि आहे । हे दोनीचि उपाये । सुखदुःखासी ॥ ३३ ॥ ( ५६४. चेतना, १३४–१४२ ) आतां असंगा साक्षिभूता । देहीं चैतन्याची जे सत्ता । तिये नाम पांडुसुता । चेतना येथें ॥ ३४ ॥ जे नखौनि केशवरी । उभी जागे शरीरीं । जे तिहीं अवस्थांतरीं । पालटेना ॥ ३५ ॥ मनबुद्ध्यादि आघवीं । जियेचेनि टवटवी । प्रकृतिवनमेंधवी । सदांचि जे ॥ ३६ ॥ जडाजडीं अंशीं । राहाटे जे सरिसी । ते चेतना गा तुजसी । लटिकें नाहीं ॥ ३७ ॥ पैं रावो परिवारु नेणे । आज्ञाचि परचक्र जिणे । कां चंद्राचेनि पूर्णपणें । सिंधू भरती ॥ ३८ ॥ नाना भ्रामकाचें सन्निधान । लोहो करी सचेतन । कां सूर्यसंगू जन । चेष्टवी गा ॥ ३९ ॥ अगा मुखमेळेंविणें । पिलियांचें पोषण । करी निरीक्षणें । कूर्मी जेवीं ॥ १४० ॥ पार्था

१ उच्चार. २ चालणें. ३ त्याग. ४ मळमूत्राचा. ५ मार्ग. ६ मागील. ७ कोणत्याही पदार्थाची वारंवार इच्छा होणें, काम ८ हात. ९ जिकडे तिकडे. १० घालतात. ११ सगत. १२ बरोबर. १३ विषयभोग. १४ बळ. १५ निद्रा. १६ लाभ. १७ वाचे. १८ मायारूप वनाचा वसंत. १९ जड व चेतन वस्तूत. २० लोहचुंबकाच्या. २१ जवळ असण्यानें. २२ चंचल. २३ स्तनास तोंड लावल्यावाचून. २४ नजरेनें.

द्रियांच्या द्वारानें ज्ञान बाहेर धाव घेतें. १८ मग स्वर व वर्ण यांचा उच्चार, वस्तु घेणें व टाकणें, चालणें व मलमूत्र विसर्जन करणें १९ हे पांच कर्मेंद्रियांचे पांच विषय आहेत. ज्यांच्या आधारानें क्रिया बाहेर धाव घेते, १२० असे हे ज्ञानेंद्रियांचे व कर्मेंद्रियांचे दहा विषय या देहांत आहेत. आतां इच्छा म्हणजे काय तें सांगतों. २१ पूर्वी ज्या पदार्थाचा उपभोग घेतला आहे, त्याची आठवण होणें, आणि कानावर शब्द पडण्याबरोबर जी प्रकाशित होणारी वृत्ति; २२ इंद्रियांची व विषयांची गांठ पडताक्षणींच जी उत्पन्न होते, व तेच विषय वारंवार उपभोगास मिळावे असें जिला वाटतें; २३ ज्या वृत्तीच्या उद्भवण्यानें मन इकडे तिकडे धावूं लागतें व जिकडे जाऊं नये अशा ठिकाणीं इंद्रियें तोंडें घालतात; २४ ज्या वृत्तीच्या संगतीनें बुद्धि वेडी होते, व जिची विषयावर आवड असते, त्या वृत्तीला इच्छा असें म्हणतात; २५ आणि इच्छा उत्पन्न होण्याबरोबर इंद्रियांना विषय उपभोगास मिळाले नाहींत तर त्या वेळीं जी वृत्ति उत्पन्न होते, तिला द्वेष असें म्हणतात. २६ आतां सुख हें या लक्षणानीं जाणावें कीं, जें प्राप्त झालें असतां इतर सर्व वस्तूंचा जिवाला विसर पडतो; २७ जें काया, वाचा आणि मन याना आपली शपथ घालून देहाच्या आठवणीचा नाश करतें; २८ जें प्राप्त झालें असतां प्राण लंगडा पडून सात्त्विक वृत्ति पूर्वीपेक्षां दुप्पट वाढते; २९ सगळ्या इंद्रियांच्या वृत्तींना हृदयाच्या एकांतांत थोपटून जें निद्रा घेण्यास लावतें; १३० फार काय सांगावें ? जीवाला ज्या ठिकाणीं आत्म्याचा लाभ होतो, त्यालाच सुख असें म्हणतात; ३१ आणि पार्था, अशी ही स्थिति न लाभतां जी स्थिति असणें, तेंच खरोखर दुःख असें समज. ३२ ज्या ठिकाणीं कल्पना उत्पन्न झाली, त्या ठिकाणीं सुख होत नाहीं. एरवीं, कल्पना नाहींशी झाल्यावर तें सहजानुसार प्राप्त होतें. म्हणून, कल्पना उत्पन्न होणें व तीच नाहीशी होणें हें सुखदुःखांला कारण आहे. ३३ आतां अर्जुना, अलिप्त व सर्वसाक्षीभूत अशा ब्रह्माची ( चैतन्याची ) जी देहावर सत्ता आहे, तिला चेतना असें म्हणतात. ३४ या शरीरांत जी नखशिखांत नेहमीं जागृत असते, व जागृति, स्वप्न, सुषुप्ति या तिन्ही अवस्थांमध्यें जिच्यांत फरक पडत नाहीं; ३५ जिच्या योगानें मन, बुद्धि इत्यादिकांना टवटवी असते, व जी मायारूप वनाला नेहमीं वसंत ऋतूप्रमाणें प्रफुल्लित ठेवते; ३६ आणि जड व चेतन वस्तूंत जिचा अंशरूपानें सारखा संचार असतो, तिला चेतना असें म्हणतात, यांत संशय नाहीं. ३७ हें पहा, राजा जसा आपल्या लवाजम्यास जाणत नसून, त्याच्या फक्त आज्ञेनेंच त्याची प्रजा परचक्रास जिंकिते; किंवा चंद्राच्या योगानें जशी समुद्रास भरती येते, ३८ अथवा लोहचुंबकाच्या सान्निध्यानें जसा लोखंडास चंचलपणा येतो; किंवा सूर्याचा प्रकाश जसा सर्व जीवांकडून व्यापार घडवितो; ३९ अथवा स्तनास तोंड लावल्याशिवाय कासवी ज्याप्रमाणें केवळ नजरेनेंच आपल्या पिलांचें पोषण करते, १४० त्याप्रमाणें, अर्जुना, या शरीरांत जी आत्म्याच्या संमतीनें

तयापरी । आत्मसंगती इये शरीरीं । सजीवत्वाचा करी । उपेगु जडा ॥ ४१ ॥ मग तियेतें चेतना । म्हणिपे पैं अर्जुना । आतां धृतिविवंचना- । भेदु आइक ॥ ४२ ॥ ( ५६५. धृति, १४३–१४८ ) तरि भूतां परस्परें । उघड जातिस्वभाववैरें । नोहे पृथ्वीतें नीरें । विनाशिजे ॥ ४३ ॥ नीरातें आटी तेज । तेजा वायूसी झुंज । आणि गगन तंव सहज । वायु भक्षी ॥ ४४ ॥ तेवींचि कोणेहि वेळे । आपण कायिसयाही न मिळे । आंत रिघोनि वेगळें । आकाश हें ॥ ४५ ॥ ऐसीं हीं पाचही भूतें । न साहती एकमेकांतें । कीं तियेंही ऐक्यातें । देहा येती ॥४६॥ द्वंद्वाची उखिविखी । सोडूनि वसती एकीं । एकएकातें पोखी । निजगुणे गा ॥ ४७ ॥ ऐसें न मिळे तयां साजणें । चळे धैर्य जेणें । तया नांव म्हणे । धृति पैं गा ॥ ४८ ॥ ( ५६६. संघात, १४९–१५५ ) आणि जीवेंसीं पांडवा । या छत्तिसांचा मेळावा । तो हा एथ जाणावा । संघातु पैं गा ॥ ४९ ॥ एवं छत्तीसही भेद । सांगितले तुज विशद । यया येतुलेयातें प्रसिद्ध । क्षेत्र म्हणिजे ॥ १५० ॥ रथांगांचो मेळावा । जेवि रथु म्हणिजे पांडवा । कां अधोर्ध्व अवेवा । नाम देहो ॥ ५१ ॥ चतुरंगसमाजें । सेना नाम निपजे । कां वाक्यें म्हणिपती पुंजे । अक्षरांचे ॥ ५२ ॥ का जळधारांचा मेळा । वाच्य होय आभाळा । नाना लोकां सकळां । नाम जग ॥ ५३ ॥ कां स्नेहसूत्रवन्ही । मेळ एकिये स्थानीं । धरिजे तो जनीं । दीपु होय ॥ ५४ ॥ तैसीं छत्तीसही इयें तत्वे । मिळती जेणें एकत्वें । तेणें समूहपरत्वें । क्षेत्र म्हणिपे ॥ ५५ ॥ ( ५६७. क्षेत्र म्हणण्याचीं कारणें १५६–१५९. ) आणि वाहतेनि भौतिकें । पाप पुण्य येथें पिके । म्हणोनि आम्ही कौतुकें । क्षेत्र म्हणों ॥ ५६ ॥ आणि एकाचेनि मतें । देह म्हणती यातें । परि असो हें; अनंतें । नामें यया ॥ ५७ ॥ पैं परतत्वाआंरौतें । स्थावरांआतौतें । जें कांहीं होतें जातें । तें क्षेत्रचि हें ॥ ५८ ॥ परि सुर नर उरगीं । घडत आहे योनिविभागीं । तें गुणकर्मसंगीं । पडिले सातें ॥ ५९ ॥ ( ५६८. आत्मज्ञानाचे महत्त्व, १६०–१८४ ) हेचि गुणविवंचनें । पुढां म्हणिपेल अर्जुना । अवतरणः– प्रस्तुत तुज ज्ञाना । रूप दावूं ॥ १६० ॥ क्षेत्र तंव सविस्तर । सांगितलें सविकार । म्हणोनि आतां उदार । ज्ञान आइकें ॥ ६१ ॥ जया ज्ञानालागीं । गैंगन गिळिताति योगी । स्वर्गाची आडवंगी । उमरडोनी ॥ ६२ ॥ न धरिती ऋद्धीची भीड । न करिती सिद्धीची चाड । योगाऐसें दुवाड । हेळसिती ॥ ६३ ॥ तपोदुर्गें वोला-

१ धैर्याच्या विचाराचे. २ वादविवाद. ३ मैत्री. ४ समुदाय. ५ रथाचे सर्व भाग. ६ पायापासून डोक्यापर्यंत. ७ तेल, वात व ज्योत. ८ सर्वांना मिळून. ९ प्राणिमात्र. १० अलीकडे. ११ पर्यंत. १२ सर्प. १३ विचार. १४ चौदाव्या अध्यायात. १५ ब्रह्मरंध्र आकाश. १६ ओलांडून. १७ हेळसांड करतात.

जड वस्तूला सजीवपणा आणते, ४१ तिलाच, बाबारे ! चेतना हें नांव आहे. आतां धैर्याचे भेद कोणते आहेत ते ऐक. ४२ पंचतत्त्वांचें एकमेकांशीं जातिस्वभावावरून उघड वैर असतें; पहा कीं, पाणी हें पृथ्वीचा नाश करीत नाहीं का ? ४३ पाण्याचें शोषण तेज करतें, तेज वायूबरोबर झगडतें, आणि आकाश हें वायूस सहज भक्षून टाकतें; ४४ त्याचप्रमाणें कधींही कशाबरोबर न मिळतां सर्वत्र ओतप्रोत भरलेलें असून आकाश वेगळें असतें; ४५ अशा प्रकारें हीं पंचमहाभूतें एकमेकांशीं विरुद्ध असून त्यांनाही जी एकत्र करते; ४६ दुजेपणाचा वादविवाद सोडून, एकत्र राहून जीं आपल्या गुणांनीं एकमेकांचें पोषण करतात; ४७ याप्रमाणें न होणारी मैत्री जिच्या योगानें होते, व धैर्य कायम राहतें, त्या वृत्तीला मी धृति असें म्हणतों; ४८ आणि, हे पांडवा, जीवासह या छत्तीस तत्त्वांचें जें ऐक्य होतें, त्यालाच संघात असें म्हणतात. ४९ याप्रमाणें हे छत्तीस भेद तुला स्पष्ट रीतीनें सांगितले; व या सर्वांना मिळून क्षेत्र हें नाव प्राप्त झालें आहे. १५० बा अर्जुना, रथाचे सर्व भाग मिळून जसें रथ हें नांव येतें; किंवा पायापासून डोक्यापर्यंत सर्व अवयव मिळून देह हें नांव येतें; ५१ अथवा हत्ती, घोडे, रथ व पायदळ या सर्वांना मिळून जसें चतुरंग सेना हें नांव येतें; किंवा अक्षरांच्या समुदायाला वाक्य असें म्हणतात; ५२ मेघांच्या सर्व समुदायाला जसें आभाळ म्हणतात; किंवा सर्व लोकांच्या समुदायाला ज्याप्रमाणें जग असें म्हणतात; ५३ अथवा तेल, वात व ज्योत हीं एकत्र मिळालीं म्हणजे ज्याप्रमाणें त्याला दिवा असें लोक म्हणतात, ५४ त्याचप्रमाणें, हीं छत्तीस तत्त्वें जेव्हा एके ठिकाणीं मिळतात, तेव्हां त्या सर्वांना मिळून क्षेत्र म्हणतात; ५५ आणि सर्व प्राणी जगतात राहाटून जी पापाची किंवा पुण्याईची कमाई येथें करतात, ( तेंच पीक समजून ) यास आम्ही क्षेत्र ( शेत ) असें कौतुकानें म्हटलें; ५६ आणि कोणी या क्षेत्रास देह असें म्हणतात. पण तें असो; याला अनेक नांवें आहेत. ५७ हें पहा—ब्रह्माच्या अलीकडे ब्रह्मदेवापासून स्थावरजंगमापर्यंत जेवढें कांहीं निर्माण होतें व लय पावतें, तें सर्व क्षेत्रच होय. ५८ परंतु देव, मनुष्य, सर्प, असे निरनिराळ्या योनींत जे निर्माण होतात, ते सत्त्व, रज व तम या गुणांची संगति घडल्यानें उत्पन्न होतात. ५९ अर्जुना, ह्या गुणाचा विचार पुढें ( चौदाव्या अध्यायांत ) सांगितला जाईल. सध्यां तुला ज्ञानाचें स्वरूप काय आहे तें सांगतो. १६० क्षेत्राचीं एकंदर सर्व लक्षणें विकारासह तुला सांगितलीं; तर यापुढें, ज्यापासून मोक्षप्राप्ति होते त्या उदार ज्ञानाविषयीं तुला सांगतों, तें ऐक. ६१ ज्या ज्ञानाकरितां योगी लोक स्वर्गाचा आडमार्ग ओलांडून ब्रह्मरंध्र आकाश गिळून टाकतात, ६२ ऋद्धींची भीड धरीत नाहींत, सिद्धींची गरज बाळगीत नाहींत, व कठीण असें जें योगसाधन त्याची अवहेलना करतात; ६३ तपोरूपी किल्ले ओलांडून, कोट्यवधि यज्ञ ओंवाळून टाकून कर्मकांडरूप वल्ली उपटून टाकतात; ६४ पुष्कळ प्रकारचे उपासनामार्ग स्वीकारून कोणी उघडया अंगानेंच वागतात, व कोणी सुषुम्नेच्या गुप्त मार्गानें

डित । ऋतुकोटि वोवाडितें । उलथूनि सांडित । कर्मवल्ली ॥ ६४ ॥ नाना भजैन-मार्गीं । धांवत उघडिया आंगीं । एक रिगताति सुरंगीं । सुषुम्नेचिये ॥ ६५ ॥ ऐसी जिये ज्ञानीं । मुनीश्वरांची उतान्हीं । वेदतरूच्या पानोवानीं । हिंडताती ॥ ६६ ॥ देईल गुरुसेवा । इया बुद्धी पांडवा । जन्मशतांचा सांडोवा । टाकित जे ॥ ६७ ॥ जया ज्ञानाची रिगवणी । अविद्ये उणें आणी । जीवात्मया बुझावणी । मांडूनि दे ॥ ६८ ॥ जें इंद्रियांचीं द्वारें ऑडी । प्रवृत्तीचे पाय मोडी । जें दैन्याचि फेडी । मानसाचें ॥ ६९ ॥ द्वैताचा दुकाळ पाहे । साम्याचें सुयाणें होये । जया ज्ञानाची सोये । ऐसें करी ॥ १७० ॥ मदाचा ठावोचि पुसी । जें महामोहातें ग्रासी । नेदी आपपरु ऐसी । भाष उरों ॥ ७१ ॥ जें संसारातें उन्मूळी । संकल्प-पंकु पोंखाळी । अनावरातें वेंटाळी । ज्ञेयातें जें ॥ ७२ ॥ जयाचेनि जालेपणें । पांगूळ होइजे प्राणें । जयाचेनि विंदाणें । जग हें चेष्टे ॥ ७३ ॥ जयाचेनि उजाळें । उघडती बुद्धीचे डोळे । जीवु दोंदावरी लोळे । आनंदाचिया ॥ ७४ ॥ ऐसें जें ज्ञान । पवित्रैकनिधान । जेथ विटाळलें मन । चोख कीजे ॥ ७५ ॥ आत्मया जीवबुद्धि । जे लागली होती क्षयव्याधि । ते जयाचिया सन्निधि । निरुजों कीजे ॥ ७६ ॥ तें अनिरूप्य कीं निरूपिजे । ऐकतां बुद्धी आणिजे । वांचूनि डोळां देखिजे । ऐसें नाहीं ॥ ७७ ॥ मग तेंचि इये शरीरीं । जें आपुला प्रभावो करी । तैं इंद्रियांचिया व्यापारीं । डोळांहि दिसे ॥ ७८ ॥ पैं वसंताचें रिगवणें । झाडांचेनि सेजेपणें । जाणिजे तेविं करणें । सांगती ज्ञान ॥ ७९ ॥ अगा वृक्षासि पाताळीं । जळ सांपडे मुळीं । तें शाखांचिये बाहाळी- । वरिहि दिसे ॥ १८० ॥ कां भूमीचें मार्दव । सांगे कोंभाची लवलव । नाना आचारगौरव । सुकुलीनाचें ॥ ८१ ॥ अथवा संभ्रमाचिया आयती । स्नेहो जैसा ये व्यक्ती । कां दर्शनाचिये प्रशस्ती । पुण्यपुरुष ॥ ८२ ॥ नातरी केळीं कापूर जाहला । जेविं परिमळें जाणों आला । कां भिंगारीं दीप ठेविला । बाहेरि फाके ॥ ८३ ॥ तैसें हृदयींचेनि ज्ञानें । जियें देहीं उमटती चिन्हें । तियें सांगों आतां अवधानें । चांगें आइक ॥ ८४ ॥

अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।
आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥

अन्वयः—अमानित्वं, अदंभित्वं, अहिंसा, क्षांतिः, आर्जवं, आचार्योपासनं, शौचं, स्थैर्यं, आत्मविनिग्रहः; ॥ ७ ॥

---

१ यश. २ ओंवाळून टाकतात. ३ उपासनामार्गी. ४ गुप्त मार्गी. ५ उत्कट इच्छा. ६ प्राप्ति. ७ ऐक्य. ८ बंद करते. ९ कर्माचे. १० काळजी. ११ सुकाळ. १२ उपटून टाकते. १३ चिखल. १४ धुवून टाकते. १५ परब्रह्मातें. १६ व्यापकाला. १७ सचेतें. १८ प्रकाशानें. १९ निरोगी. २० सुखात होणें. २१ टवटवी. २२ विस्तारावर. २३ मृदुपणा. २४ कोंवळेपणा. २५ पद्धत. २६ आदरातिथ्याची. २७ तयारी. २८ दृष्टीस पडतो. २९ ताव्दानांत.

जातात; ६५ असें जें ज्ञान, त्याच्या प्राप्तीकरितां सर्व ऋषि उत्कट इच्छा मनांत धारण करून, वेदरूपी झाडाच्या पानांवरून हिंडतात (वेदात सांगितलेल्या सर्व मार्गांचें शोधन करतात.) ६६ हे पांडवा, गुरूची सेवा केली असतां त्यापासून ज्ञानप्राप्ति होईल, या बुद्धीनें पुढील येणाऱ्या अनेक जन्माची गुरुसेवेवरून ओंवाळणी करतात; ६७ ज्या ज्ञानाची प्राप्ति झाली असता अज्ञान नाहींसें होतें व जीवाचें आणि आत्म्याचें ऐक्य होतें; ६८ जें ज्ञान इंद्रियांस विषयांची इच्छा होऊं देत नाहीं, कर्मांची हाव मोडून टाकितें, व मनाची काळजी दूर करितें; ६९ ज्या ज्ञानाचा लाभ झाला असतां द्वैताचा अभाव होतो; १७० ज्याच्या योगानें गर्वाचा मागमूस नाहींसा होतो; जें मायेला थारा देत नाहीं, व ज्याच्या ठिकाणीं आपपरभाव उरत नाहीं; ७१ जें संसाराला उपटून टाकितें, संकल्परूपी चिखल धुऊन टाकितें, व सर्वव्यापक परब्रह्माची भेट करून देतें; ७२ जें प्राप्त झालें असतां प्राण पांगळा होतो, (इंद्रियांकडून विषयोपभोग मिळविण्याची त्याची हांव बंद होते) व ज्याच्या सत्तेनें सर्व जगतांतील व्यापार चालत असतात; ७३ आणि ज्याच्या प्रकाशानें बुद्धि प्रौढ होऊन जीव आनंदमय होतो, ७४ असें जें ज्ञान, जें पवित्रपणाचा ठेवा, व जें प्राप्त झालें असतां विषयांनीं विटाळलेलें मन निर्मळ होतें; ७५ 'मी जीव आहें' असा जो आत्म्याला क्षयरोग लागलेला असतो, तो ज्याच्या प्राप्तीनें लय पावतो, ७६ तें ज्ञान निरूपण करण्यास अशक्य असूनही आम्ही समजून सांगतों, तर तें ऐकून नीट समजून घे. बाकी तें डोळ्यांसमोर दिसेल अशी वस्तु नाहीं. ७७ मग तेंच ज्ञान ज्या वेळेस या शरीरांत उत्पन्न होतें, त्या वेळीं इंद्रियांच्या आचरणावरून दृष्टोत्पत्तीस येतें. ७८ ज्याप्रमाणें झाडाच्या टवटवीतपणावरून वसंत ऋतु सुरू झाला हें समजतें, त्याप्रमाणें इंद्रियांच्या व्यापारांवरून ज्ञानप्राप्तीची लोकांस ओळख होते. ७९ अरे! झाडाला जमिनींत मुळाशीं पाणी मिळालें म्हणजे फांद्यांच्या विस्तारावरही जशी त्याची टवटवी दिसते, १८० अथवा कोंबाच्या कोंवळेपणावरून जसा जमिनीचा मृदुपणा दिसून येतो, किंवा कुलीन मनुष्याच्या वागण्याच्या पद्धतीवरून त्याचा थोरपणा दिसून येतो; ८१ अथवा आदरातिथ्यावरून जसा स्नेहभाव दृष्टीस पडतो, किंवा एखाद्याचें दर्शन होतांच मनाला प्रशस्तपणा आल्यामुळें हा पुण्यपुरुष आहे असें कळून येतें, ८२ अथवा केळींत उत्पन्न झालेला कापूर जसा वासानें समजून येतो, किंवा तावदानांत ठेविलेल्या दिव्याचा ज्याप्रमाणें बाहेर प्रकाश पडतो, ८३ त्याप्रमाणें, हृदयांत ज्ञानप्राप्ति झाल्यावर जीं शरीरावर त्याचीं लक्षणें दृष्टीस पडतात, तीं आतां सांगतों, तीं लक्ष देऊन उत्तम रीतीनें ऐक. ८४

*श्लोकार्थः—मानाची इच्छा नसणें, दांभिकपणा नसणें, अहिंसा, क्षांति (शांति), सरळपणा, आचार्योपासन, अंतर्बाह्य शुचिर्भूतपणा, स्थिरता आणि आत्मसंयम; ॥ ७ ॥*

कोणतेही विषय आपल्यास प्राप्त व्हावे अशी ज्याला आवड नसते, व लोकांनीं संभावित म्हटलें असतां ज्याला पराकाष्ठेचें ओझें वाटतें; ८५ असलेले गुण वर्णन केले

( ५६९. अमानित्व १८५–२०२ ) तरी कवणेही विषयींचें । साम्य होणें न रुचे । संभावितपणाचें । वोझें जया ॥ ८५ ॥ आंथिलेचि गुण वानितां । मान्यपणें मानितां । योग्यतेचें येतां । रूपें आगा ॥ ८६ ॥ तैं गजबजों लागे कैसा । व्याधें रुंधला मृगु जैसा । कां बाहीं तरतां वळसा । दाटला जेवीं ॥ ८७ ॥ पार्था तेणें पाडें । सन्मानें जो सांकडे । गरिमेतें आंगाकडे । येवोंचि नेदी ॥ ८८ ॥ पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी । हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ॥ ८९ ॥ तेथ सत्काराची कें गोठी । कें आदरा देईल भेटी । मरणेंसीं सांटी । नमस्कारितां ॥ १९० ॥ वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे । परि वेडिवेमाजि दडे । महिमे भेणें ॥ ९१ ॥ चातुर्य लपवी । महत्त्व हारवी । पिसेपण मिरवी । आवडोनी ॥ ९२ ॥ लौकिकाचा उद्वेगु । शास्त्रांवरी उबगु । उगेपणीं चाडु । आथी मरु ॥ ९३ ॥ जगें अवज्ञाचि करावी । संबंधीं सोयरिक न धरावी । ऐसी ऐसी जीवीं । चाड बहु ॥ ९४ ॥ तळौटेपणें वाणे । आगीं हिणावो खेवणें । तें तेंचि करणें । बहुतकरुनी ॥ ९५ ॥ हा जीतु ना नोहे । लोक कल्पी येणें भावें । तैसें जिणें होआवें । ऐसी आशा ॥ ९६ ॥ पैं चालतु कां नोहे । कीं वारेनि जातु आहे । जना ऐसा भ्रमु जाये । तैसें होइजे ॥ ९७ ॥ माझें असतेपण लोपो । नामरूप हारपो । मज झणें वासिपो । भूतजात ॥ ९८ ॥ ऐसी जयाचीं नवसियें । जो नित्य एकांता जातु जाये । नामेंचि जो जिये । विजनाचेनि ॥ ९९ ॥ वायु आणि तया पडे । गगनेसीं बोलों आवडे । जीवें प्राणें झाडें । पढियंतीं[21] जया ॥ २०० किंबहुना ऐसीं । चिन्हें जया देखसी । जाण तया ज्ञानेंसीं । शेजे जाहली ॥ १ ॥ पैं अमानित्व पुरुषीं । तें जाणावें इहीं मिषीं[24] । आतां अदंभाचिया वोळखीसी । सौरसु देवों ॥ २ ॥ ( ५७०. अदंभित्व २०३–२१७ ) तरि अदंभित्व ऐसे । लोभियाचें मन जैसे । जीवु जावो परि नुमसे[26] । ठेविला ठावो ॥ ३ ॥ तयापरी किरीटी । पडिलाही प्राणसंकटीं । परि सुकृत न प्रकटी । आंगें[27] बोलें ॥ ४ ॥ खेंडाणे आला पान्हा । पळवी जेवीं अर्जुना । का लपवी पण्यांगना । वडिलपण ॥ ५ ॥ आढ्यु आंतुडे आडवीं । मग आढ्यता जेवीं हारवी । नातरी कुळवधू लपवी । अवेवांतें ॥ ६ ॥ नाना कृषीवळु आपुलें । पाधुरवी पेरिलें । तैसें झाकी निपजलें । दानपुण्य ॥ ७ ॥ वरिवरी देह न पूजी । लोकांतें न[34] रंजी ।

१ असलेले. २ वर्णन केलें असता. ३ सन्मान केला असता. ४ घाबरा होतो. ५ पारध्यानें. ६ आडवला. ७ भोंवऱ्यात. ८ सापडला. ९ मोठेपणाला. १० बरोबरी. ११ बृहस्पतीच्या. १२ कंटाळा. १३ हयगय. १४ चिंता. १५ नम्रपण. १६ हीनपणा. १७ भूषण. १८ भिणें. १९ निर्जन, ओसाड. २० धागतो. २१ प्रिय. २२ हस्तगत. २३ सन्मानाची इच्छा नसणें. २४ चिन्हांनीं. २५ अभिप्राय. २६ सागत नाहीं. २७ स्वमुखानें. २८ पान्हा चोरणाऱ्या गाईला. २९ वेश्या. ३० धनवान. ३१ संकटात पडतो. ३२ अरण्यात. ३३ शेतकरी. ३४ आर्जव न करणें.

असतां, लोकांनीं सन्मान केला असतां, किंवा अंगची योग्यता लोकांनीं वर्णन केली असतां ८६ कसा घाबरा होतो म्हणशील, तर व्याधानें आडवलेला हरिण, किंवा नदी पोहून पलीकडे जात असतांना भोंवऱ्यांत सांपडलेला मनुष्यंच! ८७ अशा प्रकारें, पार्था, लोकांनीं सन्मान केला असतां जो कष्टी होतो, व आपल्याकडे मोठेपणा येऊं देत नाहीं; ८८ आपल्यास लोकांनीं पूज्य मानलेलें आपण न पहावें, आपली कीर्ति आपल्या कानांनीं न ऐकावी, व आपण अमुक आहो अशी लोकांना आठवणच न व्हावी, (अशी ज्या पुरुषाची इच्छा असते), ८९ त्या पुरुषाचे ठिकाणीं सत्काराची गोष्ट कशाला बोलावी? व तो आदराला तरी कशी भेट देणार? कोणी त्यास नमस्कार केला असतां त्याला तें मरण वाटतें! १९० बृहस्पतीसारखी सर्वज्ञता जरी अंगीं असली, तरी आपलें माहात्म्य लोकांत वाढेल या भीतीनें जो वेड्यासारखा वागतो, ९१ आपल्या अंगचें शहाणपण दाखवीत नाहीं, आपला मोठेपणा सोडून देतो, आणि मोठ्या प्रेमानें वेडेपणा स्वीकारतो; ९२ ज्याला कीर्तीचा कंटाळा असून, प्रवृत्तिशास्त्रांवरील वादविवादांची हयगय करून स्वस्थपणें बसण्याचीच फार आवड असते, ९३ लोकांनीं आपला अपमान करावा, व आप्तवर्गांनीं आपली चिंता करूं नये, अशी ज्याच्या मनाला फार आवड असते; ९४ अंगांत नम्रपणा पूर्ण भरलेला असून, हीनपणा हें आपलें भूषण अशा गोष्टी तो बहुतकरून करतो; ९५ आपण जिवंत आहों किंवा नाहीं असें लोकांस वाटावयाजोगें आपलें वर्तन असावें, अशी जो इच्छा करतो; ९६ हा आपल्या पायांनीं चालत आहे किंवा वाऱ्यानें ढकलला जात आहे असें लोकांस वाटावें असें जो इच्छितो; ९७ माझ्या अस्तित्वाचा लोप होवो, माझें नांवरूप नाहींसें होवो, व प्राणिमात्राला माझ्यापासून भीति न वाटो, ९८ असे ज्याचे देवापाशीं नवस असतात; जो नित्य एकांतवास करतो, व एखादी जागा निर्जन आहे असें ऐकल्याबरोबर आनंद पावतो; ९९ वायूच्या अनुरोधानें जो वागतो, व आकाशाबरोबर ज्याला बोलणें आवडतें, व ज्याला झाडेंच जीव कीं प्राण आहेत, २०० किंबहुना हीं लक्षणें ज्याच्या अंगांत आहेत, असें दृष्टीस पडेल, त्याला ज्ञान हस्तगत झालें असें समज. १ म्हणून (अमानित्व) जो मनुष्य अभिमानरहित आहे, तो या लक्षणांनीं ओळखावा. आतां अदांभिकत्व ओळखण्याचे अभिप्राय सांगतों. २ तर अदंभित्व असें असतें कीं, ज्याप्रमाणें कृपणाचें मन, त्याचा जीव गेला तरी तो आपला पुरून ठेवलेला पैसा कोणालाही सांगावयाचा नाहीं, ३ त्याप्रमाणें, अर्जुना, आपल्या प्राणावर येऊन बेतली तरी तो आपलें सुकृत स्वमुखानें बोलून दाखवीत नाहीं. ४ ज्याप्रमाणें पान्हा चोरणारी गाय आपला पान्हा चोरते, किंवा वेश्या आपलें प्रौढ वय लपविते; ५ एखाद्या धनवान मनुष्याला अरण्यांत चोरट्यांनीं गांठलें असतां तो ज्याप्रमाणें आपल्या श्रीमंतीचा डौल मारीत नाहीं; किंवा कुलवधू आपलें सर्वांग वस्त्रांनीं आच्छादित करिते; ६ अथवा, धान्य पेरल्यावर त्याच्यावर कुळवानें माती ओढून शेतकरी ज्याप्रमाणें तें झांकून

स्वधर्मु वाग्ध्वजीं । बांधों नेणें ॥ ८ ॥ परोपकारु न बोले । न मिरवी अभ्यासिले ।
न शके विकूं जोडलें । रूकीतीसाठीं ॥ ९ ॥ शरीरभोगाकडे । पहातां कृपणु आवडे ।
येऱ्हवीं धर्मविषयीं थोडें । बहु न म्हणे ॥ २१० ॥ घरीं दिसे सांकड । देहींची
आयती रोड । परि दानीं जया होड । सुरतरूसीं ॥ ११ ॥ किंबहुना स्वधर्मीं थोरु ।
अवसरीं उदारु । आत्मचर्चे चतुरु । येऱ्हवीं वेडा ॥ १२ ॥ केळींचें दळवाडें ।
हळू पोकळ आवडे । परि फळोनि गाढें । रसाळ जैसें ॥ १३ ॥ कां मेघाचें आंग
झीलें । दिसे वारेनि जैसें जाईल । परि वर्षती नवल । घनवट तें ॥ १४ ॥ तैसा
जो पूर्णपर्णी । पाहतां धाती आयणी । येऱ्हवीं तरी वैणी । तोचि ठावो ॥१५॥
हें असो या चिन्हाचा । नेटेनाचु ठायीं जयाच्या । जाण ज्ञान तयाच्या । हाता
चढे ॥ १६ ॥ पैं गा अदंभपण । म्हणितलें तें हें जाण । आतां आईक खुण ।
अहिंसेची ॥ १७ ॥ ( ५७१. हिंसामताचे दोष सांगतात, २१८–२२० ) तरि अहिंसा
बहुतीं परी । बोलिली असे अवधारीं । आपुलालिया मतांतरीं । निरूपिली ॥१८॥
परि ते ऐसी देखा । जैशा खांडूनिया शाखा । मग तयाचिया बुडुखा । कुंप कीजे
॥ १९ ॥ का बाहु तोडोनि पैंचाविजे । मग भुकेची पीडा राखिजे । नाना देऊळ
मोडूनि कीजे । पौळी देवा ॥ २२० ॥ ( ५७२. पूर्वमीमांसेचा हिंसेविषयीं दोष,
२२१–२२४ ) तैसी हिंसाचि करूनि अहिंसा । निफजविजे हा ऐसा । पैं पूर्व-
मीमांसों- । निर्णो केला ॥ २१ ॥ जे अवृष्टीचेनि उपद्रवें । गांदलें विश्व आघवें ।
म्हणोनि पर्जन्येष्टी करावे । नाना याग ॥ २२ ॥ तंव तिये इष्टीचिया बुडीं ।
पशुहिंसा रोकडी । मग अहिंसेची थडी । कैंची दिसे ॥ २३ ॥ पेरिजे नुसधी
हिंसा । तेथ उगवैल काय अहिंसा । परि नवल बापा धिंवसा । या याज्ञिकांचा
॥ २४ ॥ ( ५७३. आयुर्वेदाचा हिंसेविषयीं दोष, २२५–२३४ ) आणि आयुर्वेदु
आघवा । तो याच मोहरीं पांडवा । जे जीवाकारणें करावा । जीवघातु ॥ २५ ॥
नानारोगें आंहाळलीं । लोळती भूतें देखिलीं । ते हिंसा निवारावया केली । चिकित्सा
कां ॥ २६ ॥ तंव ते चिकित्से पहिलें । एकाचे कंद खणविले । एका उपडविलें ।
समूळीं सपत्रीं ॥ २७ ॥ एकें आंड मोडविली । अजंगमांची खाल काढविली ।
एकें गर्भिणी उकडविली । पुटांमाजी ॥ २८ ॥ अजातशत्रु तरुवरां । सर्वांगीं

---

१ शब्दरूप ध्वजावर. २ प्रतिष्ठेकरितां. ३ अडचण. ४ अवस्था. ५ आत्मानात्मविचार करण्यांत. ६ समुदाय. ७ हलकें. ८ पुष्कळ. ९ तृप्ति होते. १० बुद्धि. ११ वर्णन करण्यास. १२ खेळ. १३ शिजवावें. १४ आवार. १५ कर्मकांड. १६ गांजलें. १७ हौस. १८ वैद्यक. १९ मार्ग. २० ग्रस्त झाली. २१ औषधाची योजना. २२ मध्येंच. २३ झाडाची. २४ खालीवर झांकण घालून. २५ शत्रुरहित.

टाकतो, त्याप्रमाणें, आपण केलेलें दान व पुण्य जो कोणासही कळूं देत नाहीं; ७ आपल्या देहास सुशोभित करीत नाहीं, लोकाचे आर्जव करीत नाहीं, आणि आपल्या दानधर्माविषयीं आपणच टिमकी वाजवीत नाहीं । ८ तसेंच, लोकावर उपकार केलेले बोलून दाखवीत नाहीं; आपल्यास येत असलेल्या विद्येची प्रौढी मिरवीत नाहीं; व प्रतिष्ठेसाठीं आपल्या विद्येचा विक्रय करीत नाहीं; ९ आपल्या शरीराच्या उपभोगाकरितां कृपणाप्रमाणें कांहीं खर्च करीत नाहीं; बाकी धर्माची बाब आली म्हणजे, थोडा फार न म्हणतां हवा तेवढा खर्च करतो; २१० घरांत पाहिलें असतां सर्व प्रकारें अडचण असून स्वत.चें शरीर पाहूं गेलें असतां रोड असावयाचें; परंतु दान करण्याची वेळ आली म्हणजे कल्पवृक्षालाही मागें हटवितो; ११ फार काय सांगावें ? स्वधर्माचें आचरण करण्यांत जो गंभीर असून प्रसंग आला असतां अति उदार असतो. आणि त्याचप्रमाणें आत्मानात्मविचाराच्या गोष्टी निघाल्या असतां जो वादविवादांत महाचतुर असतो, बाकी इतर बाबतींत पाहूं लागलें असतां वेड्यासारखा दिसतो; १२ केळीचे रोप जसे हलके व पोकळ दिसतात, परंतु त्यांना फळें आलीं म्हणजे रसाळ दिसतात; १३ किंवा मेघ ज्याप्रमाणें दिसण्यांत हलके असून सहज वाऱ्यानें जातील असे दिसतात, परंतु वर्षाव होऊं लागला म्हणजे सर्वत्र जलमय करून टाकतात, १४ त्याप्रमाणें, ज्याला पूर्ण पाहिलें असतां बुद्धीला समाधान वाटतें—बाकी वर्णन करण्यासही तोच पुरुष योग्य होय. १५ हें असो; हीं चिन्हें ज्याच्या अंगीं दृष्टीस पडतात, त्याच्या हातीं ज्ञान आलें असें समज. १६ अदांभिकत्व ज्याला म्हणतात, तें हें होय. आतां अहिंसेचीं लक्षणे सांगतों, तीं ऐक. १७ हें पहा—अहिंसेचें पुष्कळ प्रकारच्या मतवाद्यांनीं आपआपल्या मताप्रमाणें वर्णन केलें आहे, तें ऐक. १८ ते प्रकार कोणते म्हणशील, तर ज्याप्रमाणें झाडाच्या फांद्या तोडून त्या झाडाच्या बुंध्याभोंवतीं त्यांचेंच कुंपण घालणें, १९ किंवा आपले हात तोडून ते शिजवून आपली भूक शमन करणें, अथवा देऊळ मोडून त्याच सामानानें देवाभोंवतीं आवार बांधणें, २२० त्याप्रमाणें हिंसा करून अहिंसा केली असें दाखविणें, ह्याचा कर्मकांडांत निर्णय केला आहे. २१ कारण, पावसाच्या अवर्षणामुळें सर्व जग गांजून गेलें म्हणून पर्जन्येष्टि वगैरे पुष्कळ यज्ञ करितात, २२ तो त्या इष्टीच्या मुळाशीं पाहूं गेलें असतां पशूची हिंसा ही स्पष्ट घडून येते; मग अहिंसेचा जो पलीकडील कांठ, तो त्या ठिकाणीं कसा दृष्टीस पडणार ? २३ जर केवळ हिंसाच पेरली, तर त्या ठिकाणीं अहिंसा उगवेल काय ? परंतु अर्जुना, या याज्ञिकांच्या हौसेची कमाल आहे । २४ बा पांडवा, सर्व वैद्यक ग्रंथांत हाच मार्ग सांगितला आहे कीं, एका जीवाचें रक्षण करण्याकरितां दुसऱ्या जीवाचा घात करावा । २५ नानाप्रकारच्या रोगांनीं ग्रस्त होऊन पुष्कळ जीव लोळत आहेत, असें पाहून ह्या घडत असलेल्या हिंसेच्या निवारणार्थ रोगाची परीक्षा करून औषधाची योजना करतात; २६ त्या औषधाच्या योजनेकरितां प्रथम एका झाडाचें मूळ खणून आणतात, व दुसऱ्या झुडपाला मुळासकट उपटून आणतात; २७ एक झाड मध्येंच मोडतात, एका मोठ्या झाडाची साल काढून आणतात, व गाभण असलेला जीव खालीं वर आच्छादन घालून उकडून काढतात * २८ ज्याला शत्रुभाव मुळींच नाहीं अशा

*पायाला वाघचवडा वगैरे झाला असतां, त्यावर गाभण वेडकुळी बांधतात, त्याला अनुलक्षून ही ओंवी आहे.

देवविल्या शिरा । ऐसे जीव घेऊनि धनुर्धरा । कोरडे[2] केले ॥ २९ ॥ आणि जंग[3]माही हात । लावूनि काढिलें पित्त । मग राखिलें शिणेंत । आणिक जीव ॥ २३० ॥ अहो वैसतीं धवळारें । मोडूनि केलीं देव्हारें । नागवूनि वेव्हारें । गैंवादी घातली ॥ ३१ ॥ मस्तक पांघुरविलें । तंव तळवटीं उघडें पडलें । घर मोडोनि केले । मांडव पुढें ॥ ३२ ॥ नाना पांघुरणें । जाळूनि जैसें तापणें । कां जालें आंगधुणें । कुंजराचें ॥ ३३ ॥ नातरी वैल विकूनि गोठा । पुंसा लावोनि वांधिजे गैंठा । इथा करणी कीं चेष्टा । काइ हंसों ॥ ३४ ॥ ( ५७४. जैनमताचा दोप, २३५–२३७. ) एकीं धर्मांचिया वाहेणी । गाळूं आदरिलें पाणी । तंव गाळितया आहोळेंणीं । जीव मेले ॥ ३५ ॥ एक नें[3] पचवितीचि कैंणं । इये हिंसेचे भेणें । तेथ कैंदर्थले प्राण । तोचि हिंसा ॥ ३६ ॥ एवं हिंसाचि आहिंसा । कर्मकांडीं हा ऐसा । सिद्धांतु सुमनसा । वोळखें तूं ॥ ३७ ॥ ( ५७५. अहिंसा, २३८–२४५ ) पहिलें आहिंसेचें नांव । आम्हीं केलें जंव । तंव स्फूर्ति वांधली हांव । इये मती ॥ ३८ ॥ तरि कैसेनि इयेतें गाळावें । म्हणोनि पडिलें वोलावें । तेवींचि तुवांही जाणावें । ऐसा भावो ॥ ३९ ॥ वहुतकरुनि किरीटी । ह्याचि विपय इये गोठी । येन्हवीं कां अँव्हांठीं । धांविजैल गा ॥ २४० ॥ आणि स्वमताचिया निर्धारा- । लागोनियां धनुर्धरा । प्राप्त मतांतरां । निर्वेचुं कीजे ॥ ४१ ॥ ऐसी हे अवधारीं । निरूपितीं परी । आतां ययावरी । मुख्य जें गा ॥ ४२ ॥ तें स्वमत वोलिजेल । आहिंसे रूप कीजेल । जिया उठलिया आंतुल । ज्ञान दिसे ॥ ४३ ॥ परि तें अँधिष्ठिलेनि आंगें । जाणिजे आचरतेनि वैंगें । जैसी कसवटी सांगे । वानियैंतें ॥ ४४ ॥ तैसें ज्ञानामनाचिये भेटी । सरिसेंचि आहिंसेचें विंवें[3] उठी । तेंचि ऐसें किरीटी । परिस आतां ॥४५॥ ( ५७६. पायांची अहिंसा, २४६-२६१ ) तरि तरंगु नोलांडितुं । लैंहेरी पायें न फोडितु । सांचेलुं न मोड़तु । पाणियाचा ॥ ४६ ॥ वेगें आणि लेसें । दिठी घालूनि आंविसें । जळीं वकु जैसा । पाऊल सुंये ॥ ४७ ॥ कां कमळावरी भ्रमर । पाय ठेविती हळुवार । कुंचंवैल केसर । इया शंका ॥ ४८ ॥ तैसें परमौणुपां गुंतले । जाणूनि जीव सैंनुले । कारुण्यामाजि पाउलें । लपवूनि चाले ॥ ४९ ॥ ते वाट कृपेची करितु । ते

१ सत्त्व. २ वठविले. ३ सजीवांचही. ४ पीडित झालेले. ५ नांदती. ६ सावकार. ७ अन्नसत्रें. ८ शेक घेणें. ९ हत्तीचें. १० पिंजरा. ११ संप्रदायानें. १२ आधानें. १३ शिजवीत नाहीत. १४ धान्य. १५ भीतीनें. १६ व्याकुळ झाले. १७ आडमार्गानें. १८ विचार; निवड. १९ वर्णन; लक्षणें. २० शरीररचनेवरून. २१ मार्गानें. २२ कस; दर. २३ ठसा. २४ न ओलांडता. २५ लाटा. २६ स्थिरपणा. २७ हळू. २८ साच. २९ ठेवितो. ३० चुरडेल. ३१ मुद्दा. ३२ अति सूक्ष्म.

झाडाच्या सर्वांगावर घाव घालून त्यांतून निघणारा चीक काढून घेतात. याप्रमाणें, धनुर्धरा, सर्व वनस्पतींचें सत्त्व नाहींसें करून तीं झाडें वठवितात; २९ आणि सजीवाच्या अंगात हात घालून त्यांचें पोटांतील पित्त काढून घेतात, व त्यामुळें पीडित झालेले पुष्कळ जीव रक्षण करतात. २३० अहो, नांदतीं घरें मोडून त्यांचे देव्हारे केले, सावकार बुचाडून अन्नसत्रें घातलीं, ३१ डोक्याला वस्त्र गुंडाळल्यामुळें खालचें अंग उघडें पडलें. पुढील आंगण उघडें होतें त्यावर घर मोडून माडव घातले; ३२ ज्याप्रमाणें पुष्कळ प्रकारचीं पांघरुणें जाळून शेक घ्यावा; हत्तीला स्नान घालून स्वच्छ धुऊन काढल्यावर पाण्यांतून वर येतांच पुन: तो सोंडेनें चिखल घेऊन आपलें अंग भरवितो; ३३ किंवा बैल विकून टाकून त्या पैशाचा गोठा बांधणें, अथवा राघू हांकून देऊन मग त्याच्याकरितां पिंजरा तयार करणें, याचें नाव काम कीं चेष्टा ? आणि यास काय हंसावें कीं रडावें ? ३४ कोणी धर्मसंप्रदायाप्रमाणें पाणी गाळून पिऊं लागतात, तों चिरगुटांतील पाणी पिळून घेते वेळीं जीव मरतात. ३५ कोणी हिंसा होईल या भीतीनें धान्य न शिजवितां उपाशींच राहतात, त्यामुळें त्यांचे प्राण व्याकुळ होतात, हीही हिंसाच होते; ३६ याप्रमाणें, हे प्रसन्न मनाच्या अर्जुना, हिंसेलाच कर्मकांडांत अहिंसा मानून सिद्धांत केला आहे, तो नीट समजून घे. ३७ पहिल्या प्रथम अहिंसेचीं लक्षणें सांगावीं असें जेव्हां आम्हीं मनांत आणलें, तेव्हां आमच्या बुद्धीला असें वाटलें कीं, अगोदर खऱ्या अहिंसेचीं लक्षणें सांगावीं. ३८ तर अहिंसेचें वर्णन करण्याची आमच्या बुद्धीची इच्छा कशी न पुरवावी ? म्हणून बोलणें भाग पडलें. त्याचप्रमाणें, तुलाही हीच गोष्ट नीट समजावी असें आमचे मनांत आलें. ३९ अर्जुना, मुख्यत्वेंकरून हाच हेतु मनांत ठेवून आम्हीं तुला अहिंसेचीं लक्षणें सांगितलीं. बाकी आडमार्गानें कोणी उगीच जाईल का ? २४० अर्जुना, आपलें मत स्थापन करण्याकरितां दुसऱ्यांच्या मतांविषयीं विचार करावा लागतो. ४१ ह्याप्रमाणें आपलें मत स्पष्ट सांगण्याची ही रीत आहे; तर आतां यापुढें आमचें जें मुख्य मत आहे तें ऐक: ४२ तें आमचें मत स्पष्ट सांगून अहिंसेचीं लक्षणें सांगूं. तीं लक्षणें कोणाच्याही अंगीं स्पष्ट दिसूं लागल्यावर त्याला खरें ज्ञान प्राप्त झालें आहे असें दिसून येईल. ४३ परंतु ती अहिंसा ज्याच्या मनांत पूर्ण बाणली आहे, ती त्याच्या शरीररचनेवरून व आचरणावरून समजून येते. ज्याप्रमाणें सोनें कसास लावलें म्हणजे त्याचा दर लावतां येतो, ४४ त्याप्रमाणें, ज्ञान व मन यांची भेट झाल्याबरोबर अहिंसेचा मनावर ठसा उमटतो. अर्जुना, तो ठसा कसा उमटतो तो ऐक. ४५ पाण्याच्या लाटा न ओलांडतां व पायानें त्या न तोडतां हाळं देत नाहीं, ४६ पण वेगानें हळूच आपलें खाद्य जो मासा, त्यावर नजर ठेवून बगळा ज्याप्रमाणें पाण्यावर चालतो; ४७ किंवा आंतील केसर मोडेल या भीतीनें भुंगा कमळावर हळूच पाय ठेवतो, ४८ त्याप्रमाणें, परमाणूंत सुद्धां अति सूक्ष्म जीव भरलेले आहेत असें जाणून ते न मरावे अशी मनात करुणा उत्पन्न होऊन तो जमीनीवर बेतानें पावलें ठेवून चालतो; ४९ तो ज्या वाटेनें जातो तिकडे कृपादृष्टीनें पहात चालून, व ज्या दिशेस जातो तिकडे स्नेहभाव धरून, कोणाही प्राण्यास उपद्रव होऊं नये म्हणून आपल्या जिवापेक्षां त्याच्या जिवाला जपतो; २५० अर्जुना, अशा रीतीनें जपून जे चालतात, त्यांच्या

दिशाचि स्नेहभरितु । जीवातळीं आंथरितु । आपुला जीवु ॥ २५० ॥ ऐसिया जतनों । चालेंणें जया अर्जुना । हें अनिर्वाच्य परिमाणीं । पुरिजेना ॥ ५१ ॥ पैं मोहाचेनि सांगडें । लैासी पिलीं धरी तोंडें । तेथ दांतांचे आगरडे । लागती जैसे ॥ ५२ ॥ कां स्नेहाळु माये । तान्हयाची वास पाहे । तिये दिठी आहे । हळुवार जें ॥ ५३ ॥ नाना कमळदळें । डोलविजैती ढाळेंढाळें । तो जेणें पाडें बुबुळें । वारा घेपे ॥ ५४ ॥ तैसेनि मार्दवें पाय । भूमीवरी न्यैसीतु जाय । लागती तेथ होय । जीवा सुख ॥ ५५ ॥ ऐसिया लविमीं चालतां । कृमि कीटक पांडुसुता । देखे तरि माघौता । हळुचि निघे ॥ ५६ ॥ म्हणे पावो धडफडील । तरि स्वामीची निद्रा मोडैल । रचलेपैंणा पडैल । झोती हन ॥ ५७ ॥ इया काकुळती । वैंहणी घे माघुती । कोणेही व्यक्ती । न वंचे वरी ॥ ५८ ॥ जीवाचेनि नांवें । तृणातेंही नोलांडवे । मग न लेखिंता जावें । हे कें गोठी ॥ ५९ ॥ मुंगिये मेरु नोलांडवे । मशका सिंधु न तरवे । तैसें भेटलियां न करवे । अतिक्रमुं ॥ २६० ॥ ऐसी जयाची चैांली । कृपाफळीं फळा आली । देखसी जियेली । दया वाचे ॥ ६१ ॥ ( ५७७. वाणीची अहिंसा, २६२–२७२ ) स्वयें श्वसणेंचि तें सुकुमार । मुख मोहींचें माहेर । माधुर्या जाहले अंकुर । दशनैं तैसे ॥ ६२ ॥ पुढां स्नेह पाझरे । माघां चालती अक्षरें । शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥ ६३ ॥ तंव बोलणेंचि नाहीं । बोलों म्हणे जरी कांहीं । तरि बोल कोणाही । खुपेल कां ॥ ६४ ॥ बोलतां अधिकुही निघे । तरि कोण्हाही वर्मीं न लगे । आणि कोण्हासि न रिघे । शंका मनीं ॥ ६५ ॥ मांडिली गोठी हन मोडैल । वोसिपैल कोणी उडैल । आइकोनि वोवांडिलें । कोण्ही जरी ॥ ६६ ॥ तरि दुवैळी कोणा नोहावी । भंवई कवणाची नुचलावी । ऐसा भावो जीवीं । म्हणोनि उगा ॥ ६७ ॥ मग प्रार्थिला विपायें । जरि लोभें बोलों जाये । तरि परिसतया होये । मायबापु ॥ ६८ ॥ कां नादब्रह्मचि मुसे आलें । कीं गंगांपय अैंसळलें । पतिव्रते आलें । वार्धक्य जैसें ॥ ६९ ॥ तैसे साच आणि मवाळ । मितलें आणि रसाळ । शब्द जैसें कल्लोळ । अमृताचे ॥ २७० ॥ विरोधैंवादबळु । प्राणितांपढाळु । उपैहासु

---

१ जपून. २ वागतात. ३ माप. ४ योगानें. ५ माजरी. ६ टोंकें. ७ वाट. ८ प्रेम. ९ पानानें. १० वारा घेणें. ११ वारंवार. १२ ठेवीत. १३ हळू. १४ प्रकृतीच्या स्वस्थपणास. १५ धक्का. १६ मार्ग. १७ चाले. १८ जुमानतां. १९ उल्लंघन. २० वागणूक. २१ मूर्तिमंत. २२ प्रेमाचें. २३ दात. २४ ठरलेली. २५ भीति वाटेल. २६ दचकून जागें होईल. २७ तिरस्कार करील. २८ पीडा. २९ कदाचित्. ३० गंगोदक. ३१ उसळलें. ३२ परिमित. ३३ विरुद्ध वादाचें बळ. ३४ दुसऱ्यास त्रास देणें. ३५ निंदा.

अहिंसेचें माप शब्दांनीं करता येत नाहीं. ५१ मायेच्या योगानें मांजरी आपल्या तोंडांत पिलास धरिते, त्या वेळेस ज्याप्रमाणें तिचे दांत त्यास लागत नाहींत, ५२ किंवा ज्याप्रमाणें ममताळू आईची आपल्या मुलाच्या वाटेकडे दृष्टि लागली असतां त्या दृष्टींत प्रेम असतें; ५३ अथवा कमळाच्या पानानें वारा घेऊं लागलें असता ज्याप्रमाणें डोळ्याच्या बुबुळांस समाधान होतें, ५४ त्याप्रमाणें तो जमीनीवर पाय हळूच टेंकून चालतो; व ते ज्या जीवांना लागतात, त्यांना त्रास न होतां, जपून टाकल्यामुळें उलट सुख होतें. ५५ अर्जुना, याप्रमाणें तो हळू चालत असतां जमीनीवर किडा किंवा मुंगी दृष्टीस पडली, तर तो हळूच माघारा फिरतो. ५६ जर आपण पाय आपटीत चाललों, तर स्वामींच्या निद्रेचा भंग होईल, व त्यांच्या प्रकृतीच्या स्वस्थपणास धक्का बसेल, ५७ अशी दया मनात उत्पन्न होऊन, तो कोणच्याही प्राण्याचें उल्लंघन न करतां माघारा फिरतो; ५८ जीवाचा नाश होईल म्हणून गवतावरही पाय देऊन जात नाहीं, मग एखादा प्राणी दृष्टीस पडून त्याला न जुमानतां ( त्याची प्राणहानि होईल असें मनांत न आणितां ) तो वाट चालेल, ही गोष्ट त्याचे हातून कशी घडेल ? ५९ ज्याप्रमाणें मुंगीला मेरु पर्वत ओलांडून जातां येत नाहीं, अथवा चिलटाला समुद्र तरून जातां येत नाहीं, त्याप्रमाणें प्राण्याची गांठ पडली असतां ज्याच्यानें त्याचें उल्लंघन करवत नाहीं; २६० अशी ज्याची वागणूक कृपारूप फळांनीं फळास येऊन वाणींतही मूर्तिमंत दया दृष्टीस पडते; ६१ स्वतः श्वासोच्छ्वास टाकावयाचा तोही शेजारच्या मनुष्यास त्रास न होईल अशा बेतानें हळू टाकतो; व त्याचें मुख पाहिलें असतां केवळ प्रेमाचें माहेरघर असें दिसतें. तसेंच त्याचे दांत माधुर्याला अंकुर फुटल्याप्रमाणें दिसतात; ६२ त्याच्या तोंडातून अक्षरें बाहेर पडण्याचे अगोदर तोंडावर स्नेहभाव दृष्टीस पडूं लागतो; व पोटांत अगोदर दया उत्पन्न होऊन नंतर कृपेनें भरलेले असे शब्द बाहेर पडतात. ६३ तो होतां होई तोंपर्यंत कोणाशीं बोलतच नाहीं; कदाचित् त्यानें बोलण्याचें मनात आणलें, तर आपलें बोलणें कोणास लागेल कीं काय अशी त्यास भीति वाटते; ६४ बोलताना जर आपल्या तोंडांतून कमीजास्त शब्द निघाले, तर ते कोणाच्या वर्मी न लागावे व त्यापासून कोणाच्याही मनांत शंका उत्पन्न होऊं नये; ६५ ( त्यांपासून ) कोणाचा ठरलेला बेत मोडेल, कोणास भीति वाटेल व कोणी दचकून जागे होईल; आणि जरी कोणी आपल्या बोलण्याचा तिरस्कार केला, ६६ तरी कोणाला पीडा होऊं नये, व कोणी भिंवया चढवून आपलेकडे पाहूं नये, असें मनांत आणून जो बोलत नाहीं; ६७ मग कदाचित् कोणीं प्रार्थना केली, व लोभानें जर बोलूं लागला, तर ऐकणारास त्याचें बोलणें आईबापाप्रमाणें उपदेशपर वाटावें; ६८ किंवा मधुर नाद हा मूर्तिमंत पुढें उभा राहिला आहे, अथवा स्वच्छ गंगोदक उसळलें आहे, किंवा पतिव्रता स्त्रीला वृद्धपण प्राप्त झालें आहे, ६९ त्याप्रमाणें खरे आणि मऊ, परिमित व प्रेमळ असे, अमृताच्या लाटांप्रमाणें त्याच्या तोंडांतन शब्द निघतात; २७० जे शब्द व्याजस्तुतीनें भरलेले आहेत, ज्यापासून वाद उत्पन्न

छळ । वर्मस्पर्शु ॥ ७१ ॥ ओटू वेंगू विंदाण । आशा शंका प्रतारण । हे संन्यासिले अवगुण । जया वाचा ॥ ७२ ॥ ( ५७८. डोळ्याची अहिंसा, २७३-२७८ ) आणि तयाचिपरी किरीटी । थाऊ जयाचिये दिठी । सांडिलिया भृकुटी । मोकळिया ॥ ७३ ॥ कां जे भूतीं वस्तु आहे । तिये रुपों शके विपायें । म्हणोनि वासु न पाहे । वहुत करुनी ॥ ७४ ॥ ऐसाही कोणे एके वेळे । भीतरिले कृपेचेनि बळें । उघडोनि डोळे । दृष्टि घाली ॥ ७५ ॥ तरि चंद्रबिंबौनि धारा । निघतां नव्हती गोचरा । परि एकसरें चकोरां । निघती दोंदें ॥ ७६ ॥ तैसें प्राणियासि होये । जरी तो कहीं वासु पाहे । तया अवलोकनाची सोये । कूर्मीही नेणे ॥ ७७ ॥ किंवहुना ऐसी । दिठी जयाची भूतांसी । करही देखसी । तैसेचि ते ॥ ७८ ॥ ( ५७९. हाताची अहिंसा, २७९-२९२ ) तरी होऊनियां कृतार्थ । राहिले सिद्धांचे मनोरथ । तैसे जयाचे हात । निर्व्यापार ॥ ७९ ॥ अक्षम आणि संन्यासिलें । कां निरिंधन आणि विझालें । मुकेनि घेतलें । मौन जैसें ॥ २८० ॥ तयापरी कांहीं । जयां करां करणें नाहीं । जे अकर्तयाच्या ठायीं । बैसों येती ॥ ८१ ॥ आर्सुडैल वारा । नख लागेल अंबरा । इया बुद्धी करा । चेंळों नेदी ॥ ८२ ॥ तेथ आंगावरिलीं उडवावीं । कां डोळां रिगतें[२१] झाडावीं । पशुपक्ष्यां दावावी । त्रासमुद्रा ॥ ८३ ॥ इया केउतिया गोठी । नावडे दंडु काठी । मग शस्त्राचें किरीटी । बोलणें कें ॥ ८४ ॥ लीलाकमलें खेळणें । कां पुष्पमाला झेलणें । न करी म्हणे गोफणें । ऐसें होईल ॥ ८५ ॥ हालवतील रोमावळी । यालागीं आंग न कुरवाळी । नखांची गुंडाळी । बोटावरी ॥ ८६ ॥ आधीं तंव करणेंयाचाचि अभावो । परि ऐसाही पडे प्रस्तावो । तरि हातां हाचि सरावो । जे जोडिजती ॥ ८७ ॥ कां नाभिकारा उचालिजे । हातु पडिलिया देइजे । नातरि आर्तातें स्पर्शिजे । अळुमाळ ॥ ८८ ॥ हेंही उपरोधें करणें । तरी आर्तभय हरणें । नेणती चंद्रकिरणें । जिव्हाळा तो ॥ ८९ ॥ पावोनि तो स्पर्शु । मलयानिळु खरपुसु । येणें मानें पशु । कुरवाळणें ॥ २९० ॥ जे सदा रिते मोकळे । जैशीं चंदनांगें निसळें । न फळतांही निर्फळें । होतीचि ना ॥ ९१ ॥ आता असो हें वाग्जाळ । जाणें तें करतळ । सज्जनांचें शीळ । स्वभाव जैसे ॥ ९२ ॥ ( ५८०. मनाची अहिंसा, २९३-३१३ ) आतां मन तयाचें । सांगों म्हणों जरी साचें । तरी सांगितलें कोणाचें ।

१ अटी. २ अवसान. ३ कपट. ४ ठकबाजी. ५ सोडून दिलें. ६ स्थिर. ७ भिवया. ८ ब्रह्म. ९ खुपेल. १० दृष्टि. ११ आंतील. १२ दृष्टीस पडणें. १३ कासवी. १४ ब्रह्मनिष्ठाचे. १५ अंधळा. १६ सोडून दिलें. १७ पेटवणाशिवाय. १८ धक्का बसेल. १९ आकाशास. २० हालू. २१ शिरणारीं. २२ भीति. २३ प्रसंग. २४ अभय कर. २५ पीडितास. २६ संकटानें. २७ पाझर.-

होतो व दुसऱ्यास त्रास उत्पन्न होतो, तसेंच ज्यापासून निंदा व छळ होतो व जे दुसऱ्याच्या वर्मीं लागतात; ७१ आणि ज्यात अटी, अवसान, कपट, आशा, शंका व ठकबाजी हीं भरलेलीं आहेत, असे शब्द जो आपल्या वाचेनें बोलत नाहीं; ७२ त्याचप्रमाणें अर्जुना, ज्याची दृष्टि स्थिर असून भिंवया मोकळ्या असतात, म्हणजे ज्याच्या कपाळावर आठ्या दृष्टीस पडत नाहीत; ७३ कारण, प्रत्येक प्राण्यांत ब्रह्म भरलेलें आहे, त्याला कदाचित् त्रास होईल म्हणून जो बहुतकरून कोणाकडेहीं पहात नाहीं; ७४ असें असतांही एखाद्या वेळीं आंतल्या कृपेच्या बळानें जर डोळे उघडून कोणाकडे पाहील, ७५ तर, चंद्रबिंबांतून निघणाऱ्या अमृताच्या धारा जरी कोणाच्या दृष्टीस पडत नाहींत, तरी चकोर पक्षी चंद्राकडे एकसारखी टक लावून पाहूं लागले म्हणजे त्यांचें अमृतानें पोट भरतें, ७६ त्याप्रमाणें ज्या प्राण्याकडे तो आपल्या दृष्टीनें पाहील, त्याला समाधान होतें; व ( कासवी जरी आपल्या पिलांकडे नुसत्या दृष्टीनें पाहून त्यांना वाढवितें, तरी त्या ) कासवीलाही त्या दृष्टीचें प्रेम कळत नाहीं; ७७ किम्बहुना जो भूतमात्राकडे अशा प्रेमळ दृष्टीनें पाहतो, त्याच्या हाताचे गुण पाहूं गेलें असतां तेही दृष्टीप्रमाणेंच अलौकिक आहेत. ७८ ज्याप्रमाणें ब्रह्मनिष्ठाचे मनोरथ पूर्ण झालेले असतात, त्याप्रमाणें, ज्याचे हातांस कांहींएक करण्याची इच्छा नसून ते निर्व्यापार असतात; ७९ जन्मांधानें ज्याप्रमाणें पहाण्याची क्रिया सोडावी, किंवा अग्नीस पेटवण नसून तो जसा विझावा, अथवा मुक्या मनुष्यानें जसें मौनव्रत धारण करावें, २८० तसें ज्याच्या हातांना कांहींएक करावयाचें उरलें नसतें, व जे कांहींएक व्यापार न करतां स्वस्थ असतात; ८१ वाऱ्याला धक्का लागेल किंवा आकाशाला नख लागेल असें वाटून जो आपले हात हालवीत नाहीं, ८२ तेथें अंगावर बसलेली माशी उडवावी, किंवा डोळ्यांत जाणारीं घुंगुरटीं एकीकडे करावीं अथवा पशुपक्ष्यांना डोळ्यांनीं भीति दाखवावी, ८३ या गोष्टी कोठून घडणार? हे किरीटी, त्याला हातात दंड किंवा काठी घेणेंही जर आवडत नाहीं, तर मग शस्त्राची गोष्ट कशाला पाहिजे? ८४ हातांत लीलेनें कमळ घेऊन फिरविल्यास अथवा फुलाचा हार झेलल्यास ते गोफणीप्रमाणें एखाद्या जीवास लागून त्यास इजा होईल अशा समजुतीनें हेही व्यापार जो हातानें करीत नाहीं; ८५ अंगावरील लवेस इजा होईल म्हणून जो अंगावरून हात फिरवीत नाहीं, व बोटाचीं नखें काढिलीं असतां हिंसा होईल म्हणून जो तीं वाढवितो, ८६ अगोदर कोणती गोष्ट हातानें करावयाचीच नाहीं, परंतु जर प्रसंग आलाच तर हात जोडण्याशिवाय दुसरा अभ्यासच ज्याला ठाऊक नाहीं; ८७ किंवा हातानें व्यापार केलाच तर दुसऱ्यास हात उचलून अभयवचन देणें, किंवा एखादा कोणी पडत असल्यास त्यास हातानें सावरणें अथवा पीडित मनुष्याच्या अंगावरून हळूच हात फिरविणें, ८८ ह्या गोष्टी मोठ्या संकटानें जो करितो; तथापि पीडित मनुष्याची चिंता तो दूर करतो. या त्याच्या करण्यानें जो कृपेचा पाझर सुटतो, तसा चंद्रकिरणानाही सुटणें कठीण आहे. ८९ त्याच्या हाताचा स्पर्श होतांक्षणींच मलय पर्वतावरील वाराही पीडित मनुष्यास कठीण वाटतो, व अशाच मृदु हातानें तो पशूसही कुरवाळतो; २९० जे हात नेहमीं मोकळे असतात; आणि चंदनाचे झाडाचा कोणताही भाग थंडगार असतो, व त्याला फळें न येतांही तो निष्फळ आहे असें कोणास वाटत नाहीं; ९१ आता हें

विलास हे ॥ ९३ ॥ काई शाखा नव्हे तरु । जळेंवीण असे सागरु । तेज आणि तेजाकारु । आन काई ॥ ९४ ॥ अवयव आणि शरीर । हे वेगळाले काय-कीर । कीं रसु आणि नीर । सिनानीं आथी ॥ ९५ ॥ म्हणोनि हे जे सर्व । सांगितले बाह्य भाव । तें मनचि गा सावयव । ऐसें जाणें ॥ ९६ ॥ जें बीज भुंई खोंविलें । तेंचि वरी रूख जाहलें । तैसें इंद्रियद्वारीं फांकलें । अंतरचि कीं ॥ ९७ ॥ पैं मानसींचि जरी । आहिंसेची अवसरी । तरी कैची बाहेरी । वोसंडैल ॥ ९८ ॥ आवडे ते वृत्ति किरीटी । आधीं मनौनीचि उठी । मग ते वाचे दिठी । करांसि ये ॥९९॥ वांचूनि मनींचि नाहीं । तें वाचेसि उमटेल काई । बींवीण भुंई । अंकुर असे ॥२००॥ म्हणोनि मनपण जैं मोडे । तैं इंद्रिय आधींचि उबडें । सूत्रधारेंवीण सैाइखडें । वावो जैसें ॥ १ ॥ उगमींचि वाळूनि जाये । तें वोघीं कैचें वाहे । जीवु गेलिया आहे । चेष्टा देहीं ॥ २ ॥ तैसें मन हें पांडवा । मूळ या इंद्रियभावा । हेंचि राहटे आघवां । द्वारीं इहीं ॥ ३ ॥ परि जिये वेळीं जैसें । जें होऊनि आंत असे । बाहेरि ये तैसें । व्यापाररूपें ॥ ४ ॥ यालागीं साचोकारें । मनीं आहिंसा थावे थोरें । जैसी पिकली द्रुंति आंदरें । वोभात[12] निघे ॥ ५ ॥ म्हणोनि इंद्रियें तेचि संपदा । वेचितां हीं उदावादा । आहिंसेचा धंदा । करितें आहाती ॥ ६ ॥ समुद्रीं दाटे भरितें । तैं समुद्रचि भरी तरियांतें । तैसें स्वसंपत्ति चित्तें । इंद्रियां केलें ॥७॥ हें बहु असो पंडितु । धरूनि बाळकाचा हातु । वोळी लिही सुव्यक्तु । आपणचि ॥ ८ ॥ तैसें दयाळुत्वा आपुलें । मनें हातापायां आणिलें । मग तेथ उपजविलें । आहिंसेतें ॥ ९ ॥ याकारणें किरीटी । इंद्रियांचिया गोठी । मनाचियेचि राहाटी । रूप केलें ॥ २१० ॥ ऐसा मनें देहें वाचा । सर्व संन्यासु दंडांचा । जाहाला ठायीं जयाचा । देखशील ॥ ११ ॥ तो जाण वेल्हाळ । ज्ञानाचें वेळाउळ । हें असो निखिळ । ज्ञानचि तो ॥ १२ ॥ जे आहिंसा कानें ऐकिजे । ग्रंथाधारें निरूपिजे । ते पाहावी ऐसें जें उपजे । तैं तोचि पाहावा ॥ १३ ॥ (५८१. व्याख्यान वाढण्याचीं कारणें, २१४-२३९ ) ऐसें म्हणितलें देवें । तें बोलें एकें सांगावें । परि फांकलों हें उपसाहावें । तुम्हीं मज ॥ १४ ॥ म्हणाल हिरवे चारीं गुरूं । विसरे मागील मोहरे धरूं । का वारेंलगें पाखिरूं । गगनीं भरे ॥ १५ ॥ तैसिया प्रेमाचिया

१ मनाचेंच. २ उणीव. ३ पडेल. ४ निर्बल. ५ कळसूत्री बाहुली. ६ व्यर्थ. ७ व्यापार करी. ८ वासना. ९ स्थिर होते. १० घास. ११ आपोआप. १२ बोभाटा करून निघतो; पसरतो. १३ पूर्णपण. १४ खाडयाना. १५ पतोजी. १६ व्यापार. १७ हिंसेचा. १८ विलासी. १९ वसतिस्थान. २० विस्तार झाला. २१ मार्ग. २२ वाऱ्याच्या वेगानें.

वाक्पांडित्य राहूं दे; सज्जनांचें शील व स्वभाव हीं जशीं असतात, तसेंच त्यांच्या हातांचें आचरण असतें. ९२ आतां त्यांचें मन कसें आहे म्हणून जर सांगावयाचें म्हटलें, तर ह्या ज्या गोष्टी वर्णन केल्या, ती कृति कोणाची आहे ? ९३ झाडांच्या फांद्या म्हणजे झाडें नाहींत काय ? पाण्याशिवाय समुद्र आहे काय ? तेज आणि सूर्य हीं निराळीं आहेत का ? ९४ अवयव आणि शरीर हीं निराळीं आहेत का ? किंवा पाणी व पाण्याची गोडी हीं कांहीं निराळीं का आहेत ? ९५ म्हणून, हे जे सर्व इंद्रियांचे बाह्य व्यापार सांगितले, ते मनाचेच आहेत असें समज. ९६ जें बीज जमीनींत पेरलें असतें, तेंच वर झाडाच्या रूपानें दृष्टीस पडतें; त्याचप्रमाणें, इंद्रियांकडून जे व्यापार घडतात, ते मनाच्याच प्रेरणेनें होतात. ९७ परंतु मनांत जर अहिंसेचा उदय झाला नसेल, तर इंद्रियांकडून ती बाहेर कशी पडेल ? ९८ अर्जुना, कोणतीही वृत्ति अगोदर मनाच्या ठिकाणींच उत्पन्न होते; आणि मग तीच वाचेनें, दृष्टीनें व हातांनीं घडते. ९९ बाकी जी गोष्ट मनांत येत नाहीं, ती तोंडानें बोलली जाईल का ? हें पहा, बीजाशिवाय जमीनींत अंकुर उत्पन्न होईल का ? ३०० म्हणून, ज्याप्रमाणें सूत्रधाराशिवाय कळसूत्री बाहुली हालत नाहीं, त्याप्रमाणें, मन जेव्हां कोणचाही व्यापार करण्यास प्रवृत्त होत नाहीं, तेव्हां इंद्रियें अगोदर निर्बल होतात. १ जें पाणी उगमापाशींच आटून जातें, तें नदीच्या ओघात कोठून वाहणार ? हें पहा, प्राण गेल्याबरोबर देहाकडून कांहीं व्यापार घडतात का ? २ त्याप्रमाणें पार्था, मन हें या इंद्रियांच्या व्यापारास मूळ कारण आहे, व हेंच सर्व इंद्रियांकडून व्यापार करवितें. ३ परंतु ज्या वेळीं मनांत जशी वासना उत्पन्न होते, तसे इंद्रियांकडून बाहेर व्यापार घडतात; ४ ह्याकारितां, ज्याप्रमाणें पिकलेल्या फळांचा वास आपोआप चहूंकडे पसरतो, त्याप्रमाणें खरोखर मनांत अहिंसा बळकट कायम असली म्हणजे इंद्रियांच्या व्यापारांत अहिंसाच दृष्टीस पडते. ५ म्हणून, इंद्रियें हीं, अहिंसा हीच आपली संपत्ति असें पूर्णपणें मानून, तिचीच देवघेव म्हणजे व्यापार करीत असतात. ६ ज्याप्रमाणें समुद्राला भरती आली म्हणजे समुद्राच्या पाण्यानें खाड्या भरतात; त्याप्रमाणें मनांत अहिंसेचें आलेलें भरतें इंद्रियांच्या व्यापारांतही दृष्टीस पडतें. ७ फार काय सांगावें ? पंतोजी ज्याप्रमाणें लहान मुलाचा हात धरून त्याजकडून सुरेख अक्षर लिहवितो, ८ त्याप्रमाणें, आपले ठिकाणीं पूर्णत्वास आलेली दया हस्तपादादि इंद्रियांचे ठिकाणीं आणून मन हें त्या ठिकाणीं अहिंसा उपन्न करवितें; ( त्या इंद्रियांकडून अहिंसेचें आचरण करवितें. ) ९ ह्याकरितां अर्जुना, इंद्रियांच्या चेष्टा मनाच्याच व्यापाराप्रमाणें दृष्टीस पडतात. १० अशा प्रकारें ज्यानें कायावाचामनेंकरून हिंसेचा त्याग केला आहे असें तूं पाहशील, ११ तो पुरुष ज्ञानाचा विलासी व वसतिस्थान आहे असें समज. फार तर काय ? तो मूर्तिमंत ज्ञानच आहे. १२ ज्या अहिंसेचें वर्णन आपण कानांनीं ऐकतों, व ग्रंथाच्या आधारानें जिचें निरूपण करितों, ती अहिंसा प्रत्यक्ष पहावीशी वाटल्यास त्या पुरुषाचें दर्शन घ्यावें. १३ ( ज्ञानदेव म्हणतातः— ) असें जें श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें, तें मीं तुम्हांला एका शब्दांत सांगावयास पाहिजे होतें; परंतु त्याचा फार विस्तार झाला, ह्याबद्दल तुम्ही मला क्षमा करा. १४ तुम्ही म्हणाल कीं, जनावर हिरवें गवत खाऊं लागलें म्हणजे खात खात

स्फूर्ति । फावलिया रसवृत्ति । वाहविला मति । आकळेना ॥ १६ ॥ तरि तैसें नोहे अवधारा । कारण असे विस्तारा । येऱ्हवीं पद तरी अक्षरा । तिहींचेंचि ॥ १७ ॥ अहिंसा म्हणता थोडी । परि ते तेंचि होय उघडी । जें लोटिजेती कोडी । मतांचिया ॥ १८ ॥ येऱ्हवीं प्राप्तें मतांतरें । थांतंबूनि आंगभरें । बोलिजैल तें नें सरे । तुम्हांपासीं ॥ १९ ॥ रत्नपारखियाच्या गांवीं । जाईल गंडकी[6] तरि सोडावी । कोंदिमरीं न करावी । मिर्डगण जेवीं ॥ ३२० ॥ काइसा वासु कापुरा । मंद जेथ अवधारा । पिठाचा विकरा । तियेसातें ॥ २१ ॥ म्हणोनि इये सभे । बोलकेपणाचेनि क्षोभें[1] । लँग सरूं न लभे । बोला प्रभु ॥ २२ ॥ सामान्या आणि विशेषा । सकळै कीजेल देखा । तरि कानाचेया मुखा- । कडे न्याल ना तुम्ही ॥ २३ ॥ शंकेचेनि गदळें । जें शुद्ध प्रमेयें मैळे । तें मागुतिया पाउलीं पळे । अवधान येतें ॥ २४ ॥ का करूनि वोंबुळियेची बुंथी[13] । जळें जियें ठेंती । तयाची वास पाहाती । हंस काइ ॥ २५ ॥ कां अभ्रापैलीकडे । जैं येत चांदिणें कोडें । तैं चकोरें चांचुवडे । उचलीतना ॥ २६ ॥ तैसे तुम्ही वास न पाहाल । ग्रंथु नेघों वरि कोपाल । जरी निर्विवाद नव्हैल । निरूपण ॥ २७ ॥ न बुझावितां मतें । न फिटे आक्षेपाचें लागतें । तें व्याख्यान जी तुमतें । जोडूनि[17] नेदी ॥२८॥ आणि माझें तंव आघवें । ग्रंथेंन येणेंचि भावें । जे तुम्हीं संतीं होआवें । सन्मुखें सदा ॥२९॥ येऱ्हवीं तरी साचोकारें । तुम्ही गीतार्थाचे सोइरे । जाणोनि गीता एकसरें । धरिली[20] मियां ॥ ३३० ॥ जे आपुलें सर्वस्व द्याल । मग इयेतें सोडवूनि न्याल । म्हणोनि ग्रंथु नव्हे बोलें । साचचि हे ॥ ३१ ॥ कां सर्वस्वाचा लोभु धरा । बोलीचा अव्हेरु करा । तरि गीते मज अवधारा । एकचि गति ॥ ३२ ॥ किंबहुना मज । तुमचिया कृपा काज । तियेलागीं व्याज[23] । ग्रंथाचें केलें ॥ ३३ ॥ तरि तुम्हां रसिकांजोगें । व्याख्यान शोधावें लागे । म्हणूनि जी मैतांगें[23] । बोलों गेलों ॥ ३४ ॥ तंव कथेसि पसरु जाहला । श्लोकार्थु दुरी गेला । कीजो क्षमा यया बोला । अपत्या मज ॥ ३५ ॥ आणि घासाआंतिल हरळु । फेडितां लागे वेळु । तें दूषण नव्हे खेंडळु । सांडावा कीं ॥ ३६ ॥ कां संवचोरां चुकवितां । दिवस लागलिया मैता । कोपावें कीं जीविता । जितांणें

१ पसरल्या. २ खंडण करावें. ३ ठेवून. ४ तशींच्या तशींच. ५ पटणार नाहीं. ६ शालिग्राम शिला. ७ सरस्वती. ८ स्तुति. ९ अभिमानानें. १० रुचि. ११ स्वरूप; तत्व. १२ शेवाळाचें. १३ पांघरूण. १४ असतात. १५ घेणार नाहीं. १६ समजून सांगताना. १७ प्राप्त होऊं देणार नाहीं. १८ प्रतिपादन. १९ प्रसन्न. २० मोक्ते. २१ घ्यास घेतला. २२ तारण. २३ निमित्त. २४ निरानिराळीं मतें. २५ खडा. २६ आईनें. २७ निंबलोण.

पुढें जातां जातां मागें फिरण्याचें विसरतें; किंवा पक्षी आकाशांत उडूं लागल्यावर वाऱ्याच्या वेगानें पुढेंच भराऱ्या मारीत जातो, १५ त्याप्रमाणें प्रेमाच्या भरांत रसवृत्ति पसरून माझी बुद्धि मलाच आवरेनाशी झाली. १६ पण तशांतला कांहीं प्रकार नसून, विस्तार करण्याला कारण आहे. बाकी अहिंसा शब्द तीनच अक्षरांचा आहे. १७ पाहूं गेलें तर अहिंसेचें वर्णन थोडक्यांत करतां येईल; परंतु ( ज्या वेळेस हिंसेलाच अहिंसा म्हणणाऱ्या ) बहुमतांचें खंडण करावें, तेव्हांच ती स्पष्ट करतां येईल. १८ बाकी अहिंसे-संबंधानें जीं उपलब्ध मतें आहेत, तीं जशींच्या तशींच जर सांगितलीं, तर तुम्हांला माझें बोलणें पटणार नाहीं. १९ रत्नपारख्यांच्या गांवांत शालिग्राम शिळा जर विकल्या जातील, तरच त्यांचें गांठोडें सोडावें. सरस्वतीच्या पुढें जशी कोणाचीही स्तुति करण्याची शक्ति नाहीं, ३२० ज्या ठिकाणीं पिठाचीच विक्री कमी होते, त्या ठिकाणीं कापराच्या वासाला कोण विचारतो ? २१ म्हणून श्रोतेहो, तुमच्या सभेमध्यें मी मोठा वक्ता आहें असा जर अभिमान धाव्लगला, तर माझें बोलणें तुम्हांस रुचणार नाहीं. २२ सामान्य व विशेष गोष्टी जर सरसकट करून सांगितल्या, तर त्या तुम्ही आपल्या कानाच्या मुखा-कडे सुद्धां नेणार नाहीं. ( कानांवर सुद्धां पडूं देणार नाहीं. ) २३ जर कोणत्याही वस्तूचें खरें स्वरूप सांगतांना शंकेस जागा राहील, तर तुम्ही जें मजकडे लक्ष देत आहां, तें मागच्या पावलांनींच नाहींसें होईल ! २४ ज्या पाण्यावर शेवाळें पसरलेलें असतें, त्या पाण्याकडे हंस पक्षी जातात काय ? २५ किंवा अभ्राच्या पलीकडे जर सुंदर चांदणें पडलें असलें, तर तें भक्षण करण्याकरितां चकोर पक्षी चोंच उघडीत नाहींत; २६ त्याप्रमाणें, जर निरूपण निर्दोष झालें नाहीं, तर तम्ही माझ्याकडे न येतां ग्रंथ अमान्य करून उलट माझ्यावर रागवाल. २७ ( अहिंसेवरी ) निरनिराळीं मतें समजून सांगतांना जर आक्षेपांचें निरसन होणार नाहीं, तर तें व्याख्यान मला तुमचा लाभ जोडूं देणार नाहीं; ( तुम्ही माझें व्याख्यान ऐकत बसणार नाहीं; ) २८ आणि माझें हें सर्व प्रति-पादन तरी तुम्हीं संतजनांनीं नेहमीं सन्मुख व्हावें ह्याकरितांच आहे. २९ बाकी खरोखर पाहूं गेलें असतां तुम्ही गीतेच्या अर्थाचे भोक्ते आहां, असें समजून गीतेचाच मीं एक-सारखा ध्यास धरिला आहे. ३३० तुम्ही सर्व लक्ष इकडे द्याल, आणि ह्या भगवद्गीतेला सोडवून न्याल; ( ह्याचें रहस्य तुमच्या लक्षांत पूर्णपणें येईल; ) म्हणून, हा ग्रंथ नसून खरोखर तुमच्या सर्वस्वाचें तारणच आहे. ३१ किंवा आपल्या सर्वस्वाचा लोभ धरून जर तुम्हीं ह्या तारणाची आशा सोडली, तर गीतेची व माझी एकच गति होईल असें समजा. ३२ किंबहुना, तुमच्या कृपाप्रसादाची मला जरूर असल्यामुळेंच मीं गीतेचा अर्थ सांग-ण्याचें निमित्त केलें आहे. ३३ तेव्हां तुमच्यासारख्या रसिक श्रोत्यांना रुचेल असें व्याख्यान करावें म्हणून अहिंसेवरील वेगवेगळीं मतें तुम्हास सांगितलीं. ३४ त्यामुळें कथेचा विस्तार होऊन श्लोकाचा अर्थ बाजूला राहिला, त्याची मज लेंकराला आपण क्षमा करा. ३५ जेवतांना घासांत खडा लागला, तर तो काढण्यास लागलेला वेळ व्यर्थ गेला असें म्हणतां येत नाहीं. कारण, तो खडा काढून टाकलाच पाहिजे. ३६ आपला मुलगा गावाहून येत असतांना जर चोरांना चुकवून येण्याकरितां त्यास वेळ लागला, तर आईनें

कीजे ॥ ३७ ॥ परि यावरील हें नव्हे । तुम्हीं उपसाहिलें तेंचि बरवें । आतां अवधारिजो देवें । बोलिलें ऐसें ॥ ३८ ॥ म्हणे उन्मेखसुलोचना[1] । सावध होई अर्जुना । करूं तुज ज्ञाना । वोळखी आतां ॥ ३९ ॥ (५८२. शांति, ३४०–३५३) तरि ज्ञान गा तें एथें । वोळख तूं निरुतें । आक्रोशेंवीण[2] जेथें । क्षमा असे ॥ ३४० ॥ अगाध सरोवरीं । कमळिणी जियापरी । कां सदैवाचिया घरीं । संपत्ति जैसी ॥ ४१ ॥ पार्था तेणें पाडें । क्षमा जयातें वाढे । तेही लक्षे[3] तें फुडें । लक्षण सांगों ॥ ४२ ॥ तरि पढियंतें[4] लेणें । आंगीं भावें[5] जेणें । धरिजे तेविं साहणें । सर्वांचि जया ॥ ४३ ॥ त्रिविधें[6] मुख्य आघवे । उपद्रवांचे मेळावे । वरिपडिलिया[7] नव्हे । वांकुडा जो ॥ ४४ ॥ अपेक्षित पावे । तें जेणें तोषें मानवे । अनपेक्षिताही करवे । मानु तोचि ॥ ४५ ॥ जो मानापमानातें साहे । सुखदुःख जेथ सामाये[8] । निंदास्तुती नोहे । दुखंडु जो ॥ ४६ ॥ उन्हाळेनि जो न तपे । हिमेवंतीं[9] न कांपे । कायसेनिही न वांसिपे[10] । पातलेया ॥ ४७ ॥ स्वशिखरांचा भारु । नेणे जैसा मेरु । कीं धरा[11] यज्ञसूकरु[12] । वोझें न म्हणे ॥ ४८ ॥ नाना चराचरीं भूतीं । दाटणी नव्हे क्षिती[13] । तैसा नाना द्वंद्वीं प्राप्तीं । घामेजेना[14] ॥ ४९ ॥ घेऊनि जळाचे लोट । आलिया नदीनदांचे संघोट[15] । करी वाड[16] पोट । समुद्र जेवीं ॥ ३५० ॥ तैसें जयाचिया ठायीं । न साहणें कांहींचि नाहीं । आणि साहतु असे ऐसेंही । स्मरण नुरे ॥ ५१ ॥ शरीरा जें पातलें । तें करूनि घाली आपुलें । तेथ साहतेनि नवलें । घेपिजेना ॥ ५२ ॥ हे अनाक्रोशें[17] क्षमा । जयापाशीं प्रियोत्तमा । जाण तेणें महिमा । ज्ञानासि गा ॥ ५३ ॥ (५८३. आर्जव, ३५४–३६८) तो पुरुषु पांडवा । ज्ञानाचा वोलेंवा[18] । आतां परिस आर्जवो[19] । रूप करूं ॥ ५४ ॥ तरि आर्जव तें ऐसें । प्राणाचें सौजन्य[20] जैसें । आवडे तयाही दोषें । एकाचि पैं गा ॥ ५५ ॥ कां तोंड पाहूनि प्रकाशु । न करी जेविं चंडांशु[21] । जगा एकुचि अवकाशु[22] । आकाश जैसें ॥ ५६ ॥ तैसें जयाचें मन । माणुसप्रती आन आन । नोहे आणि वर्तन । ऐसें पैं तें ॥ ५७ ॥ जें जगेंचि सनोळख[23] । जगेंसीं जुनाट सोयरिक । आपपर हे भाख[24] । जाणणें नाहीं ॥ ५८ ॥ भलतेणेंसीं मेळु । पाणिया ऐसा ढौळु । कवणेविखीं

---

१ ज्ञानोत्तमनयना, (ज्याला उत्तम ज्ञान स्पष्ट दिसले आहे अशा अर्जुना). २ दंभरहित; अवडंबर न घालता. ३ लक्षात येईल. ४ आवडतें. ५ हौसेनें; भावनेनें. ६ आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक हे त्रिविध ताप. ७ प्राप्त झाले असता ८ सामावतें. ९ हिवाळ्यानें. १० भीत नाहीं. ११ पृथ्वी. १२ यज्ञवराह. १३ पृथ्वीला. १४ कष्टी होत नाहीं. १५ समुदाय. १६ मोठें. १७ दुःखरहित शांति. १८ जिव्हाळा. १९ सरळपणा. २० अनुकूलता. २१ सूर्य. २२ भरलेलें. २३ ओळखीचें. २४ भाव; भाषण. २५ वर्तणूक.

त्याच्यावर रागवावें, का तो जिवंत घरीं आला म्हणून त्याच्यावरून लिंबलोण उतरून टाकावें ? ३७ परंतु हे दाखले देण्याचें काहीं कारण नाहीं. माझें वाढलेलें व्याख्यान तुम्हीं शांतपणें ऐकावें हा तुमचा मोठेपणा आहे. आतां श्रीकृष्ण हे अर्जुनास काय म्हणाले तें ऐका. ३८ भगवान म्हणाले:—हे ज्ञानोत्तमनयना अर्जुना, सावध हो. तुला ज्ञानाची आतां चांगली ओळख करून देतों. ३९ हें पहा, ज्ञान म्हणून जें आहे, तें ज्या ठिकाणीं दंभरहित क्षमा वास करिते, त्याच ठिकाणीं खरोखर आहे असें समज. ३४० खोल तलावांत ज्याप्रमाणें कमळाचीं झाडें असतात, किंवा दैववानाच्या घरीं लक्ष्मी वास करिते,४१ त्याप्रमाणें पार्था, ज्यांच्या योगानें क्षमा वृद्धिंगत होते, तीं लक्षणें सांगतों; म्हणजे तीं पूर्णपणें लक्षांत येतील. ४२ आवडते अलंकार ज्या भावनेनें अंगावर धारण करावयाचे, त्याच भावनेनें जे वाईट बरे प्रसंग येतील ते जो सहन करतो; ४३ ज्या त्रिविध तापांपासून बहुत उपद्रव होतात, ते ताप सहन करण्याची पाळी आली असतां जो कधीं दुःख मानीत नाहीं; ४४ अपेक्षित वस्तु प्राप्त झाली असतां तिच्यापासून जसा संतोष होतो, तसाच संतोष अनिष्टप्राप्ति झाली असतांही जो मानतो; ४५ जो मानापमान सहन करतो, सुखदु:खांनाही जागा देतो आणि निंदेनें किंवा स्तुतीनें मनाची समता भंगू देत नाहीं; ४६ जो उन्हाच्या तापानें तप्त होत नाहीं व थंडीनें कांपत नाहीं, आणि कसलाही प्रसंग आला असतां भीत नाहीं; ४७ मेरु पर्वताला जसा आपल्या शिखरांचा भार होत नाहीं, किंवा यज्ञवराह जसा दंताग्रीं धारण केलेली पृथ्वी जड आहे असें म्हणत नाहीं; ४८ अथवा स्थावरजंगम भूतांची ज्याप्रमाणें पृथ्वीला दाटी होत नाहीं, त्याप्रमाणें, अनेक प्रकारचीं सुखदु:खें प्राप्त झालीं तरी तो कष्टी होत नाहीं; ४९ पाण्याचे लोटच्या लोट घेऊन जरी नदी व नद हे आले, तरी ज्याप्रमाणें समुद्र त्यांना आपल्या पोटांत घेतो, ३५० त्याप्रमाणें, ज्याला सहन न होणारी अशी कोणतीही वस्तु नसून, आपण सर्व गोष्टी सहन करतों ही आठवणही ज्याला नसते; ५१ देहाला ज्या ज्या गोष्टी प्राप्त होतात, त्या सर्व आपणच आहों, म्हणून, आपण सर्व गोष्टी सहन करतों, असा ज्याला अभिमान उत्पन्न होत नाहीं, ५२ अशी अभिमानरहित क्षमा ज्या पुरुषापाशीं वास करिते, त्या पुरुषाच्या योगें, अर्जुना, उलट ज्ञानासही मोठेपणा येतो. ५३ हे पांडवा, असा जो पुरुष, तो ज्ञानाचा खरोखर जिव्हाळाच होय. आतां आर्जव ( सरळपणा ) ह्याविषयींचें वर्णन करतों, तें ऐक. ५४ वाटेल त्या उद्देशानें जरी मनुष्यानें काहींही आचरण केलें, तरी ज्याप्रमाणें त्याला प्राण अनुकूल असतो, त्याप्रमाणें सर्व गोष्टीला अनुकूल असणें याचेंच नांव आर्जव. ५५ हें पहा, सूर्य जसा मनुष्याचें तोंडाकडे पाहून प्रकाश पाडीत नाहीं, किंवा आकाश हें ज्याप्रमाणें सर्व जगभर सारखेंच पसरलेलें आहे, ५६ त्याप्रमाणें ज्याचें मन प्राण्यागणिक निरनिराळें नसून त्याचें वर्तन असें असतें: ५७ सर्व जग ज्याच्या ओळखीचें आहे, आणि ज्याला आपपरभाव नाहीं, ५८ ज्याची वाटेल त्याबरोबर मैत्री होते; पाण्याला

आडॆल्ठ । नेघे चित्त ॥ ५९ ॥ वारियाची धांव । तैसे सरळ भाव । शंका आणि हाव । नाहीं जया ॥ ३६० ॥ मायेपुढें बाळका । रिगतां न पडे शंका । तैसें मन देता लोका । नालोची जो ॥ ६१ ॥ फांकलियाँ इंदीवरॆंरा । परिवारु नाहीं धनुर्धरा । तैसा कोनकोंपरा । नेणेचि जो ॥ ६२ ॥ चोखाळ[6]पण रत्नाचें । रत्नावरी किळेचें । तैसें पुढा मन जयाचें । करणें पाठीं ॥ ६३ ॥ आलोचूं जो नेणे । अनुभवचि जोगावेणें । धरी मोकॆली अंतःकरणें । नव्हेचि जया ॥ ६४ ॥ दिठी नोहे मिणॆधी । बोलणें नाहीं संदिग्धीं[12] । कवणेसीं हीनें[13]बुद्धी । राहॊ[14]टीजेना ॥ ६५ ॥ दाहाही इंद्रियें प्रांजेळें । निष्[16]प्रपंचें निर्मळें । पांचही पॉलॆव मोकळे । आठही पाहर ॥६६॥ अमृताची धार । तैसें उजू अंतर । किंबहुना जो माहेर । या चिन्हांचें ॥ ६७ ॥ तो पुरुष सुभटा । आर्जवाचा आंगवॆटा । जाण तेथोंचि घरटा । ज्ञानें केला ॥६८॥ ( ५८४. गुरुभक्ति, ३६९–४५५ ) आता ययावरी । गुरुभक्तीची परी । सांगों गा अवधारीं । चतुरनाथा ॥ ६९ ॥ आघवीयाचि दैवा[21] । जन्मभूमि हे सेवा । जे ब्रह्म करी जीवा । शोच्यॆंतेंही ॥ ३७० ॥ ते आचार्योंपास्ती । प्रकटिजेल तुजप्रती । बैसों दे एकपांतीं[24] । अवधानाची ॥ ७१ ॥ तरि सकळ जळसमृद्धी । घेऊनि गंगा निघाली उदॆधी । कीं श्रुति हे महॊपदीं । पैठी[27] जाहाली ॥ ७२ ॥ नाना वेंटाळूनि जीवितें । गुणागुण उखितें[28] । प्राणनाथा उचितें[29] । दिधलें प्रिया ॥ ७३ ॥ तैसें सबाह्य आपुलें । जेणें गुरुकुळीं वोपिलें । आपणपें केलें । भक्तीचें घर ॥ ७४ ॥ गुरुगृह जये देशीं । तो देशुचि वसे मानसीं । विरहिणी का जैसी । वल्लभातें ॥ ७५ ॥ तियेकडोनि येतसे वारा । देखोनि धांवे सामोरा । आड[30] पडे म्हणे घरा । बीजें[31] कीजो ॥ ७६ ॥ साचा प्रेमाचिया भुली । तया दिशेसीचि आवडे बोली । जीवु थानॆपती करूनि घाली । गुरुगृहीं जो ॥ ७७ ॥ परि गुरुआज्ञा धरिलें । देह गावीं असे एकलें । वासरुवा लाविलें । दावें जैसें ॥ ७८ ॥ म्हणे कैं हें विरडें फिटेल । कैं तो स्वामी भेटेल । युगाहूनि वडिल । निमिष मानी ॥ ७९ ॥ ऐसेया गुरुग्रामींचें आलें । कां स्वयें गुरूंनींचि धाडिलें । तरी गतायुष्या जोडलें । आयुष्य जैसें ॥ ३८० ॥ कां सुकतया अंकुरा- । वरि

---

१ आडथळा. २ विचार करीत असत नाहीं. ३ फुललेल्या. ४ कमळाला. ५ गुप्तपणा. ६ सुरेखपणा. ७ तेज. ८ विचार करणें. ९ तृप्ति. १० सोडणें. ११ कपटी. १२ संशययुक्त. १३ वाईट. १४ वागू १५ मोकळेपणानें. १६ निष्कपटी. १७ प्राण. १८ मन. १९ मूर्तिमत. २० पर्याय. २१ भाग्योदय. २२ शोकानें ग्रस्त झालेला. २३ गुरुसेवा. २४ पक्तीला. २५ समुद्राकडे. २६ ब्रह्मपदीं. २७ प्रविष्ट झाली. २८ सर्व, उत्कें. २९ योग्यायोग्य. ३० नमस्कार घालतो; सामोरा येतो. ३१ राहण्यास यावें. ३२ वतनदार.

ज्याप्रमाणें ढाळ असतो, त्याप्रमाणें ज्याचा स्वभाव आहे; व कोणतीही गोष्ट करण्याविषयीं ज्याचें मन आड येत नाहीं; ५९ वाऱ्याच्या वेगाप्रमाणें ज्याचे मनाचा सरळपणा आहे, आणि ज्याला शंका व इच्छा मुळींच नाहीं, ३६० ज्याप्रमाणें आईचे मांडीवर बसण्यास मुलाला शंका येत नाहीं, त्याप्रमाणें जो दुसऱ्यास मत देण्याविषयीं विचार करीत बसत नाहीं, ६१ हे धनुर्धरा, फुललेल्या कमलास ज्याप्रमाणें आपला सुवास दाबून ठेवतां येत नाहीं, त्याप्रमाणें, आंत एक व बाहेर एक असे विचार ज्याचे मनांत नाहींत; ६२ ज्याप्रमाणें रत्नाचा सुरेखपणा दृष्टीस पडण्याच्या पूर्वीं त्याचें तेज फांकतें, त्याप्रमाणें, कोणतीही गोष्ट करण्याच्या अगोदर ज्याच्या मनाची धाव पुढें असते; ६३ ज्याला विचार करणें हें माहीत नाहीं, व सदोदित तृप्त असणें हाच ज्याचा अनुभव आहे; अमुक गोष्ट करावयाची व अमुक अमुक गोष्ट करावयाची नाहीं असा ज्याच्या अंतःकरणात विचार नसतो; ६४ ज्याची कपटदृष्टि नाहीं, व ज्याचें बोलणें संदिग्ध नाहीं आणि जो कोणाबरोबरही वाईट बुद्धीनें वागत नाहीं; ६५ ज्याचीं दहा इंद्रियें व पंचप्राण सदासर्वदा निष्कपट बुद्धीनें वर्तन करीत असतात; ६६ अमृताच्या धारेप्रमाणें ज्याचें मन सरळ आहे; किम्बहुना जो या चिन्हाचें माहेरघरच आहे; ६७ हे वीरा, तो पुरुष मूर्तिमंत आर्जवच होय, आणि त्याचेच ठिकाणीं ज्ञानानें आपलें बिऱ्हाड ठेविलें आहे हें ध्यानांत असूं दे. ६८ हे चतुरश्रेष्ठा, आतां यापुढें तुला गुरुभक्तीचे पर्याय सांगतों, ते ऐक. ६९ ही गुरुसेवा म्हणजे सर्व भाग्याची जन्मभूमि बरें; कारण शोकानें ग्रस्त झालेल्या जीवास ही ब्रह्मस्वरूप करते. ३७० अशी जी ही गुरुसेवा, ती तुला समजून सांगतों, तिकडे तुझें पूर्ण लक्ष असूं दे. ७१ हें पहा, ज्याप्रमाणें आपलें सर्व उदक घेऊन गंगा समुद्रास मिळते, किंवा ( सर्व अभिप्रायांसह ) श्रुति ब्रह्मपदीं प्रविष्ट होते, ७२ अथवा पतिव्रता स्त्री आपलें जीवित व गुणावगुण हें सर्व आपल्या प्रिय पतीस अर्पण करिते, ७३ त्याप्रमाणें ज्यानें आपलें अंतःकरण अंतर्बाह्य गुरुकुलाचे ठिकाणीं अर्पण केलें आहे, आणि आपलें शरीर म्हणजे गुरुभक्तीचें आगरच केलें आहे, ७४ ज्या देशांत आपल्या गुरूंचें घर असेल तोच देश ज्याचे मनांत नेहमीं घोळत असतो, ज्याप्रमाणें विरहिणी पतिव्रता नेहमीं पतीचेंच चिंतन करिते, ७५ त्या दिशेनें येणाऱ्या वाऱ्यासही सामोरा जाऊन त्यास जो साष्टांग नमस्कार घालतो; आणि माझ्या घरीं वस्तीला यावें अशी प्रार्थना करितो; ७६ खऱ्या प्रीतीनें वेडावून जाऊन, गुरु ज्या दिशेस राहतात त्या दिशेशींच ज्याला बोलणें आवडतें; व जो गुरूच्या घरीं आपला जीव वतनदार करून ठेवतो; ७७ परंतु ज्याप्रमाणें वांसराला दावें लावलें ( असल्यामुळें, त्याचें सर्व लक्ष गाईकडे लागलेलें असलें तरी त्याचें शरीर गोठ्यांतच असतें; त्याप्रमाणें ) केवळ गुरूंच्या आज्ञेमुळेंच ज्याचा देह त्याच्या गांवीं असतो; ७८ त्याला असें वाटत असतें कीं, आपल्या गळ्याचें हें गुर्वाज्ञारूप पेंडें केव्हां सुटेल ? व गुरूंची भेट केव्हां होईल ? आणि त्याला एक एक क्षणही युगापेक्षा मोठा भासत असतो. ७९ तशात जर आपले गुरूंचे गांवाहून कोणी मनुष्य आला, किंवा स्वतः गुरूंनींच एखादा मनुष्य पाठविला, तर, गतायुषी माणसाला आणखी आयुष्य मिळावें, ३८० किंवा वाळलेल्या अंकुरावर अमृताच्या

पडलिया पीयूषधारा । नाना अर्घोदकींचा सागरा । आला मासा ॥ ८१ ॥ नातरी रंकें निधान देखिलें । का आंधळिया डोळे उघडले । भणंगाचिया आंगा आलें । इंद्रपद ॥ ८२ ॥ तैसा गुरुकुळाचेनि नांवें । महासुखें अति थोरावे । जे कोंडेंही पोटाळावें । आकाश कां ॥ ८३ ॥ पै गुरुकुळीं ऐसी । आवडी जया देखसी । जाण ज्ञान तयापासीं । पाइकी करी ॥ ८४ ॥ आणि अभ्यंतरिलियेकडे । प्रेमाचेनि पवाडें । श्रीगुरूचें रूपडें । उपासी ध्यानीं ॥ ८५ ॥ हृदयशुद्धीचिया आवारीं । आराध्यु तो ध्रुव करी । मग सर्व भावेंसीं परिवारीं । आपण होय ॥ ८६ ॥ कां चैतन्याचिये पोवळीं[10] - । माजि आनंदाचिया रांउळीं । श्रीगुरुलिंगा ढाळी । ध्यानामृत ॥ ८७ ॥ उदयिजतां बोधीर्का । बुद्धीची डाळ सात्त्विका । भरोनिया त्र्यंबका । लाखोली वाहे ॥ ८८ ॥ काळशुद्धी त्रिकाळीं । जीवदशा धूप जाळी । ज्ञानदीपें वोवाळी । निरंतर ॥ ८९ ॥ सामरस्याची रससोय । अखंड अर्पितु जाय । आपण भेराडा होय । गुरु तो लिंग ॥ ३९० ॥ नातरी जीवाचिये सेजे । गुरु कांतु करूनि भुंजे[20] । ऐसी प्रेमाचेनि भोजें । बुद्धि वाहे ॥ ९१ ॥ कोणेएके अवसरीं । अनुरागु भरे अंतरीं । कीं तया नाम करी । क्षीराब्धि ॥ ९२ ॥ तेथ ध्येयध्यान बहु सुख । तेचि शेषतुळिकैं निर्दोख । वरि जळशयन देख । भावी गुरु ॥ ९३ ॥ मग वोळंगती पाय । ते लक्ष्मी आपण होय । गरुड होऊनि उभा राहे । आपणचि ॥ ९४ ॥ नाभीं आपण जन्मे । ऐसें गुरुमूर्तिप्रेमें । अनुभवी मनोधर्मे । ध्यानसुख ॥ ९५ ॥ एकाधिये वेळे । गुरु माय करी भावबळें । मग स्तन्यसुखें लोळे । अंकावरी ॥ ९६ ॥ नातरी गा किरीटी । चैतन्यतरुतळवटीं । गुरु धेनु आपण पाठीं । वत्स होय ॥ ९७ ॥ गुरुकृपास्नेहसलिलीं । आपण होय मासोळी । कोणे एके वेळीं । हेंचि भावी ॥ ९८ ॥ गुरुकृपामृताचें वेडप । आपण सेवावृत्तीचें होय रोप । ऐसेऐसे संकल्प । विये मन ॥ ९९ ॥ चक्षुपक्षेंवीण । पिलूं होय आपण । कैसें पै अपारपण । आवडीचें ॥ ४०० ॥ गुरूतें पक्षिणी करी । चारा घे चांचूवरी । गुरु तारु धरी । आपण कास ॥ १ ॥ ऐसे प्रेमाचेनि थांवें । ध्यानचि ध्यानातें प्रसवे । पूर्णसिंधु हेलावे । फुटती जैसे ॥ २ ॥ किंबहुना यापरी । श्रीगुरुमूर्ति अंतरीं । भोगी आतां अवधारीं । बाह्य सेवा ॥ ३ ॥ तरि जीवीं ऐसे आवाके ।

---

१ अमृत. २ भिकाऱ्याच्या. ३ आवडीनें. ४ आलिंगावें. ५ सेवा. ६ अंतःकरणात. ७ निश्चळ. ८ पूजासाहित्य. ९ ज्ञानाच्या १० तटात. ११ देवळात. १२ अभिषेक करतो. १३ बोधरूपी सूर्य. १४ मसुराची डाळ. १५ गुरुरूपी शिवाला. १६ देहाभिमान. १७ ऐक्याची. १८ नैवेद्य. १९ भक्त. २० भोगी. २१ कौतुकानें. २२ प्रीति. २३ शेषशयन. २४ नारायण. २५ सेवा करणारी. २६ ज्ञानरूपी वृक्ष. २७ पाण्यात. २८ वृष्टि. २९ तारक. ३० बळानें. ३१ लाटा. ३२ निश्चय करतो.

धारा पडाव्या, अथवा डबक्यातील मासा समुद्रांत् यावा, ८१ नाहीं तर एकाद्या दरिद्यानें द्रव्याचा ठेवा पहावा, किंवा जन्मांधास एकाएकी दृष्टि यावी, अथवा भिकाऱ्याच्या वांट्यास इंद्रपद यावें, ८२ त्याप्रमाणें गुरूच्या कुळाचें नांव ऐकताच तो महासुखानें अतिशय थोरावतो; इतका कीं, कौतुकानें आकाशच वेंगेंत धरीत आहे कीं काय ! ८३ हें बघ, गुरुकुळाच्या ठिकाणीं ज्याची अशी प्रीति असलेली तुझ्या नजरेस येईल, त्याच्याजवळ ज्ञान हें सेवा करीत राहिलेलें असतें असें समज; ८४ आणि अंतःकरणांत अत्यंत प्रेमयुक्त होऊन, श्रीगुरूंच्या मूर्तीची जो ध्यानोपासना करतो; ८५ शुद्ध हृदय हेंच देवळाच्या तटाच्या भोंवतालचें आवार; व आपलें जें आराध्यदैवत श्रीगुरु त्यांची त्या आवारांत स्थापना करून मग आपल्या भावनेनें आपणच पूजासाहित्य बनतो; ८६ अथवा ज्ञानरूपी तटात आनंदरूप देऊळ बनवून, व त्यांत श्रीगुरुरूप शिवलिंगाची स्थापना करून त्याच्यावर ध्यानरूपी अमृतानें अभिषेक करितो; ८७ बोधरूप सूर्य उगवल्यावर सात्विकबुद्धिरूप मसुराच्या डाळीची ओंजळ भरून जो शिवरूपी गुरूला लाखोली वाहतो, ८८ उत्तम वेळ हेच शिवाच्या पूजेचे तिनही काल असें मानून, त्यांत देहाभिमानरूपी धूप जाळतो, व ज्ञानरूप दिव्यानें जो नेहमीं गुरुरूपी श्रीशंकरास ओंवाळतो, ८९ गुरूशीं ऐक्य हाच नैवेद्य गुरूला नेहमीं अर्पण करून, आपण पुजारी बनून, गुरूस शंकराचे ठिकाणीं मानून स्तवन करतो; ३९० अथवा आपल्या जीवाची शेज करून, गुरु हे आपले पति आहेत असें समजून जो त्यांचा उपभोग घेतो, आणि अशा प्रकारें प्रेमाच्या योगानें जो आपल्या बुद्धींत अशीं कौतुकें धारण करतो; ९१ एखादे वेळेस मनांत गुरूविषयीं प्रीतीचा उमाळा आला असतां त्यालाच क्षीराब्धि असें मानतो; ९२ त्या ठिकाणीं गुरुध्यानापासून होणाऱ्या बहुसुखरूप शेषशय्येवर गुरु हे भगवान विष्णुच निजलेले आहेत असें मानतो; ९३ मग, पाय रगडणारी जी लक्ष्मी, ती आपणच होतो; आणि गरुडही आपणच होऊन ( पुढें हात जोडून ) उभा राहतो; ९४ नाभीपासून उत्पन्न होणारा जो ब्रह्मदेव, तोही आपणच होऊन गुरुमूर्तीच्या प्रेमानें आपल्या मनांत ध्यानसुखाचा अनुभव घेतो; ९५ एखादे वेळेस भक्तीच्या प्रेमानें गुरूला आई असें कल्पून, स्तनपानापासून होणाऱ्या सुखाचा अनुभव घेत तिच्या अंकावर लोळतो; ९६ किंवा अर्जुना, ज्ञानरूप वृक्षाच्या खालीं गुरु हीच कोणी गाय असें मानून, आपण तिच्या पाठीस लागलेलें वासरूं बनतो; ९७ गुरुकृपेच्या स्नेहरूप उदकांत आपण मासोळी झालों आहों, अशीच एखादे वेळीं भावना करतो; ९८ गुरुकृपा हीच अमृताची वृष्टि आणि आपण गुरुसेवावृत्तिरूप रोप आहों, असे निरनिराळे संकल्प त्याच्या मनांत उत्पन्न होतात; ९९ त्याच्या आवडीचें अमर्यादपण कसें आहे तें पहा कीं, डोळे व पंख याशिवायच आपण पिलूं होतो; ४०० मग गुरूला पक्षिणी करून त्या पक्षिणीच्या चोंचीवरील चारा आपण घेतो; व गुरु तारक आहे असें समजून आपण त्यांच्या कासेस लागतो. १ अशा प्रकारें, ज्याप्रमाणें समुद्राला भरती आल्यावर लाटांपासून लाटा उत्पन्न होतात, त्याप्रमाणें प्रेमाच्या बळानें गुरुध्यानापासून अनेक ध्यानें उत्पन्न होतात. २ असे बहुत प्रकार किती सांगावे ? तर याप्रमाणें गुरूंची मूर्ति अंतर्यामीं धारण करून तो ध्यानसुखाचा अनुभव घेतो. आतां तो श्रीगुरूंची बाह्यसेवा कशी

म्हणे दास्य करीन निकें । जैसेनि गुरु कौतुकें । माग म्हणती ॥ ४ ॥ तैसिया साचा उपास्ती । गोसावी प्रसन्न होती । तेथ मी विनंती । ऐसी करीन ॥ ५ ॥ म्हणेन तुमचा देवा । परिवारु जो आघवा । येतुलें रूपें होआवा । मीचि एकु ॥ ६ ॥ आणि उपकरतीं आपुलीं । उपकरणें आथि जेतुलीं । माझीं रूपें तेतुलीं । होआवीं स्वामी ॥ ७ ॥ ऐसा मागेन वरु । तेथ हो म्हणती श्रीगुरु । मग तो परिवारु । मीचि होईन ॥ ८ ॥ उपकरणजात सकाळिक । तें मीचि होईन एकैक । तेव्हां उपास्तीचें कौतुक । देखिजेल ॥ ९ ॥ गुरु बहुतांची माये । परी एकलौती होऊनि ठाये । तैसें करूनि आण वाये । कृपे तिये ॥ ४१० ॥ तया अनुरागा वेधु लावीं । एकपत्नीव्रत घेववीं । क्षेत्रसंन्यासु करवीं । लोभाकरवीं ॥ ११ ॥ चतुर्दिक्षु वारा । न लाहे निघों बाहिरा । तैसा गुरुकृपें पांजिरा । मीचि होईन ॥ १२ ॥ आपुलिया गुणांचीं लेणीं । करीन गुरुसेवे स्वामिणी । हें असो होईन गंवसणी । मीचि भक्तीसी ॥ १३ ॥ गुरुस्नेहाचिये वृष्टी । मी पृथ्वी होईन तळवटीं । ऐसिया मनोरथांचिया सृष्टी । अनंता रची ॥ १४ ॥ म्हणे श्रीगुरूचें भुवन । आपण मी होईन । आणि दास होऊनि करीन । दास्य तेथींचें ॥ १५ ॥ निर्गमागमीं दातारें । जे वोलांडिजती उंबरे । ते मी होईन आणि द्वारें । द्वारपाळु ॥ १६ ॥ पाउवा मी होईन । तियां मीचि लेववीन । छत्र मी आणि करीन । नारीपण ॥ १७ ॥ मी तैळ उपरु जाणविता । चंवरधरू हातु देता । स्वामीपुढें खोलैंता । होईन मी ॥ १८ ॥ मीचि होईन सेंगळा । करूं सुईन गुरळां । सांडिती तो नेपाळा । पडिघा मीचि ॥ १९ ॥ हडप मी वोळगेन । मीचि उगाळु घेईन । उळिगें मी करीन । आघोळीचें ॥ ४२० ॥ होईन गुरूचें आसन । अळंकार परिधानें । चंदनादि होईन । उपचार ते ॥ २१ ॥ मीचि होईन सुआरू । वोगरीन उपाहारु । आपणपें श्रीगुरु । वोंवाळीन ॥ २२ ॥ जे वेळीं देवो आरोगिती । तेव्हां पातीकेर मीचि पांतीं । मीचि होईन पुढती । देईन विडा ॥ २३ ॥ ताट मी काढीन । सेज मी झाडीन । चरणसंवाहन । मीचि करीन ॥ २४ ॥ सिंहासन होईन आपण । वरि गुरु करिती आरोहण । होईन पुरेपण । वोळगेचें ॥ २५ ॥ श्रीगुरूचें मन । जया देईल अवधान । तो मी पुढा होईन । चमत्कारू ॥ २६ ॥ तया श्रवणाचे आंगणीं । होईन

१ सेवेनें. २ उपयोगी पडणारी. ३ साधनें. ४ प्रेमाला. ५ छंद. ६ चारी दिशांच्या. ७ जाता येता. ८ गुरूंनीं. ९ पादुका. १० छत्र धरणें. ११ खळगा. १२ उंचवटा. १३ चंवरी धरणारा. १४ हुजऱ्या. १५ झारी धरणारा शागिर्द. १६ देईन. १७ चूळ. १८ निर्मळ. १९ तस्त. २० हसबी. ( लहान पडशीसारखी पिशवी. श्रीमंत लोकांच्या हुजऱ्याचे खांद्यावर असते ती. ) २१ वाळगीन. २२ उटणें. २३ काम. २४ वस्त्र. २५ आचारी. २६ वाढीन. २७ आत्मत्वानें. २८ भोजन करतील. २९ पंक्तीचा लाभ घेणारा. ३० पादसेवा. ३१ सेवेचें.

करतो तें ऐक. ३ तो मनांत असा निश्चय करतो कीं, मी गुरूंची इतकी उत्तम सेवा करीन कीं, गुरूंनीं संतोष पावून मला 'कांहीं तरी माग' असें म्हणावें. ४ अशा प्रकारच्या माझ्या उत्तम सेवेनें गुरु प्रसन्न होतील तेव्हां मी त्यांची प्रार्थना करून, ५ असें म्हणेन कीं, " हे प्रभो, आपला जेवढा परिवार आहे, त्या सर्व परिवाराचीं रूपें मीच एकट्यानें घ्यावीं; ६ आणि आपल्या उपभोगास लागणारीं जितकीं साधनें आहेत, तितक्या सर्वांचीं रूपें मीच एकट्यानें घ्यावीं." ७ याप्रमाणें मी वर मागितल्यावर श्रीगुरु म्हणतील, 'हो.' मग त्यांचा सर्व परिवार मीच होईन. (मीच त्यांची सर्व प्रकारें सेवा करीन.) ८ त्यांच्या उपयोगीं पडणाऱ्या जेवढ्या म्हणून वस्तु आहेत त्यांपैकीं प्रत्येक वस्तु मीच होईन; त्या वेळेस माझ्या सेवेचा चमत्कार दृष्टीस पडेल. ९ गुरु हे जरी पुष्कळ भक्तांची माउली आहेत, तरी त्या गुरूंच्या कृपेस मी आपली शपथ घालून माझी एकट्याची माउली करून घेईन; ४१० गुरूंच्या प्रेमास आपलें वेड लावून, त्यांच्याकडून एकपत्नीव्रत आचरवीन; आणि गुरूंच्या लोभाकडून ( माझेच ठिकाणीं वास करण्याविषयीं ) क्षेत्रसंन्यास घेववीन; ११ वारा ( किती जरी वाहूं लागला तरी तो ) चारी दिशांच्या आंतच वाहतो; त्याप्रमाणें गुरूंच्या कृपेस सर्व बाजूंनीं मीच पिंजरा होईन. १२ माझी स्वामिनी जी गुरुसेवा, तिला मी आपल्या गुणांचीं लेणीं करीन. फार काय ? पण गुरुभक्तीला मीच गंवसणी होईन; ( आपल्याशिवाय दुसऱ्या कोणासही गुरुसेवा करूं देणार नाहीं; ) १३ आणि गुरुस्नेहरूप वृष्टीखालीं मी पृथ्वी होईन. याप्रमाणें नानाप्रकारच्या कल्पना जो मनांत करतो; १४ आणि म्हणतो कीं, मी श्रीगुरूंचें राहण्याचें घर होईन; आणि दास होऊन त्यांची त्या ठिकाणीं सेवा करीत राहीन; १५ जाता येता जे उंबरे गुरु ओलांडतात, ते मीच होईन; आणि दारेंही मीच होऊन द्वारपाळही मीच होईन; १६ मी गुरूंच्या पादुका होऊन, त्या पादुका गुरूंच्या पायीं मीच लेववीन; आणि छत्रही मीच होऊन मीच तें गुरूंवर धरीन. १७ या ठिकाणीं खोल खळगा आहे, या ठिकाणीं उंचवटा आहे, अशी इशारत देणारा मी गुरूंचा चोपदार होईन; आणि गुरूंवर चंवरी धरणारा, गुरूंस हात देणारा व गुरूंपुढें चालणारा हुजऱ्याही मीच होईन; १८ गुरूंची झारी हातांत घेणारा शागिर्द मी होईन व गुरूंला चूळ भरण्यास पाणीही मीच देईन; व चूळ टाकण्याचें निर्मळ तस्तही मीच होईन; १९ गुरूंची हसबी मी आपल्या खांद्यावर बाळगीन; व मी उटणें घेऊन गुरूंला स्नान घालण्याचें काम करीन; ४२० गुरूंचें आसन, अलंकार, वस्त्रचंदनादिक सर्व उपचार हे सर्व मीच होईन; २१ मीच आचारी होऊन गुरूंला फराळाचे पदार्थ वाढीन; आणि आत्मत्वानें श्रीगुरूंला ओवाळीन; ( गुरूंवरून अलईबलई उतरीन. ) २२ ज्या वेळेस गुरुमहाराज भोजन करतील, त्या वेळेस त्यांचे पंक्तीचाही लाभ घेईन; आणि मीच पुढें होऊन त्यांस विडा देईन; २३ गुरूंचें उष्टें मीच काढीन, गुरूंचा बिछाना मीच झाडीन, व गुरूंची पादसेवाही मीच करीन; २४ आणि गुरूंचें सिंहासनही मीच होईन, व मग त्यावर गुरु आरोहण करतील. याप्रमाणें सर्व प्रकारें गुरूंची सेवा करीन. २५ ज्या चमत्काराकडे श्रीगुरूंचें लक्ष लागेल, तो चमत्कारही मीच होईन, २६ गुरूंच्या श्रवणरूप अंगणांत शब्दांचे असंख्य समुदाय मीच होईन,

शब्दांचिया अक्षौहिणी[1] । स्पर्श होईन घसणी । आगाचिया ॥ २७ ॥ श्रीगुरूचे डोळे । अवलोकनें स्नेहाळे[2] । पाहाती तियें सकळें । होईन रूपें ॥ २८ ॥ तिये रसने जो जो रुचेल । तो तो रसु म्यां होइजेल । गंधरूपें कीजेल । घ्राणसेवा ॥ २९ ॥ एवं बाह्य मनोगत । श्रीगुरुसेवा समस्त । वेंटाळीन वस्तुजात । होऊनिया ॥४३०॥ जंव देह हें असेल । तंव वोळगी ऐसी कीजेल । मग देहांतीं नवल । बुद्धि आहे ॥ ३१ ॥ इये शरीरींची माती । मेळवीन तिये क्षिती[5] । जेथ श्रीचरण उभे ठाती । श्रीगुरूचे ॥ ३२ ॥ माझा स्वामी कवतिकें । स्पर्शत जियें उदकें । तेथ लया नेईन निकें । आपीं आप ॥३३॥ श्रीगुरु वोवाळिजती । कां भुवनीं जे उजळिजती । तयां दीपांचिया दीप्तीं । ठेवीन तेज ॥ ३४ ॥ चवरी हन विंजणा । तेथ लयो करीन प्राणा । मग आंगाचा वोळंगणा । होईन मी ॥ ३५ ॥ जिये जिये अवकाशीं । श्रीगुरु असती परिवारेंसीं । आकाश लया आकाशीं । नेईन तिये ॥ ३६ ॥ परि जीतु मेला न संडीं । निमेषु लोकां न घडी । ऐसेनि गणावया कोडी । कल्पांचिया ॥ ३७ ॥ येतुलेवरी धिंवसा । जयाचिया मानसा । आणि करूनियाहि तैसा । अपारु जो ॥ ३८ ॥ रात्रदिवस नेणे । थोडें बहु न म्हणे । म्हणियाचेनि दाटपणें । सौजा होय ॥ ३९ ॥ तो व्यापारु येणें नांवें । गगनाहूनि थोरावे । एकला करी आघवें । एकेचि काळीं ॥ ४४० ॥ हृदयवृत्ति पुढा । आंगचि घे दवडा । काज करी होडा । मानसेशीं ॥ ४१ ॥ एखादिया वेळां । श्रीगुरूंचिया खेळा । लोण करी सकळा । जीविताचें ॥ ४२ ॥ जो गुरुदास्यें कृशु । जो गुरुप्रेमें सपोषु । जो गुरुआज्ञे निवासु । आपणचि ॥ ४३ ॥ जो गुरुकुळें सुकुलीनु । जो गुरुबंधुसौजन्यें सुजनु । जो गुरुसेवाव्यसनें सव्यसनु । निरंतर ॥ ४४ ॥ गुरुसंप्रदायधर्म । तेचि जयाचे वर्णाश्रम । गुरुपरिचर्या नित्यकर्म । जयाचें गा ॥ ४५ ॥ गुरु क्षेत्र गुरु देवता । गुरु माता गुरु पिता । जो गुरुसेवेपरौता । मार्गु नेणे ॥ ४६ ॥ श्रीगुरूचें द्वार । तें जयाचें सर्वस्व सार । गुरुसेवका सहोदर । प्रेमें भजे ॥ ४७ ॥ जयाचें वक्त्रें । वाहे गुरुनामाचे मंत्र । गुरुवाक्यावांचूनि शास्त्र । हातीं न शिवे ॥ ४८ ॥ शिवतलें गुरुचरणीं । भलतैसें हो पाणी । तेथ सकळ तीर्थें आणी । त्रैलोक्यींचीं ॥ ४९ ॥ श्रीगुरूचें उशिटें । लाहे जें अवचटें । तें तेणें लाभें

---

१ असंख्य समुदाय. २ प्रेमळपणानें. ३ जिव्हेला. ४ पदार्थ. ५ पृथ्वीला. ६ शरीरांतील उदकाचा भाग. ७ प्रकाश पाडतील. ८ सेवक. ९ इच्छा. १० आशेच्या भरांत. ११ स्फुरण पावतो. १२ धाव. १३ पैज. १४ ओंवाळणी. १५ पुष्ट. १६ घर. १७ स्नेह. १८ सेवा. १९ तोंड.

आणि गुरूंचें ज्या ठिकाणीं अंग लागेल, तें ठिकाणही मीच होईन. २७ श्रीगुरूंचे डोळे प्रेमळपणानें अवलोकन करतील तीं सर्व रूपें मींच होईन, २८ त्यांच्या जिव्हेस जो जो पदार्थ आवडेल, तो तो मीच होईन. मीच सुवासरूप होऊन त्यांच्या घ्राणेंद्रियाची सेवा करीन. २९ याप्रमाणें गुरूंची बाह्यसेवा सर्व प्रकारें करून, गुरूंना लागणाऱ्या सर्व वस्तु मीच होऊन व्यापून टाकीन. " ४३० ( ज्ञानेश्वर म्हणतातः— ) जोंपर्यंत हा देह आहे, तोंपर्यंत गुरूंची अशीच सेवा करीन म्हणतो; मग देह पडल्यावर त्याची बुद्धि सेवेविषयीं आस्था धरिते तें नवल ऐका. ३१ ( तो म्हणतोः— ) " या शरिराची माती पृथ्वीच्या त्या भागांत मिळवीन, कीं ज्या ठिकाणीं श्रीगुरूंचे चरण उभे राहतील । ३२ मी आपल्या शरीरांतील उदकाचा भाग खरोखर त्या उदकाला नेऊन मिळवीन, कीं ज्या उदकाला माझे स्वामी कौतुकानें स्पर्श करतील । ३३ आपल्या देहांतील तेज त्या दिव्यांत नेऊन मिळवीन, की ज्या दिव्यांनीं ( लोक ) श्रीगुरूंना ओंवाळतील, अथवा जे दिवे श्रीगुरूंच्या मंदिरांत प्रकाश करीत असतील । ३४ मी आपल्या देहांतील प्राणवायूचा लय त्या ठिकाणीं करीन, कीं ज्या ठिकाणीं श्रीगुरूंना पंख्यानें व चंवरीनें वारा वातला जात असेल । ३५ मी आपल्या शरीरांतील आकाशाचा भाग त्या ठिकाणीं मिळवीन, कीं ज्या अवकाशांत ( पोकळींत ) श्रीगुरु आपल्या परिवारासह असतील । ३६ परंतु जिवंत असतांना व मेल्यावरही श्रीगुरूंची सेवा केल्याशिवाय राहणार नाहीं, आणि एक पळभरही दुसऱ्यास गुरूंची सेवा करूं देणार नाहीं. याप्रमाणें कल्पचे कल्प गुरुसेवा करीन. " ३७ अशा प्रकारची पूर्ण इच्छा ज्याचे मनांत आहे, आणि त्या आपल्या इच्छेप्रमाणेंच अपार गुरुसेवा करूनही ३८ जो गुरुसेवेला रात्रदिवस किंवा थोडीफार म्हणत नाहीं, आणि तशांत जर गुरूंनीं काम करण्याची आज्ञा केली, तर त्याला जास्त स्फुरण येतें; ३९ गुरूंची सेवा अशा प्रकारें करण्यास जो गगनाएवढा होतो, व तें काम एकटाच एकदम करतो; ४४० मनाच्या धावेपेक्षां याच्या अंगाची धाव पुढें असते, व याची काम करण्याची इच्छा मनाशीं पैज बांधिते. ४१ एखादे वेळेस श्रीगुरूंच्या लीलांना आपल्या जीविताचें लिंबलोण करितो, ( त्यांच्या लीलांवरून आपलें जीवित उतरून ठेवितो, ) ४२ जो गुरूंची सेवा केल्यानें कृश झाला आहे; गुरूंच्या प्रेमानें पुष्ट होतो; व जो आपण गुरूंच्या आज्ञेचे घरच बनतो; ४३ जो गुरुकुलाच्या योगें आपणास कुलीन असें मानतो, जो गुरुबुद्धींचा स्नेह करण्याविषयीं कुशल, व जो गुरुसेवारूप व्यसनानें निरंतर व्यसनी असतो; ४४ गुरूंचे परंपरा चालत आलेले धर्म तेच ज्याचे वर्णाश्रमधर्म होत; व गुरूंची सेवा करणें हेंच ज्याचें नित्यनैमित्तिक कर्म होय; ४५ ज्याचें गुरु हेंच क्षेत्र, गुरु हेंच दैवत, गुरुच आई व गुरुच बाप; आणि ज्याला गुरुसेवेशिवाय दुसरें कांहींएक माहीत नाहीं; ४६ गुरूंचें जें द्वार तेंच ज्याचें सर्व धर्मांचें सार होय; आणि गुरुसेवकावर आपल्या सख्या भावाप्रमाणें जो प्रेम करितो; ४७ ज्याच्या वाणींतून रात्रंदिवस गुरुनामाचा उच्चार चालत असतो; व जो गुरुवाक्यावांचून दुसरें कोणतेंही शास्त्र हातीं धरीत नाहीं; ४८ ज्या पाण्यास गुरूचे चरण लागले आहेत तें पाणी कसलेंही असलें तरी त्यांत त्रैलोक्यांतील सर्व तीर्थें आहेत असें जो मानितो; ४

शब्दांचिया अक्षौहिणी[1] । स्पर्श होईन घसणी । आंगाचिया ॥ २७ ॥ श्रीगुरूचे डोळे । अवलोकनें स्नेहाळे[2] । पाहाती तियें सकळें । होईन रूपें ॥ २८ ॥ तिये रसने जो जो रुचेल । तो तो रसु म्यां होइजेल[3] । गंधरूपें कीजेल । घ्राणसेवा ॥ २९ ॥ एवं बाह्य मनोगत । श्रीगुरुसेवा समस्त । वेंटाळीन वस्तुजात[4] । होऊनिया ॥४३०॥ जंव देह हें असेल । तंव वोळगी ऐसी कीजेल । मग देहांतीं नवल । बुद्धि आहे ॥ ३१ ॥ इये शरीरींची माती । मेळवीन तिये क्षिती[5] । जेथ श्रीचरण उभे ठाती । श्रीगुरूचे ॥ ३२ ॥ माझा स्वामी कवतिकें । स्पर्शीत जियें उदकें । तेथ लया नेईन निकें । आपीं आप ॥३३॥ श्रीगुरु वोंवाळिजती । कां भुवनीं जे उजळिजती[7] । तयां दीपांचिया दीप्तीं । ठेवीन तेज ॥ ३४ ॥ चवरी हन विंजणा । तेथ लयो करीन प्राणा । मग आंगाचा वोळंगणा[8] । होईन मी ॥ ३५ ॥ जिये जिये अवकाशीं । श्रीगुरु असती परिवारेंसीं । आकाश लया आकाशीं । नेईन तिये ॥ ३६ ॥ परि जीतु मेला न संडीं । निमेषु लोकां न घडी । ऐसेनि गणावया कोडी । कल्पांचिया ॥ ३७ ॥ येतुलेवरी धिंवसा[9] । जयाचिया मानसा । आणि करूनियाहि तैसा । अपारु जो ॥ ३८ ॥ रात्रदिवस नेणे । थोडें बहु न म्हणे । म्हणियाचेनि दांटपणें[10] । सांजा होय ॥ ३९ ॥ तो व्यापारु येणें नांवें । गगनाहूनि थोरावे । एकला करी आघवें । एकेचि काळीं ॥ ४४० ॥ हृदयवृत्ति पुढां । आंगचि घे दवडा[12] । काज करी होडां[13] । मानसेशीं ॥ ४१ ॥ एखादिया वेळां । श्रीगुरूंचिया खेळा । लोण[14] करी सकळा । जीविताचें ॥ ४२ ॥ जो गुरुदास्यें कृशु । जो गुरुप्रेमें सपोषु[15] । जो गुरुआज्ञे निवांसु[16] । आपणचि ॥ ४३ ॥ जो गुरुकुळें सुकुलीनु । जो गुरुबंधुसौजन्यें[17] सुजनु । जो गुरुसेवाव्यसनें सव्यसनु । निरंतर ॥ ४४ ॥ गुरुसंप्रदायधर्म । तेचि जयाचे वर्णाश्रम । गुरुपरिचर्या[18] नित्यकर्म । जयाचें गा ॥ ४५ ॥ गुरु क्षेत्र गुरु देवता । गुरु माता गुरु पिता । जो गुरुसेवेपरौता । मार्गु नेणे ॥ ४६ ॥ श्रीगुरूचें द्वार । तें जयाचें सर्वस्व सार । गुरुसेवका सहोदर । प्रेमें भजे ॥ ४७ ॥ जयाचें वक्त्रें । वाहे गुरुनामाचे मंत्र । गुरुवाक्यावांचूनि शास्त्र । हातीं न शिवे ॥ ४८ ॥ शिवतलें गुरुचरणीं । भलतैसें हो पाणी । तेथ सकळ तीर्थें आणी । त्रैलोक्यींचीं ॥ ४९ ॥ श्रीगुरूचें उशिटें । लाहे जें अवचटें । तें तेणें लाभें

१ असंख्य समुदाय. २ प्रेमळपणानें. ३ जिव्हेला. ४ पदार्थ. ५ पृथ्वीला. ६ शरीरांतील उदकाचा भाग. ७ प्रकाश पाडतील. ८ सेवक. ९ इच्छा. १० आशेच्या भरांत. ११ स्फुरण पावतो. १२ धांव. १३ पैज. १४ ओंवाळणी. १५ पुष्ट. १६ घर. १७ स्नेह. १८ सेवा. १९ तोंड.

अकस्मात् श्रीगुरूंचा उच्छिष्टप्रसाद मिळाला तर त्या लाभापुढें जो समाधिसुखालाही तुच्छ मानतो; ४५० गुरु चालत असतां मागें जे गुरूंचे पदरज:कण उडतात ते जो आपले मस्तकावर धारण करितो, व त्या लाभापुढें मोक्षसुख तुच्छ मानितो; ५१ हें असो; गुरुभक्तीचा महिमा किती म्हणून सांगावा ? कारण त्याला पार नाहीं. परंतु माझ्या बुद्धीला गुरुभक्तीची उकळी फुटल्यामुळें सांगणें भाग पडलें ! ५२ ज्याला गुरुभक्तीची इच्छा आहे, व ज्याला गुरुभक्तीचीच आवड आहे; आणि ज्याला गुरुसेवेवाचून दुसरें कांहींही गोड लागत नाहीं, ५३ तो ब्रह्मज्ञानाचें माहेरघर असून ज्ञानाला त्याच्याच योगानें शोभा येते; फार तर काय ? तो देव, व ज्ञान त्याचें उपासक बनतें. ५४ ज्याला खरोखर गुरुभक्तीची आवड आहे, त्याचे घरीं जगाला पुरून उरेल इतकें ज्ञान भरलेलें असतें असें समज. ५५ ज्ञानदेव म्हणतात.—गुरुसेवेविषयीं माझ्या मनांत खरी उत्कंठा आहे, म्हणून मीं त्या गुरुभक्तीचें अमर्याद असें वर्णन केलें; ५६ एरवीं मी हात असून थोंटा, डोळे असून भजनाविषयीं आंधळा व पाय असून गुरुसेवा करण्याविषयीं पांगळ्यापेक्षांही पांगळा; ५७ आणि गुरूंचें वर्णन करण्याविषयीं मुका व आळशी आहें; इतके अवगुण असूनही मला गुरूंनीं फुकट पोसला आहे. परंतु मी मनांतून मात्र गुरूंविषयीं सप्रेम आहें. ५८ ज्ञानदेव म्हणतात.—एवढ्याच कारणाकरितां मला शरीराचें पोषण करणें भाग पडलें. ५९ परंतु मीं एवढें अमर्याद गुरुसेवेविषयीं वर्णन केलें, तें सहन करून मला तुमची सेवा करण्यास संधि द्या, म्हणजे मी ग्रंथार्थ उत्तम रीतीनें सांगेन. ४६० ( साधुजनहो, ) ऐका, ऐका ! भूताचा भार सहन करणारा विष्णूचा अवतार जो श्रीकृष्ण भगवान, तो सांगत असून पार्थ ऐकतो आहे. ६१ कापूर अंतर्बाह्य शुद्ध असतो, तसें ज्याचें शुचित्व स्वच्छ दिसतें, तेंच खरें शुचित्व होय; ६२ किंवा रत्नाचें खोड जसें अंतर्बाह्य चकचकीत असतें, अथवा सूर्य जसा आंत व बाहेर लकलकीत दिसतो; ६३ कर्माच्या योगानें ज्याची बाह्यशुद्धि झाली असून ज्ञानाच्या योगें ज्याची अंत:शुद्धि झालेली आहे; आणि अशा दोन्ही प्रकारानीं जो शुद्ध झाला आहे; ६४ वेदांत सांगितल्याप्रमाणें मंत्रोच्चार करून मृत्तिका व पाणी बाहेरून लाविलीं असतां जशी बाह्यशुद्धि होते, ६५ ज्याप्रमाणें वाटेल तेव्हां बुद्धीच्या योगानें आरसा धुळीनें स्वच्छ करतां येतो, किंवा परटाच्या सतालांत वस्त्र धुतल्यानें त्याचा डाग नाहींसा होतो, ६६ फार-काय सांगावें ? याप्रमाणें जो बाहेर निर्मळ झाला आहे, आणि अंतर्यामीं ज्ञानाचा उजेड झाल्यामुळें खरोखर अंतर्बाह्य शुद्ध झाला आहे, ६७ बाकी अर्जुना, अंतर्यामीं शुद्ध न होतां जो बाह्यात्कारीं कर्में करितो, त्याची सर्वत्र विटंबना होते. ६८ ज्याप्रमाणें प्रेतावर डागिने घालून त्याला शृंगारावें, किंवा गाढवास तीर्थांत न्हाऊं घालावें, अथवा कडू दुध्या भोपळा गुळानें माखावा, ६९ किंवा ओसाड घराला तोरण बांधावें, अथवा उपाशी मनुष्याच्या पोटावर अन्न लिपावें, किंवा हीनभर्तृकेनें कुंकू व शेंदूर लावावा, ४७० मुलाम्याच्या कळसाचा पोकळ डेरा जरी किती चकचकीत दिसला, तरी तो व्यर्थ होय; तसेंच, चित्रांतील फल किती जरी उत्तम दिसलें, तरी त्यांत शेणच भरलेलें असतें, ७१ त्याप्रमाणें बाह्यात्कारीं कर्में करणाराची स्थिति आहे ! हिणकट पदार्थाला पुष्कळ मोल येत नाहीं. ७२

विटे । समाधीसी ॥ ४५० ॥ कैवल्यसुखासाठीं । परमाणु घे किरीटी । उधळती पायांपाठी । चालतां जे ॥ ५१ ॥ हें असो सांगावें किती । नाहीं पारु गुरुभक्ती । परी गा उत्क्रांतमतीं । कारण हें ॥ ५२ ॥ जया इये भक्तीची चाड । जया इये विषयींचे कोड । जो हे सेवेवांचून गोड । न मनी कांहीं ॥ ५३ ॥ तो तत्त्वज्ञानाचा ठावो । ज्ञाना तेणेंचि आवो । हें असो तो देवो । ज्ञान भक्तु ॥ ५४ ॥ हें जाण पां साचोकारें । तेथ ज्ञान उघडेनि द्वारें । नादत असे जगा पुरे । इया रीति ॥ ५५ ॥ ( ५८५. गुरुभक्तीचें विशेष वर्णन करण्याचें कारण, ४५६–४६० ) जिये गुरुसेवेविखीं । माझा जीव अभिलाखी । म्हणोनि सोयँचुकी । बोली केली ॥ ५६ ॥ येऱ्हवीं असतां हातीं खुळा । भजनावधानीं आंधळा । परिचर्येलागीं पांगुळा- । पासूनि मंदु ॥ ५७ ॥ गुरुवर्णनीं मुका । आळशी पोशिजे फुका । परि मनीं आथी निका । सानुरागु ॥ ५८ ॥ तेणेंचि पैं कारणें । हें स्थूळ पोसणें । पडलें मज म्हणे । ज्ञानदेवो ॥ ५९ ॥ परि तो बोलु उपसाहावा । आणि वोळगे अवसरु देयावा । आता म्हणेन जी बरवा । ग्रंथार्थुचि ॥ ४६० ॥ ( ५८६. शुचित्व, ४६१–४८४ ) परिसा परिसा श्रीकृष्णु । जो भूतभारसहिष्णु । तो बोलतसे विष्णु । पार्थु ऐके ॥ ६१ ॥ म्हणे शुचित्वं गा ऐसें । जयापाशीं दिसे । आंग मन जैसें । कापुराचें ॥ ६२ ॥ कां रत्नाचें दळेंवाडें । जैसें सबाह्य चोखंडें । आंत बाहेरि एकें पाडें । सूर्य जैसा ॥ ६३ ॥ बाहेरीं कर्में क्षाळेला । भीतरीं ज्ञानें उजळला । इहीं दोहीं परी आला । पाखाळा एका ॥ ६४ ॥ मृत्तिका आणि जळें । बाह्य येणें मेळें । निर्मळु होय बोलें । वेदाचेनि ॥ ६५ ॥ भलतेथ बुद्धि बळी । रजें आरिसा उजळी । सौंदणी फेडी थिगोळी । वस्त्रांचिया ॥ ६६ ॥ किंबहुना इयापरी । बाह्य चोख अवधारीं । आणि ज्ञानदीपु अंतरीं । म्हणौनि शुद्ध ॥ ६७ ॥ येऱ्हवीं तरी पांडुसुता । आंतर शुद्ध नसतां । बाहेरि कर्म तो तत्त्वतां । विटंबु गा ॥ ६८ ॥ मृत जैसा शृंगारिला । गाढव तीर्थी न्हाणिला । कडु दुधिया माखिला । गुळें जैसा ॥ ६९ ॥ वोसगृहीं तोरण बांधिलें । कां उपवासी अन्नें लिंपिलें । कुंकुमसेंदुर केलें । कांतहीनेनें ॥ ४७० ॥ कळस ढिमोंचे पोकळ । जळो वरील ते झळाळ । काय करूं चितरींव फळ । आतु शेण ॥ ७१ ॥ तेसें कर्म वरिचिलेकडा ।

---

१ उकळी. २ शोभा. ३ अमर्याद. ४ थोटा. ५ सेवेकरतां. ६ सप्रेम. ७ शरीर. ८ ठेवेला. ९ सहन करणारा. १० अंतर्बाह्य शुचिर्मूतपणा. ११ खोड. १२ स्वच्छ. १३ शुद्ध झाला. १४ निर्मळपणा. १५ योगानें. १६ आशेनें. १७ धूळ. १८ परटाच्या रातालातील धुण्याचें पाणी. १९ डाग. २० विटंबना. २१ मुलाम्याचें. २२ चकाकी.

अकस्मात् श्रीगुरूंचा उच्छिष्टप्रसाद मिळाला तर त्या लाभापुढें जो समाधिसुखालाही तुच्छ मानतो; ४५० गुरु चालत असता मागें जे गुरूंचे पदरजःकण उडतात ते जो आपले मस्तकावर धारण करितो, व त्या लाभापुढें मोक्षसुख तुच्छ मानितो; ५१ हें असो; गुरुभक्तीचा महिमा किती म्हणून सांगावा ? कारण त्याला पार नाहीं. परंतु माझ्या बुद्धीला गुरुभक्तीची उकळी फुटल्यामुळें सांगणें भाग पडलें! ५२ ज्याला गुरुभक्तीची इच्छा आहे, व ज्याला गुरुभक्तीचीच आवड आहे; आणि ज्याला गुरुसेवेवाचून दुसरें कांहींही गोड लागत नाहीं, ५३ तो ब्रह्मज्ञानाचें माहेरघर असून ज्ञानाला त्याच्याच योगानें शोभा येते; फार तर काय ? तो देव, व ज्ञान त्याचें उपासक बनतें. ५४ ज्याला खरोखर गुरुभक्तीची आवड आहे, त्याचे घरीं जगाला पुरून उरेल इतकें ज्ञान भरलेलें असतें असें समज. ५५ ज्ञानदेव म्हणतातः—गुरुसेवेविषयीं माझ्या मनांत खरी उत्कंठा आहे, म्हणून मीं त्या गुरुभक्तीचें अमर्याद असें वर्णन केलें; ५६ एरवीं मी हात असून थोंटा, डोळे असून भजनाविषयीं आंधळा व पाय असून गुरुसेवा करण्याविषयीं पांगळ्या-पेक्षांही पांगळा; ५७ आणि गुरूंचें वर्णन करण्याविषयीं मुका व आळशी आहें; इतके अवगुण असूनही मला गुरूंनीं फुकट पोसला आहे. परंतु मी मनातून मात्र गुरूंविषयीं सप्रेम आहें. ५८ ज्ञानदेव म्हणतातः—एवढ्याच कारणाकरितां मला शरीराचें पोषण करणें भाग पडलें. ५९ परंतु मी एवढें अमर्याद गुरुसेवेविषयीं वर्णन केलें, तें सहन करून मला तुमची सेवा करण्यास संधि द्या, म्हणजे मी ग्रंथार्थ उत्तम रीतीनें सांगेन. ४६० ( साधुजनहो, ) ऐका, ऐका! भूतांचा भार सहन करणारा विष्णूचा अवतार जो श्रीकृष्ण भगवान, तो सांगत असून पार्थ ऐकतो आहे. ६१ कापूर अंतर्बाह्य शुद्ध असतो, तसें ज्याचें शुचित्व स्वच्छ दिसतें, तेंच खरें शुचित्व होय; ६२ किंवा रत्नाचें खोड जसें अंतर्बाह्य चकचकीत असतें, अथवा सूर्य जसा आंत व बाहेर लकलकीत दिसतो; ६३ कर्माच्या योगानें ज्याची बाह्यशुद्धि झाली असून ज्ञानाच्या योगें ज्याची अंतःशुद्धि झालेली आहे; आणि अशा दोन्ही प्रकारांनीं जो शुद्ध झाला आहे; ६४ वेदांत सांगितल्या-प्रमाणें मंत्रोच्चार करून मृत्तिका व पाणी बाहेरून लाविलीं असतां जशी बाह्यशुद्धि होते, ६५ ज्याप्रमाणें वाटेल तेव्हां बुद्धीच्या योगानें आरसा धुळीनें स्वच्छ करतां येतो, किंवा परटाच्या सतालांत वस्त्र धुतल्यानें त्याचा डाग नाहींसा होतो, ६६ फार-काय सांगावें ? याप्रमाणें जो बाहेर निर्मळ झाला आहे, आणि अंतर्यामीं ज्ञानाचा उजेड झाल्यामुळें खरोखर अंतर्बाह्य शुद्ध झाला आहे, ६७ बाकी अर्जुना, अंतर्यामीं शुद्ध न होता जो बाह्यात्कारीं कर्में करितो, त्याची सर्वत्र विटंबना होते. ६८ ज्याप्रमाणें प्रेतावर डागिने घालून त्याला शृंगारावें, किंवा गाढवास तीर्थांत न्हाऊं घालावें, अथवा कडू दुध्या भोपळा गुळानें माखावा, ६९ किंवा ओसाड घराला तोरण बांधावें, अथवा उपाशी मनुष्याच्या पोटावर अन्न लिंपावें, किंवा हीनभर्तृकेनें कुंकू व शेंदूर लावावा, ४७० मुला-म्याच्या कळसाचा पोकळ डेरा जरी किती चकचकीत दिसला, तरी तो व्यर्थ होय; तसेंच, चित्रांतील फळ किती जरी उत्तम दिसलें, तरी त्यांत शेणच भरलेलें असतें, ७१ त्या-प्रमाणें बाह्यात्कारीं कर्म करणाराची स्थिति आहे! हिणकट पदार्थाला पुष्कळ मोल येत नाहीं. ७२

न सरे थोर मोलें कुंडा । नव्हे मदिरेचा घडा । पवित्र गंगे ॥ ७२ ॥ म्हणोनि अंतरीं ज्ञान व्हावें । मग बाह्य लाभे स्वभावें । वरि ज्ञान कर्में संभवे । ऐसें कें जोडे ॥ ७३ ॥ यालागीं बाह्य भाग । कर्में धुतला चांग । ज्ञानें फिटला वंग । अंतरींचा ॥ ७४ ॥ तेथ अंतर्बाह्य गेलें । निर्मळत्व एक जाहलें । किंबहुना उरलें । शुचित्वाचि ॥ ७५ ॥ म्हणोनि सद्भाव जीवगत । बाहेरि दिसती फांकत । स्फटिकगृहींचे डोलैंत । दीप जैसे ॥ ७६ ॥ विकल्प जेणें उपजे । नाथिली विकृति निपजे । अप्रवृत्तीचीं बीजें । अंकुर घेती ॥ ७७ ॥ तें आइके देखे अथवा भेटे । परि मनीं कांहींचि नुमटे । मेघरंगें ने कांटे । व्योम जैसें ॥ ७८ ॥ येऱ्हवीं इंद्रियांचेनि मेळें । विषयांवरी तरी लोळे । परि विकाराचेनि विटाळें । लिंपिजेना ॥ ७९ ॥ भेटलेया वाटेवरी । चोखी आणि मोहारी । तेथ नातळे तियापरी । राहाटों जाणे ॥ ४८० ॥ कां पतिपुत्रातें आलिंगी । एकचि ते तरुणांगी । तेथ पुत्रभावाच्या आंगीं । न रिगे कामु ॥ ८१ ॥ तैसें हृदय चोख । संकल्पविकल्पीं सनोळख । कृत्याकृत्य विशेखें । फुडें जाणे ॥ ८२ ॥ पाणियें हिरा न भिजे । आधणीं हरळ न शिजे । तैसी विकल्पजातीं न लिंपिजे । मनोवृत्ति ॥ ८३ ॥ तया नांव शुचिपण । पार्था गा संपूर्ण । हें देखसी तेथ जाण । ज्ञान असे ॥ ८४ ॥ ( ५८७. स्थैर्य, ४८५-५०१) आणि स्थिरता साचें । घर रिगाली जयाचें । तो पुरुष ज्ञानाचें । आयुष्य गा ॥ ८५ ॥ देह तरी वरिचिलीकडे । आपुलिया परि हिंडे । परि बैसकी न मोडे । मानसींची ॥ ८६ ॥ वत्सावरूनि धेनूचें । स्नेह रानीं न वचे । नव्हती भोग सतीयेचे । प्रेमभोग ॥ ८७ ॥ कां लोभिया दूर जाये । परि जीव ठेविलाचि ठाये । तैसा देहो चालितां न होये । चळ चित्ता ॥ ८८ ॥ जातया अभ्रासवें । जैसें आकाश न धांवे । भ्रमणचक्रीं न भंवे । ध्रुव जैसा ॥ ८९ ॥ पांथिकांचिया येरझारा- । सवें पंथु न वचे धनुर्धरा । कां नाहीं जेवीं तरुवरां । येणें जाणें ॥ ४९० ॥ तैसा चळणवळणात्मकीं । असोनि ये पांचभौतिकीं । भूतोर्मी एकी । चळिजेना ॥ ९१ ॥ वाहुटोळीचेनि बळें । पृथ्वी जैसी न ढळे । तैसा उपद्रवउमाळें । न लोटे जो ॥ ९२ ॥ दैन्यदुःखीं न तपे । भयशोकीं न कंपे । देहमृत्यु न वासिपे । पातलेनी

१ उत्पन्न होत नाहीं. २ हिणकट. ३ कलंक; डाग. ४ अंतर्यामीं. ५ प्रकाशतात. ६ संशय. ७ नसती; गेलेली; ८ कुकर्मांची. ९ बाधित होत नाहीं. १० आकाश. ११ पवित्र. १२ अपवित्र. १३ विकार उत्पन्न होत नाहीं. १४ परिचित. १५ तारतम्य. १६ वाळू. १७ जीवन. १८ बैठक. १९ चलन. २० प्रवास करणारा. २१ स्वरूपीं. २२ विकारांच्या लहरींनीं. २३ ढळत नाहीं. २४ लोटानें. २५ दारिद्र. २६ पीडा पावत नाहीं. २७ व्याकुळ होत नाहीं. २८ भीत नाहीं.

नाहीं, किंवा मद्य भरलेली घागर गंगेंत नेऊन ठेवली तरी पवित्र होत नाहीं. ७२ म्हणून, अंतर्यामीं ज्ञानप्राप्ति असून बाह्यात्कारीं कर्माचें आचरण करणारा असा मनुष्य कोठें सांपडणार? ७३ याकरितां, बाह्यात्कारीं कर्माचें आचरण करून जो शुद्ध झाला आहे, व ज्ञानप्राप्तीमुळें ज्याचें अंतर्याम निर्मळ झालें आहे, ७४ त्याचे ठिकाणीं आंत व बाहेर हा भेद न राहतां सर्वत्र शुद्धि होऊन त्याचे ठिकाणीं केवळ शुचित्वच वास करितें. ७५ म्हणून, अंतर्यामीं शुद्ध वासना झाली म्हणजे बाहेर इंद्रियांत ती तशीच दिसून येते. ज्याप्रमाणें स्फटिकाच्या घरांत लावलेल्या दिव्याचा प्रकाश आंतल्याप्रमाणें बाहेरही लकलकीत दिसतो; ७६ ज्या योगानें संशय उत्पन्न होतात, नसत्या विकृति जडतात, व कुकर्मांकडे प्रवृत्ति होते, ७७ असे विषय जरी प्रत्यक्ष भेटले, अथवा कानानें ऐकले, तरी ज्याच्या मनावर त्याचा कांहींच ठसा उमटत नाहीं; ज्याप्रमाणें आकाशाला मेघांच्या रंगामुळें कोणत्याही प्रकारची बाधा होऊं शकत नाहीं; ७८ एऱ्हवीं ज्याचीं इंद्रियें विषयोपभोग घेत असलीं तरी विषयाच्या विकारानें ज्याच्या मनावर कोणत्याही रीतीचा पगडा बसत नाहीं; ७९ वाटेनें जात असतां एखाद्यास पवित्र अथवा अपवित्र स्त्री भेटल्यानें तिजविषयीं त्याच्या मनांत जसा विकार उत्पन्न होत नाहीं, अशा रीतीनें जो संसारांत राहात असतां इंद्रियाच्या विकाराचें प्राबल्य आपल्या मनावर होऊं देत नाहीं; ४८० एखादी तरुण स्त्री आपल्या पतीला व पुत्रालाही आलिंगन देते, परंतु पुत्राला आलिंगन देते वेळीं तिच्या मनांत कामवासना उत्पन्न होत नाहीं, ८१ त्याप्रमाणें ज्याचें मन निर्मळ असून चांगल्या व वाईट विकारांची ज्याला ओळख असते, व योग्यायोग्य कर्म जाणण्याचें ज्याला ज्ञान असतें; ८२ ज्याप्रमाणें पाण्यांत हिरा भिजत नाहीं, व अधणांत वाळू शिजत नाहीं, त्याप्रमाणें ज्याच्या मनोवृत्तीला विकारांची बाधा होत नाहीं; ८३ पार्था, ह्याच आचरणाचें नांव शुचित्व; व ज्याचे ठिकाणीं हें दृष्टीस पडतें तेथें ज्ञान खास आहे, असें समज, ८४ आणि स्थिरपणा ज्याचे मनांत पूर्णपणें प्राप्त झाला आहे, तो पुरुष ज्ञानाचें जीवनच होय. ८५ जरी तो वरकातीं देहानें वाटेल तिकडे हिंडत असतो, म्हणजे सर्व व्यापार करीत असतो, तरी त्याच्या मनाची बैठक कायम असते. ८६ ज्याप्रमाणें गाय रानांत चरावयास गेली तरी तिचें लक्ष तिच्या बरोबर रानांत न जातां घरीं वासरापाशीं असतें, अथवा पतीबरोबर सती जाण्यास निघालेल्या पतिव्रता स्त्रीस सहगमनसमयींचे भोग प्रेमदायक नसतात; ८७ किंवा कृपण घर सोडून लांब गेला तरी त्याचें चित्त पुरून ठेवलेल्या द्रव्याजवळ असतें, त्याप्रमाणें, देहाचे व्यापार जरी चालू असले, तरी ज्याचें चित्त स्थिरच असतें, ८८ धावणाऱ्या ढगांबरोबर ज्याप्रमाणें आकाश धावत नाहीं, अथवा फिरणाऱ्या नक्षत्रांबरोबर ध्रुव फिरत नाहीं, ८९ अर्जुना, प्रवास करणाऱ्या मनुष्याबरोबर ज्याप्रमाणें रस्ता वाट चालत नाहीं किंवा झाडें जात येत नाहींत, ४९० त्याप्रमाणें, पंचमहाभूतात्मक शरीराची जरी इंद्रियांच्या संबंधानें हालचाल होत असली, तरी ज्याचें मन कोणच्याही विकाराच्या लहरीनें ढळत नाहीं; ९१ वावटळीच्या योगानें ज्याप्रमाणें पृथ्वी हालत नाहीं, त्याप्रमाणें विकारांच्या योगानें ज्याचें मन ढळत नाहीं, ९२ दरिद्र व दुःख यापासून जो पीडित होत नाहीं, भीति व शोक यापासून जो व्याकुळ

॥९३॥ आर्ति आशा पडिभरें। वय व्याधीं गजरें। उजू असतां पाठिमोरें। नव्हे चित्त ॥९४॥ निंदा निस्तेज दंडी। कामलोभा वैरपडी। परि रोम नव्हे वांकुडी। मानसाची ॥९५॥ आकाश हे वोसँरो। पृथ्वी वरि विरो[5]। परि नेणे मोहरो[6]। चित्त-वृत्ति ॥९६॥ हाँती हाला फुलीं। पोसवणा जेवीं न घाली। तैसा न लोटे दुर्वाक्यें-शेलीं। शोलिलौ सांता ॥ ९७ ॥ क्षीरार्णवाचिया कल्लोळीं। कंपु नाहीं मंदराचळीं। आकाश न जळे जौळीं[12]। वणावियाच्या ॥ ९८ ॥ तैशा आल्या गेल्या ऊँमीं[13]। नव्हे गजबज मनोधर्मीं। किंबहुना धैर्य क्षेँमी। कल्पांतींही ॥ ९९ ॥ पैं स्थैर्य ऐसी भाष। बोलिजे जे सविशेष। ते हे दशा गा देख। देखणेयौ ॥ ५०० ॥ हें स्थैर्य निघडें[16]। जेथ आंगें जीवें जोडे। तें ज्ञानाचें उघडें। निधान साचें ॥१॥ (५८८. आत्मविनिग्रह, ५०२–५१२) आणि ईसाँळ जैसा घरा। का द्वंद्वी[18] हति-येरा। न विसंबे भांडारा। लुंँधकु जैसा ॥ २ ॥ कां एकलौतियेंं बाळका। वरि-पैंडौनि ठाके अंबिकैं। मधुविषीं मधुमक्षिका। लोभिणी जैसी ॥ ३ ॥ अर्जुना जो यापरी। अंतःकरण जैंतन[23] करी। नेदी उभें ठाकों द्वारीं। इंद्रियांच्या ॥ ४ ॥ म्हणे काम वैंगुल[24] ऐकेल। हे आशा सियौरी[25] देखैल। तरी जीवा टेंकैल। म्हणोनि बिहे ॥ ५ ॥ बाहेरी धीट[26] जैसी। दौंडुगा[27] पति कैंळासी[28]। करी टेहेंणी[29] तैसी। प्रवृत्तीसी[30] ॥ ६ ॥ सचेतनी[31] वौणेपणें[32]। देहासकट आंटणें[33]। संयँमावरी[34] कैंरणें[35]। बुझूनि घाली ॥७॥ मनाचिया महाद्वारीं। प्रत्याहाराचिया[36] ठाँणांतरीं[37]। जो यमदम शरीरीं। जागवी उभे ॥ ८ ॥ आँधारीं[38] नौंभीं[39] कंठीं[40]। बंधलयाची घैरटी[41]। चंद्रैसूर्य[42][43] संपुँटीं[44]। सुये चित्त ॥ ९ ॥ समाधीचे शेजेपासीं। बांधोनि घाली ध्यानासी। चित्त चैतन्य सँमरसीं[45]। अंतँरतें[46] ॥५१०॥ अगा अंतःकरणनिग्रहो जो। तो हा हें जाणिजो। हा आथी तेथ विजो[47]। ज्ञानाचा पैं ॥ ११ ॥ जयाची आज्ञा आपण। शिरीं वाहे अंतःकरण। मनुष्याकारें जाण। ज्ञानचि तो ॥ १२ ॥

इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च।
जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥

---

१ पीडा. २ अपमान. ३ धरपगडा झाला असतां. ४ तुटून पडो. ५ विरून जावो. ६ माघारीं फिरणें. ७ हत्ती. ८ मारले असतां. ९ पासंगीं. १० बाणानें. ११ मारला असतां. १२ ज्वालांनीं. १३ लाटा. १४ सहन करतो. १५ डोळस. १६ अविनाशी; बळकट. १७ सर्प. १८ योद्धा. १९ कृपण. २० एकुलत्या एक. २१ जीव का प्राण करून. २२ आई. २३ ताब्यांत ठेवतो. २४ बागुलबोवा. २५ डाकीण. २६ व्यभिचारिणी. २७ दांडगा. २८ कोंडून ठेवतो. २९ अटकाव; नजर ठेवणें. ३० मनोवृत्तीला. ३१ जिवंतपणीं. ३२ कमी झाला तरी. ३३ झिजविणें. ३४ इंद्रियनिग्रही. ३५ इंद्रियें. ३६ विषयांपासून माघारें येणें. ३७ जागेंत. ३८ मूळबंध. ३९ ओढियाणाबंध. ४० जालंदरबंध. ४१ स्थिर करून. ४२ इडा. ४३ पिंगळा. ४४ संगमीं. ४५ ऐक्य. ४६ आंत रत होतें. ४७ विजय.

होत नाहीं, व देहास मृत्यु आला असतांही जो भीत नाहीं; ९३ एखाद्या वस्तूची आशा अथवा एखादी पीडा यांच्या भारानें, आणि वृद्धापकाल व व्याधि हीं प्राप्त झालीं असतां ज्याचें चित्त मागें ढुंकूनही पहात नाहीं; ९४ निंदा, अपमान, दंड, काम व लाभ याचा वरपगडा झाला असता ज्याचे मनाची वृत्ति माघारी फिरत नाहीं; ९५ आकाश तुटून पडलें किंवा पृथ्वी विरून गेली तरी ज्याची चित्तवृत्ति माघारी फिरत नाहीं; ९६ हत्तीला फुलानें मारिलें असता त्याचा मार जसा त्याचे पासंगालाही नसतो, तसा दुर्वाक्यरूप बाणांनीं मारलें असतां जो मागें पहात नाहीं; ९७ क्षीराब्धीच्या लाटांनीं ज्याप्रमाणें मंदराचल हालत नाहीं, किंवा वणव्याच्या ज्वालांनीं आकाश जळत नाहीं, ९८ त्याप्रमाणें इंद्रियांवर विषयविकाराच्या कितीही लाटा आल्या किंवा गेल्या, तरी ज्याचे मन गडबडत नाहीं, किंवा कल्पांतींही जो धैर्य सोडीत नाहीं; ९९ हे डोळसा अर्जुना, स्थैर्य म्हणून ज्याला म्हणतात, व जें या नांवानें प्रसिद्ध आहे, त्याचीं हीं अशीं लक्षणें आहेत. ५०० हेंच अविनाशी स्थैर्य ज्याच्या अंगीं अंतर्बाह्य बाणलें आहे, तो ज्ञानाचा उघड उघड ठेवाच आहे. १ आणि साप जसें (अ ली खोडी करणाऱ्या मनुष्याचें) घर, किंवा योद्धा आपलें हत्यार, अथवा कृपण आप ठेवा विसरत नाहीं; २ किंवा ज्याप्रमाणें एकुलत्या एक मुलावर त्याची आई जी कीं प्राण करून असते, अथवा मधमाशी मधाविषयीं आसक्त असते, ३ त्याप्रमाणें अर्जुना, जो आपलें मन ताब्यात ठेवून इंद्रियांच्या दारांतही उभें राहूं देत नाहीं; ४ तो म्हणतो, (आपण मन ताब्यांत ठेवलें) हें कामरूप बागुलबोवा ऐकेल, व आशारूप डाकीण (मनाची अशी स्थिति पाहून) त्याला आपल्या पाशांत गुंतवील, म्हणून त्याला फार भीति वाटते; ५ ज्याप्रमाणें व्यभिचारिणी स्त्रीला तिचा दांडगा नवरा बाहेर फिरकूं न देता घरांत कोंडून ठेवतो, त्याप्रमाणें आपल्या मनोवृत्तीला जो इंद्रियांकडे जाऊं न देता अंतर्यामीं कोंडून ठेवतो; ६ जिवंतपणीं देहाची पर्वा न करितां देह झिजवून इंद्रियाचा निग्रह करितो; ७ मनाच्या दरवाज्यांत व प्रत्याहाराच्या जागेंत जो अनुक्रमें यम व दम पहारेकरी रात्रंदिवस उभे करितो, ८ मूळबंध, ओढियाणाबंध व जालंधर-बंध हे तिन्ही स्थिर करून इडा व पिंगला यांच्या संगमस्थानीं जो आपलें चित्त लावतो; समाधीच्या शेजेजवळ जो ध्यानाला बांधून टाकतो; ९ म्हणजे ध्यानाचा परिपाक जो समाधि तो लागेपर्यंत ध्यानस्थ असून, जो आत्म्याचें ऐक्य होईपर्यंत चित्त स्थिर करतो, ५१० अरे, अंतःकरणनिग्रह ज्याला म्हणतात, तो ह्या गुणांनीं जाणावा, व असा ज्या ठिकाणीं असेल, त्या ठिकाणीं ज्ञानाचा विजय होतो. ११ ज्या साधकाची आज्ञा त्याचें मन शिरसावंद्य मानतें, तो जरी मनुष्याच्या आकारानें जगांत वागत असला तरी तो मूर्तिमंत ज्ञानच आहे असें जाण. १२

श्लोकार्थः—विषयाविषयीं विरक्ति, अहंपणाचा अभाव, आणि जन्म, मृत्यु, वृद्धपणा व शरीर-व्यथा यांचे ठिकाणीं दोषदृष्टीनें पहाणें; ॥ ८ ॥

अन्वयः—इंद्रियार्थेषु वैराग्यं; अनहंकारः एव च जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम्; ॥८॥

( ५८९. वैराग्य, ५१३-५२४ ) आणि विषयांविखीं । वैराग्याची निकी । पुरवणी मानसीं कीं । जिती आथी ॥ १३ ॥ वमिलिया अन्ना । लाळ न घोंटी रसना । आंग न सूये आलिंगना । प्रेताचिया ॥ १४ ॥ विष खाणें नागवे । जळत घरीं न रिघवे । व्याघ्रविवरा न वचवे । वस्ती जेवीं ॥ १५ धेंडाडीत लोहरसीं । उडी न घालवे जैसी । न करवे उशी । अजगराची ॥ १६ ॥ अर्जुना तेणें पाडें । जयासी विषयवार्ता नावडे । नेदी इंद्रियांचेनि तोंडें । कांहींच जावों ॥१७॥ जयाचे मनीं आलस्य । देहीं अतिकार्श्य । शमदमीं सौरस्य । जयासि गा ॥१८॥ तपोव्रतांचा मेळावा । जयाचे ठायीं पांडवा । युगांत जया गांवा- । आतु येतां ॥ १९ ॥ बहु योगाभ्यासीं हाव । विजनाकडे धाव । न साहे जो नांव । संघाताचें ॥ ५२० ॥ नाराचाचीं आंथुरणें । पूयपंकीं लोळणें । तैसें लेखी भोगणें । ऐहिकीचें ॥ २१ ॥ आणि स्वर्गातें मानसें । ऐकोनि मानी ऐसें । कुहिलें[14] पिशितें जैसें । श्वानाचें कां ॥ २२ ॥ तें हें विषयवैराग्य । जें आत्मलाभाचें सभाग्य । येणें ब्रह्मानंदा योग्य । होती जीव ॥ २३ ॥ ऐसा उभयभोगीं त्रासु । देखसी जेथ बहुवसु । तेथ जाण रहिवासु । ज्ञानाचा तूं ॥ २४ ॥ ( ५९०. अनहंकार, ५२५–५३५ ) आणि सचाडाचिये परी । इष्टापूर्तें करी । परी केलेंपण शरीरीं । वसों नेदी ॥ २५ ॥ वर्णाश्रमपोषकें । कर्मे नित्यनैमित्तिकें । यांमाजि कांहीं न ठके । आचरतां ॥ २६ ॥ परि हें मियां केलें । कीं हें माझेनि सिद्धी गेलें । ऐसें नाहीं ठेविलें । वासनेमाजी ॥ २७ ॥ जैसें अवचितपणें । वायूसि सर्वत्र विचरणें । कीं निरभिमान उदैजणें । सूर्याचें जैसें ॥ २८ ॥ कां श्रुति स्वभावतां बोले । गंगा काजेंविण चाले । तैसें अवष्टंभहीन भलें । वर्तणें जयाचें ॥ २९ ॥ ऋतुकाळीं तरी फळती । परी फळलों हें नेणती । तयां वृक्षांचिये ऐसी वृत्ती । कर्मीं सदा ॥ ५३० ॥ एवं मनीं कर्मीं बोलीं । जेथ अहंकारा उखी जाहली । एकावळीची काढिली । दोरी जैसी ॥ ३१ ॥ संबंधेंवीण जैसीं । अभ्रें असती आकाशीं । देहीं कर्मे तैसीं । जयासि गा ॥ ३२ ॥ मद्यपाआंगींचें वस्त्र । कां लेपाहातींचें शस्त्र । बैलावरी शास्त्र । बांधलें आहे ॥ ३३ ॥ तया पाडें देहीं । जया मी आहे हे सेचि नाहीं । निरहं-

---

१ मदत. २ आवडत नाहीं. ३ दरींत. ४ करवत नाहीं. ५ सळसळणाऱ्या. ६ रोडका. ७ मनाचा व इंद्रियांचा निग्रह. ८ ऐक्य. ९ प्रलयकालाप्रमाणें दुःख. १० अरण्याकडे. ११ समुदाय. १२ बाणांची. १३ पुवाच्या चिखलांत. १४ कुजलेलें. १५ मांस. १६ खूण. १७ इहपर. १८ आस्थापूर्वक. १९ न्यून न पाडणें. २० फिरणें. २१ अहंकाराशिवाय. २२ नाश. २३ हार. २४ दारूवाज. २५ चित्राच्या.

आणि विषयाविषयीं ज्याच्या मनांत वैराग्याची जिवंत मदत आहे; १३ ओकलेलें अन्न फिरून खाण्याविषयीं जिव्हेला इच्छा होत नाहीं; अथवा प्रेताला आलिंगन देण्याविषयीं इच्छा होत नाहीं, १४ विष खाणें हें आवडत नाहीं, जळत्या घरांत शिरवत नाहीं, आणि वाघाच्या दरींत वस्तीला जाववत नाहीं, १५ सळसळीत लोखंडाचे रसांत उडी घालवत नाहीं किंवा अजगराची उशी करवत नाहीं, १६ त्याप्रमाणें अर्जुना, ज्याला विषयांचें नांव घेतलेलें देखील खपत नाहीं, तो इंद्रियांची व विषयांची गांठ पडूं देत नाहीं. १७ ज्याच्या मनांत ( विषयसेवनाविषयीं ) आळस भरलेला आहे, व जो विषय सेवन न केल्यामुळें रोड झाला आहे, परंतु ज्याच्या मनाचें इंद्रियनिग्रहाशीं ऐक्य आहे, १८ हे पांडवा, जो नेहमीं तपें व व्रतें एकसारखीं करतो, व ज्याला मनुष्याच्या वस्तींत येणें म्हणजे प्रळयकाळाप्रमाणें दुःख होतें; १९ ज्याची योगाभ्यासाविषयीं फार इच्छा असते, व अरण्यांत राहणें ज्याला फार आवडतें आणि मंडळींत मिसळण्याचें नुसतें नांवही ज्याला सहन होत नाहीं; ५२० बाणाच्या शय्येवर निजणें, अथवा पुवाच्या चिखलांत लोळणें, याप्रमाणें जो ऐहिक भोगांची योग्यता समजतो; २१ आणि स्वर्गप्राप्तीची गोष्ट काढल्यावर जो त्याला कुत्र्याच्या कुजलेल्या मांसाप्रमाणें मानतो; २२ ज्याला विषयवैराग्य म्हणतात तें हें होय; व हेंच आत्मप्राप्तीचें भाग्य असून त्याच्याच योगानें जीव ब्रह्मानंदाचें सुख भोगण्यास योग्य होतात. २३ याप्रमाणें इहपरलोकींच्या सुखोपभोगांचा ज्याला पूर्ण कंटाळा आहे, तेथेंच ज्ञानाची वस्ती आहे असें पक्कें समज, २४ आणि जो आस्थापूर्वक यज्ञ करणें व तलाव, बाग वगैरे बांधणें हीं कर्में करितो, परंतु कर्तृत्वाच्या अभिमानाचा लेश सुद्धां आपल्या आंगीं वसूं देत नाहीं, २५ वर्णाश्रमधर्माप्रमाणें नित्यनैमित्तिक कर्माचें यथाविधि आचरण करितो व त्यांत कांहीं न्यून पडूं देत नाहीं, २६ परंतु हें कर्म मीं केलें किंवा मीं केल्यामुळें सिद्धीस गेलें, असें मुळींच मनांत आणीत नाहीं, २७ ज्याप्रमाणें वायु हा सहज सर्वत्र फिरतो, किंवा सूर्य निरभिमानानें सर्वत्र प्रकाश पाडतो, २८ अथवा श्रुति ही स्वभावतः ( सर्वांस इष्ट अशाच गोष्टीचें ) वर्णन करिते; किंवा गंगा ( अमुकच ठिकाणीं जाण्याचें मनांत न धरितां ) सहज ओघानें जाते, त्याप्रमाणें, ज्याचें नेहमीचें वर्तन अभिमानरहित असें आहे; २९ वृक्षास यथाकाळीं फळें येतात, परंतु त्यांचीं त्यांस आठवणही नसते; त्या वृक्षांप्रमाणेंच, कर्में करीत असतांना कर्मफळप्राप्तीविषयीं ज्याची वृत्ति असते; ५३० ज्याप्रमाणें हारातील दोरी काढून घेतल्यावर त्याचें ऐक्य नाहींसें होतें, त्याप्रमाणें मनांत, आचरणांत व बोलण्यांत ज्यानें अहंकाराचा नाश केला आहे; ३१ अभ्रांचा आकाशाशीं संबंध नसतांही ज्याप्रमाणें तीं आकाशांत आपल्या दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें जो देहानें कर्माचें आचरण करीत असतां त्यापासून अलिप्त राहतो; ३२ मद्यप्याला ज्याप्रमाणें आपल्या अंगावरील वस्त्राची आठवण नसते, किंवा चित्राच्या हातीं दिलेल्या शस्त्राचा उपयोग त्याला कांहीं नसतो, अथवा बैलावर बांधलेल्या शास्त्रांचा त्याला उपयोग नसतो, ३३ त्याप्रमाणें जो

कारता पाहीं । तया नांव ॥ ३४ ॥ हें संपूर्ण जेथें दिसे । तेथेंचि ज्ञान असे । इये-
विषीं अनारिसें । बोलों नये ॥ ३५ ॥ (५९१. जन्माचा विचार, ५३६–५४४)
जन्म मृत्यु जरा दुःखें । व्याधि वार्धक्य कलुषें[1] । तियें आंगा न येतां[2] देखे । दुरूनि
जो ॥ ३६ ॥ साधकु[3] विवसिया[4] । कां उपसर्गु[5] योगिया । पावे उणेयापुरेया ।
बोथंबा[6] जेवीं ॥ ३७ ॥ वैर जन्मातरींचें । सर्पा मनौनि न वचे । तेविं अतीता[7]
जन्माचें उणें[8] । जो वाहे ॥ ३८ ॥ डोळां हेरळ[9] न विरे । घाईं कोंत[10] न जिरे । तैसे
कोळींचें[11] न विसरे । जन्मदुःख ॥ ३९ ॥ म्हणे पूयगर्ते[12] रिघाला[13] । अहा मूत्ररंध्रें[14]
निघाला । कटारें[15] मियां चाटिला । कुचस्वेदु[16] ॥ ५४० ॥ ऐसऐसिया परी ।
जन्माचा कांटाळा घरी । म्हणे आतां तें मी न करीं । जेणें ऐसें होय ॥ ४१ ॥
हारी[17] उमचावया[18] । जुंवारी जैसा ये डाया । कीं वैरा बापाचेया । पुत्र जंचे[19] ॥४२॥
मारिलियाचेनि रागें । पाठींचा[20] जेवीं सूड मागे । तेणें आक्षेपें[21] लागे । जन्मापाठीं
॥ ४३ ॥ परि जन्मती ते लाज । न सांडी जयाचें निजें[22] । संभाविता निस्तेजें[23] ।
नें[24] जिरे जेवीं ॥ ४४ ॥ (५९२. मृत्यूचा विचार, ५४५-५५४) आणि मृत्यु पुढां
आहे । तोचि कल्पांतीं कां पाहे । परि आजीच होये । सावधु जो ॥ ४५ ॥
माजी अथाव[25] म्हणतां । थडियेचि पांडुसुतां । पोहणार आइता । कासे[26] जेवीं
॥ ४६ ॥ कां न पवता रणाचा ठावो । साभाळिजे जैसा आंवो[27] । वोडण[28] सुइजे
घावो । न लगतांचि ॥ ४७ ॥ पाहेचा[29] पेणा[30] वाटवधा । तंव आजीचि होइजे
सावधा । जीवु न वेंचतां[31] औषधा । धांविजे जेवीं ॥ ४८ ॥ येरवीं ऐसें घडे ।
जो जळत घरीं सापडे । तो मग न पवाडे[32] । कुंहा[33] खणों ॥ ४९ ॥ चोंढिये[34] पाथरू[35]
गेला । तैसेनि जो बुडाला । तो बोंबेहीसकट निमाला[36] । कोण सांगे ॥ ५५० ॥
म्हणोनि समर्थेसीं वैर । जया पडिलें हाडखाईर[37] । तो जैसा आठही पाहर । पैर-
जूनि[38] असे ॥ ५१ ॥ नातरी केळवली[39] नोवरी । कां संन्यासी जयापरी । तैसा न
मरतां जो करी । मृत्युसूचना[40] ॥ ५२ ॥ पैं गा जो ययापरी । जन्मेंचि जन्म निवारी ।
मरणें मृत्यु मारी । आपण उरे ॥ ५३ ॥ तया घरीं ज्ञानाचें । सांकडें नाहीं

१ पातकें. २ प्राप्त होण्यापूर्वी. ३ मांत्रिक. ४ पिशाच ५ उपद्रव. ६ ओळंबा. ७ मागील. ८ पातक. ९ खडा. १० भाला. ११ जन्माचें. १२ पुवाच्या खड्यात. १३ गेला. १४ मूत्रद्वारातून. १५ अरेरे ! १६ स्तनावरील घाम. १७ हार. (डावहरणें). १८ फेडण्याकरिता. १९ जपतो; उगवतो. २० पाठिराखा. २१ काळजीनें. २२ मन. २३ अपमान. २४ सहन होत नाहीं. २५ खोल. २६ कमरेस. २७ अवसान. २८ ढाल. २९ उद्याचा. ३० मुक्काम. ३१ जाण्याच्या अगोदर. ३२ सिद्धीस जाई. ३३ विहीर. ३४ डोहात. ३५ दगड. ३६ नाहींसा झाला. ३७ हाडास भेदणारे. ३८ शस्त्र धारण करून. ३९ उपवर. ४० विचार.

आपल्या देहाविषयीं निरभिमान असतो, त्यालाच निरहंकार असें म्हणतात; ३४ हीं चिन्हें ज्याचे ठिकाणीं पूर्णपणें दृष्टीस पडतात; त्याचेच ठिकाणीं ज्ञान वास करितें, याजबद्दल बिलकूल शंका नाहीं. ३५ जो जन्म, मृत्यु, जरा, दुःखें, व्याधि, वार्धक्य व पातकें हीं प्राप्त होण्याचे अगोदरच त्यांविषयीं सावध राहतो; ३६ ज्याप्रमाणें आपल्यास पिशाच्चबाधा होऊं नये म्हणून मांत्रिक अगोदर व्यवस्था करतो, अथवा आपल्यास दुसऱ्याचा उपसर्ग लागूं नये म्हणून योगी अगोदर तजवीज करतो, किंवा गवंडी हा भिंत बांधते वेळीं ओळंबा लावून ती मागें पुढें जाऊं देत नाहीं; ३७ ज्याप्रमाणें सर्पाचे मनातून जन्मांतरींचेंही वैर नाहींसें होत नाहीं, त्याप्रमाणें जो पूर्वजन्मींचें दुःख आठवून पुनः जन्म न होऊं देण्याबद्दल उद्योग करतो; ३८ ज्याप्रमाणें डोळ्यांत खडा गेला असतां तो सहन होत नाहीं, किंवा शस्त्राच्या घावांत भाला सहन होत नाहीं, त्याप्रमाणें या जन्मीं रोज होणारीं दुःखें जो विसरत नाहीं, ३९ व म्हणतो कीं, अरेरे, मी मूत्रद्वारांतून पुवाच्या खाड्यांत गेलेल्या रेतापासून जन्मलों आहें व मातेचें स्तनपान करतेवेळीं माझे तोंडांत स्तनावरील घामही गेला आहे! ५४० याप्रमाणें जो जन्माचा कंटाळा करतो व असें म्हणतो कीं, ज्या योगानें मला हा जन्म पुनः प्राप्त होईल तें कर्म मी करणार नाहीं; ४१ ज्याप्रमाणें जुगारी हा डाव हारल्यावर तो फेडण्याकरितां पुनः सावधगिरीनें खेळतो, किंवा मुलगा आपल्या बापाचें वैर उगवतो; ४२ अथवा एखाद्यास कोणी मारिलें असतां त्याचा पाठिराखा जसा सूड उगवतो, तसा हा जन्म पुनः न यावा म्हणून जो काळजीनें त्याचे पाठीस लागून दक्ष असतो; ४३ ज्याप्रमाणें संभाविताला अपकीर्ति सहन होत नाहीं, त्याप्रमाणें ज्याच्या मनांतून अशा अमंगल जन्माची लज्जा नाहींशी होत नाहीं; ४४ पुढें येणारा मृत्यु जरी लांब असला तरी जो त्याच्याविषयीं आजच सावध राहतो; ४५ अर्जुना, जो खरा पोहणारा आहे तो नदीच्या मध्यभागीं जरी खोल पाणी असलें तरी जसा कांठावरच आपल्या कमरेला भोपळ्याची सांगड बांधून नदींत उडी घालतो; ४६ किंवा रणांत जाण्याचे पूर्वींच जो आपलें अवसान संभाळून घाव लागण्याचे पूर्वींच ढाल पुढें करतो; ४७ उद्यांच्या मुक्कामाला कांहीं दगा होईल असें समजून जो आजच सावध राहतो; अथवा प्राण जाण्याचे पूर्वींच औषधाची योजना करतो; ४८ बाकी गोष्ट तर अशी घडून येते कीं, घर जळूं लागल्यावर मग विहीर खणूं लागावयाचें; पण तो प्रयत्न कांहीं सिद्धीस जात नाहीं! ४९ डोहाचे तळाशीं जाणाऱ्या दगडाप्रमाणें जो या संसारसागरांत बुडतो, त्यानें बोंब मारली असताही ती जशी कोणास ऐकूं येत नाहीं, मग तो बुडाला म्हणून कोणास सांगणार? ५५० म्हणून, बलवंताबरोबर ज्याचें हाडवैर पडलें आहे, तो जसा रात्रंदिवस शस्त्र परजून असतो; ५१ किंवा उपवर झालेली नोवरी (लवकरच दुसऱ्याच्या घरीं खास जाणार असल्यामुळें) ती घरात असूनही नाहीं असें तिचा बाप समजतो, अथवा संन्यास घेतल्यावर ज्याप्रमाणें तो मरणास तयार असतो, त्याप्रमाणें जो जिवंत असूनही मृत्यूचा विचार करतो; ५२ याप्रमाणें जो जिवंत असतानाच पुनर्जन्माचें निवारण करतो, व हा जन्म गेल्यावर पुनः पुनः मृत्यु टाळतो, आणि आत्मस्वरूपीं राहतो, म्हणजे जन्ममृत्यु मिथ्या समजून आत्मस्वरूपीं लीन असतो; ५३ आणि

साचें । जया जन्ममृत्यूचें । निमालें[1] शैल्य[2] ॥५४॥ ( ५९३. जरेचा विचार,५५५-५८७ ) आणि तयाचिपरी जरा । न टेकतां शरीरा । तारुण्याचिया भरा- । माजि देखे ॥५५॥ म्हणे आजिच्या अवसरीं । पुष्टि जे शरीरीं । ते पाहे होईल काचरी[3] । वाळली जैसी ॥ ५६ ॥ निदैवाचे व्यवसाय । तैसे ठाकती[4] हातपाय । अमंत्री राजाची पैरी[5] आहे । वळा यया ॥५७॥ फुलाचिया भोगा- । लागीं प्रे[6]मटांगा । तें करेयांचा[7] गुडघा । तैसें होईल ॥ ५८ ॥ वोढाळाच्या खुरीं । आखरुआतें [8]चुंरी । ते दशा माझ्या शिरीं[9] । पावेल गा ॥ ५९ ॥ पद्मदळेंसीं[10] ईसाळें[11] । भांडताति हे डोळे । ते होती पडवळें[12] । पिकलीं जैसीं ॥ ५६० ॥ भुंवईचीं पेंडळें । वोमैथती[13] शिर्नैसाळें[14] । उरु कुहिजेल[15] जळें । आंसुवां[16]चोनि ॥ ६१ ॥ जैसें बाभुळीचें खोड । गिरबंडूनि[17] जाती सरड । तैसें पिचर्डीं[18] तोंड । सरकाटिजेल[19] ॥ ६२ ॥ [20]रांधवणी चुलीपुढें । पन्हे[21] उन्मादती[22] खैतवडे[23] । तैसींचि ये नाकाडें । बिडबिडैती[24] ॥ ६३ ॥ तांबुलें वोंठ रोऊं[25] । हांसतां दांत दाऊं । सैनागर[26] मिरऊं । बोल जेणें ॥ ६४ ॥ तयाचि पाहें या तोंडा । येईल जळंबैटाचा[27] लोंढा । इया उमळती[28] दाढा । दांतांसहित ॥ ६५ ॥ कुळवाडी[29]रिणें दाटलीं । कां वांकाडियां[30] ढोरें बैसलीं । तैसी तुठी काहीं केली । जीभचि हे ॥६६॥ कुसळें कोरडीं । वारेनें जाती थेरडीं[31] । तैसी आपदा[32] तोंडीं । दाढियेसी ॥६७॥ आषाढीचेनि जळें । जैसीं झिरपती शैलांचीं[33] मौळें[34] । तैसे खोडीहूनि[35] लाळे । येती पूर[36] ॥ ६८ ॥ वाचेसि अपवादु[37] । कानीं अनुघडु[38] । पिंडें[39] गरुवा[40] माकडु । होईल हा ॥ ६९ ॥ तृणाचें बुझवणें । आंदोळे[41] वारेनगुणें । तैसें येईल कांपणें । सर्वांगासी ॥५७०॥ पायां पडती वेंगडीं[42] । हात वळती मुरकुंडी[43] । वरवेर्पणा[44] वोंगडी[45] । नाचविजैल ॥७१॥ मळमूत्रद्वारें । होऊनि ठाती खोंकरें[46] । नवासियें होती इतरें । माक्षिया निर्धनीं ॥ ७२ ॥ देखोनि थुंकील जगु । मृत्यूचा पडैल पांगु[48] । सोइरियां उवेगु[49] । येईल माझा ॥७३॥ स्त्रिया म्हणती विवसी[50] । बाळें जाती मूर्च्छीं । किंबहुना चिळेंसी[51] ।

---

१ नाहींसे झालें. २ दुःख ३ उसरी; वाळलेली भाजी. ४ राहती. ५ स्थिति. ६ नाक. ७ उंटाच्या. ८ चिखल. ९ शरीराला. १० कमळाच्या पानाशीं. ११ स्पर्धेनें. १२ पडदे. १३ लोंबतात. १४ वाळलेल्या सालीप्रमाणें. १५ कुजेल. १६ डोळ्यांच्या अश्रूंनीं. १७ ढिंकानें बुळबुळीत होतें. १८ थुंकीनें. १९ मरेल. २० स्वयंपाकाच्या. २१ चर. २२ येतात. २३ सांचलेल्या पाण्यांतील बुडबुडे. २४ घरबडून जातात. २५ रंगवूं. २६ उत्तम. २७ लाळेचा. २८ उखळतील; पडतील. २९ शेतकी. ३० पावसाच्या झडींत. ३१ उडून जातात. ३२ दशा. ३३ पर्वतांचीं. ३४ शिखरें. ३५ शरीरावरील खबदांतून. ३६ पाझर. ३७ शब्दांचा उच्चार न होणें. ३८ स्पष्ट ऐकूं न येणें. ३९ शरीर. ४० वृद्ध. ४१ हालतें. ४२ वेडेवांकडे. ४३ थरथर कांपणें. ४४ शरीराच्या चेष्टा. ४५ ढोंग. ४६ फुटकीं भांडीं. ४७ अंतकाळ. ४८ उणीव. ४९ कंटाळा. ५० भूत. ५१ किळस.

अशा प्रकारें ) ज्याला जन्ममृत्यूचें दु:ख राहिलें नाहीं, त्याला ज्ञानाची कधींही उणीव नसते. ५४ आणि त्याचप्रमाणें शरीरास म्हातारपण आलें नाहीं, तोंच ऐन तारुण्याच्या भरांत जो त्याजविषयीं तजवीज करतो. ५५ तो म्हणतो:—आजमितीस माझ्या शरीरांत जी शक्ति आहे, तें शरीर जरा प्राप्त झाल्यावर वाळलेल्या काचरीसारखें होईल; ५६ दैवहीनाच्या खटपटी व्यर्थ होतात, किंवा एखाद्या राजास प्रधान नसला म्हणजे त्याची जशी स्थिति होते, तसे माझे हातपाय चालेनातसे झाले म्हणजे या माझ्या शक्तीची स्थिति होईल; ५७ फुलांचा वास घेणारें नाक तें उंटाच्या गुडघ्याप्रमाणें बधिर होईल; ५८ आषाढ महिन्यात पावसाच्या झडींत ज्याप्रमाणें ओढाळ गुराचे पाय चिखलानें कुजतात, त्याप्रमाणें माझें हें शरीर होईल; ५९ जे माझे डोळे सांप्रत कमलपत्राशीं स्पर्धा करीत आहेत, तेच पुढें पिकलेल्या पडवळाप्रमाणें निस्तेज होऊन खोल जातील. ५६० भुंवया वाळलेल्या सालीप्रमाणें डोळ्यावर लोंबतील, व डोळ्यातून वाहणाऱ्या पाण्यामुळें ऊर कुजून जाईल. ६१ ज्याप्रमाणें सरड हा बाभळीच्या खोडावरून खालीं वर आल्या-गेल्यामुळें तें डिंकानें बुळबुळीत होतें, त्याप्रमाणें थुंकीनें तोंड भरून जाईल, ६२ स्वयं-पाकाच्या चुलीपुढें खणलेल्या चरांत ज्याप्रमाणें पाणी साचून बुडबुडे येतात, त्याप्रमाणें नाक शेंबडानें बरबटून जाईल, ६३ ज्या ह्या तोंडाचे ओंठ मी तांबुलानें रंगवितों, हंस-तांना दांत दाखवितो, व ज्याच्या योगानें मला उत्तम भाषण करतां येतें; ६४ त्याच या तोंडाला लाळेचा लोंढा येईल, व दातांस कटदाढा पडतील; ६५ कर्ज झाल्यावर शेतकी जशी बुडते, किंवा पावसाच्या झडींत जनावरें उठावणीस येतात, तशी जीभ कांहीं केल्यानें उचलणार नाहीं, ६६ जशीं वाळलेल्या गवताचीं कुसळें वाऱ्यानें उडून जातात, तशी दशा दाढीचे केसांस येऊन लहान मुलें तीं उपटावयास लागतील. ६७ आषाढ महिन्यांतील पावसाच्या झडीनें ज्याप्रमाणें पर्वतांचीं शिखरें पाझरतात, त्याप्रमाणें शरीरा-वरील खवंदांतून पाझर सुटतील. ६८ तोंडांतून शब्दांचा उच्चार होणार नाहीं, व कानांनीं स्पष्ट ऐकूं येणार नाहीं, अशी या शरीराची वृद्ध माकडाप्रमाणें स्थिति होईल. ६९ शेतांतील पांखराकरितां उभें केलेलें गवताचें बुजगावणें जसें वाऱ्यानें सहज हालतें, तसें सर्वांग सहज हालूं लागेल, ५७० पायात पाय अडकतील, व हात कांपूं लागतील, याप्रमाणें सर्व शरीराच्या चेष्टांचें सोंग होईल। ७१ मलमूत्रद्वारेंही फुटक्या भांड्यां-सारखीं होऊन आपल्या अवसानाबाहेर जातील आणि माझा अंत केव्हां होईल म्हणून जवळची मंडळी देवास नवस करतील। ७२ माझी अशी अवस्था पाहून जग माझा धिक्कार करील, मृत्यु लवकर येणार नाहीं, आणि सोयऱ्याधायऱ्यांना माझा कंटाळा येईल. ७३ बायका मला पिशाच म्हणतील, आणि ( तें ऐकून ) मुलांना माझी फार भीति वाटेल. फार काय सांगावें। मी सर्व प्रकारें लोकांना चिळस येण्यास पात्र होईन. ७४ खोकल्याची

पात्र होईन ॥ ७४ ॥ उंभळींचा उजगरा । शेजालिया सोइलियाँ घरा । शिणवील म्हणती म्हातारा । बहुतांतें हा ॥७५॥ ऐसी वार्धक्याची सूचणी । आपणिया तरुणपणीं । देखे मग मनीं । विटे जो गा ॥ ७६ ॥ म्हणे पाहे हें येईल । आणि आतांचें भोगितां जाईल । मग काय उरेल । हितालागीं ॥ ७७ ॥ म्हणोनि नाइकणें पावे । तंव आइकोनि घाली आघवें । पंगु न होतां जावें । तेथूनियां ॥ ७८ ॥ दृष्टि जंव आहे । तंव पाहावें तेतुलें पाहे । मूकत्वा आधीं वाचा वाहे । सुभाषितें ॥ ७९ ॥ हात होती खुळे । हें पुढील मोटकें कळे । तंव करूनि घाली सकळें । दानादिकें ॥ ५८० ॥ ऐसी दशा येईल पुढें । तैं मन होईल वेडें । तंव चिंतूनि ठेवी चोखडें । आत्मज्ञान ॥ ८१ ॥ जैं चोर पाहे झोंबती । तंव आजचि रुसिजे संपत्ती । कां झांकाझाकी वाती । नें[6] वचतां कीजे ॥ ८२ ॥ तैसें वार्धक्य यावें । मग जें वायां जावें । तें आतांचि आघवें । सवतें करी ॥ ८३ ॥ आतां मोडूनि ठेलीं दुर्गें । कां वळिंतें धरिलें खगें । तेथ उपेक्षूनि[10] जो निगे । तो नागवला कीं ॥ ८४ ॥ तैसें वृद्धाप्य होय । आलेपण वायां जाय । जे तो शैंतवृद्ध आहे । नेणों कैंचा ॥ ८५ ॥ झाडिलींचि कोळें[12] झाडी । तया न फळे जेविं बोंडी । जाहला अग्नि तरी राखोंडी । जाळील काई ॥ ८६ ॥ म्हणोनि वार्धक्याचेनि आठवें । वैंर्धक्या जो नैंगवे । तयाच्या ठायीं जाणावें । ज्ञान आहे ॥ ८७ ॥ ( ५९४. व्याधींचा विचार, ५८८-५८९ ) तैसेंचि नाना रोग । पडिघैंाती ना जंव पुढां आंग । तंव आरोग्याचे उपेगें । करूनि घाली ॥८८॥ सापाच्या तोंडीं । पडिली जे उंडी । ते लाहूनि सांडी । प्रबुद्ध[16] जैसा ॥८९॥ ( ५९५. जरादिकांविषयीं दोषदर्शन, ५९०–५९२ ) तैसा वियोगें जेणें दुःखें । विपत्ति शोक पोखे[17] । तें स्नेह सांडूनि सुखें । उदासु होय ॥ ५९० ॥ आणि जेणें जेणेंकडे । दोष सूतील तोंडें । तयां कर्मरंध्रीं गुंडे । नियमाचे दाटी ॥ ९१ ॥ ऐसऐसिया आईती । जयाची परी असती । तोचि तो ज्ञानसंपत्ती । गोसावी गा ॥ ९२ ॥ ( ५९६. आसक्ति, ५९३–६०० ) अवतरणः—आता आणीकही एक । लक्षण अलौकिक । सांगेन आइक । धनंजया ॥ ९३ ॥

असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।
नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥

अन्वयः—असक्तिः, पुत्रदारगृहादिषु अनभिष्वंगः च इष्टानिष्टोपपत्तिषु नित्यं समचित्तत्वम् ॥९॥

तरि जो या देहावरी । उदासू ऐसिया परी । उखितो जैसा बिढारीं ।

---

१ खोकल्याची उभळ. २ जागरण. ३ निजलेले. ४ उद्या. ५ दूर करतो. ६ गेला नाहीं तोंच. ७ वाटेंत पुष्कळ लागतात. ८ माघार. ९ पश्यानीं. १० सर्व बाजूस ठेवून. ११ शतायु. १२ विळाचीं झाडें. १३ जो वार्धक्याच्या सपाट्यात सापडत नाहीं. १४ आसणें. १५ उपाय. १६ शहाणा. १७ वाढवितो. १८ आगणूक. १९ वाटसरू.

उभळ रात्रभर ऐकून शेजारीपाजारी व सोयरेधायरे म्हणूं लागतील' कीं, हा म्हातारा कितीकांना त्रास देईल न कळे ! ७५ याप्रमाणें म्हातारपणीं आपली स्थिति होईल, असें मनांत आणून जो तारुण्यातच त्या स्थितीबद्दल मनांत खंती बाळगतो, ७६ व असें म्हणतो कीं, पुढें आपल्यास म्हातारपण येईल; तर हल्लींचें तारुण्य विषयोपभोगांत गेलें असतां आपल्यास कोणती गोष्ट हितावह होईल ! ७७ म्हणून कान बधिर झाले नाहींत तोंपर्यंतच ( आत्मानात्मविचाराच्या ) सर्व गोष्टी ऐकून घेतो; आणि जोंपर्यंत शरीर स्वाधीन आहे तोंपर्यंतच तीर्थयात्रा करून घेतो; ७८ दृष्टि शाबूद आहे, तोंपर्यंतच जितकीं देवस्थानें वगैरे पाहवतील तितकीं पाहून घेतो; आणि जोंपर्यंत वाणी कायम आहे तोंपर्यंतच ईश्वराचे गुणानुवाद गाऊन घेतो; ७९ पुढें आपले हात लुळे होतील हें ओळखून, ते शाबूत आहेत तोंच सर्व दानधर्म करून घेतो; ५८० याप्रमाणें पुढें दशा आल्यावर मन शुद्धीवर राहणार नाहीं म्हणून शुद्ध आत्मज्ञानाचा पूर्ण विचार करून ठेवतो; ८१ उद्यां आपल्यास चोर लुटतील असें समजून जो आजच आपले जवळील संपत्तीची व्यवस्था लावून अलिप्त राहतो, किंवा दिवा जाण्याच्यापूर्वी सर्व जिनसा व्यवस्थित ठेवतो, ८२ त्याप्रमाणें म्हातारपण आल्यावर ( तारुण्यांत ज्ञानप्राप्ति न करून घेतल्यामुळें जे जन्ममृत्यूंच्या फेऱ्यांत पडून ) व्यर्थ जावें, त्यापेक्षा (जन्ममृत्यु देणाऱ्या) सर्व गोष्टी आपल्यापासून दूर कराव्या. ८३ ज्या वाटेंत पुष्कळ डोंगर, किल्ले वगैरे आहेत असें समजून, किंवा पक्षी आपापल्या घरट्यांकडे परत जात आहेत तेव्हां संध्याकाळ झाली असें समजून, जो आपल्याजवळ कांहींएक ऐवज न घेतां सडा जातो, त्यास चोर कसे लुटतील ? ८४ त्याप्रमाणें अशा ज्ञान्याला, तो इतर अज्ञान्याप्रमाणें ' शंभर वर्षे आयुष्य आहे ' असें समजत नाहीं. म्हणून म्हातारपण आलें असतां म्हातारपणच उलट परत जातें; ८५ तिळाच्या झाडाचीं झाडलेलीं बोंडें पुनः झाडलीं तरी जसे तीळ सांपडावयाचे नाहींत; अथवा राख झाल्यावर मग पुनः अग्नि कसा जाळील ? ८६ म्हणून आपल्याला पुढें वृद्धापकाल येईल असें जाणून जो त्याच्या सपाट्यांत सांपडत नाहीं, त्याच्याच ठिकाणीं ज्ञान आहे असें समजावें. ८७ त्याचप्रमाणें, नाना प्रकारचे रोग जोंपर्यंत या शरीरास जडले नाहींत, तोंपर्यंतच शरीराचें आरोग्य राहण्याकरितां उपाय करितो; ८८ ज्याप्रमाणें सापाच्या तोंडांतून पडलेली पिठाची उंडी शहाणा मनुष्य टाकून देतो, ८९ त्याप्रमाणें, ज्या प्रेमाच्या वियोगापासून दुःख, विपत्ति व शोक प्राप्त होतात, त्या देहाचा स्नेह टाकून जो उदास वृत्तींत राहतो; ५९० आणि ज्या ज्या योगानें आपल्याला दोष लागतील, तीं कर्मे करीत नाहीं; व कर्मेंद्रियाच्या मार्गांनीं दोष आत जाऊं नयेत म्हणून नियमरूपी धोंडे आड बसवून त्या वाटा बंद करतो. ९१ याप्रमाणें जो वागतो, तोच ज्ञानसंपन्न पुरुष असें समज. ९२ आतां अर्जुना, तुला ( त्या ज्ञानवंताचें ) आणखी एक अलौकिक लक्षण सांगतों, तें ऐक. ९३

श्लोकार्थः—सर्वत्र उदासीनता, पुत्र, स्त्री, गृह इत्यादिकांच्या ठिकाणीं पूर्ण अनासक्ति आणि इष्ट अथवा अनिष्ट कांहीं प्राप्त झालें तरी आपल्या चित्ताची समता नेहमीं कायम ठेवणें; ॥ ९ ॥

हें पहा कीं, जो आपल्या शरीराविषयीं उदास असतो; जसा एक वाटसरू दुसऱ्या

बैसला आहे ॥ ९४ ॥ कां वृक्षाची साउली । वाटे जाता मीनली । घरावरी तेतुली । आस्था नाहीं ॥ ९५ ॥ साउली[2] सरिसीच असे । परी असे हें नेणिजे जैसें । स्त्रियेचें तैसें । लोलुप्य नाहीं ॥ ९६ ॥ आणि प्रजा जे जाली । तियें वस्ती कीर आलीं । कां गोरुवें बैसलीं । रुखातळीं ॥ ९७ ॥ जो संपत्तीमाजि असतां । ऐसा गमे पांडुसुता । जैसा कां वाटे जातां । साक्षी ठेविला ॥ ९८ ॥ किंबहुना पुंसा । पांजरियामाजि जैसा । वेदाज्ञेसी तैसा । बिहुनि असे ॥ ९९ ॥ येऱ्हवीं दारा-गृहपुत्रीं । नाहीं जया मैत्री । तो जाण पां धात्री[6] । ज्ञानासि गा ॥६००॥ ( ५९७. समचित्तता इष्टानिष्टाविपर्यी, ६०१–६०३ ) महासिंधू जैसें । ग्रीष्म[7] वर्षे सरिसें । ईष्टानिष्ट तैसें । जयाच्या ठायीं ॥ १ ॥ कां तिन्ही काळ होतां । त्रिधा नव्हे सविता । तैसा सुखदुःखीं चित्ता । भेदु नाहीं ॥ २ ॥ जेथ नभाचेनि पाडें । समत्वा न्यून न पडे । तेथ ज्ञान रोकडें । वोळख तूं ॥ ३ ॥

मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।
विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥

अन्वयः--मयि च अनन्ययोगेन अव्यभिचारिणी भक्तिः, विविक्तदेशसेवित्वं, जनसंसदि अरतिः; ॥ १० ॥

( ५९८. अनन्यभक्ति, ६०४-६११ ) आणि मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटें नाहीं । ऐसा निश्चयोचि तिहीं[10] । जयाचा केला ॥ ४ ॥ शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा कोशें[11] । एक मीवांचूनि वींस[12] । न पाहती आन ॥ ५ ॥ किंबहुना निकट निजें[13] । जयाचें जाहलें मज । तेणें आपणयां आम्हां सेज । एकी केली ॥ ६ ॥ रिगतां वल्लभापुढें । नाहीं आंगीं जीवीं साकडें । तिये कांते-चेनि पाडें । ऐंकसरला[14] जो ॥ ७ ॥ मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें । मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ॥ ८ ॥ सूर्याच्या होण्या होइजे । कां सूर्यासवेंचि जाइजे । हें विकलेपणें साजे । प्रभेसि जेवीं ॥ ९ ॥ पैं पाणियाचिये भूमिके । पाणी तळपे[16] कौतुकें । ते लहरी म्हणती लौकिकें । येऱ्हवीं तें पाणी ॥ ६१० ॥ जो अनन्यु यापरी । मी जाहलाही मातें वरी । तोचि तो मूर्तधारी । ज्ञान पैं गा ॥ ११ ॥ ( ५९९. एकांतवास, ६१२–६१३. ) आणि तीर्थें धौतें[17] तटें । तपोवनें चोखटें । आवडती कैंपाटें । वसवूं जया ॥ १२ ॥ शैलें-कक्षांचीं कुहरें । जळाशयें-परिसरें । अधिष्ठी[21] जो आदरें । नगरा न ये ॥ १३ ॥ ( ६००.

१ सांपडली. २ पडछाया. ३ प्रेम. ४ गुरें. ५ राघू. ६ ठिकाण. ७ ग्रीष्मऋतु व वर्षाऋतु. ८ लाभ व हानि. ९ आकाशाप्रमाणें. १० काया, वाचा व मन या तिहींनीं. ११ तीर्थ; शपथ. १२ वाट. १३ मन. १४ अनुसरला. १५ ऐक्य. १६ हालतें. १७ पवित्र. १८ गुहा. १९ पर्वतांच्या. २० सरोवराच्या कांठचीं ठिकाणें. २१ आश्रय करतो.

वाटसरानें आपले स्वाधीन कांहीं वेळ केलेलें गाठोडें अभिलाप न धरितां तो वाटसरू परत येईपर्यंत जतन करितो; ९४ किंवा वाटेनें जातांना ऊन टाळण्याकरितां ज्याप्रमाणें एखादा मनुष्य झाडाचे सावलींत बसतो, तितकीसुद्धां आस्था ज्याची घराविषयीं नसते; ९५ ज्याप्रमाणें मनुष्याची पडछाया त्याचेबरोबर असूनही ती आहे हें त्याच्या गांवींही नसतें, त्याप्रमाणें ( नेहमीं सन्निध असणाऱ्या ) स्त्रीविषयीं ज्याला प्रेम वाटत नाहीं; ९६ बरें, ( संततीविषयीं म्हटलें तर ती ) संतति म्हणजे ज्याप्रमाणें वाटसरू धर्मशाळेंत वस्तीस राहतात, किंवा गुरें दोनप्रहरीं झाडाखालीं सावलींत बसतात, त्याप्रमाणें मानतो; ९७ अर्जुना, जो श्रीमंत असतांनाही, ज्याप्रमाणें कोणी मनुष्य वाटेनें जातांना रस्त्यांतील एखाद्या गोष्टीविषयीं केवळ साक्षिभूत असतो त्याप्रमाणें संपत्तीविषयीं उदास असतो; ९८ किंवा पिंजऱ्यांतील राघू जसा बाळगणाराच्या आज्ञेंत वागतो, त्याप्रमाणें जो वेदाचें उल्लंघन करीत नाहीं; ९९ बाकी स्त्री, पुत्र, घर यांजविषयीं जो प्रीति बाळगीत नाहीं, तो ज्ञानाचें अधिष्ठान आहे असें जाण. ६०० समुद्र जसा ग्रीष्मकाळीं कमी होत नाहीं, व वर्षाकाळीं वाढतही नाहीं, तशी ज्याला लाभ व हानि यांपासून बाधा होत नाहीं; १ किंवा तिन्ही कालांत सूर्याचे ज्याप्रमाणें तीन प्रकार होत नाहींत, त्याप्रमाणें ज्याच्या मनाला सुखदु:खापासून भेद होत नाहीं, २ आणि ज्याच्या ठिकाणीं आकाशाप्रमाणें समतेंत कमीपणा पडत नाहीं, त्याचे ठिकाणीं ज्ञान प्रत्यक्ष वास करीत आहे असें समज. ३

श्लोकार्थः—आणि माझ्या ठिकाणीं अनन्यभावेंकरून निर्दोष भक्ति असणें, एकांतांत राहण्याची आवड असणें, व लोकसमुदायांत राहण्याची आवड नसणें; ॥ १० ॥

ज्यानें कायावाचामनेंकरून असा निश्चय केला आहे कीं, मज ईश्वरावांचून या जगतांत दुसरी चांगली वस्तु नाहीं. ४ ज्याच्या शरीरानें, वाचेनें व मनानें अशा कृतनिश्चयाची शपथ वाहिली आहे कीं, या जगतांत माझ्यावांचून दुसरें कांहीं नाहीं; ५ फार काय सांगावें ? ज्यानें आपलें मन माझ्या स्वरूपीं लीन केलें, त्यानेंच आपलें व माझें ऐक्य केलें. ६ ज्याप्रमाणें आपले पतीशीं समागम करण्यास जातेवेळीं स्त्रीचे मनांत मुळींच शंका येत नाहीं, त्याप्रमाणें माझ्याबरोबर ऐक्य करण्यास ज्याला शंका येत नाहीं; ७ ज्याप्रमाणें गंगा समुद्रास एकदां मिळाल्यावरही त्यांतच मिळून असते, त्याप्रमाणेंच माझें ऐक्य पावल्यावरही जे सर्वभावेंकरून मलाच भजतात; ८ सूर्याचे प्रभेचा सूर्याबरोबर उदय होतो, व अस्ताबरोबर लय होतो, हें ऐक्य जसें प्रभेसच शोभतें; ९ तसेंच वाऱ्यानें पाण्यावर जें पाणी उसळून वर येतें, त्यास लोक लाटा असें म्हणतात; परंतु पाहूं गेलें असतां तें खरोखर पाणीच असतें; ६१० याप्रमाणें एकनिष्ठ होऊन जो माझी सेवा करतो, तोच मूर्तिमंत ज्ञान होय. ११ अशा मनुष्यास पवित्र तीर्थें, उत्तम तपोवनें व गुहा या ठिकाणीं राहण्याची आवड असते. १२ पर्वताच्या गुहा व सरोवरांचीं तीरें या

ठिकाणीं रहावयाची ज्याला विशेष आवड असते, व ज्यास शहरांत राहण्याचें आवडत नाहीं; १३ ज्याला एकांतवासाची फार आवड असते, व मनुष्यवस्तींत राहण्याचा कंटाळा असतो, तो ज्ञानाची मनुष्यरूपी मूर्तिच होय. १४ हे सुबुद्धिमंता, तुला ज्ञानाचीं स्पष्टीकरणार्थ आणखी काहीं लक्षणें पुढें सांगतों. १५

श्लोकार्थ:—अध्यात्मज्ञानात निमग्न असणें, व पारमार्थिक ज्ञानाचा साक्षात्कार होणें, हीं लक्षणें ज्ञानप्राप्ति करून देणारीं आहेत. म्हणून याना ज्ञान असें म्हटलें आहे; आणि याहून जें उलट तें अज्ञान होय. ॥ ११ ॥

हें पहा—परमात्मा म्हणून जी एक वस्तु आहे ती ज्या ज्ञानानें दिसते, १६ त्या एका ज्ञानाशिवाय, संसार व स्वर्ग ज्या ज्ञानापासून प्राप्त होतात तें अज्ञान आहे असें ज्याच्या मनानें पक्कें घेतलें आहे, १७ तो स्वर्गास जाण्याची इच्छा सोडून देतो, संसाराविषयीं कंटाळा करतो, व अध्यात्मज्ञानाचे ठिकाणीं भाव धरून मन लावतो. १८ ज्याप्रमाणें एखादा वाटसरू ज्या ठिकाणीं अनेक वाटा फुटतात त्या ठिकाणीं नीट शोध करून आडमार्ग सोडून सरळ राजमार्गानें जातो, १९ त्याप्रमाणें, ज्ञानमात्राविषयीं विचार करून इतर ज्ञानें टाकून देऊन आपले ज्ञान व बुद्धि अध्यात्मज्ञानाकडेसच लावतो, ६२० त्याचप्रमाणें, इतर ज्ञान भ्रांतिमूलक आहे म्हणून जो आपले मन मेरुपर्वताप्रमाणें स्थिर करून अध्यात्मज्ञानाकडेसच लावतो. २१ असा निश्चय करून, ज्याप्रमाणें आकाशांत ध्रुवनक्षत्र कायम असतें, त्याप्रमाणें अध्यात्मज्ञानाचे ठिकाणीं जो आपली बुद्धि कायम ठेवतो, २२ त्याच्याच ठिकाणीं ज्ञान वास करतें यांत शंका नाहीं आणि अशा प्रकारे त्याचे मनात ज्ञान पूर्णपणें बिंबल्याबरोबर तो मद्रूप होतो. २३ ज्याप्रमाणें कोणी मनुष्य जेवणाकरितां पानावर बसला असतां ( जेवण्यास सुरवात केल्याशिवाय ) तो जेवावयास बसला असें म्हणतां येत नाहीं, त्याप्रमाणें, ज्ञानाचे प्राप्तीची इच्छा झाल्यावर ज्ञान मिळाल्याशिवाय त्याला ज्ञानी असें नांव प्राप्त होत नाहीं, २४. आणि तत्त्वज्ञानापासून जें एक फल प्राप्त होतें, तें ज्ञेय होय. त्यावर जो आपली पूर्ण दृष्टि ठेवितो. २५ येऱ्हवीं ज्ञानाचा लाभ झाल्यावर जर ज्ञेय हातीं लागलें नाहीं, तर ज्ञानाचा लाभ होऊनही न झाल्याप्रमाणें आहे। २६ अंधळ्यानें हातीं दिवा घेतला असतां त्याचा त्याला काय उपयोग आहे? त्याप्रमाणें ज्ञानाचा नुसता निश्चय करून ( जर आत्मदर्शन झालें नाहीं, तर तें ) व्यर्थ होय. २७ जर ज्ञानाचे प्रकाशानें परमात्म्याची प्राप्ति होत नाहीं, तर ती बुद्धि अंधळ्याप्रमाणें निरर्थक होय. २८ म्हणून, त्या ज्ञानानें जिकडे पहावें तिकडे परमात्माच दृष्टीस पडतो. तें ज्ञान प्राप्त व्हावें अशी ज्याला चांगली बुद्धि झाली आहे, २९ म्हणून त्या निर्दोष ज्ञानानें जाणावयाची वस्तु दृष्टीस पडते, त्याच ज्ञानानें जो संपन्न झाला आहे, ६३० अशा प्रकारें ज्याच्या ज्ञानाला चोहोंकडे ज्ञेयाशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं, तो ज्ञानी आहे असें शब्दांनीं वर्णन करण्याचे कारण नाहीं. ३१ ज्याची बुद्धि ज्ञानाचे प्रकाशाबरोबर ज्ञेयास झोंबते, तो

अरति–जनाची, ६१४. ) बहु एकांतावरी प्रीति । जया जनपदांची खंती । जाण मनुष्याकारें मूर्ती । ज्ञानाची तो ॥ १४ ॥ अवतरण:—( ६०१. अध्यात्मज्ञानाचें नित्यत्व, ६१५–६२३.) आणिकही पुढती । चिन्हें गा सुमती । ज्ञानाचिये निरुती-। लागीं सांगों ॥ १५ ॥

अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्वज्ञानार्थदर्शनम् ।
एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥

अन्वयः—अध्यात्मज्ञाननित्यत्वं, तत्वज्ञानार्थदर्शनं, एतत् ज्ञानं इति प्रोक्तं; यत् अतः अन्यथा ( तत् ) अज्ञानं ( प्रोक्तं ) ॥ ११ ॥

तरी परमात्मा ऐसें । जें एक वस्तु असे । तें जया दिसे । ज्ञानास्तव ॥ १६ ॥ तें एकवांचूनि आनें । जियें भवस्वर्गादि ज्ञानें । तें अज्ञान ऐसा मनें । निश्चयो केला ॥ १७ ॥ स्वर्गा जाणें हें सांडी । भवविषयीं कान झाडी । दे अध्यात्मज्ञानीं बुडी । सद्भावाची ॥ १८ ॥ भंगलियें[३] वाटे । शोधूनियां अव्हांटे[४] । निघिजे[५] जेवीं निटें । राजपंथें ॥ १९ ॥ तैसें ज्ञानजाता करी । आघवेंचि एकीकडे सारी । मग मन बुद्धि मोहरी[६] । अध्यात्मज्ञानीं ॥ ६२० ॥ म्हणे एक हेचि आथी । येर जाणणें ते भ्राती । ऐसी निकुरेंसीं[७] मती । मेरु होय ॥ २१ ॥ एवं निश्चयो जयाचा । द्वारीं अध्यात्मज्ञानाचा । ध्रुव देवो गगनींचा । तैसा राहिला ॥ २२ ॥ तयाचिया ठायीं ज्ञान । या बोला नाहीं आन । जे ज्ञानीं बैसलें मन । तेव्हांचि तो मी ॥ २३ ॥ ( ६०२. बोलण्यानें ज्ञान होत नाहीं, ६२४. ) तरि बैसलेपणें जें होये । तें बैसतांचि बोलें न होये । तरि ज्ञाना तया आहे । सरिसा पाडु ॥ २४ ॥ ( ६०३. अध्यात्मज्ञानानेंच तत्त्वदर्शन, ६२५ ) आणि तत्त्वज्ञान निर्मळ । फळे जें एक फळ । तें ज्ञेयहीं वरी सरळ । दिठी जया ॥ २५ ॥ ( ६०४. अंधज्ञान, ६२६-६२८ ) येऱ्हवीं बोधा आलेनि ज्ञानें । जरी ज्ञेय न दिसेचि मनें । तरि ज्ञानलाभुही न मने । जाहला सांता ॥ २६ ॥ आंधळेनि हातीं दिवा । घेऊनि काय करावा । तैसा ज्ञाननिश्चयो आघवा । वायांचि जाय ॥ २७ ॥ जरि ज्ञानाचेनि प्रकाशें । परतत्त्वीं दिठी न पैसे[९] । ते स्फूर्तीचि असे । अंध होउनी ॥२८॥ ( ६०५. शुध्दबुध्दि, ६२९. ) म्हणोनि ज्ञान जेतुलें दावी । तेतुली वस्तुचि आघवी । ते देखे ऐसी व्हावी । बुद्धि चोख ॥ २९ ॥ ( ६०६. तत्त्ववेत्त्याचें महत्त्व. ६३०-६३३. ) यालागीं ज्ञानें निर्दोखें । दाविलें ज्ञेय देखे । तैसेनि उन्मेखें । आथिलीं[१२] जो ॥ ६३० ॥ जेवढी ज्ञानाची वृद्धी । तेवढीच जयाची बुद्धी । तो ज्ञान हें शब्दीं । करणें न लगे ॥ ३१ ॥ पैं ज्ञानाचिये प्रभेसवे । जयाची मति ज्ञेयीं पावे । तो

१ वस्तीची. २ संसार, ३ वाटा फुटलेल्या. ४ आडवाट. ५ जातो. ६ वळवी. ७ निश्चयानें. ८ परमात्म्याकडे. ९ पोहोंचत नाहीं. १० बुद्धि. ११ ज्ञानानें. १२ संपन्न झाला.

ठिकाणीं रहावयाची ज्याला विशेष आवड असते, व ज्यास शहरांत राहण्याचें आवडत नाहीं; १३ ज्याला एकांतवासाची फार आवड असते, व मनुष्यवस्तींत राहण्याचा कंटाळा असतो, तो ज्ञानाची मनुष्यरूपी मूर्तिच होय. १४ हे सुबुद्धिमंता, तुला ज्ञानाचीं स्पष्टीकरणार्थ आणखी कांहीं लक्षणें पुढें सांगतों. १५

श्लोकार्थ:—अध्यात्मज्ञानांत निमग्न असणें, व पारमार्थिक ज्ञानाचा साक्षात्कार होणें, हीं लक्षणें ज्ञानप्राप्ति करून देणारीं आहेत. म्हणून यांना ज्ञान असें म्हटलें आहे; आणि यांहून जें उलट तें अज्ञान होय. ॥ ११ ॥

हें पहा—परमात्मा म्हणून जी एक वस्तु आहे ती ज्या ज्ञानानें दिसते; १६ त्या एका ज्ञानाशिवाय, संसार व स्वर्ग ज्या ज्ञानापासून प्राप्त होतात तें अज्ञान आहे असें ज्याच्या मनानें पक्कें घेतलें आहे, १७ तो स्वर्गास जाण्याची इच्छा सोडून देतो, संसाराविषयीं कंटाळा करतो, व अध्यात्मज्ञानाचे ठिकाणीं भाव धरून मन लावतो. १८ ज्याप्रमाणें एखादा वाटसरू ज्या ठिकाणीं अनेक वाटा फुटतात त्या ठिकाणीं नीट शोध करून आडमार्ग सोडून सरळ राजमार्गानें जातो, १९ त्याप्रमाणें, ज्ञानमात्राविषयीं विचार करून इतर ज्ञानें टाकून देऊन आपलें ज्ञान व बुद्धि अध्यात्मज्ञानाकडेसच लावतो, ६२० त्याचप्रमाणें, इतर ज्ञान भ्रांतिमूलक आहे म्हणून जो आपलें मन मेरुपर्वताप्रमाणें स्थिर करून अध्यात्मज्ञानाकडेसच लावतो. २१ असा निश्चय करून, ज्याप्रमाणें आकाशांत ध्रुवनक्षत्र कायम असतें, त्याप्रमाणें अध्यात्मज्ञानाचे ठिकाणीं जो आपली बुद्धि कायम ठेवतो, २२ त्याच्याच ठिकाणीं ज्ञान वास करतें यांत शंका नाहीं आणि अशा प्रकारें त्याचे मनात ज्ञान पूर्णपणें बिंबल्याबरोबर तो मद्रूप होतो. २३ ज्याप्रमाणें कोणी मनुष्य जेवणाकरितां पानावर बसला असतां ( जेवण्यास सुरवात केल्याशिवाय ) तो जेवावयास बसला असें म्हणतां येत नाहीं, त्याप्रमाणें, ज्ञानाचे प्राप्तीची इच्छा झाल्यावर ज्ञान मिळाल्याशिवाय त्याला ज्ञानी असें नांव प्राप्त होत नाहीं, २४. आणि तत्त्वज्ञानापासून जें एक फल प्राप्त होतें, तें ज्ञेय होय. त्यावर जो आपली पूर्ण दृष्टि ठेवितो. २५ येऱ्हवीं ज्ञानाचा लाभ झाल्यावर जर ज्ञेय हातीं लागलें नाहीं, तर ज्ञानाचा लाभ होऊनही न झाल्याप्रमाणें आहे! २६ अंधळ्यानें हातीं दिवा घेतला असतां त्याचा त्याला काय उपयोग आहे? त्याप्रमाणें ज्ञानाचा नुसता निश्चय करून ( जर आत्मदर्शन झालें नाहीं, तर तें ) व्यर्थ होय. २७ जर ज्ञानाचे प्रकाशानें परमात्म्याची प्राप्ति होत नाहीं, तर ती बुद्धि अंधळ्याप्रमाणें निरर्थक होय. २८ म्हणून, त्या ज्ञानानें जिकडे पहावें तिकडे परमात्माच दृष्टीस पडतो. तें ज्ञान प्राप्त व्हावें अशी ज्याला चांगली बुद्धि झाली आहे, २९ म्हणून त्या निर्दोष ज्ञानानें जाणावयाची वस्तु दृष्टीस पडते, त्याच ज्ञानानें जो संपन्न झाला आहे, ६३० अशा प्रकारें ज्याच्या ज्ञानाला चोहोंकडे ज्ञेयाशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं, तो ज्ञानी आहे असें शब्दांनीं वर्णन करण्याचें कारण नाहीं. ३१ ज्याची बुद्धि ज्ञानाचे प्रकाशाबरोबर ज्ञेयास झोंबते, तो

हातधराणिया शिवे । परतत्त्वातें ॥ ३२ ॥ तोचि ज्ञान हें बोलतां । विस्मयो कवण पांडुसुता । काय सवितयातें सविता । म्हणावें असे ॥ ३३ ॥ ( ६०७. श्रोते ज्ञानेश्वरांचें वर्णन करतात; काव्य, ६३४—६४७ ) तंव श्रोते म्हणती असो । न संगें तयाचा अतिसो । ग्रंथोक्ति तेथ आडसो । घालिसी कां ॥ ३४ ॥ तुझा हाचि आम्हां थोरु । वक्तृत्वाचा पाहुणेरु । जे ज्ञानविषो फारु । निरोपिला ॥ ३५ ॥ रसु होआवा अतिमात्रु । हा घेतासि कविमंत्रु । तरी आवंतूनि शेत्रु । करितोसि कां गा ॥ ३६ ॥ ठोयीं बैसातिये वेळे । जे रससोय घेऊनि पळे । तियेचा येरु वोडँव मिळे । कोण्या अर्था ॥ ३७ ॥ आघवांचि विषयीं भादी । परि सांजवणीं टेकों नेदी । ते खुंरखोडी तुसधी । पोषी कवण ॥ ३८ ॥ तैसी ज्ञानीं मति न फांके । येर जैल्पती नेणों कौतुकें । परि तें असो निकें । केलें तुवां ॥ ३९ ॥ जया ज्ञानलेशोद्देशें । कीजती योगादि सायासें । तें धेणीचें आणि तुझिया ऐसें । निरूपण ॥ ६४० ॥ अमृताची सौंतवांकुडी । लागो कां अनुघडी । सुखाच्या दिवसकोडी । गणिजेतु का ॥ ४१ ॥ पूर्णचंद्रेसीं राती । युग एक असोनि पाहाती । तरि काय न पाहात आहाती । चकोर ते ॥ ४२ ॥ तैसें ज्ञानाचें बोलणें । आणि येणें रसाळपणें । आतां पुरे कोण म्हणे । आकर्णितां ॥ ४३ ॥ आणि सभाग्यु पाहुणा ये । सुभगाचि वाढती होये । तैं सरों नेणे रससोये । ऐसें आथी ॥४४॥ तैसा जाहला प्रसंगु । जे ज्ञानीं आम्हांसि लगू । आणि तुजही अनुरागु । आथि तेथ ॥ ४५ ॥ म्हणोनि यया व्याख्याना- । पासीं से आली चौगुणा । न म्हणों नयेसी देखणा । होसी ज्ञानी ॥ ४६ ॥ तरी आतां ययावरी । प्रज्ञेच्या माजघरीं । पदें साच करीं । निरूपणीं ॥ ४७ ॥ ( ६०८. श्रोत्यांची आज्ञा मान्य, ६४८—६४९ ) या संतवाक्यासरिसें । म्हणितलें निवृत्तिदासें । माझेंही जी ऐसें । मनोगत ॥ ४८ ॥ यावरी आतां तुम्हीं । आज्ञापिला स्वामी । तरि वायां वाग्जाळ मी । वाढों नेदीं ॥ ४९ ॥ ( ६०९. मागील विषयाचा अनुवाद, ६५०—६५२ ) एवं इयें अवधारा । ज्ञानलक्षणें अठरा । श्रीकृष्णें धनुर्धरा । निरूपिलीं ॥ ६५० ॥ मग म्हणे या नांवें । ज्ञान एथ जाणावें । हें स्वमत आणि आघवें । ज्ञानियेही म्हणती ॥ ५१ ॥ करतळावरी वाटोळा । डोळतु देखिजे आंवळा । तैसें ज्ञान आम्हीं डोळां । दाविलें तुज ॥ ५२ ॥ ( ६१०. अज्ञान, ६५३—६५६, ) आतां धनंजया

१ हातोहात. २ अडथळा. ३ आमंत्रण करून. ४ अवगुण. ५ पानावर. ६ स्वयंपाक. ७ आदर. ८ चागली. ९ धार काढते वेळीं. १० लाथाळ गाय. ११ वल्गना करतात. १२ तृप्ति देणारें. १३ सात दिवसाची झड. १४ उघाडीशिवाय. १५ मोजील काय ! १६ ऐकताना. १७ श्रीमंत. १८ सुग्रण. १९ आवड. २० उत्सुकता. २१ बळ. २२ बुद्धीच्या. २३ ज्ञानाचीं अठरा लक्षणें. २४ बडबड.

हातोहात परतत्त्वाची प्राप्ति करून घेतो; ३२ अर्जुना, तोच ज्ञानरूप आहे असें म्हटलें असतां त्यांत आश्चर्य तें कोणतें ? हें पहा, सूर्याला सूर्य असें म्हणावें लागतें काय ? ३३ तेव्हां श्रोते म्हणूं लागले, " आतां ज्ञानाविषयीं अधिक स्पष्टीकरण करण्याचें कारण नाहीं, मग गीतेचा अर्थ सांगण्याच्या आड कां येतोस ? ३४ तूं आम्हांस ज्ञानाविषयीं पूर्णपणें माहिती करून दिलीस, हा तुझे वक्तृत्वाचा आम्हास मोठा लाभ झाला । ३५ इतर कवि कोणत्याही वस्तूचें वर्णन करूं लागले असतां त्या वस्तूविषयीं वर्णन न करतां तिच्या उपांगांविषयीं मोठ्या कौतुकानें फाजील वर्णन करितात, हा कवीचा मंत्र तूं आपले वर्तनांत आगंतुकाप्रमाणें कां घुसडतोस ? ३६ एखाद्यानें जेवावयास बोलावून व पाटरांगोळ्यांचा थाट करून, मंडळी पानावर बसल्यावर जर तयार असलेलें अन्न त्या ठिकाणावरून लांबविलें, तर त्यानें बोलाविलेल्या मंडळीचें आणखी कितीही आदरातिथ्य केलें तरी त्यांना त्याचा काय उपयोग ? ३७ सर्व गुणांनीं युक्त असून जी गाय धार काढतेवेळीं कासेंत हात घालूं न देतां लाथा मारते, तिला फुकट कोण बाळगील ? ३८ त्याप्रमाणें, ज्ञानाविषयीं न बोलतां इतर कवि हवें तेवढें वर्णन करितात, तसं तूं न करतां आम्हांला खऱ्या ज्ञानाची पूर्णपणें ओळख करून दिलीस. ३९ ज्या ज्ञानाच्या थोड्या प्राप्तीकरितां लोक योगादि साधनें मोठ्या कष्टानें करतात, तें ज्ञान तूं उत्तम प्रकारें समजून सांगितल्यामुळें आमचे मनाची तृप्ति झाली. ६४० अमृताच्या वृष्टीचें जरी सारखें सातरें लागलें, तरी त्याला कोणी कंटाळेल काय ? व सुखाचे कोट्यवधि जरी दिवस गेले, तरी ते मोजीत बसून त्यांचा कोणी कंटाळा करतील काय ? ४१ पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें चांदण्याच्या एक युगभर जरी रात्री गेल्या तरी चकोर पक्षी चंद्राकडे पहाण्यास कंटाळतील काय ? ४२ त्याप्रमाणें, ज्ञानाविषयीं तुझ्यासारखा रसाळ वर्णन करणारा भेटल्यावर तें ऐकण्याचा कोण कंटाळा करील ? ४३ आणि श्रीमान पाहुण्याला चतुर वाढणारीण असल्यावर त्याला जेवण पुरेसें होणार नाहीं, व तिलाही आपण केलेले पदार्थ संपूं नयेत असें वाटेल, ४४ त्याचप्रमाणें आजचा हा प्रसंग आहे. कारण, आम्हांला ज्ञानप्राप्तीची आवड असून तुलाही तें सांगण्याविषयीं उत्सुकता आहे. ४५ या कारणामुळें तुझ्या व्याख्यानास चौपट बळ आलें आहे. तर तुला आम्ही ' ज्ञानाविषयीं तूं परिपूर्ण आहेस ' असें म्हटल्यावांचून कसे राहूं ? ४६ तर आता यापुढें, बुद्धीचे माजघरांत, ज्ञानाच्या ( अठरा लक्षणां- ) विरुद्ध जें अज्ञान त्याचें वर्णन कर. " ४७ हें संतांचें भाषण ऐकल्यावर, निवृत्तिमहाराजांचे दास ज्ञानदेव म्हणाले कीं, माझेही मनात असेंच आहे. ४८ तशात, गुरो ! तुम्हीं मला आज्ञा केली; तेव्हां आतां मी व्यर्थ बडबड करीत नाहीं. ४९ हें पहा, याप्रमाणें श्रीकृष्णांनीं अर्जुनास ज्ञानाचीं अठरा लक्षणें सांगितलीं. ६५०. मग म्हणाले, हीं लक्षणें ज्याचे ठिकाणीं दृष्टीस पडतील, त्याचे ठिकाणीं ज्ञान वास करतें असें माझें मत असून इतर ज्ञानीही असेंच म्हणतात. ५१ आम्ही तुला तळहातावरील आंवळ्या-

होतधराणिया शिवे । परतत्त्वातें ॥ ३२ ॥ तोचि ज्ञान हें बोलतां । विस्मयो कवण पांडुसुता । काय सवितयातें सविता । म्हणावें असे ॥ ३३ ॥ ( ६०७. श्रोते ज्ञानेश्वरांचें वर्णन करतात; काव्य, ६३४–६४७ ) तंव श्रोते म्हणती असो । न संगें तयाचा अतिसो । ग्रंथोक्ति तेथ आडसो । घालिसी कां ॥ ३४ ॥ तुझा हाचि आम्हां थोरु । वक्तृत्वाचा पाहुणेरु । जे ज्ञानविषो फारु । निरोपिला ॥ ३५ ॥ रसु होआवा अतिमात्रु । हा घेतासि कविमंत्रु । तरी आवंतूनि शेंत्रु । करितोसि कां गा ॥ ३६ ॥ ठोर्यी वैसातिये वेळे । जे रसलोय घेऊनि पळे । तियेचा येरु वोडैव मिळे । कोण्या अर्था ॥ ३७ ॥ आघवांचि विषयीं भादी । परि सांजवर्णी टेकों नेदी । ते खुंरखोडी नुसधी । पोषी कवण ॥ ३८ ॥ तैसी ज्ञानीं मति न फांके । येर जैल्पती नेणों कौतुकें । परि तें असो निकें । केलें तुवां ॥ ३९ ॥ जया ज्ञानलेशोद्देशें । कीजती योगादि सायासें । तें धैणीचें आणि तुझिया ऐसें । निरूपण ॥ ६४० ॥ अमृताची सौंतवांकुडी । लागो कां अैनुघडी । सुखाच्या दिवसकोडी । गणिजैतु का ॥ ४१ ॥ पूर्णचंद्रेसीं राती । युग एक असोनि पाहाती । तरि काय न पाहात आहाती । चकोर ते ॥ ४२ ॥ तैसें ज्ञानाचें बोलणें । आणि येणें रसाळपणें । आतां पुरे कोण म्हणे । आंकाणींतां ॥ ४३ ॥ आणि सैंभाग्यु पाहुणा ये । सुंभगाचि वाढती होये । तें सरो नेणे रससोये । ऐसें आथी ॥४४॥ तैसा जाहला प्रसंगु । जे ज्ञानीं आम्हांसि लैंगू । आणि तुजही अैनुरागु । आथि

दाखविलें. ५२ हे महाबुद्धिमंता अर्जुना, आतां अज्ञान ज्याला
ा लक्षणांसह स्पष्ट करून सांगतों. ५३ धनंजया, ज्ञान
ज आोळखतां येतें. कारण, जें ज्ञान नव्हे तेंच अज्ञान होय.
ल्यावर मग रात्रीचीच पाळी उरते. कारण रात्र व दिवस
कारच नाहीं; ५५ त्याप्रमाणें, ज्या ठिकाणीं ज्ञान नाहीं, तेंच
तथापि अज्ञानाचीं कांहीं लक्षणें तुला सांगतों. ५६ आपली
कि आपल्यास मान केव्हां देतील याची जो वाट पहात असतो,
ार केला म्हणजे संतोष पावतो; ५७ आणि गर्वानें पर्वताचे
ाऊन कधींही खालीं उतरत नाहीं, अशा पुरुषाचे ठिकाणीं
असें समज, ५८ आणि स्वधर्माचरणाविषयीं, पिंपळाची मुंज
र बाधतात त्याप्रमाणें किंवा पार बांधतात त्याप्रमाणें अथवा
त्याच्या उपयोगास येतो त्याप्रमाणें लोकांत आपले कृत-
५९ आपल्यास येत असलेल्या विद्येची आपल्या मुखानें प्रसिद्धि
घडलेल्या सत्कृत्याबद्दल लोकांत डांगोरा पिटतो; याप्रमाणें, ज्या
तिष्ठा वाढेल तीं कृत्यें नेहमीं करीत असतो; ६६० आणि
ान करून अगास अत्तर वगैरे लावून शरीर नटवितो, परंतु
वेषयीं कंटाळा करतो, तो अज्ञानाची खाण आहे असें समज.
वणवा पेटल्याबरोबर तो स्थावर जंगम याचा विचार न करतां
त्याप्रमाणें, ज्याच्या आचरणापासून सर्व जगास दु.ख होतें;
भाषण करतो तें मनुष्याचे हृदयास तीक्ष्ण पहारीचे टोंका-
सर्व बेत इतर जनास विषाहूनही घातक असतात, ६३ त्याचे
फार काय सागावें ? तो अज्ञानाचें माहेरघरच होय; आणि त्याचें
ाश्रयस्थानच होय. ६४ आणि भाता फुंकला म्हणजे जसा तो
च वारा नाहींसा झाला म्हणजे लागलीच दबतो, तसा लाभ झाला
व हानि झाली असतां लगेच दुःखमग्न होतो; ६५ वावटळींत
माणें आकाशापर्यंत उंच उडते. त्याप्रमाणें लोकांनीं स्तुति केली
तो, ६६ थेंबभर पाण्यानें ज्याप्रमाणें चिखल ओला होतो आणि
तो, त्याप्रमाणें कोणी थोडी निंदा केली असताही जो वाईट वाटून
६७ तसेंच ज्याला मान व अपमान हे दोन्ही सहन होत नाहींत, त्याचे
स करतें असें समज. ६८ जो मनात एक असून तोंडानें दुसरेंच
ास वचन देऊन त्याचे उलट दुसऱ्यास मदत करतो; ६९ पारधी
नो केवळ अपकारबुद्धीनें; त्यांत त्याचा घात करण्याचा त्याचा
णे जो एखाद्याचें पालन करितो, परंतु अंतर्यामीं त्याचा घात
७० शेवाळ्यानें लिप्त झालेली शिळा वरकांती हिरवीगार दिसते,
मक दिसतात, त्याप्रमाणें ज्याचीं कृत्ये बाह्यात्कारीं मात्र उत्तम
ठिकाणीं अज्ञान नि.संशय आहे हें तूं पक्कें समजून ठेव. .७२

महामती । अज्ञान ऐसी वदंती । तेंही सांगों व्यक्ती[१] । लक्षणेंसीं ॥ ५३ ॥ येऱ्हवीं ज्ञान फुडें जालिया । अज्ञान जाणवे धनंजया । जें ज्ञान नव्हे तें अपैसया । अज्ञानचि ॥ ५४ ॥ पाहें पां दिवसु आघवा सरे । मग रात्रीची वारी उरे । वांचूनि कांहीं तिसरें । नाहीं जेवीं ॥ ५५ ॥ तैसें ज्ञान जेथ नाहीं । तें अज्ञानचि पाहीं । तरि सांगों कांहीं कांहीं । चिन्हें तियें ॥ ५६ ॥ ( ६११. मान, ६५७–६५८ ) तरि संभावने[३] जियें । जो मानाची वाट पाहे । सत्कारें होये । तोषु जया ॥ ५७ ॥ गर्वे पर्वताचीं शिखरें । तैसा महत्त्वावरूनि नुतरे । तयाचिया ठायीं पुरें । अज्ञान आहे ॥ ५८ ॥ ( ६१२. दंभ, ६५९–६६१. ) आणि स्वधर्माची मांगळी[४] । बांधे वाचेच्या पिंपळीं । उभिला जैसा देउळीं । जाणोनि कुंचा ॥ ५९ ॥ घाली विद्येचा पसारा । सुये सुकृताचा डांगोरा । करी तेतुलें मोहरा । स्फीतीचिया ॥ ६६० ॥ आंग वरिवरी चर्ची । जनातें अभ्यर्चितां वंची[६] । तो जाण पां अज्ञानाची । खाणी एथ ॥ ६१ ॥ ( ६१३. हिंसा, ६६२–६६४ ) आणि वन्हि वनि विचरे । तेथ जळती जैसीं जंगम- स्थावरें । तैसें जयाचेनि आचारें । जगा दुःख ॥ ६२ ॥ कौतुकें जें जें जल्पे । तें सांवळाहूनि तीख रुपे । विषाहूनि संकल्पें । मारकु जें ॥ ६३ ॥ तयातें बहु अज्ञान । तो अज्ञानाचें निधान । हिंसेसि आयतन । जयाचें जिणें ॥ ६४ ॥ ( ६१४. अशांति, ६६५–६६८ ) आणि फुंकें भाता फुगे । रेचिलिया सवेंचि उफंगे[१२] । तैसा संयोगें[१३]वियोगें । चढे वोहटे ॥ ६५ ॥ पडली वारयाचिया वळसा[१४] । धुळी चढे आकाशा । हरिखें[१५] वळघे[१६] तैसा । स्तुतीवेळे ॥ ६६ ॥ निंदा मोटकी[१७] आइके । आणि कपाळ धरूनि ठाके । थेंबें विरे[१८] वारेनि शोखे[१९] । चिखलु जैसा ॥ ६७ ॥ तैसा मानापमानीं होये । जो कोणीचि ऊर्मि[२०] न साहे । तयाच्या ठायीं आहे । अज्ञान पुरें ॥ ६८ ॥ ( ६१५. अनार्जव, ६६९–६७२ ) आणि जयाचिया मनीं गांठी । वरिवरी मोकळी वाचा दिठी । आंगें मिळे जीवें पाठी । भलतया दे ॥ ६९ ॥ व्याधाचें चारा घालणें । तैसें प्रांजळ जोगेंवणें । चांगाचीं अंतःकरणें । विरु[२२] करी ॥ ६७० ॥ गार शेवाळें गुंडाळली । कां निंबोळी जैसी पिकली । तैसी जयाची भली । बाह्य क्रिया ॥ ७१ ॥ अज्ञान तयाचिया ठायीं । ठेविलें असे पाहीं । या बोला आन नाहीं । सत्य मानीं ॥ ७२ ॥ ( ६१६. गुरुसेवारहित ( निंदक ), ६७३ ) आणि गुरुकुळीं

---

१ स्पष्ट करून. २ पाळी. ३ प्रतिष्ठेसाठीं. ४ मुंज केल्यावर जो दोर बांधतात, किंवा पार बांधतात तो. ५ उभा केलेला. ६ कंटाळा करतो. ७ पहारीहून. ८ वेत. ९ घातक. १० आश्रयस्थान. ११ निघून गेला असता. १२ रिकामा होतो. १३ लाभ-हानीनें. १४ भावटळींत. १५ हर्षानें १६ फुगतो. १७ थोडी. १८ ओला होतो. १९ वाळतो. २० तरंग. २१ पालन करणें. २२ विरुद्ध. २३ शिळीं.

प्रमाणें ज्ञान स्पष्ट करून दाखविलें. ५२ हे महाबुद्धिमंता अर्जुना, आतां अज्ञान ज्याला म्हणतात तेंही त्याच्या लक्षणांसह स्पष्ट करून सांगतों. ५३ धनंजया, ज्ञान समजल्यावर अज्ञान सहज ओळखतां येतें. कारण, जें ज्ञान नव्हे तेंच अज्ञान होय. ५४ हें पहा, दिवस संपल्यावर मग रात्रीचीच पाळी उरते. कारण रात्र व दिवस या दोहोंवांचून तिसरा प्रकारच नाहीं; ५५ त्याप्रमाणें, ज्या ठिकाणीं ज्ञान नाहीं, तेंच अज्ञान आहे असें समज. तथापि अज्ञानाचीं कांहीं लक्षणें तुला सांगतों. ५६ आपली प्रतिष्ठा व्हावी म्हणून लोक आपल्यास मान केव्हां देतील याची जो वाट पहात असतो, व लोकांनीं आपला सत्कार केला म्हणजे संतोष पावतो; ५७ आणि गर्वानें पर्वताचे शिखराइतका चढून जाऊन कधींही खालीं उतरत नाहीं, अशा पुरुषाचे ठिकाणीं पूर्ण अज्ञान वास करतें असें समज, ५८ आणि स्वधर्माचरणाविषयीं, पिंपळाची मुंज केल्यावर त्यास जो दोर बांधतात त्याप्रमाणें किंवा पार बांधतात त्याप्रमाणें अथवा देवळांतील कुंचा वाटेल त्याच्या उपयोगास येतो त्याप्रमाणें लोकांत आपले कृतकर्माची प्रसिद्धि करतो; ५९ आपल्यास येत असलेल्या विद्येची आपल्या मुखानें प्रसिद्धि करतो; व आपले हातून घडलेल्या सत्कृत्याबद्दल लोकांत डांगोरा पिटतो; याप्रमाणें, ज्या कृत्यापासून आपली प्रतिष्ठा वाढेल तीं कृत्यें नेहमीं करीत असतो; ६६० आणि दिवसातून तीनदां स्नान करून अंगास अत्तर वगैरे लावून शरीर नटवितो, परंतु प्राण्यांचें पूजन करण्याविषयीं कंटाळा करतो, तो अज्ञानाची खाण आहे असें समज. ६१ ज्याप्रमाणें रानात वणवा पेटल्याबरोबर तो स्थावर जंगम याचा विचार न करतां सर्व पदार्थ जाळतो, त्याप्रमाणें, ज्याच्या आचरणापासून सर्व जगास दुःख होतें; ६२ तो सहजगत्या जें भाषण करतो तें मनुष्याचे हृदयास तीक्ष्ण पहारीचे टोंकाप्रमाणें भेदतें; व ज्याचे सर्व बेत इतर जनांस विषाहूनही घातक असतात, ६३ त्याचे ठिकाणीं अज्ञान आहे. फार काय सांगावें ? तो अज्ञानाचें माहेरघरच होय; आणि त्याचें जिणें म्हणजे हिंसेचें आश्रयस्थानच होय. ६४ आणि भाता फुंकला म्हणजे जसा तो वाऱ्यानें फुगतो, व तोच वारा नाहींसा झाला म्हणजे लागलीच दबतो, तसा लाभ झाला असता जो चढून जातो व हानि झाली असता लगेच दुःखमग्न होतो; ६५ वावटळींत सांपडलेली धूळ ज्याप्रमाणें आकाशापर्यंत उंच उडते. त्याप्रमाणे लोकांनीं स्तुति केली असतां जो हर्षानें फुगतो; ६६ थेंबभर पाण्यानें ज्याप्रमाणें चिखल ओला होतो आणि वारा सुटल्यावर हडकतो, त्याप्रमाणें कोणी थोडी निंदा केली असतांही जो वाईट वाटून कपाळ धरून बसतो; ६७ तसेंच ज्याला मान व अपमान हे दोन्ही सहन होत नाहींत, त्याचे ठिकाणीं पूर्ण अज्ञान वास करतें असें समज. ६८ जो मनांत एक असून तोंडानें दुसरेंच बोलून दाखवितो, व एकास वचन देऊन त्याचे उलट दुसऱ्यास मदत करतो; ६९ पारधी मृगास चारा घालतो, ( तो केवळ अपकारबुद्धीनें; त्यांत त्याचा घात करण्याचा त्याचा विचार असतो. ) त्याप्रमाणें जो एखाद्याचें पालन करितो, परंतु अंतर्यामीं त्याचा घात करण्याविषयीं हेतु धरतो; ६७० शेवाळ्यानें लिप्त झालेली शिळा वरकांती हिरवीगार दिसते, किंवा निंबोळ्या पिवळ्या धमक दिसतात, त्याप्रमाणें ज्याचीं कृत्यें बाह्यात्कारीं मात्र उत्तम दिसतात, ७१ त्या मनुष्याचे ठिकाणीं अज्ञान निःसंशय आहे हें तूं पक्कें समजून ठेव. ७२

लाजे । जो गुरुभक्ती उंभजे । विद्या घेऊनि माजे । गुरूसींचि जो ॥ ७३ ॥ ( ६१७. गुरुभक्ताच्या स्मरणानें पातकनाश, ६७४–६७७ ) तयाचें नाम घेणें । तें वाचे शूद्रान्न होणें । परि घडलें लक्षणें । बोलतां इयें ॥ ७४ ॥ आतां गुरुभक्ताचें नांव घेवों । तेणें वाचे प्रायश्चित्त देवों । गुरुसेवका नांव पावों । सूर्य जैसा ॥ ७५ ॥ येतुलेनि पांगु पापाचा । निस्तरेल हे वाचा । जो गुरुतल्पगाचा[3] । नामीं जाला ॥ ७६ ॥ हा ठाय वरी । तया नामाचें भय हरी । मग म्हणे अवधारीं । आणिकें चिन्हें ॥ ७७ ॥ ( ६१८. अशुद्धत्व, ६७८–६८४ ) तरी आंगें कर्मे ढिला । जो मनें विकल्पें भरला । अडवींचा अवगळला[6] । कुंहा जैसा ॥ ७८ ॥ तया तोंडीं कांटिवडें[8] । आंतु नुसधीं हाडें । अशुचि तेणें पाडें । सबाह्य जो ॥ ७९ ॥ जैसें पोटालागीं सुणें । उघडें झांकलें न म्हणे । तैसें आपलें परावें नेणे । द्रव्यालागीं ॥ ६८० ॥ इया ग्रामसिंहाचिया ठायीं । जैसा मिळणीं ठावो अठावो नाहीं । तैसा स्त्रीविषयीं कांहीं । विचारीना ॥ ८१ ॥ कर्माचा वेळ चुके । कां नित्य नैमित्तिक ठाके । तें जया न दुखे । जीवामाजीं ॥ ८२ ॥ पापीं जो निसुंगु । पुण्याविषयीं अति निलागु[2] । जयाचिया मनीं वेगु । विकल्पाचा ॥ ८३ ॥ तो जाण निखिळा । अज्ञानाचा पुतळा । जो बांधोनि असे डोळा । वित्ताशेतें ॥ ८४ ॥ ( ६१९. अस्थैर्य, ६८५–६९२ ) आणि स्वार्थें अळुमाळें । जो धैर्यापासोनि चळे । जैसें तृणबीज ढळे । मुंगियेचेनि ॥ ८५ ॥ पावो सूदलियाँ सवें । जैसें थिल्लर कालवे । तैसा भयाचेनि नांवें । गंजबजे जो ॥ ८६ ॥ मनोरथांचिया धोंरसा । वाहणें जयाचिया मानसा । पुरीं पडिला जैसा । दुधिर्या पाहीं ॥ ८७ ॥ वायूचेनि सांवायें । धूं[20] दिगंतरा जाये । दुःखवार्ता होये । तैसें जया ॥ ८८ ॥ वाउधर्णाचिया[21] परीं । जो आस्रो कहींचि न धरी । क्षेत्रीं तीर्थीं पुरीं । थारों नेणे ॥ ८९ ॥ का मातलिया सरडा । पुढती बुडुख पुढती शेंडा । हिंडण वोरा कोरडा । तैसा जया ॥ ६९० ॥ जैसा रोंविल्याविणें । रांजणु थारों नेणे । तैसा पडे तैं राहणें । येऱ्हवीं हिंडे ॥ ९१ ॥ तयाच्या ठायीं उदंड । अज्ञान असे वितंडें[23] । जो चांचल्यें भावंड । मर्कटाचें ॥ ९२ ॥ ( ६२०. मनोनिग्रहाचा अभाव, ६९३–७०२ ) आणि पैं गा धनुर्धरा । जयाचिया अंतरा । नाहीं[24] वोढावारा । संयमाचा ॥ ९३ ॥ लेंडिये[25] आला लोंढा । न मनी वाळ्वेचा वरवंडें[26] । तैसा

१ तिरस्कार करतो. २ कमीपणा. ३ गुरूची निंदा करणाऱ्याच्या. ४ संशयानें. ५ रानांतील. ६ अमगळ. ७ विहीर. ८ कांटेरी झाडें. ९ कुत्र्याच्या. १० स्त्रीसंगास. ११ निःसंग. १२ निर्लज्ज. १३ गवताची काडी. १४ ठेवल्याबरोबर. १५ डबकें. १६ घाबरतो. १७ पुरात. १८ भोंपळा. १९ साह्यानें. २० धूर. २१ वावघणाच्या; वावटळीच्या. २२ छंद. २३ मोठें. २४ परबंध. २५ ओहोळास. २६ बांध.

आणि गुरुकुळाचें नांव घ्यावयास ज्याला लाज वाटते, गुरुसेवेचा जो तिटकारा करतो, आणि ज्या गुरूपासून आपल्यास विद्या प्राप्त झाली आहे त्यालाही जो मानीत नाहीं, ७३ अशा मनुष्याचें नांव घेणें म्हणजे शूद्राच्या घरीं अन्न सेवन केल्याप्रमाणें होय ! पण काय करावें ? अज्ञानाचीं लक्षणें सांगताना त्याचा उच्चार करावा लागला ! ७४ तेव्हां आतां ज्या गुरुभक्ताचें नांव सूर्याचे तेजाप्रमाणें सर्व अज्ञानांधकार नाहींसा करणारें आहे, त्याचें नांव घेऊन वाचेनें घडलेले पापास प्रायश्चित्त देतो ! ७५ गुरूची निंदा करणाराचें नांव घेण्यांत जें पातक घडलें, तें यापासून दूर होईल ! ७६ एवढा वेळ नामोच्चारापासून जें भय होतें तें दूर झालें. तर आतां अज्ञानाचीं दुसरीं चिन्हें ऐक. ७७ जो स्वतः कर्में करीत नाहीं, व मनांत संशय धारण करतो, तो रानांतल्या अमंगळ विहिरीप्रमाणें होय. ७८ ती विहीर कशी असते ? तर तिचे तोंडावर कांटेरीं झाडें उगवलेलीं असतात, व आत पुष्कळ प्राणी मडून मेल्यामुळें हाडें साचलेलीं असतात; त्याप्रमाणें जो मनुष्य अंतर्बाह्य अशुद्ध असतो; ७९ ज्याप्रमाणें अन्न उघडें आहे किंवा झांकलेलें आहे हें न पाहतां कुत्रें तें खातें, त्याप्रमाणें आपलें किंवा दुसऱ्याचें, याचा विचार न करतां जो द्रव्याचा अभिलाष करतो; ६८० या ग्रामसिंहाच्या ठिकाणीं जसा स्त्रीसंग करण्याविषयीं एकांत किंवा चव्हाट्याची जागा यांचा विधिनिषेध नाहीं, तसा जो स्त्रीसंगाविषयीं निर्लज्ज असतो; ८१ स्वधर्माप्रमाणें कर्म करण्याची वेळ चुकली किंवा नित्यनैमित्तिक करावयाचें राहिलें तर त्याबद्दल ज्याचे मनांत शंकाही येत नाहीं; ८२ पापाचरणाबद्दल जो निःसंग व पुण्यकर्मांच्या आचरणाबद्दल जो निर्लज्ज असतो; व ज्याचे मनांत संशय भरलेला असतो; ८३ आणि जो द्रव्यप्राप्तीविषयीं पापपुण्याची चाड बाळगीत नाहीं, तो केवळ अज्ञानाचा पुतळाच आहे असें समज. ८४ ज्याप्रमाणें गवताच्या काडीवर मुंगी चढली तरी ती गवताची काडी लवते, त्याप्रमाणें जो अल्प लाभाकरितांही बुद्धीच्या स्थिरपणापासून ढळतो; ८५ डबक्यांत पाय पडल्याबरोबर जसें त्यांतील पाणी गढूळ होतें, तसा जो भयाचें नांव ऐकल्याबरोबर घाबरा होतो; ८६ पुरांत पडलेला भोंपळा जसा हवा तिकडे वहात जातो, तसा जो मनोरथाच्या पुरांत वहात जातो; ८७ वाऱ्याचे साह्यानें धूर जसा गगनापर्यंत उंच जातो, तसा जो दुःखाची गोष्ट ऐकल्याबरोबर गडबडतो; ८८ वावटळ ज्याप्रमाणें कोठेंही स्थिर होत नाहीं; त्याप्रमाणें जो क्षेत्राचे, तीर्थाचे किंवा शहराचे ठिकाणीं कोठेंही कायम रहात नाहीं; ८९ किंवा माजलेल्या सरडास ज्याप्रमाणें वरून खालीं व खालून वर जाण्याचा व्यर्थ नाद लागतो; ६९० ज्याप्रमाणें पाण्याचा रांजण पुरल्याशिवाय जाग्यावर ठरत नाहीं, त्याप्रमाणें जो निद्रेशिवाय एके ठिकाणीं न राहतां चोहोंकडे हिंडतो; ९१ व ज्याची माकडाप्रमाणें नेहमीं चळवळ असते, त्याचे ठिकाणीं अज्ञान पूर्णपणें वास करतें ९२ आणि अर्जुना, ज्याचे अंतर्यामीं आत्मसंयमनाचा वाराही नसतो; ९३ ज्याप्रमाणें एखादे ओहोळास लोंढा आला म्हणजे

निषेधाचिया तोंडा । विहेना[1] जो ॥ ९४ ॥ व्रतातें आड मोडी । स्वधर्मु[2] पायें वोलांडी । नियमाची आश तोडी । जयाची क्रिया ॥ ९५ ॥ नाहीं पापाचा कंटाळा । नेणें पुण्याचा जिव्हाळा । लाजेचा पेंडवळा । खाणोनि घाली ॥ ९६ ॥ कुळेंसीं जो पाठमोरा । वेदाज्ञेसी दुन्हा । कृत्याकृत्यव्यापारा । निवाडु[3] नेणे ॥ ९७ ॥ वसु जैसा मोकाटू । वारा जैसा अफाटू । फुटला जैसा पाटू । निरंजनीं[4] ॥ ९८ ॥ आंधळें हातिरूं[5] मातलें । कां डोंगरीं जैसें पेटलें । तैसें विषयीं सुटलें । चित्त जयाचें ॥ ९९ ॥ पैं उकरडां काय न पडे । मोकाटू कोणां नातुडे । ग्रामद्वारींचें आडें । नोलांडी कोण ॥ ७०० ॥ जैसें सत्रीं अन्न जालें । कां सामान्या बीकें आलें । वींणासियेचें उंभविलें । कोण न रिगे ॥ १ ॥ तैसें जयाचें अंतःकरण । तयाच्या ठायीं संपूर्ण । अज्ञानाची जाण । ऋद्धि आहे ॥ २ ॥ ( ६२१. वैराग्याचा अभाव, ७०३–७१३ ) आणि विषयांची गोडी । जो जीतु मेला न संडी । स्वर्गींही खावया जोडी । एथुनीचि ॥ ३ ॥ जो अखंड भोगा जेंचे । जया व्यसन काम्यक्रियेचें । मुख देखोनि विरक्ताचें । सचैल करी ॥ ४ ॥ विषो शिणोनि जाये । परि न शिणे सावधु नोहे । कुहिलें हातीं खाये । कोढी जैसा ॥ ५ ॥ खैरी टेंको नेदी उडे । लातौनि फोडी नाकाडें । तन्ही जेवीं न काढे । माघौता खरू ॥ ६ ॥ तैसा जो विषयांलागीं । उडी घाली जळते आगीं । व्यसनाचीं आंगीं । लेणीं मिरवी ॥ ७ ॥ फुंटोनि पडे तंव । मृग वाढवी हांव । परि न म्हणे ते मांव । रोहिणीची[20] ॥ ८ ॥ तैसा जन्मौनि मृत्यूवरी । विषयीं त्रासितां बहुतीं परी । तन्ही त्रासु नेघे धरी । अधिक प्रेम ॥ ९ ॥ पहिलिये बाळदशे । आई बा हेंचि पिसें । तें सरे मग स्त्रीमांसें[21] । भुलोनि ठाके ॥ ७१० ॥ मग स्त्री भोगितां थावो । वृद्धाप्य लागे येवों । तेव्हां तोचि प्रेमभावो । बाळकासि आणी ॥ ११ ॥ आंधळें व्यालें जैसें । तैसा बाळें पेंरिवसे । परी जीवें मरे तों न त्रासे । विषयासीं जो ॥ १२ ॥ जाण तयाच्या ठायीं । अज्ञानासि पारु नाहीं । आतां आणीक कांहीं । चिन्हें सांगों ॥ १३ ॥ ( ६२२. अहंकार, ७१४–७२७ ) तरि देह हाचि आत्मा । ऐसेया जो मनोधर्मा । वेंळघोनिया[23] कर्मा । आरंभु करी ॥ १४ ॥ आणि उणें का पुरे । जें जें कांहीं आचरे । तयाचेनि आविष्करें[24] । कुंथों लागे ॥ १५ ॥ डोइये ठेविलेनि भोजें[25] । देवेंलविसे[26]

१ मर्यादा. २ कुलधर्माला. ३ निर्णय. ४ रानांत. ५ हत्ती. ६ मोकळा; पोळ. ७ आवरत नाहीं. ८ उंबरा. ९ अधिकार. १० वाण्याच्या. ११ दुकानांत. १२ श्रम करतो. १३ सचैल स्नान. १४ कुनख्या. १५ कोड असलेला मनुष्य. १६ गाढवी. १७ लाथानीं. १८ उरीं फुटून. १९ मिथ्या भास. २० मृगजळाचा. २१ शरीरास. २२ राहतो. २३ चढून. २४ अभिमानानें. २५ देवाचा प्रसाद. २६ पुजारी; भगत.

तो वाळूच्या बांधास जुमानीत नाहीं, त्याप्रमाणें जो शास्त्रनिषिद्ध गोष्टींस भीत नाहीं, ९४ जो व्रतें पाळीत नाहीं, स्वधर्मास लाथेनें झुगारतो, व शास्त्रानें घालून दिलेल्या नियमांविरुद्ध ज्याची क्रिया असते, ९५ ज्याला पापाचरणाचा कंटाळा नसतो, पुण्याचरणाचा लेशही माहीत नसतो, आणि जो लज्जेची मर्यादा खणून टाकतो; ९६ जो कुलधर्म ओळखीत नाहीं, वेदांतील आज्ञा मानीत नाहीं, व ज्याला बऱ्या वाईट गोष्टींची चाड नसते; ९७ ज्याप्रमाणें पोळ मोकळा सुटलेला असतो, किंवा वारा अफाट वाहतो, अथवा रानांतील फुटलेल्या पाटाचें पाणी वाटेल तिकडे जातें, ९८ आंधळा हत्ती माजावा, किंवा डोंगरास वणवा लागावा, त्याप्रमाणें ज्याचें मन विषयांविषयीं बहकलेलें असतें. ९९ हें पहा, उकिरड्यावर काय टाकीत नाहींत ? पोळाला कोण आवरतो ? आणि वेशीच्या उंबऱ्यावरून कोण जात नाहीं ? ७०० ज्याप्रमाणें अन्नसत्रांत वाटेल त्यानें जेवावें, किंवा साधारण मनुष्यास अधिकार प्राप्त झाल्यावर त्यानें तो वाटेल तसा गाजवावा, अथवा वाण्याचे दुकानांत कोणींही जावें, १ त्याप्रमाणें, ज्याचें अंत:करण चंचल आहे, त्याचे ठिकाणीं संपूर्ण अज्ञानाची वृद्धि होते, असें समज, २ आणि जो जिवंत असतांना व मेल्यावरही विषयांची इच्छा सोडीत नाहीं व ज्या योगानें स्वर्गांतही विषयोपभोग प्राप्त होतील त्या मार्गाचें आचरण ह्या लोकीं करितो; ३ ज्याचे सर्व श्रम विषयोपभोगाचे प्राप्तीकरतां असतात, व ज्याला सकाम कर्मांशिवाय इतर कर्में आवडत नाहींत; आणि विरक्तांचें दर्शन झालें असतां जो सचैल स्नान करतो, ४ ज्याप्रमाणें कोड असलेल्या मनुष्यास आपल्या कुजक्या हातानें अन्न खाण्यास खंती वाटत नाहीं, त्याप्रमाणें, ज्याचा विषयांस जरी कंटाळा आला तरी जो त्यांस कंटाळत नाहीं, व कर्मफलांविषयीं निरिच्छ होत नाहीं, ५ गाढवीच्या पाठीस गाढव लागल्यावर तिनें लाथा झाडून त्याचें नाक फोडलें तरी तो मागें न वळतां तिच्याच पाठीस लागतो, ६ त्याप्रमाणें, जो विषयांकरतां जळत्या आगींतही उडी घालण्यास मागेंपुढें पहात नाहीं, आणि आपलें व्यसन हें ( दूषण नसून ) भूषणच आहे असें मानतो, ७ मृगजलाच्या लालसेनें धावतां धावतां जरी मृगाचा ऊर फुटला, तरी त्याची हाव कमी न होतां अधिकच वाढते, पण हें मिथ्या आहे असें तो मानीत नाहीं, ८ त्याप्रमाणें, जन्मापासून मरेपर्यंत विषयप्राप्तीकरतां सारखे श्रम करतो, तथापि त्याबद्दल त्यास तिटकारा न येतां उलटें अधिकच प्रेम सुटतें; ९ बालपणीं मातापितरांचें वेड असतें; व तें संपल्यावर ( तारुण्यदशेंत ) स्त्रीचें वेड लागतें; ७१० नंतर स्त्रीचा उपभोग पूर्ण झाल्यावर म्हातारपण येतें, तेव्हां तेंच प्रेम तो मुलांबाळांवर करूं लागतो; ११ जन्मांध जसा घर सोडून जात नाहीं, तसा जो मुलांबाळांतच कालक्रमण करतो, परंतु ज्यास मरेपर्यंत विषयाचा तिटकारा येत नाहीं, १२ त्याचे ठिकाणीं अज्ञानास पार नाहीं असें समज. आतां अज्ञानाचीं आणखीं कांहीं लक्षणें सांगतों. १३ हें पहा कीं, जो आपलें देहालाच आत्मा असें समजून कर्में करूं लागतो; १४ आणि जर एखादे कर्माचें आचरण कमी किंवा जास्त झालें. तर अभिमानानें फुगून

जेवीं फुंजे[१] । तैसा विद्यावयसा माजे । उताणा चाले ॥ १६ ॥ म्हणे मीचि एकु आथी । माझ्याचि घरीं संपत्ती । माझी आचरती रीती । कोणा आहे ॥१७॥ नाहीं माझेनि पाडें वाडु[२] । मी सर्वज्ञु एकुचि रूढ । ऐसा गर्वतुष्टीगंडु । घेऊनि ठाके ॥ १८ ॥ व्याधि लागलिया माणुसा । न येचि भोग दाऊं जैसा । निकें[३] न साहे तो तैसा । पुढिलाचें[४] ॥ १९ ॥ पैं गुण[५] तेतुला खाय । स्नेह[६] कीं जाळितु जाय । जेथ ठेविजे तेथ होय । मसी[७]ऐसें ॥ ७२० ॥ जीवनें[८] शिंपिला तिडापिडी[९] । वीजिलें[१०] प्राण सांडी । लागला तरी काडी । उरों नेदी ॥ २१ ॥ अल्पमाळ प्रकाशु करी । तेतुलेनीच उबारा धरी । तैसियां दीपाचिया परी । सुविद्यु[११] जो ॥ २२ ॥ औषधाचेनि नांवें अमृतें[१२] । जैसा नवज्वरु आंबुथे[१३] । कां विषचि होऊनि परते । सर्पा दूध ॥ २३ ॥ तैसा सद्गुणी मत्सरु । व्युत्पत्ति-अहंकारु । तपोज्ञानें अपारु । ताठा चढे ॥ २४ ॥ अंत्यजु राणिवे[१४] बैसविला । ओरें[१५] धारणु[१६] गिळिला । तैसा गर्वे फुगला । देखसी जो ॥ २५ ॥ जो लाटणें ऐसा न लवे । पाथरु तेविं न द्रवे । गुणियांसि[१७] नागवे[१८] । फोडसें[१९] जैसें ॥ २६ ॥ किंबहुना तयापासीं । अज्ञान आहे वाढीसी । हें निकरें[२०] गा तुजसीं । बोलत असों ॥ २७ ॥ ( ६२३. जन्माचा विचार नसणें, ७२८-७५३ ) आणीकही धनंजया । जो गृह देह सामग्रिया । न देखे कौल-चेया । जन्मातें गा ॥ २८ ॥ कृतघ्ना उपकारु केला । कां चोरा व्यवहारु[२२] दिधला । निसुगु[२३] स्तविला । विसरे जैसा ॥ २९ ॥ वोढाळतां लोंविलें[२४] । तें तैसेंचि कान पुंसे[२५] वोलें । कीं पुढती वोढाळं आलें । सुणें[२६] जैसें ॥ ७३० ॥ वेडूक सापाचिया तोंडीं । जातसे सबुडबुडीं[२७] । तो मक्षिकांचिया कोडी[२८] । स्मरेना कांहीं ॥ ३१ ॥ तैसीं नवही द्वारें स्रवती । आंगीं देहाची लुती[२९] जिती । जेणे जाली ते चित्तीं । सलेना जया ॥ ३२ ॥ मातेच्या उदरकुहरीं[३०] । पचूनि विष्ठेच्या थोथरीं[३१] । जठरीं नवमासवरी । उकडला जें ॥ ३३ ॥ ते गर्भींची जे व्यथा । कां जें जालें उपजतां । तें कांहींचि सर्वथा । नाठवी जो ॥ ३४ ॥ मलमूत्रपंकीं । जें लोळतें बाळ अंकीं । देखोनि जो न थुंकी । त्रासु नेघे ॥ ३५ ॥ कालचि ना जन्म गेलें । पाहेच पुढती आलें । ऐसें हे कांहीं वाटलें । नाहीं जया ॥ ३६ ॥ आणि पैं तयाचि परी । जीविताची फरारी[३२] । देखोनि जो न करी । मृत्युचिंता ॥ ३७ ॥ जिणेयाचेनि विश्वासें ।

१ धुमू लागतो. २ बरोबरीचा. ३ बरें. ४ दुसऱ्याचें. ५ वात. ६ तेल. ७ काजळी. ८ पाण्यानें. ९ तडतडतो. १० वारा घातला तर. ११ गुणी. १२ दुधानें. १३ विकोपास जातो. १४ राज्यावर. १५ अजगरानें. १६ खांब; लाकूड. १७ गारोड्यास, मान्त्रिकास. १८ उतरत नाहीं १९ फुरसें. २० निश्चयानें. २१ विद्यमान. २२ व्यापारास भांडवल. २३ निर्लज्ज. २४ घरातून हाकून. २५ शेंपूट. २६ कुत्रें. २७ जीवासह. २८ कौतुकानें. २९ लूत. ३० गर्भाशयात. ३१ थरात. ३२ भरात.

जाऊन कुंथूंही लागतो; १५ देवाचा प्रसाद डोक्यावर ठेवतांच जसा देवाचा भगत घुमूं लागतो, तसा जो विद्येच्या जोरावर व वयाचे मानावर अभिमानाचा ताठा धरून उताणा चालतो; १६ आणि सर्व जगांत काय तो मींच शहाणा, मीच श्रीमंत, माझेप्रमाणें चालरीत कोणाची आहे ? १७ माझेबरोबरीचा दुसरा कोणी नाहीं, मी सर्वज्ञ असून मी एकटाच या जगांत ज्ञाता आहें, याप्रमाणें सर्व गोष्टींबद्दल गर्व बाळगतो; १८ व्याधिग्रस्त माणसाला ज्याप्रमाणें कोणताही भोग सहन होत नाहीं, त्याप्रमाणें दुसऱ्याचें चांगलें झालेलें ज्यास सहन होत नाहीं; १९ हें पहा--दिवा हा गुण (वात) तेवढाच खाऊन टाकून स्नेह (तेल) जाळून टाकतो, आणि ज्या जागीं ठेवावा ती जागा काळीकुट्ट करून टाकतो; ७२० पाण्याचा थेंब पडला तर तडतडतो, वाऱ्यानें विझतो, घरास लागला तर काडी देखील उरूं देत नाहीं, २१ आणि कोठें उगीच थोडासा प्रकाश करतो तर तेवढ्यानेंही उष्मा करावयास लागतो, ह्या त्याच्या गुणांप्रमाणें ज्याचे अंगांत गुण भरलेले आहेत ! २२ नवज्वर झालेल्या रोग्यास दूध हें औषध म्हणून जरी दिलें, तरी तें त्याचा ताप विकोपास नेतें; किंवा सापास दूध पाजलें असतां तें विष होऊन तो ओकतो, २३ त्याप्रमाणें, गुणवान मनुष्याचा जो मत्सर करतो, व्युत्पत्तीबद्दल अहंपणा बाळगतो, व तपाचरणानें ज्याचे अंगीं ताठा भरतो; २४ अंत्यजाला राज्यावर बसविलें असता तो जसा अभिमानानें फुगतो, अथवा अजगरानें खांब गिळल्यावर तो जसा ताठतो, तसा ज्याचे अंगीं गर्वाचा ताठा भरलेला असतो; २५ जो लाटण्याप्रमाणें ताठ असून लवत नाहीं, आणि फुरसें जसें गारोड्याचे मंत्रानें उतरत नाहीं, तसा दगडाप्रमाणें कठीण असून ज्याला द्रव येत नाहीं, २६ त्याचेजवळ अज्ञान वाढीस लागलें आहे हें तुला निश्चयानें सांगतों. २७ हे धनंजया, जो आपलें घरदार, संपत्ति, देह व आपला विद्यमान जन्म यांजविषयीं कांहीं सुद्धा विचार करीत नाहीं; २८ कृतघ्नावर उपकार केला असतां, अथवा चोरास व्यापाराकरितां भांडवल दिलें असतां, किंवा निर्लज्ज मनुष्याची स्तुति केली असतां ते ज्याप्रमाणें केलेले उपकार विसरतात: २९ द्वाड कुत्र्याचे कान आणि शेंपूट कापून त्यास घरांतून हांकून लाविलें, तरी तें रक्त गळत असताच जसें पुनः त्याच घरात शिरतें; ७३० सापाचे तोंडांत सांपडून गिळला जात असताही बेडूक कौतुकानें देखील माशा गिळण्याचें विसरत नाहीं; ३१ त्याप्रमाणें, अंगांत व्रत भरून नवद्वारें वहात असतांही ज्याचे मनांत आपली अशी स्थिति होण्याचें कारण काय याचा विचार सुद्धां येत नाहीं; ३२ आईच्या गर्भाशयामध्यें विष्ठेच्या थरांत नऊ महिनेपर्यंत जरी उकडून जातो, ३३ तरी तें गर्भांतील दुःख किंवा उदरांतून बाहेर निघते समयींचें दुःख यांविषयीं जो कांहींच स्मरण बाळगीत नाहीं; ३४ मांडीवर घेतलेलें मूल मलमूत्रांच्या चिखलांत लोळत असतांना पाहूनही ज्याला किळस न येऊन त्रासही उत्पन्न होत नाहीं; ३५ हल्लीं ज्या जन्मांत आपण आहों तो व पुढें येणारा जन्म, यांविषयीं ज्याचे मनांत कांहींही विचार उत्पन्न होत नाहीं; ३६ आणि त्याचप्रमाणें, आपले तारुण्याचे भरांत पुढें येणाऱ्या मृत्यूबद्दल जो कांहींही काळजी बाळगीत नाहीं; ३७ आपले जीवितावर पूर्ण विश्वास ठेवून आपल्यास पुढें

मृत्यु एक एथ असे । हें जयाचेनि मानसें । मानिजेना ॥ ३८ ॥ अल्पोदकींचा मासा । हें नाटे ऐसिया आशा । न वचेचि कां जैसा । अगाध डोहां ॥ ३९ ॥ कां गोरीचिया भुली । मृग व्याधा दृष्टि न घाली । गळ न पाहतां गिळिली । उंडी मीनें ॥ ७४० ॥ दीपाचिया झेगमगा । जाळील हें पतंगा । नेणवेचि पैं गा । जयापरी ॥ ४१ ॥ गवांरु निद्रासुखें । घर जळत असे तें न देखे । नेणतां जेवीं विखें । रांधिलें अन्न ॥ ४२ ॥ तैसा जीविताचेनि मिषें । हा मृत्युचि आला असे । हें नेणोचि रीजसें । सुखें जो गा ॥ ४३ ॥ शरीरींची वाढी । अहोरात्राची जोडी । विषयसुखप्रौढी । साचचि मानी ॥ ४४ ॥ परि बापुडा ऐसें नेणे । जें वेश्येचें सर्वस्व देणें । तेंचि तें नागवणें । रूप एथ ॥ ४५ ॥ संवचोराचें साजणें । तेंचि तें प्राण घेणें । लेंपा स्नेपन करणें । तोचि नाशु ॥ ४६ ॥ पांडुरोगें आंग सुटलें । तें तयाचि नांवें खुंटलें । तैसें नेणे भुललें । आहारनिद्रा ॥ ४७ ॥ सन्मुख शूळा । धांवतया पायें चपळा । प्रतिपदीं जवळा । मृत्यु जेवीं ॥ ४८ ॥ तेवीं देहा जंव जंव वाढ । जंव जंव दिवसांचा पैंवाडु । जंव जंव सुरवाडु । भोगाचा यया ॥ ४९ ॥ तंव तंव अधिकाधिकें । मरण आयुष्यातें जिंके । मीठ जेवीं उदकें । घांसिजेत असे ॥ ७५० ॥ तैसें जीवित्व जाये । तयास्तव काळु पाहे । हें हातोहातींचें न होये । ठाउकें जया ॥ ५१ ॥ किंबहुना पांडवा । हा आंगींचा मृत्यु नित्य नवा । न देखे जो मैंवा । विषयांचिया ॥ ५२ ॥ तो अज्ञानदेशींचा रावो । या बोला महाबाहो । न पडे गा ठावो । आणिकांचा ॥ ५३ ॥ ( ६२४. जरेचा विचार नसणें, ७५४–७६० ) पैं जीविताचेनि तोखें । जैसा कां मृत्यु न देखे । तैसाचि तारुण्यें पोखे । जैरा न *गणी* ॥ ५४ ॥ कैंडाडीं लोटला गाडा । कां शिखरौनि सुटला धोंडा । तैसा न देखे जो पुढां । वार्धक्य आहे ॥ ५५ ॥ कां आडवोहळा पाणी आलें । कां जैसें म्हसयाचें झुंज मातलें । तैसें तारुण्याचें चढलें । भुररें जया ॥ ५६ ॥ पुष्टि लागे विघैरों । कांति पाहे निसेरों । मस्तक आदरी शिरो-[22] । भार्गी कंप ॥ ५७ ॥ दाढी सौंउळ धरी । मान हालौनि वारी । तरी जो करी । मायेचीं पैसुं ॥ ५८ ॥ पुढील उरीं

१ डबक्यांतला. २ आटणार नाहीं. ३ जात नाहीं. ४ पारध्याच्या गाण्याला. ५ प्रकाशानें. ६ मूर्ख. ७ लातो. ८ विषय. ९ मैत्री. १० मातीच्या चित्राला ११ स्नान. १२ सुळ. १३ वृद्धि. १४ सुख. १५ विरघळतें. १६ मुळीनें. १७ म्हातारपण. १८ डोंगराच्या कड्यावरून. १९ धुंदी. २० कमी होऊं. २१ निःशेष लोप होऊं. २२ मान. २३ सावली. २४ तारुण्याचा मद. २५ विस्तार.

मृत्यु येणार आहे याबद्दल ज्याचे मनांत बिलकूल विचार नसतो; ३८ डबकें आटणार नाहीं अशा समजुतीनें जसा त्यांतील मासा मोठ्या डोहांत जात नाहीं; ३९ किंवा पारध्यांच्या गाण्यास भुलून मृग जसा पारध्याकडे पहात नाहीं; अथवा मासा हा गळास लावलेल्या आमिषाचे आंत गळ आहे असें न समजतां ते खाऊन मरतो; ७४० किंवा दिव्याच्या ज्योतीनें आपण जळून जाऊं असें न समजतां पतंग त्यावर झडप घालतो; ४१ घर जळत असतांही एखादा मूर्ख निद्रेच्या भरांत तिकडे लक्ष न देऊन घर सोडून जात नाहीं; किंवा ज्या अन्नात विष घातलें आहे तें अन्न न समजतां, कोणी खातो, ४२ त्याप्रमाणें, जीविताचे रूपानें हा मृत्युच आला आहे असें जो विषयसुखाचे भरात जाणत नाहीं; ४३ आपल्या शरीराचा पुष्टपणा, रात्र व दिवस यांचा उपयोग आणि विषयांपासून होणारे सुखाची प्रौढी, यांशिवाय या जगांत इतर सर्व गोष्टी मिथ्या आहेत असें जो मानतो; ४४ परंतु बिचारा असें समजत नाहीं, कीं वेश्या आपल्यास तनमन अर्पण करिते, तें तिचें करणें वरकांतीं असून, उलट आपल्यास बुचाडण्याचाच तो मार्ग आहे! ४५ वाटेनें जातांना सवचोरांची गांठ पडल्यावर त्यानें आपल्यास वरकांतीं मैत्री दाखविणें म्हणजे ती खरोखर मैत्री नसून रानांत गेल्यावर आपला प्राण घेणेंच होय; व मातीचे चित्रास स्नान वगैरे घालून पूजन करणें म्हणजे त्याचा नाश करणेंच होय; ४६ पंडुरोगानें मनुष्य लठ्ठ झाला, म्हणजे तो सशक्त झाला नसून त्याचें आयुष्य संपलें असें समजावें; त्याप्रमाणें, जो आहार व निद्रा यांत गर्क होऊन, त्यापासून आपला नाश आहे असें समजत नाहीं; ४७ सुळीं देण्याकरितां नेत असलेला मनुष्य समोर सूळ पाहिल्यावर त्याकडे धावत जाऊं लागला म्हणजे तो आपल्या प्रत्येक पावलास मृत्यु जवळ करतो; ४८ त्याप्रमाणें, देह जों जों वाढेल, आयुष्य जों जों वृद्धिंगत होईल, व जों जों विषयसुखांत निमग्न होईल, ४९ तों तों मरण आयुष्यास जिंकील; आणि मीठ ज्याप्रमाणें पाण्यांत टाकल्यावर विरवळतें, ७५० त्याप्रमाणें जों जों आयुष्य वाढेल तों तों तें काळ जवळ आणील, व तो आपल्यास हातोहात घेऊन जाईल, हें ज्याला समजत नाहीं; ५१ अर्जुना, आयुष्याच्या वृद्धीपासून आपला मृत्यु रोज जवळ जवळ येत आहे हें ज्याला विषयांच्या धुंदीनें समजत नाहीं, ५२ तो, हे महाबाहो अर्जुना, अज्ञानरूप देशाचा राजा या म्हणण्यांत कांहीं शंका नाहीं. ५३ ज्याप्रमाणें तो आयुष्याच्या भरांत पुढें येणाऱ्या मृत्यूबद्दल विचार करीत नाहीं, त्याचप्रमाणें तारुण्याच्या भरांत पुढें येणाऱ्या म्हातारपणाबद्दलही काळजी करीत नाहीं. ५४ डोंगराच्या कड्यावरून गाडी लोटल्यावर किंवा पर्वताच्या शिखरावरून धोंडा सुटल्यावर त्याला ज्याप्रमाणें आपलें पुढें काय होईल हें माहीत नसतें, त्याप्रमाणें जो आपल्यास वार्धक्य येऊन आपली काय स्थिति होईल याकडे लक्ष देत नाहीं; ५५ किंवा आडरानांतील ओढ्यास लोंढा आल्यावर त्यांतून पलीकडे जातां येत नाहीं, इतक्या जोरानें तो वाहतो; अथवा रेड्यांची टक्कर लागल्यावर ते उन्मत्त होऊन दुसऱ्यास जवळ येऊं देत नाहींत, त्याप्रमाणें ज्याच्या अंगावर तारुण्याची धुंदी चढलेली असते; ५६ शरीरसंपत्ति कमी होते, अंगावरील तेज लोपतें, व डोकें मानेबरोबर हालूं लागतें; ५७ दाढीवर नाकाची सावली पडूं लागते व मानेचा कांटा ढिला होतो, अशी जरी शरीराची स्थिति झाली, तरी त्याच्या तारुण्याचा मद कमी होत नाहीं; ५८ अंधळ्याला ज्याप्रमाणें पुढें असलेला

आदळे । तंव न देखे जेवि आंधळें । का डोळ्यावरले निगेळें । आळसी तोषे ॥५९॥ तैसें तारुण्य आजीचें । भोगितां वृद्धाप्य पाहेचें । न देखे तोचि साचें । अज्ञानु गा ॥७६०॥ देखे अक्षमें कुंज्जें । कीं विटोवूं लागे फुंजें[६] । परि न म्हणे पाहें माझें । ऐसोंचि भवे ॥ ६१ ॥ आणि आंगीं वृद्धाप्यतेची । संज्ञा ये मरणाची । परि जया तारुण्याची । भुली न फिटे ॥६२॥ तो अज्ञानाचें घर । हें साचचि घे उत्तर । तेवींचि परियेसीं थोर । चिन्हें आणिक ॥ ६३ ॥ तरि वाघाचिये अडवे । एक वेळ आला चरोनि दैवें । तेणें विश्वासें पुढती धावे । वसू जैसा ॥ ६४ ॥ कां सर्पघराआंतु । अवचटें ठेवा आणिला स्वस्थु । येतुलियासाठीं निश्चितु । नास्तिकु होय ॥ ६५ ॥ तैसेंचि अवचटें हें । एक दोनी वेळां लाहे । एथ रोगें एक आहे । हें मानीना जो ॥ ६६ ॥ वैरिया नीद आली । आतां द्वंद्वें[१०] माझीं सरलीं । हें मानी तो सपिलीं[११] मुकला जेवीं ॥ ६७ ॥ तैसी आहारनिद्रेची उंजरी । रोग निवांतु जोंवरी । तंव जो न करी । व्याधिचिंता ॥ ६८ ॥ ( ६२६. दुःखाचा विचार नसणें, ७६९-७७१) आणि स्त्रीपुत्रादिमेळें । संपत्ति जंव जंव फळे । तेणें रजें[१३] डोळे । जाती जयाचे ॥ ६९ ॥ सर्वेचि[१४] वियोगु पडेल । विळौनि[१५] विपत्ति येईल । हें दुःख पुढील । देखेना जो ॥ ७७० ॥ तो अज्ञान गा पांडवा । आणि तोही तोचि जाणावा । जो इंद्रियें अव्हासवा । चारी एथ ॥ ७१ ॥ ( ६२७. दोषाचें अज्ञान, ७७२-७८१) वैर्यसेचेनि[१६] उंवायें । संपत्तीचेनि सावायें । सेव्यासेव्य जाये । सैरकटितु ॥ ७२ ॥ न करावें तें करी । असंभाव्य मनीं धरी । चिंतूं नये तें विचारी । जयाची मति ॥ ७३ ॥ रिघे जेथ न रिघावें । मागे जें न घ्यावें । स्पर्शे जेथ न लगावें । आंग मन ॥ ७४ ॥ न जावे तेथ जाये । न पाहावें तें जो पाहे । न खावें तें खाये । तेवींचि तोषे ॥ ७५ ॥ न धरावा तो संगु । न लगावें तेथ लागु । नाचरावा तो मार्गु । आचरे जो ॥ ७६ ॥ नायकावें तें आइके । न बोलावें तें बके । परि दोष होतील हें न देखे । प्रवर्ततां ॥ ७७ ॥ आंगा मनासि रुचावें । येतुलेनि कृत्याकृत्य नाठवे । जो करणेयाचेनि नांवें । भलतेंचि करी ॥ ७८ ॥ परी पाप मज होईल । कां नरकयातना येईल । हें कांहींचि पुढील । देखेना जो ॥७९॥

---

१ आगाधर पडणारें घर. २ उद्याचें. ३ आधळा. ४ कुबड आलेला. ५ वेडावतो. ६ ताठ्यानें. ७ खूण. ८ रानात. ९ घोका. १० मांडणें; वैर. ११ मुलाबाळांसह. १२ चांगली लागणें. १३ रजोगुणात्मक विषयानें. १४ सहज. १५ वेळानें. १६ तारुण्याच्या. १७ मरानें. १८ सरसकट भक्षण करीत.

खांब उरावर आदळेपर्यंत समजत नाहीं, किंवा जळत असलेलें घर अंगावर पडेपर्यंत आळशी मनुष्य उठत नाहीं, ५९ त्याप्रमाणें तारुण्याचा उपभोग घेत असतां पुढें येणाऱ्या म्हातारपणाबद्दल जो विचार करीत नाहीं, तो केवळ अज्ञानरूपच होय. ७६० तारुण्याचे भरांत, कोणी अंधळा अगर कुबड वांकलेला मनुष्य दिसला तर तो त्यास वेडावून दाखवितो; परंतु पुढें आपलीही अशीच स्थिति होईल असें मनांत आणीत नाहीं; ६१ आणि मरणाची खूण जें म्हातारपण, तें जरी प्राप्त झालें, तरी जो तारुण्याची घमेंडी सोडीत नाहीं, ६२ तो पुरुष अज्ञानाचें घर आहे असें पक्कें समज. त्याचप्रमाणें अज्ञानाचीं आणखी कांहीं ठोकळ लक्षणें सांगतों, तीं ऐक. ६३ वाघाचे रानांतून एक वेळ चरून बैल नशिबानें सुखरूप घरीं परत आला असता, वाघ आपल्यास कांहीं करीत नाहीं या विश्वासानें तो ज्याप्रमाणें त्या रानांत फिरून चरावयास जातो; ६४ अथवा ज्या घरांतील संपत्तीवर सर्प बसला आहे, त्यांतील ठेवा सर्पदंश न होतां एखाद्यानें आणिला म्हणजे तो 'संपत्तीवर सर्प बसतो' या गोष्टीवर विश्वास ठेवीत नाहीं, ६५ त्याप्रमाणें, ह्या गोष्टी वरचेवर घडून येत नसतात, परंतु तसें करण्यांत जिवास धोका आहे, असें जो मानीत नाहीं; ६६ आपला वैरी निजला आहे, तेव्हा आता त्याचें व आपलें वैर संपलें, असें जर कोणी मानील, ( आणि त्या भरंवशावर स्वस्थ बसेल ) तर तो वैरी जागृत झाल्यावर तो ज्याप्रमाणें आपल्या मुलांबाळांसह जीवास मुकेल, ६७ त्याप्रमाणें, जोंपर्यंत भूक व झोंप चांगली लागत आहे, व जोंपर्यंत रोगराई वगैरे कांहीं झालें नाहीं, तोंपर्यंत, आपल्यास वृद्धापकाळीं रोग वगैरे जडतील याची जो काळजी बाळगीत नाही; ६८ आणि स्त्रीपुत्रादि व संपत्ति हीं जों जों जास्त मिळूं लागतात, तों तों ज्याच्या डोळ्यांवर अधिकाधिक धूर चढून डोळे धुंद होतात, ६९ आणि स्त्रीपुत्रादिकांचा वियोग एका क्षणांत होईल व एका क्षणांत संपत्ति जाऊन विपत्ति येईल. हें पुढील दुःख जो पहात नाहीं, ७७० तो अज्ञानी होय; आणि अर्जुना, जो या मृत्युलोकीं इंद्रियांना स्वस्थ चरूं देतो, ( स्वैर वर्तन करूं देतो, ) तोही केवळ अज्ञानरूपच समजावा. ७१ जो तारुण्याचे भरांत संपत्तीच्या मदानें सेव्यासेव्य वस्तूंचा विचार न करितां सरसकट त्याचा उपभोग घेतो; ७२ जी गोष्ट करूं नये ती करतो, असंभाव्य गोष्टीची हाव धरितो, आणि ज्या गोष्टींबद्दल विचार करूं नये अशा गोष्टी नेहमीं मनांत आणितो; ७३ जेथें प्रवेश करूं नये तेथें शिरकाव करतो, जी वस्तु घेऊं नये ती मागतो, आणि ज्या गोष्टी मनांत सुद्धा आणूं नयेत किंवा ज्यांस स्पर्शही करूं नये, त्या करतो; ७४ जेथें जाऊं नये तेथें जातो, पाहूं नये तें पाहतो, खाऊं नये तें खातो, आणि याप्रमाणें वर्ज केलेल्या गोष्टी केल्यानेंच ज्याचा संतोष होतो; ७५ ज्याची संगत धरूं नये त्याची संगत धरतो, ज्या ठिकाणीं संबंध असूं नये त्या ठिकाणीं संबंध ठेवतो, आणि ज्या मार्गाचें आचरण करूं नये तो मार्ग आचरतो; ७६ जें ऐकूं नये तें ऐकतो, बोलूं नये तें बडबडतो, परंतु या गोष्टी केल्यानें आपल्या हातून दोष घडतील असें मनातही आणीत नाहीं; ७७ आपल्या मनांत येईल व आपल्यास सुखावह होईल तीच गोष्ट करण्याकडे लक्ष असल्यामुळें, जो बरी वाईट गोष्ट करण्याबद्दल मुळींच विचार करीत नाहीं; आणि यामुळें भलत्याच गोष्टींचें आचरण करितो; ७८ परंतु आपले हातून पाप घडेल, किंवा आपल्याला नरकयातना सोसाव्या लागतील, या पुढील गोष्टीं-

तयाचेनि आंगलगें । जगीं अज्ञान दाटुगें । जें सज्ञानाही संगें । झोंबों सके ॥७८०॥ परी असो हें आइक । अज्ञानचिन्हें आणिक । जेणें तुज सैम्यक । जाणवे तें ॥ ८१ ॥ ( ६२८. आसक्ति, ७८२–८०४ ) तरी जयाची प्रीति पुरी । गुंतली देखसी घरीं । नवगंधकेसरीं । भ्रमरी जैसी ॥ ८२ ॥ साखरेचिया राशी । बैसली तुठे माशी । तैसेनि स्त्रीवित्त आवेशी । जयाचें मन ॥ ८३ ॥ ठेला बेडूक कुंडीं । मशक गुंतला शेंबुडीं । जैसा ढोरु सेंबुडबुडीं । रुतला पंकीं ॥ ८४ ॥ तैसें घरीं-हुनि निघणें । नाहीं जीवें मने प्राणें । जया साप होऊनि असणें । भाटीं तिये ॥ ८५ ॥ प्रियोत्तमाचिया कंठीं । प्रमदा घे आटी । तैसी जीवेंसीं कोपटी । धरूनि ठाके ॥ ८६ ॥ मधुरसोद्देशें । मधुकर जैंचे जैसें । गृहसंगोपन तैसें । करी जो गा ॥ ८७ ॥ म्हातारपणीं जौलें । मा आणिक विपाइलें । तयाचें का जेतुलें । माता-पितरां ॥ ८८ ॥ तेतुलेनि पाडें पार्था । घरीं जया प्रेमआस्था । आणि स्त्रीवांचूनि सर्वथा । जाणेना जो ॥ ८९ ॥ तैसा स्त्रीदेहीं जो जीवें । पडोनिया सर्वभावें । कोण मी काय करावें । कांहीं नेणे ॥ ७९० ॥ महापुरुषाचें चित्त । जालिया वस्तुगतें । ठाके व्यवहारजात । जयापरी ॥ ९१ ॥ हानि लज्जा न देखे । परापवाद नाइके । जयाचीं इंद्रियें एकमुखें । स्त्रिया केलीं ॥ ९२ ॥ चित्त आराधी स्त्रियेचें । आणि तियेचेचि छंदें नाचे । माकड गारुडियाचें । जैसें होय ॥९३॥ आपणपेंही शिणवी । इष्टमित्र दुखवी । मग कवडाचि वाढवी । लोभी जैसा ॥९४॥ तैसा दानुपुण्यें खांची । गोत्रकुटुंबा [२०]वंची । परी गौरभरी स्त्रियेची । उणी हों नेदी ॥९५॥ पूजितीं दैवतें जोगेवी । गुरूतें बोलें झकवी । मायाबापां दावी । निदैरपण ॥ ९६ ॥ स्त्रियेच्या तरी विखीं । भोगुसंपत्ति अनेकीं । आणि वस्तु निकी[२४] । जे जे देखे ॥ ९७ ॥ प्रेमोथिलेनि भक्तें । जैसेनि भजिजे कुळदैवतें । तैसा एकाग्राचित्तें । स्त्री जो उपासी ॥ ९८ ॥ साच आणि चोख । तें स्त्रियेसीचि अशेख । येरांविषयीं जोगावणूक । तेही नाहीं ॥ ९९ ॥ इयेतें हन कोणी देखैल । इयेसी वेखैंसें जाईल । तरि युगचि बुडैल । ऐसें जया ॥ ८०० ॥ नायटया भेण । न मोडिजे नागांची आण । तैसी पाळी ऊणखूण । स्त्रियेची जो ॥ १ ॥ किंबहुना धनंजया । स्त्रीचि सर्वस्व जया । आणि तियेचिया जालिया- । लागीं प्रेम ॥ २ ॥ आणिकहीं

१ संगतीनें. २ पसरते. ३ स्पष्ट. ४ आसक्त. ५ समूळ. ६ वलळींत. ७ स्त्री. ८ मिठी ९ खोपटें. १० मधाच्या संरक्षणार्थ. ११ जाच सोसतो. १२ ( मूल ) झालें. १३ एकुलतें एक. १४ सिद्धार्थे. १५ ब्रह्मरूपी लीन. १६ निंदा. १७ सर्वस्व देणें. १८ कवडीचाही; द्रव्याचा. १९ कमी करतो. २० कपट करतो. २१ यैत्री. २२ साधारण सेवा करतो, २३ दरिद्र. २४ चांगली. २५ प्रेमळ. २६ निगडीपुरतें. २७ विरुद्ध २८ नायटे होतील या भीतीनें. २९ मनोगत. ३० पुत्रादिकावर.

बद्दल जो विचार करीत नाहीं, ७९ त्या धर्मभ्रष्टाच्या संगतीनें सर्व जगांत अतिशय अज्ञान पसरतें; आणि तें इतकें वाढतें कीं, ज्ञानासही तें आपल्या बळानें मागें हटवूं शकतें. ७८० पण हें असो; ज्या योगानें तुला अज्ञानाचें स्वरूप स्पष्ट समजेल अशीं त्याचीं आणखी कांहीं लक्षणें सांगतों, तीं ऐक. ८१ ज्याप्रमाणें भ्रमराचें चित्त नवीन उमललेल्या कमळाच्या केसरावर आसक्त असतें, त्याप्रमाणें ज्याची प्रीति घरावर जडलेली असते, ८२ ज्याप्रमाणें साखरेच्या राशीवरून माशी उठत नाहीं, त्याप्रमाणें ज्याचें मन स्त्रीवर आसक्त झालेलें असतें; ८३ ज्याप्रमाणें बेडूक पाण्याच्या कुंडांतून बाहेर पडत नाहीं, माशी शेंबडात गुंतल्यावर बाहेर पडूं शकत नाहीं, किंवा जनावर चिखलांत रुतल्यावर बाहेर निघूं शकत नाहीं, ८४ त्याप्रमाणें ज्याचें मन घरावरून दूर होत नाहीं, व जो मरणानंतर आपल्या बखळींत साप होऊन बसतो; ८५ एखादी स्त्री आपल्या जिवलगाच्या गळ्यांत मिठी मारून बसते, त्याप्रमाणें जो आपलें खोपट जिवाशीं धरून बसतो; ८६ मधाचे संरक्षणार्थ मधमाशा जाच सोसतात, त्याप्रमाणें जो हवीं तीं संकटें सोसून आपल्या घराचें संरक्षण करतो; ८७ म्हातारपणीं झालेलें, आणि त्यांतही एकुलतें एक असें मूल असलें म्हणजे त्याच्या आईबापाचें जितकें त्याच्यावर प्रेम असतें, ८८ तितकें ज्याचें प्रेम घरावर असतें; आणि, अर्जुना, ज्याला स्त्रीवाचून जगतांत दुसरी प्रिय वस्तु नाहीं; ८९ त्याचप्रमाणें, जो जिवाभावानें स्त्रीवर प्रेम करितो, आणि आपण कोण आहों, व आपलें सार्थक कशानें होईल हें कांहीं जाणत नाहीं; ७९० ज्याप्रमाणें सिद्ध पुरुषाचें चित्त ब्रह्मस्वरूपीं लीन झाल्यावर त्याचे सर्व व्यवहार थांबतात, ९१ त्याप्रमाणें ज्यानें आपलें सर्वस्व स्त्रीला विकलें आहे, तो आपली हानि, लोकलज्जा किंवा लोकांनीं केलेली निंदा इकडे लक्ष देत नाहीं. ९२ ज्याप्रमाणें माकड गारोड्याचे ताब्यात राहतें, त्याप्रमाणें जो मनांत स्त्रीचा ध्यास धरून तिचेच छंदानें वागतो; ९३ स्त्रीकरितां आपण हवे ते श्रम करतो, इष्टमित्राचा वाईटपणा घेतो, व तिच्याकरितां जितका जमवितां येईल तितका पैसा लोभ्याप्रमाणें जतन करतो; ९४ तसेच दानें व पुण्यकर्में कमी करितो. गोत्रज व कुटुंबांतील माणसें यांचेजवळ पैशाविषयीं कपट करितो; परंतु स्त्रीची थैली भरण्यांत कमी पडूं देत नाहीं; ९५ आपल्या आराध्यदेवतेची साधारण सेवा करतो, गुरूला थापा देतो, व आईबापांनीं पैसे मागितले तर त्यांस 'शिलक नाहींत' म्हणून सांगतो. ९६ पण स्त्रीविषयीं म्हटलें तर जी जी उत्तम वस्तु पाहील, ती ती तिच्या उपभोगाकरितां घेऊन देतो; ९७ ज्याप्रमाणें प्रेमळ भक्त आपल्या इष्ट देवतेस भजतो, त्याप्रमाणें जो स्त्रीची एकाग्र चित्तानें सेवा करतो; ९८ जेवढ्या उत्तम व मूल्यवान वस्तु तेवढ्या स्त्रीला देतो, आणि कुटुंबांतील माणसांना निर्वाहापुरत्या सुद्धां जिनसा देत नाहीं; ९९ स्त्रीकडे जर कोणी वाकड्या नजरेनें पाहील किंवा तिच्या विरुद्ध जाईल, तर ज्याला युगाचा अंत झाल्याप्रमाणें वाईट वाटतें; ८०० नायटे होतील या भीतीनें ज्याप्रमाणें नागाचे नवस फेडितात, त्याप्रमाणें जो स्त्रीची थुंकी झेलतो; १ अर्जुना, फार काय सांगावें ? ज्याला स्त्री हेंच दैवत वाटतें व जो तिजपासून झालेल्या पुत्रादिकांवर विशेष प्रेम करितो; २ आणखी तिचे जेवढे आप्तसंबंधी असतील त्यांना आपल्या जीवापलीकडील

जें समस्त । तियेचें संपत्तिजात । तें जीवाहूनि आप्त । मानी जो कां ॥ ३ ॥ तो अज्ञानासी मूळ । अज्ञाना त्याचेनि बळ । हें असो केवळ । तो तेंचि रूप ॥ ४ ॥ ( ६२९. इष्टानिष्टाचा विचार नसणें, ८०५–८०७ ) आणि मैतालिया सागरीं । मोकळिलिया तरी । लाटांच्या येरझारीं । आंदोळे जेवीं ॥ ५ ॥ तेवीं प्रिय वस्तु पावे । आणि सुखें जो उंचावे । तैसाचि अप्रियासवें । तळवटु घे ॥ ६ ॥ ऐसेनि जयाचे चित्तीं । वैषम्य-साम्याची वाखती । वाहे तो महामती । अज्ञान गा ॥७॥ ( ६३०. व्याभिचारी भक्ति, ८०८–८२३ ) आणि माझ्या ठायीं भक्ति । फळालागीं जया आर्ती । धनोद्देशें विरक्ति । नटणें जेवीं ॥ ८ ॥ नातरी कांताच्या मानसीं । रिगोनि स्वैरिणी जैसी । राहाटे जारेंसी । जावयालागीं ॥ ९ ॥ तैसी मातें किरीटी । भजती गा पोटीं । करूनि जो दिठी । विषो सुये ॥ ८१० ॥ आणि भजिन्नलियासवें । तो विषो जरी न पावे । तरी सांडी म्हणे आघवें । टवाळ हें ॥११॥ कुणबट कुळवाडी । तैसा आन आन देव मांडी । आदिलाची परवडी । करी तया ॥१२॥ तया गुरुमार्गा टेंके । जयाचा सुंगरवा देखे । तरी तयाचा मंत्र शिके । येरु नेघे ॥ १३ ॥ प्राणिजातेंसी निष्ठुरु । स्थावरीं बहु भरु । तेवींचि नाहीं एकसरु । निर्वाहो जया ॥ १४ ॥ माझी मूर्ति निफजवी । ते घराचे कोनीं बैसवी । आपण देवो देवी । यात्रे जाय ॥ १५ ॥ नित्य आराधन माझें । काजीं कुळदेवता भजे । पर्वविशेषें कीजे । पूजा आना ॥ १६ ॥ माझें अधिष्ठान घरीं । आणि वोसे आनाचे करी । पितृकार्यावसरीं । पितराचा होय ॥ १७ ॥ एकादशीच्या दिवशीं । जेतुला पैंडु आम्हांसी । तेतुलाचि नागांसी । पंचमीच्या दिवशीं ॥ १८ ॥ चौथे मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होये । चवदसी म्हणे माये । तुझाचि वो दुर्गे ॥१९॥ नित्य नैमित्तिकें कर्में सांडी । मग बैसे नवचंडी । आदित्यवारीं वोढी । वहिरवा पात्रीं ॥ ८२० ॥ पाठीं सोमवार पावे । आणि बेलेंसीं लिंगा धांवे । ऐसा एकलाचि आघवे । जोगावी जो ॥ २१ ॥ ऐसा अखंड भजन करी । उगा नोहे क्षणभरी । आघवेन गांवद्वारीं । अहेवे जैसी ॥ २२ ॥ ऐसेनि जो भक्तु । देखसी सैरा धावतु । जाण अज्ञानाचा मूर्तु । अवतार तो ॥२३॥ ( ६३१. एकांताची आवड नसणें, ८२४ ) आणि एकांतें चोखटें । तपोवनें तीर्थें तटें । देखोनि जो गा विटे । तोही तोचि ॥ २४ ॥ ( ६३२. जनसमूहाची आवड, ८२५ ) जया जनपदीं सुख । गजबजेचें कवतिक । वानूं आवडे लौकिक । तोही तोचि ॥ २५ ॥ ( ६३३.

---

१ आप्तसंबंधी. २ सवळलेल्या. ३ नौका. ४ तळीं जातो, खेद पावतो. ५ लाभालाभाची. ६ चिंता. ७ इच्छा. ८ व्यभिचारिणी. ९ रीत; देखावा १० थाटमाट. ११ प्रतिमांवर. १२ एकनिष्ठपणा. १३ कार्यप्राप्तीकरतां. १४ स्थापना. १५ वाणें वाटणें. १६ श्राद्धकालीं. १७ भक्ति. १८ चतुर्थी. १९ चतुर्दशीस. २० नवरात्रांत नवचंडीच्या पाठास. २१ खिचडा वाटतो. २२ सेवा करतो. २३ वेश्या.

समजतो, ३ तो अज्ञानाचें मूळ आहे; व त्याच्याचमुळें अज्ञानाची वृद्धि होते. फार काय सांगावें ? तो केवळ अज्ञानरूपच होय. ४ ज्याप्रमाणें खवळलेल्या समुद्रांत घातलेली नौका लाटांमुळें हेलकावे खाते, ५ त्याप्रमाणें जो आवडती वस्तु प्राप्त झाली असतां सुखाच्या शिखरावर चढतो, व ती न मिळाली असतां खालीं आपटतो; ६ याप्रमाणें, हे महाबुद्धिमंता अर्जुना, ज्याचे चित्तांत वस्तूच्या लाभालाभापासून चिंता उत्पन्न होते, तो अज्ञानी होय. ७ आणि जो माझी भक्ति करतो, परंतु मनांत फळाची इच्छा धरतो; आणि बाहेरून विरक्तपणा दाखविणारा मनुष्य ज्याप्रमाणें अंतर्यामीं धनाची इच्छा करतो, ८ किंवा व्यभिचारिणी स्त्री आपलें जारकर्म चालविण्याकरितां पतीच्या पुढेंपुढें करून त्याची मर्जी संपादिते, ९ त्याप्रमाणें, हे किरीटी, मजवर भक्ति आहे असें दाखवून जो विषयांकडे दृष्टि ठेवितो, ८१० आणि विषयप्राप्तीकरिता माझी भक्ति करून विषयप्राप्ति झाली नाहीं तर माझी भक्ति सोडून देऊन ' ईश्वर खोटा आहे ' अशी माझी टवाळी करितो; ११ कुणबी जशी आपली शेतकी वाढवितो, तसा हा पुष्कळ देवांची सेवा करितो; व पहिल्या देवाप्रमाणेंच दुसऱ्या देवाचीही परवड करितो; १२ ज्याचे ठिकाणीं विशेष थाटमाट आहे अशा गुरूवर भक्ति ठेवून त्याजपासून गुरुमंत्र घेतो, व इतरांला विचारीत नाहीं; १३ प्राणिमात्राबरोबर कठीण शब्द बोलून त्यांचा तिरस्कार करतो, व पाषाणाच्या मूर्तीवर विशेष प्रेम करितो; तसेंच ज्याला एकनिष्ठपणानें भक्ति करून राहवत नाहीं, १४ माझी मूर्ति तयार करून तिची घराचे कोंपऱ्यात स्थापना करतो, आणि आपण इतर देवांच्या यात्रा करीत हिंडतो. १५ रोज माझी पूजा करितो; कार्यप्राप्तीकरितां कुलदेवतेची पूजा करितो; आणि एखादी पर्वणी आली असतां तिसऱ्याच देवाची पूजा करितो; १६ माझी स्थापना घरांत करून दुसऱ्या देवाप्रीत्यर्थ वाणें वाटतो, व श्राद्धकालीं पितरांची पूजा करितो; १७ एकादशीच्या दिवशीं जशी माझी भक्ति करितो, तसाच नागपंचमीच्या दिवशीं नागांस भजतो; १८ चतुर्थीचे दिवशीं गणपतीची पूर्ण भक्ति करितो, व चतुर्दशीचे दिवशीं देवीचें पूजन करून, ' हे अंबे, मी तुझा आहे, ' अशी तिची प्रार्थना करितो, १९ नित्यनैमित्तिक कर्में टाकून देऊन नवरात्रांत नवचंडीचा पाठ एके जागीं बसून करितो; आदित्यवार आला म्हणजे बहिरोबाच्या नांवानें खिचडा वाटतो, ८२० पुढें सोमवार आला म्हणजे बेल घेऊन शंकरास वाहण्याकरितां जातो, व याप्रमाणें जो एकटाच सर्व देवांची सेवा करितो; २१ ज्याप्रमाणें गावांतील वेश्या आपली प्रीति दाखवून सर्वांचें मन आकर्षण करून घेते, त्याप्रमाणे जो क्षणभरही स्वस्थ न बसता विषयप्राप्तीकरितां सर्व-देवांचें पूजन करितो, २२ याप्रमाणें जो देवांची भक्ति करीत चोहोंकडे धावत असतो, तो अज्ञानाचा अवतारच होय, २३ आणि उत्तम एकांतस्थानें, तपोवनें, तीर्थें व तट हीं पाहून ज्याचें मन विटतें, तोही केवळ अज्ञानरूपच होय. २४ ज्याला शहरांत राहण्यानें सुख होतें, पुष्कळ मंडळींत बसणे आवडतें व लौकिकांतील गोष्टी सांगण्याची हौस वाटते, तोही केवळ अज्ञानरूपीच होय. २५ आणि जो अशा प्रकारचा

अध्यात्मज्ञानाची आवड नसणें, ८२६–८४२ ) आणि आत्मा गोचरु होये। ऐसी जे विद्या आहे । ते आइकोनि डौरें[1] वाहे । विद्वांसु जो ॥ २६ ॥ उपनिषदांकडे न वचे। योगशास्त्र न रुचे । अध्यात्मज्ञानीं जयाचें । मनचि नाहीं ॥२७॥ आत्मचर्चा[2] एकी आथी । ऐसिये बुद्धीची भिंती । पाडूनि जयाची मती । वोढाळ जाहली ॥२८॥ कर्मकांड तरी जाणे । मुखोद्गत पुराणें । ज्योतिषीं तो म्हणे । तैसोंचि होय ॥ २९ ॥ शिल्पीं अति निपुण । सूपकर्मीं[3]ही प्रवीण । विधि[4] आथर्वण । हातीं आथी ॥ ८३० ॥ कोकीं[5] नाहीं ठेलें । भारत कैरीं[6] म्हणितलें । आगम[7] आपाविले[8]। मूर्त होती ॥ ३१ ॥ नीतिजात सुंझे[9] । वैद्यकही बुंझे । काव्यनाटकीं दुजें । चतुर नाहीं ॥३२॥ स्मृतींची चर्चा । दंशुं[10] जाणे गारुडियाचा । निघंटू[11] प्रज्ञेचौं[12] । पाँइकी[13] करी ॥३३॥ पैं व्याकरणीं चोखडा । तर्कीं[14] अतिगाढा । परि एक आत्मज्ञानीं फुडा । जात्यंधु जो ॥३४॥ तें एकवांचूनि आघवां शास्त्रीं । सिद्धांत निर्माणधौत्री[15] । परी जळो तें मूळनक्षत्रीं । न पाहें गा ॥३५॥ मोराआंगीं अशेषें । पिसें असती डोळसें । परि एकली दृष्टि नसे । तैसें तें गा ॥३६॥ जरी परमाणूयेवढें । संजीवनीमूळ जोडे । तरी बहु काय गाडे । भरणे येरें ॥ ३७ ॥ आयुष्यावीण लक्षणें । [16]सिसेंवीण अळंकरणें । वोहरेंवीणें[17] वेंधावणें । तो विटंबु गा ॥ ३८ ॥ तैसें शास्त्रजात जाण । आघवोंचि अप्रमाण । पार्था अध्यात्मज्ञानेंविण । एकलेनि ॥ ३९ ॥ यालागीं अर्जुना पाहीं । अध्यात्मज्ञानाच्या ठायीं । जया नित्यबोधु नाहीं । शास्त्रमूढा ॥ ८४० ॥ तया शरीर जें जालें । तें अज्ञानाचें बी विरूढलें । तयाचें व्युत्पन्नत्व गेलें । अज्ञानवेलीं ॥ ४१ ॥ तो जें जें बोले । तें अज्ञानाचि फुलले । तयाचें पुण्य जें फळलें । तें अज्ञान गा ॥ ४२ ॥

( ६३४. तत्वार्थदर्शनाचा अभाव, ८४३–८५२ ) आणि अध्यात्मज्ञान कहीं । जेणें मानिलेंचि नाहीं । तो ज्ञानार्थु न देखे काई । हें बोलावें असे ॥ ४३ ॥ ऐलीची थडी न पवतां । पळे जो माघौता । तया पैलद्वीपींची वार्ता । काय होय ॥४४॥ कां दौंरवंठाचि जयाचें । शीर रोंविलें रैंांचे । तो केविं परिवरींचें[21] । ठेविलें देखे ॥ ४५ ॥ तेविं अध्यात्मज्ञानीं जया । अनोळख धनंजया । तया ज्ञानार्थु देखावया । विषो काई ॥ ४६ ॥ म्हणोनि आतां विशेषें । तो ज्ञानाचें तत्त्व न देखे। हें सांगावें आखें[22] लेखें । न लगे तुज ॥ ४७ ॥ जेव्हां सगर्भे वाढिलें । तेव्हांचि पोटींचें धैलें[23] । तैसें मागिले पदें बोलिलें । तेंचि होय ॥ ४८ ॥ वांचूनियां वेगळें।

१ डौर वाजवितो, उपहास करतो. २ आत्मानात्मनिरूपण. ३ पाकशास्त्री. ४ जारण, मारण, उच्चाटन, व वशीकरण. ५ कामशास्त्री. ६ व्याख्यान करतो. ७ शास्त्र. ८ स्वाधीन केलें. ९ जाणतो. १० रहस्य. ११ वेदांतील शब्दाचा कोश. १२ बुद्धीचा १३ चाकरी. १४ न्यायशास्त्री. १५ आधारभूत. १६ मस्तक. १७ वधूवराशिवाय. १८ वरघवा किंवा वरात काढणें. १९ उंबऱ्यातच. २० ध्यानेंत दडपणें. २१ घरातील. २२ आंकडे मांडून. २३ तृप्त झालें.

विद्वान असतो कीं, ज्या विद्येपासून आत्म्याची प्राप्ति होते ती ऐकूं आली असतां डौर वाजवून, तीं कानीं पडूं देत नाहीं ! ( तिचा उपहास करतो ! ) २६ उपनिषदांकडे जो पहात नाहीं, योगशास्त्र ज्याला आवडत नाहीं, व अध्यात्मज्ञानाकडे ज्याचें लक्ष जात नाहीं, २७ ज्या बुद्धीपासून आत्मानात्मनिरूपण होतें, ती बुद्धि टाकून ज्याचें मन इतर सर्व शास्त्रांकडे ओढ घेतें; २८ जो कर्मकांड पूर्णपणें जाणतो, ज्याला पुराणें मुखोद्गत आहेत, आणि ज्योतिषांत तर इतका निपुण आहे कीं, तो म्हणेल तसेंच व्हावयाचें ! २९ जो शिल्पशास्त्रांत अति निष्णात आहे, पाकशास्त्रांत प्रवीण आहे, आणि जारण, मारण, उच्चाटन व वशीकरण हीं म्हणजे केवळ ज्याचा हातचा मळ आहेत; ८३० कामशास्त्रांत जो पक्का दर्दी आहे; एखादी गोष्ट ऐकली असतां तिजविषयीं भारताप्रमाणें व्याख्यान करतो; व शास्त्रें ज्याचे पुढें मूर्तिमंत उभीं राहतात; ३१ जो नीतिजात उत्तम जाणतो, वैद्यशास्त्रांत जो निपुण आहे, आणि काव्यनाटकांत ज्याचा हात कोणी धरूं शकत नाहीं; ३२ स्मृतींची जो चर्चा करितो, गारोड्याची मंत्रविद्या जाणतो, वेदांतील शब्दांचा कोश ज्याला मुखोद्गत आहे; ३३ जो व्याकरणांत निपुण आहे व न्यायशास्त्रात ज्याची मति गहन आहे, परंतु एक आत्मज्ञानाविषयीं जो जन्मांध आहे; ३४ तो त्या एका आत्मज्ञानाशिवाय इतर सर्व शास्त्रांतील सिद्धांताना आधारभूत असेल, पण जळो तें त्याचें ज्ञान ! तें ( म्हणजे सर्व लक्षणांनीं संपन्न असलेल्या पण ) मूळ नक्षत्रावर जन्मलेल्या मुलाप्रमाणें होय. तूं तिकडे मुळींच लक्ष देऊं नको. ३५ ज्याप्रमाणें मोराच्या सर्वांगावरील पिसाऱ्यावर डोळे असतात, परंतु त्यांस एक दृष्टि नाहीं, त्याप्रमाणें त्याची ती सर्वविद्यासंपन्नता होय. ३६ मेलेल्या मनुष्यास जिवंत करणारी मुळी जर परमाणूएवढीही सांपडली, तर मग इतर गाडाभर मुळ्या करावयाच्या आहेत काय ? ३७ उत्तम लक्षणें असून अल्पायुष्य असणें, किंवा मस्तकाशिवाय अलंकार घालणें, अथवा वधूवरांवांचून वरात काढणें ही विटंबना होय; ३८ त्याप्रमाणें पार्था, एक अध्यात्मज्ञानावांचून इतर सर्व शास्त्रें अप्रमाण होत. ३९ यास्तव अर्जुना, तूं हें ध्यानात धर कीं, ज्या पढतमूर्खाला आत्मज्ञानाचा नित्यावबोध नाहीं, ८४० त्या मनुष्याचें शरीर म्हणजे अज्ञानाचें वाढलेलें बीजच होय; आणि त्याची व्युत्पन्नता म्हणजे अज्ञानाच्या वेली होत. ४१ तो जें बोलतो, तें अज्ञानाचें फुलच होय; व तो जें पुण्यमार्गाचें आचरण करितो, तें अज्ञानाचें फल होय; ४२ आणि ज्याची अध्यात्मज्ञानावर श्रद्धा नाहीं, त्याला ज्ञानार्थ ( तत्त्वार्थ ) प्राप्त होत नाहीं, हें बोलूनच का दाखविलें पाहिजे ? ४३ नदीच्या अलीकडील कांठापर्यंतही न येतां जो माघारी जातो, त्याला पलीकडच्या कांठची बातमी कशी बरें कळेल ? ४४ किंवा घरांत शिरताना उंबऱ्यांतच ज्याचें मस्तक कापून खांचेंत दडपलें, तो घरांत काय ठेवलें आहे हें कसें पाहील ? ४५ त्याप्रमाणें अर्जुना, अध्यात्मज्ञानाची व ज्याची ओळखही नाहीं, त्याला ज्ञानार्थ ( तत्त्वार्थ ) पहावयास कसा विषय होईल ? ४६ म्हणून, अशा मनुष्यास ज्ञानाचें तत्त्व कळत नाहीं, हें तुला विशेषेंकरून–आंकडे मांडून सांगण्याचें कारण नाहीं. ४७ गरोदर स्त्रीला वाढलें तेव्हांच तिच्या उदरातील गर्भाची तृप्ति झाली; त्याप्रमाणें, पूर्वी जीं ज्ञानाचीं लक्षणें सांगितलीं, तद्विरुद्ध ज्या गोष्टी तेंच अज्ञान होय. ४८ अंधळ्यास जेव-

रूप करणें हें न मिळे । जेवीं अवंतिलें आंधळें । तें दुजेनसीं ये ॥ ४९ ॥ एवं इये उपरतीं । अज्ञानचिन्हें मागुती । अमानित्वादि प्रभृती । वाखाणिलीं ॥८५०॥ जे ज्ञानपदें अठरा । केलिया येरीं मोहरां । अज्ञान यां आकारा । सहजें येती ॥५१॥ मागा श्लोकाचेनि अर्धार्धें । ऐसें सांगितलें श्रीमुकुंदें । ना उफराटीं इये ज्ञानपदें । तेंचि अज्ञान ॥ ५२ ॥ ( ६३५. ज्ञान नाहीं तेंच अज्ञान, त्याचाच विचार केला; ८५३-८५४ ) म्हणोनि ईया वाहणीं । केली म्यां उपलवणी । वांचूनि दुधा मेळऊनि पाणी । फार कीजे काई ॥ ५३ ॥ तैसें जी न बडबडी । पदाची कोरें न सांडीं । मूळध्वनीचिये वाढी । निमित्त जाहलों ॥ ५४ ॥ ( ६३६. श्रोते ज्ञानदेवांची स्तुति करतात, ८५५-८५९ ) तंव श्रोते म्हणती राहें । कें परिहारा ठावो आहे । बिहिसी कां वायें । कविपोषका ॥ ५५ ॥ तूतें श्रीमुरारी । म्हणितलें प्रगट करीं । जे अभिप्राय गेव्हरीं । झांकिले आम्हीं ॥ ५६ ॥ तें देवाचें मनोगत । दावित आहासी तूं मूर्त । हेंही म्हणतां चित्त । दाटैल तुझें ॥ ५७ ॥ म्हणोनि असो हें न बोलों । परि सांविया गा तोषलों । जें ज्ञानतरियें मेळविलों । श्रवणसुखाचिये ॥ ५८ ॥ आतां इयावरी । जे तो श्रीहरी । बोलिला तें करीं । कथन वेगां ॥५९॥ ( ६३७. श्रोत्यांची प्रार्थना, ८६० ) इया संतवाक्यासरिसें । म्हणितलें निवृत्तिदासें । जी अवधारा तरी ऐसें । बोलिलें देवें ॥ ८६० ॥ ( ६३८. अज्ञानमार्ग टाकून ज्ञानाचे ठिकाणीं बुद्धि निश्चित कर, ८६१-८६२ ) म्हणती तुवां पांडवां । हा चिन्हसमुच्चयो आघवा । आयकिला तो जाणावा । अज्ञानभागु ॥ ६१ ॥ इया अज्ञानविभागा । पाठी देऊनि पैं गा । ज्ञानविखीं चांगा । दृढा होइजे ॥ ६२ ॥ ( ६३९. ज्ञेय जाणण्याची इच्छा, ८६३. ) मग निर्वाळिलेनि ज्ञानें । ज्ञेय भेटेल मनें । तें जाणावया अर्जुनें । आस केली ॥ ६३ ॥ ( ६४०. ज्ञेय म्हणजे ब्रह्म, ८६४-८६५ ) अवतरणः—तंव सर्वज्ञांचा रावो । म्हणे जाणोनि तयाचा भावो । परिसें ज्ञेयाचा अभिप्रावो । सांगों आतां ॥ ६४ ॥

ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ।
अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥

अन्वयः—यत् ज्ञेयं तत् प्रवक्ष्यामि यद् ज्ञात्वा ( जीवः ) अमृतं अश्नुते, तत् अनादिमत् परं ब्रह्म सद् न च असद् न इति उच्यते ॥ १२ ॥

तरि ज्ञेय ऐसें म्हणणें । वस्तुतें येणेंचि कारणें । जें ज्ञानेंवांचूनि कवणें । उपायें नये ॥ ६५ ॥ ( ६४१. ज्ञेय जाणल्याचें फळ, ८६६-८६७ ) आणि जाणितलेयावरीतें । कांहींच करणें नाहीं जेथें । जाणणेंचि तन्मयीतें । आणी जयाचे ॥६६॥ जें जाणितलेयासाठीं । संसार काढूनियां कांठीं । जिरोनि जाइजे पोटीं । नित्या-

णाचें आमंत्रण दिल्यावर ज्याप्रमाणें त्याबरोबर दुसरा ( डोळस ) मनुष्य येतो, त्याप्रमाणें, ज्ञानाचीं लक्षणें सांगितल्यावर अज्ञानाचें जास्त स्पष्टीकरण करण्याचें कारण नाहीं. ४९ याप्रमाणें उलट रीतीनें ज्ञानाचीं अमानित्वादि चिन्हें पुनः सांगितलीं. ८५० तीं ज्ञानाचीं अठरा लक्षणें उलटपक्षीं लाविलीं असता सहज अज्ञानाचीं लक्षणें सिद्ध होतात. ५१ मागें ( अकराव्या ) श्लोकाच्या उत्तरार्धाच्या दुसऱ्या अर्धामध्यें श्रीमुकुंदांनीं सांगितलें कीं, " हीं ज्ञानाचीं लक्षणें; आणि याचे उलट जीं लक्षणें, तें अज्ञान होय." ५२ म्हणून या प्रकारानें मीं अज्ञान लक्षणांचा विस्तार केला. एऱ्हवीं दुधांत पाणी मिळवून दूध वाढवून काय करावयाचें? ५३ त्याचप्रमाणें, एक अक्षरही न सोडता आणि व्यर्थ बडबड न करितां, मुळांत जो अर्थ होता, तोच मीं विस्तारानें सांगितला. ५४ तेव्हां श्रोते म्हणतात, " हे कविपोषका, तुला निराश होण्यास कोठें जागा आहे? आणि तूं उगीच का भितोस? ५५ तुला श्रीमुरारींनींच सांगितलें आहे कीं, ' आम्हीं जें अभिप्राय गुप्तस्थळीं झांकून ठेविले आहेत, ते तूं प्रकट कर ' ५६ तें देवाचें मनोगत आम्हाला तूं स्पष्ट करून सांगितलेंस असें जरी आम्हीं म्हटलें, तरी तुला तें सहन होणार नाहीं. ५७ म्हणून आम्ही आतां या सर्व गोष्टी सोडून देतों. पण सध्यां तूं श्रवणसुखाची ज्ञाननौका आम्हास प्राप्त करून दिलीस, त्या योगानें आम्हास फार संतोष झाला आहे. ५८ आतां यापुढें, श्रीहरि काय बोलले तें आम्हास लवकर कथन कर " ५९ हें संतांचें वाक्य ऐकल्याबरोबर निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणाले, तर ऐका. देव असें बोलले. ८६० ( काय बोलले? तर ) ते म्हणाले, " अर्जुना, हीं जीं तूं सर्व लक्षणें ऐकलींस, तीं अज्ञानाचीं होत. ६१ ह्या अज्ञानभागाकडे दुर्लक्ष करून तूं ज्ञानप्राप्तीविषयीं आपला निश्चय दृढ कर. ६२ मग त्या शुद्ध ज्ञानाच्या योगें तुला ज्ञेयाची प्राप्ति होईल. " हें ऐकताच अर्जुनानें तें जाणण्याविषयीं मनःपूर्वक इच्छा केली. ६३ तेव्हां सर्वज्ञांचा राजा श्रीकृष्ण यानें अर्जुनाच्या मनांतील भाव जाणून त्यास म्हटलें कीं, आतां तुला ज्ञेय म्हणजे काय तें सांगतों, ऐक. ६४

*श्लोकार्थः—जें ज्ञेय म्हणजे जाणण्यास योग्य, जें जाणल्यानें जीवाला मोक्ष मिळतो, तें तुला मी आतां सांगतों. ज्याला आदि नाहीं, तें सर्वोत्कृष्ट ब्रह्म सत् म्हणता येत नाहीं व असत् म्हणतां येत नाहीं ॥ १२ ॥*

हें पहा, वस्तूला म्हणजे ब्रह्माला ज्ञेय म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, तें ज्ञानप्राप्तीशिवाय इतर कोणत्याही उपायानें प्राप्त होत नाहीं; ६५ आणि तें समजल्यावर मुमुक्षूस कांहीं कर्तव्य उरत नाहीं. कारण, त्याचें ज्ञानच मुमुक्षूला तद्रूपतेला आणतें. ( तें जाणल्याबरोबर तो तद्रूप होतो. ) ६६ जें जाणलें असतां मुमुक्षूंनीं संसाराचा त्याग करून नित्या-

१ या प्रकारानें. २ विस्तार. ३ फाठ-अक्षर. ४ निराधेय. ५ गुप्त स्थळीं. ६ तुला सहन होणार नाहीं. ७ सध्यां. ८ नौका. ९ लक्षणसमुदाय. १० शुद्ध. ११ तद्रूपतेस. १२ कांठास काढून; त्याग करून.

नंदाच्या ॥ ६७ ॥ ( ६४२. सतासताहून वेगळेपणा, ८६८–८७३ ) तें ज्ञेय गा ऐसें। आदि जया नसे । परब्रह्म आपैसें। नाम जया ॥६८॥ जें नाहीं म्हणों जाइजे । तंव विश्वाकारें देखिजे । आणि विश्वाचि ऐसें म्हणिजे । तरि हे माया ॥ ६९ ॥ रूप वर्ण व्यक्ती । नाहीं दृश्य द्रष्टा स्थिती । तरि कोणे कैसें आथी । म्हणावे पां ॥ ८७० ॥ आणि साचाचि जरी नाहीं । तरि महदादि कोणे ठाईं । स्फुरत कैचे काई । तेणेवीण असे ॥ ७१ ॥ म्हणोनि आथी नाथी हे बोली । जें देखोनि मुकी जाहली । विचारेंसीं मोडली । वाट जेथें ॥ ७२ ॥ जैसी भांड घट शेरावीं। तदाकारें असे पृथ्वी । तैसें सर्व होऊनियां सर्वी । असे जे वस्तु ॥ ७३ ॥

सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥

अन्वयः—लोके तत् सर्वतः पाणिपाद, सर्वतः अक्षिशिरोमुख; सर्वतः श्रुतिमत् (अस्ति), च सर्वं आवृत्य तिष्ठति ॥ १३ ॥

( ६४३. विश्वबाहू, ८७४–८७५ ) आघवांचि देशीं कालीं । नेण्हतां देशकाळावेगळी। जे क्रिया स्थूलास्थूलीं । तेचि हात जयाचे ॥ ७४ ॥ तयातें याकारणें। विश्वबाहु ऐसें म्हणणें । जे सर्वांचि सर्वपणें । सर्वदा करी ॥ ७५ ॥ ( ६४४. विश्वांघ्रि, ८७६ ) आणि समस्तांही ठायां । एके काळीं [१]घनंजया । आलें असे म्हणोनि जया । विश्वांघ्रि[३] नाम ॥ ७६ ॥ ( ६४५. विश्वतश्चक्षु, ८७७–८७८ ) पैं सवितया आंग डोळे । नाहींत वेगळे वेगळे । तैसे सर्वद्रष्टें सकळें । स्वरूपें जें ॥ ७७ ॥ म्हणोनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षूच्या ठायीं पक्षु । बोलावया [४]दक्षु । जाहला वेदु ॥ ७८ ॥ ( ६४६. विश्वमूर्धा, ८७९. ) जें सर्वांचि शिरावरी । नित्य नांदे सर्वोपरी। ऐसिये स्थितीवरी । [५]विश्वमूर्धा म्हणिपे ॥ ७९ ॥ ( ६४७. विश्वतोमुख, ८८०–८८१ ) पैं गा मूर्ति तेंचि मुख । [६]हुताशना जैसें देख । तैसे सर्वपणें अशेख । भोक्ते जे ॥ ८८० ॥ यालागीं तया पार्था । विश्वतोमुख हे व्यवस्था । आली [७]वाक्पथा। श्रुतीचिया ॥ ८१ ॥ ( ६४८. सर्वत्र कान असून तें सर्वव्यापी आहे, ८८२–८८३ ) आणि वस्तुमात्रीं गगन । जैसें असे [८]संलग्न । तैसें शब्दजातीं कान । सर्वत्र जया ॥ ८२ ॥ म्हणोनि आम्ही तयातें । म्हणों सर्वत्र आइकतें । एवं जें सर्वांतें। आवरूनि असे ॥८३॥ ( ६४९. ज्ञेयावर हातापायाचा आरोप, ८८४–८९०. ) येऱ्हवीं तरी महामती । विश्वतश्चक्षु इया श्रुती । तयाचिये व्याप्ती । रूप केलें ॥ ८४ ॥ वांचूनि हस्त नेत्र पाये । हे भाष तेथ के आहे । सर्वशून्यत्वाचा सांहे । [९]निष्कर्षु जें ॥ ८५ ॥ पैं कल्लोळातें कल्लोळें । ग्रासिजत असे ऐसें कळे। परि ग्रासितें ग्रासा-

१ डेरा, घागर, परळ इत्यादिकांत. २ न होतां ३ ज्याला सर्वत्र पाय आहेत असें. ४ शहाणा. ५ ज्याला सर्वत्र डोकीं आहेत असें. ६ अग्नीला. ७ बोलण्यात. ८ ओतप्रोत भरले. ९ परिणाम.

नंदांत निमग्न व्हावें, ६७ तें ज्ञेय असें आहे कीं, त्याला आदि नाहीं; आणि त्याला साहजिकच परब्रह्म हें नांव आहे. ६८ तें नाहीं म्हणावयास जावें तर विश्वरूपेंकरून दृष्टीस पडतें; आणि विश्वच परब्रह्म असें म्हणावें, तर ही आहे माया! ६९ त्याला रूप, वर्ण आकार हीं नाहींत; तसेंच तें दृष्टीस पडणारें नाहीं, व तें कशास पहातही नाहीं; तेव्हां 'तें आहे' असें कोणीं व कसें म्हणावें? ८७० बरें, तें नाहीं असें धरून चाललें, तर हीं महत्तत्त्वादि कोठून स्फुरण पावलीं? आणि त्यावांचून दुसरें आहे तरी काय? ७१ म्हणून त्यासंबंधानें 'आहे' 'नाहीं' असें कांहींच बोलतां न येऊन वेदांचीही वाणी मुकी झाली; आणि त्यांच्या ठिकाणीं विचारासह वाट खुंटली! ७२ ज्याप्रमाणें मातीपासून तयार केलेले डेरे, घागरी, परळ इत्यादिकांच्या आकारांप्रमाणें पृथ्वी दिसते, (परंतु ती त्यांपासून निराळी आहे.) त्याप्रमाणें ब्रह्म आपणच सर्व जग नटलेलें असून जगांत ओतप्रोत भरलेलें आहे; (तथापि तें त्याहून भिन्न आहे); ७३

श्लोकार्थः—या जगात त्याला सर्व बाजूंनीं हात व पाय आहेत; सर्व बाजूंनीं नेत्र, मस्तकें व मुखें आहेत; सर्व बाजूंनीं कान आहेत; आणि तें सर्वांला व्यापून राहिलें आहे. ॥ १३ ॥

सर्व देशांत सर्व कालीं भरलेलें असल्यामुळें स्थूल व सूक्ष्म वस्तूंपासून तेंच क्रिया करवितें, म्हणून वस्तुच ज्याचे हात होत, ७४ त्या ब्रह्माला या कारणामुळेंच 'विश्वबाहु' असें म्हटलें आहे; का कीं, तें सर्वत्र सर्व प्रकारें सर्वदा क्रिया करवीत असतें; ७५ आणि अर्जुना, तें सर्व ठिकाणीं एकसमयावच्छेदेंकरून असतें, म्हणूनच त्याला 'विश्वांघ्रि' हें नांव प्राप्त झालें आहे. ७६ ज्याप्रमाणें सूर्याला अंग व डोळे हे अवयव वेगळे वेगळे नाहींत, त्याप्रमाणें जें सर्वस्वरूपेंकरून पाहतें, ७७ म्हणूनच त्यास डोळे नाहींत, तरी वेदानें त्याला मोठ्या शहाणपणानें 'विश्वतश्चक्षु' असें म्हटलें आहे; ७८ जें सर्वांपेक्षां उंच व सर्व प्रकारें नित्य आहे, म्हणूनच ज्याला 'विश्वमूर्धा' असें म्हणतात; ७९ हें पहा, अग्नीची जी मूर्ति तेंच त्याचें मुख होय; त्याचप्रमाणें, जें ब्रह्म सर्व वस्तूंचा उपभोग घेतें; ८८० पार्था, याच कारणास्तव श्रुतींनीं ब्रह्माला 'विश्वतोमुख' असें म्हटलें आहे. ८१ आणि आकाश ज्याप्रमाणें सर्व वस्तूंत ओतप्रोत भरलें आहे, त्याप्रमाणें शब्दमात्राबरोबर त्याचे श्रवण आहेत, ८२ म्हणूनच त्या ब्रह्माला आम्ही 'सर्वत्र ऐकणारें' असें म्हणतों. कारण तें या जगतांत सर्वांला व्यापून आहे. ८३ हे महामते अर्जुना, ब्रह्माची याप्रमाणें व्याप्ति असल्यामुळें श्रुतींनीं त्याला 'विश्वतश्चक्षु' असें म्हटलें आहे. ८४ बाकी हात, नेत्र, पाय ह्यांची त्या ठिकाणीं गोष्ट तरी कोठून येणार? कारण तें सर्वशून्याचा निष्कर्ष (परिणाम) आहे. ८५ (समुद्राचे कांठावर उभें राहिलें असतां, लाटा उत्पन्न होऊं लागल्या म्हणजे) एखादी मोठी लाट लहान लाटेचा नाश करते असें दिसतें, परंतु (खरोखर विचारपूर्वक पाहूं गेलें असतां) ती थोरली लाट (ज्या लाटेचा नाश करिते) त्या लहान लाटेपासून

वेगळें । असे काई ॥ ८६ ॥ तैसें साचचि जें एक । तेथ कें व्याप्यव्यापक । परि बोलावया नावेक । करावें लागे ॥ ८७ ॥ पैं शून्य जैं दावावें जाहालें । तैं बिंदुलें एक केलें । तैसें अद्वैत सांगावें बोलें । तैं द्वैत कीजे ॥ ८८ ॥ येऱ्हवीं तरी पार्था । गुरुशिष्यसत्पथा । ओडल पडे सर्वथा । बोल खुंटे ॥ ८९ ॥ म्हणोनि गा श्रुती । द्वैतभावें अद्वैतीं । निरूपणाची वाहती । वाट केली ॥ ८९० ॥ ( ६५०. ज्ञेय इंद्रियद्वारा भासमान होतें, ८९१-८९८ ) अवतरणः—तेंचि आतां अवधारीं । इये नेत्रगोचरें आकारीं । तें ज्ञेय गा जयापरी । व्यापक असे ॥ ९१ ॥

सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥

अन्वयः—( तत् ) सर्वेंद्रियगुणाभासं, सर्वेंद्रियविवर्जितं, च असक्तं सर्वभृत् च निर्गुणं गुणभोक्तृ ( अस्ति ). ॥ १४ ॥

तरि तें गा किरीटी ऐसें । [१]अवकाशीं आकाश जैसें । पटीं पटु होऊनि असे । तंतु जेवीं ॥ ९२ ॥ उदक होऊनि उदकीं । रसु जैसा अवलोकीं । दीपपणें दीपकीं । तेज जैसें ॥ ९३ ॥ कर्पूरत्वें कापुरीं । सौरभ्य असे जयापरी । शरीर होऊनि शरीरीं । कर्म जेवीं ॥ ९४ ॥ किंबहुना पांडवा । सोनेंचि सोनयाचा रवा । तैसें जें या सर्वां । सर्वांगीं असे ॥ ९५ ॥ परी असे रवेपणामाजिवडें । तंव रवा ऐसें आवडे । वांचूनि सोनें सांगडें । सोनया जेवीं ॥ ९६ ॥ पैं गा वोघुचि वांकुडा । परि पाणी उजू सुहाडा । वन्हि आला लोखंडा । लोह नव्हे कीं ॥ ९७ ॥ घटाकारें वेटाळे । तेथ नभ गमे वाटोळें । मठीं तरी चौफळें । आयें दिसे ॥ ९८ ॥ ( ६५१. ज्ञेय इंद्रियरहित, ८९९–९०५ ) परि तें अवकाश जैसें । मोहिजतीचि आकाशें । जें विकार होऊनि तैसें । विकारी नोहे ॥ ९९ ॥ मन मुख्य इंद्रियां । सत्त्वादि गुणां ययां- । सारिखें ऐसें धनंजया । आवडे कीर ॥ ९०० ॥ पैं गुळाची गोडी । नोहे बांधेया सांगडीं । तैसीं गुण इंद्रियें फुडीं । नाहीं तेथ ॥ १ ॥ अगा क्षीराचिये दशे । घृत क्षीराकारें असे । परि क्षीरचि नोहे जैसें । कपिध्वजा ॥ २ ॥ तैसें जें इये विकारीं । विकार नोहे अवधारीं । पैं आकारा नाम भोंवरी । येर सोनें तें सोनें ॥ ३ ॥ इया उघड मऱ्हाटिया । तें वेगळेपण धनंजया । जाण गुणइंद्रियां- । पासोनियां ॥ ४ ॥ नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु । हा आकारासींच प्रवादु । वस्तूसि नाहीं ॥ ५ ॥ ( ६५२. ज्ञेय कोठेंही सक्त नसून सर्वाला धारण करतें, ९०६–९१० ) तें गुण नव्हे कहीं । गुणा तया संबंधु

१ संप्रदायास. २ अडथळा. ३ पोकळींत. ४ सुगंध. ५ ठेपेमध्यें, ६ फूल वगैरे डागिणे. ७ संज्ञा; प्रकार.

वेगळी का आहे ? ( नाहीं. सर्वत्र पाणीच आहे । ) ८६ त्याचप्रमाणें, जें ब्रह्म सर्वत्र भरलेलें आहे, त्याचे ठिकाणीं व्याप्यव्यापकभाव कोठून येणार ? परंतु ( तें स्पष्ट करून दाखविण्याकरितां ) क्षणभर असें बोलावें लागतें. ८७ ज्याप्रमाणें हिशोब लिहितांना बाकी पूज्य दाखविण्याची वेळ येते त्या वेळेस शून्याबद्दल वर्तुलाकृति काढतात, त्याप्रमाणें, अद्वैत स्पष्ट करून सांगावयाचें म्हटलें म्हणजे द्वैताचा स्वीकार करूनच स्पष्टीकरण करावें लागतें. ८८ नाहीं तर अर्जुना, गुरुशिष्यसंप्रदाय चहूंकडे बंद पडेल; आणि अद्वैताविषयीं सर्व भाषण बंद होईल. ८९ म्हणून श्रुतींनीं द्वैताविषयीं स्पष्टीकरण करून अद्वैत समजून देण्याची वहिवाट पाडली. ८९० तेव्हां आतां, आपल्या नेत्रांनीं जो आकार दिसतो, त्यांत तें ब्रह्म कसें व्यापक आहे तें ऐक. ९१

श्लोकार्थः—तें सर्व इंद्रियांना त्यांच्या विषयाचें ज्ञान करून देणारें असून, सर्वेंद्रियरहित आहे; तें कोठेंही सक्त नसून सर्वांना धारण करणारें आहे; आणि गुणरहित असून गुणांचा उपभोग घेणारें आहे ॥ १४ ॥

हें पहा अर्जुना, तें ब्रह्म म्हणजे, ज्याप्रमाणें पोकळींत सर्व आकाश भरलेलें असतें, किंवा तंतु हे वस्त्रामध्यें वस्त्ररूप होऊन असतात; ९२ हें बघ, रस ज्याप्रमाणें उदकामध्यें उदकरूप होऊन असतो, तेज ज्याप्रमाणें दीपामध्यें दीपपणानें असतें; ९३ सुगंध जसा कापुराच्या रूपानें कापुरांत भरलेला असतो, व क्रिया शरीराच्या रूपानें शरीरांत दृष्टीस पडते, ९४ किंबहुना अर्जुना, सोनें ज्याप्रमाणें सोन्याच्या रव्याच्या रूपानें दृष्टीस पडतें, त्याप्रमाणें जें या सर्व जगाचें आदिकारण असून सर्वांत दृष्टीस पडतें, ९५ तें सोनें ज्या वेळेस रव्याच्या रूपानें दृष्टीस पडतें, त्या वेळेस आपल्यास तो रवा आहे असें वाटतें, परंतु सोनें या दृष्टीनें पाहूं गेलें असतां तो रवा सोनेंच होय; ९६ अर्जुना, पाण्याचा ओघ वाकडा असला म्हणजे पाणी वाकडें दिसतें, परंतु तें खरोखर वाकडें नाहीं; लोखंड तापवून लाल झाल्यावर त्याचा आकार दृष्टीस पडतो, तो लोखंडच नव्हे का ? ९७ घटाच्या आकारानें आकाश वाटोळें दिसतें, व तेंच घराचे चौकांत पाहिलें म्हणजे चोकोनी दिसतें; ९८ परंतु तोच मठ व घट नाश पावल्यावर आकाशाचा नाश होत नाहीं, त्याप्रमाणें जें ब्रह्म मायेचे उपाधीनें विश्वमय होतें, परंतु मायेंत नसते; ९९ अर्जुना, तें ब्रह्म म्हणजे मन इत्यादि इंद्रियांप्रमाणें व सत्त्वादि गुणांप्रमाणें आकारास आलें आहे असा भास होतो, ९०० परंतु ज्याप्रमाणें गुळाची गोडी ही गुळाच्या आकारांत नसते, त्याप्रमाणें इंद्रियें व गुण यांत ब्रह्म नसतें. १ हे कपिध्वजा, ज्याप्रमाणें दुधाच्या अवस्थेंत तूप दुधाच्या आकारानें असतें, परंतु तें दूध म्हणजे तूप नव्हे, २ त्याप्रमाणें, तें ब्रह्म विश्वात भरलेलें असून विश्व नव्हे. कारण सुवर्णाचे अलंकार बनविल्यावर त्यांस आपण कडें, वांकी अशीं नांवें देतों, बाकी सुवर्णदृष्टीनें तें सोनेंच । ३ याप्रमाणें मीं उघड मराठी भाषेंत सांगतों, अर्जुना, ब्रह्म हें गुण व इंद्रियें यांपासून वेगळें आहे. ४ नाव, रूप, संबंध, जाति, क्रिया, भेद हे सर्व प्रकार आकारासच लागू आहेत, ब्रह्माला नाहींत. ५ तें ब्रह्म गुण नाहीं, व त्याचा आणि गुणाचा संबंध नाहीं,

नाहीं । परि तयाच्याचि ठाईं । आभासती ॥ ६ ॥ येतुलेयासाठीं । संभ्रांताच्या पोटीं । ऐसें जाय किरीटी । जें हेंचि धरी ॥ ७ ॥ तरि तें गा धरणें ऐसें । अभ्रातें जेवीं आकाशें । का प्रतिबिंबन जैसें । आरसेंनि ॥ ८ ॥ नातरी सूर्यप्रतिमंडळ । जैसेनि धरी सलिल । कां रश्मिकरीं मृगजळ । धरिजे जेवीं ॥ ९ ॥ तैसें गा संबंधेंविण । यया सर्वांतें धरी निर्गुण । परि तें वाया जाण । मिथ्यादृष्टि ॥ ९१० ॥ ( ६५३. ज्ञेय निर्गुण असून गुणाचा भोग घेतें, ९११-९१२ ) आणि यापरी निर्गुणें । गुणातें भोगणें । रंका राज्य करणें । स्वप्नीं जैसें ॥ ११ ॥ म्हणोनि गुणांचा संगु । अथवा गुणभोगु । हा निर्गुणीं लागु । बोलों नये ॥ १२ ॥

बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १५ ॥

अन्वयः—तत् भूतानां बहिः च अंतः ( अस्ति ), च अचरं चरं एव ( अस्ति ); सूक्ष्मत्वात् अविज्ञेयं ( अस्ति ) च दूरस्थं अंतिके ( अस्ति ). ॥ १५ ॥

( ६५४. ज्ञेय सूक्ष्म असून भूतांच्या आंतबाहेर आहे, ९१३–९१६ ) जें चराचर भूतां- । माजी असे पांडुसुता । नाना वन्हीं उष्णता । अभेदें जैसी ॥ १३ ॥ तैसेंनि अविनाशभावें । जें सूक्ष्मदशे आघवें । व्यापूनि असे तें जाणावें । ज्ञेय एथ ॥ १४ ॥ जें एक आंतबाहेरी । जें एक जवळ दुरी । जें एकवाचूनि परी । दुजी नाहीं ॥ १५ ॥ क्षीरसागरींची गोडी । माजी बहु थडिये थोडी । हें नाहीं तया परवडी । पूर्ण जें गा ॥ १६ ॥ ( ६५५. श्रुति ज्ञेयाला महाशून्य म्हणते, ९१७–९२६ ) स्वेदजप्रभृती । वेगळाल्या भूतीं । जयाचिये अनुस्यूतीं । खोमणें नाहीं ॥ १७ ॥ पैं श्रोतृमुर्ख्यटिळका । घटसहस्रा अनेकां- । माजी बिंबोनि चंद्रिका । न भेदे जेवीं ॥ १८ ॥ नाना लवणकणांचिये राशी । क्षारता एकचि जैसी । कां कोडी एकीं उसीं । एकचि गोडी ॥ १९ ॥

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥

अन्वयः—तत् ज्ञेयं अविभक्तं भूतेषु च विभक्तं इव स्थितम्, च भूतभर्तृ च ग्रसिष्णु च प्रभविष्णु ( अस्ति ). ॥ १६ ॥

तैसें अनेकीं भूतजातीं । जें आहे एकी व्याप्ती । विश्वकार्या सुमती । कारण जें गा ॥ ९२० ॥ म्हणोनि हा भूताकारु । जेथोनि तेंचि तया आधारु । कल्लोळां सागरु । जियापरी ॥ २१ ॥ बाल्यादि तिन्ही वयसीं । काया एकचि जैसी । तैसें आदिस्थितिग्रासीं । अखंड जें ॥ २२ ॥ सायंप्रातर्मध्यान्ह । होतां जातां दिनमान । जैसें का गगन । पालटेना ॥ २३ ॥ अगा सृष्टिवेळे प्रियोत्तमा । जया

१ अज्ञानाच्या. २ प्रतिबिंब. ३ पाणी. ४ सूर्यकिरणांत. ५ संबंध. ६ अखंडपणाला. ७ खंड. ८ श्रोत्यामध्यें श्रेष्ठ. ९ वीस वस्तु म्हणजे एक कोडी. १० उत्पत्ति, स्थिति व लय यांत.

परंतु त्याचेच ठिकाणीं ते भासतात. ६ या कारणावरून, अर्जुना, अज्ञान्याच्या मतांत असें येतें कीं, गुण हे ब्रह्माचेच आहेत व हीच गोष्ट तो खरी मानतो. ७ परंतु ब्रह्माच्या ठिकाणीं गुण आहेत असें मानणें म्हणजे, ज्याप्रमाणें ढग आकाशांत दृष्टीस पडतात म्हणून त्यांना आकाश धारण करतें, किंवा आरशांत पाहिलें असतां जें प्रतिबिंब दृष्टीस पडतें तें आरशाचेंच आहे, असें म्हणण्याप्रमाणें होय. ८ किंवा पाण्यांत सूर्याचें प्रतिबिंब पडल्यावर त्यांत सूर्य आहे असें समजणें, अथवा सूर्यकिरणात मृगजळ आहे असें म्हणणें हें ज्याप्रमाणें शोभत नाहीं, ९ त्याप्रमाणें, ब्रह्म सर्व जगताला संबंधाशिवाय धारण करतें, परंतु हें म्हणणें भ्रममूलक असल्यामुळें व्यर्थ आहे. ९१० ज्याप्रमाणें भिकारी मनुष्य स्वप्नांत राज्याचा उपभोग घेतो हें मिथ्या होय, त्याप्रमाणें ब्रह्म गुणाला भोगतें हें म्हणणें व्यर्थ होय. ११ म्हणून, ब्रह्म गुणांचा संग करतें अथवा गुणांचा उपभोग घेतें, असें म्हणतां येत नाहीं. १२

श्लोकार्थः—तें सर्व भूताच्या बाहेर असून आंतही आहे; स्थिर असून हालणारें आहे; तें अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें जाणतां येत नाहीं; आणि तें दूर असून जवळही आहे ॥ १५ ॥

हे पांडुसुता, ब्रह्म चराचर भूतांमध्यें जरी दृष्टीस पडलें, तरी तें एकच आहे. अग्नीचे निखारे जरी पुष्कळ आकारांचे निरनिराळे असले, तरी त्यांतील उष्णता ज्याप्रमाणें एकच होय, त्याप्रमाणें, १३ जें अविनाशी असून सूक्ष्मपणानें सर्व जगास व्यापून आहे, तें ज्ञेय होय. १४ जे शरिराचे आत असतें व बाहेरही असतें; तसेंच जें पाहिलें असतां जवळ आहे व दूरही आहे; व जें एकच असून ज्यांत द्वैत नाहीं; १५ क्षीरसागराचें पाणी जसें काठाशीं व मध्यभागीं सारखेंच गोड असतें, तसें जें सर्वत्र व्यापक असून पूर्ण आहे, १६ जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज या सर्व वेगळाल्या भूतांच्या ठिकाणीं ज्याची अखंड व्याप्ति आहे; १७ हे श्रोतृशिरोमणे, हजारों घटांच्या निराळ्या आकारांत चंद्राचें बिंब निराळें दिसतें, परंतु त्याला जसा भेद नाहीं; १८ मिठाच्या पुष्कळ राशि जरी असल्या तरी सर्वांचा खारटपणा जसा सारखाच असतो, अथवा मोळीभर ऊंस जरी असले तरी त्या सर्वांची गोडी जशी सारखीच असते, १९

श्लोकार्थः—तें ब्रह्म मूळचें विभागलेलें नसून प्राणिमात्राच्या ठिकाणीं विभागल्यासारखें दिसतें; आणि तें सर्व भूतांना धारण करणारें, सर्वांचा नाश करणारें, व सर्वांची उत्पत्ति करणारें आहे ॥१६॥

तशी अनेक भूतमात्रांत ज्याची एकत्वानें व्याप्ति आहे; आणि अर्जुना, विश्वाच्या रचनेंत जें आदिकारण आहे; ९२० म्हणून, ज्याप्रमाणें लाटा समुद्रापासून उत्पन्न होतात, त्याप्रमाणें प्राणिमात्राला जें आधारभूत आहे; २१ बाल्यावस्था, तारुण्यअवस्था व वृद्धावस्था ह्यांना जसें एकच शरीर आधारभूत असतें, तसें उत्पत्ति, स्थिति व लय या तिन्ही अवस्थांस जें आधारभूत आहे; २२ प्रातःकाळ, मध्यान्हकाळ व सायंकाळ हे दिवसाचे तिन्ही काळ जरी गेले, तरी आकाशात जसा पालट नसतो; २३ हे प्रियोत्तमा, सृष्टीच्या

नांव म्हणती ब्रह्मा । व्यापी जें विष्णुनामा । पात्र जाहलें ॥२४॥ मग आकारु हा हारपे । तेव्हां रुद्र जें म्हणिपे । तेंही गुणत्रय जेव्हां लोपे । तें जें शून्य ॥ २५ ॥ नभाचें शून्यत्व गिळून । गुणत्रयातें तुरऊन । तें शून्य तें महाशून्य । श्रुतिवचनसंमत ॥ २६ ॥

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥ १७ ॥

अन्वयः—तत् ज्योतिषां अपि ज्योतिः ( अस्ति ); तमसः परं उच्यते; ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं ( अस्ति ), सर्वस्य हृदि धिष्ठितम् ( अस्ति ). ॥ १७ ॥

( ६५६. ज्ञेय हें तेजाचें तेज असून तमाच्या पलीकडे आहे, ९२७–९३४ ) जे अग्नीचें दीपन । जें चंद्राचें जीवन । सूर्याचे नयन । देखती जेणें ॥ २७ ॥ जयाचे उजियेडें । तारागण उघडें । महातेज सुरवाडें । राहाटे जेणें ॥ २८ ॥ जें आदीची आदि । जें वृद्धीची वृद्धि । जें बुद्धीची बुद्धी । जीवाचा जीवु ॥ २९ ॥ जे मनाचें मन । जें नेत्राचे नयन । कानाचें कान । वाचेची वाचा ॥ ९३० ॥ जे प्राणाचा प्राण । जें गतीचे चरण । क्रियेचें कर्तेपण । जयाचेनि ॥३१॥ आकारु जेणें आकारे । विस्तारु जेणे विस्तारे । संहारु जेणें संहारे । पाडुकुमरा ॥ ३२ ॥ जें मेदिनीची मेदिनी[4] । जें पाणी पिऊनि असे पाणी । तेजा दिवेलावणी । जेणें तेजें ॥ ३३ ॥ जें वायूचा श्वासोश्वासु । जें गगनाचा अवकाशु । हें असो आघवाचि आभासु । आभासे जेणें ॥ ३४ ॥ ( ६५७. ज्ञेय ज्ञानानेंच गम्य, ९३५–९३९ ) किंबहुना पांडवा । जें आघवेंचि असे आघवा । जेथ नाहीं रिगावा । द्वैतभावासी ॥ ३५ ॥ जें देखिलियाचिसवें । दृश्य द्रष्टा हें आघवें । एकवट कालवे । सामरस्यें ॥ ३६ ॥ मग तेंचि होय ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हन । जेणें गमिजे स्थान । तेंहि तेंचि ॥ ३७ ॥ जैसें सरलिया लेख । आंख होती एक । तैसें साध्यसाधनादिक । ऐक्यासि ये ॥ ३८ ॥ अर्जुना जिये ठायीं । न सरे द्वैताची वही । हें असो; जे हृदयीं । सर्वांच्या असे ॥ ३९ ॥

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।
मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥

अन्वयः—इति क्षेत्रं तथा ज्ञानं च ज्ञेयं समासतः उक्तं; मद्भक्तः एतत् विज्ञाय मद्भावाय उपपद्यते ॥ १८ ॥

( ६५८. मागील विषयाचा उपसंहार, ९४०–९४७ ) एवं हें तुजपुढां । आदीं क्षेत्र सुहाडा । दाविलें फाडोवाडां । विवंचुनी ॥ ९४० ॥ तैसेंचि क्षेत्रापाठीं । जैसेनि देखसी दिठी । तैसें ज्ञानही किरीटी । सांगितलें ॥४१॥ अज्ञानाही कौतुकें । रूप केलें निकें । जंव आयेणी तुझी टेंकें[10] । पुरे म्हणे ॥ ४२ ॥ आणि आता हें

१ प्रकृतिशून्य. २ ब्रह्म. ३ तेजानें. ४ पृथ्वी. ५ तेज. ६ लेख; सवाद. ७ प्रिय मित्रा. ८ फाडी माडून. ९ बुद्धि. १० तृप्त होई.

उत्पत्तिकालीं ज्याला आपण ब्रह्मदेव म्हणतों, व व्याप्तिकालीं म्हणजे स्थितिकालीं ज्याला विष्णु हें नांव देतों, २४ मग लय करते वेळेस ज्याला आपण रुद्र असें म्हणतों, व हीं तिन्ही कामें ज्या वेळेस लोप पावतात, त्या वेळेस आपण ज्याला प्रकृतिशून्य असें म्हणतों; २५ आणि आकाशाचें शून्यत्व गिळून गुणत्रय नाहींसें करणारें जें प्रकृतिशून्य, त्याला जें नाहींसें करतें, तें श्रुतींनीं वर्णन केलेलें महाशून्य होय. २६

श्लोकार्थः—तें ब्रह्म चंद्रसूर्यादिकानाही प्रकाश देणारें आहे. तें अज्ञानरूप अंधकाराच्या पलीकडे आहे असें म्हणतात. तें ज्ञानस्वरूप आहे, ज्ञेयस्वरूप आहे, ज्ञानानें मिळण्याजोगें आहे, आणि तेंच सर्वांच्या हृदयामध्यें विद्यमान आहे. ॥ १७ ॥

जें ब्रह्म अग्नीला दीपन करण्याची शक्ति देतें, ज्या चंद्रापासून जगतांत अमृताची प्राप्ति होते त्याला जें अमृत देतें, ज्या सूर्याचे उजेडापासून सर्व जग व्यवहार करितें त्याला ज्याचेपासून दृष्टि प्राप्त होते; २७ ज्याचे तेजानें तारागणांस तेज प्राप्त होतें; तसेंच महातेज ज्याचे तेजानें तेजस्वी होतें; २८ जगतात जे मूळ पदार्थ म्हणून आहेत त्यांचें जें मूळ, जें वृद्धीची वृद्धि, तसेंच बुद्धि व जीव यांचें जें आदिकारण आहे; २९ जें मन, डोळे, कान व वाचा यांचें आदिकारण आहे; ९३० जें प्राणाचें जीवन आहे, गतीचें चरण आहे, व ज्याच्यामुळें क्रियेस कर्तेपणा येतो; ३१ हे पाडुकुमरा, ज्याच्यामुळें आकार, विस्तार व संहार याना आपापलें रूप प्राप्त होतें; ३२ जें पृथ्वीस धारण करणारें, जें पाण्याचें जीवन, व ज्याचे योगानें तेज प्रकाशमान होतें; ३३ जें वायूस वाहण्याची शक्ति देतें व ज्यांत आकाश सामावतें; फार काय सांगावें ? सर्व भासमान वस्तु ज्याचे तेजानें कळतात; ३४ हे पांडवा, या सर्व जगतांत जें आदिकारण असून ज्याचे ठिकाणीं द्वैताचा भास होत नाहीं; ३५ ज्याचें दर्शन होण्याबरोबर द्रष्टा, दृश्य व दर्शन ही त्रिपुटी नाहींशी होते; ३६ मग तेंच ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान ही त्रिपुटी होऊन ज्याचे योगानें ब्रह्म कळतें तेंही तेंच होय. ३७ ज्याप्रमाणें हिशेबाचा ताळा जमल्यावर हिशेबाच्या कच्च्या कागदांचें काम संपतें, त्याप्रमाणें ब्रह्मप्राप्ति झाल्यावर साध्य व साधक हे भाव नाहींतसे होतात. ३८ अर्जुना, ब्रह्माचे ठिकाणीं द्वैताचा संबंधही रहात नाहीं. आता हें राहूं दे. तें सर्वांच्या हृदयात वास करतें. ३९

श्लोकार्थः—याप्रमाणें क्षेत्र, ज्ञान आणि ज्ञेय हीं संक्षेपानें तुला सांगितलीं. हीं जाणल्यानें माझा भक्त माझ्या रूपाला मिळतो ॥ १८ ॥

याप्रमाणें, हे प्रियमित्रा, तुला क्षेत्र म्हणजे काय हें फाडी मांडून म्हणजे स्पष्ट करून सांगितलें. ९४० त्याचप्रमाणें अर्जुना, त्या क्षेत्रानंतर, तुला उघड दृष्टीनें पाहतां येईल अशा रीतीनें ज्ञानही समजून सांगितलें. ४१ त्याप्रमाणेंच, तुझे बुद्धीची तृप्ति होऊन तूं पुरे म्हणेपर्यंत अज्ञानाच्याही लक्षणाचें कौतुकानें निरूपण केलें. ४२ आणि आतांच

रोकडें । उंपपत्तीचेनि पवाडें । निरूपिलें उघडें । ज्ञेय पैं गा ॥४३॥ हे आघवीच विवंचना । बुद्धि भरोनि अर्जुना । मत्सिद्धिभावेना । माझिया येती ॥ ४४ ॥ देहादि परिग्रहीं । संन्यासु करूनियां जिहीं । जीवु माझ्या ठाईं । वृत्तिकु केला ॥ ४५ ॥ तें मातें किरीटी । हेंचि जाणोनियां शेवटीं । आपणपयां सोंटोवाटीं । मीचि होती ॥ ४६ ॥ मीचि होती पैरी । हे मुख्य गा अवधारीं । सोहोपी सर्वांपरी । रचिली आम्हीं ॥ ४७ ॥ ( ६५९. ब्रह्माचे चार प्रकार सांगण्याचा हेतु, काव्य, ९४८–९५२. ) कडां पायरी कीजे । निराळीं माचु बांधिजे । अंथावीं सुइजे । तरी जैसी ॥ ४८ ॥ येऱ्हवीं आघवेंचि आत्मा । हें सांगों जरी वीरोत्तमा । परी तुझियां मनोधर्मा । मिळेल ना ॥ ४९ ॥ म्हणोनि एकचि संचलें । चतुर्धा आम्हीं केलें । जें भेदळपण देखिलें । तुझिये प्रज्ञे ॥ ९५० ॥ पैं बाळ जें जेवविजे । तैं घासु विसां ठायीं कीजे । तैसें एकाचि हें चतुर्ध्याजें । कथिलें आम्हीं ॥ ५१ ॥ एक क्षेत्र एक ज्ञान । एक ज्ञेय एक अज्ञान । हे भाग केले अवधान । जाणोनि तुझें ॥५२॥ ( ६६०. मागील विषय दुसऱ्या प्रकारांनीं सांगतात, काव्य, ९५३-९५४) आणि ऐसेनिही पार्था । जरी हा अभिप्रावो तुज हाता । नये तरी हे व्यवस्था । एक वेळ सांगों ॥ ५३ ॥ आतां चौठायीं न करूं । एकही म्हणोनि न सैरूं । आत्मानात्मया धरूं । सरिसा पाडु ॥५४॥ ( ६६१. प्रकृतिपुरुषाचा विभाग, काव्य, ९५५–९५९ ) परि तुवां येतुलें करावें । मागों तें आम्हां देआवें । जें कानाचें नांव ठेवावें । आपणपैं गा तें ॥ ५५ ॥ या श्रीकृष्णाचिया बोला । पार्थु रोमांचितु जाहला । तेथ देवो म्हणती भला । उचंबळेना ॥ ५६ ॥ अवतरणः— ऐसेनि तो येतां वेगु । धरूनि म्हणे श्रीरंगु । प्रकृतिपुरुषविभागु । परिसें सांगों ॥ ५७॥ जया मार्गातें जगीं । सांख्य म्हणती योगी । जयाचिये भाटिवेलौगीं । मी कपिल जाहलों ॥ ५८ ॥ तो आईक निर्दोखु । प्रकृतिपुरुषविवेकु । म्हणे आदिपुरुखु । अर्जुनातें ॥ ५९ ॥

प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।
विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९॥

*अन्वयः*—( त्वं ) प्रकृतिं च पुरुषं उभौ अपि अनादी एव विद्धि; च विकारान् च गुणान् प्रकृतिसंभवान् विद्धि ॥ १९ ॥

( ६६२. प्रकृतिपुरुष अनादि आहेत, ९६०–९६२ ) तरि पुरुष अनादि आथी । आणि तैंचि[1][2] लागोनि प्रकृती । सैरिसीं दिवोराती । दोनी जैसीं ॥९६०॥ कां रूप नोहे वायां । परी रूपा लागली छाया । निर्केणु वाढे धनंजया । कणेसीं कोंडा ॥ ६१ ॥ तैसी जाण जैवटें । दोन्ही इयें एकवटें । प्रकृतिपुरुष प्रकटें । अनादि-

१ दृष्टांताच्या. २ माझी प्राप्ति. ३ वतनदार. ४ सारेलोटें. ५ प्रकार. ६ अंतराळीं. ७ खोल

दृष्टांत देऊन तुला ज्ञेय म्हणजे काय तें स्पष्ट करून सांगितलें. ४३ अर्जुना, या सर्व गोष्टींचा विचार करून, माझ्या प्राप्तीची इच्छा धरून माझे भक्त मद्रूप होतात. ४४ देहादिक परिवाराचा त्याग करून जे माझे ठिकाणीं आपलें चित्त वतनदार करतात; ४५ हे किरीटी, ते माझे भक्त आपलें चित्त मला अर्पण करून व माझें चित्त आपलेकडे घेऊन मद्रूप होतात. ४६ अशा रीतीनें मद्रूप होण्याचा सर्वांत सुलभ मार्ग मीं मुमुक्षूंकरितां तयार करून ठेवला आहे. ४७ कड्यावर चढून जाणें झाल्यास जशा पायऱ्या कराव्या लागतात, किंवा अंतराळीं चढून जाणें असल्यास जसा पहाड बांधावा लागतो, किंवा खोल पाण्यांतून तरून जावयाचें असल्यास जसें नौकेंतून जावें लागतें; ४८ एऱ्हवीं, हे वीरोत्तमा, सर्वत्र आत्मा आहे असें जर तुला वर्णन करून सांगूं लागलों, तर तुला तें स्पष्ट कळणार नाहीं. ४९ म्हणून, तुझी बुद्धि जड आहे असें पाहून, तें एकच ब्रह्म चार विभाग करून सांगितलें. ५० ज्याप्रमाणें मुलाला जेवूं घालावयाचें असलें म्हणजे जो आपण एक घास घेतों तोच त्याला वीस वेळ थोडथोडा द्यावा लागतो, त्याप्रमाणें ब्रह्म हें चार प्रकारांनीं तुला मीं स्पष्ट करून सांगितलें. ५१ तुझी अवधानशक्ति पाहून एक क्षेत्र, एक ज्ञान, एक ज्ञेय व एक अज्ञान असे त्या ब्रह्माचे चार भाग केले; ५२ आणि पार्था, इतकें करून जर ब्रह्म तुला नीट कळत नसलें, तर तुला दुसऱ्या रीतीनें आणखी एकदां स्पष्ट सांगतों. ५३ आतां त्याचे चार भाग न करतां, तसेंच तें एकही न मानतां, आत्मा व अनात्मा ( पुरुष व प्रकृति ) असे दोन भाग करून तें तुला सांगतों. ५४ परंतु तूं एक गोष्ट कर कीं, आम्ही मागूं तें आम्हास दे. तें काय म्हणशील, तर तूं लक्षपूर्वक कान देऊन आम्ही सांगूं तें ऐक. असें श्रीकृष्णाचे वचन ऐकून पार्थाच्या अंगावर रोमांच उभे राहिले. ५५ तेव्हां देव म्हणाले कीं, याचे मनांत ही गोष्ट पूर्णपणें बिंबली आहे. ५६ याप्रमाणें श्रीकृष्णालाही आवेश आला; परंतु तो आवरून धरून ते म्हणतात.—अर्जुना, तुला ब्रह्माचे प्रकृति व पुरुष असे दोन भाग स्पष्ट करून सांगतों ते ऐक. ५७ प्रकृति व पुरुष यांचें ज्यांत विवेचन आहे, त्या मार्गाला योगी लोक 'सांख्यमार्ग' असें म्हणतात; व ज्याचें पूर्णपणें वर्णन करण्याकरितां मीं कपिलावतार घेतला, ५८ तो प्रकृति व पुरुष यांचेविषयीं निर्दोष विचार ऐक, असें श्रीकृष्ण परमात्मा अर्जुनास म्हणाले. ५९

श्लोकार्थः—प्रकृति आणि पुरुष हे दोन्ही अनादिच आहेत, असें तूं समज; आणि विकार व गुण हे प्रकृतीपासून उत्पन्न झाले आहेत असें समज. १९

तरी पुरुष हा अनादि आहे, आणि तेव्हांपासूनच प्रकृतिही आहे. ज्याप्रमाणें दिवस व रात्र यांची जोड आहे, ६० छाया ही रूप नव्हे, परंतु ती रूपाबरोबर असते; तसेंच हे धनंजया, बीं पेरल्यावर त्याचेबरोबर ज्याप्रमाणें कण व कोंडा हीं दोन्ही उत्पन्न होतात, ६१

पाण्यांत. ८ एऱ्हवीं. ९ न मानून. १० आत्मा = पुरुष, अनात्मा = प्रकृति. ११ वर्णन करण्याकरितां. १२ तेव्हांपासून. १३ जोड. १४ बीज. १५ कोंडपें.

सिद्धें ॥ ६२ ॥ ( ६६३. प्रकृतिलक्षण, ९६३ ) पैं क्षेत्र येणें नांवें । जें सांगितलें आघवें । तेंचि एथ जाणावें । प्रकृति हे गा ॥६३॥ ( ६६४. पुरुषलक्षण, ९६४-६५ ) आणि क्षेत्रज्ञु ऐसें । जयातें म्हणितलें असे । तो पुरुष हें अनारिसें । न बोलों पैं ॥६४॥ इयें आनानें नांवें । परि निरूप्य आन नोहे । हें लक्षण न चुकावें । पुढतपुढती ॥ ६५ ॥ ( ६६५. प्रकृति व पुरुष लक्षण, ९६६--९६८ ) तरी केवळ हे सत्ता । तो पुरुषु गा पांडुसुता । प्रकृतीतें समस्ता । क्रिया नाम ॥६६॥ बुद्धि इंद्रियें अंतःकरण । इत्यादि विकारभरण । आणि ते तिन्ही गुण । सत्त्वादिक ॥ ६७ ॥ हा आघवावि मेळावा । प्रकृति जाहला जाणावा । हेचि हेतु संभवा । कर्मांचिया ॥ ६८ ॥

कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।
पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥

अन्वयः--प्रकृतिः कार्यकारणकर्तृत्वे हेतुः उच्यते; पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुः उच्यते ॥ २० ॥

( ६६६. कार्यकारणकर्तृत्व हें प्रकृतिकार्य व कर्माचें कारण, ९६९-९७२ ) तेथ इच्छा आणि बुद्धि । घडवी अहंकारेंसीं आधीं । मग तिया लाविती वेधीं । कारणाच्या ॥ ६९ ॥ तेंचि कारण ठोकावया । जें सूत्र धरणें उपाया । तया नांव धनंजया । कार्य पैं गा ॥ ९७० ॥ आणि इंच्छामदाच्या थावीं । लागली मनातें उठवी । ते इंद्रियें राहाटवी । हें कर्तृत्व पैं गा ॥ ७१ ॥ म्हणोनि तिन्ही या जाणा । कार्यकर्तृत्वकारणा । प्रकृति मूळ हें राणा । सिद्धांचा म्हणे ॥ ७२ ॥ ( ६६७. पुरुषाला सुखदुःखभोग, ९७३--९७८ ) एवं तिहींचेनि समवायें । प्रकृति कर्मरूप होये । परि जया गुणा वाढे श्राये । त्याचि सारिखी ॥ ७३ ॥ जें सत्वगुणें अधिष्ठिजे । तें सत्कर्म म्हणिजे । रजोगुणें निफजे । मध्यम तें ॥ ७४ ॥ जें का केवळ तमें । होती जियें कर्मे । निषिद्धें अधर्मे । जाण तियें ॥ ७५ ऐसेंनि संतीसंतें । कर्मे प्रकृतीस्तव होतें । तयापासोनि निर्वाळतें । सुखदुःख गा ॥ ७६ ॥ असंतीं दुःख उपजे । सत्कर्मीं सुख निफजे । तया दोहींचा बोलिजे । भोगु पुरुषा ॥ ७७ ॥ सुखदुःखें जंववरी । निफजती साचोकारीं । तंव प्रकृति उद्यमु करी । पुरुषु भोगी ॥ ७८ ॥ ( ६६८. प्रकृतिपुरुषांचा संबंध अनिर्वचनीय, ९७९--९८० ) अवतरणः--प्रकृतिपुरुषांची कुळवाडी । सांगतां असंगडी । जे आंवुली जोडी । आंवुला खाय ॥ ७९ ॥ आंवुलिया आंवुलिये । संगति ना सोये । कीं आंवुली जग विये । चोज ऐका ॥ ९८० ॥

पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान् गुणान् ।
कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥

अन्वयः--पुरुषः प्रकृतिस्थः (सन्) प्रकृतिजान् गुणान् भुंक्ते हि; गुणसंगः अस्य सदसद्योनिजन्मसु कारणं ( अस्ति ) ॥ २१ ॥

त्याप्रमाणें प्रकृति व पुरुष ह्यांचें अनादिसिद्ध जोडपें प्रसिद्ध आहे. ६२ तर क्षेत्र या नावानें तुला जें सांगितलें, त्यालाच या ठिकाणीं प्रकृति म्हणून समजावें; ६३ आणि क्षेत्रज्ञ म्हणून ज्याला म्हणतात, तो पुरुष हें आम्ही नि.संशय सांगतों असें समज. ६४ यांचीं जरी हीं निरनिराळीं नांवें आहेत, तरी त्याजविषयीं निरूपण निराळें नाहीं, ही गोष्ट तूं वरचेवर पूर्णपणें लक्षांत ठेव. ६५ हे पाडुसुता, ज्या सत्तेला कधींही नाश नाहीं, तिला पुरुष असें समजावें; व सत्तेच्या योगानें ज्या क्रिया घडतात, त्याना प्रकृति असें म्हणावें. ६६ बुद्धि, इंद्रियें अंत.करण इत्यादि इंद्रियें--ज्यापासून विकार उत्पन्न होतात--आणि सत्त्व, रज व तम हे तिन्ही गुण ६७ या सर्वांची प्रकृतीपासून उत्पत्ति होते व यांचेपासून सर्व कर्में होतात. ६८

श्लोकार्थः--प्रकृति ही कार्य म्हणजे शरीर व करण म्हणजे तेरा इंद्रियें याच्या उत्पत्तीला कारण आहे, आणि पुरुष हा सुखदुःखाच्या भोक्तेपणास कारण आहे ॥ २० ॥

त्या ठिकाणीं इच्छा व बुद्धि याच्यापासून अहंकार उत्पन्न होतो; व त्यामुळें कारणाचा नाद लागतो. ६९ तीच गोष्ट प्राप्त होण्याकरितां जो उपाय करावयाचा, त्यास हे धनंजया, कार्य असें म्हणतात. ९७० तीच इच्छा प्रबळ होऊन मन जागृत करते, व त्याजकडून सर्व व्यवहार करविते. ७१ म्हणून कार्य, कर्तृत्व व कारण या त्रिपुटीस प्रकृति मूळ होय, असें सिद्धांचा राणा जो श्रीकृष्ण परमात्मा तो म्हणाला. ७२ याप्रमाणें तिन्ही एकत्र झाल्यावर प्रकृति क्रियारूप होते; परंतु ज्या गुणाचा विशेष जोर होईल, त्या गुणाप्रमाणें ती आचरण करते. ७३ जें कर्म सत्वगुणापासून उत्पन्न होतें, तें सत्कर्म होय; रजोगुणापासून उत्पन्न होतें, तें मध्यम म्हणजे काम्य कर्म होय; ७४ आणि जीं कर्में केवळ तमोगुणापासून उत्पन्न होतात, तीं निषिद्ध म्हणजे धर्मविरुद्ध कर्में होत. ७५ याप्रमाणें प्रकृतीपासून चांगलीं व वाईट कर्में घडतात, व त्या कर्मांपासून सुखदुःख प्राप्त होतें. ७६ वाईट कर्मांपासून दुःख उत्पन्न होतें, सत्कर्मांपासून सुख उत्पन्न होतें, व त्या दोहोंचा उपभोग पुरुषास घ्यावा लागतो. ७७ जोंपर्यंत सुख व दुःख उत्पन्न होतें, तोंपर्यंत प्रकृति उद्योग करीत असते, व तीं पुरुषास भोगावीं लागतात. ७८ प्रकृति व पुरुष यांचा असा अघटित व्यापार आहे कीं, स्त्रीनें मिळवावें व [illegible] स्वस्थ [illegible] खावें. ७९ काय चमत्कार आहे पहा, कीं या स्त्रीपुरुषांचा [illegible] संग न घडतां [illegible] जगाची उत्पत्ति होते. ९८०

श्लोकार्थः--पुरुष प्रकृतीशीं संबंध ठेवून प्रकृतीच्या [illegible] देतो; व [illegible] पुरुषाच्या बऱ्या वाईट जन्माला कारण होतो ॥ २१ ॥

---

१ निरूपण. २ कारण. ३ उत्पत्तीस. ४ [illegible]. ५ नाद होण्या[illegible] उन्मत्तपणाच्या आश्रयानें. ८ एकत्रानें. ९ [illegible]. १० [illegible]. ११ [illegible] होतें. १३ व्यापार. १४ निरुपम; अघटित, १५ [illegible]. १६ [illegible]. १७ [illegible]

( ६६९. प्रकृतिस्थ पुरुषाचें लक्षण, ९८१-९८५ ) जे अनंगु तो पैंधा। निकवैंडा नुसैधा । जीर्णु अतिवृद्धा- । पासोनि वृद्धु ॥ ८१ ॥ तया याडनांव पुरुषु । येऱ्हवीं स्त्री ना नपुंसकु । किंबहुना एकू । निश्चयो नाहीं ॥ ८२ ॥ तो अचक्षु अश्रवणु । अहस्तु अचरणु । रूप ना वर्णु । नाम आथी ॥ ८३ ॥ अर्जुना कांहींचि जेथ नाहीं । तो प्रकृतीचा भर्ता पाहीं । कीं भोगणें ऐसयाही । सुख-दुःखाचें ॥ ८४ ॥ तो तरी अकर्ता । उदासु अभोक्ता । परि इया पतिव्रता । भोगविजे ॥ ८५ ॥ ( ६७०. प्रकृतीचें लक्षण, ९८६-९९८ ) जियेतें अळुमाळु । रूपा-गुणाचा चाळढाळु । ते मलतैसाही खेळु । लेखा आणी ॥ ८६ ॥ इये प्रकृती तंव । गुणमयी हेंचि नांव । किंबहुना सावेव । गुण तेचि हे ॥ ८७ ॥ हे प्रतिक्षणीं नित्य नवी । रूपा गुणाचीच आघवी । जडातेंही माजवी । इयेचा माजु ॥ ८८ ॥ नामें इयें प्रसिद्धें । स्नेहो इया स्निग्धें । इंद्रियें प्रबुद्धें । इयेचेनि ॥ ८९ ॥ कायि मन हें नपुंसक । कीं तें हिंडवी तिन्ही लोक । ऐसें ऐसें अलौकिक । करणें इयेचें ॥ ९९० ॥ हे भ्रमाचें महाद्वीप॰ । हे व्याप्तीचें रूप । विकार उर्मप । इया केले ॥ ९१ ॥ हे कामाची मांडवी । हे मोहवनींची माधवी । इये प्रसिद्धचि दैवी॥ । माया हें नाम ॥ ९२ ॥ हे वाङ्मयीची वाढी । हे साकारपणाची जोडी । प्रपंचाची धैंडी । अभंग हे ॥ ९३ ॥ कळा येथूनि जालिया । विद्या इयेच्या केलिया । इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ॥ ९४ ॥ हे नादाची टांकसाळ । हे चमत्काराचें वेळाउळ । किंबहुना सकळ । खेळु इयेचा ॥ ९५ ॥ जे उत्पत्ति प्रलयो होत । ते इयेचे सायंप्रात । हें असो अद्भुत । मोहन हे ॥ ९६ ॥ हे अद्वयाचें दुसरें । हे निःसंगाचें सोयरें । हे निरालेंसि घरें । नांदतु असे ॥ ९७ ॥ इयेतें येतुलवरी । सौभाग्यव्याप्ति थोरी । म्हणोनि तया आवरी । अनावरातें ॥ ९८ ॥ ( ६७१. पुरुषाला प्रकृतीमुळें सदसत् योनि व सुखदु:खभोग, ९९९-१०२१ ) तयाच्या तंव ठायीं । निपटूनि कांहींचि नाहीं । कीं तया आघवे ही । आपणचि होय ॥ ९९ ॥ तया स्वयंभाची संभूति । तया अमूर्ताची मूर्ति । आपण होय स्थिति । ठावो तया ॥ १००० ॥ तया अनार्ताची आर्ति । तया पूर्णाची तृप्ति । तया अकुळाची जाति । गोत होय ॥ १ ॥ तया अचर्चाचें चिन्ह । तया अपाराचें मौन । तया अमनस्काचें मन । बुद्धि ही होय ॥ २ ॥ तया निराकाराचा आकारु । तया निर्व्यापाराचा व्यापारु । निरहंकाराचा अहंकारु । होऊनि ठाके ॥ ३ ॥ तया

१ ब्रह्म. २ उदासीन. ३ निर्धन. ४ एकटा. ५ हालचाल. ६ गुणांनीं भरलेली. ७ शहाणीं. ८ अमर्याद. ९ मांडव. १० वसंत ऋतु. ११ सभाग्य. १२ शब्दमय वस्त्राची. १३ धाड. १४ छंदाची. १५ घर. १६ शून्यात. १७ उत्पत्ति. १८ इच्छारहितांची. १९ वर्णन करता न येणाराचें. २० अपरिमिताचें. २१ प्रमाण. २२ विकाररहिताचें.

जें ब्रह्म निराकार असून उदासीन आहे, तसेंच निर्धन असून केवळ एकटें आहे; आणि जीर्ण असून या जगांत जी अति वृद्ध वस्तु असेल तिच्यापेक्षांही वृद्ध आहे, ८१ त्याला आडनांव पुरुष हें आहे. एऱ्हवीं तें स्त्री किंवा नपुंसक यांपैकीं निश्चयानें कोणतेंच सांगतां येत नाहीं. ८२ त्याला डोळे, कान, हात, पाय, रूप, वर्ण व नांव हें कांहींएक नाहीं. ८३ अर्जुना, ज्याला कोणतेही अवयव नाहींत असा हा प्रकृतीचा नवरा असून त्यालाही सुखदु:ख भोगावें लागतें. ८४ तो कर्म न करणारा, उदासीन व उपभोग न घेणारा असा जरी आहे, तरी ही पतिव्रता प्रकृति त्याला उपभोग घेण्यास लावते. ८५ ही प्रकृति आपल्या गुणाच्या व रूपाच्या अनुरोधानें विलक्षण खेळ करून दाखविते, ८६ म्हणून या प्रकृतीला गुणमयी असें नांव दिलें आहे; किंबहुना ही मूर्तिमंत गुणच आहे. ८७ ही क्षणोक्षणीं नित्य नवी असून रूप व गुण यानीं युक्त आहे; व ही जड वस्तूकडूनही आपले कर्तबगारीनें कर्मे करवितें. ८८ नांव, प्रीति, इंद्रियें या सर्वांचे व्यापाराला ही कारण आहे. ८९ पाहूं गेलें असतां मन हें नपुंसक असूनही त्याला तिन्ही लोकांत हिंडविते. याप्रमाणें इची अलौकिक करणी आहे. ९९० ही भ्रमाचें केवळ महाद्वीप, स्वयमेव व्याप्ति करणारी व अमर्याद विकार उत्पन्न करणारी अशी आहे. ९१ ही कामरूप वेलीचा मांडव असून मोहरूप वनाचा वसंत ऋतु आहे, व ही दैवी माया या नांवानें प्रसिद्ध आहे. ९२ ही शब्दमय शास्त्राची वाढी आहे, ही निराकाराला आकार देणारी आहे, व प्रपंचाची सतत धाड घालणारी आहे. ९३ सर्व कला हिच्यापासून उत्पन्न झालेल्या असून, सर्व विद्याही हिनेंच केलेल्या आहेत; आणि इच्छा, ज्ञान व क्रिया यांसही हीच व्यायली आहे. ९४ ही नादाची ( छंदाची ) टांकसाळ आहे; ही चमत्काराचें घर आहे. फार काय सांगावें ? सर्व खेळ हीच खेळते. ९५ जगाचे उत्पत्ति आणि प्रलय जे होतात ते हिचे सायं-प्रात:काल होत. हें असो; ही जगाला अद्‌भुत मोह घालणारी आहे. ९६ ही अद्वयाची दुसरी मूर्ति आहे; ही संगरहिताची सोबतीण आहे; आणि हिचें वास्तव्य शून्यांत असून त्या ठिकाणीं ही नांदते. ९७ याप्रमाणें हिच्या सौभाग्याचा महिमा आहे; म्हणूनच, अनावर असें जें ब्रह्म त्याला ही आवरते. ९८ वस्तुत: ब्रह्माचे ठिकाणीं कोणतेच विकार नाहींत; परंतु त्याचे ठिकाणीं ही आपण स्वत: विकार बनते. ९९ त्या स्वयंभूला उत्पत्ति, त्या निराकाराला आकार, स्थिति व ठिकाण आपणच बनते. १००० त्या इच्छारहिताची इच्छा, त्या पूर्णाची तृप्ति व त्या कुलरहिताची जात व गोतही आपणच होते. १ त्या अवर्णनीयाचें लक्षण, त्या अपाराचें प्रमाण, आणि अमनस्काचे मन व बुद्धिही आपणच होते. २ त्या निराकाराचा आकार, निर्व्यापाराचा व्यापार व निरहंकाराचा अहंकारही आपणच होऊन राहते. ३ त्या नामरहिताचें नांव व त्या जन्मरहिताचें जन्म, आणि कर्म व क्रिया आपण होऊन राहते. ४ त्या निर्गुणाचे गुण त्या अचरणाचे चरण, त्या अश्रवणाचे कान व अचक्षूचे नेत्र आपण होऊन राहते.

अनामाचें नाम। तया अजाचें जन्म। आपण होय कर्म। क्रिया तयां ॥ ४ ॥ तया निर्गुणाचे गुण। तया अचरणाचे चरण। तया अश्रवणाचे श्रवण। अचक्षूचे चक्षु ॥५॥ तया भावातीताचे भाव। तया निरवयवाचे अवयव। किंबहुना होय सर्व। पुरुषाचें हे॥ ६ ॥ ऐसेनि इया प्रकृती। आपुलिया सर्वव्याप्ती। तया अविकारातें विकृती-। माजी कीजे ॥ ७ ॥ तेथ पुरुषत्व जें असे। तें ये प्रकृतिदशे। चंद्रमा अंवसे। हरपला जेवीं ॥ ८ ॥ विदळे बहु चोखौं। मीनलिया वाला एका। कसु होय पांचैंका। जयापरी ॥ ९ ॥ कां साधूतें गोंधेळीं। संचरोनि सुये मैळीं[६]। नाना सुदिनाचा आभाळीं। दुर्दिनु कीजे ॥ १०१० ॥ जेवीं पय पशूच्या पोटीं। कां वन्हि जैसा काष्ठीं। गुंडूनि घेतला पटीं। रत्नदीपु ॥ ११ ॥ राजा पराधीनु जाहला। कीं सिंहु रोगें रुंधला। तैसा पुरुष प्रकृतीं आला। स्वतेजा मुके ॥ १२ ॥ जागता नरु सहसा। निद्रा पाडूनि तैसा। स्वप्नींचिया सोसा। वश्यु कीजे ॥ १३ ॥ तैसें प्रकृति जालेपणें। पुरुषा गुण भोगणें। उदास अंतुरीगुंणें। ऑतुडे जेवीं ॥ १४ ॥ तैसें अजा नित्या होये। आंगीं जन्ममृत्यूचे धाये। वाजती जंव लाहे। गुणसंगातें ॥ १५ ॥ परि तें ऐसें पंडुसुता। तौंतलें लोह पिटितां। जेवीं वन्हीसीचि घौंता। बोलती तया ॥ १६ ॥ कां आंदोळैलिया उदक। प्रतिमौं होय अनेक। तें नौंनात्व म्हणती लोक। चंद्रीं जेवीं ॥ १७ ॥ दर्पणाचिया जवळिका। दुजेपण जैसें ये मुखा। कां कुंकुमें स्फटिका। लोहितैत्व ये ॥ १८ ॥ तैसा गुणसंगमें। अजन्मा हा जन्मे। पावतु ऐसा गमे। येऱ्हवीं नाहीं ॥ १९ ॥ अधमोत्तम योनी। यासि ऐसिया मानी। जैसा संन्यासी होय स्वप्नीं। अंत्यजादि जाती ॥ १०२० ॥ म्हणोनि केवळ पुरुषा। नाहीं होणें भोगणें देखा। येथ गुणसंगुचि अशेखा-। लागीं मूळ ॥ २१ ॥

उपद्रष्टाऽनुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥

अन्वयः—उपद्रष्टा, अनुमंता, भर्ता, भोक्ता, महेश्वरः अपि च परमात्मा इति उक्तः परः पुरुषः अस्मिन् देहे ( अस्ति ) ॥ २२ ॥

( ६७२. पुरुष प्रकृतीपलीकडे असून त्याला परमात्मा असें म्हणतात, १०२२-१०२९ ) हा प्रकृतीमाजीं उभा। परि जुई जैसा वोथंबौं। इया प्रकृती पृथ्वीनैंभा। तेतुला पाडु ॥ २२ ॥ प्रकृतिसारितेच्यैा तटीं। मेरु होय हा किरीटी। माजी बिंबे परी [२३]लोटीं। [२३]लोटों नेणे ॥ २३ ॥ प्रकृति होये जाये। हा तो असतुचि आहे।

---

१ जन्मरहिताचें. २ डाक; अन्य धातु. ३ सोनें. ४ हिणकस. ५ संध्याकाळीं. ६ वेडा होतो. ७ गुंडाळून. ८ व्यापला. ९ सुखदुःखभोगास. १० त्यांच्या योगानें. ११ आडकतो. १२ जन्मरहिताला. १३ तापलेलें. १४ घाव. १५ हालतें असता. १६ प्रतिबिंब. १७ पुष्कळपणा; अनेकत्व. १८ तांबडेपणा. १९ टेंका दिलेलें लांकूड; खांब. २० जमीन अस्मान. २१ नदीच्या. २२ प्रवाहानें. २३ वाहात नाहीं.

५ त्या भावातीताचे भाव, निरवयवाचे अवयव, किंबहुना माया आपण स्वताच पुरुषाचे सर्व विकार बनते. ६ याप्रमाणें प्रकृति आपल्या सामर्थ्यानें त्या अविकारी ब्रह्माला विकारवश करते. ७ ज्याप्रमाणें अमावास्येच्या दिवशीं चंद्राचें तेज लोपतें, त्याप्रमाणें ब्रह्माचें तेज या प्रकृतीच्या पुढें पडत नाहीं. ८ उत्तम प्रकारच्या सोन्यांत जर वालभर अन्य धातु मिसळली, तर त्या सर्व सोन्याचा कस जसा कमी लागतो; ९ अथवा सदाचारी मनुष्यही संध्याकाळीं अपवित्र जागेंत गेला असतां त्यास पिशाच्चबाधा होऊन तो जसा वेडा होतो; अथवा ढग जसे दोन प्रहरच्या वेळीं स्वच्छ आकाशांत निबिड अंधकार करून सुदिनाचा दुर्दिन करतात, १०१० ज्याप्रमाणें गाईचे पोटात दूध किंवा लांकडांत अग्नि असतो, अथवा उत्तम रत्नाचें तेज वस्त्रांत गुंडाळून घेतल्यावर बाहेर पडत नाहीं, ११ राजा पराधीन झाल्यावर किंवा सिंह रोगग्रस्त झाल्यावर ज्याप्रमाणें त्यांचें तेज लोपतें, त्याप्रमाणें पुरुष प्रकृतीच्या अधीन झाल्यावर त्याचे तेज पडत नाहीं. १२ झोंप जशी जागृत अवस्थेंत असलेल्या पुरुषाला तो निजल्यावर सहज स्वप्नांतील सुखदुःख भोगावयास लावते, १३ त्याप्रमाणें, प्रकृतीच्या आधीन झाल्यामुळें पुरुषाला गुण भोगावे लागतात. ज्याप्रमाणें उदासीन पुरुष असला तरी स्त्रीच्या अधीन झाला म्हणजे तिच्या नादानें अगदींच वेडा होऊन जातो, १४ त्याप्रमाणें, तें ब्रह्म अज आणि नित्य आहे, तरी ( तें प्रकृतीच्या अधीन होऊन ) त्याला गुणसंग झाला म्हणजे जन्ममृत्यूचे धाव सोसावे लागतात. १५ परंतु अर्जुना, हें कसें आहे म्हणशील, तर तापलेल्या लोखंडावर घाव घालते वेळीं ते घाव अग्नीवर बसतात असें लोक म्हणतात; १६ किंवा पाणी हाललें म्हणजे त्यांत चंद्राचीं अनेक बिंबें दृष्टीस पडतात; व त्यायोगें लोक चंद्राचे ठिकाणीं अनेकत्व कल्पितात; १७ आरशांत तोंड पाहिल्यावर ज्याप्रमाणें दोन तोंडें दृष्टीस पडतात, किंवा कुंकुवावर स्फटिक मणि ठेविला म्हणजे तो लाल दिसतो, १८ त्याप्रमाणें गुणांच्या संगतीनें, जन्मरहित जो पुरुष तो जन्म घेतो असें वाटते; परंतु खरोखर पाहूं गेलें असतां तशी गोष्ट नाहीं. १९ पुरुष उत्तम व वाईट योनींत जन्म घेतो असें वाटतें; पण ज्याप्रमाणें संन्यासी हा स्वप्नांत आपण अंत्यजादि जातींत प्रविष्ट झालों आहों असें पाहतो, ( पण तें सत्य नसतें; त्याप्रमाणें असें वाटणें हा केवळ भास होय.) १०२० म्हणून जो केवळ पुरुष, त्याला जन्ममृत्यु हे भोगावे लागत नाहींत. परंतु तसें वाटतें. याला सर्व कारण प्रकृतीच्या गुणाची संगत होय. २१

श्लोकार्थः—साक्षीभूत, प्रवृत्तीला अनुकूल असणारा, धारण करणारा, उपभोग घेणारा, परमेश्वर आणि ज्याला परमात्मा असें म्हटलें आहे, असा श्रेष्ठ पुरुष या देहामध्यें विद्यमान आहे ॥२२॥

हा पुरुष प्रकृतीचे ठिकाणीं आहे; पण जुईच्या झाडाला टेंका देण्याकरितां उभा केलेला खांब ( ज्याप्रमाणें त्या झाडाच्या सर्व विकारांपासून अलिप्त असतो ), त्याप्रमाणें अलिप्त आहे; आणि प्रकृतींत व यात जमीन–अस्मानाचें अंतर आहे. २२ अर्जुना, हा प्रकृतिरूप नदीच्या तीरावर मेरु पर्वताप्रमाणे अचल उभा असतो; आणि याचें बिंब जरी

अनामाचें नाम । तया अजाचें जन्म । आपण होय कर्म । क्रिया तया ॥ ४ ॥ तया निर्गुणाचे गुण । तया अचरणाचे चरण । तया अश्रवणाचे श्रवण । अचक्षूचे चक्षु ॥५॥ तया भावातीताचे भाव । तया निरवयवाचे अवयव । किंबहुना होय सर्व । पुरुषाचें हे॥ ६ ॥ ऐसेनि इया प्रकृती । आपुलिया सर्वव्याप्ती । तया अविकारातें विकृती- । माजी कीजे ॥ ७ ॥ तेथ पुरुषत्व जें असे । तें ये प्रकृतिदशे । चंद्रमा अंवसे । हरपला जेवीं ॥ ८ ॥ विदळे बहु चोखौं । मीनालिया वाला एका । कसु होय पांचेका । जयापरी ॥ ९ ॥ कां साधूतें गोंधळीं । संचरोनि सुये मैळीं । नाना सुदिनाचा आभाळीं । दुर्दिनु कीजे ॥ १०१० ॥ जेवीं पय पशूच्या पोटीं । कां वन्हि जैसा काष्ठीं । गुंडूनि घेतला पटीं । रत्नदीपु ॥ ११ ॥ राजा पराधीनु जाहला । कीं सिंहु रोगें रुंधला । तैसा पुरुष प्रकृतीं आला । स्वतेजा मुके ॥ १२ ॥ जागता नरु सहसा । निद्रा पाडूनि तैसा । स्वप्नींचिया सोसा । वश्यु कीजे ॥ १३ ॥ तैसें प्रकृति जालेपणें । पुरुषा गुण भोगणें । उदास अंतुरीगुंणें । ऑतुडे जेवीं ॥ १४ ॥ तैसे अंजा नित्या होये । आंगीं जन्ममृत्यूचे घाये । वाजती जंव लाहे । गुणसंगाते ॥ १५ ॥ परि ते ऐसें पंडुसुता । तौतलें लोह पिटितां । जेवीं वन्हीसीचि घौता । बोलती तया ॥ १६ ॥ कां आंदोळेंलिया उदक । प्रतिमौं होय अनेक । तें नौंनात्व म्हणती लोक । चंद्रीं जेवीं ॥ १७ ॥ दर्पणा- चिया जवळिका । दुजेपण जैसें ये मुखा । का कुंकुमें स्फटिका । लोहितत्व ये ॥ १८ ॥ तैसा गुणसंगमें । अजन्मा हा जन्मे । पावतु ऐसा गमे । येऱ्हवीं नाहीं ॥ १९ ॥ अधमोत्तम योनी । यासि ऐसिया मानी । जैसा संन्यासी होय स्वप्नीं । अंत्यजादि जाती ॥ १०२० ॥ म्हणोनि केवळा पुरुषा । नाहीं होणें भोगणें देखा । येथ गुणसंगुचि अशेखा- । लागीं मूळ ॥ २१ ॥

उपद्रष्टाऽनुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥

अन्वयः—उपद्रष्टा, अनुमंता, भर्ता, भोक्ता, महेश्वरः अपि च परमात्मा इति उक्तः परः पुरुषः अस्मिन् देहे ( अस्ति ) ॥ २२ ॥

( ६७२. पुरुष प्रकृतीपलीकडे असून त्याला परमात्मा असें म्हणतात, १०२२-१०२९ ) हा प्रकृतीमाजीं उभा । परि जुई जैसा वोथंबा । इया प्रकृती ... तेतुला पाडु ॥ २२ ॥ प्रकृतिसरितेच्या तटीं । मेरु होय हा किरीटी । माजी परी [23]लोटीं । [23]लोटों नेणे ॥ २३ ॥ प्रकृति होये जाये । हा तो असताचे

१ जन्मरहिताचें. २ डाक; अन्य धातु. ३ सोनें. ४ हिणकस. ५ संध्याकाळीं. ६ गुंडाळून. ८ व्यापला. ९ सुखदुःखभोगास. १० स्त्रीच्या योगानें. ११ आडकतो. १२ १३ तापलेलें. १४ घाव. १५ हालवें असता. १६ प्रतिबिंब. १७ पुष्कळपणा; अनेकत्व. १ १९ टेंका दिलेलें लाकूड; खांब. २० जमीन अस्मान. २१ नदीच्या. २२ प्रवाहानें. २

नदींत पडलेलें असतें, तरी तिच्या प्रवाहानें हा वाहून जात नाहीं. २३ प्रकृति उत्पन्न होते व लयही पावते; तथापि हा कायमच असतो; म्हणून सर्व जगताचा हा शास्ता आहे. २४ प्रकृति याचे योगानें वाचते, व याच्याच सत्तेनें जग निर्माण होतें. म्हणून हा प्रकृतीचा भर्ता होय. २५ हे किरीटी, अनंत कालापासून चालत आलेली सृष्टि कल्पातसमयीं याचे ठिकाणीं लय पावते. २६ हा प्रकृतीचा स्वामी आहे; व या ब्रह्मांडाचा सूत्रधार असून प्रपंचाला अजमावणारा आहे; २७ या देहांत परमात्मा म्हणून जो म्हणतात, तो हाच होय असें समज. २८ हे पाडुसुता, प्रकृतीच्या पलीकडे एकविध पुरुष आहे असें जें म्हणतात, तो खरोखर हा होय. २९

श्लोकार्थः—जो याप्रमाणें परमात्म्याला आणि गुणासह प्रकृतीला जाणतो, तो सर्व प्रकारानीं कर्में करीत असला तरी पुनः जन्म पावत नाहीं ॥ २३ ॥

जो या पुरुषाला याप्रमाणें पूर्णपणें जाणतो, आणि तसेंच सर्व गुण व कर्में प्रकृतीचीं आहेत हें जाणतो; १०३० हे धनंजया, पुरुष हें रूप असून प्रकृति ही त्याची छाया आहे, तसेंच तो जल असून ही मृगजल आहे, अशी खात्री करून घ्यावी. ३१ अर्जुना, याप्रमाणें ज्यानें आपले मनाशीं प्रकृति व पुरुष याजबद्दल विचार करून खात्री करून घेतली आहे, ३२ तो शरीरानें जरी सर्व कर्में करीत असला, तरी आकाश जसें धूळ उंच उडाल्यानें मळत नाहीं, तसा तो प्रकृतीच्या कर्मांपासून अलिप्त असतो. ३३ जिवंतपणीं जो देहाच्या मोहांत पडून प्रकृतीच्या अधीन होत नाहीं, तो देह गेल्यावर पुनः जन्म पावत नाहीं. ३४ प्रकृति व पुरुष यांजविषयीं पूर्णपणें ज्ञान झाल्यावर त्या ज्ञानाचा अशा रीतीनें मनुष्यावर अलौकिक उपकार घडतो. ३५ परंतु सूर्याप्रमाणें निर्मळ असें हे ज्ञान तुझे हृदयात उदय पावेल असे पुष्कळ उपाय आहेत, ते सागतों ऐक. ३६

श्लोकार्थः—कोणी ध्यानाच्या योगानें शुद्ध झालेल्या मनानेंच आपल्या ठिकाणीं आत्म्याला पाहतात; कोणी विचारानें, आणि कोणी कर्मयोगानें आपल्या ठिकाणीं आत्म्याला पाहतात ॥२४॥

हे सुभटा, कोणी विचाररूप शेगडींत श्रवणमनननिदिध्यासरूपी पुटें देऊन आत्म्यावरील अनात्मरूप किडाळ काढून टाकून आत्मरूप सुवर्ण शुद्ध करतात; ३७ छत्तीस भेदरूपी हिणकस जाळून आपलें शुद्ध तत्त्व निवडून घेतात; ३८ मग अर्जुना, त्या आत्मस्वरूपाचे पोटात आत्मज्ञानाच्या दृष्टीनें आत्मस्वरूप पाहतात, ३९ आणि कोणी दैवयोगानें, कोणी सांख्ययोगानें व कोणी कर्मयोगाचे आधारानें आत्मस्वरूपाची ओळख करून घेतात. १०४०

श्लोकार्थः— याप्रमाणें ज्याना आत्म्याचें ज्ञान नाहीं, असे दुसरे लोक गुरुमुखानें आत्म्याचें ज्ञान ऐकून आत्म्याची उपासना करतात, तें ऐकून उपासना करणारेही जन्ममृत्यु तरून जातात ॥ २५ ॥

---

१ सर्व जगाचा. २ शास्ता. ३ भर्ता. ४ प्रकृति. ५ सूत्रधार. ६ गणना करतो. ७ एकविध. ८ चर्चा. ९ पूर्णपणें. १० ज्ञान. ११ शेगडी. १२ किडाळ. १३ कस. १४ दैवयोगानें. १५ आधारानें.

म्हणोनि आम्हांचें होये । शासन हा ॥ २४ ॥ प्रकृति येणें जिये । याचिया सत्ता जग विये । इयालागीं इये । वैरपेतु हा ॥ २५ ॥ अनंतें काळें किरीटी । जिया मिळती इया सृष्टी । तिया रिगती ययाच्या पोटीं । कल्पांतसमयीं ॥ २६ ॥ हा महद्‌ब्रह्मगोसावी । ब्रह्मगोळेलाघवी । अपारपणें मवी । प्रपंचातें ॥ २७ ॥ पैं या देहामाझारीं । परमात्मा ऐसी जे परी । बोलिजे ते अवधारीं । ययातेंचि ॥ २८ ॥ अगा प्रकृतिपरौता । एकु आथी पंडुसुता । ऐसा प्रवादु तो तत्त्वता । पुरुष हा पैं ॥२९॥

य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।
सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥

अन्वयः—यः एव पुरुष च गुणैः सह प्रकृतिं वेत्ति, सः सर्वथा वर्तमानः अपि भूयः न अभिजायते ॥ २३ ॥

( ६७३. प्रकृतिपुरुषाला जो यथार्थ जाणतो, त्याला पुनर्जन्म नाहीं; १०३०–१०३५ ) जो निखळपणें येणें । पुरुषा यया जाणे । आणि गुणाचें करणें । प्रकृतीचें तें ॥ १०३० ॥ हें रूप हे छाया । पैल जळ हे माया । ऐसा निवाडु धनंजया । जेवीं कीजे ॥ ३१ ॥ तेणें पाडे अर्जुना । प्रकृतिपुरुषाविवेचना । जयाचिया मना । गोचर जाहली ॥ ३२ ॥ तो शरीराचेनि मेळें । करू का कर्मे सकळें । परि आकाश धुई न मैळे । तैसा असे ॥ ३३ ॥ आथिलेनि देहें । जो न घेपे देहमोहें । देह गेलिया नोहे । पुनरपि तो ॥ ३४ ॥ ऐसा तया एकु । प्रकृतिपुरुषविवेकु । उपकारु अलौकिकु । करी पैं गा ॥ ३५ ॥ ( ६७४. प्रकृतिपुरुषांच्या विवेकाचा उदय होण्याचे उपाय, १०३६–१०४१ ) अवतरण.—परी हाचि अंतरीं । विवेकुं भानूचियापरी । उदैजे ते अवधारीं । उपाय बहुत ॥ ३६ ॥

ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना ।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥

अन्वयः—केचित् ध्यानेन आत्मना आत्मनि आत्मानं पश्यति; अन्ये सांख्येन योगेन ( आत्मानं पश्यंति ), च अपरे कर्मयोगेन ( आत्मानं पश्यति ) ॥ २४ ॥

कोणी एक सुभटा । विचाराचा आगिटीं । आत्मनात्मकिटीं । पुटें देउनी ॥ ३७ ॥ छत्तीसही वैनी भेद । निवाडिती शुद्ध । तोडोनि निर्विवाद । आपणपें ॥ ३८ ॥ तया आपणपयाच्या पोटीं । आत्मध्यानाचिया दिठी । देखती गा किरीटी । आपणपेंचि ॥ ३९ ॥ आणि पैं दैवेंवेगें । चित्त देती सांख्ययोगें । एक ते अंगेलगें । कर्माचेनि ॥ १०४० ॥

अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वाऽन्येभ्य उपासते ।
तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥

अन्वयः—अन्ये एवम् अजानंतः तु अन्येभ्यः श्रुत्वा उपासते, च श्रुतिपरायणाः ते अपि मृत्युं अतितरंति एव ॥ २५ ॥

नदींत पडलेलें असतें, तरी तिच्या प्रवाहानें हा वाहून जात नाहीं. २३ प्रकृति उत्पन्न होते व लयही पावते; तथापि हा कायमच असतो; म्हणून सर्व जगताचा हा शास्ता आहे. २४ प्रकृति याचे योगाने वाचते, व याच्याच सत्तेनें जग निर्माण होतें. म्हणून हा प्रकृतीचा भर्ता होय. २५ हे किरीटी, अनंत कालापासून चालत आलेली सृष्टि कल्पांतसमयीं याचे ठिकाणीं लय पावते. २६ हा प्रकृतीचा स्वामी आहे; व या ब्रह्मांडाचा सूत्रधार असून प्रपंचाला भजमावणारा आहे; २७ या देहांत परमात्मा म्हणून जो म्हणतात, तो हाच होय असें समज. २८ हे पांडुसुता, प्रकृतीच्या पलीकडे एकविध पुरुष आहे असें जें म्हणतात, तो खरोखर हा होय. २९

श्लोकार्थः—जो याप्रमाणें परमात्म्याला आणि गुणासह प्रकृतीला जाणतो, तो सर्व प्रकारानीं कर्में करीत असला तरी पुनः जन्म पावत नाहीं ॥ २३ ॥

जो या पुरुषाला याप्रमाणे पूर्णपणें जाणतो, आणि तसेंच सर्व गुण व कर्में प्रकृतीचीं आहेत हें जाणतो; १०३० हे धनंजया, पुरुष हें रूप असून प्रकृति ही त्याची छाया आहे, तसेंच तो जल असून ही मृगजल आहे, अशी खात्री करून घ्यावी. ३१ अर्जुना, याप्रमाणे ज्यानें आपले मनाशीं प्रकृति व पुरुष यांजबद्दल विचार करून खात्री करून घेतली आहे, ३२ तो शरीरानें जरी सर्व कर्में करीत असला, तरी आकाश जसें धूळ उंच उडाल्यानें मळत नाहीं, तसा तो प्रकृतीच्या कर्मांपासून अलिप्त असतो. ३३ जिवंतपणीं जो देहाच्या मोहांत पडून प्रकृतीच्या अधीन होत नाहीं, तो देह गेल्यावर पुनः जन्म पावत नाहीं. ३४ प्रकृति व पुरुष याजविषयीं पूर्णपणें ज्ञान झाल्यावर त्या ज्ञानाचा अशा रीतीनें मनुष्यावर अलौकिक उपकार घडतो. ३५ परंतु सूर्याप्रमाणें निर्मळ असें हें ज्ञान तुझे हृदयात उदय पावेल असे पुष्कळ उपाय आहेत, ते सांगतों ऐक. ३६

श्लोकार्थः—कोणी ध्यानाच्या योगानें शुद्ध झालेल्या मनानेंच आपल्या ठिकाणीं आत्म्याला पाहतात; कोणी विचारानें, आणि कोणी कर्मयोगानें आपल्या ठिकाणीं आत्म्याला पाहतात ॥२४॥

हे सुभटा, कोणी विचाररूप शेगडींत श्रवणमननिदिध्यासरूपी पुटें देऊन आत्म्यावरील अनात्मरूप किडाळ काढून टाकून आत्मरूप सुवर्ण शुद्ध करतात; ३७ छत्तीस भेदरूपी हिणकस जाळून आपलें शुद्ध तत्त्व निवडून घेतात; ३८ मग अर्जुना, त्या आत्मस्वरूपाचे पोटात आत्मज्ञानाच्या दृष्टीनें आत्मस्वरूप पाहतात, ३९ आणि कोणी दैवयोगानें, कोणी सांख्ययोगाने व कोणी कर्मयोगाचे आधाराने आत्मस्वरूपाची ओळख करून घेतात. १०४०

श्लोकार्थः—याप्रमाणें ज्याना आत्म्याचें ज्ञान नाहीं, असे दुसरे लोक गुरुमुखानें आत्म्याचें ज्ञान ऐकून आत्म्याची उपासना करतात, तें ऐकून उपासना करणारेही जन्ममृत्यु तरून जातात ॥ २५ ॥

---

१ सर्व जगाचा. २ शास्ता. ३ भर्ता. ४ प्रकृति. ५ सूत्रधार. ६ गणना करतो. ७ एकविध. ८ चर्चा. ९ पूर्णपणें. १० ज्ञान. ११ शेगडी. १२ किडाळ. १३ कस. १४ दैवयोगानें. १५ आधारानें.

येणें येणें प्रकारें । निस्तरती साचोकारें । हें भवभिउरें[2] । आघवेंचि ॥ ४१ ॥ (६७५. संतांच्या वचनावर विश्वास ठेवणारेही मृत्यूपासून सुटतात, १०४२–१०४७) परि ते करिती ऐसें । अभिमानु दवडूनि देशें । एकाचिया विश्वासें । टेंकैती बोला ॥ ४२ ॥ जे हिताहित देखती । हानि कणवा घेपती । पुसोनि शीणु हरिती । देती सुख ॥ ४३ ॥ तयांचेनि मुखें जें निघे । तेतुलें आदरें चांगें । ऐकोनियां आंगें । मनें होती ॥ ४४ ॥ तया ऐकणेयाचेनि नांवें । ठेविती गा आघवें । तया अक्षरांसी जीवें । लोण करिती ॥ ४५ ॥ तेही अंतीं कपिध्वजा । इया मरणार्णवसमाजा- । पासूनि निघती वोजां । गोमटेया ॥ ४६ ॥ ऐसैसे हे उपाये । बहुवस एथें पाहें । जाणावया होये । एकी वस्तु ॥ ४७ ॥ (६७६. आत्मप्राप्तीच्या उपायाचें निरसन करून फलितार्थ सांगतात, १०४८–१०५१) अवतरण:—आतां पुरे हें बहुत । पैं सर्वार्थाचें माथित । सिद्धांतनवनीत । देऊं तुज ॥ ४८ ॥ येतुलेनि पंडुसुता । अनुभव लौहाणा आयिता । येर तंव तुज होतां । सायास नाहीं ॥ ४९ ॥ म्हणोनि बुद्धि रेंचूं । मतवाद हे खांचूं । सोलींव[4] निर्वंचूं[5] । फलितार्थुचि ॥ १०५० ॥

यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् ।
क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥

अन्वयः—भरतर्षभ, यावत् किंचित् स्थावरजंगमं सत्त्वं संजायते, तत् क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् ( जात इति त्वं ) विद्धि ॥ २६ ॥

तरी क्षेत्रज्ञ येणें बोलें । तुज आपणपें जें दाविलें । आणि क्षेत्रही सांगितलें । आघवें जें ॥ ५१ ॥ (६७७. स्थावरजंगमाची उत्पत्ति क्षेत्रक्षेत्रज्ञाच्या संयोगानें होते, १०५२–१०५७) तया येरयेराच्या मेळीं । होइजे भूतीं सकळीं । अनिळसंगें सेलिलीं । कल्लोळ जैसे ॥ ५२ ॥ कां तेजा आणि उंखरा । भेटी जालिया वीरा । मृगजळाचिया पूरा । रूप होये ॥ ५३ ॥ नाना धाराधरधारीं । वोळलिया वसुंधरी । उठिजे जेवीं अंकुरीं । नानाविधीं ॥ ५४ ॥ तैसें चराचर आघवें । जें कांहीं जीवु येणें नांवें । तें तों उभययोगें संभवे । ऐसें जाण ॥५५॥ इयालागीं अर्जुना । क्षेत्रज्ञा प्रधाना- । पासूनि न होती भिन्ना । भूतव्यक्ति ॥५६॥

समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् ।
विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥

अन्वयः—यः विनश्यत्सु सर्वेषु भूतेषु समं तिष्ठंतं अविनश्यंतं परमेश्वरं पश्यति, सः पश्यति ॥२७॥

पैं पटत्व तंतु नव्हे । तरि तंतूसीचि तें आहे । ऐसें खोलीं डोळा पाहें । ऐक्य हें गा ॥ ५७ ॥ (६७८. ईश्वराला सर्वत्र समत्वानें पाहणाराच खरा पाहणारा,

१ तरून जातात. २ संसारसागर. ३ ठेवतात. ४ दुःखाचें. ५ ममतेनें. ६ निवारण करतात.

अशा अशा प्रकारानें खरोखर या संसाररूप सागरांतून सर्व तरून जातात. ४१ पण ते असें करितात: कोणी अभिमान टाकून श्रद्धेने एकाच्या शब्दावर विश्वास ठेवतात. ४२ ज्या मनुष्याच्या शब्दावर विश्वास ठेवावयाचा, तो हित-अहित पाहणारा, आपल्या दुःखाचें ममतेनें निवारण करणारा व आपली पूसतपास करून शीण हरणारा व शेवटीं सुख देणारा असा पाहून, ४३ मग त्या पुरुषाच्या मुखातून जे जे शब्द निघतील त्यांचा उत्तम रीतीनें आदर करून श्रवण केल्यावर, आपलें तनमन त्याचे ठिकाणीं अर्पण करतात. ४४ त्याचे शब्द कानीं पडावे म्हणून आपले सर्व व्यवहार सोडून देतात, व त्याच्या मुखातून निघणाऱ्या अक्षरांवरून आपल्या जीवाचें लिंबलोण उतरून टाकतात. ४५ हे कपिध्वजा, (अशा रीतीनें जे वागतात,) ते अंतीं ह्या मृत्युरूप समुद्रातून उत्तम प्रकारें पार पडतात. ४६ याप्रमाणें ब्रह्मवस्तु जाणण्याचे या मृत्युलोकीं पुष्कळ मार्ग आहेत. ४७ पण आतां हे बहुत उपाय राहूं दे. त्या सगळ्यांचे मंथन करून सिद्धांतरूप नवनीत तुला देतों. ४८ त्यामुळें अर्जुना, तुला सहज अनुभव येऊन ब्रह्मरूप होण्यास श्रम पडणार नाहींत. ४९ म्हणून मतवाद्यांचें खंडन करून सिद्धांत ठरवून केवळ शुद्धतत्त्व तुला सांगतों. १०५०

श्लोकार्थः--हे भरतश्रेष्ठा, स्थावर अथवा जगम असा कोणताही प्राणी उत्पन्न होतो तो क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या संयोगानें झाला आहे असें तूं समज ॥ २६ ॥

तरी 'क्षेत्रज्ञ' या शब्दानें जें तुला आम्हीं दाखविलें, आणि 'क्षेत्र' म्हणून जें सर्व कांहीं सांगितलें, ५१ त्या परस्परांच्या ऐक्यापासून या सर्व सृष्टीची उत्पत्ति होते. वाऱ्याच्या संयोगानें ज्याप्रमाणें उदकांत लाटा उत्पन्न होतात, ५२ किंवा हे वीरा, माळ जमिनीवर सूर्यकिरण पडल्यावर जशा मृगजलाच्या लाटावर लाटा निर्माण होतात; ५३ अथवा पावसाच्या धारा पृथ्वीवर पडल्यावर ज्याप्रमाणे कोट्यवधि अंकुर जमिनीवर उत्पन्न होतात, ५४ त्याप्रमाणे सर्व चराचर--ज्याला म्हणून 'जीव' असें नांव आहे--तें या दोघांच्या संयोगापासून उत्पन्न होतें असें समज. ५५ यास्तव अर्जुना, पुरुष व प्रकृति याहून भूतव्यक्ति भिन्न नाहींत. ५६

श्लोकार्थः--जो नाशवत अशा सर्व भूतांच्या ठिकाणीं सारखेपणानें राहणारा आणि नाश न पावणारा असा परमेश्वर पाहतो, तोच खरा ज्ञानी होय ॥ २७ ॥

हें पहा, वस्त्र हें जरी तंतु नव्हे, तरी तें तंतूंचेच केलेलें आहे; याप्रमाणें तूं खोल दृष्टि देऊन ईश्वर आणि प्रकृति यांच्यामधील ऐक्य पाहा; ५७ हीं सर्व भूते एकापासून एक निर्माण झालेलीं आहेत; पण तूं याचा अनुभव असा घे: ५८ त्याचप्रमाणें

७ शब्द कानीं पडावेत. ८ व्यवहार. ९ मृत्युरूप समुद्र. १० प्रकारानें. ११ प्राप्त होऊन. १२ सिद्धांत ठरवूं. १३ खंडन करूं. १४ केवळ शुद्ध. १५ सांगूं. १६ तत्त्व. १७ सृष्टि. १८ वारा. १९ समुद्रात. २० माळ जमीन. २१ पर्जन्याच्या धारा. २२ पडल्या. २३ पृथ्वीवर. २४ पुरुष. २५ प्रकृति. २६ वस्त्रपण.

१०५८–१०६९ ) भूतें आघवींचि होतीं । एकाची एक आहाती । परी तूं प्रतीती[1] । यांची घे पां ॥ ५८ ॥ यांचीं नामेंही आनानें[2] । अनारिसीं वर्तनें[3] । वेषही सिनाने[4] । आघवेयांचे ॥ ५९ ॥ ऐसें देखोनि किरीटी । भेद सूसी हन पोटीं । तरि जन्माचिया कोटी । न लाहसी निघों ॥ १०६० ॥ पैं नाना-प्रयोजनशीळें[4] । दीर्घें वक्रें वर्तुळें । होती एकीचींच फळें । तुंबिणीयेचीं[5] ॥ ६१ ॥ होतु कां उजू वांकुडें । परि बोरीचें हें न मोडे । तैसीं भूतें अवघडें । परि वस्तू उजू ॥ ६२ ॥ अंगारकणीं[6] बहुवसीं । उष्णता समान जैसी । तैसा नाना जीवराशी । परेशुं[7] असे ॥ ६३ ॥ गगनभरी धारा । परि पाणी एकचि वीरा । तैसा या भूताकारा । सर्वांगीं तो ॥ ६४ ॥ हे भूतग्राम विषम । परि वस्तु ते एथ सम । घटमठीं व्योम । जियापरी ॥ ६५ ॥ हा नाशतां भूताभासु । ऐथ आत्मा तो अविनाशु । जैसा केयूरादिकीं[9] कसु । सुवर्णाचा ॥ ६६ ॥ एवं जीवधर्महीनु । जो जीवेंसीं अभिन्नु । देखे तो सुनयनु[11] । ज्ञानियांमाजी ॥ ६७ ॥ ज्ञानाचा डोळा डोळसा- । माजी डोळस तो वीरेशा । हे स्तुति नोहे बहुवसा । भाग्याचा तो ॥ ६८ ॥

समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।
न हिनस्त्यात्मनाऽऽत्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८ ॥

अन्वयः—( यः ) सर्वत्र समवस्थितं ईश्वरं समं पश्यन् आत्मना आत्मान न हिनस्ति, ( सः ) ततः परां गतिं याति ॥ २८ ॥

हे गुणेंद्रिय धोकौटी[12] । देह धातूंची[13] लिंकुटी । पाचमेळांवा[14] वोरवेंटी[15] । दारुण[16] हे ॥ ६९ ॥ ( ६७९. ईश्वराला अविनाशी जाणणारा मोक्षाला जातो, १०७०-१०७३ ) हे उघड पांचवेउली[17] । पंचेधा[18] आगी लागली । जीवपंचाननेंना[19] सांपडली । हरिणकुटी हे ॥ १०७० ॥ ऐसा असोनि इये शरीरीं । कोण नित्यबुद्धीची सुरी । अनित्यभावाच्या उदरीं । दाटीजेनी[20] ॥ ७१ ॥ परि इये देहीं असतां । जो नयेचि आपणया घाता । आणि शेखीं पंडुसुता । तेथेंचि मिळे ॥ ७२ ॥ जेथ योगज्ञानाचिया प्रौढी । वोलांडुनियां जन्मकोडी । न निगों इया भाषा बुडी । देती योगी ॥ ७३ ॥ ( ६८०. ज्ञानी परमपदाला जातात, १०७४-१०८० ) जें आकाराचें पैल तीर । जें नादाची पैल मेर[22] । तुर्येचें माजघर । परब्रह्म जें ॥ ७४ ॥ मोक्षासगट गंति । जेथें येती विश्रांति । गंगादि अंपांपति[23] । सरिता जेवीं ॥ ७५ ॥ तें सुख

१ अनुभव. २ भिन्नभिन्न. ३ तन्देतन्देचे. ४ आधाराच्या अनुरोधानें. ५ भोपळ्याच्या वेलीचीं. ६ निखाऱ्यांत. ७ आत्मा. ८ भिन्न. ९ बाहुभूषणादि अलंकार. १० वेगळा. ११ उत्तम ज्ञानी. १२ पिशवी. १३ वात, पित्त व कफ हे त्रिधातु. १४ पंचतत्त्वें. १५ वाईट. १६ बलवान. १७ पांच नांग्यांची इंगळी. १८ पाच प्रकारचे. १९ जीवरूप व्याघ्र. २० सांपळा. २१ घालीत नाहीं. २२ कडा. २३ समुद्र.

त्यांचीं नांवें निरनिराळीं असून, वर्तनही भिन्न असतें; आणि सर्वांचे वेषही तऱ्हेतऱ्हेचे असतात. ५९ असें पाहून जर तूं मनांत अशी गांठ मारलीस कीं, आत्मा व भूतें यांचे ठिकाणीं भेद आहे, तर अर्जुना, तूं या संसारातून कोट्यवधि जन्मपर्यंत पार पडणार नाहींस. १०६० ज्याप्रमाणें एकाच भोंपळ्याचे वेलाला जसजसा आधार असेल तसतसे लांब, वाटोळे व वाकडे असे भोंपळे येतात; ६१ बोरीचे झाडाची फांदी सरळ असो किंवा वाकडी असो, तिला बोरीचीच म्हणतात; त्याप्रमाणें जीवमात्र जरी वेडेवाकडे असले तरी त्यातील आत्मा म्हणून जी वस्तु आहे ती सरळच आहे. ६२ पुष्कळ निखारे जरी असले, तरी त्याची उष्णता सारखीच असते; त्याप्रमाणें, पुष्कळ जीवराशी जरी असल्या, तरी त्यातील आत्मा एकच आहे. ६३ वीरा अर्जुना, सर्व गगनातून जरी पावसाच्या धारा पडत असल्या, तरी त्यांतील पाणी एकच आहे; त्याप्रमाणें, हे भूताचे आकार जरी निरनिराळे असले, तरी सर्वांचे ठिकाणीं आत्मा म्हणून जो आहे तो एकच आहे. ६४ घट अथवा मठ यांमधील आकाश जरी निराळ्या आकाराचें असलें, तरी तें आकाशरूपानें एकच असतें; त्याप्रमाणें, भूतें जरी निराळीं असलीं तरी त्यांतील आत्मा म्हणून जी वस्तु आहे ती एकच आहे. ६५ सुवर्णाचे बाहुभूषणें इत्यादि अलंकार जरी पुष्कळ असले, तरी त्या सर्वांतील सोन्याचा कस एकच असतो; त्याप्रमाणें, भूतांचा भास नाशवंत असून त्या सर्वांतील आत्मा हा अविनाशी आहे. ६६ याप्रमाणें आत्मा जरी जीवाशीं अभिन्न आहे, तरी तो जीवाचे धर्माहून भिन्न आहे असें जो जाणतो, तो सर्व ज्ञान्यांत उत्तम ज्ञानी होय; ६७ आणि असा जो सर्व ज्ञान्यांत डोळस आहे, तो स्तुतीस पात्र आहे; इतकेंच नव्हे, तर अर्जुना, तो केवळ भाग्यवान होय. ६८

श्लोकार्थः—सर्व भूताचे ठिकाणीं परमात्मा समदृष्टीनें आहे असें पाहून जो आपल्या आत्मस्वरूपाचा नाश करीत नाहीं, तो उत्तम गतीस पोहोंचतो ॥ २८ ॥

हें शरीर म्हणजे गुण व इंद्रियें यांची धोकटी आहे; वात, पित्त व कफ या धातूंनीं हें भरलेलें आहे; वाईट अशा पंचतत्त्वांनीं बनलेलें असून हें बलवान आहे; ६९ हें उघड उघड पांच नाग्यांची इंगळीच होय; याला पांच प्रकारचे अग्नि लागले आहेत, व जीवरूप पंचानन (आत्मा) हा सापळ्यांत म्हणजे शरिरात सापडला आहे; १०७० असा जरी या शरीराचा प्रकार आहे, तरी अशाश्वतरूपी मावाच्या उदरात; आत्मा नाशवंत नाहीं अशा बुद्धीची सुरी कोणी घालीत नाहीं; ७१ तथापि अर्जुना, जो ज्ञानी आहे तो या देहांत असूनही आपला घात करून न घेतां शेवटीं ब्रह्मपदालाच जाऊन मिळतो. ७२ ज्या पदाच्या योगज्ञानाच्या प्रौढीनें कोट्यवधि जन्म ओलांडून, 'पुनः जन्म घेणार नाहीं' असें म्हणून, त्या ठिकाणीं योगी लोक बुडी देतात; ७३ जें परब्रह्म आकाराच्या पलीकडल्या कांठावर व नादाच्या पलीकडील कड्यावर तुर्यावस्थेच्या माजघरांत असतें; ७४ ज्याप्रमाणें सर्व नद्या समुद्रास मिळण्याकरितां येतात, त्याप्रमाणें जेथें मोक्षासुद्धां सर्व गति विश्रांति पावतात, ७५ जो

येणेचि देहें । पाय पाखाळणिया लाहे । जो भूतवैषम्यें नोहे । विषमबुद्धी ॥७६॥ दीपांचिया कोडीं जैसें । एकचि तेज सरिसें । तैसा जो असतचि असे । सर्वत्र ईशु ॥ ७७ ॥ ऐसेनि समत्वें पंडुसुता । जिये जो देखत सांता । तो मरणा आणि जीविता । नागवे फुडा ॥ ७८ ॥ म्हणोनि तो दैवागळा । वानीत असों वेळोवेळां । जे साम्यसेजे डोळा । लागला तया ॥ ७९ ॥

प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।
यः पश्यति तथाऽऽत्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥

अन्वयः—यः प्रकृत्या एव कर्माणि सर्वशः क्रियमाणानि ( संति इति ) पश्यति, तथा आत्मानं अकर्तारं पश्यति, स पश्यति ॥ २९ ॥

आणि मनोबुद्धिप्रमुखें । कर्मेंद्रियें अशेखें । करी प्रकृतिचि हें देखे । साचें जो गा ॥ १०८० ॥ ( ६८१. प्रकृतिच क्रिया करते, आत्मा काहींच करीत नाहीं; १०८१-१०८४ ) घरींची राहटती घरीं । घर कांहीं न करी । अभ्र धावे अंबरीं । अंबर तें उगें ॥ ८१ ॥ तैसी ती प्रकृति आत्मप्रभा । खेळे गुणीं विविधारंभीं । येथ आत्मा तो वोथंबौ । नेणे कोण ॥ ८२ ॥ ऐसेनि येणें निर्वाडें । जयाच्या जीवीं उजिवडें । अकर्तयातें फुडें । देखिलें तेणें ॥ ८३ ॥

यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।
तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥

अन्वयः—यदा भूतपृथग्भाव एकस्थ अनुपश्यति, च ततः एव विस्तारं ( अनुपश्यति ), तदा ब्रह्म संपद्यते ॥ ३० ॥

*येऱ्हवीं तैंचि अर्जुना । होइजे ब्रह्मसंपन्ना । जैं या भूताकृति भिन्ना ।* दिसती एकीं ॥ ८४ ॥ ( ६८२. सर्व भूतें एकत्वानें अनुभवास येतील, तेव्हांच ब्रह्मसंपत्ति प्राप्त झाली, १०८५-१०८९ ) लहरी जैसिया जळीं । परमाणुकणिका भूस्थळीं । रश्मिकर मंडळीं । सूर्याच्या जेवीं ॥ ८५ ॥ नातरी देहीं अवेव । मनीं आघवेचि भाव । विस्फुलिंग सावेव । वन्हीं एकीं ॥ ८६ ॥ तैसे भूताकार एकाचे । हें दिठी रिगे जैं साचें । तैंचि ब्रह्मसंपत्तीचें । तारूं लागे ॥ ८७ ॥ मग जया तया कडे । ब्रह्मचि दिठी उघडे । किंबहुना जोडे । अपार सुख ॥८८॥ येतुलेनि तुज पार्था । प्रकृतिपुरुषव्यवस्था । ठायें ठावो प्रतिपैथा- । मार्जी जाहली ॥ ८९ ॥ ( ६८३. आत्म्याविषयीं आणखी दोन गोष्टी सांगतात, १०९०-१०९४ ) अमृत जैसें ये चुळा । कां निधान देखिजे डोळा । तेतुला जिव्हाळा । मानावा हा ॥ १०९० ॥ जी जाहलिये प्रतीती । घर बांधेणें जें चित्तीं । तें आता नो सुभद्रापती । इयावरी

१ पुण्यास. २ भेदानें. ३ पूर्वीपासून. ४ घरातील माणसें. ५ आत्म्याच्या प्रकाशानें. ६ पुष्कळ कार्यें आरंभितें. ७ खांबाप्रमाणें स्थिर. ८ अनुभव घेऊन. ९ प्रकाश. १० काहीं न

भूतांच्या भेदापासून आपल्या बुद्धीस भेद होऊं देत नाहीं, त्याला अशा ह्या ब्रह्माचें सुख याच देहांत उपभोगावयास सांपडतें. ७६ पुष्कळ दिवे जरी असले, तरी त्या सर्वांचें तेज एकच असतें; त्याप्रमाणें, पूर्वीपासून अनादि असा जो आत्मा, तो सर्वत्र भरलेला आहे. ७७ हे पांडुसुता, याप्रमाणें ज्याचें जीव व आत्मा याविषयीं समत्व आहे, तो जन्ममरणाच्या सपाट्यांत सांपडत नाहीं. ७८ जो साम्यरूप बिछान्यावर स्वस्थ निजला आहे, त्याला आम्ही दैववान असें म्हणतों, व वारंवार त्याचें वर्णन करतों. ७९

श्लोकार्थः—प्रकृतीच्या योगानेंच सर्व प्रकारें कर्में केलीं जातात, असें जो पाहतो, आणि आत्मा कर्ता नाहीं असें पाहतो, तोच खरा ज्ञानी होय ॥२९॥

आणि मन, बुद्धि इत्यादि पांच ज्ञानेंद्रियें व पाच कर्मेंद्रियें याचेपासून होणारीं कर्में हीं प्रकृतीचीं कर्में होत असें जो पूर्णपणें जाणतो; १०८० घरांतील राहणारीं माणसें सर्व व्यापार करतात, परंतु घर कांहींएक करीत नाहीं; तसेंच आकाशात ढग धावतांना दृष्टीस पडले तरी आकाश ज्याप्रमाणें स्थिर असतें, ८१ त्याप्रमाणें प्रकृति आत्म्याचे प्रकाशानें गुणांनीं युक्त होऊन पुष्कळ खेळ खेळते, तथापि आत्मा हा खांबाप्रमाणें अचल असून तिनें केलेलें कर्म जाणीत नाहीं. ८२ याप्रमाणें अनुभव घेऊन ज्यानें आपल्या हृदयांत प्रकाश पाडला आहे, त्यानें आत्म्याला पूर्णपणें जाणलें असें समज. ८३

श्लोकार्थः—जेव्हा सर्व भूताचा वेगळेपणा एका परमेश्वराचे ठिकाणीं पहातो, आणि परमेश्वरापासूनच या जगाचा विस्तार झाला आहे असें पहातो, तेव्हा तो ब्रह्मसपन्न होतो ॥ ३० ॥

अर्जुना, ज्या वेळेस भिन्न भिन्न असलेलीं भूतें एकरूपानेंच पाहतो, त्या वेळेस त्या मनुष्याला ब्रह्मसंपन्न असें म्हणावें. ८४ ज्याप्रमाणें पाण्यावरील लाटा, किंवा जमिनीवरील परमाणूंचे कण, अथवा सूर्यमंडळांतील सूर्यकिरण, ८५ अथवा देहांतील सर्व अवयव, मनांतील सर्व भाव, व विस्तवापासून निघणाऱ्या सर्व ठिणग्या, या सर्व गोष्टी आपल्या उत्पत्तिस्थानांपासून भिन्न दिसल्या, तरी ज्या भूमिकांपासून त्या उत्पन्न झाल्या आहेत, त्यांच्यांशीं त्या साम्यत्वानेच असतात, ८६ त्याप्रमाणें प्राणिमात्र एकच आत्म्यापासून उत्पन्न झाले आहेत, अशी ज्याच्या मनाची खरोखर खात्री झाली आहे, त्यालाच ब्रह्मरूप संपत्तीचें जहाज सांपडलें असे म्हणतां येईल. ८७ मग तो जिकडे पाहील तिकडे त्याला सर्व ब्रह्ममयच दिसतें. फार काय सागावें ? त्याला अपार सुख होतें. ८८ पार्था, याप्रमाणें तुला प्रकृति व पुरुष याची व्यवस्था अनुभवसिद्ध दाखले देऊन सांगितली, ती समजली ना ? ८९ ज्याप्रमाणें अमृत चुळ्क्यात यावें, किंवा ठेवा दृष्टीस पडावा, त्या योग्यतेचा हा लाभ आहे असें मान. १०९० हे सुभद्रापते, या आलेल्या अनुभवावरून तूं आपले मनात जो एक कायम विचार करणार असशील, तो इतक्यांत करूं नको.

करणाऱ्याला—आत्म्याला. ११ ठिणग्या. १२ पूर्णपणें. १३ अनुभवसिद्ध दाखल्यानीं. १४ लाभ. १५ कायमचा विचार करणें. १६ इतक्यात करू नको.

॥ ९१ ॥ अवतरणः—तरि एक दोनी ते बोल । बोलिजती सखोले । देई मनातें बोलें । मग तें घेई ॥ ९२ ॥ ऐसें देवें म्हणितलें । मग बोलों आदरिलें । तेथें अवधानाचेंचि केलें । सर्वांग येरें ॥ ९३ ॥

अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्माऽयमव्ययः ।
शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥

अन्वयः—कौन्तेय, अयं परमात्मा अनादित्वात्, निर्गुणत्वात् अव्ययः अस्ति (अतः) सः शरीरस्थः (सन्) अपि न करोति (च) न लिप्यते ॥ ३१ ॥

परि परमात्मा म्हणिपे । तो ऐसा जाण स्वरूपें । जळीं जळें न लिंपे । सूर्य जैसा ॥ ९४ ॥ (६८४. आत्मा शरीरांत असून कांहीं करीत नाहीं व कोणाकडून करवीतही नाहीं, १०९५-१०९९) का जे जळा आदीं पाठीं । तो असतुचि असे किरीटी । माजी बिंबे तें दृष्टी । आणिकांचिये ॥ ९५ ॥ तैसा आत्मा देहीं । आथी म्हणिपे हें कांहीं । साचें तरी नाहीं । तो जेथींचा तेथें ॥९६॥आरिसां मुख जैसें । बिंबलिया नाम असे । देहीं वसणें तैसें । आत्मतत्त्वा ॥ ९७ ॥ तया देहा म्हणती भेटी[४] । हे सैपायी निर्जीव गोठी । वारिया वाळुवे गांठी । केंही आहे ॥ ९८ ॥ आगी आणि कापुसा । दोरा सुवावा कैसा । केउता सांदा आकाशा । पाषाणेंसी ॥ ९९ ॥ (६८५. आत्म्यामध्यें व देहामध्यें पूर्व पश्चिमेचें अंतर, ११००-११०७) एक निघे पूर्वेकडे । एक ते पश्चिमेकडे । तिये भेटीचेनि पाडें । संबंधु हा ॥ ११०० ॥ उजियेडा आणि आंधारेया । जो पाडु सृता उभया । तोचि गा आत्मया । देहा जाण ॥ १ ॥ रात्री आणि दिवसा । कनका आणि कापुसा । अपाडु का जैसा । तैसाचि यासी ॥ २ ॥ देह तंव पांचाचें जालें । हें कर्मांचे गुणीं गुंथलें । भंवतसें चाकीं सूदलें । जन्मृत्यूच्या ॥ ३ ॥ हें काळानळाच्या तोंडीं । घातली लोणियाची उंडी । माशी पांखु पाखडी । तंव हें सरे ॥ ४ ॥ हें विपायें आगींत पडे । तरि भस्म होऊनि उडे । जाहलें श्वानां वरपडे । तरि ते विष्ठा ॥५॥ या चुके दोहीं काजां । तरि होय कृमींचा पुंजा । हा परिणामु कपिध्वजा । कैश्मलु गा ॥ ६ ॥ या देहाची हे दशा । आणि आत्मा तो एथ ऐसा । पैं नित्य सिद्ध अपैसा । अनादिपणें ॥ ७ ॥ (६८६. आत्म्याचें स्वरूप, ११०८-१११५) सकळु ना निष्कळु । अक्रियु ना क्रियाशीळु । कृशु ना स्थूळु । निर्गुणपणें ॥ ८ ॥ आभासु ना निराभासु । प्रकाशु ना अप्रकाशु । अल्प ना बहुवसु । अरूपपणें

१ गहन. २ आमीन. ३ अशान्यांच्या. ४ संबंध. ५ सर्वथैव. ६ ओंगळ. ७ जोड. ८ जिवंत असलेल्यास. ९ दोन्यांत. १० कुत्र्याच्या स्वाधीन. ११ वाईट. १२ सहज. १३ पूर्ण. १४ अपूर्ण. १५ दृश्य. १६ अदृश्य.

कारण, यावर ९१ तुला आणखी एक दोन गहन विचार मी सांगणार आहें, ते तूं आपलें मन मला वोलीस दिल्यावर मग सांगेन. ९२ याप्रमाणें भगवंतांनीं बोलून सांगण्यास आरंभ केला, तों आपलें सर्वांग अवधानमय करून अर्जुन ऐकण्यास तयार झाला. ९३

श्लोकार्थः—हे कौंतेया, हा परमात्मा अनादि व निर्गुण असल्यामुळें अविनाशी आहे; आणि यामुळें, तो शरीरात असला तरी कांहीं करीत नाहीं, व कशानेंही लिप्त होत नाहीं ॥३१॥

ज्याप्रमाणें सूर्याचें प्रतिबिंब पाण्यात पडलें असतां त्याजपासून तें अलिप्त असतें, त्याप्रमाणें, परमात्मा म्हणून ज्याला म्हणतात, तो असा, शरीरांत असूनही शुद्धस्वरूपच असतो, असें जाण. ९४ हे किरीटी, सूर्य, पाणी उत्पन्न होण्याचे अगोदर व मागूनही, पूर्वीं होता त्याप्रमाणेंच कायम असतो; परंतु अज्ञानी लोकांच्या दृष्टीनें पाण्यांत दृष्टीस पडल्यावर त्यास तें प्रतिबिंब सूर्यच भासतें; ९५ त्याप्रमाणें, आत्मा देहांत आहे, हें म्हणणें खरें नसून, देह उत्पन्न होण्याचे पूर्वीपासून तो जेथें होता तेथेंच नंतरही असतो. ९६ ज्याप्रमाणें आरशांत आपलें स्वरूप आहे असा भास होतो, त्याप्रमाणें आत्मा देहांत वास करतो हें म्हणणें मिथ्या होय. ९७ त्या देहाचा व आत्म्याचा संबंध आहे हें म्हणणें सर्वैथैव व्यर्थ होय. हें पहा, वारा व वाळू यांची कधीं गाठ मारतां येईल काय ? ( कारण एक अदृश्य व दुसरी जड वस्तु आहे. ) ९८ तसेंच, अग्नि आणि कापूस हीं दोन्ही दोऱ्यांत कशीं ओंवता येतील ? आणि आकाश व पाषाण यांची जोड कशी करता येईल ? ९९ ( एकाच ठिकाणाहून निघून ) एक मनुष्य पूर्वेकडे जावयास निघावा आणि एक पश्चिमेकडे जावयास निघावा, मग त्याची गांठ पडावी, त्याप्रमाणें हा संबंध आहे ! ११०० उजेड व अंधेर, मेलेला व जिवंत मनुष्य यांचा ज्याप्रमाणें एकमेकांशीं संबंध नाहीं, त्याचप्रमाणें आत्मा व शरीर यांचा संबंध नाहीं असें समज. १ रात्र व दिवस, सोनें आणि कापूस यांचा ज्याप्रमाणें संबंध नाहीं, त्याचप्रमाणें आत्मा व देह यांचा संबंध नाहीं. २ पाहूं गेलें असता शरीर हें पंचतत्त्वांचें बनलेलें आहे, व कर्माच्या दोऱ्यात गोंवलेलें आहे, व जन्ममृत्यूच्या भवचक्रांत फिरत आहे; ३ काळरूपी अग्नीच्या तोंडांत लोण्याच्या उंडीप्रमाणें घातलेलें असून, माशीचा पंख हालण्यास जितका वेळ लागतो तितक्या थोड्या वेळांत हें शरीर नाहींसें होतें. ४ हा देह कदाचित् अग्नींत पडला, तर त्याची राख होऊन उडून जाते; व कुत्र्याच्या तावडींत सांपडला तर त्याची विष्ठा बनते. ५ हे कपिध्वजा, या दोन प्रकारांतून जर देह चुकला, तर ज्या ठिकाणीं हा पडेल त्या ठिकाणीं यामध्यें किडे व आळ्या यांचे पुंजकेच्या पुंजके सांपडतात; अशा रीतीनें याचा वाईट परिणाम होतो. ६ या देहाची ही अशी वाईट दशा होते; परंतु आत्मा तर सिद्ध, नित्य, सहज व अनादि आहे. ७ तो निर्गुण असल्यामुळें पूर्णही नाहीं, व अपूर्णही नाहीं. अपूर्णही क्रिया करणारा नाहीं व क्रिया न करणाराही नाहीं. तसेंच रोडका नाहीं व लठ्ठही नाहीं. ८ तो निराकार असल्यामुळें दृश्य नाहीं व अदृश्यही नाहीं. तो प्रकाशमान

॥ ९ ॥ रिता ना भरितु । रहितु ना सहितु । मूर्त ना अमूर्तु । शून्यपणें ॥१११०॥ आनंदु ना निरानंदु । एकु ना विविधु । मुक्त ना बध्दु । आत्मपणें ॥ ११ ॥ येतुला ना तेतुला । आइता ना रचिला । बोलता ना उगला । अलक्षपणें ॥१२॥ सृष्टीचा होणा न रचे । सर्वसंहारें न वेंचे । आथी नाथी या दोहींचें । पंचत्व तो ॥ १३ ॥ मेवे ना चर्चे । वाढे ना खांचे । विटे ना वेंचे । अव्ययपणें ॥ १४ ॥ एवंरूप पैं आत्मा । देही जें म्हणती प्रियोत्तमा । तें मठाकारें व्योमा । नाम जैसें ॥ १५ ॥ ( ६८७. आत्म्याचें अकर्तृत्व, १११६–१११९ ) तैसें तयाचिये अनुस्यूति । होती जाती देहाकृति । तो घे ना सांडी सुमति । जैसा तैसा ॥ १६ ॥ अहोरात्रें जैसीं । येती जाती आकाशीं । आत्मसत्ते तैसीं । देहें जाण ॥ १७ ॥ म्हणोनि इये शरीरीं । कांहीं करवी ना करी । आयताही व्यापारीं । सज्ज न होय ॥ १८ ॥ यालागीं स्वरूपें । उणा पुरा न घेपे । हें असो तो न लिंपे । देहीं देहा ॥१९॥

यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।
सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥

अन्वयः—यथा सर्वगतं आकाशं सौक्ष्म्यात् न उपलिप्यते, तथा सर्वत्र देहे अवस्थितः आत्मा न उपलिप्यते ॥ ३२ ॥

( ६८८. आत्म्याचें अलिप्तपण, ११२०-११२२ ) अगा आकाश कें नाहीं । हें न रिघेचि कवणे ठायीं । परि कायिसेनि कहीं । गांदिजेना जैसें ॥ ११२० ॥ तैसा सर्वत्र सर्व देहीं । आत्मा असतुचि असे पाहीं । परी संगदोषें एकेंही । लिप्त नोहे ॥ २१ ॥ पुढतपुढती एथें । हेंचि लक्षण निरुतें । जे जाणावें क्षेत्रज्ञातें । क्षेत्रविहीना ॥ २२ ॥

यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।
क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥

अन्वयः—भारत, यथा एकः रविः इमं कृत्स्नं लोकं प्रकाशयति, तथा क्षेत्री कृत्स्नं क्षेत्रं प्रकाशयति ॥ ३३ ॥

( ६८९. आत्मा क्षेत्रविहीन आहे; लक्षण चुकूं नको; ११२३ ) संसर्गें चेष्टिजे लोहें । परि लोह भ्रामक नोहे । क्षेत्रक्षेत्रज्ञां आहे । तेतुला पाडु ॥ २३ ॥ ( ६९०. क्षेत्रज्ञामुळें क्षेत्राचें प्रकाशन होतें, ११२४–११२९ ) दीपकाची अंचीं । राहाटी वाहे घरींची । परि वेगळीक कोडीची । दीपा आणि घरा ॥ २४ ॥ पैं काष्ठाच्या पोटीं । वन्हि असे किरीटी । परि काष्ठ नोहे या दृष्टी । पाहिजे हा ॥ २५ ॥

---

१ मुका. २ लक्षणरहित असल्यामुळें. ३ होण्यानें. ४ लयस्थान. ५ मोजतां येत नाहीं. ६ वर्णन करतां येत नाहीं. ७ आकाशाला. ८ अखंडपणा. ९ माळ्लेल्या. १० पीडा पावत नाहीं. ११ उपाधीनें. १२ आत्म्याला. १३ देहापासून निराळा. १४ लोहचुंबक. १५ ज्योति.

नाहीं व निस्तेजही नाहीं, आणि थोडा नाहीं व पुष्कळही नाहीं. ९ तो शून्य असल्यामुळें रिकामा नाहीं, व भरलेलाही नाहीं; कशाविरहित अथवा कशासहितही नाहीं, आणि तो साकार नाहीं व निराकारहि नाहीं. १११० तो आत्मस्वरूपी असल्यामुळें त्याला आनंदही नाहीं व दु:खही नाहीं, त्याला एक रूप नाहीं व पुष्कळ रूपेंही नाहींत, आणि तो कशापासून मुक्त नाहीं व कशानें बद्धही नाहीं. ११ तो लक्षणरहित असल्यामुळें एवढा किंवा तेवढा, आयता किंवा बनलेला आणि बोलका किंवा मुका असाही नाहीं. १२ सृष्टीच्या होण्याबरोबर हा होत नाहीं व सृष्टीचा संहार झाल्यावर लय पावत नाहीं; आणि हा असणें व नसणें या दोन्ही स्थितींचें लयस्थान होय. १३ हा अव्यय असल्यामुळें मोजतां येत नाहीं व वर्णन करता येत नाहीं. हा वाढत नाहीं अथवा कमी होत नाहीं, आणि हा विटत नाहीं व खर्च होत नाहीं, १४ हे प्रियोत्तमा, असें ज्या आत्म्याचें स्वरूप आहे, तो देहांत आहे असें जे म्हणतात, त्याचें तें म्हणणें—मठांत असलेल्या आकाशाला आकार आहे हें म्हणणें-जसें व्यर्थ आहे, १५ तसें आत्म्याच्या अखंडपणा-संबंधानें विचार न करितां तो शरीर धारण करतो किंवा टाकतो हें म्हणणें व्यर्थ होय. कारण अर्जुना, तो शरीर धारण करीत नाहीं व सोडूनही जात नाहीं; तो जसा पूर्वीपासून आहे तसाच असतो. १६ ज्याप्रमाणें आकाशात दिवस व रात्र येतात व जातात, त्याप्रमाणें या आत्म्याला देह येतात व जातात. परंतु त्यापासून तो लिप्त होत नाहीं; १७ म्हणून या शरीरांत तो कांहीं करीत नाहीं व करवीतही नाहीं; व शरीराच्या कोणत्याही व्यापारात सक्त होत नाहीं. १८ यास्तव त्याचे स्वरूपात कमी अगर जास्त कांहीं होत नाहीं; इतकेंच नव्हे, तर देहात असूनही देहाच्या सर्व व्यापारांपासून तो अलिप्त असतो. १९

*श्लोकार्थः—जसें सर्वव्यापक आकाश सूक्ष्मपणामुळें कशानेंही लिप्त होत नाहीं, तसा सर्व देहाचे ठिकाणीं असलेला आत्मा देहादिकाच्या कर्मांनीं लिप्त होत नाहीं ॥ ३२ ॥*

अर्जुना, आकाश म्हणून जें म्हणतात, तें कोठें नाहीं ? व त्याचा कोठें रिगाव होत नाहीं ? म्हणजे तें सर्वत्र आहे; परंतु ज्याप्रमाणें त्याला कशापासूनही पीडा होत नाहीं, ११२० त्याप्रमाणें सर्वत्र सर्व देहांत आत्मा जरी आहे, तरी देहाच्या उपाधीं-पासून तो लिप्त होत नाहीं. २१ तर वारंवार तूं हें शुद्धतत्त्व ध्यानांत ठेव कीं, आत्मा देहापासून निराळा आहे. २२

*श्लोकार्थः—हे भारता, जसा एकटा सूर्य या सर्व जगताला प्रकाशित करितो, तसाच क्षेत्रज्ञ हा सर्व क्षेत्राना प्रकाशित करितो ॥ ३३ ॥*

लोहचुंबकाच्या संसर्गानें लोखंड हालतें, परंतु लोखंड हें लोहचुंबक नव्हे. तीच व्यवस्था आत्मा व देह यांस लागू आहे. २३ दीपज्योतीच्या उजेडाने घरांतील सर्व व्यवहार करितां येतात, परंतु दिवा आणि घर यांत कोटिश: अंतर आहे; २४ हे किरीटी, लाकडाच्या पोटात अग्नि आहे, परंतु तो लांकूड नव्हे; अशा दृष्टीनें आत्मा हा पहावा. २५

अपाडु नभा आभाळा । रवि आणि मृगजळा । तैसाचि हाही डोळां । देखावा पैं ॥ २६ ॥ हें आघवेंचि असो एकु । गगनीनि जैसा अर्कु । प्रगटवी लोकु । नांवें नांवें ॥ २७ ॥ एथ क्षेत्रज्ञु तो ऐसा । प्रकाशकु नेत्राभासा । यावरुतें हें न पुसा । शंका नेघा ॥ २८ ॥

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा । भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ॥ ३४ ॥

अन्वयः--ये एवं ज्ञानचक्षुषा क्षेत्रक्षेत्रज्ञयोः अंतरं ( ज्ञानं ) च भूतप्रकृतिमोक्षं विदुः ते परं यान्ति ॥ ३४ ॥

इति श्रीभगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

शब्दतत्वसारज्ञा[3] । पैं देखणी तेचि प्रज्ञा । जे क्षेत्रक्षेत्रज्ञा । अपाडु देखे ॥ २९ ॥ ( ६९१. ज्ञानानेंच क्षेत्र--क्षेत्रज्ञाचें. अंतर कळतें, ११३०--११३६ ) इया दोहींचें अंतर । देखावया चतुर । ज्ञानियांचें द्वार । आराधिती ॥ ११३० ॥ याचिलागीं सुमती । जोडिती शांतिसंपत्ती । शास्त्रांची दुभतीं । पोषिती घरीं ॥ ३१ ॥ योगाचिया आकाशा । वळघिजे येवढा धिंवसा । याचियाचि आशा । पुरुषासि गा ॥ ३२ ॥ शरीरादि समस्त । मानिताति तृणवत । जीवें संतांचे होत । वाहाणधर ॥ ३३ ॥ ऐसैसिया परी । ज्ञानाचिया भरोवरी । करूनियां अंतरीं । निरुतें[10] होती ॥ ३४ ॥ मग क्षेत्रक्षेत्रज्ञांचें । जे अंतर देखती साचें । ज्ञानें उन्मेख तयांचें । वोवाळूं आम्ही ॥ ३५ ॥ आणि महाभूतादिकीं । प्रभेदली अनेकीं । पसरलीसे लटिकी । प्रकृति जे हे ॥ ३६ ॥ ( ६९२. प्रकृतीचा भूतांसह मोक्ष होतो, ११३७--११४१ ) जे शुकनलिकान्यायें । न लगतां लागली आहे । हें जैसें तैसें होये । ठाउवें जयां ॥ ३७ ॥ जैसीं माळा ते माळा । ऐसीचि देखिजे डोळां । सर्पबुद्धि टवाळा । उखी होउनी ॥ ३८ ॥ कां शुक्ति ते शुक्ति । हे साच होय प्रतीति । रुपयाची भ्रांति । जाऊनियां ॥ ३९ ॥ तैसी वेगळी वेगळेपणें । प्रकृति जे अंतःकरणें । देखती ते मी म्हणें । ब्रह्म होती ॥ ११४० ॥ जें आकाशाहूनि वाड । जें अव्यक्ताची पैल कड । जें भेटलिया अपाडा पांड । पडों नेदी[21] ॥ ४१ ॥ ( ६९३. ब्रह्माचें वर्णन, ११४२--११४४ ) आकारु जेथ सरे । जीवत्व जेथ विरे । द्वैत जेथ नुरे । अद्वय जें ॥ ४२ ॥ तें परमतत्त्व पार्था । होती ते सर्वथा । जे आत्मानात्मव्यवस्था- । राजहंसु ॥ ४३ ॥ ऐसा हा जी आघवा । श्रीकृष्णें तया पांडवा । उगाणा[22] दिधला जीवा । जीवाचिया ॥ ४४ ॥ ( ६९४. अर्जुनाला प्रेमानें आत्मानात्मविचार दिला; का[illegible] ११४५ ) येरें[23] [illegible] येरीं[25] ।

१ अंतर. २ सूर्य. ३ शब्दतत्वाचें सार जाणण[illegible] ५ दुमत्या [illegible] जातो.
७ हांव. ८ पादुका धारण करणारे, ९ साधनें. १० [illegible]

आकाश व अभ्र किंवा सूर्य व मृगजल यांच्यांत ज्या मानानें अंतर आहे, त्याच मानानें देह व आत्मा यांत आहे असें समज. २६ या सर्व गोष्टी एकीकडे ठेव; परंतु गगनांत सूर्य एकटा असून ज्याप्रमाणें निरनिराळ्या सर्व लोकांवर प्रकाश पाडितो, २७ त्याप्रमाणें आत्मा हा सर्व देहांत प्रकाश पाडणारा आहे. यापुढें आत्मा व देह याविषयीं पुनः शंका घेऊन विचारूं नको. २८

श्लोकार्थ—जे याप्रमाणें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्यामधील अंतर, आणि सर्व भूतांची प्रकृतीपासून सुटका कशी होते हें जाणतात, ते ब्रह्माला पावतात ॥ ३४ ॥

हे शब्दतत्त्वसारज्ञा, तीच बुद्धि खरी होय, कीं जिच्या योगानें शरीर व आत्मा या दोहोंमधील अंतर समजतें. २९ या दोहोंमधील अंतर समजण्याकरितां चतुर (मुमुक्षु) लोक ज्ञानी जनांच्या घराच्या उंबऱ्याची साल काढतात; १०३० आणि अर्जुना, हेंच समजण्याकरितां शांतिरूप संपत्ति स्वाधीन करून घेऊन शास्त्ररूपी दुभत्या गाई घरीं पाळतात; ( नेहमीं शास्त्राध्ययन करितात; ) ३१ हेच समजण्याकरितां पुरुष योगरूप आकाश चढून जाण्याची मनांत हाव धरितात; ३२ शरीर आदिकरून सर्व तृणप्राय मानतात; आणि संतांच्या पादुका आपल्या डोक्यावर घेतात. ३३ याप्रमाणें ज्ञानाचीं साधनें करून अंतर्यामीं खात्री करून घेतात. ३४ नंतर शरीर व आत्मा यामधील खरें अंतर त्यांच्या दृष्टीस पडतें; तेव्हां भगवान म्हणतात, आम्ही आपलें ज्ञान त्यांच्या ज्ञानावरून ओंवाळून टाकतों. ३५ आणि या पृथ्वीवर प्राण्यांच्या भिन्न भिन्न रूपानें जी ही लटकी माया पसरलेली आहे; ३६ जी शुकनलिकान्यायानें जीवांच्या मागें न लागतां लागली आहे असें दिसतें, अशी ही वस्तुस्थिति ज्याला पूर्णपणें माहीत आहे; ३७ ज्याप्रमाणें माळेवरील लटकी सर्पबुद्धि नष्ट झाली म्हणजे माळ ती माळच दिसावी; ३८ अथवा शिपीच्या चकाकण्यामुळें तिजवरील रुप्याचा भास जाऊन ती केवळ शिपीच आहे असें प्रत्ययास यावें, ३९ त्याप्रमाणें, आत्म्यापासून प्रकृति वेगळी आहे असें जे आपल्या अंतःकरणांत पाहतात, ते ब्रह्मरूप होतात असें मी म्हणतों. ११४० जें ब्रह्म आकाशाहूनही व्यापक आहे, जें प्रकृतीची पैलथडी आहे, व जें प्राप्त झालें असतां आपल्यापासून दूर करीत नाहीं, ४१ ज्या ब्रह्माचे ठिकाणीं प्रकृतीच्या अनुरोधानें आलेला आकार नाहींसा होतो, जीवपणा विरून जातो, आणि द्वैतभाव नाहींसा होतो, असें जें अद्वय आहे; ४२ पार्था, असें हें परमतत्त्व तेंच ते पुरुष स्वतः होतात, कीं जे ( दूध व पाणी निराळें करणाऱ्या ) राजहंसाप्रमाणें आत्मा व प्रकृति यांची फोड करितात। ४३ ( ज्ञानेश्वर म्हणतात ) याप्रमाणें श्रीकृष्णांनीं अर्जुनाला प्रकृति व आत्मा यांजविषयीं अनुभव आणून दिला. ४४ ज्याप्रमाणें एका भांड्यातील पाणी दुसऱ्या भांड्यांत ओतावें,

ओंवी ७६, ७७, ७८ पहा. १४ ठाऊक. १५ लटकी. १६ नाश. १७ मोठे. १८ प्रकृतीची. १९ वियोग. २० योग, २१ आणीत नाहीं. २२ अनुभव. २३ एका. २४ कळशींतलें, भांड्यातलें. २५ दुसऱ्यात.

अपाडु नभा आभाळा । रवि आणि मृगजळा । तैसाचि हाही डोळां । देखावा पैं ॥ २६ ॥ हें आघवेंचि असो एकु । गगनौनि जैसा अर्कु । प्रगटवी लोकु । नांवें नांवें ॥ २७ ॥ एथ क्षेत्रज्ञु तो ऐसा । प्रकाशकु नेत्राभासा । यावरुतें हें न पुसा । शंका नेघा ॥ २८ ॥

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा । भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ॥ ३४ ॥

अन्वयः--ये एवं ज्ञानचक्षुषा क्षेत्रक्षेत्रज्ञयोः अंतरं ( ज्ञानं ) च भूतप्रकृतिमोक्षं विदुः ते परं यान्ति ॥ ३४ ॥

इति श्रीभगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

शैब्दतत्वसारज्ञा । पैं देखणी तेंचि प्रज्ञा । जे क्षेत्रक्षेत्रज्ञा । अपाडु देखे ॥ २९ ॥ ( ६९१. ज्ञानानेंच क्षेत्र–क्षेत्रज्ञांचें. अंतर कळतें, ११३०–११३६ ) इया दोहींचें अंतर । देखावया चैतुर । ज्ञानियांचें द्वार । आराधिती ॥ ११३० ॥ याचिलागीं सुमती । जोडिती शांतिसंपत्ती । शास्त्रांची दुैमतीं । पोषिती घरीं ॥ ३१ ॥ योगाचिया आकाशा । वैळघिजे येवढा धिंवसा । याचियाचि आशा । पुरुषासि गा ॥ ३२ ॥ शरीरादि समस्त । मानिताति तृणवत । जीवें संतांचे होत । वैहाणधर ॥ ३३ ॥ ऐसैसिया परी । ज्ञानाचिया भरोवरी । करूनियां अंतरीं । निरुते[10] होती ॥ ३४ ॥ मग क्षेत्रक्षेत्रज्ञांचें । जे अंतर देखती साचें । ज्ञानें उैन्मेख तयांचें । वोवाळूं आम्ही ॥ ३५ ॥ आणि महाभूतादिकीं । प्रभेदली अनेकीं । पसरलीसे लटिकी । प्रकृति जे हे ॥ ३६ ॥ ( ६९२. प्रकृतीचा भूतांसह मोक्ष होतो, ११३७–११४१ ) जे शुैकनलिकान्यायें । न लगतां लागली आहे । हें जैसें तैसें होये । ठैंवें जयां ॥ ३७ ॥ जैसीं माळा ते माळा । ऐसीचि देखिजे डोळां । सर्पबुद्धि टैवाळा । उैखी होउनी ॥ ३८ ॥ कां शुक्ति ते शुक्ति । हे साच होय प्रतीति । रुपयाची भ्रांति । जाऊनियां ॥ ३९ ॥ तैसी वेगळी वेगळेपणें । प्रकृति जे अंतःकरणें । देखती ते मी म्हणें । ब्रह्म होती ॥ ११४० ॥ जें आकाशाहूनि वैाड । जें अैव्यक्ताची पैल कड । जें भेटलिया अैपाडा पैांड । पडों नेदी[21] ॥ ४१ ॥ ( ६९३. ब्रह्माचें वर्णन, ११४२–११४४ ) आकारु जेथ सरे । जीवत्व जेथ विरे । द्वैत जेथ नुरे । अद्वय जें ॥ ४२ ॥ तें परमतत्त्व पार्था । होती ते सर्वथा । जे आत्मानात्मव्यवस्था- । राजहंसु ॥ ४३ ॥ ऐसा हा जी आघवा । श्रीकृष्णें तया पांडवा । उैगाणा दिघला जीवा । जीवाचिया ॥ ४४ ॥ ( ६९४. अर्जुनाला प्रेमानें आत्मानात्मविचार दिला; काव्य, ११४५ ) येरें[23] कैलशींचें येरीं[24] ।

---

१ अंतर. २ सूर्य. ३ शब्दतत्त्वाचें सार जाणणाऱ्या. ४ मुमुक्षु. ५ दुमत्या गाई. ६ चढून जातो. ७ द्रव. ८ पादुका धारण करणारे. ९ साधनें. १० निश्चल. ११ ज्ञान. १२ भगवान. १३ अध्याय ६,

त्याप्रमाणें श्रीहरींनी आपल्या हृदयांतील हें ज्ञान अर्जुनाच्या हृदयांत ओतलें, ४५ आणि ( यांत विशेष तें काय झालें ? कारण, ) जो नर तोच नारायण असल्यामुळें, ज्ञान कोणीं कोणास दिलें ? तर श्रीकृष्ण ( अर्जुनाकडे बोट दाखवून ) ' हा तो मीच आहें ' असें म्हणाले. ४६ परंतु ही गोष्ट मला कोणीं विचारल्याशिवाय सांगण्याचें कारण नाहीं ( असो ); फार काय सांगावें ! देवांनीं अर्जुनास आपलें सर्वस्व दिलें. ४७ परंतु भगवंतांनीं इतकें जरी सांगितलें, तरी अर्जुन आपले मनांत तृप्त न होतां त्यांनीं अधिक सांगावें अशी हांव करूं लागला. ४८ दिव्यांत जों जों तेल घालावें, तों तों अधिकाधिक प्रकाश पडतो; त्याप्रमाणें, श्रीकृष्ण जों जों जास्ती सांगूं लागले, तों तों अर्जुनाचे मनांत ऐकण्याविषयीं इच्छा वाढत चालली ! ४९ ज्याप्रमाणें एखादी सुगरण बायको असून वाढण्यांत सढळ हाताची असली व जेवणारे चतुर असून भोक्ते असले म्हणजे दोघांनाही वाढण्याची व जेवणाची परस्पर हौस उत्पन्न होते, ११५० त्याप्रमाणें अर्जुनाची ऐकण्याची चुळबुळ पाहून देवांची स्थिति झाली, व त्यांचें व्याख्यान चौपट वाढलें. ५१ ज्याप्रमाणें अनुकूल वाऱ्यानें मेघ सांवरून वृष्टि होते, किंवा चंद्रोदय झाला म्हणजे समुद्रास भरती येते, त्याप्रमाणें ऐकणाराच्या आदरबुद्धीनें वक्त्यांस बोलण्याचें स्फुरण येतें. ५२ संजय म्हणतो हे धृतराष्ट्र राजा, याप्रमाणें अर्जुनाची ऐकण्याची इच्छा पाहून, देव हे ज्या आपल्या वक्तृत्वानें सर्व विश्व आनंदभरित करितील, तें वक्तृत्व ऐक. ५३ याप्रमाणें महाभारतांत भीष्मपर्वाच्या संगतींत श्रीव्यासमुनींनीं आपल्या अमर्याद बुद्धीनें जी कथा सांगितली आहे, ५४ तो कृष्णार्जुनांचा संवाद उत्तम मराठी भाषेंत ओंवीछंदानें मी सांगतों. ५५ मी आतां नुस्ती शांतिरसकथा सांगेन, पण ती शृंगारादि रसांच्या वरचढ होईल. ५६ ही देशभाषा साहित्याला शिकविणारी असून, आपल्या गोडीनें अमृतही फिकें पाडील. ५७ ज्या चंद्राचे उदयापासून चंद्रकांत मण्यास पाझर फुटतात; त्या चंद्रालाही माझे बोलापासून पाझर फुटेल; तसेंच, माझे वाक्याचे रसानें नादब्रह्म देखील लोपून जाईल; ५८ अज्ञान्याच्या मनास- देखील सात्त्विकतेचा पान्हा फुटेल; आणि जो अधिकारी आहे, त्याला तर ऐकण्याबरोबर समाधि लागेल ! ५९ गीतेचा अर्थ असा सांगेन कीं, तो सर्व जगभर पसरून सर्व जगास आनंददायक होईल. ११६० त्यामुळें विचाराचें दैन्य फिटून मन आणि श्रवण एकरूप होतील; व जिकडे पहावें तिकडे ब्रह्मविद्येची खाण दृष्टीस पडेल. ६१ ब्रह्म डोळ्यांनीं पाहून सुखाचा सोहळा दृष्टीस पडावा, व सर्व जगांत आत्मज्ञानाचा सुकाळ व्हावा. ६२ मजवर श्रीनिवृत्ति महाराजांचा अनुग्रह असल्यामुळें, मी आतां असें भाषण करीन कीं, या सर्व गोष्टी आपल्या अनुभवास येतील. ६३ म्हणून प्रत्येक अक्षराचे ठिकाणीं कवित्व

१४ देशी भाषा. १५ चंद्रकात मण्यास पाझर फोडणाऱ्या. १६ बरोबरी करणें. १७ नादब्रह्म. १८ अज्ञान्याच्या. १९ अधिकारी. २० दैन्य. २१ ऐक्य; तन्मय. २२ वाटेल तिकडे. २३ अनुग्रह केला. २४ प्रत्येक. २५ कवित्व.

रिचविजे जयापरी । आपणपें तया श्रीहरी । दिधलें तैसें ॥ ४५ ॥ (६९५. आत्मानात्मविचार देण्याचा प्रकार, ११४६ ) आणि कोणा देता कोण । तो नर तैसा नारायण । वरि अर्जुनातें श्रीकृष्ण । हा मी म्हणे ॥ ४६ ॥ (६९६. काव्य-प्रतिभा, ११४७ ) .परि असो तें नाथिलें । न पुसतां कां मी बोलें । किंबहुना दिधलें । सर्वस्व देवें ॥ ४७ ॥ (६९७. देवानीं आपलें सर्वस्व अर्जुनाला दिलें; काव्य, ११४८ ) कीं तो पार्थु जी मनीं । अझुनी तृप्ती न मनी । अधिकाधिक उतान्ही । वाढवीतु असे ॥ ४८ ॥ (६९८. अर्जुनाची श्रवणाची इच्छा व पुढील अध्यायप्रस्ताव, ११४९–११५० ) स्नेहाचिया भरोवरी । आंबुथिला दीपु घे थोरी । चाड अर्जुना अंतरीं । परिसतां तैसी ॥ ४९ ॥ तेथ सुगरिणी आणि उदारे । रसज्ञ आणि जेवणारे । मिळती मग अवतरे । हातु जैसा ॥ ११५० ॥ (६९९. देवांस सांगण्याचा आनंद झाला असें सजंय धृतराष्ट्राला सांगतो, ११५१–११५४ ) तैसें जी होतसे देवा । तया अवधानाचिया लेवलांवा । पाहातां व्याख्यान चढलें थावा । चौगुणें वरी ॥ ५१ ॥ सुंबायें मेघु सांवरे । जैसा चंद्रें सिंधु भरे । तैसा मातला रसु आदरें । श्रोतयाचेनि ॥ ५२ ॥ आतां आनंदमय आघवें । विश्व कीजेल देवें । तें रायें परिसावें । संजयो म्हणे ॥ ५३ ॥ एवं जे महाभारतीं । श्रीव्यासें अप्रांत-मैत्तीं । भीष्मपर्वसंगतीं । म्हणितली कथा ॥ ५४ ॥ (७००. गीताकथा भारतांत व्यासांनीं वर्णन केली, ११५५ ) श्रीकृष्णार्जुनसंवादु । नांगरी बोलीं विशदु । सांगोनि दाऊं प्रबंधु । ओंवियेचा ॥ ५५ ॥ (७०१. कथा ओवीप्रबंधानें शांतरसांत सांगतात, ११५६-११६७ ) नुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वांक्पथा । जे शृंगाराच्या माथां । पाय ठेवी ॥ ५६ ॥ दाऊं वेल्हाळे देशी नवी । जे साहि-त्यातें वोजवी । अमृतातें चुकी ठेवी । गोडिसेपणें ॥ ५७ ॥ बोल ओल्हावतेनि गुणें । चंद्रासि घे उमाणे । रसरंगीं भुलवणें । नादु लोपी ॥ ५८ ॥ खेचराचि-याही मना । आणि सात्त्विकाचा पान्हा । श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ॥ ५९ ॥ तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थेसी विश्व भरूं । आनंदाचा आवारूं । मांडूं जगा ॥ ११६० ॥ फिटो विवेकाची वाणी । हो काना मना जिणी[२१] । देखो आंवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ६१ ॥ दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा । रिघो महाबोध-सुकाळा- । माजी विश्व ॥ ६२ ॥ हें निफजेल आतां आघवें । ऐसें बोलिजेल बरवें । जे आंधिष्ठिला असें परमदेवें । श्रीनिवृत्ती मी ॥ ६३ ॥ म्हणोनि अक्षरीं सुभेदीं । उपमा श्लोकें कोंदाकोंदी । झाडा देईन मति-

---

१ ओतावें. २ व्यर्थ. ३ इच्छा. ४ पेटलेला. ५ चळवळ. ६ वळास. ७ अनुकूल वाऱ्यानें. ८ स्फुरण येतें. ९ अमर्याद बुद्धीनें. १० मराठी I. ११ स्पष्ट, उत्तम. १२ छंदात. १३ मोलण्यांत.

त्याप्रमाणें श्रीहरींनीं आपल्या हृदयांतील हें ज्ञान अर्जुनाच्या हृदयांत ओतलें, ४५ आणि ( यांत विशेष तें काय झालें ? कारण, ) जो नर तोच नारायण असल्यामुळें, ज्ञान कोणीं कोणास दिलें ? तर श्रीकृष्ण ( अर्जुनाकडे बोट दाखवून ) 'हा तो मीच आहें' असें म्हणाले. ४६ परंतु ही गोष्ट मला कोणीं विचारल्याशिवाय सांगण्याचें कारण नाहीं ( असो ); फार काय सांगावें! देवांनीं अर्जुनास आपलें सर्वस्व दिलें. ४७ परंतु भगवंतांनीं इतकें जरी सांगितलें, तरी अर्जुन आपले मनांत तृप्त न होतां त्यांनीं अधिक सांगावें अशी हांव करूं लागला. ४८ दिव्यांत जों जों तेल घालावें, तों तों अधिकाधिक प्रकाश पडतो; त्याप्रमाणें, श्रीकृष्ण जों जों जास्ती सांगूं लागले, तों तों अर्जुनाचे मनांत ऐकण्याविषयीं इच्छा वाढत चालली! ४९ ज्याप्रमाणें एखादी सुगरण बायको असून वाढण्यांत सढळ हाताची असली व जेवणारे चतुर असून भोक्ते असले म्हणजे दोघांनाही वाढण्याची व जेवणाची परस्पर हौस उत्पन्न होते, ११५० त्याप्रमाणें अर्जुनाची ऐकण्याची चुळबुळ पाहून देवांची स्थिति झाली, व त्यांचें व्याख्यान चौपट वाढलें. ५१ ज्याप्रमाणें अनुकूल वाऱ्यानें मेघ सांवरून वृष्टि होते, किंवा चंद्रोदय झाला म्हणजे समुद्रास भरती येते, त्याप्रमाणें ऐकणाराच्या आदरबुद्धीनें वक्त्यांस बोलण्याचें स्फुरण येतें. ५२ संजय म्हणतो हे धृतराष्ट्र राजा, याप्रमाणें अर्जुनाची ऐकण्याची इच्छा पाहून, देव हे ज्या आपल्या वक्तृत्वानें सर्व विश्व आनंदभरित करितील, तें वक्तृत्व ऐक. ५३ याप्रमाणें महाभारतांत भीष्मपर्वाच्या संगतींत श्रीव्यासमुनींनीं आपल्या अमर्याद बुद्धीनें जी कथा सांगितली आहे, ५४ तो कृष्णार्जुनांचा संवाद उत्तम मराठी भाषेंत ओंवीछंदानें मी सांगतों. ५५ मी आतां नुस्ती शांतिरसकथा सांगेन, पण ती शृंगारादि रसांच्या वरचढ होईल. ५६ ही देशभाषा साहित्याला शिकविणारी असून, आपल्या गोडीनें अमृतही फिकें पाडील. ५७ ज्या चंद्राचे उदयापासून चंद्रकांत मण्यास पाझर फुटतात; त्या चंद्रालाही माझे बोलापासून पाझर फुटेल; तसेंच, माझे वाक्याचे रसानें नादब्रह्म देखील लोपून जाईल; ५८ अज्ञान्याच्या मनास देखील सात्विकतेचा पान्हा फुटेल; आणि जो अधिकारी आहे, त्याला तर ऐकण्याबरोबर समाधि लागेल! ५९ गीतेचा अर्थ असा सांगेन कीं, तो सर्व जगभर पसरून सर्व जगास आनंददायक होईल. ११६० त्यामुळें विचाराचें दैन्य फिटून मन आणि श्रवण एकरूप होतील; व जिकडे पहावें तिकडे ब्रह्मविद्येची खाण दृष्टीस पडेल. ६१ ब्रह्म डोळ्यांनीं पाहून सुखाचा सोहळा दृष्टीस पडावा, व सर्व जगांत आत्मज्ञानाचा सुकाळ व्हावा. ६२ मजवर श्रीनिवृत्ति महाराजांचा अनुग्रह असल्यामुळें, मी आतां असें भाषण करीन कीं, या सर्व गोष्टी आपल्या अनुभवास येतील. ६३ म्हणून प्रत्येक अक्षराचे ठिकाणीं कवित्व

१४ देशी भाषा. १५ चंद्रकांत मण्यास पाझर फोडणाऱ्या. १६ बरोबरी करणें. १७ नादब्रह्म. १८ अज्ञान्याच्या. १९ अधिकारी. २० दैन्य. २१ ऐक्य; तन्मय. २२ वाटेल तिकडे. २३ अनुग्रह केला. २४ प्रत्येक. २५ कवित्व.

पदीं । ग्रंथार्थासी ॥ ६४ ॥ हा ठावोवरी मातें । पुरतया सारस्वतें । केलें असे श्रीमंतें । श्रीगुरुरायें ॥ ६५ ॥ तेणें जी कृपासावाये । मी बोलें तेतुलें सामाये । आणि तुमचिये सभे लोहें । गीता म्हणों ॥ ६६ ॥ वरि तुम्हां संताचे पाये । आजि मी लाधलों आहें । म्हणोनि जी नोहे । अटकु कांहीं ॥ ६७ ॥ (७०२. संतांची प्रार्थना, ११६८–११७१ ) प्रभु काश्मिरीं मुकें । नुपजे हें काय कौतुकें । नाहीं उणीं सामुद्रिकें । लक्ष्मीयेसी ॥ ६८ ॥ तैसी तुम्हां संतांपासीं । अज्ञानाची गोठी कायसी । यालागीं नवरसीं । वरुषेन मी ॥ ६९ ॥ किंबहुना आतां देवा । अवसरु मज देयावा । ज्ञानदेव म्हणे बरवा । सांगेन ग्रंथु ॥ ११७० ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां
त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥ श्लोक ३४, ओंव्या ॥ ११७० ॥

---

१ निपुण. २ शास्त्रात. ३ साहाय्यानें. ४ मान्य करता. ५ योग्यता आली आहे ६ सरस्वतीला. ७ सामुद्रिक लक्षणें. ८ वेळ.

आणि उपमा यांची गर्दी करून सोडीन; परंतु ग्रंथाच्या प्रत्येक पदातील अर्थाचा झाडा देईन. ( एक पदही सोडणार नाहीं ). ६४ येथपर्यंत मला आमच्या श्रीमंत अशा गुरूंनीं सर्व शास्त्रांत निपुण केलें आहे; ६५ आणि मी जें भाषण करतों ते आपण मान्य करितां, व आपणासारख्या संतमंडळींच्या सभेंत गीतेचा अर्थ सांगण्याची मला योग्यता आली आहे, हें तरी त्यांच्या कृपेच्या योगानेंच । ६६ त्यात तुमच्यासारख्या संतांचे पाय आज माझ्या दृष्टीस पडले आहेत, म्हणून मला कसलीही अडचण पडत नाहीं. ६७ प्रभो, सरस्वती—जी सर्वांस बोलण्याची शक्ति देणारी आहे—तिला मुकें मूल होणार नाहीं, ह्यात काहीं कौतुक का आहे ? लक्ष्मीच्या हातावर सामुद्रिक चिन्हांची उणीव असूं शकणार नाहीं; ६८ त्याप्रमाणें, तुम्हां संतांच्या पुढे कोणीही आंला असतां तो अज्ञानी राहील अशी गोष्ट कशी होईल ? तेव्हा मी आता आपल्या बोलण्यांत नवरसाची रेलचेल करून देईन. ६९ तर हे प्रभो, आता मला थोडा वेळ द्या, म्हणजे मी उत्तम रीतीच्या कथा सांगेन, असें ज्ञानदेव म्हणाले. ११७०

अध्याय १३, ओंव्या ११७०.

---

# ज्ञानेश्वरी

## अध्याय चौदावा

( ७०३. सद्गुरूस नमस्काररूप मंगल, काव्य-प्रतिभा, १-१६ ) जयजय आचार्या। समस्तसुरवर्या। प्रज्ञाप्रभासूर्या। सुखोदया ॥ १ ॥ जयजय सर्वविसांवया। सोहंभावसुहावया। नाना लोक हेलावया। समुद्रा तूं ॥ २ ॥ आइकें गा आर्तबंधु। निरंतरकारुण्यसिंधु। विशदविद्यावधू-। वल्लभा जी ॥ ३ ॥ तूं जयाप्रति लपसी। तया विश्व हें दाविसी। प्रकट तैं करिसी। आघवेंचि तूं ॥ ४ ॥ कीं पुढिलाची दृष्टि चोरिजे। हा दृष्टिबंधु निफजे। परी नवल लाघव तुझें। जे आपणपें चोरे ॥५॥ जी तूंचि तूं सर्वां यया। मा कोणा बोधु कोणा माया। ऐसिया आपेंआप लोंघविया। नमों तुज ॥ ६ ॥ जाणों जगीं आप वोलें। तें तुझिया वोला सुरस जालें। तुझेनि क्षमत्व आलें। पृथ्वीयेसी ॥ ७ ॥ रविचंद्रादि शुक्ति। उदय करिती त्रिजगतीं। तें तुझिया[14] दीप्ति-। तेज तेजां ॥८॥ जें चळवळिजे अनिळें। तें दैविकेनि[16] जी निजबळें। नभ तुजमाजी खेळे। लपीथपी[17] ॥ ९ ॥ किंबहुना माया असोस। ज्ञान जी तुझेनि डोळस। असो वानणें सायास। श्रुतीसि हें ॥१०॥ वेद वानूनि तंवाचि चांग। जंव न दिसे तुझें आंग। मग आम्हां तयां मुंग। एके पांतीं ॥ ११ ॥ जी एकार्णवाचे ठाईं। पाहतां थेंबाचा पाडु नाहीं। मा महानदी काई। जाणिजती ॥ १२ ॥ कां उदयालिया भास्वतु। चंद्र जैसा खद्योतु। आम्हां श्रुती तुजआंतु। तो पाडु असे ॥ १३ ॥ आणि दुजया थांवो[23] मोडे। जेथ परेशीं वैखरी बुडे। तो तूं मा कोणे तोंडें। वानावासि ॥ १४ ॥ यालागीं आतां। स्तुति सांडूनि निवांतां। चरणीं ठेविजे माथा। हेंचि भले ॥ १५ ॥ तरी तूं जैसा आहासि तैसिया। नमों जी श्रीगुरुराया। मज ग्रंथोद्यमु फळावया। वेव्हारा होईं ॥ १६ ॥ ( ७०४. ग्रंथोद्यमाकरितां कृपेची प्रार्थना, काव्यप्रतिभा, १७–२४ ) आतां

---

१ गुरो. २ बुद्धिरूप प्रकाशाचे सूर्य. ३ घालणारे. ४ (चौदा) लोक. ५ हेलकावे देणारे. ६ दीनदयाळ. ७ दुसऱ्याची. ८ नजरबंद. ९ तुझ्या मायेचें १० खेळ करणाऱ्या. ११ पाणी. १२ सहनशीलता. १३ शिंपल्याप्रमाणें निर्लेप. १४ तेजाच्या शक्तीच्या प्रभावानें. १५ वायूनें. १६ देवांच्या. १७ लपंडाव. १८ मुंग लागणें म्हणजे न बोलणें. १९ सर्व जलमय झाल्यावर. २० सूर्य. २१ काजवा. २२ द्वैताचें. २३ बळ. २४ मुकाट्यानें २५ साहकार.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय चौदावा

हे गुरो, तुम्ही सकल देवांत श्रेष्ठ असून बुद्धिरूप प्रकाशाचे सूर्य आहां. तुमचा जयजयकार असो. १ तुम्ही सर्वांचें विश्रांतिस्थान असून सर्वांच्या हृदयांत अहंब्रह्म हें तत्त्व घालणारे आहां; किंवा तुम्ही समुद्ररूपी असून तुमच्यांत चौदा लोक लाटांप्रमाणें हेलकावे खातात. तुमचा जयजयकार असो. २ तुम्ही दीनदयाळ असून निरंतर करुणेचे सागर आहां, आणि ब्रह्मविद्यावधूचे वर आहां. ३ जे कोणी तुम्हांला जाणत नाहींत, त्याना हें सर्व विश्व खरें भासतें; व जे कोणी तुम्हांला जाणतात, त्याना सर्व विश्वांत तुमच्याशिवाय कांहीं दिसत नाहीं. ४ नजरबंद खेळात गारोडी दुसऱ्याची दृष्टि चोरतो, परंतु तो आपण आपल्यास जाणत असतो; पण तुमच्या मायेचा असा प्रभाव आहे कीं, जो तिच्या सपाट्यात सापडतो, तो आपण आपल्यास ओळखत नाहीं. ५ या सर्व जगांत तुम्ही कोणाला ज्ञानाचा बोध करतां व तुम्हीच कोणाला मायेच्या सपाट्यांत गुंतवितां; असा तुमचा सहज खेळ सुरू आहे. तुम्हांला नमस्कार असो. ६ जगतांत ज्याला पाणी असें म्हणतात, त्याला जी गोडी आहे, ती तुमच्यामुळें आली आहे, व पृथ्वीला जी सहन करण्याची शक्ति आहे, तिला तुमचीच शक्ति कारण आहे. ७ चंद्र व सूर्य हे केवळ मोठ्या शिंपल्याप्रमाणें निस्तेज आहेत; परंतु त्याचा जो तिन्ही लोकावर उजेड पडतो, तो तुमच्या तेजाच्या शक्तीचा प्रभाव आहे. ८ चहूंकडे फिरणारा वायु हाही तुमच्याच शक्तीमुळें फिरत असतो; व आकाश जरी मोठें दिसतें तरी त्याचा समावेश तुमच्यांत होऊन तें लपंडावाप्रमाणें तुमच्या एका कोंपऱ्यात लपते. ९ फार काय सांगावें ? सर्व माया ही तुमच्याच योगानें उत्पन्न झाली असून, ज्ञानही तुमच्याच शक्तीनें चहूंकडे पाहतें; इतकेंच नव्हे, तर तुमच्या स्वरूपाचा पार न लागल्यामुळें, तें श्रुतींसही वर्णन करतां आलें नाहीं. १० जोंपर्यंत तुमचें दर्शन झालें नाहीं, तोंपर्यंतच वेद तुमचें वर्णन करूं शकतात; परंतु तेंच आपले दर्शन झाल्यावर आमची व त्यांची एकच दशा होते, व दोघांसही स्वस्थ बसावें लागतें. ११ सर्व जलमय झाल्यावर त्यांत एका थेंबाची जशी खिसगणती नसते, इतकेंच नव्हे, तर महानद्या सुद्धा ओळखतां येत नाहींत; १२ किंवा सूर्य उगवल्यावर चंद्राचा प्रकाश ज्याप्रमाणें त्याच्यापुढें काजव्याप्रमाणें यत्किंचित् पडतो, त्याप्रमाणें तुमच्या ठिकाणीं अज्ञानी असे आम्ही व वेद यांची सारखीच योग्यता असते; १३ आणि ज्या ठिकाणीं द्वैतभाव मोडून परेसह वैखरी वाणी स्तब्ध राहते, त्या तुमचें कोणत्या तोंडानें वर्णन करूं ? १४ यास्तव आतां तुमची स्तुति करण्याचें सोडून मुकाट्यानें तुमच्या चरणावर मस्तक ठेवावें हाच उत्तम मार्ग होय. १५

कृपाभांडवल सोडी । भरीं मति माझी पोतडी । करीं ज्ञानपद्यजोडी । थोरा मातें ॥ १७ ॥ मग मी संसरेनें तेणें । करीन संतांसी कर्णभूषणें । लेववीन सुलक्षणें । विवेकाचीं ॥ १८ ॥ जी गीतार्थनिधान । काढू माझें मन । सुयीं स्नेहांजैन । आपलें तूं ॥ १९ ॥ हे वाक्सृष्टि एके वेळे । देखतु माझे बुद्धीचे डोळे । तैसा उदैजो जी निर्मळें । कारुण्यबिंबें ॥ २० ॥ माझी प्रज्ञावेली वेल्हाळ । काव्यें होय सफळ । तो वसंतु होईं स्नेहाळ । शिरोमणी ॥ २१ ॥ प्रमेयें-महापूरें । हे मतिगंगा ये थोरे । तैसा वरिष उदारें । दिठीवेनि ॥२२॥ अगा विश्वैकधामा । तुझा प्रसादचंद्रमा । करू मज पूर्णिमा । स्फूर्तीची जी ॥२३॥ जी अवलोकिलिया मातें । उन्मेषसागरीं भरितें । वोसंडेलं स्फूर्तीतें । रसवृत्तीचे ॥ २४ ॥ ( ७०५. स्तुतिमिषानें द्वैतच होतें व श्रवणाला अडथळा होतो; काव्यप्रतिभा, २५–२६ ) तंव संतोषोनि श्रीगुरुराजें । म्हणितलें विनातिव्याजें । मांडिलें देखोनि दुजें । स्तैवनामिषें ॥ २५ ॥ हें असो आतां वांजटें । तो ज्ञानार्थ करूनि गोमटा । ग्रंथु दावीं उत्कंठा । भंगों नेदीं ॥ २६ ॥ ( ७०६. कृपारूपी भिक्षा मागून ग्रंथ सांगतों; काव्यप्रतिभा, २७–३२ ) हो कां जी स्वामी । हेंचि पाहत होतों मी । जे श्रीमुखें म्हणा तुम्ही । ग्रंथ सांग ॥ २७ ॥ सहजें दूर्वेचा डिरु । आंगेंचि तंव अमरु । वरी आला पूरु । पीयूषाचा ॥ २८ ॥ तरि आतां येणें प्रसादें । विन्यासें विदग्धें । मूळ शास्त्रपदें । वाखाणीन ॥ २९ ॥ परि जीवा आंतुलीकडे । जैसी संदेहाची डोणी बुडे । ना श्रवणीं तरि चोंडे । वाढी दिसे ॥ ३० ॥ तैसी बोली साचारी । अवतरो माझी माधुरी । मोले मागूनि घरीं । गुरुकृपेच्या ॥ ३१ ॥ अवतरणः—तरी मागां त्रयोदशीं । अध्यायीं गोठी ऐसी । श्रीकृष्ण अर्जुनेंसीं । चावळेले ॥ ३२ ॥ ( ७०७. अनुवाद आणि पुढील अध्यायाचा संबंध, ३३–३८ ) जे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगें । होइजे येणें जगें । आत्मा गुणसंगें । संसारिया ॥ ३३ ॥ आणि हाचि प्रकृतिगतु । सुखदुःखभोगीं हेतु । अथवा गुणातीतु । केवळु हा ॥ ३४ ॥ तरि कैसा पां असंगा संगु । कोण तो क्षेत्रक्षेत्रज्ञयोगु । सुखदुःखादि भोगु । केविं तया ॥ ३५ ॥ गुण ते कैसे किती । बांधती कवणे रीती । नातरी गुणातीतें । चिन्हें[25] काइ ॥ ३६ ॥ एवं इया आधवेया । अर्था रूप करावया । विषो येथ चौदाविया । अध्यायासी ॥ ३७ ॥ तरि तो आतां ऐसा । प्रस्तुत परियेसा । अभिप्रावो विश्वेशा । वैकुंठाचा

---

१ सांवरेन. २ ठेवा. ३ स्नेहरूप अंजन. ४ बुद्धिरूप वेली. ५ पसरून; वाढून. ६ अर्थरूप. ७ बुद्धिरूप गंगा. ८ वर्षाव करा. ९ ज्ञान. १० उतू जाईल. ११ नवरसांचे. १२ द्वैत. १३ स्तुतीच्या मिषानें. १४ व्यर्थ. १५ मुळी; अंकुर. १६ विस्तारानें. १७ स्पष्ट. १८ नौका. १९ इच्छा. २० मधुर वाणी. २१ संडोवाचे माळे=गळ्यांत नांगर बांधून भिक्षा मागणें. २२ बोलले. २३ मायोपाधीनें. २४ मुक्त. २५ लक्षणें.

तर हे गुरुराया, तुम्ही जसे आहां तशाच तुम्हांला मी नमस्कार करतों. तुम्ही माझ्या गीतार्थकथनरूपी व्यापारांत मला नफा करून देण्याकरितां माझे सावकार व्हा. १६ तर आतां आपल्या कृपारूप भांडवलाच्या थैलीची गांठ सोडून माझी मतिरूप पोतडी भरा; आणि आपण थोर आहां, तेव्हां मला ज्ञानपदाची (ज्ञानरूप नफ्याची) जोड करून द्या. १७ मग मी या व्यापारावर सांवरून संतांच्या कानात सुंदर अशीं विचाररूप कर्णभूषणें तयार करून घालीन. १८ महाराज, गीतार्थरूपी ठेवा बाहेर काढण्याविषयीं माझ्या मनांत जी इच्छा उत्पन्न झाली आहे, ती सफल करण्याकरितां तुम्ही आपलें स्नेहरूप अंजन माझ्या डोळ्यांत घाला. १९ माझ्या बुद्धिरूप डोळ्यांना एक वेळ शब्दमय सृष्टि पाहतां येईल, अशा तऱ्हेचा आपल्या करुणारूप सूर्यबिंबाचा निर्मळ प्रकाश पाडा. २० माझी बुद्धिरूप वेली पुष्कळ वाढून तिला काव्यरूपी फळें येण्याकरितां, वेलींना प्रफुल्लित करण्याची कृपा करण्यामध्यें श्रेष्ठ असा जो वसंत, तो तुम्ही व्हा. २१ आपल्या कृपादृष्टीचा इतका औदार्यानें वर्षाव करा कीं, त्यानें माझ्या बुद्धिरूप गंगेस अर्थरूपी महापूर यावा. २२ हे विश्वैकधामा, आपला प्रसादचंद्रमा मला स्फूर्तीची पौर्णिमा करो. (पूर्णचंद्रोदयानें पौर्णिमा शोभते, त्याप्रमाणें आपल्या कृपेनें मला पूर्ण स्फूर्ति येवो.) २३ ती पौर्णिमा मीं अवलोकन केली, (आपला मजवर कृपाप्रसाद झाला,) म्हणजे माझ्या ज्ञानसमुद्राला भरतें येईल; आणि नवरस हे स्फूर्ति भरून साहूं लागतील! २४ असें ज्ञानदेवांचें भाषण ऐकून श्रीगुरु निवृत्तिनाथ महाराज संतोष पावून म्हणाले कीं, तूं स्तुतीच्या मिषानें द्वैत व्यर्थ वाढवितोस. २५ तर आतां ही व्यर्थ स्तुति राहूं दे; जो जाणण्याचा विषय आहे तो चागला तयार करून ग्रंथ सांग. उत्कंठेचा भंग होऊं देऊं नको. २६ (तेव्हां ज्ञानदेव म्हणाले:—) प्रभो, तुम्ही आपल्या मुखानें ग्रंथ साग हेंच म्हणण्याची मी वाट पहात होतों. २७ अगोदरच हरळीची मुळी अमर, त्यांत तिजवर अमृताचा वर्षाव झाला! (मग काय विचारतां?) २८ आतां गुरुप्रसाद झाल्यामुळें, मी गीतेंतील मूळ शास्त्राच्या प्रत्येक पदाचें असें सविस्तर व स्पष्ट वर्णन करीन, २९ कीं, जें ऐकल्यामुळें मनांतील सर्व संशय नाहींसा होऊन श्रवणाची इच्छा दुणावेल. ३० माझ्या वाणींतून असे उत्तम मधुर शब्द निघावे एवढेंच गुरूंच्या पायापाशीं माझें मागणें आहे. ३१ तर मागें तेराव्या अध्यायांत श्रीकृष्णांनीं अर्जुनास अशी कथा सांगितली, ३२ कीं, आत्मा व प्रकृति यांच्या संयोगानें हें जग निर्माण होतें; व गुणांच्या अनुरोधानें आत्मा संसारांत निमग्न होतो; ३३ मायोपाधीनें झालाच सुखदुःख भोगावें लागतें; व तोच गुणसंगरहित झाला म्हणजे मुक्त होतो. ३४ तर संगरहित असा जो आत्मा, त्याला प्रकृतीचा संग कसा होतो, आत्मा व प्रकृति यांचा संयोग होतो तो कोणता, त्याला सुखदुःखें कशीं भोगावीं लागतात, ३५ त्या गुणांची बाधा कशा रीतीनें होते, ते गुण कसे व किती आहेत, आणि तोच गुणातीत झाला म्हणजे त्याचीं लक्षणें कोणतीं, ३६ अशा प्रकारें या सर्व गोष्टींचें वर्णन करणें हाच विषय या चौदाव्या अध्यायांत आहे. ३७ तर आता त्या वैकुंठनिवासी

॥ ३८ ॥ ( ७०८. ज्ञान मागें सांगितलें, पण तुझ्या लक्षांत न आल्यामुळें तें पुन्हा सांगतों; ३९-४१ ) श्रीभगवानुवाचः—तो म्हणे गा अर्जुना । अवधानाची सर्व सेना । मेळऊनि इया ज्ञाना । झोंबावें हो ॥ ३९ ॥ आम्हीं मागा तुज बहुतीं । दाविलें हें उपपत्ती । तरि अझुनी प्रतीती । कुशीं न रिघे ॥ ४० ॥

परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।
यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥१॥

अन्वयः—यत् ज्ञात्वा सर्वे मुनयः इतः परां सिद्धिं गताः, ( तत् ) ज्ञानानां उत्तमं परं ज्ञानं भूयः ( अहं ते ) प्रवक्ष्यामि ॥ १ ॥

म्हणौनि गा पुढती । सांगिजेल तुजप्रती । पर म्हणम्हणोन श्रुतीं । डाहारिलें जें ॥ ४१ ॥ ( ७०९. ज्ञानात उत्तम ज्ञान म्हणून तुला सांगतों, ४२–४८ ) येऱ्हवीं ज्ञान हें आपुलें । परी पैर ऐसेनि जालें । जे आवडोनि घेतले । भवस्वर्गादिक ॥ ४२ ॥ अगा याचि कारणें । हें उत्तम सर्वांपरी मी म्हणें । जे वन्हि हे तृणें । येरें ज्ञानें ॥ ४३ ॥ जियें भवस्वर्गीतें जाणती । यागचि चांग म्हणती । पोरखी फुडी आथी । भेदीं जया ॥ ४४ ॥ तियें आघवींचि ज्ञानें । केलीं येणें स्वप्नें । जैशा वातोर्मि गगनें । गिळिजती अंतीं ॥ ४५ ॥ कां उदितें रश्मिराजें । लोपिलीं चंद्रादि तेजें । नाना प्रळयांबुमाजें । नदी-नद ॥ ४६ ॥ तैसें येणें पाहलेयां । ज्ञानजात जाय लया । म्हणोनियां धनंजया । उत्तम हें ॥ ४७ ॥ अनादि जे मुक्तता । आपली असे पंडुसुता । तो मोक्षु हातां येता । होय जेणें ॥ ४८ ॥ ( ७१०. ज्ञान जाणून सर्व मुनि संसारांतून मुक्त होतात, ४९–५२ ) जयाचिया प्रतीती । विचारवीरीं समस्तीं । नेदिजेचि संसृती । माथा उंधऊं ॥ ४९ ॥ मनें मन घालूनि मागें । विश्रांति जालिया आंगें । ते देहीं देहाजोगे । होतीचि ना ॥ ५० ॥ मग ते देहाचें वेळें । वोलांडूनि एकेचि वेळे । संवतुकीं कार्टेळें । माझे जाले ॥ ५१ ॥

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।
सर्गेऽपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च ॥ २ ॥

अन्वयः—( ये ) इदं ज्ञानं उपाश्रित्य मम साधर्म्यं आगताः, ( ते ) सर्गे अपि न उपजायन्ते च प्रलये न व्यथन्ति ॥ २ ॥

जे माझिया नित्यता । तेणें नित्य ते पंडुसुता । परिपूर्ण पूर्णता । माझियाचि ॥ ५२ ॥ ( ७११. ज्ञानाचा आश्रय करणारे, सृष्टीबरोबर उत्पन्न होत नाहींत व प्रळयाचे वेळीं नाश पावत नाहींत; ५३–६० ) मी जैसा अनंतानंदु । तैसाचि सत्यसिद्धु । तैसेचि ते भेदु । उरेचि ना ॥ ५३ ॥ जे मी जेव्हढे जैसे । ते तेंचि जाले

१ प्रकारानीं. २ ज्ञान. ३ महिमा वर्णन केला. ४ पलीकडे. ५ ओळख. ६ द्वैतीं. ७ वाऱ्याच्या लहरी. ८ सूर्यानें. ९ प्रळयकाळचें पाणी यादव्यावर. १० उदय झाल्यावर. ११ मोक्ष.

विश्वेशांचा अभिप्राय काय आहे तो ऐका. ३८ ते म्हणाले:—अर्जुना, श्रवण करण्याची सर्व सामुग्री जमवून तूं या ज्ञानाला झोंब बरें का! ३९ पूर्वी तुला आम्हीं हें ज्ञान अनेक प्रकारें स्पष्ट करून सांगितलें, परंतु तुझें अज्ञान अजून पूर्ण नाहींसें होत नाहीं. ४०

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणाले, ज्या ज्ञानाला जाणून सर्व मुनि या जन्मापासून मोक्षसिद्धि पावले, तें सर्व ज्ञानांत उत्तम व श्रेष्ठ ज्ञान मी तुला पुनः सांगतों ॥ १ ॥

म्हणून, बाबारे! 'पर' या शब्दाचा महिमा श्रुतींनीं जो वर्णन केला आहे, तो तुला आम्ही पुनः सांगतों. ४१ आपल्या ज्ञानाहून आत्मज्ञान 'पर' म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, आपल्या ज्ञानाची आवड संसार व स्वर्ग यांच्या प्राप्तीशिवाय अन्य कशा-विषयींही नसते. ४२ अरे, याच कारणास्तव हें मी उत्तम म्हणतों. कारण हें अग्निरूप असून इतर ज्ञानें तृणरूपी आहेत. ४३ ज्या ज्ञानाची मजल संसार व स्वर्ग या सुखांपलीकडे नसते, ज्याला यज्ञयागादि कर्मेंच उत्तम वाटतात, व ज्याला द्वैताशिवाय दुसऱ्या कशाची ओळख नसते, ४४ तीं सर्व ज्ञानें आत्मज्ञानापुढें स्वप्नवत् भासतात. ज्याप्रमाणें गगनांत उत्पन्न झालेला वायु कितीही मोठा असला तरी त्याचा त्यांतच लय होतो, ४५ किंवा सूर्य उगवल्यावर जसें चंद्रादि नक्षत्रांचें तेज लोपतें, अथवा प्रलयकाल झाल्यावर ज्याप्रमाणें नदी, नद हा भेद रहात नाहीं, ४६ त्याप्रमाणें आत्मज्ञानाचा उदय झाल्यावर इतर सर्व ज्ञानें लय पावतात. म्हणून अर्जुना, याला आम्हीं 'उत्तम' असें म्हणतों. ४७ हे पांडु-सुता, अनादि कालापासून आपल्याजवळ असणारा मोक्ष ह्या ज्ञानाच्या प्राप्तीपासून आपल्या हातास येतो. ४८ ज्याचा अनुभव आला असतां, सर्व ज्ञाते संसाराला वर डोकें काढूं देत नाहींत; ४९ आपल्या मनाची विषयाकडे जाणारी धाव मागें हटवून त्याला जागच्या जागीं बसविल्यावर, सहज विश्रांति प्राप्त होते. असें झाल्यावर, ते देही असूनही इंद्रियांना आवंडणाऱ्या गोष्टींचें आचरण करीत नाहींत. ५० नंतर ते देहरूप कुंपण एकदम ओलांडून माझ्याच योग्यतेस पावतात. ५१

श्लोकार्थः—ह्या ज्ञानाचा आश्रय करून जे माझ्या सायुज्याला प्राप्त झाले, ते सृष्टीच्या उत्पत्तिकालींही जन्मत नाहींत आणि प्रलयकालींही नाश पावत नाहींत ॥ २ ॥

कारण अर्जुना, ते माझेप्रमाणें नित्य असून मजप्रमाणेंच पूर्णत्वास पावलेले असतात. ५२ मी जसा नेहमीं अनंत असून महानंदांत असतो व सत्यसिद्ध असतों, त्याप्रमाणें तेही होऊन त्यांच्यांत व माझ्यांत कांहीं भेद रहात नाहीं. ५३ ज्याप्रमाणें मी अनंत आहें, त्याप्रमाणें तेही होतात. ज्याप्रमाणें घटाचा नाश झाल्यावर घटाकाश महाकाशास मिळतें, ५४ किंवा मूळ दिव्यापासून लावलेल्या पुष्कळ वाती एकत्र केल्या म्हणजे त्या मूळ दिव्यांतच तेज मिळतें; ५५ त्याप्रमाणें अर्जुना, द्वैतभाव नाहींसा होऊन मी व तूं हे भेद एकाच पंक्तीला बसून एकत्र नांदतात. ५६ याच कारणामुळें, ज्या वेळीं समूळ सृष्टि

१२ शास्त्यांनीं. १३ संसार. १४ वर फरूं. १५ ते मुनि. १६ कुंपणाचा आडा. १७ समतोल. १८ वजनांत; योग्यतेंत.

तैसे । घटभंगीं घटाकाशें । आकाश जेवीं ॥ ५४ ॥ नातरि दीपमूळकीं । दीप-शिखा अनेकीं । मीनलिया अवलोकीं । होय जैसें ॥ ५५ ॥ अर्जुना तयापरी । सरली द्वैताची वारी । नांदे नामार्थ एकाहारीं । मीतूंविणें ॥ ५६ ॥ येणेचि पैं कारणें । जैं पहिलें सृष्टीचें जुंपणें । तैंही तयां होणें । पडेचिना ॥ ५७ ॥ सृष्टीचिये सर्वादि । जयां देहाची नाहीं बांधी[3] । ते कैचे प्रळयावधी । निमतील ॥ ५८ ॥ म्हणोनि जन्मक्षयां । अतीत ते धनंजया । मी जाले ज्ञाना इया । अ-सरोनि ॥ ५९ ॥ ऐसी ज्ञानाची वाडी । वानिली, देवें आवडी । तेविंचि पार्था गोडी । लावावया ॥ ६० ॥ ( ७१२. ज्ञानाची गोडी लागावी म्हणून विशेष वर्णन, ६१ तंव तया जालें आन । सर्वांगीं निघाले कान । सैपाई अवधान । आतला ॥ ६१ ॥ ( ७१३. ज्ञानश्रवणार्थ अर्जुनाच्या सर्वांगाला जणों कान फुटले । काव्य, ६२ आतां देवाचिया ऐसें । जाकळीजेत असे वोरसें । जें निरूपण आकाशें । वे-ळेना ॥ ६२ ॥ ( ७१४. कन्यादानाचें वक्तृत्वावर रूपक, ६३–६४ ) मग म्हणे प्रज्ञाकांता । उजवली आजि वैक्तृत्वता । जे बोलायेवढा श्रोता । जोडलासी ॥६३ अवतरण.—तरि एकु मी अनेकीं । गोविजे देहपाशकीं । त्रिगुणीं लुंध कीं कवणेपरी ॥ ६४ ॥ ( ७१५. आत्मा गुणपाशानें देहात आडकतो, ६५ ) कैसा क्षे-योगें । वियें इयें जगें । तें परिस सांगें । कवणे परी ॥ ६५ ॥ ( ७१६. क्षेत्रक्षेत्र-संयोगानें जग कसें उत्पन्न करतों, ६६–६७ ) पैं क्षेत्र येणें व्याजें । यालागीं बोलिजे । जे मत्संगबीजें । भूतीं पिके ॥ ६६ ॥

मम योनिर्महद् ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।
संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥

अन्वयः—भारत, महद्ब्रह्म मम योनिः ( अस्ति ); तस्मिन् अहं गर्भं दधामि; ततः सर्व-भूतानां संभवः भवति ॥ ३ ॥

येऱ्हवीं तरी महद्ब्रह्म । यालागीं हें ऐसें नाम । जे महदादि विश्राम-शालिका हें ॥ ६७ ॥ ( ७१७. महद्ब्रह्म या योनींत गर्भाचें आधान व त्यामुळें भूतांची उत्पत्ति होते, ६८–७१ ) विकारा वहुवस योरी । अर्जुना हेंचि करी । म्हणोनि अवधारीं । महद्ब्रह्म ॥ ६८ ॥ अव्यक्तवादेमतीं । अव्यक्त ऐसी वदंती । सांख्याचिया मतीं । प्रकृति हेचि ॥ ६९ ॥ वेदांतीं इयेतें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञराया । असो किती बोलों वायां । अज्ञान हें ॥७०॥ आपला आपणपेया । विसरु जो धनंजया । तेंचि रूप यया । अज्ञानासी ॥७१॥ ( ७१८. अज्ञानवर्णन, ७२-८० ) आणिकही एक असे । जें विचारावेळे न दिसे । वातीं पाहातां जैसें । आंधारें का ॥७२॥ हालविलिया जाय । निश्चळीं तरी होय । दुधीं जैसी साय । दुधाची ते ॥ ७३ ॥ पैं जागरु ना स्वप्न । ना स्वैरूप-अवस्थान । ते सुषुप्ति का घन । जैसी होय ॥ ७४ ॥

नेर्माण होते, त्या वेळेस अशा आत्मज्ञान्यांना जन्म घ्यावे लागत नाहींत. ५७ मग, ज्यांना सृष्टीच्या उत्पत्तीबरोबर देहाची बाधा होत नाहीं, त्यांचा प्रलयकालीं नाश कोठून होणार? ५८ म्हणून धनंजया, जे आत्मज्ञानाला अनुसरून मद्रूप झाले आहेत, ते जन्ममरणाच्या सपाट्यांत सांपडत नाहींत. ५९ याप्रमाणें, पार्थासही आत्मज्ञानाची आवड उत्पन्न व्हावी, म्हणून श्रीकृष्णानीं त्याची प्रौढी वर्णन केली. ६० तों अर्जुनाची अशी स्थिति झाली कीं, त्याला सर्व अवयवांच्या ठिकाणीं श्रवणाची इच्छा उत्पन्न होऊन, तो अवधानाची केवळ मूर्तिच बनला. ६१ आपलें सांगणें आकाशासही आवरलें जाणार नाहीं, तें अर्जुन धारण करतो आहे, असें पाहून देवांनाही प्रेमाचें भरतें आलें; (त्यांची सागण्याची हौस गगनांत मावेना). ६२ मग भगवान म्हणाले, अर्जुना, माझ्या वक्तृत्वरूपी कन्येस तूं बुद्धिरूप वर मिळाल्यामुळें ती आज उजवली! कारण माझ्या बोलण्याच्या हौसेप्रमाणें तूं उत्तम श्रोता मिळालास! ६३ तर आतां, मी एक असून, त्रिगुणरूपी पारधी हे देहरूपी पाश टाकून मला अनेक रूपें कशीं व्यावयास लावतात, ६४ व मायेच्या उपाधीनें माझ्यापासून हें जग कसें उत्पन्न होतें, तें सांगतों, ऐक. ६५ हें पहा, माझ्या संगरूपी बीजापासून प्राणिमात्र उत्पन्न होतात, याच कारणामुळें प्रकृतीला क्षेत्र असें म्हणावयाचें. ६६

श्लोकार्थः—हे भारता, महद्ब्रह्म ( प्रकृति ) हें माझें गर्भ ठेवण्याचें ठिकाण आहे; त्याजमध्यें मी गर्भ ठेवितों, आणि त्यापासून सर्व भूतांची उत्पत्ति होते ॥ ३ ॥

ही माया महत्तत्त्वादिकाचें मूळ स्थान असल्यामुळें हिला 'महद्ब्रह्म' असें नांव दिलें आहे. ६७ अर्जुना, हिच्या योगानें विकार व गुण हे वृद्धि पावतात. म्हणून हिला महद्ब्रह्म असें म्हटलें आहे. ६८ अव्यक्त मतवाद्यांच्या मतें हिला *'अव्यक्त' असें नांव आहे; व सांख्यमतवादी हिला 'प्रकृतिः' असें म्हणतात.* ६९ हे प्राज्ञशिरोमणे, वेदांती हिला 'माया' असें म्हणतात. असो; उगीच फार काय बोलावें? अज्ञान जें तें हेंच. ७० हे धनंजया, आपल्या आत्मस्वरूपाचा आपल्यास जो विसर पडतो, तेंच या अज्ञानाचें रूप. ७१ आणखी असें आहे कीं, ज्याप्रमाणें हातांत दिवा घेऊन अंधार शोधूं लागलें असतां तो दिसत नाहीं, त्याप्रमाणें आत्मस्वरूपाचा विचार केला कीं तें दिसेनासें होतें. ७२ दूध घोंटीत बसलें म्हणजे जशी त्यावर साय येत नाहीं, व तेंच घोंटले नाहीं म्हणजे त्यावर साय येते; ७३ किंवा मनुष्य ज्या वेळेस जागृत अवस्थेंत अथवा स्वप्नावस्थेंत नसतो, किंवा समाधिस्थ नसतो, त्या वेळेस जशी गाढ झोप लागते; ७४ किंवा वायूची हालचाल नसली म्हणजे ज्याप्रमाणें आकाश निःसत्त्व असतें, त्याप्रमाणें

१ मूळ ज्योतींत. २ वाती. ३ बंधन. ४ नाश पावतील. ५ संपूर्ण. ६ नटला. ७ धारण करीत आहे; ऐकत आहे. ८ स्नेहभरीत उत्कंठेनें. ९ विवाहित झाली. १० वक्तृत्वरूपी कन्या. ११ पारध्यांनीं. १२ मूळमाया. १३ स्थान. १४ अव्यक्तवाद्यांच्या मतें. १५ समाधि.

का न वियेतां वायूतें । वांझें आकाश रितें[2] । तया ऐसें निरुतें । अज्ञान गा ॥७५॥ पैल खांब का पुरुखु । ऐसा निश्चयो नाहीं एकु । परि काय नेणों आलोकुं । दिसत असे ॥ ७६ ॥ तेविं वस्तु जैसी असे । तैसी कीर न दिसे । परि कांहीं अनारिसें । देखिजेना ॥ ७७ ॥ ना राती ना तेज । ते संधि जेविं सांज । तेविं विरुध्द ना निजें । ज्ञान आथी ॥ ७८ ॥ ऐसी कोण्ही एकी दशा । तिये वाढु अज्ञान ऐसा । तया गुंडलिया [6]प्रकाशा । क्षेत्रज्ञु नाम ॥ ७९ ॥ अज्ञान थोरिये आणिजे । आपणपें तरी नेणिजे । तें रूप जाणिजे । क्षेत्रज्ञाचें ॥ ८० ॥ ( ७१९. क्षेत्रज्ञाचा क्षेत्रांशीं संयोग, ८१-८२ ) हाचि उभय योगु । तुझें बापा चांगु । सत्तेचा नैसर्गु । स्वभावो हा ॥ ८१ ॥ आतां अज्ञानासारिखें । वस्तु आपणपांचि देखे । परि रूपें अनेकें । नेणों कोणें ॥ ८२ ॥ ( ७२०. क्षेत्रसंयोगानें आत्म्यास भ्रम, ८३-८७ ) जैसा रंकु भ्रमला । म्हणे जा रे मी रावो आला । कां मूर्छितु गेला । स्वर्गलोका ॥८३॥ तेविं लवंकलिया दिठी । मग देखणें जें जें उठी । तया नाम सृष्टी । मीचि वियें पैं गा ॥ ८४ ॥ जैसें का स्वप्नमोहा । तो एकाकी देखे बहुवा । तोचि पाडु आत्मया । स्मरणेंवीण असे ॥ ८५ ॥ हेंचि आनभ्रांती । प्रयेयें[12] उपलवूं[13] पुढती । परी तूं प्रतीती । याची घे पां ॥ ८६ ॥ तरी माझी हे गृहिणी । अनादि तरुणी । अनिर्वाच्यगुणी । अविद्या हे ॥ ८७ ॥ ( ७२१. आत्म्याचे आश्रयानें माया जग प्रसवते, ८८–९७ ) इये नाहीं हेंचि रूप । ठायें हें अति उमप- । हे [16]निद्रितां समीप । चेतां[17] दुरी ॥ ८८ ॥ पैं माझेनिचि आंगें । पहुडल्या हे[19] जागे । आणि सत्तासंभोगें । गुर्विणी[21] होय ॥ ८९ ॥ [22]महद्ब्रह्माउदरीं । प्राकृतीं आठै विकारीं । गर्भाची करी । पेलोवेली[23] ॥ ९० ॥ उभयसंगें पहिलें । बुध्दितत्त्व प्रसवलें । बुध्दितत्त्वें उभारलें । होय मन ॥ ९१ ॥ तरुणी ममता मनाची । ते अहंकार तत्त्व रची । तेणें महाभूतांची । अभिव्यक्ति होय ॥९२॥ आणि विषयेंद्रियां गोसी[26] । स्वभावें तंव भूतासी । म्हणोनि येती सरिसी । तियेंही रूपा ॥९३॥ जालेनि विकार-क्षोभें । पाठी त्रिगुणाचें उभें । तेव्हां ये वासनागर्भे । ठायेंठावों ॥ ९४ ॥ रुखाचा आवांका । जैसी बीजकणिका । जीवीं बांधे उदका । भेटतखेवों ॥ ९५ ॥ तैसी माझेनि संगें । अविद्या नाना जगें । आर घेवों लागे । अणियाली ॥ ९६ ॥ मग गर्भगोळा तया । कैसें रूप तें ये आया । ते परियेसें राया । सुजनांचिया ॥९७॥

१ न हालवितां. २ रिकामें; निःसत्त्व. ३ विपरीत. ४ जगत्. ५ आत्मा. ६ चैतन्याला. ७ मूळ स्वरूपावर मायेचा. ८ मायेच्या अनुरोधानें. ९ चैतन्य. १० चळली असतां. ११ दुसरी भ्रांति. १२ तात्पर्य. १३ विस्तारानें सांगूं. १४ आकृति. १५ मोठी. १६ निजला असतां = अज्ञानकालीं. १७ जागा झाला असतां = ज्ञानकालीं. १८ स्वरूपीं. १९ ही माया. २० आत्मसत्ताभोगानें. २१ गरोदर. २२ जीवभूता प्रकृतीच्या. २३ तयार. २४ वगळल्यावर. २५ उत्पत्ति. २६ संबंध; जोड; बरोबर.

इतर अवस्थांशिवाय जी निवांत निद्रावस्था, तेंच अज्ञान होय. ७५ ज्या वेळेस आपल्यासमोर एखादा झाडाचा बुडखा असून तो खांब आहे किंवा पुरुष आहे असें निश्चयानें सांगतां येत नाहीं, परंतु कांहीं तरी विपरीत आहे असा भास होतो, ७६ त्याप्रमाणें आत्म्याचें निवळ स्वरूप ज्या वेळेस खरोखर दिसत नाहीं, व दुसरी कांहीं वस्तु आहे, असाही निश्चय होत नाहीं; ७७ दिवस व रात्र या दोहोंच्या मधील जो सायंकाल, त्याचप्रमाणें आत्मा व जगत् यांच्यामधलें जें ज्ञान, ७८ अशी जी एकवार दोहोंमधील दशा, तिला 'अज्ञान' असें म्हणतात; व त्या अज्ञानानें बद्ध झालेलें जें चैतन्य, त्यालाच क्षेत्रज्ञ असें म्हणतात. ७९ आपलें शुद्धस्वरूप न जाणतां जें अज्ञान वाढतें, तें क्षेत्रज्ञाचें (जीवात्म्याचें) रूप होय. ८० हा माया व चैतन्य यांचा योग नीट लक्षात आण. कारण, मूळ स्वरूपावर मायेचा स्वभावच असा आहे. ८१ याप्रमाणें मायेच्या अनुरोधानें चैतन्य आत्मस्वरूप विसरून अनेक रूपें घेतें. ८२ ज्याप्रमाणें दरिद्री मनुष्याला भ्रम झाला असतां तो रस्त्यानें जाऊं लागला म्हणजे इतर लोकांस 'आमची राजाची स्वारी आली' म्हणतो किंवा मूर्च्छा आलेला मनुष्य ज्याप्रमाणें 'स्वर्ग पाहून आलों' असें म्हणतो, ८३ त्याप्रमाणें, एकदां दृष्टि आत्मस्वरूपावरून चळली, म्हणजे जी जी कल्पना उत्पन्न होते, तिला सृष्टि असें म्हणतात; ती माइयापासूनच उत्पन्न होते. ८४ मनुष्य एकटा असून स्वप्नाच्या भ्रांतीनें पुष्कळ वस्तु पाहतो, तोच प्रकार चैतन्याला आत्मस्वरूपाचा विसर पडला म्हणजे होतो. ८५ हीच भ्रांति पुनः शुद्ध स्वरूपावर आलेली अन्य प्रकारानें तुला सांगतों; परंतु मूळ स्वरूपावर हें मायेचें रूप आहे ही गोष्ट तूं विसरूं नको. ८६ तर माया ही माझी स्त्री असून आद्यंतरहित, तरुण, अलौकिक व गुणवान आहे. ८७ हिचें रूप पाहूं गेलें असतां कशाप्रमाणेंच नाहीं; हिची आकृति फार व्यापक आहे; ही अज्ञान्याच्या सन्निध असते, व ज्ञान्यापासून दूर राहते. ८८ परंतु ही माया माझ्या आत्मस्वरूपावर निजल्यामुळें आत्मसत्तेच्या संभोगानें गर्भ धारण करते. ८९ मग जीवभूता प्रकृतीच्या उदरीं प्राकृत अष्ट विकाररूप गर्भाची ही वृद्धि करिते. ९० आत्मा व प्रकृति यांच्या संयोगापासून प्रथम बुद्धितत्त्व उत्पन्न होतें, व तीच बुद्धि बळावल्यावर मन उत्पन्न होतें. ९१ मनाची स्त्री ममता हिच्यापासून अहंकार उत्पन्न होतो, व त्याच्या योगानें पंचमहाभूतांची उत्पत्ति होते; ९२ आणि विषय व इंद्रियें यांचा भूतासह संबंध असल्यामुळें त्यांचीही यांचेबरोबर उत्पत्ति होते. ९३ विषय व इंद्रियें यांचा क्षोभ झाल्यावर पाठोपाठ सत्त्व, रज, तम हे तीन गुण असावयाचेच; त्या योगानें, वासना होईल त्याप्रमाणें जीव हा जागोजागीं जन्म घेतो. ९४ ज्याप्रमाणें बीजाची व पाण्याची गांठ पडल्यावर त्यास अंकुर फुटून झाडाचें अवसान येते, ९५ त्याप्रमाणें माझ्या संगानें मायेला अनेक प्रकारचे विश्वांकुर फुटूं लागतात.

२७ वासनेप्रमाणें. २८ जागोजागीं. २९ अवसान. ३० अंकुर. ३१ आकाराला.

९६ हे सुजनश्रेष्ठा, मग त्या गर्भाला कसें रूप येतें तें ऐक. ९७ हें पहा, अंडज, स्वेदज, उद्भिज्ज आणि जारज असे अंकुर तिला साहजिक फुटतात. ९८ आकाश व वायु यांचा ज्यांत जास्त अंश असतो असा जो गर्भवास, त्याला मणिज असें नांव आहे; हा एक त्याचा अवयव होय. ९९ तम व रज या गुणांनीं युक्त असून, ज्यांत जल व तेज यांचा अधिक अंश असतो, त्याला स्वेदज म्हणतात. १०० जल व पृथ्वी याचा विशेष अंश असून, केवळ ज्यांत तमोगुण दृष्टीस पडतो, ते उद्भिज्ज होत. १ पंचज्ञानेंद्रियें व पंच-कर्मेंद्रियें हीं ज्यात समान असतात, व मन आणि बुद्धि यांची ज्याला जोड असते, ते जारज होत. २ याप्रमाणें हे—जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज असे-चार देह म्हणजे दोन हात व दोन चरणतळ असून अष्टधा प्रकृति हें ज्याचें शिर आहे; ३ प्रपंच हें ज्याचें मोठें पोट असून, निवृत्ति ही ज्याची पाठ आहे; व बेंबीवरील भागांत आठ देवसर्ग आहेत, ४ वरील स्वर्गलोक हा कंठ, मृत्युलोक हा मध्यभाग, व पाताळ लोक हा कमरेखालील भाग होय; ५ असें एक लेंकरूं या मायेस झालें. तीन लोकांचा विस्तार हें या मुलाचें बाळसें होय. ६ चौऱ्यायशीं लक्ष योनि म्हणजे त्याच्या बोटांचीं पेरीं व सांधे असून, हें मूल प्रतिदिनीं वृद्धिंगत होतें. ७ नाना प्रकारचे देह, अवयव व नामें हे अलंकार घालून माया ही त्या मुलाला मोहरूप स्तनपान देऊन वाढविते. ८ वेगवेगळ्या सृष्टि ह्या त्याचीं बोटें व करं-गळ्या होत, आणि निरनिराळ्या प्रकारचे देह व त्यामधील अभिमान अंगठ्या होत. ९ असें एकुलतें एक विश्वरूपी लेंकरूं अज्ञानरूपी प्रकृतीस झाल्यावर आपण भाग्यवान आहों असें तिला वाटलें. ११० ब्रह्मा हा या बाळाचा प्रातःकाल, विष्णु हा माध्यान्ह-काल व सदाशिव हा सायंकाल म्हणजे उत्पत्ति, स्थिति व लय हे तीन काल होत. ११ आणि महाप्रलय हेंच याचें अंथरूण होय. त्यावर खेळ खेळून हें निवांत निजतें, व पुनः कल्पाचा उदय झाल्यावर विपरीत ज्ञानानें जागें होतें. १२ अर्जुना, याप्रमाणें मिथ्या दृष्टीच्या घरांत कालगतीच्या योगानें हें लेंकरूं पाऊल टाकूं लागतें. १३ ज्याचा संकल्प हा आवडता स्नेही असून अहंकार ही शोभा आहे, अशा या बालकाला आत्मज्ञान झालें म्हणजे मरण येतें. १४ असो; आता विशेष वर्णन न करतां इतकेंच सांगतों कीं, या-प्रमाणें मायेपासून हें विश्व माझ्या सत्तेच्या साह्यानें उत्पन्न झालें. १५

श्लोकार्थ—हे कौंतेया, चौऱ्यायशीं लक्ष योनींमध्यें ज्या व्यक्ति उत्पन्न होतात, त्या सर्वांचें कारण महद्ब्रह्म (प्रकृति) आहे, आणि त्या प्रकृतींत बीजारोपण करणारा पिता मी आहें ॥४॥

यास्तव अर्जुना, मी बाप, माया ही आई, व हें जग, आमचें लेंकरूं आहे. १६ या जगांत पुष्कळ शरीरें दृष्टीस पडल्यामुळें, जग माझें अपत्य असून माझें व त्याचें ऐक्य नाहीं अशी शंका तुझ्या मनांत येऊं देऊं नको. कारण, सर्व भूतांची उत्पत्ति मन, बुद्धि वगैरे पंचेंद्रियापासूनच आहे. १७ हें पहा कीं, एकाच शरीराला निरनिराळे अवयव नाहींत

२३ अभिमानानें फुगली. २४ विपरीत. २५ जागें होतें. २६ कालगतीच्या. २७ आवडता स्नेही. २८ शोभा; ऐश्वर्य. २९ मरण.

( ७२२. मायेचें मूल हिरण्यगर्भ, ९८–११३ ) पैं मणिज स्वेदज । उद्भिज्ज जारज । उमटती सहज । अवयव हे ॥ ९८ ॥ व्योमवायुवशें । वाढलेनि गर्भरसें । मणिजु उँससे । अवयव तो ॥ ९९ ॥ पोटीं सूनि तमरजें । आगळिकां तोय तेजें । उठितां निपजे । स्वेदजु गा ॥ १०० ॥ आपपृथ्वी उँत्कटें । आणि तमोमात्रें निकृष्टें । स्थावरु उमटे । उद्भिजु हा ॥ १ ॥ पांचां पांचही विरजीं । होती मनबुद्धयादि साँजीं । हीं हेतु जारजीं । ऐसें जाण ॥ २ ॥ ऐसे चारी हे सरळ । करचरणतळ । महाप्रकृति स्थूळ । तेंचि शिर ॥ ३ ॥ प्रवृत्ति पेललें पोट । निवृत्ति ते पाठी नीट । सुरयोनि आंगें आठ । ऊँर्ध्वीचीं ॥ ४ ॥ कंठु उल्हासता स्वर्गु । मृत्युलोकु मध्यभागु । अधोदेशु चांगु । नितंबु तो ॥ ५ ॥ ऐसें लेंकरूं एक । प्रसवली हे देख । जयाचें तिन्ही लोक । बाळसें गा ॥ ६ ॥ चौऱ्यायशीं लक्ष योनी । तियें कांडें पेरां सांदेणी । वाढे प्रतिदिनीं । बालक हें ॥ ७ ॥ नाना देह अवयवीं । नामाचीं लेणीं लेववी । मोहस्तन्यें वाढवी । नित्य नवें ॥ ८ ॥ सृष्टी वेगळवेगळिया । तिया कैरांग्रीं आँगोळियाँ । भिन्नाभिमान सूदालियाँ । मुदियाँ तेथें ॥ ९ ॥ हें एकोलतें चराचर । अविचारित सुंदर । प्रसवोनि थोर । थोरावली ॥ ११० ॥ पैं ब्रह्मा प्रातःकाळ । विष्णु तो मध्यान्ह वेळ । सदाशिव सायंकाळ । बाळा यया ॥ ११ ॥ महाप्रळयसेजे । खेळोनि निवांत निजे । विषमज्ञानें उमजे । कल्पोदयीं ॥ १२ ॥ अर्जुना इयापरी । मिथ्यादृष्टीच्या घरीं । युगानुवृत्तीच्या करीं । चोज पाउलें ॥ १३ ॥ ( ७२३. मायेच्या मुळाचा नाश ज्ञानानेंच होतो, ११४ ) संकल्पु जयाचा ईंष्टु । अहंकारु तो विनेटु । ऐसिया होय शेवटु । ज्ञानें यया ॥ १४ ॥ अवतरणः—आतां असो हे बहु बोली । ऐसें विश्व माया व्याली । तेथ साह्य जाली । माझी सत्ता ॥ १५ ॥

सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवंति याः ।
तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥

*अन्वयः—कौन्तेय, सर्वयोनिषु याः मूर्तयः संभवन्ति, तासां योनिः महद्ब्रह्म ( अस्ति ); अहं बीजप्रदः पिता ( अस्मि ) ॥ ४ ॥*

( ७२४. आत्मसत्तेनें माया विश्व व्याली, म्हणून आत्मा जगाचा बाप, ११६–११७) याकारणें मी पिता । महद्ब्रह्म हे माता । अपत्य पंडुसुता । जगडंबरु ॥१६॥ आतां शरीरें बहुतें । देखोनि न भेदें हो चित्तें । जे मनबुद्धयादि भूतें । एकेंचि येथें ॥१७॥

१ अंडज. २ आकाश. ३ जीवन पावतो. ४ पुष्कळ अंशानें. ५ समान. ६ सिद्ध; जोड. ७ मैथुनापासून उत्पन्न होणारी. ८ प्रपच. ९ दोंद वाढलें. १० बेंबीवरील भागात. ११ पाताळ. १२ कमरेच्या मागील भाग. १३ बोटें. १४ पेरीं. १५ सांधे. १६ करांगळींत. १७ बोटांत. १८ निरनिराळ्या प्रकारचे देह. १९ घातल्या. २० संगळ्या. २१ अज्ञानरूपी. २२ प्रकृति.

का? त्याप्रमाणें या जगात जरी पुष्कळ देह दृष्टीस पडले,तरी सर्व एकाचपासून उत्पन्न झालेले आहेत. १८ हें बघ, एकाच बाजीपासून उत्पन्न झालेल्या झाडास लांब, आखूड,जाड, बारीक अशा शाखा असतात; १९ म्हणून जगत् व मी यांचा संबंध असा आहे. ज्याप्रमाणें, मातीपासून उत्पन्न झालेला घट मातीचें लेंकरूं होय, किंवा वस्त्र हें कापसाचें नातवंड होय; (कारण कापसाचें सूत बनल्यावर त्यापासून वस्त्र तयार होतें;) २० अथवा समुद्रावर उत्पन्न होणाऱ्या असंख्य लाटा ज्याप्रमाणें समुद्राची संतति आहे, त्याप्रमाणेंच चराचर व मी याचा संबंध आहे. २१ म्हणून अग्नि व ज्वाला हीं दोन्ही ज्याप्रमाणें, अग्नीचींच स्वरूपें होत, त्याप्रमाणें मी व जगद् हीं दोन्ही एकच स्वरूपें असून मजपासून जगाची उत्पत्ति असा संबंध मानणें व्यर्थ होय. २२ जगाच्या उत्पत्तीमुळें, जर माझें स्वरूप लोपतें म्हणावें, तर हें जगत् कोणाच्या तेजानें प्रकट होतें? हें पहा—माणकाच्या तेजानें माणीक झांकलें जातें का? २३ तसेंच सोन्याचे अलंकार बनविल्यानें त्यांतील सुवर्णत्व नाहींसें होतें का? अथवा कमल उमलल्यावर त्याचें कमलत्व नाहींसें होतें कीं काय? २४ अर्जुना, अवयव धारण करणारा अवयवानें झांकला जातो, किंवा अवयवा-मुळें त्याला शोभा येते? सांग बरें! २५ जोंधळ्याचें बी पेरल्यावर त्याला कणीस आलें म्हणजे तो कमी झाला म्हणावा का वाढला म्हणावा? २६ म्हणून, जगाला बाजूस सारून मला पाहूं म्हणशील, तर मी निराळा दिसणार नाहीं; कारण मी जगद्रूपच आहें. २७ हे वीरा, या सिद्धांताची तूं आपल्या मनांत खरोखर पूर्णपणें गांठ बांधून ठेव. २८ आतां, मी जरी पुष्कळ शरीरांनीं वेगळा दृष्टीस पडलों, तरी तीं सर्व शरीरें एकाच गुणांनीं बांधलेलीं आहेत असें समज. २९ हे कपिध्वजा, ज्याप्रमाणें मनुष्य स्वप्नामध्यें आपण मेलों आहों, अशी कल्पना करतो, १३० किंवा कावीळ झालेल्या मनुष्याचे डोळे पिवळे होऊन, तो जी जी वस्तु पाहतो ती ती त्यास पिवळी दिसते, ३१ अथवा सूर्याच्या प्रकाशानें जसें अभ्र दिसतें व तो अभ्राच्छादित झाला हेंही त्याच्याच तेजानें दिसतें, ३२ किंवा हें पहा कीं, आपल्यामुळेंच पडलेली आपली छाया पाहून जो भितो, तो कोणी दुसरा असतो का? ३३ त्याचप्रमाणें, जगांत जरी पुष्कळ देह दृष्टीस पडले, तरी ते माझ्याच स्वरूपापासून झाले आहेत, असा त्यांचा माझा संबंध आहे, हें नीट लक्षात ठेव. ३४ माझें स्वरूप जाणल्यावर जगाचा व माझा संबंध आहे, हें प्रत्ययास येतें; परंतु माझ्या स्वरूपाचा विसर पडल्यावर मी व जगत् निराळे भासतें. ३५ हे अर्जुना, जगताचा व माझा कोणत्या गुणानें आणि कसा संबंध होतो तें ऐक. ३६ गुण किती आहेत, त्यांचे धर्म काय, तसेंच त्यांचें स्वरूप व नावें काय, व ते कशापासून उत्पन्न होतात, हें वर्म तुला सांगतों, ऐक. ३७

श्लोकार्थः—हे महाबाहो, सत्त्व, रज व तम हे तीन गुण प्रकृतीपासून उत्पन्न झालेले आहेत; ते या देहांत अविनाशी आत्म्याला बांधून टाकतात ॥ ५ ॥

(७२५. जगामध्यें व आत्म्यामध्यें भेद नाहीं, ११८-१२९) हां गा एकचि देहीं। काय अनारिसे अवयव नाहीं । तेविं विचित्र विश्व पाहीं । एकचि हें ॥ १८ ॥ पैं उंचा नीचा डाहाळिया । विषमा वेगळालिया । येकाचि जेवीं जालिया । बीजाचिया ॥ १९ ॥ आणि संबंधु तोही ऐसा । मृत्तिके घट्ट लेंकु जैसा । कां पटत्व कापुसा । नातू होय ॥ २० ॥ नाना कल्लोळपरंपरा । संतति जैसी सागरा । आम्हां आणि चराचरा । संबंधु तैसा ॥ २१ ॥ म्हणोनि वन्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्हिचि केवळ । तेविं मी गा सकळ । संबंधु वावो ॥ २२ ॥ जालेनि जगें मी झांकें । तरी जगत्वें कोण फांके । किळेवेरी माणिकें । लोपिजे काई ॥ २३ ॥ अळंकारा आलें । तरि सोनेपण काइ गेलें । कीं कमळ फांकलें । कमळत्वा मुके ॥ २४ ॥ सांग पां धनंजया । अवयवीं अवयविया । आच्छादिजे कीं तया । तेंचि रू ॥ २५ ॥ कीं विरूढलिया जोंधळा । कणिसाचा निर्वाळा । वेंचला कीं आगळा दिसतसे ॥ २६ ॥ म्हणोनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें । तैसा नों उखितें । आघवें मीचि ॥ २७ ॥ हां तूं साचोकारा । निश्चयाची खरा । गांठी बांध वीरा । जीवाचिये ॥ २८ ॥ अवतरणः—आतां मियां मज दाविला । शरीरें वेगळाला । गुणीं मीचि बांधला । ऐसा आवडे ॥ २९ ॥ (७२६. अज्ञानामुळें गुण बंध होतो, १३०-१३६) जैसें स्वप्नीं आपण । उठूनियां आत्ममरण । भोगिजे गा जाण । कपिध्वजा ॥ १३० ॥ कां कवळातें डोळे । प्रकाशूनि पिंवळे । देखती तेव्हां कळे । तयांसीचि ॥ ३१ ॥ नाना सूर्यप्रकाशें । प्रगटी तें अभ्र भासे । तो लोपला हेंही दिसे । सूर्येचि कीं ॥ ३२ ॥ पैं आपणपेनि जालिया । छाया गा आपुलिया । बिहोनि बिहालिया । आन आहे ॥ ३३ ॥ तैसीं इयें नाना देहें । दाऊनि मी नाना होयें । तेथ ऐसा जो बंधु आहे । तेंही देखें ॥ ३४ ॥ बंधु का न बंधिजे । हें जाणणें मज माझें । नेणणेनि उपजे । आपलेनि ॥ ३५ ॥ तरि कोणें गुणें कैसा । मजचि मी बंधु ऐसा । आवडे तें परियेसा । अर्जुन देवा ॥ ३६ ॥ (७२७. गुणांचा बंध, संख्या, धर्म, स्वरूप, नांवें आणि कारण हीं सांगण्याची प्रतिज्ञा, १३७-१३८) गुण ते किती किंधर्म । कायि ययां रूपनाम । कें जाले हें वर्म । अवधारीं पां ॥ ३७ ॥

सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।
निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥

अन्वयः—महाबाहो, सत्त्वं, रजः, तमः इति गुणाः प्रकृतिसंभवाः ( संति; ते ) देहे अव्ययं देहिनं निबध्नंति ॥ ५ ॥

---

१ तेजानें. २ अवयव धारण करणारास. ३ पेरल्यावर. ४ उत्पत्ति. ५ कमी झाला. ६ सिद्धात. ७ कल्पना येऊन. ८ कावीळ झालेल्याचे.

तरी सत्त्व, रज, तम अशीं गुणांचीं तीन नांवें आहेत, व ते मायेपासून उत्पन्न झाले आहेत. १३८ त्यांत सत्त्वगुण हा उत्तम, रजोगुण हा मध्यम, व तमोगुण कनिष्ठ होय. ३९ हे तिन्ही गुण एकाच वृत्तीच्या ठिकाणीं उत्पन्न होतात. ज्याप्रमाणें एकाच देहास बाल्य, तारुण्य व वार्धक्य या तिन्ही अवस्था येतात; ४० किंवा उत्तम सोन्यांत किडाळ सोनें मिळविल्यावर जों जों त्याचें वजन वाढतें तों तों सोनें फिकें दिसून कसास कमी उतरतें; ४१ ज्याप्रमाणें आळस आल्यावर जागृति नाहींशी होऊन झोंप वाढते, ४२ त्याप्रमाणें, अज्ञानाचा स्वीकार केल्यावर जी वृत्ति वाढते, तिला सत्त्व-रज-तम असें म्हणतात, ४३ अर्जुना, याच वृत्तीला गुण असें म्हणतात. तर आतां ते गुण मनुष्यास कसे आकळतात, तीं लक्षणें सांगतों. ४४ तर जीवात्मा ज्या वेळेस देहाचा अभिमान धारण करतो, त्याच वेळेस त्याला वाईट शकुन होतो असें समज. ४५ आजन्ममरणांत जोंपर्यंत देहावर ममत्व ठेवलें नाहीं, तोंपर्यंत या गुणांची बाधा होत नाहीं. ४६ ज्याप्रमाणें गळास लावलेलें आमिष माशानें तोंडांत धरलें नाहीं, तोंपर्यंत कोळी गळ हालवून पाहतो, व तोच माशानें तोंडांत धरल्यावर ओढून घेतो; ४७

श्लोकार्थः—हे निष्पाप अर्जुना, त्यामध्यें निर्दोष आणि प्रकाशक असा जो सत्त्वगुण, तो निर्मल असल्यामुळें आत्म्याला सुखसंग्रधानें व ज्ञानसंबंधानें या देहात बांधून टाकतो ॥ ६ ॥

त्याप्रमाणें सत्त्वगुण हाच कोणी पारधी सुख व ज्ञान या पाशांनीं जीवास ओढतो, व ज्याप्रमाणें मृग पारध्याच्या पाशांत सांपडल्यावर तरफडतो, ४८ त्याप्रमाणें जीव सत्त्वगुणाच्या सपाट्यांत सांपडल्यावर, मी ज्ञानी आहें अशी कल्पना करतो, आणि माझ्याप्रमाणें कोणी जगात ज्ञाता नाहीं अशी घमेंड बाळगतो; या कारणानें आत्मज्ञानापासून होणारें सुख आपल्या हातचें दवडतो. ४९ मग विद्वान म्हणून कोणीं आपला बहुमान केला असतां आनंद पावतो, व लाभ झाला असतां हर्ष मानतो. माझ्याप्रमाणें कोणी जगांत सुखी नाहीं असें मानतो, १५० व माझ्यासारखा या जगात दुसरा कोणीं सुखी नाहीं हें माझें केवढें भाग्य आहे, असें मानून अष्टसात्त्विक भावानीं भरून जातो; ५१ आणि एवढ्यानेंच आटोपत नाहीं; तर जगात काय तो मीच विद्वान हें अहंकाराचें दुसरें एक लचांड त्याच्या पाठीस लागतें. ५२ आपण स्वतः ज्ञानरूपी आहों याचें ज्ञान नाहींसें झाल्याबद्दल त्यास दुःख वाटत नाहीं; परंतु उलट विषयज्ञानाच्या भरात तो गगनाएवढा फुगतो; ५३ ज्याप्रमाणें एखादा राजा स्वप्नांत भिकारी होऊन भिक्षा मागण्यास निघाल्यावर इतरांपेक्षां थोडी जास्त भिक्षा मिळाल्यामुळें आपण इंद्र आहों असें समजतो, ५४ त्याप्रमाणें अर्जुना, जीवात्म्यानें देहाचा अभिमान धरल्यावर बाह्य ज्ञानानें त्याची स्थिति होते. ५५ प्रवृत्तिशास्त्रांत तो निपुण होतो, यज्ञविद्येंत तो निष्णात बनतो, किंबहुना तो स्वर्गांतीलही बातमी जाणतो; ५६ आणि माझ्याशिवाय या जगांत दुसरा कोणी ज्ञानवान नाहीं, व चातुर्यरूपी चंद्रास प्रकाश करण्यास माझें चित्त गगनरूपी आहे, असें मानतो. ५७

तरी सत्त्वरजतम । तिघांसि हें नाम । आणि प्रकृति जन्म- । भूमिका ययां ॥ ३८ ॥ ( ७२८. गुण प्रकृतीपासून उत्पन्न होतात, व आत्म्याला बंध करितात; १३९–१४४ ) येथ सत्त्व तें उत्तम । रज तें मध्यम । तिहींमाजीं तम । सावियों- धारें ॥ ३९ ॥ हें एकेचि वृत्तीच्या ठायीं । त्रिगुणत्व आवडे पाहीं । वयसात्रय देहीं । येकीं जेविं ॥ १४० ॥ का मीनलेनि कीडें । जंवजंव तुंक वाढे । तंवतंव सोनें हीन पडे । पांचिकें कसीं ॥ ४१ ॥ पैं सावधपण जैसें । वाहविलें आळसें । घुघुसि वैसे । घेणावोनि ॥ ४२ ॥ तैसी अज्ञानांगीकारें । निघाली वृत्ति विखुरे । ते सत्त्वरजद्वारें । तमही होय ॥ ४३ ॥ अर्जुना गा जाण । ययां नाम गुण । आतां दाखऊं खुण । बांधिती ते ॥ ४४ ॥ ( ७२९. सत्त्वगुण सुख व ज्ञान या दोन पाशांनीं आत्म्याला बाधतो, १४५–१५९ ) तरी क्षेत्रज्ञदशे । आत्मा मोटका पैसे । हें देह मी ऐसें । कुमुहूर्त करी ॥ ४५ ॥ आजन्म मरणान्तीं । देहधर्मी समस्तीं । ममत्वाची सूंती । घेना जंव ॥ ४६ ॥ जैसी मीनाच्या तोंडीं । पडेना जंव उंडी । तंव गळ आसुडी । जळपारधी ॥ ४७ ॥

तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।
सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ ६ ॥

अन्वयः--( ६ ) अनघ, तत्र अनामयं प्रकाशकं सत्त्वं निर्मलत्वात् ( आत्मानं ) सुखसंगेन च ज्ञानसंगेन बध्नाति ॥ ६ ॥

तेविं सत्वें लुब्धेकें । सुखज्ञानाचीं पाशकें । वोढिजती मग खुंडके । मृगु जैसा ॥ ४८ ॥ मग ज्ञानें चडफडी । जाणिवेचे खुरखोडी । स्वयंसुख हें धाडी । हातींचें गा ॥ ४९ ॥ तेव्हां विद्यमानें तोखे । लाभमात्रें हरिखे । मी संतुष्ट हेंही देखे । श्लाघों लागे ॥ १५० ॥ म्हणे भाग्य ना माझें । आजि सुखियें नाहीं दुजें । विकाराष्टकें फुंजे । सात्त्विकांचेनि ॥५१॥ आणि येणेंही न सरे । लांकणें लागे दुसरें । जें विद्वत्तेचें भरे । भूत आंगीं ॥ ५२ ॥ आपणचि ज्ञानस्वरूप आहे । तें गेलें हें दुःख न वाहे । कीं विषयज्ञानें होये । गगनायेवढा ॥ ५३ ॥ रावो जैसा स्वप्नीं । रंकपणें रिघे धानीं । तो दों दाणा मानी । इंद्रु ना मी ॥ ५४ ॥ तैसें गा देहातीता । जालेया देहवंता । हों लागे पंडुसुता । बाह्य ज्ञानें ॥ ५५ ॥ प्रवृत्तिशास्त्र बुझे । यज्ञविद्या उमजे । किंबहुना सुझे । स्वर्गवेरी ॥ ५६ ॥ आणि म्हणे आजि आन । मीवाचूनि नाहीं सज्ञान । चातुर्यचंद्रा गगन । चित्त माझें ॥ ५७ ॥ ऐसें

१ कनिष्ठ. २ बाल्य, तारुण्य व वार्धक्य. ३ किडाळ. ४ वजन. ५ कसास कमी उतरतें. ६ दृढ होऊन. ७ वाढते. ८ थोडा. ९ शिरतो. १० अभिमान. ११ पारध्यानें. १२ तडफडतो. १३ वलाना करतो. १४ ज्ञानाची. १५ घमेंड बाळगतो. १६ अष्टसात्त्विक भावांनीं. १७ लचाड. १८ भिक्षा मागण्यास. १९ भिक्षेच्या दोन अधिक दाण्यांनीं. २० जाणतो. २१ स्वर्गांतील बातमी.

तरी सत्त्व, रज, तम अशीं गुणांचीं तीन नांवें आहेत, व ते मायेपासून उत्पन्न झाले आहेत. ३८ त्यांत सत्त्वगुण हा उत्तम, रजोगुण हा मध्यम, व तमोगुण कनिष्ठ होय. ३९ हे तिन्ही गुण एकाच वृत्तीच्या ठिकाणीं उत्पन्न होतात. ज्याप्रमाणें एकाच देहास बाल्य, तारुण्य व वार्धक्य या तिन्ही अवस्था येतात; ४० किंवा उत्तम सोन्यांत किडाळ सोनें मिळविल्यावर जों जों त्याचें वजन वाढतें तों तों सोनें फिकें दिसून कसास कमी उतरतें; ४१ ज्याप्रमाणें आळस आल्यावर जागृति नाहींशी होऊन झोंप वाढते, ४२ त्याप्रमाणें, अज्ञानाचा स्वीकार केल्यावर जी वृत्ति वाढते, तिला सत्त्व-रज-तम असें म्हणतात, ४३ अर्जुना, याच वृत्तीला गुण असें म्हणतात. तर आतां ते गुण मनुष्यास कसे आकळतात, तीं लक्षणें सांगतों. ४४ तर जीवात्मा ज्या वेळेस देहाचा अभिमान धारण करतो, त्याच वेळेस त्याला वाईट शकुन होतो असें समज. ४५ आजन्ममरणांत जोंपर्यंत देहावर ममत्व ठेवलें नाहीं, तोंपर्यंत या गुणांची बाधा होत नाहीं. ४६ ज्याप्रमाणें गळास लावलेलें आमिष माशानें तोंडांत धरलें नाहीं, तोंपर्यंत कोळी गळ हालवून पाहतो, व तोच माशानें तोंडांत धरल्यावर ओढून घेतो; ४७

श्लोकार्थः—हे निष्पाप अर्जुना, त्यामध्यें निर्दोष आणि प्रकाशक असा जो सत्त्वगुण, तो निर्मल असल्यामुळें आत्म्याला सुखसंबंधानें व ज्ञानसंबंधानें या देहात बांधून टाकतो ॥ ६ ॥

त्याप्रमाणें सत्त्वगुण हाच कोणी पारधी सुख व ज्ञान या पाशानीं जीवास ओढतो, व ज्याप्रमाणें मृग पारध्याच्या पाशांत सांपडल्यावर तरफडतो, ४८ त्याप्रमाणें जीव सत्त्वगुणाच्या सपाट्यांत सांपडल्यावर, मी ज्ञानी आहें अशी वल्गना करतो, आणि माझ्याप्रमाणें कोणी जगात ज्ञाता नाहीं अशी घमेंड बाळगतो; या कारणानें आत्मज्ञानापासून होणारें सुख आपल्या हातचें दवडतो. ४९ मग विद्वान म्हणून कोणी आपला बहुमान केला असतां आनंद पावतो, व लाभ झाला असतां हर्ष मानतो. माझ्याप्रमाणें कोणी जगांत सुखी नाहीं असें मानतो, १५० व माझ्यासारखा या जगात दुसरा कोणी सुखी नाहीं हें माझें केवढें भाग्य आहे, असें मानून अष्टसात्त्विक भावांनीं भरून जातो; ५१ आणि एवढ्यानेंच आटोपत नाहीं; तर जगांत काय तो मीच विद्वान हें अहंकाराचें दुसरें एक लचांड त्याच्या पाठीस लागतें. ५२ आपण स्वतः ज्ञानरूपी आहों याचें ज्ञान नाहींसें झाल्याबद्दल त्यास दुःख वाटत नाहीं; परंतु उलट विषयज्ञानाच्या भरांत तो गगनाएवढा फुगतो; ५३ ज्याप्रमाणें एखादा राजा स्वप्नांत भिकारी होऊन भिक्षा मागण्यास निघाल्यावर इतरांपेक्षां थोडी जास्त भिक्षा मिळाल्यामुळें आपण इंद्र आहों असें समजतो, ५४ त्याप्रमाणें अर्जुना, जीवात्म्यानें देहाचा अभिमान धरल्यावर बाह्य ज्ञानानें त्याची स्थिति होते. ५५ प्रवृत्तिशास्त्रांत तो निपुण होतो, यज्ञविधींत तो निष्णात बनतो, किंबहुना तो स्वर्गांतीलही बातमी जाणतो; ५६ आणि माझ्याशिवाय या जगांत दुसरा कोणी ज्ञानवान नाहीं, व चातुर्यरूपी चंद्रास प्रकाश करण्यास माझें चित्त गगनरूपी आहे, असें मानतो. ५७

सत्व सुखज्ञानीं । जीवासि लाऊनि कानी । बैलाची करी वानी । पांगुळाचिया ॥ ५८ ॥ अवतरणः—आतां हाचि शरीरी । रजें जियापरी । बांधिजे तें अवधारीं । सांगिजेल ॥ ५९ ॥

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।
तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥ ७ ॥

अन्वयः—( हे ) कौंतेय, रागात्मकं रजः तृष्णासंगसमुद्भवं विद्धि; तत् देहिनं कर्मसंगेन निबध्नाति ॥ ७ ॥

( ७३०. रजोगुण आसक्ति, आशा व कर्मे या पाशांनीं आत्म्याला बांधतो, १६०-१७४ ) हें रज याचिकारणें । जीवातें रंजऊं जाणे । हें अभिलाषाचें तरुणें । सदाचि गा ॥ १६० ॥ हें जीवीं मोटकें रिगे । आणि कामाच्या मदीं लागे । मग वारया वळंघे । तृष्णेचिया ॥ ६१ ॥ घृतें आंबुखूनि आगियाळें । वज्राग्नीचें सादुकलें । आतां बहु थेंकुलें । आहे तेथ ॥ ६२ ॥ तैसी खवळे चाड । होय दुःखासकट गोड । इंद्रश्रीहि साकडं । गमों लागे ॥ ६३ ॥ तैसी तृष्णा वाढिन्नलिया । मेरुही हाता आलिया । तन्ही म्हणे एखादिया । दारुणा वेळंघो ॥६४॥ जीविताची कुरोंडी । वोवाळूं लागे कवडी । मानी तृणाचिये जोडी[१४] । कृतकृत्यता ॥ ६५ ॥ आजि असतें वेंचिजेल । परि पाहे काय कीजेल । ऐसा पांगी वेंडील । व्यवसाय माडी ॥ ६६ ॥ म्हणे स्वर्गा हन जावें । तरी काय तेथ खावें । इयालागीं धांवे । याग करूं ॥ ६७ ॥ व्रतापाठीं व्रतें । आचरे इष्टापूर्तें । काम्यावांचूनि हातें । शिवणें नाहीं ॥ ६८ ॥ पैं ग्रीष्मांतींचा वारा । विसांवों नेणे वीरा । तैसा न म्हणे व्यापारा । रात्र दिवस ॥ ६९ ॥ काय चंचळु मासा । कामिनीकटाक्षु जैसा । लवलाहो तैसा । विजूही नाहीं ॥ १७० ॥ तेतुलेनि गा वेगें । स्वर्गसंसारपांगें । आगीमाजीं रिगे । क्रियांचिये ॥७१॥ ऐसा देहीं देहावेगळा । लें[२०] तृष्णेचिया सांखळा । खटाटोपु वाहे गळां । व्यापाराचा ॥ ७२ ॥ हें रजोगुणाचें दारुण । देहीं देहियासि बंधन । अवतरणः—परिस आतां विंदाण । तमाचें तें ॥ ७३ ॥

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥

अन्वयः—भारत, तमः तु सर्वदेहिनां मोहनं अज्ञानजं विद्धि, तत् ( देहिनं ) प्रमादालस्यनिद्राभिः निबध्नाति ॥ ८ ॥

---

१ काढणी. २ शारखें. ३ कामवासनेचें. ४ चिकटवितो. ५ शिंपडून. ६ अग्निकुंड. ७ पेटविलें. ८ लहान. ९ इंद्राची संपत्ति. १० थोडी. ११ मोठी. १२ प्राप्त व्हावी. १३ ओंवाळणी. १४ लाभानें. १५ उद्यां. १६ इच्छेनें. १७ मोठें. १८ चंचलपणा. १९ जीव. २० घेतो. २१ कौतुक.

याप्रमाणें सत्त्वगुण हा, जीवात्म्यास सुख व ज्ञान यांच्या काढण्या लावून पांगुळा जसा बैलास ओढतो, त्याप्रमाणें आपल्या ताब्यात आणतो. ५८ आतां रजोगुणही या जीवास कसें बंधन करतो, तीं लक्षणें ऐक. ५९

श्लोकार्थः—हे कौंतेया, प्रीतिस्वरूप जो रजोगुण, तो आशा व आसक्ति याच्या संबंधानें उत्पन्न झाला आहे; तो आत्म्याला कर्मांच्या आसक्तीनें या देहांत बांधून टाकतो ॥ ७ ॥

या गुणापासून जीवाचें नेहमीं रंजन होतें, व कामवासना सदैव जागृत राहते, यास्तव त्यास रजोगुण असें म्हणतात. १६० जीवाच्या ठिकाणीं याचा थोडा शिरकाव होतांक्षणीं हा त्याला कामाच्या नादीं लावतो. मग मनाच्या इच्छा वाऱ्याप्रमाणें वाढूं लागतात. ६१ मग, अग्निकुंडात अग्नीवर तूप घातलें म्हणजे जसा वज्राग्नि भडकतो, व त्याला लहान व मोठी वस्तु याचें भान न राहतां तो सर्वांचा नाश करतो, ६२ त्याप्रमाणेंच याच्या इच्छा प्रबल होऊन दुःखदायक गोष्टीही त्याला सुखदायक वाटतात; व इंद्रलोकें जरी प्राप्त झाला, तरी त्याची तृप्ति होत नाहीं. ६३ अशा प्रकारें विषयवासना वाढल्यावर, मेरुपर्वतही त्याच्या हस्तगत झाला तरी त्यापेक्षाही अधिक मोठी वस्तु प्राप्त व्हावी असें म्हणतो. ६४ एका कवडीवरूनही आपलें जीवित. ओंवाळून टाकण्यास तो मागेंपुढें पहात नाहीं, आणि तृणाइतकी जरी अल्प वस्तु प्राप्त झाली, तरी आपल्यास धन्य मानतो. ६५ आपल्याजवळ असलेलें द्रव्य जर आज संपविलें, तर उद्या आपली काय वाट होणार, असें मानून तृष्णेच्या जोरावर मोठमोठे उद्योग सुरू करतो; ६६ आणि म्हणतो कीं, जर आपल्यास स्वर्गप्राप्ति झाली, तर त्या ठिकाणीं आपल्यास खावयास काय मिळणार? याकरिता यज्ञयागादि क्रिया करतो. ६७ व्रतावर व्रतें करतो; इष्टापूर्त ( विहिरी, तलाव वगैरे बांधणें, यज्ञयागादि करणें ) कर्में करतो, काम्य ( कामनिक ) व्रतांवाचून इतर व्रतांचें आचरण करीत नाहीं; ६८ ज्याप्रमाणें ग्रीष्मऋतूंतील अखेरचा ( आषाढ महिन्यांतला ) वारा रात्रंदिवस सारखा वाहतो, त्याप्रमाणें अर्जुना, अशा प्रकारच्या व्यापारांत हा रात्रंदिवस खपत असतो; ६९ मासा किंवा कामिनी स्त्रीचे नेत्रकटाक्ष हे चंचळ आहेत व विजेला तर अति चंचल असें म्हणतात; परंतु त्यांची रजोगुणाच्या चंचलतेशीं तुलना केली असतां तीं कमी भरतील; १७० अशा अति वेगानें स्वर्ग व संसार यांच्या प्राप्तीकरितां हा अग्नींतही उडी टाकण्यास मागेंपुढें पहात नाहीं. ७१ याप्रमाणें देहांत असून देहावेगळा जो जीव, तो तृष्णेच्या सपाट्यात सांपडल्यावर आपल्या गळ्यांत व्यापाराचा साखळदंड वागवितो. ७२ अशा रीतीनें देहांत राहणारा जो जीव, त्याला रजोगुणाचें बळकट बंधन असतें. आतां तमोगुणाचें लक्षण ऐक. ७३

श्लोकार्थः—हे भारता, प्राणिमात्राला मोहून टाकणारा तमोगुण तर अज्ञानापासून उत्पन्न झाला आहे असें तूं समज; तो या देहांत आत्म्याला कर्तव्याविषयीं दुर्लक्ष, आळस व झोंप यांनीं बांधून टाकतो ॥ ८ ॥

व्यवहाराचेहि डोळे । मंद जेणें पेंडळें[1] । मोहरात्रीचें काळें । मेहुडें[2] जें ॥७४॥ (७३१. तमोगुण मोहांत पाडून कर्तव्यमूढ करून आत्म्याला बांधतो, १७५–१९४) अज्ञानाचें जिव्हाळें[3] । जया एका लागलें । जेणें विश्व भुललें । नाचत असे ॥७५॥ अविवेक महामंत्र । जें मौढ्यमद्याचें[4] पात्र । हें असो मोहनास्त्र । जीवांसि जें ॥ ७६ ॥ पार्था तें गा तम । रचूनि ऐसें वर्म । चौखुरी[5] देहात्म-[6] । मानियातें[7] ॥ ७७ ॥ हें येकचि कीर शरीरीं । माजों लागे चराचरीं[8] । आणि तेथ दुसरी । गोठी नाहीं ॥ ७८ ॥ सर्वेंद्रियां जाड्य । मनामाजि मौढ्य । माल्हाती दार्ढ्य[9] । आलस्याचें ॥ ७९ ॥ आंगें आंग मोडामोडी । कार्यजातीं अनावडी । नुसती परवंडी[10] । जांभयांची ॥ १८० ॥ उघडियाचि दिठी । देखणें नाहीं किरीटी । नाळेवितांचि[11] उठी । वो म्हणोनि ॥ ८१ ॥ पडलिये धोंडी[12] । नेणे कोनीं मुरडी । तयाचिपरी मुरकुंडी[13] । उकलूं नेणे ॥ ८२ ॥ पृथ्वी पाताळीं जावो । कां आकाशही वरी येवो । परी उठणें हा भावो । उपजों नेणे ॥ ८३ ॥ उचितानुचित आघवें । झांसुरेतां नाठवे जीवें । जेथींचा तेथ लोळावें । ऐसी मेधी[14] ॥ ८४ ॥ उभऊनि[15] करतळें । पाडिघोंये कंपोळें[16] । पायाचें शिरियेंळें[17] । मांडूं[18] लागे ॥८५॥ आणि निद्रेविषयीं चांगु । जीवीं व्याथी लोगु[19] । झोंपीं जातां स्वर्गु । वावो म्हणे ॥ ८६ ॥ ब्रह्मायु[20] होइजे । मा निजोलियाचि असिजे । हें वांचूनि दुजें । व्यसन नाहीं ॥ ८७ ॥ कां वाटे जातां[21] बैसें । केल्हातांही[22] डोळा लागे । अमृतही परी नेघे । जरी नीद आली ॥ ८८ ॥ तेविंचि आक्रोशबळें[23] । व्यापारे कोणे एके वेळे । निगालें तरी आंधळें । रोपे जैसें ॥ ८९ ॥ केधवां कैसें राहाटावें । कोणेसीं काय बोलावें । हें ठौकतें कीं नोगवें । हेंही नेणे ॥ १९० ॥ वणवा मियां आघवा । पांखें पुसोनि घेयावा । पतंगु या हावो[26] । घाली[27] जेवीं ॥ ९१ ॥ तैसा वेळघे साहसा । अकरणींच[28] धिंवसा[29] । किंबहुना ऐसा । प्रमादु रुचे ॥ ९२ ॥ एवं निद्रा-आलस्यप्रमादीं । तम इया त्रिबंधीं[31] । बांधे निरुपाधी । चोखंटातें[32] ॥ ९३ ॥

अवतरणः—जैसा वन्ही काष्ठीं भरे । तैं दिसे काष्ठाकारें । व्योम घटें आवरे । तैं घटाकाश ॥ ९४ ॥ (७३२. गुणांनीं आत्मा बांधल्यासारखा दिसतो, पण बांधला जात नाहीं, १९५-१९६) नाना सरोवर भरलें । तैं चंद्रत्व तेथें बिंबलें । तैसें गुणपाशीं बांधलें । आत्मत्व गमे ॥ ९५ ॥

१ पडद्यानें. २ ढग. ३ जिव्हाळा. ४ अज्ञान. ५ चोहोंकडून. ६ देहालाच आत्मा. ७ मानणारांना. ८ व्यापिती. ९ दृढपणा. १० रेलचेल. ११ हांक न मारतां. १२ दुसऱ्या बाजूस वळत नाहीं. १३ स्वस्थ पडला असतां. १४ बुद्धि. १५ ठेवणें. १६ कपाळावर. १७ गुडघ्यांत डोकें. १८ घालतो. १९ इच्छा. २० ब्रह्मदेवाइतका दीर्घायु. २१ सहज. २२ पाय पसरून पडला असतां. २३ बलात्कारानें. २४ धंदाच. २५ फडफड. २६ इच्छेनें. २७ उडी घालतो. २८ मनूच होवो. २९ वेदबाह्य कर्मी. ३० हौस. ३१ तीन पाश. ३२ जीवास.

ज्याच्या पडद्यानें मनुष्याची व्यवहाराकडील दृष्टि मंद होते; जें मोहरूप रात्रीचें काळेंभोर असें आभाळच; ७४ जो तमोगुण अज्ञानानें वाढतो, तो सर्व विश्वास अज्ञानांत पाडून नाचवितो. ७५ हा तमोगुण अविचाराचा महामंत्र होय, व अज्ञानरूपी मद्याचें पात्र होय. फार काय सांगावें ? जीवास मोह घालणारें असें हें एक अस्त्रच होय. ७६ पार्था, ह्या लक्षणांसच तमोगुण असे म्हणतात, व जे देहालाच आत्मा मानतात, त्याना हाच ग्रासून टाकतो. ७७ हा तमोगुण एकटाच चराचराच्या अंगीं वाढूं लागला, म्हणजे त्या ठिकाणीं दुसऱ्या कोणाचाही शिरकाव होऊं देत नाहीं. ७८ हा सर्व इंद्रियांना जडत्व आणतो, मनाला मूढत्व आणतो, व याच्या योगानें आळस येतो. ७९ याच्या योगानें मनुष्य नेहमीं अंग मोडतो, काम करण्याची हौस नसते, आणि जांभयांची रेलचेल होते. १८० अर्जुना, त्या मनुष्याचे डोळे उघडे असूनही त्याला समोरील वस्तु दिसत नाहींत, आणि हाका मारल्याशिवाय तो मध्येंच 'ओ' म्हणून अंथरुणांतून उठतो. ८१ मोठा एखादा धोंडा खालीं पडल्यावर तो जसा एका बाजूवरून दुसऱ्या बाजूवर फिरत नाहीं, त्याप्रमाणें हा मुरकुंडी मारून एकदां निजला, म्हणजे ह्या कुशीचा त्या कुशीवर होत नाहीं. ८२ पृथ्वी पाताळास जावो अथवा आकाश तुटून पडो, परंतु याच्या मनात उठण्याची म्हणून इच्छा उत्पन्न होत नाहीं. ८३ हा स्वस्थ निजल्यावर आपल्या आन्हिक कर्माची सुद्धां यास आठवण होत नाहीं; परंतु अंथरुणाच्या अंथरुणावरच लोळावें अशी त्याची बळकट बुद्धि असते. ८४ हात वर करून, बोटांत बोटें अडकवून व ते डोक्यावर ठेवून हा गुडघ्यांत डोकें घालून बसतो; ८५ आणि मनांत निद्रेविषयीं पूर्ण इच्छा धरून, झोंप लागल्यावर तिच्यापुढें स्वर्ग देखील तुच्छ मानतो. ८६ मला ब्रह्मदेवाचें आयुष्य यावें, व मी असाच निजला रहावा, याशिवाय त्याला दुसरें व्यसन कांहीं नसतें. ८७ वाटेनें जातांना जर पाय घसरून पडला, तर त्या ठिकाणींही त्याला झोंप लागते; आणि झोंप जर आली असली, तर कोणी अमृत देऊं लागल्यास त्याचा देखील तो अव्हेर करतो. ८८ त्याचप्रमाणें, कोणीं मारून मुटकून काम करावयास लावलेंच, तर क्रोधानें अगदीं अंधळा होऊन जातो. ८९ कोणत्या वेळेस कसें वागावें, कोणाबरोबर कसें बोलावें, व ज्याच्याबरोबर देवघेव करावयाची तो घरंदाज आहे अथवा कफल्लक आहे, ह्याचाही तो विचार करीत नाहीं. १९० ज्याप्रमाणें, वणवा लागला असतां तो मी आपले पंखानीं विझवीन अशी पतंगास इच्छा असते, ९१ त्याप्रमाणें साहसकर्में करण्यास प्रवृत्त होऊन अकरणीय कर्में करण्याची त्याला हौस असते; किंबहुना असले प्रमाद करणेंच त्याला गोड वाटतें. ९२ याप्रमाणें तमोगुण हा निद्रा, आळस व प्रमाद या तीन पाशांनीं उपाधिरहित अशा जीवास बंधन करतो. ९३ ज्याप्रमाणें अग्नि काष्ठास लागला असतां काष्ठाच्या आकाराप्रमाणें दिसतो, किंवा आकाश हें घटांत त्या घटाच्या आकाराप्रमाणें भासतें, ९४ अथवा सरोवरांत चंद्राचें बिंब दिसतें,

सत्त्वं सुखे संजयति रजः कर्माणि भारत। ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९॥
रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत। रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥१०॥

अन्वयः—भारत, सत्त्वं ( देहिनं ) सुखे संजयति; रजः कर्मणि ( संजयति ); उत तमः तु ज्ञानं आवृत्य प्रमादे संजयति ॥ ९ ॥ भारत। सत्त्वं, रजः च तमः अभिभूय ( स्वयं ) भवति, रजः सत्त्वं च तमः ( अभिभूय स्वयं भवति ), तथा तमः सत्त्वं च रजः ( अभिभूय स्वयं भवति ) ॥१०॥

पैं परिहेरूनि कफवात। जैं देहीं आटोपे पित्त। तैं करी संतप्त। देह जेवि ॥९६॥ ( ७३३. सत्त्वगुण जीवाला सुखबंध करतो, १९७-२०० ) कां वरिषें आतप जैसें। जिणौनि शीतैचि दिसे। तेव्हां होय हिंव ऐसें। आकाश हें ॥ ९७ ॥ नाना स्वप्न जागृति। लोपूनि ये सुषुप्ति। तैं क्षणएकु चित्तवृत्ति। तेचि होय ॥ ९८ ॥ तैसीं रजतमें हारवी। जैं सत्त्व माजुं मिरवी। तैं जीवाकरवीं म्हणवी। सुखिया ना मी ॥ ९९ ॥ तैसेंचि सत्व रज। लोपूनि तमाचें भोजें। वळघे तैं सहज। प्रमादी होय ॥२००॥ ( ७३४. तमोगुण जीवाला कर्तव्यमूढ करितो, २०१ ) तयाचि गा परिपाठीं। सत्व तमातें पोटीं। घालूनि जेव्हां उठी। रजोगुण ॥ १ ॥ ( ७३५. रजोगुण जीवाला कर्माचें बंधन करितो, २०२-२०३ ) तेव्हां कर्मावांचूनि काहीं। आन गोमटें नाहीं। ऐसें मानी देहीं। देहराजु ॥ २ ॥ त्रिगुणवृद्धि-निरूपण। तीं श्लोकीं सांगितलें जाण। अवतरणः—आतां सत्त्वादिवृद्धिलक्षण। सादर परियेसा ॥ ३ ॥

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते। ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११ ॥
लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा। रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२॥
अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च। तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन ॥ १३ ॥
यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत्। तदोत्तमविदाँल्लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥
रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते। तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥

अन्वयः—उत यदा अस्मिन् देहे सर्वद्वारेषु प्रकाशः च ज्ञानं उपजायते। तदा सत्त्वं विवृद्धं इति विद्यात् ॥ ११ ॥ भरतर्षभ, लोभः, प्रवृत्तिः, कर्मणां आरंभः, अशमः, स्पृहा एतानि ( चिन्हानि ) रजसि विवृद्धे ( सति ) जायन्ते ॥ १२ ॥ ( हे ) कुरुनंदन, अप्रकाशः, अप्रवृत्तिः च प्रमादः च मोहः एव एतानि तमसि विवृद्धे ( सति ) जायन्ते ॥ १३ ॥ यदा तु सत्त्वे प्रवृद्धे ( सति ) देहभृत् प्रलयं याति, तदा उत्तमविदां अमलान् लोकान् प्रतिपद्यते ॥ १४ ॥ ( देहभृत् ) रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते; तथा ( सः ) तमसि प्रलीनः मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥

( ७३६. सत्त्वगुण वाढल्याचें लक्षण सांगावयाचें, २०४ ) पैं रजतमाविजयें। सत्त्व गा देहीं इये। वाढतां चिन्हें तियें। ऐसीं होती ॥ ४ ॥ ( ७३७. सत्त्वगुणामुळें ज्ञान वाढतें, २०५-२१५ ) जे प्रज्ञा आंतुलीकडे। न समाती बाहेरी वोसंडे। वसंतीं पद्मखंडें। दृंति जैसा ॥५॥ सर्वेंद्रियांच्या आंगणीं। विवेक करी राबणी। साचचि करचरणीं। होती डोळे ॥ ६ ॥ राजहंसापुढें। चांचूचें आगरडें। तोडी जेवि झगडे।

त्याप्रमाणें, जीव गुणपाशांनीं बद्ध झाल्यावर गुणांच्या लक्षणांसारखा दिसतो. ९५

श्लोकार्थः—हे भारता, सत्त्वगुण हा आत्म्याला सुखाचा संबंध करून देतो; रजोगुण हा आत्म्याला कर्माचा संबंध करून देतो; व तमोगुण तर ज्ञान आच्छादन करून आत्म्याला कर्तव्याविषयीं दुर्लक्षाचा संबंध करून देतो. ॥ ९ ॥ हे भारता, सत्त्वगुण हा रज व तम या गुणांना जिंकून आपण वाढतो; रजोगुण हा सत्त्व आणि तम या गुणांना जिंकून आपण वाढतो; आणि तमोगुण हा सत्त्व आणि रज या गुणांना जिंकून आपण वाढतो ॥ १० ॥

हें पहा—कफ व वात यांस मागें सारून[1] देहांत पित्त वाढलें असतां तें जसें शरीर तप्त करितें, ९६ किंवा उन्हाळा आणि पावसाळा निघून गेल्यावर थंडी पडूं लागली असतां चहूंकडे अगदीं गारीगार होऊन जातें, ९७-अथवा जागृति व स्वप्न ह्या अवस्था नाहींतशा होऊन गाढ झोंप लागली असतां जशी क्षणभर चित्तवृत्ति होते, ९८ त्याप्रमाणें रज व तम यांपेक्षां जेव्हां सत्त्वगुण अधिक वाढतो, तेव्हां ' मी सुखी आहें ' असें तो या जीवास म्हणावयास लावतो. ९९ त्याचप्रमाणें, सत्त्व व रज या गुणाचा लोप होऊन जेव्हां तमाचें प्राबल्य होतें, तेव्हां साहजिकपणें प्रमाद घडून येतात; २०० त्याच रीतीनें सत्त्व व तम या गुणांना दाबून जेव्हां रजोगुण बळावतो, १ तेव्हां देहांत राहणारा जो देहाचा राजा जीवात्मा, त्याला कर्मावांचून दुसरें कांहीं एक चांगलें दिसत नाहीं. २ याप्रमाणें तीन श्लोकांनीं तीन गुणांचें निरूपण केलें. आतां ह्या सत्त्वादि गुणांच्या वृद्धीचें लक्षण लक्षपूर्वक ऐक. ३

श्लोकार्थः—या देहामध्यें सर्व इंद्रियांच्या ठिकाणीं ज्ञानाचा प्रकाश पडतो, तेव्हा सत्त्वाची वृद्धि झाली आहे असें समजावें ॥ ११ ॥ हे भरतश्रेष्ठा, लोभ, प्रवृत्ति, कर्मारंभ, उच्छृंखलपणा आणि इच्छा हीं चिन्हें ( रजोगुणाची विशेष वृद्धि झाली असतां ) उत्पन्न होतात ॥ १२ ॥ विवेकाचा नाश, उद्योगाचा कंटाळा, दुर्लक्ष, आणि मोह हीं चिन्हें ( तमोगुणाची विशेष वृद्धि झाली असता ) उत्पन्न होतात ॥ १३ ॥ सत्त्वाची वृद्धि झाली असतां जर प्राणी मृत्यु पावला, तर तो, महत्तत्त्वादिक जाणणाऱ्यांना जो उत्तम लोक प्राप्त होतो, त्या उत्तम लोकाप्रत ( ब्रह्मलोकाप्रत ) जातो ॥ १४ ॥ रजोगुणाची वृद्धि झाली असता जर प्राणी मृत्यु पावला, तर, कर्माच्या ठायीं आसक्त असे जे जन, त्यामध्यें तो जन्म पावतो; आणि तमोगुणाची वृद्धि झाली असतां जर मृत्यु पावला तर तो पशु इत्यादि मूढ योनींत जन्म पावतो ॥ १५ ॥

हें पहा, रज व तम या गुणांना जिंकून जेव्हां सत्त्वगुण या देहांत वाढतो, तेव्हां जीं लक्षणें होतात तीं अशीं: ४ वसंत ऋतूमध्यें कमळें फुलल्यावर त्यांचा वास जसा चहूंकडे पसरतो, त्याप्रमाणें ज्ञान हें अंतर्यामीं ओतप्रोत भरून बाहेर निघतें. ५ सर्व इंद्रियांमध्यें विवेक अगदीं राबत असतो, व खरोखर हातापायांनाही डोळे येतात. (सत्कर्म कोणतें व दुष्कर्म कोणतें हें त्यांनाच समजतें; विचार करावयाचीही आवश्यकता नसते. ) ६ राजहंसापुढें दूध व पाणी मिसळून ठेवल्यावर, जसा त्याचे चोंचीच्या टोंकानें त्या

१ मागें सारून. २ पर्जन्यकाल. ३ उन्हाळा. ४ थंडी. ५ गाढ निद्रा. ६ अधिक वाढतो. ७ महत्त्व. ८ ज्ञान. ९ कमळें. १० वास. ११ टोंकें.

क्षीरनीराचे ॥ ७ ॥ तेवीं दोषादोषविवेकीं । इंद्रियेंचि होती पारखीं । नियमु बा रे पायिकीं । वोळगे तें ॥ ८ ॥ अवतरण:—नायिकणें तें कानचि वाळी । न पाहणें तें दिठीचि गाळी । अवाच्य तें टाळी । जीभचि गा ॥ ९ ॥ वातीपुढां जैसें । पळों लागे कोळवसें । निषिद्ध इंद्रियां तैसें । समोर नोहे ॥ ११० ॥ धाराधरकाळें । महानदी उचंबळे । तैसी बुद्धि पैंघळे । शास्त्रजातीं ॥ ११ ॥ अगा पुनवेच्या दिवशीं । चंद्रप्रभा धांवे आकाशीं । ज्ञानीं वृत्ति तैसी । फांके सैंघ ॥ १२ ॥ वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे । मानस विटे । विषयांवरी ॥ १३ ॥ एवं सत्त्व वाढे । तैं हें चिन्ह फुडें । आणि निधनही घडे । तेव्हाचि जरी ॥ १४ ॥ कां पाहालेनि सुयाणें । जालया परगुणें । पढियंतें पाहुणें । स्वर्गौनियां ॥ १५ ॥ ( ७३८. सत्त्वगुणांत मेलेला पुरुष ब्रह्मसंपन्न कुलांत जन्म घेतो, २१७–२२६ ) तरि जैसीचि घरींची संपत्ति । आणि तैसीच औदार्यधैर्यवृत्ति । मा परत्रा आणि कीर्ति । कां नोहावें ॥ १६ ॥ मग गोमटेया तया । जैंवळी असे धनंजया । तेवीं सत्त्वीं जाणे देहा । कें आथी गा ॥ १७ ॥ जे स्वगुणीं उद्भट । घेऊनि सत्त्व चोखट । निगे सांडूनि कोपट[११] । भोगक्षेमें[१२] हें ॥ १८ ॥ अवचटें ऐसा जो जाये । तो सत्त्वाचाचि नवा होये । किंबहुना जन्म लाहे । ज्ञानियांमाजी ॥ १९ ॥ सांग पां धनुर्धरा । रावो रायपणें डोंगरा । गेलिया अपुरा । होय काई ॥ २२० ॥ नातरि येथींचा दिवा । नेलिया सेंजिया गावा । तो तेथें तरि पांडवा । दीपाचि कीं ॥ २१ ॥ तैसी ते सत्त्वशुद्धि । आगळी ज्ञानेंसी वृद्धि । तरंगावों लागे बुद्धि । विवेकावरी ॥ २२ ॥ पैं महदादिपरिपाठीं । विचारूनि शेवटीं । विचारासकट पोटीं[१४] । जिरोनि जाय ॥ २३ ॥ छत्तिसां सदातिसावें । चोविसां पंचविसावें । तिन्ही नुरोनि स्वभावें । चतुर्थ जें ॥ २४ ॥ ऐसें सर्व जें सर्वोत्तम । जालें असे जया सम । तयासवें निरुपम । लाहे देह ॥ २५ ॥ इयाचिपरी देख । तमसत्त्व अधोमुख । बैसोनि जें आगळीक । धरी रज ॥ २६ ॥ ( ७३९. रजोगुणाच्या वृद्धीचीं चिन्हें, २२७–२२९ ) आपुलिया कार्याचा । धुमौड गांवीं देहाचा । माजवी तैं चिन्हाचा । उदयो ऐसा ॥ २७ ॥ पांजरली वाहटुळी । करी वेगळ वेंटाळी । तैसी विषयीं सैरळी । इंद्रियां होय ॥ २८ ॥ परदारादि पडे । परि विरुद्ध ऐसें नावडे । मग शेळियेचेनि तोंडें । सैंघ चारी ॥ २९ ॥ ( ७४०. लोभ

१ अंधार. २ पर्जन्यकालीं. ३ भरून जाते. ४ नाहींतशा होतात. ५ मरण. ६ प्राप्त झाल्यावर. ७ सुकाळ. ८ सण. ९ स्वर्ग. १० तोंड; उपमा. ११ शरीर. १२ भोग भोगण्याचें ठिकाण. १३ महत्तत्त्वादिकाचा क्रम. १४ स्वरूपात. १५ धामधूम. १६ सुटली. १७ मोकळीक.

दोहोंचा निवाडा होतो, ७ त्याप्रमाणें बा अर्जुना, इंद्रियेंच बऱ्यावाईट कर्मांची पारख करतात, व नियम हा त्याची सेवा करतो; ८ न ऐकण्यासारख्या गोष्टी त्याचे कानच ऐकत नाहींत; न पाहण्यासारख्या वस्तु त्याचे डोळेच पहात नाहींत; जें आपण बोलूं नये, तें त्याची जीभच बोलत नाहीं; ९ काळोख जसा दिव्यासमोर न येतां नाहींसा होतो, त्याप्रमाणें त्याचीं इंद्रियेंच त्याच्यासमोर निषिद्ध कर्में येऊं देत नाहींत. २१० हें पहा, नदी जशी पर्जन्यकाळीं पाण्यानें उचंबळूं लागते, त्याप्रमाणें त्याच्या बुद्धीचे ठिकाणीं सर्व शास्त्रांचा पूर येतो. ११ ज्याप्रमाणें पौर्णिमेचे दिवशीं सर्व आकाशातच चंद्राचा प्रकाश पसरतो, त्याप्रमाणें त्याचे वृत्तींत ज्ञानाचा प्रकाश पडतो. १२ त्याच्या सर्व वासना नाहींतशा होऊन प्रवृत्तिमार्गाकडे त्याचें मन जात नाहीं. त्याचप्रमाणें त्याच्या मनाला विषयांचा वीट येतो. १३ याप्रमाणें सत्त्वगुण वाढून त्याचीं लक्षणें दिसत असतां जर त्याचा काल झाला: १४ किंवा दुष्काळाचे दिवस गेल्यावर उत्तम पाऊस पडून सर्व सुबत्ता झाली, तशांत एखादा मोठा सण प्राप्त झाला, आणि अशा समयीं जसे आपले स्वर्गांतील पूर्वज पाहुणे यावेत, अशी न घडणारी गोष्ट घडल्यास जसा सर्वत्र आनंद होतो; १५ त्याचप्रमाणें, घरात पुष्कळ संपत्ति असून तिचा दानधर्म करण्याकडे विनियोग केला, तर त्यापासून इहलोकीं कीर्ति होऊन स्वर्गलोकाची प्राप्ति कां होणार नाहीं ? १६ अर्जुना, अशा रीतीचें आचरण असलें म्हणजे मग त्याला दुसरी तोड कोठून असणार ? त्याचप्रमाणें, सत्वगुण वाढला असतां मरणानंतर तो दुसऱ्या कोठें जाईल ? १७ कारण, उत्तम आचरण करणारा, भोग भोगण्याचें ठिकाण जें शरीर तें टाकून शुद्ध सत्त्वगुणाला घेऊन जातो. १८ अशा रीतीनें जो देह ठेवतो, तो केवळ सत्त्वाची मूर्तिच बनतो; फार काय, पुनः ज्ञान्यांत जन्म घेतो. १९ हे धनुर्धरा, राजा आपल्या गादीवर असतांना जर डोंगरावर जाऊन उभा राहिला, तर त्याला त्या ठिकाणींहीं कांहीं कमी पडतें का सांग बरें ? २२० किंवा बाबारे, एका गावाहून दुसऱ्या गांवास नेलेल्या दिव्याचा उजेड जसा दोहों ठिकाणीं सारखाच पडतो, २१ त्याप्रमाणें, सत्त्वगुणाची वृद्धि झाल्यावर ज्ञान अधिक वाढतें व बुद्धि ज्ञानांत तरंगूं लागते; २२ नंतर महत्तत्त्वादिकाचा विचार करून तो त्या विचारासह आत्मस्वरूपांत निमग्न होतो. २३ ( तेराव्या अध्यायांत वर्णन केल्याप्रमाणें ) छत्तीस तत्त्वांहून सदतिसावें, सांख्यमताप्रमाणें चोविसाहून पंचविसावें, व तिन्ही गुणाहून निराळें असें जें चौथे ब्रह्म, २४ असें जें सर्वांत उत्तम व ज्याचें त्याला ऐक्य प्राप्त झालें आहे, असा देह तो धारण करतो. २५ याचप्रमाणें पहा कीं, तमोगुण व सत्त्वगुण यांस दाबून ज्या वेळेस रजोगुण वाढतो; २६ व ज्या वेळीं तो शरीररूप गावात आपली कृति चोहोंकडे प्रगट करतो, तेव्हां त्याचीं लक्षणें अशीं असतात. २७ वावटळ सुटल्यावर, ज्याप्रमाणें ती सर्व जिनसा एकत्र करून वर उडवते, त्याप्रमाणें इंद्रियें विषयाकडे मोकळीं सुटतात. २८ परस्त्री दृष्टीस पडल्यावर ती कोणाची आहे याचा विचार होत

तमोगुणामुळें, २३०–२३१ ) हा ठायवरी लोभु । करी स्वैरत्वाचा रावु । वेंटाळितां अलाभु । तें तें उरे ॥ २३० ॥ आणि आड पडलिया । उद्यमा जाती भलतिया । प्रवृत्ति धनंजया । हातु न काढी ॥ ३१ ॥ ( ७४१. प्रवृत्ति, २३२ ) तेवींचि एखादा प्रासाद । का करावा अश्वमेधु । ऐसा अचाट छंदु । घेऊनि उठी ॥ ३२ ॥ ( ७४२. कर्मारंभ, २३३–२३६ ) नगरेंचि रचावीं । जळाशयें निर्मावीं । महावनें लावावीं । नानाविधें ॥ ३३ ॥ ऐसैसां अफाटीं कर्मीं । समारंभु उपक्रमी । आणि दृष्टादृष्टकामीं । पुरे न म्हणे ॥ ३४ ॥ सागरुही सांडी पडे । आगी न लाहे तीन कवडे । ऐसें अभिलाषीं जोडे । दुर्भरत्व ॥ ३५ ॥ स्पृहा मना पुढां पुढां । आशेचा घे दवडा । विश्व घेंपे चाडा । पायातळीं ॥ ३६ ॥ ( ७४३. स्पृहा, २३७–२३८ ) इत्यादि वाढतां रजीं । इयें चिन्हें होती सौंजीं । आणि ऐशा समाजीं । वेंचे जरी देह ॥ ३७ ॥ तरि आघवाचि इहीं । परिवारलें आनीं देहीं । रिगे परि योनिही । मानुषीचि ॥ ३८ ॥ ( ७४४. रजोगुणामध्यें मरण आल्यास मनुष्ययोनींत कर्मजड बनतो, २३९–२४२ ) सुखेंवोडेंसि भिकारी । वसो पां राजमंदिरीं । तरी काय अवधारीं । रावो होईल ॥ ३९ ॥ बैल तेथें करबैंडें । हें न चुके गा फुडें । नेइजो कां वऱ्हाडें । समर्थाचेनि ॥ २४० ॥ म्हणौनि व्यापारा हातीं । उसंतु दिहीं ना रातीं । तैसयाचिये पांतीं[१०] । जुंपिजे तो ॥ ४१ ॥ कर्मजडांच्या ठायीं । किंबहुना होय देहीं । जो रजोवृत्तीच्या डोहीं । बुडोनि निमे[११] ॥ ४२ ॥ ( ७४५. तमोगुण वाढल्याचीं लक्षणें, २४३–२४५ ) अवतरणः–मग तैसाचि पुढती । रजसत्त्ववृत्ती । गिळूनि ये उन्नती । तमोगुण ॥ ४३ ॥ तेंचि जियें लिंगें[१२] । देहींचीं सबाह्य सांगें । तियें परिस चांगें । श्रोत्रबळें ॥ ४४ ॥ तरी होय ऐसें मन । जैसें रविचंद्रहीन । रात्रींचें का गगन । अंवसेचिये ॥ ४५ ॥ ( ७४६. अप्रकाश, २४६ ) तैसें अंतर असोस । होय स्फूर्तिहीन उद्वसें । विचाराची भाष । हारपे तैं ॥ ४६ ॥ ( ७४७. अप्रवृत्ति, २४७ ) बुद्धि मेचवेना धोंडी । हा ठायवरी मैंवाळें सांडी । आठवो देशधडी । जाला दिसे ॥ ४७ ॥ ( ७४८. प्रमाद, २४८ ) अविवेकाचेनि माजें । सबाह्य शरीर गाजे । एकलेनि घेपे दीजे । माढयें तेथ ॥ ४८ ॥ ( ७४९. मोह, २४९–२५५ ) आचारभंगाचीं हाडें । रूपती इंद्रियापुढें । मरे जरी तेणें कडे । क्रिया जाय ॥ ४९ ॥ पैं आणिकही एक दिसे । जे दुष्कृतीं चित्त उल्हासे । आंधारीं देखणें जैसें । डुडुळाचें ॥ २५० ॥ तैसें निषिद्धाचेनि नांवें । भलतेही भरे हांवे । तियेविषयीं धांवे । घेती करणें ॥ ५१ ॥ मदिरा न घेतां डुले । सान्निपातेंवीण बरळे । निष्प्रेमेंचि भुले । पिसें जैसें ॥ ५२ ॥ चित्त

१ आपल्या इच्छेचा. २ सापडणार नाहीं. ३ पुढें. ४ देऊळ. ५ तलाव. ६ सुरू करतो. ७ इहपरलोकप्राप्तीची इच्छा. ८ हरेल, हार घेईल. ९ अपहाराविषयीं. १० अवृत्ति. ११ इच्छा.

नाहीं; त्यामुळें, शेळीप्रमाणें वाटेल तसा तो चरूं लागतो. २९ लोभ इतका वाढतो कीं, जी वस्तु याच्या सपाट्यांत सांपडणार नाहीं, तेवढीच काय ती बाजूस उरते. २३० अर्जुना, हवा तो उद्योग याच्यापुढें आला असतां तो करण्यास हा मागें घेत नाहीं. ३१ त्याप्रमाणें, एखादें अवाढव्य देऊळ बांधणें किंवा अश्वमेध यज्ञ करणें, अशा अचाट छंदाच्या मागें लागतो. ३२ एखादें शहर वसवावें किंवा मोठाले तळाव बांधावे, अथवा विस्तीर्ण अरण्यांत बागा कराव्या, ३३ याप्रमाणें अचाट कृत्यें हातीं घेतो; आणि इहपर-लोकप्राप्तीची त्याची इच्छा कधीं कमी होत नाहीं. ३४ समुद्रही हार घेईल, व अग्नीला तीन कवड्यांइतकी देखील किंमत येणार नाहीं, इतका याचा अभिलाष प्रबल होऊन बसतो. ३५ याच्या इच्छेची धाव मनापुढें असते, व सर्व विश्वही याला फिरण्यास पुरेसें होत नाहीं. ३६ याप्रमाणें रजोगुण वाढून लक्षणें दिसूं लागतात, आणि अशा स्थितींत जर देहावसान झालें, ३७ तर दुसऱ्या देहांतही याच गुणांनीं युक्त होऊन मनुष्ययोनींत जन्म घेतो. ३८ एखादा भिकारी सर्व सुखासह जरी राजवाड्यांत बसला, तरी तो राजा होऊं शकेल का ? ३९ बैल जरी श्रीमान गृहस्थाच्या वऱ्हाडाबरोबर गेला, तरी त्याला कडबाच खावयास मिळतो. २४० म्हणून, ज्या व्यापारांत रात्रंदिवस विसावा नाहीं, त्याच्या पंक्तीला हा जाऊन बसतो. ४१ जो रजोवृत्तीच्या डोहांत बुडून मरतो, तो काम्य कर्म करणाराच्या घराण्यांतच जन्म घेतो. ४२ त्याप्रमाणे, पुढें रज व सत्वगुण यास नाहींतसे करून तमोगुणवृत्ति जास्त वाढते. ४३ त्या कालीं देहांत व बाह्यात्कारीं जीं चिन्हें दिसतात, तीं नीट लक्ष देऊन ऐक. ४४ तर मन हें अज्ञानानें इतकें भरून जातें कीं, जणूं काय चंद्र व सूर्य हे दोन्ही नसलेल्या अमावास्येच्या रात्रीचें आकाशच. ४५ त्याचप्रमाणे, अंतःकरण पूर्ण अज्ञानभरित होऊन, तेथें विचाराची गोष्टही निघत नाहीं. ४६ बुद्धि ही कठीणपणांत दगडालाही मागें सारते, आणि स्मृति देशोधडीस लागल्याप्रमाणें दिसते. ४७ त्याचे शरिरावर अंतर्बाह्य अविचार दृष्टीस पडतो, व त्याचे सर्व व्यापार मूर्खपणाचे असतात. ४८ त्याच्या इंद्रियांसमोर अनाचार उभा असतो, आणि मेला असतांही जो अनाचाराच्या क्रिया करतो. ४९ ज्याप्रमाणे घुबडास अंधाऱ्या रात्रींही स्वच्छ दिसतें, त्याप्रमाणें इतर लोकापेक्षां वाईट कर्में करण्यास त्याच्या मनाला फार हौस असते. २५० त्याचप्रमाणें, निषिद्ध कर्में करण्याची ह्याला फार हांव असून त्याचे इंद्रियाची धावही तिकडेच असते. ५१ हा मद्य न पिताच गुंगतो. सन्निपात न होतांच बरळूं लागतो, आणि प्रेमाशिवायच वेड्याप्रमाणें भुलतो. ५२ त्याचें चित्त तर

१२ घाप. १३ घालतो. १४ सिद्ध. १५ परिवारासह. १६ सुखासह. १७ कडबा. १८ विसावा. १९ दिवसा. २० पक्तीला. २१ काम्य कर्मे करणाराच्या. २२ मरतो. २३ चिन्हें, लक्षणें. २४ लक्ष देऊन. २५ अतःकरण. २६ अत्यत. २७ ज्ञान. २८ शून्य. २९ मोजीत नाहीं; मागें सारते. ३० मऊपणा. ३१ घुबडाचें. ३२ इंद्रियें.

तरी गेलें आहे । परि उन्मनी ते नोहे । ऐसें माल्हातिजे मोहें । मांजिरेनि ॥ ५३ ॥ किंबहुना ऐसैसीं । इये चिन्हें तम पोषी । जें वाढे आयितीसी । आपुलिया ॥ ५४ ॥ आणि हेंचि होय प्रसंगें । मरणाचें जरी पडे खेवों । तरि तेतुलेनि निगे । तमेंसी तो ॥ ५५ ॥ ( ७५०. तमोगुणात मेलेला पशुपक्ष्यादिकांच्या जन्माला येतो, २५६–२६० ) राई राईपण बीजीं । सांठवूनियां अंग त्यजी । मग विरूढे तैं दुजी । गोठी आहे ॥ ५६ ॥ पैं होऊनि दीपकलिका । येरु आगी विझो कां । कां जेथ लागे तेथ असका । तोचि आहे ॥ ५७ ॥ म्हणोनि तमाचिये लोथें । बांधोनियां संकल्पातें । देह जाय तैं मागौतें । तमाचेंचि होय ॥ ५८ ॥ आतां काय येणें बहुं । जो तमोवृद्धि मृत्यु लाहे । तो पशु कां पक्षी होये । झाड कां कृमी ॥ ५९ ॥

कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम् ।
रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥

अन्वयः—सुकृतस्य कर्मणः फलं सात्त्विकं निर्मलं, रजसः फलं तु दुःखं ( च ) तमसः फलं अज्ञानं आहुः ॥ १६ ॥

येणेंचि पैं कारणें । जें निपजे सत्त्वगुणें । तें सुकृत ऐसें म्हणे । श्रौतसमो ॥ २६० ॥ ( ७५१. सत्त्वगुणाचें फल, २६१–२६२ ) म्हणोनि तया निर्मळा । सुखज्ञानी सरळा । अपूर्व ये फळा । सात्विक तें ॥ ६१ ॥ मग राजसा जिया क्रिया । तया इंद्रावणी फळलिया । जे सुखें चितारूनियां । फळती दुःखें ॥ ६२ ॥ ( ७५२. रजोगुणाचें फल, २६३–२६४ ) कां निंबोळियेचें पिक । वरि गोड आंत विख । तैसें तें राजस देख । क्रियाफळ ॥ ६३ ॥ तामस कर्म जितुकें । अज्ञान-फळेंचि पिके । विषांकुर विखें । जियापरी ॥ ६४ ॥

सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।
प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥

अन्वयः—सत्त्वात् ज्ञानं संजायते; रजसः लोभः एव ( संजायते ); च तमसः प्रमादमोहौ भवतः च अज्ञानं एव ( भवति ) ॥ १७ ॥

( ७५३. तमोगुणाचें फल, २६५ ) म्हणौनि वारे अर्जुना । येथ सत्त्वचि हेतु ज्ञाना । जैसा कां दिनमाना । सूर्यु हा पैं ॥ ६५ ॥ ( ७५४. सत्त्वगुणापासून ज्ञान, २६६ ) आणि तैसेंचि हें जाण । लोभासि रज कारण । आपुलें विस्मरण । अद्वैता जेवीं ॥ ६६ ॥ ( ७५५. रजोगुणापासून लोभ, २६७ ) मोह अज्ञान प्रमादा । यया मैळेया दोषवृंदा । पुढती पुढती प्रवुद्धा । तमचि मूळ ॥ ६७ ॥ ( ७५६. तमोगुणापासून अज्ञान, प्रमाद, मोह, २६८ ) ऐसे विचाराच्या डोळां । तिन्ही गुण वेगळवेगळां । दाविले जैसा आंवळा । तळहातींचा ॥ ६८ ॥ ( ७५७. रजतम

ताळ्यावर नसतेंच, परंतु तो कांहीं समाधि नव्हे. याप्रमाणे तो मोहानें उन्मत्त झालेला असतो. ५३ किंबहुना, आपल्या सर्व सामुग्रीसह तमोगुण वाढला म्हणजे अशीं चिन्हें दिसूं लागतात ५४ आणि अशाच वेळीं मरण आलें तर दुसऱ्या जन्मींही तो तमोगुणातच जन्म घेतो. ५५ मोहरी पेरल्यावर आपले रूप सोडून ज्या वेळेस तिचे झाड होते, त्या वेळेसही तिला जीं फळे येतात तीं मोहरीशिवाय दुसरीं कोठून येणार ? ५६ त्याचप्रमाणें, दिव्याच्या स्वरूपात गेल्यावर अग्नि जरी विझला तरी तो ज्या ज्या ठिकाणीं लागेल त्या ठिकाणीं सर्व आपल्यासारखेच करील; ५७ म्हणून आपल्या संकल्पांत तमाचें गाठोडें बाधून देह ठेवल्यावर पुनः जन्म घेणें तो तमोगुणातच घेतो. ५८ फार काय सागावें ? तमोगुण वाढला असतां जो मृत्यु पावतो, तो पुनः पशु किंवा पक्षी अथवा झाड किंवा किडे यांचा जन्म पावतो. ५९

श्लोकार्थः—पुण्यकर्माचें फल सात्त्विक आणि निर्मल, रजोगुणाचें फल दुःख, आणि तमोगुणाचें फल अज्ञान हें आहे, असें म्हणतात ॥ १६ ॥

याच कारणास्तव, सत्त्वगुणापासून जें उत्पन्न होतें, ते 'सुकृत' होय, असें श्रुतींत म्हटलें आहे. २६० म्हणून, सत्त्वगुणापासून सहज सुख व ज्ञान अपूर्व फलास येतें; यास्तव त्याला सात्त्विक (सत्कर्म) फल असें म्हणतात. ६१ आता, रजोगुणापासून ज्या क्रिया उत्पन्न होतात, त्या कडू वृंदावनाप्रमाणें दिसण्यांत सुरेख असून अंतर्यामीं दुःखकारक असतात. ६२ अथवा, निंबोळ्या ज्याप्रमाणे वरून दिसण्यांत पिवळ्या धमधमीत असून आत विषाप्रमाणें कडू असतात, त्याप्रमाणें रजोगुणापासून होणारीं फळें आहेत. ६३ ज्याप्रमाणे विषाचा कांदा लावला असतां त्याला विषाचाच अंकुर फुटतो, त्याप्रमाणें तमोगुणापासून होणाऱ्या क्रिया अज्ञानमयच असतात. ६४

श्लोकार्थः—सत्त्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होतें, रजोगुणापासून लोभ उत्पन्न होतो, आणि तमोगुणापासून प्रमाद, मोह आणि अज्ञान हीं उत्पन्न होतात ॥ १७ ॥

म्हणून बाबा अर्जुना, ज्याप्रमाणें दिवसाला सूर्य कारण आहे, त्याप्रमाणें ज्ञानास सत्त्वगुण कारण आहे; ६५ आणि ज्याप्रमाणें अद्वैत होण्याला आपलें स्वतःचें विस्मरण व्हावें लागतें, त्याप्रमाणें लोभ उत्पन्न होण्यास रजोगुण कारण होतो. ६६ हे ज्ञानवंता, मोह, अज्ञान व प्रमाद या त्रिदोषसमुदायाला तमोगुणच कारण आहे. ६७ ज्याप्रमाणें तळहातावर आवळा घेऊन तो एखादे मनुष्यास प्रत्यक्ष दाखवावा, त्याप्रमाणें विचारवंत मनुष्यास विचार करण्याकरितां तिन्ही गुण वेगवेगळाले स्पष्ट करून सांगितले. ६८ तेव्हां रज व तम हे दोन्ही गुण म्हणजे नरकाचीं मोठीं साधनें मानलीं आहेत;

१ पाचवी अवस्था जी समाधि ती. २ स्वाधीन होतो. ३ उन्मत्तपणानें. ४ सामुग्रीसह. ५ खळगा; बोलावणें. ६ वाढे. ७ सर्व. ८ गाठोडें. ९ फार बोलण्यानें. १० श्रुतिसमुदाय. ११ सहज. १२ कडू वृंदावन. १३ दाखवून; रंगवून.

टाकून सत्त्वाविषयीं बुद्धि निश्चित करावी, २६९-२७१ ) तंव रजतमें दोन्हीं। देखिलीं प्रौढपतनीं। सत्त्वावांचूनि नाणी। ज्ञानाकडे ॥ ६९ ॥ म्हणौनि सात्त्विकवृत्ती। एक जाले जन्मव्रती। सर्वत्यागें चतुर्थी। भक्ति जैसी ॥ ७० ॥

ऊर्ध्वं गच्छंति सत्त्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः।
जघन्यगुणवृत्तस्था अधो गच्छंति तामसाः ॥ १८ ॥

अन्वयः—सत्त्वस्थाः ऊर्ध्वं गच्छन्ति, राजसाः मध्ये तिष्ठन्ति, जघन्यगुणवृत्तस्थाः तामसाः अधः गच्छन्ति ॥ १८ ॥

तैसें सत्त्वाचेनि नटेनाचें। असणें जाणें जयांचें। ते तनुत्यागीं स्वर्गींचे। राय होती ॥ ७१ ॥ ( ७५८. सत्त्वगुणी देवलोकीं जातो, २७२ ) इयाचिपरी रजें। जिहीं कां जीजे मरिजे। तिहीं मनुष्य होइजे। मृत्युलोकीं ॥ ७२ ॥ ( ७५९. रजोगुणी मनुष्यलोकीं येतो, २७३–२७४ ) तेथ सुखदुःखाचें खिचटें। जेविजे एकेचि ताटें। जेथ इये मरणवाटे। पडिलें तुटी ॥ ७३ ॥ आणि तयाचि स्थिति तमीं। जे वाढोनि निमती भोगक्षमीं। ते घेती नरकभूमी। मूळपत्र ॥ ७४ ॥ ( ७६०. तमोगुणी नरकांत पडतो, २७५–२७६ ) एवं वस्तूचियाँ सत्ता। त्रिगुणासी पंडुसुता। दाविली सकारणता। आघवीचि ॥ ७५ ॥ प्रकरणाचा उपसंहारः— पैं वस्तु वस्तुत्वें असिकें। तें आपणपें गुणासारिखें। देखोनि कार्यविशेखें। अनुकरे गा ॥ ७६ ॥ ( ७६१. आत्मा गुणांत सांपडल्यामुळें गुणासारखेच आपण आहों असें मानतो, २७७–२७९ ) जैसें कां स्वप्नींचेनि राजें। जें परचक्र देखिजे। तें हारि जैत होइजे। आपणपांचि ॥ ७७ ॥ तैसें मध्योर्ध्व अध। जे हे गुणवृत्तिभेद। ते दृष्टीवांचूनि शुद्ध। वस्तुचि असे ॥ ७८ ॥

नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टाऽनुपश्यति।
गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥

अन्वयः—यदा द्रष्टा गुणेभ्यः अन्यं कर्तारं न अनुपश्यति, च गुणेभ्यः परं ( मा ) वेत्ति, तदा सः मद्भावं अधिगच्छति ॥ १९ ॥

परि हे वांहणी असो। तरि तुज आन न दिसो। परिसें तें सांगतसों। मागील गोठी ॥ ७९ ॥ ( ७६२. देहरूपानें गुणच वर्तन करताल हें जो जाणतो त्याचा संसार मोक्षरूप होतो, २८०–२८६ ) तरि ऐसें जाणिजे। सामर्थ्यें तिन्ही सहजें। होती देहँव्याजें। गुणचि हे ॥ २८० ॥ इंधनाचेनि आकारें। अग्नि जैसा अवतरे। कां आघवेनि तरुवरें। भूमिरसु ॥ ८१ ॥ ना ना दहियाचेनि मिसें। परिणमे दूधचि जैसें। कां मूर्त होय उसें। गोडी जेवीं ॥ ८२ ॥ तैसें हे सांतःकरण। देहचि होती त्रिगुण। म्हणोनि बंधासि कारण। घडे कीर ॥ ८३ ॥ परि चोज हें धनुर्धरा। जे एवढा हा गुंफिरो। मोक्षाचा संसारों। उणा नोहे ॥ ८४ ॥

आणि ज्ञानाची प्राप्ति सत्त्वावांचून व्हावयाची नाहीं, ६९ म्हणून ज्याप्रमाणें इतर भक्तींचा त्याग करून ज्ञानी चौथ्या भक्तीचा स्वीकार करतात, कोणी आजन्म सात्त्विक वृत्ति धारण करतात. २७०

श्लोकार्थः—जे सत्त्वगुणी आहेत, ते देवयोनीला पावतात, जे रजोगुणी आहेत, ते मनुष्ययोनीला पावतात, आणि कनिष्ठ गुणामध्यें असणारे जे तामस, ते पश्वादि योनीला पावतात ॥१८॥

अशा प्रकारें जे सात्त्विक वृत्तीचें नेहमीं आचरण करितात, ते देह ठेवल्यावर स्वर्गांत वास करतात. ७१ त्याचप्रमाणें, जे राजस वृत्तीचें आचरण करीत असतां देहत्याग करतात, ते मृत्युलोकीं मनुष्ययोनींत जन्म घेतात. ७२ त्या मृत्युलोकांत सुख व दुःख यांची खिचडी एकाच ताटांत खावी लागते; (एकाच देहास सुखदुःख भोगावें लागतें;) व तेथें कांहीं केल्यानें मृत्यु टळत नाहीं; ७३ आणि त्याचप्रमाणें तमोगुणाचें जे आचरण करतात, ते देहातीं नरकभूमींत जाण्याची सनद मिळवितात. ७४ अर्जुना, याप्रमाणें वस्तूच्या सत्तेनें वाढणारे तिन्ही गुण त्यांच्या लक्षणांसह तुला स्पष्ट सांगितले. ७५ परंतु वस्तूच्या स्वरूपांत बदल न होतां, ती गुणांच्या उपाधीनें आपणच गुणलक्षणांप्रमाणें कार्य करते. ७६ आपण राजे झालों आहों, व आपल्यावर परचक्र आलें आहे, असें स्वप्नांत पाहणारा मनुष्य ज्याप्रमाणे आपला जय व अपजय आपणच होतो, ७७ त्याप्रमाणें, स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे गुणाच्या वृत्तींचे भेद आहेत; गुणदृष्टि बाजूस ठेवून पाहिलें असतां ते शुद्ध वस्तुच होत. ७८

*श्लोकार्थः—जेव्हा जीव हा गुणाहून कर्ता निराळा नाहीं असें पाहतो, आणि आपण गुणाच्या पलीकडे आहें असें समजतो, तेव्हा तो माझ्या स्वरूपाला पावतो ॥ १९ ॥*

पण हें बोलणें आतां बाजूस ठेवूं. मात्र तूं एवढे लक्षांत ठेव कीं, वस्तूवांचून दुसरें कांहीं नाहीं. आतां तुला मागील गोष्ट सागतों, ती ऐक. ७९ तर तूं असें पक्कें समज कीं, वस्तूच्या सामर्थ्यानें हे तिन्ही गुण सहज देहाच्या निमित्तानें उत्पन्न होतात. २८० लांकडें पेटल्यावर जसा अग्नि त्याच्या आकारासारखा दिसतो; किंवा भूमि व पाणी यांचा आकार जसा झाडांत दृष्टीस पडतो; (कारण झाडात भूमि व उदक हींच दोन तत्त्वें आहेत.) ८१ अथवा दूध विरजलें असतां जसें दह्याच्या आकारानें दिसतें; किंवा उंसाच्या आकारानें गोडी व्यक्त होते, ८२ त्याप्रमाणें अंतःकरणासह सूक्ष्म देहच हे तिन्ही गुण बनतो; म्हणून त्यांच्या सपाट्यांत तो सांपडतो. ८३ परंतु अर्जुना, हें केवढें आश्चर्य आहे कीं, सूक्ष्म देहाची व गुणांची ही एवढी गुंतागुंत झाली असतांही (ज्ञान्यांना) मोक्षाचा व्यवहार कमी पडत नाहीं. ८४ तिन्ही गुण आपापल्या धर्माप्रमाणें देहास जन्म व मृत्यु

१ आजन्म मताचरण करणारे. २ प्रभावानें. ३ आचरण करीत असता. ४ खिचडी. ५ भरतात. ६ देहीं. ७ ब्रह्माच्या. ८ संपूर्ण. ९ बोलणें. १० देहाच्या निमित्तानें. ११ साकार दिसे. १२ पाणी. १३ व्यक्त. १४ सूक्ष्म देह. १५ गुंतागुंत. १६ व्यवहार.

त्रिगुण आपलालेनि धर्मे । देहींचें मायुतें सोउमें । चाळितांही न खोमे । गुणातीतता ॥ ८५ ॥ ऐसी मुक्ति असे सहज । ते आतां परिसऊं तुज । जे तूं ज्ञानांबुज- । द्विरेफु कीं ॥ ८६ ॥ ( ७६३. गुणाच्या पलीकडील तत्त्व जो जाणतो, तो मत्स्वरूप होतो, २८७–२९९ ) आणि गुणीं गुणाजोगें । चैतन्य नोहे मार्गे । बोलिलों तें खोगें । तेवींचि हें ॥ ८७ ॥ तरि पार्था जैं ऐसें । बोधलेनि जीवें दिसे । स्वप्न कां जैसें । चेइलेनि ॥ ८८ ॥ नातरी आपण जळीं । बिंबलो तीरोनि कळी । चलन होतां कल्लोळीं । अनेकधा ॥ ८९ ॥ का नटलेनि लांघवें । नटु जैसा न झकवे । तैसें गुणजात देखावें । न होनियां ॥ २९० ॥ पैं ऋतुत्रय आकाशें । धरूनियांही जैसें । नेदिजेचि येवों वैसे । वेगळेपणा ॥ ९१ ॥ तैसें गुणीं गुणापरौतें । जें आपणपें असे आयितें । तिये अहं वैसे अहंते । मूळकेंचिये ॥ ९२ ॥ पैं तेथूनि मग पाहतां । म्हणे साक्षी मी अकर्ता । हे गुणचि क्रियाजातां । नियोजिते ॥ ९३ ॥ सत्त्वरजतमाच्या । भेदीं प्रसरु कर्मांचा । होत असे तो गुणांचा । विकारु हा ॥ ९४ ॥ यमामाजि मी ऐसा । वनीं कां वसंतु जैसा । वनलक्ष्मीविलासा । हेतुभूत ॥ ९५ ॥ कां तारांगणीं लोपावें । सूर्यकांतीं उद्दीपावें । कमळीं विकासावें । जावें तमें ॥ ९६ ॥ यया कोणाचीं काजें कहीं । सविता जैसा नाहीं । तैसा अकर्ता मी देहीं । सत्तारूप ॥ ९७ ॥ मी दाऊनि गुण देखे । गुणता हे मियां पोखे ।ययाचेनि निःशेषें । उरे तें मी ॥ ९८ ॥ ऐसेनि विवेकें जया । उदयो होय धनंजया । ये गुणातीतता तया । अर्थपंथें ॥ ९९ ॥

गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।
जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥

अन्वयः—देही एतान् देहसमुद्भवान् त्रीन् गुणान् अतीत्य, जन्ममृत्युजरादुःखैः विमुक्तः ( सन् ) अमृतं अश्नुते ॥ २० ॥

( ७६४. आत्मा गुणातीत आहे असा विवेक ज्याला होतो त्याला गुणातीतता प्राप्त होते, ३००-३१२ ) आतां निर्गुण असे आणिक । तें तो जाणे अचुक । जे ज्ञानें केलें टीक । तयाचिवरी ॥ ३०० ॥ किंबहुना पंडुसुता । ऐसी तो माझी सत्ता । पावे जैसी सरिता । सिंधुत्व गा ॥ १ ॥ नाळिकेवरूनि उठिला । जैसा शुक शाखे बैसला । तैसा मूळअहंतें ठाकिला । तो मी म्हणौनि ॥ २ ॥ अगा अज्ञानाचिया निदें । जो घोरत होता बदबदा । तो स्वस्वरूपीं प्रबुद्धा । चेइला कीं ॥ ३ ॥ पैं बुद्धिभेदाचा आरिसा । तया हातोनि पडिला वीरेशा । म्हणौनि

१ जन्ममृत्यु. २ उणीव होत नाहीं. ३ ज्ञानरूप कमळावरचा. ४ भ्रमर. ५ तत्त्व. ६ कौशल्यानें. ७ कर्मीपणा. ८ मूळ स्वरूपाविषयीं. ९ नियमन करणारे. १० शोभेला. ११ सूर्यकांत मण्यानें. १२ अग्नि उत्पन्न करावा. १३ बाढते. १४ नाहींसें होण्यानें. १५ अर्थात्. १६ स्थिति. १७ मद्रूपता. १८ अहंब्रह्म. १९ निद्रेनें.

यांच्या सपाट्यांत गुंतवितात, तथापि गुणातीततेची उणीव नसते. ८५ अशा प्रकारें मुक्ति कशी सहज आहे तें आतां तुला सांगतों; तूं ज्ञानकमलावरचा जणूं भ्रमरच आहेस. ८६ आणि चैतन्य गुणांप्रमाणें न होतां त्यांपासून अलिप्त असतें असें जें तत्त्व तुला मागें (तेराव्या अध्यायांत) सांगितलें आहे, तेंच हें होय. ८७ तर पार्था, ज्ञानाचा बोध झाल्यावर गुणापासून चैतन्य वेगळें आहे असें दिसतें. जागृत झाल्यावर जसें स्वप्न, ८८ किंवा नदीच्या कांठीं उभा राहिलेला मनुष्य आपलें प्रतिबिंब जसें पाण्यात पहातो, व पाणी हालविल्यावर तेंच प्रतिबिंब जसें पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतें; ८९ किंवा नटानें वेष घेतल्यावर ज्याप्रमाणें तो त्याच्या गुणांनीं फसत नाहीं (आपण मूळ कोण आहों हें विसरत नाहीं,) त्याप्रमाणें, स्वस्वरूपीं सत्यबुद्धि कायम ठेवून गुण नुसते पहावे. २९० ज्याप्रमाणें आकाशावर तिन्ही ऋतु होतात व जातात, परंतु त्यांजपासून तें अलिप्त असतें, ९१ त्याप्रमाणें गुणांत वागत असूनही गुणातीत होऊन जो आत्मस्वरूपीं रत असतो, त्याचा मूळ स्वरूपाविषयीं अहंकार कायम असतो. ९२ मग त्या ठिकाणाहून पाहूं लागला असतां म्हणतो कीं, मी कर्मकर्ता नसून फक्त साक्षिभूत आहें, आणि सर्व क्रिया गुणांपासून होतात. ९३ सत्त्व, रज व तम या गुणापासून निरनिराळीं कर्में जीं होतात, तीं आपण न करितां त्याला गुणच कारण आहेत. ९४ वनशोभेला जसा वसंत ऋतु कारण असतो, परंतु तो अलिप्त असतो, तसा मी सर्व क्रिया करीत असूनही अलिप्त आहें. ९५ अथवा, नक्षत्रांचा लोप व्हावा, सूर्यकांत मण्यानें अग्नि उत्पन्न करावा, कमळानें विकसित व्हावें, व तमाचा नाश व्हावा, ९६ (या सर्व गोष्टी एका सूर्योदयापासून होतात,) परंतु सूर्य त्यांकडे पहात नाहीं; त्याप्रमाणें, माझ्याच सत्तेनें कर्में होत असूनही मी या देहात अकर्ता आहें. ९७ मीं दाखविल्यानें गुण दृष्टीस पडतात, माझ्याच सत्तेनें गुण वाढतात, व ते नाहींतसे झाल्यावर जें बाकी राहतें, तेंही मीच होय. ९८ धनंजया, याप्रमाणें, ज्याच्या हृदयांत ज्ञानाचा उदय झाला आहे, तो अर्थात गुणातीत होय. ९९

श्लोकार्थः—जीव हा देहापासून उत्पन्न झालेल्या तीन गुणांचा अतिक्रम करून, जन्म, मृत्यु व वार्धक्य या दुःखापासून मुक्त होऊन मोक्षाप्रत प्राप्त होतो ॥ २० ॥

मग तो निर्गुण असें ब्रह्म अचूकपणें जाणतो. कारण गुणातीतत्वानें त्याला टिळा केलेला असतो. ३०० किंबहुना अर्जुना, नदी ज्याप्रमाणें समुद्रत्व पावते, त्याप्रमाणें तो माझीच सत्ता पावतो. १ ज्याप्रमाणें नालिकेवरून उडून झाडाच्या दुसऱ्या फांदीवर बसल्यावर राघू भ्रांतिरहित होतो, त्याप्रमाणें जो गुणातीत झाला, तो गुणाच्या [illegible]-त्यांत न सांपडतां अहं ब्रह्म असें जाणतो. २ हे ज्ञानवंता, जो अज्ञानरूप निद्रेत मोठ्यानें घोरत पडलेला असतो, तो स्वस्वरूपीं मिळाल्यावर जागा होतो. ३ हे अर्जुना, त्याच्या हातून बुद्धिभेदरूपी आरसा खालीं पडल्यामुळें त्यात दिसणाऱ्या [illegible] रूपी प्रतिबिंबापासून तो मुक्त होतो. ४ मग हे वीरा, देहाभिमानरूपी [illegible]

प्रतिमुखाभासा मुकला तो ॥ ४ ॥ देहाभिमानाचा वारा । आता वाजों ठेला वीरा । तैं ऐक्य वीचिसागरां । जीवेशां हें ॥ ५ ॥ म्हणौनि मद्भावेंसी । प्राप्ति पाविजे तेणें सरिसी । वर्षांतीं आकाशीं । घनजात जेवीं ॥ ६ ॥ तेविं मी होऊनि निरुता । मग देहींचि इये असतां । नागवे देहसंभूतां । गुणांसि तो ॥ ७ ॥ जैसा भिंगाचेनि घरें । दीपप्रकाशु नावरे । कां न विझेचि सागरें । वडवानळु ॥ ८ ॥ तैसा आला गेला गुणाचा । बोधु न मैळे तयाचा । तो देहीं जैसा व्योमींचा । चंद्र जळीं ॥ ९ ॥ तिन्ही गुण आपुलालिये प्रौढी । देहीं नाचविती वागडी । तो पाहोंही न धाडी । अहंतेतें ॥ ३१० ॥ हा ठायवरी । नेहॅटोनि ठेला अंतरीं । आतां काय वर्ते शरीरीं । हेंही नेणे ॥ ११ ॥ सांडूनि आंगींची खोळी । सर्प रिगालिया पाताळीं । ते त्वचा कोण सांभाळी । तैसें जालें ॥ १२ ॥ ( ७६५. गुणातीताला देहधर्माची बाधा होत नाहीं; तो मोक्षरूप अमृताचा भोग घेतो, ३१३-३१९ ) कां सौरभ्यजीर्णु[1] जैसा । आमोदु[2] मिळोनि जाय आकाशा । माघारा कमळकोशा । नयेचि तो ॥ १३ ॥ पैं स्वरूपसमरसें । ऐक्य गा जालें तैसें । तेथ किंधर्म हें कैसें । नेणे देह ॥ १४ ॥ म्हणौनि जन्मजरामरण । इत्यादि जे साही गुण । ते देहींचि ठेले कारण । नाहीं तया ॥ १५ ॥ घटाचिया खापरिया । घटभंगीं फेडिलिया । महदाकाश आपैसया । जालेंचि असे ॥ १६ ॥ तैसी देहबुद्धि जाये । जैं आपणपां आठवू होये । तैं आन कांहीं आहे । तेंवाचुनी ॥ १७ ॥ येणें थोर बोधलेपणें । तयासि गा देहीं असणें । म्हणूनि तो मी म्हणें । गुणातीत ॥ १८ ॥ अर्जुन उवाचः— यया देवाचिया बोला । पार्थु अतिसुखावला । मेघें संबोखिला । मोरु जैसा ॥ १९ ॥

कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।
किमाचारः कथं चैतांस्त्रीन् गुणानतिवर्तते ॥ २१ ॥

अन्वयः—प्रभो, एतान् त्रीन् गुणान् अतीतः ( जीवः ) कैः लिंगैः ( ज्ञातः ) भवति ? किम् आचारः ? ( सः ) एतान् त्रीन् गुणान् कथं अतिवर्तते ? ॥ २१ ॥

( ७६६. गुणातीत कसा ओळखावा असा अर्जुनाचा प्रश्न, ३२०-३२२ ) तेणें तोषें वीर पुसे । जी कोण्ही चिन्हीं तो दिसे । जयामाजी वसे । ऐसा बोधु ॥ ३२० ॥ तो निर्गुण काय आचरे । कैसेनि गुण निस्तरे । हें सांगिजो माहेरें । कृपेचेनि ॥ २१ ॥ यया अर्जुनाचिया प्रश्ना । तो षड्गुणांचा राणा । परिहारु[9] आकर्णा । बोलतु असे ॥ २२ ॥ श्रीभगवानुवाचः—( ७६७. गुणातीताचीं लक्षणें, ३२३-३२७ ) म्हणे पार्था तुझी नवाई । हें येतुलेंचि पुससी काई । तें नामाचि तया पाहीं । सत्य लटिकें ॥ २३ ॥ गुणातीत जया नांवें । तो गुणाधीन तरी

---

१ लाटा व समुद्र यास. २ शुद्ध ज्ञान. ३ आकाशांतील. ४ निश्चयानें. ५ कात. ६ कमलाच्या कळीचें सौंदर्य जीर्ण झाल्यावर म्हणजे कमलाची कळी उमलल्यावर. ७ सुगंध. ८ समाधान पावला. ९ निवारण करतो. १० उत्तर. ११ ऐका.

होऊन, त्याच्यावरील जीव व ईश एतद्रूपी लाटा आत्मस्वरूप—सागरांत मिळतात. ५ म्हणून असें होण्याबरोबर ते मद्रूप होतात. ज्याप्रमाणें वर्षाकाळाचे अखेरीस आकाशांत उत्पन्न होणारे ढग आकाशांतच लय पावतात, ( पर्जन्यवृष्टि करीत नाहींत ), ६ त्याप्रमाणें, मद्रूप झाल्यावर, तो जरी देहांत असला तरी गुणांनीं लिप्त होत नाहीं. ७ ज्याप्रमाणें दिवा भिंगाच्या घरांत ठेवला म्हणजे त्याचा उजेड आवरत नाहीं, अथवा वडवानल हा समुद्राच्या पाण्यानेंही विझत नाहीं, ८ त्याप्रमाणें गुणांच्या येण्याजाण्यानें त्याचें शुद्ध ज्ञान मलिन होत नाहीं, आणि आकाशांतील चंद्राचें पाण्यांत प्रतिबिंब पडलें, तरी तो जसा पाण्यापासून वेगळा असतो, त्याप्रमाणें तो देहांत असूनही गुणांनीं बद्ध होत नाहीं. ९ तिन्ही गुण त्याच्या देहांत जरी वास करीत असले, तरी त्याकडे तो ढुंकूनही पहात नाहीं. ३१० याप्रमाणें तो अंतर्यामीं निश्चळ असतो; इतका कीं, शरीराचे धर्मही तो जाणत नाहीं. ११ साप आपली कात टाकून ज्या वेळेस पाताळलोकीं जाण्यास निघतो, त्या वेळेस जसें आपल्या कातीचें काय होईल इकडे लक्ष देत नाहीं, तसे ज्ञानी आपल्या शरीराविषयीं निष्काळजी असतात. १२ अथवा, कमळ उमलल्यावर त्याचा सुवास आकाशांत निघून गेल्यावर ज्याप्रमाणें माघारा कमलकोशांत येत नाहीं, १३ त्याप्रमाणें, आत्मस्वरूपांत ऐक्य झाल्यावर मग हा पुरुष त्या ठिकाणीं धर्माचरण वगैरे कांहीं जाणत नाहीं; १४ म्हणून जन्म, जरा, मरण इत्यादि जे सहा गुण, त्यांचा संबंध देहाच्या ठिकाणीं असतो, ज्ञान्याच्या ठिकाणीं नसतो. १५ घट फुटून त्याच्या ठिकऱ्या झाल्या म्हणजे त्यांतील आकाश ( घटाकाश ) जसें सहज महदाकाशांत मिळतें, १६ तशी देहबुद्धि नाहींशी झाल्यावर जेव्हां आत्मस्वरूपाची ओळख होते, तेव्हां अशा स्थितींत आत्मस्वरूपाशिवाय दुसऱ्या कशाची आठवण होणार ! १७ याप्रमाणें ज्याच्या अंतःकरणांत बोध झाला आहे, तो जरी देहधारी असला, तरी तो गुणातीत आहे असें मी म्हणतों. १८ मेघाची गर्जना ऐकून जसा मोराला संतोष होतो, तसा या श्रीकृष्णांच्या भाषणानें पार्थास फार संतोष वाटला. १९

*श्लोकार्थः—अर्जुन म्हणाला, हे प्रभो, या तिन्ही गुणांना मागें टाकून पलीकडे गेलेला जीव कोणत्या चिन्हांनीं ओळखावा ? त्याचा आचार कसा असतो ? आणि तो तीन गुणांना कसा ओलांडून जातो ? ॥ २१ ॥*

अशा हर्षयुक्त अंतःकरणानें तो वीर अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, " ज्याच्या अंतःकरणांत असा बोध झाला आहे, त्याचीं लक्षणें काय असतात ? ३२० तो गुणातीत कशा रीतीनें वागतो ? व गुणाचें निवारण कसें करतो ? देवा, आपण कृपेचें माहेरघर आहां, तेव्हां हें सर्व मला स्पष्ट करून सांगा. " २१ या अर्जुनाच्या प्रश्नास षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीकृष्ण परमात्मा काय उत्तर देतात तें ऐका. २२ ते म्हणतातः—पार्था, हाच का तुझा प्रश्न आहे ? कारण, गुणातीत हें नांव उच्चारण्याबरोबरच त्याचें आचरण काय हा प्रश्न संभवत नाहीं, २३ ज्याला गुणातीत म्हणतात, तो गुणाधीन खास नसतो; अथवा

नव्हे । ना होय तरी नागवे । गुणा यया ॥ २४ ॥ परि अधीन का नागवे हेंचि कैसेनि जाणावें । गुणांचियें खरवे- । माजी असतां ॥ २५ ॥ हा संदेह जरी वाहसी । तरि सुख पुसों लाहसी । परिस आता तयासी । रूप करूं ॥ २६ ॥

प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।
न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥

अन्वयः—पाडव, (यः) प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहं एव च संप्रवृत्तानि न द्वेष्टि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥

तरी रजाचेनि माजें । देहीं कर्माचें आणोजें । प्रवृत्ति जैं घेइजे । वेंटाळीं ॥ २७ ॥ ( ७६८. जो पुरुष गुणांची वृद्धि झाली असता त्यांचा रागद्वेष करीत नाहीं, ३२८-३४३ ) तैं मीचि का कर्मठ । ऐसा नये श्रीमाठें । कां दरिद्रलिये बुद्धी वीट । तोही नाहीं ॥ २८ ॥ अथवा सत्त्वेंचि अधिकें । जैं सर्वेंद्रियीं ज्ञान फाके । तैं सुविद्यतातोखें । उंभेजेही ना ॥ २९ ॥ कां वाढिन्नलेनि तमें । न गिळिजेचि मोहभ्रमें । तैं अज्ञानत्वें व श्रमे । घेणेंही नाहीं ॥ ३३० ॥ पैं मोहाच्या अवसरीं । ज्ञानाची चाड न धरी । ज्ञानें कर्में नादरी । होतां न दुःखी ॥ ३१ ॥ सायंप्रातर्मध्यान्हा । या तिहीं काळांची गणना । नाहीं जेवीं तेपना । तैसा असे ॥ ३२ ॥ तया वेगळाचि काय प्रकाशें । ज्ञानित्व यावें असे । कायि जळार्णवें । साजा होय ॥ ३३ ॥ ना प्रवर्तलेनि कर्में । कर्मठत्व तया का गमे । सागें हिमवंतु हिमें । कांपे कायि ॥ ३४ ॥ नातरि मोह आलिया । काइ पा ज्ञाना मुकिजेल तया । हो मा आगीतें उन्हाळेया । जाळवत असे ॥ ३५ ॥

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।
गुणा वर्तंत इत्येव योऽवतिष्ठति नेंगते ॥ २३ ॥

अन्वयः—उदासीनवत् आसीनः यः गुणैः न विचाल्यते; यः गुणाः वर्तन्त इति (मत्वा) एव अवतिष्ठति, न इङ्गते, ॥ २३ ॥

तैसें गुणागुणकार्य हें । आघवेंचि आपण आहे । म्हणौनि एकेका नोहे । तेंडातोडी ॥ ३६ ॥ येवढेया गा प्रतीती । तो देहा आलासे वस्ती । वाटे जातां गुंती- । माजी जैसा ॥ ३७ ॥ तो जिणेता ना हारवी । तैसा गुण नव्हे ना करवी । जैसी कां श्रोणेंवी । संग्रामींची ॥ ३८ ॥ कां शरीराआतील प्राणु । घरीं आतिथ्याचा ब्राह्मणु । नाना चोहटाचा स्थाणु । उदासु जैसा ॥ ३९ ॥ आणि गुणाचा यावाजावा । ढळे चळेना पांडवा । मृगजळाचा हेलावा । मेरु जैसा ॥ ३४० ॥ हें बहुत कायि बोलिजे । व्योम वारेंनि न वाचिजे । कां सूर्य ना गिळिजे । अंध-

१ अंकुर. २ अभिमान. ३ अति विद्वान-अशा संतोषानें. ४ गढून जात नाहीं. ५ सूर्याला. ६ समुद्र. ७ ताजा. ८ करीत असतांना. ९ असूं दे. १० सुखदुःख. ११ मुक्काम करतो. १२ जय पावणारा. १३ अपजय पावणारा. १४ निशाण. १५ खांब; जागा.

गुणांत राहटत असला तरी गुणाच्या सपाट्यात सांपडत नाहीं. २४ पण त्याचा गुणाशीं संबंध असून तो गुणाच्या अधीन आहे किंवा नाहीं हें कसें जाणावें, २५ हीच जर तुझ्या मनात शंका असेल, तर खुशाल विचार. त्याचीं लक्षणें सांगतों, ऐक. २६

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणाले, अर्जुना, जो ज्ञान, कर्मप्रवृत्ति आणि अज्ञान हीं प्राप्त झालीं असता द्वेष करीत नाहीं, व नष्ट झालीं असता त्याची इच्छा करीत नाहीं, ॥ २२ ॥

तर, जरी रजोगुणाचा जोर होऊन देहांत कर्माचे अंकुर फुटून तो प्रवृत्तिमार्गात गढून गेला, २७ तरी मीच कर्म करणारा आहे, असा अभिमान ज्याला उत्पन्न होत नाहीं; अथवा कर्म नाहींसें झाल्यावर त्याच्या बुद्धीस वाईटही वाटत नाहीं; २८ किंवा सत्त्वगुण वाढल्यावर ज्या वेळेस सर्व इंद्रियात ज्ञान फाकतें, त्या वेळेस, माझ्यासारखा दुसरा कोणी विद्वान नाहीं, अशा संतोषात जो गढून जात नाहीं; २९ अथवा तमोगुण वाढल्यावर जो मोहभ्रमानें लिप्त होत नाहीं, व अज्ञानामुळे मनात खेदही बाळगीत नाहीं; ३३० किंवा मोह उत्पन्न झाला असता ज्ञानाची इच्छा करीत नाहीं; त्याचप्रमाणें, ज्ञानवान झाला असतां कर्म टाकीत नाहीं व त्यापासून दु.खही मानीत नाहीं; ३१ सकाळ, दुपार व सायंकाळ याची सूर्याला जशी गणना नसते, तसा जो देहावर उत्पन्न होणाऱ्या गुणांकडे लक्ष देत नाहीं, ३२ असा जो ज्ञानी आहे, त्याला दुसऱ्या ज्ञानाची अपेक्षा आहे काय ? हे पहा कीं, समुद्रास पावसाची गरज आहे काय ? ३३ अथवा, कर्म करीत असतां, मी करणारा आहें असा अभिमान होईल काय ? हें पहा, हिमालय पर्वत आपल्यास थंडी होईल म्हणून भितो काय ? ३४ अथवा मोह उत्पन्न झाला असतां त्याचे ज्ञान नष्ट होईल का ? हें बघ, अग्नि उन्हाळ्यापासून जळतो का ? ३५

श्लोकार्थः—उदासीनाप्रमाणें असणारा जो गुणापासून विकार पावत नाहीं; 'गुण कर्ते आहेत' असें मानूनच आपण स्थिर राहतो; कांहीं करीत नाहीं ॥ २३ ॥

त्याप्रमाणे, गुण व शरीर हें आपणच असल्यामुळें, ते आले किंवा गेले तरी त्यापासून सुख किंवा दु:ख होत नाहीं, ३६ अशी ज्याची पक्की समजूत असते, तो, वाटसरू वाटेने मुक्कामापुरता उतरतो, त्याप्रमाणें उदासीनवृत्तीने देहांत वास करतो. ३७ ज्याप्रमाणें रणभूमीवरील निशाण कोणाचाही जय अथवा अपजय झाला असतां ( तज्जन्य हर्षशोकापासून ) अलिप्त असतें, त्याप्रमाणें हा गुणाच्या स्वाधीन होऊन कांहीं कर्में करीत नाहीं. ३८ किंवा देहांतील प्राण हा रक्षणापुरतें मिष्ट किंवा कसलेंही अन्न घातलें असतां त्याची चव पहात नाहीं; अथवा अतिथि कांहींही जेवावयास घातलें तरी ते खातो, किंवा चवाठ्यावरील जांग्यावर कोणीही बसला तरी ती जशी उदासीन असते; ३९ अर्जुना, मृगजलाच्या लाटांनीं मेरु पर्वत जसा ढळत नाहीं, तसा जो गुणाच्या येण्याजाण्यानें अंतर्यामीं ढळत नाहीं, ३४० फार काय सांगावे ? असें पहा कीं, आकाशांत जरी वायु नेहमीं फिरत असतो, तरी ते कधीं वाऱ्यानें हाललें आहे का ? किंवा अंध-

कारें ॥ ४१ ॥ स्वप्न का गा जियापरी । जागतयातें न [1]सिंतरी । गुणीं तैसा अवधारीं । न बंधिजे तो ॥ ४२ ॥ गुणांसि कीर नातुडे । परि दुरूनि जैं पाहे कोडें । तैं गुणदोष सैायिखडें । स[2]भ्युं जैसा ॥ ४३ ॥ ( ७६९. गुणच कर्में करितात, मी काहींच करीत नाहीं, ३४४-३४९ ) सत्कर्में सात्त्विकीं । रज तें रजोविषयकीं । तम मोहादिकीं । वर्तत असे ॥ ४४ ॥ परिस तयाचिया गा सत्ता । होती गुणक्रिया समस्ता । हें फुडें जाणे सविता । लौकिका जेविं ॥ ४५ ॥ समुद्रावि भरती । सोमकांतचि द्रवती । कुमुदें विकसती । चंद्रु तो उगा ॥ ४६ ॥ कां वारावि वाजे विझे[3] । गगनें निश्चळ असिजे । तैसा गुणाचिये गजबजे । डोलेना जो ॥ ४७ ॥ अवतरणः—अर्जुना येणें लक्षणें । तो गुणातीतु जाणणें । परिस आतां आचरणें । तयाचीं जीं ॥ ४८ ॥

समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।
तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥

अन्वयः—( यः ) समदुःखसुखः, स्वस्थः, समलोष्टाश्मकाचनः, तुल्यप्रियाप्रियः, धीरः तुल्यनिंदात्मसंस्तुतिः; ॥ २४ ॥

तरि वस्त्रासि पाठीं पोटीं । नाहीं सुतावांचूनि किरीटी । ऐसें सुये दिठी । चराचर मद्रूपें ॥४९॥ म्हणोनि सुखदुःखासरिसें । कांटाळें आचरे ऐसें । ( ७७० गुणातीताचें आचरण, सुखदुःखांचे ठिकाणीं समत्व, ३५०-३५७ ) रिपुभक्तां जैसें । हरीचें देणें ॥ ३५० ॥ येरवीं तरि सहजें । सुखदुःख तैंचि सेविजे । देहजळीं होइजे । मासोळी जैं ॥ ५१ ॥ आतां तें तंव तेणें सांडिलें । आहे स्वस्वरूपेंसींचि मांडिलें । [5]संस्यांतीं निवाडिलें । बीज जैसें ॥ ५२ ॥ कां ओघ सांडूनि गांगें[10] । रिघोनि समुद्राचें आंग । नि[11]रंतरली लगबग । [12]खळाळाची ॥ ५३ ॥ तेविं आपणपाचि जया । वस्ती जाली गा धनंजया । तया देहीं आपैसया । सुख तसें दुःख ॥ ५४ रात्रि तैसें पैंहलें । हें धरणीं जेंवि एक जालें । आत्माराम देहीं[15] आतलें । द्वंद्वें[16] तैसें ॥ ५५ ॥ पैं निद्रिताचेनि आंगेंसि । साप तैशी उर्वशी । तेंवि स्वरूपस्था सारिसीं । देहीं द्वंद्वें ॥ ५६ ॥ म्हणौनि तयाच्या ठायीं । शेणा सोनया विशेष नाहीं । रत्ना गुंडेयाँ कांहीं । नेणिजे भेदु ॥ ५७ ॥ ( ७७१. सोनें व माती समान, ३५८ ) घरा येवो पां स्वर्ग । कां वरिपैंडो वाघ । परि आत्मबुद्धीसि भंग । कदा नोहे ॥ ५८ ॥ ( ७७२. प्रिय व अप्रिय यांचे ठिकाणीं समत्व, ३५९ ) निवटलें [20]नें उपवडे । जाळिलें न विरूढे[21] । साम्यबुद्धि न मोडे । तयापरी ॥ ५९ ॥

१ फसवीत नाहीं. २ नाकळे. ३ चित्राप्रमाणें. ४ प्रेक्षकाप्रमाणें उदासीन. ५ कमळें. ६ पडतो. ७ ताजवा. ८ देह. ९ धान्य तयार झाल्यावर. १० गंगा. ११ बंद झाली. १२ खळखळाटाची. १३ दिवसाचें. १४ खावास. १५ देहातील. १६ सुख व दुःख. १७ दगडाला. १८ प्राप्त होवो. १९ मेलेले. २० जिवंत होत नाहीं. २१ उगवत नाहीं.

कारानें सूर्यास कधीं गिळून टाकलें आहे का ? ४१ ज्याप्रमाणें जागृदवस्थेंत असलेल्या मनुष्यास स्वप्न फसवीत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानवान पुरुष गुणविकारांनीं फसत नाहीं. ४२ गुणांनीं तो निश्चयेंकरून आकळला जात नाहीं, परंतु दुरून त्यांचे खेळ पहातो, त्या वेळेस ते गुण चित्रांप्रमाणें असून हा प्रेक्षकाप्रमाणें उदासीन असतो. ४३ मग सात्विक गुण सत्कर्माचें आचरण करो, रजोगुण विषयांची आशा करो, किंवा तमोगुण मोहादिक अज्ञानांत बुडो, तरी त्यापासून याला बाधा होत नाहीं. ४४ पहा कीं, आपल्याच सत्तेनें या सर्व गुणाच्या चेष्टा होत आहेत, असें जो समजतो, तो, सूर्य जसा लोकव्यवहारास साक्षीभूत असून अलिप्त असतो, ४५ समुद्रास भरती येते, सोमकात मण्यास पाझर सुटतो, व चंद्रविकासी कमळें उमलतात, ह्या क्रिया जरी चंद्रापासूनच होतात, तरी तो जसा अलिप्त असतो; ४६ किंवा गगनांत वारा पुष्कळ वाहतो अथवा पडतो, तथापि गगन ज्याप्रमाणें निश्चळ आहे, त्याप्रमाणें गुणानीं जरी पुष्कळ गडबड केली, तरी त्यांच्या सपाट्यांत तो सांपडत नाहीं. ४७ अर्जुना, याप्रमाणें गुणातीताचीं चिन्हें तुला सांगितलीं. आतां त्यांचें आचरण कसें असतें तें सांगतों ऐक. ४८

श्लोकार्थः—जो सुखदुःख समान जाणणारा, आत्मस्वरूपीं स्थिर असणारा, माती, दगड व सोनें सारखें मानणारा, प्रिय व अप्रिय समान मानणारा, धैर्यवान, आपली निंदा आणि स्तुति सारखी मानणारा, ॥ २४ ॥

अर्जुना, ज्याप्रमाणें वस्त्राच्या आंत व बाहेर सुतावांचून दुसरें कांहीं नाहीं, त्याप्रमाणें जो मद्रूप झाला आहे, त्याला सर्व चराचरात माझ्या रूपाशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं. ४९ म्हणून, ज्याप्रमाणें ईश्वर आपल्या शत्रूस व भक्तांस सारखीच मुक्ति देतो, त्याप्रमाणें सुख व दुःख प्राप्त झालें असतां ज्याचें मन ताजव्याप्रमाणें समतोल रहातें; ३५० बाकी देहरूप जलांत मनरूपी मासा खेळत असला म्हणजे सुख व दुःख याची सहज बाधा होते, ५१ आतां, देहाभिमान सोडून आत्मरूप झाल्यामुळें, बीज पेरून धान्य आल्यावर त्यांत जसा बीजाचा परिपाक होतो, ५२ किंवा गंगा समुद्रात मिळून गेल्यावर जसा तिचा खळखळाट आपोआप बंद होतो, ५३ त्याप्रमाणें अर्जुना, ज्यानें आत्मस्वरूपीं लय लावलें आहे, तो देहांत असला तरी सुख व दुःख यांपासून बाधा पावत नाहीं. ५४ घराच्या खांबास ज्याप्रमाणें रात्र किंवा दिवस हीं दोन्हीं सारखींच आहेत, त्याप्रमाणें देहांतील आत्म्यास सुख व दुःख हीं दोन्हीं सारखींच आहेत. कारण तो गुणांपासून अलिप्त असतो. ५५ ज्याप्रमाणें निजलेल्या मनुष्याचे एका अंगास साप व दुसऱ्या अंगास उर्वशी जरी असली, तरी त्या दोघांची सारखीच योग्यता असते, त्याप्रमाणें, जो आत्मस्वरूपीं लीन झाला आहे त्यास सुख व दुःख यांची सारखीच योग्यता आहे. ५६ म्हणून त्याच्या ठिकाणीं शेण व सोनें यांची सारखीच किमत आहे, आणि रत्न व धोंडा यांतही तो कांहीं भेद जाणत नाहीं; ५७ स्वर्गसुख घरीं चालत येवो, अथवा त्यास खाण्याकरितां वाघ त्याच्यावर धावून येवो, परंतु त्याच्या आत्मस्वरूपाच्या बुद्धीस भंग होत नाहीं. ५८ मेलेलें जसें जिवंत होत नाहीं, आणि जळालेलें पुनःउगवत नाहीं त्याप्रमाणें त्याची आत्मस्वरूपाविषयीं जी साम्यबुद्धि झाली आहे, तिचा कशानेंही भंग होत नाहीं. ५९ "हा ब्रह्मदेव आहे" म्हणून कोणी स्तुति करो, किंवा 'नीच आहे' म्हणून कोणी

( ७७३. धैर्य, ३६० ) हा ब्रह्मा ऐसेनि स्तविजो । कां नीच म्हणोनि निंदिजो । तरि नेणे जळों विझों । राखोंडी जैसी ॥ ३६० ॥ ( ७७४. निंदास्तुतींचे ठिकाणीं समता, ३६१–३६२ ) तैसी निंदा आणि स्तुति । नये कोण्हेचि व्यक्ती । नाहीं अंधारें कां वांती । सूर्या घरीं ॥ ६१ ॥

मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।
सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥

अन्वयः—( यः ) मानापमानयोः तुल्यः, मित्रारिपक्षयोः तुल्यः, ( च ) सर्वारंभपरित्यागी ( अस्ति ), सः गुणातीतः उच्यते ॥ २५ ॥

ईश्वरु म्हणोनि पूजिला । कां चोरु म्हणोनि गांजिला । वृषगजीं वेढिला । केला रावो ॥ ६२ ॥ ( ७७५. मानापमान, मित्रादिक यांचे ठिकाणीं समत्व, ३६३-३६५ ) कां सुहृद पासीं आले । अथवा वैरी वरपडे[2] जाले । परि नेणे राती पाहलें । तेज जेवीं ॥ ६३ ॥ साही ऋतु येता आकाशें । लिंपिजेचि ना जैसे । तेवीं वैषम्य मानसें । जाणिजेना ॥ ६४ ॥ आणीकही येकु पाहीं । आचारु तयाच्या ठायीं । तरि व्यापारासि नाहीं । जालें दिसे ॥ ६५ ॥ ( ७७६. सर्वारंभाचा त्याग, ३६६-३७० ) सर्वारंभा उटकलें । प्रवृत्तींचें तेय मावळलें । जळती गा कर्मफळें । तें[4] तो आगी ॥ ६६ ॥ दृष्टादृष्टेंचेनि नांवें । भावाचि जीवीं नुगवे । सेवी जें कां स्वभावें । पैठें[6] होय ॥ ६७ ॥ सुखे ना शिणे । पाषाणु का जेणें माने । तैसी सांडींमांडी मने । वर्जिली असे ॥ ६८ ॥ आतां किती हा विस्तारु । जाणे ऐसा आचारु । जयाचा तोचि साचारु । गुणातीतु ॥ ६९ ॥ अवतरणः—गुणातें अतिक्रमणें । घडे उपायें जेणें । तो आतां आईक म्हणे । श्रीकृष्णनाथु ॥ ३७० ॥

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।
स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥

अन्वयः—यः च मा अव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते, सः एतान् गुणान् समतीत्य ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥

( ७७७. अव्यभिचारी भक्ति, ३७१–३९८ ) तरि व्यभिचाररहित चित्तें । भक्तियोगें मातें । सेवी तो गुणातें । जाळूं शके ॥ ७१ ॥ तरि कोण मी कैसी भक्ति । अव्यभिचारा काय व्यक्ति । हे आघवींचि निरुती । होआवी लागे ॥७२॥ तरी पार्था परियेसा । मी तंव येथ ऐसा । रत्नीं किळैंवो जैसा । रत्नाचि तो ॥७३॥ कां द्रवपणाचि नीर । अवकाशचि अंबर । गोडी तेचि साखर । आन नाहीं ॥७४॥ वन्हि तोचि ज्वाळ । दळाचि नांव कमळ । रूख तेंचि डाळ । फळादिक ॥ ७५ ॥ अगा हिम जें आकर्षलें । तेंचि हिमवंत जेवीं जालें । नाना दूध मुरालें । तेंचि

निंदा करो; परंतु राख झाल्यावर तिला ज्याप्रमाणे जळण्याची अगर विझण्याची भीति रहात नाहीं, ३६० त्याप्रमाणें निंदा किंवा स्तुति केली असतां त्यापासून त्याला राग अथवा लोभ उत्पन्न होत नाहीं. हें पहा, सूर्याच्या घरीं अंधार किंवा दिवा यांची गोष्टच बोलण्यास नको. ( कारण तो सदोदित स्वयंप्रकाशच आहे ). ६१

श्लोकार्थः—ज्याला मान व अपमान हे सारखे आहेत, मित्र व शत्रु हेही सारखेच आहेत, आणि जो कोणत्याही कर्माचा आरंभ करीत नाहीं, त्याला गुणातीत असें म्हणावें ॥ २५ ॥

ईश्वर समजून त्याची पूजा केली, अथवा चोर समजून मार दिला किंवा हत्ती, घोडे, रथ वगैरेंनीं वेष्टित करून त्याला राजा बनविला; ६२ अथवा आप्त जवळ येऊन बसले, किंवा वैरी जवळ येऊन बसला, तथापि त्याला सर्वच सारखे. ज्याप्रमाणें सूर्याचे तेजास रात्र व दिवस माहीत नसतात; ६३ आकाशावर सहा ऋतु जरी येऊन गेले तरी तें ज्याप्रमाणे अलिप्त असतें, त्याप्रमाणें त्याच्या बुद्धीला विषमता ही कधीं ठाऊक नसते. ६४ त्याचे ठिकाणीं आणखी असे दिसतें कीं, तो कोणतेही व्यापार करीत नसतो, ६५ तो कोणतीही गोष्ट आरंभीत नाहीं, प्रवृत्तिमार्गापासून दूर राहतो, व तो ज्ञानवान असल्यामुळें त्याच्या कर्मांचीं फळें जळून जातात. ६६ इहलोक अथवा परलोक याच्याविषयीं ज्याच्या मनांत विचारही येत नाहीत, परंतु सहजानुसार जें जे प्राप्त होईल तें तें तो सेवन करतो; ६७ जो सुख झालें असतां आनंद मानीत नाहीं, व दु.ख झालें असतां शीण मानीत नाहीं; पाषाणाप्रमाणें ज्याचें मन कठीण आहे, त्याचप्रमाणें जो मनानें काहींएक व्यापार करीत नाहीं; ६८ आणखी तुला किती स्पष्ट सांगूं ? तर असें ज्याचें आचरण असेल, तोच गुणातीत असें जाण. ६९ श्रीकृष्ण म्हणतात.—तसा गुणातीत होण्याकरितां, गुणांचो बाधा कोणत्या उपायानें होत नाहीं, तें तुला सांगतों, ऐक. ३७० .

श्लोकार्थः—आणि जो एकनिष्ठ भक्तीनें माझी सेवा करतो, तो या तीन गुणांना उत्तम प्रकारें जिंकून ब्रह्मरूप होण्याला योग्य होतो ॥ २६ ॥

तर जो माझी एकनिष्ठ मनानें भक्ति करतो, तो या गुणांचा नाश करूं शकतो। ७१ तर मी कोण, माझी भक्ति कशी करावयाची, एकनिष्ठपणाचें काय लक्षण, या सर्व गोष्टी तुला स्पष्ट करून सांगितल्या पाहिजेत. ७२ तर अर्जुना, ऐक. मी या जगांत असा आहें कीं, रत्नाचें तेज व रत्न हें जसें एकच आहे, ७३ अथवा पातळपणा व पाणी, अवकाश व आकाश, गोडी व साखर हीं जशीं भिन्न नसून एकच आहेत; ७४ विस्तव व ज्वाला हीं एकच आहेत, कमळाच्या पाकळ्या हेंच कमळ, झाड हेंच फांद्या, फळें वगैरे; ७५ ज्याप्रमाणें थंडी, व ज्या ठिकाणीं थंडी वास करते तो हिमालय पर्वत हीं दोन्ही एकच आहेत, व दूध विरजलें म्हणजे ज्याप्रमाणें त्यालाच दहीं म्हणतात, ७६ त्याप्रमाणें विश्व

१ दिवा. २ हत्ती, घोडे, रथ वगैरेंनीं. ३ दूर झाले. ४ ज्ञान, ५ इह व पर या लोकांच्या, ६ प्राप्त. ७ व्यापार. ८ मूर्तिमंत, ९ निश्चय. १० तेज.

दहीं ॥७६॥ तैसें विश्व येणें नांवें। हें मीचि पैं आघवें। घेईं चंद्रबिंब सोळावें। न लगे जेविं ॥७७॥ घृताचें थिजलेपण। न मोडितां घृतचि जाण। कां नाटितां कांकण। सोनेंचि तें ॥ ७८ ॥ न उकलितां पटु। तंतुचि असे स्पष्टु। न विरवितां घटु। मृत्तिका जेविं ॥ ७९ ॥ म्हणोनि विश्वपण जावें। मग मातें घेयावें। तैसा नव्हे आघवें। सकटचि मी ॥ ३८० ॥ ऐसेनि मातें जाणिजे। ते अव्यभिचारी भक्ति म्हणिजे। येथ भेद कांहीं देखिजे। तरि व्यभिचारु तो ॥ ८१ ॥ याकारणें भेदातें। सांडूनि अभेदें चित्तें। आपणया सकट मातें। जाणावें गा ॥ ८२ ॥ पार्था सोनयाची टिक। सोनयासी लागली देख। तैसें आपणपें औणिक। मानावें ना ॥ ८३ ॥ तेजाचा तेजौनि निघाला। परि तेजींचि असे लागला। तया रश्मीऐसा भला। बोधु होआवा ॥ ८४ ॥ पैं परमाणु भूतळीं। हिमकणु हिमाचळीं। मजमाजीं न्याहाळीं। अहं तैसें ॥ ८५ ॥ हो कां तरंगु लहानु। परि सिंधूसीं नाहीं भिन्नु। तैसा ईश्वरीं मी आनु। नोहेचि मा ॥८६॥ ऐसेनि वा समरसें। दृष्टि जे उल्हासे। ते भक्ति पैं ऐसें। आम्ही म्हणों ॥ ८७ ॥ आणि ज्ञानाचें चांगावें। इयेचि दृष्टी नांवें। योगाचेंही आघवें। सर्वस्वं हें ॥ ८८ ॥ सिंधू आणि जळधरा। माजी लागली अखंड धारा। तैसी वृत्ति वीरा। प्रवर्ते ते ॥ ८९ ॥ कां कुंहसीं आकाशा। तोंडीं सांदा नाहीं जैसा। तो परमपुरुषीं तैसा। एकवटे गा ॥ ३९० ॥ प्रतिबिंबौनि बिंबवरी। प्रभेची जैसी उजरी। ते सोहंवृत्ति अवधारीं। तैसी होय ॥ ९१ ॥ ऐसेनि मम परस्परें। ते सोहंवृत्ति जैं अवतरे। तैं तियेंही सकट सरे। आपैसया ॥ ९२ ॥ जैसा सैंधवाचा रवा। सिंधूमाजि पांडवा। विरालेया विरवावा। हेंही ठाके ॥ ९३ ॥ नातरि जाळूनि तृण। वन्हिही विझे आपण। तैसें भेदु नाशूनि जाण। ज्ञानही नुरे ॥ ९४ ॥ माझें पैलपण जाये। भक्त हे ऐलपण ठाये। अनादि ऐक्य जें आहे। तेंचि निवडे ॥ ९५ ॥ आतां गुणातें तो किरीटी। जिणे या नव्हती गोष्टी। जे एकपणाही मिठी। पडों सरली ॥ ९६ ॥ किंबहुना ऐसी दशा। तें ब्रह्मत्व गा सुदंशा। हें तो पावे जो ऐसा। मातें भजे ॥ ९७ ॥ पुढती इहीं लिंगीं। भक्तु जो माझा जगीं। हे ब्रह्मता तयालागीं। पतिव्रता ॥ ९८ ॥ ( ७७८. ब्रह्मसंपत्ति, ३९९–४०२ ) जैसें गंगेचेनि वोघें। डळमळीत जळ जें निघे। सिंधुपद तयाजोगें। आन नाहीं ॥९९॥ तैसा ज्ञानाचिया दिठी। जो मातें सेवी किरीटी। तो होय ब्रह्मतेच्या मुकुटीं। चूडारत्न ॥ ४०० ॥ यया ब्रह्मत्वासीचि पार्था। सायुज्य ऐसी व्यवस्था। याचि

१ सोडून. २ विश्व. ३ उत्तमपणा. ४ सार. ५ मेघ. ६ भक्ति, भक्त व भजन या त्रिपुटींत परमात्माच आहे अशी वृत्ति. ७ पिहिरीस. ८ नटलेला. ९ अहंब्रह्मवृत्ति. १० लय पावते. ११ जिंकतो. १२ मर्मज्ञा. १३ लक्षणानीं. १४ वाहत. १५ मुगुटमणि.

म्हटलें म्हणजे तें सर्व मद्रूपच आहे. पहा कीं, चंद्राची कला पाहणें झाल्यास ती जशी चंद्रापासून सोडून काढावी लागत नाहीं; ( कां कीं, दोन्ही एकच आहेत ); ७७ तूप जरी थिजलें, तरी त्या स्थितींतही तें तूपच असतें; किंवा कंकण आटवून जरी त्याची लगड केली नाहीं, तरी तें जसें सोनेंच होय; ७८ वस्त्र फाडून त्यांतील तंतु जरी निराळे केले नाहींत, तरी तें जसें तंतुमयच आहे, व मडकें फोडून विरवलें नाहीं तरी ती ज्याप्रमाणें मातीच होय, ७९ त्याप्रमाणें, विश्व लयास गेल्यावर मग माझी प्राप्ति करून घ्यावी, अशांतला प्रकार नसून, विश्वासकटच मला जाणलें पाहिजे. ३८० अशा ऐक्यबुद्धीनें जें मला जाणणें त्यालाच माझी एकनिष्ठ भक्ति करणें म्हणतात; आणि मी व विश्व ह्या दोहोंत जर भेद आहे अशी कल्पना केली तर ती व्यभिचारी भक्ति होते. ८१ याकरितां भेद न मानतां एकनिष्ठ चित्तानें तूं आपल्यासह मी या विश्वांत भरलों आहें असें जाण. ८२ पार्था, सोन्याची टीक करून जरी ती सोन्याच्या दागिन्यावर बसविली, तरी त्या दोहोंत ज्याप्रमाणें भेद नसतो, त्याप्रमाणें आपल्यापासून विश्व वेगळें आहे असें समजूं नको. ८३ सूर्यापासून निघालेले किरण जसे तेजोमय असून सूर्यापासून निराळे झालेले नसतात, ८४ तसा मी व विश्व यांबद्दल ऐक्यबोध व्हावा. भूमीवरील रजःकण आणि हिमालयावरील हिमकण हे ज्याप्रमाणें भूमि व हिमालय याहून निराळे नाहींत, त्याप्रमाणें माझ्या ठिकाणीं सर्व विश्व आहे असें जाण. ८५ लाट किती जरी लहान असली तरी ती जशी समुद्राहून निराळी नाहीं, तसा ईश्वराहून मी निराळा नाहीं, ८६ अशा प्रकारें सर्वत्र ऐक्यता आहे अशी जी दृष्टि फांकते तिलाच आम्ही भक्ति असें म्हणतों; ८७ आणि याच दृष्टीनें ज्ञानही ओम्ही सर्वांत उत्तम असें समजतों व योगाचेंही सार हेंच आहे. ८८ समुद्र आणि मेघ यांच्या मध्यें पाऊस पडूं लागल्यावर ज्याप्रमाणें अखंड धारा पडत असतात, त्याप्रमाणें अर्जुना, भक्ति, भक्त व भजन या त्रिपुटींत परमात्मा भरलेला आहे. ८९ विहिरीच्या तोंडाशीं असलेल्या आकाशास व सर्व आकाशास जसा जोड नाहीं, तसा जो आपल्यांत व आत्मस्वरूपांत भेद न मानतां ऐक्य आहे असें जाणतो, ३९० सूर्याची प्रभा प्रतिबिंबापासून सूर्यापर्यंत जशी सारखी नटलेली असते, त्याप्रमाणें त्याला, अहंब्रह्म अशी वृत्ति बनल्यावर ब्रह्म व विश्व यांत अंतर दिसत नाहीं; ९१ याप्रमाणें अहंब्रह्म अशी मनाची वृत्ति बनल्यावर तीही पुढें आपोआप लय पावते. ९२ हे पांडवा, ज्याप्रमाणें मिठाचा खडा समुद्रांत टाकला असतां तो विरल्यावर त्याचें विरणें आपोआपच राहतें, ९३ किंवा गवत जाळल्यावर विस्तवही आपोआपच विझून जातो, त्याप्रमाणें ज्या ज्ञानापासून ब्रह्माचें ऐक्य होतें, तें ज्ञानही मागून नाहींसें होतें. ९४ मी पलीकडे आहें व भक्त अलीकडे आहेत हा भास नाहींसा होऊन, दोघांमधील अनादि ऐक्य तेंच केवळ उरतें. ९५ हे किरीटी, अशी स्थिति प्राप्त झाल्यावर, गुणांना त्यानें जिकावें असें म्हणणेंच उरत नाहीं. कारण ऐक्य झाल्यावर तेही मागाहून नाहींतसे होतात. ९६ किंबहुना, हे मर्मज्ञा, याच दशेस ब्रह्मत्व असें म्हणतात; आणि जो माझी भक्ति करतो, त्यालाच ही प्राप्त होते. ९७ अशा लक्षणांनीं या जगांत जो माझा भक्त होतो, त्याला ब्रह्मता माळ घालते. ९८ ज्याप्रमाणें गंगेचें पाणी वाहात चालल्यावर

नांवें चौथा । पुरुषार्थु गा ॥ १ ॥ अवतरणः—परी माझें आराधन । ब्रह्मत्वीं होय सोपान । तेथ मी हन साधन । गमेन हो ॥ २ ॥ ( ७७९. साधनानें ब्रह्मप्राप्ति होते; माझ्याहून ब्रह्म वेगळें नाहीं, ४०३–४०९ ) तरि झणें झणें ऐसें । तुझ्या चित्तीं पैसे[१] । पैं ब्रह्म आन नसे । मवांचूनि ॥ ३ ॥

ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहममृतस्याव्ययस्य च ।
शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ॥ २७ ॥

अन्वयः—हि अमृतस्य च अव्ययस्य ब्रह्मणः च शाश्वतस्य धर्मस्य च ऐकांतिकस्य सुखस्य प्रतिष्ठा अहं ( अस्मि ) ॥ २७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

अगा ब्रह्म या नांवा । अभिप्रायो मी पांडवा । मीचि बोलिजे आघवा । शब्दीं इहीं ॥ ४ ॥ पैं मंडळ आणि चंद्रमा । दोनी नव्हती सुवर्मा । तैसा मज आणि ब्रह्मा । भेदु नाहीं ॥ ५ ॥ अगा नित्य जें निष्कम्प । अनावृत[२] धर्मरूप । सुख जें उमप[३] । अद्वितीय ॥ ६ ॥ विवेकु आपलें काम । सारूनि ठाकी जें धाम । निष्कर्षाचें[४] निःसीमें[५] । किंबहुना मी ॥ ७ ॥ ऐसेसें हो अवधारा । तो अनन्याचा[६] सोयरा । सांगतसे वीरा । पार्थासी ॥८॥ पुढील अध्यायाचें बीजः—येथ धृतराष्ट्र म्हणे । संजया हें तूतें कोणें । पुसलेनिविण वायाणें । कां बोलसी ॥ ९ ॥ ( ७८०. संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो; काव्य, ४१०–४११ ) माझी अवसरी[७] ते फेडीं । विजयाची सांगें गुढी । येरु जीवीं म्हणे सांडीं । गोठी इया ॥ ४१० ॥ संजय विस्मयो मानसीं । आहा करुनी सरिसी । म्हणे कैसें पां दैवेंसी । द्वंद्व यया ॥ ११ ॥ तरि कृपाळु तो तुष्टो । यया विवेकु हा घोंटो[८] । मोहाचा फिटो । महारोगु ॥ १२ ॥ ( ७८१. संजयाला देवाचें भाषण ऐकून आनंद झाला, त्या भरांत तो बोलतो; काव्य, ४१२–४१४ ) संजयो ऐसें चिंतिता । संवादु तो सांभाळितां । हरिखाचा[९] येतु चित्ता[१०] । महापूरु ॥ १३ ॥ म्हणोनि आतां येणें । उत्साहाचेनि अवतरणें । श्रीकृष्णाचें बोलणें । सांगिजेल ॥ १४ ॥ ( ७८२. ज्ञानदेव तोच अभिप्राय सांगतात, ४१५ ) तया अक्षराआंतील भावो । पाववीन मी तुमचा ठांवो । आइका म्हणे ज्ञानदेवो । निवृत्तीचा ॥ ४१५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥
श्लोक २७, ओंव्या ४१५.

---

१ कल्पना येईल. २ न आवरणारें. ३ अपार. ४ सिद्धांताचें. ५ शेवटचें. ६ एकनिष्ठेचा. ७ शंका. ८ गिळो. ९ आनंदाचा. १० हृदयांत.

त्याला समुद्राशिवाय गत्यंतरच नसतें, ९९ त्याप्रमाणें अर्जुना, ज्ञानाच्या दृष्टीनें जो माझी सेवा करतो, तो ब्रह्मतेच्या मुकुटावरील मणि होतो. ४०० पार्था, या ब्रह्मप्राप्तीलाच सायुज्य मुक्ति म्हणतात, व हिलाच चौथा पुरुषार्थ ( मोक्ष ) असें म्हणतात. १ परंतु ब्रह्मत्व पावण्याकरिता माझी आराधना हा जिना होय; तेव्हां तें प्राप्त झाल्यावर, मी व माझ्या प्राप्तीकरितां करावयाचें साधन हीं दोन्ही निराळीं आहेत असें समजशील हो! २ तर माझ्यापासून ब्रह्म निराळें आहे अशी तुझ्या मनात कल्पनाही येऊं देऊं नको. ३

*श्लोकार्थः—कारण, अविनाशी व निर्विकार अशा ब्रह्माचें, सनातन धर्माचें व अखंड अशा सुखाचें स्थान मी आहें ॥ २७ ॥*

हे पांडवा, ब्रह्म म्हणून ज्याला म्हणतात, तो मीच होय, व मलाच हीं नांवें आहेत. ४ पहा कीं, चंद्र व त्याचें मंडल हीं ज्याप्रमाणें दोन नाहींत, त्याप्रमाणें, हे मर्मज्ञ अर्जुना, मी व ब्रह्म यांत भेद नाहीं. ५ तें ब्रह्म नित्य, निष्कंप, न आवरणारें, धर्मरूपी व अपार सुख देणारें असें अद्वितीय आहे. ६ अज्ञानाचा नाश करून ज्ञान ज्या स्वरूपीं लय पावतें, तें सिद्धांतानें ठरलेलें शेवटचें स्वरूप मीच होय. ७ एकनिष्ठ भक्तांचा जो आवडता परमात्मा, तो शूर पार्थास याप्रमाणें सांगता झाला. ८ तेव्हां धृतराष्ट्र संजयास म्हणाला कीं, या गोष्टी तुला कोणीं पुसल्या होत्या? व त्या तूं मला व्यर्थ का सांगतोस? ९ माझ्या मुलाच्या विजयाची गोष्ट मला सांगून माझी शंका फेड. त्या वेळेस संजय आपल्या मनांत म्हणतो, अरे, या गोष्टी सोडून दे! ४१० संजय मनांत विस्मय पावून आपल्यास फार उत्तम गोष्ट ऐकण्यास सापडली असें मानून म्हणाला, दैवगति काय विचित्र आहे, कीं याला युद्धाचीच आवड आहे. ११ तरी कृपाळू भगवान संतुष्ट होऊन याच्या मनांत विवेकरूपी औषध घालून याचा मोहरूपी महारोग नाहींसा करोत. १२ संजय अशा प्रकारें मनांत विचार करतो आहे, इतक्यांत कृष्णार्जुनाच्या संवादाकडे लक्ष जाऊन त्याच्या चित्तांत आनंदाचा महापूर आला. १३ म्हणून मनात हर्षयुक्त होऊन, श्रीकृष्ण काय म्हणाले तें तो सांगेल. १४ निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणालेः—त्याच्या बोलण्याचा भाव मी तुमच्या हृदयांत ठसवीन, तो ऐका. ४१५

( अध्याय १४, ओंव्या ४१५. )

# ज्ञानेश्वरी



## अध्याय पंधरावा

(७८३. सद्गुरूचें पूजन; काव्यप्रतिभा, १–८) आतां हृदय हें आपुलें। चौफाळुनिया[1] भलें। वरी बैसऊं पाउलें। श्रीगुरूचीं ॥ १ ॥ ऐक्यभावाची अंजुळी। सर्वेंद्रियकुड्मुळीं[2]। भरूनियां पुष्पांजुळी। अर्घ्यु देवों ॥ २ ॥ अनन्योदकें[3] धुवट। वासना जे तन्निष्ठ[4]। तें लागलेंसे अवोटें। चंदनाचें ॥ ३ ॥ प्रेमाचेनि भांगारें[6]। निर्वाळूनि[7] नूपुरें[8]। लेवऊं सुकुमारें। पदें तियें ॥ ४ ॥ घणावली आवडी। अव्यभिचारें चोखडी[9]। तिये घालूं जोडी[10]। आंगोळियें[11] ॥ ५ ॥ आनंदामोदबहुळ[12]। सात्त्विकाचें मुकुळें[13]। तें उमललें अष्टदळ[14]। ठेऊं वरी ॥ ६ ॥ तेथें अहं[15] हा धूप जाळूं। नाहं[16] तेजें[17] वोवाळूं। सामरस्यें[18] पोटाळूं[19]। निरंतर ॥ ७ ॥ माझी तनु आणि प्राण। इया दोनी पाउवां[20] लेऊं श्रीचरण। करूं भोगमोक्ष[21] निंबलोण। पायां तयां ॥ ८ ॥ (७८४. गुरुसेवेची फलप्राप्ति, ९–१७) इया गुरुचरणसेवा। हो पात्र तया दैवा। जे सकळार्थमेळावीं[22]। पाटू बांधे ॥ ९ ॥ ब्रह्मींचें विसंवणेवरी[23]। उन्मेख[24] लाहे उजैरी। जें वाचेतें इये करी। सुधासिंधु[25] ॥ १० ॥ पूर्णचंद्राचिया कोडी। वक्तृत्वा घांपे[26] कुरोंडी। तैसी आणी गोडी। अक्षरांतें ॥ ११ ॥ सूर्यें अधिष्ठिली प्राची[27]। जगा राणीव दे प्रकाशाची। तैसी वाचा श्रोतयां ज्ञानाची। दिवाळी करी ॥ १२ ॥ नादब्रह्म खुजें। कैवल्यही तैसें न सजे। ऐसा बोलु देखिजे। जेणें[28] दैवें ॥ १३ ॥ श्रवणसुखाच्या माडवीं। विश्व भोगी माधवी। तैसी सोसिनली[29] बरवी। वाचावल्ली ॥ १४ ॥ ठावो न पवतां जयाचा। मनेंसी मुरडली वाचा। तो देवो होय शब्दाचा। चमत्कारु ॥ १५ ॥ जें ज्ञानासि न चोजवे[30]। ध्यानासिही जें नांगवे[31]। तें अगोचर फांवे[32]। गोठीमाजीं ॥ १६ ॥ येवढें एक

---

१ चोखाळून; स्वच्छ करून. २ पुष्पाच्या कळ्यांनीं. ३ एकनिष्ठ–भावरूप उदकानें. ४ श्रीगुरूचे ठिकाणीं. ५ अनामिका = करंगळीच्या शेजारचें बोट. ६ सुवर्णानें. ७ गाळून. ८ पागन्या. ९ दृढ. १० रणजोडवी. ११ अंगठ्यात. १२ आनंदरूप सुगंध. १३ कळी. १४ कमळ. १५ अहंकार. १६ निरभिमान. १७ दीपें. १८ ऐक्यभावानें. १९ आलिंगन देऊं. २० पादुका. २१ मोक्ष. २२ प्राप्त करून देते. २३ विश्रांतीपर्यंत. २४ योग्यता. २५ अमृत. २६ टाकावे. २७ पूर्वदिशा. २८ ज्या गुरुसेवारूप दैवयोगानें. २९ भरास येते, ३० जाणतां येत नाहीं. ३१ सांपडत नाहीं. ३२ सांपडतें.

# ज्ञानेश्वरी



## अध्याय पंधरावा

( मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें गुणातीत होऊन चित्तशुद्धि झाल्यावर श्रीज्ञानेश्वर म्हणतातः— ) आतां आपलें हृदय स्वच्छ करून त्यावर श्रीगुरूंच्या पादुकांची स्थापना करूं. १ नंतर एकनिष्ठपणाच्या ओंजळींत सर्वेंद्रियरूपी पुष्पांच्या कळ्या घेऊन श्रीगुरूंस अर्घ्य देऊं. २ अनन्यभावरूपी स्वच्छ उदकानें स्नान घालून वासनारूपी चंदन श्रीगुरूंस अनामिकेनें लावूं. ३ प्रेमरूपी सुवर्णाच्या घागऱ्या करून गुरूंच्या सुकुमार पायांत घालूं. ४ गुरूंच्या ठिकाणीं असलेल्या एकनिष्ठ व दृढ भक्तीचीं रणजोडवीं करून गुरूंच्या अंगठ्यांत घालूं. ५ अष्टभावरूपी पाकळ्या उमललेल्या आहेत असें सात्त्विक भावरूपी कमळ आनंदरूपी वासासह त्यांच्या चरणांवर वाहूं. ६ त्या ठिकाणीं अहंकाराचा धूप करून निरभिमानाचा दीप ओवाळूं, व ऐक्यभावानें गुरूंस आलिंगन देऊं. ७ आपलें शरीर व प्राण या दोन पादुका करून श्रीगुरूंच्या चरणांत घालूं; व गुरूंच्या चरणांवरून भोग व मोक्ष याचें लिंबलोण करूं. ८ मोक्षप्राप्ति करून देणारी जी अशा प्रकारची गुरुचरणसेवा, ती करण्यास मी पात्र होवो. ९ ( मग त्या ज्ञान्याची योग्यता इतकी वाढते कीं, ) तो ब्रह्मस्वरूपीं विश्रांति घेतो; व त्याच ज्ञानाच्या योगानें, त्याच्या तोंडातून जे शब्द निघतात ते अमृततुल्य असतात. १० त्याच्या वक्तृत्वावरून पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें कोटिचंद्र ओंवाळून टाकावे, असें त्याच्या तोंडातून निघणाऱ्या अक्षरास माधुर्य येतें. ११ पूर्वेस सूर्य उगवल्याबरोबर ज्याप्रमाणें सर्व जगांत प्रकाशाची रेलचेल होते, त्याप्रमाणें त्याच्या तोंडांतून निघणाऱ्या भाषणांनीं श्रोत्यांना ज्ञानाची दिवाळी होते. १२ नादब्रह्म त्याच्या बोलण्याच्या माधुर्यापुढें फिकें पडतें, व तसेंच मोक्षसुखही त्याची योग्यता पावत नाहीं. याप्रमाणें उत्तम असें जें भाषण, तें गुरुसेवारूप दैवयोगें प्राप्त होतें. १३ श्रवणसुखरूपी मांडवांत, वसंत ऋतूंत ज्याप्रमाणें चहूंकडे झाडें टवटवीत दिसतात, त्याप्रमाणें वाचारूप वेल चहूंकडे पसरतो. १४ हा काय चमत्कार आहे कीं, ज्या ब्रह्माचा ठाव न लागल्यामुळें वेदांनीं आपलें तोंड मागें फिरविलें, तें ब्रह्म त्याच्या वाणींत सहज येतें. १५ ज्ञानासही जाणतां येत नाहीं व ध्यानासही सांपडत नाहीं असें जें अगोचर ब्रह्म, तें त्याच्या सहज बोलण्यांत येतें. १६ वाचेंत सहज ब्रह्म येण्याएवढें हें सौभाग्य

सौभग । वेंळघें वाचेचें आंग । श्रीगुरुपादपद्मपेराग । लाहे जैं कां ॥ १७ ॥ ( ७८५. गुरुसेवेचें भाग्य माझ्यावांचून कोठेंही नाहीं, म्हणून गुरुप्रसादानें, संतांचे आशीर्वादानें गीतार्थ-अभिप्राय सांगतों; काव्यप्रतिभा, १८–२८ ) तरि बहु बोलूं काई । आजि तें आना ठाईं । मातेवांचूनि नाहीं । ज्ञानदेवो म्हणे ॥ १८ ॥ जे तान्हेनि मियां अपत्यें । आणि माझे गुरु एकलौते । म्हणोनि कृपेसि एकहातें । जालें तियें ॥ १९ ॥ पाहा पां भेरोवरी आघवी । मेघ चातकांसी रिचवी । मजलागीं गोसावी । तैसें केलें ॥ २० ॥ म्हणोनि रिकामें तोंड । करूं गेलें बडबड । कीं गीता ऐसें गोड । आंतुडलें ॥ २१ ॥ होय अदृष्ट आपैतें । तैं वाळुचि रत्नें पैरते । उंजू आयुष्य तैं मारितें । लोभु करी ॥ २२ ॥ आधणीं घातलिया हरळे । होती अमृताचे तांदुळ । जरी भुकेची राखे वेळ । श्रीजगन्नाथु ॥ २३ ॥ तयापरी श्रीगुरु । करिती जैं अंगीकारु । तैं होऊनि ठाके संसारु । मोक्षमय आघवा ॥ २४ ॥ पाहा पां काई नारायणें । तया पांडवाचें उणें । कीजेचि ना पुराणें । विश्ववंद्यें ॥ २५ ॥ तैसें श्रीनिवृत्तिराजें । अज्ञानपण हें माझें । आणिलें वोजे[13] । ज्ञानाचिया ॥ २६ ॥ परि हें असो आतां । प्रेम रुळतसे बोलतां । कें गुरुगौरव वर्णितां । उन्मेष असे ॥ २७ ॥ आतां तेणेंचि पसांयें । तुम्हां संतांचे मी पाये । वोळेगेन आभिप्रायें । गीतेचेनि ॥ २८ ॥ अवतरणः—( ७८६. ज्ञानानेंच मोक्ष मिळतो, असा मागील सिध्दांताचा अनुवाद, २९-३२ ) तरि तोचि प्रस्तुतीं । चौदाविया अध्यायाच्या अंतीं । निर्णयो कैवल्यपती । ऐसा केला ॥ २९ ॥ जें ज्ञान जयाच्या हातीं । तोचि समर्थु मुक्ती । जैसा शत मखें संपत्ती । स्वर्गीचिये ॥ ३० ॥ कां एक शत जन्मां । जो जन्मोनि ब्रह्मकर्मा । करी तोचि ब्रह्मा । आन नोहे ॥ ३१ ॥ नाना सूर्याचा प्रकाशु । लाहे जेवीं डोळसु । तेवीं ज्ञानियां सौरसु । मोक्षाचा तो ॥ ३२ ॥ ( ७८७. वैराग्यवानालाच ज्ञान होतें; काव्य, ३३-३६ ) तरि तया ज्ञानालागीं । कवणा पा योग्यता आंगीं । हें पाहतां जगीं । देखिला एकु ॥ ३३ ॥ जे पाताळींचेंही निधान । दावील कीर अंजन । परि होआवे लोचन । पायाळाचे ॥ ३४ ॥ तैसें मोक्ष देईल ज्ञान । येथ कीर नाहीं आन । परि तेंचि थारे ऐसें मन । शुद्ध होआवें ॥ ३५ ॥ तरी विरक्तीवांचूनि कहीं । ज्ञानासि तगणेंचि नाहीं । हें विचारूनि ठाईं । ठेविलें देवें ॥ ३६ ॥ ( ७८८. वैराग्य होण्याकरितां वृक्षाच्या रूपकानें संसारानें अनित्यत्व, काव्यप्रतिभा, ३७–४२ ) आतां विरक्तीची कवण परी । जे येऊनि मनातें वरी । हेंही सर्वज्ञें श्रीहरी । देखिलें असे

१ आश्रय करते. २ कमलांतील पराग. ३ एकटाच. ४ पाणी आटवून वर सांठविणें. ५ पाऊस पाडतो. ६ सांपडलें. ७ प्रारब्ध. ८ अनुकूल. ९ परिणाम पावे. १० बळकट. ११ मारणारा. १२ खडे. १३ योग्यतेस. १४ प्रसादानें. १५ सांगेल. १६ यश.

एक श्रीगुरुपदकमलपरागांच्याच प्राप्तीनें येतें. १७ श्रीज्ञानेश्वर म्हणतात, पुष्कळ बोलण्यांत काय अर्थ आहे ? ही योग्यता आज माझ्यावांचून दुसऱ्या कोणाच्याही ठिकाणीं नाहीं. १८ याचें कारण असें कीं, मी माझ्या गुरूचें एकुलतें एक तान्हें लेंकरूं असल्यामुळें, त्यांच्या कृपेस एकटाच पात्र झालों. १९ असें पहा, मेघ हा एका चातक पक्ष्यास पाणी मिळावें म्हणून समुद्राचें पाणी आटवून वर नेण्याची व पुनः पाऊस पाडण्याची खटपट करतो; त्याप्रमाणें, माझ्या हातून असें कृत्य घडावें म्हणून श्रीगुरूंनीं मजवर कृपा केली. २० म्हणून, माझ्या रिकाम्या तोंडांतून नुसती बडबड म्हणून जे शब्द बाहेर पडले, त्यांत गीतेचा अर्थ मी सहज बोलून गेलों. २१ प्रारब्ध अनुकूल असल्यावर वाळू हातांत घेतली असतां तींच रत्नें होतात, आणि आयुष्याची दोरी बळकट असल्यावर मारणाराही लोभ करतो; २२ जर ईश्वराच्या मनात अन्न देऊन जगवावयाचें असलें, तर अधणांत खडे वैरले असतांही त्यांचे अमृततुल्य तांदूळ होतात; २३ त्याचप्रमाणें, श्रीगुरु ज्याचा अंगीकार करतात, तो संसारांत असूनही त्याला तो संसारच मोक्ष देणारा होतो. २४ पहा कीं, पांडवांचें सर्व प्रकारें उणें असूनही श्रीकृष्णानें त्यांच्या कथेस पुराणाची योग्यता आणून ती सर्व जगास वंद्य अशी करून ठेवली, नाहीं का ? २५ त्याप्रमाणें, श्रीनिवृत्तिमहाराजांनीं माझ्या ठिकाणचें अज्ञान ज्ञानाच्या योग्यतेस आणून बसविलें. २६ परंतु हें असो; अशा बोलण्यानें फक्त प्रेम अधिक वाढतें. कारण श्रीगुरुमाहात्म्य वर्णन करण्यास आम्हांस ज्ञान आहे कोठें ! २७ तेव्हां त्या गुरूंच्याच प्रसादानें व तुम्हां संतांच्या पायाच्या दर्शनानें गीतेचा अभिप्राय मी सांगतों. २८ तर येथपर्यंत कथाभाग आला आहे कीं, चौदाव्या अध्यायाच्या शेवटीं, मोक्षदाते असे जे भगवान श्रीकृष्ण त्यांनीं असा निर्णय केला कीं, २९ ज्याला ज्ञानप्राप्ति झाली आहे, त्यालाच मोक्ष प्राप्त होतो. ज्याप्रमाणें शंभर यज्ञ करणारास स्वर्गातील संपत्ति ( इंद्रपद ) प्राप्त होतें; ३० किंवा जो शंभर जन्म ब्रह्मकर्मांत घालवितो, तोच निःसंशय ब्रह्मदेवाचें पद मिळवितो, ३१ किंवा सूर्याचे प्रकाशाचा उपयोग एक डोळसासच होतो, त्याप्रमाणें, जो ज्ञानी आहे त्यालाच मोक्षप्राप्तीचें सुख मिळतें. ३२ तर हें ज्ञान मिळविण्याची कोणाच्या ठिकाणीं योग्यता आहे हें पाहूं गेलें असतां जगांत एकच पुरुष दृष्टीस पडतो. ३३ ज्याप्रमाणें भूमिगत द्रव्य अंजन घातलें असतां दृष्टीस पडतें, परंतु तें अंजन घालण्यास पायाळू मनुष्यच पाहिजे, ३४ त्याप्रमाणें, ज्ञानापासून मोक्ष प्राप्त होतो यांत शंका नाहीं; परंतु तें ज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां मनाची शुद्धि करावी लागते. ३५ तथापि देवांनीं विचार करून असा सिद्धांत करून ठेवला आहे कीं, वैराग्याशिवाय ज्ञानाचा टिकावच लागावयाचा नाहीं. ३६ आतां वैराग्य आपणच होऊन मनास कसें वरतें, याजबद्दलही सर्वज्ञ श्रीहरींनीं सिद्धांत केला आहे. ३७ ज्याप्रमाणें एखादा मनुष्य भोजनास बसल्यावर अन्नात विष घातलें आहे असें समजताच ताट टाकून उठून जातो, ३८ त्याप्रमाणें

॥ ३७ ॥ जे विषें रांधिली रससोये । जैं जेवणारा ठाउवी होये । तैं तो तात्कचि सांडूनि जाये । जयापरी ॥ ३८ ॥ तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता । तैं वैराग्य दवडितां । पाठीं लागे ॥ ३९ ॥ आता अनित्यत्व या कैसें । तेंचि वृक्षाकारमिषें । सांगिजत असे विश्वेशें । पंचदर्शी ॥ ४० ॥ उपडिलें कवतिकें । झाड येरिमोहरा ठाके । तें वेगें जैसें सुके । तैसें हें नोहे ॥ ४१ ॥ यातें एकेपरी । रूपकाचिया कुसरी । सारीतसे वारी । संसाराची ॥ ४२ ॥ ( ७८९. पंधराव्या अध्यायाचा हेतु, ४३-४५ ) करूनि संसार वावो । स्वरूपीं अहंतेचा ठावो । होआवया अध्यावो । पंधरावा हा ॥ ४३ ॥ आता होंचि आघवें । ग्रंथगर्भींचें चांगावें । उपलैविजेल जीवें । आकर्णिजे ॥ ४४ ॥ भगवानुवाचः—तरि महानंदु समुद्र । जो पूर्ण पूर्णतेचा चंद्र । तो द्वारकेचा नरेंद्र । ऐसें म्हणे ॥ ४५ ॥

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥

*अन्वयः—( इमं संसारवृक्षं ) अश्वत्थं ऊर्ध्वमूलं, अधःशाखं च अव्ययं प्राहुः, छंदांसि यस्य पर्णानि (सन्ति;) यः तं वेद, सः वेदवित् ॥ १ ॥*

( ७९०. संसारावर वृक्षाचें रूपक, काव्यप्रतिभा, ४६-६२ ) अगा पैं पंडुकुमरा । येतां स्वरूपाचिया घरा । करीतसे आडवारो । विश्वाभासु जो ॥ ४६ ॥ तो हा जगडंबरु । नोंहे येथ संसारु । हा जाणिजे महातरु । थांवला असे ॥ ४७ ॥ परि येरां रुखासारिखा । तळीं मुळें वरी शाखा । तैसा नोहे म्हणोनि लेखा । नयेचि कवणा ॥ ४८ ॥ आगी कां कुऱ्हाडी । होय रिगावा जरी बुडीं । तरी हो कां भलतेवढी । वरिचील वाढी ॥ ४९ ॥ जे तुटलिया मुळापासीं । उलंडेलें कां शाखांसीं । परी तैसी गोठी कायसी । हा सोपा नव्हे ॥ ५० ॥ अर्जुना हें कवतिक । सांगतां असे अलौकिक । जे वाढी अधोमुख । रुखा यया ॥ ५१ ॥ जैसा भानु उंची नेणों कें । रश्मिजाळ तळीं फाके । संसार हें कावरुखें । झाड तैसें ॥ ५२ ॥ आणि आथी नाथी तितुकें । रुंधलें असे येणेंचि एकें । कल्पांतींचेनि उदकें । व्योम जैसें ॥ ५३ ॥ कां रवीच्या अस्तमानीं । आधारेनि कोंदे रजनी । तैसाचि हा गगनीं । मांडला असे ॥ ५४ ॥ यया फळ ना चुंवितां । फूल ना तुरंवितां' । जें कांहीं पंडुसुता । तें रुखुचि हा ॥ ५५ ॥ हा ऊर्ध्वमूळ आहे । परि उन्मूळिला नोहे । येणेंचि हा होये । शाड्वळ गा ॥ ५६ ॥ आणि ऊर्ध्वमूळ ऐसें । निगदिलें[१४] कीर असे । परी अधींही अंसोसें । मूळें यया ॥ ५७ ॥ प्रबळेलें चौमेरीं[१८] । पिंपळा कां वडाचिया

१ कुशलतेनें. २ स्पष्ट फेला जाईल. ३ ऐका. ४ इच्छारहिताचा. ५ प्रतिबंध. ६ पाडला. ७ उलथून पडेल. ८ खालीं. ९ चमत्कारिक. १० व्यापलें. ११ हुंगावें तर. १२ उपटलेला. १३ हिरवागार. १४ म्हटलें. १५ खालीं हो. १६ पुष्कळ. १७ पसरला. १८ चहूंकडून.

सर्व संसार अशाश्वत आहे, असें ज्या वेळेस समजतें, त्या वेळीं वैराग्य ढकलून दिलें तरी आपल्या पाठीस लागतें. ३९ आतां हा संसार कसा अशाश्वत आहे याचें या पंधराव्या अध्यायांत वृक्षाची उपमा देऊन वर्णन केलें आहे. ४० इतर झाडें जशीं उपटून टाकल्यावर लवकर सुकतात, तसें हें संसाररूपी झाड सुकत नाहीं. ४१ याप्रमाणें संसाराविषयीं झाडाचें कुशलतेनें रूपक करून श्रीकृष्ण भगवान मुमुक्षूंस जन्ममरणाच्या येरझारापासून सोडवितात. ४२ संसार मिथ्या आहे असें समजून आत्मस्वरूपीं मीपणाचा अंतर्भाव व्हावा, याकरितां हा गीतेचा पंधरावा अध्याय श्रीकृष्णांनीं सांगितला. ४३ तर या अध्यायांत हा सिद्धांत उत्तम रीतीने स्पष्ट केला जाईल. म्हणून मनापासून तिकडे लक्ष असूं द्या. ४४ महानंदाचा समुद्र, इच्छारहिताचा पूर्णचंद्र व द्वारकेचा राजा जो श्रीकृष्ण भगवान तो म्हणाला. ४५

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणाले, ह्या संसाररूप अश्वत्थ वृक्षाचीं पाळेंमुळें वर आहेत, आणि शाखा खालीं आहेत असें म्हणतात. छंदोबद्ध असे वेद हीं ह्या वृक्षाचीं पानें होत, आणि ज्याला हें सर्व प्रकारें अवगत आहे, तो वेदवित् म्हणजे वेदवेत्ता (ज्ञाता) होय ॥ १ ॥

हें बघ अर्जुना, आत्मस्वरूपाच्या घराला येत असतां मध्यें जो विश्वाभास प्रतिबंध करतो, ४६ तो हें जगत् नव्हे व संसारही नव्हे; तर हा मोठा वृक्ष वाढलेला आहे असें समज. ४७ पण इतर झाडांचीं मुळें खालीं असून फांद्या वर असतात, तसा हा नाहीं, म्हणून याचें कोणालाही वर्णन करितां येत नाहीं. ४८ याच्या बुडाशीं कुऱ्हाडीचा घाव घातला, किंवा अग्नि लावला, तरी हा नाश न पावतां उलट जास्त वाढतो. ४९ इतर झाडें मुळापाशीं तोडलीं असतां फांद्यासकट उलथून पडतात, पण तसा प्रकार याचा होत नाहीं. म्हणून हा वृक्ष साधारण नव्हे. ५० अर्जुना, हें झाड अलौकिक असून याचें असें एक नवल आहे कीं, याची वाढ खालच्या बाजूस आहे. ५१ ज्याप्रमाणें सूर्याची उंची किती आहे हें कळत नाहीं, पण त्याचीं किरणें खालीं पसरतात, त्याप्रमाणें हा संसाररूपी वृक्ष चमत्कारिक आहे. ५२ आणखी, या जगतांत जितक्या म्हणून वस्तु आहेत, तितक्या सर्वांस या झाडानें व्यापून टाकलें आहे. कल्पांतसमयींच्या उदकानें जसें सर्व आकाश व्यापून जातें, ५३ किंवा सूर्य अस्तास गेल्यावर ज्याप्रमाणें रात्र अंधारानें कोंदलेली असते, त्याप्रमाणें हा वृक्ष सर्व गगनांत भरलेला आहे. ५४ चाखावें म्हटलें तर याला फळ नाहीं; हुंगावें म्हटलें तर फूलही नाहीं; जें कांहीं आहे, तें सर्व हा वृक्षच! ५५ याचीं मुळें वर आहेत, तथापि हा उपटून टाकलेला नाहीं. अर्जुना, याच कारणास्तव हा नेहमीं हिरवागार असतो. ५६ आणि याला वर मुळें आहेत असें जरी म्हटलें आहे, तरी खालींही याला पुष्कळ मुळें आहेत. ५७ हा चहूंकडून पिंपळ अथवा वड यांप्रमाणें पसरलेला आहे. त्याच्या पारंब्या जशा जमिनीस लागून त्यांस डाहाळ्या फुटतात, ५८ त्याप्रमाणें अर्जुना, संसाररूपी

परी । जे पारंवियांमाझारीं । डहाळिया असती ॥ ५८ ॥ तेविंचि गा धनंजया । संसारतरू ययां । अधींचि आथी खांदिया । हेंही नाहीं ॥ ५९ ॥ तरी ऊर्ध्वाहीकडे । शाखांचे भांदोडे । दिसताति अपाडें । सासिन्नले ॥ ६० ॥ जालें गगनाचि पैलविये । कां वारा मांडला रुखाचेनि आयें । नाना अवस्थात्रयें । उदयला असे ॥ ६१ ॥ ऐसा हा एकु । विश्वाकार विटंकू । उदयला जाण रुखु । ऊर्ध्वमूळ ॥ ६२ ॥ ( ७९१. वृक्षाचें मूळ, शाखा कशा व याला अश्वत्थ कां म्हणतात तो अभिप्राय; काव्य, ६३–६७ ) आतां ऊर्ध्व या कवण । येथें मूळ तें कीलक्षण । कां अधोमुखपण । शाखा कैसिया ॥ ६३ ॥ अथवा द्रुमा यया । अधीं जिया मुळिया । तिया कोण कैसिया । ऊर्ध्व शाखा ॥ ६४ ॥ आणि अश्वत्थु हा ऐसीं । प्रसिद्धि कायसी । आत्मविदविलासीं । निर्णयो केला ॥ ६५ ॥ हें आघवेंचि चरवें । तुझिये प्रतीतीसि फावे । तैसेनि सांगों सौलिवें । विन्यासें गा ॥ ६६ ॥ परी ऐकें गा सुभंगा । हा प्रसंगु असे तुजाचिजोगा । कानाचि करी हो सर्वांगा । हियें आथिलियां ॥ ६७ ॥ ( ७९२. श्रवणाविषयीं अर्जुनाच्या सर्वांगाला कान फुटले, त्यावर दोन रूपकें; काव्यप्रतिमा, ६८–७० ) ऐसें प्रेमरसें सुरफुरें । बोलिलें जंव यादववीरें । तंव अवधान अर्जुनाकारें । मूर्त जालें ॥ ६८ ॥ देव निरुपिती तें थेंकुलें । येवढें श्रोतेपण फांकलें । जैसें आकाशा खेंव पसरिलें । दाहीं दिशीं ॥ ६९ ॥ श्रीकृष्णोक्तिसागरा । हा अगस्तीचि दुसरा । म्हणौनि घोंटू भरों पाहे एकसरा । अववेयाचा ॥ ७० ॥ ( ७९३. देवांनीं झालेला आनंद अर्जुनावरून ओंवाळून टाकला आणि बोलूं लागले, ७१-७२ ) ऐसी सोय सांडूनि खवाळिली । आवडी अर्जुनीं देवें देखिली । तेथ जालेनि सुखें केली । कुरवंडी तया ॥ ७१ ॥ मग म्हणे धनंजया । तें ऊर्ध्व गा तरु यया । येणें रुखोंचि कां जया । ऊर्ध्वता गमे ॥ ७२ ॥ ( ७९४. उर्ध्वमूळ, ७३–७९ ) येऱ्हवीं मध्योर्ध्व अध । हे नाहीं जेथ भेद । अद्वयासी एकवेंदें । जया ठायीं ॥ ७३ ॥ जो नाइकिजता नादु । जो असौरभ्य मकरंदु । जो आंगाथिलें आनंदु । सुरतेंविण ॥ ७४ ॥ जया जें ओऱ्हां परौतें । जया जें पुढें मागौतें । दिसतेनविण दिसतें । अदृश्य जे ॥ ७५ ॥ उपाधीचा दुसरा । घालितां वोपसरें । नामरूपाचा संसारा । होय जयातें ॥ ७६ ॥ ज्ञातृज्ञेयाविहीन । नुसधेंचि जें ज्ञान । सुखा भरलें गगन । गौळीव जें ॥ ७७ ॥ जें कार्य ना कारण । जया दुजें ना एकपण । आपणयां जें जाण । आपणचि ॥७८॥

१ जुंम्राडे. २ विस्तार पावलेले. ३ आश्रयभूत. ४ सामर्थ्यानें. ५ निविड. ६ वृक्षास. ७ स्पष्ट. ८ निरूपणानें. ९ भाग्यवंता. १० अंतःकरणपूर्वक. ११ भरपूर. १२ मर्यादा. १३ ब्रह्म. १४ ऐक्य. १५ सुगंध. १६ स्वयमेव. १७ स्वरूपानंद. १८ विषयसेवनाशिवाय. १९ अलीकडे. २० पृ. ६९३ ची टीप पाहा. २१ सूक्ष्म.

वृक्षास खालींच खांद्या आहेत असाही प्रकार नाहीं. ५९ तर वरही ह्याला अपार खांद्या असून त्या विस्तार पावलेल्या आहेत. ६० या झाडाचा विस्तार होण्यास सर्व आकाश आश्रयभूत असून, सर्व वारा या वृक्षाच्या सामर्थ्यानेंच वाहतो, व याच्याच योगानें तिन्ही अवस्था ( उत्पत्ति, स्थिति आणि लय ) प्राप्त होतात. ६१ याप्रमाणें हा विश्वाकाररूपी वर मुळें असलेला निबिड असा वृक्ष उत्पन्न झाला आहे. ६२ आतां या झाडाच्या वर कोण आहे, याचे मूळ कोण, त्याचीं लक्षणे काय, व याचा खालीं विस्तार असून याच्या फांद्या कोणत्या; ६३ अथवा या वृक्षाला खालीं ज्या मुळ्या आहेत, त्यापासून वर खांद्या कोणत्या व कशा उत्पन्न होतात, ६४ आणि या वृक्षास ' अश्वत्थ ' हें नांव कशावरून प्राप्त झालें, व आत्मज्ञान्यांनीं याचा काय निर्णय केला आहे, ६५ या सर्व गोष्टी उत्तम रीतीनें तुझ्या अनुभवास येतील असें स्पष्ट निरूपण करून सांगतों. ६६ तर हे भाग्यवंता, हें निरूपण ऐकण्यास तूंच योग्य आहेस; म्हणून सर्व इंद्रियें कानांचे ठिकाणीं आणून अंत:करणपूर्वक ऐक. ६७ यादववीर जो श्रीकृष्ण भगवान, तो याप्रमाणें प्रेमरसानें भरलेलें असें भाषण बोलल्यावर, अर्जुनाच्या ठिकाणीं अवधान हें मूर्तिमंत दिसूं लागलें. ६८ ज्याप्रमाणें आकाश मोठे असूनही त्यास दाही दिशांनीं आलिंगन दिलें आहे, त्याप्रमाणें, भगवंतांचें निरूपण इतकें लहान झालें कीं, त्यास अर्जुनाचे श्रोतेपणानें आलिंगन दिलें ! ६९ श्रीकृष्णाच्या भाषणरूपी समुद्रास अर्जुनाचें श्रोतेपण हाच कोणी एका आचमनात संपविणारा दुसरा अगस्ति ऋषि होय; म्हणून, श्रीकृष्ण जे सांगतील, त्या सर्वांचा एकच घोट करण्यास अर्जुन प्रवृत्त झाला ! ७० अर्जुनाच्या ठिकाणीं ऐकण्याची अशी अमर्याद इच्छा उत्पन्न झालेली पाहून श्रीकृष्णानीं आपल्यास झालेलें समाधान त्याच्यावरून ओंवाळून टाकलें ! ७१ मग श्रीकृष्ण भगवान अर्जुनास म्हणतात.—धनंजया, या झाडाच्या वर जें ( ब्रह्म ) आहे, त्यास या झाडामुळेंच ऊर्ध्वपणा प्राप्त झाला. ७२ एरव्हीं ज्या ब्रह्माचे ठिकाणीं मध्य, ऊर्ध्व व अध हे कांहींच प्रकार नसून जें अद्वैताला ऐक्यतेस आणितें; ७३ व जें तंतुवाद्यापासून उत्पन्न होऊन ऐकूं येणाऱ्या नादाच्या पूर्वींचा जो मूळ नाद, तसेंच मकरंदांतून उत्पन्न होणाऱ्या सुगंधाच्या मुळांचा जो सुगंध, व जो विषयसेवनाशिवाय उत्पन्न होणारा स्वरूपानंद—असें आहे; ७४ ज्याला अलीकडे व पलीकडे, पुढें व मागें अशी मर्यादा नाहीं; व दृष्टि नसून पाहणारें व अदृश्य आहे; ७५ उपाधींचा ओपसरा* घातला असतां जे नांवारूपाच्या विस्तारास येतें; ७६ जें ज्ञाता व ज्ञेय यांच्याशिवाय केवळ ज्ञान असून, सर्व जगात सूक्ष्म रीतीनें भरून राहिलें आहे; ७७ जें कार्य नाहीं व कारणही नाहीं, ज्याला द्वैत व अद्वैतही नाहीं, व जें आपलेपणास जाणणारें आहे; ७८

*तोरमलीची किंवा दुसऱ्या कसल्या रत्नाची अंगठी करितांना, तें रत्न फार तेजस्वी दिसावें म्हणून त्याखालीं जें द्रव्य घालतात, त्यास ओपसरा म्हणतात.

ऐसें वस्तु जें साचें । तें ऊर्ध्व गा यया तरूचें । तेथ आंर घेणें मूळाचें । तें ऐसें असे ॥ ७९ ॥ ( ७९५. उर्ध्वमूळाला उपाधीनें अंकुर फुटतात, ८०–९३ ) तरी माया ऐसी ख्याती । नसतीच यया आथी । कां वाझेची संतती । वानणें जैशी ॥८०॥ तैसी सत् ना असत् होये । जे विचाराचें नाम न साहे । ऐसेया परीची आहे । अनादि म्हणती ॥ ८१ ॥ जे नानातत्त्वांची मांदुस । जे जगदभ्राचें आकाश । जे आकारजाताचें दुस । घडी केलें ॥ ८२ ॥ जे भवद्रुमबीजिका । जे प्रपंचाची भूमिका । विपरीत ज्ञानदीपिका । सांचली जे ॥ ८३ ॥ ते माया वस्तूच्या ठायीं । असे जैसेनि नाहीं । मग वस्तुप्रभावाचि पाहीं । प्रगट होय ॥ ८४ ॥ जेव्हां आपणया आली निद । करी आपणपें जेविं मुग्ध । का काजळी आणी मंद । प्रभा दीपीं ॥ ८५ ॥ स्वप्नीं प्रियापुढें तरुणांगी । निदेली चेवऊनि वेगीं । आलिंगिलेनिवीण आलिंगी । सकामु करी ॥ ८६ ॥ तैसी स्वरूपीं जाली माया । आणि स्वरूप नेणे धनंजया । तेंचि रुखा यया । मूळ पहिलें ॥ ८७ ॥ वस्तूसी आपला जो अबोधु । तो ऊर्ध्वीं आठुळइजे कंदु । वेदांतीं हाचि प्रसिद्धु । बीजभावो ॥ ८८ ॥ घन अज्ञान सुषुप्ति । तो बिजांकुरभावो म्हणती । येर स्वप्न हन जागृती । हा फळभावो तियेचा ॥ ८९ ॥ ऐसी यया वेदांतीं । निरूपणभाषाप्रतीती । परी तें असो प्रस्तुतीं । अज्ञान मूळ ॥ ९० ॥ तें ऊर्ध्व आत्मा निर्मळें । अधोर्ध्व सूचिती मूळें । बाळिया बांधोनि आळें । मायायोगाचें ॥९१॥ मग ओंथिलीं सदहांतरें । उठती जियें अपारें । तें चौपांसी घेऊनि आगारें । खोलावती ॥९२॥ ऐसें भवद्रुमाचें मूळ । हें ऊर्ध्वीं करी बळ । मग आणियाचें वेंवळें । अधीं दावी ॥९३॥ ( ७९६. शाखांची वाढ, ९४-१०९ ) तेथ चिद्वृत्ती पहिलें । महत्तत्वें उमेलें । तें पान वाल्हेंदुल्हें । एक निघे ॥९४॥ मग सत्त्वरजतमात्मकु । त्रिविध अहंकारु जो एकु । तो तिवेणा अधोमुखु । डिरुं फुटे ॥ ९५ ॥ तो बुद्धीची घेऊनि आगेंारी । भेदाची वृद्धि करी । तेथ मनाचें ढाळ धरी । सोंजेपणें ॥९६॥ ऐसा मूळाचिया गाढिकें । विकल्परस कोंवळिका । चित्तचतुष्टय डाहाळिका । कोंभैजेतो ॥ ९७ ॥ मग आकाश वायु द्योतक । आप पृथ्वी हे पांच फोंक । महाभूतांचे सरोखें । सरळे होती ॥ ९८ ॥ तैसीं श्रोत्रादि तन्मात्रें । तियें अंगवसां गर्भपत्रें । लुळलुळितें विचित्रें । उमळती ना ॥ ९९ ॥ तेथ

१ शुद्ध ब्रह्म. २ अंकुर. ३ पेटी. ४ विश्वाकाराचें. ५ वस्त्र. ६ ब्रह्माचे ठिकाणीं. ७ माया. ८ निघतात. ९ प्रथम. १० चार प्रकारचे. ११ संसाररूपी झाडाचें. १२ अंकुरांचे. १३ झुबके. १४ ज्ञानरूप वृत्ति. १५ अंतःकरण. १६ उत्पन्न झालें. १७ नाजुक. १८ तीन पानाचा. १९ अंकुर. २० डाहाळी. २१ टवटवीतपणानें. २२ दृढतेनें. २३ भेद. २४ बुद्धि, मन, अहंकार व चित्त. २५ तेज. २६ वेगानें. २७ पंचज्ञानेंद्रियें व त्यांचे विषय. २८ पालवी. २९ कोंवळी.

याप्रमाणें जें शुद्ध ब्रह्म, तें या संसाररूपी झाडाला वर मूळ असून त्याला जे अंकुर फुटतात ते असे आहेत, ७९ तर या विश्वास माया असें म्हणतात. जी ज्ञानाच्या योगानें भासत नाहीं, व अज्ञानाच्या योगानें भासते; किंवा वांझ स्त्रीला अमुक संतति झाली, असें वर्णन करणें ज्याप्रमाणें मिथ्या होय, ८० त्याप्रमाणें, जी आहे म्हणतां येत नाहीं व नाहींही म्हणतां येत नाहीं; व जी ज्ञानापुढें टिकत नाहीं. याप्रमाणें हिचा प्रकार असून हिला अनादि असें म्हणतात. ८१ जी नाना तत्त्वांची पेटी होय, जी जगद्रूप अभ्राला आधार होय; व विश्वाकाररूप वस्त्राची घडी होय; ८२ जी संसाररूप वृक्षाची बी, जी प्रपंचाचें चित्र काढण्याची भूमिका, व जिच्यामध्यें ब्रह्मज्ञानाशिवाय इतर ज्ञानाचें तेज भरलेलें आहे. ८३ अशी ती माया ब्रह्माचे ठिकाणीं आश्रय करून असते. त्या योगानें ब्रह्माचे तेजानें ती प्रकट होते. ८४ जागृत मनुष्यास निद्रा आली असतां तो जसा जागचे जागीं स्तब्ध होतो; किंवा काजळीनें दिव्याचें तेज जसें मंद होतें; ८५ अथवा स्वप्नात एखाद्या मनुष्याजवळ तरुण स्त्री येऊन त्यास जागें करून आलिंगन दिल्याशिवायच तो ज्याप्रमाणें तिला आलिंगन देऊन कामातुर होतो, ८६ त्याप्रमाणें, धनंजया, स्वरूपाच्या आधारावर माया उत्पन्न होऊन, त्या स्वरूपानें आपलेपण विसरणें, हेंच या विश्वरूप तरूचें पहिलें मूळ होय. ८७ ब्रह्माला आत्मस्वरूपाचा विसर पडला, म्हणजे ब्रह्माचे ठिकाणीं माया उत्पन्न होते; आणि ह्यालाच वेदांती मंडळी " बीजभाव " असें म्हणतात. ८८ जेव्हां अज्ञानानें गाढ झोप लागते, तेव्हां त्यालाच मायेचा मोड फुटतो असें म्हणतात; व त्याच मोडापासून स्वप्न व जागृति हीं फळें उत्पन्न होतात. ८९ याप्रमाणें वेदांती लोकांची निरूपण करण्याची पद्धत आहे; परंतु तें तूर्त राहूं दे. या सर्व गोष्टींस मूळ अज्ञान आहे, एवढेंच समज. ९० निर्मळ आत्म्याचे ठिकाणीं असणारी जी माया, तिच्या खालच्या व वरच्या बाजूस मुळें निघून, त्यांना मायारूपी आळ्यांत पाणी मिळून तीं मुळें बळकट होतात. ९१ मग त्या मुळांस पहिल्या प्रथम देह उत्पन्न होऊन खालच्या बाजूस चार प्रकारचे अंकुर फुटतात. ९२ याप्रमाणें संसाररूपी झाडाचें मूळ स्वरूपाचे ठिकाणीं बळकट झाल्यावर, मग त्याला खालीं अंकुरांचे झुबके निघतात. ९३ त्या अंकुरांत ज्ञानरूप वृत्ति अंतःकरणांत उत्पन्न होऊन तें प्रथमचें एक नाजूक पान उगवतें. ९४ नंतर सत्त्वरजतमात्मक जो अहंकार, तो एक तीन पानांचा अंकुर खालच्या बाजूस फुटतो. ९५ नंतर बुद्धिरूप दुसरी डाहाळी फुटून भेदाची वृद्धि होते. त्या योगानें मनरूपी डाहाळीस ओलावा मिळून ती टवटवीत होते. ९६ याप्रमाणें मूळ बळकट झाल्यावर, विकल्परूपी रसाच्या योगानें, त्याला चित्तचतुष्टय ह्या चार कोंवळ्या डहाळ्या फुटतात. ९७ मग आकाश, वायु, तेज, पाणी व पृथ्वी हे पंचमहाभूतांचे पांच फोंक वेगानें सरळ निघतात. ९८ त्याचप्रमाणें, त्या फोंकांला श्रोत्रादि पंचज्ञानेंद्रियें व त्यांचे विषय हीं कोंवळी विचित्र पालवी फुटते. ९९ नंतर शब्दरूपी अंकुर कानाच्या व्याप्तीयेवढा

शब्दांकुर वैरिपडी । श्रोत्रा वाढी देव्हडी[2] । होता करित कांडीं । आकांक्षेची[3]- ॥ १०० ॥ अंगत्वचेचे वेलपल्लव । स्पर्शांकुरीं घेती धांव । तेथें वांवळ पडे[4] अभिनव । विकाराचें ॥ १ ॥ पाठीं रूपपत्र[6] पालोवेलीं । चक्षु लांब तें कांडें घाली । ते वेळी व्यामोह[7]ता भली । पाल्हाळीं[8] जाय ॥ २ ॥ आणि रसाचें आंगवसें । वाढतां वेगें बहुवसें । जिव्हे आर्तीची अंसोसें । निघती वेंचें[10] ॥ ३ ॥ तैसेंचि कोंभलेनि गंधें । घ्राणाची डिरी थांबु[11] बांधे । तेथ तळ घे स्वानंदें । प्रलोभाचा ॥ ४ ॥ एवं मह[12]देहंबुद्धि । मनें महाभूतसमृद्धि । इये संसा[13]राचिया अवधि । सौंसः निजें ॥ ५ ॥ किंबहुना इहीं आठें । आंगीं हा अधिक फांटे । परि शिंपीचियेवढें उमटे । रुपें जेविं ॥ ६ ॥ का समुद्राचेनि पैसारें । वरी तरंगता आसारे । तैसें ब्रह्मचि होय वृक्षाकारें । अज्ञानमूळ ॥ ७ ॥ आतां याचा हाचि विस्तारु । हाचि यया पैसारु । जैसा आपणपें स्वप्नीं परिवारु । येकाकिया ॥ ८ ॥ परि तें असो हें ऐसें । कोंवेरें झाड उससे[16] । यया महदादि आरवसें[17] । अधोशाखा ॥ ९ ॥ ( ७९७. अश्वत्थ म्हणण्याचें कारण, ११०–११४ ) आणि अश्वत्थु ऐसें ययातें । म्हणती जे जाणते । तेंही परिस हो येथें । सांगिजेल ॥ ११० ॥ तरि श्वा म्हणिजे उर्खा । तोंवरी एकसारिखा । नाहीं निर्वाहो यया रुखा । प्रपंचरूपा ॥ ११ ॥ जैसा न लोटतां क्षणु । मेघु होय नानावर्णु । कां विजु नसे संपूर्णु । निमेषभरी ॥ १२ ॥ ना कांपतया पद्मदळा । वरिलिया त्रैसका नाहीं जळा । कां चित्त जैसें व्याकुळा । माणुसाचें ॥ १३ ॥ तैसीचि ययाची स्थिति । नासत जाय क्षणक्षणाप्रती । म्हणौनि ययातें म्हणती । अश्वत्थु हा ॥ १४ ॥ ( ७९८. अश्वत्थ म्हणजे पिंपळ नव्हे, क्षणिकत्वामुळें अश्वत्थ, ११५–११७ ) आणि अश्वत्थु येणें नावें । पिंपळु म्हणती स्वभावें । परि तो अभिप्राय नोहे । श्रीहरीचा ॥ १५ ॥ येरव्हीं पिंपळु म्हणतां विर्खी[19] । मियां गति देखिली असे निकी । परि तें असो काय लौकिकीं । हेतु काज ॥ १६ ॥ म्हणौनि हा प्रस्तुतु । अलौकिकु परिसा ग्रंथु । तरी क्षणिकत्वेंचि अश्वत्थु । बोलिजे हा ॥ १७ ॥ ( ७९९. अव्यय म्हणण्याचें कारण, ११८–१३२ ) आणीकही येकु थोरु । यया अव्ययत्वाचा डगरु[21] । आथी परी तो भीतरें । ऐसा आहे ॥ १८ ॥ जैसा मेघाचेनि तोंडें । सिंधु एकें आंगें काढे । आणि नदी येरीकडे । भरितचि असती ॥ १९ ॥ तेथ वोहटे ना चढे । ऐसा परिपूर्णचि आवडे । परी ते फुली[22] जंव नुघडे । मेघा नदीची ॥ १२० ॥ ऐसें या रुखाचें होणें

१ प्राप्त होऊन. २ दुप्पट. ३ इच्छेची. ४ आधिक्य होतें. ५ नानाप्रकारच्या. ६ रूप हेंच पान. ७ भ्रम. ८ धाव घेतो. ९ अपार. १० पानांतली पानें ११ मळ. १२ अष्टधाप्रकृति=मन, बुद्धि, अहंकार व पंच महाभूतें. १३ मायेपासून. १४ तयार होते. १५ आश्चर्यकारक. १६ वाटतें. १७ अंकुर. १८ उद्यां. १९ विश्वीं. २० प्रसिद्धि. २१ गर्भित अर्थ. २२ फांटा.

फुटून ऐकण्याची इच्छा पूर्ण करतो. १०० मग अंग व त्वचा हीं वेल आणि पानें फुटून त्याला स्पर्शरूपी अंकुर येतो; आणि मग नानाप्रकारच्या विकारांचें आधिक्य होतें. १ पुढें रूप हें पान फुटून डोळा ह्या भ्रमानें त्याची गोडी घेण्याविषयीं धांव घेतो; २ आणि रसरूपी फांदी वेगानें फुटून जिभेस अपार इच्छा उत्पन्न होते. ३ त्याचप्रमाणें, गंधरूपी कोंब येऊन नाकाची इच्छा प्रबल होऊन लोभ उत्पन्न होतो. ४ याप्रमाणें मन, बुद्धि, अहंकार व पंचमहाभूतें अशी जी अष्टधाप्रकृति ती या मायेपासून तयार होते. ५ फार काय ? परंतु हा वृक्ष ह्या आठ प्रकारांनीं अधिक वाढेल; पण शिपीवर भासलेलें रुपें जसें शिपीच्या आकाराएवढेंच भासतें, ६ किंवा समुद्रावर उत्पन्न होणाऱ्या लाटा ज्याप्रमाणें समुद्राएवढ्याच असतात, त्याप्रमाणें, अज्ञानमूलक जो हा जगद्रूपी वृक्ष, तो ब्रह्मच बनतें, ७ म्हणून सर्व जग हा अज्ञानाचा विस्तार असून त्यावर त्याचा पसारा भासतो. ज्याप्रमाणें स्वप्नांत मनुष्य एकटा असून जें जें कांहीं पहातो तें सर्व आपणच होतो; ८ परंतु या सर्व गोष्टी बाजूस ठेव. याप्रमाणें हें आश्चर्यकारक झाड वाढतें, व याला महत्तत्त्वादि अंकुर खालच्या बाजूस फुटतात, ९ आणि या झाडाला ज्ञाते लोक अश्वत्थ असें जें म्हणतात, त्याबद्दलही तुला सांगतों तें ऐक. १० तर श्वा (श्व) याचा अर्थ उद्यां असा आहे. उद्यांपर्यंतही या प्रपंचरूपी झाडाचा एकच प्रकार रहात नाहीं, म्हणून याला 'अश्वत्थ' असें म्हणतात. ( संस्कृतात, क्षणभरही जो एकसारखा नसतो तो *अश्वत्थ*. ) ११ ज्याप्रमाणें एका क्षणात मेघाचे नानातऱ्हेचे रंग बदलतात, किंवा वीज निमिषमात्र देखील पूर्णपणें टिकत नाहीं; १२ कमलाच्या हालणाऱ्या पानावर जसें पाणी ठरत नाहीं, किंवा व्याकुळ झालेल्या मनुष्याचें मन ज्याप्रमाणें स्थिर नसतें, १३ त्याचप्रमाणें, या संसाररूपी झाडाची स्थिति असून प्रत्येक क्षणास तिचा नाश होतो, म्हणूनच याला 'अश्वत्थ' असें म्हणतात; १४ आणि व्यवहारांत 'अश्वत्थ' म्हणजे पिंपळ असें म्हणतात; परंतु श्रीहरींचा या ठिकाणीं तसा अभिप्राय नाहीं. १५ बाकी या झाडास पिंपळ म्हटलें असतां मी आपले मनांत त्याचा खरा अर्थ समजलों होतों. परंतु या व्यावहारिक गोष्टीबद्दल बोलण्याचे आपणांस कारण नाहीं. १६ म्हणून सध्यां हा अलौकिक ग्रंथ ऐका. तर संसाररूपी वृक्ष हा क्षणिक आहे, म्हणूनच याला अश्वत्थ असें म्हणतात. १७ आणखी हा वृक्ष अव्यय म्हणजे नित्य या नांवानें प्रसिद्ध आहे. परंतु ह्याचा गर्भित अर्थ असा आहे कीं, १८ ज्याप्रमाणें समुद्राचे पाणी वाफेच्या रूपाने मेघ शोषण करितात, व तेच मेघ वर्षाव करून नदींत पडल्यावर त्या नद्या समुद्रास मिळतात; १९ समुद्र आटतही नाहीं व वाढतही नाहीं म्हणून परिपूर्ण असा दिसतो; परंतु जोंपर्यंत मेघाचें शोषण करणें किंवा नद्यांचे समुद्रास मिळणें या दोहोंपैकीं एकास फाटा मिळाला नाहीं तोंपर्यंतच तो पूर्ण होय; १२० त्याप्रमाणें या संसाररूपी झाडाची उत्पत्ति व लय हीं अति त्वरेनें होतात, म्हणून त्याचा तर्क करितां येत नाहीं; यास्तव लोक याला 'अव्यय' असें म्हणतात. २१ एरवीं, दा

जाणें । न तर्के होतेनि वोहिलेपणें । म्हणोनि ययातें लोकु म्हणे । अव्ययु हा ॥२१॥ येऱ्हवीं दानशीळ पुरुषु । वेंचकेपणोंचि संचकु । तैसा व्ययेंचि हा रुखु । अव्ययो गमे ॥२२॥ जातां वेगें बहुवसें । नैं वचे कां भूमी रुतले असे । रथाचें चक्र दिसे । जियापरी ॥ २३ ॥ तैसें काळातिक्रमें जे वाळे । ते भूतशाखा जेथ गळे । तेथ कोडीवरी उर्माळे । उठती आणिक ॥ २४ ॥ परी येकी केधवां गेली । शाखाकोडी केधवां जाली । हें नेणवे जेवि उमललीं । आषाढअभ्रें ॥ २५ ॥ महाकल्पाच्या शेवटीं । उदेलिया उमळती सृष्टी । तैसीचि आणिखींचें दांगें उठी । सासिन्नलें ॥ २६ ॥ संहारवातें प्रचंडें । पडती प्रळयांतींचीं सालडें । तंव कल्पादीचीं जुंबाडें । पाल्हेजैंती ॥ २७ ॥ रिगे मन्वंतर मनूपुढें । वंशावरी वंशांचे मांडे । जैसी इक्षुवृद्धी कांडेनकांडें । जिंके जेवि ॥ २८ ॥ कलियुगांतीं कोरडीं । चहूं युगाचीं सांले सांडी । तंव कृतयुगाची पेली[11] देव्हैडी । पडे पुढती ॥ २९ ॥ वर्ततें वर्ष जाये । तें पुढिला मुळहारी होये । जैसा दिवसु जात कीं येत आहे । हें चोजवेनैं ॥ १३० ॥ जैसा वारियाचा झुळकां । सांदा ठाउवा नव्हे देखा । तैसिया उठती पडती शाखा । नेणों किती ॥ ३१ ॥ एकी देहाची डिरी तुटे । तंव देहांकुरीं बहुवी फुटे । ऐसेनि भवतरु हा वाटे । अव्ययो ऐसा ॥ ३२ ॥ (८००. अज्ञान्याला वृक्षाची गति न कळल्यामुळें अव्यय म्हणतात, १३३–१३८) जैसें वाहतें पाणी जाय वेगें । तैसेंचि आणिक मिळे मागें । येथ असंतेंचि आसिजे जगें । मानिजे संतें ॥ ३३ ॥ का लागोनि डोळा उघडे । तंव कोडीवरी घडे मोडे । नेणतया तरंगु आवडे । नित्यु ऐसा ॥ ३४ ॥ वायसा एकें बुबुळें दोहींकडे । डोळा चाळिता अँपाडें । दोन्ही आथी ऐसा पडे । भ्रमु जेवि जगा ॥ ३५ ॥ पैं भिंगोरी[18] निधियें[19] पडली । ते गमे भूमीसी जैसी जडली । ऐसा वेगातिशयो भुली । हेतु होय ॥ ३६ ॥ हें बहु असो झैंडती । आंधारें भोवंडितां कोलती । ते दिसे जैसी आयती । चक्राकार ॥ ३७ ॥ हा संसारवृक्ष तैसा । मोडत मांडतु सहसा । न देखोनि लोकु पिसा । अव्ययो मानी ॥ ३८ ॥ (८०१. वृक्षाचें क्षणिकत्व जो जाणतो तोच तत्त्ववेत्ता, १३९–१४३) परि ययाचा वेग देखे । जो हा क्षणिक ऐसा वोळखे । जाणे कोडिवेळां निमिखें । होत जात ॥ ३९ ॥ नाहीं अज्ञानावांचूनि मूळ । ययांचें आसिलेंपण टवाळ । ऐसें झाड सिनैसाळ । देखिलें जेणें ॥ १४० ॥ तयातें गा पंडुसुता । मी सर्वज्ञुही म्हणे

१ लवकर. २ खर्चिकपणानें. ३ वाटत नाहीं. ४ अंकुर. ५ अरण्यें; फांद्या. ६ शरीरें. ७ उत्पन्न होतात. ८ सूर्यवंश व चंद्रवंश. ९ विस्तार होतो. १० साली; शरीरें. ११ ओली साल; उत्पत्ति. १२ दुप्पट. १३ आमंत्रण. १४ कळत नाहीं. १५ नाशवंत. १६ स्थिर. १७ सत्वर. १८ भोवरा. १९ अतिवेगानें फिरूं लागला. २० दाखले. २१ हातांत घेऊन. २२ खोटें. २३ संपूर्ण.

शील पुरुष हा जरी धर्म करून सर्व पैसा खर्च करून टाकतो, तरी तो ज्याप्रमाणें पुढील जन्मीं आपल्यास ठेव जोडतो, त्याप्रमाणें हा वृक्ष अति वेगानें उत्पत्ति, स्थिति व लय पावत असल्यामुळें लोकांस नित्य असा भास होतो. २२ रथाचें चाक भूमीवर न टेकतां अति वेगानें चाललें असतां त्याची गति लोकांस न दिसल्यामुळें ज्याप्रमाणें तें स्थिर आहे असें भासतें, २३ त्याप्रमाणें, कालातिक्रमानें ह्या झाडाची जी प्राणिरूपें शाखा गळून पडते व पुनः तीस कोट्यावधि अंकुर फुटतात. २४ परंतु एक खांदी केव्हा गळाली अथवा कोट्यावधि फांद्या केव्हां फुटल्या, हें ज्याप्रमाणें, आषाढ महिन्यांत अभ्रावर अभ्रें येत असलीं म्हणजे कोणचीं आलीं व कोणचीं गेलीं हें कळत नाहीं, त्याप्रमाणें कळत नाहीं. २५ प्रलयकालाचे शेवटीं ह्या संसाररूपी वृक्षाच्या देहरूपी शाखा गळून पडतात, व पुनः जगदुत्पत्तीच्या वेळीं नव्या फुटतात. २६ संहारकालाच्या प्रचंड वाऱ्यानें प्रळयाच्या अंतीं शरीरें पडतात, व त्यांचे कल्पाच्या सुरवातीस पुनः झुबक्याचे झुबके उगवतात. २७ मग एका मन्वंतरापुढें दुसरें मन्वंतर, याप्रमाणें सूर्यवंश, चंद्रवंश असा विस्तार होतो; व ऊंस ज्याप्रमाणें पेऱ्यापेऱ्यानीं वाढत जातो, त्याप्रमाणें हें सर्व विश्व वाढतें. २८ कलियुगाच्या अंतीं चारी युगातील शरीरें खालीं पडतात, ( झाडाच्या साली झडून तें वठतें, ) इतक्यांत कृतयुग सुरू झालें म्हणजे त्याची पुनः उत्पत्ति होऊन तें जास्त वाढतें. २९ चालू असलेलें वर्ष संपून तें जसें पुढील वर्षास आमंत्रण देतें, किंवा ज्याप्रमाणें दिवस जातो किंवा येतो हें त्याच्या नित्य येण्याजाण्यानें कळत नाहीं; १३० ज्याप्रमाणें वाऱ्याच्या झुळकावर झुळका येऊं लागल्या म्हणजे कोणची झुळुक संपली व कोणची आली हें समजत नाहीं, त्याप्रमाणें किती शरीरें उत्पन्न होतात व लय पावतात, हें समजत नाहीं. ३१ एक डिरी तुटून पडली न पडली तोंच दुसऱ्या शेंकडों डिऱ्या फुटतात, त्या योगानें हा भवरूपी वृक्ष नित्य आहे असा भासतो. ३२ नदीचें वाहतें पाणी वेगानें चाललें म्हणजे त्याला ज्याप्रमाणें मागून येणारें पाणी वरचेवर मिळून वाहतें, त्याप्रमाणें, हें जग नाशवंत असून त्याला स्थिर असें समजतात. ३३ किंवा डोळ्याचें पातें लवलें नाहीं इतक्या अवकाशांत कोट्यवधि प्राण्यांची घडामोड होते; परंतु समुद्रावर ज्या लाटावर लाटा येतात त्या नित्य भासतात, त्याप्रमाणें अज्ञान्याला संसार नित्य भासतो. ३४ कावळा आपलें एक बुबुळ एका क्षणात दोन्ही डोळ्यांत फिरवितो, आणि त्या योगानें त्याला एक डोळा असतांही दोन आहेत असें लोकांस भासतें; त्याप्रमाणें, जग अनित्य असून नित्य आहे असा भ्रम होतो. ३५ किंवा भोंवरा अतिवेगानें फिरूं लागला म्हणजे फिरत असून स्थिर आहे असा भास होतो, त्याप्रमाणें या जगाचा प्रकार आहे. ३६ हे पुष्कळ दाखले राहूं दे; परंतु एखादा मनुष्य हातात कोलती घेऊन अति वेगानें आपले भोंवतीं फिरूं लागला म्हणजे ती ज्याप्रमाणें मोठ्या चक्राच्या आकाराची दिसते; ३७ त्याप्रमाणें, हा संसाररूपी वृक्ष नेहमीं नाश पावतो व उत्पन्न होतो हें न समजल्यामुळें, लोक वेडेपणानें यास नित्य मानतात. ३८ परंतु या संसाररूपी वृक्षाचा वेग जाणून, हा क्षणिक आहे व हा एका निमिषांत कोट्यवधि वेळा उत्पन्न होतो व लय पावतो असें जो समजतो; ३९ आणि ह्याला अज्ञानावाचून दुसरें कारण नाहीं, व याचें अस्तित्व खोटें आहे, याप्रमाणें जो या संसाररूपी वृक्षास पूर्णपणें जाणतो, १४० तोच मनुष्य, अर्जुना, सर्वज्ञ आहे, व वेदांतील सिद्धांत जाण-

जाणता । पैं वेगब्रह्मीं सिद्धांता । वंद्यु तोचि ॥ ४१ ॥ योगजाताचें जोडलें । तया एकासीची उपयोगा गेलें । किंबहुना जियालें । ज्ञानही त्याचेनि ॥ ४२ ॥ हें असो बहु बोलणें । वानिजेल तो कवणें । जो भवरुख जाणे । [१]उखि ऐसा ॥४३॥

अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।
अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ॥ २ ॥

अन्वयः—तस्य गुणप्रवृद्धाः विषयप्रवालाः शाखाः अधः च ऊर्ध्वं प्रसृताः ( सन्ति ), अधः च मनुष्यलोके कर्मानुबंधीनि मूलानि अनुसंततानि ( सन्ति ) ॥ २ ॥

( ८०२. गुणामुळें वृक्षाच्या शाखा खालींवर वाढल्या आहेत, १४४–१५४ ) मग ययाचि प्रपंचरूपा । अधोशाखिया [३]पाँदपा । डाहालिया जाती उमपा । ऊर्ध्वाही उजू ॥ ४४ ॥ आणि [४]अधीं फांकलीं डोळें । तियें होतीं मूळें । तयाही तळीं पघळे । वेल पालवु ॥ ४५ ॥ ऐसें जें आम्हीं । म्हणितलें [६]उपक्रमीं । तेंही परिसें सुगमीं । बोलीं सांगों ॥ ४६ ॥ तरी बद्धमूळ अज्ञानें । महदादिकीं[७] शासनें । वेदांचीं[८] थोर वनें । घेऊनियां ॥ ४७ ॥ परि आधीं तंव स्वेदज । जारज उद्भिज्ज अंडज । हे बुडौनि महाभुज । उठती चारी ॥ ४८ ॥ यया एकैकाचेनि ओंणगटें । चौऱ्यांशीं लक्षधा फुटे । ते वेळीं जीवशाखीं फांटे । सैंघाचि होती ॥ ४९ ॥ प्रसवती शाखा सरळिया । नाना सृष्टि डाहाळिया । आडें फुटती माळियेंी । जातीचिया ॥ १५० ॥ स्त्री पुरुष नपुंसकें । हे व्यक्तिभेदाचे टके[१२] । आंदोळती आगिकें । विकारभारें ॥ ५१ ॥ जैसा वर्षाकाळु गगनीं । पाल्हेजे नवैंधनीं । तैसें आकारजात अज्ञानीं । वेली[१४] जाय ॥ ५२ ॥ मग शाखांचेनि आंगभारें । लवोनि गुंफती परस्परें । गुणक्षोभाचे वारे । उदयजती ॥ ५३ ॥ तेथ तेणें अचाटें । गुणाचेनि झडझडाटें । तिहीं ठायीं हा फांटे । ऊर्ध्वमूळ ॥ ५४ ॥ ( ८०३. रजोगुणानें शाखांची वाढ, १५५-१६२ ) ऐसा रजाचिया झुळका । झडोडितां आगळिका । मनुष्यजातीं शाखा । थोरावती ॥ ५५ ॥ तिया ऊर्ध्वीं ना अधीं । माझारींचि कोंदाकोंदी । आड फुटती खांदी । चतुर्वर्णाच्या ॥ ५६ ॥ तेथ विधिनिषेध सपल्लव । वेदवाक्यांचे अभिनेंव । पालव डोलती बरव । नीच नवे ॥ ५७ ॥ अर्थु कामु पसरे । अग्रेंवनें घेती थारे । तेथ क्षणिकें पैंदातरें । इहभोगाचीं ॥ ५८ ॥ तेथ प्रवृत्तीचेनि वृद्धिलोभें । खांकरेजेती शुभाशुभें । नानाकर्मांचे खांबे । नेणों किती ॥ ५९ ॥ तेवींचि भोगक्षीणें मागिलें । पडती देहांतींची बुडसेंळें । तंव पुढा वाढी पेले । नवेया देहाची ॥ १६० ॥ आणि शब्दादिक सुहेवे । सहज रंगें हेवेंवें । विषयपल्लव नवे । नित्य होती ॥ ६१ ॥ ऐसे रजोवातें प्रचंडें । मनुष्यशाखांचे

१ वेदांतील. २ अनित्य. ३ पायानें पाणी घेऊन वाढणाऱ्यास. ४ खालीं. ५ डहाळ्य ६ आरंभीं. ७ अष्टधाप्रकृति. ८ ज्ञानाचीं. ९ फांद्या. १० अंकुरापासून. ११ आडव्या. १

णाराही आहे, असें मी म्हणतों; आणि तोच मला बंध आहे ! ४१ योगापासून मिळणारें फळही त्यालाच मिळतें. फार काय सांगावें ? त्याच्याच योगानें ज्ञानालाही जीवन मिळतें. ४२ हें पुष्कळ बोलणें असो; अशा प्रकारें हा संसाररूपी वृक्ष अनित्य आहे असें ज्यानें जाणलें, त्याचें कोणाच्यानेंही वर्णन करवणार नाहीं. ४३

श्लोकार्थः—त्या वृक्षाच्या खाद्या सत्त्वादि गुणानीं वाढलेल्या व शब्दादि विषयांच्या पालवीनें युक्त अशा असून, त्या वर ( सत्यलोकापर्यंत ) व खालीं ( पाताललोकापर्यंत ) पसरलेल्या आहेत; आणि खालीं मनुष्यलोकात ह्या वृक्षाचीं कर्मसंबंधी मुळें एकात एक गुंतून राहिलीं आहेत ॥ २ ॥

मग या प्रपंचरूपी वृक्षास खालीं शाखा येऊन, त्या जमीनींत गेल्यावर पुनः त्यांना शाखा उत्पन्न होऊन वरही सरळ शाखा उत्पन्न होतात; ४४ व ज्या डाहळ्या खालीं येतात, त्यांनाही मूळ फुटून खालच्या बाजूस वेल वाढून पानें येतात. ४५ याप्रमाणें, जें आम्हीं आरंभीं म्हटलें आहे, तेंच अधिक स्पष्ट करून सांगतों ऐक. ४६ तर मूळ अज्ञान असून, त्याच्यापासून अष्टधा प्रकृति उत्पन्न होऊन ज्ञानरूप मोठालीं वनें उत्पन्न होतात. ४७ पण आधीं या झाडाच्या बुडापासून स्वेदज, जारज, उद्भिज्ज व अंडज अशा चार मोठाल्या फांद्या फुटतात. ४८ ह्यांपैकीं एक एक फांदी बळावली म्हणजे त्यांच्या चौऱ्यायशीं लक्ष योनिरूप फांद्या होतात; व त्या फांद्यांस जीवरूपी फांटे फुटतात. ४९ या सरळ फांद्यांपासून ज्या डाहळ्या आडव्या फुटतात, त्या निरनिराळ्या जाति होत. १५० मग स्त्री, पुरुष व नपुंसक असे व्यक्तींचे भेद उत्पन्न होऊन त्या विषयांच्या भारानें एकमेकांवर आदळतात. ५१ ज्याप्रमाणें वर्षाकालीं आकाशांत मेघ उत्पन्न होतात, त्याप्रमाणें अज्ञानामुळें पुष्कळ जातींचीं शरीरें उत्पन्न होतात. ५२ मग गुणरूपी वारें सुटल्यावर खांद्या आपल्या भारानें लवून एकमेकांत गुंततात. ५३ ते गुण आंत वाढल्यामुळें ह्या ऊर्ध्वमूळाच्या वृक्षास ( अधस् = खालीं, मध्य व ऊर्ध्व असे ) तीन भेद होऊन फांटे फुटतात. ५४ याप्रमाणें रजोगुणाची झुळूक सुटून ती जोरानें वाहूं लागल्यावर मनुष्यजातिरूपी शाखा थोरावते. ५५ त्या शाखेला वर किंवा खालीं शाखा न फुटतां, मध्येंच ( मृत्युलोकीं ) चार वर्णांच्या चार फांद्या दाटीनें फुटतात. ५६ त्या फांद्यांस विधिनिषेधरूपी पानें व वेदवाक्यें हाच कोंवळा पाला फुटतो; ५७ आणि अर्थ व काम यांचा विस्तार होऊन, इहलोकींच्या क्षणिक सुखाचे कोंभ येतात. ५८ नंतर, प्रवृत्तिमार्ग वाढावा, या हेतूनें शुभाशुभ कर्मांचे किती फांटे फुटतात हें समजत नाहीं. ५९ त्याचप्रमाणें, भोगांचा क्षय झाला म्हणजे मागले देह शुष्क होऊन खालीं पडतात, तों दुसरीकडे नव्या देहाचे फांटे फुटतात; १६० आणि पंचविषयांच्या साह्यानें इच्छा उत्पन्न होऊन विषयरूपी नवीं नवीं पानें नित्य येतात. ६१ याप्रमाणें रजोगुणाचा मोठा वारा सुटल्यावर मनुष्यरूपी

ठसे. १३ मेघांत. १४ विस्तार पावतात. १५ वाहूं लागल्यावर. १६ नवीन. १७ कोंब. १८ अन्यस्थानें. १९ फुटतात. २० शुष्क काष्ठें. २१ पंचविषय. २२ साह्यानें. २३ इच्छा.

मांदोडें[1] । वाढती तो एथ रूढे । मनुष्यलोक ॥ ६२ ॥ ( ८०४. तमोगुणानें शाखांची वाढ, १६३–१७४ ) तैसाचि तो रजाचा वारा । नावेक धरी वोसरा[2] । मग वाजों लागे घोरा । तमाचा तो ॥ ६३ ॥ तेथवां याचिया मनुष्यशाखा । नीच वासना अधीं[3] देखा । पाल्हेजती डाहाळिका । कुकर्मांचिया[4] ॥६४॥ अप्रवृत्तीचे खणुवाळे[5] । कोंभ निघती[6] सरळे । घेत पान पालव डाळें । प्रमादाचीं ॥ ६५ ॥ बोलती निषेधनियमें । जिया ऋचा यजुःसामें । तो पाला तया घुमे । टकैयावरी[7] ॥ ६६ ॥ प्रतिपादिती अभिचार । आगम जे परमार[8] । तिहीं पानीं घेती प्रसर । वासना वेली ॥ ६७ ॥ तंव तंव होती थोराडें । अकर्माचीं तळबुडें । आणि जन्मशाखा पुढेंपुढें । घेती धांव ॥ ६८ ॥ तेथ चांडाळादि निकृष्टा । दोषजातीचा थोर फांटा । जोंळ पडे कर्मभ्रष्टां । भुलोनियां ॥ ६९ ॥ पशु पक्षी सूकर[13] । व्याघ्र वृश्चिक विखार[14] । हे आडशाखाप्रकार । पैसु घेती ॥ १७० ॥ परि ऐशा शाखा पांडवा । सर्वांगींही नित्य नवा । निरयभोग यावा । फळाचा तो ॥ ७१ ॥ आणि हिंसा विषयपुढारी । कुकर्मसंगें धुरंधरी । जन्मवरी आगारी । वाढतांचि असे ॥ ७२ ॥ ऐसे होती तरुतृण.। लोह लोष्ट[12] पाषाण । इया खांदिया तेवींचि जाण । फळेंही हेचि ॥ ७३ ॥ अर्जुना गा अवधारीं । मनुष्यालागोनि इया परी । वृद्धि स्थावरांतवरी । अधोशाखांची ॥ ७४ ॥ ( ८०५. ऊर्ध्वमूळापासून खालीं आलेली मनुष्यशाखाच मूळ होऊन अधऊर्ध्व जाते, १७५-१८२ ) म्हणोनि जीं मनुष्यढाळें । तियें जाणावीं अधींचीं मूळें । जे एथूनि हा पघळे । संसारतरु ॥ ७५ ॥ येऱ्हवीं ऊर्ध्वींचें पार्था । मुदल[9] मूळ पाहतां । अधींचिया मध्यस्था । शाखा इया ॥ ७६ ॥ परी तामसी सात्त्विकी । सुकृतदुष्कृतात्मकी । विरूढती या शाखीं । अधोर्ध्वींचिया ॥ ७७ ॥ आणि वेदत्रयाचिया पाना[11] । नये अन्यत्र लागों अर्जुना । जे मनुष्यावांचूनि विधाना । विषय नाहीं ॥ ७८ ॥ म्हणोनि तनु मानुषा । इया ऊर्ध्वमूळौनि जरी शाखा । तरी कर्मबुद्धीसि देखा । इयेंचि मूळें ॥ ७९ ॥ आणि आनीं तरी झाडीं । शाखा वाढतां मुळें गाढीं । मूळ गाढें तंव वाढी । पैस आथी ॥ १८० ॥ तैसेंचि इया शरीरा । कर्म तंव देहा संसारा । आणि देह तंव व्यापारा । ना म्हणोंचि नये ॥ ८१ ॥ म्हणोनि देहें मानुषें । इयें मूळें होती न चुके । ऐसें जगज्जनकें । बोलिलें तेणें ॥ ८२ ॥ ( ८०६. सत्त्वगुणानें वृक्षाची वाढ, १८३–१९२ ) मग तमाचें तें दारुण । स्थिरावलेया वाउधाणें । सत्त्वाची सुटे सत्रीण । वाहुटळी ॥ ८३ ॥ तैं याचि मनुष्याकारा । मुळीं सुवासना निघती आरा । घेऊनि फुटती कोंवारा । सुकृतांकुरीं ॥ ८४ ॥ उकलतेनि उन्मेखें । प्रज्ञाकुशलतेंचि तिखें ।

१ समुदाय. २ थाबल्यावर. ३ खालीं. ४ कुमार्गाचे. ५ बळकट. ६ फुटतो. ७ अग्रभागीं. ८ जारणमार . ९ मुख्य. १० परपीडा. ११ तीन पानाचा. १२ ढेंकूळ(?) १३ डुकर. १४ सर्प.

शाखांचे समुदाय ज्या ठिकाणीं वाढतात, त्याला मनुष्यलोक म्हणतात. ६२ त्याचप्रमाणें, हा रजोगुणरूपी वारा क्षणभर थांबल्यावर तमोगुणरूपी वारा मोठ्या सपाट्यानें वाहूं लागतो. ६३ मग याच मनुष्यरूपी शाखांना वाईट वासना उत्पन्न होऊन कुकर्मांच्या डाहळ्या खालीं फुटूं लागतात. ६४ अप्रवृत्तीचे ( वाईट मार्गाचे ) बळकट सरळ सोट निघून त्यांस प्रमादरूपी पानें व डाहळ्या फुटतात. ६५ ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांच्या ऋचांत जे नियम अथवा निषेध सांगितले आहेत, त्यांचा अग्रभागीं पाला फुटतो. ६६ अथर्वणवेदांत जें जारणमारण सांगितलें आहे, व ज्यांत परपीडा ही मुख्य धरली आहे, अशा तीन पानांचा वासनारूपी वेल पसरतो. ६७ नंतर वाईट कर्मांचीं मुळें मोठीं होऊन त्यांना जन्मरूपी शाखा पुष्कळ फुटतात. ६८ त्या वाईट कर्माला मुकून गेल्यानें, त्याला चांडालादि नीच योनींचा मोठा फाटा फुटून कर्मभ्रष्टाचे जातींत जन्मावें लागतें. ६९ पशु, पक्षी, डुकर, वाघ, विंचू, सर्प याप्रमाणें आडव्या फांद्या पुष्कळ फुटतात. १७० अर्जुना, याप्रमाणें त्या वृक्षाच्या सर्वांगावर नित्य नव्या फांद्या फुटून त्यांना नरकभोगाची प्राप्ति होते; ७१ आणि हिंसाविषय पुढें करून वाईट संगतीच्या योगानें अनेक जन्म घ्यावे लागतात. ७२ याप्रमाणें झाडें, गवत, लोखंड, माती व दगड या खांद्यांनाही तसलींच फळें येतात. ७३ अर्जुना, मनुष्यापासून स्थावरापर्यंत सगळ्या शाखांची वाढ खालींच आहे. ७४ म्हणून मनुष्यरूपी खांदीच खालीं जाणाऱ्या खांद्यांचें मूळ असून, हिजपासूनच हा संसारवृक्ष वाढतो. ७५ एरवीं, पार्था, वर जाणाऱ्या खांदीचें मूळ पाहूं गेलें असतां, वर व खालीं यांच्यामध्यें जी खांदी आहे तेंच तें ( मनुष्यजन्मच ) होय. ७६ परंतु तमोगुण व सत्त्वगुण यांच्या दुष्कर्म व सत्कर्म यांनीं भरलेल्या शाखा या मधल्या शाखेपासून खालीं व वर जातात. ७७ अर्जुना, वेदत्रयरूपी पानें दुसऱ्या कोणाला लागू नसून मनुष्ययोनीलाच लागू आहेत. ७८ म्हणून, मनुष्यरूप खांदी ही जरी वरच्या मुळापासून खालीं वाढली आहे, तरी कर्मवृद्धिरूप शाखा इच्यापासूनच उत्पन्न होते; ७९ आणि दुसऱ्या झाडाची तरी हीच तऱ्हा आहे कीं, फांद्या वाढल्या म्हणजे मूळ दृढ होतें, व मूळ बळकट झालें म्हणजे फांद्यांचा विस्तार होतो. १८० त्याचप्रमाणें या शरीराची गोष्ट होय; म्हणजे शरीर आहे तोंपर्यंत कर्म केलें पाहिजे, व कर्म जोंपर्यंत चाललें आहे तोंपर्यंत शरीर नाहीं असें म्हणतां येत नाहीं. ८१ म्हणून, मनुष्यदेह हा अन्यकर्मरूपी खांद्यांचें मूळ होय, यांत संशय नाहीं; असें त्या जगज्जनक श्रीकृष्णांनीं सांगितलें. ८२ ( मग म्हणतातः— ) नंतर तमोगुणाचें वादळ स्थिर झाल्यावर सत्त्वगुणाचें वादळ जोरानें सुटतें, ८३ तेव्हां याच मनुष्याकाररूपी मुळास सद्वासनारूपी अंकुर फुटून त्याला सुकृतरूपी कोंब येतात. ८४ मग ज्ञानाच्या योगानें जाणतेपणाच्या तीक्ष्ण अशा जोरानें एके क्षणांत बुद्धीला डिऱ्या फुटतात. ८५ नंतर बुद्धिरूपी फोंक विस्तारून स्फूर्तीचे फाटे

१५ पुढें करून. १६ योगानें. १७ अंकुर. १८ माती. १९ दृढ होते. २० वादळ. २१ जोरानें.

मांदोडे[1] । वाढती तो एथ रूढे । मनुष्यलोक ॥ ६२ ॥ ( ८०४. तमोगुणानें शाखांची वाढ, १६३–१७४ ) तैसाचि तो रजाचा वारा । नावेक घरी वोसरा । मग वाजों लागे घोरा । तमाचा तो ॥ ६३ ॥ तेधवां याचिया मनुष्यशाखा । नीच वासना अधीं देखा । पाल्हेजती डाहाळिका । कुकर्माचिया ॥६४॥ अप्रवृत्तीचे खणुवेळे । कोंभ निघती सरळे । घेत पान पालव डाळें । प्रमादाचीं ॥ ६५ ॥ वोलती निषेधनियमें । जिया ऋचा यजुःसामें । तो पाला तया घुमे । टकैंयावरी ॥ ६६ ॥ प्रतिपादिती अभिचार । आगम जे परमार । तिहीं पोंनी घेती प्रसर । वासना वेली ॥ ६७ ॥ तंव तंव होती थोराडें । अकर्माचीं तळ्वुडें । आणि जन्मशाखा पुढेंपुढें । घेती धांव ॥ ६८ ॥ तेथ चांडाळादि निकृष्टा । दोषजातीचा थोर फांटा । जोळ पडे कर्मभ्रष्टां । भुलोनियां ॥ ६९ ॥ पशु पक्षी सूंकर । व्याघ्र वृश्चिक विखार । हे आडशाखाप्रकार । पैसु घेती ॥ १७० ॥ परि ऐशा शाखा पांडवा । सर्वांगींही नित्य नवा । निरयभोग यावा । फळाचा तो ॥ ७१ ॥ आणि हिंसा विषयपुढारी । कुकर्मसंगें धुरंधरी । जन्मवरी आगारी । वाढतांचि असे ॥ ७२ ॥ ऐसे होती तरुतृण.। लोह लोष्ट पाषाण । इया खांदिया तेवींचि जाण । फळेंही हेचि ॥ ७३ ॥ अर्जुना गा अवधारीं । मनुष्यालागोनि इया परी । वृद्धि स्थावरांतवरी । अधोशाखांची ॥ ७४ ॥ ( ८०५. ऊर्ध्वमूळापासून खालीं आलेली मनुष्यशाखाच मूळ होऊन अधऊर्ध्व जाते, १७५-१८२ ) म्हणोनि जीं मनुष्यढाळें । तियें जाणावीं अधींचीं मूळें । जे एथूनि हा पघळे । संसारतरु ॥ ७५ ॥ येऱ्हवीं ऊर्ध्वींचें पार्था । मुद्दल मूळ पाहतां । अधींचिया मध्यस्था । शाखा इया ॥ ७६ ॥ परी तामसी सात्त्विकी । सुकृतदुष्कृतात्मकी । विरूढती या शाखीं । अधोर्ध्वींचिया ॥ ७७ ॥ आणि वेदत्रयाचिया पाना । नये अन्यत्र लागो अर्जुना । जे मनुष्यावांचूनि विधाना । विषय नाहीं ॥ ७८ ॥ म्हणोनि तनु मानुषा । इया ऊर्ध्वमूळौनि जरी शाखा । तरी कर्मवृद्धीसि देखा । इयेंचि मूळें ॥ ७९ ॥ आणि आनीं तरी झाडीं । शाखा वाढतां मुळें गाढीं । मूळ गाढें तंव वाढी । पैस आथी ॥ १८० ॥ तैसेंचि इया शरीरा । कर्म तंव देहा संसारा । आणि देह तंव व्यापारा । ना म्हणोंचि नये ॥ ८१ ॥ म्हणोनि देहें मानुषें । इयें मूळें होती न चुके । ऐसें जगज्जनकें । बोलिलें तेणें ॥ ८२ ॥ ( ८०६. सत्त्वगुणानें वृक्षाची वाढ, १८३–१९२ ) मग तमाचें तें दारुण । स्थिरावलेया वाउधाण । सत्त्वाची सुटे सत्राण । वाहुटळी ॥ ८३ ॥ तैं याचि मनुष्याकारा । मुळीं सुवासना निघती धारा । घेऊनि फुटती कोंवारा । सुकृतांकुरीं ॥ ८४ ॥ उकलतेनि उन्मेखें । प्रज्ञाकुशलतेंचि तिखें ।

१ समुदाय. २ थाबल्यावर. ३ खालीं. ४ कुमार्गाचे. ५ वळकट. ६ फुटतो. ७ अग्रभागीं. ८ जारणमार . ९ मुख्य. १० परपीडा. ११ तीन पानाचा. १२ जाणें. १३ डुकर. १४ सर्प.

शाखाचे समुदाय ज्या ठिकाणीं वाढतात, त्याला मनुष्यलोक म्हणतात. ६२ त्याचप्रमाणें, हा रजोगुणरूपी वारा क्षणभर थांबल्यावर तमोगुणरूपी वारा मोठ्या सपाट्यानें वाहूं लागतो. ६३ मग याच मनुष्यरूपी शाखांना वाईट वासना उत्पन्न होऊन कुकर्मांच्या डाहळ्या खालीं फुटूं लागतात. ६४ अप्रवृत्तीचे ( वाईट मार्गाचे ) बळकट सरळ सोट निघून त्यांस प्रमादरूपी पानें व डाहळ्या फुटतात. ६५ ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद याच्या ऋचात जे नियम अथवा निषेध सागितले आहेत, त्यांचा अग्रभागीं पाला फुटतो. ६६ अथर्वणवेदांत जें जारणमारण सांगितलें आहे, व ज्यांत परपीडा ही मुख्य धरली आहे, अशा तीन पानांचा वासनारूपी वेल पसरतो. ६७ नंतर वाईट कर्मांचीं मुळें मोठीं होऊन त्यांना जन्मरूपी शाखा पुष्कळ फुटतात. ६८ त्या वाईट कर्माला भुलून गेल्यानें, त्याला चाडालादि नीच योनींचा मोठा फाटा फुटून कर्मभ्रष्टाचे जातींत जन्मावें लागतें. ६९ पशु, पक्षी, डुकर, वाघ, विंचू, सर्प याप्रमाणें आडव्या फांद्या पुष्कळ फुटतात. १७० अर्जुना, याप्रमाणें त्या वृक्षाच्या सर्वांगावर नित्य नव्या फांद्या फुटून त्यांना नरकभोगाची प्राप्ति होते; ७१ आणि हिंसाविषय पुढें करून वाईट संगतीच्या योगानें अनेक जन्म घ्यावे लागतात. ७२ याप्रमाणें झाडें, गवत, लोखंड, माती व दगड या खांद्यांनाही तसलींच फळें येतात. ७३ अर्जुना, मनुष्यापासून स्थावरापर्यंत सगळ्या शाखाची वाढ खालींच आहे. ७४ म्हणून मनुष्यरूपी खांदीच खालीं जाणाऱ्या खांद्याचें मूळ असून, हिजपासूनच हा संसारवृक्ष वाढतो. ७५ एरवीं, पार्था, वर जाणाऱ्या खांदीचें मूळ पाहूं गेलें असता, वर व खालीं यांच्यामध्यें जी खांदी आहे तेंच तें ( मनुष्यजन्मच ) होय. ७६ परंतु तमोगुण व सत्त्वगुण यांच्या दुष्कर्म व सत्कर्म यांनीं भरलेल्या शाखा या मधल्या शाखेपासून खालीं व वर जातात. ७७ अर्जुना, वेदत्रयरूपी पानें दुसऱ्या कोणाला लागू नसून मनुष्ययोनीलाच लागू आहेत. ७८ म्हणून, मनुष्यरूप खांदी ही जरी वरच्या मुळापासून खालीं वाढली आहे, तरी कर्मवृद्धिरूप शाखा इच्यापासूनच उत्पन्न होते; ७९ आणि दुसऱ्या झाडाची तरी हीच तऱ्हा आहे कीं, फांद्या वाढल्या म्हणजे मूळ दृढ होतें, व मूळ बळकट झालें म्हणजे फांद्यांचा विस्तार होतो. १८० त्याचप्रमाणें या शरीराची गोष्ट होय; म्हणजे शरीर आहे तोंपर्यंत कर्म केलें पाहिजे, व कर्म जोंपर्यंत चाललें आहे तोंपर्यंत शरीर नाहीं असे म्हणतां येत नाहीं. ८१ म्हणून, मनुष्यदेह हा अन्यकर्मरूपी खांद्यांचें मूळ होय, यांत संशय नाहीं; असें त्या जगज्जनक श्रीकृष्णानीं सांगितलें. ८२ ( मग म्हणतातः– ) नंतर तमोगुणाचें वादळ स्थिर झाल्यावर सत्त्वगुणाचें वादळ जोरानें सुटतें, ८३ तेव्हां याच मनुष्याकाररूपी मुळास सद्वासनारूपी अंकुर फुटून त्याला [illegible] रूपी कोंब येतात. ८४ मग ज्ञानाच्या योगानें जाणतेपणाच्या तीक्ष्ण अशा [illegible] एके क्षणात बुद्धीला डिऱ्या फुटतात. ८५ नंतर बुद्धिरूपी फांक विस्तारून [illegible]

१५ पुढें करून. १६ योगानें. १७ अंकुर. १८ माती. १९ दृढ होते. २० [illegible]

डिरिया निघती निमिखें । वावळेंजुनी ॥ ८५ ॥ मतींचे सोटें वांवे । घालिती स्फूर्तीचेनि थांवें । बुद्धिप्रकाश घे धांवे । विवेकावरी ॥ ८६ ॥ तेथ मेधारसें सेगर्भ। आस्थापत्रीं सैंचोंव । सरळ निघती कोंभ । सद्वृत्तींचे ॥ ८७ ॥ सदाचाराचिया सहसा । टर्का उठती बहुवसा । घुमघुमिती घोषा । वेदपद्याच्या ॥ ८८ ॥ शिष्टागेम-विधानें । विविधयोंगवितानें । इये पानावरी पानें । पालेजेंती ॥ ८९ ॥ ऐशा यम-दमीं घोंसौळिया । उठती तपाचिया डाहाळिया । येती वैराग्यशाखा कोंवळिया । वेल्हाळेंपणें ॥ १९० ॥ विशिष्टां व्रतांचे फोक । धीराच्या अँणगटी तिख । जन्म-वेगें ऊर्ध्वमुख । उंचावती ॥ ९१ ॥ माजी वेदाचा पाला दाट । तो करी सुविद्येचा झडझडाट । जंव वाजे अचाट । सत्त्वानिळु तो ॥ ९२ ॥ (८०७. सत्त्वगुणाच्या शाखा वर जातात, १९३-२०८) तेथ धर्मडाळ वौंहाळी । दिसती जन्मशाखा सरळी । तिया आड फुटती फळीं । स्वर्गादिकीं ॥ ९३ ॥ पुढां उपरति रींगें लोहिवी[17] । धर्ममोक्षाची शाखा पालवी । पाल्हाजत नित्य नवी । वाढतीचि असे ॥ ९४ ॥ पैं रविचंद्रादि ग्रहवर । पितृ ऋषि विद्याधर । हे आडशाखाप्रकार । पैसु घेती ॥ ९५ ॥ याहीपासून उंचवडे । गूंढिले फळांचेनि बुडे । इंद्रादिक ते मोंदोडे । थोर शाखांचे ॥ ९६ ॥ मग तयाही उपरी डाहाळिया । तपोज्ञानी उंचावलिया । मरीचिकश्यपादि इया । उपरी शाखा ॥ ९७ ॥ एवं माळोवेंळीं उत्तरोत्तरु । ऊर्ध्वशाखांचा पैसारु । बुडीं साना अग्रीं थोरु । फळाढ्यपणें ॥ ९८ ॥ वरी उपरी शाखाही पाठीं । येती फळभार जे किरीटी । ते ब्रह्मेशान्त अणगटीं । कोंभ निघती ॥ ९९ ॥ फळाचेनि वोझेपणें । ऊर्ध्वीं वोवौंडे दुणे । जंव माघौतें बैसणें । मूळींचि होय ॥ २०० ॥ प्राकृताही तरी रुखा । जे फळें दाटली होय शाखा । ते वोवांडली देखा । बुडासि ये ॥ १ ॥ तैसें जेथूनि हा आघवा । संसारतरूचा उठावा । तियें मूळीं टेकती पांडवा । वाढतेनि ज्ञानें ॥ २ ॥ म्हणौनि ब्रह्मेशाना-परौतें । वाढणें नाहीं जीवातें । तेथूनि मग वरौतें । ब्रह्मचि कीं ॥ ३ ॥ परि हें असो ऐसे । ब्रह्मादिक ते आंगवसे । ऊर्ध्वमूळासरिसे । न तुकती गा ॥ ४ ॥ आणिकही शाखा उपरता । जिया सनकादिका नामें विख्याता । तिया फळीं मूळीं नौंडळतां । भरलिया ब्रह्मीं ॥ ५ ॥ ऐशी मनुष्यापासूनि जाणावी । ऊर्ध्वीं ब्रह्मादिशेष पालवी । शाखाची वाढी बरवी । उंचावे पैं ॥ ६ ॥ पार्था ऊर्ध्वींचिया ब्रह्मादि । मनुष्यत्वाचि होय आदि । म्हणौनि इयें अधीं । म्हणितलीं मुळें ॥ ७ ॥ एवं तुज अलौकिकु । हा अधोर्ध्वशाखु । सांगितला भवरुखु । ऊर्ध्वमूळ ॥ ८ ॥ (८०८. शंका अफाट

---

१ जोरानें. २ फॉक. ३ विस्तारून. ४ बळ; फाटे. ५ भरलेली. ६ निष्ठा. ७ सुशोभित. ८ ठेचे; अंकुर. ९ शिष्टाचार व वेदोक्त आचरण. १० नाना प्रकारचीं यज्ञयागादिक कर्मे. ११ फुटतात. १२ घोंस. १३ विस्तारानें; पुष्कळ. १४ अणकुच्या. १५ विस्तार. १६ रंगानें. १७ लाल. १८ झांकणें.

फुटतात, त्या योगानें बुद्धीस विचार सुचतो. ८६ त्या ठिकाणीं *मेधारसानें भरलेलीं अशीं निष्ठारूपी पानें सुशोभित दिसून, सत्त्ववृत्तीचे कोंभ सरळ निघतात. ८७ सदाचाररूपी पुष्कळ अंकुर सहज निघून, त्या योगानें चहूंकडे वेदघोष चालतो. ८८ शिष्टाचार, वेदोक्त आचरण, व नानाप्रकारचीं यज्ञयागादि कर्मे अशीं पानांवर पानें फुटतात. ८९ याप्रमाणें यमदमरूपी घोंस व तपांच्या डाहळ्या फुटतात; आणि वैराग्यरूपी कोंवळ्या शाखा पुष्कळ फुटतात; १९० विशिष्ट व्रतांचे फोक व धीराच्या तीक्ष्ण अणकुच्या फुटून वेगानें वर जातात. ९१ मध्यंतरीं वेदरूपी दाट पानें फुटून, त्या योगानें, सत्त्वरूपी प्रचंड वारा वाहात आहे तोंपर्यंत सुविद्येचा चहूंकडे प्रसार होतो. ९२ मग धर्मरूपी एक सरळ शाखा निघते; व तिला स्वर्गादिक फळांची आडफांदी फुटते. ९३ दुसरी उपरतिरूप लाल शाखा फुटून तिला मोक्षरूपी नित्य नवी पालवी फुटतच असते. ९४ पुढें रवि, चंद्र इत्यादि ग्रह, व पितर, ऋषि, विद्याधर एतद्रूपी आडव्या फांद्या फुटतात. ९५ या शाखांपेक्षांही उंच अशा दुसऱ्या शाखा फुटून त्यांना इंद्रादि-लोकरूपी फळें पुष्कळ येतात. ९६ मग त्या खांद्यांवर, तप व ज्ञान यांत श्रेष्ठ अशा मरीचि, कश्यप इत्यादिरूप दुसऱ्या उंच शाखा येतात. ९७ अशा प्रकारें मालिका लागल्यावर वरती शाखांचा विस्तार होऊन, हा वृक्ष बुडाशीं लहान असूनही वर ह्याला मोठालीं फळें येतात। ९८ त्यावरही आणखी ज्या दुसऱ्या फांद्या येतात, त्यांना अर्जुना, ब्रह्मदेव व शिव यांपर्यंत वर शाखा फुटतात. ९९ फळांच्या भारानें वरच्या खांद्या खालीं लवून मुळाशीं टेकतात. २०० इतर झाडांचीही अशीच स्थिति आहे कीं, फांद्यांना पुष्कळ फळें आलीं म्हणजे त्या वांकून बुडाला लागतात; १ त्याचप्रमाणें अर्जुना, हा संसाररूपी वृक्ष ज्या ठिकाणाहून उत्पन्न होतो, त्याच मुळाशीं ज्ञानाचे वाढीनें पुनः लवतो. २ म्हणून ब्रह्मा व शिव यांच्या पलीकडे जीवाची वाढ नसून, तेथून पुढें वरती ब्रह्मच लागतें. ३ परंतु हें असूं दे; या ब्रह्मादिक खांद्या संसाररूप वृक्षाची योग्यता पावत नाहींत. ४ आणखी, निवृत्तिमार्गाच्या ज्या वर सनकादिकरूपी शाखा आहेत, त्यांना फळें व मुळें नसून त्या ब्रह्मरूपीच आहेत, ५ याप्रमाणें मनुष्यरूप खांदीपासून वरच्या बाजूस ज्या ब्रह्मादिरूप खांद्या आहेत, त्या फार उंच जातात. ६ पार्था, ब्रह्मादिरूप ज्या वरच्या उंच खांद्या आहेत, त्या मनुष्यरूप खांदीपासूनच उत्पन्न झाल्या आहेत, म्हणून या खालच्या खांद्या त्यांचीं मुळें होत. ७ याप्रमाणें, जो संसाररूपी वृक्ष ऊर्ध्वमूळ असून ज्याला खालीं वर अशा शाखा फुटलेल्या आहेत, व जो अलौकिक आहे, त्याचें वर्णन तुला सांगितलें. ८ याप्रमाणें या झाडाला खालचीं व वरचीं मुळें असून त्याविषयीं सर्व विवेचन तुला सांगितलें. तर असा जो हा बळकट वृक्ष, तो कोणत्या उपायानें उपटून टाकतां येतो, तें ऐक. ९

* 'स्वहिता अनुयायिनी मेधा...' ( अध्याय १० ओंवी २७९. )

१९ मोठाले झुबके. २० एकावर एक अशी माळ लागल्यावर. २१ लवतात. २२ नवून. ज्ञाने. ८९

वृक्ष कशानें तुटेल ? २०९ ) आणि अधींचीं हीं मूळें । उपरती परिसेविलीं वेळें। अवतरण:—आतां परिस उन्मूळे । कैसेनि हा ॥ ९ ॥

न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा।
अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्त्वा॥ ३ ॥

अन्वयः—( यथा अयं वर्णितः ) तथा अस्य रूपं इह न उपलभ्यते, ( अस्य ) अन्तः न च आदिः न, च संप्रतिष्ठा न ( उपलभ्यते ). सुविरूढमूलं एनं अश्वत्थं दृढेन असंगशस्त्रेण छित्त्वा ॥३॥

( ८०९. वृक्ष जसा वर्णन केला, तसा तो नाहीं; मग त्याच्या नाशाचा प्रयत्न कशाला ? २१०-२१३ ) परि तुझ्या हन पोटीं । ऐसें गमेल किरीटी । जे येवढें झाड उत्पाटी । ऐसें कायि असे ॥ २१० ॥ कीं ब्रह्मयाच्या शेवटवरी । ऊर्ध्व शाखांची थोरी । आणि मूळ तंव निराकारीं । ऊर्ध्वीं असे ॥ ११ ॥ हा स्थावराही तळीं । फांकत असे अधींच्या डाळीं । माजी धावतसे दुज्या मुळीं । मनुष्यरूपीं ॥ १२ ॥ ऐसा गाढा आणि अफाट । आतां कोण करी यया शेवट । तरि झणिं हा हळुवट । धरिसी भावो ॥ १३ ॥ ( ८१०. भववृक्षाचा अत्यंत अभाव, मग नाश करणें अवघड नाहीं;- २१४-२२३ ) तरि हा उन्मूळावया दोषें । येथ सायासचि कायिसे । काय बाळा बागुल देशें । दवडावा आहे ॥ १४ ॥ गंधर्वदुर्ग कायी पाडावे । काय शशविषाण मोडावें । होआवें मग तोडावें । खपुष्प कीं ॥१५॥ तैसा संसारु हा वीरा । रूख नाहीं साचोकारा । मा उन्मूळणीं दरारा । कायिसा तरी ॥ १६ ॥ आम्हीं सांगितली जे परी । मूळडाळांची उजरी । ते वांझेचीं घरभरी । लेंकुरें जैसीं ॥ १७ ॥ काय कीजती चेइलेपणीं । स्वप्नींचीं तियें बोलणीं । तैसी जाण ते काहाणी । दुगेळीचि ते ॥ १८ ॥ वांचूनि आम्हीं निरूपिलें जैसें । ययाचें अचळ मूळ असे तैसें । आणि तैसाचि जरी हा असे । साचोकारा ॥१९॥ तरि कोणाचेनि संतानें । निपजती तया उन्मूळणें । काय फुंकिलिया गगनें । जाइजेल गा ॥ २२० ॥ म्हणौनि पैं धनंजया । आम्हीं वानिलें रूप तें माया । कासवीचेनि तुपें राया । वोगरिलें जैसें ॥ २१ ॥ मृगजळाचीं गा तळीं । तियें दिठी दुरूनि न्याहाळी । वांचूनि तेणें पाणियें साळी केळी । लाविसी काई ॥२२॥ मूळ अज्ञानचि तंव लटिकें । मा तयाचें कार्य हें केतुकें । म्हणौनि संसाररुख सेतुकें । वावोचि गा ॥ २३ ॥ ( ८११. भववृक्षाचा अंत नाहीं, २२४–२२९ ) आणि अंतु यया नाहीं । ऐसें बोलिजे जें कांहीं । तेंही साचाचि पाहीं । येके परी ॥ २४ ॥ तरी प्रबोधु जंव नोहे । तंव निद्रे काय अंतु आहे । कीं रात्री न सरे तंव पाहे । तया अैरोतें ॥ २५ ॥ तैसा जंव पार्था । विवेकु नुर्धवी माथा । तंव अंतु नाहीं अश्वत्था । भवरूपा यया ॥ २६ ॥ वाजतें वारें निवांत । जंव न राहे

१ सांगितलें. २ सविस्तर. ३ उपदेश. ४ उपटून टाकील. ५ मध्यभागांत. ६ हलकी.

*श्लोकार्थः*—या अश्वत्थ वृक्षाचें हें जें वर्णन केलें आहे, तसें त्याचें खरें रूप अनुभवास येत नाहीं; आणि त्याचा अंत, आदि व स्थिति हींही नाहींत. अशा या बळकट मुळाच्या वृक्षाचा दृढ-वैराग्यरूप शस्त्रानें छेद करून, ॥ ३ ॥

परंतु अर्जुना, तुझ्या मनांत अशी शंका येईल कीं, याप्रमाणें हा एवढा प्रचंड वाढलेला जो संसाररूपी वृक्ष. त्याला उपटून टाकील असें काय ( साधन ) आहे ? २१० कारण, ज्याच्या वरच्या बाजूच्या शाखाची वाढ ब्रह्मलोकापर्यंत असून. ज्याचें मूळ निराकाररूपी ब्रह्मांत वर आहे; ११ या वृक्षाच्या खालीं येणाऱ्या फांद्या स्थावरजंगमाच्या तळांत शिरलेल्या असून, याच्या मध्यभागांत मृत्युलोक भरलेला आहे; १२ याप्रमाणें हा वृक्ष अति बळकट व अफाट असून, याचा नाश कोणाच्यानें करवेल, अशी हळवी भावना कदाचित् तूं आपले मनांत धरशील हो! १३ तर हें बघ, हा वृक्ष उपटून टाकण्यास श्रम ते कसले आहेत ? लहान मुलाला जो बागुलबोवा दाखवितात, तो हाकून देण्यास त्याला कोठें दुसऱ्या गांवास का घालवावा लागतो ? १४ आकाशांत दिसणारे किल्ले काय पाडावे लागतात ? तसेंच सशाच्या शिंगास काय मोडावें लागतें ? आकाशास जर पुष्प येईल, तरच तें तोडतां येईल! १५ त्याचप्रमाणें अर्जुना, हा तुला सांगितलेला संसाररूपी वृक्ष खरा नाहीं. मग तो उपटून टाकण्यास कसली भीति आली आहे ? १६ आम्हीं या झाडाचीं मुळें व डाहळ्या यांविषयीं जो प्रकार सांगितला, तो, वांझेच्या घरांत पुष्कळ मुलेंलेंकरें आहेत असें सांगण्यापैकींच होय. १७ स्वप्नांत जीं आपण भाषणें करतों, त्याचा जागे झाल्यावर आपल्यास कांहीं उपयोग होतो का ? त्याचप्रमाणें, जो ज्ञानी आहे, त्याला या संसाररूपी वृक्षाची गोष्ट व्यर्थच होय. १८ परंतु *ज्याप्रमाणें आम्हीं या झाडाचें वर्णन केलें, त्याचप्रमाणें जर याचीं मुळें भक्कम* असून हा खरोखरच विस्तार पावलेला असता, १९ तर कोणाची माय व्याली होती कीं त्याला उपटून टाकील ? हें पहा—फुंकर घातल्यानें आकाश दूर होईल काय ? २२० म्हणून, हे धनंजया, ज्याप्रमाणें कासवीच्या तुपाची राजास मेजवानी करणें असंभवनीय आहे, त्याचप्रमाणें, आम्हीं जें या संसाररूपी वृक्षाच्या स्वरूपाचें वर्णन केलें, ती सर्व माया होय. २१ बाबारे, मृगजळाचे तलाव दुरून दृष्टीनें पाहण्यासच योग्य आहेत, बाकी त्यांच्या पाण्यावर कधीं साळी केळीं करशील काय ? २२ अगोदर अज्ञान हें मिथ्या आहे; मग त्यापासून होणारें कार्य काय किमतीचें असणार ? म्हणून, संसाररूपी वृक्ष हा सर्व खोटा आहे; २३ आणि या वृक्षाला अंत नाहीं, असें म्हणणें हेंही एका प्रकारानें खरें आहे. २४ तर जोंपर्यंत मनुष्य जागा झाला नाहीं, तोंपर्यंत निद्रेला शेवट आहे काय ? किंवा रात्र सरली नाहीं तोंपर्यंत पहाट होते काय ? २५ त्याप्रमाणें, हे पार्था, जोंपर्यंत

७ बागुलबोवा. ८ ढगांत दिसणारे किल्ले. ९ सशाचें शिंग. १० आकाशाचें फूल. ११ व्यर्थ. १२ सर्व. १३ जागृति. १४ प्रातःकाल. १५ पूर्वी. १६ वर काढीत नाहीं.

जेथींचें तेथ । तंव तरंगता अनंत । म्हणावीचि कीं ॥ २७ ॥ म्हणौनि सूर्ये जें हारपे । तें मृगजळाभासु लोपे । कां प्रभा जाय दीपें । मालवलेनि ॥ २८ ॥ तैसें मूळ अविद्या खाये । तें ज्ञान जें उभें होये । तेंचि यया अंतु आहे । येऱ्हवीं नाहीं ॥ २९ ॥ ( ८१२. भववृक्षास आदि नाहीं, २३०–२३६ ) तेवींचि हा अनादि । ऐसी ही आथी शाब्दी । तो आळें नोहे अनुरोधी । बोलातें यया ॥ २३० ॥ जे संसारवृक्षाच्या ठाईं । साचोकारें तंव नाहीं । मा नाहीं तया आदि काई । कोण होईल ॥ ३१ ॥ जो साच जेयूनि उपजे । तयातें आदि हें साजे । आतां नाहींचि तो म्हणिजे । कोठूनिया ॥ ३२ ॥ म्हणौनि जन्मेना आहे । ऐसिया सांगों कवण माये । यालागीं नाहींपणेंचि होये । अनादि हा ॥ ३३ ॥ वांझेचिया लेंका । कैंची जन्मपत्रिका । नभीं निळी भूमिका । कें कलूं पां ॥ ३४ ॥ व्योमकुसुमाचा पांडवा । कवणें देंठ तोडावा । म्हणौनि नाहीं ऐसिया भवा । आदि कैंची ॥ ३५ ॥ जैसें घटाचें नाहींपण । असतचि असे केलेनिवीण । तैसा समूळ वृक्षु जाण । अनादि हा ॥ ३६ ॥ ( ८१३. भववृक्षाला मध्यही नाहीं, २३७-२४७ ) अर्जुना ऐसेनि पाहीं । आद्यंतु ययासि नाहीं । माजी स्थिति आभासे कांहीं । परि टवाळ ते गा ॥ ३७ ॥ ब्रह्मगिरीहूनि न निगे । आणि समुद्रींही कीर न रिगे । माजी दिसे वाउगे । मृगांबु जैसें ॥ ३८ ॥ तैसा आद्यंतीं कीर नाहीं । आणि साचही नोहे कहीं । परी लटिकेपणाची नवाई । पडिभासे गा ॥ ३९ ॥ नाना रंगीं गजबजे । जैसें इंद्रधनुष्य देखिजे । तैसा नेणतया आपजे । आहे ऐसा ॥ १४० ॥ ऐसेनि स्थितीचिये वेळे । भुलवी अज्ञानाचे डोळे । लाघवी हरी मेखळे । लोकु जैसा ॥ ४१ ॥ आणि नसतीचि श्यामिकें । व्योमीं दिसे तैसी दिसो का । तरी दिसणेंही क्षणा एका । होय जाय ॥ ४२ ॥ स्वप्नींही मानिलें लटिकें । तरी निर्वाहो का एकसारिखें । तेवि आभास क्षणिकें । रिताचि गा ॥ ४३ ॥ देखतां आहे आंवडे । धेऊं जाइजे तरी नोतुडे । जैसा टिंकु कीजे माकडें । जळामाजीं ॥ ४४ ॥ तरंगभंगु सांडी पडे । विजूही न पुरे होडे । आभासासि तेणें पाडें । होणें जाणें गा ॥ ४५ ॥ जैसा ग्रीष्मशेषींचा वारा । नेणिजे समोर कीं पाठिमोरा । तैसी स्थिति नाहीं तरुवरा । भवरूपा यया ॥ ४६ ॥ एवं आदि ना अंत स्थिति । ना रूप ययासि आथी । आतां कायसी कुंथाकुंथी । उन्मूळणीं गा ॥ ४७ ॥ ( ८१४. आत्मज्ञानानेंच भववृक्षाचा नाश होतो, २४८–२५४ ) आपुलिया अज्ञानासाठीं । नव्हता थांवला किरीटी । तरि आतां आत्म-

१ लौकिक. २ आळ. ३ सत्यता. ४ मग. ५ आकाशपुष्पाचा. ६ दिसतो. ७ बहुरूपी. ८ हरण करतो. ९ सोंगें घेऊन. १० निळा रंग. ११ वाटतें. १२ हातांत येत नाहीं १३ स्थिति. १४ एके बाजूस राहते. १५ पैज. १६ मळावला.

ज्ञान उत्पन्न झालें नाहीं, तोंपर्यंत या संसाररूपी अश्वत्थास अंत नाहीं. २६ जोंपर्यंत वारा वाहतांना राहिला नाहीं, तोंपर्यंत समुद्रावरील लाटांना शेवट नाहीं असें म्हणावें लागतें. २७ म्हणून, ज्या वेळेस सूर्य अस्तास जातो, त्या वेळेस मृगजलाचा भास नाहींसा होतो, किंवा दिव्याचा प्रकाश दिवा मालवल्यावर नाहींसा होतो; २८ त्याप्रमाणें, या संसाररूपी वृक्षाचें मूळ जें अज्ञान, तें ज्ञानाचा उदय झाल्याशिवाय नाहींसें होत नाहीं. २९ त्याचप्रमाणें, हा अनादि आहे असें लोक म्हणतात; तर खरोखर पाहूं गेलें असतां हा त्याच्यावर आळ आलेला नसून ही गोष्ट त्याच्या लक्षणांस अनुसरूनच आहे. २३० कारण, संसारवृक्षाचे ठिकाणीं तर खरेपणा नाहीं; मग जो मुळांत नाहीं, त्याला आरंभ कसला? व आरंभ करणार कोण? ३१ जो खरोखर एखाद्या ठिकाणाहून उत्पन्न होतो, त्याला आदि आहे हें म्हणणें शोभतें; पण जो वस्तुत: नाहींच, त्याला आदि कोठून असणार? ३२ म्हणून, ज्याला जन्म नाहीं त्याची आई कोण म्हणून म्हणावी? यास्तव हा वृक्ष अस्तित्वाशिवाय आहे, म्हणून याला अनादि म्हटलें आहे इतकेंच! ३३ वांझेच्या मुलाची जन्मपत्रिका कोठून असणार? त्याचप्रमाणें, आकाशाचा रंग निळा आहे अशी कल्पना कशी करतां येईल? ३४ अर्जुना, आकाशाच्या पुष्पाचा देंठ कोणास तोडतां येईल? म्हणून, ज्या संसाररूपी वृक्षास अस्तित्व नाहीं, त्याला मूलारंभ कोठून असणार? ३५ ज्याप्रमाणें मातीचा घट तयार केल्याशिवाय त्याला अस्तित्व येत नाहीं, त्याप्रमाणें हा संसाररूपी वृक्ष मुळासह अनादि आहे असें जाण. ३६ अर्जुना, ह्याप्रमाणें ह्या वृक्षास आदि व अंत नाहीं व याची दोहोंमधील स्थिति जी भासते तीही व्यर्थ होय. ३७ गोदावरी ज्याप्रमाणें ब्रह्मगिरी पर्वतावरून निघून पूर्वसमुद्रास जाऊन मिळते, त्याप्रमाणें मृगजळाचे नदीला उत्पत्ति खरी नाहीं व अंतही खरा नाहीं; तथापि तें मृगजल जसें मध्यंतरीं व्यर्थ भासतें, ३८ तसा यास आदि नाहीं व पाहूं गेलें असतां हा कोठें दिसतही नाहीं; पण काय नवल आहे पहा कीं, हा नसूनही याचा भास होतो! ३९ इंद्रधनुष्य ज्याप्रमाणें नानाप्रकारच्या रंगांनीं भरलेलें दिसतें, त्याप्रमाणें हा संसाररूपी वृक्ष अज्ञान्यास सुंदर असा दिसतो. २४० याप्रमाणें, हा खरा आहे असें घेऊन चालल्यावर, अज्ञान्याच्या डोळ्यांस भूल पाडतो. ज्याप्रमाणें बहुरूपी नानातऱ्हेचीं सोंगें आणून लोकांचें मन हरण करतो (रिझवितो), ४१ आणि आकाशास कसलाही रंग नसून ज्याप्रमाणें त्याचा निळा रंग भासतो—तथापि तोच रंग एका क्षणांत दिसतो व नाहींसा होतो; ४२ स्वप्नांत जरी लटक्या जिनसा सत्य मानल्या, तरी त्यांपासून एकसारखा निर्वाह होईल का? त्याप्रमाणें हा क्षणिक जगाभास आहे! ४३ आपलें प्रतिबिंब पाण्यांत पडलेलें पाहून, माकडास तें दुसरें माकडच आहे असें वाटतें, व धरूं लागलें असतां तें हातास येत नाहीं; ४४ लाटांची एकामागून एक येण्याची त्वरा व विजेचें चमकणें यांच्यापेक्षांही या विश्वरूपी झाडाचें होणें जाणें अति जलद आहे. ४५ ग्रीष्म ऋतूच्या शेवटचा वारा जसा समोरून किंवा पाठीमागून येतो हें समजत नाहीं, तशी या नसणाऱ्या संसाररूपी वृक्षाची स्थिति आहे. ४६ याप्रमाणें या वृक्षास आदि, अंत, स्थिति व रूप हीं नाहींत, म्हणून हा उपटून टाकण्यास खटाटोप कशाला पाहिजे? ४७ अर्जुना, आत्मस्वरूपाचे अज्ञानामुळें हा वृक्ष बळावला आहे असें वाटत होतें ना?, तर आतां आत्मज्ञानरूप शस्त्रानें

ज्ञानाच्या लोटीं । खांडेनि[1] गा ॥ ४८ ॥ वांचूनि ज्ञानेंवीण एकें । उपाय करिसी जितुके । तिहीं गुंफसि अधिकें । रुखीं इये ॥ ४९ ॥ मग किती खांदोखादी । यया हिंडावें ऊर्ध्वीं अधीं । म्हणौनि मूळाचि अज्ञान छेदीं । सम्यक्[2]ज्ञानें ॥ २५० ॥ येऱ्हवीं दोरीचिया उरगा[3] । डांगों[4] मेळवितां पैं गा । तो शिणुचि वाउगा । केला होय ॥ ५१ ॥ तरावया मृगजळाची गंगा । डोंणीलागीं धांवतां दांगा-[6] । माजी वोहळें बुडिजे पैं गा । साच जेवीं ॥ ५२ ॥ तेवीं नाथिलिया संसारा । उपायीं जाचतया[7] वीरा । आपणपें लोपे वारा[8] । विकोपीं जाय ॥ ५३ ॥ म्हणोनि स्वप्नीं-चेया घाया[9] । ओखद[10] चेवोचि धनंजया । तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ॥ ५४ ॥ (८१५. आत्मज्ञानखड्ग धारण करण्यास वैराग्य पाहिजे, २५५–२६६)

परि तेंचि[11] लीला परजवे । तैसें वैराग्याचें नवें । अभंगबळ होआवें । बुद्धीसी गा ॥ ५५ ॥ उठिलेनि वैराग्यें जेणें । हा त्रिवर्गु[12] ऐसा साडणें । जैसें वमुनिया सुणें[13] । आताचि गेलें ॥ ५६ ॥ हा ठायवरी पांडवा । पदार्थजाती आघवा । विटवी तो होआवा । वैराग्यलाटु[14] ॥ ५७ ॥ मग देहाहंतेचें दळें[15] । सांडूनि एकेचि वेळे । प्रत्यक्[16]बुद्धी करतळें । हातवसावे ॥ ५८ ॥ निसळें[17] विवेक-साहणें । जे ब्रह्माहमस्मिबोधें सर्णाणे[18] । मग पुरतेनि बोधें उटणें[19] । एकलेंचि ॥ ५९ ॥ परि निश्चयाचें मुष्टिबळ । पाहावें एकदोन वेळ । मग तुळावें अति चोखाळ । मननवरी ॥ २६० ॥ पाठीं हतियेरां आपणयां । निदिध्यासें एक जालिया । पुढें दुजें नुरेल घाया- । पुरतें गा ॥ ६१ ॥ तें आत्मज्ञानाचें खांडें[20] । अद्वैत प्रभेचें निर्वाडें[21] । नेदील उरों कवणेकडे । भववृक्षासि ॥ ६२ ॥ शरदा[22]गमींचा वारा । जैसा केरु फेडी अंबरा । कां उदयला रवी आंधारा । घोंटु भरी ॥ ६३ ॥ नाना उपेवेंढ[23] होताखेंवो । नुरे स्वप्नसंभ्रमाचा ठावो । स्वप्रतीतिधारेचा वोहो[24] । करील तैसें ॥ ६४ ॥ तेव्हां ऊर्ध्व कां अधोमूळ । का अधींचें हन शाखाडाळ । तें कांहींचि न दिसे मृगजळ । चांदिणा जेवीं ॥ ६५ ॥ ऐसेनि गा वीरनाथा । आत्मज्ञानाचिया खड्गलता । छेदूनियां भवाश्वत्था । ऊर्ध्वमूळातें ॥ ६६ ॥

ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्तंति भूयः ।
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥

अन्वयः—ततः यस्मिन् गताः भूयः न निवर्तन्ति, तत् पदं परिमार्गितव्यं; यतः पुराणी प्रवृत्तिः प्रसृता ( अस्ति, अहं ) तं एव आद्यं पुरुषं प्रपद्ये ॥ ४ ॥

१ शस्त्रानें. २ यथार्थ ज्ञानानें. ३ सर्प. ४ काठ्या. ५ होडी; नाव. ६ अरण्यात. ७ श्रमी होणें. ८ आपलें खरें ज्ञान. ९ अंगात भरलेलें वारें. १० जागें होणें. ११ ज्ञानखड्ग. १२ स्वर्ग, मृत्यु, पाताळ. १३ कुत्रें. १४ लोट. १५ म्यान. १६ विचारवंत. १७ पाजवून. १८ तीक्ष्ण धार. १९ पाणी देणें. २० शस्त्र २१ पादल्यानें. २२ शरदतूच्या सुरवातीचा. २३ जागृति. २४ तिखटपणा.

हा तोडून टाक पाहूं. ४८ परंतु एक ज्ञानाशिवाय याला छेदण्याचे जेवढे उपाय करशील, तितका तूं या वृक्षांत अधिकाधिकच गुंतून पडशील. ४९ मग तूं किती खांद्यांवरून हिंडशील, आणि तसाच वर किंवा खालीं जाशील. (कारण, याला अगणित खांद्या आहेत). म्हणून, याचें मूळ जें अज्ञान, तें तूं यथार्थ ज्ञानानें छेदून टाक. २५० एरवीं, दोरीवर भासलेला सर्प मारण्याकरितां पुष्कळ काठ्या मिळविल्या म्हणजे तो जसा व्यर्थ शीण केल्याप्रमाणें होय. ५१ मृगजलाच्या मोठ्या नदींतून तरून जाण्याकरितां नाव शोधण्याची धावाधाव करीत असतां अरण्यांतील खऱ्या ओहोळांत खरोखर एकादा बुडतो, ५२ त्याप्रमाणें, वीरा अर्जुना, या लटक्या संसाराच्या निवृत्तीचा मनुष्य उपाय करीत असतां भ्रम पावतो, आणि आपल्या खऱ्या ज्ञानाचा लोप झाल्यामुळें त्याच्या अंगांत 'संसार सत्य' असें जें वारें भरलेलें असतें, तें अधिकच होतें. ५३ धनंजया, स्वप्नांत लागलेल्या तरवारीचे वारांस ज्याप्रमाणें जागृति हेंच औषध, त्याप्रमाणें, ज्या संसाराची अज्ञानापासून उत्पत्ति आहे, त्याचा छेद करण्यास ज्ञानखड्गच पाहिजे. ५४ परंतु तेंच ज्ञानखड्ग लीलेनें धारण करतां येईल असें बुद्धीस वैराग्याचें बळकट साह्य लागतें. ५५ तें वैराग्य इतकें दृढ झालें पाहिजे कीं, त्या योगानें त्रैलोक्यांतील भोगांचा इतका वीट आला पाहिजे कीं, ते भोग म्हणजे जसें नुकतेंच कुत्रें ओकून गेलें आहे! ५६ अर्जुना, पदार्थमात्राबद्दल जेव्हां इतका वीट येतो, तेव्हांच वैराग्य प्राप्त झालें असें म्हणावें. ५७ मग देहाची अहंता हें म्यान त्या वैराग्यरूप खड्गावरून एकदम काढून तें विचारवंत बुद्धिरूपी हातांत घ्यावें. ५८ मग तें खड्ग विवेकरूप सहाणेवर पाजवून अहंब्रह्म या बोधाची तीक्ष्ण धार लावावी, आणि त्यास अद्वैतरूपी पाणी द्यावें. ५९ इतकें झाल्यावर निश्चयरूपी मूठ हातांत घेऊन व मनन करून, तें खड्ग एक दोन वेळ अजमावून पहावें. २६० नंतर ज्ञानखड्गाचें व आपलें निदिध्यासानें ऐक्य झाल्यावर, आपल्यापुढें घाव मारण्यास तें झाड टिकणार नाहीं. ६१ तें आत्मज्ञानरूप शस्त्र अद्वैतप्रभेच्या तेजानें भवरूपी वृक्षास कोठेंही उरूं देणार नाहीं. ६२ शरदृतूच्या सुरवीताचा वारा ज्याप्रमाणें आकाशांतील सर्व केर नाहींसा करतो, अथवा सूर्योदय झाल्यावर सर्व अंधार नाहींसा होतो; ६३ किंवा जागें होण्याबरोबर स्वप्नांतील गोष्टी नाश पावतात, त्याप्रमाणें, आत्मज्ञानरूपी धारेच्या तिखटपणामुळें संसाररूप तरूचा नाश होतो. ६४ त्या वेळेस, ज्याप्रमाणें चांदणें पडल्यावर मृगजल दिसत नाहीं, त्याप्रमाणें संसाररूपी वृक्षाचीं वरचीं व खालचीं मुळें अथवा खालीं वाढलेला सर्व विस्तार हीं नाहींतशीं होतात. ६५ याप्रमाणें, हे वीरोत्तमा अर्जुना, आत्मज्ञानरूपी खड्गानें हा संसाररूपी अश्वत्थवृक्ष खालच्या वरच्या मुळांसुद्धां छेदून टाक. ६६ .

श्लोकार्थः—नंतर, ज्या पदाला प्राप्त झालेले लोक पुनः मागें येत नाहींत, तें पद शोधून

( ८१६. भववृक्षाचा नाश करून अव्ययपदाचा शोध करण्याचा प्रकार, २६७-२७५ ) मग इदंतेसि[1] वाळलें। जें मीपणेंवीण डाहॅारलें[2]। तें रूप पाहिजे[3] आपलें। आपणाचि ॥६७॥ परि दर्पणाचेनि आधारें। एकाचि करून दुसरें। मुख पाहातीं गव्हारें। तैसें नको हो ॥ ६८ ॥ हें पाहाणें ऐसें असे वीरा। जैसा बुडलिया विहिरॅा[4]। मग आपलिया उगमीं झरा। भरोनि ठाके ॥ ६९ ॥ नातरि आटलिया अंभे[5]। निजबिंबीं प्रतिबिंब। [6]नेहटे कां नभीं नभ। घटाभावीं ॥ २७० ॥ ना ना इंधनांशु सरलेया। वन्हि परते जेवीं आपणपयां। तैसें आपेंआप धनंजया। न्याहाळणें जें गा ॥ ७१ ॥ जिव्हे आपुली चवी चाखणें। चक्षू निज बुबुळ देखणें। आहे तया ऐसें निरीक्षणें। आपुलें पैं ॥ ७२ ॥ कां प्रभेसि प्रभा मिळे। गगन गगनावरी लोळे। नाना पाणी भरलें खोळे। पाणियाचिये ॥ ७३ ॥ आपणेंचि आपणयातें। पाहिजे जें अद्वैतें। तें ऐसें होय निरुतें। बोलिजतु असे ॥ ७४ ॥ जें पाहिजतेंनवीण पाहिजे। कांहीं नेणणाचि जाणिजे। आद्यपुरुष कां म्हणिजे। जया ठायातें ॥ ७५ ॥ ( ८१७. अव्ययपदाला गेल्यानंतर मुमुक्षु परत येत नाहींत, २७६-२८४ ) तेथही उपाधीचा बोथंबा[7]। घेऊनि श्रुति उभविती जिभा। मग नामरूपाचा वडंबा[8]। करिती वायां ॥ ७६ ॥ पैं भवस्वर्गा उबगले। मुमुक्षु योगज्ञाना वेंळघले[9]। पुढती नें[10] यों इया निगाले[11]। पैजा जेथ ॥ ७७ ॥ संसाराचिया पायां पुढां। पळती वीतरॅाग[12] होडा[13]। ओलांडोनि ब्रह्मपदाचा कर्मकडा। घालिती मागां ॥ ७८ ॥ अहंतादिभावां आपुलिया। झाडा देऊनि आघवेया। पत्र घेती ज्ञानिये जया। मूळघरासी ॥ ७९ ॥ पैं जेथुनी हे येवढी। विश्वपरंपरेची वेलाडी। वाढती आशा जैशी कोरडी। निर्देवाची ॥ २८० ॥ जियें कां वस्तूचें नेणणें। आणिलें थोर जगा जाणणें। नाहीं तें नांदविलें जेणें। मी तूं जगीं ॥ ८१ ॥ पार्था तें वस्तु पहिलें। आपणपें पैं आपुलें। पाहिजे जैसें हिंवलें। हिंवें ॥ ८२ ॥ आणीकही एक तया। वोळखण असे धनंजया। तरी जया कां भेटलिया। येणेंचि नाहीं ॥८३॥ परी तया भेटती ऐसे। जे ज्ञानें सर्वत्र सरिसे। महाप्रळयांबूचें जैसें। भरलेपण ॥ ८४ ॥

निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः।
द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥

अन्वयः—निर्मानमोहाः, जितसंगदोषाः, अध्यात्मनित्याः, विनिवृत्तकामाः, सुखदुःखसंज्ञैः द्वंद्वैः विमुक्ताः, अमूढाः, तत् अव्ययं पदं गच्छन्ति ॥ ५ ॥

---

१ ही अमुक वस्तु. २ प्रसिद्ध आहे. ३ पाहावें. ४ झरा. ५ पाणी. ६ मिळतें. ७ आश्रय. ८ बडबड. ९ कंटाळले. १० अनुसरले. ११ परत यावयाचे नाहीं. १२ विरक्तपणा. १३ पैजेनें.

काढावें. ( कसें ? तर, ) ज्याच्यापासून अनादि प्रवृत्ति चालत आली आहे, त्याच आद्य पुरुषाला मी शरण आहें अशा भावनेनें ( त्या पदाचा शोध लावावा ). ॥ ४ ॥

मग, ही अमुक वस्तु हा भास जेथें रहात नाहीं, व अहंतेचा लोप होतो, असें जें आत्मस्वरूप, तें पहावें. ६७ परंतु मूर्ख लोक आरशाच्या आधारानें आपलें एकच रूप दुसरें पहातात, त्याप्रमाणें तूं करूं नको हो ! ६८ अर्जुना, आपलें स्वरूप पाहण्याची रीत अशी आहे कीं, एखादा झरा उकरला असता पाणी आहे असें प्रत्ययास येतें, परंतु तोंच बुजवला तरी त्यांत मूळ पाणी आहेच, ६९ किंवा पाणी आटल्यावर जसें त्यांतील प्रतिबिंब मुख्य बिंबाशीं ऐक्य पावतें, अथवा घट फुटल्यावर घटांतील आकाश महदाकाशास मिळतें; २७० किंवा लाकडें नाहींतशीं झाल्यावर त्यांतील अग्नि जसा स्वस्वरूपीं लय पावतो, तसें, अर्जुना, आपलें स्वरूप हें आपल्या स्वरूपांत पहावें लागतें. ७१ जसें जिव्हेनें आपली स्वतःची चव पाहणें किंवा डोळ्यांनीं आपलें बुबुळ पाहणें, तसें आपलें स्वरूप आपण पाहणें हें होय. ७२ किंवा प्रभा जशी प्रभेस मिळते, आकाश आकाशावरच असतें, अथवा पाणी ज्याप्रमाणें पाण्यातच असतें, ७३ त्याप्रमाणें, अद्वैतदृष्टीनें आपलें स्वरूप आपण पाहण्याची रीत आहे हें तुला निश्चयपूर्वक सांगतों. ७४ पाहिल्याशिवाय पाहणें, व जाणल्याशिवाय जाणणें असें जें आद्य ठिकाण—ज्याला ब्रह्म असें म्हणतात, ७५ त्या ब्रह्मालाही उपाधींच्या योगानें अस्तित्व आणून त्याचें श्रुति वर्णन करतात; मग, त्याला नांवरूप आहे अशी व्यर्थ बडबड करतात. ७६ पण स्वर्ग व संसार यांस कंटाळलेले मुमुक्षु लोक योगज्ञानाचा आश्रय करितात; आणि मग तेथून ' परत यावयाचें नाहीं ' अशा प्रतिज्ञेनें जिकडे जाण्यास निघतात, ७७ मग संसाराच्या पुढें पाय ठेवून वैराग्याची पैज मारून धावतात; आणि कर्ममार्गाच्या आचरणानें प्राप्त होणारा ब्रह्मलोक, तोही ओलांडून पुढें जातात. ७८ मग आपले अहंतादि सर्व भाव जिंकून ते ज्ञानी निजपदास जाण्याकरितां अजिक्यपत्र घेतात. ७९ हें पहा—त्या निजपदापासून ही विश्वाची परंपरा एवढी वाढली आहे, ती केवळ दैवहीनाच्या आशेप्रमाणें व्यर्थ ( मिथ्या ) होय. २८० आत्मस्वरूप न जाणल्यामुळें जो हा संसार भासतो, तो ज्या मुमुक्षूनें अहंता सोडून नाहींसा केला, ८१ पार्था, अशी जी वस्तु, ती, ज्याप्रमाणें थंडी थंडीस काकडावितें, त्याप्रमाणें आपली आपण पाहिली पाहिजे. ८२ हे धनंजया, तें निजपद ( आत्मस्वरूप ) ओळखण्याची आणखी एक खूण आहे कीं, ज्या स्वरूपाची भेट झाली असतां त्या ठिकाणाहून पुनः परत येणें घडत नाहीं. ८३ महाप्रलयकालीं जसें सर्वत्र जलमय होतें, तसें जे ज्ञानानें परिपूर्ण होऊन त्या स्वरूपास भेटतात, ते स्वस्वरूपांत निमग्न असतात. ८४

श्लोकार्थः—ज्याचा अभिमान आणि मोह गेला आहे, ज्यांनीं विषयासक्तिरूप दोष जिंकले आहेत, जे आत्मज्ञानाला नित्य पावतात, ज्याच्या सर्व वासना नाहींतशा झाल्या आहेत, आणि जे सुखदुःखरूप द्वंद्वापासून मुक्त झाले आहेत, असे जे ज्ञाते जन, ते त्या शाश्वत पदाला जाऊन मिळतात ॥५॥

(८१८. मानमोह सोडावे, २८५) जया पुरुषांचें कां मन। सांडोनि गेलें मोह मान[1]। वर्षांतीं जैसे घन। आकाशातें ॥ ८५ ॥ (८१९. विषयादि विकार गेले पाहिजेत, २८६) निकवड्या निष्ठुरा। उबगिजे जेविं सोयरां[2]। तैसें नागवती विकारां। वेटाळूं जे ॥ ८६ ॥ (८२०. अध्यात्मज्ञानांत बुद्धि स्थिर व्हावी, २८७) फळेली केळी उन्मूळे। तैसी आत्मलाभें प्रबळें। जयाची क्रिया ढाळें ढाळें[5] गळती आहे ॥ ८७ ॥ (८२१. सर्व कामना नामशेष व्हाव्या, २८८–२९० आगी लागलिया रुखीं। देखोनि सैरा पळती पक्षी। तैसे सांडिले अशेखीं। विकल्पीं जे ॥ ८८ ॥ आइकें सकळ दोषतृणीं। अंकुरिजती जिये मेदिनीं[8]। तिये भेदबुद्धीची कहाणी। नाहीं जयातें ॥ ८९ ॥ सूर्योदयासारिसी। रात्री पळोनि जाय अपैसी। गेली देहअहंता तैसी। अविद्येसवें ॥२९०॥ (८२२. सुखदुःख-द्वंद्वांपासून मुक्त व्हावें, २९१-२९९) पैं आयुष्यहीना जीवातें। शरीर सांडी जेविं अवचितें। तेविं निदसुरें द्वैतें। सांडिले जे ॥ ९१ ॥ ॥ लोहाचें सांकडें परिसा। न जोडे अंधारु रवि जैसा। द्वैतबुद्धीचा तैसा। सदा दुकाळ जया ॥ ९२ ॥ अगा सुखदुःखाकारें। द्वंद्वं देहीं जिये गोचरें। तियें जयां कां समोरें। होतीचि ना ॥९३॥ स्वप्नींचे राज्य कां मरण। नोहे हर्षशोकांसि कारण। उपवढालियां जाण। जियापरि ॥ ९४ ॥ तैसें सुखदुःखरूपीं। द्वंद्वीं जे पुण्यपापीं। नें[12] घेपिजती सर्पी। गरुड जैसे ॥ ९५ ॥ आणि अनात्मवर्ग[13] नीर। सांडूनि आत्मरसाचें[14] क्षीर। चरताति जे सविचार। राजहंस ॥ ९६ ॥ जैसा वर्षोनि भूतळीं। आपला रसु अंशुमाळी[15]। मागौता आणी रश्मिजाळीं[16]। बिंवासीचि ॥९७॥ तैसें आत्मभ्रांतीसाठीं। वस्तु विखुरली बारा वाटीं। ते एकवाटिती ज्ञानदृष्टी। अखंड जे ॥ ९८ ॥ किंबहुना आत्मयाचा। निर्धारीं विवेकु जयांचा। बुडाला बोधु गंगेचा। सिंधूमाजीं जैसा ॥९९॥ (८२३. अव्ययपद, ३००-३०७) पैं अवघाचि आपुलेपणें। नुरेचि जया अभिलषणें। जैसें येथूनि पऱ्हां जाणें। आकाशा नाहीं ॥ ३०० ॥ जैसा अग्नीचा डोंगरु। नेघे कोणी बीजअंकुरु। तैसा मनीं जयां विकारु। उदयजेना ॥ १ ॥ जैसा काढिलिया मंदराचळ। राहे क्षीराब्धि निश्चळ। तैसा नुठी जयां सळ। कामोर्मीचा ॥२॥ चंद्रमा कळीं घाली। न दिसे कोणें आंगीं ओसावला। तेविं अपेक्षेचा अवेखळा। न पडे जयां ॥ ३ ॥ हें किती बोलूं अँसांगडें। जेविं परमाणु नुरे वायूपुढें। तैसें विषयाचें नावडे। नांवचि जयां ॥ ४ ॥ एवं जे जे कोणी ऐसे। केले ज्ञानाग्नि-हुताशें। ते तेथ मिळती जैसें। हेमीं हेम ॥ ५ ॥ तेथ म्हणिजे कवणे ठाईं। ऐसेंही पुससी

१ अभिमान. २ तिरस्कार करणें; सोडणें. ३ सांपडत नाहीं. ४ व्यायलेली. ५ क्रमाक्रमानें. ६ धंद पडतात. ७ पापांनीं. ८ पृथ्वी. ९ मोह पाडणारें १० दुष्काळ. ११ आगें झाल्यावर. १२ जिंकल्या नाहींत. १३ असद्वस्तुरूपी पाणी. १४ सद्रूपी दूध. १५ सूर्य. १६ किरणद्वारा.

वर्षाऋतूच्या अखेरीस ज्याप्रमाणें मेघ आकाशास सोडून जातात, त्याप्रमाणें ज्या पुरुषाचे मनाला मोह व अभिमान सोडून जातात, ८५ निर्धन व निष्ठुर अशा मनुष्यांस ज्याप्रमाणें त्याचे आप्त सोडतात, त्याप्रमाणें जे विकारांचे सपाट्यांत सांपडत नाहींत; ८६ केळीला केळीं आल्यावर ती जशी उन्मळून पडते, तशा आत्मस्वरूपलाभाच्या प्रबलतेनें ज्यांच्या क्रिया क्रमाक्रमानें बंद पडतात; ८७ वृक्षाला आग लागल्यावर त्यावर बसणारे पक्षी ज्याप्रमाणें तो सोडून जातात, त्याप्रमाणें ज्यांना सर्व पापें सोडून जातात; ८८ ज्या भेदबुद्धिरूप पृथ्वीवर सर्वदोषरूप तृणाचे अंकुर फुटतात, त्या भेदबुद्धीची ज्यांना ओळखही रहात नाहीं; ८९ सूर्योदय होण्याबरोबर रात्र जशी आपोआप नाहींशी होते, तसा आत्मस्वरूपाचा लाभ झाल्यावर ज्यांचा देहविषयक अभिमान अज्ञानासह नाहींसा होतो; २९० हें पहा, आयुष्यहीन जीवास ज्याप्रमाणें शरीर अवचित सोडतें, त्याप्रमाणें मोह पाडणारें द्वैत ज्यांना सोडून जातें; ९१ परिसाला जसें लोखंड दुर्मिळ आहे, किंवा सूर्याची व अंधकाराची ज्याप्रमाणें गांठ पडत नाहीं, त्याप्रमाणें द्वैतबुद्धीचा ज्यांच्यापाशीं सदोदित तोटा असतो; ९२ अरे, या देहाचा अभिमान धरल्यावर, सुखदु:खाकाररूपी जें द्वैत ( द्वंद्व ) दृष्टीस पडतें, तें ज्यांच्यापुढें येत नाहीं; ९३ ज्याप्रमाणें जागें झाल्यावर स्वप्नांत मिळालेलें राज्य अथवा प्राप्त झालेलें मरण यांजपासून हर्ष किंवा शोक होत नाहीं; ९४ ज्यामाणें गरुडापुढें सर्प येत नाहीं, त्याप्रमाणें, सुखदु:खरूपी पुण्य व पाप उत्पन्न करणारें जें द्वैत, तें ज्यांना जिंकीत नाहीं, ९५ आणि असद्वस्तुरूपी पाणी टाकून जे विचारी राजहंस सद्वस्तुरूप दुधाचें सेवन करतात; ९६ ज्याप्रमाणें सूर्य पृथ्वीवर पाऊस पाडून तेंच पाणी आपल्या किरणद्वारा आपल्या ठिकाणींच शोषण करून घेतो, ९७ त्याप्रमाणें, आत्मस्वरूपाची भ्रांति पडल्यामुळें जें ब्रह्म चहूंकडे फांकलें असतें, तें ज्ञानदृष्टि झाल्यावर आपल्या स्वरूपांत नेहमीं ऐक्य पावतें. ९८ इतकेंच नव्हे, तर ज्याप्रमाणें गंगेचा ओघ समुद्रास मिळाल्यावर माघारा येत नाहीं, त्याप्रमाणें आत्मस्वरूपाविषयीं त्याचे विचार ढळत नाहींत. शिवाय, सर्वत्र आत्मस्वरूप झाल्यावर ज्ञान्याला कसलीच इच्छा नसते. ९९ ज्याप्रमाणें आकाशाची सर्वत्र व्याप्ति असल्यामुळें त्याला एका गांवाहून दुसरे गांवास जाणें शक्य नाहीं; ३०० ज्याप्रमाणें अग्नीच्या डोंगरावर कसलेंही बीं पेरलें असतां उगवत नाहीं, त्याप्रमाणें, ज्याचे मनांत ज्ञानाचा उदय झाला आहे, तेथें कोणतेही विकार उद्भवत नाहींत. १ ( समुद्रमंथनसमयीं ) क्षीरसमुद्रांत घातलेला मंदराचल त्यांतून काढून घेतल्यावर तो समुद्र स्थिर झाला, त्याप्रमाणें, आत्मप्राप्ति झाल्यामुळें ज्यांचे मनांत कामवासना उत्पन्न होत नाहीं; २ ज्याप्रमाणें चंद्र षोडश कलांनीं भरल्यावर कोणतेही बाजूनें कमी दिसत नाहीं, त्याप्रमाणें आत्मप्राप्ति झाल्यामुळें ज्यांचे मनांत कोणतीच इच्छा उत्पन्न होत नाहीं; ३ अशा निरुपम गोष्टी तुला किती सांगूं ? ज्याप्रमाणें वायूच्या पुढें परमाणु टिकत नाहीं; ४ अशा प्रकारें, हुत भक्षण करणारा जो ज्ञानाग्नि, त्यांत ज्यांनीं सर्व विषय जाळून टाकले आहेत, ते पुरुष सुवर्णांत सुवर्ण मिळाल्याप्रमाणें स्वरूपाशीं ऐक्य पाव-

---

१७ पसरलीं. १८ इच्छा. १९ पलीकडे. २० वाढ. २१ पूर्ण झाला. २२ कमी असलेला. २३ उकळी. २४ निरुपम. २५ हुत भक्षण करणारा जो ज्ञानाग्नि त्यांत. २६ सुवर्णांत.

कांहीं । तरि तें पद गा नाहीं । वेंचु जया ॥ ६ ॥ दृश्यपणें देखिजे । कां ज्ञेयते जाणिजे । अमुकें ऐसें म्हणिजे । तें जें नव्हे ॥ ७ ॥

न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।
यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥

अन्वयः—न सूर्यः, न शशांकः ( च ) न पावकः तत् ( पदं ) भासयते, यत् गताः निवर्तन्ते, तत् मम परमं धाम ॥ ६ ॥

( ८२४. अव्ययपदाचें प्रकाशन चंद्र, सूर्य, अग्नि करीत नाहीं, ३०८–३१६ ) पैं दीपाचिया वंबाळीं । कां चंद्र हन जें उजळी । हें काय बोलों अंशुमाळी प्रकाशी जें ॥ ८ ॥ तें आघवेंचि दिसणें । जयाचें कां न देखणें । विश्व भासतां जेणें । लपालेनी ॥ ९ ॥ जैसें शिंपीपण हारपे । तंव तंव खरें होय रुपें । कां दोरी लोपतां सापें । फार होइजे ॥ ३१० ॥ तैसीं चंद्रसूर्यादि थोरें । इयें तेजें जियें फारें । तियें जयाचेनि आंधारें । प्रकाशती ॥ ११ ॥ ते वस्तु कीं तेजोराशि । सर्व भूतात्मक सरिसी । चंद्रसूर्यांच्या मानसीं । प्रकाशे जे ॥ १२ ॥ म्हणौनि चंद्रसूर्य कैडवसां । पडती वस्तूच्या प्रकाशा । यालागीं तेज जें तेजसा । तें वस्तूचें आंग ॥ १३ ॥ आणि जयाच्या प्रकाशीं । जग हारपे चंद्रार्कैंसीं । सचंद्र नक्षत्रें जैसीं । दिनोदयीं ॥ १४ ॥ नातरी प्रबोधलिये वेळे । ते स्वप्नींची डिंडी मावळे । कां नुरेचि सांजवेळे । मृगतृष्णिका ॥ १५ ॥ तैसा जिये वस्तूच्या ठायीं । कोण्हीच कां आभासु नाहीं । तें माझें निजधाम पाहीं । पांटाचें गा ॥ १६ ॥ ( ८२५. अव्ययपदाला जाणारे पुन्हा संसाराला येत नाहींत, ३१७-३२० ) पुढती जे तेथ गेले । ते न येतीचि माघौतीं पाउलें । महोदधीं का मिनले । स्रोत जैसे ॥ १७ ॥ कां लवणाची कुंजरी । सूदलियां लवणसागरीं । होयाचि ना माघारी । परती जैसी ॥ १८ ॥ नाना गेलिया अंतराळा । न येतीचि वन्हि-ज्वाळा । नाहीं तप्त लोहौनि जळा । निघणें जेवीं ॥ १९ ॥ तेवीं मजसीं एकवट । जे जाले ज्ञानें चोखट । तयां पुनरावृत्तीची वाट । मोडली गा ॥ ३२० ॥ ( ८२६. अर्जुनाची शंका, देवाच्या भाषणात विरोध, ३२१–३२८ ) तेथ प्रज्ञापृथ्वीचा रावो । पार्थु म्हणे जी जी पैसावो । परि विनंति एकी देवो । चित्त देतु ॥ २१ ॥ तरी देवेंसि स्वयें एक होती । मग माघौते जे न येती । ते देवेंसि भिन्न आथी । कीं अभिन्न जी ॥ २२ ॥ जरि भिन्नाचि अनादिसिद्ध । तरी न येती हें असंबद्ध । जे फुलां गेले षट्पद । ते फुलेंचि होती का ॥ २३ ॥ पैं लक्षौहूनि अनारिसे । बाण लक्षीं शिवोनि जैसे । माघुते पडती तैसे । येतीचि ते ॥ २४ ॥ नातरि तूंचि

---

१ नाश. २ व्यापक. ३ अंधकार. ४ जागें झाल्यावर. ५ पसारा. ६ मृगजळ. ७ मुख्य. ८ ओघ. ९ हत्तीण. १० घातली असतां. ११ प्रसाद. १२ भ्रमर. १३ निशाणाहून.

तात. ५ तें ठिकाण कोठें आहे असें जर तूं विचारशील, तर, जें कधीं नाश पावत नाहीं तें तें ठिकाण. ६ जें पाहूं गेलें असतां दिसावें, जाणूं गेलें असतां समजावें, किंवा अमुक वस्तूप्रमाणें आहे असें म्हणतां यावें, याहून वेगळें आहे; ७

श्लोकार्थः—त्या पदाला प्रकाशित करण्यास सूर्य, चंद्र किंवा अग्नि हे समर्थ नाहींत. ज्या पदाला प्राप्त झालेले लोक पुनः परत येत नाहींत, तें माझें परम धाम ( उत्तम पद ) आहे ॥ ६ ॥

परंतु दिव्याच्या उजेडानें अथवा चंद्राच्या प्रकाशानें—फार तर काय ? परंतु ज्या सूर्यापासून सर्व जग प्रकाशित होतें, त्याच्या प्रकाशानें, ८ ह्या सर्वांच्या प्रकाशानें जें दृष्टीस पडणें, हेंच ज्याच्या आड येतें, ( जोंपर्यंत जग दिसतें, तोंपर्यंत ज्याचा लोप असतो, ) व ज्याच्या लोपामुळेंच विश्वाचा भास होतो; ९ जसजसा शिंपीचा भास कमी होईल, तसतसा रुप्याचा भास वाढतो; किंवा दोरीचा भास नाहींसा झाल्यावर सापाचा खरेपणा उघडकीस येतो; ३१० त्याप्रमाणें, चंद्रसूर्यादिकांचें जें प्रखर तेज, तें ज्या स्वरूपाच्या अंधकारांत प्रकाशित होतें, ११ अशी जी वस्तु, ती अति तेजस्वी असून, सर्व भूतांना व्यापून चंद्र व सूर्य यांनाही प्रकाश देते. १२ म्हणून या वस्तूच्या प्रकाशापुढें चंद्र व सूर्य यांच्या तेजांचा अंधार पडतो. याकरितां, सर्व तेजस्वी वस्तूंस तेज देणारें असें या वस्तूचें ( ब्रह्माचें ) स्वरूप आहे १३ आणि या वस्तूचा प्रकाश झाला असतां चंद्रसूर्यांसह जगाचा लोप होतो. ज्याप्रमाणें सूर्योदय झाल्यावर नक्षत्रांसह चंद्र निस्तेज होतो, १४ किंवा जागें झाल्यावर स्वप्नांत भासलेला सर्व पसारा मावळतो, अथवा संध्याकाळ झाल्यावर मृगजल आपोआप नाहींसें होतें, १५ त्याप्रमाणें, ज्या वस्तूचे ठिकाणीं कसलाच भास रहात नाहीं, तें माझें मुख्य स्थान होय. १६ त्या ठिकाणीं जे गेले, ते, ज्याप्रमाणें पाण्याचे ओघ समुद्रास मिळाल्यावर माघारे येत नाहींत, त्याप्रमाणें जगाकडे माघारे येत नाहींत, १७ किंवा मिठाची तयार केलेली हत्तीण समुद्रांत बुडविल्यावर जशी माघारी येत नाहीं, १८ किंवा आकाशांत गेलेल्या अग्नीच्या ज्वाला जशा खालीं परतून येत नाहींत, किंवा तापलेल्या लोखंडावर टाकलेलें पाणी जसें नाहींसें होतें ( माघारी येत नाहीं ), १९ तसे शुद्ध ज्ञान झाल्यामुळें जे माझें ऐक्य पावतात, ते पुनर्जन्मापासून मुक्त होतात. ३२० तेव्हां, बुद्धिरूप पृथ्वीचा राजा जो अर्जुन, तो म्हणाला, " प्रभो, आपला आज मजवर प्रसाद झाला आहे; परंतु एक माझी विनंती आहे, तिकडे लक्ष द्यावें. २१ तर जे देवांच्या स्वरूपांत जाऊन मिळाल्यावर माघारी येत नाहींत, ते पूर्वी देवांच्या स्वरूपापासून भिन्न होते किंवा एकरूपच होते ? २२ जर ते अनादिसिद्ध भिन्न असतील, तर ते माघारी येत नाहींत हें म्हणणें असंभवनीय होय. कारण असें पहा—भ्रमर फुलांतील मकरंद सेवन करण्यास गेले असतां कधीं फुलेंच होतात काय ? २३ दुसरें असें पहा, लक्ष्याहून वेगळे असे जे बाण, ते सोडल्यावर ज्याप्रमाणें लक्ष्यास भेदून पुनः खालीं पडतातच, ( ऐक्य पावत नाहींत, ) त्याप्रमाणें ते परत येतातच. ( तुमच्या स्वरूपांत मिळाले असतांही माघारे येत नाहींत हें म्हणणें शोभत नाहीं. ) २४ नाहीं तर, तुम्ही तेच ते असें जर वस्तुतः असेल, तर कोणीं कोणास मिळावयाचें ? असें पहा, शस्त्रानें

ते स्वभावें । तरि कोण कोणेंसीं मिळावें । आपणयासी आपण रुपावें । शस्त्र केविं ॥ २५ ॥ म्हणौनि तुजसीं अभिन्ना जीवां । तुझा संयोगवियोगु देवा । नये बोलों अवयवां । शरीरेंसीं ॥ २६ ॥ आणि जे सदा वेगळे तुजसीं । तया मिळणी नाहीं कोणे दिवसीं । मा येती न येती हे कायसी । वाय बुद्धि ॥ २७ ॥ तरि कोण गा ते तूतें । पावोनि न येती माघौते । हे विश्वतोमुखा मातें । बुझावीं जी ॥ २८ ॥ ( ८२७. देव शंकेचें निरसन करतात, ३२९–३३७ ) इये आक्षेपीं अर्जुनाचा । तो शिरोमणि सर्वज्ञांचा । तोषला बोध शिष्याचा । देखोनियां ॥ २९ ॥ मग म्हणे गा महामती । मातें पावोनि न येती पुढती । ते भिन्नाभिन्न रिती । आहाती दोनी ॥ ३३० ॥ जैं विवेकें खोलें पाहिजे । तरि मी तेचि ते सहजें । ना आहाचँवाहाच तरि दुजे । ऐसेंही गमती ॥ ३१ ॥ जैसे पाणियावरी वेगळ । तळँपतां दिसती कल्लोळ । येऱ्हवीं तरी निखिळ । पाणीचि तें ॥ ३२ ॥ कां सुवर्णाहूनि आनें । लेणीं गमतीं भिन्नें । मग पाहिजे तंव सोनें । आघवेंचि तें ॥ ३३ ॥ तैसें ज्ञानाचिये दिठी । मजसीं अभिन्नचि ते किरीटी । येर भिन्नपण तें उठी । अज्ञानास्तव ॥ ३४ ॥ आणि साचोकारेंनि वस्तुविचारें । कैंचें मज एकासि दुसरें । जें भिन्नाभिन्नें व्यवहारें । उँमसिजेल ॥ ३५ ॥ आघवेंचि आकाश सूनि पोटीं । विंबचि जैं आँते खोटी । तैं प्रतिबिंब कें उठी । कें रश्मि शिरे ॥ ३६ ॥ का कल्पांतींचिया पाणिया । काय वोतं भरिती धनंजया । म्हणौनि कैंचे वंशं अविक्रियें । एका मज ॥ ३७ ॥ ( ८२८. जीव मायोपाधीमुळें अंशासारखे भासतात, ३३८-३४२ ) अवतरणः—परि ओघाचेनि मेळें । पाणी उजू परि वाकुडें जालें । रवी दुजेपण आलें । तोयँवगें ॥ ३८ ॥ व्योम चौफळें कीं वाटोळें । हें ऐसें कायसया मिळे । परि घटमठीं वेंटाळें । तैसेंही आथी ॥ ३९ ॥ हा गा निद्रेचेनि आधारें । काय एकलेनि जग न भरे । स्वर्मीचेनि जें अवतरे । रायपणें ॥ ३४० ॥ कां भिनलेनि किडाळें । वाँनिभेदासि ये सोळें[१५] । तैसा स्वमायें वेटाळे । शुद्ध जें मी ॥ ४१ ॥ तें अज्ञान एक रूढे । तेणें कोहंविकल्पाचें मांडे[१६] । मग विवरूनि कीजे फुडें । देहो मी ऐसें ॥ ४२ ॥

ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।
मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥

अन्वयः—जीवलोके मम एव सनातनः जीवभूतः अंशः ( अस्ति, सः ) प्रकृतिस्थानि मनःषष्ठानि इंद्रियाणि कर्षति ॥ ७ ॥

---

१ सर्वत्र मुखें आहेत ज्याला अशा श्रीकृष्णा. २ समजाव. ३ वरवर विचार केला तर. ४ हालतें असतां. ५ मायेच्या उपाधीनें. ६ उद्भवेल. ७ व्यापून टाकील. ८ ओहोटी. ९ भेद, अभेद. १० विकाररहिताला. ११ पाण्याच्या उपाधीनें. १२ चौकोनी. १३ उपाधियुक्त होतें. १४ निराळी कसोटी. १५ सोळाच्या दराचें—उत्तम सोनें. १६ उत्पन्न होतो.

शस्त्राचा ( आपला स्वतांचा ) छेद होतो काय ? २५ म्हणून, देवा, तुमच्या स्वरूपाशीं ज्यांचें ऐक्य आहे, त्यांना तुमचा संयोग किंवा वियोग होतो असें कसें म्हणतां येईल ? अवयव आणि शरीर कधीं एकमेकांपासून वेगळीं होतात असें म्हणतां येत नाहीं. २६ बरें, जे नेहमीं तुमच्या स्वरूपापासून भिन्न आहेत, ते केव्हाही तुमच्या स्वरूपांत ऐक्य पावावयाचे नाहींत, मग ते माघारी येतात किंवा येत नाहींत, हें व्यर्थ बोलणें तरी कशाला हवें ? २७ तर, श्रीकृष्णा, ज्या तुम्हांला सर्वत्र मुखें आहेत, त्या तुमच्या स्वरूपांत मिळाल्यावर कोण माघारी येत नाहींत, ते मला नीट समजावून सांग. " २८ अर्जुनाची ही शंका ऐकून आपण सांगितलेलें त्याच्या मनांत पूर्णपणें बिंबलें असें पाहून सर्वज्ञशिरोमणि भगवान श्रीकृष्ण यास संतोष वाटला. २९ मग भगवान म्हणतात:—हे महामते, मद्रूप झाल्यावर जे पुनः माघारी येत नाहींत, त्यात भिन्न व अभिन्न अशा दोन्ही प्रकारचे लोक आहेत. ३३० जर विचारदृष्टीनें पूर्ण लक्ष देऊन पाहिलें, तर माझें व त्यांचें स्वरूपांत स्वभावतःच ऐक्य असतें; आणि वरवर विचार करून पाहिलें, तर ते माझ्यापासून भिन्न आहेत असेंही वाटतें. ३१ ज्याप्रमाणें पाणी हाललें असता त्यावर येणाऱ्या लाटा पाण्यापासून वेगळ्या दिसतात, बाकी वस्तुतः तें निवळ पाणीच होय; ३२ किंवा सोन्याचे दागिने सोन्याहून भिन्न दिसतात; पण मग विचारपूर्वक पाहिलें असतां तें सर्व सोनेंच आहे; ३३ त्याप्रमाणें, हे किरीटी, ज्ञानदृष्टीनें पाहिलें असतां ते मद्रूपच आहेत; एरवीं त्यांच्यांत व माझ्यांत जो भिन्नपणा वाटतो, तो अज्ञानामुळें; ३४ आणि खरोखर वस्तूच्या दृष्टीनें पाहिलें असतां, मायोपाधींच्या योगें उद्भवणारें असें भिन्नत्व मज एकाच्या ठिकाणीं कोठून असणार ? ३५ सूर्यबिंबानें सर्व आकाश व्यापून पोटांत घातल्यावर त्याचें प्रतिबिंब कोठें दिसणार ? व किरणें तरी कशावर पडतील ? ३६ किंवा, अर्जुना, कल्पांतींच्या पाण्याला ओहटी व भरती असते काय ? म्हणून, विकाररहित असा जो मी, त्या मला भेद व अभेद कोठून असणार ? ३७ परंतु ओघाच्या अनुरोधानें जसें पाणी उजू असूनही वांकडें होतें, किंवा पाण्याच्या उपाधीनें जसा सूर्याच्या बिंबास त्याच्या प्रतिबिंबानें दुजेपणा येतो; ३८ आकाश हें चौकोनी किंवा वाटोळें असें कसें म्हणतां येईल ? परंतु तेंच घट व मठ याच्या उपाधीनें तसेंच दिसतें; ३९ अरे हें पहा, निद्रेच्या उपाधीनें स्वप्नांत ज्या वेळीं मनुष्य राज्यपदावर आरूढ होतो, त्या वेळीं राजा, प्रजा इत्यादि सर्व जग त्या एकट्यानेंच व्याप्त होत नाहीं काय ? ३४० किंवा सोळाच्या दराच्या उत्तम सोन्यात किडाळ मिळविल्यावर तें कसास कमी उतरतें, त्याप्रमाणें, शुद्धस्वरूप असा मी जेव्हां मायेनें परिवेष्टित होतों, तेव्हां माझे ठिकाणीं मायेच्या उपाधीनें जीव व ईश्वर हे भाव उत्पन्न होतात. ४१ त्या वेळीं एक अज्ञानच चहूंकडे रूढ होतें आणि त्या योगानें, मी कोण ? असा विकल्प उत्पन्न होतो. मग पुष्कळ विचार करून असा निश्चय करितात कीं, देहच मी ! ४२

श्लोकार्थः—मनुष्यलोकीं माझाच सनातन असा जीवरूप अंश आहे. तो, प्रकृतीमध्यें असलेलीं पंचज्ञानेंद्रियें व मन याना आकर्षित करितो ॥ ७ ॥

( ८२९. जीव सनातन माझेच असून इंद्रियांचे संगतीनें जीवभावाला आले, ३४३-३४७ ) ऐसें शरीराचियेवढें। जैं आत्मज्ञान वेगळें पडे। तैं माझा अंशु आवडे। थोडेपणें ॥ ४३ ॥ समुद्र कां वायुवशें। तरंगाकार उल्लसे। तो समुद्रांशु ऐसा दिसे। सानिवां जेविं ॥ ४४ ॥ तेविं जडातें जीवविता। देहअहंता उपजविता। मी जीव गमें पंडुसुता। जीवलोकीं ॥ ४५ ॥ पैं जीवाचिया बोधा। गोचरु जो हा धांदा। तो जीवलोक शब्दा। अभिप्रायो ॥ ४६ ॥ अगा उपजणें निमणें। हें साचचि जें कां मानणें। तो जीवलोकु मी म्हणें। संसारु हन ॥ ४७ ॥ (८३०. जीव सनातन, ३४८-३५१) एवंविध जीवलोकीं। तूं मातें ऐसा अवलोकीं। जैसा चंद्रु कां उदकीं। उदकातीत ॥४८॥ पैं काश्मीराचा रवा। कुंकुमावरी पांडवा। आणिकां गमे लोहिंवा। तो तरी नव्हे ॥ ४९ ॥ तैसें अनादिपण न मोडे। माझें अक्रियत्व न खंडे। परि कर्ता भोक्ता ऐसें आवडे। ते जाण गा भ्रांति ॥ ३५० ॥ किंबहुना आत्मा चोखड्ड। होऊनि प्रकृतीसी एकवड्ड। बांधे प्रकृतिधर्माचा पाटु। आपणपयां ॥ ५१ ॥ ( ८३१. जीव सर्व इंद्रियें माझीं म्हणतो, ३५२-३६० ) पैं मनादि साही इंद्रियें। श्रोत्रादि प्रकृतिकार्यें। तियें माझीं म्हणौनि होये। व्यापारारूढ ॥ ५२ ॥ जैसें स्वप्नीं परिव्रांजें। आपणपयां आपण कुटुंब होइजे। मग तयाचेनि धांविजे। मोहें सैरा ॥५३॥ तैसा आपलिया विस्मृती। आत्मा आपणाचे प्रकृती-। सारिखा गमोनि पुढती। तियेसीचि भजे ॥ ५४ ॥ मनाच्या रथीं वळघे। श्रवणाच्या द्वारें निघे। मग शब्दाचिया रिघे। रानामाजीं ॥ ५५ ॥ तोचि प्रकृतीचा वागोरां। करी त्वचेचिया मोहरां। आणि स्पर्शाचिया घोरा। वना जाय ॥ ५६ ॥ कोणे एके अवसरीं। रिघोनि नेत्राच्या द्वारीं। मग रूपाच्या डोंगरीं। सैरा हिंडे ॥ ५७ ॥ कां रसनेचिया वाटा। निघोनि गा सुभटा। रसाचा दरकुटां। भरोंचि लागे ॥ ५८ ॥ नातरि येणेंचि घ्राणें। मदंशु करी निघणें। मग गंधाचीं दारुणें। आडवें लंघी ॥ ५९ ॥ ऐसेनि देहेंद्रियनायके। धरूनि मन जवळिकें। भोगिजती शब्दादिकें। विषयभरणें ॥ ३६० ॥

शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः।
गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥ ८ ॥

अन्वयः—यत् ईश्वरः शरीरं अवाप्नोति च यत् अपि उत्क्रामति; वायुः आशयात् गंधान् इव एतानि गृहीत्वा संयाति ॥ ८ ॥

( ८३२. जीव सर्व इंद्रियाना घेऊन दुसऱ्या देहांत प्रवेश करतो, ३६१–३६७) परि कर्ता भोक्ता ऐसें। हें जीवाचें तेंचि दिसे। जें शरीरीं कां पैसे। एकादियें ॥ ६१ ॥ जैसा श्रीमंतु आणि विलासिया। तेंचि वोळखा ये धनंजया। जें

१ लहानपणा. २ अखंड व्यापार. ३ सोंग. ४ मरणें. ५ स्फटिकमणि. ६ तांबडा. ७ स्वीकारतो.

अशा प्रकारें आत्मज्ञान हें देहाएवढेंच आहे असें न समजता, शरीरालाच मी म्हणणें याचेंच नाव माझा अंश जाणणें होय. ४३ वाऱ्यामुळें समुद्रावर लाटा उत्पन्न होतात, त्या जशा समुद्राचा एक लहानसा अंश असें दिसतें, ४४ त्याप्रमाणें, हे पांडुसुता, देहाचा अहंकार उत्पन्न झाल्यावर, त्या जड देहाचा जो चालक, तो या मृत्युलोकांत जीवरूपी मीच होय. ४५ त्याच जीवाच्या दृष्टीनें, जो हा अखंड व्यापार चालतो, त्याला जीवलोक ( सृष्टि ) असें म्हणतात; ४६ अरे, ज्या ठिकाणीं जन्म व मृत्यु हे खरे म्हणून मानले जातात, त्या ठिकाणाला मी जीवलोक म्हणजे संसार असें म्हणतों. ४७ अशा प्रकारच्या या जीवलोकांत, ज्याप्रमाणें चंद्र हा पाण्यापासून वेगळा असतांही पाण्यांत प्रतिबिंब पडल्यावर त्यात आहे असा भासतो, त्याप्रमाणें मी आहें असें समज. ४८ अर्जुना, स्फटिकाचा मणि कुंकुमावर ठेवला असतां तो तांबडा दिसतो, तथापि तो कांहीं तांबडा नव्हे; ४९ त्याप्रमाणें, माझें अनादिपण मोडत नाहीं, आणि अक्रियत्वही भंगत नाहीं; तथापि मला कर्ता, भोक्ता असे जें म्हणतात, तें केवळ अज्ञान आहे असें समज. ३५० किंबहुना, शुद्ध असा हा आत्मा प्रकृतीशीं ऐक्य पावून, प्रकृतीचे उपाधीनें तिच्या धर्मांचा अधिकार स्वीकारतो, ५१ मग मन व श्रोत्रादि पांच इंद्रियें हीं माझीं आहेत असें म्हणून, त्यांचे व्यापार मी करतों असें म्हणतो. ५२ ज्याप्रमाणें स्वप्नांत संन्याशानें आपणच आपले कुटुंब बनून संसार थाटावा, व त्याच्या मोहानें सैरावैरा धावावें ( संसारातील सुखदुःख भोगावें ), ५३ त्याप्रमाणें, आपली विस्मृति झाल्यावर, आत्मा हा आपलें स्वरूपही तिजसारखेंच आहे असें मानून, तिच्या अनुरोधानें तिचींच कार्यें करतो; ५४ मनरूपी रथावर बसून श्रवणाच्या द्वारानें बाहेर निघून शब्दरूपी रानांत संचार करतो; ५५ तोच प्रकृतीचा लगाम हातात धरून त्वचेच्या द्वारानें स्पर्शरूपी घोर वनांत जातो; ५६ एखाद्या वेळेस नेत्राच्या द्वारानें बाहेर पडून रूपविषयाच्या डोंगरावर स्वछंदानें हिंडतो; ५७ किंवा, हे सुभटा, जिव्हेच्या द्वारानें बाहेर पडून रसाच्या गुहेंत हिंडतो, ५८ किंवा, माझा अंश जो हा जीव, तो नाकाच्या द्वारानें बाहेर पडून सुगंधाच्या अरण्यांत हिंडतो; ५९ याप्रमाणें, देह व इंद्रियें यांचा नायक जें मन, तें धरून, पंचेंद्रियाचे विषय जे शब्दादिक त्यांचा उपभोग घेतो. ३६०

श्लोकार्थः—( केव्हां ? तर ) वायु जसा पुष्पादिकापासून सुगंध घेऊन जातो, तसा हा जीव जेव्हा पूर्वींचें शरीर टाकून दुसरें शरीर धारण करतो, तेव्हा मन व इंद्रियें आपल्याबरोबर घेऊन जातो ॥ ८ ॥

पण जीवाचें कर्तृत्व किंवा भोक्तृत्व तेव्हांच दृष्टीस पडतें, कीं जेव्हां तो एखाद्या शरीरांत प्रवेश करितो. ६१ ज्याप्रमाणें एखाद्या संपन्न व विलासी पुरुषाचें ऐश्वर्य तेव्हांच

८ अधिकार. ९ संन्याशानें. १० लगाम. ११ द्वार. १२ गुहा. १३ जीव. १४ अरण्यें. १५ प्रवेश करतो. १६ संपन्न.

राजसेव्या ठाया । वस्तीसि ये ॥ ६२ ॥ तैसा अहंकर्तृत्वाचा वाढु । कां विषयें- द्रियांचा धुमाडु । हा जाणिजे तें निवाडु । जैं देह पावे ॥ ६३ ॥ अथवा शरीरातें सांडी । तऱ्ही इंद्रियांची तांडी । हे आपणपयासवें [4]जोडी । घेऊनि जाय ॥६४॥ जैसा अपमानिला अतिथि । ने सुकृताची संपत्ति । कां सैाइखडेयांची गति । सूत्रतंतु ॥ ६५ ॥ ना ना मावळतेनि त[6]र्पनें । नेइजती लोकांचीं दर्शनें । हें असो [7]द्रुति पवनें । नेइजे जैसी ॥ ६६ ॥ अवतरणः—तेवि [8]मनःषष्ठां ययां । इंद्रियांतें धनंजया । देहराजु ने देहा- । पासुनी गेला ॥ ६७ ॥

श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।
अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥

अन्वयः—अयं ( जीवः ) श्रोत्रं, चक्षुः, स्पर्शनं च रसनं, घ्राणं एव च मनः अधिष्ठाय विषयान् उपसेवते ॥९॥

( ८३३. जीव इंद्रियांच्या साहाय्यानें विषयांचा भोग घेतो, ३६८–३७२ ) मग येथें अथवा स्वर्गीं । जेथ जेथ जैसे देह आंपंगी । तेथ तैसेंचि पुढती [11]पांगी । मनादिक ॥ ६८ ॥ जैसा मालवालिया दिवा । प्रभेंसि जाय पांडवा । मग उजळिजे तेथ तेधवां । तैसाचि फांके ॥ ६९ ॥ तरि ऐसैसिया राहाटीं । अविवेकियांचे दिठी । येतुलें हें किरीटी । गमेचि गा ॥ ३७० ॥ अवतरणः—जे आत्मा देहासि आला । आणि विषयो येणेंचि भोगिला । अथवा देहोनि गेला । हें साचचि मानिती ॥ ७१ ॥ येऱ्हवीं येणें आणि जाणें । कां करणें हन भोगणें । हें प्रकृतीचें तेणें । मानियेलें ॥ ७२ ॥

उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् ।
विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥
यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम् ।
यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥ ११ ॥

अन्वयः—उत्क्रामन्तं, स्थितं वा अपि भुंजानं वा गुणान्वितं ( तं ) विमूढाः न अनुपश्यन्ति; ज्ञानचक्षुषः पश्यन्ति ॥ १० ॥ यतन्तः योगिनः आत्मनि अवस्थित एनं पश्यन्ति; च अचेतसः, अकृतात्मानः यतन्तः अपि एनं न पश्यन्ति ॥ ११ ॥

( ८३४. देहच होतात व जातात, ३७३–३७५ ) परि देहाचें मोटकें उभें । आणि चेतना तेथ [13]उपलभे । तिये चळवळेचेनि [14]लोभें । आला म्हणती ॥ ७३ ॥ तैसेंचि तया संगती । इंद्रियें आपलाला अर्थीं वर्तती । तया नांव सुभद्रा- पति । भोगणें जया ॥ ७४ ॥ पाठीं भोगक्षीण आपैसें । देह गेलिया तें न दिसे ।

१ नगरांत. २ धामधूम. ३ समुदाय. ४ संपत्ति, ऐश्वर्य. ५ कळसूत्री बाहुल्यांची. ६ पूर्वनें ७ सुवास. ८ मन व पांच ज्ञानेंद्रियें यांस. ९ जीव. १० स्वीकारतो. ११ पसारा पाळतो.

दृष्टीस पडतें, कीं जेव्हां तो एखाद्या नगरांत राहावयास येतो, ६२ त्याप्रमाणें, ज्या वेळेस जीव देह धारण करतो, त्या वेळेसच जीवाच्या अहंकाराची वाढ किंवा विषयेंद्रियांची धामधूम दिसण्यांत येते. ६३ अथवा, शरीर जर टाकलें, तर जीव आपल्याबरोबर नेहमीं असणारें मन व इंद्रियें ही आपली संपत्ति घेऊन जातो. ६४ ज्याप्रमाणें अतिथि भोजनास आला असतां त्याचा अपमान करून त्यास माघारें लावल्यावर तो आपलें पुण्य घेऊन जातो, किंवा दोऱ्या काढून घेतल्यावर कळसूत्री बाहूल्याची गति नाहींशी होते; ६५ अथवा सूर्य मावळला असता तो लोकांची दृष्टि आपल्याबरोबर घेऊन जातो; फार काय सांगावें ? वारा ज्याप्रमाणें आपल्या बरोबर पुष्पांतील सुवास घेऊन जातो, ६६ त्याप्रमाणें हे धनंजया, जीव देहाला सोडून गेला म्हणजे आपल्याबरोबर पांच ज्ञानेंद्रियें व सहावें मन यांना घेऊन जातो. ६७

*श्लोकार्थः—तो जीव कर्ण, नेत्र, त्वचा, जिव्हा व घ्राण तसेंच मन यावर सत्ता ठेवून विषयांचा उपभोग घेतो ॥ ९ ॥*

मग एथें अथवा स्वर्गलोकांत—ज्या ज्या ठिकाणीं जीव देहाचा स्वीकार करतो, त्या त्या ठिकाणीं मनादिक सहा इंद्रियांचा पुनः पसारा घालतो. ६८ अर्जुना, दिवा मालवल्यावर तो जसा आपल्या तेजासह नाहींसा होतो, तसाच तो फिरून लावल्यावर आपल्या तेजासह फांकतो; ६९ तर अर्जुना, अज्ञान्याचे दृष्टीला अशा प्रकारें, जीवाचें सर्व कर्तृत्व आहे असें वाटतें. ३७० कारण, आत्माच या देहामध्यें आला, आणि यानेंच विषयांचा उपभोग घेतला, अथवा तोच हा देह सोडून गेला, हेंच खरें असें ते लोक मानितात. ७१ एरवीं जन्म घेणें अथवा मरणें, किंवा क्रिया करणें अथवा विषयाचा उपभोग घेणें हे प्रकृतीचे धर्म आहेत. पण त्यांनीं हे आत्म्याचे मानिले आहेत. ७२

*श्लोकार्थः—देहापासून वियुक्त होणारा किंवा देहामध्येंच असणारा, शब्दादि विषयाचा उपभोग घेणारा अथवा सुखदुःखादिकांनीं युक्त असणारा जो जीव, त्याचें सत्स्वरूप मूढजनांना दिसत नाहीं; ज्यांना ज्ञानचक्षु आहेत त्यांना दिसतें ॥ १० ॥ यत्न करणारे योगी आपले ठिकाणी स्थित असलेल्या जीवाला ( आत्म्याला ) पाहतात; आणि जे शास्त्रसंस्काररहित व अविचारी आहेत, त्यांना यत्न करूनही जीवाचें स्वरूप दृष्टीस पडत नाहीं ॥ ११ ॥*

परंतु लहानसा देह समोर पाहिल्यावर, त्यांत चेतना आल्यावर जी चळवळ दृष्टीस पडते, त्या चळवळीच्या योगानें तो जन्मास आला असें म्हणतात. ७३ त्याचप्रमाणें, हे सुभद्रापते, त्याच्या संगतीनें इंद्रियें आपआपले विषय सेवीत असतां जीव उपभोग घेतो असें ह्मणतात. ७४ अरे, शरीर क्षीण होऊन भोग घेणें आपोआप राहिल्यावर देह पडून नाहींसा झाला म्हणजे जीव गेला म्हणून हांका मारतात. ७५ हे पाडवा, झाड हालत असलें म्हणजेच वारा वाहतो आहे असें समजावें, आणि तोच वृक्ष हालेनासा झाला

१२ फिरून लावल्यावर. १३ मिळे. १४ योगानें.

तेथें गेला गेला ऐसें । बोभाती गा ॥ ७५ ॥ ( ८३५. देह होतात जातात, हें ज्यांस कळत नाहीं ते आंधळे, ३७६–३८० ) पैं रुखु डोलतु देखावा । तरी वारा वाजतु मानावा । रुखु नसे तेथें पांडवा । नाहीं तो गा ॥ ७६ ॥ कां आरसा समोर ठेविजे । आणि आपणपें तेथ देखिजे । तरि तेधवांचि जालें मानिजे । काय आधीं नाहीं ॥ ७७ ॥ कां परता केलिया आरसा । लोपू जाला तया आभासा । तरी आपणपें नाहीं ऐसा । निश्चयो करावा ॥ ७८ ॥ शब्द तरि आकाशाचा परि कपाळीं पिटे[3] मेघाचा । कां चंद्रीं वेगु अभ्राचा । आरोपिजे ॥ ७९ ॥ तैसें होइजे जाइजे देहें । तें आत्मसत्ते अविक्रिये । निष्टंकिती[4] गा मोहें । आंधळे ते ॥ ३८० ॥ ( ८३६. आत्मतत्त्व जाणतात तेच ज्ञानी, ३८१–३९० ) येथ आत्मा आत्मयाच्या ठायीं । देखिजे देहींचा धर्मु देहीं । ऐसे देखणे ते पाहीं । आन आहाती ॥ ८१ ॥ ज्ञानें कां जयांचे डोळे । देखोनि न राहाती देहींचे खोळे[6] । सूर्यरश्मि अणियाँळे । ग्रीष्मीं जैसे ॥ ८२ ॥ तैसी विवेकाचेनि पैसें[8] । जयांची स्फूर्ति स्वरूपीं बैसे । ते ज्ञानिये देखती ऐसें । आत्मयातें ॥ ८३ ॥ जैसें तारांगणीं भरलें । गगन समुद्रीं बिंबलें । परि तें तुटोनि नाहीं पडिलें । ऐसें निवडे ॥ ८४ ॥ गगन गगनींचि आहे । हें आभासे तें वाये । तैसा आत्मा देखती देहें । गंवसिलाही ॥ ८५ ॥ खळाळाच्या लगबगी । फेडूनि खळाळाच्या भागीं । देखिजे चंद्रिका कां उगी । चंद्रीं जेविं ॥ ८६ ॥ कां नाडेरचि भरे शोषे । सूर्यु तो जैसा तैसाचि असे । देह होतां जातां तैसें । देखती मातें ॥ ८७ ॥ घट मठ घडले । तेचि पाठीं मोडले । परि आकाश तें संचलें । असतचि असे ॥ ८८ ॥ तैसें अखंडे आत्मसत्ते । अज्ञानदृष्टि कल्पितें । हें देहचि होतें जातें । जाणती फुडें ॥ ८९ ॥ चैतन्य चढे ना वोहटे । चेष्टवी ना चेष्टे । ऐसें आत्मज्ञानें चोखटें । जाणती ते ॥ ३९० ॥ ( ८३७. विरक्तीवांचून ज्ञान, आत्मरूपाची प्राप्ति करून देत नाहीं, ३९१–३९६ ) आणि ज्ञानही आँपैतें होईल । प्रज्ञा परमाणुही उगौणा घेईल । सकळ शास्त्रांचें येईल । सर्वस्व हातां ॥ ९१ ॥ परी ते व्युत्पत्ति ऐसी । जरी विरक्ति न रिगे मानसीं । तरी सर्वात्मका भज़सीं । नव्हेचि भेटी ॥ ९२ ॥ पैं तोंड भरो कां विचारा । आणि अंतःकरणीं विषयासी थारा । तरी नातुडे धनुर्धरा । त्रिशुद्धि मी ॥ ९३ ॥ हा गा वोसणतयाच्याँ ग्रंथि । काई तुटती संसारगुंती । कीं पँरिवासिलिया पोथी । वाचिली होय ॥ ९४ ॥ ना ना बांधोनिया डोळे । घ्राणीं लाविजती मुक्ताफँळें । तरी तयांचें

१ हांका मारतात. २ वृक्ष. ३ ठेवतात; लादतात. ४ निश्चय करतात. ५ पाहाणारे. ६ शिरावीत. ७ प्रखर. ८ प्रकाशानें. ९ डबकें. १० प्राप्त. ११ बुद्धि. १२ झाडा. १३ स्वप्नांत मुखोद्गत असणाऱ्याला. १४ रक्षण करून ठेवल्यानें. १५ मोतीं.

म्हणजे वारा नाहीं असें समजावयाचें कीं काय ? ७६ किंवा आरसा समोर ठेवून आपलें रूप त्यांत पाहिलें म्हणजेच आपण आहों असें मानावें, तर आरशांत पाहण्याचे अगोदर आपलें रूप नव्हते कीं काय ? ७७ अथवा तो आरसा बाजूस केल्यावर आपल्या रूपाचा लोप झाला म्हणून आपण या जगांतून नाहींसे झालों असा निश्चय करावयाचा कीं काय ? ७८ आकाशांत होणारा गडगडाट हा जरी खरोखरी आकाशापासूनच होतो, तरी तो मेघांपासून होतो असा लोक त्याच्यावर आरोप घेतात; अथवा, ढग वेगानें इकडून तिकडे जाऊं लागले म्हणजे त्यांतून दिसणारा चंद्र जरी स्थिर आहे, तरी तोच वेगानें धावतो आहे, असा लोक आरोप घेतात; ७९ त्याप्रमाणें, मोहानें आंधळे झालेले ते लोक, देह उत्पन्न होतो किंवा नाहींसा होतो म्हणजे अविक्रिय असा आत्माच उत्पन्न होतो किंवा नाहींसा होतो असा निश्चय करतात. ३८० या शरीरांत आत्मा आपल्या ठिकाणींच असून देहाच्या धर्मास फक्त साक्षिभूत आहे, या दृष्टीनें पाहणारे लोक निराळेच आहेत. ८१ देह हा जीवाची राहण्याची पिशवी आहे असें ज्ञानाच्या प्रकाशानें पाहून ज्यांचे डोळे त्यात गुंतत नाहींत; ज्याप्रमाणें ग्रीष्म ऋतूंत पुष्कळ ढग आले तरी त्यांतून सूर्याचे किरण बाहेर आल्याशिवाय राहत नाहींत, ८२ त्याप्रमाणें, ज्ञानाच्या प्रभेनें ज्यांची स्फूर्ति स्वरूपाच्या ठिकाणापर्यंत पोहोंचली आहे, ते ज्ञानी, आत्मा हा अकर्ता आहे, असें मानतात. ८३ ज्याप्रमाणें, नक्षत्रांनीं भरलेलें आकाश प्रतिबिंब पडल्यावर समुद्रांत दिसलें म्हणून तें वरून गळून खालीं पडलें नाहीं हें खचित आहे; ८४ आकाश आकाशाचे जागीं आहे, व जें समुद्रांत दिसतें तें प्रतिबिंब खोटें आहे; त्याप्रमाणें, देहांत असलेला जीव हा आत्माच आहे. ८५ लाटांच्या सपाट्यांत चंद्राचे तुकडे तुकडे झालेले दृष्टीस पडतात, परंतु तोच चंद्र पाहूं गेलें असतां आपले जागींच कायम आहे; ८६ किंवा डबक्यांत पाणी सांचल्यावर त्यांत सूर्य दिसतो, व तेंच पाणी आटल्यावर तो दिसत नाहीं; परंतु सूर्य पाहूं गेलें असतां आपले ठिकाणींच असतो; त्याप्रमाणें, देह उत्पन्न झाल्यावर व नाहींसा झाल्यावर मी उत्पन्न होत नाहीं व मरतही नाहीं, अशा दृष्टीनें जे मला पाहतात, ८७ मातीचे घट अथवा मठ तयार करून पुनः जरी मोडून टाकले तरी त्या घटमठांत दिसणारें आकाश हें जसेंचें तसेंच कायम असतें; ८८ त्याप्रमाणें, अखंड जी आत्मसत्ता, त्या सत्तेच्या आधारावर, अज्ञानदृष्टीनें, देह होतात व जातात असें दिसतें. ८९ आत्मा हा वाढत नाहीं व ओहोटही पावत नाहीं, चेष्टा करवीत नाहीं व करीतही नाहीं ! हें, ज्यांना यथार्थ आत्मज्ञान झालें आहे तेंच जाणतात; ३९० आणि ज्ञान प्राप्त होईल, बुद्धि परमाणूंचाही झाडा घेईल, व तो सकल शास्त्रांत निपुण होईल; ९१ परंतु इतका शास्त्रसंपन्न होऊनही जर त्या मनुष्याच्या मनांत वैराग्याचा लेश नसला, तर सर्वव्यापक असा जो मी, त्या माझी भेट त्याला होणार नाहीं. ९२ त्याचप्रमाणें, सर्व शास्त्रें जरी मुखोद्गत असलीं, आणि अंतःकरणांत जर विषयाचें चिंतन असलें, तर अर्जुना, खचित खचित त्याला माझी प्राप्ति व्हावयाची नाहीं। ९३ अरे, असें पहा,

काय कळे । मोल मान ॥ ९५ ॥ तैसा चित्तीं अहंते ठावो । आणि जिभे सकळ शास्त्राचा सरावो । ऐसेनि कोडी एक जन्म जावो । परि न पविजे मातें ॥ ९६ ॥ ( ८३८. आत्मस्वरूपाची व्याप्ति, ३९७–४०० ) अवतरण:—जो एक मी कां समस्तीं । व्यापकु असें भूतजातीं । ऐक तिये व्याप्ती । रूपें करूं ॥ ९७ ॥

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।
यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥

अन्वयः—यत् आदित्यगतं तेजः अखिलं जगत् भासयते, यत् च चंद्रमसि च यत् अग्नौ ( स्थितं अस्ति ), तत् मामकं तेजः विद्धि ॥ १२ ॥

तरी सूर्यासकट आघवी । हे विश्वरचना जे दावी । ते [२]दीप्ति माझी जाणावी । आद्यंतीं आहे ॥ ९८ ॥ जल शोषूनि गेलिया सविता । ओलांशु पुरवीतसे जे माघौता । ते चंद्रीं पंडुसुता । जोत्स्ना माझी ॥ ९९ ॥ आणि दहन-पाचनसिद्धि । करीतसे जे निरवधि । ते हुताशीं तेजोवृद्धि । माझीचि गा ॥ ४०० ॥

गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।
पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥ १३ ॥

अन्वयः—च अहं गाम् आविश्य ओजसा भूतानि धारयामि; रसात्मकः सोमः भूत्वा च सर्वाः औषधीः पुष्णामि ॥ १३ ॥

( ८३९. पृथ्वीचा आधार व सर्व तेजांचा प्रकाशक, ४०१ ) मी रिगालों असें भूतळीं । म्हणौनि समुद्र-महाजळीं । हे पांसूची ढेंपुळी । विरोचिना ॥ १ ॥ ( ८४०. भूतांना मी धारण करणारा, ४०२ ) आणि भूतेंही चराचरें । हें धरितसे जियें अपारें । तियें मीचि धरीं धरे[७] । रिगोनियां ॥ २ ॥ ( ८४१. अमृतरूप मी आहें, ४०३ ) गगनीं मी पंडुसुता । चंद्राचेनि मिसें अमृता । भरला जालों चालता । सरोवर ॥ ३ ॥ ( ८४२. अन्न पचविणारा जठराग्नि मी आहें, ४०४-४११ ) तेथूनि फांकती रश्मिकर । ते पीट पेलूनि अपार । सर्वौषधींचें आगर । भरित असें मी ॥ ४ ॥ ऐसेनि सस्योदिकां सकळां । करी धान्यजाती सुकाळा । दे अन्नद्वारा जिव्हाळा । भूतजातां ॥ ५ ॥ अवतरण:—आणि निपजविलें अन्न । तरि तैसें कैंचें दीपन । जेणें जिरूनि समाधान । भोगिती जीव ॥ ६ ॥

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः । प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥ १४ ॥

अन्वयः—अहं प्राणिनां देहं आश्रितः प्राणापानसमायुक्तः वैश्वानरः भूत्वा चतुर्विधं अन्नं पचामि ॥ १४ ॥

म्हणौनि प्राणिजाताच्या घरीं । करूनि कंदोंवरी आगिठी । दीप्त जठरीं हीं किरीटी । मीचि जालों ॥ ७ ॥ प्राणापानाच्या जोडभातीं । फुंकफुंकोनियां अहोरातीं । आटीतसें नेणों किती । उदरामाजी ॥ ८ ॥ शुष्कें अथवा स्निग्धें । सुपक्कें

स्वप्नांत ग्रंथ जरी मुखोद्गत झाले, तरी त्या योगानें संसारातून मुक्त होतां येईल का? किंवा घरांत असलेले वडिलोपार्जित ग्रंथ रक्षण करून ठेवल्यानें ते वाचले असें म्हणतां येईल का? ९४ अथवा डोळे बांधून मोतीं जर नाकास लावलीं, तर त्यांचें पाणी व किंमत कळेल का? ९५ त्याचप्रमाणें, चित्तांत अभिमान बाळगून तोंडानें सर्व शास्त्रें जरी पाठ म्हटलीं, आणि असे कोट्यावधि जन्म गेले, तरी त्यास माझी प्राप्ति होणार नाहीं. ९६ जो मी एकच असून प्राणिमात्रास व्यापून राहिलों आहें, त्या माझी व्याप्ति कशी आहे तें तुला स्पष्ट करून सांगतों, ऐक. ९७

श्लोकार्थः—जें सूर्याच्या ठिकाणीं असलेलें तेज सर्व जगाला प्रकाशित करतें, आणि जें अग्नि व चंद्र याचे ठिकाणीं आहे, तें तेज माझें आहे असें समज ॥ १२ ॥

तर ज्या सूर्याच्या तेजानें सर्व विश्वरचना दृष्टीस पडते, तें तेज सूर्यासकट माझें आहे असें जाण. ९८ हे पाण्डुसुता, सूर्याच्या तेजानें पाणी शोषण करून घेतल्यावर पुनः पृथ्वीस जो ओलावा येतो, तो आणणारी जी चंद्राचे ठिकाणची प्रभा ती माझी होय; ९९ आणि दहन करणें किंवा पाचन करणें ही जी अग्नीचे ठिकाणीं असलेली अमर्याद तेजोवृद्धि, ती माझीच आहे. ४००

श्लोकार्थः—आणि मी या पृथ्वीमध्यें प्रवेश करून आपल्या सामर्थ्यानें सर्व भूतें धारण करितों; व रसात्मक चंद्र होऊन सर्व औषधींचें पोषण करतों ॥ १३ ॥

मी पृथ्वीमध्यें शिरून तिला आधारभूत झालों आहे, म्हणूनच, ही जरी रजःकणांची बनलेली मोठी ढेप आहे, तरी समुद्राच्या अपार पाण्यांत असूनही विरघळून जात नाहीं, १ आणि ही आपल्या पृष्ठभागावर अपरिमित चराचर भूतें धारण करते, तीं भूतेंही मीच तिच्यामध्यें शिरून धारण करतों. २ हे पाण्डुसुता, मी आकाशांत चंद्राच्या रूपानें जणूं काय अमृताचें चालतें सरोवरच झालों आहे. ३ आणि तेथून चंद्राच्या किरणरूपी ओघानें सर्व वनस्पतींचें पोषणही मीच करतों. ४ अशा प्रकारें सर्व धान्यादिकांचें पोषण करून व नानाप्रकारच्या धान्याची समृद्धि करून, अन्नद्वारा प्राणिमात्राचें रक्षण मीच करतों. ५ आणि अन्न जरी उत्पन्न केलें, तरी प्राणिमात्रास तें असें कसें पचेल, कीं ज्याच्या योगानें जीवास समाधान होईल? ६

श्लोकार्थः—मी प्राण्याच्या देहामध्यें शिरून आणि प्राण, अपान इत्यादि वायूंत मिळून, जठराग्नि होऊन (भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य अशा) चतुर्विध अन्नाचें पचन करितों ॥ १४ ॥

म्हणून, अर्जुना, प्राणिमात्राच्या शरिरांत नाभिकंदावर शेगडी पेटवून जठरामध्यें मीच प्रदीप्त झालों आहें! ७ प्राण व अपान या वायूंच्या जोडभात्यानें रात्रंदिवस (तो जठराग्नि पेटवून) या उदरांत किती अन्नाचा मी फन्ना करतों याचा पत्ता नाहीं! ८ कोरडें, स्निग्ध, शिजलेलें व कच्चें असें कसलेंही अन्न असलें तरी मी त्याचें पचन करतो. ९ अशा प्रकारें सर्व जग मी, जगाचा निर्वाह ज्यावर होतो तें धान्य मी,

१ अभ्यास. २ स्पष्ट. ३ तेज. ४ प्रभा. ५ अग्नीचे ठिकाणीं असलेली. ६ रजःकणांची. ७ जमिनीत. ८ ओघ. ९ धान्यादिकाना. १० नाभिकंदावर. ११ शेगडी. १२ पचवितों.

कां विदग्धें[1] । एवं मीचि गा चतुर्विधें । अन्नें पचीं ॥ ९ ॥ एवं मीचि आघवे जन । जना ब्रीहितें[2] मीचि जीवन । जीवनीं मुख्य साधन । वन्हिही मीचि ॥ ४१० ॥ आतां ऐसियाहीवरी काई । सांगों व्याप्तीचि नवाई । अवतरणः—येथ दुजें नाहींचि धेई । सर्वत्र मी गा ॥ ११ ॥ ( ८४३. शंका अर्जुनाची–ईश्वर सर्वांच्या हृदयांत असतांना एक सुखी, एक दुःखी कां ? असा प्रश्न, ४१२–४१३ ) तरि कैसेनि पां वेखें[3] । सदा सुखियें एकें । एकें तियें बहु दुःखें । क्रांतें भूतें ॥ १२ ॥ जैसी सगळिये पाटेंणीं । एकेंचि दीपें दिवेलावणी । जालिया कां न देखणीं । उरलीं एकें ॥ १३ ॥ ( ८४४. शंकेचें उत्तर–जीव आपल्या कल्पनेनें सुखी दुःखी होतो, ४१४–४२० ) ऐसी हन उंखीविखी । करित आहासी मानसीं कीं । तरि परिस तेही निकी । शंका फेडूं ॥ १४ ॥ पैं आवघा मीचि असें । येथ नाहीं कीर अनारिसें । परि प्राणियांचिया उल्लासें । बुद्धीऐसा ॥ १५ ॥ जैसें एकचि आकाशध्वनी । वाद्यविशेषीं आनानी । वाजावें पडे भिन्नीं । नादांतरीं ॥ १६ ॥ कां लोकचेष्टीं वेगळाला । जो हा एकुचि भानु उदेला । तो आनानीं परि गेला । उपयोगासी ॥ १७ ॥ ना ना बीजधर्मानुरूप । झाडीं उपजविलें आप । तैसें परिणमलें स्वरूप । माझें जीवां ॥ १८ ॥ अगा नेणा आणि चतुरा । पुढां निळयांचा दुसरा । नेणा सर्प जाला येरा । सुखालागीं ॥ १९ ॥ हें असो स्वातीचें उदक । शुंक्ति मोतीं व्यालीं विख । तैसा सज्ञानासी मी सुख । दुःख तों अज्ञानासी ॥ ४२० ॥

सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदांतकृद्वेदविदेव चाहम् ॥ १५ ॥

अन्वयः—च अहं सर्वस्य हृदि संनिविष्टः ( अस्मि ), मत्तः सर्वस्य स्मृतिः ज्ञानं अपोहनं च ( अस्ति ); अहं एव सर्वैः वेदैः वेद्यः ( अस्मि ); अहं एव वेदांतकृत् वेदवित् च ( अस्मि ) ॥१५॥

( ८४५. ईश्वर सर्वांच्या हृदयात आहे, ४२१ ) येऱ्हवीं सर्वांच्या हृदयदेशीं । मी अमुका आहें ऐसी । जे बुद्धि स्फुरे अहर्निशीं । ते वस्तु गा मी ॥ २१ ॥ ( ८४६. हृदयस्थाला जाणण्याचा उपाय, ४२२–४२४ ) परी संतांसवें वसतां । योगज्ञानीं पैसतां । गुरुचरण उपासितां । वैराग्येंसीं ॥ २२ ॥ येणेंचि सत्कर्में । अशेषही अज्ञान विरमे[13] । जयांचें अहं विश्रमे । आत्मरूपीं ॥ २३ ॥ ते आपेआप देखोनि देखीं । मियां आत्मेनि सदा सुखी । येथें मीवांचून अवलोकीं । आन हेतु असे ॥ २४ ॥ ( ८४७. आत्मा जाणण्यास आत्माच हेतु, ४२५ ) अगा सूर्योदयो जालिया । सूर्यें सूर्यचि पाहावा धनंजया । तेविं मातें मियां जाणावया । मींचि हेतु ॥ २५ ॥

१ कचें. २ निर्वाह करणारें धान्य. ३ वेषानें. ४ व्यास. ५ नगरात. ६ तर्कवितर्क. ७ कल्पनेनें. ८ बुद्धीसारखा. ९ पाणी. १० शिंपल्यात. ११ सर्पाच्या तोंडांत. १२ अभ्यास करून. १३ नाहींसें होतें. १४ लय पावतो.

व जीवनाचें मुख्य साधन जो जठराग्नि तोही मीच आहें. ४१० आता यापेक्षां माझ्या व्यापकपणाचें नवल तुला काय सांगूं ? तर तूं हें पक्कें लक्षांत ठेव कीं, या जगांत दुसरें कांहींच नाहीं, सर्वत्र मीच भरलेला आहें. ११ तर मग, " या जगात कांहीं प्राणी सर्वदा सुखी असे दिसतात व कांहीं दुःखानें अगदीं व्याप्त झालेले दिसतात, ते कशानें ? १२ जसें एखाद्या शहरांत एकाच दिव्यानें सर्व दिवे लावले तर त्यांपैकीं कांहीं दिवे प्रकाश करतात व कांहीं करीत नाहींत असें कसें होईल ?" १३ अशा प्रकारचे तर्कवितर्क जर तूं आपल्या मनांत करीत बसला असशील, तर त्यांचेंही चांगलें निवारण करतों, ऐक. १४ हें पहा, सर्वत्र मी भरलेला आहें, ही गोष्ट तर अगदीं निर्विवाद आहे; परंतु प्राण्यांच्या बुद्धीच्या कल्पनेप्रमाणें मी त्यांस भासतों. १५ ज्याप्रमाणें एकाच आकाशध्वनीचे निरनिराळ्या वाद्यांच्या अनुरोधानें निरनिराळे नाद ऐकूं येतात; १६ किंवा सूर्य एकच आहे, पण तो उगवल्यावर लोकांच्या व्यापारांस निरनिराळ्या प्रकारें उपयोगीं पडतो; १७ अथवा पाणी एकच असून, बीजांच्या निरनिराळ्या धर्मांप्रमाणें झाडांमध्यें उत्पन्न होतें, ( निरनिराळीं झाडें उत्पन्न होतात ), त्याप्रमाणें ( मी एकच असून ) निरनिराळ्या प्राण्यांचे ठिकाणीं माझें स्वरूप परिणाम पावलें आहे. १८ अरे, एक अज्ञान व एक चतुर अशा दोघां वाटसरूंच्या दृष्टीस दोन सरांचा नीलमण्यांचा एक हार पडला; तेव्हां जो अज्ञानी होता त्याला तो सर्प असें वाटून भीति उत्पन्न झाली, व दुसरा जो चतुर होता, त्याला तो हार आहे असें वाटून सुख झालें. १९ हें असो; स्वाती नक्षत्राचें पाणी सारखेंच असून तें शिंपल्यांत पडलें असतां त्याचीं मोत्यें होतात, व सर्पाच्या तोंडांत पडलें असतां विष उत्पन्न होतें; त्याप्रमाणें, जे ज्ञानी आहेत त्यांना मजपासून सुख उत्पन्न होतें, व अज्ञानी आहेत त्यांना दुःख होतें. ४२०

श्लोकार्थः— मी सर्वांच्या हृदयामध्यें प्रवेश करून राहतों; मजपासूनच सर्वांना स्मृति, ज्ञान आणि या दोहोंचा अभाव ( विस्मरण व अज्ञान ) हीं उत्पन्न होतात. सर्व वेदांनीं जाणण्यास मीच योग्य आहें; वेदांताचा सिद्धांत करणारा व त्याचा ज्ञाताही मीच आहें ॥ १५ ॥

एरव्हीं, सर्व प्राण्यांच्या हृदयांत, ' मी अमुक आहें ' अशी जी बुद्धि ( अहंकार ) रात्रंदिवस असते, तीही मीच आहें. २१ परंतु साधूंच्या समागमानें, योग व ज्ञान यांच्या अभ्यासानें, आणि वैराग्यासहवर्तमान गुरुचरणांच्या सेवेनें, २२ एवंच, अशा सदाचरणानेंच सर्व अज्ञान नाहींसें होऊन, त्याचा मीपणा आत्मस्वरूपांत लय पावतो. २३ मग आत्मस्वरूपाकडे दृष्टि गेल्यावर, मज आत्म्याच्या योगानें तो नेहमीं सुखांतच असतो. अशी स्थिति होण्यास माझ्याशिवाय दुसरा कोणी कारणीभूत आहे काय ? २४ हे धनंजया, सूर्य उगवल्यावर सूर्याच्या तेजानेंच सूर्य पाहावा लागतो, त्याप्रमाणें, मला जाणण्यास मीच कारण आहें. २५ किंवा आत्म्याहून वेगळें जें शरीर, त्याची सेवा करण्यांत व संसाराची बढाई ऐकण्यांत ज्यांचा देहाविषयीं मीपणा कायम झाला आहे,

(८४८. ज्ञानाच्या विस्मृतीला कारण आत्माच, ४२६-४३१) ना शरीरपरातें सेवितां। संसार-गौरवचि ऐकतां। देहीं जयांची अहंता। बुडोनि ठेली ॥ २६ ॥ ते स्वर्ग-संसारालागीं। धांवतां कर्ममार्गीं। दुःखाच्या सेलभागीं। विभागी होती ॥ २७ ॥ परि हेंही होणें अर्जुना। मजचिस्तव तया अज्ञाना। जैसा जागताचि हेतु स्वप्ना। निद्रेतें होय ॥ २८ ॥ पैं अभ्रें दिवसु हारपला। तोही दिवसेंचि जाणों आला। तेवीं मी नेणोनि विषयो देखिला। मजचिस्तव भूतीं ॥ २९ ॥ एवं निद्रा कां जागणिया। प्रबोधुचि हेतु धनंजया। तेवीं ज्ञाना अज्ञाना जीवां यां। मीचि मूळ ॥ ४३० ॥ जैसें सर्पत्वा कां दोरा। दोरुचि मूळ धनुर्धरा। तैसा ज्ञाना अज्ञानाचिया संसारा। मियांचि सिद्धुं ॥ ३१ ॥ (८४९. वेदाच्या शाखांनीं आत्म्याचाच विचार करतात, ४३२–४३३) म्हणोनि जैसा असें तैसया। मातें नेणोनि धनंजया। वेदु जाणों गेला तंव तया। जालिया शाखा ॥ ३२ ॥ तरि तिहीं शाखाभेदीं। मीचि जाणिजे त्रिशुद्धी। जैसा पूर्वापरा नदी। समुद्रुचि ठी ॥३३॥ (८५०. वेदांतांचा सिद्धांत करणारा व सिद्धांत जाणणारा मीच, ४३४-४४२) आणि महासिद्धांतोपासीं। श्रुति हारपती शब्देंसीं। जैसिया सगंधा आकाशीं। वातलहरी ॥ ३४ ॥ तैसें समस्तही श्रुतिजात। ठाके लाजिलें ऐसें निवांत। तें मीचि करीं यथावत। प्रकटोनिया ॥ ३५ ॥ पाठीं श्रुतीसहित अशेष। जग हारपे जेथ निःशेष। तें निजज्ञानही चोख। जाणता मीचि ॥ ३६ ॥ जैसें निदेलिया जागिजे। तेव्हां स्वप्नींचें कीर नाहीं दुजें। परि एकत्वही देखों पाविजे। आपलेंचि ॥ ३७ ॥ तैसें आपलें अद्वयपण। मी जाणतसें दुजेनवीण। तयाही बोधाकारण। जाणता मीचि ॥ ३८ ॥ मग आगी लागलिया कापुरा। ना काजळी ना वैश्वानरा। उरणें नाहीं वीरा। जयापरी ॥ ३९ ॥ तेवीं समूळ अविद्या खाये। तें ज्ञानही जें बुडोनि जाये। तऱ्ही नाहीं कीर नोहे। आणि न साहे असणेंही ॥ ४४० ॥ पैं विश्व घेऊनि गेला मागेंसी। तया चोरातें कवण कें गिंवसी। जे कोणीएकी दशा ऐसी। शुद्ध ते मी ॥ ४१ ॥ ऐसी जडाजडव्याप्ति। रूप करितां कैवल्यपति। ठीं केली निरुपहितीं। आपुल्या रूपीं ॥ ४२ ॥ (८५१. अर्जुनास बोध कसा झाला आहे; काव्यप्रतिभा, ४४३–४४५) अवतरणः—तो आघवाचि बोधु सहसा। अर्जुनीं उमटला कैसा। व्योमींचा चंद्रोदयो जैसा। क्षीरार्णवीं ॥ ४३ ॥ कां प्रतिभिंतीं चोखटें। समोरील चित्र उमटे। तैसा अर्जुनें आणि वैकुंठें। नादतसे बोधु ॥ ४४ ॥ तरि बोंप वस्तुस्वैभावो। फांवे तंव तंव गोडिये थांवो।

---

१ माझ्याच सत्तेनें. २ मूळ ज्ञान. ३ खरोखर. ४ पूर्वेकडे व पश्चिमेकडे वाहणाऱ्या. ५ महाजवळ. ६ गंधयुक्त. ७ अग्नि. ८ दृश्य व अदृश्य. ९ सिद्धांत. १० निरुपाधिक स्वरूपाचे ठिकाणीं. ११ धन्य. १२ स्वरूप. १३ समजेल.

२६ ते स्वर्ग व संसार या सुखाच्या प्राप्तीकरितां कर्ममार्गाचें आचरण करतात, त्यामुळें त्यांना दुःखाचा शेलका वांटा प्राप्त होतो. २७ परंतु अर्जुना, हीही स्थिति त्या अज्ञानी लोकांस माझ्यापासूनच प्राप्त होते. ज्याप्रमाणें जागा असणारा मनुष्यच स्वप्न व निद्रा या अवस्थांचा उपभोग घेतो; २८ परंतु दिवसा ढगांनीं आकाश व्यापलें म्हणजे उजेड कमी होतो, हेंही उजेडानेंच जसें समजतें; त्याप्रमाणें, माझेविपर्यी अज्ञान उत्पन्न होऊन, प्राणी विषयांचें सेवन करतात, हेंही माझ्याच सत्तेनें होतें. २९ याप्रमाणें हे धनंजया, निद्रेला किंवा जागृतीला जसें मूळ ज्ञानच कारण आहे, त्याप्रमाणें या ज्ञानी व अज्ञानी अशा जीवांना मीच मूळ आहें. ४३० हे धनुर्धरा, ज्याप्रमाणें, सर्पाच्या किंवा दोरीच्या भासास दोरीच कारण आहे, त्याप्रमाणें ज्ञान व अज्ञान यांच्या वृद्धीस मी सिद्धच कारण आहें. ३१ म्हणून, हे धनंजया, माझें खरें स्वरूप न समजल्यामुळें वेद मला जाणण्याकरितां खटपट करूं लागला, तों त्याच्या शाखा झाल्या. ३२ तथापि त्या वेदाच्या तीनही शाखांनीं ( ऋक्, यजु व साम यांनीं ) माझेंच वर्णन केलें आहे. ,ज्याप्रमाणें पूर्वपश्चिमवाहिनी नद्यांस समुद्रच आश्रयस्थान होय; ३३ आणि ज्याप्रमाणें महासिद्धांताजवळ ( ब्रह्माजवळ ) श्रुतींची मति कुंठित होते; अथवा गंध-गुणयुक्त आकाशांत वायूचें वहाणें बंद पडतें, ३४ त्याप्रमाणें, सर्व श्रुति ज्या ठिकाणीं लाजून स्तब्ध राहतात, तें ब्रह्मस्वरूप मीच प्रकट करतों. ३५ नंतर श्रुतींसह सर्व जग ज्या ठिकाणीं लय पावतें, तें शुद्ध आत्मज्ञान जाणणारा मीच आहें. ३६ ज्याप्रमाणें निजलेल्या मनुष्यास जागें केल्यावर स्वप्नांत भासलेल्या वस्तु आपणच झालों होतों असें तो समजतो, त्याप्रमाणेंच जागृदवस्थेंतही आपण एकटेच आहों हेंही तोच समजतो. ३७ त्याप्रमाणें, जगाच्या उपाधीशिवाय जें माझें आत्मस्वरूप, त्याचा बोध होण्यास मीच कारण आहें; व तें आत्मस्वरूपही मीच आहें. ३८ वीरा अर्जुना, ज्याप्रमाणें कापूर जळल्यावर मागें त्याची काजळी रहात नाहीं व अग्निही रहात नाहीं, ३९ त्याप्रमाणें, अज्ञानाचा समूळ नाश करणारें जें ज्ञान, तेंही ज्या वेळेस लय पावतें, त्या वेळेस तें नाहीं असेंही म्हणतां येत नाहीं, व आहे हेंही म्हणणें शोभत नाहीं. ४४० हें पहा, मागमूस न ठेवतां विश्वाला घेऊन जाणारा जो चोर, त्याला कोणी कोठें शोधावें ? असें जें न कळणारें शुद्ध स्वरूप, तें मी. ४१ याप्रमाणें, मोक्षदाता जो श्रीकृष्ण परमात्मा, त्यानें आपल्या उपाधिरहित शुद्ध स्वरूपापर्यंत आपणच सर्व दृश्य व अदृश्य पदार्थांत कसे व्यापून राहिलों आहों तें सांगितलें. ४२ ज्याप्रमाणें आकाशांत चंद्रोदय झाल्यावर क्षीरसमुद्रांत त्याचें पूर्ण प्रतिबिंब दिसतें, त्याप्रमाणें श्रीकृष्णांनीं केलेला हा सर्व बोध अर्जुनाच्या मनांत पूर्ण ठसला. ४३ चित्रें काढलेल्या भिंतीच्या समोरील भिंत घोटून गुळगुळीत केल्यावर तींत ज्याप्रमाणें त्या चित्रांचें प्रतिबिंब दिसतें, त्याप्रमाणें वैकुंठनायक जो श्रीकृष्ण परमात्मा, त्याच्या मनांतील बोध अर्जुनाच्या शुद्ध अंतःकरणामध्यें प्रतिबिंबित झाला. ४४ मग, अनुभव घेणारांत श्रेष्ठ असा जो अर्जुन तो असें म्हणालाः—धन्य

म्हणौनि अनुभवियांचा रावो । अर्जुन म्हणे ॥ ४५ ॥ (८५२. निरुपाधिक स्वरूप ऐकण्याची इच्छा, ४४६–४४७) जी व्यापकपण बोलतां । निरुपाधिक जें आतां । स्वरूप प्रसंगतां । बोलिलें देवो ॥ ४६ ॥ तें एक वेळ अव्यंगवाणें । कीजो कां मजकारणें । तेथ द्वारकेचा नाथु म्हणे । भलें केलें ॥ ४७ ॥ (८५३. देव अर्जुनास आनंदांत आलिंगन देऊन बोलतात; काव्यप्रतिभा, ४४८–४५३) पैं अर्जुना आम्हांहि वाडेंकोडें । अखंड बोलों आवडे । परि काय कीजे न जोडे । पुसतें ऐसें ॥ ४८ ॥ आजि मनोरथांसि फळ । जोडलासि तूं केवळ । जे तोंड भरूनि निखळ । आलासि पुसों ॥ ४९ ॥ जें अद्वैतावरीही भोगिजे । तें अनुभवींचें तूं विरजें । पुसोनि मज माझें । देतासि सुख ॥ ४५० ॥ जैसा आरिसा आलिया जवळां । दिसे आपणपें आपला डोळा । तैसा संवादिया तूं निर्मळा । शिरोमणि ॥ ५१ ॥ तुवां नेणोनि पुसावें । मग आम्हीं परिसऊं बैसावें । तो गा हा पोटू नव्हे । सोयरेया ॥ ५२ ॥ ऐसें म्हणौनि आलिंगिलें । कृपादृष्टी अवलोकिलें । मग देवो काय बोलिले । अर्जुनेंसीं ॥ ५३ ॥ (८५४. देवाच्या बोलण्याची तऱ्हा; काव्यप्रतिभा, ४५४-४५५) पैं दोहीं वोठीं एक बोलणें । दोहीं चरणीं एक चालणें । तैसें पुसणें सांगणें । तुझें माझें ॥ ५४ ॥ एवं आम्ही तुम्ही येथें । देखावें एका अर्थातें । सांगतें पुसतें येथें । दोन्ही एक ॥ ५५ ॥ (८५५. आनंदांत भुलून गेलेले देव सावध होऊन अर्जुनास प्रश्न करतात; काव्यप्रतिभा, ४५६-४५९) ऐसा बोलत देवो भुलला मोहें । अर्जुनातें आलिंगूनि ठाये । मग विहाला म्हणे नोहे । आवडी हे ॥ ५६ ॥ जाले इक्षुरसाचे ढाळ । तरि लवण देणें किडाळि । जें संवादसुखाचें रसाळें । नासेल [१०]थितें ॥ ५७ ॥ आधींच आम्हा यया कांहीं । नरनारायणांसी भिन्न नाहीं । परी आतां जिरो माझ्या ठाईं । वेगु हा माझा ॥ ५८ ॥ इया बुद्धी सहसा । श्रीकृष्ण म्हणे वीरेशा । पैं गा तो तुवां कैसा । प्रश्नु केला ॥ ५९ ॥ (८५६. अर्जुन सावध होऊन म्हणतो, आपलें निरुपाधिक स्वरूप सांगा; काव्यप्रतिभा, ४६०–४६१) जो अर्जुन श्रीकृष्णीं विरत होता । तो परतोनियां मागुता । प्रश्नावळीची कथा । ऐकों आला ॥ ४६० ॥ तेथ सद्गदें बोलें । अर्जुनें जी जी म्हणितलें । निरुपाधिक आपुलें । रूप सांगा ॥ ६१ ॥ (८५७. निरुपाधिक स्वरूप सांगण्यासाठीं प्रथम दोन उपाधींचें वर्णन, काव्यप्रतिभा, ४६२-४७०) यया बोला तो शार्ङ्गी । तेंचि सांगावयालागीं । उपाधि दोहीं मार्गी । निरूपीत असे ॥ ६२ ॥ पुसिलिया निरुपहित । उपाधि कां सांगे येथ । हें कोण्हाही प्रस्तुत । गमे जरी ॥ ६३ ॥ तरि ताकाचें अंश फेडणें । तयाचें नाव

१ पूर्णपणें. २ आवडीनें. ३ निर्मळ स्थान. ४ योग्यता. ५ स्वरूप. ६ गुळाची ढेप. ७ क्षार. ८ हीन. ९ प्रेम. १० असलेलें.

तें ब्रह्म, कीं त्याचें स्वरूप जों जों समजेल, तों तों त्याची गोडी वाढते. ४५ देवा, आपल्या व्यापकपणाचें वर्णन करतांना आपण प्रसंगानुसार जें निरुपाधिक स्वरूपाचें वर्णन केलें, ४६ तें निरुपाधिक स्वरूप एक वेळ मजकरितां स्पष्ट करा. तेव्हां द्वारकानाथ म्हणाले, " भले शाबास ! ४७ हें पहा अर्जुना, आम्हाला नेहमीं सांगण्याची आवड आहे; परंतु काय करावें ? आम्हांला असा प्रश्न करणाराच मिळत नाहीं ! ४८ तूं आज अशा रीतीनें स्पष्ट प्रश्न केलास, त्यामुळें आमचे मनोदय सफल झाले ! ४९ अद्वैतप्राप्ती-नंतर होणाऱ्या सुखानुभवास आज तूं निर्मल स्थानच झाला आहेस; आणि हा प्रश्न करून माझ्या सुखाचीच मला प्राप्ति करून देत आहेस. ४५० ज्याप्रमाणें आरशांत पाहिल्यावर आपलें स्वरूप आपल्या नेत्रांनीं दिसतें, त्याप्रमाणें ( तुझ्याबरोबर संवाद केल्यामुळें मला आत्मसुख झालें आहे, म्हणून ) तूं संवाद करणारांत शिरोमणि आहेस. ५१ मित्रा अर्जुना, तुला समजत नाहीं म्हणून त्वा आम्हांस विचारावें, आणि आम्हीं तुझी समजूत करून द्यावी, अशी तुझी योग्यता नाहीं बरें ! " ५२ असें म्हणून देवांनीं अर्जुनास आलिंगन देऊन त्याजकडे कृपादृष्टीनें अवलोकन केलें. मग अर्जुनाशीं काय बोलूं लागले ? तर ५३ " ज्याप्रमाणें दोन्ही ओठांपासून एकच बोलणें निघतें, किंवा दोन्ही पायांनीं एकच चालणें होतें, त्याप्रमाणें तुझें पुसणें व माझें सांगणें हीं दोन्ही एकच आहेत. ५४ याप्रमाणें तुझें व माझें स्वरूप एकच आहे असें समज, आणि मी सांगणारा व तूं पुसणारा हे आपण दोघेही एकच आहों. " ५५ (असें म्हणाले; आणि) असें बोलतां बोलतां मोहानें भुलून जाऊन अर्जुनास आलिंगन देऊन तसेंच उभे राहिले. इतक्यांत चकित होऊन म्हणाले, इतकें प्रेम चांगलें नाहीं ! ५६ उंसाच्या रसाची गुळाची ढेप करते वेळीं त्यात ज्याप्रमाणें हीन असा क्षार घालावा लागतो, त्याप्रमाणें, आमच्या संवादरूपी सुखांत द्वैत उत्पन्न केलें नाहीं तर आज आलेलें प्रेम नाहींसें होईल. ५७ अर्जुन नर व मी नारायण असल्यामुळें, आम्हां दोघांत आधींच भेद नाहीं. पण मला आलेलें हें प्रेमाचें भरतें आतां माझ्या ठिकाणींच जिरूं द्या. ५८ याप्रमाणें बुद्धि स्थिर करून श्रीकृष्ण भगवान म्हणाले, " हे वीरश्रेष्ठा, तूं मला काय प्रश्न केलास ? " ५९ इकडे, अर्जुन जो श्रीकृष्णांच्या ध्यानांत निमग्न झालेला होता, तो देहभानावर येऊन आपल्या प्रश्नाचें उत्तर ऐकण्यास तयार झाला. ४६० तेव्हां सद्गदित वाणीनें अर्जुनानें म्हटलें, " देवा, आपलें निरुपाधिक रूप कोणतें तें सांगा. " ६१ अर्जुनाचें हें भाषण ऐकून, तेंच सांगण्याकरितां, श्रीकृष्ण भगवान प्रथम दोन प्रकारच्या उपाधींचें वर्णन करितात. ६२ आपलें निर्गुणरूप सांगा म्हणून विचारलें असतां उपाधींविषयीं भगवान अगोदर वर्णन का करतात, अशी जर कोणास शंका येईल, तर ६३ असें पहा कीं, कोणी लोणी मागावयास आला तर ताक करून त्यांतून तें त्याला काढून द्यावें लागतें, किंवा शुद्ध सोनें पाहिजे असल्यास तें जसें तावून त्यांतील वाईट धातू काढावी लागते,

लोणी काढणें। चोखाचिये शुद्धि तोडणें। कीडाचि जेवीं ॥ ६४ ॥ बाबुळीचि सारावी हातें। परि पाणी तंव असे आइतें। अभ्रचि जावें गगन तें। सिद्धचि कीं ॥ ६५ ॥ वरील कोंडियाचा गुंडाळा। झाडूनि केलिया वेगळा। कणु घेतां विरंगोळा। असे काई ॥ ६६ ॥ तैसा उपाधि उपहितां। शेवटु जेथ विचारितां। तें कोणातेंही न पुसतां। निरुपाधिक ॥ ६७ ॥ जैसें न सांगणेवरी। बोळा पतीसी रूप करी। बोल निमालेपणें विवरी। अचर्चातें ॥ ६८ ॥ पैं सांगणेयाजोगें नव्हे। तेथिंचें सांगणें ऐसें आहे। म्हणौनि उपाधि लक्ष्मीनाहें। बोलिजे आदि ॥ ६९ ॥ पाडिव्याची चंद्ररेखा। निरुती दावावया शाखा। दाविजे तेविं औपाधिका। बोली इया ॥ ४७० ॥

द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥

अन्वयः--लोके क्षरः च अक्षरः एव इमौ द्वौ पुरुषौ ( स्तः ). सर्वाणि भूतानि क्षरः ( उच्यते ), कूटस्थः अक्षरः उच्यते ॥ १६ ॥

( ८५८. संसारनगरांत दोन पुरुषांची वस्ती आहे, ४७१–४७२ ) मग तो म्हणे गा सव्यसाची। पैं इये संसारपाटणींची। वस्ती साविया टांची। दुपुरुषीं ॥ ७१ ॥ जैसी आघवांचि गगनीं। नांदत दिवोराती दोन्ही। तैसे संसारराजधानीं। दोन्हीचि हे ॥ ७२ ॥ ( ८५९. तिसरा पुरुष, ४७३ ) आणिकही तिजा पुरुषु आहे। परि तो या दोहींचें नांव न साहे। जो उदेला गांवेंसीं खाये। दोहींतें यया ॥ ७३ ॥ ( ८६०. संसारांत क्षर-अक्षर असें दोन पुरुषांचें स्वरूप, ४७४-४७७ ) परि ते तंव गोठी असो। आधीं दोहींची हे परियेसों। जे संसारग्रामा वसों। आले असती ॥ ७४ ॥ एक आंधळा वेडा पंगु। येर सर्वांगें पुरता चांगु। परि ग्रामगुणें संगु। घडला दोघां ॥ ७५ ॥ तया एका नाम क्षरु। येरातें म्हणती अक्षरु। इहीं दोहींचि परि संसारु। कोंदला असे ॥ ७६ ॥ आतां क्षरु तो कवणु। अक्षरु तो किंलक्षणु। हा अभिप्रावो संपूर्णु। विवंचूं गा ॥ ७७ ॥ ( ८६१. क्षर पुरुष, ४७८-५०१ ) तरी महदहंकारीं-। लागूनियां धनुर्धरा। तृणांतींचा पांगोरीं-। वरी पैं गा ॥ ७८ ॥ जें कांहीं सानें थोर। चालतें अथवा स्थिर। किंबहुना गोचर। मनबुद्धीसि जें ॥ ७९ ॥ जेतुलें पांचभौतिक घडतें। जें नामरूपा सांपडतें। गुणत्रयाच्या पडतें। कौमठां जें ॥ ४८० ॥ भूताकृतीचें नाणें। घडत भांगारें जेणें। काळासि जूं खेळणें। जिहीं कैवडां ॥ ८१ ॥ जाणणेंचि विपरीतें। जें जें कांहीं जाणिजेतें। जें प्रतिक्षणीं निमतें। होऊनियां ॥ ८२ ॥ अगा काढूनि

१ तांदूळ. २ हरकत. ३ उपाधीचा ज्याच्यावर परिणाम होतो तें स्वरूप. ४ कुलक्ष्मी. ५ लक्ष्मीपतीनें. ६ निश्चयानें. ७ नगरांतील. ८ खरोखर. ९ थोडी. १० महत्तत्वापासून. ११ तृणापर्यंत.

६४ पाण्यावरील शेंवाळच काढून टाकावयाचें असतें, म्हणजे मग पाणी शुद्धच आहे; अथवा अभ्र नाहींसें झाल्यावर आकाश स्वच्छच असतें; ६५ तांदुळावरील भाताचा कोंडा काढून टाकल्यावर तांदुळ हातीं येण्यास कांहीं हरकत असते काय ? ६६ त्याप्रमाणें, स्वरूपावरील उपाधि काढून टाकल्यावर, विचार केला तर जें बाकी राहतें तेंच शुद्ध स्वरूप, हें कोणास विचारावयास नको. ६७ ज्याप्रमाणें कुलस्त्रीला तिच्या पतीचें नांव विचारल्यावर, जें नांव घेतलें असतां ती गप राहते तेंच तिच्या पतीचें नांव समजावयाचें, त्याप्रमाणें, जेथें शब्दांची गति कुंठित होते, तेंच अवर्णनीय असें शुद्ध स्वरूप होय. ६८ दुसरें असें पहा कीं, ह्या निरुपाधिक स्वरूपाचें वर्णन करणें म्हणजे वर्णन ज्याचें करतां येत नाहीं अशा स्वरूपाचें वर्णन करणें आहे. म्हणूनच लक्ष्मीपति उपाधींचें स्वरूप प्रथम सांगतात. ६९ शुद्ध प्रतिपदेच्या चंद्राची कोर दाखविते वेळीं ज्याप्रमाणें एखाद्या झाडाच्या खांदीच्या आधारानें ती दाखवावी लागते, त्याप्रमाणें, निरुपाधिक स्वरूपाचें लक्षण सांगते वेळीं उपाधींचें स्वरूप सांगावें लागतें. ४७०

श्लोकार्थः—या लोकीं क्षर आणि अक्षर हे दोनच पुरुष ( पदार्थ ) आहेत. सर्व भूतांना क्षर म्हणतात, आणि कूटस्थाला ( मायोपाधियुक्त जीवाला ) अक्षर म्हणतात ॥ १६ ॥

मग श्रीकृष्ण म्हणतात, हे सव्यसाची, या संसाररूपी नगराची वस्ती अगदीं लहान–दोन पुरुषांची आहे. ७१ ज्याप्रमाणें सर्व आकाशांत काय तीं दिवस ( उजेड ) व रात्र ( काळोख ) हींच नांदतात, त्याप्रमाणें संसाररूपी राजधानींत हे दोघेच राहतात. ७२ आणखीही एक तिसरा पुरुष आहे; परंतु त्याला या दोघाचें नाव देखील सहन होत नाहीं. कारण तो येथें आला असतां नगरासह त्या दोघांचा नाश करतो. ७३ परंतु त्या तिसऱ्याची गोष्ट सध्यां राहूं दे. अगोदर, जे या संसाररूपी नगरांत वस्ती करण्याकरितां आले आहेत त्या दोघांविषयीं सांगतों तें ऐक. ७४ त्यांपैकीं एक आंधळा, वेडा व पंगु असा आहे; आणि दुसरा सर्व अवयवांनीं परिपूर्ण आहे. पण दोघे एका गावांत राहिल्यानें त्यांचा संग जडला. ७५ त्या एकाचें नांव ' क्षर ' व दुसऱ्याचें नांव ' अक्षर '; या दोघांनींच हें संसाररूपी नगर व्यापून टाकिलें आहे. ७६ आतां, ' क्षर ' म्हणून आहे तो कोण, व ' अक्षर ' म्हणतात त्याचीं लक्षणें काय, हें सर्व तुला फोड करून सांगतों; ७७ तर अर्जुना, महत्तत्त्वापासून गवताच्या काडीपर्यंत सर्व, ७८ जें कांहीं लहान व थोर, चालणारें अथवा स्थिर किंवा मन व बुद्धि यांस समजणारें; ७९ जें पंचमहाभूतांनीं बनलेलें, नांवारूपांत येणारें, आणि सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या टांकसाळींतून बाहेर पडणारें; ४८० ज्या सोन्यानें भूताकृतीचें नाणें तयार होतें, व ज्या द्रव्यानें काळास जुगार खेळतां येतो; ८१ विपरीत ज्ञानानें जें जाणतां येतें व जें प्रतिक्षणीं उत्पन्न होऊन लय पावतें; ८२ अरे, भ्रांतिरूपी अरण्यांत ( मायेंत ) शिरून जें सृष्टिरूपी अवयव

१२ टांकसाळींतून. १३ सोनें. १४ जुगार. १५ द्रव्य. १६ ज्ञानानें. १७ लय पावतें.

भ्रांतीचें दांग । उभवी सृष्टीचें आंग । हें असो बहु जग । जया नाम ॥ ८३ ॥ पैं अष्टधा भिन्न ऐसें । जें दाविलें प्रकृतिमिसें । जें क्षेत्रद्वारा छत्तीसें । भागीं केलें ॥ ८४ ॥ हें मागील सांगों किती । अगा आतांचि जे प्रस्तुतीं । वृक्षाकार-रूपाकृति । निरुपिली ॥ ८५ ॥ तें आघवेंचि साकार । कल्पूनि आपणयां पुर । जालें असे तदनुसार । चैतन्यचि ॥ ८६ ॥ जैसा कुहां आपणचि बिंबे । सिंह प्रतिबिंब पाहतां क्षोभे । मग क्षोभला समारंभें । घाली तेथ ॥ ८७ ॥ कां सलिलीं असताचि असें । व्योमावरी व्योम बिंबे जैसें । अद्वैत होऊनि तैसें । द्वैत घेपे ॥ ८८ ॥ अर्जुना गा यापरी । साकार कल्पूनि पुरी । आत्मा विस्मृतीची करी । निद्रा तेथ ॥ ८९ ॥ पैं स्वप्नीं सेजाँर देखिजे । मग पहुडणें जैसें तेथ कीजे । तैसें पुरीं शयन देखिजे । आत्मयासी ॥४९०॥ पाठीं तिये निद्रेचेनि भरें । मी सुखी दुःखी म्हणत घोरें । अहंममतेचेनि थोरें । वोसणाये सादें ॥९१॥ हा जनकु हे माता । हा मी गौरँ हीनँ पुरता । पुत्र वित्त कांता । माझे हे ना ॥९२॥ ऐसिया वेळघोनि स्वप्ना । धांवत भवसर्गाचिया राना । तया चैतन्या नाम अर्जुना । क्षर पुरुषु गा ॥९३॥ आतां ऐक क्षेत्रज्ञु येणें । नामें जयातें बोलणें । जग जीवु कां म्हणे । जिये दशेतें ॥ ९४ ॥ जो आपुलेनि विसरें । सर्व भूतत्वें अनुकरे । तो आत्मा बोलिजे क्षरें । पुरुषनामें ॥ ९५ ॥ जे तो वस्तुस्थिती पुरता । म्हणोनि आली पुरुषता । वरी देहपुरीं निदेजतां । पुरुषनामें ॥ ९६ ॥ आणि क्षरपणाचा नाथिलें । आळ यया ऐसेनि आला । जे उपाधींचि आतला । म्हणोनियां ॥ ९७ ॥ जैसी खळाळींचिया उदका- । सरसीं आंदोळे चंद्रिका । तैसा विकारां औपाधिकां । ऐसाचि गमे ॥ ९८ ॥ कां खळाळ मोटका शोषे । आणि चंद्रिका तें सरिसीच भ्रंशे । तैसा उपाधिनाशीं न दिसे । उपाधिकु ॥९९॥ ऐसें उपाधीचेनि पाडें । क्षणिकत्व यातें जोडे । तेणें खोंकरपणें घडे । क्षर हें नाम ॥५००॥ एवं जीवचैतन्य आघवें । हें क्षर पुरुष जाणावें । आतां रूप करूं बरवें । अक्षरासी ॥ १ ॥ (८६२. कूटस्थ अक्षर, ५०२-५२५) तरि अक्षरु जो दुसरा । पुरुषु पैं धनुर्धरा । तो मध्यस्थु गा गिरिवरां । मेरु जैसा ॥ २ ॥ जे तो पृथ्वी पाताळ स्वर्गीं । इहीं न भेदे तिहीं भागीं । तैसा दोहीं ज्ञानाज्ञानांगीं । पडेना जो ॥ ३ ॥ ना यथार्थज्ञानें एक होणें । ना अन्यथात्वें दुजें घेणें । ऐसें निखिळ जें नेणणें । तेंचि तें रूप ॥ ४ ॥ पांसुता निःशेष जाये । ना घटभांडादि होये । तया मृत्पिंडा ऐसें आहे । मध्यस्थ जें ॥ ५ ॥ पैं आटोनि गेलिया सागर । मग तरंगु ना नीर । तया ऐसी अनाकार ।

१ अरण्य. २ नगर. ३ अंथरूण. ४ निजणें. ५ बरळतो. ६ गोरा. ७ काळा. ८ पूर्ण. ९ आश्रय करून. १० संचार करतो. ११ खोटा. १२ योगानें. १३ हालते. १४ उपाधीनें. १५ कमीपणानें. १६ विपरीत ज्ञान. १७ रजःकणत्व.

उत्पन्न करतें; फार काय सांगावें ? ज्याला ' जग ' असें म्हणतात; ८३ जें ( सातवे अध्यायांत ) आठ प्रकारच्या प्रकृतीनें वर्णन केलें आहे; व ( तेराव्या अध्यायांत ) छत्तीस प्रकारांनीं क्षेत्राच्या रूपानें वर्णन केलें आहे; ८४ या मागील गोष्टी कशास पाहिजेत ? अरे, आतां ( याच अध्यायांत ) वृक्षाकार-रूपाकृतीनें जें तुला सांगितलें; ८५ तें चैतन्य आपल्यास नगरांत राहणारा मी पुरुष आहें असें मानून सर्व रूपानें आपणच या जगांत नटलें आहे. ८६ विहिरींत पडलेलें आपलें प्रतिबिंब पाहून हा कोणी दुसरा सिंह आहे असें मानून रागानें त्याचा नाश करण्याकरितां जसा सिंह विहिरींत उडी घालतो; ८७ किंवा आकाशापासून उत्पन्न होणाऱ्या पाण्यांत जसें आकाशाचें प्रतिबिंब दिसतें, तसें मायेच्या उपाधीनें चैतन्य जगदाकार बनतें. ८८ अर्जुना, याप्रमाणें सृष्टिरूपी नगरांत आत्मा आपल्या स्वरूपाच्या विस्मृतीनें स्वस्थ निद्रा करतो. ८९ मग, स्वप्नांत जसा एखादा मनुष्य अंथरूण पाहून त्यावर निजतो तसा आत्मा या जगांत स्वस्थ झोंप घेतो. ४९० मग निद्रेच्या भरांत, मी सुखी आहें, मी दुःखी आहें, असा घोरत पडतो; आणि अहंकार व ममता यांच्या सपाट्यांत सांपडून बरळतो. ९१ हा माझा बाप, ही माझी आई, मी गोरा, मी काळा, मी पूर्ण आहें, मुलगा, संपत्ति व स्त्री हीं माझींच आहेत; ९२ याप्रमाणें स्वप्नाच्या आधारानें स्वर्ग व संसार यांत जें चैतन्य निमग्न झालें आहे, त्याला अर्जुना, ' क्षर ' पुरुष असें म्हणतात. ९३ आतां, ज्याला क्षेत्रज्ञ असें म्हणतात व ज्या दशेस सर्व जग ' जीव ' म्हणतें, ९४ आणि जो आत्मस्वरूपाच्या विस्मृतीनें सर्व भूतांत संचार करतो, त्या जीवात्म्याला ' क्षर पुरुष, असें म्हणतात. ९५ कारण, तो सर्व वस्तूंत व्यापक असतो म्हणून त्याला ' पुरुष ' हें नाव प्राप्त झालें. शिवाय, तो देहांत वास करतो म्हणूनही त्याला ' पुरुष ' असें नांव आहे; ९६ आणि त्याच्यावर क्षरपणाचा खोटा आळ आला आहे; कारण, त्यानें उपाधीला नुसता स्पर्श केलेला आहे. ९७ ज्याप्रमाणें हालणाऱ्या पाण्यांत चंद्राचें प्रतिबिंब हालतें असें वाटतें, त्याप्रमाणें विकाराच्या उपाधींनीं आत्मा उपाधियुक्त भासतो. ९८ नंतर तेंच हालणारें पाणी नाहींसें झाल्यावर त्यांत दिसणारें चंद्रप्रतिबिंबही नाहींसें होतें; त्याप्रमाणें, उपाधींचा नाश झाल्यावर चैतन्य उपाधिरहित दिसतें. ९९ याप्रमाणें उपाधींच्या योगानें चैतन्यास क्षणिकत्व प्राप्त होतें, आणि असा कमीपणा आल्यानें त्याला ' क्षर ' असें म्हणतात. ५०० अशा प्रकारें सर्व जीवचैतन्यास ' क्षर ' असें म्हणावें. आतां अक्षराचीं लक्षणें कोणतीं तें उत्तम प्रकारें सांगतों. १ तर अर्जुना, दुसरा जो ' अक्षर पुरुष, ' तो, ज्याप्रमाणें सर्व पर्वतांत मेरु पर्वत मध्यस्थ आहे, त्याप्रमाणें मध्यस्थ आहे. २ कारण तो मेरु पर्वत पृथ्वी, पाताळ व स्वर्ग या तिन्ही लोकांत अखंड आहे; त्याप्रमाणें जो ज्ञान किंवा अज्ञान यांपैकीं एकांतही पडत नाहीं, ३ यथार्थ ज्ञानानें ऐक्य होणें किंवा विपरीत ज्ञानानें द्वैत पावणें या दोन स्थितींमधील जी केवळ अज्ञान स्थिति ( उदासीनता ), तेंच ज्याचें स्वरूप होय; ४ माती भिजवून तिचा गोळा करावा; मग तिचें भांडें घडावयाचे पूर्वीं तिचा मातीपणा तर गेलेला असतो व तिला मडक्याचाही आकार नसतो; त्या गोळ्याप्रमाणें या अक्षर पुरुषाची मधली स्थिति आहे. ५ समुद्र

जे दशा गा ॥ ६ ॥ पार्थी जागणें तरी बुडे । परि स्वप्नाचें कांहीं न मांडे । तैसिये निद्रे सांगेडें । न्याहाळणें जें ॥ ७ ॥ विश्व आघवेंचि मावळे । आणि आत्मबोधु तरी नुजळे । तिये अज्ञानदशे केवळे । अक्षरु नांव ॥ ८ ॥ सर्वा कळीं सांडिलें जैसें । चंद्रपण उरे अंवसे । रूप जाणावें तैसें । अक्षराचें ॥ ९ ॥ पैं सर्वोपाधि-विनाशें । हे जीवदशा जेथ पैसे[2] । फळपाकांतैं जैसें । झाड बीजीं ॥ ५१० ॥ तैसें उपाधीं उपहित । थोंकोनि ठाके जेथ । तयातें अव्यक्त । बोलती गा ॥११॥ घन अज्ञान सुषुप्ति । तो बीजभावो म्हणती । येर स्वप्न हन जागृति । फळभावो तो ॥ १२ ॥ जयासी कां बीजभावो । वेदांतीं केला ऐसा आवो । तो तया पुरुषा ठावो । अक्षराचा ॥ १३ ॥ जेथुनी अन्यथा ज्ञान । फांकोनि जागृति स्वप्न । नानाबुद्धींचें रान । रिगालें असे ॥ १४ ॥ जीवत्व जेथुनी किरीटी । विश्व उठवितचि उठीं । ते उभय भेदांची मिठी । अक्षरु पुरुषु ॥ १५ ॥ येरु क्षरु पुरुषु का जनीं । देहीं खेळे जागृतीं स्वप्नीं । तिया अवस्था जो दोन्ही । वियाला गा ॥ १६ ॥ पैं अज्ञानघन सुषुप्ति । ऐसैसी जे कां ख्याति । या उणी येकी प्राप्ति । ब्रह्माची जे ॥ १७ ॥ साचचि पुढती वीरा । जरि न येता स्वप्नजागरा । तरी ब्रह्मभावो साचोकारा । म्हणों येता ॥ १८ ॥ परि प्रकृतिपुरुषें दोनी । अभ्रें जालीं जिये गगनीं । क्षेत्रक्षेत्रज्ञु स्वप्नीं । देखिला जिये ॥ १९ ॥ हें असो अधो-शाखा । या संसाररूपा रुखा । मूळ तें रूप पुरुषा । अक्षराचें ॥ ५२० ॥ हा पुरुषु कां म्हणिजे । जे पूर्णपणेंचि निजें । पैं मायापुरीं पहुडिजे । तेणेंही बोलें ॥ २१ ॥ आणि विकारांची जे वारी । ते विपरीत ज्ञानाची परी । नेणिजे जिये-माझारीं । ते सुषुप्ति गा हा ॥ २२ ॥ म्हणौनि यया आपैसें । क्षरणें पां नसे । आणिकेंही हा न नाशे । ज्ञानाविणें ॥ २३ ॥ यालागीं हा अक्षरु । ऐसा वेदांतीं डगरु । केला देशीं थोरु । सिद्धांताच्या ॥ २४ ॥ ऐसें जीवकार्य कारण । जया मायासंगुचि लक्षण । अक्षर पुरुषु जाण । चैतन्य तें ॥ २५ ॥

उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।
यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥

अन्वयः—उत्तमः पुरुषः तु अन्यः (अस्ति), सः परमात्मा इति उदाहृतः, यः अव्ययः ईश्वरः लोकत्रयं आविश्य (तत्) बिभर्ति ॥ १८ ॥

(८६३. उत्तम पुरुष, ५२६–५३६) आतां अन्यथाज्ञानीं । या दोनी अवस्था जिया जनीं । तिया हारपती घनीं । अज्ञानत्वीं ॥ २६ ॥ तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया । ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया । जैसा वन्हि काष्ठ जाळूनिया । स्वयें

१ सारखी. २ विभाति घेतो. ३ फल येईपर्यंत. ४ ठौर. ५ विपरीत. ६ प्रसिद्धि. ७ बेशातात. ८ सन्मुखपणा.

आटल्यावर त्यांत लाटाही नसतात किंवा पाणीही नसतें, त्याप्रमाणें जी आकाररहित स्थिति; ६ पार्था, जागृदवस्था जाऊन स्वप्नावस्था येण्याच्या मधील जी निद्रावस्था, त्याप्रमाणें ज्याचें स्वरूप आहे; ७ आणि जगाचा भास नाहींसा होणें, व आत्मज्ञानाचा बोध न होणें, या दोहोंमधील जी केवळ अज्ञानदशा, तिलाच ' अक्षर ' असें म्हणतात. ८ अमावास्येच्या दिवशीं सर्व कला नाहींतशा होऊन जें चंद्राचें स्वरूप असतें, त्याप्रमाणें ज्ञान व अज्ञान यांविरहित अक्षराचें रूप आहे. ९ हें पहा—सर्व उपाधींचा नाश झाल्यावर ज्या ठिकाणीं जीवात्मा विश्रांति घेतो, त्याचप्रमाणें फळ आल्यावर झाड त्यांत बीजरूपानें असतें, ५१० त्याप्रमाणें उपाधींचा स्वीकार करणारा उपाधींसह जेथें विश्राति घेतो, त्या स्थानाला अव्यक्त असें म्हणतात. ११ पूर्ण अज्ञान ज्या निद्रावस्थेंत असतें, तिला ' बीजभाव ' असें म्हणतात; व दुसरी स्वप्न व जागृति स्थिति, तिला ' फलभाव ' असें म्हणतात. १२ वेदांती लोक ज्या स्थितीला ' बीजभाव ' असें म्हणतात, त्या स्थितीलाच ' अक्षर पुरुष ' असें म्हणतात. १३ तेथून विपरीत ज्ञान उत्पन्न होऊन जागृति व स्वप्न या रूपांनीं फांकतें; आणि अनेकबुद्धितरंगरूप रानांत संचार करितें. १४ अर्जुना, जीवात्मा जेथून विश्वाची मांडणी करीत उठतो, त्या दोघांमधील जी भेदस्थिति तोच अक्षर पुरुष होय. १५ दुसरा क्षर पुरुष म्हणजे जीव. हा या विश्वांत देह धारण करून जागृति व स्वप्नावस्था याचा उपभोग घेतो. या दोन्ही अवस्था ज्याच्यापासून उत्पन्न होतात; १६ किंवा ज्या अवस्थेला पूर्ण अज्ञानानें भरलेली अशी निद्रावस्था म्हणतात, व जिच्यांत ब्रह्मप्राप्तीची उणीव असते; १७ वीरा अर्जुना, खरोखर या निद्रावस्थेपासून जर स्वप्न किंवा जागृति या अवस्था प्राप्त न होतील, तर या अवस्थांत ब्रह्मप्राप्ति होते असें खास म्हणतां येईल. १८ पण या निद्रारूपी आकाशांत प्रकृतिपुरुषरूपी ढग येऊन स्वप्नरूपी जीव व शरीर यांची वृष्टि होते. १९ हें असो; या खालीं विस्तार पावणाऱ्या फांद्यांच्या संसाररूपी वृक्षाचें ' अक्षर पुरुष ' हेंच मूळ होय. ५२० याला पुरुष कां म्हणावयाचें ? तर हा पूर्णपणें निद्रा घेतो म्हणून, व मायारूपी नगरांत शयन करतो म्हणून; २१ आणि ज्या गाढ निद्रेंत विकार अथवा विपरीत ज्ञान यांचा भास नसतो, तें याचें रूप होय. २२ म्हणून याचा सहज नाश होत नाहीं; आणि तो तरी ज्ञानावांचून दुसऱ्या कशानेंही नाहीं. २३ म्हणून वेदांतांत हा ' अक्षर ' आहे असा सिद्धांत केला आहे. २४ याप्रमाणें मायेच्या उपाधीनें चैतन्य जें जीवात्म्याचें रूप धारण करतें, त्याला ' अक्षर पुरुष ' म्हणतात. २५

श्लोकार्थः—या दोहोंहून उत्तम पुरुष तर निराळा आहे. त्याला परमात्मा म्हणतात. तो अविनाशी ईश्वर या जगत्रयात शिरून त्याचें धारण व पोषण करतो ॥ १७ ॥

आतां, विपरीत ज्ञानानें या विश्वांत उत्पन्न होणाऱ्या ज्या जागृति व स्वप्न या अवस्था, त्या ज्या गाढ अज्ञानांत लय पावतात; २६ तें अज्ञान ज्ञानांत बुडून ज्ञानाच्याही पलीकडे गेल्यावर, ज्याप्रमाणें अग्नि लांकडास जाळून मागाहून आपणही नाहींसा होतो,

जळे ॥ २७ ॥ तैसें अज्ञान ज्ञानें नेलें । आपण वस्तु देऊनि गेलें । ऐसें जाणणेनिवीण उरलें । जाणतें जें ॥ २८ ॥ तें तो गा उत्तम पुरुषु । जो तृतीय कां निष्कर्षु । दोहींहून आणिकु । मागिला जो ॥ २९ ॥ सुषुप्ती आणि स्वप्ना- । पासूनि बहुवें अर्जुना । जागणें जैसें आना । बोधाचेंचि ॥ ५३० ॥ कां रश्मि हन मृगजळा- । पासूनि अर्कमंडळा । अफाटु तेवि वेगळा । उत्तम गा ॥ ३१ ॥ हें ना काष्ठींचा काष्ठींहुनी । अनारिसा जैसा वन्ही । तैसा क्षराक्षरापासुनी । आनाचि तो ॥ ३२ ॥ पैं ग्रासूनि आपली मर्यादा । एक करीत नदीनदां । उठी कल्पांतीं उदावोदा । एकार्णवाचा ॥ ३३ ॥ तैसें स्वप्न ना सुषुप्ति । ना जागराची गोठी आथी । जैसी गिळिली दिवोराती । प्रळयतेजें ॥ ३४ ॥ मग एकपण ना दुजें । असें नाहीं हें नेणिजे । अनुभवु निर्वुजे । बुडाला जेथें ॥ ३५ ॥ ऐसें आथी जें कांहीं । तें तो उत्तम पुरुषु पाहीं । जें परमात्मा इहीं । बोलिजे नामीं ॥ ३६ ॥ ( ८६४. उत्तम पुरुषालाच परमात्मा म्हणतात, ५३७–५४५ ) तेंही येथ न मिळतां । बोलणें जीवत्वें पंडुसुता । जैसी बुडणेयाची वार्ता । थडियेचा कीजे ॥ ३७ ॥ तैसें विवेकाचिये कांठीं । उभे ठाकलिया किरीटी । पारावराचिया गोठी । करणें वेदां ॥ ३८ ॥ म्हणौनि पुरुषु क्षराक्षर । दोन्ही देखोनि अवर । यातें म्हणती पर । आत्मरूप ॥ ३९ ॥ अर्जुना ऐसिया परी । परमात्मा शब्दवरी । सूचिजे गा अवधारी । पुरुषोत्तमु ॥ ५४० ॥ येऱ्हवीं न बोलणेनि बोलणें । जेथींचें सर्व नेणिवा जाणणें । कांहींच न होनि होणें । जे वस्तु गा ॥ ४१ ॥ सोहं तेंही अस्तवलें । जेथ सांगतेंचि सांगणें जालें । द्रष्टृत्वेंसी गेलें । दृश्य जेथ ॥ ४२ ॥ आतां बिंबा आणि प्रतिबिंबा । माजी कैंची हें म्हणों नये प्रभा । जऱ्ही कैसेनि हे लाभा । जायेचि ना ॥ ४३ ॥ कां घ्राण फुला दोहीं । द्रुति असे जे माझारिला ठायीं । ते न दिसे तरी नाहीं । ऐसें बोलों नये ॥ ४४ ॥ तैसें द्रष्टा दृश्य हें जाये । मग कोण म्हणे काय आहे । हेंचि अनुभवें तेंचि पाहे । रूप तया ॥ ४५ ॥ ( ८६५. आत्म्यालाच ईश्वर म्हणतात, ५४६–५५० ) जो प्रकाश्येंवीण प्रकाशु । जो ईशितव्येंवीण ईशु । आपणेंनीचि अवकाशु । वसवीत असे जो ॥ ४६ ॥ जो नादें ऐकिजता नादु । स्वादें चाखिजता स्वादु । जो भोगिजतसे आनंदु । आनंदेंचि ॥ ४७ ॥ जो पूर्णतेचा परिणामु । पुरुषु गा पुरुषोत्तमु । विश्रांतीचाही विश्रामु । विराला जेथें ॥ ४८ ॥ सुखासि सुख जोडिलें । जें तेज तेजासि सांपडलें । शून्यही बुडालें । महाशून्यीं जिये

१ शेवटचा. २ अधिक. ३ अगदींच वेगळा. ४ पूर्णत्व. ५ घाबरा होऊन. ६ अलीकडच्या किंवा पलीकडच्या. ७ अलीकडचे. ८ दिसत नाहीं. ९ सुगंध. १० प्रकाशक. ११ नियमन करणारा. १२ ईश्वर.

२७ त्याप्रमाणें ज्ञानानें अज्ञान नाहींसें केलें, आणि ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति करून देऊन तें आपणही नष्ट झालें. मग असें जें जाणणेपणाशिवाय जाणणें उरलें, २८ तें, अर्जुना, तो उत्तम पुरुष होय, कीं जो शेवटचा तिसरा म्हणून सांगितला; आणि जो मागें सांगितलेल्या दोघांहून निराळा होय. २९ अर्जुना, निद्रा आणि स्वप्न यांपेक्षां जागृदवस्था जशी निराळयाच बोधाची असते; ५३० किंवा सूर्यकिरण आणि मृगजल यांहून जसें सूर्यमंडल अगदींच वेगळें, तसा हा उत्तम पुरुष त्या दोघांहून अगदींच वेगळा होय. ३१ इतकेंच नव्हे, तर लांकडांत असलेला अग्नि जसा लांकडापासून वेगळा आहे, तसा क्षर व अक्षर यांहून तो वेगळा आहे. ३२ कल्पांतसमयीं ज्याप्रमाणें समुद्राची मर्यादा नाहींशी होऊन सर्वत्र जलमय झालें म्हणजे नदी व नद सर्व एकत्र होतात, ३३ त्याप्रमाणें, स्वप्न, गाढ झोंप किंवा जागृति यांचा जेथें भास उरत नाहीं; ( कसा उरत नाहीं ? तर ) प्रळयकालच्या तेजानें रात्र व दिवस हीं गिळून टाकावीं त्याप्रमाणें. ३४ मग अद्वैत किंवा द्वैत हा भाव रहात नाहीं; असणें व नसणें हेंही कळत नाहीं, आणि जेथें अनुभव घाबरा होऊन नष्ट होतो, ३५ असें जें काहीं तत्त्व आहे, तें म्हणजे तो उत्तम पुरुष समज, कीं ज्याला इहलोकीं परमात्मा असें म्हणतात. ३६ पण अर्जुना, तें बोलणेंही, येथें न मिळतां जीवदशा पतकरूनच होय. ज्याप्रमाणें कांठावर उभे असलेल्या मनुष्यानें बुडाल्याची वार्ता सांगावी, ( त्या बुडणाऱ्याबरोबरच जो बुडाला तो काय सांगणार ? ) ३७ त्याप्रमाणें अर्जुना, विचाररूपी कांठावर जोंपर्यंत वेद उभे आहेत, तोंपर्यंतच अलीकडच्या किंवा पलीकडच्या गोष्टी बोलण्यास त्यांस शक्ति असते. ३८ म्हणून, क्षर व अक्षर पुरुष हे दोन्ही अलीकडचे आहेत असें पाहून त्या आत्मस्वरूपाला पर पुरुष असें म्हणतात. ३९ अशा प्रकारें अर्जुना, परमात्मा या शब्दानें पुरुषोत्तम ओळखावा असें तूं समज. ५४० एरवीं ज्या ठिकाणीं शब्द मावळतो, ज्ञान लोप पावतें व सर्व व्यापार बंद राहतात, अशी जी वस्तु आहे; ४१ अहंब्रह्म हा भावही जेथें नाहींसा होतो, तेथें सांगणाराच जें सांगावयाचें तें होतो; आणि द्रष्ट्यासह दृश्य नाहींसें होतें; ४२ आतां, बिंब व त्याचें ( पाण्यांत पडलेलें ) प्रतिबिंब यांच्यामध्यें असणारी प्रभा जरी आपल्यास दिसत नाहीं, तरी ती नाहीं असें कसें म्हणतां येईल ? ४३ किंवा नाक व फूल या दोहोंमध्यें जो फुलाचा सुगंध असतो तो जरी आपल्यास न दिसला तरी नाहीं कसा म्हणतां येईल ? ४४ त्याप्रमाणें, द्रष्टा व दृश्य नष्ट झाल्यावर, अमुक वस्तु आहे असें कोण म्हणेल ? पण तेंच अनुभवानें पाहणें तेंच त्याचें रूप होय. ४५ जो प्रकाशित होणाऱ्या वस्तूशिवाय प्रकाशक व जो नियम्य पदार्थाशिवाय नियमन करणारा असा जो ईश्वर, तो आपले स्वरूपांतच आपण असतो. ४६ जो नादब्रह्माला ऐकण्याची शक्ति देणारा नाद, स्वादाला स्वादाची शक्ति देणारा मूळ स्वाद व जो ब्रह्मानंदाला आनंदाची शक्ति देणारा; ४७ जो पूर्णत्वाचा शेवट, व सर्व पुरुषांमध्यें श्रेष्ठ पुरुष व विश्रांतीला विश्रांतीचें स्थान; ४८ जें सुखास सुखच जोडलें, तेजास तेज प्राप्त झालें, व शून्य महाशून्यांत लय पावलें;

॥ ४९ ॥ जो विकासींही वरी उरता । ग्रासातेंही ग्रासूनि पुरता । जो बहुतें पाडें बहुतां- । पासूनि बहु ॥ ५५० ॥ पैं नेणतयाप्रती । रुपेपणाची प्रतीति । रुपें न होनि शुक्ति । दावी जेवीं ॥ ५१ ॥ कां नाना अलंकारदशे । सोनें न लपत लपालें असे । विश्व न होनियां तैसें । विश्व जो धरी ॥ ५२ ॥ हें असो जलतरंगा । नाहीं सिनानपण जेवीं गा । तेवीं दिसता प्रकाशु जगा । आपणाचि जो ॥ ५३ ॥ आपुलिया संकोचविकासा । आपणाचि रूप वीरेशा । हा जळीं चंद्र हन जैसा । समग्रु गा ॥ ५४ ॥ तैसा विश्वपणें कांहीं होये । विश्वलोपीं कहीं न जाये । जैसा रात्रिदिवसें नोहे । द्विधा रवि ॥ ५५ ॥ तैसा कांहींचि कोणीकडे । कायिसेनिहि वेंचीं[३] न पडे । जयाचें सांगडें । जयासीचि ॥ ५६ ॥

यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।
अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥

अन्वयः—यस्मात् अहं क्षर अतीतः च अक्षरात् अपि उत्तमः, अतः अहं लोके च वेदे च पुरुषोत्तमः इति प्रथितः अस्मि ॥ १८ ॥

( ८६७. क्षराक्षरांपासून जो वेगळा, त्यालाच शास्त्रात, वेदांत, लोकात उत्तम पुरुष म्हणतात, ५५७–५५८ ) जो आपणपेंचि आपणया । प्रकाशीतसे धनंजया । काय बहु बोलों जया । नाहीं दुजें ॥ ५७ ॥ तो गा मी निरुपाधिकु । क्षराक्षरोत्तमु एकु । म्हणोनि म्हणे वेद लोकु । पुरुषोत्तमु ॥ ५८ ॥

यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।
स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥

अन्वयः—भारत, यः असंमूढः मां पुरुषोत्तमं एवं जानाति सः सर्ववित् ( भूत्वा ) मां सर्वभावेन भजति ॥ १९ ॥

( ८६८. पुरुषोत्तमाला जाणतो तोच सर्वज्ञ होऊन मला भजतो, ५५९–५७० ) परि हें असो ऐसिया । मज पुरुषोत्तमातें धनंजया । जाणे जो पाहलेया[४] । ज्ञानमित्रें[५] ॥ ५९ ॥ चेइलिया आपुलें ज्ञान । जैसें नाहींचि होय स्वप्न । तैसें स्फुरतें त्रिभुवन । वावो जालें ॥ ५६० ॥ कां हातीं घेतलिया माळा । फिटे सर्पाभासाचा कांटाळा । तैसा माझेनि बोधें टवाळा । नागवे तो ॥ ६१ ॥ लेणें सोनेंचि जो जाणे । तो लेणेंपण तें वावो म्हणे । तेवीं मी जाणोनि जेणें । वाळिलें भेदु ॥ ६२ ॥ मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वतःसिद्धु । जो आपणेंनसीं भेदु । नेणोनियां जाणे ॥ ६३ ॥ तेणेंचि सर्व जाणितलें । हेंही म्हणणें थेंकुलें । जे तया सर्वत्र उरलें । द्वैत नाहीं ॥ ६४ ॥ म्हणोनि माझिया भजना । उचितु तोचि अर्जुना । गगन जैसें आलिंगना । गगनाचिया ॥ ६५ ॥ क्षीरसागरा पाहुणें । कीजे क्षीरसागरपणें । अमृताचि होऊनि मिळणें । अमृतीं जेवीं ॥ ६६ ॥

१ उदय. २ दूर. ३ नाश. ४ तुलना. ५ उजाडलें आहे. ६ ज्ञानरूपी सूर्य. ७ भासतें. ८ त्रास.

४९ जो उदय झाल्यावरही त्यापासून दूर असतो, व लय झाल्यावरही त्यापलीकडे असतो. फार काय सांगावें? जो सर्वांहून दूर आहे; ५५० ज्याप्रमाणें शिपी आपण रुपें नसून अज्ञान्याला रुप्याचा भास करते, ५१ किंवा अलंकाराच्या रूपानें सोनें नाहींसें न होतां नाहीं असें भासतें, त्याप्रमाणें, आपण विश्व न होतां जो विश्व धारण करितो; ५२ हें असो; पाणी व लाटा यांत कांहीं वेगळेपणा आहे का? त्याचप्रमाणें जग व परमात्मस्वरूप वेगळें नाहीं. ५३ हे वीरेशा, जगाच्या संकोचाला व विस्ताराला जो कारण आहे; ज्याप्रमाणें पाण्यांत पडणाऱ्या प्रतिबिंबास समग्र चंद्र कारण असतो. ५४ त्याप्रमाणें, जगाची उत्पत्ति झाली असतां ज्याच्यांत फरक होत नाहीं, व लय झाला असतां जो कोठें जात नाहीं; ज्याप्रमाणें रात्र व दिवस हीं आलीं असतां सूर्यांत कांहीं फरक पडत नाहीं, ५५ त्याप्रमाणें तो कोणांत नसतो, कोणाच्यानेंही नाश पावत नाहीं; आणि ज्याची तुलना करावयास तो स्वतःच योग्य आहे. ५६

श्लोकार्थः—ज्या अर्थी मी क्षराच्या पलीकडे आणि अक्षराहूनही उत्तम आहें, त्या अर्थी मी लोकांमध्यें व वेदामध्यें पुरुषोत्तम या नावानें प्रसिद्ध आहें ॥ १८ ॥

हे धनंजया, जो आपणच आपल्याला प्रकाशित करितो, फार काय सांगावें? ज्याचे ठिकाणीं द्वैत नाहीं. ५७ तें माझें निरुपाधिक रूप असून, क्षर व अक्षर याच्या पलीकडचा मी आहें; म्हणून मला वेद आणि लोक हे 'पुरुषोत्तम' असें म्हणतात. ५८

श्लोकार्थः—अर्जुना, जो ज्ञानी या प्रकारें मला पुरुषोत्तम असें समजतो, तो सर्वज्ञ होऊन सर्वभावेंकरून मला भजतो ॥ १९ ॥

पण हें असो; अर्जुना, अशा मज पुरुषोत्तमाला तोच पुरुष जाणतो, कीं ज्याला ज्ञानरूपी सूर्याचा उजेड झाला आहे. ५९ ज्याप्रमाणें जागृत झाल्यावर आपल्यास स्वप्न भासत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानाचा उदय झाल्यावर सर्व जग व्यर्थ भासतें. ५६० किंवा माळ हातीं घेतली म्हणजे ज्याप्रमाणें तीवर झालेला सर्पाचा भास नाहींसा होतो, त्याप्रमाणें माझें स्वरूपज्ञान झाल्यानें जगाचा मिथ्या भास नाहींसा होतो. ६१ जो सोन्याच्या अलंकाराला सोन्याच्या दृष्टीनें पाहतो, तो त्याचें अलंकारत्व व्यर्थ मानतो; त्याप्रमाणें, ज्याला माझें ज्ञान प्राप्त होतें, त्याला ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही त्रिपुटी नाहींशी होते. ६२ मग तो म्हणतो, 'मीच एक स्वतःसिद्ध सच्चिदानंद सर्वत्र आहें.' अशा अद्वैतदृष्टीनें जो मला जाणतो, ६३ त्यानें सर्व जाणलें हें म्हणणें देखील शोभत नाहीं. कारण, त्याला द्वैताचा भाव कोठेंच उरलेला नसतो. ६४ म्हणून अर्जुना, तोच माझें भजन करण्यास अधिकारी होय. ज्याप्रमाणें आकाशास आलिंगन देण्यास आकाशच योग्य होय. ६५ क्षीरसागराला ज्याप्रमाणे क्षीरसागराचीच मेजवानी करणें योग्य होय, अथवा ज्याप्रमाणें अमृतरूप होऊनच अमृतास मिळावें लागतें; ६६ उत्तम सोन्यात उत्तम सोनेंच

९ मिथ्याभास. १० टाकला. ११ ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही त्रिपुटी. १२ अल्प; थोडें. १३ मेजवानी.

साडेपंधरा मिसळावें । तैं साडेपंधरोंचि होआवें । तेविं मी जालिया संभवे । भक्ति माझी ॥ ६७ ॥ हां गा सिंधूसि आनी होती । तरि गंगा कैसेनि मिळती । म्हणौनि मीं न होतां भक्ती । अन्वयो[१] आहे ॥ ६८ ॥ ऐसियालागीं सर्व प्रकारीं । जैसा कल्लोळ अनन्यु सागरीं । तैसा मातें अवधारीं । भजिन्नला जो ॥ ६९ ॥ सूर्या आणि प्रभे । एकेवंकी जेणें लोभें । तो पाडु मातूं लाभे । भजना तया ॥ ५७० ॥

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयाऽनघ ।
एतद् बुध्द्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥

अन्वयः—( हे ) अनघ, इति मया इदं गुह्यतमं शास्त्रं उक्तम्; भारत, एतत् बुध्द्वा ( जीवः ) बुद्धिमान् च कृतकृत्यः स्यात् ॥ २० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
पुरुषोत्तमयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

( ८६९. गुह्यतम शास्त्रावर लक्ष्मीचें रूपक; काव्यप्रतिभा, ५७१—५७६ ) एवं कथिलैंयादारभ्य[३] । जें हें सर्व शास्त्रैकलभ्य[४] । उपनिषदां सौरभ्य । कमळदळां जेविं ॥ ७१ ॥ हें शब्दब्रह्माचें मथितें[५] । श्रीव्यासप्रज्ञेचेनि हातें । मथूनि काढिलें आयितें । सार आम्हीं ॥ ७२ ॥ जे ज्ञानामृताची जान्हवी । जे आनंदचंद्रींची सतरावी । विचारक्षीरार्णवींची नवी । लक्ष्मी जे हे ॥ ७३ ॥ म्हणोनि आपुलेनि पदें वर्णें । अर्थाचेनि जीवें प्राणें । मींवांचोनि हों नेणें । आन कांहीं ॥ ७४ ॥ क्षराक्षरत्वें समोर जाले । तयाचें पुरुषत्व वाळिलें । मग सर्वस्व मज दिधलें । पुरुषोत्तमीं ॥ ७५ ॥ म्हणौनि जगीं गीता । मियां आत्मेनि पतिव्रता । जे हे प्रस्तुत तुवां आतां । आकर्णिली ॥ ७६ ॥ ( ८७०. देव म्हणतात, शास्त्ररूपी माझा निधि काढण्यास अर्जुना, तूं गौतम झालास; रूपक; काव्यप्रतिभा, ५७७-५८२ ) साचाचि बोलाचें नव्हे हें शास्त्र । पैं संसारु जिणें हें शस्त्र । आत्मा अवतरवी ते मंत्र । अक्षरें इयें ॥ ७७ ॥ परि तुजपुढां सांगितलें । तें अर्जुना ऐसें जालें । जें गौप्यधन काढिलें । माझें आजी ॥ ७८ ॥ मज चैतन्यशंभूचा माथा । जो निक्षेपु होता पार्था । तया गौतमु जालासि आस्था- । निधि तूं गा ॥ ७९ ॥ चोखटिवें आपुलिया । पुढिला उगोंणा घेयावया । तया दर्पणाचीचि परी धनंजया । केली आम्हां ॥ ५८० ॥ कां भरलें चंद्रतारागणीं । नभ सिंधु आपणयामाजि आणी । तैसा गीतेंसी मी अंतःकरणीं । सूदला तुवां ॥ ८१ ॥ जे त्रिविधैमळिकटा । तूं सांडलासि सुभटा । म्हणौनि गीतेंसीं मज वसौटों । जालासि गा ॥ ८२ ॥ ( ८७१. गीताशास्त्र जाणणारा बुद्धिमान होतो व त्याचा मोह जातो, ५८३-५८५ ) परि हे बोलों काय गीता । जे हे माझी उन्मेषता । जाणे तो समस्तां । मोहां मुके

१ दुर्मिळ आहे. २ ऐक्य. ३ पंधराव्या अध्यायाच्या आरंभापासून. ४ केवळ शास्त्रानेंच

मिसळल्यावर त्याची एक किंमत लागते. त्याप्रमाणें मद्रूप झाल्यावर माझी भक्ति करण्यास पुरुष योग्य होतो. ६७ असें पहा की, समुद्राहून गंगा जर निराळी असती, तर ती समुद्रास कशी मिळाली असती ? म्हणून, मद्रूप झाल्याशिवाय माझी भक्ति प्राप्त होत नाहीं. ६८ याप्रमाणें, समुद्रांतील लाटा जशा सर्व प्रकारें समुद्राहून भिन्न नाहींत, त्याप्रमाणें जो माझें भजन करतो त्याच्यात व माझ्यात द्वैत नसतें. ६९ सूर्य आणि प्रभा याच्यांत जसें ऐक्य आहे, तसें माझें भजन केलें असता माझ्यात व भक्तांत अंतर राहात नाहीं. ५७०

श्लोकार्थः—हे निष्पापा, याप्रमाणें हें अत्यंत गुह्य शास्त्र मीं तुला सांगितलें; अर्जुना, हें जाणल्यानें मनुष्य बुद्धिमान आणि कृतकृत्य होतो ॥ २० ॥

याप्रमाणें ( पंधराव्या अध्यायांत ) सांगावयास आरंभ केल्यापासून सर्व शास्त्रांनीच प्राप्त होणारा असा उपनिषद्रूपी कमलदलांतून गीतारूपी सुवास सर्व जगभर फाकला; ७१ जी गीता वेदाचें मंथन करून श्रीव्यासमुनींच्या ज्ञानरूप हातानें काढलेल्या लोण्याप्रमाणें होय; ७२ जी गीता ज्ञानामृतानें भरलेली दुसरी भागीरथी नदीच होय; व आनंदरूपी चंद्राची सतरावी कला होय व विचाररूपी क्षीरसागराचें मंथन करून काढलेल्या लक्ष्मीप्रमाणेंच होय. ७३ म्हणून या गीतेस तिच्या पदरूपी वर्णानें व अर्थरूपी जीवप्राणानें माझ्याशिवाय गतिच नाहीं. ७४ हिच्या समोर क्षर व अक्षर प्राप्त झाले असतां त्यांचें पुरुषत्व ही नाहींसें करते; व मग पुरुषोत्तमास आपलें तनमन अर्पण करते. ७५ म्हणून, हल्लीं जी तूं गीता ऐकलीस, तिनें मला वरल्यामुळें पतिव्रता हें नाव मिळविलें. ७६ खरोखर ही गीता म्हणजे बोलून वर्णन करण्याजोगें शास्त्र नाहीं; परंतु संसारास जिंकण्याचें एक शस्त्रच आहे. गीतेचीं अक्षरें हीं आत्मभाव उत्पन्न करणारे मंत्रच होत. ( आत्मप्राप्ति करून देण्याची हिच्या अक्षरात शक्ति आहे ). ७७ अर्जुना, तुला जी ही गीता सांगितली, तो प्रकार कसा झाला म्हणशील, तर माझे जवळील गुप्त ठेवा आज बाहेर काढला. ७८ ज्याप्रमाणे गौतम मुनींनीं तपश्चर्या करून शंकराचे जटेंतून गंगा वर काढली, त्याप्रमाणें जो चैतन्यशंभु मी त्या माझे जटेंतून गीतारूपी गंगा काढण्यास तूं गौतम झालास. ७९ आपले चांगलेपणाचा अनुभव घेण्यास जसा आरसा समोर घ्यावा लागतो, तसा, हे धनंजया, आत्मस्वरूप पाहण्यास गीतारूप आरसाच घ्यावा लागतो. ५८० ज्याप्रमाणें आकाशातील चंद्र व नक्षत्रें हीं सर्व समुद्रांत प्रतिबिंबित होतात, त्याप्रमाणें गीतेसह मला तूं आपल्या अंतःकरणांत प्रतिबिंबित केलेंस. ८१ अर्जुना, तुझ्या ठिकाणचा त्रिविधतापरूपी मळ गेल्यामुळें तूं गीतेसह माझें राहण्याचें ठिकाण झाला आहेस. ८२ परंतु फार

प्राप्त होणारें. ६ वास. ७ मथन केलेलें. ८ लोणी. ९ प्रकट करते. १० पुरून ठेवलेला गंगारूप ठेवा. ११ इच्छा. १२ चांगुलपणा. १३ अनुभव. १४ काम, क्रोध व लोभ हा त्रिविधतापरूपी मळ. १५ स्थान. १६ ज्ञानवल्ली.

॥ ८३ ॥ सेविली अमृतसरिता । रोगु दवडूनि पंडुसुता । अमरपण उचितां । देऊनि घाली ॥८४॥ तैसी गीता हे जाणितलीया । काय विस्मयो मोह जावया । परि आत्मज्ञानें आपणपयां । मिळिजे येथ ॥ ८५ ॥ ( ८७२. कृतकृत्यता, ५८६-५८८ ) जया आत्मज्ञानाच्या ठायीं । कर्म आपलेया जीविता पाहीं । होऊनियां उतराई । लया जाय ॥ ८६ ॥ हरपलें दावूनि जैसा । माग सरे वीरविलासा । ज्ञानचि कळस चळघे तैसा । कर्मप्रासादाचा ॥ ८७ ॥ म्हणौनि ज्ञानिया पुरुषा । कृत्य करूं सरलें देखा । ऐसा अनाथाचा सखा । बोलिला तो ॥ ८८ ॥ उपसंहारः—( ८७३. गीताशास्त्र व्यासकृपेनें संजयाला प्राप्त, ५८९ ) तें श्रीकृष्णवचनामृत । पार्थी भरोनि असे वोसंडत । मग व्यासकृपा प्राप्त । संजयासी ॥ ८९ ॥ ( ८७४. संजय धृतराष्ट्राला गीताशास्त्र पाजतो; व तोही अवसरीं कृतकृत्य होतो; काव्यप्रतिभा, ५९०-५९३ ) तो धृतराष्ट्र राया । सूतसें पान करावया । म्हणौनि जीविता तया । नोहेचि भारी ॥ ५९० ॥ येऱ्हवीं गीताश्रवण-अवसरीं । आवडों लागतां अनधिकारी । परि सेखीं तेंचि उंजरी । पातली भली ॥ ९१ ॥ जेव्हां द्राक्षीं दूध घातलें । तेव्हां वायां गेलें गमलें । परि फळपाकीं दुणावलें । देखिजे जेवीं ॥ ९२ ॥ तैसीं श्रीहरिवक्त्रींचीं अक्षरें । संजयें सांगितलीं आदरें । तिहीं अंधु तोही अवसरें । सुखिया जाला ॥ ९३ ॥ ( ८७५. गीताशास्त्र ओबडधोबड मराठी भाषेंत सांगितलें तें संतांनीं मानलें; काव्यप्रतिभा, ५९४-५९८ ) तेंचि मऱ्हाटेनि विन्यांसें । मियां उन्मेषें ठसेंठोंवसें । जी जाणें नेणें तैसें । निरोपिलें ॥ ९४ ॥ सेवंतीये अरसिकांहीं । आंग पाहतां विशेषु नाहीं । परि सौरभ्य नेलें तिहीं । भ्रमरीं जाणिजे ॥ ९५ ॥ तैसें घडतें प्रमेय घेइजे । उणें तें मज देइजे । जें नेणणें हेंचि सहजें । रूप कीं बाळा ॥९६॥ तरि नेणतें जऱ्ही होये । तऱ्ही देखोनि बाप कीं माये । हर्षे केंही न समाये । चोज करिती ॥ ९७ ॥ तैसें संत माहेर माझें । तुम्हीं मिनलियां मी लाडें जें । तेंचि ग्रंथाचेनि व्याजें । जाणिजो जी ॥९८॥ ( ८७६. वाक्यपूजा निवृत्तिनाथ अवधारोत; काव्य, ५९९ ) आतां विश्वात्मकु हा माझा । स्वामी श्रीनिवृत्तिराजा । तो अवधारू वाक्यपूजा । ज्ञानदेवो म्हणे ॥ ५९९ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥
श्लोक २०, ओंव्या ५९९.

---

१ देवालयाचा. २ देत असे. ३ सहज. ४ उत्कर्ष. ५ परिणामीं. ६ निरूपणानें. ७ ओबडधोबड. ८ मिळाल्यामुळें. ९ प्रेम उत्पन्न झालें.

काय सांगावें ? गीता ही केवळ माझी ज्ञानवल्ली आहे; व तिला जो जाणतो, तो या सर्व मोहापासून मुक्त होतो. ८३ हे पांडुसुता, ज्याप्रमाणें अमृतरूपी नदीचें पाणी प्याल्यावर रोग नाहींसा होऊन अमरपण प्राप्त होतें, व तो दोषमुक्त होतो, ८४ त्याप्रमाणें गीता पूर्णपणें समजल्यावर मोहाचा नाश होतो यांत आश्चर्य तें काय ? परंतु आत्मज्ञानाच्या प्राप्तीनें आत्मस्वरूपाशीं ऐक्य होतें. ८५ जें आत्मज्ञान प्राप्त झालें असतां कर्मच आपोआप निष्कर्म होतें, व तें ज्ञानाचें उतराई होऊन लय पावतें; ८६ हे वीरविलासा अर्जुना, ज्याप्रमाणें हरवलेली जिन्नस सांपडल्यावर, त्या जिनसेचा माग काढावयाचें काम संपतें, त्याप्रमाणें ज्ञानप्राप्ति झाली म्हणजे कर्मरूपी देवालयाचा कळस होतो. ८७ म्हणून, ज्ञान प्राप्त झालेल्या पुरुषांचीं कर्में आपोआप राहतात. अनाथाचा सखा जो श्रीकृष्ण भगवान तो याप्रमाणें बोलला. ८८ असें जें श्रीकृष्णवदनांतील अमृतरूपी भाषण पार्थाचे मनांत ठसून वर-उतूं आलें, तेंच व्यासांच्या कृपेनें संजयास प्राप्त झालें. ८९ तें अमृत धृतराष्ट्र राजास प्यावयास दिलें, तरी हें योग्यतेचें आहे असें त्याला वाटलें नाहीं. ५९० एरवीं, अनधिकारी मनुष्यास सहज गीताश्रवण झाले तरी त्याचा शेवट गोड होतो. ९१ द्राक्षाचे वेलास पाण्याचे ऐवजीं दूध घालते वेळी तें ज्याप्रमाणें व्यर्थ गेलेंसें वाटतें, परंतु तेच त्या वेलास द्राक्षांचे घोंस आले म्हणजे परिणाम गोड होतो, ९२ त्याप्रमाणें, श्रीहरीच्या मुखांतील अक्षरें संजयानें अति आदरानें धृतराष्ट्रास सांगितल्यावर कांहीं काळानें तोही सुखी झाला. ९३ तींच अक्षरें मी ओबडधोबड मराठी भाषेंत, ज्याप्रमाणें मला समजलीं त्याप्रमाणें सांगितलीं. ९४ अरसिक मनुष्यानें सेवंतीच्या झाडास हात लावला असतां कांटे बोंचतात, परंतु जो जाणता आहे तो भ्रमराप्रमाणें सेवंतीच्या फुलांतील सुगंध घेतो, ९५ त्याप्रमाणें, माझ्या बोलण्यांत जे योग्य सिद्धांत असतील तेच आपण घ्यावे, व उणे असतील ते टाकून द्यावे; कारण लहान बाळाला कांहीं न समजणें हेंच त्याचें ज्ञान होय. ९६ परंतु नेणतें जरी बाळ असलें, तरी त्याचें तें अज्ञान पाहून आईबापांस अति हर्ष होऊन ते कौतुक मानितात. ९७ त्याचप्रमाणें तुम्ही संत माझे आईबाप आहां, व तुमच्या दर्शनानेंच मला प्रेम उत्पन्न झालें आहे; तर या ग्रंथाचे निमित्तानें ग्रंथ गोड मानून माझे लाड पुरवा. ९८ ज्ञानदेव म्हणतातः--आता, विश्वव्यापक असे जे माझे गुरु श्रीनिवृत्तिनाथ, ते ही माझी वाक्यरूपी पूजा सेवन करोत. ५९९

अध्याय १५, ओंव्या ५९९.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सोळावा.

(८७७. सूर्यरूपकानें सद्गुरूंस नमस्कार, १-१७) मावळवीत विश्वाभासु । नवल उदयला चंडांशु[1] । अद्वयाब्जिनीविकासु[2] । वंदूं आता ॥ १ ॥ जो अविद्याराती[3] रुसोनियां । गिळी ज्ञानाज्ञान चांदाणिया । जो सुदिनु करी ज्ञानियां । स्वबोधाचा[4] ॥ २ ॥ जेणें विवळतिये[5] सवळे । लाहोनि[6] आत्मज्ञानाचे डोळे । सांडिती[7] देहाहंतेचीं अविसाळें । जीवपक्षी ॥ ३ ॥ लिंगदेह[8] कमळाचा । पोटीं वेंचु[9] तया चिद्भ्रमराचें[10] । [11]वंदी मोक्षु[12] जयाचा । उदैलें[13] होय ॥ ४ ॥ शब्दाचिया औसकडीं[14] । भेदनदीच्या दोहीं थडीं । आरडत विरहवेडीं[15] । बुद्धिबोधु[16] ॥ ५ ॥ तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें[17] समाधान । भोगवी जो चिद्गगन[18] । भुवनदिवा[19] ॥ ६ ॥ जेणें पाहालिये पाहांटें । भेदाची चोर वेळ फिटे । रिघती आत्मानुभव-वाटे । पांथिकें[20] योगी ॥ ७ ॥ जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेख-सूर्यकांत फुणगे । दीपले जाळिती दांगें[21] । संसाराचीं ॥ ८ ॥ जयाचा रश्मिपुंजु निबरु[22] । होतां स्वरूप-उखरीं स्थिरु । ये महासिद्धीचा पूरु । मृगजळ तें ॥ ९ ॥ जो प्रत्यग्बोधाचिया माथया । सोहंतेचा माध्यान्हीं आलिया । लपे आत्मभ्रांति[23] छाया । आपणपां तळीं ॥ १० ॥ ते वेळीं विश्वस्वप्नासहितें । कोण अन्यथामति[24] निद्रेतें । सामाळी तुरेचि जेथें । मायाराती ॥ ११ ॥ म्हणौनि अद्वयबोधपाटणीं[25] । तेथ महानंदाची दाटणी । मग सुखानुभूतीचीं घेणीं देणीं । मंदावों लागती ॥ १२ ॥ किंबहुना ऐसेसें । मुक्तकैवल्य[26]-सुदिवसें । सदा लाहिजे कां प्रकाशें । जयाचेनि ॥ १३ ॥ जो निजधामव्योमींचा रावो । उदैलाचि उदैजतखेंवो । फेडी पूर्वादि दिशांसि ठावो । उदोअस्तूचा ॥ १४ ॥ नें[27] दिसणें दिसणेंनसीं मावळवी । दोहीं झांकिलें तें[28] सैंघ पोलवी । काय बहु बोलों ते आघवी । उखाचि आनी ॥ १५ ॥

---

१ सूर्य. २ अद्वैतरूप कमलाला उमलविणारा. ३ अज्ञानरूप रात्रीचा नाश करून. ४ आत्मबोधाचा. ५ उजाडल्यावर होणाऱ्या प्रातःकालीं. ६ प्राप्त होऊन. ७ घरटीं. ८ वासनात्मक सूक्ष्म देह. ९ मरण. १० जीवचैतन्यरूपी भ्रमराचा. ११ बंधन झालें असता. १२ सुटका. १३ उदयानें. १४ आशेनें. १५ वियोग. १६ बुद्धि=चक्रवाकी, ज्ञान=चक्रवाक पक्षी. १७ ऐक्याचें. १८ ब्रह्मरूप आकाश. १९ सूर्योदय. २० पांथस्थ. २१ वनें. २२ प्रखर. २३ देहात्मभाव. २४ विपरीत ज्ञान. २५ नगरांत. २६ समाधिसुखरूप. २७ ज्ञान-अज्ञानासह. २८ आत्मज्ञान. २९ प्रकटवी.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सोळावा.

( श्रीसद्गुरूला सूर्याची उपमा देऊन ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात:—) जगाचा भास नाहींसा करणारा व अद्वैतरूप कमलाला उमलविणारा असा चमत्कारिक सूर्योदय झाला आहे, त्याला माझा नमस्कार असो. १ जो सूर्य उगवल्यामुळें अज्ञानरूप रात्रीचा नाश करून व ज्ञानाज्ञानरूपी चांदण्या नाहींतशा करून ज्ञानी लोकांस आत्मबोधाचा सुदिन करतो; २ जो सूर्य उगवल्यामुळें आत्मज्ञानाचा प्रकाश होऊन जीवरूप पक्षी देहाभिमानरूप घरटीं सोडून जातात; ३ ( वासनात्मक ) सूक्ष्मदेहरूपी कमलांत जीवचैतन्यरूपी भ्रमर जो अडकलेला असतो, तो ज्या सूर्याच्या उगवण्यामुळें बाहेर पडतो, ४ शास्त्रादिकाच्या शब्दरूप अडचणीमध्यें सांपडतांच अज्ञानरूप सायंकाळ झाल्यामुळें ज्या बुद्धि व ज्ञान या चक्रवाक पक्ष्यांच्या जोड्याची फुटाफूट होऊन तीं उभयतां जीवेश्वरभेदरूप नदीच्या दोन्ही कांठांवर वियोगदु:खानें ओरडत असतात, ५ त्या बुद्धिबोधरूपी चक्रवाक पक्ष्यांचें जोडपें ब्रह्मरूप आकाशांत ह्या सूर्योदयाच्या प्रकाशामुळें एकत्र होऊन समाधान पावतें. ६ ज्या सूर्याचा उदय झाल्यावर भेदरूपी चोरांची भीति नाहींशी होऊन योगी हेच पाथस्थ आत्मानुभवरूप वाट चालावयास लागतात; ७ ज्या सूर्याच्या विवेकरूपी किरणानें ज्ञानरूपी सूर्यकांत प्रदीप्त होऊन संसाररूपी वनें जाळून टाकतो; ८ ज्या सूर्याच्या प्रखर किरणांनीं आत्मस्वरूपी माळजमीनीवर मृगजळाप्रमाणें महासिद्धींचा पूर आलेला दिसतो; ९ जो आत्मबोधाच्या माथ्यावर सोऽहंरूपी मध्यान्हाच्या वेळीं आल्यामुळें देहात्मभावाची म्हणजे ' मी देह आहें ' ही भ्रांतीची छाया पायांखालींच पडते. १० त्या वेळेस मायारूपी रात्र नाहींशी झाल्यामुळें विश्वरूपी स्वप्नासह विपरीत ज्ञानरूपी निद्रेची आठवण कोठून राहणार ? ११ म्हणून अद्वयबोधरूपी नगरांत महानंदाची गर्दी होऊन आनंदानुभवाची देवघेव स्वस्थपणें चालते. १२ किंबहुना याप्रमाणें समाधिसुखरूपी सुदिन नेहमीं ज्या सूर्याच्या तेजामुळें प्रकाशित होतो; १३ जो सूर्य आत्मस्वरूपी आकाशाचा राजा असून नेहमीं बोधाचा उदय करणारा आहे, तो पूर्वादि दिशांसह उदय व अस्त यांचें अस्तित्व नाहींसें करतो; १४ ज्ञानासकट अज्ञान नाहींसें करून, शेवटीं ज्ञानाचाही लोप करून आत्मज्ञानाचा उजेड करितो. फार काय सांगावें ! तो सर्वेंग प्रात:कालाप्रमाणें सुख देतो. १५ ज्या सूर्याच्या तेजापुढें दिवस व रात्र यांचा भास होत नसून जो दुसऱ्या प्रकाशाशिवाय स्वयंप्रकाशित असतो; १६ असे चैतन्यरूपी सूर्य जे

तो अहोरात्रांचा पैलकडू । कोणें देखावा ज्ञानमार्तंडु[1] । जो प्रकाश्येंवीण सुरवाडु । प्रकाशाचा ॥ १६ ॥ तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती । आतां नमो म्हणों पुढतपुढती । जे बाधकें येइजतसे स्तुति । बोलाचिया ॥ १७ ॥ ( ८७८. सूर्यरूपकानें वर्णन केल्याची क्षमा मागतात, १८–२९ ) देवाचें माहिमान पाहोनियां । स्तुति तरि येइजे चांगावया । जरि स्तव्यबुद्धीसी लया । जाइजे का ॥ १८ ॥ जो सर्वनेणिवां जाणिजे । मौनाचिया मिठिया वानिजे । कांहींच न होनि आणिजे । आपणपयां जो ॥ १९ ॥ तया तुझिया उद्देशासाठीं । पश्यंती मध्यमा पोटीं । सूनि परेसीही पाठीं । वैखरी विरे ॥ २० ॥ तया तूतें मी सेवकपणें । लेववीं बोलकेया स्तोत्राचें लेणें । हें उपसाहावेंही म्हणतां उणें । अद्वयानंदा ॥ २१ ॥ परि रंकें अमृताचा सागरु । देखिलिया पडे उचिताचा विसरु । मग करूं धांवे पाहुणेरु । शाकांचा तया ॥ २२ ॥ तेथ शाकुही कीर बहुत म्हणावा । तयाचा हर्षवेगुचि तो घ्यावा । उँजळोनि दिव्यतेजा हातिवा । ते भक्तीचि पाहावी ॥ २३ ॥ बाळा उचित जाणणें होये । तरि ब्राळपणचि कें आहे । परि साचचि येरी माये । म्हणोनि तोपे ॥ २४ ॥ हा गा गांवरसें भरलें । पाणी पाठीं पाय देत आलें । तें गंगा काय म्हणितलें । परतें सर ॥ २५ ॥ जी भृगूचा कैसा अपकारु । कीं तो मानूनि प्रियोपचारु । तोपेचिना शाङ्गंधरु । गुरुत्वासी ॥ २६ ॥ कीं आंधारें खतेलें अंबरें । झालेया दिवसनाथासमोर । तेणें तयातें पऱ्हां[11] सर । म्हणितलें काई ॥ २७ ॥ तेविं भेदबुद्धीचिये तुळे । घालूनि सूर्यश्लेषाचें कांटोळें । तुकिलासि तें येकी वेळे । उपसाहिजो जी ॥ २८ ॥ जिहीं[15] ध्यानाचा डोळां पाहिलासी । वेदादि वाचां वानिलासी । जें उपसाहिलें तयांसी । तें आम्हांही करीं ॥ २९ ॥ ( ८७९. गुरु-प्रसादानें मी गीतार्थ वर्णन करीनच, गुरु क्षमा करोत वा न करोत, ३०-४० ) परि मी आजि तुझ्या गुणीं । लाचावलों अपराधु न गणीं । भैलतें करीं परी अर्धेणीं । तुटीं कदा ॥३०॥ मिया गीता येणें नांवें । तुझें पसायामृत सुहावें । वानूं लाधलों तें दुणेन थावें । दैवलों दैवें ॥ ३१ ॥ माझिया सत्यवादाचें तप । वाचा केलें बहुत कल्प । तया फळाचें हें महाद्वीप । पातली प्रभु ॥ ३२ ॥ पुण्यें[22] पोशिलीं असाधारणें । तियें तुझे गुण वानणें । देवूनि मज उत्तीर्णें[23] । जालीं आजी ॥३३॥ जी जीवित्वाच्यॆ आडवीं । आतुडलों होतों मरणगांवीं । ते अवदसाचि आघवी ।

१ चैतन्यरूपी सूर्यास. २ शोभत नाहीं. ३ लावून. ४ सूर्याला. ५ काडघातीनें. ६ नाल्याचे पाण्यानें. ७ अन्याय. ८ गुरुप्रसादाला. ९ भरले. १०.जग, आकाश. ११ पलीकडे हो. १२ तराजूंत. १३ उपमेचें; बरोबरीचें. १४ पारड्यात. १५ ज्या योग्यांनीं. १६ सवकलों; प्रवृत्त झालों. १७ पाहिजे तें. १८ अर्धपोटीं. १९ प्रसादामृत. २० आवडीनें. २१ दैववान झालों. २२ आचरिलीं. २३ उतराई. २४ देहसंबंधाच्या.

निवृत्तिमहाराज, त्यांना वारंवार माझा नमस्कार असो. (श्रीज्ञानेश्वरमहाराज आणखी म्हणतात). त्यांची वाणीनें स्तुति करणें शोभत नाहीं. १७ ज्या वेळेस स्तुति करणारा, स्तोत्र व स्तुत्य ही त्रिपुटी नाहींशी होते, तेव्हांच देवाच्या योग्यतेचे मानानें खरी स्तुति होते. १८ सर्व वस्तूंचें ज्ञान नाहींसें होणें हेंच ज्याला जाणणें होय, व मौन धरून कांहींएक वर्णन न करणें हेंच ज्याचें वर्णन करणें होय; आणि जेव्हां आपलेपणाची आठवण नाहींशी होते त्या वेळेस ज्याची प्राप्ति होते, १९ त्या तुमची स्तुति करण्याकरितां पश्यंती व मध्यमा ह्या परेसह वैखरीस पाठी घालून लय पावतात. २० त्या तुम्हांला, हें अद्वयानंदरूपी गुरो, मी सेवक या नात्यानें स्तुतिरूप अलंकार घालतों. हें घालणें जरी आपल्या योग्यतेच्या मानानें कमी आहे, तरी त्याचा आपण स्वीकार करावा. २१ एखाद्या दरिद्र्यानें अमृताचा सिंधु पाहिल्यावर त्याच्या योग्यतेनुसार त्याचा काय पाहुणचार करावा ह्याचें भान न राहून तो जसा भाजीपाल्याचीच मेजवानी करतो; २२ त्या ठिकाणीं, भाजीपाला हेंच पक्वान्न समजून त्याची पाहुणचार करण्याची पूर्ण इच्छा तीच विशेष मानली पाहिजे. अथवा सूर्याला काडवातीनें त्याच्या दिव्य तेजापुढें कोणीं ओंवाळूं लागला असतां, त्या ठिकाणीं काडवातीच्या उजेडाचा कमीपणा मनांत न आणतां त्याची भक्तिच विशेष मानली पाहिजे. २३ लहान बालकाला योग्य व अयोग्य हें जर समजलें, तर मग बाळपण तें काय? म्हणून, त्याच्या कृत्याचेंच मातुश्री कौतुक मानून संतोष पावते. २४ असें पहा—नाल्याच्या पाण्याचे लोट गंगेच्या पायावर पाय देऊन आंत घुसले, तर ती त्याला नको येऊं किंवा परत जा असें म्हणते का? २५ भृगु ऋषींनीं हृदयावर लाथ मारली हा खरोखर पाहूं गेलें असतां केवढा अन्याय त्यांनीं केला? परंतु उलटा तोच प्रेमानें अलंकार समजून शार्ङ्गधरांनीं आपल्या हृदयावर गुरुप्रसाद म्हणून श्रीवत्सलांच्छन चिन्ह बाळगलें! २६ किंवा अंधारानें भरलेलें जग सूर्योदय झाल्याबरोबर उजेडानें भरतें, त्या वेळेस सूर्यानें अंधेरास 'मागें सर' म्हणून म्हटलें आहे का? २७ त्याचप्रमाणें, तुमच्या ठिकाणीं भेदबुद्धीची तराजू करून तुम्हाला सूर्याबरोबर पारड्यांत घालून तुलना केली, ह्या माझे हातून घडलेल्या अपराधाची गुरो, आपण क्षमा करा. २८ योग्यानीं ध्यान करून तुमची प्राप्ति करून घेतली, व वेदांनीं आपल्या वाचेनें तुमचे वर्णन केलें, ह्या गोष्टी जशा तुम्हीं सहन केल्या, त्याप्रमाणें, मीं जी तुमची तुलना केली, त्याची क्षमा करा. २९ परंतु तुमचे गुणानुवाद वर्णन करण्यास प्रवृत्त झालों आहें, तर तो माझा अपराध न समजतां, काय पाहिजे तें करा, परंतु मी अर्धपोटीं उठणार नाहीं. ३० मी गीतारूप प्रसादामृताचें आवडीनें वर्णन करूं लागलों, तों तुमच्या कृपेनें मला दुप्पट बळ आलें. ३१ प्रभो, माझ्या वाचेनें अनंत जन्मीं सत्यभाषणरूप तप केलें. त्याचें फळ हें गीतानामक महाद्वीप मला मिळालें. ३२ मीं आजपर्यंत जी बहुत पुण्याई केली, तिनें तुमचे गुणानुवाद वर्णन करणें हेंच फळ मला देऊन ती माझी उतराई झाली. ३३ मी देहसंबंधाच्या अरण्यांत—जेथें

फेडिली आजी ॥ ३४ ॥ जे गीता येणें नांवें नावाणिगी । जे अविद्या जिणोनि दांटुगी । ते कीर्ति तुझी आम्हांजोगी । वानावया जाली ॥ ३५ ॥ पैं निर्धना घरीं वानिवसें । महालक्ष्मी येऊनि वैसे । तयातें निर्धन ऐसें । म्हणों ये काई ॥ ३६ ॥ का अंधकाराचिया ठाया । दैवें सूर्यु आलिया । तो अंधारुचि जगा यया । प्रकाशु नोहे ॥ ३७ ॥ जया देवाची पाहतां थोरी । विश्व परमाणुही दशा न धरी । तो भावाचिये सरोभरी । नव्हेचि काई ॥ ३८ ॥ तैसा मी गीता वाखाणीं । हे खपुष्पाची तुरंवेणी । परि समर्थे तुवां शिंयाणी । फेडिली ते ॥ ३९ ॥ म्हणौनि तुझेनि प्रसादें । मी गीतापद्यें अगाधें । निरूपीन जी विशदें । ज्ञानदेवो म्हणे ॥४०॥ अध्यायसंगतिः—( ८८०. पंधराव्या अध्यायाचा अनुवाद, ४१-५१ ) तरि अध्यायीं पंधरावां । श्रीकृष्णें तया पांडवा । शास्त्रसिद्धांतु आघवा । उगाणिला ॥ ४१ ॥ जे वृक्षरूपक परिभाषा । केलें उपाधिरूप अशेषा । सद्वैद्यें जैसें दोषा । अंगलीनीं ॥ ४२ ॥ आणि कूटस्थ जो अक्षरु । दाविला पुरुषप्रकारु । तेणें उपहिताहि आकारु । चैतन्य केला ॥ ४३ ॥ पाठीं उत्तम पुरुष । शब्दाचें करूनि मिष । दाविलें चोख । आत्मतत्त्व ॥ ४४ ॥ आत्मविषयीं आंतुवट । साधन जें आंगदट । ज्ञान हेंही स्पष्ट । चावळेंला ॥ ४५ ॥ म्हणौनि इये अध्यायीं । निरूप्य तुरेचि कांहीं । आतां गुरुशिष्यां दोहीं । स्नेहो लाहणें ॥ ४६ ॥ एवं इयेविषयीं कीर । जाणते बुझावले अपार । परि मुमुक्षु इतर । साकांक्ष जाले ॥ ४७ ॥ त्या मज पुरुषोत्तमा । ज्ञानें भेटे जो सुवर्मा । तो सर्वज्ञु तोचि सीमा । भक्तीचीही ॥ ४८ ॥ ऐसें हें त्रैलोक्यनायकें । बोलिलें अध्यायांतश्लोकें । तेथें ज्ञानाचि बहुतेकें । वानिलें तोषें ॥ ४९ ॥ भरूनि प्रपंचाचा घोंटु । कीजे देखताचि देखतया द्रंष्टु । आनंद-साम्राज्यीं पाटु । बांधिजे जीवा ॥ ५० ॥ येवढेया लाठेपणाचा उपावो । आनु नाहींचि म्हणे देवो । हा सम्यक ज्ञानाचा रावो । उपायांमाजि ॥ ५१ ॥ ( ८८१. सोळाव्या अध्यायाचा हेतु; जिज्ञासूंची चिंता, ५२—५७ ) ऐसे आत्मजिज्ञासु जे होते । तिहीं तोषलेनि चित्तें । आदरें तया ज्ञानातें । वोवाळिलें जीवें ॥ ५२ ॥ आतां आवडी जेथ पडे । तयाची अवसरी पुढें पुढें । रिगों लागे हें घडे । प्रेम ऐसें ॥ ५३ ॥ म्हणौनि जिज्ञासूंच्या पैकीं । ज्ञानी प्रतीति होय ना जंव निकी । तंव योगें-क्षेमु ज्ञानविखीं । स्फुरेलचि कीं ॥ ५४ ॥ म्हणौनि तेंचि सम्यक् ज्ञान । कैसेनि होय स्वाधीन । जालिया वृद्धियत्न । घडेल केवीं ॥ ५५ ॥ कां उपजोंचि

१ प्रसिद्ध. २ बलवान. ३ अकस्मात्. ४ भरांत. ५ वास घेणें. ६ हौस. ७ स्पष्ट. ८ सांगितला. ९ झाला. १० अंगांत मुरलेल्या. ११ जीवात्मा. १२ अविनाशी. १३ उपाधीला. १४ अंतरंग. १५ बळकट. १६ स्पष्ट करून सांगितलें. १७ सांगायचें तें. १८ प्राप्त झाला. १९ मर्मज्ञ. २० ब्रह्मरूप. २१ यथार्थ; अपरोक्ष. २२ आत्मज्ञानप्राप्तीची इच्छा करणारे. २३ विचार.

जन्ममरण घ्यावें लागतें, तेथें सांपडलों होतों, ती सर्व माझी पीडा आज दूर झाली. ३४ जी 'गीता' या नांवानें प्रसिद्ध आहे, व अविद्येचा नाश करून बळवान झाली आहे, ती तुमची कीर्ति आम्हीं वर्णन करण्यासारखी आहे. ३५ दरिद्र्याचे घरीं अकस्मात् महालक्ष्मी आली, तर त्याला दरिद्री म्हणतां येईल काय? ३६ अथवा अंधकाराच्या घरीं दैवयोगानें सूर्य पाहुणा आला, तर तोच अंधकार जगाला प्रकाशमय होत नाहीं का? ३७ ज्या ईश्वराच्या योग्यतेपुढें जग हें परमाणूएवढेंही दिसत नाहीं, तो ईश्वर, भक्तीनें पाहिजे तें रूप धारण करीत नाहीं काय? ३८ त्याप्रमाणें, माझें गीतेचें व्याख्यान म्हणजे आकाशाच्या पुष्पाचा वास ( अघटित करणी ) होय; परंतु आपण समर्थ असल्यामुळें माझी हौस पूर्ण केली. ३९ म्हणून, ज्ञानदेव म्हणतात, तुमच्या प्रसादानें गीतेंतील सर्व श्लोकांचा अर्थ मी स्पष्ट सांगेन. ४० तरी पंधराव्या अध्यायांत श्रीकृष्णानीं अर्जुनास सर्व शास्त्रसिद्धांत स्पष्ट करून सांगितला. ४१ ज्याप्रमाणें अंगांत मुरलेल्या रोगाची उत्तम वैद्यानें चिकित्सा करून निदान ठरवावें, त्याप्रमाणें, ब्रह्म हें मायेच्या उपाधीनें जगद्रूप धारण करतें, त्याची वृक्षाबरोबर तुलना केली, ४२ आणि अविनाशी असा जो देहांतील जीवात्मा तो पुरुष या शब्दानें स्पष्ट करून सांगितला. त्यानें चैतन्याला मायेच्या उपाधीनें आकारास आणलें. ४३ नंतर, केवळ शुद्ध जें आत्मतत्त्व ( ब्रह्म ), त्याला उत्तम पुरुष या शब्दानें स्पष्ट केलें. ४४ आत्मप्राप्तीकरितां बळकट साधन जें ज्ञान, तेंही स्पष्ट करून सांगितलें. म्हणून या अध्यायांत निरूपण करण्याचें कांहींच उरलें नाहीं. ४५ परंतु गुरु व शिष्य यांच्या स्नेहातिशयामुळें बोललेलीच गोष्ट पुन बोलण्यांत येते. ४६ याप्रमाणें, पंधराव्या अध्यायांत सांगितलेल्या सर्व गोष्टी ज्ञान्याना पूर्ण रीतीनें समजल्या, परंतु इतर जे मुमुक्षु होते त्यांची शंका निवारण झाली नाहीं. ४७ 'असा जो मी पुरुषोत्तम, त्याला जो मर्मज्ञ ज्ञानाची प्राप्ति करून घेऊन भेटतो, तो सर्वज्ञ व तोच माझा खरा भक्त होय.' ४८ असें त्रैलोक्यनायक भगवान श्रीकृष्णानीं पंधराव्या अध्यायाच्या शेवटल्या श्लोकांत परम संतोषानें ज्ञानाचें विशेष वर्णन केलें आहे. ४९ संसाराचा घोट घेऊन ब्रह्माचें दर्शन होण्याबरोबर पहाणारा ब्रह्मरूप होऊन जीवाला आनंदरूपी राज्याचा पट्टाभिषेक होतो, ५० असा ब्रह्मप्राप्तीचा दुसरा बळवत्तर उपाय नाहीं, व सर्व उपायांत यथार्थ ज्ञान हा राजा आहे, असें श्रीकृष्ण म्हणाले. ५१ याप्रमाणें, आत्मज्ञानप्राप्तीची इच्छा करणारे जे होते त्यांना संतोष होऊन त्यांनीं आपले प्राण ज्ञानावरून ओंवाळून टाकले. ५२ आतां, ज्याबद्दल आवड उत्पन्न होते, त्या वस्तूबद्दल अधिकाधिकच विचार उत्पन्न होतात असें प्रेमाचें लक्षणच आहे. ५३ म्हणून, जिज्ञासूंपैकीं ज्याना केवळ ज्ञानाचा अनुभव नव्हता, त्याना, ज्ञान प्राप्त करून घेऊन त्याचें रक्षण कसें करावें अशी काळजी उत्पन्न झाली. ५४ म्हणून, तेंच अपरोक्ष ज्ञान आपल्यास कसें प्राप्त होईल; व पुढें कसें वृद्धिंगत होईल; ५५ किंवा जें

२४ अनुभव. २५ अप्राप्ताची प्राप्ति. २६ प्राप्ताचें रक्षण.

जें न लाहे । जें उपजलेंही अव्हाटा सूये । तें ज्ञानीं विरुद्ध काय आहे । हें जाणावें कीं ॥ ५६ ॥ मग जाणतंया जें विरूं । तयाची वाट वाहती करूं । ज्ञाना हित तेंचि विचारूं । सर्वभावें ॥ ५७ ॥ ( ८८२. जिज्ञासूंच्या चिंतेचें निवारण, ५८-६४ ) ऐसा ज्ञानजिज्ञासु तुम्हीं समस्तीं । भावो जो धरिला असे चित्तीं । तो पुरवावया लक्ष्मीपति । बोलिजेल ॥ ५८ ॥ ज्ञानासि सुजन्म जोडे । आपली विश्रांतिही वरी वाढे । ते संपत्तीचे पवाडे । सांगिजेल दैवी[४] ॥ ५९ ॥ आणि ज्ञानाचेनि कामोकारें । जे रागद्वेषांसि दे थारे । तिये आसुरियेहि घोरें । करील रूप ॥ ६० ॥ सहज इष्टानिष्ट करणी । दोघीचि इया कवतुकिणी । हें नवमाध्यायीं उभारणी । केली होती ॥ ६१ ॥ तेथ साउंमा घेयावया उवावो । तंव वोडवला आन प्रस्तावो । तरी तया प्रसंगें आतां देवो । निरूपीत असे ॥ ६२ ॥ तया निरूपणाचेनि नांवें । अध्याय पद सोळावें । लेंवणी पाहतां जाणावें । मागिलावरी ॥ ६३ ॥ परि हें असो आतां प्रस्तुतीं । ज्ञानाच्या हिताहितीं । समर्था संपत्ति । इयाचि दोन्ही ॥ ६४ ॥ ( ८८३. दैवी संपत्तीचें स्वरूप; काव्यप्रतिभा, ६५–६७ ) जे मुमुक्षुमार्गींची बोळींवी । जे मोहरात्रीची धर्मदिवी । ते आधीं तंव दैवी । संपत्ति ऐका ॥ ६५ ॥ जेथ एक एकातें पोखी । ऐसें बहुत पदार्थ येकीं[१३] । संपादिजती ते लोकीं । संपत्ति म्हणिजे ॥ ६६ ॥ ते दैवी सुखसंभवी । तेथ दैवगुणें एकोपजीवी । जाली म्हणौनि दैवी । संपत्ति हे ॥ ६७ ॥

अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥

अन्वयः—अभयं, सत्त्वसंशुद्धिः, ज्ञानयोगव्यवस्थितिः, दानं च दमः च यज्ञः स्वाध्यायः, तपः, आर्जवम् ॥ १ ॥

( ८८४. अभय, ६८-७३ ) आतां तयाचि दैवगुणा- । माजि धुरेचा बैसणा । बैसे तया आकर्णा । अभय ऐसें ॥६८॥ तरि न घोळूनि महापुरीं । न घेपे बुडणयाची शियारी । कां रोगु न गणिजे घरीं । पथ्याचिया ॥ ६९ ॥ तैसा कर्माकर्मांचिया मोहेरा । उठूं नेदूनि अहंकारा । संसाराचा दरारा । सांडणें येणें ॥ ७० ॥ अथवा ऐक्यभावाचेनि पैसें[११] । दुजें मानूनि आत्मा ऐसें । भयवार्ता देशें । दवडणें जें ॥ ७१ ॥ पाणी बुडऊं ये मिठातें । तंव मीठचि पाणी आतें । तेविं आपण जालेनि अद्वैतें । नाशे भय ॥ ७२ ॥ अगा अभय येणें नांवें । बोलिजे तें हें जाणावें । सम्यग्ज्ञानाचें आघवें । धांवणें हें ॥ ७३ ॥ ( ८८५. सत्त्वशुद्धि, ७४-८० ) आतां सत्त्वशुद्धि जे म्हणिजे । ते ऐशा चिन्हीं जाणिजे ।

१ ज्ञानाला. २ विरुद्ध. ३ स्वरूपाची प्राप्ति. ४ दैवी संपत्ति. ५ नाश करणें. ६ आसुरी संपत्ति ७ सगळा. ८ विचार. ९ प्रसंग. १० संबंध. ११ शोवत करणारी. १२ धर्मरूप मशाल.

ज्ञान प्राप्त न व्हावें, व प्राप्त झालें असतांही आडमार्गास लावावें अशी ज्ञानास विघ्न करणारी कोणती गोष्ट आहे ती समजावी. ५६ मग ज्ञानप्राप्तीच्या विरुद्ध अशी जी गोष्ट असेल ती सोडून देऊन ज्ञानप्राप्तीस हितकर अशी कोणती गोष्ट आहे ती मनोभावानें विचारावी; ५७ याप्रमाणें, ज्ञानप्राप्तीची इच्छा करणाऱ्या तुम्हीं जी मनांत शंका आणली आहे, तिचें निवारण करण्याकरितां श्रीकृष्ण उपाय सांगतील; ५८ ज्ञानाची उत्तम वेळेवर प्राप्ति होऊन त्याचे योगानें स्वरूपाची प्राप्ति होईल अशी जी दैवी संपत्ति, तिचें वर्णन करतील; ५९ आणि ज्या आसुरी संपत्तीमुळें रागद्वेषांस थारा मिळून ज्ञानाचा नाश होतो तिचेंही वर्णन करतील. ६० अशी दैवी व आसुरी संपत्ति, ज्यांचे योगानें इष्ट व अनिष्ट कृत्यें घडतात, तें सांगण्याची नवव्या अध्यायांत सुरवात केली होती. ६१ त्या वेळेस सगळा विचार करावयाचा होता,' परंतु दुसरा प्रसंग उद्भवल्यामुळें तो तसाच राहिला. म्हणून तो प्रसंग आतां देव निरूपण करतील. ६२ त्या निरूपणाच्या संबंधानें मागील पंधरा अध्याय झाले, त्याचे पुढचा हा सोळावा अध्याय होय. ६३ परंतु हें असो; या दोन संपत्ति ( दैवी व आसुरी ) ज्ञानाची प्राप्ति व हानि करून देण्यास समर्थ आहेत. ६४ जी देवी संपत्ति मुमुक्षूला मोक्षमार्गांत सोबत करणारी व मोहरूप रात्रीं वाट चालण्यास धर्मरूप मशाल होय, तिचें आधीं वर्णन करतों तें ऐका. ६५ ज्या कुटुंबांत एक मनुष्य दुसऱ्याचें संरक्षण करतो, अशीं पुष्कळ कुटुंबें जेथें एके ठिकाणीं संरक्षण केलीं जातात, त्यालाच लोक संपत्ति असें म्हणतात. ६६ अशी जी दैवयोगानें एके ठिकाणीं जमलेल्या सर्वांस सुख देणारी संपत्ति तिलाच दैवी संपत्ति असें म्हणतात. ६७

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणालेः—अभय, चित्तशुद्धि, ज्ञान व योग याचे ठिकाणीं एकनिष्ठता, दातृत्व, बाह्य इंद्रियाचा संयम, यज्ञ, वेदाचें सार्थ पठन, तप, सरळपणा ॥ १ ॥

आतां, त्या दैवी गुणांमध्यें ज्याला प्रमुखत्व प्राप्त होतें, त्याला अभय असें म्हणतात. ६८ जो महापुरांत उडी घालीत नाहीं, त्याला बुडण्याचें भय नसतें; किंवा जो पथ्यानें वागतो, त्याला रोग उत्पन्न होत नाहींत; ६९ त्याचप्रमाणें, जो कोणतेंही कर्म करते वेळीं अहंकार उत्पन्न होऊं देत नाहीं, त्याला संसाराचे भय कोठून असणार ? ७० अथवा, अद्वैतभावाच्या विस्तारानें जो सर्व जग आत्मस्वरूप आहे असें समजतो, त्याला भयाची गोष्टही ऐकूं येत नाहीं. ७१ पाणी मिठास बुडविण्यास लागलें असतां जसें मिठाचेंच पाणी होतें, त्याप्रमाणें आपली अद्वैतभावना झाल्यावर भयाचा नाश होतो. ७२ अरे, अभय ज्याला म्हणतात त्याचीं हीं लक्षणें होत, व हें अभय सम्यग्ज्ञानाची इच्छा करणाराचें पाठीराखें होय. ७३ आतां, शुद्ध बुद्धि जिला म्हणतात, ती अशा चिन्हांनीं ओळखावी:—ज्याप्रमाणें राखोंडी जळतही नाहीं व विझतही नाहीं, त्या-

१३ एके ठिकाणीं. १४ प्रमुखत्व. १५ ऐका. १६ उडी न घालता. १७ भय. १८ मार्गास. १९ विस्तारानें. २० पाठीराखें. २१ शुद्ध बुद्धि.

तरी जळे ना विझें । राखोंडी जैसी ॥ ७४ ॥ कां पाडिवा वाढी न मैंगे । अंवसे तुटी सांडूनि मागें । माजी अतिसूक्ष्म अंगें । चंद्रु जैसा राहे ॥ ७५ ॥ नातरी ग्रीष्में सांडिली । नाहीं वार्षियें मांडिली । माजी निजरूपें निवडली । गंगा जैसी ॥ ७६ ॥ तैसी संकल्पविकल्पाची वोढी । सांडूनि रजतमाची कावडी । भोगितां निजधर्मांची आवडी । बुद्धि उरे ॥ ७७ ॥ इंद्रियवर्गीं दाखविलिया । विरुद्धा अथवा भलिया । विस्मयो कांहीं केलिया । नुठी चित्तीं ॥ ७८ ॥ गांवा गेलिया वल्लभु । पतिव्रतेचा विरहक्षोभु । भलतेसणी हानिलाभु । न मनी जेवीं ॥ ७९ ॥ तेवि सत्स्वरूप रुचलेपणें । बुद्धि जे ऐसें अनन्य होणें । ते सत्त्वशुद्धि म्हणे । केशिहंता ॥ ८० ॥ ( ८८६. ज्ञान किंवा योग यांविषयीं निश्चित बुद्धि, ८१-८४ ) आतां आत्मलाभाविखीं । ज्ञानयोगामांजी एकी । जे आपुलिया ठाकीं । हावे भरे ॥ ८१ ॥ तेथ सगळिये चित्तवृत्ति । त्यागु करणें या रीती । निष्कामें पूर्णाहुति । हुताशीं जैसी ॥ ८२ ॥ का सुकुलीनें आपुली । आत्मजा सत्कुळींचि दिधली । हें असो लक्ष्मी स्थिरावली । मुकुंदीं जैसी ॥ ८३ ॥ तैसें निर्विकल्पपणें । जें योगज्ञानींच या वृत्तिक होणें । तो तिजा गुण म्हणे । कृष्णनाथु ॥८४॥ ( ८८७. दान, ८५-८८ ) आतां देहवाचाचित्तें । यथासंपन्नें वित्तें । वैरी जालियाही आर्तातें । न वंचणें जें कां ॥ ८५ ॥ फुलीं फळीं छाया । मुळीं पत्रींही धनंजया । वाटेचा न चुके आलिया । वृक्षु जैसा ॥ ८६ ॥ तैसें मनौनि धनवरी । विद्यमानें आल्या अवसरीं । श्रांतांचिये मनोहारीं । उपयोगीं जाणें ॥ ८७ ॥ तया नांव जाण दान । जें मोक्षनिधानींचें अंजन । हें असो आयिक चिन्ह । दमाचें तें ॥ ८८ ॥ ( ८८८. दम, ८९-९३ ) तरि विषयेंद्रियां मिळणी । करूनि घापे वितुटणी । जैसें तोडिजे खड्गपाणी । पारकेया ॥ ८९ ॥ तैसा विषयजातांचा वारा । वाजों नेदिजे इंद्रियद्वारां । इयें वांधोनि प्रत्याहारा । हातीं वोपी[19] ॥ ९० ॥ आतुला चित्ताचे अंगवरी । प्रवृत्ति पळे पर बाहेरीं । आगी सुइजे दाहींही द्वारीं । वैराग्याची ॥ ९१ ॥ श्वासोश्वासाहुनी बहुवसें । व्रतें आचरे खरपुसें । वोसंतितां[20] रात्रिदिवसें । नाराणुक जया ॥ ९२ ॥ पैं दमु ऐसा म्हणिपे । तो हा जाण स्वरूपें । यागार्थुही संक्षेपें । सांगों ऐक ॥ ९३ ॥ ( ८८९. यज्ञ, ९४-९९ ) तरि ब्राह्मण करूनि धुरे । स्त्रियादिक पैल मेरे । माझारीं अधिकारें । आपुलालेनि ॥ ९४ ॥ जया जे

१ प्रतिपदा. २ सुरवात झाली नाहीं तोंच. ३ क्षय. ४ निजरूप. ५ पाहिजे तेवढी. ६ केशी दैत्यास मारणारा श्रीकृष्ण. ७ स्थिर होईल. ८ आहुति देण्याची राहिली म्हणजे. ९ तिसरा ज्ञानयोग. १० विमुख न लावणें. ११ लपवून ठेवीत नाहीं. १२ मनापासून. १३ मनोरथाप्रमाणें. १४ समाधान करणें. १५ मोक्षरूपी ठेवा दृष्टीस पडण्याचें. १६ वियोग. १७ शस्त्रधारी. १८ शत्रूला. १९ देतो. २० आचरताना.

प्रमाणें ज्या बुद्धीच्या ठिकाणीं संकल्प व विकल्प हे दोन्ही नसतात; ७४ किंवा प्रतिपदेस सुरवात होण्याच्या पूर्वी व अमावास्या संपल्यावर मधल्या वेळांत चंद्राचें जसें निजरूप असतें, ७५ अथवा ग्रीष्म ऋतूच्या अंतीं व वर्षाऋतु सुरू होण्याच्या पूर्वी गंगेच्या पाण्याचें स्वरूप निवळ ज्याप्रमाणें असतें; ७६ त्याप्रमाणें, संकल्प व विकल्प हे दोन्ही ज्या ठिकाणीं उरले नाहींत, व रजोगुण व तमोगुण हेही ज्या ठिकाणीं नाहींतसे झाले आहेत, व ज्या बुद्धीस स्वरूपाचे ध्यान करण्याची आवड उत्पन्न झालेली आहे, ७७ इंद्रियवर्गांनीं आवडते किंवा नावडते विषय दाखविले असतांही ज्या बुद्धीच्या ठिकाणीं इच्छा उत्पन्न होत नाहीं, ७८ पतिव्रता स्त्रीचा पति गांवास गेल्यामुळें ती विरहानें विव्हळ झाली असतां तिला पाहिजे तेव्हढी हानि किंवा लाभ यांची वार्ता सांगितली तरी त्याकडे जसें तिचें मन जात नाहीं, ७९ त्याप्रमाणें स्वस्वरूपाची आवड उत्पन्न होऊन बुद्धि एकनिष्ठ होणें, याला सत्वशुद्धि म्हणतात, असें केशी दैत्यास मारणारे श्रीकृष्ण म्हणाले. ८० आतां, आत्मलाभाकारितां, ज्ञान किंवा योग या दोहोंपैकीं आपली बुद्धि ज्यावर स्थिर होईल, ८१ त्या ठिकाणीं आपली चित्तवृत्ति स्थिर करावी. ज्याप्रमाणें पुढें कोणतीही आहुति देणें राहिली नाहीं म्हणजे पूर्णाहुति देतात, ८२ किंवा कुलीन मनुष्यानें आपली कन्या उत्तम कुळांत अर्पण केल्यावर जशी तिजविषयीं त्याची काहींएक इच्छा उरत नाहीं; अथवा समुद्रमंथन करून लक्ष्मी वर आल्यावर तिनें सर्व देवांस सोडून एका विष्णूसच वरलें, ८३ त्याप्रमाणें, विकल्परहित होऊन योग किंवा ज्ञान याच्या ठिकाणीं वतनदार होणें हा तिसरा ज्ञानयोग आहे, असें श्रीकृष्ण म्हणाले. ८४ आतां, कायावाचामनेंकरून शक्त्यनुसार आपल्यास जें दान करावयाचें तें, आपला शत्रु असून जर खरोखर अडलेला असेल तर त्यासही विमुख लावूं नये, हेंच खरें दान होय. ८५ धनंजया, वृक्ष ज्याप्रमाणें आपलीं फुलें, फळें, छाया, मुळ्या, पानें यांपैकीं काहींही वाटेनें जाणारापासून लपवून ठेवीत नाहीं, (पाहिजे त्यास आपल्या सर्वस्वाचा उपभोग घेण्यास मनाई करीत नाहीं,) ८६ त्याप्रमाणें, मनापासून संपत्तीपर्यंत प्रसंगानुसार हवें तें देऊन दमलेल्याचें त्याच्या मनोरथाप्रमाणें समाधान करणें, ८७ त्यालाच दान असें म्हणतात, व तें मोक्षरूपी ठेवा दृष्टीस पडण्याचें अंजन आहे. हें असो, आतां दमाचीं लक्षणें सांगतों तीं ऐक. ८८ ज्याप्रमाणें शस्त्र धारण करणारा शत्रूचा नाश करितो, त्याप्रमाणें विषय व इंद्रियें यांचें जें ऐक्य झालेलें असतें, त्याचा जो वियोग करतो; ८९ त्याचप्रमाणें, इंद्रियद्वारां येणाऱ्या विषयांचा वारा देखील लागूं देत नाहीं, व सर्व इंद्रियें प्रत्याहाराच्या ताब्यांत बांधून देतो; ९० चित्ताच्या आत गढून गेलेली जी प्रवृत्ति, ती, दहा इंद्रियांच्या द्वारांनीं वैराग्यरूप अग्नि आंत घालवून बाहेर काढतो, ९१ श्वासोच्छ्वास बंद करण्याहूनही योग्यांचीं जीं अति कठीण व्रतें, त्यांचें उत्तम रीतीनें जो रात्रंदिवस आचरण करतो, ९२ हें, दम म्हणून ज्याला म्हणतात त्याचें लक्षण आहे. आतां, यज्ञ म्हणजे काय, तें संक्षेपानें सांगतों ऐक. ९३ तर ब्राह्मण व स्त्रियादिक यांच्यामधील सर्वांनीं आपापल्या अधिकारानुरूप, ९४ ज्याला ज्या उक्त दैवतांचें पूजन व धर्म असतील, ते यथाशास्त्र विधीनें आचरावे.

सर्वोत्तम । भजनीय देवताधर्म । ते तेणें यथागम । विधी यजिजे ॥ ९५ ॥ जैसा द्विज षट्कर्मे[2] करी । शूद्र तयातें नमस्कारी । कीं दोहींसिही सरोभरी[3] । निपजे यागु ॥ ९६ ॥ तैसें अधिकारपर्यालोचें[4] । हें यज्ञ करणें सर्वांचें । परि[5] विषयविष फळाशेचें । न घापे माजी ॥९७॥ आणि मी कर्ता ऐसा भावो । नेदिजे देहाचेनि द्वारें जावों । नो वेदाज्ञेसि तरी ठावो । होइजे स्वयें ॥ ९८ ॥ अर्जुना एवं यज्ञु । सर्वत्र जाण साज्ञु[6] । कैवल्यमार्गींचा अभिज्ञु[7] । सांगाती हा ॥ ९९ ॥ ( ८९०. स्वाध्याय, १००–१०५ ) आता चेंडुवें भूमी हाणिजे । हें नव्हे तो हाता आणिजे । कीं शेतीं बीं विखुरिजे । परी पिकीं लक्ष ॥ १०० ॥ नातरी ठेविलें देखावया । आदर कीजे दिविया । कां शाखा फळें यावया । सिंपिजे मूळ ॥ १ ॥ हें बहु असो आरिसा । आपणपें देखावया जैसा । पुढतपुढती बहुवसा । उटिजे प्रीती ॥ २ ॥ तैसा वेदप्रतिपाद्यु जो ईश्वरु । तो होआवयालागीं गोचरु । श्रुतीचा निरंतरु । अभ्यासु करणें ॥ ३ ॥ तेंचि द्विजासीच ब्रह्मसूत्र । येरां स्तोत्र कां नाममंत्र । आवर्तवणें[8] पवित्र । पायावया तत्त्व ॥ ४ ॥ पार्था गा स्वाध्यावो । बोलिजे तो हा म्हणे देवो । आतां तप शब्दाभिप्रावो । आईक सांगों ॥ ५ ॥ ( ८९१. तप, १०६–११२ ) तरी दानें सर्वस्व देणें । वेंचणें तें व्यर्थ करणें । जैसें फळोनि स्वयें सुकणें । इंद्रीवणी[9] जेवीं ॥ ६ ॥ ना ना धूपाचा अग्निप्रवेशु । कनकीं तुकाचा[10] नाशु । पितृपक्षु[11] पोषिता -हासु । चंद्राचा जैसा ॥ ७ ॥ तैसा स्वरूपाचिया प्रसरा[12]- । लागीं प्राणेंद्रियशरीरां । आटणी करणें जें वीरा । तेंचि तप ॥ ८ ॥ अथवा अनारिसें । तपाचें रूप जरी असे । तरि जाण जेविं दुधीं हंसें । सूदली चांचू ॥ ९ ॥ तैसें देहजीवाचिये मेळणीं । जो उदयजत सूये पाणी[13] । तो विवेकु अंतःकरणीं । जागवी जो ॥ ११० ॥ पाहतां आत्मयाकडे । बुद्धीचा पैसु[14] सांकडे[15] । सनिद्र स्वप्न बुडे । जागणीं जैसें ॥ ११ ॥ तैसा आत्मपर्यालोचु । प्रवर्ते जो साचु । तपाचा हा निर्वेचु । धनुर्धरा ॥ १२ ॥ ( ८९२. आर्जव, ११३ ) आतां बाळाच्या हितीं स्तन्य । जैसें नानाभूतीं चैतन्य । तैसें प्राणिमात्रीं सौजन्य । आर्जव तें ॥ १३ ॥

अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ।
दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥

अन्वयः—अहिंसा, सत्यं, अक्रोधः, त्यागः, शांतिः, अपैशुनम्, भूतेषु दया, अलोलुप्त्वं, मार्दवं, ह्रीः, अचापलम् ॥ २ ॥

१ यथाशास्त्र. २ यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान व प्रतिग्रह. ३ सारखें. ४ अधिकारपरत्वें. ५ तथापि. ६ सशास्त्र. ७ जाणता. ८ वरचेवर म्हणणें. ९ कडू वृंदावन. १० वजनाचा. ११ कृष्णपक्ष. १२ प्राप्ति. १३ झिजविणें. १४ हात. १५ कुंठित होतो.

९५ ज्याप्रमाणें ब्राह्मणानें षट्कर्माचें आचरण करावें व शूद्रानें त्यास वंदन करावें हाच त्यांचा यज्ञ होय, आणि त्या दोघांसही त्याच्या यज्ञाचें सारखें फळ मिळतें, ९६ त्याचप्रमाणें, अधिकारपरत्वें विचार करून सर्वांनीं आपापले यज्ञ करावे. परंतु फलाशेचें विष त्यांत घालूं नये; ९७ आणि या यज्ञाचा मी कर्ता असा देहाचे द्वारानें मनांत भाव उत्पन्न होऊं देऊं नये, तथापि वेदांच्या सर्व आज्ञा स्वतः पाळाव्या. ९८ अर्जुना, यालाच सशास्त्र यज्ञ म्हणतात; व हा मोक्षमार्गाचा जाणता असून सोबती होय. ९९ आतां खेळणारा चेंडू भुईवर आपटतो तो उगीच न फेकतां हातांत परत यावा या हेतूनें आपटतो, किंवा शेतकरी शेतांत जें उत्तम धान्य पेरतो तें पिकाकडे लक्ष देऊन जमिनींत टाकतो; १०० किंवा ठेवलेली जिन्नस दृष्टीस पडावी या हेतूनें जसा कोणी हातांत दिवा घेतो, अथवा झाडांच्या मुळाशीं त्याला फांद्या व फळें यावीं म्हणून जसा कोणी पाणी घालतो; १ फार काय ? परंतु आपलें स्वरूप आरशांत पाहण्याच्या हेतूनें जसा वरचेवर प्रीतीनें एकादा मनुष्य तो स्वच्छ पुसतो. २ त्याचप्रमाणें, वेदांनीं ज्या ईश्वराचें वर्णन केलें आहे, तो आपल्यास प्राप्त व्हावा म्हणून वेदांचा सतत अभ्यास करावा. ३ ब्रह्मप्राप्ति होण्याकरितां ब्राह्मणांनीं वेदांतील ब्रह्मसूत्र, व इतरांनीं स्तोत्र किंवा ईश्वराचें नांव हेंच वरवर म्हणावें. ४ देव म्हणतात, पार्था, ज्याला स्वाध्याय म्हणतात तें हेंच होय. असो. आतां तुला तप शब्दाचा अभिप्राय सांगतां, तो ऐक. ५ तर आपलें सर्वस्व दान करणें यालाच दान म्हणतात; व द्रव्य उडविणें तें दान नसून व्यर्थ खर्च करणें होय. ज्याप्रमाणें कडू वृंदावनाचें फळ झाडास लागूनही कोणाच्या उपयोगास न येतां व्यर्थ सुकून जातें; ( पण औषधरूपानें सर्व जगाच्या उपयोगीं पडतें ). ६ किंवा धूप अग्नींत पडून स्वतःचा नाश करून घेतो, ( पण सर्वांस सुगंध देतो ) किंवा सोनें जों जों शुद्ध करावें तों तों तें वजनांत कमी भरतें पण कसास जास्त चढतें किंवा कृष्णपक्षामध्यें चंद्र एकेक कलेनें कमी होतो, पण कृष्णपक्षाचें पोषण करितो, ( सर्व औषधांचें पोषण करितो, ) ७ त्याप्रमाणें हे वीरा, ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति होण्याकरितां प्राण, इंद्रियें व शरीर यांचें जें झिजवणें त्यालाच तप असें म्हणतात. ८ अथवा, इतर जीं तपें आहेत, तीं ह्या तपाप्रमाणें शुद्ध नाहींत. म्हणून, हंस पक्षी जसें दुधांत आपली चोंच घालून दूध व पाणी वेगळें करितो, ९ त्याप्रमाणें, देह व जीव यांचें ऐक्य मोडून टाकण्याकरितां तो जन्मतःच हात घालून विवेकानें निराळें करण्याचा विचार नेहमीं अंतःकरणांत बाळगतो, व ११० आत्मविचार झाला असतां बुद्धीचे विषयाकडील मार्ग कुंठित होतात. ज्याप्रमाणें मनुष्य जागा झाला असतां निद्रा व स्वप्न हीं दोन्ही आपोआप नाहींतशीं होतात. ११ याप्रमाणें, धनुर्धरा, आत्मप्राप्ति करून घेण्याकरितां जो अंतःकरणांत विवेक उत्पन्न होतो, त्यालाच तप म्हणतात. १२ ज्याप्रमाणें दूध हें मुलास हितकारक आहे, व प्राण हा जसा सर्व भूतांचे ठायीं सारखाच आहे, त्याप्रमाणें ज्याचें प्राणिमात्रांशीं सौजन्य आहे, त्यालाच " आर्जव " असें म्हणतात. १३

श्लोकार्थः—अहिंसा, सत्य भाषण, राग न येणें, संन्यास, अंतःकरणाचा उपशम, चहाडी न करणें, प्राणिमात्रावर दया करणें, विषयलंपट न होणें, नम्रता, जनलज्जा आणि स्थिरपणा ॥२॥

१६ आत्मप्राप्तीचा विचार. १७ सिद्धांत. १८ सरळपणा.

( ८९३. अहिंसा, ११४ ) आणि जगाचिया सुखोद्देशें । शरीवाचामानसें । राहाटणें तें अहिंसे । रूप जाण ॥ १४ ॥ ( ८९४. सत्य, ११५-१२४ ) आतां तीख होउनी मवाळ । जैसें जातीचें मुकुळें । कां तेज परी शीतळ । शशांकाचें ॥ १५ ॥ शके दावितांचि रोगु फेडूं । आणि जिभे तरि नव्हे कडु । तें वोखद नाहीं[3] मा घडु । उपमा कैंची ॥ १६ ॥ तरि मऊपणें बुबुळें । झगडतांही परि नाडळे । येरवीं फोडी कोराळें । पाणी जैसें ॥ १७ ॥ तैसें तोडावया संदेह । तीख जैसें कां लोह । श्राव्यत्वें तरि माधुर्य । पायीं[7] घाली ॥ १८ ॥ ऐकों ठातां कौतुकें । कानातें निघती मुखें । जें साचारिवेचेनि विकें[8] । ब्रह्महीं भेदी ॥ १९ ॥ किंबहुना प्रियपणें । कोणातेंही झकऊं नेणे । यथार्थ तरि खुपणें । नाहीं कवणा ॥ १२० ॥ येऱ्हवीं 'गौरी कीर काना गोड । परि सोंचाचा पाँखाळीं[12] कीडें[13] । आगीचें करणें उघड । परि जळो तें सौंच[14] ॥ २१ ॥ कानीं लागतां मेहुर । अर्थे विमांडी[16] जिव्हौर । ते वाचा नव्हे सुंदर । लावाचे पां ॥ २२ ॥ परि अहितीं कोपोनि सोपें[19] । लालनीं मऊ जैसें पुष्प । तिये मातेचें स्वरूप । जैसें का होय ॥ २३ ॥ तैसें श्रवणसुख चतुर । परिणमोनि[20] सौचार[21] । बोलणें जें अविकौर[22] । तें सत्य येथें ॥ २४ ॥ ( ८९५. अक्रोधत्व, १२५-१३० ) आतां घालिताही पाणी । पाषाणीं न निघे आणी । कां मथिलिया लोणी । [23]कांजी नेदी ॥ २५ ॥ [24]त्वैंचा पायें शिरीं । [25]हौलेयाही फडे न करी । वसंतींही अंबरीं । न होती फुलें ॥ २६ ॥ ना ना रंभेचेनिही रूपें । शुकीं नुठिजेचि [26]कंदर्पें । कां भस्मीं वन्हि न उद्दीपे । घृतेंही जेवीं ॥ २७ ॥ तेविंचि [27]कुंमारु क्रोधें भरे । तैसिया मंत्राचीं बीजाक्षरें । तियें निमिततेंही अपारें । मीनालिया ॥ २८ ॥ पैं धाताही पायां पडतां । नुठी गतायु पंडुसुता । तैसी नुपजे उपजवितां । क्रोधोर्मि गा ॥ २९ ॥ अक्रोधत्व ऐसें । नांव तें ये दशे । जाण ऐसें श्रीनिवासें । म्हणितलें तया ॥ १३० ॥ ( ८९६. त्याग, १३१-१३५ ) आतां मृत्तिकात्यागें घटु । तंतुत्यागें पटु । त्यजिजे जेवीं वटु । बीजत्यागें ॥ ३१ ॥ कां त्यजूनि भिंतिमात्र । त्यजिजे आघवेंचि चित्र । कां निद्रात्यागें विचित्र । स्वप्नजाळ तें ॥ ३२ ॥ ना ना जळत्यागें तरंग । वर्षात्यागें मेघ । त्यजिजती जैसे भोग । धनत्यागें ॥ ३३ ॥ तेविं बुद्धिमंतीं देहीं । अहंता सांडून पाहीं । सांडिजे अशेषही । संसारजात ॥ ३४ ॥ तया नांव त्यागु ।

---

१ कमळ. २ चंद्राचें. ३ म्हणून. ४ खुपत नाहीं. ५ पर्वताचा कडा. ६ ऐकलें असता. ७ लाजवतें. ८ सत्यपणानें. ९ बळानें. १० पारध्याचें गाणें. ११ सत्य. १२ पक्ष. १३ वाईट. १४ खरेपणा. १५ मधुर. १६ भेदते. १७ काळीज. १८ विवशी. १९ पोकळ. २० परिणामीं. २१ गोड. २२ मर्मभेद न करणारें. २३ ताकाची निवळ. २४ सापाची कात. २५ हाणिलीं असता. २६ कामवासनेनें. २७ काम.

आणि कायावाचामनानें जगाला सुख व्हावें या हेतूनें जें वर्तन करणें तेंच अहिंसेचें खरें लक्षण जाण. १४ आतां, तीक्ष्ण असून मऊ म्हटलें म्हणजे जसें कमळ—तें पाण्याचा भेद करून वर येतें, परंतु मऊ असतें, किंवा चंद्राचें तेज पडतें परंतु तें शीतळ असतें; १५ जें औषध रोग्यास दिलें असतां रोगाचा नाश करील, आणि जिभेसही कडू लागणार नाही असें औषध सांपडावयाचें नाहीं, म्हणून त्याची उपमा या ठिकाणीं लागू पडत नाहीं. १६ तर मऊपणा म्हटला म्हणजे डोळ्यांतील बुबुळावर घासलें असतांही जें खुपत नाहीं, व कठोरपणा पाहूं गेलें असतां जें पाणी पर्वताचा कडाही फोडून बाहेर पडतें, १७ त्याप्रमाणें संशयनिवृत्ति करण्यांत जें लोखंडाप्रमाणें तीक्ष्ण असतें, व ऐकिलें असतां माधुर्याला लाजवितें, १८ जें ऐकलें असतां कानासही त्याचें सेवन करावें असें वाटतें, व सत्यपणाच्या बळानें ब्रह्मापर्यंत जाऊन ठेपतें; १९ फार काय ? परंतु त्याची गोडी इतकी असते कीं, कोणीही फसत नाहीं व त्यांतील अर्थ पाहूं गेलें असतां त्यापासून कोणाच्या मनालाही धक्का बसावयाचा नाहीं. १२० एरवीं पारध्याचें गाणें कानास गोड लागतें; परंतु खरेपणाच्या दृष्टीनें पाहिलें असतां तें मृगास घातक असतें; अथवा अग्नि हा आपलें कृत्य उघड रीतीनें करतो. परंतु ह्या त्याच्या खरेपणास आग लागो ! २१ कानास मधुर लागणारें असून अर्थ पाहूं गेलें असतां जें काळीज भेदतें, तें भाषण नसून सुंदर विवशीच होय. २२ परंतु रागावल्यावर अहित होण्याबद्दल बोलणें पोकळ असून लालन करण्यांत पुष्पाप्रमाणें मऊ असतें असें आईचें जें स्वरूप,. २३ त्याप्रमाणें, ऐकलें असतां ज्यापासून सुखांची प्राप्ति होते, व परिणामीं गोड असून कोणाचाही मर्मभेद न करणारें जें बोलणें, त्यालाच सत्य बोलणें असें म्हणतात. २४ आतां, दगडावर पाणी घातलें असतांही त्यास अंकुर फुटत नाहींत, किंवा ताकाची निवळ घुसळली असतां त्यास लोणी येत नाहीं; २५ सापाच्या कातीच्या डोक्यावर पाय दिला असतां ती फडा वर करीत नाहीं, व वसंतऋतु प्राप्त झाला असतांही आकाशास जशीं फुलें येत नाहींत, २६ अथवा रंभेच्या स्वरूपानें शुकास ज्याप्रमाणें विषयवासना झाली नाहीं, किंवा भस्मांत तूप ओतलें असतां जसा अग्नि पेटत नाहीं; २७ त्याप्रमाणें, ज्या अक्षरांनीं काम व क्रोध उत्पन्न होतो, त्यांचा उच्चार केला असतां; २८ किंवा, हे पांडुसुता, ज्याचें आयुष्य संपलें आहे, त्याला उठविण्याकरितां ब्रह्मदेवाच्या जरी पायां पडलें तरी तो ज्याप्रमाणें उठत नाही, त्याप्रमाणें, त्याच्या ठिकाणीं क्रोध आणण्याविषयीं खटपट केली असतां क्रोध येत नाहीं, २९ याच स्थितीला " अक्रोधत्व " म्हणतात, असें श्रीकृष्णानीं अर्जुनास सांगितलें. १३० मृत्तिकेचा त्याग केला असतां जसा घटाचा त्याग आपोआप होतो, व तंतूचा त्याग केला असतां वस्त्राचा त्याग, तसेंच बीजाचा त्याग केला असतां वृक्षाचा त्याग सहज होतो; ३१ किंवा भिंतीचा त्याग केला असतां त्यावरील सर्व चित्रांचा त्याग आपोआप होतो, अथवा झोपेचा त्याग केला असतां नानातऱ्हेच्या स्वप्नांचा त्याग जसा आपोआप होतो; ३२ किंवा जळाचा त्याग केला असतां लाटांचा त्याग, व वर्षाकालाचा त्याग केला असतां मेघांचा, व धनाचा त्याग केला असतां ज्याप्रमाणें विषयोपभोगांचा आपोआप त्याग होतो, ३३ त्याप्रमाणें, जे ज्ञानी आहेत, ते, देहच मी अशा अहंतेचा

म्हणे तो यज्ञांगु । हें मानूनि सुभँगु । पार्थु पुसे ॥ ३५ ॥ ( ८९७. शांति, १३६–१४० ) आतां शांतीचें लिंग । तें व्यक्त मज सांग । देवो म्हणती चांग । अवधान देईं ॥ ३६ ॥ तरी गिळोनि ज्ञेयातें । ज्ञाता ज्ञानही मागौतें । हारपे निरुतें । ते शांति पैं गा ॥ ३७ ॥ जैसा प्रळयांबूंचा उभडू । बुडवूनि विश्वाचा पवाडु । होय आपणपें निविडु । आपणाचि ॥ ३८ ॥ मग उगम ओघु सिंधु । हा नुरेचि व्यवहारभेदु । परि जलैक्याचा बोधु । तोही कवणा ॥ ३९ ॥ तैसी ज्ञेया देतां मिठी । ज्ञातृत्वही पडे पोटीं । मग उरे तेंचि किरीटी । शांतीचें रूप ॥ १४० ॥ ( ८९८. अपैशुन्य, १४१–१५३ ) आतां कदर्थवित व्याधि । बळीकरणाचिया आँधि । आपपरु न शोधी । सद्वैद्यु जैसा ॥ ४१ ॥ कां चिखलीं रुतली गाये । धड भाकड न पाहे । जो तियेचिया ग्लांनि होये । कालाभुला ॥ ४२ ॥ ना ना बुडतयातें सकरुणु । न पुसे अंत्यजु कीं ब्राह्मणु । काढूनि राखे प्राणु । हेंचि जाणे ॥ ४३ ॥ कीं महावनीं पापियें । स्त्री उघडी केली विपायें । ते नेसविल्याविण न पाहे । शिष्टु जैसा ॥ ४४ ॥ तैसें अज्ञानप्रमादादिकीं । कां प्राक्तनही सदोषीं । निंद्यत्वाच्या सर्वविषीं । खिळिले[11] जे ॥४५॥ तयां आंगींकें[12] आपुलें । देऊनिया भलें । विसरविजती सैलें । सलतीं तियें ॥ ४६ ॥ अगा पुढिलाचा दोषु । करूनि आपुलिये दिठी चोखु । मग घापे अवलोकु । तयावरी ॥ ४७ ॥ जैसा पुजूनि देवो पाहिजे । पेरूनि शेता जाइजे । तोषौनि प्रसादु घेइजे । अतिथीचा ॥ ४८ ॥ तैसें आपुलेनि गुणें । पुढिलाचें उणें । फेडुनियां पाहणें । तयाकडे ॥ ४९ ॥ वांचूनि न [14]विंधिजे वर्मीं । नातुडविजे अकर्मीं । न बोलविजे नामीं । सदोषीं तिहीं ॥ १५० ॥ वरि कोणे एके उपायें । पडिलें तें उभें होये । तेंचि कीजे परि घाँये । नेदावे वर्मीं ॥ ५१ ॥ पैं उत्तमाचियासैंठीं । नीच मानिजे किरीटी । हें वांचोनि दिठी । दोषु न घेपे ॥ ५२ ॥ अगा अपैशून्यांचें लक्षण । अर्जुना हें फुडें जाण । मोक्षमार्गींचें सुखासन । मुख्य हें गा ॥ ५३ ॥ ( ८९९. दया, १५४–१६२ ) आतां दया ते ऐसी । पूर्णचंद्रिका जैसी । निववितां न कडेसी । सानें थोर ॥ ५४ ॥ तैसें दुःखिताचें शिणणें । हिरतां सकणवेपणें । उत्तमाधम नेणे । विवंचूं गा ॥ ५५ ॥

१ यज्ञभोक्ता. २ भाग्यवान. ३ प्रलयकालच्या उदकाची वाढ. ४ गुप्त. ५ पीडा देणारी. ६ वाईट बातमी ऐकून. ७ चिंता. ८ दुर्मती. ९ दुःखानें. १० कासावीस. ११ पाप झालें. १२ साहाय्य. १३ दुःख, व्याधि. १४ डाग देऊं नये. .१५ दुखवूं नये. १६ घाव. १७ मानानें. १८ उणें न पाहाणें. १९ परीक्षा करणें. २० सदयतेनें.

त्याग करून सर्व संसाराचा त्याग करितात, ३४ त्यालाच त्याग म्हणतात, असें यज्ञभोक्ता श्रीकृष्ण परमात्मा यानें सांगितलेलें मनांत उमजून, भाग्यवान जो पार्थ, त्यानें प्रश्न केला, ३५ " हे प्रभो, शांतीचीं लक्षणें काय आहेत, तीं मला उघड करून सांगा." तेव्हां देव म्हणाले, " तूं फार उत्तम गोष्ट विचारलीस; तर तीं सांगतों तिकडे लक्ष दे. ३६ ज्ञात्यानें जी वस्तु जाणावयाची, ती पूर्णपणें जाणल्यावर मागून ज्ञाता व ज्ञान हीं ज्या ठिकाणीं लय पावतात, त्यालाच ( ब्रह्माला ) शांति असें म्हणतात. ३७ ज्याप्रमाणें प्रलयकालचें उदक वाढल्यावर सर्व विश्व बुडून आपले स्वरूपांत आपण लय पावतें; ३८ मग उगम, प्रवाह व समुद्रास मिळणें ह्या अवस्था राहत नाहींत, व सर्वत्र जलमय आहे याचाही बोध कोणास होत नाहीं; ३९ त्याप्रमाणें, ज्ञेयाचें ऐक्य झाल्यावर ज्ञातृत्वही आपोआप नाहींसें होतें. मग अर्जुना, बाकी जें ज्ञान उरतें, तेंच शांतीचें रूप होय. १४० आतां, पीडा देणाऱ्या व्याधीनें किंवा एखादी वाईट बातमी ऐकून उत्पन्न होणाऱ्या चिंतेनें जो ग्रस्त झाला आहे, तो आपला आहे किंवा परका आहे हें मनांत न आणतां जसा चांगला वैद्य त्याच्या दुःखाचें निवारण करतो; ४१ किंवा एखादी गाय चिखलांत रुतल्यावर तिचें दुःख पाहून ज्याचे मनात कासाविशी होते, तो ती दुभती आहे किंवा भाकड आहे इकडे लक्ष न देतां तिला वर काढतो; ४२ किंवा बुडणाऱ्या मनुष्याकडे पाहून ज्याच्या मनांत करुणा उत्पन्न होते, तो ज्याप्रमाणें बुडणारा ब्राह्मण आहे किंवा अंत्यज आहे याची चौकशी न करितां त्यास बाहेर काढून त्याचें प्राणरक्षण करतो; ४३ अथवा-महावनांत दुष्टांनीं एखाद्या पतिव्रता स्त्रीस लुबाडून तिला वस्त्रहीन करून सोडून दिलें आहे अशी स्त्री एखाद्या संभावित मनुष्याच्या दृष्टीस पडल्यावर तो जसा प्रथम तिच्या अंगावर आपलें वस्त्र टाकून नंतर तिची पूसतपास करितो; ४४ तसेंच, जे अज्ञान व प्रमाद यांनीं व्याप्त आहेत किंवा पूर्वकर्मानुरूप ज्यांस कांहीं व्याधि जडलेली आहे व जे सर्वांच्या निंदेस पात्र झाले आहेत, ४५ त्यांना आपण स्वतः साह्य करून, त्यांना ज्या व्याधीपासून दुःख होत असतें तिचा विसर पाडतात, ४६ अरे, त्यांच्यापुढें येणाऱ्या मनुष्यांचे दोष ते आपल्या दृष्टीनें नाहींतसे करून मग त्याचेकडे अवलोकन करतात. ४७ ज्याप्रमाणें शाळिग्राममूर्तीस वस्त्रालंकार घालून व उत्तम पुष्पें वाहून मग आपलें चित्त तिच्याकडे लावावें, किंवा शेतांत धान्य पेरून उत्तम रीतीचें पीक आल्यावर जसें त्याजकडे पाहून समाधान मानावें, अथवा आपल्या घरीं अतिथि आला असतां त्यास अन्नदान देऊन संतोषित केल्यावर ज्याप्रमाणें त्याचा आशीर्वाद घ्यावयाचा, ४८ त्याप्रमाणें, आपल्यापुढें येणाऱ्या मनुष्याचा कमीपणा आपल्या गुणसामर्थ्यानें दूर करून नंतर त्याजकडे दयार्द्र दृष्टीनें पाहतात. ४९ असें न करतां त्याच्या वर्मावर डाग देऊं नये, अथवा त्यांच्या पापकर्माचा उच्चार करून त्यास दुःख देऊं नये, व त्यांस असणाऱ्या व्याधींचें नांव घेऊन तूं व्याधिष्ट आहेस असें म्हणूं नये. १५० परंतु ज्या उपायानें कोणीही मनुष्य वाईट स्थितींतून उत्तम स्थितींत येईल तोच उपाय जो करतो, पण त्याच्या वर्मीं डाग देत नाहीं; ५१ तर अर्जुना, उत्तम मनुष्याच्या मानानें जो दुसऱ्यास कनिष्ठ मानीत नाहीं, व त्याचे दोष मनांत आणीत नाहीं, ५२ तेंच ' अपैशुन्याचें ' खरें

पैं जगीं जीवनोंसारिखें । वस्तु अंगेंवरी उपैखे । परि जातें जीवित राखे । तृणाचेंही ॥ ५६ ॥ तैसें पुढिलाचेनि तापें । कळवळलिये कृपे । सर्वस्वेंसीं दिधलेंही आपणपें । न्यूनचि मानी ॥ ५७ ॥ निम्न भरलियाविणें । पाणी ढळोंचि नेणे । तेविं श्रांता तोषौनि जाणें । सामोरें पां ॥ ५८ ॥ पैं पायीं कांटा नेहटें । तंव व्यथा जीवीं उमटे । तैसा पोळे संकटें । पुढिलांचेनि ॥ ५९ ॥ का पाँवो शीतळता लाहे । कीं ते डोळयाचिलागीं होये । तैसा परसुखें जाये । सुखावतु ॥ १६० ॥ किंबहुना तृषितालागीं । पाणी आँरायिलें असे जगीं । तैसें दुःखितांचे सेलभागीं । जिणें जयाचें ॥ ६१ ॥ तो पुरुष वीरराया । मूर्तिमंत जाण दया । मी उदयजतांचि तया । ऋणिया लाभें ॥ ६२ ॥ (९००. अलोलुप्त्व, १६३-१७३ ) आतां सूर्यासि जीवें । अनुसरलिया राजीवें । परि तें तो न शिवे । सौरभ्य जैसें ॥ ६३ ॥ कां वसंताचिया वांहाणीं । आलिया वनश्रीच्या अक्षौहिणी । ते न करितुचि घेणी । निगोला जो ॥ ६४ ॥ हें असो महासिद्धींसीं । लक्ष्मीही आलिया पाशीं । परि महाविष्णु जैसी । न गणीच ते ॥ ६५ ॥ तैसे ऐहिकींचे का स्वर्गींचे । भोग पाईक जालिया इच्छेचे । परि भोगावे हें न रुचे । मनामाजीं ॥ ६६ ॥ बहुवें काय कौतुकीं । जीव नेहे विषयाभिलाखी । अलोलुप्त्वदशा ठाउकी । जाण ते हे ॥ ६७ ॥ आतां माशियां जैसें मोहळ । जळचरां जेविं जळ । कां पक्षियां अंतराळ । मोकळे हें ॥ ६८ ॥ नातरी बाळकोद्देशें । मातेचें स्नेह जैसें । कां वसंतींच्या स्पर्शें । मऊ मलयाँनिळु ॥ ६९ ॥ डोळयां प्रियाची भेटी । कां पिलियां कूर्मीची दिठी । तैसी भूतमात्रीं राहटी । मवाळें ते ॥ १७० ॥ स्पर्शें अति मृदु । मुखीं घेतां सुस्वादु । घ्राणासि सुगंधु । उजाळें आंगें ॥ ७१ ॥ तो आवडे तेवढा घेतां । विरुद्ध जरी न होता । तरी उपमे येता । कापुर कीं ॥७२॥ परी महाभूतें पोटीं वाहे । तेवींचि परमाणूमाजि सामाये । या विश्वानुसार होये । गगन जैसें ॥ ७३ ॥ (९०१. मार्दव, १७४ ) काय सांगों ऐसें जिणें । जें जगाचेनि जीवें प्राणें । तया नाव म्हणे । मार्दव मी ॥ ७४ ॥ (९०२. न्ही (लज्जा), १७५–१८२ ) आतां पराजयें राजा । जैसा कँदर्थिजे लाजा । कां मानिया निस्तेजा । निकृष्टास्तव ॥ ७५ ॥ ना ना चाडाळमंदिराशीं । अवचटें

---

१ पाण्यासारखें. २ आपला. ३ नाश करून. ४ सलगा. ५ पोंचल्यावर. ६ पाय. ७ निर्माण केलें. ८ कमनानें. ९ सुगंध १० मार्गांत. ११ चालना-होतो. १२ कोणत्याही विषयापासून इंद्रियास विकार होऊं न देणें. १३ मलय पर्वतावरील सुगंधी वारा. १४ मृदु. १५ पांदरा स्वच्छ. १६ नघता. १७ दुःखित होतो. १८ निकृष्टावस्था प्राप्त झाली असता.

लक्षण होय; आणि अर्जुना, मोक्षमार्गाचें सुखावह मुख्य साधन हेंच होय. ५३ आतां, दया अशी असावी कीं, ज्याप्रमाणें पौर्णिमेचा चंद्र हा शांति देण्यांत लहान अथवा थोर असा पर्याय न ठेवितां सर्वांस सारखीच शांति देतो, ५४ त्याप्रमाणें, दयार्द्र अंत:करणानें दु:खित मनुष्याचें दु:ख हरण करिते वेळेस तो उत्तम आहे किंवा अधम आहे हें मनांत न आणतां सर्वांचें दु:ख निवारण करतो; ५५ जगतांत पाण्यासारखी वस्तु दुसरी कोणती आहे, कीं गवत सुकूं लागलें असतां जें आपला स्वत:चा नाश करून त्याचें आपल्या ओला-व्यानें रक्षण करितें ? ५६ त्याप्रमाणें, आपल्या समोर पीडित मनुष्य आला असतां, त्याच्या कळवळीनें, त्यास जरी आपलें सर्वस्व दिलें तर आपण त्यास कांहींच दिलें नाहीं, असें जो मानतो; ५७ पाणी वाहात असतांना वाटेंत खळगा आला असतां तो भरून टाक-ल्याशिवाय जसें तें पुढें जात नाहीं, तसा आपल्या समोरील श्रमलेल्या मनुष्यास संतोषित केल्याशिवाय जो पुढें जात नाहीं, ५८ ज्याप्रमाणें पायांत काटा बोंचला असतां जीव कळवळतो, त्याप्रमाणें दुसऱ्याचें संकट पाहिलें असतां ज्याचें मन कळवळतें; ५९ किंवा पायास थंड पदार्थ चोळल्यावर डोळ्यास जसा गारवा येतो, तसें दुसऱ्याचें सुख पाहून ज्याला सुख होतें; १६० किंबहुना, तहान लागलेल्या मनुष्याची तृषा भागण्याकरितां जसें जगांत पाणी निर्माण केलें आहे, त्याप्रमाणें दु:खित मनुष्याचें दु:ख हरण करण्या-करितांच जो या जगांत राहतो; ६१ अशा गुणांनीं युक्त जो पुरुष असतो, तो दयेची केवळ मूर्तिच होय; आणि हे वीरोत्तमा, त्याचा जन्मत:च मी ऋणी आहें. ६२ सूर्योदय होण्याबरोबर कमळाचें फूल उमलतें, परंतु सूर्य जसा त्याच्या सुगंधाचा उपभोग घेत नाहीं; ६३ किंवा वसंतऋतूंत वनांत पुष्कळ झाडें टवटवीत होतात, तथापि त्यांतील एकाही झाडाचा उपभोग न घेतां तो जसा चालता होतो; ६४ फार काय ? लक्ष्मी महा-सिद्धीसह जरी श्रीविष्णूंजवळ प्राप्त झाली, तरी जसें त्यांचें तिच्याकडे लक्ष जात नाहीं; ६५ तसें आपल्यास आवडणारे इहलोकींचे किंवा परलोकींचे भोग जरी चाकर झाले, तरी त्यांच्या मनांत त्यांचा उपभोग घ्यावा असें येत नाहीं. ६६ फार काय सांगावें ? ते कौतुकानें देखील विषयाची इच्छा करीत नाहींत. अशी जी दशा, तिला ' अलोलुप्त्व ' असें म्हणतात. ६७ मधमाशीस जसें तिचें मोहोळ सुखकारक आहे, किंवा जलचरास जसें पाणी प्रिय आहे, किंवा पक्ष्यांना आकाश फिरण्यास मोकळें आहे; ६८ किंवा बाळ-काला सुख व्हावें या दृष्टीनें आईचें जसें त्यावर प्रेम असतें; अथवा वसंतऋतु सुरू झाल्या-वर जसा मलय पर्वतावरील वारा मंद सुगंध वाहतो, ६९ प्रिय वस्तु पाहिली असतां जसें डोळ्यांस समाधान होतें, किंवा ज्याप्रमाणें कासवी आपल्या दृष्टीनें पिलांचें पोषण करतें, त्याप्रमाणें ज्यांची दृष्टि भूतमात्राच्या ठिकाणीं प्रेमयुक्त असते; १७० हात लावला असतां मऊ लागतो, तोंडांत घातला असतां रुचकर लागतो, नाकास ज्याचा सुगंध येतो, व रूपानें पाहिलें असतां जो पांढरा स्वच्छ आहे, ७१ असा जो कापूर, तो वाटेल तितका खाल्ला असतां जर त्याजपासून बाधा झाली नसती, तर तो उपमेस पात्र झाला असता. ७२ परंतु ज्याच्या पोटांत पंचमहाभूतांचा समावेश होतो, त्याचप्रमाणें, जो परमाणूंतही सामावतो, व गगन जसें विश्वाच्या आकाराप्रमाणें आकारास येतें, ७३ फार काय

आलिया संन्यासी । मग लाज होय जैसी । उत्तमा तया ॥ ७६ ॥ क्षत्रिया रणीं पळोनि जाणें । तें कोण साहे लाजिरवाणें । कां वैधव्यें पाचारणें । महासातियेतें ॥ ७७ ॥ रूपसा उदयलें कुष्ट । संभावितां कुटीचें बोट । तया लाजा प्राणसंकट । होय जैसें ॥ ७८ ॥ तैसें औटहातपणें । जें शेव होऊनि जिणें । उपजों उपजों मरणें । नावानावा ॥ ७९ ॥ तियें गर्भमेदमुसें । रक्त मूत्र रसें । वोतीव होऊनि असे । तें लाजिरवाणें ॥ १८० ॥ हें बहु असो देहपणें । नामरूपासि येणें । नाहीं गा लाजिरवाणें । तयाहुनी ॥ ८१ ॥ ऐसैसिया अवकळा । घेपे शरीराचा कंटाळा । ते लाज पैं निर्मळा । निसुगा गोड ॥ ८२ ॥ ( ९०३. अचापल्य, १८३-१८५ ) आतां सूत्रतंतु तुटलिया । चेष्टाचि ठाके सायखेडिया । तैसी प्राणजयें कर्मेंद्रियां । खुंटे गति ॥ ८३ ॥ कीं मावळलिया दिनकरु । सरे किरणांचा प्रसरु । तैसा मनोजयें प्रकारु । ज्ञानेंद्रियांचा ॥ ८४ ॥ एवं मनपवननियमें । होती दाही इंद्रियें अक्षमें । तें अचापल्य वर्मे । येणें होय ॥ ८५ ॥

तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।
भवंति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

*अन्वयः—भारत, तेजः, क्षमा, धृतिः, शौचम्, अद्रोहः, न अतिमानिता ( इत्येतानि लक्षणानि ) दैवीं संपदं अभिजातस्य ( पुरुषस्य ) भवन्ति ॥ ३ ॥*

( ९०४. तेज, १८६-१९० ) आतां ईश्वरप्राप्तीलागीं । प्रवर्ततां ज्ञानमार्गीं । धिवसेयाच्या आंगीं । उणीव नोहे ॥ ८६ ॥ वोखटें मरणाऐसें । तेंही आलें अग्निप्रवेशें । परी प्राणेश्वरोद्देशें । न गणीचि सती ॥ ८७ ॥ तैसें आत्मनाथाचिया आंधीं । लाऊनि विषयविषाची बाधी । धावों आवडे पोणधीं । शून्याचिये ॥ ८८ ॥ न ठाके निषेधु आड । न पडे विधीची भीड । नुपजेचि जीवीं कोड । महासिद्धींचें ॥ ८९ ॥ ऐसें ईश्वराकडे निर्जे । धांवे आपसया सहज । तया नांव तेज । आध्यात्मिकें तें ॥ १९० ॥ ( ९०५. क्षमा, १९१ ) आतां सर्वही साहोतिया गरिमा । गर्वा न ये तेंचि क्षमा । जैसें देह वाहोनि रोमां । वाहणें नेणें ॥ ९१ ॥ ( ९०६. धैर्य, १९२–१९६ ) आणि मातलिया इंद्रियांचे वेग । कां प्रांचीनें खवळले रोग । अथवा योगवियोग । प्रियाप्रियाचे ॥ ९२ ॥ यया आववियाचाचि थोरु । एके वेळे आलिया पूरु । तरी अगस्त्य का होऊनि धीरु । उभा ठाके ॥ ९३ ॥ आकाशीं धूमाची रेखा । उठिली बहुवा आगळिका । ते

१ धाईट आळ. २ शरीर. ३ दुश्चिन्ह. ४ साधूना. ५ फोडण्याला. ६ पंगु. ७ स्थिरपणा. ८ ती इच्छा धारण करणाऱ्याच्या. ९ पतीकरितां. १० चिंता. ११ कठीण मार्गी. १२ अंतराळीं. १३ मन. १४ शारीरिक. १५ सहन करणारांत. १६ महत्त्व. १७ पूर्वकर्मानें.

सांगावें ! जे जगाच्या जीवनाकरितांच वांचतात; अशी जी स्थिति, तिला 'मार्दव' असें मी म्हणतों. ७४ पराजित झालेला राजा जसा लज्जेनें दुःखी होतो, अथवा निकृष्ट स्थिति प्राप्त झाली असतां मानी पुरुष जसा निस्तेज होतो; ७५ किंवा एखादा उत्तम संन्यासी अकस्मात् एखाद्या चाडाळाच्या घरांत गेला असतां त्यास जशी लज्जा उत्पन्न होते; ७६ क्षत्रियाला रणांतून पळून जाण्याचा प्रसंग आला असतां तो सहन करण्यास जशी त्याला लाज वाटते; किंवा पतिव्रता स्त्रीस ' गंगाभागीरथी ' या नांवानें हाक मारली असतां जसें तिला दुःख होतें, ७७ सुंदर मनुष्यास कोड उत्पन्न झालें, अथवा संभावितावर वाईट आळ आला, तर त्यांना ज्याप्रमाणें लज्जेनें प्राणसंकट उत्पन्न होतें, ७८ त्याप्रमाणें, साडेतीन हात शरीर धारण करून निरनिराळ्या योनींत उत्पन्न होणें व मरणें याची, ७९ आणि गर्भमेदरूपी मुशींत रक्त व मूत्र यांच्या रसाचें ओतींव शरीर धारण करण्याची ज्यांना लाज वाटते, १८० फार काय सांगावें ? तर ज्यांना देह धारण करून नांवारूपास येण्यापेक्षां दुसरी कोणतीही लाजिरवाणी गोष्ट वाटत नाहीं; ८१ अशा दुश्चिन्हांनीं युक्त असें जें शरीर, तें धारण करण्याचा साधूंना कंटाळा असून लाज उत्पन्न होते; व इतर जे कोडगे लोक आहेत, त्यांना तेंच शरीर धारण करण्याची गोडी वाटते. ८२ ज्याप्रमाणें कळसूत्री बाहुल्यांच्या दोऱ्या तुटल्यावर त्यांची चेष्टा बंद होते, त्याप्रमाणें प्राणाचा जय केला असता कर्मेंद्रियांची गति बंद होते, ८३ किंवा सूर्य मावळल्यावर त्याच्या किरणांची प्रभा बंद होते, त्याप्रमाणें मनाचा जय केला असतां ज्ञानेंद्रियांची मति कुंठित होते. ८४ याप्रमाणें मन व प्राण यांचा जय केला असतां दहा इंद्रियें पंगु होतात, त्यालाच ' अचापल्य ' असें म्हणतात. ८५

श्लोकार्थः—अर्जुना, प्रगल्भता, क्षमा, धैर्य, शुचिर्भूतपणा, दुसऱ्याचा द्वेष न करणें व मानीपणाचा अभाव हीं लक्षणें दैवी संपत्तींत उत्पन्न झालेल्या पुरुषाचे ठिकाणीं असतात. ॥ ३ ॥

आतां, ईश्वरप्राप्तीकरतां ज्ञानमार्गाचें मनापासून अवलंबन केलें असतां त्याला उणीव पडत नाहीं. ८६ पतिव्रता स्त्री पतीच्या मरणानंतर अग्निप्रवेश करून मरणासारखा वाईट प्रसंग आला तरी सहगमन करण्यास मागेंपुढें पहात नाहीं, ८७ त्याप्रमाणें, जो आत्म्याची चिता लागल्यामुळें विषयांस विषवत् मानून आत्मप्राप्तीकरितां सुषुम्ना नाडींतून प्राणवायु नेण्यासारख्या कठीण मार्गाचेंही अवलंबन करतो; ८८ त्याला शास्त्रांत सांगितलेल्या विधिनिषेधांची अडचण व भीड नसते; व महासिद्धि प्राप्त झाली असतां तिचेंही त्यास कौतुक वाटत नाहीं, ८९ याप्रमाणें ज्याचें मन आपण होऊन ईश्वराकडे धाव घेतें, त्याला आध्यात्मिक तेज असें म्हणतात. १९० आतां, सर्व सहन करणारांत मी श्रेष्ठ असा ज्याला गर्व उत्पन्न होत नाहीं, त्यालाच क्षमा असें म्हणतात. ज्याप्रमाणें देह हा सर्व रोम धारण करीत असूनही त्याचा गर्व बाळगीत नाहीं; ९१ आणि विषयसेवनाविषयीं इंद्रियांची अति प्रवृत्ति, किंवा पूर्वकर्मानें रोगाची प्राप्ति, अथवा प्रिय वस्तूचा वियोग, ९२ या सर्व

गिळी येकीं शुल्का । वारा जेवीं ॥ ९४ ॥ तैसें अधिभूताधिदैवा । अध्यात्मादि उपद्रवां । पातलेया पांडवा । गिळूनि घाली ॥ ९५ ॥ ऐसें चित्तक्षोभाच्या अवसरीं । उचलूनि धैर्या जे चांगावें करी । धृति म्हणिपे अवधारीं । तियेतें गा ॥ ९६ ॥ ( ९०७. शुचित्व, १९७–१९८ ) आतां निर्वाळूनि[3] कनकें । भरिला गांगें पीयूखें । तया कलशाचियासारिखें । शौच असे ॥ ९७ ॥ जे आंगीं निष्काम आचारु । जीवीं विवेकु साचारु । तो सबाह्य घडला आकारु । शुचित्वाचाचि ॥ ९८ ॥ ( ९०८. अद्रोहत्व, १९९–२०४ ) कां फेडीत पाप ताप । पोखीत तीरींचे पादप । समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥ ९९ ॥ कां जगाचें आंध्य फेडितु । श्रियेचीं[7] राउळें उघडितु । निघे जैसा भास्वतु । प्रदक्षिणे ॥ २०० ॥ तैसीं बांधलीं सोडितां । बुडालीं काढितां । सांकडीं फेडितां । आर्तांचिया ॥ १ ॥ किंबहुना दिवसरातीं । पुढिलांचें सुख उन्नति । आणित आणित स्वार्थीं । प्रवेशिजे ॥ २ ॥ वांचूनि आपुलिया काजालागीं । प्राणिजाताच्या अहितभागीं । संकल्पाचीही ओडवंगी । न करणें जें ॥ ३ ॥ पैं अद्रोहत्व ऐशिया गोष्टी । ऐकसी जिया किरीटी । तें सांगितलें हें दिठी । पाहों ये तैसें ॥ ४ ॥ ( ९०९. अमानित्व, २०५–२०६ ) आणि गंगा शंभूच्या माथा । पावोनि संकोचे जेविं पार्था । तेविं मान्यपणें सर्वथा । लाजणें जें ॥ ५ ॥ ते हें पुढतपुढती । अमानित्व जाण सुमति । मागां सांगितलेंसें किती । तेंचि तें बोलों ॥ ६ ॥ ( ९१०. दैवी संपत्तीचें महत्त्व, २०७–२१२ ) एवं इहीं सव्विसें । ब्रह्मसंपदा हे वसत असे । मोक्षचक्रवर्तीचें जैसें । अग्रहार होय ॥ ७ ॥ ना ना हे संपत्ति दैवी । या गुणतीर्थांची नीच नवी । निर्विण्णसगराची दैवी । गंगाचि आली ॥ ८ ॥ कीं गुणकुसुमाची माळा । हे घेऊनि मुक्तिबाळा । वैराग्यनिरपेक्षाचा गळा । गिंवसीत असे ॥ ९ ॥ कीं सव्विसें गुणज्योति । इहीं उजळूनि आरति । गीता आत्मया निजपति । नीराजनों आली ॥ २१० ॥ उगळिते निर्मळें । गुण इयेंचि मुक्ताफळें । दैवी शुक्ति कैळें । गीतार्णवींची ॥ ११ ॥ काय बहु वानूं ऐसी । अभिव्यक्ति ये आपैसी । केलें दैवी गुणराशि । संपत्ति रूप ॥ १२ ॥ ( ९११. आसुरी संपत्ति, २१३–२१६ ) अवतरण.—आतां दुःखाची आंतुवट वेली । दोषकांट्यांची जरी भरली । तरी निर्जाभिधानीं घालीं । आसुरी ते ॥ १३ ॥ पैं त्याज्य त्यजावयालागीं । जाणावी जरी अनुपयोगी । तरी ऐका ते चांगी ।

१ मानुषी व दैवी. २ कायम. ३ स्वच्छ करून. ४ गंगारूप अमृतानें. ५ शुचिर्भूतपणा. ६ वृक्ष. ७ संपत्तीची. ८ सूर्य ९ अद्यपळा. १० ह्या सव्वीस गुणाची. ११ वैराग्यरूपी. १२ ओंवाळण्यास. १३ उकलून वर आलेलीं. १४ शिंपल्यातून. १५ गीतारूप समुद्रांतून. १६ स्पष्ट करणें. १७ मरलेली. १८ आपले मनांत.

गोष्टी जरी एकसमयावच्छेदेंकरून प्राप्त झाल्या, तरी जो अगस्ति ऋषीप्रमाणें धीर धरून त्या सहन करतो; ९३ आकाशांत धुराचा मोठा लोट गेला तरी ज्याप्रमाणें वाऱ्याची एक झुळुक त्यास नष्ट करते, ९४ त्याप्रमाणें अर्जुना, आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक हे उपद्रव जरी एकदम उत्पन्न झाले, तरी जो ते सर्व गिळून टाकतो; ९५ आणि याप्रमाणें चित्तात राग उत्पन्न होण्याचे वेळीं धैर्य कायम ठेवितो, त्यालाच धृति असें म्हणतात. ९६ आतां, सुवर्णकलश स्वच्छ करून त्यांत गंगारूपी अमृत भरलें असतां तें जसें सर्वच शुद्ध असतें, त्याप्रमाणें ' शौच ' होय. ९७ ज्या मनुष्याचें आचरण निष्काम असतें व ज्याच्या अंतर्यामीं विवेक जागृत असतो, तो जसा अंतर्यामीं व बाहेरूनही शुद्ध असतो, त्याप्रमाणें ' शौच ' होय. ९८ गंगेचें उदक जसें समुद्राकडे जातांना सहज तीरावरील वृक्षांचें पोषण करितें, व स्नान करणारांचेंही पाप नाहींसें करून त्यांस संसारतापापासून मुक्त करतें; ९९ किंवा ज्याप्रमाणें सूर्य आपली रोजची प्रदक्षिणा करण्यास निघाला म्हणजे अंधकाराचा नाश करतो, व जगांतील संपत्तीचीं मंदिरें उघडून व्यापार सुरू होतो, २०० त्याप्रमाणें, जे बद्ध असतील त्यांना मुक्त करून, व जे संसारसागरांत बुडाले आहेत त्यांना तारून, जे पीडित आहेत त्यांचें दुःख निवारण करतो; १ किंबहुना रात्रंदिवस स्वार्थ साधीत असतांही जो दुसऱ्याचें सुख वाढवितो; आणि २ स्वार्थ साधण्याकरितां दुसऱ्याचा नाश करण्याविषयीं ज्याच्या अंतःकरणांत संकल्पही उत्पन्न होत नाहींत, ३ त्यालाच अर्जुना, ' अद्रोहत्व ' असें म्हणतात; व तें मीं तुला तुझ्या दृष्टीस उघड रीतीनें पडेल असें सांगितलें आहे. ४ आणि पार्था, भगीरथानें गंगेची प्रार्थना करून तिला मृत्युलोकांत आणिते वेळीं तिला शंकरांनीं आपले जटेंत धारण केल्यावर तिचा आपले वेगाचा गर्व हरण होऊन ती लज्जित झाली, त्याप्रमाणें, लोकांनीं मान दिला असतां जो संकोचित होतो, ५ त्यालाच, हे सुमते अर्जुना, ' अमानित्व ' असें म्हणतात; याबद्दल तुला मागें पुष्कळ वेळां सांगितलें आहे. तेंच तें पुनः किती सांगूं ? ६ याप्रमाणें दैवी संपत्ति या सव्वीस गुणांना चक्रवर्ती परमात्म्यानें अग्रहार करून दिली आहे. ७ किंवा ही दैवी संपत्ति या सव्वीस गुणरूपी तीर्थांनीं नित्य नवी असून, वैराग्यरूपी सगराचा उद्धार करण्याकरितां जणूं काय भगवती गंगाच प्राप्त झाली आहे. ८ किंवा ही गुणरूपी पुष्पांची माळ हातांत घेऊन मुक्तिरूप वधू निरपेक्ष वैराग्यरूप वराचा गळा शोधीत आहे; ( त्याला वरण्याकरितां पाहत आहे, ) ९ अथवा या गुणरूपी वाती लावून, गीता आपल्या आत्मरूपी पतीस ओंवाळण्याकरितां आरती घेऊन आली आहे. २१० किंवा गीतारूप समुद्रांतील हीं गुणरूपी मोत्यें दैवी संपत्तिरूप शिंपल्यांत उत्पन्न झालीं आहेत. ११ दैवी संपत्तीचीं जीं हीं लक्षणें सांगितलीं, त्यांपेक्षां अधिक किती म्हणून सांगूं ? १२ आतां, आसुरी संपत्ति ही दुःखरूपी वेली असून दोषरूपी कांट्यांनीं जरी भरलेली आहे, तरी तूं आपले मनात ती समजून घे. १३ कारण असें पहा कीं, जी वस्तु त्याज्य आहे, ती आपल्या उपयोगाची नाहीं

श्रोत्रशेक्ती ॥ १४ ॥ तरी नरकव्यथा थोरी । आणावया दोषीं घोरीं । मेळु केला ते आसुरी । संपत्ति हे ॥ १५ ॥ ना ना विषवर्गु एकवटु । तया नांव जैसा वासैंदु । आसुरी संपत्ति हा खोटुं । दोषांचा तैसा ॥ १६ ॥

दंभो दर्पोऽतिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥

अन्वयः—पार्थ, दंभः, दर्पः, अतिमानः, क्रोधः च पारुष्यं एव च अज्ञानं ( एतानि लक्षणानि ) आसुरीं संपदम् अभिजातस्य ( पुरुषस्य भवन्ति ) ॥ ४ ॥

( ९१२. दंभ, २१७–२२३ ) तरी तयाचि आसुरां । दोषांमाजी जया वीरा । वाडपणाचा डांगोरा । तो दंभु ऐसा ॥ १७ ॥ जैसी आपुली जननी । नेम्र दाविलिया जनीं । ते तीर्थचि परी पतनीं । कारण होय ॥ १८ ॥ कां विद्या गुरूपदिष्टा । चोभाइलिया चोहटां । तरि इष्टदा परि अनिष्टा । हेतु होती ॥ १९ ॥ पैं आगें बुडतां महापुरीं । जे वेगें काढी पैलतीरीं । ते नावचि बांधिलिया शिरीं । बुडवी जैसी ॥ २० ॥ कारण जें जीविता । तें वांनिलें जरि सेवितां । तरि अन्नचि पंडुसुता । होय विष ॥ २१ ॥ तैसा दृष्टादृष्टाचा सखा । धर्मु जाला तो फोकारिजे देखा- । तरि तारिता तोचि दोखा- । लागीं होय ॥ २२ ॥ म्हणौनि वाचेचा चौबारा । घातलिया धर्माचा पसारा । धर्मुचि तो अधर्मु होय वीरा । तो दंभुं जाणे ॥ २३ ॥ ( ९१३. दर्प, २२४–२२९ ) आतां मूर्खांचिये जिभे । अक्षराचा आंबुखा सुभे । आणि तो ब्रह्मसभे । नें रिझे जैसा ॥ २४ ॥ कां मांदुरी लोकांचा घोडा । गर्जपतिही मानी थोडा । कां कांटिये वरिल्या सरडा । स्वर्गुही नीच ॥ २५ ॥ तृणाचेनि इंधनें । आगी धांवे गगनें । थिल्लरबळें मीनें । न गणिजे सिंधु ॥ २६ ॥ तैसा माजे स्त्रिया धनें । विद्या स्तुती बहुतें मानें- । एके दिवसीं-चेनि परान्नें । अल्पंकु जैसा ॥ २७ ॥ अभ्रच्छायेचिया जोडी । निदैवु घर मोडी । मृगांबु देखोनि फोडी । पाणियाढें मूर्ख ॥ २८ ॥ किंबहुना ऐसेंसें । उतणें जें संपत्तिमिसें । तो दर्पु गा अनारिसें । न बोलें येई ॥ २९ ॥ ( ९१४. अभिमान, २३०–२३६ ) आणि जगा वेदीं विश्वासु । आणि विश्वासी पूज्य ईशु । जगीं एक तेजसु । सूर्युचि हा ॥ ३० ॥ जग स्पृहे आस्पदं । एक सार्वभौमपद । न मरणें निर्विवाद । जगा पेढियें ॥ ३१ ॥ म्हणौनि जग उत्साहें । यातें वानूं

१ सावधगिरीनें. २ अति भयंकर विष–कालकूट. ३ गोळा. ४ प्रमुखलाचा. ५ निंदा करून. ६ महाविद्या. ७ गुरूनें उपदेशिलेली. ८ उघड केली. ९ हित करणारी. १० उत्तम म्हणून अधिक लाहे. ११ इह-परलोकचा. १२ चव्हाटा. १३ ढोंग. १४ शितोडा; चार अक्षरें. १५ पडला; प्राप्त झाली तर. १६ भीत नाहीं. १७ मद्यपी. १८ राजा. १९ डबकें. २० दरिद्री. २१ आढ. २२ गर्व. २३ इच्छा करितें. २४ स्थान. २५ आवडतें.

हें खरें; पण तिचा त्याग करण्याकरितांच ती फार सावधपणें ऐकून घे. १४ हें बघ–जीवांना भयंकर अशी नरकप्राप्ति करून देण्याकरितां घोर दोषांनीं जी आपली जूट केली आहे, तीच ही आसुरी संपत्ति. १५ किंवा, सगळीं विषें एकत्र झालीं म्हणजे ज्याप्रमाणें त्यांस काळ-कूट हें नांव द्यावें, त्याप्रमाणें आसुरी संपत्ति म्हणजे दोषांचा गोळाच होय. १६

श्लोकार्थः—अर्जुना, ढोंगीपणा, गर्व, मानीपणा, क्रोध, मर्मभेदक भाषण आणि अज्ञान हीं लक्षणें आसुरी संपत्तींत उत्पन्न झालेल्या पुरुषाचे ठिकाणीं असतात ॥ ४ ॥

हे वीरा, ह्या आसुर दोषामध्यें जो मुख्य म्हणून प्रसिद्ध आहे, तो दंभ असा आहे: १७ ज्याप्रमाणें आपल्या आईची निंदा करून तिचे दोष लोकांस उघड केले असतां ती तीर्थाप्रमाणें आपल्यास पावन करणारी असूनही आपल्या पतनास तीच कारणीभूत होते, १८ किंवा गुरुपासून संपादन केलेली ब्रह्मविद्या जर चव्हाट्यावर उघड करीत बसलें, तर ती आपलें हित करणारी असूनही तिजपासून आपलें अहितच होतें; १९ हें पहा कीं, जी स्वतः महापुरांत पाण्यांत बुडून दुसऱ्यास वेगानें पलीकडील तीरास नेते, तीच नाव जर आपल्या डोक्यावर घेतली, तर ज्याप्रमाणें आपल्यास बुडविते; २२० हे पांडुसुता, जीवाचें रक्षण करणारें जें अन्न, तेंच उत्तम म्हणून जर अधिक सेवन केलें, तर तें अन्न खरें परंतु विषाप्रमाणें घातक होतें, २१ त्याप्रमाणें, इहपरलोकींचा सखा जो धर्म, तो जर चव्हाट्यावर उघडा केला, तर तो आपल्यास तारणारा खरा परंतु त्याजपासून दोष घड-तात. २२ म्हणून हे वीरा, आपण केलेला धर्म जर चहूंकडे आपल्या वाचेनें प्रसिद्ध केला, तर तो धर्मच अधर्म होतो; आणि त्यालाच दंभ असें म्हणतात. २३ आतां, मूर्ख मनु-ष्यास चार अक्षरें येण्याबरोबर तो जसा ब्रह्मदेवाचे सभेंतही वल्गना करण्यास भीत नाहीं, २४ किंवा मद्यपान केलेल्या मनुष्याचा घोडा जसा राजाचे स्वारीसही तुच्छ मानतो; अथवा कांटेरी झाडांवरील सरडा झाडाच्या वरच्या टोंकावर बसला म्हणजे आपण स्वर्गा-पेक्षांही उंच स्थानीं आहों असें मानतो; २५ तृण हेंच इंधन मिळालें तरी अग्नीच्या ज्वाला ज्याप्रमाणें आकाशाला जाऊन पोहोंचतात, किंवा डबक्यातील मासा त्याच्या जोरावर समुद्र तुच्छ मानतो, २६ अथवा ज्याप्रमाणें एक दिवस परान्न मिळालें कीं तेवढ्यानें दरिद्री उन्मत्त होतो, त्याप्रमाणें जो स्त्री, धन, विद्या, स्तुति व बहुमान यांनीं उन्मत्त होतो; २७ एखादे दिवशीं अभ्रच्छाया पडलेली पाहून, (आता आपल्याला बसावयास सावली काय करावयाची आहे अशा विचारानें) दैवहीन मनुष्य ज्याप्रमाणें आपलें घर मोडून टाकतो, किंवा जसा मृगजळ पाहून एखादा मूर्ख मनुष्य आपल्या घरांतील आड बुजवून टाकतो; २८ किंब-हुना याप्रमाणें संपत्तीच्या योगानें जें उन्मत्त होणें; त्याला दर्प असें म्हणतात, असें तुला मी निःसंशय सांगतों. २९ आणि सर्व जगाचा वेदावर भरंवसा आहे; व ईश्वर सर्व जगास पूज्य आहे; आणि सर्व जगांत सूर्याप्रमाणें तेजस्वी दुसरा कोणी नाहीं; २३० सर्व जगास एका सार्वभौमपदाची इच्छा असते; व आपल्यास मरण येऊं नये हें सर्व

जाये। कीं तें आइकोनि मत्सरु वाहे। फुगों लागे ॥ ३२ ॥ म्हणे ईश्वरातें खायें। तया वेदा विष सूये। गोखामाजीं ग्रैाये। भंगीत असे ॥ ३३ ॥ पतंगा नावडे ज्योति। खद्योता भानूची खंती। टिटिमेनें अपांपेति। वैरी केला ॥ ३४ ॥ तैसा अभिमानाचेनि मोहें। ईश्वराचेंही नाम न साहे। बापातें म्हणे मज हे। सवती जाली ॥ ३५ ॥ ऐसा मान्यतेचा पुष्टगंडु। तो अभिमानी परमलंडू। रौरवाचा रूढु। मार्गुचि पैं ॥ ३६ ॥ (९१५. क्रोध, २३७–२४२) आणि पुढिलांचें सुख। देखणियांचें होय मिष। चढे क्रोधाग्नीचें विख। मनोवृत्ती ॥ ३७ ॥ शीतजलाचिये भेटी। तातला तेलीं आगी उठी। चंद्रु देखोनि जळे पोटीं। कोल्हा जैसा ॥ ३८ ॥ विश्वाचें आयुष्य जेणें उजळे। तो सूर्य उदैला देखोनि सवेळे। पापिया फुटती डोळे। डुडुळांचे ॥ ३९ ॥ जगाची सुखपहांट। चोरां मरणाहूनि निकृष्ट। दुधाचें काळकूट। होय व्याळीं ॥ ३४० ॥ अगाधें समुद्रजळें। प्राशितां अधिक जळे। वडवाग्नि न मिळे। शांति कहीं ॥ ४१ ॥ तैसा विद्याविनोदविभवें। देखे पुढिलांचीं दैवें। तंव तंव रोषु दुणावे। क्रोधु तो जाण ॥४२॥ (९१६. पारुष्य, २४३-२४५) आणि मन सर्पाची कुंटी। डोळे नाराचांची सुटी। बोलणें ते वृष्टि। इंगळांची ॥ ४३ ॥ येर जें क्रियाजात। तें तिखयाचें कवेत। ऐसें सबाह्य खसांसित। जयाचें गा ॥४४॥ तो मनुष्यांत अधमु जाण। पारुष्याचें अवतरण। आतां आईक खुण। अज्ञानाची ॥४५॥ (९१७. अज्ञान, २४६-२५२) तरी शीतोष्णस्पर्शा। निवाडु नेणे पाषाणु जैसा। कां रात्री आणि दिवसा। जात्यंधु तो ॥ ४६ ॥ आगी उठला अंगिगणें। जैसा खाद्याखाद्य न म्हणे। कां परिस पाडु नेणे। सोनया लोहा ॥ ४७ ॥ नातरि ते नानारसीं। रिघोनि दर्वी जैसी। परि रसस्वादासी। चाखों नेणे ॥ ४८ ॥ कां वारा जैसा पारखी। नव्हेचि गा मार्गामार्गाविखीं। तैसें कृत्याकृत्यविवेकीं। अंधपण जें ॥ ४९ ॥ हें चोख हें मैळ। ऐसें नेणोनियां बाळ। देखे तें केवळ। मुखींचि घाली ॥ ५० ॥ तैसें पापपुण्याचें खिचटें। करोनि खातां बुद्धिचेष्टे। कडु मधुर न वाटे। ऐसी जे दशा ॥ ५१ ॥ तिये नाम अज्ञान। या बोला नाहीं आन। एवं साही दोषांचें चिन्ह। सांगितलें ॥ ५२ ॥ (९१८. आसुरी संपत्ति गुणांनीं थोडी पण कीर्तिनें मोठी, २५३-२६३) इहींच साही दोषांगीं। हे आसुरी संपत्ति दौंडगी। जैसें थोर विष भुजंगीं। अंग

१ गोप्ता–रक्षण करणारा. २ सत्ता. ३ टिटवीनें. ४ समुद्र. ५ मोठा ताठा. ६ उन्मत्त. ७ रौरव नरकाचा. ८ प्रसिद्ध. ९ तापलेल्या. १० सकाळीं. ११ घुबडाचे. १२ ऐश्वर्य. १३ वारूळ. १४ बाणांची. १५ वृष्टि. १६ पोलादी. १७ मनास टोचणाऱ्या क्रियांनीं भरलेलें. १८ कठोर भाषणाचें. १९ लक्षण; मूर्ति. २० खावयाला. २१ पळी. २२ खिचडी. २३ बुद्धिव्यापारास. २४ बलाढ्य.

जगास आवडतें हें निर्विवाद आहे; ३१ म्हणून लोक मोठ्या उत्साहानें वेदाचें व ईश्वराचें वर्णन करतात; पण तें ऐकल्याबरोबर ज्याचे मनांत मत्सर उत्पन्न होऊन जो रागावतो; ३२ व म्हणतो कीं, मी ईश्वरास खाऊन टाकीन, वेदास विष घालून ठार करीन, व जो सर्वांचें रक्षण करणारा त्याची सत्ता हरण करीन ! ३३ पतंगाला दिव्याचा उजेड सहन होत नाहीं, काजव्याला सूर्याचा तिटकारा येतो, व टिटवी समुद्राशीं वैर मांडते, ३४ त्याप्रमाणें, ईश्वराची कोणीं स्तुति केली असतां अभिमानाच्या मदानें त्याला सहन होत नाहीं; व बाप आपल्या संपत्तीचा अंश मागेल या भीतीनें म्हणतो कीं, ही मला सवतच उत्पन्न झाली आहे ! ३५ याप्रमाणें ज्याचे अंगात मानाचा अतिशय ताठा भरला आहे, तोच ' अभिमानी ' होय. तो उन्मत्त पुरुष रौरव नरकाचा हमरस्ताच होय. ३६ आणि दुसऱ्याचें सुख पाहण्याचें निमित्त होण्याबरोबर ज्याच्या मनोवृत्तीस क्रोधरूप अग्नीचें विष चढतें; ३७ ज्याप्रमाणें तापलेल्या तेलांत थंड पाणी टाकलें असतां तें जास्त भडकतें, किंवा चंद्राला पाहताच कोल्हा आपल्या मनांत जळफळावयास लागतो; ३८ ज्याच्या योगानें सर्व विश्वाचे व्यापार सुरू होतात तोच सूर्य सकाळीं उगवलेला पाहून पापी घुबडाचे मात्र डोळे फुटतात; ३९ जी पहांट झाली म्हणजे सर्व लोकांस सुख होतें, तिच्याचपासून चोरास मरणाहूनही जास्त दुःख होतें, आणि सर्पास दूध घातलें तरी त्याचें भयंकर असें विषच होतें, २४० अगाध अशा समुद्रजलाचें प्राशन करीत असतांही वडवाग्नि उलटा अधिकच प्रदीप्त होतो, आणि त्याला शांतता म्हणून कसली ती नाहींच, ४१ त्याप्रमाणें, दुसऱ्याचें विद्याविनोदवैभव आणि सभाग्यता हीं पाहून ज्याच्या अंगाचा अगदीं तिळपापड होऊन जातो, त्याला ' क्रोध ' असें म्हणतात. ४२ ज्याचें मन सर्पाच्या वारुळाप्रमाणें असून दृष्टि बाणांच्या अग्रांप्रमाणें तीक्ष्ण असते, व ज्याचें भाषण अग्नीच्या वर्षावाप्रमाणें प्रखर असतें, ४३ आणि ज्याच्या इतर क्रिया पोलादी करवतीप्रमाणें इतरांना त्रासदायक आहेत, अशा प्रकारें जो दुसऱ्याचे मनास भेद होणाऱ्या क्रियांनीं अंतर्बाह्य भरलेला आहे, ४४ तो मनुष्यांत अधम असें समज, याप्रमाणें पारुष्याचें लक्षण होय. आतां अज्ञानाचीं लक्षणें सांगतों तीं ऐक. ४५ ज्याप्रमाणें दगडास थंडी व ऊन यांच्या स्पर्शाची समज नसते, किंवा जन्मांधास रात्र व दिवस समजत नाहींत. ४६ अग्नि भडकल्यावर तो जसा कोणत्या वस्तूचा नाश करावा किंवा कोणतीचा करूं नये हें जाणत नाहीं; अथवा परिसास सोनें किंवा लोखंड यांत जसा भेद नसतो, ४७ किंवा पळी ज्याप्रमाणें नानातऱ्हेच्या रसांत फिरविली तरी तिला रस किंवा स्वाद यांचा उपभोग घेतां येत नाहीं, ४८ अथवा वारा वाहूं लागला म्हणजे हा लहान किंवा मोठा रस्ता न समजतां सर्वत्र वाहतो, त्याप्रमाणें, चांगल्या किंवा वाईट कृत्याच्या विचाराविषयीं जो अंधळा असतो, ४९ ही वस्तु चांगली किंवा वाईट हें न जाणतां, लहान मूल जसें जी वस्तु पाहील ती तोंडांत घालतें, २५० त्याप्रमाणें पापपुण्यांची खिचडी करून ती खाते वेळीं ( कोणतेंही कृत्य करते वेळेस ) बुद्धिव्यापारास कडू किंवा मधुर ( बरें किंवा वाईट ) न समजणें अशी जी दशा, ५१ तिला अज्ञान असें म्हणतात, यांत संशय नाहीं. याप्रमाणें सहाही दोषांचीं लक्षणें तुला सांगितलीं. ५२ हे सहाही दोष आंगीं असल्यामुळेच ही आसुरी संपत्ति मोठी बलाढ्य झालेली आहे. ज्याप-

सानें ॥ ५३ ॥ का तिघां वन्हींच्या पांती । पाहतां थोडे ठाय गमती । परि विश्वही प्राणाहुति । करूं न पुरे ॥ ५४ ॥ धातयाही गेलिया शरण । त्रिदोषी न चुके मरण । तया तिहींची दुणी जाण । साही दोष हे ॥ ५५ ॥ इहीं साही दोषीं संपूर्णीं । जाली इयेची उभारणी । म्हणोनि आसुरी उणी । संपदा नव्हे ॥ ५६ ॥ परि क्रूरग्रहांची जैसी । मांदी मिळे एकेचि राशी । कां येती निंदकापासीं । अशेष पापें ॥ ५७ ॥ मरणाराचें आंग । पडिघाती अवघेचि रोग । कां कुमुहूर्तीं दुर्योग । एकवटती ॥ ५८ ॥ विश्वासला आतुंडवीजे चोरा । शिणला सुइजे महापुरा । तैसें दोषीं इहीं नरा । अनिष्ट कीजे ॥ ५९ ॥ कां आयुष्य जातिये वेळे । शेळिये सातँवेउळी मिळे । तैसे साही दोष सगळे । जोडती तया ॥ २६० ॥ मोक्षमार्गाकडे । जें ययाचा आंबुखा पडे । तें न निघे म्हणोनि बुडे । संसारीं जो ॥ ६१ ॥ अधमां योनींच्या पाउटीं । उतरत जो किरीटी । स्थावराही तळवटीं । बैसणें घे ॥ ६२ ॥ हें असो तयाच्या ठायीं । मिळोनि साही दोषीं इहीं । आसुरी संपत्ति पाहीं । वाढविजे ॥ ६३ ॥ (९१९. दैवी संपत्ति मुक्त करणारी व आसुरी संपत्ति बंध करणारी, २६४–२६६) ऐसिया या दोनी । संपदा प्रसिद्धा जनीं । सांगितलिया चिन्हीं । वेगळाल्या ॥ ६४ ॥

दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता ।
मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥

अन्वयः--दैवी संपत् विमोक्षाय ( च ) आसुरी ( संपत् ) निबंधाय मता. पाण्डव, ( त्वं ) दैवीं संपदं अभिजातः असि, ( तस्मात् ) मा शुचः. ॥ ५ ॥

इया दोन्हींमाजी पहिली । दैवी जे म्हणितली । ते मोक्षसूर्यें पांहली । उखाँचि जाण ॥ ६५ ॥ येरी जे दुसरी । संपत्ति कां आसुरी । ते मोहलोहाची खरी । सांखळी जीवां ॥ ६६ ॥ (९२०. दैवी संपातिमान अर्जुन, २६७-२७०) परि हें आइकोनि झणें । भय घेसी हो मनें । काय रात्रीचा दिनें[१२] । धाकु धरिजे ॥ ६७ ॥ हे आसुरी संपत्ति तया । बंधालागीं धनंजया । जो साही दोषां ययां । आश्रयो होय ॥ ६८ ॥ तूं तंव पांडवा । सांगितलेया दैवा । गुणनिधि बरवा । जन्मलासी ॥ ६९ ॥ म्हणोनि पार्था तूं या । दैवी संपत्ति स्वामिया । होऊनि यावें उवायाँ । कैवल्याचिया ॥ २७० ॥

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ।
दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥

अन्वयः--पार्थ ! अस्मिन् लोके दैवः च आसुरः एव द्वौ भूतसर्गौ ( स्तः; तत्र ) दैवः विस्तरशः प्रोक्तः; आसुरं मे शृणु. ॥ ६ ॥

---

१ संख्या. २ ब्रह्मदेवालाही. ३ दुष्ट. ४ व्यापतात. ५ धांपडाया. ६ पडाया. ७ सात

माणें सर्पाचें शरीर लहान असलें तरी त्याचें विष भयंकर असतें, ५३ किंवा प्रलयाग्नि, विद्युदग्नि व वडवाग्नि या तीन अग्नींची संख्या पाहूं गेलें असतां थोडी आहे, पण ते भडकल्यावर त्यांना प्राणाहुति करण्याला हें विश्वही पुरणार नाहीं, ५४ ब्रह्मदेवास शरण गेलें असतांही ज्या त्रिदोष झालेल्या मनुष्याचें मरण चुकत नाहीं, त्या तीन दोषांच्या दुप्पट हे सहा दोष आहेत असें समज. ५५ या संपूर्ण सहा दोषांनीं ह्या आसुरी संपत्तीची उभारणी झाली असल्यामुळें, ही कमी आहे असें नाहीं. ५६ परंतु क्रूर ग्रहांचा समुदाय एखादे वेळीं एकाच राशीला येतो, किंवा निंदा करणाराला जशीं सर्व पापें लागतात, ५७ मरण समीप आलेल्या मनुष्यास ज्याप्रमाणें सर्व रोग ग्रस्त करतात, किंवा कुमुहूर्ताचे वेळीं कुयोग एकत्र होतात, ५८ दुसऱ्यावर विश्वास ठेवणारा मनुष्य चोरांच्या तावडींत सांपडावा, किंवा थकला भागलेला मनुष्य महापुरांत पडावा ( म्हणजे त्यांचे वाईट परिणाम होतात ), त्याप्रमाणें, या दोषांनीं मनुष्याचें अतिशय अनिष्ट होतें. ५९ किंवा शेळी मरते वेळीं तिला सात नांग्यांची इंगळी चावते, त्याप्रमाणें हे सहा दोष त्या मनुष्यास प्राप्त होतात, कीं २६० ज्याचे मोक्षमार्गास जाण्याचे सर्व उपाय बंद असल्यामुळें जो संसारसागरांत बुडतो, ६१ आणि अर्जुना, अधम योनींच्या पायऱ्यांनीं उतरत उतरत जो स्थावर योनींच्या तळापर्यंत येऊन ठेपतो. ६२ हें असो, त्याच्या ठिकाणीं हे सहा दोष एकत्र होऊन आसुरी संपत्ति वाढवितात. ६३ याप्रमाणें जगांत ज्या ह्या दोन संपत्ति प्रसिद्ध आहेत, त्यांचीं निरनिराळीं लक्षणें तुला सांगितलीं. ६४

श्लोकार्थः—दैवी संपत्तीपासून संसारांतून सुटका होते, आणि आसुरी संपत्तीपासून संसाराचें बंधन प्राप्त होतें. अर्जुना, तूं दैवी संपत्तींत जन्मला आहेस, तेव्हां तूं शोक करूं नको ॥ ५ ॥

या दोन संपत्तीपैकीं पहिली जी दैवी संपत्ति तुला सांगितली, ती म्हणजे मोक्षरूपी सूर्याच्या उदयानें झालेली पहांटच आहे असें समज. ( सूर्योदयाच्या पूर्वी जशी पहाट होते, तशी ह्या दैवी संपत्तीची प्राप्ति म्हणजे मोक्षापूर्वीची स्थिति होय. ) ६५ दुसरी जी आसुरी संपत्ति, ती जीवास मोहरूपी लोखंडाची प्रत्यक्ष बेडीच होय. ६६ पण हें ऐकून तूं मनांत धास्ती घेशील हो ! हें पहा कीं, सूर्यानें रात्रीचा का धाक बाळगावा ? ६७ हे धनंजया, या आसुरी संपत्तीच्या सपाट्यांत तोच सांपडतो, कीं जो या सहाही गुणांस आश्रय देतो. ६८ अर्जुना, तूं तर असा जन्म पावला आहेस कीं, आतां सांगितलेल्या या दैवी गुणांचा उत्तम असा समुद्रच. ६९ म्हणून पार्था, तूं या दैवी संपत्तीचा स्वामी होऊन, मोक्षसुख घेण्यास ये. २७०

श्लोकार्थः—अर्जुना, या लोकीं दैव आणि आसुर असे दोन प्रकारचेच मनुष्याचे वर्ग आहेत. त्यांपैकीं, दैववर्ग पूर्वी तुला विस्तारानें सांगितलाच आहे; आतां आसुरवर्गाचीं लक्षणें सांगतों तीं ऐक ॥ ६ ॥

---

नांग्याची इंगळी. ८ धितोंडा; गवसणी. ९ पायऱ्यांनीं. १० उजाडलेली. ११ पहाट; प्रातःकाल. १२ सूर्यानें. १३ सुख भोगण्यास.

( ९२१. आसुरी संपत्तिच अध्याय संपेपर्यंत, २७१-२७६ ) आणि दैवा आसुरां। संपत्तिवंतां नरां। अनादिसिद्ध उजगरा। राहाटीचा आहे ॥ ७१ ॥ जैसें रात्रीच्या अवसरीं। व्यापारिजे निशाचरीं। दिवसा सुव्यवहारीं। मनुष्यादिकीं ॥ ७२ ॥ तैसिया आपुलिया राहाटीं। वर्तती दोनी सृष्टी। दैवी आणि किरीटी। आसुरी येथ ॥ ७३ ॥ तेवींचि विस्तारूनि दैवी। ज्ञानकथनादि प्रस्तावीं। मागील ग्रंथीं बरवी। सांगितली ॥ ७४ ॥ आतां आसुरी जे सृष्टि। तेथींची उपलऊं गोठी। अवधानाची दिठी। दे पां निकी ॥ ७५ ॥ अवतरणः—तरी वाद्येंवीण नादु। नेदी कवणाही सादु। कां अपुष्पीं मकरंदु। न लभे जैसा ॥ ७६ ॥ ( ९२२. आसुरी संपत्ति घेऊन जन्मलेले, २७६-२८० ) तैसी प्रकृति हे आसुर। एकली नोहे गोचर। जंव एकाधें शरीर। मांल्हातीना ॥ ७७ ॥ मग आविष्करला लाकुडें। पावकु जैसा जोडे। तैसी प्राणिदेहीं सांपडे। आटोपली हे ॥ ७८ ॥ ते वेळीं जे वाढी उंसा। तेचि आंतुला रसा। देहाधाराचा उसांसा। प्राणियांचा ॥ ७९ ॥ आतां तयांचि प्राणियां। रूप करूं धनंजया। घडले जे आसुरिया। दोषवृंदीं ॥ २८० ॥

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः।
न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥

अन्वयः—आसुराः जनाः प्रवृत्तिं च निवृत्तिं न विदुः; तेषु च न शौचं न च अपि आचारः न सत्यम् विद्यते. ॥ ७ ॥

( ९२३. प्रवृत्ति–निवृत्तीचें अज्ञान, २८१–२८४ ) तरि पुण्यालागीं प्रवृत्ति। कां पापाविषयीं निवृत्ति। या जाणणेयाची राती। तयांचें मन ॥ ८१ ॥ निगणेया आणि प्रवेशा। चित्त नेदीतु आवेशा। कोशकीटु जैसा। जाचिन्नला पैं ॥ ८२ ॥ कां दिधलें मागुती येईल। कीं नये हें पुढील। न पाहाता दे भांडवल। मूर्ख चोरां ॥ ८३ ॥ तैसिया प्रवृत्ति निवृत्ति दोनी। नेणिजती आसुरीं जनीं। आणि शौच तें स्वप्नीं। देखती ना ते ॥ ८४ ॥ ( ९२४. अशुचि, २८५–२८६ ) काळिमा सांडील कोळसा। वरिचोखीं होईल वायसा। राक्षसही मासा। विटों शके ॥ ८५ ॥ परि आसुरा प्राणियां। शौच नाहीं धनंजया। पवित्रत्व जेवि भांडिया। मद्याचिया ॥ ८६ ॥ ( ९२५. दुराचार, २८७–२८९ ) वेंढविती विधीची आस। कां पाहाती वडिलांची वींस। आचाराची भाप। नेणतीचि ते ॥ ८७ ॥ जैसें चरणें शेळियेचें। कां धांवणें वारियाचें। जाळणें आगीचें। भलतेउतें ॥ ८८ ॥ तैसें पुढां सूनि स्वैर। आचरती ते गा आसुर। सत्येंसि कीर वैर। सदाचि तया ॥ ८९ ॥ ( ९२६. असत्य, २९०–२९२ ) जरी नांगिया आपुलिया। विंचू करी गुदगुलिया। तरी

१ मार्ग. २ ज्ञान सांगते वेळीं. ३ सांगूं. ४ पुष्परस. ५ आश्रय केल्याशिवाय. ६ माव्हेली. ७ वाट. ८ कोंडला. ९ पांढरेपणा. १० नाहींशी करतात. ११ वाट. १२ पुढें करून.

आणि या दैवी व आसुरी संपत्तींनीं युक्त अशा लोकांच्या वागणुकीचे अनादिसिद्ध मार्ग चालत आलेले आहेत. ७१ ज्याप्रमाणें रात्रीं निशाचरांचे व्यापार चालू असतात, व दिवसा मनुष्यादिकांचे योग्य व्यवहार चालत असतात, ७२ त्याप्रमाणें, अर्जुना, आपआपल्या मार्गानें ही दैवी व आसुरी सृष्टि चालत असते. ७३ त्याचप्रमाणें, ज्ञान सांगते वेळीं दैवी संपत्ति मागले अध्यायांत विस्तारेंकरून सांगितली, ७४ आतां, आसुरी संपत्तींत वागणारे जे लोक, त्यांजविषयीं तुला सांगतों तिकडे पूर्ण लक्ष असूं दे. ७५ तर नाद ज्याप्रमाणें वाद्याशिवाय कोणास ऐकूं येत नाहीं, किंवा पुष्पाशिवाय मकरंद मिळत नाहीं, ७६-त्याप्रमाणें ह्या आसुरी संपत्तीनें एखाद्या शरीराचा आश्रय केल्याशिवाय ती दृष्टीस पडत नाहीं. ७७ मग लाकडावर लांकूड घासल्यानें जसा त्या ठिकाणीं अग्नि दृष्टीस पडतो, तशी मनुष्याच्या देहांत ओतप्रोत भरलेली ही दृष्टोत्पत्तीस येते. ७८ त्या वेळीं, ऊंस ज्याप्रमाणें वाढत जाईल तसा त्यांतील रसही वाढतो, त्याप्रमाणें, जसजसा प्राण्याचा देह वाढेल तसतशीं तीही वाढते. ७९ आतां अर्जुना, आसुरी संपत्तीच्या दोषांनीं युक्त असे जे प्राणी जन्मलेले आहेत, त्यांचीं लक्षणें तुला सांगतों. २८०

श्लोकार्थः—आसुरी संपत्तीच्या लोकांना, कोणतें काम करावें व कोणतें करूं नये हें समजत नाहीं; आणि त्याचे ठिकाणीं अंतर्बाह्य शुचिर्भूतपणा आणि त्याचप्रमाणें आचार व सत्य हीं नसतात ॥ ७ ॥

तर पुण्याचरणाविषयीं प्रवृत्ति किंवा पापाचरणाविषयीं निषेध या जाणिवेचा ज्यांचे अंतःकरणांत काळोख असतो; ८१ कोशकिडा आवेशानें आपलें घरटें बांधूं लागला म्हणजे ज्याप्रमाणें आपल्यास बाहेर निघण्याला किंवा आंत प्रवेश करण्याला वाट आहे किंवा नाहीं इकडे लक्ष न देतां आंत कोंडला जातो; ८२ अथवा आपण दिलेलें भांडवल वसूल होईल किंवा नाहीं हा पुढील विचार न पाहतां मूर्ख मनुष्य चोरास कर्जाऊ पैसे देतो, ८३ त्याप्रमाणें, आसुरी संपत्तीचा आश्रय करणारे जे लोक आहेत, ते प्रवृत्ति व निवृत्ति हे दोन्ही मार्ग जाणीत नाहींत; आणि शुचित्व कसें तें त्यांना स्वप्नांत देखील माहीत नसतें. ८४ कोळसाही आपला काळेपणा टाकील, कावळाही पांढरा होईल, आणि राक्षसही मांस खाण्याचा वीट मानतील; ८५ पण, अर्जुना, ज्याप्रमाणें मद्याच्या पात्रास पवित्रपणा येत नाहीं, त्याप्रमाणें या आसुरी प्राण्यांस शुचित्व येणार नाहीं. ८६ ज्यांना शास्त्रोक्त कर्माची इच्छा नसते, जे वडिलांच्या आज्ञेची वाट पहात नाहींत आणि आचाराची ज्यांना ओळखही नसते; ८७ ज्याप्रमाणें शेळी हवा तो पाला खाते, किंवा वारा वाटेल तिकडे वाहतो, तसाच अग्नि एकदा भडकल्यावर हवा तो पदार्थ जाळून टाकतो, ८८ त्याप्रमाणें, आपले इच्छेला पुढें करून आसुरी संपत्तीचे लोक आचरण करितात, व सत्याबरोबर त्यांचें नेहमीं हाडवैर असतें. ८९ जर विंचू आपली नांगी मारून त्यायोगानें लोकास गुदगुल्या करूं शकेल, तरच त्याच्या बोलण्यांत सत्य आढळेल. ९०

साचा बोलिया । बोलती ते ॥ २९० ॥ अपानाचेनि तोंडें । जरि सुगंधा येणें घडे । तरि सत्य तयां जोडे । आसुरांतें ॥ ९१ ॥ ऐसें ते न करितां कांहीं । आंगचि बोखटें पाहीं । अवतरणः—आतां बोलती ते नवाई । सांगिजेल ॥ ९२ ॥ ( ९२७. असत्य भाषण, २९३–२९७ ) येऱ्हवीं करैयाच्या ठायीं चांग । तें तयासि कैचें नीट आंग । तैसा आसुरांचा प्रसंग । प्रसंगें परिस ॥ ९३ ॥ उधैवणीचें जेवि तोंड । उभैळीं धुवाँचे उभडे । हें जाणिजे तेविं उघड । सांगों ते बोल ॥ ९४ ॥

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥

अन्वयः—‘ ( इदं ) जगत् असत्यं, अप्रतिष्ठं, अनीश्वरम्, अपरस्परसंभूतं, ( च ) कामहैतुकं ( अस्ति ), अन्यत् किं ! ’. ( इति ते ) आहुः ॥ ८ ॥

तरि विश्व हा अनादि ठावो । येथ नियंता ईश्वररावो । चावडिये न्यावो अन्यावो । निवडी वेदु ॥ ९५ ॥ वेदीं अन्यायी पडे । तो निरैयभोगें दंडे । सन्यैायी तो सुखैवाडें । स्वर्गीं जिये ॥ ९६ ॥ ऐसी हे विश्वव्यवस्था । अनादि जे पार्था । इयेतें म्हणती ते वृथा । अवघेंचि हें ॥ ९७ ॥ ( ९२८. वेद अप्रमाण मानणें, २९८–३०७ ) यज्ञमूढ ठकिले यागीं । देवापिसे प्रतिमालिंगीं । नागवले भगवे योगी । समाधिभ्रमें ॥ ९८ ॥ येथ आपलेनि बळें । भोगिजे जें जें वेंटाळे । हें वांचोनि वेगळें । पुण्य आहे ॥ ९९ ॥ ना अशक्तपणें आंगिकें । वेगळ वेंटाळीं न टके । ऐसा गैादिजेवीण विषयसुखें । तेंचि पाप ॥ ३०० ॥ प्राण घेपती संपन्नाचे । हें पाप जरी साचें । तरी सर्वस्व हाता ये तयांचें । हें पुण्यफळ कीं ॥ १ ॥ बळी अबळातें खाय । हेंचि बाधित जरी होय । तरी मासयां कां न होय । निसंतान ॥ २ ॥ आणि कुळें शोधूनि दोन्ही । कुमारेंचि शुभलग्नीं । मेळवीजती प्रजासाधनीं हेतु जरी ॥ ३ ॥ तरी पशुपक्ष्यादि जाती । जयां मिति नाहीं संतती । तयां कोणें प्रतिपदीं॑ । विवाह केले ॥ ४ ॥ चोरियेचें धन आलें । तरि तें कोणासि विष जालें । वैलभें पैरद्वार केलें । कोढी कोणी होय ॥ ५ ॥ म्हणोनि देवो गोसावी । तो धर्माधर्मु भोगवी । आणि परत्राच्या गैांवीं । करी तो भोगी ॥ ६ ॥ परि परत्र ना देवो । न दिसे म्हणोनि तें वावो । आणि कर्ता निमे मा ठावो । भोग्यासि कवणु ॥ ७ ॥ ( ९२९. जगत्-उत्पत्तीचें कारण काय, ३०८–३१२ ) येथ उर्वशिया इंद्र सुखी । जैसा कां स्वर्गलोकीं । तैसाचि कृमिही नरकीं । लोळतु

१ उंटाच्या. २ धुराड्याचें. ३ ओकते. ४ धुराचे. ५ लोट. ६ नरक. ७ न्यायानें वागणारा. ८ सुखानें. ९ गांजला जातो. १० पाप. ११ पावलोपावलीं. १२ आवडीनें १३ व्यभिचार. १४ परलोकीं. १५ मरतो.

२९० गुदद्वारांतून निघणारा वारा जर सुगंधयुक्त निघेल, तरच आसुरी संपत्तीच्या लोकांजवळ सत्य सांपडेल ! ९१ अशा प्रकारें कांहीं न करतांही ते स्वभावत.च वाईट असतात, समजलास ? आतां, त्याचे बोलण्याचा नवलाव तुला सांगतों. ९२ एरव्हीं, उंटाच्या ठिकाणीं पाहूं गेलें तर त्याचा कोणता अवयव नीट आहे म्हणून सांगतां येणार ? त्याप्रमाणें आसुरी संपत्तीच्या लोकांची स्थिति आहे. परंतु प्रसंगानुसार सांगतों ती ऐक. ९३ आतां जीं आम्ही त्यांचीं भाषणें सांगणार आहों, तीं म्हणजे धुराड्याच्या तोंडांतून ज्याप्रमाणें धुराचे लोट बाहेर निघतात, त्याप्रमाणें असतात असें समज. ९४

श्लोकार्थः—' हे जग लबाड, धर्माधर्मांची स्थिति ज्यांत नाहीं असें, ईश्वररहित, संयोगजन्य आणि ज्याला काम हेंच मूळ कारण, असें आहे, दुसरें काय ? ' असें ते म्हणतात. ॥ ८ ॥

तर विश्व हें अनादि चालत आलेलें आहे, व त्या ठिकाणीं ईश्वर हा सर्वांत श्रेष्ठ असून तेथील नियंता आहे, आणि तेथील चावडीवर वेद हे न्याय व अन्याय यांचा उलगडा करतात; ९५ वेद ज्याला अन्यायी ठरवितात, त्याला नरकभोगाची शिक्षा होते; व न्यायी ठरवितात तो सुखानें स्वर्गवास करतो. ९६ पार्था, अनादि कालापासून चालत आलेली जी ही विश्वाची व्यवस्था, तिला, हें सर्व खोटें आहे, असें ते म्हणतात. ९७ ज्यांना यज्ञाचें वेड लागलें आहे, ते यज्ञ करून फसतात; ज्यांना देवांची पूजा करण्याचें वेड लागलें आहे; ते मूर्तिपूजा करतात; व जे समाधियोगानें भ्रम पावले आहेत, ते हा संसार टाकून, भगवीं वस्त्रें पांघरून योगी होतात. ९८ या जगांत आपल्या सामर्थ्यानें ज्याचा उपभोग घेतां येईल त्यावांचून दुसरें पुण्य आहे काय ? ९९ सर्व विषयोपभोग एकत्र करून अंगांत शक्ति नसल्यामुळें त्यांचा उपभोग ज्याला घेतां येत नाहीं, तेंच पाप होय. ३०० श्रीमान लोकांचे प्राण हरण करणें हें जरी खरोखर पाप आहे, तरी त्यांचें सर्व धन आपले हातांत येतें हें पुण्यफळ होय. १ जो बलवान असतो तो अशक्ताचा नाश करतो; हें जर पाप म्हणावें, तर मोठे मासे लहान माशांस खातात, तर त्यांचें निसंतान कसें होत नाहीं ? २ आणि दोन्हीकडील कुळें शोधून प्रजा उत्पन्न करण्याच्या हेतूनें जर मुलामुलींचे समुहूर्तावर विवाह करतात, ३ तर पशुपक्ष्यादिकांस जी अनिवार संतति होते, त्यांचीं सुमुहूर्त पाहून पावलोपावलीं कोण लग्नें लावितो ? ४ चोरून आणलेल्या धनाचा कोणीं उपयोग केला असतां कोणास तें विषाप्रमाणें बाधलें आहे काय ? किंवा आवडीनें व्यभिचार केला असतां कोणास कोड उत्पन्न झालें आहे काय ? ५ म्हणून, ईश्वर जो जगाचा स्वामी आहे, तो धर्माधर्मानें वागणारांस शासन करतो, आणि या लोकीं केलेलें कृत्य मनुष्यास परलोकीं भोगावें लागतें; ६ परंतु परलोक व ईश्वर दिसत नाहींत, म्हणून त्याविषयीं बोलणें व्यर्थ होय; आणि पुण्य किंवा पाप करणारा मरण पावला तर त्याचीं फळें भोगण्यास कोण उरतो ? ७ हें पहा—स्वर्गलोकीं ज्याप्रमाणें उर्वशीच्या उपभोगानें इंद्र सुखी असतो, त्याप्रमाणेंच नरकांतील किडेही त्यांतच संतोष मानतात. ८ म्हणून

श्लोंघे ॥ ८ ॥ म्हणौनि नरक स्वर्गु । नव्हे पापपुण्यभागु । जे दोहीं ठायीं सुख-भोगु । कामाचाचि तो ॥ ९ ॥ याकारणें कामें । स्त्रीपुरुषयुग्में । मिळतीं तेथ जन्मे । आघवें जग ॥ ११० ॥ आणि जें जें अभिलाषें । स्वार्थालागीं हें पोषे[३] । पाठीं परस्परद्वेषें । कामचि नाशी ॥ ११ ॥ एवं कामावांचूनि कांहीं । जगा मूळचि आन नाहीं । ऐसें बोलती पाहीं । आसुर गा ते ॥ १२ ॥ (९३०. आसुरांचे वर्णनानें वाणीला शीण, ३१३) आतां असो हें किडाळ । बोलीं न करूं पघळ । सांगतांचि सैफोल । होतसे वाचा ॥ १३ ॥

एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।
प्रभवंत्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥

अन्वयः—एतां दृष्टिं अवष्टभ्य नष्टात्मानः, अल्पबुद्धयः, उग्रकर्माणः अहिताः जगतः क्षयाय प्रभवन्ति ॥ ९ ॥

(९३१. जगत् अनीश्वर या समजुतीनें घोर कर्में करितात, ३१४-३२२) आणि ईश्वराचिया खंती । तुसाधियाचि करिती चांथी । हेंही नाहीं चित्तीं । निश्चयो एकु ॥ १४ ॥ किंबहुना उघड । आंगीं लाऊनियां पाखांड । नास्तिक-पणाचें हाडँ । रोंविलें जीवीं ॥ १५ ॥ ते वेळीं स्वर्गालागीं आदरु । कां नरकाचा अडदरु । या वासनांचा अंकुरु । जळोनि गेला ॥ १६ ॥ मग केवळ ये देहखोडां । अमेध्योदकाचा बुडबुडा । विषयपंकीं सुहाडा । बुडाले गा ॥ १७ ॥ जैं आंटावे होती जळचर । तैं डोहीं मिळती ढीवरें । कां पडावें होय शरीर । तैं रोगां उदयो ॥ १८ ॥ उदैजणें केतूचें जैसें । विश्वा अनिष्टोद्देशें । जन्मती ते तैसे । लोकां आटूं ॥ १९ ॥ विरूढलिया अशुभ । फुटती तैं ते कोंभ । पापाचे कीर्तिस्तंभ । चालते ते ॥ ३२० ॥ आणि मागां पुढां जाळणें । वाचूनि आगी कांहीं नेणे । तैसें विरुद्धाचि एक करणें । भलतेया ॥ २१ ॥ अवतरण —परि तेंचि गा करणें । आद-रिती संभ्रमें जेणें । तो आईक पार्था म्हणे । श्रीनिवासु ॥ २२ ॥

काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः ।
मोहाद् गृहीत्वाऽसद्ग्राहान्प्रवर्ततेऽशुचिव्रताः ॥ १० ॥

अन्वयः—दुष्पूरं काममाश्रित्य मोहात् असत् ग्राहान् गृहीत्वा अशुचिव्रताः दंभमानमदा-न्विताः प्रवर्तंते ॥ १० ॥

(९३२. काम, दंभ, मान यांच्या साहयानें कर्में करितात, ३२३–३२९) तरि जैंळ पाणियें न भरे । आगी इंधनें न पुरे । तयां दुर्भराचिये धुरे । भकाळ जो ॥ २३ ॥ तया कामाचा वोलैंवा । जीवीं धरूनि पांडवा । दंभमानाचा मेळावा । मेळविती ॥ २४ ॥ मातलिया कुंजैरा । आगळी जाली मदिरा । तैसा मदाचा

---

१ संतोष मानतो. २ इच्छेनें. ३ मिळवितो. ४ निंद्य. ५ व्यर्थ. ६ बडबड. ७ हा महार-वाडा आहे हें समजण्याकरितां त्या ठिकाणीं एक हाड रोंवलेलें असतें, त्याप्रमाणें. ८ भय. ९ अपवित्र

नरक किंवा स्वर्ग हें पापकर्माचें किंवा पुण्यकर्माचें फल नाहीं. कारण दोन्ही ठिकाणीं कामाचाच सुखोपभोग प्राप्त होतो. ९ यास्तव कामाच्या इच्छेनें स्त्रीपुरुष एकत्र झाले असतां सर्व जगाची उत्पत्ति होते; १० आणि आपल्या हिताकरितां जी जी इच्छा करून आपण कांहीं मिळवितों, त्याचा आपल्यास वीट आल्यावर द्वेष उत्पन्न होऊन आपली इच्छाच त्याचा नाश करिते. ११ याप्रमाणें, जगाच्या उत्पत्तीस कामावांचून दुसरें कांहीं नाहीं, असें आसुर लोक म्हणतात. १२ आतां ह्या निंद्य बोलण्याचा जास्ती विचार नको. कारण याविषयीं चर्चा करणें केवळ व्यर्थ होय. १३

श्लोकार्थः—या पूर्वोक्त दृष्टीचा आश्रय करून ज्यांचे स्वभाव दुष्ट झाले आहेत, जे विषयलंपट झाले आहेत, जे भयंकर कर्मे करणारे व सर्वांशीं वैर करणारे आहेत, असे आसुरी संपत्तींतील लोक जगाचा नाश करण्यास उत्पन्न झालेले असतात. ॥ ९ ॥

आणि ईश्वराचा तिटकारा करून नुसती बडबड करतात; इतकेंच नव्हे, तर त्यांच्या चित्तांत एक निश्चय नसतो; १४ किंबहुना, आपण पाखांडी आहों असें म्हणवून घेऊन नास्तिकपणाचें हाड आपले जीवांत रोंवून घेतात. १५ मग स्वर्गाविषयीं श्रद्धा किंवा नरकाचें भय यांविषयीं त्यांचे मनांत कांहीं एक वागत नाहीं. १६ मग, वीरा अर्जुना, हे आसुरी लोक देहरूपी खोड्यांत सांपडून अपवित्र जलाच्या नाशवंत बुडबुड्याप्रमाणें विषयरूपी चिखलांत बुडतात. १७ ज्या वेळेस जलचरांचा मृत्यु ओढवतो, त्या वेळेस त्यांना धरण्याकरितां डोहावर कोळी लोक जमून जाळीं टाकतात, किंवा शरीरपतनाची वेळ आल्यावर रोग उद्भवतात, १८ किंवा प्रजेला पीडा व्हावयाची असेली म्हणजे ज्याप्रमाणें धूमकेतु आकाशांत उगवतो, त्याप्रमाणें, लोकांचा नाश होण्याची वेळ आली म्हणजे आसुर उत्पन्न होतात. १९ ज्याप्रमाणें अशुभ पेरलें असतां त्याला अशुभच कोंब येतात, त्याप्रमाणें हे पापाचे चालतेबोलते कीर्तिस्तंभच आहेत. ३२० आणि ज्याप्रमाणें अग्नीला मागें अथवा पुढें आलेली वस्तु जाळण्याशिवाय दुसरें कर्तव्य नसतें, त्याप्रमाणें त्यांच्याजवळ येणारा मनुष्य चांगला असो अथवा वाईट असो, त्याचा हे नाशच करतात. २१ परंतु ज्या समारंभानें ते आपलीं कृत्यें करतात, त्याचें वर्णन करतों, तें ऐक, असें श्रीनिवास पार्थास म्हणाले. २२

श्लोकार्थ—अनिवार कामाचा स्वीकार करून व मोहानें भलताच ग्रह धरून ते दुराचारी, आणि दंभ, मान व मद यांनीं युक्त असे लोक कर्मे करण्यास उद्युक्त होतात ॥ १० ॥

तर जाळ्यांत कधीं पाणी सांठवितां येत नाहीं, व अग्नीला काष्ठें कधीं पुरीं होत नाहींत, अशा दुर्भर वस्तूंप्रमाणें जो नेहमीं बुभुक्षित असतो, २३ त्या कामाला आपले मनांत आश्रय देऊन, हे पांडवा, जे दंभ व मान यांची त्यांत भर घालतात, २४ माज-

जलाचा. १० मृत्यु ओढवतो. ११ कोळी. १२ पेरलें असता. १३ समारंभानें. १४ जाळें. १५ तृप्ति न होणाऱ्या. १६ आश्रय. १७ हत्तीला.

ताठा तंव जरा-। चढतां आंगीं ॥ २५ ॥ आणि आग्रहा तोचि ठावो। वरि मौढ्याऐसा सावांवो । मग काय वानूं निर्वाहो । निश्चयाचा ॥ २६ ॥ जिहीं परोपैतापु घडे। परावा जीवु रगडे। तिहीं कर्मीं होऊनि गाढे। जन्मवृत्ति ॥२७॥ मग आपुलें केलें फोकारिती। आणि जगातें धिकारिती। दाही दिशीं पसरिती। स्पृहाँजाळ ॥ २८ ॥ ऐसेनि गा आँटोपें । थोरियें जाणिती पापें । धर्मधेनु खुरपें। सुटलें जैसें ॥ २९ ॥

चिंतामपरिमेयां च प्रलयांतामुपाश्रिताः।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥

अन्वयः—( ते ) अपरिमेयां प्रलयांतां चिंताम् उपाश्रिताः च कामोपभोगपरमाः एतावत् इति निश्चिताः ॥ ११ ॥

( ९३३. चिंतेला न सोडतां कामभोगातच पुरुषार्थ, ३३०–३३६ ) याचि येका आयेती। तयाचिया कर्मप्रवृत्ती । आजि जिणियाही परौती । वाहती चिंता ॥ ३३० ॥ पाताळाहूनि निम्न । जियेचिये उंचिये सानें गगन। जे पाहतां त्रिभुवन। अणुही नोहे ॥ ३१ ॥ ते योगपटाँची मवणी। जीवीं अनियम चिंतवणी। जे सांडूं नेणे मैरणीं । वल्लभीं जैसी ॥ ३२ ॥ तैसी चिंता अपार। वाढविती निरंतर। जीवीं सूनि असारें । विषयादिक ॥ ३३ ॥ स्त्रियां गाइलें आइकावें। स्त्रीरूप डोळा देखावें । सर्वेंद्रियें आलिंगावें । स्त्रियेतेंचि ॥ ३४ ॥ कुरवंडी कीजे अमृतें। ऐसें सुख स्त्रियेपरौतें। नाहींचि म्हणौनि चित्तें । निश्चयो केला ॥ ३५ ॥ मग तयाचि स्त्रीभोगा-। लागीं पाताळ स्वर्गा। धांवती दिग्विभागौं-। परौतेही ॥ ३६ ॥

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः।
ईहंते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥

अन्वयः—आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः कामभोगार्थं अन्यायेन अर्थसंचयान् ईहन्ते ॥ १२ ॥

( ९३४. आशापाशांत बद्ध होऊन अन्यायानें द्रव्य मिळविणें, ३३७--३४७ ) आमिषैंकवल थोरी आशा। न विचारितां गिळी मासा। तैसें कीजे विषयाशा। तयांहि गा ॥ ३७ ॥ वांछित तंव न पवती। मग कोरडियेचि आशेची संतति। वाढऊं वाढऊं होती। कोशकिडे ॥ ३८ ॥ आणि पसारिला अभिलाषु। अपूर्णु होय

१ साहाय्य. २ परपीडा. ३ इच्छेचें जाळें. ४ अभिमानानें. ५ साधनानें. ६ खोल. ७ संन्याशास घालून दिलेल्या नियमाप्रमाणें. ८ मोजणी. ९ चिंता धारण करतात. १० सकटात. ११ पतीचे ठिकाणीं एकनिष्ठ असणारी स्त्री. १२ खोटें. १३ दिशाच्या सीमेपलीकडे. १४ मासाचे गोळे.

लेल्या हत्तीस ज्याप्रमाणें दारू पाजल्यावर तो अधिक उन्मत्त होतो, त्याप्रमाणें अंगांत मदाचा ताठा भरलेले ते आसुरी संपत्तीनें युक्त असे लोक जों जों वृद्ध होतात, तों तों आपणांस मोठे वुद्धाचार्य असें समजतात, २५ आणि ते कोणतीही गोष्ट दुराग्रहानें तडीस नेल्याशिवाय ठेवीत नाहींत. तशांत मूर्खपणाची भर पडल्यावर मग निश्चयाची दाद कोठे लागणार ? २६ ज्या योगानें दुसऱ्यास पीडा होईल किंवा दुसऱ्याची प्राणहानि होईल, तीं कर्मे करण्याविषयीं जे नेहमीं प्रवृत्त असतात, २७ आपण केलेलें कृत्य चहूंकडे प्रसिद्ध करतात व जगाला तुच्छ मानतात, आणि त्याच्या इच्छेची धाव दाही दिशांत पसरते; २८ ज्याप्रमाणें गाय शेतांत मोकळी सोडल्यावर ती हवी तिकडे चरते, त्याप्रमाणें अभिमानानें पापाचरणाची वृद्धि करतात; २९

श्लोकार्थः—जिचें मोजमाप करितां येत नाहीं, व मरणापर्यंत जिचा अंत होत नाहीं, अशा चिंतेचा आश्रय केलेल्या आणि कामोपभोगामध्येंच मग्न झालेल्या पुरुषाचा, ( कामशांति ) हाच पुरुषार्थ होय, असा निश्चय झालेला असतो ॥ ११ ॥

याच एका साधनानें ते आपलीं कर्मे करतात; आणि मरण पावल्यावरही आपल्यास सुख मिळावें म्हणून काळजी वाहतात. ३३० जी चिंता पाताळाहूनही खोल व गगनाहूनही उंच, आणि जिच्याशीं तुलना केली असतां त्रिभुवन अगूएवढेंही दिसत नाहीं; ३१ संन्याशास घालून दिलेल्या नियमाप्रमाणें हे आपला किता वळवून मनांत अनियमित चिंता धारण करतात; आणि ज्याप्रमाणें पतिव्रता स्त्री संकटसमयींही आपल्या नवऱ्यास सोडीत नाहीं, त्याप्रमाणें ती यांना सोडीत नाहीं. ३२ त्याचप्रमाणें असार अशा विषयादिकांविषयीं नेहमीं मनांत लालसा बाळगून त्याच्या प्राप्तीविषयीं अपार चिंता वाहतात, ३३ स्त्रियांचे गाणें नेहमीं ऐकावें, स्त्रियांचे स्वरूप डोळ्यांनीं पाहावें, सर्व इंद्रियांना स्त्रियांचेंच आलिंगन करण्यास सांपडावें, ३४ आणि स्त्रीपासून होणाऱ्या सुखावरून अमृतही ओंवाळून टाकावें; अशा प्रकारें, स्त्रीपेक्षां अधिक असें दुसरें सुखच नाहीं असा त्यांचे मनानें निश्चय केलेला असतो. ३५ मग त्याच स्त्रीभोगाकरितां स्वर्गांत, पाताळांत किंवा दिशांचे सीमेपलीकडेही धाव घेण्यास ते तयार असतात. ३३६

श्लोकार्थः— शतशः आशापाशांनीं बद्ध झालेले व कामक्रोधाचे ठिकाणीं तत्पर असलेले ते लोक आपल्या इच्छेप्रमाणें भोग भोगण्याकरितां अन्यायानें पुष्कळ द्रव्य मिळविण्याची इच्छा करतात ॥ १२ ॥

गळास लाविलेल्या आमिषाच्या आशेनें मासा जसा तें खावयास जाऊन मरण पावतो, तसे हे विषयाच्या आशेनें मरण पावतात. ३७ इच्छित गोष्टी प्राप्त न होतां नेहमीं विषयाची कोरडी आशाच करून शेवटीं हे आपल्यास कोशकिड्याप्रमाणें बंधन करून घेतात; ३८ आणि ज्या वस्तूची इच्छा करावी, ती जर पूर्ण झाली नाहीं, तर लागलीच द्वेष उत्पन्न होतो. ( याप्रमाणें नेहमीं वस्तुलाभापासून तृप्ति मानून तीच वस्तु न मिळाल्यामुळें क्रोध-

तोचि द्वेषु । एवं कामक्रोधांहूनि अधिकु । पुरुषार्थु नाहीं ॥३९॥ दिहा खोलंणें रात्रीं जागोवा । ठाणांतरिया जैसा पांडवा । अहोरात्रिंही विसांवा । भेटेचिना ॥३४०॥ तैसें उंचौनि लोटिलें कामें । नेहटैती क्रोधाचेचि ढेमें । तरी रागद्वेष प्रेमें । न माती केंही ॥ ४१ ॥ तेविंचि जीवींचिया हावा । विषयवासनांचा मेळावा । केला परी तो भोगावा । अर्थे कीं ना ॥ ४२ ॥ म्हणोनि भोगावयाजोगा । पुरता अर्थु पैं गा । आणावया जगा । झोंबती सैरा ॥ ४३ ॥ एकातें साधूनि मारिती । एकाचीं सर्वस्वें हरिती । एकालागीं उभारिती । अपायंयंत्रें ॥ ४४ ॥ पाशिकें पोतीं वागुरा । सुंणीं ससाणे चिकोटी खोचौरा । घेऊनि निघती डोंगरा । पारधी जैसे ॥ ४५ ॥ ते पोसावया पोट । मारूनि प्राणियांचे संघाट । आणिती ऐसें निकृष्ट । तेंही करिती ॥ ४६ ॥ अवतरणः—परप्राणघातें । मेळविती वित्तें । मिळाल्या चित्तें । तोषणें कैसें ॥ ४७ ॥

इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥१३॥

अन्वयः—अद्य इदं मया लब्धं, इदं मनोरथं ( श्वः ) प्राप्स्ये, इदं धनं ( अधुना ) मे अस्ति, च ( इदं ) अपि धनं पुनः भविष्यति ॥ १३ ॥

( ९३५. धनाबद्दल मनोराज्य, ३४८–३५१ ) म्हणे आजि मियां । संपत्ति बहुतेकांचिया । आपुल्या हातीं केलिया । धन्यु ना मी ॥ ४८ ॥ ऐसा श्लाघों जंव जाये । तंव मन आणीकही वाहे । सर्वेचि म्हणे पाहे । आणिकांचेंही आणूं ॥ ४९ ॥ हें जेतुलें असे जोडिलें । तयाचेनि भांडवलें । लाभा घेईन उरलें । चराचर हें ॥ ३५० ॥ ऐसेनि धना विश्वाचिया । मीचि होईन स्वामिया । अवतरणः—मग दिठी पडे तया । उरों नेदीं ॥ ५१ ॥

असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १४ ॥

अन्वयः—असौ शत्रुः मया हतः, अपरान् अपि च हनिष्ये; अहं ईश्वरः, अहं भोगी, अहं सिद्धः, बलवान् ( च ) सुखी ( अस्मि ). १४ ॥

( ९३६. शत्रूला मारून धनाच्या भोगानें बलाढ्य होईन. ३५२-३५६ ) हे मारिले वैरी थोडे । आणीकही रांधीन गाढे । मग नांदेन पवाडें । येकलाचि मी ॥ ५२ ॥ मग माझी होतील कामारीं । तियेंवांचूनि येरे मारीं । किंबहुना चराचरीं । ईश्वरु तो मी ॥ ५३ ॥ मी भोगभूमीचा रावो । आजि सर्वसुखासी ठावो ।

१ चालणें. २ ठाण्यांतील स्वारास. ३ आदळतात. ४ टेंकडीवर. ५ कामक्रोध. ६ लदबिदात. ७ नाश करण्याच्या युक्त्या. ८ पाश. ९ जाळें. १० शिकारी कुत्रे. ११ चिकटण्या. १२ भाले. १३ प्रौढी मिरवीत आहे तों. १४ मारीन. १५ बलाढ्य. १६ कानें. १७ सेवक.

युक्त होतात. ) एवंच, कामक्रोध वाढविण्यापलीकडे ज्यांना कर्तव्य नसतें, ३९ अर्जुना, ज्याप्रमाणें ठाण्यांतील स्वारास दिवसा कामगिरीकरितां फिरावें लागतें व रात्रीं गस्त घालावी लागते, म्हणून त्याला रात्रंदिवस विसावा नसतो, ३४० त्याप्रमाणें, उंच शिखरावरून कामानें लोटून दिल्यामुळें ( ज्या वस्तुविषयीं अतिशय इच्छा धरली, ती न मिळाल्यामुळें ) क्रोधाच्या टेंकडीवर आदळतात, ( क्रोधाविष्ट होतात, ) तरी त्याचें कामक्रोधांविषयींचें प्रेम कमी होत नाहीं. ४१ त्याचप्रमाणें, मनांत उत्पन्न झालेली विषयांची इच्छा पैशाशिवाय पूर्ण कोठून होणार ? ४२ म्हणून, विषयवासना पूर्ण होण्यापुरतें द्रव्य मिळविण्याकरितां जगांतील लोकांस त्रास देतात. ४३ एखाद्याला आडरानांत गांठून मारतात, एखाद्याचें सर्वस्व हरण करतात, व एखाद्याचा नाश करण्याकरितां युक्ति लढवितात. ४४ पारधी लोक डोंगरांवर शिकारीस जाते वेळीं ज्याप्रमाणें आपल्याजवळ पाश, पोतीं, जाळीं, शिकारी कुत्रे, बहिरी ससाणे, चिकाट्या व भाले घेतात, ४५ आणि आपलें पोट भरण्याकरितां पुष्कळ प्राणी मारून आणतात, त्याप्रमाणें हेहि अशींच वाईट कर्मे करतात. ४६ दुसऱ्याचा प्राणघात करून द्रव्य मिळवितात; आणि तें मिळाल्यावर त्यांच्या चित्तास कसा संतोष होतो तें ऐक. ४७

श्लोकार्थः—हें मीं आज मिळविलें, हा मनोरथ मी उद्यां साध्य करीन, हें इतकें धन आतां मजपाशीं आहे, हेंही पुनः अधिक वाढेल, ( असें मनोराज्य ते करितात ) ॥ १३ ॥

तो म्हणतो, " आज बहुतेकांची संपत्ति मीं स्वाधीन करून घेतली आहे, तेव्हां मी आतां धन्य नाहीं काय ? " ४८ याप्रमाणें आपणच आपली प्रौढी मिरवीत आहे, तों त्याचे मनांत लागलीच इच्छा उत्पन्न होते कीं, " आणखीही पुष्कळ लोकांचें द्रव्य हरण करून आणूं. ४९ जेवढें कांहीं आज आपण मिळविलें आहे, तेवढ्या भांडवलावर, जें कांहीं आणखी चराचरापैकीं शिल्लक असेल तेवढें मिळवीन. ( लुबाडावयाजोग्या श्रीमंतांजवळ आणखी जी कांहीं स्थावरजंगम संपत्ति शिल्लक असेल तीही हरण करून आणीन. ) ३५० याप्रमाणें या विश्वांतील सर्व संपत्तीचा मीच मालक होईन. मग ज्याच्याकडे दृष्टि फिरवीन त्याला राहूं देणार नाहीं. ५१

श्लोकार्थः—हा शत्रु मीं मारला, व दुसरे आणखी देखील मारीन. मी मोठा समर्थ, मी विषयभोग घेणारा, मी संपन्न, मी बलवान, व मीच सुखी, ( आहे असें ते मानितात ) ॥ १४ ॥

" हे आजपर्यंत नष्ट केलेले शत्रु थोडे आहेत, तर आणखी दुसरे जे बलाढ्य आहेत त्यांनाही जिंकीन, आणि मग मी एकटाच मोठ्या लौकिकानें नांदेन. ५२ मग माझे जे सेवक होतील, त्यांखेरीज इतरांचा मी नाश करीन; किंबहुना या सर्व चराचराचा मी ईश्वरच होईन. ५३ मी या मृत्युलोकचा राजा असून सर्व सुखांचा उपभोग घेईन, म्हणून माझें ऐश्वर्य पाहून इंद्रही लाजेल. ५४ मी कायावाचामनेंकरून जें करीन तें सिद्धीस कसें जाणार नाहीं ? आणि माझ्यावांचून दुसरा आज्ञा करणारा कोण असणार ?

म्हणोनि इंदुही वावो । मातें पाहुनि ॥ ५४ ॥ मी मनें वाचा देहें । करीं तें कैसें नोहे । कें मजवांचूनि आहे । आज्ञासिद्ध आन ॥ ५५ ॥ तंवचि बळिया काळ । जंव न दिसें मी अतुर्बळ । सुखाचा कीर निखिळ । रासिवा मीचि ॥ ५६ ॥

आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥

अन्वयः—आढ्यः .अभिजनवान् अस्मि, मया सदृशः कः अन्यः अस्ति ? अहं यक्ष्ये, दास्यामि, मोदिष्ये इति ते अज्ञानविमोहिताः ( सतः ) ॥ १५ ॥

( ९३७. धनवान्, कुलवान, माझ्यासारखा यज्ञदानात दुसरा कोणी नाहीं, ३५७-३६३ ) कुबेरु आथिला होये । परी तो नेणे माझी सोये । संपत्ति मजसम नव्हे । श्रीनाथाही ॥ ५७ ॥ माझिया कुळाचा उजाळ । कां जातिगोतांचा मेळ । पाहतां ब्रह्माही हीळ । उणाचि दिसे ॥ ५८ ॥ म्हणोनि मिरविती नांवें । वायां ईश्वरादि आघवे । नाहीं मजसी सरी पावे । ऐसे कोण्ही ॥ ५९ ॥ आतां लोपला अभिचारु । त्याचा करीन मी जीर्णोद्धारु । प्रतिष्ठीन परमारु । यागवरि ॥ ३६० ॥ मातें गाती वानिती । नटनाचें रिझविती । तयां देईन मागती । ते ते वस्तु ॥ ६१ ॥ मोजिरा अन्नपानीं । प्रमदांच्या आलिंगनीं । मी होईन त्रिभुवनीं । आनंदाकारु ॥ ६२ ॥ काय बहु सांगों ऐसें । ते आसुरीप्रकृती पिसे । तुरंबिती ऐसोसे । गगनौळें तियें ॥ ६३ ॥

अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ।
प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥

अन्वयः—अनेकचित्तविभ्रांताः, मोहजालसमावृताः, कामभोगेषु प्रसक्ताः ते अशुचौ नरके पतंति ॥ १६ ॥

( ९३८. मोहजालाने वेढलेले पुरुष कामासक्त होऊन नरकांत पडतात, ३६४-३७२ ) ज्वराचेनि आटोपें । रोगी भलतैसें जल्पे । चावळती संकल्पें । जाण ते तैसे ॥ ६४ ॥ अज्ञान आंतुले धुळी । म्हणौनि आशा वाहटुळी । भोवंडीजती अंतराळीं । मनोरथांच्या ॥ ६५ ॥ अनियम आषाढ मेघ । कां समुद्रोर्मि अभंग । तैसे कामिती अनेग । अखंड काम ॥ ६६ ॥ मग पैं कामनांचि तया । जीवीं जाल्या वेलरियां । वोरापिलीं काटिया । कमळें जैसीं ॥ ६७ ॥ कां पाषाणाचिया माथां । हांडी फुटली पार्था । जीवीं तैसें सर्वथा । कुटके जाले ॥ ६८ ॥ तेव्हां चढतियें रजनीं । तमाची होय पुरवणी । तैसा मोहो अंतःकरणीं । वाढोचि लागे ॥ ६९ ॥ आणि वाढे जंव जंव मोहो । तंव तंव विषयीं राहो । विषय तेथ

१ आज्ञा करणारा. २ महा बलवान. ३ राशि. ४ संपन्न. ५ बरोबरी. ६ श्रीविष्णूचीही. ७ नावलौकिक. ८ थोडा, हलका. ९ जारणमारणादि. १० परपीडा. ११ मादक. १२ स्त्रियांच्या.

•५५ महाबलवान असा जो मी, त्या मला पाहिलें नाहीं तोंपर्यंतच कालाच्या बळाची प्रतिष्ठा आहे, आणि मी तर सुखाची केवळ रासच होय. ५६

श्लोकार्थः—धनाढ्य मी, कुलीन मी, या जगात मजसारखा दुसरा कोण आहे! मी यज्ञ करण्याच्या कामात सर्वोवर कडी करीन, व नट वगैरे लोकाना विशेष देणग्या देईन व आनंद पावेन, ( अशा प्रकारें अतिशय मूढ होऊन ते बडबड करितात ) ॥ १५ ॥

कुबेर संपन्न आहे खरा, परंतु त्याच्यानें माझी बरोबरी करवणार नाहीं; आणि माझ्या संपत्तीप्रमाणें श्रीविष्णूचीही संपत्ति नाहीं. ५७ माझ्या कुळाचा नावलौकिक किंवा आप्तवर्गाचा समुदाय याच्या मानानें ( सृष्टिकर्ता ) ब्रह्मदेवही थोडा कमीच होईल. ५८ म्हणून, लोक जो ईश्वरादिकांचा लौकिक गातात, तो व्यर्थ असून माझी बरोबरी करणारा कोणीही सांपडणार नाहीं. ५९ आतां जारणमारणादिकांचा जो लोप झाला आहे, त्यांचा मी जीर्णोद्धार करीन, व लोकांस पीडा करणारे जे यज्ञयाग ते करीन. ३६० माझ्या ऐश्वर्याचें जे वर्णन करतील, किंवा माझी स्तुति करतील, आणि नाचतमाशे करून जे मला संतोषवितील त्यांना ते मागतील त्या वस्तु मी देईन. ६१ मादक अन्न खाऊन व मद्य वगैरे पिऊन स्त्रियांना आलिंगन देण्यांत या त्रिभुवनात मी तल्लीन होईन." ६२ असें आणखी काय म्हणून सांगूं? ज्यांना आसुरी प्रकृतीचें वेड लागलें आहे, ते अशा प्रकारें आकाशपुष्पांचा अपरिमित इच्छेनें वास घेतात! ६३

श्लोकार्थः—अशा प्रकारें, अनेक मनोरथांनीं ज्यांचें चित्त विक्षिप्त झालेलें आहे, जे मोहजालानें वेढलेले आहेत, आणि कामभोगामध्यें अत्यंत आसक्त झालेले आहेत, ते पुरुष अमंगल नरकामध्यें पडतात ॥ १६ ॥

ज्याप्रमाणें सन्निपात झालेला रोगी हवें तें बरळतो, त्याप्रमाणें आसुरी संपत्तीनें वेडे झालेले लोक हव्या त्या कल्पना तोंडानें बकतात असें समज. ६४ अज्ञानरूपी धूळ आशारूपी वावटळीच्या सपाट्यांत सांपडल्यावर मनोरथरूपी आकाशांत वाटोळी फिरत जाते. ६५ ज्याप्रमाणें आषाढाचे महिन्यात एकावर एक असे पुष्कळ ढग येतात, किंवा समुद्रांत लाटांवर लाटा येतात, त्याप्रमाणें ते अखंड कामाची इच्छा करतात. ६६ मग मनोरथरूपी वेल मनांत पसरल्यावर, ज्याप्रमाणें काट्यांवरून कमळें ओढलीं असतां फाटून जातात, ६७ किंवा, पार्था, ज्याप्रमाणें दगडावर हंडी आपटली असतां फुटते, त्याप्रमाणें त्यांच्या मनोरथांचे तुकडे तुकडे होतात! ६८ तेव्हां, जों जों रात्र वाढेल तों तों काळोखही वाढतो. त्याप्रमाणें (जों जों अज्ञान वाढेल तों तों ) त्याचे अंतःकरणात मोह वाढतो; ६९ आणि जों जों मोह वाढेल, तों तों विषयवासनेची वृद्धि होते; आणि विषय तर पातकाला कारण आहेत. ३७० पापें बळावून जों जों वाढतील, तों तों जिवंतपणींच नरकयातना भोगाव्या लाग-

१३ हुंगितात, वास घेतात. १४ अपरिमित इच्छेनें. १५ आकाशपुष्पें. १६ भरात. १७ बडबडतो. १८ बरळतात. १९ सापडल्यावर. २० मनोरथ. २१ वेल. २२ ओरबाडलीं. २३ वासना.

ठावो । पातकासी ॥३७०॥ पापें आपलेनि थावें । जंव करिती मेळावे । तंव जितांचि आघवे । येती नरका ॥ ७१ ॥ म्हणौनि गा सुमति । जे कुमनोरथां पाळिती । ते आसुर येती वस्ती । तया ठाया ॥ ७२ ॥ ( ९३९. नरक, ३७३–३७५ ) जेथ असिपत्रतरुवर । खदिरांगाराचे डोंगर । तातला तेलीं सागर । उतताती ॥ ७३ ॥ जेथ यातनांची [3]श्रेणी । हे नित्य नवी यमजाचणी । पडती तिये दारुणीं । नरकलोकीं ॥ ७४ ॥ ऐसे नरकाचिये सेले । भागीं जे जे जन्मले । तेही देखों भुलले । यजिती यागीं ॥ ७५ ॥ ( ९४०. शास्त्रविधि सोडून यज्ञ, ३७६-३८८ ) येऱ्हवीं यागादिक क्रिया । आहार्णतेची धनंजया । परि विफेळती आचरोनियां । नाटकी जैसे ॥ ७६ ॥ वल्लभाचिया उजरियां । आपणयाप्रति कुस्त्रियां । जोडोनि तोषिती जैसिया । अहेवपणें ॥ ७७ ॥

आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।
यजंते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥

अन्वयः—आत्मसंभाविताः, स्तब्धाः, धनमानमदान्विताः ते अविधिपूर्वकम् दंभेन नामयज्ञैः यजन्ते ॥ १७ ॥

तैसें आपणया आपण । मानिता महंतपण । फुगती असाधारण । गर्वे तेणें ॥ ७८ ॥ मग लवों नेणती कैसे । आटिवा लोहाचे खांब जैसे । कां उंचवले आकाशें । शिळीराशि ॥ ७९ ॥ तैसे आपुलिये बैरवे । आपणाचि रिझैतां जीवें । तृणाहीहूनि आघवें । मानिती नीच ॥ ३८० ॥ वरि धनाचिया मदिरा । माजूनि धनुर्धरा । कृत्याकृत्यविचारा । सैंवतें केलें ॥ ८१ ॥ जया आंगीं औयती ऐसी । तेथ यज्ञाची गोठी कायसी । तरि काय काय पिसीं । न करिती गा ॥८२॥ म्हणौनि कोणे ऐके वेळे । मौढ्यमद्याचेनि बळें । यागाचींही टेंवाळें । आदरिती ॥ ८३ ॥ ना कुंड मंडप वेदी । ना उचित साधनसमृद्धि । आणि तयांसी तंव विधि । [17]द्वंद्वचि सदा ॥ ८४ ॥ देवां ब्राह्मणांचेनि नांवें । आडवारेनहि नोहावें । ऐसें आथी तेथ यावें । लागे कवणा ॥ ८५ ॥ पैं वासरुवाचीं भोंकसा । गाईपुढें ठेऊनि जैसा । उगाणीं घेती क्षीररसा । बुद्धिवंत ॥ ८६ ॥ तैसें यागाचेनि नांवें । जग वाऊनि हावे । नागविती आघवें । अहेरावारीं ॥ ८७ ॥ ऐशा कांहीं आपुलिया । होमिती जे उजेरिया । तेणें कौमिती प्राणिया । सर्वनाशु ॥ ८८ ॥

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।
मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥

१ तरवारीच्या धारेसारख्या तीक्ष्ण पानाची. २ खैराच्या निखाऱ्याचे. ३ पंक्ति, ओळी. ४ हानिकारक. ५ मालवितात. ६ आश्रयानें. ७ वेश्या. ८ सौभाग्यानें. ९ पिढाचे. १० उच गेलेले. ११ पर्वत. १२ ऐश्वर्यानें. १३ संतोषून. १४ वेगळें. १५ सामुग्री- ताठा. १६ पट्टा. १७ वैमनस्य, १८ पेंढा भरून नमें केलेलें वासरूं. १९ झाडा. २० धोलावून. २१ मार्ग. २२ इच्छा करतात,

तात ! ७१ म्हणून, हे सुबुद्धिमंता, जे वाईट वासना मनांत आणतात, ते आसुर त्या ठिकाणीं वस्तीला येतात, ७२ कीं ज्या ठिकाणी तरवारीच्या धारेसारख्या तीक्ष्ण पानांचीं झाडें असून खैराच्या निखाऱ्यांचे डोंगर आहेत, व तापलेल्या तेलाचे समुद्र उतू येतात; ७३ आणि जेथें यातनांची ओळची ओळच असून यमाची नित्य नवी जाचणी असते. अशा घोर नरकलोकांत ते पडतात. ७४ अशा नरकाच्या शेलक्या भागांत जे जन्म घेतात, तेही पहावें तों यज्ञयागादिक कर्मे करण्यांत निमग्न झालेले असतात. ७५ बाकी, अर्जुना, यज्ञादिक क्रिया जरी हानिकारक आहेत, तरी नाटकी लोकाप्रमाणें त्यांचें आचरण करून ते व्यर्थ डौल मिरवितात. ७६ वेश्या ज्याप्रमाणें आपल्या यजमानाच्या आश्रयानें आपल्यास सौभाग्यवती मानून संतोष मानतात, ७७

श्लोकार्थः—आपणच आपली प्रशंसा करणारे, ताठ्यानें वागणारे, व धनाच्या आणि थोरपणाच्या गर्वानें उन्मत्त झालेले ते लोक शास्त्रविधीला सोडून दांभिकपणानें केवळ नावाचे यज्ञ करितात ॥ १७ ॥

त्याप्रमाणें, मी सर्वांत श्रेष्ठ आहें, असें आपणच आपल्यास मानून, ज्यांचे अंगांत गर्वाचा ताठा भरतो; ७८ मग, भिंडाचे खांब वांकत नाहींत त्याप्रमाणें हे लवत नाहींत, किंवा आकाशांत उंच गेलेले पर्वत ज्याप्रमाणें खालीं लवत नाहींत, ७९ त्याप्रमाणें, आपणच आपल्या ऐश्वर्यानें मनांत संतोष मानून, इतरांस तृणाहूनही कमी लेखितात. ३८० अर्जुना, संपत्तीच्या मदानें उन्मत्त होऊन, हे योग्यायोग्य विचारास फांटा देतात. ८१ अरे, ज्यांच्या अंगांत असा ताठा भरलेला आहे, त्यांच्या ठिकाणीं यज्ञाची काय किंमत आहे ? तथापि मूर्ख लोक काय करीत नाहींत ? ८२ म्हणून, एखादे वेळेस ते मौर्ख्यरूप मद्याच्या बळानें यज्ञाचीही थट्टा करण्यास तयार होतात ! ८३ त्यांना कुंड, मंडप, वेदी किंवा तत्संबंधीं लागणारी सर्व सामुग्री यांची जरूर नसते; आणि विधीचें (कोणतेंही कर्म यथाविधि करण्याचें) तर त्यांशीं सदाच वैर असतें. ८४ देवब्राह्मणांचें नांव नुसतें वाऱ्याच्या झुळकेबरोबर जरी यांच्या कानांवर पडलें, तरी तेंही त्यांना खपत नाहीं. अशी जेथें स्थिति आहे, तेथें देवब्राह्मणांचें काय काम ? ८५ परंतु ज्याप्रमाणें शहाणे लोक मेलेल्या वांसराचे पोटांत पेंढा भरून तें गाईचे पुढें उभें करून तिचें दूध काढून घेतात, ८६ त्याप्रमाणें यज्ञाच्या मिषानें सर्व लोकांस आमंत्रण करून (आपल्यास कांहीं मिळेल या आशेनें ते आले असतां) उलट त्यांच्यापासूनच अहेर उपटून त्यांस नागवितात ! ८७ याप्रमाणें आपल्या मोठेपणाकरितां यज्ञ करितात व ते प्राण्यांच्या नाशाची इच्छा करतात. ८८

श्लोकार्थः—मीपणा, बल, गर्व, काम व क्रोध याचा आश्रय केलेले, आपल्या व दुसऱ्याच्या शरीरामध्यें असणारा जो मी परमेश्वर त्या माझा द्वेष करणारे, आणि दुसऱ्याचा (साधूचा) उत्कर्ष सहन न करणारे (असे हे लोक असतात) ॥ १८ ॥

अन्वयः—अहंकार, बल, दर्प, कामं, क्रोधं संश्रिताः च आत्मपरदेहेषु (स्थित) मा प्रद्विषतः च अभ्यसूयकाः, ॥ १८ ॥

( ९४१. अहंकार, ३८९–३९१ ) मग पुढां भेरी[1] निशाण । लाउनी ते दीक्षितपण । जगीं फोकारिती आण । वावो[2] वावो ॥ ८९ ॥ तेव्हां महत्त्वें तेणे अधमा । गर्वा चढे महिमा । जैसे [3]लेवे दिधले तमा । काजळाचे ॥ ३९० ॥ तैसे मौढ्य घणावे । औद्धत्य उंचावे । अहंकारु दुणावे । अविवेकुही ॥ ९१ ॥ ( ९४२. बल, ३९२ ) मग दुजयाची भाष । नुरवावया निःशेष । बाळियेपणा अधिक । होय बळ ॥ ९२ ॥ ( ९४३. दर्प, ३९३–३९४ ) ऐसा अहंकार बळा । जालया येकवळा । दर्पसागरु मैर्यादवेळा । सांडूनि उते ॥ ९३ ॥ ( ९४४. कामक्रोधाचे आश्रित, ३९५-३९६ ) मग वोसंडलेनि दर्पे । कामाही पित्त कुरुपे । तया धगीं सैंध पैलिपे । क्रोधाग्नि तो ॥ ९४ ॥ तेथ उन्हाळा आगी खरमरा । तेलातुपाचिया कोठारा । लागला आणि वारा । सुटला जैसा ॥ ९५ ॥ तैसा अहंकारु बळा आला । दर्पु कामक्रोधीं गूढला । या दोहींचा मेळु जाला । जयांच्या ठायीं ॥ ९६ ॥ ( ९४५. आपल्या व परक्याच्या आत्म्याला पीडा, ३९७-४०० ) ते आपुलिया सवेसीं । मग कोणी कोणी हिंसा । या प्राणियांतें वीरेशा । न साधिती गो ॥ ९७ ॥ पहिले तंव धनुर्धरा । आपुलिया मांसरुधिरा । वेंचु करिती अभिचारीं । लागोनियां ॥ ९८ ॥ तेथ जाळिती जिये देहें । यांमाजी जो मी आहें । तया आत्मया मज घाये । वाजती ते ॥ ९९ ॥ आणि अभिचारकीं तिहीं । उपद्रविजे जेतुलें कांहीं । तेथ चैतन्य मी पाहीं । सिणु पावे ॥ ४०० ॥ ( ९४६. साधूंचा अपमान, ४०१-४०४ ) आणि अभिचारावेगळें । विपाये जे अंवगळें । तयां टाकिती ईटाळें । पैशुन्यांचीं ॥ १ ॥ सती आणि सत्पुरुख । दानशीळ याज्ञिक । तपस्वी अलौकिक । संन्यासी जे ॥ २ ॥ कां भक्त हन महात्मे । इये माझीं निजोचीं धामें । निर्वाळैलीं होमकर्मे । श्रौतादिकीं ॥ ३ ॥ तयां द्वेषाचेनि काळकूटें । वासैंटोनि तिखटें । कुबोलांचीं सैंदटें । सूती [2]कांडे ॥ ४ ॥

तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।
क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९॥

अन्वयः—तान् द्विषतः क्रूरान्, अशुभान् नराधमान् संसारेषु आसुरीषु एव योनिषु अजस्रं अहं क्षिपामि ॥ १९ ॥

( ९४७. देवसाधूंचा द्वेष करणारे, त्याना निरंतर आसुरी योनींत घालतों, ४०५–४१३ ) ऐसे आघवाचि परी । प्रवर्तले माझ्या वैरीं । तयां पापियां जें मी करीं । तें आईक पां ॥ ५ ॥ तरी मनुष्यदेहाचा तागा । घेऊनि रैसती

१ डंका. २ व्यर्थ. ३ पुटें. ४ उद्धटपणा. ५ समुद्राच्या भरतीच्या पाण्याच्या मर्यादेचा

मग आपल्यापुढें डंका निशाण लावून आम्ही दीक्षित आहों अशी जगांत व्यर्थ प्रसिद्धि करतात; ८९ त्या वेळीं त्या अधमांस अशा दीक्षितपणाच्या महत्त्वानें अधिकच गर्व चढतो. ज्याप्रमाणें अंधकाराला काजळाचीं पुटें द्यावीं म्हणजे तो अधिक काळेपणा पावतो, ३९० त्याप्रमाणें, त्यांचें मूर्खत्व बळावून उद्धटपणा वाढतो, व अहंकारानें अज्ञानही वाढतें. ९१ मग दुसऱ्या कोणाचें नांवहि निघूं नये म्हणून आपलाच मोठेपणा ते वाढवूं लागतात. ९२ याप्रमाणें, अहंकार एकदां प्रबल झाल्यावर दर्परूपी सागर आपली मर्यादेची वेळ सोडून वाहूं लागतो. ९३ मग याप्रमाणें दर्प वाढला म्हणजे कामाचेंही पित्त खवळतें; आणि त्याच्या धगीनें क्रोधाग्नि अधिकच पेटतो. ९४ मग जसा उन्हाळयांत प्रखर अग्नि तेलातुपाच्या कोठारास लागावा, आणि तशांत वारा सुटावा, ९५ तसा अहंकार प्रबल झाल्यावर व दर्प कामक्रोधांत गुरफटून गेल्यावर या दोहोंचें ऐक्य ज्याचे ठिकाणीं होतें, ९६ ते, अर्जुना, आपल्या इच्छेप्रमाणें कोणत्या कोणत्या हिंसा करून प्राण्यांचा नाश करणार नाहींत ? ९७ हे धनुर्धरा, प्रथम हे दीक्षित जारणमारणाच्या नादास लागून आपल्या रक्तमांसाचा व्यय करतात; ९८ ते आपल्या देहास जो त्रास करून घेतात, त्याचे घाव, त्या देहांत वास करणारा जो मी, त्या मज आत्म्याला बसतात; ९९ आणि जारणमारणादि क्रियांनीं ज्याला ज्याला म्हणून ते पीडा देतात, त्यांच्यात वास करणारें जें जीवचैतन्य जो मी त्या मला तो त्रास होतो; ४०० आणि कदाचित् त्यांच्या जारणमारण क्रियेच्या सपाट्यांतून कोणी बचावलेच, तर त्यांचीं वर्मे काढून त्यांच्या मनांस ते त्रास देतात. १ सती, सत्पुरुष, दानशील, यज्ञ करणारे, जे अलौकिक तप करणारे व संन्यासी, २ किंवा भक्त, महात्मे पुरुष किंवा ज्यांचीं घरें श्रौतादिक होमकर्मांनें पवित्र झालीं आहेत, हीं जीं माझीं आवडतीं व राहण्याचीं स्थलें आहेत, ३ त्यांना द्वेषरूपी काळकूट विषानें तीक्ष्ण केलेले दुःशब्दरूपी बळकट बाण मारतात ! ४

श्लोकार्थः—त्या साधुद्वेषी व क्रूर अशा पापी नराधमाना संसारांतील ( अतिशय दुःखदायक अशा ) आसुरी योनीमध्येंच मी निरंतर जन्मास घालतों ।। १९ ।।

याप्रमाणें जे सर्व प्रकारें मजशीं वैर करण्यास प्रवृत्त होतात, त्या पाप्याना मी कोणती शिक्षा देतों ती ऐक. ५ तर मनुष्यदेह धारण करून जे या जगांत आपलें कर्तव्य काय तें विसरतात, त्यांची मनुष्यदेहरूप पदवी हरण करून मी त्यांना अशा स्थितींत ठेवतों, ६ कीं, जी क्लेशरूपी गांवाचा उकिरडा, व संसारपुरीचा पाणवठा ! अशी जी तमो-

घेऊ; मारवेऊ. ६ वाहून जाणाऱ्या. ७ उठतें; खवळतें. ८ अनिवार. ९ पेटतो. १० इच्छेप्रमाणें. ११ जारणमारणादि प्रयोगासाठीं. १२ वाचतात. १३ दगड. १४ वर्मांचीं. १५ आवडतीं. १६ पवित्र झालेलीं. १७ मालून. १८ बळकट. १९ मारतात. २० बाण. २१ दोरा. २२ कर्तव्यकर्म विसरतात.

जे जगा। ते पदवी हिरोनि पैं गा। ऐसे ठेवीं ॥ ६ ॥ जे क्लेशगांवींचा उकरडा। भवपुरीचा पानवडा। ते तमोयोनि तयां मूढां। वृत्तिचि दे ॥ ७ ॥ मग आहाराचेनि नांवें। तृणही जेथ नुगवे। ते व्याघ्र वृश्चिक आडवे। तैसिये करीं ॥ ८ ॥ तेथ क्षुधादुःखें बहुतें। तोडूनि खाती आपणयातें। मरमरों मागुते। होताचि असती ॥ ९ ॥ कां आपला गरळजाळीं। जाळिती आंगाची पेंदळी। ते सर्पचि करीं विळीं। निरुंधलों ॥ ४१० ॥ परी घेतला श्वासु घांपे। येतुलेनही मापें। विसांवा तयां नाटोपे। दुर्जनांसी ॥ ११ ॥ ऐसेनि कल्पांचिया कोडी। गणितांही संख्या थोडी। तेतुला वेळ न काढीं। क्लेशौनि तयां ॥ १२ ॥ तरि तयांसी जेथ जाणें। तेथींचें हें पहिलें पेणें। तें पावोनि येरें दारुणें। न होती दुःखें ॥ १३ ॥

आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि।
मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिम् ॥ २० ॥

अन्वयः—( हे ) कौन्तेय, आसुरीं योनिं आपन्नाः जन्मनि जन्मनि मूढाः ( संतः ) माम् अप्राप्य एव ततः अधमां गतिं यान्ति ॥ २० ॥

( ९४८. आसुरी योनींत जन्मलेले मूर्ख उत्तरोत्तर अधम गतीला जातात, ४१४-४२० ) हा ठायवरी चोरी। संपत्ति ते आसुरी। अधोगति अवधारी। जोडिली तिहीं ॥ १४ ॥ पाठीं व्याघ्रादि तामसा। योनि तो अळुमाळु ऐसा। देहाधाराचा उसासा। आथी जोही ॥ १५ ॥ तोही मी वोल्हावा हिरें। मग तमाचि होति एकसरें। जेथ गेलें आंधारें। काळवंडिजे ॥ १६ ॥ जयांची पापा चिळसी। नरक घेती विवसी। शीण जाय मूर्च्छी। शिणे जेणें ॥ १७ ॥ मळु जेणें मैळे। तापु जेणें पोळे। जयाचेनि नांवें सळे। महाभय ॥ १८ ॥ पापा जयाचा कंटाळा। उपजे अमंगळ अमंगळा। विटाळही विटाळा। बिहे जया ॥ १९ ॥ ऐसे विश्वाचे या वोखटेया। अधम जे धनंजया। ते ते होती भोगूनियां। तामसा योनि ॥ ४२० ॥ ( ९४९. आसुरी लोकाचें वर्णन करताना आंगावर शहारे येतात, ४२१-४२२ ) अहा सांगतां वाचा रडे। आठवितां मन खिरडे। कटारे मूर्खीं केवढे जोडिले निरय ॥ २१ ॥ कायिसया ते आसुर। संपत्ति पोषिती वोंडर। जिया दिधलें घोर। पतन ऐसें ॥ २२ ॥ ( ९५०. आसुरी संपत्तीच्या लोकांचा सहवास करू नये; ४२३ ) म्हणौनि तुवां धनुर्धरा। नोहावें गा तिया मोहरा। जेउता वासु आसुरा। संपत्तिवंता ॥ २३ ॥ अवतरणः—आणि दंभादि दोष साही। हे संपूर्ण जयाच्या ठायीं। ते त्यजावे हें काई। म्हणों कीर ॥ २४ ॥

१ संसारपुरीचा. २ पाणवठा. ३ अरण्यात राहणारे. ४ त्वचा. ५ कोंडून ठेवलेल्या. ६ बाहेर टाकतां येईल. ७ मुक्काम. ८ स्वस्थता. ९ भीति १० भीति पावतें. ११ निकृष्ट.

योनि, तेथील त्या मूर्खास वतनदार करतों. ७ मग, भूक लागली असतां ज्यांना गवतही खाण्याची सोय नाहीं, अशा वाघ, विंचू, इत्यादि रानात राहाणाऱ्या योनींत त्यांना घालतों. ८ त्या योनींत ते भुकेनें अतित्रस्त झाले म्हणजे आपल्या अंगाचे लचके तोडतोडून खातात व मरतात, आणि पुनः त्याच योनींत कित्येक वेळां जन्म घेतात. ९ किंवा जो आपणच खाऊन गरळ ओकतो, व तिच्या धगीनें त्याची त्वचा जळून जाते, त्या सर्पाच्या योनींत त्यांना घालून नेहमीं बिळांत कोंडून ठेवतों. ४१० परंतु आंत घेतलेला श्वास बाहेर टाकतां येईल इतका थोडा वेळही त्या दुर्जनास मी विश्रांति मिळूं देत नाहीं. ११ याप्रमाणें ज्याचें माप करतां येत नाहीं, असे कल्पचे कल्प त्यांना अशा क्लेशदायक योनींत ठेवतों. १२ परंतु त्यांना ज्या ठिकाणीं जावयाचें आहे, त्या मार्गांतील हा पहिला मुक्काम होय. मग त्या ठिकाणीं गेल्यावर त्यांना यांहीपेक्षां भयंकर अशीं दुःखें होणार नाहींत का? १३

श्लोकार्थः—अर्जुना, आसुरी योनीला पावलेले ते पुरुष जन्मोजन्मीं (अधिकाधिकच) मूढ होत्साते मला न पावता उत्तरोत्तर अधम गतीला प्राप्त होतात ॥ २० ॥

अशा प्रकारें, या आसुरी संपत्तीचा महिमा असा आहे कीं, ज्याच्या योगानें अधोगति प्राप्त होते; १४ नंतर व्याघ्रादि तामस योनींत देहाचे आधारानें जी थोडीशी स्वस्थता प्राप्त होते, १५ तीही स्वस्थता हिरावून घेऊन जेथें अंधेर गेला असतांही काळवंडतो, त्या तमाच्या योनींत त्यांना मी घालतों. १६ ज्या तमाची पापालाही किळस उत्पन्न होते, नरकही ज्याला भितो, व जेथील श्रमानें श्रमही मूर्च्छित होतो; १७ ज्याच्या योगानें मल मलिन होतो, तापालाही ताप होतो, व ज्यांचें नांव काढलें असतां महाभयही भीति पावतें, १८ ज्या तमाचा पापालाही कंटाळा येतो, अमंगळ वस्तूसही ज्याच्या स्पर्शानें अमंगळपणा वाटतो, व विटाळही ज्याच्या विटाळाची भीति मानतो; १९ धनंजया, अशी जी या साऱ्या जगातील निकृष्ट अवस्था, ती भोगून हे अधम तामस योनींत जन्म घेतात. ४२० अरे, त्या योनीचें वर्णन करतांना वाचेस रडें कोसळतें व त्या योनीची आठवण होण्याबरोबर मन मागें फिरतें. हाय हाय! त्या मूर्खांनीं काय ही नरकवासाची जोड करून घेतली! २१ ज्या आसुरी संपत्तीनें असें घोर पतन प्राप्त होतें, ती ते कां व्यर्थ वाढवितात! २२ अर्जुना, ज्या आसुरी संपत्तिमंतांना असा नरकवास भोगावा लागतो, त्या मार्गाकडे तूं जाऊं नको; २३ आणि ज्या आसुरी संपत्तीच्या अंगीं दंभ आदिकरून सहा दोष भरलेले असतात, तिचा त्याग कर, हें खरोखर तुला सांगावयाला का पाहिजे? २४

श्लोकार्थः—काम, क्रोध आणि लोभ हीं जीवाला कोणत्याही पुरुषार्थाची प्राप्ति करून न देणारीं नरकाचीं तीन द्वारें आहेत; यास्तव या तिहींचा त्याग करावा ॥ २१ ॥

---

१२ मागें फिरतें १३ हायहाय! १४ नरकवास. १५ व्यर्थ. १६ जेथें.

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत् त्रयं त्यजेत् ॥२१॥

अन्वयः—कामः, क्रोधः तथा लोभः इदं त्रिविधं आत्मनः नाशनं च नरकस्य द्वारं (अस्ति), तस्मात् एतत् त्रयं त्यजेत् ।। २२ ।।

परि काम क्रोध लोभ। या तिहींचेंचि थोंवे। थांवे तेथें अशुभ। पिकलें जाण ॥ २५ ॥ सर्व दुःखां आपुलिया। देशिना धनंजया। पाढाऊं हे भलतया। दिधले आहाती ॥ २६ ॥ कां पापियां नरकभोगीं। सुवावर्यालागीं जगीं। पातकांची दौडुगी। सभाचि हे ॥ २७ ॥ ते रौरव गा तंवाचि वरी। आइकिजती पँटांतरीं। जंव हे तिन्ही अंतरीं। उठती ना ॥ २८ ॥ अपाय तिहीं असलग। यातना इहीं सवंग। हाणी हाणी नोहे हे तिघ। हेचि हाणी ॥ २९ ॥ काय बहु बोलों सुभटा। सांगितलिया निकृष्टा। नरकाचा दारवंटा। त्रिशंकु हा ॥ ४३० ॥ या कामक्रोध-लोभा-। माजी जीवें जो होय उभा। तो निरँयपुरीची सभा। सन्मातु पावे ॥ ३१ ॥ म्हणौनि पुढतपुढतीं किरीटी। हे कामादि दोषत्रिपुटी। त्यजावीचि गा वोखटी। आघवा विषयीं ॥ ३२ ॥

एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥२२॥

अन्वयः—( हे ) कौन्तेय, एतैः त्रिभिः तमोद्वारैः विमुक्तः नरः आत्मनः श्रेयः आचरति, ततः परां गतिम् याति ॥२२॥

( ९५२. कामक्रोध-दोषांचा त्याग करणारा नरकापासून मुक्त होऊन उत्तम गतीला जातो, ४३३-४४४ ) धर्मादिकां चौंहींआंतु। पुरुषार्थांची तैंचि मातु। करावी जैं संघातु। सांडील हा ॥ ३३ ॥ हे तिन्ही जीवीं जंव जागती। तंववरी निकियेची प्राप्ति। हे माझे कान नाइकती। देवोही म्हणे ॥ ३४ ॥ जया आपणपें पढिये। आत्मनाशा जो बिहे। तेणें न धरावी हे सोये[13]। सावधु होइजे ॥ ३५ ॥ पोटीं बांधोनि पाषाण। समुद्रीं वौंहीं आंगवण। कां जियावया जेवण। काळकूटाचें ॥ ३६ ॥ इहीं कामक्रोधलोभेंसी। कार्यसिद्धि जाण तैसी। म्हणोनि ठौवोचि पुंसीं। ययांचा गा ॥ ३७ ॥ जें कहीं अवचटें। हे तिकडी साखळ तुटे। तैं सुखें आपलिये वाटे। चालों लाभे ॥ ३८ ॥ त्रिदोषीं सांडिलें शरीर। त्रिकुटीं फिटलिया नगर। त्रिदाह निमालिया अंतरें। जैसें होय ॥ ३९ ॥ तैसा कामादिकीं तिघीं। सांडिला सुख पावोनि जगीं। संगु लाहे मोक्षमार्गीं। सज्जनाचा ॥ ४४० ॥ मग सत्संगें प्रबळें। सच्छास्त्राचेनि बळें। जन्ममृत्यूचीं

१ बूड. २ अनुभव घेण्यास. ३ थाटाडे. ४ घालण्याकरतां. ५ मोठी. ६ रौरव नरक. ७ पुराणांतरीं. ८ लष्कर. ९ तीन दोषांचा समुदाय. १० नरकपुरीची. ११ कल्याणाची.

परंतु काम, क्रोध व-लोभ या तिघांचें बूड जेथें जोरावलें आहे, तेथें अशुभ पिकलें असें समज. २५ हे धनंजया, आपल्यास सर्व दुःखाचा अनुभव येण्यास हे वाटेल त्याला वाटाडेच झालेले आहेत; २६ किंवा पापी लोकांस नरकभोग प्राप्त करून देण्यास पातकांची ही मोठी थोरली सभाच आहे. २७ रौरव नरक म्हणून ज्याची पुराणांतरीं आपण ख्याति ऐकतों, त्या रौरव नरकाची तोंपर्यंतच प्रतिष्ठा आहे, कीं जोंपर्यंत हे तिन्ही दोष अंतर्यामीं उठले नाहींत । २८ यांच्यामुळें अपाय फार लवकर प्राप्त होतो, यातना फार सवंग होतात, व हानि हानि म्हणून जिला म्हणतात ती' हानि' नसून हे तिन्ही दोषच हानिरूप होत. २९ अर्जुना, यांची जी अति निकृष्ट अवस्था सांगितली, तिच्यापेक्षां काय अधिक वर्णन करूं ? फार काय सांगावें ! हा त्रिदोषसमुदाय म्हणजे नरकाच्या दरवाजाचा उंबरठाच होय. ४३० काम, क्रोध व लोभ यांना जो मनःपूर्वक अनुकूल होतो, तो नरकपुरीच्या सभेंत सन्मानास पात्र होतो. ३१ म्हणून, हे किरीटी, तुला वारंवार सांगतों कीं, काम, क्रोध व लोभ यांची ही त्रिपुटी—जी सर्व विषयांत अति वाईट आहे, तिचा त्याग करावा. ३२

श्लोकार्थः—हे कौंतेया, नरकाच्या या तिन्ही द्वारांपासून जो मनुष्य मुक्त होतो, तो आपलें कल्याण करून घेण्याचे मार्गाला लागतो; आणि त्यानंतर उत्तम गतीला पोहोंचतो. ॥ २२ ॥

धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारही पुरुषार्थांची गोष्ट तेव्हांच काढता येईल, कीं ज्या वेळेस काम, क्रोध व लोभ हे तिन्ही सुटतील. ३३ काम, क्रोध व लोभ हे तिन्ही जोंपर्यंत अंतर्यामीं वास करीत आहेत, तोंपर्यंत एखाद्याचें कल्याण होईल हें म्हणणें माझे कान ऐकत नाहींत, असें भगवान श्रीकृष्ण सुद्धां म्हणतात ! ३४ ज्याला आपल्या कल्याणाची इच्छा आहे, किंवा आपला नाश होईल म्हणून जो भितो, त्यानें सावध होऊन या तिघांची संगत करूं नये. ३५ पोटाला दगड बांधून समुद्रांत बाहूंनीं तरून जाणें, किंवा जगण्याकरितां काळकूट विषाचें सेवन करणें, ३६ त्याप्रमाणें ह्या कामक्रोधलोभांच्या संगतीनें कार्यसिद्धि होते ! म्हणून यांचा मनांतून मागमूस नाहींसा करून टाक. ३७ ज्या वेळेस सहजगत्या ही तीन कड्यांची सांखळी पायांतून तुटून जाईल, त्या वेळेस आपल्या हिताची वाट सुखानें चालतां येईल. ३८ कफ, वात व पित्त हे तिन्ही दोष जोंपर्यंत शरीरांत उत्पन्न झाले नाहींत, किंवा चहाडी, चोरी व शिंदळकी यांपासून जोंपर्यंत एखादें शहर अलिप्त आहे, आणि जोंपर्यंत आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक ह्या त्रिविध तापांपासून अंतःकरण मुक्त आहे, तोंपर्यंत जसें सुख प्राप्त होतें, ३९ तसें काम, क्रोध व लोभ हे ज्यानें सोडले आहेत, त्याला या जगतांत सुख प्राप्त होतें; आणि सज्जनांचे संगतीनें मोक्षमार्गाची प्राप्ति होते. ४४० मग तो सत्संगतीच्या बळानें व सच्छास्त्रांच्या

१२ आपल्या कल्याणाची इच्छा आहे. १३ संगत. १४ बाहूंच्या सामर्थ्यावर. १५ मागमूस. १६ नाहींसा कर. १७ सोडिलें; १८ चहाडी, चोरी व शिंदळकी यांनीं. १९ अंतःकरण.

निमाळें। निरंतरे रानें ॥ ४१ ॥ ते वेळीं आत्मानंदें आघवें। जें सदा वसतें बरवें। तें तैसेंचि पाटण पावे। गुरुकृपेचें ॥४२॥ तेथ प्रियाची परम सीमा। तो भेटे माउली आत्मा। तये खेंवीं आटे डिंडिमा। सांसारिक हे ॥४३॥ ऐसा जो कामक्रोधलोभां। झाडी करूनि ठाके उभा। तोचि येवढिया लाभा। गोसावी होय ॥ ४४ ॥

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥

अन्वयः—यः शास्त्रविधिं उत्सृज्य कामकारतः वर्तते, सः न सिद्धिम् न सुखं न च परां गतिं अवाप्नोति ॥ २३ ॥

( ९५३. शास्त्रविधि सोडून वागणाराला परागति नाहीं. ४४५-४५४ ) ना हें नावडोनि कांहीं। कामादिकांच्याचि ठायीं। दाटिली जेणें डोई। आत्मचोरें ॥ ४५ ॥ जो जगीं समान सकृपु। हिताहित दाविता दीपु। तो अमान्यु केला बापु। वेदु जेणें ॥४६॥ न धरीचि विधीची भीड। न करीचि आपली चाड। वाढवीत गेला कोडें। इंद्रियाचें ॥ ४७ ॥ कामक्रोधलोभांची कास। न सोडीच पाळिली भेंप। स्वैराचाराचें असोस। वेंळघला रान ॥ ४८ ॥ तो सुटकेचिया वोहिणीं। मग पिवों न लाहे पाणी। स्वर्गीही ते काहाणी। दूरीचि तया ॥ ४९॥ आणि परत्र तंव जाये। हे कीर तया आहे। परी ऐहिकही न लाहे। भोग भोगूं ॥४५०॥ तरी माशालागीं भुलला। ब्राह्मण पाणबुडा रिघाला। कीं तेथही पावला। नास्तिकवादु ॥ ५१ ॥ तैसें विषयाचेनि कोडें। जेणें परत्रा केलें उवेंडें। तंव तोचि आणिकीकडे। मरणें नेला ॥५२॥ एंव परत्र ना स्वर्गु। ना ऐहिकही विषयभोगु। तेथ केउता प्रसंगु। मोक्षाचा तो ॥ ५३ ॥ म्हणौनि कामाचेनि बळें। जो विषय सेऊं पाहे सैळें। तया विषयो ना स्वर्गु मिळे। ना उद्धरे तो ॥ ५४ ॥

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥

अन्वयः—तस्मात्, कार्याकार्यव्यवस्थितौ ते शास्त्रं प्रमाणम् (अस्ति); शास्त्रविधानोक्तं कर्म ज्ञात्वा ( तत् त्वं ) इह कर्तुं अर्हसि ॥ २४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

( ९५४. कार्याकार्याविषयीं शास्त्रच प्रमाण, ४५५-४६९ ) याकारणें पैं बापा। जया आथी आपली कृपा। तेणें वेदाचिया निरोपा। आन न कीजे ॥ ५५ ॥ पतीचिया मता। अनुसरोनि पतिव्रता। अनायासें आत्महिता। भेटेचि ते ॥५६॥ नातरी श्रीगुरुवचना। दिठी देतु जतना। शिष्य आत्मभुवना-। माजी पैसे

१ मरट माळ. २ उल्लंघन करतो. ३ स्थान. ४ आलिंगनीं, ५ ताप. ६ त्याग. ७ दिलें.

योगानें जन्ममृत्यूचीं माळरानें उल्लंघन करितो. ४१ त्या वेळेस, ज्या ठिकाणीं आत्मानंद नेहमीं वास करतो असें जें गुरुकृपेचें स्थान, तें त्याला प्राप्त होतें. ४२ प्रीतीच्या पलीकडील स्थान जी आत्मरूपी माउली, तिची त्या ठिकाणीं भेट होते; व तिला आलिंगन दिल्यावर संसाराचा ताप आपोआप नाहींसा होतो. ४३ याप्रमाणें जो काम, क्रोध व लोभ यांचा त्याग करून मोकळा होतो, तोच आत्म्याची प्राप्ति करून घेण्यास समर्थ होतो. ४४

श्लोकार्थः—जो शास्त्रोक्त विधीला सोडून आपल्या इच्छेप्रमाणें वागतो, त्याला सिद्धि, सुख आणि उत्तम गति हीं मिळत नाहींत. ॥ २३ ॥

किंवा आत्मप्राप्तीचा लाभ न आवडून जो कामादिकांच्या ठिकाणींच डोकें देऊन राहतो; तो आत्मघात करणारा होय. ४५ या जगात सर्वांना सारखे असून सर्वांवर सारखी कृपा करणारे, व आपलें हित किंवा अनहित दाखविणारे केवळ दीपच, असे जे सर्वांचे गुरु वेद, त्यांची आज्ञा जो पाळीत नाहीं, ४६ जो शास्त्रात सांगितलेल्या विधिनिषेधांची भीड धरीत नाहीं, व आपलें हित न पाहतां इंद्रियांचे सर्व कोड पुरवितो; ४७ काम, क्रोध व लोभ यांची कास सोडीत नाहीं, आणि त्यांनीं घातलेली शपथ मोडीत नाहीं, व आपल्या इच्छेस येईल त्याप्रमाणें वागतो, ४८ त्याची त्यांच्यापासून क्षणभर देखील सुटका होत नाहीं; सुखाची गोष्ट तर स्वप्नांत देखील त्यांजपासून दूर असते; ४९ आणि परलोकास तो अंतरतो, यांत शंका नाहीं. परंतु त्याला या लोकींचेही भोग भोगण्यास मिळत नाहींत, ४५० तर एखादा ब्राह्मण नदीच्या तीरीं स्नानसंध्या करीत असतां माशावर मन जाऊन तो धरावयास गेला असतां त्याचें कृत्य लोकांनीं पाहिल्यावर जसें त्यास ते नास्तिक असें म्हणतात; म्हणून अर्थात त्याची माशाविषयीं इच्छाही पुरी होत नाहीं, व तो ब्राह्मणत्वासही मुकतो, ५१ त्याप्रमाणें, विषयांच्या नादाला लागून ज्यानें परलोक पालथा घातला, व इहलोकींही पाहूं गेलें असतां जो मृत्यूच्या सपाट्यात सांपडला; ५२ याप्रमाणें त्याला परलोक नाहीं व स्वर्गही नाहीं ! आणि ज्याला इहलोकींही विषयांचा भोग भोगावयास सांपडत नाहीं, तेथें मोक्षप्राप्तीची गोष्ट कशास बोलावयास पाहिजे ? ५३ म्हणून कामाच्या वृद्धीनें जो विषयाचें सेवन करूं पाहतो, त्याला विषय भोगावयास मिळत नाहींत; स्वर्गही प्राप्त होत नाहीं, आणि तो उद्धरूनही जात नाहीं ! ५४

श्लोकार्थः—यास्तव कार्य अथवा अकार्य याचा निर्णय करण्याच्या कामीं तुला शास्त्र हेंच प्रमाण आहे. शास्त्रानें सांगितलेलें कर्म समजून घेऊन तें या लोकीं करणें तुला योग्य आहे ॥२४॥

यास्तव, बापा अर्जुना, ज्याला आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा आहे, त्यानें वेदांत सांगितलेल्या गोष्टींची अवज्ञा करूं नये. ५५ पतीच्या मर्जीप्रमाणें पतिव्रता स्त्री वागून अनायासानें आपलें हित करून घेते; ५६ किंवा श्रीगुरूंच्या आज्ञेकडे लक्ष देऊन

८ आत्मघातक्यानें. ९ लाड. १० शपथ. ११ फिरला. १२ नदीतील. १३ पाण्यात बुडी मारली. १४ पालथें. १५ बळानें.

॥ ५७ ॥ हें असो आपुला ठेवा । हाता आथी जरी यावा । तरी आदरें जेविं दिवा । पुढां कीजे ॥ ५८ ॥ तैसा अशेषांही पुरुषार्थां । जो गोसावी हो म्हणे पार्था । तेणें श्रुतिस्मृति माथां । वैसणें घेपे ॥ ५९ ॥ शास्त्र म्हणेल जें सांडावें । तें राज्यही तृण मानावें । जें घेववी तें न म्हणावें । विषही विरुद्धे ॥ ४६० ॥ ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा । तरि कें आहे अनिष्टा । भेटणें गा ॥ ६१ ॥ पैं अहितापासूनि काढिती । हित देउनी वाढविती । नाहीं गा श्रुतीपरौती । माउली जगा ॥ ६२ ॥ म्हणौनि ब्रह्मेंशी मेळवी । तंव हे कोण्हें न सांडावी । अगा तुवांही ऐसीचि भजावी । विशेषेंसी ॥ ६३ ॥ जे आजि अर्जुना तूं येथें । करावया सत्य शास्त्रें साथें । जन्मलासि बळार्थें । धर्माचेनि ॥ ६४ ॥ आणि धर्मानुजं हें ऐसें । ओवेंचि आलें आपैसें । म्हणौनि अनारिसें । करूं नये ॥६५॥ *कार्याकार्यविवेकीं । शास्त्रेंचि करावीं पारखीं । अकृत्य तें कुडें लोकीं । वाळावें गा* ॥ ६६ ॥ मग कृत्यपणें खरें निगे । तें तुवां आपलेनि आंगें । आचरोनि आदरें चांगें । सारावें गा ॥ ६७ ॥ जे विश्वप्रामाण्याची मुंदी । आजि तुझ्या हातीं असे सुबुद्धि । लोकसंग्रहासि त्रिशुद्धि । योग्यु होसी ॥ ६८ ॥ एवं आसुरवर्गु आघवा । सांगोनि तेथींचा निगावा । तोही देवें पाडवा । निरूपिला ॥ ६९ ॥ ( ९५५. अर्जुनाची शंका, ४७० ) इयावरी तो पंडूचा । कुमरु सद्भावो जीवींचा । पुसेल तो चैतन्याचा । कानीं ऐका ॥ ४७० ॥ ( ९५६. संजय धृतराष्ट्राला सांगतो तीच कथा ज्ञानदेव सांगतात, ४७१–४७३ ) संजयें व्यासाचिया निरोपा । तो वेळ फेडिला तया नृपा । तैसा मीही निवृत्तिकृपा । सांगेन तुम्हां ॥ ७१ ॥ तुम्ही संत माझिया कडा । दिठीचा कराल वहुडा । तरि तुम्हां मांने येवढा । होईन मी ॥ ७२ ॥ म्हणोनि निज अवधान । मज वोळगे पसायदान । दीजो जी सनाथु होईन । ज्ञानदेवो म्हणे ॥ ४७३ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां षोडशोऽध्यायः ॥१६॥

श्लोक २४, ओंव्या ४७३.

---

१ घातलें पाहिजे. २ मारक. ३ धर्मराजाचा धाकटा भाऊ. ४ वाईट. ५ जगानें प्रमाण मानण्याजोगा. ६ शिक्का. ७ लोकांनी किचा वळवावा अशी. ८ निर्णय. ९ सावधान चित्तानें. १० बुद्धि. ११ मान्य होईल. १२ प्रसाद.

जो वागतो, तो शिष्य आत्मप्राप्ति करून घेतो, ५७ फार काय ? परंतु आपणच ठेवलेली ठेव हातीं येण्याकरितां ज्याप्रमाणे दिव्याचा उजेड अगत्य पुढें करावा लागतो, ५८ त्याप्रमाणें पार्था, सर्व पुरुषार्थांचा स्वामी होण्याची ज्याला इच्छा असेल, त्यानें श्रुति व स्मृति यांना शिरसा वंद्य मानलेंच पाहिजे. ५९ जी गोष्ट करूं नये म्हणून शास्त्रात सांगितलें आहे, तें राज्यही असलें तरी तृणासमान मानावें; व ज्या गोष्टीचें सेवन करावें असें सांगितले आहे, तें मारक विष असलें तरी घ्यावें. ४६० हे सुभटा, याप्रमाणें जो वेदांची एकनिष्ठपणें आज्ञा पाळतो, त्याची व अनिष्टाची गांठ कोठून पडणार ? ६१ हें वध–अहितापासून सोडविणारी आणि हित करून वाढविणारी श्रुतीप्रमाणें जगांत दुसरी माउली नाहीं बरें. ६२ म्हणून जिच्या योगानें ब्रह्मप्राप्ति होते, त्या ह्या श्रुतीची कोणीं अवज्ञा करूं नये; व तूंही विशेषेंकरून श्रुतीचीच आज्ञा पाळ. ६३ अर्जुना, मागील जन्मीं धर्माचरण केल्यामुळें या जन्मीं सच्छास्त्रें यथार्थ करण्यास तूं उत्पन्न झाला आहेस; ६४ आणि ( धर्मराजाचा तूं भाऊ असल्यामुळें ) ' धर्मानुज ' हें नांव तुला सहज प्राप्त झालें आहे. तेव्हा तूं वेदबाह्य वर्तन करूं नको. ६५ कार्याकार्याचा विचार करण्याकरितां शास्त्रें नीट समजून घ्यावीं, व जें वाईट कृत्य आहे त्याचा त्याग करावा. ६६ मग खरोखर जें उत्तम कर्तव्य आहे, तें स्वतः अगत्यपूर्वक आचरावे. ६७ हे सुबुद्धिमंता, आज तुझ्या हातांत जगानें प्रमाण मानण्याजोगा शिक्का असल्यामुळें, खरोखर लोकांनी तुझे आचरणाचा कित्ता वळवावा अशी तुझी योग्यता होईल. ६८ याप्रमाणें आसुरवर्गाचीं सर्व लक्षणें सांगून, त्यांचा निर्णयही देवानीं अर्जुनास सांगितला. ६९ यावर तो पांडुपुत्र अर्जुन अंतर्यामीं सद्भाव ठेवून जें काहीं विचारील, तें सावधान चित्तानें ऐका. ४७० श्रीव्यासानीं आज्ञा केल्याप्रमाणें संजयानें धृतराष्ट्राजाचा वेळ घालविला. त्याप्रमाणें निवृत्तीमहाराजाचे कृपेनें मीही तुम्हाला सांगेन. ७१ तुम्ही संत मंडळी जर माझ्यावर कृपादृष्टि कराल, तर तुम्हास मान्य होईल असेंच मी बोलेन. ७२ म्हणून, श्रीज्ञानदेव म्हणतात, आपलें अवधान देऊन शिष्यावर प्रसाद करावा, म्हणजे मी कृतकृत्य होईन. ४७३

अध्याय १६, ओव्या ४७३.

---

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सतरावा.

( ९५७. सद्‌गुरूला नमस्कार, गणपतीचे रूपक, १ ) विश्वविकसित मुद्रा । जया सोडी तुझी योगनिद्रा । तया नमोजी गणेंद्रा । श्रीगुरुराया ॥ १ ॥ ( ९५८. त्रिपुरासुराच्या वेढ्यात सापडलेल्या शंकराचे रूपक, काव्यप्रतिभा, २ ) त्रिगुणीं त्रिपुरीं वेढिला । जीवत्वदुर्गीं आडिला । तो आत्मा शंभूनें सोडविला । तुझिया स्मृती ॥ २ ॥ ( ९५९. शिवापेक्षा तुलनेनें सद्‌गुरु अधिक जड आहेत, पण मायेंतून तारण्यास हलके आहेत, ३ ) म्हणोनि शिवेंसी कांटाळा । गुरुत्वें तूंचि आगळा । तऱ्ही हळु मायाजळा- । माजी तारुनी ॥ ३ ॥ ( ९६०. गणपती अज्ञान्याला वक्रतुंड व सज्ञानाला सरळ, ४ ) जे तुझ्याविखीं मूढ । तयांलागीं तूं वक्रतुंड । ज्ञानियांसि तरी अखंड । उजूचि आहासी ॥ ४ ॥ ( ९६१. गणेंद्राचें रूपक. ५-२० ) दैविकी दिठी पाहतां सानी । तऱ्ही मीलनोन्मीलनीं । उत्पत्ति प्रळयो दोन्ही । लीलाचि करिसी ॥ ५ ॥ प्रवृत्तिकर्णाच्या चाळीं । उठिला मदगंधानिळीं । पूजीजेसी नीळोत्पळीं । जीवभृंगांच्या ॥ ६ ॥ पाठीं निवृत्तिकर्णचाळें । आंहाळी ते पूजा विघुळे- । तेव्हां मिरविसी मोकळें । आंगाचें लेणें ॥ ७ ॥ वामांगीचा लास्यविलासु । जो हा जगद्रूप आभासु । तो तांडवमिसें कळोसु । दाविसी तूं ॥ ८ ॥ हें असो विस्मो दातारा । तूं होसी जयाचा सोयरा । सोइरिकेचिया व्यवहारा । मुकेचि तो ॥ ९ ॥ फेडितां बंधनाचा ठावो । तूं जगद्‌बंधु ऐसा भावो । धरूं बोलेंगे उवावो । तुझाचि आंगीं ॥ १० ॥ दुजयाचेनि नांवें तया । देहही नुरेचि पैं देवराया । जेणें तूं आपणपयां । केलासि दुजा ॥ ११ ॥ तूतें करूनि पुढे[27] । जे उपायीं घेती दवडे । तयां ठासी वहुवे पाडें । मागांचि तूं ॥ १२ ॥ जो ध्यानें सूये मानसीं । तयालागीं नाहीं तूं त्याचे देशीं । ध्यानहीं विसरे तेणेंसी । वालभ तुज ॥ १३ ॥ तूतें सिद्धचि

---

१ जगरूप प्रफुल्लित मायेची आकृति. २ योगरूपी माया. ३ सत्त्व, रज व तम. ४ तीन शहरें. ५ तुलना. ६ योग्यता; वजन. ७ भवसमुद्र. ८ उघडझापीनें. ९ सांसारिक वृत्ति. १० हालविण्यानें. ११ सुगंध घापूनें. १२ पूजा केली जाते. १३ नीलकमळांनी. १४ जीवरूपी भ्रमरांच्या. १५ अंतर्मुख वृत्ति. १६ बांधलेली. १७ विसर्जन होते. १८ शक्तीचा; मायेचा. १९ नृत्यक्रीडा. २० नृत्याच्या मिषानें. २१ व्यवहार. २२ गुरुराया. २३ आपल्या अर्थे म्हणतां. २४ द्वैतभाव. २५ सेवा करतात. २६ आनंदानें. २७ निराळे. २८ ध्यानासह. २९ आवड; प्रेम.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सतरावा.

अहो श्रीगुरुराया, ज्या तुमची योगरूपी माया जगद्रूपी प्रफुल्लित अशा मुद्रेला विकसित करिते, त्या तुम्हां गणपतीस-माझा नमस्कार असो. १ सत्त्व, रज व तम या त्रिगुणरूपी तीन शहरांनीं वेढलेला व जीवरूपी किल्ल्यांत अडकलेला असा जो आत्मा, तो तुमच्या स्मरणानें श्रीशंकरांनीं मुक्त केला. २ म्हणून श्रीशंकरांबरोबर तुमची तुलना केली असतांही तुमची योग्यता विशेष आहे. (तुमचें पारडें वजनानें खालीं बसतें.) तथापि मायारूप समुद्रांतून (भवसमुद्रांतून) मुमुक्षूंस तारून नेण्याविषयीं नावेप्रमाणें तुम्ही हलके आहां. ३ जे तुमच्याविषयीं अजाण आहेत, त्याना तुम्ही वक्रतुंड (वाकड्या सोंडेचे) दिसतां; व जे तुमचें स्वरूप जाणतात, त्यांना तुम्ही नित्य असून सरळ सोंडेचेच आहां. ४ देवांचे डोळे पाहूं गेलें असतां लहान दिसतात; तथापि त्यांच्या उघडझापीनें आपण जगाची उत्पत्ति व नाश लीलेनें करितां. ५ प्रवृत्तिरूप कान हालविल्यानें (संसाररूपी वृत्ति उत्पन्न होऊन) मधाचा सुगंधवायु सुटून, त्यास लुब्ध झालेले जीवरूपी भ्रमर गंडस्थलावर बसल्यानें, नीलकमलांनीं तुमची पूजा केल्याप्रमाणें तुमचें गंडस्थळ शोभतें. ६ नंतर दुसरा निवृत्तिकर्ण हालविल्यानें (अंतर्मुखवृत्ति उत्पन्न होऊन) तुमची बांधलेली पूजा विसर्जन होते; त्या वेळेस आपलें शुद्ध स्वरूप फार गोड दिसतें. ७ तुमच्या डाव्या मांडीवर बसलेल्या सरस्वतीची (शक्तीची) नृत्यक्रीडाच जगत् उत्पन्न करिते; व त्या नृत्याच्या मिषानें आपण सर्व जगताचा व्यवहार चालवितां. ८ हें असो; हे गुरुराया, आपण ज्याचे सोयरे (संबंधी) होतां, तो सोयरिकीच्या व्यवहाराला मुकतो, (त्याचा द्वैतभाव नाहींसा होऊन तो तुमच्या स्वरूपांत मिळतो,) ही केवढी विस्मयाची गोष्ट आहे ?. ९ तुम्ही जगाचे बंधनाचा ठावठिकाणही नाहींसा करितां; म्हणून, आपण जगद्बंधु आहां असा भाव धरून जे मोठ्या आनंदानें आपल्याला (आत्मस्वरूपभावानें) शरण येतात, १० त्यांचा देह सुद्धां द्वैतपणानें शिल्लक उरत नाहीं. कारण, देवराया, त्या दुसऱ्यांला आपण स्वस्वरूपच करितां. (त्यांचे ठिकाणचें द्वैत नष्ट केलें. मग सर्वत्र अद्वैत झाल्यावर दुजा भाव कोठून उरणार ?) ११ जे तुम्हाला निराळा असें समजून तुमची प्राप्ति करून घेण्याकरितां धावत सुटतात, त्यांना तुमची प्राप्ति न होतां तुम्ही सर्व प्रकारें मागेंच राहातां. १२ जे ध्यान करण्याच्या निमित्तानें तुमची मूर्ति मनांत आणितात, त्यांना तुम्ही न सांपडतां त्यांच्या देशातही तुम्ही वास करीत नाहीं; परंतु जे ध्यानासह तुमचेविषयीं आपला द्वैतभाव सोडतात, ते तुम्हांला अति प्रियकर आहेत. १३ तुम्ही जे सिद्ध, त्या तुम्हांला जो जाणत नाहीं, त्यालाच

जो नेणे । तो नांदे सर्वज्ञपणें । वेदांही येवढें बोलणें । नेघसी कानीं ॥ १४ ॥ मौन गा तुझें राशिनांव । आतां स्तोत्रीं कें बांधों हांव । दिससी तेतुली माव । भजों काई ॥ १५ ॥ दैविकें सेवकु हों पाहों । तरि भेदितां द्रोहोचि लाहों । म्हणोनि आतां कांहीं नोहों । तुजलागीं जी ॥ १६ ॥ जें सर्वथा सर्वही नोहिजे । तें अद्वया तूतें लाहिजे । हें जाणें मी वर्म तुझें । आराध्यलिंगा ॥ १७ ॥ तरि तुरोनि वेगळेंपण । रसीं भजिन्नलें लवण । तैसें नमन माझें जाण । बहु काय बोलों ॥ १८ ॥ आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे । तो उचंबळत भरोनि निगे । कां दशी दीपसंगें । दीपुचि होय ॥ १९ ॥ तैसा तुझिया प्रणीतीं[3] । मी पूर्णु जाहलों श्रीनिवृत्ति । आतां आणीन व्यक्ति । गीतार्थु तो ॥ २० ॥ ( ९६२. अनुवाद, अध्यायसंगति, २१–२२ ) तरि षोडशाध्यायशेखीं । तिये समाप्तीच्या श्लोकीं । जो ऐसा निर्णयो निष्टंकीं । ठेविला देवें ॥ २१ ॥ जे कृत्याकृत्यव्यवस्था । अनुष्ठावया पार्था । शास्त्रचि एक सर्वथा । प्रमाण तुज ॥ २२ ॥ ( ९६३. अर्जुनाची शंका, मागील अध्यायावरून, २३-३० ) तेथ अर्जुन मानसें । म्हणे हें ऐसें कैसें । जे शास्त्रेंवीण नसे । सुटिका कर्मा ॥ २३ ॥ तरी तक्षकाची फडे । ठाकोनि कें तो मणि काढे । कें नाकींचा केशु जोडे । सिंहाचिये ॥ २४ ॥ मग तेणें तो वोविजे । तरीच लेणें पाविजे । येऱ्हवीं काय असिजे । रिक्तकंठी ॥ २५ ॥ तैसी शास्त्रांची मोकळी । यां कें कोण पां वेंटाळी । एकवाक्यतेच्या फळीं । पैसिजे[8] कें ॥ २६ ॥ जालयाही एकवाक्यता । कां लाभे वेळु अनुष्ठितां । कैंचा पैसारु जीविता । येतुलालिया ॥ २७ ॥ आणि शास्त्रें अर्थे देशें काळें । या चहूंही जें एकफळे । तो उपावो कें मिळे । आघवयांसी ॥ २८ ॥ म्हणौनि शास्त्राचें धेंडतें । नोहे प्रकारें बहुतें । तरि मूर्खा मुमुक्षां येथें । काय गति पां ॥ २९ ॥ हा पुसावया अभिप्रावो । जो अर्जुन करी प्रस्तावो । तो सतराविया ठावो । अध्याया येथ ॥ ३० ॥ अवतरण, अर्जुन उवाच.–( ९६४. अर्जुनाची योग्यता, ३१-३३ ) तरी सर्वविषयीं वितृष्णु । जो सकळकळीं प्रवीणु । कृष्णाही नवलें कृष्णु । अर्जुनत्वें जो ॥ ३१ ॥ शौर्या जोडला आधार । जो सोमवंशाचा शृंगार । सुखादि उपचार । जयाची लीला ॥ ३२ ॥ जो प्रज्ञेचा प्रियोत्तमु । ब्रह्मविद्येचा विश्रामु । सहचरु मनोधर्मु । देवाचा जो ॥ ३३ ॥

ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयाऽन्विताः ।
तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥

---

१ माथा. २ वात. ३ नमस्कार केल्यानें. ४ सिद्धांतीं. ५ सर्पाची. ६ भिन्नपणा. ७ एकत्र करणें. ८ उपभोग घेणें. ९ आयुष्य; दीर्घपणा. १० साधन. ११ निरिच्छ. १२ आनंद देणारा. १३ बुद्धीचा.

सर्वज्ञ असें म्हणतात. वेदांनीं जें तुमचें एवढें वर्णन केलें आहे, तें तुम्ही ऐकत देखील नाहीं. १४ तुमचें राशीवरून 'मौन' असें नांव निवर्ते, म्हणून आपली स्तुति करण्याची मीं कशाला इच्छा करावी ? हें सर्व भासमान जगत्‌ही सर्व आपली माया आहे, म्हणून तुमचें भजन मला कसें करतां येईल ? १५ मी तुमचा सेवक होईन म्हटलें, तर द्वैतरूपी द्रोह माझे पदरांत येतो; म्हणून तुमचा कांहीं संबंध न ठेवणें म्हणजे तुमच्यात व माझ्यांत द्वैतभाव न ठेवणें हें उत्तम होय, म्हणजे तुमचें पूजन होय. १६ जेव्हां मी सर्व प्रकारें तुमचा कोणी नाहीं असें म्हणावें, तेव्हां तुमच्यांत व माझ्यांत अद्वैत आहे असें होईल; तर, हे आराध्यदेवता गुरुराया, तुमचें हें वर्म मला आतां समजलें; १७ तर मीठ ज्याप्रमाणें पाण्यापासून वेगळें नसून त्यात मिळविलें असतां ऐक्य पावतें, त्याप्रमाणें तुमच्यांत व माझ्यांत द्वैतभाव नसून मी तुम्हास नमस्कार करतों. यापेक्षां विशेष काय बोलावें ? १८ हें पहा, रिकामी घागर समुद्रांत बुडविली असतां ती जशी पाण्यानें उचंबळून भरून निवते, किंवा दिव्याच्या संसर्गानें वात दीपस्वरूपच होते; १९ त्याप्रमाणें, हे गुरुराया श्रीनिवृत्तिनाथा, तुम्हांला नमस्कार केल्यानें मी कृतकृत्य झालों. आतां गीतेचा अर्थ मी स्पष्ट करीन. २० तर सोळाव्या अध्यायाच्या शेवटल्या श्लोकांत देवांनीं जो असा निश्चयपूर्वक सिद्धांत सांगितला, २१ कीं, पार्था, चांगल्या अथवा वाईट गोष्टीचें आचरण करण्यास तुला शास्त्रच सर्वथैव प्रमाण मानलें पाहिजे, २२ तो ऐकून अर्जुन मनांत म्हणतो, " हें असें कसें ? कोणतेंही कर्म करण्यास शास्त्राशिवाय सुटका नाहीं हें काय ? २३ सर्पाच्या जवळ जाऊन त्याच्या फणीवरील मणि कसा काढावा ? आणि सिंहाच्या नाकांतील केंस कसा मिळवावा ? २४ मग त्या केंसांत तो मणि ओंवला म्हणजेच गळ्यांत भूषण घालावें, नाहीं तर गळा मोकळाच ठेवावा कीं काय ? २५ त्याप्रमाणें, निरानिराळ्या शास्त्रांना एकत्र कोण करील ? आणि त्यांची एकवाक्यता करून त्याचा उपयोग कोण करून घेईल ? २६ बरें, एकवाक्यताही जरी कोणीं केली, तरी त्याप्रमाणें आचरण करण्यास वेळ कोठून सांपडणार ? आणि इतकें आयुष्य तरी कोणास असणार ? २७ आणि शास्त्र, अर्थ, देश व काल हीं चारी जरी प्राप्त झालीं, तरी यांची सर्वांना प्राप्ति कोठून असणार ? २८ म्हणून पुष्कळ प्रकारानें शास्त्राचें साधन या मृत्युलोकीं सर्वांना प्राप्त होणार नाहीं, तर मग मूर्ख अशा मुमुक्षूंना कोणता तरणोपाय आहे ? " २९ हा अभिप्राय पुसण्याकरितां अर्जुनानें जी प्रस्तावना केली, तो या सतरावे अध्यायाचा मूळ विषय होय. ३० तर सर्व विषयांविषयीं निरिच्छ व सकळ कलांत प्रवीण, आणि अर्जुनाच्या रूपानें श्रीकृष्णालाही आनंद देणारा असा जो कृष्ण ( अर्जुन ); ३१ जो शौर्याचा आधार, जो सोमवंशाचें भूषण, आणि ज्याच्या लीलेनें देवाला फार सुख होतें; ३२ जो बुद्धीचा आवडता, जो ब्रह्मविद्येचें विश्रांतिस्थान, आणि जो सदैव श्रीकृष्णांच्या अंतःकरणांत असणारा, ३३

अन्वयः—कृष्ण, ये शास्त्रविधिमुत्सृज्य श्रद्धयान्विताः ( संतः ) यजन्ते, तेषां तु का निष्ठा ! सत्त्वं, रजः आहो तमः ? ॥ १ ॥

( ९६५. शास्त्राला सोडून भजन करणारी श्रद्धा कोणत्या गुणाची ? ३४-३९ ) तो अर्जुन म्हणे गा तमालश्यामा । इंद्रियां फावलियो ब्रह्मा । तुझा बोलु आम्हां। साकांक्षु पैं जी ॥ ३४ ॥ जे शास्त्रेंवांचूनि आणिकें । प्राणिया स्वमोक्षु न देखे । ऐसें का कैंपखें । बोलिलासी ॥ ३५ ॥ तरी न मिळेचि तो देशु । नव्हेचि काळा अवकाशु । जो करवी शास्त्राभ्यासु । तोही दुरी ॥ ३६ ॥ आणि अभ्यासीं विराजियों । होती जिया सामग्रिया । त्याही नाहीं आपैतियां । तिये वेळीं ॥३७॥ उंजू नोहेचि प्राचीन । नेदीचि प्रज्ञा संवाहन । ऐसें ठेलें आपादन । शास्त्राचें जया ॥ ३८ ॥ किंबहुना शास्त्रविखीं । येकही न लाहातीचि नेखी । म्हणूनि उखीविखी । सांडिली जिहीं ॥ ३९ ॥ ( ९६६. शास्त्राज्ञेवर श्रद्धा ठेवून भजन करणाराला कोण गति ? ४०-४५ ) परि निर्धारूनि शास्त्रें । अर्थानुष्ठानें पवित्रें । नांदताति परत्रें । साचारें जे ॥ ४० ॥ तयां ऐसें आम्हीं होआवें । ऐसी चाड वांधोनि जीवें । घेती तयांचे मार्गांवे । आचरावया ॥ ४१ ॥ धडयाचियां आखरां । तळीं बाळ लिहे दातारा । कां पुढां सूनि पडिकरां । अक्षमु चाले ॥ ४२ ॥ तैसें सर्वशास्त्रानिपुण । तयाचें जें आचरण । तेंचि करिती प्रमाण । आपलिये श्रद्धे ॥४३॥ मग शिवादिकें पूजनें । भूम्यादिकें महादानें । अग्निहोत्रादि यजनें । करिती जे श्रद्धा ॥ ४४ ॥ तयां सत्त्वरजतमां- । माजि कोण पुरुषोत्तमा । गति होय ते आम्हां । सांगिजो जी ॥ ४५ ॥ ( ९६७. कृष्णाचें स्वरूप, ४६-४८ ) श्रीभगवानुवाचः—तंव वैकुंठपीठींचें लिंग । जो निगमपद्माचा पराग । जिये जयाचेनि हें जग । अंगच्छाया ॥ ४६ ॥ काळ सावियाचि वाढु । लोकोत्तर प्रौढु । अद्वितीय गूढु । आनंदघनु ॥ ४७ ॥ इयें श्लाघिजेती जेणें विकें । तें जयाचे आंगीं असिकें । तो श्रीकृष्ण स्वमुखें । बोलत असे ॥ ४८ ॥

त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।
सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २ ॥

अन्वयः—देहिनां ( या ) स्वभावजा श्रद्धा, सा सात्त्विकी च राजसी च एव तामसी इति त्रिविधा भवति, तां शृणु ॥ २ ॥

( ९६८. जीवाची जन्मतांच जी श्रद्धा ती गुणांस्तव तीन प्रकारची होते; ४९-७५ ) म्हणे पार्था तुझा अतिसो । हेंही आम्ही जाणतसों । जे शास्त्राभ्यासाचा आडसो । मानितासि कीं ॥ ४९ ॥ नुसधियाचि श्रद्धा । क्षोंवों पाहसी परमपदा । तरी तैसें हें प्रबुद्धा । सोहोपें नोहे ॥ ५० ॥ श्रद्धा म्हणितलियासाठीं ।

१ तमालपत्राप्रमाणें ज्याचा नील वर्ण आहे, असा श्रीकृष्णा. २ भोगतां येणारे. ३ पद्धतीनें. ४ गुरु. ५ साहाय्य. ६ स्वाधीन. ७ अनुकूल. ८ पूर्वकर्म. ९ संपादन. १० निश्चय. ११ वादविवाद.

श्लोकार्थः—अर्जुन म्हणाला, श्रीकृष्णा, जे कोणी शास्त्रविधीला टाकून, खऱ्या श्रद्धेनें युक्त होत्साते तुम्हांला भजतात, त्यांची ती भक्ति कोणत्या प्रकारची? सात्त्विक, राजस कीं तामस? ॥१॥

तो अर्जुन म्हणतो, " हे तमालश्यामा, सर्व इंद्रियांस प्रत्यक्ष भोगतां येणाऱ्या परब्रह्मा, तुमचें भाषण मला संशययुक्त दिसतें. ३४ प्राणिमात्राला शास्त्रज्ञानावांचून मोक्षप्राप्ति होत नाहीं असें जें आपण एकपक्षी बोललां, त्याचा हेतु काय? ३५ तर ज्या देशांत शास्त्राभ्यास करण्याची सोय आहे, तोही ज्यास प्राप्त होत नाहीं; तसेंच, अभ्यासाला लागणाऱ्या आयुष्याचीही ज्याला अनुकूलता नाहीं; व ज्या गुरूपासून शास्त्राची माहिती मिळावयाची तोही दूर आहे; ३६ आणि अभ्यासाला साह्य करणाऱ्या ज्या सामुग्री त्याही त्या वेळीं ज्याजवळ नाहींत; ३७ तसेंच, पूर्वकर्म अनुकूल नसल्यामुळें बुद्धीचेंही साह्य नाहीं; अशा प्रकारें ज्याचें शास्त्रसंपादन खुंटलें आहे; ३८ किंबहुना, शास्त्रांची एकवाक्यता करण्यास समर्थ नसल्यामुळें ज्यांनीं वादाविवाद करण्याचें सोडून दिलें आहे, ३९ पण शास्त्रांचा अभ्यास करून त्यांत सांगितल्याप्रमाणें यथाविधि अनुष्ठान करून परलोकीं जे आनंदानें नांदतात, ४० त्यांच्याप्रमाणें आपण व्हावें अशी मनांत इच्छा धरून त्यांच्या मार्गाचें जे आचरण करतात; ४१ प्रभो, ज्याप्रमाणें वर काढून दिलेल्या धड्याच्या अक्षरांप्रमाणें लहान मूल खालीं अक्षरें काढतें, किंवा डोळस मनुष्यास पुढें करून अंधळा मनुष्य वाट चालतो, ४२ त्याप्रमाणें, जे सर्व शास्त्रांत निपुण आहेत त्यांचें आचरण प्रमाण मानून त्यावर जे श्रद्धा ठेवतात; ४३ आणि शंकर आदिकरून देवांचें पूजन करणें, भूमि वगैरे महादानें देणें, व अग्निहोत्रादि यज्ञ करणें हीं कर्में श्रद्धेनें करतात, ४४ त्यांना पुरुषोत्तमा, सत्त्व, रज व तम यांपैकीं कोणती गति प्राप्त होते तें आम्हांला सांगा. " ४५ तेव्हां वैकुंठपीठींचें अधिदैवत, वेदरूपी कमलांतील पराग, ज्याच्या सत्तेनें हें सर्व जग वांचतें; ४६ जो लोकोत्तर प्रौढ व स्वभावतः मोठा असा काल, जो अद्वितीय, गूढ व आनंदघन, ४७ आणि हे सर्व गुण ज्या शक्तीच्या आधारानें वर्णनीय होतात, ती शक्ति ज्याचे अंगीं आहे, तो श्रीकृष्ण भगवान स्वमुखानें बोलत आहे. ४८

श्लोकार्थः—श्रीभगवान म्हणाले, मनुष्यांची स्वाभाविक जी श्रद्धा, ती सात्त्विक, राजस आणि तामस अशी तीन प्रकारची असते, ती ऐक ॥ २ ॥

भगवान म्हणतातः—पार्था, शास्त्राभ्यासाची अडचण आहे असा तुझ्या मनाचा कल आहे, हेंहि आम्ही जाणतों. ४९ तूं नुसत्या श्रद्धेनेंच मोक्षप्राप्ति करून घेऊं पहात आहेस; पण हे प्रबुद्धा, तूं म्हणतोस तितकें हें काम सोपें नाहीं. ५० अर्जुना, श्रद्धेवरच नुसता विश्वास ठेवूं नये. हें पहा कीं, अंत्यजाच्या समागमानें ब्राह्मणही अंत्यज

१२ अभ्यास करून. १३ परलोकीं. १४ मार्ग. १५ डोळस. १६ अंधळा. १७ वेद. १८ गंध. १९ वांचे, २० आधारानें. २१ योग्यता पावतात. २२ शक्तीनें. २३ कल. २४ अडचण. २५ मोघ.

पातेजों नये किरीटी । काय द्विजु अंत्यजगृहीं । अंत्यजु नोहे ॥ ५१ ॥ गंगोदक जरी जालें । तरि मद्यभांडां आलें । तें घेऊं नये कांहीं केलें । विचारीं पां ॥५२॥ चंदनु होय शीतळु । परी अग्नीसी पावे मेळु । तैं हातीं धरितां जाळू । न शके काई ॥ ५३ ॥ कां किडाचिये आटतिये पुटीं । पडिलें सोळें[४] किरीटी । घेतले चोखासोंठीं । नागवीना ॥ ५४ ॥ तैसें श्रद्धेचें दळवाडें । आंगें कीर चोखडें । परि प्राणियाच्या पडे । विभागीं जें ॥ ५५ ॥ तें प्राणिये तंव स्वभावें । अनादि माया-प्रभावें । त्रिगुणाचेचि आघवे । वळिले आहाती ॥ ५६ ॥ तेथही दोन गुण खांचती[७] । मग एक धरी उन्नति । तें तैसियाचि होती वृत्ति । जीवाचिया ॥ ५७ ॥ वृत्तीऐसें मन धरिती[८] । मनाऐसी क्रिया करिती । केलियाऐसीं वैरिती । मरोनि देहें ॥५८॥ बीज मोडे झाड होये । झाड मोडे बीजीं सामाये । ऐसेनि कल्पकोडी जाये । परी जाति न नसे ॥ ५९ ॥ तियापरि इयें अपारें । होतां जातां जन्मांतरें । त्रिगुणत्व न व्यभिचरे । प्राणियांचें ॥ ६० ॥ म्हणूनि प्राणियांच्या पैकीं । पडिली श्रद्धा अवलोकीं । ते होय गुणासारिखी । तिहीं ययां ॥ ६१ ॥ विपायें वाढे सत्त्व शुद्ध । तेव्हां ज्ञानासी करी[९] साद । परि एका दोघे वोखेंद[१०] । येर आहाती ॥ ६२ ॥ सत्त्वाचेनि आंगलेगें[११] । ते श्रद्धा मोक्षफळा रिगे । तंव रज तम उगे । कां पा राहाती ॥ ६३ ॥ मोडोनि सत्त्वाची थ्रोंये[१२] । रजोगुण आकाशे जाये । तेव्हां तेचि श्रद्धा होये । कर्मकेरसुणी[१३] ॥ ६४ ॥ मग तमाची उठी आगी । तेव्हां तेचि श्रद्धा भंगी । हों लागे भोगालागीं । भलतेया ॥ ६५ ॥

सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।
श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रध्दः स एव सः ॥३॥

अन्वयः—भारत, सर्वस्य सत्त्वानुरूपा श्रद्धा भवति, अयं पुरुषः श्रद्धामयः ( अस्ति ), यः यच्छ्रद्धः ( भवति ), सः एव सः ( जीवः ) ॥ ३ ॥

एवं सत्त्वरजतमां- । वेगळी श्रद्धा सुवर्मा[१४] । नाहीं गा जीवग्रामा- । माजी यया ॥ ६६ ॥ म्हणोनि श्रद्धा स्वाभाविक । असे पैं त्रिगुणात्मक । रजतमसात्त्विक । भेदीं इहीं ॥ ६७ ॥ जैसे जीवनचि उदक । परि विषीं होय मारक । का मिरेंयां[१५]-माजि तीख । उंसीं गोड ॥ ६८ ॥ तैसा बहुवसें तमें । जो सदाचि होये[६] निमे[७] । तेथ श्रद्धा परिणमे । तेंचि होऊनि ॥ ६९ ॥ मग काजळा आणि मसी । न दिसे विवंचना जैसी । तेवीं श्रद्धा तामसी । सिनी[११] नाहीं ॥ ७० ॥ तैसीच राजसीं जीवीं । रजोमय जाणावी । सात्त्विकीं आघवी । सत्त्वाचीच ॥ ७१ ॥ ऐसेनि हा

१ विश्वास ठेवणें. २ चांडालाच्या समागमानें. ३ हिणकट. ४ शुद्ध सोनें. ५ उत्तमाच्या भावानें. ६ स्वरूप. ७ दबतात, क्षीण होतात. ८ धारण करतात. ९ हाक मारतो; प्राप्ति करून देतो. १० विरुद्ध. ११ अनुरोधानें. १२ आश्रय. १३ कर्म करणारी. १४ सुज्ञा. १५ मिरच्यांत.

होत नाहीं का ? ५१ गंगेचें जरी पाणी असलें, तरी तें जर मद्याच्या भांड्यांत घातलें तर ते कांहीं केल्या घेऊं नये याचा विचार कर. ५२ चंदन हा थंड आहे खरा, पण तो पेटल्यावर जर हातांत धरला, तर हात भाजूं शकणार नाहीं का ? ५३ किंवा अर्जुना, हिणकट सोनें आटवीत असतां त्यांत उत्तम सोनें पडलें, आणि मग तें जर उत्तम सोन्याच्या भावानें विकत घेतलें, तर तें नागवणार नाहीं का ? ५४ त्याप्रमाणें, श्रद्धेचें स्वरूप जरी मूळचें शुद्ध आहे, तरी जेव्हां ती प्राण्यांच्या वांटणीला येते, ५५ तेव्हां, प्राणी तर स्वभावतःच अनादि मायेच्या शक्तीनें तीन गुणांचेच बनले आहेत. ५६ त्यांतही, दोन गुण क्षीण होऊन तिसरा ज्या वेळेस वाढतो, त्या वेळेस त्या गुणाच्या अनुरोधानें जीवांच्या वृत्ति होतात, ५७ वृत्तीच्या अनुरोधानेंच ते मन (वासना) धारण करितात, मनाप्रमाणें क्रिया करितात, आणि मेल्यावर पुनः आपल्या कर्माप्रमाणेंच देह धारण करतात; ५८ बीज नाहींसें होतें आणि झाड वाढतें, व झाड नाहींसें होतें आणि बीजांत सामावतें, याप्रमाणें कल्पचे कल्प जरी गेले तरी मूळ झाडाची जात कांहीं नाहींशी होत नाहीं, ५९ त्याप्रमाणें, जीवांचीं पुष्कळ जन्मांतरें झालीं तरी त्याच्यातील तीन गुणांचा बदल होत नाहीं. ६० म्हणून, प्राण्याच्या वांट्याला जी श्रद्धा आलेली असते, ती गुणांच्या अनुरोधानें असते असें समज. ६१ कदाचित् शुद्ध सत्त्वगुण वाढला, तर तो ज्ञानाला हांक मारितो; परंतु त्याला रज व तम हे दोन गुण विरुद्ध आहेत. ६२ सत्त्वगुणाच्या अनुरोधानें जी श्रद्धा असते, ती मोक्षफलापर्यंत जाते; पण रज व तम हे दोन गुण स्वस्थ कसे बसतील ? ६३ सत्त्वगुणाचा आश्रय नाहींसा करून ज्या वेळेस रजोगुण वाढतो, त्या वेळेस तीच श्रद्धा कर्मे करण्यास लागते. ६४ मग तमोगुणाचा ज्या वेळेस जोर होतो, तेव्हां त्या श्रद्धेचा भंग होऊन तीच श्रद्धा वाटेल ते भोग भोगण्यास उद्युक्त होते. ६५

श्लोकार्थः—हे भारता, सर्वांना आपल्या पूर्वसंस्कारानुसार श्रद्धा उत्पन्न होते; कारण हा जीव श्रद्धामय आहे. जो ज्या प्रकारच्या श्रद्धेनें युक्त असतो, तो त्या योग्यतेचा असतो ॥ ३ ॥

याप्रमाणें हे सुज्ञा, या जीवसमुदायांत सत्त्व, रज व तम यांच्याशिवाय निराळी श्रद्धा नाहीं. ६६ म्हणून सत्त्व, रज व तम या भेदांनीं अशी ही श्रद्धा स्वभावतःच त्रिगुणात्मक आहे. ६७ पाणी प्राणिमात्राचें जीवन—पण तेंच बचनागास दिलें असतां ज्याप्रमाणें मारक होतें, किंवा मिरच्यांस दिलें असता तिखट होतें, आणि उंसास दिलें तर गोड होतें, ६८ त्याप्रमाणें, तमोगुण वाढला असता, जो नेहमीं जन्म पावतो व मरतो त्या प्राण्याच्या ठिकाणीं श्रद्धा ही तमोगुणाच्याच अनुरोधानें परिणाम पावते. ६९ मग, काजळ आणि मस यांत जसा फरक दिसत नाहीं, तशी ही तामसी श्रद्धा त्या मनुष्याहून निराळी असते. ७० त्याचप्रमाणें, राजस प्राण्यांच्या ठिकाणीं येणारी श्रद्धा रजोगुणमय आणि सात्त्विकांच्या ठिकाणीं असणारी सगळी सत्त्वगुणमयच असते. ७१ याप्रमाणें हें

१६ जन्मतो. १७ मृत्यु पावतो. १८ भेद. १९ निराळी.

सकळु । जगडंबरु निखिळु । श्रद्धेचाचि केवळु । वोतला असे ॥ ७२ ॥ परि गुण-त्रयवशें । त्रिविधपणाचें ठासें । श्रद्धे जें उठिलें असे । तें वोळख तूं ॥ ७३ ॥ अवतरणः—तरि जाणिजे झाड फुलें । कां मानस जाणिजे बोलें । भोगें जाणिजे केलें । पूर्वजन्मींचें ॥७४॥ तैसीं जिहीं चिन्हीं । श्रद्धेचीं रूपें तिन्ही । देखिजती ते वानी । अवधारीं पा ॥ ७५ ॥

यजंते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।
प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजंते तामसा जनाः ॥ ४ ॥

*अन्वयः—सात्त्विकाः देवान् यजन्ते; राजसाः यक्षरक्षांसि यजन्ते; अन्ये तामसाः जनाः प्रेतान् च भूतगणान् यजन्ते. ॥ ४ ॥*

( ९६९. सात्त्विक श्रद्धा, ७६-७७ ) तरी सात्त्विक श्रद्धा । जयांचा होय बांधा । तयां बहुतकरूनि मेधा । स्वर्गीं आथी ॥ ७६ ॥ ते विद्याजात पढती । यज्ञक्रिये निवडती । किंबहुना पडती । देवलोकीं ॥ ७७ ॥ ( ९७०. राजस श्रद्धा, ७८ ) आणि श्रद्धा राजसा । घडले जे वीरेशा । ते भजती राक्षसां । खेचैरा हन ॥ ७८ ॥ ( ९७१. तामस श्रद्धा, ७९–८२ ) श्रद्धा जे कां तामसी । ते मी सांगेन तुजपाशीं । जे का केवळ पापराशी । अतिकर्कशी निर्दयत्वें ॥ ७९ ॥ जीववधें साधूनि बळी । भूतप्रेतकुळें मैळीं । स्मशानीं संध्याकाळीं । पूजिती जे ॥ ८० ॥ ते तमोगुणाचें सार । काढूनि निर्मिले नर । जाण तामसियेचें घर । श्रद्धेचें तें ॥ ८१ ॥ (तीन श्लोकाचा अभिप्राय) ऐसीं इहीं तिहीं लिंगीं । त्रिविध श्रद्धा जगीं । पैं हें ययालागीं । सांगतु असें ॥ ८२ ॥ ( ९७२. शास्त्रावर विश्वास ठेवून सात्त्विक श्रद्धेचे अवलंबन करावें, ८३–९२ ) जे हे सात्त्विक श्रद्धा । जतन करावी प्रबुध्दा । येरी दोनी विरुध्दा । सांडाविया ॥ ८३ ॥ हे सात्त्विक मति जया । निर्वाहती होय धनंजया । बागूल नोहें तया । कैवल्य तें ॥ ८४ ॥ तो न पढो कां ब्रह्मसूत्र । नालोडो सर्व शास्त्र । सिध्दांत न होत स्वतंत्र । तयाच्या हातीं ॥ ८५ ॥ परी श्रुतिस्मृतींचे अर्थ । जे आपण होऊन मूर्त । अनुष्ठानें गाजत । जगा वडील जे जे ॥ ८६ ॥ तयांचीं आचरतीं पाउलें । पाऊनि सात्त्विकी श्रध्दा चाले । तो तेंचि फळ ठेविलें । ऐसें लाहे ॥ ८७ ॥ पैं एक दीपु लावी सायासें । आणिक तेथें लाऊं बैसे । तरी तो काय प्रकाशें । वंचिजे गा ॥ ८८ ॥ का येकें मोल अपार । वेंचोनि केलें धवळार । तो सुखोंडु वस्तीकर । न भोगी काई ॥ ८९ ॥ हें असो जो तळें करी । तें तयाचीच तृषा हरी । कीं सुआरांसीचि अन्न घरीं । येरां नोहे ॥ ९० ॥ बहुत काय बोलों पैं गा । येका गौतमासीचि

१ रूप; चिन्ह. २ खूण. ३ शरीर. ४ बुद्धि. ५ पिशाचांस. ६ संरक्षणकर्ती. ७ वेद. ८ अध्ययन करो. ९ वंचना करील; फसवील. १० घर. ११ सुखकर. १२ स्वयंपाक करणारासच.

सर्व जग खरोखर श्रद्धेचेंच ओतलेलें आहे. ७२ परंतु त्रिगुणांच्या अधीन असल्यानें श्रद्धेचे ठिकाणीं जें तीन प्रकारचें चिन्ह प्राप्त होतें, तें तूं ओळख. ७३ तर ज्याप्रमाणें फुलांच्या बारावरून झाडाला येणाऱ्या फळांचें अनुमान समजतें, किंवा बोलण्यावरून स्वभावाचें लक्षण समजतें, व मनुष्याच्या प्रस्तुत स्थितीवरून त्याचें पूर्वजन्मींचें कर्म ओळखतां येतें, ७४ त्याप्रमाणें, ज्या चिन्हांनीं श्रद्धेचीं तिन्ही रूपें ओळखतां येतील, त्या लक्षणांचीं खूण सांगतों, ती ऐक. ७५

श्लोकार्थः—जे सात्त्विक असतात, ते देवाचें पूजन करितात; जे राजस असतात, ते यक्षराक्षसांचें पूजन करितात; आणि बाकी राहिलेले जे तामस जन, ते प्रेत आणि भूतगण याचें पूजन करितात ॥४॥

तर ज्यांचें शरीर सात्त्विक श्रद्धेचें बनलेलें आहे, त्यांची बुद्धि बहुतकरून स्वर्गप्राप्तीविषयींचीच होते. ७६ ते सर्व विद्या शिकतात; कोणते यज्ञ करणें योग्य आहे त्याची वाटाघाट करतात. फार काय ? ते देवलोकास पावतात. ७७ आणि हे वीरशिरोमणे, ज्यांचें शरीर रजोगुणात्मक श्रद्धेचें बनलेलें आहे, ते राक्षस व पिशाच यांना भजतात. ७८ ज्यांचें शरीर तमोगुणात्मक श्रद्धेचें बनलेलें आहे, त्यांविषयीं मी तुला सांगतों कीं, ते केवळ पापराशी असून अति कठोर व दयाहीन असतात. ७९ ते जीवांचा वध करून बळी देतात, आणि भूत, प्रेत वगैरे दैवतांची स्मशानांत संध्याकाळीं पूजा करितात. ८० ते तमोगुणाचें सार काढून निर्माण केलेले पुरुष म्हणजे तामस श्रद्धेचें आगरच होय असें समज. ८१ याप्रमाणें सात्त्विक, राजस व तामस अशी तीन प्रकारची श्रद्धा जगांत आहे. परंतु मी हें एवढ्याकरितां सांगत आहें ८२ कीं, या या तिन्हींपैकीं जी सात्त्विक श्रद्धा, तिचा स्वीकार करावा; आणि हे बुद्धिमंता, दुसऱ्या ज्या दोन्ही राजस व तामस श्रद्धा, त्यांचा त्याग करावा. ८३ धनंजया, ही सात्त्विक बुद्धि जे आचरतात, त्यांना मोक्षप्राप्तीचा मोठासा बाऊ वाटत नाहीं. ८४ तो मनुष्य वेदाचें पठन न करो, शास्त्राध्ययन न करो, अथवा शास्त्रांची एकवाक्यता करून कोणताही सिद्धांत न ठरवो; ८५ परंतु जे श्रुतिस्मृतींचें अध्ययन करून मूर्तिमंत वेद बनतात, ( विद्वान झालेले असतात, ) व आपल्या आचरणानें सर्व जगास पूज्य असतात, ८६ त्यांचे आचरणाचा कित्ता वळवून जो सात्त्विक श्रद्धेनें चालतो, त्याला त्यांना मिळणारें फळच प्राप्त होतें. ८७ हें पहा, एखादा मनुष्य मोठ्या प्रयासानें दिवा लावतो, आणि त्या दिव्यावरून जर दुसरा कोणी दिवा लावूं लागला, तर तो दिवा त्याला फसवील काय ? ( त्याच्या घरीं उजेड पाडणार नाहीं असें होईल काय ? ) ८८ किंवा एखाद्यानें अपार द्रव्य खर्च करून घर बांधलें, तर त्या घरांत राहाणाऱ्या दुसऱ्या मनुष्यास तें सुख भोगतां येत नाहीं काय ? ८९ हें असो; जो तळें बांधतो, त्याचीच का तहान त्यांतील पाण्यानें भागते ? अथवा घरामध्यें स्वयंपाक करणाऱ्याचीच तेवढी त्या अन्नानें तृप्ति होते, आणि इतरांची होत नाहीं कीं काय ? ९० उगीच पुष्कळ बोलून काय करावयाचें

गंगा । येरा समस्ता काय जगा । वाहोळ जाली ॥ ९१ ॥ म्हणोनि आपुलिया परी । शास्त्र अनुष्ठिती कुसरी । जाणे तयांतें श्रद्धाळ जो वरी । तो मूर्खही तरे ॥९२॥

अशास्त्रविहितं घोरं तप्यंते ये तपो जनाः ।
दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥

अन्वयः—दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ये जनाः अशास्त्रविहितं घोरं तपः तप्यन्ते; ॥५॥

( ९७३. शास्त्राविरुद्ध घोर तपाचें अनुष्ठान, ९३–१०४ ) ना शास्त्राचेनि कीर नावें । खाकरोंही[3] नेणती जीवें । परि शास्त्रज्ञांही शिवे । टेकों नेदिती ॥ ९३ ॥ वडिलांचिया क्रिया । देखोनि वांती वांकुलिया । पंडितां डाकुलिया । वाजविती ॥ ९४ ॥ आपलेनीचि आँटोपें । धनित्वाचेनि दर्पें । साचचि पाखंडाचीं तपें । आदरिती ॥ ९५ ॥ आपुलिया पुढिलांचिया । आंगीं घालूनि कातिया । रक्तमांसा प्रणीतया । भरभरों ॥ ९६ ॥ रिचविती[11] जळत कुंडीं । लाविती चेडयाच्या तोंडीं । नवासिया देती उंडी[12] । बाळकांची ॥ ९७ ॥ आग्रहाचिया उँजरिया । क्षुद्रदेवतां वरियेँ । अन्नत्यागें सौतारिया । ठाकती ऐक ॥ ९८ ॥ अगा आत्मपरपीडा- । बीज तमक्षेत्रीं सुहाडें । पेरिती मग पुढां । तेंचि पिके ॥ ९९ ॥ बाहु नाहीं आपलिया । आणि नावेतेंही धनंजया । न धरी होय तया । समुद्रीं जैसें ॥ १०० ॥ कां वैद्यातें करी सैंळा । रेंसु सांडी पायखोळीं । तो रोगिया जेविं विव्हळा- । सैंवता न होय ॥ १ ॥ ना ना पडिकरोंचेनि सळें । काढी आपलेचि डोळे । तें वाँनवसां आंधळें । जैसें ठाके ॥ २ ॥ तैसें तया आसुरां होये । जे निंदूनि शास्त्रांची सोये । सैंघें धांवताती मोहें । आडवीं जे कां ॥ ३ ॥ कामु करवी तें करिती । क्रोधु मारवी तें मारिती । अवतरणः—किंबहुना मातें पुरिती । दुःखाचा गुंडां[27] ॥ ४ ॥

कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।
मां चैवांतःशरीरस्थं तान्विध्द्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥

अन्वयः—च अचेतसः ये शरीरस्थं भूतग्रामं च अन्तःशरीरस्थं मां कर्षयन्तः, तान् आसुरनिश्चयान् विद्धि ॥ ६ ॥

( ९७४. आत्म्याला व इंद्रियांना पीडा देणारे, १०५ ) आपुलां पैरावां देहीं । दुःख देती जें जें कांहीं । मज आत्मया तेतुलाही । होय शीणु ॥ ५ ॥ ( ९७५. पाप्याचें नांव घेऊं नये, पण त्यागाकरितां बोलावें लागतें; १०६-१०८ ) पैं वाचेचेनिही पैंलवें । पापियां तया नींतळावें । परि पडिलें सांगावें । त्यजावया ॥ ६ ॥

१ ओढा. २ दक्षतेनें. ३ इच्छाही होत नाहीं. ४ दाखवितात. ५ टिमक्या. ६ शहाणपणाची. ७ घमेंडीनें. ८ कोयता; शस्त्र. ९ यज्ञपात्रें. १० ओततात. ११ चेटुकांच्या. १२ बळी. १३ आढ्यतेनें. १४ वर प्राप्त करून घेण्याकरितां. १५ सात दिवस. १६ सुशा. १७ द्वेष. १८ काढा. १९ लाथेनें. २० व्यथा. २१ वेगळा. २२ डोळसाच्या. २३ माजघरात. २४ मार्ग. २५ सैरावैरा. २६ अरण्यांत. २७ वगडांत. २८ दुसऱ्याच्या. २९ पदरानें. ३० स्पर्श करूं नये.

आहे ? अरे, गौतम ऋषींनीं दीर्घ प्रयत्नानें आणिलेली गंगा ही एक त्यांसच पवित्र करते, आणि जगातील इतर सर्व लोकांविषयीं ती ओढ्याची योग्यता पावते कीं काय ? ९१ म्हणून, आपल्यापेक्षां जे दक्षतेनें शास्त्रांचें अनुष्ठान करितात; त्यांचेप्रमाणें जो श्रद्धाळु पुरुष आचरण करतो, तो मूर्ख असला तरी तरतो ! ९२

श्लोकार्थः—दंभ आणि अहंकार यांनीं युक्त, तसेंच काम व प्रीति यांच्या बलानें युक्त असे जे जन शास्त्रविरुद्ध घोर तपाचें आचरण करतात ॥ ५ ॥

ज्याना खरोखर शास्त्रांचें अध्ययन तर नाहींच, व शास्त्र शिकण्याची नुस्ती इच्छाही ज्यांनीं केली नाहीं; इतकेंच नव्हे, तर जे शास्त्रज्ञाना उंबऱ्यांतही उभे करीत नाहींत; ९३ वडिलांचें स्नानसंध्यादि आचरण पाहून जे त्यांस वेडावून दाखवितात, व पंडितांचा संवाद ऐकला असतां टिमक्या वाजवितात, ( त्यांचे शब्द कानीं देखील पडूं देत नाहींत; ) ९४ आपल्या शहाणपणानें व द्रव्याच्या मदानें आपल्याच कुऱ्यांत असतात, ते खरोखर पाखाडयाच्या तपाचें आचरण करतात. ९५ आपल्या पुढें आलेल्यांच्या अंगावर शस्त्रांचे प्रहार करून त्यांच्या रक्तमांसांनीं यज्ञपात्रें भरभरून, ९६ प्रदीप्त अग्निकुंडांत चेडयांना आहुति देतात; व त्यांस नवस करून बाळकांचे बळी देतात ! ९७ क्षुद्र दैवतांपासून वरप्राप्ति करून घेण्याकरितां आग्रहाच्या आढयतेनें सात सात दिवस अन्न सेवन न करितां अनुष्ठानें करतात. ९८ हे सुज्ञा, ( अशा प्रकारें ) ते आपल्यास व दुसऱ्यास पीडा करण्याचें बीज तमोरूपी जमिनींत पेरतात, आणि त्यापासून पुढें तामस श्रद्धेचेंच पीक येतें. ९९ अर्जुना, ज्या मनुष्यास स्वतः पोहतां येत नाहीं, तो नावेचा आश्रय न करितां समुद्रांत गेला असतां त्याची जी स्थिति होते; १०० किंवा वैद्याचा द्वेष करून जो लाथेनें काढा लवंडून देतो, तो रोगी जसा व्यथेपासून मुक्त होत नाहीं, १ अथवा जो डोळस मनुष्याचा कंटाळा करतो आणि अशा प्रकारें आपलेच डोळे काढून टाकतो, त्या अंधळ्या मनुष्याची जशी त्याच्या माजघरांतही गति होते, २ तशी त्या आसुरांची स्थिति होते ! कारण शास्त्रांत सांगितलेल्या मार्गाची ते निंदा करतात, त्यामुळें ते मोहरूपी अरण्यांत सैरावैरा धावतात; ३ कामाच्या अधीन होऊन त्याच्या अनुरोधानें आचरण करतात; क्रोधाच्या अधीन होऊन तो ज्याचा वध करण्यास लावील त्याचा वध करतात; किंबहुना मला दुःखाच्या दगडांत पुरतात ! ४

श्लोकार्थः—आणि ते अविवेकी शरीरातील इंद्रियसमुदायाला आणि शरीराच्या अंतर्यामी असणाऱ्या मलाही त्रास देतात, ते आसुरी निष्ठेचे लोक आहेत असें तूं समज ॥ ६ ॥

ते आपल्या व दुसऱ्यांच्या शरीरास जें जें दुःख देतात, त्यामुळें ( सर्वांच्या अंतर्यामीं असणाऱ्या ) मज आत्म्यालाच शीण होतो. ५ हें पहा—अशा पाप्याना वाचेच्या पदरानेंही स्पर्श करूं नये, ( त्यांचें नामग्रहणही करूं नये, ) पण त्यांचा त्याग करण्याकरितां त्यांचीं लक्षणें सांगणें भाग पडलें ! ६ प्रेत घराबाहेर काढावें लागतें, किंवा अंत्य-

प्रेत बाहिरें घालिजे । कां अंत्युजु संभाषणीं त्यजिजे । हें असो हातें क्षाळिजे । कश्मेलातें ॥७॥ येथ शुद्धीचिया आशा । तो लेंपु नं मनवे जैसा । तयातें सांडावया तैसा । अनुवादु हा ॥ ८॥ ( ९७६. पापाला भगवत्स्मरणावांचून दुसरें प्रायश्चित्त नाहीं, १०९ ) तरि अर्जुना तूं तयांतें । देखसी तें स्मर हो मातें । जे आन प्रायश्चित्त येथें । मानेलें ना ॥ ९॥ ( ९७७. सात्विक श्रद्धा वाढविण्याचा मार्ग, ११०-११९ ) म्हणौनि श्रद्धा जे सात्विकी । पुढती तेचि पैं येकी । जतन करावी निकी । सर्वांपरी ॥११०॥ अवतरणः–तरि धरावा तैसा संगु । जेणें पोखे सात्विक लागु । सत्वबृद्धीचा भागु । आहारू घेपे ॥ ११ ॥ एरव्हीं तरी पाहीं । स्वभावबृद्धीच्या ठायीं । आहारावांचूनि नाहीं । बळी हेतु ॥१२॥ प्रत्यक्ष पाहें पा वीरा । जो सावध घे मादिरा । तो होऊनि ठाके माजिरां । तियेचि क्षणीं ॥ १३ ॥ का जो सावियां अन्नरसु सेवी । तो व्यापिजे वातश्लेष्मस्वभावीं । काय ज्वरु जालिया निववी । पयादिक ॥ १४ ॥ नातरि अमृत जयापरी । घेतलिया मरण वारी । कां आपुलियाऐसें करी । जैसें विष ॥ १५ ॥ तेविं जैसा घेपे आहारु । धातु तैसाचि होय आकारु । आणि धातूऐसा अंतरु । भावो पोखे ॥१६॥ जैसें भाडियाचेनि तापें । आंतुलें उदकही तापे । तैसी धातुवशें आटोपे । चित्तवृत्ति ॥ १७ ॥ म्हणोनि सात्विकु रसु सेविजे । तें सत्त्वाची वाढी पाविजे । राजसा तामसा होइजे । येरीं रसीं ॥ १८ ॥ तरी सात्विकु कोण आहारु । राजसा तामसा कायि आकारु । हें सागों करीं आदरु । आकर्णनीं ॥ १९ ॥

आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।
यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥

अन्वयः—सर्वस्य प्रियः आहारः अपि तु त्रिविधो भवति; तथा यज्ञः, तपः च दानं ( सर्वस्य त्रिविधं प्रियं भवति ). ( त्वं ) तेषां इमं भेदं शृणु ॥ ७ ॥

( ९७८. यज्ञ, दान, तप, आहार, हे गुणामुळें तीन प्रकारचे, १२०–१२३ ) आणि एकंसरें आहारा । कैसेनि तिनी मोहरें । जालिया तेंही वीरा । रोकडें दाऊं ॥१२०॥ तरि जेवणाराचिया रुची । निष्पत्ति कीं [१३]बोनियांची । आणि जेविता तवं गुणांची । दासी येथ ॥ २१ ॥ जो जीव कर्ता भोक्ता । तो गुणास्तव स्वभावतां । पावोनियां त्रिविधता । चेष्टे त्रिधा ॥ २२ ॥ म्हणौनि त्रिविधु आहारु । यज्ञुही त्रिप्रकारु । तप दान हन व्यापारु । त्रिविधचि ते ॥ २३ ॥ अवतरणः— ( ९७९. सात्विक आहार, १२४–१२६ ) पैं आहारलक्षण पहिलें । सांगों जें म्हणितलें । तें आईक गा भलें । रूप करूं ॥ २४ ॥

आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥ ८ ॥

अन्वयः—आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः रस्याः स्निग्धाः स्थिराः हृद्याः आहाराः सात्त्विकप्रियाः ( सन्ति ) ॥ ८ ॥

जावरोबर ( संभाषण करूं नये तरी ) दोन शब्द बोलून त्याला टाळावें लागतें; फार काय, विष्ठाही हातानेंच धुऊन काढावी लागते; ७ या ठिकाणीं फक्त शुद्धीच्या निमित्तानेंच त्यांना स्पर्श केल्यामुळें त्या स्पर्शाचा जसा दोष मानतां येत नाहीं; तसा या पापी लोकांचा त्याग करण्याकरितां त्यांचीं लक्षणें सांगितलीं. ८ तर अर्जुना, त्यांना पाहिल्याबरोबर तूं माझें स्मरण कर. कारण, त्या पापक्षालनाला याशिवाय दुसरें प्रायश्चित्त कांहीं उपयोगीं पडणार नाहीं. ९ म्हणून, सात्विक श्रद्धा ही वरचेवर सर्व प्रकारें जतन करावी. ११० दुसरें, ज्या योगानें सात्विक श्रद्धा वाढेल, त्याचाच संग करावा; आणि ज्या अन्नाच्या सेवनानें सात्विक बुद्धि वाढेल, तोच आहार सेवन करावा. ११ बाकी असें पहा कीं, र भावबृध्दि होण्यास आहारावांचून दुसरें कोणतेंही प्रबल साधन नाहीं. १२ वीरा अर्जुना, तूं प्रत्यक्ष असें पहा कीं, जो धडधडीत सावध असून मद्याचें सेवन करतो, तो तक्षणींच उन्मत्त होऊन जातो; १३ किंवा, जो मनुष्य नेहमीं अन्न खातो, त्याला स्वभावतःच वात व कफ यांची विकृति असते. ज्वर आला असतां तो दुधादिकांपासून कमी होईल काय ? १४ अथवा, ज्याप्रमाणें अमृताचें सेवन केलें असतां मरण टळतें, किंवा विषाचें सेवन केलें असतां मृत्यु प्राप्त होतो, १५ त्याप्रमाणें, जसें अन्न भक्षण करावें तशी धातु उत्पन्न होते, आणि धातूप्रमाणें अंतर्भाव उत्पन्न होतो. १६ जसें भांडें तापल्यावर आंतलें पाणीही तापतें, तशी धातूच्या अनुरोधानें चित्तवृत्ति होते. १७ म्हणून, सात्विक अन्नाचें सेवन केलें असतां सात्विक भावच उत्पन्न होतो; आणि राजस व तामस या भावांची उत्पत्ति त्यांच्या त्यांच्या रसांपासून होते. १८ तेव्हां सात्विक आहार कोणता, आणि राजस व तामस यांचे आहार कोणते, हें मीं तुला सांगतों; तर त्याचें तूं आदरानें श्रवण कर. १९

श्लोकार्थः—प्रत्येकाच्या आवडीचा जो आहार, तोही तीन प्रकारचा असतो; त्याचप्रमाणें यज्ञ, तप आणि दान हींही तीनतीन प्रकारचीं आहेत. त्याचे भेद तुला सांगतों ते ऐक ॥ ७ ॥

आणि अर्जुना, सरसकट अन्नाचें तीन प्रकार कसे झाले तें स्पष्ट सांगतों. १२० हें बघ—जेवणाराच्या रुचीप्रमाणें अन्न तयार करावें लागतें, आणि जेवणारा तर गुणांचा दास आहे। २१ जो जीव कर्ता व भोक्ता आहे, तो स्वभावतःच गुणांच्या अनुरोधानें तीन प्रकारच्या चित्तवृत्ति धारण करून वागतो. २२ म्हणून, आहार तीन प्रकारचा; यज्ञ, तप, व ज्ञान हीं तीन प्रकारचीं; आणि व्यापारही तीन प्रकारचेच आहेत. २३ परंतु प्रथमतः तुला जें आहाराचें लक्षण सांगूं म्हणून म्हटलें, तें स्पष्ट करून सांगतों, ऐक. २४

श्लोकार्थः- आयुष्य, उत्साह, बल, आरोग्य, सुख व प्रीति यांना वाढविणारे, आणि रसभरित, स्निग्ध, पौष्टिक व मनाला आनंद देणारे असे आहार सात्विकांना प्रिय असतात ॥ ८ ॥

१ विटाळा. २ दोष. ३ मानता येत नाहीं. ४ भाषण. ५ योग्य नाहीं. ६ मार्ग. ७ उन्मत्त. ८ नेहमीं. ९ कफ. १० श्रवणांनीं. ११ एकदम. १२ प्रकार. १३ अन्नाची.

तरी सत्वगुणाकडे । जैं दैवें भोक्ता पडे । तैं मधुरीं रसीं वाढे । मेचु तया ॥ २५ ॥ आंगेंचि द्रव्यें सुरसें । जे आंगेंचि पदार्थ गोडसे । आंगेंचि स्नेहें बहुवसें । सुपक्कें जियें ॥ २६ ॥ (९८०. स्निग्ध अन्न, १२७–१२८ ) आकारें नव्हती डगेळें । स्पर्शें अति मवाळें । जिभेलागीं स्नेहाळें । स्वादें जियें ॥ २७ ॥ रसें गाढीं वरी विर्ली । द्रवेंभावीं आथिलीं । ठायें ठावो सांडिलीं । अग्नितापें ॥ २८ ॥ (९८१. स्थिर राहाणारें अन्न, २९ ),आंगें सानें परिणामें थोर । जैसें गुरुमुखींचें अक्षर । तैसा अल्पीं जिहीं अपार । तृप्ति राहे ॥ २९ ॥ ( ९८२. आनंद देणारें अन्न, १३०–१३१ ) आणि मुखीं जैसीं गोडें । तैसींचिहि ते आंतुलेकडे । तिये अन्नीं प्रीति वाढे । सात्विकांसी ॥ १३० ॥ एवंगुणलक्षण । सात्विक भोज्य जाण । आयुष्याचें त्राणें । नीच नवें हें ॥ ३१ ॥ ( ९८३. आयुष्य वाढविणारें अन्न, १३२ ) येणें सात्विक रसें । जंव देहीं मेहो[१२] वरिषे[१३]। तव आयुष्यनदी उसैंसे । देहींचि देहा ॥ ३२ ॥ ( ९८४. सत्व वाढविणारें अन्न, १३३ ) सत्वाचिये कीर पाळेंती। कारण हाचि सुमति । दिवसाचिये उन्नती । भानु जैसा ॥ ३३ ॥ ( ९८५. बळ, आरोग्य वाढविणारें अन्न, १३४–१३५ ) आणि शरीरा हन मानसा । बळाचा पैं कुवैंसा । हा आहारु तरी दशा । कैंची रोगां ॥ ३४ ॥ हा सात्त्विकु होय भोग्यु । तैंचि भोगावया आरोग्यु । शरीरासी भाग्यु । उदयलें जाणों ॥ ३५ ॥ ( ९८६. सुखस्थिति वाढविणारें अन्न, १३६–१३७ ) आणि सुखाचें घेणें देणें । निकें उवोर्या ये येणें । हें असो वाढे साजेंणें । आनंदेंसी ॥ ३६ ॥ ऐसा सात्त्विकु आहारु । परिणमला थोरु । करी हा उपकारु । सबाह्यासी ॥ ३७ ॥ अवतरणः—( ९८७. राजस आहार—कडू, आंबट, खारट वगैरे; १३८–१५० ) आतां राजसासि प्रीति । जिहीं रसीं आथी । करूं तयाही व्यक्ति । प्रसंगें गा ॥ ३८ ॥

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।
आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥

अन्वयः—कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः दुःखशोकामयप्रदाः आहाराः राजसस्य इष्टाः ( संति ) ॥ ९ ॥

तरी मारें उणें काळकूट । तेणें मानें जें कडुवट । कां चुनियाहूनि दाहट । आम्ल हन ॥ ३९ ॥ कणिकीतें जैसें पाणी । तैसेंचि मीठ बांधया आणी । तेतुलीच मेळवणी । रसांतरेंचीं ॥ १४० ॥ ऐसें खारट अपाडें । राजसा तया आवडे । उन्हींचेनि मिषें तोंडें । आगीचि गिळी ॥ ४१ ॥ वाफेचिया सिगे । वातीही लाविल्या लागे । तैसें उन्ह मागे । राजसु तो ॥ ४२ ॥ वावदळ पैं हूनि

१ जीव. २ आवड. ३ पदार्थ. ४ स्वादिष्ट. ५ मोठे. ६ मऊ. ७ विरघळणारे. ८ मारलेले. ९ पाणीदार. १० गुणानें. ११ अन्न. १२ मेघ. १३ वर्षाव करतो. १४ पूर येतो. १५ दिवसानुदिवस.

तर जेव्हां दैवयोगानें जीव सत्त्वगुणाचा बनलेला असतो, तेव्हां मधुर अन्न खाण्याविषयीं त्याला विशेष आवड असते. २५ जे पदार्थ स्वतःच उत्तम रसानें युक्त, जे स्वतः गोड, जे स्वतः अति स्निग्ध व पक्क झालेले असतात; २६ जे आकारानें मोठे नसतात; हातास मऊ लागतात; जिभेवर ठेविले असतां लवकर विरघळतात; व स्वादिष्ट असतात; २७ जे रसानें भरलेले असून वरून मऊ असतात व पाणीदार असून विस्तवाच्या आंचीनें जागजागीं काळे झालेले असतात; २८ श्रीगुरूंच्या मुखांतील अक्षरें जरी थोडीं असलीं तरी त्यांचा परिणाम फार थोर असतो; त्याप्रमाणें, जे पदार्थ थोडे खाल्ले असतांही त्यांपासून अपार तृप्ति होते, २९ आणि जें खातेवेळेस तोंडास गोड लागतें तसें परिणामींही गोडच असतें, त्या अन्नाविषयीं सात्त्विकाची विशेष प्रीति असते. १३० याप्रमाणें सात्त्विक मनुष्याला आवडणाऱ्या पदार्थांचीं गुणलक्षणें होत. अशा पदार्थांचे सेवनापासून आयुष्याचें बल नित्य वाढतें. ३१ अशा सात्त्विक रसरूप मेघाची जों जों देहावर वृष्टि होते, तों तों आयुष्यरूप नदीस दिवसानुदिवस पूर येतो. ३२ हे सुबुध्दिमंता, ज्याप्रमाणें दिवसाची उन्नति होण्यास सूर्य कारण आहे, त्याप्रमाणें सत्त्वाचें रक्षण करण्यास हाच आहार योग्य आहे; ३३ आणि शरीर व मन यांचे बलाची वृध्दि ह्याच आहारापासून होते. मग त्या ठिकाणीं रोगाचा शिरकाव कोठून होणार ? ३४ या सात्त्विक अन्नाचें सेवन केलें तरच शरीरास आरोग्य भोगण्याचें भाग्य प्राप्त होतें; असें समजावें. ३५ आणि मग त्याच्या सर्व व्यापाराचा विस्तार सुखमय होतो. फार काय, तर त्याची आनंदाबरोबर मैत्री होते. ३६ याप्रमाणें या सात्त्विक आहाराचा परिणाम थोर असून तो शरीराला अंतर्बाह्य सुखकर होतो. ३७ आतां, राजस गुणाच्या मनुष्याची कोणत्या अन्नावर भक्ति असते, तें तुला प्रसंगानुसार स्पष्ट करून सांगतों. ३८

श्लोकार्थः--अतिशय कडू, आंबट, खारट, उष्ण, तिखट, रुक्ष व जळजळणारे, आणि दुःख, शोक व रोग याना उत्पन्न करणारे असे आहार राजसाना प्रिय असतात ॥ ९ ॥

तर मारकपणानें मात्र उणे, बाकी काळकूटाच्या बरोबरीचेंच कडू; किंवा चुन्याहूनही दाहक असून जें आंबट असतें; ३९ कणीक भिजविण्यास जितकें पाणी लागतें; तितकेंच मीठ आणि अवांतरही खारट जिन्नस त्यांत मिसळणें, १४० याप्रमाणें अतिशय खारट पदार्थ राजस गुणाच्या मनुष्यास आवडतात; आणि तो ऊन ऊन इतकें खातो कीं, केवळ तोंडानें अग्निच गिळतो! ४१ ज्या पदार्थांतून इतक्या वाफा निघतात कीं, त्याजवर दिव्याची वातही लावता येईल, असे ऊन पदार्थ राजस गुणाचा मनुष्य खावयास मागतो. ४२ वावटळीला मागें सारून पहारीच्या टोंकाप्रमाणें प्रहार करणारे तिखट पदार्थ तो खातो, कीं, ज्या योगानें जखम न पडतां शस्त्राप्रमाणें वेदना होतात; ४३ आणि

१६ रक्षणार्थ. १७ आश्रय. १८ विस्तार. १९ मैत्री. २० दाहक. २१ आंबट. २२ इतर खारट जिनसाची. २३ उष्ण. २४ मागें सारून.

ठायें । साबळें डाहारेला आहे । तैसें तीख तो खाये । जें घायेंविण रुपे ॥४३॥ आणि राखेहूनि कोरडें । आंत बाहेरी येके पाडें । तो जिव्हादंशु आवडे । बहु तया ॥ ४४ ॥ परस्परें दाता । आदळु होय खातां । तो गा मुखीं घेतां । तोषो लागे ॥ ४५ ॥ आधींच द्रव्यें चुरमुरीं । वरी परवडिजेती मोहरी । जियें घेतां होती धुंवारी । नाकतोंडा ॥ ४६ ॥ हें असो उगें आगीतें । म्हणे तैसें राइतें । पैंढियें प्राणापरतें । राजसासि गा ॥ ४७ ॥ ऐसा न पुरोनि तोंडा । जिभा केला वेडा । अन्नमिषें अग्नि भडभडां । पोटीं भरी ॥ ४८ ॥ तैसाचि लवंगा सुंठे । मग भुंई ना सेजे सांटे । पाणियाचें न सुटे । तोंडोनि पात्र ॥ ४९ ॥ ते आहार नव्हती घेतले । व्याधिव्याळ जे सुतले । ते चेववाया घातले । माजवेंणे पोटीं ॥ १५० ॥ ( ९८८. राजस आहाराचें फल, १५०–१५२ ) तैसें एकमेकां सेळें । रोग उठती एके वेळे । ऐसा राजसु आहारु फळे । केवळ दुःखें ॥ ५१ ॥ एवं राजसा आहारा । रूप केलें धनुर्धरा । परिणामाचाही विसुरा । सांगितला ॥ ५२ ॥ ( ९८९. तामस आहार—बेचव, शिळें वगैरे, १५३–१६४ ) अवतरणः—आतां तया तामसा । आवडे आहारु जैसा । तेंही सांगों चिळसा । झणें तुम्ही ॥ ५३ ॥ तरि कुहिलें उष्टें खातां । न मनिजे तेणें अनहिता । जैसें कां उपहितां । म्हैसी खाय ॥ ५४ ॥

यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।
उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥

अन्वयः—यत् यातयाम, गतरसं, पूति, पर्युषितं च उच्छिष्ट, अपि च अमेध्यं भोजनं, तत् तामसप्रियं ( अस्ति ) ॥ १० ॥

निपजलें अन्न तैसें । दुपाहरीं का येरें दिवसें । अतिकरें तें तामसें । घेईजेतें ॥ ५५ ॥ नातरी अर्ध उकडिलें । का निपटें करपोनि गेलें । तैसेंही खाय चुकलें । रसा जें येवों ॥ ५६ ॥ जया कां आथी पूर्ण निष्पत्ति । जेथ रसु धरी व्यक्ति । तें अन्न ऐसी प्रतीति । तामसा नाहीं ॥ ५७ ॥ ऐसेनि कहीं विपायें । सदन्ना वेरपडा होये । तरी घाणी सुटे तंव राहे । व्याघ्रु जैसा ॥ ५८ ॥ कां बहुवे दिवशीं वोलाडिलें । स्वादपणें साडिलें । शुष्क अथवा सडलें । गोभिणेंही हो ॥ ५९ ॥ तेंही बाळाचे हातवरी । चिवाडिलें जैसी रोंडी करी । का सवें बैसोनि नारी । गोतांबीलें करी ॥ १६० ॥ ऐसेनि कश्मेलें जें खाय । तें तया सुखभोजन ऐसें होय । परि येणेंही न धाय । पापिया तो ॥ ६१ ॥ मग चमत्कारु देखा । निषेधाचा आंबुखा । जया कां सदोषा । कुद्रव्यासी ॥ ६२ ॥ तया अपेयांच्या

१ पहार. २ प्रहार करणारे. ३ तोंडी लावणें. ४ हाणहाणीत. ५ ओतून. ६ हिणहिण्या. ७ आपटतें. ८ लोळतो. ९ व्याधिरूपी सर्प. १० निवळलेले. ११ कैफ. १२ स्पर्शनें. १३ विचार.

राखेहून रूक्ष, व अंतर्बाह्य कोरडें असलेलें असें तोंडीं लावणें त्याला फार आवडतें. ४४ जो पदार्थ खाते वेळेस दातांशीं दांत घासावे लागतात, असे कठीण पदार्थ खाते वेळेस त्याला आनंद होतो, ४५ अगोदरच झणझणीत पदार्थ, त्यांत त्यांना आणखी मोहरी लावावयाची; ( मग कांय विचारतां ? ) त्यांचें सेवन केलें असतां नाकातोंडांतून झिणझिण्या येतात ! ४६ फार काय सांगावें ? रायतें—जें अग्नीला मागें सारतें, तें राजस गुणाच्या मनुष्यास प्राणापेक्षांही विशेष आवडतें. ४७ अशा प्रकारें, कांहीं खाल्ल्यानें ज्याची तृप्ति होत नाहीं, तो तोंड हातांत धरलेला मनुष्य अन्नाच्या निमित्तानें पेटलेला अग्निच पोटांत घालतो. ४८ त्याचप्रमाणें, लवंगा व सुंठ खाऊन त्यामुळें भुईवर गडबडां लोळतो, व तोंडचें पाण्याचें भांडें एकीकडे ठेवीत नाहीं; ४९ तर हें अन्न नसून, निजलेले व्याधिरूप सर्प जागे करण्याकरितां पोटांत कैफच घालणें आहे. १५० त्याबरोबर एकमेकांच्या स्पर्धेनें रोग एकदम उठतात. याप्रमाणें राजस अन्नापासून केवळ दुःख हें फळ मिळतें. ५१ हे धनुर्धरा, याप्रमाणें राजस अन्नाचें वर्णन केलें, व त्याच्या परिणामाचाही विचार तुला सांगितला. ५२ आतां, तमोगुणाच्या मनुष्यास जो आहार आवडतो, तोही तुला सांगतों; पण तूं त्याची किळस करशील हो ! ५३ तर कुजलेलें व उष्टें अन्न खातांना, यापासून अहित होईल असें त्याच्या मनांतही येत नाहीं ! ज्याप्रमाणें म्हैस आंबोण खाते, ५४

श्लोकार्थः—जें अर्धवट शिजलेलें, बेचव झालेलें, आंबलेलें, शिळें, आणि उष्टें व अपवित्र असें अन्न, तें तामसांना प्रिय असतें ॥ १० ॥

त्याप्रमाणें सकाळीं शिजविलेलें अन्न दुपारीं किंवा दुसरे दिवशीं खाण्याची तामस मनुष्यास अति प्रीति असते. ५५ किंवा अर्धेकच्चें, अथवा केवळ राखुंडी झालेलें, त्याचप्रमाणें अति कडकडीत व वाळलेलें अन्न तो खातो. ५६ जें अन्न पूर्ण पक्व झालेलें व रसभरित असतें, त्याला तामस मनुष्य अन्न असें मुळींच मानीत नाहीं. ५७ असें उत्तम अन्न कदाचित् खाण्याचा प्रसंग आला, तर, वाघाप्रमाणें तें अन्न ठेवून त्यास वास येईपर्यंत तें तो खात नाहीं; ५८ किंवा ज्या अन्नाला बहुत दिवस झाले आहेत असें, रुचि नाहींशी झालेलें, कोरडें झालेलें, किंवा सडलेलें अथवा बुरें पडलेलें, ५९ आणि तेंही मुलांनीं हातांनीं चिखलाप्रमाणें चिवडलेलें असलें, म्हणजे बायको व इतर मंडळी घेऊन गोतांबील करतो. १६० अशा प्रकारचें घाणेरडें अन्न जेव्हां तो खातो, तेव्हां त्याला सुखाचें भोजन केलेंसें वाटतें. परंतु एवढ्यानेंच त्या पाप्याची तृप्ति होत नाहीं ! ६१ मग चमत्कार पहा कीं, ज्या वाईट पदार्थांवर शास्त्रनिषेधाचा शितोडा पडून ते त्याज्य ठरले आहेत, ६२ त्या अपेयांचें पान करण्याची व अभक्ष्यांचें भक्षण करण्याची

१४ किळस. १५ कुजलेलें. १६ आंबोण. १७ दोन प्रहरीं. १८ प्रीतीनें. १९ अगदीं. २० पक्व झालेलें. २१ ग्रास. २२ बुरें पडलेलें. २३ चिखल. २४ एका ताटांत सर्वांनीं बसून जेवणें. २५ घाणेरडें अन्न. २६ तृप्त होत नाहीं. २७ शितोडा.

पानीं । अखाद्याच्या भोजनीं । वाढविजे उतान्ही । तामसें तेणें ॥ ६३ ॥ एवं तामस जेवणारा । ऐसैसी मेचु हे वीरा । तयाचें फल दुसरां । क्षणीं नाहीं ॥ ६४ ॥ ( ९९०. तामस आहाराचें फल, १६५-१६८ ) जे जेव्हांचि हें अपवित्र । शिवे तयाचें वक्त्र । तेव्हांचि पापा पात्र । जाला तो कीं ॥ ६५ ॥ यावरतें जें जेवी । ते जेविती वोजें न म्हणावी । पोटभरती जाणावी । यातना ते ॥ ६६ ॥ शिरच्छेदें काय होये । कां आगीं रिघतां कैसें आहे । हें जाणावें काई पाहें । परि साहातुचि असे ॥ ६७ ॥ म्हणौनि तामसा अन्ना । परिणामु गा सिनाना । न सांगोंचि अर्जुना । देवो म्हणे ॥ ६८ ॥ अवतरण:—( ९९१. सात्त्विक यज्ञ, १६९-१८४ ) आतां ययावरी । आहाराचिया परी । यज्ञुही अवधारीं । त्रिधा असे ॥ ६९ ॥ तरी तिहीं-माजी प्रथम । सात्त्विक यज्ञाचें वर्म । आईक पां सुमहिमे । शिरोमणि ॥१७०॥

अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।
यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥ ११ ॥

अन्वय:—अफलाकांक्षिभिः ( पुरुषैः ) यष्टव्यमेव इति मनः समाधाय विधिदृष्टः यः यज्ञः इज्यते, सः सात्त्विकः ( यज्ञः मतः ) ॥ ११ ॥

तरि एकु प्रियोत्तमु । वाचोनि वाढों नेदी कामु । जैसा का मनोधर्मु । पति-व्रतेचा ॥ ७१ ॥ ना ना सिंधूतें ठाकोनि गंगा । पुढारां न करीचि रिगा । कां आत्मा देखोनि उगा । वेदु ठेला ॥ ७२ ॥ तैसे जे आपुल्या स्वहितीं । वेंचूनिया चित्तवृत्ति । नुरवितीचि अहंकृति । फळालागीं ॥ ७३ ॥ पातलेया झाडाचें मूळ । मागुतें सरों नेणेचि जळ । जिरालें का केवळ । तयाच्याचि आंगीं ॥ ७४ ॥ तैसें मनें देही । यजननिश्चयाच्या ठाईं । हारपोनि जे कांहीं । वांछितीना ॥ ७५ ॥ तिहीं फळवांच्छात्यागीं । स्वधर्मावांचूनि विरागीं । कीजे जो यज्ञु सर्वांगीं । अलं-कृतु ॥ ७६ ॥ परि आरिसा आपणपें । डोळा जैसे घेपे । का तळहातींचे दीपें । रत्न पाहिजे ॥ ७७ ॥ नाना उदितें दिवाकरें । गमावा मार्गु दिठी भरे । तैसा वेदु निर्धारें । देखोनिया ॥ ७८ ॥ तियें कुंडें मंडप वेदी । आणीकही संभार-समृद्धि । ते मेळवणी जैसी विधी[3] । आपणपां केली ॥ ७९ ॥ सकळावयव-उचितें । लेणीं पातलीं जैसीं आंगातें । तैसे पदार्थ जेथींचे तेथें । विनियोगुनी ॥१८०॥ काय वानूं बहुतीं । बोलीं जैसी सर्वाभरणीं भरली । ते यज्ञविद्याचि रूपा आली । यजनमिषें ॥ ८१ ॥ तैसा सांगोपांगु । निपजे जो यागु । नुठऊनियां लागु । महत्वाचा ॥ ८२ ॥ प्रतिपाळु तरी पाटाचा । झाडीं कीजे तुळसीचा ।

१ इच्छा. २ आवड. ३ रीत. ४ सहन करतो. ५ उत्तम महिमेच्या शिरोमणे-अर्जुना. ६ अर्पण करून. ७ निमग्न होऊन. ८ विरक्त होऊन. ९ उगवल्यावर. १० दिवस. ११ चालण्याचा.

त्या मनुष्यास अतिशय इच्छा होते. ६३ वीरा अर्जुना, अशा प्रकारें त्या तामस मनुष्याची असले पदार्थ खाण्याची जी आवड असते, त्या आवडीचें फल त्यास तत्क्षणींच मिळतें ! ६४ कारण, ज्या वेळीं तो त्या अपवित्र पदार्थाचें सेवन करतो, त्या वेळेसच तो पापास पात्र होतो; ६५ मग जें जेवणें, तें खरोखर जेवण नव्हे, तर पोटात यातनांची भरच करावयाची असें समजावें. ६६ शिरच्छेद केल्यापासून काय होतें, किंवा अग्नींत उडी घातल्यापासून काय परिणाम होतो, या गोष्टींचा प्रत्यक्ष का अनुभव घ्यावा लागतो ? पण पहा, तसलेही परिणाम तो सहन करतो ! ६७ म्हणून श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना, तामस अन्नाचा परिणाम निराळा सागण्याचें कारण नाहीं. ६८ आतां यापुढें, आहाराप्रमाणें यज्ञही तीन प्रकारचे आहेत. ६९ तर अर्जुना, त्या तिहींमधील सात्त्विक यज्ञाचें लक्षण प्रथम सांगतों, तें ऐक, १७०

श्लोकार्थ—फलाची इच्छा न करणाऱ्या पुरुषाच्या हातून, 'कर्तव्य म्हणून करावयाचा' अशा मनाच्या निर्धारानें जो शास्त्रोक्त यज्ञ केला जातो, त्याला सात्त्विक यज्ञ असें म्हणतात ॥११॥

तर ज्याप्रमाणें पतिव्रता स्त्रीचा मनोधर्म प्रिय पतीवांचून अन्याविषयीं काम वाढूं देत नाहीं, ७१ किंवा गंगा नदी समुद्रास मिळाल्यावर पुढें जाण्याचा प्रयत्न करीत नाहीं, अथवा आत्मस्वरूपाचें दर्शन होतांच वेद स्तब्ध राहतो, ७२ त्याप्रमाणें, आपल्या हिताकरितां चित्ताची वृत्ति अर्पण करून जे फळाच्या आशेनें अहंकार बाळगीत नाहींत, ७३ जसें पाणी झाडाचे मुळाजवळ गेल्यावर ( हें झाड चांगलें अगर वाईट हा भेद मनांत न आणतां ) मागें परतत नाहीं, पण त्यास मिळून त्याचें पोषण करतें, ७४ तसें जे मनानें व देहानें निश्चय करून यज्ञ करण्यांत निमग्न होतात, परंतु त्यापासून कसल्याही फलाची इच्छा करीत नाहींत; ७५ फलाची इच्छा सोडून, स्वधर्माशिवाय इतर गोष्टींविषयीं विरक्त होऊन जे सर्वांगपरिपूर्ण यज्ञ करतात; ७६ परंतु आपल्या हातांत आरसा घेतल्यावर आपलें स्वरूप जसें डोळ्यांनीं पाहातां येतें, किंवा तळहातावरील रत्न दिव्याच्या उजेडानें जसें स्वच्छ दिसतें, ७७ अथवा दिवस उगवल्यावर मार्ग जसा स्पष्ट दिसतो, तसा वेदात सांगितलेल्या मार्गावर विश्वास ठेवून जे आचरण करतात, ७८ ते कुंडें, मंडप, वेदी वगैरे यज्ञाची सर्व सामुग्री अशा रीतीनें तयार करतात कीं, जणूं काय वेदांनींच स्वतः येऊन तयारी केली आहे ! ७९ सर्व अवयवांस जेथल्या तेथें डागिने घातले असतां ते जसे शोभतात, तसे यज्ञाचे सर्व पदार्थ जागचे जागीं नीट व्यवस्थेनें मांडतात; १८० आणखी त्याचें शब्दांनीं किती वर्णन करूं ? तर तो यज्ञमंडप पाहिला असतां असें वाटतें कीं, मूर्तिमंत यज्ञविद्या ही यज्ञाच्या मिषानें या ठिकाणीं आली आहे ! ८१ अशा प्रकारें जो यज्ञ सांगोपांग होतो, आणि ज्यात कसल्याही फलाची इच्छा नसते; ८२ तुळशीच्या झाडापासून फल, पुष्प, छाया याची प्राप्ति नाहीं, तरी लोक पाटांतील पाण्यानेंही त्याचा

१२ यज्ञाची सामुग्री. १३ वेद. १४ व्यवस्थेनें मांडून. १५ इच्छा.

परी फळा फुला छायेचा । आश्रयो नाहीं ॥ ८३ ॥ किंबहुना फळाशेवीण । ऐसेया निरुती निर्माण । होय तो यागु जाण । सात्विकु गा ॥ ८४ ॥

अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ।
इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥

अन्वयः—भरतश्रेष्ठ, फलं तु अभिसंधाय अपि च दंभार्थम् एव यत् इज्यते, तं यज्ञं राजसं विद्धि ॥ १२ ॥

( ९९२. राजस यज्ञ, १८५-१८८ ) आतां यज्ञु कीर वीरेशा । करी पैं याचिऐसा । परि श्राद्धालागीं जैसा । अवंतिला रावो ॥ ८५ ॥ जरि राजा घरासि ये । तरी बहुत उपेगा जाये । आणि कीर्तिही होये । श्राद्ध न ठके ॥ ८६ ॥ तैसा धरूनि आंवांका । म्हणे स्वर्गु जोडेल असिका । दीक्षितु होईन मान्यु लोकां । घडेल यागु ॥ ८७ ॥ ऐसी केवळ फळालागीं । महत्व फोकारावया जगीं । पार्था निष्पत्ति जे यागीं । राजस पैं ते ॥ ८८ ॥

विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ।
श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥

अन्वयः—विधिहीनं, असृष्टान्नं, मंत्रहीनं, अदक्षिणं ( च ) श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥

( ९९३. तामस यज्ञ, १८९-१९५ ) आणि पशुपक्षिविवाहीं । जोशी कोमापरौता नाहीं । तैसा तामसा यज्ञा पाहीं । आग्रहोचि मूळ ॥ ८९ ॥ वारया वाट न वाहे । कीं मरण मुहूर्त पाहे । निपिद्धासी विहे । आगी जरी ॥ १९० ॥ तरी तामसाचिया आचारा । विधीचा आथी वोढावारा । म्हणूनि तो धनुर्धरा । उत्सँखळ ॥ ९१ ॥ नाहीं विधीची तेथ चाड । नये मंत्रादिकां तया कड । अन्नजातां न सुये तोंड । मासिये केविं ॥ ९२ ॥ वैराचा वोधु ब्राह्मणा । तेथ कें रिगेल दाक्षिणा । अग्नि जाला वाउधाणा । वेरंपडा जैसा ॥९३॥ तैसें वायांचि सर्वस्व वेंचे । मुख न देखती श्रद्धेचें । नागविलें निपुत्रिकाचें । जैसें घर ॥ ९४ ॥ ऐसा जो यज्ञाभासु । तया नाम यागु तामसु । आइकें म्हणे निवासु । श्रियेचा तो ॥ ९५ ॥ अवतरणः—( ९९४. तपाचें सामान्य लक्षण—कायिक, वाचिक, मानसिक, १९६-२०० ) आतां गंगेचें एक पाणी । परि नेलें आनानीं वाहणीं । एक मैळीं एक आणी । शुद्धत्व जैसें ॥ ९६ ॥ तैसें तिहीं गुणीं तप । येथ जाहालें आहे त्रिरूप । तें एक केलें दे पाप । उद्धरी एक ॥ ९७ ॥ तरि तेंचि तिहीं भेदीं । कैसेनि पां म्हणौनि सुबुद्धि । जाणों पाहासी तरि आधीं । तपाचि जाण ॥ ९८ ॥ येथ तप म्हणिजे काई । तें स्वरूप दाऊं पाहीं । मग भेदिलें गुणीं तिहीं । तें

१ युक्तिपूर्वक. २ हेतु; मतलब. ३ प्रसिद्धि होण्याकरिता. ४ उत्पत्ति, खटपट. ५ विषयसेवन. ६ मर्यादा; घरबंध. ७ अमर्याद. ८ भाव. ९ वाकटलीला. १० साहाय्य; प्राप्त. ११ लक्ष्मी ज्याचे

प्रतिपाळ करतात; ८३ फार सांगून काय करावयाचें आहे ? तर फलाशेशिवाय अशा युक्तीनें जो यथासांग यज्ञ होतो, त्यालाच सात्विक यज्ञ असें म्हणतात. ८४

श्लोकार्थः—हे भरतश्रेष्ठा, फलाची इच्छा धरून दंभासाठीं केलेला जो यज्ञ, त्याला राजस यज्ञ म्हणतात, असें तूं समज ॥ १२ ॥

आतां, हे वीरश्रेष्ठा, ( दुसऱ्या प्रकारचा जो राजस यज्ञ, ) तोही याच्यासारखाच करितात; पण श्राद्धतिथीचे दिवशीं सहज राजासही मेजवानीला बोलवावें त्याप्रमाणें ! ८५ ( कारण ), जर राजा आपले घरीं भोजनास आला, तर त्यापासून आपल्यास पुष्कळ उपयोग होऊन आपला लौकिकही होईल, आणि श्राद्धही थांबणार नाहीं. ( तें तर पार पडेलच. एवंच कामांत काम होऊन जाईल ! ) ८६ त्याप्रमाणें, तो फलाशा धरून मनांत म्हणतो कीं, आपल्यास स्वर्गप्राप्ति होईल, लोक दीक्षित म्हणून आपल्यास बहुमान देतील, व आपल्या हातून यज्ञासारखें महत्कार्य घडेल ! ८७ अशा प्रकारें केवळ फळाची आशा धरून व जगात कीर्ति व्हावी म्हणून जे यज्ञ होतात, ते, अर्जुना, राजस यज्ञ होत. ८८

श्लोकार्थः—अशास्त्र, अन्नदानरहित, मंत्ररहित, दक्षिणारहित आणि श्रद्धारहित असा जो यज्ञ, त्याला विद्वान् लोक लोक तामस यज्ञ म्हणतात ॥ १३ ॥

आणि पशुपक्ष्यांच्या विवाहास कामावांचून जसा दुसरा जोशी लागत नाहीं, तसा तामस यज्ञाला आग्रहच कारण होय. ८९ वाऱ्याला वाहण्यास वाट लागत नाहीं, किंवा मरणास मुहूर्त लागत नाहीं; आणि अग्नि जर निषिद्ध पदार्थ जाळण्यास भिईल, १९० तरच तामसाच्या यज्ञाला विधीची मर्यादा असेल ! म्हणून, हे धनुर्धरा, तो अमर्याद होय. ९१ त्याला विधीची चाड नसते, मंत्राची वगैरे जरूर लागत नाहीं, आणि माशीलाही त्या मंडपांतून जातांना अन्न मिळत नाहीं ! ९२ त्या ठिकाणीं ब्राह्मणांविषयीं पूर्ण वैरभाव असतो, मग दक्षिणेचा विचार कोठून असणार ? आणि अग्नि ज्याप्रमाणें वाऱ्यानें वणव्यासारखा भडकतो, ९३ किंवा निपुत्रिकाचें घर त्याचे पश्चात् पाहिजे त्यानें लुटावें, त्याप्रमाणें सर्व द्रव्य व्यर्थ खर्च होऊन, त्यांत श्रद्धेचा लवलेशही नसतो. ९४ श्रीनिवास म्हणतातः— असा जो यज्ञाविषयीं वरकांतीं केलेला डौल, त्याला तामस यज्ञ असें म्हणतात, समजलास ! ९५ आता, गंगेचें पाणी जसें निरानिराळ्या मार्गांनीं उपयोगास आणलें असतां शुद्धता व अपवित्रता आणतें, ९६ तसें सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या योगें जें तप त्रिविध झालें आहे, त्यापैकीं एकापासून मोक्ष व एकापासून अधोगति प्राप्त होते. ९७ तर अर्जुना, या तपाचे तीन भेद कसे होतात हें तूं समजून घेऊं पहात असलास तर आधीं तप म्हणजे काय हें समजून घे. ९८ तर तप म्हणजे काय त्याचें स्वरूप तुला सांगतों. मग गुणाच्या योगें त्याचे भेद कसे होतात तें मागून सांगेन. ९९ तरी अर्जुना,

ठिकाणीं सदैव वास्तव्य करिते तो भगवान श्रीकृष्ण. १२ अपवित्रपणा.

पाठीं बोलों ॥ ९९ ॥ तरि तप जें कां सम्यक । तेंही त्रिविध आइक । शारीर मानसिक । शाब्द गा ॥ २०० ॥ ( ९९५. कायिक तप, २०१-२१५ ) आतां या तिहींमाझारी । शारीर तंव अवधारीं । तरि शंभु कां श्रीहरी । पढियंता होय ॥१॥

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥

अन्वयः—देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं, शौचं, आर्जवं, ब्रह्मचर्यं च अहिंसा इति शारीरं तपः उच्यते ॥ १४ ॥

तया प्रिय देवतालया । यात्रादिकें करावया । आठही पाहार जैसें पायां । उळिग घापे ॥ २ ॥ देवांगण मिरवणियां । अंगोपचार पुरवणिया । करावया म्हणियां । शोभती हात ॥ ३ ॥ लिंग का प्रतिमा दिठी । देखतखेवों अंगेष्टी । लोटिजे का काठी । पडली जैसी ॥ ४ ॥ आणि विधिविनैयादिकीं । गुणी वडील जे लोकीं । तयां ब्राह्मणांची निकी । पाइकी कीजे ॥ ५ ॥ अथवा प्रवासें कां पीडा । कां शिणले जे साकडां । ते जीव सुखाडा । आणिजती ॥ ६ ॥ सकल तीर्थांचिये धुरे । जियें कां मातापितरें । तयां सेवेसि कीर शरीरें । लोण कीजे ॥ ७ ॥ आणि संसारा ऐसा दारुणु । जो भेटलाचि हरी शीणु । तो ज्ञानदानीं सकरुणु । भजिजे गुरु ॥ ८ ॥ आणि स्वधर्माचा आगिठां । देह जाड्याचिया किटा । आवृत्तिपुटीं सुभटा । झाडी कीजे ॥ ९ ॥ वस्तु भूतमात्रीं नमिजे । परोपकारीं भजिजे । स्त्रीविषयीं नियमिजे । नांवेंनांवें ॥ २१० ॥ जन्मतेनि प्रसंगें । स्त्रीदेह शिवणें आंगें । तेथूनि जन्म आघवें । सोंविळें कीजे ॥ ११ ॥ भूतमात्राचेनि नांवें । तृणही नासुडावें । किंबहुना सांडावे । छेद भेद ॥ १२ ॥ ऐसैसी जें शरीरीं । राहाटीची पडे उँजरी । तें शारीर तप धुंमरी । आलें जाण ॥ १३ ॥ पार्था समस्तही हें करणें । देहाचेनि प्रधानपणें । म्हणौनि ययातें मी म्हणें । शारीर तप ॥ १४ ॥ एवं शारीर जें तप । तयाचें दाविलें रूप । अवतरणः— आतां आईक निष्पाप । वाङ्मय तें ॥ १५ ॥

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥

अन्वयः—यत् अनुद्वेगकरं सत्यं प्रियहितं च वाक्यं च स्वाध्यायाभ्यसनं, एव वाङ्मयं तपः इति उच्यते ॥ १५ ॥

( ९९६. वाचिक तप, २१६–२२३ ) तरी लोहाचें आग तुकें । न तोडितांचि कनक । केलें जैसें देख । परिसें तेणें ॥ १६ ॥ तैसें न दुखविता सहजें ।

१ भोंवरा. २ सुशोभित करण्यास. ३ गंध, फुलें वगैरे पूजासाहित्य. ४ सेवा; पूजा. ५ साष्टांग. ६ यथाशास्त्र आचरण करणारे. ७ नम्रता. ८ सेवाचाकरी. ९ सुखावस्था. १० अग्रभागीं. ११ अग्नि. १२ अभिमान. १३ वेदाध्ययन. १४ संचय. १५ पूर्णपणें. १६ वाचिक. १७ वजन.

उत्तम तप ज्याला म्हणतात, त्याचेही तीन प्रकार आहेत. ते कायिक, मानसिक व वाचिक हे होत. २०० आतां, या तिहींमधील कायिक तप कोणतें तें ऐक. तर शंकर अथवा विष्णु यांपैकीं कोणाचीही ज्यास भक्ति असेल, १

श्लोकार्थः—देव, ब्राह्मण, गुरु व विद्वान यांचें पूजन, शुचिर्भूतपणा, सरळपणा, ब्रह्मचर्य आणि अहिंसा याला कायिक तप म्हणतात. ॥ १४ ॥

त्या आपल्या प्रियदेवताच्या मंदिरांत जाऊन त्याचें दर्शन करण्याविषयीं किंवा यात्रादि करण्याविषयीं आठही प्रहरांत ज्याच्या पायांला विसांवा नसतो; २ देवाचें आंगण सुशोभित करण्याविषयीं, पूजासाहित्य पुरविण्याविषयीं व देवाची सेवा करण्याविषयीं ज्याचे हात शोभतात; ३ शंकराचें लिंग अथवा विष्णूची मूर्ति दृष्टीस पडल्याबरोबर जो दंडाप्रमाणें जमीनीवर अंग टाकून सपशेल-नमस्कार घालतो; ४ आणि विधि-विनयादि गुणांनीं पूज्य असे जे ब्राह्मण त्यांची सेवा करतो; ५ अथवा प्रवासानें थकलेले किंवा संकटांत सांपडलेले जे जीव असतील, त्यांना सुखावस्थेस आणतो; ( त्याची सेवा वगैरे करून श्रमपरिहार करितो, किंवा संकट निवारण करून त्यांस दुःखमुक्त करितो; ) ६ सर्व तीर्थामध्यें श्रेष्ठ मानलेलीं जीं मातापितरें, त्यांची सेवा करण्यांत जो आपलें शरीरही त्यांवरून ओंवाळून टाकतो; ७ आणि संसारासारख्या दुर्धर व्याधीपासून आपल्या दर्शनानें मुक्त करणारा व ज्ञानामृत पाजण्याविषयीं तत्पर असा जो गुरु त्याची सेवा करतो; ८ आणि अर्जुना, देहाभिमानरूपी कीट नाहींसें करण्याकरितां त्याला स्वधर्मरूप अग्नींत जो वेदाध्ययनरूपी पुटें देतो; ९ प्राणिमात्राचे ठिकाणीं एकच आत्मा आहे असें समजून त्यांस नमस्कार करतो; परोपकार करण्याविषयीं जो तत्पर असतो, आणि स्त्रीसंबंधीं तर त्याचा असा नियम झालेला असतो कीं, तिचें नांवही घ्यावयाचें नाहीं! २१० जन्माच्या वेळेस स्त्रीचा ( आईचा ) स्पर्श झाला आहे, तो पुनः न व्हावा म्हणून जो आपलें शरीरास स्त्रीसंबंध बिलकूल होऊं न देतां जन्मभर पवित्र ठेवतो, ११ गवतासही जीव आहे असें समजून जो तें तुडवीत नाहीं; फार काय? परंतु जो कोणालाहि टाकून किंवा वर्मी लागेल असें बोलत नाहीं; १२ अशा प्रकारें शरीरानें व्यापार करण्याची ज्या वेळेस संवय होते, त्या वेळेस त्याच्या अंगांत शारीर तप पूर्णपणें ठसलें आहे असें समज. १३ पार्था, या सर्व गोष्टी देहाच्या अनुरोधानें जेव्हां घडून येतात; तेव्हां मी त्यास शारीर (कायिक) तप असें म्हणतों. १४ याप्रमाणें, शारीर तप ज्यास म्हणतात, त्याचीं लक्षणें तुला सांगितलीं. आतां, निष्पाप असें जें वाचिक तप, त्याचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक. १५

श्लोकार्थः—कोणाच्याही मनाला न लागणारें, सत्य व गोड असून परिणामीं हितकारक असें भाषण करणें, आणि वेदाचें अध्ययन करणें यास वाचिक तप असें म्हणतात. ॥ १५ ॥

तर असें पहा कीं, परीस लोखंडाचा आकार व वजन हीं कमी न करतां ज्या-

जावेंळिया सुख निपजे । ऐसें साधुत्वें कां देखिजे । बोलणा जिये ॥ १७ ॥ पाणी मुदल झाडा जाये । तृण तें प्रसंगेंचि जिये । तैसें एका बोलिलें होये । सर्वांहि हित ॥ १८ ॥ जोडे अमृताची सुरसरी । तें प्राणातें अमर करी । स्नानें पाप ताप वारी । गोडीही दे ॥ १९ ॥ तैसा अविवेकुही फिटे । आपुलें अनादित्व भेटे । आइकतां रुचि न विटे । पीयूषीं जैसी ॥ २२० ॥ जरी कोणी करी पुसणें । तरी होआवें ऐसें बोलणें । नातरी आवर्तणें । निगमु का नाम ॥ २१ ॥ ऋग्वेदादि तिन्ही । प्रतिष्ठीजती वाग्भुवनीं । केली जैसी वदनीं । ब्रह्मशाळा ॥ २२ ॥ नातरि एकाधें नाव । तेंचि शैवें कां वैष्णवें । वाचे वसे तें वाग्भवें । तप जाणावें ॥ २३ ॥

अवतरणः—( ९९७. मानसिक तप, २२४-२३८ ) आता तप जें मानसिक । तेंही सांगों आइक । म्हणे लोकनाथनायक । नायकु तो ॥ २४ ॥

*मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।*
*भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥*

अन्वयः—मनःप्रसादः सौम्यत्वं, मौनं, आत्मविनिग्रहः, भावसंशुद्धिः इति एतत् मानसं तपः उच्यते ॥ १६ ॥

तरि सरोवरें तरंगीं । सांडिलें आकाश मेघीं । का चंदनाचें उरगीं । उद्यान जैसें ॥ २५ ॥ नाना कळावैषम्यें चंद्रु । का सांडिला आधीं नरेंद्रु । नातरि क्षीरसमुद्रु । मंदराचळें ॥ २६ ॥ तैसीं नाना विकल्पजाळें । सांडूनि गेलिया सकळें । मन राहे कां केवळें । स्वरूपें जें ॥ २७ ॥ तपनेंवीण प्रकाशु । जोड्येंवीण रसु । पोकळीवीण अवकाशु । होय जैसा ॥ २८ ॥ तैसी आपली सोयें देखे[22] । आणि आपलिया स्वभावा मुके । हिंवली जैसी आंगिकें । हिंवो नेदी ॥ २९ ॥ मग न चलतें कळंकेंवीण । शशिबिंब जैसें नित्य परिपूर्ण । तैसें [24]चोखीं शृंगारपणें । मनाचें जें ॥ २३० ॥ बुजाली वैराग्याची वोरप । जिराली मनाची धांपें-कांपें । तेथ केवळ जाली वोफ । निजबोधाची ॥ ३१ ॥ म्हणौनि विचारावया शास्त्र । राहाटवावें जें वक्त्र । तें वाचेचेंही सूत्र । हातीं न धरीं ॥ ३२ ॥ तें स्वलाभ लाभलें लाभलेपणें । मन मनपणांही धरूं नेणे । शिवतलें जैसें लवणें । आपुलें निजें ॥ ३३ ॥ तेथ कें उठिती ते भाव । जिहीं इंद्रियमार्गीं धांव । घेऊनि ठाकावें गांव । विषयांचे ते ॥ ३४ ॥ म्हणोनि तिये मानसीं । भावशुद्धिचि असे आपैसी । रोमशुचि जैसी । तळहातासी ॥ ३५ ॥ काय बहु बोलों अर्जुना । जें हे दशा ये

१ परक्या मनुष्यास. २ सरळपणा; शक्ति. ३ गंगा. ४ अज्ञान. ५ आत्मस्वरूप ६ अमृतीं. ७ अध्ययन. ८ वेद. ९ वेदशाला. १० शिव. ११ विष्णु. १२ वाचेपासून उत्पन्न झालेलें; वाचिक. १३ लाटांनीं. १४ सर्पांनीं. १५ कलंकविरहित. १६ काळजीनें. १७ राजा. १८ उष्णता. १९ अपचन. २० वस्तु. २१ स्वरूप. २२ जाणून. २३ शरीरीं. २४ आत्मस्वरूपीं. २५ स्थिरपणा.

प्रमाणें त्याचें सोनें करितो, १६ त्याप्रमाणें, ज्याशीं बोलावयाचें, त्याचेजवळ असणाऱ्या दुसऱ्या मनुष्यास दुःख न होतां सहज सुख व्हावें, अशी ज्या बोलण्याची शक्ति आहे; १७ वस्तुतः पाणी झाडास दिलें जातें; पण त्यायोगें त्याच्याजवळ असणारें गवत सहज वाढतें; तसें एकास बोलते वेळीं त्या बोलण्यापासून सर्वांचें हित होतें, १८ अमृताची गंगा प्राप्त झाली असतां ती प्राण्यास जशी प्राशनानें अमर करते, स्नानानें पाप नाहींसें करून संसारतापापासून मुक्त करते व गोडीही देते, १९ त्याप्रमाणें, अज्ञान नाहींसें होऊन आत्मस्वरूपाची भेट होते; व पुष्कळ वेळ ऐकल्यानें अमृताप्रमाणें ज्याची रुचि बिघडत नाहीं, २२० जर कोणीं प्रश्न केला तर अशा प्रकारें भाषण करतात, नाहीं तर वेदाचें अध्ययन अथवा हरिस्मरण करतात; २१ ऋग्वेदादि तिन्ही वेदांची वाचारूप मंदिरांत प्राणप्रतिष्ठा करून जे आपल्या वदनाची वेदशाळाच करतात, २२ किंवा शिव अथवा विष्णु यांपैकीं एकाचें नामस्मरण करणें, हेंच वाचेपासून उत्पन्न झालेलें वाचिक तप असें जाणावें. २३ आतां मानसिक तपाचीं लक्षणें सांगतों तीं ऐक, असें, लोकनाथांचा नायक जो श्रीकृष्ण परमात्मा, तो म्हणाला. २४

श्लोकार्थः—मनाची प्रसन्नता, सौजन्य, मौन, आत्मसंयम, आणि अंतःकरणशुद्धि याला मानसिक तप म्हणतात. ॥ १६ ॥

तर लाटांशिवाय जसें सरोवर, किंवा अभ्रांशिवाय स्वच्छ असलेलें आकाश, किंवा सर्पांनीं सोडलेली चंदनाची बाग, २५ अथवा पूर्णचंद्र, चिंतारहित राजा, अथवा जसा मंदराचलाशिवाय असलेला क्षीरसमुद्र, २६ तसे अनेक कल्पनातरंग अगदीं निःशेष नाहींसे झाल्यावर मन जें शुद्धस्वरूपीं निमग्न होऊन राहतें; २७ अथवा उष्णतेवांचून प्रकाश, जाड्यावांचून अन्न, आणि पोकळीशिवाय असलेली वस्तु ( ब्रह्म ), २८ तसेंच आपलें स्वरूप जाणून जो आपला स्वभाव टाकतो; थंडीनें अंग कांकडल्यावर ज्याप्रमाणें थंडीची बाधा होत नाहीं; २९ मग, अचल आणि कलंकरहित असें चंद्राचें बिंब जसें नेहमीं पूर्ण असतें; तसें आत्मस्वरूपीं जें मन स्थिर झालेलें असतें, २३० वैराग्याची इच्छा जेथें नाहींशी झाली आहे, आणि मनाची धाव व भीति जेथें कमी झाली आहे, तेथें मन बोधस्वरूपी होतें. ३१ म्हणून शास्त्रांचा विचार करण्यास ज्या मुखास शीण द्यावयाचा, ( ज्या मुखानें शास्त्राध्ययन करावयाचें, ) तें मुख वाचेचें सूतही हातीं धरीत नाहीं, ( भाषण-विरहित--मौनसंपन्न--असतें. ) ३२ त्या मनाला आत्मस्वरूपाचा लाभ झाल्यामुळें, ज्या-प्रमाणें मीठ आपलें मूळ स्वरूप जें पाणी त्यांत घातलें असतां तद्रूप होतें, त्याप्रमाणें तें संकल्पविकल्प सोडून देतें. ३३ अशा वेळेस त्या मनांत इच्छा कोठून उत्पन्न होणार, कीं जिच्या योगानें इंद्रियांकडे धाव घेऊन विषयांचे गांवास प्राप्त व्हावें ? ३४ म्हणून, तळ-हातावर ज्याप्रमाणें केश नसतात, त्याप्रमाणें अशा प्रकारें तयार झालेल्या मनाचे

२६ इच्छा. २७ धाव. २८ भीति. २९ रूपमय. ३० संकल्पविकल्प. ३१ मूळस्वरूप जें पाणी तें.

मना । तें मेनस्तपोभिधाना । पात्र होय ती ॥ ३६ ॥ परि तें असो हें जाण । मानस तपाचें लक्षण । देवो म्हणे संपूर्ण । सांगितलें ॥ ३७ ॥ एवं देहवाचाचित्तें । जें पातलें त्रिविधत्वातें । तें सामान्य तप तूतें । परिसविलें गा ॥ ३८ ॥ अवतरणः– ( ९९८. सात्विक तप, २३९-२४१ ). आतां गुणत्रयसंगें । हेंचि विशेषीं त्रिविधीं रिगे । तेंही आईक सांगें । प्रज्ञावळें ॥ ३९ ॥

श्रद्धया परया तप्तं तपस्तत् त्रिविधं नरैः ।
अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥

अन्वयः—अफलाकांक्षिभिः युक्तैः नरैः परया श्रद्धया तप्तं यत् त्रिविधं तपः तत् सात्विकं परिचक्षते ॥ १७ ॥

तरि हेंचि तप त्रिविधा । जें दाविलें तुज प्रबुद्धा । तेंचि करी पूर्ण श्रद्धा । सांडूनि फळ ॥ २४० ॥ जें पुरतिया सत्त्वशुद्धि । आचरिजे आस्तिक्यबुद्धि । तें तयातेंचि गा प्रबुध्दि । सात्त्विक म्हणिपे ॥ ४१ ॥

सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ।
क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥

अन्वयः—सत्कारमानपूजार्थं च दंभेन एव यत् तपः क्रियते, तत् इह राजसं, चलं अध्रुवं प्रोक्तम् ॥ १८ ॥

( ९९९. राजस तप, २४२–२५२ ) नातरि तपस्थापनेलागीं । दुजेपण मांडूनि जगीं । महत्त्वाच्या शृंगीं । बैसावया ॥ ४२ ॥ त्रिभुवनींचिया सन्माना । न वचावें ठाया आना । धुरेचिया आसना । भोजनालागीं ॥ ४३ ॥ विश्वाचिया स्तोत्रा । आपण होआवया पात्रा । विश्वें आपुलिया यात्रा । कराविया ॥ ४४ ॥ लोकांचिया विविधा पूजा । आश्रयो न धरावया दुजा । भोग भोगावे वोजा । महत्त्वाचिये ॥ ४५ ॥ अगा बोल माखूनि तपें । विकावया आपणपें । अंगहीनें पडेपे । जियापरी ॥ ४६ ॥ हें असो धनमानीं आस । वाढउनी तप कीजे सायास । तें तेंचि तप राजस । बोलिजे गा ॥ ४७ ॥ परी पहुरणें जें दुहिलें । तें तें गुरूं न दुभेचि व्यालें । कां उभें शेत चारिलें । पिकावया नुरे ॥ ४८ ॥ तैसें फोकारितां तप । कीजे जें साक्षेप । तें फळीं तंव सोपें । निःशेष जाय ॥ ४९ ॥ ऐसें निर्फळ देखोनि करिता । माझारीं सांडी पंडुसुता । म्हणोनि नाहीं स्थिरता । तपा तया ॥ २५० ॥ येऱ्हवीं तरी आकाश मांडी । जो गर्जोनि ब्रह्मांड फोडी । तो अकाळ मेघु काय घडी । राहात आहे ॥ ५१ ॥ तैसें राजस तप जें होये । तें फळीं कीर वांझ जाये । परी आचरणींही नोहे । निर्वाहतें गा ॥ ५२ ॥ अवतरणः—

१ मानसिक तप अशा नांवाला. २ शय्या. ३ चांगुलपणानें. ४ वृद्ध वेश्या. ५ शृंगार करते. ६ एक किडा आहे त्यानें. ७ दूध पिऊन टाकलें. ८ प्रसिद्धि होण्याकरितां. ९ व्यर्थ. १० टिकण्याजोगें.

ठिकाणीं सहजच भावशुद्धि असते. ( संकल्पविकल्प नसतात ). ३५ अर्जुना, फार काय सांगावें ? जेव्हां मनास ही योग्यता प्राप्त होते, तेव्हांच मानस तप असें नांव मिळतें. ३६ देव म्हणतातः–परंतु तें असो, मानस तपाचीं जीं लक्षणें आहेत, तीं मीं तुला सर्व सांगितलीं. ३७ याप्रमाणें देह, वाचा व चित्त यांच्या योगानें जें त्रिविधत्वास पावलें आहे तें सामान्य तप तुला सांगितलें. ३८ आतां, तीन गुणांच्या संगानें हेंच तप तीन प्रकारचें होतें, तें बुद्धीच्या बळानें चांगलें ऐक. ३९

श्लोकार्थः—फलाची आशा न करणारे आणि समाधानी अशा पुरुषानीं उत्तम श्रद्धेनें आचरिलेलें असें जें हें तीन प्रकारचें ( कायिक, वाचिक व मानसिक तप ), त्याला सात्त्विक तप म्हणतात ॥ १७ ॥

तर हे प्रबुध्दा, हें जें आम्हीं तुला तीन प्रकारचें तप सांगितलें, त्याचेंच पूर्ण श्रध्दापूर्वक आचरण कर, पण फळाची आशा धरूं नको. २४० अरे, ज्या वेळीं मन पूर्णपणें शुध्द ठेवून श्रद्धेनें या तपाचें आचरण करावें; त्या वेळीं याच तपाला ज्ञाते जन सात्त्विक असें म्हणतात. ४१

श्लोकार्थः—येथें आपली स्तुति, बहुमान व पूजा व्हावी या हेतूनें किंवा दांभिकपणानें केलेलें जें तप, तें राजस, चंचल आणि अस्थिर असें म्हटलें आहे ॥ १८ ॥

अथवा, तप करण्याच्या हेतूनें जगांत द्वैत स्थापन करून मोठेपणाच्या शिखरावर बसण्याची जे इच्छा करतात; ४२ त्रिभुवनांतील सर्व सन्मान दुसऱ्या कोणास मिळूं नयेत आणि सभेंत व भोजनाचे समयीं आपल्यास अग्रभागीं मान मिळावा, ४३ सर्व जगांतील लोकांनीं आपली स्तुति करण्यास आपण पात्र व्हावें; आणि लोकांनीं आपले दर्शनास यावें, ४४ लोकांनीं आपलीच विशेष पूजा करावी, व सर्व महत्त्वाचे भोग आपल्यास उपभोगास मिळावे; ४५ अरे, अशा प्रकारें, जशी एखादी वृद्ध वेश्या आपलें वय झाकण्याकरितां वरकांती शृंगार करून थाटामाटानें बसते, तसें तपाचें ढोंग माजवून जे आपलें स्वरूप लोकांस विकतात, ४६ फार काय सांगावें ? परंतु द्रव्य व मान याच्या प्राप्तीची इच्छा धरून जें सायासानें तप करणें, त्यालाच राजस तप म्हणतात. ४७ परंतु पहुरणें नामक किड्यानें ज्या गाईच्या थानांतील दूध पिऊन टाकलें असतें, ती गाय व्याली तरी दूध देत नाहीं; किंवा उभें शेत जनावरास चारल्यावर जशी त्यापासून पिकाची प्राप्ति होत नाहीं, ४८ तसें आपली प्रसिद्धि व्हावी या हेतूनें केलेलें जें तप, त्याचें फल पाहूं गेलें असतां शेवटीं व्यर्थ होतें. ४९ याप्रमाणें, अर्जुना, तपापासून फलप्राप्ति नाहीं असें समजल्यावर तो तें मध्येंच सोडून देतो, म्हणून त्या तपाला स्थिरता नसते. २५० एरवीं असें पहा कीं, आकाशात अभ्रांची अकालीं गर्दी होऊन तीं ब्रह्मांडांत गर्जना करतात, परंतु तीं घटकाभर तरी टिकतात काय ? ५१ तसें राजस तपाचें फल खरोखर वांझेप्रमाणें व्यर्थ होय. परंतु त्याचें आचरण केलें असतां तें आचरणही

( १०००. तामस तप, २५३–२६३ ) आतां तेंचि तप पुढती । तामसें येचि रीती । पै पैरत्रा आणि कीर्ति । मुकोनि कीजे ॥ ५३ ॥

मूढग्राहेणात्मनो यत् पीडया क्रियते तपः ।
परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥

अन्वयः—मूढग्राहेण आत्मनः पीडया वा परस्य उत्सादनार्थं यत् तपः क्रियते, तत् तामसं उदाहृतम् ॥ १९ ॥

केवळ मूर्खपणाचा वारा । जीवीं घेऊनि धनुर्धरा । नाम ठेविजे शरीरा । वैरियाचें ॥ ५४ ॥ पंचाग्नीची दैंडगी । खोलैंवीजती शरीरालागीं । कां इंधन कीजे हे आगी । आतुळावी ॥ ५५ ॥ माथां जाळिजती गुगुळ । पाठीं घालिजती गळ । आंग जाळिती इंगळ । जळतभीतें ॥ ५६ ॥ दवडोनि श्वासोश्वास । कीजती वायांचि उपवास । का घेपती धूमाचे घांस । अधोमुखें ॥ ५७ ॥ हिमोदकें आकंठें । खडकें सेविजती तटें । जितेया मांसाचे चिमुटे । तोडिती जेथ ॥ ५८ ॥ ऐसीं नानापरी हे काया । घाँय सूतां पै धनंजया । तप कीजे नाशावया । पुढिलातें ॥ ५९ ॥ आंगभारें सुटला धोंडा । आपण फुटोनि होय खंडखंडा । का आड जालिया तें रगडा । करी जैसा ॥ २६० ॥ तेविं आपुलिया आटणिया । सुखें असतया प्राणिया । जियेंवया शिराणियैं । कीजती गा ॥ ६१ ॥ किंबहुना हे वोखटी[१३] । घेऊनि क्लेशाची हातवटी । तप निफजे तें किरीटी । तामस होय ॥ ६२ ॥ एवं सत्त्वादिकांच्या आंगीं । पडिलें तप तिहीं भागीं । जालें तेंही तुज चांगी । दाविलें व्यक्ती ॥६३॥ अवतरणः—( १००१. सात्विक दान, २६४–२८४ ) आतां बोलता प्रसंगा । आलें म्हणोनि पै गा । करूं रूप दानलिंगा । त्रिविधा तया ॥ ६४ ॥ येथ गुणाचेनि बोलें । दानहि त्रिविध असे जालें । तेंचि आईक पहिलें । सात्त्विक ऐसें ॥ ६५ ॥

दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।
देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥

अन्वयः—दातव्यम् इति यत् दानं देशे च काले च पात्रे अनुपकारिणे दीयते, तत् दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥

तरि स्वधर्मा आंतौतें । जें जें मिळेल आपणयातें । तें तें दीजे बहुतें । सन्मानयोगें ॥ ६६ ॥ जालिया सुबीजप्रसंगु । पडे क्षेत्र बाफेचा पांगु । तैसाचि दानाचा हा लँगु । देखतसे ॥ ६७ ॥ अँनर्घ्य रत्न हाता चढे । तैं भांगाराची वोढी[१९] पडे । दोनी जालीं तरी न जोडे । लेतें आंग ॥ ६८ ॥ परि सण सुहृद

१ परलोक. २ तप्तज्वाला. ३ लावतात. ४ पेटावितो. ५ काष्टें. ६ गळ्यापर्यंत. ७ दुःखें. ८ देतात. ९ दुसऱ्यास. १० शरीरास दुःख देऊन. ११ जिंकण्यास. १२ प्रमुख. १३ वाईट. १४ प्रकार. १५ उणीव. १६ संबंध. १७ अमोल. १८ सोन्याची. १९ टंचाई.

टिकत नाहीं. ५२ आता यापुढें जें तामस तप, तेंही अशा प्रकारचेंच आहे; पण ( यांत एक कीर्ति तरी मिळण्याचा संभव आहे. ) त्यांत तर कीर्ति आणि स्वर्ग या दोहोंचीही प्राप्ति होत नाहीं । ५३

श्लोकार्थः—वेडेपणानें, दुराग्रह धरून, आपल्या शरीराला दुःख देऊन, अथवा दुसऱ्याचा नाश व्हावा अशी इच्छा धरून केलेलें जें तप, तें तामस तप म्हटलें आहे ॥ १९ ॥

हे धनुर्धरा, मूर्खपणाचा अभिमान मनांत बाळगून जे आपल्या शरीरास वैरी असें समजतात; ५४ आपलें शरीर हेंच लांकूड असें मानून आपल्या शरीरांतील पंचाग्नीनें त्यास पेटवितात, ५५ आपल्या डोक्यावर शेगडी घेऊन त्यांत गुग्गुळ जाळतात, पाठीला गळ लावतात, भोंवतालीं अग्नि पेटवून मध्यें आपलें शरीर जाळतात, ५६ श्वासोच्छ्वास बंद करून व्यर्थ उपास करतात; अथवा उफराटें टांगून घेऊन धूम्रपान करतात; ५७ हिंवाळ्यांत नदींत गळ्याइतक्या पाण्यांत उभे राहतात; व खडकावर किंवा नदीचे तीरास बसतात; आणि आपल्या अंगाचें जिवंतपणीं मांस काढतात । ५८ हे धनंजया, अशा नानातऱ्हेनें आपल्या शरीरास दुःख देऊन दुसऱ्याचा नाश करण्याकरितां तपाचें आचरण करतात, ५९ डोंगरावरील धोंडा आपल्या जडपणानें सुटल्यावर खालीं पडला म्हणजे त्याचे तुकडे तुकडे होतात, परंतु तो खालीं येते वेळेस जर त्याचे सपाट्यांत एखादी वस्तु सांपडली तर तो जसा तिचा चुराडा करितो, २६० तसें आपल्या शरीरास दुःख देऊन, जे सुखी प्राणी असतील अथवा जे प्रमुख असतील त्यांना जिकण्याकरितां तपाचें आचरण करतात. ६१ अर्जुना, फार काय सांगावें ? परंतु असें वाईट व क्लेशयुक्त जें तप करतात त्यास तामस तप म्हणतात. ६२ याप्रमाणें सत्त्व, रज व तम यांच्या अनुरोधानें जे तपाचे तीन भाग झाले, ते तुला चांगले स्पष्ट करून दाखविले. ६३ आतां बोलण्याचा ओघ आला म्हणून, दानाचे तीन प्रकार कसे होतात त्याचीं लक्षणें तुला सांगतों. ६४ हें पहा, गुणाच्या अनुरोधानें दानाचेही तीन प्रकार झाले आहेत. त्यापैकीं पहिलें जें सात्विक दान तें ऐक. ६५

श्लोकार्थः—दान करणें हें आपलें कर्तव्य आहे अशा हेतूनें जें दान पुण्यक्षेत्रीं, पर्वकाळीं व सत्पात्रीं, आणि दानाचा मोबदला न करणारा अशाला दिलें जातें, तें सात्विक दान होय ॥ २० ॥

तर आपण स्वकष्टानें व सन्मार्गानें मिळविलेलें जें धन, तें जो आदरातिथ्यानें दुसऱ्यास अर्पण करतो; ६६ कदाचित् उत्तम बीज मिळालें तर उत्तम जमीन व वाफ यांची उणीव पडते; त्याचप्रमाणें, दानाची इच्छा असली तरी दान देण्यास पात्र मनुष्य आणि देश व काळ यांची उणीव असते. ६७ अमोल रत्न सांपडलें असतां ( त्याला कोंदण करण्यास ) सोन्याची उणीव पडते; कदाचित् सोनेंही मिळालें, तरी अलंकार घालण्याच्या इंद्रियाची उणीव पडते; ६८ परंतु, ( दिवाळीसारखा ) सण, आपले आप्तवर्ग व संपत्ति हे तीन योग एकत्र मिळणें नशीबावर अवलंबून आहे. '६९ तसें, आपल्या

संपत्ति । हे तिन्ही येकीं मिळती । जें भाग्य घरीं उन्नति । आपुलयाविषीं ॥६९॥ तैसें निफजवावया दान । जें सत्त्वासि ये संवोहन । तें देश काळ भाजन । द्रव्यही मिळे ॥ २७० ॥ तरि [१]आर्धी तंव प्रयत्नेंसी । होआवें कुरुक्षेत्र कां काशी । नातरि तुके जो इहींसी । तो देशही हो ॥ ७१ ॥ तेथ रविचंद्राहुमेळें । होतां पाहे पुण्यकाळु । कां तयासारिखा निर्मळु । आनुही जाला ॥ ७२ ॥ तैशा काळीं तिये देशीं । होआवी पात्रसंपत्ति ऐसी । मूर्ति आहे धरिली जैसी । शुचित्वेंचि कां ॥ ७३ ॥ आचाराचें मूळपीठ । वेदांची उतारपेठ । तैसें द्विजरत्न चोखट । पावोनियां ॥ ७४ ॥ मग तयाचे ठायीं वित्ता । [४]निवर्तवावी स्वसत्ता । परि प्रियापुढें कांता । रिगे जैसेनि ॥ ७५ ॥ का जयाचें ठेविलें तया । देऊनि होइजे उतराइया । नाना हडेपें विडा राया । दिधला जैसा ॥ ७६ ॥ तैसेनि निष्कामें जीवें । भूम्यादिक अर्पावें । किंबहुता हांवे । नेदावें उठों ॥ ७७ ॥ आणि दान जया द्यावें । तयातें ऐसेया पाहावें । जया घेतलें नुमचवे । कायसेंनही ॥ ७८ ॥ सादे घातलिया आकाशा । नेदी प्रतिशब्दु जैसा । कां पाहिला आरसा । येरीकडे ॥ ७९ ॥ नातरी उदकाचिये भूमिके । आफळिलेनि कंदुकें । उधळौनि कवतिकें । न येइजे हाता ॥ २८० ॥ नाना वसो घातला चारु । माथां तुरंबिलें बुरु । न करी प्रत्युपकारु । जियापरी ॥ ८१ ॥ तैसें दिधलें दातयाचें । जो कोणेही आंगें नुमचे । अर्पिलिया साम्य तयाचे । कीजे पैं गा ॥ ८२ ॥ ऐसिया जें सामग्रिया । दान निफजे वीरराया । तें सात्विक दानवर्या । सर्वांही जाण ॥ ८३ ॥ आणि तोचि देशु काळु । घडे तैसाचि पात्रमेळु । दानभोगुही निर्मळु । न्यायगतु ॥ ८४ ॥

> यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।
> दीयते च परिक्लिष्टं तद्राजसमुदाहृतम् ॥ २१ ॥

अन्वयः—यत् तु प्रत्युपकारार्थं च फलं उद्दिश्य पुनः च परिक्लिष्टं दीयते, तत् दानं राजसं स्मृतम् ॥ २१ ॥

( १००२. राजस दान, २८५-२९३ ) परि मनीं धरूनि दुभतें । चारिजे जेविं गाईतें । कां पेंव करूनि आइतें । पेरूं जाइजे ॥ ८५ ॥ ना ना दिठी घाळूनि आहेरा । अवंतूं जाइजे सोयिरा । कां वाण धाडिजे घरा । वोवसीयाचे ॥ ८६ ॥ पैं कळांतरें गांठीं बांधिजे । मग पुढिलाचें काज कीजे । पूजीं घेऊनि रैसु दीजे । पीडितांसि ॥ ८७ ॥ तैसें जया जें दान देणें । तो तेणेंचि गा जीवनें[१०] । पुढती

१ साहाय्य. २ सत्पात्र ब्राह्मण. ३ सूर्यग्रहण अथवा चंद्रग्रहण. ४ संतोषानें सोडावी. ५ खिसमतगारानें. ६ फलेच्छेस. ७ उलट प्राप्ति होणार नाहीं. ८ हाक; आरोळ्या. ९ आपटला असतां. १० चेंडू. ११ उसळून; उडी खाऊन. १२ वास घेतला; उपकार केला. १३ कृतघ्न.

हातून दान घडावयाचें असलें, तर सत्त्वगुणाची साह्यता होऊन देश, काल, सत्पात्र ब्राह्मण व द्रव्य हे सर्व योग अनुकूल होतात. २७० प्रथम यत्नानें होईल तेवढें दान करण्यास कुरुक्षेत्र अथवा काशी हे देश असावे; नाहीं तर यांच्या बरोबरीचे तरी दुसरे देश असावे; ७१ त्या पुण्यक्षेत्रांत सूर्यग्रहण किंवा चंद्रग्रहण यासारखा पुण्यकाल असावा; अथवा त्याच्या योग्यतेचा दुसरा असावा; ७२ तशा देशांत व त्या पर्वकालीं असा सत्पात्र ब्राह्मण असावा कीं, मूर्तिमंत शुचित्वच होय. ७३ तो ब्राह्मण केवळ आचाराचेंच मुख्य-स्थान व वेदाचें वसतिस्थान अशा योग्यतेचा असावा. ७४ त्या ब्राह्मणास द्यावयाचें जें दान त्यावरील आपली सत्ता काढून घेऊन त्यास तें अर्पण करावें, पण जशी स्त्री आपल्या पतीजवळ स्वसंतोषानें जाते, ७५ किंवा एखाद्याची आपल्या जवळ असलेली ठेव आपण जशी त्यास स्वसंतोषानें परत देऊन उतराई होतों; अथवा खिसमतगाराजवळ असलेला विडा जसा तो राजास अर्पण करतो, ७६ तसें निष्काम बुध्दीनें भूमि आदिकरून दान ब्राह्मणास अर्पण करावें, परंतु त्या दानाविषयीं कोणत्याही प्रकारची फलेच्छा होऊं देऊं नये; ७७ आणि दान ज्यास द्यावयाचें, तो अशा रीतीचा असावा कीं, त्याचेकडून आप-ल्यास उलट कोणतेही प्रकारें काहींही लाभ होणार नाहीं. ७८ आकाशांत पुष्कळ आरोळ्या मारल्या तरी जसें त्याचें प्रत्युत्तर आकाशापासून मिळत नाहीं; किंवा आर-शाचे मागें पाहिलें असतां जसें त्यांत प्रतिबिंब दिसत नाहीं; ७९ अथवा उदकावर चेंडू मारला असतां तो जसा उसळून हातात येत नाही; २८० किंवा वसूस ( पोळास ) घात-लेल्या चाऱ्यापासून जसा तो उपकार मानीत नाहीं; अथवा ज्याप्रमाणें कृतघ्न मनुष्यावर केलेले उपकार तो फेडीत नाहीं, ८१ त्याप्रमाणें, दान करणारावर कोणत्याही प्रकारानें उलट उपकार होणार नाहींत अशा मनुष्यास दान द्यावें; व आपण दान दिल्याबद्दल अभिमान बाळगूं नये. ८२ हे वीरोत्तमा अर्जुना, अशा प्रकारचें जें दान, तें सर्व दानांत उत्तम असें जें सात्विक दान तें होय. ८३ आणि याप्रमाणेंच देश, काल, सत्पात्र ब्राह्मण व यथान्याय मिळविलेलें द्रव्य हें आहे; ८४

श्लोकार्थः—प्रत्युपकाराकरिता किंवा फळाच्या इच्छेनें अथवा मोठ्या कष्टानें दिलेलें जें दान, तें राजस दान होय ॥ २१ ॥

परंतु मनांत दुधाची इच्छा धरून जसें गाईस उत्तम रीतीनें चारावें, किंवा पेंव तयार करून त्यांत दाणे सांठविण्याकरितां शेताची मेहनत मशागत करून त्यांत धान्य पेरावें; ८५ अथवा अहेरावर नजर ठेवून जसें सोयऱ्याधायऱ्यांस लग्नकार्याचे वेळीं आमं-त्रण करावें, किंवा जेथून वोवसा माघारा येईल अशा ठिकाणींच वाण द्यावें; ८६ अथवा लांच पदरांत घेऊन मग दुसऱ्याचें काम करावें, किंवा द्रव्य घेऊन रोग्यांस औषध द्यावें, ८७ तसें, ज्याला जें दान द्यावें त्याचें त्यापासून संरक्षण होऊन त्यानें आपली लोकांत

१४ श्रेष्ठ. १५ दान करण्याचें द्रव्य. १६ लाच. १७ द्रव्य. १८ कादा. १९ आश्रयानें.

भजावा भावें येणें। दीजे कां ॥ ८८ ॥ अथवा कोणी वाटे जातां। घेतलें उमेचों न शकता। मिळे जैं पंडुसुता। द्विजोत्तमु ॥ ८९ ॥ तरी कवडया एकासाठीं। अशेषां गोत्राचींच किरीटी। सर्व प्रायश्चित्तें सुये मुठी। तयाचिये ॥२९०॥ तेवींचि पारलौकिकें। फळें वांछिजती अनेकें। आणि दीजे तरी भुके। येकाही नोहे ॥९१॥ तेंही ब्राह्मणु नेवों सरे। कीं हानीचेनि शिणें झोंसुरे। सर्वस्व जैसें चोरें। नागऊनि नेलें ॥ ९२ ॥ काय बहु सांगों सुमति। जें दीजे या मनोवृत्ति। तें दान गा त्रिजगतीं। राजस पैं ॥ ९३ ॥

*अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते।*
*असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम्॥ २२॥*

अन्वयः—यत् दानं असत्कृतं अवज्ञातं अदेशकाले च अपात्रेभ्यः दीयते, तत् तामसं उदाहृतम् ॥ २२ ॥

( १००३. तामस दान, २९४-३०८ ) मग म्लेंच्छाचे वैसौटे। दांगाणें हन कैंकटें। कां शिविरें[6] चोहटे। नगरींचे ते ॥ ९४ ॥ तेही ठाईं मिळणी। समयो सांजवेळ कां रजनी। तेव्हां उदार होणे धनीं। चोरियेच्या ॥ ९५ ॥ पात्रें भाट नागौरी। सामान्य[8] स्त्रिया कां जुवारी। जियें मूर्तिमंतें भुररीं। भुले तयां ॥९६॥ रूपा नृत्याची पुरवणी। ते पुढां डोळेंभरणी। गीत भाटीव तो श्रवणीं। कर्णजपु ॥ ९७ ॥ तयाहीवरी अळुमाळु। जैं घे फुलागंधाचा गुगुंळु। तंव भ्रमाचा तो वेताळु। अवतरे तैसा ॥ ९८ ॥ तेथ [12]विभांडूनियां जग। आणिले पदार्थ अनेग। तेणें घालूं लागे मौतंग। गैंवादी जैसी ॥ ९९ ॥ एवं ऐसेनि जें देणें। तें तामसदान मी म्हणें। आणि घडे दैवगुणें। आणिकही ऐक ॥ ३०० ॥ विपायें घुणाक्षरें पढे। टाळिये काउळा सांपडे। तैसें तामसां पर्व जोडे। पुण्यदेशा ॥ १ ॥ तेथ देखोनि तो [16]आंथिला। योग्यु मार्गोही आला। तोही दर्पा चढला। मांगावे जरी ॥ २ ॥ तरी श्रद्धा न धरी जीवीं। तया माथाही न खालवी। स्वयें न करी ना करवी। अर्घ्यादिक ॥ ३ ॥ आलिया न घाली वैसों। तेथ गंधाक्षतांचा काय अतिसो। हा अप्रसंगु कीर असो। तामसीं नरीं ॥ ४ ॥ पैं बोळविजे रिणाइतु। तैसा झकवी तयाचा हातु। तूं करणें याचा बहुतु। प्रयोगु तेथ ॥ ५ ॥ आणि जया जें दे किरीटी। तयातें उमाणी तयासाठीं। मग कुबोलें कां लोटी। अवज्ञेच्या ॥ ६ ॥ हें बहु असो यापरी। मोल वेंचणें जें अवधारीं। तया नांव चराचरीं। तामस दान ॥ ७ ॥ ऐसें आपुलाल्या चिन्हीं। अळंकृतें तिन्ही। दानें

---

१ प्रत्युपकार करण्यास असमर्थ असा. २ झुरतो. ३ वसतिस्थानें. ४ अरण्यें. ५ अपवित्र जागा. ६ तंबू. ७ तमासगीर. ८ वेश्या. ९ चेटकी. १० नेत्रसुख. ११ सुवास. १२ लुटून. १३ मांग. १४ भग्नछत्र. १५ भुंग्यानें लाकूड पोखरल्यावर अक्षरासारखें दिसतें तें. १६ श्रीमत. १७ किंमत करतात.

वाखाणणी करावी या हेतूनें दान करतात, ८८ अथवा अर्जुना, वाटेनें जातांना कोणी एखादा उत्तम ब्राह्मण भेटला, पण त्यापासून प्रत्युपकार होण्यासारखा नसला, ८९ तर, हे किरीटी, त्यास एक कवडी दान देऊन आपल्या सर्व आप्तवर्गाच्या प्रायश्चित्तांचा संकल्प करून त्याचे हातावर पाणी सोडतात; २९० त्याचप्रमाणें, त्या दानापासून परलोकच्या सर्व फलाची आशा करून त्यास तें देतात, आणि तें तरी किती? तर त्या ब्राह्मणाच्या एक वेळच्या भुकेलाही तें पुरावयाचें नाहीं. ९१ बरें, तेवढेंच कां होईना? (पण तें तरी संतोषानें द्यावयाचें, तर नाहीं!) तो ब्राह्मण तें घेऊन चालला असतां, आपली मोठी हानि झाली असें म्हणून मनांत झुरतात. जणूं काय चोरानें यांचें सर्वस्वच हरण केलें! ९२ हे सुमते अर्जुना, आणखी काय सांगावें? अशा मनोवृत्तीनें जें दान देतात, तें दान त्रिजगतांत राजस दान समज. ९३

श्लोकार्थः—जें दान सत्काररहित, अपमानपूर्वक, आणि पुण्यदेश, पुण्यकाल व सत्पात्र नसून दिलें जातें, तें तामस दान होय ॥ २२ ॥

मग म्लेंच्छांची वस्ती असेल तीं ठिकाणें, अथवा अरण्यें, किंवा अपवित्र जागा, अथवा तंबू, किंवा नगराचे चव्हाटे, ९४ अशा ठिकाणीं जेमून, संध्याकाळीं अथवा रात्रीं, चोरी करून आणिलेल्या धनाचें उदारपणानें दान करतात; ९५ हें दान देण्यास पात्र कोण? तर भाट लोक, तमासगीर लोक, किंवा वेश्या, अथवा जुगार खेळणारे, किंवा मूर्तिमंत चेटकी, यांच्यावरच खुष होतात! ९६ अशा लोकांनीं त्यांच्या पुढें नृत्यगायन केल्यावर अथवा भाट लोकांनीं स्तुति केलेली ऐकल्यावर तीच त्यांच्या कानांत नेहमीं गुणगुणत असते. ९७ त्याहीनंतर जेव्हां पुष्पें अगर सुगंधी द्रव्यें यांचा सुवास घेतात, तेव्हां तल्लीन होऊन केवळ भ्रमाचे मूर्तिमंत वेताळ बनतात! ९८ मग दुसऱ्यास लुटून आणलेल्या अनेक पदार्थांचें मांग वगैरे लोकांस अन्नसत्र घालतात. ९९ याप्रमाणें जें दान करणें, तें तामस दान असें मी म्हणतों; आणि दैववशात् आणखीही एक प्रकार घडून येतो, तो ऐक. ३०० कदाचित् भुंग्यानें लाकूड पोखरल्यावर त्यास अक्षराचा आकार यावा, किंवा सहज टाळी वाजवीत असता दोन्ही हातांच्यामध्यें कावळा सांपडावा, त्याप्रमाणें तामस मनुष्यास पुण्यक्षेत्राचे ठिकाणीं पर्वणीचा लाभ झाला, त्या ठिकाणीं ह्याचें ऐश्वर्य पाहून योग्य अतिथि प्राप्त झाला, आणि त्यास पाहून हा रागानें भांबावून जाऊन त्याला कांहीं द्यावें असें जर याला वाटलें, २ तर त्याजविषयीं पूज्यबुद्धि न बाळगतां व त्यास नमस्कार न करतां, आपण स्वतः किंवा दुसऱ्याकडूनही त्याला अर्घ्यादिक समर्पण करीत नाहीं, ३ आणि त्याला बसावयास आसनही देत नाहीं, मग गंधाक्षतानीं त्याचें पूजन करण्याची गोष्ट कशास पाहिजे? याप्रमाणें तामसी पुरुष अतिथीची अप्रतिष्ठा करतात. ४ परंतु ऋणकऱ्याची बोळवण करावी, त्याप्रमाणें त्याच्या हातावर कांहीं द्रव्य ठेवून 'अरे तुरे' करून त्याचा अपमान करतात; ५ आणि, अर्जुना, त्याला जें दान द्यावयाचें; तितकीच त्याची किंमत आहे, अशी त्याची हेलना करतात; आणि मग त्या ब्राह्मणास वाईट शब्द बोलून धक्के मारून त्याची अमर्यादा करतात. ६ हें पुष्कळ बोलणें राहूं दे; याप्रमाणें जें द्रव्य दान करणें; त्याला या जगांत तामस दान असें म्हणतात. ७ याप्रमाणें, ज्याच्या त्याच्या चिन्हांनीं युक्त अशीं हीं सात्त्विक, राजस

दाविलीं अभिधानीं । रजतमांचिया ॥ ८ ॥ ( १००४. सत्त्वच भवबंधांतून सोडवितें, मग रज तम कां सांगितले? ३०९-३१७ ) तेथ मी जाणत असें । विपायें तूं गा ऐसें । कल्पिसील मानसें । विचक्षणा ॥ ९ ॥ जे भवबंधमोचक । येकलें कर्म सात्त्विक । तरी कां वेखौसी सदोख । येर बोलावीं ॥ ३१० ॥ परि नोसंतितां विवेंसी । भेटी नाहीं निधीसी । कां धूं न साहतां जैसी । वाती न लगे ॥ ११ ॥ तैसें शुद्धसत्त्वाआड । आहे रजतमाचें कवाड । तें भेदणें यांतें कीडें । म्हणावें कां ॥ १२ ॥ आम्ही श्रद्धादि दानांत । जें समस्तही क्रियाजात । सांगितलें कां व्याप्त । तिहीं गुणीं ॥ १३ ॥ तेथ भरंवसेनि तिन्ही । न सांगोंचि ऐसें मानीं । परि सत्त्व दावावया दोन्ही । बोलिलों येरें ॥ १४ ॥ जें दोहींमाजि तिजें असे । तें दोही सांडितांचि दिसे । अहोरात्रत्यागें जैसें । संध्यारूप ॥ १५ ॥ तैसें रजतमविनाशें । तिजें जें उत्तम दिसे । तें सत्त्व हें आपैसें । भावार्सि ये ॥ १६ ॥ एवं दावावया सत्त्व तुज । निरूपिलें तम रज । तें सांडूनि सत्त्वें काज । साधी आपलें ॥१७॥ ( १००५. सात्त्विक कर्म केलें असतां फल मिळणार नाहीं काय? ३१८-३१९ ) सत्त्वेंचि येणें चोखाळें । करीं यज्ञादिकें सकळें । पावसी तैं करतळें । आपलें निज ॥१८॥ सूर्यें दाविलेंसांतें । काय एक न दिसे येथें । तेविं सत्त्वें केलें फळातें । काय नेदी ॥ १९ ॥ ( १००६. सात्त्विक कर्म केलें तरी मोक्ष देणारें दुसरेंच साधन आहे, ३२०-३२५ ) हे कीर आवडतांविखीं । शक्ति सत्त्वीं आथी निकी । अवतरण:–परि मोक्षेंसी एकीं । मिळणें जें ॥ ३२० ॥ तें एक आनचि आहे । तयाचा सांवावो जैं लाहे । तैं मोक्षाचाही होये । गांवीं सरतें ॥ २१ ॥ पैं भांगार जऱ्ही पंधरें । तऱ्ही राजावळीचीं अक्षरें । लाहे तैंचि सरे । जियापरी ॥ २२ ॥ स्वच्छें शीतळें सुगंधें । जळें होतीं सुखप्रदें । परि पवित्रत्व संबंधें । तीर्थाचेनि ॥ २३ ॥ न हो कां भलतैसी थोरी । परि गंगा जैं अंगिकारी । तैंचि तिये सागरीं । प्रवेशु गा ॥ २४ ॥ तैसें सात्विका कर्मा किरीटी । येतां मोक्षाचिये भेटी । न पडे आडकाठी । तें वेगळें आहे ॥ २५ ॥ ( १००७. मोक्ष देणारें साधन ऐकण्याची अर्जुनास त्वरा, ३२६ ) हा बोलु आयकतखेंवीं । अर्जुना आंधि न माये जीवीं । म्हणे देवें कृपा करावी । सांगावें तें ॥ २६ ॥ ( १००८. मोक्ष देणारें साधन, ३२७ ) तेथ कृपाळें चक्रवर्ती । म्हणे आईक तयाची व्यक्ति । जेणें सात्विकें तें मुक्तिरत्न देखे ॥ २७ ॥

ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥

---

१ बुद्धिमंता. २ वेगळी. ३ निवारण केल्याशिवाय. ४ समय. ५ धूर. ६ वाईट. ७ नाश झाल्यावर. ८ प्राप्त होतो. ९ सर्वतोपरी. १० साहाय्य. ११ योग्यता. १२ राजाचा शिक्का.

आणि तामस हीं दानें तुला स्पष्ट सांगितलीं. ८ त्यांविषयीं, अर्जुना मला असें वाटतें कीं, कदाचित् तूं आपल्या मनांत अशी शंका घेशील कीं, ९ संसारबंधनापासून सोडविणारें जर एक सात्त्विक कर्मच आहे, तर त्यावांचून दोषयुक्त अशीं जीं वेगळीं कर्में त्यांचें वर्णन कां करावें ? ३१० परंतु द्रव्याच्या ठेव्यावरील समंधाचें निवारण केल्याशिवाय जसें तें हातीं येत नाहीं, अथवा धूर सोसल्याशिवाय जसा अग्नि पेटत नाहीं, ११ तसें शुद्ध सत्त्वगुणाचे आड जें रजस्तमोगुणाचें द्वार आहे, तें फोडण्याचा प्रयत्न केला असतां त्यास वाईट कां म्हणावें ? १२ आम्हीं श्रद्धेपासून दानापर्यंत जेवढ्या क्रिया सांगितल्या त्या सर्व तीन गुणांनीं युक्त आहेत. १३ त्या तिन्ही गुणाचा मीं खरोखर उल्लेख करणार नव्हतों; परंतु सत्त्वगुण उघड रीतीनें दाखविण्याकरितां दुसऱ्या दोन गुणांचें वर्णन केलें. १४ जें दोहोंमध्यें तिसरें आहे, तें दोघांचा त्याग केल्यावर दिसतें. ज्याप्रमाणें दिवस व रात्र यांचा त्याग केला असतां संध्याकाल दिसतो, १५ त्याप्रमाणें रज व तम यांचा नाश झाल्यावर, तिसरा जो उत्तम सत्त्वगुण, तो आपोआप प्राप्त होतो. १६ अशा प्रकारें सत्त्वगुण दाखविण्याकरितां तुला तम व रज या गुणाचीं लक्षणें सांगितलीं. तर त्यांचा त्याग करून सत्त्वगुणाच्या योगें आपली कार्यसिद्धि करून घे. १७ या शुध्द सत्त्वगुणानेंच तूं यज्ञादि सर्व कर्मांचें आचरण कर, म्हणजे तूं स्वस्वरूपाला अगदीं सहज प्राप्त होशील. १८ स्वतः सूर्यच जर कोणतीही वस्तु दाखवावयास लागला, तर काय एक दिसणार नाहीं ? तसें सत्त्वगुणानें आचरण केलें असतां तें कोणतें फल देणार नाही ? १९ अशी सर्वतोपरी सत्त्वगुणाच्या अंगीं शक्ति आहे खरी; परंतु मोक्षाची प्राप्ति जेणेंकरून होते, ३२० ती एक निराळीच वस्तु आहे आणि तिचें जेव्हां सत्त्वगुणास साहाय्य होतें, तेव्हांच मोक्षप्राप्तीची योग्यता येते. २१ हें पहा कीं, जरी पंधराच्या दराचें उत्तम सोनें असलें, तरी जेव्हां त्याच्यावर राजाचा शिक्का पडेल, तेव्हांच तें चहूंकडे चालतें. २२ अनेक ठिकाणचें जल स्वच्छ, थंड, सुगंधयुक्त व सुखदायक असेल, पण तीर्थाला मिळाल्याशिवाय त्याला पवित्रता येत नाहीं; २३ इतर ठिकाणच्या पाण्याला केवढीही योग्यता असेना; पण जेव्हां गंगा त्याचा अंगीकार करील, तेव्हांच त्याचा समुद्रांत प्रवेश होतो; २४ त्याप्रमाणें अर्जुना, सात्त्विक कर्मांच्या आचरणानें मोक्षाच्या भेटीला येत असतां, ज्याच्या योगें मध्यें आडकाठी होत नाहीं, तें वेगळेंच आहे. २५ हें भाषण ऐकतांच अर्जुनाचे मनांत अनिवार चिंता उत्पन्न होऊन तो म्हणाला कीं, "देवानीं कृपा करून तें सांगावें." २६ तेव्हां भगवान श्रीकृष्ण म्हणाले.–जिचे योगानें सात्त्विक गुणास मोक्षरूप रत्नाचा लाभ होतो, त्या वस्तूचीं लक्षणें ऐक. २७

श्लोकार्थः—ॐ तत् सत् अशीं तीन प्रकारचीं ब्रह्माचीं नावें आहेत. त्यांच्या योगानें ब्राह्मण, वेद आणि यज्ञ हे पूर्वी उत्पन्न केले आहेत ॥ २३ ॥

१३ चिंता. १४ कृपेचा सार्वभौम राजा–कृपा करणारात श्रेष्ठ.

अन्वयः—ॐ तत् सत् इति ब्रह्मणः त्रिविधः निर्देशः स्मृतः; तेन ब्राह्मणाः वेदाः च यज्ञाः पुरा विहिताः ॥ २३ ॥

( १००९. ॐ तत् सत् या ब्रह्मनामोच्चारानें पूर्वी ब्राह्मण, वेद व यज्ञ निर्माण केले, ३२८-३३५ ) तरि अनादि परब्रह्म । जें जगदादि विश्रामधाम । तयाचें एक नाम । त्रिधा पैं असे ॥ २८ ॥ तें कीर अनाम अजाति । परि अविद्यावर्गाचिये राती- । माजी वोळखावया श्रुति । खूण केली ॥ २९ ॥ उपजलिया बाळकासी । नांव नाहीं तयापासीं । ठेविलेनि नांवेंसी । ओ देत उठी ॥ ३३० ॥ कष्टले संसाराशिणें । जे देवों येती गाऱ्हाणें । तयां ओ दे नांवें जेणें । तो संकेतु हा ॥ ३१ ॥ ब्रह्माचा अबोला फिटावा । अद्वैतत्वें तो भेटावा । ऐसा मंत्रु देखिला कैणवा । वेदें बापें ॥ ३२ ॥ मग दाविलेनि जेणें एकें । ब्रह्म आळविलें कवतिकें । मागां असत ठाके । पुढां उभें ॥ ३३ ॥ परि निगैमाचळशिखरीं । उपनिषदार्थनगरीं । आहाति जे ब्रह्माच्या येकाहारीं । तयांसीच कळे ॥ ३४ ॥ हेंही असो प्रजापति । शक्ति जे सृष्टि करिती । ते जया एका आवृत्ति । नामाचिये ॥ ३५ ॥ ( १०१०. नामाच्या साहाय्यानें ब्रह्मदेवास सृष्टि उत्पन्न करण्याचें सामर्थ्य, ३३६-३४१ ) पैं सृष्टीचिया उपक्रमा- । पूर्वीं गा वीरोत्तमा । वेडा ऐसा ब्रह्मा । एकला होता ॥ ३६ ॥ मज ईश्वरातें नोळखे । ना सृष्टिही करूं न शके । तो थोरु केला एकें । नामें जेणें ॥ ३७ ॥ जयाचा अर्थ जीवीं ध्यातां । जें वर्णत्रयचि जपतां । विश्वसृजनयोग्यता । आली तया ॥ ३८ ॥ तेधवां रचिले ब्रह्मजन । तयां वेद दिधले शासन । यज्ञाऐसें वर्तन । जीविकें केलें ॥ ३९ ॥ पाठीं नेणों किती येर । स्रजिले लोक अपार । जाले ब्रह्मदत्त अग्रहार । तिन्ही भुवनें ॥ ३४० ॥ ऐसें नाममंत्रें जेणें । धौतया अैढळचि करणें । तयाचें स्वरूप आइक म्हणे । श्रीकांतु तो ॥ ४१ ॥ ( १०११. नामाचें वर्णन, ३४२-३४४ ) तरि सर्व मंत्रांचा राजा । तो प्रैणवो आदिवर्णु बुझा । आणि तत्कारु तो दुजा । तिजा सत्कारु ॥ ४२ ॥ एवं ॐतत्सदाकार । ब्रह्मनाम हें त्रिप्रकार । हें फूल तुरंबीं सुंदर । उपनिषदाचें ॥ ४३ ॥ येणेंसी गा होऊनि एक । जें कर्म चाले सात्विक । तें कैवल्यातें.पाइक । घरींचें करी ॥४४॥ अवतरण.—( १०१२. कर्मांत नामाचा विनियोग कसा करावा हें कळलें नाहीं तर कर्म फुकट; काव्यप्रतिभा, ३४५-३५२ ) परि कापुराचें थैळींव । आणूनि देईल दैव । लेवों जाणणेंचि अैंडव । तेथ असे बापा ॥ ४५ ॥ तैसें आदरिजेल सत्कर्म । उच्चारिजेल ब्रह्मनाम । परि नेणिजेल जरि वर्म । विनियोगाचें ॥४६॥ तरी महंतांचिया कोढी । घरा आलियाही वोढी । मानूं नेणतां अैंपरवडी । मुंदल तुटे ॥ ४७ ॥ कां ल्यावया चोखट । टीक भांगार एकवट । घालूनि बांधली

१ खूण. २ कृपेनें. ३ वेदरूपी पर्वत. ४ अनुष्ठान. ५ आरंभाच्या. ६ विश्वाची उत्पत्ति.

तर अनादि जें परब्रह्म, व जें जगत् आदिकरून सर्वांचें विश्रांतिस्थान आहे, त्याचें एकच नांव तीन प्रकारचें आहे. २८ तें ब्रह्म खरोखर नाम व जात एतद्रहित आहे. परंतु अज्ञानी लोकांच्या अंधकारांत ओळखण्याकरितां वेदांनीं त्याला नांव दिलें. २९ मूल जन्मल्यावर त्याला नांव नसतें, पण तेंच त्याचें नांव ठेवून हांका मारू लागल्यावर तें ओ देत उठतें; ३३० त्याप्रमाणें, संसाराच्या कष्टानें शिणलेले जीव वेदाकडे गाऱ्हाणें सांगण्यास आले असतां त्यांनीं हाका मारल्यावर वेद त्यांस ओ देतात, तेंच नाव हें होय. ३१ ब्रह्माचें अनिर्वाच्यपण फिटावें, व ऐक्यरूप होऊन भेट व्हावी, असा वेदांनीं कृपावंत होऊन मंत्र शोधून काढला. ३२ मग ज्या मंत्रानें ब्रह्मास हांक मारली असतां तें सहज मागें असूनही पुढें उभें राहतें; ३३ परंतु वेदरूपी पर्वताच्या शिखरावर उपनिषद्रूपी नगरांत जे ब्रह्माच्या पंक्तीस असतात, त्यांनाच तें कळतें. ३४ फार काय, परंतु सृष्टि उत्पन्न करण्याची ब्रह्मदेवास जी शक्ति आली, ती ज्या एका नामाच्या अनुष्ठानानेंच प्राप्त झाली, ३५ परंतु हे वीरोत्तमा, सृष्टि उत्पन्न करण्याचे पूर्वी ब्रह्मदेव एकटा उत्पन्न झाल्यावर वेडाच होऊन गेला. ३६ ज्या मजपासून त्याची उत्पत्ति झाली, त्या ईश्वरासही तो ओळखीना, अथवा सृष्टिही उत्पन्न करूं शकेना; ती योग्यता ज्या एका नांवाच्या उच्चारानें त्यास प्राप्त झाली; ३७ ज्याचा अर्थ मनांत आणल्यावर, व ज्या तीन अक्षरांचा जप केल्यावर सृष्टि उत्पन्न करण्याची योग्यता त्यास आली, ३८ तेव्हां ब्राह्मण निर्माण करून त्यांना वेदांची आज्ञा मान्य करण्यास सांगून त्याचे निर्वाहाकरिता त्यानें त्यांस यज्ञाचें वगैरे आचरण करण्यास सांगितलें. ३९ नंतर अपार लोक उत्पन्न केले, कीं ज्यांची गणना करितां येत नाहीं; व तिन्ही भुवनें हीं ब्रह्मदेवानें त्यांस अग्रहार करून दिलीं. ३४० श्रीलक्ष्मीपति म्हणतात:—अशा प्रकारें ज्या नाममंत्राच्या योगानें ब्रह्मदेव श्रेष्ठत्वास पावला, त्याचें लक्षण ऐक. ४१ तर सर्व मंत्रांत श्रेष्ठ जो ॐकार, तो मूळ अक्षर असें समज; आणि तत्कार दुसरें अक्षर, व सत्कार तिसरें होय. ४२ याप्रमाणें ॐतत्सत् असें तीन प्रकारचें ब्रह्माचें नांव आहे; आणि उपनिषदाचें हें जें नामरूपी सुंदर पुष्प, त्याचा तूं वास घे. ४३ याचें ऐक्य झाल्यावर जर सात्त्विक कर्माचें आचरण केलें, तर मोक्ष आपल्या घरचा चाकर होतो. ४४ परंतु दैवयोगानें जर कापुराचे अलंकार प्राप्त झाले, तर बाचारे, ते कसे वापरावे हें समजण्याचीच अडचण असते; ४५ तसें सत्कर्माचें आचरण करून ब्रह्माच्या नांवाचा जरी उच्चार केला, पण त्याचे व्यवस्थेचें वर्म जर माहीत नसलें; ४६ तर, साधुवृंद घरीं आले असतां त्यांचा सन्मान न करिता अपमान केला म्हणजे पुण्याचा क्षय होतो; ४७ अथवा टिका वगैरे सोन्याचे सुंदर डागिने एके ठिकाणीं बांधून ते जसे गळ्यांत अडकवावे, ४८ तसा तोंडानें ब्रह्माचे नांवाचा उच्चार केला, व

७ ब्राह्मण. ८ आज्ञा. ९ आचरण. १० निर्वाहाकरितां. ११ ब्रह्मदेवाला. १२ श्रेष्ठत्व. १३ ॐकार. १४ समज. १५ अलंकार. १६ अडचण. १७ ओढीनें. १८ अपमान. १९ मुद्दल.

मोट । गळां जेवीं ॥ ४८ ॥ तैसें तोंडीं ब्रह्मनाम । हातीं तें सात्त्विक कर्म। विनियोगेंवीण काम । विफळ होय ॥ ४९ ॥ अगा अन्न आणि भूक । पासीं असे परि देख । जेऊं नेणतां बाळक । लंघनचि कीं ॥ ३५० ॥ कां स्नेह सूत्र वैश्वानरा । जालियाही संसारा । हातवटी नेणतां वीरा । प्रकाशु नोहे ॥ ५१ ॥ तैसें वेळे कृत्य पावे । तेथींचा मंत्रुही आठवे । परि व्यर्थ तें आघवें । विनियोगेंवीण ॥ ५२ ॥ ( १०१३. नामाचा विनियोग, ३५३ ) म्हणौनि वर्णत्रयात्मक । जें हें परब्रह्मनाम एक । विनियोगु तूं आइक । याचा आतां ॥ ५३ ॥

तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः।
प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥

अन्वयः—तस्मात् ब्रह्मवादिनां विधानोक्ताः यज्ञदानतपःक्रियाः ॐ इति उदाहृत्य सततं प्रवर्तंते ॥ २४ ॥

( १०१४. नामाचा उच्चार करून यज्ञदानतप या कर्मांचा आरंभ करतात, ३५४–३५९ ) तरि या नामींचीं अक्षरें तिन्ही । कर्मा आदि मध्य निदानीं। प्रयोजावीं पैं स्थानीं । इहीं तिन्ही ॥ ५४ ॥ हेचि एकी हातवटी । घेउनी हन किरीटी । आले ब्रह्मविद भेटी । ब्रह्माचिये ॥ ५५ ॥ ब्रह्मेंसी होआवया एकी । ते न वचती यज्ञादिकीं । जें चाँवळलें वोळखी । शास्त्रांचिया ॥५६॥ तो आदि तंव ओंकारु । ध्यानें करिती गोचरु । पाठीं आणिती उच्चारु । वाचेही तो ॥ ५७ ॥ तेणें ध्यानें प्रकटे । प्रणवोच्चारें स्पष्टें । लागती मग वाटे । क्रियांचिये ॥ ५८ ॥ आंधारीं अभंगु दिवा । आडवीं समर्थु वोळावा । तैसा प्रणवो जाणावा । कर्मारंभीं ॥ ५९ ॥ ( १०१५. यज्ञारंभाचे पूर्वी प्रणवाचें ध्यान व उच्चार करतात, ३६०-३६२ ) उचित देवोद्देशें । द्रव्यें धर्म्यें आणि बहुवसें। द्विजद्वारा हन हुताशें । यजिती पैं ते ॥ ३६० ॥ आँहवनीयादि वन्हीं । निक्षेपरूपी हवनीं । यजिती पैं विधानीं । फुडें होउनी ॥ ६१ ॥ किंबहुना नाना याग । निष्पत्तीचें घेउनी अंग । करिती नावडतेया त्याग । उपाधीचा ॥६२॥ ( १०१६. दानाचे पूर्वी प्रणवाचें ध्यान व उच्चार करतात, ३६३ ) का न्यायें जोडला पवित्रीं। भूम्यादिकीं स्वतंत्रीं । देशकाळशुद्ध पात्रीं । देती दानें ॥ ६३ ॥ ( १०१७. तपाचे पूर्वी प्रणवाचें ध्यान व उच्चार, ३६४ ) अथवा एकांतरा कृच्छ्रीं । चांद्रायणें मासोपवासीं । शोषोनि गा धातुराशि । करिती तपें ॥ ६४ ॥ ( १०१८. कर्मे बंधक असून नामाचे साहाय्यानें मोक्षदायक होतात, ३६५-३६७ ) एवं यज्ञदानतपें । जियें गाजतीं बंधरूपें । तिहींच होय सोपें । मोक्षाचें तयां ॥ ६५ ॥ स्थळीं नावा जिया दाटिजे । जळीं तियांचि जेवीं तरिजे । तेवि बंधकीं कर्मी सुटिजे । नामें येणें

१ तेल. २ अग्नि. ३ मिळणी. ४ शेवटीं. ५ ब्रह्मज्ञानी. ६ त्याग करिती. ७ चर्चा केली.

हातानें सात्विक कर्माचें आचरण केलें, पण त्याची व्यवस्था माहीत नसली, तर तें सर्व कर्म व्यर्थ होय. ४९ अरे, अन्न जवळ असून भूकही लागली आहे; परंतु असें पहा कीं, लहान बालकास तें हातानें घेऊन तोंडांत घालण्याची व्यवस्था माहीत नसल्यामुळें त्यास लंघनच घडतें; ३५० अथवा अर्जुना, तेल, वात व अग्नि हीं एके ठिकाणीं असतांही दिवा कसा लावावा हें माहीत नसेल तर उजेड करतां येत नाहीं; ५१ त्याप्रमाणें, पर्वकाल प्राप्त होऊन, व कर्म करण्याची इच्छा होऊन त्या वेळचा मंत्रही जरी आठवला, तरी त्याची व्यवस्था माहीत नसल्यामुळें ते सर्व योग व्यर्थ होतात. ५२ म्हणून, तीन अक्षराचें जें हें परब्रह्माचें नांव, त्याची व्यवस्था कशी करावी ती सांगतों, ऐक. ५३

श्लोकार्थः—याकरितां, वेदवेत्त्याच्या यथाविधि यज्ञ, दान व तप या क्रिया ॐ या ब्रह्माच्या नावाचा उच्चार करून निरंतर चालू असतात ॥ २४ ॥

तर या परब्रह्म नांवाचीं जीं तीन अक्षरें आहेत, त्या तिहींची योजना कर्माच्या आधीं, मध्यें व शेवटीं करावी. ५४ हे किरीटी, याच हातोटीनें ब्रह्मज्ञान्यांना ब्रह्माची भेट होते. ५५ ज्यांनीं शास्त्राची माहिती करून घेतली आहे, ते ब्रह्माशीं ऐक्य होण्याकरितां यज्ञादि क्रियाचा त्याग करीत नाहींत. ५६ ते अगोदर ध्यानानें ॐकार सिद्ध करून मागून वाचेनें त्याचा उच्चार करतात. ५७ अशा रीतीनें ध्यान केल्यावर प्रणवोच्चार स्पष्ट करून मग क्रिया करण्यास आरंभ करितात. ५८ मग अंधेरांत न जाणाऱ्या दिव्याप्रमाणें अथवा अरण्यांत बरोबर असणाऱ्या बलवान सोबत्याप्रमाणें, कर्मारंभींचा प्रणवोच्चार ( कर्म करते वेळीं सोबत करतो ) असें समज. ५९ धर्मानें मिळविलेलें पुष्कळ द्रव्य वेदांत सांगितलेल्या देवतेला अर्पण करण्याच्या हेतूनें ब्राह्मणद्वारा अथवा अग्नीच्या मुखानें यज्ञ करतात; ३६० आहवनीय, गार्हपत्य व दक्षिण या तीन अग्नींत ते यथाविधि हवन करतात; ६१ फार काय, परंतु नानातऱ्हेचे यज्ञ उत्पन्न करून नावडत्या अहंकाराचा त्याग करतात, ६२ किंवा न्यायानें मिळविलेलें पवित्र द्रव्य व भूमि आदिकरून मुख्य दानें हीं देश-काल पाहून पवित्र ब्राह्मणांस देतात ६३ अथवा एक दिवसा-आड, किंवा एक महिन्याआड चांद्रायण व्रताचें आचरण करून आपलें शरीर शुद्ध करून तपाचें आचरण करतात. ६४ अशा प्रकारें यज्ञ, दान व तप हीं जीं कर्में बंधनरूप म्हणून प्रसिद्ध आहेत, त्यांचे ( आरंभीं प्रणवोच्चार केला असतां त्या ) योगानें मोक्ष सोपा होतो. ६५ नदीच्या कडेस असलेली नाव पाण्यात लोटते वेळीं जड लागते, परंतु तिच्याच योगानें पाण्यावरून तरून जातां येतें; त्याप्रमाणें, संसारांत पाडणारीं अशीं जीं कर्में, त्या कर्मांपासून या नामाच्या योगानें मनुष्य मुक्त होतो. ६६ परंतु या गोष्टी तशाच राहूं दे.

८ सिद्ध. ९ सोबती. १० आहवनीय, गार्हपत्य व दक्षिण हे तीन अग्नि. ११ अग्नींत यथाविधि तें. १२ दक्षतेनें. १३ उत्पन्न करून. १४ अहंकाराचा. १५ शरीर. १६ नदीच्या कडेस. १७ नाव. १८ जड जाते.

॥ ६६ ॥ परि हें असो ऐसिया । या यज्ञदानादि क्रिया । ओंकारें सांवायिलिया । प्रवर्तती ॥ ६७ ॥ अवतरणः—( १०१९. तत् नामाचें ध्यान करून कर्मफल ब्रह्मार्पण करतात, ३६८–३७२ ) तिया मोटाकिया जेथ फळीं । रिगों पाहाती निहाळीं । प्रयोजिती तिये काळीं । तच्छब्दु तो ॥ ६८ ॥

तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः ।
दानक्रियाश्च विविधाः क्रियंते मोक्षकांक्षिभिः ॥ २५ ॥

अन्वयः—मोक्षकांक्षिभिः तत् इति ( उदाहृत्य ) फलं अनभिसंधाय विविधाः यज्ञतपः क्रियाः च दानक्रियाः क्रियंते ॥ २५ ॥

जें सर्वांही जगापरौतें । जें एक सर्वही देखतें । जें तच्छब्दें बोलिजे तें । पैल वस्तु ॥ ६९ ॥ तें सर्वादिकत्वें चित्तीं । तद्रूप ध्यावूनियां सुमति । उच्चारेंही व्यक्ती । आणिती शुद्धती ॥ ३७० ॥ म्हणती तद्रूपा ब्रह्मा तया । फळेंसीं क्रिया इया । तेचि होतु आम्हां भोगावया । कांहींचि नुरो ॥ ७१ ॥ ऐसेंनि तदात्मकें ब्रह्में । तेथ उगौणूनि कर्में । आंग झाडिती न मेमें । येणें बोलें ॥ ७२ ॥ अवतरणः—( १०२०. परत्व असलेलें ब्रह्म आत्मत्वानें अनुभवास येण्याकरितां सत् शब्दाचा उपयोग करतात; अशा कर्माला प्रशस्त कर्म म्हणतात, ३७३–३७८ ) आतां ओंकारें आदरिलें । तत्कारें समर्पिलें । इया रिती जया आलें । ब्रह्मत्व कर्मा ॥ ७३ ॥ तें कर्म कीर ब्रह्माकारें । जालें तेणेंही न सरे । जें करी तेणेंसी दुसरें । आहे म्हणौनि ॥ ७४ ॥ मीठ आंगें जळीं विरे । परि क्षारता वेगळी उरे । तैसें कर्म ब्रह्माकारें । गमे तें द्वैत ॥ ७५ ॥ आणि दुजें जंव घडे । तंव संसारभय जोडे । हें देवो आपुलेनि तोंडें । बोलती वेद ॥ ७६ ॥ म्हणौनि परत्वें ब्रह्म असे । तें आत्मत्वें परियॆसे । सच्छब्द या रिणोद्देशें । ठेविला देवें ॥ ७७ ॥ तरि ओंकार तत्कारीं । कर्म केलें जें ब्रह्मशरीरीं । जें प्रशस्तादि बोलवरी । वाखाणिलें ॥ ७८ ॥ ( १०२१. सत् हें नाम कर्माचें आस्तित्व, चांगलेपणाकरितां उपयोग करितात, ३७९–३८४ ) प्रशस्तकर्मीं तिये । सच्छब्दा विनियोगु आहे । तोचि आइका होये । तैसा सांगों ॥ ७९ ॥

सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।
प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥

अन्वयः—ज्ञानिभिः, सत् इति एतत् सद्भावे च साधुभावे प्रयुज्यते; तथा, पार्थ प्रशस्ते कर्मणि सत् शब्दः युज्यते ॥ २६ ॥

तरि सच्छब्दें येणें । आटूनि असंताचें नाणें । दाविजे अव्यंगवाणें । सत्तेचें रूप ॥ ३८० ॥ जें सताचि काळें देशें । होऊं नेणेचि अनारिसें । आपणपां आपण असे । अखंडित ॥ ८१ ॥ हें दिसतें जेतुलें आहे । तें असतपणें जें नोहे ।

या यज्ञ, दान वगैरे ज्या क्रिया आहेत, त्या ॐकाराच्या साह्यानें योग्यतेस येतात. ६७ तीं कर्में फळाला आलीं असें ज्या वेळेस यांच्या दृष्टीस पडतें, त्या वेळेस 'तत्' शब्दाचा उपयोग करितात. ६८

श्लोकार्थः—मुमुक्षु जन 'तत्' या ब्रह्माच्या नांवाचा उच्चार करून फळाची आशा न धरितां यज्ञ, तप आणि दान यांच्या अनेक प्रकारच्या क्रिया करितात ॥ २५ ॥

जें सर्व जगाच्या पलीकडे आहे, व जें एकटें सर्वांला पाहूं शकतें, असें जें परब्रह्म तें 'तत्' या शब्दानें म्हणतात. ६९ अर्जुना, तें सर्वांच्याहून अगोदरचें आहे असें लक्षांत आणून त्याच्या रूपाचें ध्यान करून पुढें त्याचा 'तत्' उच्चार करतात; ३७० आणि असें म्हणतात कीं, तद्रूपी जें ब्रह्म, त्याला फळांसह सर्व क्रिया अर्पण असोत, आम्हांस भोगावयास कांहीं शिल्लक न राहोत. ७१ याप्रमाणें तत्स्वरूपी ब्रह्मास कर्में अर्पून तीं 'माझीं नव्हेत' असें म्हणून अंग झाडून मोकळे होतात. ७२ आतां, ॐकाराचा उच्चार करून ज्याचा आरंभ केला, व 'तत्' याचा उच्चार करून ज्याचें फळ अर्पण केलें आणि अशा रीतीनें ज्या कर्माला ब्रह्मत्व प्राप्त झालें, ७३ तें कर्म खरोखर जरी ब्रह्मरूप झालें, तरी तेवढ्यानेंच कार्यभाग होत नाहीं. कारण जो कर्म करणारा असतो, त्याचा दुजा भाव शिल्लक राहतो. ७४ मीठ पाण्यांत टाकलें असतां विरून जातें, परंतु त्याचा खारटपणा पाण्यापासून वेगळाच असतो; तसें कर्म ब्रह्माकार झालें असें समजणें तेंच द्वैत होय; ७५ आणि जोंपर्यंत द्वैत आहे, तोंपर्यंत संसारभय जात नाहीं, हें देव आपल्या तोंडानें सांगतात, व वेदही तसेंच सांगतात. ७६ म्हणून, ब्रह्माच्या ठिकाणीं असलेलें द्वैत हें 'सत्' शब्दाच्या ज्ञानानें निरसन होण्याकरितां देवांनीं 'सत्' शब्दाची योजना केली आहे. ७७ तर ॐकार व तत्कार यांच्या उच्चारानें केलेलें कर्म ब्रह्मस्वरूपी होतें, त्याला प्रशस्त कर्म असें म्हणतात. ७८ प्रशस्त कर्मांचे ठिकाणीं 'सत्' शब्दाचा उपयोग करतात, तो ऐकण्याजोगा आहे; तो सांगतों. ७९

श्लोकार्थः—'सत्' या ब्रह्माच्या नांवाची योजना ज्ञानी हे अस्तित्व आणि चांगलेपणा दाखविण्याकरिता करितात. तसेंच पार्था, शुभ कर्म दाखविण्यालाही 'सत्' हा शब्द योजीत असतात ॥ २६ ॥

तर या सत् शब्दानें असद्रूपी मिथ्या नाणें आटून सत्तेचें व्यंगरहित स्वरूप दृष्टीस पडतें. ३८० जें 'सत्' कोणत्याही काळीं अथवा कोणत्याही देशांत वस्तुशिवाय इतरासारखें होत नाहीं, व नेहमीं आत्मस्वरूपी असतें, ८१ हें जें सर्व दृश्यमान जगत्, ह्याचा मिथ्या भास ज्या 'सत्' शब्दाच्या लाभानें नाहींसा होऊन जें आत्मस्वरूपीं मिळतें, ८२ त्या या 'सत्' शब्दाच्या योगानें सर्वात्मक ब्रह्मरूपी झालेलें जें

१ साहाय्य झाल्यास. २ योग्यतेस येतात. ३ दृष्टीस पडतें. ४ अर्पण करून. ५ माझीं नाहींत. ६ निरानास पावे. ७ ब्रह्मस्वरूपी. ८ मिथ्या. ९ व्यंगरहित.

देखतां रूपीं सोये । लाभे जयाची ॥ ८२ ॥ तेणेंसी प्रशस्त तें कर्म । जें जालें सर्वात्मक ब्रह्म । देखिजे करूनि सम । ऐक्यनेंधें ॥ ८३ ॥ तरी ओंकारतत्कारीं । जें कर्म दाविलें ब्रह्माकारें । तें गिळूनि होइजे एकसरें । सन्मात्रचि ॥ ८४ ॥ ( १०२२. ज्ञानदेव म्हणतात हें बोलणें माझें नसून देवाचेंच आहे, ३८५-३८६ ) ऐसा हा अंतरंगु । सच्छब्दाचा विनियोगु । जाणा म्हणे श्रीरंगु । मी न म्हणे हो ॥ ८५ ॥ ना मीचि जरी हो म्हणें । तरी श्रीरंगीं दुजें हेंचि उणें । म्हणौनि हें बोलणें । देवाचेंचि ॥ ८६ ॥ ( १०२३. सत् नामाच्या विनियोगाचा अन्य प्रकार, ३८७-४०५ ) आतां आणिकीही परी । सच्छब्दु हा अवधारीं । सात्त्विक कर्मा करी । उपकारु जो ॥ ८७ ॥ तरी सत्कर्में चांगें । चालिलीं अधिकारबगें । परी एकाधें कां आंगें । हिणावती जैं ॥ ८८ ॥ तें उणें एकें अवयवें । शरीर ठाके आघवें । कां अंगहीनें न भौंडावे । रथाची गति ॥ ८९ ॥ तैसें एकेंचि गुणेंवीण । सताचि परी असतपण । कर्म धरीं गा जाण । जिये वेळे ॥ ३९० ॥ तेव्हां ओंकार तत्कारीं । सावांयिला हा चांगी परी । सच्छब्दु कर्मा करी । जीर्णोद्धारु ॥ ९१ ॥ तें असतपण फेडी । आणि सद्भावाचिये रूढी । निज सत्त्वाचिये प्रौढी । सच्छब्दु हा ॥ ९२ ॥ दिव्यौषध जैसें रोगिया । कां सांवावो ये भंगलिया । सच्छब्दु कर्मा व्यंगलिया । तैसा जाण ॥ ९३ ॥ अथवा कांहीं प्रमादें । कर्म आपुलिये मर्यादे । चुकोनि पडे निषिद्धें । वाटे हन ॥ ९४ ॥ चालतयाचे मार्गु सांडे । पारखियाचि अखरें पडे । रांहाटीमाजि न घडे । काई काई ॥ ९५ ॥ म्हणौनि तैसीं कर्मा । रांभेस्यं सांडे सीमा । असाधुत्वाचिया दुर्नामा । येवों पाहे जें ॥ ९६ ॥ तेथ गा हा सच्छब्दु । येरां[13] दोहींपरीस प्रबुध्दु । प्रयोजिला करी सोधु । कर्मातें यया ॥ ९७ ॥ लोहा परिसाची घृष्टि । वोहळा गंगेची भेटी । कां मृता जैसी वृष्टी । पीयूषाची ॥९८॥ पैं असाधुकर्मा तैसा । सच्छब्दप्रयोगु वीरेशा । हें असो गौरवुचि ऐसा । नामाचा यया ॥ ९९ ॥ घेऊनि येथींचें वर्म । जैं विचारिसी हें नाम । तैं केवळ हेंचि ब्रह्म । जाणसी तूं ॥ ४०० ॥ पाहें पां ॐतत्सत् ऐसें । हें बोलणें तेथ नेतसे । जेथूनि का हें प्रकाशे । दृश्यजात ॥ १ ॥ तें तंव निर्विशेष । परब्रह्म चोखट । तयाचें हें आंतुवट । व्यंजकें नाम ॥ २ ॥ परि आश्रयो आकाशा । आकाशाचि का जैसा । या नामा नामीं आश्रयो तैसा । अभेदु असे ॥ ३ ॥ उदयिला आकाशीं । रविचि रवीतें प्रकाशी । हे नामव्यक्ति तैसी । ब्रह्मचि करी ॥४॥ म्हणौनि त्र्यक्षर हें नाम । नव्हे जाण केवळ ब्रह्म । अवतरणः—यालागीं कर्म । जें जें कीजे ॥५॥

---

१ ब्रह्म. २ रथाचा एखादा भाग कमी असला तर. ३ बंद होते. ४ सहाय झालेला. ५ आपल्या तेजाच्या. ६ बळानें. ७ शक्ति. ८ दाडगाईनें. ९ भ्रम. १० व्यवहार. ११ अविचारानें. १२ निषिद्ध कर्माच्या. १३ ॐकार व तत्कार. १४ ज्ञाता. १५ चांगलें. १६ घर्षण. १७ अमृताची.

प्रशस्त कर्म, तें कर्म करणाराचें द्वैत फेडून ऐक्यास नेतें. ८३ तर ॐकार व तत्कार यांच्या योगानें कर्म ब्रह्माकार होतें, हेंही म्हणणें ' सत् ' शब्दाच्या प्रकाशानें नाहींसें होतें. ८४ याप्रमाणें ही ' सत् ' शब्दाची अंतर्गत व्यवस्था समजा, असें श्रीरंग म्हणाले. ( ज्ञानेश्वर म्हणतात:– ) मी म्हणत नाहीं हो ! ८५ मीच म्हणतों असें जर म्हटलें, तर श्रीरंगाचे ठिकाणीं द्वैताचा भाव उत्पन्न होऊन उणेपणा येतो; म्हणून हें देवांचेंच म्हणणें आहे. ८६ आतां ' सत् ' शब्द हा दुसऱ्या तऱ्हेनें सात्विक कर्मावर उपकार करतो, तो ऐक. ८७ तर सत्कर्में यथाविधि उत्तम प्रकारें चाललीं असतां त्यांत एखाद्या बाजूनें जेव्हां उणेपणा येतो, ८८ तेव्हां, शरीराचा एखादा अवयव कमी असला म्हणजे जसे शरीराचे व्यापार थांबतात, किंवा रथाचा एखादा भाग कमी झाल्यावर रथाची गति जशी कमी होते, ८९ तसें कर्म सत् ( उत्तम ) खरें, परंतु ज्या वेळीं एखाद्याच गुणाच्या अभावीं तें असत् होतें, ३९० तेव्हां ॐकार व तत्कार यांच्या साहाय्यानें ' सत् ' शब्द हा त्या व्यंग कर्माचा उत्तम प्रकारें जीर्णोद्धार करतो; ९१ आणि आपल्या तेजाचे जोरानें कर्माचें व्यंग नाहींसें करून त्यास सद्भावाच्या योग्यतेस आणतो. ९२ दिव्य औषध जसें रोग्याला बरें करतें, किंवा एखाद्याचा पराजय झाला असतां त्यास साह्य मिळाल्यावर जशी दुप्पट शक्ति येते, तसा ' सत् ' हा शब्द व्यंग कर्माचा न्यूनपणा नाहींसा करतो असें समज. ९३ अथवा काहीं प्रमादानें कर्म आपली मर्यादा सोडून जर निषिध्द मार्गानें गेलें; ९४ चालणारा आहे तोच मार्ग चुकतो, आणि परीक्षकालाच भ्रम होतो; तर व्यवहारांत काय काय होत नाहीं ? ९५ म्हणून, तशी कर्माची अविचारानें मर्यादा सुटून त्याला जर निषिद्ध कर्माचें वाईट नांव प्राप्त झालें, ९६ तर दोहोंपेक्षां ज्ञाता असा जो हा ' सत् ' शब्द, त्याची योजना केली असतां हा वाईट कर्माचें चांगलें कर्म करितो. ९७ लोखंडाला जसें परिसाचें घर्षण, ओढ्यास जशी गंगेची भेट, अथवा मेलेल्या मनुष्यास जशी अमृताची वृष्टि, ९८ तसा, हे वीरेशा, असत् कर्माला ' सत् ' ह्या शब्दाचा प्रयोग होय. फार काय सांगावें ? ' सत् ' या नामाचा महिमाच असा आहे. ९९ अशा रीतीनें सत् शब्दाचें वर्म जाणून घेऊन जेव्हां तूं त्या नामाचा उच्चार करशील, तेव्हां हेंच केवळ ब्रह्म आहे, असें तुला समजेल. ४०० हें पहा, ॐतत्सत् हीं अक्षरें मुमुक्षूस त्या ठिकाणीं नेतात, कीं ज्या ब्रह्मापासून दृष्टिगोचर सर्व पदार्थ प्रकाशमान होतात. १ तें परब्रह्म स्वच्छ असून अपरिछिन्न आहे, व ॐतत्सत् हें त्याचें अंतर्गत दर्शक नाम आहे. २ परंतु आकाशाला जसा आकाशाचाच आश्रय आहे, तसा ॐतत्सत् या अक्षरांना ब्रह्माचाच आश्रय आहे. ३ आकाशात उदय पावल्यावर सूर्यच सूर्याला प्रकाशित करितो, त्याप्रमाणें या नावाचे उच्चाराबरोबर ब्रह्माची प्राप्ति होते. ४ म्हणून हें त्र्यक्षरी नाव नसून केवळ ब्रह्म आहे असें समज, आणि याप्रीत्यर्थ जें जें कर्म तूं करशील, ५

१८ अपरिच्छिन्न. १९ अंतर्गत. २० दर्शक.

यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।
कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥

अन्वयः—यज्ञे, दाने च तपसि या स्थितिः सा सत् इति उच्यते; तदर्थीयं च यत् कर्म, तत् सत् इति अभिधीयते एव ॥ २७ ॥

( १०२४. ब्रह्मासाठीं केलेल्या कर्माला सत् म्हणतात, ४०६-४१३ ) तें याग अथवा दानें । तपादिकेंही गहनें । तियें निफजतु का न्यूनें । होऊनि ठातु ॥ ६ ॥ परि परिसाचा वेंरकलीं । नाहीं चोखाकिडाची बोली । तैसीं ब्रह्मीं अर्पितां केलीं । ब्रह्मचि होती ॥ ७ ॥ उणिया पुरयाची परी । नुरेचि तेथ अवधारीं । निवडूं न येती सागरीं । जैसिया नदी ॥ ८ ॥ एवं पार्था तुजप्रती । ब्रह्मनामाची हे शक्ति । सांगितली उपपत्ति । डोळसा गा ॥ ९ ॥ आणि येकें कांहीं अक्षरा । वेगळवेगळा वीरा । विनियोगु नागरा । बोलिलों रीती ॥ ४१० ॥ एवं ऐसें सुमहिम । म्हणौनि हें ब्रह्मनाम । आतां जाणितलें कीं सुवर्म । राया तुवां ॥ ११ ॥ तरी येथूनि याचि श्रद्धा । उपलविली[3] हो सर्वदा । जयाचें जालें बंधा । उरों नेदी ॥ १२ ॥ जिये कर्मी हा प्रयोगु । अनुष्ठिजे सद्विनियोगु । तेथ अनुष्ठिला सांगु । वेदुचि तो ॥ १३ ॥

अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥

अन्वयः—पार्थ, अश्रद्धया हुतं, दत्तं, तपः तप्तं च यत् कृतं, तत् असत् इति उच्यते. तत् प्रेत्य च इहापि ( फलप्रदं ) नो ( भवति ). ॥ २८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
श्रद्धात्रयविभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

( १०२५. अश्रद्धेनें केलेलें कर्म असत् होतें व ह्या लोकीं व परलोकीं फल देत नाहीं, ४१४-४२३ ) ना सांडूनि हे सोये[4] । मोडूनि श्रद्धेची बाहे[5] । दुराग्रहाची श्रीये । वाढऊनियां ॥ १४ ॥ मग अश्वमेध कोडी कीजे । रत्नें भरोनि पृथ्वी दीजे । एकांगुष्ठींही तपिजे । तपसाहस्रीं ॥ १५ ॥ जळाशयाचेनि नांवें । समुद्रही कीजती नवे । परि किंबहुना आघवें । वृथाचि तें ॥ १६ ॥ खडकावरी वर्षलें । जैसें भस्मीं हवन केलें । कां खेंव दीधलें । साउलियें ॥ १७ ॥ नातरि जैसें चंडकणा । गगन हाणितलें अर्जुना । तैसा समारंभु सुणा । गेलाचि तो ॥ १८ ॥ घाणा गाळिले गुंडे । तेथ तेल ना पेंडी जोडे । तैसें दरिद्र तेवढें । ठेलेंचि आंगीं ॥ १९ ॥ गांठीं बांधली खापरी । येथ अथवा पैलतीरीं । न सरोनि जैसी मारी । उपवासीं गा ॥ ४२० ॥ तैसें कर्मजातें तेणें । नाहीं ऐहिकींचें भोगणें । तेथ परत्र तें कवणें । अपेक्षावें ॥ २१ ॥ म्हणौनि ब्रह्मनामश्रद्धा । सांडूनि कीजे जो धांदा । हें असो सिणु नुसधा । दृष्टादृष्टीं तो ॥ २२ ॥ ऐसें कलुषकरी-केसरी । त्रिताप-तिमिर-तमारि[6] । श्रीवर वीर नरहरि । बोलिले तेणें

श्लोकार्थः—यज्ञ, दान व तप यामध्यें तत्पर असणें याला 'सत्' म्हणतात, आणि त्याच्यासाठीं केलेलें जें कर्म, त्यालाही सत् असेंच म्हणतात ॥ २७ ॥

आणि त्या कर्मामध्यें आरंभींच कांहीं व्यंग उत्पन्न होवो, किंवा तीं आरंभूनहि अपूर्ण राहोत; यज्ञ, दानें, किंवा गहन तपें असोत, ६ पण परिसाच्या स्पर्शानें झालेल्या सोन्याच्या कसोटींत उत्तम किंवा हिणकट ह्याची भासही नसते, त्याप्रमाणें केलेलीं कर्में ब्रह्मार्पण केलीं असतां ब्रह्मरूपच होतात; ७ आणि ज्याप्रमाणें समुद्रामध्यें नद्या निवडतां येत नाहींत, त्याप्रमाणें त्या कर्मांच्या ठिकाणीं पूर्णापूर्ण ( उत्तम किंवा निषिद्ध ) हा भेद उरत नाहीं, समजलास ? ८ याप्रमाणें, हे ज्ञानवंता अर्जुना, ब्रह्मनामाची शक्ति तुला दृष्टांतपूर्वक उघड करून सांगितली; ९ आणि हे वीरा, ब्रह्मनामाच्या एकेक अक्षराचीही निरनिराळी व्यवस्था तुला चांगल्या रीतीनें सांगितली. ४१० याप्रमाणें अर्जुना, ब्रह्मनामाची ही अशी थोरवी आहे हें वर्मे तुला समजलें ना ? ११ तर यापुढें नेहमीं याच नामावर श्रद्धा ठेवलीस, तर जन्मबंधनापासून तूं मुक्त होशील १२ जें कर्म करतांना या शब्दाचा उत्तम रीतीनें उपयोग करण्यात येईल, तें कर्म पूर्ण होऊन वेदरूपीच होईल. १३

श्लोकार्थः—पार्था, श्रद्धेवांचून केलेलें यज्ञ, दान, तप आणि कोणतेंही कर्म याला 'असत्' असें म्हणतात. तें परलोकीं फलप्रद होत नाहीं, व या लोकींही फलप्रद होत नाहीं ॥ २८ ॥

अथवा हा मार्ग सोडून, श्रद्धा नाहींशी करून व दुराग्रहाचें बल वाढवून, १४ मग कोट्यवधि अश्वमेध यज्ञ केले, सर्व पृथ्वी रत्नांनीं भरून दान दिली, एक अंगुष्ठावर उभें राहून सहस्रावधि वर्षें तपश्चर्या केली, १५ आणि जलाशयाप्रमाणें गोड्या पाण्याचा समुद्र बांधला, तरी तें सर्व व्यर्थ होय. १६ खडकावर वृष्टि व्हावी, किंवा भस्मांत आहुति द्यावी, अथवा सावलीस आलिंगन द्यावें, १७ किंवा अर्जुना, आकाशास चडकण मारावी, त्याप्रमाणें हे सर्व समारंभ फुकट जातात ! १८ घाण्यांत जर गोटे घालून गाळले, तर त्यापासून तेल अथवा पेंड प्राप्त होत नाहीं; त्याप्रमाणें, या गोष्टीपासून दरिद्रच प्राप्त होणार ! १९ पदरांत खापरखुंटी बांधून या देशांत अथवा दुसऱ्या देशांत गेलें तरी जशी ती जवळची नाहींशी न होतां उपाशीं मारते, ४२० तसें त्या सर्व कर्मांचे आचरणापासून इहलोकीं सुख मिळत नाहीं; मग परलोकच्या सुखाची इच्छा कशास करावी ? २१ म्हणून ब्रह्माचे ठिकाणीं श्रद्धा न ठेवतां ( ब्रह्मार्पण न करतां ) जें कर्म करावें, त्यांत कांहीं अर्थ नाहीं;—तो इहपरलोकीं केवळ शीण होय ! २२ असें पातकगजाचा सिंह, त्रितापरूपी अंधकाराचा सूर्य, लक्ष्मीपति व सर्व वीरामध्यें श्रेष्ठ असा जो श्रीकृष्ण परमात्मा, तो बोलला. २३ तेव्हां, आत्मानंदांत

१ कसोटींत. २ चागनी. ३ ठेवलीस; विस्तारलीस. ४ मार्ग. ५ हात; आश्रय. ६ प्राबल्य. ७ तलाव वगैरेंच्या. ८ थप्पड. ९ फुकट; व्यर्थ. १० शीण. ११ इहलोकीं. १२ पातकरूपी हत्तीचा नाश करणारा सिंह. १३ आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक ताप एतद्रूपी अंधकाराचा नाश करणारा सूर्य.

|| २३ || ( १०२६. संजय सुखप्राप्तीमुळें अर्जुनाला गुरु मानतो; काव्यप्रतिभा, ४२४-४३० ) तेथ निजानंदा वहुवेसा- | माजी अर्जुनु तो सहसा | हरपला चंद्रु जैसा | चांदिणेनि || २४ || अहो संग्रामु हा वाणिया | मापें नारांचांचिया आणिया | सूनि माप घे मर्वाणिया | जीवितेंसी || २५ || ऐसिया समयीं कैर्कशें | भोगीजत स्वानंदराज्य कैसें | आजि भाग्योदयो हा नसे | आणिके ठायीं || २६ || संजयो म्हणे कौरवराया | गुणा रिझों ये रिपूचिया | आणि गुरुही हा आमुचिया | सुखाचा येथ || २७ || हा न पुसता हे गोठी | तरी देव कां सोडिते गांठी | तरी कैसेनि आम्हां भेटी | परमार्थेंसी || २८ || होतों अज्ञानाच्या आंधारां | वोसंतीतें जन्मवार्हरा | तों आत्मप्रकाशमांदिरा- | आंतु आणिलें ||२९|| येवढा आम्हां तुम्हां थोरु | केला येणें उपकारु | म्हणौनि हा व्यास-सहोदरु | गुरुत्वें होय || ४३० || ( १०२७. अर्जुनाची स्तुति राजाला आवडणार नाहीं, म्हणून अर्जुनानें देवाला विचारली ती गोष्ट सांगेल, ४३१–४३२ ) तेविंचि संजयो म्हणे चित्तीं | हा अतिशयो या नृपती | खुपेल म्हणौनि किती | बोलत असों || ३१ || ऐसी हे बोली सांडिली | मग येरीचि गोठी आदरिली | जे पार्थे कां पुसिली | श्रीकृष्णातें || ३२ || ( १०२८. ज्ञानदेव तीच गोष्ट सांगतात, ४३३ ) याचें जैसें कां करणें | तैसें मीही करीन बोलणें | ऐकिजो ज्ञानदेवो म्हणे | निवृत्तीचा || ४३३ ||

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां सप्तदशोऽध्यायः || १७ ||

अध्याय १७, ओवी ४३३.

---

१ निमग्न झालेला. २ वाणी. ३ बाणांच्या. ४ मोजणी. ५ दुर्धट. ६ प्रीति उत्पन्न होते. ७ करीत. ८ येरझारा. ९ बंधु.

निमग्न झालेला अर्जुन हा पौर्णिमेच्या चांदण्यानें चंद्र हारपला जातो तसा हारपला. ( मागें पडला. ) २४ अहो, संग्राम हा केवळ वाणी असून बाणांचीं टोंकें हींच त्याचीं मापें होत, त्यांनीं जीविताचें जणूं काय मापच घेतो आहे, २५ अशा दुर्घट प्रसंगीं आत्मानंदाचे भरांत अर्जुन कसा निमग्न झाला आहे ? आज ह्याच्याप्रमाणें दुसऱ्या कोणाचे भाग्य उदयास आलेलें दिसत नाहीं ! २६ संजय म्हणतो:—हे कौरवेश्वरा धृतराष्ट्रा, शत्रूचे ( अर्जुनाचे ) गुण पाहून प्रीति उत्पन्न होते, आणि आमच्या सुखप्राप्तीला हाच येथें गुरु ( कारण ) झाला आहे. २७ जर ह्यानें ही गोष्ट विचारली नसती, तर देवानीं आपलें हृद्गत कशाला सांगितलें असतें व आम्हास परमार्थाची भेट तरी कशी झाली असती ? २८ अज्ञानरूपी अंधकारात जन्ममरणाच्या येरझारा करीत पडलों होतों, तों आत्मप्रकाशरूपी मंदिरांत मला आणून सोडलें. २९ एवढा माझ्यावर व तुझ्यावर उपकार केला आहे, म्हणून हा व्यासाप्रमाणेच आमचा गुरु झाला. ४३० इतक्यांत संजय आपले मनात म्हणाला कीं, मीं जी अर्जुनाची अतिशय स्तुति केली, ती धृतराष्ट्रास सहन होणार नाहीं; तेव्हा आता फार बोलूं नये. ३१ याप्रमाणें संजयानें ही गोष्ट सोडून, अर्जुनाने श्रीकृष्णास दुसरीच गोष्ट विचारली ती सांगण्यास आरंभ केला. ३२ निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात.—त्याने जशी आपली गोष्ट फिरविली, तशी मीही सांगतों, ती ऐका. ४३३

अध्याय १७, ओंव्या ४३३.

---

# ज्ञानेश्वरी

## अध्याय अठरावा.

( १०२९. सद्गुरूंचा जयजयकार, काव्यप्रतिभा, १–१० ) जयजय देव निर्मळ । निजजनाखिलमंगळ । जन्मजरा-जलदजाळ । प्रभंजन ॥ १ ॥ जयज देव प्रबळ । विदळितामंगळकुळ । निगमागमद्रुमफळ । फलप्रद ॥ २ ॥ जयज देव सकल । विगतविषय-वत्सल । कलितकाळकौतूहल । कलातीत ॥ ३ ॥ ज जय देव निश्चळ । चलचित्तपान-तुंदिल । जगदुन्मीलनाविरल । केलिप्रिय ॥ ४ जयजय देव निखळ । स्फुरदमंदानंदबहळ । नित्यनिरस्ताखिल-मळ । मूळभृ ॥ ५ ॥ जयजय देव स्वप्रभ । जगदंबुद-गर्भनभ । भुवनोद्भवारंभस्तंभ । भवध्वं ॥ ६ ॥ जयजय देव विशुद्ध । विद्वुदयोद्यान-द्विरद । शमदम-मदनमद । दयार्ण ॥ ७ ॥ जयजय देवैकरूप । अतिकृतकंदर्प-सर्पदर्प । भक्तभावे-भुवनदीप । ताप पहै ॥८॥ जयजय देव अद्वितीय । परिणतोपरमैकप्रिय । निजजनजित भजनीय मायागम्य ॥ ९ ॥ जयजय देव श्रीगुरो । अकल्पनाख्यकल्पतरो । स्वसंविद्द्रुमबीज प्ररो- । हणावनी ॥ १० ॥ ( १०३०. निर्विशेष स्वरूपाचें वर्णन करण्यास लाज वाटते काव्यप्रतिभा, ११-१२ ) हें काय एकैक ऐसैसें । नानापरिभाषावशें । स्तोत्र करूं तुजोद्देशें । निर्विशेषा ॥ ११ ॥ जिहीं विशेषणीं विशेषिजे । तें दृश्य नव्हे रूप तुझें । हें जाणें मी म्हणोनि लाजें । वानणां इहीं ॥ १२ ॥ ( १०३१. स्तवनानें वाणीला वेड लावलें; काव्यप्रतिभा, १३-१८ ) परी मर्यादेचा सागरु । हा तंवचि

१ आपल्या भक्ताचें सर्वथैव मंगल करणारे. २ जन्मवार्धक्यरूपी मेघाचा. ३ नाश करणारा वायु. ४ दुःखाचा समूळ नाश करणारे. ५ वेदशास्त्ररूपी वृक्षाचें फळ. ६ विषयाचा त्याग करणारावर कृपा करणारे. ७ नाश करणाऱ्या कालाच्या क्रीडेस लीलेनें कारण आहांत. ८ चंचल चित्ताच्या प्राशनानें दोंद वाढलें आहे. ९ वरचेवर जग उत्पन्न करून. १० क्रिया करण्याची आवड आहे. ११ आनंदाला स्फूर्ति देणारे. १२ सर्व पापांचें नित्य निरसन करणारे. १३ स्वयंप्रकाश. १४ जगद्रूप मेघाचें धारण करणारें आकाश. १५ जगद्रूप उत्पत्तीचे मूळस्तंभ. १६ संसाराचा नाश करणारे. १७ उपाधिरहित. १८ विद्यारूपी बागेचा नाश करणारे हत्ती. १९ काममदाचा शमदमें करून नाश करणारे. २० दयेचे समुद्र. २१ कामरूपी सर्पाचे गर्वाचा तिरस्कार करणारे. २२ भाविक भक्ताचे चित्तरूपी मंदिरांतील दीप. २३ संसाररूपी तापाचा नाश करणारे. २४ पूर्ण मग्न झालेल्या मनुष्यावर प्रेम करणारे. २५ भक्ताधीन. २६ भजनास योग्य. २७ मायेस अगम्य. २८ कल्पनातीत वस्तूचे कल्पतरु. २९ आपल्या ज्ञानवृक्षाच्या बीजाचें उत्पत्तिस्थान. ३० अनेक

# ज्ञानेश्वरी

## अध्याय अठरावा.

हे देवा, तुम्ही निर्मळ असून आपल्या भक्तांचें सर्वथैव मंगल करणारे आहां; आणि जन्म व वार्धक्य एतद्रूपी मेघाचा नाश करणारे वायुच आहां. तुमचा जयजयकार असो! १ देवा, तुम्ही सर्वांत बलवान असून दुःखाचा समूळ नाश करणारे आहां, व वेद व शास्त्ररूपी वृक्षाचें फल असून लाभदायक आहां. तुमचा जयजयकार असो! २ देवा, तुम्ही संपूर्ण असून, ज्यांनीं विषयांचा त्याग केला आहे त्यांच्यावर कृपा करणारे आहां, व लीलेनें कालाच्या क्रीडेस आपण कारण असून कलातीत असे पूर्ण आहां. तुमचा जयजयकार असो! ३ देवा, तुम्ही अचल असून चंचल चित्ताच्या प्राशनानें तुमचें दोंद वाढलें आहे, आणि वरचेवर जग उत्पन्न करून क्रिया करण्याची तुम्हांस आवड आहे. तुमचा जयजयकार असो! ४ देवा, तुमचें रूप निवळ शुद्ध असून तुम्ही आनंदाला स्फूर्ति देणारे व सर्व पापाचें नित्य निरसन करणारे आहां, व सर्व जगास कारणीभूत आहां. तुमचा जयजयकार असो! ५ हे देवा, तुम्ही स्वयंप्रकाश आहां, व जगद्रूप मेघाचें धारण करणारें आकाशच आहां; तसेंच जगद्रूप उत्पत्तीचे मूळस्तंभ असून संसाराचा नाश करणारे आहां. तुमचा जयजयकार असो! ६ हे देवा, तुम्ही उपाधिरहित आहां, व विद्यारूपी बागेचा नाश करणारे हत्तीच आहां, आणि शमदमेंकरून काममदाचा नाश करणारे व दयेचे समुद्रच आहां. तुमचा जयजयकार असो! ७ हे देवा, तुमचें एकच रूप असून तुम्ही कामरूपी सर्पाच्या गर्वाचा तिरस्कार करणारे आहां, व भाविक भक्तांचे चित्तरूपी मंदिरांतील दीप आहां, आणि संसारतापाचा नाश करणारे आहां. तुमचा जयजयकार असो! ८ हे देवा, तुमचें रूप अद्वितीय असून तुम्ही पूर्ण नम्र झालेल्या मनुष्यावर प्रेम करणारे आहां; व भक्ताधीन असून भजनास योग्य व मायेस अगम्य आहां. तुमचा जयजयकार असो! ९ हे देवा गुरुराया, तुम्ही कल्पनातीत वस्तूंचे कल्पवृक्षच आहां, व आपल्या ज्ञानवृक्षाच्या बीजाचें उत्पत्तिस्थान आहां. तुमचा जयजयकार असो! १० याप्रमाणें अनेक प्रकारच्या प्रत्ययांनीं विशेषणें देण्यास योग्य नाहीं असे जे तुम्ही, त्या तुमची स्तुति किती करूं? ११ ज्या विशेषणांनीं तुमची स्तुति करावी, तें तुमचे स्पष्ट रूप नव्हे, हें मी जाणतों. म्हणून तुमचें वर्णन करण्यास मला लाज वाटते. १२ परंतु समुद्राला मर्यादा आहे, असा जो त्याचा लौकिक आहे, तो जोंपर्यंत चंद्र उगवला नाहीं तोंपर्यंतच! १३ सोमकांत मणि हा आपल्या स्वतःच्या उदकानें चंद्रास अर्घ्य देत नाहीं; तर चंद्रच

भाषा प्रकारानीं. ३१ तुझ्या उद्देशानें. ३२ विशेषण योग्य नाहीं असा. ३३ स्तुति करावी. ३४ वर्णन करण्यास.

तया डगैरु । जंव न देखे सुधाकरु[2] । उदया आला ॥ १३ ॥ सोमकांतु निज-निर्झरीं । चंद्रा अर्घ्यादिक न करी । तें तोचि अवधारीं । करवी कीं जी ॥ १४ ॥ नैणों कैसी वसंतसंगें । अवचितिया वृक्षाचीं अंगें । फुटती तैं तयांही जोगें । घरणें नोहे ॥ १५ ॥ पँद्मिनी रविकिरण । लाहे मग लाजे कवण । कां जळें शिवतलें लवण । आंग भुले ॥ १६ ॥ तैसा तूतें जेथ मी स्मरें । तेथ मीपण मी विसरें । मग जाँकळिला ढेंकरें । तृप्तु जैसा ॥ १७ ॥ मज तुवां जी केलें तैसें । माझें मीपण दवडूनि देशें । स्तुतिमिषेंच पां पिसें । बांधलें वाचे ॥ १८ ॥ ( १०३२. बोलणे नये हीच खरी स्तुति, काव्यप्रतिभा, १९-२९ ) ना येऱ्हवीं तरी आँठवी । राहोनि स्तुति जे करावी । तैं गुणागुणिया धरावी । सरोभरी कीं ॥ १९ ॥ तरी तूं जी एकरसाचें लिंग । केवीं करूं गुणागुणीं विभाग । मोतीं फोडोनि सांधितां चांग । कीं तैसेंचि भलें ॥ २० ॥ आणि बाप तूं माय । इहीं बोलीं ना स्तुति होय । डिंभोपाधिक आहे । विटाळ तेथें ॥ २१ ॥ जी जालेनि पाइकें आलें । तें गोसावीपण केवीं बोलें । ऐसें उपाधी उशिटलें । काय वर्णूं ॥ २२ ॥ जगीं आत्मा तूं एकसरा । हेंही म्हणतां दातारा । तरी आतुलें तूं बाहेरा । घापतोंसी ॥ २३ ॥ म्हणूनि सत्यचि तुजलागीं । स्तुति न देखों जी जगीं । मौनावांचूनि लेणें आंगीं । सुसीनाँ मा ॥ २४ ॥ स्तुति कांहीं[14] न बोलणें । पूजा कांहीं न करणें । सन्निधी कांहीं न होणें । तुझ्या ठायीं ॥ २५ ॥ ( १०३३. स्तवनाचें वेड लागलें म्हणून बोललों, तरी तें सहन करावें; काव्य, २६ ) तरी जितलें जैसें भुली । पिसें आलापु घाली । तैसें वानूं तें माउली । उपहासावें तुवां ॥ २६ ॥ ( १०३४. गीतार्थाचा शिक्का वाणीवर मारा, म्हणजे ती सज्जनांना मान्य होईल; काव्य, २७ ) आतां गीतार्थाची मुक्तमुद्रा । लावी माझिये वाग्मुद्रा । जे माने हे सभासदीं । सज्जनाच्या ॥ २७ ॥ ( १०३५. निवृत्तिनाथ म्हणतात—पुन:पुन्हा काय विचारतोस, २८ ) तेथ म्हणितलें श्रीनिवृत्ती । नको हें पुढत-पुढती । परिसीं लोहा घृष्टी किती । वेळवेळां कीजे गा ॥ २८ ॥ ( १०३६. अवधानाची प्रार्थना; काव्य, २९ ) तंव विनवी ज्ञानदेवो । म्हणे हो का जी पसावो । तरी अवधान देतु देवो । ग्रंथा आतां ॥ २९ ॥ ( १०३७. गीताप्रासादाचा १८ वा अध्याय हा कळस; काव्यप्रतिभा, ३०—३४ ) जी गीतारत्नप्रासादाचा । कळसु अर्थचिंतामणीचा । सर्व गीतादर्शनाचा । पाढाऊ जो ॥ ३० ॥ लोकीं तरी आथी ऐसें । जे दुरूनि कळसु दिसे । आणि भेटीचि होतवसे । देवतेची तिये ॥ ३१ ॥ तैसेंचि एथही आहे । जे एकेंचि येणें अध्यायें ।

१ लौकिक. २ चंद्र. ३ सूर्यविकासी कमळ. ४ व्यापतो. ५ आठवणीनें. ६ निवड. ७ लेंकराच्या उपाधिंनी. ८ धनीपणा. ९ जगदात्मा. १० एकदम. ११ अंतर्यामीचा. १२ काढणें. १३ धाउतां येत नाहींत. १४ वेगळेपणानें न उरणें. १५ घडवड. १६ स्पष्ट करण्याची मुद्रा.

त्याजकडून तें करवितो. १४ वसंत ऋतु सुरू झाल्याबरोबर वृक्षास एकदम पालवी कशी फुटते हें समजत नाहीं, त्याचप्रमाणें माझीही स्थिति झाली असें कां समजूं नये ? १५ सूर्यविकासी कमल सूर्यकिरण पडतांक्षणींच लज्जा सोडून प्रफुल्लित होतें, किंवा मीठ पाण्यांत घातल्यावर जसें तद्रूप होतें, १६ तसा जेव्हां मी तुमचें स्मरण करतों, तेव्हां आपलें स्वरूप विसरून जातों. मग, भोजनापासून तृप्त झालेला मनुष्य जसा ढेंकरावर ढेंकरा देतो, १७ तसें, हे प्रभो, माझें मीपण विसरून जाऊन तुमची स्तुति करण्याचें वेड माझे वाचेस लागलें आहे. अशी माझी स्थिति तुमचेमुळें झाली आहे. १८ किंवा जर मीं आपल्या आठवणीनें स्तुति करावी, तर तुमचे गुण व अवगुण यांची निवड केली पाहिजे. १९ तर हे प्रभो, तुम्ही एकरसाचेंच बनलेलें लिंग आहां, त्या आपले ठिकाणीं गुण व अवगुण यांची निवड कशी करूं ? हें पहा--मोतीं फोडून तें सांधीत बसण्यापेक्षां तें न फोडलेलेंच बरें नव्हे काय ? २० आणि तुम्ही मायबाप आहां असें म्हटलें, तर या बोलण्यानें स्तुति तर होणार नाहींच, पण माझ्या लेंकुरपणाच्या उपाधीनें आपल्याला विटाळ लागतो. ( कमीपणा येतो. ) २१ मी तुमचा चाकर होईन असें म्हटलें, तर तुम्हांस धनी म्हणून कसें म्हणूं ? अशा रीतीनें, आपल्या उपाधीच्या योगानें उष्टें झालेलें रूप, त्याचें काय वर्णन करूं ? २२ हे प्रभो, तुम्ही जगदात्मा आहां असें जर एकदम तुम्हांला म्हटलें, तर माझ्या अंतर्यामीं वास करणाऱ्या तुम्हांला मीं बाहेर काढल्याप्रमाणें होतें. २३ म्हणून, खरोखर पाहूं गेलें असतां या जगांत तुमची स्तुति करितां येत नाहीं; आणि मौनाशिवाय तुमचे अंगावर इतर दागिने चढवतां येत नाहींत. २४ तर कांहीं न बोलणें हीच आपली स्तुति, कांहीं न करणें हीच आपली पूजा, आणि वेगळेपणानें न उरणें ह्याच गोष्टी तुमच्या ठिकाणीं संभवतात. २५ तर जसा एखादा मनुष्य भ्रांतियुक्त होऊन वेडेपणानें बडबड करितो, त्याच प्रकारचें माझें वर्णन आहे. तर, हे गुरुमाउली, त्वां तें सहन करावें. २६ आतां तुम्ही माझ्या वाग्बुद्धीस गीतार्थ स्पष्ट करण्याची अशी मुद्रा ( शिक्का ) लावा कीं, जिच्या योगानें, मीं सांगितलेला अर्थ ह्या सज्जनाचे सभेत मान्य होईल. २७ तेव्हां श्रीनिवृत्ति महाराज म्हणाले कीं, " तूं अशी वारंवार आमची विनंती करूं नको. अरे, लोखंडाचें सुवर्ण करण्याकरितां परिसावर तें लोखंड वरचेवर का घासावें लागतें ? " २८ तेव्हां ज्ञानेश्वरानीं प्रार्थना केली कीं, महाराज, आपला ह्याच प्रसाद व्हावा कीं, मी जो आतां गीतेचा अर्थ सांगणार आहें, त्याकडे देवानीं लक्ष द्यावें. २९ गीताग्रंथ हें रत्नखचित देवालय असून, त्याचा कळस अर्थरूपी चिंतामणीचा आहे; असा कीं, ज्याचे दर्शनानें गीतेच्या दर्शनाचें फळ मिळतें. ३० जगांत रूढिही अशीच आहे कीं, कळसाचें दुरून दर्शन घेतलें असतां देवाल्यांतील देवतेच्या भेटीचेंच फळ प्राप्त होतें. ३१ तसाच येथेंही प्रकार आहे कीं, जो एकच अध्याय वाचला असतां सर्व गीताशास्त्र वाच-

१७ घर्षण. १८ प्रसाद. १९ देवालय. २० बोधक. २१ प्राप्त होते.

आघवाचि दृष्ट होये । गीतागमु हा ॥ ३२ ॥ मी कळसु याचि कारणें । अठरावा अध्यायो म्हणें । उवाइला बादरायणें । गीताप्रासादा ॥ ३३ ॥ नोहे कळसापरतें कांहीं । प्रासादीं काम नाहीं । तें सांगतसे गीता ही । संपलेपणें ॥ ३४ ॥ ( १०३८. गीतामंदिराचें काम करणारे कारागीर व्यास; काव्यप्रतिभा, ३५–४४ ) व्यासु सहजें सूत्रीं बोळी । तेणें निगमरत्नाचळीं । उपनिषदार्थांची मौळी-। माजी खांडिली[८] ॥ ३५ ॥ तेथ त्रिवर्गाचा अनुकारु । आडेंऊं निघाला जो अपारु । तो महाभारतप्राकारु । भोंवता केला ॥ ३६ ॥ माजी आत्मज्ञानाचें एकवट । देंळवाडें झाडूनि चोखट । घडिले पार्थवैकुंठ-। संवाद कुसरी ॥ ३७ ॥ [१६]निवृत्ति सूत्रें सोडवणियां । सर्व शास्त्रार्थ पुरेखाणिया । आंवो साधिला मांडणिया । मोक्षरेखेचा ॥ ३८ ॥ ऐसेनि करिता उभारा । पंधरा अध्यायांत पंधरा । भूमि निर्वाळिलिया पुरा । प्रासादु जाहला ॥ ३९ ॥ उपरि सोळावा अध्यावो । तो ग्रीवे[२३] घंटेचा आवो । सप्तदशु तोचि ठावो । पडघेंणिये ॥ ४० ॥ तयाहीवरी अष्टादशु । तो आपैसा मांडला कळसु । उपरि गीतादिकीं व्यासु । ध्वजें लागला ॥ ४१ ॥ म्हणोनि मागील जे अध्याय । ते चढते भूमीचे आय । तयाचें पुरें दावितahे । आपुल्या आंगीं ॥ ४२ ॥ जालया कामा नाहीं चोरी । ते कळसें होय उजरी । तेविं अष्टादशु विवरी । साद्यंत गीता ॥ ४३ ॥ ऐसा व्यासें विंदोणियें । गीताप्रासादु जोडणिये[२६] । आणूनि राखिले प्राणिये । नानापरी ॥ ४४ ॥ ( १०३९. गीतासेवनानें मोक्षच मिळतो, म्हणून १८ वा अध्याय कळस; काव्यप्रतिभा, ४५-४९ ) एक प्रदक्षिणा जपाचियां । बाहेरोनि करिती यया । एक ते श्रवणमिषें छाया । सेविती ययाची ॥ ४५ ॥ एक ते अवधानाचा पुरा । विडापैंउड भीतरा । घेऊनि रिघती गाभारां । अर्थज्ञानाच्या ॥ ४६ ॥ ते निजबोधें उराउरी । भेटती आत्मया श्रीहरी । परी मोक्षप्रासादीं सैरी । सर्वांही आथी ॥ ४७ ॥ समर्थाचिये पंक्तिभोजनें । तळिल्या वरिल्या एकचि पक्वान्नें । तेविं श्रवणें अर्थें पठणें । मोक्षुचि लाभे ॥ ४८ ॥ ऐसा गीता-वैष्णवप्रासादु । अठरावा अध्याय कळसु विशदु । म्यां म्हणितला हा भेदु । जाणोनियां ॥ ४९ ॥ ( १०४०. अठरा अध्याय झाले तरी देव एकच बोलले, त्याच धोरणानें ज्ञानेश्वर बोलले; काव्यप्रतिभा, ५०–५९ ) आतां सप्तदशापाठीं । अध्याय कैसेनि उठी । तो संबंधु सागों दिठी । दिसे तैसा ॥ ५० ॥ का गंगायमुना उदक । वोघबगें वेगळिक । दावी होऊनि

१ गीताशास्त्र. २ बसविला. ३ श्रीवेदव्यासांनीं. ४ सूत्रें. ५ कुशलतेनें. ६ वेदरूपी रत्नांचा पर्वत. ७ माळ जमिनींत. ८ खाण लावली. ९ धर्म, अर्थ व काम. १० भिन्न आकार. ११ गडगळ गोटे. १२ तट. १३ चिरे. १४ कृष्णार्जुन. १५ चातुर्यानें. १६ शानपर. १७ दोरी. १८ आखणी

त्याचें श्रेय येतें. ३२ याच कारणास्तव मीं या अठराव्या अध्यायास कळसाची उपमा दिली आहे, कीं जो वेदव्यासांनीं गीतारूपी देवालयावर बसविला आहे. ३३ देवालयावर कळस चढविल्यावर मग त्याचें जसें कोणतेंही काम करावयाचें उरत नाहीं, तसेंच हा अठरावा अध्याय गीता संपविली असें दर्शवितो. ३४ व्यासांनीं फार कुशलतेनें सूत्रें रचिलीं, त्यानींच वेदरूपी रत्नांच्या पर्वतावर उपनिषदार्थरूपी माळ जमिनींत खाण लाविली. ३५ त्या माळ जमिनीवर धर्म, अर्थ व काम एतद्रूपी भिन्नभिन्न आकाराचे पुष्कळ गडगळ गोटे निघाले, त्या धोंड्यांचा महाभारतरूपी देवालयाचे भोंवतीं तट बांधला. ३६ नंतर आत्मज्ञानरूपी एकसारखे उत्तम चिरे कृष्णार्जुनसंवादरूपी चातुर्यानें घडले. ३७ मग निवृत्तिरूपी दोरीनें आंखणी करून व सर्व शास्त्रांची पुरणी घालून मोक्ष-मर्यादेचा आय ( आकार ) साधला. ३८ याप्रमाणें देवालयाची रचना करितां करितां पंधरा अध्यायापर्यंत पंधरा थर होऊन गाभाऱ्याच्या भिंती डेऱ्यापर्यंत येऊन ठेपल्या. ३९ पुढें सोळावा अध्याय हा गळमण्याचा आकार असून, सतरावा अध्याय पडघाणी ( कळसाची बैठक ) होय. ४० त्या पडघाणीवर अठरावा अध्यायरूपी कळस उत्तम रीतीनें बसवून त्यावर व्यासकृत गीता हा ध्वज उभारला. ४१ म्हणून, मागचे जे अध्याय, ते एकावर एक चढते थर असून, त्यांची आपल्या योगानें पूर्णता झाली हें हा अठरावा अध्याय दाखवितो. ४२ कोणतेंही पुरें झालेलें काम चोरून न ठेवतां कळसाच्या योगानें स्पष्ट दृष्टीस पडतें, तसें अठराव्या अध्यायांत साद्यंत गीतेचें वर्णन आहे. ४३ याप्रमाणें व्यासांनीं कुशलतेनें गीतारूपी देवालय तयार करून प्राणिमात्राचा नानाप्रकारें उद्धार केला. ४४ कोणी बाहेरून प्रदक्षिणा करून जप करतात, ( गीतेचा पाठ करितात; ) कोणी श्रवणरूप छायेंत देवालयाचे भिंतीस टेंकून बसतात; ४५ कोणी अवधानरूपी विडा व पैसा घेऊन देवळाच्या अर्थज्ञानरूपी गाभाऱ्यांत शिरतात, ४६ ते आत्मबोधाच्या योगानें जगदात्मा श्रीहरीची सत्वर भेट घेतात. परंतु मोक्षरूपी देवालयांत या सर्वांची योग्यता सारखीच आहे. ४७ समर्थाचे घरीं भोजनास गेलें असता पंक्तींत वरच्या व खालच्या पानावर ज्याप्रमाणें एकसारखींच पक्वान्नें असतात, ( पंक्तिभेद नसतो, ) त्याप्रमाणें गीता श्रवण करणारास, अर्थ जाणणारास व पठन करणारास मोक्षच प्राप्त होतो. ४८ असो; गीताग्रंथ हा विष्णूचें देवालय असून, अठरावा अध्याय हा त्यावरील उघड कळस आहे, असा भेद मीं जाणून बुजून केला. ४९ आतां सतराव्या अध्यायापर्यंत सर्व अध्यायांची कशी उभारणी झाली आहे तें तुमच्या दृष्टीस पडेल असें समजून सांगतों. ५० प्रयागास गंगा व यमुना यांचे संगमाचे ठिकाणीं उदक जरी ओघाच्या बळानें निराळें दिसलें, तरी पाणी या भावनेनें तें एकच आहे. ५१ अर्ध-

२४ कळसाची बैठक. २५ कुशलतेनें. २६ तयार करून, २७ पाठाच्या. २८ विडा व पैसा, २९ योग्यता, ३० स्पष्ट,

एक । पाणीपणें ॥ ५१ ॥ न मोडतां दोन्ही आकार । घडिलें एक शरीर ।
हें अर्धनारीनटेश्वर- । रूपीं दिसे ॥ ५२ ॥ ना ना वाढली दिवसें । कळा
बिंबीं पैसे । परि सिनाने लेवे जैसे । चंद्रीं नाहीं ॥ ५३ ॥ तैसीं सिनानीं चारी
पदें । श्लोक तो श्लोकावच्छेदें । अध्यावो अध्यायभेदें । गमे कीर ॥ ५४ ॥ परी
प्रमेयांची उजरी । आनान रूप न धरी । नाना रत्नमणीं दोरी । एकचि जैसी
॥ ५५ ॥ मोतियें मिळोनि बहुवें । एकावेळींचा[2] पाडु आहे । परी शोभे रूप
होये । एकचि तेथ ॥ ५६ ॥ फुलां फुलसरां[4] लेख चढे । द्रुती[5] दुजी अंगुळी न
पडे । श्लोक अध्याय तेणें पाडें । जाणावे हे ॥ ५७ ॥ सात शतें श्लोक । अध्याया
अठरांचे लेख । परी देव बोलिले एक । जें दुजें नाहीं ॥ ५८ ॥ आणि म्यांही न
सांडोनि ते सोये । ग्रंथव्यक्ति[6] केली आहे । प्रस्तुत तेणें निर्वाहें[7] । निरूपण
आइका ॥ ५९ ॥ ( १०४१. सतराव्या अध्यायाचा अनुवाद; काव्य, ६०-६१ ) तरी
सतरावा अध्यावो । पावतां पुरता ठावो । जें संपता श्लोकीं देवो । बोलिले ऐसें
॥ ६० ॥ अर्जुना ब्रह्मनामाच्या विखीं । बुद्धि सांडूनि आस्तिकीं । कर्में कीजती
तितुकीं । असंतें[9] होती ॥ ६१ ॥ ( १०४२. कर्मामध्यें दोषच आहेत तर त्याग किंवा
संन्यास केलेला बरा असें अर्जुनाचें मत; काव्य, ६२-६९ ) हा ऐकोनि देवाचा बोलु ।
अर्जुना आला डोलु । म्हणे कर्मनिष्ठां मेळु । ठेविला देखों ॥ ६२ ॥ तो अज्ञा-
नांधु तंव बापुडा । ईश्वरुचि न देखे एवढा । तेथ नावेक पुढां । कां सुझे तया
॥ ६३ ॥ आणि रजतमें दोन्ही । गेलियावीण श्रद्धा सानी । ते[13] कां लागे
अभिधानीं । ब्रह्माचिये ॥ ६४ ॥ मग कोतौ खेंवें[16] देणें । वार्तेवरील धांवणें ।
सांडी[17] पडे खेळणें । नागिणीचें तें ॥ ६५ ॥ तैसीं कर्में दुवाडें । तया जन्मां-
तराची कडे । दुर्मेळवे येवढे । कर्मामाजीं ॥ ६६ ॥ ना विपायें हें उजू होये ।
तरी ज्ञानाची योग्यता लाहे । येऱ्हवीं येणेंचि जाये । निरयालया ॥ ६७ ॥ कर्मीं
हा ठायवरी । आहाती बहुवा अवसरी । आतां कर्मठां कैवारी । मोक्षाची हे
॥ ६८ ॥ तरी फिटो कर्माचा पांगु । कीजो अवघाचि त्यागु । आदरी जो
अव्यंगु । संन्यासु हा ॥ ६९ ॥ ( १०४३. त्याग-संन्यासाचें महत्त्व; काव्य, ७०-७२ )
कर्मबाधेची कहीं । जेथ भयाची गोठी नाहीं । तें आत्मज्ञान जिहीं । स्वाधीन
होय ॥ ७० ॥ ज्ञानाचे आवाहनमंत्र । जें ज्ञानपिक तें सुक्षेत्र । ज्ञान आकर्षितें
सूत्र । तंतु जे कां ॥ ७१ ॥ ते दोन्ही संन्यास-त्याग । अनुष्ठूनि सुटो जग ।
तरी हेंचि आतां चांग । व्यक्त पुसों ॥ ७२ ॥ ऐसें म्हणोनि पार्थे । त्यागसंन्यास

१ अर्थाची. २ माळ. ३ माळेचा पदर. ४ सुगंध. ५ मार्ग. ६ स्पष्टीकरण. ७ समजुतीनें. ८ श्रद्धा. ९ व्यर्थ. १० आनंद; प्रेम. ११ दोष. १२ समजेल. १३ कशी पात्र होईल. १४ नाव. १५ शहाला. १६ आलिंगन. १७ मरणास कारण होय. १८ दुष्टधर्म. १९ नरकप्राप्ति. २० अडचणी. २१ दैन्य.

नारीनटेश्वराचे रूपांत जसे स्त्री व पुरुष यांचे आकार कायम असून एकच शरीर दिसतें, ५२ शुद्ध पक्षांत चंद्राची कला जशी रोज वाढलेली दिसते, परंतु चंद्राचे दृष्टीनें पाहूं गेलें असतां तो पूर्णच आहे, ( त्याच्यावर निराळे थर नाहींत, ) ५३ तसे श्लोक चार चरणानीं वेगळे वेगळे दिसतात, व अध्याय अध्यायांमुळें वेगळे भासतात खरे; ५४ परंतु अर्थाच्या दृष्टीनें त्यांत भेद नाहीं. जशी पुष्कळ रत्नें धारण करणारी दोरी एकच असते; ५५ पुष्कळ मोतीं मिळून एकावळीची माळ तयार होते, परंतु सर्वांची कांति एकच असते; ५६ माळेंत फुलें ओंवण्यास लागल्यावर फुलांची संख्या वाढते, परंतु त्यांचा सुगंध घेऊं गेलें असतां संख्येकरितां दुसरें बोट घालावें लागत नाहीं, म्हणजे सारखाच सुगंध असतो; त्याचप्रमाणें, श्लोक व अध्याय हे जरी पुष्कळ असले तरी त्यांतील अर्थ एकच आहे. ५७ गीतेचे श्लोक सातशें असून अध्याय अठरा आहेत. परंतु देवानीं या सर्वांत एकाच तत्त्वाचें विवेचन केलें आहे; ५८ आणि मींही देवांचा मार्ग न सोडतां ग्रंथाचें स्पष्टीकरण केलें आहे. तूर्त ह्याच समजुतीनें मी अठरावा अध्याय सांगतों, तो ऐका. ५९ तर सतराव्या अध्यायांतील शेवटच्या श्लोकांत देव असें म्हणाले कीं, ६० " अर्जुना, ब्रह्मनामाच्याविषयीं श्रद्धा सोडून जितकीं कर्मे करशील, तितकीं व्यर्थ होत." ६१ असें देवांचें बोलणें ऐकून अर्जुनास मोठा आनंद झाला. आणि तो म्हणाला कीं, देवांनीं कर्मावर श्रद्धा ठेवणारास दोष ठेविला आहे. ६२ तो बिचारा अज्ञानामुळें अंध झालेला असल्यामुळें, सर्व जगतांत ईश्वर भरलेला आहे, हें त्यास समजलें नाहीं; मग तो प्रत्यक्ष त्याच्यापुढें असूनही ब्रह्मनामश्रद्धेचें वर्म त्यास कसें समजेल ? ६३ रज व तम या दोन्ही गुणांचा नाश झाल्याशिवाय जी श्रद्धा असते, ती ब्रह्माच्या श्रद्धेच्या नांवास कशी पात्र होईल ? ६४ *मग, शस्त्राला आलिंगन देणें, अथवा बातमी ऐकतांक्षणींच धावत सुटणें, व नागिणीला* हातांत धरून खेळविणें या गोष्टी जशा मरणास कारण होतात, ६५ तशीं कर्मे कठीण असून तीं जन्ममरण देण्यास कारणीभूत होतात, असे कर्मांचे दुष्ट धर्म आहेत. ६६ कदाचित् कर्मे यथासांग झालीं तर त्यांना ज्ञानाची योग्यता येते, व तेंच कर्म यथासांग न झाल्यास नरकप्राप्तीस कारण होतें. ६७ कर्म करणाराला अशा प्रकारच्या अडचणी पुष्कळ येतात, म्हणून त्यांचा कैवार घेऊन, त्यांना मोक्षप्राप्ति कशी होईल असा प्रश्न अर्जुनानें केला. ६८ तर कर्मांचें दैन्य फिटून व त्याचा सर्वत्याग करून, अव्यंग असा जो कर्मसंन्यास, त्याचा आदर करावा. ६९ ज्याच्या योगानें कर्मांच्या बाधेपासून भीति नसते, व आत्मज्ञान प्राप्त होतें, ७० व जो कर्मसंन्यास आणि कर्मत्याग हे ज्ञानाला आमंत्रण करण्याचे मंत्र, अथवा ज्ञान पिकण्याचें क्षेत्र अथवा ज्ञानाला आकर्षण करणाऱ्या सूत्राचे तंतु होत; ७१ ते दोन्ही संन्यास व त्याग यांचें अनुष्ठान करून जग मुक्त होवो, तर हेंच आतां उघड रीतीनें सां[illegible] असें देवास पुसावें. ७२ असें पार्थानें मनांत आणून, त्याग व संन्यास यांचें स्पष्टी[illegible] म्हणून प्रश्न केला. ७३ तेव्हां श्रीकृष्णानीं

एक । पाणीपणें ॥ ५१ ॥ न मोडतां दोन्ही आकार । वाढिलें एक शरीर । हें अर्धनारीनटेश्वर- । रूपीं दिसे ॥ ५२ ॥ ना ना वाढली दिवसें । कळा बिंबीं पैसे । परि सिनाने लेवे जैसे । चंद्रीं नाहीं ॥ ५३ ॥ तैसीं सिनानीं चारी पदें । श्लोक तो श्लोकावच्छेदें । अध्यावो अध्यायभेदें । गमे कीर ॥ ५४ ॥ परी प्रमेयाची उजरी । आनान रूप न धरी । नाना रत्नमणीं दोरी । एकचि जैसी ॥ ५५ ॥ मोतियें मिळोनि बहुवें । एकावळींचा पाडु आहे । परी शोभे रूप होये । एकचि तेथ ॥ ५६ ॥ फुलां फुलसरां लेख चढे । द्रुती दुजी अंगुळी न पडे । श्लोक अध्याय तेणें पाडें । जाणावे हे ॥ ५७ ॥ सात शतें श्लोक । अध्याया अठरांचे लेख । परी देव बोलिले एक । जें दुजें नाहीं ॥ ५८ ॥ आणि म्यांही न सांडोनि ते सोये । ग्रंथव्यक्ति केली आहे । प्रस्तुत तेणें निर्वाहें[7] । निरूपण आइका ॥ ५९ ॥ ( १०४१. सतराव्या अध्यायाचा अनुवाद; काव्य, ६०-६१ ) तरी सतरावा अध्यावो । पावतां पुरता ठावो । जें संपता श्लोकीं देवो । बोलिले ऐसें ॥ ६० ॥ अर्जुना ब्रह्मनामाच्या विखीं । बुद्धि सांडूनि आस्तिकीं । कर्मे कीजती तितुकीं । असंतें[9] होती ॥ ६१ ॥ ( १०४२. कर्मामध्यें दोषच आहेत तर त्याग किंवा संन्यास केलेला बरा असें अर्जुनाचें मत; काव्य, ६२-६९ ) हा ऐकोनि देवाचा बोलु । अर्जुना आला डोलु । म्हणे कर्मनिष्ठां मेळु । ठेविला देखों ॥ ६२ ॥ तो अज्ञानांधु तंव बापुडा । ईश्वराचि न देखे एवढा । तेथ नावेक पुढां । कां सुझे तया ॥ ६३ ॥ आणि रजतमें दोन्ही । गेलियावीण श्रद्धा सानी । ते [13]कां लागे अभिधानीं । ब्रह्माचिये ॥ ६४ ॥ मग कोतें खेंवें[16] देणें । वातेंवरील धांवणें । सांडी[17] पडे खेळणें । नागिणीचें तें ॥ ६५ ॥ तैसीं कर्मे दुवाडें । तया जन्मांतराची कडे । दुर्मेळीवे येवढे । कर्मामाजीं ॥ ६६ ॥ ना विपायें हें उजू होये । तरी ज्ञानाची योग्यता लाहे । येऱ्हवीं येणेंचि जाये । निरयालया ॥ ६७ ॥ कर्मीं हा ठायवरी । आहाती बहुवा अवंसरी । आतां कर्मठां कैवारी । मोक्षाची हे ॥ ६८ ॥ तरी फिटो कर्माचा पांगु[20] । कीजो अवघाचि त्यागु । आदरी जो अव्यंगु । संन्यासु हा ॥ ६९ ॥ ( १०४३. त्याग-संन्यासाचे महत्त्व; काव्य, ७०-७३ ) कर्मबाधेची कहीं । जेथ भयाची गोठी नाहीं । तें आत्मज्ञान जिहीं । स्वाधीन होय ॥ ७० ॥ ज्ञानाचे आवाहनमंत्र । जें ज्ञानपिक तें सुक्षेत्र । ज्ञान आकर्षितें सूत्र । तंतु जे कां ॥ ७१ ॥ ते दोन्ही संन्यास-त्याग । अनुष्ठानि सुटो जग । तरी हेंचि आतां चांग । व्यक्त पुसों ॥ ७२ ॥ ऐसें म्हणोनि पार्थे । त्यागसंन्यासें

१ अर्थाची. २ माळ. ३ माळेचा पदर. ४ सुगंध. ५ मार्ग ६ स्पष्टीकरण. ७ समजुतीनें. ८ श्रद्धा. ९ व्यर्थ. १० आनंद; प्रेम. ११ दोष. १२ समजेल. १३ कशी पात्र होईल. १४ नाव. १५ शत्राला. १६ आलिंगन. १७ मरणास कारण होय. १८ दुष्टधर्म. १९ नरकप्राप्ति. २० अडचणी. २१ दैन्य.

नारीनटेश्वराचे रूपांत जसे स्त्री व पुरुष याचे आकार कायम असून एकच शरीर दिसतें, ५२ शुद्ध पक्षांत चंद्राची कला जशी रोज वाढलेली दिसते, परंतु चंद्राचे दृष्टीनें पाहूं गेलें असतां तो पूर्णच आहे, ( त्याच्यावर निराळे थर नाहींत, ) ५३ तसे श्लोक चार चरणांनीं वेगळे वेगळे दिसतात, व अध्याय अध्यायांमुळें वेगळे भासतात खरे; ५४ परंतु अर्थाच्या दृष्टीनें त्यांत भेद नाहीं. जशी पुष्कळ रत्नें धारण करणारी दोरी एकच असते; ५५ पुष्कळ मोतीं मिळून एकावळीची माळ तयार होते, परंतु सर्वांची कांति एकच असते; ५६ माळेंत फुलें ओंवण्यास लागल्यावर फुलांची संख्या वाढते, परंतु त्यांचा सुगंध घेऊं गेलें असतां संख्येकरितां दुसरें बोट घालावें लागत नाहीं, म्हणजे सारखाच सुगंध असतो; त्याचप्रमाणें, श्लोक व अध्याय हे जरी पुष्कळ असले तरी त्यांतील अर्थ एकच आहे. ५७ गीतेचे श्लोक सातशें असून अध्याय अठरा आहेत. परंतु देवानीं या सर्वात एकाच तत्त्वाचें विवेचन केलें आहे; ५८ आणि मींही देवांचा मार्ग न सोडतां ग्रंथाचें स्पष्टीकरण केलें आहे. तूर्त ह्याच समजुतीनें मी अठरावा अध्याय सांगतों, तो ऐका. ५९ तर सतराव्या अध्यायांतील शेवटच्या श्लोकात देव असें म्हणाले कीं, ६० " अर्जुना, ब्रह्मनामाच्याविषयीं श्रद्धा सोडून जितकीं कर्मे करशील, तितकीं व्यर्थ होत." ६१ असें देवांचें बोलणें ऐकून अर्जुनास मोठा आनंद झाला. आणि तो म्हणाला कीं, देवांनी कर्मावर श्रद्धा ठेवणारास दोष ठेविला आहे. ६२ तो बिचारा अज्ञानामुळें अंध झालेला असल्यामुळें, सर्व जगतात ईश्वर भरलेला आहे, हें त्यास समजलें नाहीं; मग तो प्रत्यक्ष त्याच्यापुढें असूनही ब्रह्मनामश्रद्धेचें वर्म त्यास कसें समजेल ? ६३ रज व तम या दोन्ही गुणांचा नाश झाल्याशिवाय जी श्रद्धा असते, ती ब्रह्माच्या श्रद्धेच्या नांवास कशी पात्र होईल ? ६४ मग, शस्त्राला आलिंगन देणें, अथवा बातमी ऐकतांक्षणींच धावत सुटणें, व नागिणीला हातांत धरून खेळविणें या गोष्टी जशा मरणास कारण होतात, ६५ तशीं कर्मे कठीण असून तीं जन्ममरण देण्यास कारणीभूत होतात, असे कर्मांचे दुष्ट धर्म आहेत. ६६ कदाचित् कर्मे यथासांग झालीं तर त्यांना ज्ञानाची योग्यता येते, व तेंच कर्म यथासांग न झाल्यास नरकप्राप्तीस कारण होतें. ६७ कर्म करणाराला अशा प्रकारच्या अडचणी पुष्कळ येतात, म्हणून त्यांचा कैवार घेऊन, त्याना मोक्षप्राप्ति कशी होईल असा प्रश्न अर्जुनानें केला. ६८ तर कर्माचें दैन्य फिटून व त्याचा सर्वत्याग करून, अव्यंग असा जो कर्मसंन्यास, त्याचा आदर करावा. ६९ ज्याच्या योगानें कर्माच्या बाधेपासून भीति नसते, व आत्मज्ञान प्राप्त होतें, ७० व जो कर्मसंन्यास आणि कर्मत्याग हे ज्ञानाला आमंत्रण करण्याचे मंत्र, अथवा ज्ञान पिकण्याचें क्षेत्र अथवा ज्ञानाला आकर्षण करणाऱ्या सूत्राचे तंतु होत; ७१ ते दोन्ही संन्यास व त्याग यांचें अनुष्ठान करून जग मुक्त होवो, तर हेंच आता उघड रीतीनें सांगा असें देवास पुसावें. ७२ असें पार्थानें मनात आणून, त्याग व संन्यास यांचें स्पष्टीकरण व्हावें म्हणून प्रश्न केला . ७३ तेव्हां श्रीकृष्णांनीं

व्यवस्थे । रूप होआवया जेथें । प्रश्नु केला ॥ ७३ ॥ ( १०४४. देवाचें उत्तर तोच अठरावा अध्याय; काव्य, ७४-७५ ) तेथ प्रत्युत्तरें बोली । श्रीकृष्णें जे चावळिली । तया व्यक्ति जाली । अष्टादशा ॥ ७४ ॥ एवं जन्यजनकभावें । अध्यावो अध्यायातें प्रसवे । आतां ऐका बरवें । पुसिलें जें ॥ ७५ ॥ ( १०४५. अर्जुनाचा प्रश्न, ७६ ) तरि पंडुकुमरें तेणें । देवाचें सरतें बोलणें । जाणोनि अंतःकरणें । कोणी घेतली ॥ ७६ ॥ ( १०४६. देव बोलूं लागले; काव्यप्रतिभा, ७७-८३ ) येऱ्हवीं तत्त्वाविषयीं भला । तो निश्चितु असे कीर जाहला । परी देवो राहे उगला । तें साहावेना ॥ ७७ ॥ वत्स धालेयाही वरी । धेनू न वचावी दुरी । अनन्य प्रीतीची परी । ऐसी आहे ॥ ७८ ॥ तेणें काजेंवीणही बोलावें । तें देखिलें तरी पाहावें । भोगितां चाड दुणावे । पढियंताठायीं ॥ ७९ ॥ ऐसी प्रेमाची हे जाति । आणि पार्थ तंव तेचि मूर्ति । म्हणूनि करूं लाहे खंती । उगेपणाची ॥ ८० ॥ आणि संवादाचेनि मिषें । जे अव्यवहारी वस्तु असे । ते भोगिजे कीं जैसें । आरिसां रूप ॥ ८१ ॥ मग संवादु तोही पारुखे । तरी भोगितां भोगणें थोके । हें कां साहावेल सुखें । लांचावलेया ॥ ८२ ॥ यालागीं त्याग संन्यास । पुसावयाचें घेऊनि मिस । मग उपलविलें डुंस । गीतेचें तें ॥ ८३ ॥ ( १०४७. एका अध्यायांत गीता पुन्हा सांगितली; काव्यप्रतिभा, ८४-८९; १-८५ ) अठरावा अध्यावो नोहे । हे एकाध्यायी गीताचि आहे । जैं वांसरुचि गाय दुहे । तैं वेळ कायसा ॥ ८४ ॥ तैसी संपतां अवसरीं । गीता आदरविली माघारीं । स्वामी भृत्याचा न करी । संवादु काई ॥ ८५ ॥ अवतरणः—( १०४८. त्याग व संन्यास या दोन्ही शब्दांचा अर्थ एक आहे किंवा भेद आहे ? ८६-८९ ) परि हें असो ऐसें । अर्जुनें पुसिजत असे । म्हणे विनंती विश्वेशें । अवधारिजो ॥ ८६ ॥

अर्जुन उवाच—

संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।
त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥

अन्वयः—महाबाहो, हृषीकेश, केशिनिषूदन, अहं संन्यासस्य च त्यागस्य तत्त्वम् पृथक् वेदितुम् इच्छामि ॥ १ ॥

हां जी संन्यासु आणि त्यागु । इयां दोहीं एक अर्थी लिंगु । जैसा संघातु आणि संघु । संघातेंचि बोलिजे ॥ ८७ ॥ तैसेंचि त्यागें आणि संन्यासें । त्यागुचि बोलिजतु असे । आमचेनि तंव मानसें । जाणिजे हेंचि ॥ ८८ ॥ ना कांहीं आथी अर्थभेद । तो देव करोत विशद । अवतरण, भगवानुवाचः—तेथ म्हणती श्रीमुकुंद । भिन्नचि पैं ॥ ८९ ॥ ( १०४९. त्याग-संन्यास शब्दार्थाचा भेद, ९०-९२ ) तरी

१ कार्यकारणभावानें. २ शंका. ३ स्वस्थ बसले. ४ पोट भरल्यावर. ५ सोडावी. ६ पारमार्थिक.

अर्जुनाचे प्रश्नास जें उत्तर दिलें, तोच हा अठरावा अध्याय होय. ७४ याप्रमाणें कार्य-कारणभावानें एक अध्याय दुसरे अध्यायास कारणीभूत होतो. तर अर्जुनानें काय प्रश्न केला तो ऐका. ७५ सतरावे अध्यायांत देवांनीं जो शेवटचा श्लोक सांगितला, त्याचें अंतः-करणांत मनन करून् अर्जुनानें अशी शंका घेतली. ७६ एरवीं त्याला देवांनीं सांगितलेलें तत्त्व पूर्णपणें समजलें होतें; परंतु देव कांहीं न बोलतां स्वस्थ बसले तें त्याला बरें वाटेना. ७७ वांसराचें पोट भरल्यावरही गाईनें त्याचेपासून दूर न व्हावें असें एकनिष्ठ प्रेमाचें लक्षण आहे. ७८ आपल्यास जो मनुष्य परम प्रिय असतो, त्यानें कांहीं कारण नसतांही आपल्याशीं बोलावें व आपल्यास पाहिल्यावरही आपल्याकडे पाहतच असावें असें प्रीतीचें लक्षण आहे. ७९ अशी प्रेमाची जात असून पार्थ तर श्रीकृष्णांच्या प्रेमाची मूर्तिच आहे. म्हणून भगवान स्वस्थ बसल्यामुळें पार्थास अवघड वाटलें; ८० आणि संवादाच्या योगानें, पारमार्थिक वस्तु जें 'ब्रह्म' तें, आरशांत पाहिल्यावर जसें आपलें रूप स्पष्ट दिसतें, तसें भोगितां येतें. ८१ मग संवाद बंद पडल्यावर ब्रह्म-प्राप्तिही बंद होते, ही गोष्ट सुखप्राप्तीला सवकलेल्या मनुष्याला कशी सहन होईल ? ८२ म्हणून 'त्याग व संन्यास' म्हणजे काय हें पुसण्याच्या निमित्तानें गीतारूपी वत्साची अर्जुनानें पुनः घडी उकलली. ८३ तर हा अठरावा अध्याय नसून ही एकाध्यायी गीताच आहे. पहा कीं, जेव्हां वांसरूंच गाईस पान्हा आणतें, तेव्हा वेळ अवेळ याचा गाईस विचार असतो काय ? ८४ त्याप्रमाणें, गीता संपण्याचे वेळीं पुनः गीतेच्या पूर्वपदावर अर्जुन आला, तर सेवकानें प्रश्न केल्यावर स्वामी त्याचें उत्तर कसे देणार नाहींत ? ८५ परंतु ही गोष्ट राहूं द्या. अर्जुनानें श्रीकृष्णाची विनंती करून म्हटलें कीं, भगवंतानीं आता माझ्या विनंतीकडे लक्ष द्यावें. ८६

श्लोकार्थ—हे महाबाहो हृषीकेशा, केशिदैत्यांतका, मी 'संन्यास' शब्दाचा खरा अर्थ आणि 'त्याग' शब्दाचाही खरा अर्थ पृथक् जाणूं इच्छितों ॥ १ ॥

"हे प्रभो, संन्यास आणि त्याग या दोहोंचा एकाच अर्थाशीं संबंध आहे. जसा 'संघात' आणि 'संघ' या दोन्ही शब्दांचा निर्देश संघात या शब्दानेंच करितात, ८७ तसाच त्याग आणि संन्यास या दोन्ही शब्दांनीं त्यागाचाच बोध होतो. आमच्या मनाला तर हें असें वाटतें. ८८ मग जर त्याच्या अर्थांत कांहीं भेद असेल, तर तो देवांनीं स्पष्ट करून सांगावा." तेव्हां श्रीमुकुंद म्हणाले:—अरे, हे दोन्ही शब्द भिन्नच आहेत. ८९ तथापि, अर्जुना, त्याग व संन्यास हे दोन्ही शब्द एकार्थीच आहेत, असें जें तुझ्या मनाला वाटलें, तें बरोबर आहे असें मीही म्हणतो. ९० खरोखर या दोन्ही शब्दांनीं एक त्यागाचाच निर्देश होतो, हें खरें आहे; पण त्याच्या अर्थामध्यें भेद

७ राहतो. ८ थाबे. ९ सवकलेला. १० उघडली. ११ घडी. १२ पान्हा आणतें. १३ सेवकाचा. १४ संबंध. १५ समुदाय.

अर्जुना तुझ्या मनीं । त्याग संन्यास दोनी । एकार्थ गमले हें मानीं । मीही साच ॥ ९० ॥ इहीं दोहीं कीर शब्दीं । त्यागुचि बोलिजे त्रिशुद्धि । परी कारण एथ भेदीं । येतुलेंचि ॥ ९१ ॥ निपटूनि कर्म सांडिजे । तें सांडणें संन्यासु म्हणिजे । आणि फळ मात्र कां त्यजिजे । तो त्यागु गा ॥ ९२ ॥ (१०५०. कोणत्या कर्मांचें फळ टाकावयाचें व कोणतें कर्म टाकावयाचें, ९३–९७ ) तरी कोणा कर्मांचें फळ । सांडिजे कोण कर्म केवळ । हेंही सांगों विवेळ । चित्त देईं ॥ ९३ ॥ तरी आपैसीं दांगें डोंगर । झाडें लागती अपार । तैसे लांवे राजागर । नुठिती ते ॥ ९४ ॥ न पेरितां सैंघ तृणें । उठती तैसें साळींचें होणें । नाहीं गा राबाविणें । जियापरी ॥ ९५ ॥ कां अंग जाहलें सहजें । परी लेणें उद्यमें कीजे । नदी आपैसी आपादिजे । विहिरी जेवीं ॥ ९६ ॥ तैसें नित्य नैमित्तिक । कर्म होय स्वाभाविक । परी न कामितां कांमिक । न निफजे जें ॥ ९७ ॥

काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।
सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥

अन्वयः—कवयः काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासम् इति विदुः; च विचक्षणाः सर्वकर्मफलत्यागं त्यागम् इति प्राहुः ॥ २ ॥

( १०५१. काम्य कर्मांचा त्याग, ९८–१०९ ) कां कामनेचेचि दळवाडें । जें उभारावया घडे । अश्वमेधादिक फुडे । याग जेथ ॥ ९८ ॥ वापी कूप आराम । अग्रहारें हन महाग्राम । आणीकही नानासंभ्रम । व्रतांचे ते ॥ ९९ ॥ ऐसें इष्टापूर्ते सकळ । जया कामना एक मूळ । जें केलें भोगवी फळ । बांधोनियां ॥१००॥ देहाचिया गांवा आलिया । जन्ममृत्यूचिया सोहळया । ना म्हणों नये धनंजया । जियापरी ॥ १ ॥ का ललाटींचें लिहिलें । न मोडे गा कांहीं केलें । काळेंगोरेपण धुतलें । फिटों नेणे ॥ २ ॥ केलें काम्य कर्म तैसें । फळ भोगावया धरणें बैसे । न फेडितां ऋण जैसें । वोसंडीना ॥ ३ ॥ का कामनाही न करितां । अवसांत घडे पंडुसुता । तरी वार्यकांढेन झुंजतां । लागे जैसें ॥ ४ ॥ गूळ नेणता तोंडीं । घातला देचि गोडी । आगी मानूनि राखोंडी । चेपिला पोळी ॥ ५ ॥ काम्यकर्मी हें एक । सामर्थ्य आथी स्वाभाविक । म्हणोनि नको कौतुक । मुमुक्षू एथ ॥ ६ ॥ किंबहुना पार्था ऐसें । जें काम्य कर्म गा असे । तें त्यजिजे विष जैसें । वोकूनिया ॥ ७ ॥ मग तया त्यागातें जगीं । संन्यासु ऐसया भंगीं । बोलिजे अंतरंगीं । सर्वद्रष्टा ॥ ८ ॥ हें काम्यकर्म सांडणें । तें कामनेतेंचि उपडणें ।

१ सर्वथैव. २ कर्मकर्तृत्वाचा अभिमान व फळ. ३ स्पष्ट. ४ अरण्यें. ५ लावर्चे भात. ६ बागेंतील झाडें. ७ उद्योगानें. ८ मिळवावें लागतें. ९ इच्छा करितां. १० काम्यकर्म. ११ पुष्करणी. १२ बागा. १३ ब्राह्मणाचें कुटुंबपोषण व्हावें म्हणून ईश्वरप्रीत्यर्थ त्यास जो गांव अथवा जमीन देतात, त्यास अग्रहार म्हणतात. १४ डाहर बसविणें. १५ नशिबांत लिहिलेलें

होण्याचें कारण एवढेंच आहे कीं, ९१ जें सर्वथैव कर्म सोडणें त्या सोडण्याला संन्यास असें म्हणतात; आणि अर्जुना, कर्मकर्तृत्वाचा अभिमान व फळ ह्यांचा त्याग करणें, त्याला त्याग असें म्हणतात. ९२ तर कोणत्या कर्माचें फळ टाकावें, व कोणतें कर्म मुळींच टाकावें, हेंही स्पष्ट करून सांगतों, तें चित्त देऊन ऐक. ९३ तर ज्याप्रमाणें अरण्यांत व डोंगरावर पुष्कळ झाडें आपोआप उगवतात, त्याप्रमाणें लांबीचें भात व बागेंतील झाडें आपोआप उगवत नाहींत; ९४ पेरल्याशिवाय गवत हवें तेवढें उगवतें, तसें शेतांत राब घातल्याशिवाय साळीचें पीक होत नाहीं; ९५ अथवा शरीर जरी सहज झालेलें आहे, तरी डागिने उद्योग करूनच करावे लागतात; किंवा नदीचें पाणी सहज प्राप्त होतें, पण विहीर खणावी लागते; ९६ त्याप्रमाणें, नित्यनैमित्तिक कर्म हें स्वाभाविक आहे, परंतु काम्य कर्म हें इच्छा केल्याशिवाय उत्पन्न होत नाहीं। ९७

श्लोकार्थः—हे पंडित काम्यकर्मांचा त्याग करणें याला संन्यास म्हणतात; व विद्वान लोक सर्व कर्में करून त्याच्या फळाचा त्याग करणें याला त्याग म्हणतात. ॥ २ ॥

किंवा, येथें कामनेच्या जोरानें उत्पन्न होणारे जे यथासांग अश्वमेधादि याग, ९८ पुष्करिणी, विहिरी इत्यादि बांधणें, बागा लावणें, अग्रहार देणें, व एखादे ठिकाणीं शहर बसविणें व आणखी पुष्कळ प्रकारचीं मतें, ९९ असें जें सर्व इष्टापूर्त कर्म—ज्याला कामना मूळ कारण आहे, आणि ज्याचें आचरण केलें असतां तें करणारास बद्ध करून फळ भोगण्यास लावतें; १०० अर्जुना, देहरूप गांवास आल्यावर जन्ममृत्यूच्या सोहळ्यांना नाहीं म्हणतां येत नाहीं, १ किंवा नशिबांत लिहिलेलें कांहीं टळत नाहीं, अथवा काळेपण व गोरेपण कितीही धुतलें तरी नाहींसें होत नाहीं, २ तसें, काम्यकर्म केलें असतां, ऋण फेडल्यावांचून ज्याप्रमाणें सुटका होत नाहीं, त्याप्रमाणें तें फळ भोगविण्याकरितां दारांत धरणें घेऊन बसतें। ३ अथवा अर्जुना, इच्छा न करितां जरी काम्यकर्म अकस्मात् घडलें, तरी, केवळ करमणुकीकरितां वायबाणांनीं युद्ध करीत असतां तो मर्मस्थलीं लागला तर जसा जीव घेण्यास कमी करीत नाहीं, ४ गूळ न समजून जरी तोंडांत घातला तरी गोडच लागतो, किंवा अग्नीस राखोंडी समजून जरी त्यावर पाय दिला तरी तो भाजतोच; ५ त्याप्रमाणें, काम्यकर्मांचे ठिकाणीं फळ भोगविण्याचें स्वाभाविक सामर्थ्य आहे. म्हणून मुमुक्षूनें कौतुकानेंही त्याचें आचरण करूं नये. ६ किंबहुना, बा पार्था, असें जे काम्यकर्म आहे, तें, विष पोटांत गेलें म्हणजे जसें ओकून टाकतात, तसें टाकून द्यावें. ७ मग त्याच त्यागाला जगात संन्यास असें म्हणतात, असें सर्वांतरसाक्षी भगवान श्रीकृष्ण बोलले. ८ ( मग म्हणतातः-- ) ज्याप्रमाणें आपल्या जवळील द्रव्य टाकून दिलें म्हणजे त्यापासून उत्पन्न होणारें भय नाहींसें होतें, त्याप्रमाणें ह्या काम्यकर्मांचा त्याग करणें म्हणजे मनातील वासना समूळ नाहींतशा करणें होय ९ आणि चंद्रग्रहण व सूर्य-

असेल तें. १६ सोडीत नाहीं. १७ अकस्मात्. १८ वायबाणानीं. १९ भेदानें.

द्रव्यत्यागें दवडणें । भय जैसें ॥ ९ ॥ ( १०५२. नैमित्तिक कर्म, ११०-११४ ) आणि सोमसूर्यग्रहणें । येऊनि करविती पार्वणें । कां मातापितरमरणें । अंकित जे दिवस ॥ ११० ॥ अथवा अतिथि हन पावे । हें ऐसैसें पडे जें करावें । तें तें कर्म जाणावें । नैमित्तिक गा ॥ ११ ॥ वार्षियां क्षोभे गगन । वसंतें दुणावे वन । देहा शृंगारी यौवन- । दशा जैसी ॥ १२ ॥ कां सोमकांतु सोमें पघळे । सूर्यें फांकती कमळें । एथ असे तेंचि पाल्हाळे । आनें नये ॥ १३ ॥ तैसें नित्य जें कां कर्म । तेंचि निमित्ताचे लाहे नियम । एथ उंचावे तेणें नाम । नैमित्तिक होय ॥ १४ ॥ ( १०५३. नित्यकर्म, ११५-११८ ) आणि सायंप्रातर्मध्यान्हीं । जें का करणीय प्रतिदिनीं । परी दृष्टि जैसी लोचनीं । अधिक नोहे ॥ १५ ॥ कां नापादितां गति । चरणीं जैसी आथी । नातरी ते दीप्ति । दीपाचिवी ॥ १६ ॥ वासु नेदितां जैसें । चंदनीं सौरभ्य असे । अधिकाराचें तैसें । रूपचि जें ॥ १७ ॥ नित्य कर्म ऐसें जनीं । पार्था बोलिजे तें मानीं । एवं नित्य नैमित्तिक दोन्ही । दाविलीं तुज ॥ १८ ॥ ( १०५४. नित्यनैमित्तिक कर्माला सर्वांगानें फल, ११९–१२३ ) हेंचि नित्य नैमित्तिक । अनुष्ठेय आवश्यक । म्हणोनि म्हणों पाहती एक । वांझ ययातें ॥ १९ ॥ परी भोजनीं जैसें होये । तृप्ति लाहे भूक जाये । तैसें नित्यनैमित्तिकीं आहे । सर्वांगीं फळ ॥ १२० ॥ कीडें आगिटा पडे । तरी मळ तुटे वानी चढे । यया कर्मा तया सांगडें । फळ जाणावें ॥ २१ ॥ जे प्रत्यवायें तंव गळे । स्वाधिकार बहुवें उजळे । तेथ हातोफळिया मिळे । सद्गतीसी ॥ २२ ॥ येवढेवरी ढिसाळ । नित्यनैमित्तिकीं आहे फळ । परी तें त्यजिजे मूळ । नक्षत्रीं जैसें ॥२३॥ ( १०५५. नित्यनैमित्तिक कर्माच्या फलत्यागाला विद्वान त्याग म्हणतात, १२४-१२६ ) लता पिकें आघवी । तंव च्यूतें बांधे पालवी । मग हात न लावित मोधवी । सोडूनि घाली ॥ २४ ॥ तैसी नोलांडितां कर्मरेखा । चित्त दीजे नित्यनैमित्तिका । पाठीं फळा कीजे अशेखा । वांताचे वानी ॥ २५ ॥ यया कर्मफळत्यागातें । त्यागु म्हणती पैं जाणते । एवं त्याग संन्यास तूतें । परिसाविले ॥ २६ ॥ ( १०५६. युक्तीनें कर्मफलत्याग व संन्यास झाल्यास ज्ञानप्राप्ति होते, १२७–१३० ) हा संन्यासु जैं संभवे । तैं काम्य बाधूं न पवे । निषिद्ध तंव स्वभावें । निषेधें गेलें ॥ २७ ॥ आणि नित्यादिक जें असे । तें येणें फलत्यागें नासे । शिर लोटलियां जैसें । येर आंग ॥ २८ ॥ मग सस्यें परिपाकांत । तैसें निमालिया कर्मजात । आत्मज्ञान गिंवसीत । आपैसें ये ॥ २९ ॥ ऐसिया निर्गुती दोनी । त्याग संन्यास

१ पर्वण्या. २ वर्षाकाळीं. ३ चंद्राच्या किरणानीं. ४ वाढतें; वृद्धिंगत होतें. ५ निराळें. ६ स्वीकार न करता. ७ सुगंध. ८ अनुष्ठान–आचरण केलेंच पाहिजे असें. ९ हिणकट सोनें. १० कस. ११ दोष. १२ आम्रवृक्ष. १३ वसंतऋतु १४ तोडलें असता. १५ धान्य पिकल्यावर. १६ युक्ति.

ग्रहण ह्या पर्वणीच्या दिवशीं, किंवा मातापितरांच्या श्राद्धतिथींस, ११० अथवा काकबळि टाकण्याचे समयास अतिथि प्राप्त झाला असतां, जीं जीं कर्मे करावीं लागतात, तीं नैमित्तिक कर्मे होत. ११ वर्षाकाळीं जसें आकाश भरून येऊन मेघांची गर्जना होते, वसंतऋतूच्या योगानें वनास पालवी फुटून दुप्पट शोभा येते, अथवा शरीराला यौवनदशा शोभा आणिते, १२ किंवा सोमकांत मणि चंद्राच्या किरणांनीं द्रवतो व सूर्याचे किरणांनीं सूर्यविकासी कमळें प्रफुल्लित होतात; या ठिकाणीं, जें मूळचें असतें तेंच वाढतें, निराळें कांहीं उत्पन्न होत नाहीं; १३ त्याप्रमाणें, जें नित्यकर्म आहे, त्यालाच निमित्ताचे नियम लागले कीं नैमित्तिक हें मोठें नांव त्याला प्राप्त होतें १४ आणि दररोज सकाळीं, दुपारीं व सायंकाळीं जें कर्म करावें लागतें; परंतु ज्याप्रमाणें डोळ्यांतील दृष्टि अधिक होत नाहीं, १५ अथवा गतीचा स्वीकार न करितां ती जशी पायांत आपोआपच आहे; किंवा दिव्याचे ठिकाणीं जसें त्याचें सहजच तेज आहे, १६ चंदनास वरून वास लावल्याशिवाय जसा अंगचाच सुगंध असतो, तसें अधिकाराचें लक्षण होय. १७ त्या कर्मास, पार्था, जगांत नित्यकर्म म्हणतात असें समज. याप्रमाणें तुला नित्य व नैमित्तिक हीं दोन्ही कर्मे दाखविलीं. १८ हेंच नित्यनैमित्तिक कर्म अवश्य केलें पाहिजे म्हणून कांहीं लोक या कर्मास निष्फल कर्म असें म्हणू पाहतात. १९ परंतु भोजनापासून जशी तृप्ति प्राप्त होऊन क्षुधा नष्ट होते, तशी या नित्यनैमित्तिक कर्मापासून सर्व प्रकारें फलप्राप्ति होते. १२० ज्याप्रमाणें हिणकट सोनें अग्नींत घातल्यावर त्याचा हिणकटपणा जाऊन कस वाढतो, त्याप्रमाणें नित्यनैमित्तिक कर्मापासून फलप्राप्ति होते. ( चित्तशुद्धि होते. ) २१ कारण ( या कर्माच्या आचरणानें ) दोष नाहींतसे होऊन आपला अधिकार जास्त वाढतो आणि असें झाल्यावर हातोहात सद्गति प्राप्त होते. २२ नित्यनैमिरिक कर्मापासून जरी एवढी मोठी फलप्राप्ति होते, तरी मूळनक्षत्रावर उपजलेल्या मुलाप्रमाणें त्याच्या फलाचा त्याग करावा. २३ वसंतऋतूच्या योगानें जरी सर्व वेल वाढले, व आम्रवृक्षास पालवी फुटली, तरी जसा तो त्यांस हात न लावितां टाकून जातो, २४ तसें नित्यनैमित्तिक कर्माचें चित्त देऊन यथाविधि आचरण करावें, पण त्यापासून निष्पन्न होणाऱ्या सर्व फलांचा वांतीप्रमाणें त्याग करावा. २५ अशा रीतीनें नित्यनैमिरिक कर्माचे फळांचा त्याग करणें, याळाच ज्ञाते पुरुष ' त्याग ' असें म्हणतात. याप्रमाणें त्याग व संन्यास हे, त्यांची फोड करून, तुला सांगितले. २६ याप्रमाणें जेव्हां संन्यास घडतो, तेव्हां काम्यकर्मापासून बाधा होऊं शकत नाहीं; आणि निषिद्ध कर्म तर निषेधाच्या योगें स्वभावतःच नाहींसें होतें. २७ आणि ज्याप्रमाणें शिर कापल्यावर धड आपोआप निर्जीव होऊन खालीं पडतें, त्याप्रमाणें नित्यनैमित्तिक कर्माच्या फळांचा आतां सांगितल्या रीतीनें त्याग केला असतां त्यापासून बाधा होत नाहीं. २८ मग, धान्य पिकल्यावर जशी पिकाची वाढ खुंटते, तसा सर्व कर्माचा क्षय झाला म्हणजे आत्मज्ञान आपण होऊन

अनुष्ठानीं । पडले गा आत्मज्ञानीं । बांधती पैंठु ॥ १३० ॥ ( १०५७. युक्ति सोडून कर्मत्याग केल्यास संसारबंध होईल, १३१–१३४ ) नातरी हे निगुती चुके । मग त्यागु कीजे हातेंतुकें । तें काहीं न त्यजे अधिकें । गोंवींचि[3] पडे ॥ ३१ ॥ जें औषध व्याधी अनोळख । तें घेतलिया परतें विख । कां अन्न न मानितां भूक । मारीना काय ॥ ३२ ॥ म्हणोनि त्याज्य जें नोहे । तेथ त्यागातें न सुवावें । त्याज्यालागीं नोहावें । लोभपर ॥ ३३ ॥ चुकलिया त्यागाचें वेंझें । केला सर्वत्यागही होय वोझें । न देखती सर्वत्र दुजें । वीतरागे ते ॥ ३४ ॥

त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।
यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥

अन्वयः—एके मनीषिणः कर्म दोषवत् अस्ति ( तस्मात् ) त्याज्यम् इति प्राहुः; च अपरे यज्ञदानतपःकर्म न त्याज्यम् इति ( आहुः. ) ॥ ३ ॥

( १०५८. कर्मे टाकावींत असें एक मत, १३५–१३७ ) एकां फलाभिलाष न ठके । ते कर्मातें म्हणती बंधकें । जैसें आपण नग्न भांडकें[6] । जगातें म्हणे ॥ ३५ ॥ कां जिव्हालंपट रोगिया । अन्नें दूषी धनंजया । आंगा न रुसे कोढियाँ । मासियां कोपे ॥ ३६ ॥ तैसे फळकाम दुर्बळ । म्हणती कर्मचि किडाळ । मग निर्णयो देती केवळ । त्यजावें ऐसा ॥ ३७ ॥ ( १०५९. कर्मे केलींच पाहिजेत असें दुसरें मत, १३८-१४३ ) एक म्हणती यागादिक । करावेंचि आवश्यक । जे यावांचूनि शोधक । आन नसे ॥ ३८ ॥ मनशुद्धीच्या मार्गीं । जैं विजयी व्हावें वेगीं । तैं कर्म सबळालागीं । आळसु न कीजे ॥ ३९ ॥ भांगार आथी शोधावें । तरी आगी जेविं तुर्बगावें । कां दर्पणालागीं सांचावें । अधिक रज ॥ १४० ॥ नाना वस्त्रें चोख होआवीं । ऐसें आथी जरी जीवीं । तरी सवंदेणी न मानावी । मलिन जैसी ॥ ४१ ॥ तैसीं कर्मे क्लेशकारें । म्हणोनि न न्यावीं अँव्हेरें । का अन्नलाभें अँरुवारें । रांधितिये[12] उणें ॥ ४२ ॥ इहीं इहीं गा शब्दीं । एक कर्मी बांधावितीं बुद्धि । ऐसा त्यागु विसंवीदीं । पडोनि ठेला ॥ ४३ ॥ ( १०६०. त्यागाबद्दल वादविवादाचें निवारण, १४४ ) अवतरणः—तरी विसंवादु तो फिटे । त्यागाचा निश्चयो भेटे । तैसें बोलों गोमटें । अवधान देईं ॥ ४४ ॥

निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।
त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥

अन्वयः—भरतसत्तम, तत्र त्यागे मे निश्चयं शृणु. पुरुषव्याघ्र, हि त्यागः त्रिविधः संप्रकीर्तितः ( अस्ति ) ॥ ४ ॥

---

१ योग्यता. २ अटकळीनें. ३ घोंटाळ्यांत. ४ स्वीकार न करितां. ५ वैराग्यसंपन्न. ६ कुभांडखोर. ७ कुष्ठरोगी. ८ कंटाळा करूं नये. ९ सतात. १० देळसांडीवारी. ११ उत्तम. १२ तयार केल्याशिवाय. १३ सिद्धांत. १४ वादांत.

शोधीत येतें. २९ अशा युक्तीनें ( नित्यनैमित्तिक कर्मांच्या फलाचा ) त्याग व ( काम्य-कर्मांचा ) संन्यास जे करतात, ते आत्मज्ञानाचे प्राप्तीला योग्य होतात. १३० किंवा ही युक्ति चुकून जर कोणी अटकळीनें त्याग करूं म्हणतील, तर कर्मांचा त्याग न होतां ते अधिक घोंटाळ्यांत पडतात. ३१ जसें रोगाची चिकित्सा न करितां घेतलेलें ( भलतेंच ) औषध विषतुल्य होतें, अथवा अन्नाचें सेवन केलें नाहीं तर भुकेनें मनुष्य मरणार नाहीं काय ? ३२ म्हणून, ज्या गोष्टीचा त्याग करूं नये असें सांगितलें आहे, तिचा त्याग करूं नये; व ज्या गोष्टीचा त्याग करावा असें सांगितलें आहे, तिचें आचरण करण्याचा लोभ धरूं नये. ३३ त्याग करण्याची युक्ति चुकली तर कर्मत्याग करूनही मनुष्य कर्म-बंधांत सांपडतो; म्हणून वैराग्यसंपन्न जे आहेत ते केव्हांही त्याज्य गोष्टींचें आचरण करीत नाहींत. ३४

श्लोकार्थः—कित्येक पंडित असें म्हणतात कीं, कर्म दोषयुक्त असल्यामुळें त्याचा त्याग करावा, आणि दुसरे पंडित असें म्हणतात कीं, यज्ञ, दान व तप या कर्मांचा त्याग करूं नये॥३॥

कित्येकास फलाभिलाष सोडवत नाहीं, म्हणून ' कर्म बंधक ' आहे असें ते म्हण-तात. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य नग्न असून त्यास नग्न म्हटलें असतां जग भांडखोर आहे असें तो म्हणतो; ३५ किंवा, हे धनंजया, जिव्हेच्या अधीन झालेला रोगी पाहिजे तें खातो, आणि तें पचलें नाहीं म्हणजे अन्नास दोष देतो; किंवा कुष्ठ रोगी आपल्या शरीरावर न रुसतां त्यावर बसणाऱ्या माशांवर रागावतो; ३६ त्याप्रमाणें, जे फलेच्छु आहेत, त्यांना कर्माचें फल टाकण्याची शक्ति नसल्यामुळें कर्मच वाईट असें ते म्हणतात; आणि मग कर्मत्याग करावा असा सिद्धांत ठरवितात. ३७ कोणी असें म्हणतात कीं, यज्ञयागादिक हें अवश्य केलेंच पाहिजे; कारण त्यावांचून चित्तशुद्धि होण्यास दुसरा उपा-यच नाहीं. ३८ जर चित्तशुद्धि लवकर व्हावी अशी इच्छा असेल तर कर्मांचें आचरण करण्यास आळस करूं नये. ३९ सोनें शुद्ध करावयाचें असेल, तर तें अग्नींत घालण्या-विषयीं जसा कंटाळा करूं नये, अथवा आरशांत पाहावयाचें असल्यास त्यावरील मळ काढण्याकरितां चुना लावून तो साफ करावा लागतो; १४० अथवा वस्त्रें स्वच्छ निघावीं अशी जर इच्छा असेल, तर तीं परटाच्या गलिच्छ सतालांत घालण्याविषयीं मनात शंका वाळ्गूं नये. ४१ किंवा उत्तम अन्न हवें असेल, तर तें तयार केल्याशिवाय कसें प्राप्त होईल ? त्याप्रमाणें, कर्में क्लेशदायक आहेत म्हणून त्याची हेळसाड करूं नये. ४२ या प्रकारचे सिद्धांत ठरवून कोणी कर्म करण्यास तयार होतात, व कोणी कर्म टाकावें म्हण-तात. अशा प्रकारें कर्मत्यागाविषयीं वाद पडला आहे. ४३ तर या वादाचा निकाल करून, कर्मांचा त्याग कसा करावा तें तुला उत्तम रीतीनें सांगतों, तिकडे लक्ष दे. ४४

श्लोकार्थः—हे भरतसत्तमा, त्या त्यागाविषयीं ( त्याग आणि संन्यास याविषयीं ) माझें निश्चित मत काय आहे तें तुला सांगतों, ऐक. हे पुरुषश्रेष्ठा, त्याग तीन प्रकारचा सांगितला आहे॥४॥

( १०६१. त्यागाबद्दल देवांचें निश्चित मत, १४५–१४७ ) तरी त्यागु एथें पांडवा । त्रिविधु पैं जाणावा । तया त्रिविधाही वरवा । विभाग करूं ॥ ४५ ॥ त्यागाचे तिन्ही प्रकार । कीजती जरी गोचर । तरी तूं इत्यर्थाचें सार । इतुलें जाण ॥ ४६ ॥ मज सर्वज्ञाचियेही बुद्धी । जें आलोट माने त्रिशुद्धि । निश्चयतत्त्व तें आधीं । अवधारीं पां ॥ ४७ ॥ अवतरणः—तरी आपुलिये सोडवणे । जो मुमुक्षु जागों म्हणे । तया सर्वस्वें करणें । हेंचि एक ॥ ४८ ॥

यज्ञो दानं तपः कर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।
यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥

अन्वयः—यज्ञः दानं तपः कर्म न त्याज्यम् तत् कार्यम् एव. यज्ञः दान च तपः एतानि मनीषिणाम् पावनानि एव ( संति ) ॥ ५ ॥

जियें यज्ञदानतपादिकें । इयें कर्में आवश्यकें । तियें न साडावीं पांथिकें[१] । पाउलें जैसीं ॥ ४९ ॥ हरपलें न देखिजे । तंव तयाचा मागु न सांडिजे । का तृप्त न होतां न लोटिजे । भाणें जेवीं ॥ १५० ॥ नाव थडी न पवतां । न सांडिजे केळी न फळतां । कां ठेविलें न दिसतां । दीपु जैसा ॥ ५१ ॥ तैसी आत्मज्ञानविखीं । जंव निश्चिती नाहीं निकी । तंव नोहावें यागादिकीं । उदासीन ॥ ५२ ॥ तरी स्वाधिकारानुरूपें । तियें यज्ञदानें तपें । अनुष्ठावींचि सौक्षेपें । अधिकें वरें ॥ ५३ ॥ जें चालणें वेगावत जाये । तो वेगु बैसावयाचि होये । तैसा कर्मातिशयो आहे । नैष्कर्म्यालागीं ॥ ५४ ॥ अधिकें जंव जंव औषधी । सेवायाची मांडी बांधी[७] । तंव तंव मुकिजे व्याधी । तयाचिये ॥ ५५ ॥ तैसीं कर्में हातोंपातीं । जें कीजती यथानिगुती । तें रजतमें झडती । झाडा देउनी ॥ ५६ ॥ कां पैंटोवारीं पुटें । भांगारा खारु देणें घटे । तें कीड झडकरी तुटे । निर्व्याजें होय ॥ ५७ ॥ तैसें निष्ठा केलें कर्म । तें झाडी करूनि रजतम । सत्त्वशुद्धीचें धाम । डोळां दावी ॥ ५८ ॥ म्हणोनिया धनंजया । सत्त्वशुद्धि गिंवसितया । तीर्थांचिया सावायौ । आलीं कर्में ॥ ५९ ॥ तीर्थें बाह्यमळ क्षाळे । कर्में अभ्यंतर उजळे । एवं तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्मेंचि ॥ १६० ॥ तृषार्ता मैरुदेशीं । झैंळे अमृतें वोळेंलीं जैसीं । कीं अंधालागीं डोळ्यांसी । सूर्यु आला ॥ ६१ ॥ बुडतया नदीच धावीन्नली । पडतया पृथ्वीच कळवळिली । निमतयाँ मृत्यूनें दिधली । आयुष्यवृद्धि ॥ ६२ कर्में कर्मबद्धता । मुमुक्षु सोडविले पंडुसुता । जैसा रैंसरीति मरतां । राखिला विषें ॥ ६३ ॥ अवतरणः—तैसी एके हातवटियें । कर्में कीजती धनं-

१ तात्पर्य. २ खरें. ३ वाटसरानें. ४ पान. ५ यथाविधि. ६ थरचेवर. ७ निश्चय; तयारी. ८ लष्कर. ९ विधिपूर्वक. १० एकामागून एक. ११ निर्दोष; शुद्ध. १२ बरोबरीस. १३ शरीरावरचा मळ. १४ मारवाड देशात. १५ झरे. १६ लागली; छापडली. १७ मरणाराला. १८ रसायन करण्याची युक्ति. १९ युक्ति.

तर अर्जुना, असें पहा कीं, हा त्याग तीन प्रकारचा आहे, समजलास ? आतां ते तिन्ही प्रकार नीट वर्णन करून सांगतों. ४५ त्यागाचे तीन प्रकार जरी स्पष्ट सांगितले, तरी त्यांचें तात्पर्य एवढेंच आहे असें तूं समज. ४६ मज सर्वज्ञाच्याही बुद्धीला जें खरें वाटतें, आणि ज्याविषयीं माझे मनाचा निश्चय ठरला आहे, तो निश्चय कोणता तो ऐक. ४७ संसारापासून आपली सुटका व्हावी म्हणून जो मुमुक्षु दक्ष असतो, त्यानें सर्व प्रकारें हेंच एक करावें:–त्यागाचें खरें स्वरूप ओळखून तो करावा. ४८

श्लोकार्थः—यज्ञ, दान, तप या कर्मांचा त्याग करूं नये; तीं केलींच पाहिजेत. कारण यज्ञ, दान आणि तप हीं कर्में निष्काम कर्म करणारांचें चित्त शुद्ध करणारीं आहेत ॥ ५ ॥

पांथिकानें ज्याप्रमाणें पावलें टाकण्याचें ( मार्ग चालण्याचें ) सोडता कामा नये, त्याप्रमाणें यज्ञ, दान व तप हीं जीं आवश्यक कर्में तीं सोडूं नयेत. ४९ हरवलेला जिन्नस सांपडेपर्यंत जसा त्याचा माग सोडतां येत नाहीं; अथवा पोट भरल्याशिवाय जसें आपल्या पुढील पान दूर सारतां येत नाहीं; १५० किंवा नाव नदीचे कांठास पोहोंचल्या-खेरीज मध्येंच सोडतां येत नाहीं, अथवा केळीं आल्याशिवाय केळीचीं झाडें कापतां येत नाहींत; किंवा ज्याप्रमाणें ठेवलेली वस्तु सांपडल्याशिवाय दिवा मालवितां येत नाहीं, ५१ त्या-प्रमाणें, आत्मज्ञानाविषयीं दृढ निश्चय झाला नाहीं तोंवर यागादिक कर्में करण्याविषयीं उदासीन होऊं नये. ५२ तर आपल्या अधिकाराप्रमाणें यज्ञ, दान व तप याचें यथाविधि वरचेवर आचरण केलेंच पाहिजे. ५३ जो चालण्याची त्वरा करतो त्याला तीच त्वरा विसावा घेण्यास उपयोगी पडते; तसें कर्माचें अधिक आचरण करणें हें कर्मत्यागास उपयोगी पडतें. ५४ एखादा रोगी औषध घेण्याविषयीं जों जों अधिकाधिक तयार होतो, तों तों तो रोगापासून मुक्त होत जातो; ५५ त्याप्रमाणें, जों जों कर्में विधिपूर्वक लवकर लवकर करावीं, तों तों रज व तम हे गुण समूळ नाहींतसे होतात. ५६ अथवा, सोन्यास एकामागून एक जेव्हां खाराचीं पुटें द्यावीं, तेव्हां त्याचा हिणकटपणा जाऊन तें शुद्ध होतें, ५७ तसें निष्ठेनें कर्माचें आचरण केलें असतां तें रज व तम यांचा नाश करून सत्त्वशुद्धीचें दर्शन करून देतें. ५८ म्हणून, अर्जुना, सत्त्वशुद्धि प्राप्त होण्यास सत्कर्में हींच तीर्थाची योग्यता पावतात. ५९ तीर्थांनीं बाह्य मळाचें क्षालन होतें, आणि कर्मांच्या योगें अंतर्मळ नाहींसा होतो; एवंच, सत्कर्में हींच चित्त-शुद्धीस तीर्थें होत. १६० तहान लागलेल्या मनुष्यास मारवाड देशांत जसा एखादा अमृ-ताचा झरा सांपडावा, किंवा अंधळ्याच्या डोळ्यांत सूर्याचें तेज यावें, ६१ बुडणाऱ्यास तारण्याकरितां नदीनेंच धावावें, पडणाराला जसें पृथ्वीनेंच झेलावें, अथवा मरणारास मृत्यूनेंच आयुष्यवृद्धि द्यावी; ६२ कर्मापासून मुमुक्षूस होणारी पीडा कर्मांनीं दूर करावी; अथवा, हे अर्जुना, रसायन करण्याची ज्यास युक्ति माहीत आहे तो वैद्य ज्याप्रमाणें विष शुद्ध करून त्याचें अमृत करून मरणाराचें रक्षण करतो, ६३ त्याप्रमाणें, धनंजया,

जया । बंधकेंचि सोडवावया । मुख्यें होती ॥ ६४ ॥ ( १०६३. कर्तृत्व-अभिमान टाकण्याची युक्ति, १६५-१७० ) आतां तेचि हातवटी । तुज सांगों गोमटी । जया कर्मातें किरीटी । कर्मचि रुंसे ॥ ६५ ॥

एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥

अन्वयः—अपि तु एतानि कर्माणि संगं च फलानि त्यक्त्वा कर्तव्यानि, इति, पार्थ, मम उत्तमं निश्चितम् मतम् ( अस्ति ). ॥ ६ ॥

तरी महायागप्रमुखें । कर्में निफजतांही अचुकें । कर्तेपणाचें न ठाके । फुंजणें आंगीं ॥ ६६ ॥ जो मोलें तीर्था जाये । तया मी यात्रा करितु आहें । ऐसिये श्लाघ्यतेचा नोहे । तोपु जीवीं ॥ ६७ ॥ का मुद्रा समर्थाचिया । जो एकवटु झोंबे राया । तो मी जिणता ऐसिया । न येचि गर्वा ॥ ६८ ॥ जो कांसे लागोनि तरे । तया पोहती ऊर्मि नुरे । पुरोहितु नाविष्करे । दातेपणें ॥ ६९ ॥ तैसें कर्तृत्व अहंकारें । नेघोनि यथाअवसरें । कृत्यजातांचें मोहरें । सारीजती ॥ १७० ॥ ( १०६४. कर्मफलत्यागाची युक्ति, १७१-१७६ ) केलया कर्मा पांडवा । जो आथी फळाचा यावो । तया मोहरीं हों नेदावा । मनोरथु ॥ ७१ ॥ आर्धीचि फळीं आस तुटिया । कर्में आरंभावीं धनंजया । पैरावें वाळ धायीं । पाहिजे जैसें ॥ ७२ ॥ पिंपरुवांचिया आशा । न शिंपिजे पिंपळु जैसा । तैसिया फळनिराशा । कीजती कर्में ॥ ७३ ॥ सांडूनि दुधाची टकैळी । गोंवारी गांवधेनु वेंटाळी । किंबहुना कर्मफळीं । तैसें कीजे ॥ ७४ ॥ ऐसी हे हातवटी । घेऊनि जे क्रिया उठी । आपणा आपुलिया गांठी । लाहेचि तो ॥ ७५ ॥ म्हणोनि फळीं लैगु । सांडोनि देहसंगु । कर्में करावीं हा चांगु । निरोपु माझा ॥ ७६ ॥ ( १०६५. जीवबंधांतून सुटणारानें युक्तीचा अव्हेर करूं नये, १७७ ) जो जीवबंधें शिणला । सुटके जोंचे आपला । तेणें पुढतपुढती या बोला । आन न कीजे ॥ ७७ ॥

नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।
मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥

अन्वयः—नियतस्य कर्मणः तु संन्यासः न उपपद्यते; मोहात् तस्य परित्यागः तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥

( १०६६. तामस त्याग, १७८-१८३ ) नातरी आंधाराचेनि रोखें । जैसीं डोळां रोंविजती नखें । तैसा कर्मद्वेषें अशेखें । कर्मचि सांडी ॥ ७८ ॥ तयाचें कर्म सांडणें । तें तामस पैं मी म्हणें । शिसारीचे रागें लोटणें । शिसचि जैसें

१ दूर होतें. २ पंचमहायज्ञ. ३ अभिमान. ४ मोठेपणाचा. ५ एकटा. ६ गर्व. ७ राजाचा उपाध्याय. ८ अभिमान वाटत नाहीं. ९ प्रसंग. १० पूर्ण करतो. ११ प्राप्ति. १२ प्राप्तीविषयीं. १३ आशा. १४ दुसऱ्याचें. १५ संतोषास्तव. १६ पिंपळाचीं फळें. १७ आशा. १८ अभिमान.

युक्तीनें कर्मे केलीं असतां तीं बाधक असूनही मुक्त करण्यास कारणीभूत होतात. ६४ तर अर्जुना, जिच्या योगें कर्मापासूनच कर्माचा नाश होतो, ती युक्ति कोणती ती तुला उत्तम रीतीनें सांगतों. ६५

श्लोकार्थः- परंतु, पार्था, हीं कर्मे कर्तेपणाचा अभिमान आणि फळाची इच्छा टाकून करावीं असें माझें उत्तम निश्चित मत आहे ॥ ६ ॥

तर पंचमहायज्ञादि प्रमुख कर्मे यथाविधि घडत असतां जो कर्तेत्वाचा अभिमान बाळगीत नाहीं; ६६ जो मोलानें ( दुसऱ्याजवळून पैसे घेऊन ) तीर्थयात्रा करतो, त्याला मी यात्रा करीत आहें अशा मोठेपणाचा हर्ष होत नाहीं; ६७ किंवा राजशिक्क्याच्या बळावर जो एकटा राजासही पकडून आणतो, त्याला मीं या राजास जिंकलें असा गर्व होत नाहीं; ६८ जो दुसऱ्याच्या कांसेस लागून नदी उतरून पलीकडे जातो, त्याला मी पोहणारा आहें, असा गर्व होत नाहीं; किंवा ज्याप्रमाणें राजाचे उपाध्यायास राजाकरितां दुसऱ्यास आपल्या हातानें दिलेल्या दानाबद्दल अभिमान वाटत नाहीं; ६९ त्याप्रमाणें कर्तेत्वाचा अभिमान न बाळगितां, ज्या ज्या वेळेस जीं जीं कर्मे करावयाचीं तीं तीं यथाविधि जो करितो; १७० हे पांडवा, केलेल्या कर्माची जी फलप्राप्ति व्हावयाची तिच्याविषयीं जो आपले मनांत इच्छा उत्पन्न होऊं देत नाहीं; ७१ हे धनंजया, प्रथम फळाची आशा सोडून निष्काम कर्मास आरंभ करावा. ज्याप्रमाणें दुसऱ्याचें लेंकरूं पाहून ( त्याचे ठिकाणीं प्रीति न ठेवितां नुस्ता ) संतोष मानावा, ७२ पिंपरांच्या आशेनें जसा कोणी पिंपळास पाणी घालीत नाहीं, तशी फळाची आशा सोडून कर्मे करावीं. ७३ गुराखी दुधाची आशा सोडून जसा गांवांतील गाई वळतो, तसें कर्मफळाविषयीं निरिच्छ असावें. ७४ या युक्तीनें जो कर्माचें आचरण करतो त्याला आपल्या जवळच असलेल्या आत्मस्वरूपाची भेट होते. ७५ म्हणून, फळाविषयीं आशा सोडून व मी कर्ता हा अभिमान सोडून कर्मे करावीं, अशी उत्तम प्रकारची माझी आज्ञा आहे. ७६ जो जन्ममृत्यूच्या येरझारा करितां करितां त्रासून गेला आहे, व आपली त्यापासून सुटका कशी होईल, या काळजींत आहे, त्याला वारंवार सांगणें आहे कीं, त्यानें या आज्ञेचें उल्लंघन करूं नये. ७७

श्लोकार्थः—नित्यनैमित्तिक कर्माचा त्याग करणें योग्य नाहीं, अज्ञानानें जर त्यांचा त्याग केला, तर त्याला तामस त्याग म्हणतात ॥ ७ ॥

एखादा मनुष्य अंधारांतून चालत असतां अंगास धक्का बसल्यावर त्याबद्दलचा राग डोळ्यावर काढून डोळ्यांत नखें बोंचतो, त्याप्रमाणें कर्मे जन्मबंधास कारण आहेत, म्हणून त्यांच्यावर रागावून जो तीं सर्व टाकून देतो, ७८ त्याच्या कर्मत्यागास मी तामस त्याग असें म्हणतों. ज्याप्रमाणें अर्धेशिशी उठल्यावर कोणी रागानें आपलें शिरच

१९ काळजी वाटतो. २० रागानें. २१ अर्धशिशीच्या. २२ कांपणें.

॥ ७९ ॥ हां गा मार्गु दुवाडु होये । तरी निस्तरितील पाये । कीं तेचि खांडणें आहे । मार्गापराधें ॥ १८० ॥ भुकेलियापुढें अन्न । हो कां भलतैसें ऊन्ह । तरी बुद्धि न घेतां लंघन । भाणें पापैरां हाल्या ॥ ८१ ॥ तैसा कर्माचा बोधु कर्में । निस्तारिजे करितेनि वर्में । हे तामसु नेणे भ्रमें । माजविला ॥ ८२ ॥ कीं स्वभावें आलें विभागा । तें कर्मचि वोसंडी पैं गा । तरी ज्ञणें आतळ त्यागा । तामसा तया ॥ ८३ ॥

दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।
स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥

अन्वयः—यः दुःखम् इति ( मत्वा ) एव यत् कर्म कायक्लेशभयात् त्यजेत्, सः राजसं त्यागं कृत्वा त्यागफलं न एव लभेत् ॥ ८ ॥

( १०६७. राजस त्याग, १८४–१९९ ) अथवा स्वाधिकारु बुझे । आपलें विहितही सुझे । परी करितया उभंजे । निवरपणें ॥ ८४ ॥ जे कर्माची ऐलीकड । नावेक दिसे दुवाड । जे वाहतिये वेळे जड । शिदोरी जैसी ॥ ८५ ॥ जैसा निंब जिभे कडवटु । हिरडा पहिले तुरटु । तैसा कर्मा ऐल सेवटु । खणुवोळा होय ॥ ८६ ॥ कां धेनू दुवाड शिंग । शेवंतीये अडवें आंग । भोजनसुख महाग । पाकु करितां ॥ ८७ ॥ तैसें पुढतपुढती कर्म । आरंभींच अति विषम । म्हणोनि तो तें श्रम । करितां मानी ॥ ८८ ॥ येऱ्हवीं विहितत्वें मांडी । परी घालितां असुरवाडी । तेथ पोळला ऐसा सांडी । आदरिलेंही ॥ ८९ ॥ म्हणे वस्तु देहासारिखी । आली बहुतीं भाग्यविशेखीं । मा जाचुं का कर्मादिकीं । पापिया जैसा ॥ १९० ॥ केले कर्मीं जें द्यावें । तें ज्ञणें मज होआवें । आजि भोगूं ना कां बरवे । हातींचे भोग ॥ ९१ ॥ ऐसा शरीराचिया क्लेशा । भेणें कर्में वीरेशा । सांडी तो परियेसा । राजसु त्यागु ॥ ९२ ॥ ( १०६८. राजस त्यागाला खरें त्यागाचें फळ नाहीं, १९३–१९९ ) येऱ्हवीं तेथही कर्म सांडे । परी तया त्यागफळ न जोडे । जैसें उतलें आगीं पडे । तें नलगेचि होमा ॥ ९३ ॥ कां बुडोनि प्राण गेले । ते अर्धोदकीं निमाले । हें म्हणों नये जाहलें । दुर्मरणचि ॥ ९४ ॥ तैसें देहाचेनि लोभें । जेणें कर्मा पाणी सुंभे । तेणें साच न लभे । त्यागाचें फळ ॥ ९५ ॥ किंबहुना आपुलें । जें ज्ञान होय उदया आलें । तें नक्षत्रातें पाहलें । गिळी जैसें ॥ ९६ ॥ तैशा सकारणें क्रिया । हारपती धनंजया । तो कर्मत्यागु ये जया । मोक्षफळासी ॥ ९७ ॥ तें मोक्षफळ अज्ञाना । त्यागिया नाहीं अर्जुना । म्हणोनि तो त्यागु न माना ।

१ वाईट. २ संपवितील. ३ लायेनें. ४ झुगारिलें तर. ५ दोष. ६ टाकतो. ७ स्वाधीन होणें. ८ जाणतो. ९ कंटाळे. १० दुःखदायकता; कठीणपणा. ११ कठीण. १२ कांटे. १३ कठोर. १४ श्रमामुळें. १५ घास. १६ जलसमाधि. १७ सोडलें. १८ सूर्योदय. १९ अज्ञानास्तव.

कापतो; ७९ अरे, वाट जरी वाईट असली तरी पायानींच चालून संपविली पाहिजे, पण त्या वाटेच्या वाईटपणाबद्दल पाय तोडावे कीं काय ? १८० भूक लागलेल्या मनुष्यापुढें अति कढत अन्न ठेवलें, आणि त्याला तें सहन न होऊन त्यानें तें लाथेनें झुगारून दिलें, तर त्याला लंघनच करावें लागणार ! ८१ त्याप्रमाणें, कर्माचें युक्तीनें आचरण केलें असतां कर्माचा दोष नाहींसा होतो, हें तो तामस मनुष्य भ्रमिष्ट झाला असल्यामुळें त्याला समजत नाहीं, ८२ तो आपल्या धर्माप्रमाणें आपल्यास करावयाचें जें कर्म तें टाकून देतो, तेव्हां तूं त्या तामस मनुष्याप्रमाणें कर्मत्यागाच्या स्वाधीन होऊं नको. ८३

श्लोकार्थः— जो कोणी कर्म हें दुःखकारक आहे असें मानूनच शरीराला क्लेश होतील या भीतीनें त्याचा त्याग करितो, तो राजस त्याग असल्यामुळे खऱ्या त्यागाचें फल त्याला प्राप्त होणार नाहींच ॥ ८ ॥

अथवा, आपला अधिकार काय आहे हें जो जाणतो, व आपलें विहित कर्म कोणतें हेंही ज्यास माहित आहे, परंतु तीं कर्में करण्याच्या क्लेशांस भिऊन जो त्यांजविषयीं कंटाळा करतो; ८४ कर्माचा प्रारंभ क्षणभर कठीण दिसतो; जशी शिदोरी नेते वेळेस जड लागते, ८५ जसा लिंब खाते वेळेस जिभेस कडू लागतो, व हिरडा तुरट लागतो, तसा कर्माचा आरंभ हा कठीण वाटतो; ८६ किंवा गाय मारकट असली, शेवंतीच्या झाडाला कांटे आहेत, व स्वयंपाक करतेवेळेस भोजनाचें सुख नसतें, ८७ तसें कर्म आरंभिते वेळेस अति कठोर असतें, म्हणून तें करण्याचे श्रम होतात असें तो समजतो. ८८ बाकी कर्माचा आरंभ यथाविधि करतो, पण कढत वस्तु हातांत घेऊन हात भाजतांच ती टाकून द्यावी त्याप्रमाणें त्या कर्माचरणापासून श्रम होऊं लागल्यावर तीं कर्में मध्येंच टाकतो; ८९ आणि म्हणतो कीं, माझें महद्भाग्य म्हणून देहासारखी उत्तम वस्तु लाभली असतां पाप्याप्रमाणें कर्माचें आचरण करून मी आपल्यास त्रास कां करून घ्यावा ? १९० कर्माचें आचरण करून त्यापासून मिळणारे जे भोग त्यांची मला गरज नाहीं, तर आज आपल्याला जें ऐश्वर्य प्राप्त झालें आहे त्याचाच उपभोग कां घेऊं नये ? ९१ अशा प्रकारें, अर्जुना, शरीरास क्लेश होतील या भीतीनें जो कर्में टाकून देतो, त्याला राजस त्याग असें म्हणतात. ९२ त्या ठिकाणींही कर्मत्याग होतो, परंतु त्याला कर्मत्यागाचें फल मिळत नाहीं. ज्याप्रमाणें उतू आलेलें तूप अग्नींत पडलें तरी त्याला होमाची योग्यता प्राप्त होत नाहीं. ९३ किंवा एखाद्याचा पाण्यांत बुडून प्राण गेला असतां त्यानें जलसमाधि घेतली असें म्हणतां येत नाहीं, तर त्याचें तें अपघाताचेंच मरण असें म्हटलें पाहिजे; ९४ त्याप्रमाणें देहावर प्रीति ठेवून ज्यानें कर्मावर पाणी सोडलें, त्याला कर्मत्यागाचें फल खास मिळत नाहीं. ९५ किंबहुना, ज्याला आत्मज्ञानाची प्राप्ति झाली आहे, त्याला, सूर्योदय झाल्यावर ज्याप्रमाणें नक्षत्रांचें तेज लोपतें, ९६ त्याप्रमाणें अर्जुना, ज्या कर्मत्यागापासून अज्ञानासह क्रियांचा लोप होतो, त्यापासून मोक्षप्राप्ति होते. ९७ अर्जुना,

राजसु जो ॥ ९८ ॥ अवतरणः—तरी कोणे पां एथ त्यागें। तें मोक्षफळ घर रिगे। हेंही आईक प्रसंगें। बोलिजेल ॥ ९९ ॥

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन।
संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥ ९ ॥

अन्वयः—अर्जुन, कार्यम् इति (मत्वा) एव यत् नियतं कर्म संगं च फलं त्यक्त्वा एव क्रियते, सः त्यागः सात्त्विकः मतः ॥ ९ ॥

(१०६७. सात्त्विक त्याग, २००–२११) तरी स्वाधिकाराचेनि नांवें। जें वांटिया आलें स्वभावें। तें आचरे विधिगौरवें। शृंगारोनि ॥ २०० ॥ परी हें मी करितु असें। ऐसा आठवु त्यजी मानसें। तैसेंचि पाणी दे आशे। फळाचिये ॥ १ ॥ पैं अवज्ञा आणि कामना। मातेच्या ठायीं अर्जुना। केलिया दोनी पतना। कारण होती ॥ २ ॥ तरी दोनी यें त्यजावीं। मग माताचि ते भजावी। वांचूनि मुखालागीं वाळावी। गायचि सगळी ॥ ३ ॥ आवडतियेही फळीं। असारें साली आंठोळी। त्यासाठीं अवगळी। फळातें कोण्ही ॥ ४ ॥ तैसा कर्तृत्वाचा मदु। आणि कर्मफळाचा आस्वादु। या दोहींचें नांव बंधु। कर्माचा कीं ॥ ५ ॥ तरी या दोहींच्या विखीं। जैसा बापु नातळे लेंकी। तैसा हों न शके दुःखी। विहिता क्रिया ॥ ६ ॥ हा तो त्याग तरुवरु। जो गा मोक्षफळें ये थोरु। सात्त्विक ऐसा डंगरु। यासीच जगीं ॥ ७ ॥ आतां जाळूनि बीज जैसें। झाडा कीजे निर्वंशें। फळ त्यागूनि कर्म तैसें। त्यजिलें जेणें ॥ ८ ॥ तया लागतखेंवो परिसीं। धातूची गंधिकाळिमा जैसी। जाती रजतमें तैसीं। तुटलीं दोन्ही ॥ ९ ॥ मग सत्त्वें चोखाळें। उघडती आत्मबोधाचे डोळे। तेथ मृगांबु सांजवेळे। होय जैसें ॥२१०॥ तैसा बुद्ध्यादिकां पुढां। असतु विश्वाभासु हा येवढा। तो न देखे कवणीकडां। आकाश जैसें ॥ ११ ॥

न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते।
त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥

अन्वयः—(यः) अकुशलं कर्म न द्वेष्टि, च कुशले न अनुषज्जते, सः सत्त्वसमाविष्टः मेधावी त्यागी छिन्नसंशयः (भवति) ॥ १० ॥

(१०७०. चांगल्या वाईट कर्माविषयीं तो द्वेष करीत नाहीं, २१२–२१४) म्हणोनि प्राचीनाचेनि बळें। अलंकृतें कुशलाकुशलें। तियें व्योमामार्गीं आभाळें। जिरालीं जैसीं ॥१२॥ तैसीं तयाचिये दिठी। कर्में चोखाळलीं किरीटी। म्हणोनि सुखदुःखीं उठी। पडेना तो ॥ १३ ॥ तेणें शुभकर्म जाणावें। मग तें

१ टाकी. २ प्रसिद्धि. ३ कलंक. ४ मृगजळ. ५ अलंकृत होई; त्यास प्राप्त होतात. ६ बरीं वाईट. ७ आकाशांत. ८ उठाठेव.

ती मोक्षप्राप्ति अज्ञानानें कर्मांचा त्याग केला असतां होत नाहीं. म्हणून तो खरा कर्मत्याग नसून राजस त्याग होय. ९८ तर कोणत्या त्यागापासून मोक्षप्राप्ति आपल्या घरीं चालत येते, तेंही प्रसंगानुरोधानें तुला सांगतों तें ऐक. ९९

श्लोकार्थः—अर्जुना, आपलें कर्तव्य असें समजूनच जें नित्यनैमित्तिक कर्म फलाची आशा व कर्तेपणाचा अभिमान टाकून केलें जातें, त्या त्यागाला सात्त्विक त्याग म्हणतात ॥ ९ ॥

तर आपल्या अधिकारानुरूप जें सहज आपल्या वाट्यांस आलेलें कर्म, तें साहित्यासह गौरवानें यथाविधि आचरण करितो; २०० परंतु हें कर्म मीं करीत आहें, अशी मनांत आठवणही होऊं देत नाहीं; तसेंच फळाच्या आशेवरही पाणी सोडतो; १ अर्जुना, असें पहा कीं, मातेची अवज्ञा केली व तिच्याविषयीं मनांत कामवासना उत्पन्न होऊं दिली, तर या दोन्ही गोष्टी नरकप्राप्तीस कारण होतात. २ तर ह्या दोन्ही वर्ज्य करून मातेची सेवा करावी; गाईचें तोंड अपवित्र असलें म्हणून गाईच्या सर्वांगाचा त्याग करावयाचा कीं काय ? ३ आपल्यास आवडतें जें फळ ( आंबा ) त्याची साल व कोय यामध्यें रस नाहीं, हे दोन दुर्गुण त्याचे ठिकाणीं आहेत, म्हणून तो आंबा कोणी टाकून देईल काय ? ४ त्याप्रमाणें, कर्म केल्याचा अभिमान आणि कर्मफळाची इच्छा या दोहोंसच बंध असें नांव आहे. ५ म्हणून, बाप ज्याप्रमाणें आपल्या कन्येविषयीं इच्छा बाळगीत नाहीं, त्याप्रमाणें विहित कर्मांचें आचरण करून जो या दोहोंविषयीं इच्छा करीत नाहीं, त्याला दुःख होऊं शकत नाहीं. ६ हा त्यागरूप वृक्ष सर्व वृक्षांत श्रेष्ठ असून, यालाच मोक्षरूप मोठालीं फळें येतात, म्हणून सर्व जगांत हा सात्त्विक त्याग अशी प्रसिद्धि आहे. ७ आता, झाडाचें बीज जाळून झाडास जसें निर्वंश करावें, तसें फळाचा त्याग करून जो कर्मांचा त्याग करतो; ८ ज्याप्रमाणें परिसाचा स्पर्श होतांक्षणींच लोखंडाचा कलंक व रंगही बदलतात, त्याप्रमाणें ( कर्मकर्तृत्वाचा अभिमान आणि कर्मफळाची इच्छा ) या दोन गोष्टींचा त्याग केल्यावर रज व तम हे दोन्ही त्याग नाहींतसे होतात. ९ मग शुद्ध सत्त्वानें आत्मबोधाचा उजेड होतो. जसें संध्याकाळीं मृगजळ आपोआप नाहींसें होतें, २१० किंवा आकाश ( पोकळी ) जसें कोणीकडे दिसत नाहीं, तसा, ज्ञानाच्या पुढें जगाचा मोठा मिथ्या भास दिसत नाहीं. ११

श्लोकार्थः—जो काम्य कर्मांचा द्वेष करीत नाहीं, व पुण्यकर्मांच्या ठिकाणीं सक्त होत नाहीं, तो शुद्ध चित्ताचा बुद्धिमान असा त्यागी संशयरहित होऊन मुक्त होतो ॥ १० ॥

म्हणून पूर्वकर्मानुरोधानें जीं बरीं वाईट कर्में प्राप्त होतील, तीं आकाशात जसे ढग उत्पन्न होऊन मावळतात, १२ तशीं अर्जुना, त्यांच्या दृष्टीनें सर्व कर्में निर्दोष असतात, म्हणून त्यांपासून होणाऱ्या सुखदुःखांची उठाठेव तो करीत नाहीं. १३ हें शुभ कर्म असें समजून तो तें हर्षानें करीत नाहीं, किंवा हें अशुभ म्हणून त्याचा द्वेष करीत नाहीं. १४ ज्याप्रमाणें जागृत झाल्यावर स्वप्नांत पाहिलेल्या गोष्टींचें कोणी सुखदुःख मानीत नाहीं,

हर्षे करावें । कां अशुभालागीं व्हावें । द्वेषिया ना ॥ १४ ॥ ( १०७१. बुद्धिमान संशयरहित होऊन कर्मत्याग करतो, त्यालाच त्याग म्हणतात, २१५–२३७ ) तरी इयाविषयींचा कांहीं । तया एकही संदेहो नाहीं । जैसा स्वप्नाच्या ठायीं । जागिन्नलिया ॥ १५ ॥ म्हणऊनि कर्म आणि कर्ता । या द्वैतभावाची वार्ता । नेणे तो पंडुसुता । सात्त्विक त्यागु ॥ १६ ॥ ऐसेनि कर्मे पार्था । त्यजिलीं त्यजिती सर्वथा । अधिकें बांधती अन्यथा । सांडिलीं तरी ॥ १७ ॥

न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।
यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥

अन्वयः—देहभृता हि अशेषतः कर्माणि त्यक्तुम् शक्यम् न; यः तु कर्मफलत्यागी, सः त्यागी इति अभिधीयते ॥ ११ ॥

( १०७२. देहधारी मनुष्याला कर्मत्याग शक्य नाहीं, २१८–२२६ ) आणि हां गा सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची । खंती कारिती कर्माची । ते गांवढे गा ॥ १८ ॥ मृत्तिकेचा वीटु । घेऊनि काय करील घटु । केउतें तंतु पटु । सांडील तो ॥ १९ ॥ तेवींचि वन्हित्व आंगीं । आणि उबे उबगणे आगी । कीं तो दीपु प्रभेलागीं । द्वेषु करील काई ॥ २२० ॥ हिंगु त्रासला घाणी । तरी कैंचें सुगंधत्व आणी ॥ द्रवपण सांडूनि पाणी । कें राहे तें ॥ २१ ॥ तैसा शरीराचेनि आभासें । नांदतु जंव असे । तंव कर्मत्यागाचें पिसें । काइसें तरी ॥ २२ ॥ आपण लाविजे टिळा । म्हणोनि पुसों ये वेळोवेळा । मा घाली फेडी निडळीं । कां करूं ये गा ॥ २३ ॥ तैसे विहित स्वयें आदरिलें । म्हणोनि त्यजूं ये त्यजिलें । परी कर्मचि देह आतलें । तें कां सांडील गा ॥ २४ ॥ जें श्वासोश्वासवरी । होत निजेलियाही वरी । कांहीं न करणेंचि परी । होती जयाची ॥ २५ ॥ या शरीराचेनि मिसेंकें । कर्मही लागलें असिकें । जिता मेलया न ठाके । इया रीती ॥ २६ ॥ ( १०७३. फल ईश्वरास अर्पण करून ज्ञान प्राप्त करून घेतो, तोच खरा त्यागी, २२७-२३२) यया कर्मातें सांडिती परी । एकीचि ते अवधारीं । जे करितां न जाइजे हारीं । फळाशेचिये ॥ २७ ॥ कर्मफळ ईश्वरीं अर्पे । तत्प्रसादें बोधु उद्दीपे । तेथ रज्जुज्ञानें लोपे । व्याळशंका ॥ २८ ॥ तेणें आत्मबोधें तैसें । अविद्येंशीं कर्म नासे । पार्था त्यजिजे जें ऐसें । तें त्यजिलें होय ॥ २९ ॥ म्हणोनि इयापरी जगीं । कर्मे त्यजी तो महात्यागी । येर मूर्च्छने नांव रोगीं । विसावा जैसा ॥ २३० ॥ तैसा कर्मी शिणे एकीं । तो विसावो पाहे आणिकीं । दांडेयाचे घाय बुकी । धाडणें जैसें ॥ ३१ ॥ परी हें असो पुढती । तोचि त्यागी त्रिजगतीं । तेणें फळत्यागें निष्कृति । नेलें कर्म ॥ ३२ ॥

---

१ कंटाळणें. २ मग. ३ कपाळ. ४ उभारणी होते. ५ निमित्तानें.

त्याप्रमाणें शुभ किंवा अशुभ यांविषयीं त्याचे मनांत शंकाच येत नाहीं. १९ म्हणून अर्जुना, ( ज्याच्या योगें ) हें कर्म आणि याचा कर्ता मी अशा द्वैतभावाची वार्ताही उरत नाहीं, त्याला सात्त्विक त्याग असें म्हणतात. १६ पार्था, अशा प्रकारें कर्मांचा त्याग केला म्हणजे तीं आपल्यास पूर्णपणें सोडतात; पण जर या व्यतिरिक्त अन्य प्रकारें कर्मांचा त्याग केला, तर तीं उलटीं अधिकच बंधनांत पाडतात. १७

श्लोकार्थः—देहधारी म्हणून जो आहे, त्यानें कर्मांचा निखालस त्याग करीन म्हणणें शक्य नाहीं; जो कर्मफलाचा मात्र त्याग करतो, त्यालाच खरा त्यागी असें म्हणतात ॥ ११ ॥

आणि अर्जुना, जे देह प्राप्त झाला असतां कर्म करण्याचा कंटाळा करितात, ते मूर्ख होत. १८ मातीचा कंटाळा करून घट काय करील? आणि वस्त्राला तंतूचा संबंध कसा तोडतां येईल? १९ तसेंच अग्नित्व अंगीं असलेल्या अग्नीला उष्णतेचा कंटाळा करितां येईल काय? किंवा दिवा आपल्या प्रभेचा द्वेष करील काय? २२० हिंगाला जरी आपल्या घाणीचा त्रास आला तरी त्यानें चांगला वास कोठून आणावा? किंवा पातळपणा टाकून पाणी कोठें राहणार? २१ त्याप्रमाणें, शरीराचे अवस्थेमध्यें जोंपर्यंत मनुष्य नांदत आहे, तोंपर्यंत कर्मत्यागाचें वेड काय उपयोगीं पडेल? २२ आपण लावलेलें गंध वाकडें लागलें तर तें वरचेवर पुसतां येतें, परंतु कपाळच जर वाकडें असेल, तर तें कसें नीट करतां येईल? २३ त्याप्रमाणें, ज्या विहित कर्मांचा आपणच स्वतः आदर केला आहे, त्याचा त्याग करावयाचा म्हटलें तर करतां येईल, पण ( त्यायोगें कांहीं कर्मत्याग होणार नाहीं. कारण, ) शरीर हें कर्मरूपच असल्यामुळें कर्म कसें टाकतां येणार? २४ कां कीं, मनुष्य निजला असला तरी श्वासोच्छ्वासरूपानें कर्म हें घडतेंच, अर्थात् आपण कांहींएक न करितां त्याची उभारणी होते. २५ या शरीराच्या निमित्तानें कर्म हें पाठीस लागलें आहेच; आणि जिवंतपणीं व मेल्यावरही याप्रमाणें कर्म करण्याचें रहात नाहीं. २६ हें बऱ्या कर्मांचा त्याग करण्याचा एकच प्रकार आहे. तो असा कीं, कर्म करीत असतां फलेच्छेच्या अधीन होऊं नये. २७ कर्माचें फल ईश्वरास अर्पण केलें म्हणजे त्याच्या प्रसादानें ज्ञान उत्पन्न होतें आणि मग, दोरीचें यथार्थ ज्ञान प्राप्त झाल्यावर जशी सर्पाची शंका दूर होते, २८ तसा या आत्मबोधानें अज्ञानासह कर्मांचा नाश होतो. पार्था, जेव्हां कर्मांचा अशा रीतीनें त्याग करावा, तेव्हांच तो खरा त्याग होय. २९ म्हणून, याप्रमाणें जो या जगांत कर्मांचा त्याग करतो, तोच महात्यागी ( त्याग करणारा ) होय. एरवीं, रोग्याला मूर्च्छा आली असतां ज्याप्रमाणें त्याला विश्रांति मिळाली असें लोक समजतात, २३० लाकडाच्या ऐवजीं जसा अंगावर बुक्क्यांचा मार सोसावयाचा, त्याप्रमाणें जो कर्म करतांना कंटाळतो, तो विसांवा घ्यावा म्हणून दुसरें कर्म सुरू करतो. ३१ परंतु हें असो, तिन्ही लोकांत त्यागी त्यालाच म्हणतात, कीं ज्यानें कर्म करून फलत्यागाच्या योगें त्याला तें न केल्याची योग्यता आणली. ३२

अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।
भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥

अन्वयः—अनिष्टम्, इष्टं च मिश्रं इति त्रिविधं कर्मणः फलं प्रेत्य अत्यागिनां भवति; संन्यासिनां तु क्वचित् न ( भवति ) ॥ १२ ॥

( १०७४. कर्मफलत्याग न करणारे मेल्यावर कर्मफळें भोगतात, २३३-२३७ ) येऱ्हवीं तरी धनंजया । त्रिविधा कर्मफळा गा यया । समर्थ ते कीं भोगावया । जे न सांडितीचि आशा ॥ ३३ ॥ आपणाचि विऊनि दुहिता[1] । कीं न मम[2] म्हणे पिता । तो सुटे कीं प्रतिग्रहीतां[3] । जांवाई शिरके ॥ ३४ ॥ विषाचे आगरही[4] वाहती । ते विकितां सुटले जिती[5] । येर निर्माले[6] जे घेती । वेंचोनि मोलें ॥ ३५ ॥ तैसें कर्ता कर्म करू । अकर्ता फळाशा न धरू । एथ न शके आवरूं । दोहींतें कर्म ॥ ३६ ॥ वाटे पिकलिया वृक्षाचें । फळ अपेक्षी तयाचें । तेविं साधारण कर्माचें । फळ घेतया ॥ ३७ ॥ ( १०७५. कर्मफलत्यागयाला मेल्यावर कर्मफलभोग नाहीं, २३८-२४० ) परी करूनि फळ नेघे । तो जगाच्या कामीं न रिघे । जे त्रिविध जग आवघें । कर्मफळ हें ॥ ३८ ॥ देव मनुष्य स्थावर । यया नांव जगडंबर । आणि हे तंव तिन्ही प्रकार । कर्मफळाचे ॥ ३९ ॥ तेंचि एक गा अनिष्ट[7] । एक तें केवळ इष्ट[8] । आणि एक इष्टानिष्ट । त्रिविध ऐसें ॥ २४० ॥ ( १०७६. अनिष्ट कर्मफल, २४१-२४२ ) परि विषयमंती[9] बुद्धि । आंगीं सूनि अविधि । प्रवर्तती जे निषिद्धीं । कुव्यापारीं[10] ॥ ४१ ॥ तेथ कृमि कीट लोष्ट[11] । हे देह लाहती[12] निकृष्ट । तया नाम तें अनिष्ट । कर्मफळ ॥४२॥ ( १०७७. इष्टकर्मफल, २४३-२४४ ) कां स्वधर्मा मानु देतां । स्वाधिकारु पुढां सूतां । सुकृत कीजे पुसतां । आम्नायातें[13] ॥ ४३ ॥ तैं इंद्रादिक देवांचीं । देहें लाहिजती सव्यसाची । तया कर्मफळा इष्टाची । प्रसिद्धि गा ॥ ४४ ॥ ( १०७८. इष्टानिष्ट कर्मफल, २४५-२४७ ) आणि गोड आंबट मिळे । तेथ रसांतर[14] फेरसाळें[15] । उठी दोहींवेगळें । दोहीं जिणतें[16] ॥ ४५ ॥ रेचकुचि[17] योगवशें । होय स्तंभावया[18] दोषें । तेविं सत्यासत्य समरसें[19] । सत्यासत्याचि जिणिजे ॥ ४६ ॥ म्हणोनि समभागें शुभाशुभें । मिळोनि अनुष्ठानाचें[20] उभें । तेणें मनुष्यत्व लाभे । तें मिश्र फळ ॥ ४७ ॥ ( १०७९. आशाबद्धाला कर्मफळें भोगावीं लागतात, २४८-२५६ ) ऐसें त्रिविध यया मार्गी । कर्मफळ मांडलेंसे जगीं । हें न सांडी तयां भोगी । जे सूदले आशा ॥ ४८ ॥ जेथ जिव्हेचा हातु फाटे । तंव जेवितां वाटे गोमटें । मग

१ कन्या. २ माझी नाहीं. ३ दान घेणारा. ४ बागा. ५ जिवंत; अलिप्त. ६ मेले. ७ प्रतिकूल. ८ अनुकूल. ९ विषयासक्त. १० दुराचार. ११ मातीचें ढेंकूळ. १२ पावतात. १३ वेदाला. १४ मधुर. १५ भिन्न रुचि येते. १६ जिंकून. १७ प्राणवायु ( सोडण्याचा ). १८ कुंभक ( स्थिरपणा ). १९ ऐक्य. २० कर्म घडतें.

श्लोकार्थः—अनिष्ट, इष्ट आणि इष्टानिष्ट असें तीन प्रकारचें कर्माचें फल कर्मफलाचा त्याग न करणाराला मरणानंतर प्राप्त होतें; परंतु ( कर्मफलाचा त्याग करणारे ) संन्यासी यांना ( तिन्ही फलांची प्राप्ति ) केव्हांही होत नाहीं ॥ १२ ॥

एरवीं तरी अर्जुना, हें कर्मफल तीन प्रकारचें आहे; आणि जे फळाची आशा सोडीत नाहींत, त्यांना तें भोगावें लागतें. ३३ आपण कन्येस जन्म दिला असूनही ती ' माझी नाहीं ' असें म्हणून पिता जेव्हां कन्यादानाचें उदक सोडतो, तेव्हां त्याची तिजवरील माया सुटून पाणिग्रहण करणारा जांवई तिचे मायापाशांत पडतो. ३४ जे विषाच्या ( बचनाग वगैरेंच्या ) बागा करितात, ते त्याची विक्री करूनही ( त्याच्या सेवनापासून अलिप्त असल्यामुळें ) मरण—भयापासून सुटून जिवंत असतात; पण जे त्याचें सेवन करितात, ते द्रव्य खर्चूनही मरण पावतात ! ३५ त्याप्रमाणें, कर्तेपणाचा अभिमान धरून, कर्म केलें, किंवा मी कर्ता नाहीं असें समजून फळाची आशा सोडली, तरी दोघांनाही कर्म स्वतः बांधीत नाहीं, म्हणजे कर्म उदासीन आहे. ३६ वाटेवरील वृक्षाच्या पिकलेल्या फळाची जो इच्छा करितो, त्यासच ती बाधक होते; तसें कर्माच्या फळाची इच्छा करणारास तें बाधक होतें. ३७ परंतु कर्म करून जो फळाची आशा करीत नाहीं, तो जन्ममृत्यूंच्या सपाट्यांत सांपडत नाहीं. कारण, हें तीन प्रकारचें जग कर्माचें फल आहे. ३८ देव, मनुष्य व स्थावर यालाच जग असें म्हणतात; आणि हे तिन्ही प्रकार तर कर्मफळाचेच आहेत. ३९ तेंच कर्म एक अनिष्ट ( प्रतिकूल ), एक केवळ इष्ट ( अनुकूल ) आणि एक इष्टानिष्ट ( मिश्र ) असें तीन प्रकारचें आहे. २४० परंतु जे विषयासक्त आहेत, ते अविधीचा अंगीकार करून निषिद्ध व वाईट अशा कर्माचे ठिकाणीं प्रवृत्त होतात, ४१ आणि त्यायोगें कृमि, कीटक अथवा माती असे वाईट देह पावतात. त्याला अनिष्ट कर्मफल असें म्हणतात. ४२ किंवा स्वधर्माला मान देऊन आपल्या अधिकारानुरूप वेदांत सांगितल्याप्रमाणें जेव्हां सुकृत करतात, ४३ तेव्हां अर्जुना, त्यांना इंद्रादिक देवतांचे देह प्राप्त होतात. त्या कर्मफळाला पुण्यकर्म असें म्हणतात; ४४ आणि गोड व आंबट हीं एकत्र केलीं असतां ज्याप्रमाणें या दोहोंहून वरचढ अशा निराळ्या रुचीचा मधुर रस उत्पन्न होतो; ४५ किंवा प्राणवायु योगाभ्यासानें कुंभक होतो, त्याप्रमाणें सत्य व असत्य याचें ऐक्य झाल्यावर तें त्या दोहोंनाही जिंकण्यास कारण होतें. ४६ म्हणून, शुभ व अशुभ कर्में समभाग मिळून जें कर्म घडतें, त्याचें मनुष्यदेहाचा लाभ हेंच मिश्रफळ होय. ४७ असें या जगांत तीन प्रकारचें कर्मफळ आहे; आणि जे या कर्मफळाची आशा टाकीत नाहींत, ते जन्ममरणाचे फेऱ्यांत पडतात. ४८ ज्या जेवणाराला जिभेला सहन न होईल इतके तिखट पदार्थ खाऊन समाधान होतें, त्याला त्या योगें परिणामीं अवश्य मरण प्राप्त होतें. ४९ जोंपर्यंत अरण्य लागलें नाहीं, तोंपर्यंतच संवचोराची मैत्री बरी; किंवा वेश्येशीं जोंपर्यंत समागम घडला नाहीं, तोंपर्यंतच तिच्या-

परिणामीं शेवटें । अवश्य मरण ॥ ४९ ॥ संवेचोरमैत्री चांग । जंव न पाविजे तें दांग । सामान्या भली आंग । न शिवे तंव ॥२५०॥ तैसीं कर्मे करितां शरीरीं । लाहती महत्त्वाची फरारी । पाठीं निधनीं एकसरी । पावती फळें ॥ ५१ ॥ तैसा समर्थु आणि ऋणिया । मागों आला वाइणिया । न लोटे तैसा प्राणिया । पडे तो भोगु ॥ ५२ ॥ मग कॅणिसौनि कणु झडे । तो विरूढला कणिसा चढे । पुढती भूमी पडे । पुढती उठी ॥ ५३ ॥ तैसें भोगीं जें फळ होय । तें फळांतरें वीत जाय । चालतां पायें पाय । जिणिजे जैसा ॥ ५४ ॥ उताराचिये सांगडी । ठाके ते ऐलीच थडी । तेविं न मुकीजती वोढी । भोग्याचिये ॥ ५५ ॥ पैं साध्य साधन प्रकारें । फळभोगु तो पसरे । एवं गोंविले संसारें । अत्यागी ते ॥ ५६ ॥ ( १०८०. त्यागी पुरुषाला कर्मफलभोग नाहीं, २५७–२६१ ) येरवीं जाईचिया फुलांचें फांकणें । त्याचि नाम जैसें सुकणें । तैसें कर्ममिषें न करणें । केलें जिहीं ॥ ५७ ॥ बीजचि वरोसि वेंचे । तेथ वाढती कुळवाडी खुंचे । तेविं फळत्यागें कर्माचें । सारिलें काम ॥ ५८ ॥ ते सत्त्वशुद्धि साहाकारें । गुरुकृपामृततुषारें । सासिन्नलेनि बोधें वोसरे । द्वैतदैन्य ॥ ५९ ॥ तेव्हां जगदाभासमिषें । स्फुरे तें त्रिविध फल नाशे । एथ भोक्ता भोग्य आपैसें । निमालें हें ॥ २६० ॥ घडे ज्ञानप्रधानु ऐसा । संन्यासु जयां वीरेशा । तेचि फलभोगसोसौं । मुकले गा ॥ ६१ ॥ ( १०८१. आत्मज्ञानी ( संन्यासी ) पुरुषाला कर्मफलाची बाधा नाहीं, २६२–२६७ ) आणि येणें कीर संन्यासें । जैं आत्मरूपीं दिठी पैसे । तैं कर्म एक ऐसें । देखणें आहे ॥ ६२ ॥ पडोनि गेलिया भिंती । चित्रांची केवळ होय माती । कां पाहालेया राती । आंधारें उरे ॥ ६३ ॥ जैं रूपचि नाहीं उभें । तैं छाया काह्याची शोभे । दर्पणेंवीण बिंबें । वदन कें पां ॥ ६४ ॥ फिटलिया निद्रेचा ठावो । कैचा स्वप्नासि प्रस्तावो । मग सत्य कीं तें वावो । कोण म्हणे ॥ ६५ ॥ तैसें गा संन्यासें येणें । मूळ अविद्येसीचि नाहीं जिणें । मा तियेचें कार्य कोणें । घेपे दीजे ॥ ६६ ॥ अवतरणः—म्हणोनि संन्यासियें पाहीं । कर्माची गोठी कीजेल कायी । परी अविद्या आपुल्या देहीं । आहे जैं कां ॥ ६७ ॥ ( १०८२. संन्यासी पुरुषाला कर्म लागत नाहीं, २६८–२७५ ) कर्तेपणाचेनि थांवें । आत्मा शुभाशुभीं धांवे । दृष्टि भेदाचिये गाणिवे । रचलीसे जैं ॥ ६८ ॥ तैं तरी गा सुवर्मा । विजावळी आत्मया कर्मा । अपाडें जैसी पश्चिमा । पूर्वेसि कां ॥ ६९ ॥ नातरी आकाशा कां आभाळा । सूर्या आणि मृगजळा ।

१ वरकातीं गोड गोड बोलून अंतर्यामीं घाताची इच्छा धरणाऱ्या चोराची मैत्री. २ वेश्या. ३ नायको, बयाणा, इस्ता. ४ कणसातून. ५ उगवला असतां. ६ शरीर. ७ ओढ चुकत नाहीं. ८ वरखर्चात. ९ शेतकी, उदीम. १० बंद पडे. ११ सिद्ध झालेल्या. १२ दुःखापासून.

शीं मैत्री बरी असते; २५० त्याप्रमाणें, देहांत आहेत तोंपर्यंत कर्मे करीत असतां कर्तेपणाचा गर्व वाहतात, परंतु शेवटीं मरणानंतर फल भोगावें लागतें. ५१ जसा समर्थ असून त्याचे जवळ ऋण काढलें, आणि मग तो जरी मायकोही मागूं लागला, तरी नाहीं म्हणवत नाहीं, त्याप्रमाणें, प्राणिमात्राला कर्मांचें फल भोगणें भाग पडतें. ( कर्मफल चुकत नाहीं. ) ५२ मग, कणसांतून दाणा खालीं पडल्यावर तो उगवला म्हणजे पुनः त्याला कणीस येतें, व त्याचे दाणे भूमीवर पडले म्हणजे दाण्याचें कणीस व कणसाचे दाणे असा क्रम सुरू होतो, ५३ त्याप्रमाणें, उपभोगाचें फल जें शरीर तें फलाच्या शेवटीं जन्म घेतें; जसा वाट चालणारा मनुष्य एकेक पाऊल टाकून वाट जिंकितो; ५४ किंवा होडी एक तीराहून दुसरे तीरास गेली असतां तिला प्रत्येक तीर अलीकडलाच होय, कारण प्रत्येक तीरास तिला पलीकडेपणा आहेच, म्हणून वाहून न्यावें लागतें, तसा फलाच्या उपभोगाला शेवट नाहीं. ५५ हें बघ कीं, साध्य व साधन अशा क्रमानें फल व फलाचा भोग हीं वाढतात; व फलेच्छेचा त्याग न करणारे संसारांत गुंडाळले जातात. ५६ एरवीं, जाईचें फूल ज्याप्रमाणें प्रफुल्लित होतांक्षणीं सुकतें, त्याप्रमाणें कर्माचा आरंभ करूनही फक्त अभिमान सोडून तें न केल्याप्रमाणें जे फलापासून अलिप्त असतात; ५७ बीजाकरितां ठेवलेलें धान्य जर दररोजच्या खर्चास खाऊन टाकिलें, तर मग पुढें पेरण्याचा प्रकार जसा बंद होतो, तसें फलाच्या त्यागानें कर्मांपासून प्राप्त होणारे जन्ममृत्यु बाजूस राहतात. ५८ शुद्ध सत्त्वाच्या साह्यानें गुरुकृपारूपी अमृताच्या तुपारानें सिद्ध झालेला जो आत्मबोध, त्यानें द्वैताचें दैन्य नाहींसें होतें. ५९ मग, ज्या तीन प्रकारच्या फलांपासून सर्व आभासरूप जग उत्पन्न होतें, तें आपोआप नाश पावून भोक्ता व भोग्य वस्तु याही आपोआप लयास जातात. २६० हे वीरेशा, ज्यांच्या हातून अशा प्रकारचा कर्मांचा ज्ञानप्रधान असा संन्यास होतो, त्यांनाच, फलाच्या भोगापासून होणारें दुःख होत नाहीं. ६१ आणि या संन्यासानें खरोखर जेव्हां आत्मस्वरूपीं दृष्टि पोहोंचते, तेव्हां कर्म निराळें आहे असें दिसतें काय ? ६२ भिंत पडल्यावर तिजवर काढलेलीं चित्रें मातीस मिळतात, अथवा उजाडल्यावर रात्रीचा अंधार दिसतो काय ? ६३ जर आकृतिच नसली, तर सावली कशाची पडणार ? आरसाच नसेल तर आपल्या मुखाचें प्रतिबिंब कोठें पडेल ? ६४ झोंप पुरी झाल्यावर स्वप्न कोठून पडणार ? आणि मग त्याला खरें अथवा खोटें कोण म्हणेल ? ६५ त्याप्रमाणें असा (कर्मफलाचा) संन्यास केला असतां अविद्येला थारा मिळत नाहीं; मग तिच्यापासून होणारें जें फल, त्याचा कोण उपभोग घेईल ? ६६ म्हणून, संन्यास केल्यावर कर्माची गोष्ट कोठून बोलता येणार ? परंतु जर आपल्या देहांत अज्ञान वास करीत असेल; ६७ जेव्हां कर्तेपणाच्या बळानें आत्मा चांगलीं व वाईट कर्में करण्यास प्रवृत्त होतो, व दृष्टिही भेदाच्या ऐश्वर्यानें जेव्हां युक्त असते, ६८ तेव्हां, हे सुवर्मा अर्जुना, आत्मा व कर्म यांचे ठिकाणीं पूर्व व पश्चिम याप्रमाणें द्वैतविशेष असतें. ६९ आकाश व आभाळ, सूर्य

विजेवळी भूतळा । वायूसि जैसी ॥ २७० ॥ पांघरोनि नईचें उदक । असे नयीमाजि खडक । परी जाणिजे कां वेगळिक । कोडीची ते ॥ ७१ ॥ हो कां उदकाजवळी । परी सिनानीचि ते बाबुळी । काय संगास्तव काजळी । दीपु म्हणों ये ॥ ७२ ॥ जरी चंद्रीं जाला कलंकु । तरी चंद्रेंसीं नव्हे एकु । आहे दृष्टी डोळयां विवेकु । अपाडु जेतुला ॥ ७३ ॥ नाना वाटा वाटे जातया । बोधा बोधीं वाहतया । आरसा आरसां पाहतया । अपाडु जेतुला ॥ ७४ ॥ पार्था गा तेतुलेनि मानें । आत्मेनिसीं कर्म सिनें । परी घेवविजे अज्ञानें । तें कीर ऐसें ॥ ७५ ॥ ( १०८३. कर्माची सिद्धि पांच कारणांनीं होते, असें सांख्यशास्त्र म्हणतें; आत्मा कांहीं करीत नाहीं, २७६–२८१ ) विकासें रवीतें उपजवी । द्रुति अलीकरवीं भोगवी । ते सरोवरीं कां वरवी । अब्जिनी जैसी ॥ ७६ ॥ पुढतपुढती आत्मक्रिया । अन्यकारणकाचि तैशिया । करूं पांचांही तयां । कारणां रूप ॥७७॥

पंचेमानि महाबाहो कारणानि निबोध मे ।
सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥

अन्वयः—महाबाहो, सर्वकर्मणा सिद्धये कृतान्ते साख्ये प्रोक्तानि इमानि पंच कारणानि मे निबोध ॥ १३ ॥

आणि पांचही कारणें तियें । तूंही जाणसील विषंयें । जे शास्त्रें उभऊनि बांहे । बोलती जयांतें ॥ ७८ ॥ वेदरायाचिया राजधानीं । सांख्यवेदांताच्या भुवनीं । निरूपणाच्या निशाणध्वनीं । गर्जती जियें ॥ ७९ ॥ जें सर्वकर्मसिद्धी-लागीं । इयेंचि मुदलें हो जगीं । तेथ न सुवावा अंभंगीं । आत्मराजु ॥ २८० ॥ इया बोलाचे डांगुरटी । तियें प्रसिद्धी आलीं किरीटी । म्हणोनि तुझ्या हन कर्ण-पुटीं । वसो काज ॥ ८१ ॥ ( १०८४. शास्त्रप्रकाशक प्रत्यक्ष असता शास्त्रप्रमाणें कशाला हवींत ? २८२-२८५ ) आणि मुखांतरीं आइकिजे । तैसें कायसें हें ओझें । मी चिद्रत्न तुझें । असतां हातीं ॥ ८२ ॥ दर्पणु पुढां मांडलेया । कां लोकाचियां डोळयां । मानु द्यावा पहावया । आपुलें निकें ॥ ८३ ॥ भक्त जैसेनि जेथ पाहे । तेथ तें तेंचि होत जायें । तो मी तुझें जाहालों आहें । खेळणें आजी ॥ ८४ ॥ ऐसें हें प्रीतीचेनि वेगें । देवो बोलतां से नेघे । तंव आनंदामाजीं आंगें । विरतसे येरु ॥ ८५ ॥ ( १०८५. देवभक्तांचें प्रेम; काव्यप्रतिभा, २८६-२८७ ) चांदिणियाचा पडिभरु । होतां सोमकांताचा डोंगरु । विघरोनि सरोवरु । हों पाहे जैसा ॥ ८६ ॥ तैसें सुख आणि अनुभूति । या भावांची मोडूनि भिंती । आंतलें अर्जुनाकृति । सुखाचि जेथ ॥ ८७ ॥ ( १०८६. आनंदांत बुडालेल्या अर्जुनाला सावध करितात, अर्जुन देवाला नमस्कार करून बोलतो; काव्य, २८८–२९० ) तेथ समर्थु म्हणोनि देवा । अवकाशु जाहला आठवा । मग बुडतयाचा धांवा । जीवें

आणि मृगजळ व पृथ्वी आणि वायु यांच्यांत संबंध जरी दिसला, तरी ते फार दूर आहेत; २७० नदीचें पाणी पांघरून नदींत खडक असतो, परंतु त्या दोहोंत जसें कोटपट अंतर असतें; ७१ पाण्यावर असलेलें शेवाळें हें पाण्यापासून वेगळें असतें; काजळाचा दिव्याशीं संबंध आहे, म्हणून त्या काजळाला दीप म्हणतां येईल काय ? ७२ जरी चंद्राला कलंक लागला आहे, तरी त्याचें चंद्राशीं ऐक्य नाहीं;. तसेंच, दृष्टि व डोळे यांमध्यें जितका भेद आहे, ७३ अथवा वाट व तिजवरून चालणारा वाटसरू, ओघ व ओघांत वाहणारें पाणी, आणि आरसा व आरशांत पाहणारा मनुष्य यांच्यांत जितका भेद आहे, ७४ तितक्याच मानानें आत्म्यापासून कर्म भिन्न आहे; परंतु अर्जुना, अज्ञानामुळें तीं दोन्ही एकच आहेत असें वाटतें. ७५ जशीं सरोवरांतील कमळें आपल्या फुलण्यानें रवीचा उदय झाला असें कळवितात, व आपल्यांतील मकरंदाचा भ्रमराकडून उपभोग घेववितात, ७६ तशी आत्म्याच्या ठिकाणीं असलेलीं कर्में अन्य कारणानें वारंवार उत्पन्न होतात. तीं कारणें पांच आहेत, त्यांचीं लक्षणें तुला सागतों. ७७

श्लोकार्थः—हे महाबाहो अर्जुना, सर्व कर्माच्या सिद्धीकरितां वेदांतशास्त्राचे सिद्धांतांत ही पाच कारणें सांगितलेलीं मी सांगतों, तीं समजून घे ॥ १३ ॥

तीं पांच कारणें तूंही कदाचित् जाणत असशील. कारण, ज्याविषयीं शास्त्रांनीं उंच हात करून वर्णन केलेलें आहे, ७८ तीं वेदराजाच्या राजधानींत सांख्यवेदांतरूप मंदिरांत निरूपणरूपी नौबदीनें प्रसिद्ध आहेत. ७९ कारण, सर्व कर्मांची सिद्धि होण्याकरितां या जगांत हींच मुख्य अवश्य आहेत, तर त्यांचे ठिकाणीं आत्म्यास कारणीभूत मानूं नको. २८० अर्जुना, अशी दौंडी पिटल्यानें त्यांची चहूंकडे प्रसिद्धि झालेली आहे, म्हणून तुलाही ठाऊक असूं दे, उपयोग होईल; ८१ आणि मी ज्ञानरूपी रत्न तुझे हातीं असल्यावर, दुसऱ्याचे तोंडांतून तूं ही गोष्ट ऐकावीस इतकी अडचण तुला कशास पाहिजे ? ८२ आपल्यासमोर आरसा असल्यावर, आपलें रूप पाहण्यास, लोकांना, माझें रूप कसें दिसतें तें मला सांगा, अशी विनंती कां करावी ? ८३ भक्त ज्या स्थितींत जिकडे पाहील, त्या ठिकाणीं ती वस्तु मी त्याच्या दृष्टीस पाडतों, तो मी आज तुझें खेळणें झालों आहें. ( हस्तगत झालों आहें ). ८४ असें प्रेमाच्या भरांत देव बोलत असतां त्यांना आठवण राहिली नाहीं, तों इकडे पार्थ आनंदांत निमग्न होऊन गेला. ८५ पौर्णिमेच्या चांदण्यांत सोमकांत मण्याचा डोंगर जरी असला, तरी तो पाझरून त्याचें सरोवर बनावें, ८६ त्याप्रमाणें सुख व अनुभव ह्या भावांचा पडदा नाहींसा होऊन सुखच अर्जुनाच्या आकृतीचें

१ वियोग. २ नदीचें. ३ वेगळी. ४ शेवाळें. ५ भेद ६ फुलण्यानें. ७ मकरंद. ८ भ्रमराकडून. ९ कमलिनी. १० कदाचित् ११ हात. १२ नौबद. १३ मध्यें. १४ दवंडी १५ दुसऱ्याचे तोंडून. १६ ज्ञानरूपी रत्न. १७ रूप. १८ प्रेमाच्या. १९ आठवण. २० भरांत. २१ अनुभव २२ व्यापलें.

केला ॥ ८८ ॥ अर्जुना येसणें धेंडें । प्रश्नोपसरेंसी बुडे । आलें भरतें एवढें । तें काढूनि पुढती ॥ ८९ ॥ देवो म्हणे हां गा पार्था । तूं आपणपें देख सर्वथा । तव श्वासूनि येरें माथा । तुकियेला ॥ २९० ॥ ( १०८७. अर्जुन म्हणतो, देवा, मला जीवभावाला ( द्वैतांत ) कां आणलें ? काव्य, २९१–२९२ ) म्हणे जाणसी दातारा । मी तुजशीं व्यक्तिशेंजारा । उबगलों आदीं एकाहारा । येवों पाहें ॥ ९१ ॥ तयाही हा ऐसा । लोभें देतसां जरी लालेसा । तरी कां जी घालीतसां । आड आड जीवा ॥ ९२ ॥ ( १०८८. प्रेमाचें खरें स्वरूप प्रगट व्हावें म्हणून द्वैतावर आणलें. अर्जुना, तूं काय प्रश्न केला होतास, आत्मा कर्माहून भिन्न आहे हाच ना ? काव्यप्रतिभा, २९३-२९६ ) तेथ श्रीकृष्ण म्हणती निकें । अद्यापि नाहीं मा ठाउकें । वेड्या चंद्रा आणि चांद्रिके । न मिळणें आहे ॥ ९३ ॥ आणि हाही बोलोनि भावो । तुज दाऊं आम्ही भिवों । जे रुसतां वांधे थांवो । तें प्रेम गा हें ॥ ९४ ॥ एथ एकमेकांचिये खुणे । विसंवादु तंवचि जिणें । म्हणोनि असो हें बोलणें । इयेविषयींचें ॥ ९५ ॥ मग कसकसें तें आतां । बोलत होतों पंडुसुता । सर्वकर्मभिन्नता । आत्मेनिसीं ॥ ९६ ॥ ( १०८९. अर्जुन म्हणतो, आत्मा कर्मातीत कसा तें सांगा; काव्यप्रतिभा, २९७-२९९ ) तंव अर्जुन म्हणे देवें । माझिये मनींचेंचि स्वभावें । प्रस्ताविलें बरवें । प्रमेय तें जी ॥ ९७ ॥ जें सकळकर्मांचें बीज । कारणपंचक तुज । सांगेन ऐसी पैज । घेतली कां ॥ ९८ ॥ आणि आत्मया एथ कांहीं । सर्वथा लागु नाहीं । हें पुढारलैंसि तें देईं । लाहाणें माझें ॥ ९९ ॥ ( १०९०. देव आनंदित होऊन म्हणतात, आत्मा कर्मातीत आहे असें कोण विचारतो आहे; काव्यप्रतिभा, ३०० ) यया बोला विश्वेशें । म्हणितलें तोषें बहुवसें । इयेविषयीं धरणें बैसे । ऐसें कें जोडे ॥ ३०० ॥ ( १०९१. देव म्हणतात, अर्जुना, मी तुझा ऋणी आहें म्हणून शब्दापलीकडचा सिद्धांत सांगतों, ३०१ ) तरी अर्जुना निरूपिजेल । तें कीर भोंघेआंतुल । परि मेचुंये होइजेल । ऋणिया तुज ॥ १ ॥ ( १०९२. अर्जुन देवाच्या बोलण्यावर विरोध दाखवितो; मागील २९३ ओंवींतील; काव्यप्रतिभा, ३०२ ) तंव अर्जुन म्हणे देवो । काइ विसरले मागील भावो । इये गोठी कीं राखत आहों । मीतूंपण जी ॥ २ ॥ ( १०९३. अर्जुनाचें बोलणें आपल्या अंगावर आलें असें जाणून देव पुढील विषय सांगतात. कर्मे पांच कारणांनींच उत्पन्न होतात, व आत्मा कर्मातीत आहे; काव्यप्रतिभा, ३०३-३१४, २८३-३१४ ) एथ श्रीकृष्ण म्हणती होका । आतां अवधानाचा पसरु निका । करूनियां आइका । पुढारलों तें ॥ ३ ॥ अवतरण:—( १०९४. कर्मांचीं पांच कारणें, ३०४-३७६ ) तरी सत्यचि गा धनुर्धरा । सर्वकर्मांचा उभारा । होतसे बाँहिरबाहिरा । कारणीं पांचें ॥ ४ ॥ आणि पंचकारण दळेंवाडें । जिहीं कर्माकारु मांडे ।

दिसूं लागलें. ८७ तेव्हां देव समर्थ असल्यामुळें त्यांस आठवण होऊन त्यांनीं सुखाच्या समुद्रात बुडणाऱ्या अर्जुनास वर काढलें. ८८ अर्जुनासारखा थोर असूनही तो बुद्धीच्या प्रसारासह बुडूं लागला, एवढें प्रेमाचें भरतें आलें असून तें बाजूला सारून, ८९ देव म्हणाले, "पार्था, तूं आपलें स्वरूप पाहून शुद्धीवर ये." तेव्हां उसासा टाकून अर्जुनानें मान डोलवली; २९० आणि तो म्हणाला कीं, "हे प्रभो, जो मी तुमच्या सानिध्यास (द्वैतभावास) त्रासून आज तुमच्या ऐक्यास येऊं पहात आहें, ९१ त्या माझें तुम्ही जर प्रेमानें कौतुक करीत असाल, तर मला जीवदशेस कां आणतां?" ९२ तेव्हां श्रीकृष्ण म्हणतात कीं, "अरे वेड्या, खरोखर तुला अजून कसें माहीत नाहीं, कीं चंद्र आणि प्रभा यांचा कधीं वियोग घडतो का? ९३ आणि असेंच बोलून तुला जी आम्ही भीति दाखवितों, तिनें तूं रुसलास म्हणजे आमच्या प्रीतीस जास्ती बळ येतें, अशी ही प्रीति होय. ९४ या ठिकाणीं एकमेकाचे खुणेनें परस्परांस जें बोलणें तेंच आपल्या वांचण्यास कारण होय, म्हणून याविषयीं वादविवाद पुरे. ९५ मग अर्जुना, मी आतां कसें कसें बोलत होतों, कीं सर्व कर्में आत्म्यापासून भिन्न आहेत. ९६ तेव्हां अर्जुन म्हणाला, देवा, माझे मनांतील तात्पर्यच सांगण्यास तुम्हीं होऊन आरंभ केला. ९७ सर्व कर्मांस कारणीभूत अशीं पांच कारणें तुला सांगेन अशी जी तुम्हीं प्रतिज्ञा केली, ९८ आणि आत्म्याचा कर्मांशीं कांहीं संबंध नाहीं असें जें तुम्ही बोलला होतां, तें माझें देणें मला द्या. ९९ हें बोलणें ऐकून भगवान अति संतोषानें म्हणाले, याविषयीं तूं धरणें घेऊन बसलास. असा विचारणारा आम्हांला कोठें मिळतो आहे? ३०० तर अर्जुना, तुला खरोखर सिद्धांत सांगतों; कारण मी तुझा ऋणी असल्यामुळें तुला मोठा नमून आहें. १ तेव्हां अर्जुन म्हणाला, हे देवा, तुम्ही मागील गोष्टींचा अभिप्राय विसरलां काय? आणि मी व तूं हें द्वैत आपल्या भाषणात का आणतां? २ तेव्हा श्रीकृष्ण म्हणाले, बरें तर; आता मी जी गोष्ट तुला सांगण्यास सुरवात केली होती, ती सांगतों; सावधान चित्तानें ऐक. ३ तर हे धनुर्धरा, खरोखर सर्व कर्मांची उभारणी या पांच कारणांनीं परभारें होते. ४ आणि ज्या या पांच कारणांच्या योगानें जो कर्माचा पसारा होतो, तींच पांच कारणें त्या कर्मास हेतु असतात. ५ दुसरा जो आत्मा, तो उदासीन असून कर्माला निमित्त कारण किंवा उपादान कारण नसतो, अथवा तो स्वतः कर्माला साह्य करीत नाहीं. ६ त्याचे ठिकाणीं शुभ किंवा अशुभ कर्में अशा रीतीनें होतात कीं, रात्र व दिवस आकाशांत उत्पन्न झालीं तरी आकाश जसें त्याहून वेगळें असतें, ७ पाणी व तेज यांपासून उत्पन्न होणाऱ्या वाफेचा वायूशीं संबंध झाला म्हणजे ती आकाशात जाऊन तिचे ढग

---

१ एवढें. २ बुद्धीच्या प्रसारासह. ३ सान्निध्यास. ४ त्रासून. ५ कौतुक. ६ प्रभेस. ७ भीति. ८ बळ. ९ मर्म. १० परस्पर बोलणें. ११ वाचणें. १२ तात्पर्य. १३ बोललास. १४ ऐकून; देणें. १५ सिद्धांत. १६ नमून. १७ परभारें. १८ स्वरूप.

ते हेतु तंव उघडे । पांच आथी ॥ ५ ॥ येथें आत्मतत्त्व उदासीन । तें ना हेतु ना उपादानें । ना तें अंगें करी संवाहनें । कर्मसिद्धीचें ॥ ६ ॥ तेथ शुभाशुभीं अंशीं । निफजती कर्मे ऐसीं । राती दिवो आकाशीं । जियापरी ॥ ७ ॥ तोयें तेजें धूंमु । ययां वायूशीं संगमु । जालिया होय अभ्रागमु । व्योम तें नेणे ॥ ८ ॥ नाना काष्ठीं नाव मिळे । ते नावाडेनि चळे । चालविजे आनिळें । उदक तें साक्षी ॥ ९ ॥ कां कवणे एकें पिंडें । वेंचिता अवतरे भांडें । मग भवंडीजे दंडें । भ्रमे चक्र ॥ ३१० ॥ आणि कर्तृत्व कुलेंलाचें । तेथ काय तें पृथ्वीयेचें । आधारावांचूनि वेंचे । विचारी पां ॥ ११ ॥ हेंहि असो लोकाचिया । राहाटी होतां आघविया । कोण काम सवितयां । आंगा आलें ॥ १२ ॥ तैसें पाचहेतुमिळणी । पांचेंचि इहीं कारणीं । कीजे कर्मलतांची लावणी । आत्मा सिना ॥ १३ ॥ आतां तेंचि वेगळालीं । पांचही विवंचूं गा भलीं । तुकोनी घेतलीं । मोतियें जैसीं ॥ १४ ॥

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम्।
विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥१४॥

*अन्वयः—अधिष्ठानं तथा कर्ता पृथग्विधं करणं च विविधाः पृथक् चेष्टाः च अत्र दैवं पंचमं एव ( भवति ) ॥ १४ ॥*

( १०९४. अधिष्ठान, ३१५-३२० ) तैसीं ययालक्षणें । आइकें कर्म-कारणें । तरी देह हें मी म्हणें । पहिलें एथ ॥ १५ ॥ ययातें अधिष्ठानें ऐसें । म्हणिजे तें याचि उद्देशें । जे स्वभोग्येंसी वसे । भोक्ता येथ ॥ १६ ॥ इंद्रियांच्या दाहें हातीं । जोंचोनिया दिवोराती । सुखदुःखें प्रकृति । जोडीजती जियें ॥ १७ ॥ तियें भोगावया पुरुखा । आन ठावोचि नाहीं देखा । म्हणोनि अधिष्ठानभाखा । बोलिजे देह ॥ १८ ॥ हें चोविसांही तत्वांचें । कुटुंबघर वस्तीचें । तुटे बंधमोक्षाचें । गुंथाडें एथ ॥ १९ ॥ किंबहुना अवस्थात्रयां । हें अधिष्ठान धनंजया । म्हणोनि देहा यया । हेंचि नाम ॥ ३२० ॥ ( १०९५. कर्ता, ३२१-३२६ ) आणि कर्ता हें दुजें । कर्माचें कारण जाणिजे । प्रतिबिंब म्हणिजे । चैतन्याचें जें ॥ २१ ॥ आकाशचि वर्षे नीर । तें तळवटीं बांधे नाडेरें । मग बिंबोनि तदाकार । होय जेवीं ॥ २२ ॥ कां निद्राभरें बहुवें । राया आपणपें ठाउवें नव्हे । मग स्वप्नींचिये मावे । रंकपणीं ॥ २३ ॥ तैसें आपुलेनि विसरें । चैतन्यचि देहाकारें । आभासोनि आविष्करे । देहपणें जें ॥ २४ ॥ जया विसराच्या देशीं । प्रसिद्धि गा जीवु ऐसी । जेणें भाष केली देहेंसी । आघवा विषयीं ॥ २५ ॥ प्रकृति करी कर्मे ।

१ हेतु=निमित्तकारण=कुंभार. २ उपादान कारण=घटातील माती. ३ साहाय्य. ४ दिवस. ५ पाणी. ६ सूर्य. ७ वाफ. ८ ढग. ९ आकाश. १० चालते. ११ मातीच्या गोळ्यानें. १२ कुंभाराचें.

बनतात, परंतु आकाशास जशी ही गोष्ट माहीत नसते; ८ पुष्कळ लांकडें एकत्र जोडून तयार केलेली नाव वाऱ्याच्या जोरानें नावाडी पाण्यावर चालवितो, परंतु त्या ठिकाणीं उदक जसें कांहीएक न करितां साक्षिभूत असतें; ९ किंवा मातीचा गोळा वेऊन चक्रावर ठेवून दाड्यानें चाक हलविल्यावर त्याचें मातीपण जाऊन भांडें तयार होतें; ४१० तर या ठिकाणीं कुंभाराच्या कसबाशिवाय भांड्यास आधारावांचून पृथ्वीचें दुसरें कोणतें साह्य मिळतें याचा विचार कर. ११ हेंही असो; परंतु जगांत लोकांचे सर्व व्यापार सूर्यप्रकाशानें चालत असतांही सूर्य ज्याप्रमाणें त्यांपासून अलिप्त असतो, १२ त्याप्रमाणें पांच कारणें मिळाल्यानें सर्व कर्मरूप वेलाची मांडणूक होते, व आत्मा हा वेगळाच असतो. १३ आतां तींच पांच कारणें चांगल्या प्रकारें वेगवेगळीं वर्णन करून सांगतों. मोत्यें ज्याप्रमाणें वजन करून घ्यावीं लागतात, १४

श्लोकार्थः—अधिष्ठान म्हणजे आधारभूत शरीर, तसाच कर्ता म्हणजे जीव व वेगळालीं इंद्रियें, व प्राणापान वायूंचे नानाप्रकारचे व्यापार आणि दैव म्हणजे इंद्रियांच्या देवता हीं पांच कारणें आहेत ॥ १४ ॥

त्याप्रमाणें, कर्मांच्या कारणांचीं सर्व यथार्थ लक्षणें तुला सांगतों, तीं ऐक. तर देह हें पहिलें कारण होय, असें मी म्हणतों. १५ या देहाला अधिष्ठान म्हणण्याचें प्रयोजन इतकेंच कीं, भोग्य जे विषय, त्यांसहवर्तमान भोक्ता या ठिकाणीं राहतो. १६ इंद्रियांच्या दहा हातांनीं रात्रंदिवस कष्ट सोसून प्रकृतीच्या योगानें जीं सुखें व दुःखें उत्पन्न होतात, १७ तीं भोगण्याकरितां मनुष्यास दुसरें ठिकाणच नाहीं. म्हणून देहाला अधिष्ठान असें म्हणतात. १८ हें चोवीस तत्त्वांचें वसतिस्थान असून बंध व मोक्ष यांचा उलगडा या ठिकाणीं होतो. १९ फार काय ? परंतु जागृति, स्वप्न व सुषुप्ति यांचें हें मुख्य ठिकाण होय. म्हणून हे धनंजया, या देहाला अधिष्ठान हेंच नांव योग्य आहे. ३२० आणि कर्माचें दुसरें कारण कर्ता हें होय. आणि ह्यालाच चैतन्याचें प्रतिबिंब म्हणजे जीव असें म्हणतात. २१ आकाशांतून पाऊस पडल्यावर त्याचें पृथ्वीवर डबकें होतें; आणि मग त्यांत आकाशाचेंच प्रतिबिंब पडल्यावर ज्याप्रमाणें तें प्रतिबिंब त्याचेच आकाराचें होतें; २२ किंवा निद्रेच्या भरांत राजा आपलें ऐश्वर्य विसरून स्वप्नांत आपण भिकारी झालों आहें असें समजतो, २३ तसेंच चैतन्य आपलें स्वरूप विसरून देहच मी असें मानून देहरूपानें प्रकट होतें. २४ ज्या देहांत आत्मस्वरूपाचा विसर पडतो, तेथें चैतन्य 'जीव' या नांवानें प्रसिद्ध आहे; व देहाला सर्व प्रकारें ज्यानें वचन दिलें आहे; '२५ देहाकडून जीं जीं कर्मे होतात, तीं मींच केलीं असें जो भ्रमानें म्हणतो, म्हणून जीवाला तो कर्मांचा कर्ता आहे असें म्हणतात. २६ मग दृष्टि ही एकच असून ज्याप्रमाणें

१३ सूर्याला. १४ वेगळी करूं. १५ ब्रह्म; आधार. १६ उद्देशानें. १७ कष्ट सोसून. १८ शब्दानें. १९ जागृति, स्वप्न, सुषुप्ति. २० जीव. २१ डबकें. २२ प्रकटे. २३ वचन देणें.

ते म्यां केलीं म्हणे भ्रमें । येथ कर्ता येणें नामें । बोलिजे जीवु ॥ २६ ॥ (१०९६. इंद्रियें वेगळालीं, ३२७-३३१) मग पातेयांच्यों केशीं । एकीच उठती दिठी जैसी । मोकळी चंवरी ऐसी । चिरींवें गमे ॥ २७ ॥ कां घराआंतुल एकु । दीपाचा तो अवलोकु । गवांक्षभेदें अनेकु । आवडे जेवीं ॥ २८ ॥ कां एकुचि पुरुषु जैसा । अनुसरत नवा रसां । नवविधु ऐसा । आवडों लागे ॥ २९ ॥ तेवीं बुद्धीचें एक जाणणें । श्रोत्रादिभेदें येणें । बाहेरि इंद्रियपणें । फांके जें कां ॥ ३३० ॥ तें पृथग्विध करण । कर्माचें इया कारण । तिसरें गा जाण । नृपनंदना ॥ ३१ ॥ ( १०९७. प्राणाच्या वेगळाल्या क्रिया, ३३२-३४३ ) आणि पूर्वपश्चिमवाहणी । निघालिया वोघाचिया मिळणी । होय नदी नद पाणी । एकचि जेवीं ॥ ३२ ॥ तैसी क्रियाशक्ति पवनीं । असे जे अनपायिनी । ते पडिली नानास्थानीं । नाना होय ॥ ३३ ॥ जें वाचे करी येणें । तें तेंचि होय बोलणें । हाता आली तरी घेणें । देणें होय ॥ ३४ ॥ अगा चरणाच्या ठायीं । तरी गति तेचि पाहीं । अधोद्वारीं दोहीं । क्षरणें तेचि ॥ ३५ ॥ [12]कंदौनि हृदयवरी । प्रणवाची उजेरी । करितां तेचि शरीरीं । प्राणु म्हणिजे ॥ ३६ ॥ मग ऊर्ध्वींचिया रिगनिगा । पुढती तेचि शक्ति पैं गा । उदानु ऐसिया लिंगा । पात्र जाहली ॥ ३७ ॥ अधोरंध्राचेनि वाहें । अपानु हें नाम लाहे । व्यापकपणें होये । व्यानु तेचि ॥ ३८ ॥ आरोगिलेनि रसें । शरीर भरी सरिसें । आणि न सांडितां असे । सर्वसंधीं ॥ ३९ ॥ ऐसिया इया राहटीं । मग तेचि क्रिया पाठीं । समानु ऐसी किरीटी । बोलिजे गा ॥ ३४० ॥ आणि जांभई शिंक ढेंकर । ऐसैसा होतसे व्यापार । नाग कूर्म कृकर । इत्यादि होय ॥ ४१ ॥ एवं वायूची हे चेष्टा । एकीचि परी सुभटा । वर्तनास्तव पालटा । येतसे जे ॥ ४२ ॥ ते भेदली वृत्तिपंथें । वायुशक्ति गा एथें । कर्मकारण चौथें । ऐसें जाण ॥ ४३ ॥ ( १०९८. देवतांचा अनुग्रह, ३४४-३५२ ) आणि ऋतु बरवा शारदु । शारदीं पुढती चांदु । चंद्रीं जैसा संबंधु । पूर्णिमेचा ॥ ४५ ॥ कां वसंतीं बरवा आरामु । आरामींहि प्रियासंगमु । संगमीं आगमु । उपचारांचा ॥ ४५ ॥ नाना कमळीं पांडवा । विकासु जैसा बरवा । विकासींही यावा । परागाचा ॥४६॥ वाचे बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व । रसिकत्वीं परतत्त्वस्पर्शु जैसा ॥ ४७ ॥ तैसी सर्ववृत्तिवैभवीं । बुद्धीचि एकली बरवी । बुद्धिही बरव नवी । इंद्रियमोढी ॥ ४८ ॥ इंद्रियमोढीमंडळा । शृंगारु एकुचि निर्मळा । जें अधि-

---

१ पापण्यांच्या. २ चिरलेली. ३ अवलोकन. ४ झरोका. ५ निरानिराळीं. ६ इंद्रियें. ७ रजोगुणाची कर्तृत्वशक्ति. ८ प्राणवायूंत. ९ न संपादन करतां असणारी. १० मलमूत्रद्वारीं. ११ टाकणें. १२ नाभीपासून. १३ ओंकाराची. १४ वृद्धि. १५ वर जाणारा. १६ श्वासोच्छ्वास.

पापण्यांच्या केसांमुळें चंवरीच्या केसाप्रमाणें चिरल्यासारखी दिसते; २७ अथवा घरात असलेला एकच दिवा झरोक्यांतून पाहिला असतां जसे त्याचे पुष्कळ दिवे दिसतात; २८ किंवा एकच पुरुष शृंगार, वीर, करुणा इत्यादि नवरसांचे आविर्भाव दाखवूं लागला म्हणजे तो जसा नऊ प्रकारचा वाटूं लागतो, २९ तसें बुद्धीचें एकच ज्ञान असून तें नेत्रादि इंद्रियांच्या निराळेपणानें बाहेर येऊं लागतें. ३३० हे नृपनंदना, तीं निरनिराळीं इंद्रियें हें कर्माचें तिसरें कारण होय असें समज. ३१ आणि पूर्वपश्चिमवाहिनी नद्या वहात वहात समुद्रास जातांच त्या जशा पाण्याच्या रूपानें एकत्र होतात, ३२ तशी रजोगुणाची कर्तृत्वशक्ति—जी संपादन केल्याशिवाय प्राणवायूंत मूळचीच आहे, ती निरनिराळ्या अवयवांत निरनिराळी भासते. ३३ जेव्हां ती वाचाद्वारें बाहेर पडते, तेव्हां तिला बोलणें असें आपण म्हणतों, व हस्तद्वारें बाहेर पडल्यावर वेण्यादेण्याचा व्यापार असें म्हणतात. ३४ अरे, जी पायांत आली असतां गति असें म्हणतात, व मलमूत्रद्वारें आली असतां 'क्षरण' असें म्हणतात. ३५ नाभीपासून हृदयापर्यंत ॐकाराची शरीरांत वृद्धि करते, तिलाच प्राण असें म्हणतात. ३६ मग वर जो श्वासोच्छ्वास जातो त्याच शक्तीला उदान ( कंठस्थ वायु ) असें नांव प्राप्त होतें; ३७ व गुदद्वारानें बाहेर येऊं लागली म्हणजे अपान ( गुदस्थ वायु ) हें नाव प्राप्त होतें; आणि सर्व शरीरास व्यापक झाली असतां व्यान ( शरीरस्थ वायु ) असें म्हणतात. ३८ खाल्लेल्या अन्नाचा रस सर्व शरीरांत पसरून जी सर्व साध्यांत भरलेली असते; ३९ अर्जुना, अशा सर्व क्रिया होत असून या शक्तीस नंतर समान (म्हणजे नाभिस्थ वायु) असें म्हणतात. ३४० आणि जाभई, शिक, ढेंकर वगैरे जे वायूचे व्यापार होतात, ते नाग, कूर्म, कृकर इत्यादि उपप्राणांचे होत. ४१ हे सुभटा, याप्रमाणें हे सर्व वायूचे खेळ असून त्यांच्या त्यांच्या वर्तनाप्रमाणें त्याचे नांवांत बदल होतो. ४२ अशी जी आपआपल्या व्यापारानें वायूची शक्ति निरनिराळी होते, तें कर्माचें चौथें कारण होय असें समज. ४३ आणि शरदृतूसारखा उत्तम ऋतु असून त्यांत चंद्रोदय व्हावा व तशांत पौर्णिमेचा योग असावा; ४४ अथवा वसंतऋतु असून त्यांत उत्तम बाग असावी, व बागेंत स्त्री संनिध असावी, आणि त्या योगांत सर्व साहित्याची भर पडावी; ४५ अथवा, अर्जुना, कमल असून तें उमलावें, व मग त्यांत पुष्परेणूंचा उद्भव व्हावा; ४६ एखाद्याचे वाणींत कवित्व असावें, त्या कवितेंत रसिकता असावी, आणि त्या रसिकतेंत आत्मतत्त्वाची भर पडावी; ४७ तसेंच, सर्व वृत्तींच्या ऐश्वर्यानें युक्त जी बुद्धि, ती उत्तम प्रकारची असून तशांत सर्व इंद्रियेंही तिला अनुकूल असावीं; ४८ आणि सर्व इंद्रियांना भूषण

१७ कंठस्थ वायु. १८ गुदद्वारानें. १९ गुदस्थ वायु. २० शरीरस्थ वायु. २१ खाल्लेल्या. २२ नाभिस्थ वायु. २३ नाग, कूर्म, कृकर, देवदत्त व धनंजय हे उपप्राण; ह्यांची जाभई; शिंक, ढेकर व उचकी व शरीर फुगवणें हीं लक्षणें. २४ बाग. २५ साहित्य. २६ उद्भव. २७ पुष्परेणु. २८ गोडी. २९ आत्मतत्त्व. ३० शोभा; भूषण.

श्रोत्रियां कां मेळा । देवतांचा जो ॥ ४९ ॥ म्हणूनि चक्षुरादिकीं दाहें । इंद्रियांपाठीं स्वानुग्रहें । सूर्यादिका कां आहे । सुरांचें वृंद ॥ ३५० ॥ तें देववृंद बरवें । कर्मकारण पांचवें । अर्जुना एथ जाणावें । देवो म्हणे ॥ ५१ ॥ एवं मानें तुझिये आयेणी । तैसी कर्मजातांची हे खाणी । पंचविध आकर्णीं । निरूपिली ॥ ५२ ॥ अवतरणः—( १०९९. कर्मे ज्या हेतूंनीं उत्पन्न होतें ते पांच हेतु, ३५३–३७७ ) आतां हेचि खाणी वाढे । मग कर्मांची सृष्टि घडे । जिहीं ते हेतुही उघडे । दाऊं पांचै ॥ ५३ ॥

शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।
न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥

अन्वयः—नरः शरीरवाङ्मनोभिः न्याय्यं वा विपरीतं वा यत् कर्म प्रारभते, तस्य ( एते ) पंच हेतवः ( संति ) ॥ १५ ॥

( ११००. मनाचें कर्म, ३५४–३५७ ) तरी अवसांत आली माधवी । ते हेतु होय नवपल्लवीं । पल्लव पुष्पपुंज दावी । पुष्पफळातें ॥ ५४ ॥ कां वार्षियें आणिजे मेघु । मेघें वृष्टिप्रसंगु । वृष्टीस्तव भोगु । सस्यसुखाचा ॥ ५५ ॥ नातरी प्राँची अरुणातें विये । अरुणें सूर्योदयो होये । सूर्यें सगळा पाहे । दिवो जैसा ॥ ५६ ॥ तसें मन हेतु पांडवा । होय कर्मसंकल्पभावा । तो संकल्पु लावी दिवा । वाचेचा गा ॥ ५७ ॥ ( ११०१. वाणीचें कर्म, ३५८ ) मग वाचेचा तो दिवटा । दावी कृत्यजातांचिया वाटा । तेव्हां कर्ता रिगे कौमठा । कर्तृत्वाच्या ॥ ५८ ॥ ( ११०२. शरीराचें कर्म व त्यामुळें पुन्हा शरीरप्राप्ति, ३५९-३६६ ) तेथ शरीरादिक दळवाडें । शैरीरादिकां हेतुचि घडे । लोहकाम लोखंडें । निर्वाळिजे जैसें ॥ ५९ ॥ कां तांथुवांचा ताणा । तांथु घालितां वैरणें । तो तंतुचि विचक्षणा । होय पटु ॥ ३६० ॥ तैसें मनवाचादेहाचें । कर्म मनादि हेतुचि रचे । रत्नीं घडे रत्नाचें । दंळेवाडें जेविं ॥ ६१ ॥ एथ शरीरादिकें कारणें । तेंचि हेतु केवि हें कोणें । अपेक्षिजे[७] तरी तेणें । अवधारिजो ॥ ६२ ॥ आइका सूर्याचिया प्रकाशा । हेतु कारण सूर्युचि जैसा । कां उंसाचें कांडें उंसा । वाढी हेतु ॥ ६३ ॥ नाना वैग्देवता वानावी । तैं वाचाचि लागे कामवीवी । कां वेदां वेदेंचि बोलावी । प्रतिष्ठा जेविं ॥ ६४ ॥ तैसें कर्मा शरीरादिकें । कारण हें कीर ठाउकें । परि हेंचि हेतु न चुके । हेंही एथ ॥ ६५ ॥ आणि देहादिकीं कारणीं । देहादि हेतुमिळणीं । होय जया उभारणी । कर्मजाता ॥ ६६ ॥ ( ११०३. न्याय्य कर्म, ३६७–३७० ) तें शास्त्रार्थे मानिलेया । मार्गा अनुसरे धनंजया । तरी न्याय तो न्याया । हेतु होय ॥ ६७ ॥ जैसा पर्जन्योदकाचा लोटु । विपायें धरी साळीचा पाटु । तो जिरे परी अचाटु ।

---

१ आश्रयानें असणारा. २ स्वकृपेनें. ३ समुदाय. ४ फळेल. ५ बुद्धि. ६ अकस्मात्.

भूपण देणारा असा जो देवांचा मेळा, तोही त्यांत अनुकूल असावा; ४९ म्हणून चक्षुरादि दहा इंद्रियांच्या ठिकाणीं सूर्यादि देवांच्या समुदायाची जी अनुकूलता, ३५० ते देवांचे समुदाय हें या कर्माचें पांचवें कारण होय. देव म्हणतात, समजलास अर्जुना? ५१ याप्रमाणें, तुझ्या बुद्धीस कळेल अशा रीतीनें कर्माचीं पांच प्रकारचीं कारणें तुला सांगितलीं, तीं ऐकिलींस ना? ५२ आतां, ज्या हेतूंच्या योगें हीं कर्मे घडतात, ते पाच हेतु तुला उघड करून सागतों. ५३

श्लोकार्थः—मनुष्य शरीरानें, वाणीनें व मनानें सशास्त्र किंवा अशास्त्र असें जें कर्म करितो, त्याचे हे अधिष्ठानादि पाच हेतु आहेत ॥ १५ ॥

तर अकस्मात् वसंतऋतु प्राप्त झाला असतां त्याच्या योगानें झाडास नवी पालवी फुटते, पालवी फुटल्यावर फुलांचे घोंस येतात, आणि फुलांपासून फळें निर्माण होतात, ५४ अथवा पावसाळ्यात मेघ उत्पन्न होतात, मेघांपासून पर्जन्यवृष्टि होते, आणि पर्जन्यवृष्टीपासून धान्य उत्पन्न होतें; ५५ किंवा पूर्वेस अरुणोदय होतो, अरुणोदय झाल्यावर सूर्य उगवतो, आणि सूर्याचा पूर्ण प्रकाश झाला म्हणजे दिवस होतो; ५६ त्याप्रमाणें अर्जुना, मन हें कर्माचा संकल्प होण्यास कारण आहे; आणि तोच संकल्प झाला म्हणजे वाचेनें बाहेर पडतो. ५७ मग वाणीच्या उजेडानें कर्माची वाट स्पष्ट दिसूं लागते, तेव्हां कर्ता कर्म करण्यास लागतो. ५८ तेव्हां शरीरादिक सर्व इंद्रियें कर्माला कारण होतात. लोखंडाचा एखादा जिन्नस तयार करणें झाल्यास ज्याप्रमाणें तो लोखंडाच्या हत्यारांनींच तयार करावा लागतो; ५९ अथवा तंतूंच्या मार्गांत तंतुच आडवे घातले म्हणजे त्या तंतूंचें वस्त्र होतें, ३६० जसे हिऱ्याला पैंद्व पाडावयाचे ते हिऱ्यानेंच पाडावे लागतात, तसें मन, वाचा व देह यांच्या कर्मास मनच कारण आहे. ६१ या ठिकाणीं, कर्माचीं शरीरादिक कारणें, तींच त्यांना हेतु कशीं होतील, अशी जर कोणी शंका घेईल, तर सांगतों, ऐक. ६२ हें पहा—सूर्याच्या प्रकाशास जसा सूर्यच हेतु व कारण आहे, किंवा उंसाचें कांडें हेंच उंसाच्या वाढीस हेतु आहे; ६३ अथवा सरस्वतीची स्तुति करणें असल्यास जसे वाणीलाच श्रम द्यावे लागतात, किंवा वेदांची थोरवी वर्णन करावयाची असल्यास ती वेदांनींच करावी लागते, ६४ तसें कर्माला शरीरादि हींच कारणें होत, हें सर्वांस माहीत आहे; परंतु या ठिकाणीं शरीरादिकच कर्मास हेतू आहेत, यांत शंका नाहीं. ६५ आणि देहादिक अधिष्ठानाला देहादिकच हेतु आहेत; व ज्याच्यामुळें कर्माची उभारणी होते, ६६ तें कर्म शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें जर केलें, तर हे धनंजया, तें पुण्यकर्म होय; व त्यालाच न्याय्यकर्म म्हणतात; आणि त्याचा हेतुही न्याय्यच होय. ६७ जसें पर्जन्याचें पाणी अवचित साळीला लावलें, तर तें जमि-

७ वसंतऋतु. ८ कारण. ९ फुलांचे झुबके. १० धान्य. ११ पूर्व दिशा. १२ व्यापारात. १३ कर्माला. १४ तंतूचा. १५ आडवा धागा. १६ पैद् पाडणें. १७ जाणण्याची इच्छा करील. १८ सरस्वती. १९ श्रमवावी. २० अधिष्ठानीं.

उपयोगु आथी ॥ ६८ ॥ कां रोपें निघालें अवचटें । पाडिलें द्वारकेचिये वाटे । तें शिणे परी सुनाटें । न वचती पदें ॥ ६९ ॥ तैसें हेतुकारणमेळें । उठी कर्म जें आंधळें । तें शास्त्राचे लाहे डोळे । तें न्याय म्हणिपे ॥३७०॥ ( ११०४. अन्याय्य कर्म हींच कर्मे पुढील जन्माला कारण होतात, ३७१-३७६ ) ना दूध वाढितां ठावों पावे । तंव उतोनि जाय स्वभावें । तोही वेंचु परी नव्हे । वेंचिलें तें ॥ ७१ ॥ तैसें शास्त्रसाह्येंवीण । केलें नोहे जरी अकारण । तरी लागो कां नागवण । दान-लेखीं ॥ ७२ ॥ अगा बावन्ना वर्णांपरतां । कोण मंत्रु आहे पंडुसुता । कां बावन्नही नुच्चारितां । जीवु आथी ॥ ७३ ॥ परी मंत्राची कडसणी । जंव नेणिजे कोदंडपाणी । तंव उच्चारफळा वाणी । न पवे जेविं ॥ ७४ ॥ तेविं कारणहेतुयोगें । जें विसाट कर्म निगे । तें शास्त्राचिये न लगे । कांसे जंव ॥ ७५ ॥ कर्म होताचि असे तेव्हांही । परी तें होणें नव्हे पाहीं । तो अन्यायो गा अन्यायीं । हेतु होय ॥ ७६ ॥

तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।
पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥

अन्वयः—तत्र एव सति यः केवलं तु आत्मानं कर्तारं पश्यति, सः दुर्मतिः अकृतबुद्धित्वात् न पश्यति ॥ १६ ॥

( ११०५. आत्मा काही न करतां आपल्या तेजानें कर्माचें प्रकाशन करतो, ३७७-३८० ) एवं पंचकारणा कर्मा । पांचही हेतु हे सुमहिमा । आतां एथें पाहें पां आत्मा । सांपडला असे ॥ ७७ ॥ भानु न होनि रूपें जैसीं । चक्षुरूपातें प्रकाशी । आत्मा न होनि कर्में तैसीं । प्रकटित असे गा ॥ ७८ ॥ पैं प्रतिबिंब आरिसा । दोन्ही न होनि वीरेशा । दोहींतें प्रकाशी जैसा । न्याहाळिता तो ॥ ७९ ॥ कां अहोरात्र सविता । न होनि करी पंडुसुता । तैसा आत्मा कर्मकर्ता । न होनि दावी ॥ ३८० ॥ ( ११०६. आत्मज्ञानी संस्कारहीन असतो । ३८१-३९४ ) परी देहाहंमानभुली । जयाची बुद्धि देहींच आतली । तया आत्मविषयीं जाली । मध्यरात्री गा ॥ ८१ ॥ जेणें चैतन्या ईश्वरा ब्रह्मा । देहचि केलें परमसीमा । तया आत्मा कर्ता हे प्रमा । अंलोट उपजे ॥ ८२ ॥ आत्माचि कर्मकर्ता । हाही निश्चयो नाहीं तत्वता । देहोंचि मी कर्मकर्ता । मानितो साच ॥ ८३ ॥ जे आत्मा मी कर्मातीतु । सर्वकर्मसाक्षिभूतु । हे आपुली कहीं मातु । नायकोचि कानीं ॥८४॥ म्हणोनि उमोपें आत्मयातें । देहचिवरी मैविजे एथें । विचित्र काई रात्रि दिवसातें । डुडुळें न करी ॥ ८५ ॥ पैं जेणें आकाशींचा कहीं । सत्य सूर्यु देखिला नाहीं ।

१ व्यर्थ. २ जात नाहींत. ३ संपतें. ४ छत्तीस व्यंजनें आणि सोळा स्वर याशिवाय. ५ युक्ति. ६ सामान्य. ७ व्यापली. ८ आत्मस्वरूपाची. ९ बुद्धि. १० पूर्ण. ११ अगणित. १२ मानतो. १३ घुबड.

नींत जिरतें, परंतु त्यापासून पुष्कळ उपयोग होतो; ६८ अथवा कोणी एखादा मनुष्य रागावून घरांतून निघाला व सहज द्वारकेच्या वाटेस लागला, तर त्याला चालण्याचे श्रम होतील खरे, परंतु त्याचें एक पाऊलही व्यर्थ जाणार नाहीं; ६९ तसें हेतु व कारण यांच्या योगानें जें अंधळें कर्म घडतें, तेंच जर सशास्त्र होईल, तर त्यालाच पुण्यकर्म म्हणावें. ३७० अथवा एका भाड्यांतील दूध ब्राह्मणांस वाढून संपलें, आणि दुसऱ्या पात्रांतील दूध आपोआप उतूं जाऊन संपलें, तर त्या दोन्ही पात्रांतील दूध खर्च झालें खरें, तथापि उतूं गेलेलें दूध खर्च झालें ( कारणीं लागलें ) असें म्हणतां येत नाहीं; ७१ तसें, शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें कर्म न केलें तर तें जर व्यर्थ होणार नाहीं, तर दरवड्यांत गेलेलें द्रव्य दान केलें असें कां समजूं नये ? ७२ अर्जुना, बावन्न वर्णांविरहित कोणचा मंत्र आहे ? अथवा, बावन्न वर्णांपैकीं एकाचा तरी उच्चार न करणारा असा कोण प्राणी सापडेल ? ७३ परंतु, अर्जुना, जोंपर्यंत मंत्राची युक्ति समजली नाहीं, तोंपर्यंत त्या बावन्न अक्षरांच्या उच्चारास मंत्रोच्चाराची फलप्राप्ति होणार नाहीं; ७४ त्याप्रमाणें, कारण व हेतु यांच्या योगानें जें सामान्य कर्म घडतें, तें जेव्हां यथाशास्त्र घडत नाहीं, ७५ तेव्हांही कर्म हें घडतच असतें; पण, बाबारे ! तें घडणें नव्हे, तें पापकर्म असून पापकर्मालाच हेतु आहे. ७६

श्लोकार्थः—याप्रमाणें सर्व कर्मांना हे पांच हेतु असतात. जो मनुष्य केवळ आत्माच कर्ता आहे असें पहातो, तो अज्ञानी वेदांतसंस्कारशून्य असल्यामुळें कांहींच जाणत नाहीं ॥ १६ ॥

अशा प्रकारें, हे सुमहिमा, कर्माच्या पांच कारणांस पांच हेतु आहेत. तर आतां या ठिकाणीं आत्मा हा कर्मास कारण आहे काय, सांग बरें ? ७७ ज्याप्रमाणें सूर्य हा स्वतः विषयी न होतां नेत्रादि पांच इंद्रियांचे विषय प्रकट करतो, त्याप्रमाणें, आत्मा कर्म न होतां करणाराकडून तीं करवितो. ७८ हें बघ अर्जुना, आरसा व प्रतिबिंब हीं दोन्ही आपण न होतां पाहणारा जसा दोहींला प्रकाशित करितो; ७९ किंवा हे पांडुसुता, सूर्य हा दिवस व रात्र यांस कारणीभूत असून ज्याप्रमाणें त्यांपासून अलिप्त असतो, त्याप्रमाणें, आत्म्याच्या अधिष्ठानावर जरी कर्म होतें, तरी तो कर्मकर्ता नाहीं असें दाखवितो. ३८० परंतु मीपणाच्या भ्रमानें ज्याची बुद्धि देह हाच मी अशी पक्की झाली आहे, त्याला आत्मस्वरूपाची मध्यरात्रच झाली आहे. ८१ ज्यानें चैतन्य, ईश्वर व ब्रह्म हें सर्व देहालाच मानलें आहे, त्याला आत्मा कर्ता आहे ही बुद्धि पूर्ण असते. ८२ आत्मा हाच कर्मकर्ता आहे असाही पक्का निश्चय तो करीत नाहीं, तर तो खरोखर देहालाच कर्मकर्ता असें मानतो. ८३ कारण, मी आत्मा कर्मातीत असून सर्व कर्मांना साक्षिभूत आहें, अशी स्वस्वरूपाची गोष्ट तो कानानेंही कधीं ऐकत नाहीं; ८४ म्हणून, सर्वव्यापक असा जो आत्मा, तो देहच होय असें तो मानतो. काय चमत्कार पहा, कीं, घुबड हें आपले डोळे झांकून घेऊन दिवसालाच रात्र म्हणत नाहीं काय ? ८५ हें पहा—ज्यानें

तो थिल्लरींचें बिंब काई । मानूं न लाहे ॥ ८६ ॥ थिल्लराचेनि जालेपणें । सूर्यासि आणी होणें । त्याच्या नाशीं नाशणें । कंपें कंपु ॥ ८७ ॥ आणि निद्रिस्ता चेवो नये । तंव स्वप्न साच हों लाहे । रज्जु नेणतां सर्पा विहे । विस्मो कवण ॥८८॥ जंव कवळें आथि डोळां । तंव चंद्र देखावा कीं पिंवळा । काय मृगींही मृगजळा । भाळावें नाहीं ॥ ८९ ॥ तैसा शास्त्रगुरूचेनि नांवें । जो वाराही टेंकों नेदी शिवें । केवळ मौढ्याचेनिचि जीवें । जियाला जो ॥ ३९० ॥ तेणें देहात्मदृष्टीमुळें । आत्मया घापे देहाचें जाळें । जैसा अभ्राचा वेगु कोल्हें । चंद्रीं मानी ॥ ९१ ॥ मग तया मानणयासाठीं । देहबंदीशाळे किरीटी । कर्माच्या वज्रगांठीं । कळौसे तो ॥ ९२ ॥ पाहे पां बंधभावना दृढा । नळियेवरी तो बापुडा । काय मोकळेयाही चवडा । नै ठकेचि पुंसां ॥ ९३ ॥ म्हणोनि निर्मळें आत्मस्वरूपीं । जो प्रकृतीचें केलें आरोपी । तो कल्पकोडीच्या मापीं । मैवीचि कर्में ॥ ९४ ॥ अवतरणः— ( ११०७. कर्मांतून सुटलेला पुरुष, ३९५–४०२ ) आतां कर्मामाजि असे । परी तयातें कर्म न स्पर्शे । वडवानळातें जैसें । समुद्रोदक ॥ ९५ ॥ तैसेनि वेगळेपणें । जयाचें कर्मीं असणें । तो कीर वोळखावा कवणें । तरी सांगों ॥ ९६ ॥ जे मुक्तातें निर्धारितां । लाभे आपलीच मुक्तता । जैसी दीपें दिसे पाहतां । आपली वस्तु ॥९७॥ नातरी दर्पणु जंव उटिजे । तंव आपणपयां आपण भेटिजे । कां तोय पावतां तोय होइजे । लवणें जेंवि ॥ ९८ ॥ हें असो परतोनि मागुतें । प्रतिबिंब पाहे बिंबातें । तंव पाहणें जाउनी आयितें । बिंबचि होय ॥ ९९ ॥ तैसें हारपलें आपणपें पावे । तैं संतांतें पाहतां गिंवसावें । म्हणोनि वानावे ऐकावे । तेचि सदा ॥ ४०० ॥ परी कर्मीं असोनि कर्में । जो नागेवे सैंमविषमें । चर्मचक्षूंचेनि चामें । दृष्टि जैसी ॥ १ ॥ तैसा सोडवला जो आहे । तयाचें रूप आतां पाहें । उपपैत्तीची बाहे । उभऊनि सांगों ॥ २ ॥

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।
हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हंति न निबद्ध्यते ॥ १७ ॥

अन्वयः—यस्य अहंकृतः भावः न, यस्य बुद्धिः न लिप्यते; सः इमान् लोकान् हत्वा अपि न हन्ति न निबद्ध्यते ॥ १७ ॥

(११०८. अहंकृति गेलेला पुरुष, ४०३-४२२) तरी अविद्येचिया निदा । विश्वस्वप्नाचा हा धांदौ । भोगीत होता प्रबुद्धा । अनादि जो ॥३॥ तो महावाक्याचेनि

१ डबक्यांतलें. २ जागृति. ३ कावीळ. ४ भुलावें. ५ बांधला जातो. ६ सोडीत नाहीं. ७ राघू. ८ मोजतो. ९ निश्चय करतां; शोध करतां. १० स्वच्छ करावा. ११ लिप्त होत नाहीं. १२ चांगल्या अथवा वाईट परिणामानें. १३ युक्तीची. १४ बाहु. १५ धंदा; अनुभव. १६ 'तत्त्वमसि' या महावाक्याच्या उपदेशानें.

खऱ्या सूर्यास कधीं पाहिलें नाहीं, तो डबक्यांतील पाण्यांत पडलेल्या प्रतिबिंबास सूर्य समजत नाहीं काय ? ८६ डबक्यांत पाणी सांचलें म्हणजे सूर्य जन्मास आला असें तो म्हणतो, तेंच पाणी वाऱ्यानें हाललें म्हणजे सूर्यास कंप सुटला असें म्हणतो, आणि डबकें कोरडें पडलें म्हणजे सूर्याचा नाश झाला असें समजतो; ८७ आणि निजलेला मनुष्य जोंपर्यंत जागा होत नाहीं, तोंपर्यंत त्याला स्वप्न खरें भासतें; ज्याला ही दोरी आहे हें कळत नाहीं, तो तिला सर्प समजून भितो, यांत नवल तें कोणतें ? ८८ जोंपर्यंत कावीळ झालेली आहे, तोंपर्यंत चंद्राचा रंग पिवळा दिसतो. अरे, मृगांनीं मृगजळाला भुलूं नये ? (तर मग कोणीं भुलावें ?) ८९ त्याप्रमाणें, शास्त्र व गुरु यांचीं नांवें उच्चारल्याबरोबर तो त्यांचा वाराही आपल्या शिवेस लागूं देत नाहीं. कारण तो मूर्खपणाच्याच जोरावर वांचलेला असतो. ३९० अभ्रें चालत असलीं म्हणजे ज्याप्रमाणें कोल्हे हे, चंद्र चालतो असा त्याचेवर आरोप करतात, त्याप्रमाणें, त्यानें देहच आत्मा आहे अशा दृष्टीनें आत्म्याला देहरूप जाळें घातलें आहे. ९१ मग अर्जुना, त्याच्या या समजुतीनें देहरूपी बंदिशाळेंत कर्माच्या बळकट गांठीनें तो बंदिवान होतो. ९२ अरे, हें पहा–बिचारा राघू नळीवर बसलेला असतो, तो मी बांधला गेलों आहें, अशा दृढ कल्पनेनें, आपला पंजा मोकळा असूनही ती नळी सोडीत नाहीं; ९३ म्हणून, निर्मळ अशा आत्मस्वरूपावर जो देहानें केलेल्या कर्माचा आरोप करतो, तो कल्पकोटीपर्यंत कर्मांतच गुंडाळला जातो. ९४ आतां, कर्म करीत असूनही ज्याला कर्माचा स्पर्श होत नाहीं; जसा वडवानल हा समुद्रांत असूनही त्याला समुद्र स्पर्श करीत नाहीं, ९५ तसें जो अलिप्तपणानें कर्म करीत असतो, तो खरोखर कसा ओळखावा, तें सांगतों. ९६ अशा मुक्त मनुष्य कोण आहे म्हणून शोध करूं लागलें असतां आपल्यालाच मुक्ति मिळते. जसें दिव्याच्या उजेडानें पाहूं लागल्यावर आपली हारवलेली वस्तु सांपडते, ९७ अथवा आरसा स्वच्छ करूं लागलें असतां आपलें स्वरूप त्यांत आपल्यास दिसतें; किंवा मीठ पाण्यांत घातलें असतां जसें त्याचें पाणी होतें; ९८ फार काय, आरशांतील प्रतिबिंबाकडे न पाहतां मागें फिरून पाहिलें असतां आपलें स्वरूप आपोआप दिसतें, ९९ तसें संतांच्या स्थितीचा विचार केला असतां आपलें हारवलेलें स्वरूप आपल्यास मिळतें. म्हणून, संतांचेंच नेहमीं वर्णन करावें व त्यांचेच गुण नेहमीं श्रवण करावे. ४०० परंतु कर्म करीत असून जो कर्माच्या वाईट अथवा चांगल्या परिणामानें लिप्त होत नाहीं; जशी चर्मचक्षूंच्या चर्मानें खरी दृष्टि लोपत नाहीं, १ तसा जो कर्मातीत झाला आहे, त्याचीं लक्षणें तुला युक्तीचे बाहु उभारून सांगतों. २

श्लोकार्थः—मी हें अमुक कर्म करितों असा ज्याला अभिमान नाहीं, आणि ज्याच्या बुद्धीला कर्मापासून विकार होत नाहीं, त्यानें जरी या सर्व प्राण्यांचा वध केला, तरी तो वध करीत नाहीं, व त्या वधाच्या दोषानें बद्ध होत नाहीं ॥ १७ ॥

तर, हे प्रबुद्धा अर्जुना, जो अज्ञानाच्या निद्रेंत विश्वरूपी स्वप्नाचा अनुभव पुष्कळ

नांवें । गुरुकृपेचेनि थांवें । माथां हात ठेवणें नव्हे । थापटिला जैसा ॥ ४ ॥ तैसा विश्वस्वप्नेंसी माया- । नीद सांडूनि धनंजया । सहजेंचि चेइला अद्वया- । नंदपणें जो ॥ ५ ॥ तेव्हां मृगजळाचें पुर । दिसतें एक निरंतर । हारपती कां चंद्रकर । फांकतां जैसे ॥ ६ ॥ कां बाळत्व निघोनि जाय । तें बागुला नाहीं त्राय । पैं जळालिया इंधन न होय । इंधन जेविं ॥ ७ ॥ ना ना चेवो आलिया पाठीं । तें स्वप्न न दिसे दिठी । तैसी अहंममता गा किरीटी । नुरेचि तया ॥ ८ ॥ मग सूर्य आंधारालागीं । रिघो कां भलते सुरंगीं । परी तो तयाच्या भागीं । नाहींचि जैसा ॥ ९ ॥ तैसा आत्मत्वें वेष्टिला होये । तो जया जया दृश्यातें पाहे । तें दृश्य द्रष्टेपणेंसी होत जाये । तयाचेंचि रूप ॥ ४१० ॥ जैसा वन्हि जया लागे । तें वन्हिचि जालिया आंगें । दाह्यदाहकविभागें । सांडिजे तें ॥ ११ ॥ तैसा कर्मा- कारा दुर्जेया । तो कर्तेपणाचा आत्मया । आळु आला तो गेलिया । कांहीं बाहीं जें उरे ॥ १२ ॥ तिये आत्मस्थितीचा जो रावो । मग तो देहीं इये जाणेल ठावो । काय प्रलयांबूचीं उन्नोहो । बोध मानी ॥ १३ ॥ तैसी ते पूर्ण अहंतां । काई देहपणें पंडुसुता । आवरे काई सविता । बिंबें धरिला ॥ १४ ॥ पैं मथूनि लोणी घेपे । तें मागुतीं ताकीं घापे । तरी तें अलिप्तपणें सिंपे[13] । तेणेंसी काई ॥ १५ ॥ नाना काष्ठौनि वीरेशा । वेगळेंविलिया हुताशौ । राहे काष्ठाचिया मांदुसौ । कोंडलेपणें ॥ १६ ॥ कां रात्रीचिया उदरायांतु । निगाला जो हा भास्वंतु । तो राती ऐसी मातु । ऐके कानीं ॥ १७ ॥ तैसें वेद्य वेदकपणेंसी । पाडिलें कां जयाचे ग्रासीं । तया देह मी ऐसी । अहंता कैंची ॥ १८ ॥ आणि आकाशें जेथें जेथुनी । जाइजे तेथ असे भरोनी । म्हणोनि ठेलें कोंदोनी । आपेंआपे ॥ १९ ॥ तैसें जें तेणें करावें । तो तेंचि आहे स्वभावें । मा कोणें कर्मी वेष्टावें । कर्तेपणें ॥ ४२० ॥ नुरेचि गगनावीण ठावो । नोहेचि समुद्रा प्रवाहो । नुठीचि ध्रुवा जावो । तैसें जाहलें ॥ २१ ॥ ऐसेनि अहंकृतिभावो । जयाचा बोधीं जाहला वावो । तऱ्ही देहा जंव निर्वाहो । तंव आथी कर्में ॥ २२ ॥ ( ११०९. ज्ञान्याचीं कर्में पूर्वसंस्कारामुळें होतात, ४२३–४३१ ) वारा जरी वाजोनि वोसरे[21] । तरी तो डोल रुखीं उरे । कां सदे[22] [23]द्रुति राहे कापुरें । वेंचलेनि ॥ २३ ॥ कां सरलेया गीताचा समारंभु । न वचे राहिलेपणाचा क्षोभुं[24] । भूमी लोळोनि गेलिया अंबु । वोल थारे

१ बळानें. २ अज्ञान. ३ निजस्वरूपाच्या दर्शनानें. ४ चंद्रकिरण. ५ थारा. ६ भुयारांत. ७ जळणारी वस्तु, लांकूड वगैरे. ८ जाळणारा अग्नि. ९ द्वैत. १० प्रळयकालच्या जलाचा. ११ वृद्धि. १२ अहंब्रह्म. १३ मिळे. १४ निराळा केल्यावर. १५ अग्नि. १६ पेटी. १७ सूर्य. १८ जाणण्याची वस्तु व जाणणारा. १९ आपल्या स्वरूपांत. २० व्यर्थ. २१ कमी झाला. २२ करंड्यांत. २३ वास. २४ भर.

चर्ये घेत होता, ३ तो, तत्त्वमसि हें महावाक्य कानीं पडून गुरुकृपेच्या जलानें मस्तकावर नुस्ता हात ठेवून नव्हे तर जसा थापटून जागा केला आहे, ४ तसा अर्जुना, जगद्रूपी स्वप्न व अज्ञानरूपी निद्रा टाकून सहज निजस्वरूपाच्या दर्शनानें जागा झाला; ५ तेव्हां, चंद्र उगवल्यावर मृगजळाचे दिसणारे पूर आपोआप जसे नाहींतसे होतात; ६ किंवा बाल्यदशा निघून गेल्यावर बागुलबोवाला जसें कोणी भीत नाहीं; किंवा लांकूड जळल्यावर त्यांत जसें लांकूडपण रहात नाहीं; ७ अथवा जागृत झाल्यावर स्वप्न जसें दृष्टीस पडत नाहीं, तसा अर्जुना, त्याला मी व माझें हा अभिमान राहत नाहीं. ८ मग, अंधार पाहण्याकरितां जरी सूर्य हा वाटेल त्या भुयारांत शिरला, तरी तेथें जसा अंधार रहात नाहीं, ९ तशी, मी आत्मा आहें, अशी ज्याची पूर्ण समजूत झाली, तो ज्या वस्तूकडे पाहील, ती वस्तु व त्याची दृष्टि हीं त्याला आत्मरूपीच दिसतील. ४१० अग्नि ज्या पदार्थास लागतो तो पदार्थ जसा अग्निरूपच होतो; व मग जसा दाह्य व दाहक हा भेद शिल्लक रहात नाहीं, ११ तसें कर्माचे ठिकाणीं द्वैत मानून तें कर्म करण्याचा आत्म्यावर आळ आलेला नाहींसा झाल्यावर जें कांहीं (शरीर) उरतें, १२ त्या शरीरालाच, अशा रीतीनें जो आत्मस्वरूपांत निमग्न झाला, तो आत्मा, असें कसें मानील? हें पहा, प्रळयकालच्या जलांत लहानमोठे असे काहीं ओघ असतात काय? १३ त्याप्रमाणें अर्जुना, ज्याचे ठिकाणीं अहंब्रह्म अशी पूर्ण स्थिति झाली आहे, त्याला मी देह आहें, असें कोठून वाटणार? हें पहा, सूर्याचें पडलेलें प्रतिबिंब हातांत धरलें असतां सूर्य धरला जातो काय? १४ ताक घुसळून लोणी काढल्यावर तें पुनः ताकांत घातलें, तर तें त्यापासून अलिप्त असल्यामुळे त्यांत मिसळतें का? १५ अथवा, हे वीरेशा, लांकडांतून अग्नि तयार करून निराळा काढल्यावर तो लांकडाच्या पेटींत कोंडून राहील काय? १६ किंवा रात्रीच्या उदरातून जो सूर्य बाहेर निघाला आहे, तो 'रात्र' अशी गोष्ट कानांनीं ऐकील तरी का! १७ त्याप्रमाणें, जाणण्याची वस्तु व जाणणारा हीं ज्याचे ठिकाणीं ऐक्य पावलीं आहेत, त्याला मी देह आहें (अथवा देहच आत्मा आहे) असा गर्व कोठून असणार! १८ आणि आकाश जेथें जिकडून जाईल, तेथें भरलेलेंच आहे; म्हणून तें आपल्या स्वरूपांतच भरलेलें आहे; १९ तसें तो जें जें करितो, तें आत्मस्वरूपच आहे; मग कोणत्या कर्मानें तो आपलेकडे कर्तेपणा घेईल? ४२० गगनाशिवाय कोणतेंही ठिकाण नाहीं, समुद्राला प्रवाह नाहीं, व ध्रुव नक्षत्राला कोठेंही जातां येत नाहीं, तशी त्या मनुष्याची स्थिति झालेली असते. २१ अशा प्रकारें ज्याला आत्मज्ञानाच्या योगें कर्माच्या कर्तेपणाचा अभिमान व्यर्थ वाटत आहे, त्याचा देह आहे तोंपर्यंत त्याच्याकडून कर्मं होतातच; २२ वारा वाहण्याचा जरी बंद झाला, तरी झाडाचे हालणें बंद होत नाही, अथवा कापूर जरी संपला, तरी करंड्यांत वास शिल्लक असतो; २३ गाण्याचा समारंभ संपला तरी गाणें ऐकून मनास झालेल्या आनंदाचा भर जसा कमी होत नाहीं, किंवा पाण्यानें जमीन ओली होऊन पाणी कमी झालें असतां जशी

॥ २४ ॥ अगा मावळलेनि अर्कें[1] । संध्येचिये[2] भूमिके[3] । ज्योतिदीप्ति[4] कौतुकें । दिसे जैसी ॥ २५ ॥ पैं लक्ष भेदिलियाहीवरी । बाण धांवेचि तंववरी । जंव भरली आथी उँरी । बळाची तया ॥ २६ ॥ नाना चाकीं भांडें जालें । तें कुलालें[7] परतें नेलें । परी भ्रमेचि तें मागिले । भोंवडिलेपणें[8] ॥ २७ ॥ तैसा देहाभिमानु गेलिया । देह जेणें स्वभावें धनंजया । जालें तें अपैसया । चेष्टवीच तें ॥ २८ ॥ संकल्पेंवीण[9] स्वप्न । न लाविता दांगीचें वन । न रचितां गंधर्वभुवन । उठी जैसें ॥ २९ ॥ आत्मयाचेनि उद्यमेंवीण । तैसें देहादिपंचकारण । होय आपणया आपण । क्रियाजात ॥ ४३० ॥ पैं प्राचीनसंस्कारवशें । पांचही कारणें सहेतुकें । कामैंवीजती[10] गा अनेकें । कर्माकारें ॥ ३१ ॥ ( १११०. ज्ञान्याच्या आचरणांत जगाचा घात झाला तरी त्याला दोष नाहीं, ४३२–४३६ ) तया कर्मामाजीं मग । संहरो आघवें जग । अथवा नवें चांग । अँनुकरो[11] ॥ ३२ ॥ परी कुमुंदें[12] कैसेनि सुके । तें कमँळ[13] कैसें फांके । हीं दोन्ही रवि न देखे । जयापरी ॥ ३३ ॥ कां वीजु वर्षोनि थाभाळ । ठिकरिया आतो भूँतळ[14] । अथवा करू शाड्वेंळें[15] । पर्जन्य-वृष्टि ॥ ३४ ॥ तरी तया दोहींतें जैसें । नेणिजेचि कां आकाशें । तैसा देहींच जो असे । विदेहेंदृष्टि[16] ॥ ३५ ॥ तो देहादिकीं चेष्टीं । घडतां मोडतां हे सृष्टि । न देखे स्वप्नदृष्टि । चेइला जैसा ॥ ३६ ॥ ( १११९. अज्ञानी लोक ज्ञात्याला कर्ता असें समजतात, ४३७–४५३ ) येऱ्हवीं चामाचे डोळेवरी । जे देखती देहचिवरी । ते कीर तो व्यापारी । ऐसेंचि मानिती ॥ ३७ ॥ कां तृणाचा वाहुला । जो आगेंरा[17] मेरे ठेविला । तो साचचि राखता कोल्हा । मानिजे नरा ॥ ३८ ॥ पिसें[18] नेसलें कां नागवें । हें लोकीं येऊनि जाणावें । ठोंणोरियांचे[19] मवावे । आणिकीं घाय ॥ ३९ ॥ कां महासतीचे भोग । देखे कीर सकळ जग । परी ते आगी ना आंग । ना लोकु देखे ॥ ४४० ॥ तैसा स्वस्वरूपें उठिलें[20] । जो दृश्येंसी द्रष्टा आटलें[21] । तो नेणे काय राहटेंलें[22] । इंद्रियेंग्रामु[23] ॥ ४१ ॥ अगा थोरीं कल्लोळीं कल्लोळ साने । लोपतां तीरींचेनि जनें । एकाएकीं गिळिले हें मनें । मानिजे जऱ्ही ॥ ४२ ॥ तऱ्ही उदकाप्रति पाहीं । कोण ग्रासितसे काई । तैसें पूर्णा दुजें नाहीं । जें तो मारी ॥ ४३ ॥ सुवर्णाचिया चंडिकेंं । सुवर्णशूळेंचि देखा । सुवर्णाचिया महिखेंा[25] । नाशु केला ॥ ४४ ॥ तो देवेंलवसिया[24] कडा । व्यव-

१ सूर्यानें. २ संध्याकाळच्या. ३ आकाशांत. ४ तेज. ५ निशाण. ६ वेग. ७ कुंभारानें. ८ गतीनें. ९ संकल्पाशिवाय. १० क्रिया करवितात. ११ उत्पन्न होवो. १२ चंद्रविकासी कमल. १३ सूर्यविकासी कमल. १४ जमीन. १५ हिरवें गवत. १६ देहाभिमानरहित. १७ शेताच्या कडेस. १८ वेडा मनुष्य. १९ रणांत पडलेल्यांचे. २० जागृत झाला. २१ भाव नाहींसा झाला. २२ व्यवहार केला. २३ इंद्रियसमुदाय. २४ देवीनें. २५ महिषासुर. २६ भक्ताच्या दृष्टीनें.

त्याची ओल मागें राहते; २४ अरे, सूर्य मावळल्यावर संध्याकाळीं पश्चिमेकडे आकाशात सूर्याच्या ज्योतीचें तेज ( संधिप्रकाश ) जसें दिसतें; २५ अथवा निशाण मारल्यावरही बाण जसा त्यांतील शक्ति कमी होईपर्यंत पुढेंच जातो, २६ अथवा कुंभाराच्या चाकावर तयार झालेलें भांडें कुंभारानें काढून घेतल्यावरही पूर्वीं दिलेल्या गतीनें चाक फिरतच असतें, २७ तसा, हे धनंजया, देहाचा अभिमान नाहींसा झाल्यावरही, ज्या गुणांनीं देह उत्पन्न झाला आहे, त्या गुणांच्या चेष्टा त्यात दृष्टीस पडतात. २८ संकल्पाशिवाय स्वप्न दिसतें, न लाविता जशीं अरण्यांत झाडें उत्पन्न होतात, व रचना केल्याशिवाय आकाशात जशीं गंधर्वनगरें दृष्टीस पडतात, २९ तशीं आत्म्याच्या संकल्पाशिवाय देहादि पंचकारणें क्रिया करण्यास कारणीभूत होतात. ४३० आणि पूर्वजन्मींच्या संस्कारानें पांचही कारणें व हेतु अनेक क्रिया करवितात. ३१ त्या कर्मांत मग सर्व जगाचा संहार होवो, अथवा नवें जग उत्पन्न होवो; ३२ परंतु कुमुद कसें सुकतें, व कमळाची प्रभा कशी फांकते हे ( आपल्यापासून होणारे दोन्ही ) परिणाम सूर्यास माहीत नसतात; ३३ किंवा आकाशातून वीज पडून जमीनीच्या जरी ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या, किंवा पाऊस पडून जरी जमीन हिरवीगार झाली, ३४ तरी या दोहींलाही जसें आकाश जाणत नाहीं, तसा जो देहाभिमानरहित देहांतच वास करतो, ३५ तो जसा स्वप्नातून जागा झालेला मनुष्य स्वप्न पहात नाहीं, तसा देहादिकांपासून सृष्टीचा उद्भव झाला किंवा लय झाला तरी तें जाणत नाहीं. ३६ एरवीं, हा देही आहे असें जे चर्मचक्षूंनीं पाहतात, ते त्यालाच कर्म करणारा असें मानतात. ३७ अथवा गवताचें बुजगावणें करून तें शेताच्या कडेस उभें केलें म्हणजे कोल्हा त्यालाच खरा रखवालदार समजत नाहीं काय ? ३८ वेडा मनुष्य वस्त्र नेसलेला आहे किंवा नागवा आहे हें जसें लोकांनीं जाणावें लागतें, किंवा रणांत पडलेल्या मनुष्याच्या अंगावरचे घाव जसे दुसऱ्यांनीं पाहून त्याचें शौर्य जाणावें लागतें, ३९ अथवा महासती ही सती जाते वेळेस जरी न्हाणें, माखणें, मळवट भरणें इत्यादि उपभोग भोगीत आहे असें लोकांस वाटतें, तरी तिला अग्नि दिसत नाहीं, स्वतः-च्या शरीराची तिला स्मृति नसते, किंवा लोकांकडेही तिचें लक्ष नसतें, ( तर ती पति-स्वरूपीं तल्लीन झालेली असते, ) ४४० त्याप्रमाणें, आत्मस्वरूपप्राप्तीच्या योगें जो द्रष्टा दृश्यासह नष्ट झाला, ( पाहणारा व पहावयाची वस्तु हा भाव नाहींसा झाला, ) तो, इंद्रियसमुदायानें काय कर्म केलें हें जाणत नाहीं. ४१ अरे, समुद्राचे तीरावर असलेल्या लोकांस जरी असें वाटलें कीं, थोरल्या लाटेनें धाकट्या लाटांस एकदम गिळून टाकलें आहे, ४२ तरी उदकाच्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां कोणती लाट कोणत्या लाटेस खाऊन टाकते ? त्याप्रमाणें, जो आत्मस्वरूपास मिळाला, त्यास कर्म टाकावें असें कर्मा-विषयीं द्वैत राहत नाहीं. ४३ पहा कीं, सोन्याच्या देवीनें, सोन्याच्या त्रिशूळानें सोन्या-च्याच महिषासुराचा नाश केला, ४४ हा सर्व प्रकार भक्तांच्या दृष्टीनें खरा असा भासतो,

हार गमला फुडा । वांचूनि महिष शूळ चामुंडा । सुवर्णचि तें ॥ ४५ ॥ पैं चित्रींचें जळ हुताशु । तो दृष्टीचाचि आभासु । पटीं अग्नि वोलांशु । दोन्ही नाहीं ॥ ४६ ॥ मुक्ताचें देह तैसें । हाले तें संस्कारवशें । तें न देखोनि लोक पिसे । कर्ता म्हणती ॥ ४७ ॥ आणि तयां कारणेयाअंतु । घडो त्रैलोक्या घातु । परी तेणें केला हे मातु । बोलों नये ॥ ४८ ॥ अगा अंधारुचि देखावा तेजें । मग तो फेडिजे हें बोलिजे । तैसें ज्ञानिया नाहीं दुजें । जें तो मारील ॥ ४९ ॥ म्हणोनि तयाची बुद्धि । नेणे पापपुण्याची गंधी । गंगा मीनलिया नदी । विटाळु जैसा ॥ ५० ॥ अग्नीसी अग्नि झगटालिया । काय पोळे तो धनंजया । कीं शस्त्र रुपे आपणया । आपणाचि ॥ ५१ ॥ तैसें आपणपयापरतें । जो नेणे क्रियाजाततें । तेथ काय लिंपवी बुद्धीतें । तयाचिये ॥ ५२ ॥ म्हणोनि कार्य कर्ता क्रिया । हें स्वरूपचि जाहलें जया । नाहीं शरीरादिकीं तया । कर्मबंधु ॥ ५३ ॥ ( १११२. आत्मा कर्माला हुकार सुद्धां देत नसून, कर्म घडण्याचीं कारणें वेगळींच आहेत; ४५४-४५९ ) जे कर्ता जीव विंदाणीं । काढूनि पाचही खेणी । घडित आहे करणीं । आंउत्तीं दाहें ॥ ५४ ॥ तेथ न्यांवो आणि अन्यावो । हा द्विविधु साधूनि आंवो । उभारितां न लवी खेंवो । कर्मभुवनें ॥ ५५ ॥ या थोराडां कीर कामा । विरंजा नोहे आत्मा । परी म्हणसी हन उपक्रमा । हातु लावी ॥ ५६ ॥ तो साक्षी चिद्रूपु । कर्मप्रवृत्तीचा संकल्पु । उठी तो कां निरोपु । आपणाचि दे ॥ ५७ ॥ तरी कर्मप्रवृत्तीहीलागीं । तया आयासु नाहीं आंगीं । जे प्रवृत्तीचेही उंळिगीं । लोकुचि आथी ॥५८॥ म्हणोनि आत्मयाचें केवळ । जो रूपाचि जाहला निखिळ । तया नाहीं बंदीशाळ । कर्माची हे ॥५९॥ अवतरण:—( १११३. अज्ञानपटावर द्वैतरूपी त्रिपुटीचीं चित्रें उत्पन्न होतात, ४६० ) पगी अज्ञानाच्या पटीं । अन्यथा ज्ञानाचें चित्र उठी । तेथ चितारणी हे त्रिपुटी । प्रसिद्ध जे कां ॥ ४६० ॥ ( १११४. ज्ञाता, ४६१-४६६ ) जें ज्ञान ज्ञाता ज्ञेय । हें जगाचें बीजत्रय । ते कर्माची निःसंदेह । प्रवृत्ति जाण ॥ ६१ ॥ आतां ययाचि गा त्रया । व्यक्ति वेगळालिया । आइकें धनंजया । करूं रूप ॥ ६२ ॥

ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।
करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

अन्वयः—ज्ञानं, ज्ञेयं, परिज्ञाता ( इति ) त्रिविधा कर्मचोदना अस्ति; करणं, कर्म, कर्ता इति त्रिविधः कर्मसंग्रहः ( अस्ति ) ॥ १८ ॥

तरी जीवसूर्यबिंबाचे । रश्मि श्रोत्रादिकें पांचें । धांवोनि विषयपद्माचे ।

१ अग्नि. २ प्रारब्धकर्मवशानें. ३ आपविभ्रपणा. ४ कौशल्यानें. ५ हेतु. ६ साधन. ७ न्याय. ८ आकार. ९ क्षणही. १० मोठ्या. ११ साक्षकर्ता. १२ आरंभास. १३ ज्ञानस्वरूप.

परंतु सोन्याच्या दृष्टीनें महिषासुर, त्रिशूळ व देवी हें सर्व सोनेंच आहे, ४५ तसेंच, पटावर काढलेल्या चित्रांत एक तलाव व एक अग्निकुंड हा फक्त [14]दृष्टीचाच भेद आहे, परंतु त्या दोहांस वस्त्र लावलें असतां तें भिजत नाहीं किंवा जळतही नाहीं; ४६ त्याप्रमाणें, जो ज्ञानी आहे, त्याच्या देहाचा व्यवहार पूर्वकर्मानुसार होत असतो; परंतु हें न समजता वेडे लोक त्यालाच कर्मकर्ता असें म्हणतात. ४७ आणि तो कर्म करीत असतां जरी त्यायोगें त्रैलोक्याचा घात झाला, तरी तो त्यानें केला असें म्हणूं नये. ४८ अरे, सूर्यानें अंधार पहावा आणि मग त्याला दूर सर असें म्हणावें, त्याप्रमाणें, ज्ञान्याला अशी कांहीं दुसरी वस्तुच नाहीं कीं, जिचा तो नाश करील. ( त्याचे ठिकाणचा द्वैतभाव जाऊन सर्व जग त्याला स्वस्वरूप झालेलें असतें. ) ४९ म्हणून त्याच्या बुद्धीला पाप व पुण्य यांचा गंधही नसतो. जशी एखादी नदी गंगेस मिळाली असतां तिचा अपवित्रपणा नाहींसा होतो; ४५० अर्जुना, अग्नीवर जर अग्नि पडला, तर तो भाजतो का ? किंवा शस्त्र आपणच आपल्याला कधीं रुपेल काय ? ५१ त्याप्रमाणें, आपल्या स्वरूपाहून कोणतेंही कर्म भिन्न नाहीं असें जो समजतो; तेथें कोणत्या पदार्थानें त्याची बुद्धि लिप्त होईल ? ५२ म्हणून जो कर्म, कर्ता व क्रिया ही त्रिपुटी आपणच झाला आहे, तो शरीरादिकांपासून होणाऱ्या कर्मांपासून बद्ध होत नाहीं. ५३ कारण, जीवात्मा हा मोठेपणानें आपल्यास कर्ता समजून दहा इंद्रियांच्या साधनानें पांच हेतु धारण करितो, ५४ आणि त्या ठिकाणीं न्याय किंवा अन्याय अशीं दोन प्रकारचीं कर्में करून एका क्षणांत कर्मांचीं भुवनें तयार करतो. ५५ पण या मोठ्या कृत्यास आत्मा हा साह्यकर्ता नाहीं, व तो आरंभ करतो असेंही म्हणूं नको. ५६ तो साक्षिभूत व ज्ञानस्वरूप आहे; तेव्हां, कर्मप्रवृत्तीचा जो संकल्प उत्पन्न होतो, त्याला तो का आज्ञा देईल ? ५७ तर जीं जीं कर्में करण्याकरितां सर्व लोक श्रम करीत असतात, तीं तीं कर्में करण्याविषयीं त्याच्या शरीरास आयास पडत नाहींत. ५८ म्हणून, जो केवळ शुद्ध आत्मस्वरूपी झाला आहे, त्याला ही कर्मांची बंदिशाळा नाहीं. ५९ परंतु अज्ञानाच्या पटावर जो द्वैतज्ञानाचें चित्र काढतो, तेथील चित्र, चित्र काढणारा व चित्रपट ही त्रिपुटी तुला स्पष्ट करून सांगतों. ४६० कारण ज्ञान, ज्ञाता व ज्ञेय ही त्रिपुटी जगास कारणीभूत असून, इजपासूनच कर्मांची निःसंशय प्रवृत्ति होते. ६१ हे धनंजया, आतां ह्याच त्रिपुटीचीं निरनिराळीं स्वरूपें उघड करून सांगतों, तीं ऐक. ६२

श्लोकार्थः—ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता ही त्रिपुटी कर्माला प्रेरक आहे; आणि करण, कर्म व कर्ता ही त्रिपुटी कर्मसंग्रहास कारण आहे. ॥ १८ ॥

तर जीवरूपी सूर्यबिंबाचे ज्ञानेंद्रियादि पंचेंद्रियरूपी किरण विषयरूपी कमळाचे

१४ श्रम करण्यास. १५ द्वैताचें; भेदाचें. १६ चित्र काढणारा, चित्र व पट ही त्रिपुटी. १७ स्वरूप. १८ किरण.

फोडीत मढं ॥ ६३ ॥ कीं जीवनृपाचे वारुं उपळाणे। घेऊनि इंद्रियांचीं केंकाणं। विषयदेशींचें नागवणें। आणीत जे ॥ ६४ ॥ हें असो इहीं इंद्रियीं राहटे। जें सुखदुःखेंसीं जीवा भेटे। तें सुषुप्तिकालीं वोहटे। जेथ ज्ञान ॥ ६५ ॥ तया जीवा नांव ज्ञाता। आणि जें हें सांगितलें आतां। तेंचि एथ पंडुसुता। ज्ञान जाण ॥ ६६ ॥ ( १११५. ज्ञान, ४६७–४७१ ) जें अविद्येचिये पोटीं। उपजत खेंवों किरीटी। आपणयातें वांटी। तिहीं ठायीं ॥ ६७ ॥ आपुलिये धावे पुढां। घालूनि ज्ञेयाचा गुंडा। उभारी मागिलीकडां। ज्ञातृत्वातें ॥ ६८ ॥ मग ज्ञातया ज्ञेया दोघां। तो नांदणुकेचा वेगा। माजी जालेनि पैं गा। वाहे जेणें ॥ ६९ ॥ ठाकूनि ज्ञेयाची शींव। पुरे जयाची धांव। सकळ पदार्थां नांव। सूतसे जें ॥ १७० ॥ तें गा सामान्य ज्ञान। या बोला नाहीं आन। ज्ञेयाचेंही चिन्ह। आईक आता ॥ ७१ ॥ ( १११६. ज्ञेय, ४७२–४७७ ) तरि शब्दु स्पर्शु। रूप गंध रसु। हा पंचविध आभासु। ज्ञेयाचा तो ॥ ७२ ॥ जैसें एकेंचि चूतफळें। इंद्रियां वेगळवेगळें। रसें वर्णें परिमळें[12]। भेटिजे स्पर्शें ॥ ७३ ॥ तैसें ज्ञेय तरी एकसरें। परी ज्ञान इंद्रियद्वारें। घे म्हणोनि प्रकारें। पांचें जालें ॥ ७४ ॥ आणि समुद्रीं वोघाचें जाणें। सरे लाणीपाँसीं धांवणें। कां फळीं सरे वाढणें। सस्यांचें जेवीं ॥ ७५ ॥ तैसें इंद्रियांच्या वोहवटीं। धावतया ज्ञाना जेथ [17]ठी। होय तें गा किरीटी। विषय ज्ञेय ॥ ७६ ॥ एवं ज्ञातया ज्ञाना ज्ञेया। तिहीं रूप केलें धनंजया। हे त्रिविध सर्वक्रिया-। प्रवृत्ति जाण ॥ ७७ ॥ ( १११७. त्रिपुटीच ज्ञात्याची कर्मांत प्रवृत्ति करते, ४७८–४८९ ) जे शब्दादि विषय। हें पंचविध जें ज्ञेय। तेंचि प्रिय कां अप्रिय। एके परीचें ॥ ७८ ॥ ज्ञान मोटकें ज्ञातया। दावी ना जंव धनंजया। तंव स्वीकारा कीं त्यजावया। प्रवर्तेचि तो ॥ ७९ ॥ परी मीनातें देखोनि बकु। जैसा निधानातें रंकु। का स्त्री देखोनि कामुकु। प्रवृत्ति धरी ॥ ४८० ॥ जैसें खालारा धांवे पाणी। भ्रमर पुष्पाचिये घाणी। ना ना सुटला सांजवेणीं। वत्साचि पां ॥ ८१ ॥ अगा स्वर्गींची उर्वशी। ऐकोनि जेविं माणुसीं। वैरीता लावीजती आकाशीं। यागांचिया ॥ ८२ ॥ पैं पारिवा[22] जैसा किरीटी। चढला नभाचिये पोटीं। पारवी देखोनि लोटी। आंगाचि सगळें ॥ ८३ ॥ हें ना घनगर्जनासरिसा। मयूर [23]वोवाळे आकाशा। ज्ञाता ज्ञेया देखोनि तैसा। धांवचि घे ॥ ८४ ॥ म्हणोनि ज्ञान ज्ञेय

---

१ फळी. २ शरीररूपी घोडे. ३ मोकळ्या पाठीचे. ४ हत्यारें. ५ लूट. ६ वृत्तीस. ७ दगड. ८ व्यवहार. ९ ठेवतें. १० आम्रफळानें. ११ रंगानें. १२ वासानें. १३ मुक्कामास. १४ चालणें. १५ धान्याचें. १६ मार्गात. १७ शेवट. १८ उतरत्या जमीनीकडे. १९ वासाला. २० धार काढण्याचे वेळीं. २१ शिड्या. २२ पारधी. २३ ओवाळून टाकतो.

कळीवर पडून तीं उमलवितात; ६३ अथवा जीवरूपी राजा हा शरीररूपी उपलाणी घोड्यावर बसून हातांत इंद्रियरूपी हत्यारें घेऊन विषयरूपी देशांतून लूट आणतो, ६४ फार काय? जें या इंद्रियांत वागत असून जीवाला सुख व दुःख भोगावयास देतें व जें ज्ञान गाढ झोंपेंत नाहींसें होतें; ६५ त्या जीवाला, अर्जुना ज्ञाता असें म्हणतात. आणि जें आतां सांगितलें त्यालाच ज्ञान असें म्हणतात. ६६ अर्जुना, जें अज्ञानाच्या पोटांत उपजतांक्षणीं आपल्यास तीन ठिकाणीं वाटून घेतें, ६७ आपल्या वृत्तीपुढें जाणावयाचा विषयरूप दगड घालून मागचे बाजूस ज्ञात्याला उभे करितें, ६८ मग ज्ञाता व ज्ञेय या दोघांच्या मधील व्यवहार होत असतांना जें ज्ञान मध्यें राहतें, ६९ ज्ञेयाला जाऊन पोहोंचल्यावर ज्याची धाव खुंटते, व जें सर्व पदार्थांला नांव ठेवितें, ४७० त्याला सामान्य ज्ञान असें म्हणतात, यांत संशय नाहीं. आतां ज्ञेयाचीं लक्षणें सांगतों तीं ऐक. ७१ तर शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे ज्ञेयाचे पांच प्रकारचे धर्म आहेत. ७२ जसा एकच आंबा दृष्टीस पडल्यावर पांच इंद्रियांना निरनिराळ्या प्रकारानें भासतो, म्हणजे आंबा या शब्दानें कानास समजतो, रसानें जिभेस समजतो, रंगानें डोळ्यांस समजतो, वासानें नाकास समजतो, आणि स्पर्शानें त्वचेस समजतो, ७३ तसें ज्ञेय तर एकच आहे, परंतु आपल्या इंद्रियांच्या द्वारानें त्याजविषयीं निरनिराळें ज्ञान उत्पन्न होतें, म्हणून तें पांच प्रकारचें झालें आहे. ७४ समुद्रास मिळाल्यावर नदीचा ओघ संपतो, मुक्कामास गेल्यावर चालणें संपतें, अथवा फळ आल्यावर ज्याप्रमाणें धान्याची वाढ खुंटते, ७५ त्याप्रमाणें अर्जुना, इंद्रियांच्या मार्गांत धावत असलेल्या ज्ञानाला जेथें शेवट होतो, त्यालाच ज्ञेय (विषय) असें म्हणतात. ७६ याप्रमाणें धनंजया, ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय यांचीं लक्षणें तुला सांगितलीं. ही त्रिपुटी तीन प्रकारच्या सर्व कर्मास कारणीभूत आहे. ७७ कारण, शब्दादि पांच विषय हेंच ज्ञेय होय; आणि तेंच प्रिय किंवा अप्रिय यांपैकीं कोणतें तरी एक असतें. ७८ हे धनंजया, ज्ञान हें ज्ञात्याला ज्ञेय पदार्थ किंचित् दाखवीत आहे तोंच त्याचा स्वीकार किंवा त्याग करण्याविषयीं ज्ञाता उद्युक्त होतो. ७९ परंतु माशाला पाहतांच जसा बगळा त्यास धरावयास धावतो, अथवा द्रव्याचा ठेवा पाहतांक्षणीं तो घेण्यास दरिद्री धावतो, किंवा स्त्री पाहतांच जसा कामुक पुरुष तिची प्राप्ति करून घेण्याविषयीं प्रवृत्त होतो; ४८० जसें पाणी उतरत्या जमिनीकडे धावतें, भ्रमर पुष्पांचा वास घेण्यास जातो, अथवा धार काढण्याचे वेळीं वांसरूं सोडल्यावर तें गाईकडे धावत जातें; ८१ अरे, स्वर्गांतील उर्वशी नामक अप्सरेचें वर्णन ऐकून ती उपभोगास मिळावी म्हणून जसे लोक आकाशांत यज्ञरूपी शिड्या लावतात; ८२ अथवा अर्जुना, पारवा आकाशांत फिरत असतां पारवीस पाहतांच एकदम सगळें आंग टाकून तिजजवळ येतो; ८३ इतकेंच नव्हे, तर मेघांची गर्जना होतांक्षणींच मोर जसा आपल्यास आकाशावरून ओंवाळून टाकतो, तसा ज्ञाता हा ज्ञेयास (विषयास) पाहून उडी घालतो. ८४ म्हणून, हे पांडुसुता, ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता ही त्रिपुटी सर्व कर्में करण्यास कारणीभूत होते. ८५ आणि

ज्ञाता । हे त्रिविध गा पंडुसुता । होयचि कर्मा समस्तां । प्रवृत्ति येथ ॥ ८५ ॥ परी तेंचि ज्ञेय विपायें । जरी ज्ञातयातें प्रिय होये । तरी भोगावया न साहे । क्षणही विलंबु ॥ ८६ ॥ नातरी अवचटें । तेंचि विरुद्ध होऊनि भेटे । तरी युगान्त वाटे । सांडावया ॥ ८७ ॥ व्याळ कां हारा । वरपडा जालेया नरा । हरिखु आणि दरारा । सरिसाचि उठी ॥ ८८ ॥ तैसें ज्ञेय प्रियाप्रियें । देखिलेनि ज्ञातया होये । मग त्याग–स्वीकारीं वाहे । व्यापारातें ॥ ८९ ॥ ( १११८. जीव ज्ञाता असून कर्ता होतो, ४९०–५०५ ) तेथ रांगी प्रतिमल्लाचा[1] गोसावी सर्व दळाचा । रथु सांडूनि पायांचा[2] । होय जैसा ॥ ४९० ॥ तैसें ज्ञातेपणें जें असे । तें ये कर्ता ऐसिये दशे । जेवितें बैसलें जैसें । रंधन[3] करूं ॥ ९१ ॥ कां भॅवरोंचि[4] केला मळा । वरॅकलुचि[5] जाला अंकसळा[6] । ना ना देवो रिगाला देउळा- । चिया कामा ॥ ९२ ॥ तैसा ज्ञेयाचिया हांवा[7] । ज्ञाता इंद्रियांचा मेळावा । राहाटवी तेथ पांडवा । कर्ता होय ॥ ९३ ॥ आणि आपण होउनी कर्ता । ज्ञाना आणी करणता । तेथें ज्ञेयचि स्वभावतां । कार्य होय ॥ ९४ ॥ ऐसा ज्ञानाचिये निजगति । पालटु पडे गा सुमति । नेत्राची शोभा रातीं । पालटे जैसी ॥ ९५ ॥ कां अदृष्ट[8] जालिया उदासु[9] । पालटे श्रीमंताचा विलासु[10] । पूर्णिमेपाठीं शीतांशु[11] । पालटे जैसा ॥ ९६ ॥ तैसा चाळितां करणें[12] । ज्ञाता वेष्टिजे कर्तेपणें । तेथींचीं तियें लक्षणें । ऐक आतां ॥ ९७ ॥ तरी बुद्धि आणि मन । चित्त अहंकार हन । हें चतुर्विध चिन्ह । अंतःकरणाचें ॥९८॥ बाह्य त्वचा श्रवण । चक्षु रसना घ्राण । हें पंचविध जाण । इंद्रिय गा ॥ ९९ ॥ तेथ आंतुलें तंव करणें । कर्ता[13] कर्तव्या घे उमाणें[14] । मग तें जरी जाणे । सुखा येतें ॥ ५०० ॥ तरी बाहेरिलें तियेंही । चक्षुरादिकें दाहाही । उठौनि लवलाहीं । व्यापारा सुये ॥ १ ॥ मग तो इंद्रियकदंबु[15] । करविजे तंव रांबु[16] । जंव कर्तव्याचा लाभु । हातासि ये ॥ २ ॥ ना तें कर्तव्य जरी दुःखें । फळेल ऐसें देखे । तो लावी त्यागमुखें । तियें दाहाही ॥ ३ ॥ मग फिटे दुःखाचा ठावो । तंव राहाटवी रात्रिदिवो । विकर्णुवातें[17] कां रावो । जयापरी ॥ ४ ॥ तैसेनि त्याग-स्वीकारीं । वाहतां इंद्रियांची धुरी[18] । ज्ञातयातें अवधारीं । कर्ता म्हणिपे ॥ ५ ॥ ( १११९. करणें–इंद्रियें, ५०६ ) आणि कर्तयाच्या सर्व कर्मीं । आउतांचिया[19] परी क्षेमी । म्हणोनि इंद्रियातें आम्ही । करणें[20] म्हणों ॥ ६ ॥

१ शोकी. २ पायीं चालणारा. ३ स्वयंपाक. ४ भ्रमरानें. ५ कसोटी. ६ धातु. ७ विषयांच्या इच्छेनें. ८ दैव. ९ प्रतिकूल. १० ऐश्वर्य. ११ चंद्र. १२ इंद्रियें. १३ जीव. १४ स्फुरण. १५ समुदाय. १६ व्यापार. १७ वसूल करण्याकरितां. १८ पुढारीपण. १९ सत्पत्ती. २० क्रियेचें साधन.

कदाचित् तोच विषय जर ज्ञात्यास आवडता असला, तर मग तो भोगण्याविषयीं त्याला एका क्षणाचाही विलंब खपत नाहीं. ८६ अथवा अवचित तोच विषय जर नावडता असला, तर त्याचा त्याग करण्याविषयीं एकेक क्षण त्याला युगाप्रमाणें भासतो. ८७ सर्प असून नीळ मण्यांचा हार आहे या भावनेनें हर्ष होतो, व त्यास हात लावतांक्षणींच सर्प आहे असें लक्षांत येऊन लागलीच भीति उत्पन्न होते; ८८ त्याप्रमाणें प्रिय किंवा अप्रिय विषय पाहिल्यावर ज्ञात्याची स्थिति होते; आणि मग त्याचा त्याग किंवा स्वीकार करण्याबद्दल कर्म उत्पन्न होतें. ८९ जो कुस्तीचा शोकी आहे, त्यानें दुसरा मल्ल समोर पाहिल्यावर, तो जरी सर्व सैन्याचा अधिपति असला तरी रथ सोडून पादचारी होतो, ४९० तसा जो ज्ञाता म्हणून असतो, तो विषयासक्त झाला म्हणजे आपल्यास कर्ता असें म्हणवितो. ज्याप्रमाणें पानावर बसून आयतें जेवणाऱ्या मनुष्यानें तें सुख सोडून स्वयंपाकाचे कष्ट करण्यास तयार व्हावें, ९१ किंवा आपल्यास पुष्परेणु खाण्यास मिळावे म्हणून भ्रमरानें जशी बाग लावण्याची खटपट करावी, अथवा कसोटीनें आपलें ऐश्वर्य तुच्छ मानून धातु व्हावें, किंवा देवांनीं देवळांत स्वस्थ बसण्याचें सोडून देऊळ बांधण्यास प्रवृत्त व्हावें, ९२ तसें विषयाच्या इच्छेनें ज्ञाता जेथें इंद्रियांचे लाड पुरवितो, तेथें अर्जुना, त्याला कर्ता असें नांव प्राप्त होतें. ९३ आणि आपण जो ज्ञाता, तो कर्ता होऊन ज्ञानाला कारण (साधन) करतो. मग तेथें ज्ञेय हें सहज कार्य होतें. ९४ हे सुमते, ज्ञानाच्या त्रिपुटीस अशा रीतीनें पालट पडतो. जसे नेत्रांचें तेज रात्रीं उपयोगी पडत नाहीं, ९५ किंवा दैव प्रतिकूल झाल्यावर श्रीमंताचे विलास बदलतात; अथवा पौर्णिमा झाल्यावर ज्याप्रमाणें चंद्र एकेक कलेनें कमी होत जातो, ९६ त्याप्रमाणें, इंद्रियांचे लाड पुरवीत असतां ज्ञाता हा कर्तेपणाच्या अभिमानांत गुंततो, त्या वेळचीं त्याचीं लक्षणें आतां तुला सांगतों; तीं ऐक. ९७ तर बुद्धि, मन, चित्त व अहंकार हें या अंतःकरणाचें चतुर्विध चिन्ह आहे; (अंतःकरणाच्या ह्या चार वृत्ति आहेत); ९८ आणि त्वचा, कान, डोळे, जिव्हा व नाक अशीं पांच प्रकारचीं बाह्य इंद्रियें आहेत. ९९ त्या ठिकाणीं अंतःकरणाच्या वृत्तीच्या योगें जीवास कर्म करण्याविषयीं स्फुरण येतें; मग या कर्मापासून सुखप्राप्ति होईल असें वाटूं लागलें, ५०० तर नेत्रादि दहाही बाह्येंद्रियांना उठवून त्यांना तो व्यापार करावयास लावितो. १ नंतर त्या इंद्रियसमुदायाला तोंपर्यंत राबवितो, कीं जोंपर्यंत कर्माचें फल हातीं आलें नाहीं! २ किंवा जर त्या कर्मापासून दुःख होईल असें दिसलें, तर त्या कर्माचा त्याग करण्याकरितां त्या दहाही इंद्रियांची योजना करतो. ३ मग, जसा एखादा राजा वसूल करण्याकरितां आपल्या सेवकांना रात्रंदिवस राबवितो, तसा तो तें दुःख नाहींसें होईपर्यंत रात्रंदिवस खटपट करितो. ४ अशा प्रकारें कर्माचा त्याग अथवा स्वीकार करण्याकरितां इंद्रियांचें पुढारीपण ज्ञात्यानें घेतलें, म्हणजे त्यालाच कर्ता असें म्हणतात, ५ आणि कर्ता हा कर्म करण्याकरितां आउतांप्रमाणें सर्व इंद्रियांना खपवितो, म्हणून आम्ही

( ११२०. कर्म, ५०७–५१४ ) आणि हेचि करणेंवरी । कर्ता क्रिया ज्या उभारी । तिया व्यापे तें अवधारीं । कर्म एथ ॥ ७ ॥ सोनाराचिया बुद्धी लेणें । व्यापे चंद्रकरीं चांदिणें । कां व्यापे वेल्हाळपणें । वेली जैसी ॥ ८ ॥ ना ना प्रभा व्यापे प्रकाशु । गोडिया इक्षुरसु । हें असो अवकाशु । आकाशीं जैसा ॥ ९ ॥ तैसें कर्तयाचिया क्रिया । व्यापलें जें धनंजया । तें कर्म गा बोलावया । आन नाहीं ॥ ५१० ॥ एवं कर्म कर्ता करणें । यया तिहींचेंही लक्षण । सांगितलें तुज विचक्षण- । शिरोमणि ॥ ११ ॥ एथ ज्ञाता ज्ञान ज्ञेयें[१] । हें कर्माचें प्रवृत्तित्रय । तैसेंचि कर्ता करण कार्य । हा कर्मसंचयो गा ॥१२॥ वन्हीं ठेविला असे धूमु । आणि बीजीं जेवि द्रुमु[४] । कां मनीं जोडे कामु[५] । सदा जैसा ॥ १३ ॥ तैसा कर्ता क्रिया करणीं । कर्माचें आहे जितवणी । सोनें जैसें खाणीं । सुवर्णाचिये ॥ १४ ॥ ( ११२१. आत्मा कर्त्याहून व कर्माहून वेगळा आहे, ५१५-५१६ ) म्हणोनि हें कार्य मी कर्ता । ऐसें आथी जेथ पंडुसुता । तेथ आत्मा दूरी समस्तां । क्रियांपासीं ॥ १५ ॥ यालागीं पुढतपुढती । आत्मा वेगळाचि सुमति । आतां असो हें किती । जाणितासि तूं ॥ १६ ॥

ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।
प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥

अन्वयः—ज्ञानं, कर्म च कर्ता त्रिधा एव गुणभेदतः अस्ति, इति गुणसंख्याने यथावत् प्रोच्यते, तान् अपि शृणु ॥ १९ ॥

( ११२२. गुणांमुळें ज्ञान, कर्ता व कर्म तीन प्रकारचे झाले; त्यांत दोन बंधाला कारण व एक मुक्ततेला कारण, ५१७-५१८ ) परी सांगितलें जें ज्ञान । कर्म कर्ता हन । ते तिन्ही तिहीं ठायीं भिन्न । गुणीं आहाती ॥ १७ ॥ म्हणोनि ज्ञाना कर्मा कर्तया । पातेजों[७] नये धनंजया । जे दोनी[८] बांधती सोडावया । एकेचि प्रौढें[९] ॥ १८ ॥ ( ११२३. सांख्यशास्त्राचें महत्त्व, ५१९-५२३ ) तें सात्त्विक ठाउवें होये । तो गुणभेदु सांगों पाहें । जो सांख्यशास्त्रीं आहे । उवाइला ॥ १९ ॥ जें विचार-क्षीरसमुद्र । स्वैबोधकुमुदिनीचंद्र । ज्ञानडोळसां नरेंद्र । शास्त्राचा जें ॥५२०॥ कीं प्रकृतिपुरुष दोनी । मिसळलीं दिवोरजनीं । तियें निवाडितां त्रिभुवनीं । मार्तंडु जें ॥ २१ ॥ जेथ अपारा मोहराशि । तत्त्वाच्या मापीं चोविसीं । उमाणों घेऊनि परेशीं । सुखाविजे ॥ २२ ॥ अर्जुना तें सांख्यशास्त्र । पढे जयाचें स्तोत्र । तें गुणभेदचारित्र । ऐसें आहे ॥ २३ ॥ ( ११२४. तीन गुणांनीं ब्रह्मांड व्यापलें आहे, ५२४-५२५ ) जे आपुलेनि आंगिकें । त्रिविधपणाचेनि अंकें । दृश्यजात

१ इंद्रियें. २ ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय=कर्ता, कार्य ( कर्म ), करण ( इंद्रियें ). ३ जाणण्याची वस्तु. ४ वृक्ष. ५ इच्छा. ६ जिव्हाळा. ७ विश्वासूं नये. ८ रज व तम हे दोन्ही. ९ एकटा सत्त्वगुण.

त्यांस क्रियेचीं साधनें असें म्हणतों; ६ आणि हें करण्याकरितां कर्ता ज्या ज्या क्रिया उत्पन्न करितो, त्यांनीं जें व्यापिलें जातें त्यास कर्म असें म्हणतों. ७ सोनाराच्या बुद्धीनें दागिन्यानें जसें सोनें व्यापलें जातें, चंद्राच्या किरणांनीं जसें चांदणें व्यापलें जातें किंवा विस्तारानें जसा वेल व्यापला जातो, ८ अथवा सूर्याच्या प्रभेनें जसा सूर्यप्रकाश व्यापला जातो, व गोडीनें जसा उंसाचा रस व्यापला जातो, हें असो; अवकाशानें जसें आकाश व्यापलें जातें, ९ तसें, अर्जुना, कर्त्याच्या क्रियांनीं जें व्यापिलें जातें, तें कर्म होय यांत शंका नाहीं. ५१० याप्रमाणें, अर्जुना, तुला कर्म, कर्ता व करण या तिघांचीं लक्षणें सांगितलीं. ११ तर ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ही त्रिपुटी कर्मप्रवृत्तिकारक आहे. तसेंच कर्ता, करण व कार्य ही त्रिपुटी हा कर्मसंचय आहे. १२ विस्तवांत जसा धूर ठेवलेलाच असतो, बीजांत जसा वृक्ष असतो, अथवा मनांत जशी नेहमीं इच्छा असते, १३ आणि सोनें जसें सुवर्णाच्या खाणींत सांपडतें, तसा कर्ता, क्रिया व करणें ( इंद्रियें ) ही त्रिपुटी कर्माचा जिव्हाळाच ( उत्पत्तिस्थानच ) आहे. १४ म्हणून, हे पांडुसुता, अमुक कार्याचा मी कर्ता, असा जीवानें कर्तेपणा धारण केला, म्हणजे सर्व क्रिया जवळ येतात, व आत्मा दूर जातो. १५ यास्तव, हे सुमते, कर्मापासून आत्मा वेगळाच आहे, हें तुला वारंवार काय सांगावें ? कारण हें तूं जाणतोच आहेस. १६

श्लोकार्थः—ज्ञान, कर्म व कर्ता हे गुणभेदानें तीन प्रकारचे आहेत, असें सांख्यशास्त्रांत यथार्थ सांगितलें आहे, तेंही तूं ऐक ॥ १९ ॥

पण तुला जें ज्ञान, कर्म व कर्ता म्हणून सांगितलें, तीं तिन्ही तीन गुणांनीं निरनिराळीं आहेत. १७ म्हणून, अर्जुना, ज्ञान, कर्म व कर्ता यांच्यावर विश्वास ठेवूं नको. कारण यांतील रज व तम या दोन गुणांपासून मनुष्य बद्ध होतो; व फक्त सत्त्वगुणच सुटका करण्यास समर्थ आहे. १८ तो सात्त्विक गुणाचा भेद, ज्याविषयीं सांख्यशास्त्रांत विवेचन केलेलें आहे, तो तुला समजेल असा सांगतों. १९ जें सांख्यशास्त्र विचाररूपी क्षीरसमुद्रच आहे, आत्मबोधरूपी कमलास प्रफुल्लित करणारा चंद्रच आहे, व ज्ञान उत्पन्न करणाऱ्या शास्त्रांत श्रेष्ठ आहे; ५२० किंवा, प्रकृति व पुरुष हीं दोन्ही जीं दिवस व रात्र यांप्रमाणें एकमेकांत मिसळलीं आहेत, तीं निराळीं करून दाखविणारा या त्रिभुवनांतील सूर्यच आहे. २१ जें अपार अशा मोहाचा चोवीस तत्त्वांनीं ठाव घेऊन परतत्त्वाची प्राप्ति करून देऊन सुख भोगावयास लावतें, २२ अर्जुना, असें जें सांख्यशास्त्र, तें ज्या गुणांचें स्तवन करितें, त्या गुणाचें वर्णन असें आहे. २३ ज्या गुणांनीं आपल्या बळानें तीन प्रकारचे शिक्के देऊन सर्व दृश्य पदार्थ स्वाधीन करून घेतले आहेत. २४ याप्रमाणें सत्त्व, रज व तम या तीन गुणांचें

१० समर्थ. ११ विवेचन केलें. १२ आत्मबोध. १३ कमलास प्रफुल्लित करणारा. १४ ज्ञान उत्पन्न करणाऱ्या. १५ माप. १६ परतत्त्वाशीं. १७ प्राप्ति करून देऊन सुखी करतें. १८ स्तवन, १९ बळानें. २० शिक्क्यानें.

तितुकें । अंकित केलें ॥ २४ ॥ एवं सत्त्वरजतमा । तिहींची एवढी असे महिमा । जें त्रैविध्य[1] आदीं ब्रह्मा । अंतीं कृमि ॥ २५ ॥ अवतरणः—( ११२५. देव म्हणतात, प्रथम ज्ञान सांगतों, ५२६–५२८ ) परी विधींची आघवी मांदी । जेणें भेदलेंनि गुणभेदीं । पडिली तें तंव आदीं । ज्ञान सांगों ॥ २६ ॥ जे दिठी जरी चोख कीजे । तरी भलतेंही चोख सुजे । तैसें ज्ञानें शुद्धें लाहिजे । सर्वही शुद्ध ॥ २७ ॥ म्हणोनि तें सात्त्विक ज्ञान । आतां सांगों दे अवधान । कैवल्यगुणनिधान । श्रीकृष्ण म्हणे ॥ २८ ॥

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।
अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ २० ॥

अन्वयः—येन ( जीवः ) विभक्तेषु सर्वभूतेषु अविभक्तं एकं अव्ययं भावं ईक्षते, तत् ज्ञानम् सात्त्विकं विद्धि ॥ २० ॥

( ११२६. सात्त्विक ज्ञान, ५२९-५३७ ) तरी अर्जुना गा तें फुडें । सात्त्विक ज्ञान चोखडें । जयाच्या उदरीं ज्ञेय बुडे । ज्ञातेनिसीं ॥ २९ ॥ जैसा सूर्य न देखे आंधारें । सरितां नेणिजती सागरें । कां कवळिलिया न धरे । आत्मच्छाया ॥ ५३० ॥ तयापरी जया ज्ञाना । शिवादि तृणावसाना[6] । इया भूतव्यक्ति भिन्ना । नाडळती ॥ ३१ ॥ जैसें हातें चित्र पाहतां । होय पाणियें मीठ धुतां । कां चेवोनि स्वप्ना येतां । जैसें होय ॥ ३२ ॥ तैसें ज्ञानें जेणें । करितां ज्ञातव्यातें पाहाणें । जाणता ना जाणणें । जाणावें उरे ॥ ३३ ॥ पैं सोनें आटूनि लेणीं । न काढिती आपुलीया आंथणीं । कां तैरंग न घेपती पाणी । गाळूनि जैसें ॥ ३४ ॥ तैसी जया ज्ञानाचिया हाता । न लागेचि दृश्यकथा । तें ज्ञान जाण सर्वथा । सात्त्विक गा ॥ ३५ ॥ आरिसा पाहों जातां कोडें । जैसें पाहातेंचि कां रिगे पुढें । तैसें ज्ञेय लोटोनि पडे । ज्ञाताचि जें ॥ ३६ ॥ पुढती तेंचि सात्त्विक ज्ञान । जें मोक्षलक्ष्मीचें भुवन । अवतरणः–हें असो ऐक चिन्ह । राजसाचें ॥ ३७ ॥

पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।
वेत्ति सर्वेषु भुतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥

अन्वयः—यत् ज्ञानं पृथक्त्वेन सर्वेषु भूतेषु पृथग्विधान् नानाभावान् वेत्ति, तत् ज्ञानं राजसं विद्धि ॥ २१ ॥

( ११२७. राजस ज्ञान, ५३८-५४८ ) तरी पार्था परियेस । तें ज्ञान गा राजस । जें भेदाची कांस । धरूनि चाले ॥ ३८ ॥ विचित्रता भूतांचिया । आपण आतोनि ठिकरियां । बहु चेकै ज्ञातया । आणिली जेणें ॥ ३९ ॥ जैसें साचा रूपाआड । घालूनि विसरांचें कवाड । मग स्वप्नाचें कावाडें । ओपी निद्रा ॥ ५४० ॥ तैसें स्वज्ञानाचिये पोळीं । बाहेरि मिथ्यामोहांचे खळी । तिहीं

१ तीन भेद. २ समजतें. ३ मोक्षप्राप्तीचा ठेवा. ४ नद्या. ५ सांपडे. ६ गवतापर्यंत.

एवढें सामर्थ्य आहे कीं, त्यांनीं ब्रह्मदेवापासून कीटकापर्यंत तीन भेद केले आहेत. २५ परंतु हें सर्व विश्व ज्याच्या योगानें या तीन गुणांच्या सपाट्यांत सांपडलें, तें ज्ञान तुला अगोदर सांगतों. २६ कारण, दृष्टि शुद्ध झाली म्हणजे पाहिजे त्या पदार्थाचें स्वरूप समजतें, त्याप्रमाणें, शुद्ध ज्ञान प्राप्त झालें असता सर्व पदार्थांचें शुद्ध स्वरूप कळतें. २७ म्हणून सात्त्विक ज्ञान आतां तुला सांगतों, लक्ष दे, असें कैवल्यगुणनिधान भगवान श्रीकृष्ण म्हणाले. २८

श्लोकार्थः—ज्या ज्ञानाच्या योगानें, जीव हा, वेगळाल्या सर्व भूतामध्यें न विभागलेला असा एकच अविनाशी भाव पहातो, तें ज्ञान सात्त्विक होय, असें समज ॥ २० ॥

तर, अर्जुना, तेंच खरोखर शुद्ध सात्त्विक ज्ञान होय, कीं ज्याचा उदय झाल्याबरोबर त्यामध्यें ज्ञेय हें ज्ञात्यासह लीन होतें. २९ ज्याप्रमाणें सूर्य अंधाराला पाहूं शकत नाहीं, किंवा समुद्राला नद्यांची ओळखही नसते, अथवा आपल्या पडछायेस धरूं लागलें असतां ती सांपडत नाहीं, ५३० त्याप्रमाणें, ज्या ज्ञानाला शिवापासून गवतापर्यंत सर्व व्यक्तींत भिन्नपणा दिसत नाहीं; ३१ भिंतीवरील चित्र सारवून पाहिलें असतां, किंवा मीठ धुतलें असतां जसें होतें; अथवा जागृत झाल्यावर स्वप्नाची जशी स्थिति होते, ३२ तसें ज्या ज्ञानाच्या प्रकाशानें ज्ञेय पाहूं गेलें असता ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ही त्रिपुटी नाहींशी होते; ३३ परंतु ( ज्ञात्यास जसें सोन्याची परीक्षा करण्याकरितां ) आपल्या बुद्धीनें डागिने आटवून त्यांतील सोनें काढावें लागत नाहीं, किंवा पाणी घ्यावयाचें असल्यास त्यावरील लाटा गाळून तें घेत नाहींत, ३४ तसा सर्व दृश्य वस्तूंचे ठिकाणीं ज्या ज्ञानाला भेद दिसत नाहीं, त्याच ज्ञानाला सात्त्विक ज्ञान असे म्हणतात. ३५ आरसा पाहूं गेलें असतां जसें पाहणाराचेंच प्रतिबिंब त्यांत दिसतें, तसें ज्ञेय लोटून प्रत्येक वस्तूचे ठिकाणीं ज्ञाता आपलें स्वरूपच पाहतो. ३६ हेंच सात्त्विक ज्ञान मोक्षलक्ष्मीचें मंदिर होय. हें असो; आतां तुला ' राजस ' ज्ञानाचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक. ३७

श्लोकार्थः—जें ज्ञान वेगळेपणानें सर्व भूताचे ठिकाणीं नानाप्रकारचे भिन्नभिन्न भाव जाणतें, तें राजस होय असें समज ॥ २१ ॥

तर, पार्था, तेंच ज्ञान राजस होय, कीं जें भूतमात्राचे ठिकाणीं भेदभाव मानून चालतें, समजलास? ३८ ज्या ज्ञानाने भूतमात्राचे ठिकाणीं अनेकत्व मानून आपल्या ठिकऱ्या ( वेगळेपणा ) करून घेतल्या आहेत; व ज्यानें ज्ञात्याला चकवून सोडलें आहे; ३९ ज्याप्रमाणें निद्रा ही स्वस्वरूपाचे आड अज्ञानाचा पडदा घालून मग स्वप्नांतील कष्टमय स्थिति आणते, ५४० त्याप्रमाणें, आत्मज्ञानाच्या मंदिराभोंवतालीं मायेचा पसारा घालून जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांच्या थापा मारून जें जीवास फसवितें,

७ दिसत नाहींत. ८ हातानें सारवून. ९ शेंयाला. १० बुद्धीनें. ११ लाटा. १२ दृश्य वस्तु. १३ व्यापून. १४ वेगळेपणा. १५ चकविलें, फसविलें. १६ अज्ञानाचें. १७ कष्टमय स्थिति. १८ मंदिरासभोंवतीं. १९ मायेच्या. २० जागृति, स्वप्न व सुषुप्ति.

अवस्थांची वह्योळी । दावी जें जीवा ॥ ४१ ॥ अलंकारपणें झांकलें । बाळका सोनें कां वायां गेलें । तैसें नामीं[2] रूपीं दुरावलें । अद्वैत जया ॥ ४२ ॥ अवतरली गाडग्या घडा । पृथ्वी अनोळख जाली मूढा । वन्हि जाला कानडा । दीपत्वासाठीं ॥ ४३ ॥ कां वस्त्रपणाचेनि आरोपें । मूर्खाप्रति तंतु हारपे । ना ना मुग्धा पटु लोपे । दाऊनि चित्र ॥ ४४ ॥ तैसी जया ज्ञाना । जाणोनि भूतव्यक्ति भिन्ना । ऐक्यबोधाची भावना । निमोनि गेली ॥ ४५ ॥ मग इंधनीं भेदला अनळु । फुलावरी परिमळु । कां जळभेदें शकलु । चंद्रु जैसा ॥ ४६ ॥ तैसे पदार्थभेद बहुवस । जाणोनि लहानथोर वेष । आतलें तें राजस । ज्ञान येथ ॥ ४७ ॥ अवतरणः—आतां तामसाचेंही लिंग । सांगेन तें वोळख चांग । डावलावया मांतंग- । सदन जैसें ॥ ४८ ॥

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ।
अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

अन्वयः—यत् तु एकस्मिन् कार्ये कृत्स्नवत् सक्तं अहैतुकं अतत्त्वार्थकं च अल्पं, तत् ज्ञान तामसं उदाहृतम् ॥ २२ ॥

( ११२८. तामस ज्ञान, ५४९–५७८ ) तरी किरीटी जें ज्ञान । हिंडे विधीचेनि वस्त्रें हीन । श्रुति पाठमोरी नग्न । म्हणौनि तया ॥ ४९ ॥ येरीही शास्त्र वेंटिकरीं । जें निंदेचे विटाळवरी । वोळविलेंसे डोंगरीं । म्लेंच्छधर्माच्या ॥ ५५० ॥ जें गा ज्ञान ऐसें । गुणग्रहें तामसें । [13]घेतलें भंवे पिसें । होऊनियां ॥ ५१ ॥ जें [14]सोयरिकें वोधु नेणे । पदार्थीं निषेधु न म्हणे । [16]निरोविलें जैसें सुणें । शून्यग्रामीं ॥ ५२ ॥ तया तोंडीं जें नोंडळे । कां खातां जेणें पोळे । तेंचि येक वोळे । येर घेणेंचि ॥ ५३ ॥ पैं सोनें चोरितां उंदिरु । न म्हणे थेंराविथरु । नेणे मांसखाईरु । काळें गोरें ॥ ५४ ॥ ना ना वनामाजीं बोहरी[22] । कडसणी जेविं न करी । कां जीत मेलें न विचारी । वैसतां माशी ॥ ५५ ॥ अगा वांतीं कां वाढिलेया । साजुक कां सडालिया । विवेकु कावळिया । नाहीं जैसा ॥ ५६ ॥ तैसें निषिद्ध सांडूनि द्यावें । कां विहित आदरें घ्यावें । हें विषयांचेनि नांवें । नेणेचि जें ॥ ५७ ॥ जेतुलें आडें[24] पडे दिठी । तेतुलें घेचि विषयासाठीं । मग तें स्त्रीद्रव्य वाटी । शिश्नोदरा ॥ ५८ ॥ तीर्थातीर्थ हे भाप । उदकीं नाहीं सनोळखें । तृषा [26]वोळे तेंचि सुख । वाचूनियां ॥ ५९ ॥ तया-चिपरी खाद्याखाद्य । न म्हणे निंद्यानिंद्य । तोंडा आवडे तें मेध्य । ऐसाचि बोधु

१ थापा. २ नामरूपाच्या भेदानें. ३ अवघड; अपरिचित. ४ पडदा. ५ नाश पावली. ६ लाकडांत. ७ तुकडे झालेला. ८ व्यापलें. ९ टाकण्याकरितां. १० मांगाचें घर. ११ बट्टा लावून. १२ ब्रह्मराक्षसानें. १३ संचरलें. १४ शरीरसंबंधास. १५ अडचण. १६ सोडलेलें. १७ कुत्रें. १८ येत नाहीं. १९ टाकतें. २० बरेंवाईट. २१ खाणारा. २२ वणवा. २३ ओकलेलें. २४ समोर येईल; दिसेल. २५ ओळख. २६ भागते. २७ भक्ष्याभक्ष्य. २८ पवित्र; गोड. २९ निश्चय.

४१ लहान मुलाला दागिन्यांच्या रूपानें सोनें दाखविलें असतां सोन्याची ओळख नसते, तसें नामरूपांच्या भेदामुळें ज्या ज्ञानाला अद्वैत दुरावतें; ४२ अज्ञान मनुष्याला मातीपासून केलेलीं मडकीं व घागरी हीं दाखविलीं असतां त्यास जशी मूळ मातीची ओळख नसते; अथवा दिवा पाहिला असतां अग्नीची ओळख नसते; ४३ किंवा मूर्ख मनुष्याला वस्त्र दाखविलें असतां तंतूंची ओळख पटत नाहीं; अथवा त्यास पड्यावरील चित्रें दाखविलीं असतां पड्याची ओळख नसते, ४४ तसें भूतमात्र भिन्नभिन्न आहे या समजुतीनें ज्या ज्ञानाची ऐक्यबोधाची भावना नाश पावली आहे; ४५ मग लांकडें पेटल्यावर त्यांचे आकारांप्रमाणें अग्नि निरनिराळा आहे, अथवा फुलांवरून वास निराळे आहेत, अथवा चंद्राचें प्रतिबिंब पाण्यांत पडल्यामुळें तें हाल-ल्यावर चंद्राचे तुकडे झाले आहेत, ४६ तसा नानाप्रकारच्या पदार्थांत पुष्कळ भिन्नपणा आहे, अथवा वेपावरून लहान व मोठा हा भेद आहे, या समजुतीनें जें भरलेलें ज्ञान, तें राजस ज्ञान होय. ४७ आतां, गांवाबाहेर असणाऱ्या मांगाचें घर वस्ती करण्यास अयोग्य एवढ्याचकरितां जसें वाटसरास सांगावें लागतें, तशीं तामस ज्ञानाचीं लक्षणें तुला सांगतों, तीं पूर्ण ध्यानांत ठेव. ४८

श्लोकार्थः—जें ज्ञान, एक शरीर अथवा उपास्य देवतेची मूर्ति यापलीकडे कांहीं नाहीं असें पाहतें, जें असयुक्तिक व ज्यात कांहीं तात्पर्य नाहीं, व जें थोडें असतें, त्याला तामस ज्ञान म्हणतात ॥ २२ ॥

तर, अर्जुना, जें ज्ञान विधिरूपी वस्त्र पांघरल्याशिवाय संचार करितें, आणि म्हणू-नच तें नग्न असल्यामुळें, सर्व शास्त्रांची ' माता ' जी श्रुति ती त्याला पाठमोरी असते; ४९ इतर शास्त्रांनींही, त्या ज्ञानास बट्टा लावून त्याची निंदा केली असतां आपल्यास विटाळ होईल म्हणून म्लेंच्छधर्मरूपी डोंगराकडे ज्याची बोळवण केली; ५५० जें ज्ञान तमोगुणरूपी ब्रह्मराक्षसाचा संचार झाल्यामुळें वेड्याप्रमाणें फिरतें; ५१ जें शरीरसंबंधाची अडचण बाळगीत नाहीं, व पदार्थांचे ठिकाणीं निषेधपणा ओळखीत नाहीं; जसें ओसाड गांवांत सोडलेलें कुत्रें स्वेच्छेनें वागतें; ५२ त्याच्या तोंडींत सांपडत नाहीं अथवा जें खाल्लें असतां तोंड भाजतें तीच वस्तु तें टाकतें, बाकी सर्व वस्तु त्याजपाशीं खपतात; ५३ उंदरानें सोनें चोरलें असतां तें चांगलें अथवा वाईट हें तो जाणत नाहीं, अथवा मांस खाणारा हा मांसाचे ठिकाणीं काळें व गोरें हा भेद जाणत नाहीं; ५४ किंवा रानास वणवा लागल्यावर त्याला जसा कसलाच विचार राहत नाहीं, अथवा प्राणी जिवंत किंवा मेलेला याचा विचार न करितां माशी वाटेल त्यावर बसते; ५५ अरे, कावळ्यास जसा अन्न ओकलेलें किंवा वाढलेलें, साजुक किंवा सडलेलें हा विचार नसतो, ५६ तसें अपवित्र वस्तूचा त्याग करावा अथवा शास्त्रांत सांगितलेल्या गोष्टींचा स्वीकार करावा, हें विषयांचे भरांत जें जाणत नाहीं; ५७ तर जी जी वस्तु दृष्टीस पडेल, त्या त्या वस्तूचा उपभोग घेतें; आणि मग स्त्री असल्यास शिश्नास व द्रव्य असल्यास उदरास वांटून देतें; ५८ उदकाचे ठिकाणीं हें तीर्थ किंवा हें अपवित्र ही ज्यास ओळख नसते, परंतु त्यापासून तहान भागते, एवढेंच सुख जें मानतें; ५९ त्याचप्रमाणें, भक्ष्याभक्ष्य व निंद्यानिंद्य यांचा जें विचार करीत नाहीं, परंतु आपल्याला जें आवडेल तेंच

॥ ५६० ॥ आणि स्त्रीजात तितुकें । त्वचेंद्रियेंचि वोळखे । तियेविपयीं सोय-रिके । एकचि घोधु ॥ ६१ ॥ पैं स्वार्थी जें उपकेरे । तयाचि नाम सोयिरें । देह-संबंधु न सैरे । जिये ज्ञानीं ॥ ६२ ॥ मृत्यूचें आघवेंचि अन्न । आघवेंचि आगी इंधन । तैसें जगचि आपलें धन । तामस ज्ञाना ॥ ६३ ॥ ऐसेनि विश्व सकळ । जेणें विपयोचि मानिलें केवळ । तया एक जाण फळ । देहभरण ॥ ६४ ॥ आकाशपतिता नीरा । जैसा सिंधुचि येक थारा । तैसें कृत्यजात उदरा-लागींचि बुझे ॥ ६५ ॥ वाचूनि स्वर्गु नरकु आथी । तया हेतु प्रवृत्ति निवृत्ति । इये आघविये राती । जाणिवेची जें ॥ ६६ ॥ जें देहखंडा नाम आत्मा । ईश्वर पापाणप्रतिमा । ययापरौती प्रमा । ढळों नेणे ॥ ६७ ॥ म्हणे पाडिलेनि शरीरें । केलेनिसीं आत्मा सरे । मा भोगावया उरे । कोण वेषें ॥ ६८ ॥ ना ईश्वरु पाहतां आहे । तो भोगवी जरी हें होये । तरी देवचि खाये । विकूनिया ॥ ६९ ॥ गांवींचे देवळेश्वर । नियामकचि होती साचार । तरी देशींचे डोंगर । उगे कां असती ॥ ५७० ॥ ऐसा विपायें देवो मानिजे । तरी पाषाणमात्रचि जाणिजे । आणि आत्मा तंव म्हणिजे । देहातेंचि ॥ ७१ ॥ येरें पापपुण्यादिकें । तें आवघेंचि करोनि लटिकें । हित मानी अग्निमुखें । चैरणें जें कां ॥ ७२ ॥ जे चामांचे डोळे दाविती । जे इंद्रियें गोडी लाविती । तेचि साच हे प्रतीती । फुडी जया ॥७३॥ किंबहुना ऐसी प्रथा । वाढती देखसी पार्था । धूमाची वेली वृथा । आकाशीं जैशी ॥ ७४ ॥ कोरडा ना वोला । उपयोगा आथी गेला । तो वाढोनि मोडला । भेंडु जैसा ॥ ७५ ॥ ना ना उंसाचीं कणसें । कां नपुंसकें माणुसें । वन लागलें जैसें । सांवरीचें ॥ ७६ ॥ नातरी बाळकाचें मन । कां चोराघरींचें धन । अथवा गळस्तन । शेळियेचे ॥ ७७ ॥ तैसें जें वांयाणें । वोसांळ दिसे जाणणें । तयातें मी म्हणें । तामस ज्ञान ॥ ७८ ॥ ( ११२९. तामस ज्ञानाला ज्ञान म्हणण्याचें कारण, ५७९–५८२ ) तेंही ज्ञान इया भाषा । बोलिजे तो भावो ऐसा । जात्यंधाचा कां जैसा । डोळा वोंडु ॥ ७९ ॥ कां बधिराचे नीट कान । अपेया नाम पान । तैसें आडनांव ज्ञान । तामसा तया ॥ ५८० ॥ हें असो किती बोलावें । तरी ऐसें जें देखावें । तें ज्ञान नोहे जाणावें । डोळेंस तम ॥ ८१ ॥ एवं तिहीं गुणीं । भेदलें यथालक्षणीं । ज्ञान श्रोतेशिरोमणि । दाविलें तुज ॥ ८२ ॥ अवतरणः—( ११३०. ज्ञानाच्या तीन प्रकारांमुळें कर्माचे तीन प्रकार, ५८३-५८५ ) आतां याचि त्रिप्रकारा ।

---

१ भोग्यविषय. २ कामास येतें. ३ योग्य होत नाहीं. ४ पुरुषार्थ. ५ देहाच्या तुकड्यास. ६ बुद्धि. ७ कैर्मासह. ८ नाश पावतो. ९ शासन करणारे. १० सेवन करणें. ११ कातड्याचे. १२ बुद्धि. १३ बरूंतील भुरकुंड. १४ निवडुंगाचें. १५ निरर्थक. १६ चाईट; ओशाळलेलें. १७ मोठा. १८ प्रत्यक्ष.

पवित्र आहे, असा ज्याचा निश्चय झालेला असतो; ५६० आणि स्त्रीजात म्हणून जेवढी आहे, तिजविषयीं भोग्य विषय एवढीच ज्याची ओळख आहे, व तिचे ठिकाणीं आप्तपणा करण्याविषयीं जें तत्पर असतें; ६१ हें पहा—आपल्या जे उपयोगीं पडतील तेच आपले सोयरे आहेत, व देहसंबंध ज्यांच्याशीं आहे ते सोयरिकीस योग्य नाहींत, अशी ज्या ज्ञानाची समजूत असते; ६२ मृत्यूला दृश्यपदार्थमात्र हे भक्ष्यस्थानींच होत, व अग्नीला सर्व दृश्यमान वस्तु काष्ठाप्रमाणेंच आहेत, तसें तामस ज्ञानाला जगात असलेलें सर्व धन आपलेंच आहे असें वाटतें. ६३ याप्रमाणें, सर्व जग हें उपभोगाकरितांच निर्माण केलें आहे, अशी ज्या ज्ञानाची समजूत झालेली आहे, त्यास देहभरणाशिवाय दुसरा पुरुषार्थच नसतो; ६४ आकाशांतून पडलेल्या पाण्यास जसें समुद्रासच मिळावें लागतें, तसें कोणतीही खटपट करणें झाल्यास तें ज्ञान पोटाकरितांच करितें; ६५ स्वर्ग किंवा नरक यांच्या प्राप्तीकरिता यथाशास्त्र व निषिद्ध आचरण हेंच कारण होय, याविषयीं ज्या ज्ञानास अज्ञान असतें; ६६ देहाच्या तुकड्यासच आत्मा हें नांव आहे, व ईश्वर ही दगडाचीच मूर्ति आहे, यापलीकडे ज्याच्या बुद्धीची धाव नसते; ६७ आणि तें असें म्हणतें कीं, हें शरीर पडल्यावर आत्मा केलेल्या कर्मासह नाश पावतो; मग कर्मांचीं फळें भोगावयास या मृत्युलोकीं कोणत्या रूपानें आत्मा राहतो? ६८ किंवा आपल्या केलेल्या कर्मास ईश्वर साक्षी असून तो त्या कर्मांचीं फळें भोगावयास लावतो असें म्हणावें, तर सोन्यारुप्याच्या केलेल्या देवांच्या मूर्ति बाजारांत नेऊन विकल्या असतां त्याजबद्दल देव शासन करील अशी भीति नसते; ६९ गांवांतील प्रमुख देव जर कर्माबद्दल शासन करतील म्हणावें, तर त्या मूर्ति ज्या डोंगरांतील दगडांच्या तयार केलेल्या असतात, ते डोंगर स्वस्थ कां बसतात? ५७० याप्रमाणें, कदाचित् देव आहे असें मानलें, तरी तो दगडाची मूर्ति आहे असें समजतें, आणि आत्मा म्हणजे देहच असें समजतें, ७१ याशिवाय, पाप किंवा पुण्य हीं सर्व लटकीं आहेत; व अग्नि पेटल्यावर पुढें येणाऱ्या सर्व जिनसांचें भक्षण करतो, त्याप्रमाणें, जी जी गोष्ट भोगण्यास मिळेल तिचा भोग घेण्यांतच हित आहे असें जें समजतें; ७२ चर्मचक्षूंनीं जे जे पदार्थ दृष्टीस पडतील, व इंद्रियें ज्या विषयांची गोडी लावतील, त्याच गोष्टी खऱ्या आहेत असा ज्याचा पक्का अनुभव आहे; ७३ किंबहुना पार्था, आकाशांत धुराचे लोट व्यर्थ जातात, त्याप्रमाणें ज्याची बुद्धि अशा रीतीनें वाढत जाते; ७४ वस्तुंतील भेंड जसें कोरडें किंवा ओलें असलें तरी मोठें वाढल्यावरही कोणत्याच उपयोगास येत नाहीं; ७५ अथवा उंसास आलेलीं कणसें, किंवा नपुंसक मनुष्य अथवा निवडुंगाचें वन हीं सर्व जशीं निरुपयोगी आहेत; ७६ अथवा बालकाचें मन जसें चंचल असतें, किंवा चोरानें चोरून आणलेलें धन जसें त्याला राजरोस वापरतां येत नाहीं, अथवा शेळीचे गळ्यास असणारे स्तन जसे निरुपयोगी असतात, ७७ तसें जें निरर्थक व ओशाळलेलें ज्ञान, त्याला मी तामस ज्ञान असें म्हणतों. ७८ त्यालाही ज्ञान म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, मनुष्य जन्मांध असला तरी त्याच्या डोळ्यांचें वर्णन करूं लागलें असतां त्याचे डोळे मोठे आहेत असें आपण म्हणतों; ७९ किंवा बहिऱ्याचे कान काय मोठे आहेत, असें त्यास ऐकूं येत नसतांही वाखाणतों; अथवा पिण्याच्या अपवित्र वस्तूस आपण पान ( पिण्याची वस्तु )

ज्ञानाचेनि धनुर्धरा । प्रकाशें होती गोचरा[1] । कर्तयांच्या क्रिया ॥ ८३ ॥ म्हणौनि कर्म पैं गा । अनुसरे तिहीं भागां । मोहरें[2] जालिया वोघा । तोय जैसें ॥ ८४ ॥ तेंचि ज्ञानत्रयवशें । त्रिविध कर्म जें असे । तेथ सात्त्विक तंव ऐसें । परिस आधीं ॥ ८५ ॥

नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ।
अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥

अन्वयः—अफलप्रेप्सुना यत् नियतम् कर्म संगरहितम् अरागद्वेषतः कृतम्, तत् सात्त्विकं उच्यते ॥ २३ ॥

( ११३१. सात्त्विक–नियत कर्म, ५८६–५८८ ) तरी स्वाधिकाराचेनि मार्गें । आलें जें मानिलें आंगें । पतिव्रतेचेनि पैरिष्वंगें[4] । प्रियातें जैसें ॥ ८६ ॥ सावळ्या आंगा चंदन । प्रमदालोचनां[5] अंजन । तैसें अधिकारासी मंडण[6] । नित्यपणें जें[7] ॥ ८७ ॥ तें नित्य कर्म भलें । होय नैमित्तिकीं सावाइलें[8] । सोनयासि जोडलें । सौरंभ्य[9] जैसें ॥ ८८ ॥ ( ११३२. सात्त्विक–संगरहित कर्म, ५८९ ) आणि आंगा जीवाची संपत्ति । वेंचूनि करी बाळाची पाळेंती[10] । परी जीवें उबगणें[11] हे स्थिति । न पाहे माय ॥ ८९ ॥ ( ११३३. सात्त्विक–फलेच्छारहित कर्म, ५९० ) तैसें सर्वस्वें कर्म अनुष्ठी । परी फळ न सूये दिठी । उखिती[12] क्रिया पैठी[13] । ब्रह्मींचि करी ॥ ५९० ॥ ( ११३४. सात्त्विक–रागद्वेषरहित कर्म, ५९१-५९३ ) आणि प्रिय आलिया स्वभावें । सबल उरे वेंचे ठावें नव्हे । तैसें सत्प्रसंगें करावें । पौरुषें जरी ॥ ९१ ॥ तरी अकरणाचेनि खेदें । द्वेषातें जीवीं न बांधे । जालियाचेनि आनंदें । फुंजों नेणे ॥ ९२ ॥ ऐसऐसिया हातवटिया । कर्म निफजे जें धनंजया । जाण सात्त्विक हें तया । गुणनाम गा ॥ ९३ ॥ अवतरण:—( ११३५. राजस कर्म, ५९४-६१० ) ययावरी राजसाचें लक्षण । सांगिजेल साचें । न करीं अवधानाचें । वौणेंपण ॥ ९४ ॥

यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।
क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

अन्वयः—पुनः यत् तु कामेप्सुना साहंकारेण वा बहुलायासं कर्म क्रियते, तत् राजसं उदाहृतम् ॥ २४ ॥

( ११३६. फलेच्छा धरून केलेलें कर्म–राजस, ५९५-६०२ ) तरि घरीं मातापितरा । धड बोली नाहीं संसारा । येर विश्वभरी आदरा । मूर्खु जैसा ॥ ९५ ॥ का तुळशीचिया झाडा । दुरूनि न घापे सिंतोडा । द्राक्षीचेया तरी बुडा । दूधाचि लाविजे ॥ ९६ ॥ तैसीं नित्यनैमित्तिकें । कर्में जियें आवश्यकें । तयाचेविषीं न

१ दृष्टीस पडतात. २ मार्गास लागलेले. ३ उक्त. ४ आलिंगनानें. ५ स्त्रियांच्या नेत्रांला. ६ भूषण. ७ कर्म. ८ साह्य झालें. ९ सुगंध. १० रक्षण. ११ कंटाळणें. १२ सर्व. १३ अर्पण.

असें म्हणतों, तसें या तामस ज्ञानाला ज्ञान हें आडनांव होय। ५८० हें असो; आणखी किती वर्णन करावें! तर असें जें ज्ञान, त्यास ज्ञान न समजतां प्रत्यक्ष तमोगुणच समजावें. ८१ याप्रमाणें, हे श्रोतृश्रेष्ठा, तीन गुणांनीं भेद पावलेलें जें ज्ञान, त्याचीं यथार्थ लक्षणें तुला सांगितलीं. ८२ हे धनुर्धरा, आतां याच तीन प्रकारच्या ज्ञानाच्या प्रकाशानें कर्त्यांच्या क्रिया उघड दिसतात. ८३ म्हणून, पाण्याला जिकडे लावावें तिकडे जसें तें जातें, तसें कर्म हें ज्ञानाच्या तीन भागांनीं निरनिराळें घडतें. ८४ तेंच ज्ञानाच्या अनुरोधानें जें तीन प्रकारचें कर्म होतें, त्यापैकीं सात्त्विक कर्माचीं लक्षणें प्रथम ऐक. ८५

श्लोकार्थः—फलाची इच्छा न करिता जें नित्यनैमित्तिक कर्म कर्तेपणाचा अभिमान सोडून रागद्वेषरहित केलें जातें, त्याला सात्त्विक कर्म म्हणतात ॥ २३ ॥

तर पतिव्रता स्त्री आपल्या प्रिय पतीस जसें आलिंगन देते, तसें आपल्या अधिकारानुरूप आपल्यास उक्त असेल तें कर्म जो आचरण करितो; ८६ सांवळ्या रंगाच्या शरीरास जसें चंदन शोभतें, व स्त्रियांच्या नेत्रांस जसें अंजन शोभा देतें, तसें जें अधिकारानुरूप नित्य आचरण केलें असतां भूषण होय, ८७ तें नित्यकर्म करीत असून त्यांत नैमित्तिक कर्माची भर पडली असतां, सोन्याच्या दागिन्यांस सुगंधानें शोभा येते, त्याप्रमाणें होय. ८८ जशी शरीरानें, जीवानें व संपत्तीनें माता आपल्या बालकाचें रक्षण करिते, तरी तिला कंटाळा आला असें कधीं वाटत नाहीं, ८९ तसें सर्वपरी कर्माचें अनुष्ठान फलाची इच्छा न धरितां करितो, व तें सर्व कर्म ब्रह्मार्पण करितो; ५९० आणि आपला प्रियपति घरीं आल्यावर त्याच्या भोजनाचे समयीं आपल्यास जिन्नस उरेल किंवा संपेल हें जसें पतिव्रतेच्या लक्षांत सुद्धां येत नाहीं, तसें, कर्म करीत असतां साधुजन घरीं आल्यावर त्यांचें आदरातिथ्य करण्यांत वेळ मोडून जरी कर्म राहिलें, ९१ तरी जो कर्म करण्याचें राहिलें असा खेद मनास होऊं देत नाहीं व रागावत नाहीं, व तें कर्म शेवटास गेलें असतांही जो आनंदानें गर्व मानीत नाहीं, ९२ या युक्तीनें जें कर्म होतें, त्याला, अर्जुना, सात्त्विक कर्म म्हणतात असें समज. ९३ यापुढें राजस कर्माचें खरें स्वरूप तुला सांगतों, तें ऐकण्यास हयगय करूं नको. ९४

श्लोकार्थः—पण जें कर्म फलाची इच्छा धरून, अहंकारपूर्वक व पुष्कळ आयासानें केलें जातें, त्याला राजस कर्म म्हणतात ॥ २४ ॥

तर घरीं मातापितरें असून त्यांच्याशीं जो संसारांत गोड भाषणही करीत नाहीं, परंतु मूर्खाप्रमाणें जगांतील सर्व लोकांचें आदरातिथ्य करितो; ९५ किंवा तुळशीचे झाडास दुरून पाण्याचा शितोडा पडूं देत नाहीं, कारण त्यापासून फळ किंवा पुष्प यांची प्राप्ति नाहीं; परंतु द्राक्षांच्या झाडास दूध घालतो, ९६ त्याप्रमाणें, आवश्यक अशीं जीं नित्यनैमित्तिक कर्में, त्यांचें आचरण करण्याविषयीं जो बसल्या जागेवरून उठत सुद्धां नाहीं;

१४ सहज. १५ राहे. १६ कर्म न झाल्यामुळें. १७ कमीपणा; हयगय.

शके । बैसला उठूं ॥ ९७ ॥ येरां काम्याचेनि तरी नांवें । देहसर्वस्व आघवें । वेचितांही न [1]मनवे । बहु ऐसें ॥ ९८ ॥ अगा देवढी[2] वाढी लाहिजे । तेय मोल देतां न धाइजे । पेरितां पुरे न म्हणिजे । बीज जेवीं ॥ ९९ ॥ कां परिसु आलिया हातीं । लोहालागीं सर्वसंपत्ति । वेंचिता ये उन्नती[3] । साधकु जैसा ॥ ६०० ॥ तैसीं फळें देखोनि पुढें । काम्य कर्में दुवाडें । करी परी तें थोकडें । केलेंहि मानी ॥ १ ॥ तेणें फळकामुकें । यथाविधि नेटकें । काम्य कीजे तितुकें । क्रियाजात ॥ २ ॥ ( ११३७. अहंकारयुक्त कर्म—राजस, ६०३-६०५ ) आणि तयाही केलियाचें । तोंडीं[4] लावी दौंडीचें[5] । कर्मीं या नांव पांटाचें[6] । वाणें सैरी ॥ ३ ॥ तैसा भरे कर्माहंकारु । मग पिता अथवा गुरु । ते न मनी काळज्वरु । औषध जैसें ॥ ४ ॥ तैसेनि साहंकारें । फळाभिलाषियें नरें । कीजे गा आदरें । जें जें कांहीं ॥ ५ ॥ ( ११३८. कष्टयुक्त कर्म—राजस, ६०६-६१० ) परी तेंही करणें बहुवसा । वळघोनि करी सायासा । जीवनोपायो कां जैसा । कोल्हांटियांचा ॥ ६ ॥ एका कणालागीं उंदिरु । असका उपसे डोंगरु । कां शेवाळोद्देशें दर्दुरु । समुद्र डहुळी ॥ ७ ॥ पैं भिकेपरतें न लाहे । तऱ्ही गारुडी सापु वाहे । काय कीजे शीणुचि होये । गोडु येकां ॥ ८ ॥ हें असो परमाणूचेनि लाभें । पाताळ लंघिती वोळंबे[7] । तैसें स्वर्गसुखलोभें । विचंबणें[8] जें ॥ ९ ॥ तें काम्य कर्म सक्लेश । जाणावें येथ राजस । अवतरण:—आतां चिन्ह परिस । तामसाचें ॥ १० ॥

> अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् ।
> मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥

अन्वयः—अनुबंधं, क्षयं, हिंसाम् च पौरुषं अनपेक्ष्य यत् कर्म मोहात् आरभ्यते, तत् तामसं उच्यते ॥ २५ ॥

( ११३९. तामस कर्म, ६११-६२७ ) तरी तें गा तामस कर्म । जें निंदेचें काळें धाम । निषेधाचें जन्म । साच जेणें ॥ ११ ॥ ( ११४०. परिणामाचा विचार न करता केलेलें कर्म—तामस, ६१२-६१५ ) जें निपजविल्यापाठीं । कांहींच न दिसे दिठी । रेघ काढिलिया पोटीं । तोयाचे जेवीं ॥ १२ ॥ कां [9]कांजी घुसळलिया । कां रांखोडी फुंकलिया । क़ांहीं न दिसे गाळिलिया । वाळुघाणा ॥ १३ ॥ ना ना उपणिलिया भूंस । का विंधिलियें आकाश । ना ना मांडिलिया पाश । वारयासी ॥ १४ ॥ हें अवघेंचि जैसें । वांझें होऊनि नासे । जें केलिया पाठी तैसें । वायांचि जाय ॥ १५ ॥ ( ११४१. हानियुक्त कर्म—तामस, ६१६–६१७ ) येऱ्हवीं नरदेहाही येवढें । धन आटणीये पडे । तें कर्म निफजवितां मोडे । जगाचें सुख ॥ १६ ॥

---

१ वाटत नाहीं. २ वाढीदिढी. ३ उत्कर्ष. ४ दौंडी पिटवितो. ५ मुखाचे. ६ वांटतो. ७ वाळवी. ८ श्रम करणें. ९ सार्थक. १० ताकाची निवड. ११ बाण मारले असतां. १२ खर्ची.

९७ एरवीं काम्यकर्माविषयीं सर्व देह जरी झिजला तरी त्यास शीण येत नाहीं; (थोडकेंच केलें असें मानतो;) ९८ अरे, वाढीदिढीच्या व्यापारांत पैसे खर्च करण्यास ज्याची तृप्ति होत नाहीं, व जमिनींत धान्य पेरूं लागल्यावर कितीही पेरलें तरी त्याला पुरेसें वाटत नाहीं; ९९ किंवा परीस हातीं आल्यावर जो लोखंडाचें सोनें करण्याकरितां तयार केलेलें सोनें विकून लोखंडच खरेदी करतो, ६०० त्याप्रमाणें फळावर आशा ठेवून कठीण अशीं काम्यकर्में पुष्कळ करतो, परंतु तीं थोडींच केलीं असें मानतो; १ याप्रमाणें फळाची इच्छा धरून, काम्यकर्में जितकीं असतील तितकीं यथाविधि करतो; २ आणि केलेल्या कर्मांची आपल्या तोंडानें वाखाणणी करितो, व त्या केलेल्या कर्मांचीं चहूंकडे वाणें वांटतो; ३ अशा रीतीनें मनात अभिमान उत्पन्न झाल्यावर बाप अथवा गुरु यास मानीत नाहीं, कालज्वरानें व्याप्त झालेल्या मनुष्यास जसें औषध लागू पडत नाहीं, ४ तसा अहंकारयुक्त होऊन व फळावर नजर ठेवून अगत्यानें जें जें कर्म करितो; ५ परंतु कोल्हाट्याचे श्रम त्याला केवळ उदरभरणासच उपयोगीं पडतात, तसें अति कष्टानें कर्म करून त्याला दुसरें कांहीं प्राप्त होत नाहीं; ६ एक कणाकरितां उंदीर जसा सर्व डोंगर पोखरतो, अथवा शेवाळाच्या प्राप्तीकरितां बेडूक समुद्र ढवळतो; ७ भिक्षेशिवाय दुसरी कांहीं प्राप्ति न होता गारुडी जसें सापाचें ओझें वाहतो; काय करावें ? या लोकांना खटपटच प्रिय आहे ! ८ हें असो; एक कणाच्या आशेकरितो वाळवी ही पाताळापर्यंत खोल खणते, त्याप्रमाणें, स्वर्गसुखाचे प्राप्तीकरितां जे श्रम करितात ! ९ याप्रमाणें अति दगदगीचें असें जें काम्यकर्म, त्याला राजस कर्म असें म्हणावें. आतां तामस कर्माची लक्षणें सांगतों, तीं ऐक. ६१०

श्लोकार्थः—परिणाम, हानि, हिंसा व आपलें सामर्थ्य इकडे लक्ष न देता अज्ञानानें जें कर्म केलें जातें, त्याला तामस कर्म म्हणतात ॥ २५ ॥

तर तामस कर्म तें होय, कीं जें निंदेचें काळें (पापमय) घरच होय; आणि ज्याच्या योगें निषेधाच्या जन्माचें सार्थक झालें आहे ! ११ जें कर्म झालें असता त्यापासून कांहींच फलप्राप्ति दृष्टीस पडत नाहीं; जशी पाण्यावर रेघ ओढली असतां ती निष्फल होय; १२ किंवा ताकाची निवळ घुसळली असतां (जसें लोणी निघत नाहीं;) किंवा सोनाराचे घरांतल्या राखेशिवाय इतर ठिकाणची राख फुंकीत बसलें असता (जसें सोन्याचे कण वगैरे कांहीं सांपडत नाहींत); अथवा वाळू घाण्यांत घातली असतां जसें तिजपासून (तेल किंवा पेंड) कांहींच उत्पन्न होत नाहीं; १३ अथवा भूस उफणणें, किंवा आकाशांत बाण मारीत बसणें, अथवा वाऱ्यास धरण्याकरितां फांस टाकणें, १४ या गोष्टी ज्याप्रमाणें करून निष्फल आहेत, त्याप्रमाणें ज्या कर्माचें आचरण करूनही व्यर्थ होतें; १५ एरवीं, नरदेहासारखी अमूल्य वस्तु प्राप्त होऊन आणि संपत्तिही खर्च करून जें कर्म केलें असतां जगाला उलट दुःख मात्र होतें; १६ ज्याप्रमाणें कमळें काढण्याकरितां त्यांवर कांट्यांचा फांस टाकून ओढला असतां आपल्यास श्रम होऊन कमळांचाही नाश

जैसा कमळवनीं फांसु । काढिलिया कांटसु । आपण झिजे नाशु । कमळा करी ॥ १७ ॥ ( ११४२. हिंसायुक्त कर्म–तामस, ६१८–६२० ) कां आपण आगें जळे । आणि नागँवी जगाचे डोळे । पतंगु जैसा सैंळें । दीपाचेनि ॥ १८ ॥ तैसें सर्वस्व वायां जावो । वरी देहाही होय घावो । परी पुढिलां अपावो । निफजविजे जेणें ॥ १९ ॥ माशी आपणयातें गिळवी । परी पुढिला वांती शिणवी । तें कश्मळ आँठवी । आचरण जें ॥ ६२० ॥ ( ११४३. सामर्थ्यरहित कर्म–तामस, ६२१-६२२ ) तेंही करावयोद्देशें । मज सामर्थ्य असे कीं नसे । हेंही पुढील तैसें । न पाहतां करी ॥ २१ ॥ केवढा माझा उपावो । करितां कोण प्रस्तावो । केलियाही आंवो । काय येथ ॥ २२ ॥ ( ११४४. अज्ञानयुक्त कर्म–तामस, ६२३-६२७ ) इये जाणिवेची सोये । अविवेकाचेनि पायें । पुसोनियां होये । सांटोप कर्मीं ॥ २३ ॥ आपला वसौटीं जाळुनी । विसौटे जैसा वन्ही । कां स्वमर्यादा गिळोनी । सिंधु उठी ॥ २४ ॥ मग नेणे बहु थोडें । न पाहे मागें पुढें । मार्गामार्ग येकैंवढें । करीत चाले ॥ २५ ॥ तैसें कृत्याकृत्य सैरकटित । आपपर नुरवित । कर्म होय तें निश्चित । तामस जाण ॥ २६ ॥ ऐसी गुणत्रयाभिन्ना । कर्माची गा अर्जुना । हे केली विवंचना । उँप-पत्तींसी ॥ २७ ॥ ( ११४५. गुणामुळें कर्ता तीन प्रकारचा, ६२८-६२९ ) अवतरण:— आतां ययाचि कर्मा भजतां । कर्माभिमानिया कर्ता । तो जीवुही त्रिविधता । पातला असे ॥ २८ ॥ चतुरांश्रमवशें । एकु पुरुषु चँतुर्धा दिसे । कर्तया त्रैविध्य तैसें । कर्मभेदें ॥ २९ ॥ ( ११४६. सात्त्विक कर्ता, ६३०–६४८, संगरहित कर्ता–सात्त्विक ६३०–६३३ ) तरी तया तिहींआंतु । सात्त्विक तंव प्रस्तुत । सांगेन दॆंत्तचित्तु । आँकर्णीं तूं ॥ ६३० ॥

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।
सिद्धयसिद्धयोर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥ २६ ॥

*अन्वयः—यः मुक्तसंगः अनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः सिद्ध्यसिद्ध्योः निर्विकारः, सः कर्ता सात्त्विकः उच्यते ॥ २६ ॥*

तरी फळोद्देशें सांडिलिया । वाढिती जेविं सरळिया । शाखा कां चंदनाचिया । वाँवनया ॥ ३१ ॥ कां न फळतांही सार्थका । जैसिया नागलतिकाँ । तैसिया करी नित्यादिका । क्रिया जो कां ॥ ३२ ॥ परी फळशून्यता । नाहीं तया विफळता । पैं फळासीचि पंडुसुता । फळें कायिसीं ॥ ३३ ॥ ( ११४७. निरहंकार कर्ता–सात्त्विक, ६३४–६३६ ) आणि आदरें करी बहुवसें । परी मी कर्ता हें नुँमसे ।

१ फांद्यांचा. २ श्रमी होय. ३ अंधार करतो. ४ संतापानें, द्वेषानें. ५ श्रम. ६ दुसऱ्यास; ७ आठवण करून देतें. ८ प्रसार. ९ प्राप्ति. १० अभिमानयुक्त. ११ राहण्याची जागा. १२ पसरतो. १३ एकत्र. १४ रगडीत. १५ दाखल्यासह. १६ ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास.

होतो; १७ किंवा पतंग ज्याप्रमाणें दिव्याचा हेवा करून त्यावर झडप घालतो, आणि स्वतः नाश पावून जगालाही अंधार करतो; १८ त्याप्रमाणें, आपलें सर्वस्व वाया जाऊन देहाला श्रम जरी झाले, तरी दुसऱ्यास ज्या कर्मापासून अपाय होतो; १९ माशी ही स्वतःला गिळविते, ( पोटांत जाऊन स्वतः मरते, ) पण दुसऱ्याला वांती करून शिणविते, तर जें आपण त्या वाईट गोष्टीची आठवण करून देतें; ६२० बरें, तेंही कर्म करण्याचें आपल्यांत सामर्थ्य आहे किंवा नाहीं, हा पुढील विचार (तर करावा! पण तसें कांहीं ) न करतां कर्म करूं लागतो; २१ माझा केवढा प्रयत्न, व त्याचा मीं केवढा पसारा मांडिला आहे, आणि तो केल्यापासून मला काय प्राप्ति होणार, २२ या विचाराला अविवेकाच्या पायांखालीं तुडवून टाकतो; आणि त्या कर्माबद्दल अभिमान बाळगतो; २३ अग्नि ( ज्या वेळूंपासून उत्पन्न होतो ती ) आपली राहण्याची जागा ( वेळूचें बेट ) जाळून पसरतो, अथवा आपली मर्यादा सोडून समुद्र वाढला, २४ म्हणजे मग लहान किंवा मोठी वस्तु याचा विचार न करितां पवित्र व अपवित्र वस्तु एकत्र करून चालतो, २५ तसें योग्यायोग्य एके ठिकाणीं रगडून आपलें व दुसऱ्याचें हा भेद जें उरूं देत नाहीं, तें तामस कर्म असें समज. २६ याप्रमाणें अर्जुना, गुणाच्या भिन्नपणानें कर्म तीन प्रकारचें कसें झालें, तें तुला दाखल्यांसह स्पष्ट करून सांगितलें. २७ आतां, या कर्माचा अभिमान बाळगून त्याचें आचरण करणारा जो जीव, तो याचे योगानें तीन प्रकारचा झाला आहे. २८ ज्याप्रमाणें, एकाच पुरुषावर ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास या चार आश्रमांच्या योगें चार अवस्था दिसतात, त्याचप्रमाणें कर्मांच्या भेदानें कर्त्याला तीन अवस्था येतात. २९ तर त्या तिहींपैकीं सात्विक अवस्थेचें प्रथम वर्णन करतों, तें पूर्ण लक्ष देऊन ऐक. ६३०

श्लोकार्थः—सर्वसंगपरित्यागी, निरहंकार, धैर्य व उत्साह यांनीं युक्त, आणि कार्याच्या सिद्धीपासून अथवा असिद्धीपासून विकार न पावणारा याला सात्विक कर्ता म्हणतात ॥ २६ ॥

तर ज्याप्रमाणें मलय पर्वतावरील चंदनाच्या फांद्या फळाची इच्छा न धरितां सरळ वाढतात, ( तथापि त्या झाडाच्या सर्व भागास उत्तम सुवासच असतो; ) ३१ किंवा नागवेल न फळतांही सार्थकीं लागतो, ( नागवेलीला जरी फळ येत नाहीं, तरी तिचीं पानेंच उपयोगीं पडतात; ) त्याप्रमाणें ( जीं सर्वतोपरी उत्तम आहेत ) त्या नित्यनैमित्तिक कर्मांच्या फळांची इच्छा न धरितां जो त्यांचें आचरण करितो; ३२ पण त्याला फलशून्य असें म्हणूं नये; कारण त्या कर्माला विफलता नाहींच. म्हणून अर्जुना, फळाला फळें कोठून येणार ? ३३ आणि तीं कर्में आदरानें करितो, पण कर्तृत्वाचा अभिमान बाळगीत नाहीं; ज्याप्रमाणें पावसाळ्यांतील मेघसमुदाय कांहीं गर्जना न करितां वृष्टि करितात, ३४ त्याप्रमाणें,

१७ चार प्रकारचा. १८ पूर्ण लक्ष देऊन. १९ ऐक. २० मलय पर्वतावरील. २१ नागवेल २२ अभिमान नसतो.

वर्षाकाळींचे जैसे । मेघवृंद ॥ ३४ ॥ तेवींचि परमात्मलिंगा । समर्पावयाजोगा । कर्मकलापु पैं गा । निपजावया ॥ ३५ ॥ तथा काळातें नुलंघणें । देशशुद्धिही साधणें । कां शास्त्रांच्या वातीं पाहणें । क्रियानिर्णयो ॥ ३६ ॥ ( ११४८. धैर्य व उत्साह यांनीं युक्त कर्ता--सात्त्विक, ६३७-६४४ ) वृत्ति करणें येकवळा । चित्त जाया न देणें फळा । नियमांचिया साखळां । वाहणें सदा ॥ ३७ ॥ हा निरोधु साहावयालागीं । धैर्याचिया चांगाचांगी । चिंतवणी जिती आंगीं । वाहे जो कां ॥३८॥ आणि आत्मयाचिये आवडी । कर्मे करितां वरंपडीं । देहसुखाचिये परवडीं । येवों न लाहे ॥ ३९ ॥ आळस निद्रा दुऱ्हावे । क्षुधा न वांणवे । सुरवाडु न पावे । आंगाचा ठावो ॥ ६४० ॥ तंव अधिकाधिक । उत्साहो धरी आगळीक । सोनें जैसें तुके । तुटलिया कसीं ॥ ४१ ॥ जरी आवडी आथी साच । तरी जीवितही सलंचें । आगीं घालिता रोमांच । देखिजती सतिये ॥ ४२ ॥ मा आत्मयायेवढिया प्रिया । वालभेलें जो धनंजया । देहही सिदेतां तया । काय खेदु होईल ॥ ४३ ॥ म्हणोनि विषयसुरवाडु तुटे । जंव जंव देहबुद्धि आटे । तंव तंव आनंदु दुणवटे । कर्मीं जया ॥ ४४ ॥ ऐसेंनि जो कर्म करी । आणि कोणे येके अवसरीं । तें ठाके ऐसी पैरी । वाहे जरी ॥ ४५ ॥ ( ११४९. सिद्धि किंवा असिद्धि झाली तरी विकाररहित कर्ता--सात्त्विक, ६४५--६४८ ) तरी कडेंडीं लोटला गाडा । तो आपणपें न मनी अवघडा । तैसा ठाकलेनिही थोडा । नोहे जो कां ॥४६॥ नातरी आदरिलें । अव्यंग सिद्धी गेलें । तरी तेंही जिंतिलें । मिरऊं नेणे ॥ ४७ ॥ इया खुणा कर्म करितां । देखिजे जो पंडुसुता । तयातें म्हणिपे तत्त्वता । सात्त्विकु कर्ता ॥४८॥ (११५०. राजस कर्ता, ६४९--६६१) आतां राजसा कर्तेया । वोळखणें हें धनंजया । जे अभिलाषा जगाचिया । वसौटा तो ॥ ४९ ॥

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।
हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥

अन्वयः—रागी, कर्मफलप्रेप्सुः, लुब्धः, हिंसात्मकः, अशुचिः, हर्षशोकान्वितः यः कर्ता सः राजसः परिकीर्तितः ॥२७॥

( ११५१. विषयासक्त कर्ता--राजस, ६५०-६५१ ) जैसा गांवींचिया कश्मळां । उकरडा होय येकवळा । का स्मशानीं अमंगळा । आघवयाचि ॥ ३५०॥ तयापरी जो अशेषा । विश्वाचिया अभिलाषा । पायपाखाळणिया दोषां । घरटा जाला ॥ ५१ ॥ (११५२. फलेच्छा करणारा कर्ता--राजस, ६५२-६५३ ) म्हणोनि फळाचा लागु । देखे जिये असलगु । तिये कर्मीं चांगु । रोहो[20] मांडी ॥ ५२ ॥ आणि

१ समुदाय. २ शास्त्ररूप दिव्यानें. ३ इंद्रियें. ४ विडी. ५ अट. ६ चिता, ७ प्राप्त. ८ प्रतिबंध. ९ आठवण होत नाहीं. १० सुख. ११ वजन. १२ तुच्छ. १३ आवड उत्पन्न झाली.

परमात्म्याला अर्पण करण्यास योग्य होतील अशीं कर्में करण्याकीरतां ३५ कालाची मर्यादा न सोडतां, देशशुद्धि साधून कर्मांच्या योग्यायोग्यतेचा निर्णय शास्त्ररूप दिव्यानें पाहतो, (कर्मांच्या योग्यायोग्यतेचा निर्णय शास्त्रानुरोधें करितो); ३६ इंद्रियें व वृत्ति याचें ऐक्य करून फलाकडे चित्तास जाऊं न देतां, जो नियमाची बेडी पायांत बाळगितो; ३७ ही अट सहन करण्याकारितां उत्तम प्रकारचें धैर्य आपल्या अंगीं असावें अशाविषयीं जो आपले मनात जिवंत चिंता वाहतो, ( अहोरात्र त्याजविषयींच विचार करीत असतो, ) ३८ आणि आत्म्याचे प्राप्तीविषयीं कर्म करीत असतां देहाच्या सुखाची पर्वा करीत नाहीं; ३९ तो आळस व झोंप टाकून देतो, व त्याला भुकेचीही आठवण होत नाहीं; आणि त्यायोगें जों जों सुखावस्था दूर दूर पळते, ६४० तों तों, सोनें ज्याप्रमाणें आंचींत घातल्यावर वजनास कमी भरलें तरी कसास जास्त लागतें, त्याप्रमाणें कर्म करण्याविषयीं नानाप्रकारें अधिकाधिक उत्साह धरतो. ४१ जेथें खरोखर प्रीति आहे, तेथें जीवितही तुच्छ असतें. सहगमन करतांना अग्नींत उडी टाकते समयींही पतिप्रेमामुळें पतिव्रता स्त्रीच्या अंगावर रोमांच उभे राहतात ! ४२ मग अर्जुना, आत्मप्राप्तीसारखी प्रिय वस्तु प्राप्त होण्याविषयीं ज्याला इच्छा झाली आहे, त्याचे शरीरास जरी कष्ट झाले तरी त्यास खेद होईल काय ? ४३ म्हणून, विषयसुखेच्छा नाहींशी होऊन जों जों देहाविषयीं अभिमान कमी होतो, तों तों कर्म करण्याविषयीं त्याला दुप्पट आनंद होतो; ४४ याप्रमाणें कर्म करीत असतां एखादे वेळीं तें कर्म जरी बंद पडलें, तरी ४५ गाडा डोंगरावरून आपोआप खालीं पडून त्याचे तुकडे झाले तरी जसें त्याला त्याजबद्दल अवघड वाटत नाहीं, तसें कर्म राहिलें असतां तो यत्किंचितही खेद मानीत नाहीं, ४६ अथवा आरंभिलेलें कर्म पूर्णपणें सिद्धीस गेलें असताही त्याजबद्दल प्रतिष्ठा मिरवूं जाणत नाहीं. ४७ अर्जुना, कर्मांचें आचरण करीत असतां हीं लक्षणें ज्याचे ठिकाणीं आढळतील, त्याला निश्चयानें सात्त्विक कर्ता म्हणावें. ४८ हे धनंजया, आतां राजस कर्त्यांचीं चिन्हें तुला सांगतां. कारण, जगातील सर्व अभिमानांचें हें माहेरघरच होय. ४९

श्लोकार्थ—विषयासक्त, कर्मफलाची इच्छा करणारा, लोभी, घातकी, अपवित्र, आणि हर्ष व शोक यांनीं युक्त असा जो कर्ता, तो राजस म्हणून प्रसिद्ध आहे ॥ २७ ॥

ज्याप्रमाणें गांवांतील सर्व घाणेरडे पदार्थ टाकण्याचें उकिरडा हें ठिकाण असतें, अथवा सर्व अमंगळ पदार्थ जसे स्मशानांत टाकतात, ६५० त्याप्रमाणें वस्तुतः पाहिलें असतां ही जगातील सर्व कामांची पाय धुण्याची जागाच होय; ५१ म्हणून, ज्या कर्मापासून इच्छित फलप्राप्ति होईल तें कर्म करण्याकडे रोख ठेवतो, ५२ आणि आपण संपादन केलेल्या पदार्थांपैकी एक कवडीही खर्च करीत नाहीं, व क्षणोक्षणीं त्या पदार्थांवरून

१४ दुःख होत असतां. १५ प्रकार. १६ डोंगराच्या कड्यावरून. १७ केरकचरा. १८ धुण्यांची. १९ सोपा. २० रोख.

आपण जालिये जोडी[1] । उंपखों नेदी कवडी । क्षणक्षणा कुरोंडी । जीवाची करी ॥ ५३ ॥ ( ११५३. लोभी कर्ता–राजस, ६५४ ) कृपणाचित्तीं ठेवा आपुला । तैसा दक्षु परावया माला । बकु जैसा खुंतला । मासेयांसी ॥५४॥ ( ११५४. हिंसक कर्ता, ६५५–६५६ ) आणि गोंवी[5] गेलिया जवळी । झगटलिया[6] अंग फाळी । फळे तरी आंतु पोळी । बोरांटी जैसी ॥ ५५ ॥ तैसें मनें वाचा कायें । भलतया दुःख देतु जाये । स्वार्थु साधितां न पाहे । पराचें हित ॥५६॥ ( ११५५. अशुचि कर्ता, ६५७–६५८ ) तेविंच आंगें कर्मीं । आचरण नोहे क्षमी । न निघे मनोधर्मीं । अरोचकु ॥ ५७ ॥ कनकीचिया फळा । आंतु मांज बाहेरी मोळें । तैसा सबाह्य दुर्बळा । शुचित्वें जो ॥ ५८ ॥ ( ११५६. हर्षशोकयुक्त कर्ता, ६५९–६६१ ) आणि कर्मजात केलिया । फळ लाहे जरी धनंजया । तरी हरिखें जगा यया । वाकुलियां वाये ॥ ५९ ॥ अथवा जें आदरिलें । हीनफळें होय केलें । तरी शोकें तेणें जिंतिलें[16] । धिक्कारीं लागे ॥ ६६० ॥ कर्मीं राहाटी ऐसी । जयातें होती देखसी । तोचि जाण त्रिशुद्धीसी । राजस कर्ता ॥ ६१ ॥ अवतरणः–( ११५७. तामस कर्ता, ६६२–६६९, तामस कर्ता, ६६२ ) आतां यया पाठीं येरु । जो कुकर्माचा आगरु । तोही करूं गोचरु । तामस कर्ता ॥ ६२ ॥

अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।
विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥

अन्वयः—अयुक्तः, प्राकृतः, स्तब्धः, शठः, नैष्कृतिकः, अलसः, विषादी च दीर्घसूत्री कर्ता तामसः उच्यते ॥ २८ ॥

( ११५८. इंद्रियें न जिकणारा, ६६३-६६७ ) तरी मियां लागलिया कैसें । पुढील जळत असे । हें नेणिजे हुताशें । जियापरी ॥ ६३ ॥ पैं शस्त्रें मियां तिखटें । नेणिजे कैसेनि निवटे[17] । कां नेणिजे काळकूटें । आपलें केलें ॥ ॥ ६४ ॥ तैसा पुढीलया आपुलया । घातु करीत धनंजया । आदरी बोखटिया । क्रिया जो का ॥ ६५ ॥ तिया करितांही वेळीं । काय जालें हें न सांभाळी । चळला वायु वाहटुळीं । चेष्टे तैसा ॥ ६६ ॥ पैं करणिया आणि जया । मेळु नाहीं धनंजया । तो पाहूनि पिसेयां । केंची ओंय ॥ ६७ ॥ ( ११५९. मूर्खत्व, ६६८–६७० ) आणि इंद्रियांचें[20] बोगरिलें । चरोनि राखे जो जियालें । बैला तळीं लागलें । गोचिड जैसें ॥ ६८ ॥ हांसयीं रुदना वेळ । नेणता आदरी बाळ । राहटे उच्छृंखळ । तया परी ॥ ६९ ॥ जो प्रकृती आंतलेपणें । कृत्याकृत्यस्वादु नेणे । फुगे केरें घालेपणें । उकरडा जैसा ॥६७०॥ ( ११६०. उन्मत्तपणा, ६७१ )

१ संपादन केलेले. २ खर्च करणें. ३ दुसऱ्याच्या. ४ ध्यान धरून बसला. ५ अडकविते. ६ दांडगाई केली असता. ७ फाडते. ८ निरंतर चालणारे. ९ कंटाळा. १० धोतऱ्याच्या. ११ मूल.

आपला जीव ओंवाळून टाकतो. ५३ कृपण मनुष्य आपल्या ठेवीवर जसें नेहमी लक्ष ठेवतो, तसा हा दुसऱ्याचे पदार्थ मिळविण्याविषयीं दक्ष असतो, जसा बगळा मासा धरण्याविषयीं मोठा तत्पर असतो, ५४ आणि बोरीचें झाड जसें जवळ गेलें असतां वस्त्र अडकून गुंतवितें, दांडगाईनें कांढू लागल्यावर अंगास ओरखाडतें, व तिचीं फळें पाहूं गेलें असतां कोलितामाणें आंबट असतात; ५५ तसें काया--वाचा--मनेंकरून जो दुसऱ्यास दुःख देतो, व आपलें हित साधण्याकरितां दुसऱ्याचे हिताकडे लक्ष देत नाहीं, ५६ तसेंच स्वतः जें कर्म आरंभिलें, तें निरंतर चालण्याचा नेम नसतो, व त्या कर्माविषयीं ज्याचे मनाला कंटाळा येत नाहीं; ५७ धोत्र्याचे फळास जशी आंतून भूल व बाहेरून काटे असतात, तसा जो शुचित्वाविषयीं अंतर्बाह्य दरिद्री असतो; ५८ आणि अर्जुना, केलेल्या कर्माची फलप्राप्ति झाली असतां त्या आनंदाचे भरांत दुसऱ्यास वेडावून दाखवितो, ५९ अथवा आरंभिलेलें कार्य फलद्रूप न झालें म्हणजे शोकानें त्या कर्माचा धिक्कार करतो; ६६० अशा रीतीनें कर्माविषयी ज्याची वागणूक दृष्टीस पडेल; तो राजस कर्ता होय असें खचित खचित समज. ६१ आतां यानंतर, वाईट कर्माची खाणच असा जो तामस कर्ता, त्याचीं लक्षणें तुला कळतील अशीं सांगतों. ६२

श्लोकार्थः—अजितेंद्रिय, मूर्ख, उन्मत्त, कपटी, परोत्कर्ष सहन न करणारा, आळशी, दुर्मुख व चेंगट असा जो कर्ता, त्याला तामस म्हणतात ॥ २८ ॥

तर आपल्या स्पर्शामुळें समोर येणारे जिन्नस कसे जळतात हें जसें अग्नीस समजत नाहीं; ६३ अथवा आपल्या धारेनें दुसऱ्याचा जीव कसा जातो हें जसें शस्त्राला समजत नाहीं; किंवा आपल्या योगें दुसऱ्याचा नाश कसा होतो हे काळकूट विषाला समजत नाहीं; ६४ तसा, हे धनंजया, ज्या क्रियेनें आपला व दुसऱ्याचा नाश होईल अशा वाईट क्रिया करण्यास जो प्रवृत्त होतो; ६५ ज्याप्रमाणें वावटळ सुटल्यावर वायु हवा तसा वाहतो, त्याप्रमाणें तीं कर्में करतेवेळीं, यांत काय लाभ झाला याची जो काळजी बाळगीत नाहीं; ६६ हें बघ अर्जुना, ज्याच्या कृतीला व इच्छेला कांहीं मेळ नसतो, असल्या तामस कर्त्याला पाहून त्याचेपुढें वेडाची काय किंमत आहे! ६७ आणि बैलाचे कासेस जसे गोचीड अगदीं चिकटून राहतात, तसें इंद्रियांनीं दिलेले भोग भोगून जो आपले जीवित रक्षण करतो, ६८ ज्याप्रमाणें लहान मुलास हसण्यास व रडण्यास वेळ लागत नाहीं, त्याप्रमाणें ज्याच्या कृतींत कांहीं मेळ नसतो; ६९ प्रकृतीचे स्वाधीन असल्यामुळें, काय करावें व काय न करावें, याविषयीं ज्याला ज्ञान नसतें, व केरानें जसा उकिरडा फुगतो तसा जो कुकर्मानें फुगलेला असतो; ६७० म्हणून गर्वाच्या भरांत ईश्वरासही नम्र होत नाहीं, व ताठ्यानें डोंगरालाही तुच्छ करतो; ७१ आणि ज्याचें मन म्हणजे केवळ विषयांच्या लाटा होत; ज्याचें आचरण

१२ काटे. १३ दरिद्री. १४ वेडावणें. १५ निष्फल. १६ व्याकूळ होऊन. १७ मरण येतें. १८ वेडयाची. १९ किंमत. २० वाढलेलें (इंद्रियांनीं दिलेले भोग.) २१ हसणें. २२ स्वाधीन होऊन. २३ तृप्त होऊन.

म्हणौनि मान्याचेनि[१] नांवें । ईश्वराही परी न खालवे । स्तब्धपणें न मनवे डोंगरासी ॥ ७१ ॥ आणि मन जयाचे विषकल्लोळीं । राहौंटी फुडी चोरिली । दिठी कीर ते वोळी । पण्यांगनेची ॥ ७२ ॥ ( ११६१. कपट व लुच्चेपणा, ६७२-६७४ ) किंबहुना कपटाचें । देहचि वळिलें तयाचें । तें जिणें कीं जुवाराचें । टिटेंघर ॥ ७३ ॥ नोहे तयाचा प्रादुर्भावो । तो साभिलाष भिल्लांचा गांवो । म्हणोनि नये येवों जावों । तिया वाटा ॥ ७४ ॥ ( ११६२. उत्कर्ष सहन न होणारा, ६७५-६७९ ) आणि आणिकांचें निकें केलें । विरु होय जया आलें । जैसें अपेय पयां मिनलें । लवण करी ॥ ७५ ॥ कां हींव ऐसा पदार्थु । घातलिया आगीआंतु । तेंचि क्षणीं धडाडितु । अग्नि होय ॥ ७६ ॥ नाना सुद्रव्यें गोमटीं । जालिया शरीरीं पैठीं । होऊनि ठाती किरीटी । मळचि जेवीं ॥ ७७ ॥ तैसें पुढिलाचें बरवें । जयाच्या भीतरीं पावे । आणि विरुद्धाचि आघवें । होऊनि निगे ॥ ७८ ॥ जो गुण घे दे दोष । अमृताचें करी विष । दूध पाजिलिया देख । व्याळ जैसा ॥ ७९ ॥ ( ११६३. आळशी, ६८०--६८३ ) आणि ऐहिकीं जियावें । जेणें परत्रा साच यावें । तें उचित कृत्य पावे । अवसरीं जिये ॥६८०॥ तेव्हां जया आपैसी । निद्रा ये ठेविलीऐसी । दुर्व्यवहारीं जैसी । विटाळें लोटे ॥ ८१ ॥ पैं द्राक्षरसा आम्ररसा । वेळे तोंड सडे वायसा । कां डोळे फुटती दिवसा । डुडुळाचे ॥ ८२ ॥ तैसा कल्याणकाळु पाहे । तैं तयातें आळसु खाये । ना प्रमादीं तरी होये । तो म्हणे तैसें ॥ ८३ ॥ ( ११६४. दुर्मुखलेला, ६८४–६८५ ) जेवींचि सागराच्या पोटीं । जळे अखंड आगिठी । तैसा विषादु वाहे गांठीं । जिवाचिये जो ॥ ८४ ॥ लेंडोरीं आगीं धूमावधि । कां अपानीं आगीं दुर्गंधी । तैसा जो जीवितावधि । विषादें केला ॥ ८५ ॥ ( ११६५. चेंगटपणा, ६८६–६८९ ) आणि कल्पांताचिया पैंरा । वेगळेंही जो वीरा । सूत्र धरी व्यापारा । साभिलाषा ॥ ८६ ॥ अगा जगाहीपरौती । शुंचा वाहे पैं चित्तीं । करितां विषीं हातीं । तृणही न लगे ॥ ८७ ॥ ऐसा जो लोकाआंतु । पापपुंजु मूर्तु । देखसी तो अन्याहेतु । तामसु कर्ता ॥ ८८ ॥ एवं कर्म कर्ता ज्ञान । या तिहींचें त्रिधा चिन्ह- । दाविलें तुज सुजन । चक्रवर्ती ॥ ८९ ॥

बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं श्रृणु । प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥

अन्वयः—धनंजय, बुद्धेः च धृतेः एव गुणतः त्रिविधं भेदं अशेषेण पृथक्त्वेन प्रोच्यमानं श्रृणु ॥ २९ ॥

( ११६६. बुद्धि, धृति तीन प्रकारची, ६९०-६९५ ) आतां अविद्येच्या गांवीं ।

१ गर्वाच्या भरात. २ ताठ्यानें. ३ आचरण. ४ माहेरघर. ५ प्रसन्नता. ६ वैर. ७ दुधात. ८ विटाळशी स्त्रीप्रमाणें. ९ वाईट कर्मी. १० दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणें; असंतुष्टपणा.

नेहमीं चोरटें ( वरकांतीं दिसण्यांत चांगलें पण अंतर्यामीं दुसऱ्याचा घात करणारें ) आणि दृष्टि केवळ *वेश्यांच्या मालिकेप्रमाणें ( दिसण्यांत गोड पण दुसऱ्याचें सर्वस्व हरण करणारी )* होय. ७२ किंबहुना ज्याचा सर्व देह कपटाचाच बनलेला आहे, व ज्याचें आयुष्य जुगाराचें ( वाईट कृत्याचें ) माहेरघरच होय, ७३ त्याची प्रसन्नता म्हणजे केवळ अभिलापरूप भिल्लांचें गावच होय; म्हणून त्या वाटेनें कोणींही जाऊं नये. ७४ आणि दुसऱ्याचें चांगलें झालेलें पाहून ज्यास वैर उत्पन्न होतें; ज्याप्रमाणें दुधांत मीठ मिळालें असतां तें पिण्यास अयोग्य होतें; ७५ अथवा कितीही थंड पदार्थ जर अग्नींत घातला तर तो अग्नि उलट त्याच क्षणीं धडाडतो, ७६ किंवा, अर्जुना, कितीही उत्तम उत्तम पदार्थ असले तरी ज्याप्रमाणें ते पोटांत गेले म्हणजे त्यांचा मलच होतो, ७७ त्याप्रमाणें, दुसऱ्याचें चांगलें झालेलें यानें ऐकलें किंवा पाहिलें, तर तें याला सहन न होऊन तो उलट निंदा करूं लागतो; ( त्याला वाईट वाटतें; ) ७८ सर्पास दूध पाजलें तरी ज्याप्रमाणें त्याचें विषच होतें, त्याप्रमाणें, दुसऱ्याचे गुण ऐकल्याबरोबर जो त्यांस दुर्गुण मानतो, ७९ आणि इहलोकीं कीर्ति होऊन ज्याचे योगानें परलोकही मिळेल असें कृत्य ज्या वेळेस प्राप्त होईल, ६८० त्या वेळेस ज्याला हटकून झोंप ठेवल्याप्रमाणें येते; आणि वाईट कर्माच्या वेळेस तीच झोंप विटाळशीसारखी दूर राहते; ८१ हें पहा, द्राक्षांच्या किंवा आंब्यांच्या दिवसांत ज्याप्रमाणें कावळ्यास मुखरोग होतो, किंवा घुबडाचे डोळे ज्याप्रमाणें दिवसा फुटतात, ८२ त्याप्रमाणें पवित्रकाळ ( पर्वणी ) आला असतां त्याच्यावर आळस लोटतो, आणि अन्यायाचें कर्म करण्याचे वेळीं तोच आळस त्याचे हुकमांत वागतो, ८३ जसा समुद्राचे पोटांत अग्नि ( वडवानल ) अखंड जळत असतो, तसा याच्या अंतःकरणांत, दुसऱ्याचा उत्कर्ष सहन होत नाहीं असा विषाद असतो; ८४ लेंड्यांचे विस्तवांत जसा धूरच असतो, किंवा अपानद्वारानें निघणारा वायु जसा दुर्गंधयुक्तच असतो, *तशी जन्मभर विषादाची गांठ ज्याच्या जिवाशीं असते, ( विषाद* मनांत बाळगतो, ) ८५ आणि अर्जुना, जो कल्पांताच्याही पलीकडे लाभ होईल अशा कल्पनेनें व्यापाराला आरंभ करतो; ८६ अरे, जगातील लोक जे व्यापार करीत नाहींत, ते करण्याविषयीं मनांत इच्छा धरून कर्म करतो, परंतु ज्यापासून *तृणाचाही लाभ* त्यास होत नाहीं; ८७ असा जो लोकांमध्यें मूर्तिमंत पापाची राशीच होय, तो निःसंशय तामस कर्ता असें जाण. ८८ याप्रमाणें अर्जुना, तुला कर्म, कर्ता व ज्ञान या तिहींचीं त्रिविध लक्षणं सांगितलीं. ८९

श्लोकार्थः—हे धनंजया, गुणांच्या योगानें झालेले बुद्धीचे व धैर्याचे तीन प्रकारचे भेद तुला वेगळे वेगळे सांगतों, ते ऐक ॥ २९ ॥

---

११ लेंड्यांचे विस्तवांत. १२ गुदद्वारांतून निघणारा वारा. १३ पलीकडे. १४ आरंभ करणें. १५ इच्छा. १६ पापाची राशी. १७ निःसंशय. १८ भुवनांच्या चक्रवर्ती राजा;—भुवनश्रेष्ठ.

मोहाची वेढूनि मेदवी । संदेहाचीं आघवीं । लेऊनि लेणीं ॥६९०॥ आत्मनिश्चयाची वैरख । जया आरिसां पाहे सावयव । तिये बुद्धीचीही धांव । त्रिधा असे ॥ ९१ ॥ अगा सत्त्वादि गुणीं इहीं । काइ एक तिहीं ठायीं । न कीजेचि येथ पाहीं । जगामाजीं ॥ ९२ ॥ आगी न वसतां पोटीं । कवण काष्ठ असे सृष्टीं । तैसें तें कैंचें दृश्यकोटीं । त्रिविध जें नोहे ॥ ९३ ॥ म्हणौनि तिहीं गुणीं । बुद्धि केली त्रिगुणी । धृतीसीही वांटणी । तैसीचि असे ॥ ९४ ॥ तेंचि येक वेगळालें । यथाचिन्हीं अळंकारलें । सांगिजेल उपाइलें । भेदलेपणें ॥ ९५ ॥ अवतरणः—( ११६७. सात्त्विक बुद्धि, ६९६–७१७ ) परी बुद्धि धृति इयां । दोहीं भागांमाजि धनंजया । आधीं रूप बुद्धीचिया । भेदासि करूं ॥ ९६ ॥ तरी उत्तम मध्यम निकृष्टा । संसारासि गा सुभटा । प्राणिया येतिया वाटा । तिनी आथी ॥ ९७ ॥ जे अकरणीय काम्य निषिद्ध । ते हे मार्ग तिन्ही प्रसिद्ध । संसारभयसंबंध । जीवा ययां ॥ ९८ ॥

प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।
बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३० ॥

अन्वयः—पार्थ, या बुद्धिः प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये बंधं च मोक्षं वेत्ति, सा सात्त्विकी मता ॥ ३० ॥

म्हणोनि अधिकारें मानिलें । जें विधीचेनि बोधें आलें । तें एकचि येथ भलें । नित्य कर्म ॥ ९९ ॥ तेंचि आत्मप्राप्तिफळ । दिठी सूनि केवळ । कीजे जैसें कां जळ । सेविजे तांहनें ॥ ७०० ॥ येतुलेनि तें कर्म । सांडी जन्मभय विषमें । करूनि दे सुगम । मोक्षसिद्धि ॥ १ ॥ ऐसें करी तो भला । संसारभयें सांडिला । करणीयत्वें आला । मुमुक्षुभागा ॥ २ ॥ तेथ जे बुद्धि ऐसा । बाळिया बांधे भरंवसा । मोक्षु ठेविला ऐसा । जोडेल येथ ॥ ३ ॥ म्हणौनि निवृत्तीचीं मांडली । सूनि प्रवृत्तितळीं । इये कर्मीं बुडकुळी । द्यावी कीं ना ॥ ४ ॥ तृषार्तो उदकें जिणें । कां पुरीं पडलिया पव्हणें । अंधकूपीं गति किरणें । सूर्याचेनि ॥ ५ ॥ ना ना पथ्येंसीं औषध लाहे । तरी रोगें दाटलाही जिये । का मीना जिव्हाळा होये । जळाचा जरी ॥ ६ ॥ तरी तयाच्या जीविता । नाहीं जेवि अन्यथा । तैसें कर्मीं इये वर्ततां । जोडेचि मोक्षु ॥ ७ ॥ हें करणीयाचिया कडे । जें ज्ञान आथी चोखडें । आणि अकरणीय हें फुडें । ऐसें जाण ॥ ८ ॥ जीं तियें काम्यादिकें । संसारभयदायकें । अकृत्यपणाचें आंबुखें । पाडिलें जयां ॥ ९ ॥ तिये कर्मीं अकार्यी । जन्ममरणसमयीं । प्रवृत्ति पळवी पायीं । मागिलींचि ॥७१०॥

१ वस्त्र. २ चांगलेपणा. ३ दृष्टीस पडणाऱ्या वस्तूंत. ४ विस्तारानें. ५ विहित–निष्काम कर्म. ६ तहान लागलेला मनुष्य. ७ दुस्तर. ८ पाया घालून. ९ भोपळा. १० शिंतोडा.

आतां, अज्ञानरूपी गावांत मोहरूपी वस्त्र नेसून, संशयरूपी सर्व अलंकार घालून, ६९० आत्मनिश्चयाचा चांगलेपणा ज्या बुद्धिरूप आरशांत स्पष्ट दिसतो, त्या बुद्धीचेही तीन प्रकार आहेत. ९१ अर्जुना, अरे ! या सत्त्वरजस्तमोगुणांनीं जगांतील कोणत्या वस्तूचे तीन प्रकार केले नाहींत ? ९२ पोटांत अग्नि नाहीं असें या सृष्टींत कोणतें लांकूड आहे ? त्याप्रमाणें, जिचे तीन प्रकार नाहींत अशी दृश्य वस्तूंत कोणती वस्तु आहे ? ९३ म्हणून, या तीन गुणांनीं बुद्धीचे तीन प्रकार केले आहेत. तसेंच धृतीचेही तीन गुणांनीं तीन प्रकार झालेले आहेत. ९४ तेच निरनिराळे भेद त्यांच्या चिन्हांसहवर्तमान विस्तारपूर्वक सांगतों. ९५ परंतु, हे धनंजया, बुद्धि व धृति या दोन्हींपैकीं अगोदर बुद्धीच्या भेदाचीं लक्षणें सांगतों. ९६ तर हे सुभटा, मनुष्याला या संसारांत येण्यास उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे तीन मार्ग आहेत. ९७ ते तीन मार्ग म्हणजे अकरण, काम्य कर्म व निषिद्ध कर्म हे प्रसिद्ध आहेत; आणि प्राणिमात्राला यांच्यापासून संसार-भय प्राप्त होत असतें. ९८

श्लोकार्थः—हे पार्था, प्रवृत्ति ( कर्ममार्ग ) व निवृत्ति ( संन्यासमार्ग ), काय करावें व काय करूं नये, भय कशापासून व अभय कशापासून, आणि बंध कसा होतो व मोक्ष कसा होतो, हें जी बुद्धि जाणते, तिला सात्त्विक म्हणतात. ॥ ३० ॥

याकरितां, या लोकीं, अधिकारसंमत व विधींच्या ओघानें प्राप्त झालेलें जें कर्म, तें नित्यकर्मच एक उत्तम होय. ९९ तेंच नित्य कर्म आत्मप्राप्तिरूप फळावर दृष्टि ठेवून, तृषाक्रांत मनुष्य जसें अत्यंत आदरानें पाणी पितो, तसें करावें. ७०० अशा युक्तीनें नित्य कर्म केलें असतां तें दुस्तर अशा जन्मभयापासून सोडवितें आणि मोक्षप्राप्ति सुलभ करून देतें. १ अशा रीतीनें जो सुज्ञ पुरुष कर्म करितो, तो संसारभयापासून मुक्त होतो, व या आचरणानें मुमुक्षुत्वाच्या पायरीला येऊन पोंचतो. ( मोक्षमार्गास लागतो. ) २ या नित्यकर्मावर भरंवसा ठेवून जी बुद्धि त्याच्या आचरणाविषयीं निश्चय करिते, तेथें मोक्ष-प्राप्ति ठेवलेलीच आहे. ३ म्हणून, ज्याची निवृत्तीचे पायावर प्रवृत्तीची उभारणी आहे अशा या कर्मांत बुडी का न मारावी ! ४ तहान लागलेल्या मनुष्यास पाणी असल्यावर, पुरात बुडणाऱ्याजवळ भोपळा असतांना, अंधकारांत सूर्याच्या प्रकाशाचें साह्य असल्या-वर, ५ अथवा पथ्यासह औषध घेतलें असतां जसा रोगानें ग्रस्त झालेला मनुष्य वांचतो; किंवा माशाला जर पाण्याचा आश्रय असला, ६ तर त्याच्या जिवास जसें भय नाहीं, तसें या नित्यकर्माचें आचरण केलें असतां मोक्षप्राप्ति होतेच होते. ७ हें नित्यकर्म करण्या-कडे ज्या ज्ञानाची प्रवृत्ति असते, आणि हें बघ—खरोखर आचरण्यास योग्य नव्हत अशीं ८ जीं काम्यादिक कर्में—जीं संसारभय उत्पन्न करतात, व ज्यांच्यावर निषिद्धपणाचा शिंतोडा आहे, ९ त्या अनाचरणीय व जन्ममरणदायक अशा वाईट कर्मांपासून जो आपली प्रवृत्ति मागल्या पायींच पळवितो; ७१० अग्नींत जसा प्रवेश करवत नाहीं, खोल पाण्यांत

पैं आगीमाजि न रिघवे । अथांवीं र्न घलवे । धगधगीत नांगैवे । शूळ जेवीं ॥११॥ कां कालियानाग धुंधुवातु । देखोनि न घालवे हातु । न वचवे खोपैआंतु । व्याघ्राचिये ॥ १२ ॥ तेसें कर्म अकरणीय । देखोनि महाभय । उपजे निःसंदेह । बुद्धी जिये ॥ १३ ॥ वाढिलें रांधूनि विखें । तेथ जाणिजे मृत्यु न चुके । तेवीं निषेधीं कां देखे । बंधातें जे ॥ १४ ॥ मग बंधभयभरितीं । तियें निषिद्धीं प्रासीं । विनियोगु जाणे निवृत्ती । कर्माचिये ॥ १५ ॥ ऐसेनि कार्याकार्यविवेकीं । जे प्रवृत्तिनिवृत्ति मापकीं । खरा कुडा पारखी । जिया परी ॥ १६ ॥ तैसी कृत्याकृत्यशुद्धि । बुझे जे निरवधि । सात्त्विक म्हणिपे बुद्धि । तेचि तूं जाण ॥ १७ ॥

यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च।
अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥

अन्वयः—पार्थ, यया ( बुद्धया जीवः ) धर्मं च अधर्मं, कार्यं च अकार्यं अयथावत् एव प्रजानाति, सा बुद्धिः राजसी ( मता ) ॥ ३१ ॥

( ११६८. राजस बुद्धि, ७१८–७२३ ) आणि बकाच्यां गांवीं । घेपे क्षीरनीरें सकळेंवी । कां अहोरात्रींची गोंवी । आंधळें नेणे ॥ १८ ॥ जया फुलाचा मकरंदु फैंवे । तो काष्ठें कोरूं धावे । परि भ्रमरपणा नव्हे । अव्हांटा जेवीं ॥ १९ ॥ तैसीं इयें कार्याकार्यें । धर्माधर्मरूपें जियें । तियें न चोजैवितां जाये । जाणती जे का ॥७२०॥ अगा डोळांवीण मोतियें । घेतां पैडु मिळे विपायें । न मिळणें तें आहे । ठेविलें तेथें ॥ २१ ॥ तैसें अकरणीय अवचटें । नोडवे तरीच लोटे । येरवीं जाणें एकवटें । दोन्ही जे कां ॥ २२ ॥ ते गा बुद्धि चोखावियी । जाण येथ राजसी । अक्षत टाकिली जैसी । मांदियेवरी[२०] ॥ २३ ॥

अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसाऽऽवृता।
सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥

अन्वयः—पार्थ, या तमसा आवृता ( बुद्धिः ) अधर्मं धर्मं इति च सर्वार्थान् विपरीतान् मन्यते, सा बुद्धिः तामसी ( स्मृता ) ॥ ३२ ॥

( ११६९. तामस बुद्धि, ७२४-७३० ) आणि राजा जिया वाटा जाये । ते चोरांसि आडेंव होये । कां राक्षसां दिवो पाहे । राती होउनी ॥ २४ ॥ ना ना निधानाचि निदेवा । होये कोळसयाचा उँडवा । पैं असतें आपणपें जीवा । नाहीं झालें ॥ २५ ॥ तैसें धर्मजात तितुकें । जिये बुद्धीसी पातकें । साच तें लटिकें । ऐसेंचि बुझे ॥ २६ ॥ ते आघवेचि अर्थ । करूनि घाली अनर्थ । गुण ते ते व्यवस्थित ।

१ खोल पाण्यात. २ तापलेल्या. ३ घरवत नाहीं. ४ फुस्कारे टाकीत असलेल्या. ५ जाळांत. ६ व्यवस्था. ७ खोटा. ८ समजते. ९ स्पष्ट. १० बगळ्यांच्या. ११ दूध व पाणी. १२ एकत्र. १३ दिवस व रात्र याची भेसळ. १४ प्राप्त होतो. १५ निवड न करितां. १६ बुद्धि. १७ परीक्षे-

जशी उडी घालवत नाहीं, व तापून लाल झालेला सूळ जसा हातांत धरवत नाहीं, ११ अथवा काळा नाग फुसकारे टाकीत असलेला दिसत असला म्हणजे त्यास हात घालवत नाहीं, व ज्याप्रमाणें वाघाचे जाळींत कोणी जाऊं शकत नाहीं, १२ त्याप्रमाणें, निषिद्ध कर्म केलें असतां महाभय उत्पन्न होईल असा ज्या बुद्धीचा निश्चय होतो, १३ विष घालून तयार केलेलें अन्न खाल्लें असतां मरण चुकत नाहीं, तसें निषिद्ध कर्माचें आचरण केलें असतां जन्ममृत्यु चुकत नाहींत; १४ मग, निषिद्ध कर्माचें आचरण केलें असतां जन्ममृत्यूंचें भय प्राप्त होतें असें समजून जी बुद्धि त्याचा त्याग करिते, १५ रत्नपारखी जसा खऱ्याखोट्याचा निर्णय करतो, तसा कार्य व अकार्य यांविषयीं प्रवृत्तिनिवृत्तिरूप मापानें जी निर्णय करते; १६ तसेंच, ज्या बुद्धीला चांगलें व वाईट हें स्पष्ट समजतें, ती सात्त्विक बुद्धि होय, असें समज. १७

श्लोकार्थः—ज्या बुद्धीच्या योगें जीव हा धर्म व अधर्म आणि कर्तव्य व अकर्तव्य हें यथार्थ रीतीनें जाणत नाहीं, तिला राजस बुद्धि म्हणतात ॥ ३१ ॥

आणि बगळ्यांच्या गांवांत जसें दूध व पाणी एकत्रच घेतलें जातें; किंवा अंधळा ज्याप्रमाणें दिवस व रात्र यांच्यामधील भेद जाणत नाहीं; १८ ज्या भ्रमराला अतिशय कोमल अशा फुलांचा मकरंद सेवन करितां येतो, तोच लांकूडही कोरण्यास प्रवृत्त होतो, परंतु त्याचा भ्रमरपणा कांहीं नष्ट होत नाहीं; १९ त्याप्रमाणें, धर्माधर्मरूपानें असणारीं जीं कार्याकार्यें, त्यांची निवड न करितां जी बुद्धि त्यांचें आचरण करिते; ७२० अरे, परीक्षेशिवाय मोतीं घेतलीं असतां क्वचित् चांगलीं मिळतील; बाकी मिळणार नाहींत हें अगदीं ठरलेलें आहे; २१ तसें, निषिद्ध कर्म साहजिकपणें प्राप्त न झालें तरच राहतें; एरवीं जेथें चांगलें व वाईट हीं दोन्ही कर्में सरसकटच मानलीं जातात, २२ जसें सर्व समाजास योग्य व अयोग्य यांचा विचार न करितां आमंत्रण द्यावें, तसें चांगल्या व वाईट कर्माविषयीं जी अंधबुद्धि, ती राजस बुद्धि होय. २३

श्लोकार्थः—पार्था, तमोगुणानें व्यापलेली जी बुद्धि अधर्माला धर्म मानणारी व अर्थाचा अनर्थ करणारी, ती तामस बुद्धि असें म्हटलें आहे. ॥ ३२ ॥

आणि राजा ज्या मार्गांनीं जातो, ते चोरास जसे आडमार्ग होत; ( राजमार्ग जसे चोराच्या उपयोगी नाहींत ). किंवा राक्षसाला रात्रीं जसें उजाडतें, २४ अथवा धनाचा ठेवा असून भाग्यहीनाला जशी ती कोळशांचीच रास दिसते; म्हणून धन जवळ असतांना त्याला तें नाहींसारखें होतें; २५ तसें, शास्त्रांत सांगितलेल्या सर्व मार्गांचें आचरण करणें हें ज्या बुद्धीला घातक वाटतें, व खऱ्या गोष्टी खोट्या भासतात; २६ जी शास्त्राचा खरा अर्थ टाकून उलट अर्थ करिते, व जे गुण म्हणून आहेत त्या सर्वांस दोष मानते, २७ किंबहुना, श्रुतीस मान्य असलेल्या ज्या गोष्टी, त्याही सर्व ज्या बुद्धीला विपरीत भासतात;

शिवाय, १८ उत्तम. १९ प्राप्त न झालें, २० समाजास. २१ आडमार्ग. २२ रास.

दोषचि मानी ॥ २७ ॥ किंबहुना श्रुतिजातें । अधिष्ठूनि केलें सरतें । तेतुलेंहि उपरतें । जाणे जे बुद्धि ॥ २८ ॥ कोणातेंही न पुसतां । तामसी जाणावी पंडुसुता । रात्री काय धर्मार्था । साच करावी ॥ २९ ॥ एवं बुद्धीचे भेद । तिन्ही तुज विशद । सांगितले स्वबोधं- । कुमुदचंद्रा ॥ ७३० ॥ अवतरणः–(११७०. सात्त्विक धैर्य, ७३१-७४४ ) आतां ययाचि बुद्धिवृत्ती । निश्चाकेलीं कर्मजातीं । खांदु मांडिजे धृति । त्रिविधा तया ॥ ३१ ॥ तिये धृतीचेही विभाग । तिन्ही यथालिंगं । सांगिजती चांग । अवधान देई ॥ ३२ ॥

धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः ।
योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३ ॥

अन्वयः—पार्थ, ( नरः ) यया अव्यभिचारिण्या धृत्या मनःप्राणेंद्रियक्रियाः योगेन धारयते सा धृतिः सात्त्विकी ॥ ३३ ॥

तरी उदेलिया दिनकरु । चोरीसि थोके[१] अंधारु । कां राजाज्ञा अव्यवहारु । कुंठवी जेवीं ॥ ३३ ॥ ना ना पवनाचा सौटु । वाजैनिलिया नीटु । आंगेंसीं बोभाटु । सांडिती मेघ ॥ ३४ ॥ कां अगस्तीचेनि दर्शनें । सिंधु घेउनी ठोंती मौनें । चंद्रोदयीं कमळवनें । मिठी देती ॥ ३५ ॥ हें असो पावो उचलिला । मैंद-मुख न ठेविती खालां । गर्जोनि पुढां जाला । सिंहु जरी ॥ ३६ ॥ तैसा जो धीर । उठलिया अंतरें । मनादिकें व्यापार । सांडिती उर्मी ॥ ३७ ॥ इंद्रियां विषयांचिया गांठी । आपैसया सुटती किरीटी । मन मायेच्या पोटीं । रिगती दाही ॥ ३८ ॥ अधोर्ध्व गूढें कोंढी । प्राण नवाची पेंढी । बांधोनि घाली उडी । मध्यमेमाजीं ॥ ३९ ॥ संकल्पविकल्पांचें लुंगडें । सांडूनि मन उघडें । बुद्धिमागिले कडे । उगीचि बैसे ॥ ७४० ॥ ऐसी धैर्यराजें जेणें । मन प्राण करणें । स्वचेष्टांचीं संभाषणें । सांडवी-जती ॥ ४१ ॥ मग आघवींचि सैंडीं । ध्यानाच्या आंतुल्या मेंढीं । कोंडिजती निरंवैडी । योगाचिये ॥ ४२ ॥ परी परमात्मया चक्रवर्ती । उंगाणिती जंव हातीं । तंव लांचु न घेतां धृति । धरिजती जिया ॥ ४३ ॥ ते गा धृती येथें । सात्विक हें निरुतें । आईक अर्जुनातें । श्रीकांतु म्हणे ॥ ४४ ॥

यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन ।
प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥

अन्वयः—अर्जुन, ( नरः ) यया धृत्या धर्मकामार्थान् धारयते, ( च यया नरः ) प्रसंगेन फलाकांक्षी ( भवति ), सा धृतिः राजसी ॥ ३४ ॥

( ११७१. राजस धैर्य, ७४५–७४८ ) आणि होऊनियां शरीरी । स्वर्ग-संसाराच्या दोहीं घरीं । नांदे जो पोटभरी । त्रिवेर्गोपायें ॥ ४५ ॥ तो मनोरथांच्या सागरीं । धर्मार्थकामांच्या तारुवावरी । जेणें धैर्यबळें करी । क्रिया-वणिज ॥ ४६ ॥

---

१ स्थापून. २ मान्य. ३ विपरीत. ४ उचित. ५ स्पष्ट. ६ ज्ञानरूप कमळास प्रफुल्लित

२८ त्या बुद्धीला अर्जुना, कोणालाही न विचारतां बेलाशक तामसी म्हणावें. हें पहा, दानधर्माला रात्र उचित आहे काय ? २९ याप्रमाणें अर्जुना, तुला बुद्धीचे तीन भेद स्पष्ट करून सांगितले. ७३० आतां, याच बुद्धीचा कर्म करण्याविषयीं जेव्हां निश्चय होतो, तेव्हां तिला धृति अशी संज्ञा प्राप्त होते, व तिचेही तीन प्रकार आहेत. ३१ त्या धृतीच्याही तीन प्रकारांचीं लक्षणें तुला स्पष्टपणें सांगतों, तिकडे लक्ष दे. ३२

श्लोकार्थः—पार्था, ज्या एकनिष्ठ धैर्यानें मन, प्राण व इंद्रियें यांच्या क्रिया मनुष्य समाधि कायम ठेवून करतो, तें सात्त्विक धैर्य होय ॥ ३२ ॥

तर, सूर्योदय होतांच जसा चौर्यकर्मासह अंधकार नाहींसा होतो, किंवा राजाज्ञा झाली असतां कुव्यवहार बंद पडतो; ३३ किंवा वारा एकसारखा सपाट्यानें वाहूं लागला म्हणजे मेघ हे आपल्या गर्जनांसह नाहींतसे होतात; ३४ अथवा अगस्ति ऋषीच्या दर्शनानें समुद्राच्या गर्जना बंद पडतात, किंवा चंद्रोदय झाल्यावर सूर्यविकासी कमलें आपोआप मिटतात; ३५ फार काय सांगावें ? गर्जना करून सिंह पुढें आला तर मदोन्मत्त हत्तीला देखील उचललेला पाय खालीं ठेवण्याचें सुचत नाहीं; ३६ तसें, सात्त्विक धैर्य उत्पन्न झालें असतां मन, प्राण व इंद्रियें यांचे व्यापार जागचे जागीं बंद पडतात; ३७ अर्जुना, इंद्रियें व विषय यांचा स्नेह आपोआप सुटतो; आणि तीं घाबरून आपली आई जें मन त्याच्या पोटांत शिरतात. ३८ प्राणाचे जे नऊ प्रकारचे भेद आहेत, ते सर्व मोडून व एकत्र करून त्यांत सुषुम्ना नाडीच्या कोठडींत अडकवून टाकितें; ३९ मानाचें संकल्पविकल्परूपी वस्त्र फेडून मन उघडें करितें, आणि मग बुद्धि मनाच्या मागें स्वस्थ बसते; ७४० याप्रमाणें जो धैर्यराज मन, प्राण व इंद्रियें यांच्या स्वकीय चेष्टांचीं भाषणें बंद पाडितो; ४१ मग सर्वांचा झाडा घेऊन त्यास ध्यानाच्या आतल्या कोठडींत युक्तीनें कोंडून टाकतो, ४२ परंतु चक्रवर्ती जो परमात्मा, त्याच्या ताब्यांत त्यांस देहपर्यंत त्यांजपासून लांच न घेतां त्याना जो धैर्यराज सोडीत नाहीं; ४३ लक्ष्मीपति भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतातः—असें जे धैर्य, तें केवळ सात्त्विक धैर्य होय असें समज. ४४

श्लोकार्थः—हे अर्जुना, ज्या धैर्यानें धर्म, काम व अर्थ हे तीनच पुरुषार्थ मनुष्य करतो, व त्या त्या पुरुषार्थाच्या आचरणसमयीं फलाची इच्छा करतो, तें राजस धैर्य होय ॥ ३४ ॥

आणि शरीर हेंच माझें स्वरूप असें मानून जो स्वर्ग व संसार या दोहोंतच धर्म, अर्थ व काम या तीन उपायांनीं आनंदानें वास करतो, ४५ तो मनोरथसागरांत धर्मार्थकामरूपी नौकेवर ज्या धैर्यानें व्यापार करतो; ४६ जें कर्मरूपी भांडवल घातलें

करणाऱ्या चंद्रा—अर्जुना. ७ निश्चय झाला. ८ संज्ञा प्राप्त होते. ९ धैर्य. १० लक्षणें. ११ बंद पडते. १२ वेग. १३ जोरानें चालला असतां. १४ गर्जना. १५ राहतात. १६ मस्त हत्ती. १७ अंतर्यामीं. १८ सीमा सोडून. १९ सुषुम्ना. २० वस्त्र. २१ मोकळी झालेली; झाडा घेऊन २२ कोठडींत. २३ युक्तीनें. २४ ताब्यांत देहपर्यंत. २५ धर्म, अर्थ व काम या तीन उपायांनीं. २६ व्यापार,

जें कर्म भांडवला सुये । तयाची चौगुणी येती पाहे । येवढें साहस वाहे । जया धृती ॥ ४७ ॥ ते गा धृति राजस । पार्था येथ परियेस । अवतरणः—आतां आईक तामस । तिसरी जे कां ॥ ४८ ॥

यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।
न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥

अन्वयः—पार्थ, दुर्मेधा ( नरः ) यया ( धृत्या ) स्वप्नं, भयं, शोकं, विषादं एव च मदं न विमुंचति, सा धृतिः तामसी ( मता ) ॥ ३५ ॥

( ११७२. तामस धैर्य, ७४९–७६२, ७४९–७५३ ) तरि सर्वाधमें गुणें । जयाचें कां रूपा येणें । कोळसा काळेपणें । घडला जैसा ॥ ४९ ॥ अहो प्राकृत आणि हीनु । तयाही कीं गुणत्वाचा मानु । तरि न म्हणिजे पुण्यजंनु[१] । राक्षसु काई ॥ ७५० ॥ पैं ग्रहांमाजि इंगळु । तयातें म्हणिजे मंगळु । तैसा तमीं धसाळु[२] । गुणशब्दु हा ॥ ५१ ॥ जे सर्वदोषाचा वसौटा[३] । तमचि कामऊनि[४] सुभटा । उभारिला आंगवठा[५] । जंया नराचा ॥ ५२ ॥ तो आळसु सूनि असे कांखे । म्हणौनि निद्रे कहीं न-मुके । पापें पोशितां दुःखें । न सांडिजे जेविं ॥ ५३ ॥ ( ११७३. भय, ७५४ ) आणि देह धनाचिया आवडी । सदा भय तयातें न सांडी । विसंबूं न सके धोंडी । काठिण्य जैसें ॥ ५४ ॥ ( ११७४. शोक, ७५५ ) आणि पदार्थजातीं स्नेहो[६] । बांधे म्हणौनि तो शोकें ठावो । केला न शके पाप जावों । कृतघ्नौनि जैसें ॥ ५५ ॥ ( ११७५. खेद, ७५६–७५७ ) आणि असंतोष जीवेंसीं । धरूनि ठेला अहर्निशीं । म्हणौनि मैत्री तेणेंसी । विषादें केली ॥ ५६ ॥ लसणातें न सांडी गंधी । कां अपथ्यशीळातें व्याधि । तैसी केली मरणावधि । विषादें तया ॥ ५७ ॥ ( ११७६. मद, ७५८–७६२ ) आणि वयसा वित्त कामु । ययाचा वाढवी संभ्रमु । म्हणौनि मदें आश्रमु । तोचि केला ॥ ५८ ॥ आगीतें न सांडी तापु । सळांतें जातीचा सापु । कां जगाचा वैरी वॅसिपु । अखंडु जैसा ॥ ५९ ॥ नातरी शरीरातें काळु । न विसंघे कवणे वेळु । तैसा आथी अढळु । तामसीं मद ॥ ७६० ॥ एवं पांचही हे निद्रादिक । तामसाच्या ठाईं दोख । जिया धृती देख । धरिले आहाती ॥ ६१ ॥ तिये गा धृति नांवें । तामसी येथ हें जाणावें । म्हणितलें तेणें देवें । जगाचेनि ॥ ६२ ॥ ( ११७७. तीन श्लोकाचा भावार्थ, ७६३-७६६ ) एवं त्रिविध जे बुद्धि । कीजे कर्मनिश्चयो आधि । तो धृती या सिद्धि । नेइजो येथ ॥ ६३ ॥ सूर्ये मार्गु गोचरु होये । आणि तो चालती कीर पाये । परि चालणें तें आहे । धैर्यें जेविं ॥ ६४ ॥ तैसी बुद्धि कर्मातें दावी । ते

१ सत्पुरुष. २ ढसाळ, साधारण. ३ वसतिस्थान. ४ कमवून, सिद्ध करून. ५ मूर्ति. ६ प्रीति. ७ दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणें. ८ गर्व. ९ सळसळणें. १० भय.

असतां त्याचा चौपट फायदा येतो असें मानून ज्या धैर्यानें साहस कर्म करितो; ४७ या धैर्यास, अर्जुना, राजस धैर्य असें म्हणतात. आतां तिसऱ्या तामस धैर्याचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक. ४८

श्लोकार्थः--पार्था, ज्या धैर्यानें दुष्टबुद्धीचा मनुष्य झोंप, त्रास, शोक, खेद, विषय व मद याना सोडीत नाहीं, तें तामस धैर्य होय ॥ ३५ ॥

तर सर्व नीच गुणांनीं युक्त असून जें उत्पन्न होतें; जसा कोळसा हा काळेपणानें घडलेला असतो; ४९ अहो, प्राकृत ( जड ) आणि हीन असा असूनही त्याला गुण हें मोठें नाव देण्याचें प्रयोजन काय ? अशी शंका येईल. तर असें पहा कीं, राक्षसालाही पुण्यजन म्हणत नाहींत काय ? ७५० सर्व ग्रहांत जो इंगळ ( निखाऱ्याप्रमाणें ताप देणारा ), त्यालाही मंगळ ( शुभ ) म्हणत नाहींत काय ? तसा तमाला गुण हा ढसाळ ( साधारण ) शब्द आहे. ५१ हे सुभटा अर्जुना, सर्व दोषांचें वसतिस्थान जो तमोगुण तो कमवून ज्या नराची मूर्ति बनलेली आहे; ५२ ज्याप्रमाणें पापांचें पोषण केलें असतां दुःख सोडीत नाहीं. त्याप्रमाणें तो खाकेंत आळस बाळगून असतो, म्हणून निद्रा त्याला कधीं सोडीत नाहीं; ५३ आणि ज्याप्रमाणें दगडापासून कठीणपणा कधीं दूर होत नाहीं, त्याप्रमाणें देहरूप धनावर त्याची नेहमीं अत्यंत प्रीति असल्यामुळें त्याला भय सोडीत नाहीं; ५४ आणि कृतघ्न मनुष्याचें पाप जाण्याविषयीं कितीही खटपट केली असतां जसें तें जात नाहीं, तसें, पदार्थमात्राचे ठिकाणीं प्रीति ठेवल्यामुळें तो शोकाचें राहण्याचें ठिकाण होतो; ५५ आणि रात्रंदिवस असंतोष आपल्या जीवाशीं बांधून ठेविला असल्यामुळें विषादानें ज्याच्याशीं मैत्री केली आहे; ५६ लसुणाची घाण जशी त्याजपासून दूर होत नाहीं, किंवा कुपथ्य करणाऱ्या मनुष्याला व्याधि सोडीत नाहीं, त्याप्रमाणें, विषादानें याजबरोबर आजन्म मैत्री केलेली असते; ५७ आणखी तारुण्य, वित्त व काम याचा जो गर्व वाहतो, म्हणून त्याचे ठिकाणीं मदही वास करतो, ५८ अग्नीला जशी तप्तता सोडीत नाहीं; जातिवंत सापाचा सळसळपणा जसा सुटत नाहीं, अथवा भय हें जसें सर्व जगाचें वैरी असून त्याला सोडीत नाहीं; ५९ अथवा काळ हा शरीराला कधींही विसरत नाहीं, तसा तमोगुणाच्या ठिकाणीं मद अखंड असतो; ७६० याप्रमाणें निद्रा, भय, शोक, विषाद व मद हे पाच तमाचे दोष ज्या धैर्यानें धारण केले आहेत, ६१ त्या धैर्याला तामस धैर्य असें म्हणतात, असें जगन्नायक भगवान श्रीकृष्ण बोलले. ६२ याप्रमाणें, तीन प्रकारच्या बुद्धींनीं जो कर्माचा निश्चय केला, तो तें धैर्य शेवटास नेतें. ६३ सूर्य उगवल्यावर मार्ग दिसूं लागून त्यावरून मनुष्य पायांनीं चालतो, परंतु चालणारानें धैर्य धारण केल्याशिवाय चालणें होत नाहीं; ६४ त्याप्रमाणें, बुद्धि ही कर्माचा निश्चय करते, व त्याचीं साधनेंही उत्पन्न करते, परंतु तें कर्म शेवटास जाण्यास धैर्याची अनुकूलता लागते. ६५ तें धैर्य तुला तीन प्रकारांनीं सांगितलें आणि त्याच धैर्यामुळें तीन प्रकारचें कर्म उत्पन्न झालें. म्हणजे ६६ त्याला जें

करणसामग्री निफजवी । परि निफजावया होआवी । धीरता जे ॥ ६५ ॥ ते हे गा तुजप्रति । सांगीतली त्रिविध धृति । यया कर्मत्रया निष्पत्ति । जालिया मग ॥ ६६ ॥ अवतरण:—येथ फळ जें एक निफजे । सुख जयातें म्हणिजे । तेंही त्रिविध जाणिजे । कर्मवशें ॥ ६७ ॥ तरि फळरूप तें सुख । त्रिगुणीं भेदलें देख । विवंचू आतां चोख । चोखीं बोलीं ॥ ६८ ॥ ( ११७९. श्रवण करण्याची तऱ्हा, ७६९–७७० ) परि चोखी ते कैसी सांगे । पैं घेवों जातां बोलेंवगें । कानींचियेही लागे । हातींचा मळु ॥ ६९ ॥ म्हणौनि जयाचेनि थव्हेरें । अवधानही होय बाहिरें । तेणें आईक हो अंतरें । जीवाचेनि ॥ ७७० ॥ ( ११८०. सुखाचें वर्णन, ७७१–७७२ ) ऐसें म्हणौनि देवो । त्रिविध सुखाचा प्रस्तावो । मांडला तो निर्वाहो । निरूपित असें ॥ ७१ ॥

सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।
अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति ॥ ३६ ॥

अन्वयः—हे भरतर्षभ, इदानीं तु त्रिविधं सुखं मे शृणु; यत्र ( सुखे जीवः ) अभ्यासात् रमते च दुःखांतं निगच्छति ॥ ३६ ॥

म्हणे सुखत्रयसंज्ञा । सांगों म्हणौनि प्रतिज्ञा । बोलिलों तें प्राज्ञा । ऐक आतां ॥ ७२ ॥ ( ११८१. सुखाचें खरें स्वरूप, ७७३–७७६ ) तरि सुख तें गा किरीटी । दाविजेल तुज दिठी । जें आत्मयाचिये भेटी । जीवासि होय ॥ ७३ ॥ परी मात्रेचेनि मापें । दिव्यौषध जैसें घेपे । कां कथिलाचें कीजे रुपें । रसभेवनीं ॥ ७४ ॥ ना ना लवणाचें जळ । होआवया दोनी चार वेळ । देऊनि सांडिजती ढाळ । तोयाँचे जेवि ॥ ७५ ॥ तेवि जालेनि सुखलेशें । जीवु भाविलिया अभ्यासें । जीवपणाचें नासे । दुःख जेथें ॥ ७६ ॥ अवतरण:— ( ११८२. सात्विक सुख, ७७७–७९३ ) तें येथ आत्मसुख । जालें असे त्रिगुणात्मक । तेंही सांगों एकैक । रूप आतां ॥ ७७ ॥

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।
तत्सुखं सात्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥

अन्वयः—यत् अग्रे विषं इव, परिणामे अमृतोपमं आत्मबुद्धिप्रसादजं ( अस्ति ), तत् सुखं सात्विकं प्रोक्तम् ॥ ३७ ॥

आतां चंदनाचें बूड । सर्पीं जैसें दुवाड । कां निधानाचें तोंड । विवसियाँ जेवि ॥ ७८ ॥ अगा स्वर्गींचें गोमटें । आडेंव यागसंकटें । कां बाळपण दाँसटें । ग्रासेंकाळें ॥ ७९ ॥ हें असो दीपाचिये सिद्धी । अवघड धूम आधीं । नातरि तो औषधीं । जिभेचा ठावो ॥ ७८० ॥ तयापरी पांडवा । जया सुखाचा रिगावा । विषमें तेथ मेळावा । यमदमांचा ॥ ८१ ॥ देत सर्वस्नेहा मिठी । आंगीं ऐसें वैराग्य

फळ येतें, व ज्याला सुख अशी संज्ञा आहे, तेंही कर्माप्रमाणें तीन प्रकारचें आहे. ६७ तर फलरूप जें सुख, तें तीन गुणांनीं निरनिराळें केलेलें आहे. त्याचा आतां स्पष्ट भाषणांनीं विचार करूं. ६८ तें स्पष्ट कसें सांगेन म्हणशील, तर शब्दाच्या मार्गानें सांगण्यास गेलें असतां शब्दाचा मळ त्याला लागतो, व कर्णद्वारा श्रवण केलें असतां कर्णरूप हाताचा मळ त्याला लागतो; ६९ म्हणून शब्दाचा व अवधानाचा अव्हेर करून तें केवळ अंतःकरणानें श्रवण कर. ७७० असें बोलून देवांनीं त्रिविध सुखाचें वर्णन करण्याविषयीं प्रस्तावना केली, तीच व्यवस्था मी सागतों. ७१

श्लोकार्थः—आतां, हे भरतश्रेष्ठा, ज्या सुखाचे ठिकाणीं अभ्यासानें जीव रमतो, व त्याच्या दुःखाचा नाश होतो, तें सुखही तीन प्रकारचें आहे; तें मी सांगतों, ऐक ॥ ३६ ॥

भगवान् म्हणतातः—हे बुद्धिमंता अर्जुना, सुखाचीं तीन रूपें गुणांच्या योगानें आहेत म्हणून तुला जें म्हटलें होतें, तें सांगतों ऐक. ७२ हे किरीटी, जीवाला आत्म्याची भेट होते वेळेस जो आनंद होतो, त्याला सुख असें म्हणावें. तें सुख तुला समजेल असें सांगतों. ७३ जसें उत्तम औषध मात्रेच्या प्रमाणानें सेवन करावें, अथवा रसाची पुटें देऊन जसें कथलाचें रुपें करावें, ७४ किंवा मिठाचें पाणी करणें असल्यास ज्याप्रमाणें त्याजवर दोन चार वेळ पाणी घालावें लागतें, ७५ त्याप्रमाणें, सुखाचा यत्किंचित् लाभ झाला असतां तोच अभ्यास पुढें वाढवून जीवदशेचें दुःख जेथें नाहींसें होतें, ७६ तें आत्मसुखही गुणांच्या योगानें तीन प्रकारचें झालें आहे, त्या एकेकाचीं लक्षणें तुला सांगतों. ७७

श्लोकार्थः—जें आरंभीं विषासारखें कडू, परिणामीं अमृतासारखें गोड, आणि आत्मविषयक बुद्धीच्या प्रसादापासून उत्पन्न झालेलें असतें, तें सात्विक सुख होय ॥ ३७ ॥

आतां, चंदनाच्या बुडापासून वरपर्यंत जशीं सर्पाचीं वेष्टणें असतात, अथवा द्रव्याच्या ठेव्यावर जसा ब्रह्मराक्षसादिकांचा प्रतिबंध असतो; ७८ अरे, स्वर्गींचे उत्तम भोग मिळविण्यास प्रथम जसें यज्ञाचें महत्संकट आहे, किंवा बाळदशेमध्यें मुलांचा सर्वस्वीं त्रास सहन करावा लागतो; ७९ हें राहो; पण दिवा लावणें झाल्यास प्रथम विस्तव पेटविण्यास जसा धुराचा त्रास सोसावा लागतो, ७८० त्याप्रमाणें अर्जुना, आत्मसुखाची प्राप्ति करून घेण्याकरितां यमदमादिक साधनांचें दुःख सोसावें लागतें. ८१ देहादिकांवरील प्रीतीचा ग्रास करणारें असें अग्निप्रमाणें तीव्र वैराग्य जेव्हां उत्पन्न होईल, तेव्हां तें स्वर्ग व संसार यांचें कुंपण उपटून टाकतें. ८२ तीव्र अशा ज्ञानाचें श्रवण व कठोर व्रताचरण करतांना जेथें बुद्धि इत्यादिकांचे वाभाडे निघतात, ८३ सुषुम्ना नाडीच्या तोंडानें प्राण व अपान या वायूंचा रोध करावा लागतो. याप्रमाणें सुरवातीस जेथें महत्कष्ट आहेत; ८४ चक्रवाक पक्ष्यांच्या

१ साधन. २ शब्दाच्या मार्गानें. ३ व्यवस्था. ४ बुद्धिमंता. ५ रसाचीं पुटें देऊन. ६ पूर. ७ पाण्याचे. ८ भेदभावाचें. ९ भयंकर. १० ब्रह्मराक्षसादि. ११ कठीण मार्ग. १२ पीडाकारक. १३ विपरीत.

उठी । स्वर्गसंसारा कांटी । काढिताचि ॥८२॥ विवेकश्रवणें खरेंपुसें । जेथ व्रताचरणें कर्कशें । करितां जाती भोकसे । बुद्ध्यादिकांचे ॥८३॥ सुषुम्नेचेनि तोंडें । गिळिजे प्राणापानाचे लोंढे । बोहँणिएसीचि येवढें । भारी जेथ ॥ ८४ ॥ जें सारसांहीं विघडतां । होय वोहाँहूनि वत्स काढितां । ना भणँगु दवडितां । भाणयावरूनी ॥ ८५ ॥ पैं मायेपुढौनि बाळक । काळें नेतां एकुलतें एक । होय कां उदक । तुटतां मीना ॥ ८६ ॥ तैसें विषयांचें घर । इंद्रियां सांडितां थोर । युगांतु होय तें वीर । विरांग साहाती ॥ ८७ ॥ ऐसा जया सुखाचा आरंभु । दावी काठिण्याचा क्षोभु । मग क्षीराब्धीं लाभु । अमृताचा जैसा ॥ ८८ ॥ पहिलया वैराग्यगरेंळा । धैर्यशंभु वोडेवी गळा । तरि ज्ञानामृतें सोहळा । पाहे जेथें ॥ ८९ ॥ पैं कोलिताही कोपे ऐसें । द्राक्षांचें हिरवेपण असे । तें परिपाकीं कां जैसें । माधुर्य आते ॥ ७९० ॥ तेंचि वैराग्यादिक तैसें । पिकलिया आत्मप्रकाशें । मग वैराग्येंसीही नाशे । अविद्याजातें ॥ ९१ ॥ तेव्हां सागरीं गंगा जैसी । आत्मीं मीनलया बुद्धि तैसी । अद्वयानंदाची आपैसी । खाणी उघडे ॥ ९२ ॥ ऐसें स्वानुभवविश्रामें । वैराग्यमूळ जें परिणमे । तें सात्त्विक येणें नामें । बोलिजे सुख ॥ ९३ ॥

विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।
परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥

अन्वयः—यत् विषयेंद्रियसंयोगात् अग्रे अमृतोपमं (च) परिणामे विषं इव (अस्ति, तत्) सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥

(११८३. राजस सुख, ७९४–८०५) आणि विषयेंद्रियां । मेळु होतां धनंजया । जें सुख जाय थडिया । सांडूनि दोन्ही ॥ ९४ ॥ आधिकारिया रिगतां गांवो । होय जैसा उत्साहो । कां रिणावरी विवाहो । विस्तारिला ॥ ९५ ॥ ना ना रोगिया जिभेपासीं । केळें गोड साखरेसीं । कां वचनागाची जैसी । मधुरता पाहिली ॥ ९६ ॥ पहिलें संवचोराचें मैत्र । हाटभेटीचें कलत्र । कां लाघवियांचे विचित्र । विनोदें ते ॥ ९७ ॥ तैसें विषयेंद्रियंदोखीं । जें सुख जीवातें पोखी । मग उपाडिलें खडकीं । हंसु जैसा ॥ ९८ ॥ तैसी जोडी आघवी आटे । जीविताचा ठाय फिटे । सुकृताचियाही सुटे । धनाची गांठी ॥ ९९ ॥ आणिक भोगिलें जें कांहीं । तें स्वप्न तैसें होय नाहीं । मग हानीच्याचि घाई । लोळावें उरे ॥ ८०० ॥ ऐसें आपत्ती जें सुख । ऐहिकीं परिणमे देख । परलीं कीर विख । होऊनि परते ॥ १ ॥

---

१ कुंपण. २ तीव्र. ३ कठोर. ४ सुरवातीस. ५ चक्रवाक पक्ष्यांच्या जोडीचा वियोग करितांना. ६ गाईच्या कासेपासून. ७ क्षुधित; भिकारी. ८ पानावरून. ९ विरक्त. १० विष. ११ पुढें करी. १२ अज्ञान, दुःख. १३ बाजारांतील. १४ नटाचे. १५ आविर्भाव. १६ विषय व इंद्रियें यांच्यासंबंधानें. १७ उडी घातली असतां. १८ घायात.

जोड्याची ताटातूट केली असतां, अथवा गाईला पान्हा फुटल्यावर कासेपासून वासरास माघारी ओढलें असतां, किंवा क्षुधितास, पानावरून उठवून लाविलें असतां, ८५ अथवा आईपुढून एकुलतें एक लेंकरूं काळानें ओढून नेलें असतां, किंवा माशास पाण्यांतून काढलें असतां जसें दुःख होतें, ८६ तसें विषयांचें घर सोडते वेळेस इंद्रियांना युगान्त ओढवल्याप्रमाणें दुःख होतें; परंतु वैराग्यसंपन्न शूर तेंही दुःख सहन करतात. ८७ असा ज्या सुखाचा आरंभ कष्टमय आहे, तो जो सहन करील, त्याला, जसा क्षीराब्धीचें मंथन करिते वेळेस ज्यांनीं दुःख सहन केलें त्यांना अमृताचा लाभ झाला, तसा परम सुखाचा लाभ होतो. ८८ प्रथम, वैराग्यरूप गरळ ज्यांत निवेल तें प्राशन करण्यास सात्विकधैर्यरूपी शंभु जेव्हां आ करील, तेव्हां परिणामीं ज्ञानरूप अमृताचा सोहळा भोगावयास सांपडतो. ८९ हें पहा कीं, द्राक्षांचा आंबटपणा कच्चेपणीं कोलितासही मागें सारतो, परंतु तींच पिकल्यावर मधुर लागतात; ७९० तसें वैराग्य आत्मप्रकाशानें पूर्णतेस आल्यावर मग तेथें वैराग्यादिक सर्व दुःखाचा नाश होतो. ९१ समुद्रास गंगा मिळाल्यावर जशी सुखरूप होते, तशी बुद्धि आत्म्याचे ठिकाणीं मिळाली असता तिला अद्वयानंदरूपी सुखाची खाण उघडते. ९२ याप्रमाणें ज्या सुखास वैराग्य हें मूळ असून आत्मानंदप्राप्ति हा ज्याचा परिणाम होय, त्या सुखाला सात्विक सुख असें म्हणतात. ९३

श्लोकार्थः—जें विषय आणि इंद्रियें याच्या संयोगानें आरंभीं अमृतासारखें गोड आणि परिणामीं विषासारखें कडू असतें, तें राजस सुख होय ॥ ३८ ॥

आणि अर्जुना, विषय व इंद्रियें याचा संबंध झाला म्हणजे दुथडी भरून जो सुखाचा पूर येतो; ९४ अधिकारी आपल्या अधिकाराच्या गांवीं गेला असतां जसा उत्सव होतो; किंवा ऋण काढून लग्नाचा जसा समारंभ करावा; ९५ अथवा रोग्याला साखर व केळीं हीं कुपथ्यें असूनही जशीं गोड लागतात; किंवा बचनाग खाते वेळेस जसा गोड लागतो; ९६ संवचोराची मैत्री जशी प्रथम गोड असते, किंवा बाजारांतील स्त्रियांचें (वेश्यादिकांचें ) आचरण प्रथम सुखकर वाटतें; किंवा नटाचे आविर्भाव जसे आल्हादकारक वाटतात, ९७ तसें, विषय व इंद्रियें यांच्या संबंधानें जीवाला जें सुख होतें, तें परिणामीं दुःखदायक असतें. खडकावर सांचलेल्या पाण्यांत शुक्रादि चांदण्यांचें प्रतिबिंब पडलेलें पाहून, तीं रत्नें आहेत अशा भ्रमानें हंसानें त्यावर उडी घातली असतां रत्नप्राप्ति न होतां जसा तो प्राणास मुकतो, ९८ तशी, ज्यायोगें सुकृतानें मिळविलेल्या सुखाची जोड नाहींशी होते व जीवाचाही नाश होतो; आणि विषयसुख मिळण्याकरितां संपादिलेल्या सर्व पुण्यरूपी धनाचाही नाश होतो; ९९ आणि भोगलेले जे विषय तेही स्वप्नाप्रमाणें नाहींतसे होतात; मग दुःखाच्या राशींत लोळणें, हेंच त्याच्या वांट्यास राहतें; ८०० इहलोकीं प्राप्त झालेलें जें सुख, त्याचा हा अशा प्रकारचा परिणाम होतो; आणि तें परलोकींही खरोखर विषरूपानेंच फलप्रद होतें. १ जें इंद्रियाचे लाड पुरविण्याकरितां धर्मरूपी मळा

जे इंद्रियजाता ळळा । दिधलिया धर्माचा मळा । जाळूनि भोगिजे सोहळा । विषयांचा जेथ ॥२॥ तेथ पातकें बांधिती थावो । तियें नरकीं देती ठावो । जेणें सुखें हा अपावो । परत्रीं ऐसा ॥ ३ ॥ पैं नामें विष महुरें । परी मारूनि अंतीं खरें । तैसें आदि जें गोडिरें । अंतीं कडू ॥ ४ ॥ पार्था तें सुख साचें । वळिलें आहे रजाचें । म्हणौनि न शिवें तयाचें । आंग कहीं ॥ ५ ॥

यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः ।
निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

अन्वयः—यत् अग्रे अनुबंधे आत्मनः मोहनं च निद्रालस्यप्रमादोत्थं, तत् सुखं तामसं उदाहृतम् ॥ ३९ ॥

( ११८४. तामस सुख, ८०६--८१० ) आणि अपेयाचेनि पानें । अखाद्याचेनि भोजनें । स्वैरस्त्रीसंनिधानें । होय जें सुख ॥ ६ ॥ का पुढिलांचेनि मारें । नातरी परस्वापहारें । जें सुख अवतरे । भाटाच्या बोलीं ॥ ७ ॥ जें आलस्यावरी पोखिजे । निद्रेमाजीं जें देखिजे । जयाच्या आद्यंतीं भुलिजे । आपुली वाट ॥ ८ ॥ तें गा सुख पार्था । तामस जाण सर्वथा । हें बहु न सांगोंचि जे कथा । असंभाव्य हे ॥ ९ ॥ ऐसें कर्मभेदें मुदलें । फळसुखही तिधा जालें । तें हें यथागमें केलें । गोचर तुज ॥ ८१० ॥ ( ११८५. सर्व ब्रह्मांड त्रिगुणानें बनलें आहे, ८११-८१७ ) अवतरण:—ते कर्ता कर्म कर्मफळ । ये त्रिपुटी येकी केवळ । वांचूनि कांहींचि नसे स्थूळ । सूक्ष्मीं इये ॥ ११ ॥ आणि हे तंव त्रिपुटी । तिहीं गुणीं इहीं किरीटी । गुंफिली असे पटीं । तांतुवीं जैसी ॥ १२ ॥

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात् त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥

अन्वयः—यत् सत्त्वं एभिः प्रकृतिजैः त्रिभिः गुणैः मुक्तं स्यात्, तत् पृथिव्यां वा दिवि वा पुनः देवेषु न अस्ति ॥ ४० ॥

म्हणौनि प्रकृतीच्या अवलोकीं । न बंधिजे इहीं सत्त्वादिकीं । तैसी स्वर्गीं ना मृत्युलोकीं । आथी वस्तु ॥ १३ ॥ कैंचा लोंवेवीण कांबळा । मातियेवीण मोदला । का जळेंविण कल्लोळा । होणें आहे ॥ १४ ॥ तैसें न होनि गुणाचें । सृष्टीचा रचल रचे । ऐसें नाहींच गा साचें । प्राणिजात ॥ १५ ॥ यालागीं हें सकळ । तिहीं गुणांचेंचि केवळ । घडलें आहे निखिळ । ऐसें जाण ॥ १६ ॥ गुणीं देवां त्रयी लाविली । गुणीं लोकीं त्रिपुटी पाडिली । चतुर्वर्णा घातलीं । सिनानीं उंळिगें ॥ १७ ॥

ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप । कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥

अन्वयः—(हे) परंतप, ब्राह्मणक्षत्रियविशां च शूद्राणां कर्माणि स्वभावप्रभवैः गुणैः प्रविभक्तानि (सन्ति) ॥ ४१ ॥

त्यांचे स्वाधीन करतात, ते धर्म जाळून इंद्रियांकडून विषयांचा सोहळा भोगवितात. २ मग पातकांस थारा मिळून तीं बलवान होतात, व नरकप्राप्ति करून देतात. ज्या इहलोकच्या सुखानें परलोकीं हा असा घात होतो; ३ हें पहा, जसें विष हें शब्दानें मात्र मधुर, परंतु परिणामीं प्राणनाश करणारें आहे, तसें इहलोकींचें सुख आरंभीं गोड असून परिणामीं कडू आहे. ४ पार्था, हें सुख केवळ रजोगुणाचेंच बनलेलें ( राजस ) आहें, म्हणून त्याला तूं कधींही स्पर्श करूं नको. ५

श्लोकार्थः—जें आरंभीं व शेवटींही चित्ताला मोह उत्पन्न करणारें, आणि निद्रा, आळस व प्रमाद यांपासून उत्पन्न झालेलें, तें तामस सुख होय ॥ ३९ ॥

आणि अपेयपानानें, अभक्ष्यभक्षणानें व स्वैरिणी स्त्रीच्या संयोगानें उत्पन्न होणारें जें सुख; ६ किंवा दुसऱ्याचा घात करून अथवा दुसऱ्याचें सर्वस्व हरण करून किंवा भाटाच्या स्तुतिपाठानें जें सुख होतें; ७ जें आळसानें किंवा निद्रेनें वाढतें, आणि ज्या सुखाच्या आरंभीं व शेवटीं आपल्या कल्याणाची शुध्दि नसते, ८ तें सुख, अर्जुना, तामस असें जाण. ही कथा मी विस्तारानें सांगत बसत नाहीं. कारण ती असंभाव्य आहे. ९ अशा प्रकारें मूळ कर्माच्या भेदानें फलरूप सुख हें तीन प्रकारचें झालें आहे, तें तुला यथाशास्त्र सांगितलें. ८१० सर्व जगतांत लहान व मोठ्या वस्तु ज्या आहेत, त्यांत एकही वस्तु कर्ता, कर्म व फल या त्रिपुटीशिवाय सांपडणार नाहीं. ११ आणि अर्जुना, पट जसा तंतूंनीं तयार केला आहे, तशी ही त्रिपुटी पाहूं गेलें असतां तीन गुणांनीं भरलेली आहे. १२

श्लोकार्थः—कोणतीही स्थावरजंगम वस्तु या प्रकृतिपासून उत्पन्न झालेल्या तीन गुणांपासून अलिप्त आहे, अशी पृथ्वीवर, मनुष्यादिकांत व स्वर्गी देवादिकांतही दृष्टीस पडत नाहीं ॥ ४० ॥

म्हणून तूं हें लक्षांत ठेव कीं, प्रकृतीच्या गुणांनीं बध्द न झालेली अशी कोणतीही वस्तु या लोकीं अथवा स्वर्गलोकीं नाहीं; १३ लोंकरीवांचून कांबळा व मातीवांचून गोळा कसा होणार ? अथवा पाण्यावांचून लाटा कशा होतील ? १४ त्याप्रमाणें, जीवमात्र गुणांच्या रचनेवांचून या सृष्टींत मोकळे नाहींत. १५ यास्तव हे सर्व जगांतील पदार्थ तीन गुणांनींच केवळ रचलेले आहेत असें समज. १६ या तीन गुणांची शक्ति इतकी अचाट आहे कीं, त्यांनीं एका देवाचे तीन देव केले; आणि लोकांचे तीन लोक ( स्वर्ग, मृत्यु व पाताळ) गुणांनींच केले आहेत; आणि चार वर्ण व त्यांचीं कर्मे निरनिराळीं केलीं आहेत. १७

श्लोकार्थः—हे परंतपा, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांचीं कर्मे प्रकृतिजन्य गुणांनीं निरनिराळीं केलेलीं आहेत ॥ ४१ ॥

ते चार वर्ण कोणते असें जर पुसशील, तर ज्यांत अग्रभागीं ब्राह्मण आहेत; १८ दुसरे क्षत्रिय व वैश्य हे दोन वर्ण वैदिक कर्म करण्याचे अधिकारी असल्यामुळें ब्राह्मणा-

१ मळावतात. २ घात. ३ दुसऱ्याचें सर्व हरण करून. ४ यथाशास्त्र. ५ तंतूंनीं. ६ लोंकरीवांचून. ७ मातीचा गोळा. ८ ब्रह्मा, विष्णु व महेश. ९ स्वर्ग, मृत्यु व पाताळ. १० कर्मे.

( ११८६. चार वर्ण, ८१८-८२३ ) तेचि चारी वर्ण । पुससी जरी कोण कोण । तरी जयां मुख्य ब्राह्मण । धुरेचे कां ॥ १८ ॥ येर क्षत्रिय वैश्य दोन्ही । तेही ब्राह्मणाच्याचि मानिजे मार्नी । जे ते वैदिकैंविधानीं । योग्य म्हणौनि ॥ १९ ॥ चौथा शूद्र जो धनंजया । वेदीं लागु कीर नाहीं तया । तन्ही वृत्ति वर्णत्रया । अधीन तयाची ॥ ८२० ॥ तिये वृत्तिचिया जवळिका । वर्ण ब्राह्मणादिकां । अहो शूद्रही कीं देखा । चौथा जाला ॥ २१ ॥ जैसा फुलाचेनि सांगातें । तांतु तुरंविजे श्रीमंतें । तैसें द्विजसंगें शूद्रातें । स्वीकारी श्रुति ॥ २२ ॥ ऐसैसी गा पार्था । हे चतुर्वर्ण्यव्यवस्था । करूं आतां कर्मपथा । यांचिया रूप ॥ २३ ॥ ( ११८७. चार वर्णांचें कर्म भिन्न, ८२४-८३२ ) जिहीं गुणीं ते वर्ण चारी । जन्ममृत्यूचिये कातरी । चुकोनियां ईश्वरीं । पैठे होती ॥ २४ ॥ जियें आत्मप्रकृतीचे इहीं । गुणीं सत्त्वादिकीं तिहीं । कर्मे चौघां चहूं ठायीं । वाटिलीं वर्णा ॥ २५ ॥ जैसें बापें जोडिलें लेंका । वांटिले सूर्ये मार्ग पांथिकां । ना ना व्यापार सेवकां । स्वामीनें जैसे ॥ २६ ॥ तैसी प्रकृतीच्या गुणीं । जया कर्मांची वेल्हावणी । केली आहे वर्णीं । चहूं इहीं ॥ २७ ॥ तेथ सत्त्वें आपल्या आंगीं । समीन-निमीन भागीं । दोघे केले नियोगीं । ब्राह्मण क्षात्रिय ॥ २८ ॥ आणि रज परी सात्त्विक । तेथ ठेविले वैश्य लोक । रजचि तमभेसक । तेथ शूद्र ते गा ॥ २९ ॥ ऐसा येकाचि प्राणिवृंदा । भेद चतुर्वर्णधा । गुणींचि इहीं प्रबुद्धा । केला जाण ॥ ८३० ॥ अवतरण:–मग आपलें ठेविलें जैसें । आइतेंचि दीपें दिसे । गुणभिन्न कर्म तैसें । शास्त्र दावी ॥ ३१ ॥ ( ११८८. ब्राह्मण कर्म, ८३२-८५४ ) ( ११८९. शम, ८३२-८३४ ) तेंचि आतां कोण कोण । वर्णविहिताचें लक्षण । हें सांगों ऐक श्रवण- । सौभाग्यनिधि ॥ ३२ ॥

शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥

अन्वयः—शमः, दमः, तपः, शौचं, क्षान्तिः आर्जवं, ज्ञानं, विज्ञानं एव च आस्तिक्यं (इति) स्वभावजं ब्रह्मकर्म (अस्ति) ॥ ४२ ॥

तरी सर्वेंद्रियांचिया वृत्ति । घेऊनि आपुल्या हातीं । बुद्धि आत्मया मिळे येकांतीं । प्रिया जैसी ॥ ३३ ॥ ऐसा बुद्धीचा उपेरमु । तया नाम म्हणिपे शमु । तो गुण गा उपक्रमु । जया कर्माचा ॥ ३४ ॥ ( ११८९. दम, ८३५-८३६ ) आणि बाह्येंद्रियांचें घेंडें । पिटूनि विधीचेनि दंडें । नेदिजे अधर्माकडे । कहींचि जावों ॥ ३५ ॥ तो पैं गा शमा विरजा । दमु गुण जेथ दुजा । आणि स्वधर्माचिया वोजा । जिणें जें कां ॥ ३६ ॥ ( ११९०. तप, ८३७-८३८ ) सेवींचि सटवीचिये रातीं । न विसंविजे जेवि वाती । तैसा ईश्वरनिर्णयो चित्तीं ।

तच घेतले आहेत. १९ हे धनंजया, चौथा जो शूद्रवर्ण, त्याला वेदाचा अधिकार नाहीं; तर त्याची सेवावृत्ति तीन वर्णांच्या अधीन आहे. ८२० त्या ब्राह्मणादि तीन वर्णांच्या सेवावृत्तीच्या सान्निध्यानें शूद्रालाही चौथ्या वर्णांत गणिलें. २१ जसा फुलांच्या संगतीनें आंतील दोऱ्याचाही श्रीमंत लोक वास घेतात, तसें श्रुतींनीं ब्राह्मणांच्या संगतीनें शूद्रांचा वर्णांत समावेश केला. २२ पार्था, आतां अशा चार प्रकारांनीं या चार वर्णांची व्यवस्था झालेली आहे. तर त्या त्या वर्णांचीं कर्में कोणतीं, ते भेद तुला सांगतों. २३ ज्या गुणांनीं ते चारी वर्ण जन्ममृत्यूंचें संकट चुकवून ईश्वराप्रत प्राप्त होतात, २४ आत्म्याची जी प्रकृति, तिच्या सत्त्वादि गुणांनीं चार वर्णांना चार ठिकाणीं कर्में वांटून दिलीं आहेत. २५ ज्याप्रमाणें बापानें मिळविलेली संपत्ति मुलांना वांटून देतात, किंवा सूर्य वाटसरूंस त्यांचे त्यांचे मार्ग दाखवून देतो, अथवा स्वामी सेवकांस भिन्नभिन्न व्यवहार सांगतो, २६ त्याप्रमाणें, प्रकृतीचे जे गुण, त्यांनीं कर्मांचा विस्तार करून त्यांची चार वर्णांचे ठिकाणीं वांटणी केली. २७ त्या ठिकाणीं सत्त्वगुणानें आपल्या समविषम भागानें ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन वर्ण उत्पन्न केले; २८ आणि रजोगुण व सत्त्वगुण यांच्या मिश्रणानें वैश्य वर्ण उत्पन्न झाला; व रज आणि तम यांच्या मिश्रणानें शूद्र वर्ण उत्पन्न झाला. २९ अशा प्रकारें, हे प्रबुध्दा, एकरूपचं अशा प्राणिमात्राचा गुणांनी चार प्रकारचा भेद केला आहे, असें समज. ९३० मग, आपली ठेवलेली वस्तु जशी दिव्याच्या उजेडानें सहज दिसते, तसें गुणांनीं वेगळें झालेलें कर्म शास्त्रांत स्पष्ट सांगितलें आहे. ३१ हे भाग्यवंता, कोणत्या वर्णाला कोणतें विहित कर्म, तेंच तुला आतां सांगतों ऐक. ३२

श्लोकार्थः—शम म्हणजे चित्ताचें नियमन, दम म्हणजे बाह्येंद्रियांचें नियमन, कायिक, वाचिक व मानसिक तप, शुचिर्भूतपणा, क्षमा, सरळपणा, शास्त्रज्ञान, अनुभवज्ञान आणि श्रुतिस्मृतींविषयीं श्रद्धा हें ब्राह्मणांचें स्वभावसिद्ध कर्म होय ॥ ४२ ॥

तर प्रिया ज्याप्रमाणें आपले पतीशीं एकांतीं ऐक्य पावते, त्याप्रमाणें सर्व इंद्रियांच्या वृत्ति आपल्या हातांत घेऊन जी बुद्धि आत्मस्वरूपीं मिळते; ३३ असा जो बुद्धीचा लीनपणा, त्याला 'शम' असें म्हणतात. तो सर्व गुणांमध्यें प्रथम असून, त्याजपासून सर्व कर्मांचा आरंभ होतो ३४ आणि जो बाह्य इंद्रियांना विधीचा दंड करून अधर्माच्या मार्गाला कधींही जाऊं देत नाहीं, ३५ तो शमाला साह्यकर्ता असा दुसरा 'दम' गुण होय. तो इंद्रियांना स्वधर्मानें चालवितो. ३६ जसे षष्ठीपूजनाचे रात्रीं दिव्याला विसंबत नाहींत, तसें सर्वकाळ चित्तात ईश्वरस्वरूपाचा विचार करणें, ३७ त्याला 'तप' असें म्हणतात; आणि हा ब्राह्मण कर्माचा तिसरा गुण आहे. आणखी शौच म्हणजे पवित्रपणा, हा निष्पाप असून दोन

१ अग्रभागीं. २ वैदिक कर्म करण्याचे अधिकारी. ३ सेवावृत्ति. ४ दोऱ्याचा वास घेतात. ५ प्राप्त. ६ विस्तार. ७ समविषम. ८ उत्पन्न. ९ तमाच्या मिश्रणानें. १० लीनपणा. ११ चित्ताचें नियमन. १२ आरंभ. १३ स्वारी. १४ साह्य. १५ बाह्येंद्रियांचें नियमन. १६ मार्गानें. ८ षष्ठीपूजनाचे रात्रीं.

वाहणें सदा ॥ ३७ ॥ तया नाम तप । हें तिजया गुणाचें रूप । आणि शौचेंही निष्पाप । द्विविध जेथ ॥ ३८ ॥ ( ११९१. शुचिर्भूतपणा, ८३९–८४० ) मन भावशुद्धी भरलें । आंग क्रिया अळंकारिलें । ऐसें सबाह्य जियालें । साजिरें जें कां ॥ ३९ ॥ तया नाम शौच पार्था । तो कर्मीं गुण जये चौथा । आणि पृथ्वीचिया परी सर्वथा । सर्व जें साहाणें ॥ ८४० ॥ ( ११९२. शांति, ८४१ ) ते गा क्षमा पांडवा । गुण जेथ पांचवा । स्वरांमाजीं सुहावा । पंचमु जैसा ॥ ४१ ॥ ( ११९३. आर्जव–सरळपणा, ८४२–८४३ ) आणि वांकडेनि वोघेंसी । गंगा वाहे उजूचि जैसी । कां ऊंटीं वळला उसीं । गोडी जैसी ॥ ४२ ॥ तैसा विषमांहि जीवां- । लागीं उजुकारु बरवा । तें आर्जव गा साहावा । जेथींचा गुण ॥४३॥ ( ११९४. ज्ञान–शास्त्रज्ञान, ८४४-८४६ ) आणि पाणियें प्रयत्नें माळी । अखंड जचे झाडामुळीं । परी तें आघवेंचि फळीं । जाणें जेवीं ॥ ४४ ॥ तैसें शास्त्राचारें तेणें । ईश्वरुच येक पावणें । हें फुडें जें कां जाणणें । तें येथ ज्ञान ॥४५॥ तें गा कर्मीं जिये । सातवा गुण होये । आणि विज्ञान हें पाहें । एवंरूप ॥ ४६ ॥ ( ११९५. विज्ञान–अनुभवज्ञान, ८४७-८४८ ) तरी सत्त्वशुद्धीचिये वेळे । शास्त्रें कां ध्यानबळें । ईश्वरतत्त्वींचि मिळे । निष्टंक बुद्धी ॥ ४७ ॥ हें विज्ञान बरवें । गुणरत्न जेथ आठवें । आणि आस्तिक्य जाणावें । नववा गुण ॥४८॥ ( ११९६. श्रद्धा, ८४९–८५० ) पैं राजमुद्रा आथिलिया । प्रजा भजे भलतया । तेविं शास्त्रें स्वीकारिलिया । मार्गमात्रातें ॥ ४९ ॥ आदरें जें कां मानणें । तें आस्तिक्य मी म्हणें । तो नववा गुण जेणें । कर्म तें साच ॥ ८५० ॥ ( ११९७. ब्राह्मणाचें स्वभावसिद्ध कर्म; काव्य, ८५१–८५४ ) एवं नवही शमादिक । गुण जेथ निर्दोख । तें कर्म जाण स्वाभाविक । ब्राह्मणाचें ॥ ५१ ॥ तो नवगुणरत्नाकरु । यया नवरत्नाचा हारु । न फेडीत ले दिनकरु । प्रकाशु जैसा ॥ ५२ ॥ ना ना चांपा चांपोळीं पूजिला । चंद्र चंद्रिकां धवळलें । का चंदनु निजें चर्चिला । सौरभ्यें जेविं ॥ ५३ ॥ तेविं नवगुण टिकलेंगें । लेणें ब्राह्मणाचें अव्यंग । कहींचि न संडी आग । ब्राह्मणाचें ॥ ५४ ॥ अवतरणः—( ११९८. क्षत्रियकर्म, ८५५–८७८, शौर्य, ८५५–८५७ ) आतां उचित तें क्षत्रिया । तेंही कर्म धनंजया । सांगों ऐक प्रज्ञेचिया । भेरीवरीं ॥ ५५ ॥

शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रकर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥

अन्वयः—शौर्यं, तेजः, धृतिः, दाक्ष्यं च युद्धे अपि अपलायनं, दानं च ईश्वरभावः ( इति ) स्वभावजं क्षत्रकर्म ( अस्ति ) ॥ ४३ ॥

१ पवित्रपणा. २ मधुर. ३ पेरीं वाकडीं असलीं तरी. ४ त्रास देणारे जीव. ५ सरळपणा.

प्रकारचा आहे. ३८ मन हें शुद्ध भावानें भरलेलें असून सर्व शरीर सत्कर्मानें सुशोभित आहे, असा अंतर्बाह्य शुचिपणा भरलेला आहे, ३९ त्याला पार्था, 'शौच' असें म्हणतात; व तो ब्रह्मकर्मापैकीं चौथा गुण होय. आणि पृथ्वीप्रमाणें नेहमीं सर्व दुःखें सहन करणें, ८४० त्याला अर्जुना, 'क्षमा' असें म्हणतात, व ब्राह्मणकर्मापैकीं हा पांचवा गुण होय. हा म्हणजे, सप्तस्वरांत पंचमस्वर जसा अति मधुर आहे तसा होय. ४१ आणि गंगेचा ओघ जरी वाकडा असला, तरी ती ज्याप्रमाणें सरळच आहे, किंवा उंसाचीं पेरीं जरी वांकडीं असलीं, तरी त्यांची गोडी ज्याप्रमाणें सारखीच असते, ४२ त्याप्रमाणें, आपल्यास त्रास देणाऱ्या जीवांवरही अत्यंत प्रीति असणें यास 'आर्जव' असें म्हणतात, व ब्राह्मणकर्मापैकीं हा सहावा गुण होय. ४३ आणि माळी कष्ट करून पाणी झाडांचे मुळांस लावतो, त्याचे श्रम जसे फळें आल्यावर सार्थकीं लागतात, ४४ तसें शास्त्रोक्त आचरणानें ईश्वरप्राप्तिच व्हावयाची हें ज्यानें समजतें, तें 'ज्ञान' होय. ४५ तें ज्ञान ब्रह्मकर्मापैकीं सातवा गुण होय. आणि त्याचप्रमाणें विज्ञानाचें लक्षण असें आहे; ४६ तर शास्त्रविचारानें व ध्यानाच्या अभ्यासानें ईश्वरस्वरूपीं जी बुद्धि सत्त्वशुद्धीच्या वेळीं निश्चयानें मिळते, ४७ तिला 'विज्ञान' असें म्हणतात; व तें ब्रह्मकर्मापैकीं आठवें गुणरत्न होय. आणि 'आस्तिक्य' हा नववा गुण असें समज. ४८ हें पहा, राजमुद्रांकित मनुष्य कोणीहि असला तरी त्याची सर्व लोक सेवा करतात, त्याप्रमाणें, शास्त्रानें जे मार्ग स्वीकारले आहेत, ४९ ते मार्ग आदरानें मानून त्याप्रमाणें आचरण करणें, याला 'आस्तिक्य' असें मी म्हणतों. तो ब्राह्मणकर्मापैकीं नववा गुण होय, व याच गुणानें ब्राह्मणकर्म सर्व खरें होतें. ८५० याप्रमाणें शमादिक नऊ गुण जेथें निर्दोष दृष्टीस पडतात, तें ब्राह्मणाचें स्वाभाविक कर्म आहे असें समज. ५१ ब्राह्मणवर्ण केवळ नवगुणरूपी रत्नांचा रत्नाकर (समुद्रच), अथवा नऊ रत्नांचा हारच होय. सूर्य जसा प्रकाश न टाकतां प्रकाशानें युक्त असतो, ५२ अथवा चांफ्याचा वृक्ष त्याच्याच फुलांनीं जसा सुशोभित दिसतो, अथवा चंद्र आपल्या प्रभेनेंच जसा प्रकाशित असतो, किंवा चंदन आपल्याच परिमळानें जसा चर्चित असतो, ५३ तसें नवगुणरूपी दागिने हे ब्राह्मणाचें अभ्यंग लेणें आहे; व हे ब्राह्मणांचें अंग सोडून कधींच राहत नाहींत. ५४ आतां हे धनंजया, क्षत्रियांना उचित जें कर्म, तें बुद्धीच्या हुपारीनें ऐक. ५५

श्लोकार्थः—पराक्रम, तेज (दृढव्रत), धैर्य, दक्षता, युद्धापासून परत न फिरणें, दातृत्व आणि लोकांवर सत्ता चालविणें हें क्षत्रियाचें स्वभावसिद्ध कर्म होय. ॥ ४३ ॥

तर सूर्य हा प्रकाश पाडण्याकरितां दुसऱ्याच्या साह्याची अपेक्षा करीत नाहीं, किंवा

६ सिद्धांतबुध्दीनें; निश्चयानें. ७ अनुभवज्ञान. ८ श्रुतिस्मृतीविषयीं श्रध्दा. ९ न टाकतां. १० स्वीकार करतो. ११ चांफ्याच्या फुलांनीं. १२ चांदण्यानें. १३ प्रकाशित असतो. १४ दागिने. १५ हुपारीनें; सामुग्रीनें.

तरी भानु हा तेजें । नापेक्षी जेवीं विरजें[1] । कां सिंहें न पाहिजे । जावळिया ॥ ५६ ॥ ऐसा स्वयंभ जो जीवें लाट्टु । सावाँयेंवीण उद्दट्ट । तें शौर्य गा जेथ श्रेष्ठ । पहिला गुण ॥५७॥ ( ११९९. तेज, ८५८–८६० ) आणि सूर्याचेनि प्रतापें । कोडीही[6] नक्षत्र हारपे । ना तो तरी न लोपे । सचंद्रीं तिहीं ॥ ५८ ॥ तेसैनि आपुले प्रौढीगुणें । जगा या विस्मयो देणें । आपण तरी न शोभणें । कायसेनही ॥ ५९ ॥ तें प्रागल्भ्यरूप तेजा । जिये कर्मीं गुण दुजा । आणि धीरु तो तिजा । जेथींचा गुण ॥ ८६० ॥ (१२००. धैर्य, ८६१) वरिपडलिया आकाश । बुद्धीचे डोळे मानस । झांकी ना तें परियेस । धैर्य जेथें ॥६१॥ ( १२०१. दक्षता, ८६२–८६४ ) आणि पाणी हो कां भलतेतुकें । परी तें जिणौनि पद्म फांके । कां आकाश उंचिया जिंके । आवडे तयातें ॥ ६२ ॥ तेविं विविधा अवस्था । पातलिया जिणौनि पार्था । प्रज्ञाफळ तया अर्था । वेंझे देणें जें ॥ ६३ ॥ तें दक्षत्व गा चोख । जेथ चौथा गुण देख । आणि झुंज अलौकिक । तो पांचवा गुण ॥ ६४ ॥ ( १२०२. युद्धापासून परत न फिरणें, ८६५–८६७ ) आदित्याचीं झाडें । सदा सन्मुख सूर्याकडे । तेविं समोर शत्रूपुढें । होणें जें कां ॥ ६५ ॥ माहेवंणी प्रयत्नेंसी । चुकविजे सेजे जैसी । रिपू पाठीं नेदिजे तैसी । समरंगणीं ॥ ६६ ॥ हा क्षत्रियाचेया आचारीं । पांचवा गुणेंद्रु अवधारीं । चहुं पुरुषार्थां शिरीं । भक्ति जैसी ॥ ६७ ॥ ( १२०३. दातृत्व, ८६८–८७० ) आणि जालेनि फुलें फळें । शाखिया जैसी मोकळें । कां उदार परिमळें । पद्माकरु ॥ ६८ ॥ ना ना आवडीचेनि मापें । चांदिणें भलतेणें घेपे । पुढिलांचेनि संकल्पें । तैसें जें देणें ॥ ६९ ॥ तें उमैपें गा दान । जेथ सहावें गुणरत्न । आणि आज्ञे एकायतैन । होणें जें कां ॥ ८७० ॥ ( १२०४. ईश्वरभाव–प्रजेवर सत्ता, ८७१–८७४ ) पोपूनि अवयव आपुले । करविजती मानविले । तेविं पालणें लोभविलें । जग जें भोगणें ॥ ७१ ॥ तया नाम ईश्वरभावो । जो सर्वसामर्थ्याचा ठावो । तो गुणांमाजीं रावो । सातवा जेथ ॥ ७२ ॥ ऐसें जें शौर्यादिकीं । इहीं सात गुणविशेखीं । अळंकृत सप्तर्षेखीं । आकाश जैसें ॥ ७३ ॥ तैसें सप्तगुणीं विचित्र । कर्म जें जगीं पवित्र । तें सहज जाण क्षात्र । क्षत्रियाचें ॥ ७४ ॥ ( १२०५. क्षत्रियाचीं स्वभावसिद्ध कर्मे; काव्य, ८७५–८७८ ) ना ना क्षत्रिय नव्हे नरु । तो सत्त्वसोनयाचा मेरु । म्हणौनि गुणस्वर्गा आधारु । सातां इयां ॥ ७५ ॥ नातरी सप्तगुणार्णवीं । परिवारली बरवी । हे क्रिया नव्हे पृथ्वी । भोगीतसे तो ॥ ७६ ॥ कां गुणांचे सातांही ओघीं । हे

१ साह्य. २ सोबती. ३ बळवान. ४ साह्यावांचून. ५ शूर. ६ कोट्यावधि. ७ घाबरणें. ८ प्रशंसनीय. ९ जिंकणें. १० गरोदर. ११ देई. १२ अमर्याद. १३ राहण्याचें स्थान. १४ सात चांदण्यांनीं.

सिंह आपल्या पराक्रमाला सोबत्याचे मदतीची गरज बाळगीत नाहीं; ५६ असा साह्यते-वांचून जो स्वयंभू बळवान व शूर, तो क्षात्र प्रकृतीचा पहिला गुण 'शौर्य' होय. ५७ आणि सूर्याच्या प्रकाशानें कोट्यावधि नक्षत्रें नाहींतशीं होऊन जातात, परंतु चंद्रासह-वर्तमान सर्व नक्षत्रें सूर्याचा लोप करण्याविषयीं समर्थ होत नाहींत; ५८ तसें, आपल्या योग्य गुणानें सर्व जगाला आश्चर्य करण्यास लावतात, व कसलाही प्रसंग आला तरी आपण घाबरत नाहींत. ५९ असा जो प्रशंसनीय गुण 'तेज' ( इभ्रत ), तो त्या क्षात्रप्रकृतीचा दुसरा गुण होय; व 'धीर' हा त्याच प्रकृतीचा तिसरा गुण होय. ८६० आकाशही कोसळून पडलें तरी ज्याचें मन व बुद्धि कचरत नाहीं, त्याचें नांव 'धैर्य' होय. ६१ आणि पाणी कितीही खोल असलें तरी कमल हें पाण्याला खालीं टाकून वर येतें, किंवा आकाश हें उंचीविषयीं सर्व पदार्थांस जिंकतें, ६२ तशी नानाप्रकारचे प्रसंग प्राप्त झाले, तरी पार्था, फलरूप जो अर्थ त्याला बुद्धि जिंकते; ६३ याप्रमाणें सावधगिरी ठेवणें, याला 'दक्षता' म्हणतात; व तो क्षात्र प्रकृतीचा चौथा गुण होय. आणि 'अलौकिक युद्धपराक्रम' हा त्याच प्रकृतीचा पांचवा गुण होय. ६४ सूर्यकमळें जशीं नेहमीं सूर्याला सन्मुख असतात, तसें शत्रूच्या समोर नेहमीं असणें; ६५ गरोदर स्त्री पतिसमागमास जशी प्रयत्नेंकरून चुकविते, तसें शत्रूला रणांगणांत पाठ दाखविण्याचें तो चुकवितो; ६६ तसा क्षात्रप्रकृतीच्या गुणां-मध्यें हा पांचवा गुण इंद्राप्रमाणें श्रेष्ठ आहे असें समज. जसा चार पुरुषार्थांत 'भक्ति' हा पुरुषार्थ श्रेष्ठ आहे. ६७ आणि वृक्ष आपलीं पानें, फुलें व फळें हीं जशीं याचकास अर्पण करण्यास तयार असतो, अथवा परिमळाविषयीं कमल जसें उदार असतें; ६८ अथवा, ज्याला जितकी आवड असेल तितकें त्यानें चांदण्याचें सुख घ्यावें, तसें याचकास त्याचे इच्छेप्रमाणें देणें, ६९ याला 'अमर्याद दान' असें म्हणतात तें क्षात्र प्रकृतीचें सहावें गुणरत्न होय. आणि आज्ञेचें राहण्याचें एक स्थान क्षत्रिय होय; ८७० आपल्या हस्त-पादादिक अवयवांचें चांगलें पोषण केलें असतां त्यांजकडून वाटेल तें काम करून घेतां येतें, त्याप्रमाणें प्रजेचें प्रेमानें पालन केलें असतां सर्व प्रजा आनंदानें आज्ञा पालन करतात. ७१ प्रजेला उत्तम रीतीनें वागविणें यालाच 'ईश्वरभाव' असें म्हणतात, व त्याचे ठिकाणीं सर्व सामर्थ्य वास करितें. तो या क्षात्र प्रकृतीच्या सर्व गुणाचा राजा असा सातवा गुण होय. ७२ अशा शौर्य आदिकरून सात गुणांनीं जो पुरुष विशेष अलंकृत आहे, तो, सप्तर्षींच्या सात चांदण्यानीं आकाश शोभतें त्याप्रमाणें शोभतो. ७३ अशा प्रकारें, या सात पवित्र गुणांनीं या जगांत जें कर्म पवित्र झालेलें असतें, तें क्षात्र प्रकृतीचें स्वाभाविक कर्म आहे. ७४ अथवा, असा जो पुरुष, तो क्षत्रिय नसून सत्त्वरूप सोन्याचा मेरुच होय, म्हणून तो सप्तगुणरूपी स्वर्गाला धारण करितो. ७५ किंवा सप्तगुणरूपी समुद्रांनीं वेष्टित केलेली ही क्षात्रप्रकृतिरूप पृथ्वी होय. ७६ अथवा सप्तगुणरूपी ओघांनीं क्षात्रक्रिया-रूपी गंगा ही क्षात्र प्रकृति धारण करणाऱ्या ह्या महोदधीला मिळून शोभते. ७७ या सर्व

क्रिया-ते गंगा जगीं। तया महोदधीचिया आंगीं। विलसे जैसी ॥ ७७ ॥ परी हें बहु असो देख। शौर्यादि गुणात्मक। कर्म गा नैसर्गिकें। क्षात्रजातीसी ॥ ७८ ॥ अवतरणः—( १२०६. वैश्यकर्म, ८७९–८८२ ) आतां वैश्याचियें जाती। उचित जे महामति। ते ऐकें निरुती। क्रिया सांगों ॥ ७९ ॥

कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्।
परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥

अन्वयः—कृषिगौरक्ष्यवाणिज्यं स्वभावजं वैश्यकर्म ( अस्ति ); शूद्रस्य अपि परिचर्यात्मकं कर्म स्वभावजं ( अस्ति ) ॥ ४४ ॥

तरी भूमि बीज नांगरु। यया भांडवलाचा आधारु। घेऊनि लाभु अपारु। मेळवणें जें ॥ ८८० ॥ किंबहुना कृषि[3] जिणें। गोधनें राखोनि वर्तणें। कां सँमर्घाची विकणें। मैहार्घ वस्तु ॥ ८१ ॥ येतुलाचि पांडवा। वैश्यातें कर्माचा मेळावा। हा वैश्यजातिस्वभावा। आंतुला जाण ॥ ८२ ॥ ( १२०७. शूद्रकर्म, ८८३-८८४ ) आणि वैश्य क्षत्रिय ब्राह्मण। हे द्विजन्में तिन्ही वर्ण। ययांचें जें शुश्रूषण। तें शूद्र कर्म ॥ ८३ ॥ पैं द्विजसेवेपरौतें। धांवणें नाहीं शूद्रातें। एवं चतुर्वर्णाचितें। दाविलीं कर्में ॥ ८४ ॥

स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः।
स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु ॥ ४५ ॥

अन्वयः—स्वे स्वे कर्मणि अभिरतः नरः संसिद्धिं लभते, स्वकर्मनिरतः (नरः) यथा सिद्धिः विन्दति, तत् शृणु ॥ ४५ ॥

( १२०८. स्वभावतः कर्में वाट्यास आलीं, ८८५–८८७ ) आतां इयेचि विचक्षणा। वेगळालिया वर्णा। उचित जैसें करणां। शब्दादिक ॥ ८५ ॥ नातरि जळदच्युता। पाणिया उचित सरितां। सरितेसी पांडुसुता। सिंधु उचितु ॥ ८६ ॥ तैसें वर्णाश्रमवशें। जें करणीय आलें असे। गोरेया आंगा जैसें। गोरेपण ॥ ८७ ॥ ( १२०९. स्वकर्माचे ठिकाणीं रति, ८८८–८९१ ) तया स्वभावविहिता कर्मा। शास्त्राचेनि मुखें वीरोत्तमा। प्रवर्तावयालागीं प्रमा। अढळ कीजे ॥ ८८ ॥ पैं आपुलेंचि रत्न थितें[2]। घेपे पारखियाचेनि हातें। तैसें स्वकर्म आंपैतें। शास्त्रें करावें ॥ ८९ ॥ जैसी दिठी असे आपुलिया ठाईं। परी दीपेंवीण भोग नाहीं। मार्गु न लाहतां काई। पाय असतां होय ॥ ८९० ॥ म्हणोनि जातिवशें साचोरु। सहज असे जो अधिकारु। तो आपुलालिया शास्त्रें गोचरु। आपण कीजे ॥ ९१ ॥ ( १२१०. ज्ञाननिष्ठेची योग्यता, ८९२–९०५ ) मग घरींचाचि ठेवा। जेवीं डोळयां दावी दिवा। तरी घेतां काय पांडवा। आडळे असे ॥ ९२ ॥ तैसें स्वभावें भागा आलें। वरी शास्त्रें खरें केलें। तें विहित जो

गोष्टी राहूं दे. क्षात्र प्रकृतीचीं शौर्यादिगुणात्मक कर्में हीं स्वाभाविक आहेत. ७८ आतां, हे महामते, वैश्य जातीला जें योग्य कर्म आहे, तें तुला सागतों, ऐक. ७९

श्लोकार्थ;—कृषि म्हणजे शेती, गौरक्ष्य म्हणजे गुरें बाळगणें, आणि वाणिज्य म्हणजे क्रयविक्रय करणें, हें वैश्याचें स्वभावसिद्ध कर्म होय. आणि शूद्राचेंही परिचर्या म्हणजे सेवा करणें हें स्वभावसिद्ध कर्म होय. ॥ ४४ ॥

तर शेत, बीज, नांगर इत्यादि साहित्य मिळवून त्यांच्या योगें पुष्कळ नफा मिळविणें, ८८० किम्बहुना कृषिकर्म करून अथवा गाईचें संरक्षण करून, किंवा सवंग वस्तु घेऊन महाग दरानें विकून, ८१ अर्जुना, वैश्य जातीनें ह्या तीन प्रकारें कर्म करून निर्वाह करणें हाच त्यांचा स्वाभाविक धर्म होय. ८२ आणि वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण या तिन्ही वर्णांस द्विज हें नांव आहे, व याची सेवा करणें हाच शूद्रवर्णाचा स्वाभाविक धर्म आहे. ८३ परंतु द्विजाच्या सेवेवांचून शूद्रांना दुसरें कर्मच नाहीं. या प्रकारेंकरून चारी वर्णांचीं कर्में तुला सांगितलीं. ८४

श्लोकार्थः—आपापल्या कर्मांच्या ठायीं जो तत्पर असतो, त्याला ज्ञाननिष्ठेला पात्र होण्याची योग्यता येते. आपल्या कर्माचे ठिकाणीं तत्पर असणाराला ती योग्यता कशी येते तें ऐक ॥ ४५ ॥

आता, या चार वर्णांचीं निरनिराळीं उचित कर्में तुला स्पष्ट करून सांगतों. ज्याप्रमाणें कर्णादि इंद्रियांना शब्दादिक विषयच उचित होत; ८५ अथवा मेघांपासून पडलेल्या उदकास योग्य स्थान नदीच होय; आणि अर्जुना, नदीस उचित स्थान समुद्र, ८६ तसें वर्णाश्रमधर्माप्रमाणें जें आवश्यक कर्म, तें केलें असतां, गौर अंगास जसें तें गोरेपण शोभा देतें, तशी त्या वर्णाला अत्यंत शोभा येते. ८७ हे वीरोत्तमा, त्या स्वभावजन्य कर्माचें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें आचरण करण्याविषयीं आपली बुद्धि निश्चित करावी. ८८ परंतु आपल्या जवळ असलेलें रत्न जसें रत्नपारख्याच्या हातून पारखून घ्यावें लागतें, तसें आपलें स्वकर्म शास्त्राच्या आधारानें समजून घ्यावें. ८९ जशी आपलेजवळ दृष्टि असूनही दिव्यावांचून तिचा उपयोग होत नाहीं, आणि मार्ग न सांपडला तर पाय असतांही त्यांचा काय उपयोग ? ८९० म्हणून, जातीप्रमाणें जो जो योग्य अधिकार असेल, तो आपण आपल्या शास्त्राप्रमाणें समजून घ्यावा. ९१ मग अर्जुना, दिवा जसा आपल्या घरांतील ठेवा आपल्या डोळ्यांस दाखवितो, तेव्हां तो घेण्याविषयीं प्रतिबंध असतो काय ? ९२ तसें, स्वभावतः आपल्या वांट्यास आलेलें व शास्त्रानें खरें केलेलें असें जें विहित कर्म, त्याचें जो आचरण करतो; ९३ पण आळस सोडून व फलेच्छा टाकून मोठ्या हौसेनें शरीरानें जीव लावून त्या-

---

१ शोभतें. २ स्वाभाविक. ३ शेतकीवर निर्वाह करणें. ४ स्वस्त दरानें घेतलेली वस्तु. ५ महाग दरानें. ६ दोन वेळ जन्म; पहिलें सर्वसामान्य व दुसरें ( उपनयनाग ) मुंज झाल्यामुळें. ७ सेवा. ८ स्पष्ट करून. ९ मेघापासून पडलेल्या पाण्याला. १० नदी. ११ बुद्धि. १२ जवळ असलेलें. १३ आपण समजून घेऊन. १४ योग्य. १५ अडथळा.

आपुलें । आचरे गा ॥ ९३ ॥ परी आळसु सांडुनी । फळकाम दवडुनी । मागें जीवें मांडुनी । तेथेंचि भरे ॥ ९४ ॥ वोघीं पडिलें पाणी । नेणे आनानी वाहणी । तैसा जाय आचरणीं । व्यवस्थौनि ॥ ९५ ॥ अर्जुना जो यापरी । तें विहित कर्म स्वयें करी । तो मोक्षाच्या ऐलद्वारीं । पैठा होय ॥ ९६ ॥ जे अकरणा[1] आणि निषिद्धा । नवचेचि कांहीं संबंधा[2] । म्हणौनि भवा[3] विरुद्धा । मुकला तो ॥ ९७ ॥ आणि काम्यकर्माकडे । न परतेचि जेथ कोडें[4] । तेथ चंदनाचेही खोडें[5] । न लेचि[6] तो ॥ ९८ ॥ येर नित्य कर्म तंव । फळत्यागें वेंचिलें सर्व । म्हणौनि मोक्षाची शींव । ठाकूं लाहे ॥ ९९ ॥ ऐसेनि शुभाशुभीं संसारीं । सांडिला तो अवधारीं । वैराग्यमोक्षद्वारीं । उभा ठाके ॥ ९०० ॥ जें सकळ भाग्याची सीमा । मोक्षलाभाची जें प्रमा[7] । नाना कर्ममार्गश्रमा । शेवटु[8] जेथ ॥ १ ॥ मोक्षफळें दिधली वोल । जें सुकृततरूचें फूल । तयें वैराग्यीं ठेवी पाऊल । भवरु[9] जैसा ॥ २ ॥ पाहीं आत्मज्ञानसुदिनाचा । वर्धावा सांगतया अरुणाचा । उदयो त्या वैराग्याचा । ठावो पावे ॥ ३ ॥ किंबहुना आत्मज्ञान । जेणें हाता ये निधान । तें वैराग्य दिव्यांजन । जीवें ले[10] तो ॥ ४ ॥ ऐसी मोक्षाची योग्यता । सिद्धी जाय तया पंडुसुता । अनुसरोनि विहिता । कर्मा यया ॥ ५ ॥ ( १२११. स्वकर्माची महती, ९०६–९१३ ) हें विहित कर्म पांडवा । आपुला अनन्य वोलावा[11] । आणि हेचि परम सेवा । मज सर्वात्मकाची ॥ ६ ॥ पैं आघवांचि भोगेंसी । पतिव्रता क्रीडे प्रियेंसी । कीं तयाचि नामें जैसीं । तपें तियां केलीं ॥ ७ ॥ कां बाळका एकी माये । वांचोनि जिणें काय आहे । म्हणौनि सेविजे कीं तो होये । पाटीचा धर्मु ॥ ८ ॥ ना ना पाणी म्हणौनि मासा । गंगा न सांडितां जैसा । सर्वतीर्थसहवासा । वरपडौ जाला ॥ ९ ॥ तैसें आपलिया विहिता । उपायो असे न विसंवितां । ऐसा कीजे कीं जगन्नाथा । आभारु पडे ॥ ९१० ॥ अगा जयाचें विहित । तें ईश्वराचें मनोगत । म्हणौनि केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ॥ ११ ॥ पैं जीवाचे कसीं उतरली । ते दासी कीं गोसांविण जाली । सिसें[15] वेंची तया मविली[16] । वहीं जेविं ॥ १२ ॥ तैसें स्वामीचिया मनोभावा । न चुकिजे हेचि परमसेवा । येर तें गा पांडवा । वणिज करणें ॥ १३ ॥

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥ ४६ ॥

अन्वयः—यतः भूताना प्रवृत्तिः ( अस्ति ), येन इद सर्व तत ( अस्ति ), त ( ईश्वरं ) स्वकर्मणा अभ्यर्च्य मानवः सिद्धिं विन्दति ॥ ४६ ॥

---

१ सर्व मेळ घालविणें. २ मुळींच कर्म न करणें. ३ आत्मप्राप्तीस विरुद्ध जो संसार त्यापासून. ४ आवडीनें; कौतुकानें. ५ पायलोढे. ६ स्वीकारीत नाहीं. ७ निश्चय. ८ जामीन; तारण. ९ भ्रमर. १० घालतो. ११ जि-हाळा. १२ ईश्वराची. १३ मुख्य: १४ प्राप्ति. १५ शिर. १६ लिहून ठेविली.

ठिकाणीं जो आपला सर्व काळ घालवितो; ९४ पाणी ओवांत पडल्यावर जसें भलतीकडे जात नाहीं, तसें ज्याचें आचरण यथाशास्त्र होतें; ९५ अर्जुना, याप्रमाणें जो विहित कर्माचें स्वतः आचरण करतो, तो पुरुष मोक्षाच्या अलीकडलें जें द्वार ' वैराग्य ' तेथें प्राप्त होतो. ९६ जो अकरण व निषिद्ध या कर्मांचा संबंध होऊं देत नाहीं, म्हणून आत्मप्राप्तीस विरुद्ध जो संसार त्याच्या भयापासून मुक्त होतो; ९७ तसेंच, चंदनाचाही खोडा पायांत घालण्यास आणिला तरी पाय अडकवून घेत नाहीं, तसें काम्यकर्मांकडे जो कौतुकानेंही पहात नाहीं, ९८ आणि दुसरें जें नित्य कर्म, त्याचा फलत्याग केल्यामुळें तेंही तो संपवितो, म्हणून तो मोक्षाच्या शिवेजवळ प्राप्त होतो. ९९ अशा युक्तीनें कर्माचें निरसन करून शुभाशुभ संसारापासून तो सुटतो, व मोक्षाचें द्वार जें वैराग्य तेथें येऊन उभा राहतो. ९९० जें वैराग्य सकळ भाग्याची सीमा होय, व मोक्षलाभाचा निश्चय अथवा कर्ममार्गाचे श्रम परिहार होण्याचें जें स्थान होय; १ ज्याला मोक्षफल जामीन झालेलें आहे; किंवा जें सत्कर्मरूप वृक्षाचें फूलच होय, त्या वैराग्याचे ठिकाणीं साधक पुरुष भ्रमराप्रमाणें पाऊल ठेवतो. २ आत्मज्ञानसूर्याचा उदय सुचविणारा अरुण असें हें वैराग्य आहे. ३ किंबहुना, आत्मज्ञानरूप जें निधान, तें ज्या वैराग्यरूप दिव्यांजनानें हातास येतें, तें जो जिवेंभावेंकरून बुद्धिरूप डोळ्यांत घालतो; ४ अर्जुना, अशा प्रकारें *विहित कर्माला अनुसरून आचरण केलें असतां, त्याला मोक्षप्राप्तीची योग्यता प्राप्त होते.* ५ हे पाडवा, विहित कर्म हा आपल्या कल्याणाचा जिव्हाळा होय, व त्याचेंच आचरण करणें हीच मज सर्वात्मक ईश्वराची सेवा होय. ६ संपूर्ण भोगेंकरून पतिव्रता स्त्री आपल्या प्रियपतीबरोबर क्रीडा करते, त्याच तिच्या आचरणास ' तप ' असें म्हणावें. ७ किंवा बाळाला आईवांचून जगण्याला दुसरें साधनच नाहीं, म्हणून तिची सेवा केली असतां त्याचें कल्याण होतें, त्याप्रमाणें, स्वधर्माचें आचरण करणें हाच मुख्य धर्म होय. ८ अथवा, केवळ पाणी समजून गंगेंत राहिलेल्या माशाला तेथें राहिल्यानें जसा सर्व तीर्थांचा सहज लाभ होतो, ९ तसें आपल्या विहित कर्माचें आचरण केल्यावांचून दुसरा उपायच नाहीं, व अशा निश्चयानें त्यांचें आचरण केलें असतां, जगन्नाथ जो ईश्वर त्यावर आपलें ओझें पडतें! ९१० अरे, ज्याचें जें विहित कर्म नेमलेलें आहे, तें त्यानें करणें हेंच ईश्वराचें मनोगत आहे. म्हणूनच तें कर्म केलें असतां निःसंशय ईश्वर प्राप्त होतो. ११ दासी असूनही जर राजाच्या कसोटीस उतरली, तर तीच सर्वांची स्वामिणी होते; किंवा स्वामिकार्यार्थ जो आपलें डोकें देणारा, त्याला स्वामी जसा इनामपत्र करून देऊन आपले दसरीं दाखला ठेवितो, १२ तसें ईश्वराच्या मनोभावाप्रमाणें वागणें हीच त्याची परमसेवा होय. व यावांचून जें दुसरें कृत्य करणें, तें अर्जुना, वाणिज्य कर्माप्रमाणें आहे. १३

श्लोकार्थः—ज्याच्या सत्तेनें सर्व भूतांच्या इंद्रियांच्या चेष्टा चालतात, आणि ज्यानें हें सर्व विश्व व्यापलें आहे, त्या ईश्वराला स्वकर्मानें भजणाऱ्या मनुष्याला ज्ञाननिष्ठायोग्यतारूप सिद्धि मिळते ॥४६॥

( १२१२. ईश्वरापासून भूतोत्पत्ति, ९१४ ) म्हणौनि विहित क्रिया केली। नव्हे तयाची खूण पाळिली। जयापासूनि कां आलीं। आकारा भूतें॥ १४॥ ( १२१३. ईश्वर जीवरूपी बाहुल्यांना अहंकाररज्जूनें खेळवितो, ९१५–९१६ ) जो अविद्येचिया चिंधिया। गुंढूनि जीव-बाहुलिया। खेळवीतसे तिगुणिया। अहंकार-रज्जूं॥ १५॥ जेणें जग हें समस्त। आंत बाहेरी पूर्ण भरित। जालें आहे दीप-जात। तेजें जैसें॥ १६॥ ( १२१४. ईश्वरपूजनानें ज्ञाननिष्ठाप्राप्ति, ९१७-९१८ ) तया सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्मकुसुमांची वीरा। पूजा केली होय अपारा। तोषा-लागीं॥ १७॥ म्हणौनि तिये पूजे। रिझैलेनि आत्मराजें। वैराग्यसिद्धि देइजे। पसाय तया॥ १८॥ ( १२१५. ईश्वरप्रसादानें वैराग्यप्राप्ति, ९१९–९२१ ) जिये वैराग्यदशे। ईश्वराचेनि वेधेंवशें। हें सर्वही नावडे जैसें। वांतें होय॥१९॥ प्राण-नाथाचिया आँधी। विरहिणीतें जिणेंही बाधी। तैसें सुखजात त्रिशुद्धि। दुःखचि लागे॥९२०॥ सम्यक्ज्ञान नुदैजता। वेधेंचि तन्मयता। उपजे ऐसी योग्यता। बोधाची लाहे॥२१॥ अवतरणः–( १२१६. स्वधर्माचरणानें पाप लागत नाहीं, ९२२–९३३ ) म्हणोनि मोक्षलाभालागीं। जो व्रतें वाहतसे आंगीं। तेणें स्वधर्मु आस्था चांगी। अनुष्ठावा॥ २२॥

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्।
स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्॥ ४७॥

अन्वयः—विगुणः स्वधर्मः स्वनुष्ठितात् परधर्मात् श्रेयान् (अस्ति). स्वभावनियतं कर्म कुर्वन् नरः किल्बिषं न आप्नोति॥ ४७॥

अगा आपुला हा स्वधर्मु। आचरणीं जरी विषमु। तरी पाहावा तो परि-णामु। फळेल जेणें॥२३॥ जें सुखालागीं आपणपया। निंबाचि आथी धनंजया। तें कडुवटपण तयाचिया। उबगिजे ना॥ २४॥ फळणयाँ ऐलीकडे। केळीतें पाहतां आँस मोडे। ऐसी त्यजिली तरी जोडे। तैसें कें गोमटें॥ २५॥ तेविं स्वधर्मु सांकडु। देखोनि केला जरी कडु। तरी मोक्षसुखेंडु। अंतरला कीं॥२६॥ आणि आपुली माये। कुब्जा जरी आहे। तरी जीजे तें नोहे। स्नेह कुंन्हें कीं॥२७॥ येरी जिया पैराविया। रंभेहूनि बराविया। तिया काय कराविया। बाळकें तेणें॥ २८॥ अगा पाणियाहूनि बहुवें। तुपीं गुण कीर आहे। परी मीना काय होये। असणें तेथ॥ २९॥ पैं आघविया जगा जें विख। तें विखाकिडियाचें पीयूख। आणि जगा गूळ तें देख। मरण तया॥ ९३०॥ म्हणौनि जे विहित जया जेणें। फिटे संसाराचें धरणें। क्रिया कठोर तन्ही तेणें। तेचि करावी॥३१॥

---

१ मनोगत. २ पुष्पांची. ३ संतुष्ट झालेल्या. ४ प्रसाद. ५ छंदानें. ६ वाती. ७ चितेनें. ८ तुच्छ वाटतें. ९ अपरोक्ष ज्ञान. १० ध्यासानें. ११ कठीण. १२ कंटाळू नये. १३ विम्याचे पूर्वी.

म्हणून, विहित कर्म केलें म्हणजे, तें कर्म केलें असें नव्हे, तर ज्या परमात्म्यापासून सर्व भूतें उत्पन्न झालीं आहेत, त्याचें मनोगतच आपण पाळिलें ! १४ जो परमात्मा अज्ञानरूपी चिंध्या गुंडाळून जीवरूपी बाहुल्या तयार करतो, आणि (सत्व, रज व तम अशा) तीन पदरी अहंकाररूप सूत्रानें त्यांना खेळवितो; १५ दिवा जसा तेजानें अंतर्बाह्य भरलेला असतो, तसें ज्या परमात्म्यानें हें सर्व जग अंतर्बाह्य ओतप्रोत भरलेलें आहे, १६ हे वीरा अर्जुना, त्या सर्वात्मक ईश्वराची स्वकर्मरूपी पुष्पांनीं पूजा केली असतां, ती पूजा त्याला परम संतोषकारक होते. १७ म्हणून त्या पूजेच्या योगानें आत्मराज प्रसन्न होऊन भक्ताला वैराग्यसिद्धिरूप प्रसाद देतो. १८ जी वैराग्यदशा प्राप्त झाली असतां ईश्वराचा छंद लागून हा सर्व संसार वमनप्राय भासतो; १९ ज्याप्रमाणें आपल्या प्रिय पतीच्या वियोगानें विरहिणी स्त्रीस जिवंत राहणें देखील नकोसें होतें, त्याप्रमाणें संसारांतील सर्व सुखें त्याला खरोखर दुःखवत् भासतात. ९२० ईश्वराचें अपरोक्ष ज्ञान उत्पन्न होण्याचे पूर्वी त्याच्या ध्यासानें तन्मयता प्राप्त होते, अशी बोधाची योग्यता आहे. २१ यास्तव, ज्याच्या मनांत मोक्ष प्राप्त व्हावा अशी इच्छा असेल, त्यानें स्वधर्माचें परम आस्थेनें आचरण करावें. २२

श्लोकार्थः—स्वतःचा धर्म आचरण्यास कठीण असला तरी दुसऱ्याच्या धर्मापेक्षा, मग तो आचरण्यास सोपा असला तरी, श्रेष्ठ आहे. स्वभावनियत जें कर्म, तें केल्यानें मनुष्य पापानें लिप्त होत नाहीं ॥४७॥

अरे, आपला धर्म जरी आचरण करण्यास कठीण असला, तरी त्यापासून परिणामीं जें फल प्राप्त होणार त्यावर लक्ष ठेविलें पाहिजे. २३ हे धनंजया, कडुलिंबाचें सेवन केलें असतां जर आपल्याला सुख होत असेल, तर त्याच्या कडूपणास कंटाळूं नये. २४ केळ विण्याचे पूर्वी तिच्याकडे पाहून निराशा होते; आणि तशा स्थितींतच जर ती तोडून टाकिली, तर तिजपासून उत्तम फल कोठून प्राप्त होणार ? २५ त्याप्रमाणें, स्वधर्म आचरण्यास कठीण आहे असें म्हणून जर त्याचा त्याग केला, तर तो मोक्षसुखाला अंतरलाच कीं ! २६ आणि आपली आई जरी कुरूप असली, तरी ज्या तिच्या प्रेमामुळें आपण जगतों, तें तिचें प्रेम कांहीं वांकडें नाहीं; २७ एरवीं दुसऱ्या स्त्रिया जरी रंभेहून सुस्वरूप असल्या, तरी बाळकाला त्या काय करावयाच्या आहेत ? २८ अरे, पाण्यापेक्षां तुपांत पुष्कळ गुण आहेत हें खरें; पण माशाला तुपात ठेवलें असतां तो जगेल का ? २९ हें पहा—जो बचनाग सर्व जगाला विष आहे, तोच त्यातील किड्याला अमृत आहे; आणि गूळ—जो साऱ्या जगाला गोड आहे, तोच त्या किड्याचा मृत्यु आहे ! ९३० म्हणून, ज्याला जें विहित कर्म सांगितलें आहे, कीं ज्याच्या आचरणानें संसाराचें बंधन तुटतें, तें कितीही कष्टसाध्य असलें तरी त्यानें त्याचेंच आचरण करावें. ३१ पण तोच दुसऱ्याचा धर्म उत्तम म्हणून जर का त्याचें आचरण केलें, तर पायानें चालण्याचें काम डोक्यानें केल्याप्रमाणें होऊन उलट तें दुःखाला मात्र

१४ आशा. १५ उत्तम फल. १६ सुख. १७ कुरूप. १८ वाकडें. १९ इतर स्त्रिया.

येरा पराचारा वरविया । ऐसें होईल टेंकलया । पायांचें चालणें डोइया । केलें जैसें ॥ ३२ ॥ यालागीं कर्म आपुलें । जें जातिस्वभावें असे आलें । तें करी तेणें जिंतिलें । कर्मबंधातें ॥ ३३ ॥ अवतरणः—( १२-१७. सर्व आरंभ सदोषच आहे, ९३४-९४१ ) आणि स्वधर्मुचि पाळावा । परधर्मु तो गाळावा । हा नेमुही पांडवा । न कीजेचि मा ॥ ३४ ॥ तरी आत्मा दृष्ट नोहे । तंव कर्म करणें कां ठाये । आणि करणें तेथ आहे । आयासु आधीं ॥ ३५ ॥

सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।
सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥

अन्वयः—कौन्तेय, सहजं कर्म सदोषं अपि न त्यजेत्; धूमेन अग्निः इव सर्वारंभाः हि दोषेण आवृताः ( सन्ति ) ॥ ४८ ॥

म्हणौनि भलतिये कर्मीं । आयास जऱ्ही उपक्रमीं[४] । तरी काय स्वधर्मीं । दोषु सांगें ॥ ३६ ॥ अगा उजू वाटा चालावें । तऱ्ही पायचि शिणवावे । ना आडरानें धावावें । तऱ्ही तेंचि ॥ ३७ ॥ पैं शिळा कां सिदोरिया । दाटणें एक धनंजया । परी जें वाहतां विसांवयां । मिळिजे तें घेपे ॥ ३८ ॥ येऱ्हवीं कणा आणि भुसा । कांडितांही सोसु सरिसा । जैंचि रंधन मांसा । तेंचि हर्वी ॥ ३९ ॥ दधी-जळाचिया घुसळणा । व्यापार सारिखेचि विचक्षणा । वाळवे-तिळा घाणा । गाळणें एक ॥ ९४० ॥ पैं नित्य होम देयावया । कां सैरां आगी सुवावयां । फुंकितां धू धनंजया । साहणें तेंचि ॥ ४१ ॥ ( १२१८. विहित कर्म टाकूं नये, ९४२–९९१ ) परी धर्मपत्नी धांगडी । पोसितां जरी एकी वोढी[१२] । तरी कां अपरवडी । आणावी आंगा ॥ ४२ ॥ हां गा पाठीं लागली घाई । मरण न चुकेचि पाहीं । तरी समोरलौं काई । आगळें न कीजे ॥ ४३ ॥ कुळस्त्री दांडयाचे घायें । मरघरें रिगालीहि जरी साहे । तरी स्वपतीतें वायें । सांडिलें कीं ॥ ४४ ॥ तैसें आवडतेंही करणें । न निपजे शिणल्याविणें । तरी विहित या रे कोणें । बोलें भारी ॥ ४५ ॥ वरी थोडेंचि अमृत घेतां । सर्वस्व वेंचो कां पंडुसुता । जेणें जोडे जीविता । अक्षयत्व ॥ ४६ ॥ येर कांह्या मोलें वेंचूनि । विष पियावें घेऊनि । आत्महत्येसि निमोनि[१५] । जाइजे जेणें ॥ ४७ ॥ तैसें जाचूनियां इंद्रियें । वेंचूनि आयुष्याचेनि दियें[१६] । सांचलें पापीं आन आहे । दुःखावांचूनि ॥ ४८ ॥ म्हणोनि करावा स्वधर्मु । जो करितां

१ दुसऱ्याच्या धर्माचें. २ आचरण केल्यास. ३ कर्में राहील. ४ सुरुवातीस. ५ विसाव्याचे ठिकाणीं ६ धान्य. ७ श्रम. ८ होम. ९ इतर कामाकरितां. १० पेटविण्यास. ११ ठेवलेली स्त्री. १२ थारसाच खर्च लागतो; खर्चाची ताणाताण होते. १३ अपकीर्ति. १४ समोर उभे राहून. १५ मरून. १६ दिवस.

कारण होईल. ३२ याकरितां, आपल्या जातिस्वभावानुसार आपल्या वांट्यास जें कर्म आलेलें आहे, त्याचें जो आचरण करतो, त्यानें कर्मबंधाला जिंकलें; ( तो कर्मबंधनापासून मुक्त झाला; ) ३३ आणि म्हणूनच अर्जुना, परधर्माचा त्याग करून स्वधर्मीचेंच आचरण करण्याविषयीं नियम नको का करायला ? ३४ तर आत्मा जोंपावेतों दृष्ट झाला नाहीं, तोंपर्यंत कर्म करण्याचें राहील काय ? ( नाहीं. तें अवश्य केलेंच पाहिजे ) आणि कर्म करावयाचें म्हटलें म्हणजे प्रथम कष्ट आहेत. ३५

श्लोकार्थः—हे कौंतेया, स्वभावसिद्ध जें कर्म, त्यामध्यें जरी दोष असला, तरी तें सोडूं नये; कारण, जसा धुरानें अग्नि व्यापिलेला आहे, तसे सर्व कर्मांचे आरंभ दोषानें व्यापिलेले आहेत ॥४८॥

याचकरितां, कोणतंही कर्म केलें तरी जर प्रारंभीं आयास पडतात, तर स्वधर्मीचें आचरण केलें असतां दोष का लागेल सांग बरें ? ३६ अरे, सरळ वाटेनें चालावयाचें झालें तरी पायांलाच शीण द्यावयाचा, आणि आडरानांत भटकावयाचें झालें तरी तीच स्थिति ! ३७ अर्जुना, हें बघ—वाटेनें जातांना पदरांत शिळा किंवा शिदोरी ( फराळाचें ) हीं दोन्ही जरी बांधलीं, तरी ओझें सारखेंच होतें. परंतु जें विसाव्याचे ( मुक्कामाचे ) ठिकाणीं सुखकर होईल तेंच घ्यावें. ३८ बाकी धान्य आणि भूस कांडतांना श्रम सारखेच पडतात, अथवा खाण्याकरितां किंवा होमाकरितां मांस शिजविण्याचे श्रमही सारखेच आहेत; ३९ हे विचक्षणा, दहीं किंवा पाणी यांच्या घुसळण्याचे श्रम सारखेच; अथवा वाळू किंवा तीळ घाण्यांत गाळण्याचे श्रम सारखेच; ९४० हें बघ अर्जुना, नित्यहोम देण्याकरितां किंवा एरवीं विस्तव पेटविण्याचे वेळीं धूर हा दोषासही सोसावा लागतोच; ४१ अथवा लग्नाची बायको किंवा एखादी ठेवलेली स्त्री या दोघींचेंही पोषण करण्यास जर सारखाच खर्च लागतो, तर मग एखादी स्त्री जवळ ठेवून अपकीर्तीचा डाग कां लावून घ्यावा ? ४२ अरे, आपला शत्रु पाठीस लागून आला असतां त्यानें जर अतिशय् लगट केलेली आहे, आणि आतां मरण चुकतच नाहीं असें जर आहे, तर त्याच्यासमोर उभें राहून दोन हात का करूं नयेत ? ४३ कुलस्त्री दुसऱ्याचे घरात शिरूनही जर तिला दाडक्याचा मार सोसावा लागतो, तर तिनें आपला पति व्यर्थ सोडला असें नाहीं का होत ? ४४ त्याप्रमाणें, पाहिजे तें कर्म केलें असतांही जर दुःख सोसावें लागतें, तर बापा, स्वधर्माचरण कठीण असे कोणत्या तोंडानें म्हणतां येईल ? ४५ हे पांडुसुता, ज्या अमृतसेवनानें अमरत्व प्राप्त होतें, त्याच्या अल्पप्राप्तीकरितांही सर्वस्व कां खर्च करूं नये ? ४६ आणि ज्या विषाचें सेवन केलें असतां सर्व सुखाचा नाश होऊन आत्महत्येचें पातक लागतें, तें विष विकत घेऊन कां प्यावें ? ४७ त्याप्रमाणें, इंद्रियांना शीण देऊन आयुष्याचे दिवस खर्च करून पापाचा संचय केला असतां दुःखांवांचून दुसरें फल आहे काय ? ४८ म्हणून, स्वधर्मीचेंच आचरण करावें. तो आपल्या श्रमाचा परिहार करून, उचित अशा परमपुरुषार्थाची—सर्वश्रेष्ठ मोक्षाची—प्राप्ति करून देईल. ४९ याकरितां, स्वधर्माचें आचरण सोडूं नये. ज्याप्रमाणें संकटसमयींही सिद्धमंत्र विसरूं नये,

हिरोनि घे श्रमु । उचित देईल परमु । पुरुषार्थराजु ॥ ४९ ॥ याकारणें किरीटी । स्वधर्मांचिये राहाटी । न विसंबिजे संकटीं । सिद्धमंत्रु जैसा ॥ ९५० ॥ कां नाव जैसी उदधीं । महारोगी दिव्यौषधी । न विसंबिजे तया बुद्धी । स्वकर्म येथ ॥ ५१ ॥ अवतरणः—( १२१९. स्वकर्माचरणानें ईश्वरप्रसाद होतो, ९५२-९५५ ) मग ययाचि गा कपिध्वजीं । स्वकर्मांचिया महापूजा । तोषला ईशु तमरजां । झाडा करूनि ॥ ५२ ॥ शुद्ध सत्त्वाचिया वाटा । आणी आपुली उत्कंठा । भव-स्वर्ग काळकूटा । ऐसे दावी ॥ ५३ ॥ जियें वैराग्य येणें बोलें । मोगां संसिद्धी रूप केलें । किंबहुना तें आपुलें । मेळवी खांगें ॥५४॥ मग जितिलिया हे भोयें । पुरुष सर्वत्र जैसा होये । कां जालाहि जें लाहे । तें आतां सांगों ॥ ५५ ॥

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।
नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥

अन्वयः—सर्वत्र असक्तबुध्दिः, जितात्मा, विगतस्पृहः ( नरः ) परमां नैष्कर्म्यसिध्दिं संन्यासेन अधिगच्छति ॥ ४९ ॥

( १२२०. असक्तबुद्धि, ९५६–९५८ ) तरी देहादिक हें संसारें । सर्वही मांडलेंसे जें गुंफिरें । तेथ नातुडे तो वागुरें । वारा जैसा ॥ ५६ ॥ पैं परिपाका-चिये वेळे । फळ देठें ना देठु फळें । न धरे तैसें स्नेह खुळें । सर्वत्र होय ॥ ५७ ॥ पुत्र वित्त कलत्रें । हे जालियाही स्वतंत्र । माझें न म्हणे पात्र । विषाचें जैसें ॥५८॥ ( १२२१. जितेंद्रिय–जितात्मा, ९५९-९६१ ) हें असो विषयजातीं । बुद्धि पोळली ऐसी माघौती । पाउलें घेऊनि एकांतीं । हृदयाच्या रिघे ॥ ५९ ॥ ऐसया अंतःकरण । बाह्य येतां तयाची आण । न मोडी समर्था भेणें । दासी जैसी ॥९६०॥ तैसें ऐक्याचिये मुठी । मौजिवडें चित्त किरीटी । करूनि वेधीं नेहटीं । आत्म-याच्या ॥ ६१ ॥ ( १२२२. स्पृहा सुटली पाहिजे, ९६२-९६३ ) तेव्हां दृष्टादृष्टें स्पृहे । निमणें जालेंचि आहे । आगीं दडपलिया धुंयें । राहिजे जैसें ॥ ६२ ॥ म्हणोनि नियमिलियां मानसीं । स्पृहा नासोनि जाय आपैसी । किंबहुना तो ऐसी । भूमिका पावे ॥६३॥ ( १२२३. अज्ञाननाशानें नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होते, ९६४-९८३ ) पैं अन्यथा बोधु आघवा । मावळोनि तया पांडवा । बोधमात्रींचि जीवा । ठावो होय ॥ ६४ ॥ धरवणी वेंचें सरे । तैसें भोगें प्राचीन पुरे । नवें तंव नुपकरे । कांहींचि करूं ॥ ६५ ॥ ऐशी कर्मे साम्यदशा । होय तेथ वीरेशा । मग श्रीगुरु आपैसा । भेटेचि गा ॥ ६६ ॥ रात्रीची चौपाहरी । वेंचलिया अवधारीं । डोळ्या तमारी ।

---

१ परिहार करितो. २ मोक्ष. ३ अर्जुनाच्या ध्वजावर कपिश्रेष्ठ मारुति विराजमान असे. म्हणून त्याला 'कपिध्वज' म्हणतात. ४ नाश करून. ५ मागें पंचेचाळिसाव्या श्लोकांत. ६ स्थान. ७ वैराग्यभूमिका. ८ पूर्णत्वास पावलेला. ९ पाश. १० सापडत नाहीं. ११ जाळ्यांत.

९५० अथवा समुद्रांत पडलेल्यानें नाव सोडूं नये, किंवा महारोग्यानें दिव्यौषधीचा त्याग करूं नये, त्याप्रमाणें स्वकर्माचें आचरण सोडूं नये. ५१ मग, हे कपिध्वजा, याच स्वकर्मरूप महापूजेनें संतुष्ट झालेला ईश्वर तम व रज या गुणाचा नाश करून, ५२ आपल्या उत्कंठेला शुद्धसत्त्वगुणाच्या मार्गाला लावितो, आणि संसार व स्वर्ग हे काळकूट विषाप्रमाणें आहेत असें वाटावयास लावितो. नंतर, ५३ पूर्वी वैराग्य या शब्दानें संसिद्धि या शब्दाचें जें वर्णन केले, तें आपलें वैराग्यरूप स्थान तो मिळवितो. ५४ मग ही वैराग्यभूमिका जिंकल्यावर जी त्याची योग्यता होते, किंवा पूर्णत्वास पावलेल्या त्या पुरुषाला कशाचा लाभ होतो, तें आतां सांगतों. ५५

श्लोकार्थः—ज्याची बुद्धि कोठेंही आसक्त होत नाहीं, व जो जितेंद्रिय व निस्पृह आहे, असा मनुष्य संन्यासाच्या योगानें उत्कृष्ट अशा ज्ञानसिद्धीला प्राप्त होतो ॥ ४९ ॥

तर, वारा जसा पारध्याच्या जाळ्यांत इकडून तिकडे जाताना अडकत नाहीं, तसा, देह आदिकरून जे संसाराचे पाश, त्यांत तो असूनही, सापडत नाहीं. ५६ हें पहा—पिकलेलें फळ जसें देंठाला धरीत नाहीं, किंवा देठही त्याला धरीत नाहीं, तसें संसारादिकावरील सर्व प्रेम निर्जीव होतें. ५७ पुत्र, द्रव्य व स्त्री हीं आपल्या तंत्रानें वागत असलीं तरी 'हीं माझीं आहेत' असें न म्हणतां तो त्याचा विषाप्रमाणे त्याग करतो. ५८ फार काय सांगावें ? कढत पदार्थाच्या योगें हाताला चटका बसतांच जसा मनुष्य हात मागें घेतो, तशी त्याची बुद्धि विषयांपासून मागे परतून आत्मविचाराकडे लागते. ५९ अशा प्रकारें अंतःकरण हें इंद्रियद्वारा विषयांकडे न जाण्याविषयीं याची शपथ मोडीत नाहीं. जशी स्वामीच्या भयानें दासी आज्ञा मोडीत नाहीं, ९६० तसें अर्जुना, ऐक्याच्या मुठीमध्यें चित्त धरून त्याला आत्म्याच्या छंदास लावतो. ६१ त्या वेळेस, जसा अग्नि राखेंत पुरला म्हणजे धूर आपोआप राहतो; तशी इहपर विषयाची इच्छा सहजच नष्ट होते; ६२ म्हणून, मनाचा निग्रह झाला म्हणजे इच्छा आपोआप नाहींशी होते; फार सांगून काय करावयाचे आहे ? अशी भूमिका साधकाला प्राप्त होते. ६३ हें बघ अर्जुना, विपरीत बोध सगळा मावळून त्याला खरा बोधच प्राप्त होतो. ६४ जसें साचविलेले पाणी रोज खर्च केलें म्हणजे तें सरतें, तसें प्रारब्धकर्म हें भोगातीं सरतें; आणि अहंकर्तृत्वभावना नसल्यामुळें नवीन कर्म उत्पन्न होत नाहीं. ६५ अर्जुना, अशा प्रकारें सर्व कर्माची क्षीणदशा झाली म्हणजे मग श्रीगुरूंची आपोआप भेट होते. ६६ हें पहा, रात्रीचे चार प्रहर संपले म्हणजे अंधकाराचा नाश करणारा जो सूर्य तो दृष्टीस पडतो; ६७ अथवा फळाचा घड येऊन तो ज्याप्रमाणें केळीची वाढ खुंटवितो, त्याप्रमाणें, श्रीगुरु हे भेटून जिज्ञासूची कर्मकर्तृत्वाची खटपट बंद करतात.

१२ निर्जीव. १३ स्त्री. १४ भयानें. १५ मध्यें. १६ छर्दी. १७ लावतो. १८ इहपर विषयाची इच्छा करी. १९ नाहींशी; नष्ट. २० पुरानें. २१ हुकुमात असलेल्या. २२ इच्छा. २३ कुतर्क. २४ साचवणीचें पाणी. २५ संपतें. २६ उत्पन्न न होय. २७ सूर्य.

मिळे जैसा ॥ ६७ ॥ का येऊनि फळाचा घड । पारुपवी केळीची वाढ । श्रीगुरु भेटोनि करी पाड । बुभुत्सु तैसा ॥ ६८ ॥ मग आलिंगिला पूर्णिमा । जैसा उणीव सांडी चंद्रमा । तैसें होय वीरोत्तमा । गुरुकृपा तया ॥ ६९ ॥ तेव्हां अबोधमात्र असे । तो तंव तया कृपा नासे । तेथ निशीसवें जैसें । आधारें जाय ॥ ९७० ॥ तैसी अबोधाचिये कुशीं । कर्म कर्ता कार्य ऐशी । त्रिपुटी असे ते जैसी । गाभिणी मारिली ॥ ७१ ॥ तैसेंचि अबोधनाशासवें । नासे क्रियाजात आघवें । ऐसा समूळ संभवे । संन्यासु हा ॥ ७२ ॥ येणें मुळाज्ञानसंन्यासें । दृश्याचा जेथ ठावो पुसे । तेथ बुझावें तें आपैसें । तोचि आहे ॥ ७३ ॥ चेइलियावेंरी पाहीं । स्वप्नींचिया तिये डोहीं । आपणयातें काई । काढूं जाइजे ॥ ७४ ॥ तैं मीं नेणें आतां जाणेन । हें सरलें तया दुःस्वप्न । जाला ज्ञातृज्ञेया विहीन । चिदाकाश ॥ ७५ ॥ मुखाभासेंसी आरिसा । परौता नेलिया वीरेशा । पाहातेपणेंवीण जैसा । पाहाता ठाके ॥ ७६ ॥ तैसें नेणणें जें गेलें । तेणें जाणणेंही नेलें । मग निष्क्रिय उरलें । चिन्मात्रंचि ॥ ७७ ॥ तेथ स्वभावें धनंजया । नाहीं कोणीचि क्रिया । म्हणोनि प्रवादु तया । नैष्कर्म्यु ऐसा ॥ ७८ ॥ तें आपुलें आपणपें । असतचि होऊनि आरोपे । तरंग कां वायुलोपें । समुद्रु जैसा ॥ ७९ ॥ तैसें न होणें निफजे । ते नैष्कर्म्यसिध्दि जाणिजे । सर्वसिध्दींत सहजे । परम हेचि ॥ ९८० ॥ देउळाचिया कामा कळसु । उपरम गंगेसी सिंधुप्रवेशु । कां सुवर्णशुद्धी कसु । सोळावा जैसा ॥ ८१ ॥ तैसें आपुलें नेणणें । फेडिजे कां जाणणें । तेंहि गिळूनि असणें । ऐसी जे दशा ॥ ८२ ॥ तियेपरतें कांहीं । निपजणें येथ नाहीं । म्हणोनि म्हणिपे पाहीं । परमसिद्धि ते ॥ ८३ ॥ अवतरण.—( १२२४. ज्ञानाची परमसीमा, ९८४–९९० ) परी हेचि आत्मसिद्धि । जो कोणी भाग्यनिधि । श्रीगुरुकृपालब्धि[12]-। काळीं पावे ॥ ८४ ॥

सिध्दिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाऽऽप्नोति निबोध मे ।
समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥

अन्वयः—कौन्तेय, सिद्धिं प्राप्तः ( नरः ) यथा ब्रह्म आप्नोति, तथा मे समासेन एव निबोध; या च इयं ब्रह्मप्राप्तिः सा ज्ञानस्य परा निष्ठा ( वर्तते ) ॥ ५० ॥

उदयजतांचि दिनकरु । प्रकाशुचि आैते[13] आंधारु । कां दीपसंगें कापुरु । दीपुचि होय ॥ ८५ ॥ तया लवणाची कणिका । मिळतखेंवो उदका । उदकाचि होऊनि देखा । ठाके जेवि ॥ ८६ ॥ कां निद्रित चेइलिया । स्वप्नेंसी नीद वायां ।

१ थाबवी; बंद करी. २ जिज्ञासुला. ३ अज्ञान. ४ जाणावें. ५ जागें झाल्यावर. ६ ज्ञाता. ७ ज्ञानस्वरूप. ८ मुखाचें जें प्रतिबिंब दिसतें त्यासह. ९ क्रियारहित. १० ज्ञान मात्र. ११ नांव. १२ प्राप्तीच्या वेळेस. १३ व्यापतो.

६८ मग, पौर्णिमा प्राप्त झाली म्हणजे ज्याप्रमाणें चंद्राचे ठिकाणीं मुळींच उणीव रहात नाहीं, त्याप्रमाणें गुरुकृपा झाली म्हणजे जिज्ञासूला कोणतीही उणीव राहत नाहीं. ६९ त्या वेळीं, अज्ञान म्हणून जेवढें असतें, तेवढें तर त्यांच्या कृपेनेंच नष्ट होतें; आणि रात्र गेल्यावर अंधार नाहींसा होतो, ९७० त्याप्रमाणें अज्ञानाचा नाश झाला म्हणजे, त्याच्या पोटांत जी कर्म, कर्ता आणि कार्य ही त्रिपुटी आहे तीही नाश पावते. जशी गर्भिणी मारली म्हणजे पोटांतला गर्भ निराळा मारावा लागत नाहीं, तो आपोआपच मरतो, ७१ तसा अज्ञानाचा नाश झाला म्हणजे सर्व कर्मांचा नाश होतो. अशा प्रकारें सर्व कर्मांचा समूळ नाश होणें यालाच संन्यास म्हणतात, तोच त्याला प्राप्त होतो. ७२ त्यामुळें अज्ञानाच्या त्यागानें सर्व दृश्य पदार्थ नष्टवत् झाले म्हणजे मग जाणावयाचें जें तें तो आपोआप स्वतःच होतो. ७३ असें पहा, मनुष्य झोपेंतून जागा झाल्यानंतर, आपण डोहांत बुडत असल्याचा जो त्याला स्वप्नांत भ्रम झाला होता, तो सत्य मानून त्यांतून आपल्याला काढण्याविषयीं तो खटपट करील काय ? ७४ त्याप्रमाणें, मला कळत नाहीं, मी आतां समजून घेईन, हें त्याचें दुःस्वप्न नष्ट होतें, आणि ज्ञेय व ज्ञाता हे जाऊन तो केवळ ज्ञानमात्र होतो. ७५ अर्जुना, प्रतिबिंबासहित आरसा दूर नेल्यावर ज्याप्रमाणें पाहाणारा हा पाहतेपणाशिवाय असतो, ७६ त्याप्रमाणें, अज्ञान जें जातें तें एकटें न जातां ज्ञानालाही वेऊन जातें. मग केवळ निष्क्रिय असें ज्ञान मात्र उरतें. ७७ अर्जुना, या नैष्कर्म्यभूमिकेच्या ठिकाणीं स्वभावतः कोणतीच क्रिया नाहीं, म्हणून त्या स्थितीला नैष्कर्म्यसिद्धि असें म्हणतात. ७८ तें आपलें स्वरूप असून, नसणेपणाच्या भ्रमामुळें जो असणेपणा येतो तोही जाऊन केवळ असणेपणा राहतो. जसा वायूच्या उपाधीमुळें उत्पन्न होणाऱ्या लाटा वायु नाहींसा झाला म्हणजे आपोआप पाण्याशीं ऐक्य पावतात. ७९ असें कोणतेंही कर्म न होणें अशी जी स्थिति, तिला नैष्कर्म्यसिध्दि म्हणतात; आणि हीच साहजिकतः सर्व सिध्दींत मुख्य होय. ९८० कळस बसल्यावर जसा देवळाच्या कामाचा शेवट होतो; अथवा गंगा समुद्रांत पावली म्हणजे जसें पुढें तिचें नांव राहत नाहीं; किंवा सोनें शुध्द करीत असतां सोळा आणे कस लागला म्हणजे ज्याप्रमाणें शुध्द करण्याची क्रिया बंद होते, ८१ त्याप्रमाणें, आपलें अज्ञान ज्या ज्ञानानें नाहींसें केलें, तें ज्ञानही जेव्हां नाहींसें होईल अशी जी स्थिति, ८२ तिच्यापेक्षां दुसरें कांहीं प्राप्त होणें राहत नाहीं, म्हणून तिला परमसिध्दि असें म्हणतात. ८३

श्लोकार्थः—कौंतेया, ही ज्ञाननिष्ठायोग्यतारूप सिद्धि ज्याला प्राप्त झाली आहे, त्याला ब्रह्माची प्राप्ति कशी होते तें मी संक्षेपानेंच सांगतों, तें समजून घे. ही जी ब्रह्मप्राप्ति, तीच ज्ञानाची परमसीमा होय ॥ ५० ॥

पण श्रीगुरुकृपेच्या योगें ज्या कोणा भाग्यवान पुरुषास ही आत्मसिद्धि प्राप्त होते; ८४ सूर्य उगवतांच जसा अंधाराचाच प्रकाश होतो, किंवा दिव्याच्या ज्योतीस कापूर लागतांच तो दिवा होतो; ८५ अथवा मिठाचा खडा पाण्यांत मिळवितांच जसा जलरूप होऊन राहतो; ८६ किंवा निजलेल्या मनुष्यास जागें केल्यावर मिथ्या स्वप्नासह झोंप

जाऊनि आपणपयां । मिळे जैसा ॥ ८७ ॥ तैसें जया कोण्हासि देवें । गुरुवाक्यश्रवणाचिसवें । द्वैत गिळोनि विसवे[1] । आपणयाँ वृत्ति ॥ ८८ ॥ तयासी मग कर्म करणें । हें बोलिजेलाचि कवणें । आकाशा येणें जाणें । आहे काई ॥ ८९ ॥ म्हणौनि तयासि कांहीं । त्रिशुद्धि करणें नाहीं । परी ऐसें जरी हें कांहीं । नव्हे जया ॥ ९९० ॥ ( १२२५. सद्गुरु भेटूनही ज्याला नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त झाली नाहीं, तो क्रमानें त्या सिद्धीस प्राप्त होतो, ९९१--१००९ ) काना वचनाचिये भेटी । सरिसाचि पैं किरीटी । वस्तु होऊनि उठी । कवणिएकु जो ॥ ९१ ॥ येर्‍हवीं स्वकर्माचेनि वैन्हीं । काम्यनिषिद्धाचिया इंधनीं । रजतमें कीर दोन्ही । जाळिलीं आधीं ॥ ९२ ॥ पुत्र वित्त परलोकु । यया तिहींचा अभिलाखु । घरीं होय पाइकु । हेंही जालें ॥ ९३ ॥ इंद्रियें सैरा पदार्थीं । रिगतां विटाळलीं होतीं । तियें प्रत्याहारतीर्थीं । न्हाणिलीं कीर ॥ ९४ ॥ आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरीं अर्पूनि सकळ । घेऊनि केलें अढळ । वैराग्यपद ॥ ९५ ॥ ऐसी आत्मसाक्षात्कारीं । लाभे ज्ञानाची उँजरी । ते सामुग्री कीर पुरी । मेळविली ॥ ९६ ॥ आणि तेचि समयीं । सद्गुरु भेटले पाहीं । तेवींचि तिहीं कांहीं । वंचिजेनां ॥ ९७ ॥ परी वोखद घेतखेंवो । काय लाभे आपला ठावो । कां उदयजतांचि दिवो[10] । मध्यान्ह होय ॥ ९८ ॥ सुक्षेत्रीं आणि वोलटें[11] । बीजही पेरिलें गोमटें । तरी अलोट फळ भेटे । परि वेळे कीं गा ॥ ९९ ॥ जोडला मार्गु प्राजळु । मीनला सुसंगाचाही मेळु । तरि पाविजे वांचूनि वेळु । लागेचि कीं ॥ १००० ॥ तैसा वैराग्यलाभु जाला । वरि सद्गुरुही भेटला । जीवीं अंकुरु फुटला । विवेकाचा ॥ १ ॥ तेणें ब्रह्म एक आथी । येर आघवीचि भ्रांति । हेही कीर प्रतीति । गाढ केली ॥ २ ॥ परी तेंचि जें परब्रह्म । सर्वात्मक सर्वोत्तम । मोक्षाचेंही काम । सरे जेथ ॥ ३ ॥ यया तिन्ही अवस्था पोटीं । जिरवी जें गा किरीटी । तया ज्ञानासीही मिठी । दे जें वस्तु ॥ ४ ॥ ऐक्याचें एकपण सरे । जेथ आनंदकणुही विरे । कांहींचि नुरोनि उरे । जें कांहीं गा ॥ ५ ॥ तियें ब्रह्मीं ऐक्यपणें । ब्रह्मचि होऊनि असणें । तें क्रमेंचि करून तेणें । पाविजे पैं ॥ ६ ॥ भुकेलियापासीं । [12]वोगरिलें पैंडूसीं । तो तृप्ति प्रतिग्रासीं । लाहे जेवि ॥ ७ ॥ तैसा वैराग्याचा वोलावो । विवेकाचा तो दिवा । [13]आंतुयितां आत्मठेवा । काढीचि तो ॥ ८ ॥ तरी भोगिजे आत्मऋद्धि । येवढी योग्यतेची सिद्धि । जयाच्या आंगीं निरवधि । लेणें जाली ॥ ९ ॥ अवतरणः—( १२२६. ब्रह्म होण्याचा क्रम, १०१० ) तो जेणें क्रमें ब्रह्म । होणें

१ स्थिर होतें. २ ब्रह्मस्वरूप. ३ अग्नीमध्यें. ४ काष्ठांनीं. ५ इच्छा. ६ सेवक. ७ उत्कृष्ट दशा. ८ प्रतारणा केली नाहीं. ९ मूळ स्थिति. १० दिवस. ११ पर्जन्यानें भिजल्यावर. १२ वाढिलें, १३ पदूसाध. १४ आश्रय. १५ पेटला असतां.

नाहींशीं होऊन तो आपल्या मूळस्वरूपाप्रत प्राप्त होतो; ८७ तशी दैवयोगानें ज्या कोणाची वृत्ति गुरुवाक्यश्रवणाबरोबर भेदाचा नाश करून स्वस्वरूपाच्या ठिकाणीं स्थिर होते; ८८ मग त्याला कांहींएक कर्म करण्याचें उरतें असें कोण म्हणेल ? पहा कीं, आकाश सर्वत्र भरलेलें असल्यामुळें, त्याला इकडून तिकडे व तिकडून इकडे येणें घडतें का ? ८९ म्हणून, ज्यास आत्मसिद्धि प्राप्त झाली आहे, त्याला खरोखर कांहींएक कर्तव्य उरत नाहीं. परंतु ज्या साधकाला इतका अधिकार प्राप्त झाला नसेल; ( असंभावना व विपरीत भावना हे दोष असल्यामुळें बुद्धीचा निश्चय झालेला नसेल; ) ९९० अर्जुना, कोणी एक साधक—जो तीव्र अधिकारी आहे तो--श्रीगुरूंच्या वचनाचो व त्याच्या कानाची गांठ पडण्याबरोबर ब्रह्मस्वरूप होतो, ९१ एरवीं, ज्या मंदाधिकारी साधकानें स्वकर्मरूप अग्नीमध्यें काम्यकर्म व निषिध्दकर्म या इंधनानें रज व तम हे गुण अगोदर जाळून टाकले. ९२ नंतर पुत्र, वित्त ( द्रव्य ) व स्वर्गादि लोक या तिहींचा काम ( इच्छा ) हा ज्याच्या स्वाधीन होऊन घरीं सेवक झाला. ९३ भिन्न भिन्न निषिध्द विषयाचे ठायीं प्रवेश केल्यामुळें इंद्रियें जीं विटाळलीं होतीं, तीं, योगामध्यें प्रत्याहाररूपी तीर्थांत स्नान घालून पवित्र केलीं. ९४ आणखी, स्वधर्माच्या आचरणानें प्राप्त होणारें फळ ईश्वरास अर्पण करून त्याच्या प्रसादानें अक्षय्य वैराग्यपद प्राप्त करून घेतलें. ९५ अशा प्रकारें, आत्मसाक्षात्काररूप जें ज्ञान, तें होण्याला जीं साधनें पाहिजेत ती सर्व सामुग्री मिळविली; ९६ आणि तशांत सद्गुरूंची गांठ पडली व त्यांनींही प्रतरणा न करितां सम्यग्ज्ञानाचा उपदेश केला. ९७ परंतु औषध घेतांक्षणींच तात्काळ रोगाची निवृत्ति होऊन आपले मूळचे प्रकृतीची स्थिति प्राप्त होते काय ? अथवा प्रातःकालीं सूर्य उगवतांच मध्यान्हकाल होतो काय ? ९८ उत्तम जमीन असून पर्जन्यवृष्टि झाली, व त्यांत उत्तम बीजही पेरलें, म्हणजे त्यास पुष्कळ पीक येतें; परंतु अर्जुना, त्याला वेळ लागतो; ९९ उत्तम मार्ग असून त्यांत चांगल्याची सोबतही मिळाली, तरी ज्या ठिकाणीं आपल्यास जावयाचें असेल त्या ठिकाणीं जाण्यास वेळ हा लागावयाचाच. १००० त्याप्रमाणें, वैराग्यही प्राप्त झालें, त्यांत सद्गुरूंचीही भेट झाली व ज्ञानप्राप्ति करून घेण्याचीही अंतःकरणांत इच्छा झाली, १ मग त्यांच्या उपदेशानें, ब्रह्म एक सत्य आहे, व त्यावांचून इतर सर्व प्रपंच भ्रांतिरूप आहे, हें ऐकून साधकाचाही त्याप्रमाणें दृढनिश्चय झाला; २ परंतु असें जें सर्वव्यापक व सर्वोत्तम परब्रह्म—ज्या ठिकाणीं मोक्ष शब्दही नाहींसा होतो; ३ अर्जुना, साध्य, साधक व साधन ही त्रिपुटी ज्या ज्ञानानें नाहींशी होते असें जें ज्ञान, तें ज्या ब्रह्माच्या ठिकाणीं लय पावतें; ४ जेथें ऐक्याचा एकपणाही उरत नाहीं, व जेथें आनंदसुखाचा लेशही उरत नाहीं व जेथें कांहीं न उरून जें उरतें, ५ असें जें ब्रह्म, त्या ब्रह्माच्या ठिकाणीं ऐक्य पावून राहणें तें क्रमानेंच प्राप्त होतें. ६ क्षुधितापुढें पड्रस अन्नाचें ताट वाढून ठेवलेलें असलें तरी तो ( एकदम तृप्त न होतां ) प्रत्येक घासानें तृप्ति वाढता वाढतां शेवटच्या घासाला पूर्ण तृप्त होतो; ७ त्याप्रमाणें, तो साधक वैराग्याच्या आश्रयानें व विवेकरूप दीपाच्या प्रकाशानें आत्मस्वरूपी ठेव्यास प्राप्त होतो; ८ तर आत्मरूप ऐश्वर्य भोगण्याची ज्या साधकाचे अंगीं खरोखर योग्यता प्राप्त झाली, ९

करी गा सुगम । तया क्रमाचें आतां वर्म । आइक सांगों ॥ १०१० ॥

बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्याऽऽत्मानं नियम्य च ।
शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥

अन्वयः—विशुद्धया बुद्ध्या युक्तः, धृत्या आत्मानं च नियम्य, शब्दादीन् विषयान् त्यक्त्वा, रागद्वेषौ च व्युदस्य ॥ ५१ ॥

( १२२७. शुद्धबुद्धि, १०११-१०१३ ) तरी गुरू दाविलिया वाटा । येऊन विवेकतीर्थतटा । धुऊनियां मळकटा । बुद्धीचा तेणें ॥११॥ मग राहूनें उगळिली । प्रभा चंद्रें आलिंगिली । तैसी शुद्धत्वें जडली । आपणेयां बुद्धि ॥ १२ ॥ सांडूनि कुळें दोन्ही । प्रियासी अनुसरे कामिनी । द्वंद्वत्यागें स्वचिंतनीं । पडली तैसी॥१३॥ ( १२२८. विषयत्याग, १०१४–१०१६ ) आणि ज्ञानाऐसें जिव्हार । नेवों नेवों निरंतर । इंद्रियीं केले थोर । शब्दादिक जे ॥ १४ ॥ ते रश्मिजाळ काढलेया । मृगजळ जाय लया । तैसें धृतिरोधें तयां । पांचांहीं केलें ॥१५॥ नेणतां अधमाचिया अन्न । खादलिया कीजे वमन । तैसीं वोकविलीं सवासन । इंद्रियें विषयीं ॥ १६ ॥ ( १२२९. मनाचें नियमन, १०१७–१०१८ ) मग प्रत्यगोवृत्ति चोखटें । लाविलीं गंगेचेनि तटें । ऐसीं प्रायश्चित्तें धुवटें । केलीं जेणें ॥१७॥ पाठीं सात्त्विकें धीरें तेणें । शोधारलीं तियें करणें । मग मनेंसीं योगधारणें । मेळविलीं ॥ १८ ॥ ( १२३०. रागद्वेषरहितता, १०१९–१०२१ ) तेविंचि प्राचीनें इष्टानिष्टें । भोगेंसीं येउनी भेटे । तेथ देखिलियाही वोखटें । द्वेषु न करी ॥ १९ ॥ ना गोमटेंचि विषायें । तें आणूनि पुढां सूये । तयालागीं न होये । साभिलाषु ॥ १०२० ॥ अवतरणः— यापरी इष्टानिष्टीं । रागद्वेषं किरीटी । त्यजूनि गिरिकपाटीं । निकुंजीं[१०] वसे ॥ २१ ॥

विविक्तसेवी लध्वाशी यतवाक्कायमानसः ।
ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥

अन्वयः—विविक्तसेवी, लघ्वाशी, यतवाक्कायमानसः, नित्यं ध्यानयोगपरः च वैराग्यं समुपाश्रितः ( अस्ति ) ॥ ५२ ॥

( १२३१. एकांतवास, १०२२-१०२३ ) गजबेजा सांडिलिया । वसवी वनस्थळिया । अंगाचियाचि मादियें । एकलेया ॥ २२ ॥ शमदमादिकीं खेळे । न बोलणेंचि चावळे । गुरुवाक्याचेनि मेळें[१४] । नेणे वेळ ॥ २३ ॥ ( १२३२. अल्प आहार, १०२४-१०२६ ) आणि आंगा बळ यावें । नातरि क्षुधा जावें । कां जिभेचे पुरावे । मनोरथ ॥२४॥ भोजन करितांविखीं[१५] । यया तिहींतें न लेखी । आहारीं मिती संतोषीं । माप न सूये ॥२५॥ अशनेंचेनि पैंवकें । हारपतां प्राणु पोखे ।

१ ओकलेली; सोडलेली. २ आत्मस्वरूपीं. ३ आवडतें. ४ सूर्यकिरण. ५ अंतर्मुख वृत्ति. ६ शुद्ध केलीं. ७ पूर्वकर्माच्या योगानें. ८ प्रीति. ९ पर्वताच्या गुहेंत. १० निरंजन वनांत.

तो ज्या क्रमानें ब्रह्मप्राप्ति सुलभ करून घेतो, त्या क्रमाचें वर्म तुला सांगतों ऐक. १०१०

श्लोकार्थः—जो मनुष्य अत्यंत शुद्धबुद्धीनें युक्त होऊन, धैर्यानें आपल्या चित्ताचें नियमन करून, शब्दादिक विषय टाकून, प्रीति व अप्रीति नाहींशी करून टाकतो ॥ ५१ ॥

तर श्रीगुरूंनीं दाखविलेला मार्ग स्वीकारून विवेकरूपी तीर्थाच्या तटावर बुद्धीचा मळ धुऊन टाकतो; ११ मग ज्याप्रमाणें राहूनें ग्रासलेली चंद्राची प्रभा त्यानें सोडल्यावर ती चंद्रास आलिंगन देते, त्याप्रमाणें, बुद्धीचा शुद्धपणा—जो नानाप्रकारच्या दुर्वासनांनीं भ्रष्ट झाला होता, तो शुद्ध होऊन ती आपले मूळचे स्थितीस प्राप्त होते. १२ कुलस्त्री जशी दोन्ही कुळांचा अभिमान टाकून केवळ आपल्या प्रियपतीलाच अनुकूल असते, तशी बुद्धि ही द्वैतभावना सोडून आत्मचिंतनातच रत होते. १३ जीवाचें आवडतें असें जें ज्ञान, तें नेऊन इंद्रियांनीं ज्या शब्दादिक विषयाला थोरपणा दिला, ( प्रौढी वाढविली, ) १४ ते पंचविषय, सूर्याचे किरण नाहींतसे झाले म्हणजे मृगजळ जसें आपोआप नाहींसें होतें, तसे धैर्यानें इंद्रियांचा रोध झाला म्हणजे आपोआप नाहींतसे होतात. १५ न समजतां भ्रष्टाच्या घरचें खाल्लेलें अन्न जसें कळल्यावर ओकून टाकावें लागतें, तशा अंतःकरणांतलि विषयवासना इंद्रियांकडूनच ओकाविल्या. १६ मग अंतर्मुखवृत्तिरूपी जी शुद्ध गंगा तिच्या तीराला वृत्ति आणून स्नान घातलें. याप्रमाणें ज्यानें वृत्ति शुद्ध केली; १७ नंतर सात्त्विक धैर्यानें ती सर्व इंद्रियें शुद्ध केलीं, आणि मग मनाला योगाभ्यास करण्यास लावलें; १८ त्याचप्रमाणें, पूर्वकर्माच्या योगानें चांगले किंवा वाईट भोग प्राप्त झाले असतां वाईट भोगाविषयीं खेद करीत नाहीं; १९ अथवा सहज चांगला भोग भोगण्याचा समय आला असतां त्याविषयीं अभिलाष धरीत नाहीं; १०२० याप्रमाणें अर्जुना, इष्ट किंवा अनिष्ट भोगाविषयीं हर्ष अथवा खेद टाकून, पर्वताचे गुहेंत अथवा निरंजन वनांत वास करितो; २१

श्लोकार्थः–जो एकांतवास करणारा, मिताहारी, काया, वाचा व मन यांना स्वाधीन ठेवणारा, निरंतर ध्यानयोगांत तत्पर असणारा, आणि वैराग्याचा आश्रय करणारा असा असतो; ॥ ५२ ॥

ज्या ठिकाणीं लोकांचा गलबला नाहीं असें अरण्य पाहून त्या ठिकाणीं वस्ती करतो, तेथें समाज जर कसला असेल तर त्या एकट्याच्या अवयवसमुदायाचाच असतो; २२ इंद्रियें व मन यांचा निग्रह हीच त्याची क्रीडा, न बोलणें हेंच त्याचें बोलणें; गुरुवाक्याचे मननामुळें दुसऱ्या कशाचेंही चिंतन करण्यास त्यास वेळच फावत नाहीं; २३ आणि आपले अंगात शक्ति यावी, व क्षुधा नाहींशी व्हावी, आणि जिव्हेचे मनोरथ पूर्ण व्हावे, २४ या तिन्ही गोष्टींची भोजनप्रसंगीं जो पर्वा करीत नाहीं; आणि मिताहार करून पूर्ण संतुष्टता मिळवावी अशीही इच्छा करीत नाहीं; २५ अन्नपचन करणारा जो जठराग्नि त्याला जर कांहीं आहार दिला नाहीं, तर तो प्राणनाश करील, म्हणून

*११ लोकांच्या गडबडीनें. १२ समुदाय. १३ इंद्रियनिग्रह व मनोनिग्रह यांशींच. १४ मननामुळें, १५ वेळीं. १६ अन्नपचन. १७ जठराग्नि.*

इतुकियाचि भागु मोटकें । अशनें करी ॥२६॥ (१२३३. कायावाचामन ताब्यांत असणें, १०२७-१०३१ ) आणि परपुरुषें कामिली । कुळवधू आंग न घाली । निद्रालस्या न मोकली । आसन तसें ॥ २७ ॥ दंडवताचेनि प्रसंगें । भुयीं हन अंग लागे । वांचूनि येर नेघे । राभस्यें तेथ ॥ २८ ॥ देहनिर्वाहापुरतें । राहाटवी हातांपायातें । किंबहुना आपैतें । सबाह्य केलें ॥ २९ ॥ आणि मनाचा उंबरा । वृत्तीसी देखों नेदी वीरा । तेथ कें वाग्व्यापारा । अवकाशु असे ॥ १०३० ॥ ऐसेनि देह वाचा मानस । हे जिणोनि बाह्यप्रदेश । आकाळिलें आकाश । ध्यानाचें तेणें ॥ ३१ ॥ ( १२३४. ध्यानयोग, १०३२–१०४१ ) गुरुवाक्यें उठविला । बोधीं निश्चयो आपुला । न्याहाळीं हातीं घेतला । आरिसा जैसा ॥ ३२ ॥ पैं ध्याता आपणाचि परी । ध्यानरूप वृत्तिमाझारीं । ध्येयत्वें हे अवधारीं । ध्यानरूढी गा ॥ ३३ ॥ तेथ ध्येय ध्यान ध्याता । यया तिहीं एकरूपता । होय तंव पंडुसुता । कीजे तें गा ॥ ३४ ॥ म्हणौनि तो मुमुक्षु । आत्मज्ञानीं जाला दक्षु । परी पुढां सूनि पक्षु । योगाभ्यासाचा ॥ ३५ ॥ अपानरंध्रद्वयां- । माझारीं धनंजया । पार्ष्णीं पीडूनियां । कावरुमूळ ॥ ३६ ॥ आकुंचूनि अध । देऊनि तिन्ही बंध । करूनि एकवद । वायुभेदी ॥ ३७ ॥ कुंडलिनी जागऊनि । मध्यमा विकासूनि । आधारादि भेदूनि । आज्ञावेरी ॥ ३८ ॥ सहस्रदळाचा मेघु । पीयूषें वर्षोनि चांगु । तो मूळवरी वोघु । आणूनिया ॥ ३९ ॥ नाचतया पुण्यगिरी । चिद्भैरवाच्या खापरीं । मनपवनाची खीच धुरी । वाढूनिया ॥ १०४० ॥ जालिया योगाचा गाढा । मेळावा सूनि हा पुढां । ध्यान मागिलीकडा । स्थैर्यें केलें ॥ ४१ ॥ ( १२३५. वैराग्य, १०४२–१०४६ ) आणि ध्यान योग दोनी । इयें आत्मतत्त्वज्ञानीं । पैठी होआवया निर्विघ्नीं । आधींचि तेणें ॥ ४२ ॥ वीतरागतेसारिखा । जोडूनि ठेविला सखा । तो आघवियाचि भूमिकां । सवें चाले ॥ ४३ ॥ पहावें दिसे तंववरी । दिठीतें न संडी दीपु जरी । तरी कें आहे अवसरी । देखावया ॥ ४४ ॥ तैसें मोक्षीं प्रवर्तलया । वृत्ति ब्रह्मीं जाय लया । तंव वैराग्य आथी तया । भंगु कैंचा ॥ ४५ ॥ म्हणौनि सवैराग्यु । ज्ञानाभ्यासु तो सभाग्यु । करूनि जाला योग्यु । आत्मलाभा ॥ ४६ ॥ अवतरणः—( १२३६. मोक्ष मिळविणारा शूर; काव्यप्रतिभा, १०४७–१०४९ ) ऐसी वैराग्याची अंगीं । बाणूनिया वज्रांगी । राजयोगतुरंगीं । आरूढला

१ आहार. २ इच्छा केली. ३ अविचारानें. ४ स्वाधीन. ५ बोलणें. ६ गुद व शिश्न. ७ टाचेनें दाबून. ८ चार बोटाचा मध्य; मूळबंध. ९ मोकळा करून. १० भुंवयाच्या मध्ये असणाऱ्या आज्ञाचक्रापर्यंत. ११ मूर्ध्नि, आकाशात. १२ चैतन्यरूप भैरवाच्या. १३ खिचडा. १४ बळकट. १५ स्थापन; निश्चित. १६ प्राप्त. १७ वैराग्यासारखा १८ अवस्था. १९ उशीर. २० वज्रकवच. २१ अद्वैतबोधरूप घोड्यावर.

प्राणरक्षण होईल इतक्यापुरताच आहार करतो; २६ आणि परपुरुषानें इच्छा केली तरी कुलस्त्री जशी त्याला वश होत नाहीं, तसें निद्रेला किंवा आळसाला वश होऊन आपलें आसन ढळूं देत नाहीं; २७ ईश्वराला दंडवत करते समयीं जो जमीनीला स्पर्श होईल, त्यावांचून कधींही अविचारानें जमीनीवर निद्रेकरितां अंग टाकीत नाहीं; २८ शरीर-निर्वाहापुरता जो हातापायांचा उपयोग करितो, किंबहुना ज्यानें अंतःकरण व बाह्येंद्रियें स्वाधीन ठेविलीं आहेत, २९ आणि, अर्जुना, जो आपल्या वृत्तीला मनाच्या उंबऱ्या-पर्यंतही येऊं देत नाहीं, त्याच्या ठिकाणीं बोलणें, चालणें वगैरे व्यापारास कोठून थारा मिळणार ? १०३० अशा प्रकारें शरीर, वाणी व मन हीं सर्व जिंकून ज्यानें ध्यानाकाश स्वाधीन करून घेतलें; ३१ ज्याप्रमाणें आरसा हातीं घेतला असतां त्यांत आपलें स्वरूप स्पष्ट दिसतें, त्याप्रमाणें गुरुवाक्याच्या बोधानें ज्यानें आपल्या बोधाचा निश्चय केला आहे, ३२ तो ध्यानाचा प्रकार असा कीं, ध्यान करणारा ध्याता, त्याची जी वृत्ति ती ध्यानरूपी वृत्ति, व त्या वृत्तीनें ज्याचें ध्यान करावयाचें तें ध्येय ही त्रिपुटी आपले ठिकाणींच पाहतो; ३३ हे पांडुसुता, त्या ठिकाणीं ध्येय, ध्यान व ध्याता ही त्रिपुटी विसरून केवळ एकच रूप राही तोंपर्यंत ध्यान करावें लागतें; ३४ म्हणून तो मोक्षेच्छु आत्मज्ञानाविषयीं दक्ष होतो; परंतु योगाभ्यासाचा पक्ष पुढें करून, ३५ अर्जुना, गुद व शिश्न या दोहोंच्या मध्यभागीं पायाच्या टाचेनें दाबून मूळबंध करितो; ३६ अधोभाग संकुचित करून मूळबंध, ओढियाणाबंध, जालंधरबंध, ह्या तीन बंधांनीं वायूचे भेद मोडून एकाविध करतो; ३७ अशा प्रकारें प्राणांचा रोध झाला म्हणजे कुंडलिनी जागी होऊन मध्यमा म्हणजे सुषुम्नामार्ग मोकळा होतो; आणि आधारचक्रापासून आज्ञाचक्रापर्यंत प्राण-भेद करून उर्ध्व जातो; ३८ मग ब्रह्मरंध्रांतील सहस्रदलकमलरूपी मेघापासून अमृतवृष्टि होते, त्याचा ओघ सुषुम्ना नाडीनें मूळबंधापर्यंत येतो; ३९ मग मूर्ध्नि आकाशामध्यें चैतन्यरूपी भैरवाच्या खापरांत ( पात्रांत ) मन व वायु ह्याचा खिचडा वाढतो; १०४० अशा प्रकारें हा योगसाधनांचा बळकट मेळावा पुढें करून त्याचे मागें ध्यान निश्चित करतो; ४१ आणखी, ध्यान व योग हे दोन्ही निर्विघ्नपणें आत्मतत्त्वज्ञानाच्या ठिकाणीं प्राप्त होण्याचे अगोदरच ४२ जो वैराग्यासारखा परममित्र जोडून ठेवलेला असतो, तो, ज्या ज्या भूमिकेवर साधक प्राप्त होईल, तेथें तेथें त्याजबरोबर असतो. ४३ आपल्याला जें पाहावयाचें आहे, तें दिसलें नाहीं तोंपर्यंत जर दिव्याची सोबत आहे, तर मग पाह-ण्यास काय उशीर ? ४४ त्याप्रमाणें, मोक्षप्राप्ति व्हावी म्हणून प्रवृत्त झालेल्या साधकास त्याची वृत्ती ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणीं लय पावे तोंपर्यंत जर वैराग्याची सोबत आहे, तर त्याच्या मोक्षप्राप्तीस भंग कसा होईल ? ४५ म्हणून, वैराग्ययुक्त ज्ञानाचा अभ्यास कर-णारा जो भाग्यवान पुरुष, तो आत्मलाभाला योग्य होतो; ४६ असें वैराग्याचें वज्रकवच अंगांत घालून जो राजयोगरूप घोड्यावर स्वार होतो; ४७ मग लहानमोठें जें दृष्टीस

॥ ४७ ॥ वरी आडपडिलें दिठी । सानें थोर निर्वेटी । तें बळी विवेकमुष्टीं । ध्यानाचें खांडें ॥ ४८ ॥ ऐसेनि संसाररणाआंतु । आंधारीं सूर्यु तैसा असे जातु । मोक्षविजयश्रिये वरैतुं । होआवयालागीं ॥ ४९ ॥

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।
विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥

अन्वयः—अहंकारं, बलं, दर्पं, कामं, क्रोधं च परिग्रहं विमुच्य निर्ममः, शान्तः सः नरः ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥

( १२३७. अहंकार शत्रु, १०५०-१०५२ ) तेथ आडवाया आले । दोषवैरी जे धोपटिले । तयांमाजीं पहिले । देहाहंकारु ॥ १०५० ॥ जो नैं मोकली मारूनी । जीवीं नेदी उपनवोनी । विचंवेंवी खोडां घालूनी । हाडांचिया ॥ ५१ ॥ तयाचा देहदुर्ग हा थारा । मोडोनि घेतला तो वीरा । आणि बळ हा दुसरा । मारिला वैरी ॥ ५२ ॥ ( १२६८. बल–शत्रु. १०५३-१०५४ ) जो विषयाचेनि नांवें । चौगुणेंही वरी थांवे । जेणें मृतावस्था धांवे । सर्वत्र जगा ॥५३॥ तो विषय विषयां अंथावो । आघविया दोषांचा रावो । परी ध्यानखड्गाचा घावो । साहेल कैंचा ॥५४॥ ( १२३९. दर्पशत्रु, १०५५--१०५७ ) आणि प्रिय विषयप्राप्ति । करी जय सुखाची व्यक्ति । तेचि घालूनि कुंथी । आंगीं जो वाजे ॥५५॥ जो सन्मार्गा भुलवी । मग अधर्माच्या आडवीं । सूनि वाघां सांपडवी । नरकादिकां ॥५६॥ तो विश्वासें मारितां रिपु । निवटूनि घातला दर्पु । आणि जयाचा अहा कंपु । तापसांसी ॥५७॥ ( १२४०. कामक्रोध-शत्रु, १०५८–१०६१ ) क्रोधा ऐसा महादोखु । जयाचा देख पैरिपाकु । भरिजे तंव अधिकु । रिता होय जो ॥ ५८ ॥ तो कामु कोणेच ठायीं । नसे ऐसें केलें पाहीं । कीं तेंचि क्रोधाही । सहजें आलें ॥ ५९ ॥ मुळाचें तोडणें जैसें । होय कां शाखोद्देशें । कामु नासिलेनि नासे । तैसा क्रोधु ॥ १०६० ॥ म्हणौनि काम वैरी । जाला जेथ ठौंणोरी । तेथ सरली वारी । क्रोधाचीही ॥ ६१ ॥ ( १२४१. परिग्रह, १०६२–१०६६ ) आणि समर्थु आपला खोडा । शिसें वाहवी जैसा होडों । तैसा भुंजोनि जो गाढा । परिग्रेहो ॥ ६२ ॥ जो माथांचि पैंलाणवी । अंगा अवगुण घोलवी । जीवें दांडी घेववी । ममत्वाची ॥ ६३ ॥ शिष्यशाखादिविलासें । मठादिमुद्रेचेनि मिसें । घातले आहाती फांसे । निःसंगा जेणें ॥ ६४ ॥ घरीं कुटुंबपणें सरे । तरी वनीं वैन्य होउनी अवतरे । नागवीयाही शरीरें । लागला आहे ॥ ६५ ॥ ऐसा दुर्जयो जो परिग्रहो । तयाचा

१ निवारण करी. २ खड्ग. ३ वर; भर्ता. ४ सोडीत नाहीं. ५ कुचंबवितो; दुःख देतो. ६ मळावे. ७ डोह. ८ खोल. ९ रानात. १० विश्वासघातकी. ११ गर्व. १२ थरकांप. १३ परिणाम. १४ ठार मारला. १५ प्रतिशेनें. १६ स्फुरण पावून. १७ संग. १८ हालवून. १९ उत्पन्न करितो. २०. काठी, अभिमान. २१ चिन्हांनीं. २२ वनातील वस्तूंवर प्रेम करवून.

पडेल, त्याचें निवारण करण्याकरितां विवेकरूपी मुठींत ध्यानरूपी बळकट खड्ग घेतो; ४८ आणि अशा प्रकारें, सूर्य जसा अंधारांत निःशंकपणें शिरतो, तसा जो मोक्षरूपी विजयश्रीला वरण्याकरितां संसाररूपी रणात निःशंकपणें शिरतो, ४९

श्लोकार्थः—आणि जो मनुष्य अहंकार, सामर्थ्य, उन्मत्तपणा, काम, क्रोध व संग्रह या विकाराना टाकून ममतारहित होऊन शांत असतो तो मनुष्य ब्रह्मरूप होण्यास योग्य होतो ॥ ५३ ॥

त्या ठिकाणीं त्याला आडविण्याकरितां आलेले जे दोषरूपी वैरी तो मारतो. त्यापैकीं पहिला वैरी 'देहाहंकार' हा होय. १०५० जो अहंकार मनुष्याला मारून सोडीत नाहीं, व उत्पन्न करून जगूं देत नाहीं, तर देहाच्या सांपळ्यांत घालून कुचंबवीत ठेवितो, ५१ त्या अहंकाराचें राहण्याचें ठिकाण जो देहरूप किल्ला, तो फोडून हस्तगत करून घेतो आणि त्याचप्रमाणें अर्जुना, 'बल' हा जो दुसरा वैरी, त्याचाही नाश करितो. ५२ जो बलरूप शत्रु विषयांचें नांव ऐकल्याबरोबर चौपट वाढून सर्व जगाला विषयांशिवाय इतर वस्तूंचे भान राहूं देत नाहीं, ५३ तो बलरूपी शत्रु विषयरूपी विषाचा केवळ डोह असून, सर्व दोषाचा राजा आहे; पण त्याला ध्यानरूपी खड्गाचा घाव कसा सहन होईल? ५४ आणि प्रिय विषयांची प्राप्ति झाली असतां ज्याला परम आनंद होतो व त्याच आनंदानें जो जिवाला आच्छादन करतो; ५५ जो सन्मार्गाविषयीं भूल पाडून व अधर्माच्या रानांत घालून नरकादिरूप वाघाच्या तावडींत देतो, ५६ असा जो विश्वासघातकी 'गर्वरूप' शत्रु, तो मारून टाकतो, आणि ज्याला भिऊन तापसी लोक थरथर कांपतात; ५७ भयंकर क्रोध हा ज्याचा परिणाम होय आणि जों जों लाड पुरवावे तों तों जो अधिकाधिक वाढतो, ५८ असा जो 'काम' त्याचा नायनाट केल्यावर क्रोधाचीही सहज तीच वाट होते. ५९ झाडाचें मूळ तोडून टाकलें म्हणजे खांद्यांचा नाश जसा आपोआप होतो, तसा कामाचा नाश केला म्हणजे क्रोधाचा नाश सहज होतो. १०६० म्हणून 'काम' शत्रु मारून टाकला म्हणजे क्रोधाचें येणें जाणें सहज चुकतें ६१ आणि राजा जसा प्रतिज्ञेनें आपला खोडा ज्याला घालावयाचा असेल त्याचेच डोक्यावर देऊन तो नेववितो, तसा 'परिग्रह' शत्रु मनुष्याचे मनांत स्फुरण करितो. ६२ जो परिग्रह वैराग्यशीलाचें नाव ऐकल्याबरोबर डोकें हालवून त्या वैराग्यशील पुरुषाचे अंगांत संचार करून अवगुण उत्पन्न करतो, व 'हें माझें' अशा अभिमानात त्याला गुंतवितो; ६३ ज्या परिग्रहानें, 'हा मठ माझा आहे' 'हे शिष्य माझे' 'हे ग्रंथ माझे' या चिन्हांनीं वैराग्यशील पुरुषास पाशांत घातलें आहे; ६४ वैराग्यशील पुरुष हा कुटुंबादि संसाराचा त्याग करून वनांत गेला तरी त्याजकडून जो परिग्रह तेथील पदार्थांवर ममत्व ठेववितो; सारांश, अगदीं नागवा उघडा असला तरी त्याला आपल्या पाशांत गुंतवितो; ६५ असा जो आजिंक्य शत्रु परिग्रह, त्याचा ठावाठिकाण नाहींसा करून जो पुरुष संसार जिंकल्याचा आनंद भोगतो, ६६ त्याच्या भेटीला, ज्ञानगुणाचे

फेडूनि ठावो । भवविजयाचा उत्साहो । भोगीतसे जो ॥ ६६ ॥ ( १२४२. मुमुक्षला ब्रह्मपदावर बसविण्याकरितां मांडलिक राजे सामोरे येतात व पट्टाभिषेक करण्याकरितां नेतात, १०६७–१०७५ ) तेथ अमानित्वादि आघवे । ज्ञानगुणाचे जे मेळावे । ते कैवल्यदेशींचे आघवे । राव जैसे आले ॥ ६७ ॥ तेव्हां सम्यक्ज्ञानाचिया । राणिवा उगाणूनि तया । परिवारु होऊनिया । राहतां आंगें ॥ ६८ ॥ प्रवृत्तीचिये राजबिदीं । अवस्थाभेद–प्रमेंदीं । कीजत आहे प्रतिपदीं । सुखाचें लोण ॥ ६९ ॥ पुढां बोधाचिये कांबीवरी । विवेकु दृश्याची भांदी सारी । योगभूमिका आरती करी । येती जैसिया ॥ १०७० ॥ तेथ ऋद्धिसिद्धींचीं अनेगें । वृंदें मिळती प्रसंगें । तिये पुष्पवर्षीं आंगें । नाहातसे तो ॥ ७१ ॥ ऐसेनि ब्रह्मैक्यासारिखें । स्वराज्य येतां जवळिकें । झळंबित आहे हरिखें । तिन्ही लोक ॥ ७२ ॥ तेव्हां वैरिया कां मैत्रिया । तयासि माझें म्हणावया । समानता धनंजया । उरेचिही ना ॥ ७३ ॥ हें ना भलतेणें व्याजें । तो जयातें म्हणे माझें । ते नोडवेचि कां दुजें । अद्वितीय जाला ॥ ७४ ॥ पैं आपुलिया एकी सत्ता । सर्वेही कवळूनियां पंडुसुता । कहीं न लगती ममता । धेंडिली तेणें ॥ ७५ ॥ ( १२४३. शांतिप्राप्ति, १०७६–१०८६ ) ऐसा जिंतिलिया रिपुवर्ग । अपमानिलिया हें जग । अपैसा योगतुरंग । स्थिर जाला ॥ ७६ ॥ वैराग्याचे गाढलें । अंगत्राण होतें भलें । तेंही नावेक ढिलें । तेव्हां करी ॥ ७७ ॥ आणि निवटी ध्यानाचें खाडें । तें दुजें नाहींचि पुढें । म्हणूनि हातु मौंसुडे । वृत्तीचाही ॥ ७८ ॥ जैसें रसौषध खरें । आपुलें काज करूनि पुरें । आपणही नुरे । तैसें होतसे ॥ ७९ ॥ देखोनि ठाकिता ठावो । धांवता थिरावे पावो । तैसा ब्रह्मसामीप्यें थांवो । अभ्यासु सांडी ॥१०८०॥ घडतां महोदधीसी । गंगा वेगु सांडी जैसी । कां कामिनी कांतापासीं । स्थिर होय ॥ ८१ ॥ ना ना फळतिये वेळे । केळीची वाढी मांटुळे[१७] । कां गांवापुढें वळे । मार्गु जैसा ॥ ८२ ॥ तैसा आत्मसाक्षात्कारु । होईल देखोनि गोचरु । ऐसा साधनहतियेरु[१८] । हळुचि ठेवी ॥ ८३ ॥ म्हणौनि ब्रह्मेंसी तया । ऐक्याचा सैंमो धनंजया । होतसे तैं उपाया । वोहटु पडे ॥ ८४ ॥ मग वैराग्याची गोंधळुंक । जे ज्ञानाभ्यासाचे वार्धक्य । योगफळाचाही परिपाक । दशा जे कां ॥ ८५ ॥ ते शांति पैं गा सुभगा । संपूर्ण ये तयाचिया आंगा । तैं ब्रह्म होआवया जोगा । होय तो पुरुषु ॥ ८६ ॥ ( १२४४. ब्रह्म व ब्रह्म होणारा यामधील अंतर, १०८७- १०९० ) पुनवेहुनी चतुर्दशी । जेतुलें उणेपण शशी । कां सोळयाहूनि

१ अर्पण करून. २ राजमार्गांनें. ३ त्रिपानीं. ४ पदोपदीं. ५ गर्दी. ६ मोडतो. ७ पुष्पवृष्टीनें. ८ मिमित्तानें. ९ अवकाश नसल्यामुळें. १० त्याग होतो. ११ योगरूपी घोडा. १२ बळ फट. १३ कवच. १४ उगारलेला हात खालीं येतो. १५ रसायन. १६ थांबतो. १७ खुंटते.

अमानित्वादिक समुदाय हेच कोणी मोक्षरूपी देशाचे मांडलिक राजे येतात, ६७ तेव्हां यथार्थ ज्ञान हेंच सार्वभौम राज्य त्या साधकाला अर्पण करून आपण त्याचे परिवार होऊन राहतात. ६८ प्रवृत्तिरूपी राजमार्गानें त्याची स्वारी चालली असतां तीन अवस्थारूपी स्त्रिया येऊन त्याच्यावरून पदोपदीं आपल्या सुखाचें लिंबलोण करून टाकतात. ६९ त्या सार्वभौम राजाच्या पुढें विवेकरूपी चोपदार बोधरूप सोन्याची काठी हातांत घेऊन दृश्य पदार्थांची गर्दी मोडीत चालतो. आणि योगभूमिका जणूं काय आरत्याच घेऊन त्यास ओंवाळण्यास येतात. १०७० तेव्हां ऋद्धिसिद्धींचे अनेक समुदाय मिळून त्या प्रसंगीं त्यांनीं केलेल्या पुष्पवृष्टीच्या योगानें तो नाहातो. ७१ अशा प्रकारें ब्रह्मैक्यरूप स्वराज्य प्राप्त होण्याची वेळ जों जों जवळ येते, तों तों त्याला त्रैलोक्य हर्षानें भरलेलें दिसतें. ७२ त्या वेळीं अर्जुना, हा आपला वैरी आहे, किंवा हा आपला मित्र आहे म्हणून हा माझाच आहे, असें म्हणावयास त्यास सेमानता उरतच नाहीं; ७३ इतकेंच नव्हे, तर तो ज्याला 'माझें' असें म्हणेल असें दुसरें कांहींच नसतें. कारण, तो अद्वितीय झालेला असतो. ( द्वैतच नष्ट झाल्यावर दुसरें कांहीं कोठें शिल्लक राहणार ? ) ७४ हें बघ अर्जुना, आपल्या त्या एक सत्तेनें सर्व विश्व व्यापून टाकल्यावर 'माझें' असें म्हणण्यास अवकाश नसल्यामुळें ममतेचा त्याग होतो. ७५ याप्रमाणें सर्व रिपुवर्ग जिंकून, सर्व जगत् मीच आहें असें समजल्यामुळें, योगरूपी घोड्याची धाव आपोआप बंद होते; ७६ आणि मग अंगांत जें वैराग्याचें बळकट कवच घातलेलें असतें, तेंही तो त्या वेळीं क्षणभर सैल करतो. ७७ आणखी, ध्यानखड्गाच्या योगें ज्याचा नाश होतो असें कांहींच नसल्यामुळें, तें धारण करणाऱ्या वृत्तीचाही हात आसडून खालीं येतो. ७८ जसें एखादें खरें रसायन असतें, तें रोगाचा नाश करून आपणही नाहींसें होतें, तशी याची स्थिति होते. ७९ किंवा मुक्कामाचें ठिकाण पाहिल्याबरोबर जसें धावणें थांबतें, तसें ब्रह्मप्राप्ति झाल्याबरोबर अभ्यास आपोआप राहतात. १०८० गंगा समुद्रास मिळाल्यावर आपला वेग जसा टाकते, किंवा कामिनी स्त्री आपला पति भेटला म्हणजे जशी शांत होते; ८१ अथवा केळ व्याली म्हणजे तिची वाढ खुंटते, किंवा गांव येतांच ज्याप्रमाणें मार्ग संपतो, ८२ त्याप्रमाणें, आपल्याला आत्मसाक्षात्कार होईल असें दृष्टीस पडतांच तो साधनरूपी हत्यारें हातांतून हळूच खालीं ठेवतो. ८३ म्हणून अर्जुना, ब्रह्माशीं ऐक्य होण्याचे वेळेस त्याचे सर्व उपाय मागें फिरतात. ८४ वैराग्यरूपी गोंधळीक लग्नाची वेळ, किंवा ज्ञानरूपी अभ्यासाचें वृद्धपण, अथवा योगरूप फळाची परिपक्व दशा, ८५ अशी जी शांति, ती, अर्जुना, त्याचे ठिकाणीं संपूर्ण प्राप्त होते, तेव्हां तो पुरुष ब्रह्म होण्यास अधिकारी होतो. ८६ पुनवेपेक्षां चतुर्दशीचे दिवशीं जितका चंद्राच्या कलेंत उणेपणा असतो, किंवा सोळा आणे कसापेक्षां पंधरा आणे कसांत जितकी कमतरता आहे; ८७ जसा सागरांत गंगेनें प्रवेश केल्यावरही तिचा वेग

८ हत्यार. १९ समप. २० गोंधळीक ( गोरज ) लग्नाची वेळ. २१ सुंदरा.

जैसी । पंधरावी वांनी ॥ ८७ ॥ सागरींही पाणी वेगें । संचरे तें रूप गंगे । येर निश्चळ जें उगें । तें समुद्र जैसा ॥ ८८ ॥ ब्रह्म आणि ब्रह्महोतिये । योग्यते तैसा पाडु आहे । तेंचि शांतीचेनि लवलाहें । होय तें गा ॥ ८९ ॥ पैं तेंचि होणेनवीण। प्रतीती आलें जें ब्रह्मपण । ते ब्रह्म होती जाण । योग्यता येथ ॥ १०९० ॥

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।
समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥

अन्वयः—( सः ) ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा ( सन् ) न शोचति च न कांक्षति; सर्वेषु समः भूत्वा परां मद्भक्तिं लभते ॥ ५४ ॥

( १२४५. प्रसन्न अंतःकरण, १०९१–१०९५ ) ते ब्रह्मभावयोग्यता । पुरुषु तो मग पंडुसुता । आत्मबोधप्रसन्नता- । पदीं बैसे ॥ ९१ ॥ जेणें निपजे रससोय । तो तापुही जैं जाय । तैं ते[1]कां होय । प्रसन्नें जैसी ॥ ९२ ॥ ना ना भरतिया लगबगा । शरत्काळीं सांडिजे गंगा । कां गीत राहतां उपांगा[2] । वोहट्ट पडे ॥ ९३ ॥ तैसा आत्मबोधीं उद्यमु । करितां होय जो श्रमु । तोही तेथें समु । होऊनि जाय ॥ ९४ ॥ आत्मबोधप्रशंस्ति । हे तिये दशेची ख्याति । ते भोगीतसे महामति । योग्य तो गा ॥ ९५ ॥ ( १२४६. शोक व इच्छा रहित, १०९६ ) तेव्हां आत्मत्वें शोचावें । कांहीं पावावया कामावें । हें सरलें समभावें । भरितें तया ॥ ९६ ॥ ( १२४७. समत्वबुद्धीनें श्रेष्ठ भक्ति मिळवितो, १०९७-११११ ) उदया येतां गभास्ति । नाना नक्षत्रव्यक्ति । हारवीजती दीप्ति । आंगिका जेवीं ॥९७॥ तेंवी उठतिया आत्मप्रथा । हे भूतभेदव्यवस्था । मोडीत मोडीत पार्था । वासि पाहे तो ॥ ९८ ॥ पाटियेवरील अक्षरें । जैसीं पुसता येती करें । तैसीं हारपती भेदांतरें । तयाचिये दृष्टी ॥ ९९ ॥ तैसेनि अन्यथाज्ञानें । जियें घेपती जागरस्वप्नें । तियें दोन्ही केलीं लीनें । अव्यक्तामाजी ॥ ११०० ॥ मग तेंही अव्यक्त । बोध वाढतां झिजत । पुरला बोधीं समस्त । बुडोनि जाय ॥ १ ॥ जैसी भोजनाच्या व्यापारीं । क्षुधा जिरत जाय अवधारीं । मग तृप्तीच्या अवसरीं । नाहींच होय ॥ २ ॥ नाना चालीचिया वाढी । वाट होत जाय थोडी । मग पातला ठायीं बुडी । देऊनि निमे ॥ ३ ॥ कां जागृति जंव जंव उद्दीपे । तंव तंव निद्रा हारपे । मग जागीन्नलिया स्वरूपें । नाहींच होय ॥ ४ ॥ हें ना आपुलें पूर्णत्व भेटे । जेथ चंद्रासी वाढी खुंटे । तेथ शुक्लपक्षु आटे । निःशेषु जैसा ॥ ५ ॥ तैसा बोध्यजात गिळितु । बोधबोधें ये मजआंतु । मिसळला तेथ सायंतु । अबोधु गेला ॥ ६ ॥ तेव्हां कल्पांताचिये वेळे । नदी सिंधूचें पेंडवळें । मोडूनि भरलें जळें । आब्रह्म जैसें ॥७॥

१ कष्ट. २ त्वरेनें. ३ अन्न. ४ समाधानकारक. ५ मृदंग; तंबुरा वगैरे. ६ प्रसन्नता. ७ आत्मानुभव. ८ दृष्टि. ९ पूर्ण बोधाचे ठिकाणीं. १० मर्यादा; भेद.

जेथपर्यंत दृष्टीस पडतो ती गंगा, व जेथें तो वेग थांबतो तो समुद्र; ८८ तसें ब्रह्म व ब्रह्म होणारा यांत अंतर असतें. तें अंतर शांतीच्या योगें लागलीच नाहींसें होतें. ८९ परंतु तद्रूप न होतां ब्रह्माला जे वेगळेपणानें जाणतात, तेच ब्रह्म होण्याची योग्यता पावतात. १०९०

श्लोकार्थः—आणि तो ब्रह्मरूप झालेला प्रसन्न अंतःकरण होऊन कशाचा शोक करीत नाहीं, व कशाची इच्छा करीत नाहीं; तर सर्व भूतांच्या ठिकाणीं समबुद्धि ठेवून माझी परमभक्ति प्राप्त करून घेतो ॥ ५४ ॥

अर्जुना, ती ब्रह्मभावाची योग्यता असलेला पुरुष मग आत्मबोधप्रसन्नतेच्या पदावर बसतो. ९१ ज्या अग्नीच्या योगें स्वयंपाक तयार होतो, त्या अग्नीची त्या स्वयंपाकामधील ( पदार्थांमधील ) उष्णता ( कढतपणा ) जेव्हां नाहींशी होते, तेव्हांच जसें तें अन्न समाधानकारक होतें; ९२ अथवा ज्याप्रमाणें शरदृतु लागला म्हणजे वर्षाकालांत दररोज येणारी भरती व ओहोटी ही गंगेची लगबग जाऊन गंगा स्थिर होते; किंवा गाण्याचा समारंभ संपला म्हणजे उपांगें ( मृदंग, तंबुरा वगैरे ) बंद होऊन मागें केवळ वाहवा मात्र उरते, ९३ त्याप्रमाणें, आत्मज्ञानप्राप्तीविषयीं जे श्रम केले होते, त्यांचेंही ज्या प्रसन्न स्थितीच्या ठिकाणीं ऐक्य होऊन जातें; ( परिहार होतो; ) ९४ ( जेथें श्रमाचीही आठवण राहत नाहीं ), त्या स्थितीला आत्मज्ञानाची प्रसन्नता असें म्हणतात. अर्जुना, ती स्थिति तो योग्य झालेला पुरुष भोगितो. ९५ तेव्हां ऐक्यभावाचें भरतें आल्यामुळें, अमुक एक वस्तु माझी आहे म्हणून तिच्याकरतां शोक करावा, अथवा कांहीं प्राप्त व्हावें म्हणून इच्छा करावी, या दोन्ही गोष्टी आपोआप राहतात. ९६ सूर्य उगवल्यावर सर्व नक्षत्रें हीं आपल्या अंगचें तेज हारवितात; ९७ त्याप्रमाणें अर्जुना, आत्मप्रथा ( आत्मानुभव ) प्राप्त झाली म्हणजे भूतांचे ठिकाणीं जिकडे जिकडे पाहील तिकडे तिकडे भेदभाव मोडत मोडत नाहींसा होतो. ९८ पाटीवरील लिहिलेलीं अक्षरें जशीं हातानें पुसतां येतात, तसें याच्या दृष्टीनें सर्व भेद व द्वैत नाहींसें होतें. ९९ त्यायोगें, जागृति व स्वप्न या दोन अवस्थामधील जीं विपरीत ज्ञानें आहेत, तीं दोन्ही ज्ञानें अज्ञानामध्यें लीन होतात. ११०० मग, अन्यथा ज्ञानाला कारण जें अज्ञान, तेंही आत्मबोध वाढल्यावर जिरत जिरत पूर्ण बोधाचे ठिकाणीं सर्व नाहींसें होतें. १ भोजनास आरंभ केला म्हणजे जशी प्रत्येक घासानें भूक कमी कमी होत जाऊन शेवटच्या घासानें तृप्ति झाली म्हणजे भूक अगदींच नाहींशी होते; २ अथवा चालण्याचे श्रमानें वाट कमी होतां होतां मुक्कामास गेलें म्हणजे सर्व वाट चालण्याचें सरतें; ३ किंवा मनुष्य जों जों हळू हळू जागा होत जातो तों तों झोंप कमी कमी होते व पूर्ण जागा झाला म्हणजे निद्रा संपूर्ण नाहींशी होते; ४ अथवा पौर्णिमेच्या दिवशीं पूर्ण कला प्राप्त झाली म्हणजे चंद्राची वाढ खुंटून शुक्ल पक्ष नाहींसा होतो; ५ त्याप्रमाणें बोध्य नाहींसें होता होता पूर्णबोधाचे ठिकाणीं बोधपणाही जेव्हां समभागप्रत ऐक्य पावतो, त्या वेळेस सर्व अज्ञान नाहींसें होतें. ६ कल्पांतसमयीं सर्व जलमय होतें, ते वेळेस समुद्र

ना ना गेलिया घट मठ । आकाश ठाके एकवट । कां जळोनि काष्ठें काष्ठ । वन्हिचि होय ॥ ८ ॥ नातरि लेणियांचे ठसे । आटोनि गेलिया मुसे । नामरूपभेदें जैसें । सांडिजे सोनें ॥ ९ ॥ हेंही असो चेइलया । हें स्वप्न नाहीं जालया । मग आपणचि आपणयां । उरिजे जैसें ॥ १११० ॥ तैसी मी एकवांचूनि कांहीं । तया तयाहीसकट नाहीं । हे चौथी भक्ति पाहीं । माझी तो लाहे ॥ ११ ॥
( १२४८. सहज प्रकाशाला भक्ति म्हणतात; काव्यप्रतिभा, १११२–११२९ )
येर आर्त जिज्ञासु अर्थार्थी । हे भजती जिये पंथीं । ते तिन्ही पावोनी चौथी । म्हणिपत आहे ॥ १२ ॥ येरवीं तिजी ना चौथी । हे पहिली ना सरती । पैं माझिये सहजास्थिती । भक्ति नाम ॥१३॥ जें नेणणें माझें प्रकाशूनि । अन्यथात्वें मातें दाऊनि । सर्वही सर्वीं भजौनि । बुझावीतसे ॥१४॥ जो जेथ जैसें पाहों बैसे । तया तेथ तैसेंचि असे । हें उजियेडें का दिसे । अखंडें जेणें ॥ १५ ॥ स्वप्नाचें दिसणें न दिसणें । जैसें आपलेनि असलेपणें । विश्वाचें आहे नाहीं जेणें । प्रकाशें तैसें ॥१६॥ ऐसा हा सहज माझा । प्रकाशु जो कपिध्वजा । तो भक्ति या वोजा । बोलिजे गा ॥ १७ ॥ म्हणौनि आर्ताच्या ठायीं । हे आर्ति होऊनि पाहीं । अपेक्षणीय जें कांहीं । तें मीचि केला ॥ १८ ॥ जिज्ञासूपुढां वीरेशा । हेचि होऊनि जिज्ञासा । मी कां जिज्ञासु ऐसा । दाखविला ॥ १९ ॥ हेचि होऊनि अर्थना । मीचि माझ्या अर्थीं अर्जुना । करूनि अर्थाभिधाना । आणी मातें ॥ ११२० ॥ एवं घेऊनि अज्ञानातें । माझी भक्ति जे हे वर्ते । ते दावी मज द्रष्टयातें । दृश्य करूनि ॥ २१ ॥ येथें मुखाचि दिसे मुखें । या बोला कांहीं न चुके । परी दुजेपण हें लटिकें । आरिसा करी ॥२२॥ दिठी चंद्रचि घे साचें । परि येतुलें हें तिमिराचें । जे एकाचि असे तयाचे । दोनी दावी ॥ २३ ॥ तैसा सर्वत्र मीचि मियां । घेपतसें भक्ती इया । परि दृश्यत्व हें वायां । अज्ञानवशें ॥२४॥ तें अज्ञान आतां फिटलें । माझें द्रष्टृत्व मज भेटलें । निजाबिंबीं एकवटलें । प्रतिबिंब जैसें ॥२५॥ पैं जेव्हांही असे किडाळ । तेव्हांही सोनेंचि अढळ । परि तें कीड गेलिया केवळ । उरे जैसें ॥ २६ ॥ हां गा पूर्णिमे आधीं कायी । चंद्रु सावयव नाहीं । परि तिये दिवसीं भेटे पाहीं । पूर्णता तया ॥ २७ ॥ तैसा मीचि ज्ञानद्वारें । दिसे परि हेंस्तांतरें । मग द्रष्टृत्व तें सरे । मियांचि मी लाभें ॥२८॥ म्हणौनि दृश्यपथा । अतीतु माझा पार्था । भक्तियोगु चवथा । म्हणितला गा ॥ २९ ॥

भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।
ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥ ५५ ॥

१ इच्छा करण्यास योग्य. २ सर्वांशी. ३ भिन्नपणा. ४ सर्वव्यापकपणा. ५ उपाधीच्या योगानें. ६ उपाधि. ७ पलीकडचा.

व नदी हे भेद मोडून आब्रह्मस्तंबपर्यंत जसें जलच होतें, ७ किंवा घटमठादि उपाधि गेल्या म्हणजे मग एकदम एक आकाशच राहतें, अथवा काष्ठमात्र नाहींसें झालें म्हणजे केवळ अग्नि मात्र उरतो, ८ अथवा अनेक प्रकारचे डागिने मुशींत घालून आटले म्हणजे डागिन्यांचें नांव व आकार नष्ट होऊन केवळ सुवर्ण मात्र उरतें, ९ हें असो, मनुष्य जागा झाला म्हणजे स्वप्न नाहींसें होतें, आणि मग केवळ आपण मात्र उरतो, १११० त्याप्रमाणें एका मजवाचून त्याच्यासुद्धां त्या पुरुषाला भेद उरत नाहीं. त्या स्थितीला चौथी भक्ति ( ज्ञानी ) म्हणतात, ती त्यास प्राप्त होते. ११ दुसरे आर्त, जिज्ञासु आणि अर्थार्थी हे भेद आहेत, म्हणून ते पाहून हिला चौथी भक्ति असें नांव आलें. १२ बाकी पहिली, दुसरी, तिसरी व चौथी असें कांहींच हिला म्हणतां येत नाहीं. परंतु केवळ माझी जी सहजस्थिति, तिलाच भक्ति असें म्हणतात. १३ जी भक्ति अज्ञानाला प्रकाशित करून मलाच विपरीत भाव दाखवून सर्व लोकांकडून माझी भक्ति करून समजावीत असते; १४ जो भक्त ज्या ठिकाणीं जशी कल्पना करून पाहील, त्याला तेथें तशीच दिसते, हें ज्या अखंड प्रकाशानें भासतें, १५ ज्याप्रमाणें आपण असल्यामुळें स्वप्नाचा आहेपणा व नाहींपणा भासतो, त्याप्रमाणें विश्वाचा उदय व लोप ज्या प्रकाशानें होतो; १६ हे कपिध्वजा, असा जो माझा सहज प्रकाश आहे, त्यालाच उत्तम भक्ति असें म्हणतात. १७ म्हणून, आर्त भक्तांच्या ठायीं ' आर्ति ' आपणच होऊन, ज्या पदार्थाची अपेक्षा केली, तो पदार्थही ती भक्तिच बनते, १८ त्याचप्रमाणें अर्जुना, जिज्ञासु भक्ताच्या पुढें जाणण्याची इच्छा व जाणणें हीं दोन्ही आपणच बनते; १९ अर्जुना, हीच भक्ति आपणच अर्थ, अर्थप्राप्तीचें साधन व अर्थप्राप्तीची इच्छा करणारा अशी त्रिपुटी होऊन मलाच अर्थ या नांवाला आणते. ११२० अशा प्रकारें अज्ञानाला घेऊन जी माझी भक्ति वागते, ती मी जो पाहणारा त्या मला पाहण्याची वस्तु बनविते; २१ आरशांत आपलें स्वरूप पाहिल्यावरच त्याचें प्रतिबिंब दिसतें यांत कांहीं शंका नाहीं; परंतु मिथ्या दुजेपण ( एक मुखाचीं दोन मुखें दिसणें ) हें आरसा करितो, २२ दृष्टीनें चंद्रच दिसतो हें खरें; परंतु एका चंद्राचे दोन चंद्र दिसणें हें डोळ्यामध्यें ' तिमिर ' नांवाचा रोग असल्यामुळेंच होतें; २३ त्याचप्रमाणें, या भक्तीच्या योगें मीच मी आपल्याला सर्वत्र प्रतीत होतों; परंतु दृश्यच जें आहे, ते मिथ्या असून, अज्ञानाच्या उपाधीनें होतें. २४ तें भेद दाखविणारें अज्ञान या भक्तियोगानें नाहींसें होऊन, ज्याप्रमाणें उपाधीचा नाश झाल्यावर प्रतिबिंब आपले स्वरूपांत ऐक्य पावतें, त्याप्रमाणें माझें द्रष्टृत्व मला भेटलें. ( माझे ठिकाणींच लीन झालें ). २५ हें बघ, ज्या वेळीं सोन्यांत किडाळ मिसळलेलें असतें, त्या वेळीं देखील सोनेंच अढळ असते; परंतु तें हीण काढून टाकल्यावर जसें शुद्ध सोनें उरतें; २६ अरे, पौर्णिमेच्या अगोदर चंद्र संपूर्ण नाहीं कीं काय ? पण त्या दिवशीं जशी त्याची पूर्णता त्याला भेटते, २७ तसा मीच वृत्तिज्ञानद्वारें दिसतों, परंतु त्यांत द्रष्टृत्वरूप भेद असतो; तेंच द्रष्टृत्व नाहींसें झालें म्हणजे माझा मीच मला प्राप्त होतों. २८ म्हणून पार्था, माझा जो चौथा भक्तियोग आहे, तो दृश्यमार्गाहून भिन्न आहे. २९

श्लोकार्थः—आणि तो मी जेवढा आणि जसा आहें, त्या मला भक्तीच्या योगानें यथार्थ जाणतो, व मला यथार्थ जाणल्यावर तो मद्रूप होतो ॥ ५५ ॥

अन्वयः—( किं च ) यावान् यः च अस्मि, तं मा तत्त्वतः भक्त्या अभिजानाति, तत तत्त्वतः मा ज्ञात्वा तदनंतरम् ( मा ) विशते. ॥ ५५ ॥

( १२४९. ज्ञानरूप भक्ति, ११३०--११३३ ) इया ज्ञानभक्ती सहज । भक्त एकवटला मज । तो मीचि केवळ हें तुज । श्रुतही आहे ॥११३०॥ जे उभऊनिय भुजा । ज्ञानिया आत्मा माझा । हें बोलिलों कपिध्वजा । सप्तमाध्यायीं ॥ ३१ ॥ ते ह कैल्पादि भक्ति मियां । श्रीभागवतमिषें ब्रह्मया । उत्तम म्हणौनि धनंजया । उपदेशिली ॥ ३२ ॥ ज्ञानी इयेतें स्वसंवित्ति । शैव म्हणती शक्ति । आम्ही परम भक्ति । आपुली म्हणों ॥ ३३ ॥ ( १२५०. भक्तीनं आत्म्याला यथार्थ जाणून त्याचा उपभोग घेतो, ११३४–११४१ ) हे मज मिळतिये वेळे । तयां क्रमयोगियां फळे । मग समस्तही निखिळें । मियांचि भरे ॥ ३४ ॥ तेथ वैराग्य विवेकेंसी । आटे बंध मोक्षेंसी । वृत्ति तये आवृत्तीसी । बुडोनि जाय ॥३५॥ घेऊनि ऐलैपणातें । पैरत्व हारपे जेथें । गिळूनि चाऱ्ही भूतें । आकाश जैसें ॥ ३६ ॥ तया परी थँडथांद । साध्यसाधनातीत शुद्ध । तें मी होऊनि एकवद । भोगितों मातें ॥ ३७ ॥ घडोनि सिंधूचिया आंगा । सिंधूवरी तळपे गंगा । तैसा पाडु तया भोगा । अवधारी जो ॥ ३८ ॥ कां आरिसयासि आरिसा । उठूनि दाविलिया जैसा । देखणा अतिशेयो तैसा । भोगणा तिये ॥ ३९ ॥ हें असो दर्पणु नेलिया । तो मुखबोधुही गेलिया । देखलेंपण एकलेया । आस्वादिजे जेवि ॥ ११४० ॥ चेइलया स्वप्न नासे । आपलें ऐक्यचि दिसे । तें दुजेनवीण जैसें । भोगिजे कां ॥४१॥ ( १२५१. शंका, एकत्वांत भोग कसा होईल ? ११४२ ) तोचि जालिया भोगु तयाचा । न घडे हा भावो जयांचा । तिहीं बोलें केंवि बोलाचा । उच्चारु कीजे ॥ ४२ ॥ ( १२५२. शंकेचें उत्तर, ११४३–११४७ ) तयांच्या नेणो गांवीं । रवि प्रकाशी हन दिवीं । कीं व्योमालागीं मांडवी । उभिली तिहीं ॥ ४३ ॥ हां गा राजत्व नव्हतां आंगीं । रावो रायपण काय भोगी । कां आंधारु हन आलिंगी । दिनकरातें ॥ ४४ ॥ आणि आकाश जे नव्हे । तया आकाश काय जाणवे । रत्नाच्या रूपीं मिरवे । गुंजांचें लेणें ॥ ४५ ॥ म्हणौनि मी होणें नाहीं । तया मीचि आहे केंही । मग भजेल हें कायी । बोलों कीर ॥ ४६ ॥ यालागीं तो क्रमयोगी । मी जालाचि मातें भोगी । तारुण्य कां तरुणांगीं । जियापरी ॥ ४७ ॥ ( १२५३. शरीराच्या सर्व

१ उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् । हा सातव्या अध्यायातील १८ वा श्लोक आणि त्यावरील टीका पहा. २ कल्पाच्या आरंभीं. ३ स्वकीय ज्ञानकला. ४ येरझारा; संसारपरिभ्रमण. ५ अलीकडील. ६ पलीकडील. ७ अलीकडील कांठ, मध्यभाग व पलीकडील कांठ. ८ शोभते. ९ मुख. १० भोगतो.

ह्या ज्ञानभक्तीच्या योगें जो माझ्याशीं ऐक्य पावतो, तो केवळ मीच आहें (त्याच्यांत व माझ्यांत अंतर नाहीं, तो तद्रूपच आहे), हें तुला माहितच आहे. ११३० कारण अर्जुना, 'ज्ञानी हा माझा आत्मा आहे' असें सातव्या अध्यायामध्यें हात उभारून प्रतिज्ञेनें मीं सांगितलें आहे. ३१ अर्जुना, ती ही भक्ति उत्तम आहे, म्हणूनच मीं ती कल्पाच्या आरंभीं भागवतमिषानें ब्रह्मदेवाला उपदेशिली. ३२ ज्ञानी याच भक्तीला स्वसंवित्ति म्हणतात, शैव शक्ति म्हणतात, व आम्ही आपली परम भक्ति असें म्हणतों. ३३ ही भक्ति त्या क्रमयोग्याला माझ्याशीं ऐक्य होते वेळीं फलद्रूप होते; आणि मग हें सर्व केवळ माझ्याच योगें ओतप्रोत भरलेलें आहे (असें ज्ञान करून देते). ३४ तेव्हां वैराग्य विचारासह नष्ट होतें, बंध मोक्षासह नाहींसा होतो, आणि वृत्ति (निवृत्ति) आवृत्तीसह नामशेष होते. ३५ ज्या भक्तीच्या योगानें अलीकडील व पलीकडील हे भेद नाहींतसे होतात; जसें आकाश हें (पृथ्वी, अप्, तेज व वायु या) चारी भूतांना व्यापून शेष राहतें, ३६ तसें अलीकडील कांठ, मध्यभाग व पलीकडील कांठ याप्रमाणें साध्य, साधन व साधक या त्रिपुटीहून पलीकडील जें माझें शुद्ध स्वरूप, त्याच्याशीं ऐक्य पावून माझें भजन करतो. ३७ सिंधूस गंगा मिळाल्यावरही जशी वेगळेपणानें समुद्रांत दिसते, तसा जो माझ्याशीं ऐक्य पावला आहे, तो माझे भक्तीचा उपभोग द्वैतावांचून घेतो. ३८ किंवा दोन आरसे स्वच्छ करून एकापुढें एक ठेविले असतां एकमेकांला पाहण्याचें सुख भोगितात; तसा मद्रूप झाल्यावर तो ज्ञानी माझे भक्तीचा उपभोग घेतो. ३९ इतकेंच नव्हे, परंतु आरसा बाजूस केल्यावर व त्यांतील प्रतिबिंब दिसेनासें झाल्यानंतरही पाहणारा आपले ठिकाणींच आपल्या स्वरूपाचा आनंद भोगितो. ११४० जागें झाल्यावर स्वप्न नाहींसें होऊन आपल्या स्वरूपास मिळाल्यावर मग आपलें ऐक्य जसें द्वैतावांचून भोगतो; ४१ याजवर शंका करणारा अशी शंका करतो कीं, ऐक्य पावल्यावर त्याचा भोग कसा घेतां येतो? तर पहा कीं, शब्दानें शब्दाचा उच्चार कसा करितां येतो? ४२ यावरून, शंका घेणाराचे गांवांत कदाचित् सूर्याला दिव्यानें पाहण्याची चाल असेल तर नकळे! अथवा आकाशाला मांडव घालण्याची चाल असल्यास असेल! ४३ अरे, ज्याचे अंगीं राजपण नाहीं, त्याला राजा राजेपणाचें काय सुख भोगतो हें कसें समजणार? किंवा सूर्याला अंधार आलिंगन देईल कीं काय? ४४ आणि जो स्वतः आकाश झाला नाहीं, त्याला आकाशाची व्याप्ति कशी समजेल? व गुंजांचे दागिने रत्नांच्या दागिन्यांची बरोबरी कशी करतील? ४५ म्हणून, जो मद्रूप झाला नाहीं, त्याला मी कोठें आहें, हें कसें समजणार? मग तो माझें भजन करतो असें कसें म्हणतां येईल? ४६ यास्तव, क्रमानें येणारा योगी मत्स्वरूप होतो, तेव्हां माझे स्वरूपाचा उपभोग घेतो. जशी तरुण स्त्री आपल्या तारुण्याचा उपभोग घेते; ४७ पाण्याच्या लाटा सर्व बाजूंनीं पाण्याचेंच सेवन करतात; किंवा प्रकाश जो आहे तो सर्वप्रकारेंकरून सूर्यबिंबांतच असतो; अथवा पोकळी

अन्वयः—( किं च ) यावान् यः च अस्मि, तं मा तत्त्वतः भक्त्या अभिजानाति, ततः तत्त्वतः मा ज्ञात्वा तदनंतरम् ( मा ) विशते. ॥ ५५ ॥

( १२४९. ज्ञानरूप भक्ति, ११३०--११३३ ) इया ज्ञानभक्ती सहज । भक्तु एकवटला मज । तो मीचि केवळ हें तुज । श्रुतही आहे ॥११३०॥ जे उभऊनियां भुजा । ज्ञानिया आत्मा माझा । हें बोलिलों कपिध्वजा । सप्तमाध्यायीं ॥ ३१ ॥ ते इ कैल्पादि भक्ति मियां । श्रीभागवतमिषें ब्रह्मया । उत्तम म्हणौनि धनंजया । उपदेशिली ॥ ३२ ॥ ज्ञानी इयेतें स्वसंवित्ति । शैव म्हणती शक्ति । आम्ही परम भक्ति । आपुली म्हणों ॥ ३३ ॥ ( १२५०. भक्तीनं आत्म्याला यथार्थ जाणून त्याचा उपभोग घेतो, ११३४–११४१ ) हे मज मिळातिये वेळे । तयां क्रमयोगियां फळे । मग समस्तही निखिळें । मियांचि भरे ॥ ३४ ॥ तेथ वैराग्य विवेकेंसी । आटे बंध मोक्षेंसी । वृत्ति तये ऑवृत्तीसी । बुडोनि जाय ॥३५॥ घेऊनि ऐलैपणातें । पैरत्व हारपे जेथें । गिळूनि चाऱ्ही भूतें । आकाश जैसें ॥ ३६ ॥ तया परी थैंडथांद । साध्यसाधनातीत शुद्ध । तें मी होऊनि एकवद । भोगितों मातें ॥ ३७ ॥ घडोनि सिंधूचिया आंगा । सिंधूवरी तळपे गंगा । तैसा पाडु तया भोगा । अवधारी जो ॥ ३८ ॥ कां आरिसयासि आरिसा । उठूनि दाविलिया जैसा । देखणा अतिशेयो तैसा । भोगणा तिये ॥ ३९ ॥ हें असो दर्पणु नेलिया । तो मुखबोधुही गेलिया । देखलेंपण एकलेया । औस्वादिजे जेविं ॥ ११४० ॥ चेइलया स्वप्न नासे । आपलें ऐक्यचि दिसे । तें दुजेनवीण जैसें । भोगिजे कां ॥४१॥ ( १२५१. शंका, एकत्वांत भोग कसा होईल ? ११४२ ) तोचि जालिया भोगु तयाचा । न घडे हा भावो जयांचा । तिहीं बोलें केविं बोलाचा । उच्चारु कीजे ॥ ४२ ॥ ( १२५२. शंकेचें उत्तर, ११४३–११४७ ) तयांच्या नेणो गांवीं । रवि प्रकाशी हन दिवीं । कीं व्योमालागीं मांडवी । उभिली तिहीं ॥ ४३ ॥ हां गा राजत्व नव्हतां आंगीं । रावो रायपण काय भोगी । कां आंधारु हन आलिंगी । दिनकरातें ॥ ४४ ॥ आणि आकाश जें नव्हे । तया आकाश काय जाणवे । रत्नाच्या रूपीं मिरवे । गुंजांचें लेणें ॥ ४५ ॥ म्हणौनि मी होणें नाहीं । तया मीचि आहे केंही । मग भजेल हें कायी । बोलों कीर ॥ ४६ ॥ यालागीं तो क्रमयोगी । मी जालाचि मातें भोगी । तारुण्य कां तरुणांगीं । जियापरी ॥ ४७ ॥ ( १२५३. शरीराच्या सर्व

१ उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् । हा सातव्या अध्यायातील १८ वा श्लोक आणि त्यावरील टीका पहा. २ कल्पाच्या आरंभीं. ३ स्वकीय ज्ञानकला. ४ येरझारा; संसारपरिभ्रमण. ५ अलीकडील. ६ पलीकडील. ७ अलीकडील कांठ, मध्यभाग व पलीकडील कांठ. ८ शोभते. ९ सुख. १० भोगतो.

ह्या ज्ञानभक्तीच्या योगें जो माझ्याशीं ऐक्य पावतो, तो केवळ मीच आहे (त्याच्यांत व माझ्यांत अंतर नाहीं, तो तद्रूपच आहे), हें तुला माहितच आहे. ११३० कारण अर्जुना, 'ज्ञानी हा माझा आत्मा आहे' असें सातव्या अध्यायामध्यें हात उभारून प्रतिज्ञेनें मीं सांगितलें आहे. ३१ अर्जुना, ती ही भक्ति उत्तम आहे, म्हणूनच मीं ती कल्पाच्या आरंभीं भागवतमिषानें ब्रह्मदेवाला उपदेशिली. ३२ ज्ञानी याच भक्तीला स्वसंवित्ति म्हणतात, शैव शक्ति म्हणतात, व आम्ही आपली परम भक्ति असें म्हणतों. ३३ ही भक्ति त्या क्रमयोग्याला माझ्याशीं ऐक्य होते वेळीं फलद्रूप होते; आणि मग हें सर्व केवळ माझ्याच योगें ओतप्रोत भरलेलें आहे (असें ज्ञान करून देते). ३४ तेव्हां वैराग्य विचारासह नष्ट होतें, बंध मोक्षासह नाहींसा होतो, आणि वृत्ति (निवृत्ति) आवृत्तीसह नामशेष होते. ३५ ज्या भक्तीच्या योगानें अलीकडील व पलीकडील हे भेद नाहींतसे होतात; जसें आकाश हें (पृथ्वी, अप्, तेज व वायु या) चारी भूतांना व्यापून शेष राहतें, ३६ तसें अलीकडील कांठ, मध्यभाग व पलीकडील कांठ याप्रमाणें साध्य, साधन व साधक या त्रिपुटीहून पलीकडील जें माझें शुद्ध स्वरूप, त्याच्याशीं ऐक्य पावून माझें भजन करतो. ३७ सिंधूस गंगा मिळाल्यावरही जशी वेगळेपणानें समुद्रांत दिसते, तसा जो माझ्याशीं ऐक्य पावला आहे, तो माझे भक्तीचा उपभोग द्वैतावांचून घेतो. ३८ किंवा दोन आरसे स्वच्छ करून एकापुढें एक ठेविले असतां एकमेकांला पाहण्याचें सुख भोगितात; तसा मद्रूप झाल्यावर तो ज्ञानी माझे भक्तीचा उपभोग घेतो. ३९ इतकेंच नव्हे, परंतु आरसा बाजूस केल्यावर व त्यांतील प्रतिबिंब दिसेनासें झाल्यानंतरही पाहणारा आपले ठिकाणींच आपल्या स्वरूपाचा आनंद भोगितो. ११४० जागें झाल्यावर स्वप्न नाहींसें होऊन आपल्या स्वरूपास मिळाल्यावर मग आपलें ऐक्य जसें द्वैतावांचून भोगतो; ४१ याजवर शंका करणारा अशी शंका करतो कीं, ऐक्य पावल्यावर त्याचा भोग कसा घेतां येतो? तर पहा कीं, शब्दानें शब्दाचा उच्चार कसा करितां येतो? ४२ यावरून, शंका घेणाराचे गांवांत कदाचित् सूर्याला दिव्यानें पाहण्याची चाल असेल तर नकळे! अथवा आकाशाला मांडव घालण्याची चाल असल्यास असेल! ४३ अरे, ज्याचे अंगीं राजपण नाहीं, त्याला राजा राजेपणाचें काय सुख भोगतो हें कसें समजणार? किंवा सूर्याला अंधार आलिंगन देईल कीं काय? ४४ आणि जो स्वतः आकाश झाला नाहीं, त्याला आकाशाची व्याप्ति कशी समजेल? व गुंजांचे दागिने रत्नाच्या दागिन्यांची बरोबरी कशी करतील? ४५ म्हणून, जो मद्रूप झाला नाहीं, त्याला मी कोठें आहें, हें कसें समजणार? मग तो माझें भजन करतो असें कसें म्हणतां येईल? ४६ यास्तव, क्रमानें येणारा योगी मत्स्वरूप होतो, तेव्हां माझे स्वरूपाचा उपभोग घेतो. जशी तरुण स्त्री आपल्या तारुण्याचा उपभोग घेते; ४७ पाण्याच्या लाटा सर्व बाजूंनीं पाण्याचेंच सेवन करतात; किंवा प्रकाश जो आहे तो सर्वप्रकारेंकरून सूर्यबिंबांतच असतो; अथवा पोकळी

व्यापारांनीं एकत्वाचा भोग, ११४८–११९२ ) तरंग सर्वांगीं तोय चुंबी । प्रभ सर्वत्र विलसे बिंबीं । ना ना अवकाश नभीं । लुंठतें जैसा ॥ ४८ ॥ तैसा रु होऊनि माझें । मातें क्रियावीण तो भजे । अलंकारु कां सहजें । सोनया जेविं ॥ ४९ ॥ कां चंदनाची द्रुति जैसी । चंदनीं भजे अपैसी । कां अकृ त्रिम शशी । चंद्रिका ते ॥ ११५० ॥ तैसी क्रिया कीर न साहे । तन्ह अद्वैतीं भक्ति आहे । हें अनुभवाचिजोगें नव्हे । बोलाऐसें ॥ ५१ ॥ तेव्ह पूर्वसंस्कारछंदें । जें कांहीं तो अनुवादे । तेणें आळविलेनि वो दें । बोलत मीचि ॥ ५२ ॥ बोलतया बोलताचि भेटे । तेथें बोलिलें हें न घटे । तें मौ तंव गोमटें । स्तवन माझें ॥ ५३ ॥ म्हणौनि तया बोलतां । बोली बोलत मी भेटतां । मौन होय तेणें तत्त्वता । स्तवितो मातें ॥ ५४ ॥ तैसेंचि बुद्धी क दिठी । जें तो देखों जाय किरीटी । तें देखणें दृश्य लोटी । देखतेंचि दावी ॥५५। आरिसया आधीं जैसें । देखतेंचि मुख दिसे । तयाचें देखणें तैसें । मेळवी द्र ॥ ५६ ॥ दृश्य जाउनियां द्रष्टें । द्रष्टयासीचि जें भेटे । तें एकलेपणें न घटे द्रष्टेपणही ॥५७॥ तेथ स्वप्नींचिया प्रिया । चेवोनि झोंबों गेलिया । ठायिजे दोन्ह न होनियां । आपणाचि जैसें ॥५८॥ कां दोहीं काष्ठांचिये घृष्टी-। माजीं वन्हि येव उठी । तो दोन्ही हे भाष आटी । आपणचि होय ॥ ५९ ॥ ना ना प्रतिबिंब हातीं । घेऊं गेलिया गभस्ति । बिंबताही असती । जाय जैसी ॥ ११६० ॥ तैसा मी होऊनि देखतें । तो घेऊं जाय दृश्यातें । तेथ दृश्या ने थितें । द्रष्टृत्वेंसी ॥६१॥ रवि आंधारु प्रकाशिवां । नुरेचि जेविं प्रकाश्यता । तेविं दृश्यीं नाहीं द्रष्टृता । मी जालिया ॥ ६२ ॥ मग देखिजे ना न देखिजे । ऐसी जे दशा निपजे । ते तें दर्शन माझें । साचोकारें ॥ ६३ ॥ तें भलतयाही किरीटी । पदार्थांचिया भेटी । द्रष्टृदृश्यातीता दृष्टी । भोगितो सदा ॥ ६४ ॥ आणि आकाश हें आकाशें । दाटलें न ढळे जैसें । मियां आत्मेन आपणपें तैसें । जालें तया ॥ ६५ ॥ कल्पांतीं उदक उदकें । रुंधिलिया वाहों ठाके । तैसा आत्मेनि मियां येकें । कोंदला तो ॥ ६६ ॥ पावो आपणपयां वोळंघे । केविं वन्हि आपणपया लागे । आपणपां पाणी । रिघे स्नाना कैसें ॥ ६७ ॥ म्हणोनि सर्व मी जालेपणें । ठेलें तया येणें जाणें । तेंचि गा यात्रा करणें । अद्वया मज ॥ ६८ ॥ पैं जळावरील तरंगु । जरी धाविन्नला सवेगु । तरी नाहीं भूमिभागु । क्रमिला तेणें ॥ ६९ ॥ जें सांडावें कां मांडावें । जें चालणें जेणें चालावें । तें तोयचि एक आघवें । म्हणोनियां ॥११७०॥ गेलियाही भलतेउता । उदकपणें पंडुसुता । तरंगाची एकात्मता । न मोडेचि जेविं ॥ ७१ ॥ तैसा मीपणें हा लोटला । तो आघवेयाचि मजआंतु आला । या

१ व्यापून. २ सुवास. ३ बोले. ४ बिनविस्यानें. ५ मूळचेंच असणारें. ६ आळविल्यामुळें. ७ चरें.

ज्याप्रमाणें सर्वत्र आकाशास व्यापून असते, ४८ त्याप्रमाणें, माझें स्वरूप होऊन माझें भजन क्रियेवांचून करतो; जसा अलंकार सोन्याला सहज भजतो; ४९ चंदनाचा सुगंध चंदनाचें सेवन करतो, किंवा चंद्राची प्रभा चंद्रापार्शींच सहज असते; ११५० त्याप्रमाणें, क्रिया सहन होत नाहीं, तथापि अद्वैतस्वरूपाचे ठिकाणीं भक्ति असते. ह्याचा अनुभव घेतला तरच समजेल, एरवीं बोलून सांगतां येण्याजोगी ही गोष्ट नव्हे. ५१ अशा योग्यतेस आलेला मनुष्य पूर्वसंस्कारेंकरून जें कांहीं बोलेल, त्यानें मला आळविल्यामुळें त्यानें हाक मारतांक्षणींच मी त्याला ओ देतां. ५२ जेथें बोलणारालो त्याच्याशिवाय दुसरें कोणीं बोलण्यास भेटत नाहीं, तेथें तो बोलतो असें कसें म्हणतां येईल ? अशा प्रकारचें जें बोलणें, तें न बोलण्यासारखेंच असून तेंच माझें उत्तम स्तवन होय. ५३ म्हणून, तो बोलणें बोलत असतां, व त्या बोलण्यानें मी भेटलों असतां, तें बोलणेंच मौन होतें; आणि त्या मौनानेंच माझें खरोखर स्तवन होतें. ५४ तसेंच, हे किरीटी, त्याचे बुद्धीनें अथवा दृष्टीनें जें जें तो जाणील अथवा पाहील, तें जाणणें व पाहणें, जाणण्याची किंवा पाहण्याची वस्तु एकीकडे करून, जाणणारालाच व पाहणारालाच दाखवितें. ५५ आरशांत पाहण्याचे पूर्वीं जें मुख होतें, तेंच, आरसा पाहतांक्षणींच आरशाला न पाहतां मुखालाच पाहतें; तद्वत् त्याचें पाहणें पाहणारालाच दाखवितें. ५६ पाहण्याची वस्तु जाऊन पाहणाराच पाहणाराला जर पाहील, तर पाहणेपणाचा धर्म उरत नाहीं. ५७ स्वप्नांत पाहिलेल्या स्त्रीला जागें होऊन मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊं गेलें असतां आलिंगन देणारा व आलिंगन देण्याची वस्तु दोन्ही नसून एकटाच पुरुष जसा असतो; ५८ अथवा दोन लांकडांच्या घर्षणानें जो अग्नि उत्पन्न होतो, तो दोन्ही लांकडांस जाळून लांकडाचें नांव नाहींसें करून आपणच होतो; ५९ अथवा आपलें पाण्यांत पडलेलें प्रतिबिंब सूर्य हातानें घेऊं लागला असतां त्याचें प्रतिबिंब नाहींसें होऊन त्याचें असलेलें बिंबत्वही जातें; ११६० त्याप्रमाणें, मद्रूप होऊन जो दृश्य वस्तु पाहण्यास जातो, त्याला ती दुसरी दृश्य वस्तु वेगळी उरत नाहीं. परंतु त्याचें असलेलें द्रष्टृत्वही नाहींसें होतें. ६१ सूर्य अंधाराला प्रकाशित करावयास गेला असतां प्रकाश्य जो अंधकार तो जर उरत नाहीं, तर मग सूर्यावरील प्रकाशक धर्मही नाहींसा होतो; त्याप्रमाणें, दृश्य वस्तु जर मीच झालों आहें, तर आपल्याहून दृश्य वस्तु भिन्न नाहीं; मग पाहणारा द्रष्टाही उरत नाहीं. ६२ यावर, पाहणें व न पाहणें एतद्विवर्जित जी स्थिति, तें माझें खरोखर दर्शन होय. ६३ हे किरीटी, तें दर्शन वाटेल त्या पदार्थाच्या भेटीबरोबर त्याला होतें. मग दृश्य व द्रष्टा या द्वैताच्या पलीकडील जी दृष्टि, ती तो सर्वकाळ भोगतो. ६४ आणि आकाश हें सर्वव्यापक असल्यामुळें त्याला जसें ढळणें नाहीं, तसा मी जो आत्मा, तेणेंकरून सर्वत्र माझीच व्याप्ति झाली आहे. ६५ कल्पांतकालीं ओतप्रोत उदकच भरल्यामुळें जसें उदकाचें वाहणें बंद होतें, तसें सर्व विश्व आत्मत्वानें कोंदलें असल्यामुळें त्याला आत्म्यावांचून दुसरा पदार्थच उरत नाहीं. ६६ पाय पायावर चढेल काय ? अग्नि अग्नीसच जाळील काय ? पाणी पाण्यांतच स्नान करें करील ? ६७ म्हणून, सर्वत्र माझी व्याप्ति झाल्यामुळें त्याचें येणेंजाणें बंद पडतें; व अद्वय असा जो मी परमात्मा, त्याची त्याला या त्याच्या कृतीनेंच यात्रा घडते. ६८ तसेंच, पाण्यावरील बुडबुडा मोठ्या वेगानें जरी धावत गेला, तरी तो पाण्याशिवाय भूमीवर धावत नाहीं; अर्थात् त्याचें तें धावणें हें न धावण्याचेच ठिकाणीं समजलें पाहिजे; ६९ म्हणून,

यात्रा होय भला । कापडी माझा ॥ ७२ ॥ आणि शरीरस्वभाववशें । कांहीं येक करूं जरी बैसे । तरी मीचि तो तेणें मिषें । भेटें तया ॥ ७३ ॥ तेथ कर्म आणि कर्ता । हें जाऊनि पंडुसुता । मियां आत्मेनि मज पाहतां । मीचि होय ॥ ७४ ॥ पैं दर्पणातें दर्पणें । पाहिलिया होय न पाहणें । सोनें झांकिलिया सुवर्णें । न झांके जेविं ॥ ७५ ॥ दीपातें दीपें प्रकाशिजे । तें न प्रकाशणेंचि निपजे । तैसें कर्म मियां कीजे । तें करणें कैंचें ॥ ७६ ॥ कर्मही करितचि आहे । जैं करावें हे माप जाये । तें न करणेंचि होये । तयाचें केलें ॥ ७७ ॥ क्रियाजात मी जालेपणें । घडे कांहींचि न करणें । तयाचि नांव पूजणें । खुणेचें माझें ॥ ७८ ॥ म्हणौनि करी तयाही वोजा । तें न करणें हेंचि कपिध्वजा । निपजे तिया महापूजा । पूजी तो मातें ॥ ७९ ॥ एवं तो बोले तें स्तवन । तो देखे तें दर्शन । अद्वया मज गमन । तो चाले तेंचि ॥ ११८० ॥ तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जपु माझा । तो असे तेंचि कपिध्वजा । समाधि माझी ॥ ८१ ॥ जैसें कनकेंसी कांकणें । असिजे अनन्यपणें । तो भक्तियोगें येणें । मजसी तैसा ॥ ८२ ॥ उदकीं कल्लोळु । कापुरीं परिमळु । रत्नीं उजाळु । अनन्यु जैसा ॥ ८३ ॥ किंबहुना तंतूंसी पटु । कां मृत्तिकेसी घटु । तैसा तो येकवटु । मजसी माझा ॥ ८४ ॥ इया अनन्यसिद्धा भक्ती । या आघवाचि दृश्यजातीं । मज आपणपेंया सुमति । द्रष्टयातें जाणे ॥ ८५ ॥ तिन्ही अवस्थांचेनि द्वारें । उपाध्युपहिताकारें । भावाभावरूप स्फुरे । दृश्य जें हें ॥ ८६ ॥ तें हें आघवेंचि मी द्रष्टा । ऐसिया बोधाचा माजिवटा । अनुभवाचा सुभटा । घेंडा तो नाचे ॥ ८७ ॥ रज्जु जालिया गोचरु । आभासतां तो व्याळाकारु । रज्जुच ऐसा निर्धारु । होय जेविं ॥ ८८ ॥ भांगारापरतें कांहीं । लेणें गुंजहीभरी नाहीं । हें आटूनियां ठायीं । कीजे जैसें ॥ ८९ ॥ उदका येकापरतें । तरंग नाहींचि हें निरुतें । जाणोनि तया आकारातें । न घेपे जेंवि ॥ ११९० ॥ नातरी स्वप्नविकारां समस्तां । चेऊनियां उमाणें घेतां । तो आपणया परौता । न दिसे जैसा ॥ ९१ ॥ तैसें जें कांहीं आथी नाथी । येणें होय ज्ञेयस्फूर्ति । तें ज्ञाताचि मी हें प्रतीति । होऊनि भोगी ॥ ९२ ॥ ( १२५४. भक्तीनें ईश्वराला यथार्थ जाणतो, ११९३-१२०४ ) जाणे अजु मी अजरु । अक्षयो मी अक्षरु । अपूर्वु मी अपारु । आनंदु मी ॥ ९३ ॥ अचळु मी अच्युतु । अनंतु मी अद्वैतु । आद्यु मी अव्यक्तु । व्यक्तुही मी ॥ ९४ ॥ ईश्य मी ईश्वरु । अनादि मी अमरु । अभय मी आधारु । आधेय

१ यात्रेकरू. २ तेज. ३ शरीर व शरीराचा चालक यांच्या योगानें. ४ व्यक्त व अव्यक्त एतद्रूप. ५ डोंडा. ६ माप. ७ उत्पन्न न होणारा. ८ जरारहित. ९ नाशरहित. १० अविनाशी. ११ ज्याच्या पूर्वी कांहीं नाहीं असा. १२ चळून न पावणारा. १३ पतित न होणारा. १४ अंतरहित. १५ आधारावर असणारें.

जें स्थल सोडावयाचें तें व ज्या स्थळास जावयाचें तें व चालणारा व चालण्याचे पाय हें सर्व उदकच असल्यामुळें, ११७० तो तरंग पाहिजे तितका धावत गेला तरी, हे पांडुसुता, तो उदकच असल्यामुळें त्याचा एकपणा मोडत नाहीं. ७१ त्याप्रमाणें मद्रूप झाल्यावर, मीपणानें जरी त्याला स्फुरण झालें, तरी तो संपूर्ण माझेकडेसच आला; अशी जी यात्रा, त्या यात्रेनें तो माझा यात्रेकरूच झाला. ७२ आणि त्याचे शरिराचे स्वभावामुळें त्यानें कांहींही कृत्य आरंभिलें, तरी त्या कृत्याचे मिषानें मीच त्याला भेटतों. ७३ हे पांडुसुता, अशा स्थितींत हें कर्म व हा कर्ता हा भेद जाऊन आत्मत्वेंकरून मला पाहिलें असतां मद्रूप होतो. ७४ हें पहा, ज्याप्रमाणें आरशानें आरशाला पाहिलें असतां तें न पाहणें होतें, किंवा सोन्यानें सोनें झांकलें तर झांकणें होत नाहीं; ७५ दिव्यानें दिव्याला प्रकाशित केलें तर तें प्रकाश न करणेंच होय; त्याप्रमाणें मद्रूप होऊन कर्म केलें तें कर्म करणें कसें म्हणावें? ७६ कर्म करीत असतां मी कर्ता असा अभिमान नाहींसा झाला म्हणजे त्याचें सर्व करणें न करणेंच होतें. ७७ त्याला सर्व क्रिया आत्मस्वरूप झाल्यामुळें, त्या सर्व क्रियांला न करणेंच म्हणावें; व तीच माझी खुणेची पूजा होय. ७८ म्हणून हे कपिध्वजा, तो ज्या ज्या यथासाग क्रिया करतो, त्या न केल्याप्रमाणें होऊन तीच माझी महापूजा होते. ७९ याप्रमाणें, तो जें जें बोलेल ती माझी स्तुति; तो जें पाहतो तें माझें दर्शन, अद्वय जो मी, त्याची तो चालेल ती यात्रा होय. ११८० हे कपिध्वजा, तो जें करील ती माझी पूजा, तो जी कल्पना करील तो माझा जप, व तो ज्या स्थितींत असेल तो माझा समाधि होय. ८१ जसें सुवर्णाशीं सुवर्णाचें कंकण अभेद आहे, तसा भक्तियोगानें माझ्याशीं तो ऐक्य पावतो. ८२ पाण्याचे ठिकाणीं लाट, कापुराचे ठिकाणीं परिमळ, व रत्नाचे ठिकाणीं तेज, जसें भिन्न नाहीं, ८३ फार काय? जसा तंतूंशीं पट, किंवा मृत्तिकेशीं जसा घट यांचें ऐक्य असतें, तसा तो माझा भक्त माझ्याशीं ऐक्य पावतो. ८४ अर्जुना, ही जी एकनिष्ठ भक्ति, त्या भक्तीच्या योगानें, दृश्यमात्राचे ठिकाणीं, मी आत्मा जो द्रष्टा त्या मला तो जाणतो. ८५ जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांच्या योगानें, आणि शरीर व शरीराचा चालक याच्या योगानें व्यक्त व अव्यक्त एतद्रूपानें सर्व दृश्य पदार्थांचें स्फुरण होतें. ८६ हे सुमते अर्जुना, तें सर्व दृश्य मीच आहें अशा बोधाच्या भरांत अनुभवाचा झेंडा नाचतो. ८७ दोर दृष्टीस पडल्यावर त्यावर झालेला सर्पाचा भास नाहींसा होऊन दोरच आहे असा जेव्हां निश्चय होतो; ८८ सोन्यावेगळे गुंजभर सुद्धां अलंकार नाहींत असा दृढ निश्चय होण्यानें सर्व अलंकारांची आटणी होते; ८९ पाण्यावर येणारे तरंग उदकाविरहित नाहींत असें पक्कें समजून त्यांच्या आकाराला जो भुलत नाहीं; ११९० अथवा स्वप्नांतील पाहिलेले सर्व विकार जागें झाल्यावर पाहूं गेलें असतां आपलेविरहित दुसरें कांहीं नाहीं असें जसें दिसतें, ९१ तसें, जें कांहीं आहे व नाहीं, त्याच्या योगें हें जाणण्याची स्फूर्ति होते; व ते सर्व पदार्थ मीच आहें, अशा अनुभवाचा तो उपभोग घेतो. ९२ मी उत्पन्न न होणारा, जरारहित, नाशरहित, अविनाशी, ज्याच्या पूर्वीं कांहीं नाहीं असा, ज्याला अंत नाहीं असा, व नेहमीं आनंदमय असा आहें, असें तो समजतो. ९३ चलन न पावणारा व पतित न होणारा, अंतरहित, अद्वैत, सर्वांचें मूळ, निराकार व साकारही मीच आहें. ९४ सर्वांचा ईश, अनादि, व अमर, अभय आणि आधार व आधारावर असणारें जें आधेय तें सर्व असा मी आहें,

मी ॥९५॥ स्वामी मी सदोदितु । सहजु मी सततु । सर्व मी सर्वगतु । सर्वातीतु मी ॥९६॥ नवा मी पुराणु । शून्युं[1] मी संपूर्णु[2] । स्थूलु अणु[3] । जें कांहीं तें मी ॥ ९७॥ अक्रियु[4] मी एकु । असंगु मी अशोकु । व्याप्यु मी व्यापकु । पुरुषोत्तमु मी ॥९८॥ अशब्दु[5] मी अश्रोत्रु । अरूपु मी अगोत्रु । समु मी स्वतंत्रु । ब्रह्म मी परु ॥ ९९॥ ऐसें आत्मत्वें मज एकातें । इया अद्वयभक्ती जाणोनि निरुतें । आणि याही बोधा जाणतें । तेंही मीचि जाणें ॥१२००॥ पैं चेइलेयानंतरें । आपुलें एकपण उरे । तेंही तोंवरी स्फुरे । तयासीचि जैसें ॥ १॥ कां प्रकाशतां अर्कु । तोचि होय प्रकाशकु । तयाही अभेदा द्योतकु[6] । तोचि जैसा ॥ २॥ तैसा वेद्यांच्या[7] विलयीं । केवळ वेदकु उरे पाहीं । तेणें जाणवे तया तेंही । हेंही जो जाणे ॥ ३ ॥ तया अद्वयपण आपुलिया । जाणती ज्ञप्ति[8] जे धनंजया । ते ईश्वरचि मी हें तया । बोधासि ये ॥ ४ ॥ ( १२९५. ईश्वराला जाणणारा ईश्वरस्वरूपात प्रवेश करतो, १२०५-१२१७) मग द्वैताद्वैतातीत । मीचि आत्मा एकु निभ्रांत । हें जाणोनि जाणणें जेथ । अनुभवीं रिघे ॥ ५ ॥ तेथ चेइलया येकपण । दिसे जें आपुलया आपण । तेंही जातां नेणों कोण । होइजे जेवि ॥ ६ ॥ कां डोळां देखतिये क्षणीं । सुवर्ण सुवर्णीं । नाटितां होय आटणी । अळंकाराचीही ॥ ७ ॥ ना नां लवण तोय होयें । मग क्षारता तोयत्वें राहे । तेही जिरतां जेवि जाये । जालेपण तें ॥ ८ ॥ तैसा मी तो हें जें असे । तें स्वानंदानुभवसमरसें । कालवूनियां प्रवेशे । मजचिमाजी ॥ ९ ॥ आणि तो हे भाष जेथ जाये । तेथें मी हें कोण्हासी आहे । ऐसा मी ना तो तिये सामाये । माझ्याचि रूपीं ॥ १२१० ॥ जेव्हां कापूर जळों सरे । तयाचि नाम अग्नि पुरे[10] । मग उभयतातीत[11] उरे । आकाश जेवि ॥ ११ ॥ कां घाडलियां एका एकु । वाढे तो शून्यनिशेखु । तैसा आहेनाहींचा शेखु । मीचि मग आथी ॥१२॥ तेथ ब्रह्म आत्मा ईशु । यया बोला मोडे सौरसुं[12] । न बोलणें याही पैसुं[13] । नाहीं तेथ ॥ १३ ॥ न बोलणेंही न बोलोनी । तें बोलिजे तोंड भरूनी । जाणीव नेणीव नेणोनी । जाणिजे तें ॥ १४ ॥ तेथ बुझिजे[14] बोधु बोधें । आनंदु घेपे आनंदें । सुखवरी नुसधें । सुखाचि भोगिजे ॥ १५ ॥ तेथ लाभु जोडला लाभा । प्रभा आलिंगिली प्रभा । विस्मयो बुडाला उभा । विस्मयामाजीं ॥ १६ ॥ शमु तेथ सामावेला[15] । विश्रामु विश्रांती आला[16] । अनुभवु वेडावेला[17] । अनुभूतिपणें ॥१७॥ ( १२५६. उपक्रम व उपसंहार—झालेल्या विषयाचा, १२१८—१२२३ ) किंबहुना

---

१ अभावरूप. २ सर्वाहून मोठा. ३ अणुरेणूहून लहान. ४ क्रियारहित. ५ शब्दातीत. ६ दर्शक. ७ जाणण्याच्या वस्तु. ८ नाश पावल्यावर. ९ जाणणारा. १० ज्ञानकला. ११ नाहींसें होतें. १२ दोहींहून भिन्न. १३ थक्का केला असतां. १४ अभिप्राय. १५ अवकाश. १६ जाणावें. १७ विभाति पावला. १८ संकोच पावला. १९ अनुभवानें.

९५ सर्वांचा अधिपति व नेहमीं असणारा, सहज व सतत सर्वव्यापी, व सर्वत्र भरून असणारा, आणि सर्वांच्या पलीकडला असा मी आहें. ९६ सर्वांत नवा व जुना, अभावरूप व संपूर्ण, सर्वांहून मोठा व अणुरेणूहूनही लहान जें कांहीं आहे, तें मी आहें. ९७ क्रियारहित व एक, संगरहित व शोकरहित, सर्व वस्तूंत मी असून, माझ्यांत सर्व वस्तु आहेत, असा सर्वांत उत्तम पुरुष मी आहें. ९८ शब्दातीत व कर्णरहित, रूपरहित आणि गोत्ररहित, सर्वत्र सारखा व स्वतंत्र ब्रह्म व परब्रह्म मी आहें. ९९ असें आत्मस्वरूपीं ऐक्य पावून, *माझी खरोखर अद्वयभक्ति करून मला जाणतो;* *व याही बोधाला जाणणारा जो मी परमात्मा*, तोही आपण आहों असें तो समजतो. १२०० जसें जागें झाल्यावर आपलें एकत्व उरतें, व हेंही जसें ज्याचें त्यालाच समजतें; १ प्रकाश करणारा जो सूर्य, व ज्या पदार्थाला प्रकाशित करावयाचें ते पदार्थही तोच आहे; आणि प्रकाशक व प्रकाश्य या दोहोंमधील अभेदही तोच जाणतो; २ तसा, जाणण्यास योग्य अशा पदार्थाच्या नाशानंतर केवळ जाणणारा उरतो, हेंही ज्याला समजतें असा जो, तोही मीच आहे असें जो समजतो, ३ त्याला अर्जुना, आपल्या अभेदपणास जाणणारी ज्ञानकळा तोही मी ईश्वरच आहे, तोही मीच आहें असें तो समजतो. ४ मग द्वैत व अद्वैत या पलीकडील जो आत्मा तोच निःसंशय मी आहें असें समजून तें ज्ञानही जेथें मुरून जातें, ५ तेव्हां जागें झाल्यावर जें आपल्याला आपलें स्वरूप दिसतें, तेंही नाहींसें होऊन कोणती स्थिति प्राप्त होते तेंही जसें सागतां येत नाहीं; ६ किंवा सोन्याचें सोनेंपण दृष्टीनें पाहतांक्षणीं अलंकाराची आटणी न करता आटणी केल्याप्रमाणेंच होतें; ७ अथवा मिठाचें पाणी होतें, परंतु त्या पाण्यात खारटपणा राहतो, तोही जिरून गेल्यावर जसा मीठपणा नाहींसा होतो, ८ तसा मी व तो हा भेद असतो, तोही पूर्ण आनंदाचे भरांत एकत्र होऊन मद्रूपीं लय पावतो. ९ आणि तोही ( दुसरा ) भास जेथें नाहींसा होतो, तेथें ' मी ' हा शब्द कोठें उरणार? असा मी नाहीं व तोही नाहीं असें जें माझें रूप, त्या ठिकाणीं तो ऐक्य पावतो. १२१० कापूर जळतांक्षणींच जसें अग्निचेंही नांव नाहींसें होतें, व मग कापूर व अग्नि याहून भिन्न जें आकाश तेंच उरतें; ११ किंवा एकात एक वजा केला असतां बाकी जसें शून्य उरतें, तसा आहे व नाहीं याची वजाबाकी केली असतां बाकी मीच उरतों. १२ त्या ठिकाणीं ब्रह्म, आत्मा, ईश या बोलण्यालाही जागा राहत नाहीं, व कांहीं न बोलणें यालाही तेथें ठाव नाहीं. १३ न बोलणें हें न बोलून मग तोंडभर बोललें जातें, तसें ज्ञान व अज्ञान टाकून जें जाणलें जातें. १४ तशा स्थितींत बोध बोधानें जाणून आनंदानें आनंद भोगून सुखानें सुखाचाच अनुभव येतो. १५ मग लाभांत लाभाची भर पडून प्रकाशानें प्रकाशास आलिंगन देऊन आश्चर्य आश्चर्यांत उभेंचें उभेंच बुडून जातें. १६ शम विश्रांति पावून विश्रामही विश्रांतीस येतो; व अनुभव अनुभवानेंच संकोच पावतो. १७ फार काय सांगावें? क्रमयोगाच्या सुंदर वेलीचें सेवन केल्यामुळें त्याला मद्रूपप्राप्तीचें सुंदर फळ मिळतें. १८

ऐसें निखळ । मीपण जोडे तया फळ । सेवूनि वेली वेल्हाळ । क्रमयोगाची ते ॥ १८ ॥ पैं क्रमयोगा किरीटी । चक्रवर्तीच्या मुकुटीं । मी चिद्रत्न तें साटोवाटीं । होय तो माझा ॥ १९ ॥ कीं क्रमयोगप्रासादाचा । कळसु जो हा मोक्षाचा । तया-वरील अवकाशाचा । उवावो जाला तो ॥ २२० ॥ ना ना संसारआडवीं । क्रम-योग वाट बरवी । जोडिली ते मदैक्यगावीं । पैठी जालीसे ॥ २१ ॥ हें असो क्रमयोगबोधें । तेणें भक्तिचिद्गंगें । मी स्वानंदोदधि वेगें । ठाकिला कीं गा ॥२२॥ हा ठायवरी सुवर्मा । क्रमयोगीं आहे महिमा । म्हणौनि वेळोवेळां तुम्हां । सांगतों आम्ही ॥ २३ ॥ ( १२५७. ईश्वरप्राप्ति उपायानेंच होते, प्रतिभा, १२२४-१२२८ ) पैं देशें काळें पदार्थें । साधूनि घेइजे मातें । तैसा नव्हे मी आयतें । सर्वांचें सर्वही ॥ २४ ॥ म्हणौनि माझ्या ठायीं । जाचावें न लगे कांहीं । मी लाभें इये उपायीं साचचि गा ॥ २५ ॥ एक शिष्य एक गुरु । हा रूढला साच व्यवहारु । तो मत्प्राप्तिप्रकारु । जाणावया ॥ २६ ॥ अगा वसुधेच्या पोटीं । निधान सिद्ध किरीटी । वन्हि सिद्ध काष्ठीं । वोहां दूध ॥ २७ ॥ परी लाभे तें असतें । तया कीजे उपायातें । येर सिद्धचि तैसा येथें । उपायीं मी ॥ २८ ॥ ( १२५८. फलप्राप्ती-नंतर उपाय सांगण्याचें कारण, १२२९-१२३६ ) हा फळहीवरी उपावो । कां पां प्रस्तावीतसे देवो । हें पुसतां तरी अभिप्रावो । येथींचा ऐसा ॥ २९ ॥ जे गीता-र्थाचें चांगावें । मोक्षोपायपर आघवें । आन शास्त्रोपाय कीं नव्हे । प्रमाणसिद्ध ॥ १२३० ॥ वारा आभाळाचि फेडी । वांचूनि सूर्यातें न घडी । कां हातु बाबुळी धाडी । तोय न करी ॥ ३१ ॥ तैसा आत्मदर्शनीं आडळु । असे अविद्येचा जो मळु । तो शास्त्र नाशी येरु निर्मळु । मी प्रकाशें स्वयें ॥ ३२ ॥ म्हणौनि आघ-वींचि शास्त्रें । अविद्याविनाशाचीं पात्रें । वांचोनि न होती स्वतंत्रें । आत्मबोधीं ॥ ३३ ॥ तया अध्यात्मशास्त्रासीं । जें साचपणाची ये पुंसी । तें येइजे जया ठायासी । ते हे गीता ॥ ३४ ॥ भानु भूषितां प्राचिया । सतेजा दिशा आघविया । तैसी शास्त्रेश्वरा गीता या । सनाथें शास्त्रें ॥ ३५ ॥ अवतरण:— हें असो येणें शास्त्रेश्वरें । मागां उपाय बहुवें विस्तारें । सांगीतला जैसा करें । घेवों ये आत्मा ॥ ३६ ॥ ( १२५९. उपाय सांगण्याचें दुसरें कारण, १२३७–१२३८ ) परी प्रथमश्रवणासवें । अर्जुनासी विपायें हें फावे । हा भावो सर्कैणवे । धरूनि श्रीहरी ॥ ३७ ॥ तेंचि प्रमेयें एकवेळ । शिष्यीं होआवया अढळ । सांगतसे मुकुंद । मुद्रा आतां ॥ ३८ ॥ ( १२६०. उपाय सांगण्याचें तिसरें कारण, १२३९-१२४२ )

---

१ सुंदर. २ ज्ञानरूप रत्न. ३ अदलाबदल; साटेलोटें. ४ प्रसार. ५ पृथ्वीच्या. ६ कांसेत. ७ सामर्थ्य. ८ अढळ. ९ आत्मानात्मप्रतिपादक वेदांतशास्त्र. १० प्रसंग. ११ पूर्व दिशेस. १२ कळकळीनें. १३ अर्थ; सार. १४ स्पष्ट करून.

हे किरीटी, क्रमयोगरूपी चक्रवर्तीच्या मुकुटावरील ज्ञानरूप रत्न मी होतों, व माझे मुकुटावर तें रत्न शोभतें. १९ किंवा क्रमयोगरूपी देवळाच्या मोक्षरूपी कळसावरील अवकाशाचा प्रसार तो होतो. १२२० अथवा संसाररूपी अरण्यांतील क्रमयोगरूपी राजमार्गानें माझ्या ऐक्यरूपी गांवांत प्रविष्ट होतो. २१ फार काय सांगावें? क्रमयोगाच्या ओघानें भक्तिज्ञानरूपी गंगा ही आनंदरूपी समुद्र जो मी त्याला येऊन मिळते. २२ हे मर्मज्ञ अर्जुना, असा या क्रमयोगाचा महिमा आहे, म्हणून मी वारंवार त्याचें वर्णन तुझ्याजवळ करितों. २३ परंतु देश, काल व पदार्थ यांच्या अनुकूलतेनें मला साध्य करून घेण्यांचा हा मार्ग नसून, केवळ मी सर्वांना आपोआप प्राप्त होण्याचा हा क्रमयोगमार्ग आहे. २४ म्हणून माझ्या प्राप्तीकरितां शीण न घेतां मी या क्रमयोग उपायानें खरोखर सहज प्राप्त होतों. २५ माझ्या प्राप्तीचा उपाय समजण्याकरितां गुरु व शिष्य हा संप्रदाय खरोखर अनादिसिद्ध आहे. २६ अरे अर्जुना, पृथ्वीच्या पोटांत द्रव्य सिद्ध आहे, तसेंच काष्ठांत अग्नि व कांसेंत दूध याही गोष्टी सिद्ध आहेत; २७ परंतु या गोष्टी सिद्ध आहेत तरी त्याचा लाभ होण्याकरितां उपाय करावे लागतात. पण माझी गोष्ट विचारशील तर मी स्वतःसिद्ध असून, माझ्या आड येणारे पदार्थ दूर करण्यास उपाय केले पाहिजेत. २८ ही फलप्राप्ति झाल्यावर पुनः उपायाची प्रस्तावना देवांनीं कां केली, अशी जर कोणी शंका घेईल, तर देवांचे बोलण्याचा असा अभिप्राय आहे कीं, २९ गीतेचें सामर्थ्य असें आहे कीं, येथें सांगितलेल्या सर्व उपायांनीं मोक्षप्राप्ति होते, व इतर शास्त्रांत सांगितलेल्या उपायांनीं प्रमाणांची सिद्धि होत नाहीं, त्यासारखें हें नाहीं. १२३० वाऱ्यानें सूर्याचे आड आलेले ढग दूर होतात, परंतु त्याच्यानें सूर्य उत्पन्न करवत नाहीं, किंवा हातानें पाण्यावरील गोंडाळ दूर करतां येतें, पाणी करितां येत नाहीं, तें स्वतःसिद्धच आहे; ३१ त्याप्रमाणें, आत्मदर्शनाचे आड आलेला जो अज्ञानाचा मळ, तो इतर शास्त्रांनीं नाहींसा होतो; त्यांच्यानें निर्मळ असें जें माझें आत्मस्वरूप तें करवत नाहीं—तें स्वतःसिद्धच आहे. ३२ म्हणून सर्व शास्त्रें अज्ञानाचा नाश करण्यास मात्र योग्य आहेत; येरवीं त्यांच्यानें स्वतःसिद्ध आत्म्याचा बोध करवत नाहीं. ३३ त्या अध्यात्मशास्त्रांना खरा आत्मस्वरूपाचा निर्णय करण्याचा प्रसंग आला म्हणजे त्या शास्त्रांना ज्या ठिकाणीं विचारण्यास यावें लागतें, तें हें गीताशास्त्र होय. ३४ सूर्यानें पूर्वदिशा अलंकृत केली म्हणजे सर्व दिशा प्रकाशित होतात, त्याप्रमाणें, सर्व शास्त्रांना आधारभूत जी शास्त्रश्रेष्ठ गीता, तिच्या योगानें सर्व शास्त्रें सनाथ झालीं आहेत. ३५ फार काय? परंतु या गीतेनें मागील अध्यायांत पुष्कळ उपाय सांगितले आहेत कीं, ज्या योगानें आत्मा आपले हस्तगत होईल. ३६ परंतु प्रथम (एकदां) ऐकल्याने अर्जुनाला हें कळलें किंवा नाहीं हा भाव, कळकळीनें श्रीहरींनीं मनांत धरून, ३७ तोच अर्थ शिष्याच्या ठिकाणीं दृढ होण्याकरितां मोकळ्या मनानें एक वेळ पुनः सांगतात. ३८ आणखी, गीता समाप्त होण्याचा प्रसंग आलेला आहे, म्हणून आरंभापासून शेवटपर्यंत एकच अर्थ प्रतिपादन

आणि प्रसंगें गीता । ठावोही हा संपतां । म्हणौनि दावी आयंता । एकार्थत्व ॥ ३९ ॥ जे ग्रंथाच्या मध्यभागीं । नाना अधिकारप्रसंगीं । निरूपण अनेगीं । सिद्धांतीं केलें ॥ १२४० ॥ तरी तेतुलेही सिद्धांत । इये शास्त्रीं प्रस्तुत । हें पूर्वापर नेणत । कोण्ही जै मानी ॥ ४१ ॥ तें महासिद्धांताचा औवांका । सिद्धांतकक्षा अनेका । भिडऊनि आरंभु देखा । संपवीतु असे ॥ ४२ ॥ ( १२६१. गीतार्थाचा आदिअंत थोडक्यांत, १२४३–१२४५ ) *एथ अविद्यानाशु* हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ । या दोहीं केवळ । साधन ज्ञान ॥ ४३ ॥ हें इतुलेंचि नानापरी । निरूपिलें ग्रंथविस्तारीं । तें आतां दोहीं अक्षरीं । अनुवादावें ॥ ४४ ॥ म्हणौनि उपेयही हातीं । जालया उपायस्थिती । देव प्रवर्तले ते पुढती । येणेंचि भावें ॥ ४५ ॥

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥

अन्वयः—मद्व्यपाश्रयः सदा सर्वकर्माणि अपि कुर्वाणः मत्प्रसादात् शाश्वतं अव्ययं पदं अवाप्नोति ॥ ५६ ॥

( १२६२. ईश्वराचे ठिकाणीं भाव ठेवून कर्मे करितो, १२४६-१२५१ ) मग म्हणे गा सुभटा । तो क्रमयोगिया निष्ठा । मी होउनी होय पैठा । माझ्या रूपीं ॥ ४६ ॥ स्वकर्माच्या चोखौळीं । मज पूजा करूनि भली । तेणें प्रसादें आकळी । ज्ञाननिष्ठेतें ॥ ४७ ॥ ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे । तेथ भक्ति माझी उल्लासे । तिया भजन–समरसें । सुखिया होय ॥ ४८ ॥ आणि विश्वप्रकाशितया । आत्मया मज आपुलिया । अनुसरे जो करूनियां । सर्वत्रैता हे ॥ ४९ ॥ सांडूनि आपला आडैळ । लवण आश्रयी जळ । कां हिंडोनि राहे निश्चळ । वायु व्योमीं ॥ १२५० ॥ तैसा बुद्धी वाचा कायें । जो मातें आश्रयूनि ठाये । तो निषिद्धेंही विपायें । कर्मे करू ॥ ५१ ॥ ( १२६३. ईश्वरप्रसादानें शाश्वत-पदप्राप्ति, १२५२–१२५८ ) परी गंगेच्या संबंधीं । बिदी आणि महानदी । येक तेविं माझ्या बोधीं । शुभाशुभांसी ॥ ५२ ॥ कां वावेनें आणि धुरें । हा निवाडु तंवाचि सरे । जंव न घेपती वैश्वानरें । कवळूनि दोन्ही ॥ ५३ ॥ ना ना पांचिकें आणि सोळें । हें सोनया तंवाचि वोलें । जंव परिसु आंगमेळें । येकवटीना ॥ ५४ ॥ तैसें शुभाशुभ ऐसें । हें तंवचिवरी आभासे । जंव येकु न प्रकाशे । सर्वत्र मी ॥ ५५ ॥ अगा रात्रि आणि दिवो । हा तंवचि द्वैतभावो । जंव न रिगिजे गावो । गभस्तीचा ॥ ५६ ॥ म्हणौनि माझिया भेटी । तयाचीं सर्व कर्मे किरीटी । जाऊनि बैसे तो पोटीं । सायुज्याच्या ॥ ५७ ॥ देशें काळें स्वभावें । वेंचु जया न संभवे । तें पद माझें पावे । अविनाश तो ॥ ५८ ॥ ( १२६४. शाश्वतपदापेक्षां

आहे असें दाखवितात, ३९ किंवा ग्रंथाच्या मध्यंतरीं नाना अधिकारप्रसंगानें अनेक सिद्धांत सांगितलेले आहेत, १२४० तरी पूर्वापर संबंध मनांत न आणून गीतेमध्यें अनेक सिद्धांत आहेत असें जर कोणी मानील, तर ४१ महासिद्धांतांचें एकंदर ऐक्य करून त्याच्या पोटांत अनेक सिद्धांतकक्षा ( युक्ति ) मिळवून आरंभिलेली गीता संपवितात. ४२ या गीताशास्त्रांत अविद्येचा नाश ही मुख्य भूमि, व मोक्षाचा लाभ हें तिचें फळ, या दोन गोष्टी होण्याला ज्ञान हें केवळ साधन होय. ४३ तेंच ज्ञान नानाप्रकारें ग्रंथांत सांगून ग्रंथाचा विस्तार झाला आहे, तें ज्ञान आतां एकदोन शब्दांनी सांगतों. ४४ म्हणून, उपायानें मिळणारी वस्तु हातांत आली ती वस्तु प्राप्त होण्याचें साधन देवांनीं पुन: येवढ्याचकरितां सांगितलें. ४५

श्लोकार्थः—जो मनुष्य माझ्या ठिकाणीं सर्व भाव ठेवतो, तो माझ्या प्रसादानें शाश्वत अविनाशी अशा पदाला प्राप्त होतो ॥ ५६ ॥

मग देव म्हणतात, हे सुभटा, तो क्रमयोगी अशा निष्ठेनें मद्रूप होऊन माझ्या स्वरूपीं मिळतो. ४६ स्वकर्मानुष्ठानरूपी सुंदर पुष्पांनीं माझी चांगली पूजा केल्यावर, मला प्रसन्न करून घेऊन ज्ञाननिष्ठेचा प्रसाद तो मिळवितो. ४७ ती ज्ञाननिष्ठा ज्याचे हातांत आली आहे, तेथें माझी परमभक्ति उल्लासित होते; आणि त्या भक्तीच्या भजनेंकरून माझ्याशीं ऐक्य पावून तो सुख भोगतो. ४८ आणि विश्वाला प्रकाशित करणारा मी जो आत्मा, त्याप्रत जो सर्व भावेंकरून अनुसरला; ४९ मिठानें आपला लोभ सोडून पाण्याचा आश्रय केला म्हणजे जसें तें जलरूपच होतें, किंवा आकाशामध्यें वायु फिरून पुन: आकाशांतच ऐक्य पावतो, १२५० तसा बुद्धीनें व कायावाचामनानें जो माझा आश्रय करून राहतो, त्याच्या हातून एखादे वेळीं कदाचित् निषिद्धही कर्म घडेल; ५१ परंतु महानदी, किंवा, रस्त्यांतील घाणेरडें पाणी, यांना गंगेचा संबंध झाला म्हणजे जशीं तीं गंगारूप होतात, तसा माझा आश्रय करणाऱ्या भक्ताला शुभ किंवा अशुभ कर्मानें दोष लागत नाहीं. ५२ अथवा, मैलागिरी चंदन आणि दुसरें रायवळ लांकूड हा भेद तोंपावेतोंच असतो, कीं जोंपावेतों, त्याचा अग्नीशीं संबंध झाला नाहीं. ५३ किंवा हिणकट अथवा सोळा रुपये दराचें सोनें हा भेद सोन्यामध्यें तोंपर्यंतच असतो, कीं जोंपर्यंत परिसाशीं संबंध झाला नाहीं। ५४ त्याप्रमाणें शुभ व अशुभ हा भेद तोंपर्यंतच असतो, की जोंपर्यंत सर्वत्र माझा प्रकाश झाला नाहीं। ५५ अरे, जोंपर्यंत सूर्याच्या गांवात प्रवेश झाला नाहीं, तोंपर्यंतच रात्र व दिवस हा भेद आहे. ५६ म्हणून अर्जुना, माझी भेट झाली म्हणजे त्याचीं सर्व कर्मे नाहींतशीं होऊन तो सायुज्यपदावर बसतो. ५७ ज्या पदाचा देशानें, काळानें व स्वभावानें कधीं-नाश

१ पुष्कळ. २ बळ; ऐक्य. ३ युक्ति. ४ मिळवून. ५ मोक्षसंपादन. ६ सांगावें. ७ उपायानें मिळणारी वस्तु. ८ साधन. ९ सुंदर फुलांनीं. १० हस्तगत होते. ११ ऐक्यानें. १२ सर्वभावानें. १३ लोभ. १४ नाला. १५ मैलागिरी चंदन. १६ लाकूड. १७ हिणकट. १८ आळ आला. १९ पदाप्रत.

जगात दुसरा कोणता लाभार्थ नाहीं, १२९९) किंबहुना पंडुसुता । मज आत्मयाची प्रसन्नता । लाहे तेणें न पाविजैता । लाभु कवणु असे ॥ ५९ ॥

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।
बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥

अन्वयः—( त्वं ) सर्वकर्माणि चेतसा मयि संन्यस्य मत्परः बुद्धियोगं उपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥

( १२६५. कर्में मनानें ईश्वराला अर्पण करावीं, १२६०–१२६५ ) याकारणें गा तुवां इया । सर्व कर्मा आपुलिया । माझ्या स्वरूपीं धनंजया । संन्यासु कीजे ॥ १२६० ॥ परी तोचि संन्यासु वीरा । कैरणीयेचा झणें करा । आत्मविवेकीं धरा । चित्तवृत्ति हे ॥ ६१ ॥ मग तेणें विवेकबळें । आपणपें कर्मावेगळें । माझ्या स्वरूपीं निर्मळें । देखिजेल ॥ ६२ ॥ आणि कर्माची जन्मभोये । प्रकृति जे कां आहे । ते आपणयाहूनि बहुवें । देखसी दुरी ॥ ६३ ॥ तेथ प्रकृति आपणया । वेगळी नुरे धनंजया । रूपेंवीण कां छाया । जयापरी ॥ ६४ ॥ ऐसेनि प्रकृतिनाशु । जालया कर्मसंन्यासु । निफजेल अनायासु । सकारणु ॥ ६५ ॥ ( १२६६. बुद्धि ईश्वरनिष्ठ करावी, १२६६–१२६८ ) मग कर्मजात गेलया । मी आत्मा उरे आपणपया । तेथ बुद्धि धांपे करूनिया । पतिव्रता ॥ ६६ ॥ बुद्धि अनन्य येणें योगें । मजमाजीं जैं रिगे । तैं चित्त चैत्यत्यागें । मातेंचि भजे ॥ ६७ ॥ ऐसें चैत्यजातें सांडिलें । चित्त माझ्या ठायीं जडलें । ठाके तैसें वहिलें । सर्वदा करीं ॥ ६८ ॥

मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।
अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥

अन्वयः—( त्वं ) मच्चित्तः ( सन् ) सर्वदुर्गाणि मत्प्रसादात् तरिष्यसि; अथ चेत् त्वं अहंकारात् न श्रोष्यसि, ( तर्हि त्वं ) विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥

( १२६७. चित्त ईश्वराचे ठिकाणीं ठेविलें तर ईश्वरप्रसाद होईल, १२६९-१२७३ ) मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियांचि भरेल जेव्हां । माझा प्रसादु जाण तेव्हां । संपूर्ण जाहला ॥ ६९ ॥ तेथ सकळ दुःखधामें । भुंजीजैती जियें मृत्युजन्में । तियें दुर्गमेंचि सुगमें । होती तुज ॥ १२७० ॥ सूर्याचेनि सावाये । डोळा सावाइलें होये । तैं आंधारगचा आहे । पाडु तया ॥ ७१ ॥ तैसा माझेनि प्रसादें । जीवकणु जयाचा उपमर्दे । तो संसाराचेनि बाधे । बागुलें केवीं ॥ ७२ ॥ म्हणौनि धनंजया । तूं संसारदुर्गती इया । तरसील माझिया । प्रसादास्तव ॥ ७३ ॥ ( १२६८. ईश्वराची आज्ञा न ऐकणारा नाश पावेल, १२७४–१२७७ ) अथवा हन अहंभावें । माझें बोलणें हें आघवें । कानामनाचिये शिवे । नेदिसी टेंकों ॥ ७४ ॥ तरि नित्य मुक्त अव्ययो । तूं आहासि तें होऊनि वावो । देहसंबंधाचा घावो ।

होत नाहीं, तें अविनाशपद त्याला प्राप्त होतें. ५८ फार काय सांगावें ? अर्जुना, मी जो आत्मा, त्या माझी प्रसन्नता ज्याला प्राप्त झाली आहे, त्याला प्राप्त होणार नाहीं असा कोणता लाभ आहे ? ५९

श्लोकार्थः—असें आहे म्हणून तू मनानें सर्व कर्मे मला अर्पण करून माझे ठिकाणीं तत्पर होऊन माझ्या ठिकाणीं बुद्धि ठेवून मन्निष्ठ हो ॥ ५७ ॥

यास्तव धनंजया, तूं आपलीं सर्व कर्मे माझे ठिकाणीं समर्पण कर ( असा संन्यास कर ). ६० परंतु हे वीरा, तोच कर्माचा संन्यास वरकांतीं न करतां, विचाराचे ठिकाणीं चित्तवृत्ति ठेवून मनापासून कर. ६१ मग त्या विचाराच्या बळानें, आपलें कर्माहून वेगळें असें निर्मळ स्वरूप तूं माझ्या स्वरूपांत पाहशील; ६२ आणि सर्व कर्मांची जन्मभूमि जें अज्ञान (माया) तें आपल्याहून फार दूर आहे असें तुझ्या दृष्टीस पडेल. ६३ मग, अर्जुना, जशी रूपावांचून छाया दृष्टीस पडत नाहीं, तसें अज्ञान हे आपल्याहून निराळें नाहीं, असें तुझ्या दृष्टीस पडेल. ६४ अशा ज्ञानानें अज्ञानाचा नाश झाला, म्हणजे समूळ कर्माचा संन्यास अनायासाने झाला असें होईल. ६५ मग आत्म्यावर जो भ्रमानें कर्माचा भास दिसतो आहे, तो विचारानें गेला म्हणजे शुद्ध आत्म्याचे ठायीं बुद्धि पतिव्रता ( अनन्य ) करून स्थापन कर. ६६ अशा अनन्ययोगेंकरून ज्या वेळेस बुद्धि माझ्या ठिकाणीं प्रवेश करील, त्या वेळेस चित्त हें चिंतन करण्याच्या पदार्थांचा त्याग करून माझेंच भजन करतें. ६७ याप्रमाणें चिंतन करण्याचे विषय टाकून सर्वकाळ चित्त माझे ठिकाणीं नेहमीं जडून राहील असें त्वरित कर. ६८

श्लोकार्थः—जर तूं माझ्या ठिकाणीं चित्त देऊन राहशील, तर माझ्या प्रसादानें सर्व संकटांतून पार पडशील. आता तूं जर अभिमानानें माझें न ऐकशील, तर नाश पावशील ॥ ५८ ॥

मग, याप्रमाणें अभेदरूपी सेवेनें जेव्हा तुझें चित्त मद्रूप होईल, तेव्हां माझा तुझ्यावर पूर्ण प्रसाद होईल असें समज. ६९ मग जीं जन्ममृत्यूचीं सर्व दुःखांचीं घरें जीवमात्र भोगतो व जीं अति दुर्घट आहेत, तींच तुला सुखकारक होतील; १२७० सूर्यप्रकाशाची डोळ्याला साह्यता मिळाल्यावर मग अंधकाराची किमत आहे काय ? ७१ त्याप्रमाणें, माझ्या प्रसादानें ज्याचा जीवपणा नष्ट झालेला आहे, तो संसाररूपी बागुलाच्या भयानें भिईल कीं काय ? ७२ म्हणून हे धनंजया, माझ्या प्रसादेंकरून संसारदुर्गतीपासून तूं तरशील. ७३ अथवा, अभिमानाच्या योगानें माझें हें सर्व भाषण कानानें न ऐकशील, किंवा मनावर न घेशील, ७४ तर, तूं जरी नित्यमुक्त अव्यय आहेस, तरी ते व्यर्थ होऊन देहसंबंधाचे घाव तुला सोसावे लागतील । ७५ ज्या देहसंबंधाचे ठिकाणीं पदोपदीं आपला

१ न मिळणारा. २ वरकांतीं. ३ जन्मभूमि. ४ अज्ञान. ५ समूळ. ६ घालावी. ७ चिंतन करण्याचा पदार्थ. ८ लवकर. ९ स्थानें. १० भोगिलीं जातात. ११ मदतीनें. १२ साह्यभूत. १३ किंमत. १४ जीवात्म. १५ तुडवला जातो.

वाजेल आंगीं ॥ ७५ ॥ जया देह संबंधाआंतु । प्रतिपदीं आत्मघातु । भुंजतां उसंतु । कहींच नाहीं ॥ ७६ ॥ येवढेनि दारुणें । निमेंणेनिवीण निमणें । पडेल जरी बोलणें । नेघेसी माझें ॥ ७७ ॥

यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।
मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥

अन्वयः—यत् अहंकारं आश्रित्य न योत्स्ये इति मन्यसे, ( तर्हि ) एषः ते व्यवसायः मिथ्या ( अस्ति; यतः ) प्रकृतिः त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥

( १२६९. अर्जुना, अहंकारानें युद्ध न केलेंस तरी क्षात्रस्वभावानें तूं युद्ध करशील, १२७८–१२८५ ) पथ्यद्वेषिया पोषी ज्वरु । कां दीपद्वेषिया अंधकारु । विवेकद्वेषें अहंकारु । पोपूनि तैसा ॥७८॥ स्वदेहा नाम अर्जुनु । परदेहा नाम स्वजनु । संग्रामा नाम मलिनु । पापाचारु ॥ ७९ ॥ इया मती आपुलिया । तिघां तीन नामें यया । ठेऊनिया धनंजया । न झुंजें ऐसा ॥ १२८० ॥ जीवामाजीं निष्टंकु । करिसी जो आत्यंतिकु । तो वायां धाडील नैसर्गिकु । स्वभावोचि तुझा ॥ ८१ ॥ आणि मी अर्जुनु हे आत्मिकें । ययां वधु करणें हें पातक । हे माया वांचूनि तात्विक । कांहीं आहे ॥ ८२ ॥ आधीं झुंजार तुवां होआवें । मग झुंजावया शस्त्र घेयावें । कां न झुंजावया करावें । देवांगण ॥ ८३ ॥ म्हणौनि न झुंजणें । म्हणसी तें वायाणें । ना मानूं लोकपणें । लोकदृष्टीही ॥ ८४ ॥ तऱ्ही न झुंजें ऐसें । निष्टंकिसी जें मानसें । तें प्रकृति अनारिसें । करवीलचि ॥ ८५ ॥

स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥

अन्वयः—कौन्तेय, स्वभावजेन स्वेन कर्मणा निबद्धः ( त्वं ) यत् मोहात् कर्तुं न इच्छसि, तत् अवशः सन् अपि करिष्यसि ॥ ६० ॥

( १२७०. प्राणी स्वभावकर्मांनीं बद्ध असतो, १२८६–१२९१ ) पैं पूर्वे वाहतां पाणी । पव्हिजे पश्चिमेचे वाहणीं । तरी आग्रहोचि उरे तें आणी । आपुलिया लेखा ॥ ८६ ॥ कां साळीचा कणु म्हणे । मी नुगवें साळीपणें । तरी आहे आन करणें । स्वभावासि ॥ ८७ ॥ तैसा क्षात्रसंस्कारासिद्धा । प्रकृती घडिलासी प्रबुद्धा । आतां नुठीं म्हणसी हा धांदा । परी उठवीजसीचि तूं ॥ ८८ ॥ पैं शौर्य तेज दक्षता । एवमादिक पंडुसुता । गुण दिधले जन्मतां । प्रकृती तुज ॥ ८९ ॥ तरी तयाचिया समवायीं- । अनुरूप धनंजया । न करितां उगेलिया । नयेल असों ॥ १२९० ॥ म्हणौनियां तिहीं गुणीं । बांधलासि तूं कोदंडपाणि । त्रिशुद्धि निघसी वाहणीं । क्षात्राचिया ॥ ९१ ॥ ( १२७१. मोहानें युद्ध करणार नाहींस, तरी करणें भाग

१ मरण. २ न ऐकशील. ३ पूर्ण निश्चय. ४ क्षात्रधर्म. ५ आत. ६ तत्त्वदृष्टीनें पाहिलें असतां. ७ युद्ध करणारा. ८ शपथ. ९ मार्गास. १० गुण. ११ स्वस्थ बसणें. १२ ओघांतून.

घात आहे, तो भोगतांना कधींही विश्रांति मिळावयाची नाहीं ! ७६ जर माझें बोलणें न ऐकशील, तर एवढा भयंकर मृत्यु न मरतां तुला सोसावा लागेल ! ७७

श्लोकार्थः–जर अहंकाराचा आश्रय करून, मी युद्ध करणार नाहीं असें म्हणशील, तर हा तुझा आग्रह व्यर्थ आहे; कारण, क्षत्रिय स्वभाव हा तुला जबरदस्तीनें युद्ध करण्यास लावील ॥ ५९ ॥

पथ्याच्या द्वेषानें जसा ज्वर वाढतो, अथवा दिव्याचे द्वेषानें जसा अंधकार वाढतो, तसा विवेकाचे द्वेषानें अहंकार वाढेल. ७८ मग, आपल्या देहाला अर्जुन, दुसऱ्याचे देहाला हे माझे आप्त, व यांच्याशीं संग्राम करणें हेंच पातक, ७९ याप्रमाणें आपल्या बुद्धीनें तिघांना अशीं तीन नांवें ठेवून, अर्जुना, मी युद्ध करणार नाहीं, असा १२८० आपले अंतःकरणांत पूर्ण निश्चय केलास, तरी तुझा जो नैसर्गिक स्वभाव आहे, तो तुझा निश्चय टिकूं देणार नाहीं. ८१ वास्तविक विचार करून पाहिलें असतां, मी अर्जुन, व हे माझे आप्त, व यांचा वध करणें हें पातक ह्या सर्व कल्पना मायेवांचून खऱ्या आहेत काय ? ८२ अगोदर तूं युद्धास तयार झालास, व युद्धाकरितां शस्त्रही घेतलेंस, आणि आतां युद्ध न करण्याची शपथ घेतोस हें योग्य आहे का ? ८३ याजकरितां, मी युद्ध करणार नाहीं, हें तुझें म्हणणें व्यर्थ होय; शिवाय, लोकदृष्टीनेंही तुझें म्हणणें कोणी मान्य करणार नाहीं. ८४ तर मी युद्ध करणार नाहीं, असा जो आपले मनानें निश्चय करीत आहेस, तो व्यर्थ होऊन, तुझी स्वकीय क्षात्रप्रकृति आहे ती तुझ्या निश्चयाचे उलट तुझ्याकडून युद्ध करवीलच करवील ! ८५

श्लोकार्थः—हे कौंतेया, स्वभावसिद्ध जें तुझें युद्धकर्म, त्यानें बद्ध झालेला तू मोहानें जें करू इच्छित नाहींस, तें करशील ॥ ६० ॥

हें पहा, पूर्वेकडे पाण्याचा ओघ चाललेला असून, पोहणारा जर म्हणेल कीं, 'मी पश्चिमेकडे जाईन,' तर त्याचें म्हणणें व्यर्थ होऊन तें पाणी त्याला ओघाकडेच ( पूर्वेकडेच ) ओढून नेईल. ८६ किंवा साळीचा कण जर असें म्हणेल कीं, मी साळीपणानें उगवणार नाहीं, तर तें त्याचें म्हणणें व्यर्थ होय. कारण, त्याला त्याच्या स्वभावाच्या उलट जातांच येणार नाहीं; ८७ त्याप्रमाणें, हे प्रबुद्धा, तुझी प्रकृति क्षात्रगुणानें घडलेली असल्यामुळें, मी युद्ध करण्याला उठणार नाहीं, असें म्हणशील तर तें व्यर्थ होय. तुझा क्षात्रधर्मच तुला युद्ध करण्यास उठवील; ८८ हें बघ, अर्जुना, तुझ्या क्षात्रप्रकृतीनें शौर्य, तेज, दक्षता इत्यादि गुण जन्मतःच तुला दिले आहेत. ८९ तर, हे धनंजया, त्या प्रकृतीच्या गुणानुरोधानें, युद्ध न करता स्वस्थ बसणें होणार नाहीं. १२९० म्हणून हे कोदंडपाणी, त्या क्षात्रगुणांनीं तूं बद्ध झाल्यामुळें तुला तुझ्या स्वभावाच्या विरुद्ध खरोखर जाता येणार नाहीं. ९१ अथवा, आपल्या जन्माच्या मूळाचा विचार न करता, मी युद्ध करणार नाहीं असेंच अढळ मत धारण केलेंस, ९२ तर, हातपाय बांधून रथावर घातलेला मनुष्य मी चालणार नाहीं असें जरी म्हणेल, तरी तो जसा रथाबरोबर दिगंतराला जातो, ९३ तसा तूं आपल्या-

पडेल, १२९२-१२९४ ) ना हें आपुलें जन्ममूळ । न विचारीतचि केवळ । न झुंजें ऐसें अढळ । व्रत जरी घेसी ॥ ९२ ॥ तरी बांधोनि हात पाये । जो रथीं घातला होये । तो न चाले तरी जाये । दिगंता जेवीं ॥ ९३ ॥ तैसा तूं आपुलियाकडूनी । मीं काहींच न करी म्हणौनी । ठासी परी भरंवसेनी । तूंचि करिसी ॥ ९४ ॥ ( १२७२. युद्ध करशीलच; याबद्दल मागील गोष्टींची आठवण देतात, १२९५-१२९६ ) उत्तरु वैराटींचा राजा । पळतां तूं कां निघालासि झुंजा । हा क्षात्रस्वभावो तुझा । झुंजवील तुज ॥ ९५ ॥ महावीर अकरा अक्षोहिणी । तुवां येकें नागविले रणांगणीं । तो स्वभावो कोदंडपाणी । झुंजवील तूतें ॥ ९६ ॥ ( १२७३. जीवाला प्रारब्ध भोगावेंच लागतें व तें प्रारब्ध ईश्वराधीन आहे, १२९७-१२९८ ) हां गा रोगु कायी रोगिया । आवडे दारिद्र दरिद्रिया । परी भोगविजे बळिया । अदृष्टें जेणें ॥ ९७ ॥ अवतरणः—तें अदृष्ट अनारिसें । न करील ईश्वरवशें । तो ईश्वरुही असे । हृदयीं तुझ्या ॥ ९८ ॥

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ६१ ॥

*अन्वयः—( हे ) अर्जुन, यंत्रारूढानि सर्वभूतानि मायया भ्रामयन् ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशे तिष्ठति ॥ ६१ ॥*

( १२७४. हृदयस्थ ईश्वराचें सूर्याच्या रूपकानें वर्णन; काव्यप्रतिभा, १२९९-१३०४ ) सर्व भूतांच्या अंतरीं । हृदय-महाअंबरीं । चिद्वृत्तीच्या सहस्रकरीं । उदयला असे जो ॥ ९९ ॥ अवस्थात्रय तिन्ही लोक । प्रकाशूनि अशेख । अन्यथेदृष्टि पांथिक । चेवविले ॥ १३०० ॥ वेद्योदकाच्या सरोवरीं । फांकतां विषयकल्हारीं । इंद्रियषट्पदा चारी । जीवभ्रमरातें ॥ १ ॥ असो रूपक हें तो ईश्वरु । सकळ भूतांचा अहंकारु । पांघरोनि निरंतरु । उल्हासत असे ॥ २ ॥ स्वमायेचें आडवस्त्र । लावूनि एकला खेळवी सूत्र । बाहेरी नटी छायाविचित्र । चौर्‍यांशीं लक्ष ॥ ३ ॥ तया ब्रह्मादिकीटान्तां । अशेषांही भूतजातां । देहाकारयोग्यता । पाहोनि दावी ॥ ४ ॥ ( १२७५. जीव मायायंत्रावर आरूढ झाले, १३०५-१३१८ ) तेथ जें देह जयापुढें । अनुरूपपणें मांडे । तें भूत तया आरूढे । हें मी म्हणौनि ॥ ५ ॥ सूत सुतें गुंतलें । तृण तृणोंचि बांधलें । कां आत्मबिंबा घेतलें । बाळकें जळीं ॥ ६ ॥ तयापरी देहाकारें । आपणपेंचि दुसरें । देखोनि जीव आविष्करे । आत्मबुद्धी ॥ ७ ॥ ऐसेनि शरीराकारीं । यंत्रीं भूतें अवधारीं । वाऊनि हालवी दोरी । प्राचीनैंची ॥ ८ ॥ तेथ जया जें कर्मसूत्र । मांडूनि ठेविलें स्वतंत्र । तें तिये तिये गती पात्र । होंचि लागे ॥ ९ ॥ किंबहुना धनुर्धरा । भूतातें स्वर्गसंसारामाजी भोवंडी तृणें वारा । आकाशीं जैसा ॥ १३१० ॥ भ्रामकाचेनि संगें ।

कडून मी कांहीं करणार नाहीं असें म्हणून जरी स्वस्थ बसशील, तरी खास तूं युद्धच करशील, यांत संशय नाहीं. ९४ उत्तरगोग्रहणाचे वेळीं विराट राजाचा पुत्र उत्तर हा युद्धांतून माघारी पळत असतांना तूं बृहन्नडेचें सोंग घेतलें असूनही त्याचा सारथि होऊन युद्ध कां केलेंस? तर तोच तुझा क्षात्रिय स्वभाव उगीच न बसतां तुझ्याकडून युद्ध करवीलच करवील! ९५ अर्जुना, त्या युद्धांत अकरा अक्षौहिणी महावीर तूं एकट्यानें त्यांजवर मोहनास्त्र घालून त्यांचीं वस्त्रें नागविलींस, तो तुझा क्षात्रस्वभाव तुझ्याकडून युद्ध करवील. ९६ अरे, असें पहा कीं, रोग्याला रोग आवडतो का? दरिद्री यास दरिद्र आवडतें काय? परंतु बलवान जें प्रारब्ध, तें त्याजकडून भोगवितेंच. ९७ तर तें प्रारब्ध ईश्वरसत्तेनें अन्यथा कधीं करणार नाहीं! असा जो ईश्वर, तो तुझ्या हृदयांत वास करीत आहे. ९८

श्लोकार्थः—हे अर्जुना, देहादिक यंत्रावर अभिमानानें चढलेलीं जीं सर्व भूतें, त्याना आपल्या मायारूप शक्तीनें नाना योनींत फिरविणारा असा परमेश्वर सर्व भूतांच्या हृदयांत वास करितो ॥६१॥

सर्व भूतांचें अंतःकरण हेंच कोणी महाआकाश, त्यांत ज्ञानरूपी वृत्ति हींच ज्याचीं सहस्र किरणें आहेत, त्या किरणांनीं जो उदयास आलेला आहे, ९९ त्या ईश्वररूप सूर्यानें जागृति, स्वप्न व सुषुप्ति हेच कोणी तीन लोक यांस प्रकाशित करून विपरीत ज्ञानानें भुललेले जीव हेच वाटसरू जागृत केले. १३०० वेद्योदकाच्या सरोवरांत विषयरूपी कमळें प्रफुल्लित करवून पंचज्ञानेंद्रियें व सहावें मन यांस या सहा पायांच्या जीवरूपी भ्रमरांकडून त्या कमळाचें सेवन करवितो. १ हें सूर्याचें रूपक असूं दे. सर्वांच्या हृदयांत वास करणारा जो ईश्वर, तोच सर्व भूतांचें अहंकाररूपीं पांघरूण आपले अंगावर घेऊन प्रकटत आहे. २ जो आपल्या मायेचा आडपडदा लावून आंतून एकटाच सूत्र हालवून बाहेर चौऱ्यायशीं लक्ष छायारूपी चित्रें नाचवितो, ३ त्या ब्रह्मदेवापासून कीटकापर्यंत सर्व भूतमात्रांना योग्यतेनुसार देहाच्या आकारास आणतो, ४ ज्या भूतापुढें त्याच्या योग्यतेप्रमाणें जो देह मांडला, तो देह मीच आहे, अशा बुद्धीनें तो देहरूपी यंत्रावर चढतो; ५ सूत सुतानेंच बांधावें, गवत गवतानेंच बांधावें, किंवा आपलें प्रतिबिंब पाण्यांत पाहून बालक ज्याप्रमाणें भ्रमानें तें घेण्यास धावतें, ६ त्याप्रमाणें, देहरूप आकारानें जो दुसरा तो मीच आहे म्हणून भ्रमानें ग्रहण करितो. (अभिमान बाळगतो.) ७ या प्रकारें शरीराकारयंत्रावर भूतांना बसवून पूर्वकर्मानुरूप सूत्रें हालवितो, ८ तेव्हां ज्या भूताचें जें स्वतंत्र प्रारब्धसूत्र असेल, तें तें भूत त्या त्या गतीला प्राप्त होतें. ९ जसा वारा हा आकाशामध्यें तृणाला फिरवितो, तसें, धनुर्धरा, सर्व भूतांना स्वर्ग व संसार यामध्यें प्रारब्ध फिरवितें. १३१० लोहचुंबकाचे सत्तेनें

१ स्वस्थ बसलास. २ प्रारब्ध. ३ महाकाशात. ४ ज्ञानरूपी वृत्तींच्या. ५ विपरीत ज्ञानानें भुललेले. ६ वाटसरू. ७ विषयरूप. ८ कमळें. ९ वृक्ष २० लक्ष, कीटक ११ (लक्ष, पशु ३० लक्ष, जलचर ९ लक्ष, पक्षी १० लक्ष, मनुष्ययोनि ४ लक्ष मिळून) ८४ लक्ष योनि. १० ब्रह्मदेवापासून कीटकापर्यंत. ११ योग्यतेनुरूप. १२ स्वीकार करतो. १३ पूर्वकर्मांची. १४ लोहचुंबकाच्या.

जैसें लोहो वेढां रिगे । तैसीं ईश्वरसत्तायोगें । चेष्टती भूतें ॥ ११ ॥ जैसे चेष्टा आपुलालिया । समुद्रादिक धनंजया । चेष्टती चंद्राचिया । सन्निधीं येकीं ॥१२॥ तया सिंधू भरितें दाटे । सोमकांता पाझरु फुटे । कुमुदा चकोरांचा फिटे । संकोचु तो ॥ १३ ॥ तैसीं बीजप्रकृतिवशें । अनेकें भूतें येकें ईशें । चेष्टवीजती तो असे । तुझ्या हृदयीं ॥१४॥ अर्जुनपण न घेतां । मी ऐसें जें पंडुसुता । उठतसे तें तत्त्वता । तयाचें रूप ॥ १५ ॥ यालागीं तो प्रकृतीतें । झुंज प्रवर्तवील हें निरुतें । आणि ते वील तूतें । न झुंजसी ज्न्ही ॥ १६ ॥ म्हणोनि ईश्वर गोसावी । तेणें प्रकृति हे नेमावी । तिया सुखें राबवावी । इंद्रियें आपुलीं ॥ १७ ॥ तूं करणें न करणें दोन्ही । लाऊनि प्रकृतीच्या मानीं । प्रकृतिही कां अधीनी । हृदयस्था जया ॥ १८ ॥

तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।
तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥

अन्वयः—भारत, ( त्वं ) तम् एव सर्वभावेन शरणं गच्छ, तत्प्रसादात् परां शांतिं ( च ) शाश्वतं स्थानं प्राप्स्यसि. ॥ ६२ ॥

(१२७६. हृदयस्थास शरण जावें, १३१९) तया अहं वाचा चित्त आंग । देऊनिया शरण रिग । महोदधी कां गांग । रिगालें जैसें ॥१९॥ (१२७७. ईशप्रसादानें शांति मिळते, १३२० ) मग तयाचेनि प्रसादें । सर्वोपशांतिप्रमदे । कांतु होऊनिया स्वानंदें । स्वरूपींच रमसी ॥ १३२० ॥ ( १२७८. शाश्वतपद, १३२१–१३२२ ) संभूति जेणें संभवे । विश्रांति जेथें विसंवे । अनुभूतिही अनुभवे । अनुभवा जया ॥ २१ ॥ तिये निजात्मपदींचा रावो । होऊनि ठाकसी अव्ययो । म्हणे लक्ष्मीनाहो । पार्था तूं ॥ २२ ॥

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद् गुह्यतरं मया ।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥

अन्वयः—अर्जुन, इति गुह्यात् गुह्यतरं ज्ञानं मया ते व्याख्यातम्; एतत् अशेषेण विमृश्य त्वं यथा इच्छसि तथा कुरु. ॥ ६३ ॥

( १२७९. गुह्यातील गुह्य ज्ञान, १३२३–१३३१ ) हें गीतानाम विख्यात । सर्ववाङ्मयाचें मथित । आत्मा जेणें हस्तगत । रत्न होय ॥ २३ ॥ ज्ञान ऐसिया ढेंढी । वेदान्तीं जयाची प्रौढी । वानितां कीर्ति चोखडी । पातली जगीं ॥ २४ ॥ बुद्ध्यादिकें डोळसें । हें जयाचें कां कैंडवसें । मी सर्वद्रष्टाहि दिसें । पाहला जया ॥२५॥ तें हें गा आत्मज्ञान । मज गोप्याचेंही गुप्त धन । परी तूं म्हणूनि आन । केविं करूं ॥ २६ ॥ याकारणें गा पांडवा । आम्हीं आपला हा गुह्य ठेवा । तुज दिधला कणवा । औकाळिलेपणें ॥२७॥ जैसी भुलली वोरसें । माय बोले बाळोद्देशें । प्रीति ही परी तैसें । न करूंचि हो ॥२८॥ येथ आकाश आणि गाळिजे ।

१ थाटोळें फिरतें. २ चंद्रविकासी कमळांचा. ३ पराप्रकृति. ४ धोरणानें. ५ अहंकार.

जसें लोखंड हालतें, तशीं ईश्वरसत्तेच्या योगानें सर्व भूतें व्यवहार करतात. ११ हे धनंजया, जसें चंद्राचें सांनिध्य झालें म्हणजे समुद्रादिकांच्या चेष्टा सुरू होतात, १२ समुद्राला भरती येते, सोमकांत मण्याला पाझर फुटतो, चंद्रविकासी कमलें उमलतात, व चकोर पक्ष्यांना आनंद होतो, १३ तसा पराप्रकृतीच्या योगानें अनेक भूतांना जो एक ईश्वर चेष्टवितो, तो तुझ्या हृदयांत वास करीत आहे. १४ हे पांडुसुता, अर्जुनपणाचा अभिमान न धरितां जो मीपणा तुझ्या ठिकाणीं उद्भवतो, तें त्या ईश्वराचें खरें रूप होय. १५ म्हणून, तो ईश्वर, प्रकृतीला प्रवृत्त करून, तूं जरी युद्ध केलें नाहींस तरी तुझ्याकडून युद्ध करवील. १६ याकरितां, सर्वांचा स्वामी ईश्वर आहे, तो सर्व भूतांना जशी प्रकृति देतो, त्या प्रकृत्यनुरूप सर्व इंद्रियें आपआपल्या क्रिया करतात. १७ एवढ्याकरितां, कर्माचा अभिमान न धरितां, त्या सगळ्या क्रिया प्रकृतीच्या अधीन आहेत असें समजून, प्रकृति ज्या हृदयस्थ आत्म्याच्या स्वाधीन आहे, १८

श्लोकार्थः—हे भारता, तूं त्यालाच सर्वभावेंकरून शरण जा. त्याच्या प्रसादानें तूं परम शांति आणि शाश्वत स्थान प्राप्त पावशील ॥ ६२ ॥

त्या ईश्वराला, जसें गंगेचें उदक समुद्राला शरण जाऊन तद्रूप होतें, तसा अहंकार, वाचा, चित्त व शरीर हीं सर्वस्वी अर्पण करून शरण जा. १९ मग त्या ईश्वराचे प्रसादानें सर्वत्रशांतिरूपी स्त्रीचा तूं पति होऊन आनंदानें आत्मस्वरूपीं रममाण होशील. १३२० जें पद उत्पत्तीचें कारण, विश्रांतीचें विश्रांतिस्थान व अनुभूति ज्याचा अनुभव घेते, २१ त्या आपल्या आत्मपदाचा तूं राजा होऊन अक्षय्य सुख भोगशील. असें लक्ष्मीपति श्रीकृष्ण पार्थास बोलले. २२

श्लोकार्थः—याप्रमाणें अर्जुना, गुह्याहूनहीं अति गुह्य असें ज्ञान मीं तुला सांगितलें; आतां त्याचा पूर्ण विचार करून मग तुझ्या मनास येईल तसें कर ॥ ६३ ॥

हें ज्ञान, गीता या नांवानें प्रसिद्ध आहे, व जें सर्व वेदाचें सार आहे, व ज्या ज्ञानानें आत्मरूप रत्न स्वाधीन होतें. २३ वेदांतशास्त्रांत ज्ञान या नांवानें जें प्रसिद्ध आहे, व ज्याचें वर्णन करून जगांतील सर्व शास्त्रांना कीर्ति प्राप्त झाली; २४ बुद्ध्यादिक ज्ञानें ज्या ज्ञानापुढें निस्तेज आहेत, व मी सर्वद्रष्टाही ज्या ज्ञानानें समजला जातो, २५ तें हें आत्मज्ञान, सर्वांमध्यें जो मी गुप्त त्या माझेंही गुप्त धन आहे, व हें ज्ञान जरी इतकें योग्यतेचें आहे, तरी तूं माझा परमभक्त असल्यामुळें, तुला न सांगतां गुप्त कसें ठेववेल? २६ याकरितां हे पांडवा, तुझ्या प्रेमभरानें आम्ही तृप्त झालों, म्हणून आम्हीं आपला गुप्त ठेवा तुला दिला. २७ ज्याप्रमाणें मुलाच्या प्रेमानें आई भुलून जाते, आणि त्याच्या उद्देशानें प्रेमभरित भाषण करते, त्याप्रमाणें आमचें तुझ्यावरील प्रेम तसें कसें करूं देणार नाहीं! २८ आकाश सर्वां-

६ गंगोदक. ७ सर्वत्रशांतिरूप स्त्रीचा. ८ उत्पत्ति. ९ अनुभव. १० लक्ष्मीपति. ११ वेदाचें सार. १२ प्रसिद्धि. १३ निस्तेज. १४ कळकळीनें. १५ तृप्त झाल्यामुळें. १६ प्रेमानें.

अमृताही साली फेडिजे । कां दिव्याकरवीं करविजे । दिव्य जैसें ॥ २९ ॥ जयाचेनि अंगप्रकाशें । पाताळींचा परमाणु दिसे । तया सूर्याहि कां जैसें । अंजन सूदलें ॥ १३३० ॥ तैसें सर्वज्ञेंही मियां । सर्वही निर्धारूनियां । निकें होय तें धनंजया । सांगितलें तुज ॥ ३१ ॥ ( १२८०. आत्मज्ञानाचा निश्चय करून इच्छेस येईल तसें कर, १३३२ ) आतां तूं ययावरी । निकें हें निर्धारीं । निर्धारूनि करीं । आवडे तैसें ॥३२॥ (१२८१. देवाचें भाषण ऐकून अर्जुना उगीच राहिला; काव्यप्रतिभा, १३३३ ) यया देवाचिया बोला । अर्जुनु उगाचि ठेला । तेथ देवो म्हणती भला । अवंचकु होसी ॥३३॥ (१२८२. अर्जुनाच्या उगेपणाचा अभिप्राय जाणून देव म्हणतात, तुला ज्ञान सांगतों; काव्यप्रतिभा, १३३४-१३३७ ) वाढितयापुढें भुकेला । उपरोधें म्हणे मी धाला । तें तोचि पीडे आपुला । आणि दोषुही तया ॥ ३४ ॥ तैसा सर्वज्ञु श्रीगुरु । भेटलिया आत्मनिर्धारु । न पुसिजे जैं आभारु । धरूनियां ॥३५॥ तैं आपणपेंचि वचे । आणि पापही वंचनाचें । आपणयाचि साचें । चुकविलें तेणें ॥ ३६ ॥ पैं उगेपणा तुझिया । हा अभिप्रावो कीं धनंजया । जें एकवेळ आंवांकूनियां । सांगावें ज्ञान ॥ ३७ ॥ ( १२८३. अर्जुन म्हणतो, देवा, जगांत ज्ञाते आपण व बाकी सर्व ज्ञेय आहे; काव्यप्रतिभा; १३३८–१३३९ ) तेथ पार्थु म्हणे दातारा । भलें जाणसी माझिया अंतरा । हें म्हणों तरी दुसरा । जाणता असे काई ॥ ३८ ॥ येर ज्ञेय हें जी आघवें । तूं ज्ञाता एकाचि स्वभावें । मा सूर्यु म्हणौनि वानावें । सूर्यातें काई ॥ ३९ ॥ ( १२८४. देव बोलतात; काव्यप्रतिभा, १३४० ) या बोला श्रीकृष्णें । म्हाणितलें काय येणें । हेंचि थोडें गा वानणें । जें बुझतासि तूं ॥ १३४० ॥

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।
इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥

अन्वयः—सर्वगुह्यतमं परमं वचः मे भूयः शृणु; मे दृढं इष्टः असि, इति ततः ते हितं वक्ष्यामि ॥ ६४ ॥

( १२८५. देवाचें गुह्यवचन; काव्यप्रतिभा, १३४१–१३५२ ) तरी अवधान पघळ । करूनियां आणी एकवेळ । वाक्य माझें निर्मळ । अवधारीं पां ॥ ४१ ॥ हें वेंच्य म्हणौनि बोलिजे । कां श्रेव्य मग आयिकिजे । तैसें नव्हे परी तुझें । भाग्य बरवें ॥४२॥ कूर्मीचिया पिलियां । दिठी पान्हा ये धनंजया । कां आकाश वाहे चापियों । घरींचें पाणी ॥ ४३ ॥ जो व्यवहारु जेथ न घडे । तयाचें फळचि तेथ जोडे । काय दैवें न सांपडे । सानुकूळें ॥ ४४ ॥ येरवीं द्वैताची वैरी । सारूनि ऐक्याच्या परिवरीं । भोगिजे तें अवधारीं । रहस्य हें ॥ ४५ ॥ आणि निरुपचारा

१ प्रतिज्ञा, २ वंचना न करणारा, ३ लाजून, ४ भोंट, ५ लाभ गम्बी, ६ आपल्याव

हून सूक्ष्म असूनही तें जसें गाळून घ्यावें, अमृत आत बाहेर गोड असूनही त्याची जशी साल काढावी, अथवा दिव्याकडून जसें दिव्य करवावें; २९ ज्या सूर्याच्या अंगप्रकाशानें पाताळांतील परमाणुही दिसतो, त्या सूर्याचे डोळ्यांतही अंजन घालावें, १३३० तसें मी सर्वज्ञ असून व सर्वांचा विचार करून जें माझें खात्रीस उत्तम, तें, हे धनंजया, तुला ज्ञान सांगितलें. ३१ आता तूं पुढें या ज्ञानाचा नीट विचार करून निश्चय कर; आणि निश्चय झाल्यावर तुला वाटेल तें कर. ३२ हें देवाचें भाषण ऐकल्यावर अर्जुन स्तब्ध राहिला. हें पाहून देव म्हणाले, " तूं खरोखर अवंचकच (आंत बाहेर न करणारा) आहेस. ३३ वाढणारा वाढीत असतांना भुकलेला मनुष्य जर लाजून पुरे पुरे म्हणेल, तर क्षुधेची पीडा आपण सोसून वंचकपणाचा दोषही त्याजवर येतो. ३४ त्याप्रमाणें, सर्वज्ञ असा श्रीगुरु भेटल्यावर भीड धरून आत्मस्वरुपाचा विचार जर न विचारील, ३५ तर आपला लाभ आपणच गमावून वंचना केल्याचें पातकही त्याला लागतें, व तो आपल्या खरोखर लाभास अंतरतो. ३६ परंतु अर्जुना, तुझा स्वस्थ राहण्याचा असा अभिप्राय आहे कीं, तुला आणखी एक वेळ ज्ञान पूर्णपणें सांगावें. ३७ तेव्हा पार्थ म्हणाला: " हे प्रभो, आपण माझे मनातील गोष्ट खरोखर जाणली, हें म्हणावयास कशास पाहिजे ! कारण तुमचेवांचून दुसरा कोणी जाणता आहे काय ? ३८ तुमच्यावाचून सर्व जग तुमचें ज्ञेय ( जाणण्याची वस्तु ) असून त्या सर्वांना जाणणारे तुम्हीच आहां. मग सूर्याला सूर्य म्हणून त्याची वाखाणणी काय करावी ? " ३९ हें अर्जुनाचें बोलणें ऐकून भगवान श्रीकृष्ण म्हणतात, या तुझ्या बोलण्यानें थोडें वर्णन झालें असें समजतोस कीं काय ? १३४०

श्लोकार्थः—सर्वांहून अतिशय गुह्य असें माझें वचन पुनः तूं ऐक. कारण तूं माझा अत्यंत आवडता आहेस, म्हणून तुझ्या हिताची गोष्ट सांगतों ॥ ६४ ॥

तर आणखी एक वेळ अवधान चांगलें विस्तीर्ण करून माझें निर्मळ वचन ऐक. ४१ हें वचन वाच्य आहे म्हणून बोलावें किंवा श्राव्य म्हणून ऐकावें, असें नसून हें केवळ ब्रह्मस्वरूपच आहे; परंतु तूं भाग्यवान असल्यामुळें तुला हें प्राप्त झालें आहे. ४२ हे धनंजया, कासवीच्या दृष्टीला, पिलें पाहतांक्षणींच पान्हा फुटतो, आणि तीं तृप्त होतात, किंवा आकाश हें चातक पक्ष्यांकरितां सर्व काळ पाणी पोटांत बाळगितें, ४३ म्हणून जो व्यवहार जेथें घडत नाहीं, त्याचें फळ तेथेंच प्राप्त होतें. याचें कारण काय म्हणून विचारशील तर, अनुकूल दैव असल्यावर कोणता लाभ होणार नाहीं ? ४४ बाकी हें रहस्य किती दुर्लभ आहे तें सांगतां येत नाहीं. कारण, द्वैताचा भाव टाकून ऐक्याचे घरामध्ये भोगण्यासारखें हें रहस्य आहे. ४५ हे प्रियोत्तमा, उपचाररहित जें आमचें प्रेम त्या प्रेमाला जो तूं विषय झाला आहेस, तो तूं दुसरा कोणी नसून माझा आत्माच आहे असें समज.

फसविणें. ७ पूर्णपणें. ८ समजतास. ९ विस्तीर्ण. १० बोलण्याचा शब्द. ११ ऐकण्याची गोष्ट. १२ चातक पक्षी. १३ भाव. १४ घरात. १५ गुह्य. १६ आदरयुक्त.

प्रेमा। विषय होय जें प्रियोत्तमा। तें दुजें नव्हे कीं आत्मा। ऐसेंचि जाणावें ॥४६॥ आरिसाचिया देखिलया। गोमटें कीजे धनंजया। तें तया नोहे आपणया-। लागीं जैसें ॥ ४७ ॥ तैसें पार्था तुझेनि मिषें। मी बोलें आपणयाचि उद्देशें। माझ्या तुझ्या ठाईं असे। मीतूंपण गा ॥ ४८ ॥ म्हणौनि जिव्हारींचें गुज। सांगतसें जीवासी तुज। हें अनन्यगतीचें मज। आथी व्यसन ॥ ४९ ॥ पैं जळा आपणपें देतां। लवण भुललें पंडुसुता। कीं आघवें तयाचें होतां। न लजेचि तें ॥ ३५० ॥ तैसा तूं माझ्या ठाईं। राखों नेणसीचि कांहीं। तरी आतां तुज काई। गोप्य मी करूं ॥ ५१ ॥ अवतरणः—म्हणौनि आघवींचि गूढें। जें पाऊनि अति उघडें। तें गोप्य माझें चोखडें। वाक्य आइक ॥५२॥

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।
मामेवैष्यासि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥६५॥

अन्वयः—मन्मनाः, मद्भक्तः ( च ) मद्याजी भव, मां नमस्कुरु; ( एवं कृत्वा त्वं ) माम् एव एष्यसि, ( इति ) ते सत्यं प्रतिजाने; ( यतः त्वं ) मे प्रियः असि ॥ ६५ ॥

( १२८६. मनानें भक्त हो, १३५३–१३५५ ) तरी बाह्य आणि अंतरा। आपुलिया सर्व व्यापारा। मज व्यापकातें वीरा। विषयो करीं ॥ ५३ ॥ आघवा आंगीं जैसा। वायु मिळोनि आहे आकाशा। तूं सर्व कर्मीं तैसा। मजसीचि आस ॥ ५४ ॥ किंबहुना आपुलें मन। करीं माझें एकायतन। माझेनि श्रवणें कान। भरूनि घालीं ॥ ५५ ॥ आत्मज्ञानें चोखडीं। संत जे माझीं रूपडीं। तेथ दृष्टि पडो आवडी। कामिनी जैसी ॥ ५६ ॥ ( १२८७. इंद्रियांनीं सेवा करणें, १३५६-१३५८ ) मीं सर्व वस्तीचें वसौटें। माझीं नामें जियें चोखटें। तियें जियावया वाटे। वाचेचियें लावीं ॥ ५७ ॥ हातांचें करणें। कां पायांचें चालणें। तें होय मजकारणें। तैसें करीं ॥ ५८ ॥ (१२८८. ईश्वराचें यजन करणें, १३५९-१३६१) आपुला अथवा परावा। ठायीं उपकरैसी पांडवा। तेणें यज्ञें होईं बरवा। याज्ञिकु माझा ॥ ५९ ॥ हें एकैक शिकऊं काई। पैं सेवैकै आपुल्या ठाईं। उरऊनि येर सर्वही। मी सेव्याचि करीं ॥१३६०॥ तेथ जाऊनि भूतद्वेषु। सर्वत्र नमवेन मीचि एकु। ऐसेनि आश्रयो आत्यंतिकु। लाहसी तूं माझा ॥ ६१ ॥ ( १२८९. ईश्वर-स्वरूप होशील, १३६२–१३६७ ) मग भरलेया जगाआंतु। जाऊनि तिजयाची मातु। होऊनि ठायील एकांतु। आम्हां तुम्हां ॥६२॥ तेव्हां भलतिये अवस्थे। मी तूंतें तूं मातें। भोगिसी ऐसें आइतें। वाढेल सुख ॥६३॥ आणि तिजें आडेळ करितें। निमालें अर्जुना जेथें। तें मीचि म्हणौनि तूं मातें। पावसी शेखीं ॥ ६४ ॥ जैसी

१ यज्ञतिस्थान. २ उपयोगीं पदार्थांस. ३ सेवकभाव. ४ जगभाव. ५ अडथळा करणें.
६ नाहींसें झालें.

४६ अर्जुना, आरशाला वारंवार स्वच्छ करून पुसावयाचें, तें आरशाकरितां नसून; स्वस्वरूपसौख्य भोगण्याकरितां आपण तें करितों; ४७ त्याप्रमाणें, पार्था, तुझें उगींच निमित्त करून मी आपल्याचकरितां बोलतों; तुझ्या व आमच्यामध्यें कांहीं दुजेपणा आहे काय? ४८ याकरितां, आमच्या अगदीं जीवींचें गुह्य तुला मी सांगतों. कारण, एकनिष्ठ भक्ताचे आम्ही भुकेलेले आहों. ४९ हे पाण्डुसुता, जसें मीठ जलाला आपलेपणा सर्वस्वीं देतें व तत्स्वरूप होण्यास लाजत नाहीं, ५० त्याप्रकारें तूं माझ्याशीं भेद ठेवीत नाहींस, तर मी तरी तुला चोरून गुप्त गोष्ट कशी ठेवूं? ५१ म्हणून, जेवढीं गुह्यें म्हणून आहेत, तेवढीं सर्व ज्या आमच्या गुह्यवचनापुढें उघडीं पडतात, तें माझें निर्मळ गुह्य वचन ऐक. ५२

श्लोकार्थः—माझ्या ठायीं मन ठेव, माझी भक्ति कर, माझें पूजन कर, व मला नमस्कार कर. असें केल्यानें मलाच प्राप्त होशील, असें मी प्रतिज्ञा करून तुला खरोखर सांगतों. कारण, तूं माझा आवडता आहेस ॥ ६५ ॥

तर, वीरा अर्जुना, तुझे अंतर्बाह्य मानसिक व शारीरिक असे जे जे सर्व व्यापार होतील, त्यांना, मी जो सर्वव्यापक तोच विषय कर. ५३ वायु ज्याप्रमाणें सर्व बाजूंनी आकाशास मिळालेला असतो, त्याप्रमाणें तूं जीं सर्व कर्में करशील, तीं माझ्या प्रीत्यर्थच कर. ५४ फार काय सांगावें? तूं आपलें मन माझें एकटें राहण्याचें स्थान कर, आणि तूं आपल्या कानानें माझ्या गुणांचें श्रवण कर. ५५ आत्मज्ञानानें युक्त असे जे संत, जीं माझींच रूपें आहेत, त्याचे ठिकाणीं, तुझी दृष्टि कामिनी स्त्रीवर जशी लुब्ध असते तशी ठेव. ५६ वस्तुमात्राचें वसतिस्थान जो मी, माझीं जीं निर्मळ नामें तीं जगण्याकरितां तूं आपल्या वाणीच्या वाटेला लाव. ५७ हातांनीं जीं जीं कृत्यें करशील, किंवा पायानें जिकडे जाशील, त्या सर्व क्रिया माझ्याचकरितां कर. ५८ आपल्या किंवा दुसऱ्याच्या उपयोगीं पडणाऱ्या ज्या ज्या क्रिया करशील, त्या अर्जुना, माझ्या ठिकाणीं अर्पण करून माझा याज्ञिक हो. ५९ आतां एक एक अशा किती गोष्टी शिकवूं! तर आपले ठिकाणीं सेवकभाव मानून जें सर्वत्र तुला दृष्टीस पडेल, तें सर्व मद्रूप आहे असें समजून त्याची सेवा कर. १३६० मग प्राणिमात्राच्या ठिकाणचा द्वैतभाव नाहींसा होऊन सर्वत्र ठिकाणीं मीच आहें, असें तुझ्या अनुभवास येऊन सर्वत्र नम्र होऊन वंदन कर. एवढ्यानें माझा अत्यंत आश्रय तुला प्राप्त होईल. ६१ मग, सर्व जगांत तिसरेपणा नाहींसा होऊन देव-भक्ताचा (माझा व तुझा) एकांत झालेला पाहशील. ६२ मग वाटेल त्या स्थितींत पाहिजे त्या वेळेस मी तुला व तूं मला भोगशील, असें अत्यंत व सहज सुख वाढेल, ६३ आणि अर्जुना, तिसरेपणा (जगभाव) आडवा येतो, तो नाहींसा झाला म्हणजे तूं माझाच आहेस म्हणून मला प्राप्त होशील. ६४ जलाचा नाश झाल्यावर जलांतील प्रतिबिंबाला मूळबिंबास येऊन मिळण्यास कांहीं हरकत होते काय? ६५ तसेंच वारा आकाशास किंवा लाटा समुद्रास मिळण्यास कोणाची अडचण असते काय? ६६ म्हणून तूं आणि मी हा जो भेद

जळींची प्रतिमा[१] जळनाशीं विंवा । येतां गाभांगोभा । कांहीं आहे ॥ ६५ ॥ पैं पवनु अंबरीं[२] । कां कल्लोळ सागरा । मिळतां आडवारा[३] । कोणाचा गा ॥ ६६ ॥ म्हणौनि तूं आणि आम्ही । हें दिसतांहे देहधर्मीं । मग ययाच्या विरामीं । मीचि होसी ॥ ६७ ॥ ( १२९०. देव शपथ घेऊन म्हणतात, तूं मत्स्वरूप होशील; १३६८ ) यया बोलामाझारीं । होय नव्हे झणें करीं । येथ आन आथी तरी । तुझीच आण ॥ ६८ ॥ ( १२९१. देवांनीं शपथ प्रेमांत भुलून घेतली; काव्यप्रतिभा, १३६९-१३७३ ) पैं तुझी आण वाहणें । हें आत्मलिंगातें शिवणें । प्रीतीची जाती लाजणें । आठवों नेदी ॥ ६९ ॥ येऱ्हवीं वेद्यु निष्प्रपंचु[५] । जेणें विश्वाभासु हा साचू । आज्ञेचा नटनाचू[६] । काळातें जिणे ॥ १३७० ॥ तो देवो मी सत्यसंकल्पु । आणि जगाच्या हितीं बापू । मा आणेचा आक्षेपु[७] । कां करावा ॥ ७१ ॥ परी अर्जुना तुझेनि वेधें[८] । मियां देवपणाचीं विरुदें[९] । सांडिलीं गा मी हें आधें । सगळेनि तुवां ॥ ७२ ॥ पैं काजा आपुलिया । रावो आपली आपणया । आण वाहे धनंजया । तैसें हें कीं ॥७३॥ ( १२९२. अर्जुन म्हणतो, देवा, माझ्या निमित्तानें सर्व जगाचें कार्य साधलें; काव्यप्रतिभा, १३७४–१३७८ ) तेथ अर्जुनु म्हणे देवें । अचाट हें न बोलावें । जे आमचें काज नांवें[१०] । तुझेनि एकें ॥ ७४ ॥ यावरी सांगों बैससी । कां सांगतां भींपही देसी । या तुझिया विनोदासी । पारु आहे जी ॥७५॥ कमळवना विकासु । करी रवीचा येक अंशु । तेथ आघवाचि प्रकाशु । नित्य देतो ॥७६॥ पृथ्वी निवऊनि सागर । भरीजती येवढें थोर । वर्षे तेथ मिषांतर[११] । चातकु कीं ॥ ७७ ॥ म्हणौनि औदार्या तुझेया । मज निमित्त ना म्हणावया । प्राप्ति असे दानीराया । कृपानिधि ॥७८॥ ( १२९३. ईश्वरप्राप्तीकरितां कर्मापासून अनेक उपाय सांगितले; काव्यप्रतिभा, १३७९–१३८२ ) तंव देवो म्हणती राहें । या बोलाचा प्रस्तावो नोहे । पैं मातें पावसी उपायें । साचचि येणें ॥ ७९ ॥ सैंधवें[१२] सिंधू पाडिलिया । जो क्षणु धनंजया । तेणें विरोंचि कीं उरावया । कारण कायी ॥ १३८० ॥ तैसें सर्वत्र मातें भजता । सर्व मी होतां अहंता । निःशेष जाऊनि तत्त्वता । मीचि होसी ॥८१॥ एवं माझिये प्राप्ती-वरी । कर्मालागोनि अवधारीं । दाविली तुज उजरी[१३] । उपायाची ॥ ८२ ॥ अवतरणः– ( १२९४. उपायांचें थोडक्यात वर्णन, १३८३–१३८५ ) जे आधीं तंव पंडुसुता । सर्व कर्में मज अर्पितां । सर्वत्र प्रसन्नता । लाहिजे माझी ॥ ८३ ॥ पाठीं माझ्या इये प्रसादीं । माझें ज्ञान जाय सिद्धी । तेणें मिसळिजे त्रिशुद्धी । स्वरूपीं माझ्या ॥८४॥ मग पार्था तिये ठायीं । साध्य साधन होय नाहीं । किंबहुना तुज कांहीं । उरेचिना ॥ ८५ ॥ ( १२९५. देव म्हणतात, मीं प्रसन्न होऊन ज्ञान सांगितलें, त्या

१ प्रतिबिंब. २ आकाश. ३ अडचण. ४ अभाव-समयीं. ५ निर्भेद. ६ शक्ति. ७ शंका. ८ छंदानें. ९ चिन्हें. १० वचन; शपथ. ११ निमित्त. १२ मीठ. १३ प्रकार.

देहभेदामुळें दिसतो आहे, तो भेद नाहींसा झाल्यावर तूं मद्रूप होशील. ६७ या माझ्या बोलण्याविषयीं खरें किंवा खोटें अशी शंका घेऊं नको; यांत जर कांहीं फरक पडला, तर तुझीच शपथ! ६८ परंतु (अशी कल्पना करशील कीं, तुझी आण वाहिली म्हणजे मी मोकळाच राहून परिणाम तुझ्यावर होईल, तर असें नाहीं.) तुझी शपथ वाहणें म्हणजे केवळ आपल्या आत्मलिंगास हात लावणेंच होय. परंतु प्रीतीची जातच अशी आहे कीं, मनुष्यास कसलीही लाज वाटत नाहीं. ६९ (ज्यांचे बोलण्याचा कोणीच विश्वास मानीत नाहीं, त्यांनाच शपथ वाहण्याचा प्रसंग येतो, परंतु भगवान असे आहेत कीं,) ज्यांना सर्व वेद जाणतात, व जे निर्भेद आहेत; व ज्यांच्या सत्तेनें हा सर्व जगदाभास दिसतो, व ज्याच्या आज्ञेची अशी शक्ति आहे कीं, ती काळालाही जिंकिते; १३७० तो मी देव सत्यसंकल्प असून जगाच्या हिताविषयीं बापाप्रमाणें कळकळ बाळगणारा आहें, त्या मी शपथ वाहण्याची खटपट का करावी? ७१ परंतु अर्जुना, तुझा जो मला अतिशय छंद लागला आहे, त्यायोगानें मी आपलें देवपणाचें ब्रीद टाकून भक्त झाल्यामुळें अर्धा आहें, व तुला माझा छंद लागून तूं मद्रूप झाल्यामुळें तूं सगळा आहेस; ७२ हे धनंजया, राजाही आपल्या कार्याकरितां जशी प्रधानादि आपले पदरचे मंडळीबरोबर त्यांचा आपल्यावर विश्वास बसण्याकरितां आपली शपथ आपण वाहतो, तसा हा प्रकार होय. ७३ त्या वेळेस अर्जुन म्हणाला कीं, हे देवा, हें अचाट बोलणें बोलावयाचें प्रयोजन नाहीं, केवळ तुमच्या नामस्मरणानेंच आमचीं सर्व कार्यें सिद्धीस जातात, ७४ असें असतां यावर आपण सांगतां, आणि त्यामध्यें शपथही वाहता या आपल्या विनोदाला कांहीं पार आहे काय? ७५ कमलवनाला सूर्याचा यत्किंचित् प्रकाश जरी प्राप्त झाला, तरी तें एकदंम प्रकाशित होतें; असें जरी आहे, तरी सूर्य आपल्या सामर्थ्यानें सर्व जगताला एकंदर प्रकाश पूर्ण अंशानें करतो, निमित्त मात्र कमळाचें आहे. ७६ चातकाच्या तृषा तृप्त करण्यकरितां म्हणून मेघ वृष्टि करतो, परंतु त्यामध्यें पृथ्वी संपूर्ण जलानें परिपूर्ण करून जलाच्या ओघानें समुद्राचीही भरती होते, येवढें त्याच्या औदार्याचें सामर्थ्य आहे. ७७ म्हणून, हे कृपानिधे, तुमच्या औदार्याला सीमा नाहीं; परंतु मला निमित्तमात्र करून जगदुद्धार होण्याकरितां आपण हें एवढें ज्ञान सांगितलें. ७८ तेव्हां देव म्हणाले कीं, आता ही तुझी स्तुति पुरे कर. परंतु तुला जो उपाय सांगितला, या उपायानें तूं खरोखर मद्रूप होशील. ७९ हे धनंजया, मीठ समुद्रांत पडल्यावर जो जो क्षण जाईल, तों तों तें विरेल, परंतु उरण्याचें कांहीं कारण आहे काय? १३८० तसें, सर्व प्रकारें सर्वत्र माझें भजन केले असता सर्वत्र मीच आहें, अशी तुझी बुद्धि झाली म्हणजे अहंकार समूळ नाहींसा होऊन तूं मद्रूप होशील. ८१ याप्रकारें, कर्मापासून ज्ञानानें माझी प्राप्ति होईपर्यंतच उपायांचे प्रकार स्पष्टपणें तुला सांगितले. ८२ हे पांडुसुता, अगोदर सर्व कर्में ईश्वरार्पण करावीं, म्हणजे सर्व ठिकाणीं ईश्वर आहे अशी भावना होते. ८३ मग माझ्या प्रसादानें माझें ज्ञान त्यास प्राप्त होतें व त्या ज्ञानानें

ज्ञानानें अज्ञान टाकून दे; काव्यप्रतिभा, १३८६–१३८९ ) तरी सर्व कर्में आपलीं। तुवां सर्वदा मज अर्पिलीं । तेणें प्रसन्नता लाधली। आजि हे माझी ॥ ८६॥ म्हणौनि येणें प्रसादबळें । नवे झुंजाचेनि आडळें । न ठाकेचि येक वेळे । भाळलें तुज ॥ ८७॥ जेणें सप्रपंच अज्ञान जाये । येकु मीं गोचरु होये । तें उपपत्तीचेनि उपायें । गीतारूप हें ॥ ८८ ॥ मियां ज्ञान तुज आपुलें । नानापरी उपदेशिलें। येणें अज्ञानजात सांडी वियालें । धर्माधर्म जें ॥ ८९ ॥

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥

अन्वयः—(त्वं) सर्वधर्मान् परित्यज्य मां एकं शरणं व्रज; अहं त्वा सर्वपापेभ्यः मोक्षयिष्यामि; (त्वं) मा शुचः ॥ ६६ ॥

( १२९६. अज्ञान टाकण्याचा प्रकार, १३९०-१३९५ ) आशा जैसी दुःखातें। व्याली निंदा दुरितें । हें असो जैसें दैन्यातें । दुर्भगत्व ॥ १३९० ॥ तैसें स्वर्गनरकसूचक । अज्ञान व्यालें धर्मादिक । तें सांडूनि घालीं अशेख । ज्ञानें येणें ॥ ९१ ॥ हातीं घेऊनि तो दोरु । सांडिजे जैसा सर्पाकारु । कां निद्रात्यागें घराचारु । स्वप्नींचा जैसा ॥ ९२ ॥ ना ना सांडिलेनि कावळें । चंद्रींचें धुपें पिवळें । व्याधित्यागें कडुवाळें- । पण मुखाचें ॥ ९३ ॥ अगा दिवसा पाठीं देउनी । मृगजळ घापे त्यजुनी । कां काष्ठत्यागें वन्हि । त्याजिजे जैसा ॥ ९४ ॥ तैसें धर्माधर्मांचें टवाळ । दावी अज्ञान जें कां मूळ । तें त्यजूनि त्यजीं सकळ । धर्मजात ॥ ९५ ॥ ( १२९७. ईश्वरालाच शरण जावें, १३९६–१४०० ) मग अज्ञान निमालिया । मीचि येकु असें अपैसया । सनिद्र स्वप्न गेलया । आपणपें जैसें ॥९६॥ तैसा मी एकवांचूनि कांहीं । मग भिन्नाभिन्न आन नाहीं । सोऽहंबोधें तयाच्या ठायीं । अनन्यु होय ॥ ९७ ॥ पैं आपलेनि भेदेंविण । माझें जाणिजे जें एकपण । तयाचि नांव शरण । मज येणें गा ॥ ९८ ॥ जैसें घटाचेनि नाशें । गगनीं गगन प्रवेशे । मज शरण येणें तैसें । ऐक्य करी ॥ ९९ ॥ सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळ जैसा पाणिया । तैसा मज धनंजया । शरण ये तूं ॥१४००॥ ( १२९८. ईश्वराला शरण गेलें म्हणजे जीवत्व राहात नाहीं, जीवत्व असेल तर शरण गेला नाहीं; १४०१–१४०५ ) वांचूनि सागराच्या पोटीं । वडवानळु शरण आला किरीटी । जाळूनि ठाके तया गोठी । वाळूनि दे पां ॥ १ ॥ मजही शरण रिघिजे । आणि जीवत्वेंचि असिजे । धिग् बोलीं इया न लजे । प्रज्ञा केविं ॥ २ ॥ अगा प्राकृताही राया । आंगीं पडे जें धनंजया । तें दासिरुहि कीं तया । समान होय ॥ ३ ॥ मा मी विश्वेश्वरु भेटे । आणि जीवग्रंथि न सुटे । हे बोल नको वोखटे । कानीं लाऊं

१ अडचण. २ पातकें. ३ दुर्दैव. ४ प्रपंच. ५ काचीळ. ६ चांदणें. ७ बंद. ८ मटीक; दासी.

माझ्या शुद्ध स्वरूपामध्यें सत्य सत्य तो मिळून जातो. ८४ मग पार्था, माझ्या स्वरूपांत मिळाल्यानंतर साध्य व साधन हें लय पावतें. असें झाल्यावर तुला कांहीं करण्याचें उरणार नाहीं. ८५ तर तूं आपलीं सर्व कर्में सर्वकाळ मला अर्पण केलींस म्हणून माझी प्रसन्नता आज तुला मिळाली आहे, ८६ म्हणून त्या प्रसन्नतेच्या बळानें युद्धाचे प्रसंगाची अडचण न जुमानितां तुला मी एकदम भाळलों. ८७ गीता या नामेंकरून जें दृष्टांत व युक्ति यांसह ज्ञान तुला सांगितलें, त्या ज्ञानेंकरून प्रपंचभेदासह अज्ञान नाहींसें होईल; व मी एकत्वेंकरून तुला प्राप्त होईन. ८८ तुला मीं आपलें ज्ञान नानाप्रकारें जें सांगितलें, त्या ज्ञानेंकरून, धर्माधर्माला प्रसवलेलें जें अज्ञान तें टाकून दे. ८९

श्लोकार्थः—तूं सर्व धर्म टाकून मला एकट्यालाच शरण ये. मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन; तूं शोक करूं नको ॥ ६६ ॥

जशीं आशेपासून सर्व दुःखें प्राप्त होतात, व निंदेपासून सर्व पातकें उत्पन्न होतात, व दुर्देवेंकरून दरिद्र प्राप्त होतें, १३९० तसे स्वर्ग व नरक हे प्राप्त होण्यास साधनीभूत जे धर्म व अधर्म, ते ज्या अज्ञानापासून उत्पन्न होतात, त्या अज्ञानाचा या ज्ञानानें समूळ नाश करून टाक. ९१ ज्या दोरावर सर्पाचा भास झालेला असतो, तो दोर हातांत घेतल्यावर मग जसा सर्पभ्रम नाहींसा होतो, अथवा झोंप गेली म्हणजे स्वप्नांतील घरादारासुद्धां प्रपंच नाहींसा होतो; ९२ अथवा कावीळ नाहींशी झाल्यावर चंद्राचा पिवळेपणा जसा नाहींसा होतो; अथवा व्याधि दूर झाल्यानें तोंडाचा कडूपणा नाहींसा होतो; ९३ अरे, दिवस नसला म्हणजे मृगजळ जसें आपोआप नाहींसें होतें; किंवा काष्ठांचा त्याग केला म्हणजे अग्नीचा जसा त्याग होतो, ९४ तसें धर्माधर्माचें बंड भासविणारें जें अज्ञान, तें टाकलेंस म्हणजे सर्व धर्म आपोआप जातील. ९५ मग तें अज्ञान नाहींसें झालें म्हणजे मी सहज एकटाच उरेन. जसें निद्रा व तिचेपासून भासलेलें स्वप्न यांसुद्धां निद्रा गेली म्हणजे मनुष्य आपला आपण एकटा उरतो, ९६ तसा माझ्याशिवाय त्याला भिन्नाभिन्न दुसरा कांहीं भाव उरत नाहीं. मग तो मीच आहें, अशा बुध्दीनें माझ्या स्वरूपीं ऐक्य पावतो. ९७ आपलेपणाचा भेद न ठेवून माझें एकत्व जें जाणणें, त्यालाच मला शरण आला असें म्हणावें. ९८ जसें घटोपाधीनें घटाकाश वेगळें दिसतें, व घटनाश झाल्यावर घटाकाश महाकाशांत ऐक्य पावतें, तसें मला शरण आलास म्हणजे माझ्या रूपाशीं ऐक्य पावशील. ९९ सुवर्णाचा मणि सुवर्णाशीं जसा ऐक्यरूप असतो, अथवा पाण्याची लाट जशी पाण्याशीं ऐक्यरूपानें असते, तशा रीतीनें, हे धनंजया, तूं मला ऐक्यत्वेंकरून शरण ये. १४०० यावांचून, वडवानल समुद्राला शरण जाऊनही जसा नाश करतो, तसा मला शरण येऊन माझ्याशीं द्वैतभावानें वागण्याचा विरुद्ध मार्ग टाकून दे. १ मला शरण येऊन जिवाभावानें वेगळा राहतो, असें बोलण्याला त्याची बुद्धि कशी लाजत नाहीं ? म्हणून त्या बोलण्याला धिक्कार असो. २ हे धनंजया, राजानें जवळ जी बाळगलेली यःकश्चित् बटीक असते, ती त्याच्याशीं संबंध झाल्यानें त्याची बरोबरी पावते, ३ मग मी जो विश्वाचा ईश्वर, त्या माझी भेट झाल्यावर जीवदशेचें बंधन सुटत नाहीं, असें घाणेरडें भाषण ऐकूं देखील नको. ४ याकरितां, मी होऊन मग माझी भक्ति सहज होईल, अशी

॥ ४ ॥ म्हणोनि मी होऊनि मातें । सेवणें आहे आयितें । तें करी हातां येतें । ज्ञान येणें ॥ ५ ॥ ( १२९९. ज्ञानानें सर्व पापांपासून मुक्तता होते, १४०६-१४१७ ) मग ताकौनियां काढिलें । लोणी माघौतें ताकीं घातलें । परि न घेपेचि कांहीं केले । तेणें जेविं ॥ ६ ॥ तैसें अद्वयत्वें मज । शरण रिघालिया तुज । धर्माधर्म हे सहज । लागतील ना ॥७॥ लोह उभें खाय माती । तें परिसाचिये संगती । सोनें जालया पुढती । न शिविजे मळें ॥ ८ ॥ हें असो काष्ठापासोनि । मथूनि घेतलिया वन्हि । मग काष्ठेंही कोंडोनि । न ठके जैसा ॥ ९ ॥ अर्जुना काय दिनकरु । देखत आहे आंधारु । कीं प्रबोधीं होय गोचरु । स्वप्नभ्रमु ॥१४१०॥ तैसें मजसी येकवटलेया । मी सर्वरूप वांचूनियां । आन कांहीं उरावया । कारण असे ॥ ११ ॥ म्हणौनि तयाचें कांहीं । चिंतीं ना आपुल्या ठाईं । तुझें पापपुण्य पाहीं । मीचि होईन ॥१२॥ तेथ सर्वबंधेलक्षणें । पापें उरावें दुजेपणें । तें माझ्या बोधीं वायाणें । होऊनि जाईल ॥ १३ ॥ जळीं पडिलिया लवणा । सर्वही जळ होय विचक्षणा । तुज मी अनन्य शरणा । होईन तैसा ॥ १४ ॥ येतुलेनि आपैसया । सुटलाचि आहासी धनंजया । घेई मज प्रकाशोनियाँ । सोडवीन तूतें ॥ १५ ॥ याकारणें पुढती । हे आधि न वाहें चित्तीं । मज एकासि ये सुमति । जाणोनि शरण ॥ १६ ॥ ऐसें सर्वरूपरूपसें । सर्वदृष्टिडोळसें । सर्वदेशनिवासें । बोलिलें श्रीकृष्णें ॥ १७ ॥ स्वानुभव-सुखोक्तिः—( १३००. देवांनी अर्जुनाला आलिंगन दिलें त्याचा हेतु, काव्यप्रतिभा, १४१८-१४२२ ) मग सांवळा सकंकेणु । बाहु पसरोनि दक्षिणु । आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु तो ॥ १८ ॥ न पवतां जयातें । काखे सूँनि बुद्धीतें । बोलणें मागौतें । वोसरलें ॥ १९ ॥ ऐसें जें कांहीं येक । बोला बुद्धीसीही अटक । तें द्यावया मिष । खेंवाचें केलें ॥१४२०॥ हृदया हृदय येक जालें । ये हृदयींचें ते हृदयीं घातलें । द्वैत न मोडितां केलें । आपणाऐसें अर्जुना ॥ २१ ॥ दीपें दीपु लाविला । तैसा परिष्वंगु तो जाला । द्वैत न मोडितां केला । आपणपें पार्थु ॥ २२ ॥ ( १३०१. आलिंगनाच्या प्रेमांत देव मोठा असून बुडून गेला; काव्यप्रतिभा, १४२३ ) तेव्हां सुखाचा मग तया । पूरु आला जो धनंजया । तेथ वाढु तऱ्हीं बुडोनिया । ठेला देवो ॥ २३ ॥ ( १३०२. देव-अर्जुन आलिंगनांत एक झाले; काव्यप्रतिभा, १४२४-१४२५ ) सिंधु सिंधूतें पावों जाये । तें पावणें ठाके दुणा होये । वरी रिगे पुरवणिये । आकाशही ॥ २४ ॥ तैसें तया दोघांचें मिळणें । दोघां नावरे जाणावें कवणें । किंबहुना श्रीनारायणें । विश्व कोंदलें ॥ २५ ॥ गीतामाहात्म्यः—( १३०३. गीता वेदाला मूळभूत आहे असें ज्ञानेश्वर म्हणतात व ते सोपपत्तिक सिद्ध करतात;

१ जागे झाल्यावर. २ सर्व बंधाला कारण. ३ जाणून. ४ चिंता. ५ भूषणयुक्त. ६ उजवा. ७ खाकेंत मारून. ८ प्राप्त न होणारे. ९ आलिंगनाचें. १० आलिंगन. ११ व्यापक.

भक्ति या ज्ञानेंकरून प्राप्त करून घे. ५ मंथन करून ताकांतून लोणी वेगळें काढल्यावर पुन: जरी ताकांत वातलें, तरी तें कांहीं केल्यानें त्यांत मिसळत नाहीं; ६ त्याप्रमाणें, अद्वितीयबोधानें तूं मला शरण आल्यावर तुला धर्माधर्माचा स्पर्श होणार नाहीं. ७ लोखंड उभें खुंटीस अलग अडकाविलें, तरी त्याला तांब्र चढतें; तेंच परिसाच्या स्पर्शानें सोनें झाल्यावर पुन: मातींत पुरून ठेविलें तरी त्याला तांब्र चढत नाहीं. ८ फार तर काय ? काष्ठ मथून काढिलेला अग्नि पुन: जरी लांकडाचे पेटींत कोंडून ठेवला, तरी तींत जसा राहत नाहीं; ९ अर्जुना, सूर्याला जसा अंधार भेटत नाहीं, किंवा जागें झाल्यावर स्वप्न दृष्टीस पडत नाहीं; १४१० तसें माझ्याशीं ऐक्य पावल्यावर, सर्वरूप असा जो मी, त्या माझ्यावांचून दुसरें कांहीं उरण्यास कारण आहे काय ? ११ याकरितां, पापपुण्यांची किंवा धर्माधर्माची चिंता करूं नको. तुझें पाप व पुण्य मीच होईन, समजलास ! १२ सर्व बंध देणारें असें जें पाप, त्याचें हेंच लक्षण होय कीं, माझ्याहून भिन्नपणानें उरणें. तें पाप माझ्या ज्ञानानें नाश पावेल. १३ हे विचारशीला अर्जुना, उदकांत मीठ पडलें म्हणजे तें आपण नाहींसें होऊन सर्व जलरूप होतें, त्याप्रमाणें तूं अनन्यभावानें मला शरण आलास म्हणजे मद्रूपच होशील. १४ हे धनंजया, या योगानें तूं आपोआप सर्व बंधांपासून सुटशील, याकरितां मला जाणून तूं माझी प्राप्ति करून घे, म्हणजे मग मी सर्व बंधापासून तुला मुक्त करीन. १५ म्हणून हे सुमते, धर्माधर्माची चिंता मनांत ठेवूं नको. एक अद्वितीय जो मी, त्या मला जाणून शरण ये. १६ याप्रमाणें, सर्व रूपाचें रूप, सर्व दृष्टीची दृष्टि व सर्व देशांचें वसतिस्थान असे जे श्रीकृष्ण भगवान ते बोलले. मग श्यामसुंदर मूर्ति जो श्रीकृष्ण भगवान, १७ त्यांनीं आपला भूषणयुक्त उजवा हात पुढें करून, आपल्यास शरण आलेला जो भक्तराज अर्जुन, त्याला वर घेऊन आलिंगन दिलें. १८ ज्या स्वरूपाला प्राप्त न होतां शब्द व बुद्धि यांस मागें ओढून बोलणें माघारी फिरतें, १९ असें जें बुद्धीला व शब्दाला आकलन न होणारें स्वरूप, तें स्वरूप देण्याकरितां देवांनीं आलिंगनाचें निमित्त केलें. १४२० अर्जुनाचें व आपलें हृदय देवांनीं मिळवून आपले हृदयांतील ज्ञान त्याचे हृदयांत घातलें, आणि देवभक्तांचें द्वैत न मोडतां अर्जुनास आत्मरूप केलें. २१ एका दिव्यानें दुसरा दिवा लावल्यावर जसें द्वैत कायम राहून ऐक्य मोडत नाहीं, तसा प्रकार या आलिंगनाचा होऊन द्वैत न मोडतां पार्थाला आपलेपणा दिला. २२ मग त्या वेळेस अर्जुनाला त्या आनंदाचे सुखाचा जो पूर आला, त्या पुरांत, भगवान सर्वव्यापक आहेत तरी तेही बुडून गेले ! २३ समुद्रास समुद्र मिळाल्यावर पाणी दुप्पट वाढून पुरवणीला आकाश घ्यावे लागतें, २४ तसें श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या आलिंगनाचें प्रेम दोघांनाही आवरेना, तें कोणीं जाणावें ! फार काय सांगावें? सर्व विश्व नारायणरूप होऊन गेलें ! २५ याप्रमाणें, वेदांचें मूळसूत्र आणि ज्याच्या श्रवणपठनाचा सर्वांना अधिकार आहे असें पवित्र हें गीताशास्त्र श्रीकृष्णांनीं प्रकट केलें. २६ या ठिकाणीं, गीताशास्त्र हें वेदाचें मूळ आहे असें कसें तुमचे बोधास आलें, असें म्हणाल

काव्यप्रतिभा, १४२६-१४२९ ) एवं वेदाचें मूळसूत्र । सर्वाधिकैरैकपवित्र । श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रकट केलें ॥ २६ ॥ येथ गीता मूळ वेदां । ऐसें केविं पां आलें बोधा । हें म्हणाल तरी प्रसिद्धा । उपपत्ति सांगों ॥ २७ ॥ तरी जयाच्या निश्वासीं । जन्म झालें वेदराशी । तो सत्यप्रतिज्ञ पैजेसीं । बोलिला स्वमुखें ॥ २८ ॥ म्हणौनि वेदां मूळभूत । गीता म्हणों हें होय उचित । आणिकही येकी येथ । उपपत्ति असे ॥ २९ ॥ ( १३०४. गीता वेदाला मूळ कशी, याचें दुसरें कारण; काव्यप्रतिभा, १४३०--१४३२ ) जें न नशेतु स्वरूपें । जयाचा विस्तार जेथ लपे । तें तयाचें म्हणिपे । बीज जगीं ॥ १५३० ॥ तरी कांडत्रयात्मकु । शब्दराशि अशेषु । गीतेमाजि असे रुखु । बीजीं जैसा ॥ ३१ ॥ म्हणोनि वेदांचें बीज । श्रीगीता होय हें मज । गमे आणि सहज । दिसतही आहे ॥ ३२ ॥ (१३०५. कांडत्रय वेद गीतेंत कसा आला, काव्य, १४३३-१४३४, काव्यप्रतिभा, १४१८-१४३४) जे वेदांचे तिन्ही भाग । गीते उमटले असती चांग । भूषणरत्नीं सर्वांग । शोभलें जैसें ॥ ३३ ॥ तियेंचि कर्मादिकें तिन्ही । कांडें कोणकोणे स्थानीं । गीते आहाति तें नयनीं । दाखऊं आइक ॥ ३४ ॥ गीताशास्त्रोत्पत्ति--प्रस्तावना:–( १३०६. शास्त्रप्रवृत्तिप्रस्ताव–अध्याय १, १४३५ ) तरी पहिला जो अध्यावो । तो शास्त्रप्रवृत्ति-प्रस्तावो । द्वितीयीं शास्त्रसद्भावो । प्रकाशिला ॥३५॥ ( १३०७. अध्याय २, सांख्य-शास्त्र ज्ञानप्रधान असून मोक्ष देणारें आहे, १४३६ ) मोक्षदानीं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र । येतुलालें दुजीं सूत्र । उभारिलें ॥ ३६ ॥ कर्मकांड:–( १३०८. अध्याय ३, कर्मयोग, १४३७--१४३९ ) मग अज्ञानें बांधलेया । मोक्षपदीं बैसावया । साधनारंभु तो तृतीया- । ध्यायीं बोलिला ॥ ३७ ॥ जे देहाभिमानें बंधें । सांडूनि काम्यनिषिद्धें । विहित परी अप्रमादें । अनुष्ठावें ॥ ३८ ॥ ऐसेंनि सद्भावें कर्म करावें । हा तिजा अध्यावो जो देवें । निर्णय केला तें जाणावें । कर्मकांड येथ ॥ ३९ ॥ उपासनाकांड:–( १३०९. अध्याय ४ ते ११ पर्यंत उपासना ( देवताकांड )--भजनाचे प्रकार, १४४०—१४४५ ) आणि तेंचि नित्यादिक । अज्ञानाचें आवश्यक । आचरतां मोचक । केविं होय पा ॥ १४४० ॥ ऐसी अपेक्षा जालिया । बद्ध मुमुक्षुते आलिया । देवें ब्रह्मार्पणत्वें क्रिया । सांगितली ॥ ४१ ॥ जे देह वाचा मानसें । विहित निपजे जें जैसें । तें येक ईश्वरोद्देशें । कीजे म्हणितलें ॥ ४२ ॥ हेंचि ईश्वरीं कर्मयोगें । भजनकथनाचें खागें । आदरिलें शेषभागें । चतुर्थाचेनि ॥ ४३ ॥ तें विश्वरूप अकारावा । अध्यायो संपे जंव आघवा । तंव कर्में ईशु भजावा । हें जें बोलिलें ॥ ४४ ॥ तें अष्टाध्यायीं उघड । जाण येथें देवताकांड । शास्त्र सांगतसे आंड । मोडूनि बोलें ॥४५॥ ( १३१०. अध्याय १२ ते १५ पर्यंत ज्ञानकांड, १४४६–१४४९ ) आणि तेणेंचि ईशप्रसादें । श्रीगुरुसंप्र-

तर ज्या कारणांनीं तें आमचे बोधास आलें, तीं प्रसिद्ध कारणें सांगतों; ( असें ज्ञानेश्वर म्हणाले. ) २७ तर ज्या ईश्वराच्या श्वासोच्छ्वासापासून वेद निघाले, तो सत्यप्रतिज्ञ ईश्वर स्वमुखानें प्रतिज्ञा करून गीताशास्त्र बोलला; २८ या कारणास्तव, गीताशास्त्र हें वेदांचें मूळ आहे, हें म्हणणें योग्य आहे; व याविषयीं आणखीही एक कारण आहे, २९ कीं, जें वृक्षस्वरूपानें नसून त्याचा विस्तार जेथें अंतर्गत असतो, तें त्या झाडाचें बीज होय अशी जगात म्हण आहे. १४३० जसा वृक्ष बीजामध्यें गुप्तरूपानें असतो, तसा त्रिकांडवेद ( कर्म, उपासना व ज्ञान ) गीतेमध्यें गुप्तरूपानें आहे. ३१ म्हणून, वेदाचें बीज गीता आहे असें मला वाटतें, व तें उघड दिसतही आहे. ३२ जसें अंग रत्नांनीं सुशोभित दिसतें, तशीं वेदाचीं तीन कांडें गीतेमध्यें स्पष्ट केलीं आहेत. ३३ तीं वेदाचीं कर्मादिक तीन कांडें गीतेमध्यें कोणते ठिकाणीं वर्णिलीं आहेत, तीं डोळ्यानीं दिसतील अशीं दाखवितों, तीं ऐका. ३४ तर पहिले अध्यायांत प्रवृत्तिशास्त्राचा अर्जुनानें विचार केला आहे; दुसरे अध्यायात शास्त्रावर विश्वास ठेवावा हें प्रतिपादन केलें आहे. ३५ हें गीताशास्त्र ज्ञानप्रधान असून मोक्ष देण्याविषयीं स्वतंत्र आहे असें दुसरे अध्यायांत (दोन निष्ठारूपानें—कर्मनिष्ठा व ज्ञाननिष्ठा एतद्रूपानें ) सांगितलें आहे. ३६ यावर तिसरे अध्यायांत अज्ञानानें कर्मबंधांत जो सांपडलेला, त्याला, बंधापासून सुटून मोक्षपदावर बसण्याविषयींचीं जीं साधनें तीं सांगण्याचा आरंभ केला आहे. ३७ जे देहाभिमानानें बद्ध झाले आहेत, त्यांनीं निषिद्ध व काम्य कर्में टाकून विहित कर्में निरभिमानबुद्धीनें करावीं. ३८ अशा रीतीनें सद्भावानें कर्मांचें आचरण करावें, असा देवांनीं तिसरे अध्यायांत निर्णय केला आहे, म्हणून या अध्यायाला कर्मकांड असें म्हणावें. ३९ त्या नित्यनैमित्तिक कर्मांचें आचरण केलें असता तीं अज्ञानाचा कसा नाश करतील, १४४० अशी इच्छा होऊन बद्ध हा मुमुक्षुत्वाच्या पायरीला आला तर त्याच्याकरितां, तींच सर्व कर्में ब्रह्मार्पणबुद्धीनें करावीं, असें देवांनीं सांगितलें. ४१ जीं जीं विहितकर्में ( कायिक, वाचिक व मानसिक ) तूं करशील, तीं सर्व कर्में ईश्वरप्रसन्नतेकरताच करून ईश्वरार्पण कर असें सांगितलें. ४२ ईश्वराचे ठायीं कर्मयोगानें भजन व कथन करण्याचा प्रकार चौथ्या अध्यायाचे शेवटीं सांगण्याचा आरंभ केला आहे. ४३ तो प्रकार, अकरावा विश्वरूपाध्याय संपेपर्यंत, कर्में ईश्वरास अर्पून ईश्वराचें भजन कसें करावें, हें सांगितलें आहे. ४४ तेंच चौथ्या अध्यायापासून अकराव्या अध्यायापर्यंत आठ अध्यायांत उपासनाकांड ( देवताकांड ) सर्व अडचणी दूर करून येथें सांगितलें आहे. ४५ आणि ईश्वरप्रसादानें व श्रीगुरुसंप्रदायानें कोमल असें खरें ज्ञान उत्पन्न होतें, ४६ तें ज्ञान, बाराव्या अध्यायामध्यें "अद्वेष्टा सर्वभूतानां" या श्लोकापासून अथवा

१ सर्वांना अधिकार आहे. २ श्वासोच्छ्वासापासून. ३ नाश न होता. ४ कर्म, उपासना व ज्ञान हें कांडत्रय. ५ वेद. ६ निरभिमान बुद्धीनें. ७ मोक्षेच्छु स्थितीला. ८ ठिकाण. ९ उपासनाकांड. १० अडचणी.

दायलेऱ्हें । साच ज्ञान उद्बोधें । कोवळें जें ॥ ४६ ॥ तें अद्वेष्टादिप्रभृतिकीं । अथवा अमानित्वादिकीं । वाढविजे म्हणोनि लेखी । बारावा गणूं ॥ ४७ ॥ तो बारावा अध्याय आदी । आणि पंधरावा अवधि । ज्ञानफळपाकासिद्धि । निरूपणासी ॥४८॥ म्हणौनि चहूंही इहीं । ऊर्ध्वमूळान्तीं अध्यायीं । ज्ञानकांड ये ठायीं । निरूपिजे ॥ ४९ ॥ ( १३११. गीतेंत तिन्ही कांडें, १४५०-१४५१ ) एवं कांडत्रयनिरूपिणी । श्रुतिचि हे कोडिसेवाणी । गीतापद्यरत्नाचीं लेणीं । लेयिली आहे ॥ १४५० ॥ हें असो कांडत्रयात्मक । श्रुति मोक्षरूप फळ येक । बोभावे जें आवश्यक । ठाकावें म्हणौनि ॥ ५१ ॥ १६ ते १८ अध्यायांचें कारण ( १३१२. ज्ञानाशीं वैर करणारा आसुरी वर्ग, अध्याय १६, १४५२ ) तयाचेंनि साधन ज्ञानेंसी । वैर करी जो प्रतिदिवशीं । तो अज्ञागवर्ग षोडशीं । प्रतिपादिजे ॥ ५२ ॥ ( १३१३. शास्त्राचे साह्यानें ज्ञानाचे वैरी जिंकावे, अध्याय १७, १४५३ ) तोचि शास्त्राचा बोळावा । घेवोनि वैरी जिणावा । हा निरोपु तो सतरावा । अध्याय येथ ॥५३॥ ( १३१४. पहिल्यापासून सतराव्यापर्यंत झालेल्या विषयांचें तात्पर्य, अध्याय १८, १४५४-१४५६ ) ऐसा प्रथमालागोनी । सतरावा लैाणी करूनी । आत्मनिश्वास विवरूनी । दाविला देवें ॥५४॥ तया अर्थजातां अशेषा । केला तात्पर्याचा आंवांका । तो हा अठरावा देखा । कळशाध्यायो ॥ ५५ ॥ एवं सकळ संख्यासिध्दु । श्रीमद्भवद्गीताप्रबंधु । हा औदार्यें आगळा वेदु । मूर्तु जाण ॥५६॥ (१३१५. गीताशास्त्र मोक्ष देण्याचे कामांत वेदांपेक्षां श्रेष्ठ आहे, म्हणून वेदांनीं गीतेचा आश्रय केला; काव्यप्रतिभा, १४५६-१४६६) वेदु संपन्नु होय ठाईं । परि कृपणु ऐसा आनु नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णांच्याचि ॥ ५७ ॥ येरां भवव्यथा ठेलिया । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां । अनवसरु मांडूनियां । राहिला आहे ॥ ५८ ॥ तरी मज पाहातां तें मागील उणें । फेडावया गीतापणें । वेदु वेठेला भलतेणें । सेव्य होआवया ॥ ५९ ॥ नां हे अर्थु रिगोनि मनीं । श्रवणें लागोनि कानीं । जपमिषें वदनीं । वसोनियां ॥१४६०॥ ये गीतेचा पाठु जो जाणे । तयाचेनि सांगातीपणें । गीता लिहोनि वाहाणें । पुस्तकमिषें ॥ ६१ ॥ ऐसैसा समिसकटा । संसाराचा चोहटा । गैंवादी घालीत चोखटा । मोक्षसुखाची ॥६२॥ परी आकाशीं वसावया । पृथ्वीवरी बैसावया । रविदीप्ति राहाटावया । आवारु नभ ॥६३॥ तेविं उत्तम अधम ऐसें । सेवितां कवणातेंही न पुसे । कैवल्यदानें सरिसें । निववीत जगा ॥ ६४ ॥ यालागीं मागिली कुंटी । भ्याला वेदु गीतेच्या पोटीं । रिगाला आतां गोमटी । कीर्ति पातला ॥ ६५ ॥ म्हणौनि वेदाची सुसेव्यता । ते हे मूर्त जाण श्रीगीता । श्रीकृष्णें पंडुसुता । उपदेशिली ॥ ६६ ॥ ( १३१६. देवांनीं

१ प्रसीनें. २ उत्पन्न होतें. ३ लहानशी. ४ डांगोरा पिटतें. ५ शेवट. ६ आपले श्वासापासून झालेला वेद. ७ विचार. ८ शिखररूप. ९ पीडित झालेले. १० सवड नाहीं असें म्हणून. ११ प्रकट झाला.

तेराव्या अध्यायातील " अमानित्वम् " इत्यादि श्लोकापासून विस्तारानें सांगितलें आहे. म्हणून बारावा अध्याय हा ज्ञानकांडांतच धरला आहे. ४७ त्या बाराव्या अध्यायाच्या आरंभापासून पंधराव्या अध्यायाचे अखेरीपर्यंत चार अध्यायांत ज्ञानफल आणि त्याची सिद्धि यांचें निरूपण झालेलें आहे. ४८ म्हणून पंधराव्या अध्यायाच्या शेवटापर्यंत या चार अध्यायांनीं येथें ज्ञानकांड सांगितलें आहे. ४९ अशा प्रकारें ( कर्म, उपासना व ज्ञान या ) कांडत्रयाचें निरूपण करणारी ही गीता गीता नसून एक लहानशी गोजिरवाणी श्रुतिच आहे; आणि ती गीतापद्यरूप रत्नांचीं लेणीं ल्याली आहे. १४५० हें असो; अशी जी ही कांडत्रयात्मक श्रुति, ती, मोक्षरूप फळ अवश्य द्या असा डांगोरा पिटीत आहे. ५१ त्या ज्ञानाच्या साधनांचें सदैव वैर करणारा जो अज्ञानवर्ग, तो सोळाव्या अध्यायांत सांगितला आहे. ५२ त्याच शत्रूला शास्त्राचे साह्यानें जिंकावा, अशी आज्ञा ज्या अध्यायांत केली आहे, तो सतरावा अध्याय होय. ५३ अशा प्रकारें, पहिल्या अध्यायापासून सतराव्या अध्यायाचे अखेरीपर्यंत आपले श्वासापासून झालेल्या वेदाचें देवानीं निरूपण केलें आहे. ५४ त्या सर्व अध्यायांचा तात्पर्यार्थ ज्या अठराव्यांत आहे, तो हा शेवटील अध्याय सर्व अध्यायांचा कळस आहे. ५५ अशा प्रकारें, सातशें श्लोकांच्या संख्येनें सिद्ध झालेला हा श्रीमद्भगवद्गीताप्रबंध मूर्तिमंत वेद असून औदार्यानें वेदाहीपेक्षां श्रेष्ठ आहे. ५६ वेद संपन्न खरा, परंतु त्याच्यासारखा कृपण दुसरा कोणी नाहीं. कारण तो ( ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या ) तीन वर्णांच्याच कानीं लागला. ( त्यांनाच आपलें हृद्गत कानांत सांगतो. ) ५७ यांशिवाय जे स्त्रीशूद्रादिक जीव संसारव्यथेनें पीडित झालेले आहेत, त्यांचा रिघाव होण्याला सवडच नाहीं असें म्हणून तो स्वस्थ बसला आहे. ५८ तर ( ज्ञानेश्वर म्हणतात:— ) मला असें दिसतें कीं, तो आपला मागील उणेपणा जाऊन, आपल्यास सत्कीर्ति मिळावी या हेतूनें, वाटेल त्यानें आपलें सेवन करावें म्हणून हा वेदच गीतारूपानें प्रकट झाला आहे. ५९ ( कारण असें पहा— ) वेद सुलभ झाला नाहीं का ? कां कीं, तो अर्थानें मनांत प्रवेश करितो, श्रवणमिषानें कानांत शिरतो, व जपमिषानें मुखांत राहतो. १४६० या गीतेचा नित्य जो पाठ करतो, किंवा पाठ करणाराच्या संगतीनें असतो, अथवा पुस्तकाच्या मिषानें गीता लिहून लोकांस देतो, ६१ अशा प्रकारें प्राणिमात्रास सरसकट संसारबाजारांत मोक्षसुखाचें सदावर्त घालतो; ६२ आकाशांत वास करण्याकरितां, पृथ्वीवर बसण्याकरितां अथवा सूर्याचे दीप्तीचा व्यवहार होण्याकरितां ज्याप्रमाणें आकाश सर्वांना आधार आहे, ६३ त्याप्रमाणें, गीतेचें सेवन करणारांत उत्तम, अधम ही निवड न करितां सरसकट त्या सर्वांना मोक्षपद देऊन सर्व जगाला ती सुखी करते. ६४ एवढ्याकरितां, आपल्या मागल्या निंदेला भ्यालेला वेद गीतेच्या पोटांत शिरल्यामुळें उत्तम कीर्तीला पात्र झाला. ६५ म्हणून, वेदांचेंही सुसेवन करण्यास योग्य अशी ही मूर्तिमंत गीता स्वत: श्रीकृष्णांनीं पांडुसुत अर्जुन..

१२ नव्हे काय. १३ चव्हाट्यावर. १४ अन्नछत्र. १५ निंदा. १६ सेवन करण्यास योग्य.

अर्जुनाच्या निमित्तानें जगाला आनंदाचें आवार केलें; काव्यप्रतिभा, १४६७-१४७२) परी वत्साचेनि वोरेसें । दुभतें होय घरोद्देशें । जालें पांडवाचेनि मिषें । जगदुद्धरण ॥ ६७ ॥ चातकाचिये कणवे । मेघु पाणियेंसि धांवे । तेथ चराचर आघवें । निवालें जेविं ॥ ६८ ॥ कां अनन्यगति कमळा- । लागीं सूर्य ये वेळोवेळां । कीं सुखिया होइजे डोळा । त्रिभुवनींचा ॥ ६९ ॥ तैसें अर्जुनाचेनि व्याजें । गीता प्रकाशूनि श्रीराजें । संसारायेवढें थोर ओझें । फेडिलें जगाचें ॥ १४७० ॥ सर्वशास्त्ररत्नदीप्ति[२] । उजळिता हा त्रिजगतीं । सूर्य नव्हे लक्ष्मीपति । वैक्त्राकाशींचा ॥ ७१ ॥ बाप कुळ तें पवित्र । जेथींचा पार्थु या ज्ञाना पात्र । जेणें गीता केलें शास्त्र । आवारु जगा ॥ ७२ ॥ ( १३१७. देवांनीं अर्जुनाला द्वैतावर आणून ज्ञानाचा संप्रदाय सांगतात; काव्यप्रतिभा, १४७३–१४८५. काव्यप्रतिभा, १४५६-१४८५) हें असो मग तेणें । सद्गुरु श्रीकृष्णें । पार्थाचें मिसळणें । आणिलें द्वैतां ॥ ७३ ॥ अवतरण:—पाठीं म्हणतसे पांडवा । शास्त्र तें मानलें कीं जीवा । तेथ येरु म्हणे देवा । आपुलिया कृपा ॥ ७४ ॥ तरी निधान जोडावया । भाग्य घडे गा धनंजया । परी जोडिलें भोगावया । विपायें होय ॥ ७५ ॥ पैं क्षीरसागरायेवढें । अविरंजी दुधाचें भाडें । सुरां असुरां केवढें । मथितां जालें ॥ ७६ ॥ ते सायासही फळा आले । जे अमृतही डोळां देखिलें । परि वरिचिली[६] चुकले । जँतनेतें ॥ ७७ ॥ तेथ अमरत्वा वोगरिलें । तें मरणाचिलागीं जालें । भोगों नेणतां जोडलें । ऐसें आहे ॥ ७८ ॥ नहुषु स्वर्गाधिपति जाहला । परी राहाटीं भांबावला । तो भुजंगत्व पावला । नेणसी कायी ॥ ७९ ॥ म्हणौनि बहुत पुण्य तुवां । केलें तेणें धनंजया । आजि शास्त्रराजा इया । जालासि विषयो ॥ १४८० ॥ तरि ययाचि शास्त्राचेनि । संप्रदायें पांघरौनि । शास्त्रार्थु हा निकेनि । अनुष्ठीं हो ॥ ८१ ॥ येऱ्हवीं अमृतमथना- । सारिखें होईल अर्जुना । जरी रिघसी अनुष्ठाना । संप्रदायेंवीण ॥ ८२ ॥ गाय धड जोडे गोमटी । तें तैंचि पय दे किरीटी । जें जाणिजे हातवटी । सांजवणीची ॥ ८३ ॥ तैसा श्रीगुरु प्रसन्नु होये । शिष्य विद्याही कीर लाहे । परि ते फळे संप्रदायें । उपासिलिया ॥ ८४ ॥ म्हणौनि शास्त्रीं जो इये । उचितु संप्रदायो आहे । तो ऐक आतां बहुवें । आदरेंसीं ॥ ८५ ॥

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन।
न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥

१ प्रीतीनें; पान्हानें. २ तेज. ३ मुखरूपी आकाश. ४ भेददशा. ५ निरुपम. ६ युक्ति; हातोटी. ७ जतन करण्याची. ८ अमर होण्याकरिता जें प्राप्त करून घेतलें. ९ चांगलेपणानें. १० धार काढण्याची.

याला सांगितली. ६६ परंतु वांसराचे प्रीतीकरितां सर्व घरादाराला गाईच्या दुधाचें सुख मिळतें, त्याप्रमाणें अर्जुनाच्या निमित्तानें सर्व जगाचा उध्दार झाला. ६७ चातकाची कळकळ मनांत बाळगून मेघ पाण्याची वृष्टि करितो, त्या वृष्टीनें सहज सर्व जगाचें जसें सांत्वन होतें; ६८ अथवा, एकनिष्ठ जें कमळ, त्याला प्रफुल्लित करण्याकरितां वारंवार सूर्य उदयास येतो, परंतु तेवढ्यानें त्रिभुवनांतील सर्व प्राण्यांचे डोळ्यांना प्रकाश मिळाल्यामुळें सुख होतें. ६९ या न्यायानें, श्रीकृष्णांनीं अर्जुनाच्या मिषानें गीता प्रकाशून जगाचें संसाराएवढें मोठें ओझें हलकें केलें. १४७० सर्वशास्त्ररूपी रत्नाचें तेज या तीन लोकांत प्रकट करणारा लक्ष्मीपति जो श्रीकृष्ण, त्याचें मुख हेंच कोणी आकाश-त्या आकाशामध्यें गीताशास्त्र हा सूर्य उगवला नाही काय ? ७१ ज्या कुळांत अर्जुनानें जन्म घेतला, व जो या गीताज्ञानाला पात्र होऊन सर्व जगाला ज्यानें गीताशास्त्राचें आधार घातलें, तें कुळ धन्य होय. ७२ हें असो; मग सद्गुरु श्रीकृष्णांनीं, पार्थ आपल्या स्वरूपामध्यें मिसळून गेला होता, तो द्वैतभावावर आणिला. ७३ त्यावंर अर्जुनास भगवान म्हणतात कीं, "तुला जें आम्हीं गीताशास्त्र सांगितलें, तें समजलें का ?" तेव्हां अर्जुन म्हणाला, "हे देवा, आपल्या कृपेनें समजलें." ७४ भगवान म्हणतात:--हे धनंजया, भाग्यानें कदाचित् ऐश्वर्याची जोड होते; परंतु जोडलेल्या ऐश्वर्याचा उपभोग कसा घ्यावा हें एखाद्यासच समजतें. ७५ जोडलेलें ऐश्वर्य प्राप्त होऊन कसें नाहींसें होतें, याविषयीं भगवान उपपत्ति सांगतात कीं, जसें क्षीरसागराएवढें निरुपम दुधाचें भांडें मंथन करण्याला देवदैत्यांना किती श्रम पडले ! ७६ त्या श्रमाचें फळ जें अमृत तेंही प्राप्त झालें, परंतु तें जतन करण्याची त्यांची हातोटी चुकली. ७७ अमर व्हावें म्हणून अमृत प्राप्त करून घेतलें तों तेंच ( दैत्यांस ) मरणास कारण झालें; तर भोग कसा घ्यावा ही युक्ति जर कळली नाहीं, तर जोडलेल्याचा असा परिणाम होतो. ७८ नहुष राजा यज्ञादिक कष्टमय आचरण करून स्वर्गाचा अधिपति ( इंद्र ) झाला. परंतु तेथील वागणुकीची पध्दत न समजल्यामुळें भांबावून जाऊन सर्पयोनींत गेला हें तुला माहित नाहीं काय ? ७९ यास्तव हे धनंजया, तूं बहुत पुण्य केल्यामुळें, सर्व शास्त्रांचा राजा जें गीताशास्त्र तें सांगण्यास कारण झालास. १४८० तर, या शास्त्राचा जो वागण्याचा संप्रदाय आहे, तो समजून घेऊन मग शास्त्राप्रमाणें त्याचें अनुष्ठान कर. ८१ एरवीं अर्जुना, संप्रदाय सोडून जर त्याचें अनुष्ठान करावयास लागशील, तर अमृतमंथनाप्रमाणें परिणाम होईल. ८२ हे किरीटी, गाय उत्तम मिळाली तरी तिचें दूध काढण्याची हातोटी माहीत असली तरच ती दूध देईल; ८३ तसे सद्गुरुही प्रसन्न होतील, व त्यांच्यापासून शिष्याला विद्याही प्राप्त होईल; परंतु संप्रदायानें गुरुसेवा केली तरच ती फळास येईल. ८४ म्हणून, हें गीताशास्त्र प्राप्त करून घेण्याचा जो योग्य संप्रदाय आहे, तो मी तुला सांगतों, तो तूं आदरानें ऐक. ८५

श्लोकार्थः—मीं तुला सांगितलेलें हें ज्ञान तपोविहीनाला तू कधींही सांगूं नको; अभक्तालाही सांगूं नको; ज्याला ऐकण्याची इच्छा नाहीं त्याला सांगू नको; आणि जो माझा द्वेष करतो, त्यालाही सांगूं नको. ॥ ६७ ॥

अन्वयः—इदं ते न अतपस्काय ( च ) न अभक्ताय कदाचन वाच्यं; न च अशुश्रूषवे न च मां यः अभ्यसूयति ( तस्मै वाच्यम् ) ॥ ६७ ॥

( १३१८. ज्ञान तपोहीनाला सांगूं नये, १४८६ ) तरि तुवां हें जें पार्था। गीताशास्त्र लाधलें आस्था। तें तपोहीनां सर्वथा। सांगावें ना हो ॥ ८६ ॥ ( १३१९. ज्ञान अभक्ताला सांगूं नये, १४८७-१४८८ ) अथवा तापसुही जाला। परि गुरुभक्तीं जो ढिला। तो वेदीं अंत्यजु वाळिला। तैसा वाळी ॥ ८७ ॥ नातरि पुरोडाशु जैसा। न घापे वृद्ध तरी वायसा। गीता नेदी तैसी तापसा। गुरुभक्तिहीना ॥ ८८ ॥ ( १३२०. ज्ञान ऐकण्याची इच्छा नसेल त्याला तें सांगूं नये, १४८९-१४९६ ) कां तपही जोडे देहीं। भजे गुरुदेवांच्या ठायीं। परि आकर्णनीं नाहीं। चाड जरी ॥ ८९ ॥ तरि मागील दोहीं आंगीं। उत्तम होय कीर जगीं। परि या श्रवणालागीं। योग्यु नोहे ॥ १४९० ॥ मुक्ताफळ भलतैसें। हो परी मुख नसे। तंव गुणें प्रवेशे। तेथ कायी ॥ ९१ ॥ सागरु गंभीरु होये। हें कोण ना म्हणत आहे। परि वृष्टि वाया जाये। जाली तेथ ॥ ९२ ॥ धालिया दिव्यान्न सुवावें। मग जें वायां धाडावें। तें आर्ती कां न करावें। उदारपण ॥ ९३ ॥ म्हणौनि योग्य भलतैसे। होतु परि चाड नसे। तरि झणीं वानिवसें। देसी हें तयां ॥ ९४ ॥ रूपाचा सुजाणु डोळा। बोढवूं ये[10] कायि परिमळा। जेथ जें माने फळा। तेथचि गा ॥ ९५ ॥ म्हणौनि तपी भक्ति। पाहावे ते सुभद्रापति। परि शास्त्रश्रवणीं अनासक्ति। वाळावेचि ते ॥ ९६ ॥ ( १३२१. ज्ञान ईश्वराचा द्वेष करणाराला सांगूं नये, १४९७–१५०६ ) नातरी तपभक्ति। होऊनि श्रवणीं आर्ति। आथी ऐसीही आयती। देखसी जरी ॥ ९७ ॥ तरी गीताशास्त्रनिर्मिता। जो मी सकळलोकशास्ता। तया मातें सामान्यता। बोलेल जो ॥ ९८ ॥ माझ्या सज्जनेंसि मातें। पैशुन्याचेनि[11] हातें। येक आहाती तयांतें। योग्य न म्हण ॥ ९९ ॥ तयाची येर आघवी। सामग्री ऐसी जाणावी। दीपेंवीण ठाणदिवी। रात्रींची जैसी ॥ १५०० ॥ अंग गोरें आणि तरुणं। वरि लेयिलें आहे लेणें। परि येकलेनि प्राणें। सांडिलें जेवीं ॥ १ ॥ सोनयाचें सुंदर। निर्वाळिलें[6] होय घर। परि सर्पांगनां द्वार। रुंधलें आहे ॥ २ ॥ निपजे दिव्यान्न चोखट। परि मार्जी काळकूट। असो मैत्री कपट- । गर्भिणी जैसी ॥ ३ ॥ तैसी तपभक्तिमेधा। तयाची जाण प्रबुद्धा। जो माझयांची कां निंदा। माझीचि करी ॥ ४ ॥ याकारणें धनंजया। तो भक्तु मेधावी तपिया। तरी नको बापा इया। शास्त्रा आतळों देवों ॥ ५ ॥ काय बहु बोलों निंदका। योग्य स्रष्टयाहीसारिखा।

१ वाळीत टाकला; दूर केला. २ श्रवणाविषयीं. ३ मोती. ४ वेज; भोंक. ५ सोन्याचें सूत. ६ गृति साळेल्याना. ७ वाढावें. ८ झुणितााला. ९ कौतुकानें. १० पुढें करतां येईल. ११ आवड नसणें.

तर हे पार्था, तुला ह्या गीताशास्त्राची आस्थापूर्वक प्राप्ति झाली आहे, तर तें तपोहीन मनुष्यास कधींही सांगूं नको बरें. ८६ अथवा, तापसीही मनुष्य असला, परंतु तो गुरुभक्ति करीत नसेल, तर, वेदांनीं जसा अंत्यजाला आपल्यापासून दूर केला आहे, तसा त्याला तूं दूर ठेव. ८७ अथवा, यज्ञाचा अवशिष्ट भाग (पुरोडाश) जसा कावळा वृद्ध असला तरी त्यास घालीत नाहींत, तसें हें गीताशास्त्र गुरुभक्ति न करणाऱ्या तापसासही सांगूं नको. ८८ किंवा शरीरानें तपही करीत असून गुरु व देव यांचीही भक्ति जो करितो, परंतु श्रवणाची ज्याला इच्छा नाहीं, ८९ तर तप व गुरुभक्ति या दोन अंगांनीं जरी तो योग्य आहे, तरी श्रवणाची इच्छा नसल्यामुळें तो गीताशास्त्र ऐकण्यास योग्य नाहीं. १४९० उत्तम मोतीं असून जर त्यास वेज पाडलें नसेल, तर त्यांत सोन्याचें सूत कसें घालतां येईल ? ९१ समुद्र गंभीर आहे हें कोण नाहीं म्हणेल ? परंतु त्याच्यावर पाऊस पडला असतां तो जसा व्यर्थ जातो; ९२ तृप्त झालेल्या मनुष्याचे पानांत पक्वान्नें वाढून तीं वाया दवडावीं; त्यापेक्षां तींच पक्वान्नें क्षुधित मनुष्यास घालून आपलें औदार्य कां न प्रकट करावें ? ९३ म्हणून, सर्व रीतीनें योग्य असून जर श्रवणाची इच्छा नसेल, तर हें गीताशास्त्र कौतुकानेंही कोणास सांगूं नको. ९४ रूपविषय डोळ्यानें समजण्याचा असून तो नाकानें वास घेऊन समजेल काय ? ज्याची जी योग्यता असेल, त्याप्रमाणेंच तो काम करील. ९५ म्हणून हे सुभद्रापते, तपस्वी, गुरु व देव यांची भक्ति करणारा असूनही जर शास्त्रश्रवणाविषयीं त्यास आवड नसेल, तर त्याचा त्याग करावा. ९६ अथवा तपस्वी व गुरु आणि देव यांची भक्ति करणारा असून शास्त्रश्रवणाचीही इच्छा आहे, असा मनुष्य सर्व प्रकारें युक्त असलेला जरी तुला आढळला, ९७ तरी, सकल लोकांचें शासन करणारा व गीताशास्त्र निर्माण करणारा जो मी, त्या मला साधारण मनुष्याप्रमाणें जो समजेल, ९८ तसेंच, माझीं व सज्जनांचीं छिद्रें बाहेर काढून जे निंदा करतात, तेही हें शास्त्र ऐकण्यास योग्य नाहींत असें समज. ९९ त्यांची इतर सर्व सामुग्री कशी आहे म्हणशील, तर रात्रीं दिव्याचे ज्योतीशिवाय तेलवातीनें भरलेली ठाणवई जशी व्यर्थ होय; १५०० ज्याप्रमाणें एखादा तरुण मनुष्य गोरापान असून व त्याचे अंगावर डागिनेही घातलेले असून जर त्यांत जीव नसेल; १ किंवा सोन्याचें सुंदर प्रकाशित घर असून जर त्याचे दारांत नागीण बसलेली असेल; २ उत्तम अन्न तयार केलेलें असून जर त्यांत विष मिळविलेलें असेल, अथवा गर्भिणी स्त्रीप्रमाणें वरकांतीं एक, अंतर्यामीं एक असा कपटी स्नेह असेल, ३ त्याप्रमाणें, हे बुद्धिमान अर्जुना, जो माझी व माझ्या भक्तांची निंदा करतो, त्याचें तप, भक्ति व बुद्धि कपटीपणाचीं होय. ४ यास्तव, हे धनंजया, तो भक्त बुद्धिमान असून तपस्वीही असला, पण जर माझी व माझ्या भक्ताची निंदा करील, तरी बापा,

१२ सामुग्री. १३ शासन करणारा. १४ साधारण मनुष्याप्रमाणें. १५ छिद्रांनीं. १६ प्रकाशित केलेलें. १७ नागीण. १८ आढवलें. १९ बुद्धि. २० बुद्धिमान. २१ स्पर्श करणें. २२ ब्रह्मदेवाबारखा.

गीता हे कवतिका- । लागींही नेदीं ॥ ६ ॥ अवतरणः--( १३२२. गुह्यज्ञान भक्ताला सांगतो; तो संशयरहित होऊन मत्स्वरूप होतो, १५०७–१५१३ ) म्हणौनि तपाचा धनुर्धरा । तळीं दाटोनि गाडोरा । वरि गुरुभक्तीचा पुरा । प्रासादु जो जाला ॥ ७ ॥ आणि श्रवणेच्छेचा पुढां । दारवंटा सदा उघडा । वरी कळॅशु चोखडा । अनिंदारत्नांचा ॥ ८ ॥

य इमं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।
भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥

अन्वयः—यः इमं परमं गुह्यं ( ज्ञानं ) मद्भक्तेषु अभिधास्यति, ( सः ) मयि परां भक्तिं कृत्वा असंशयः ( सन् ) माम् एव एष्यति ॥ ६८ ॥

ऐशा भक्तालयीं चोखटीं । गीतारत्नेश्वर हा प्रतिष्ठीं । मग माझिया संवसाटीं । तुकसी जगीं ॥ ९ ॥ कां जे एकाक्षरपणेंसीं । त्रिमात्रकेचिये कुशीं । प्रणवु होतां गर्भवासीं । सांकडलें ॥१५१०॥ तो गीतेचिया वाहेळीं । वेदबीज गेलें पाहोंळीं । कीं गायत्री फुलींफळीं । श्लोकांच्या आली ॥ ११ ॥ ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्ता । अनन्यजीवना माता । बाळका जैसी ॥ १२ ॥ तैसा भक्तां गीतेसीं । भेटी करी जो आदरेंसी । तो देहापाठीं मजसीं । येकचि होय ॥१३॥

न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।
भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥

अन्वयः—मनुष्येषु च कश्चित् तस्मात् मे प्रियकृत्तमः न ( अस्ति ); च तस्मात् अन्यः मे भुवि प्रियतरः न भविता ॥ ६ ॥

( १३२३. ज्ञान सांगणारापेक्षां मनुष्यलोकांत मला दुसरा कोणी आवडत नाहीं, १५१४–१५१६ ) आणि देहाचेंही लेणें । लेऊनि वेगळेपणें । असे तंव जीवें प्राणें । तोचि पढिये ॥ १४ ॥ ज्ञानियां कर्मठां तापसां । यया खुणेचिया माणुसां- । माजी तो एकु गा जैसा । पढिये मज ॥ १५ ॥ तैसा भूतळीं आघवा । आन न देखें पांडवा । जो गीता सांगे मेळावा । भक्तजनांचा ॥ १६ ॥ (१३२४. ईश्वराच्या हेतूला धरून जो गीता पढतो व सांगतो तो मला आवडतो, १५१७–१५२३ ) मज ईश्वराचेनि लोभें । हे गीता पढतां अक्षोभें । जो मंडनै होय सभे । संतांचिये ॥ १७ ॥ नवपल्लवीं रोमांचितु । मंदानिळें कांपावितु । आमोदजळें वोलवितु । फुलांचे डोळे ॥ १८ ॥ कोकिला कलरवाचेनि मिषें । सद्गद बोलवीत जैसें । वसंत कां प्रवेशे । मद्भक्तआरामीं ॥ १९ ॥ कां जन्माचें फळ चकोरां । होत जें चंद्र ये अंबरीं । ना ना नव घन मयूरां । वो देत पावे ॥ १५२० ॥ तैसा सज्ज-

१ दगडाचा पाया. २ देवालय. ३ दरवाजा. ४ कळस. ५ भक्तरूपी देवालयात. ६ साम्यतेस. ७ योग्य होशील. ८ अकार, उकार व मकार. ९ ॐकार. १० आडकलेला. ११ विस्तारांत.

त्याला या गीताशास्त्राचा स्पर्श होऊं देऊं नको. ५ निंदकाविषयीं आणखी जास्ती काय तुला सांगूं ? तो जरी ब्रह्मदेवाप्रमाणें योग्य असला, तरी त्याला कौतुकानेंही गीताशास्त्र सांगूं नको. ६ म्हणून, हे धनुर्धरा, ज्यानें तपरूपी दगडाचा खालीं पाया घालून वर गुरुभक्तिरूपी देवालय बांधलें आहे; ७ आणि श्रवणेच्छारूपी पुढील दरवाजा नेहमीं उघडा ठेवून वर अनिंदारूप रत्नांचा उत्तम कळस लावला आहे; ८

श्लोकार्थः—जो हें परम गुह्य ज्ञान माझ्या भक्ताला सांगेल तो माझी दृढ भक्ति करून व संशयरहित होऊन मलाच पावेल ॥ ६८ ॥

अशा उत्तम भक्तरूपी देवालयांत गीतारूप रत्नेश्वराची स्थापना केल्यावर तुला माझी योग्यता या जगांत प्राप्त होईल. ९ कारण, एक अक्षरपणानें अकार, उकार व मकार या तीन मात्रांच्या कुशींत जो ओंकार गर्भवासांत अडकलेला होता, १० तो वेदांचें बीज जो ओंकार—तो गीतारूपी वृक्षाचा विस्तार पावून त्यांतील श्लोक हे गायत्रीरूप फुलें व फळें होत. ११ अशी ही मंत्रयुक्त गीता जो माझे भक्तांस सांगतो, मातेच्या स्तनावांचून ज्याला जीवनास अन्य साधन नाहीं अशा बालकास जशी माता भेटवावी, १२ तशी माझ्या भक्तांची जो आदरानें गीतेशीं भेट करून देतो तो मरणानंतर मद्रूपच होतो. १३

श्लोकार्थः—आणि त्या ( माझें गुह्य ज्ञान सांगणारा ) हून माझी अत्यंत आवडती गोष्ट करणारा मनुष्यांमध्यें दुसरा कोणीही नाहीं; आणि त्याच्यापेक्षा दुसरा या लोकीं मला अत्यंत आवडता दुसरा होणार नाहीं ॥ ६९ ॥

आणि देह धारण करूनही जो जीवानें व प्राणानें देहभावापासून अलिप्त असतो, तोच मला अत्यंत प्रिय आहे. १४ ज्ञानी, कर्मठ व तपस्वी हे जरी मला जाणतात, तरी त्या सर्वांत गीतार्थ जाणणारा मला अत्यंत प्रिय आहे. १५ हे पांडवा, जो माझ्या भक्तजनांच्या समुदायाला गीताशास्त्र सांगतो, त्याच्याप्रमाणें या पृथ्वीतलावर मला दुसरा कोणी प्रिय नाहीं. १६ माझ्या प्रीतीनेंच आपलें मन स्थिर करून जो गीताशास्त्र माझ्या भक्तांस सांगतो, तो संतजनांचा मुकुटमणिच होय. १७ मला असें वाटतें कीं, मद्भक्तरूपी बागेंत गीतार्थ प्रतिपादन करणारा भक्त तो वसंतच होय कीं काय ! म्हणून, श्रोतेमंडळींचे अंगावर नवपल्लवरूपी रोमांच उभे राहतात; व मंद वाऱ्यानें जसे वृक्ष हालतात, तसें त्यांचें अंग आनंदाचे भरात डोलत असतें; व नेत्ररूपी पुष्पांतून जे आनंदाश्रु पडतात, ते मधुस्रावाप्रमाणें शोभतात, व त्या बागेंत कोकिळ पक्षी जसे मधुर स्वरानें गायन करतात, तशी ही श्रोतेमंडळी सद्गदित अंतःकरणानें भगवन्नामाचा जयघोष करितात. १८—१९ * किंवा चंद्र गगनांत उगवल्यावरच चकोरपक्ष्यांच्या जन्माचें सार्थक्य होतें; अथवा नवीन मेघ

* १५१८ आणि १५१९ या दोन ओव्यांचा अर्थ मुद्दामच एकत्र दिला आहे.

१२ वृक्षरूपानें उंच गेलें. १३ मातेच्या स्तनावांचून जीवनास अन्य साधन नाहीं अशा. १४ स्थिर चित्तानें. १५ भूषणरूप. १६ मंद वाऱ्यानें. १७ सुगंधोदकें. १८ मधुर स्वराच्या. १९ बागेंत. २० गगनीं.

नाच्या मेळापीं । गीतापद्मरत्नीं उमपीं । वर्षे जो माझ्या रूपीं । हेतु ठेऊनि ॥२१॥ मग तयाचेनि पाडें । पढियंतें मज फुडें । नाहींचि गा मागेंपुढें । न्याहाळितां ॥ २२ ॥ अर्जुना हा ठायवरी । मी तयातें सूये जिव्हारीं । जो गीतार्थाचें करी । परगुणें संतां ॥ २३ ॥

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।
ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥

अन्वयः—यः च आवयोः इमं धर्म्यं संवादम् अध्येष्यते, तेन ज्ञानयज्ञेन अहं इष्टः स्याम् इति मे मतिः ( अस्ति ) ॥७०॥

( १३२५. धर्मयुक्त संवादाचें जो पठण करितो त्यानें ज्ञानयज्ञानें माझें यजन केलें, १५२४–१५२६ ) पैं माझिया तुझिया मिळणीं । वाढिन्नली जे हे काहाणी । मोक्षधर्म कां जिणी । आलासे जेथें ॥ २४ ॥ तो हा सकळार्थप्रबोधु । आम्हां दोघांचा संवादु । न करितां पदभेदु । पाठेंचि जो पढे ॥ २५ ॥ तेणें ज्ञानानळीं प्रदीप्तीं । मूळ अविद्येचिया आहुतीं । तोषविला होय सुमति । परमात्मा मी॥२६॥ ( १३२६. भक्तियुक्त अंतःकरणानें जो गीताशास्त्र श्रवण करील तो मुक्त होऊन शुभ लोकाला जाईल; १५२७–१५३८ ) घेऊनि गीतार्थ उगाणा । ज्ञानिये जे विचक्षणा । ठाकिती तें गौणावाणा । गीतेचा तो लाहे ॥२७॥ गीता पाठकासि असे । फळ अर्थज्ञाचिसरिसें । गीता माउलियेसि नसे । जाणें तान्हें ॥ २८ ॥

श्रद्धावाननसूयश्च श‍ृणुयादपि यो नरः ।
सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥

अन्वयः—श्रद्धावान् अनसूयः च यः नरः ( इदं ) श‍ृणुयात् सः अपि मुक्तः ( सन् ) पुण्यकर्मणां शुभान् लोकान् प्राप्नुयात् ॥ ७१ ॥

आणि सर्वमार्गीं निंदा । सांडूनि आस्था पैं शुद्धा । गीताश्रवणीं श्रद्धा । उभारी जो ॥ २९ ॥ तयाच्या श्रवणपुटीं । गीतेचीं अक्षरें जंव पैठीं । होतीं ना तंव उठाउठीं । पळेचि पाप ॥ १५३० ॥ अटवियेमाजीं जैसा । वन्हि रिघतां सहसा । लंघिती कां दिशा । वनौकें तियें ॥ ३१ ॥ कां उदयाचळकुळीं । झळकतां अंशुमाळी । तिमिरें अंतराळीं । हारपती ॥ ३२ ॥ तैसा कानाच्या महाद्वारीं । गीता गजर जेथ करी । तेथ सृष्टीचिये आदिवरी । जायचि पाप ॥ ३३ ॥ ऐसा जन्मवल्ली धुवट । होय पुण्यरूप चोखट । याहीवरी अचाट । लाहे फळ ॥ ३४ ॥ जे इये गीतेचीं अक्षरें । जेतुलीं कां कर्णद्वारें । रिघती तेतुले होती पुरे । अश्वमेध कीं ॥ ३५ ॥ म्हणौनि श्रवणें पापें जाती । आणि धर्म घरी उन्नति । तेणें स्वर्गराजसंपत्ति । लाहेचि शेखीं ॥ ३६ ॥ तो पैं मज यावयालागीं । पहिलें पेणें करी स्वर्गीं । मग आवडे तंव भोगी । पाठीं मजचि मिळे ॥ ३७ ॥ ऐसी गीता धनंजया । ऐकतया आणि पढतया । फळे महानंदें मियां । बहु काय बोलों ॥३८॥

मोराला ओ देतच येतात कीं काय, तसा १५२० माझे प्राप्तीवर नजर ठेवून जो संतांच्या समुदायांत गीतापद्यरूपी रत्नांचा वर्षाव करितो; २१ मग अशा योग्यतेचा आवडता भक्त पाहूं गेलें असतां मागें मिळाला नाहीं व पुढेंही मिळणार नाहीं। २२ अर्जुना, याप्रमाणें जो गीतेच्या अर्थाची संतजनांस मेजवानी करितो त्याला मी आपले हृदयांत धारण करितों. २३

श्लोकार्थः—आणि जो तुझ्या व माझ्या ह्या धर्मयुक्त गीतासंवादाचें पठन करील, त्यानें माझें ज्ञानयज्ञानें पूजन केलें असें मी समजतों ॥ ७० ॥

माझ्या व तुझ्या समागमांत जो हा संवाद झाला, तो या पृथ्वीवर मोक्ष जिकण्यासच आला आहे. २४ तो सकल अर्थ प्राप्त करून देणारा आपला दोघांचा संवाद, त्यांतील पदांचा विचार न करितां जो केवळ पठन करतो, २५ त्यानें ज्ञानरूपी प्रज्वलित अग्नींत अज्ञानाची आहुति देऊन, मी जो परमात्मा त्याला, हे सुमते अर्जुना, संतोषित केल्याप्रमाणें होतें. २६ गीतेच्या अर्थाचा अनुभव घेऊन, जे शोधक ज्ञानी आहेत ते जी योग्यता पावतात, तीच योग्यता गीतेचें गायन करणारे व वर्णन करणारे यांनाही प्राप्त होते. २७ गीतेचा पाठ करणाऱ्यास गीतेचा अर्थ जाणणाऱ्याप्रमाणेंच फलप्राप्ति होते; कारण गीतामाउलीजवळ जाणतें व नेणतें मूल असा भेद नाहीं. २८

श्लोकार्थः—जो मनुष्य भक्तियुक्त अंतःकरणानें निर्मत्सर होऊन हें गीताशास्त्र नुसतें ऐकेल तोही मुक्त होऊन, पुण्यवान पुरुष ज्या शुभ लोकीं जातात तेथें जाईल ॥ ७१ ॥

आणि सर्वत्र निंदा सोडून शुद्ध आस्थेनें जो गीतेच्या श्रवणावर श्रद्धा ठेवतो, २९ त्याच्या कानांत गीतेचीं अक्षरें पडल्याबरोबर हातोहात पातकें पळून जातात. १५३० जसा अरण्यांत अग्नि सहज शिरला म्हणजे तेथील वनचरें व पशुपक्ष्यादिक दाही दिशास पळून जातात; ३१ अथवा उदयाचलावर सूर्य उगवला म्हणजे जसा आकाशांत अंधकार नाहींसा होतो, ३२ तसा गीतेचा घोष कानाच्या महाद्वारानें अंतःकरणांत गेल्यावर सृष्टि उत्पन्न होण्याच्या अगोदरचींही पापें नाहींतशीं होतात. ३३ अशा रीतीनें सर्व कुल पवित्र होऊन तो पुरुष केवळ पुण्यरूपच होतो. याप्रमाणें त्याला अलभ्य लाभ होतो. ३४ या गीतेचीं जितकीं जितकीं अक्षरें कर्णद्वारानें अंतःकरणांत प्रवेश करतील, तितके अश्वमेध केल्याचें पुण्य लागतें. ३५ म्हणून, गीतेच्या श्रवणानें पापें नाहींतशीं होऊन धर्माची वृद्धि होते व त्या योगानें शेवटीं स्वर्गाचें राज्य उपभोगास मिळतें. ३६ असा जो पुरुष तो, माझ्या प्राप्तीचा पहिला मुक्काम स्वर्गलोकीं करून, तेथें वाटेल तोंपर्यंत सुख भोगून नंतर मलाच येऊन मिळतो. ३७ हे धनंजया, अशी गीता ऐकणारास व गीतेचा पाठ करणारास, फार काय सांगावें। पण आनंदस्वरूपी जो मी तें मद्रूप फळ गीता त्याला प्राप्त करून देते. ३८

१ समुदायात. २ पुष्कळ. ३ अंतःकरणात. ४ मेजवानी. ५ समागमीं. ६ जिंकणें. ७ ज्ञानाग्नीत. ८ पेटलेल्या. ९ अनुभव. १० शोधक. ११ गाण्यानें व वर्णन करण्यानें. १२ जाणतें व नेणतें. १३ प्रविष्ट. १४ अरण्यांत. १५ वनचर. १६ सूर्य. १७ अगोदरचे. १८ कुळ. १९ मुक्काम.

अवतरणः—( १३२७. देव म्हणतात--गीताशास्त्र श्रवण करून अज्ञानामुळें झालेला मोह गेला कीं नाहीं ? १५३९–१५४५ ) याकारणें हें असो । परि जयालागीं शास्त्रा-तिसो[1] । केला तें तंव तुज पुसों । काज तुझें ॥ ३९ ॥

कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।
कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥

अन्वयः—पार्थ, त्वया एतत् एकाग्रेण चेतसा श्रुतं कच्चित् ? धनंजय, ते अज्ञानसंमोहः प्रनष्टः कच्चित् ? ॥ ७२ ॥

तरी सांग पा पांडवा । हा शास्त्रसिद्धांतु आघवा । तुज एकचित्तें फांवा । गेलों आहे ॥ १५४० ॥ आम्हीं जैसें जया रीती । उगाणिलें कानांच्या हातीं । येरीं तैसेंचि तुझ्या चित्तीं । पैठें केलें कीं ॥ ४१ ॥ अथवा माझारीं । गेलें सांडीविखुरी । किंवा उपेक्षेवरी । वाळूनि[2] सांडिलें ॥ ४२ ॥ जैसें आम्हीं सांगितलें । तैसेंचि हृदयीं फावलें । तरी सांग पां वहिलें । पुसेन तें मी ॥ ४३ ॥ तरी स्वाज्ञानजनितें । मागिले मोहें तूतें । भुलविलें तो येथें । असे कीं नाहीं ॥ ४४ ॥ हें बहु पुसों काई । सांगें तूं आपल्या ठायीं । कर्माकर्म कांहीं । देखतासी ॥ ४५ ॥ ( १३२८. स्वानंदांत निमग्न झालेल्या अर्जुनास द्वैतावर आणून गीतार्थानें पूर्णत्व प्राप्त झालें तें त्याचे तोंडून वदवितात; काव्यप्रतिभा, १५४६-१५४९ ) पार्थु स्वानंदैकरसें । विरेल ऐसा भेददशे । आणिला येणें मिषें । प्रश्नाचेनि ॥४६॥ पूर्णब्रह्म जाला पार्थु । तरी पुढील साधावया कार्यार्थु । मर्यादा श्रीकृष्णनाथु । उलंघों नेदी ॥ ४७ ॥ येऱ्हवीं आपुलें करणें । सर्वज्ञ काय तो नेणे । परि केलें पुसणें । याचिलागीं ॥ ४८ ॥ एवं करोनियां प्रश्न । नसतेंचि अर्जुनपण । आणू-नियां जालें पूर्णपण । तें बोलवी स्वयें ॥ ४९ ॥ अवतरणः—( १३२९. अर्जुन अष्ट सात्विक भाव आवरून देवांस उत्तर देतो; काव्यप्रतिभा, १५५०–१५५७ ) मग क्षीराब्धीतें सांडितु । गगनीं पुंजु मंडितु । निवडे जैसा न निवाडितु । पूर्णचंद्र ॥ १५५० ॥ तैसा ब्रह्म मी हें विसरे । तेथ जगचि ब्रह्मत्वें भरे । हेंही सांडी तरी विरे[13] । ब्रह्मपणहीं ॥ ५१ ॥ ऐसा मोडतु मांडतु ब्रह्में । तो दुःखें देहाचिये सीमे । मी अर्जुन येणें नामें । उभा ठेला ॥ ५२ ॥ मग कांपतां करतळीं । दडपूनि रोमा-वळी । पुलिकीं स्वेदेंजळीं । जिरऊनियां ॥ ५३ ॥ प्राणक्षोभें डोलतया । आंगा आंगचि टेंकयाँ । सूनि स्तंभु चाळया । भुलौनियां ॥ ५४ ॥ नेत्रयुगुळाचेनि वोतें[1] । आनंदामृताचें भरितें । वोसंडेंत तें मागुतें । काढूनियां ॥ ५५ ॥ विविधा औत्सु-क्यांची दाटी । चीप देंटत होती कंठीं । ते करूनियां पैठी । हृदयामाजीं ॥५६॥ वाचेचें वितुळणें । सांवरूनि प्राणें । अक्रमाचें श्वसणें । ठेऊनि ठायीं ॥ ५७ ॥

---

१ आरंभ. २ समजला; ठसला. ३ स्वाधीन केलें. ४ लवंडून. ५ चाळढकलीवर. ६ झुगारून दिलें. ७ उत्तर. ८ आपल्या अज्ञानापासून उत्पन्न झालेला. ९ पुण्य व पाप. १० निजानंदरूप ऐक्यानें.

यास्तव या गोष्टी असूं दे. परंतु ज्या कारणाकरितां हें गीताशास्त्र सांगण्यास मीं आरंभ केला, तें तुझें काम झालें काय ? ३९

श्लोकार्थः—हे पार्था, मीं सांगितलेलें हें गीताशास्त्र तूं एकाग्रचित्तानें ऐकलेंस ना ? हे धनंजया, अज्ञानापासून जो तुझ्या मनामध्यें मोह उत्पन्न झाला होता, तो नाहींसा झाला ना? ॥७२॥

तर, पांडवा, सांग बरें, ह्या गीताशास्त्रांतील सर्व सिद्धांत तुझ्या मनांत पूर्णपणें ठसले आहेत काय ? १५४० आम्हीं जसे व ज्या रीतीनें हे सिद्धांत कानांच्या स्वाधीन केले तसे त्यांनीं तुझ्या चित्ताचे स्वाधीन केले ना ? ४१ अथवा, त्यांनीं ( कानांनीं ) मध्येंच वाटेंत पाडले किंवा तूं चालढकल करून झुगारून दिलेस ? ४२ जसे आम्हीं ते सांगितले तसेच जर तुझ्या हृदयांत त्यांनीं पोंचते केले असतील, तर जें मी तुला आतां पुसेन तें सत्वर सांग. ४३ तर तुझ्या अज्ञानापासून मागें उत्पन्न झालेला व ज्यानें तुला भूल पाडली तो मोह तुझ्याजवळ आतां आहे किंवा नाहींसा झाला ? ४४ इतकेंच नव्हे, तर सांग बरें, तुझ्या ठिकाणीं पुण्य व पाप हीं कांहीं तुला दिसतात काय ? ४५ पार्थ निजानंदैक्य-रूपांत निमग्न होऊन जाईल म्हणून या प्रश्नांच्या निमित्तानें देवांनीं भेदबुद्धीवर आणला. ४६ पार्थ पूर्णब्रह्मरूपी झाला तर आपलें पुढील कार्य साधणार नाहीं म्हणून श्रीकृष्णनाथांनीं त्याला भेददशेची मर्यादा उल्लंघूं दिली नाहीं. ४७ एरवीं सर्वज्ञ जो श्रीकृष्ण, त्याला आपलें करणें समजलें नव्हतें काय ? परंतु या कारणाकरितांच त्यानें अर्जुनास प्रश्न केला. ४८ याप्रमाणें प्रश्न करून, नाहींसें झालेलें अर्जुनपण आणून, अर्जुन पूर्णदशेस आला किंवा नाहीं हें त्याचे मुखांतून बोलविलें. ४९ मग, पूर्णचंद्र हा क्षीराब्धीला सोडून आकाशांतील तारकापुंजास सुशोभित करीत आहे असें दिसलें तरी तो जसा क्षीराब्धीपासून वेगळा नाहीं, १५५० तसा मी ब्रह्म झालों होतों हें विसरून, मग सर्व जग ब्रह्मरूपी आहे हेंही विसरून, ब्रह्मपण आपोआप विरघळलें. ५१ अशा रीतीनें ब्रह्माची स्मृति ठेवून *वागणारा व ब्रह्माच्या विस्मृतीनें ब्रह्मरूपीच असणारा तो, अति कष्टानें, मी अर्जुन आहें असें* समजून देहस्थितीवर येऊन उभा राहिला. ५२ मग हातपाय कांपावयास लागून अंगावरील उभे राहिलेले रोमाच दडपून, घामाचे बिंदु जिरवून, ५३ प्राणवायूच्या वाढण्यानें डोलत असलेल्या अंगास अंगाचाच टेका देऊन व कंठ सद्गदित झाला होता तो, हे सर्व विकार त्यानें आंत जिरवून टाकले. ५४ दोन्ही नेत्रांतून प्रेमाश्रुधारा चाललेल्या आवरून मग पुसून टाकल्या. ५५ नानाप्रकारच्या उत्कंठांच्या भरानें कंठ दाटत होता, त्या उत्कंठा हृदयांत दाबून, ५६ व वाचा जी वितळली होती ती सावरून, प्राणक्षोभ झाला होता तोही सावरला; आणि *श्वासोच्छ्वासाची गति विपरीत झाली होती ती पूर्ववत् सावरली.* ५७

११ सोडून. १२ नक्षत्रास सुशोभित करून. १३ विरघळे. १४ बिंदु. १५ घामाचे. १६ प्राणवायूच्या वाढण्यानें. १७ टेंका देऊन. १८ कंठ. १९ अश्रुप्रवाहानें. २० उसळत होतें. २१ स्वरभंग होत होता. २२ विपरीत.

अर्जुन उवाच—

नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाऽच्युत ॥
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥

अन्वयः—अच्युत, त्वत्प्रसादात् मे मोहः नष्टः, मया स्मृतिः च लब्धा; गतसंदेहः स्थितः (अहं) तव वचनं करिष्ये. ॥ ७३ ॥

( १३३०. देवाच्या प्रसादानें मोह गेला व आत्मस्वरूपाची आठवण होऊन मी संदेहरहित झालों, १५५८–१५७५ ) मग अर्जुन म्हणे काय देवो । पुसताति आवडे मोहो । तरि तो सकुटुंब गेला जी ठावो । घेऊनि आपला ॥ ५८ ॥ पासीं येऊनि दिनकरें । डोळ्यातें आंधारें । पुसिजे हें कायि सरे । कोणे गांवीं ॥ ५९ ॥ तैसा तूं श्रीकृष्णराया । आमुचिया डोळयां । गोचर हेंचि कायिसया । न पुरे तंव ॥ १५६० ॥ वरि लोभें मायेपासूनि । तें सांगसी तोंड भरुनि । जें कायिसेनिही करूनि । जाणूं न ये ॥ ६१ ॥ आतां मोह असे कीं नाहीं । हें ऐसें जी पुससी काई । कृतकृत्य जाहलों पाहीं । तुझेपणें ॥ ६२ ॥ गुंतलों होतों अर्जुनगुणें । तो मुक्त जालों तुझेपणें । आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाहीं ॥ ६३ ॥ मी तुझेनि प्रसादें । लाधलेनि आत्मबोधें । मोहाचे तया कांदे । नेदींच उरों ॥ ६४ ॥ आतां करणें कां न करणें । हें जेणें उठी दुजेपणें । तें तूंवांचूनि नेणें । सर्वत्र गा ॥ ६५ ॥ ये विषयीं माझ्या ठायीं । संदेहाचें तुरोचि कांहीं । त्रिशुद्धि कर्म जेथ नाहीं । तें मी जालों ॥ ६६ ॥ तुझेनि मज मी पावोनि । कर्तव्य गेलें निपटूनि । परि आज्ञा तुझीवांचोनि । आन नाहीं प्रभो ॥ ६७ ॥ कां जें दृश्य दृश्यातें नाशी । जें दुजें द्वैतातें ग्रासी । जें एक परी सर्वदेशीं । वसवी सदा ॥ ६८ ॥ जयाचेनि संबंधें बंधु फिटे । जयाचिया आशा आस तुटे । जें भेटलया सर्व भेटे । आपणपांचि ॥ ६९ ॥ तें तूं गुरुलिंग[1] जी माझें । जें येकलेपणींचें विरजें[2] । जयालागीं वोलांडिजे[3] । अद्वैत-बोधु ॥ १५७० ॥ आपणाचि होऊनि ब्रह्म । सारिजे कृत्याकृत्याचें काम । मग कीजे का निःसीम । सेवा जयाची ॥ ७१ ॥ गंगा सिंधु सेवूं गेली । पावतांचि समुद्र जाली । तेविं भक्ता सैंलें[4] दिधली । निजपदाची ॥ ७२ ॥ तो तूं माझा जी निरुपचारु । श्रीकृष्णा सेव्य सद्गुरु । मा ब्रह्मतेचा उपकारु । हाचि मानीं ॥ ७३ ॥ जें मज तुम्हां आड । होतें भेदाचें कवाड । तें फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ ७४ ॥ तरी आतां तुझी आज्ञा । सकळ देवाधिदेवराज्ञा । करीन देई अनुज्ञा । भलतियेविषयीं ॥ ७५ ॥ ( १३३१. अर्जुनाचें उत्तर ऐकून देवास आनंद झाला, त्या भरात दोघांचें लग्न लागलें; काव्यप्रतिभा, १५७६–१५७८ ) यया अर्जु-नाचिया बोला । देवो नांचे सुखें भुलला । म्हणे विश्वफळा जाला । फळ हा मज

१ शोभेल; योग्य होईल. २ मूर्ति. ३ साह्य करणारें. ४ वाटा. ५ भेदरहित.

श्लोकार्थः—अर्जुन म्हणाला, हे अच्युता, तुमच्या प्रसादेंकरून माझा मोह नाहींसा झाला; मला माझ्या खऱ्या स्वरूपाची आठवण झाली; मी संशयरहित झालों आहें; आतां तुम्ही सांगाल तसें मी करीन. ॥ ७३ ॥

मग अर्जुन देवास म्हणाला कीं, तुम्हीं मला मोहाची अजून आवड आहे कीं काय असें विचारिलें, तर तो आपल्या कुटुंबासह ठावाठिकाण सोडून गेला! ५८ सूर्य जवळ आल्यावर डोळ्याला अंधार दृष्टीस पडतो कीं काय? हें म्हणणें कोणत्या गांवीं शोभेल? ५९ तसें, हे श्रीकृष्णराया, तुम्हीं आमच्या डोळ्यांस प्रत्यक्ष दर्शन दिल्यावर तें मोहाच्या नाशास पुरे होणार नाहीं काय? १५६० तशांत, तुम्ही आईपेक्षांही अति प्रेमानें, जें कोणत्याही प्रयासानें दुसरे कोणापासून समजणार नाहीं, तें ज्ञान विस्तारानें सांगितलें. ६१ आता मोह अद्याप आहे किंवा नाहींसा झाला असें तुम्ही विचारतां, तर तुमच्याशीं एकरूपता झाल्यामुळें मी आज कृतार्थ झालों आहें. ६२ मी अर्जुन आहें अशा अभिमानानें मोहांत गुंतलों होतों, तो तुमच्या रूपाशीं ऐक्य पावल्यामुळें मुक्त झालों; म्हणून आतां पुसणें किंवा सांगणें या दोन्ही गोष्टी आपोआप नाहींतशा झाल्या. ६३ तुमच्या प्रसादानें आत्मबोधाची प्राप्ति झाल्यामुळें माझा मोह समूळ नाहींसा झाला. ६४ आतां, ज्या द्वैतामुळें क्रिया करणें अथवा न करणें हे भाव उत्पन्न होत होते, तें द्वैत मी जाणत नसून, या जगतांत तुम्हांशिवाय दुसरें कांहीं जाणत नाहीं. ६५ याविषयीं माझ्या ठिकाणीं संशय बिलकूल राहिला नाहीं. तर खरोखर जेथें कर्म उरत नाहीं, ती ब्रह्मस्थिति मी पावलों आहें. ६६ तुमच्या योगानें मला माझें स्वरूप प्राप्त होऊन माझें कर्तव्य समूळ नाहींसें झालें. परंतु हे प्रभो, तुमच्या आज्ञेशिवाय मला कांहींही दुसरें करावयाचें नाहीं. ६७ कारण जें दृश्य प्राप्त झालें असतां दृश्यभावाचा नाश होतो, जें द्वैत गुरुशिष्यभाव नाहींसा करतें, जें एक असून सर्व देश व्यापून राहतें, ६८ ज्याचा संबंध झाला असतां सर्व बंध नाहींतसे होतात, ज्याच्या आशेनें आशा कुंठित होते व ज्याची भेट झाली असतां सर्वत्र आत्मस्वरूपच दिसतें, ६९ ते तुम्ही माझी सद्गुरुमूर्ति आहां—कीं, जी एकटेपणापासून साह्य करते व जिच्यावरून अद्वैताचा बोध ओंवाळून टाकावा; १५७० आणि जे आपणच ब्रह्म होऊन चांगलें व वाईट कर्म नाहींसें करतां; आणि मग ज्याची निःसीम सेवा करावी; ७१ गंगा समुद्राची सेवा करावयास गेली असतां समुद्राची व तिची गांठ पडल्यावर ती समुद्ररूपच झाली, त्याप्रमाणें ज्यानीं आपल्या भक्तांना आत्मपदाचा आपला शेलका वांटा दिला, ७२ ते तुम्ही, हे श्रीकृष्णा, भेदरहित व सेवा करण्यास योग्य असे माझे सद्गुरु आहां. म्हणून हाच ब्रह्मय होण्याचा मजवर आपला उपकार आहे असें समजा. ७३ जें तुमच्या व माझ्या एकरूपतेच्या आड भेदाचें प्रतिबंधक कवाड होतें, तें तुम्ही नाहींसें करून उत्तम अशी सेवासुखाची जोड करून दिली. ७४ तर सर्व देवांचे राजे जे तुम्ही, ते मला जी आज्ञा कराल ती मी पाळीन. फार काय! वाटेल त्याविषयीं मला आज्ञा करा. ७५ हें

॥ ७६ ॥ उणेनि[1] उमचला सुधाकरु[2] । देखुनी आपला कुमरु । मर्यादा क्षीरसागरु । विसरेचि ना ॥ ७७ ॥ अवतरण:—ऐसें संवादाचा चहूंलां । लग्न दोघांचिया आंतुला । लागलें देखोनि जाला । निर्भरु संजयो ॥ ७८ ॥ ( १३३२. संजय आपल्या व राजाच्या भाग्याचें वर्णन करितो; काव्यप्रतिभा, १५७९–१५८६ ) तेणें उचंबळलेपणें । संजय धृतराष्ट्रातें म्हणे । जी कैसे बादरायणें । रक्षिलों दोघे ॥ ७९ ॥ आजि तुमतें अवधारा । नाहीं चर्मचक्षुही संसारा । कीं ज्ञानदृष्टिव्यवहारा आणिलेति ॥ १५८० ॥ आजि रथींचिये[3] राहाटी । घेई जो घोडेयासाठीं । तया आम्हां या गोष्टी । गोचरा होती ॥ ८१ ॥ वरी झुंझाचें निर्वाणें । मांडलें असे दारुणें । दोहीं हारीं आपण । हारापिजे जैसें ८२ ॥ येवढा जिये सांकडां । कैसा अनुग्रहो पैं गाढा । जे ब्रह्मानंदु उघडा । भोगवीतसे ॥ ८३ ॥ ऐसें संजय बोलिला । परि न द्रवे येरु[3] उगला । चंद्रकिरणीं शिवतला । पाषाणु जैसा ॥८४॥ हे देखोनि तयाची दशा । मग करीचि ना सरिसा । परि सुखें जाला पिसा । बोलतसे ॥ ८५ ॥ भुलविला हर्षवेगें । म्हणौनि धृतराष्ट्रा सांगे । येन्हवीं नव्हे तयाजोगें । हें कीर जाणे ॥ ८६ ॥

संजय उवाच—

इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥

अन्वयः—इति अहं वासुदेवस्य च महात्मनः पार्थस्य इमं अद्भुतं रोमहर्षणं संवादं अश्रौषम् ॥ ७४ ॥

( १३३३. *संजय म्हणतो, अर्जुनाचा व देवाचा जो संवाद झाला तो मीं ऐकला,* १५८७–१६०८ ) मग म्हणे पैं कुरुराजा । ऐसा भ्रातृपुत्र तो तुझा । बोलिला तें अधोक्षजा । गोड जालें ॥ ८७ ॥ अगा पूर्वापर सागर । ययां नामांसीचि सिनार । येर आघवें तें नीर । एक जैसें ॥ ८८ ॥ तैसा श्रीकृष्ण पार्थ ऐसें । हें आंगीचिपासीं दिसे । मग संवादीं जी नसे । कांहींच भेदु ॥ ८९ ॥ पैं दर्पणाहूनि चोखें । दोन्ही होतीं सन्मुखें । तेथ येरीं येर देखे । आपणपें जैसें ॥ १५९० ॥ तैसा देवेंसी पंडुसुतु । आपणपें देवीं देखतु । पांडवेंसीं देखे अनंतु । आपणपें पार्थीं ॥ ९१ ॥ देवदेवो भक्तालागीं । जिये विवेकूनि देखे आंगीं । येरु तियेचेही भागीं । दोन्ही देखे ॥ ९२ ॥ आणिक कांहींचि नाहीं । म्हणौनि करिती काई । दोघे येकपणें पाहीं । नांदताति ॥ ९३ ॥ आतां भेदु जरी मोडे ।

१ उणेपणा टाकून. २ चंद्र. ३ घोड्यावर. ४ हृदयस्थ गुणेनें. ५ तल्लीन. ६ श्रीव्यासांनी. ७ रथ चालवावा म्हणून. ८ घोड्यांची परीक्षा करण्याकरितां. ९ प्रसंग. १० थोर. ११ मार्दुव. १२ धृतराष्ट्र. १३ सत्य वचना. १४ संबंध. १५ पुतण्या. १६ पूर्वपश्चिम. १७ वेगळेपण.

अर्जुनाचें भाषण ऐकून देव सुखानें अति हर्ष पावून प्रेमानें नाचूं लागले; आणि म्हणाले कीं, या विश्वरूप फळाला मला अर्जुन हें एक फळच उत्पन्न झालें ! ७६ पूर्ण कलेनें युक्त असा आपला मुलगा जो चंद्र, त्याला पाहून क्षीरसागर मर्यादा विसरत नाहीं काय ? ७७ असें संवादरूपी बोहल्यावर हृदयस्थ खुणेनें श्रीकृष्ण भगवान व अर्जुन या दोघांचें लग्न लागलेलें पाहून संजय तल्लीन झाला. ७८ अशा रीतीनें प्रेमाचा गाहिवर आल्यामुळें संजय धृतराष्ट्र राजास म्हणाला कीं, हे राजन् ! केवढें आपलें दोघांचें नशीब थोर आहे कीं, श्रीव्यासांनीं आपलें अशा समयास रक्षण केलें ! ७९ आज पहा कीं, तुम्हांला व्यावहारिक दृष्टिही नसून ज्ञानदृष्टि आपल्यास सहज प्राप्त झाली; १५८० आणि रथ चालविण्याकरितां व त्यांच्या घोड्यांची परीक्षा करण्याकरितां मला ठेवलेलें असून, मला कृष्ण व अर्जुन यांचा संवाद ऐकण्याचा प्रसंग आला ! ८१ युद्धाचा घोर प्रसंग सुरू असून, दोन्ही पक्षांकडील योद्धे आपणच होऊन, जय व अपजय कोणाचाही झाला तरी तो आपलाच होय; ८२ एवढ्या संकटसमयीं केवढा महान् अनुग्रह, कीं ज्याच्या योगानें ब्रह्मानंदाचा उघड उघड उपभोग घ्यावयास सांपडतो ! ८३ हें संजयाचें भाषण ऐकून, दगडावर चंद्राचे किरण पडले तरी जसा त्याला पाझर फुटत नाहीं, तसा धृतराष्ट्र राजा स्वस्थ बसून त्याचे मनास काडीइतकाही द्रव आला नाहीं. ८४ अशी राजाची स्थिति पाहून संजयानें त्याच्याशीं भाषण करण्याचें टाकलें; परंतु तो सुखाचे भरानें वेडा होऊन बोलूं लागला. ८५ हर्षाच्या भरानें बुडून गेल्यामुळें धृतराष्ट्राशीं संजयानें भाषण केलें; एरवीं, तें ऐकण्याची राजाची योग्यता नाहीं असें तो जाणत होता. ८६

श्लोकार्थः—संजय म्हणालाः—हे धृतराष्ट्र राजा, याप्रमाणें वासुदेवाचा आणि परमश्रेष्ठ अर्जुनाचा अद्भुत व रोमांच उत्पन्न करणारा असा हा संवाद मीं ऐकिला ॥ ७४ ॥

मग म्हणाला कीं, हे धृतराष्ट्र राजा, तुझा पुतण्या जो अर्जुन, तो असें बोलल्यावर श्रीकृष्णास परम आनंद झाला. ८७ राजा, 'पूर्वसमुद्र व पश्चिमसमुद्र हीं नांवें मात्र वेगळीं आहेत; परंतु उदकाचे दृष्टीनें ते दोन्ही जसे एकच आहेत, ८८ तसे श्रीकृष्ण व अर्जुन हे देहाच्या दृष्टीनें भिन्न आहेत; परंतु त्यांच्या झालेल्या भाषणांत तो भेद उरला नाहीं. ८९ दोन आरसे स्वच्छ करून समोरासमोर ठेवल्यावर जसे एकमेकांत एकमेकांचें रूप दिसतें, १५९० तसा देवांसह अर्जुन देव आपले स्वरूपांत पाहूं लागले, व अर्जुनासह देव अर्जुन आपले स्वरूपांत पाहूं लागला. ९१ तो देवांचा देव हा भक्ताकरितां विचार करून आपल्या स्वरूपाकडे पाहूं लागला, तों त्यांत भक्ताचेंही स्वरूप दिसूं लागलें. ९२ द्वैतभाव मुळींच उरला नाहीं, म्हणून श्रीकृष्ण भगवान व अर्जुन ऐक्याचे भरांत निमग्न झाले. ९३ आता दोघांमधील भेद जर नाहींसा झाला, तर दोघांचे प्रश्न व उत्तरें होणार नाहींत व तोच जर भेद नाहींसा होणार नाहीं, तर संवादाचें सुख कोठून मिळणार ?

१८ देहभिन्नतेच्या दृष्टीनें. १९ देवांचा देव. २० विचार करून.

तरी प्रश्नोत्तर कां घडे । ना भेदुचि तरी जोडे । संवादसुख कां ॥ ९४ ॥ ऐसें बोलतां दुजेपणें । संवादीं द्वैत गिळणें । तें ऐकिलें बोलणें । दोघांचे मियां ॥ ९५ ॥ उटूनि दोन्ही आरसे । वोडविलीया सरिसे । कोण कोणा पाहातसे । कल्पावें पां ॥ ९६ ॥ कां दीपासन्मुखु । ठेविलया दीपकु । कोण कोणा अर्थिकु । कोण जाणे ॥ ९७ ॥ ना ना अर्कापुढें अर्कु । उदयलिया आणिकु । कोण म्हणे प्रकाशकु । प्रकाश्य कवणु ॥ ९८ ॥ हें निर्धारूं जातां फुडें । निर्धारासि ठकें पडे । ते दोघे जाले येवढे । संवादें सरिसे ॥ ९९ ॥ जी मिळतां दोन्ही उदकें । माजी लवण वीरूं ठाके । कीं तथासीही निमिखें । तेंचि होय ॥ १६०० ॥ तैसे श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादले तें मनीं । धरितां मजही वानी । तेंचि होतसे ॥ १ ॥ ऐसें म्हणे ना [४] मोटकें । तंव हिरोनि सात्विकें । आठव नेला नेणों कें । संजयपणाचा ॥ २ ॥ रोमांच जंव फेरके । तंव तंव आंग सुरके । स्तंभ स्वेदातें जिंके । एकला कंपु ॥ ३ ॥ अद्वयानंदस्पर्शे । दिठी रसमय जाली असे । ते अश्रु नव्हती जैसें । द्रवत्वाचि ॥ ४ ॥ नेणों काय न माय पोटीं । काय नेणों गुंफे कंठीं । वाग्वृत्ती पडत मिठी । उससाचिया ॥ ५ ॥ किंबहुना सात्विका आठां । चौचरु मांडतां उमेठा[४] । संजयो जालासे चोहटा । संवादसुखाचा ॥ ६ ॥ तया सुखाची ऐसी जाती । जे आपणचि धरी शांति । मग पुढति देहस्मृति । लाधली तेणें ॥ ७ ॥

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद् गुह्यमहं परम् ।
योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥

अन्वयः—व्यासप्रसादात् योगेश्वरात् स्वयं योगं कथयतः कृष्णात् एतत् परं गुह्यम् अहं साक्षात् श्रुतवान् ॥ ७५ ॥

तेव्हां बैसतेनि आनंदें । म्हणे जी जें उपनिषदें । नेणती तें व्यासप्रसादें । ऐकिलें मियां ॥ ८ ॥ (१३३४. संजय म्हणतो, देवांनीं अर्जुनाला गुह्यज्ञान सांगितलें तें मीं व्यासांच्या कृपेनें प्रत्यक्ष ऐकिलें, १६०९-१६१३ ) ऐकतांचि ते गोठी । ब्रह्मत्वाची पडिली मिठी । मीतूंपणेंसी सृष्टी । विरोनि गेली ॥ ९ ॥ हे आघवेचि कां योग । जया ठाया येती मार्ग । तयाचें वाक्य सवंग । केलें मज व्यासें ॥ १६१० ॥ अहो अर्जुनाचेनि मिषें । आपणपेंचि दुजें ऐसें । नटोनि आपणया उद्देशें । बोलिले जें देव ॥ ११ ॥ तेथ कीं माझे श्रोत्र । पैठाचें जाले जी पात्र । काय वानूं स्वतंत्र । सामर्थ्य श्रीगुरूचें ॥ १२ ॥

राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।
केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥

अन्वयः—राजन्, ( अहं ) केशवार्जुनयोः इमं पुण्यं अद्भुतं संवादं संस्मृत्य संस्मृत्य मुहुः मुहुः हृष्यामि ॥ ७६ ॥

९४ असें द्वैतपणाचें भाषण चाललें असतां त्यांत द्वैत नाहींसें झालें; तें श्रीकृष्ण भगवान व अर्जुन यांचें भाषण मीं ऐकलें. ९५ दोन आरसे स्वच्छ करून समोरासमोर ठेवले असतां कोण कोणाला पाहतो याची कल्पना कशी करावी ? ९६ अथवा, दिव्यासमोर दुसरा दिवा ठेवला असतां कोणता प्रकाशक व कोणता प्रकाश्य ( ज्यावर उजेड पडावयाचा ती वस्तु ) हें कोणीं जाणावें ? ९७ किंवा सूर्यासमोर दुसरा सूर्य उगवला असतां, अमुक प्रकाशक व अमुक प्रकाश्य असें कोण म्हणेल ? ९८ श्रीकृष्ण व अर्जुन हे संवादाच्या भरांत इतक्या ऐक्यास पावले कीं, त्याचा विचार करूं लागलें असतां तो जागचे जागीं बंद राहतो. ९९ दोन नद्यांचे प्रवाह मिळत असतां, त्या दोहोंस बाजूस करण्याकरितां मीठ मध्यें ठेवलें तर त्या मिठास एके क्षणांत जसें पाणीच व्हावें लागतें, १६०० तसें श्रीकृष्ण व अर्जुन यांचें जें भाषण झालें, तें ध्यानांत धरतांना माझीही स्थिति तशीच झाली. १ इतकें संजय भाषण करीत आहे तोंच अष्टसात्त्विक भावांनीं त्याचा संजयपणा हिरावून नेला. २ अंगावर जों जों रोमांच उभे राहूं लागले, तों तों सुरकुत्या पडल्या; स्तब्धपणा येऊन घाम सुटून त्याहीपेक्षां कंप विशेष वाढला. ३ अद्वयानंदाच्या भरानें दृष्टि ब्रह्मानंदमय होऊन प्रेमाश्रु वाहूं लागले; जणूं काय ते अश्रु नसून (ब्रह्मानंदाला) पाझरच सुटले आहेत ! ४ त्याचे पोटांत कांहींएक मावेनासें होऊन कंठ दाटून आला; व श्वासोच्छ्वासामुळें तोंडांतून शब्द बाहेर पडेना. ५ फार काय ? अष्टसात्त्विक भावानें संजयाची अतिशय बोबडी वळली, आणि श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादसुखाचा संजय हा चव्हाटाच झाला. ६ त्या सुखाची अशी जात आहे कीं, त्याच्या योगानें आपोआप शांति उत्पन्न होते; म्हणून संजय पुढें सहज देहभानावर आला. ७

*श्लोकार्थः—श्रीव्यासाच्या प्रसादानें, योगेश्वर व स्वतः अर्जुनाला ज्ञानयोग सांगणाऱ्या श्रीकृष्णापासून हें अति गुह्य ज्ञान मीं प्रत्यक्ष ऐकलें. ॥ ७५ ॥*

तेव्हां संजयाचें आनंदाचें भरतें कमी झाल्यावर तो असें म्हणाला कीं, उपनिषदांनाही जें गुह्य ठाऊक नाहीं, तें श्रीव्यासांच्या प्रसादानें मला ऐकण्यास मिळालें. ८ तें गुह्य ऐकल्याबरोबर ब्रह्मभावाची मिठी पडून मी व तूं या भावासहवर्तमान सृष्टि बुडून गेली. ९ हे सर्व योगमार्ग ज्या ठिकाणीं येऊन मिळतात असा जो श्रीकृष्ण भगवान, त्याचें वाक्य श्रीव्यासांचे कृपेनें मला स्वस्त झालें. १६१० अहो, अर्जुनाच्या निमित्तानें श्रीकृष्ण भगवान आपणच अर्जुनरूप होऊन आपल्यालाच उद्देशून बोलले. ११ तें बोलणें ऐकण्यास माझे कान योग्य झाले, तर श्रीगुरूंच्या अद्भुत सामर्थ्याचें काय वर्णन करावें ! १२

श्लोकार्थः—हे राजा, केशवार्जुनांच्या ह्या पुण्यकारक व अद्भुत संवादाचें वारंवार स्मरण होऊन मला पुनः पुनः आनंद होतो. ॥ ७६ ॥

१ प्रकाशक. २ बंद राही. ३ बाजूस करण्यास. ४ थोडें. ५ उभे राहूं लागले. ६ सुरकुत्या पडूं लागल्या. ७ स्तब्धपण. ८ घाम. ९ ब्रह्मानंदमय. १० पाझरच सुटले आहेत. ११ शब्दार्थास. १२ श्वासोच्छ्वासामुळें. १३ बोबडी वळली. १४ अतिशय. १५ योग्यतेचें. १६ अद्भुत.

राया हें बोलतां विस्मित होये । तेणेंचि मोडावला ठाये । रत्नीं कीं रत्न-किळे ये । झांकोळीत जैसी ॥ १३ ॥ ( १३३५. संजयास–अर्जुन देवाच्या पुण्यकारक संवादाचें स्मरण होऊन आनंद होतो, १६१४–१६१६ ) हिमवंतीचीं सरोवरें । चंद्रोदयीं होतीं काश्मीरें । मग सूर्यागमीं माघारें । द्रवत्व ये ॥ १४ ॥ तैसा शरीराचिया स्मृती । तो संवादु संजय चित्तीं । धरी आणि पुढती । तेंचि होय ॥ १५ ॥

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।
विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७ ॥

अन्वयः—तत् च राजन्, हरेः अत्यद्भुतं रूप संस्मृत्य संस्मृत्य मे महान् विस्मयः ( भवति ), अहं च पुनः पुनः हृष्यामि ॥ ७७ ॥

मग उठोनि म्हणे नृपा । श्रीहरीचिया विश्वरूपा । देखिलया उगा कां पां । असों लाहसी ॥ १६ ॥ ( १३३६. संजयास-विश्वरूपाचें स्मरण होऊन विस्मय वाटतो व आनंद होतो, १६१७–१६२१ ) न देखणेनि जें दिसे । नाहींपणेंचि जें असे । विसरें आठवे तें कैसें । चुकऊं आतां ॥१७॥ देखोनि चमत्कारु । कीजे तो नाहीं पैसारु । मजहीसकट महापूरु । नेत आहे ॥ १८ ॥ ऐसा श्रीकृष्णार्जुन- । संवाद-संगमीं स्नान । करूनि देतसे तिळदान । अहंतेचें ॥ १९ ॥ तेथ असंवरें आनंदें । अलौकिकही कांहीं स्फुंदे । श्रीकृष्ण म्हणे सद्गदें । वेळोवेळां ॥ १६२० ॥ या अवस्थांची कांहीं । कौरवातें पैरी नाहीं । म्हणोनि रायें तें कांहीं । कल्पावें जंव ॥ २१ ॥ ( १३३७. अत्यानंद कौरवराजास झाला नाहीं. संवादाचा आनंद संजयानें आपले ठिकाणीं विरविला; काव्यप्रतिभा, १६२२–१६२३ ) तंव जाला सुखलाभु । आपणपा करूनि स्वयंभु । बुझाविलें अंबष्टंभु । संजयें तेणें ॥ २२ ॥ तेथ कोणी येकी अवसरी । होआवी ते करूनि दुरी । राजा धृतराष्ट्राची शंका:–रावो म्हणे संजया पैरी । कैसी तुझी गा ॥ २३ ॥ ( १३३८. धृतराष्ट्र राजा म्हणतो, संजया, मला विजयाची गोष्ट सांग–भाकड गोष्टी नकोत; १६२४–१६३१ ) तेणें तूतें येथें व्यासें । बसविलें कासया उद्देशें । अप्रसंगामाजी ऐसें । बोलसी काई ॥ २४ ॥ रानींचें राउळा नेलिया । दाही दिशा मानी सुनियां । कां रात्री होय पांहलया । निशाचरां ॥ २५ ॥ जो जेथींचें गौरव नेणे । तयासि तें भिंगुळवाणें । म्हणोनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कीं तो ॥ २६ ॥ मग म्हणे सांगें प्रस्तुत । उदयलेंसे जें उत्कलित । तें कोणासि वा रे जैत । देईल शेखीं ॥ २७ ॥ येऱ्हवीं विशेषें बहुतेक । आमुचें ऐसें मानसिक । जे दुर्योधनाचें आधिक । प्रताप सदा ॥ २८ ॥ आणि येरांचेनि पाडें । दळही याचें

१ प्रेमा चमकते, २ स्फटिकाच्यासारखीं, ३ माझेपणाच्या आठवाहून. ४ अनिवार.

संजय धृतराष्ट्र राजास इतकें बोलून पुनः विस्मय पावला, व त्याचा संजयपणाचा आठव मोडला. जशी रत्नाची प्रभा घटकेंत चमकते व घटकेंत बंद पडते; १३ हिमालय पर्वतावरील सरोवरांतील पाणी चंद्रोदय होतांच गोठून तीं स्फटिक मण्यांच्यासारखीं दिसतात; व तींच सूर्योदय झाला म्हणजे विरघळून पूर्ववत् पाणी होतें; १४ तसा संजय देहभानावर आल्यावर, श्रीकृष्णार्जुनांचे संवादाची त्याचे चित्तांत आठवण होण्याबरोबर विस्मय होई. १५

श्लोकार्थः—आणि हे राजा, त्या श्रीकृष्णाच्या अत्यद्भुत विश्वरूपाचें वारंवार स्मरण होऊन मला मोठा विस्मय होतो, आणि पुनः पुनः मला आनंद होतो ।। ७७ ।।

मग त्या आनंदाचे भरांत उभा राहून संजय धृतराष्ट्रास म्हणाला कीं, हे राजा, श्रीहरीचें विश्वरूप पाहून देखील तुला आनंद न होतां तूं स्वस्थ कां बसलास ? १६ जें विश्वरूप न पाहतांही दिसतें, जें नाहीं म्हटलें तरी ज्याचें अस्तित्व बुडत नाहीं, व जें विसरूं म्हटलें तरी आठवतें, तें चुकवितां कसें येईल ? १७ या आनंदाचा पूर जो आला, तो पाहून, काय चमत्कार आहे, असें म्हणण्याला देखील अवकाश उरला नाहीं. तो आनंदाचा महापूर माझेपणाचा आठवही घेऊन जात आहे. १८ या प्रकारेंकरून श्रीकृष्णार्जुनसंवादरूपी संगमांत त्यानें स्नान करून अहंतेला तिलांजलि देऊन तिचा संबंध तोडला. १९ त्या अनिवार आनंदांत मोठा श्वासोच्छ्वास टाकून सद्गदित कंठ होऊन वारंवार, " हे कृष्णा, हे कृष्णा, " असें संजय म्हणूं लागला ! १६२० ही संजयाची अवस्था पाहून, त्यांतील एकेही गोष्टीचा गंध धृतराष्ट्र राजाचे ठिकाणीं नव्हता, म्हणून त्या आनंदाची कल्पनाही राजास येईना. २१ इतक्यांत, झालेला जो सुखाचा लाभ, तो आपले ठिकाणीं दाबून संजय देहभानावर आला. २२ त्या वेळेस धृतराष्ट्र राजा म्हणतोः—संजया, माझा वेळ जावा म्हणून तुला येथें श्रीव्यासांनीं बसविलें असून, ती गोष्ट न करतां हा तूं काय प्रकार मांडला आहेस ? २३ त्या व्यासमुनींनीं तुला कोणते उद्देशानें बसविलें ? आणि येथें हीं भलतीं भाषणें काय बोलतोस ? २४ रानटी मनुष्यास एखादे मोठे महालांत नेल्यावर त्याला जशा दाही दिशा उदास दिसतात; किंवा उजाडलें म्हणजे जशी निशाचरांस रात्र होते; २५ ज्याला ज्या गोष्टीचा अनुभव नाहीं, त्यानें ती गोष्ट भयंकर मानणें हें योग्यच आहे. म्हणून, चांगल्या गोष्टीस वाईट गोष्ट म्हणणें हेंही योग्यच होय. २६ मग धृतराष्ट्र राजा म्हणाला कीं, हलीं जो हा कलह उत्पन्न झाला आहे, यामध्यें शेवटीं, बा संजया, कोणाला जय मिळेल ? २७ एरवीं बहुतकरून आमची अशी मनोदेवता धावते कीं, दुर्योधनाचाच प्रताप सर्वदा जास्ती आहे; २८ आणि पांडवांचे मानानें पाहिलें असतां आमचें सैन्यही दिढीनें जास्त आहे, म्हणून खरोखर दुर्योधनालाच जय मिळेल. २९

५ हुंदका भरून. ६ गंध; किंमत. ७ जिरविला. ८ सात्त्विक अहंकार. ९ प्रसंग. १० रीत; प्रकार. ११ भलत्या वेळीं. १२ उदास, शून्यवत्. १३ उजाडल्यावर. १४ भयंकर. १५ कलह. १६ जय.

देव्हडें । म्हणौनि जैत फुडें । आणील ना तें ॥ २९ ॥ आम्हां तंव गमे ऐसें । मा तुझें ज्योतिषें कैसें । तें नेणों संजया असे । तैसें सांग पां ॥ १६३० ॥

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥

अन्वयः—यत्र योगेश्वरः कृष्णः, यत्र धनुर्धरः पार्थः, तत्र श्रीः, विजयः, भूतिः च ध्रुवा नीतिः इति मम मतिः ( अस्ति ) ॥ ७८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
मोक्षसंन्यासयोगो नामाष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

यया बोला संजयो म्हणे । जी येरयेराचें मी नेणें । परि आयुष्य तेथें जिणें । हें फुडें कीं गा ॥ ३१ ॥ (१३३९. संजय म्हणतो, राजा, ज्या पक्षाला श्रीकृष्ण आणि पार्थ यांची जोडी आहे, तिकडेच विजय आहे, १६३२–१६४८ ) चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका । संत तेथें विवेका । असणें कीं जी ॥ ३२ ॥ रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोइरीक । वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ॥ ३३ ॥ दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु । सुखीं पुरुषोत्तमु । असे जैसा ॥ ३४ ॥ वसंत तेथें वनें । वन तेथ सुमनें । सुमनीं पौळिंगनें । सौरंगांचीं ॥ ३५ ॥ गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन । दर्शनीं समाधान । आथी जैसें ॥ ३६ ॥ भाग्य तेथ विलासु । सुख तेथें उल्हासु । हें असो तेथ प्रकाशु । सूर्य जेथें ॥ ३७ ॥ तैसे सकळ पुरुषार्थ । जेणें स्वामी कां सनाथ । तो श्रीकृष्ण रावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥ ३८ ॥ आणि आपलेनि कांतेंसी । ते जगदंबा जयापासीं । अणिमादिकीं काय दासी । नव्हती तयातें ॥ ३९ ॥ कृष्ण विजयस्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें । तें जयो लागवेगें । तेथेंचि आहे ॥ १६४० ॥ विजय नामें अर्जुन विख्यातु । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथु । श्रियेसी[१६] विजय निश्चितु । तेथेंचि असे ॥ ४१ ॥ तयाचिये देशींच्या झाडीं । कल्पतरूतें होडी[१७] । न जिणावें कां येवढीं । मायबापें असतां ॥ ४२ ॥ ते पाषाणही आघवे । चिंतारत्नें कां नोहावे । तिये भूमिके कां न यावें । सुवर्णत्व ॥ ४३ ॥ तयाचिया गांवींचिया । नदी अमृतें वाहाविया । नवल कायि राया । विचारी पां ॥ ४४ ॥ तयाचे विसांटे शब्द । सुखें म्हणों येती वेद । सदेह सच्चिदानंद । कां नोहावे ते ॥ ४५ ॥ पैं स्वर्गापवर्ग दोन्ही । इयें पदें तया अधीनीं । जे श्रीकृष्ण बाप जननी । कमळा जया ॥ ४६ ॥ म्हणौनि जिया बाहीं उभा । तो लक्ष्मीयेचा वल्लभा । तेथ सर्वसिद्धि स्वयंभा । येर मी नेणें ॥ ४७ ॥ आणि समुद्राचा मेघु । उपयोगें तयाहुनि चांगु । तैसा पार्थीं आजि लागु । आहे तये ॥ ४८ ॥ ( १३४०. अर्जुनाचे वर्णनानें श्रीकृष्णास कमीपणा येईल

१ दिठीनें. २ भाकीत ३ चादणें. ४ पार्वती. ५ ज्ञान. ६ सैन्य. ७ अग्नि. ८ उष्णता. ९ मुखाचें स्थान. १० फुलें ११ समुदाय. १२ भ्रमराचे. १३ आत्मानुभव. १४ सुखोपभोग.

आम्हांला तर असें वाटतें; मग तुला कसें काय वाटत असेल ते असो. परंतु, संजया तुझें भाकीत काय आहे तें आम्हांला सांग. १६३०

*श्लोकार्थः—जिकडे योगेश्वर श्रीकृष्ण आणि धनुर्धारी पार्थ आहे, तिकडे लक्ष्मी, विजय, ऐश्वर्य आणि निश्चल नीति ह्या गोष्टी असावयाच्या असें माझें मत आहे ॥ ७८ ॥*

हें राजाचें भाषण ऐकून संजय म्हणाला कीं, तुम्हां दोघांपैकीं कोणाला जय येईल हें मला सांगवत नाहीं, परंतु जेथें आयुष्य आहे तेथें जगणें हें खास आहे. ३१ चंद्र तेथें चांदणें, शंकर तेथें पार्वती, संत तेथें ज्ञान या गोष्टी निश्चित असावयाच्याच. ३२ राजा तेथें सैन्य, सौजन्य तेथें सोयरिक, अग्नि तेथें दाहकतेचें सामर्थ्य, ३३ दया तेथें धर्म, धर्म तेथें सुखाचें स्थान, व जेथें सुख आहे तेथें पुरुषोत्तम, या गोष्टी असावयाच्याच. ३४ वसंत तेथें वन, वन तेथें फुलें, आणि फुलाचे ठिकाणीं भ्रमराचे समुदाय; ३५ गुरु तेथें ज्ञान, ज्ञानाचे ठिकाणीं आत्मानुभव, आणि आत्मानुभव झाल्यावर समाधान हें असावयाचेंच. ३६ भाग्य तेथें विलास, सुख तेथें उल्हास, फार काय सांगावें ? जेथें सूर्य तेथें प्रकाश हा असावयाचाच. ३७ त्याप्रमाणें, चार पुरुषार्थ ( धर्म, अर्थ, काम व मोक्ष ) ज्याच्या योगानें सनाथ झाले आहेत, तो श्रीकृष्ण भगवान जेथें आहे, तेथें लक्ष्मी असावयाचीच; ३८ आणि आपल्या पतीसह ज्याजवळ जगदंबा आहे, त्याच्याजवळ जगदंबेच्या दासी अष्टसिद्धि ह्या असणार नाहींत काय ? ३९ विजयस्वरूप जो श्रीकृष्ण, तो ज्या पक्षाकडे स्वतः उभा राहिला आहे, तिकडेच जय असावयाचा. १६४० जो अर्जुन विजय नांवानें प्रख्यात आहे, आणि विजयस्वरूप श्रीकृष्ण भगवान हा लक्ष्मीसह जिकडे आहे, तिकडेच जय खास ठेवला आहे. ४१ ज्या भक्ताला श्रीकृष्ण भगवान व लक्ष्मी हीं बाप व आई आहेत, त्याच्या देशांतील झाडांनीं कल्पतरूची बरोबरी कां न करावी ? ४२ तेथील सर्व दगड चिंतामणि कां न होतील ? व तेथील जमिनी सुवर्णाच्या कां न होतील ? ४३ त्याच्या गांवच्या नद्या अमृतानें कां न वाहतील ? यांत नवल तें काय ! राजा, याचा तूंच विचार कर. ४४ त्याच्या तोंडांतून निघणारे जे शब्द, त्यांना सुखानें वेदवाक्य म्हणतां येईल. देह असतांना ते सच्चिदानंदस्वरूप कां न होतील ? ४५ म्हणून, स्वर्ग व मोक्ष दोन्हीं पदें ज्याच्या सत्तेंत आहेत, असा श्रीकृष्ण भगवान व कमला ( लक्ष्मी ) हीं ज्याला बाप व आई प्राप्त झालीं आहेत, ४६ म्हणून ज्या पक्षाकडे लक्ष्मीपति श्रीकृष्ण भगवान उभे आहेत, तिकडे स्वयमेव सर्व सिद्धि असावयाच्याच. याशिवाय मी दुसरें कांहीं जाणीत नाहीं. ४७ आणि समुद्रापासून उत्पन्न होणारा जो मेघ, त्याचा समुद्राहूनही जगतास विशेष उपयोग होतो; तसें श्रीकृष्णापेक्षां पार्थाचें भाग्य आज विशेष आहे. ४८ लोखंडाला कनकाची दीक्षा देणारा परीस हा गुरु खरा,

१५ अष्टसिद्धि. १६ लक्ष्मीसह. १७ पैज मारून. १८ चिंतामणि. १९ भक्ते. २० स्वर्ग व मोक्ष. २१ स्वाधीन. २२ लक्ष्मी. २३ वाजूस. २४ पति. २५ भाग्य.

असें कोणास वाटेल तर त्याचें उत्तर संजय सांगतो; काव्यप्रतिभा, १६४९-१६५३ ) कनकत्वदीक्षागुरु । लोहा परिसु होय कीरु । परि जगा पोसिता व्यवहारु । तेंचि जाणे ॥ ४९ ॥ येथ गुरुत्वा येतसे उणें । ऐसें ज्ञणें कोण्ही म्हणे । वन्हि प्रकाश दीपपणें । प्रकाशी आपला ॥ १६५० ॥ तैसा देवाचिया शक्ती । पार्थु देवासीचि वहुती । परी मानें इयें स्तुती । गौरव असे ॥ ५१ ॥ आणि पुत्रें मी सर्व गुणीं । जिणावा हे बापा शिरोंणी । तरी ते शार्ङ्गपाणी । फळा आली ॥ ५२ ॥ किंबहुना ऐसा नृपा । पार्थु जालासे कृष्णकृपा । तो जयाकडे साक्षेपा । रीती आहे ॥ ५३ ॥ (१३४१. श्रीकृष्ण व अर्जुन यांची जोडी जिकडे आहे तिकडे भाग्य श्री ऐश्वर्य आहे, १६५४--१६५९ ) तोचि गा विजयासि ठावो । येथ तुज कोण संदेहो । तेथ नये तरी वावो । विजयोचि होय ॥ ५४ ॥ म्हणौनि जेथ श्री तेथ श्रीमंतु । जेथ तो पंडूचा सुतु । तेथ विजय समस्तु । अभ्युदयो तेथ ॥ ५५ ॥ जरी व्यासाचेंनि सौचे । धिरे[६] मन तुमचें । तरी या बोलाचें । ध्रुवचि माना ॥ ५६ ॥ जेथ तो श्रीवल्लभु । जेथ भक्तकदंबु । तेथ सुख आणि लाभु । मंगळांचा ॥ ५७ ॥ या बोला आन होये । तरी व्यासाचा अंकुं न वाहे । ऐसें गाजोनि बाहे । उभिली तेणें ॥ ५८ ॥ श्लोकमाहात्म्यः—एवं भारताचा आंवांका । आणूनि श्लोका येका । संजयें कुरुनायका । दिधला हातीं ॥ ५९ ॥ ( १३४२. कवि शेवटल्या श्लोकाचें वर्णन करितात, त्यामुळें बाकीचे श्लोक महत्त्वाचे नाहींत असें होईल; तसें नसून सर्व श्लोक महत्त्वाचे आहेत; काव्यप्रतिभा, १६६०–१६६४ ). जैसा नेणों केवढा वन्ही । परी गुणाग्रीं ठेउनी । आणिजे सूर्याची हानी । निस्तरावया ॥ १६६० ॥ तैसें शब्दब्रह्म अनंत । जाले सवालक्ष भारत । भारताचें शतें सात । सर्वस्व गीता ॥ ६१ ॥ तयांही सातां शतांचा । इत्यर्थु हा श्लोक शेषींचा । व्यासशिष्य संजयाचा । पूर्णोद्गारु जो ॥ ६२ ॥ येणें येकेंचि श्लोकें । राहे तेणें अंसकें । अविद्याजाताचें निकें । जितिलें होय ॥६३॥ ऐसें श्लोकशतें सात । गीतेचीं पदें आंगें वाहत । पदें म्हणों कीं परमामृत । गीताकाशींचें ॥ ६४ ॥ कीं आत्मराजाचिये सभे । गीते वोडवले हे खांबे । मज श्लोक प्रतिभे । ऐसें येत ॥ ६५ ॥ कीं गीता हे सप्तशती । मंत्रप्रतिपाद्य भगवती । मोहमहिषा मुक्ति । आनंदली असे ॥ ६६ ॥ म्हणौनि मनें कायें वाचा । जो सेवकु होईल इयेचा । तो स्वानंदसाम्राज्याचा । चक्रवर्ती करी ॥ ६७ ॥ कीं अविद्यातिमिररोखे । श्लोक सूर्यातें पैजा जिंके । ऐसे प्रकाशिले गीतामिषें । रायें श्रीकृष्णें ॥ ६८ ॥ कीं श्लोकाक्षरद्राक्षलता । मांडव जाली

१ सोन्याची दीक्षा देणारा गुरु. २ इच्छा. ३ पक्षाचा अभिमान धरून. ४ विषयाचें विजयत्व. ५ खरें बोलण्यावर. ६ भरवसा. ७ अढळत. ८ लक्ष्मीपति. ९ कल्याणाचा. १० शिप्पत. ११ सारांश. १२ शेवटीं. १३ वेद. १४ सर्व. १५ गीतारूप आकाशांतील. १६ भास होतो.

परंतु जगाला व्यवहारांत ज्याचा ( सोन्याचा ) उपयोग होतो, त्याचीच योग्यता विशेष मानली जाते. ४९ या उक्तीनें गुरुत्वाला उणेपणा येतो असें कदाचित् कोणी म्हणेल, तर, अग्नीचा प्रकाश जो दीप त्याची प्रशंसा केली असतां ती जशी अग्नीचीच होते, १६५० तशी देवांच्याच प्रसादानें पार्थाची शक्ति देवाहून विशेष आहे; परंतु पार्थाचीच स्तुति केली असतां त्याचें देवाला विशेष गौरव वाटतें. ५१ आणि पुत्रानें मला सर्व गुणांनीं जिंकावें अशी बापास जी इच्छा असते, तीच श्रीकृष्णाची इच्छा परिपूर्ण झाली आहे. ५२ राजा, फार काय सांगू ? कृष्णकृपेनें युक्त जो पार्थ तो ज्या बाजूला आहे, ५३ तेंच विजयाचें ठिकाण याविषयीं तुला संशय कशास पाहिजे ? तेथें जर विजय नाही आला, तर विजयाचें विजयपण व्यर्थ होईल. ५४ याकरितां, जेथें लक्ष्मी तेथें तिचा पति श्रीकृष्ण भगवान, व जेथें पांडुपुत्र अर्जुन तेथें विजय असून भाग्योदयही तेथेंच आहे. ५५ जर श्रीव्यासांच्या बोलण्यावर तुमचा भरवंसा असेल, तर मी जें आतां बोललों ते खचित आहे असें समजा. ५६ जेथें लक्ष्मीचा पति श्रीकृष्ण व भक्तकदंब अर्जुन हे आहेत, तेथें मंगलाचा लाभ आणि सौख्य आहे. ५७ हें माझें बोलणें जर असत्य होईल, तर मी व्यासांचा शिष्य म्हणविणार नाहीं, असें हात उभारून मोठ्यानें गर्जना करून तो बोलला. ६८ याप्रमाणें, सर्व भारताचा सारांश संजयानें गीतेच्या अठराव्या अध्यायांतील एका अठ्याहत्तराव्या श्लोकांत आणून, कुरुनायक जो धृतराष्ट्र राजा त्याचे हातांत दिला. ५९ अग्नि किती मोठा आहे ? परंतु वातीच्या शेवटाला लावला असतां, त्याच्या उजेडानें, सूर्य मावळल्यावर जो अंधार पडतो, त्याचें निवारण होतें; १६६० त्याप्रमाणें, वेद अनंत असून त्याचें सार सवालक्ष भारत केलें; व त्या भारताचा सारांश गीतेच्या सातशें श्लोकांत आणिला. ६१ व्यासांचा शिष्य जो संजय, त्याही गीतेच्या सातशें श्लोकांतील शेवटला जो श्लोक तो व्यासशिष्य संजय याचा पूर्णोद्गार होय. ६२ या एकाच श्लोकानें अज्ञानाचें मूळ समूळ जिंकून टाकलें. ६३ असे गीतेचे सातशे श्लोक हीं गीतेचीं पदें ( पाउलें ) असून, गीतेला घेऊन जात आहेत; किंवा हीं पदें नसून हे श्लोकही गीताकाशींची अमृतवृष्टिच आहे कीं काय ? ६४ किंवा हे श्लोक नव्हेत, तर आत्मराजाची सभा जी गीता, त्या गीतारूप सभेचे हे सातशें श्लोकरूप खांबच आहेत, असें मला वाटतें. ६६ किंवा, गीता ही सातशे श्लोकांनीं प्रतिपादन केलेली साक्षात् भगवती देवीच आहे. या देवीनें मोहरूप महिषासुरास मारून ही आनंदाप्रत पावली आहे. ६६ म्हणून, या गीतारूप देवीचा जो कायावाचामनेंकरून सेवक होईल, तो आनंदरूपी साम्राज्यपटाचा सार्वभौम राजाच होईल. ६७ किंवा, अज्ञानरूप जो अंधकार, त्याला प्रतिज्ञेनें जिंकणारे हे सातशें श्लोक नसून हे सातशें सूर्यच श्रीकृष्णांनीं गीतेच्या रूपानें प्रकाशित केले आहेत. ६८ किंवा, संसारमार्गानें चालणाराना जे श्रम झाले आहेत, त्यांचा परिहार होऊन विसांवा घेण्याकरितां सातशें

---

१७ मोहरूपी महिषासुरास मारून. १८ अज्ञानांधकाराला अडविणारे.

आहे गीता । संसारपथश्राता । विसंवावया ॥ ६९ ॥ कीं सभाग्य संतीं भ्रमरीं । सेविले ते श्लोक कल्हारीं । श्रीकृष्णाख्यसरोवरीं । सासिन्नली हे ॥ १६७० ॥ कीं श्लोक नव्हती आन । गमे गीतेचें महिमान । वाखाणिते बंदीजन । उदंड जैसे ॥ ७१ ॥ कीं श्लोकाचिया आवारा । सात शतें करूनि सुंदरा । सर्वागमें गीतापुरा । वसों आले ॥ ७२ ॥ कीं निजकांता आत्मयां । आवडी गीता मिळावया । श्लोक नव्हती बाह्या । पसरु कां जो ॥ ७३ ॥ कीं गीताकमळींचे भृंग । कीं हे गीतासागरतरंग । कीं हरीचे हे तुरंग । गीतारथींचे ॥ ७४ ॥ कीं श्लोक सर्व तीर्थसंघातु । आला श्रीगीतेगंगे आंतु । जे अर्जुन नर सिंहस्थु । जाला म्हणौनि ॥७५॥ कीं नोहे हे श्लोकश्रेणी । अचिंतचित्ताचिंतामणी । कीं निर्विकल्पा लावणी । कल्पतरूंची ॥ ७६ ॥ ऐसिया शतें सात श्लोकां । परी आगळा येकयेका । आतां कोण वेगळिका । वानावा पां ॥ ७७ ॥ तान्ही आणि पारठी । इया कामधेनूतें दिठी । सूनि जैसिया गाठी । कीजती ना ॥ ७८ ॥ दीपा आगिलु मागिलु । सूर्य धाकुटा वडीलु । अमृतासिंधु खोलु । उथलु कायसा ॥ ७९ ॥ तैसे पहिले सरते । श्लोक न म्हणावे गीते । जुनीं नवीं पारिजातें । आहाती काई ॥१६८०॥ *आणि श्लोका पाडु नाहीं । हें कीर समर्थु काई । येथ वाच्यें वाचकही । भागु न* धरी ॥ ८१ ॥ गीतापाठमाहात्म्यः—जे इये शास्त्रीं येकु । श्रीकृष्णाचि वाच्य वाचकु । हें प्रसिद्ध जाणे लोकु । भलताही ॥ ८२ ॥ येथें अर्थे तेंचि पाठें । जोडे येवढेंनि घटे[14] । वाच्यवाचक येकवटें । साधितें शास्त्र ॥ ८३ ॥ ( १३४४. गीतापाठाचें महत्त्व; काव्यप्रतिभा, १६८४–१६८६ ) म्हणोनि मज कांहीं । समर्थनीं आतां विषय नाहीं । गीता जाणा हे वाङ्मयी । श्रीमूर्ति प्रभूची ॥ ८४ ॥ शास्त्र वाच्यें अर्थे फळे । मग आपण मावळे । तैसें नव्हे हें सगळें । परब्रह्मचि ॥ ८५ ॥ कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महानंद सोपा । अर्जुन–व्याजें रूपा । आणिला देवें ॥ ८६ ॥ ( १३४५. श्रीकृष्णरूप गाईनें अर्जुनाच्या निमित्तानें जगाला पुरेल इतकें दूध दिलें; काव्यप्रतिभा, १६८७–१६९६ ) चकोराचेनि निमित्तें । तिन्ही भुवनें संतप्तें । निववलीं कळावंतें । चंद्रें जेविं ॥ ८७ ॥ गीता ही वेदमाताच आहे:—कां गौतमाचेनि मिषें । कळिकाळज्वरितोद्देशें । पाणिढाळ गिरीशें । गंगेचा केला ॥ ८८ ॥ तैसें गीतेचें हें दुभतें । वत्स करूनि पार्थातें । दुभिन्नली जगापुरतें । श्रीकृष्ण गाय ॥ ८९ ॥ येथें जीवें जरी नाहाल । तरी हेच

१ कमळांनीं. २ श्रीकृष्णरूप सरोवरांत. ३ तयार झाली. ४ स्तुतिपाठक. ५ सर्व शास्त्रें. ६ भ्रमर. ७ घोडे. ८ पंक्ति. ९ प्रश्न. १० कल्पनातीत प्रश्न. ११ सुवर्णपारिजातक. १२ कमजास्तीपणा. १३ बोलणारा व ऐकणारा. १४ घट, तागडी लावून. १५ पाणीरूप. १६ निमित्तानें. १७ कलिकालरूप ज्वरानें पीडित. १८ शंकरांनीं.

श्लोक हे द्राक्षांचे वेलच असून ते गीतारूप मांडवावर पसरलेले आहेत. ६९ किंवा, श्रीकृष्णाख्यानरूपी गीतासरोवरांत सातशें श्लोक हीं कमळें असून, त्यांचा गंध घेणारे भाग्यवान संत हे भ्रमरच होत. १६७० किंवा हे श्लोक नव्हेत, तर गीतेचा महिमा वर्णन करणारे हे सातशें स्तुतिपाठकच आहेत. ७१ किंवा गीतारूप शहराला भोंवताली सातशें श्लोकांचा कोटच आहे, म्हणून सर्व शास्त्रें गीतापुरांत वास करण्यास आलीं आहेत. ७२ किंवा, आपला पति जो आत्मा, त्याला प्रेमानें आलिंगन देण्याकरितां गीता ही श्लोकरूपी बाहु पसरून आली आहे असें वाटतें. ७३ किंवा गीतारूप कमळाचा गंध घेणारे हे श्लोक नसून भ्रमरच आहेत; अथवा हे श्लोक गीतारूप सागराच्या लाटाच आहेत, किंवा श्रीहरीचा गीतारूप रथ ओढणारे हे घोडेच आहेत. ७४ किंवा गीता ही गंगा असून इचे ठायीं सर्व श्लोकरूपी तीर्थें, नरावतार अर्जुनरूपी सिंहस्थ पर्वणी आल्यामुळें मिळावयास आलीं आहेत. ७५ किंवा या श्लोकपंक्ति नसून, चित्ताला अचिंत्य जें ब्रह्म त्याची प्राप्ति करून देणारे चिंतामणिच आहेत; अथवा, कल्पनातीत जें ब्रह्म, तें प्राप्त करून देणारे हे कल्पतरुच आहेत. ७६ असे हे सातशें श्लोक एकापेक्षां एक वरचढ आहेत. तर यांत लहान मोठे अशा वेगळेपणानें कोणत्या श्लोकाचें वर्णन करावें ? ७७ कामधेनूकडे बघितलें म्हणजे जशी ती दुभती व आटलेली या गोष्टी संभवत नाहीं; ७८ दिव्यांमध्यें अगोदरचा व मागचा कोणता, व सूर्याकडे पाहिलें म्हणजे धाकटा किंवा मोठा हें समजत नाहीं, आणि अमृत समुद्राला खोल किंवा उथळ हें म्हणतां येईल काय ? ( कारण सर्वांचीं फळें एकच आहेत, ) ७९ त्याप्रमाणें, गीतेच्या सातशें श्लोकांत पहिला व शेवटला हें म्हणतां येत नाहीं. पहा कीं, सुवर्णपारिजातकाच्या पुष्पांत ताजीं व शिळीं असा भेद करतां येईल काय ? १६८० आणि श्लोकांत कमजास्तपणा नाहीं याविषयीं काय सिद्ध करूं ? परंतु या गीताशास्त्रामध्यें सांगणारा व ऐकणारा या दोघांत भेद नसून ते एकस्वरूपच आहेत. ८१ कारण, या गीताशास्त्रांत श्रीकृष्ण सांगणारे व अर्जुन हा श्रीकृष्णरूपच ऐकणारा या गोष्टी सर्वांना ठाऊक आहेत. ८२ या गीतेंत अर्थानें जें फळ, तेंच पाठ करण्यानें धट लावून मिळतें, म्हणून वाच्य व वाचक या दोघांनाही सारखीच योग्यता देणारें हें शास्त्र आहे. ८३ म्हणून, त्या गीतेविषयीं जास्त सिद्ध करण्याचें राहिलें नाहीं. कारण गीता ही भगवंताची शब्दमय मूर्तिच आहे. ८४ इतर शास्त्रांचें वाचन करून अर्थ समजल्यावर फलप्राप्ति झाली म्हणजे तें शास्त्र नाहींसें होतें; तसें हें गीताशास्त्र नसून हें ओतप्रोत परब्रह्मस्वरूपच आहे. ८५ काय सांगावें ? अर्जुनाचें निमित्त करून सर्व जगावर कृपा करण्याकरितां श्रीकृष्णानीं दुर्लभ असा ब्रह्मानंद सुलभ करून ठेवला आहे. ८६ जसा पूर्णकलायुक्त चंद्र चकोराच्या निमित्तानें प्रकाशित होऊन तिन्ही लोकांच्या तापाची निवृत्ति करितो; ८७ अथवा गौतमाच्या निमित्तानें, कलिकालरूपी ज्वरानें पीडित झालेल्या जीवाच्या दोषांची निवृत्ति होण्याकरितां श्रीशंकरांनीं गंगा या मृत्यलोकीं पाठवून दिली. ८८ त्याप्रमाणें, पार्थरूपी वत्साचें निमित्त करून श्रीकृष्णरूपी

कीर होआल। नातरी पाठमिषें तिंबाल। जीभचि जरी ॥ १६९० ॥ तरी लोह एकें अंशें। झगटलिया परिसें। येरीकडे अपैसें। सुवर्ण होय ॥९१॥ तैसी पाठाची ते वाटी। श्लोकपाद लावा ना जंव वोठीं। तंव ब्रह्मतेची पुष्टि। येईल आंगा ॥ ९२ ॥ ना येणेंसीं मुख वांकडें। करूनि ठाकाल कानवडे। तरी कानींही घेतां पडे। तेंचि लेखें ॥ ९३ ॥ जे हे श्रवणें पाठें अर्थें। गीता नेदी मोक्षाऽरौतें। जैसा समर्थ दाता कोण्हातें। नास्ति न म्हणे ॥ ९४ ॥ म्हणोनि जाणतया सवां। गीताचि येकी सेवा। काय कराल आघवां। शास्त्रीं येरीं ॥ ९५ ॥ व्यासवर्णन.– आणि कृष्णार्जुनीं मोकळी। गोठी चांवळिली जे निराळीं। ते श्रीव्यासें केली करतळीं। घेवों ये ऐसी ॥ ९६ ॥ ( १३४६. व्यासांनीं गीताशास्त्र प्रकट केलें, त्यांचे उपकार; काव्यप्रतिभा, १६९७-१७०८ ) बाळकातें वोरसें। माय जैं जेवऊं बैसे। तैं तया ठाकती तैसे। घांस करी ॥९७॥ कां अफाटा समीरणा। आंपैतेंपण शाहाणा। केलें जैसें विंजैणा। निर्मूनिया ॥ ९८ ॥ तैसें शब्दें जे न लभे। तें घडूनियां अनुष्टुभें। स्त्रीशूद्रादि प्रतिभे। सामाविलें ॥९९॥ स्वातीचेनि पाणियें। न होती जरी मोतियें। तरी अंगीं सुंदराचिये। कां शोभती तियें ॥ १७०० ॥ नादु वाद्या न येता। तरी कां गोचरु होता। फुलें न होतां घेपता। आमोदु केंवि ॥ १ ॥ गोडी न होती पक्वान्नें। तरी कां फावती रसनें। दर्पणावीण नयनें। नयनु कां दिसे ॥ २ ॥ द्रष्टा श्रीगुरुमूर्ति। न रिगता दृश्यपंथीं। तरी कां ह्या उपास्ती। आकळता तो ॥३॥ तैसें वस्तु जें असंख्यात। तया संख्या शतें सात। न होती तरी कोणा येथ। फावों शकतें ॥ ४ ॥ मेघ सिंधूचें पाणी वाहे। तरी जग तयातेंचि पाहे। कां जें उमैपें तें नोहे। ठाकतें कोण्हा ॥ ५ ॥ आणि वाचा जें न पवे। ते हे श्लोक न होते बरवे। तरी कानें मुखें फावे। ऐसें कां होतें ॥ ६ ॥ म्हणोनि श्रीव्यासांचा हा थोरु। विश्वा जाला उपकारु। जे श्रीकृष्ण उक्ती आकारु। ग्रंथाचा केला ॥ ७ ॥ ग्रंथकर्तृत्वाभिमानपरिहार:–आणि तोचि हा मी आतां। श्रीव्यासांचीं पदें पाहातां पाहातां। आणिला श्रवणपथा। मऱ्हाठिया ॥ ८ ॥ ( १३४७. ग्रंथकर्तृत्वाचा परिहार करून गीताभाष्य करणे हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे; काव्यप्रतिभा, १७०९-१७२३ ) व्यासादिकांचे उन्मेखें। राहाटती जेथ साशंक। तेथ मीही रंक येक। चांवळी करीं ॥ ९ ॥ परी गीताईश्वरु भोळा। ले व्यासोक्तिकुसुममाळा। तरी माझिया दूर्वादळा। ना न

१ भिववाल; भ्रमवाल. २ एका अंगावर. ३ फळ. ४ दिसाय. ५ नाहीं. ६ सर्व. ७ बोलले. ८ आकाशात. ९ प्रेमानें. १० गिळता येतील. ११ पान्हाला. १२ स्वाधीन होण्याकरितां. १३ पंखा. १४ बत्तीस अक्षरांचा छंद=अनुष्टुभ छंद. १५ बुद्धीस. १६ सुगंध, वास. १७ साक्षी, निराकार. १८ साकार. १९ उपासनेला. २० ब्रह्म. २१ अगणित. २२ ज्ञान. २३ व्याख्यान.

गाईनें हें गीतारूप दूध देऊन सर्व जगाला संतोषित केलें. ८९ या गीताशास्त्राचे ठिकाणीं जिवाभावानें बुडी घाल, तर गीतारूपच व्हाल, अथवा पाठरूपानें जिभेला जर श्रम घाल, तर (गीतारूपच व्हाल.) १६९० परिसाचें सामर्थ्य असें आहे कीं, तो लोखंडाचे एके बाजूस लागला असता सर्व लोखंड आपोआप सुवर्णमय होतें, ९१ तशी, गीतापाठरूपी वाटींतील एक श्लोकाचें पद मुखाला लावाल न लावाल तोंच ब्रह्मत्वाची पुष्टि अंगांत येईल. ९२ अथवा गीता पाठ करण्याविषयीं तोंड वाकडें करून जर कुशीवर वळाल, तर तीं अक्षरें कानांत जरी पडलीं तरी त्यांचेंही फळ तेंच येईल, ९३ गीतेचें औदार्य काय सांगावें, कीं जी आपल्या श्रवणानें, पाठानें व अर्थानें मोक्षाशिवाय दुसरें फळच देत नाहीं. जसा समर्थ दाता कोणालाही विमुख लावीत नाहीं तशी. ९४ म्हणून, जितके शहाणे आहेत त्यांनीं एक गीतेचें सेवन करावें; यावांचून इतर शास्त्रांचें सेवन करून काय प्राप्त होणार आहे ? ९५ आणि श्रीकृष्ण व अर्जुन यानीं जे नुसतें संभाषण केलें, तें श्रीव्यासांनीं हातांत घेतां येईल तितकें सुलभ केलें. ९६ मुलाला आई प्रेमानें जेऊं घालण्यास बसली म्हणजे त्याला जसे गिळतां येतील तसेच लहान घास करिते; ९७ किंवा अफाट जो वायु तो आपल्या हातात यावा म्हणून शाहाण्यांनीं जशी पंख्याची योजना केली, ९८ तसें, शब्दानें जें कळावयाचें नाहीं, त्याचे अनुष्टुभ छंद करून स्त्री, शूद्र आदिकरून सर्वांच्या बुद्धीला तें सुलभ करून ठेवलें. ९९ स्वाती नक्षत्राच्या पाण्यापासून जर मोतीं उत्पन्न झालीं नसतीं, तर स्त्रियांचीं अंगें कशानें शोभिवंत झालीं असतीं ? १७०० नादब्रह्म जर वाद्यात आलें नसतें, तर नाद आपल्यास कसा कळला असता ? फुलें जर नसतीं, तर वास कसा घेतां आला असता ? १ पक्वान्नांत जर गोडी नसती, तर ती जिभेला कशी प्राप्त झाली असती ? आरसा जर नसता तर डोळ्यांला आपलें रूप कसें पाहतां आलें असतें ? २ निराकार श्रीगुरु जर आकारास आले नसते, तर उपासकांना कशी सेवा करतां आली असती ? ३ तसें, अगणित जें ब्रह्म, तें गीतेच्या सातशें श्लोकांच्या रूपानें जर प्रकट झालें नसतें, तर कोणालाही जाणतां आलें असतें काय ? ४ मेघ समुद्राचेंच पाणी वर घेऊन वृष्टि करून सर्वांचा उपयोग करतो, तरी लोक मेघांचीच आशा करतात; कारण अमर्याद जो समुद्र, त्यापासून कोणाचाच उपयोग होत नाहीं. ५ म्हणून, जें वाणीला देखील प्राप्त होत नाहीं, तें, व्यासांनीं जर हे उत्तम श्लोक केले नसते तर, ऐकावयाला किंवा मुखानें तरी वर्णन करावयाला कसें आलें असतें ? ६ याकरितां, श्रीकृष्णाची जी उक्ति ( संभाषण ), तिची गीतेच्या रूपानें व्यासांनीं रचना केली, म्हणून सर्व जगतावर त्यांचा मोठा उपकार झाला आहे. ७ आणि आतां तोच गीतार्थ मीं व्यासाचीं पदें पाहून पाहून शुद्ध मराठी भाषेंत ऐकण्याजोगा केला. ८ ज्या गीतार्थाचें यथार्थ वर्णन करण्याविषयीं व्यासादिकांचें देखील ज्ञान सशंक होतें, त्या गीतेचें मीं हें गरीबानें व्याख्यान केलें आहे. ९ परंतु गीतारूप ईश्वर हा अत्यंत

म्हणे कीं ॥ १७१० ॥ आणि क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येती गजघटा । तेथ काय सुरकुटा । वारिजैत असे ॥ ११ ॥ पांखफुटें पाखिरूं । तुडे तरी नभींच थिरु । गगन आक्रमी सत्वरु । तो गरुडही तेथ ॥ १२ ॥ राजहंसाचें चालणें । भूतळीं जालिया शहाणें । आणिकें काय कोणें । चालावेंचि ना ॥ १३ ॥ जी आपुलेनि अवकाशें । अगाध जळ घेपे कलशें । चुळीं चूळपणाऐसें । भरुनि न निघे ॥ १४ ॥ दिवटीच्या आंगीं थोरी । तरी ते बहु तेज धरी । वाती आपुलियापरी । आणीच कीं ना ॥ १५ ॥ जी समुद्राचेनि पैसें[4] । समुद्रीं आकाश आभासे । थिल्लरीं थिल्लरा ऐसें । बिंबेचि पैं ॥ १६ ॥ तेवीं व्यासादिक महामति । वांवरों येती इये ग्रंथीं । मा आम्ही ठाँकों हे युक्ति । न मिळे कीर ॥ १७ ॥ जिये सागरीं जळचरें । संचरती मंदराकारें । तेथ देखोनि शेफरें येरें । पोहों न लाहती ॥ १८ ॥ अरुण आंगाजवळिके । म्हणोनि सूर्यातें देखे । मा भूतळींची न देखे । मुंगी काई ॥ १९ ॥ यालागीं आम्हां प्राकृतां । देशिकारें बंधे गीता । म्हणणें हें अनुचिता । कारण नोहे ॥ १७२० ॥ आणि बापु पुढां जाये । ते घेत पाउलाची सोये । बाळ ये तरी न लाहे । पावों कायी ॥२१॥ तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारातें वाट पुसतु । अयोग्यही मी न पवतु । कें जाईन ॥ २२ ॥ आणि पृथ्वी जयाचिया क्षमा । नुबगे स्थावरजंगमा । जयाचेनि अमृतें चंद्रमा । निववी जग ॥ २३ ॥ ( १३४८. सद्गुरु अंतर्यामीं आहेत, त्यांचे प्रसादानें मीं आयती गीता प्रकट केली; काव्यप्रतिभा, १७२४–१७३६ ) जयाचें आंगिक आसिकें । तेज लाहोनि अर्कें । आंधाराचें सांवाइकें । लोटिजत आहे ॥२४॥ समुद्रा जयाचें तोय । तोया जयाचें माधुर्य । माधुर्या सौंदर्य । जयाचेनि ॥२५॥ पवना जयाचें बळ । आकाश जेणें पैंधळ । ज्ञान जेणें उज्वळ । चक्रवर्ती ॥ २६ ॥ वेद जेणें सुभास । सुख जेणें सोल्हास । हें असो रूपस । विश्व जेणें ॥ २७ ॥ तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजहीआंतु । रिघोनियां ॥ २८ ॥ आतां आयती गीता जगीं । मी सांगें मऱ्हाठिया भंगी[22] । येथ कें विस्मयालागीं । ठावो आहे ॥ २९ ॥ श्रीगुरूचेनि नांवें माती । डोंगरीं जयापासीं होती । तेणें [23]कोळियें त्रिजगतीं । येकैवद केली ॥ १७३० ॥ चंदनें वेधलीं झाडें । जालीं चंदनाचेनि पाडें । वसिष्ठें मांडली कीं भांडे । भानूसी शौटी ॥ ३१ ॥ मा

---

१ हत्तींचे कळप. २ परतावितो, माघारी घालवितो. ३ सुंदर. ४ विस्तार. ५ डबक्यांत. ६ विचार करावा. ७ स्वस्थ बसावें. ८ मंदराचलाएवढीं. ९ लहान मासे. १० सूर्याचा सारथि. ११ देशी भाषेत वर्णन केलें. १२ वाट. १३ पोहोंचूं. १४ माग. १५ सहनशक्ति. १६ कंटाळा करीत नाहीं. १७ संकट. १८ विस्तार. १९ उत्तम बोलणारा. २० आनंदित. २१ देखणें. २२ भाषण. २३ एकलव्य नांवाच्या कोळ्यानें. २४ सर्वमान्य. २५ छाटी.

भोळा आहे, म्हणून व्यासांच्या भाषणरूपी पुष्पमाला धारण करितो, व आमचे गरीबाचे दूर्वांकुरांसही नाहीं म्हणत नाहीं; १७१० आणि क्षीरसमुद्राचे कांठाला हत्तींचे समुदाय पाणी पिण्यास येतात, तेथें त्यांना तेवढी परवानगी असून, मुरकुटांना तो माघारी लावतो काय? ११ पंख न फुटलेल्या पांखराला जरी उडतां आलें नाहीं, तरी तें आकाशांतच राहतें व सर्व गगनाचें आक्रमण करणारा गरुडही त्या आकाशांतच राहतो. १२ राजहंसाची मंद गति सर्व जगतांत उत्तम असली, म्हणून दुसऱ्या कोणीं चालूंच नये कीं काय? १३ कलशांत पुष्कळ सांठवण असल्यामुळें पुष्कळ पाणी मावतें; पण चूळ लहान असली तरी तिच्या मानानें तींत पाणी येत नाहीं काय? १४ मशाल मोठी असल्यामुळें तिचें तेज मोठें पडतें; पण वात जरी लहान असली, तरी तिच्या मानानें तिचें तेज पडतेंच कीं नाहीं? १५ समुद्राच्या विस्ताराप्रमाणें त्यांत आकाशाचें प्रतिबिंब मोठें दिसतें, पण तें डबक्यांतही डबक्याचे मानानें दिसतेंच; १६ त्याप्रमाणें, व्यासादिकाच्या महामतींनीं या ग्रंथाविषयीं विचार करावा, व आम्हीं स्वस्थ बसावें, ही गोष्ट युक्तीला जुळत नाहीं. १७ ज्या समुद्रामध्यें मंदराचलासारखे महान महान जलचर वास करतात, त्यांचें वैभव पाहून लहान माशांनीं तेथें राहूंच नये कीं काय? १८ अरुण हा सूर्याचे सन्निध आहे म्हणून तो सूर्यास पहातो, आणि पृथ्वीवर जी लहान मुंगी आहे ती त्याकडे पहात नाहीं कीं काय? १९ यास्तव, आम्हीं प्राकृत जनानीं गीतेचें देशभाषेंत वर्णन केलें ही गोष्ट अयोग्य आहे, असें म्हणण्याचें कारण नाहीं. १७२० आणि बापाच्या मार्गानें लहान मूल जर चालूं लागलें, तर ज्या स्थानाला बाप गेला त्या स्थानाला तें पोहोंचूं शकणार नाहीं काय? २१ तसा मी व्यासांचा माग घेत आणि भाष्यकाराला वाट विचारीत चाललों असता, मी जरी अयोग्य आहें, तरी, व्यास ज्या ठिकाणीं गेले, त्या ठिकाणाला पावणार नाहीं तर कोठें जाईन? २२ आणि ज्या परमेश्वराच्या क्षमेनें पृथ्वी स्थावरजंगम विश्वाचा उपद्रव सहन करते, व ज्या परमेश्वराच्या अमृतानें चंद्र सर्व जगाच्या तापाची निवृत्ति करून शांत करतो; २३ ज्या परमेश्वराच्या अंगच्या तेजानें सूर्याला तेज प्राप्त झालें आहे म्हणून तो सर्व जगाला अंधारापासून प्राप्त होणारें संकट दूर करतो; २४ ज्या परमेश्वराच्या सत्तेनें समुद्राला उदक मिळालें आहे, व पाण्याला माधुर्य व माधुर्याला सौंदर्य प्राप्त झालें आहे; २५ ज्या परमेश्वराच्या सत्तेनें वाऱ्याला गतिरूप बल, आकाशाला विस्तार, व ज्ञानाला उज्ज्वल सार्वभौमत्व प्राप्त झालें आहे, २६ ज्याच्या सत्तेनें वेदाला बोलण्याची शक्ति, सुखाला आनंदितपणा, हें असो, परंतु ज्याच्या योगानें सर्व विश्वाला रूप प्राप्त झालें आहे, २७ तो वस्तुमात्रावर उपकार करणारा समर्थ सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथ माझे अंतःकरणांत शिरून वास करीत आहे, २८ तेव्हा आतां, आयती तयार जी गीता, ती मी जगताला मराठी भाषेनें सांगण्यास समर्थ झालों आहें यांत आश्चर्य तें काय? २९ श्रीगुरूंच्या नांवानें डोंगरावर मातीची द्रोणाचार्यांची मूर्ति स्थापून त्यांची सेवा करून एकलव्य कोळ्यानें आपले विद्येची कीर्ति त्रिजगतांत सर्वमान्य करून घेतली; १७३० चंदनाचे आसपास असलेले वृक्ष त्याच्या अंगच्या सुगंधानें सर्व चंदन होतात, व वसिष्ठांनीं स्वीकारिलेली छाटी आपले तेजानें सूर्याबरोबर भांडूं लागली, ३१ मग मी तर सद्गुरुमय चित्तानें युक्त, आणि

मी तंव चित्तांथिला । आणि श्रीगुरु ऐसा दोंदुला । जो दिठीवेनि आपुला । वैसवी पदीं ॥ ३२ ॥ आघींचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी । तैं न दिसे ऐसी गोठी । केंही आहे ॥ ३३ ॥ म्हणोनि माझें नित्य नवें । श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे । श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ॥ ३४ ॥ ग्रंथाचें वैभवः— याकारणें मियां । श्रीगीतार्थ मऱ्हाठिया । केला लोकां ययां । दिठीचा विषो ॥ ३५ ॥ परी मऱ्हाटें बोलेंरंगें । कवळितां[6] पैं गीतांगें[7] । तें गातयाचेनि पांगें[8] । हेकांडता नोहे ॥ ३६ ॥ ( १३४९. मराठी भाषेंतील ग्रंथाचे वैभव; काव्यप्रतिभा, १७३७-१७५१ ) म्हणोनि गीता गावों म्हणे । तें गाणिवें होती लेणें । ना मोकळे तरि उणें । गीतीं ही आणित ॥ ३७ ॥ सुंदर आंगीं लेणें न सूये । तैं तो मोकळा शृंगारु होये । ना लेइलें तरि आहे । तैसें कें उचित ॥ ३८ ॥ कां मोतियांची जैसी जाती । सोनयाही मान देती । नातरी मानविती । अंगेंचि सडीं ॥ ३९ ॥ ना ना गुंफिलीं कां मोकळीं । उणीं न होती परिमळीं । वसंतागमींचीं वाटोळीं । मोगरीं जैसीं ॥ १७४० ॥ तैसा गाणिवेतें मिरवी । गीतेवीणही रंगु दावील । तो लाभाचा प्रबंधु वोवीं । केला मियां ॥ ४१ ॥ तेणें आबाळसुबोधें । वोवीयेचेनि प्रबंधें । ब्रह्मरससुस्वादें । अक्षरें गुंथिलीं[13] ॥ ४२ ॥ आतां चंदनाच्या तरुवरीं । परिमळालागीं फुलवरीं । पांरुखणें जियापरी । लागेना कीं ॥४३॥ तैसा प्रबंधु हा श्रवणीं । लागतखेंवो समाधि आणी । ऐकिलियाही वाखाणी । काय व्यसन न लवी ॥४४॥ पाठ करितां व्याजें । पांडित्यें येती वेषजें[19] । तैं अमृतातें नेणिजे । फोवेंलिया ॥ ४५ ॥ तैसेनि आइतेपणें । कवित्व जालें हें उंपेणें[20] । मनन निदिध्यास श्रवणें । जिंतिलें आतां ॥ ४६ ॥ हे स्वानंदभोगाची सेल । भलतयासीचि देईल । सर्वेंद्रियां पोषवील । श्रवणाकरवीं ॥ ४७ ॥ चंद्रातें आंगेंवणें । भोगूनि चकोर शाहाणे । परी फावे जैसें चांदिणें । भलतयाही ॥ ४८ ॥ तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । [23]अंतरंगाचि अधिकारियें । परी लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ ४९ ॥ ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव आहे जी साचें । ग्रंथु नोहे हें कृपेचें । वैभव तिये ॥ १७५० ॥ गुरुपरंपराकथन.—क्षीरसिंधुपरिसरीं । शक्तीच्यें कर्णकुहरीं[26] । नेणों कैं श्रीत्रिपुरारी[27] । सांगितलें जें ॥ ५१ ॥ ( १३५०. गुरुपरंपरा, १७५२–१७६४ ) तें क्षीरकल्लोळाआंतु । मकरोदरीं[28] गुप्तु । होता तयाचा हातु ।

१ चित्त सद्गुरुमय झालेला. २ धनी. ३ मदत मिळाल्यावर. ४ काव्य; ग्रंथ. ५ भाषेंत. ६ स्पष्ट केला. ७ गीतेचा अर्थ. ८ गाणारा नसला तरी. ९ उदासीनता. १० वक्तृत्वाला. ११ गाणाराला. १२ वसंत ऋतूंतील. १३ गुंफिली. १४ सुवासासाठीं. १५ फूल मेईपर्यंत. १६ खिन्न होणें; थंड होणें. १७ व्याख्यानरूपानें. १८ शुद्ध. १९ मिळालें असता. २० उत्पत्तिस्थान; विश्रांतिस्थान. २१ आपल्या शक्तीनें. २२ आत्मानात्मविचार. २३ जितेंद्रिय. २४ पत्नीकडे. २५ पार्वतीच्या. २६ कानात. २७ श्रीशंकरांनीं. २८ माशाच्या पोटात.

माझा सद्गुरु समर्थ धनी—जो दृष्टीनें अवलोकन केल्याबरोबर आपलें स्वरूप देतो, असा आहे; ३२ अगोदरच उत्तम दृष्टि असून त्यांत सूर्याचे तेजाची मदत मिळाल्यावर, मग दिसणार नाहीं अशी कोणती गोष्ट आहे ? ३३ म्हणून, श्रीज्ञानदेव महाराज म्हणतात कीं, माझे तोंडातून निघणारे नवे श्वासोच्छ्वास देखील प्रबंध होतील; कारण श्रीगुरूंच्या कृपेनें काय होणार नाहीं ? ३४ याकरितां मीं गीतेचा अर्थ मराठींत अशा रीतीनें सोपा केला कीं, तो लोकाच्या नजरेनें पाहण्यास योग्य होईल. ३५ परंतु मराठी भाषेंत गीतेचा अर्थ स्पष्ट केला आहे तो, जरी कोणी वक्ता नसला तरी नुसतीं वाक्येंच वाचलीं असता उदासीन न दिसता स्पष्टपणें समजतो. ३६ म्हणून, गीतेचें वक्तृत्व करणाराच्या बोलण्याला माझा अर्थ भूषणेंच होतात; व गाणारा नसला तरी, नुसतीं वाचलीं असतां वक्ता जरी नसला तरी उणेपणा दिसत नाहीं. ३७ दागिने सुंदर अंगावर न घालतां नुसते जरी ठेविले तरी ते जसे शोभिवंत दिसतात, अथवा ते जरी अंगावर घातले तरी शोभा देतीलच, परंतु या दोन गोष्टी एके ठिकाणीं कधीं मिळतात ? ३८ किंवा मोत्यांची जात अशी आहे कीं, तीं सोन्याला अनुकूल होऊन शोभा देतात, कदाचित् सोनें नसलें तरी तीं नुस्तीं सडींच अंगानें शोभा देतात; ३९ अथवा वसंतऋतूंतील वाटोळीं मोगऱ्याचीं फुलें जशीं गुंफून गजरा केला अथवा मोकळीं घेतलीं तरी त्यांचे वासात कमीपणा नसतो, १७४० तसा गाणारा भेटला तरी त्याला शोभा देतो, व गाणारा नसला तरी त्याचें तेज पडतें, असा सर्वलाभदायक ओंवीप्रबंधानें मीं हा ग्रंथ केला आहे. ४१ या ग्रंथांत आबालवृद्धांस समजण्याजोग्या ओंवीच्या प्रबंधानें सर्व ब्रह्मरसानें भरलेल्या अशा अक्षरांची योजना केली आहे. ४२ चंदनाच्या झाडाजवळ गेल्यावर वास घेण्यास त्याला फुलें नाहींत म्हणून खिन्न होण्याचें कारण नाहीं; कां कीं, त्याचें सर्वांग सुगंधमयच आहे, ४३ तसा हा माझा ग्रंथ श्रवणांत ( कानांत ) पडतांक्षणींच समाधि आणितो, मग त्याचें व्याख्यान ऐकल्यावर तो पुनः ऐकण्याविषयीं नाद लावणार नाहीं काय ? ४४ या माझे ग्रंथाचा पाठ करीत असतां जर वक्तृत्व केलें, तर त्यापासून उत्पन्न होणारी गोडी अमृतालाही मागें टाकते. ४५ असें हें अमृताहून सुरस आयतें कवित्व श्रीगुरुप्रसादानें उत्पन्न झालेलें, याच्या श्रवणानें मनन व निदिध्यास यांस जिंकिलें आहे. ४६ हें वाटेल त्यास आत्मरूपाच्या आनंदाचा शेलका वाटा घेववील, व श्रवणाकडून सर्व इंद्रियांची तृप्ति करवील. ४७ आपल्या शक्तीनें चतुर चकोर पक्षी चंद्राचे अमृताचा जसा उपभोग घेतात, तसा सर्वांना उपभोग घेतां येत नाहीं, तरी चांदण्याचा उपभोग सर्वांस होतो. ४८ तसा या अध्यात्मशास्त्रापासून जितेंद्रिय पुरुष जे अधिकारी आहेत त्यांनाच खरा आनंद प्राप्त होतो; परंतु इतर लोकांना वाणीच्या सौंदर्यापासून सुख होतें. ४९ अशा प्रकारचें श्रीगुरु निवृत्तिनाथांचें खरें ऐश्वर्य आहे, म्हणून हा माझा ग्रंथ नसून त्यांच्या कृपेचें वैभवच होय. १७५० क्षीरसिंधूच्या पलीकडे पार्वतीचे कानांत श्रीशंकरांनीं जें ज्ञान सांगितलें, केव्हां

पैठें जालें ॥ ५२ ॥ तो मत्स्येंद्र सप्तशृंगीं । भग्नावयव[3] चौरंगी । भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ॥ ५३ ॥ मग समाधि अव्यत्यया । भोगावी वासना यया । ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली मीनीं ॥ ५४ ॥ तेणें योगाब्जिनी-सरोवरु । विषयविध्वंसैकवीरु । तिये पदीं कां सर्वेश्वरु । अभिषेकिले ॥ ५५ ॥ मग तिहीं तें शांभव । अद्वयानंदवैभव । संपादिलें सप्रभव । श्रीगहिनीनाथा ॥५६॥ तेणें कळिकंळित भूतां । आला देखोनि निरुता । ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ॥ ५७ ॥ ना आदिगुरु शंकरा- । लागोनि शिष्यपरंपरा । बोधाचा हा संसरों । जाला जो आमुतें ॥५८॥ तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितयां जीवां । सर्व प्रकारीं धांवें । करी पां वेगीं ॥५९॥ आधींच तंव तो कृपाळु । वरी गुरुआज्ञेचा बोलु । जाला जैसा वर्षाकाळु । खवळणें मेघां ॥ १७६० ॥ मग आर्ताचेनि वोरसें । गीतार्थग्रंथनामिसें । वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ॥६१॥ तेथ पुढां मी बापियें । मांडला आर्ती आपुलिया । कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥ ६२ ॥ एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें । तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ॥ ६३ ॥ गुरुस्तवनः—वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणे स्वामीची । ऐसिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे ॥ ६४ ॥ (१३५१. योग्यता नसून श्रीगुरूंनीं माझेकडून ग्रंथनिर्मिति करविली, याकरितां त्याचें स्तवन; काव्यप्रतिभा, १७६५–१७७०) परी साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें । प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ॥ ६५ ॥ तऱ्ही पुरोहितगुणें । मी बोलिलों पुरें उणें । तें तुम्हीं माउलीपणें । उपसाहिजो जी ॥ ६६ ॥ शब्द कैसा घडिजे । प्रमेयीं[18] कैसें पां चढिजे । अळंकारु म्हणिजे । काय तें नेणें ॥ ६७ ॥ सायिखडेयाचें बाहुलें । चाळवित्या सूत्राचेनि चाले । तैसा मातें दावीत बोलें । स्वामी तो माझा ॥ ६८ ॥ यालागीं मी गुणदोष- । विषीं क्षमावीना विशेष । जे मी संजात ग्रंथलों देख । आचार्यें कीं ॥ ६९ ॥ संतस्तवनः—आणि तुम्हां संतांचिये सभे । जें उणीवेंसी ठाके उभें । तें पूर्ण नोहे तरी लोभें । तुम्हांसीचि कोपे ॥ १७७० ॥ (१३५२. संतांच्या अवधानामुळें अपूर्व शब्दसृष्टि निर्माण झाली, म्हणून संतांचें स्तवन; काव्यप्रतिभा, १७७१–१७९३) सिवतलियाही परिसें । लोहत्वाचिये अवदसे । न मुकिजे अनायासें । तें कवणा बोलु ॥ ७१ ॥ वोहळें हेंचि करावें । जे गंगेचें आंग ठाकावें । मगही गंगा जरी नोहावें । तें तो काय करी

१ मत्स्येंद्रनाथ. २ हातपाय तुटलेल्या. ३ चौरंगीनाथ. ४ अचल. ५ ज्ञानमुद्रा. ६ मत्स्येंद्र-नाथांनीं. ७ योगरूप कमलिनीचें. ८ शंकरापासून परंपरेनें आलेलें. ९ संपूर्ण. १० कलीनें ग्रस्त झालेल्या. ११ प्राणिमात्रास. १२ खरा. १३ ऐश्वर्य. १४ धावून रक्षण कर. १५ कळकळीनें. १६ ग्रंथ करण्याच्या उद्देशानें. १७ चातक पक्षी. १८ अर्थी. १९ बाहुलें. २० वाईट स्थिति; कमीपणा.

सांगितलें तें माहीत नाहीं, ५१ तें ज्ञान, क्षीरसमुद्रामध्यें माशाचे पोटांत जे गुप्तरूपानें होते त्यांना प्राप्त झालें, ५२ ते मत्स्येंद्रनाथ सहज संचार करितां सप्तशृंगावर आले. तेथें ज्यांचे अवयव भंगलेले होते असे चौरंगीनाथ हे मत्स्येंद्रनाथांचें दर्शन होण्याबरोबर सर्व अवयवांनीं परिपूर्ण झाले. ५३ मग, त्या अचल समाधीचा उपभोग घ्यावा या इच्छेनें तें आपलें ऐश्वर्य मत्स्येंद्रनाथांनीं गोरक्षनाथांस दिलें. ५४ त्या मत्स्येंद्रनाथांनीं योगरूप कमलिनी धारण करणारें सरोवर व विषय विध्वंस करण्याविषयीं महशूर असे जे गोरक्षनाथ, त्यांजला आपले योगैश्वर्याचे पदावर बसवून राज्याभिषेक केला. ५५ त्यानंतर, शंकरांपासून परंपरेनें आलेलें जें अद्वयानंदसुख, तें गहिनीनाथ यांनीं गोरक्षनाथांपासून संपूर्ण संपादन केलें. ५६ मग, कलीनें सर्व भूतांचा ग्रास केलेला आहे असें पाहून गहिनीनाथांनीं श्रीनिवृत्तिनाथांना अशी आज्ञा केली, ५७ कीं, आदिगुरु शंकरांपासून शिष्यपरंपरेनें जें हें बोधाचें ऐश्वर्य आमचे कुलांत प्राप्त झालें आहे, ५८ तें तूं घेऊन कलीनें त्रस्त केलेले जिवांना दुःखापासून सर्व प्रकारें मुक्त कर. ५९ अगोदर श्रीनिवृत्तिनाथ हे दयाळू असून त्यांत श्रीगुरूंची आज्ञा झाल्यावर त्यांस परमानंद झाला; जसा मेघ वृष्टि करण्याविषयीं स्वतः उत्सुक असून त्यांतच वर्षाकाळ आल्यावर तो अत्यंत खवळतो तसा. १७६० मग, पीडित झालेल्या जनाला दुःखापासून सोडवावें या कळकळीनें गीतेचा अर्थ करण्याचे मिषानें ब्रह्मरसाचा जो त्यांनीं वर्षाव केला, तो हा ग्रंथ होय. ६१ तेथें मीं चातकासारखा गुरूचा प्रसाद प्राप्त व्हावा अशी इच्छा करून बसलेला अनन्य शिष्य पाहून मजवर त्यांनीं कृपा केली, म्हणून मी या यशास प्राप्त झालों. ६२ अशा प्रकारेंकरून गुरुपरंपरेनें प्राप्त झालेलें समाधिधन एके ठिकाणीं बांधून श्रीनिवृत्तिनाथांनीं मजला दिलें. ६३ एरवीं, मीं अध्ययन केलें नाहीं व कांहीं ऐकलेंही नाहीं; व तसेंच स्वामीची सेवा करण्याचेंही मला ज्ञान नाहीं, मग ग्रंथ करण्याची योग्यता कोठून येणार ? ६४ परंतु वास्तविक पाहिलें असतां, श्रीगुरूंनीं माझें निमित्त करून जो ग्रंथ केला, त्या योगानें सर्व जगाचें संरक्षण झालें आहे. ६५ याजकरितां, मी पुरोहिताप्रमाणें जें कांहीं न्यूनाधिक बोललों असेन, तें तुम्ही आईप्रमाणें सहन करा. ६६ शब्दाची रचना कशी करावी, व त्याचा अर्थ कसा चढता असावा, व अलंकार कशाला म्हणतात, हें मला माहीतही नाहीं. ६७ कळसूत्री बाहुलें जसें, सूत्रधारानें हालविल्याप्रमाणें हालतें, तसें माझ्या गुरूंनीं जें जें अंतःकरणांत प्रकाशित केलें तें मी बोललों; ६८ म्हणून, माझ्या ग्रंथांतील गुणदोष सहन करा असें मीं म्हणत नाहीं, कारण माझ्या गुरूंनीं मजजवळ ठेविलेला जागड ग्रंथ मीं आपल्यापुढें मांडला आहे ६९ आणि तुम्हां संतजनांच्या सभेंत एखाद्या गोष्टीचा उणेपणा नाहींसा न होईल तर लडिवाळपणें तुम्हांवरच दोष येईल. १७७० लोखंडाचा कमीपणा परिसाच्या स्पर्शानें जर सहज नाहींसा होणार नाहीं, तर त्याचा दोष कोणाकडे येईल ? ७१ ओहोळानें इतकेंच करावें कीं गंगेस जाऊन मिळावें; मग जर त्याला ती आपल्यांत स्वीकार करून न घेईल

॥ ७२ ॥ म्हणौनि भाग्ययोगें बहुवें । तुम्हां संतांचे मी पाये । पातलों आतां के आहे । उणें जगीं ॥ ७३ ॥ अहो जी माझेनि स्वामी । मज संत जोडूनि तुम्हीं । दिधलेति तेणें सर्वकामीं । परिपूर्ण जालों ॥ ७४ ॥ पाहा पां मातें तुम्हां सांगडें । माहेर तेणें सुरवाडें । ग्रंथाचें आळियांडें । सिद्धी गेलें ॥ ७५ ॥ जी कनकाचें निखळ । वोतूं येईल भूतळ । चिंतारत्नीं कुळाचैळ । निर्मूं येती ॥ ७६ ॥ सातांही हो सागरांतें । सोपें भरितां अमृतें । दुवाड नोहे तारांतें । चंद्र करितां ॥ ७७ ॥ कल्पतरूचे आराम । लावितां नाहीं विषेम । परी गीतार्थाचें वर्म । निवडूं न ये ॥ ७८ ॥ तो मी येकु सर्व मुका । बोलोनि मऱ्हाटिया भाषा । करीं डोळेंरी लोकां । घेवों ये ऐसें ॥ ७९ ॥ हा ग्रंथ-सागरु येव्हडा । उतरोनि पैलीकडा । कीर्तिविजयाचा घेंडा । नाचे जो कां ॥ १७८० ॥ गीतार्थाचा आवारुं । कलशेंसी महामेरु । रचूनि माझीं श्रीगुरु-। लिंग जें पूजीं ॥ ८१ ॥ गीता निष्कपट माय । चुकोनि तान्हें हिंडे जें वाय । ते मायपूतां भेटी होय । हा धर्म तुमचा ॥ ८२ ॥ तुम्हां सज्जनांचें केलें । आकळुनी जी मी बोलें । ज्ञानदेव म्हणे थेंकुलें । तैसें नोहे ॥ ८३ ॥ काय बहु बोलों सकळा । मेळविलों जन्मफळा । ग्रंथसिद्धीचा सोहळा । दाविला जो हा ॥ ८४ ॥ मियां जैसजैसिया आशा । केला तुमचा भरंवसा । ते पुरवूनि जी बहुवसा । आणिलों सुखा ॥ ८५ ॥ मजलागीं ग्रंथाची स्वामी । दुजी सृष्टी जे हे केली तुम्हीं । ते पाहोनि हांसों आम्हीं । विश्वामित्रातेंही ॥ ८६ ॥ जे असोनि त्रिशंकुदोषें । धातयाही आणावें वोसें । तें नासतें कीजे कीं ऐसें । निर्मावें नाहीं ॥ ८७ ॥ शंभू उपमन्यूचेनि मोहें । क्षीरसागरुही केला आहे । येथ तोही उपमेसरी नोहे । जे विषगर्भ कीं ॥ ८८ ॥ अंधकारु निशाचरां । गिळितां सूर्ये चराचरां । धांवा केला तरी खरा । ताउनी कीं तो ॥ ८९ ॥ तैतालिया जगाकारणें । चंद्रे वेंचिलें चांदणें । तया सदोषा केविं म्हणें । सारिखें हें ॥ १७९० ॥ म्हणोनि तुम्हीं मज संतीं । ग्रंथरूप जो हा त्रिजगतीं । उपयोग केला तो पुढती । निरुपम जी ॥ ९१ ॥ किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी नेलें । येथ माझें जी उरलें । पाईकपणें ॥ ९२ ॥ वरप्रार्थनाः—आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें । तोषोनि मज द्यावें । पैसायदान हें ॥ ९३ ॥ ( १३५२. सद्गुरूंजवळ प्रसादाची याचना, काव्यप्रतिभा, १७९४–१८०१ ) जे खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मीं

---

१ अनुकूल. २ छंद. ३ कुलपर्वत. ४ बाग. ५ कठीण. ६ दृष्टिगोचर. ७ देवालय. ८ कळस. ९ मायलेंकरांची. १० अल्प. ११ त्रिशंकु राजाच्या हेतूनें. १२ कमीपणा. १३ तप्त झालेल्या. १४ सेवकपण. १५ ग्रंथरूप यज्ञानें. १६ प्रसाद. १७ वक्रदृष्टि; कुटिलपणा.

( पवित्र न करील ), तर त्याच्याकडे काय दोष आहे ? ७२ म्हणून, मद्भाग्याच्या योगानें मी तुम्हां संतजनांच्या पायांजवळ आलों आहें; तर आतां या जगतांत मला काय कमी आहे ? ७३ अहो, काय सांगावें ? माझ्या गुरूंनीं तुम्हां संतजनांची भेट करून दिली, त्या योगानें माझ्या सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या आहेत. ७४ असें पहा कीं, तुमचेसारखें अनुकूल माहेरघर मला मिळालें, म्हणून हा ग्रंथ करण्याचा माझा छंद सिद्धीस गेला. ७५ एरवीं सर्व पृथ्वी निखळ सोन्याची करतां येईल, व कुलपर्वत चिंतामणीचे करितां येतील; ७६ सात समुद्र अमृतानें भरण्याचेंही सोपें आहे, तान्यांना चंद्र करणें हेंही कठीण नाहीं; ७७ कल्पतरूचे बाग लावण्यांत कांहीं कठीण नाहीं. ( या सांगितलेल्या सर्व गोष्टी तपाच्या बळानें करतां येतील, ) परंतु गीतेच्या अर्थाचें वर्म ( गुरुप्रसादाशिवाय ) समजावयाचें नाहीं. ७८ तो मी सर्व प्रकारें मुका असून, गुरुच्या कृपेनें गीतेचा अर्थ मराठींत अशा रीतीनें केला आहे कीं, सर्व लोकांना प्रत्यक्ष डोळ्यांनीं दिसावा; ७९ व त्याच्याच कृपेनें एवढा ग्रंथरूपी सागर तरून पलीकडे कीर्तिरूप विजयाचा झेंडा नाचविला. ८० गीतेचें अर्थरूप देवालय अठरावे अध्यायरूपी कळसासुद्धां रचून त्यांत श्रीगुरूंचें लिंग स्थापन करून त्याची पूजा केली. ८१ गीता ही निष्कपट आई असून, मुमुक्षु हीं जीं तिचीं लहान पोरें, त्याची व तिची चुकामूक पडून जीं तीं सैरावैरा हिंडतात, त्या मायलेकरांची गांठ पाडणें हा तुम्हां संतजनांचा धर्म आहे. ८२ ज्ञानदेव म्हणतात कीं, तुम्हीं संतजनांनीं जी कृपा केली, व त्यामुळें मी जें बोललों, तें, अल्प नव्हे. ८३ फार काय सांगूं ? हा ग्रंथ शेवटास गेल्यामुळें मला माझ्या सर्व पूर्वपुण्याचें फळ तुम्हीं प्राप्त करून दिलें आहे. ८४ मीं तुमच्यावर भरंवसा ठेवून जी जी इच्छा केली ती सर्व तुम्हीं पुरवून मी सुखास पात्र झालों. ८५ हे गुरो, तुम्ही माझ्याकरितां जी गीतार्थरूपी ग्रंथाची नवी सृष्टि केली, ती पाहून आम्ही विश्वामित्राच्या सृष्टीला हसतों. ८६ कारण, ती नाशवंत सृष्टि त्रिशंकु राजाचे उद्देशानें ब्रह्मदेवास कमीपणा आणावा या हेतूनें विश्वामित्रानीं उत्पन्न केली, तशी ही आपण केलेली सृष्टि नाशवंत नसून शाश्वत आहे. ८७ शंकरांनीं आपला भक्त उपमन्यु याच्या ममतेंत त्याच्याकरितां क्षीरसागरही उत्पन्न केला. तो जर या ग्रंथाच्या बरोबर आहे म्हणावें, तर तो विषगर्भ आहे, ( समुद्रमंथनाचे वेळेस त्याच्यातून हलाहल विष निघालें. ) ८८ प्राणिमात्राला अंधकार व निशाचर याची पीडा होऊं नये म्हणून त्यांनीं धावा केला असतां सूर्यानें त्यांच्या दुःखाचा आपले तेजानें परिहार केला खरा, परंतु त्याच्या तेजाचे उष्णतेनें जीवमात्राला त्रास होतो, हा त्याच्यात कमीपणा आहे. ८९ तप्त झालेल्या जगास चंद्रानें आपल्या चांदण्यानें शांत केलें, तो चंद्र कलंकानें युक्त आहे; म्हणून त्या दोषयुक्त चंद्रासारखा हा ग्रंथ आहे असें कसें म्हणावें ? ९० याकारितां, तुम्ही संतजनानीं माझ्याकडून त्रैलोक्याला उपयोग व्हावा म्हणून जो ग्रंथ करविला, तो अनुपम आहे. ९१ फार काय सांगावें ?

रेति वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥ ९४ ॥ दुरितांचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्ये पाहो । जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥९५॥ वर्षत सकलमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी । अनवरत भूतळीं । भेटो तयां भूतां ॥ ९६ ॥ चलां कल्पतरूचे आरव । चेतना चिंतामणीचे गांव । बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ ९७ ॥ चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ९८ ॥ किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भजिजो आदिपुरुषीं । अखंडित ॥ ९९ ॥ आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥ १८०० ॥ तेथ म्हणे श्रीविश्वेशरावो । हा होईल दानपसावो । येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला ॥ १ ॥ स्थानमाहात्म्यः—( १३५४. सद्गुरूचा प्रसाद, १८०२ ) ऐसें युगीं परी कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं । श्रीगोदावरीच्या कूलीं । दक्षिणलिंगीं ॥ २ ॥ ( १३५५. ग्रंथनिर्मितिस्थलाचा अधिपति, शक व लेखक, १८०३-१८११ ) त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोशक्षेत्र । जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥ ३ ॥ तेथ यदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु । न्यायातें पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्र ॥ ४ ॥ तें महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें । केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें ॥५॥ एवं भारताच्या गांवीं । भीष्मनाम प्रसिद्ध पर्वीं । श्रीकृष्णार्जुनीं बरवी । गोठी जे केली ॥ ६ ॥ जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर । परमहंसीं सरोवर । सेविजे जें ॥ ७ ॥ तिये गीतेचा कळसु । संपूर्ण हा अष्टादशु । म्हणे निवृत्तिदासु । ज्ञानदेवो ॥ ८ ॥ पुढती पुढती पुढती । इया ग्रंथपुण्यसंपत्ति । सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होइजे ॥ ९ ॥ शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाहला ॥ १८१० ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

इति श्रीभावार्थदीपिका समाप्ता ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

१ प्रीति. २ पातकाचें. ३ सद्भावानें; सर्वकाल. ४ चालत [illegible] नाग, अंकुर. ६ जिवंत. ७ समुद्र. ८ अमृताचें. ९ कलंकरहित. १० [illegible] प्रिय. १२ [illegible] १३ सद्गुरु. १४ दानप्रसाद. १५ कलियुगात. १६ तीरास. १[illegible] १८ [illegible]

तुमच्या कृपेनें हें धर्मरूप कीर्तन शेवटास गेलें; तर माझें आतां इतकेंच काम राहिलें आहे कीं, आपली सेवा करावी. ९२ आतां यावर, विश्वस्वरूप सद्गुरू यांनीं माझ्या वाग्यज्ञें-करून संतुष्ट होऊन मजला हा प्रसाद द्यावा ९३ कीं, दुष्टांचा कुटिलपणा जाऊन त्यांना सत्कर्मांची प्रीति उत्पन्न होवो; व जीवमात्राची एकमेकांवर मैत्री वाढो. ९४ या सर्व विश्वामधील पापरूपी अंधकार नाहींसा होऊन स्वधर्मरूपी सूर्य उगवून त्याचा प्रकाश होवो, आणि प्राणिमात्राच्या ज्या ज्या इच्छा असतील त्या त्या पूर्ण होवोत. ९५ या भूतलावर अखिल मंगलाचा वर्षाव करणाऱ्या भगवद्भक्तांच्या समुदायांची सर्व भूतांना सद्भावेंकरून सदोदित भेट होवो. ९६ ते भक्तजन कसे आहेत, तर चालतेबोलते कल्पतरूचे बाग, जिवंत चिंतामणीचे गांव किंवा अमृताचे चालतेबोलते समुद्रच होत. ९७ जे कलंकरहित प्रतिचंद्र, संसाररूपी अंधकार दूर करून शांतिसुख देणारे प्रतिसूर्य असे भगवद्भक्त, ते सकल जीवांना प्रिय होवोत. ९८ फार काय मागावें ! सर्व त्रैलोक्य सुखानें परिपूर्ण होऊन प्राणिमात्राला हरीचें अखंड भजन करण्याची इच्छा होवो ९९ आणि या ग्रंथा-वरच ज्यांचें उपजीवन आहे, त्यांना इहलोकचें व परलोकचें सुख प्राप्त होवो. १८०० तेव्हां सद्गुरु प्रसन्न होऊन म्हणाले कीं, तुझ्या म्हणण्याप्रमाणें सर्व होईल. असें वरप्रदान मिळाल्यानें श्रीज्ञानदेव फार संतोषित झाले. १ याप्रमाणें कलियुगामध्यें, महाराष्ट्र देशांत श्रीगोदावरीच्या दक्षिण तीरास, २ त्रैलोक्यात पवित्र व अनादि पंचक्रोश क्षेत्र नेवासें, ज्या ठिकाणीं सर्व जगताचें जीवनसूत्र श्रीमोहनीराज आहेत, ३ त्या क्षेत्रांत, सकल कलांनीं संपूर्ण, व पृथ्वीचा धनी व न्यायानें प्रजेचें पालन करणारा यदुकुलास भूषण देणारा रामराजा राज्य करीत होता, ४ त्या वेळेस, ज्या श्रीनिवृत्तिनाथ महाराजांची परंपरा श्रीशंकरापासून आहे, त्यांचे शिष्य ज्ञानदेव यांनीं श्रीमद्भगवद्गीतेस मराठी भाषेचे लेणें केलें. ५ याप्रमाणें भार-तांतील प्रसिद्ध भीष्मपर्वांत श्रीकृष्णार्जुनाचा जो उत्तम संवाद झाला; ६ जें उपनिषदांचें सार असून सर्व शास्त्रांचें माहेर व परमहंस साधूंचें क्रीडा करण्याचें सरोवरच होय; ७ त्या गीतेचा अठरावा अध्याय हा कळस आहे, असें श्रीनिवृत्ति महाराजांचे शिष्य ज्ञान-देव म्हणतात. ८ उत्तरोत्तर या ग्रंथाच्या पुण्यरूप संपत्तीनें जीवमात्राला सर्व सुखाचा पूर्ण लाभ होवो. ९ शके १२१२-मध्यें ही टीका ज्ञानेश्वर महाराजांनीं करून सच्चिदानंद-बाबांनीं अति आदरानें लिहिली. १८१०

---

## श्रीएकनाथमहाराजांनीं ज्ञानेश्वरीचें संशोधन केल्यावर त्यासंबधें लिहिलेल्या ओंव्या.

( १३५६. नाथाचा शेरा--ओंव्या ५ ) श्रीशके पधराशे साहोत्तरीं । नामसंवत्सरीं । येकाजनार्दन अत्यादरीं । गीता–ज्ञानेश्वरी–प्रती शुद्ध केली ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध । तो शोधूनियां , प्रतिशुद्ध सिद्धज्ञानेश्वरी ॥ २ ॥ नमो ज्ञानेश्वरा निष्कळंका । जयाची वाचितां टीका । ज्ञान होय लोका । अतिभाविका ग्रथार्थियां ॥ ३ । काळ पर्वणी गोमटी । भाद्रमास कपिलाषष्ठी । प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखन संपूर्ण जाली ॥ ४ ॥ ज्ञानेश्वरीपाठीं । जो वोवी करील मऱ्हाटी । तेणे तार्टी । जाण नरोटी ठेविली ॥ ५ ॥

---

शके १५०६ तारण नाम संवत्सरांत जनार्दन महाराजांचे शिष्य एकनाथस्वामी
गीता–ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली. १ ग्रंथ मूळचाच अति शुद्ध होता, परंतु लोकां-
ाठभेदानें कोठें कोठें अबद्ध झाला होता, तो पाहून ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली.
ांची गीतेवरील टीका वाचली असतां भाविक वाचणारांला गीतेचें संपूर्ण ज्ञान
त्या निष्कलंक ज्ञानेश्वर महाराजांस नमस्कार असो. ३ पुष्कळ कालानें प्राप्त
ा जो उत्तम कपिलाषष्ठीचा योग भाद्रपद वद्य षष्ठी, त्या दिवशीं गोदेच्या तीरीं पैठण
ा ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करण्याचें काम समाप्त झालें. ४ ज्ञानेश्वरीचे पाठांत जो
ाष्ट्र भाषेंत ओंवी करून घालील, त्यानें अमृताचे ताटांत नरोटी ठेवल्याप्रमाणें होईल
समजावें. ५

---

# ज्ञानेश्वरीची फलश्रुति.

सूत्रभाष्यादिकाचा अर्थ समजण्यास जे असमर्थ आहेत, त्यांच्यावर कृपा करण्या-
तां ( भूतमात्रावर दया करणें हा संताचा स्वभावच होय. ) भगवान विष्णु ' ज्ञानेश्वर '
ानें अवतीर्ण झाले व त्यांनीं सर्व वेदार्थसारभूत असा ' श्रीज्ञानेश्वरी ' ग्रंथ, गुरु-
ानें लिहिला. त्याचा यथार्थ अर्थ मराठी सरळ भाषेंत ब्र. भू. नानामहाराज साखरे
नीं लिहिला. मूळ ज्ञानेश्वरी ग्रंथाचें, अगर त्याच्या मराठी भाषेत नानामहाराजांनीं
गितलेल्या अर्थाचें, मुमुक्षु श्रवणमनन करील तर वरील इच्छित फलप्राप्ति ( दुःखसंबंध-
हंत निरतिशय सुख ) त्यास झाल्यावाचून रहाणार नाहीं हें निश्चित आहे.

ज्ञानेश्वरी ग्रथाचे नित्य पठण व अर्थश्रवण झाल्यास श्रीज्ञानेश्वरमहाराज त्याच्या-
र प्रसन्न होतील व त्यांच्या प्रसादानें जीवाचे बुद्धिगत दोष निवृत्त होऊन, त्याचें यथार्थ
ल्याण होवो, अशी श्रीज्ञानेश्वरचरणीं माझी प्रार्थना आहे.

मे. फा. शु. १० श. १८६९. ) ह. भ. विनायकमहाराज साखरे याचे शिष्य
भार्गव वासुदेव खांबेटे.

## श्रीएकनाथमहाराजांनीं ज्ञानेश्वरीचें संशोधन केल्यावर त्यासंबंधें लिहिलेल्या ओंव्या.

( १३५६. नाथांचा शेरा--ओंव्या ५ ) श्रीशके पंधराशें साहोत्तरीं । तार नामसंवत्सरीं । येकाजनार्दन अत्यादरीं । गीता–ज्ञानेश्वरी–प्रती शुद्ध केली ॥ १ ॥ ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध । तो शोधूनियां एवंविध प्रतिशुद्ध सिद्धज्ञानेश्वरी ॥ २ ॥ नमो ज्ञानेश्वरा निष्कळंका । जयाची गीता वाचितां टीका । ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ॥ ३ ॥ काळ पर्वणी गोमटी । भाद्रमास कपिलाषष्ठी । प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनका संपूर्ण जाली ॥ ४ ॥ ज्ञानेश्वरीपाठीं । जो वोवी करील मऱ्हाटी । तेणें अमृत ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ ५ ॥

---

## श्रीज्ञानेश्वरीची आरती.

### ( गोविंद दामोदर दीक्षितकृत )

आरती ज्ञानदेवी । जीवा चिन्मार्ग दावी ॥ भारत अठरा पर्वीं । मर्मक पुरी ठावी ॥ १ ॥ करतळीं आमलक । तसा आणुनी ठेवी ॥ भाविक उद्धराया क्लेशसीमाच व्हावी ॥ वय तरी काय भावी । कुठें ज्ञान मेळवी ॥ २ ॥ दृष्टां पाहुनीयां । मना चटक लावी ॥ ३ ॥ शंभुहि पार्वतीशीं । चित्कला करीं ठावी म्हणे देवि रूपें तूझे । नित्य जशी नवाई ॥ तशी गीता पाहे त्याला । वाटे मजल व्हावी ॥ ४ ॥ प्रथम अध्यायीं । अर्जुनविषाद दावी ॥ दुजांत योग थोर देवबोली मानावी ॥ तिजांत कर्म लावी । चवथ्यांत ज्ञान भावी ॥ ५ ॥ पंचमं पुन्हां योग । स्पष्ट करुनी दावी ॥ षष्ठांत आसन रीत । सानें वयें पहावी ॥ सप्तमं सात प्रश्न । पार्थे श्रीस सुखावी ॥ उत्तरें अष्टमांत । देव सुंदर दावी ॥ ६ । गीतार्ध नवमांतीं । पुरती सर्व जाणावी ॥ देव जेथें सांगो बैसे । न्यून का नवलावी ॥ भुलला भक्तिपंथें । पार्थममता दावी ॥ ७ ॥ दशमीं विभूतियोग । म विश्वरूप दावी ॥ द्वादशीं साच ज्ञान । क्रमयोगें कथावी ॥ तेथूनी पंचदशीं । ज्ञान-विस्तार दावी ॥ षोडश सप्तदशीं । यौवनदशा स्वभावी ॥ ८ ॥ सौंदर्य अतिरेकें विजुपरी चमकावी ॥ पुढील कळसाध्यायीं । पूर्ण गीता पहावी ॥ भारत अठरा पर्वीं असे मर्म तें दावी ॥ ९ ॥ तशी ही गीतामाता । नित्य नेमें पढावी ॥ सहज देह … दशदिशेस लावी ॥ गोविंद कृपालेश । तरी माय संपादावी ॥ १० ॥

---

शके १५०६ तारण नाम संवत्सरांत जनार्दन महाराजांचे शिष्य एकनाथस्वामी गीता-ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली. १ ग्रंथ मूळचाच अति शुद्ध होता, परंतु लोकां- पाठभेदानें कोठें कोठें अबद्ध झाला होता, तो पाहून ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली. ज्यांची गीतेवरील टीका वाचली असतां भाविक वाचणारांला गीतेचें संपूर्ण ज्ञान त्या निष्कलंक ज्ञानेश्वर महाराजांस नमस्कार असो. ३ पुष्कळ कालानें प्राप्त जो उत्तम कपिलाषष्ठीचा योग भाद्रपद वद्य षष्ठी, त्या दिवशीं गोदेच्या तीरीं पैठण ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करण्याचें काम समाप्त झालें. ४ ज्ञानेश्वरीचे पाठांत जो पू भाषेंत ओंवी करून घालील, त्यानें अमृताचे ताटांत नरोटी ठेवल्याप्रमाणें होईल समजावें. ५

---

# ज्ञानेश्वरीची फलश्रुति.

सूत्रभाष्यादिकाचा अर्थ समजण्यास जे असमर्थ आहेत, त्यांच्यावर कृपा करण्या- तां ( भूतमात्रावर दया करणें हा संतांचा स्वभावच होय. ) भगवान विष्णु ' ज्ञानेश्वर ' नें अवतीर्ण झाले व त्यांनीं सर्व वेदार्थसारभूत असा ' श्रीज्ञानेश्वरी ' ग्रंथ, गुरु- नें लिहिला. त्याचा यथार्थ अर्थ मराठी सरळ भाषेंत ब्र. भू. नानामहाराज साखरे नीं लिहिला. मूळ ज्ञानेश्वरी ग्रंथाचें, अगर त्याच्या मराठी भाषेंत नानामहाराजांनीं गितलेल्या अर्थाचें, मुमुक्षु श्रवणमनन करील तर वरील इच्छित फलप्राप्ति ( दुःखसंबंध- रहित निरतिशय सुख ) त्यास झाल्यावाचून रहाणार नाहीं हें निश्चित आहे.

ज्ञानेश्वरी ग्रंथाचे नित्य पठण व अर्थश्रवण झाल्यास श्रीज्ञानेश्वरमहाराज त्याच्या- र प्रसन्न होतील व त्यांच्या प्रसादानें जीवाचे बुद्धिगत दोष निवृत्त होऊन, त्याचें यथार्थ ल्याण होवो, अशी श्रीज्ञानेश्वरचरणीं माझी प्रार्थना आहे.

मि. फा. शु. १० श. १८६९. ) ह. भ. विनायकमहाराज साखरे यांचे शिष्य

भार्गव वासुदेव खांबेटे.

| अध्याय | ओ०या | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | ३ | सुवषे | सुवेष |
| २ | ७१ | लावला | लागला |
| २ | ६८ | आप | आपु |
| ४ | ३४ | विजे | विइजे |
| ४ | ३८ | स्ववेनिर्शी | सुवेनिर्शी |
| ६ | ५६ | अघाडा | अघाडा |
| ६ | १३३ | पजरेर्शी | पाजरेर्शी |
| ६ | २७१ | मघ्यमेचेंनि | मध्यमेचेनि |
| ६ | ३४१ | लेणी | केणी |
| ६ | ४१२ | केसे | कैसे |
| ६ | ४३२ | इद्रियगामोनि | इद्रियग्रामोनि |
| ८ | १३१ | ऋणवेपण | ऋणवैपण |
| ८ | २११ | समवावो | सममावो |
| ९ | २४३ | प्रतीताचेनि | प्रतीतीचेनि |
| ९ | ३३१ | जन्मजन्मो | जन्मजन्मोनि |
| १० | ३२८ | आम्हा | आम्ही |
| ११ | ३१२ | तेसे | तैसे |
| ११ | ५४८ | अस्वड | ...सवाडा |
| ११ | ५५३ | कृष्ण | कृष्णा |
| ११ | ५६८ | प्रसीद | प्रसीदप्रसी... |
| ११ | ६४७ | मोंवते | भगवते |
| १२ | ६१ | वरिताति | करिताति |
| १३ | ८ | पै | मै |
| १३ | ६७ | आग | - आग |
| १३ | ७६० | (६२५ ०याधीचा विचार नसणें, |  |
|  |  | ७६१ ते ७६८ ) हा सूचिक्रमाक पा... |  |
| १४ | २९५ | यपामाजि | ययामाजि |
| १४ | २९७ | (चरण २ मध्यें) | देखत |
| १४ | ३३० | व | न |
| १४ | ३३३ | जळाणव | जळार्णव प... |
| १४ | ३९० | कुडसी | कुहेसी |
| १४ | ३९२ | मम | मग |
| १५ | ४२ | यातें | याचि |
| १५ | ९२ | खोलावता | खालावती |
| १५ | १०४ | कोंमलेनि | कोंभेलेनि |
| १५ | १०७ | आसारे | आस्तरे |
| १५ | १९० | येनी | देती |